# सारसंग्रह

अर्थात्

# केसरीचें छोटें फाईल



सन १९३२

# सारसंग्रहाची अनुक्रमणिका

# केसरी सारसंग्रह १९३२

वर्ष ५ वें ] वर्षारंभ ता. १ जानेवारी १९३२ [ पुस्तक ५ वें

## येतें वर्ष गेल्या वर्षास बरें म्हणविणार काय ?

॥ प्रसंग हा तडातडी। करा विवेक तांतडी ॥ सुचीत व्हा घडी घडी। प्रबोध घ्या खडाखडी ॥ —समर्थ

१९३१ साल संपलें आणि १९३२ साल सुरू झालें. कालाच्या प्रचंड ओघांत आणखी एक वर्ष बिलीन झालें; पण कालाला त्याची दाद ना फिकीर! अथांग व अपरंपार अशा महासागरांत एखादा जलबिंदु पडला असतां महासागराला त्या जलबिंदूची जितपत जाणीव तितपतच अनाद्यनंत कालाला या १९३१ सालाची जाणीव! परंतु त्याच कालौघांतील एखाद्या लाटेबरोबर यदृच्छेनें हेलकावे खाणारे जे मानवी प्राणी त्या प्राण्यांना तेवढ्या लाटेचेंच नव्हे तर त्या लाटेंतील विशिष्ट जलबिंदूंचेंहि केवढें महत्त्व! कारण त्या जलबिंदूंच्या हालचालींवरच त्यांचें सुखदुःख अवलंबून असणार. जागतिक आपत्तिरूपी वादळानें त्या जलबिंदूंना किंचित् हेलकावा बसला कीं, त्यांचा जीव घाबरा होणार आणि वादळ थांबून लाटा किंचित् शांत होऊं लागल्या कीं तेवढ्यांतच ते मानव आनंद मानणार. याच न्यायानें कालौघांतील या विशिष्ट वर्षाशीं हिंदुस्थानाच्या सुखदुःखाचा संबंध विशिष्ट रीतीनें निगडित झाला असल्यानें या देशाला त्या वर्षाचें तादृश महत्त्व वाटत असून त्याच्या मागून येणारें वर्षहि आपल्याला अशाच किंवा याहून अधिक निराशेच्या खोल दरींत ढकलणार कीं काय असाहि प्रश्न साहजिकच हिंदी जनतेच्या मनापुढें आज उभा आहे.

### एकं वा एतद्देवानामहः यत्संवत्सरः

मानवी कालगणनेंत ज्याला आपण एक संवत्सर मानतों तो देवांचा एक दिवस म्हणजे एक अहोरात्र होय. आणि मानवी प्राण्यांचें सुखःदुख देवांच्या लीलेवर अवलंबून असल्यानें त्या एका अहोरात्रांत देवांनीं जी लीला दर्शविली असेल तीस अनुसरून आम्हांस इकडे त्या एका वर्षांत इष्टानिष्ट अनुभव आलेला असणार हें उघड आहे. यास्तव गत संवत्सरांतील सुखदुःखांचा आढावा घेतांना देवांच्या एका अहोरात्राच्या दृष्टीनेंच त्याचे विभाग पाडून एकेक विभागाचा विचार करणें सोईचें होईल. इंग्रजी पद्धतीनें तारखेचा प्रारंभ मध्यरात्रीपासून मानला जातो. आणि आपण आढावाहि इंग्रजी वर्षाचाच घेणार आहों. यास्तव त्या वर्षाची विभागणीहि मध्यरात्रीपासून मध्यरात्रीपर्यंतच्या चोवीस तासांत करणेंच सयुक्तिक ठरेल आणि ती वस्तुस्थितीशींहि पूर्णपणें जुळते.

### निराशामय भयंकर अंधकार

हिंदुस्थानाच्या दृष्टीनें तरी १९३१ सालाचा प्रारंभ भयंकर निराशामय अंधकारांत झाला. कायदेभंगाची मोहीम खूप जोरांत चाललेली पाहून सरकारचें डोकें ठिकाणावर राहिलें नव्हतें. वटहुकुमांचें जणूं काय पेंव फुटलें होतें आणि त्यांच्या तडाक्यानें संस्था चिरडून टाकल्या जात होत्या. लाठीबाजीला ऊत आला होता आणि मुंबईच्या आझाद मैदानावर लाठ्यांच्या तडाक्यानें रक्तांच्या चिळकांड्या उडत होत्या. पुरुषांच्या मिरवणुकीवरच नव्हे तर स्त्रियांच्या मिरवणुकीवरहि लाठीचे हल्ले करण्यास अधिकाऱ्यांना शरम वाटेनाशी झाली होती; आणि बोरसद येथील स्त्रियांच्या मिरवणुकीच्या वेळीं जे प्रकार घडले त्यांनीं तर अत्याचारांचा कळस झाला. त्यांतच लाखों लोकांचे विनंतिअर्ज धुडकावून लावून मुंबई–सरकारनें सोलापूरच्या श्रीयुत मल्लप्पा प्रभृति आरोपींस फांसावर टांगलें आणि आपल्या पाषाणहृदयीपणाचें प्रदर्शन

करून निराशामय अंधकाराच्या भीषणतेंत भरच घातली. भूतलावरील यमदूतांनीं सोलापूरच्या हुतात्म्यांना यमलोकास धाडलें तर यमलोकांतील दूतांनीं भूतलावर येऊन मौलाना महंमदअल्लीस अचानक उचलून नेलें!

### अरुणोदयाची किंचित छटा

अशा रीतीनें अंधकाराचें साम्राज्य माजलें असतां कालक्रमानुसार अरुणोदयानें आपल्याकडून तो अंधकार मागें परतविण्याचा यथाशक्ति प्रयत्न केला. गोलमेज परिषदेच्या पहिल्या अंकाची परिसमाप्ति झाली आणि रॅम्से मॅक्डोनाल्ड यांनीं भाषणाचें मोठें अवडंबर माजवून त्यांत जबाबदारीच्या स्वराज्याची अंधुक आशा दाखविली. ती आशा अगदींच फोल नाहीं, असें दर्शविण्याकरितां मोठी भीड खर्चून म. गांधी प्रभृति पुढाऱ्यांना व वर्किंग कमिटीच्या सभासदांना बंधमुक्त करण्यांत आलें आणि आयर्विन साहेबांशीं तडजोडीची भाषा सुरू झाली. त्या तडजोडीनें निराशामय अंधकाराचा पूर्ण निरास व्हावा अशी गांधीजींची व आयर्विन यांचीहि इच्छा दिसली. परन्तु याच संधीस मोतीलाल नेहरूसारख्या चतुरस्र पुढाऱ्यावर झडप घालून काळानें त्यांची प्राणज्योति मालविली व तेवढाहि प्रकाश नाहींसा केला, आणि इकडे आयर्विनसाहेबांच्या हस्तकांनीं त्यांच्या विरुध्द काहूर माजवून राजीनाम्यांचा घूत्कार सुरू केला! अर्थातच सूर्योदयाची वेळ जवळ आली तरी काळ्याकुट्ट ढगांच्या आवरणामुळें प्रकाशाचा पत्ताच लागेना.

### समेटाच्या सूर्यास ग्रहणानें ग्रासलें!

अशा परिस्थितींतहि पूर्ण आशावादी अशा गांधी—आयर्विन दुकलीनें दिल्लीचा कागदोपत्री करारनामा करून समेटाचा सूर्योदय झाल्याचें जाहीर केलें. पण प्रत्यक्ष सूर्यदर्शन न होतां दडपशाहीचा काळोख कायमच राहिला. कारागृहांत कोंडलेल्या सत्याग्रह्यांची संख्या नोकरशाहीलाच अनावर झाली असल्यामुळें हजारों राजबंद्यांना बंधमुक्त करण्यांत आलें; कांहीं वटहुकुमहि रद्द ठरविण्यांत आले. तथापि ज्या राजबंद्यांवर नोकरशाहीचा डोळा होता त्यांचा कारावास कायमच राहिला. बंगालमधील अटकबंद्यांची मुक्तता झाली नाहीं. मीरतचा खटलाहि काढून घेतला गेला नाहीं. नागपूरच्या महाराष्ट्रावरचा खटला, चिरनेरच्या गोळीबाराचा खटला इत्यादिकांची सुनावणी चालूच राहिली. सरहद्दप्रांतांतले सरदार अबदुल गफरखान, सोलापूरचे रामभाऊ राजवाडे, मुंबईचे एच. डी. राजा इत्यादिकांना समेटाचा फायदा मिळाला नाहीं. पुष्कळच तक्रार झाल्यावर अखेरीस रामभाऊ राजवाड्यांना तेवढें सोडावेंच लागलें! तथापि सोलापूर प्रकरणांतील इतरांना तसेंच डांबून ठेवण्यांत आलें. बिळाशीच्या आरोपींनाहि सोडण्याचें नाकारण्यांत आलें. परन्तु एवढ्यानेंहि नोकरशाहीचें समाधान झालें नाहीं. पंजाबच्या केतूनें राजगुरु, भगतसिंग व सुखदेव यांना फांसावर टांगून समेटाला खग्रास ग्रहण लावलें आणि तिकडे कानपुरांतील कुटिल कारस्थान्यांनीं त्याच ग्रहणाच्या पर्वणींत पेटलेल्या हिंदु-मुसलमानांच्या कलहाग्नींत गणेश शंकर विद्यार्थी यांची आहुति पडूं देऊन कराचीच्या कॉंग्रेसला अपशकुन केला. तथापि गांधीजींनीं हुतात्मे राजगुरु, भगतसिंग व सुखदेव यांच्या अभिनंदनाच्या ठरावाचा मंत्र जपून समेटाचें ग्रहण सोडविलें आणि गोलमेज परिषदेच्या पौरोहित्याची सुपारीहि मिळविली.

### अंधार नाहीं पण सूर्यदर्शनहि नाहीं

अशा रीतीनें ग्रहण सुटून सूर्य मोकळा झाला खरा; तथापि त्याच्या पुढचीं कृष्णमेघांचीं पटलें न हालतां कायमच राहिल्यानें प्रत्यक्ष सूर्यदर्शन होऊं शकेना. तरी पण आकाशांत सूर्य वर वर चढूं लागल्यावर काळ्या ढगांनीं आकाश कितीहि व्यापलें तरी व्यवहार चालण्यापुरता प्रकाश पडतोच व तेवढ्यानें दिवाभीतांचा घूत्कार बंद पडतो, वन्यपशूंचा संचार थांबतो आणि शर्विलकांच्याहि हालचालीला पायबंद बसतो; अशीच कांहींशी स्थिति एप्रिलपासून सप्टेंबरपर्यंतच्या सहा महिन्यांत राहिली. राष्ट्रीय सभेनें जनतेच्या मूलभूत हक्कांसंबंधाचा वीस कलमी ठराव केल्यानें सामान्य जनतेलाहि स्वराज्याविषयीं आस्था वाटूं लागली. राष्ट्रीय शिक्षण परिषदा भरून ग्रामसंघटनेचा विचार होऊं लागला; ठिकठिकाणीं जिल्हापरिषदा भरून भावी संघटनात्मक व विधायक कार्यक्रमाची रूपरेषा आंखली जाऊं लागली. श्री. रामभाऊ राजवाडे आणि डॉ. अंत्रोळीकर यांची सुटका झाल्यानें सोलापूरच्या कार्यकर्त्यांचा उत्साह वृद्धिंगत झाला, चिरनेरचा खटला जरी काढून घेतला गेला नाहीं तरी सेशन्स कोर्टाच्या निकालानें नोकरशाहीच्या कारवाईची नांगीच मोडली गेली, कानपूरच्या दंग्यासंबंधीं सरकारी चौकशीकमिटीनेंच प्रतिकूल अभिप्राय दिल्यामुळें तेथील डि. मॅजिस्ट्रेटास निजधामाला जावें लागलें. व्हिटले कमिशनचा रिपोर्ट प्रसिद्ध होऊन मजूर वर्गाला आपल्या नैसर्गिक हक्कांची सनद मिळाल्याप्रमाणें धीर आला. वर्किंग कमिटीचा रिपोर्ट प्रसिद्ध झाल्यानें देशी उद्योगधंद्यांच्या वाढीच्या मार्गावर बराच प्रकाश पडला. सँढर्स्ट कमिटीकडून लष्करी कॉलेज स्थापण्याची योजना नक्की झाल्यानें क्षात्र व्यव-

सायाचें नवें क्षेत्र थोडें तरी खुलें होईल अशी आशा वाटूं लागून नवयुवकांचीं मनें उल्हसित झालीं. सरहद्द प्रांतासंबंधाच्या सुधारणा कमिटीनें त्या प्रांतांतील बेबंदशाही कारभाराला कायद्याचें नियंत्रण घालण्याची शिफारस केल्यानें तेथील नवजवानांचा उत्साह वृद्धिंगत झाला. गोलमेज परिषदेचें दुसरें अधिवेशन होण्याची तारीख निश्चित होऊन निमंत्रणें येऊं लागलीं आणि परिषदेचे प्रतिनिधी प्रस्थान ठेवण्याच्याहि तयारीला लागले.

### पूर्वेकडे अंधार पडूं लागला

अशा प्रकारें प्रत्यक्ष सूर्यदर्शन होत नव्हतें तरी ढगांच्या आड असलेल्या सूर्याच्या अप्रत्यक्ष प्रकाशांत आणि आशा व निराशा यांच्या समन्वयाच्या मनोवृत्तींत मामुली व्यवहार चालू असतां विघ्नसंतोषी रात्रिंचरांना ही स्वस्थता पाहवेना! विशेषतः ज्यांनीं समेट घडवून आणला ते आयर्विन तर विलायतेला निघून गेलेच आणि त्यांचे जोडीदार गांधीजीहि तिकडे जाण्यासाठीं लवकरच प्रस्थान ठेवणार असें ठरलेलें पाहून पुनः एकदां समेटाची पायमल्ली करण्याचें कारस्थान शिजूं लागलें. त्यांत इकडील नोकरशाहीला विलायतेंतल्या हुजूर पक्षाचाहि या वेळीं पाठिंबा मिळाला. गांधीजींना विलायतेला निघतांनाच अपशकुन करण्यांत आला. पण काळें मांजर आडवे आलेलें पाहून चार पावलें माघार घेऊन, दोन मिनिटें थांबून, पुनः निघावें त्याप्रमाणें कशीबशी तडजोड करून गांधीजी पाश्चात्य देशाच्या यात्रेस निघाले. परंतु त्यांच्या पश्चिमेकडे जाण्यानें समेटच अस्तास गेल्याप्रमाणें होऊन इकडे पूर्वेकडील प्रदेशांत अंधकार पसरूं लागला. ब्रह्मदेशांतील ब्रह्मघोटाळा वाढतच चालला. खजिना कोरडा ठणठणीत होऊं लागलेला पाहून नवीन करांचा बोजा जनतेच्या शिरावर लादण्याच्या विचाराचा खल होऊं लागला. अशा वेळीं वृत्तपत्रांची ओरड सुरू होईल म्हणून त्यांची मुस्कटदाबी करण्याचीं नवीं बंधनें तयार करण्यांत येऊं लागलीं. आणि सोटेशाही सुरू करावयाचेंच मनांत आणल्यावर निमित्त सांपडावयाला काय उशीर ! बंगालच्या राजबंद्यांना हिजली येथें ज्या कारागारांत कोंडलें होतें तेथील अंमल अधिक कडक करण्यांत आला. त्यांना पूर्वी मिळणाऱ्या कांहीं सवलती संपुष्टांत आल्या; त्यांच्या तक्रारींची दाद लागेनाशी झाली; त्यांचा वारंवार उपमर्द करण्यांत येऊं लागला आणि अखेरीस कांहीं बाचाबाची झाल्याचें निमित्त होऊन गोळीबार करण्यांत आला! दोन राजबंदी ठार झाले; वीस इसम जायबंदी झाले; आणि विशेष चीड येण्याची गोष्ट अशी कीं, सरकारी चौकशी कमिटीनेंच गोळीबार निष्कारण झाला व त्याचें समर्थन होऊं शकत नाहीं असें म्हटलें असतांहि कोणाहि अधिकाऱ्याला शिक्षा झाली नाहीं. अशा रीतीनें बंगाल प्रांतावर अंधकाराचा अंमल बसत चालला. अंधारांतच सगळे व्यवहार चालू झाल्यावर कोणाचा पाय आधीं कोणास लागला याची मीमांसा करण्यांत अर्थ नसतो. पण सरकारचा डाव असा कीं, अंधारामुळें सरकारी नोकरांच्या हातून भलतीच आगळीक झाली तरी ती क्षम्य, पण जनतेकडून जर त्याच अंधारामुळें कोणाच्या अंगाला धक्का लागला तर तो मात्र अत्याचार म्हणून त्याविरुध्द आकाशपाताळ एक करावयाचें! असल्या पक्षपाताच्या व खुनशी वृत्तीमुळें बंगाल्यांतील तरुणांचीं मनें जास्तच भडकून जाऊन दडपशाहीला अत्याचाराचें उत्तर मिळूं लागलें आणि त्या उत्तराला प्रत्युत्तर म्हणून नवे नवे वटहुकूम निघून दडपशाहीचा जुलूम पराकाष्ठेला पोंचूं लागला!

अंधार पडण्याला प्रारंभ पूर्व दिशेला आधीं झाला तरी क्रमाक्रमानें तो सगळ्या दिशा व्यापतो त्याप्रमाणें दडपशाहीची कृष्णच्छाया बंगालवरून संयुक्त प्रातात आणि संयुक्त प्रांतांतून सरहद्द प्रांतांत येऊन ठेपली आहे. आणि यापुढें ती इतर प्रांतहि व्यापून टाकील असा रंग दिसत आहे.

### विलायतेंतहि अंधारच

समेटाचे पुरस्कर्ते गाधीजी व लॉर्ड आयर्विन हे विलायतेला गेल्यामुळें त्यांच्यामागें इकडे हिंदुस्थानांत दडपशाहीची कृष्णच्छाया पडली, पण तिकडे विलायतेंत तरी गोलमेज परिषदेनें मोठा प्रकाश पाडला असें म्हणावें तर तसेंहि झालें नाहीं. गांधीजी विलायतेला जाऊन पोंचण्यापूर्वीच तिकडील हुजूर पक्षाचा डाव यशस्वी होऊन मजूर-सरकार स्थानभ्रष्ट झालें आणि मॅक्डोनाल्ड हे हुजूर पक्षाच्या आहारीं जाऊन बाहुलें बनले. अर्थातच गोल परिषदेपुढे गांधीजींनीं वाचलेलें स्वराज्याचें पुराण फुकट गेलें. अल्पसंख्याकांचाहि प्रश्न हुजूर पक्षाच्या चिथावणीमुळें सुटूं शकला नाहीं आणि ब्रिटिश मंत्रिमंडळानें रक्षाबंधनाची दोरी अधिकाधिक आंवळून स्वराज्याची गळचेपी केली.

एवंच विलायतेंतली कामगिरी मनाजोगती होऊं शकली नाहीं म्हणून स्वदेशांत परत येऊन येथील संघटना अधिक परिणामकारक करावी असा विचार ठरवीत गांधीजी इकडे परत येतात न येतात तोंच संयुक्त प्रांताचे व सरहद्द प्रांताचे लोकप्रिय पुढारी आणि गांधीजींचे डावे-उजवे हात अब्दुल गफर व पं. जवाहरलाल यांना अटक झाल्याचें वृत्त त्यांच्या कानीं आलें आणि ज्या दिवशीं त्यांनीं

मुंबईस पाऊल ठेवलें त्याच दिवशीं तिकडे सरहद्द प्रांतांत गोळीबार करून दहापंधरा स्वयंसेवकांच्या प्राणांबरोबरच तेथील समेटाचेहि प्राणहरण करण्यांत आलें.

### मध्यरात्रीचा घनदाट अंधकार

एतावता १९३१ सालाच्या अखेरीस पुनः मध्यरात्रीचा समय प्राप्त होऊन हिंदुस्थानभर निराशेचा घनदाट अंधकार पसरूं लागला आहे. १९३१ सालाच्या प्रारंभींहि असाच अंधार पडला होता खरा. पण त्या वेळीं सत्याग्रहाच्या प्रचंड वाऱ्यानें कृष्णमेघांची वाताहत होऊन आकाश निरभ्र होण्याचीं चिन्हें दिसत होतीं व त्यामुळें क्वचित् चांदण्यांचा प्रकाश चमकत होता. परंतु या वेळीं अमावास्येच्या मध्यरात्रीच्या अंधकारांतच दडपशाहीच्या काळ्या ढगांनीं बहुतेक सर्व आकाश व्यापिलें असल्यामुळें चांदण्यांचाहि प्रकाश दिसेनासा होऊन अंधकाराची भीषणता दुप्पट वाढली आहे. अशा वेळीं सुरू होणारें हें नवीन वर्ष या भारतवर्षाला काय काय देखावे दाखविणार याचें भविष्य करणें कठिण असलें तरी एक मात्र गोष्ट निश्चित आहे कीं, रात्रीच्या अंधकाराची परमावधि झाली म्हणजे भावी अरुणोदयाची वेळ जवळ येत चालली असें निश्चित अनुमान करावयास हरकत नाहीं. मेघांचें अस्तित्व हें नैमित्तिक असून अरुणोदय व सूर्योदय यांचें आगमन नित्य व निश्चित असेंच असतें. तेव्हां दडपशाहीनें केवढेंहि उग्र स्वरूप धारण केलें तरी तें शाश्वत टिकूं शकत नाहीं व केव्हांना केव्हां तरी तिची हाकलपट्टी होऊन स्वराज्यसूर्य उदयाचलावर आलेला दृष्टीस पडतोच. पण तो किती अवधीनें आणि कोणाच्या अर्घ्यप्रदानानें दृष्टीस पडणार एवढाच काय तो प्रश्न आहे.

## महात्मा गांधींचें भाषण

सोमवार ता. २८ रोजीं सायंकाळीं ५ वाजतां मुंबई येथें अझाद मैदानावर म.गांधींचें भाषण झालें.

नंतर महात्माजींनी शांतपणें व सावकाशपणें भाषण केलें. सर्वांचे आभार मानून ते म्हणाले, "आज सकाळीं आणि आतां संध्याकाळीं अशा दोनही वेळीं उपस्थित होऊन आपण मजवरील आपलें प्रेम प्रगट केलें आहे. तें आपल्या काँग्रेसनिष्ठेचेंच निदर्शक आहे असें मी मानतों. आपल्यापुढें जें बोलण्याचा मी काल रात्रीं विचार करीत होतों, त्याहून निराळेंच सांगणें आज प्राप्त आहे. पेशावरचा गोळीबार, त्यांत पडलेली वीरपुरुषांची प्राणाहुति, जवाहरलाल व शेरवानी यांना झालेली अटक वगैरे प्रकार मला काल माहीत नव्हते. ते सारे बोटींतून उतरल्यानंतर मला कळले. लॉर्ड विलिंग्डन यांनीं पाठविलेले ते

### नाताळचे नजराणे

आहेत असें मी समजतों ! सरहद्द प्रांतांत अब्दूल गफूरखान आणि त्यांचे बंधु यांना पकडण्यांत आलें आहे. आणखी कितीजणांना पकडण्यांत येईल तें सांगतां येत नाहीं. सरहद्दीकडील पुरेशा बातम्याहि आपल्याला मिळत नाहींत. माझ्या समजुतीप्रमाणें गफरखान यांच्या ठायीं सत्याग्रही वृत्ति पूर्णपणें भिनलेली होती. आणि जवाहर किंवा शेरवानी यांच्या वृत्तीबद्दल संशय कोण घेईल?

### 'पाऊल मागें घेणार नाहीं !'

"तुम्ही विचाराल, अशा आणीबाणीच्या वेळीं काय करावें? सरकारच्या या वर्तनाला सत्याग्रहानें जाब द्यावा काय ? का दुसरा एखादा उपाय आहे ? या प्रश्नाला सध्यां मी कांहींच उत्तर देऊं शकत नाहीं. पण एक गोष्ट निश्चित समजा. ती ही कीं, लढ्याला पुनः तोंड लावणें अवश्य ठरेल तर मी वर्किंग कमिटीला तसाच सल्ला देईन. तुम्ही पक्की खूणगाठ बांधून ठेवा कीं, या वेळीं मी तिळभरहि पाऊल मागें घेणार नाहीं ! मात्र लढा टाळण्याचा मी कसून प्रयत्न करीन. कांहीं लोक युद्धाला अत्यंत उत्सुक झालेले आहेत खरे; पण लक्षांत ठेवा, जातिवंत योद्धा धिम्मा असतो, दमदार असतो. जनताहि दम धरण्यास शिकलेली आहे, असा माझा अनुभव आहे. बंगाल्यांतील दोघां मुलींनीं केलेला अत्याचार मला पसंत नाहीं. सत्याग्रह्यानें क्लेश सोसले पाहिजेत आणि ते प्रतिक्रिया न करतां सोसले पाहिजेत. आपला सरकारशीं चाललेला लढा प्रेममूलक आहे. प्रेमानें त्यांना आपण जिंकूं.

### दडपशाहीचा प्रळय

"पण एखाद्याच्या अशा अत्याचारासाठीं साऱ्या देशाला कां भरडण्यांत यावें ? सरकारनें तर दडपशाहीचा प्रळय मांडला आहे. खरोखर सामर्थ्यसंपन्न सरकारला हें मुळींच शोभत नाहीं. संयुक्त व सरहद्द या प्रांतांतील वटहुकूम हे तर मला असह्य वाटत आहेत ! वाटाघाट पुढें चालविण्याचा मार्ग मोकळा राहील अशी मला आशा वाटत होती, पण आतां ती फारशी उरली नाहीं. याचा अर्थ मी पूर्ण निराश झालों आहें असा नव्हे, पण पूर्वीइतकी आशा आतां राहिली नाहीं हें मात्र खरें. यदाकदाचित् पुनः

लढा सुरू झाला तर त्यांत सर्वांनीं भाग घेतला पाहिजे; बालकांनींहि आपला वांटा उचलला पाहिजे.

**मृत्यूचें भय कोणाला ?**

"गेल्या चळवळींत आपल्याला लाठ्या खाव्या लागल्या; येत्या चळवळींत गोळ्या खाव्या लागतील! आपण असें सिद्ध केलें पाहिजे कीं, सरहद्दीवरील लोकच काय पण मुंबईचे नागरिकहि बंदुकीला धैर्यानें तोंड देऊं शकतात. भारतीय स्वातंत्र्य संपादन करण्यासाठीं दहा लाख माणसें हिंदुस्थानांत तळहातावर शिर घेऊन तयार आहेत असें मी इंग्लंडांत म्हणालों होतों. त्या सर्वांना आपलीं शिरकमलें मातृभूमीच्या चरणीं वाहावीं लागलीं तरी मला त्याबद्दल दुःख वाटणार नाहीं. मरणाचें भय नाहींसें झालें पाहिजे. मृत्यूला जिवलग मित्राप्रमाणें कवटाळण्यास आपण सदैव सिद्ध असलें पाहिजे. आणि मरण स्वीकारतांनाहि प्रतिपक्षाविषयीं आपण दुर्बुद्धि बाळगतां कामा नये. आपण क्लेश सोसावे आणि ते सोसतांनाहि आपल्या शत्रूचें अभीष्ट चिंतावें. हें तत्त्व माझ्या चित्तावर अधिकाधिक आरूढ होत आहे. आपला हा आत्मत्याग शुद्ध स्वरूपाचा राहील तर पाषाणाचेंहि हृदय आपण बदलूं शकूं, याबद्दल मला काडीमात्र शंका वाटत नाहीं.

**भारतीय स्वराज्य म्हणजेच जागतिक शांति**

"युरोपांतील प्रवासात मी नवें कांहीं शिकलों नाहीं, आणि जुनें कांहीं विसरलों नाहीं. सत्य व अहिंसा यांच्या उपयुक्ततेवरील माझी श्रद्धा मात्र अधिकच दृढ झाली आहे. इंग्लंडांतील मंत्रिमंडळाचें असें प्रामाणिक मत मला दिसलें कीं, हिंदुस्थान स्वराज्याला अजून पात्र झाला नाहीं, आणि कॉंग्रेसच्या हातून अहिंसेचें व्रत पूर्णपणें पाळलें जाणार नाहीं. याचें कारण त्यांची सारी भिस्त सरकारी रिपोर्टांवर आहे. पण आपण अहिंसेच्या ध्येयापासून रतिमात्र चळतां कामा नये. ज्यांना तें मान्य नसेल, त्यांनीं कॉंग्रेसमधून निघावें, किंवा तिचें ब्रीद बदलून घ्यावें. हिंदुस्थानाच्या स्वराज्यप्राप्तीवर जागतिक शांतता अवलंबून आहे. आपल्या मार्गानीं हिंदुस्थानाला स्वराज्य मिळण्यास वर्षानुवर्षें लागतील, पण त्याची मला पर्वा नाहीं. सत्याग्रह आणि कॉंग्रेस यांचें अद्वैत आहे. हिंदुस्थान कॉंग्रेसच्या द्वारा स्वराज्य मिळविणार आहे, आणि कॉंग्रेस तें कार्य सत्याग्रहाचे द्वारां पार पाडणार आहे. त्यांत शेवटीं यश हें ठेवलेलेंच आहे. सरकार आज विरोध करील; पण अखेरीस आपल्याशीं सहकार्य करणें त्यांना भागच पडेल.

"कॉंग्रेस ही सर्व पक्षांची आहे, सर्व जातींची आहे. जातिकलह इंग्लंडांत मिटले नाहींत. ते हिंदुस्थानांत मिटतील हें मी पूर्वीपासून सांगत आहें. ते मिटविण्याचा कॉंग्रेस प्रयत्न करील. अस्पृश्यतेचा कलंक धुवून काढला पाहिजे, त्यासाठीं वाटेल तो स्वार्थत्याग केला पाहिजे. अस्पृश्यांना अन्याय झालेला मला खपत नाहीं. मीं माझें सारें आयुष्य त्यांच्या सेवेप्रीत्यर्थ वाहिलेलें आहे. मी स्वतःच एक अस्पृश्य आहें.

**यशःसिद्धीपर्यंत युद्ध चालणार !**

"इंग्लंडांतील दौऱ्यासंबंधीं मला पुष्कळ सांगावयाचें आहे. तें मी लिहून कळवीन. मात्र त्यापूर्वी मी पकडलों न गेलों पाहिजे. पुनश्च रणशिंग फुंकलें तर सावध राहा, सिद्ध राहा. रणसंग्राम टाळण्याची मी शिकस्त करीन. आशेचा एक किरणहि दिसला तरी त्याच्या अनुरोधानें वाटाघाटीची वाट मी चालू लागेन. पण सारे उपाय खुंटले तर मी तुम्हांला युद्धाला पाचारण करीन. तें युद्ध यशःसिद्धीपर्यंत चालणार हें निश्चित समजा. त्यासाठीं आपल्याला धैर्य व सामर्थ्य लाभो अशी माझी परमेश्वरापाशीं प्रार्थना आहे."

अशा आशयाचें महात्माजींचें अर्धा तास भाषण झाल्यावर बँड वाजूं लागले, लोक उठले आणि 'वंदे मातरम्' व 'महात्मा गांधीकी जय' यांच्या गगनभेदी गर्जनेंत सभा समाप्त झाली.

# सोशॅलिझमचा सूड !

( ले.—एक सोशालिस्ट )

मुंबई कौन्सिलपुढें कांहीं दिवसांपूर्वी आलेल्या 'वारसावरील करा' संबंधीं चर्चा करीत असतां माझ्या एका मित्रानें 'हा सोशॅलिझमचाच एक लहानसा घोट आम्हांला पाजला जात आहे' असा अभिप्राय दिला. सध्यां जगांत जिकडे तिकडे श्रीमंतांवर कर बसविण्याच्या योजना व कल्पना एकाहून एक पुढें येत आहेत. श्रीमंतांची संपत्ति काढून घेणें ही सोशालिझमची एक फलश्रुति दिसत असल्यामुळें भ्रमानें, स्थूल विचारानें अथवा धूर्तपणानें या करवाढीस सोशॅलिझम् असें नांव देण्याचा परिपाठ पुष्कळ ठिकाणीं पडत चाललेला दिसतो. 'आतां तुमच्यावर सोशॅलिझम् सोडतों' म्हणून कोणी करवाढीद्वारां

प्रतिपक्षास धाक घालीत आहेत, तर 'तुमचा सोशॅलिझम पत्करतों बाबा' म्हणून कोणी प्रतिपक्षास शरण जाण्याचा आव आणीत आहेत. उलट यांच्या प्रतिपक्षांतील कोणी या 'सोशॅलिझम'ला पाहून भेदरले आहेत, तर दुसरे कोणी 'सोशॅलिझम' एकदांचा आलेला पाहून हातांतलें काम टाकून देऊन 'शाबास माझी कृति' म्हणून आपल्या पाठीवरून हात फिरवून आपलें आपण अभिनंदन करीत आहेत! या प्रकारची अज्ञ, स्थूल अथवा धूर्त विचारसरणि सोशॅलिझमच्या प्रगतीस—अथवा ज्यांना सोशॅलिझम नको असेल त्यांना त्याची पीछेहाट करण्यांच्या प्रयत्नासहि— विघातक आहे.

हल्लीं सर्वत्र चाललेली करवाढ हा सोशॅलिझम नव्हे, सोशॅलिझमचें सोंगसुध्दां नव्हे. असलाच तर हा सोशॅलिस्ट लोकांचा सूड घेतला जात आहे! सोशॅलिस्ट पद्धतींत श्रीमंतांची संपत्ति सरकारनें घेणें ही बाब मुख्य नसून संपत्तीची वांटणी न्याय्य पद्धतीनें व्हावी ही बाब महत्त्वाची आहे. आजच्या करवाढीकडे या दृष्टीनें पाहा. आज राज्यकर्ते आपला कारभार थोड्या खर्चांत कां आटपत नाहींत? त्यांनीं साम्राज्यलोभानें मोठमोठीं सैन्यें उभारलीं त्या वेळीं धनिकांकडून काढलेल्या कर्जाच्या ओझ्याचें व्याज फुगत चाललें आहे. गेल्या महायुद्धामुळें विजयी व अपजयी दोनहि राष्ट्रें विपत्तींत आलीं खरीं. पण प्रत्येकांतील श्रीमंत एकंदरीनें आबादानींत असून गरीब अधिकाधिक निर्धन व त्रस्त होत आहेत. युद्धामुळें त्यांच्यात जागृतिहि झाली असून श्रीमंत गरीबांच्या श्रमावर गब्बर होतात, व आपणावर जुलूम करतात असा त्यांचा समज–गैरसमज म्हणा–झाला आहे. या असंतुष्ट निर्धनांनीं आपणास सत्तापदावरून ओढूं नये म्हणून आजच्या श्रीमंत राज्यांना सैन्य खडें ठेवावें लागतें व त्याच्या खर्चाकरिता कर वाढवावे लागतात. श्रीमंत लोक हे कर सुखासुखी देत नाहींत. गरीबांकडून कर घेऊनच गरीबांवर दंडुका चालवावा अशी यांची राज्यकर्त्यांना सूचना असतेच. पण गरीबाजवळ एक तर पैसा नसतो, व गरीब असंतुष्ट झाले म्हणजे सैन्याचा व पोलिसाचा खर्च करांचे पेक्षां अधिक वाढतो. म्हणून श्रीमंतांना ही करवाढीची गोळी एरंडेलाप्रमाणें वाईट तोंड करून गिळावी लागते.

म्हणजे गरीब करांतून सुटतात असें नव्हे. मिळकतीच्या प्रमाणांत पाहिलें तर गरीबांना श्रीमंतांहून अधिक कर द्यावा लागतो. पण चोरून खिसा कापावा, त्याप्रमाणें हिंदुस्थानांत मिठावर आणि इंग्लंड इत्यादि राष्ट्रांत आयात मालावर कर बसवून अप्रत्यक्षपणें गरीबांच्या चिरीमिरीचीहि चोरी हे राज्यकर्ते करतात.

'ज्यांचेकडून कर घ्यावा त्यांचे कारणीं तो लावावा' असें कर-शास्त्र सांगतें. पण हा नियम आजचे राज्यकर्ते पाळतात काय? 'लोकांकडून आम्ही कर घेतों आणि तो लोकांचे कारणीं लावतों' हा शाब्दिक बुरखा केव्हांच उडून गेला आहे. यंत्रयुगामध्यें ज्याच्या हातीं यंत्र त्यालाच आवश्यक संपत्ति निर्माण करण्यास संधि असते. त्याचे दारीं हातापायाचीं फक्त निसर्गदत्त हत्यारें घेऊन काम मिळविण्याकरितां यंत्रहीन मजुरांना तोंड वेंगाडावें लागतें. गरजेहून हे मजूर अधिक असतात. यामुळें कमींत कमी मजुरीवर त्यांना यंत्रवाल्यांची संपत्ति निर्मावी लागते, आणि यंत्रवाल्यास नफा जास्त मिळतो. म्हणून समाजांत यंत्रवाला, अल्पसंख्य श्रीमंत वर्ग व केवळ हातपाय एवढींच आयुधें असणारा प्रचंडसंख्य गरीब असें वर्गीकरण झालें आहे. दळवळणाचीं साधनें वाढल्यानें हें वर्गीकरण भौगोलिक मर्यादाहि ओलांडून जागतिक होऊं पाहत आहे. श्रीमंतांकडून घेतला जाणारा कर कदाचित् श्रीमंताकारणीं खर्चिला जात असेल; पण गरीबांच्या कराचा व्यय कसा होतो? त्यांना शिक्षण नाहीं, आरोग्य नाहीं, आयुष्य नाहीं, राहाण्यास घरें नाहींत, कायदेबाजींत संरक्षण नाहीं, नीतिवर्धनास अनुकूल परिस्थिति नाहीं, कांहींहि नाहीं. गरीबांचीं खिल्लारें पोरें पाठीस बांधून, त्यांच्या पाठीस लागलेले सरकारी अधिकारी, पोलीस, सैनिक यांस भिऊन धूम दशदिशा पळताहेत, अथवा आपआपल्या घरांत अथवा खुराडांत लपून बसलीं आहेत. त्यांना प्रतिकार करण्याचें धैर्य अथवा कल्पनाहि नाहीं. त्यांच्यांत धैर्य आणणाऱ्या पुढाऱ्यांकरितां त्यांच्याच खर्चानीं तुरुंग बांधले आहेत. त्यांत लान्सबरी, गांधी, जवाहरलाल यासारख्यांना कोंडण्यांत येतें. आणि गरीब प्रजेचें रक्त करग्रहणानें पिळून काढून 'आम्ही कसें दराऱ्यानें राज्य करतों' अशी शेखी हे राज्यकर्ते मिरवितात. कदाचित् गरीबांना दंडुक्यांनीं मारण्यास पोलीस व त्यांच्या जमावावर गोळ्या घालण्यास सैन्य सरकार ठेवतें या अर्थानें 'गरीबांचा कर गरीबाकारणीं' लागत आहे असें म्हणतां येईल !!

श्रीमंतांवरील कराच्या व्ययाचीहि हीच रड. दराऱ्यानें राज्य करवायाचें म्हटलें कीं लठ्ठ लठ्ठ पगाराचे जुलमी अधिकारी व सैनिक ठेवावे लागतात. हे अधिकारी आपला धाक प्रसंगीं श्रीमंतांसहि दाखविल्यावांचून राहात नाहींत. कारण अधिकारमदाचा प्रभावच तसा आहे. हिंदुस्थानांतील

श्रीमंतागरिबाकडून घेतलेल्या कराचा व्यय कोठें होतो? पेन्शन घेऊन विलायतेस गेलेल्या सैनिकांचीं व मुलकी अधिकाऱ्यांचीं पेन्शनें, आमच्या डोक्यावर लादलेल्या युरोपियन अधिकाऱ्यांचे लठ्ठ पगार, विलायतची खंडणी, हुंडणावळ संभाळण्याकरितां विलायती व्यापाऱ्यांस देण्यांत येणारी दक्षिणा आणि येथील श्रीमंत–गरीब कोणांसच नको असूनहि आशियाखंडावर गुरगुरण्याकरितां ठेवलेलें प्रचंड सैन्य या कामीं होतो. 'ज्याचा कर घ्यावा त्याच्या तो कारणीं लावावा' या करशास्त्राच्या नियमाचा पद्धतशीर भंग येथें होत आहे, व कमी-अधिक प्रमाणांत जगभर असेंच चाललें आहे.

आणि म्हणून 'प्रजेच्या कल्याणाकरितां संपत्तीचा व्यय करणें' हें जें सोशालिझमचें ध्येय त्याऐवजीं येथें प्रजेवर जुलूम करण्याकरितां संपत्तीचा व्यय होत आहे. श्रीमंतांकडून संपत्ति घेणें ही अर्धी गोष्ट करून व्यय करतांना व्यभिचार करणें म्हणजे धार काढून मला दूध पाजव असें मुलानें म्हटलें असतां धार काढल्यावर तें दूध गटारांत ओतून अथवा सापास पाजून मुलाचा सूड घ्यावा त्याप्रमाणें सोशॅलिझमचा सूड घेणें आहे. कर न घेतां संपत्तिसाधनेंच सरकारनें कबजांत घेणें हा एक घटनेचा फरक करवाढ व सोशॅलिझम यांमध्यें असल्यामुळें करवाढीच्या चौकटींत सोशॅलिझम बसतच नाहीं. पण संपत्तीचा सद्व्यय ही जी मुख्य ध्येयभूत बाब त्या दृष्टीनेंच आधीं हल्लींची करवाढ हा सोशॅलिझम नव्हे.

सोशॅलिझमचे कोणी पुरस्कर्ते असोत वा तिरस्कर्ते असोत, मला त्यांत इष्टानिष्ट कांहीं नाहीं. शुद्ध बुद्धीनें व पूर्ण विचारानें केलेल्या कसल्याहि प्रयत्नास अखेर सत्लाभ व सद्गति मिळत असते अशी माझी दृढश्रद्धा आहे. पण 'हा सोशॅलिझम आला!' म्हणून भ्रमानें कोणीहि आपल्या प्रयत्नांत शैथिल्य आणूं नये, अथवा भलत्या वाटेनें जाऊं नये.

# अबदुल गफरखान व लाल डगलेवाले

सरकारच्या वटहुकमांचा त्रिशूळ आणि दडपशाहीचें तांडवनृत्य यांचा रोख सध्यां सरहद्द प्रांताकडे वळलेला असल्यामुळें साऱ्या हिन्दी जनतेचें लक्ष तिकडे वेधलें गेलें आहे. 'लालडगलेवाल्यांवर' अटकेपासून गोळीबारापर्यंतचे सर्व प्रयोग सरकारी अधिकाऱ्यांनीं तेथें सुरू करण्यापूर्वीपासून सरकारच्या बगलेंतील वर्तमानपत्रांनीं त्या 'लाल डगलेवाल्यांचें' भेसूर चित्र रंगविण्यास सुरुवात केलेली आहे. लंडनमधील 'डेली एक्प्रेस' नें त्यांच्यावर व त्यांचे पुढारी खान गफूर यांजवर किती खोटेनाटे आरोप केले हें आम्हीं ता. १९ डिसेंबरच्या केसरींत दाखविलें आहेच. आतां त्या प्रांतांतील सत्यस्थिति पुढें देत आहों. ती एका कार्यकर्त्या बाईनीं प्रसिद्ध केलेली आहे. त्यांना म. गांधींनीं तिकडे मुद्दाम पाठविलें होतें. त्या वेळीं तेथील लहानमोठ्या अनेक गांवांतून हिंडून व सर्व दर्जाच्या स्त्री-पुरुषांत मिसळून त्यांनीं आपलें हें मत दिलें आहे.

लाल डगलेवाल्यांची संघटना पाहून मोठें नवल वाटतें. कायदा व व्यवस्था यांचा विध्वंस करण्यासाठीं ते उठले आहेत, हीं इंग्रजी पत्रांतील वर्णनें धादांत खोटीं आहेत. म. गांधींनीं उपदेश केलेल्या सत्य आणि अहिंसा या शस्त्रांशिवाय तिसऱ्या शस्त्राला ते शिवतहि नाहींत. हातांत सोटा धरणेंहि त्यांनीं बंद केलें आहे. समशेरीवर ज्यांचें जीवन आणि समशेरीवरच ज्यांचें मरण अशा लष्करी बाण्याच्या पठाणांच्या हातीं सत्य व अहिंसा हींच शस्त्रें पाहून कोणास आश्चर्य वाटणार नाहीं? हें अद्भुत व्रत मातृभूमीच्या स्वातंत्र्यप्राप्तीसाठीं स्वीकारणारे तीन लाख लोक आहेत. २७ लाखांच्या लोकवस्तींत तीन लाख माणसें 'लाल डगलेवालीं' झालेलीं आहेत. यावरून तेथें राष्ट्रीय जागृतीचें वारें किती वेगानें फिरत आहे हें दिसून येतें. याचें सर्व श्रेय गफरखान यांनाच आहे. अवघ्या ३७ वर्षांच्या या तरुण लोकनायकानें सारी चळवळ आपल्या मुठींत ठेविली आहे, आणि सारे अनुयायी आपल्या प्रेमळ स्वभावानें आपलेसे करून सोडले आहेत. आपल्या चळवळीला लागणारा पैसा स्वतःचे स्वतः पुरविण्याची त्यांनीं व्यवस्था केलेली आहे. त्यांच्या चळवळींत रशियाचा कांहीं हात असावा ही इंग्रजी पत्रांनीं उठविलेली आवई दुष्टपणाची आहे. 'लाल डगलेवाल्यांना' बोल्शेव्हिकांची कांहींहि मदत नाहीं. त्यांना त्यांचं अस्तित्व तरी ठाऊक आहे कीं नाहीं कोण जाणे!

लाल डगलेवाल्यांची शिस्त फार वाखाणण्याजोगी आहे. अंमलदारांची योजना, त्यांच्या हातांतील शिट्या, ते घेत असलेली कवाईत, प्रत्येक डगलेवाल्याचा पोषाक, पट्टा, ढब सर्व कांहीं लष्करी थाटावर! प्रत्येक शुक्रवारीं त्यांची कवाईत ठरलेली! ती हिंदी लष्कराच्या दृष्टीच्या टप्प्यांत करूं नका असा सरकारनें हुकूम सोडलेला आहे. चळवळींत सामील होण्यासाठीं जो तो अहमहामिकेनें पुढें येत

आहे. ज्याला प्रवेश मिळण्यास विलंब लागणार असेल तो खट्टू होतो, इतकें राष्ट्रीय जागृतीचें वारें तेथील लोकांत पसरलें आहे. आणि तें आसपासच्या लोकांतहि शिरूं पहात आहे. या चळवळींत हिंदु–मुसलमान वगैरे कोणताहि भेदभाव नाहीं. बन्नू येथें तर सरदार रामसिंग यांनीं ' काळे डगलेवाले ' या नांवाची एक शाखा काढलेली आहे. पुष्कळ ठिकाणीं हिंदु अंमलदारांचे हाताखालीं खुदा-इ-खिदमतगार काम करीत आहेत. स्त्रीवर्गहि पुढें येऊं पाहात आहे. परदेशी कापडावर बहिष्कार घालण्याचे ठराव ठिकठिकाणीं होऊन त्याबरहुकूम वर्तनहि होत आहे. कोहट जिल्ह्यांतील कांहीं स्त्रियांनीं आपल्या गांवांतील विणकऱ्यांना हातसूत पुरविण्याचें ठरविलें आहे. हजारों स्त्रिया खुदा-इ-खिदमतगार झाल्या आहेत. स्त्रीपुरुष, हिंदुमुसलमान असा कोणताहि भेद ' लाल डगलेवाल्यां ' च्या चळवळींत नाहीं.

# हिंदुस्थानांतील अस्पृश्यांची लोकसंख्या खरी किती आहे ?

( ले०—श्री. गणेश नारायण जोगदेव, पुणें. )

अस्पृश्यांची संख्या ७ कोटी आहे, असें गेलीं कांहीं वर्षे म्हटलें जातें; आणि असेंहि समजलें जातें कीं, हिंदुस्थानांत ७ कोटी मुसलमान आहेत. त्याचप्रमाणें संस्थानांतील लोकसंख्या ७ कोट आहे. परंतु सन १९२१ च्या सेन्सस रिपोर्टाप्रमाणें मुसलमानांच्या व संस्थानांच्या लोकसंख्येचे आंकडे जवळ जवळ बरोबर आहेत असें दिसतें. मुसलमानांची संख्या ६ कोट ८७ लक्ष, व संस्थानांतील लोकसंख्या ६ कोट ९१ लक्ष आहे. अस्पृश्यांची संख्या मात्र नेमकी कळण्याला मार्ग नाहीं, व ती जवळजवळ सात कोट आहे असें म्हटलें जातें.

सेन्सस रिपोर्टामध्यें ज्याप्रमाणें मुसलमानांची व खिश्चन लोकांची संख्या संकलित दिलेली आढळते, त्याप्रमाणें अस्पृश्यांची संख्या दिलेली आढळत नाहीं. अस्पृश्यांची संख्या हिंदूंच्या लोकसंख्येंतच आहे, आणि ती संख्या निराळी देण्याचें प्रयोजनहि नाहीं. तथापि रिपोर्टामध्यें अस्पृश्यांच्याकरितां निराळा भाग पाडून त्यांची संख्या अदमासें ५ कोटि ३० लक्ष असली पाहिजे, असें तो रिपोर्ट लिहिणारे म्हणतात. परंतु ती संख्या सात कोट असलीच पाहिजे, असें म्हणण्याचें त्यांच्याच्यानें धारिष्ट होत नाहीं.

### मागासलेले व अस्पृश्य कोण ?

अस्पृश्यांची नक्की संख्या कळण्यापूर्वी अस्पृश्यांत कोणकोणत्या जाती अंतर्भूत होतात हें कळणें अवश्य आहे. ' अस्पृश्य ' या व्याख्येंत ' मागासलेपणा 'चा अर्थबोध होत नाहीं. कोणत्याहि जातीचा भाग मागासलेला असूं शकेल; परंतु ' अस्पृश्य ' असणार नाहीं. दऱ्याखोऱ्यांत राहणारे लोक व मूळचे लोक ( कोंक, कोळी, कातकरी, भिल्ल, मांगगारोडी) यांचा अस्पृश्यांत अंतर्भाव होत नाहीं. त्यांची मोजणी अगदीं निराळी केली जाते. इतकेंच नव्हे तर अस्पृश्यांत डाकूंचाहि ( Criminal Tribes ) समावेश होत नाहीं. ही वर्गवारी रिपोर्टामध्यें मुद्दाम दिलेली आहे. ' अस्पृश्य ' या शब्दाची निराळी फोड करून सांगण्याची आवश्यकता नाहीं. त्या शब्दावरूनच खरा अर्थबोध होतो. पंचवार्षिक शैक्षणिक रिपोर्ट ( सन १९२२–२७ ) सन १९२९ सालीं प्रसिद्ध झाला आहे. त्यांत रिपोर्ट लिहिणारे असें म्हणतात कीं, ' अस्पृश्य ' या शब्दाची व्याख्या करणे अत्यंत अवघड आहे.

अस्पृश्य वर्ग हा हिंदुसमाजांतीलच एक मोठा वर्ग खरा; परंतु त्यांच्या अस्वच्छ राहणीमुळें व अभक्ष्यभक्षणामुळें ( सर्वच अस्पृश्य अभक्ष्यभक्षण करतात असें नाहीं) ती जात स्पृश्य वर्गापासून निराळी विभागली गेली. शिवाय त्यांची वस्ती स्पृश्य वर्गापासून अगदीं दूर असते. शाळांत व पाणवठ्यावरहि त्यांना मज्जाव केला जातो. अस्पृश्यवर्ग व मागासलेला वर्ग यांचा कांहीं एक अर्थाअर्थी संबंध नाहीं. मागासलेल्या वर्गांतच डोंगरी लोक, मूळचे रहिवासी व डाकू लोक यांची गणना होते. त्यांचा दर्जा सामाजिक बाबतींत जरी उच्च समजला जातो तरी त्यांच्या अशिक्षितपणामुळें त्यास मागासलेला वर्ग असें नांव पडलें आणि अस्पृश्यहि अशिक्षित असल्यामुळें त्यांस मागासलेल्या वर्गांत घातलें गेलें.

पंचवार्षिक रिपोर्टांत मद्रास, बंगाल, मुंबई, संयुक्तप्रांत, पंजाब, बिहार, ओरिसा आणि मध्यप्रांत, वऱ्हाड या सात प्रांतांत मिळून कमी जास्त प्रमाणांत अस्पृश्यांची संख्या १ कोट २६ लक्ष उल्लेखिली आहे. उलट तोच रिपोर्ट लिहिणारे वरील सात प्रांत मिळून अस्पृश्यांची संख्या ३ कोट ३५ लक्ष आहे असें सन १९२१ च्या सेन्सस रिपोर्टाच्या आधारें म्हणतात. एकंदर सात प्रांतांची हिंदूंची

लोकसंख्या १५ कोट ७५ लक्ष आहे, आणि बाकीच्या भागांत म्हणजे हिंदी संस्थानें, आसाम व नवीन जोडलेले प्रांत या सर्व प्रांतांत मिळून हिंदूंची संख्या ५ कोट ९२ लक्ष आहे. जरी आपण घटकाभर अस्पृश्यांची संख्या वर उल्लेखिलेली खरी मानली तरी ५ कोट ९२ लक्ष हिंदूंच्या संख्येंत ३ कोट ३५ लक्ष अस्पृश्य असणें अशक्य आहे. कारण अस्पृश्य वर्ग हा डोंगरी किंवा रानटी लोकांप्रमाणें एका विविक्षित ठिकाणीं राहाणारा नसून तो सर्व देशभर पसरलेला आहे. अस्पृश्यांचें प्रमाण एकंदर हिंदु लोकसंख्येंत किती आहे हें कळणें जरी अवघड असलें तरी पंचवार्षिक रिपोर्टांत दिलेली १ कोट २६ लक्ष अस्पृश्यांची संख्या व सेन्सस रिपोर्टांतील ३ कोट ३५ लक्ष संख्या या दोन्ही मिळून ४ कोट ६१ लक्ष अस्पृश्यांची संख्या होते, असें आपण धरून चालूं. पण मग वारंवार उल्लेखिलेली ७ कोट अस्पृश्यांची संख्या कोठून आली?

सन १९३१ च्या सेन्सस रिपोर्टाप्रमाणें हिंदूंची लोकसंख्या वाढलेली आहे; तथापि अस्पृश्यांची संख्याहि त्याच प्रमाणांत वाढली नसून उलट ती संख्या घटली असण्याचा जास्त संभव आहे. कारण अस्पृश्यांना 'अस्पृश्य' हा शब्द लावून घेण्याची लाज वाटूं लागली आहे. त्यांचा कल स्वच्छतेनें राहण्याकडे दिवसेंदिवस जास्त होऊं लागला आहे, आणि दुसरें मोठें कारण म्हणजे त्यांच्यांतील कांहीं लोक अस्पृश्यतेला कंटाळून मुसलमान व ख्रिश्चन होऊं लागले आहेत !

वर निदर्शित केलेली अस्पृश्यांची संख्या परधर्मांत जाऊं द्यावयाची कां, हिंदुधर्मांत त्यांना पुष्कळशा सवलती देऊन आत्मसात करावयाचें, हाच बिकट प्रश्न हिंदु समाजापुढें आहे, आणि तो प्रश्न जितका लवकर सोडवितां येणें शक्य असेल तितका लवकर सोडविणें, आजच्या चालू राजकीय घडामोडीकडे पाहिलें म्हणजे, अत्यावश्यक वाटतें.

# सरकारनें साम झिडकारला; आतां पुढील मार्गास लागा

॥ न साम रक्षस्सु गुणाय कल्पते । न दानमर्थोपचितेषु युज्यते ॥
॥ न भेदसाध्या बलदर्पिता जनाः । पराक्रमस्त्वेष ममेह रोचते ॥ —रा. ५-४१-३

शक्यतोंवर शिष्टाईच्याच मार्गाचा अवलंब करावयाचा अशी ज्यांची मनःपूर्वक इच्छा त्या म. गांधींनीं आयर्विनसाहेबांशीं दिल्लीची तात्पुरती तडजोड करून शिष्टाईकरितां विलायतेला जाण्याचें ठरविलें. ही तडजोड व ही शिष्टाई राष्ट्रीय सभेच्या अनेक कार्यकर्त्यांना नापसंत होती. तथापि केवळ गांधीजींचा शब्द खालीं पडूं द्यावयाचा नाहीं एवढ्यासाठींच कराचीच्या कॉंग्रेसमध्यें दिल्लीची तडजोड मान्य करण्यांत आली आणि गांधीजींनीं शिष्टाईकरितां विलायतेस जावें असा ठराव झाला. अशा रीतीनें सामोपचारानेंच हा झगडा मिटावा अशी राष्ट्रीय सभेनें सदिच्छा प्रगट केली असतां मदांध नोकरशाहीनें तिचा भलताच फायदा घेतला. आयर्विनसाहेबांची पाठ फिरतांच नोकरशाहीनें पदोपदीं करारभंगास प्रारंभ केला आणि गांधीजी परत येईपर्यंत अशी परिस्थिति निर्माण करून ठेवली कीं, कोणाहि स्वाभिमानी पुढाऱ्यास समेट कायम आहे असें मानणें किंवा तो चालू ठेवण्यासाठीं पुनश्च बोलणें सुरू करणें उपमर्दकारक वाटावें. परंतु साममूर्ति गांधीजींनीं तेवढाहि अपमान गिळून टाकून विलायतेंतून परत येतांच साम करण्याकरितां हात पुढें केला. तथापि आसुरी प्रकृतीच्या माणसांकडून शिष्टाईचा अर्थ भलताच समजला जात असल्यानें मदोन्मत्त नोकरशाहीनें सामार्थ पुढें केला गेलेला गांधीजींचा हात झिडकारला आणि हिंदी राष्ट्रास उघड उघड आव्हान केलें. अर्थातच या आव्हानास बिनतोड उत्तर कसें द्यावयाचें हाच राष्ट्रापुढें मुख्य प्रश्न येऊन थडकला आहे.

गांधीजींची शिष्टाईची मागणी तुच्छतेनें झिडकारतांना व्हाइसरॉयांनीं जी कारणपरंपरा म्हणून दिली आहे तींत वस्तुस्थितीचा भलताच विपर्यास केलेला आहे. दिल्लीची तडजोड झाल्या दिवसापासून तिची अगदीं एकतर्फी बजावणी चालू होती. राष्ट्रीय सभेच्या अनुयायांपैकीं कोणाकडून चुकूनमाकून एखादी आगळिक झाल्यास त्याची उचलबांगडी करण्यास सरकारचे हात मोकळेच होते; कारण त्या बाबतींत दिल्लीचा करार त्यांना बंधनकारक नव्हताच. निदानपक्षीं तडजोडीच्या मुदतींत सरकारनें आपलीं युद्धसाधनें वाढविण्याचा उपक्रम करूं नये असें म्हटल्यास तें देखील मानावयास सरकार तयार नव्हतें. अर्थातच कराराच्या मुदतींत सरकारनें शक्य तितका शेतसारा शेतकऱ्यांकडून पिळून काढला, भावी लढ्याच्या वेळीं पैक्याची टंचाई भासूं नये

म्हणून नवे नवे कर कायदेमंडळाला न जुमानतां शिक्केबाजीनें लादले आणि नव्या प्रेस ॲक्टासारखे जुलमी कायदे करून राष्ट्रांतील चळवळीच्या मार्गांत मोठीच धोंड आडवी टाकून दिली. याखेरीज व्यक्तिशः ज्यांच्या ज्यांच्यावर डोळा होता त्यांस कोणत्या ना कोणत्या तरी निमित्तानें चौकशीनें अगर बिगरचौकशीनें डांबूनहि टाकलें.

दिल्लीच्या कराराची अशा रीतीनें पायमल्ली होत असल्याच्या वार्ता शिष्टाईकरितां विलायतेस गेलेल्या गांधींच्या कर्णपथावर नित्य आदळत होत्या. तथापि तेवढ्यावर साम मोडला असें तुम्ही मानूं नका असा गांधींचा उपदेश कायमच होता. पण नोकरशाहीला तेंहि पाहवेना.करारभंगाच्या क्षुल्लक फुंकरानें हा शांतिसमुद्र खवळत नाहींसें पाहून त्यानीं सरसकट दडपशाहीचें वादळ उठविण्याचा प्रयत्न केला.बंगाल प्रांतावर वटहुकुमांचा वरवंटा फिरविण्यास सुरुवात झाली, संयुक्त प्रांतांत शेतसाऱ्यांत व जमीनदारांच्या खंडांत किती सूटतहकुबी द्यावी याविषयीं वाद उपस्थित होऊन काँग्रेसच्या पुढाऱ्यांच्या सूचना झिडकारण्यांत आल्या.आणि खंडाची व सारावसुलीची सुरुवात तरी लांबणीवर टाका असें म्हटलें असतां तेवढीहि सवलत नाकारून संयुक्त प्रांतांत असंतोषाचें बीं रुजत टाकलें.आणि या सर्वांवर कळस चढविण्याकरितां गांधीजी येण्याच्या नेमक्या संधीसच पं. जवाहरलाल नेहरू व शेरवानी यांना अटक करण्यांत आली;सरहद्द प्रांताला वटहुकूम लागू करून व लाल डगलेवाल्यांचे पुढारी अबदुल गफूरखान यांना गिरफदार करून त्यांस ब्रह्मदेशाची वाट दाखविण्यांत आली आणि त्यांच्या पश्चात् त्यांच्या अनुयायांवर गोळीबार करून दिल्लीच्या कराराला रक्तपातानें पुरता हरताळ फांसण्यांत आला.

मदांध नोकरशाहीकडून होणारा असला झोटिंगपणा प्रत्यक्ष पाहिल्यानंतर दिल्लीचा करार अस्तित्वांत आहे कां नाहीं अशी पृच्छा करण्याचें कारणच नव्हतें. तथापि वचनभंगाचें माप नोकरशाहीच्या पदरांत घालावें आणि अद्यापि तरी व्हाइसरॉय हे आपल्या हस्तकांना आवरूं इच्छितात कीं काय हें एकवार पाहावें म्हणून गांधीजींनीं व्हाइसरॉयांकडे तार पाठवून पृच्छा केली कीं, दिल्लीचा करार जागेवर आहे का नाहीं याविषयीं आपलें मत कळून घेण्याकरितां आणि सरकारपक्षाचें म्हणणें समजून घेण्याकरितां मी आपल्या मुलाखतीस येऊं इच्छितों, तरी आपली संमति कळवावी. यापेक्षां अधिक पडतें घ्यावयाचें तरी कसें! परंतु नोकरशाहीला सामोपचाराची पर्वाच राहिली नाहीं हेंच खरें. गांधींच्या या मागणीला असें उद्दट उत्तर आलें कीं, तुम निसांत सामवादी आहां हें आम्हांस कबूल आहे व गेले चार महिने तुम्ही येथें नसल्यामुळें तुमच्या पश्चात् काँग्रेसच्या अनुयायांनीं जो खट्याळपणा केला त्याची जबाबदारी तुमच्यावर नाहीं हेंहि आम्ही जाणतों. तथापि काँग्रेसच्या अनुयायांच्या खट्याळपणाला आळा घालण्यासाठीं आम्ही जो त्यांना कोलदांडा घातला आहे तो काढण्याची भाषा बोलणार नसाल आणि त्यांच्या खोडसाळपणाचा पाढा वाचलेला निमूटपणें ऐकून घेऊन, कोलदंडा घालून भली खोड मोडलीत खट्याळ कार्ट्यांची, आणखी वरती चार चापट्या लगावा, असें जर म्हणणार असाल तर भेटीचा राजरस्ता तुम्हांस अगदीं खुला आहे !!

असल्या चढेलपणाच्या हेकट उत्तराला प्रत्युत्तर तें काय द्यावयाचें ? सामोपचाराचा मार्ग खुंटला असें ओळखून पुढील मार्गालाच लागावयाचें. त्याप्रमाणें वर्किंग कमिटीनें पुढील कायदेभंगाची योजना आंखली. तरी पण तिची प्रत्यक्ष बजावणी करण्यापूर्वी व्हाइसरॉयांना त्यांच्या दुराग्रहाच्या परिणामाची जाणीव करून देण्याकरितां पुनश्च गांधींनीं तारेनें कळविलें कीं, सरकारची बाजू ऐकून घेण्याकरितां मी भेट घेऊं इच्छितों; पण ती ऐकतांना वटहुकुमांचा वरवंटा सरकारनें कां उचलला किंवा गोळीबार करून रक्ताचा सडा कां शिंपला याच्या युक्तायुक्ततेची चर्चा न करून कसें चालेल ? फार तर मी एवढें आश्वासन देऊं शकेन कीं, मला सरकारची बाजू पटल्यास काँग्रेसच्या अनुयायांनींच चूक केली असें कबूल करून त्यांना कायदेभंगापासून परावृत्त करण्याची मी शिकस्त करीन. या दुसऱ्या तारेला पूर्वीच्यापेक्षांहि अधिक चीड येणारें उत्तर आलें. त्यात सरकारनें बजावलें आहे कीं, कायदेभंगाच्या धमकीचा खलिता हातांत घेऊन येणाऱ्याला भेटीला मज्जाव आहे; जर तुम्ही कायदेभंगाची चळवळ सुरू कराल तर त्याच्या घोर परिणामाबद्दल तुम्हांला व काँग्रेसला जबाबदार धरण्यांत येईल आणि असली चळवळ हाणून पाडण्यासाठीं जे जे उपाय सरकारला योजावे लागतील ते ते उपाय योजण्यास सरकार केव्हांहि माघार घेणार नाहीं !

गांधीजींना त्यांच्या जबाबदारीची जाणीव सरकारनें करून देण्याची जरूरी आहे असें नाहीं. ते आपली जबाबदारी पूर्ण ओळखतात. त्याचप्रमाणें कायदेभंगाच्या चळवळीचें कंबरडें मोडण्यासाठीं म्हणून कोणताहि घोर उपाय योजतांना सरकारला यत्किंचितहि दिक्कत वाटणार नाहीं हेंहि सगळें जग जाणून आहे. तथापि व्हाइसरॉयांच्या उत्तरांत त्या दोनहि गोष्टींचा मुद्दाम

उल्लेख करण्यांत त्रयस्थांचा गैरसमज करून काँग्रेस-संबंधानें त्यांचें मन कलुषित करावें असाच डाव असावा. कारण सरकारी अत्याचाराविषयीं गवगवा होतांच आम्ही आगाऊच इषारा दिला असतां या काँग्रेसवाल्यांनींच आपण होऊन हें संकट आपल्यावर ओढून घेतलें असें म्हणण्याला सरकारला त्यायोगानें पळवाट राहील अशी सरकारची समजूत दिसते. पण ह्या केवळ भ्रम आहे. जबाबदारीच्या स्वराज्याच्या दुधाच्या नांवानें विलायतेंतील मुत्सद्द्यांनीं देऊं केलेलें पिठाचें पाणी स्वीकारण्याचें गांधींनीं नाकारतांच सरकारची वृत्ति बदलली आणि त्या वेळेपासून काँग्रेसची चळवळ हाणून पाडण्याचें व गांधीचा उपमर्द करण्याचें धोरण सुरू झालें आहे. विलायतेंतून सर महंमद शफी हे परत फिरले त्या वेळीं भारतमंत्र्यांनीं त्यांना निरोप देण्याकरितां आपला खास प्रतिनिधी पाठविला होता आणि स्टेशनचा सगळा प्लॅटफॉर्म हारतुऱ्यांनीं व पुष्पगुच्छांनीं दरवळून टाकला होता; परंतु गांधींजी निघाले त्यावेळीं ब्रिटिश मंत्रिमंडळाकडून असा एकहि प्रतिनिधि पाठविण्यांत आला नाहीं अगर फुलांचा एकहि हार दिसला नाहीं! आणि मि. लान्सबरीखेरीज एकहि प्रमुख ब्रिटिश मुत्सद्दी निरोप देण्याकरितां हजर राहिला नाहीं. त्याच वेळीं इकडे काँग्रेसच्या कार्यकर्त्यांनाहि चिडविण्याची कारवाई सुरू झाली; आणि वर्किंग कमिटीला कायदेभंगाचा पुकारा करण्याखेरीज गत्यंतरच राहूं नये अशी परिस्थिति निर्माण करण्यांत आली. असें असून देखील करारभंग केल्याचें आपलें पाप सरकार काँग्रेसच्या माथीं मारूं पाहत आहे. पण ही हातचलाखी सरकारला पचणें शक्य नाहीं.

संयुक्त प्रांताच्या अधिकाऱ्यांनीं जवाहरलाल व शेरवाणी यांच्यावर झडप घातली तत्पूर्वी काँग्रेसच्या वर्किंग कमिटीनें कायदेभंगाचा ठराव केला नव्हता. त्याचप्रमाणें सुभाषबाबूंच्या नांवाचें पकड वॉरंट कलकत्त्याहून निघालें तत्पूर्वींहि वर्किंग कमिटीचा ठराव बाहेर पडलेला नव्हता. सरहद्दीवरील प्रांताचे पुढारी सरदार अबदुल गफूरखान यांना कां पकडलें याचें कारण सांगतांना तर सरकारची त्रेधातिरपीटच उडाली आहे. बंगाल प्रांतांत अत्याचार घडले एवढें दिखाऊ निमित्त तरी ऑर्डिनन्स काढण्याला होतें, संयुक्त प्रांतांत कायदेभंग चालू नसला तरी खंडबंदीची तरी चळवळ सुरू झाली होती, पण सरहद्द प्रांतांत तसें कांहींच कारण नव्हतें. तर मग सरदार अबदुल गफूर यांना कां पकडलें? याचें कारण सांगतांना सरकार म्हणतें कीं, अबदुल गफूर हे दरबारला हजर राहिले नाहींत आणि ते संपूर्ण स्वराज्य मिळविण्याकरितां चळवळ करूं पाहतात! याच्याखेरीज दुसरी कोणतीहि सबब सांगण्याला सरकारला सांपडूं नये व सुचूं नये यावरून सरकारची बाजू किती लंगडी आहे तें दिसून येतें. लाहोरच्या काँग्रेसनें दोन वर्षांपूर्वींच संपूर्ण स्वातंत्र्याचा ठराव केला आणि तें संपूर्ण स्वातंत्र्य मागण्यासाठींच गांधीजीहि विलायतेला गेले होते. जी मागणी गोलमेज परिषदेपुढें गांधींनीं मांडली तीच संपूर्ण स्वातंत्र्याची मागणी सरदार अबदुल गफूरखान यांनींहि केल्यास त्यांत त्यांचा गुन्हा काय झाला? परंतु कांहीं तरी गुन्हा अंगीं चिकटवावयाचा व कोकराला गट्ट करावयाचें ही वृकनीति चालविणाऱ्या सरकारला सूक्तासूक्त मार्गाचा विधि-निषेध कशास वाटेल?

असो. सरकारची ही उद्दाम वृत्ति पाहून वर्किंग कमिटीनें कायदेभंगाच्या ठरावाची घोषणा केली आहे. आतां त्या ठरावांतील मुख्य तत्त्व कोणतें, त्यांतील बीज काय, त्या बीजाचा विस्तार किती व कसा होऊं शकेल आणि त्या बीजापासून इष्ट असा वृक्ष बनून त्याला सुमधुर फळें येण्याला कोणतें खतपाणी द्यावें आणि त्याचा कोवळा कोंब खुडून टाकला जाऊं नये याकरितां त्याचें संरक्षण कोणकोणापासून कसकसें करावें याचा विचार यथाक्रम करूं.

## महात्माजींची व्हाइसरॉयांस तार

म. गांधींनीं काँग्रेसच्या वर्किंग कमिटीच्या संमतीनें ता. २९ डिसेंबर रोजीं ना. व्हाइसरॉय यांस पुढील आशयाची तार पाठविली.

"मी हिंदुस्थानांत पाऊल ठेवतांच सरहद्द प्रांत, सं. प्रांत व बंगाल या प्रांतांत निरनिराळे दडपशाहीचे ऑर्डिनन्स काढून तेथें पकडापकडी सुरू केल्याचें ऐकून मला फार आश्चर्य वाटलें.

या धोरणावरून तुमचा व आमचा जो मित्रत्वाचा संबंध होता तो संपला असें समजावयाचें काय? अशा स्थितींत मीं कोणतें धोरण स्वीकारावें यासंबंधानें आपल्याशीं विचारविनिमय करण्यासाठीं मी आपणास भेटणें अवश्य असल्यास तसें कळवावें."

### (२) व्हाइसरॉयांकडून उत्तर

या तारेस ना. व्हाइसरॉयांच्या चिटणिसांकडून पुढील आशयाचें उत्तर ता. ३१ रोजीं आलें.

"सरहद्द प्रांत, सं. प्रांत व बंगाल या प्रांतांतील

अत्याचारांना आळा घालण्यासाठीं वटहुकूम काढणें अत्यंत अवश्य होतें. सरहद्द प्रांत व सं. प्रांत यांमध्यें कॉंग्रेसनें करबंदी व इतर चळवळी करून सरकारला कारभार चालवणें अशक्य केलें. अशा चळवळी सरकार कधींहि चालूं देणार नाहीं. सं. प्रांतांत शेतकऱ्यांना योग्य अशा सवलती सरकार देण्यास तयार असतां कॉंग्रेसनें करबंदीची चळवळ सुरू केली. अबदुल गफुरखानानें तर सरहद्द प्रांतांत सरकारला आपला कारभार चालविणें अशक्य करून सोडलें.

कांहीं महिने आपण या देशांत नव्हतां त्यामुळें अर्थात् येथील चळवळीची जबाबदारी तुम्हांवर नाहीं व या चळवळीच्या धोरणाशींहि तुम्ही समरस झालां नसाल. परंतु कॉंग्रेसनें त्या भागांतील स्वयंसेवकांस मान्यता दिली आहे. तेव्हां अशा संस्थांशीं अगर तिच्या चालकांशीं सरकार संबंध ठेवूं इच्छित नाहीं. तुम्ही भेटण्यास येण्यास हरकत नाहीं व तुम्ही आल्यास सरकाराशीं कशा रीतीनें सहकार्य करतां येईल या संबंधीं व्हाइसरॉय आपले विचार सांगतील. परंतु सं. प्रांत, सरहद्द प्रांत, व बंगाल या प्रांतात व्हाइसरॉयांनीं साम्राज्यसरकाराच्या पूर्ण संमतीनें जें धोरण स्वीकारलें आहे व जे उपाय योजले आहेत त्याबद्दल मात्र चर्चा होणार नाहीं. कायदा व सुव्यवस्था, यासाठीं हे वटहुकूम काढले आहेत व त्यांचा हेतु साध्य होईपर्यंत त्या वटहुकुमांच्या बाबतींत फेरविचार होणार नाहीं."

## ( ३ ) महात्माजींची दुसरी तार

वरील आशयाचें व्हाइसरॉयांकडून उत्तर आल्यावर वर्किंग कमिटींत त्याचा पुनः विचार झाला व त्यावर ता. ३१ रोजीं रात्रीं महात्माजींनीं पुढील आशयाची दुसरी तार ना. व्हाइसरॉयांना पाठविली.

"केवळ मित्रत्वाच्या नात्यानें मीं मुलाखत मागितली असतां ती ज्या पद्धतीनें नाकारण्यांत आली ती पध्दति आपल्या उच्च दर्जाला मुळींच साजेशी नाहीं.

सरकारनें जें धोरण स्वीकारलें त्यासंबंधीं सरकारची बाजू समजावी म्हणून मीं मुलाखत मागितली. परंतु माझी विनंति व्हाइसरॉयांनीं फेटाळून मलाच माझ्या मित्रांनीं स्वीकारलेल्या धोरणाबद्दल नापसंती दर्शविण्याबद्दल सांगत आहेत. व अशा मानहानीची मुलाखत मीं पत्करली तरीहि देशाला अत्यंत महत्त्वाच्या प्रश्नाबद्दल चर्चा करण्यास ते तयारहि नाहींत! यावरून वटहुकूम व दडपशाही यांच्या योगानें सनदशीरपणा संपुष्टांतच आला आहे व त्यांना जर जोराचा प्रतिकार झाला नाहीं तर देशाचा तो मोठाच नैतिक अधःपात होय असें मला वाटतें. अशा रीतीनें ज्या राष्ट्रांत म्हणून कांहीं पुरुषार्थ आहे तें राष्ट्र आपली राष्ट्रीय वृत्ति अशी मरूं देणार नाहीं.

तुमच्या तारेंत सरहद्द प्रांतासंबंधीं कांहीं गोष्टी आहेत. परंतु तेवढ्यावरून एखाद्या नियमबाह्य वटहुकुमान्वयें तेथील लोकप्रिय पुढारी पकडावा, लोकांचें वित्त व जीवित अशाश्वत करावें, शांततामय निःशस्त्र लोकांवर गोळ्या झाडाव्या, इत्यादि गोष्टी योग्य ठरत नाहींत. खानसाहेब अबदुल गफूरखान हे पूर्ण स्वातंत्र्यवादी असतील. पण लाहोर कॉंग्रेसनेंच तसा स्पष्ट ठराव केला आहे. मीहि तो लण्डनमध्यें ब्रि. सरकारापुढें मांडला आहे. कॉंग्रेसनें असा ठराव केला असतांहि मला सरकारनें कॉंग्रेसचा प्रतिनिधी म्हणून लंडनला बोलावलें. मी कॉंग्रेसच्या हुकुमानें बांधला गेलों होतों ही गोष्ट सरकारास विदितच आहे. अबदुल गफर खानसाहेब दरबाराला आले नाहींत यामुळें ज्ञातिद्वेष कसा फैलावतो हें गूढ आहे!

सं. प्रांताची कहाणी आजचीच नाहीं. लक्षावधि शेतकरी तेथें भरडले जात आहेत. ज्या सरकारला लोककल्याण साधावयाचें आहे तें सरकार त्यासाठीं कॉंग्रेससारख्या मोठ्या संस्थेचें सहकार्य खुषीनें पत्करील. कारण कॉंग्रेसचें वजन लाकांवर आहे. तेथें कसल्याहि प्रकारची अस्वस्थता उत्पन्न करण्याचा कॉंग्रेसचा हेतु नाहीं हें मी स्पष्ट सांगतों.

बंगालमध्यें खून, अत्याचार होत आहेत व ते नाहींसे करण्याला कॉंग्रेस सरकाराशीं सहकार्यच करील. अत्याचाराचा कॉंग्रेस निषेध करीलच, परंतु सरकारनें ऑर्डिनन्स काढून तेथें चालविलेल्या अत्याचाराचाहि निषेध तिला करावा लागेल. सहकार्य हें दोघांनींहि सारखेपणानें केलें पाहिजे ही गोष्ट मलाहि मान्य आहे. परंतु व्हाइसरॉयांच्या तारेवरून सरकार सहकार्यास तयार नसून फक्त कॉंग्रेसचेंच सहकार्य मागत आहे असें दिसतें.

दोन्ही बाजू समजून घ्यावयास पाहिजेत. मला लोकांची बाजू समजली तशी सरकारचीहि समजावयास पाहिजे. म्हणजे मग मी कॉंग्रेसला माझ्या बुद्धीप्रमाणें सल्ला देईन. सरहद्द प्रांत अगर सं.प्रांत येथें माझ्या सहकाऱ्यांनीं केलेल्या सर्वच कामाला मी पसंती दर्शविणार नाहीं. परंतु मी येथें नसतांना माझ्या गैरहजेरींत तेथें जे प्रकार झाले म्हणून त्याची सर्व हकीकत समजून घेण्यासाठीं तर व्हाइसरॉयांची मीं मुलाखत मागितली!

मीं मित्रत्वाच्या नात्यानें व सद्धेतुपूर्वक पत्र पाठविलें. त्याचें योग्य उत्तर व्हाइसरॉयांनीं पाठविलें नाहीं. अजून वेळ गेली नसेल तर व्हाइसरॉयांनीं पुनः विचार करून मजवर कसल्याहि अटी न घालतां भेट घ्यावी व मीहि खुल्या मनानें दोन्ही बाजू ऐकेन. मी त्या त्या प्रांतांत जाईन व

तेथील अधिकाऱ्यांच्या मदतीनें दोनहि बाजू ऐकेन. व त्या ऐकून लोकांची बाजू चूक आहे व सरकारचें करणें योग्य आहे असा माझा ग्रह झाला तर मी तसें स्पष्ट सांगेन व काँग्रेसलाहि तसा सल्ला देईन.

माझी सरकाराशीं सहकार्य करण्याची इच्छा समर्याद आहे. अहिंसा हें माझें ध्येय आहे. लोकांना राजकाजांत ज्या वेळीं हात नसतो त्या वेळीं सविनय कायदेभंग हा त्यांचा जन्मसिद्ध हक्क असतो व हिंसा व सशस्त्र बंड यांवरहि सविनय कायदेभंग हीच एक जालीम मात्रा आहे.

सरकारचीं अलीकडील कृत्यें अशीं आहेत कीं, यासंबंधानें लोकांनाहि मला कांहीं सांगितलें पाहिजे. म्हणून वर्किंग कमिटीनें सविनय कायदेभंगाचा एक तात्पुरता ठराव करून ठेवला आहे. व्हाइसरॉयांची व माझी मुलाखत होऊन तींत सलोखा झाला तर तो ठराव रद्द होईल.

## वर्किंग कमिटीचे ठराव

ठराव १ ला—ज्यांतील लोकांना कायदेभंगाची चळवळ अनत्याचाराचें व्रत संभाळून चालविली पाहिजे हें समजलें नसेल व कायदेभंगाच्या लढ्यांत सामील झाल्यानंतर आपलें जीवित व मालमत्ता यांची आहुति देण्यापर्यंत ज्यांतील लोकांच्या मनाची तयारी झाली नसेल त्या प्रांतांतील, जिल्ह्यांतील, तहशिलींतील अगर खेड्यांतील लोक कायदेभंगाची चळवळ सुरू करण्यास बांधले गेले नाहींत.

ठराव २ रा—कितीहि चिडविलें तरी अनत्याचाराचें व्रत विचारांत, कृतींत व शब्दांत पाळलेंच पाहिजे. या ठिकाणीं हें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं ही चळवळ जुलूम करणाराचा सूड घेण्याकरितां किंवा त्याला दुखापत करण्याकरितां नसून त्याला आत्मक्लेशानें व आत्मशुद्धीनें ताळ्यावर आणण्याकरितां आहे.

ठराव ३ रा—सरकारी अधिकारी, पोलीस व अराष्ट्रीय अशा लोकांना इजा करण्याच्या हेतूनें त्यांजवर सामाजिक बहिष्कार घालूं नये. कारण तो अनत्याचाराच्या ब्रीदाला सर्वस्वी सोडून आहे.

ठराव ४ था—अनत्याचाराच्या मोहिमा द्रव्य-साहाय्यावांचून चालवावयाच्या असतात हे विसरतां कामा नये. म्हणून चळवळीसाठीं भाडोत्री स्वयंसेवक ठेवूं नयेत. तथापि शक्य तर स्वयंसेवकांच्या निर्वाहाची तजवीज व त्याचप्रमाणें त्यांना शिक्षा झाली किंवा ते मारले गेले तर त्यांच्या कौटुंबिक निर्वाहाची तजवीज करण्यास परवानगी आहे. तथापि कार्यकर्ते लोक पोटाचे हाल झाले तरी झगडा चालवितील अशी वर्किंग कमिटीची अपेक्षा आहे.

ठराव ५ वा—कोणत्याहि परिस्थितींत इंग्लंडाच्या व इतर कोणत्याहि परदेशाच्या कापडावर बहिष्कार घातलाच पाहिजे.

ठराव ६ वा—सर्व काँग्रेसवाल्या स्त्रीपुरुषांनीं हातसुताची व हातमागाची खादी वापरावी व देशी गिरण्यांचें कापड मुळींच वापरूं नये अशी वर्किंग कमिटीची अपेक्षा आहे.

ठराव ७ वा—दारूदुकानावरील व परदेशी कापडाच्या दुकानांवरील पिकेटिंग विशेषतः स्त्रियांनीं जोरानें सुरू करावें. पण त्यांत अत्याचार मुळींच होऊं देतां कामा नये.

ठराव ८ वा—मीठ हें बिगरपरवाना तयार करावें व गोळा करावें.

ठराव ९ वा—मिरवणुकी व समारंभ यांची योजना करतांना जे लोक लाठीचा हल्ला सहन करतील, गोळ्याहि खातील पण आपली जागा सोडणार नाहींत अशा लोकांनींच त्यांत सामील व्हावें.

ठराव १० वा—अनत्याचाराच्या युध्दांत सुद्धां जुलूम करणाराच्या मालावर बहिष्कार घालणें पूर्णपणें कायदेशीर आहे. कारण जुलुमास बळी पडणाराचें, जुलूम करणाऱ्याच्या व्यापाराची अभिवृद्धि करणें किंवा त्याजबरोबर व्यापारी संबंध राखणें, हें कर्तव्यच ठरत नाहीं. म्हणून ब्रिटिश मालावरील बहिष्कार व ब्रिटिश कंपन्या बँका वगैरेंवरील बहिष्कार सुरू करावा व तो जोरानें चालवावा.

ठराव ११ वा—जे कायदे व हुकूम लोकांस उपद्रवकारक असतील ते सविनयपणें शक्य त्या ठिकाणीं मोडावे.

ठराव १२ वा—वटहुकुमाखालीं सुटलेले अन्यायाचे हुकूम सविनयपणें मोडावे.

## व्हाइसरॉयांचा नकार

महात्माजींनीं ता. २ रोजीं भेटीस येण्याबद्दल व्हाइसरॉयास पाठविलेल्या तारेचें उत्तर व्हाइसरॉयांच्या चिटणिसाकडून पुढील आशयाचें आलें.

आपल्या तारेचा विचार व्हाइसरॉयांनीं केला. आपल्या सल्ल्याप्रमाणें वर्किंग कमिटीनें जो ठराव केला आहे त्यांत कायदेभंगाची चळवळ पुनरुज्जीवित करणार असल्याचा उल्लेख आहे व आपल्या अटी मान्य न केल्यास आपण सविनय

कायदेभंग सुरू करणार असें म्हटलें आहे, याबद्दल आम्हांस खेद वाटतो.

मुख्य प्रधानांनीं केलेल्या खुलाशानुसार व सरकारच्या जाहीर आश्वासनाप्रमाणें शक्य तितक्या लवकर सनदशीर सुधारणा चालू करण्याच्या प्रयत्नांत सरकार असतां आपण आपलें जें धोरण जाहीर केलें तें गैर आहे असें वाटतें.

कोणतेंहि सरकार आपली जबाबदारी पार पाडीत असताना एखाद्या राजकीय संस्थेनें बेकायदा मार्गाच्या धमकीची अट घातल्यास ती कोणीहि मानणार नाहीं. हिंदुस्थानसरकारनें गांधी–आयर्विन कराराचा पूर्ण विचार करून व सर्व उपाय संपले तेव्हांच जो मार्ग पत्करला तो मार्ग योग्य कीं अयोग्य याबद्दल तुमच्या निर्णयावर अवलंबून राहणें हिंदुस्थानसरकारला मान्य नाहीं.

कायदेभंगाची धमकी दिल्यानें सरकार तुम्हांस मुलाखतीस बोलावील व अशा मुलाखतीपासून कांहीं निष्पन्न होईल या गोष्टींवर सरकारचा विश्वास नाहीं.

अशा स्थितींत कॉंग्रेसनें मार्ग आंखला आहे त्याचे जे परिणाम होतील त्याबद्दल सरकार तुम्हांला व तुमच्या कॉंग्रेसला जबाबदार धरील आणि ही चळवळ हाणून पाडण्यासाठीं सरकारहि आवश्यक ते उपाय योजील.

# महात्माजींची युद्धघोषणा !

व्हाइसरॉयसाहेबांनीं उत्तर म्हणून पाठविलेल्या तारेसंबंधीं वर्तमानपत्रांच्या प्रतिनिधींना मुंबई येथें ता. ३ रोजीं मुलाखत देतांना महात्मा गांधी म्हणाले, " व्हाइसरॉयांनीं माझ्या तारेला असें उत्तर पाठवावें ही मोठी शोचनीय गोष्ट होय. या उत्तरानें व्हाइसरॉयांनीं मात्र आपल्या पापांच्या घड्यात आणखी एक खडा टाकला ! मुलाखतीविषयीं त्यांनीं ज्या अटी यापूर्वी मला कळविल्या होत्या त्या कोणाहि स्वाभिमानी मनुष्याला पटण्यासारख्या नव्हत्या. मीं सत्याग्रहयुद्धाची पुनर्घोषणा केली म्हणून मला मुलाखत देतां येत नाहीं, हें कारण व्हाइसरॉयांनीं आपल्या तारेंत नमूद केलें आहे तें शुद्ध बनावट व माझ्या मागणीशीं अगदींच विसंगत आहे.मुलाखतीची मागणी धुडकावून लावून व्हाइसरॉयांनीं दिल्ली–करारालाच मुळीं मूठमाती दिली आहे. दिल्लीकरारावर जेव्हां सह्या झाल्या तेव्हांच मुळीं उभय पक्षीं ही गोष्ट माहीत होती कीं, गोलमेज परिषद, राष्ट्राच्या मागणीच्या दृष्टीने अयशस्वी ठरल्यास सविनय कायदेभंगाची चळवळ पुनः सुरू करण्यांत येईल व ही गोष्ट व्हाइसरॉयसाहेबांना माहीत असावयास पाहिजे होती. तसेंच मी इंग्लंडला जाण्यासाठीं हिंदुस्थानाचा किनारा सोडण्यापूर्वी हिंदुस्थानसरकार व मी यांच्यामध्यें जो पत्रव्यवहार झाला त्यांतहि साध्यासुध्या मार्गांनीं लोकांचीं गाऱ्हाणीं मिटविलीं न गेल्यास पुनः कायदेभंगाचें शस्त्र उचलण्याचा हक्क मीं आपल्या हातीं राखून ठेवलाच होता.

सविनय कायदेभंग खरोखरीच एवढा अतिनिंद्य असता तर त्यांनीं त्या तत्त्वांवर माझ्याशीं मुळीं पत्रव्यवहारच केला नसता व शुभ आशीर्वादांचीं फुलें उधळीत त्यांनीं मला इंग्लंडलाहि पाठविलें नसतें. परंतु मला तर आतां असें वाटतें कीं, बदलत्या काळाबरोबर सरकारनें आपल्या धोरणाचीं चाकेंहि निराळ्या दिशेनें फिरविण्याचें ठरविलेलें आहे.

सरकारच्या या आव्हानाला सडेतोडपणें तोंड देण्यास जनतेनें मात्र आतां आपली कंबर कसली पाहिजे. या दिव्यांतून पार पडण्यास कसलाहि त्याग व कितीहि क्लेश सहन करण्यास जनतेनें तयार असलें पाहिजे. मात्र युध्दाची दीक्षा घेतल्यावर लोकांनीं मनानें वाचेनें व कायेनें अनत्याचाराचें व्रत अत्यंत कडकपणें पाळलें पाहिजे. मग शत्रूकडून कितीहि अत्याचार होवोत. तसेंच आपलें भांडण विशिष्ट व्यक्तींशीं नसून त्या व्यक्तींकडून उपयोजिल्या जाणाऱ्या साधनाविरुध्द म्हणजे राज्ययंत्राविरुध्द आहे हीहि गोष्ट लोकांनीं ध्यानांत धरावी.

ही चळवळ चालवितांना स्वतःच्या ठायीं मात्र अढळ श्रद्धा पाहिजे. आत्मक्लेशाचें व्रत इतक्या तीव्रतेनें व एकनिष्ठपणें आचरलें गेलें पाहिजे कीं, शेवटीं त्याचें पर्यवसान राज्यकर्त्यांचें अंतःकरण बदलण्यांत झाले पाहिजे. आत्मक्लेशाचें दिव्य जितकें उज्ज्वल तितका स्वराज्याचा उदय समीप हा सर्वांचा दृढ विश्वास पाहिजे. ही चळवळ चालविण्यांत आपण कोणाचाहि द्वेष करतां कामा नये. शेवटीं इंग्लिश जनतेला माझी एवढीच विनंति आहे कीं, यापुढें त्यांच्या कानावर रात्रंदिवस आदळणाऱ्या एकतर्फी व खोट्या बातम्यांनीं त्यांनीं आपलीं मनें कलुषित करून घेऊं नयेत. ' मिथ्याज्ञानं स्नेहशङ्कि ' म्हणजे खोट्या बातम्यांमुळें मैत्रीवर विरजण पडतें हें वचन त्यांनीं लक्षांत ठेवावें. "



## बाबू सुभाष चंद्र बोस

बंगालचे तरुण पुढारी व नवयुवकांचे कंठमणि दे. भ. बाबू सुभाष चंद्र बोस यांना ते मुंबईहून कलकत्त्यास जात असतां वाटेंत कल्याण स्टेशनावर गेल्या शनिवारीं सायंकाळीं पावणेसहा वाजतां १८१८ च्या ३ ऱ्या कानूप्रमाणें अटक करण्यांत येऊन त्यांना कोठें तरी अज्ञात स्थळीं नेण्यांत आलें! व्हाईसरॉय व म. गांधी यांच्यांत तारा होऊन गल्या रविवारींच उभयपक्षांनीं भारतीय युध्दांतील कौरवपांडवांप्रमाणें आपापलीं रणशिंगें फुंकलीं व सरकारनें डाव धरून सुभाष बाबूसारखा आघाडीचा मोहरा पहिल्याच सलामीला अचानकपणें उचलला ! गेल्या २२ तारखेस पुणें येथील महाराष्ट्र युवक परिषदेच्या कामासाठीं त्यांनीं एकदां जो बंगाल सोडला तो सोडलाच. परमोच्च ध्येय, अतुल स्वार्थत्याग व अढळ कार्यनिष्ठा या बाबूजींच्या दिव्य गुणांच्या प्रतिभेनें नोकरशाहीची दृष्टि अंध होऊन तिनें त्यांना खोड्यांत टाकलें. सुभाषबाबूंना बंगाल्यांत परत जाऊं न देतां त्यांना मध्येंच पकडून बंगाल्यांतील चळवळीचीं व विशेषतः ब्रिटिश मालावरील बहिष्काराच्या चळवळीचीं हाडें आपण पार मोडून काढूं हा नोकरशाहीचा भ्रम असेल तर तिच्यासारखी मतिभ्रष्ट तीच असें म्हटलें पाहिजे. पुढाऱ्यांच्या बंदीवासामुळें राजकारणाचा गाडा न थांबतां उलट तो शतपट गतीनें धांवतच जातो असा हिंदी राजकारणाचा तरी इतिहास सांगतो. म्हणून सुभाषबाबूंच्या अटकेनें हिंदी जनतेला आश्चर्यचकित होण्याचें कांहींच कारण नाहीं. अगदीं आरंभालाच सुभाष बाबू, सरदार वल्लभभाई व महात्मा गांधी यांना अटक झाली. राष्ट्रीय सभेच्या इतर अधिकाऱ्यांनाहि लवकरच अटक होईल. नाहीं असें कोणीं म्हणावें ! तथापि कोणता पुढारी पकडला गेला आणि कोणता पकडला गेला नाहीं याची गणती करण्याची ही वेळ नाहीं. पुढाऱ्यांच्या अभावींहि नोकरशाहीच्या सुलतानशाहीवर कठोर आघात करून आत्मक्लेशाचें भयंकर दिव्य आचरण्यासाठीं हिंदी जनतेनें आतां तावडतोब सुसज्ज झालें पाहिजे. तरच हिंदी जनतेला आपल्या पुढाऱ्याविषयीं वाटत असलेला आदर व स्वध्येयसिद्धीसाठीं लागलेली तळमळ खरी आहे हें सिद्ध होणार आहे.

## सुभाषबाबू व महाराष्ट्र

महाराष्ट्रांतील दौरा आटोपून बंगालचे प्रसिद्ध पुढारी बाबू सुभाष चंद्र बोस हे मुंबईला आल्यावर महाराष्ट्रांतील दौऱ्याबद्दल त्यांनीं पुढील विचार प्रकट केले.

या वेळचा महाराष्ट्रांतील दौरा फारच उत्साहजनक व स्फूर्तिदायी वाटला. विशेषतः भव्य दऱ्याखोऱ्यांचें सृष्टिसौंदर्य पाहून आल्हाद वाटला. सिंहगडाची सफर माझ्या स्मरणांतून कधींहि जाणार नाहीं.

महाराष्ट्रांतील प्रवास हा स्फूर्तीचा शाश्वत झरा आहे. महाराष्ट्रांत प्रवास करतांना पूर्वीचा इतिहास डोळ्यांपुढें स्पष्ट उभा राहतो. इतिहासाच्या अभ्यास फलदायी होण्यास ज्या प्रकारच्या मनःप्रवृत्तीची आवश्यकता असते त्या प्रकारची मनःप्रवृत्ति अशा वातावरणांत उत्पन्न होते.

महाराष्ट्र प्रांतिक युवक परिषदेंत सर्वत्र उत्साह दिसत होता. यापूर्वीच्या पुण्याच्या भेटीशीं तुलना करतां या वेळीं महाराष्ट्रीय तरुणांमध्यें एक नवचैतन्य उत्पन्न झालेलें मला आढळलें. मी ज्या ज्या ठिकाणीं गेलों तेथील स्वागतांत हार्दिकता व आपलेपणा यांजबरोबर मला उत्कटताहि आढळली. या बाबतींत सोलापूरचा नामनिर्देश मुद्दाम करणें आवश्यक आहे. अशा प्रकारच्या वातावरणांत आणखीं काळ घालवितां आला असता तर बरें झालें असतें.



महात्मा गांधी



सरदार वल्लभभाई पटेल

म. गांधींच्या दुसऱ्या तारेसहि व्हाइसरॉयांकडून बेदरकारपणाचा नकार आल्यानंतर आतां सर्वत्र धरपकड चालू होणार असें निश्चित वाटतच होतें. तथापि हें धरपकडीचें सत्र केव्हां चालू होणार याची वार्ता सरकारनें अत्यंत गुप्त राखली होती. तरी असलें कृष्णकृत्य रात्रीच्या काळोखांतच व्हावयाचें हेंहि ठरलेलेंच आहे. त्याप्रमाणें गेल्या रविवारीं मध्यरात्र उलटल्यावर पहाटे ३ वाजतां मुंबईचे पोलिस कमिशनर मि. विल्सन आणि खा. ब. पेटिगारा हे आपल्या काळ्या डगलेवाल्या हस्तकांसह मणिभुवनाशीं आले आणि मि. विल्सन यांनीं गांधीजींना उठवून त्यांस वारंट दाखविलें. त्यांत १८२७ च्या २५ व्या रेग्युलेशन अन्वयें त्यांस अटक करण्याचा हुकूम होता.

हुकूम दाखवून गांधीजींना तयारी करण्यास अर्ध्या तासाचा अवधि देण्यांत आला. गांधींना कांहीं तयारी करावयाची नव्हतीच. त्यांचे बरोबरचें मामुली सामान खालीं मोटारींत नेऊन ठेवतांच त्यांनीं आपली तयारी असल्याचें खुणेनें दर्शविलें. कारण त्यांचें सोमवारचें मौन सुरू झालें होतें. श्रीमती सौ. कस्तुरीबाई गांधी यानीं त्यांचा अश्रुपूर्ण नयनांनीं निरोप घेतल्यानंतर ते खालीं आले. पण तत्पूर्वी त्यांनीं राष्ट्राला संदेश म्हणून अध्यक्ष वल्लभभाई यांना देण्याकरितां एकच वाक्य लिहून दिलें. तें असें—

" भारतवासियांनो, सत्य व अहिंसा या मार्गापासून केव्हांहि तिळभरहि ढळूं नका आणि आपल्या भारत-मातेच्या सेवेकरितां व स्वराज्याकरितां आपलें सर्वस्व अर्पण करण्यास तयार व्हा. "

गांधीजींना इकडे अटक होत असतां त्याचवेळीं तिकडे राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष सरदार वल्लभभाई पटेल यांनाहि सँढर्स्टरोडवरील त्यांच्या घरीं अटक करण्यांत आली.

गांधीजी व वल्लभभाई या उभयतांनाहि अटक करून मोटारींतून पुण्यानजिक येरवड्याच्या तुरुंगांत नेऊन ठेवण्यांत आलें. त्यांच्या मोटारीबरोबर पोलिस सुपरिंटेंडंट मि. हर्स्ट आणि सब इन्स्पेक्टर मि. कामत हे होते.

# लष्करी खर्च कसा कमी होईल ?

( एका लष्करी तज्ज्ञाकडून )

### प्रास्ताविक

दिवाणबहादुर रंगाचारीअर यांच्या अध्यक्षतेखालीं सरकारनें असेंब्लींतील कांहीं सभासदांची लष्करी खर्च काटकसर कमिटी नेमिली होती. पण ह्या कमिटीला ब्रिटिश सोल्जर्स व ऑफिसर्स आणि ब्रिटिश कारकून व इतर ब्रिटिश नोकर यांच्या पगारांची व भत्त्याची माहिती पुरविण्याचें सरकारनें साफ नाकारलें. तेव्हां काटकसर कमिटीचा नाइलाज होऊन त्यांनीं मोघम सुमारें पावणेतीन कोटींचे काट सुचविले, व जेथें जेथें ब्रिटिश अमलदार व कारकून आहेत त्या ठिकाणीं हिंदी अमलदार, कारकून व शिपायांची भरती केल्यास बराच खर्च कमी करतां येईल असा मोघम अभिप्राय दिला.

तसेंच हिंदुस्थानाचे स्टेट सेक्रेटरी—सर सॅम्युअल होअर यांनीं राऊंड टेबलाच्या कांहीं प्रतिनिधींना बोलावून लष्करी खर्चासंबंधीं वाटाघाट केली व त्या वेळीं त्यांनीं व मिलिटरी सेक्रेटरी यांनीं स्वच्छ सांगितलें कीं, ब्रिटिश फौज हिंदुस्थानांत किती राहावी व त्यांचा खर्च काय असावा वगैरे बाबतींचें धोरण ब्रिटिश सरकारच ठरवील व ब्रिटिश सोल्जर हिंदी अम्मलदारांचे हुकूम मानण्यास कधीं तयार होणार नाहीं. असेंहि त्यांनीं सांगितलें.

या दोनही गोष्टींवरून ब्रिटिश फौजेचा पांढरा हत्ती पोसणें हें हिंदुस्थानच्या भावी स्वराज्याला किती घातुक होईल हें दिसून येईल. स्वराज्य मिळूनहि लष्करावर ताबा नसल्यास त्याला स्वराज्य हें नांव देतां येणार नाहीं. तेव्हां गोलमेज परिषदेंत लष्करावर ताबा मिळविण्याची अट जरूर घालावयास पाहिजे.

हलवायाच्या घरावर तुळशीपत्र या न्यायानें हिंदुस्थानच्या तिजोरीवर ब्रिटिश फौजेचा कसा व किती भार टाकण्यांत आलेला आहे व तो किती अनवश्यक आहे हें पुढील विवेचनावरून दिसून येईल.

ब्रिटिश फौजेच्या जागीं हिंदी फौज व हिंदी अम्मलदारांची भरती केल्यास व त्यांच्या पगाराचें व भत्त्याचें स्केल हिंदीच ठेविल्यास अठ्ठावीसपासून बत्तीस कोटींपर्यंत लष्करी खर्चाची बचत करतां येईल, व ही रक्कम राष्ट्रपोषणाच्या इतर खात्यांकडे खेंचतां येईल. उदाहरणार्थ शिक्षण, आरोग्य, शेतकी वगैरे खात्यांकडे जास्त लक्ष पुरवितां येईल.

### ब्रिटिश व हिंदी फौजेंतील पंक्तिप्रपंच

ब्रिटिश फौज व हिंदी फौज यांतील तफावत व पंक्तिप्रपंच—

ब्रिटिश फौजेमध्यें एकंदर अदमासें साठ हजार ( कमिशन्ड ऑफिसर्स, नॉनकमिशण्ड ऑफिसर्स व सैनिक मिळून ) लोक आहेत. यांच्या जागीं इतकीच हिंदी फौज हिंदी अम्मलदारांच्या हाताखालीं ठेविल्यास वर सांगितलेली बचत करतां येईल.

(१) प्रथम ब्रिटिश सैनिकांचा पगार व हिंदी सैनिकांचा पगार यांत बरीच तफावत आहे. ब्रिटिश सैनिकास हिंदी सैनिकाच्या चौपटपासून पांचपटपर्यंत पगार मिळतो.

(२) नुसत्या पगारवाढीनेंच ब्रिटिश सैनिकांची तृप्ति होत नाहीं. त्यांस निरनिराळ्या तऱ्हेचे भत्ते पगाराशिवाय मिळतात. उदाहरणार्थ पुढें दिलेल्या पत्रकांतील क्रमांक नं. २, ७, ८, १२, १३, वगैरे पहा.

सपत्नीक ब्रिटिश सैनिकास खालील भत्ते मिळतात. वैवाहिक भत्ता ( मॅरेज अलावन्स ) दरमहा रुपये तीस व फर्नीचर अलावन्स दरमहा रु.सवा तीन. चाइल्ड अलावन्स दरमुलास दहा रुपये महिना, असे चार मुलांपर्यंत चाळीस रुपये दरमहा. याशिवाय बाळंतपणाकरितां दरवेळेस निराळा भत्ता मिळतोच. प्रत्येक ब्रिटिश सैनिकास न्हावी—धोबीभत्ता दरमहा तीन रुपये मिळतो. हा भत्ता अलीकडे कपड्यालत्त्याच्या भत्त्यामध्यें सामील केला गेला आहे. याशिवाय सैनिकांच्या धंदेशिक्षणाकरितां (Vocational Training) एकंदर सात लाख रुपये खर्च करण्यांत येतात. कांहीं भत्ते ब्रिटिश व तसेच हिंदी सैनिकांनाहि मिळतात.पण त्यांतील पंक्तीप्रपंच ध्यानांत ठेवण्यासारखा आहे उदाहरणार्थ—मेसिंग अलावन्स म्हणून ब्रिटिश सैनिकास दरमहा सहा रुपये साडेतेरा आणे दिले जातात, पण गरीब हिंदी सैनिकास फक्त दहा आणे दिले जातात.म्हणजे हा भत्ता हिंदी सैनिकाच्या भत्त्यापेक्षां जवळ जवळ अकरापट जास्त आहे. ब्रिटिश सैनिकास हिंदी सैनिकाइतकाच पगार व भत्ता चालू ठेविल्यास अठ्ठावीस ते बत्तीस कोटींची बचत करतां येईल. ती येणेंप्रमाणें:—

## बचत अशी होईल

(१) मेसिंग अलावन्सः—हा भत्ता हिंदी सैनिकाबरोबर म्हणजे १० आणेच ठेविल्यास किंवा ब्रिटिश सैनिकाच्या जागीं हिंदी सैनिकाची भरती केल्यास साडेबेचाळीस लाखांची बचत होईल. हा भत्ता जेवणाशिवाय दिला जातो. हिंदी पलटणींत याला मसाल्याचा भत्ता म्हणतात.

(२) हेअरकटिंग अलावन्स (न्हावी–धोबी) हिंदी सैनिकाच्या पगारांतून दरमहा पांच आणे याबद्दल काढले जातात, पण ब्रिटिश सैनिकांस दरमहा तीन रुपये जास्त दिले जातात. तेव्हां या बाबतींतहि कटोत्री व भत्ता मिळून सवाबावीस लाख रु. बचत होईल.

(३) किट क्लोदिंग—हा भत्ता ब्रिटिश व हिन्दी सैनिकांस दिला जातो आणि यांतहि पंक्तिप्रपंच आहे व. ब्रिटिश सैनिकांस ५८१५ तर हिन्दी सैनिकांस रु. २८१५ दरमहा मिळतात. यांत दरशिपायामागें तीन रुपये बचत करतां येईल. एकंदर बचत साडेवीस लाख रु. करतां येईल. हा भत्ता सरकारी वर्दीशिवाय दिला जातो.

(४) इक्विप्मेण्ट अलावन्स—हा भत्ता दोनही प्रकारच्या सैनिकांस दिला जातो. ब्रिटिश सैनिकास रु. ५८१५ व हिंदी सैनिकास रु.२८१५. दोघांनाहि एकाच प्रकारचें इक्विपमेण्ट दिलें जात असतांना भत्त्यामध्यें ही तफावत कां असावी ? तेव्हां ह्या बाबींतहि साडेवीस लक्षांची बचत करतां येईल.

(५) एज्युकेशनल प्रोफिशन्सी (शिक्षणांतील प्रगति)—हा भत्ता फक्त ब्रिटिश सैनिकांस शिक्षणासाठीं दिला जातो. ब्रिटिश सैनिकांत साक्षर. तेचें प्रमाण शेंकडा ८५ हून जास्त आहे. आणि हिंदी सैनिकांत तेंच प्रमाण शेंकडा १४ आहे. तरी ब्रिटिश सैनिकाच्या शिक्षणप्रगतीकडे जास्त लक्ष दिलें जातें आणि हिंदी सैनिकाच्या शिक्षणाची हेळसांड केली जाते. आधुनिक पद्धतीच्या लष्करामध्यें शिक्षण अत्यंत महत्त्वाचें आहे. आधुनिक शास्त्रीय गोष्टींची समजूत होण्यास शिपायास शिक्षणाची अत्यंत जरूरी असते. शिपाई जितका शिकलेला असेल तितका जास्त कार्यक्षम होऊं शकतो. हा भत्ता जो केवळ ब्रिटिश सैनिकांस दिला जातो तो दरमहा तीन रुपयेप्रमाणें आहे. यांतहि साडेवीस लक्षांची बचत करतां येईल.

(६) मिलिटरी प्रोफीशन्सी (Military Proficiency) हाहि रु. ३ दरमहाप्रमाणें भत्ता फक्त ब्रिटिश सैनिकास दिला जातो. याचा उद्देश सैनिकाची कार्यक्षमता वाढविण्याचा असतो. बिचाऱ्या हिंदी सैनिकास अशा तऱ्हेचें कसलेंहि उत्तेजन मिळत नाहीं. हा भत्ता कमी केल्यास साडेवीस लाख रुपये वांचतील.

(७) सपत्नीक ब्रिटिश सैनिकांस दरमहा रु. ३८४ प्रमाणें फर्नीचर अलावन्स दिला जातो याचा उल्लेख वर आलाच आहे. हिंदी सैनिकांस हा भत्ता मिळत नाहीं. त्या बिचाऱ्यास फर्नीचरचा उपयोग कसा करावा हें कदाचित माहीत नसेल! अथवा दुसरें हेंहि एक कारण असूं शकेल कीं, खुर्च्या—टेबलांनीं सुशोभित करण्याइतकी त्यांची राहाण्याची जागा नसते. अजमासें शेंकडा चार ब्रिटिश सैनिक सपत्नीक असतात अशी कल्पना केल्यास या बाबींत तीन लाख रुपयांची बचत करतां येईल.

## विलक्षण पक्षपात

धंदे-शिक्षण—ब्रिटिश सैनिकांस कोणत्या तरी धंद्याचें शिक्षण दिलें जातें. याकरितां महू, खडकी, नसीराबाद व इंग्लंडांत हाउन्स्लो व चिसेलडन या ठिकाणीं धंदेशिक्षणाच्या शाळा आहेत व याप्रीत्यर्थ सहा लाख रुपये खर्च होतात. बिचाऱ्या हिंदी सैनिकास शिपाईगिरींतच पेन्शन घ्यावी लागते व तुटपुंज्या पेन्शनीवरच आयुष्य कंठावें लागते नोकरी करीत असतांना ब्रिटिश सैनिकाप्रमाणें त्याच्या शिक्षणांत अथवा कार्यक्षमतेंत प्रगति होण्यास वाव नाहीं.

(९) धर्मोपदेश—साठ हजार ब्रिटिश सैनिकांकरितां अजमासें साडेसात लक्ष रुपये या कामीं खर्च केले जातात. पाद्री भटांची दक्षिणा व प्रार्थना-गृहें यांवर हा खर्च होतो आणि यांच्या तिप्पट हिंदी सैनिकांच्या धर्मोपदेशाप्रीत्यर्थ फक्त एक लाख खर्च केला जातो ! अर्थात् ब्रिटिश सैनिकांना रजा दिल्यास हे साडेसात लाख रुपये वांचतील.

(१०) साठ हजार ब्रिटिश सैनिकांच्या अभावीं तितके हिंदी सैनिक वाढविल्यास नुसत्या पगारवांटणींत चार कोटी बेचाळीस लक्ष रुपये वांचतील.

(११) तसेंच ब्रिटिश नॉन–कमिशण्ड ऑफिसर्स यांच्याऐवजीं हिंदी नॉन–कमिशण्ड ऑफिसर्स नेमिले तर एकवीस लाख रुपये भत्त्याशिवाय वांचतील.

(१२) मागें उल्लेखिलेल्या सपत्नीक ब्रिटिश सैनिकांच्या मॅरेज अलावन्सची रक्कम जवळ जवळ आठ लाखांची होते.

(१३) चाइल्ड अलावन्स—हाहि फक्त ब्रिटिश सैनिकास दिला जातो. याची रक्कम सहापासून आठ लाखापर्यंत होते.

(१४) ब्रिटिश सैनिकांच्या मुलांच्या शिक्षणाचाहि खर्च हिंदुस्थानाच्या तिजोरीवर लादला जातो. या मुलांकरितां पुस्तकें, उपकरणीं, मास्तर, मास्तरिणी,

खेळांची साधनें, व्यायामशाळा, शाळेच्या इमारती, यांमीलयर्थ लाखों रुपयांचा खर्च होतो. या बाबतींत आणखी एक गमतीची गोष्ट म्हणजे या मुलांचें शिक्षक व शिक्षकिणी ब्रिटिश पाहिजेत असा निर्बंध आहे व त्यांनाहि तसेच पगार व भत्ते मिळत असतात.

### सपत्नीक–भत्ता

( १५ ) ब्रिटिश अंमलदारांचे मॅरेज अलावन्स. यांत निरनिराळे वर्ग आहेत. लेफ्टेनण्ट कर्नल यांस रु. ७५, मेजर ९० रु., कॅप्टन १०० रु., लेफ्टेनन्ट रु. ६५ प्रमाणें दरमहा, या अंमलदारांस भत्ता मिळतो. हिंदी अंमलदारांस मात्र त्यांचा पगार पुष्कळ पटींनीं कमी असतांहि हा भत्ता मिळत नाहीं. या बाबींत चौपन्न लाख रुपयांचा चुराडा होतो.

( १६ ) सेपरेशन अलावन्स—ब्रिटिश अंमलदारांच्या बायका विलायतेस गेल्यावर विरहताप कमी व्हावा म्हणून या अम्मलदारांस हा भत्ता दिला जातो. यांतहि पुष्कळ वर्ग आहेत. लेफ्टेनण्ट कर्नल रु. १२९, मेजर रु. ९०, कॅप्टन रु. ६० व लेफ्टेनण्ट रु. ४० याप्रमाणें दरमहा भत्ता दिला जातो.

(१७) सपत्नीक ब्रिटिश अंमलदारांना सरकारी जागेच्याऐवजीं लॉजिंग अलावन्स मिळत असतो. त्याची वर्गवारी येणेंप्रमाणें—कर्नल रु. १५०, मेजर रु. ११०, कॅप्टन रु. ९०, लेफ्टेनंट रु. ५७ प्रतिमहिना.

(१९) इंडियन आर्मी अलावन्सः—सरासरीनें हा भत्ता रु. १२० ते रु. १४० दरमहा पडतो. कर्नलला रु. २०० दरमहा, मेजर २०० दरमहा, कॅप्टन १५० रु., लेफ्टेनंट १००, सेकंड लेफ्टेनंट ७५ रु. हा भत्ता कमी केल्यास ५० लाख रुपये वांचतील.

### इतर भत्ते

( २० ) एन्जीनियर्स पे अलावन्स—कर्नल १६० रु., मेजर ११५ रु., कॅप्टन ७० रु., लेफ्टेनण्ट ४५. हा भत्ता एन्जीनियर्स व पलटणीच्या ब्रिटिश अंमलदारांनाच मिळतो. या बाबींत साडेतीन लक्षांची बचत करतां येईल.

(२१) आर. ए. एम. सी. ( R.A.M.C. ) ची अलावन्स— फौजेच्या डॉक्टर लोकांना हा भत्ता दिला जातो. हाहि त्यांच्या हुद्याप्रमाणें कमीजास्ती असतो. कर्नल रु. ३००, मेजर रु. २५०, २००, कॅप्टन १५०, १२५ लेफ्टेनन्ट रु. १२५, १००. डॉक्टरांची संख्या ध्यानांत घेतां यांतहि अजमासें तीन लक्षांची बचत करतां येईल.

( २२ ) कमाण्ड आणि चार्ज अलावन्स प्रत्येक युनिटच्या फक्त पांच ब्रिटिश अंमलदारांना हा भत्ता मिळत असतो. कमाण्डण्टला ३०० रु. दरमहा, सेकण्ड इन कमाण्ड रु. ५०, ॲड्ज्यूटण्ट व क्वार्टर–मास्टर यांना अनुक्रमें रु. १०० व रु. ७५ व युनिट ट्रान्स्पोर्ट ऑफिसर यांना रु. ४० या बाबींतहि सोळा लाख रुपये बांचवितां येतील.

पूर्वी कमाण्डटचा भत्ता रु. ६०० असे. कंपनी कमाण्डण्टला रु. २५० असत. ॲडज्यूटण्टला रु. ४०० व क्वार्टरमास्तरला रु. ३०० असे असत.

### ब्रिटिश व हिंदी अधिकारी यांच्यांत भेदभाव

( २३ ) आतां ब्रिटिश युनिटचे ब्रिटिश अंमलदार व इंडियन युनिटचे ब्रिटिश अंमलदार यांच्या पगारांतील फरक पाहा—

| | ब्रिटिश युनिट ऑफिसर | इंडियन युनिट ऑफिसर |
|---|---|---|
| लेफ्टेनन्ट कर्नल | १७५० | १९५० |
| मेजर | १२३५ | १४३५ |
| कॅप्टन | ( ८२५ ते ९५५ ) | ( ९२५ ते ११०५ ) |
| फर्स्ट लेफ्टेनन्ट | ( ५४५ ते ६२० ) | ( ६२० ते ७२० ) |
| सेकन्ड लेफ्टेनन्ट | ४९० | ५६५ |

केवळ हिंदी सैनिकांचे अंमलदार होण्याबद्दल हा विशिष्ट पगार दिला जातो हें यावरून स्पष्ट होईल. या दोहोंमधील ही तफावत काढल्यास म्हणजे दोन्ही युनिटचा पगार सारखा ठेवल्यास पन्नास लाख रुपये वांचवितां येतील.

(२४) ट्रान्स्पोर्टेशन, कान्झरव्हन्सी, हॉट वेदर, एस्टाब्लिशमेन्ट आणि इतर आनुषंगिक खर्च यांत तीन कोटि पंचवीस लाख रुपये गडप होतात. यांपैकीं दोन कोटि पंचवीस लक्ष हिंदुस्थानांत खर्च होतात, व एक कोटि रुपये इंग्लंडांत खर्च होतात. हिंदुस्थानांत खर्च होणाऱ्या दोन कोटि पंचवीस लक्षांत एक कोटि दहा लक्ष रुपये वांचवितां येण्यासारखे आहेत.

### हिंदी तिजोरीवर असह्य बोजा

(२५) ब्रिटिश फौज हिंदुस्थानांत ठेवण्याबद्दल तेरा कोटि बावीस लक्ष रुपये इंग्लंडला दिले जातात. यांपैकीं दर ब्रिटिश सैनिकामागें दरसाल २५ पौंड म्हणजे सुमारें दोन कोटि रुपये इंग्लंडास दिले जातात. तसेंच ब्रिटिश सैनिकास हिंदी सैनिकाच्या चौपट-पांचपट पगार मिळून भत्याच्या रूपानें आणखी किती तरी पट पगार वाढतो. ब्रिटिश सैनिकांस उत्तम डॉक्टरी मदत, राहण्यास हवाशीर, आरोग्यदायक जागा आणि सर्व तऱ्हेच्या मुबलक सोई असतात. इतकें असून या सैनिकांचें भाडें म्हणून किंवा मेन्टेनन्स म्हणून वर सांगितल्याप्रमाणें

दोन कोटि रुपये घेतले जातातच. याशिवाय बेकारीचा विमा (अन्-एंप्लॉयमेन्ट इन्शुरन्स ) आरोग्याचा विमा (हेल्थ-इन्शुरन्स ) या-करितां अनुक्रमें सुमारें वीस लाख व सात लाख हिंदुस्थानास द्यावे लागतात. अशाच आणखीहि किती तरी बाबी आहेत. या सर्व मिळून ब्रिटिश सैनिकाप्रीत्यर्थ तेरा कोटि बावीस लाख रुपये रोख पाठवावे लागतात. हिंदी सैनिकांप्रमाणेंच ब्रिटिश सैनिकांचा पगार व भत्ता ठरल्यास व हिंदी अंमलदाराच्या हाताखालीं काम करण्यास ते तयार झाल्यास हे तेरा कोटि बावीस लाख रुपये पाठ-विण्याचें कारण नाहीं.

पत्रकांतील नंबर २६ पासून ३१ पावेतों ज्या बाबी।पुढें दिलेल्या आहेत त्यांचा समावेश या तेरा कोटि बावीस लाखांत होतो. आणि ह्याच बाबींवरें हिंदुस्थानांत एकवीस कोटि सदतीस लाख रुपये खर्च होतो.

### खर्चाच्या बाबी

हिंदुस्थानांतील स्टँडिंग आर्मीपार्ट (अ) बजेट छत्तीस कोटि छप्पन लाखांचें आहे त्यांत या खालीं दिलेल्या मुख्य सात बाबींचा समावेश होतो.

(अ) लढवय्यांचा पगार व भत्ता
(ब) अॅड्मिनिस्ट्रेटिव्ह सर्व्हिसेस
(क) मॅनुफॅक्चरिंग एंस्टाब्लिशमेन्ट
(ड) आर्मी हेडक्वार्टर स्टाफ आणि कमाण्डस्
(ई) स्टोर्स आणि इक्विपमेन्ट
(फ) स्पेशल सर्व्हिसेस
(ग) ट्रान्स्पोर्टेशन आणि कॉन्झरवन्सी.

नं. (अ) च्या बाबतींत वर सांगितलेल्या एक ते बावीस क्रमांकापर्यंत विवेचन केल्याप्रमाणें बचत करतां येईल.

नं. (ब) च्या बाबतींत दोन कोटि बत्तीस लक्षांची बचत करतां येईल.

नं. (क) यांच्यांत साठ लाखांची बचत करतां येईल.

नं. (ड) मध्यें ३५ लाखांची बचत करतां येईल.

नं. (ई) यांच्यांत एक कोटि पंचवीस लक्षांची बचत करतां येईल.

(पत्रकांतील नंबर २६ ते २९ पाहा)

### हें असह्य जोखड आतां नको

(३०) मिलिटरी इंजीनियरिंग सर्व्हिस यांत चार कोटि एकसष्ट लक्ष रुपये खर्च होतात. यांत दोन कोटि दहा लक्ष रुपये वांचवितां येतील.

(३१) ब्रिटिश कारकुनांची संख्या फौजेमध्यें जवळ जवळ सहा हजार आहे यांच्याऐवजीं हिंदी कारकून घेतल्यास अजमासें एक कोटी पन्नास लक्षांची बचत करतां येईल.

येणेंप्रमाणें नं. १ ते ३१ पावेतों ज्या बाबी वर सांगितल्या आहेत त्यांत अठ्ठावीस ते बत्तीस कोटीं-पर्यंत रक्कम वांचवतां येईल.

ब्रिटिश सैनिकाइतकाच हिंदी सैनिक कार्यक्षम आहे, हें गेल्या महायुध्दांत जगाच्या निदर्शनास आलें आहे. सरहद्दींचें संरक्षण करण्यांत जी फौज ठेवलेली असते, त्यांत हिंदी सैनिकांचा भरणा बराच असतो हेंहि दाखवितां येईल. तसेंच सरहद्दीवर आजपर्यंत जितक्या मोहिमा झाल्या आहेत त्यांतहि हिंदी सैनिकांनींच मोठा भाग उचललेला आहे, हेंहि दाखवितां येईल. तेव्हां हिंदुस्थानच्या संरक्षणास अथवा अंतस्थ बंडाळी मोडण्यास किंवा परकीयांचे हल्ले परतविण्यास ब्रिटिश फौजेची जरूरी आहे असें नाहीं. हिंदी स्वराज्य सरकारच्या शर्तीवर ब्रिटिश अंमलदार राहण्यांस तयार नसले तर त्यांच्या जागीं लायक हिंदी अम्मलदाराची भरती सहज करतां येईल. ही संख्या अपुरी पडत असल्यास यंग इंडि-यांत पं. जवाहरलाल नेहरू यांनीं लिहिल्याप्रमाणें फ्रेंच, अमेरिकन, जर्मन किंवा जपानीज अंमल-दारांची मदत घेतां येईल. पण हें परकीय सैन्याचें जोखड झुगारून दिलेंच पाहिजे, त्याशिवाय हिंदु-स्थानाचा तरणोपाय नाहीं.

### बचत करण्याच्या बाबी व रकमा

| | कोटि | लक्ष |
|---|---|---|
| १ मेसिंग अलावन्स | | ४२॥ |
| २ हेअर कटिंग | | २०॥ |
| ३ किट क्लोदिंग | | २०॥ |
| ४ एक्विपमेंट | | २५ |
| ५ एज्युकेशन प्रॉफीसिएन्सी | | २०॥ |
| ६ मिलिटरी | | २०॥ |
| ७ फर्नीचर ऑल सोल्जर्स | | २ |
| ८ व्होकेशनल ट्रेनिंग कॉस्ट | | ६ |
| ९ रिलिजस सर्व्हिस | | ४॥ |
| १० बी. टी. सोल्सर्स (रिप्लेसिंग) | ४ | ४२ |
| ११ बी. टी.एन्. सी.ओज(रिप्लेसिंग) | | २१ |
| १२ मॅरीड सोल्जर्स (ऑल ) | | ८ |
| १३ सोल्जर्स चिल्ड्रेन | | ६ |
| १४ ” स्कूल्स | | |
| १५ ऑफिसर्स मॅरेज अलावन्स | | |
| १६ ” सेपरेशन अलावन्स | | |
| १७ ” लॉजिंग अलावन्स | | |
| १८ ” ” ” डबल | | |
| १९ इण्डियन आर्मी अलावन्स | | ५० |
| २० एन्जीनियर्स पे | | ३॥ |
| २१ आर. ए. एम्. सी. | | २॥ |
| २२ कमाण्ड आणि चार्ज अलावन्स | | १६ |

| | | |
|---|---|---|
| २३ डिफरन्स इन ब्रि. युनिट ॲण्ड इंडियन (ऑफिसर्स) युनिटस पे | | ५० |
| २४ ट्रान्स्पोर्टेशन ओव्हरसीज | १ | १० |
| २५ पेमेंट्स मेड इन् इंग्लंड | १३ | २२ |
| २६ ॲडमिनिस्ट्रेशन चार्जेस | २ | ३२ |
| २७ मेनु, एस्टॅ. फॅक्टरी | | ६० |
| २८ कमांड्स(ए.एच.क्यू.डिस्ट ब्रिगेड) | | ३५ |
| २९ स्टोर्स ॲण्ड एक्विपमेंट | १ | २५ |
| ३० एम. एन्जीनियरिंग सर्व्हिस | २ | १० |
| ३१ बी.ओ.आर.क्लार्क्स,स्टोरकीपर | १ | १५ |
| | २९ | ७० |

याशिवाय एक्स्ट्राज म्हणून बरीच मोठी रक्कम असते ती मिळून २८ ते ३२ कोटि रुपये.

# महाराष्ट्र प्रांतिक परिषद

### अधिवेशन आठवें

महाराष्ट्र प्रां. परिषदेचें आठवें अधिवेशन ता. २ व ३ रोजीं पनवेल मुक्कामीं वन्हाडचे पुढारी **लोकनायक बापूजी अणे** यांच्या अध्यक्षतेखालीं मोठ्या उत्साहानें व थाटानें पार पडलें. परिषदेसाठीं पनवेल पासून सुमारें १॥ मैलावर मुंबईच्या रस्त्यावरील श्री. आत्माराम महादेव ऊर्फ भाऊसाहेब आठवणे यांच्या प्रशस्त बागेंत मंडप उभारला होता.

परिषदेसाठीं ठिकठिकाणच्या जिल्ह्यांतून बरेच प्रतिनिधी आले होते. शनिवारीं सकाळीं १०॥ वाजतां अध्यक्ष मुंबईहून येऊन दाखल होतांच स्वागताध्यक्ष श्री. आठवणे यांच्यासमवेत आलेल्या प्रतिनिधींनीं त्यांचें स्वागत केलें. हार वगैरे घालण्यांत आल्यावर अध्यक्षांची मिरवणूक त्यांच्या निवासस्थानापर्यंत निघाली होती. नंतर प्रांतिक परिषदेच्या चालकांनीं व सभासदांनीं श्री. माधवरावजी यांच्याशीं विचारविनिमय केला. भोजनोत्तर पुनः विषयनियामक कमिटीची सभा बोलावण्यांत आली होती. तेथें चार वाजेपर्यंत विचारविनिमय झाल्यावर सर्व प्रतिनिधी मंडपाकडे वळले. पांच वाजतां अध्यक्ष मंडपांत दाखल होतांच हिंद-सेवादलानें व स्वयंसेवकांनीं प्रवेशद्वारांत त्यांना सलामी दिली, आणि मंडपांत शिरल्यावर सर्वांनीं उत्थापन देऊन आपलें प्रेम व्यक्त केलें. मंडपांत प्रेक्षकांची व प्रतिनिधींची अतिशय गर्दी झाली होती. गांवांतील सन्माननीय नागरिक व महिलाहि उपस्थित होत्या. व्यासपीठावर बरीच मंडळी होती. त्यांत श्री. न. चिं. केळकर, रामभाऊ मंडलीक, रामभाऊ सोमण, दादासाहेब करंदीकर, आचार्य ढवण, सॉलिसिटर बी. जी. खेर, अण्णासाहेब भोपटकर, पांडुअण्णा शिराळकर, हरिभाऊ तुळपुळे, सौ. लिलावती बाई मुनशी, दा. वि. गोखले, देवगिरीकर, कानडेशास्त्री, सुळे, तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री, डॉ. सावरकर, न. वि. गाडगीळ, युवकसंघाचे खाडिलकर, फडके, जोशी, डॉ. अंत्रोळीकर, उमरावतीचे डॉ. शिवाजीराव पटवर्धन, आमदार ल. र. गोखले, रघुनाथराव बखले व स्वागत कमिटींतील मंडळी प्रामुख्यानें दिसत होती.

प्रथम स्वागतपर पद्यें झाल्यावर श्री. भाऊसाहेब आटवणे यांनीं जमलेल्या प्रतिनिधींचें आभार मानून पुढील आशयाचें भाषण वाचून दाखविलें.

### स्वागताध्यक्ष आटवणे यांचें भाषण

"पनवेल हें एक खेडेगांवच आहे. तथापि तें ज्या जिल्ह्यांत आहे त्या जिल्ह्याचें ऐतिहासिक महत्त्व फार आहे. रायगड किल्ला, पेशव्यांचें श्रीवर्धन गांव व आंग्र्यांची राजधानी कुलाबा हीं स्थळें याच जिल्ह्यांत आहेत. गेल्या कायदेभंगाच्या चळवळींत या जिल्ह्यानें महत्त्वाची कामगिरी बजावली आहे. जंगल सत्याग्रहाची चळवळ प्रथम अलिबाग तालुक्यांत सुरू झाली व नंतर ती पनवेल, महाड, पेण या तालुक्यांत फैलावली. या चळवळींत अनेकांनीं तुरुंगवास पत्करले. चिरनेर प्रकरण तिच्यांतूनच उद्भवलें. गेल्या वर्षी जसा सरकार व प्रजा यांचे दरम्यान लढा लागला तसलाच लढा यापुढें सुरू होण्याचीं चिन्हें दिसत आहेत. तेव्हां त्या लढ्यांत महाराष्ट्राचें धोरण काय असावें त्याचाहि विचार आपणास कर्तव्य आहे. धान्याचे भाव फार उतरल्यामुळें सरकारधारा भरण्याचाहि प्रश्न बिकट होऊन बसला आहे. या सर्व बाबतींत योग्य दिशा दाखविणारे अध्यक्ष लोकनायक बापूजी अणे हे आपणास लाभले आहेत, ही सुदैवाची गोष्ट होय."

वरील आशयाचें भाषण करून आटवणे यांनीं अध्यक्षांच्या जागीं श्री. बापूजी अणे यांची निवड व्हावी अशा आशयाची सूचना केली. सदर सूचनेस श्री. बाबासाहेब फडके यांनीं अनुमोदन देऊन अध्यक्षांची सर्वांना समयोचित शब्दांत ओळख करून दिली. नंतर श्री. न. चिं. केळकर यांनींहि थोडेसें भाषण करून सदर सूचनेस दुजोरा

दिला. ठाण्यातर्फे श्री. दत्तात्रय महादेव दामले सोलापूरतर्फे डॉ. अंत्रोळीकर, सातार्‍यातर्फे रामभाऊ सोमण वगैरेंनीं आपापल्या जिल्ह्यांतर्फे मान्यता दिल्यावर वरील सर्व जिल्ह्यांतर्फे अध्यक्षांस हार घालण्यांत आले. आचार्य ढवण, युवकसंघ पुणें, राष्ट्रीय साधुसंघ यांच्यातर्फेंहि बापूजींस हार घालण्यांत येऊन त्यांचा सन्मान करण्यांत आला. परिषदेचे उत्साही सेक्रेटरी व चिरनेर खटल्यांतील श्री. त्र्यंबक नारायण बेडेकर वकील यांनीं यशाश्चिंतनपर आलेले संदेश वाचून दाखविले. नंतर अध्यक्षांचें पुढील आशयाचें भाषण झालें.

## अध्यक्षांचें भाषण

"आजच्या परिषदेच्या अध्यक्षस्थानीं माझी आपण योजना केली त्याबद्दल मी आपला आभारी आहें. परिषदेच्या कामांत व्यत्यय येऊं नये म्हणून मी ही गोष्ट मान्य केली. महाराष्ट्रांतील लोकांना वर्‍हाडनें कांहीं तरी मार्ग दाखवावा अशी परंपरा नाहीं. महाराष्ट्रच मार्गदर्शक आहे. पुण्याच्या राजकारणाच्या गंगेंतील उदक घेऊन वर्‍हाडाकडे जावें असा पूर्वींचा शिरस्ता आहे. वर्‍हाड आद्यमहाराष्ट्र म्हणून फक्त स्मृतिगतच आहे.

आजची परिस्थिति फारच कठिण असून ती चिंताजनक आहे. पूर्वींची परंपरा लक्षांत घेऊन महाराष्ट्रानें पुढें काय करावयाचें हें ओळखलें पाहिजे. समतोलपणानें विचार करण्याचें सामर्थ्य महाराष्ट्रांत आहे. तेव्हां या परिषदेनें तो विचार कसा केला आहे, याकडे सर्व हिंदुस्थानचे डोळे लागले आहेत. गेल्या ५०० वर्षांचा इतिहास आपल्याला काय सूचित करीत आहे? वाईट परिस्थिति आली असतांना तिजमधून मार्ग काढून इच्छित कार्यभाग साधण्याचें कौशल्य व धमक महाराष्ट्रांत आहे. शिवरायाच्या वेळीं हीच कामगिरी महाराष्ट्रानें केली. हल्लींच्या काळीं महाराष्ट्रच ती परंपरा कायम राखील असा मला भरंवसा आहे.

इंग्रजांच्या अमदानींत महाराष्ट्रानेंच लोकांच्या मतांत परिवर्तन घडवून आणण्याची मुख्य कामगिरी केली. न्यायमूर्ति माधवरावजी रानड्यांसारख्या अलौकिक व लोकोत्तर बुद्धीच्या पुरुषानें आपल्या बुध्दीच्या प्रवाहानें परिवर्तन कसें करतां येईल याची दिशा दाखविली. बंगालमध्यें उसळलेल्या स्वातंत्र्यप्रिय चळवळीची लाट सर्व महाराष्ट्रभर पसरविण्याची उत्कृष्ट कामगिरी लो० टिळकांनींच केली. आलेल्या परिस्थितीचा गंभीर रीतीनें विचार करण्याची परंपरा महाराष्ट्राची आहे. असें असतांना कांहीं लोक महाराष्ट्र गेल्या चळवळींत पडला नाहीं म्हणून आक्षेप घेतात. तो अर्थातच निर्मूल आहे.

परिषदेच्या चालकांच्या विनंतीवरून मी महात्माजींची मुलाखत घेऊन कांहीं संदेश असेल तर सांगा अशी विनंति केली. पण त्यांनीं तो न देतां उलट मलाच असें सांगितलें कीं 'You are my mouth-piece' यामुळें जी जबाबदारी मी टाळीत होतों तीच माझ्यावर अचानक येऊन पडली आहे. तेव्हां महात्माजींची विचारसरणी आपल्यास पटवून द्यावयाची झाल्यास मला माझे विचार विसरलेच पाहिजेत. त्याशिवाय त्यांचे विचार प्रगट करतां येणार नाहींत.

विद्यमान परिस्थितीचें पर्यालोचन करावयाचें झाल्यास आपल्यास गतकालाचें थोडेसें स्मरण करणें भाग आहे. लाहोरच्या काँग्रेसनें स्वातंत्र्याचा ठराव कसा पास केला याचा इतिहास आहे. इंग्रजांशीं संबंध ठेवून कांहीं तरी कार्य करून दाखविण्याच्या उद्देशानें नेहरू रिपोर्टाची योजना केली गेली. पण देशांतील तरुणांनीं या कामीं विरोध दर्शविला. या विरोधास बाजूस सारूनहि नेहरू रिपोर्ट काँग्रेसनें खात्रीनें मंजूर करून घेतला असता. पण त्यामुळें तरुणांचा उत्साहभंग झाला असता. तो होऊं नये म्हणून नेहरू-रिपोर्ट लाहोरास मागें घेण्यांत आला. तरुणांच्या स्वार्थत्यागाशिवाय देशाचें पाऊल पुढें पडणार नाहीं हें ध्यानांत घेऊन एक वर्षाच्या मुदतीचा कालबंध घालून १९२९ च्या लाहोर येथील अधिवेशनांत स्वातंत्र्याच्या ध्येयाचा राष्ट्रीय सभेनें पुकारा केला. एका तर्‍हेनें काँग्रेसला असें करण्यास त्या तरुणांनींच भाग पाडलें असें म्हणणें युक्त होईल. त्या ठरावाकडे पाहिल्यास भारतांतील अखिल तरुणांवर कोणती जबाबदारी येऊन पडली आहे, याचा त्यांनीं अत्यंत खोल रीतीनें विचार करणें जरूर आहे. भावी काल हा तरुणांचा आहे. सर्व देशाची मदार त्यांचेवर आहे. यामुळें राजकारणाच्या आखाड्यांत उडी घेण्यासाठीं सर्व तरुणांनीं एकदम सज्ज झालें पाहिजे, व किती धडाडीनें उडी मारतां येते हेंहि लोकांच्या निदर्शनास आणून देण्याची जबाबदारी त्यांच्यावर आहे ही गोष्ट त्यांनीं विसरतां कामा नये. पण ती उडी मारतांना अनत्याचाराचें बंधन त्यांनीं कडक रीतीनें पाळलें पाहिजे.

आजचें हें युध्द विवक्षित प्रकारचें आहे. तें अभूतपूर्व असून अद्‌भुतहि आहे. युध्द म्हणजे कांहीं तरी भयकर असलें पाहिजे असा आपला समज असतो. पण या युध्दाचें बळ आजमितीस केवळ सोशिकपणा हेंच होय. सहनशीलतेच्या तत्त्वज्ञानावर आपल्याला एका अतिपराक्रमी अशा शत्रूशीं लढावयाचें आहे. हा मार्ग कठीण तर खराच, पण चालू

परिस्थितींत त्या मार्गाशिवाय अन्य उपायच नाहीं. एका प्रबल राष्ट्राविरुद्ध हा लढा असल्यानें आपल्याला दुसरेंहि एक शस्त्र निर्माण करावयाचें आहे.आमच्या-च द्रव्यसाहाय्यानें आपला प्रतिस्पर्धी पुष्ट होत आहे व कायद्याची भीति दाखवून तो आपल्यास लागणारें द्रव्य उकळीत आहे. तेव्हां हें कायद्याचें भयच नाहींसें करण्यासाठीं जनतेंत जागृति केली पाहिजे. तेव्हां पहिला मार्ग भीति नाहींशी करणें हा होय.एक पैच्या दंडापासून तों देहान्त शासना-पर्यंत कोणताहि प्रसंग आल्यास जनतेनें तो सोसण्या-साठीं चंग बांधून तयार राहिलें पाहिजे.

गेल्या खेपेस हा सामना देण्यासाठीं राष्ट्रीय सभेच्या वर्किंग कमिटीनें एक लाखाचा बळी दिला. आतां दहा लाखांचा संकल्प जाहीर केला आहे. या संकल्पाकडे पाहिलें असतांना महाराष्ट्रानें आपल्यास या कामीं यज्ञाचा किती भाग उचलला येणें शक्य आहे याचा नीट विचार केला पाहिजे. महाराष्ट्रानें केलेली मागील कामगिरी लक्षांत घेतां तो योग्य वाटा उचलण्यासाठीं अहमहमिकेनें पुढें येईल अशी खात्री आहे.

या खेपेचा लढा शक्य त्या उपायानें टाळावा अशी महात्माजींची वृत्ति असतांना तिला सरकारनें बेदरकारपणें एकदम जबरदस्त धक्का दिला. समेट चालू असतांनाच हा धक्का देण्याचा नोकरशाहीने खोडसाळपणा केला. व त्याच अनुरोधानें प्रांता–प्रांताचे अधिकारी वागत होते असा माझा त्यांच्यावर जाहीर आरोप आहे. सरकार या खेपेस कोणतें धोरण स्वीकारील हें कांहीं सांगतां येत नाहीं. तेव्हां वर्किंग कमिटीनें काय ठरविलें हें अल्पावधींत देशाच्या कोना-कोपऱ्यांत कळविण्याची कामगिरी आतां आपल्या-वर येऊन पडली आहे.

महाराष्ट्र प्रां. कॉं. क. चे अध्यक्ष सेनापति बापट यांनीं उत्तम कामगिरी केली याबद्दल आपण त्यांचें अभिनंदन करणें जरूर आहे. त्यांची बुद्धिमत्ता खोल होती. असा आदर्शभूत पुरुष महाराष्ट्रापुढें असतांना महाराष्ट्रास निराळा असा संदेश काय द्यावयाचा ! अनत्याचारी तत्त्वावर श्रध्दा ठेवून महाराष्ट्र आपलें कर्तव्य बजावण्यास पुढें येईल अशी माझी खात्री आहे.'' वरील आशयाचें उत्साहवर्धक दीड तास भाषण झाल्यावर पुढील ठराव झाले.

## पास झालेले ठराव

**ठराव १ ला**—लाहोरच्या राष्ट्रीय सभेंत पास झालेल्या ठरावाप्रमाणें पूर्ण स्वातंत्र्याच्या लढ्याला प्रारंभ झाल्यापासून प्रत्यक्ष युद्ध सुरू असतांना, त्याच-प्रमाणें गांधी–आयर्विन समेट झाल्यानंतर इंग्लंडमध्यें गोलमेज परिषदेंत व बाहेर हिंद-राष्ट्रासाठीं व राष्ट्राच्या वतीनें कार्य करीत असतांना स्वातंत्र्याची मागणी ज्या निर्भयतेनें व निर्भीडतेनें परंतु अनुपम सौजन्यानें महात्मा गांधींनीं ब्रिटिश सरकार, ब्रिटिश प्रजाजन व जगांतील इतर राष्ट्रें यांपुढें मांडली त्यामुळें कॉंग्रेसची व हिंदराष्ट्राची इभ्रत सर्व जगामध्यें निस्संशय वाढली असून जगापुढें राजकार-णाचा उत्कृष्ट नमुना ठेवला गेला आहे. त्याबद्दल ही परिषद आपली कृतज्ञता व्यक्त करीत आहे.

**ठराव २ रा**—स्वातंत्र्याच्या युध्दाला पुनः आरंभ करण्याचीं कॉंग्रेसच्या वर्किंग कमिटीनें जीं कारणें दिलीं आहेत तीं हा लढा पुनः सुरू करण्यास पुरेशीं आहेत असें या परिषदेचें मत असून वर्किंग कमिटीनें ठरविल्या-प्रमाणें स्वातंत्र्याच्या युध्दाला महाराष्ट्रीय जनतेनें आरंभ करावा, व वर्किंग कमिटीच्या ठरावांत शिफा-रस केलेल्या कायदेभंगाच्या बाबींपैकीं कांहीं किंवा अन्य बाबींत महाराष्ट्राची परिस्थिति लक्षांत घेऊन कायदेभंग करण्याला आरंभ करावा. व कॉंग्रेस वर्किंग कमिटीच्या धोरणानुसार संघटना करण्यास प्रांतिक कमिटीनें तावडतोब लागावें अशी या परिषदेची शिफारस आहे.

पहिल्या ठरावावर श्री. दास्ताने, सौ. मुनशी, न. वि. गाडगीळ, सौ.पार्वतीबाई पटवर्धन उमरावती, रघुनाथराव खाडिलकर, के. एन. फडके, वा.वि.साठे यांचीं भाषणें झालीं, दुसरा ठराव श्री. द्वा. वि. गोखले यांनीं मांडला. त्यावर श्री.गोकुळभाई,गोविंद-राव देशपांडे, डॉ. अंत्रोळीकर, त्रिंबकराव देवगिरी-कर, हरिहरराव देशपांडे व श्री. जाजू, साधु सीता-राम वगैरे अनेक वक्त्यांचीं भाषणें झालीं.

## दिवस दुसरा

सकाळीं ९ वाजतां परिषदेस पुनः प्रारंभ होऊन से०बापटांच्या अभिनंदनाचा ठराव श्री.वा.वि. साठे यांनीं पुढें मांडला. त्यास श्री. दादासाहेब करंदीकर व अ. वि. काळे यांनीं अनुमोदन दिल्यावर तो पास झाला. नंतर अध्यक्षांनीं पुढील आशयाचे दोन ठराव मांडले. ते सर्वानुमतें पास झाले. (१) दे. भ. सुभाषचंद्र बोस यांना चालू लढ्यांतील पहिला बळी म्हणून जो मान मिळाला त्याबद्दल ही परिषद त्यांचें अभिनंदन करीत आहे. (२) महात्मा गांधी यांनीं देशांतील अस्वस्थता नष्ट होण्यासाठीं विचारविनिमय करून उपाययोजना करण्यासाठीं मुलाखत मिळावी म्हणून जी तार व्हा. लॉर्ड विलिंग्डन यांना केली होती, तिला सरकारनें बेदरकारपणें उत्तर दिल्यामुळें देशावर लढाईचें संकट ओढवलें आहे. सबब या युध्दा-बद्दलची सर्व जबाबदारी व त्यांतून उत्पन्न होणारे

वातावरण याची सर्व जबाबदारी हिंदुस्थान-सरकार व व्हाइसरॉय आणि त्यांच्या कृतीचें समर्थन करणारें ब्रिटिश सरकार यांजवरच आहे.

वरील ठरावानंतर अध्यक्षांनीं समारोपादाखल विशेष भाषण न करतां महात्माजींची मुलाखत प्रत्येकांनें वाचावी अशी शिफारस केली. नंतर सॉलिसिटर बी. जी. खेर, कुंटे व तांबवेकर यांनीं समयोचित भाषणें करून अध्यक्षांचे व प्रतिनिधींचे आभार मानले, व राष्ट्रगीत होऊन परिषदेचें काम खलास झाल्याचें अध्यक्षांनीं जाहीर केलें.

# महाराष्ट्र शारीरिक शिक्षण परिषद

## अधिवेशन चौथें

पूर्वी जाहीर झाल्याप्रमाणें सदर परिषदेचें अधिवेशन गेल्या ता. ३० डिसेंबर रोजीं पुणें डेक्कन जिमखान्याचे मैदानावर सुरू झालें.

नियोजित अध्यक्ष ॲडव्होकेट मुनशी हे दाखल होतांच स्वागताध्यक्ष प्रो. शंकरराव भागवत यांनीं त्यांना उत्थापन दिलें. नंतर रीतसर अध्यक्षांची निवडणूक झाल्यावर चिटणिसांनीं प्रो. माणिकराव, कुवलयानंद, श्रीमंत औंधकर, सोलापूरचे रामभाऊ राजवाडे, पी. डी. खेरे, दा. वि. गोखले वगैरे लोकांचे अभीष्टपर संदेश वाचून दाखविले.

स्वागताध्यक्ष श्री. भागवत यांनीं आपल्या भाषणांत पुढील मुद्दे मांडले:--

१—संस्कृति अथवा मनाचा थोरपणा वाढविण्यासाठीं जरूर असणारीं कामें—

धार्मिक व नैतिक शिक्षण, भजनपूजन, कीर्तन, सार्वजनिक उत्सव व समारंभ, सांघिक खेळ व सामने.

२—आरोग्य अथवा शरीर निरोगी, जोमदार व सुदृढ राखण्यासाठीं जरूर असलेलीं कामें.

शुद्ध हवा, पाणी व पौष्टिक अन्न यांचा भरपूर पुरवठा होण्यासाठीं जरूर असणारीं कामें;

व्यायामाचीं साधनें; शरीर स्वच्छ ठेवण्याचीं साधनें, योग्य वेळीं पुरेशी विश्रांति मिळावी म्हणून मनःस्वास्थ्य राखण्याचीं कामें;

शरीरांत रोगजंतूंचा प्रवेश होऊं नये म्हणून करावयाचीं कामें;

रोग झाल्यास त्यापासून लवकर सुटका होण्यासाठीं करावयाचे उपाय.

३—कार्यक्षमता अथवा प्रत्येक व्यक्ति आपापल्या धंद्यांत कर्तबगार होण्यासाठीं जरूर असणारीं कामें.

४—संपत्ति अथवा चरितार्थास लागणाऱ्या जिनसांचा पुरवठा व्हावा म्हणून जरूर असणारा पैसा मिळविण्यासाठीं करावयाचीं कामें:—

कच्चा अगर पक्का माल तयार करण्याचे उद्योगधंदे, तयार झालेला माल बाजारांत नेऊन किफायतशीर भावानें विक्री व्हावी म्हणून करावयाचीं कामें, जीवनक्रमास लागणाऱ्या जिनसा किफायतशीर भावानें मिळण्यासाठीं जरूर असणारीं कामें—

अशा रीतीनें शिल्लकी राहिलेली संपत्ति जतन करण्यासाठीं जरूर असणारीं कामें—

या अनेक कामांमध्यें "कवाईत, स्वयंसेवक दल" या बाबीचा समावेश होतो.

समाजस्वास्थ्यासाठीं जरूर असणाऱ्या या नाना प्रकारच्या अनेक कामांपैकीं, आपल्या परिषदेच्या कक्षेंत येणारीं कामें पाहूं गेल्यास तीं येणेंप्रमाणें—

(१)—व्यक्तीच्या मनाचा दिलदारपणा वाढविण्यासाठीं व शिस्तीनें वागण्याचें वळण लागण्यासाठीं सांघिक खेळ व सामने.

(२)—शरीर जोमदार व ताकतवान राखण्यासाठीं व्यायामाचे निरनिराळे प्रकार.

(३)—जिंदगीच्या संरक्षणासाठीं कवायत व हत्यारांचा उपयोग.

हें सर्व सांगण्याचा हेतु आपल्या परिषदेचें कार्य किती कमी आहे हें दाखविण्याचा नसून आपल्याला काय साधावयाचें आहे याची स्पष्ट कल्पना आपणास व्हावी हा आहे. आपल्याला कोणतें ध्येय गांठावयाचें आहे हे एकदां मुक्रर झालें, म्हणजे आपल्या हातून कोणत्याहि बाबतींत अतिरेक होणार नाहीं व आपलें काम समाजस्वास्थ्यासाठीं आवश्यक असणाऱ्या इतर कामांना मारक न होतां, त्यांस पोषक असेंच होत जाईल यांत शंका नाहीं. त्याचप्रमाणें एकंदर व्यवहारामध्यें आपलें स्थान कोणतें आहे हें एकदां बरोबर कळलें म्हणजे एखाद्या वेळीं फाजिल अभिनिवेशामुळें दुसऱ्यास कोपरखळ्या देण्याचा जो मोह पडतो तोहि नाहींसा होण्यास मदत होईल.

## अध्यक्ष ॲ. मुनशी यांचें भाषण

बंधुभगिनींनो, व्यायाम विषयामध्यें महाराष्ट्राचें स्थान सर्व देशांत अग्रणी आहे. शिवाजीमहाराजांच्या योद्धयांच्या परंपरेपासून चालत आलेलें शिक्षण आज देशांतील हजारों संस्थांत दिलें जात आहे, आणि या शिक्षणाचें पुणें हें तर केंद्र आहे. येथें

प्रचलित असलेली पद्धति आज सर्व देशांमध्यें शक्ति व सामर्थ्य यांचें संघटन करीत आहे, ही आपणांस मोठी अभिमानाची गोष्ट आहे. सर्व महाराष्ट्रांतील व्यायामासंबंधीं चळवळीचें या संमेलनाचे द्वारां एकीकरण होत आहे, हें पाहून डेक्कन जिमखाना वगैरें सारख्या संस्थांस मोठा संतोष होत असला पाहिजे.

आजची परिस्थिति वैयक्तिक कार्य करण्याची किंवा एकाकी संस्था चालविण्याची राहिली नाहीं. दिवसेंदिवस जगांतील सर्व भागांचा एकमेकांशीं अधिकाधिक निकट संबंध येत चालला आहे आणि सर्व प्रवृत्ति प्रचंड संघटनात्मक बनत चालल्या आहेत. आपलें मुख्य ध्येय हें आहे कीं, व्यायामशाळांच्या परस्पर सहकार्यामुळें व्यक्ती आणि समुदाय या दोहोंचीहि सुधारणा व्हावी, दोहोंमध्येंहि व्यवस्था व शील यांची वाढ व्हावी आणि त्यांचे द्वारा निरनिराळ्या जाति, देश यांस शारीरिक बल व योग्यता हीं प्राप्त व्हावींत आणि यापेक्षांहि उच्च उद्देश हा कीं, शिक्षण घेणाऱ्या सर्व युवकांचें संघटन व्हावें, त्यांच्यामध्यें सहकारवृत्ति आणि सेवाभाव हीं वाढावींत आणि त्यामुळें राष्ट्राचें संघटन शीघ्र व सुलभ व्हावें. स्वतंत्र देशांमध्यें शिस्त आणि सहकार्याची भावना लष्करी कवायतीमुळें आपोआप उत्पन्न होते. परंतु या अभागी देशाचें राज्यतंत्र आपल्या हातीं नसल्यामुळें हा प्रयोग आपण करूं शकत नाहीं. तथापि आमचें सूत्र हें आहे कीं, " आत्मनैव आत्मानं उद्धरेत् " जें कांहीं राजसत्तेमुळें होऊं शकतें त्यापेक्षांहि मोठें कार्य लोकांचा उत्साह आणि व्यवस्थाशक्ति यांमुळें होतें. सर्व हिंदुस्थानांत जितक्या व्यायामशाळा आहेत, त्या सर्व एका तंत्रांत येऊन सामान्य पध्दति व नियम यांचा स्वीकार करतील, या सर्व संस्थांमध्यें एकसहा स्फूर्ति उत्पन्न होईल, तर सर्व भारतीय अहिंसेच्या युवक सैन्याचे सैनिक बनतील, आणि लष्करी शिक्षणामुळें जी शिस्त व सहकार्याची भावना उत्पन्न होते ती व्यायामद्वारा प्राप्त करून घेतील.

### केंद्रसंस्थेची आवश्यकता

अखिल भारतीय व्यायामशाळांस एका सूत्रांत गोंवणाऱ्या एका केंद्रसंस्थेची फार आवश्यकता आहे याबद्दल संशय नाहीं. अशा संस्थेचा मुख्य उद्देश व्यायामशाळा चालविण्याचा असणार नाहीं. परन्तु निरनिराळ्या संस्थांचें एकीकरण करून व्यायामपद्धतींचें शास्त्रीय दृष्टीनें परीक्षण करणें हा या सभेचा एक महत्त्वाचा उद्देश होऊं शकतो. आपल्या देशी पद्धतींचें शास्त्रीय दृष्टीनें संशोधन केलें पाहिजे. व्यायामाची किंमत केवळ स्नायुबलाच्या वृद्धीवरून करतां येणार नाहीं. तर व्यायामाचा प्रभाव शरीराच्या सर्व अवयवांवर व त्यांच्या गतिस्थितीवर घडतो. कांहीं प्रकारच्या कसरतीमुळें रुधिराचें अभिसरण वाढतें व कांहींमध्यें शिरांवर ताण बसतो. कांहींमुळे शरीराच्या अंतर्भागांतील मळ निघून जातो; तर कांहींमुळें त्वचेची शुद्धि होते. कांहींमुळें फुप्फुसांची कार्यक्षमता वाढते व कांहीं प्रकारच्या व्यायामामुळें आंतडीं व पोटांतील इतर अवयवांस चलन मिळतें. या सर्व प्रश्नांच्या अभ्यासाची फार आवश्यकता आहे. देशी व्यायामाबरोबरच देशी खेळांस उत्तेजन देऊन त्यांचें संघटन करणेंहि आवश्यक आहे. परंतु याहूनहि व्यायामाची मानसिक, नैतिक व सामाजिक उपयुक्तता निश्चित करणें अधिक आवश्यक आहे, या उद्देशाकरितां जें अध्ययन, प्रयोग व संशोधन जरूर आहे, तें अशी केंद्रसंस्थाच पूर्णपणें करूं शकेल.

# तत्त्वभ्रष्ट सरकार सुष्ट व तत्त्वनिष्ठ वर्किंग कमिटी दुष्ट!!

॥ अतो हास्यतरं लोके किंचिदन्यन्न विद्यते ॥ यत्र दुर्जनमित्याह दुर्जनः सज्जनं स्वयम् ॥

—म. भा. १–७४–९६.

स्वतः दुर्जनानें सज्जनांना दुर्जन ठरवावें यापेक्षां जगांत अधिक हास्यास्पद काय असूं शकेल ? पण असल्यां नुसत्या हास्यास्पदच नव्हत तर शोकास्पदहि गोष्टी सध्यां जगांत घडोघडीं घडत आहेत ! तत्त्वनिष्ठ वर्किंग कमिटीनें स्वतःच्या सत्य व अहिंसा या तत्त्वांना बाध येऊं नये म्हणून आपल्या ध्येयसिद्धीचीहि विशेष पर्वा न बाळगतां अत्यंत कसोशीनें कांहीं ठराव केले आणि स्वराज्यनिष्ठ जनतेला आत्मक्लेश भोगण्यास आज्ञा केली. असली ही तत्त्वनिष्ठ वर्किंग कमिटी सरकारनें बेकायदेशीर ठरविली ! आणि त्या वर्किंग कमिटीनें आज्ञापिलेली कायदेभंगाची चळवळ चिरडून टाकण्यासाठीं म्हणून स्वतः वटहुकमांची चौकडी जाहीर केली. एका हातांत वर्किंग कमिटीचे ते ठराव आणि दुसऱ्या हातांत सरकारचे हे सोटेशाही वटहुकूम घेऊन जर कोणी त्रयस्थ

न्यायाधीश तुलना करील तर सुष्ट कोण, दुष्ट कोण, तत्त्वनिष्ठ कोण व तत्त्वभ्रष्ट कोण आणि कोण सनदशीर व कोण बेसनदशीर याचा निर्णय तो सहज देऊं शकेल. परंतु आज सरकारच्या हातांत सत्ता असल्यानें व 'बळी तो कान पिळी' हाच न्याय जगांत चालू असल्यानें सरकारच्या या सोटेशाही हुकमाची बजावणी करणारे मदांध अधिकारी सज्जनपणा मिरवीत आहेत आणि वर्किंग कमिटीच्या अध्यक्षांना, सभासदांना व त्या वर्किंग कमिटीच्या ठरावांची बजावणी करण्यासाठीं म्हणून जे जे कोणी स्वराज्यनिष्ठ स्वयंसेवक पुढें येतील त्या सर्वांना गुन्हेगार ठरवून त्यांना कारागृहांत डांबून ठेवीत आहेत, किंवा प्रसंगविशेषीं गर्दी, मारामारी केल्याचा त्यांजवर दोषारोप करून लाठ्यांनीं त्यांचीं टाळकीं फोडीत आहेत अथवा गोळ्या झाडून त्यांना यमसदनासहि धाडीत आहेत! असला हा देखावा पाहिला म्हणजे सकृद्दर्शनीं

" वयं तत्त्वान्वेषान्मधुकर हतास्त्वं खलु कृती " असे उद्‌गार बाहेर पडतात. अर्थातच वर्किंग कमिटीची ही तत्त्वनिष्ठा कार्यसाधक आहे का कार्यघातक आहे आणि ती जर कार्यसाधक असेल तर तिच्या कार्यसिध्दीचें बीज कोणत्या धोरणांत सांठविलें आहे याची तात्त्विक चिकित्सा करणें अवश्य आहे.

ही तात्त्विक चिकित्सा करतांना संपूर्ण स्वराज्य प्राप्त करून घेणें हें राष्ट्राचें ध्येय आहे आणि त्या ध्येयसिद्धीसाठींच ही चळवळ चालू आहे हें दृष्टीआड होऊं देतां कामा नये. कारण अनत्याचार हेंच ध्येय आहे व तें ध्येय प्रस्थापित होईपर्यंत स्वराज्यप्राप्ति लांबणीवर पडली तरी चालेल असें मानणारा एक पक्ष राष्ट्रांत आहे. तथापि राष्ट्रांतील बहुजनसमाज हा स्वराज्यप्राप्तीसाठीं अत्यंत उतावळा झाला आहे आणि म्हणूनच स्वराज्यरूपी फळ जर कोणीं त्याच्या हातावर अचानक ठेवलें तर हें फळ कसें आणलें, तें सरळ मार्गानें प्राप्त झालें का आड मार्गानें प्राप्त झालें, याची तो चिकित्सा करीत बसणार नाहीं आणि जरी त्यास असें कळलें कीं, हें फळ आडमार्गानें प्राप्त झालें आहे तरी तेवढ्यासाठीं कांहीं तो हातांत आलेलें फळ गटारांत फेकून देणार नाहीं. तथापि सद्यःस्थितींत अनत्याचाराचें धोरणच इष्ट, शक्य व श्रेयस्कर असल्यानें तें व्रत सर्वतोपरी पाळलें जावें असा जो वर्किंग कमिटीनें ठराव केला आहे तो योग्य असून आपल्या ध्येयसिध्दीला तो बाधक न होतां साधकच होणार आहे. अर्थातच या चळवळींत पडणाऱ्या प्रत्येक व्यक्तीनें स्वराज्यप्राप्त्यर्थ तपश्चर्या म्हणून अनत्याचाराच्या मर्यादा अत्यंत कसोशीनें पाळाव्या.

या मर्यादांची व्याप्ति कोठवर पोंचते याचें दिग्दर्शन वर्किंग कमिटीनें नं. ३ च्या ठरावांत केलें आहे. त्या ठरावानें वर्किंग कमिटीनें सरकारी अधिकारी व पोलिस वगैरेंवरील सामाजिक बहिष्कारहि वर्ज्य ठरविला आहे. बार्डोलीच्या चळवळींत हा सामाजिक बहिष्कार अत्यंत परिणामकारक झाला होता. असें असतां वर्किंग कमिटीनें यावेळीं सामाजिक बहिष्काराच्या साधनावरच कडकडीत बहिष्कार घातला आहे हें वाचकांस विदितच आहे. अनत्याचाराच्या व्रतपालनाला अत्याचाराचा अप्रत्यक्षपणें देखील संपर्क लागू नये म्हणूनच वर्किंग कमिटीनें हा ठराव केला हें उघड आहे. तथापि वर्किंग कमिटीच्या या सौजन्याचा व तत्त्वनिष्ठेचा सरकारावर बिलकूल परिणाम झालेला दिसत नाहीं. सामाजिक बहिष्कार वर्किंग कमिटीनें प्रत्यक्ष ठराव करून वर्ज्य ठरविला आहे हें कळल्यानंतरदेखील सरकारनें ' सामाजिक बहिष्कार ' हा गुन्हा ठरविणारा वटहुकूम प्रसिद्ध केलाच आहे. तेव्हां सरकारनें असला वटहुकूम काढून जनतेला एका प्रकारें आव्हान केल्यावर तें आव्हान स्वीकारावयाचें का वर्किंग कमिटीचा नं. ३ चा ठराव पाळावयाचा हें एक कोडेंच येऊन पडतें. कारण वर्किंग कमिटीनेंच आपल्या नं. १२ च्या ठरावानें वटहुकुमाखालीं सोडलेले अन्यायाचे हुकूम सविनयपणें मोडावे असा आदेश दिलेला आहे. तेव्हां नं. १२ व नं. ३ या ठरावांचा मेळ कसा घालावयाचा याचा विचार होणें जरूर आहे. अनत्याचाराच्या चळवळींत लोकमत प्रभावी होण्याला त्या मताविरुद्ध वागणाऱ्यांना जनलज्जा किंवा मनलज्जा या दोहोंतून एकाची तरी टोंचणी असावी लागते. परंतु उघड उघड रीतीनें सरकारचे हस्तक बनलेल्यांना मनलज्जा वाटणें शक्य नाहीं.

वर्किंग कमिटीनें चळवळ करणारांचे हातपाय अशा रीतीनें अनेक ठरावांनीं बांधून टाकले असल्यामुळें इतक्या निर्बंधांतून चळवळीला वाव तरी कितीसा राहणार असा खरोखरीच प्रश्न येऊन पडतो. पण वर्किंग कमिटीनें ही अडचण शेवटच्या दोनतीन ठरावांनीं थोडीशी दूर केली आहे. ब्रिटिश मालावर बहिष्कार घालण्याची चळवळ आजपर्यंत म. गांधींना पटत नव्हती. परंतु या वेळीं बंगालप्रांताचा या बाबतींत निर्धार ठरला होता आणि तो निर्धार वर्किंग कमिटीला कळवून त्या धोरणानें ही चळवळ सार्वत्रिक करण्यासाठीं तशा आशयाचा ठराव करून घेण्याकरितां सुभाषबाबू स्वतः मुंबईस आले होते. त्यांच्या कोटिक्रमाची छाप पडून वर्किंग कमिटीनें ब्रिटिश मालावर बहिष्कार घालण्याचा नं. १० चा ठराव केला. त्या ठरावांतील भाषेची शब्दरचना पाहिली असतां आपल्या चळ-

वळीला द्वेषबुध्दीचा अत्यल्पदेखील संसर्ग बाधूं नये याविषयीं म. गांधी किती जपतात हें दिसून येईल; तरी देखील सरकार गांधीजींना कायदेभंग करणारे गुन्हेगार ठरवितें आणि आपण स्वतः कायदा व शांतता राखण्याकरितां सोटेशाही हुकूम काढतें !

ब्रिटिश मालावरील बहिष्काराची चळवळ यापूर्वी बंगाल्यांत व महाराष्ट्रांत एकदोन वेळां झाली होती; पण आतां वर्किंग कमिटीच्या ठरावानें सार्वत्रिक कायदेभंगांत तिचा समावेश झाल्यानें तिची व्याप्ति वाढली आहे. त्यामुळें ती त्वरित व तीव्र परिणामकारक होईल असें वाटतें. आणि सध्याच्या चळवळीत सामील होणारे कार्यकर्ते व स्वयंसेवक आपलें शक्तिसर्वस्व त्या ठरावाच्या बजावणीवर खर्च करतील असाहि अंदाज आहे.

वर्किंग कमिटीचा नं. ११ चा ठराव मोघम शब्दांत असला तरी बराच व्यापक आहे. बिगरपरवाना मीठ तयार करणें हें तर कायदेभंगाचें एक मोठेंच शस्त्र आहे; आणि वर्किंग कमिटीनें आपल्या ८ व्या ठरावांत त्यास स्वतंत्र स्थान देऊन तो कायदेभंग सर्वत्र व्हावा अशी शिफारस केली आहे. तथापि सर्वच ठिकाणीं मिठाचा सत्याग्रह होणें शक्य किंवा निदान सोइस्कर तरी नसतें. जेथें समुद्रकिनारा जवळपास नाहीं आणि जेथें मिठाच्या खाणीहि नाहींत त्या प्रांतांत हा सत्याग्रह कसा करावयाचा ? का दुकानांतून मिठाचीं पोतीं नेऊन विहिरींत किंवा तलावांत ओतून पुनः मीठ करावयाचें ? अर्थातच अशा प्रांतांत मिठाचा सत्याग्रह होऊं शकत नाहीं. शिवाय मिठाचा कर हा गोरगरिबांना जितका जाचक आहे तितकाच किंबहुना त्याहून जास्त जाचक असा जंगलचा कर आहे आणि हिंदुस्थानांत असा कोणताहि प्रांत किंवा जिल्हा नाहीं कीं जेथें कोणत्या ना कोणत्या तरी रूपांत जंगलसत्याग्रह करतां येणार नाहीं. याकरितांच ठराव नं. ११ नें वर्किंग कमिटीनें अशी मोघम शब्दांत आज्ञा दिली असावी कीं, जे कोणतेहि कायदे अगर हुकूम लोकांना उपद्रवकारक असतील ते शक्य त्या ठिकाणीं सविनयपणें मोडावे. अर्थातच या 'पडत्या फळाच्या आज्ञेत' इतरहि अनेक प्रांतिक कायदे येऊं शकतील असें वर्किंग कमिटीचें मत दिसतें.

हे ठराव करण्यांतला हेतु आणि त्या ठरावांची बजावणी करतेवेळीं सत्याग्रही लोकांनीं पाळावयाचें पथ्य यांचा विचार केला असतां वर्किंग कमिटीनें कांहीं भयंकर बंडखोरी आरंभिली होती असा प्रकार नाहीं. कायदेभंग करून लगेच त्याबरोबर त्याचें प्रायश्चित्त शिक्षेच्या रूपानें घेण्याला जो तयार असतो तो बंडखोर ठरूं शकत नाहीं; कारण तो कोर्टाचा शिक्षा देण्याचा अधिकार मानतो व ती शिक्षा निमूटपणें सोसतो. याकरितांच असला कायदेभंग करणें हें सनदशीर चळवळींतच समाविष्ट होतें. इंग्लिश पार्लमेंटमध्यें शिक्षणसंस्थांच्या नियंत्रणासंबंधानें तीस वर्षांपूर्वी कायदा पास झाला त्या वेळीं वेल्समध्यें त्याविरुद्ध मोठी चळवळ झाली आणि मि. लॉइड जॉर्ज यांनीं त्या चळवळींत पुढाकार घेतला होता. दोन वर्षांपूर्वी येथें ज्या वेळीं कायदेभंगाची चळवळ प्रथम सुरू झाली त्या वेळींहि सरकारचा दृष्टिकोन हल्लींच्यापेक्षां निराळा होता. पुढें लॉर्ड आयर्विन यांनीं तर त्या चळवळीचे अध्वर्यु जे म. गांधीजी त्यांच्याशीं दिल्लीचा करार केला; त्या करारांत कायदेभंग तूर्त तहकूब केलेला आहे असें म्हटलेलें होतें. अर्थातच तो जर पुनः सुरू करण्यांत आला असला तर पूर्वीच्या चळवळीचीच दृष्टि या नव्या चळवळीला लागू असली पाहिजे. शिवाय त्या दिल्लीच्या करारांत शांततेनें पिकेटिंग करणें हें न्याय्य मानलें जाऊन त्याला राजरोस परवानगी दिली गेली होती. लॉर्ड आयर्विन यांच्या कारकीर्दींत जें पिकेटिंग युध्दतहकुबीच्या काळांत देखील सरकारमान्य ठरलें होतें तें आतां करारभंग झाल्यानंतरच्या काळांत गुन्हा ठरावें यापेक्षां न्यायान्यायाचा विपर्यास तो कोणता ?

सारांश, नोकरशाहीला कोणीकडून तरी दिल्लीच्या कराराला मूठमाती द्यावयाची होती. त्याकरितां तिनें वर्किंग कमिटीला इतकें चिडविलें कीं, तिला कायदेभंगाची चळवळ हातीं घेण्यावांचून गत्यंतरच राहिलें नाहीं. आणि आतां तेंच सरकार नवेनवे वटहुकूम काढून जे भयंकर निर्बंध उत्पन्न करीत आहे त्यापुढें झारशाहींतला जुलूम देखील कःपदार्थ ठरेल ! तरीदेखील केवळ सरकारच्या हातांत सत्ता आहे म्हणून सरकार जें जें कृत्य मना करील तें तें कृत्य जनतेनें बेकायदेशीर मानावें आणि जी जी संस्था सरकारच्या डोळयांत खुपेल ती ती संस्थाहि बेकायदेशीर मानावी; उलटपक्षीं सरकारच्या प्रत्यक्ष हुकुमानें किंवा अप्रत्यक्ष संमतीनें सरकारी अधिकाऱ्यांच्या हातून जें कोणतेंहि कृत्य घडेल तें अगदीं न्याय्य, सोज्ज्वल, शांतताप्रस्थापक आणि शिस्तीला व सुव्यवस्थेला धरूनच आहे असेंच जनतेनें समजून चालावें, असा सरकारचा आग्रह आहे ! असला विपरीत भास होण्यासारख्या उलट्या बाहुल्या देवानें हिंदी जनतेस दिल्या नसल्यानें सरकारनें कायद्याच्या जोरावर कांहींहि फर्माविलें तरी ती जनता सुष्टालाच सुष्ट व दुष्टालाच दुष्ट म्हणेल आणि जी चळवळ अनत्याचारानें व कायदा मानून चालली आहे तिलाच सनदशीर समजून जें सरकार पूर्वीचे कायदेकानू, कायदेमंडळ आणि प्रजाजनांचे मूलभूत हक्क धाब्यावर बसवून तद्दिरुद्ध वटहुकूम काढतें त्याच्या त्या कृतीसच गैरसनदशीर मानील.

# म. गांधींचे अटकेपूर्वीचे संदेश

**'एष पंथाः एतत् कर्म'**

आपल्या अटकेची आगाऊ अटकळ बांधून म. गांधींनीं राष्ट्रानें पुढें काय करावें हें सांगितलें. पुढील कार्यक्रमावर जोर देण्यांत यावा असा गांधीजींचा अभिप्राय आहे.

(१) सर्व परदेशी कपडे फेकून द्या व खादीचा अवलंब करा.

(२) दारू वगैरे सगळीं मादक द्रव्यें सोडा.

(३) पूर्ण अनत्याचार पाळा.

(४) सरकाराला मिळत असलेली आपली सर्व सहकारिता प्रत्येकानें बंद केली पाहिजे.

(५) वर्किंग कमिटीचा ठराव तंतोतंत पाळा व त्यासाठीं जिंदगी व जीवितहि खर्ची घाला.

(६) सर्व व्यवहार स्वेच्छेनें बंद पाडून कडकडीत हरताळ पाळा, उपवास व प्रार्थना करा आणि जेथें ज्या तऱ्हेचा शक्य असेल तेथें त्या तऱ्हेच्या पण सर्वत्र एकाच वेळीं कायदेभंगाची उठावणी करा.

**भीति कशाची ?**

रविवारीं संध्याकाळीं महात्माजींनीं सामुदायिक प्रार्थना केली. गीतेंतील श्लोक व 'रघुपति राघव' हें भजन केल्यावर त्यांनीं प्रार्थनेचें महत्त्व वर्णन केलें आणि आगामी युद्धाबद्दल ते म्हणाले, "माणसाला भयस्थानें दोन; एक मृत्यु, दुसरें दारिद्य; पण मरण अटळ आहे आणि संपत्ति चंचळ आहे. शिवाय आपल्या डोळ्यांसमोर भुकेनें सुकलेलीं तोंडें, पाठीला भिडलेलीं पोटें आणि उघडींनागडीं शरीरें धारण करणारे लाखों कंगाल लोक दिसत असतांना आणि त्यांपैकीं पुष्कळ जण केवळ गरीबीमुळें पटापट प्राण सोडीत असतांना द्रव्याचा संग्रह करण्याचा आपल्याला काय अधिकार आहे ? द्रव्याचा संग्रह त्या दीनदुबळ्यांकरितां आहे. दारिद्य व मरण या दोहोंची भीति आपण झुगारून दिली म्हणजे कोणतीहि शक्ति आपल्याला पायाखालीं तुडवूं शकणार नाहीं.

**अमेरिकेला आशापूर्ण संदेश**

रविवारीं रात्रीं अडीच वाजतां महात्माजींनीं अमेरिकेला पुढील संदेश पाठविला "भीषण स्वरूप धारण करूं पहाणाऱ्या रणसंग्रामाचे सुरुवातीस मी अशी आशा करतों कीं, अमेरिकन लोक या संग्रामाची गति सूक्ष्म नजरेनें अवलोकन करतील आणि पददलित अशा मानवजातीप्रीत्यर्थ आपलें वज़न खर्च करतील. हा भारतीय संग्राम एका राष्ट्राचा प्रश्न नसून अवघ्या जगताचा आहे. माझ्या देशबंधूंनीं व देशभगिनींनीं अहिंसेचें व्रत शेवटपर्यंत पाळलें तर तें भूतलावरील एका नव्या मनूचें प्रवर्तक होईल यांत मला शंका वाटत नाहीं."

लॉर्ड आयर्विन यांना रविवारीं तार करून गांधींनीं आपलें पूर्वीचेंच धोरण चालू असल्याचें व समेटाच्या प्रयत्नाची पराकाष्ठा केल्याचें कळविलें आहे.

**व्हाइसरॉयांची लंगडी सबब**

लंडनमधील कॉमनवेल्थ ऑफ इंडिया लीगचे मि. होरॅबिन यांना गांधीजींनीं ता. ३ रोजीं त्यांच्या तारेचें उत्तर पाठविलें. त्यांत ते लिहितात, "सरकारानें मुलाखतीचें दार बंद करून टाकलें आहे. आणि त्याला अशी सबब पुढें केली आहे कीं, मीं कायदेभंगाची धमकी घातली. पण समान व सन्मान्य नात्यानें सहकार्य करण्याची सरकारला रतिमात्रहि इच्छा आहे असें मुळींच दिसून येत नाहीं. दिल्लीच्या करारांत जनतेचा कायदेभंग करण्याचा हक्क मान्य केलेला होता आणि कायदेभंग केवळ संधिकालापुरता तहकूब केलेला होता; याचा व्हाइसरॉयांस विसर पडलेला आहे. विद्यमान व्हाइसरॉयांनींहि इतर उपाय थकल्यावर कॉंग्रेसला कायदेभंगाचा अधिकार राखून ठेवण्याची मुभा दिलेली होती. त्यांनीं कायदेभंगासाठीं शिक्षा होईल असें म्हटले होतें. पण शिक्षा ही तर कायदेभंगाच्या पांचवीलाच पुजलेली आहे. पण पूर्वी कायदेभंगाचा विचार चालू होता म्हणून व्हाइसरॉयांनीं मुलाखती बंद केल्या नव्हत्या, एवढेंच नव्हे तर, त्या पुऱ्या करून त्यांनीं मला आशीर्वाद देऊन लंडनला पाठविलें. पण सध्यांचा रागरंग कांहीं निराळा आहे. त्याचें इंगित हें आहे कीं, कॉंग्रेसचें वृध्दिंगत होणारें सामर्थ्य आणि त्यामुळें जनतेचें अधिकाधिक फांकणारें तेज सरकाराला पहावत नाहीं. अशा परिस्थितींत स्वातंत्र्याभिमुख अशी राज्यघटना निर्माण होणें अशक्य आहे याबद्दल माझी बालंबाल खात्री झालेली आहे. कॉंग्रेसच्या संस्था व पुढारी यांजवर सरकार गदा घालणार हें मला दिसत आहे. तरी जनता आपला धीर खचूं न देतां व अहिंसाव्रत न टाकतां सरकाराला निकराचा विरोध करील असा मला विश्वास आहे.

**ख्रिश्चन लोकांना संदेश**

महात्माजींनीं तार केल्यावरून रविवारीं रात्रीं पुण्याहून ख्रिस्त सेवासंघाचे फादर एल्विन मुंबईस गेले. त्यांना उद्देशून गांधीजींनीं पुढील संदेश पोलिस आल्यानंतर लिहून कळविला. "तुम्ही आपले देशबांधव इंग्रज यांना असें कळवा कीं, मी त्यांच्यावर माझ्या देश बांधवां-

इतकेंच प्रेम करीत आहें. त्यांच्याशीं मी द्वेषानें किंवा मत्सरानें प्रेरित होऊन कधींच वागलों नाहीं; आणि यापुढेंहि वागणार नाहीं. माझ्या नात्यागोत्याच्या माणसांशीं मीं जसें वर्तन ठेविलें आहे; त्याहून त्यांच्याशीं मीं वेगळें वर्तन ठेवीत नाहीं."

रविवार ता. ३ रोजीं नॅशनॅलिस्ट ख्रिश्चन पार्टीच्या सेक्रेटरीमार्फत गांधीजींनीं सर्व हिंदी ख्रिश्चनांना संदेश दिला. ख्रिस्ती लोक हे शांतीचे भोक्ते आहेत आणि भावी चळवळ शांतीवर उभारलेली आहे म्हणून तिच्यांत ख्रिस्ती लोकांनीं भाग घ्यावा असा उपदेश करून गांधी म्हणतात, "अल्पसंख्य वर्गाचे खरें संरक्षण कागदावरील 'संरक्षकां'नीं होणार नाहीं. राष्ट्रीय लढ्यांत भाग घेणें हेच त्यांचें खरें 'संरक्षक'. ख्रिस्ती समाजानें येत्या लढ्यांत दुसऱ्या कोणत्याहि समाजाच्या मागें रहातां कामा नये. मद्यपानाची पूर्ण बंदी झाली पाहिजे आणि खादीचा सर्वत्र प्रसार झाला पाहिजे. प्रत्येकाच्या अंगावर खादी हवी व घरांत चरखा हवा."

### वल्लभभाईंची वीरवाणी

राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष सरदार वल्लभभाई पटेल यांनीं अटकेपूर्वी राष्ट्रांतील जनतेस तेजस्वी संदेश दिला. त्यांत ते म्हणतात, 'राजसत्तेनें राष्ट्राविरुध्द युध्द पुकारलें आहे! हें युध्द अत्यंत भीषण स्वरूपाचें होणार असून त्यांत सोक्षमोक्ष झाल्याविना रहाणार नाहीं. 'जगावें कीं मरावें' हा प्रश्न राष्ट्रापुढें दत्त म्हणून उभा राहिला आहे! आपण जगावें यासाठीं कितीहि स्वार्थत्याग केला तरी तो थोडाच ठरणार आहे. माझी खात्री आहे कीं, सारी जनता अनत्याचारानें सर्वस्व अर्पण करण्यास पुढें येईल. तसें झाल्यास आमचा विजय हा ठेवलेलाच!'

# नादिरशाही वटहुकूम

### राष्ट्रीय सभेवर हल्ला
### वर्तमानपत्रांची मुस्कटदाबी

व्हाइसरॉय लॉर्ड विलिंग्डन यांनीं सोमवार ता. ४ रोजीं जे चार वटहुकूम जारी केले त्यांतल्या पहिल्या वटहुकुमाचें नांव 'इमर्जन्सी पॉवर्स ऑर्डिनन्स' असें आहे. या वटहुकुमानें प्रचलित लढ्यांत पोलीस अधिकारी व मॅजिस्ट्रेट यांना त्या हुकुमांत नमूद केलेले अनेकविध व सर्वंकष असे अधिकार दिले जावे म्हणून योजना केली आहे. या वटहुकुमाचे सहा भाग असून त्याचीं त्रेसष्ट कलमें आहेत.

पहिल्या भागांत असें लिहिलें आहे कीं, हा वटहुकूम गव्हर्नर–जनरल–इन–कौन्सिल गॅझिटमध्यें जाहीर करुन कोणत्याहि प्रांताला लावतील. परंतु मुंबई प्रांत व बंगाल या दोन प्रांतांना मात्र ताबडतोब तो लावला जाईल असें गॅझिटमध्यें लवकरच प्रसिध्द केलें जाईल.

### कैद करण्याचे अधिकार

दुसऱ्या भागांत सरहद्द प्रांतांतील वटहुकुमाप्रमाणेंच कोणाहि माणसाला पोलीस अधिकाऱ्यांना कैद करतां येईल अगर कोणाहि संशयित मनुष्याला अटकाऊन ठेवतां येईल असे अधिकार देण्यांत आले आहेत. जर स्थानिक सरकारला असें वाटेल कीं, एखाद्या माणसानें सार्वजनिक व्यवस्था व शांतता नाहींशी करण्याचा प्रयत्न केला आहे अगर तो तसें करण्याच्या विचारांत आहे तर त्या माणसाच्या हालचाली वगैरेंवर ताबा ठेवण्याचा अधिकार स्थानिक सरकारला देण्यांत आलेला आहे. या कलमाच्या शब्दांचा अर्थ इतका स्पष्ट आहे कीं, कायदेभंगाची चळवळ करणाऱ्या कोणत्याहि इसमाला सरकारला अटक करतां येईल अगर त्याच्या हालचालीस प्रतिबंध करतां येईल!

### मालमत्ता जप्त

पांचव्या कलमानें कोणत्याहि इमारतीचा ताबा सरकारला घेतां येतो. सहाव्या कलमानें विवक्षित इमारतींत अगर जागेंत कोणी जाऊं नये असा हुकूम काढतां येतो. सातव्या व आठव्या कलमानें रस्त्यावरील लोकांचें जाणें येणें सरकारला आपल्या ताब्यांत ठेवतां येतें व एखाद्या लोकोपयोगी विशिष्ट जिनसांचा पुरवठा करण्याचा अधिकार पोलिसांना दिला आहे. परदेशी कपड्यांचा खप वाढविण्याकरितां हें कलम आहे असें वाटतें. नवव्या व दहाव्या कलमान्वयें जंगम वस्तूंवर व वाहनांवर सरकारचा ताबा राहील अशी व्यवस्था केली आहे.

### मॅजिस्ट्रेटाचे अधिकार

अकराव्या कलमानें डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट यांना हत्यारें व दारूगोळा जप्त करण्याचा अधिकार दिला आहे. बारा ते सोळापर्यंतच्या कलमांन्वयें मॅजिस्ट्रेटांना कोणाहि इसमास आपल्या मदतीकरितां पोलीस अधिकारी बनवितां येतें. पोस्ट, टेलिग्राफ, रेल्वे, आगबोटी, मोटारी, लॉऱ्या, गाडी, घोडे व वाहनें त्यांच्यावर आपली सत्ता चालवून सरकारास वाटेल तसा त्यांचा उपयोग करतां येतो.

### जाहीर सभांची बातमी

सरकारच्या १७ व्या कलमानें कोणत्याहि जाहीर

सभेचा रिपोर्ट घेण्याकरितां पोलिस व त्यांचे साहाय्यक यांना जातां येईल. जी जी सभा, मग ती खासगी घरांत भरलेली असो अगर सार्वजनिक जागेंत भरलेली असो, सर्व लोकांना अगर कांहीं लोकांना मोकळी आहे ती जाहीर सभा समजावयाची त्या सभेला तिकिटें अगर परवाना ठेवला असला तरी ती जाहीरच समजली जाईल.

### झडत्या

अठरा, एकोणीस व वीस या कलमांत कोणाहि व्यक्तीची अगर कोणत्याहि घराची व जागेची सर्व प्रकारची झडती घेण्याची सत्ता देण्यांत आली आहे.

### शिक्षा

संशयित मनुष्याला दिलेला हुकूम त्यानें तोडला तर त्याला दोन वर्षेपर्यंत शिक्षा व वाटेल तो दंड करण्यांत येईल व पहिल्या भागांतील कोणताहि गुन्हा केल्यास त्याला सहा महिनेपर्यंत शिक्षा व दंड करण्यांत येईल. सरकारी नोकराला नोकरी सोडण्यास सांगितल्यास एक वर्षाची शिक्षा होईल. त्याचप्रमाणें सरकारी नोकरींत जाऊं नका म्हणून सांगणारांना व खोट्या बातम्या उठविणारांनाहि शिक्षा होईल. सव्विसाव्या कलमानें सर्व गांवांवर अगर गांवांतील विवक्षित भागावर दंड लादतां येतो. सरकारनें आक्षिप्त ठरविलेलीं पत्रकें काढणे हा गुन्हा आहे व याला सहा महिन्यांची शिक्षा सांगितलेली आहे. अपराध करणारा जर वयानें लहान असेल तर त्याच्या बापाकडून त्याला झालेला दंड वसूल करण्यांत येईल.

### खास न्यायकोर्टें

चौथ्या भागांत खास नेमलेल्या न्यायाधीशांनीं अपराध्याला कायद्यांत सांगितलेली वाटेल ती शिक्षा द्यावयाची. खास मॅजिस्ट्रेटांना सात वर्षेपर्यंत शिक्षा देण्याचा अधिकार दिला आहे, व झटपट चौकशी कोर्टांना फर्स्टक्लास मॅजिस्ट्रेटाप्रमाणे फक्त दोन वर्षेपर्यंत शिक्षा देण्याचा अधिकार देण्यांत आला आहे. जर आरोपी दंगाधोपा करतील तर त्यांना शिक्षा करण्याचा अगर त्यांची चौकशी न्यायाधीशांना वाटेल त्याप्रमाणें करण्याचा अधिकार वरील सर्व न्यायाधीशांना देण्यांत आला आहे.

पांचव्या भागांत या वटहुकुमामुळें ज्यांचें नुकसान होईल त्यांना योग्य ती नुकसानभरपाई देण्याचा निर्णय करण्याचा अधिकार तीन पचांना देण्यांत येणार आहे. फक्त ही नुकसानभरपाई नेहमींप्रमाणें नसून ती वटहुकुमाच्या वेळच्या किंमतीप्रमाणें देण्यांत येईल.

### वर्तमानपत्रांना वेसण

तेसष्टाव्या कलमांत वर्तमानपत्रांना नियंत्रण घालण्याची योजना केली आहे त्यांत म्हटलें आहे कीं, हे वटहुकूम अमलांत असेपर्यंत १९३१ च्या वर्तमानपत्रांच्या कायद्यांतील (इमर्जन्सी पॉवर्स ॲक्ट) चौथ्या कलमांतील गुन्ह्याखेरीज त्यांत पुढील गुन्ह्यांचा समावेश केला जाईल: (क) सरकारी अधिकारी, शिपाई, खलाशी व हवाई जहाजवाला अगर पोलीस यांना नोकरी सोडण्यास सांगणें. (ड) कायद्यानें संस्थापित झालेल्या राज्याविरुद्ध अगर संस्थानिक अगर जहागिरदार यांच्याविरुद्ध अप्रीति अगर असंतोष पसरविणें अगर बादशहा किंवा संस्थानिक यांची इभ्रत कमी होईल असें वर्तन करणें. (इ) धाकदपटशा दाखवून अगर दहशत घालून कोणाहि व्यक्तीस, ती व्यक्ती कायद्यानें ती गोष्ट करण्यास बांधली गेली नसतांना गोष्ट करावयास लावणें, (एफ) कायद्याच्या अगर न्यायाच्या अंमलबजावणीस अडथळा करणें अगर सरकारी जमीनधारा, जमीनदारांचा खंड अगर स्थानिक स्वराज्य संस्थांचे कर देऊं नका अगर देण्याचें पुढें ढकला वगैरे सांगणें, ( जी ) स्थानिक स्वराज्य संस्थांच्या नोकरास राजीनामा द्यावयास सांगणें अगर त्याला कर्तव्यच्युत करणें. ( एच ) निरनिराळ्या जाती-जातींत व वर्गांत वैर व द्वेष उत्पन्न करणें. ( आय ) सरकारी सैन्यांत अगर पोलिसांत भरती होऊं नये म्हणून लिहिणें.

१९३१ च्या वर्तमानपत्रांच्या कायद्याच्या चौथ्या कलमांत गुन्ह्याची जी यादी सांगितली आहे तिला वरील गुन्ह्यांची पुस्ती जोडली असून तिला कलमांत सांगिलल्या शिक्षा व दंड या गुन्ह्यांबद्दलहि वर्तमानपत्रकर्ते व छापखानेवाले यांनाहि करण्यांत येतील.

### बेकायदेशीर कृत्यांची चिथावणी

बेकायदेशीर कृत्यांची चिथावणी बंद करण्याचा वटहुकूम (अनलॉफुल इन्स्टिगेशन ऑर्डिनन्स) हा सर्व हिंदुस्थानास लागू केला आहे. तथापि त्यांतील नं. २ व नं. ३ हीं कलमें लागू करण्याचा अधिकार हिंदुस्थानसरकार स्वतंत्र पत्रक काढून प्रांतिक सरकारला देईल. या कलमांत प्रांताच्या जाहीर केलेल्या भागांतील सरकारी धारा, जमीनदारांचा खंड, स्थानिक स्वराज्य संस्थांचे कर देऊं नका असें सांगणें गुन्हा ठरविला आहे व वरील सर्व देणें सरकार आपल्या जमीनधाऱ्याप्रमाणें वसूल करील असें सांगितलें आहे. हा हुकूम मुंबई प्रांत, पंजाब, बहार-ओरिसा व मध्यप्रांत येथें आतांच लागू केला आहे.

### संस्थांच्या कचेऱ्यांचीं घरें जप्त

ज्या संस्था बेकायदेशीर ठरविल्या जातील त्या

संस्थांच्या कचेऱ्या ज्या घरांत असतील तीं घरें व तेथील सर्व जंगम माल जप्त करण्याचा अधिकार या वटहुकुमानें सरकारास दिला आहे. जो माल प्रत्यक्ष जप्त केला नसेल तो ही जप्ती उठविल्यावर स्थानिक सरकार परत देईल.

## काँग्रेसचे फंड सरकारजमा

बेकायदेशीर संस्थांच्या खजिनदाराकडे अगर इतरत्र असलेला द्रव्यनिधि जप्त करण्याचा अधिकार एका कलमानें सरकारास दिला आहे. या कलमाचा सारांश असा आहेः—(१) चौकशीनंतर सरकारास योग्य वाटेल त्या वेळीं, लेखी हुकूम देऊन बेकायदेशीर संस्थांचे पैसे, सरकारी रोखे अगर त्यांनीं बँका अगर खासगी ठिकाणीं ठेवलेल्या रकमा जप्त करण्यांत येतील. (२) वरील हुकमाची एक प्रत ज्याच्याजवळ वरील पैसे कर्जरोखे अगर रकमा असतील त्याच्यावर बजावली जाईल व त्या हुकुमाप्रमाणें त्यानें वरील पैसे वगैरे सरकारच्या स्वाधीन केले पाहिजेत. आपल्या एखाद्या अधिकाऱ्याला वरील बाबतींत हुकूम करून कोणत्याहि जागेची झडती वगैरे घेण्याचे अधिकार त्याला देतां येतील. (३) एखादा इसम बेकायदा संस्थांना द्रव्यद्वारा मदत करतो असा सरकारास संशय आल्यास त्यानें सरकार सांगेल त्याप्रमाणेंच पैशाचा विनियोग केला पाहिजे व सरकारच्या परवानगीनेंच सर्व देवघेव केली पाहिजे असे हुकूम काढण्यास सत्ता दिली आहे.

(४) सरकार हुकूम देईल तेव्हां त्यानें अधिकृत केलेल्या कोणत्याहि अधिकाऱ्यास कोणाचेहि हिशेबवह्या, दस्तऐवज, रोखे वगैरे पाहण्याची, झडती घेण्याची व चौकशी करण्याची मुभा ठेविली आहे. (५) या नोटिसा व हुकूम क्रि. प्रो. मध्यें सांगितलेल्या पद्धतीनें बजावाव्यात. कंपनी, बँक किंवा संस्था असल्यास त्यांच्या सेक्रेटरी अगर मॅनेजराला ही नोटीस दिली असतां चालेल. पोस्टानें त्यांच्या रजिस्टर्ड पत्त्यावर पाठविली तरी ती कायदेशीर होईल. (६) वर लिहिल्याप्रमाणें पैसे रोखे अगर रकमा जप्त करण्याचा ज्या दिवशीं हुकूम होईल त्या दिवसापासून तो हुकूम लागू झाला असें समजलें पाहिजे व ज्या इसमाला ही नोटीस दिली असेल त्यानें ती मालमत्ता सरकारच्या अधिकाऱ्यांच्या हवालीं केली पाहिजे. (७) जर कोणी हे हुकूम अमान्य करील तर त्याच्या इस्टेटीमधून जमीनधाऱ्याच्या वसुलीबाबत केलेल्या नियमाप्रमाणें ते सर्व पैसे वसूल केले जातील. (८) 'सेक्युरिटी' या शब्दांत ज्या ज्या दस्तऐवजांनीं एक मनुष्य पैसे दुसऱ्यास देण्यास बांधलेला असतो त्या सर्वांचा समावेश होतो.

## संस्था बेकायदेशीर ठरविणें

गव्हर्नर–जनरल–इन–कौन्सिल यांना ज्या वेळीं एखादी संस्था कायदा व सुव्यवस्था भंग करणारी आहे असें वाटेल त्या वेळीं अशी संस्था बेकायदेशीर आहे असें जाहीर करण्यांत येईल. असा जाहीरनामा निघाल्यास इंडियन क्रिमिनल लॉ अमेंडमेंट ॲक्ट त्या संस्थेला लागू होईल.

## बहिष्काराचा व पिकेटिंगचा वटहुकूम

प्रांतिक सरकारनें जाहीर केल्यानंतर हा नवा वटहुकूम लागणारा आहे. परंतु हिंदुस्थानांतील सर्व प्रांतिक सरकारांना हा अधिकार देण्यांत आला आहे. त्यांत असें सांगितलें आहे कीं, 'एक मनुष्य दुसऱ्याला बहिष्काराबाबत त्रास देतो असें पुढील परिस्थितींत समजलें जाईल. (अ) जें कृत्य करणें कर्तव्य नाहीं अगर जें कृत्य न करणें हेंहि कायद्यानें सांगितलें नाहीं असें कृत्य करावयास अगर न करावयास भाग पाडणें, एखाद्या मनुष्याचा अगर त्याच्या नोकरचाकराचा अगर आप्तेष्टांचा मार्ग निरोधन करणें अगर त्यांना दहशत घालणें अगर जबरदस्ती करणें, अगर त्याच्या घराजवळ, दुकानाजवळ अगर पेढीजवळ टेहळणें, अगर त्याच्या पाठोपाठ जाणें अगर त्याच्या मालमत्तेच्या बाबतींत अफरातफर करणें. (ब) नुकसान व्हावें म्हणून अगर नुकसान होईल हें माहीत असतां दुकान अगर पेढी, येथें दुसऱ्या कोणीं जाऊं नये म्हणून प्रयत्न करणें अगर तसें जाणाऱ्यास प्रतिबंध करणें, हे सर्व गुन्हे होतील. कलम चारनें हा गुन्हा करणाऱ्यास सहा महिने शिक्षा व दंड सांगितलेला आहे. या गुन्ह्याकरिता कोणालाहि वॉरंटावांचून पकडण्यांत येईल. व त्याला जामीनहि नाहीं. परंतु पोलिसांचा मॅजिस्ट्रेटपुढें लेखी रिपोर्ट आल्याशिवाय मॅजिस्ट्रेट खटला चालवूं शकणार नाहीं.

## सामाजिक बहिष्कार

सहाव्या कलमांत सांगितलें आहे कीं, जो मनुष्य अगर संस्था जो व्यवहार नेहमीं एखाद्या माणसांशीं करतात, तो व्यवहार जर तो बंद करील तर तो मनुष्य त्या दुसऱ्यावर बहिष्कार घालतो असें समजलें जाईल. सातव्या कलमांत जो मनुष्य सरकारी नोकरावर अगर स्थानिक संस्थांच्या नोकरावर कोणत्याहि तऱ्हेचा बहिष्कार घालील त्याला सहा महिने शिक्षा अगर दंड सांगितला आहे. आठव्या व नवव्या कलमांत खटला कसा चालावा वगैरे सांगितलें आहे.

## प्रेताची खोटी मिरवणूक

कोणी मनुष्य मयत झाला नसतांना त्याला त्रास व्हावा म्हणून जो कोणी त्याची खोटी प्रेतयात्रा काढील त्याला सहा महिनेपर्यंत शिक्षा अगर दंड करण्यांत येईल. या गुन्ह्याकरितां वॉरंटाशिवाय कोणालाहि पकडतां येईल व त्याचा जामीन घेतला जाणार नाहीं.



श्री. दा. वि. गोखले



श्री. अण्णासाहेब भोपटकर

# स्फुट सूचना

१ हिंदुस्थान सरकारनें दडपशाहीच्या चक्रांना गति देतांच नवीन वटहुकुमाखालीं अखिल हिंदुस्थानभर नोकरशाहीनें धुमाकूळ घालण्यास सुरुवात केली आहे. मुंबईच्या गव्हर्नरसाहेबांनीं आपल्या स्वतःचा एक खास संदेश देऊन मग आपल्या प्रांतांतील वटहुकूमाच्या सोटेशाहीस सुरुवात केली ! मुंबईचे गव्हर्नर मितभाषी व स्पष्टवक्ते आहेत. त्यांनीं अगदीं थोडक्यांत कळविलें आहे कीं, 'कायदेभंगाच्या चळवळीपासून लोकांचें संरक्षण व्हावें म्हणून व सरकारी राज्ययंत्र बंद पाडण्याचे काँग्रेसचे प्रयत्न हाणून पाडावे म्हणून मी हा नवा सोटेशाहीचा उपक्रम करीत आहे ! कायद्यानें चालणाऱ्या लोकांना यापासून मुळींच भीति नाहीं.' गव्हर्नरसाहेबांचा हा युक्तिवाद लोकांस कितपत पटतो हें लवकरच समजेल. परंतु या हुकूमशाहीचा अंमल कसा असतो याची चुणूक मात्र एक दोन दिवसांतच लोकांना कळून चुकली आहे! बहुतेक सर्व कार्यकर्ते पुढारी आज अटकेंत टाकले गेले आहेत. खुद्द मुंबईस ७४ व इतर प्रांतांत ४७४ राष्ट्रीय संस्था बेकायदा ठरविण्यांत आल्या व त्यांच्या कचेऱ्यांचीं १४१ घरें पोलिसांनीं ताब्यांत घेण्याचें ठरविलें ! मुंबई इलाख्याची व इतर प्रांतांचीहि ही परीक्षेची वेळ आहे. या दिव्यांतून राष्ट्रीय सभा कशी पार पडते हें भविष्यकाळ ठरविणार.

२ पुण्यांतहि धरपकडीचें सत्र परवांपासूनच सुरू झालें. आतांपर्यंत अटक झालेल्यांची यादी दुसरीकडे दिलीच आहे; तींत श्रीयुत दा. वि. गोखले (सहसंपादक केसरी), श्रीयुत अण्णासाहेब भोपटकर, श्रीयुत शंकरराव देव, श्रीयुत हरिभाऊ तुळपळे वगैरे प्रमुख मंडळी आहेत. ही अटक नं. २ च्या वटहुकुमान्वयें झाली असली तरी कोणाच्या कोणत्या भाषणाबद्दल अगर कोणत्या कृत्याबद्दल ही अटक झाली आहे हें कांहीं निश्चित सांगतां येत नाहीं. कारण त्यांच्यावर सध्यां १५ दिवसपर्यंत तरी काम चालविण्यांत येणार नाहीं असें वाटतें. त्यापुढें त्यांजवर आरोप ठेवून काम चालविण्यांत येतें का जामीन मागण्यांत येऊन तो नाकारल्याबद्दल शिक्षा होते पहावें. हा चळवळीचा प्रारंभच असून हें सत्र आतां असेंच कित्येक दिवस चालावयाचें; तेव्हां आतां सत्याग्रही मंडळींचें अभिनंदन आणि दडपशाहीबद्दल सरकारचा निषेध वारंवार व्यक्तिशः न करतां आम्ही सामुदायिक रीत्या असें म्हणतों कीं जे जे कोणी सत्याग्रही राष्ट्रसेवेसाठीं म्हणून यावच्छक्य स्वार्थत्याग करीत आहेत त्यांचा तो स्वार्थत्याग हिंदमातेच्या चरणीं रुजू आहे.

## चिरनेर-स्मारकाचा अनावरण-समारंभ

चिरनेर येथें ता. २५-९-३० रोजीं झालेल्या सत्याग्रहाचे वेळीं जे लोक बळी पडले त्यांचें स्मारक म्हणून चिरनेर येथें एक स्मारक-स्तंभ उभारण्यांत आला आहे. त्याचा अनावरणसमारंभ ता. ३-१-३२ रोजीं दे. भ. श्रीयुत विठ्ठलभाई पटेल यांच्या हस्तें मोठ्या थाटानें पार पडला. स्तंभावर मृत्युमुखीं पडलेल्या सर्व सरकारी नोकरांचीं व सत्याग्रही वीरांचीं नांवें लिहिलीं आहेत. हीं सर्व नांवें दगडावर खोदून तो दगडहि लवकरच त्या जागीं बसविण्याचा स्मारक-कमिटीचा विचार आहे. समारंभाचे दिवशीं चिरनेर गांवांत जिकडे तिकडे ध्वजापताका लावून शोभा आणिली होती. स्मारकाचे ठिकाणीं मंडप घालून तोहि सुशोभित केला होता. दे. भ. विठ्ठलभाई पटेल यांचेबरोबर चिरनेर चौकशी कमिटीचे अध्यक्ष श्री. जम्नादास मेहताहि आले होते. मुंबईचे श्री.बाळासाहेब खेर, पेणचे श्री.रामभाऊ मंडलीक,सातान्याचे प्रसिध्द वकील श्री. दादासाहेब करंदीकर, पनवेलचे श्री. अनंत रामचंद्र पटवर्धन, शेठ चापशी पुरुषोत्तम, श्री. भाऊसाहेब जाईल, श्री. नानासाहेब पुराणिक, बेडेकर, गुप्ते वगैरे मंडळी प्रामुख्यानें हजर होती. प्रथम बेडेकर यांनीं चिरनेर सत्याग्रहाची व तदनंतरच्या खटल्याची हकीकत थोडक्यांत सांगितल्यानंतर श्री. विठ्ठलभाई पटेल यांनीं आपल्या भाषणांत मृतांच्या आत्म्यास शांति मिळावी अशी परमेश्वराची प्रार्थना केली व आतां सुरू झालेल्या लढ्यांत बहिष्काराच्या मार्गानें तरी प्रत्येकानें भाग घ्यावा अशी विनंति करून स्तंभाचें अनावरण केलें. त्यांचें भाषण गुजराथींत झाल्यामुळें तें श्री. बाळासाहेब खेर यांनीं मराठींत समजावून सांगितलें. नंतर श्री. दादासाहेब करंदीकर यांनीं समयोचित भाषण करून स्मारकास झालेला सगळा खर्च आपण देणार असल्याचें जाहीर केलें व त्याप्रमाणें अंदाजें एक हजार रुपये देऊन ठेवले. नंतर हारतुरे, पानसुपारी व आभारप्रदर्शन वगैरे झाल्यावर समारंभ संपला.

# सर्वभक्षक वटहुकुमांचा धिंगाणा !

महात्मा गांधी यांनीं 'युद्ध' म्हणून पुकारलें, पण त्याबरोबर देशांतील सर्व लोकांना अनत्याचारित्वाची शपथ घालून हत्यारबंदी केली! उलट सरकारानें आपल्या उठावणीला युद्ध वगैरे कांहीं एक मोठें नांव न देतां तिला केवळ क्रांतिकारक बंडापासून 'बचाव' म्हणून, म्हणजे दिसण्यांत दीनपणा स्वतःकडे घेऊन, आत्मसंरक्षणाच्या बहाण्यांत आजचींच काय पण उद्यांचींहि कांहीं कार्यें साधून घेतलीं! 'माझें पोट गेलें चुलींत' असें म्हणून चुलींत भाजत घातलेला सगळा मलिदा खाऊन टाकणाऱ्या स्वयंपाकिणीप्रमाणें, सरकारानें आचरण चालविलें आहे. त्यांनीं शस्त्रसंन्यास कधींच केलेला नव्हता. उलट त्यांच्या देव्हाऱ्यांत भलेपणाच्या शब्दांच्या पुष्पाच्छादनाखालीं नित्य कशाची पूजा होत असेल तर ती शस्त्रास्त्रांचीच. आणि नित्यपूजेचा देव जसा मिरवणुकीच्या समारंभाकरितां प्रतिष्ठेनें बाहेर काढतात त्याप्रमाणें, प्रस्तुत चळवळीचें निमित्त करून, त्यांनीं आपले पोलीस लाठ्यातरवारींनीं उघडपणें सजविले आहेत; आणि नवरात्रांत वाहनें बाहेर निघतात त्याप्रमाणें सशस्त्र सैन्याच्या पलटणी देशांतून मिरवणुकीकरितां फिरतीवर काढून, त्यांना नमस्कार करण्याचीं आमंत्रणें लोकांना दिमाखानें देण्याचें सुरू केलें आहे.

आतां सरसावलेलें हत्यार हें सरकारचें एक नित्य लक्षणच असल्यामुळें त्यांत अद्भुत असें फारसें वाटत नाहीं. पण महायुद्धांतहि काढण्यांत आले नव्हते असे जे वटहुकूम सरकारनें हल्लीं काढले आहेत, त्यांचें स्वरूप लक्षांत घेतां हें कायद्याचें राज्य आहे असें मात्र यापुढें कोणास म्हणवणार नाहीं. सन १९३० च्या चळवळींत हल्लींसारखे कायदे म्हणजे ऑर्डिनन्स निघण्यास सुरुवात झाली होती. पण अवघ्या दोन वर्षांत त्या कायद्यांत जी प्रगति झाली आहे ती पाहतां सरकारच्या प्रगतिपरत्वाचें कौतुक करावें तितकें थोडेंच होणार आहे! आणि विशेष हा कीं, दोन वर्षांपूर्वींच्या चळवळींत स्वराज्यदानाच्या आश्वासनांचा पारा ज्या अंशावर होता त्याखालीं तो आज किती तरी उतरला असतां, ऑर्डिनन्सेसच्या कडकपणाचा पारा मात्र त्याच्या दुप्पट अंशांनीं वर चढला आहे. आणि त्यांतूनहि ध्यानांत ठेवण्याची गोष्ट ही कीं, जो काळ गांधींना विलायतेला नेऊन गोलमेज परिषदेच्या कार्यांत गुंतवून त्यांजकडून व्यर्थ घालविण्यांत आला, त्याच काळांत हल्लींच्या दडपशाहीचे बेत व कायदे इकडे सरकार करीत होतें!

यावरून असें वाटतें कीं, सरकाराला दोन उजवे

हात फुटलेले असून, त्यांतला एक गांधींशीं हस्तांदोलन करीत असतां दुसरा लेखणी घेऊन दडपशाहीच्या कायद्यांची भाषा लिहून काढून सजवून ठाकठीक करीत होता. कारण अशी कल्पना केल्याशिवाय म. गांधींनीं बिलायतेच्या आगबोटींतून किनाऱ्यावर पाय ठेवल्यापासून अवघ्या चार दिवसांत हल्लींचे आर्डिनन्सेस लिहिले जाऊन, टाइपराईट होऊन, वाचले जाऊन, मंजूर होऊन, छापून, जाहीर केले जाणें सर्वस्वीं अशक्य होतें. या नव्या कायद्यांचा मजकूरच इतका आहे कीं, एखादा चांगला लेखक नुसती त्यांची प्रत करावयास, मानेवर खडा ठेवून बसविला तरी, त्याच्या हातून ते सर्व इतक्या थोड्या अवधींत लिहूनहि व्हावयाचे नाहींत. मग राजकीय धोरणाच्या दृष्टीनें त्यांचा निश्चय करून कायद्याच्या भाषेनें ते तयार करून, इतर कायद्यांशीं त्यांची संगति-विरोध पाहून, मग वरील सर्व गोष्टी करावयाच्या म्हटलें तर तें सर्वस्वीं अशक्यच होय. यावरून विलायतेंत गोलमेज परिषदेची चर्चा चालू असतां मनांत कपट ठेवून कोण वागत होतें, व सरळ प्रांजळपणाचा व्यवहार कोण करीत होतें, याचें अनुमान कोणासहि सहज करतां येईल. म. गांधी हे इंग्रजसरकारावर विश्वास ठेवून वागत होते म्हणून ते फसले, आणि इंग्रजसरकार मात्र गांधींचा विश्वासघात करण्याचें ठरवून आधींच आपल्या दडपशाहीच्या तयारीला लागलें होतें म्हणून त्याचें साधलें, असेंच यावरून ठरतें.

असो, दडपशाहीचे हुकूम कायद्याच्या रूपानें कांढण्याचें सरकारनें आधींपासून योजलें होतें असें मानलें तरी तेंवढ्यावरून हल्लींच्या हुकुमांचें समर्थन होऊं शकत नाहीं. त्यांचा न्याय त्यांतील कलमांच्या व्याप्तीवरूनच करावा लागतो. आणि असा न्याय करावयास लागलें म्हणजे असें उघड दिसतें कीं, सविनय कायदेभंगाची चळवळ हाणून पाडण्याच्याहि पलीकडे या कायद्यांची मजल गेली आहे. ती इतकी कीं, त्या कायद्यांनीं सामान्य मनुष्यांना सामान्य स्वरूपाच्या सार्वजनिक गोष्टी करण्याचेंहि, अशक्य नसलें तरी, अवघड व धोक्याचें करून ठेवलें आहे. हे कायदे करतांना सरकारनें असें धोरण ठेवलेलें आहे कीं, जितकी म्हणून स्वतंत्रता व सवलत तितकी आपणाला, आणि जितकी म्हणून परतंत्रता व अडचण तितकी सर्व लोकांना ! या स्थितीचा विचार चळवळींत जाणूनबुजून पडणाऱ्या लोकांच्या दृष्टीनें करण्यापेक्षां इतरांच्याच दृष्टीनें आधीं व अधिक करावयास पाहिजे. कारण अशा चळवळीविषयीं राष्ट्राच्या अंतिम ध्येयाच्या दृष्टीनें, व आपुलकीच्या भावनेनें, मनांतून सहानुभूति असूनहि जे कोणी इतर कारणामुळें तींत प्रत्यक्ष सामील होत नाहींत, अथवा जे मनानेंहि या चळवळीपासून दूर आहेत, त्यांना या कायद्यांपासून किलपत उपद्रव पोंचण्यासारखा आहे याकडे कोणाचीहि दृष्टि गेल्याशिवाय राहात नाहीं.

बकासुराला घरटी रोज एक मनुष्य दिला तरी तेवढ्यावर भागत असे. पण या नव्या वटहुकुमांनीं सर्वभक्षक काळाचेंच अनुकरण केलेलें दिसतें. तें कसें हें पाहाण्याकरितां ता. ५ जानेवारीच्या सरकारी गॅझेटांत इं. क्रिमिनल लॉ अमेंडमेंट ॲक्ट ( १९०८ चा १४ वा ) या अन्वयें प्रसिद्ध केलेल्या नोटिफिकेशनचा विचार करूं. या जाहीरनाम्याचा हेतु कांहीं कांहीं संघ किंवा संस्था बेकायदेशीर ठरवून त्या बंद करण्याचा आहे. त्या बंद कां करावयाच्या तर त्या बेकायदा म्हणून. त्या बेकायदा कां ? तर त्या सरकारनें तशा ठरविल्या म्हणून ! व त्या तशा कां ठरविल्या ? तर "त्यांचा हेतु किंवा कार्य हल्लींच्या चळवळींत सामील होऊन कायदेभंग करणें व तो करविणें, राज्यकारभाराला अडथळा आणणें व तो आणविणें, असा असल्यामुळें त्या एक प्रकारें समाजाला संकटासारख्या होऊन बसल्या आहेत " म्हणून ! अर्थात् हें सरकाराचें मत झालें. पण लक्षांत ठेवा कीं, या मताला आधारादाखल असा पुरावा हल्लींच्या या चळवळींतला ताजा मिळणारा नसून, ते संघ व त्या संस्था यांविषयीं सरकारचा यापूर्वी तसा ग्रह होऊन राहिलेला आहे म्हणून! पण हें जर खरें तर सरकारानें त्यांच्यावर त्यासंबंधानें पूर्वींच खटला कां केला नाहीं ? आणि याचें उत्तर हेंच कीं, त्या वेळीं खटला केला असता तर रीतसर साक्षीपुरावा करावा लागला असता म्हणून. अर्थात् हे संघ व संस्था यांच्यावर आज प्रत्यक्ष ठेवण्यासारखा कांहीं आरोप व त्याचा पुरावा सरकाराजवळ नसून सरकार केवळ त्यांच्यावर असलेला आपला जुना पोटांतला राग या मार्गानें आज उगवून घेत आहे. आग लागली असतां ती विझविण्याच्या व सामानसुमान बाहेर काढण्याच्या गर्दींत चोरानें आपला हात साधून घ्यावा अशांतलाच हा प्रकार नाहीं काय ?

बरें, या कायद्यापासून आपलें रक्षण करण्याकरितां कोण्या संघानें किंवा संस्थेनें आपलें नांव बदलावयाचें म्हटलें तरी, तिकडूनहि कायद्यानें अडचणच करून ठेवली आहे. कारण या जाहीरनाम्यांत असें म्हटलें आहे कीं, त्यांचें नांव बदललें किंवा त्या मोडून बरखास्त केल्यासारख्या दिसल्या, किंवा इतर सभासद काढून एकाच्याच हातांत सत्ता दिली, किंवा त्यांची कोणत्याहि प्रकारची शाखा कोठेंहि असली, तरी त्यांना हा जाहिरनामा लागू होतो ! याचा अर्थ सरकाराला ज्या कोणत्याहि संघाबद्दल

किंवा संस्थेबद्दल मनांतून राग, अढी किंवा संशय असेल तिचीं पाळेंमुळें खणून काढण्याचा अधिकार सरकारानें या जाहीरनाम्यानें आपणाकडे घेतला आहे. पण यानें किती मालमिळकत हकनाक बुडेल, किती निरपराधी माणसें संकटांत येतील, याची कल्पना कोणालाहि सहज करतां येईल.

सरकारानें राष्ट्रीय सभाच बेकायदा ठरविली व त्यामुळें तिच्या शाखा उपशाखा बेकायदा ठरल्या तर त्याबद्दल कांहीं तरी समर्थन सरकार कदाचित् करूं शकेल.कारण या शाखा-संस्था मुख्य संस्थेच्या अंगभूत असून, तिचा हुकूम व तिची शिस्त पाळणाऱ्या असतात. पण या जाहीरनाम्यानें बेकायदेशीर ठरविलेल्या संस्थांत अशा कित्येक आहेत कीं, त्या बेकायदेशीर ठरविण्यास सरकारास कांहींएक योग्य कारण दाखवितांच येणार नाहीं. उदाहरणेंच द्यावयाचीं तर तीं या जाहिरनाम्याला जोडलेल्या यादींत किती तरी सांपडतील! पहिलें उदाहरण कित्येक सूतसंघांचें. अ. भा. सूतसंघ ही संस्था मूळ राष्ट्रीय सभेच्या चालकांकडून निघाली असली तरी ती केवळ खादीचें असें विधायक काम करिते. पूर्वीच्या चळवळींत स्वतः सरकारानें पोलीस लोकांच्या घरांतून स्त्रियांना खादी विणण्याला मदत केली होती म्हणतात. मग तसलें काम मोठ्या प्रमाणावर सूतसंघांनीं केलें तर काय बिघडलें ? पण सरकारनें किती तरी सूतसंघ बेकायदेशीर ठरविले आहेत. बेळगांव जिल्ह्यांत हुदली आणि कुमरी येथें दे.भ.गंगाधररावजी देशपांडे यांनीं खादीचीं केंद्रें किती तरी वर्षें चालविलीं आहेत; तीं सरकारानें काय म्हणून बेकायदेशीर ठरवावीं? तसेंच हुबळीचें टिळक वाचनमंदिर अथवा विलेपारलें येथील टिळक सेवासंघ या संस्थांतून मुलामुलींकरितां गीतापाठाचें व व्याख्यान, प्रवचन, पुराण असलें म्हणजे मुख्यतः धार्मिक काम चालतें. या संस्थेच्या चालकांत व सभासदांत, राजकारणांत कधींहि न पडणारे अनेक सुखवस्तु, व्यापारी व सरकारी नोकरहि आहेत. त्यांची ही संस्था बेकायदेशीर ठरविणें हा धादांत अन्याय नव्हे काय ?

मसूरचा ब्रह्मचर्याश्रम या संस्थेंत दासबोध छापून वांटणें, नमस्कार व हनुमानसेवा यांचे धडे देऊन मुलांना शरीरसंवर्धनाची सवय लावणें व हिंदुसमाजहितार्थ शुद्धीसंघटण इत्यादि कार्यें होतात. मग हा आश्रम याच वेळीं बेकायदेशीर कां ठरावा? ही संस्था भिक्षावृत्तीनें आज अनेक वर्षें काम करीत आहे. मग त्या संस्थेवर अशी आकाशाची कुऱ्हाड आतांच काय म्हणून ? याहून मौजेचें उदाहरण मुंबई शहरांतील नॅशनॅलिस्ट म्युनिसिपल पार्टीचें होय. नॅशनॅलिस्ट हें नांव राजमान्य आहे. शिवाय या संघाचा कॉंग्रेसच्या कायदेभंगाशीं प्रत्यक्ष कांहीं संबंध नाहीं. त्याचें काम मुंबई कॉरपोरेशनमध्यें खरे लोकप्रतिनिधी शक्य तितके प्रविष्ट करविणें इतकेंच आहे.आणि ही निवडणूक आटोपली कीं तो संघ आपोआप विराम पावणार. मग अशा संघाला बेकायदेशीर ठरविण्याचें काय कारण? पण सर्वांत अधिक आश्चर्यकारक उदाहरण म्हणजे कारवार जिल्ह्यांतल्या पंचायत कमिट्यांचें देतां येईल. या पंचायत कमिट्या आपसांतील तंटे पंचायतीमार्फत तोडण्याकरितां स्थापन केलेल्या आहेत. त्यांचा हेतु प्रत्यक्ष कायदेभंगाचा नव्हे व व त्यांच्या कार्यांत बेकायदेशीर किंवा शांतताभंग करणारें कांहींएक नाहीं. असें असतां सगळ्या पंचायत कमिट्या बेकायदेशीर ठरविण्यांत आल्या!

तात्पर्य, हल्लींच्या वटहुकुमाला सर्वभक्षक हें जें नांव आम्हीं प्रारंभीं दिलें तें यथार्थ आहे. अम्मला विवेक कुठला ? ‘ दाह्याभावान् न खेदात् ज्वलन इव वने शाम्यति क्रोधवन्हिः ’ हें वाक्य येथें पुरें लागू पडतें. जें कायद्याविरुद्ध काम करितें तें बेकायदेशीर अशी व्याख्या आतां राहिलेली नसून जें सरकारला अप्रिय, ज्यावर सरकारचा मनांतून राग तें बेकायदेशीर अशी विपरीत व्याख्या या नव्या वटहुकुमांनीं बनविली आहे !

# संस्थानी शेतकरी परिषद

## अधिवेशन १ लें, तेरदळ

पूर्वी जाहीर झाल्याप्रमाणें दक्षिणी संस्थानाच्या शेतकऱ्यांची परिषद सांगली संस्थानापैकीं ता. तेरदळ येथें रविवार ता. ३ रोजीं भरली होती. अध्यक्षस्थान जमखंडीचे कर्मवीर विठ्ठल रामजी शिंदे यांनीं मंडित केलें होतें. स्वागताध्यक्षांचे जागीं तेरदळचे निरपेक्ष व उत्साही पुढारी श्री. विष्णुपंत देशपांडे ( मरळीकर ) यांची योजना झाली होती. जमखंडी, मुधोळ, जत, मिरज, कोल्हापूर, सांगली, इचलकरंजी, रबकवी, महालिंगपूर, कुरुंदवाड, शिरहट्टी, कुंदगोळ, बनहट्टी, मुधोळ, आजरें वगैरे संस्थानी हद्दींतलि प्रतिनिधी सभेकरितां मुद्दाम उपस्थित होते. प्रारंभीं स्वागतपर पद्य झाल्यावर स्वागताध्यक्षांचें खालील आशयाचें भाषण झालें.

### स्वागताध्यक्षांचें भाषण

" संस्थानी शेतकरी परिषद भरविण्याचा पहिला मान आम्हा तेरदळकरांना मिळाला ह्याबद्दल आम्हांस धन्यता वाटते. आमची अल्प व खेडवळसेवा आपल्यासारख्या विद्वान् व थोर मंडळींनीं गोड करून घ्यावी अशी विनंति आहे.

आम्ही सांगली संस्थानची प्रजा आहों. हल्लींचे आमचे प्रभू श्रीमंत चिंतामणराव आप्पासाहेब हे प्रजाहिततत्पर असल्यामुळें आजुबाजूच्या इतर संस्थानी प्रजेपेक्षां आम्ही पुष्कळ सुखी आहों. ही परिषद आमचे श्रीमंत सरकारनीं आम्हांस भरवूं दिली हेंच श्रीमंतांच्या थोर व उदार अंतःकरणाचें द्योतक आहे.

सर्व जगाला पोषक जो शेतकरी वर्ग त्याची अत्यंत हलाखी व दैना झाली आहे. दिवसेंदिवस तो जास्त बुडत चालला आहे. त्याला हात देऊन वर काढणें हें राजाचें व दूरदर्शी पुढाऱ्यांचें मुख्य कर्तव्य आहे. संस्थानी शेतकरी खालसा मुलखांतील शेतकऱ्यांपेक्षां जास्त दुःखी आहे. शेतकऱ्यांची स्थिति पशुतुल्य झाली आहे. म्हणून शेतकरी म्हणजे मनुष्यच आहे हें ज्ञान त्यास प्राप्त करून देऊन त्यांचेमध्यें जागृति व संघटना होण्याकरितांच या सभेचा जन्म आहे. त्याच्या हल्लींच्या बिघडलेल्या स्थितींत, त्यास आपल्या विश्वासांत घेऊन त्याच्या कल्याणाकरितां झटून काम करण्याची ही वेळ आहे. सारा, खंड व कर्ज यांची सूट अगर तहकुबी त्यास मिळण्याची खटपट सर्वांनीं करणें जरूर आहे. त्याचप्रमाणें शेतकरी शहाणा व स्वावलंबी बनेल असे धडे त्यास घालून दिले पाहिजेत."

अशा अर्थाचें स्वागताध्यक्षांचें भाषण झाल्यावर अध्यक्ष कर्मवीर विठ्ठल रामजी शिंदे यांचें खालील आशयाचें भाषण झालें.

### विठ्ठल रामजी शिंदे यांचें भाषण

" शेतकऱ्यांच्या हितचिंतकांनीं भरविलेली ही शेतकरी वर्गाची सभा आहे. ह्यांत शेतकरी वर्ग भरपूर नसल्याबद्दल निरुत्साही होण्याचें कारण नाहीं. कॉंग्रेसची सुरुवात ह्यूम, वेडरबर्नसारख्या इंग्रज गृहस्थांच्या प्रेरणेनें झाली हें लक्षांत ठेवा. इंग्रजांच्या उत्तेजनाखालीं निघालेली कॉंग्रेस आज इंग्रजांना नको वाटत आहे. तसेंच कदाचित् उद्यांच्या शेतकरी परिषदेसंबंधीं घडून येईल. पण त्यांत वाईट वाटण्याचें कारण नाहीं.

### द्रव्य व परिश्रम

सध्यां जगांत द्रव्य व परिश्रम यांचा लढा चालू असून त्याचें महत्त्व म. गांधींसारखे गरिबांचे, काबाडकष्ट करणारांचे कनवाळू जाणतात. त्यांनीं गोलमेज परिषदेमध्यें ह्याच लढ्याचें सूक्ष्म दिग्दर्शन असंदिग्ध शब्दांत केलें आहे. भांडवलवाल्यांच्या यांत्रिक सामर्थ्यानें खरी उन्नति होणार नाहीं. कावाडकष्ट करणारा शेतकरी वर्ग सुधारल्यानें ती प्राप्त होणार आहे हें जाणून वागलें पाहिजे."

नंतर अध्यक्षांनीं जागतिक मंदीचें, आर्थिक बिकट परिस्थितीचें व त्यामुळें सर्व वर्गापेक्षां शेतकरी वर्गाचे कसे अनुकंपनीय हाल होतात याचें विवेचन करून, ह्यावर उपाययोजना करावयास ही परिषद आहे असें सांगितलें. नंतर ते म्हणाले,

### चळवळीचा कोंडमारा

" कांहीं संस्थानिक आपल्या प्रजेमध्यें दहा वर्षांतहि कांहींच चळवळ होऊं नये अशी खबरदारी घेत असल्याचें मला आढळून आलें आहे. पण त्यांना मी अतिनम्रपणानें कळवितों कीं, कोंडमाऱ्याचे दिवस गेले. आतां वातावरणाला गवसणी घालणें शुद्ध वेडेपणाचें ठरेल. कांहीं सुशील आणि प्रजाहितैषी संस्थानी राज्यकर्त्यांनीं व त्यांच्या सुशिक्षित सल्लागारांनीं नव्या जुलमी कायद्याच्या चिंध्या गोळा करून त्यांची वाकळ तयार करून तिच्या आड मुक्या शेतकऱ्यांना लपविण्याचा प्रयत्न चालविला आहे. त्याला काय म्हणावें ! या परिषदेच्या कार्यांत विघ्नें आणलीं नाहींत याबद्दल परिषद त्यांची आभारी आहे. संस्थानाच्या दरबारनें सहकार्य केलें असतें तर फार बरें झालें असतें. कारण

दिवस सहकार्याचे आहेत, दडपशाहीचे नाहींत. सहकार्य करील तोच टिकेल."

नंतर, परिषदेनें सरकारी साऱ्याची, खंडाची व व्याजाची सूट निदान तहकुबी यांविषयीं मुख्यतः विचार करावयाचा आहे असें सांगून अध्यक्षांनीं पांढरपेशा वर्गाला आपण केवळ मध्यस्थ आहों,बोल्शेव्हिक नाहीं असें स्पष्ट शब्दांत सांगितलें. आपल्या कार्याविषयीं कोणीहि गैरसमज करून घेऊं नये असेंहि त्यांनीं विनविलें. शेवटीं सर्व वर्गांनीं मिळून शेतकऱ्यांची संघटना करणें जरूर आहे. कारण त्या वर्गावरच पर्यायानें सर्वांचें जीवन अवलंबून आहे, असें त्यांनीं कळकळीनें निवेदन केलें. त्याचप्रमाणें शेतकरी वर्गानें देखील पांढरपेशा अगर इतर वर्गाशीं तंडत न बसतां त्यांच्या सहानुभूतीचा व मदतीचा उपयोग घेऊन स्वावलंबनाच्या आधारावर आपला उद्धार करून घ्यावा अशी त्यांना स्नेहपूर्वक विनंति करून अध्यक्षांनीं आपलें भाषण संपविलें.

रविवार ता. ३ रोजीं सकाळीं श्री. अभ्यंकर यांचे हस्तें राष्ट्रीय झेंडावंदनाचा कार्यक्रम उत्साहानें पार पडला. ह्या प्रसंगीं श्री. अभ्यंकर ( सांगली ) श्री. कृष्णराव मुदवेडकर ( धारवाड ) व श्री. शिंदे ( परिषदेचे अध्यक्ष ) यांचीं झेंड्याच्या महत्त्वासंबंधीं छोटीं भाषणें झालीं.

### पास झालेले ठराव

तेरदळ येथें ता. ३ रोजीं भरलेल्या परिषदेंत एकंदर १८ ठराव पास झाले. त्यांतील पुढील ठराव महत्त्वाचे आहेत–( १ ) सध्यांच्या धारणीचें मान पाहतां शेतसाऱ्यांत १/३ सूट द्यावी अशी ही शेतकरी परिषद संस्थानिकांना विनंति करीत आहे.(२) जमीनीच्या मालकांनीं आपल्या कुळांना खंडांत १/३ सूट द्यावी.(३) अडचणींत सांपडलेल्या शेतकऱ्यांना आपलें देणें भागविण्यास मदत व्हावी ह्या दृष्टीनें धनोत्पादक अगर लोकोपयोगीं कामें विशेषतः हातरहाट व हातमाग ह्यासारखे दुय्यम धंदे निरनिराळ्या टापूंत काढून शेतकऱ्यांना त्यांच्या रिकाम्या दिवसांत त्यांच्या गांवच्या आसपास उद्योगधंदा मिळेल अशी तजवीज सरकारनें, लोकलबोर्डानें, जमीनदारांनीं व शेट सावकारांनीं करावी व शक्य तेथें मजुरीच्या रूपानें आपल्या येण्याची फेड करून घ्यावी. (४) ज्या ज्या ठिकाणीं शक्य असेल तेथें तेथें पाठबंधारे वगैरे बांधून शेतीला पाण्याचा उपयोग होऊन शेतीचें उत्पन्न वाढेल अशी व्यवस्था करावी.(५) पिकाची आणेवारी रयतांनी निवडलेले दोन पंच व सरकारी एक पंच अशा तिघांनीं मिळून करावी. ( ६ ) गायरानें प्रत्येक रानांत पुरेशीं राखून त्यांचा शेतकऱ्यांना मोफत उपयोग करूं द्यावा. ( ७ ) शेतसारा एप्रिल व मे महिन्यांत घेण्यांत यावा. ( ८ ) प्राथमिक शिक्षणाबरोबर शेतीचें शिक्षण मिळण्याची तजवीज करण्यांत यावी. ( ९ ) ग्रामपंचायतीचा कायदा लागू करण्यांत यावा व शंभर रुपयेपर्यंत दाव्याचा निकाल करण्याचा अधिकार पंचायतीस देण्यांत यावा. (१०) रयतांच्या संघटनेचें कार्य सुकर व्हावें म्हणून संस्थानांत सभा भरविण्यास मुभा असावी.(११) सावकारी हुकूमनामे,सहकारी पतपेढ्यांचे हप्ते,तगाई,मुदतीच्या दाव्यांचें देणें इत्यादिकांबद्दल शेतकऱ्यांना सवलत मिळावी म्हणून त्यांची अमलबजावणी १ वर्षपर्यंत संस्थानानें करूं नये. ( १२ ) शेतकरी व सावकार आणि सहकारी पेढ्या यांचे दरम्यान असलेल्या कर्जाच्या देवघेवींत त्यांनीं यापुढें शेतकऱ्यांकडून शेंकडा ९ टक्के व्याजापेक्षां अधिक व्याज वसूल करूं नये, व मागील थकलेलें व्याज ह्या प्रमाणांतच घेऊन बाकी व्याजाची सूट द्यावी.

परिषदेंत शेतकरी कोणास म्हणावें याबद्दलहि खल होऊन पुढील सर्वसामान्य ठराव मंजूर करण्यांत आला. (१३) 'शेतकरी'—

( अ ) स्वतःच्या मालकीच्या जमिनींत स्वतः कष्ट करून शेती करणारा.

( ब ) स्वतःची जमीन मजुरांकडून मशागत करवून घेणारा.

( क ) स्वतःचें शेत दुसऱ्यास खंडानें किंवा भागानें लावणारा.

( ड ) स्वतःचें शेत नसून दुसऱ्याचें शेत फाळ्यानें किंवा भागानें पत्करून कष्ट करणारा.

# राजवाडे संशोधन-मंदिर धुळें उद्घाटन-समारंभ

मंगळवार, मार्गशीर्ष वद्य १२ शके १८५३ हा दिवस धुळ्याच्या इतिहासांत सुवर्णाक्षरांनीं लिहून ठेवण्याइतका संस्मरणीय झाला, यांत शंका नाहीं. इतिहासाचार्य राजवाडे यांची पुण्याईच जबर! त्यांच्या निधनास पुरीं पांच वर्षें होतात न होतात तोंच त्यांच्या लौकिकास साजेशी नयनमनोहर इमारत बांधून त्यांचा सर्व इतिहासग्रंथसंग्रह सुरक्षित ठेवण्याची सोय गुणग्राही आश्रयदात्यांच्या मदतीनें धुळ्याच्या राजवाडे संशोधन मंडळानें केली ही खरोखरच कौतुकाची गोष्ट होय. भारताचार्य नानासाहेब वैद्य यांच्या अध्यक्षतेखालीं इंदूरच्या महाराणी श्री. सौ. इंदिराबाईसाहेब यांचे हस्तें उद्घाटन समारंभ मोठ्या थाटानें व अपूर्व उत्साहानें पार पडला. समारंभास स्त्रीपुरुषांची विलक्षण गर्दी लोटली होती. श्री. वैद्य, प्रो. पोतदार, यंदे, मुंडले, वर्ध्याचे विनोबा भावे, भाऊसाहेब बारगळ, भाऊसाहेब कदम बांडे वगैरे जहागिरदार, तसेंच श्री. दादा खरे, गुलाबसिंग, लहु पाटील इत्यादि प्रमुख गृहस्थ पूर्व खानदेशांतून, भागवत वकील, हरिभाऊ पाटसकर, शेठ नारायण बंकट, काळूकाका भागवत, बाबासाहेब केळकर इत्यादि सद्गृहस्थ व स्थानिक अधिकारी व पुढारी असा प्रचंड समाज समारंभासाठीं उपस्थित होता. श्री. भावे, प्रो. पोतदार व मुंडले यांची राजवाडे यांच्या चरित्रावर स्फूर्तिदायक भाषणें झालीं.

या समारंभासाठीं श्री. सौ. महाराणी इंदिराबाईसाहेब होळकर आपल्या लवाजम्यानिशीं इंदुराहून धुळें येथें आल्या होत्या. प्रथम स्वागतपर गायन व हार-अर्पण होऊन संस्थेचा अहवाल वाचल्यावर श्री. सौ. महाराणी इंदिराबाईसाहेब यांचें पुढील आशयाचें भाषण झालें.

## इंदिराबाईसाहेब होळकर यांचें भाषण

"आज मंगळवार, मार्गशीर्ष वद्य १२ शके १८५३ हा कैलासवासी 'आर्यसंस्कृतिप्रदर्शक व प्रवर्तक आचार्य' विश्वनाथ काशीनाथ राजवाडे बी. ए. यांचा पांचवा पुण्य-स्मृति-दिन होय. श्रीक्षेत्र काशी येथील भारतधर्म-महामंडळानें राजवाड्यांस 'पुरातत्व भूषण' ही पदवी सादर केली होती. लौकिकांत राजवाड्यांस 'इतिहास-संशोधक' संबोधितात. स्मारकयोजनेसंबंधाचें विनंति-पत्र केसरींत प्रसिद्ध झालें त्यांत 'इतिहासाचार्य राजवाडे' असा उल्लेख आहे. राजवाड्यांच्या अनेक व विविध चळवळी ज्या वेळीं ज्या मानानें दृष्टोत्पत्तीस येत गेल्या त्या वेळीं त्या मानानें जनता त्यांस संबोधीत गेली. आज त्यांचें साग्र स्वरूप डोळ्यापुढें आल्यानें त्यांस 'आर्यसंस्कृतिप्रदर्शक व प्रवर्तक आचार्य' असें संबोधिल्यास सार्थ होईल असें वाटतें.

ज्या राजवाड्यांच्या पुण्यस्मरणार्थ आज आपण येथें जमलों आहोंत, त्यांचें चरित्राचें सिंहावलोकन करूं या. राजवाडे शके १७८५ त जन्मले व शके १८४८ त परलोकवासी झाले, म्हणजे ते ६३ वर्षें जगले. यांतील पहिलीं २७ वर्षें अध्ययनास लागलीं, राहिलीं ३६ तीं अध्यापनांत गेलीं.

### राजवाडे-विद्यार्थी

त्यांचें विद्यार्जन कसें झालें हें त्यांचें चरित्रांत पाहूंया. 'शरीर मोकळ्या हवेंत जितकें अधिक ठेवितां येईल तेवढें ठेवण्याची खबरदारी घेतली. सूर्यप्रकाश व मोकळी शुद्ध मुबलक हवा ही शरीरास जितकी मिळतील तितकी थोडीच अशा व्यायामपद्धतीनें आपली प्रकृति निकोप व सुदृढ करून घेतली. ही शरीराची जोपासना चालू असतां अनेक विषय आलटून पालटून त्यांनीं चाळिले. इतिहास, अर्थशास्त्र, नीतिशास्त्र, राजनीतिशास्त्र, तत्त्वज्ञान, तर्कशास्त्र व मानसशास्त्र यांवरील प्राचीन व अर्वाचीन, अस्सल व भाषांतरित बरेच ग्रंथ मीं मननपूर्वक वाचले. शिवाय, वनस्पतिशास्त्र व फारशी भाषा कामापुरती मी शिकलों. सतत पंधरा वर्षें बारा आणि बारा चोवीस तास सर्व कामें मी इंग्रजींत करूं लागलों; परंतु चिपळोणकरांच्या टीकात्मक निबंधांनीं इंग्रजीच्या खग्रासापासून माझा बचाव केला. काव्येतिहाससंग्रहकारांच्या ऐतिहासिक पत्रांनीं स्वदेशी म्हणून कांहीं आहे हें मला कळलें. परशुरामपंत तात्या गोडबोले ह्यांनीं छापिलेल्या काव्यांनीं महाराष्ट्रसारस्वताचा मला अभिमान वाटूं लागला.' विद्यार्थीदशेंत शरीर पौर्वात्य पद्धतीनें कमाविलेलें, तर मनावर प्रथम प्रथम बलिष्ठ पाश्चात्य संस्कार, व क्वचित पौर्वात्य संस्कृतीचें सिंचन अशा तऱ्हेनें बनलेले,

### राजवाडे भाषान्तरकार

झाले. प्लेटोचें रिपब्लिक, मान्स्क्यू यांचें एस्प्रिद् धि लॉज या ग्रंथाचें भाषांतर मराठींत त्यांनीं प्रसिद्ध केलें. मायभाषा समृद्ध करावयाची, पण तीबाहेरील संपत्ति केवळ सांठवून, असा हा प्रयत्न कांहीं वर्षें चालला. श्रीविठ्ठलछापखान्याबरोबर हें सर्व भाषांतर-भांडवल श्रीअग्निनारायणाचे स्वाधीन झालें. मातृभाषेचें सौभाग्य अंगच्याच वैभवानें जगतापुढें यावयाचें होतें. आणि पुढें

### राजवाडे-संशोधक

झाले. आतां मात्र त्यांचे बुद्धिमत्तेस पूर्ण वाव मिळाला. पाश्चात्य व पौर्वात्य अंगें त्यांस स्पष्ट

विसूंन लेखनांत तौलनात्मक विवेचन वावरूं लागलें. या कार्यासाठीं त्यांचे "मराठ्यांचे इतिहासाचीं साधनें" नांवाचे २०-२२ खंड बाहेर पडले. या खंडाच्या प्रस्तावना म्हणजे विविध-विषयांच्या तौलनिक अध्ययनाच्या व सिद्धांताच्या ज्ञानखाणीच होत. इतिहासाची व्यापक कल्पना डोळ्यापुढें ठेवून, कागदपत्रांवरून शब्द-संग्रहाकडे, शब्द-संग्रहावरून व्याकरणाकडे, व्याकरणावरून भाषेकडे व भाषेवरून "विकार व विचारप्रदर्शनांच्या साधनांची इतिहासपूर्व व इतिहासोत्तर उत्क्रांतीकडे" त्यांची प्रगल्भ, व्यापक व तौलनिक बुद्धि संचरत गेली. गंगोत्रींत जन्म पावणारी व स्थलकालानें बद्ध झालेली जान्हवी आपल्या प्रवाहाचें पात्र विस्तृत करीत करीत, सभोंवतालचे प्रांतांस सुपीक व समृद्ध करून शेवटीं स्थलकालक्रमातीत होत्साती सागरांत लीन होऊन जाते; त्याप्रमाणें राजवाड्यांची बुद्धिमत्ता प्रथम स्थल-कालानें बद्ध होत्साती 'शिवकालीन समाज--रचना' 'रामदास,' 'ज्ञानेश्वरी व राधा--माधव--विलास--चंपूची प्रस्तावना,' 'महानुभावीपंथाच्या गुप्त भाषेचा उलगडा,' 'संस्कृत भाषेचा उलगडा' इत्यादि विषयांवर उजेड पाडून 'मराठी धातु-कोशांतून' अखेरीस आर्यसंस्कृतीच्या विविध व विशाल सागरांत लीन झाली.

### राजवाडे—संस्थापक

इतिहासाचें व्यापक स्वरूप मांडिल्यावर कार्या-संबंधीं राजवाडे म्हणतात—"काल, देश व कुल या त्रिविध दृष्टीनें भारतवर्षाच्या व महाराष्ट्राच्या नानाविध चरित्राचा अफाट विस्तार पाहातां, आज पर्यंत प्रसिद्ध झालेलीं साधनें बिंदुमात्र आहेत. एके-कट्यांच्या सान्निपातिक तडफेनें काम फार तुटपुंजें, असमाधानकारक व कनिष्ट प्रतींचें होतें. 'कलौ संघः प्रकीर्तितः' ही संघशक्ति अनेक प्रकारांनीं योजितां येते. यानंतर पुण्याचें 'भारत—इतिहास संशोधक—मंडळ' गुरुपुण्याचे मुहूर्तावर जन्मले, अमळनेरास असेंच दुसरें मंडळ निघालें. पुण्यास 'समाज—शास्त्रमंडळ,' 'शिक्षा—विचार—मंडळ,' व 'भौतिकशास्त्र संशोधन मंडळ' त्यांच्याच प्रोत्साहनानें जन्मास आलीं. या सर्व संशोधनालयांचें चालन वा पुनरुज्जीवन म्हणजे राजवाड्यांचें स्मारक हें सांगणें नकोच. विसाव्या शतकांत ज्या वेळीं आर्य संस्कृति पादाक्रांत होऊन विस्कळित, विस्मृत व विकृत--रूप होत होती त्या वेळीं तौलनिक अध्ययनानें तिची योग्यता जनास पटविली.त्या थोर व्यक्तीस—

### राजवाडे—आचार्य

'आर्यसंस्कृतिप्रदर्शक व प्रवर्तक आचार्य' असें संबोधिलें, आणि या मंदिरास त्यांचे तपश्चर्येचें क्षेत्र म्हणून उल्लेखिलें तर योग्य होईल असें वाटतें. आपल्या पंचभौतिक देहाच्या आकृतीनें या मंदिरा-चा शिरोभाग मंडित झाला आहे, तर अंतरंग आपल्या तपश्चर्येनें भारलेलें आहे. 'ज्ञानार्जनामध्यें ज्यांचें सर्व आयुष्य गेलें, विद्येची मर्यादा वाढवि-ण्यांत ज्यांनीं तपेंच्या तपें घालविलीं व सर्व शास्त्रांत अपूर्व शोध करून मानव जातीला ज्यांनीं अक्षय ऋणी करून ठेविलें, अशा गुरुवर्यांनीं चालविलेली एखादी पाठशाळा असावी. तेथें १०—२० वर्षे राहून 'विद्या केवळ ज्ञानार्जनाकरितां शिकावयाची' या सिद्धांताच्या अनुरोधानें 'विद्यार्जनाची माझी हौस, अधिकारी गुरूंच्या देख-रेखीखालीं मी पुरवून घेतली असती' ही आपली हौस आतां या संस्थेची व्हावी. 'भारतेतिहास, भारतीय अर्थशास्त्र, भारतीय राजधर्मशास्त्र, भारतीय समाजशास्त्र, भारतीय भाषाशास्त्र यांचें अध्ययन--अध्यापनाचा' आपला ठराव आतां या संस्थेकडे सोंपवा. 'वागीश्वरांची ओळख धनेश्वरांना पटून शास्त्रें, कला, ज्ञानप्रसार व विदग्ध वाङ्मय यांनीं भूमि फुलून जाईल' ही आपली आशा या संस्थेच्या स्वाधीन करा. 'विद्या व्याप आणि वैभव' यांचा आशीर्वाद या.आर्य--संस्कृतिरूपी देवीचें अधिष्ठान आज येथें होऊन तिच्या दिव्य नेत्रांतून अभ्युदय आणि निःश्रेयस यांचा प्रादुर्भाव दशदिशांस होवो असा मंगलध्वनि ऋषि, मुनि, आचार्य, संत, साधु गुरु-जनामधून निघो अशी सविनय प्रार्थना करून 'राज वाडे--संशोधन--मंदिर आम्ही खुलें करितों." यानंतर

### श्री. नानासाहेब वैद्य

यांचें अध्यक्ष या नात्यानें विद्वत्तापूर्ण व विनोद-प्रचुर असें समयोचित भाषण झालें. मंडळाचे चिट-णीस श्री. तात्यासाहेब भट यानीं मंदिरास मिळा-लेल्या देणग्यांचा उल्लेख केला. त्यांत विरदेलचे पाटील श्री. लहू चिमणाजी यानीं १०१ रु. देणगी दिली ही मोठ्या अभिनंदनाची गोष्ट म्हटली पाहिजे. मंदिराचें काम सुबक रीतीनें करणार श्री. सिताराम मेस्त्री व त्यांचे मदतनीस यांस आणि सदाशिव फोटोवर्कर्सचे तरुण व उत्साही मालक श्री. माधवराव सहस्रबुद्धे यांस महाराणीसाहेबांच्या हस्तें पारितोषिकें अर्पण करण्यांत येऊन सर्वांचे मनःपूर्वक आभार मानल्यावर हा अपूर्व समारंभ समाप्त झाला. पाहुणेमंडळींस स्मारकमंडळा-मार्फत दुसरे दिवशीं थाटाची मेजवानी देण्यांत आली. त्यानंतर श्री. सौ. गिरजाबाई केळकर, रा. रा.विनोबा भावे, प्रो. पोतदार, रा. रा.मुंडले यांचीं भाषणें झाल्या-वर अध्यक्ष रावबहादुर चिंतामणराव वैद्य यांनीं समा-रोप केल्यावर राष्ट्रगीत गाण्यांत आलें व समारंभ आटोपला.



## कॉमरेड मानवेंद्र नाथ रॉय

कानपूर येथें जगप्रसिद्ध क्रांतिकारक श्री. एम. एन. रॉय यांजवर सेशन जज्जापुढें चालू असलेला खटला ता. ९ जानेवारी रोजीं संपून जज्जांनीं रॉय यांस बारा वर्षांची काळेपाण्याची शिक्षा फर्मावली ! रॉय यांस ता. २१ जुलै रोजीं मुंबईस पकडण्यांत आलें. तेव्हांपासून शिक्षा होईपर्यंतचे जवळ जवळ सहा महिने ते पोलिसांच्या अटकेंतच होते. त्यांचें चरित्र मोठें अभ्दुतरम्य आहे. त्यांनीं आयुष्याचीं गेलीं सात वर्षें हिंदुस्थानाबाहेर काढलीं. १९२४ सालच्या कानपूर येथील कटाच्या खटल्यांतच ते अडकावयाचे; परंतु त्या वेळीं पोलिसांना झुकांडी देऊन त्यांनीं परदेश गांठला. परदेशांत जाण्यापूर्वी व परदेशांत असतांनाहि त्यांचें धाडस, प्रसंगावधान, देशभक्ति, सहनशक्ति इत्यादि अनेक गुण कसोटीस लागले आहेत. जर्मनींत असतां त्यांचा कम्यूनिस्ट मतांच्या लोकांशीं संबंध आला. तेव्हांपासून हिंदुस्थानास पारतंत्र्यांतून सोडविण्याचा कम्यूनिझम हा मार्ग त्यांना पसंत पडून ते त्या पंथांत शिरले व त्यांचा प्रवेश रशियांतील बोल्शेव्हिक सरकारच्या अगदीं अंतर्गत भागांत झाला. चीनमधील राज्यक्रांतीस रॉय यांची पुष्कळ मदत झाली असें म्हणतात. परन्तु पुढें कम्यूनिस्ट पक्षाच्या सूत्रधारांशीं त्यांचा मतभेद होऊन त्यांना रशियांतील बोल्शेव्हिक सरकारचा संबंध तोडावा लागला. ते गेल्या वर्षी कराची येथील राष्ट्रीय सभेच्या अधिवेशनाचे आधीं हिंदुस्थानांत गुप्तपणानें आले. त्यांच्यासारखा धाडसी व हिकमती माणूस आपल्या पायानें हिंदुस्थानांत परत आला त्या अर्थी आज नाहीं उद्यां तो पोलिसांच्या तावडींत सांपडणार हें समजूनच आला असला पाहिजे हें उघड आहे. त्यावरून रॉय यांना झालेली शिक्षा त्यांच्याहि दृष्टीनें अनपेक्षित नव्हे. तथापि ती जबर आहे यांत शंका नाहीं. खटला चालू असतां वकील देण्याच्या किंवा पुरावा जमविण्याच्या कामीं त्यांना सरकारकडून मिळाव्या तितक्या सवलती मिळाल्या नसल्यानें रॉय यांना आपली बाजू नीट मांडतां आली नाहीं. ती मांडतां आली असती तर कदाचित् खटल्याचें स्वरूप पालटून त्यांना हल्लींहून कमी शिक्षा होण्याचा संभव होता. रॉय यांची देशभक्ति, धाडस व स्वार्थत्याग हे गुण आदरणीय असल्यानें त्यांच्यावर आलेल्या तुरुंगवासाच्या कष्टमय प्रसंगांत त्यांजविषयीं सर्वांना सहानुभूति वाटेल यांत शंका नाहीं.

---

## पं. जवाहरलालजींचे उद्‌गार

ता. ४ रोजीं पं. जवाहरलाल नेहरू यांना अलाहाबाद येथें २ वर्षें सक्त मजुरीची शिक्षा ठोठावण्यांत आली. तेव्हां त्यांनीं मॅजिस्ट्रेटापुढें जें पत्रक सादर केलें त्यांत ते म्हणतात, "माझ्या खटल्यासंबंधीं मी कांहींच बोलूं इच्छीत नाहीं. पण माझ्या प्रांतांतील शेतकऱ्यांनीं मला देशसेवेची जी अपूर्व संधि आणून दिली त्यासंबंधीं मला वाटत असलेली निःसीम कृतज्ञता व्यक्त केल्याखेरीज मला राहवत नाहीं. माझ्या प्रांतांतील, विशेषतः अलाहाबाद जिल्ह्यांतील, माझ्या किसानबंधुंविषयीं मला किती अभिमान वाटतो म्हणून सांगूं ! त्यांनीं एक प्रचंड अग्नि प्रदीप्त केला आहे. ज्या ब्रिटिश सत्तेनें या देशाचें भयंकर रक्तशोषण चालविलें आहे आणि ज्या राज्यव्यवस्थेनें त्यांच्या निढळाच्या घामानें मिळविलेलें फळ त्यांच्यापासून हिरावून व त्यांना पशुकोटीला पोंचवून दुःस्थितींत खितपत ठेवलेलें आहे त्या ब्रिटिश सत्तेची आणि त्या राज्यव्यवस्थेची रक्षा झाल्याखेरीज तो अग्नि कदापि शांत होणार नाहीं. हें उद्दिष्ट साधण्याकरितांच मी झगडलों, आणि माझ्या अंगांत त्राण असेपर्यंत मी हाच लढा पुढें चालवीन. तुरुंगाच्या चार भिंतींत मी अनेक गोष्टींचें चिंतन करीत राहिलों तरी ज्या ठिकाणीं माझे किसानबंधू कष्टदशा भोगीत आहेत, त्या खेड्यांत व त्या शेतांतच माझें मन सदैव वास करील. त्यांच्या हालअपेष्टा संपवून त्यांना चालू लढ्यांत विजय मिळावा आणि त्यांची सर्व दुःस्थिति स्मृतिशेष व्हावी अशीच मी प्रार्थना करीत राहीन. असा संपूर्ण विजय मिळाल्यावांचून कोणतीहि तडजोड वा शांतता अशक्य आहे."

# बाबांनो, हें सगळें तुमच्याच हिताकरितां !

॥ प्रहरिष्यन् प्रियं ब्रूयात् । प्रहरंश्च प्रियोत्तरम् ॥ ॥ प्रहृत्य च कृपायीत । शोचेत च रुदेत च ॥

—म. भा. १–१४०–५६

शत्रूवर घाव घालण्यापूर्वी गोड बोलावें, घाव घालतांना तर त्याहून गोड बोलावें आणि घाव घातल्यानंतरहि त्याजविषयीं दया दाखवून खेद प्रदर्शित करावा व प्रत्यक्ष डोळ्यांतून गंगा-यमुनाहि वाहूं द्याव्या ! ही जी कुटिल कणिक-नीति तींत अत्यंत तरबेज असलेलें सरकार एकीकडे वटहुकुमांच्या प्रहारानें कहर उसळून सोडीत आहे आणि दुसरीकडे मोठ्या खेदाचा आवि-र्भाव आणून सांगत आहे कीं, बाबांनो, आमचा नाइलाज झाला म्हणून आम्हांस असे कोरडे ओढावे लागत आहेत, पण हें सगळें तुमच्याच भावी कल्याणाकरितां आहे ! यावरून वटहुकुमांचा नंगा नाच चालू असतां आत्मसमर्थन करण्याची जरूर वाटण्याइतकें तरी सरकारानें डोकें ठिकाणावर आहे असें मानावयाचें का इतका धुमाकूळ माजवून देखील आत्मसमर्थन करण्यास पुढें येण्याइतकें सरकार निगरगट्ट बनलें आहे असें समजावयाचें याचा विचार ज्याचा त्यांनींच करावा. पण हें खेदप्रदर्शन व आत्मसमर्थन बंगाल, संयुक्तप्रांत, मध्यप्रांत, मुंबई वगैरे ठिकाणीं एकसमयावच्छेदेंकरून होत आहे यावरून तें एक-सूत्रानें, अर्थातच धोरण म्हणून, चालू असावें असेंच अनुमान त्यावरून निघतें.

असल्या या आत्मसमर्थनाच्या नाटकाकरितां मुंबईच्या गव्हर्नरसाहेबांनीं ता. ११ रोजीं मुंबईतील बडे बडे व्यापारी व कारखानदार यांच्या प्रमुख प्रति-निधींना पाचारण केलें आणि त्यांच्यापुढें हें पुराण सांगण्यांत आलें. पुराणाचा इत्यर्थ हाच कीं, हें वटहुकुमांचें शस्त्र चालविण्यांत ब्रिटिश मालाचा खप बळजबरीनें वाढवावा असा बिलकुल हेतु नसून केवळ भावी प्रांतिक स्वायत्ततेचा कारभार सुरळीत चालावा एवढ्याकरितांच हें हत्यार उगारलें आहे आणि तें हत्यार चालविल्यामुळें तुमच्या व्यापारास व उद्योगधंद्यास कांहीं हरकत होत असल्यास ती कशी टाळतां येईल याविषयीं तुम्हांस कांहीं सूचना करावयाच्या असतील तर त्या करा; परंतु राष्ट्रीय सभा व तिचे अनुयायी यांना विधायक असें कांहींच धोरण नसून त्यांची सगळी चळवळ शांतता व सुव्यवस्था यांना विघातक अशीच असल्यामुळें ती चळवळ चिरडून टाकून नामशेष करीपर्यंत आम्ही हें वट-हुकुमांचें शस्त्र खालीं ठेवणार नाहीं !

‘खाई त्याला खवखवे’ म्हणतात तें किती खरें आहे याचें प्रत्यंतर या होअरशाही शिक्याच्या आत्मसमर्थ-नावरून येतें. ब्रिटिश मालावर बहिष्कार घालण्याचें ठरतांच सरकार खवळून गेलें आणि शांततेच्या पिकेटिंगला पूर्वी मनाई नसतां नव्या वटहुकुमानें तशी मनाई करण्यांत आली; यावरूनच या दडपशाही-च्या बुडाशीं कोणती भावना असावी याचें अनुमान करतां येतें. लँकेशायरच्या कापडावरील बहिष्काराचा प्रतिकार कसा करावा याची वाटाघाट पार्लमेंटांतील प्रश्नोत्तररूपानें गतवर्षीपासून चालू आहे. पण त्या वेळचे भारतमंत्री वेजवुड बेन हे न्यायाची चाड बाळगणारे असल्यामुळें ‘कायद्याच्या जबरदस्तीनें कांहीं आपला माल हिन्दीइकांवर लादतां येत नाहीं’ असें उत्तर त्यांनीं त्या वेळीं दिलें होतें. परंतु त्यांच्या जागीं नव्या दमाचे व झारशाही वळणाचे होअर हे आले आणि त्याच वेळीं इकडे बंगाल्यांत ब्रिटिश मालावर बहिष्कार टाकण्याची चळवळ उपस्थित झाली. त्याबरोबर रुपयाचा संबंध पौंडाशीं जोडून ब्रिटिश मालाला सुमारें २० टक्के सवलत मिळेल अशी कारवाई करण्यांत आली आणि वर्किंग कमिटीनें ब्रिटिश मालावरील बहिष्काराचा ठराव मान्य करतांच शांततेच्या निरोधनालाहि गुन्ह्याच्या सदरांत बसविण्यांत आलें ! या पूर्वसंदर्भावरूनच नवीन वटहुकूम लिहितांना सरकारच्या डोळ्यांपुढें ब्रिटिश मालाचा खप कसा बंद न पडेल हें धोरण होतें का नव्हतें तें कळून येणार आहे.

हल्लींच्या वटहुकुमांचें सर्वव्यापक कांटेरी जाळें पाहिलें म्हणजे असें वाटूं लागतें कीं, ब्रिटिश मालावर बहिष्कार घालणें हा गुन्हा आहे अशा अर्थाचा एकच वटहुकूम उघडपणें काढला असता तर तो देखील एकपरीनें पुरवला असता ! पण हल्लींच्या वटहुकुमांचें हें कांटेरी जाळें नको! कारण या कांटेरी जाळ्यानें इतकी जागा व्यापून टाकली आहे कीं, कोणीहि कितीहि जपून चालणारा असला तरी मी जाळ्यांत अडकणार नाहीं, अशी खात्री कोणासच देतां येणार नाहीं. पूर्वी १९०९ सालीं सरकारनें प्रथमच प्रेस ॲक्ट केला त्या वेळीं त्याचा मसुदा तयार करण्याकरितां ऑस्ट्रियांतला प्रेस ॲक्ट कित्त्यादाखल आपल्यापुढें ठेवला होता असें सांगतात ! त्याप्रमाणें सध्यांचे वटहुकूम लिहितांना महायुद्धाच्या वेळीं बेल्जम देश व्यापल्यानंतर तेथील जर्मन सर्वाधिकारी बॅरन व्हान बिसिन यानें बेल्जम लोकांवर नियंत्रण ठेवण्यासाठीं जे नियम तयार केले होते तो कित्ता सरकारानें पुढें

ठेवला असावा असें वाटतें. कारण त्याशिवाय असल्या सर्वंकष नियमांचें हें कांटेरी जाळें तयार होऊंच शकलें नसतें.

या नियमावलींतला कोणता नियम तुम्हांला बाधक वाटतो तो सांगा असें गव्हर्नर साहेब व्यापाऱ्यांना विचारतात! जेथें प्रत्येक नियमांतला प्रत्येक शब्द मर्मस्थानाला झोंबून जीव कासावीस करणारा आहे तेथें हा नियम कडक व तो नियम सौम्य असा भेदाभेद तरी कसला करावयाचा! एखाद्याला उकळत्या तेलाच्या कटाहांत टाकून देऊन तुझ्या शरीराचा कोणता अवयव पोळला जात आहे तें सांग म्हणजे त्या बाजूचा जाळ कमी करतों असें म्हणण्यासारखेंच हें विचारणें चीड आणणारें आहे. या नियमावलीनें कोणत्या व्यक्तीस कसचें स्वातंत्र्य शिल्लक ठेवलें आहे! नेहमींच्या व्यवहारांत 'ज्याला कर नाहीं त्याला डर कशाची' अशा समजुतीनें निश्चिंत राहातां येतें, कारण, " जो करील तोच भरील ' असा नियम पाळला जाईल असा विश्वास वाटत असतो. पण या वटहुकुमानें तेवढाहि विवेक राखलेला नाहीं. कारण यांत मुलाच्या दंडाबद्दल बापालाहि तुरुंगांत टाकतां येतें! शिवाय तुम्ही कांहीं करा अगर न करा, सर्वाधिकारी बनविलेल्या मॅजिस्ट्रेटाच्या डोक्यांत तुम्ही अमुक कराल अशी कल्पना आली कीं तुम्ही या कांटेरी जाळ्यांत अडकलांच. एवढेंच नव्हे तर ज्या वटहुकुमाच्या जोरावर तुम्ही हा गांव सोडूं नका, तुम्ही त्या गांवांत येऊं नका, अमक्या रस्त्यानें जाऊं नका, अमक्या सभेंत बोलूं नका, अमूक लिहूं नका, असले संदेश छापूं नका, तसले फोटो प्रसिद्ध करूं नका, अमक्या संस्थेचे सभासद होऊं नका, तमक्या संस्थेला साहाय्य करूं नका, हें घर आमच्या ताब्यांत द्या, अमका माल आमच्या स्वाधीन करा, हा माल किती किंमतीला विकत घेतला तें कळवा, तो माल किती नफ्यानें विकतां। तें सांगा, तुमच्याजवळ किती माल शिल्लक आहे त्याची यादी द्या, हा माल विकूं नका, तो माल सीलबंद करून ठेवा, या कचेरींत येऊं नका, त्या गाडीनें किंवा मोटारीनें प्रवास करूं नका, अमक्या स्टेशनावरच उतरा, तमक्या स्टेशनावर उतरूं नका, तुमच्या घरांत गाड्याघोडीं, मोटारी किती आहेत त्यांची नोंद करून द्या, तीं वाहनें आम्ही फर्मावूं तेव्हां आमच्या हवालीं करा, स्पेशल गाड्या सोडा म्हणतांच गाड्या सोडा, रोजच्या गाड्या आज सोडूं नका असें कळवितांच त्या रद्द करा, तमक्या गाडीनें जाऊं देऊं नका म्हणतांच त्या डब्यांतून उतरूंना ताबडतोब खालीं खेचा, आम्ही हाक मारूं तेव्हां पोलीस कामगार बनून आमच्या मदतीस धांवून या, तुमचीं पत्रें बटवडा झालीं नाहींत तरी तक्रार करूं नका, तार पोंचली नाहीं तरी गाऱ्हाणें गाऊं नका, बँकेच्या अमक्या ठेवीदाराला त्याच्या स्वतःच्या मालकीचीहि ठेव देऊं नका असा हुकूम येऊन आदळतांच रक्कम देण्याचें बंद करा, ती रक्कम अमक्या अधिकाऱ्याच्या हातीं द्या, असें म्हणतांच ती त्याच्या हातावर ठेवा असले नेहमींच्या कायद्याला धाब्यावर बसविणारे हुकूम फर्मावितां येतात त्या वटहुकुमांच्या अमदानींत कोणतीहि व्यक्ति उपसर्ग पोंचल्याखेरीज राहूं शकेल ही कल्पनाच असंभवनीय होय!

महायुद्धाच्या काळांत 'डिफेन्स ऑफ इंडिया' अॅक्टाखालीं जितके कडक निर्बंध घातले गेले नव्हते तितके कडक निर्बंध या वेळीं जारी करून पुनः हें सगळें तुमच्याच कल्याणाकरितां चाललें आहे, त्यांत आमचा स्वार्थ लवमात्र नाहीं, असा निर्वाळा देणाऱ्याचें असंबद्ध धार्ष्ट्य खरोखरीच अभूतपूर्व असलें पाहिजे! बरें, आमचें कल्याण यानें कसें साधणार, अशी पृच्छा केली असतां त्याला जें उत्तर देण्यांत येतें तें त्याच्याहूनहि असंबद्ध! काय म्हणे, प्रांतिक स्वायत्तता मिळाल्यानंतर त्या त्या प्रांताचा कारभार बिनहरकत सुरळीत चालावा म्हणून आज हे असले कांटेरी लगाम प्रजाजनांच्या तोंडांत कोंबण्यांत येत आहेत! भविष्यकालांत मुंबई इलाख्याचा कारभार सुयंत्रित चालावा म्हणून आज मसूरचा ब्रह्मचर्याश्रम उधळून लावून त्यांतील अल्पवयी विद्यार्थ्यांस देशोधडीला लावणें आवश्यक आहे, किंवा हुदलीचें खादीकेंद्र बंद करणें जरूर आहे, किंवा हुबळीच्या भगिनीमंडळाच्या कन्याशाळेवर गदाघात करणें प्राप्त आहे असला कार्यकारणसंबंध ज्यांच्या बुद्धीला पटेल त्यांच्या बुद्धीला कांहींहि पटेल!

पण या सोटेशाहीच्या कारस्थानाच्या मुळाशीं अंतःस्थ हेतु काय आहे तो गव्हर्नरसाहेबांच्या भाषणांतूनच उघडकीस आला. राष्ट्रीय सभेच्या चळवळीला गतवर्षी अशी बंदी झाली नसतां याच वर्षी इतकीं कडक बंधनें कां अशी शंका कोणी घेईल म्हणून त्या शंकेच्या निराकरणार्थ गव्हर्नर असें बोलून गेले कीं, हिंदी स्वराज्याचें स्वरूप गतवर्षी निश्चित झालें नव्हतें. त्यामुळें त्या वेळीं कोणी कसलीहि मागणी केली तरी तिला हरकत घेण्यांत तथ्य नव्हतें. परंतु यंदा गोलमेज परिषदेंत आणि पार्लमेंटांत भावी हिंदी स्वराज्याची रूपरेषा व त्याबरोबरच त्याचीं रक्षाबंधनेंहि निश्चित झालीं आहेत आणि लवकरच ती योजना अमलांत येईल. तेव्हां तसल्या प्रांतिक स्वायत्ततेला अपशकुन होऊं नये म्हणून तिला विरोध करणाऱ्यांना प्रतिबंध करणें हे ट्रस्टी या नात्यानें आमचें कर्तव्यच आहे आणि तें कर्तव्य आम्ही निश्चयानें पार पाडूं!

या भाषणावरून एक गोष्ट स्पष्ट आहे कीं, गोलमेज परिषदेंत, स्वराज्याचा शिक्का मारलेली जी एक विद्रूप मूर्ति पुढें उभी करण्यांत आली, तिचेंच भजनपूजन हिंदी जनतेनें केलें पाहिजे असा सरकारचा आग्रह आहे. आणि जे कोणी हिंदी नागरिक त्या विद्रूप मूर्तीपुढें मस्तक नमविण्याचें नाकारतील व आपल्या उपासनेला योग्य अशी दुसरी एखादी मूर्ति घडविण्याचा आग्रह धरतील त्यांना सरकारमान्य अशा मूर्तीचा अपमान केल्याबद्दल प्रायश्चित्त भोगावयास लावण्याचा सरकारचा निश्चय ठरलेला दिसतो. अर्थातच सरकारी राज्यघटनेच्या तपशिलाचा विचार करण्याकरितां ज्या विलायती कमिट्या लवकरच हिंदुस्थानांत येतील त्या कमिट्यांवर सायमन कमिशनप्रमाणें बहिष्कार पडूं नये, त्या कमिट्यांशीं हिंदी पुढाऱ्यांनीं असहकार पुकारूं नये, किंबहुना त्या कमिट्यांशीं सहकार्य करण्यासाठीं त्यांनीं तत्परतेनें पुढें यावें, आणि त्या कमिट्यांच्या रिपोर्टावरून रक्षाबंधनांनीं जखडलेली जी स्वराज्यघटना तयार केली जाईल तिच्यांतच समाधान मानून राहावें, म्हणूनच हा वटहुकुमांचा धांगडधिंगा सुरू आहे.

लहान मुलांना त्यांच्याच हिताकरितां नाक दाबून तोंड उघडबून औषध पाजण्यांत येतें, त्याप्रमाणें आम्ही या वटहुकुमांनीं तुमचें नाक दाबून तुमच्या तोंडांत ही स्वराज्यघटना कोंबणार, असा सरकारच्या म्हणण्याचा आशय दिसतो. परंतु हिंदी जनता ही कांहीं आतां अज्ञ बालक राहिलेली नाहीं. तिला स्वतःचें हित पूर्णपणें कळत आहे, व तें कसें साधून घ्यावें याचा मार्गही तिला अवगत आहे. अर्थातच जी कोणती स्वराज्यघटना सरकार आपल्या डोक्यावर बसवील ती डोक्यावर घेऊन नाचण्याचें वेडेपण तिच्या हातून घडणार नाहीं, आणि दडपशाहीच्या जुलमानें जीव कितीहि बेजार झाला तरी राष्ट्रीय सभेला जी राज्यपद्धति मान्य होणार नाहीं तिला जनतेकडून कधींहि मान्यता मिळणार नाहीं. उदाहरणार्थ, सर पुरुषोत्तमदास ठाकुरदासासारखे व्यापारीच घ्या. ते राष्ट्रीय सभेचे सभासद कधींच नव्हते. पण त्यांनाहि संपूर्ण स्वराज्य नको असें कोण म्हणेल? यास्तव हा सगळा वटहुकुमांचा धिंगाणा केवळ हिंदी लोकांच्या कल्याणाकरितां आम्ही चालविला आहे असला कांगावा करून सरकारनें फुकटचें हंसें कां करून घ्यावें? जनतेची संमति मिळविण्याचा असला जुलमजबरदस्तीचा मार्ग आजपर्यंत कधीं यशस्वी झाला नाहीं, व पुढेंहि कधीं तो यशस्वी होणार नाहीं, हें सरकारनें निश्चित समजून राहावें.

# अभिनव भारताचें रूपदर्शन

## लेखांक ८ वा

( ले०—वासुदेव कृष्ण भावे. )

हिंदु समाजांत शांति नांदण्यास हिंदु-धर्मातील आत्मौपम्याची शिकवण बऱ्याच अंशीं कारण झाली आहे. त्या शांतीचें तिलकेंच श्रेय चातुर्वर्ण्य-व्यवस्थेसहि दिलें पाहिजे. समाजांतील बहुतेक कलहांचा उगम स्वार्थांतून होत असतो. एक व्यक्ति किंवा वर्ग दुसऱ्या व्यक्तीच्या किंवा वर्गाच्या स्वार्थास आड आला कीं कलहाला सुरुवात होते. चातुर्वर्ण्य-व्यवस्थेची रचना प्रत्येकानें आपल्या वर्णास सांगितलेला व्यवसाय करावा, दुसऱ्याचा व्यवसाय करूं नये या तत्त्वावर झालेली आहे. त्या योगानें त्या व्यक्तीचें ऐहिक कल्याण होतें इतकेंच नव्हे, तर तिला पारमार्थिक मोक्षहि प्राप्त होतो असा भगवद्गीतेंत श्रीकृष्णानेंहि निर्वाळा दिला आहे. पारमार्थिक भाग सोडून देऊन केवळ ऐहिकापुरतें पाहिलें तरी व्यक्तीचें ऐहिक कल्याण साधतें हें खोटें नाहीं. कारण ती व्यक्ति ज्या वर्णांत जन्मली आहे त्या वर्णाच्या व्यवसायांत इतर वर्णीय लोकांनीं न शिरण्याचा बंदोबस्त धर्मानें केला आहे. त्यामुळें कोणीहि मनुष्य आपला व्यवसाय निर्वेधपणानें चालवूं शकतो आणि तो व्यवसाय त्यास जरूर तें अन्नवस्त्रहि देतो. कारण समाजाच्या धारणपोषणाला त्या व्यवसायाची गरज आहे व त्या व्यवसायास खंड न पाडण्याचा पत्कर विशिष्ट व्यक्तीनें व वर्णानें घेतलेला आहे. आपल्या व्यवसायाची हमी समाजानें घेतल्यानें विशिष्ट व्यक्ति त्या व्यवसायास बिनधोक चिकटून राहाते. व अशा व्यक्तींचा समूह म्हणजे वर्णहि सतत टिकाव धरतो. ज्ञातिसंस्था हें चातुर्वर्ण्याचें विस्तृत स्वरूप होय. वाढत्या धंद्यांस चातुर्वर्ण्य पुरेनासें झाल्यावर चातुर्वर्ण्यास ज्ञातिसंस्थेचें रूप धारण करणें भाग पडलें. एका वर्णाच्या पोटांत अनेक ज्ञातींची पुढें झालेलीं मुख्यतः वैश्यवर्णांतच आढळतात.

कारण व्यवसायांची विविधता वैश्य-वर्गातच होऊं शकते. वैश्याखालोखाल तिचा संभव शूद्रांतहि असतो. पण ब्राह्मण व क्षत्रिय या वर्णांस तिची तितकी गरज पडत नाहीं. म्हणून हिंदु समाजांत जर सहस्रावधि जाती आढळत असतील तर त्या वैश्य व शूद्र या वर्णांतच आढळतात. त्या वर्णांची वांटणी जातींच्या रूपानें करण्यांत आली नसती तर जे कलह टाळण्याकरितां चातुर्वर्ण्य अस्तित्वांत आलें ते कलह माजून चातुर्वर्ण्याच्या एका मूलभूत हेतूसच धोका पोंचला असता.

### चातुर्वर्ण्यव्यवस्थेची उपयुक्तता

हिंदु समाजांत कोट्यवधि माणसें असतां तीं हजारों वर्षे गुण्यागोविंदानें एकत्र नांदत आलीं याचें श्रेय वर्णव्यवस्थेसच दिलें पाहिजे. चातुर्वर्ण्यव्यवस्थेंतहि दोष नाहींत असें नाही. व हिंदुसमाजांतील शांतिहि अगदींच कधीं मोडली नाहीं असें नाहीं. परंतु तो कलह अर्थमूलक नसून अधिकारमूलक होता. हिंदूंतील गुरुत्वाचा अधिकार ब्राह्मणांनाच कां? ब्राह्मण हेच सर्व जातींत श्रेष्ठ कां? ते जीं कार्यें करतात तीं कार्यें करण्याची मोकळीक आम्हांला कां नसावी अशा प्रकारच्या शंका इतर वर्णांच्या व जातींच्या मनांत उद्भवून त्यांनीं वर्णव्यवस्थेविरुद्ध अनेकवार बंडें केलीं आहेत. तीं बंडें कांहीं काळ माजून त्यांचा जोर कमी झाला व त्यांना वर्णव्यवस्था मोडतां आली नाही. आर्थिक बंडापेक्षां इतर कोणत्याहि बंडाचा जोर स्वभावतःच कमी असतो. अर्थोन्मूलक बंडाचा संबंध पोटाशीं भिडतो. इतर आगीपेक्षां पोटाची आग जबर होय. त्यावरूनच 'आधीं पोटोबा, मग विठोबा' ही म्हण प्रचारांत आली आहे. अधिकार, हक्क, श्रेष्ठकनिष्ठ भाव हे विषय अभिमानाचे आहेत. त्या विषयांनी समाजांतील कांहीं व्यक्तींचें डोकें कधीं कधीं भणभणतें. पण त्या भावनेस फारसे अनुयायी न मिळून भणभणलेलें डोकें लवकरच उतरतें; किंवा तें न उतरलें तरी त्यांच्या बंडाची व्याप्ति त्यांच्यापाशींच संपून एकंदर समाज ढवळून निघण्याचें अथवा उलथापालथ होण्याचें थांबतें.

### युरोपियन समाजरचना

हिंदु समाजास लाभलें हें स्वास्थ्य युरोपियन समाजास कधींच लाभलें नाहीं. याचें कारण त्यांच्या देशांत विशिष्ट बंधनांनीं बनविलेली समाजरचना नव्हती हेंच होय. हीं बंधनें नसण्याचा दुष्परिणाम यांत्रिक शक्तीवर थोडक्या माणसांच्या साहाय्यानें प्रचंड कामें होऊं लागल्यापासून अधिकच जाणवूं लागला आहे. देशांत स्वाभाविकपणेंच कारागिरांचे वेगवेगळे व स्वतंत्र वर्ग असत. ते नष्ट होऊन त्यांचीं कामें यंत्रांनीं आपल्या कबजांत घेतलीं व कारागिरांना निवळ मजूर बनवून सोडलें. युरोपांतील या स्थितीचें स्वरूप कसें असेल याची कल्पना हिंदुस्थानांतील कापडाच्या गिरण्यांवरून कोणासहि थोडीबहुत करतां येईल. हिंदुस्थानांत विणकरांचा वर्ग फार मोठ्या प्रमाणांत होता. तसेंच पिंजारी व कातारी यांचेहि वर्ग होते. पण कापडाच्या गिरण्यांतून कापूस पिंजून त्यांतील सरकी काढण्यापासून तों तहत कापड विणण्यापर्यंत सर्व प्रकारचीं कामें होत असल्यानें पिंजारी व कातारी यांचे वर्ग तर नामशेष झालेच, पण विणकरांचा वर्गहि मृत्युपंथास लागला. कापूस पिंजण्याचा व सूत काढण्याचा धंदा पिंजाऱ्यांचा व कातऱ्यांचा. तो त्यांच्या हातचा त्या धंद्याबाहेरच्या व्यापारी वर्गानें हिसकावून घेतला व त्यांना मजूर बनविलें. हीच स्थिति विणकरांचीहि क्रमाक्रमानें होत चालली आहे. आणि हळूहळू तेली, न्हावी, परीट, कुंभार, चांभार, ढोर इत्यादिकांचीहि होण्याचीं चिन्हें स्पष्ट दिसत आहेत. यंत्राचा उदय जेथें नुकताच झाला आहे त्या आमच्या देशांत एकएका जातीच्या धंद्याची जर अशी गठडी आवळली जात आहे तर शंभर—सवाशें वर्षांपूर्वींच यंत्राच्या तावडींत सांपडलेल्या युरोपियन समाजांतील भिन्न भिन्न कारागीर वर्गांचा यंत्रानें आटवून मजूररूपी गोळा बनविला असला तर त्यांत नवल काय!

युरोपांतील स्वास्थ्य व शांति अलीकडे वरील गोष्टीमुळें फारच बिघडल्यामुळें मजुरांचा एक स्वतंत्र वर्गच जन्मास आला. त्याला आपलीं दुःस्थिति कळून चुकली व त्या स्थितींतून स्वतःची सुटका करून घेण्यासाठीं त्यानें भांडवलवाल्यांविरुद्ध आपली संघटना बनविली. कोळशाच्या खाणी, रेलवे वगैरेंवरील मोठाले संप हें त्याचेंच फल होय. पण या संपापासून मिळाल्या तर अल्पस्वल्प सवलती मिळावयाच्या, त्यांची मजुराच्या अवस्थेंतून कधींहि सुटका व्हावयाची नाहीं अशी खात्री झाल्यावरून जर्मन विचारवंत कार्ल मार्क्स यानें समाजसत्तावादास जन्म दिला. रशियांतील कम्यूनिझम ही समाजसत्तावादांतीलच एक पुढची पायरी समजली पाहिजे. कम्यूनिस्ट काय, किंवा समाजसत्तावादी काय, यांचा कलह भांडवलवाल्यांशीं आहे. त्यांना यंत्र पाहिजे पण भांडवलवाले नकोत. या कारणानें भांडवलवाल्यांवर अवलंबून असणाऱ्या इतर सर्व वर्गांनाहि मूठमाती देण्यास ते तयार झाले आहेत. रशियांतील बोल्शेव्हिक सरकारानें रशियन समाजाची रचना या तत्त्वावर करण्याचा गेलीं दहाअकरा वर्षें भगीरथ प्रयत्न चालविला आहे. त्यांना कोणापाशींहि खासगी मिळकत किंवा खासगी भांडवल राहूं द्यावयाचें नाहीं. या सर्वांचा मालकी हक्क समाजाचा म्हणजे सरकाराचा. तेव्हां प्रत्येक व्यक्तीनें आपल्या मगदुराप्रमाणें

काम करावें व तिचा योगक्षेम सरकारनें चालवावा या तत्त्वाची अम्मलबजावणी रशियांत सांप्रत सुरू आहे.

### कम्युनिस्टांची टोळी

ज्या कम्युनिस्ट मताच्या टोळीनें रशियांतील राजसत्ता झारपासून जबरदस्तीनें काढून घेतली त्या टोळीनें आपल्या कंपूबाहेरच्या कोणाचाहि शिरकाव रशियाच्या अंतःस्थ राज्यकारभारांत होऊं न देण्याचा बंदोबस्त केला असल्यानें बोल्शेव्हिक राज्यपद्धतीस अगर त्या पद्धतीखालीं होऊं घातलेल्या समाजरचनेस चिरस्थायी स्वरूप आलें असें म्हणवत नाहीं. मनुष्य प्राणी हा जात्या स्वार्थी व स्वातंत्र्यप्रिय आहे. त्याला आपल्या स्वार्थाच्या आड कोणी आलेला खपत नाहीं.त्याचप्रमाणें त्याला दुसऱ्याच्या ओंजळीनें पाणीच काय पण अमृत देखील प्राशन करणें आवडणार नाहीं. बोल्शेव्हिकांची राज्यपद्धति अशी आहे कीं, तिनें मनुष्याच्या घरांत, संसारांत व प्रातींत हात घालून त्याचा खासगी असा व्यवहारच राहूं न देण्याचें ठरविलें आहे. रशियांतील माणसें जगांतील इतर मनुष्यांप्रमाणेंच असतील तर त्यांना ही नवी राज्यपद्धति व समाजरचना पसंत पडणेंच शक्य नाहीं. दुसऱ्याचें घर एखाद्या गोंडस तत्त्वाच्या पांघरुणाखालीं मिळत असल्यास तें कोणी सोडणार नाहीं.परंतु त्या तत्त्वाचा अम्मल स्वतःवर होऊन स्वतःच्या घरास पारखें होण्याची पाळी स्वतःवरच आल्यास त्याचें डोकें फिरून गेल्याशिवाय राहणार नाहीं.कालान्तरानें कम्युनिस्ट मताच्या टोळीची रशियाच्या मानेभोंवतालची पक्कड सुटली व रशियन लोकांना आपल्या मनाप्रमाणें वागण्याची मुभा मिळाली, म्हणजे ज्यांच्या स्वार्थाच्या आड रशियन राज्यपद्धति व समाजरचना येईल ते लोक बंड करून उठतील आणि कम्युनिस्टांचा डोलारा पालथा घालतील.

कारण रशियांत स्थापन करण्यांत येणारी समता ही खरी समताच नव्हे. युरोपांत सांप्रत भांडवलवाले व मजूर असे दोन प्रमुख वर्ग आहेत तर रशियांत मजूर हा एकच वर्ग कायम राखण्याचा बोल्शेव्हिकांचा प्रयत्न आहे. परंतु स्वातंत्र्यप्रिय, स्वहिततत्पर व महत्त्वाकांक्षी मनुष्याच्या स्वाभाविक प्रवृत्तीच्या तो आड येत असल्यामुळें त्या प्रवृत्तीच्या कोट्यवधि लोकांत एक प्रकारचा असंतोष शमवून टाकण्यांत आला असला तरी दुसऱ्या प्रकारचा असंतोष उद्भवून बोल्शेव्हिकांचा शांति प्रस्थापित करण्याचा व्यूह सपशेल ढांसळून पडेल. सारांश, बोल्शेव्हिक स्थापन करूं पाहतात ती समता नसून विषमता होय. तिनें शांति उदयास येणार नसून क्षोभच प्रादुर्भूत होणार आहे. सर्वांचें समान रक्षण हीच खरी समता, सर्वांची एकच दावण बांधणें ही समता नव्हे, जुलूम आहे. अशा स्थितींत पाश्चात्य राष्ट्रांना जर खरी समता व शांति स्थापन करावयाची असेल तर त्यांनीं चातुर्वर्ण्यपद्धतीच बऱ्याच अंशीं अनुसरून आपल्या समाजांत वर्गपरत्वें धंद्यांची वांटणी करण्यास शिकलें पाहिजे. असें करतांना यंत्राची अडचण सांगण्यांत येईल.

### यंत्रसंन्यासाची गरज

पण या ठिकाणीं हेंहि लक्षांत ठेवलें पाहिजे कीं यंत्रांचेंहि युग संपत आलें आहे. जेव्हां जगांतील एकदोन देशांनीं इतर सर्व देशांना माल पुरविण्याचा मक्ता घेतला होता तेव्हां यंत्रानें त्यांना चांगलाच हात देऊन त्यांच्या घरांवर सोन्याचीं कवलें चढविलीं. परंतु प्रत्येक देश जर आतां यंत्रें वापरूं लागला तर त्यांवर तयार होणारे मालाचे डोंगर उठावयाचे कसे ? सध्यां व्यापाराला सर्वत्र मंदी आली आहे ती याच कारणामुळें. म्हणून इंग्लंडांत व इतर कित्येक देशांतहि कापडाचीं वगैरे यंत्रें आठवड्यांतून कांहीं दिवस बंद ठेवावीं लागत आहेत. हें यंत्राचा मनु पालटण्याचें लक्षण होय. हाच क्रम असाच वाढत जाऊन जगाला जशी सांप्रत शस्त्रसंन्यासाची निकड भासत आहे, तशीच ती थोड्याच दिवसांनीं यंत्रसंन्यासाचीहि भासण्याचा रंग आहे. तसें झाल्यास कारखान्यांचें प्रचंडत्व व भांडवलाचा अचाटपणा कमी होऊन त्यांना आटोपशीरपणा येईल आणि विशिष्ट धंदा विशिष्ट वर्गाच्या स्वाधीन करणें सुकर ठरेल. चातुर्वर्ण्याची बीजभूत कल्पना हीच असून ती अभिनव भारतानें जगास शिकविण्याच्या योग्यतेची आहे. हिंदु विद्वज्जनांनीं जगाचें मत आपल्या शिकवणुकीनें चातुर्वर्ण्याच्या अथवा हल्लींच्या भाषेंत बोलावयाचें झाल्यास ज्ञातिसंस्थेच्या बाजूस वळविल्यास हिंदुस्थानांतील ज्ञातिसंस्थेस अधिक बळकटी प्राप्त होणार आहे.

### ज्ञातिसंस्थेची सुधारणा

आतां हें खरें कीं आमची ज्ञातिसंस्था बरीच जुनाट झाली आहे. तिच्यावरून शेंकडों वर्षांत सुधारणेचा हात न फिरल्यानें तिला मालिन्य आलें आहे. ज्ञाति-संस्थेचा हेतु दृष्टिआड झाल्यामुळें एका मोठ्या जातींत अनेक पोटजाती पडल्या आहेत. त्याचप्रमाणें विशिष्ट जातीनें विशिष्ट धंदा करावा हा धरबंध सुटून व्यवसायसंकरामुळें जातिजातींत द्वेष उद्भवला आहे व विशिष्ट जातींच्या विशिष्ट गुणांचाहि लोप होत चालला आहे. ही अनवस्था अभिनव भारत चालू देणार नाहीं. अभिनव भारत नवजीवनानें नटेल. तो पोटजाती मोडून टाकील. जातिजातींचे परस्परसंबंध अधिक सलोख्याचे व स्नेहभावाचे घडवून आणील. प्रमुख जाती मोडणार नाहींतच.उलट त्या संघटनेच्या

जोमावर स्वत:मधील परंपरागत उत्कृष्ट गुणांचा विकास करतील आणि राष्ट्राची आपल्या वांटणीची एकेक गरज भागवून राष्ट्र बलवान व सर्वांगसुंदर बनवतील. ज्ञातिव्यवस्था लोकशाही राज्यपद्धतीशीं विसंगत आहे असें कोणी म्हणतात व सकृद्दर्शनीं तें विधान खरेंहि वाटतें. तथापि त्या लोकांनीं हिंदु समाजाचा पिंड नीट तपासला नाहीं असें म्हणावें लागतें. हिंदु समाज अत्यंत सहिष्णु आहे. तो जसा मुसलमानांशीं सहिष्णु आहे तसा त्या समाजांतील भिन्न भिन्न जाती परस्परांशींहि सहिष्णु आहेत, याचा अनुभव नुकताच गोलमेज परिषदेंत आलाच आहे. अधिकाराची वांटणी मागतांना मुसलमान फुटलेले आढळले. पण हिंदूंत हजारों जाती असतां त्यांच्यांत एकोपाच दृष्टीस पडला. हा हिंदूंचा स्वभाव होय. हिंदूंना धार्मिक व सामाजिक विषय कोठें काढावेत व कोठें काढू नयेत हा व्यवहार चांगला कळतो. उद्यां हिंदुस्थानास खरें स्वराज्य मिळाल्यावर जातींचीं भांडणें राजकारणाच्या आड येऊं न देण्याची खबरदारी हिंदु लोक हल्लींहून अधिक घेतील व हिंदूंची समाजरचना लोकशाही राज्यपध्दतींतहि टिकते इतकेंच नव्हे, तर जोमदार व कणखर बनते याचें प्रत्यंतर ते जगास आणून देतील.

# लंडनचें बातमीपत्र

## इंग्लंडांतील धर्मश्रद्धाळुपणा

ख्रिस्तमसच्या वातावरणांत हें पत्र लिहिलें जात आहे. अर्थातच अशा वेळीं सर्व देशांत शांतता आणि आनंद नांदावा अशा प्रार्थना ख्रिस्ती मंदिरांतून चालत असल्या तर नवल नाहीं. ता. २४ डिसेंबर हा दिवस नाताळच्या सणाची 'संध्याकाळ' म्हणून साजरा करण्यांत येतो. त्या दिवशीं रात्रीं १२ वाजतां ख्रिस्ताचा जन्म झाला अशी आख्यायिका आहे. आपल्याकडील कृष्णाष्टमीच्या सणाप्रमाणेंच हा दिवस पाळला जातो. येथील वेस्टमिन्स्टर कॅथेड्रल चर्चमध्यें ख्रिस्तजन्माचा समारंभ पाहावयास मी गेलों होतों. वेदीपासून बऱ्याच अंतरावर प्रार्थनेस येणाऱ्या लोकांच्या खुर्च्या मांडलेल्या होत्या. गुडघे टेकतांना त्रास होऊं नये म्हणून भाविकांसाठीं प्रत्येक खुर्चीसमोर मऊ गिर्दी ठेवण्यांत आलेली असते. लंडनांतील लोक भाविकतेसाठीं प्रसिद्ध नसले तरी सदर समारंभास ४ ते ५ हजारांपर्यंत लोकसमुदाय जमला होता. तिकिटांच्या अभावीं ज्यांना आंत येतां आलें नाहीं ते बाहेरच उभे राहिले होते. सदर चर्च मुख्यतः श्रीमंत कॅथॉलिक लोकांचें असल्यामुळें व त्या पंथांत धर्मोपदेशकाला अद्यापि बराच मान असल्यामुळें सर्व वातावरण थाटाचें आणि संपत्तिसंपन्न भासलें.

चर्च मोठें भव्य आणि सुविस्तीर्ण आहे. वेदीच्या दोनहि बाजूंस बायबलाचा पाठ करीत पाद्री लोक बसले होते. त्यांपैकीं प्रमुख पाद्र्यांच्यापुढें धूप जाळण्याचें धुपाटणें असून त्यांतून धूप जाळला जात होता. त्याच्या वासानें सारें चर्च दरवळून गेलेलें पाहून मला तुळशीबागेची आणि ओंकारेश्वराच्या देवळाची आठवण झाली. दोघां पाद्र्यांनीं वेदीकडे तोंड करून—सभेकडे पाठ करून—उभे राहून बायबल वाचण्यास सुरुवात केली. त्या वेळीं त्यांचा आवाज थेट ख्रुग्वेदाचें स्तवन करणाऱ्या अथवा अथर्वशीर्ष म्हणणाऱ्या वेदमूर्तीप्रमाणें निघत होता असें म्हटल्यास त्यांत बिलकुल अतिशयोक्ति होणार नाहीं. वेदीच्या डाव्या कोपऱ्यांत पाळण्यासारखें कांहीं तरी केलेलें दिसलें. त्याच्याभोंवतीं मुख्य पाद्री हातांत ख्रिस्ताचा उंच पितळी पुतळा घेऊन उभा राहिला व त्याच्या तीनहि बाजूंला तीन पाद्री हातांत लांबच लांब मेणबत्त्या असलेलीं शामदानें किंवा नीरांजनें घेऊन उभे राहिले. आणखीहि कांहीं पाद्री लोक भोंवतीं जमा झाले व सोनेरी कलाबूत लावलेल्या एका ५-६ हात लांबीच्या वस्त्रानें त्यांनीं त्या पाळणेवजा वस्तूला आच्छादिलें व कांहीं मंत्रासारखें म्हणून मस्तक विनम्र केलें. सगळ्या सभेनेंहि ताबडतोब खालच्या गिर्द्यांवर गुडघे टेकून प्रार्थना करण्यास सुरुवात केली.

कांहीं वेळानें मंडळी पुनः आसनस्थ झाली व मुख्य पाद्री जवळ गेले व त्यांच्या डोक्यावर जरीचा मुकुट ठेवण्यांत आला. त्यांनीं वेदीवर डोकें टेकून ख्रिस्ताला नमस्कार केला व वेदीवरून उतरून ते पुनः खालीं आले. त्यांनीं हात जोडतांच इतरहि पाद्र्यांनी हात जोडून प्रार्थना म्हणण्यास प्रारंभ केला. मध्येंच मेणबत्त्यासह त्या सर्वांची वेदीच्या एका टोंकापासून मिरवणूक निघाली. दुसरीकडे बायबलचा पाठ सुरूच होता. १२चे ठोके पडतांच ख्रिस्ताचा जन्म झाला व लोकांनीं भाविकपणानें छातीवरून डावीकडून उजवीकडे आणि कपाळावरून छातीपर्यंत खालीं तर्जनीनें क्रूस चिन्ह करून त्याचें भक्तिभावानें स्वागत केलें. एवढा मोठा समाज पण तो सर्व या गोष्टी इतक्या तत्परतेनें आणि बिनचूक करतांना पाहत असतां त्याचें कौतुक वाटल्याशिवाय राहिलें नाहीं. ख्रिस्ताचा जन्म होतांच पाद्री लोकांनीं स्तोत्र गाण्यास सुरुवात केली. त्याबरोबर ऑर्गनमधून भक्तिभावाचे सुंदर

स्वर निघू लागून क्षणभर वातावरण विशुध्द भक्तिरसानें भरून गेलें.लोकांनीं डोळे मिटून आणि गुडघे टेकून खिस्ताची, आकाशांतील प्रभूच्या पुत्राची, प्रार्थना केली व समारंभ आटोपला.

या समारंभांत कांहीं भाग कंटाळवाणा असा होता. पण याज्ञिकाप्रमाणें तो भाग असल्यामुळें त्याला कंटाळवाणें स्वरूप येणें अपरिहार्य होतें. मला त्यांतल्या त्यांत ज्या कांहीं गोष्टींचें विशेष वाटलें तें म्हणजे तेथें जमलेल्या लोकांपैकीं बहुतेकांना बायबलाची असलेली चांगली माहिती हें होय. बायबलमध्यें २०० ते ३०० पर्यंत स्तोत्रें आहेत. त्यांपैकीं पाद्री प्रसंगाप्रमाणें कोणतें तरी एक म्हणू लागतो. तें अमकेंच म्हणून सांगितलें गेलें नाहीं तरी अनेकांना तें माहीत असतें व तें काढून तें लोक तें वाचूं लागतात. मला या ठिकाणीं इतकेंच दाखवावयाचें आहे कीं, आमच्या सुशिक्षित समजल्या जाणाऱ्या वर्गापेक्षां येथील सुशिक्षित माणसास त्याच्या धर्माचें ज्ञान अधिक असतें. आमच्या तरुण पिढीला धार्मिक विधींचें महत्त्व वाटत नाहीं; एवढेंच नव्हे तर त्या विधींचें ज्ञानहि आम्हांला नसतें. खिस्ती माणूस आपल्या धर्माची जितक्या संगतवार व थोडक्यांत माहिती सांगेल तितक्या संगतवारपणानें ती हिंदु मुलाला सांगतां येईलच असें मला वाटत नाहीं. हिंदुस्थानांतून येथें आलेल्या अनेक मुलांबरोबर मी या दृष्टीनें बोलून पाहिलें, पण माझी निराशा झाली असें मला कष्टानें म्हटलें पाहिजे. धार्मिक शिक्षण आणि शीलसंवर्धन याचा निकट संबंध आहे ही गोष्ट लक्षांत ठेवूनच येथील शिक्षणांत धर्माचें स्थान अढळ ठेवण्यांत आलें आहे.

### युरोपांतील राजकारण

इंग्लंड सोडून युरोप खंडावर नजर फेकली तर आपल्याला काय दिसतें तें आतां आपण पाहूं. जर्मनीनें आपल्या कर्जदारांना गेल्या महिन्यांत आपली आर्थिक परिस्थिति कर्जफेड करण्यासारखी नाहीं, तरी मुदत मिळावी अशी विनंति केली. त्याच वेळीं वाटल्यास त्यांनीं जर्मनीच्या आर्थिक परिस्थितीची चौकशी करावी असेंहि सुचविलें. त्याप्रमाणें जर्मनींतील आंतरराष्ट्रीय व्यवहार-नियामक बँकेला ( Bank for International Settlement ) सल्ला देण्यासाठीं यंग-योजनेबरहुकूम स्पेशल ॲडव्हायसरी कमिटी गेल्या दोन आठवड्यांपूर्वी नेमली गेली. सदर कमिटीचा रिपोर्ट नुकताच प्रसिद्ध झाला आहे. त्यावरून १९३१ सालीं ( जुलै १९३२ च्या आंत ) जर्मनीला ४ अब्ज ९० कोटी रीश मार्क परदेशीं द्यावे लागतील. म्हणजे २४ कोटी ५० लक्ष पौंडांचें सोनें जर्मनीला बाहेरदेशीं पाठवावें लागणार. कारण मार्कची किंमत सोन्याच्या नाण्यांत धरून कमिटीनें हिशेब केला आहे एवढ्या मोठ्या प्रमाणांत सोनें परदेशीं पाठविण्याचा प्रसंग आला तर जर्मनीसारख्या आधींच जर्जरित झालेल्या आणि त्यांतच जगाच्या आर्थिक निकृष्टावस्थेमुळें पिळून गेलेल्या राष्ट्राला तें अशक्य असलें तर नवल नाहीं. दुसरें असें कीं, ज्या वेळीं सुवर्णचलन ठरवून जर्मनीला आर्थिक स्वास्थ्य देण्यांत आलें त्या वेळची सोन्याची किंमत गेल्या २ वर्षांत घसरली गेल्यामुळेंहि जर्मनीच्या रोख्यांची किंमत बेसुमार घसरली. आतां इंग्लण्डासारख्या धनिक राष्ट्रांनीं सुवर्णचलन सोडून दिल्यामुळें सोन्याची किंमत वाढली म्हणजे गेलीं दोन वर्षें जर्मनीनें घसरत्या रोख्यासाठीं नुकसान सोसलें व आतां सोन्याच्या रूपानें खंडणी व परराष्ट्रीय कर्ज द्यावयाचें म्हणजे अधिक किंमत देऊन सोनें खरेदी करून द्यावयाचें म्हणजे तिकडूनहि त्या राष्ट्राचें नुकसान होत आहे. अशा पेंचांत सांपडल्यामुळें जर्मनीनें उपरिनिर्दिष्ट चौकशी-कमिटी मागितली.

### जर्मनींतील आर्थिक परिस्थिति

रिपोर्टावरून असें दिसतें कीं जर्मनीची १९३१ सालाची निपज १९२८ सालच्या निपजीशीं तुलना करतां ती $\frac{1}{3}$ कमी झाली आहे. २ कोटी १० लक्ष मजुरांपैकीं ५० लक्ष मजूर गेल्या सालीं अगदीं बेकार झाले. व्याजाचा दर शें. ८ होता तो या सालीं १२ पर्यंत वाढला; आणि या दरानेंसुद्धां व्यापाऱ्यांस आणि कारखानदारांस कर्ज मिळणें सोपें जात नव्हतें. या सर्वांचा परिणाम होऊन कारखानदारांच्या मालाची निपज कमी झाली. त्यामुळें व्यापार मंदावला व त्याबरोबरच करांची वसुलीहि कमी झाली. जर्मनीनें आपली आंतरराष्ट्रीय पत राखण्यासाठीं आतांपर्यंत शिकस्तीचे प्रयत्न केले आहेत. त्याचें एकच गमक म्हणजे आपल्या लोकांवर तिनें बसविलेले कर हें होय. कमिटीनें आपला असा स्पष्ट निर्णय दिला आहे कीं, जर्मन लोकांनीं स्वतःवरील कर इतके कमालीचे जड करून घेतले आहेत कीं, यापुढें त्यांच्यावर काडीइतकाहि नवा कर बसविणें अशक्य आहे.

ज्या जर्मन रेल्वेविषयीं आणि तिच्या नफ्याविषयीं पूर्वी आपण इतकें ऐकत होतों व ज्या नफ्याच्या आशेवर फ्रान्सनें सुध्दां त्याचेंच उत्पन्न-निवळ नफा-प्रतिवर्षी युद्धखंडणी म्हणून घेण्याचें कबूल केलें त्या रेल्वेची स्थिति अगदीं खालावली असून यंदा व आणखी दोन वर्षें तरी फ्रान्सला रेल्वेच्या उत्पन्नांतून कांहीं मिळेल असें वाटत नाहीं. तथापि थोडे बरे दिवस येतांच जर्मनीनें पहिल्यानें युद्धखंडणीचा हप्ता द्यावा व नंतर आपलें व्यापारी कर्ज फेडावें अशा अर्थाचें धोरण कमिटीनें

व्यक्त केलें आहे. हें कमिटीच्या कामाचें झालें. आतां जर्मनीनें गेल्या वर्षापासून आर्थिक परिस्थितीला तोंड देण्यासाठीं काय काय चालविलें आहे तेंहि पाहणें उद्बोधक आहे.

इन्कमटॅक्स पूर्वीच्या दुप्पट करण्यांत आला आहे. तंबाखू व बिअरवरील कर वाढविले आहेत. व्यापारावरील कर पूर्वी ०·२५ होता तो शें. २ टक्के करण्यांत आला आहे. नोकरांचे पगारांत २० टक्क्यांची कपात केली आहे. मजुरांना बेकारीविम्याबाबत आतां ६॥ टक्के आपल्या पगारांतून द्यावे लागतात. पण मजुरी मात्र १९२७ सालाच्यापेक्षां खालीं आणण्यांत आली आहे. म्हणजे ती शेंकडा १५ ते २० या प्रमाणांत कमी झाली आहे. बँकांचे व्यवहार आणि भांडवलाची निर्गत ( flight of capital) यावर सरकारची करडी नजर असते व आंतरराष्ट्रीय चालणाऱ्या व्यवहारांत सट्टेबाजीला आळा घालण्यांत आला आहे. जर्मनीचे प्रयत्न अत्यंत सचोटीचे आहेत व तिला नांव ठेवण्यास बिलकुल जागा नाहीं असा कमिटीनें आपला अभिप्राय व्यक्त केला आहे.

कमिटीच्या मतानें प्रस्तुत परिस्थितींतून सुटण्याचा एकच मार्ग आहे व तो म्हणजे युद्धखंडणीचा पुनः विचार करून जगाच्या बदललेल्या परिस्थितीप्रमाणें मूळ यंग-योजनेंत फरक करावा व जर्मनीच्या उरावरील खंडणीची धोंड अंशतः तरी हलकी करावी. युद्धकर्जें अजीबात रद्द करण्याच्याविरुद्ध कमिटीनें आपलें मत दिलें आहे. मात्र आर्थिक निकृष्टावस्था दूर होईपर्यंत जर्मनीला सवड द्यावी व वाटल्यास पुनः या प्रश्नाचा विचार करावा असें कमिटीनें सुचविलें आहे.

परंतु वास्तविक हा प्रश्न येथेंच संपत नाहीं. जर्मनीला आर्थिक दृष्ट्या सुदृढ करावयाचें झाल्यास त्यास धनाढ्य राष्ट्रांनीं आणखी पैशाची मदत केली पाहिजे. धनाढ्य देशांतील बँकांनीं आपलें या बाबतींतील धोरण जवळ जवळ स्पष्ट केलें आहे. त्यावरून त्या बँका यापुढें जर्मनीस आणखी कर्ज देतील असें वाटत नाहीं. अर्थातच इंग्लंड, अमेरिका आणि इटाली या देशांतील सरकारांनींच या बाबतींत पुढाकार घेणें जरूर आहे. येत्या फेब्रुवारींत तशा प्रकारचा विचार करण्यासाठीं पुनः एक कमिटी बसणार आहे. जर्मनीला सावरून धरलें नाहीं तर साऱ्या युरोपची आर्थिक घडी विस्कटून जाईल व त्या वावटळींत इंग्लंडसुद्धां टिकणार नाहीं असें येथील मुत्सद्यांस व लेटनसारख्या अर्थशास्त्रज्ञास स्पष्ट दिसत आहे.

### फ्रेंच पार्लमेंटांतील मारामारी

फ्रेंच पार्लमेंटांत चालणारें काम पाहण्याचा मला पारिस येथें असतां योग आला. एका सोशिआलिस्ट प्रतिनिधीबरोबर मी गेलों होतों. प्रेस गॅलरींत मला चांगली जागा मिळाली होती. तेथून सभेचें काम चांगलें ऐकूं येत होतें. परंतु भाषेच्या ज्ञानाच्या अभावीं त्यांतील मतैक्य अथवा मतभेद यांचा मला कांहींसुद्धां अर्थ समजत नव्हता! पण लवकरच तो अर्थ प्रत्यक्ष रूपानें व्यक्त करण्याला सभासदांनीं सुरुवात केली. तो प्रसंग असा. बेकारीविषयीं सरकारच्या धोरणावर विरोधक पक्षानें बेसुमार टीका चालविली होती. डॉ. जोसेफ बासे नांवाच्या एका सभासदानें फ्रेडरिक ब्रुने नांवाच्या दुसऱ्या एका सभासदाला एका दिवाळखोर पेढीवाल्याची उपमा दिली. त्याबरोबर ब्रुनेला संताप येऊन त्यानें खोटा, नालस्त्या, खट्याळ म्हणून बासेचा निषेध केला! थोड्याच अवधींत दोघेहि वीर हातघाईवर आले. ब्रुनेनें आपल्या जागेवरून उडी मारली व बासेचा हात पकडून त्यानें त्याच्या नाकावर मारलें. बासेनें क्षणार्धांत आपला हात सोडवून घेतला आणि तो ब्रुनेला ठोसा लगावणार इतक्यांत ब्रुनेच्या मित्रानें बासेच्या छातीवर ठोसा मारून त्याला खालीं लोळविलें. हा प्रकार चालू असतां कांहीं वक्ते कमी-अधिक शांतपणानें बोलत व बेकारीवर भाषणें करीतच होते! पण बासे खाली पडतांच धाडकन आवाज झाला व सभा क्षणभर गोंधळून गेली. इतर सभासद भराभर भांडणाच्या जागीं आले व पार्लमेंटाच्या अधिकाऱ्यांनींहि मध्यस्थी चालविली व शांतता प्रस्थापित केली.

थोड्या वेळानें सभा संपली. पण भांडणाऱ्या लोकांची रग जिरली नव्हती. सोशिआलिस्ट सभासदांना बासेचा फार राग आला होता. त्यांनीं लॅबीमध्यें त्यास पुनः गांठलें व बडवण्यास सुरुवात केली. आतां बासेला सोडविण्यासाठीं स्वतः ब्रुने पुढें झाला व त्यानें आपल्या पूर्वीच्या प्रतिपक्षाला बाजूला काढण्याचा प्रयत्न केला. पण त्या गर्दींत त्याचा चष्मा फुटून त्यालाच थोडासा मार बसला! शांततारक्षक सार्जेटांनीं मध्यें पडून शेवटीं प्रतिनिधींचा दंगा शमविला. त्या कामीं त्यांनाहि थोडाफार प्रसाद मिळाल्याशिवाय राहिला नाहीं. या छोट्या झटापटींत ३-४ सभासदांना बराच मार लागला. तिघांना तर मलमपट्टीसाठीं अॅम्ब्युलन्सकारमधून पाठविण्यांत आलें, आणि एका सोशिआलिस्ट सभासदाचा पाय मुरगळून तो लंगडूं लागला.

फ्रेंच लोकांचें राजकारण इंग्रजी राजकारणापेक्षां अधिक अस्थिर आणि चंचल असतें. कोणता प्रधान केव्हां पडेल व प्रधानमंडळ राजिनामा केव्हां देईल त्याचा नेम नसतो. फ्रेंच प्रधानमंडळाच्या इतिहासांत अवघ्या ४८ तासांत प्रधानमंडळांनीं राजीनामा दिल्याचीं उदाहरणें नमूद आहेत. फ्रेंच पार्लमेंटांत ६१२ प्रतिनिधि आहेत. पण पक्ष-

भेदामुळें त्यांचे अनेक भेद आणि पोटभेद पडले आहेत. तथापि पराराष्ट्रीय धोरण कमी–अधिक प्रमाणांत सर्वांचें सारखेंच असतें असें म्हणावयास हरकत नाहीं. त्यामुळे परदेशविषयक धोरणांत गेल्या १२ वर्षांत फ्रान्सच्या धोरणांत फारसा फरक पडल्याचें दिसत नाहीं. घरगुती प्रश्नावर ते मारामाऱ्या करतील, पण बाहेरचा प्रश्न निघाला कीं त्यांचें जरूर तेवढें एकमत होतें. राष्ट्राच्या जिवंतपणाची साक्ष ती हीच!

# जर्मनीची दुर्गति ? कीं अति तेथें माती ?

१९१७ सालीं जर्मनीचा महायुद्धांत पराभव झाल्यापासून त्याचा पाय घट्ट जागेवर ठरतच नाहीं. आणि महापुरांत नदीच्या वाढत्या वेगानें दरडी कोसळून पडतात त्याप्रमाणें, एकामागून एक येणारीं संकटें जर्मनीच्या डोक्यावर सतत आदळत आहेत.एक पराभव म्हणजे शंभर पापें असा लौकिक नीति–शास्त्रांतला न्यायच आहे.आणि या पापांचीं प्रायःश्चित्तें म्हणून जर्मनीला आपलें जगांतलें पहिल्या प्रतीचें खडें सैन्य बरखास्त करावें लागलें; पन्नास वर्षांच्या परिश्रमानें बांधलेलें सर्व आरमार समुद्राच्या तळीं बुडवून टाकावें लागलें; आफ्रिका वगैरे खंडांत स्थापलेल्या सर्व वसाहती सोडून द्याव्या लागल्या;फ्रान्सकडून पूर्वी जिंकून घेतलेले आल्सेस–लोरेन प्रांत फ्रान्सला परत द्यावे लागले. चौफेर सरहद्दीवरील किल्ले व तटबंद्या पाडून मोडून उध्वस्त झालेल्या पाहाव्या लागल्या. एका बाजूस ऑस्ट्रियासारखा प्रबळ मित्र अर्धमेला झालेला, व दुसऱ्या बाजूस मुद्दाम प्रबळ केलेला शत्रु पोलंड हा उरावर बसलेला, हें स्थित्यंतर सोसावें लागलें.

या सर्व राजकीय आपत्ति होत. पण तेवढ्यामुळें जर्मनीची हलाखी झाली इतकी होतीना ! त्याची खरी हलाखी झाली ती आर्थिक दुर्दशेमुळे, व त्या दुर्दशेचें कारण जर्मनीवर लादलेला बुरदंड. हा बुरदंड म्हणजे प्रतिपक्षीय राष्ट्रांचें झालेलें नुकसान त्याजकडून भरून घेण्याकरितां म्हणून बसविलेली रक्कम व खंडणी. ही रक्कम सर्व एकदम द्यावयास आपणाजवळ नाहीं म्हणून जर्मनीला अर्थातच हप्तेबंदी करून घ्यावी लागली. आणि ते हप्तेहि स्वतः जर्मन राष्ट्रांतल्या पैशानें देण्यास ताकद नाहीं, म्हणून परराष्ट्रांकडून कर्ज काढून तो बुरदंड भरण्यास जर्मनीनें सुरुवात केली! पण त्याहि कर्जाच्या फेडीचे हप्ते त्याला देणें आतां अशक्य झालें असून, जर्मनीच्या मुख्य फडणविसानें, परवां नुकतेंच अगदीं स्पष्ट शब्दांनीं हात वर करून, जाहीर केलें कीं यंदां जे हप्ते द्यावयाचे ते जर्मनीला देतां येणें शक्य नाहीं. याचा अर्थ हा कीं "जर्मनीचें दिवाळें वाजलें! आतां घरापुढें शेणाची पणती लावून ठेवून घराबाहेर निघण्याला जर्मनी तयार आहे, तेव्हां असतील त्या सर्व सावकारांनीं एकत्र होऊन घरांतील मालमिळकत ताब्यांत घ्यावी आणि आपलें कर्ज फेडून घेण्याचीहि व्यवस्था होईल तशी करावी !"

आतां अमेरिकेनें गेल्या जून महिन्यांत एक वर्षाची मुदत कर्जफेडीला दिली नसती तर इतर कित्येक राष्ट्रांवरहि तोच प्रसंग होता. मात्र त्यांतल्या त्यांत फरक असा आहे कीं, या एक वर्षाच्या सवलतीनें इतर राष्ट्रें कांहीं तग धरूं शकतील. पण त्या सवलतीनेंहि जर्मनीची स्थिति सुधारणें अशक्य आहे. त्याची कांहीं तरी मुद्दाम वेगळी आणि कायमचीच व्यवस्था ठरविणें प्राप्त आहे. पैशाच्या बाजारांतला असा नियम आहे कीं, कर्जदार कुळ जोंपर्यंत आपल्या तोंडानें आपली दिवाळखोरी जाहीर करीत नाहीं, तोंपर्यंत कर्जफेडीची खटपट स्वतः कुळ करीत असतें. पण त्यानें आपल्या दिवाळखोरीची जाहीर कबुली दिली म्हणजे पुढील तजवीज करणें सर्वस्वी त्याच्या सावकारावर पडतें. मृताचा दहन–दफनविधि हा दुसऱ्यांनींच करण्याचा असतो; तो स्वतः प्रेताला करतां येत नाहीं ! त्याप्रमाणें येत्या ता. २५ रोजीं जर्मनीच्या सावकारांची सभा लॅरीन येथें भरणार आहे आणि जर्मनीपासून उरलेलें कर्ज व नुकसानभरपाईची रक्कम,म्हणजे अर्थात हप्तेच, कसे वसूल करावयाचे याची योजना त्यांना सर्वानुमतें करावी लागणार आहे. आपल्या हातांतले सगळे पत्ते कोणीहि उघडे मांडून खालीं ठेवल्यावर,पुढचा सगळा खेळ सहजच इतर गड्यांकडे जातो. त्याचप्रमाणें जर्मनीची स्थिति आहे. जर्मनीजवळ द्यायला काय आहे आणि त्याला देणें काय आहे या दोनहि गोष्टी जगप्रसिद्ध आहेत. निदान त्याच्या सावकारांना त्या पुऱ्या माहीत आहेत. त्यामुळें त्यांनीं आपणाला हवा तसा कर्जफेडीचा व नुकसानभरपाईचा मेळ घालावा असें म्हणणें ओघानेंच प्राप्त होतें. मात्र हें करतांना जर्मनी निदान जिवंत राहील इतकी तरी खबरदारी त्यांना घ्यावी लागेल. दिवाणी तुरुंगाच्या वारंटानें कर्जदाराला कैदेंत घातलें तर, तेथें त्याला अन्न मिळावें याकरितां स्वतः सावकारालाच त्याच्या पोटगीचा खर्च आधीं कोर्टांत भरावा लागतो. त्याप्रमाणें आपण सांगूं तें जर्मनीनें केलें पाहिजे अशी जरी त्याच्या सावकारांची स्थिति असली तरी, जर्म-

नीला पोटगी पुरेशी देऊनच त्यांना कर्जफेडीची योजना करावी लागेल !

जर्मनीच्या डोक्यावरील कर्जाचें ओझें केवढें मोठें आहे याची कल्पना सामान्य वाचकाला येणें कठिण आहे. त्याचे आंकडे कोटीच्या हिशेबानें सांगण्यापेक्षां अब्ज व दशअब्ज यांनींच सांगावे लागतात. ज्योतिषशास्त्राची माहिती नसणाऱ्या मनुष्याला पृथ्वीपासून ग्रह व तारे यांची अंतरें, किंवा प्रकाशाची गति, किंवा धूमकेतूची दौड यांची कल्पना आणून देणें जितकें अवघड तितकीच जर्मनीच्या या ओझ्याची कल्पना आणून देणें अवघड होईल; विजयी राष्ट्रांनीं असा विचारहि केला नाहीं कीं, महायुध्दांत युध्द चालविण्याला त्यांना स्वतःला जसा खर्च पडला तसा तो जर्मनीलाहि पडला असेल; किंबहुना इतर राष्ट्रांचा खर्च प्रत्येकानें थोडथोडा सोसला म्हणून तो सुसह्य झाला. पण जर्मनीला मुख्यतः लढावें लागलें असल्यामुळें त्याच्या स्वतःच्याच खर्चाला मात्र कोणी दुसरा भागीदार होऊं शकला नाहीं. तेव्हां वास्तविक जर्मनीवर कर्जाचा बोजा लादतांना स्वतः जर्मनीला लागलेला खर्च लक्षांत घेणें कोणीहि योग्य म्हटलें असतें. तें तर झालेंच नाहीं; पण १५ वर्षेपर्यंत आपला ऱ्हाइन नदीकांठचा अत्यंत समृद्ध असा प्रांत फ्रान्सला लावून देऊन तेथें शत्रूचा अंमल चालू राहिलेला पाहणें हें जर्मनीच्या नशिबी आलें !

पराभवच झाल्यामुळें या गोष्टींतील अपमानासंबंधानें जर्मनीला कांहींच तक्रार करण्यास जागा नव्हती. कारण पराजय पावलेल्या राष्ट्राला सर्व प्रकारचे अपमान सोसावेच लागतात. पण पैशाचें सोंग पैशाशिवाय साजरें करतां येत नाहीं. कर्ज किंवा खंडणी देण्याला लागणारा अतोनात पैसा उत्पन्न करण्याला अवश्य असणारे असे जर्मनीचे कारखाने चालण्याला लागणारें लोखंड व कोळसा यांचें उत्पत्तिस्थानच शत्रूच्या हातीं गेलें! अशा रीतीनें युद्धाकरितां केलेला खर्च, वसाहती वगैरे मिळकतीचा नाश, द्रव्योत्पादक साधनांचा अभाव, जर्मन नाण्याची किंमत परदेशांत कमी झाल्यामुळें आलेलें नुकसान, इत्यादि एकदम घडून आलेल्या कारणांमुळें उद्भवलेल्या आपत्तीच दुस्तर असतां, शिवाय जर्मनीवर बसलेली खंडणी इतकी मोठी होती कीं, तिचे हप्ते देण्याचा जिवापाड प्रयत्न केल्यावर इतर सर्व योजना निष्फळ ठरून, जर्मनीला आज खांका वर करून आपलें दिवाळें निघालें असें सावकारांना सांगण्याची पाळी आली आहे.

१९२१ सालीं नुकसानभरपाई ठरविण्याकरितां पहिलें कमिशन बसलें तेव्हां सर्व विजयी राष्ट्रांनी मिळून जी रक्कम जर्मनीकडून मागितली ती बावीस हजार पांचशें कोटी मार्क्स इतकी होती! या रकमेचे रुपये किती होतात हें एखाद्या शाळेंतील प्रौढ मुलांना उदाहरण म्हणून घालण्यासारखेंच आहे. मार्क या नाण्याची किंमत गेल्या १० वर्षांत वेळोवेळीं इतकी बदलली आहे कीं त्यांतील कोणती घ्यावी हें ठरविणेंच कठिण. एकवेळीं जर्मनींत जर्मन मार्कची किंमत इतकी खाली गेली होती कीं, पंधरा कोटी मार्क म्हणजे एक पौंड असा हिशेब होत असे. खानावळींत एक वेळच्या जेवणाचें बिल पटवावयाचें तर एक पोतें भरून मार्क्सच्या कागदी नोटा द्याव्या लागत ! अर्थात् ही स्थिति कालांतरानें स्वतः जर्मनीच्या प्रयत्नांनें सुधारली व आज एका मार्कची किंमत बारा आणे अशी समजतां येते. या प्रमाणानें हिशेब केला असतां जर्मनीकडून विजयी राष्ट्रांनीं नुकसानभरपाईदाखल मागितलेली रक्कम वीस पंचवीस हजार कोटी रुपये होत होती असें म्हणतां येईल. ब्रिटिश हिंदुस्थानाचें म्हणजे दिल्ली—सरकार व सर्व प्रांत मिळून, वार्षिक उत्पन्न सालिना २५० कोटी रु. आहे असें धरलें तर, जर्मनीकडे मागितलेल्या रकमेचा अर्थ असा होता कीं, हिंदुस्थानच्या एका वर्षाच्या सर्व उत्पन्नाइतकी रक्कम दरवर्षी जर्मनी देत गेला तर ७० वर्षेपर्यंत ती त्याला देत बसावें लागेल! म्हणजे आज १९३२ पासून सन २००२ सालापर्यंत हिंदुस्थानचें सर्व उत्पन्न झाडून पदरांत घालीत बसावें व त्यांतील एक पैहि घरकार्याकरितां खर्च करूं नये, असा हिशेब बसतो!

नुकसानभरपाई कमिशननें ही सर्व रक्कम मान्य केली नाहीं. तथापि प्रथम जनरल डॉस यांच्या योजनेप्रमाणें, आणि नंतर मि. यंग यांच्या योजनेप्रमाणें, जर्मनीनें देण्याची रक्कम व हप्ते ठरले ते खालीलप्रमाणें—सन १९३० पासून सन १९८८ पर्यंत म्हणजे ५८ वर्षेपर्यंत जर्मनीनें ११३१६ कोटी इतके मार्क्स कर्जफेडीकरितां व नुकसानभरपाईकरितां मिळून द्यावे. त्यांपैकीं ८४५४ कोटि एवढी रक्कम विजयी राष्ट्रांच्या कर्जफेडीकरितां म्हणून द्यावी व बाकीची उरलेली म्हणजे २८६१ कोटी मार्क्स इतकी रकम दरसाल नुकसानभरपाईकरितां म्हणून द्यावी. फिरून या ५८ सालांच्या अवधीचे दोन भाग पाडलेले आहेत. पहिला भाग सन १९३० ते १९६६ पर्यंत ३६ वर्षांचा; दुसरा भाग सन १९६६ ते १९८८ पर्यंत म्हणज २२ वर्षांचा. वरील एकंदर वार्षिक रकमेची वांटणी इतक्या अवधींत अमुक इतकी कर्जफेड व अमुक इतकी नुकसानभरपाई अशा रीतीनें वांटून दिली आहे.

अशा रीतीनें विजयी राष्ट्रांनीं मागणी कमी म्हणून केली तरी अखेर जर्मनीवर लादलेली खंडणीची

रक्कम किती मोठी आहे याची कल्पना कोणीहि करावी. जर्मन सरकारचा मामुली वार्षिक खर्च अगदीं किमान पक्षीं असेल तो वजा घालून उरणारी उत्पन्नाची रक्कम वरीलप्रमाणें बसविलेल्या वार्षिक हप्त्याइतकी असती तर गोष्ट वेगळी. त्याचा अर्थ इतकाच झाला असता कीं, आणखी ५०-६० वर्षेपर्यंत या ऋणाच्या आगींत जर्मनीनें पिचत राहावें. पण ' अति तेथें माती ' या न्यायानें आतां अशी वेळ आली आहे कीं, "माझें आतां काय घेतां तें घ्या, वाटेल तर आंगाचें सालडें सोलून घ्या, पण खंडणीचा वार्षिक हप्ता देण्याला मजजवळ पैसा नाहीं " असें जर्मनीसारख्या मानी व संपन्न राष्ट्राला निर्वाणपदावर उभें राहून सांगावें लागत आहे! पण त्यांत आतां नुसत्या जर्मनीच्या बेअब्रूचा प्रश्न नसून, विजयी राष्ट्रें म्हणून खंडणी व नुकसानभरपाई उपटूं पाहणाऱ्या राष्ट्रांचें काय होणार हाहि प्रश्न आहे. कारण एका अमेरिकेकडून जर्मनीमुद्धां जित व विजयी अशा अनेक राष्ट्रांनीं युद्धाकरितां कर्जे काढलीं तीं फेडावयाचीं कशीं ? जर्मनी बोलूनचालून दिवाळखोर बनला; व बाकीच्यांनाहि अगदीं तीच स्थिति आली नाहीं तरी, कर्जफेडीला पदर पसरून अमेरिकेकडेएक वर्षाची तरी सवड मागावी लागली.

अशा रीतीनें महायुध्द आर्थिकदृष्ट्या सर्वांनाच भोंवलें आहे. सगळ्याचा सगळा उंदीर किंवा बेडूक धरून जठरांत घालणें सापाला प्रथम ठीक वाटतें. पण तो आंत जाऊन फुगून कुजला म्हणजे स्वतः सापाचेंच पोट फुटण्याचा प्रसंग येतो.तशी जर्मनीला खाऊन पचविणाऱ्या महत्त्वाकांक्षी युरोपियन राष्ट्रांची स्थिति झाली आहे. बिचाऱ्या हिंदुस्थानाला महायुद्धापासून लाभ असा कांहींच झाला नाहीं, तर उलट दोनशें–तीनशें कोटि रुपये हिंदुस्थानचेच गेले. आणि राजकीय सुधारणांनीं तरी ती नुकसानभरपाई मिळावी म्हटलें तर त्याचा प्रकार गोलमेज परिषदेने उघडकीस आलाच आहे! यामुळें ' राक्षस व ठेंगू ' या गोष्टींतल्याप्रमाणें हिंदुस्थानाची स्थिति झाली आहे. या स्थितींतून हिंदुस्थानानें व इतर राष्ट्रांनीं बाहेर निघावयाचें तर हा युद्धकर्जाचा, खंडणीचा व नुकसानभरपाईचा डोलारा मोडलाच पाहिजे. म्हणजे अखेर सर्वांनीं मिळून थोडथोडें व सर्व राष्ट्रांचा सावकार बनलेल्या खुद्द अमेरिकेनें बरेंचसें नुकसान सोसण्यास तयार होऊन, आपल्या सावकारी कर्जाची सूट देण्यास तयार झालें पाहिजे. तरी लॉसेन येथें होऊं घातलेल्या परिषदेंत प्रत्यक्ष काय काय प्रकार घडतात ते पाहावे.

ता. २५ जानेवारी रोजीं लॉसेन येथें जर्मनीच्या सावकारांची परिषद भरेल. तींत अखेर निर्णय काय होईल याविषयीं कांहींच अंदाज आज करतां येत नाहीं. तथापि जर्मनीला नुकसानभरपाईच्या रकमेंत पुष्कळच सूट दिल्याशिवाय जर्मनीचें निभणार नाही, इतकेंच नव्हे तर त्याच्या सावकारांनाहि कांहीं मिळणार नाहीं, हें अगदीं उघड आहे. कांहीं दूरदर्शी सल्लागारांनीं मनोधैर्य व शहाणपण हीं दोन्हीं एकदम प्रगट करून असें स्पष्ट सुचविलें आहे कीं, जर्मनीच्या डोक्यावरचा हा कर्जाचा डोंगर सगळ्याचा सगळा एकदम उतरवून टाकावा. म्हणजे जर्मनीबरोबर इतर जगाचा जीव कोंडून त्याला गुदमरण्याची जी स्थिति आली आहे ती नाहींशी होऊन सर्वांनाच मोकळ्या हवेंत भरपूर स्वाश्वोच्छवास करतां येऊं लागेल. आणि कोणत्याहि रोगाला तेंच प्रथम अवश्य असतें. पण इतर कांहीं सल्लागारांचें शहाणपण किंवा धैर्य यांची मजल इतकी पोंचत नसल्यानें, त्यांनीं हप्तेबदीची मुदत वाढविणें व कर्जाच्या डोंगराचे कानेकोपरे तासणें इतकीच सल्ला दिली आहे. पण अशा टाळाटाळीनें अखेर परिणाम कांहींच होणार नाहीं. बलाढ्य जर्मनीवर जय मिळविला एवढ्याच यशावर युरोपियन राष्ट्रांनीं यापुढें संतुष्ट राहिलें पाहिजे. गाईच्या कासेंतून दूध न निघतां रक्त निघूं लागलें म्हणजे धार काढणें संपविलेंच पाहिजे. मग तिच्यापुढें हातांत काठी घेऊन उभें राहिलें व तिचे पाय दोरीनें बांधले तरी ती दूध कोठून देणार ?

विजयी लोकांनी पराजय पावलेल्या शत्रूशीं कसें वागावें याचें उदाहरण घ्यावयाचें असेल तर, दुर्योधनादि कौरवांचा संहार झाल्यावर पांडवांनीं धृतराष्ट्राला व गांधारीला कसें वागविलें यावरून घेतां येण्यासारखें आहे. धर्मानें धृतराष्ट्राला आपल्या पित्यासारखें वागवून, त्याच्या हातून दानधर्म करविण्याकरितां आपल्या खजिन्याचीं दारें सर्रास मोकळीं ठेविलीं होतीं ! धर्माप्रमाणें अर्जुनहि या औदार्याच्या धोरणांत सामील होता. येऊनजाऊन भीमच मधूनमधून क्रोधाविष्ट होऊन जुन्या आठवणीमुळें तोंडानें हरकत घेई. पण सात्त्विक धर्मच काय तर धनुर्धर अर्जुनहि या कामीं भीमाचें निवारण करी. युरोपियन राष्ट्रांनीं जर्मनीला आज धर्मादाय करण्याकरितां उचलून पैसा देण्याचा प्रश्न नाहीं. पण नुकसानभरपाईकरितां म्हणून जो दंड, म्हणजे खोटें कर्ज, जर्मनीवर लादण्यांत आलें आहे तेवढें त्याला विजयी राष्ट्रांनीं सोडलें तर या दंडाचे हप्ते भरण्याकरितां जें कर्ज जर्मनीनें घेतलें आहे तेवढें तरी तो आनंदानें परत करूं शकेल. जर्मनीला ही सवलत देण्याचे बाबतींत फ्रान्स हा खळखळ करीत आहे. पण इंग्लंड या गोष्टीचा सहानुभूतीनें विचार करील असें वाटतें. मात्र या सर्व राष्ट्रांचा मिळून जो

मोठा सावकार म्हणजे अमेरिका तो काय करील यावर सर्वच अवलंबून आहे. सुदैवानें खुद्द अमेरिकेंतीलच कांहीं तज्ज्ञ लोक असें म्हणूं लागले आहेत कीं, महायुद्धांत विनाकारण सामील झाल्याचें प्रायश्चित्त म्हणून अमेरिकेनें जर आपल्या सर्व कर्जदारांची ऋणमुक्तता केली तर सर्व जगावर उपकार केल्याचें श्रेय अमेरिकेला लाभणार आहे. मग पहावें ही सुबुद्धि अमेरिकेला सुचते का !

# वणीच्या लो. टिळक–स्मारकमंदिराचा अनावरणसमारंभ



टिळक–स्मारक मंदिर ( वणी )

अखिल भरतखंडांत स्वातंत्र्ययुद्धाच्या नौबती झडत आहेत व त्यामुळें सामान्य जनसमूहाच्या अंतःकरणावर औदासीन्याचें दाट धुकें पसरलें आहे. अशा वेळीं वणीकर मंडळी लो. चें स्मारक-मंदिर उघडण्यांत तल्लीन झाली होती. हें द्वादशवार्षिक यज्ञसत्र आज हातावेगळें झाल्याबद्दल सर्वांना उल्हास वाटत होता. या दोन दिवसांमध्यें ध्वजापताकांनीं स्मारकमंदिर सुशोभित करण्यांत येऊन लोकनायक बापुजी अणे यांचे हस्तें रविवार ता. १०-१-३२ रोजीं अनावरणसमारंभ पार पडला.

यवतमाळहून तपस्वी बाबासाहेब परांजपे, जतकर, कोल्हे, डॉ. टेंबे, दारव्हा येथून बापूसाहेब डाऊ, उमरावतीहून बाबासाहेब खापर्डे, वर्ध्याहून मनोहरपंत देशपांडे इत्यादि मंडळी आली होती. बापुजी येणार हें कळल्यामुळें उत्साह द्विगुणित झाला होता. प्रारंभीं मुलींनीं ईशस्तवन म्हटल्यानंतर श्री. बापुसाहेब डाऊ यांनीं प्रसंगाकरितां मुद्दाम तयार केलेले संस्कृत षट्क म्हणून दाखविलें. स्मारक मंडळाचे अध्यक्ष श्री. आबासाहेब भेदी यांचें प्रास्ताविक भाषण झाल्यावर अध्यक्षस्थानीं श्रीयुत बापूजी अणे टाळ्यांच्या गजरांत विराजमान झाले. नंतर सेक्रेटरींनीं द्वादशवार्षिक पर्यालोचन केलें.

स्मारक मंदिराची इमारत सार्वजनिक सभागृह म्हणून अँफी थिएटराच्या स्वरूपांत बांधण्याची कल्पना लो. चे निधनानंतर लागलीच ठरली. पण सोयीस्कर भव्य अशी जागा निवडण्यांत मंडळाचीं ५ वर्षें खर्चीं पडलीं. त्यानंतर प्लॅन, खर्चाचा अंदाज वगैरे होऊन इमारतीचें काम १९३१ मध्यें पूर्ण झालें व अजूनहि पुष्कळ काम व्हावयाचें आहे, पण मंदिराचा सभा, नाटक वगैरेकरितां उपयोग करण्यास आतां अडचण नाहीं. मंदिर १२२×४७×३३ फूट उंच असून स्टेशनाचे रस्त्यावर आहे. मंदिर बांधण्यास आतांपर्यंत एकंदर खर्च सुमारें २७००० रु. झाला. इतकी भव्य इमारत स्मारक या नात्यानें वऱ्हाडांत ही पहिलीच आहे.

टिळक पर्स फंडाच्या धर्तीवर या स्मारक मंदिराचा ट्रस्ट करावयाचा असून लोकमान्यांचे राजकीय ध्येयास अनुसरून लोकशिक्षणाचे रूपानें या इमारतीच्या एकंदर उत्पन्नाचा विनियोग व्हावयाचा आहे. इत्यादि माहिती सांगून झाल्यावर लोकनायक अणे यांनीं लो. चें गुणगौरवपर भाषण केलें.

टिळकांची बुद्धिमत्ता,शास्त्रीय ज्ञान हीं फार श्रेष्ठ प्रकारचीं असून त्यांनीं लिहिलेले दोन ग्रंथ आर्यांचे वसतिस्थान व गीतारहस्य हें जगाचें लक्ष भारतीय संस्कृतीकडे अधिक वेधून घेत आहेत. ज्योतिषविषयक व्यासंग,पंचांगसंशोधन, वैद्यकशास्त्रोद्धाराची खटपट,हरिदास लोकांची कीर्तनसंस्था इत्यादि बहुविध व्यापार त्यांच्या डोक्यांत असत. पण भरतखंडांतील संस्कृतीवर होणाऱ्या आक्रमणाचें रक्षण करून हा डोलारा कसा चालेल हा विचार यांत प्रमुख होता. त्यामुळें लो. नीं काय केलें असें कोणीं विचारलें तर "त्यांनीं निर्जीव हिंदुस्थानाला सजीव केलें" असें एका वाक्यांत त्यांच्या सर्व आयुष्यांतील कामगिरीचें वर्णन करतां येईल. लोकांच्या ठिकाणीं प्रतिकारसामर्थ्य वाढवून सरकाराशीं भांडावयाला त्यांनीं लोक तयार केले. १९२० सालापर्यंत तरी हिं. त संघटित अनुयायी वर्ग ज्यास होता असा राजकीय पक्षाचा एकच पुढारी म्हणजे लोकमान्य होते.

लो. चें ४० वर्षांचें कार्य नसतें तर आज महात्मा गांधींना किंवा कोणत्याहि प्रतापी पुरुषास इतकी चळवळ करतां आली नसती. त्यांनीं पेरून ठेवलेल्या विचारांचीं बीजें, त्यागाचें उदाहरण व अनुकूल वृत्ति इतका मसाला या भूमींत होता म्हणून त्यागी माणसाला त्यांचा उपयोग होत आहे. कठिण जागीं पाया खोदण्याचें काम त्यांनीं केलें.

लो.चें स्मारक नाट्यमंदिराचे रूपानें केलें हें जरा चमत्कारिक दिसतें. मनोरंजन व राजकारण यांत विरोध दिसतो. तीं परस्पर पोषक कशी होतील याचा उपक्रम वणीकरांनीं केलेला आहे. या स्मारक मंदिराचा ट्रस्ट करून संस्थेचें उत्पन्न राजकीय चळवळ चालविण्यांत खर्च होणार आहे. यांतच मनोरंजनांतून राजकारण करण्याचा मार्ग दिसत आहे. नाट्यमंदिराचा उपयोग राजकारणाकडे असा आजवर कोठें झाला नव्हता.

नंतर स्वागताध्यक्षांनीं आभार मानल्यानंतर राष्ट्रगीत होऊन समारंभ संपला.

नंतर थिएटरसमोरच्या पटांगणांत शुद्ध पंचांगानुसार वार्षिक मकरसंक्रमणसंमेलन तपस्वी बाबासाहेब परांजपे यांचे अध्यक्षतेखालीं पार पडलें. त्या प्रसंगीं श्री. बाबासाहेब खापर्डे यांचे समयोचित भाषण झालें.

रात्रीं अनावरणसमारंभाच्या निमित्तानें व स्मारक मंडळास मदत म्हणून येथील असॅच्यूर कलानें "सं. सौभाग्यलक्ष्मी" या नाटकाचा प्रयोग केला. खर्च वजा जातां सुमारें २७५ रु. स्मारकास देण्यांत आले.

# ब्रिटिश पौंडाचा अधःपात !

## कमांडर केनवर्दी यांचें मत

ब्रिटिश पार्लमेंटांतील माजी मजूर सभासद कमांडर केनवर्दी यांनी इंग्लंडचें नाणें व एकंदर आर्थिक दुःस्थिति याविषयीं खालीलप्रमाणें आपला अभिप्राय 'डेली हेरल्ड' मध्यें व्यक्त केला आहे. केनवर्दी म्हणतात,

पौंडाचें घसरतां घसरतां अखेर काय होणार हें कोणालाहि—विशेषतः हल्लींच्या राष्ट्रीय सरकारला तर मुळींच कळत नाहीं. आमच्या हातीं अधिकार ठेवाल तर आम्ही पौंडास उचलून धरूं अशी हल्लींच्या प्रधानमंडळानें प्रतिज्ञा केली होती. पण हल्लींचा पौंडाचा अधःपात त्यांच्या कल्पनेबाहेर झाला आहे.

वास्तविक पौंडाची किंमत उतरते आहे यांत कांहीं बिघडलें नाहीं. उतरत उतरत एका पौंडांतला अगदीं अर्धा पौंड उरला तरी चालेल. फ्रेंच फ्रँकची किंमत उतरतां उतरतां चौथाई उरली होती. तेथें फ्रेंचांनीं ती स्थिर केली. तेव्हांपासून फ्रान्सची भरभराट होत असून आज जगांत फ्रान्स हे धनाढ्य राष्ट्र होऊन बसलें आहे. इंग्लंडचें चुकत आहे तें हें कीं, सद्यःस्थितीतून डोकें वर येण्याची कांहीं योजना येथें आंखलेली नाहीं. परिस्थिति आपोआपच सुधारेल म्हणणें चुकीचें आहे. बँकवाले, भांडवलवाले, व्यापारी, कारखानदार सर्वजण आपल्या पायापुरतें पाहतात. व्यापक कार्यक्रम हातीं घेणें हें सरकारचें काम आहे. पण सुवर्णचलन गेलें तर त्या जागीं दुसरें कोणतें चलन सुरू करावें याची कांहीं योजना पुढें येण्याचें चिन्ह दिसत नाहीं. निदान 'सुवर्णचलन पुनः सुरू करा' अशा गोड थापा ऐकून तरी कोणी मोहून न जावो म्हणजे झालें. सुवर्णचलन गेलें तर त्या जागीं दुसरी कांहीं पद्धति आली पाहिजे.

## घसरण होवो; पण स्थिरता येवो

सध्यांची अनिश्चित स्थिति व्यापारांस फार वाईट आहे. आज विकलेल्या मालाला दोनतीन महिन्यांनीं काय मिळेल याचा व्यापाऱ्यांस अंदाज करतां

येत नाहीं. आणि इंग्लंडांत व इतर देशांत आयात मालावर अनेक प्रतिबंध निर्माण झाले असल्यामुळें पौंड बिलें आगाऊ खरेदी करणें जवळ जवळ अशक्य झालें आहे. पौंडाची किंमत कितीहि कमी झाली तरी चालेल, पण ती कोठेंतरी स्थिर होईल तरच निर्यात नीट चालेल. पौंडाची किंमत कमी झाल्यावर निर्यात व्यापार भरभराटेल अशी अपेक्षा होती ती फोल होत आहे. याचें कारण पौंडाची कोणती तरी एक किंमत स्थिर होत नाहीं हें होय.

या अडचणींतून मार्ग काढण्यास निरनिराळ्या राष्ट्रांतील प्रधान, सरकारचे कायम अधिकारी व मध्यवर्ती बँकांचे गव्हर्नर या सर्वांची आंतरराष्ट्रीय परिषद भरविली पाहिजे. गेल्या निवडणुकीच्या वेळीं अशी कांहीं योजना सूचित करण्यांत आली होती.पण त्या दिशेनें आतां कां प्रयत्न होत नाहींत? सगळें जग कोणी तरी पुढाकार घेईल म्हणून वाट पाहतें आहे. सुवर्णमानवालीं फ्रान्स, अमेरिका हीं राष्ट्रें जर बसल्या जागेवरून उठण्यास तयार नसलीं तर सुवर्णमान नसलेल्या राष्ट्रांची परिषद कां बोलावीत नाहीं?आमचे पुष्कळसें गिऱ्हाईक आणि कच्चा माल व अन्न पुरविणारे लोक सुवर्णमान नसलेल्या राष्ट्रांतच आहेत. हीं राष्ट्रें आंतरराष्ट्रीय देणें पुरें करण्याकरितां कोणतीहि एकादी चलनपद्धति आमच्याशीं ठरविण्यास उत्सुक आहेत. ऐनजिनसी देवघेव जवळजवळ होऊं लागली आहे. मग आतां विलंब कां?

### ऐनजिनसी देवघेव

आमच्या मजूरपक्षाची एक योजना तयार आहे. माल निर्यात करण्याची आज जशी कांहींतरी संघटना आहे तसें आयात मंडळ स्थापून वट्टांत निर्यात मालाबद्दल आयात माल घ्यावा. तत्त्वतः आजकालचा आंतरराष्ट्रीय व्यापार म्हणजे ऐनजिनसी देवघेवच असते. पण आंतरराष्ट्रीय व्यापाराची आजची संघटना गोडकळीस आली आहे. या संघटनेंत फक्त खाजगी नफेबाजी चालते. पण यापुढें आंतरराष्ट्रीय व्यापाराची संघटना सर्व राष्ट्रांस फायदा होईल अशी केली पाहिजे. खाजगी नफेबाजीच्या दुर्गुणामुळेंच महायुद्धाचे वेळींहि आंतरराष्ट्रीय व्यापाराची संघटना मोडून पडली. आणि मग त्यावेळीं वट्टांत सार्वराष्ट्रीय खरेदी–विक्री करावी लागली.

सध्यां चार विदेशी राज्यकर्त्यांनीं ऐनजिनशीं देवघेव सुरू केली आहे. अमेरिकन सरकारचें गहूं-मंडळ गहूं देऊन त्याबद्दल ब्राझिलकडून कॉफी घेतें. जुगोस्लाव्हिया आपला तंबाकू देऊन झेकोस्लोव्हाकियाचा पक्का माल–विशेषतः कापड घेतो. साम्राज्यांतील व बाहेरील राष्ट्रांशीं आपणास अशी ऐनजिनसी देवघेव करतां येईल. चीन व जपान सोडलें तर इतर प्रत्येक राष्ट्रास खाद्य वस्तु व इतर माल विकावा लागतोच. रन्सिमन आणि गिल्मर यांनीं आयात मालावर लादलेल्या करांनीं हुंडणावळ सुधारणार नाहींच. रिकामा जाच मात्र होईल. ऐनजिनसी देवघेवीकरितां आयात मंडळ नेमल्याखेरीज पुरेसा गहूं येणें शक्य होणार नाहीं. आयात निर्यात–मंडळें स्थापून सर्व राष्ट्रांची वट्टांत खरेदी–विक्री केल्याखेरीज व्यापार सुधारणार नाहीं. बँका व हुंडणावळीचा व्यवहार या खाजगी नफेबाजीच्या संघटना नीट चालेनात म्हणून राष्ट्रानें कां उपाशीं मरावें?

### विपुल संपत्ति; विषम वांटणी

आजच्या इतकी पुष्कळ आवश्यक संपत्ति यापूर्वी कधींहि उत्पन्न झाली नव्हती. आणि ही संपत्ति वाढविण्याची साधनसामग्रीहि इतकी परिपूर्ण यापूर्वी कधी नव्हती. आज संपत्ति पुरेशी आहे. इतकेंच नव्हे तर तिची वाढ कमी करण्याचा व आहे त्यांतील कांहींचा नाश करण्याचा यत्न करावा लागत आहे. कदाचित् यापुढें आपणास इंग्लंडांत संपत्ति सरकारनें वाटून द्यावी लागेल, ती अशी कीं, सर्वांना पुरेशी भाकर मिळाल्याशिवाय कांहींना नुसतीच पोळी मिळू नये. म्हणजे संपत्ति कमी आहे म्हणून नव्हे, तर विपुल असूनहि तिची विषम वांटणी होते ती अधिक न्याय्य करावी लागेल. खरोखर इंग्लंडांतल्या इंग्लंडांतच संपत्ति इतकी विपुल आहे कीं, आम्ही बाहेरून माल येण्यास प्रतिबंध करण्याचें योजीत आहों. म्हणून पौंड कितीहि खालीं जावो परिणामतः व्यापाराची पद्धति जर बदलली आणि त्यायोगें आम्हांस माल पुरविणाऱ्या व आमचा माल विकत घेणाऱ्या राष्ट्रांशीं जर आपण सहकार्य करूं लागलों तर इंग्लंडाला भीतीचें कांहींच कारण नाहीं.

# कऱ्हाड येथील एक नवीन उपक्रम



चक्री नाव

ही नाव कऱ्हाडच्या " दी डेक्कन इंडस्ट्रियल युनिअन लि., एंजीनिअर्स अँड बोट-बिल्डर्स"-या नांवाच्या कारखान्यांत बांधली. या कारखान्याचे चालक टिळक महाविद्यालयाचे पदवीधर असून त्यांनीं आपल्या कारखान्यांत आतांपर्यंत बऱ्याच नावा बांधल्या. त्या सातारा, बेळगांव या जिल्ह्यांत निरनिराळ्या गांवी चालत असून कांहीं औंध, जमखंडी, सांगली वगैरे संस्थानांत चालत आहेत.

ह्या बांधून दिलेल्या नावा बऱ्याच मोठ्या असल्यामुळें नदीकांठच्या साधारण गांवास त्यांचा उपयोग करून घेणें सुलभ नसे. नदीकांठच्या गांवीं नाव नसल्यास फार हाल होतात. अशा गांवांना उपयोगी पडावी व त्यांना सहज विकत घेतां यावी या उद्देशानें कारखान्यानें नवीन उपक्रम करून वरील चित्रांत दाखविलेल्या नावेप्रमाणें लहान नावा बांधून देण्याचें योजिलें आहे. वरील नाव लहान, हलकी पण मजबूत असून आकार शास्त्रशुद्ध असल्यामुळें देखणी व चालीला उत्तम आहे. यांत थोडी यांत्रिक योजना केली असून ती मनुष्याच्या शक्तीनें चालवितां येण्यासारखीच आहे. यांत्रिक योजनेंत एंजिनाचा वगैरे संबंध नाहीं. तेव्हां अर्थातच विशेष जाणत्या इसमाचें कारण उरत नाहीं. रोजच्या खर्चाकरितांसुद्धां तेल, पेट्रोल वगैरे बाबतीत परदेशीं जाणारा पैशाचा ओघ आपोआप टळतो.

नांव प्रवाहांतून चालवितांना---विशेषतः धारेंतून सरळ वर अगर नीट समोर नेतांना---दोहों बाजूंची वल्हीं झपझप एकसारखीं पडावीं लागतात. अशावेळीं चालविणाराच्या कौशल्याची एकप्रकारें परीक्षाच होत असते. या नवीन यांत्रिक योजनेनें मनुष्याच्या कौशल्याचा बराचसा भाग हिरावून घेतला आहे. नेहमींच्या नावेवर साधीं वल्हीं असतात. एक वल्हें मारून दुसरें मारीपर्यंत कांहीं वेळ जातो व अशा वेळांत प्रवाहाबरोबर नाव खालीं सरकत जाते. तें टाळण्याकरितां येथें वल्ह्याच्या जागीं पंख्याची योजना केली आहे.

नावेच्या दोहों बाजूंस दोन पंखे लावले असून ते दोन्ही फिरविण्याकरितां एकाच दांड्याची व्यवस्था केलेली आहे. त्यामुळें मधला दांडा नुसता फिरवीत राहिलें कीं, आपोआप दोहोंबाजूंचे पंखे एकसारखे फिरविले जातात. प्रत्येक पंख्यास लहान लहान अशी पांच पातीं जोडलेलीं आहेत. तीं चक्राकार जोडलीं असून पंखेहि चक्राकार फिरवावयाचे असल्यामुळें एकामागून एक असें पातें पाण्यांत शिरून वल्ह्याचें काम करीत असतें. प्रत्येकीं पांच अशीं दोहो बाजूंस एकंदर दहा लहान वल्हीं एकाच ठिकाणीं बसून मारण्याची सोय या चक्राच्या योजनेनें साधली आहे. चक्रगतीमुळें एक पातें पाण्यांत शिरून वर निघण्यापूर्वीच दुसरें पातें पाण्यांत शिरत असल्यामुळें मध्यंतरीं वेळ जात नाहीं. एक वल्हें मारून दुसरें वल्हें मारीपर्यंत जाणाऱ्या वेळामुळें जशी नाव प्रवाहाबरोबर खालीं सरकते तशी या नवीन सोईमुळें नाव खालीं सरकण्याचा संभव उरत नाहीं. सुकाणूची व्यवस्था असल्यामुळें योग्य दिशेस नाव नेण्यास फार सुलभ जातें, भर पुरांतहि नावेकडून हुकमी काम करून घेतां येतें, आणि वेळेची व श्रमाची पुष्कळच बचत होते.

माणसांच्या वाहतुकीच्या दृष्टीनें तर या नावा अतिशय उपयुक्त झाल्या आहेत. आकार लहान असल्यामुळें माणसें थोडीं बसतात व कमी श्रमांत भराभर खेपा करतां येतात. त्यामुळें नावाड्यांची व उतारूंची फारच चांगली सोय होणार आहे. आकाराच्या मानानें किमतीहि माफक असल्यामुळें या नवीन सोईचा फायदा नदीकांठच्या गांवकऱ्यांना सहज करून घेतां येईल. तो शक्य असेल त्यांनीं अवश्य करून घ्यावा.

# फुस्ट सूचना

१ व्हाइसरॉयसाहेबांनीं अलीकडे दडपशाही जारी करण्यासाठीं जे वटहुकूम सोडले आहेत ते कायदेशीर आहेत का गैरकायदेशीर आहेत असा प्रश्न उपस्थित करून मुंबईचे एक सॉलिसिटर श्रीयुत पांड्या यांनीं ता. ७ जानेवारीच्या मुंबईच्या क्रॉनिकल पत्रांत एक लेख लिहिला आहे. त्यांत १८५८ चा राणीचा जाहीरनामा आधारभूत मानून त्यांत विलायतेंतील प्रजाजनांना जे हक्क आहेत तेच हक्क हिन्दी प्रजाजनांना दिलेले आहेत असा जो ओझरता उल्लेख आहे त्यावरून प्रजेच्या स्वातंत्र्यावर घाला घालणारे असले वटहुकूम काढतांच येत नाहींत असें मत दिलें आहे. त्याचप्रमाणें इंडिया आक्टान्वयें कायदे मंडळाला जो कायदा करण्याचा अधिकार आहे तसलाच कायदा वटहुकुमाच्या रूपानें व्हाइसरॉयांना जारी करतां येईल आणि प्रस्तुतच्या वटहुकुमांत नमूद असलेले विधिनिषेध घालून देण्याचा कायदेमंडळालाहि अधिकार पोंचत नसल्यानें व्हाइसरॉयांनीं प्रसिद्ध केलेले वटहुकूम कायदेशीर नाहींत असा निष्कर्ष सॉलीसिटर पांड्या यांनीं आपल्या लेखांत काढला आहे. राणीच्या जाहीरनाम्यामुळें हिंदी प्रजेला इंग्लंडांतल्याप्रमाणें मॅग्नाचार्टांत नमूद केलेले सर्व हक्क प्राप्त झाले आहेत ही जी मूलभूत गोष्ट पांड्या यांनीं गृहीत धरली आहे तीच निराधार व चुकीची असल्यानें त्यांची सगळीच विचारसरणी दूषित झाली आहे. अर्थातच सध्यांच्या कायद्यानें व्हाइसरॉयांना इतकी अमर्यादा सत्ता देऊन ठेवलेली आहे कीं कसलाहि दडपशाहीचा वटहुकूम बेकायदेशीर ठरण्याची भीति त्यास नाहीं ! अर्थातच अशा निरंकुश सत्तेचा दुरुपयोग केला जात आहे असें म्हणून वटहुकुमाविरुध्द कितीहि ओरड केली तरी केवळ बेकायदेशीरपणाच्या आक्षेपाच्या फुंकरानें उडून जाण्याइतके कांहीं ते लेचेपेचे नाहींत.

---

२ व्हाइसरॉयांना वटहुकूम सोडण्याचा सर्वाधिकार असला तरी त्या वटहुकुमानें न्यायपद्धतीच्या मूलभूत तत्त्वांनाहि बेलाशक लाथाडतां येईल असें मात्र आम्हांला वाटत नाहीं. म्हणून जर त्या वटहुकुमांतील एखाद्या कलमानें न्यायाच्या आद्यतत्त्वालाच हरताळ फांसला जात असला तर तें कलम बेकायदेशीर म्हणतां येईल आणि असें एक कलम त्या वटहुकुमांत आहे असें आम्हांस वाटतें ! इमर्जन्सी पॉवर्स ऑर्डिनन्समधील कलम २८ मध्यें असें म्हटलें आहे कीं, १६ वर्षांच्या वयाच्या आंतील मुलानें यासंबंधांत एखादा गुन्हा केला व त्यास दंडाची शिक्षा देण्यांत आली तर तो दंड बापानें किंवा पालकानें भरला पाहिजे असा हुकूम करण्याचा अधिकार कोर्टाला आहे. आणि जर तो बाप किंवा पालक तसा दंड न भरील तर तो दंड न भरल्याबद्दल त्या बापाला किंवा पालकाला कैदेची शिक्षा देण्यांत येईल ! या कलमानें न्यायाच्या मूलभूत तत्त्वाचाच खून पाडला आहे ! एकानें गुन्हा करावा आणि दुसऱ्याला शिक्षा दिली जावी असला विपरीत प्रकार जगांतल्या कोठल्याहि न्यायपद्धतींत नाहीं व व्हाइसरॉयांनाहि वटहुकुमानें असला विक्षिप्त प्रकार सुरू करतां येईल असें वाटत नाहीं. मुलाच्यासाठीं म्हणून बाप किंवा पालक आपण होऊन दंड भरील किंवा समायिक इस्टेटींतून वारसदारीच्या हक्काला अनुसरून मुलाचा हिस्सा वेगळा काढून त्यांतून दंड वसूल करण्यांत येईल तर तो प्रश्न अलाहिदा आहे. परंतु या बेकायदा कलमाची शहानिशा करण्यासाठीं एखाद्या पालकानें मीं या मुलाचा दंड भरीत नाहीं असें म्हटलें आणि जर मॅजिस्ट्रेटनें त्या पालकास तुरुंगांत पाठविलें तर ती कैद बेकायदेशीर होईल आणि अशी बेकायदेशीर अटक केल्याबद्दल त्या पालकाला त्या मॅजिस्ट्रेटाविरुद्ध फिर्याद करतां येईल. आणि अशी फिर्याद पुढे आली असतां हायकोर्टांतील न्यायाधीश जर खरा न्यायप्रिय, निस्पृह व तज्ज्ञ असेल तर एकाचा गुन्हा व दुसऱ्यास शिक्षा असला विक्षिप्त प्रकार ऑर्डिनन्सनेंहि निर्माण करण्याचा व्हाइसरॉयास अधिकार पोंचत नाहीं असाच निर्णय तो देईल. [illegible]रितां अशी आपत्ती ओढवलेल्या एखाद्या पालकानें हायकोर्टापर्यंत मजल गांठून हा अन्याय चवाठ्यावर मांडावा; किंवा सरकारनें तरी हायकोर्टाकडून थप्पड बसण्यापूर्वींच सावध होऊन निदान हें २८ वें कलम रद्द केल्याचें जाहीर करावें.

---

३ वरिष्ठ सरकारनें प्रसिद्ध केलेले वटहुकूमच आधीं अत्यंत जाचक आहेत, आणि प्रांतिक सरकार त्या वटहुकुमांचें स्पष्टीकरण करण्याकरितां म्हणून जीं सरक्युलरें काढतें, त्यायोगानें वटहुकुमांची व्याप्ति अधिकच वाढते! उदाहरणार्थ, वृत्तपत्रकारांना व छापखानेवाल्यांना इषारा म्हणून जें सर्क्युलर मुंबईसरकारनें प्रसिद्ध केलें आहे तेंच पाहा. त्यांत अटक झालेल्यांचे संदेश प्रसिद्ध करण्याला मनाई करण्यांत आली आहे. एवढेंच नव्हे तर काँग्रेसच्या चळवळींत भाग घेणाऱ्यांचे

किंवा त्या चळवळींतील प्रसंगांचे फोटोहि छापण्यास बंदी केली आहे! पोलिसांचा लाठीमार, जमावांतून घोडदौड किंवा कायदेभंगास निघाल्या-वेळचा अथवा कायदेभंग चालू असतांचा देखावा एवढ्यापुरतीच ही बंदी लागू असेल तर तिला कांहीं अर्थ आहे व तिची बजावणीहि होऊं शकेल. परंतु गांधीजी, वल्लभभाई, सुभाषबाबू अशांसारखे पुढारी अटकबंद झाल्यावर ते कायदेभंगाच्या कोणत्याहि कार्यक्रमांत भाग घेऊं शकत नसतांना त्यांच्या फोटोला हरकत कां असावी? मुंबई-सरकारचाहि तिनका व्यापक उद्देश असेल असें वाटत नाहीं. परंतु अहमदाबादच्या डि. मॅजिस्ट्रेटनें गांधीजींच्या मुंबईतील आगमनाच्या फिल्मलाहि बंदी केली आहे असें कळतें! तें खरें असल्यास ही फोटोची बंदी किती जाचक होईल याची कल्पनाहि करवत नाहीं. कारण गांधीजींसारख्यांचा फोटो कोठेंच प्रसिद्ध करावयाचा नाहीं असें जर या सर्क्युलरानें ठरेल तर गांधी-छापाच्या काड्याच्या पेट्या, एक्झरसाइज बुकें, औषधाच्या बाटल्या यांनाहि बंदी करावी लागेल! अर्थातच सरकारचा असा हेतु नसावा हें उघड आहे. वास्तव कोणत्या वेळचे व प्रसंगाचे फोटो छापूं नयेत त्याचा खुलासा होणें जरूर आहे. अलाहाबादच्या मॅजिस्ट्रेटनें मुंबईची ही फोटो-बंदी अतिव्याप्त असून आपल्याला अमान्य असल्याचे सांगितले आहे; आणि लाठीमारासारखे लोकांत खळबळ उडविणारे तेवढे फोटो छापूं नयेत, साध्या फोटोला मनाई नाहीं, असा खुलासा प्रसिद्ध केला आहे. तो लक्षांत घेऊन मुंबईसरकारहि आपल्या सर्क्युलरांतील फोटोबंदीची योग्य मर्यादा कोणती तिचें स्पष्टीकरण करील काय?

# विनाशकालीं पथ्यकर वाक्यहि रुचेनासें होतें

॥ उपस्थितविनाशः पथ्यवाक्यं न शृणोति ॥ —कौटिलीय अर्थशास्त्र—चाणक्यसूत्रें

बिचाऱ्या सरकारला बरें म्हणणारा एकहि वर्ग राहूं नये ही केवढी शोचनीय स्थिति! जिकडून पाहावें तिकडून सरकारावर टीकेचीच झोड उठलेली दिसते. राष्ट्रीय सभावाल्यांना सरकारनें आपल्याच हातानें दूर लोटून प्रतिपक्षी बनविलें आणि त्यांचींच तोंडें बंद करण्याकरितां वटहुकुमांचे लगाम तयार केले! तेव्हां राष्ट्रीय सभावाल्यांनीं सरकाराचा धिक्कार केल्यास त्यांत नवल तें काय? पण ब्राह्मणेतर पक्ष, मवाळ कंपू, बहुतेक वेळीं सरकारच्याच कच्छपीं असणारे व्यापारी, सरकारचेच भाईबंद असे हिंदुस्थानांतले, विलायतेंतले व अमेरिकेंतले कित्येक पुढारी या सर्वांनीं सरकारच्या धोरणावर एकजात तुटून पडावें हें काय दर्शवितें? केवळ सरकार-पक्षालाच वाहिलेलीं अशीं येथील आणि विलायतेंतील वृत्तपत्रें सोडून दिल्यास इतर कोणीहि त्रयस्थ लेखक किंवा वक्ता सरकारच्या दडपेगिरीचें समर्थन करूं शकत नाहीं. एवढेंच नव्हे, तर जो तो सरकारचा कान पिरगळण्याकरितां व झालेल्या चुकीची दुरुस्ती करा असें बजावण्याकरितां पुढें सरसावत आहे. यावरूनच सरकारच्या वटहुकुमांच्या धांगडधिंग्यानें लोकमत किती खवळून गेलें आहे तें सिद्ध होतें.

अमेरिकेंत हिंदुस्थानविषयक प्रश्नावर बहुतेक गाढ अज्ञानच पसरलेलें असतें; आणि मनरो डॉक्ट्रिनमुळें अमेरिकन लोकांत इतर देशांतल्या राजकारणांत नसती ढवळाढवळ करण्याची प्रवृत्ति क्वचितच आढळून येते. असें असतां अमेरिकेंतील १०६ धर्माधिकारी गांधीजींच्या अटकेचा निषेध करून त्यांस बंधमुक्त करा असा ब्रिटिश प्रधानास उपदेश करण्यास पुढें येत आहेत. यावरूनच ही दडपशाही सर्वथैव असमर्थनीय ठरत नाहीं काय?

हुजूर पक्षाच्या हडेलहप्पी धोरणाचें समर्थन करण्यास इंग्लंडांतील कट्टर पक्षाचीं सर्व पत्रें सतत सज्ज आहेत. पण अशा प्रतिकूल वातावरणांतहि कॉमनवेल्थ ऑफ इंडिया लीग आणि फ्रेंडस ऑफ इंडिया सोसायटी यांसारख्या संस्था हिंदुस्थानांतील हेलेशाहीचा धिक्कार करून सरकारास आपलें धोरण बदला असें बजावीत आहेत. वर निर्दिष्ट केलेल्या संस्थांनीं भरविलेल्या सभेंत बर्ट्रांड रसेल, कमांडर केनवर्दी, लॅरेन्स हाऊसमन, मि. वेल्डनप्रभृति वक्त्यांनीं या झारशाहीचा झणझणीत निषेध करून सरकारला स्पष्ट इषारा दिला. कॉमनवेल्थ ऑफ इंडिया लीगची सभा खासगी जागेंत तरी भरली होती. परंतु फ्रेंड्स ऑफ इंडिया सोसायटीला पडद्याआड लपून सरकारविरुद्ध बोटें मोडण्याचें हें धोरण नापसंत वाटून त्या संस्थेनें आपली सभा ट्राफलगार स्क्वेअरमध्ये भरविली; आणि तेथें कमांडर केनवर्दी यांनीं निस्संदिग्ध शब्दांत सांगितलें कीं, हिंदुस्थान-सरकार जर हिंदुस्थानांत अशीच हेलेशाही चालविण्याचा हट्ट धरील तर त्यास तेथलें चंबूगवाळें आवरतें घ्यावें लागेल! मि. लॉरेन्स हाऊसमन यांनीं हिंदुस्थानांतील लष्कर व पोलीस यांना त्यांचें कर्तव्य

काय याची जाणीव करून देणारा उपदेश केला आणि सभेला हजर असलेल्या डगलेवाल्या व बिनडगलेवाल्या पोलिसाकडे दृष्टिक्षेप करून ते छातीठोकपणानें म्हणाले कीं, माझ्या या भाषणाचा परिणाम भोगण्यास मी सिद्ध आहे. यावरूनच इंग्लंडांतील दूरदर्शी मुत्सद्यांची डोकीं या ज्ञारगिरीने कशीं भणाणून गेली आहेत तें दिसून येतें.

पण इंग्लंडांत वटहुकुमांचा वरवंटा चालू नाहीं आणि राष्ट्रीय सभावाल्यांच्या चळवळीची तेथील पुढाऱ्यांना पुरतीशी माहितीहि नाहीं, यामुळे त्यांचा निषेध कदाचित् कित्येकांकडून एकपक्षीय समजण्यांत येईल. म्हणून आपण हिंदुस्थानांतल्या लोकमताकडे वळूं. येथल्या ब्राह्मणेतर पक्षाचा व नेमस्त कंपूचा सरकारास मोठा भरंवसा. मद्रासच्या ब्राह्मणेतर पक्षाचे पुढारी सर ए. पी. पेट्रो हे तर व्हाइसरॉयांचे जुने दोस्त आणि ते लॉर्ड विलिंग्डनला नुकतेच भेटून सहकारितेचा उपदेश करण्यास पुढें सरसावलेले. पण त्यांनाहि कबूल करावेंच लागलें कीं, वटहुकुमांचा दुरुपयोग होत आहे व तो दूर केला पाहिजे. वटहुकूम कायम ठेवून त्यांचा दुरुपयोग होऊं न देणें हें सापाचे विषारी दांत कायम ठेवून त्यानें कोणाचा चावा घेऊं नये अशी अपेक्षा करण्यासारखें व सुसंगत आहे! तथापि सर ए. पी. पेट्रोसारख्यांनाहि वटहुकुमांचा दुरुपयोग होत आहे एवढें नाकबूल करतां येत नाहीं. यावरूनच या सोटेशाहीचा भयंकरपणा निर्विवाद सिद्ध ठरतो.

मद्रासकडील काँग्रेसेतर पक्षाच्या टी. रंगाचार्य, व्यंकटरमण शास्त्री, आरोग्यस्वामी मुदलिआर, एम. रामचंद्रराव, व्ही. व्ही. अय्यंगार, विद्यासागर पांड्याप्रभृति पुढाऱ्यांनी एक प्रसिद्धिपत्रक काढून त्यांत पोलिसांच्या जुलमाची व पाशवी वर्तनाची खरपूस हजेरी घेतली आहे व जनतेच्या मनावर दरारा बसवून, तिला गर्भगळित करून, सनदशीर चळवळहि दडपून टाकण्याचा सरकारचा यांत इरादा दिसतो असे स्पष्ट म्हटलें आहे. आणि शेवटीं सरकारला असें बजावलें आहे कीं, तुमच्या या गांजणुकीनेंच जनतेचें मन विटून जाऊन तडजोड करणें दुरापास्त होईल हें ध्यानांत ठेवा.

पुण्याच्या सर्व्हंट्स ऑफ इंडिया सोसायटीनें प्रसिद्ध केलेलें पत्रक मद्रासच्या प्रसिद्धिपत्रकाहूनहि अधिक निर्भीड आणि सडेतोडपणाचें आहे. या पत्रकांत कायदेभंगाची चळवळ या वेळी पुनः सुरू केल्याबद्दल नापसंती दर्शविलीच आहे! पण मुंबईचा १८२७ चा व बंगालचा १८१८ चा जुनापुराणा रेग्युलेशन आणि सर्वव्यापक व अत्यंत जाचक असा वटहुकुमांचा वरवंटा यांच्या जोरावर राज्य करणें हें गर्हणीय आहे; आणि या वटहुकुमांमुळें स्वदेशी-प्रसार व मद्यपाननिषेध यासारखीं सोंवळीं कामेंहि करणें संकटाचें होऊन बसलें आहे, असा अभिप्राय दर्शवून दडपशाहीचा तीव्र निषेध केला आहे. त्यांतल्या त्यांत बदमाषांप्रमाणें पोलीसचौकीवर हजेरी देण्यास भाग पाडणें व ती न दिल्यास दोन दोन वर्षांची सक्तमजुरीची शिक्षा देणें, वर्तमानपत्रांची मुस्कटदाबी करणें, १४४ व्या कलमाचें भूत जेथें तेथें नाचवून सभा उधळून लावण्याकरितां लाठीमार करणें इत्यादि अमानुष प्रकारांचा या प्रसिद्धि-पत्रकांत खरपूस समाचार घेतला असून स्वराज्याचे हक्क त्वरित देऊं करून तडजोड करणें हाच एक शांतता प्रस्थापित करण्याचा मार्ग आहे असा सल्ला दिला आहे.

त्रयस्थ आणि नेमस्त हे पक्ष नोकरशाहीच्या बाजूचे असले तरी एका हाडामासाचे नव्हत; तेव्हां त्यांच्यांत तेवढा परकेपणा असल्यामुळे व नोकरशाहीचें अंतरंग न कळल्यानें ते टीका करण्यास प्रवृत्त होतात असें म्हणतां येईल. परंतु ज्यांनीं आपली सदसद्विवेकबुद्धि सरकारला विकली नाहीं असे स्वतंत्र अँग्लो इंडियनहि सरकारच्या दडपशाहीचा निषेध करूं लागले आहेत. कलकत्याची जी कुप्रसिद्ध युरोपियन असोसिएशन तिनेंच तर हा आगलावेपणा प्रथम सुरू केला. परंतु मौजेनें म्हणून मारुतीच्या शेपटीला आग लावली आणि आपलींच घरें जळूं लागलीं असा जसा लंकेंतल्या राक्षसांना कटु अनुभव आला, तसाच कांहींसा अनुभव येऊं लागल्यामुळें कलकत्याचे कित्येक अँग्लो-इंडियनच सरकारला आतां ही सोटेशाही आवरतां घ्या असें म्हणूं लागले आहेत. असें सांगण्यांतला त्यांचा हेतु निवळ स्वार्थाचा आहे, स्वतःच्या व्यापाराला धक्का बसल्यानें त्यांची धुंदी उतरूं लागली आहे, हें सगळें खरें, तथापि ज्या गोऱ्या व्यापाऱ्यांच्या हितसरंक्षणासाठीं हा वटहुकुमांचा वेताळ उभा केला, त्यांचा व्यापारदेखील याच्या गंदखालीं चिरडला जातो यावरूनच या वेताळाच्या लीला भयंकर भेसूर असल्याचे प्रत्यंतर येतें.

येथील ख्रिस्त-सेवासंघाचे संस्थापक फादर एल्व्हिन हे सरहद्द प्रांतांतील परिस्थिति पाहण्याकरितां गेले होते. तेथील परिस्थिति पाहून ती प्रसिद्ध केली गेली तर आपली अब्रू चवाठ्यावर येईल अशा धास्तीनें तेथील अधिकाऱ्यांनीं फादर एल्व्हिन यांना तेथून घालवून दिलें. पण तेवढ्याच अल्पावधींत त्यांनीं जें कांहीं निरीक्षण केलें तेवढ्यावरूनहि त्यांची खात्री पटली कीं, तत्प्रांतीयांना वटहुकुमाच्या वरवंट्याखालीं आपलें जीवन असह्य वाटूं लागलें आहे. आणि विशेष आश्चर्याची व खेदाची गोष्ट ही कीं, सरदार अबदुल गफूरखान यांच्या शिकवणुकीमुळें जे पठाण अनत्याचारी बनत चालले होते तेच गफूरखानाच्या

गैरहजेरींत दडपशाहीच्या कैचीमुळें वासून जाऊन पुनः अत्याचाराकडे वळूं लागले आहेत. यावरून कोण शांतता व सुव्यवस्था प्रस्थापित करतो व कोण त्यांचा भंग करतो हें कळून येतें.

पण सर्वांत महत्त्वाची व विचारणीय गोष्ट ही कीं, जी व्यापाराची गाडी सुरळीत चालावी म्हणून आपण वटहुकुमांचा रूळ फिरवीत आहों असा सरकार टेंभा मिरवीत आहे, तीच व्यापाराची गाडी या रूळाखालींच चिरडली जात आहे, अशी व्यापाऱ्यांची ओरड आहे. हे वटहुकूम जाहीर होण्यापूर्वी जेवढा व्यापार चालू होता, तेवढाहि आतां चालू राहिला नाहीं असें मुंबईच्या व इतर ठिकाणच्या व्यापाऱ्यांचें स्पष्ट मत आहे. याकरितांच सर पुरुषोत्तमदास, मेसर्स टेरसी,ब्रोमन बेहराम, कारंजिया, डेव्हिड, मेयर निसिम, सर स्टॅन्ले रीडप्रभृति मुंबईचे प्रसिद्ध व्यापारी गव्हर्नर-साहेबांच्या मुलाखतीसाठीं गेले होते.त्यांनीं गव्हर्नरांना सगळी परिस्थिति समजून सांगितली. वटहुकूम परत घ्या व तें शक्य नसल्यास निदान त्यांत अशा स्वरूपाची तरी दुरुस्ती करा कीं त्यामुळें व्यापाराची गळचेपी दूर होईल, या त्यांच्या विनंतीला गव्हर्नरांनीं 'तुमच्या सूचनांचा मी सहानुभूतिपूर्वक विचार करीन ' इतकेंच मोघम उत्तर दिलें ! कारण मुंबईचे गव्हर्नर हे या आग्या वेतालाच्या खेळां-तले सूत्रधार नसून तेहि एक हुकुमाची उठावणी करणारें बाहुलेंच असल्यानें त्यांना नकार किंवा होकार कांहींच देतां येईना. पण नमूद करण्याचा मुद्दा इतकाच कीं, मुंबईतल्या व्यापारी शिष्ट-मंडळानें 'अप्रिय पण पथ्य ' असा उपदेश करण्याचें आपलें कर्तव्य केलें.

शिष्टमंडळाच्या मुलाखतीचा उपयोग कांहींच होत नाहीं हें जाणून व त्यापेक्षां स्वावलंबनाचा मार्ग श्रेयस्कर हें ओळखून मुंबईतल्या स्टॉक्स अँड शेअर-ब्रोकर्स या संस्थेनें मुलाखतीची याचना न करतां आपल्या संस्थेची सभा भरविली आणि त्या सभेंत सध्यांच्या दडपशाहीचा निषेध व्यक्त करून संपूर्ण स्वदेशी व्रताचें आचरण करण्याचा ठराव पसार केला. व्हाइसरॉयांनीं गांधींजींची भेट घेण्याचेंहि नाकारलें व उलट त्यांस कारागृहांत डांबून ठेवलें याचा सदर संस्थेनें निषेध केला आणि वटहुकुमांतील ज्वाळांची झळ किती दूरवर असणाऱ्या व निरपराधी नागरिकांनाहि भाजीत आहे याचें वर्णन करून हे वटहुकूम रद्द करण्याची मागणी केली. पण एवढ्यावरच समाधान न मानतां सदर संस्थेनें आपल्या सभासदांस अंतर्बाह्य पूर्ण स्वदेशी बनण्याचा मंत्रोपदेश केला. या स्वदेशीच्या महामंत्रांत नुसत्या स्वदेशी कापडाचाच समावेश नसून स्वदेशी बँका, स्वदेशी विमा कंपन्या, स्वदेशी आगबोटी यांचाच उपयोग करावा व त्यांनाच उत्तेजन द्यावें असें बजावले आहे. त्याचप्रमाणे सध्यां जो सोन्याचा प्रवाह परदेशाकडे चालला आहे तो आपल्या देशाच्या व्यापाराला व उद्योगधंद्याला घातक असल्याचें ओळखून त्यास आळा घालावा, व त्या सोन्याचा उपयोग देशी कारखाने व उद्योगधंदे यांच्या वाढीकडे करावा असा योग्य सल्ला दिला आहे.

एवंच ज्याला ज्याला म्हणून आपलें मत प्रकट करण्याचें कांहीं तरी साधन आहे तो तो इसम त्या त्या साधनानें सध्यांच्या सोटेशाहीविषयीं तिटकाराच व्यक्त करीत आहे; आणि वटहुकूम माघारे घ्या, गांधी-जींना सोडा व तडजोड करा असा पथ्यकर उपदेश करीत आहे. परंतु तात्पुरत्या विजयानें डोळे फिरून गेलेल्या आणि स्वपरबलाबलाची यथार्थ कल्पना नसले-ल्या नोकरशाहीकडून अद्याप तरी या सदुपदेशाचा अव्हेरच होत आहे. पण ही अदूरदृष्टि व घमेंड तिला बाधल्याखेरीज राहणार नाहीं. कारण आज जरी वटहुकुमांच्या जोरावर सरकारनें काँग्रेसच्या कार्य-कर्त्यांस अटकबंद करून ठेवलें असलें व त्यामुळें काँग्रे-सची चळवळ कांहींशी मंदावल्यासारखी दिसत असली तरी या झगड्याचें हें खरें व अखेरचें स्वरूप नव्हे. सरकारचें धोरण उघडउघड चढावाचें आहे आणि राष्ट्रीय सभेच्या पुढाऱ्यांची आत्मबलिदानावरच श्रद्धा असल्यानें ते बलिदान अधिकांत अधिक व्हावें अशीच त्यांची इच्छा व शिकवण आहे. अर्थातच जितकें बलिदान अधिक दिलें जाईल तितका आपला विजय समीप आला असें काँग्रेसचे कार्यकर्ते मानणार आणि सरकारचा दृष्टिकोन वेगळाच असल्यानें आम्हीं इतके काँग्रेसचे अनुयायी तुरुंगांत डांबून ठेवून 'निर्वीर्य-मुर्वीतलं' केलें अशी त्याच कारणास्तव सरकार प्रौढी मिरवणार ! परंतु ही प्रौढी व्यर्थ आहे. जोंपर्यंत सरकार आपलें धोरण बदलून जनतेचें मन काबीज करूं शकत नाहीं, तोंपर्यंत हा लढा मिटत नाहीं आणि सरकारचा जुलूम जस-जसा वाढत जाईल तसतशीं जनतेचीं मनें सरकारा-विषयीं अधिकाधिक विटतच जाणार. कारण आत्मक्लेशानें सरकारचा दृष्टिकोन बदलत नाहीं अशी त्यांची खात्री पटत जाणार.

अशा मनःस्थितींत सरकारचें सोटेशाही वर्तन बदलावें म्हणून सरकारच्या धोरणा-ला अडवणूक करण्याची प्रवृत्ति लोकांत दिसूं लागेल आणि त्या वेळीं निकराच्या झगड्याला सुरुवात होईल. हल्लींचा चाललेला काँग्रेसचा कार्यक्रम हा खऱ्या झगड्याचा प्रारंभ देखील नव्हे.कारण ज्या कार्यक्रमांत स्वतःचा बचाव करण्याचा विचार नाहीं, आणि प्रति-पक्षावर चढाव करण्याचा विचार तर सुतराम् नाहीं अशा कार्यक्रमाला झगडा हें नांवच लागू पडत नाहीं.

मग अशा एकपक्षीय मानीव कुस्तींत जयापजय कसला ? यास्तव सरकारास आमचा असा इषारा आहे कीं, मध्यांच्या एकांगी युद्धांत आपण इतके प्रतिपक्षी खेळांतून बाद केले आणि हा खेळ जिंकला असली भलतीच समजूत त्यानें करून घेऊं नये; आणि त्या भलत्या समजुतीच्या कैफानें तर्र होऊन निरनिराळ्या संस्थांकडून जो पथ्यकर उपदेश केला जात आहे, तो झिडकारूं नये. तो उपदेश झिडकारला गेल्यास ३५ कोटी लोकांचीं मनें सरकाराविषयीं विपरीत भावनेने भरून जातील. तसा प्रसंग प्राप्त झाला असतां ज्या सरकारास आज एका काँग्रेसच्या चळवळीस तोंड देणें जड जात आहे, त्याच सरकारास हिंदुस्थानांतल्या यच्चयावत संस्थांच्या संयुक्त विरोधाला तोंड द्यावें लागेल आणि मग त्या वेळीं सरकारचा विजय होण्याची शक्यता कितपत आहे याचा तर्क कोणीहि करूं शकेल.

# नवी रणभूमि–मांच्युरिया !

### कलहाचें कारण काय ?

युरोपांत बाल्कन टापू हा कलहाचें केंद्र म्हणून गाजला गेला व गेल्या युरोपीय महायुद्धालाहि प्रमुख कारण बाल्कन प्रांतांतच घडून आलें. तसाच प्रकार आशिया खंडांत मांच्युरियाबाबत होणार असें दिसूं लागलें आहे. चीन देश अत्यंत मोठा असला तरी परकीयांच्या आक्रमणाला यशस्वीपणानें टक्कर देण्याचें सामर्थ्य त्याच्या ठिकाणीं नसल्यानें या मृतवत राष्ट्रावर अनेक गिधाडांनीं हल्ला चढवून त्याचे लचके तोडले. परंतु चीन जागा झाल्यावर त्या वेदनांनी तो विव्हल होऊन त्यावर उपाय योजण्याच्या तो मागे लागलेला पाहतांच आक्रमण करणाऱ्या राष्ट्रांच्या अंतःकरणांत सहजच भीति उत्पन्न झाली.

अशा रीतीनें चीनवर आक्रमण करणाऱ्या राष्ट्रांत प्रमुख राष्ट्रे म्हणजे रशिया व जपान हीं होत. चीनच्या दुर्बलतेचा सर्वांत जास्ती कोणी फायदा घेतला असेल तर तो या दोन राष्ट्रांनी. चीनवर प्रथम आक्रमण रशियाने उत्तर मांच्युरियाच्या द्वारें केलें व जपानने द. मांच्युरियाच्या वाटेनें केलें. अशा रीतीनें या दोन राष्ट्रांनीं आपलीं आसनें तेथें स्थिर केलीं. तेव्हां इतर राष्ट्रेहि आशाळभूतपणें मांच्युरियाकडे पाहूं लागलीं. परंतु त्यांना तेथें विशेष थारा मिळाला नाहीं. जपान मांच्युरियांत स्थिर झाल्यावर तो तेथील अंतर्गत कारभारांतहि ढवळाढवळ करूं लागला ही गोष्ट जागृत झालेल्या चीनला सहन होईना. तेव्हां मांच्युरियाच्या वादाला रंग चढूं लागला. ही सर्व स्थिति समजण्यासाठीं जपान व रशिया यांचे तेथें कोणते हितसंबंध आहेत व ते चीनला कसे बाधक होत आहेत हें समजणें जरूर आहे.

### रशिया–जपान यांच्या आक्रमणापूर्वींची स्थिति

मांच्युरियाच्या उत्तर, पूर्व व दक्षिणेस अनुक्रमें सोव्हिएट रशिया, कोरिया व पीत समुद्र आहे. आणि पश्चिमबाजूस मांगोलिया आहे. या प्रांतांची लोकसंख्या सुमारें २॥ ते तीन कोटी आहे. द. मांच्युरिया रेल्वेचें प्रमुख स्टेशन व त्या प्रांतांतील प्रमुख बंदर डैरिन हे असून मुकडेन ही राजधानी आहे व उत्तर-मांच्युरियाची मुख्य राजधानी हार्बिन आहे. अशीं प्रमुख शहरें मांच्युरियांत आहेत.

सुमारें वीस वर्षांपूर्वी या प्रदेशांत लोकवस्ती फार थोडी होती. मांच्यु आणि मोंगल यांच्या वसाहती मधून मधून पसरल्या असत. याच मांच्यु लोकांनीं सतराव्या शतकांत चीन पादाक्रान्त केला. त्यांनीं चीन जिंकला पण आपल्या मायदेशाकडे मात्र द्यावें तसें लक्ष दिलें नाहीं, त्याची हेळसांडच झाली. आजहि मांच्युरियांत थोडे मांच्यु व मोंगल आहेत. परंतु मुख्य भरणा मात्र चिनी शेतकऱ्यांचा आहे. चिनी लोक उत्तर चीनमधून तेथें गेले. चिनी शेतकऱ्यांखेरीज सुमारें दहा लाख कोरियन, व बरे वसे जपानीहि तेथें स्थाईक झाले आहेत. या लोकांखेरीज रशियन व इतर परराष्ट्रीयहि तेथें आहेत. परंतु त्यांची संख्या अत्यल्प आहे. या प्रांतांतील डैरिन हें प्रमुख जपानी शहर असून त्याची लोकसंख्या २–२॥ लक्ष आहे. मुकडेनची लोकवस्ती ३–४ लक्ष आहे. हार्बिन शहरांत रशियाचें प्राधान्य जास्त असून तें शहरहि वाढतें आहे. हीं तीनहि शहरें अर्वाचीन पद्धतीचीं असून, रस्ते सुंदर व भव्य, लोकहि उद्यमशील व उत्साही असे आहेत.

### मांच्युरियाची किल्ली परकीयांच्या हातीं

मांच्युरियाची मुख्य किल्ली म्हणजे त्याचे दळणवळणाचे मार्ग होत. त्यांत दोन लोहमार्ग प्रमुख आहेत. चायनीज ईस्टर्न रेल्वे, हा रस्ता उत्तर मांच्युरियांत दक्षिणोत्तर असून सोविएटांचें आशियांतील पूर्व टोक जे व्लाडिव्होस्टॉक येथपर्यंत गेला आहे. व या रस्त्याचा एक फांटा कोरियन सरहद्दीवरील डैरिन बंदरापर्यंत गेला आहे. यांपैकीं पहिला रस्ता रशियनांच्या देखरेखीखालीं असून त्याचा फांटा जपानच्या मालकीचा आहे. याखेरीज खास चिनी लोकांच्या मालकीचाहि लोहमार्ग आहे. व या आपल्या रेल्वेना चांगलें बंदर असावें या हेतूनें पेचीलि या सामुद्रधुनीवर चिनी सरकार एक नवें

बंदर बांधीत आहे. मांच्युरियांतील दोन प्रमुख बंदरें डैरिन व व्लाडिव्होस्टॉक हीं दोनहि परकियांच्या ताब्यांत. तेव्हां आपलें स्वतःच्या मालकीचें बंदर झाल्यास आपण सर्व व्यापार त्यांत खेचून घेऊं अशी चीनची महत्त्वाकांक्षा आहे.

### समृद्ध मांच्युरिया

दळणवळणाचीं द्वारें अशा रीतीनें परकीयांच्या हातीं असल्यानें चीन त्यासंबंधांत व म्हणून आर्थिक बाबतींतहि पराधीन झाला आहे. मांच्युरिया हा प्रान्त सपाट व पाऊसपाणी मुबलक असल्यानें धनधान्य–समृद्ध आहे. तेथील डोंगरपठारावर व पायथ्यावर उत्तम प्रकारचा साग तयार होतो. मांच्यु घराणें चीनवर राज्य करीत असतांना दळणवळणाच्या साधनांचा दुष्काळ होता. त्यामुळें मांच्युरियाची भूमिगत संपत्ति दडली होती. परतु तेथें आगीच्या गाड्या मुस्कारे टाकीत धावूं लागल्याबरोबर ही भूमिगत संपत्ति वर डोकें काढूं लागली. आज मांच्युरिया हा आशियाच्या धान्याचें कोठार या पदवीस प्राप्त झाला असून तेथें नाना प्रकारचे उद्योगधंदे वाढत आहेत व मधमाशांच्या पोळ्याप्रमाणें लक्षावधि लोक नानाविध धंद्यांत गुंतले आहेत. आज मांच्युरियांत जी लोकसंख्या आहे तिच्या तिप्पट लोकसंख्या तेथें झाली तरी ती भूमि त्यांचें उत्तम प्रकारें संगोपन करील अशी आज तिची कुवत आहे.

### मांच्युरियांतील तिहेरी सत्ता

मांच्युरियाचा सर्व उत्कर्ष दळणवळणाच्या साधनांवर व तीं साधनें ज्यांच्या स्वाधीन त्याला तेथील राज्यकारभारांत विशेष अधिकार असणार हीं गोष्ट उघडच आहे. मांच्युनी चीन देश पादाक्रान्त केल्यापासून म्हणजे सतराव्या शतकापासून मांच्युरिया चीनच्या अधिराज्याखालीं आहे. तथापि या सपन्न प्रदेशाकडे चिनी सरकारनें जितकें लक्ष द्यावयास पाहिजे होतें तितकें दिलें नाहीं. पुढें स. १९०५ च्या सुमारास रशिया व जपान यांनी आपला शिरकाव तेथें करून घेतला व त्यानंतर चिनी मजुरांच्या झुंडीच्या झुंडी तेथें जाऊं लागल्या. तेथें राजकीय सत्ता चीनची होती; तथापि तेथील आर्थिक परिस्थिति सर्वस्वी रशिया व जपान यांच्या हातीं असल्यानें व तसेंच या दोनहि राष्ट्रांना तेथें विशेष प्रकारचे राजकीय हक्क मिळाल्या कारणानें मांच्युरियन राजकारणापासून या दोन राष्ट्रांना अलिप्त राहणें अशक्य झालें. शिवाय चीनमधील अंतर्गत कलहामुळें चीन या दोन राष्ट्रांशीं टक्कर देण्यास असमर्थ आहे. त्यामुळें आज मांच्युरियांत रशिया, जपान व चीन असें तिहेरी राज्य सुरू आहे.

### मांच्युरियांत रशियाचे हितसंबंध

रशियाचें वर्चस्व चिनी पूर्व–रेल्वेच्या टापूंत आहे. हा रस्ता उत्तर–मांच्युरियांतून मांचुलीपासून रशियाच्या सरहद्दीवरून निघतो तो थेट वायव्येकडे समुद्रकिनाऱ्यापर्यंत सुमारें ८२५ मैल लांबवर गेला आहे. याच रस्त्याला हार्बिनपासून दक्षिणेकडे जाणारा जपानानें आपला एक फांटा जोडला आहे. तो धरून हा सर्व रस्ता एक हजार मैल लांबीचा आहे. चिनी पूर्व–रेलरस्ता रशियांत झारची सत्ता असतांना बांधण्यांत आला व तो बांधण्याचें रशियाचें धोरण साम्राज्यविस्ताराचें होतें. परतु झारच्या जागीं सोव्हिएट सत्ता स्थापन झाल्यावर सोव्हिएट लोकांनीं आमचा आक्रमणाचा हेतु नाहीं व आम्हीं झारचे जे कांहीं हक्क चीनपासून संपादन केले आहेत ते सर्व सोडून देतों असें सांगितलें. सोव्हिएटांचें धोरण बोलण्याप्रमाणें कायम मात्र राहिलें नाहीं. कारण पुढें सोव्हिएट सरकार पूर्वीचे सर्व हक्क सोडण्यास नाखुष झालें. स. १९२९ सालीं जेव्हां चिनी अधिकारी या रेल्वेचा ताबा घेऊं लागले तेव्हां सोव्हिएटांनीं त्यांस प्रत्यक्ष विरोधच केला व अजनपर्यंतहि चिनी सरकाराला त्या रस्त्याचा ताबा मिळाला नाहीं. उत्तर–मांच्युरियाचा आर्थिक उत्कर्ष या रस्त्यावर अवलंबून आहे. परतु चीननें योग्य किंमत दिल्यास तो रस्ता त्याला आज विकत घेतां येईल. आज त्याला तो विकत न घेतां आला तरी पंचवीस वर्षांनीं हा रस्ता चीनच्या मालकीचाच होणार आहे.

### द. मांच्युरिया व जपान

जपानाचा मुख्य प्रश्न द. मांच्युरियन रेल्वेसंबंधाचा आहे. हा रस्ता ६८६ मैल लांबीचा आहे; याशिवाय या मुख्य रस्त्याला अनेक शाखा जपानानें जोडल्या आहेत. त्या सर्व लक्षांत घेतां उ. मांच्युरियापेक्षांहि द. मांच्युरियांत जपानी मालकीचा लोहमार्ग जास्त आहे. जपानानें या लोहमार्गाशिवाय द. मांच्युरियांत कोळशाच्या खाणी व लोखंडाचे मोठमोठे कारखाने उभारले आहेत. शेतीला उत्तेजन देण्यासाठीं अनेक प्रयोगक्षेत्रें स्थापन केलीं आहेत. शाळा, दवाखाने इत्यादि लोकोपयोगी संस्थाहि काढल्या आहेत.

### वेळी तो काल पिळी

ज्या भागांतून हा लोहमार्ग जातो त्याचें शेवटचें मुख्य ठिकाण डैरिन आहे व तो भाग क्वान्टुंगचें द्वीपकल्प या नांवानें प्रसिद्ध आहे. हा भाग स. १९०० सालीं जेव्हां चीनमध्यें बॉक्सर बंड झालें त्या वेळीं रशियानें चीनपासून २५ वर्षांच्या करारानें घेतला. पुढें १९०५ मध्यें रूसो जपानी युद्धांत रशियाचा पराभव झाल्यावर जपानानें रशियापासून तो हक्क मिळविला. परंतु स. १९१५ मध्यें जपानानें चीनवर ज्या नामुष्कीच्या एकवीस अटी लादल्या त्यांत

हें द्वीपकल्प ९८ वर्षांच्या करारानें आपल्याकडे घेतलें. चीन आपत्तींत सांपडला असतांना त्याजकडून जपाननें जबरीनें हा हक्क संपादन केला असल्यानें आपणास तो मान्य नाहीं, अशी चीनची तेव्हांपासून तक्रार आहे.

### चीनचा उलट शह

अशा रीतीनें रशिया व जपान या देशांनीं लोहमार्गांच्या शृंखलांनीं मांच्युरियाला डांबून टाकला असतांना चीननें आपले स्वतःचे लोहमार्ग तेथें बांधण्यास सुरुवात केली; आणि त्यामुळें रशिया व जपान यांच्या लोहमार्गाला अंशतः आळा बसूं लागला. रूसो-जपानी युद्धांत लोहमार्गाचा लष्करी व राजकीय उपयोग कसा झाला हे चीनच्या ध्यानीं आलें व तेव्हांपासून चीननें कोणाहि परराष्ट्राला रेल्वेसंबंधानें कसल्याहि सवलती द्यावयाच्या नाहींत असें ठरविलें आहे. चीननें स्वतःचा लोहमार्ग तयार केला असला तरी १९२५ पर्यंत त्यांत त्याला विशेष प्रगति करतां आली नाहीं.

त्यानंतर मात्र चीननें मांच्युरियांतील प्रमुख शहरांशीं स्वतंत्रपणें दळणवळण ठेवतां येईल असा लोहमार्ग बांधण्याचें योजिलें. हा नवा मार्ग उ. मांच्युरियांतील रशियन मार्गाला विशेष बाधक होत नाहीं; तथापि द.मांच्युरियांतील जपानी लोहमार्गावर तें एक मोठेंच आक्रमण आहे यांत शंका नाहीं. जपानशीं चढाओढ करतील असे लोहमार्ग चीननें बांधतां कामा नये असें स. १९१५ च्या करारांत ठरल्याचें जपान हल्लीं म्हणत आहे व त्यासाठीं त्यानें हल्लींचें आक्रमण केलें आहे. मांच्युरियांत खास चिनी मालकीचा जो रस्ता आहे तो १८०० मैलांचा आहे.मांच्युरियांत एकंदर ३००० मैल रस्ता बांधण्याचा चीनचा इरादा आहे. त्यांपैकीं वरील १८०० मैलांचा रस्ता हल्लीं तयार झाला आहे. यांपैकीं बराच रस्ता जपानी भांडवलानें व द. मांच्युरियन लोहमार्गाशीं निगडित असा आहे.

### जपानी भांडवलाचा फांस

लोहमार्गाखेरीज जपानचा व्यापारहि मांच्युरियांत पुष्कळ पसरला आहे. स. १९२९ सालीं मांच्युरियांत परदेशीयांनीं एकंदर व्यापार सुमारें १ अब्ज ६२ कोटी रुपयांचा केला. त्यांत एकट्या जपानचा व्यापार जवळ जवळ ६५ कोटींचा झाला. मांच्युरियांतील प्रमुख तीन बंदरांतून शें. ६३ माल जपानी जहाजांतून, शें. १२ चिनी जहाजांतून, शें. ११ ब्रिटिश जहाजांतून शें. ५ जर्मन जहाजांतून व शें. ३ अमेरिकन जहाजांतून झाला.

मांच्युरियांत एकंदर जपानी भांडवल स. १९३० अखेर ३ अब्ज रुपयांचें गुंतलें होतें. यांत द. मांच्युरियन रेल्वे व चिनी रेल्वे बांधण्यास दिलेलें कर्ज हींहि समाविष्ट होतात. अशा रीतीनें जपानचे अनेक हितसंबंध मांच्युरियांत गुंतले असल्या कारणानें ते कायम राखण्यावर जपानचा उत्कर्ष अवलंबून आहे व या सर्व गोष्टी विचारांत घेऊनच स.१९१७ सालीं लानसिंग-इशी म्हणून जो करार झाला त्यांत अमेरिकेनें मांच्युरियांतील जपानचे विशेष हक्क मान्य केले; परंतु १९२१-२२ सालच्या वॉशिंग्टन परिषदेनें तो करार रद्द ठरविला आहे. तरीहि जपाननें आपलें अतिक्रमण थांबविलें नाहीं.

### तरीहि सत्ता चीनचीच

अशा रीतीनें मांच्युरियावर आज तिहेरी हुकमत आहे, तरीहि मांच्युरिया आपल्याच अधिराज्याखालीं आहे असें चीनचें म्हणणें आहे. राजकीय सत्तेच्या दृष्टीनें चीन मांच्युरियांत आज कमकुवत असला तरी दुसऱ्या रीतीने मांच्युरियावर चीनचें वर्चस्व आहे. तेथील बहुसंख्य प्रजा चिनी आहे. खास जपानी हुकमतीखालीं जो टापू आहे तेथेंहि शेतकाम करणारे मजूर शें. ९३, शें. ७० कोळी, शें. ९६ खाणीकामगार व कारखान्यांत काम करणारांत शें. ८८ कामकरी चिनी आहेत.

### चिनी मुत्सद्यांचा विफल डाव

मांच्युरियामध्यें रशिया व जपान यांचें जें वर्चस्व आहे, त्यांचें उच्चाटन करणें हा चिनी लोकांचा मुख्य हेतु आहे व हा हेतु साध्य करण्यासाठीं चिनी मुत्सद्द्यांनीं आतांपर्यंत नाना लटपटी केल्या.जपानचा वरचष्मा कमी करण्यासाठीं स.१८९६ सालीं चीननें प्रथम रशियाशीं संगनमत केलें, पण हा स्नेहभाव चीनला महाग पडला. रशिया, जपानविरुद्ध चीनला मदत करीना. पुढें १९१८ सालीं चिनी मुत्सद्द्यांनीं रशियाविरुद्ध जपानशीं संगनमत केलें; परंतु हा स्नेहहि चीनला अत्यंत महाग लागला. आणि रशिया व जपान यांमध्यें परस्पर कलागती लावून आपला हेतु साधण्याचा चीनचा हेतु साध्य झाला नाहीं. तेव्हां चीननें अन्य राष्ट्रांची कांस धरली व केलॉग-पॅक्ट झाल्यापासून तर चीनला आपल्या तक्रारी वॉशिंग्टनपुढें व राष्ट्रसंघापुढें मांडतां येऊं लागल्या. त्याप्रमाणें राष्ट्रसंघानें व अमेरिकेनें जपानास मांच्युरियांत चढाई न करण्याबद्दल तंबी दिली असतांहि जपाननें गर्वीसच धाब्यावर बसवून आपलें आक्रमण अप्रतिहत सुरू ठेवलें व इतर राष्ट्रांनाहि जपानला या अत्याचाराचा जाब मागण्याचें आज सामर्थ्य नाहीं.

### युरोपचें संकट व जपानचा लाभ

आज युरोपांत व अमेरिकेंत आर्थिक गोंधळ इतका झाला आहे कीं, त्यांना आपापलीं घरें सांवरणेंच कठिण झालें आहे; मग मांच्युरियावर जपाननें आक्रमण केल्यानें ज्यांचें प्रत्यक्ष नफा-नुकसान कांहींच होणार

नाहीं अशीं सर्वच राष्ट्रें जपानच्या आक्रमणाबद्दल उदासीन आहेत हें साहजिकच आहे. परंतु युरोपच्या या गोंधळाचा पुरा फायदा जपाननें घेऊन अगदी योग्य वेळी आपणास कोणीहि विरोध करण्यास सिध्द नाहीं हें पाहून मांच्युरियाची गळचेपी चालविली आहे.

### जपानला मांच्युरिया कां पाहिजे ?

मांच्युरियांत जपाननें अमूप पैसा ओतला आहे व तेथें त्याचे अनेक हितसंबंध उत्पन्न झाले आहेत. त्यामुळें त्या देशावर त्याला नियंत्रण पाहिजे हें खरें. परंतु मांच्युरिया आपल्या ताब्यांत यावा या आकांक्षेला कांहीं तेवढें एकच कारण नाहीं. यापेक्षांहि मोठा व महत्त्वाचा प्रश्न जपानपुढें उभा आहे. जपानची लोकसंख्या आज दर चौरस मैलीं ४०४ आहे. व ती प्रतिवर्षी साडेसात लक्षांच्या गतीनें वाढत आहे. आज जपानची लोकसंख्या साडेसहा कोटी आहे व स. १९५१ मध्यें ती आठ कोटींवर जाईल. या वाढत्या लोकसंख्येला कोठें तरी तोंड पाडल्याखेरीज जपानला अन्य मार्गच नाहीं. अशा स्थितींत त्याची दृष्टि आपल्या सरहद्दीला चिकटलेल्या मांच्युरियासारख्या संपन्न व वसाहतीस योग्य अशा भूप्रदेशाकडे गेली यांत आश्चर्य नाहीं. मांच्युरियावर जपानचें आक्रमण या कारणासाठीं आहे. हें आक्रमण चीनला अत्यंत हानिकारक असल्यानें आज जरी जपाननें दडपशाहीकरितां मांच्युरियावर आपलें अधिराज्य स्थापलें तरी तें त्याला पचणें कठिण जाईल. व प्रसंगी तेथें युद्धाचा मोठा डोंबाळा उडेल यांत शंका नाहीं.

# स्वराज्यसंस्था व विचारस्वातंत्र्य

( ले. श्री. ना. वि. भोंडे, बी. ए. एलूएल्. बी. )

" There should be, as far as possible complete popular control in Local Bodies and the largest possible independence, for them, of outside control."
—First formula in the Report on Indian Constitutional Reforms page 123.

प्रतिकूल व आणिबाणीचे प्रसंगास तोंड देण्यासाठी सरकार वटहुकूम काढते. परंतु विद्यमान कायद्यांतूनच आपणास ( अट्टहास ) अनुकूल अर्थ काढून तो जनतेवर लादण्याचा हट्ट सरकार धरीत नाहीं, अशी कायदेकानू जाणणारांची तरी निदान अपेक्षा व समजूत होती. परंतु ह्या समजुतीस मुंबई-सरकारच्या जनरल डिपार्टमेंटचें सर्क्युलर नंबर एस १२१ तारीख १४-११-१९.३१ ने जबरदस्त धक्का बसला असून त्याद्वारें सरकारनें इलाख्यांतील सर्व म्युनिसिपालिट्या व लोकल बोर्डें यांस आतां असें बजाविलें आहे कीं, स्थानिक कायद्याचे कक्षेंत न येणारा ठराव अथवा वादविवाद हा व्यवहार-निरुपयोगी व बेकायदेशीर आहे व म्हणून अशा प्रकारच्या सूचना व अशा विषयावरील चर्चा सभापतीनें नियमबाह्य ठरविलीच पाहिजे.

### मुंबई कॉर्पोरेशन व सर अर्नेस्ट हॉटसन

वरील सर्क्युलर हें मुंबईसरकारनें ॲडव्होकेट-जनरलचे मताचे जोरावर काढलें असें त्यांतच स्वच्छ म्हटलें आहे. कोणत्या विवक्षित प्रश्नावर ह्या कायदेपंडितांचें मत घेतलें होतें तें समजण्यास मार्ग नाहीं. तथापि मुंबईसरकारच्या कार्यकारी मंडळांतील सीनियर हिंदी सभासदांचा हक्क बाजूस सारून सर अर्नेस्ट हॉटसन ह्यांस तात्पुरतें इलाखाधिपति नेमल्यामुळें उत्पन्न झालेल्या बाबीसंबंधीं विचार करण्यासाठीं मुंबई कॉर्पोरेशनमध्यें एका सदस्यानें तहकुबीचा ठराव मांडला होता. त्या वेळीं अध्यक्षानें ॲडव्होकेट—जनरल यांचें मत विचारलें होतें म्हणून ॲडव्होकेट—जनरल यांनी मत दिलें की कसें हें समजत नाहीं.

### सरकारनें कोलांटी उडी खाल्ली

तें कसेंही असो, हें मत सरास स्वीकारतांना यापूर्वी आपण कोणता ठराव, कोणता नियम व कायद्याचा कोणता अर्थ केला होता हें मुंबई-सरकार अजीबात विसरल्याचें दिसतें. म्युनिसिपल कारभाराव्यतिरिक्त इतर बाबींची चर्चा करणें जर नियमबाह्य तर सरकारनेंच सर्वस्वीं गैरलागू अशा इंडियन मर्केंटाईल मार्क अमेंडमेंट ॲक्टासारख्या प्रश्नावर स्थानिक स्वराज्य—संस्थांचीं मतें विचारून आपण गुन्हा केला आहे. सायमन कमिशनशीं सहकार्य, इजिप्शियन नॅशनॅलिस्टाचा मृत्यु वगैरे बाह्य विषयांची चर्चा करून म्युनिसिपल सभासद कालाचा अपव्यय करतात अशी सुरतेच्या जिल्हाधिकाऱ्यानें वरिष्ठ अधिकाऱ्याकडे तक्रार केल्यानंतरही मुंबईसरकारनें उत्तरविभागाचे कमिशनर व स्वतःचे कायदेपंडित ( म्हणजे Remembrancer of legal affairs) यांचा अभिप्राय घेऊन असें जाहीर केलें कीं, There is no provision in the Municipal Act which debars a Municipality

**from merely discussing or passing resolutions concerning matters such as those now in question.**— म्युनिसिपल कारभाराशीं संबंध नसलेल्या विषयाची केवळ चर्चा करण्यास अगर तत्संबंधीं ठराव मंजूर करण्यास म्युनिसिपल कायद्यांत कोठेंहि हरकत नाहीं. याप्रमाणें सरकारचे कायदेपंडितांनींच केवळ हा अभिप्राय व्यक्त केला असें नसून सरकारनें आपलेंहि मत तसेंच असल्याचें सांगून त्यास अनुसरून तारीख १७ ऑगस्ट १९२८ रोजीं जी. आर. नंबर ३७१ चा ठराव जिल्हाधिकारी व प्रांताधिकारी यांजकडे माहितीकरतां व तदनुरोधानें वागण्यासाठीं पाठविला व त्यास अनुसरून अनेक स्थानिक स्वराज्य–संस्थांनीं त्या निर्माण करणाऱ्या कायद्याचे प्रांतांत न येणाऱ्या अनेक बाबींची अनेक वेळीं चर्चा केली. त्यास मुंबई सरकारने हरकत घेतली नाहीं; मग आतां इतक्या उशीरानें त्यांनीं अशी कोलांटी उडी कां खावी हें समजत नाहीं.

### न्यायासनाच्या प्रांतांत अतिक्रमण

कायदा तयार करण्याचा अथवा त्यांत दुरुस्ती करण्याचा अधिकार हा कायदेमंडळाचा आहे. सरकारला कायदेमंडळ अनुकूल नसल्यास व तसाच आणीबाणीचा प्रसंग असल्यास वटहुकूम काढण्यास इलाखाधिपतीचा हात कोणी धरूं शकत नाहीं. पण एकदां कायदा तयार झाल्यानंतर त्यांतील कलमांचा अर्थ अमुकच हें सांगण्याचा मात्र अधिकार सरकारचा अथवा अॅडव्होकेट–जनरलाचा नाहीं, तर तो न्यायासनाचा आहे. असें असतांना सरकार तो दडपून गाजवूं पाहूं लागलेलें कृत्य अनाधिकृत व बेकायदेशीर ठरून स्वनिर्मित न्यायासनाचे प्रांतांत बेबंदशाही केल्याचें होईल.

### मॉंटेग्यू वेब वि. कराची म्युनिसिपालिटी

ह्या बाबतींत एका दाव्याचा उल्लेख करणें अस्थानीं होणार नाहीं. सुमारें दोन वर्षांपूर्वी म. गांधींच्या अटकेबद्दल निषेध करणारा व तत्कालीन स्थिति दर्शविणारा असा राष्ट्रीय स्वरूपाचा ठराव म्युनिसिपल सभेपुढें मांडण्याची यादी कराची म्युनिसिपालिटीचे सभासदानें पाठविली. तें समजल्याबरोबर हा ठराव स्थानिक स्वराज्य–संस्थांनीं विचार करण्याचे क्षेत्रांत येत नाहीं व म्हणून त्याचा विचार न होण्याबद्दल ताकीद (Injunction) मिळण्यासाठीं दुसरे एक सभासद सर मॉंटेग्यू वेब यांनीं दिवाणी कोर्टांत दावा लावला. पण दोनहि पक्षांचें म्हणणें ऐकून घेऊन वादीची मागणी अमान्य करून म्युनिसिपालिटीचे हक्कांवर गदा आणण्याचें कोर्टानें साफ नाकारलें. ह्यावरूनहि सरकारनें कायद्यांतून काढलेला अर्थ बरोबर वस्तुतः निघत नाहीं असाच निष्कर्ष निघतो.

### औचित्य म्हणजे कायदा नव्हे

वस्तुतः स्थानिक स्वराज्यकारभाराव्यतिरिक्त अवांतर राजकीय व सामाजिक अस्पृश्य–मंदिरप्रवेश–सत्याग्रह अशा विषयाची चर्चा टाळणें व केवळ स्थानिक बाबींवरच सभासदांचा उत्साह व वेळ केंद्रीभूत करणें हें औचित्यास धरून आहे. पण हें औचित्य सभासदांनीं मताधिक्यानें ठरवावयाचें असतें, कायदा म्हणून तें एकदम प्रातिनिधिक संस्थांवर लादतां येणार नाहीं. त्यांतून आजपर्यंत हिंदुस्थानांतील म्युनिसिपालिटीमध्यें आलेले अविच्छिन्न व बिनहरकत प्रघात (conventions), लीगल रिमेंब्रन्सर यांनीं जिल्हाधिकाऱ्यांच्या तक्रारी ऐकून दिलेला स्पष्ट अभिप्राय, मुंबई–सरकारनें त्याप्रमाणें काढलेला ठराव नंबर ३७१, दिवाणी कोर्टानें कराची म्युनिसिपालिटीबाबत दिलेला निकाल वगैरे महत्त्वाच्या व लागू पडणाऱ्या बाबींचा विचार करतां सरकारनें आतां एकदम विरुद्ध मताचें सर्क्युलर काढणें हें अयोग्य व अन्याय्य होय. सरकारनें आर्डिनन्स अथवा वटहुकूम काढल्यास जनतेच्या इच्छेविरुद्ध राज्यपद्धति सरकारनें चालविली आहे याचा तो एक आणखी पुरावा होईल. पण तसें न करतां आहे ह्या कायद्यांतूनच आपल्यास अनुकूल असा अर्थ काढून तो जनतेवर लादून प्रातिनिधिक संस्थांच्या विचारविनिमयावर व मतप्रदर्शन–स्वातंत्र्यावर घाला आणणें हें बिलकुल युक्त व समर्थनीय ठरणार नाहीं. वाटल्यास सरकारनें कायदा बदलून घ्यावा अथवा नमुन्यादाखल (टेस्ट केस) दावा हायकोर्टापर्यंत लढवावा; पण न्यायासनाच्या प्रांतांत घुसून न्यायमूर्तींचे खुर्चीवर स्वतःच बसून त्यांचे हक्क बळकावणें हें कायदा व सुव्यवस्था ह्यांचें उठल्यासुठल्या महत्त्व सांगणाऱ्या सरकारला तरी शोभत नाहीं.

# हिंदुस्थानांतील दडपशाहीचा इंग्लंडांत धिक्कार !

सांप्रत हिंदुस्थानभर वटहुकुमांचा नंगा नाच चालू आहे. त्याचा निषेध हिंदुस्थानच्या काना-कोपऱ्यांतून तर होत आहेच, पण साम्राज्यमदानें आंधळे न झालेले दूरदर्शी इंग्रजहि त्या निषेधास पुष्टि देत आहेत. लंडनमधील कॉमन वेल्थ ऑफ इंडिया लीग या संस्थेचे अध्यक्ष मि. बर्ट्रंड रसेल हे एक विचारी व प्रतिष्ठित ग्रंथकार म्हणून त्यांचा लौकिक जगभर गाजत आहे. त्या संस्थेतर्फे त्यांचा सत्कार ता. १८ रोजीं करण्यांत आला असतां त्यांनीं हिंदुस्थानांतील दडपशाहीचा धिक्कार तीव्र शब्दांनीं केला. ते म्हणाले,

"ब्रिटिश सरकारचें हिंदुस्थानांतील धोरण अत्यंत चुकीचें असून लाज वाटावयास लावणारें आहे. राजकीय सुधारणांविषयीं तळमळणाऱ्या हिंदी पुढाऱ्यांना कारागृहांत कोंडून त्या सुधारणा सर्वसंमत करूं पहाण्याची सरकारची योजना अजब आहे. इतकी कीं, ती वेड्याचें इस्पितळ किंवा सध्यांचें सेक्रेटरिएट याव्यतिरिक्त कोठेंहि सांपडूं शकणार नाहीं ! कांहीं केलें तरी अखेरीस हिंदुस्थान स्वतंत्र होणार याबद्दल शंकाच नाही. पण इंग्लंड युक्तीच्या गोष्टी ऐकून शहाणें न होतां शक्तीच्या प्रभावापुढें शरण जाईल ही इंग्लंडची केवढी नामुष्की! आणि हें सर्व कोणाच्या कारकीर्दीत घडत आहे ! तर मॅक्डोनॉल्डच्या. महायुद्धाच्या वेळचे मॅक्डोनाल्ड मला किती आवडत! पण तेव्हांचे युद्ध–विरोधी मॅक्डोनॉल्ड व आजचे मॅक्डोनॉल्ड यांत किती तफावत आहे ! कोणाहि माणसानें फार दिवस जगूं नये हेंच खरें ! पण मॅक्डोनॉल्डचा मृत्युलेख अशाच शब्दांनीं लिहावा लागेल कीं, ह्या गृहस्थाचें आयुष्य फार लांबलें ! ! दहा वर्षांपूर्वींच त्यांचा ग्रंथ आटोपला असता, तर 'एक सन्मान्य गृहस्थ' म्हणून त्यांचें नांव इतिहासांत चमकलें असतें."

याच विचारांना पाठिंबा देणारी भाषणें ट्राफल्गार चौकांतील सभेंत झालीं. ती सभा 'फ्रेंड्स् ऑफ इंडिया सोसायटी'नें बोलाविली होती. डॉ. चार्लस स्मिथ हे अध्यक्षस्थानीं होते. अनेक वक्त्यांनीं सडेतोड भाषणें केलीं. मि. केनवर्दी म्हणाले, 'सरकारनें आपलें सध्यांचेंच धोरण पुढें चालू ठेविलें तर हिंदुस्थानांतून ब्रिटिश लोकांची हकालपट्टी होईल ! मि. वेल्डन यांना हिंदुस्थानां-तील सद्यःस्थितीवरून १८५७ सालच्या बंडाची आठवण झाली व त्यांनीं असे उद्गार काढले कीं, 'हिंदुस्थानभर पसरलेली सध्यांची स्थिति पाहिली म्हणजे असें वाटतें कीं, सत्तावन सालचें बंड हें तिच्यापुढें कुचकामी ठरेल!' मिस् मुरील लेस्टर या बाईंनी जाहीर केलें कीं, 'महात्माजींना अटक केल्यामुळें अधिक नुकसान कोणाचें होणार असेल तर इंग्लंडचें, हिंदुस्थानचें नव्हे!' लॉरेन्स हौसमन यांनीं हिंदी लष्कर व पोलीसखातें यांना आपला सदुपदेशाचा संदेश सांगितला. रेनॉल्डस्, सौ. भट्टाचार्यजी वगैरे वक्त्यांनीहि सरकारचा असाच धिक्कार केला !

# जर्मनीची नागवणूक केव्हां थांबणार ?

महायुद्धांत जर्मनीनें जाळपोळ करून फ्रान्स-प्रभृति तत्कालीन दोस्त राष्ट्रांच्या मिळकतींची धूळ-धाण उडवून दिली. तिचा भुर्दंड म्हणून सुमारें सवा खर्व रुपयांची खंडणी दोस्तांनीं दहाअकरा वर्षांपूर्वी जर्मनीवर लादली. तिची फेड करण्याचें जर्मनीस जड जाईल अशी दोस्तांची समजूत असतांहि जर्मनीस खंडणीच्या नांवाखालीं छळून तिचा सूड घेण्याचा दोस्तांचा, विशेषतः फ्रान्सचा, इरादा असल्यानें खंडणी लादतांना जर्मनीच्या जिवाकडे त्यांनीं मुळींच पाहिलें नाहीं. आणि ती खंडणी विनतक्रार वसूल व्हावी म्हणून दोस्त राष्ट्रांनीं जर्मनीचा रूहर प्रांत आपल्या हातीं घेतला. अखेर इंग्लंडप्रभृति राष्ट्रांना जर्मनीची ही विटंबना पाहवेना. म्हणून त्यांनीं रूहरमधून स्वतःचीं सैन्यें काढून घेऊन फ्रान्सला रूहरमधून सैन्य काढून घेण्यास लावलें व जर्मनीस झेपेल अशी हप्तेबंदी ठरविण्याकरितां डॉज कमिटी नेमण्यांत आली. डॉज योजनेनें निश्चित केलेले हप्ते फेडण्याचें सामर्थ्य जर्मनींत नसल्याचें अनुभवा-अंतीं आढळून आल्यानंतर यंग कमिटीनें त्याहून हलके हप्ते जर्मनीवर बसविले.

हे हप्ते जर्मनी कसाबसा फेडीत आला. पण गेल्या वर्षी जगांतील व्यापाराच्या मंदीमुळें व देशांतील अन्तःस्थ हलाखीमुळें त्या वर्षाचा हप्ता भरण्याची ताकद जर्मनींत उरली नाहीं. जर्मनीची ही कठिण अवस्था पाहून अमेरिकेस दया आली व अमेरिकेचे अध्यक्ष मि. हूव्हर यांनी त्या वर्षाचा कर्जाचा हप्ता

युरोपांतील आपल्या सर्व ऋणको राष्ट्रांना तहकूब केला. जर्मनीकडून अमेरिकेला नुकसानभरपाई मिळावयाची नाहीं. या बाबतींत जर्मनी हा इंग्लंड, फ्रान्स, इटालीप्रभृति युरोपियन राष्ट्रांचा देणेकरी आहे. पण अमेरिका ही जर्मनीच्या सावकारांचाहि सावकार असल्यामुळें अमेरिकेनें युरोपियन राष्ट्रांनींहि त्या वर्षाचा खंडणीचा हप्ता जर्मनीपासून घेऊं नये असें बजावलें होतें. त्याचा फायदा जर्मनीस एक वर्षापुरता मिळाला. पण तें एक वर्ष संपल्यावर पुढें काय ही विवंचना कायमच. म्हणून यंग योजनेंत ठरलेल्या हप्त्यांचा फेरविचार करण्याकरितां एक स्पेशल ॲडव्हायसरी कमिटी नेमली गेली. या कमिटीनें ता. १० डिसेंबरपासून जर्मनीच्या आर्थिक स्थितीची कसून तपासणी करून आपला रिपोर्ट तयार केला. हा रिपोर्ट तिनें युरोपियन राष्ट्रांनीं एकमेकांस द्यावयाच्या कर्जाची व्यवस्था लावणारी जी एक बँक स्थापन झाली आहे तिच्याकडे व युरोपियन राष्ट्रांकडेहि पाठविला.

लॉसेन येथें भरावयाच्या परिषदेंतील वाटाघाट याच रिपोर्टाच्या आधारें होणार होती. ही परिषद ता. २५ जानेवारी रोजीं भरेल असा अंदाज होता. पण जर्मनीचे चॅन्सेलर डॉ. ब्रूनिंग यांना परिषदेंत जें सांगावयाचें तें परिषद भरण्यापूर्वीच सांगून टाकल्यामुळें फ्रान्सचें धाबें दणाणलें. जर्मनीस खंडणी भरण्याची आतां ऐपत राहिली नाहीं असें डॉ. ब्रूनिंग यांनीं उघडपणें बोलून दाखवून आपल्या काखा वर केल्या. जें राष्ट्र एवढी मोठी खंडणी मला झेपत नाहीं तेव्हां इतकीच घ्या असें म्हणेल त्याच्याभोंवतीं सावकार राष्ट्रांनीं जमून त्याजबरोबर वाटाघाट करावयाची, त्याचें मन वळवावयाचें व तडजोडीनें त्याजकडून हप्त्याची रक्कम ठरवून घ्यावयाची. पण ज्यानें काखा किंवा अंगठाच दाखवावयाचें ठरविलें त्याच्याबरोबर बोलण्याची सोय ती काय राहिली? अशा समजुतीनें ता. २५ जानेवारी रोजीं भरावयाची परिषद आतां लांबणीवर पडली असून ती केव्हां भरेल याचा आज कांहींच नेम सांगवत नाहीं.

लॉसेन परिषदेचा मुख्य सूत्रधार फ्रान्स. त्याचें कारस्थान कांहीं वेगळेंच आहे. जर्मनीच्या काखा दृष्टीस पडतांच फ्रान्स अमेरिकेच्या तोंडाकडे पाहूं लागला. फ्रान्सचे नवे मुख्य प्रधान एम. लाव्हल यांनीं फ्रेंच सरकारचें धोरण जाहीर केलें. त्यांना जर्मनी खंडणीचा हप्ता यंदा भरण्यास असमर्थ आहे हें कबूल आहे. परंतु जर्मनीस यंदां खंडणी देतां आली नाहीं म्हणून पुढें कधींहि देतां यावयाची नाहीं असें फ्रेंच सरकारास वाटत नाहीं. कारण जर्मनीचे कारखाने व उद्योगधंदे प्रचंड असून त्यांच्या जोरावर जर्मनी, त्याला थोडी उसंत खाऊं दिल्यास, आपले हप्ते मागेंपुढें भरूं शकेल अशी फ्रेंच सरकारची खात्री आहे. फ्रान्स फार तर एवढें करील कीं अमेरिका फ्रान्सपासून कर्ज वसूल करण्याच्या कामीं फ्रान्सला जेवढी सवलत देईल तेवढी सवलत फ्रान्सकडून जर्मनीस मिळेल. म्हणजे गेल्या वर्षाप्रमाणें यंदांच्या वर्षीहि हप्त्याची तहकुबी अमेरिकेनें फ्रान्सला दिल्यास तशीच तहकुबी फ्रान्सहि जर्मनीस देऊं शकेल.

फ्रान्सचा हा लपंडाव अमेरिकेस मुळींच मान्य नाहीं. जर्मनीपासून युरोपियन राष्ट्रांना मिळावयाच्या खंडणीच्या घोळांत फ्रान्सनें आपणास कां घालावें हेंच अमेरिकेस कळत नाहीं. अमेरिकेच्या या म्हणण्यांत पुष्कळ तथ्य आहे. महायुद्ध संपल्यानंतर अमेरिकेचे त्या वेळचे अध्यक्ष मि. विल्सन यांचीं उदार तत्त्वें आधीं कबूल करून 'गरज सरो वैद्य मरो' या लौकिक म्हणीप्रमाणें युद्धांत विजयी होऊन बाहेर पडतांच दोस्त राष्ट्रांनीं तीं झुगारून दिलीं. या कटु अनुभवामुळें अमेरिकेस दोस्त राष्ट्रांविषयीं सहानुभूति उरली नाहीं; उलट तिटकाराहि आला. असें असतां अमेरिकेपासून गेल्या वर्षी हप्त्यांची तहकुबी मिळाली ती अमेरिकेस कांहीं अंशीं जर्मनीविषयीं वाटणाऱ्या कळवळ्यामुळें व कांहीं अंशीं तहकुबीनें आपला बसलेला व्यापार सुधारेल या आशेमुळें. वरील कारणासाठीं यंदांहि कदाचित् अमेरिका आणखी एका वर्षापुरती कर्जाची तहकुबी फ्रान्सप्रभृतींना देऊं शकेल. परंतु तसें अभिवचन आज देणें अमेरिकेचे अध्यक्ष मि. हूव्हर यांना सोयीचें नाहीं. त्यांची अध्यक्षपदाची ठराविक मुदत भरत आली असून त्या पदावर पुनः नवी निवडणूक व्हावयाची आहे व ते स्वतः उमेदवार उभे राहणार आहेत. अशा या डळमळींत अवस्थेमध्यें भलतेंच अभिवचन देऊन प्रतिपक्षास आपल्याविरुद्ध अमेरिकेंत निवडणुकीच्या वेळीं चळवळ सुरू करण्यास नवें निमित्त मिळवून देण्याइतके हूव्हरसाहेब व त्यांचा पक्ष भोळा नाहीं. म्हणून अमेरिकन सरकारनें फ्रान्सला अगदीं धुडकावून लावल्यासारखें केलें आहे.

अमेरिकेचें म्हणणें असें कीं, जर्मनीनें दोस्त राष्ट्रांना द्यावयाची भरपाई आणि फ्रान्स व इंग्लंडप्रभृतीकडून अमेरिकेस मिळावयाचें कर्ज यांचा बादरायण संबंध जोडण्यांत हंशील नाहीं. भरपाई हा विषय अमेरिकेच्या दृष्टीनें युरोपियन राष्ट्राराष्ट्रांमधील असून अगदीं खासगी स्वरूपाचा आहे. त्याची जबाबदारी अमेरिकेवर नाहीं व त्यांत अमेरिकेचा हितसंबंधहि नाहीं. फ्रान्स जाणे, इंग्लंड जाणे व जर्मनी जाणे! जर्मनीला ऋणमुक्त करावयाचें किंवा कसें हें युरोपियन राष्ट्रांनीं आपसांत पाहून घ्यावें. त्याचा उपकार अमेरिकेला त्यांनीं काय

म्हणून सांगावा ? यासाठीं जर्मनी आपला हप्ता भरीत नाहीं, या सबबीवर युरोपियन राष्ट्रांनीं अमेरिकेस भरावयाचा कर्जाचा वार्षिक हप्ता फ्रान्सप्रभृतींना चुकवितां येणार नाहीं.

जर्मनीची सबब पुढें करून अमेरिकेचा हप्ता चुकविणारांत एकटा फ्रान्स हाच देश नसून इंग्लंडप्रभृति दोस्त राष्ट्रेंहि आहेत. कारण एखाद्या साळसूद दिसणाऱ्या निमित्तानें सावकाराचें देणें जर टळेल तर कोणता ऋणको तें टाळण्यास आनंदानें तयार होणार नाहीं ? या सर्व ऋणको राष्ट्रांचा अमेरिकेचा कर्जाचा हप्ता एकजुटीनें टाळण्याचा बेत आहे अशी अमेरिकेला शंका आली आहे. या सर्व युरोपियन राष्ट्रांनीं कर्ज देण्याचें एकजुटीनें नाकारलें तर अमेरिकेने कर्जाच्या वसुलीसाठीं त्यांजबरोबर युद्ध करण्यासाठीं कंबर कसली पाहिजे किंवा त्यांच्या एकजुटीच्या सामर्थ्यापुढें आपला निभाव लागणार नाहीं हे मनांत उमजून गप्प तरी बसलें पाहिजे. यांपैकीं लढाईकरितां शस्त्र उपसण्याची पाळी दोस्त राष्ट्रें अमेरिकेवर आजच आणतील असा प्रसंग सध्यां दिसत नसल्यानें अमेरिकेनें दोस्तांच्या संयुक्त मागणीविषयीं नापसंती दर्शविली आहे. तथापि दोस्तांपैकीं प्रत्येक राष्ट्रानें अमेरिकेपाशीं व्यक्तिशः तहकुबी मागितल्यास ज्या त्या राष्ट्राचा मगदूर पाहून त्यांच्या मागणीचा पृथक् विचार करण्याचें अमेरिकेनें आश्वासन दिले आहे.

अमेरिका हे राष्ट्र आपणास शांततावादी म्हणवितें. जगांतील युद्धांना मूठमाती मिळून सर्वत्र शांततेचें साम्राज्य स्थापन व्हावें या मताचा अमेरिका हें एकच राष्ट्र अलीकडे प्रामुख्यानें पुरस्कार करीत आलें आहे. युरोपियन राष्ट्रांच्या कर्जबाजारीपणाचें व हलाखीचें खरें कारण अमेरिकेच्या मतें व्यापारसंदीहून वेगळेंच आहे. त्या राष्ट्रांच्या उत्पन्नांपैकीं फार मोठा अंश सैन्य व आरमार यांच्यापायींच खर्च होत आहे. जर्मनीच्या सामर्थ्याची भीति फ्रान्सला, फ्रान्सच्या आरमाराची दहशत इटालीला आणि इंग्लंडाचा दरारा त्या सर्वांना. यामुळें परस्परांचा परस्परांवरील विश्वास उडून प्रत्येक राष्ट्र आपलें लष्करी व आरमारी सामर्थ्य वाढविण्यासाठीं आपला पैसा आपल्या सामर्थ्याबाहेर खर्च करीत आहे. ही स्थिति नाहींशी होऊन युरोपियन राष्ट्रें एकमेकांशीं सलोख्यानें वागण्यास शिकतील तर त्यांचा पैसा पुष्कळसा वांचून त्यांतून तीं अमेरिकेचें कर्ज सहज फेडूं शकतील.

अशा आशयाचें उत्तर पाठवून अमेरिकेनें फ्रान्सचें व इतर दोस्त राष्ट्रांचे चांगलेच कान उपटले आहेत यांत शंका नाहीं. अमेरिका व फ्रान्स यांची वरील प्रकारची चकमक उडत असतां इंग्लंडनें जरा सावधगिरीचें व धूर्तपणाचें धोरण स्वीकारलें आहे. अमेरिकेप्रमाणें इंग्लंडलाहि जर्मनीविषयीं कळवळा वाटतो. जर्मन राष्ट्र रसातळास जावें ही जशी फ्रान्सची इच्छा आहे तशी इंग्लंडची नाहीं. इंग्लंडला फ्रान्स व जर्मनी हीं दोनहि राष्ट्रें जिवंत राहावयास पाहिजेत. जर्मनी व फ्रान्स तुल्यबल असण्यावर इंग्लंडचा सुरक्षितपणा अवलंबून आहे. यांपैकीं कोणाहि एकाचें बूड जड न होऊं देण्याची खबरदारी इंग्लंड घेत आहे. त्या धोरणास अनुसरून जर्मनीचा वचक फ्रान्सवर ठेवण्यासाठीं इंग्लंड आपल्या चातुर्याचा उपयोग करीत असल्यानें इंग्लंडनें जर्मनीस फ्रान्सप्रमाणें उद्दामपणाचें उत्तर दिलें नाहीं. जर्मनीस कर्जाच्या हप्त्याची कांहीं काळ तहकुबी देण्यास आपण मदत करूं असें इंग्लंडचें मोघम आश्वासन आहे. पण त्यानें जर्मनीचें समाधान झालेलें दिसत नाहीं. कारण अगदींच हातपाय पसरलेल्या जर्मनीचा असल्या क्षुल्लक आश्वासनानें काय निभाव लागणार!

अमेरिकेस दोस्त राष्ट्रांकडून यावयाच्या हप्त्याची मुदत येत्या जून महिन्यांत संपत असली तरी चालू वर्षाच्या डिसेंबर महिन्यापर्यंत दोस्तांना नियमाप्रमाणें हप्ता भरावयाचाच नाहीं. तेव्हां तितकीच सहा महिन्यांची हप्त्याची तहकुबी दोस्त राष्ट्रांकडून जर्मनीसहि सहजासहजीं मिळण्यासारखी आहे. इंग्लंडच्या आश्वासनांत हीच गोष्ट गर्भित असेल तर इंग्लंडनें आपल्या औदार्याचा टेंभा जर्मनीपुढें मिरविणें शुद्ध मानभावीपणाचेंच ठरेल. तथापि फ्रान्स व इंग्लंड यांच्या जर्मनीस वागविण्याच्या धोरणांतच फरक असल्यामुळें इंग्लंड जर्मनीस आपल्याकडून वांचविण्याचाच प्रयत्न करील.फ्रान्स जर्मनीपासून खंडणी उगवून आपली शक्ति वाढविणार व जर्मनीचा शक्तिपात सारखा चालू ठेऊन आपण निर्भय होणार. अमेरिकेची बेपर्वाई, जर्मनीची नातवानी, इंग्लंडची जर्मनीविषयीं थोडीशी सहानुभूति व फ्रान्सचा तीव्र निष्ठुरपणा असे चौघांनीं चार कोपरे ताणून धरले असल्यानें लॉसेनमध्यें इतक्या घाईनें परिषद भरवनहि तिचा उपयोग किनपत झाला असता याची शंकाच आहे.

सांप्रत इंग्लंड व फ्रान्स यांची एकवाक्यता व्हावयास पाहिजे. त्यासंबंधानें इंग्लंडचे मुख्य प्रधान मि. राम्से मॅक्डोनाल्ड यांनीं फ्रान्सचे मुख्य प्रधान मि. लॉव्हेल यांस इंग्लंडांत आपल्या भेटीस बोलावलें आहे. त्या भेटींत काय ठरेल याचा अंदाज आज करणें कठिण आहे. तथापि वर्ष दोन वर्षांची मुदत जर्मनीस दिल्यानें जर्मनीची दिवाळखोरीच्या संकटांतून मुक्तता होईल, अशी इंग्लंडाची अगर फ्रान्सची समजूत असेल तर

ती चुकीची आहे. कारण जर्मनीनें गेलीं दहा अकरा वर्षे खंडणीची रक्कम फेडण्याचा प्रयत्न कसोशी-नें व प्रामाणिकपणानें केला असतांहि त्या कामांत त्यास यश आलें नाहीं व तें येण्याची आशा नाहीं असा तज्ज्ञांच्या कमिटीचाच अभिप्राय आतां पडला आहे.

महायुद्ध संपलें त्याच वेळीं जर्मनचें सर्वच व्यापारी भांडवल संपलें होतें. जर्मन कारखान-दारांचा व्यापाराच्या निमित्तानें परदेशांत गुंतलेला पैसा दोस्त राष्ट्रांनीं जप्त केला होता. अशा रीतीनें नागवलेल्या जर्मनीनें खंडणी भरा-वयाची तर कारखान्यांची पुनर्घटना करण्यापासून तों ते कारखाने चालविण्याकरितां भांडवल जम-विण्यापर्यंत. म्हणजे संन्याशाच्या लग्नाची शेंडीपासून तयारी! पण त्यांत एक बरें झालें कीं, इंग्लंड, फ्रान्स इत्यादि शत्रुराष्ट्रांनाच जर्मनीपासून आपली खंडणी वसूल करावयाची असल्यानें जर्मनी उत्पन्न करील तो माल आपल्या देशांत खपण्यास साहाय्यभूत होणें हें त्यांचें एक प्रकारें कर्तव्यच होऊन बसलें. तथापि माल खपविण्याची तरतूद या रीतीनें झाली तरी मालाच्या पैदाशीस भांडवल पाहिजेच. हें भांडवल जर्मनीनें परराष्ट्रांपासून विशेषतः अमेरिकेपासून घेण्याचें योजिलें, व या कामांत जर्मनीला थोडें यशहि आलें.

कर्जाऊ पैशाचा ओघ परदेशांतून जर्मनींत वाहूं लागतांच तेथील कल्पक लोकांनीं लहान मोठ्या सर्व कारखान्यांची उभारणी अगदीं नवीन धर्तीवर केली. त्यांनीं परदेशांत ज्यांना विशेष मागणी आहे त्याच वस्तू उत्पन्न करण्याचें ठरविलें. त्यासाठीं वेगवेगळ्या कारखान्यांची व कंपन्यांची जूट जमवून आणि भांडवलवाले व मजूर यांशीं सहकार्य करून नवीन यंत्रसामुग्रीच्या साहाय्यानें प्रत्येक जिन्नस जर्मन लोक मोठ्या प्रमाणावर निर्माण करूं लागले. आपला माल आपल्याच जहाजांतून गेल्यास वहा-तुकीचा तितकाच पैसा आपल्या देशांत राहील या हेतूनें त्यांनीं स्वतःचीं नवीं जहाजें बांधलीं. जर्मनीनें जो माल पैदा करावा तो खपावा असें होत गेल्यानें जर्मन राष्ट्राची भरभराट होत असल्याचा उत्साहवर्धक देखावा दृष्टीपुढें उभा राहिला. एकंदरीत जर्मनीचें बहिरंग तर चांगलेंच उठावदार झालें. पण विचारी लोकांना हा तजेला क्षणिक व नकली वाटत होता. हें जळ नसून मृगजळ आहे अशी त्यांची अन्तर्यामीं खात्री झाली होती. व अखेर तेंच खरें ठरून जर्मनीच्या भरभराटीचा डोलारा पोकळ असल्याचें उघडकीस आलें.

या पोकळपणाचें एक कारण असें कीं, ही सर्व उभारणी परदेशांतून आणिलेल्या कर्जावर झाली होती. जर्मन सरकार बाहेरचा देखावा ठीक दिसतो आहे हें पाहून स्वस्थ होतें, पण मध्यम स्थितींतील लोक म्हणजे कारकून, लहान कारखानदार व इतर धंदेवाईक यांना वरील परिस्थितीचे परिणाम लक्षांत येऊन त्यांच्या मनाची चलबिचल उडून ते फिकिरींत पडले.

जर्मनींतहि भांडवलवाले व समाजसत्तावादी असे दोन प्रमुख पक्ष असून कम्यूनिस्टांचाहि लहानसा पक्ष आहे. पण समाजसत्तावाद्यांनीं आपला राष्ट्रीयबाणा व राष्ट्रीय शिस्त सोडलेली नाहीं. त्यांचा सध्यांच्या रिप-ब्लिकन राज्यपद्धतीवरील विश्वास उडाला असला तरी त्यासाठीं देशांत बंडाळी माजविण्याची त्यांची इच्छा नाहीं. त्यांना देशाभिमान व समाजसत्ता यांचा मेळ घालावयाचा आहे. या मताचा पुरस्कर्ता हर हिटलर हा होय. त्यानें आपल्या पक्षाचें स्वयंसेवक दलहि निर्माण केलें आहे. त्याखेरीज जे निव्वळ कम्युनिस्ट आहेत त्यांचेंहि स्वयंसेवक दल आहेच. हीं दोन दलें जर्मनीत बंडाळी माजविण्यास पुरेशीं आहेत, पण त्यांनीं केवळ शिस्तीकरितां आपले हात आखडून धरले आहेत. जर्मन चॅन्सेलर डॉ. ब्रूनिंग ही सर्व स्थिति पहातच होते. त्याची स्वतःची खात्रीहि भरपाईचे हप्ते जर्मनीकडून यापुढें फिटणें दुरापास्त आहे अशी होत चाललीच होती. त्याला तज्ज्ञ कमि-टीचाहि दुजोरा मिळतांच त्यांनीं जर्मनीचें दिवाळें वाजल्याचें जाहीर केलें.

तज्ज्ञ कमिटीच्या अभिप्रायानें जर्मनीस दिवाळ-खोरीचा दाखलाच मिळाला असल्यानें दोस्त राष्ट्रें जर्मनीस सतावतील तर त्याचा अनिष्ट परिणाम जर्मनीवरच काय पण साऱ्या युरोपखंडावरहि ओढवल्यावांचून राहणार नाहीं. जर्मनी ही एक वेळ फ्रान्सला गरीब बनलेली गाय वाटत असली तरी तिनें धारेच्या क्लेशानें शिंगें हलविण्यास आतां सुरुवात केली आहे. दोस्तांनीं आपला हट्ट अधिक चालविल्यास जर्मनी व्हर्सेलीसच्या तहाचें दावें तोडून उधळून जाईल आणि मग तिचीं सूत्रें हिटलर पक्षाच्या हातीं येतील कीं रशियाप्रमाणें कम्यूनिस्ट पक्ष तेथें सत्ताधीश होऊन बसेल हें कोणी सांगावें? रशियांत कम्यूनिझम स्थिर झाल्यासारखा आहे, स्पेन देश त्याच्या कह्यांत जाण्याच्या पंथांत आहे आणि जर्मनीसारखें अत्यंत बुद्धिमान, कल्पक, विद्वान व प्रबल राष्ट्रहि त्यांच्या मालिकेंत जाऊन बसलें तर पाश्चात्यांच्या संस्कृतीचे बारा वाजण्यास विलंब लागणार नाहीं. याकरितां फ्रान्सनें जर्मनीला सतावणें इष्ट नाहीं.

# लंडनचें बातमीपत्र

## जर्मनींतील राजकारण

गेल्या दीड वर्षापासून जर्मनीत हर हिल्टर यांनीं इटालियन फॅसिस्ट पंथाप्रमाणें एक शक्तिउपासक पंथ काढला आहे. त्या पंथाचे उत्पादक सदर हिल्टर असून यांच्या अनुयायांना नाझी असें म्हणतात. सनदशीर पद्धतीपेक्षां राज्यकारभारास व्यत्यय आणण्यावर ( डायरेक्ट ॲक्शनवर ) या लोकांचा विशेष विश्वास आहे. हे राजपक्षीय असून जर्मनींत पुनः कायसरशाही प्रस्थापित करण्याची त्यांना उमेद वाटते. जर्मनींतून कायसरची उचल बांगडी झाली असली तरी त्याच्याविषयीं लोकांत भरपूर आदर असून हजारों लाखों लोकांना पुनः त्याचें राज्य झालें तर पाहिजे आहे. या भावनेचा फायदा घेऊन देशांत एक जोरकस पक्ष स्थापावा व जर्मनीची विजयी राष्ट्रांकडून चाललेली विटंबना थांबवावी असें या पक्षाचें मत आहे. युद्धखंडणी देणें, त्यासाठीं आपले सर्व हिशेब इतर राष्ट्रांपुढें ठेवणें, जर्मनीच्या आगगाड्यांचें उत्पन्न फ्रान्ससारख्या दुष्मनाला देणें आणि एकंदरींत जगांत पराजित राष्ट्र म्हणून लाजिरवाणें जिणें घालविणें या नाझी पक्षाला संमत नाहीं. या पक्षाचें जर्मनींत महत्त्व दिवसेंदिवस वाढत असून १९३२ साल संपण्यापूर्वीच कदाचित हिल्टर जर्मनीचा सर्वाधिकारी होऊन राज्यसूत्रें आपल्या हातीं घेईल अशीं चिन्हें दिसूं लागलीं आहेत.

त्याच्या पक्षाचें सामर्थ्य वाढत आहे, याचें एकच गमक म्हणजे त्याच्या अनुयायांनीं केलेल्या अत्याचारांबद्दल जर्मन सरकार त्यांचें योग्य पारिपत्य करूं शकत नाहीं हें होय. दुसरें, परवांच डॉ. ब्रूनिंग यांनीं मुद्दाम पाचारण करून हिल्टर यास विनंति केली कीं,सध्यांच्या आणीबाणीच्या वेळीं कृपा करून हिंडेनबुर्ग विरुद्ध नवा एखादा प्रेसिडेंट उभा करूं नकोस. अशी विनंति करण्याचें कारण येत्या एप्रिलमध्यें प्रे. हिंडेनबुर्गची कारकीर्द संपत आहे. प्रस्तुतच्या काळीं त्यांच्याइतका वजनदार माणस सापडणार नाहीं, व वजनदार अध्यक्षाच्या अभावीं जर्मनीचें आंतरराष्ट्रीय वजन राहणार नाहीं.जर्मन पार्लमेंटाच्या ⅔ मताधिक्यानें अध्यक्षांची निवड व्हावयाची असते. सध्या मताधिक्यानें काम होत नाहीं. आणि असें मताधिक्य हिल्टरच्या पक्षाच्या सहकार्याशिवाय कदाचित् मिळणार नाहीं अशी भीति डॉ. ब्रूनिंगला वाटत आहे. हिल्टरनें ब्रूनिंगच्या विनंतीला मान दिला नाहीं तर काय होईल तें सांगणें कठिण आहे.

सध्यां इंग्लंड असो किंवा अमेरिका असो त्यांचा विश्वास हिंडेनबुर्ग व डॉ.ब्रूनिंग यांवर जसा आहे तसा तो दुसऱ्या कोणत्याहि पक्षावर नाहीं. विशेषतः नाझी पक्ष अधिकारारूढ झाला तर फ्रान्सचें माथें फिरूनच जाईल. मग जेनेव्हाची शस्त्रसंन्यास परिषद म्हणजे दुसरें रणक्षेत्रच होईल, असें म्हणण्यास हरकत नाहीं. गेल्या दोन वर्षांपासून डॉ.ब्रूनिंगनें जर्मनीविषयीं जें नैतिक वातावरण निर्माण केलें आहे तें कदाचित् हिल्टरच्या आगमनानें क्षणांत नाहींसें होईल! मग युध्दखंडणीच्या प्रश्नाचें काय होईल अथवा शस्त्रसंन्यास परिषदेचें काय होईल हे प्रश्न विचारण्याचें कारणच उरणार नाहीं. जर्मनी व त्याबरोबर सारा युरोप एकाच वावटळींत सांपडेल. मग त्याचा अंतीं काय परिणाम होईल तें कोणीं सांगावें ? जर्मनीची अंतर्गत स्थिति ही अशी आहे.

## फ्रान्समधील बजबजपुरी

जर्मनी सोडून फ्रान्सकडे नजर टाकली तर आपल्याला काय दिसतें ? एम्. लावेल फ्रान्सचे मुख्य प्रधान आहेत. पण ते थोडेच दिवसच राहातील. पुढें कोण मुख्य प्रधान होईल तें सांगतां येत नाहीं. पण एम्. लावेल यांचें स्थान मात्र कालपासून डळमळीत झालें आहे एवढें खरें. त्याचें मुख्य कारण एम्. लावेलचे एक प्रमुख साहाय्यक एम्., मार्गिनो एकाएकीं मृत्यु पावले असून दुसरे प्रमुख मंत्री एम्. ब्रिॲं अत्यंत आजारी आहेत. येत्या आठवड्यांत ते बहुतेक राजिनामा देऊन प्रकृतिस्वास्थ्यासाठीं राजकारणाचाहि राजिनामा देतील. अशा रीतीनें या दोन पक्षांच्या अभावीं लावेलचा राज्यशकट फ्रान्समध्यें चालू शकत नाहीं. अर्थातच स्वतःच राजीनामा देऊन अब्रूनिशीं माघार घेण्याचा मार्ग त्यांनीं स्वीकारला तर नवल नाहीं. त्यानंतर दुसरी अडचण अशी कीं, बहुतेक पुढील महिन्यांतच फ्रान्समध्यें पार्लमेंटची नवी निवडणूक होण्याची वेळ आहे. अशा वेळीं निंदाव्यंजक ठराव पास करून घेऊन बाहेर येण्यापेक्षा राजीखुषीचा राजीनामा दिलेला काय वाईट ?

फ्रेंच पार्लमेंटांत ब्रिटिश पार्लमेंटाप्रमाणें २–३ पक्षच नसून ७–८ पक्ष आहेत. त्यांतील एकाच पक्षाची अशी सरशी सहसा कधींच नसते. तेव्हां आपसांत तात्पुरती तडजोड करून 'गटांचे राजकारण' चालविण्यांत येतें. लावेलचा दोन गटांचा आधार तुटल्यामुळें त्यांची स्थिति वर वर्णन केल्याप्रमाणें अस्थिर झाली आहे. लावेल गेल्यास युद्धखंडणी युध्दकर्जें आणि शस्त्रसंन्यास यांचें काय करावयाचें हा प्रश्न आलाच.

## लॉईड जॉर्ज परत आले

काल मि. लॉईड जॉर्ज हे सीलोनचा आपला प्रवास संपवून परत आले. त्यांनीं प्रस्तुत परिस्थितीवर मत देण्याचें नाकारलें. त्याचें कारण देतांना ते म्हणाले, "गेल्या दोन महिन्यांत मीं जवळ जवळ वर्तमानपत्रें मुळींच वाचलीं नाहींत असें म्हटलें तरी चालेल." वर्तमानपत्रांत लेख लिहून ज्यानें लक्षावधि रुपये मिळविले त्याच्या तोंडचे वरील उद्‌गार ऐकून किती आश्चर्य वाटेल ! सर्व प्रवासभर ते आपल्या युद्धकालीन स्मृतींचें कागद तपासण्यांत आणि आठवणी लिहिण्यांत गढून गेले होते ! महात्माजींनीं ज्या राजपुताना बोटीनें इंग्लंडचा प्रवास केला होता, त्याच बोटीनें लॉईड जॉर्ज परत आले. कॅप्टनजवळ ते महात्माजी, त्यांच्याबरोबरची मंडळी आणि त्यांच्या-बरोबर कॅप्टनच्या झालेल्या गोष्टीबद्दल चौकशी करीत होते. त्याचप्रमाणें ज्या केबिनमधून त्यांनीं प्रवास केला त्या केबीनचा फोटो लाइड जॉर्जनीं मुद्दाम घेतला असल्याचें समजतें.

नव्या पार्लमेंटांत लॉइड जॉर्ज यांचें स्थान सरकारच्या बाजूनें असणार नसून विरोधकपक्षांतच असणार हें उघड आहे. सध्यां त्यांचा असा पक्ष शिल्लकच नाहीं. ते, त्यांची मुलगी व मुलगा असा हा कौटुंबिक पक्ष आहे. पण मि. लाइड जॉर्ज ही एक असामान्य व्यक्ति आहे. त्यांच्या भाषेची जादू आणि शब्दावरील प्रभुत्व विलक्षण आहे. त्यांच्या इतका जुना सभासद प्रस्तुत पार्लमेंटांत दुसरा कोणीहि नाहीं. त्यांच्या आगमनामुळें मि. मॅक्डोनाल्ड सुध्दां वचकल्यासारखे झाले आहेत असें माझे एक आयरिश स्नेही मला सांगत होते. जॉर्ज पार्लमेंटांत बसूं लागले म्हणजे तेथील सभांना खूप रंग चढेल. एकट्या मि. लॅन्सबरीला मूठभर सभासदांनिशीं विरोधकपक्षाच्या पुढारीपणाचा भार झेपत नाहीं. शिवाय लॅन्सबरी माणूस तसा अगदींच सरळ मनाचा आणि सरळ वृत्तीचा. पार्लमेंटांतील विरोधक पुढारी डावास डाव खेळणारा, विनोद, उपहास, विटंबना वक्तृत्व आदिगुणांत तरबेज आणि हजरजबाबी असावा लागतो. हे सारे गुण मि. लॉइड जॉर्ज यांच्या ठिकाणीं ओतप्रोत भरलेले आहेत. अर्थातच त्यांच्या आगमनाबरोबर विरोधकाचा मानहि त्यांच्याच-कडे जाईल असें म्हणावयास हरकत नाहीं. राजे-साहेबांचा विरोधकपक्ष म्हणून मजूरपक्षच राहील हें उघड आहे.

## मराठी मोनोटाइप

पुण्याच्या अनाथ विद्यार्थीगृहाचे एक आजन्मसेवक श्री. शंकर रामचंद्र दाते बी. ए. हे सध्यां इकडे येऊन २।३ महिने झाले. त्यांनीं परवा मला मराठी 'मोनो-टाइप' मशीनवर छापलेलें एक पत्र दाखविलें. तें पाहून मला त्यांचे करावें तेवढें अभिनंदन थोडेंच वाटलें. श्री. दात्यांनीं मराठी मोनोटाईपची कल्पना यशस्वी करून मराठी भाषेवर विलक्षण उपकार केले आहेत. त्यांच्या या शोधामुळें मराठी पुस्तकांची किंमत हल्लींपेक्षां निम्यानें तरी खास कमी होईल. कारण जवळ जवळ १२ माणसांचें काम एकटा माणूस करूं शकतो. दुसरें असे कीं, श्री. दात्यांच्या अक्षरांत मराठी लिपीचें वळण पूर्णपणें कायम आहे. मराठीचें कंपोजिंग सोपें करण्यासाठीं श्री. वैद्य, कै. गोखले (जत) श्रद्धानंदकार डॉ. सावरकर यांनीं केलेले प्रयत्न महाराष्ट्राच्या परिचयाचे आहेत. पण त्यांत कांहींना कांहीं तरी गोम सांपडे. मूळ मराठी लिपीचा गोंडसपणा गमावून सुद्धां सुलभपणा आणावा असें प्रतिपादन करण्यापर्यंत अक्षर संशो-धकांची मजल गेल्याचें मला माहीत आहे. पण श्री. दात्यांनीं आपल्या लिपीचें सौष्ठव यत्किं-चितहि न घालवितां तिला मोनोटाइपवर नेऊन बसविली हें त्यांस निःसंशय भूषणास्पद आहे.

आज जवळ जवळ १० वर्षे रा. दाते अक्षरसंशो-धनाचें किचकट काम करीत आहेत. स्वतः ते मुंबई युनिव्हर्सिटीचे पदवीधर असले तरी या नव्या प्रयोगा-साठीं मुद्दाम कंपोजिंग शिकले, व त्याबरोबरच छपाई-च्या शास्त्रांतील सर्व अंगोपांगांचा त्यांनीं आस्था-पूर्वक अभ्यास केला. मोनोटाईपवर आपली लिपी बसवितां येईल काय असें त्यांना वाटूं लागल्यापासून त्यांनीं त्या दिशेनें प्रयत्न करण्यास सुरुवात केली. आणि त्यांच्या या सहा वर्षांपेक्षांहि अधिक काळच्या तपश्चर्येला आज फळ आलें. येथील मोनोटाईप-च्या कारखान्यांत पूर्वी एकदां मराठीवर प्रयोग झाला होता. त्या कामीं कंपनीचे हजारों रुपये व पगार घेणारे अति बुद्धिवान लोक खपले होते आणि कांहीं होत नाहीं असें म्हणून त्यांनीं मराठी मोनो-टाईपचा नाद सोडून दिला होता ! म्हणून श्री. दात्यांनीं आपली योजना चालकांपुढें मांडली. त्या वेळीं चालकसुद्धां जरा साशंकच दिसले. पण बोलतां बोलतां श्री. दात्यांनीं त्यांची खात्री पटवून दिली व कामास सुरुवात झाली. श्री. दात्यांनीं मोनोटाइपाचा अभ्यास किती सूक्ष्म रीतीनें केला असेल त्याचें एकच गमक म्हणजे कारखानदारांच्या प्रश्नांना त्यांनीं इतकीं बरोबर उत्तरें दिलीं कीं, तो म्हणूं लागला. ('Mr. Date, Do you divine things!') तुम्हांला मनकवडेपणा साधला आहे काय ? या-पेक्षां दात्यांचें कौतुक दुसऱ्या कोणत्या शब्दांत करतां येईल ? महाराष्ट्रांत अशीं संशोधक रत्नें किती तरी पडलीं असतील, पण परिस्थितीच्या अननुकूलत्वा-मुळें त्यांचा प्रकाश अंधारांतच विरून जातो.

### इंग्लंडांतील स्वदेशी

सध्यां इंग्लंडांत 'बाय ब्रिटिश' म्हणजे 'ब्रिटिश माल विकत घ्या' ही चळवळ केवढ्या मोठ्या प्रमाणावर चालू आहे, व तिचा सर्व बाजूंनीं उठाव करण्यासाठीं सरकार व व्यापारी वर्ग कसा झटत आहे हें केसरीच्या वाचकास माहीतच आहे. परवां एका बड्या लॉर्डाची झालेली फजिती वर्णनीय आहे म्हणून ती गोष्ट खालीं देतों. लॉर्ड हेलिशाम हे कट्टर साम्राज्यवादी असून प्रस्तुतच्या प्रधान मंडळांतील एक सभासद आहेत. त्यांना गेल्या रविवारीं एका विशेष प्रार्थनेसाठीं चर्चमध्यें जावयाचें होतें. ते नेहमींप्रमाणें आपल्या मोटारींत बसून तेथें गेले व बाहेर मोटार सोडून प्रार्थनेसाठीं चर्चमध्यें जाऊन बसले. इकडे बाहेरच्या मंडळीचें लक्ष त्या मोटारच्या कारखानदार कंपनीकडे जाऊन तिचा परदेशीपणा त्यांच्या ध्यानीं आला. लॉर्ड हेलिशाम सारख्यांची मोटार परदेशी बनलेली पाहून सर्वांना आश्चर्य वाटलें. त्यांपैकीं एकानें धूम ठोकली, व जवळच्याच दुकानांतून 'बाय ब्रिटिश' अशी एक जाहिरात आणून ती त्या मोटारीच्या बॉनेटवर लावली. प्रार्थना संपवून लॉर्ड साहेब बाहेर येऊन पाहतात तो आपल्या मोटारीभोंवतीं ही गर्दी! त्यांच्या स्नेह्यानें त्यांना झालेला प्रकार सांगितला. त्याबरोबर मोटारीचा नाद सोडून लॉर्ड साहेब पायींच घरीं जाण्यास निघाले. चार मैल सकाळच्या उत्तेजित हवेंत पायीं रपेट झाल्यामुळें त्यांना भूक चांगली लागल्याचें माझ्या कानाशीं कोणी तरी गुण गुणत होता!

दुसरी एक गोष्ट आठवली. ती मि. बाल्डविन यांची आहे. गेल्या जनरल इलेक्शनचे ते दिवस होते. 'साम्राज्य व देशी वस्तू' या विषयावर त्यांचें हॅक्नीला एक भाषण व्हावयाचें होतें. नित्याप्रमाणें संध्याकाळचें भोजन आटोपून आपल्या पत्नीला बरोबर घेऊन ते सभास्थानीं जाण्यास निघाले. कदाचित् बोलतां बोलतां त्यांना आपली मोटार परदेशी असल्याची जाणीव झाली असावी. हॅक्नीला ते येऊन पोंचले. व ड्रायव्हर आतां गाडी थांबविण्यासाठीं तिचा वेग कमी करणार इतक्यांत बाल्डविन ओरडले, 'हं. चल तसाच. थांबू नको.' ( Straight on please. Dont stop. ) हुकुमाप्रमाणें त्यानें गाडी हांकली व अर्ध्या मैलांवर एका तबेल्यामध्यें ती तात्पुरती ठेऊन तेथून भाड्याची टॅक्सी करून ते सभास्थानीं आले. पण या सर्व गोष्टी करण्यांत वेळ गेला व सभेला थोडासा उशीर झाला. लोक पृच्छा करूं लागले. उत्तर देण्यास मि. बाल्डविन साहेबांना सुद्धां थोडेसें कठिण वाटूं लागलें. पण इंग्रजी पद्धतीप्रमाणें त्यांनीं पांढऱ्या असत्याचा (white lie) उपयोग करून वेळ मारून नेली. ते म्हणाले, 'I had to put my car into a garage on the way. From my personal experience now I can say that the foreign makes of motor cars are absolutely unreliable.' पृच्छकांचें समाधान झालें, व बाल्डविनसाहेब पत्नीला हात देत देत व्यासपीठावर चढते झाले.

# मांच्युरिया आणि राष्ट्रसंघ

मांच्युरियांतील भानगडी मिटविण्याएवढा महत्त्वाचा प्रश्न राष्ट्रसंघापुढें त्याच्या जन्मापासून बहुधा आज पहिल्यानेंच आला आहे. हा प्रसंग राष्ट्रसंघ कसा निभावून नेणार यावर 'दुर्बल राष्ट्रांचा वाली' ही राष्ट्रसंघाची पदवी खरी अथवा खोटी ठरणार आहे. पण एवढ्या महत्त्वाच्या प्रश्नाचीहि राष्ट्रसंघानें जी चालढकल चालविली आहे तिचें आश्चर्य वाटतें. तीसंबंधानें 'जर्नल डी जिनेवा'चे परराष्ट्रीय संपादक विल्यम मार्टिन यांनीं खालील आशयाचे विचार स्पेक्टेटर पत्रांत प्रसिद्ध केले आहेत. विल्यम मार्टिन म्हणतात—

लवकरच निःशस्त्रीकरण परिषद भरणार. यामुळें मांच्यूरियाच्या प्रश्नास विशेषच महत्त्व आलें आहे. सदर परिषदेंत चर्चेचा मुख्य विषय होईल तो हा कीं, शस्त्रें कमी केल्यास त्या त्या राष्ट्रांच्या संरक्षणाची हमी काय? अशा वेळीं राष्ट्रसंघानें मांच्यूरियाचा प्रश्न न्याय्यतेनें मिटवून असें दाखवायला हवें होतें कीं, राष्ट्रसंघाची नियमावली म्हणजे कांहीं निवळ पोकळ शब्दांचा डोलारा नसून बलिष्ठांच्या हल्ल्यापासून राष्ट्रसंघ खरोखरच दुर्बल राष्ट्रांचा बचाव करण्यास समर्थ आहे. खरोखर आतांपर्यंत राष्ट्रसंघानें हा प्रश्न सोडविण्याकरितां सर्व उपाय योजावयास हवे होते. पण वस्तुस्थिति अशी कीं, १८ सप्टेंबरला जपाननें चिनी प्रदेशांत आपलीं सैन्यें घातलीं असतां आज तीन महिन्यांनंतरहि तीं तेथेंच आहेत. राष्ट्रसंघानें कांहींहि हातपाय हालविले नाहींत.

राष्ट्रसंघाच्या या वर्तनाचा अर्थ काय? अधिकृतरीत्या राष्ट्रसंघातर्फे असें सांगण्यांत येतें कीं, मांच्युरियाचा प्रश्न विशेष प्रकारच्या अडचणींनीं ग्रासलेला

आहे. जगांत इतरत्र कोठें न आढळणारी परिस्थिति मांच्यूरियांत आढळते. या एका प्रदेशांत चार राष्ट्रांनीं वसाहत केली असून तीं इतकीं सरमिसळीनें राहातात कीं, भौगोलिक मर्यादा आंखून कांहीं त्यांच्या राष्ट्रवार वांटण्या करतां येत नाहींत. एका राष्ट्रानें करार करून दुसऱ्या राष्ट्राच्या भूमीवर करारानें हक्क मिळविले आहेत. प्रदेश स्वतांच्या मालकीचा नसतांहि या राष्ट्रांना सैन्यें बाळगण्याचा हक्क आहे. राष्ट्रसंघाच्या या सर्व सबबी खऱ्या र आहेत. पण राष्ट्रसंघापुढें मांडलेल्या प्रश्नाचें स्वरूप कांहीं असें भानगडीचें नाहीं. त्यांत मुख्यतः दोन भाग आहेत. पहिला भाग असा कीं, हा चीन व जपान यांमधील लढा आहे; आणि तेवढ्यापुरता तपशीलवार तपासणी केल्याखेरीज निकाल देतां येत नाहीं ही अडचण खरी आहे. पण दुसरा भाग असा कीं, हा राष्ट्रसंघ व त्याचा एक सभासद यांच्यांतीलहि लढा आहे. आणि या बाबींत भानगड कांहीं नाहीं. चीन आणि जपान यांपैकीं, आधीं आगळीक कोणीं केली हें कसें ठरवावें? अशी एक सबब संघातर्फे पुढें केली जाते. पण येथें गोष्ट अशी आहे कीं, जपानानें आपल्या कृतीनेंच गुन्ह्याला कबुली दिली आहे. जपानी प्रदेशांतून सैन्य बाहेर पडलें तें जपान सरकारच्या हुकुमानें. तें सरकार सदर सैन्य परत बोलवण्याचें मान्य करीत नाहीं, इतकेंच नव्हे तर मध्यस्थीहि नाकारतें. म्हणून जपानाच्या आगळिकीबद्दल येथें कोणीहि शंका घेतलेली नाहीं.

पण हा प्रश्न इतका उघड आहे हीच येथें अडचण आहे कीं काय न कळे! चीन व जपान यांच्या लढ्यांत एका बाजूनें चीनचें म्हणणें इतकें न्याय्य आहे कीं राष्ट्रसंघास तें नाकबूल करून सोयच नाहीं. पण म्हणून चीनची बाजू घेऊन जपानला राष्ट्रसंघानें विरोध करावा तर संघाला राजकीय अडचणी दिसूं लागतात. या दोन अशक्य विकल्पांच्या कात्रींत राष्ट्रसंघ सांपडल्यासारखा झाला आहे. पण यांतून निघण्यास सोपा मार्ग असा होता की, चीन विरुद्ध जपान हें भांडण सध्यां बाजूस ठेवून जपाननें राष्ट्रसंघाचा सभासद असतां राष्ट्रसंघाचा नियम मोडला हा प्रश्न संघानें आधीं धसास लावायला हवा होता. पण दोन पृथक् प्रश्नांचा गुंतावा करून संघानें हें सोपें प्रकरण अवघड करून ठेवलें आहे. राष्ट्रसंघानें जपानाला स्वच्छ सांगावयाला हवें होतें कीं, "आधीं सैन्य परत बोलवा, मग तुमचे युक्तिवाद ऐकतों." तें सोडून, जपानाचीं सैन्यें चिनी प्रदेशाचें आक्रमण करीत असतां राष्ट्रसंघानें युक्तिवाद ऐकण्यास सुरुवात केली. कार्यपद्धतींत ही जी चूक झाली ती कशामुळें झाली?

याचें खरें कारण इतकेंच कीं, राष्ट्रसंघाचें कौन्सिल दुर्बळ आहे. पण कौन्सिल तरी दुर्बळ कां आहे! त्याची हल्लींची घटना चुकीची आहे म्हणून. अध्यक्ष आहेत ते थकले—भागलेले, कामानें जिकीरीला आलेले आहेत. चौदा सभासदांपैकीं सहा लहान राष्ट्रांचे आहेत. वास्तविक प्रस्तुत प्रश्न त्यांच्या जिव्हाळ्याचा. पण हे सभासद कधींच आपलीं मतें कौन्सिलपुढें मांडीत नाहीत. तीं आतांच कोठून मांडणार? राजकारणांत त्यांना निर्माल्याइतकाच मान आहे. बरें, जीं महा–राष्ट्रें कौन्सिलवर आहेत त्यांना त्यांचे फायदे या भांडणांत संभाळावयाचे आहेत. खरोखर मांच्यूरियांतील झगड्यांत खासगी हितसंबंध व सर्वसामान्य हितसंबंध असें पृथक्करण करून पाहावयाला हवें. जाहीर तह आणि गुप्त करार यांचें हें एक नमुनेदार भांडण आहे. असें दिसतें कीं, इंग्लंडांत जेव्हां आरमार परिषद भरली तेव्हां इंग्लंड आणि अमेरिका यांनी जपानकडून आरमार कमी करण्याचें कबूल करून घेऊन त्या मोबदला जपानला मांच्युरियांत खुशाल पाय पसरण्यास मोकळीक दिली असावी. आणि इंडोचायनांत जपानी लोकांनीं वसाहत करूं नये म्हणून फ्रान्सनें जपानाला 'मँच्युरियांत खुशाल घुसा, आम्ही तुम्हांस अडवणार नाहीं' असें सुचविलें असावें. वास्तविक या गुप्त करारांना कायदेशीर अधिकार नाहीं. ते राष्ट्रसंघाच्या नियमाविरुद्ध आहेत. पण ज्या मुत्सद्यांनीं ते केले त्यांचे हात त्यांनीं बांधले गेले आहेत. इंग्लंड, फ्रान्स आणि अमेरिका येथील प्रधानमंडळांत जाहीर राजकीय धोरण व मुत्सद्यांचीं गुप्त कारस्थानें यांत जी हल्लीं लढत लागलेली दिसते तिचा हा असा खुलासा आहे. इंग्लंडांत लॉर्ड सेसिल, फ्रान्समध्यें ब्रायण्ड आणि अमेरिकेत स्टिम्सन यांना आपापल्या अधिकाऱ्यांशीं यापायीं नित्य झगडावें लागत आहे. मांचूरियाच्या प्रश्नांत यापुढें ही मोठीच धोंड आहे. एक गोष्ट यावरून सिद्ध होते कीं, मुत्सद्यांचीं गुप्त खलबतें अजून थांबलीं नाहींत.

मांच्यूरियाच्या प्रश्नांत आणखी एक भानगड अशी आहे कीं, राष्ट्रसंघाच्या कौन्सिलनें जपान आपणास हुदडून लावील हें ओळखून अमेरिकेच्या पाठिंब्यानें जपानशीं वाटाघाट चालविली. मँच्युरियांत अमेरिकन हितसंबंध असल्यामुळें अमेरिकेलाहि या भांडणांत पडावें लागत आहे. पण अमेरिकेलाहि आपले हितसंबंध संभाळण्याकरितां जपानशीं मिळतेंच घ्यावेंसें वाटतें. शिवाय अमेरिका राष्ट्रसंघांत नसल्यानें संघाच्या कौन्सिलांत काय काम भानगडी चालतात याची तपशीलवार माहितीहि अमेरिकेला नसते. या सगळ्याच्या बुडाशीं राष्ट्रसंघाचा दुबळेपणाच दिसून येत आहे. मांच्यूरियाच्या प्रस्तुत प्रश्नांत मी

सुचवितों त्याप्रमाणें चीन--जपान लढा व राष्ट्रसंघाचा जपाननें केलेला कायदेभंग असें पृथक्करण राष्ट्रसंघानें न केलें तर त्याचें उघड कारण असें आहे कीं, तसें पृथक्करण केल्यास राष्ट्रसंघास जपानवर सक्ती करावी लागेल, निदान तसा धाक दाखवावा लागेल. आणि या जोखमीस राष्ट्रसंघ भीत आहे.

वास्तविक जपानवर अशी सक्ती करण्यासारखें सामर्थ्य राष्ट्रसंघाजवळ नाहीं हें म्हणणें खोटें आहे. संघांतील इतर राष्ट्रांनीं आपले वकील परत बोलवावे, येन नाण्यांतील जपानचे कर्जरोखे एकदम विकून येनची किंमत एकदम उतरवावी, वगैरे पुष्कळ राजकीय व आर्थिक शस्त्रेंहि संघाजवळ आहेत. पण हें आधींच ओळखून जपाननें मोठ्या चातुर्यानें आपल्या दरबारच्या परराष्ट्रीय वकिलांना दम भरून ठेवला आहे कीं, आपण कांहीं या बाबतींत राष्ट्रसंघाचें ऐकणार नाहीं. मग लढावें लागलें तरी बेहेत्तर ! आणि हे वकीलहि युद्ध पेटेल या धाकानें भेदरले आहेत. युद्धाचा प्रसंग ओढवून घेणें ही जबाबदारी फार मोठीच खरीच, पण आजच्या वर्तनानें दुसरें संकट ओढवणार तें हे कीं, निःशस्त्रीकरणाची परिषदच अपयशी होईल, आणि मग पुढेंमागें युरोपांतच युध्द भडकेल.

म्हणून हल्लीं राष्ट्रसंघाच्या कौन्सिलनें जें दूरदृष्टीचें धोरण पत्करल्याचें दिसत आहे, तें माझ्या मतें अत्यंत अदूर दृष्टीचेंच आहे.

# दडपशाही ? रोख ठोक ! स्वराज्यदान ? नुसता झोक !

विंचू चावला तर वेदना होणार नाहींत किंवा चांगला चरचरीत डाग दिला असतां फोड येणार नाहीं असा बहुधा एकहि मनुष्य सांपडणार नाहीं. एखादा दैववान मनुष्य आढळेलहि कीं ज्याला जन्मांत विंचू चावला नाहीं व चावला असला तरी चढला नाहीं. परंतु विंचू चावून ज्याला तो चढला त्याची चेष्टा मात्र तो खास करणार नाहीं. वृश्चिकदंश झालेला मनुष्य वेदनांनीं रडूं लागला असतां तो हंसतो आहे किंवा दुःखानें नाचूं लागला असतां आनंदानें बागडतो आहे असें तो कधींच म्हणणार नाहीं; उलट माणुसकीला स्मरून त्याच्याबद्दल त्याचें मन कळवळेल. तो परोपकारबुद्धीनें बटव्यांत बाळगलेली विंचवावरची मुळी जखमेवर उगाळून लावील, तेवढ्यानेंहि गुण न आल्यास बनारस हिंदु युनिव्हर्सिटींतील प्रो. गोडबोले यांचें 'विषहारि' हें औषध बाजारांतून आणून तें त्या जागी चोळील व त्या तळमळणाऱ्या प्राण्यास 'हंसते जाना' म्हणून सांगून घरीं जाण्यास निरोप देईल. हा जगांतील सामान्य अनुभव झाला. पण त्यालाहि अपवाद आहेतच. निदान ते हिंदुस्थानांत तरी आहेत. हिंदुस्थानांत असा एक वर्ग आहे कीं, त्याला हिंदी लोकांना जीं दुःखें भोगावीं लागतात त्यांचा हिंदुस्थानांत राहूनहि चटका बसत नाहीं. म्हणून त्याला हिंदी लोकांच्या दुखण्यावर खरा दवाच देण्याची बुद्धि होत नाहीं, इतकेंच नव्हे तर त्यांची चेष्टा करण्याचीच हौस वाटते !

व्हाइसरॉय लॉर्ड विलिंग्डन यांनीं नव्या दिल्लींतले. असेंब्लीच्या सभासदांपुढें जें भाषण केलें तें वाचून कोणाच्याहि मनांत वरील प्रकारचे विचार उद्भवल्यावांचून राहणार नाहींत. एखाद्या स्त्रीला जास्तींत जास्ती किती पुत्र व्हावे अशी तिच्या आसवर्गाची इच्छा असते ? तर अष्टपुत्रांची. यासाठीं तिनकेंच पुत्र होण्याचा आशीर्वाद तिला देण्यांत येतो. तो आशीर्वाद ज्यांच्या कुटुंबांत फळाला आला त्यांना अष्टपुत्रे हें उपनांव कायमचें चिकटविलेलें आढळतें. लॉर्ड विलिंग्डन यांना हिंदुस्थानांत येऊन अद्यापि नऊ महिनेहि झाले नाहींत; परंतु तितक्याच थोड्या महिन्यांत ते ऑर्डिनन्सचे इतके पुत्र प्रसवले आहेत कीं त्यांना अष्टपुत्रे यासारख्या एखाद्या पदाचा मान देण्यास आतां मुळींच हरकत नाहीं. त्यांच्या पुत्रांनीं जन्मल्यापासून अवघ्या एकाच महिन्याच्या आंत गाजविलेला अद्भुत पराक्रम पाहिल्यास त्यास पुराणांतरींहि तोड सांपडेल कीं नाहीं याविषयीं शंकाच वाटते. आपल्या उतारवयांतील या पुत्रांच्या पराक्रमानें विलिंग्डनसाहेब बहोत खुष झालेले दिसतात. त्या खुषीच्या तंद्रींतून त्यांना हिंदुस्थानांत सर्वत्र आबादीआबाद वाटत आहे. शेतकरी आबाद आहेत, व्यापारी आबाद आहेत, कारखानदार आबाद आहेत व मजूरहि आबाद आहेत.

धान्याचे भाव चढूं लागल्यामुळें शेतकऱ्यांचे हातांत पैसा पडूं लागला आहे ! हिन्दी गिरण्यांच्या कापडाचे गिऱ्हाईक वाढत असल्यामुळें गिरणीवाल्यांचा धंदा अधिक किफायशीर होत आहे! सोन्याला चांगला भाव येऊन, हिंदी लोकांना आपल्याजवळचें असेल नसेल तें सोनें विकून टाकण्याची पर्वणी लाभल्यामुळें, सोन्याच्याऐवजीं त्यांच्या हातांत कागदाचें व रुप्याचें भरपूर नाणें खेळण्याकरितां सरकारानें नवीन नाणें पाडण्याचा खटाटोप मांडला आहे ! त्यायोगानें सरकारास लंडनच्या बाजारांतील ता. १५ जानेवारी रोजीं द्यावयाचें दीड

कोटीचें कर्ज फेडतां आलें आहे ! हिंदुस्थानाची व्यापारी पत परदेशांत वाढली आहे ! अशीं हिंदुस्थानाच्या भरभराटीची किर्ती तरी अंगें व्हाइसरॉयांनी आपल्या भाषणांत वर्णिली आहेत. हिंदुस्थानाच्या अन्तःस्थितीकडे न पाहतां कोणीं हीं वर्णनें वाचलीं तर त्याच्या तोंडाला पाणीच सुटेल. आणि 'काय हा भाग्यशाली देश व त्यावर काय ही इंग्रजांची कृपा ' असेच उद्गार त्याच्या तोंडून बाहेर पडतील ! पण व्हाइसरॉयांच्या भाषणावरील झगझगीतपणा जरा नखानें खरवडला कीं त्या भाषणाचा बेगडीपणा व भिकारपणा लक्षांत आल्यावांचून राहात नाहीं.

व्हाइसरॉयाच्या भरभराटीच्या वर्णनांतील इतर मुद्दे तूर्त सोडून देऊन सोन्याच्या निर्गतीचाच तेवढा विचार करूं.व्हाइसरॉय दरआठवड्याला हिंदुस्थानांतून कोट्यवधि रुपयांच्या लगडी परदेशीं चाललेल्या आहेत हें हिंदुस्थानाचे कल्याणच होत असल्याचें सांगत आहेत. तें ऐकून कोणासहि त्यांच्या धार्ष्ट्याची आतां मात्र शर्थ झाली असेंच वाटेल. ज्यानें सोनें विक्रीकरितां आपल्या पेटींत सांठवून ठेवलें असेल त्याला सोन्याला चांगला भाव आल्यामुळें व्यापारी दृष्ट्या फायदाच होईल यांत शंका नाहीं. पण ही गोष्ट सावकार,सराफ अशांची. तथापि असले सावकार देशांत अगदींच थोडे. कोट्यवधि रुपयांचें जें सोनें हिंदुस्थानाबाहेर चाललें आहे त्यांत अशांचा अंश फारच लहान.शेतकऱ्यांच्या धान्याला दर नाहीं, व्यापाऱ्यांच्या धंद्याला तेजी नाहीं, व नोकरपेशाच्या लोकांना नोकऱ्या नाहीत, म्हणून जो तो आपल्याजवळचें उरलेंसुरलें किडुकमिडुक विकून दोन पैसे सध्यांच्या संकटांत जास्ती आले तर तेवढेच आपल्या ओढघस्तीच्या प्रपंचाला झाले असें मनांत आणून त्याचा बेवारा करीत आहे. याचा व्हाइसरॉय काय अर्थ करतात? तर म्हणे त्यांनीं आपलें भांडवल सोन्यांत गुंतवून ठेवलें होतें तें ते आतां पुष्कळ नफा घेऊन मोकळे करीत आहेत यांत काय बिघडलें? जणूं काय गोरगरीब मनुष्य आपल्या बायकामुलांना जो एखादा दागिना करून घालतो तो मागेंपुढें केव्हां मोडावयास सांपडावा या आतुरतेनेंच घडवीत असतो!

हिंदुस्थानाच्या भरभराटीचा स्तुतिपाठ गाऊन झाल्यावर लॉर्ड विलिंग्डन सध्यां नित्यपाठाच्या होऊन बसलेल्या दडपशाहीकडे वळले आहेत. सांप्रतच्या दडपशाहीचें रौद्ररूप पाहून कोणासहि बारा वर्षांपूर्वी देशभर पसरलेल्या इन्फ्ल्युएन्झाच्या साथीचीच आठवण होईल. तेवीस वर्षांत प्लेगनें जितके बळी घेतले नव्हते तितके बळी जसे एका इन्फ्ल्यूएन्झाच्या सांथीनें एका महिन्या–दीड महिन्याच्या अवधींत घेतले, त्याप्रमाणें मागील दीड वर्षापूर्वीचे कायदेभंगाचें एक वर्ष सोडल्यास गेल्या पन्नास–पाऊणशें वर्षांत जितके राजकीय कैदी सरकारनें तुरुंगांत टाकले नव्हते तितके या एका महिन्यांतच टाकले आहेत. हा अनर्थ पाहून खरा मनःक्षोभ बोलून दाखविण्यास हिंदी लोकांना आपण तोंडच ठेवलें नाहीं याची खात्री विलिंग्डन यांस असल्यानें ' खाई त्यास खवखवे ' या न्यायानें त्यांना आपल्या रुद्रावताराचें समर्थन करणें भाग पडलें आहे.

आपल्या कृतीचें समर्थन करावयाचें म्हणजे तिचा दोष दुसऱ्याच्या माथीं मारून मोकळें व्हावयाचें ! त्याप्रमाणें विलिंग्डनसाहेबांनीं दडपशाहीची जबाबदारी काँग्रेसच्या गळ्यांत बांधली आहे. " काँग्रेसच्या पुढाऱ्यांना कायदेभंगाची खुमखुमीच होती. त्यांनीं त्या चळवळीची तयारी समेटाच्या काळांतच चालविली होती. आम्ही मात्र समेटाच्या अटी इमानें–इतबारें पाळीत होतों. आम्ही सालस व साळसूद म्हणून त्या काळांत हात जोडून बसलों. नाहींपेक्षा त्याच वेळीं आम्हीं त्यांच्या नाड्या बंद पाडल्या असत्या. काँग्रेसचे पुढारी महा वस्ताद. संयुक्त प्रांतांत करबंदी सुरू करून त्यांनीं आमच्या सोशिकपणाचा कसा अगदीं अंतच पाहिला. मीं काँग्रेसच्या पुढाऱ्यांपाशीं व त्यांच्या अनुयायांपाशीं सहकार्याची याचना केली व पुढील राजकीय सुधारणा अमलांत आणण्याच्या पूर्वतयारींत आमच्या मदतीस या अशी त्यांची विनवणीदेखील केली. पण काँग्रेसचे लोक कसले खट्याळ ! आम्हांस युद्धाचें आव्हान करून ते आम्हांपुढें दंड ठोकून उभे राहिले. मग आम्हीं तरी काय करावें ? या देशांतील राज्य चालविण्याची जोखीम आम्ही शिरावर घेऊन बसलों असल्यानें अस्तन्या सारून पुढें सरसावलों न् काय ! आतां मात्र आम्ही मागें सरणार नाहीं व चळवळीचीं हाडें मोडल्याशिवाय राहणार नाहीं. " अशा रीतीनें व्हाइसरॉयांच्या नमतेपणाच्या सोंगाचा शेवट उघडपणें ताठ्यांत झाला आहे !

आजच्या उभय पक्षांच्या सामन्यांत अखेर कोण कोणाला जिंकणार याचें भविष्य वर्तविण्याची घाई करण्यांत हंशील काय? पण यावर व्हाइसरॉयांना एवढेंच विचारावयाचें कीं 'तुम्ही खरोखरच काँग्रेस पक्षाशीं मनापासून इतकें नमतें घेतलें होतें तर, सामन्याकरितां रंगणावर येण्यापूर्वी आणखी एकच गोष्ट करावयास पाहिजे होती. ती ही कीं, म. गांधी तुमच्या भेटीस यावयाचें म्हणत होते. त्या वेळीं त्यांना भेट घेऊं द्यावयाची होती व त्यांची बाजू ऐकून घेऊन त्यांच्या शंकांचें निरसन करावयाचें होतें.' त्या योगानें लॉर्ड विलिंग्डन यांस कमीपणा न येतां त्यांच्या सुजनत्वाची सर्वांनीं

वाखाणणीच केली असती. हें सौजन्य माजी व्हाइसरॉय लॉर्ड आयर्विन यांच्यांत होतें म्हणून, त्यांच्या कारकिर्दीच्या अखेरीस त्यांनीं देशांत दडपशाही चालविली होती, तरी त्यांची गणना लोकप्रिय व उदारमनस्क व्हाइसरॉयांतच सर्वांनी केली. लॉर्ड विलिंग्डन यांच्या ठिकाणीं सौजन्य नाहीं व मनाचा उदारपणाहि पूर्वींच्या अनुभवांत कधीं दिसला नाहीं. अहंकारामुळेच ' गांधी हा कोणत्या झाडाचा पाला ' असें मानून त्यांना भेट देण्याइतकीहि त्यांनी माणुसकी दाखविली नाहीं. म. गांधी हे सरकारशीं सहकार्य करण्यास तयार होते असें सर सॅम्युअल होअरपासून सर्वजण सांगतच आहेत. तर मग अशा पुढाऱ्यास भेट नाकारून सहकार्याची संधि दवडण्यांत व्हाइसरॉयांनींच चूक केली. या दृष्टीनें पाहिल्यास दडपशाहीचें पाप कॉंग्रेसच्या माथीं न बसतां सरकारच्याच माथीं बसतें असें सिद्ध होत नाहीं काय ? खेरीज युद्धाची तयारीच पाहावयाची झाल्यास ती कॉंग्रेसनें काय करावयाची ? तुरुंगांत जाण्याच्या व लाठीचा मार खाण्याच्या युद्धांत दारूगोळा बनवावयाचा नसतो किंवा हत्यारपात्यारहि गोळा करावयाचें नसतें. या दृष्टीनें विचार करता खरीतयारी गेले सहा महिने सरकारच करीत होतें व त्यासाठीं ठिकठिकाणच्या पुढाऱ्यांची माहिती आपल्या अधिकाऱ्यांमार्फत जमवीत होतें हें गुप्त मुंबई इलाख्यांतील दक्षिणभाग कमिशनराच्या सर्क्युलराच्या परिस्फोटानें सर्वांस केव्हांच कळलें आहे.

हरिदासाच्या कथेचा शेवट 'हेचि दान देगा देवा' यांवाचून व्हावयाचा नाहीं; त्याप्रमाणें कोणाहि बड्या इंग्रज मुत्सद्याच्या व अधिकाऱ्याच्या भाषणांत गोलमेज परिषदेचें स्तवन आल्याशिवाय राहावयाचें नाही. इंग्रज लोकांनीं एखाद्या विषयाची स्तुति करण्याचा कट केला म्हणजे त्यांना तेंच तेंच बोलण्याचा कंटाळा म्हणून येत नाहीं. त्यांना कंटाळा असला तर जें लोकांना हवें असेल तें न देण्याचा आहे, त्याविषयीं बोलण्याचा नाहीं. गोलमेज परिषद संपली तरी तिनें नेमलेल्या कमिट्या सुरू होऊन संपावयाच्या आहेतच. तेव्हां गोलमेज परिषदेच्या स्तुतीच्या पाठोपाठ तिच्या कमिट्यांचें स्तवन व्हाइसरॉयांनीं चालविलें आहे. गोलमेज परिषद स्वराज्यदानाकरितां आहे असें म्हणावयाचें मात्र. त्या परिषदेंत व परिषदेवर मुख्य प्रधान राम्से मॅक्डोनाल्ड यांपासून लॉर्ड विलिंग्डन यांच्यापर्यंत कैकजणांनी शेंकडों अघळपघळ भाषणें केलीं असतां त्यांत स्वराज्याचा कोठेंच पत्ता लागत नाहीं. म्हणून गोलमेज परिषदेंतील 'स्वराज्य' नाहींसें होऊन 'गोलमेज' शिल्लक राहणार हें जाणूनच सदर परिषदेला असलें नांव देण्यांत आलें कीं काय अशीहि शंका येते! व्हाइसरॉयांनी आपल्या भाषणाच्या शेवटीं हिंदुस्थानांत दहा—अकरा वर्षे नोकरीच्या निमित्तानें काढून हिंदुस्थानाचें अन्न खाल्याबद्दल कृतज्ञता दाखवीत उच्चारलेलें वाक्य लक्षांत ठेवण्यासारखें आहे. त्यांच्या दृष्टीनें हिंदुस्थानाच्या राजकीय आकांक्षांचा शेवटचा टप्पा वसाहतीचें स्वराज्य आहे. हिंदी लोकांनीं कितीहि नको नको म्हटलें तरी त्या मार्गानें हिंदुस्थानास आपण नेणारच असा व्हाइसरॉयांचा निर्धार आहे !

जणुं काय व्हाइसरॉयांना काय तें हिंदुस्थानाला स्वराज्य द्यावयाचें आहे आणि हिंदी लोकांना मात्र तें घ्यावयास नको आहे. पण त्यांच्या भाषणांत मेख आहे ती ही कीं, आज आम्ही तुम्हांला फक्त स्वराज्याच्या वाटेला लावणार आहोंत! तें वसाहतीचें स्वराज्य आजच देणार आहोंत असें नाहीं ! येथेंच तर घोडें पेंड खात आहे. दडपशाही रोखठोक व स्वराज्यदानाचा नुसता झोक तो हाच. नाहींपेक्षां आज स्वराज्य रोख मिळतें तर चळवळींत लोक कां पडते? त्यांनीं आपल्या घरादारांचा उन्हाळा कां केला असता ? तुरुंगवास कां पत्करला असता? व मुलाबाळांचा जीव दुःखांत कां घातला असता ? कारण तुरुंग हा कांहीं राजवाडा नव्हे किंवा त्यांतील जेवण ही कांहीं मेजवानी नव्हे कीं ज्यासाठीं लोक उड्या टाकीत अहमहमिकेनें जातील !

# फ्रान्स व इंग्लण्ड यांची तुलना

## इंग्रजांचें श्रेष्ठत्व कशांत !

फ्रेंच व इंग्रज स्वभावाची तुलना करतांना असें वाटतें कीं फ्रेंच माणूस अधिक भावनावश असला तरी इंग्रज माणसाइतका सभ्यता आणि शिष्टाचार पाळणारा नाहीं. आभारप्रदर्शन, खेदप्रदर्शन आणि दुःखप्रदर्शन करण्याच्या प्रकारांत भाषाभेदापलीकडे फारसा फरक नसला तरी इंग्रज माणसांत याच गोष्टी करीत असतां आढळून येणारें मार्दव फ्रेंच माणसांत आढळून येत नाहीं. फ्रेंच पोलिसापेक्षां इंग्रज पोलीस माहिती देण्याच्या दृष्टीनें अधिक तत्पर आणि हुशार असतो. लंडन शहरांतील अगदीं बारक्यासारख्या रस्त्यांचीसुद्धां त्यास माहिती असते. शरीराची ठेवण आणि वागण्याचा रुबाब ब्रिटिश पोलिसांत जितका दिसून येतो तितका तो फ्रेंच पोलिसांत मला आढळून आला नाहीं. इंग्रज पोलिसाचा हात आडवा झाला की केवढ्याहि मोठ्या माणसाची मोटारगाडी असली तरी ती ताबडतोब थांबतांना आढळते. फ्रेंच पोलिसाच्या शिट्यांना आणि हातांतील पांढऱ्या छोट्या सोट्याला (फ्रान्सांत प्रत्येक शिपायाला रहदारीच्या नियंत्रणासाठीं एक पांढरा सोटा दिलेला असतो व त्याच्या साहाय्यानें तो आपले काम करीत असतो) न जुमानतां खुशाल गाड्या हांकतांना पाहणें म्हणजे दुर्मिळ दृश्य नाहीं.

इंग्रज पोलीस शरीरानें धिप्पाड, उंचीनें भरपूर आणि बांध्यानें दणकट असतो. याच्या उलट फ्रेंच शिपाई पुष्कळ वेळां अगदींच किरकोळ असलेला आढळून येतो. गेल्या महिन्यांत फ्रेंच पोलिसखात्याचे प्रमुख अधिकारी लंडनांतील पोलिसखात्याची शिस्त व रहदारीच्या नियंत्रणाची पद्धत पाहण्यासाठीं आले होते. त्या वेळीं मला जरा आश्चर्य वाटलें होतें. पण मी प्रत्यक्षच सर्व गोष्टी पाहून आलों त्या वेळीं मला त्यांतील रहस्य समजलें. फ्रेंच पोलिसखात्यांत सुधारणा होण्यास पुष्कळच वाव आहे. परवांच मी इम्पीरिअल एअर वेजच्या बसमधून पारिसच्या एरोड्रोमवर विमानांत बसण्यासाठीं येत होतो. आमच्या फ्रेंच ड्रायव्हरानें गाडी हांकतां हांकतां आपली गाडी डाव्या बाजूस झुकवली व तो ती तशीच हांकीत नेत होता. फ्रान्सांत व युरोप खंडांत इतरत्रहि वाहनें उजव्या बाजूनें हांकण्याचा कायदा आहे. आतां आमच्या ड्रायव्हरानें तर डाव्या बाजूने गाडी हांकून तो कायदा मोडला होता. एवढेंच नव्हे तर वाटेंत उभ्या असलेल्या पोलिसाकडेहि त्यानें लक्ष दिलें नाहीं. तो पोलीस चटकन बाजूला झाला नसता तर कदाचित् त्याला अपघात झाला असतां इतकी त्याच्याजवळून आमच्या ड्रायव्हरानें आमची गाडी हांकली. पोलीस शिपायानें शिटी वाजवून गाडी थांबविली. ड्रायव्हर बसमधून उतरला व 'पार्दों=क्षमस्व' असें कांहीं तरी पुटपुटत परतला व त्या शिपायाचीहि समजूत झाल्यासारखें दिसलें ! येथें लंडनांत असा प्रकार क्वचितच दिसेल व त्या ड्रायव्हरावर खटला झाल्याशिवाय खास राहणार नाहीं.

## फ्रेंचांचें श्रेष्ठत्व कशांत ?

इंग्लंड व फ्रान्स यांची मी आतांपर्यंत लोकव्यवहार आणि चालीरीती या दृष्टीनें तुलना केली. परंतु कलेचे भोक्ते आणि शिल्पकलेचे अभिमानी या दृष्टीनें विचार करतां इंग्रजांना फ्रेंच लोकांची कधींहि बरोबरी करतां येणार नाहीं. भव्य इमारती, विस्तीर्ण राजपथ आणि अजब पदार्थसंग्रहालयें पाहावयाचीं असल्यास कोणीहि पारिसला एकवार तरी जरूर जावें असें मी म्हणेन. इंग्रज लोकांच्या पार्लमेंटाचा इतिहास फ्रेंच पार्लमेंटापेक्षां किती तरी जुना आणि महत्त्वपूर्ण आहे पण पारिसच्या Chambre de Deputies म्हणजे पार्लमेंटगृहाशीं वेस्टमिन्स्टरची तुलना केली तर तें भव्यतेंत आणि रुबाबांत फार मागें पडतें. बकिंगहॅम पॅलेस म्हणजे ब्रिटिश साम्राज्याच्या वैभवाचें केंद्रस्थान. पण तो राजवाडा फ्रेंचांच्या व्हार्साय व फॉंटेनेब्ल्यूच्या राजवाड्यापुढें यःकश्चित वाटतो. फॉंटेनेब्ल्यू राजवाड्यांत नेपोलियन बोनापार्ट राहत असे. त्याचे अनेक अवशेष त्या ठिकाणीं दाखविले जातात. त्याचा पलंग, त्याचें टेबल, त्याचें घड्याळ आदि वस्तू पहात असतां त्या महापराक्रमी पुरुषाच्या स्मृतीनें अंतःकरण भरून येतें व 'कालाय तस्मै नमः' असे उद्गार मुखावाटे बाहेर पडतात. ज्याच्या मोहिमांनीं आणि लढायांनीं तत्कालीन जगच काय पण आजचें जगसुद्धां आश्चर्यानें तोंडांत बोटें घालतें, त्याच महापुरुषाला सेंट हेलेनासारख्या निर्जन बेटांत शेवटीं मरावें लागलें व त्याच्या अवशेषांना परत स्वगृहीं येण्यास अर्धशतकाहूनहि अधिक काल लागला हें पाहिलें म्हणजे कोणा सहृदय माणसाचें अंतःकरण विषाद आणि विचार यांनीं भरून येणार नाहीं ? त्याचें स्मारक त्याच्या भव्य यशोमंदिराला साजेसें बांधून फ्रेंच लोकांनीं नेपोलियनवरील आपलें प्रेम चांगल्या प्रकारें दाखविलें आहे.

व्हर्सायचा राजवाडा म्हणजे १४ व्या लुईच्या

कर्तृत्वाचा आणि कलाभिज्ञतेचा साक्षात् पुरावा होय. चौथ्या हेनरीपासूनच फ्रेंच राजांनीं तेथें राहण्यास सुरुवात केली असली तरी १४ व्या लुईपर्यंत त्या राजवाड्याला आजचें महत्त्व आलें नव्हतें. सौंदर्य, शिल्पकला, भव्यपणा, आकार आणि विस्तार या सर्व बाबतीत फ्रेंच इमारती इंग्रज इमारतींपेक्षां सरस वाटतात. कामाची बांधणीच प्रतिभापूर्ण केलेली दिसते. वैभवाचें उत्कृष्ट दर्शन पारिसला जितकें घडतें तितकें तें लंडनास घडत नाहीं. आग्रा, दिल्ली आदि ठिकाणचे मोंगल राजवाडे आणि अकबराची कबर अथवा फत्तेपूरशिक्री वगैरे ठिकाणच्या इमारती ज्यांनीं पाहिल्या असतील त्यांनाच फ्रेंच राजवाड्याची आणि इमारतींची बरोबर कल्पना येईल.

### कारंजांचें सौंदर्य

पारिसला येण्यापूर्वी लंडनांतील ट्राफलगार चौकाला मी फार मोठा चौक समजत होतों. पण पारिसमधील कंकोर्द ( Concord ) पाहिला म्हणजे ट्राफल्गार चौक त्याच्यापुढें कांहींच नाहीं असें वाटूं लागतें. कंकोर्दमध्यें दोन उंच कारंजीं असून त्यांतून पाण्याचे फवारे रात्रंदिवस चाललेले असतात. सुंदर स्त्रियांच्या वक्षःस्थळांवरून माशांनीं विळखा टाकला आहे आणि त्यांतून पाण्याचा प्रवाह त्या स्त्रीच्या मागे बसलेल्या अथवा उभ्या असलेल्या एखाद्या पुरुषाकृतीवर पडत आहे असें दाखविण्यांत आलें आहे. लहान मुलांच्या आकृतींचा कळस कारंजावर चढविला असून उमलत्या कमलाचा आकार दिल्यामुळें कारंजांना विलक्षण सौंदर्य आलें आहे. रात्रींच्या वेळीं विजेचे दिवे पाण्यांतूनच खालून प्रकाश पाडतात. त्यामुळें वर उडणाऱ्या फवाऱ्यांना येणारी शोभा केवळ अवर्णनीय असते. याच कारंजाजवळ मृतवीरांच्या स्मरणार्थ दोन स्तंभ उभे केले आहेत. त्यांवर जवळूनच खूप मोठा विजेचा प्रकाश पाडतात. त्यालाच फ्लड लाइटिंग असें म्हणतात. त्यामुळें त्या उंच स्तंभांना एक प्रकारची उदात्त रम्यता प्राप्त होते. या कंकोर्दपासून एकदम सरळ असा एक रस्ता जातो. त्यास दलीझे कास असें म्हणतात. मुंबईतील क्वीन्स रोडच्या चौपट तो रस्ता रुंद आहे असें म्हटल्यास त्याची कल्पना वाचकांस येईल. हा रस्ता २–२। मैल लांब आहे. त्यांतच अज्ञात वीरांचें ( गेल्या महायुद्धांत कामास आलेल्या वीरांचें ) स्मारक आहे. त्यास ( Arch de Triumph ) विजयकमान म्हणतात. सदर कमान ही उंच आणि भक्कम बांधली आहे. कमानीच्या मध्यें सतत अग्नि जळत असतो. प्रत्यक्ष प्राणयज्ञाची कल्पना त्यामुळें मनावर अत्यंत परिणामकारकपणानें बिंबते. नेपोलियनानें आपल्या विजयाप्रीत्यर्थ बांधलेल्या कमानीचाच पण मोठा असा हा नमुना आहे.

पारिसला येऊन माणसानें एफेल टॉवर पाहिला नाहीं अथवा स्वातंत्र्यदेवीचा उंच पुतळा पाहिला नाहीं तर त्यानें काय पाहिलें, असेंच त्यास कोणीहि विचारील. मॅडेलिन चर्च, हायकोर्टाची इमारत, पोलिसखात्याच्या इमारती आणि फ्रेंच प्रेसिडेण्टाचें निवासस्थान हीं स्थळेंहि बघण्यागारखीं आहेत.

# संस्थानी महत्त्वाकांक्षेचा मासला!

हल्लीं हिंदुस्थानांतील हिंदी संस्थानांनीं शक्य तितक्या बाजूंनीं आपला दर्जा वाढविण्याचा प्रयत्न चालविला आहे. स्वाभिमानबुद्धि जागृत होणे ही गोष्ट केव्हांहि भूषणास्पदच होय. बटलर कमिटी नेमण्यांत आली, त्या वेळीं लहानांपासून थोरांपर्यंत सर्व संस्थानांनीं तहनाम्यांच्या जोरावर आपण इंग्रज सरकारच्या बरोबरीचीं स्वतंत्र राष्ट्रें आहों हे प्रस्थापित करण्याचा कसून प्रयत्न केला. कोणीं आपल्या पदव्यांमध्यें हळूच मोठेपणाचे शब्द घुसडून दिले. कोणी सलामीच्या तोफा वाढवून घेतल्या. कोणी लाटसाहेबांच्या भेटी–परतभेटींचे योग अधिक आणवून प्रसिद्धि मिळविली. संस्थानाचें उत्पन्न मोठें असणें हें अर्थातच एक मोठेपणाचें लक्षण आहे. त्याप्रमाणें उत्पन्नें वाढविण्याचा प्रयत्न सुरू असून त्यामुळें एकांत दोन कामें होतात. महत्त्व वाढतें, खासगी खर्चहि वाढूं शकतो. पण एक बाजू लक्षांतून गेली होती तिचीहि दुरुस्ती हल्लीं सुरू आहे दक्षिण–महाराष्ट्रांतील कांहीं संस्थानांना कारभारी हा शब्द अगदीं पोकळ, बेडौल किंवा हलका वाटून, त्यांनीं त्याचें नांव बदलून 'दिवाण' असें ठेवलें. आमच्या समजुतीप्रमाणें सांगली, भोर, फलटण या संस्थानांनीं वरील प्रकारचा उपक्रम अगदीं अलीकडेच पाडलेला आहे. पण फलटणसारख्या संस्थानानें आपल्या कारभाऱ्याला दिवाण ही पदवी दिली तर, कोल्हापूरसारख्या पहिल्या प्रतीच्या संस्थानानें आपल्या कारभाऱ्याची जुनीपुराणी दिवाण ही पदवी काढून टाकून त्या ठिकाणीं 'प्राईम मिनिस्टर' अशी नवी पदवी चालू केल्यास तें योग्यच आहे. एरवीं दर्जामधील फरक कसा दर्शवितां येईल? 'प्राईम मिनिस्टर' हीच इंग्रजी पदवी कायम झाली, किंवा 'मुख्य प्रधान' 'मुख्य मंत्री' असे त्याचे कांहीं मराठी प्रतिशब्द योजलेले आहेत कीं काय हें माहीत नाहीं. परंतु

मराठी शब्द अर्थनिर्णायक नसतो, म्हणून बहुधा प्राईम मिनिस्टर हा इंग्रजी शब्दच चालू होईल असें आम्हाला वाटतें. आणि इंग्लंडच्या बरोबरीच्या स्वतंत्र दोस्त राष्ट्रांचा दर्जा दर्शवावयाचा तर प्राईम मिनिस्टर हा शब्द अत्यंत समर्पक होय यांत शंका नाहीं. कारभाऱ्याला प्राईम मिनिस्टर म्हटल्यावर खुद्द राजाला 'हिज् मॅजेस्टी' हें उपपद लावणेंच योग्य होईल; व ही गोष्ट देखील पुढेंमागें घडून कां येऊं नये ?

आमच्या समजुतीप्रमाणें कारभाऱ्याचा दिवाण व दिवाणाचा प्राईम मिनिस्टर हे जे शब्दांत फरक झाले, ते चढाओढीच्या व मोठेपणाच्या स्पर्धे-मुळेंच झालेले असले पाहिजेत. आणि या बाबतींत जर कोणाकडे जबाबदारी येत असेल तर, कारभाऱ्याला दिवाण करून, हळूच सरकत जाऊन मोठ्या संस्थानांच्या रांगेला बसूं पाहणाऱ्या छोट्या संस्थानांकडेच येते ! पण आम्हांला आतां अडचण वाटते ती इतकीच कीं, या छोट्या संस्थानांनीहि उद्यां जर आपल्या दिवाणांना 'प्राईम मिनिस्टर' ही पदवी लावण्यास सुरुवात केली तर, कोल्हापूरसारख्या मोठ्या संस्थानांनीं काय करावें बरें ? मोठ्या नाइलाजाची गोष्ट होणार आहे. या स्पर्धेला व चढाओढीला शब्द पुरणार नाहींत; पण आंकडे मात्र खास पुरतील. कारण त्यांना अंत नाहीं. म्हणून आमची अशी सूचना आहे कीं, श्रीशंकराचार्यांचा किंवा एखाद्या आचार्यांचा उल्लेख करावयाचा असतां श्रींच्यापुढें १०८ आंकडा घालतात, त्याप्रमाणें सर्व संस्थानांनीं दिवाण हा एकच शब्द आतां कायम करून, सलामीच्या तोफा किंवा संस्थानांचें उत्पन्न यांना अनुलक्षून दिवाण या शब्दामागें महत्त्वदर्शक आंकडा घालीत जावें. म्हणजे मग लहानांनी थोरांची बरोबरी करण्याची काय बिशाद ! पण तोफा किंवा उत्पन्न यांचें प्रमाण न धरतां, केवळ इष्टांक म्हणून जर कांहीं तरी आंकडा घातला तर, त्यांत आपत्ति अशी संभवते कीं, कोणासहि त्याहून मोठा आंकडा घेण्याची मनाई कोण करणार? आणि तसें झालें म्हणजे मग, लहान मुलें चढाओढ सुरू असतां रामाचा केसन् केस, समुद्राच्या वाळवंटांतला खडान् खडा असें म्हणत जातात तसें, संस्थानिकांना करण्याची पाळी येईल.

कारभाऱ्याच्या पदवीची ही विचक्षणा झाली. पण यांत एक गोष्ट राहिली. ती अशी कीं, कोल्हापूरचे दिवाणसाहेब प्राईम मिनिस्टर होतील व करवीरकर छत्रपति हेहि हिज मॅजेस्टी होतील; पण बिचाऱ्या प्रजेची-लोकांची-वाट काय? त्यांचा 'प्रजा' हा पारतंत्र्य-दर्शक शब्द जाऊन 'लोक' हा स्वातंत्र्यदर्शक शब्द देखील अजून लावला जात नाहीं. त्याविषयीं खळखळ करण्यांत येते. पण विलायतेंतील कारभारी हा जर प्राईम मिनिस्टर आहे तर तेथील 'प्रजा'हि 'लोक' आहेत. त्यांचें पार्लमेंट आहे. त्यांना स्वराज्य आहे, म्हणजे प्राईम मिनिस्टर हुसकून लावण्याचा अधिकार आहे ! हिंदुस्थानांत पाहावें तो कारभाऱ्यांच्या पदव्यांचे गौरवदर्शक शब्द वाढविण्यांत मात्र अहमहमिका सुरू आहे. तथापि प्रजेला स्वराज्याचे वाढते हक्क देण्याची तजवीज फारशी दिसत नाहीं. दक्षिण—महाराष्ट्रांतील बिचाऱ्या कांहीं छोट्या संस्थानांनीं कारभाऱ्याचा दिवाण केला, पण त्याबरोबर अर्धवट अधिकाराच्या का होईना लोकसभा निर्माण केल्या. मग या बाबतींत कोल्हापूरच्या राज्याधिकाऱ्यांनीं काय केलें? तेथें अजून कायदेकौन्सिलाचा पाया भरण्याचीहि तजवीज नाहीं. सन १९०४ पासून कोल्हापुरांत लोकसभेची चळवळ प्रजा करीत आहे. चळवळ कसली म्हणा ! चळवळ केव्हांच हाणून पाडली! लोक फक्त आकांक्षा धरून आहेत. पण संस्थानांचे अधिपति व प्रधानमंडळ यांचे दर्जे वाढतांना, त्याबरोबर लोकांचा दर्जा वाढविण्याचाहि कांहीं प्रयत्न व्हावयाला नको काय? राजा काय प्रजा काय, एकाच मनुष्यजातीच्या. खाणींतील माती ! तिचा डेरा काय, बोळकें काय, दोनही पाणी भरण्याचींच भांडीं! डेरा मोठा म्हणून त्यांत पाणी जास्त मावेल, बोळकें लहान म्हणून त्यांत पाणी कमी मावेल. तें ज्या त्या घटव्यक्तीचें नशीब. पण डेरा नेहमीं सांडण्याइतका भरलेला ! आणि बोळक्याचा जन्म मात्र पाण्याच्या ओलाव्याशिवाय जावा! हा ईश्वराच्या घरचा न्याय होतो काय? याचा विचार संस्थानिक लोक सहानुभूतीनें करतील तर, आज त्यांची एकेरी असलेली महत्त्वाकांक्षा दुहेरी ठरून ती प्रागतिक म्हणून त्यांना भूषणास्पद तरी होईल.

# स्फूट सूचना

१ इंग्लंडांतील नाण्याचा भाव उतरला आणि येथल्या नाण्याचा संबंध इंग्लंडच्या नाण्याशीं जोडण्यांत आला, यामुळें सोन्याचा भाव चढला. हा भाव अशा रीतीनें चढण्यांत इंग्लंडचा फायदा झाला. कारण भारी किंमतीच्या आशेने येथल्या सोन्याचा प्रवाह इंग्लंडकडे वाहूं लागला व त्यामुळें इंग्लंडच्या नाण्याचा पडता भाव थोडा तरी स्थिरावला. अशी वस्तुस्थिति असतां इंग्लंडच्या स्वार्थी-धोरणावर पांघरूण घालण्याकरितां व्हाईसरॉयांनीं आपल्या भाषणांत सोन्याच्या निर्गतीनें हिंदुस्थानचें अकल्याण न होतां कल्याणच होत आहे, आणि या देशांत ७०० कोटि रुपये किंमतीच्या सोन्याचा सांठा असल्यामुळें ४० कोटींचें सोनें परदेशीं गेलें तरी ती अगदीं क्षुद्र बाब आहे असें भासविण्याचा प्रयत्न केला. हिंदुस्थानांतील सोन्याचा संचय ७०० कोटींचा असो अगर त्याहून अधिक असो, प्रस्तुतच्या वादांत तो मुख्य प्रश्न नाहीं. मात्र व्हाइसरॉयांना असें स्पष्ट सांगणें अवश्य आहे कीं, हिंदुस्थानांत जो कांहीं सोन्याचा सांठा आहे तो आम्हीं आमच्या निढळाच्या घामानें, प्रामाणिक व्यवहारानें, मिळविलेला आहे. दुसऱ्या कोणत्याहि देशाची लूट करून, किंवा नाण्याच्या कायद्याची हातचलाखी व धूळफेंक करून, किंवा तलवारीच्या जोरावर आपला माल दुसऱ्याच्या गळ्यांत जबरीनें बांधून मिळविलेला नाहीं. तेव्हां तो सांठा किती आहे याची उठाठेव तुम्हांला कशाला पाहिजे?

---

२ आतां हिंदुस्थानांतून सोन्याचा जो प्रवाह बाहेर चालला आहे त्यास हिंदुस्थान सरकार कितपत जबाबदार आहे याची शहानिशा केल्यास सोन्याच्या गळतीचा दोष सर्वस्वीं सरकारच्याच माथीं मारावा लागतो. शेतकऱ्यांच्या मालाला बाजारांत पूर्वीच्या अर्ध्यानेंहि किंमत येईनाशी झाली असतां शेतकऱ्याला जर अर्धी सूट दिली गेली नाहीं तर तो आपला सारा कसा भरणार! आणि आपलें इतर देणें तरी कसें फेडणार? अर्थातच सोन्याचा भाव चढलेला पाहून त्याला स्वाभाविकच वाटणार कीं, आज सोन्याला भाव येतो आहे तेव्हां तें विकून सरकाराचें व सावकाराचें देणें भागवून टाकावें. अशा रीतीनें ज्याला ज्याला म्हणून दुसऱ्याचें देणें आहे आणि तें देणें मालाच्या विक्रीनें फिटत नाहीं पण सोनें विकल्याने फिटूं शकतें असें उघड दिसत आहे तो तो मनुष्य सोनें विकावयाला काढीत आहे. सरकारनें जर भरपूर सूट—तहकुबी दिली असती आणि शेतकऱ्यांच्या शेतांतील मालास योग्य किंमत येऊं लागेपर्यंत सावकारांच्या हुकूमनाम्यांचीहि बजावणी करणें तहकूब ठेवलें असतें तर एवढें सोनें विक्रीला बाहेर निघालें नसतें. आणि विक्रीला आलेलें सोनें परदेशाला, विशेषतः इंग्लंडला, जातें याला तर सरकारच जबाबदार आहे. कारण हुंडणावळीच्या भावाच्या कारवाईमुळें तें सोनें इंग्लंडच्या नाण्यांत विकलें तर त्याची जेवढी किंमत येते तेवढी इतरत्र विकल्यानें येत नाहीं; आणि देशांतल्या देशांत तर विक्री करण्यापासून कांहींच लभ्यांश नाहीं. सारांश, हिंदुस्थानांतील नाण्याचा सोन्याशीं असलेला संबंध तोडून त्याचा इंग्लंडांतील नाण्याशीं संबंध जोडल्यामुळें इंग्लंडांत सोनें पाठविणें किफायतशीर वाटूं लागलें आणि हिंदी रयत कर्जांत बुडालेली असल्यानें त्या कर्जाची फेड करण्यासाठीं तिनें आपल्या पदरचें किडूकमिडूक निरुपायानें विकावयास काढलें. याच्या बुडाशीं सरकारची वसुलाची सक्ति व हुंडणावळीची कारवाई याच गोष्टी मुख्यतः आहेत यांत शंका नाहीं.

---

३ व्हाइसरॉयांनीं आपल्या भाषणांत अशी बढाई मारली कीं, हिंदुस्थानसरकारची सांपत्तिक स्थिति सुधारत आहे, म्हणून आतां नवीन कर बसविण्याची जरूरी पडणार नाहीं! जनतेच्या शक्तीबाहेर व जरूरीहून अधिक कर निर्घृणपणानें आगाऊच लादून व ते कर भरण्यासाठीं जनतेला आपल्या पदरचें सोनें विकण्यापर्यंत पाळी आणून आतां सरकार म्हणतें कीं, आमच्या खजिन्याची स्थिति सुधारत आहे! पण ही फुशारकीहि वस्तुस्थितीस सोडून आहे. गतवर्षी या दिवसांत ट्रेझरी बिलांचें देणें ८४ कोटि रुपयांचें होतें. आतां तें ६१ कोटींपर्यंत उतरत आलें असलें तरी इतर प्रकारचें देणें वाढलेंच आहे. ट्रेझरी बिलांचीं टेंडरें निघालीं असतां त्यांना भरपूर मागणी येत नाहीं, किंवा जी मागणी येते ती भारी व्याजाची असते म्हणून सरकार तीं कबूल करीत नाहीं. एवढ्यामुळेंच ट्रेझरी बिलांची रक्कम कमी होत चालली. पण दुसरीकडे सरकारनें आपल्या करन्सी रिझर्व्हमधून जादा नोटा बाहेर काढल्या आणि परवांच तर इम्पीरिअल बँकेकडे व्यापारी बिलांची भरती नसतांना तीन कोटींच्या नोटांच्या रूपानें बँकेला कर्ज दिलें. म्हणजे एकीकडचें कर्ज २३ कोटींनी कमी झालें तर दुसरीकडचें कर्ज ४८ कोटींनी वाढलें. त्यांची वजावाट केल्यास एकंदरींत २५ कोटींची कर्जाची वाढच झाली. शिवाय इम्पीरिअल बँकेंतली सरकारी शिल्लकहि गतवर्षीपेक्षां कमी झालेली आहे, आणि जरूरीपेक्षां अधिक करन्सी नोटा बाहेर काढल्यामुळें

कागदी चलनाला कित्येक ठिकाणीं महायुद्धाच्या वेळेप्रमाणें बट्टा पडूं लागला आहे! हीं सगळी सरकारच्या खजिन्याच्या भरभराटीचींच चिन्हें काय? परंतु यासंबंधानें आतांच वाद कशाला करा! फेब्रुवारीअखेर वार्षिक बजेट असेंब्लीपुढें येईल, त्या वेळीं ही कुंभाराची सून उकिरड्यावर येणारच असल्यानें तिचें खरें स्वरूप त्या वेळीं जगाला कळणारच आहे.

# असेंब्लींतील घडामोडी

### सर शफींबद्दल दुःखप्रदर्शन

ता. २५ जानेवारी रोजीं असेंब्लीचें कामकाज दिल्ली येथें सुरू झालें. आरंभीं व्हाइसरायांनीं समालोचनात्मक असें भाषण केलें व ते निघून गेले. ते गेल्यावर अध्यक्ष इब्राहिम रहिमतुल्ला स्थानापन्न झाले व नव्या सभासदांचे शपथविधि झाले. सर महमद शफी यांच्या निधनानिमित्त दुःख प्रदर्शित करण्यासाठीं सभा एक दिवस तहकूब करावी अशी सूचना सर जॉर्ज रेनी यांनीं मांडली. तिला अनुमोदन मिळून पुष्कळांकडून मृताचें गुणगान होऊन सभेचें काम तहकूब झालें.

ता. २६ रोजीं प्रश्नोत्तरांच्या अवधींत गृहमंत्री यांनीं युरोपियन व हिंदी यांच्या नेमणुकांसंबंधीं पुढील माहिती सादर केली.

| | इंडियन सिव्हिल सर्व्हिस | | पोलीस सर्व्हिस | |
|---|---|---|---|---|
| सन | युरो. | हिंदी | युरो. | हिंदी |
| १९२५-२६ | २० | २२ | १४ | १६ |
| १९३०-३१ | २५ | ४३ | १३ | १३ |

युद्धमंत्र्यांनीं जाहीर केलें कीं, १९३२-३३ साली लष्करी खात्यांत १ कोटि ३५ लक्ष रुपयांची बचत होईल.

### विधवांच्या मिळकतीचें शारदा-बिल

दि. ब. हरविलास शारदा यांनीं विधवासंबंधींचें बिल सिलेक्ट कमिटीकडे पाठवावें असें सुचविलें. विधवा स्त्रियांना आपल्या पतीच्या मिळकतींतील कांहीं हिस्सा मिळावा असा त्याचा आशय आहे. लोकांपुढें तें बिल दोन वर्षें आहे असें ते म्हणाले. त्याला श्री. अमरनाथ दत्त यांनीं विरोध केला. 'मी वर्णाश्रमधर्माचा अभिमानी आहें' असें म्हणून त्यांनीं सांगितलें कीं, हिंदूंच्या समाजव्यवस्थेंतील मूलभूत तत्त्वांवरच हें बिल घाला घालीत आहे. यामिन खान यांनीं बिलाला पुष्टि दिली. श्री. कृष्णम्माचारियर म्हणाले, 'सामाजिक बिलाची मागणी समाजाकडूनच व्हावयास हवी. तशी ती झालेली नाहीं.' या बिलानें मुलांचा मिळकतीवरील हक्क कमी होईल! अशी तक्रार श्री लालचंद नवलराज यांनीं केली.

### सरकारचें शौर्य दडपशाहींतच!

मि. लॅन्सलॉट ग्रॅहॅम यांनीं सरकारतर्फे जाहीर केलें कीं, 'बिलाला लोकमताचा खंबीर पाठिंबा आहे अशी खात्री झाल्याशिवाय! सरकार त्याचा पाठपुरावा करणार नाहीं. आतांच्या भाषणांत विरुद्ध मत दिसत असून, गॅलरीमध्यें प्रेक्षकांची गर्दीहि दिसत नाहीं.' शेवटच्या विधानाला अनुलक्षून एक सभासद म्हणाले, 'देशांत वटहुकुमांचा अंमल जारी आहे ना? मग अशा बिलाकडे कोण लक्ष देणार?' सरकारच्या विरोधी धोरणावर टीका करतांना हरिसिंग गौर म्हणाले, 'सरकारचें शौर्य दडपशाही करण्यांतच तेवढें पाहून घ्यावें; सामाजिक सुधारणेचे वेळीं तें दडी मारून बसतें!' आणखी कांहीं उलटसुलट भाषणें झाल्यानंतर बिलावरील चर्चा तहकूब झाली; व बिनसरकारी कामकाजाच्या दिवशीं ती सुरू करण्याचें ठरलें.

### दडपशाहीची चर्चा सोमवारीं होणार

देशांतील सद्यःस्थितीचा विचार करण्यासाठीं तहकुबीच्या तीन सूचना आल्या. रंगा अय्यर यांची सूचना म. गांधींच्या अटकेनिमित्त, एस. सी. मित्र यांची सेनगुप्तांच्या अटकेनिमित्त व संतसिंग यांची दडपशाहीनिमित्त अशा त्या सूचना होत्या. परंतु हरिसिंग गौर यांची सरकारी धोरणाबद्दलची व्यापक स्वरूपाची सूचना सोमवारीं विचारांत घेण्यांत येईल त्या बाबतींत सरकार बिनसरकारी सभासदांशीं बोलणें करीत आहे असें आश्वासन रेनी यांनीं दिलें.

१८१८ च्या कायद्याखालीं श्री. सुभाष बाबू सेनगुप्त वगैरे ३० व १८२७ च्या मुंबई कायद्याखालीं म. गांधी व वल्लभभाई असे ३२ राजबंदी सध्यां तुरुंगांत आहेत असें क्रेरार यांनीं सांगितलें.

### सिव्हिल सर्व्हंटांतील न्यायाधीश नको

ता. २७ च्या बैठकींत रामकृष्ण रेड्डी यांनीं इंपीरियल बँकेच्या कामकाजाची चौकशी करण्यासाठीं एक कमिटी नेमावी असा ठराव मांडला. हिंदी व्यापारी व संस्था यांना ती बँक पक्षपातानें वागविते असा आरोप कांहीं वक्त्यांनीं केला. लालचंद नवलराज, अझद अली वगैरें ीं भाषणें झाल्यावर शूस्टर यांनीं ठरावाला विरोध केला. ठराव नामंजूर झाला.

हायकोर्टांतील चीफ जस्टिस हा इंडियन सिव्हिल सर्व्हिसमधून नेमूं नये; वकील, बॅरिस्टर किंवा ॲडव्होकेट यांमधून नेमावा असा ठराव हरिसिंग गौर यांनीं मांडला. कृष्णम्माचार्य, आगरवाल, संतसिंग, जोग वगैरेंचीं भाषणें झाल्यावर क्रेरार यांनीं विरोध केला. मतें घेतां ४६ वि. ४० मतांनीं ठराव मंजूर झाला.

# अवघ्या दहाच वर्षांतला चमत्कार !

कोणीहि आतां खुशाल म्हणावें कीं, "अवघ्या दहा वर्षांतच काय हा जमीन–अस्मानचा फरक पडला हो !" आणि जमीन व अस्मान इतका मोठा फरक खरोखरच पडला आहे. दहा वर्षांपूर्वी म. गांधी व अलीबंधू यांचे संबंध काय होते आणि आज ते काय आहेत ? दहा वर्षांपूर्वी अलीबंधूंचे राष्ट्रीय सभेशीं संबंध काय होते व आज ते काय आहेत ? दहा वर्षांपूर्वी अस्पृश्य लोक व म. गांधी यांचे संबंध काय होते व आज ते काय आहेत ? आणि दहा वर्षांपूर्वी अस्पृश्य वर्ग व सरकार यांचे संबंध काय होते व आज ते काय आहेत ? या चारहि प्रश्नांचीं उत्तरें देणाराला आम्ही वर दर्शविल्याप्रमाणें जमीन–अस्मानची तफावत पडली असेंच म्हणणें प्राप्त नाहीं काय ? या स्थित्यंतरांना समाजांतील जिवंतपणाचीं लक्षणें असें उदात्त नाव देण्याचा मोह एकाद्याला होईल. परंतु वास्तविक तीं समाजाच्या अधोगतीचीं लक्षणें आहेत असें आम्हांला तरी म्हणावेंसें वाटतें!

दहा वर्षांपूर्वी विलायत सरकार व तुर्कस्तानचे मुसलमानी राष्ट्र यांच्यामध्यें युद्ध सुरू होतें. मुसलमानांनीं जर्मनीचा पक्ष घेतला होता. म्हणून मुसलमानांची खिलाफत बुडवावी, मुसलमानी राष्ट्रांचीं शकलें करावीं, व तीं सर्व आपल्या नियंत्रणाखालीं ठेवावीं, असा डाव ब्रिटिश सरकारानें मांडला. त्याविरुद्ध प्रतिक्रिया म्हणून हिंदुस्थानांतील मुसलमानांनीं येथील सरकाराविरुद्धहि एक प्रकारचें धर्मयुद्ध पुकारलें. म. गांधी यांना मुसलमानांविषयीं आधींच प्रेम होतें तें खिलाफतीवरील या संकटानें दुणावलें. आणि हिंदी स्वराज्याच्या चळवळींत मुसलमानांची मदत पाहिजे याहि हेतूनें त्यांनीं खिलाफतीच्या चळवळीला उचलून धरलें. म. गांधींच्या वजनामुळें राष्ट्रीय सभेनें खिलाफतीच्या चळवळीला आधार दिला; किंबहुना तिच्याशीं इतकी समरसता प्रगट केली कीं, राष्ट्रीय सभा ही राष्ट्रीय सभा नव्हे तर जणूकाय खिलाफत परिषदच आहे असें पुढें पुढें सर्वांना वाटूं लागलें. उलट अलीबंधूंसारखे पुढारी यांनीं असें भासविलें कीं, "इंग्रजांशीं भांडण्यांत काँग्रेसच्या पुढें आमचा पाय आहे. ज्या भूमीवर इंग्रजांचा अंमल चालू आहे तिजवर पाय ठेवून श्वास घेणें म्हणजे तो नरकवास आहे. या देशाचा त्याग केला तरी पुरवला, पण या इंग्रजांचा संपर्क नको. हिंदु व मुसलमान हा भेद राहिलेला नसून, जेथें हिंदूंचें पाऊल तेथें आमचेंहि पाऊल पडेल ! व हिंदूंच्या मानेवर जो सुलतानी आघात होईल तो प्रथम आम्ही आपल्या मानेवर घेऊं." महात्मा गांधी यांच्याविषयीं तर ते गुरु व आपण शिष्य याशिवाय दुसरा शब्द त्यांच्या तोंडून निघत नव्हता. ते पादवंदन काय, ते प्रेमालिंगन काय, तें तीर्थसेवन काय, ती खादीची कफनी काय! तात्पर्य, हा थाट इतका माजला कीं, सीध्या मनाच्या माणसालाहि शंका उत्पन्न व्हावी ! व अखेर तीच शंका खरी ठरली !

पुष्कळ लोकांना तेव्हां क्षणभर असा भास होई कीं, म. गांधीरूपी जादूगार दरवेशानें अलीबंधूरूपी ही दोन वाघाचीं जाणतीं पिलें मोकळीं सोडून बरोबर बाळगलीं आहेत. तीं त्या दरवेशाचे पाय चाटतात, त्याच्या ओंजळींतून दूध पितात, त्याच्याभोंवतीं रात्रंदिवस खेळतात, नाचतात, बागडतात. राष्ट्रीय सभेच्या बैठकींवर या वाघाच्या पिलांनीं इतर लोकांना खुशाल चावा घ्यावा व नखांनीं ओरबडावें. परंतु जादूगार दरवेशी सन्निध असल्यामुळें कोणीहि या वाघाच्या पिलांच्या स्वैरसंचाराला हरकत घेण्याची सोय नव्हती. दरवेशाच्या भक्तीखातर या पिलांचें कौतुक करणें हा नुसता खेळ नव्हे तर तो गुरुसेवेचाच एक प्रकार होऊन बसला. मनांत नसलें तरी कित्येक हिंदी पुढाऱ्यांनीं या वाघाच्या पिलांचे पाय उचलून त्यांना गळ्याशीं धरावें, व त्यांनीं ओरबडून कोठें रक्त काढलें तर इकडे तें हळूच कोणाला न कळत हातरुमालाला पुसून इकडे तोंडानें हंसावें !

पण आज दहा वर्षांनीं काय स्थिति झाली आहे पाहा. त्याच वाघाच्या पिलांनीं उग्र रूप धारण केलें व दरवेशानें पाजलेलें सर्व दूध व खाऊ घातलेलें सर्व खाद्य विसरून जाऊन त्यांनीं दरवेशावरच उलटून चाल केली. अलीबंधूंनीं म. गांधी यांना 'हिंदु' हा शब्द लावून, आपल्या ठेवणींतील सर्वांत मोठी व म. गांधींनाहि सर्वांत अधिक लागणारी शिवी दिली ! त्यांना तोंडावर झिडकारलें, अपमान केला, व जुना ऋणानुबंध सगळाच्या सगळा तोडून टाकला हें दर्शविण्याकरितांच की काय, महात्मा गांधींचें आवडते जे स्वराज्यसाधनाचें कार्य त्यांत नेमक्या वेळीं त्यांना अलीबंधूंनीं विरोध करून इंग्रजांपुढें फजित केलें. तसेंच सात आठ वर्षें सुवर्ण–अक्षरांनीं गिरविलेल्या स्वतःच्या राष्ट्रीयत्वाच्या ब्रीदाला धर्मद्वेषाचें काजळ इतकें फासलें कीं, तें पुसून जाऊन त्याखालून फिरून निर्मळ राष्ट्रीयत्वाचें दर्शन होणें अशक्य करून ठेवलें. अलीबंधू हे स्वराज्यवादी अशा म. गांधींचे वैरी, व स्वराज्यविरोधक अशा इंग्रजांचे जिगर दोस्त—असें चित्र जगाच्या डोळ्यांपुढें आज

उभें आहे. आणि हें सर्व कशाकरितां ? तर ज्या कौन्सिलांत जाणें हराम आहे असे फतवे निघाले, केवळ ज्या कौन्सिलांत प्रवेश केला म्हणून, अरबी दरवेशाचा पोषाख करून वरच्या गॅलरींतल्या बसल्या जागेवरून, अलीबंधूंनी बाहेर ऐकूं जाण्याइतकें हंसून अनेक सज्जनांचा उपहास केला, त्या कायदे-कौन्सिलांत म. गांधी हे जितक्या जागा देतात त्यांपेक्षां चार अधिक मिळाव्या म्हणून !!

अस्पृश्य वर्गासंबंधानेंहि असेंच प्रचंड स्थित्यंतर झालेलें आहे. म. गांधी यांनीं ज्या अतुल कर्तृत्वानें खिलाफतीची चळवळ राष्ट्रीय सभेंत घुसवली, त्याच अतुल कर्तृत्वानें त्यांनी अस्पृश्यविमोचनाची चळवळहि घुसविली. खरें बोलावयाचें तर म. गांधी यांनीं अवघ्या दहा वर्षांत अस्पृश्यता घालविण्याचें जितकें कार्य केलें तितकें कोणत्याहि शंभर हिंदू पुढाऱ्यांनीं मिळून केलेलें नव्हतें; किंवा करूं शकले नाहींत. अस्पृश्यतानिवारणाचे जुने स्मृतिग्रंथ उपलब्धच होते, पण केवळ गांधींच्या चळवळीमुळें ते विस्मृतीच्या रसातळांतून वर निघाले. गांधींच्या प्रेरणेनेंच अनेक सनातनी लोक अस्पृश्यांच्या बाबतींत मतपरिवर्तन पावून त्यांनी त्याकरितां सजातीयांचे बहिष्कार सोसले. राष्ट्रीय सभेसारख्या राजकीय परिषदेकडून "अस्पृश्यता हा हिंदू समाजावरील डाग आहे" अशा चरचरीत तापलेल्या शब्दांनीं, या लोकोत्तर वैष्णवाचार्यानें आपल्या कपाळावर दिलेला डाग ज्याच्यावरील प्रेमामुळें हिंदू समाजानें सोसला; ज्याच्या उपदेशानें सार्वजनिक स्थळें व प्रसंग यांत उरलेली अस्पृश्यता समूळ नाहींशी होण्याच्या मार्गाला लागली; आणि ज्याच्या प्रेरणेनें कांहीं थोडीं तरी देवालयांचीं कवाडें अस्पृश्यांना खुलीं होऊन इतरहि बिजागिरीवर करकरूं लागलेलीं असून, त्यांतून किलकिली का होईना पण पलीकडे नजर पोचूं लागली—तात्पर्य, ज्याला अस्पृश्यांनीं आपला उद्धारक देव म्हणावें त्याला, अंबेडकरासारख्या अविचारी गृहस्थाच्या शिकवणीनें, दैत्य किंवा दानव म्हणण्याला तयार व्हावें याहून दैवाची लीला आणखी अगाध ती काय ?

भावी स्वराज्यघटनेंत आपल्या जातिबांधवांना योग्य तें स्थान व यथाप्रमाण जागा मिळाव्या या मुसलमानांच्या किंवा अस्पृश्यांच्या आकांक्षेला आह्मी नांवें ठेवूं इच्छीत नाहीं. पण कोणीहि इतकें खास ह्मणेल कीं म. गांधींना मुसलमानांनीं व अस्पृश्यांनीं जसें वागविलें, किंवा कोळशाच्या राशींवरून जसें ओढलें, तसें त्यांनीं ओढावयाला नको होतें. अस्पृश्यांतर्फे कदाचित् इतकें तरी म्हणतां येईल कीं, म. गांधी यांनीं त्यांच्या वेगळ्या मतदारसंघाच्या मागणीला विरोध केलाच, पण संयुक्त मतदार संघामध्यें लोकसंख्येच्या प्रमाणानें राखीव जागा ठेवण्यासहि हरकत केली. बॅ. आंबेडकर यांनीं जाहीरपणें केलेल्या या आरोपासंबंधानें म. गांधींचा खुलासा काय होता किंवा आहे हे दुर्दैवानें नीटसें बाहेर प्रसिद्धीस आलें नाहीं. तथापि हिंदू सभेनें तरी या राखीव जागांना संमति दिली होती. त्यानें समाधान पावून, गांधींच्या नकाराचा दिसतो याहून कांहींतरी अधिक मार्मिक अर्थ असावा असें अस्पृश्यांनीं ओळखावयास पाहिजे होतें. केवळ जातवार मतदारसंघ मागण्याकरितां, म. गांधी हे अस्पृश्यांचे हाडवैरी आहेत असें जगाला भासविण्याचें कांहींच कारण नव्हतें.

पण जी गोष्ट अंबेडकरप्रमुख अस्पृश्यांची तीच अलीबंधूंची व मुसलमानांची. किंबहुना त्याहूनहि वाईट. स्वार्थानें त्यांना उपजत अंधाहूनहि अधिक अंध बनविलें. कारण त्यांचें अंधत्व वेगळ्या प्रकारचें असतें तर, डोळसपणाच्या काळीं म. गांधींनीं त्यांच्यावर केलेल्या उपकाराच्या दृश्याचा एकादा कोनाकोपरा तरी त्यांच्या आंधळ्या डोळ्यापुढें उभा राहून त्यांच्या शिवराळ जिभेला खीळ घालता ! असो, दहा वर्षांपूर्वी अलीबंधू हे कोठें तरी होते; पण अंबेडकर कोठेंच नव्हते. तथापि असा कोणता चमत्कार आहे कीं, जो इंग्रजप्रभूची कृपा करून दाखवूं शकणार नाही? म्हणून तोच चमत्कार बंदर किनाऱ्यावर गेल्या शुक्रवारीं विलायतची टपाल बोट आल्यावर लोकांना दिसला. म्हणजे शौकत अली व अंबेडकर यांनीं एकाच पीठावर विराजमान होऊन गांधींना मनसोक्त दोष दिला, व या निंदकांच्या जयजयकारानें वातावरण दुमदुमून गेलें !

पूर्वी कोकोनाडा येथील राष्ट्रीय सभेंत छोटे अलीबंधू, म्हणजे महंमदअली, यांनीं अशी जाहीर सूचना केली होती कीं, अस्पृश्य समाज हा निम्मा हिंदूंनीं व निम्मा मुसलमानांनीं वांटून घ्यावा. म्हणजे मिळकतीची वांटणी झाल्यानें जसें भावाभावांचें भाऊबंदकीचें भांडण संपतें तसें एका बाबतींत तरी हिंदु व मुसलमान यांचें भांडण संपेल. महंमदअली यांनीं निम्या अस्पृश्य समाजाला आपल्या हृदयांत जागा दिली; पण शौकतअली हे वयानें व शरीरानें महंमदअलीपेक्षां जितके मोठे तितकेच मनानेंहि अधिक उदार दिसतात. ते कदाचित् अस्पृश्यांच्या सगळ्याच्या सगळ्या समाजाला आपल्या हृदयांत स्थान देण्याला तयार असावे. तेव्हां डॉ. आंबेडकर यांनीं त्याहि दृष्टीनें वाटल्यास बड्या भाईच्या हृदयाचा ठाव पाहावा.

# हें चित्र पाहा आणि तें चित्र पाहा

फर्ग्युसन कॉलेजांतील एका विद्यार्थ्यानें गव्हर्नर-साहेबांवर गोळी झाडण्याचा प्रयत्न केला ही गोष्ट प्रि. महाजनी यांची शिस्त ढिली म्हणून झाली असा आरोप आहे; व श्रीछत्रपति करवीरकर महाराज यांनीं या गोष्टीचा गवगवा करून कॉलेजवर सरकारी नियंत्रण पाहिजे अशा वाडियासाहेबांच्या सूचनेस अनुमोदन दिलें आहे! पण या बाबतींत जनतेनें एक प्रश्न विचारण्यासारखा आहे. तो असा कीं, कोल्हापूर लायब्ररीच्या समारंभास रा. न. चिं. केळकर हे निमंत्रणावरून गेले असतां, कॉलेजचे प्रिन्सिपाल हे अध्यक्ष असलेल्या सभेंत केळकरांचे अंगावर एका विद्यार्थ्यानें अंडीं फेकलीं, त्याबद्दल कोणीं कोणास दोष दिला? माझ्या समजुतीप्रमाणें कॉलेजचे प्रिन्सिपॉल प्रो. बाळकृष्ण यांना तर ढिल्या शिस्तीबद्दल अधिकाऱ्यांनीं जबाबदार धरलें नाहींच, पण या अत्याचारी मुलाला तरी प्रिन्सिपाल यांनीं काय शिक्षा केली?

अंडीं-फेकीच्या प्रकारांत कांहींच दोषास्पद नव्हतें असें म्हणावें तर, त्याच संध्याकाळीं कोल्हापूरचे चीफ पोलीस ऑफिसर व खुद्द रा. ब. दिवाण-साहेब यांनीं केळकरांच्या बिऱ्हाडीं जाऊन झाल्या प्रकाराबद्दल माफी मागितली. असें असतां विद्यार्थ्याला मात्र कांहींच शिक्षा झाली नाहीं! फर्ग्युसन कॉलेजांतील गोगटे यास आठ वर्षांची कैद झालीच, पण खालीं आरडाओरड करणारी दोन मुले उमगलीं त्यांचेहि परीक्षेचें एक वर्ष प्रिन्सिपॉल महाजनी यांनीं आपण होऊन बुडवून शिक्षा केली. असें असतां आतां 'शिष्यापराधे गुरुर्दण्ड्यः' या न्यायानें महाजनीवरच काय पण कॉलेजवरहि गदा आणण्याची कुटिल कारवाई सुरू आहे. तरी विद्यार्थ्यांचा स्वभाव काय असतो व त्याचा दोष कोठवर नेऊन लावणें योग्य वा अयोग्य होईल, याविषयीं करवीरकर छत्रपतींनीं सारासारविचार करावयास पाहिजे होता. कोणालाहि आपल्या पायाखालीं जळतें त्याची घाण न येतां त्याला दीडशेंदोनशें मैलांवर धुमसणाऱ्या भुसकटाची घाण आली तर त्यानें इतर कोणाचें घ्राणेंद्रिय उसनें घेतलें असेंच म्हणावें लागत नाहीं काय?

**एक विद्यार्थी.**

# लाठीहल्ला कायदेशीर आहे काय?

सध्यां हिंदुस्थानांतलि शहरोशहरीं वटहुकुमांच्या अमलाखालीं लाठीहल्ले होत आहेत. ते कायद्याच्या कसावर घासून मद्रास ॲडव्होकेट असोसिएशनच्या कौन्सिलानें पुढील मत प्रगट केलें आहेः—

(१) बेकायदा जमाव किंवा सामाजिक शांततेला धोक्यांत आणणाऱ्या पांच अगर त्याहून अधिक माणसांचा जमाव यांना उधळून लावण्यासाठीं पोलिसांनीं दंडुकेशाही गाजवावी असा नवा अधिकार त्यांना नुकत्याच निघालेल्या वटहुकुमांनीं दिलेला नाहीं.

(२) सभा-विध्वंसाला आधार फक्त क्रि. प्रो. कोडाच्या १२८ व्या कलमाचा. त्याच्या अन्वयें, इं. पि. कोड १४१ व्या कलमांत सांगितलेल्या हेतूनें प्रेरित झालेल्या किंवा समाजाची शांतता मोडणाऱ्या पांच किंवा अधिक माणसांचा जमाव उधळून लावतां येतो.

(३) एखादा जमाव उधळून लावण्यापूर्वी त्या जमावानें हुकूम केल्यावर निघून जाण्याचें नाकारलें असलें पाहिजे किंवा हुकूम केलेला नसला तरी त्या जमावाच्या वर्तनावरून त्याचा तेथून न हलण्याचा निर्धार प्रगट झालेला असला पाहिजे.

(४) एक व्यक्ति किंवा पांचांपेक्षां कमी माणसांचा जमाव यांना क्रि. प्रो. को. १४९ प्रमाणें दंडुक्यानें हुसकतां येत नाहीं. क्रि. प्रो. को. १५८ व्या कलमानुसार होणारा प्रतिबंध मोडल्यास, त्या इसमांना त्यांनीं केलेल्या गुन्ह्यासाठींच पकडतां येतें.

### कायदेशीर निरोधन

(५) १९३२ च्या ५ व्या वटहुकुमान्वयें व्यापारधंद्याच्या ठिकाणाजवळ पांचांनीं किंवा अधिकांनीं निरोधन करणें गुन्हा ठरला आहे. म्हणून तसा जमाव बेकायदा झाला आहे. १२८ व्या कलमानुसार पांचांपेक्षां कमी माणसें निरोधन करीत असतील तर त्यांना लाठीनें हुसकतां येणार नाहीं.

(६) केवळ कुतूहलानें किंवा सहजगत्या हजर असलेले पण प्रत्यक्ष कार्यक्रमांत भाग घेत नसलेले इसम बेकायदा जमावाचे किंवा हुसकल्या जाणाऱ्या जमावाचे सभासद म्हणून गुन्हेगार होत नाहींत.

(७) पांचांपेक्षां कमी निरोधक आणि केवळ प्रेक्षकांचा घोळका यांच्यामुळें बेकायदा जमाव होऊं शकत नाहीं व त्यावर लाठीहल्ला करणें समर्थनीय ठरत नाहीं.

( ८ ) निरोधनाच्या एकाच हेतूनें प्रेरित झालेले पण जमाव न होईल अशा बेतानें पांगून पांगून काम करणारे इसम यांच्यावर निरोधनस्थळीं लाठीहल्ला करतां येत नाहीं व त्यांना एकत्र आणूनहि त्यांच्यावर लाठी चालवितां येत नाहीं.

**लाठीला मज्जाव !**

( ९ ) जेव्हां लाठी चालवावयाची, तेव्हां ती अगदीं माफक प्रमाणांत व जमाव मोडण्याइतपतच चालविली पाहिजे.

( १० ) कोणत्याहि जमावांतील लोक निघून जात असतील तर त्यांना लाठीनें बडवितां कामा नये आणि त्यांचा पाठलागहि करतां कामा नये.

( ११ ) जरी बेकायदा जमाव जमलेला असला तरी, एखाद्या गुन्हेगाराला वेढून टाकणें, त्याला बडवून काढणें, तो जमिनीवर पडल्यावर शिक्षा म्हणून लाठीनें किंवा छडीनें त्याला चोपणें,हीं कृत्यें पोलिसांच्या अधिकाराबाहेरचीं होत.

या पत्रकावर पुढील गृहस्थांच्या सह्या आहेत— दि. ब. टी. आर. रामचंद्र अय्यर, दि. ब. टी. रंगाचारियर, टी. आर. व्यंकटराम शास्त्री, रा. ब. एस. वरदाचारियर, बी. सीताराम राव, के. व्ही. कृष्णस्वामी अय्यर, के.राजा अय्यर, व्ही.गोविंदराजाचारी, बी. पोकर, व्ही. व्ही. श्रीनिवास अय्यंगार, पी. एन. मार्तंडम् पिले.

# म्युनि. निवडणूक व अटकेंतील पुढारी

(ले. ना. वि. भोंडे, बी. ए. एल्एल्. बी. )

चौकशीवांचून कैदेंत ठेवलेले पुढारी यांस रिटर्निंग ऑफिसरसमोर हजर राहणें अशक्य असल्यामुळें त्यांच्या नेमणूकपत्रिका योग्य व कायदेशीर रीतीनें स्वीकारल्या जातील कीं नाहीं असा प्रश्न नुकताच उपस्थित झाला आहे व त्या अडचणीमुळें दे. भ. अण्णासाहेब भोपटकर, बाबूराव गोखले, न. वि. गाडगीळ यांना उमेदवार म्हणून उभें राहण्यास पंचाईत पडेल कीं कसें अशी पृच्छा होत आहे. हा प्रश्न सोडविण्याचे बाबतींत पुढील बाबी महत्त्वाच्या आहेत.

(१) पुणें शहर म्यु०चे निवडणुकीचे नियमावलीत प्रत्येक उमेदवारानें रिटर्निंग ऑफिसराचे स्वाधीन नेमणूकपत्रिका केली पाहिजे, असा नियम असून सूचक व अनुमोदक यांनीं जातीनें हजर असलें पाहिजे, अशी शर्त आहे. उमेदवारांनीं जातीनें नेमणूकपत्रिका हवालीं केली पाहिजे अशी अट नियमांत नसल्यामुळें त्यांनीं समक्ष हजर असण्याची आवश्यकता दिसत नाहीं.

(२) उमेदवार याचा अर्थ निवडणुकीसाठीं अर्ज करणारा इसम असा नसून निवडणुकीसाठीं नियोजित केलेला माणूस असा आहे.

A candidate means a person who has been nominated as a candidate at any election (Electoral Rule No. 30 framed under the Indian Election & Enquiries Act of 1920).

( ३ ) व म्हणून नेमणूकपत्रिका ही सूचक व अनुमोदक यांनीं भरलेली असते व त्याखालीं त्यांच्या सह्या असून, मी निवडून आल्यास सेवा करण्यास तयार आहे, एवढी फक्त प्रतिज्ञा अगर संमति पत्रिकेचे शेवटीं उमेदवाराची असते.

( ४ ) हिंदुस्थानांतील प्रांतिक अगर मध्यवर्ती कायदे–मंडळाचे निवडणुकीचे बाबतींतहि नेमणूकपत्रिका जातीनें देण्याची सक्ति नसून रजिस्टर पोस्टानेंहि पाठविण्याची उमेदवारास सवलत आहे. ( इलेक्टोरल रूल्स नियम नं. ३१ पहा. )

( ५ ) ब्रिटिश पार्लमेंटचे निवडणुकीस उभे राहणाऱ्या उमेदवारास नेमणूकपत्रिका प्रत्यक्ष द्यावी लागत नाहीं १८७२ चे बॅलट ॲक्टाप्रमाणें उमेदवार अगर सूचक अगर अनुमोदक ह्यांपैकीं कोणीहि नेमणूकपत्रिका रिटर्निंग ऑफिसरचे स्वाधीन केली तरी ती स्वीकारली पाहिजे. ( Halsbury's Laws of England, Volume 12 page 273 पहा ).

( ६ ) पुणें शहर म्युनिसिपालिटीचे निवडणुकीचे नियमांत Each candidate shall deliver to the Returning Officer a nomination paper असे शब्द आहेत व डिलिव्हर याचे जागीं कॉज टु बी डिलिव्हर्ड असे शब्द नसल्यामुळें उमेदवारानें जातीनें हजर राहिलें पाहिजे असा एक युक्तिवाद आहे. परंतु प्रांतिक कायदे मंडळें अगर मध्यवर्ती मंडळें अगर पार्लमेंट यांतील नेमणूकपत्रिका हवालीं करण्याचे बाबतींत डिलिव्हर हाच शब्द असून व Cause to be delivered असे शब्द नसूनहि जातीनें हजर राहण्याची कोठें अट नाहीं.

(७) एकंदर धोरण व नियम पाहातां नेमणूक-पत्रिका उमेदवारांनींच हजर केली पाहिजे अशी अट नाहीं. (Law relating to Election Chamber).

अशा स्थितींत चौकशीवांचून तुरुंगांत ठेवलेल्या इसमास (इतर हरकती नसल्यास) उमेदवार उभें राहण्यास हरकत नाहीं.

## श्री. करंदीकर व दिवेकर यांस शिक्षा

पुणें येथें ता. २९ जानेवारी रोजीं पेशावर-दिना-निमित्त श्रीशिवाजीमंदिरांतून केसरीचे संपादक व महाराष्ट्र प्रांतिक काँग्रेस कमिटीचे चौथे सर्वाधिकारी श्रीयुत जनार्दन सखाराम करंदीकर यांचे नेतृत्वाखालीं मिरवणूक निघाली होती. मिरवणुकींत सुमारें १०० स्त्रियांनीं भाग घेतला होता. शनिवारवाड्यापुढील 'बाजीराव' पटांगणांत ती मिरवणूक विसर्जन पावली. शनिवारवाड्यापुढें मिरवणूक थांबल्यावर तेथें श्री.ज.स. करंदीकर यांचे अध्यक्षतेखालीं जाहीर सभा भरली. श्री. करंदीकराचें भाषण झालें. सभेनंतर राष्ट्रगीतास आरंभ होतो तोंच रा. डी. डी. पाटील व भाऊराव थोरात या पोलीस अधिकाऱ्यांनीं श्री. तात्यासाहेब करंदीकर व रा. स्वामी यांना क्रि. लॉ अ.ॲक्ट १७ (१व २) प्रमाणें अटक केली. अटक करून उभयतां राजबंद्यांना ते फरासखान्याकडे नेऊं लागतांच त्यांच्यामागून हजारों लोक जाऊं लागले. श्री. करंदी-कराना फरासखान्यांत नेल्यावर बाहेर रस्त्यावर थोडेसें गडबडीचें निमित्त होऊन पोलिसांनीं तुरळक लाठी चालविली व लोकांचा जमाव मोडून काढला! तारीख १ फेब्रुवारी १९३२ रोजीं कँटोन्मेंट मॅजि-स्ट्रेट मि. वैद्य यांजपुढें श्री. करंदीकर यांचा खटला चालून त्यांना पहिल्या आरोपाबद्दल सहा महिने व दुसऱ्याबद्दल दोन वर्षे सक्तमजुरी व ५० रुपये दंड अशी शिक्षा ठोठावण्यांत आली व 'ब' वर्ग देण्यांत आला. दोनहि शिक्षा एकदमच भोगावयाच्या आहेत. रा. स्वामी यांनाहि वरीलप्रमाणेंच शिक्षा ठोठावण्यांत आली. तारीख २६-१ रोजीं 'मराठा' पत्राचे संपादक श्री. दिनकर वासुदेव दिवेकर यांना ६ म. स. म. व ५० रु. दंड होऊन त्यांना 'ब' वर्ग देण्यांत आला.

# स्फुट सूचना

१ हिंदुस्थानाच्या भावी राज्यघटनेची चर्चा हल्लीं जोरांत सुरू असल्यामुळे संस्थानांकडे सर्व जनतेचें लक्ष पूर्वी केव्हांहि होतें त्याहून अधिक लागावें यांत आश्चर्य नाहीं. या जनतेंत दोन प्रकारचे लोक असतात; एक संस्थानांचे हितचिंतक व दुसरे संस्थानांचे टीका-कार. पैकीं जो तो सहजच आपल्या सूक्ष्म दृष्टीनें पाहून, आशावादी हितचिंतक असेल तो गुण घेतो व कुत्सित टीकाकार असेल तो दोषतेवढा घेतो. अशा रीतीनें हल्लीं संस्थानांच्या पापपुण्याच्या गुण-दोषांची झडती सुरू आहे. त्या दृष्टीनें पाहातां ज्या संस्थानांनीं फेडरेशनमध्यें सामील होण्याचें जाहीर केलें त्यांच्याबद्दल ग्रह चांगला होतो; कारण यांत त्यांची व्यापक दृष्टि व स्वार्थत्यागबुद्धि दिसून येते. आमच्या समजुतीप्रमाणें महाराष्ट्रांतील बहुतेक संस्थानांनीं फेडरेशनमध्यें सामील होण्याला संमति दिली आहे. यानंतर प्रश्न येतो तो संस्थानिकांनीं आपल्या प्रजेला स्वराज्याचे कोणते हक्क दिले हा; व हे हक्क द्यावयाचे म्हणजे ग्रामपंचायती, लोकल बोर्डें व कायदेकौन्सिलें यांची रचना करून व शक्य तितका लोकमताचा व लोकसत्तेचा प्रवेश त्यांच्या-मध्यें करवून, लोकांच्या हिताचा कारभार लोकांच्या हातून करून घेणें हें होय. या दृष्टीनें पाहातां, कोल्हापुरापासून औंधपर्यंत नजर जाते. म्हणजे एका टोकास लोकमताला व लोकसत्तेला कांहींच वाव नसणारें कोल्हापूर, दुसऱ्या टोकाला पांच वर्षांत जबाबदारीचें स्वराज्य देऊं करणारें औंध संस्थान, या दरम्यान लोकनियुक्त तत्त्व सुरू करणारीं सांगली, फलटण, भोर हीं संस्थानें, कायदे-कौन्सिलची योजना नुसती मनांत आणून राहिलेलीं मिरजेसारखीं संस्थानें हीं नजरेत येतात. पण सर्व महाराष्ट्र हा एकच प्रांत असल्यानें, म्हणजे यांतील राजा व प्रजा यांची योग्यायोग्यता जवळ जवळ एकच असल्यानें, या सर्व संस्थानांतून साधारणतः एकाच स्वरूपाचीं कायदेकौन्सिलें निर्माण होणें अवश्य आहे. कोल्हापुरासारख्या संस्थानांनीं आम्ही लोकमताला मुळींच विचारणार नाही व लोकांना सत्ता मुळींच देणार नाहीं असा दुराग्रह यापुढें तरी चालवूं नये.

---

२ यानंतर तिसरी बाब म्हटली म्हणजे मुख्यतः सारावाढ, सूट, तहकुबी यासंबंधीं. सारावाढीची

मोष्ट आली म्हणजे प्रत्येक संस्थान असें म्हणत असतें कीं शेजारच्या संस्थानाहून आमच्या राज्यांत शेतसारा कमी आहे; व सर्व संस्थानें मिळून म्हणतात कीं शेजारच्या ब्रिटिश राज्याहून आमचा शेतसारा कमी आहे! उलट ब्रिटिश सरकारहि हेंच म्हणत असतें! म्हणून यांपैकीं कोणाचेंच म्हणणें निखालस खरें असें म्हणून जमेस धरतां येत नाहीं. पण कायमच्या साऱ्याकडे इतकें कोणी लक्ष देत नाहीं. फेर-तपासणी होईल तेव्हांच गवगवा होतो, एरवीं लोक आहे तो सारा विशेष तक्रार न करतां देत असतात. पण गुदस्तांसारखें किंवा यंदांसारखें वाईट वर्ष आलें म्हणजे अधिकाऱ्यांकडून जें वर्तन होतें त्यावरून अधिपतींच्या मनोवृत्तीची परीक्षा रयतलोक करतात. या बाबतींत औंध संस्थानानें यंदां ५१ हजार रुपये सूट दिली असें प्रसिद्ध केलें आहे; व हें खरें असल्यास लोक औंधकर संस्थानिक यांना बरें कां म्हणणार नाहींत? तरी या बाबतींत इतर संस्थानांनीं काय केलें हें कळण्याची जनतेला सहजच उत्सुकता वाटते.

---

३ भोर संस्थानापैकीं सुधागड तालुक्यानें अधिकाऱ्यांकडे प्रतिनिधी रा. दादासाहेब साने यांचेमार्फत निम्मी सूट मिळण्याविषयीं अर्ज केला आहे. त्याला एक उत्तर असें देण्यांत आल्याचें समजतें कीं, ४० वर्षांपूर्वी सर्व्हे सेटलमेंट केली तेव्हां धान्याचे जे दर होते त्यांपेक्षां हल्लींच्या वाईट दिवसांतहि ते दर थोडे चढेच आहेत. दुसरें उत्तर असें कीं, शेजारीं ब्रिटिश सरकार या बाबतींत जें करील तें भोर संस्थानहि करील! आमच्या मतें दुसरें उत्तर योग्य नाहीं. ब्रिटिश मुलखाचा दाखला घ्यावयाचा तर एवढ्याच बाबतींत कां? ब्रिटिश मुलखांत कायदे कौन्सिलचे जितके अधिकार प्रजेला आहेत तितके भोर संस्थानांत आहेत काय? तात्पर्य, ही विचारसरणी सोडून द्यावी. पहिलें उत्तर मुद्देसूद आहे. पण एक तर सुधागडची रयत म्हणते कीं, सेटलमेंटच्या वेळेपेक्षांहि हल्लीं दर खालीं गेले आहेत! अर्थात् यांतलें खरें-खोटें पुराव्यानेंच ठरणार. पण दर कमी नसतां थोडे चढे आहेत असेंहि घेऊन चाललें तरी, शेतीच्या बी-बियाणाचा, मेहनतमशागतीचा, मजुरीचा खर्च पूर्वीहून अधिक वाढला आहे त्याची वाट काय? आमच्या मतें संस्थानांनीं अशा गोष्टींत प्रजेविषयीं अधिक ममत्व दाखविलें तर राजकीय सुधारणा मागसलेल्या आहेत यांविषयींचा तगादा तितका निकडीचा होणार नाहीं. कारण खरोखर सुराज्य असलें म्हणजे स्वराज्याची तात्त्विक मागणी सहजच किंचित् ढिली पडते.

४ भोर संस्थानांत हिंदु-व्यवहारधर्मशास्त्राच्या सुधारणेबाबत प्रगति दाखवितां येण्यासारखीं दोन बिलें पास होऊन त्यांना कायद्याचें स्वरूप मिळालें ही आनंदाची गोष्ट होय. हिंदु विधवांना आपल्या मृत पतीचा हिस्सा इतर समाईक सहभागीदारांपासून विभागून घेण्याचा हक्क असावा; तसेंच आपल्या मुलीचा मुलगा, बहिणीचा मुलगा व मावशीचा मुलगा हे जवळचे नातेवाईक यापूर्वीच्या कायद्यानें दत्तक होण्याला अपात्र असत ते यापुढें पात्र ठरविले जावेत; अशा अर्थाचीं दोन बिलें रा. वाग्भट नारायण देशपांडे यांनीं गतवर्षी भोर-कायदेमंडळांत आणलीं होतीं. बरीच चर्चा होऊन हीं बिलें सिलेक्ट कमिटीकडे गेलीं. त्यांत दत्तकासंबंधीं बिल जशाचें तसेंच मंजूर झालें. पण विधवेच्या संविभागासंबंधीं बिलांत बऱ्याच सुधारणा होऊन, हल्लीं जें बिल सर्वानुमतें पसार झालें त्याचा इत्यर्थ असा कीं, " सहभागीदार मयत झाल्यास, त्याचा हिस्सा नक्की करून, त्या हिश्शाचें निवळ उत्पन्न अन्नवस्त्रादाखल मिळण्यासाठीं दावा करण्याचा विधवेस हक्क असावा. पण पोटगीची रक्कम वक्तशीर न दिल्यामुळें तीन वर्षांबद्दल दरखास्ती देणे भाग पडल्यास, सदर हिस्साच तिच्या ताब्यांत देण्याचा कोर्टास अधिकार असावा. मात्र विधवेचा मृत्यु, पुनर्विवाह अगर दुराचरण या तीन बाबतींत सदर मिळकत उत्तराधिकाऱ्याकडे जावी." सदर सुधारणेंत कांहीं दोष असले, म्हणजे हिंदु स्त्रीला मिळकतीचें स्वामित्व अगर विक्रयाचा अधिकार मिळूं नये, फक्त अन्नवस्त्र मिळावें, हे जुन्या पक्षानें आपलें म्हणणें तत्त्वतः कायम ठेवलें असलें, तरी विधवेला पतीचा हिस्सा नक्की करण्यासाठीं दावा करण्याचा हक्क देणें ही गोष्ट कबूल करून उभयपक्षांनीं सामोपचारानें या बाबतींत एक पाऊल पुढें टाकलें याबद्दल रा. वाग्भट देशपांडे व सिलेक्ट कमिटींतील इतर सभासद यांचें अभिनंदन केलें पाहिजे. इकडे असेंब्लींत या विषयाला नुकतेंच तोंड लागलें असतांना संस्थानांनीं सुधारणेचें पाऊल पुढें टाकून दाखविणें ही गोष्ट जितकी मनोरंजक तितकीच बोधप्रद आहे.

---

५ दडपशाहीचा मार हिंदुस्थानास गेला सबंध महिना सारखा बसत आला आहे. या मारानें हिंदुस्थान नरम आला कीं गरम झाला हें दरआठवड्याला सरकार पाहत असतें. त्यासंबंधाचा ताजा रिपोर्ट भारतमंत्री सर सॅम्युअल होअर यांच्या हातीं पडला असून त्यावरून हिंदुस्थानांतील चळवळ मागें हटत आहे असा सरसाहेबांनीं कयास काढला आहे. त्याला प्रमाण म्हणून ते

सांगतात कीं, सरहद्द प्रांतांतील लाल डगलेवाल्यांच्या चळवळीला हादरा बसला आहे. मुंबई व अहमदाबाद हीं पिकेटिंगचीं दोन प्रमुख केंद्रें; त्या केंद्रांतील चळवळ थंडावत आहे. आणि संयुक्तप्रांतांतील करबंदीस आळा पडून सरकारी वसूल हळूहळू सुरू आहे. दडपशाहीचा इतका गुण आल्याविषयीं मनांतून आनंदूनहि सर सॅम्युअल म्हणतच आहेत कीं, दडपशाही कडक असली तरी ती हात राखून व सारासार विचार करून निःपक्षपातीपणानेंच करण्यांत येत आहे! सॅम्युअल म्हणतात तो सारासार विचार, निःपक्षपातीपणा व नेमस्तपणा कोणता हेंच कळत नाहीं. जेथे गुन्ह्यावांचून अटक होते, मुलाच्या गुन्ह्याबद्दल बापाला प्रायश्चित्त मिळतें व लहान मुलांना निर्दयपणें फटके देण्यांत येतात तेथें नेमस्तपणा व सारासार विचार तरी काय उरला ?

---

६ सर सॅम्युएल होअर हे उद्दाम वृत्तीचे आहेत अशी खात्री त्यांनी भारतमंत्र्याचें पद स्वीकारल्यापासून केलेलीं अनेक भाषणें वाचून हिंदी लोकांची झालीच आहे. परंतु हा उद्दामपणा त्यांच्या परवांच्या भाषणांत पराकाष्ठेस पोंचला आहे. स्वतःच्या शहाणपणाविषयी घमेंड व हिंदी लोकमताविषयीं तुच्छता यांचा तो एक मासलाच आहे. हिंदुस्थानांत पुढील राजकीय सुधारणेच्या दृष्टीनें चौकशी करण्यास ब्रिटिश सरकारनें कमिट्या पाठविल्या आहेत. त्यांना आपलें काम समाधानकारक रीतीनें करण्यास सध्यांची वेळ फारच प्रतिकूळ आहे यांत शंका नाहीं. यासाठीं या वेळीं सरकार व काँग्रेसपक्ष यांचे दरम्यान सलोखा घडून आला असता तर तो हवाच होता. परंतु तो सलोखा ज्या पक्षाशीं राहिला नाहीं त्या कॉंग्रेस पक्षाविषयीं सर सॅम्युएल यांनीं वापरावयाची भाषा सभ्यपणासहि धरून नाहीं. कॉंग्रेसचीं कुत्रीं कितीहि भोकत राहिलीं तरी आमचा हत्ती आपल्याच गतीनें हिंदुस्थानांतून मिरवणार या आशयाचे सॅम्युएल यांचे प्रलाप आहेत. कॉंग्रेस इतकी थोर संस्था आहे कीं तिचा दर्जा सॅम्युएलसाहेबांच्या बडबडीनें बिलकुल कमी होणार नाहीं. त्यांत कमीपणा येत असला तर तो सर सॅम्युएल यांनाच येत असून त्यायोगानें त्यांनीं भारतमंत्रिपदासंबंधी आपली अपात्रताच सिद्ध केली आहे. गर्वाचें घर खालीं आल्यावांचून राहात नाहीं हा ढोबळ नियमहि त्यांना समजू नये काय ?

---

७ सर सॅम्युएल विशेष शेफारण्यास त्यांना माजी व्हाइसराय लॉर्ड आयर्विन यांची जोड बऱ्याच अंशीं कारण झाली आहे. लॉर्ड विलिंग्डन यांच्या हडेलहप्पी कारकीर्दीमुळें लॉर्ड आयर्विन यांच्या कारकीर्दीस आपोआपच भलेपणा लाभत आला. तो मिळवून त्यांनीं आपली मूठ झांकून ठेवली असती तर तिची किंमत सवा लाखाची होती. परंतु ते या घटकेस आपल्या स्वभावांतील दुर्बळपणास बळी पडले. सर सॅम्युएल व लॉर्ड विलिंग्डन यांस त्यांचा हा स्वभाव माहीत असल्यामुळें आपण हिंदुस्थानांत चालविलेल्या दडपशाहीस नैतिक पाठबळ मिळण्याकरितां त्यांनीं आयर्विनसाहेबांस भीड घातली असावी. त्या भिडेंत सांपडून आयर्विन यांनीं सर सॅम्युअल व लॉर्ड विलिंग्डन यांनीं हिंदुस्थानांत सांप्रत जो ताळ सोडला आहे तोच योग्य आहे असें आपलें मत दिलें आहे. लॉर्ड विलिंग्डन यांच्या ऐवजीं हिंदुस्थानाचे व्हाइसरॉय आपण असतों तर लॉर्ड विलिंग्डनप्रमाणेंच वागलों असतों असें आयर्विनसाहेब स्वच्छ सांगत आहेत! दुबळ्या व भिडस्त माणसानें देश बदलला म्हणून त्याचा स्वभाव थोडाच बदलणार आहे! या दृष्टीनें विचार केल्यास आयर्विनसाहेब हिंदुस्थानांत आज असते तर कसे वागले असते हें त्यांचें त्यांसहि सांगतां येईल असें आम्हांस वाटत नाहीं. तथापि या वेळीं तोंड उघडून त्यांनीं आपली किंमत मात्र कमी करून घेतली एवढें खरें.

---

८ पंडित मदन मोहन मालवीय हे विलायतेहून हिंदुस्थानास ता. १५ जानेवारी रोजीं परत आले. तेव्हांपासून गेला पंधरवडा त्यांचा मुक्काम मुंबईसच होता. मुंबईच्या या मुक्कामांत त्यांनीं देशांत वटहुकुमांनीं चालविलेला अनर्थ बंद पाडण्याच्या आणि म. गांधी व हिंदुस्थानसरकार यांजमध्यें सलोखा घडवून आणण्याच्या हेतूनें आपल्याकडून पुष्कळ प्रयत्न करून पाहिले पण त्यांतून कांहीं तात्डतोब निष्पन्न होत नाहीं असें आढळून आल्यावरून एक शेवटचा इलाज म्हणून व्हाइसरॉयांस त्यांनी बरेच लांबलचक पत्र पाठविलें आहे. या पत्रांत त्यांनीं गांधीजींची भेट न घेऊन कॉंग्रेससारख्या सर्वश्रेष्ठ संस्थेचा उपमर्द केल्याचा दोष व्हाइसरॉयांच्याच पदरीं बांधला आहे. वटहुकुमास कायदे-मंडळाची मंजुरी मिळविण्याची संधि असतां ती न घेण्यानें न्यायाच्या मूलभूत तत्त्वांचा खून होत असल्यामुळें हे वटहुकूम बिलाच्या रूपानें कायदेमंडळापुढें मांडावयास पाहिजेत अशी पंडितजींची सूचना आहे. वटहुकुमांनीं जनतेस हैराण करून ज्या सुधारणा सरकार देईल त्या भिकार असल्या तरी निमूटपणें मान वांकवून स्वीकारण्यास भाग पाडण्यास लावण्याचें सरकारचें धोरण असल्याविषयीं लोकांना संशय आला आहे. त्याचप्रमाणें वटहुकुमांच्या

बजावणीवर कायदेभंगाची चळवळ पोसली जाण्याचाहि संभव आहे. अशा स्थितीत पंडितजींच्या मतानें एकच मार्ग शिल्लक राहतो व तो हा कीं म. गांधी-प्रभृति पुढाऱ्यांना सन्मानपूर्वक सरकारानें सोडून द्यावें व त्यांच्या सहकार्यानें कमिट्यांनीं स्वराज्य विषयक वादग्रस्त मुद्द्यांचा निर्णय लावून घ्यावा. पं. मालवीय यांच्या या सूचना योग्यच आहेत. पण त्यांचा विचार करण्याच्या मनःस्थितींत व्हाइसरॉय व भारतमंत्री हे दोघेहि दिसत नाहींत. इतकेंच नव्हे तर सर सॅम्युएल यांनीं म. गांधींच्या पत्रास पूर्वीं उत्तर पाठविलें आहे त्यावरूनहि म. गांधींप्रभृति काँग्रेसच्या पुढाऱ्यांना हव्या त्या रीतीनें संरक्षक अटींचा विचार सरकार यापुढें करील असें अद्यापि वाटत नाहीं. अशा स्थितींत पं. मालवीय यांची शिष्टाई तूर्त तरी फुकट जाणार अशी भीति वाटते.

---

९ तेलिचेरी येथें तारीख २९ रोजीं भरन्याय-सभेंत प्रत्यक हिंदुमात्राच्या अंतःकरणाला घरें पाडणारा एक संतापजनक प्रकार घडून आला. तेलिचेरीच्या सब्-डिव्हिजनल मॅजिस्ट्रेटानें सौभाग्यवती एल. एस. प्रभु यांना ६ महिने सक्त मजुरी व १ हजार रुपये दंड अशी शिक्षा ठोठावली. कारागृह आणि दंड या दोनहि राजबंद्यांच्या जीवितांतील क्रमप्राप्तच गोष्टी असल्यानें त्याबद्दल स्वतः राजबंद्याला कधींच वाईट वाटत नाहीं. सौ. प्रभु यांनीं झालेली शिक्षा शांतपणें ऐकून घेतली. परंतु दंडाची रक्कम बाईनीं आपल्या कडोसरीस बांधून आणली नव्हती. कायद्याप्रमाणें मॅजिस्ट्रेटानें बाईंना दंड भरण्यास कांहीं दिवसांची मुदत तरी द्यावयास पाहिजे होती. परंतु वटहुकुमांचा कैफ ज्यांना चढलेला त्या मॅजिस्ट्रेटांना कायद्यांतील साधें व न्याय्य तत्त्व तरी कसें सुचणार ? त्यांनीं तेथल्या तेथें तो सर्व दंड वसूल करण्याचें ठरवून सौ. प्रभुबाईंना आपल्या अंगावरील सर्व दागदागिने भरचव्हाट्यावर काढून ठेवण्यास सांगितलें ! बाईनींहि मोठ्या धिम्मेपणानें ती सर्व चीजवस्त त्यांच्या स्वाधीन केली. अंगावर एखादा मणी राहिला असेल तर तें म्हणजे बाईच्या गळ्यांतील सौभाग्यदर्शक मंगळसूत्र होय.

---

१० मॅ.मि. डॉवेल यांनीं तें मंगळसूत्रहि आपल्या हवालीं करण्याबद्दल बाईंना फर्मावलें ! मंगळसूत्र हें सौभाग्यचिन्ह असल्यानें पति जिवंत असेतों हिंदु स्त्रीला तें काढतां येत नाहीं असें बाईनीं परोपरीनें सांगितलें असतांहि मॅजिस्ट्रेटानें आपल्या कॉन्स्टेबलला ते हिसकविण्यास सांगितलें. 'सा तेन च समाधूता दुःखेन च तपस्विनी' अशी द्रौपदीप्रमाणें आपली शोचनीय अवस्था होऊं नये म्हणून बाईनीं स्वतः आपल्या मैत्रिणीकडून मंगळसूत्र काढवून त्या दुराग्रही मॅजिस्ट्रेटापुढें फेंकून दिलें ! उपर्युक्त हकीकत वाचून तर प्रत्येक हिंदु स्त्रीच्या अंतःकरणाचें पाणीच होईल. एवढ्याशा मंगळसूत्रानें दंडाच्या रकमेची भरती होणार होती असें नाहीं. पण एरवीं मॅजिस्ट्रेटाचा खुनशी स्वभाव कसा दिसावा ? एका साध्वी स्त्रीचें भरकोर्टांत मंगळसूत्र काढवून मॅजिस्ट्रेटानें हिंदूंच्या पवित्र भावनांवर जो हल्ला चढविला त्याबद्दल प्रत्येक हिंदु त्याचा सहस्रशः धिक्कारच करील. सध्यां हें प्रकरण मद्राससरकारच्या न्यायमंत्र्याकडे रुजू करण्यांत आलें आहे. ते तरी या हल्ल्याची कसून चौकशी करून सदर उन्मत्त मॅजिस्ट्रेटाला चौकशीच्या पिंजऱ्यांत सरकार खेंचील काय ?

---

११ गेल्या गुरुवारीं मुंबई येथील एका न्यायमंदिरांत जो प्रकार घडला, तो वाचून आपण इसवी सनाच्या विसाव्या शतकांत नांदत आहों कीं त्यापूर्वीच्या विसाव्या शतकांत वावरत आहों असा कोणासहि भ्रम पडेल ! फटक्यांची शिक्षा रानटी व टाकाऊ अशी सर्व देशांत मानण्यांत येते, आणि खुद्द इंग्लंडांतहि बलात्कारादिक घोर गुन्ह्यांशिवाय तिचा उपयोग करीत नाहींत. एवढेंच नव्हे तर १८ वर्षांच्या आंतील मुलानें कोणताहि अपराध केलेला असला तरी त्याला फटक्याची सजा देऊं नये अशा आशयाचें एक बिल येत्या फेब्रुवारींत पार्लमेंटापुढें येणार आहे. असें सदयतेचें वारें जगाच्या कोनाकोपऱ्यांतून वाहत असतां, मुंबई येथील एक मॅजिस्ट्रेट मात्र चौदा-पंधरा वर्षें वयाच्या एका मुलाला १२ फटक्यांची शिक्षा ठोठावतात. एवढेंच नव्हे तर, तिची अंमलबजावणी कांहीं वेळानें दुसऱ्या जागीं न होऊं देतां आपल्या न्यायमंदिरांतच आपल्या डोळ्यासमोर करवून घेतात यास काय म्हणावें ? त्या मुलाचा अपराध काय ? खून, बंड, बलात्कार यांपैकीं मुळींच नाहीं! एका बँकेमध्यें लोकांना जाऊं नका म्हणून सांगणें, हाच काय तो श्री. चंद्रकांत जोशी याचा गुन्हा ! त्याबद्दल भरकोर्टांत त्या १५ वर्षांच्या मुलाला तिकाटणीला बांधून त्याच्या उघड्या कुल्ल्यावर वेताचे एकामागून एक बारा फटके ओढण्यांत आले. हें पाहून प्रत्यक्ष न्यायदेवताहि डोळे झांकून घेतल्याशिवाय राहिली नसेल.

# असेन गुणा उणा ! पण मला भला म्हणा !

अवघ्या एका महिन्यांत सरकारच्या दडपशाहीनें साऱ्या देशभर इतका कहर करून सोडला आहे कीं त्यामुळें प्रत्येक हिंदी मनुष्याचें अन्तःकरण दुःख, उद्वेग व संताप या भावनांनीं व्याप्त होऊन गेलें आहे. इंग्रजी राज्य व त्यापूर्वींचीं हिंदुस्थानांतील राज्यें यांची तुलना करून इंग्रजांचीं न्यायकोर्टें, त्यांचे सूक्ष्म कायदे व त्या कायद्यांना धरून मिळणारा न्याय यांच्या चोखपणाविषयीं हिंदी लोक माना डोलवीत; किंबहुना त्यांतील एकंदर सुयंत्र व्यवस्था पाहून चकितहि होत. इतकेंच काय पण एखादा मनुष्य दुसऱ्यास अन्यायाची किंवा जुलमाची जाणीव करून देत असतां 'इथें काय मोगलाई लागली आहे होय?' असा त्याला विश्वासपूर्वक उलट सवालहि करी. ही स्थिति कशीबशी १९३१ सालअखेर कायम होती. पण १९३१ साल संपून १९३२ साल उजाडल्यापासून, एका जानेवारी महिन्याच्या आंतच, हिंदुस्थानांत एवढें विलक्षण स्थित्यंतर घडून आलें आहे कीं, या कडेकोट बंदोबस्तांतील जुलमी अमलापेक्षां ढिला व विस्कळित मोगली अम्मल पुरवला असें म्हणण्याची पाळी जनतेवर आली आहे.

बोलके असून मुके बनलेले वक्ते व हात असून थोटे बनलेले लेखक हा चमत्कार जर जगांत पाहावयाचा असेल तर, तो हिंदुस्थानांत येऊन पाहावा अशी जाहिरात इंग्रज सरकारनें मोठ्या फुशारकीनें इतर देशांतून फडकविण्यास आतां मुळींच हरकत नाहीं ! लो. टिळक यांच्यावर पहिला राजद्रोहाचा खटला होऊन इंडियन पिनल कोडाच्या १२४ कलमांत फरक करण्यांत आल्यानंतर, त्याचा जाचकपणा दाखविण्याकरितां ते म्हणत कीं, "या कलमाच्या कदरीखालीं वर्तमानपत्र चालविणें म्हणजे तारेवरील कसरत करण्याइतकें कठिण होय." पण तो १२४ अ कलमाचा पाश पुरवला असें वाटावयास लावण्याजोगा ऑर्डिनन्सचा कांटेरी यमपाश लेखकांच्या व वक्त्यांच्या मानेभोंवतीं आतां आवळला असल्यानें, सद्यःस्थितींत वर्तमानपत्रांचे जीवित अनेक तलवारींच्या टोकावर छाती ठेवून तिचा भेद न होऊं देणाऱ्या कसरतकाराइतकें अवघड झालें आहे. सर्वसामान्य लोकांसहि ऑर्डिनन्सच्या जुलमाचे चटके बसत आहेत.

सामान्य दुकानदारांचीहि तीच स्थिति. आपलें दुकान बंद करण्याचा कोणाहि दुकानदाराला नैसर्गिक हक्क आहे. प्रसंगविशेषीं दुकानें बंद ठेवण्याची सर्वत्र वहिवाट आहे, व ती पाळल्यापासून आर्थिक नुकसान होत असलें तर दुकानदारांचेंच होणार. त्याबद्दल तक्रार करण्याचें सरकाराला किंवा इतरांना कांहीं कारण नाहीं. परंतु ज्याच्याविषयीं शहरांतील लोकांना प्रेम व आदर वाटतो अशा मनुष्यास कायदेभंगाच्या चळवळींत तुरुंगवास घडला असतां, त्याच्याविषयीं सहानुभूति बाळगणारांनीं क्वचित् आपलीं दुकानें बंद करणें हाहि गुन्हा समजला जाऊं लागला आहे. यापेक्षां सरकारी अधिकाऱ्यांची बुद्धि बावरल्याचें दुसरें प्रमाण काय पाहिजे ? एखाद्या मनुष्यानें कायदा मोडला म्हणून तो माणसांतून उठला, पशुकोटींत किंवा राक्षसकोटींत जाऊन पडला असें समजावयाचें काय? आपल्या इष्टमित्रांसंबंधीं मनांत उत्पन्न झालेली सहानुभूति व्यक्त करण्यासहि अशी बंदी होऊं लागल्यानंतर, प्रत्यक्ष गुलामगिरींत व हिंदी लोकांच्या हीन दीन स्थितींत फरक तो काय राहिला? आतां "आम्ही सांगूं तेव्हांच लोकांनीं हंसलें पाहिजे, आम्ही हुकूम सोडूं तेव्हांच लोकांनीं रडलें पाहिजे, व आम्ही कळवूं तेव्हांच लोकांनीं आपल्या चुली पेटविल्या पाहिजेत," एवढेंच नोकरशाहीनें जाहीर करावयाचें उरलें आहे !

इंग्रज सरकारच्या या अविचाराच्या धोरणामुळें त्यांनीं गेल्या शंभर-सवाशें वर्षांत आपल्या न्यायीपणाविषयीं जो लौकिक संपादन केला तो अवघ्या एका महिन्यांत धुळीस मिळविला आहे. कोवळ्या मुलांना फटक्यांच्या शिक्षा, क्षुल्लक व काल्पनिक गुन्ह्यासाठीं दीर्घकाल तुरुंगवास, हजारों रुपयांचे दंड, आणि दंड वसूल करण्याकरितां घरांतील सामानाचे तावडतोब लिलाव, इत्यादि गोष्टींनीं हिंदी लोकांना आपल्या असहाय स्थितीची खात्री पटवून दिली आहे. 'राजानें लुटलें व पावसानें पिटलें तर जाणार कुठें?' या लौकिक म्हणीचा प्रत्यय आज पावलोपावलीं येत आहे. मॅजिस्ट्रेटांचीं कोर्टें या शिक्षा देण्याच्या निवळ चक्क्या बनल्या आहेत. एका दारानें कोणाहि मनुष्यास आरोपी म्हणून कोर्टांत घालावें, व दहा मिनिटांच्या अवधींत त्याजवर बंदिवानाचा शिक्का मारून दुसऱ्या दारानें बाहेर टाकावें हा प्रकार नित्य सुरू आहे.

पण या दडपशाहीच्या अमदानींत काय काय प्रकार घडत आहेत याची सविस्तर यादी देत बसण्याचें कारणच नाहीं. ते प्रकार सर्वांच्या प्रत्यक्ष निदर्शनासच येत आहेत, व त्यांपैकीं पुष्कळांना त्यांचें दुःख जातीनें भोगावें लागत आहे. पण या सर्व किंवा कांहीं लोकांना माहीत नाहीं अशी एक गोष्ट आहे. ती ही कीं, इतकें सर्व होत असूनहि सरकार उलट लोकांवरच मनांतून नाखूष आहे. शेळी जिवानिशीं गेली

तरी काय हरकत? पण खाणाराला ती वातड लागण्यासारखी भाजली जावी म्हणजे काय? सरकारची तक्रार अशी दिसते कीं, "देशाकरितां आम्ही दडपशाहीचा इतका उद्योग करतों, व इतकी यातायात सोसतों, तरी कांहीं ठराविक वर्गाशिवाय इतर जनता स्वयंस्फूर्तीनें पुढें येऊन आम्हाला कृतज्ञता दर्शवीत नाहीं, राजनिष्ठा प्रगट करीत नाहीं, किंवा आमचा भलेपणा वाखाणीत नाहीं. तेव्हां या लोकांना अज्ञानी किंवा बेअकली किंवा दुर्दैवी—काय म्हणावें तरी काय?"

या लेखाला मथळ्यादाखल दिलेल्या म्हणीप्रमाणें सरकारची आज स्थिति झालेली आहे. त्यांचेजवळ ईश्वराची सत्ता आहे, कुबेराची मत्ता आहे; शेषाचें बळ आहे, बादशहाचें दळ आहे, सर्व कांहीं आहे. तथापि एका गोष्टीनें सरकार उपवर मुलीसारखें मनांतून झुरणीला लागलें आहे. ती ही कीं 'आम्हांला कोणी भले म्हणत नाहीं!' हें झुरणें आज एक महिनाभर सरकारच्या मनांतल्या मनांत होतें. पण आतां तें निरनिराळ्या मार्गांनीं प्रगट होऊं लागलें आहे. उपवर मुलगी, मर्यादा संभाळून का होईना, आपल्या आईजवळ लग्नाची गोष्ट हळू हळू पर्याया-पर्यायानें काढते. त्याप्रमाणें अनुकूल लोकमताची आकांक्षा धरणाऱ्या सरकारानें समाजांतील निरनिराळ्या वर्गांच्या पुढाऱ्यांजवळ आपल्या दुःखाची ही गोष्ट काढण्यास सुरुवात केली आहे. या वर्गाशीं बोलतांना सर्व प्रकारची भाषा, माणस पाहून, अधिकारी मोठ्या तारतम्यानें बोलतात. भित्रा दिसला तर त्याला भिववितात, धीट दिसला तर स्वतः धट्ट बनतात, स्वार्थी दिसला तर त्याला आमिष दाखवितात, निःस्वार्थी दिसला तर त्याला तत्त्वज्ञान सांगतात, आणि वावदूक दिसला तर त्याला वादानेंच दमवितात.

पण कोणाशींहि बोलावयाचें असतां, त्यांच्या नीरस गाण्याचें पालुपद हेंच असतें कीं, "बाबांनों, आम्ही कांहीं असलों, कसेहि असलों, तरी सरकार आहों. कायदा म्हटला म्हणजे त्याची अंमलबजावणी हें आमचें काम आहे. उलट प्रजा म्हटली म्हणजे कायदा पाळणें हें तिचें काम आहे. आणि शांततेचा भंग न होणें ही गोष्ट तर दोघांच्याहि सारखीच फायद्याची आहे. कायदा व शांतता यांची फलश्रुति तुम्हाला माहीतच आहे कीं 'विद्यार्थी लभते विद्यां, धनार्थी लभते धनं.' फक्त 'पुत्रार्थी लभते पुत्रान, मोक्षार्थी लभते गति' इतकेंच काय तें त्यांना म्हणतां येत नाहीं. पण स्वार्थांतून परमार्थ व प्रपंचांतून मोक्ष प्राप्त होण्यासारखा असतो, असा युक्तिवाद कोणीं सुचविला तर ऑर्डिनन्सच्या अमलामुळें तेंहि साधण्यासारखेंच आहे असलें तत्त्वज्ञान स्वीकारून उपदेशिण्यास त्यांची सहज तयारी होईल. स्वराज्य-प्राप्तीच्या आकांक्षेमुळें लोकांच्या मनांत अशांतता कितीहि उचंबळो, पण ऑर्डिनन्सेसनीं प्रस्थापित होणाऱ्या शांततेंत सुखानें विद्या संपादन करतां येते; तसेंच ऑर्डिनन्सेसमुळें बहिष्काराला बंदी झाली तर परदेशी मालाचा व्यापार जोराचा होईल, आणि कोणत्याहि मालाचा का होईना व्यापार जोराचा झाला म्हणजे द्रव्यलाभाचें तें फारच मोठें साधन होय. विद्या व धनलाभ यांनींच अभ्युदय होतो, व अभ्युदय हीच निःश्रेयसाची पहिली पायरी होय."

पण स्वार्थ परमार्थ हीं दोनहि बाजूला ठेवलीं तरी, नागरिक या नात्यानें प्रजाजनांचें म्हणून कांहीं कर्तव्य आहेच कीं नाहीं? "आम्हा राज्यकर्त्यांना तुमच्या स्वार्थ-परमार्थाशीं कांहीं कर्तव्य नाहीं. पण तुम्ही आपलें राजकीय कर्तव्य करतां कीं नाहीं यांत आम्हांला लक्ष घातलेंच पाहिजे. व तें कर्तव्य हेंच कीं, सरकार जें जें करतें ते ते बरें म्हणावें व हल्लीं होणाऱ्या चळवळीचा निषेध करावा." प्रत्येक सरकारी अधिकाऱ्यानें हें केलें पाहिजे हें सांगावयासच नको. पण खासगी लोकांनाहि सरकारचा असा सवाल आहे कीं तुम्ही झालां तरी हें करतां कीं नाहीं बोला. नाहीं तर तुम्हाला अराजनिष्ठ ठरवूं! अशा प्रकारें लोकांना बोलबोलावून सांगावें असे वटहुकूमच वरिष्ठ सरकाराकडून प्रांतिक सरकारांना व प्रांतिक सरकारांकडून खालीं जिल्हाधिकाऱ्यांना सुटले असावेत असें दिसतें. कारण जानेवारी महिन्याच्या प्रारंभीं जशी सर्व हिंदुस्थानभर चोहोंकडे दडपशाहीची जोराची हवा उठली, त्याप्रमाणें फेब्रुआरी महिन्याच्या प्रारंभीं चोहेंकडे ही बुद्धिभेदरूप सभा-संभाषणांची हवा उठली आहे. या संभाषणांतून बहुधा एकच प्रकारचा उपदेश करण्याचें सुरू आहे. कांहीं अधिकारी तोंडीं बोलतात, कांहींनीं लेखी फर्मानेंच काढलीं आहेत. रत्नागिरीच्या कलेक्टरांनीं काढलेलें फर्मान प्रसिद्धच झालें आहे. त्यांत ते म्हणतात, "सर्वांचें काम आतां लोकांपुढें सरकारची बाजू मांडून त्यांना ती समजावून देणें हें आहे. कोठें कांहीं गुप्तपणें चळवळ चालू असल्याची बातमी लागल्यास ती ताबडतोब सरकारी अधिकाऱ्यांकडे पोंचवावी. हल्लींची चळवळ होण्याचा सगळा दोष कॉंग्रेसकडे आहे. अशीच चळवळ चालू राहिल्यास पुढें समेटच होणार नाहीं. चळवळ दडपून टाकण्याचे सर्व उपाय योजण्याचा सरकारचा निश्चय आहे. तात्पर्य, शांतता राहील व लोक राजनिष्ठ राहतील असे उपाय सर्वांनीं योजावे."

पण हा कोरडा उपदेश लोकांना फारसा पटेल असें आम्हांस वाटत नाहीं. सरकारनें दडपशाही करण्यापूर्वी, किंवा करतांना तरी, लोकांच्या पुढाऱ्यांचें

ऐका असें कोणी म्हणावयास गेलें तर अधिकाऱ्यांचा स्वाभिमान एकदम पुढें येऊन म्हणतो कीं "छेः, कोणीहि कर्तव्यनिष्ठ अधिकारी आपल्या जबाबदारींत खासगी माणसांना अंशभागी करूं शकत नाहीं." मग उलट सवाल असाच सुचत नाहीं काय कीं, लोकांचें समाधान करणें किंवा त्यांजकडून भलें म्हणवून घेणें याचीहि जबाबदारी तुमची तुम्हींच कां पत्करीत नाहीं? तेव्हांच मात्र लोकांची कां आठवण व्हावी? भोगणारे भोगतात, भोगविणारे भोगवितात, दुतर्फी व्यवहार परस्पर सुरू आहे. मध्यस्थाचे हेहि ऐकत नाहींत व तेहि ऐकत नाहींत. मग जात्याच्या दोन तळींत सांपडून चुरडत जाणाऱ्या गरीब त्रयस्थ लोकांना स्वस्थ तरी बसूं कां देत नाहीं?

# रा.रामभाऊ टिळक विरुद्ध कै. नेने

## दाव्यांतील निकालाचा दुसरा हप्ता

लो. टिळकांचे चिरंजीव रा. रामभाऊ टिळक यांनीं कै. अण्णासाहेब नेने यांच्यावर सुमारें ९ वर्षांपूर्वी हायकोर्टांत दावा केला. रा. नेने यांजकडे लो. टिळकांची कांहीं रक्कम आहे ती आपणांस मिळावी अशी त्यांत मागणी केली. हा मुकदमा अखेर न्या. मू. तय्यबजी यांच्यापुढें सुमारें एक महिनाभर चालून त्याचा अर्धवट निकाल गेल्या ऑक्टोबर महिन्यांत लागला. तो ता. २० ऑक्टोबरच्या केसरींत आम्ही दिला होता. हा निकाल अर्धवट स्वरूपाचा असून त्यांत न्यायमूर्तींनीं फक्त इतकेंच ठरविलें होतें कीं, "नेने यांजकडे असलेल्या सुमारें ५४ हजार रुपयांच्या रकमेपैकीं, लो.टिळकांच्या चिरंजिवांनीं नेने यांजकडून पूर्वीच उचललेले सुमारें ३० हजार रुपये वजा करून, उरलेली रक्कम वादी यांना देववावी." परंतु हा निकाल सांगण्याच्या वेळींच असा एक प्रश्न उपस्थित झाला कीं, या २४ हजारांचा तरी हुकूमनामा वादी रामभाऊ टिळक यांच्या नांवें द्यावा? किंवा टिळकांच्या मृत्युपत्रांत नेमलेले पहिले व आजपर्यंत ज्यांनीं त्या नात्यानें काम केलें ते, एक्झिक्यूटर रा. धोंडोपंत विद्वांस यांच्या नांवानें द्यावा? कारण कायदेशीर एक्झिक्यूटर काम करीत असतां कोणाहि मयताच्या इस्टेटीसंबंधीं देण्याघेण्याची जबाबदारी एक्झिक्यूटरवर राहाते. याच कारणाकरितां, वादी रामभाऊ टिळक यांच्या अर्जावरून मुकदम्याची पूर्वतयारी सुरू असतां, रा. धोंडोपंत विद्वांस यांना कै. नेने यांच्या जोडीला समाईक प्रतिवादी नं. २ करण्यांत आलें होतें.

न्या. मू. तय्यबजी यांच्यापुढें खटला सुरू झाला तेव्हां एक्झिक्यूटर विद्वांस यांनीं कोर्टाला विनंति केली कीं, "मला या मुकदम्यांत निष्कारण प्रतिवादी केलें आहे. कारण माझ्याकडून कांहीं मिळावें–घ्यावें अशाबद्दल वादीचा दावा नाहीं." त्यावर न्यायमूर्तींनीं असा निर्णय दिला कीं, "रा. नेने यांच्याकडून रक्कम मागण्याची असली तरी मृत्युपत्र करून ठेवणाऱ्या टिळकांच्या इस्टेटीचे कायदेशीर प्रतिनिधि तुम्हीच आहां, त्यामुळें नांवाकरितां का होईना, पण तुम्हांस पक्षकार म्हणून ठेवणें प्राप्त आहे. मात्र तुमचा योग्य तो खर्च तुम्हांस देण्यांत येईल." इतकें ठरल्यावर पुढें सर्व मुकदमा वादी रामभाऊ टिळक व प्रतिवादी नेने यांच्यांतच फक्त अमल्यासारखा सुरू झाला. पण वर सांगितल्याप्रमाणें न्यायमूर्ति तय्यबजी यांचा न्यायाधीशाचा अधिकार अखेर हुकूमनामा लिहिण्यापूर्वीच संपला, म्हणून त्या उरलेल्या कामाची सुनावणी न्या. मू. मिर्झा यांच्यापुढें गेल्या आठवड्यांत झाली. त्याचा निकाल मंगळवार ता. २ फेब्रुवारी रोजीं सांगण्यांत आला. त्यांत न्यायमूर्तींनीं निर्णय दिला त्याचा आशय खालीलप्रमाणें आहेः—

"वादी यांना टिळकांच्या इस्टेटीचें प्रोबेट घेण्याची संधि पूर्वी एक वेळ देण्यांत आली होती. परंतु ती त्यांनीं घेतली नाहीं. म्हणजे आपल्या नांवें प्रोबेट काढलें नाहीं. यामुळें, हल्लीं वादी यांना २४ हजार रुपये व व्याज नेने यांजकडून देण्याचा ठराव झाला तरी, प्रत्यक्ष हुकूमनामा वादी यांचे नांवें आजच करतां येत नाहीं. तथापि, आपण वारस असल्याचा दाखला त्यांनीं पूर्वी काढला नाहीं म्हणून त्यांचा दावा व हक्क बुडविणें हेहि योग्य होणार नाहीं. म्हणून त्यांना वारसा सर्टिफिकेट काढण्याविषयीं कोर्ट फिरून एक वेळ संधि देत आहे. पुढील दोन महिन्यांच्या मुदतींत त्यांनीं हे वारसा सर्टिफिकेट मिळवून कोर्टांत दाखल करावें; म्हणजे मग त्यांच्या नांवें हुकूमनामा लिहून देण्यांत येईल. पण त्यांनीं त्या मुदतींत तसें केलें नाहीं तर त्यांचा दावा बुडेल व फिर्यादीचा सर्व खर्च त्यांजवर बसविण्यांत येईल."

हल्लींचे एक्झिक्यूटर व प्रतिवादी नं. २ रा. धोंडोपंत विद्वांस यांच्यासंबंधानें कोर्टानें असा निर्णय दिला कीं, "सदर विद्वांस यांच्याकडून टिळकांच्या मृत्युपत्राप्रमाणें जी जी व्यवस्था व्हावयाची ती सर्व यापूर्वींच होऊन गेली आहे. त्यांतून कांहींहि होण्याची राहिलेली नाहीं. येऊन-

जाऊन हल्लींच्या या दाव्याकरितांच टिळकांच्या इस्टेटीचे कायदेशीर प्रातिनिधि म्हणून त्यांना ठेवतां येईल. परंतु तसें ठेवण्याचें कारण नाहीं. कां कीं, वादी व सदर एक्झिक्यूटर यांचे हितसंबंध परस्पर-विरोधी दिसून येतात; व त्यांच्या नांवें हुकूमनामा दिल्यास वादी याजकडील रक्कम वसूल करण्याला राहावी तितकी सुलभता राहणार नाहीं. म्हणून कोर्टानें असें ठरविलें आहे कीं यापुढें रा. विद्वांस यांज-कडे एक्झिक्यूटरचें कांहीं काम उरत नाहीं. आणि तें ठेवूंहि नये. तसेंच आजपर्यंत मृत्युपत्रान्वयें ज्या इतर कायदेशीर गोष्टी त्यांनीं करावयाच्या त्या सर्व केलेल्या असल्यामुळें त्यांना यापुढें अधिकारमुक्त करावें. नेने यांजकडील कर्जवसुलीची जबाबदारी त्यांचेवर ठेवूं नये. पूर्वी त्यांनीं एक्झिक्यूटर या नात्यानें केलेल्या कामासंबंधानें हिशेब मागण्याचेंहि कारण नाहीं. टिळकां-च्या इच्छेप्रमाणें त्यांच्या दोघां चिरंजिवांबरोबर, रा. विद्वांस यांना नेने यांनीं १५ हजार रुपये दिले आहेत. तथापि नेने यांनीं ती सबब न सांगतां, न्या. मू. तय्यबजी यांनीं ठरविल्याप्रमाणें, २४ हजार रु. व व्याज ही रक्कम सर्वच्या सर्व स्वतःच वादींना द्यावी. पूर्वीच्या व हल्लींच्या सुनावणीच्या खर्चा-पैकीं दोन-तृतीयांश प्रतिवादी नेने यांनीं वादी रामभाऊ टिळक यांस द्यावा. तसेंच प्रतिवादी नं. २ रा. विद्वांस यांच्या दोनहि सुनावणींतला खर्चाचा कांहीं अंश प्रतिवादींनीं द्यावा."

वरील सारांश मुंबईच्या दैनिक पत्रांत प्रसिद्ध झालेल्या मजकुरावरूनच आम्हीं दिलेला आहे. प्रत्यक्ष निकालाची अस्सल प्रत अद्याप हातीं आलेली नाहीं. मुंबईच्या 'टाइम्सनें' ही हकीकत देतांना जे मथळे दिले ते मात्र सर्वस्वीं भ्रामक आहेत. त्या पत्राच्या बातमीदाराला निकालाचें मर्म समजण्याइतकें कायद्याचें ज्ञान किंवा पात्रता कोठून असणार? वर्तमानपत्राच्या बातमीदाराला शोभण्या-सारखे भडक मथळे त्यानें दिले. पण ते चुकीचे आहेत. एक मथळा ' टिळकस् फॉर्च्यून ' असा आहे! जणुं कांहीं मुकदम्यांत टिळकांनीं मागें ठेवलेल्या लाखों रुपयांची देवघेव होती ! दावा येऊन-जाऊन ६० हजारांचा; त्यांत ३० हजार आधींच पोहोंचलेले. शिवाय उरलेल्या २४ हजारांतून रा. विद्वांस यांना मिळणाऱ्या १५ हजारांचा हक्क शिल्लकच. यावरून ऐनजिनसी शिल्लक राहाणारी वादाची रक्कम किती हें कोणाच्याहि लक्षांत येण्यासारखें आहे. टाइम्सनें दुसरा मथळा 'एक्झिक्यूटर्स लॉस्ट सूट अगेन्स्ट टिळक-सन्स' असा घातला आहे. पण हाहि मथळा सर्वस्वीं भ्रामक आहे. या दाव्यांत एक्झिक्यूटर रा. विद्वांस हे वादी नव्हते. त्यांनीं होऊन टिळकांच्या चिरंजिवावर हा दावा केलेला नव्हता. नेने व टिळकांचे चिरंजीव यांच्या आपा-पसांतला तो वाद होता. वादी रामभाऊ टिळक यांनींच एक्झिक्यूटर विद्वांस यांना समाईक प्रति-वादी केलें होतें. आणि अखेर त्यांना वादींनीं निष्कारण सामील केलें म्हणजे त्यांजकडे करण्याची मागणी अशी कांहींच नव्हती, असेंच कोर्टानें ठरविलें. तात्पर्य, नेने यांच्याविरुद्ध हुकूमनामा झाला असला तरी, या दाव्यांत रा. विद्वांस यांचा अर्थाअर्थी कांहीं संबंध नव्हता. सदर निकाला-प्रमाणें दोन महिन्यांनंतर पक्का हुकूमनामा होणार. न्या. मू. तय्यबजी यांचा ठराव व हल्लींचा हा हुकूम यांविरुद्ध रा. नेने यांचे वारस अपील करणार आहेत असें समजतें.

# गोसाहित्यकार पं. गंगाप्रसाद अग्निहोत्री

( ले. आनंदराव जोशी. )

गोरक्षण म्हणतांच ज्याप्रमाणें महाराष्ट्रांतील सुप्र-सिद्ध गो. भ. प. चौंडेबुवा डोळ्यांपुढें उभे राहतात; त्याप्रमाणें हिंदी भाषा बोलणाऱ्या लोकांच्या डोळ्या-समोर जबलपूरचे गोभक्त कै. पं. गंगाप्रसाद अग्निहोत्री उभे राहतात.

पं. गंगाप्रसाद यांचा जन्म नागपूर येथें सुमारें ६० वर्षांपूर्वी एका कान्यकुब्ज ब्राह्मणकुटुंबांत झाला. त्यांचे वडील पं. लक्ष्मणप्रसाद हे रेशमी कापडाचा व्यापार करीत. पं. गंगाप्रसादांचें प्राथमिक शिक्षण हिंदींतून न होतां मराठींतूनच झालें. दुर्दैवानें त्यांना लहानपणींच मातृसुखाला अंतरावें लागलें. या कौटुंबिक अडचणीमुळें व विशेषतः त्यांच्या अशक्त प्रकृती-मुळें त्यांच्या शिक्षणांत बराच व्यत्यय आला. पुढें तर त्यांना शिक्षण सोडावें लागून वडिलांचे हाताखालीं काम करावें लागलें. कांहीं दिवसांनीं त्यांच्या वडिलांनीं इंग्रजी शिक्षणाकरितां त्यांना मिशन स्कूलमध्यें घातलें व तेथूनच ते सन १८८८ सालीं मिडल स्कूलच्या परीक्षेंत उत्तीर्ण झाले. त्यांनीं नोकरी-करितां अनेक ठिकाणीं खटपट केली. त्यांना वर्धा येथील असि. सेटलमेंट ऑफिसर श्री. बाबू जगन्नाथ भानू यांच्या हाताखालीं नक्कलनिसाची जागा मिळाली. श्री. भानू यांनीं पंडितजींची हुशारी व बुद्धि-

मत्ता पाहिल्यावर आपल्या संग्रहीं असलेल्या अमूल्य ग्रंथसंग्रहाचा उपयोग करून घेण्याची सुसंधि त्यांनीं पंडितजींना दिली. व त्यांनींहि त्याचा योग्य तो उपयोग करून घेतला. सरकारी नोकरींत शिरल्यावर आपल्या हुशारीनें ते इतके वर चढले कीं, जबलपूर जिल्ह्यांत नायब तहशीलदार, असि. सुपरिंटेंडेंट तर झालेच; पण कोर्ट ऑफ वॉर्ड-सचे मॅनेजरहि झाले. सन १९२५ साली त्यांनीं आपल्या नोकरीचा राजीनामा देऊन पुतण्याच्या शिक्षणाकरितां ते कायमचेच जबलपुरास राहिले. पंडितजींना कौटुंबिक सुख फारच थोडें लाभलें. त्यांना प्रथम पत्नीपासून एक व द्वितीय पत्नीपासून दोन अशीं एकंदर तीन अपत्यें झालीं; पण दुर्दैवानें तींहि फार दिवस जगलीं नाहींत !

पंडितजींनीं आपल्या हयातींत पुष्कळ वाङ्मय-सेवा केली. पण विशेषतः गोसाहित्यकार म्हणून ते लोकांच्या पुष्कळ परिचयाचे झाले. कै. विष्णुशास्त्री चिपळुणकरांच्या निबंधमालेचे व कविपंचकाचे त्यांनीं हिंदींत केलेले अनुवाद, तसेंच इतिहासतत्त्व व राष्ट्रभाषा, रसवाटिका वगैरे गद्य ग्रंथ व नर्मदाविहारादि काव्य ग्रंथ प्रसिद्ध आहेत. पंडितजींच्या प्रयत्नानें सन १९१६ सालीं जबलपूर येथें हिंदी ग्रंथांचें एक मोठें प्रदर्शन भरविण्यांत आलें. पंडित-जींचा स्वभाव अत्यंत शांत, निगर्वी, पण सडेतोड व स्वाभिमानी होता. जरी त्यांची राहणी जुन्या वळणाची होती तरी त्यांचीं मतें सामाजिक बाबतींत प्रगतिपर असत. आपल्या 'कान्यकुब्ज ब्राह्मणोंकी प्राचीन तथा अर्वाचीन अवस्था-ओंका वर्णन' नामक ग्रंथांत त्यांनीं समाजांतील उच्चनीच भेदभावांची, फालतूक पोटभेदांची, लग्नकार्यांतील अनिष्ट चालीरितींची सुंदर मीमांसा केली आहे. गोरक्षण—सप्ता-हाची मूळ कल्पना त्यांचीच. त्यांनीं सुरू केलेल्या गोरक्षणसप्ताहाच्या प्रथम दिवशींच म्हणजे ता. १० नोव्हेंबर १९३१ रोजीं त्यांचें देहावसान झालें हा एक योगायोगच नव्हे काय? मृत्यूपूर्वी त्यांनीं लिहिलेल्या, गौवेका पालन और उनसे लाभ, किसानोंके बालकोंकी शिक्षा, सप्त-श्लोकी गोरक्षणी गीता, गोरक्षाके लिये आपकी आंखें कब खुलेगी? इत्यादि पुस्तकांच्या १० हजार प्रती पांजरपोळ, गोशाळा वगैरे संस्थांना व शेतकऱ्यांना फुकट वांटण्याकरतां दिल्या. पं. गंगाप्रसादांच्या मृत्यूनें हिंदी साहित्याची आणि त्यांतल्या त्यांत कृषिगो साहित्याची जी भयंकर हानि झाली आहे ती लवकर भरून निघणें दुरापास्त आहे.

# पुण्याचे कलेक्टर व व्यापारी

गेल्या शुक्रवारीं 'पेशावर–दिनानिमित्त' पुणें येथें कडकडींत हरताळ पडला होता. त्यावरून चालू चळवळीशीं व्यापारी वर्गाची सहानुभूति आहे असें अनुमान बांधून येथील कलेक्टर मि. मॅक्मिलन यांनीं सरकाराची बाजू व्यापाऱ्यांच्या कानावर घालण्यासाठीं व तिच्यासंबंधीं व्यापाऱ्यांचीं मतें ऐकण्यासाठीं व्यापाऱ्यांना आपल्या भेटीस बोलावलें होतें. त्याप्रमाणें ता. २ रोजीं मंगळवारीं दुपारीं दीड वाजतां पुणें शहर व लष्कर यांतील ३०–४० व्यापारी कलेक्टरांच्या ऑफिसांत जमले. त्यांत रा. ब. हणमंतराम रामनाथ, खा. ब. मेथा, रा. ब. लल्लुभाई दामोदरदास, रा. सा. किराड, धोंडूमामा साठे, माडीवाले, रा. सा. ठुबे, करपे, सरदार नातू, हशमभाई प्रेमजी, महमद अल्ली दोस्तमहमद, बॅ. आगरवाला, खा. ब. जान महंमद, हरिभाई वगैरे व्यापारी मंडळी होती. त्याशिवाय केसरी, मराठा, सकाळ, ज्ञानप्रकाश, नवा काळ, विजयी मराठा वगैरे पत्रांचे प्रतिनिधीहि निमंत्रणावरून उपस्थित होते.

प्रथम कलेक्टरांनीं सद्यःस्थितीसंबंधीं एक पत्रक इंग्रजींत वाचून दाखविलें, व त्याचा आशय मागाहून मराठींत सांगण्यांत आला. तें पत्रक असें—"कॉंग्रेसची चळवळ मुख्यतः अडाणी लोक, कोंवळीं मुलें, स्त्रिया वगैरे वर्गांतच पसरलेली आहे, आणि तीहि भल-भलत्या भुलथापा देऊनच. कॉंग्रेसचा रोख कायदे मोडण्याकडे आहे. कॉंग्रेस म्हणते, फक्त स्वदेशीच माल वापरा. हा उपदेश इष्ट असला तरी अव्यवहार्य आहे. कारण आगगाड्या, मोटारगाड्या, शिवणयंत्रें, विलायती कापड यांच्यावांचून तुमचें कसें चालणार? आणि हे जिन्नस तर परदेशांतच तयार होतात. म्हणून कॉंग्रेसचें ऐकूं नका, तिला सहानुभूति दाखवूं नका, हरताळ पाडूं नका. विनंतीच्या द्वारां गिऱ्हाइकांचें मन वळविण्याला सरकाराची आडकाठी नाहीं; पण निरोधन करतांना जबरदस्ती–दांडगाई होते, तिला सरकार विरोध करतें. कारण कायदा व शांतता यांचें संरक्षण आम्हांला केलेंच पाहिजे!"

त्यानंतर व्यापाऱ्यांना बोलण्यास पाचारण्यांत आलें. चर्चेत १०।१५ गृहस्थांनीं भाग घेतला. कांहीं पारशी व कांहीं मुसलमान व्यापाऱ्यांनीं कले-

क्टरांच्या मतास पुष्टि दिली. पण हे अपवाद सोडल्यास इतर वक्त्यांनीं स्वच्छ शब्दांनीं सरकारच्या वटहुकुमी राजवटीवर टीका केली. 'वटहुकुमांमुळें चळवळ फोफावते, व्यापार मंदावतो, आमचीं मनें उद्विग्न होतात आणि वेळ न लागतां व खटपट न करतां पेठांमागून पेठा आपोआप, खुषीनें हरताळ पुकारतात ' असें कांहींनीं सांगितलें. तर कांहींनीं खडखडीतपणें सुचविलें कीं, 'आधीं वटहुकूम परत घ्या आणि आजपर्यंत आम्ही जिला सर्वश्रेष्ठ मानीत आलों त्या कॉंग्रेसशीं तडजोड घडवून आणा.' वटहुकुमांच्या अंमलबजावणींत गाफिलपणा व कडकपणा कसा होत आहे हें एकानें चवाठ्यावर आणलें तर दुसऱ्यानें वटहुकुमांना कायदेमंडळाची संमति घ्या असें सुचविलें.

स्वयंसेवकांच्या भीतीमुळें दुकानें बंद पडतात का, असा सूचक सवाल एका सभासदानें केला. पण त्याला चोहोंकडून विरोध झाला. 'कॉंग्रेसच्या लोकांनीं सांगण्यापूर्वीच दुकानें बंद होतात, ते पूर्ण अनत्याचारी असतात ' अशी ग्वाही सर्वांनीं दिली. एका व्यापाऱ्यानें सांगितलें कीं, 'मुंबईचे व्यापारी-संघ हरताळाचे ठराव करतात; तेव्हां येथील त्यांच्या शाखोपशाखा तसेंच धोरण ठेवतात; तरी आधीं त्यांची समजूत घाला.' खादी परिधान केलेल्या कांहीं व्यापाऱ्यांनीं हरताळाची मीमांसा करून त्याचीं तीन कारणें सांगितलीं. तीं हीं कीं, सरकारच्या दडपशाहीचा निषेध, कॉंग्रेससारख्या सर्वश्रेष्ठ संस्थेशीं सहानुभूति व थोरथोर समाजधुरीणांना गुन्ह्यावांचून अटकेंत ठेवल्यामुळें वाटणारा उद्वेग. दुसऱ्या एकानें इंग्रजींत आपलें निदान नमूद केलें कीं, सरहद्द प्रांतांत सरकारानें चालविलेल्या भयंकर दडपशाहीच्या निषेधार्थ शुक्रवारचा हरताळ होता.

अशीं निरनिराळीं भाषणें ऐकून पण त्यांच्यांतून निघणारा एकच एक ध्वनि ध्यानीं घेऊन कलेक्टरांनीं चर्चेचा समारोप करतांना पुढील उद्गार काढले. "जरूर तेव्हां सरकार व्यापाऱ्यांना सहकार्याची मदत मागेल; त्या वेळीं त्यांनीं ती मदत दिली पाहिजे." अशा प्रकारें तास दीड तास-पर्यंत चर्चा झाली, व पुण्याच्या व्यापारी-वर्गाचें मत निर्भीडपणें कलेक्टरांच्या कानावर पडलें.

# चळवळीची जबाबदारी नोकरशाहीवरच

### मि. एच्. एन्. ब्रेलसफर्ड यांचे विचार

गांधी यांनीं इंग्लंडचा किनारा सोडला तेव्हां सत्याग्रहयुद्धास पुनः सुरुवात करण्याचा विचारहि त्यांच्या मनांत नव्हता. भावी धोरणाविषयीं त्यांचें मन थोडेंफार साशंकच होतें. गोलमेज परिषदेच्या पोटमंडळावर काम करण्याचाहि त्यांचा इरादा होता.

परंतु मध्यंतरीं बंगालमध्यें जारी केलेल्या वटहुकुमांची वार्ता त्यांच्या कानांवर आदळली. भयंकर दडपशाहीमुळें बंगाल प्रांत भरडला जाऊं लागला. मूठभर क्रांतिकारकांची चळवळ खणून काढण्यासाठीं ते वटहुकूम सबंध बंगालला लागू करण्यांत आले. त्यामुळें अवघ्या बंगालला भेडसाविण्याचें सरकारानें ठरविलें ! बंगालला नामर्द (emasculate) करण्याकरितांच वटहुकुमांचें हें अस्त्र फेंकण्यांत आलें असें गांधीजी म्हणत.

### शेतकऱ्यांची चळवळ अत्याचारात्मक नाहीं

अशा साशंक वृत्तींतच त्यांनीं हिंदुस्थानांत पाय ठेवला. वटहुकुमांचें क्षेत्र बंगालला वेढून आतां संयुक्त प्रांतापर्यंत पसरलें होतें. भयाण दारिद्र्यानें भांबावून जाऊन संयुक्त प्रांतांतील शेतकऱ्यांनीं आपल्या हातीं करबंदीचें व खंडबंदीचें शस्त्र घेतलें. तें मोडून काढण्यासाठीं सरकारानें वटहुकुमांचा सवाई सोटा उगारला. ही करबंदीची चळवळ अर्थातच राजकीय स्वरूपाची नाहीं. शेतकऱ्यांच्या विपन्नावस्थेंतच तिचा जन्म झाला आहे. धान्याचे भाव कल्पनातीत उतरल्यामुळें खंड देण्याची ताकद त्यांच्यांत उरली नाहीं. कर भरण्याइतकाहि पैसा त्यांच्या गांठीं राहिला नाहीं. करबंदीला अत्याचाराची चळवळ तर सुतराम् म्हणतां येणार नाहीं. कारण शेतकऱ्यांचें प्रतिकाराचें साधन हिंसात्मक नसून अहिंसाप्रधान आहे.

अशी वस्तुस्थिति असतां ही अहिंसामूलक चळवळ वटहुकुमांसारख्या भयंकर उपायांनीं सरकारानें झोडपून काढण्याचें ठरविलें. जणुं काय ती क्रांतिकारकांचीच चळवळ होती ! महात्माजींचा सल्ला घेण्यास अलाहाबादेहून पं. जवाहरलाल निघतांच वाटेंतच त्यांना पकडण्यांत आलें. वायव्य सरहद्द प्रांतांत तर बंदुकींच्या गोळ्यांनीं जमाव उधळले गेले ! माझ्या माहितीप्रमाणें लाल डगलेवाल्यांची चळवळ हीहि शांतताप्रधान व अहिंसानिष्ठ अशीच आहे.

### नोकरशाहीची खुमखुमी

चोहोंकडूनच असें रान उठल्यामुळें श्री. गांधी यांनीं लॉर्ड विलिंग्डन यांची मुलाखत मागितली. या मुलाखतींत इतर अनेक गोष्टीबरोबर वटहुकुमांची बजावणीहि कशी होते याचा खल झाला असता. गांधींच्या पत्रांत लपंडाव असा कांहींच नव्हता. कोणापासूनहि

कांहींच छपवून ठेवावयाचें नाहीं हा तर त्यांचा बाणा! कांहीं विशिष्ट बाबतींत कायदेभंगाची चळवळ पुनः सुरू करण्याबद्दल वर्किंग कमिटी विचार करीत असल्याची गोष्टहि त्यांनीं व्हाइसरॉयांना स्पष्ट करून सांगितली होती! परंतु या मनमोकळे बोलण्याचा परिणाम अनुकूल होण्याऐवजीं लॉर्ड विलिंग्डन तो अपमानच समजले. व आपण वटहुकुमासंबंधीं कांहींहि बोलण्यास तयार नसल्याचें उर्मट उत्तर व्हाइसरॉयांनीं गांधींना पाठविलें. ही गोष्ट अगदींच गैरमुत्सद्देगिरीची झाली.

अत्याचारी चळवळीला परिणामकारक रीतीनें तोंड देण्यासाठीं सरकाराला हिंदी पुढाऱ्यांचें सहकार्य पाहिजे तर ती हाणून पाडण्यासाठीं जीं साधनें अवलंबिण्यांत आलीं आहेत त्यांची चर्चा करण्यास त्यांना वाव द्यावयाला नको का? या वटहुकुमांचा रूळ शेतकऱ्यांच्या चळवळीवरहि फिरविण्यांत येत असल्यानें अशा प्रसंगीं परस्पर विचारविनिमय हाच अधिक यशस्वी मार्ग होय. भावी स्वराज्यांतील हिंदी लोकांच्या नैसर्गिक व राज्यविषयक हक्कांचा विचार करण्यासाठीं गांधींना इंग्लंडला बोलवावयाचें व दुसरीकडे त्याच हक्कासाठीं ते हिंदुस्थानांत भांडत असतां त्यांना तुरुंगांत डांबून टाकावयाचें या विसंगत धोरणाचा अर्थ तरी काय? माझ्या मतें हिंदी नोकरशाहीचाच हा सर्व खेळखंडोबा असून कॉंग्रेसशीं निकराची लढाई करण्याची खुमखुमी तिलाच आली होती.

हिंदी पुढाऱ्यांचे हात अशा तऱ्हेनें बांधणें ही सरकाराची परंपराच दिसते. भूतकालीन व वर्तमानकालीन परिस्थितींचा विचार करतां सध्यांच्या कांहीं पुढाऱ्यांच्या विचारापेक्षां पूर्वीच्या पुढाऱ्यांचे विचार हे कमी जहाल असतांनासुद्धां त्यांना या नोकरशाहीनें तुरुंगाचें दार दाखविलें. यावरूनच तिची मनोवृत्ति दिसून येते. लो. टिळक, लाला लजपतराय किंवा चित्त रंजन दास यांपैकीं कोणीहि संपूर्ण स्वातंत्र्याची मागणी केली नसतांहि त्यांना कारागृहांत डांबण्यांत आलें! आतां तर असा रंग दिसतो कीं, १९३० सालीं दडपशाहीचीं जीं साधनें उपयोजिण्यांत आलीं त्या सर्वांचा उपयोग करण्यांत येऊन शिवाय अधिक व्यापक व जाचक अशा साधनांचाहि त्यांत समावेश करण्यांत येईल.थोड्याच दिवसांत राजबंद्यांनीं सर्व तुरुंग पुनः भरले जातील, व लाठ्यांचे तडाखेहि पुनः ऐकूं येतील.

मुख्य प्रधानांच्या अनुमतीनेंच हिंदुस्थानसरकारनें दडपशाहीस सुरुवात करून गोलमेज परिषदेच्या कामावर पुरताच हरताळ फासला. लाठ्यांचे तडाखे उडत असतां समेटाचे आलाप काढणें व्यर्थ होय. अखिल हिंदुस्थानांत लाठीराज्य चालू असतां मवाळांतील मवाळहि हिंदुस्थानसरकाराशीं भावी राज्यघटनेंत सहकार्य करणार नाहीं असें मला तरी निदान दिसतें. कॉंग्रेससारखी राष्ट्राची प्रतिनिधीभूत संस्था दडपशाहीच्या वरवंट्याखालीं चेंचली जात असतां कोणत्या मवाळाला भावी राज्यघटनेंत काम करण्यास हुरूप वाटेल?

# स्फुट सूचना

१ वटहुकुमांच्या काठ्यांनीं एकीकडे कॉंग्रेस पक्षास धोपटणें, व दुसरीकडे कॉंग्रेस पक्षाबाहेरील इतर पक्षांस गोड शब्दांनीं थोपटणें,या दोन गोष्टी नोकरशाहीनें सांप्रत एकदम सुरू ठेवल्या आहेत. कॉंग्रेस पक्ष व इतर पक्ष यांजमध्यें राजकीय धोरणाच्या बाबतींत फरक असला तरी, नोकरशाहीनें कायदेकानू गुंडाळून ठेवून जी दडपशाही आरंभिली आहे ती कोणत्याहि पक्षाला संमत नाहीं. इतकेंच नव्हे तर त्यांनीं त्याबद्दल सरकारचा जोरानें निषेध चालविला आहे. या निषेधांतच ले. असेंब्लीच्या निषेधाचीहि भर पडली असती तर सरकारची नैतिक बाजू अगदींच लंगडी ठरून त्यांना लाजेनें मान खालीं घालावी लागली असती.पण सध्यांच्या असेंब्लींतील लोकपक्ष लेचापेचा आहे हें सर्वश्रुत आहे. कारण असेंब्लीच्या गेल्या निवडणुकीचे वेळीं देशांतील बाणेदार, धैर्यवान व कणखर पुढाऱ्यांनीं तिजवर बहिष्कार टाकल्यामुळें तिजमध्यें सामान्य प्रतीच्या लोकांची भरती झाली हें स्वाभाविक होय. तथापि डॉ. हरिसिंग गौरप्रभृति नेमस्त वृत्तीच्याच असेंब्लींतील सभासदांनीं गेल्या सोमवारीं सरकारवर अविश्वासाचा व निंदेचा ठराव असेंब्लींत मांडला, यापेक्षां नेमस्तांचीं शांत डोकींहि सांप्रतच्या दडपशाहीनें संतप्त झालीं आहेत यास वेगळे प्रमाण कोणतें पाहिजे?

---

२ डॉ. गौर यांनींहि आपला ठराव स्वतःचें व असेंब्लीचें अवसान ओळखूनच बनविला होता. त्यांत त्यांनीं कायदेभंगाच्या चळवळीविषयीं नापसंती दर्शवून सरकारनें चालविलेल्या दडपशाहीचा निषेध केला होता, व त्याबरोबरच ज्या वटहुकुमांच्या द्वारें दडपशाही सुरू आहे त्या वटहुकुमांना बिलांचें स्वरूप देऊन असेंब्लीची मंजुरी मिळवावी असेंहि त्यांनीं सुचविलें होतें. ठरावाचें हें स्वरूप कांहींसें विसंगत

दिसत होतें. तरीहि सदर ठराव असेंब्लींत व्हावयास पाहिजे असला तर त्याचें असलेंच चमत्कारिक स्वरूप राहणें अपरिहार्य होतें. तथापि इतकें करूनहि तो अखेर नापास झाला तो झालाच ! सदर ठरावावर खुद्द डॉ. गौर, षण्मुखं चेट्टी, रंगा अय्यर व हरबिलास शारदा इत्यादिकांचीं भाषणें आवेशयुक्त झालीं; व त्यांनीं जुलमांची प्रत्यक्ष पाहिलेली व माहीत असलेलीं उदाहरणें देऊन वटहुकूम डोळे मिटून कसे धुडगूस घालीत आहेत हें दाखविलें. मौ. शफी दाऊदी हे स्वतः सरहद्द प्रांतांत जाऊन आले असतां तिकडील अधिकाऱ्यांच्या भयंकर अत्याचारा- विषयीं त्यांना विशेष माहिती सांगतां आली नाहीं याचें आश्चर्य वाटलें. सरकारची बाजू गृहमंत्री सर जेम्स क्रेरार व रेनी यांनीं मांडली. पण त्यांना सर सॅम्यु- एल होअर व लॉर्ड विलिंग्डन यांनीं पूर्वी सांगितलें त्यापेक्षां अधिक कांहीं सांगतां आलें नाहीं. त्यांनीं मुख्य ठरावाची व सर अबदुल रहीम यांची टवाळी करण्याची हौस मात्र भागवून घेतली. अबदुल रहीम यांनीं बंगाल-सरकारचे पूर्वी एक वेळ मंत्री असतां वटहुकुमांस संमति दिली होती, व आज त्या विरुद्ध टीका केली, या विसंगतीचा भ्रामक दोष त्यांच्या पदरांत बांधला.

---

३ कॉंग्रेसनें आम्हांला आव्हान केलें, आणि राज्यकारभार चालविण्याची जबाबदारी आमच्यावर असल्यामुळें आम्हांला वटहुकूम काढणें भाग पडलें असें क्रेरार यांनीं सांगितलें. पण त्या वटहुकुमाखालीं ज्या कित्येक निरपराधी व्यक्तींचा छळ होत आहे त्याचें समर्थन मात्र त्यांस करतां आलें नाहीं; व तें करणार तरी कसें ? आमचे अत्याचार तुम्ही दाख- वितां, पण कॉंग्रेसनें केलेले अत्याचार, खून व खुनांचे प्रयत्न यांचीं अनेक उदाहरणें आम्हांस दाखवितां येतील हें क्रेरार यांचें समर्थन ! याला काय समर्थन म्हणावयाचें ? बंगाल, संयुक्त प्रांत व पंजाब यांत घडलेल्या खुनांचा व कॉंग्रेसचा संबंध काय ? ते खून करणारा क्रांतिकारक पक्ष कॉंग्रेसच्या बाहेरचा असून त्याचा कॉंग्रेसनें व वर्किंग कमिटीनें वेळोवेळीं निषेधहि केलाच आहे. त्यांची जबाबदारी कांग्रेसच्या माथीं मारणें ही शुद्ध लबाडी होय. क्रेरार यांनीं अशा प्रकार- चा निरपराधी लोकांचा छळ यापुढें न होण्याची खबर- दारी घेण्यांत येईल इतकें फुकटचें आश्वासनसुद्धां दिलें नाहीं. यावरून नोकरशाही कशी अद्यापि गुर्मीत आहे हेंच सिद्ध होत नाहीं काय ? रेनी यांनीं तर चक्क सांगितलें कीं, वटहुकुमासारखीं बिलें तयार करून असेंब्लीपुढें मांडल्यास तीं पास होण्याची आशा नसल्यामुळेंच आम्हीं असेंब्लीची पर्वा केली नाहीं. रेनी यांनीं या उद्गारांनीं असेंब्लीविषयीं एक प्रकारचा अविश्वासच दाखविला. म्हणून असेंब्लींतील निदान सर्व लोकनियुक्त सभासदांस जर स्वाभिमानाची चाड असली तर गौर यांनीं सरकाराविरुद्ध आणि- लेल्या अविश्वासाच्या ठरावास त्यांनीं संमतिच द्याव- यास पाहिजे होती. पण तितकाहि स्वाभिमान कित्येक लोकनियुक्त सभासदांत नाहीं हें देशाचें दुर्भाग्य होय. शेवटीं ठरावावर मतें घेण्यांत आलीं. त्यांपैकीं ठरावाविरुद्ध मतें ६२ व अनुकूल ४४ मतें पडलीं. या बासष्टांत १४ सभासद लोकनियुक्त होते. त्या लोकनियुक्त सभासदांनीं ठरावास अनुकूल मतें दिलीं असतीं तर गौर यांचा ठराव खात्रीनें पास झाला असता.

# असेंब्लींतील घडामोडी

## प्राप्तीवरील कराचें बिल

ता. २८ हा दिवस प्राप्तीवरील करासंबंधींच्या चर्चेत गेला. १९२२ च्या बिलाला दुरुस्तीवजा असा ठराव असेंब्लीच्या सप्टेंबरमधील बैठकींतच आलेला होता; त्याच्यावरील वाद 'मागील अंकावरून पुढें चालू' झाला. परदेशांत पाठविलेल्या भांडवलावर कर नसावा आणि कराची योजना स्थानिक स्वरूपाची असावी असा त्या बिलाचा उद्देश आहे. विरोध करतांना मि. स्टड म्हणाले 'या बिलाला पुष्कळ सभासदांनीं विरोध केलेला आहे. प्रांतिक सर- कारनेंहि विरोध केला आहे. तरी सरकार बिल पुढें रेटीतच आहे याचें मला नवल वाटतें. प्रचलित राज्यघटना घडविली जात असतांना असा मूलभूत फरक केला जात आहे याचा विचार झाला पाहिजे. या बिलानें दुहेरी कर बसणार आहे. आणि त्यांत मुख्य गोम अशी आहे कीं, हिंदुस्थानांत कोणता नफा मिळाला व परदेशांत कोणता नफा मिळाला याची शहानिशा होणें मुष्कील आहे.'

सर महमद याकूब यांनीं मि. स्टड यांच्यावर जोरा- चा हल्ला केला व बिलाला पाठिंबा दिला. ते म्हणाले, 'असेंब्लीचे कांहीं सभासद व प्रांतिक सरकार यांजवर भांडवलवाल्यांचा एवढा पगडा बसलेला आहे हें पाहून मी थक्कच झालों ! गरीबांच्या पाठीवर कराची काडी- देखील लादूं नका अशी ओरड आहे, म्हणून सरकारनें गबर युरोपियन व्यापाऱ्यांवर हा कर आणला पण तेहि विरोधाचा सोटा उगारून उठलेच ! नफ्याच्या तोब-

त्याला ते पुढें असतात, पण कराचा लगाम मात्र त्यांना नको!' श्री.लालचंद नवलराय, श्री. कृष्णमाचारियर, सर कावसजी जहांगीर वगैरेंनीं बिलाला विरोध केला.हिंदी व्यापाऱ्यांशीं व संस्थानांतील व्यापाऱ्यांशी या बिलानें अन्याय होणार आहे असें त्यांचें म्हणणें होतें. मि. आर्थर मूर यांनी लष्करांतील ब्रिटिश अंमलदारांचें नुकसान होईल या मुद्द्यावर बिलाला विरोध केला. हिंदूंच्या एकत्र कुटुंबपद्धतीवर घाला येईल असें म्हणून भाई परमानंदांनीं विरोध व्यक्त केला. बैठक सोमवारपर्यंत तहकूब झाली.

### दडपशाहीचा निषेध

हिंदुस्थानसरकारनें अनेक वटहुकूम काढून हल्लीं राज्यकारभार चालविला आहे. त्यासंबंधीं लोकमत स्पष्ट करून सरकारचा निषेध करण्यासाठीं सर हरिसिंग गौर यांनीं असेंब्लीपुढें ठराव मांडला. तो चर्चेसाठीं ता. १ रोजीं निघाला. सर हरिसिंग यांचा ठराव असाः—

### सर हरिसिंगांचा ठराव

"ज्या पद्धतीनें हिंदुस्थानसरकारनें वटहुकूम काढले व सरकारच्या हस्तकांकडून त्यांचा सर्वत्र जो दुरुपयोग होत आहे त्याबद्दल असेंब्लीला निषेध करण्यास सबळ कारण आहे. विशेषतः म. गांधी यांची मुलाखत नाकारण्यांत मोठा अन्याय झाला आहे. त्याचप्रमाणें खान अबदुल गफारखान यांची हद्दपारी व सेनगुप्त यांनीं हिंदुस्थानाच्या किनाऱ्यावर पाऊल टाकण्यापूर्वीच त्यांना करण्यांत आलेली अटक या सर्व गोष्टी अत्यंत गैर, अन्यायाच्या आहेत व मनुष्याच्या मूलभूत हक्कांच्या विरुद्ध आहेत. खेरीज स्त्रियांना झालेल्या शिक्षा, व त्यांचें कैद्यासंबंधाचें वर्गीकरण या गोष्टी लोकमत क्षुब्ध करणाऱ्या आहेत.

"गेली बैठक संपल्यावर लागलीच हे वटहुकूम काढण्यांत आले. या असेंब्लीला अत्याचार व करबंदीची चळवळ मान्य नाहीं. सर्व लोकांनीं नवी घटना शांततेच्या चिरस्थायी पायावर उभारण्यास मदत करावी.

"या असेंब्लीची गव्हर्नर—जनरल—इन—कौन्सिल यांस अशी शिफारस आहे कीं, त्यांना आजच्या परिस्थितींत वटहुकुमांच्या ऐवजीं कोणतीं बिलें मांडावयाचीं असतील तीं मांडावीत. वायव्य प्रांतांतील स्थिति अत्यंत चिंताजनक असल्यानें तेथील चौकशी करण्यासाठीं असेंब्लींतील बिनसरकारी सभासदांची एक कमिटी नेमावी. व नव्या हिंदी राज्यघटनेच्या कार्यासाठीं राष्ट्रीय सभा, हिंदु—मुसलमान यांच्या संस्था यांचें सहकार्य मिळवावें."

# वारू तुफान आणि राव नादान !

हिंदुस्थानांत काश्मीर हें एकच संस्थान असें आहे कीं, ज्यांत मुख्य लोकसंख्या मुसलमानांची आहे, पण राजा हिंदू आहे. उलटपक्षीं जेथील प्रजा प्रायः हिंदु पण राजा मुसलमान अशीं संस्थानें अनेक आहेत. त्यांपैकीं हैद्राबाद, भोपाळ, जुनागड, रामपूर, भावलपूर इत्यादि प्रमुख होत. गेल्या दहा बारा वर्षांत हिंदुस्थानांतील हिंदु व मुसलमान हे दोनहि समाज विशेष जागृत झाले आहेत व आपल्या उन्नतीसाठीं प्रयत्न करीत आहेत. हिंदू लोक स्वराज्याचे हक्क मिळविण्याच्या खटपटींत आहेत व मुसलमानांचे उद्योग केवळ स्वजातीच्या हिताकरितां चालू आहेत. याप्रमाणें उभयवर्गांच्या हेतूंत जसा फरक आहे तसाच सदर हेतु साध्य करण्याच्या साधनांतहि फरक आहे. हिंदूंची चळवळ तोंडाची आहे व मुसलमानांची चळवळ हातांची आहे. हिंदूंची चळवळ परकीय अशा राज्यकर्त्यांविरुद्ध आहे व मुसलमानांची चळवळ स्वकीय अशा हिंदू देशबांधवांविरुद्ध आहे. हिंदूंनी जास्तींत जास्त चळवळ केली तर ते एखादा कायदा मोडतील किंवा सत्याग्रह करतील; पण कोणावर हात उगारणार नाहींत किंवा कोणाच्या केसालाहि धक्का लावणार नाहींत. दोघांच्या चळवळींचे हे दोन भिन्न मार्ग असून त्या मार्गांनीं त्यांनीं खालसा मुलुखांत चालविलेल्या खटपटी त्या मुलुखानें स्वाभाविकच चोहोंकडून वेढलेल्या संस्थानी मुलखासहि कमी अधिक प्रमाणांत बाटल्यावांचून राहिल्या नाहींत.

मुसलमान त्यांच्या धार्मिक शिकवणुकीमुळें मूळचे धर्मवेडे आहेत. बहुसंख्य हिंदूंत त्यांना राहावें लागत असल्यानें त्यांची जूट आपोआपच झालेली आहे. त्यांतल्या त्यांत महायुद्धानंतर कॉन्स्टान्टिनोपल येथील खिलाफतीवर गुदरलेल्या संकटापासून त्यांचें धर्मवेड मुल्ला—मौलवींनीं अधिक चेतविलें व त्याचा उपयोग आपल्या राजकारणास होणार असें वाटून हिंदूंनीहि कॉंग्रेसमार्फत त्यांस अधिकच फूस दिली. तेव्हांपासून कांग्रेसचें धोरण मुसलमानांच्या दाढीला हात लावण्याचेंच झालें आहे. ते मागतील त्या सवलती त्यांना द्याव्या व त्यांच्याशीं मिळतें घ्यावें ही कॉंग्रेसची कार्यपध्दतिच ठरल्यामुळें मुसल्मान जेथें तेथें आपलाच हेका चालवूं लागले व हिंदू लोक कांहीं अंशीं धोरण म्हणून व कांहीं अंशीं त्यांच्या हातांतील काठीला किंवा

सुऱ्याला भिऊन पड खाऊं लागले. हिंदूंना किंबहुना कॉंग्रेसला वाटत होतें कीं, या धोरणानें आपण मुसलमानांच्या द्वेषाग्नीवर पाणी टाकून तो विझवीन आहों; पण वस्तुतः अनुभव मात्र या रामजुतीच्या अगदीं उलट येत होता. हिंदूंच्या हांजीहांजीनें पाणी पडून मुसलमानांचा द्वेषाग्नि न विझतां त्यांत पेट्रोल पडून तो अधिक भडकला मात्र. सर्वच हिंदु कॉंग्रेसच्या या धोरणाला बळी पडले होते असें नाही. कांहीं हिंदूंनीं आपली हिंदूसभा स्थापन करून ते हिंदूंच्या संघटनेस व हक्कसंरक्षणास साहाय्यभूत झाले यांत शंका नाहीं. परंतु बहुतेक हिंदू कॉंग्रेसच्या मुसलमानविषयक धोरणास चिकटून राहिल्यानें हिंदू महासभेच्या कार्यास परिणामाच्या दृष्टीनें फारच थोडें यश आलें.

खालसा मुलखांत चळवळींचे जे वारे वाहूं लागतील त्यांनीं संस्थानी मुलुखांतील हवा हलावी यांत नवल नाहीं. हिंदु व मुसलमान यांच्या चळवळी संस्थानांतहि जाऊन पोंचल्या. हिंदूंची संस्थानांतील चळवळ प्रायः तोंडाची व भित्रेपणाची असल्यानें गरीब अशा हिंदू संस्थानिकांच्या हद्दींत ती थोडीबहुत फैलावली. पण जेथील संस्थानिक जबरदस्त आहेत किंवा मुसलमान आहेत त्यांचें तिनें अगदी नांव घेतलें नाहीं. ती कोल्हापुराकडे वळली नाहीं, भोपाळच्या वाऱ्याला उभी राहिली नाहीं अथवा तिनें निजामाच्या हैद्राबादेकडे तोंडहि केलें नाहीं. उलट पक्षीं मुसलमानांची स्थिति पाहा. त्यांना मुसलमान संस्थानिकांच्या राज्यांत मुळीं हातपायच हलवावयास नकोत. कारण संस्थानिक मुसलमान असला कीं, तेथील राज्य मुसलमानांच्या घरचेंच. त्या संस्थानांतील प्रत्येक मुसलमान हा संस्थानिकाचा भाऊबंदच. तेथील लहान मोठ्या हुद्याच्या बहुतेक जागा मुसलमानांच्या, युनिव्हर्सिटी असल्यास ती मुसलमानांची व मुसलमानांकरितां, आणि धार्मिक सवलती तर मुसलमानांनाच. अशा संस्थानांत मुसलमानांनीं चळवळ करून अधिक मिळवावयाचें तरी काय ? हिंदूंना बाटवून मुसलमान करावयाचें तर तेंहि कार्य मुसलमान लोक आपल्या चळवळीनें साधतील त्याहून राजाश्रयामुळें लक्ष पटीनीं अधिक साधतें!

मुसलमानी संस्थानांत मुसलमानांचें बस्तान अगाऊच नीट बसलें असल्यानें उरले कोण ? तर हिंदु संस्थानिक. बिचारे हिंदूच काय पण हिंदू संस्थानिकहि मुसलमानांच्या दाढीला हात लावूनच वागतात. अमक्या एका संस्थानचा राजा हिंदू आहे म्हणून मुसलमानांवर जुलूम होत आहे असें कोणीं कधीं ऐकिलें आहे काय ? काश्मीरांत गेले पांच–सात महिने मुसलमानांनीं बंडावा मांडला आहे. यावरून कोणी म्हणेल कीं, " काय हो काश्मीरचा महाराज दुष्ट व निर्दय आहे. त्यानें मुसलमान आपल्या कचाटींत बरे सांपडले आहेत, असें पाहून व हिंदू महासभेच्या नादीं लागून आपल्या मुसलमान प्रजेला कसें सुळीं धरलें आहे !" कार्यावरून कारणाचा अंदाज करावयाचा असल्यास या प्रकारची शंका कोणीं हवी तर घ्यावी. पण वस्तुस्थिति त्याच्या अगदीं उलट आहे. काश्मीरच्या महाराजाइतके मुसलमानांचे लाड पुरविणारे राजे खुद्द मुसलमान अमीरनबाबांतहि सांपडणार नाहींत. हैद्राबादचे निजाम हे मुसलमानांना इतके जिवाचे कलिजे वाटतात ना ? पण त्यांनाहि मुसलमानांचे लाड चालविण्यांत काश्मीरचे महाराज फारसे हार जाणार नाहींत. महाराज हरिसिंग बाटले नाहींत एवढेंच कमी, बाकी ते मनःप्रवृत्तीनें व संस्कारांनीं जवळ जवळ मुसलमानच आहेत असें म्हणतात ! त्यांच्या राजवाड्यांतील प्याद्या–हुजऱ्यांतहि मुसलमानांचाच भरणा आहे. इतकेंच काय, पण एकदां महाराज कायसे मुसलमानांबरोबर नमाजहि पढण्यास गेले होते ! प्रजानुरंजनाकरितां परधर्मीय राजानें यापेक्षां आणखी काय करावयाचें ? कोणा एकाद्या मुसलमान बादशहानें किंवा नबाबानें हिंदु प्रजेची मर्जी राखण्याकरितां पाटावर बसून व पळीपंचपात्री घेऊन ताम्हनांत सूर्यनारायणाला संध्येंतील चार अर्घ्ये कधीं काळीं सोडल्याचें निदान एक उदाहरण तरी मुसलमानांनीं दाखवावें !

काश्मीर प्रांतांत तीनचतुर्थांश लोकसंख्या मुसलमानांची आहे. त्यांपैकीं बहुतेकांचा धंदा शेतकीचा आहे; व हिंदूंचा धंदा सावकारीचा आहे. मुसलमान लोक शेतकी करतात, व हिंदू सावकार त्यांच्या अडीअडचणीला त्यांस कर्जाऊ रकमा देतात. महाराजांना मुसलमानांच्या कल्याणाची केवढी काळजी! त्यांनीं मुसलमानांच्या कल्याणाकरितां स्वतः हिंदू असतां हिंदू सावकारांचा पक्ष न घेतां सावकारांनीं मुसलमान कुळांपासून व्याज किती घ्यावें याचे निर्बंधसुद्धां घालून टाकले आहेत. मुसलमान शिक्षणांत मागें म्हणून त्यांच्याकरितां त्यांनीं हजारों रुपयांच्या शिष्यवृत्त्या ठेवल्या आहेत. व जे मुसलमान लायक दिसतील त्यांना ते त्यांच्या योग्यतेप्रमाणें किंबहुना योग्यतेहूनहि अधिक दर्जाच्या नोकऱ्या देत आहेत. महाराज मुसलमान असते तर त्यांनीं यापेक्षां जास्ती काय केलें असतें ? अथवा इतकें सगळें केलें तेंहि न करतां त्यांनीं मुसलमानांचा कडवेपणा हा एकच गुण संपादला असता तर त्यांची मुसलमानांच्या बंडामुळें सहासात महिने जगभर झालेली नाचक्की तरी टळली असती !

राजाचें पाणी दंग्याच्या आरंभानंतर मुसलमानांनीं जोखलें, आपल्या एकाहून एक चढ अशा मागण्यांचे शह महाराजांच्या मागें लावले आणि बुद्धिबलांतील डावांत चोहोंकडून शह देऊन राजाला ज्याप्रमाणें कोंडून धरून प्यादी करतात तशी प्यादीची पाळी मुसलमानांनीं हरिसिंगावर आणिली.

मुसलमानांच्या मागण्या इतक्या चढेलपणाच्या आहेत कीं, त्यांना अटी हें एकच नांव शोभेल व त्या जेत्या राजानें पराभूत राजावर घातल्या तरच शोभतील. मुसलमानांचें म्हणणें कीं, काश्मीरांतील कित्येक देवळें मशिदींचे दगड काढून हिंदूंनीं बांधली आहेत. तेव्हां तीं देवळें मुसलमानांचींच असल्यामुळें मुसलमानांना परत मिळावीं. मुसलमानांच्या मुलांना शिष्यवृत्त्या दिल्या तरी शेतकींत रमलेली त्यांचीं मनें शिक्षणांत गुंतत नाहीत, व तीं शिकत नाहींत. अशा मुलांच्या पुढें महाराजांनीं काय रडावें कां दुसऱ्या कोणा मुलांच्या परीक्षा घेऊन त्या परीक्षा पास झाल्याचीं सर्टिफिकिटें मुसलमानांच्या मुलांना द्यावीं ? त्यावर मुसलमानांचें उत्तर हें कीं, कलेक्टर—कमिशनरासारख्या हुद्याचीं कामें करण्यास शिक्षण कशाला हवें ! तें कांहीं मनास न आणतां आम्हीं एकंदर लोकवस्तींत शेंकडा ७० आहोंत, तर तितक्या प्रमाणांत महाराजांनीं आम्हांला आपल्या नोकऱ्या देऊन टाकाव्या झालें. असल्या मुसलमानांचे राजे हरिसिंग हे झाले आहेत. यांना ताळ्यावर आणण्याचा चौदावें रत्न हा एकच उपाय आहे. पण महाराजांच्या संग्रहांत त्याच रत्नाची उणीव दिसते. कडक शासनाचा प्रथमपासून उपयोग करण्याऐवजीं महाराजांनीं दंगेखोर म्हणून ज्या शेंकडों मुसलमानांना शिक्षा केल्या होत्या त्यांनाहि मुसलमान समाजास गोड वाटण्याकरितां सोडून दिलें. मग मुसलमानांवर दहशत बसावी कशी ?

महाराजांचा अंमल इतका पोकळ पाहिल्यावर संस्थानांतील व संस्थानाबाहेरील मुसलमानांनीं कोपरानें खणण्यास सुरुवात केली. त्यांनीं महाराज व त्यांची हिंदु प्रजा यांच्या विरुद्ध चौदावेंच काय पण सगळीं रत्नें चालविण्यास बाहेर काढलीं. हिंसेच्या व अहिंसेच्या अशा दोन्ही प्रकारच्या हत्यारांनिशीं त्यांनी चढाई केली. काठ्या, लाठ्या, सुरे, तरवारी, बंदुका हीं हत्यारें हिंदूंवर उपसलींच; पण त्यांचीं घरें लुटून व कित्येकांच्या स्त्रियाहि भ्रष्टवून हिंदूंना नको हा जन्म असें करून सोडलें. एखाद्या गांवांत मुसलमान मूठभर असले तरी ते त्यांच्याहून अनेक पटींनीं अधिक असणाऱ्या हिंदूंना घाबरवून टाकतात; तर जेथें हिंदूच मूठभर व मुसलमान त्यांच्याहून शेंकडों पटींनीं जास्ती त्या काश्मीरांतील खेड्यांतून मुसलमानांनीं हिंदूंचे काय हाल—वनवास मांडले असतील याची कल्पना देखील अंगावर शहारे आणणारी आहे. महाराजांपाशीं पोलीस आहेत, फौजहि आहे; पण त्यांना काश्मीरी प्रजेचें रक्षण मुसलमानांच्या तडाख्यांतून करतां येत नाहीं, तें कां हेंच समजत नाहीं! त्या सर्वांनीं गेल्या चातुर्मास्यांत व्रत म्हणून अहिंसेचे आचरण केलें होतें कीं काय न कळे ! अहिंसेचें तत्त्व उदात्त व उदार आहे यांत शंका नाहीं; व तें समाजानें आपला नित्याचा व्यवहार शांततेनें चालण्याकरितां पाळलेंहि पाहिजे. पण सैनिक लढाईच्या वेळीं हें व्रत पाळूं लागलें व मुसलमान शस्त्र संगिनी चढवून हल्ला करीत असतां हिंदूहि हात जोडून बसले तर राजांचा राज्यकारभार संपला व हिंदू प्रजेचें जीवित आटोपलें असेंच समजावें.

म. गांधीहि स्वसंरक्षणार्थ जरूर पडल्यास हत्यार वापरण्यास सांगतात. काश्मीरांतील हिंदूंच्या कानावर गांधीजींचा नुसता अहिंसेचा तेवढा उपदेश गेला, पण त्यापैकीं स्वसंरक्षणाचा उपदेश त्यांना ऐकूं आला नाहीं असें दिसतें. निदान काश्मीरासारख्या अविश्वमय प्रदेशांत किंवा जेथें मुसलमान हत्यारें पाजळून येतील तेथे हिंदूंनीं अहिंसेच्या बाबतींत म. गांधींना गुरु करण्यापेक्षां मुल्ला—मौलवींचें शिष्यत्व पत्करणें अधिक श्रेयस्कर व सुरक्षित. अशा वेळीं हिंदूंनीं अहिंसेचा मंत्र जपणें म्हणजे उपाशीं मरणाऱ्या मनुष्यानें लंघनचिकित्सेच्या तावडींत सांपडण्यासारखें आहे; व मुसलमानांनीं मुल्ला—मौलवींचा उपदेश श्रवण करणें म्हणजे अधाशी मनुष्यानें वृकोदर अशा भीमसेनाचें अनुयायित्व स्वीकारण्याप्रमाणें आहे. सारांश, या बाबतींत हिंदु—मुसलमानांनीं आपल्या गुरूंची अदलाबदल केलेलीच उभयतांच्या हिताची ठरेल. किंबहुना हिंदूंनी स्वसंरक्षणाच्या बाबतींत थोडेसें मुसलमान झालें पाहिजे व मुसलमानांनीं बरेचसें हिंदू बनलें पाहिजे असेंहि म्हटलें असतां चालेल. कारण त्या योगानें दोघांचा मेळ व मैत्री चांगली जमेल.

हरिसिंगांचा नादानपणा पाहून काश्मीरांतील मुसलमान इतके चेकाळले आहेत कीं, तोंडाला येतील त्या अटी महाराजांना घालीत सुटले आहेत. तेथील चट साऱ्या हिंदूंना बाटवून मुसलमान करण्याचा त्यांचा इरादा स्पष्ट दिसतो. त्यांची एक अट अशी आहे कीं, महाराजांनीं हिंदुधर्मशास्त्रांत सुधारणा करून जे हिंदु मुसलमान होतील त्यांना पूर्वधर्मांतील स्थावरजंगम जिंदगी मिळविण्याच्या मार्गावरील अडचण काढून टाकावी. याच अडचणीमुळें हिंदू लोक मुसलमान होत नाहींत अशी मुसलमानांची तक्रार आहे. ही व या प्रकारच्या इतर

तक्रारी महाराज लवकर मिटवीत नाहींत म्हणून बाहेरील व आंतील मुसलमान शिखां-प्रमाणें जथे पाठवून, हिंदूंप्रमाणें सत्याग्रह करून आणि आपल्या स्वभावाप्रमाणें सुरे उपसून, लाठ्या उगारून व गोळ्या घालून हिंदू प्रजेला व हरिसिंगां-च्या सैन्याला दांतीं तृण धरावयास लावीत आहेत. घोडा ठाणबंदी राहून व चंदी वैरण खाऊन तुफान बनावा व त्याजवर मांडी ठेवण्याचा प्रसंग एखाद्या नादान स्वाराला यावा त्याप्रमाणें काश्मीरचे राव हरिसिंग यांची दुबळी अवस्था झाली आहे. त्यांचा पाय रिकिबींत रहात नाहीं, त्यांना लगाम खेचतां येत नाहीं व त्यांची मांड घोड्यावर न टिकून रावांची स्वारी खालीं येते कीं काय अशी भीति वाटूं लागली आहे. या घटकेला काश्मीरांत अगदीं आणीबाणीची वेळ आली आहे. हजारों मुसलमान जाळपोळ, लुटालूट व रक्तपात करीत सुटले आहेत. ते सरकारी चौक्या जाळीत आहेत, देवळें पाडीत आहेत व बँका लुटीत आहेत. त्यांना आवरणें कठिण झाल्यामुळें महा-राजांनीं आतां ब्रिटिश फौजेची मदत मागितली आहे.

सारांश काश्मीरच्या हिंदु प्रजेवर व महाराजां-वरहि दुर्धर प्रसंग ओढवला आहे. याला हिंदूंचा भ्याडपणा व महाराजांचा नादानपणाच मुख्यतः कारण आहे. सध्यांच्या संकटाचें इंग्रज सरकारच्या साहाय्यानें निवारण झालें तरी असलीं संकटें पुढील जागृतीच्या व अस्वस्थतेच्या काळांत वारंवार येणार असल्यानें हिंदूंना आपलें हिंदुत्व टिकवावयाचें व हरिसिंगांना आपलें राज्य राखावयाचें असल्यास हिंदूंनीं मुसलमानाइतकेंच कडवें बनलें पाहिजे; व हरिसिंगांनीं न डगमगतां आपला अंमल करडा बनविला पाहिजे. हें त्यांस न साधेल तर काश्मीरांत एक हिंदूहि दृष्टीस पडणार नाहीं, व काश्मी-रचा तुफान वारू रावांच्या मांडीखालींहि फार दिवस राहाणार नाहीं. याची खूणगांठ त्या उभयतांनीं आपल्या मनाशीं आतांच पक्की बांधून ठेवावयास नको काय ?

# ब्रिटिश साम्राज्यशाहीचें भवितव्य

## वसाहती फुटून निघाल्या

ब्रिटिशसाम्राज्य नष्ट होणार, ब्रिटिश साम्राज्याचीं छकलें उडण्याची वेळ आली आहे, ब्रिटिश साम्राज्य रसातळाला जाणार हें भाकीत आमचें नसून हाऊस ऑफ कॉमन्सच्या एका माजी सभासदाचें आहे. 'लॉस्ट डोमिनियन' व अमेरिकेचे मि. संडरलंड यांच्या पुस्तकांसारखीं पुस्तकें मज्जाव केलेल्या पुस्तकांच्या यादींत घालून, असलीं अशुभ भविष्यें हिंदवासी-यांच्या कानापर्यंत जाणारच नाहींत अशी आपण व्यवस्था करूं असें जर ब्रिटिशांना वाटत असेल तर तें त्यांचें ' सुखकर अज्ञान ' त्यांनाच लख-लाभ होवो. शेजीबाईनें कोंबडा झाकला तरी उजाडावयाचें थोडेंच राहणार आहे ! वजनदार वर्त-मानपत्रें व मोठमोठे राजकीय पुढारी ब्रिटिश साम्राज्यशाहीबद्दल हें भविष्य वर्तवीत आहेत. हल्लींची न भूतो न भविष्यति अशी आर्थिक मंदतेची लाट हेंच सुचवीत आहे. एवढें कशाला ! १९२६ व १९३०च्या महायुध्दानंतरच्या साम्राज्यपरिषदांना पुष्टि देणारा गेल्या नोव्हेंबर २०ला वेस्ट मिन्स्टरचा कायदा पास झाला. वसाहतींनीं म्हणजे कानडा, ऑस्ट्रेलिया, न्यूझीलंड, दक्षिण आफ्रिका, आयरिश फ्रीस्टेट व न्यू फाउन्डलंड, यांनीं ब्रिटिश पार्ले-मेंटाचा सासुरवास केव्हांच झुगारून दिला. व या नवीन कायद्यानें ब्रिटिश पार्लमेंटशीं असलेल्या संबंधाचा अवशिष्ट धागाहि त्यांनीं तोडून टाकला आहे. यापुढें वेस्ट मिन्स्टरचें पार्लमेंट हें साम्राज्याचें पार्लमेंट राहिलें नाहीं, असा सरळ अर्थ ह्या वेस्ट-मिन्स्टिर कायद्याचा आहे. जुनें ब्रिटिश साम्राज्य महायुद्धानंतर लयास गेलें व त्याचे जागीं सहकार व स्वातंत्र्य या तत्त्वावर उभारलेली ब्रिटिश कॉमनवेल्थ उदयास आली व जर आयरिश फ्रीस्टेट, कानडा, दक्षिण आफ्रिका यांनीं त्या कॉमनवेल्थचा संबंध तोडण्याचें मनांत आणलें तर ब्रिटिशांना त्यांचा प्रतिकार करतां येणार नाहीं व त्यांचेवर शस्त्र उपसतां येणार नाहीं. कानडा वगैरे वसाहती ७ स्वतंत्र राष्ट्रें आहेत. परराष्ट्राचे दरबारीं स्वतःचे राजकीय प्रतिनिधी नेमण्याचा त्यांना हक्क आहे व तो तीं बजावतात व स्वतःचे जबाबदारीवर, तहनाम्यावर सह्याहि करतात. जिनि-व्हाला राष्ट्रसंघांत इंग्लंडचे विरुद्ध मत देण्यासहि तीं कमी करीत नाहींत. वेस्टमिन्स्टिरच्या कायद्यानें ब्रिटिशांनीं पत्करलेल्या जबाबदारीपासून अलग राहण्याचा किंवा त्या जबाबदारींत सामील होण्याचा वसाहतींचा हक्क शाबीत झाला आहे. अशा स्थितींत राजभक्तीची शपथ केवळ नामभात्र होय. बादशहाचें एकमेवाद्वितीयत्व तरी कोठें राहिलें ? जें पार्लमेंट महायुद्धापूर्वी सर्व वसाहतींकरितां कायदे करण्याचा अबाधित हक्क गाजवीत होतें, त्याच पार्लमेंटची सत्ता आज साम्राज्यव्यापी तर नाहींच, पण ब्रिटनपुरतीच राहिली आहे. वसाहती व ग्रेटब्रिटन यांच्यामधील

एकच दुवा म्हणजे इंग्लंडचें सार्वभौमत्व, तेंहि आतां लयास गेलें आहे.

१८५२मध्येंच डिझरायलीला याविषयीं दुःस्वप्नें पडत होतीं. लॉर्ड मॉम्सबरीला लिहिलेल्या पत्रांत डिझरायली म्हणतो, "ह्या नष्ट वसाहती लवकरच स्वतंत्र होतील यांत शंका नाहीं; या वसाहती म्हणजे आपल्या मानेभोंवतीं एक घोरपड आहेत" पाउण शतकानंतर हीं दुःस्वप्नं खरी ठरलीं आहेत.

**इंग्लंडचें अफाट वैभव**

विन्स्टन चर्चिलसारखे ब्रिटिश साम्राज्याच्या बडे-जाव व बळ उद्घोषित करणारे साम्राज्यसेवक या नवीन परिस्थितीनें गांगरून गेले असल्यास नवल नाहीं. त्यांची आतांपर्यंत बढाई अशी. 'पहा, हीं युरोपच्या किनाऱ्यापलिकडील बेटें तीं काय पण कशीं सर्व जगभर राज्य करीत आहेत. या बेटांचें क्षेत्रफळ १२०००० चौ. मैल व लोकसंख्या २५०००००० आणि अफाट पसरलेलें साम्राज्याचें क्षेत्रफळ १४०००००० चौ. मैल म्हणजे पृथ्वीच्या ¼ जागा व्यापणारें, व लोकसंख्या ४६०,०००,००० म्हणजे जगांतील लोकसंख्येच्या चतुर्थांश आहे कीं नाहीं करामत!' राष्ट्रीयसत्तेच्या दसपट परराष्ट्रीय सत्ता व प्राबल्य गाजविणारें पृथ्वीच्या पाठीवर दुसरें ग्रेटब्रिटन आहे काय? ही सर्व साम्राज्याची वाढ रशियाप्रमाणें क्रांतींतून उद्भवणाऱ्या हेतुविशिष्ट राज्यपद्धतीसारखी नसून, उत्क्रांतीच्या तत्त्वावर होत आलेली आहे. हा युक्तिवादहि या साम्राज्य–सेवकांच्या बढाईचाच भाग! पण खरोखर पाहूं गेलें तर ब्रिटिश साम्राज्याची वाढ ही अगदींच नवीन आहे. शंभर वर्षांपूर्वी कानडा,ऑस्ट्रेलिया, न्यूझीलंड यांच्या अफाट वाढीची कल्पना तरी झाली असती काय? आफ्रिकेच्या अवाढव्य वसाहती, ईजिप्तची पुनर्घटना, सुवेजच्या कालव्याचा व युफ्रेटिस दरीचा ताबा, व पादाक्रांत केलेल्या हिंदुस्थान–ब्रह्मदेशावरील सत्ता हे साम्राज्याच्या वाढीचे सर्व प्रकार गेल्या शंभर वर्षांतीलच आहेत. सीलि म्हणतो त्याप्रमाणें साम्राज्याची यदृच्छेनें इतकी वाढ होत गेली कीं एके दिवशीं ब्रिटिश लोक जागे होऊन पाहतात तों अचानकपणें निद्रिस्थावस्थेंतच आपण भूप्रदेशाच्या अर्ध्या भागाचे मालक झालों आहों असें त्यांस आढळून आलें, पालेस्टाईन व टँगानिका हे अधिराज्याखालील देश तर महायुद्धांतीलच लूट होत. तेव्हां हें साम्राज्य आधुनिक कालांतच झपाट्यानें वाढत गेलेलें आहे हें निश्चित. प्रश्न असा कीं हें साम्राज्य यावच्चंद्रदिवाकरौ कायम रहावयाचें कीं काय?

गिबनसारख्या मोठमोठ्या इतिहासकारांनी साम्राज्यांचा उदय कसा झाला, तीं साम्राज्यें उज्ज्वल व अढळ वाढणाऱ्या उत्कर्षाच्या उच्च बिंदूला कशीं पोहोचलीं, व शेवटीं त्यांचा एकाएकीं अपकर्ष कसा झाला, ह्या करुणरसप्रधान हकिगतींनींच आपल्या इतिहासांचीं पानें भरून काढलीं आहेत. मग भविष्य काळांत ब्रिटिश साम्राज्यसत्ता अबाधित व वर्चस्व गाजवीतच राहील असें कोणीं सांगावें? व काश्मीर व कानडा, जिब्राल्टर व हाँगकाँग युगांडा, माल्टा, ग्रीनलँड व लाब्राडरासारखे भिन्न परिस्थितीचे प्रदेश ब्रिटिश अमलाखालींच राहतील हें तरी कोणीं सांगावें?

एक काळ असा होता कीं, जेव्हां वंशपरंपरागत आलेली ब्रिटिश साम्राज्यसत्तेची ही वैभवसंपदा वेळोवेळीं होणाऱ्या अभूतपूर्व अशा व डोळे दिपवून टाकणाऱ्या समारंभाचे रूपानें मोठ्या दिमाखानें प्रकट होई. १८८७ सालीं व्हिक्टोरिया राणीचा सुवर्ण–महोत्सव झाला. लगेच दहा वर्षांनीं डायमंड जुबिली झाली. पुढें बादशहा एडवर्ड व पंचमजॉर्ज यांचे राज्याभिषेक झाले, सार्वभौमत्वाची घोषणा करणारे दिल्लीचे दरबार झाले. साम्राज्यसूर्य जणूं काय मध्यान्हावर आला होता. हिरेरत्नजडित मुकुट सिंहासनाच्या द्वारां व भपकेबाज पोषाक, त्यावर चकाकणारीं मानपदकें, नवलाईची रोषणाई, आतषबाजी यांच्या द्वारां सार्वभौमत्वाचे अधिकाराची, ब्रिटिशसाम्राज्याच्या वर्चस्वाची घोषणा केली गेली. साम्राज्यसूर्यानें लोकांचे डोळे दिपून गेले.

पण त्या प्रकर्षाच्या काळांतसुद्धां निराशावादी नव्हते असें नाहीं. हा साम्राज्याचा भपका, देखावा किती दिवस टिकणार अशी शंका काढणारे लोक होतेच. इतक्या भिन्न संस्कृतींचें व इतक्या अफाट पसरलेल्या प्रदेशांनीं बनलेल्या साम्राज्याचें दुसरें उदाहरण नाहीं. साहजिकच राष्ट्रीय धुरीणांचे मनांत साम्राज्याचीं छकलें होण्याची साधार भीति उत्पन्न होऊन पन्नास वर्षांपूर्वीच साम्राज्य संघटनेची कल्पना निघाली. जोसेफ चेंबरलेनच्या सवलतीच्या जकातीनें साम्राज्याचें एकीकरण करण्याचा प्रयत्न केला, पण हे प्रयत्न विशेष प्रभावी झाले नाहींत. संघाच्या उच्च ध्येयावरून खालीं उतरत साम्राज्यपरिषदेची कल्पना निघाली. मामुली सभा व वार्षिक सिंहावलोकन यांखेरीज या परिषदेंत कांहींच तथ्य उरलें नाहीं. पुढें महायुद्धाचा वणवा पेटला व ब्रिटिश साम्राज्य रसातळाला जाणार असें वाटूं लागलें. पण वसाहती इंग्लंडच्या मदतीला धांवून आल्या. दक्षिण आफ्रिका मनांतली अढी विसरली. हिंदी–मुसलमान तुर्कांना मिळाले नाहींत व युद्धांत प्रदेशाचा इंचभर तुकडा न जातां, उलट साम्राज्याचा ८०००००० चौ. मैलांनी विस्तार झाला, व राष्ट्रसंघांत सहा मतें मिळून ब्रिटिश सत्तेचा पारा वरच चढला.

### वैभव डांसळूं लागलें

पण रोगी शस्त्रक्रियेंतून बचावला तरी त्याला उन्मादापासून त्रास होतोच. हॉस्पिटलमधून रोगी एकदम गजबजलेल्या मार्गांत पडावा व भांबावून जावा अशी ब्रिटनची स्थिति झाली. पुन्हा साम्राज्याच्या टिकाऊपणाविषयींच्या शंकेचीं, भीतीचीं कारणें जमूं लागलीं. ब्रिटिश सार्वभौमत्वाचें वैयर्थ्य पटूं लागलें. जर्मनी व रशियासारखीं अनियंत्रित राज्यपध्दति रसातळास गेली, व ब्रिटनसारखी सदनशीर राज्यपद्धति लोकसत्ताक राज्यपद्धतीच्या वाढत्या लाटेंत सांपडली असून ब्रिटिशांना हक्काचें सोंग करण्यास परिस्थितिच भाग पाडीत आहे.

साम्राज्यसत्तेचा पार्लमेंटच्या पद्धतीशीं निकट संबंध होता. पण एकीकडे लोकसत्ताक राज्यपद्धति व दुसरीकडे रशियांतील कम्यूनिझम व इटलींतील फॅसिझम यांच्या कैचींत सांपडलेली सोंवळी पार्लमेंटरी पद्धति कशी टिकाव धरणार ? पार्लमेंटरी पक्षांची तरी आज काय स्थिति आहे? पूर्वीपासून नांवलौकिक मिळविलेला लिबरल पक्ष धुळीस मिळाला आहे. सोशालिस्टांचे तत्त्वाचा जप करणारा मजूरपक्ष छिन्नविच्छिन्न होऊन त्याला दातीं तृण धरून कॉंझर्वेटिव्ह पक्षाचे पाय धरावे लागले. व आपल्याच मित्रांपासून भांडवलवाल्यांचें रक्षण करण्याकरितां मजूर पक्षाचे मॅक्डोनाल्ड व स्नोडन कॉन्झर्व्हेटिव्ह पक्षाची हांजी हांजी करीत आहेत. ह्या ग्रेटब्रिटनच्या राजकीय वातावरणांतील चळवळींतच वसाहतींशी असलेला जिव्हाळ्याचा संबंध तुटला आहे व गेल्या दोन वर्षांत हिंदुस्थानमधील राजकीय वातावरण बदललेलें आहे. महात्मा गांधींच्या प्रभावापुढें लॉर्ड आयर्विन यांना नमावें लागलें. या सर्व परिस्थितीमुळें वादळांत सांपडलेल्या सोमदत्तासारखी सरकारची स्थिति झाली आहे व 'विनाशकाले विपरीत बुद्धिः' या न्यायानें सरकारकडून विपरीत वर्तनाची सीमा झाली आहे. हिंदुस्थानसारख्या परतंत्र राष्ट्रांवर दंडुकेशाहीनें भराभर वटहुकूम काढूनच राज्य चालविण्याची पाळी यावी यापेक्षां साम्राज्यपदारूढ सरकारची अवनति ती कोणती !

### खुद्द घरची वाट काय ?

बरें; दारचे प्रश्न न सुटले तरी घरच्या प्रश्नांची काय वाट ? तें तसेंच भिजत घोंगडें पडलेलें आहे! ग्रेट ब्रिटनवर ३५०००००००० डॉलरचें शेंकडा ५ व्याजाचें कर्ज आहे. शिवाय बेकारी, आजार, म्हातारपण यांपासून संरक्षण करण्याकरितां राष्ट्रीय विमापद्धति ब्रिटिश सरकारनें सुरू केली आहे. युनायटेड स्टेटसमध्यें अतोनात पैसा व्यापारांत ओतलेला आहे. रशियांत ओतलेला पैसा परत येईल कीं नाहीं याबद्दल शंकाच आहे. अशा रीतीनें मोठेंच ओझें ब्रिटनच्या डोक्यावर आहे. याचा सरळ अर्थ हा कीं, ब्रिटनला यापुढें परराष्ट्रांशीं जोडलेल्या किंवा जोडावयाच्या संबंधावरच जास्त जास्त अवलंबून राहावें लागणार आहे. जागतिक व्यापारमंदीचा परिणाम ग्रेटब्रिटनवर जबर झाला आहे. व्यापाराचें मान कमी होऊन नफ्याला चांगलाच चट्टा बसला आहे. जगांतील व्यापारी जहाजांची संख्या अपरंपार वाढल्यामुळें, ब्रिटनचें उत्पन्नाचें साधन जें व्यापारी जहाजांची वहातूक तेंच निरुपयोगी ठरून बेकारांची संख्या भरधांव २७५०००० पर्यंत वाढली आहे व बजेटची तोंडमिळवणी कशी करावयाची याच विवंचनेंत ब्रिटिश मंत्री पडलेले आहेत. काटकसरीची कात्री लावून सुद्धां व करांची वाढ राष्ट्राच्या उत्पन्नाच्या $\frac{1}{3}$ इतकी करूनहि स्टर्लिंगची व सुवर्णाची कार्डीमोड करावी लागली. या परिस्थितीमुळें शब्द मोजून बोलणाऱ्या राजकीय पुढाऱ्यांना सुद्धां राष्ट्रीय दिवाळ्याच्या आगमनाचा इषारा जनतेला देण्याची पाळी आली आहे.

अशा वेळीं ब्रिटिश पार्लमेंटचे एक माजी सभासद पी. डब्ल्यु. विल्सन करंट हिस्ट्रीमधील लेखांत वैतागून म्हणतात, कीं ग्रेट ब्रिटननें आधीं घरची निरवानिरव करावी, बिकट प्रश्न सोडवावे व मग इतरांच्या भानगडींत पडावें. पॅलेस्टाईनमधल्या ज्यू व अरबांची काळजी करण्याचें कारण नाहीं. इराक व इजिप्त आपला कारभार हांकण्यास समर्थ आहेत. व हिंदुस्थानांतील सुराज्याची मर्यादा स्वराज्यापासून पूर्ण स्वातंत्र्यापर्यंत खेंचली गेली तरी त्यांत बिघडलें कोठें !

हल्लींच्या स्टेटसेक्रेटरींना मात्र कॉंग्रेसचें वावडें होऊन कांग्रेसच्या स्वातंत्र्याच्या ध्येयानें झपाटलें आहे. कांग्रेसची चळवळ हाणून पाडण्याचा त्यांनीं चंग बांधला आहे. साम्राज्यमदाचा धूर ब्रिटिश मंत्रिमंडळाचे डोळ्यावरून उतरला आहे व साम्राज्याची विसकटलेली घडी पुन्हां नीट कशी बसावयाची याचीच काळजी त्यांना उत्पन्न झाली आहे. पण हें निश्चित कीं साम्राज्यशाही, सार्वभौमत्व या शब्दांचे अर्थ मूळ हेतूपासून पार बदलून गेले आहेत. साम्राज्याच्या छत्राखालून वसाहती निघून गेल्या व हिंदुस्थानसारखीं परतंत्र राष्ट्रें कॉंग्रेससारख्या राष्ट्रीय सभेच्या द्वारें साम्राज्यांतून फुटण्याचा प्रयत्न करीत आहेत. व परिस्थिति त्यांना हात देत आहे. ह्या परिस्थितींत ब्रिटिश साम्राज्यशाहीचें भवितव्य खडतर आहे, करुणास्पद आहे असेंच कोणीहि म्हणेल !

# पुण्यांतील पहिला लाठीमार!

### सोळा विशेष जखमी, पुष्कळांना लाठीप्रसाद

ता. ६ रोजीं पं. मोतीलालजींच्या प्रथम पुण्यतिथीनिमित्त सभा होणार असल्याचें ४ तारखेच्या गांधी-दिनाचे सभेत आचार्य भागवत यांनीं जाहीर केलें होतें. त्याच्या दुसऱ्या दिवशीं म्हणजे ५ तारखेस कलेक्टर साहेबांनीं १४४ कलम पुणें शहरास व लष्करास लावल्याचें जाहीर करून सभा, मिरवणुकी व झेंडावंदन यांस बंदी केली. त्यामुळें ६ तारखेची सभा कशी काय पार पडेल इकडे लोकांचें लक्ष वेधलें. त्यांतच गांवांत ठिकठिकाणीं पोलीस-बंदोबस्त विशेष स्वरूपांत दिसून येऊं लागल्यामुळें तर सभेबद्दल वगैरे कधींच पूसतपासहि न करणाऱ्या लोकांत एक प्रकारची खळबळ उत्पन्न होऊन ठिकठिकाणीं तोच एक चर्चेचा विषय झाला. सभा ६ वाजतां असली तरी ४-४॥ पासूनच पोलिसांनी रेमार्केट पटांगणावर ठाणें दिलें होतें. लोक जमूं लागतांच त्यांनीं झेंड्यासभोंवारच्या सभेच्या जागेची नाकेबंदी केली, व पटांगणावर कोणालाहि फिरकूं देण्यांत येईना. मैदानाच्या सभोंवार हजारों लोक जमा झाले. तसा पोलीसबंदोबस्तहि कडक झाला. तथापि ५॥ चे सुमारास लोकांच्या गर्दीतून शहर कॉं. क. चे ११ वे सर्वाधिकारी श्री. रामचंद्र बळवंत आपटे हे एकदम झेंड्याखालीं येऊन उभे राहिले, व बोलूं लागले. ताबडतोब त्यांना अटक होतांच दुसरीकडे श्री. गणेश व मोहन सोहनीरास यांनीं झेंडा उभारला. त्यांनाहि अटक करण्यांत आल्यामुळें लोकसमुदायांत खळबळ सुरू झाली. ११२ खडे, १ पेरू, १ कांदा व एक उंसाचें कांडें पटांगणावर येऊन पडलें. मि. मिल्स, क. येट्स, कांहीं सार्जंट, इतर छोटे पोलीस अधिकारी व ७५-१०० लाठीवाले पोलीस यांनीं पटांगण व्यापून टाकलें होतें. मधून मधून हे अधिकारी किंवा पोलीस आपली छडी अगर लाठी फिरवीत सहजगत्या जरी समुदायाकडे चालले तरी लोक ताबडतोब पळूं लागत असत, व पुनः जमत.

### वादळापूर्वीची शांतता

ही पोलीस अधिकाऱ्यांची शांतता वादळापूर्वीची होती हें नंतरच्या प्रकारावरून कळून आलें. लाठीमार करण्यास डी. एस्. पी. साहेबांची परवानगी लागत असल्यानें त्यांच्या आगमनाची वाट पाहणें चालू असून, लाठीवाल्या पोलिसांच्या संख्येंत भर पडत होती. ६॥ च्या सुमारास डी. एस्. पी. मि. स्मिथ आले. पोलिस अधिकाऱ्यांशीं बोलणें झालें. लाठीमार करण्याच्या दृष्टीनें हालचालीस सुरवात झाली. बाजूनें किंवा मागून लोकांचा जमाव पोलिसांच्या पाठीवर येऊं नये अशी लढाऊ शिस्तीची तयारी, म्हणून या पटांगणाच्या पूर्व, पश्चिम व दक्षिण या बाजूंच्या लोकांना बरेच दूरवर पिटाळून लावण्यांत आलें व कांहीं पोलीस तेथें बंदोबस्तास ठेवले गेले. नंतर पटांगणावर पश्चिम ते पूर्वपर्यंत २-२ फुटांच्या अंतरावर लाठीवाले पोलीस रे-मार्केटाकडे तोंड करून उभे करण्यांत आले ! ६-४५ झाले, मि. मिल्स यांना तोंडांत शिटी धरली, दुसऱ्याच क्षणीं ती वाजविली, व एकदम दोनहि हात मागे नेऊन तसेच जोरानें ते पुढें करून चाल करण्याचा इषारा देतांच पोलिसांनीं लोकसमुदायावर हल्ला चढविला. कांहीं लोक ताबडतोब पळूं लागले हें सांगणें नकोच. तथापि पोलिसांच्या लाठींत खंड पडला नाहीं. हा लाठीमार ८ ते १० मिनिटें चालू असून त्यामध्यें मंडईबाहेरचा सभेकरितां आलेला जमावच सांपडला असें नसून मंडईत आपापल्या स्टॉलवर बसलेल्यांना व त्यांच्या गिऱ्हाइकांना जागेवरच लाठीचा प्रसाद मिळाला. मालाची नासधूसहि झाली असल्यास नवल नाहीं. एकंदर विशेष जखमी लोकांची विदित संख्या १६ असून अविदित असे बरेच लोक आहेत असें समजतें. लाठी दोन्ही हातांनीं वर डोक्यावर उंच उचलून मारण्यांत येत होती. त्यामुळें बहुतेक जखमी लोकांच्या डोक्यास व खांद्यास मार बसलेला आहे.

### जखमी लोकांचीं नांवें

डॉ. राईरकर व डॉ. मा. पु. जोशी यांच्या नेतृत्वाखालीं नवीनच निघालेल्या शुश्रूषा-पथकानें शक्य ती शुश्रूषा करून विशेष जखमी लोकांना रुग्णालयांकडे पाठवून दिलें. या जखमी लोकांपैकीं एक वयस्क गृहस्थ साधु मारुति जगदाळे हे पहिल्या तडाक्यासरशीं खालीं पडले असतां त्यांचेवर पुनः लाठ्या व लाथाबुक्यांचे तडाखे एका पोलिसानें दिले. त्यामुळें ते जे बेशुद्ध झाले ते रुग्णालयांत गेल्यावर बऱ्याच वेळानें शुद्धीवर आले. ( २ ) दुसरे श्री. कृष्णाजी मोरेश्वर आपटे. यांच्या डोक्याचे उजवे बाजूस भयंकर जखम झाली असून ससूनमध्यें पोंचल्यावर त्यांना डॉ. नाडकर्णी उपचार करीत असतां २ रक्ताच्या गुळण्या आल्या. तिसरा ( ३ ) ११-१२ वर्षांचा मुलगा रामचंद्र बाळकृष्ण सोनार हा असून त्याच्या कपाळावर जोराचा मार बसला. शिवाय खांद्यावरहि तडाखे बसले आहेत. (४) कमलाकर विनायक कुवळेकर यांना पहिल्या तडाख्यानें

डोक्याचे मागलि बाजूस जबर जखम झाली असतांहि पुनः लाठी मारण्यांत आली. (५) ग्यानोबा शंकर हगवणे यांना टाळूवर ३ इंच लांबीची जखम झाली आहे. (६) माधव बाळा निंबाळकर या गृहस्थाच्या भुवईवर जखम झाली आहे. (७) कोंडीबा सावकार यांसहि तशीच जखम झाली आहे. (८) तात्या भुरके सोनार यांस डोक्याचे मागील बाजूस मोठें टेंगूळ आलें असून त्यांच्या पाठीवर व दंडावर मार बसला आहे. याशिवाय (९) द. ल. बर्वे (१०) प्रभू (११) सादु रंगाजी वागळे वगैरेंना मुका मार चांगलाच बसला आहे. (१२) कोंडिबा दारूडकर गवंडी यांच्या डोक्याच्या उजव्या बाजूस मोठें टेंगूळ आलें आहे. (१३) बापू महादेव सोनावणे यांच्या गुडघ्यास जखम झाली आहे. (१४) सर्वोत्तम जनार्दन खिस्ती पाठीवर, मांडयांवर मार बसला आहे. (१५) फकीराप्पा रफूवाला यास डाव्या हाताच्या कोपरास तडाखा बसला आहे. (१६) मेढी यांना डोक्यास चांगलीच जखम झाली आहे.

या सर्व दंगलींत पोलीस किंवा त्यांचे अधिकारी यांपैकीं कोणालाहि इजा झालेली नाहीं ही लक्षांत घेण्याजोगी गोष्ट आहे.

विशेष जखमी अशा २-३ लोकांच्या औषधोपचाराबद्दल मि. मिल्स व स्मिथ यांनींहि बरीच काळजी घेतली. रात्रीं ८॥ पर्यंत पोलीस व लोक पटांगणाचे आजूबाजूस होते.

# बंगालच्या गव्हर्नरांवर गोळ्या

कलकत्ता येथें ता. ६ रोजीं कलकत्ता विद्यापीठाच्या पदवीदानसमारंभास दुपारीं बरोबर ३–१५ वाजतां सुरुवात झाली. गव्हर्नरांनीं आपल्या भाषणाला ४ वाजतां आरंभ केला व त्यांच्यावर ४–३० ला गोळ्या झाडण्यांत आल्या! सकाळपासूनच विद्यापीठाच्या आवारांत पोलिसांचा बंदोबस्त पक्का होता. समारंभाची नांदी कुलगुरु हसन सुऱ्हावर्दी यांनीं म्हटली व कुलपति गव्हर्नरसाहेब यांनी पुढील प्रवेशांना सुरुवात केली.समारभाचा एक एक क्षण संपत आहे तोंच डॉयसन कॉलेजांतील एक ग्रॅज्युएट विद्यार्थिनी गव्हर्नरसाहेबांच्या व्यासपीठावर चढली, आणि त्यांच्या डोक्यावर पिस्तुल रोखून तिनें पहिला बार उडविला. परंतु तितक्यांत गव्हर्नर सर स्टॅन्ले जॅक्सन हे मागे सरून खाली वाकल्यानें नेम चुकला व गोळी हवेंत अदृश्य झाली. पहिला नेम चुकलेला पाहून ती तशीच पुढें धांवली व दुसरा बार काढण्यासाठीं तिनें आपला पिस्तुलाचा हात पुढें सरसावला. तोंच कुलगुरु सुऱ्हावर्दी यांनी मोठ्या दक्षतेनें तो हात पकडला व तिला खुर्चीला खिळून टाकली. परंतु ती विद्यार्थिनी तेवढयानें न थांबतां तिनें आपल्या पिस्तुलांतील उरलेल्या गोळ्या पांच वेळां झाडल्या!

या भीषण प्रसंगानें सर्वच सभागृह दिङ्मूढ व हतबुद्ध झालें. थोडयाच वेळानें इतर लोक कुलगुरूंच्या मदतीस धांवले.मग त्या तरुणीचे सर्व प्रयत्न थांबून गव्हर्नरसाहेब हे सुदैवानें त्या अत्याचारांतून निभावले.पुढें त्या विद्यार्थिनीला तेथें पोलिसांनीं अटक केली. तिचें नांव वीणा दास असें असून यंदा ती बी. ए. ची परीक्षा उत्तीर्ण झाली होती. 'बंगाल्यांतील अत्याचारी चळवळीमुळें शैक्षणिक प्रगतीलाहि नख लागलें आहे' असे उद्गार गव्हर्नरसाहेबांनीं आपल्या भाषणांत काढले तोंच हा अत्याचार घडला असें म्हणतात. गव्हर्नरसाहेबांच्या अभिनंदनपर तार भारतमंत्री सर सॅम्युअल होअर यांजकडून आली असून विद्यापीठाच्या सिंडिकेटची त्याच दिवशीं तांतडीची सभा होऊन वरील अत्याचाराचा निषेध करण्यांत आला. या अत्याचारानतर ता. ७ रोजीं कु. वीणा दास हिच्या आईबापांना स्पेशल ब्रँच ऑफिसमध्यें नेण्यांत आलें व तेथें त्यांची जबानी घेण्यांत आली. कुमारी वीणेच्या घराची झडतीहि घेण्यांत येऊन कांहीं छायाचित्रें जप्त करण्यांत आलीं. डॉयसन कॉलेजच्या वसतिगृहांतील कु. दास यांच्या खोलीचीहि झडती घेण्यांत आली.

## चीनमधील रणक्षेत्र



# चळवळीचा व दडपशाहीचा अहवाल

;( सरकारी पत्रक )

सविनय कायदेभंगाचे चळवळीसंबंधीं पुण्यांत ज्या ज्या गोष्टी कराव्या लागल्या त्यांचा गोषवारा सार्वजनिक माहितीकरितां खालीं दिला आहे. ऑर्डिनन्स नंबर २ चे कलम ३ खालीं जानेवारी अखेर चळवळींतील ज्या पुढाऱ्यांस व कार्यकर्त्यास अटक करण्यात आली त्यांची संख्या ३७ होती त्यांचा तपशील--

२१ पुणें शहरांतील (त्यांपैकीं ७ टिळक महाविद्यालयांतील) २ लष्कर-हद्दींतील ८ तालुक्यांतील व ४ इतर जिल्ह्यांपैकीं. ५ इसमास सोडून देण्यांत आलें.

वरील सदतिसांपैकीं---२८ कोंकणस्थ ब्राह्मण, ५ इतर जातीचे ब्राह्मण ४ गुजराथी १ परदेशी २ मराठे ३ कुंभार ९ वकील १ शिक्षक २ कायद्याचे विद्यार्थी १३ इतर विद्यार्थी ४ व्यापारी २ जमीनदार.

सविनय कायदेभंगाचे कोणकोणत्या चळवळीबद्दल खटले करून शिक्षा देण्यांत आल्या त्याचा तपशील---

हस्तपत्रकें छापणें व वांटणे याबद्दल (प्रेस ॲक्ट कलम १८ अन्वयें) सभा भरविणे, भाषण करणें व मिरवणुकी काढणें याबद्दल (क्रि. लॉ अ. ॲक्ट कलम १७ (१) व १७ (२) ८२ अन्वयें. यांपैकीं २३ इसमांनीं आपण निरनिराळ्या संस्थांचे डिक्टेटर आहोंत असें सांगितलें. डिस्ट्रिक्ट पोलीस ॲक्ट अन्वयें ९, वसूल न देण्याबद्दल चिथावणी करणें २ (ऑर्डिनन्स नंबर ३ अन्वयें).

पुण्याचे बाहेर चळवळी केल्याबद्दल पुण्यांतील फार थोड्या लोकांवर खटले करण्यांत आले. तालुक्यांत पकडून खटला करण्यांत आलेल्या इसमांपैकीं बहुतेक टिळक महाविद्यालयांतून पाठविण्यांत आलेले विद्यार्थी होते.

**जाती व धंदे याबाबत तपशील**

खटले भरलेल्या १०९ इसमांपैकीं ५० ब्राह्मण होते, व अदमासें ६० तेवीस वर्षे अगर त्याखालील वयाचे तरुण होते.

बहुतेक सभा व मिरवणुकी लहान व परिणामकारक नसल्यामुळें त्यांत प्रत्यक्ष भाषण करणारे व प्रामुख्यानें भाग घेणारे व कायदेभंग करण्याचें ज्यांनीं उघडपणें जाहीर केलें अशा लोकांवरच खटले भरण्यांत आले.

अज्ञानामुळें, गैरसमजामुळें अगर पूर्ण विचाराचे अभावीं ज्यांनीं या चळवळींत भाग घेतला त्यांस न पकडण्याचे कामीं पोलिसांनीं दक्षता ठेविली होती.

कायदेभंग करण्याचे प्रयत्न मग ते कितीहि शुष्क असले तरी ते बुद्धिपुरस्सर व संघटितपणानें करणें क्षम्य होणार नाहीं ही गोष्ट आतांपर्यंत करण्यांत आलेल्या कायदेशीर इलाजावरून स्पष्ट झाली आहे असें आम्हांस वाटतें.

वरील आंकड्यांवरून स्पष्ट होत आहे कीं, पुण्यांतील ही चळवळ---मग तिचेबद्दल सार्वजनिक सहानुभूति कितीहि असो---ती एकदोन जातींतील लहान संघाकडून प्रामुख्यानें संघटितपणे करण्यांत आली आहे, आणि तिचे मदतनीस बहुतेक विद्यार्थी, शाळेंत जाणारीं मुलें व निरुद्योगी तरुण हे आहेत. आतांपर्यंत जे इलाज करण्यांत आले त्यांत जात अगर धंदा याचा विचार न करतां केवळ सार्वजनिक शांतता व सुव्यवस्था यांस हानिकारक अशी चळवळ बंद पाडणें हाच हेतु होता, हें निराळें सांगावयास नको.

# पुणें शहरांत १४४ कलम

क्रिमिनल प्रोसीजर कोड कलम १४४ अन्वयें हुकूम.

ज्याअर्थी आमचे असें निदर्शनास आणिलें आहे कीं, कायदेभंगाचे चळवळीसंबंधीं अगर तिचा पुरस्कार करण्याकरितां सभा, मिरवणुकी व झेंडा-वंदनाचे समारंभ घडवून आणिले अगर केले जात आहेत;

आणि अशा तऱ्हेच्या सभा, मिरवणुकी व झेंडा वंदनाचे समारंभामुळें सार्वजनिक सुरक्षिततेस व शांततेस बाध येण्याचा अगर धोका पोहोचण्याचा संभव आहे;

त्याअर्थी मी, ए. एम्. मॅकमिलन् डिस्ट्रिक्ट

मॅजिस्ट्रेट पुणें, यावरून असें फर्मावितों कीं, कोणाहि इसमानें अशा तऱ्हेची सभा, मिरवणूक अगर झेंडा—वंदनाचा समारंभ घडवून आणूं नये अगर घडवून आणण्याचे कामीं मदत करूं नये किंवा प्रत्यक्ष अगर अप्रत्यक्ष तऱ्हेनें त्यांत भाग घेऊं नये.

या हुकुमाचा पुणें शहर, लष्कर व सबर्बन हद्दींत आज तारखेपासून दोन महिनेपर्यंत अंमल राहील.

या कोर्टाचे सहीशिक्क्यानिशीं आज ता. ५ माहे फेब्रुवारी सन १९३२ रोजीं दिला.

(सही इंग्रजी) ए. एस्. मॅकमिलन,
डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट पुणें.

# असेंब्लींतील घडामोडी

ता. ४ फेब्रुवारीं रोजीं खासगी बिलें असेंब्लींत विचाराकरितां यावयाचीं होतीं; विशेषतः रावबहादुर हरबिलास सारडा यांचें विधवांच्या वारसाहक्कांचें बिल, तसेंच डॉ. गौर यांचें घटस्फोटासंबंधीं बिल यावयाचें असल्यामुळें गॅलरीमध्यें अनेक स्त्रिया होत्या. मद्रास स्त्री-परिषदेनें तसेंच अनेक सामाजिक परिषदांनीं हिंदु कायदो बदलण्याविषयींहि कमिटी नेमण्याच्या सूचना केल्या होत्या व सारडा यांनीं आपल्या बिलाचा मसुदा इतका सुरेख केला होता कीं, जें काय चौकशी कमिटीचें व्हावयाचें तेंच निमूटपणें हें बिल सिलेक्ट कमिटीच्या गाभाऱ्यांत उतरविल्यानें झालें असतें. पण सरकारनें या बिलाला विरोध केला, व तें ५५ विरुद्ध २५ मतांनीं नापास झालें. बिलावर पंडित सेन, रंगा अय्यर, भास्करराव जाधव, पं. मिश्र, लॉ—मेंबर पंडित ब्रजेंद्र मितर इत्यादींनीं भाषणें केलीं. पण या बिलावर वाद असा झालाच नाहीं.

यानंतर डॉ. गौर यांनीं कांहीं विशिष्ट परिस्थितींत घटस्फोटाचा स्त्रियांना हक्क असावा अशा अर्थाचें बिल मांडलें. त्यांत वसिष्ठ व नारद यांच्या अनुकूल मतांचा उल्लेख केला. पंडित सेन यांनीं त्याला विरोध करून लोकमत अजमावण्याकरितां हें बिल प्रसिद्ध करावें असें सांगितलें; व मि. बी. दास म्हणाले कीं, पुढच्या असेंब्लीच्या वेळेला राज्यघटना बदलून बहुधा कांहीं स्त्रियाच असेंब्लींत निवडून येतील. तोंपर्यंत सबुरी करावी.

# हिंदी लोकांच्या वसाहती

(ले.—**गोविंद वामन थोपाटे**, बी. ए. कऱ्हाड.)

हिंदुस्थानसरकारची हिंदी लोकांच्या आकांक्षेबद्दलची अनास्था पदोपदीं जाणवते. ज्या प्रजाजनांना स्वराष्ट्रांतदेखील किंमत नाहीं असे लोक परकीय देशांत कोणत्या रीतीनें वागविले जाणार हें निराळें सांगण्याची आवश्यकता नाहीं. तरी पण अत्यंत विषम परिस्थितींत स्पर्धा करून हिंदी लोक अनेक राष्ट्रांच्या वसाहतींत अत्यंत संपन्न स्थितींत आहेत हें पाहून अभिमान वाटणें साहजिक आहे. आज अदमासें सव्वीस लक्ष हिंदी लोक हिंदुस्थानाबाहेर वसाहती करून राहिले आहेत, तेव्हां त्यांच्या धाडसाचें व कर्तबगारीचें कौतुक करणें योग्यच होय.

## मजुरांचें परदेशगमन

धार्मिक निर्बंधामुळें परदेशगमनाबद्दल आपणामध्यें पूर्वीपासून जरी गैरसमज आहेत तरी जावा, सुमात्रा, सीलोन या ठिकाणीं फार पूर्वीपासून हिंदु लोकांच्या वसाहती झाल्या आहेत. तथापि एकोणिसाव्या शतकापासून परदेशगमनास खरी सुरुवात झाली असें म्हणतां येईल. इ. स. १८०० मध्यें पेनांगच्या ऊंस व नारळी या मळ्यांमध्यें हिंदी मजूर काम करण्यास गेले व त्या वेळेपासून इ. स. १८३४ पर्यंत स्ट्रेट्स सेटलमेंट ओलांडून पेनांगला जाण्याचा क्रम अव्याहत चालू होता. तरी पण हें फारच अल्प प्रमाणांत असे. १८३४ मध्यें जोसेफ आर्गेड नांवाच्या एका श्रीमान् फ्रेंच व्यापाऱ्यानें १५० हिंदी कारागीर बुरबोनला नेले. त्या वेळेपासून परदेशगमनाला प्रोत्साहन मिळत गेलें. त्याच वर्षी ब्रिटिश वसाहतवाल्यांनीं गुलामांची मुक्तता केल्यामुळें धूर्त मळेवाल्यांनी हिंदुस्थानाकडे धांव ठोकली. हिंदी मजूर अज्ञानी, साधा, गरीब असल्यामुळें मॉरिशसमधील मळेवाले यांचा उपयोग करून घेण्यास फारच उत्सुक झाले; व मजुरांचा प्रवाह तिकडे वाहूं लागला. अवघ्या ३ वर्षांत एकट्या कलकत्त्यामधून ७ हजार मजूर मॉरिशसला गेले. जास्त मजुरीचें आमिष दाखविलें जात असे व तिकडे गेल्यावर मात्र त्यांच्यावर जुलूम, जबरदस्ती करण्यांत येत असे. प्रवासांत त्यांचे हाल कुत्रासुद्धां खात नसे. मजुरांशी करारदेखील

त्यांच्या अज्ञानाचा व साधेभोळेपणाचा फायदा घेऊन करण्यांत येत असत. अर्थात् त्याचें पर्यवसान ठींक होणार नाहीं असें लक्षांत येतांच हिंदुस्थान-सरकारनें ली कमिशनला याबाबत सुधारणा करण्यास सुचविलें व कमिशनच्या शिफारशींच्या आधारावर १८२७ च्या ५ व्या ॲक्टान्वयें, (१) कोणताहि करार पांच वर्षांपुढें रद्द, (२) प्रवासामध्यें मजुरांच्या प्रकृतीची काळजी, (३) करारामधील सर्व गोष्टींबद्दलची मजुरांची योग्य समजूत, (४) अशा कराराची एक प्रत हिंदुस्थानसरकाराकडे पाठविण्याची व्यवस्था वगैरे बऱ्याच सुधारणा करण्यांत आल्या. वरील कायद्यानें ब्रि. ग्वायना व ऑस्ट्रेलिया या दोन नवीन वसाहती हिंदी लोकांस खुल्या करण्यांत आल्या. पण ऑस्ट्रेलियाला त्या वर्षी जे एकदां ८९ लोक गेले त्यांवर अद्यापपर्यंत कोणीहि गेलें नाहीं.

## जुलमाची चौकशी

इ० स० १८३८ मध्यें इंग्लंडांत सर्व वसाहतवाल्यांची करुण कहाणी ऐकून मळेवाल्यांविरुद्ध व खाणीवाल्यांविरुद्ध प्रचंड क्षोभ उत्पन्न झाला व होत असलेल्या जुलमाची सरकारानें जाहीर रीतीनें चौकशी करण्याबद्दल जोरानें मागणी झाली. १८४० मध्यें चौकशी कमिटीचा रिपोर्ट बाहेर पडतांच हिंदुस्थान–सरकारास धडकी भरली व एकदम सर्व परदेशगमन बंद करण्यांत आलें. कित्येक अमानुष प्रकार उघडकीस आले. कित्येक मजुरांना जबरदस्तीनें नेलें जात असे, त्यांना पशूसारखें वागवीत, व त्यांचे पगारहि लुबाडीत असत. परंतु अशा प्रकारें हिंदुस्थानसरकारनें परदेशगमनास कायद्यानें बंदी करणें अव्यवहार्य दिसून आल्यावरून १८४४ ती बंदी उठविण्यांत आली. जमेका, ब्रि. ग्वायना, ट्रिनिदाद या वसाहती हिंदी लोकांस खुल्या केल्या व त्यावर नियंत्रण ठेवण्यांत आलें. पुढें १८४७ त सीलोनमधील बंदी उठविण्यांत आली. इतक्यांत फ्रान्सनें १८४९ मध्यें गुलामांची मुक्तता केल्याचें जाहीर केलें. तेव्हां हिंदी वसाहती क्षेत्राचा विस्तार वाढला व ब्रि. वसाहतीवरचा भर कमी झाला. रीयूनियन व बुर्बोन इकडे हिंदी लोक जाऊं लागले. सुसिया १८६० व विन्सर्ट, नाताळ, सेंट किटस या वसाहती १८५८ मध्यें खुल्या झाल्या. अशा ठिकाणीं गेलेल्या हिन्दी लोकांचे हितसंबंधांत चौकशी करून, मार्टिनिक, ग्वाडेलोप, फ्रेंच ग्वायनामधील हिन्दी लोकांकरितां कायदा करण्यांत आला.

एखाद्या विशिष्ट तक्रारीचें अशा कायद्यानें निवारण होत असे. परंतु सर्वसाधारण जुलूम अजीबात कमी झालेला नव्हता. तेव्हां १८६४ च्या १३ व्या कायद्यानें परदेशगमनावरील नियंत्रणावर कडक देखरेख करण्याचें ठरलें. कायद्याचा विशेष रोख वसाहतींमधील हिन्दी लोकांचें आरोग्य याकडे होता. १८६९ मध्यें ग्रेनाडा व १८७२ मध्यें सुरीन या वसाहती खुल्या झाल्या. स्ट्रेटस सेटलमेंटवरचा हिंदुस्थान-सरकारचा ताबा १८६७ मध्यें नाहींसा होतांच तिकडे जाण्यास हिन्दी लोकांस फारच त्रास होऊं लागला. तेव्हां या त्रासाचें परिमार्जन लवकरच करण्यांत आलें. १८७० मध्यें ब्रि. ग्वायनामधील तक्रारी थडकूं लागल्या. त्याच्या पाठोपाठ नाताळ मॉरिशस वगैरे ठिकाणच्या जुलमांचा पाढा वाचण्यांत आला. एकूण काय ज्या ठिकाणीं म्हणून हिंदी लोक गेले त्या ठिकाणीं त्यांना अपरिमित हाल सहन करावे लागले. शेवटीं शेवटीं हे जुलूम अशा थराला जाऊन पोहोचले कीं वायव्य सरहद्द व बंगाल या प्रांतांमधून मजुरांना पळवून नेण्यांत येत असे. लोकक्षोभ अनावार झाला तेव्हां मेजर पिचर व ग्रियर्सन या लोकांना त्या प्रांतांत पाठविण्यांत आलें व वस्तुस्थितीचें निरीक्षण करून रिपोर्ट करण्यास सांगितलें. त्यांनीं सुचविलेल्या सुधारणेस १८८३ च्या २१ व्या कायद्यान्वयें मूर्तस्वरूप देण्यांत आलें. परंतु प्रत्यक्ष परिस्थितींत कांहींच सुधारणा झाली नाहीं. एवढेंच काय पण त्या वसाहतीमधील सरकार हिंदुस्थानांत केलेल्या करारांना मुळींच भीक घालीत नसे. हिंदी वसाहतवाल्यांमधील मृत्यूचें प्रमाण वाढूं लागलें व नाना तऱ्हेच्या रोगांनीं त्यांना हैराण करून सोडलें असतां त्यांना नीट रीतीनें परत हिंदुस्थानास पाठविण्याइतकी माणुसकी देखील दाखविली जात नसे. रियूनियन, मार्टिनिक, ग्वाडेलोप या ठिकाणीं अखेर हिंदी लोकांनीं जाऊं नये असा कायदा १९०८ मध्यें केला.

## हिं. सरकारचें कर्तव्य

अशा तऱ्हेनें नाना तऱ्हेच्या कष्टमय स्थितींत दिवस कंठून आज हिंदी लोक अनेक वसाहतींत तग धरून राहिले आहेत. हिंदुस्थान सरकारची दक्षता फारशी उपेक्षणीय नाहीं. कारण निरनिराळ्या ठिकाणच्या परिस्थितीचें अवलोकन सूक्ष्म रीतीनें करण्यांत येत आहे, व जसजशी हिंदुस्थानामधील राजकीय परिस्थिति सुधारेल तसतशी हिंदी वसाहतवाल्यांचीं गाऱ्हाणीं दूर होण्यास अडचण पडणार नाहीं.

सध्यां ज्या प्रश्नावर विशेष चर्चा चालू असते असे एकंदर तीन महत्त्वाचे प्रश्न हिंदी वसाहतवाल्यांपुढें म्हणजे पर्यायानें हिंदुस्थानापुढें आहेत. १ परदेशगमनावरील नियंत्रण. २ साम्राज्याच्या इतर वसाहतींमध्यें वसाहत करण्याचा हिंदी लोकांचा हक्क. ३ अशा ठिकाणीं गेलेल्या हिंदी लोकांचे राजकीय अस्तित्वास कायदेशीर पाठिंबा. १९२१ च्या

साम्राज्य परिषदेमध्यें पास करण्यांत आलेल्या ठरावास अनुसरून हिंदी वसाहतवाल्यांना नागरिकांचे हक्क मिळावयास पाहिजे होते; परंतु त्या ठरावाचा पुनरुच्चार १९२३ च्या साम्राज्य परिषदेंत हिंदी प्रतिनिधींनीं केला असतां जनरल स्मट्ससारख्यांनीं तो धाब्यावर बसविण्याची उघड धमकी दिली. सिंम्सन कमिटी नेमण्यांत आली, तरी तिचा तादृश उपयोग मुळींच झाला नाहीं. यावरून वसाहतवाल्यांचें नष्टचर्य अद्याप संपलें नाहीं. कांहीं झालें तरी आतां मात्र हा प्रश्न धसास लागणार हे रा. पांड्या ( मुंबासा ) यांच्या करबंदीची चळवळ हातीं घेण्याच्या विचारावरून दिसत आहे.

# खुनशी कारभार आणि खुलाशांचा भडिमार !

मुंबई सरकारचे डायरेक्टर ऑफ इन्फर्मेशन, म्हणजे माहिती खात्याचे, खुलासा–खात्याचे, मुख्याधिकारी यांना हल्लीं बरेंच काम पडूं लागलें आहे.त्यांत नव्या दडपशाही कायद्यांचा अर्थ सांगणें हेंहि एक मोठेंच काम होऊन बसलें आहे. या कायद्यांसंबंधानें जो खुलासा प्रसिद्ध होतो त्यांत कांहीं शब्दार्थांचा खुलासा असतो, व कांहीं धोरणाचा म्हणून खुलासा असतो. कारण शब्दशः अर्थ व धोरण या दोन गोष्टी राजकारणांत दुर्दैवानें सर्वस्वीं एकरूप नसतात. हत्तीचे दाखवावयाचे दांत जसे वेगळे व खावयाचे दांत वेगळे असतात, त्याप्रमाणें कायद्याच्या शब्दांच्या वाच्यार्थांतून प्रगट होणारें धोरण व शब्दामागें दडून राहाणाऱ्या सरकारी मनाचें धोरण हीं वेगवेगळीं असतात. या दोनहि धोरणांचा खुलासा प्रसिद्धी खात्याचे अधिकारी करतात तो अर्थातच आपल्या मनाचा करीत नाहींत; तर वरून खुद्द सरकाराकडून जसा खुलासा लिहून येईल तशाच्या तसा ते प्रसिद्ध करतात इतकेंच. म्हणून या खुलाशासंबंधानें जी टीका कोणी करील तीहि या अधिकाऱ्यावर नसून सरकारावरच असते.

वास्तविक कोणत्याहि कायद्यांतील शब्दांचा अर्थ करण्याचा अधिकार न्यायकोर्टाचा असतो. हातून सुटलेल्या बाणावर जशी तिरंदाजाची सत्ता उरत नाहीं, त्याचप्रमाणें मंजूर होऊन जाहीर झालेल्या कायद्याच्या अर्थावर सरकारची सत्ता उरत नाहीं. पण हल्लींच्या नव्या दडपशाहीच्या हुकुमासंबंधानें सरकारानें एक गोष्ट आधींच करून ठेविली आहे. ती ही कीं,कायद्याचे शब्द अत्यंत व्यापक असे लिहिले आहेत. म्हणजे पोलिसांनीं कोणताहि मनुष्य गुन्हेगार म्हणून कोर्टापुढें उभा केला, व त्यानें कांहींहि केलें म्हणून सांगितलें, तरी त्याला गुन्हेगार ठरविण्यावांचून न्यायाधीशाला बहुधा गत्यंतरच उरत नाहीं. तसेंच शिक्षा व दंड यांच्या कमाल मर्यादा इतक्या विस्तृत करून ठेवलेल्या आहेत कीं, कायद्यांत सांगितलेली भरशिक्षा कोर्टानें दिली तर तो न्याय झाला व थोडीशी कमी दिली तर ती दया दाखविली गेली, असें ठरून शिवाय वरतीं सरकारचें उद्दिष्ट सर्व प्रकारें साधतें.

भ्रामक सूट देण्याचे प्रकार प्रसिद्धच आहेत.सावकारी व्यवहारांत "तीन चोक तेरा आणि तीन अठरा, व त्यांत दोन सूट मिळून सोळा" असा हिशेब अशिक्षित कुळाला सावकार सांगतो,व वरतीं सूट दिल्याबद्दलचा भलेपणा मिरवितो. तसाच कांहींसा प्रकार हल्लींच्या दडपशाही कायद्यासंबंधानें झाला आहे. चळवळींतील निरुपद्रवी साधीं साधीं कृत्यें तीं काय ! व त्यांना शिक्षा किती ठेविली आहे व किती दिली जाते ! हें पाहिलें म्हणजे प्रसिद्धी–पत्रकांतून सरकार स्वतःच्या विचारीपणाची, सहनशीलतेची, मनःसंयमनाची जी टिमकी पिटतें तींत कांहींच अर्थ नाहीं, व वर वर्णिलेल्या सावकारी सुटीचाच तो एक मासला आहे हें कोणालाहि कळून येईल. कायद्यांच्या शब्दांच्या व्यापकपणाची व दंडशिक्षांच्या मोजमापांची अशी स्थिति असतां, व त्याविरुद्ध सर्व लोक–पक्षांनीं कसून व मुद्देसूद टीका केली असतां, ते कायदे सौम्य करण्याच्या दृष्टीनें व्हाइसरॉयसाहेब आपला कांहीं अधिकार चालवीत नाहींत. पण उलट पूर्वी डोळ्यांत तेल घालून, शब्दाचा कीसनूकीस काढून, लिहिलेल्या वटहुकुमांत चुकून जी कांहीं बारीक चीर किंवा भेग उरली असेल ती नव्या शब्दांनीं लिंपून टाकण्याकडे मात्र ते आपला अधिकार चालवीत आहेत.

उदाहरणार्थ, बिनबोलकेपणानें, मौनं व्रतानें, हात जोडून किंवा न जोडूनहि, स्वयंसेवक परदेशी मालविक्रीचें निरोधन करण्यास मुंबईतील दुकानापुढें उभे राहात. पोलिसांनीं अशा स्वयंसेवकांना पकडून त्यांच्यावर खटले भरले, तेव्हां मॅजिस्ट्रेट साहेबांनीं वटहुकुमांच्या शब्दाप्रमाणें तो गुन्हा होत नाहीं असा निकाल दिला. त्यावरून व्हाइसरायसाहेबांनीं वटहुकुमांत नुकतीच दुरुस्ती केली. ती अशी कीं, "या निरोधनाच्या कार्यांत कोणा गिऱ्हाइकास हरकत न करतां, मौनव्रत स्वीकारूनहि, स्वयंसेवक दुकानासमोर किंवा रस्त्यावर उभा राहील तरी तो निरोधनाचा गुन्हा करतो असेंच

समजलें जाईल." तात्पर्य, वटहुकुमांच्या शब्दांत सौम्यतेच्या दृष्टीनें तर फरक होत नाहींच, परंतु ते कडक किंवा व्यापक करण्याच्या दृष्टीनें मात्र जांबईशोध घातले जातात !

वटहुकुमांच्या शब्दार्थासंबंधानें हा प्रकार झाला. आतां अंमलबजावणीच्या धोरणासंबंधानें जे कांहीं खुलासे हल्लीं प्रसिद्ध झाले आहेत, त्यांतील एकहि समाधानकारक नसून, कांहीं तर अगदीं जांवईशोधा-सारखेच आहेत. यासंबंधीं दोन तीन उदाहरणें घेऊं. प्रसिद्धी–खात्याच्या P/61 या नंबरच्या पत्रकांत असें लिहिलें आहे कीं, "हल्लींच्या चळवळींत पडून गुन्हे करणारांची अशी एक गैरसमजूत झालेली दिसते कीं, आपण तुरुंगांत गेलों तरी आपल्याला शिक्षेची पुरी मुदत भोगावीच लागेल असें नाहीं. मुदतीआधींच बहुधा सुटका होईल. परंतु हा त्यांचा भ्रम आहे. तुरुंगांतील कैद्यांना चांगल्या वर्तणुकीबद्दल जितके दिवस बक्षीस मिळून सूट देण्यांत येते, तितकीच सूट हल्लींच्या चळवळींतील कैद्यांना मिळेल, त्याहून अधिक मिळणार नाहीं हें त्यांनीं पक्कें समजावें." वास्तविक या चळवळींत पडणारांना वरीलसारखा भ्रम आहे हा कदाचित् स्वतः सरकारचाच भ्रम असेल ! कारण शिक्षेच्या सूटीचा सट्टा करून तुरुंगांत जाणारे लोक सहसा चळवळींत पडत नसतात. म्हणून आम्ही तर या प्रसिद्धी–पत्रकाचा अर्थ इतकाच करतों कीं, "वट-हुकुम काढण्यापूर्वी सलोखा व सामोपचार न करण्याची जी एक घोडचूक आम्हीं केली तिच्या जोडीला आम्ही दुसरी एक घोडचूक करणार आहों. ती अशी कीं, यापुढेंहि तूर्त आम्हीं कोणाशीं सामो-पचाराचें बोलणें बोलणार नाहीं." तेव्हां हा जांवई-शोध नव्हे तर काय ? असला खुलासा न करतां सरकार स्वस्थ बसलें असतें तरी तें त्यांच्या अब्रूच्या दृष्टीनें अधिक बरें झालें असतें.

P/59 या पत्रकाच्या पहिल्या भागांत क्रिमिनल लॉ अॅमेंडमेंट अॅक्ट कलम १७ (१) आणि ऑर्डिनन्स नंबर २ पैकीं कलम ३, ४ यासंबंधाचा खुलासा म्हणून दिला आहे. पण त्यांत खुलासा असा कांहींच नाहीं. मग केवळ शब्दांची पुनरुक्ति करणें हाच खुलासा होतो अशी सरकारची समजूत असल्यास आमचें कांहीं म्हणणें नाहीं. अज्ञान पंतोजी व चिकित्सक मुलें असा मेळ पडला असतां, समजूत पाडण्याचे दोन प्रकार आढळतात.एक प्रकार असा कीं, "वाच्यतां समयोऽतीतः स्पष्टं अग्रे भविष्यति." म्हणजे "पुढें वाच, आणखी पुढें वाच. म्हणजे अर्थ स्पष्ट होईल." आणि दुसरा प्रकार असा कीं, "एकदां वाचलेंत ना ! पण तें पुरें नाहीं. तेंच पुनः दहा वेळां वाचा म्हणजे आपोआपच अर्थ कळेल." हल्लीं प्रसिद्धी खात्यामार्फत जे खुलासे म्हणून प्रसिद्ध होत आहेत ते जवळ जवळ अशाच स्वरूपाचे आहेत. मग ते न केलेलेच बरें नव्हे काय ?

या पत्रकांत आणखी असाहि एक खुलासा आहे कीं, ऑ. नं. २ कलम १६ यांत 'व्यापार–रेल्वे वगैरे संबंधानें नियंत्रणाच्या कांहीं विशेष गोष्टी करण्याचा अधिकार आम्ही घेतला आहे. त्यांची अंमलबजावणी आम्हीं अद्यापि केलेली नाहीं." पण जें केलें नाहीं तें लोकांना दिसतच आहे. "मी भलतेंसलतें कांहीं करणार होतों; पण तें अजून केलें नाहीं ही कृपाच समजा," इतकाच या खुलाशाचा अर्थ असेल तर त्यानें लोकांना हंसूं मात्र येईल. दुसरा एक खुलासा असा करण्यांत आला आहे कीं, "शासनाचे सर्वाधिकार आज आम्हीं घेतले आहेत. पण कायदा मानणाऱ्या व राजनिष्ठ अशा कोणाहि माणसानें त्याकरितां यत्किंचितहि भीति बाळगण्याचें कारण नाहीं. कोणी स्वदेशी मालाची निपज व उपयोग केल्यास तसेंच 'स्वदेशी माल वापरा' असा प्रचारपुरस्कार ( Advocate ) केल्यास सरकार त्या गोष्टीच्या आड येणार नाहीं. तसेंच जोंपर्यंत एकादा माणूस दुसऱ्या कोणा माणसाच्या हक्कांच्या आड येत नाहीं, तोंपर्यंत एकाद्याशीं धंद्या-बाबत व्यवहार करणें अगर न करणें याबाबतहि त्याला स्वातंत्र्य आहे. सरकार त्या इसमाच्या हक्काला मर्यादा घालूं इच्छीत नाहीं. निरनिराळ्या जातींत पूर्वी असलेले व्यापारी संबंध पुन्हां सुरू व्हावे, तसेंच नवी राज्यघटना होणार तिला लोकांनीं सहकार्यानें मदत करावी, याकरितांच सरकारचे हे प्रयत्न आहेत."

पण सरकारचे हे प्रयत्न याकरितांच आहेत हें 'म्हणणें' लोकांना समजलें नव्हतें कधीं ? व त्यांचा गैरसमज तरी कधीं कशाबद्दल झाला होता ? लाठीच्या तडाक्यानें तर हा समज त्यांच्या डोक्यांत अधिकच बिंबला असेल ! 'हवा त्याच्याशीं मनुष्यानें व्यापार करावा, हवा त्याच्याशीं करूं नये' या संदिग्ध खुलाशानें मात्र सरकारच्या चालू धोरणाविषयीं गैरसमज उत्पन्न व्हावयाचा ! कारण व्यापारी लोकांनीं वाटेल त्याच्याशीं व्यवहार करावा अगर व्यवहार करूं नये हें जर त्यांना स्वातंत्र्य आहे, तर आजच्या दिवशीं व्यापारच करावा किंवा न करावा याचेंहि स्वातंत्र्य त्यांना असलेंच पाहिजे.मग हरताळाकरितां एकाद्यानें आपल्या खुषीनें व स्वयंस्फूर्तीनें आपलें दुकान बंद केलें तर त्याला बोलावून तंबी देण्याचे अगर त्याच्या दुकानालाच मोहर करण्याचे जे उद्योग कित्येक प्रांतांत घडले त्याला काय उत्तर ! व्यापारी

दुकान बंद करतो याचा अर्थ, कोणाशींहि त्यादिवशीं व्यवहार करण्याची त्याची इच्छा नसते. व्यवहार न करण्याचें त्याला पूर्ण स्वातंत्र्य आहे. पण असा खरोखरीच हेतु नसेल तर सरकारनें हा खुलासा करून गैरसमज घालविला कीं उत्पन्न केला ?

'इतरांच्या रास्त हक्कांच्या आड न येतां' या शब्दांचा फायदा घेऊन सरकार म्हणेल कीं, "हरताळ पाडल्यानें निरपराधी राजनिष्ठ प्रजेची कुचंबणा होते." पण ही गोष्ट खरी असली तरी, दुकान आहे म्हणून तें उघडें ठेवण्याची त्याजवर सक्ती करण्याला व्यापारी हा पात्र कसा होतो, हे आम्हांला कळत नाहीं. स्टेशनवरच्या हिलेवाल्या हमालानें सामान उचललेंच पाहिजे, किंवा टांगेवाल्यानें उतारूस बसवून घोडा हांकलाच पाहिजे, त्याप्रमाणें अमुक वाजतां दुकान लावण्याला किंवा उघडण्याला व्यापारी कायद्याप्रमाणें बांधला आहे असें आम्हांस वाटत नाहीं; व सरकारचें डोकें शांत असल्यास त्यांनाहि वाटणार नाहीं अशी आमची खात्री आहे. येऊन जाऊन हा उपद्व्याप राजनिष्ठ लोकांच्या रक्षणाकरितां व सत्याग्रही लोकांना हाणून पाडण्याकरितां ! पण या दडपशाहीच्या सत्रात केवळ दहशतीच्या पायीं अशा किती लोकांना कसकसा निष्कारण जाच झाला हें सरकारला माहीत नाहीं असें नाहीं. म्हणजे रोग पुरवला, पण त्यावरचा हा उपाय नको अशी लोकांची या वेळीं खात्री झाली असेल !

प्रसिद्धी-पत्रकांतील अनवश्यक किंवा भ्रामक खुलाशासंबंधानें हें विवेचन झालें. पण सरकारला करतां येण्यासारखा, किंबहुना त्यांनीं अवश्य करावाच असा एक खुलासा मात्र आम्ही सुचवितो. आम्ही पूर्वी एकदां वर्णन केल्याप्रमाणें 'तोंडांतून सोडला पण पजांत धरला' याप्रमाणें सरकारानें अटक केलेल्या लोकांशीं उंदरा-मांजराचा घातक खेळ चालविला आहे. म्हणजे इकडे देखावा तर लोकांना अटकेंतून मुक्त करण्याचा; पण त्यांजवर अटी अशा लादावयाच्या कीं, स्वाभिमानी मनुष्याला त्या सहसा पाळतां येऊं नयेत व आयतेच त्यानें फिरून तुरुंगांत जावें ! अशा अटींपैकीं एक मासलेवाईक अट ही कीं, बंधमुक्त केलेल्या सद्गृहस्थानें अमुक एका वेळीं पोलिस-चौकीवर जाऊन हजेरी द्यावी. आणि ही अट कशाकरितां घालावयाची ? तर त्यानें हल्लींच्या चळवळीला मदत करूं नये, उत्तेजन देऊं नये म्हणून ! पण अशी अट घालण्यांत मूर्खपणा अधिक कीं दुष्टपणा अधिक हें ठरविणें कठिण आहे.

सरकारला अशा गृहस्थानें चळवळीला मदत करूं नये असें वाटत असेल तर त्याला तसें सरळ विचारावें; व त्यानें ती गोष्ट कबूल केल्यास केवळ त्याच्या शब्दावर विश्वास टाकून राहावें. किंवा त्यानें ही अट कबूल न केली तर त्याला सोडून पुनः पूर्वीप्रमाणें दोन महिनेपर्यंत नव्या वटहुकमाखालीं सरकार कैदेंत ठेवूं शकतेंच. उलट ही अट तोंडानें कबूल करणाऱ्या पण मनानें न मानणाऱ्या गृहस्थाला त्याच्यामागें केवळ हजेरी लावून सरकारला काय साध्य होईल ? हजेरीची वेळ सोडून बाकीची वेळ त्याला आपलें काम करण्याला मोकळीकच आहे ! यापेक्षां अट न घालतां अशा सद्गृहस्थांना नुसता तोंडी हेतु सांगून सोडून दिल्यानेंच कदाचित् सरकारचें उद्दिष्ट कांहीं अंशीं सफल होण्याचा संभव आहे. पण असली अपमानास्पद अट घालून, ती कोणी मोडतो म्हणून त्याला दोन वर्षेपर्यंत कैदेची शिक्षा द्यावयाची यांत मूर्खपणापेक्षां दुष्टाव्याचाच भाग अधिक दिसतो !

सरकार म्हणेल कीं "आपल्याच गुणानें दोन वर्षे पुनः तुरुंगांत गेला." पण यांत खरा गुण कोणाचा हें सुज्ञ लोक ओळखल्याशिवाय राहात नाहीत. सरकारनें या अधिकारांचें कोलीत पोलीस लोकांच्या हातीं दिलें तें त्यांच्याकडून कसें नाचविलें जात आहे याचीं उदाहरणें आतां इतकीं घडलीं आहेत कीं, त्यावरून सुविचार किंवा लाजलज्जा कोळून पिऊन या अधिकाराचा उपयोग केला जात आहे हें कोणीहि म्हणेल ! पोलीस-चौकीवर हजेरी देण्याची अट घालून आदतखोर गुन्हेगारांच्या खालच्या पायरीला नेऊन बसविण्याच्या योग्यतेचे लोक हल्लींसारख्या राष्ट्रीय चळवळींत फारसे पडत नाहींत. भग त्यांतूनहि मुंबईचे सुप्रसिद्ध सॉलिसिटर रा. बाळ गंगाधर खेर बी. ए. एलएल. बी. व धुळ्याचे सात्त्विक पुढारी रा. बाळभाई मेथा एम्.ए.एलएल.बी. अशांना पोलीस चौकीवर हजेरी देण्यास सांगणें म्हणजे ती खुनशीपणाची कमालच होय ! या दोघांहि गृहस्थांना या गुन्ह्यांकरितां कलमांत सांगितलेली भरपूर दोन वर्षांची शिक्षा देण्यांत आली आहे. तात्पर्य ही एक बाब अशी आहे कीं, यासंबंधानें सरकारला खरोखर कांहीं खुलासा करावयाचा असेल तर लोकांना ऐकण्याची इच्छा आहे. एरवीं रेल्वे-टाईम-टेबल वाचून दाखविल्याप्रमाणें, वटहुकुमांच्या कलमांचे अर्थ फिरून फिरून तेच तेच कितीहि ठासून सांगितलें तरी तो सांगणाऐकणाराला वृथा शीण होय.

# स्फुट सूचना

१ गेल्या आठवड्यांत क्रि. प्रो. कलम १४४ खालीं पुण्याचे कलेक्टर मि. मॅकमिलन यांनी नोटीस काढून, कोणीहि माणसानें कायदेभंगाच्या चळवळीशीं संबंध असणारी कोणतीहि सभा पुणें शहर, लष्कर व सबर्बन यांत भरवूं नये, अगर तींत भाग घेऊं नये. तसेंच, अशा सभा मिरवणुकी अगर झेंडावंदनसमारंभ यांत प्रत्यक्ष अगर अप्रत्यक्ष कोणताहि भाग घेतां कामा नये, असें ठरविलें आहे व त्याची अंमलबजावणी एका हातानेंच नव्हे तर दोन्ही हातांनीं सुरूहि झाली आहे! आम्हांला ही नोटीसच कितपत कायदेशीर आहे याचा जबरदस्त संशय आहे. कारण क्रि. प्रो. कोड कलम १४४ (३) यांत या कलमाची कायदेशीर मर्यादा अशी सांगितली आहे कीं, "या कलमाखालीं विशिष्ट व्यक्तीलाच (Particular individual) हुकूम करतां येईल किंवा एखाद्या विशिष्ट जागीं लोक जमत असतील तरच सर्वसाधारण जनतेलाहि उद्देशून हुकूम काढतां येईल. तसेंच एकादी विशिष्ट गोष्ट घडून सार्वजनिक शांततेचा भंग अगर धोका उत्पन्न होत असला, किंवा संभव असला व तो थांबविण्यास ताबडतोबीचा इलाज करणें इष्ट असलें, तरच या कलमाखालीं मॅजिस्ट्रेट यानें हुकूम काढावी असें १४४ कलमांत सांगितलें आहे. "लोकांचे हक्क दडपून टाकण्याकरितां नव्हे तर लोकांच्या हक्कांच्या रक्षणाकरितां किंवा इतरांकडून होणाऱ्या अतिक्रमणाच्या निवारणाकरितांच सदर कलमाचा उपयोग केला जावा" असा ६ मद्रास २०३ यांत निर्णय दिला आहे. तसेंच नुसतें मॅजिस्ट्रेटचें मत नव्हे तर सदर हुकूम काढण्याकरितां कांहीं तरी जास्त सबळ कारणहि दाखविलें तरच सरकारचा हुकूम समर्थनीय ठरतो." (A. I. R. १९२४ पाटणा ७६७), असें असल्यामुळें प्रस्तुतचा सर्व पुण्यावर बजावलेला हुकूम गैरकायदा आहे असें वाटतें. कारण एक तर तो हुकूम विशिष्ट व्यक्तीवर ब[illegible]ला पाहिजे अगर एखाद्या विशिष्ट समुदायानें वि[illegible]ष्ट गोष्ट विशिष्ट जागीं करूं नये असें त्यांत असलें पाहिजे. एखादी विशिष्ट सभा, विशिष्ट मिरवणूक अगर झेंडावंदन हें त्याचे आधीं विशिष्ट इसमांवर नोटीस बजावून सरकारला थांबवितां येईल. पण 'सर्व पुण्यानें दोन महिनेपर्यंत सभा भरवूं नयेत, मिरवणुकी काढूं नयेत' असली नोटीस आम्हांस तरी कायदेशीर आहे असें वाटत नाहीं.

---

२ कारण कांहीं दिवसांपूर्वी असलाच हुकूम बेळगांवास डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट यांनीं काढून तेथील प्रभातफेऱ्यांना बंदी केली. त्यावर कांहीं इसमांनीं मॅजिस्ट्रेटपुढें जाऊन निवळ प्रभातफेऱ्या काढणें ही गोष्ट पूर्णपणें अनत्याचारी व शांततामय आहे, त्यांत कसलाहि घातपात नाहीं असें सांगितलें. पण मॅजिस्ट्रेट गरम होते. ते हा सुविचार थोडाच ऐकून घेणार? त्यांनीं पुरावा घेण्याचें नाकारलें. पुढें अर्जदारांनीं ती गोष्ट हायकोर्टापर्यंत नेली; तेव्हां हायकोर्टानें खालच्या डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटनें १४४ (३) कलमाचा अर्थ अगदीं चुकीचा लावला असें ठरवून पहिला हुकूम रद्द केला. (व्ही. व्ही. बेळवी वि. क्राऊन ३३ बॉं. लॉ रि. पृ. ६८३.) तसेंच ३३ बॉंबे लॉ रि. यांत पृ. ११७८ वर R. Vs. Motilal या केसमध्यें असें स्वच्छ म्हटलें आहे कीं, "सर्वसामान्य जनतेवर हुकूम बजावणें हें बेकायदेशीर आहे; तसा मॅजिस्ट्रेटाला अधिकार पोंचत नाहीं. पोटकलम तीन हा १४४ कलमाचा अपवाद होय व तो लक्षांत ठेवला पाहिजे. विशिष्ट व्यक्तीवरच ही नोटीस बजावतां येते, किंवा विशिष्ट जागीं लोक जमूं नयेत असें असेल तरच सर्वसामान्य जनतेस उद्देशून नोटीस काढतां येते, एरवीं नाहीं." म्हणूनच पुण्याच्या मॅजिस्ट्रेटचें कृत्य आम्हांला गैरकायदा कां वाटतें हें सांगावयास नकोच.

---

३ गेल्या सोमवारीं मुंबई सरकारनें मुंबईच्या क्रॉनिकल पत्राचे संपादक श्री. ल. ग. खरे यांच्यावर क्रॉनिकलमध्यें कायदेभंगाकरितां शिक्षा झालेल्यांचे फोटो अगर नांवें प्रसिद्ध न करण्याबद्दल नोटीस बजावली. वृत्तपत्रांनीं कायदेभंगाच्या चळवळीचे फोटो, शिक्षा झालेल्या लोकांचे संदेश वगैरे गोष्टी प्रसिद्ध करूं नयेत अगा इषारा सरकारच्या प्रसिद्धिखात्यानें दिला होताच. आतां कायदेभंगाच्या चळवळींत पकडलेल्या अगर शिक्षा झालेल्या लोकांचीं नांवेंहि प्रसिद्ध करूं नका असा हुकूम क्रॉनिकलच्या संपादकांना करून सरकारनें वृत्तपत्रांचा बातमी प्रसिद्ध करण्याचा हक्कच काढून घेतला आहे! क्रॉनिकलचे संपादक श्री. खरे हे या हुकुमाच्या कायदेशीरपणाबद्दल आपल्या वकिलांचा सल्ला घेत आहेत असें कळतें. क्रॉनिकलचें नूतन भावंड "इंडियन डेली मेल" या वृत्तपत्रावरहि सरकारची दृष्टि वळणार अशी भीति लोकांना वाटत होती व परवां ती खरीहि ठरली. कारण क्रॉनिकलवर बजावलेल्या नोटिशीसारखीच नोटीस डेली मेलवर बजावण्यांत आली.

---

४ सध्यांच्या ब्रिटिश मंत्रिमंडळानें थोडक्याच अवधींत तीन पापें केलीं व चौथें पुण्यकृत्य करावयाचें तें केलें नाहीं. अशा रीतीनें करण--अकरणरूपी चार

पापांची गणती करून मंत्रिमंडळाविरुद्ध निंदात्मक ठराव मजूर पक्षाचे एक पुढारी मि. लान्सबरी यांनीं मांडला. त्यांनीं गणती केली तीं चार पातकें अशीं. (१) जकातीच्या बिलाची संयुक्त जबाबदारी मंत्रिमंडळानें न घेऊन जुनी वहिवाट मोडली. जी गोष्ट मंत्रिमंडळ करील ती त्यांतील प्रत्येक प्रधानास मान्य असली पाहिजे. ती कांहीं जणांना मान्य नसल्यास एक मंत्रिमंडळ मोडून दुसरें मंत्रिमंडळ बनविण्याच्या पूर्व-तयारीस लागणें आवश्यक होय. सध्यांच्या मंत्रिमंडळांत जकातीसंबंधीं मतभेद असतांहि बहुमताच्या जोरावर त्यानें जकातीच्या बिलाला अनुमति दिली. (२) दुसरें पातक तितकेंच मोठें. इंग्लंड आपणास खुल्या व्यापाराचें पुरस्कर्ते समजत आलें आहे. मंत्रिमंडळानें याहि रूढीस पायाखालीं तुडविलें. (३) हिंदुस्थानांत दडपशाही सुरू केली. (४) सध्यांचे दिवस बेकारीचे असल्यामुळें इंग्लंडांतील गरिबांचे हाल होत आहेत. ते हाल दूर करण्याची मंत्रिमंडळानें कांहींच व्यवस्था केली नाहीं. या चारहि पातकांचा उच्चार निंदात्मक ठराव मांडतांना पार्लमेंटांतील विरोधी पक्षानें केला.

---

५ या हल्ल्याला तोंड मुख्य प्रधान मि. राम्से मॅक्डोनाल्ड यांनींच द्यावयाचें. परंतु ते डोळ्याच्या दुखण्यानें आजारी असल्यामुळें त्यांच्या गैरहजेरींत मंत्रिमंडळाच्या बचावाची जोखीम मि. बाल्डविन यांनीं संभाळली. त्यांनीं संयुक्त जबाबदारीच्या आक्षेपास असें उत्तर दिलें कीं, आम्हीं जें धोरण स्वीकारलें तें स्वीकारलें नसतें तर ब्रिटिश मंत्रिमंडळ इतक्या लवकर मोडून एकट्या इंग्लंडावरच काय पण साऱ्या जगावर मोठें संकट ओढवलें असतें. खेरीज आम्हीं काढली ही तोड मंत्रिमंडळांतील सर्वांनाच पसंत पडल्यामुळें इतरांना दोष लावण्यास काय जागा उरली? जकातीसंबंधीं त्यांनीं खुलासा केला तोहि तितकाच असमाधानकारक होता. 'काय करावें! इंग्लंडची स्थितिच अशी चमत्कारिक झाली, तेव्हां तिजवर तोडगाहि तसाच अपूर्व काढावा लागला,' असें त्यांचें जकातीच्या आक्षेपास उत्तर. उरलेल्या दोन आक्षेपांस उत्तर देण्याची त्यांनीं फिकीरच केली नाहीं. ते फिकीर करतील कशाला! कारण त्यांच्या पुढ्यांत सभासदांचा तांडा एवढा मोठा आहे कीं, कोणत्याहि आक्षेपास कांहींहि उत्तर न देतां ते प्रतिपक्षाचा हल्ला उधळून लावूं शकतील. या त्यांच्या सामर्थ्याचा प्रत्ययहि मतें मोजलीं तेव्हां आलाच. कारण लॅन्सबरी यांच्या ठरावास प्रतिकूल मतें ४३८ पडलीं व अनुकूल अवघीं ३९ पडून निंदात्मक ठराव नापास झाला. प्रतिपक्ष इतका दुबळा असल्यावर तो मंत्रिमंडळाच्या खिसगणतींत असेल कशाला?

# असेंब्लींतील घडामोडी

ता. ६ रोजीं सर जॉर्ज रेनी यांनीं गहूं व मीठ यांवर जो आयात कर आहे त्याची मुदत मार्च १९३३ पर्यंत तशीच ठेवावी असें बिल आणलें. टॅरिफ बोर्डाच्या सूचनेप्रमाणें देशी साखरेला संरक्षण देण्याकरितां परकीय साखरेवर दरमणीं सवासात रुपये जकात बसवावी, व ही जकात सात वर्षें कायम राहावी, असें सांगून बिल सिलेक्ट कमिटीकडे जावें असें रेनी यांनीं सुचविलें. त्याला ए. दास यांनीं पाठिंबा दिल्यावर बिल सिलेक्ट कमिटीकडे गेलें. त्याचप्रमाणें तारेपासून खिळे करण्याच्या धंद्यालाहि फक्त मार्च १९३४ पर्यंत संरक्षण द्यावें असें एक बिल होतें तें व इंडियन एअर फोर्स बिल हीं सिलेक्ट कमिटीकडे धाडण्यांत आलीं. बांबूपासून जो कागद तयार होतो त्याला टनामागें ४५ रुपये जकात बसवून संरक्षण देण्याच्या बिलावर नांवालाच वाद झाला व ऑर्थर मूर यांनीं संरक्षणाच्या नांवाखालीं सरकारला तिजोरींत पैसा अधिक कसा पडेल ही मुख्य काळजी दिसते, असा टोमणा मारला. तथापि हें बिल पास झालें.

# गडावर

कोठें हा तुटला कडा निमुळता, कोठें दरी भीषण।
कोठे मंदिर हें जुनाट पडकें, रानें कुठें निर्जन॥
झाडी दाट, विशाल वृक्ष लपले छायेमध्यें सुंदर।
पाणी स्वच्छ झऱ्यामध्यें झिरपतें सौंदर्य चेतोहर!॥१॥
सौंदर्यामधुनी उदास फिरतां हो वृत्ति कां बावरी।
वाडे ते पडके भयाण बघतां थर्कांप कां हो उरीं?॥
शत्रूंचीं कथिना जिथें फिरकलीं पापी अशीं पावलें।
तेथें नाच अतां उरावर तुझ्या त्यांचे पहा चालले॥२॥
ज्यांचा गंभिर नाद ऐकुन सदा होई अरी कंपित।
त्या तोफा पडल्या धुळींत इथल्या निःशब्दशा लोळत॥

मृत्यूचा जबडा म्हणून अरिंना वाटे जयाचें भय ।
तो हा कां पहिला प्रचण्ड गड हा जेथें अरी निर्भय ॥३॥
ज्यानें उन्नत मस्तकें नमविलीं पायातळीं आपुल्या ।
ज्याच्या कंपित कंपनें दशदिशा कंपाकुला जाहल्या ॥

तो झेण्डा भगवा न येथ डुलतो, तें भंगलें वैभव ।
येतो हाच विचारही मम मनीं हो कालवाकालव ॥४॥
किल्ल्याचे पडके बघून तट हे चित्तांत हेलावले ।
झाले सर्व उदास आणि फिरतां मंदावलीं पावलें ॥

नाशिक —मराठा.

# हें पहा श्रीनगर आणि हें पहा भागानगर !

श्रीनगर हिंदुस्थानच्या उत्तरेस आहे, भागानगर हिंदुस्थानच्या दक्षिणेस आहे. श्रीनगर काश्मीर संस्थानांत आहे, भागानगर हैद्राबाद संस्थानांत आहे. श्रीनगरचा राजा हिंदू आहे. भागानगरचा राजा मुसलमान आहे. श्रीनगरच्या राजाची प्रमुख प्रजा मुसलमान आहे, भागानगरच्या राजाची बहुतेक प्रजा हिंदू आहे. श्रीनगर हिमालयाच्या कृपाकटाक्षांत आहे, भागानगर हें कृष्णा व गोदावरी या नद्यांच्या संनिकर्षांत आहे. पण एक हिंदू राजाच्या व दुसरें मुसलमान नबाबाच्या कब्जांत असल्यामुळें त्यांच्या वस्तुस्थितींत केवढें अंतर पडलें आहे! तें अंतर त्या दोन नगरांतील भौगोलिक अंतरापेक्षांहि मोठें आहे. त्या दोहोंत उत्तर–दक्षिणेचा फरक आहे असें म्हणण्यापेक्षां जमीन–अस्मानचा फरक आहे असें कोणीं म्हटलें तर ते तितके अतिशयोक्तीचें ठरणार नाहीं. कारण श्रीनगरांत अजून श्री आहे म्हणून त्याचें श्रीनगर हें नांव अविकृत स्वरूपांत कायम आहे. पण भागानगरचें मात्र तसें नाहीं. भागानगरांतील हिंदूंचें भाग्य केव्हांच निघून गेलें म्हणून त्याला भाग्यनगर न म्हणतां तदर्थसूचक अशा भागानगर या नांवानें लोक संबोधूं लागले. तरीहि भागानगर या विकृत शब्दावरूनहि पूर्वीच्या भाग्याची स्मृति हिंदूंना होतेच. तीहि होऊं नये यासाठीं त्याला हैद्राबाद असें नवें मुसलमानी नांव दऊन त्या गांवाच्या नांवाकडूनहि धर्मांतर करविण्यांत आलें आहे !

श्रीनगर ज्यांत आहे त्या काश्मीर प्रांताचे महाराज हरिसिंग यांस त्यांच्या नादानपणामुळें तेथील मुसलमान प्रजेस कसें आवरतां येईनासें झालें आहे याचें दिग्दर्शन गेल्या मंगळवारच्या अग्रलेखांत केलेंच आहे. त्यानंतर काश्मीरांत घडलेल्या वृत्तान्तावरून महाराजांच्या मुसलमानी प्रजेनें काश्मीरच्या एका भागांत आपला गव्हर्नर नेमून स्वतंत्र राज्य स्थापल्याचें समजतें. या बातमीनें काश्मीर संस्थानाबाहेरील हिंदु लोकांस काश्मीर येथील हिंदु राज्याच्या भवितव्याविषयीं काळजी उत्पन्न होऊन लेजिस्लेटिव्ह असेंब्लीमधील कांहीं सभासदांनीं सदर बाबतींत व्हाइसरॉय लॉर्ड विलिंग्डन यांजकडे अर्ज पाठवून, हरिसिंगमहाराजांचा आतां अंत न पहातां त्यांच्या मदतीस फौज रवाना करण्याविषयीं दीनवाणीनें याचना केली आहे. दुर्बळ गणल्या जाणाऱ्या प्रजेपासून प्रबळ समजलेल्या राजाला व त्याच्या राज्याला वांचविणें मुष्किलीचें व्हावें याहून दारुण दैवविलसित दुसरें कोणतें असूं शकेल !

हें दैवदुर्विलसित, विरोधाभासाच्या एका खडतर उदाहरणानें तर, हिंदूंचें अन्तःकरण अधिकच विदीर्ण करून सोडणारें आहे. काश्मीरचा हिंदु राजा आपल्या मुसलमानी प्रजेपुढें घाबरला आहे तर हैद्राबादची हिंदू प्रजा आपल्या मुसलमान राजाच्या जुलमापुढें भेदरून गेली असून तिनें निजामसाहेबांकडे 'ही छळणूक पुरे करा. आतां हात आटोपा' असा धाय मोकलणारा अर्ज पाठविला आहे. हिंदूंच्या डोळ्यांसमोर हीं दोन चित्रें दोन बाजूंस उभीं आहेत. एका चित्रांत मुसलमान प्रजेस हिंदु राजा भ्याला आहे व दुसऱ्या चित्रांत मुसलमान राजास हिंदू प्रजा भ्याली आहे. हिंदू राजे मुसलमानांपुढें हिंदू प्रजेइतकेंच हतबल व हतवीर्य झाले आहेत असेंच हीं दोन चित्रें पाहून जगानें समजावयाचें काय ?

काश्मीरचा राजा हिंदू व हैद्राबादचा राजा मुसलमान यामुळें या दोन संस्थानांच्या भवितव्यांत एवढाच फरक पडला आहे असें नाहीं. काश्मीरची सांप्रतची बंडाळी सोडून दिली व त्याच्या वैभवाचा विचार केला तर तें वैभव वाढविण्यास जितकें निसर्गाचें साहाय्य झालें आहे तितकेंच तेथील महाराजांचें कलाकौशल्यास मिळत गेलेलें प्रोत्साहनहि कारण आहे हें कोणीहि कबूल करील. काश्मीरावर निसर्गाची बहाल मर्जी आहे. त्याच्या माथ्याशीं हिमाच्छादित हिमालयपर्वत रौप्यराशीसारखा चकाकत आहे. त्याच्या पायथ्याशीं अनेक निर्झरिणी गीतें गात वहात आहेत. त्याच्या गळ्यांत गुलाबाचे हार रुळत आहेत. त्या गुलाबांशीं व त्या गुलाबासारख्याच कोमल व रुचिर पत्र–पुष्पांशीं स्पर्धा करणाऱ्या शानदार शाली तेथील कसबी कारागीर शेंकडों वर्षें अव्याहत बनवीत आले आहेत.

अशा त्या ईश व नरेश यांच्या प्यार्‍या प्रदेशाची कीर्ति त्यांत पैदा होणार्‍या केशराचा परिमल दश दिशांना पसरवीत आहे.

हैद्राबाद संस्थानाचेंहि गतवैभव असेंच होतें;पण आज मात्र तें तसें नाहीं.निजामशाहीतील हा मुलूख काश्मीरा-इतका परमेश्वराच्या प्रीतीस पात्र झालेला नाहीं. त्याचें महत्त्व ईश्वरीकृपेपेक्षां मानवी कृतींतच अधिक दृष्टीस पडते. तेथील कारागिरांच्या अचाट करामती-चे अजबखाने गिरिराज सह्याद्रि आजहि आपल्या हृदयसंपुटांत धारण करीत आहे. सह्याद्रि कसला कुळकुळीत काळा व कठिण पर्वत. समुद्राचें पाणी जितकें खारें तितकें या पर्वताचें काळीज कठोर. पण कुशल पाणबुड्या त्याच खार्‍या पाण्यांतून पाणीदार मोत्यांचा शोध लावतो, त्याप्रमाणें प्राचीन क्षत्रिय राजांच्या आश्रयाखालील कसबी लोकांनीं त्याच पर्वताच्या काळ्या कातळांतून अजंठा व वेरूळ येथें सृष्टिदेवतेचीं सुंदर व भव्य लेणीं घडवून ठेवलीं असून तीं सोन्या–मोत्यांच्या लेण्यांहूनहि अमोलिक व अलौकिक ठरलीं आहेत. त्या काळ्या लेण्यांना त्यांनीं लावलेले कृत्रिम रंग सोन्यामोत्यां-च्या नैसर्गिक रंगांनाहि लाजविणारे आहेत व त्यांत कोरलेल्या कैलासाची कीर्ति धवलपणांत त्या उत्तरे-च्या धवल कैलासासहि फिक्की पाडणारी आहे.

जेथील कारागीर प्रतिकैलास निर्माण करूं शक-तात तेथील कारागिरांना निर्माण करण्यास अशक्य असें काय आहे ! काश्मीरच्या पलीकडे परमेश्वरानें कैलास उभा केला आहे, तसा मोगलाईतील मराठवाड्यामध्यें मनुष्यानें दुसरा कैलास कोरला आहे. काश्मीरच्या कसबी विणकरांनीं कृत्रिम फुलांचे गालिचे गुंफले आहेत, तशा पैठणच्या कोष्ट्यांनीं भर-जरीच्या व वेलपत्तीच्या पैठण्या विणल्या आहेत. पण ही कृति मनुष्याच्या आटोक्यांतील आहे; ती त्यांनीं केली यांत फारसें आश्चर्य नाहीं. त्याहूनहि खरें आश्चर्य मनुष्यानें–नरानें नारायण होण्यांत आहे. असे नारायण मराठवाड्यांतील पवित्र गोदावरीच्या वाळ-वंटांत व तिच्या आसमंतांत कैक होऊन गेले आहेत. ते जोगाईच्या आंब्याचे पंत, पैठणचे नाथ, देवगिरी-वर देवत्व पावूनहि जनांत वावरणारे जनीं जनार्दन, व जांबचे श्रीसमर्थ रामदास हीं नारायणाचींच निर-निराळीं नांवें नव्हेत काय?

हे नर व नारायण जी पुण्यभूमि प्रसवली त्या भूमीस आज स्मशानभूमीची कळा येत चाललेली पाहून कोणा महाराष्ट्रीयाचें मन दुःखित होणार नाहीं ! त्या भूमीचे ते सद्गुण शातवाहन, चालुक्य,राष्ट्रकूट, यादव इत्यादि राजघराण्यांच्या राजवटींत उत्कर्षास पावले व पैठण, कल्याण, मालखेड, देवगिरी या त्यांच्या राजधान्या भरभराटीस आल्या. शास्त्रें, विद्या व कला-कौशल्य यांचा उदय याच काळांत होऊन विज्ञाने-श्वर, भास्कराचार्य, लक्ष्मीधर, अमलानंद यांना व यांसारख्या इतर अनेक पंडितांना राजाश्रय मिळून हिंदु धर्म व हिंदुसंस्कृति यांचीं पाळेंमुळें महाराष्ट्रांत खोल शिरून त्यांचा वृक्ष आपल्या शाखा-पल्लवांच्या व पुष्पराशींच्या वैभवांत डुलत राहिला. पण महाराष्ट्राचें हें वैभव अल्लाउद्दिनाच्या स्वारीपर्यंत व बहामनी राज्याच्या स्थापनेपर्यंतच टिकलें. तेव्हां-पासून गेलीं सातशें वर्षे त्या वैभवाचा कृष्णपक्षां-तील चंद्राप्रमाणें कलेकलेनें लोप होऊन आतां त्या अव्वल महाराष्ट्रांत अमावास्येच्या रात्रीचा काळोख पसरत चालला आहे.

हैद्राबादचे विद्यमान निजाम उस्मानअली हे नवे औरंगजेबच भासतात. जुन्या व या नव्या औरंगजेबांत फरक इतकाच कीं,जुना औरंगजेब सोळाव्या शतकांत अवतरला व हे नवे औरंगजेब विसाव्या शतकांत जन्मले आहेत. या कारणानें दोघांचा उद्देश एक असला तरी मार्ग भिन्न आहेत. औरंगजेब हिंदूंचीं देवळें पाडून मशिदी बांधीत असे, मूर्ती फोडीत असे व क्षेत्रें भ्रष्टवीत असे. त्याच्या कारकीर्दीत हिंदूंवर अपमानास्पद असा जीजिया कर बसविण्यांत येत होता आणि एका हातांत कुराण व दुसर्‍या हातांत खड्ग घेऊन हिंदूंना मुसलमानी धर्माची दीक्षा जबरदस्तीनें देण्यांत येत होती. तशा प्रकारचा जुलूम मोगलाईंत आज हिंदूंवर उघडपणानें होत नाहीं हें खरें आहे. कारण शतक विसावें पडलें व अधिराज्य इंग्रजांचें झालें. तथापि मनुष्याचा विशेषतः सत्ताधारी व संपत्तिमान अशा राजाचा हेतु प्रबळ असला म्हणजे तो त्याला कोणत्याहि उपायांनीं सिद्धीस नेतां येतो. त्याला नवीन युक्त्या सुचतात व त्या त्याला स्वतःला न सुचल्या तर भोवतालचे मुत्सद्दी सुचवि-तात. गळा तलवारीनेंहि कापतां येतो, पण तो केसा-नेंहि कापण्याचें कसब ज्याला हस्तगत झालें त्याची अक्कल तलवार चालविणारापेक्षां साहजिकच लोक बडी समजतात.

मोंगलाईंत सांप्रत निजामसाहेब व त्यांचे अधिकारी हिंदूंचीं देवळें पाडून त्या जागीं मशिदी बांधीत नाहींत, मूर्ती फोडीत नाहींत किंवा क्षेत्रेंहि मुद्दाम भ्रष्टवीत नाहींत. पण तीं देवळें न पाडतां पडावीं, मूर्ती न फोडतां फुटाव्या व क्षेत्रेंहि न भ्रष्टवितां उजाड व्हावीं हें कार्य आपण कांहींसे नामानिराळे राहून जर घडवितां आलें तरच तो राजा विसाव्या शतकांत राज्य करण्यास लायख ! कारण निजामसाहेब आपल्या हुकुमानें हिंदूंचीं देवळें पाडीत आहेत असें कळ-ल्यास ब्रिटिश सरकारची निजामसाहेबांवर एरव्हीं

कितीहि कृपा असली तरी ब्रिटिश सरकार असलें जुलूम मोंगलाईत देखील क्षणभरहि चालूं देणार नाहीं. याकरितां निजामांना आपली अक्कल फारच धूर्ततेनें व शिताफीनें लढवावी लागत आहे.

निजामांच्या कृतीवरून त्यांचा हेतु आपलें राज्य हें एक मुसलमानी राष्ट्र बनविण्याचा स्पष्ट दिसतो. त्यांचें राज्य आंध्र, महाराष्ट्र व कर्नाटक अशा तीन राष्ट्रांच्या तीन अंशांनीं बनलेलें आहे. त्यांत आंध्र म्हणजे तेलंग ६० लक्ष, महाराष्ट्रीय ३४ लक्ष व कर्नाटकी १६ लक्ष आहेत; म्हणजे एकंदर लोकवस्तींत हिंदू लोक ९५ टक्के असून बाकीचे पांच टक्के मुसलमान आहेत. या पांच टक्क्यांत मुसलमान तेरा लक्ष आहेत या तेरा लक्ष मुसलमानांच्या मशिदींत मुसलमान बनलेल्या हिंदूंना दर शुक्रवारीं नमाज पढण्यासाठीं बसवावयाचे हा पाताळयंत्री प्रयत्न सहज व सत्वर साध्य होणारा नव्हे. औरंगजेब सर्वसत्ताधीश असतां व कोणाहि हिंदूची सुंता करून मुसलमानांच्या गोटांत सोडण्याच्या कामीं त्याचा हात धरणारा कोणीहि नसतां त्याला आपल्या पन्नास वर्षांच्या कारकीर्दीत हिंदुस्थानावरील हिंदू धर्माचें प्रभुत्व कांहीं हिरावून घेतां आलें नाहीं. त्या मानानें निजामसाहेबांची सत्ता मर्यादित व साधनेंहि निरुपायामुळें दीर्घसूत्री स्वीकारावीं लागलेलीं, याकारणानें त्यांना आपला मतलब साधण्याकरितां किती अडचणींना तोंड द्यावें लागत असेल हे त्यांचें त्यांनाच माहीत ! त्याची खरी कल्पना इतरांना काय होणार ?

तथापि ह्याप्रीत्यर्थ त्यांनीं व त्यांच्या मुसलमान अधिकाऱ्यांनीं जे कायदेकानू केले आहेत आणि दीर्घोद्योग आरंभिले आहेत ते पाहून त्यांच्या मुसलमानी धर्माच्या उत्कट अभिमानाविषयीं त्यांच्या शत्रूंनाहि त्यांची तारीफच करावीशी वाटेल. निजामांनीं आपले खालपासून वरपर्यंत बहुतेक सर्व अधिकारी मुसलमान नेमले आहेत. राज्यकारभारांतून व राजकीय धोरण ठरविण्याच्या जागांवरून त्यांनीं हिंदूंना समूळ हुसकून लावलें आहे म्हटलें तरी चालेल! ज्या सेक्रेटरीएटमध्यें सर्व प्रकारचें राजकारण शिजतें त्यांत एखादा दुसरा हिंदू अधिकारी नांवालाच सांपडेल. सबंध निजामशाहींत एकहि तालुकदार किंवा सुभेदार हिंदु नाहीं. कार्यकारी कौन्सिल हें सर्व राज्यकारभाराच्या शिरोभागीं. सर्व सत्ता त्याच्या स्वाधीन. ब्रिटिश सरकारच्या वरिष्ठ व प्रांतिक कार्यकारी मंडळांतहि बरेच सभासद ब्रिटिशेतर म्हणजे हिंदी आहेत. पण निजामांनीं या बाबतींत इंग्रजसरकारावरहि ताण करून आपल्या कार्यकारी मंडळांत एकाहि हिंदूचा सभासद या नात्यानें शिरकाव होऊं दिलेला नाहीं.

लोकसंख्या मुख्यतः हिंदूंचीच असल्यानें त्यांना न्याय देणारे न्यायधीश हिंदु-धर्माचे व हिंदु-धर्मीय रीतरिवाज व कायदा जाणणारे ठेवल्यास हिंदूंना न्याय मिळणें सुलभ व सोयीस्कर होईल यांत शंका नाहीं. पण त्यांची इतकी सोय पाहिल्यावर त्यांजवर बसलेल्या मुसलमानी सत्तेचा उपयोग तो काय झाला? या न्यायखात्यांतील बहुतेक सगळ्या जागा मुसलमानांनींच व्यापल्या आहेत. हीच स्थिति शिक्षणखातें, पोलीसखातें इत्यादि सर्व खात्यांची असल्यामुळें तेथील हिंदु प्रजा मुसलमानांच्या फरासखान्यांतच अडकविल्यासारखी झाली आहे. सारांश, हिंदूंचा धर्म मुसलमानांनींच ठरवावयाचा, हिंदु-धर्माचें रक्षण मुसलमानांनींच करावयाचें व हिंदूंच्या मुलांना शिक्षण मुसलमानांनींच द्यावयाचें! मेंढरांची राखण करण्याचें काम मेंढवाड्याभोंवतीं लांडगे बसवून त्यांच्यावर सोंपवावें त्याप्रमाणें मोगलाईतील हिंदूंची अवस्था झाली आहे. चार लांडग्यांनीं मेंढवाड्याच्या चार कोपऱ्यांवर बसावें, एकएकानें एक एक मेंढरूं प्रत्यहीं सावकाश मटकावावें, तें मटकावतांना आहारविहाराचे नियम शास्त्रोक्त पद्धतीनें पाळावे, असें क्रमशः करीत करीत संबंध मेंढवाड्याचा मेंढवाडा कांहीं वर्षांनीं उजाड पाडलेला दाखवावा अशा प्रकारचें धोरण निजामसरकारानें हिंदूंच्या बाबतींत धर्मदृष्ट्या सांप्रत स्वीकारलें आहे.

या धोरणाविरुद्ध हैद्राबादेंतील हिंदु लोक अर्ज कोणाकडे करीत आहेत? तर निजाम-सरकारच्या कार्यकारी कौन्सिलच्या अध्यक्षाकडे किंवा पर्यायानें निजाम-सरकारकडेच. उलटपक्षीं काश्मीरांतील मुसलमान लोक अर्जविनवण्यांचा मार्ग तुच्छ लेखून हरिसिंग महाराजांनाच आपणापुढें दांतीं तृण धरून गुडघे टेकावयास लावण्याकरितां स्वतंत्र राज्य स्थापन करीत आहेत. तेथील मुसलमानांना बाहेरच्या मुसलमानांची मदत असल्यानें त्यांनीं आपलें कारस्थान रंगवीत रंगवीत अशा बेताला आणिलें आहे कीं मौ. शौकत अलीसारखे अट्टल मुसलमान भोपाळच्या नबाबांना महाराज व मुसलमान यांच्यांत मध्यस्थी करण्याची सुपारी देऊन श्रीनगरच्या महाराजांवर आपण फार उपकार करीत आहों अशी ऐट मारीत आहेत. सारांश, श्रीनगरच्या मुसलमानांनीं महाराजाविरुध्द युद्धाचीहि पायरी केव्हांच ओलांडली आहे व उलटपक्षीं भागानगरच्या हिंदूंनीं निजामाविरुद्ध अर्जाची पहिली पायरी आता कोठें भीत भीत चढली आहे. हा विरोध उघडाउघड दृष्टीस पडतो म्हणूनच शिरोभागीं लिहिल्याप्रमाणें हें पाहा श्रीनगर आणि हें पाहा भागानगर असे उद्गार सहजच तोंडीं येतात.

# पुस्तक-परीक्षण

## लाला लजपतराय
### किंवा
## नवयुगाचा पूर्वरंग

पंजाब प्रांताची इभ्रत सर्व हिंदुस्थानांत वाढण्यास ज्या पुरुषांचीं चरित्रें कारण झालीं त्यांपैकीं लाला लजपतराय हे प्रमुख होत. ते देशभक्त या नात्यानें आबालवृद्धांस माहीत आहेत. पण त्यांची ही देशभक्ति केवळ राजकीय स्वरूपाची नव्हती. राजकारण ही त्यांच्या आयुष्यांतील प्रधान देवता असली तरी तिच्या प्रभावळींत धर्म, समाज, शिक्षण, इत्यादि रूपें धारण केलेल्या इतर देवता अनेक होत्या. या कारणानें लजपतराय यांच्या देशभक्तीस एकांगीपणा न येतां ती सर्वांगपरिपूर्ण बनली होती. पंजाबांत स्वामी रामतीर्थ, लाला हंसराज, स्वामी श्रद्धानंद इत्यादि बरेच प्रसिद्ध व कर्तृत्ववान् पुरुष जन्मास आले. पण त्या सर्वांचें कर्तृत्व एखाददुसऱ्या विशिष्ट कार्यानेंच प्रगट झालें होतें. लाला लजपतराय व इतर पंजाबी थोर गृहस्थ यांच्यामधील फरक हाच होय. अशा रीतीनें लजपतराय यांच्या ठिकाणीं पंजाबी लोकांचे बहुतेक सर्व श्रेष्ठ गुण दृष्टीस पडत असल्यानें लालाजींना पंजाबचे आदर्श पुरुष मानण्यास हरकत नाहीं. हा मान मिळण्याचें भाग्य फारच थोड्यांच्या दैवीं लिहिलेलें असतें. या दृष्टीनें पनवेलचे रा. सदाशिव कृष्ण फडके वकील यांनीं चरित्रलेखनास लाला लजपतराय यांचीच निवड केली हें योग्य झालें असें आम्ही म्हणतों. रा. फडके यांनीं 'नवयुगधर्ममाला' या नांवाची माला सुरू केली असून तिच्यांत हें पुस्तक तिसरें पुष्प म्हणून त्यांनीं गोवलें आहे, व त्याला नवयुगाचा पूर्वरंग असें दुसरें नांव दिलें आहे. हें नांव लालाजींच्या चरित्रास देण्यांत हिंदुस्थानांत सांप्रत राजकीय, सामाजिक व धार्मिक दृष्ट्या ज्या नवीन मनूस सुरुवात झालेली दिसते तिचीं कांहीं चिन्हें लालाजींच्या चरित्रांत आढळतात हाच हेतु असावा.

### मुसलमानी संस्कृतीचा पगडा

लालाजी विचारी पण तापट, त्यागी, बुद्धिमान, उद्योगी व कर्तृत्ववान् होते. त्यांच्या या गुणांना स्वधर्माभिमानाचें व देशाभिमानाचें वळण लागलें हें पंजाबचें व त्याबरोबरच हिंदुस्थानाचें सुदैवच म्हटलें पाहिजे. कारण त्यांच्या बाल्पणांत त्यांच्या पिढींतील माणसें निराळ्याच प्रकारचीं निपजावीं अशी परिस्थिति होती. पंजाब प्रांताची कल्पना महाराष्ट्रावरून होण्यासारखी नाहीं. महाराष्ट्र हा हिंदूंचा प्रांत आहे, तसा पंजाब नाहीं. पंजाब हिंदुस्थानाचा भाग असला तरी त्यांत मुसलमान हिंदूंपेक्षां संख्येनें अधिक आहेत आणि शीख हिंदूंच्या खालोखाल आहेत. त्यामुळें पंजाबांत लजपतरायांच्या बाल्पणीं तरी त्या तीनहि धर्मांची खिचडीच बनली होती. किंबहुना या तीन धर्मांना धर्माचें स्वरूप राहिलें नसून पंथांचें स्वरूप त्यांस आलें होतें. निदान हिंदुधर्मीय लोकांचे आचार तरी तितके शिथिल बनले होते. लाला लजपतराय यांचें घर घेतल्यास त्यांत हा नमुना उत्कृष्ट आढळत होता. लालाजींचे वडील राधाकृष्णजी यांनीं फार्सी भाषेत प्रावीण्य मिळविलें होतें त्यामुळें व मुसलमान उलेमामौलवींत बसण्या-उठण्यानें त्यांजवर मुसलमानी संस्कार इतके दृढ झाले होते कीं, ते कर्मठ मुसलमानाप्रमाणें रोज नमाज पढत व रमजान महिन्याचे उपवासहि करीत !

### गुलाबदेवीची स्वधर्मनिष्ठा

लालाजींच्या पित्याची अवस्था ही. आतां आईच्या माहेरची रीत. तिच्या माहेरीं शीख धर्माचें फार प्राबल्य होतें. तिचे आई, बाप, भाऊ सारे शीख-धर्मीयच होते. अशा परिस्थितींत वाढलेल्या लालाजींस हिंदुधर्माचा अभिमान तो काय वाटावा ! त्यांतल्या त्यांत एवढें बरें कीं, त्यांची आई गुलाबदेवी हिच्या माहेरचीं माणसें शीख बनलीं असतांहि गुलाबदेवीचा हिंदुधर्माभिमान जिवंत होता, आणि तोच लालाजींस व त्यांच्या पित्यास तारक झाला. त्यांचा पिता मुसलमानी धर्माचीच दीक्षा घ्यावयाचा, पण गुलाबबाईंच्या प्रेमळ दांडगेपणामुळेंच तो दीक्षा घेण्याचा थांबला. खुद्द लालाजी बापाच्या उदाहरणानें मुसलमानी धर्माचे चहाते बनले. लालाजींस शाळेंत शिक्षण मिळालें त्यांत तरी हिंदु संस्कृतीस कोठें थारा होता ! उर्दू, पारशी व आरबी यांशिवाय त्यांस अन्य भाषा येत नव्हती, आणि त्यांच्या वाचनांत इस्लामी धर्मग्रंथांशिवाय दुसरे ग्रंथहि आले नव्हते. इतकेंच काय, पण लालाजी एक वेळ मुसलमान बनण्याच्याहि बेतांत आले होते. असा सर्वस्वीं मुसलमानी संस्कारांनीं ग्रासलेला माणस कधीं काळीं हिंदु संघटनेचा व हिंदुधर्माचा अभिमानी व कट्टा पुरस्कर्ता बनेल हें भविष्य ज्योतिष्यानें वर्तविलें असतें तर कोणास खरेंहि वाटलें नसतें !

### मत-क्रांति

या संकटांतून लाला लजपतराय यांस कोणीं वांचविलें असलें तर त्यांच्या आईनें; व त्याहूनहि दयानंद-सरस्वतीच्या आर्य-

समाजानें. दिल्लीस भरलेल्या एका आर्यसमाजाच्या सभेंत त्यांनीं सदर समाजाच्या कार्यावर वयाच्या बाराव्या वर्षीच व्याख्यान दिलें, व त्यांत गाजविलेल्या वक्तृत्वावरून त्यांची तेव्हांच मोठी कीर्ति झाली. त्यांची समाजाच्या कार्यावरील ही निष्ठा दिवसेंदिवस वाढतच गेली. लालाजींच्या धर्ममतांत जशी ही एक विलक्षण क्रांति झाली, तशीच त्यांची दुसरी क्रांति त्यांच्या राजकीय विचारांत झाली. ते प्रथम इंग्रजी राज्यपद्धतीचे मोठे चहाते होते. पण बंगालचे प्रसिद्ध वक्ते सुरेंद्रनाथ बानर्जी सन १८८० सालीं पंजाबांत आले असतां त्यांचें भाषण ऐकून लालाजींचीं राजकीय मतेंहि बदललीं आणि हा फरक अनुभवानें व वाचनानें वाढत जाऊन ते आयुष्याच्या अखेरीस स्वराज्यवादी व ब्रिटिश राज्यपद्धतीचे पक्के द्वेष्टे बनले, हें सर्वांस माहीतच आहे.

### खणखणीत वक्तृत्व

लालाजींच्या पित्याला पगार दरमहा अवघा २५ रुपये मिळत होता. इतक्या लहान पगारांत राधाकृष्णजी आपला मोठा संसार चालवून पुत्राच्या शिक्षणाकरितां कितीसा पैसा राखूं शकणार! त्यामुळें स्वाभाविकच लजपतरायांस आपलें शिक्षण अर्धवट सोडून व मुखत्यार वकिलीच्या परीक्षेस बसून पोटाच्यामागें लागावें लागलें. ते प्रथम मुखत्यार वकील झाले, व पुढें दोन वर्षें धंदा केल्यावर वकिलीची परीक्षा उत्तीर्ण झाले. त्यांच्या शिक्षणानें पदवी-परीक्षेची मजल गांठली नसतांहि लालाजींनीं इंग्रजी भाषेवर इतकें प्रभुत्व मिळविलें व ज्ञानांत चांगल्या विद्वानांचीहि बरोबरी केली, ही गोष्ट त्यांना अत्यंत भूषणावह समजली पाहिजे. इंग्रजी व हिंदी या दोनही भाषा त्यांना करतलामलकवत् होत्या. या दोनही भाषांतील वक्तृत्वांत त्यांची बरोबरी करणारे वक्ते हिंदुस्थानांत हाताच्या बोटांवर मोजण्याइतके मिळतील की नाहीं याची शंका आहे. बाटोळा बांधा, गौरवर्ण, भव्य मुद्रा व डौलदार पंजाबी फेटा यायोगानें लालाजींची छाप श्रोतृवृंदावर प्रथमदर्शनींच पडे. त्यानंतर खणखणीत आवाजांत त्यांची वाग्गंगा सुरू झाल्यावर श्रोतृवृंद केवढाहि अफाट असला तरी लालाजींचें भाषण सर्वांस ऐकूं जावें इतका तो स्तब्ध राही.

### चिकाटी व धडाडी

लालाजींत एक गुण विशेष म्हटला म्हणजे ते ज्या विषयाच्यामागें लागत त्यांत अगदीं गर्क होऊन जात. कोणतेंहि काम अर्धवट करणें त्यांना माहीत नव्हतें, व तें काम तडीस लावण्यासारखें बौद्धिक, शारीरिक व मानसिक सामर्थ्यहि त्यांच्यांत होतें. ते लेख, भाषणें, दौरे व पैसा हें चतुरंग सैन्य जमवून इष्ट कार्य घडवून आणीत. ते आर्यसमाजिस्ट होते एवढें सांगितल्यावर ते सामाजिक सुधारक होते असें वेगळें सांगण्याची गरजच नाहीं. अस्पृश्यतानिवारणाची चळवळ संयुक्त प्रांतांत सुरू झाली तेव्हां लालाजींनीं ती इतकी मनावर घेतली कीं, त्यांना अस्पृश्यांच्या घरचें अन्न व पाणी ग्रहण करण्यांतहि किंतु वाटला नाहीं. अशा प्रकारें अन्न ग्रहण करून काशीस आल्यावर तेथील जाहीर व्याख्यानांत त्यांनीं आपणास बहिष्कृत करण्याविषयीं काशीच्या ब्रह्मवृंदांना आव्हान दिलें. शूर शिपायासारखी त्यांची वृत्ति धाडसी असल्यानें त्यांनीं याहूनहि जास्ती धोक्यांत सायमन कमिशन–बहिष्काराचे वेळीं आपला जीव कसा घातला व त्या धाडसानें त्यांचा मृत्यु कसा जवळ आला हें वृत्त वाचकांच्या ताज्या स्मरणांतीलच आहे.

### ग्रंथलेखन

लजपतराय यांची ज्ञानलालसा जबर होती. सार्वजनिक चळवळींत पडणारा मनुष्य ग्रंथवाचन व ग्रंथलेखन यांस जवळजवळ पारखाच होतो म्हटलें तरी चालेल. लालाजींचें सर्व आयुष्य चळवळींत गेलें. तथापि त्यांच्या वाचनास व लेखनास खंड कधींहि पडला नाहीं. त्यांनीं बरींच पुस्तकें लिहिलीं आहेत. पण तीं सर्व मतप्रचाराकरितां लिहिलेलीं अतएव स्वतःच्या चळवळीच्या प्रसारार्थच लिहिलेलीं दिसतात. यंग इंडिया, आर्यसमाजाचा इतिहास, प्रॉब्लेम्स ऑफ नॅशनल एज्युकेशन इन इंडिया, श्रीकृष्णचरित्र, आत्मचरित्र हीं त्यांचीं पुस्तकें वरील विधानाची सत्यताच दाखवितात. त्यांनीं 'वंदे मातरम्' हें उर्दू व 'पीपल' हें इंग्रजी पत्र चालविलें. त्यावरून स्वतःच्या मताचा प्रसार करण्याचा हव्यास लालाजींना केवढा होता हें कळून येतें. त्यांना देशाच्या राजकीय, सामाजिक, धार्मिक, शैक्षणिक अशा प्रत्येक बाबतींत कांहींना कांहीं करावेसें वाटत होतें. त्यांच्या विचारशील पण चळवळ्या स्वभावाला हवें तेवढें खाद्य मिळण्याचे प्रसंगहि त्यांना जगांत लांबवर केलेल्या प्रवासानें आणून दिले. त्यांनीं इंग्लंडच्या कितीतरी सफरी केल्या. अमेरिकेंत कित्येक महिने काढले. जपानांतहि ते राहून आले. त्यामुळें त्या त्या ठिकाणच्या परिस्थितीचा सूक्ष्म रीतीनें त्यांस अभ्यास करण्यास मिळून हिंदुस्थानांतील अनेक प्रश्नांशीं तुलना करावयास सांपडली.

### संस्थांचें जाळें

त्यापासून त्यांनीं जो बोध घेतला, तो नुसत्या पुस्तकांमार्फतच आपल्या देशबांधवांस कळवून स्वस्थ न बसतां त्याप्रीत्यर्थ अनेक संस्था स्थापन केल्या. टिळक राजनैतिक विद्यालय, लोकसेवकमंडळ, अस्पृश्योद्धार–मंडळ, आईच्या नांवानें स्त्रियांकरितां काढलेलें गुलाबदेवी स्मारक इस्पितळ, पित्याचें स्मारक म्हणून राधाकृष्ण हायस्कूल,

दयानंद कॉलेज, अनाथाश्रम, नॅशनल बँक अशा कित्येक संस्थांचीं नांवें सांगतां येतील. परदेशांत हिंडल्यानें त्यांचा देशाभिमान अधिकच प्रज्वलित झाला आणि हिंदुस्थानास परकीयांनीं लावलेलीं दूषणें त्यांस खपेनाशीं झालीं. कारण त्यांना परकीयांच्या गुणांबरोबरच त्यांचे दोषहि कळून चुकले होते. म्हणून मिस् मेयोनें 'मदर इंडिया' हें पुस्तक लिहून हिंदुस्थानावर शिव्यांचा वर्षाव करतांच लालाजींना तो राष्ट्रीय अपमान असह्य होऊन त्यांनीं 'अनहॅपी इंडिया' या नांवाचें पुस्तक प्रसिद्ध केलें व त्यांतून मेयोबाईची भली खोड काढली.

### पंजाबचा कंठमणि

अशा सर्व दृष्टींनीं लाला लजपतराय यांचें चरित्र अत्यंत बोधप्रद आहे. लालाजींच्या अंगीं इतके विविध गुण होते कीं, ते कोणाहि एका व्यक्तींत आढळणें कठिण आहे. याला त्यांचा चळवळ्या, पण विचारी व खिम्मा स्वभाव कारण झाला. भिन्न भिन्न चळवळी व भिन्न भिन्न संस्था चालविणाऱ्या मनुष्याच्या ठिकाणीं आवरशक्ति व बुद्धीची व्यापकता हे गुण असावे लागतात.त्या गुणांनीं लाला लजपतराय मंडित असल्यामुळें त्यांना पंजाबांतील सर्व पुढाऱ्यांत अग्रस्थान मिळवितां आलें. हें अग्रस्थान त्यांनीं कसें मिळविलें याचें विवेचन पनवेलचे रा.फडके यांनी प्रस्तुत पुस्तकांत फार परिश्रमपूर्वक व चित्ताकर्षक रीतीनें केलें असल्यामुळें तें संग्राह्य झालें आहे. पुस्तक लिहितांना व तें प्रसिद्ध करतांना रा. फडके यांना एकसारख्या अडचणी येत गेल्या. पण त्यांनीं त्यांस न जुमानतां आपलें कार्य यशस्वीपणें शेवटास नेलें यांत त्यांची वाङ्मयसेवेची दुर्दमनीय हौसच सिद्ध होते. पुस्तकास रा. न. चिं. केळकर यांनीं प्रस्तावना जोडली आहे. पुस्तकाची किंमत दोन रुपये आहे.

# असेंब्लींतील कामकाज

### वरिष्ठ न्यायमंदिर त्वरित स्थापा

गेल्या आठवड्यांत बुधवार, शुक्रवार व शनिवार या तीन दिवशींच असेंब्लीचें काम चाललें. बुधवारीं सर रेनी यांनीं एका प्रश्नाला उत्तर देतांना खुलासा केला कीं, गो. मे.च्या सल्लागार मंडळाच्या सभासदांची नेमणूक मुख्य प्रधानांनीं केलेली असून त्या मंडळाच्या खर्चासाठीं हिंदुस्थान-सरकारानें ७ लक्ष ४८ हजार रु. मंजूर केले आहेत. नंतर बॅ. भगतराम पुरी यांनीं वरिष्ठ न्यायमंदिर सत्वर स्थापन करण्याबद्दलचा ठराव मांडला. त्या न्यायमंदिरानें राज्यघटनेचा अर्थ लावणें, फांशीच्या शिक्षेविरुद्ध अपिलें स्वीकारणें आणि प्रिव्ही कौन्सिलाप्रमाणें काम करणें हीं तीन कार्यें करावीत असें ठरावांत म्हटलें होतें. त्याला कायदेमंत्री मि. मित्र यांनीं विरोध केला व 'हें लुटुपुटीचें प्रिव्ही कौन्सिल होईल' असा शेरा मारला. सरकाराचें धोरण तटस्थपणाचें राहील असें गृहमंत्री मि. केरार यांनीं जाहीर केलें. तेव्हां ३४ वि. १७ मतांनीं ठराव मंजूर झाला.

### असेंब्लींत भाषणस्वातंत्र्य; पण बाहेर ?

शुक्रवारीं वाद चांगलाच रंगला.ब्रिटिश पार्लमेंटाप्रमाणें असेंब्लींतहि सभासदांना पूर्ण भाषणस्वातंत्र्य असतें. आणि सभासदांनीं असेंब्लींत केलेलीं भाषणें प्रसिद्ध करण्यास वर्तमानपत्रांनाहि मुभा असते. परंतु गृहमंत्र्यांनीं जाहीर केलें कीं, सभासदांनीं या सभागृहाच्या चार भिंतींच्या आंत कांहींहि बोलावें, पण त्याला प्रसिद्धि देतांना वर्तमानपत्रांनीं मात्र १९३१ चा प्रेस ॲक्ट आणि १९३२ च्या दुसऱ्या वटहुकुमांतील ६३ व्या कलमांकडे अवधान राखावें. त्यांना सर्वच्या सर्व भाषणें छापतां येणार नाहींत. वृत्तपत्रांवरील हा नवा घाला पाहून त्याच्या निवारणार्थ श्री. रंगाअय्यरप्रभृति अनेक वीर आपापलीं टीकाशस्त्रें परजून पुढें सरसावले. श्री.रंगा अय्यर यांनीं तहकुबीची सूचना मांडली व ते म्हणाले, 'प्रेस ॲक्ट या असेंब्लींत पास तरी झालेला आहे; पण वटहुकुमांनीं असेंब्लीचें शिक्कामोर्तबहि मिळविलेलें नाहीं !' सर हरिसिंग गौर यांनीं इंग्लंडांतील मुद्रण स्वातंत्र्याकडे अंगुलिनिर्देश केला व बजाविलें कीं, 'असेंब्लींतील सभासद व त्यांचे मतदार यांना जोडणारा दुवा म्हणजे वर्तमानपत्रें. त्यांत येथील भाषणांचे चोख वृत्तांत प्रसिद्ध होणें अवश्य आहे !' सर रहीम यांनीं टीका केली कीं, येथील भाषणांना प्रसिद्धी न दिली तर शाळेंतील वादसभा व ही असेंब्ली यांत अंतर कांहींच राहणार नाहीं ! सर रेनी म्हणाले, वटहुकुमाची बाधा असेंब्लीच्या पूर्वपरंपरेला होऊं नये. पण सर केरार यांनीं ठासून सांगितलें कीं, वटहुकूम हाहि एक कायदाच होय. शेवटीं अध्यक्षांनीं जाहीर केलें कीं, कायदेमंत्र्याचें मत विचारांत घेऊन मी निर्णय देईन.

क्रि. लॉ अमेंडमेंट बिलाच्या सिलेक्ट कमिटींतून श्री. रंगा अय्यर आणि श्री. अमरनाथ दत्त यांनीं अंग काढून घेतल्यामुळें त्यांचे जागीं सर गौर व दि. ब. सारडा यांची नेमणूक झाली. गव्हासंबंधींच्या बिलावर थोडा वाद झाल्यावर तें मंजूर झालें.

## वृत्तपत्रांवरील घाला परतला !

शनिवारीं वृत्तपत्रांच्या डोक्यावर आलेला घाला कांहीं अंशीं परत गेला; तेव्हां टाळ्यांचा प्रचंड गजर झाला.अध्यक्षांनीं जाहीर केलें कीं,असेंब्लींतील कामकाजाच्या प्रसिद्धीसंबंधीं जे नेहमींचे नियम आहेत; त्यांत वटहुकुमामुळें तिळमात्र फरक पडत नाहीं असा निर्णय कायदेमंत्री व हिंदुस्थानसरकार या उभयतांनीं दिला आहे.अर्थातच श्री.रंगा अय्यर यांनीं आपली तह कुबीची सूचना पुढे मांडली नाही.

# हिंदुमहासभा व मतदान–मंडळ

वर्तुल परिषदेच्या मतदान–मंडळाचें काम आतां सुरू झालें आहे. त्या मंडळांतील हिंदु सभासदांच्या व सर्वसामान्य हिंदु जनतेच्या माहितीसाठीं अ. भा. हिंदुमहासभेनें खालील सूचना प्रसिद्ध केल्या आहेत.

वर्तुल परिषदेंतून निर्माण होणाऱ्या घटनात्मक मंदिराचा ' मतदान पद्धति ' हा पाया असल्यानें इतर जातींनीं हिंदु–समाजावर आक्रमण करूं नये अशाबद्दल सर्व हिंदूंनीं डोळ्यांत तेल घालून दक्ष राहिलें पाहिजे.मतदान–मंडळाच्या कामकाजासंबंधानें आज उदासीनता धरल्यास ती आत्मघातकी ठरल्याखेरीज राहणार नाहीं. व या उदासीनपणामुळें अगर अन्य कारणामुळें नुकसान होईल त्याची पुढें भरपाई होणें कठिण जाऊन तीव्रतर कलह मात्र माजतील.म्हणून हिंदुमहासभेची सर्व हिंदु लोकांस अशी विनंति आहे कीं, त्यांनीं पुढील सूचना अमलांत आणाव्या—

१ सर्व हिंदूंनीं आपल्या साक्षींतून संयुक्त मतदार संघालाच पाठिंबा द्यावा; कोणत्याहि जातीला स्वतंत्र मतदार–संघ नसावा असें स्पष्ट मत द्यावें.

२ अस्पृश्य समजला जाणारा वर्ग स्वतंत्र मतदार संघ मागतो; परंतु अशा दलित वर्गांत आर्थिक व शैक्षणिक बाबतींत अत्यंत मागासलेल्या अशा अनेक जाती आहेत व त्यांना अस्पृश्य मानण्यांत येत नाहीं. खास अस्पृश्यांतहि जातिभेद आहे व त्यांच्यांतहि उच्चनीच व स्पृश्य–अस्पृश्य असा भेद आहेच. अस्पृश्यतानिवारण करण्याचा प्रयत्न राष्ट्रीय सभा, हिंदुमहासभा, आर्य–समाज व इतर समाजसुधारक करीत असून अस्पृश्यता दिवसानुदिवस कमी होत चालली आहे.मंदिरप्रवेशाचे बाबतींतहि उच्च जातींच्या लोकांचा दृष्टिकोन पुष्कळच बदलला आहे. विशेषतः, गेल्या पांच वर्षांत म्हणजे सायमन कमिशनचा अहवाल बाहेर येण्यापूर्वीच हा बदल झालेला आहे. अशा रीतीनें अस्पृश्यता ही क्रमशः नाहींशी होत चाललेली आहे. तेव्हां अस्पृश्यांचे म्हणून स्वतंत्र मतदारसंघ उत्पन्न करून त्यांचे वेगळे हितसंबंध उत्पन्न करणें ही गोष्ट असमंजसपणाची व हिंदी राष्ट्रीयत्वाचा घात करणारी आहे. कारण एकदां स्वतंत्र मतदार–संघ दिले कीं, विभक्त राहण्याची वृत्ति जोरावेल व इतर पंथ व जातादि आपल्याला असेच स्वतंत्र मतदार संघ मागत बसतील. म्हणून अखिल हिंदुमात्राला व अस्पृश्य वर्गालाहि अशी अत्यंत कळकळीची विनंति आहे कीं, या प्रश्नाकडे दूरदृष्टीनें पहा, राष्ट्रीयत्वाची भावना सोडूं नका व यासाठीं स्वतंत्र मतदार-संघाला विरोध करा.

३ अल्पसंख्याक व अस्पृश्य यांच्या हक्क–संरक्षणासाठीं प्रांतनिहाय व अखिल भारतांत त्यांना संयुक्त मतदारसंघांत त्यांच्या लोकसंख्येच्या प्रमाणांत जागा राखून ठेवाव्या. परंतु ही योजना तात्पुरतीच असावी.

४ अशा राखीव जागा फक्त अल्पसंख्याकांना त्यांच्या रक्षणासाठीं द्यावयाचा हेतु आहे. म्हणून कोणत्याहि प्रांतांत जो वर्ग बहुसंख्य असेल त्याला संयुक्त वा स्वतंत्र मतदारसंघांत राखीव जागा देण्यांत येऊं नयेत व हिंदूंनीं कोणत्याहि प्रांतांत तेथील बहुसंख्याकांना राखीव जागा देण्याला मान्यता देऊं नये; कारण यामुळें त्या प्रांतांत एका विशिष्ट जातीच्या हातीं जाणूनबुजून राज्यकारभार दिल्यासारखा होईल.

५ अल्पसंख्याकांना राखीव जागा द्यावयाच्या त्या कोणत्याहि प्रांतांत त्या जातीच्या त्या प्रांतांतील लोकसंख्येच्या प्रमाणापेक्षां कमी देऊं नयेत.

६ कोणत्याहि प्रांतांत सर्व जातींना मतदानाचा हक्क सारखा असावा. वयांत आलेल्या मनुष्यास मतदानाचा हक्क देण्याला हिंदुसभेचा विरोध नाहीं, परंतु आजच ती गोष्ट अव्यवहार्य आहे.

७ ' वेटेज ' च्या मागणीबद्दल असें दिसून आलें आहे कीं, अल्पसंख्य म्हणविणाऱ्या सर्व जमाती एक होऊन त्या हिंदूंना विरोध करीत आहेत. अशा या संघाच्या मताप्रमाणें तो हिंदुस्थानांतील शें. ४७ लोकांचा प्रतिनिधि आहे. अर्थात् या संघाच्या बाहेर राहिलेल्या हिंदु समाजाची संख्या शें. ५३ पडते. शें. ५३ हें प्रमाण म्हणजे फार मोठेंसें नाहीं व म्हणूनच आपल्या

संख्येंतून आणखी इतर जातींना 'वेटेज' देतां येणें हिंदु समाजाला इष्ट नाहीं. तेव्हां या जादा मागणीला कसून विरोध केला पाहिजे.

प्रांतिक हिंदुसभांनीं यासाठीं संघटित होऊन परिषदा भरवाव्या; संयुक्त मतदार संघालाच मान्यता द्यावी व तदनुरोधानें ।मतदान-मंडळ जेव्हां त्या प्रांतांत जाईल तेव्हां आपलें वरीलप्रमाणें म्हणणें मंडळाला सादर करावें.

# हैद्राबादेच्या औरंगजेबाचीं सुखस्वप्नें

गेल्या अग्रलेखांत काश्मीर व हैद्राबाद या दोन संस्थानांचा तुलनात्मक विचार मुख्यतः करण्यांत आला. प्रस्तुत लेखांत हिंदूंना मुसलमान बनविण्याकरितां हैद्राबादेचे नवे औरंगजेब उस्मानअली यांचा प्रयत्न अप्रत्यक्षपणें कसा सुरू आहे हें जरा विस्तारानें दाखवावयाचें आहे. निजाम उस्मानअली यांनीं आपल्या वेगवेगळ्या खात्यांतून जे मुसलमान अधिकारी नेमले आहेत ते बहुधा अलीगडच्या मुस्लीम युनिव्हर्सिटींतील परीक्षा पास झालेले आहेत व कित्येक इंग्लंड, अमेरिका यासारख्या परदेशांतूनहि परीक्षा देऊन आलेले आहेत. त्यांच्या साहाय्यानें निजामशाहींतील हिंदूंचें इस्लामीकरण फार कसोशीनें व धूर्ततेनें सुरू आहे.हे सर्व अधिकारी व त्यांचीं तीं सर्व खातीं हिंदूंना उघडपणें मुसलमानी धर्माची दीक्षा देत बसलीं आहेत असें नाहीं. विद्याखात्यानें त्यांना मराठी, कानडी व तेलगू या भाषांतून शिक्षण देण्याऐवजीं उर्दू भाषेंतून शिक्षण देऊन त्यांची भाषा बुडवावी व स्वभाषेमार्फत व्हावयाची स्वधर्माची व स्वसंस्कृतीची ओळख बुजवावी; महाराष्ट्रीयांना महाराष्ट्राचा इतिहास समजण्याचा मार्ग बंद पाडून त्यांच्यांतील स्वदेशाभिमानाचा बीमोड करावा व परप्रांतांतील विशिष्ट वर्तमानपत्रें त्यांच्या डोळ्यांखालून न जाण्याची दक्षता बाळगून वर्तमानकालीन ज्ञानाच्या दृष्टीनें त्यांना जिच्यांत बाहेरचा प्रकाश शिरत नाहीं, ताजी हवा खेळत नाहीं, व हुरूप आणणारा शब्दहि कानीं पडत नाहीं अशा अंधारकोठडींत कोंडावें अशा प्रकारची कदर निजामसाहेबांनीं आपल्या राज्यांत हिंदु लोकांवर ठेवली आहे. तिचा परिणाम असा झाला आहे कीं एक तर हिंदूंनीं उर्दू व फार्सी भाषांचा अभ्यास करून व त्यांत प्रावीण्य मिळवून संस्कारांनीं पूर्णपणें मुसलमान बनावें किंवा कांहींच न शिकतां अज्ञानांत जनावराप्रमाणें लोळत पडावें.

उर्दू व फार्सी या भाषा शिकून हिंदूंना मोठमोठ्या चाकऱ्या मिळत त्या काळीं त्या भाषांच्या अध्ययनापासून कांहीं ऐहिक फलप्राप्ति तरी होती. पण अलीकडे त्याहि चाकऱ्या हिंदूंना मिळेनाशा झाल्यामुळें तिकडील नव्या पिढींतील हिंदु तरुण बऱ्याच प्रमाणांत अशिक्षितच राहूं लागले आहेत. बरें, सरकारी खात्यामार्फत आपणास हवें तें शिक्षण मिळत नाहीं असें पाहून हिंदूंनीं खासगी शाळा काढण्याचा प्रयत्न करावा तर त्यावर सरकारानें इतके निर्बंध घातले आहेत कीं त्यामुळें तिकडील पुष्कळ शाळा त्यांच्या चालकांना बंद कराव्या लागल्या आहेत. खालसा मुलखांत व इतर संस्थानांतहि शिक्षणप्रसार झपाट्यानें होत आहे.पण हैद्राबाद संस्थानांत शिक्षण हिंदूंत तरी दिवसानुदिवस संकोचच पावत आहे. आंकड्यांच्याच आधारें सांगावयाचें झाल्यास सन१८८१ सालीं ३३ हिंदूंत एक हिंदु साक्षर आढळत होता. पण १९२१ सालीं पाहावें तों ३८ हिंदूंत १ हिंदु साक्षर सांपडतो. ही काय शिक्षणाची प्रगति म्हणावयाची कीं पीछेहाट समजावयाची ?

निजामसाहेबांना ती प्रगतिच वाटत असेल. कारण हिंदूंची हरएक बाबतींत पीछेहाट होण्यांतच आपल्या राज्याची खरी प्रगति आहे अशी त्यांची समजूत आहे. खालसा मुलुखांत हिंदु लोक झपझप शिकत आहेत व प्रत्येक बौद्धिक क्षेत्रांत आपलें तेज पाडीत आहेत. तें इतकें कीं त्यांची बरोबरी करणें मुसलमानांच्या आटोक्याबाहेरचें झालें आहे. काव्यांत टागोर, शास्त्रांत बोस, संशोधनांत रामन्, वक्तृत्वांत सुरेंद्रनाथ, इतिहासांत सरकार, धर्माभिमानांत श्रद्धानंद, देशाभिमानांत गांधी यांसारखे कैक हिंदु हिंदुस्थानाच्या वेगवेगळ्या प्रांतांतून गेल्या पन्नास वर्षांत उदयास आले आहेत. हे दूरचे प्रांत सोडून देऊन मोगलाईस लागून असलेल्या ब्रिटिश मुलुखांतील महाराष्ट्राचाच विचार केला तर, त्यांत टिळकांनीं विद्वान म्हणून, परांजप्यांनीं गणितज्ञ म्हणून, राजवाड्यांनीं संशोधक म्हणून, केशवसुतांनीं कवि म्हणून, कोल्हटकरांनीं नाटककार म्हणून व करमरकरांनीं मूर्तिकार म्हणून नांव केलें आहे.तशीच गणति करूं गेल्यास आणखी कित्येक विद्वान, बुद्धिमान व गुणी अशा महाराष्ट्रीय हिंदूंचीं नांवें सांगतां येतील. या व्यक्ति इंग्रज सरकारकडून विशेष उत्तेजन मिळाल्यामुळें उत्पन्न झाल्या आहेत असें मुळींच नाहीं. खालसा मुलखांत शिक्षण सर्वांना मोकळपणानें संपादन करण्याची सोय आहे त्याचा हा अपरिहार्य परिणाम होय.

पण निजामशाहीचा खाक्साच कांहीं वेगळा आहे. तिच्यांतील मराठवाड्यांत चौतीस लक्ष महाराष्ट्रीय असतां त्यांजपैकीं एकासहि निजामसाहेबांनीं कोणत्याहि गुणांत डोकें वर काढूं दिलें नाहीं. तशी ज्याची महत्त्वाकांक्षा असेल त्यानें मोगलाईला रामराम ठोकून ब्रिटिश मुलुखाचाच आश्रय केला पाहिजे. शिक्षणाच्या बाबतींत निजामांचें धोरणच असें आहे कीं हिंदूंना खांबाला बांधून थोपवून धरावयाचें व मुसलमानांना बसावयास घोडा देऊन दौडत सोडावयाचें. त्यामुळें थोडीशी प्रगति जर झाली तर ती मुसलमानांचीच झाली आहे, हिंदूंची झाली नाहीं. १८८१ सालीं २० मुसलमानांत १ मुसलमान साक्षर होता तर १९२१ सालीं ११ मुसलमानांत १ मुसलमान साक्षर बनला आहे. त्यानंतर गेल्या दहा वर्षांत मुसलमानांची प्रगति झाली व हिंदूंचा पिच्छेहाट झाली ती वेगळीच. अशा रीतीनें हिंदूंना मुसलमानांकडून मागें टाकण्याची अघटित करणी घडवून आणल्याबद्दल निजामसाहेबांना व त्यांच्या सल्लागारांना पोटांतून आनंदाच्या उकळ्या फुटत असतील नाहीं बरें ?

निजामसरकारची केवढी शहामत ही! इतर प्रांतांतून हिंदु लोक कितीहि पुढें जात असले तरी बिशाद आहे, ते निजामशाहींत त्या प्रगतीचें नांव काढतील ! सर्व संस्थानांतून प्रजेच्या साक्षरतेंत कोण पहिला नंबर पटकावतो याबद्दल स्पर्धा लागून राहिली आहे. पण निजामसरकारानें शेवटाकडूनच पहिला नंबर संभाळण्याची महत्त्वाकांक्षा बाळगलेली आहे. ही महत्त्वाकांक्षा पूर्ण करण्यांत निजामसाहेब कोणास हार जातील अशी भीति बाळगण्याचें मुळींच कारण नाहीं. यांत ते स्वतःस दूषण न समजून भूषणच मानतात. हिंदुप्रजेच्या बाबतींत त्यांना हें आपलें कर्तव्यच वाटतें व तें एका अर्थी खरेंहि आहे. कारण सुशिक्षित हिंदु व अशिक्षित मुसलमान यांना सहज रीतीने ताब्यांत ठेवणे राज्यकर्त्यांना जड जाते असा अलीकडचा अनुभव आहे. सुशिक्षित हिंदूंच्या बाबतींत हा प्रत्यय हिंदुस्थान सरकारास सांप्रत येतच आहे. आणि अशिक्षित मुसलमानांचा दंगा काश्मीरच्या हिंदु महाराजांवर या घटकेस फिरतच आहे. हिंदु प्रजा अडाणी व अशिक्षित असल्यास तिजकडून राज्यकर्त्यांच्या जुलुमास प्रतिकार होण्याची धास्ती न राहून तिला ते गुरांच्या खिल्लाराप्रमाणें अनायासानें हांकूं शकतात.

हिंदूंचें हिंदुत्व नष्ट करण्यास त्यांस अज्ञानांत ठेवणें हा एक उपाय झाला. त्यापुढें त्यांचे सण, उत्सव व देवस्थानें यांचें माहात्म्य कैमी करणें हा दुसरा उपाय. निजामसाहेबांनीं कितीहि मनांत आणिलें तरी त्यांना हिंदूंच्या सणवारांना उघडपणें मनाई करतां येत नाहीं याला त्यांचा इलाज नाहीं ! पण यावर त्यांनीं निराळीच शक्कल योजली आहे. इकडील हिंदूंप्रमाणें मोगलाईंतील हिंदु लोक दसऱ्याचा सण वाजंत्री लावून पुरातन कालापासून साजरा करतात व सायंकाळीं सीमोल्लंघनार्थ गांवाबाहेर जातात. हल्लींच्या निजामांनीं असें फर्मान काढलें आहे कीं, हा सण मोहरमांत आल्यास हिंदूंनीं देवतांची व हत्यारांची पूजा वाजंत्री न लावतां गुपचुपपणें पार पाडावी; जणु काय तें प्रेताचें दफनच आहे ! तसेंच सायंकाळीं सीमोल्लंघनास जातांना वाटेनें कसलेंच वाद्य वाजवूं नये. जणूं काय तीं प्रेतयात्राच आहे ! घरापुढें गुढ्या उभारूं नयेत व त्या उभारण्याची तितकी हौसंच वाटली तर ती मोहरमांतल्या पंधराव्या दिवशीं पुरवून घ्यावी. जणूं काय हिंदु हे धर्मानें मुसलमानच आहेत !

देवालयांची सुद्धां हीच स्थिति! खुद्द हैद्राबाद शहरांत व जेथें मुसलमानांची वस्ती मोठी आहे त्या गांवांत हिंदूंनीं जुनीं देवळें दुरुस्त करूं नयेत, व वाढवूं नयेत; सरकारी अधिकाऱ्यांची आगाऊ दहा दिवस परवानगी घेतल्यावांचून कोणतीहि मिरवणूक काढूं नये व नवा धार्मिक उत्सव सुरू करूं नये, असें सरकारी फर्मान आहे. जणूं काय मोगलाईंतील हिंदूंना मन नाहीं, मेंदू नाहीं व आत्माहि नाहीं. यांहि अडचणींतून जे देव आपआपल्या देवळांतून मुसलमानांच्या छळानें भयभीत होऊन गुपचुप बसले आहेत त्यांनाहि मुसलमान चैन पडूं देत नाहींत. बीड, उदगीर, औंध, अष्टी, देवणी, गंगाखेड इत्यादि कैक गांवांच्या देवालयांत शिरून त्यांच्या मूर्ती छिन्नविच्छिन्न करून टाकण्यांत आल्या आहेत. उलट पक्षीं मुसलमानी धर्मासंबंधानें निजामसाहेबांची कळकळ व आस्था पहा. ठिकठिकाणीं सरकारी खर्चानें नव्या नव्या मशिदी बांधण्यांत येत आहेत, व त्यांतूनहि ज्या ठिकाणीं त्या बांधण्यास हिंदूंच्या रास्त हरकती आहेत त्या ठिकाणीं सदर मशिदी हिंदूंच्या नाकावर टिचून मुद्दाम बांधल्या जात आहेत. अशा रीतीनें हिंदूंच्या मनाला पुढून आणि मागून भाल्यांनीं एकसारखें भोसकून त्यांच्या संवेदना नष्ट करण्यांत येत आहेत. हिंदूंनीं नवीं देवळें बांधावयाचीं नाहींत, जुनीं दुरुस्त करावयाचीं नाहींत, जुने उत्सव त्यांस नीट चालवूं द्यावयाचे नाहींत व नवे सुरू करूं द्यावयाचे नाहींत. त्यांना स्वभाषेंतून शिक्षण देण्याची सोय सरकाराकडून व्हावयाची नाहीं व त्यांनीं स्वतःच्या केलेल्या सोयी टिकवावयाच्या नाहींत आणि उलटपक्षीं मुसलमानांच्या मशिदींस व धार्मिक शिक्षणास हजारों रुपयांची दरसाल खैरात करावयाची !

मुसलमानी धर्मोपदेशकांना सरकार तनखा देऊन ठेवतें व त्यांस सरकारी अधिकाऱ्यांकडून मुसलमानी

धर्माच्या प्रसारार्थ साहाय्य मिळतें. उलटपक्षीं हिंदु धर्मप्रचारकांना तें साहाय्य नाहींच; पण फुकटचें धर्मस्वातंत्र्यहि नाहीं. त्यांचा हरतऱ्हेनें छळ करण्यांत येतो, व त्यांना गोत्यांत आणून त्यांचें कार्य बंद पाडण्यांत येतें. यामुळें कांहीं हिंदूंची प्रवृत्ति मुसलमानी धर्म स्वीकारण्याकडे होणें अगदीं स्वाभाविक होय. मोगलाईचा आंध्र ऊर्फ तैलंगण हा एक मुख्य विभाग आहे. त्यांत कर्मठ म्हणविणारे कित्येक ब्राह्मण हिंदु व मुसलमान या दोनहि धर्मांचे नियम पाळतात! त्यांस नमाज पढण्याबद्दल दरमहा तनखा चालू असल्यामुळें ते दररोज नमाज पढतात व तो पढून झाल्यानंतर ब्राह्मण या नात्यानें संध्यावंदनहि करतात! हिंदूंची याहून अधिक अवनति ती काय व्हावयाची राहिली? त्यांच्या सर्वच चळवळींना बंदी. त्यांना गोरक्षण नाहीं, धर्मरक्षण नाहीं व आत्मसंरक्षणहि नाहीं. ब्रिटिश मुलखांत वटहुकुमाचें पेंव आतांच फुटलें आहे; व ते सध्यांच्या राजकीय चळवळीपुरतेंच मुख्यतः आहे. पण निजामशाहींतील सगळाच कारभार वटहुकुमावर चालल्यासारखा. ब्रिटिश मुलखांत भाषणस्वातंत्र्य व लेखनस्वातंत्र्य एरव्हीं असल्यानें प्रजेला दमैपर्यंत ओरडण्याला, कंटाळा येईपर्यंत लिहिण्याला व पोटभर उघडपणें रडण्याला स्वातंत्र्य आहे. पण मोगलाईंतील हिंदूंना यांपैकीं एकहि स्वातंत्र्य नाहीं. त्यांना स्वातंत्र्य असलें तर मुसलमान होण्याचें आहे, हिंदु राहण्याचें नाहीं.

वरील विवेचनावरून निजामाच्या राज्यांत हिंदु म्हणून नांदणें हें पंचमहापातकांसारखें एक पातक कसें होऊन बसलें आहे याची वाचकांना कल्पना येईल. अशा या जाचाखालीं व जुलुमाखालीं हिंदु-धर्म मृत्युपंथास लागल्यास त्यांत आश्चर्य कसलें ? हें धोरण असेंच चालू राहिलें तर हिंदुधर्म न मारतांच हळूहळू मरणार व त्या जागीं मुसलमानी धर्म अभिवृद्धि पावत कालान्तरानें सर्व मोगलाई अविंधाक्रांत होणार अशीं दुश्चिन्हें स्पष्ट दिसत आहेत; व त्याला कारण सध्यांचे निजाम उस्मानअली यांची महत्त्वाकांक्षाच आहे. त्यांना हिंदुधर्माचा छळ चालवून केवळ औरंगजेब बनून स्वस्थ बसावयाचें नाहीं. त्यांच्या मनांत केमालपाशानें तुर्कस्थानांत बुडवून टाकलेल्या खिलाफतीचें हिंदुस्थानांत पुनरुज्जीवन करून स्वतः खलिफा व्हावयाचें आहे. साऱ्या जगांत मुसलमानी धर्माचे आधारस्तंभ काय ते आपण अशी कीर्ति पसरावी यासाठीं ते दरसाल लाखों रुपये खर्च करीत असतात. त्यांनीं अरबस्थानांतील मुसलमानांच्या मदतीकरितां नऊ लाख रुपये पाठविले व लंडन शहरांत मशीद बांधण्याकरितां पांच लाखांची देणगी दिली.

अशा रीतीनें सगळ्या मुसलमानी राष्ट्रांत धर्मात्मा काय तो मी, हा लौकिक संपादून खलिफा म्हणून त्यांजकडून स्वतःची निवडणूक करून घेण्याच्या मुखस्वप्नांत हैद्राबादचे औरंगजेब सांप्रत आहेत. त्या दृष्टीनें त्यांना आपली राजकीय सत्ता व इतमाम लहान वाटत असल्यानें कर्झन साहेबांच्या कारकीर्दीत ब्रिटिश सरकारानें गिळंकृत केलेला वऱ्हाड प्रांत कोट्यवधि रुपये खर्च करूनहि परत मिळविण्याच्या खटपटीस ते लागले असून सांप्रत दिल्लीस व्हाइसरॉयांच्या भेटीस जाण्यांत त्यांचा हाहि एक हेतु आहे. खिलाफतीचें व तसेंच वऱ्हाड परत घेण्याचेंहि कदाचित् स्वप्नच ठरेल. तथापि तेवढ्यावरून योग्य तो बोध मोगलाईंतील हिंदूंनीं घेऊन वेळींच सावध झालें पाहिजे. त्यांना काश्मिरांतील मुसलमानांप्रमाणें बंड करण्याचा सल्ला कोणीहि विचारी मनुष्य देणार नाहीं. त्यांनीं सनदशीर उपायच योजावे. पण ते गुणावह ठरतील अशा नेटानें अमलांत आणावे. त्यांत पुढाऱ्यांना हालअपेष्टाहि सोसाव्या लागतील. पण हालअपेष्टांचा योग्य मोबदला दिल्यावांचून त्यांना हवें तें स्वातंत्र्य मिळण्याचा संभव नाहीं हें त्यांस इतर कोणी सांगावयास पाहिजे असें नाहीं.

# बंगालच्या गव्हर्नरावरील गोळीबार

**कुमारी वीणा दास यांना ९ वर्षे सक्तमजुरी**

ता. ६ फेब्रुवारी रोजीं पदवीदान-समारंभाचे वेळीं बंगालचे गव्हर्नर सर स्टॅन्ले जॅक्सन हे भाषण करीत असतां त्यांजवर कुमारी वीणा दास या पदवीधर मुलीनें पांच वेळां गोळीबार केला. त्याबद्दल त्यांच्यावर खटला उभारण्यांत आला होता. त्याचा निकाल ता. १५ रोजीं सांगण्यांत आला. न्या. मू. सी. सी. घोष, एम्. एन्. मुकर्जी व एम. सी. घोष यांच्या ट्रिब्यूनलपुढें त्या दिवशीं सकाळीं खटला चालू झाला. कुमारी वीणा दास यांचें वय २०।२१ वर्षांचें असून त्या बी.ए.झालेल्या आहेत. त्यांना बसण्यासाठीं कोर्टांत खुर्ची देण्यांत आली होती. त्यांनीं अपराध कबूल करून लेखी कैफियत वाचून दाखविली.

त्यांत त्यांनीं असें म्हटलें आहे कीं, "मीं गव्हर्नरांवर गोळ्या झाडल्या, त्या माझ्या मातृभूमीवरील प्रेमामुळें. माझा देश सध्यां दडपशाहीच्या चक्रांत

सांपडला आहे.त्याचा अपमान करणारी एक एक कृति ऐकली म्हणजे माझ्या काळजाला घरें पडत. गेल्या दोन वर्षांतील सारे वटहुकूम म्हणजे उभ्या राष्ट्राला व त्यांतील मर्दपणाला एक प्रकारचें आव्हानच आहे असें मला वाटे.मिदनापूर,हिजली व चितागांग येथले या माझ्या जिल्ह्यांतील प्रकार कानावर पडल्यावर तर माझें डोकें ठिकाणावरच राहिलें नाहीं.या सर्व यातनां-तून मुक्त होण्यासाठीं मी मृत्यूकडे धांव घेण्याचें ठरविलें. पण त्यापूर्वी असा हेतु मनांत धरला कीं, देशांतील सर्व प्रकारच्या लोकांचें लक्ष चालू असलेल्या दडपशाहीकडे खेंचण्याजोगें कांहीं कृत्य करावें. तो हेतु रक्तपात न होतां सफळ झाला याबद्दल मला संतोष वाटत आहे. कारण, आर्य स्त्रीच्या उत्कृष्ट संस्कृतींत मी वाढलेली असून माझ्यासारख्या दुबळ्या अबलेलाहि आपलें अबलात्व झुगारून देण्यासारखी परिस्थिति येऊन ठेपलेली आहे हें सर्वांच्या निदर्शनास आणण्याचें माझें काम तडीस गेलें आहे. सर स्टॅन्ले जॅक्सन यांच्याशीं माझा व्यक्तिशः कांहींच हेवादेवा नाहीं. ते मला माझ्या वडिलांइतके चांगले वाटतात, आणि त्यांच्या पत्नी मला मातेसमान आहेत. पण बंगालच्या गव्हर्नर म्हणजे माझ्या तीस कोटी बंधुभगिनींना गुलाम-गिरींत डांबून ठेवणाऱ्या राज्यपद्धतीचा एक प्रति-निधि आहे ही भावना माझ्या कृत्याच्या बुडाशीं होती.!"

ॲडव्होकेट जनरल यांनीं कोर्टाला उद्देशून सांगितलें कीं, खुनशी स्वरूपाची शिक्षा द्यावी असा आग्रह मी धरीत नाहीं. आरोपीतर्फे वकील श्री. एस्. के. सेन यांनीं छोटेसें भाषण करून शिक्षा देतांना दया दर्शविण्याविषयीं विनंति केली व म्हटलें कीं, आरोपीसारख्या ध्येयनिष्ठ व सामर्थ्यवान व्यक्तीचा पुढें समाजाला उपयोग होऊं द्यावा. निकाल देण्याचें काम दुपारीं तीन वाजेपर्यंत थांबविण्यांत आलें. सव्वातीन वाजतां निकाल बाहेर पडला. इं. पि. को. च्या ३०७ व्या कलमाप्रमाणें ९ वर्षें सक्त मजुरीची शिक्षा ठोठावण्यांत आली. हत्याराच्या कायद्याच्या १९ फ या कलमाखालीं शिक्षा देण्यांत आली नाहीं. आरोपीनें दिलेली गुन्ह्याची कबुली, तिचें कॉलेजांतील आदर्शभूत वर्तन आणि तिचें कोवळें वय हें सर्व लक्षांत घेऊन शिक्षा दिली आहे असे उद्गार न्यायमूर्तींनीं काढले. आरोपीला ' ब ' वर्ग देण्यांत आला. कुमारी वीणा दास यांची मुद्रा शिक्षा ऐकतांना प्रशांत होती.

याच प्रकरणांत पकडलेल्या कुमारी प्रमिला गुप्त व सुशीला दासगुप्त या बी. ए. च्या विद्यार्थिनींचा खटला ता. २२ फेब्रुवारी रोजीं चालणार आहे.

# मँचूरिया-प्रकरण हें काय आहे ?

## लेखांक १ ला

हल्लीं मँचूरिया प्रांतांत चिनी-जपानी लोकांचें युद्ध सुरू आहे. त्याचें हिंदुस्थानाला अर्थातच कांहीं सोहेरसुतक नाहीं. पूर्वी एक वेळ हिंदुस्थानांत बौद्ध-धर्म प्रचलित होता, व तो कांहीं निराळ्या स्वरूपांत आज चिनांत आहे. परंतु या दोन जीर्ण धर्मपंथांच्या पिढ्या पूर्वीच तुटलेल्या असून हिंदुस्थानांत तर बौद्ध-धर्म आतां नामशेषच झाला आहे. परंतु पूर्व व पश्चिम या काल्पनिक भूगोलभेदानें पश्चिमेकडील लोकांना जसा एकमेकांबद्दल उगीच जिव्हाळा व अभिमान वाटतो, तसाच पूर्वेकडील लोकांनाहि एकमेकांबद्दल वाटत असतो. एवढ्या-करितांच, चिनांत लोकसत्ता प्रस्थापित झाली किंवा जपाननें रशियांवर जय मिळविला, तर पौर्वात्य म्हणून हिंदी लोकांना आपल्या अंगावर मूठभर मांस चढल्यासारखें वाटतें. पण हल्लीं चिनी व जपानी लोकांतच म्हणजे पौर्वात्यांतच यादवी चालू आहे. तरी हिंदी लोकांना कांहीं एका निराळ्या दृष्टीनें हें युद्ध महत्त्वाचें वाटतें. जपानी लोक पराक्रमी, सुधारलेले व इंग्लंडादि प्रबळ पाश्चात्य राष्ट्रांची बरोबरी करणारे म्हणून त्यांच्याविषयीं अभिमान वाटला, तर चिनी लोकसत्ता संकटांतून डोकें वर काढीत आहे म्हणून तिजबद्दल मनांतून सहानुभूति वाटते. पण ही अगदीं वरवरची दृष्टि झाली. खोलांत पाहिलें म्हणजे मँचूरियांतील युद्ध अगदींच निष्कारण आहे असें म्हणवत नाहीं. म्हणून मँचूरियासंबंधानें थोडीबहुत माहिती येथें देण्याचें योजिलें आहे.

### मँचूरियाची भौगोलिक स्थिति

मँचूरिया हा प्रांत चीनच्या ईशान्य कोपऱ्यास असून त्याच्या उत्तरेला सैबेरिया, पूर्वेला जपानी समुद्र, आग्नेयीला कोरिया, नैर्ऋत्येला पेकिंग प्रांत व पश्चिमेला मंगोलिया अशा त्याच्या सरहद्दी आहेत. जपानाचें दक्षिण टोंक कोरियाशीं समांतर तर जपानाचें उत्तर टोंक मँचूरियाशीं समांतर असून, या दोहोंच्या दरम्यान जपानी समुद्र आहे. मँचूरिया हा देश विस्तारानें इंग्लंड व वेल्स या देशांच्या

६ पट मोठा आहे. मँचूरियाचें क्षेत्रफळ ३ लक्ष ६४ हजार चौरस मैल असून लोकसंख्या २ कोटी ४५ लक्ष आहे. म्हणजे हा प्रांत पंजाब किंवा मुंबई इलाखा यापेक्षां मोठा व बिहार-ओरिसा प्रांतापेक्षां लहान असा आहे. दरसाल याची लोकसंख्या सुमारें १० लक्षांनीं वाढत आहे.याचा अर्थ ही वाढ फार झपाट्यानें होत आहे. तिचें कारण प्रांताची रचना, त्यांतील मौल्यवान कच्चा माल व आगगाडीच्या व जलमार्गांच्या वाहतुकीनें त्यांतील व्यापाराला व धनोत्पादनाला मिळालेलें चालन हें होय.मँचूरियाची मुख्य राजधानी मुकडेन. हिची लोकसंख्या सुमारें २॥ लक्ष आहे. व याशिवाय ६०-७० हजार लोकसंख्येची आणखी कांहीं शहरें या प्रांतांत आहेत. मँचुरिया हे देशविषयक नांव मँचू नामक मनुष्यवंशापासून मिळालेलें आहे.

## त्यांतील लोकवस्ती

पण हल्लीं खुद्द मँचू लोकांची वस्ती या राज्यांत फारशी नाहीं. कारण ती वस्ती मूळचीच थोडी असून, अलीकडे जी सर्व भरती त्या देशांत झाली ती चिनी लोकांची झाली आहे. अर्थात् इतरहि कांहीं लोक त्यांत येऊन राहिले आहेत. पण विशेषतः चिनी लोक या देशांत येण्याचें कारण कीं, कांहीं शतकापूर्वी मँचू लोकांपैकीं एका पराक्रमी टोळीच्या मुख्यानें चीनचा उत्तरभाग जिंकून पेकिंग येथें आपली गादी स्थापली. हा राजवंश बरीच वर्षे राज्य करीत होता. व चीनमध्यें ज्या राजाच्या अमदानींत क्रांति होऊन लोकसत्ताक राज्य स्थापलें गेलें, तो मँचू वंशांतलिच शेवटला होय. राजा मँच्यूरियानें चीनला राजा दिला, व उलट चीननें मँचूरियाला प्रजेची समृद्धि करून दिली अशी देवघेव झालेली आहे. मँचू लोक हे मूळचे मंगोलियन- हे लोक रशियन किंवा सैबेरियन लोकांपेक्षां अधिक सुधारलेले व चिनी लोकांपेक्षां अधिक जोरदार आहेत. त्यांच्यांत तिरंदाजी हा आवडता युद्धप्रकार असून,चिनी बादशहांचीं हुजुरातीचीं पथकें व पागा या लढाऊ मँचू लोकांच्या असत. मँचूरिया हा देश खूप सुपीक आहे व डोंगराळ असल्यामुळें जंगल मुबलक असून इमारतीच्या उपयोगी असे उत्तम लाकूड त्यांत पैदा होतें. न्यू चँग बंदरापासून हार्बिन राजधानीपर्यंत रेल्वे ज्या प्रदेशांतून जाते तो प्रदेश सर्वांत अधिक सुपीक आहे. मँचूरियांत तंबाखू व नीळ व अफू हीं पिकतात, द्राक्षें चांगलीं होतात, देशांत सोनें, लोखंड व कोळसा यांच्या खाणी आहेत. नद्यांतून उत्तम जातीचे मासे व अरण्यांतून उत्तम जातीचीं जनावरें पैदा होतात.

## रूसो-जपानी युद्ध

हा देश रशियाला लागून असल्यामुळें त्याचीच लोभी दृष्टि मँच्यूरियावर-प्रथम गेली. जपान थोडा दूर होता. कारण मध्यंतरीं कोरिया असून तो चिनाचाच भाग समजला जाई. पण कोरिया प्रथम आपल्या ताब्यांत ठेवून, नंतर तो खालसा करून, आपल्या राज्यास जोडल्यामुळें उत्तरेकडून जसा रशियाचा तसा आग्नेयीकडून जपानाचा शह कांहीं वर्षांनीं मंचूरियावर बसला. रशियाचें खास बंदर व्हॅलॅडिव्हॉस्टॉक हें सैबेरियाच्या दक्षिण टोंकाला जपानी समुद्राच्या पश्चिमकिनाऱ्यावर आहे. पण तेथें वर्षांतून अनेक महिने बर्फ पडत असल्यानें त्याहून कमी थंड हवेच्या समुद्रांतील बंदर मिळाल्यास रशियाला हवें होतें. म्हणून त्यानें पिवळ्या समुद्रांत मँचूरियाच्या दक्षिण टोंकाला पोर्ट आर्थर हें बंदर बनविलें. मात्र त्याच्याहि पश्चिमेला लॅयोटँगच्या उपसागरांत एखादें न्यू-चँगसारखें बंदर मिळालें तर रशियाला हवेंच होतें. पण २५-३० वर्षांपूर्वी रशिया व जपान यांचें जे प्रचंड युद्ध झालें त्यांत जपानानें रशियाला खूपच मार दिल्यामुळें रशियाची ती तर आशा गेलीच, पण उलट जपानानें पोर्ट.ऑर्थर जिंकून व मुकडेन येथें रशियाचा पुरा पराभव करून त्याला हार्बिनपर्यंत मागें रेटीत नेलें. यामुळें मँचूरियाच्या या दक्षिणभागाचा मुलूख रशियाला जपानास द्यावा लागला, व कोरियावरची दृष्टि रशियाला कायमची काढून घ्यावी लागली. ही गोष्ट १९०५ मध्यें घडली. चिनाच्या हिताच्या दृष्टीनें यांत कांहींच फरक झाला नाहीं. कारण पूर्वी रशिया आक्रमण करीत होता त्याचे जागीं आतां जपानचें आक्रमण सुरू झालें. १९०५ मध्यें स्वतः चीननें जपानला मुकडेनपासून यालू नदीपर्यंत, म्हणजे कोरियांतील रेल्वेला मिळेपर्यंत, नवी रेल्वे बांधण्याची परवानगी दिली.

## बिनसत्तेची मालकी

१९१२ सालीं फिरून किरीनपर्यंत रेल्वे झाली ती चीन व जपान यांनीं मिळून बांधली. फिरून १९१७ सालीं रेल्वेची आणखी वाढ झाली, व जपान मँचूरियामध्यें आपला पाय अधिकाधिक रोवून बसला. मँचूरियांत जपानी लोक राहातात म्हणून, मँचुरियाचा दक्षिण भाग भाडेपट्ट्यानें आहे म्हणून, मँचूरियांतील एका रेल्वेची मालकी व दुसऱ्या रेल्वेची वहिवाट जपानकडे आहे म्हणून, चीनला जपानानें रेल्वेकरितां कर्ज दिलें आहे म्हणूनं, ब्रिटिश मालाला चिनी लोकांनीं बहिष्कार घातल्यापासून मँचूरियांत जपानी व्यापार वाढला आहे म्हणून-या सर्व कारणाकरितां जपानाला मँचूरियामध्यें मुख्य सत्ता आपल्या हातीं राहावी असें वाटतें. मग मूळची मालकी

चीनची असली तरी फिकीर नाहीं; कारण त्या मालकींत आतां सत्ता उरलेली नाहीं. चीनमध्यें बंडें होऊन लोकसत्ता स्थापित झाली. तिचा पहिला व मोठा धक्का युरोपियन राष्ट्रांना बसला. इंग्लंडचा चीनशीं असलेला व्यापार निम्मा व इम्रत जवळ जवळ सगळी नष्ट झाली. चीनमध्यें बंडाळी व क्रांति झाली ती चीनचा मध्यभाग व दक्षिणभाग यांमध्येंच झाल्याकारणानें, त्याचाहि उपसर्ग चीनच्या उत्तर टोकाला असलेल्या मँचूरियांतील जपानच्या हितसंबंधाला फारसा लागला नाहीं.

उलट जपानानेंहि आपलें हित संभाळून चीनच्या राष्ट्रीय धोरणाला थोडेंबहुत उत्तेजनच दिलें. पण युरोपियन राष्ट्रांचें प्रस्थ चिनांतून कमी केल्यावर चिनी राष्ट्राचें लक्ष जपानच्या अतिक्रमणाकडे जाणें स्वाभाविक होतें, व या नव्या धोरणाचाच प्रादुर्भाव म्हणजे हल्लींचें चिनी-जपानी युद्ध होय. उलट कोरिया प्रांत व पिवळ्या समुद्रांतील बंदरें आणि मँच्यूरियांतील रेल्वे यांचें पाठबळ जपानला यापुढें कायमचें संभाळलें पाहिजे; कारण अमेरिकेशीं आपलें युद्ध केव्हां जुंपेल याची जपानला हल्लीं फार दहशत वाटते. आणि जागृत झालेलें चिनी राष्ट्र कदाचित् जपानला या दृष्टीनें भीतिप्रद होण्याचा संभव आहे. दुसऱ्या बाजूस रशिया हाहि टपून बसलाच आहे. त्याला कम्यूनिझमचें अर्थशास्त्रीय तत्त्व आणि सोव्हिएट पद्धतीची लष्करी सत्ता सर्व जगभर पसरावयाची आहे. जपान हें इंग्लंडप्रमाणें भांडवलवाल्यांचें राष्ट्र आहे. आणि चिनांत कम्यूनिझमच न अवतरला तरी मजूरपक्षाची चळवळ नवीन सुरू झाली आहे म्हणून तिला जपानपेक्षां रशिया अधिक जिव्हाळ्याचा वाटण्याचा संभव आहे.

## चीनचें सलोख्याचें धोरण

चिनी कूमिंगटँगमध्ये म्हणजे राजसत्ताधिकारी पक्षामध्यें नेमस्त व जहाल असे दोन पोटपक्ष आहेत. या पक्षांपैकीं नेमस्त पक्ष हा जपानशीं स्नेहभाव शक्य तितका ठेवीत असून, जहाल पक्ष मात्र जपानच्या विरुद्ध उठूं येऊं लागला आहे. नेमस्त पक्षाचा अध्यक्ष चेंग कै शेक हा आहे. जपानने मँचूरियांत चढाई केल्यामुळें त्याला जरी अगदींच गप्प बसतां येत नाहीं तरी सलोख्यानें तह व्हावा असें त्याचें धोरण होतें. हल्लींच्या युद्धाला सरोखरच चीनची आगळीक हें कारण झालें कीं नुसती सबब आहे हें ठरविणें कठिण आहे. परंतु जपानाविरुद्ध लोकमत चेतविलें जात आहे व त्याचा परिणाम खुनांत, बंडाळींत व व्यापाराच्या पिछेहाटींत होत आहे, हे पाहून जपानला स्वस्थ बसणें अशक्य झालें आहे असें जपानतर्फे सांगण्यांत येतें. कसेंहि असो रशिया, इंग्लंड व अमेरिका हीं राष्ट्रें चिनी-जपानी युद्धांत आज न पडतां दुरून त्याची गंमत पाहात आहेत. जपान हा इंग्लंडचा प्रतिस्पर्धी म्हणून त्यानें चीनला मदत करावी म्हटलें, तर चीनचें व इंग्लंडचें आधींच इतकें बिनसलें आहे कीं तें सुधारणें यापुढें शक्य नाही. उलट चिनांतील राष्ट्रीय बंड कोणी मोडील, मग तो जपान कां असेना, तरी इंग्लंडला हवें आहे. यामुळें इंग्लंड होतां होईतों युद्धांत पडणार नाहीं निदान चीनच्या बाजूनें तरी पडणार नाहीं. मात्र जपानहि इंग्लंडची मदत मागेल हे संभवत नाहीं. अमेरिकाहि अजून तटस्थच आहे. ब्रिटिश मालावर चिनी लोकांनीं बहिष्कार घातल्यामुळें जपानप्रमाणें अमेरिकेचेंहि प्रथम हित झालें. शिवाय खुद्द जपान व अमेरिका यांची चुरस फार वाढल्यामुळें उद्यां युद्ध जुंपलें तर जपानला चीनकडून बसणारा पायबंद अमेरिकेला इष्टच आहे. अमेरिकेनें चिनी समुद्रांतील आपलें आरमार थोडेंबहुत वाढविलें आहे; पण शांघायच्या संरक्षणांत अमेरिकेनें प्रत्यक्ष भाग घेतला नाहीं. कांहीं दिवसांपूर्वी नानकिंग बंदरावर अमेरिकेनें इंग्रजांबरोबर सहकार्य करून तोफ चालविली; पण पुढे अमेरिकेनें अंग काढून घेतलें.

## परराष्ट्रांचें धोरण

चिनांतील क्रांतीनें फ्रान्सला कांहींच इजा झालेली नाहीं; उलट थोडासा व्यापार वाढलाच आहे. इंडोचायनामध्यें फ्रान्सची मोठी वसाहत आहे म्हणून चीनला आपला शत्रू करण्याची फ्रान्सला इच्छा नाहीं. तथापि युरोप खंडांतील राजकारणांत फ्रान्स व इंग्लंड हीं हल्लीं पुष्कळ बाबींत हातांत हात घालून सहकार्य करीत असल्यामुळें, फ्रान्सचें चिनांतील धोरणहि कांहीं अंशीं इंग्लंडच्या धोरणावरच अवलंबून राहील. इटालीचा व चीनचा अर्थाअर्थी फारसा संबंध नाहीं. पण मुसलोनीनें अलीकडे इटालीचीं कांहीं लढाऊ जहाजें चिनी समुद्राकडे पाठविलीं होतीं यांचें कारण इंग्लंडशीं सहकारिता करावी ही इच्छा. इटालीला भूमध्यसमुद्राच्या बाजूला एशियामायनरमध्यें कांहीं मुलुख मिळाला तर हवा आहे, व इंग्लंडांतील बँकांकडून मिळाल्यास कांहीं कर्ज काढण्याचा इटालीचा विचार आहे. तात्पर्य, युरोपांतील जी तिसरी मोठी सत्ता तिचे धोरणहि इंग्लंडवर अवलंबून आहे. पण आशियाखंडांतील हें युद्ध उपस्थित झाल्यास इटलीला कोणत्याच पक्षाला फारशी मदत करण्याचें साधन नाहीं. तूर्त युरोपियन राष्ट्र आपापल्याला अडचणींत गुंतलीं आहेत यामुळें, व युद्धापेक्षां युद्धनिर्मूलन व निःशस्त्रीकरण या विषयींच्या बडबडीनें जगांतील हवा भरून गेली असल्यामुळें, आपल्या युद्धांत दुसरा कोणी पडण्याचा फारसा संभव नाही असें पाहून जपाननें मात्र आपलीं टांकी व घण

हीं चालू ठेविलीं आहेत. स्वातंत्र्य व लोकसत्ता यांचा पूर्ण संचार होऊन दुभंगलेल्या चिनी राष्ट्रांत एकी होईल तरच जपानला कांहीं पायबंद पडण्याचा संभव आहे. मात्र 'लीग ऑफ नेशन्स' म्हणजे राष्ट्रसंघ याच्या हातून युद्ध थांबण्याची आशा दिसत नाहीं. त्याचे शांतिपाठ कामदीच ठरणार !

# कर्जखतें रद्द होणार काय ?

महायुद्धांतील कर्जासंबंधीं जो वाद हल्लीं युरोप व अमेरिका येथें चालला आहे, त्यासंबंधीं मि. एच्. एन्. ब्रेल्सफर्ड यांनीं 'न्यू लीडर' पत्रांत खालील आशयाचे विचार प्रदर्शित केले आहेत. मि. ब्रेल्सफोर्ड म्हणतात—

## कर्ज रद्द करण्याच्या युक्त्या

लहानपणी शाळेंत शिकत असतां आम्हीं प्राचीन लोकांच्या शहाणपणाविषयीं एक गोष्ट वाचली. ती तेव्हां मनांवर खोल ठसली आहे. रोममधील गरीब लोकांच्या ( Plebeians) कर्जाचीं व्याजें फार फुगलीं म्हणजे हे गरीब लोक सावकारांना क्रांतीचा धाक घालीत, आणि कर्जावरील न फिटलेलें सर्व व्याज रद्द करून घेत. या व्याजाची नोंद मेणाच्या वड्यांवर केलेली असे. ऋणकरी गरीब लोक रद्द झालेल्या व्याजाचा हा पुरावा पुढेंमागें जाचक होऊं नये म्हणून व्याजनोंदणीच्या मेणाच्या सर्व वड्या सावकारांकडून वितळावयास लावीत.

ग्रीक लोकांत कर्ज रद्द करण्याच्या अशाच कांहीं युक्त्या होत्या. सर्व जगांत सावकारीबद्दल ज्यांचा फार दुर्लौकिक आहे असे ज्यू लोकहि ठराविक मुदतीनंतर ज्युबिली-महोत्सव करीत. तेव्हां कर्जानें बांधलेल्या गुलामांना कर्जमाफी देऊन बंधमुक्त करीत. आणि ही माफी मोठीं शिंगें फुंकून जाहीर करीत. सावकारीचा भयंकरपणा त्यावेळींहि लोकांना पुरा पटला होता. येत्या वर्षी अशाच मेणाच्या वड्या वितळव्या जाणार व शिंगें फुंकिलीं जाणार की काय अशी शंका येऊं लागली आहे.

आज जगावर जें अरिष्ट आलें आहे त्याचा इतिहास भावी काळीं बराच चित्ताकर्षक होईल. व्यापाराच्या तेजीमंदीच्या इतिहासांत ठराविक मुदतीनंतर व्यापारास मंदी आल्याचें आढळतें. वरचेवर येणाऱ्या अशा मंदीहून हल्लींचें संकट फारच वेगळें व भयंकर आहे. हल्लींच्या संकटाची मीमांसा अशी आहे कीं, आजच्या भांडवलशाहीच्या समाजरचनेंत संपत्ति ज्या वेगानें अधिकाधिक वाढते आहे तितक्या वेगानें ती संपत्ति 'खरेदी करण्याची शक्ति' ( buying power ) वाटली जात नाहीं. या शक्तीचा पुष्कळ भाग थोड्या भांडवलवाल्यांच्या वाट्यास येतो, आणि त्यांना या सर्व शक्तीचा व्ययसुद्धां करतां येत नाहीं. उलट ज्या बहुसंख्य अशा मजूर वर्गास ही 'खरेदी करण्याची शक्ति' हवी असते, त्यांना ती अत्यल्प मिळते. यामुळें त्यांनींच निर्माण केलेली संपत्ति त्यांना पुरेशी खरेदी करतां येत नाहीं. म्हणून पुष्कळ माल खपत नाहीं म्हणून तो पडून राहतो. म्हणून संपत्ति निर्माण करण्याचा वेग कमी करावा लागतो. आणि अर्थातच कांहीं मजूर बेकार होतात.

## अन्नाच्या खोलीस कुलूप

खरोखर आज होत आहे तें सर्व हेंच. 'खरेदी करण्याची शक्ति' आज सोन्याच्या रूपानें बँकांच्या तिजोऱ्यांत ऐदीपणानें पडून आहे आणि या सोन्यानें खरेदी करण्यासारखा माल आतां खपवावा कसा, हा प्रश्न अवघड होऊन बसला आहे. अमेरिकन शेतकऱ्यांना कापूस हल्लींच्या एकतृतीयांशच पिकवा असा आग्रह केला जात आहे. ब्राझिलमध्यें कॉफीची डाळ आगगाडीच्या इंजिनांत जळण म्हणून वापरण्यांत येत आहे. रबराच्या झाडाला रोग पडून रबर कमी निपजलें म्हणजे मळेवाल्यांना आनंद होत आहे. बेसल येथील बँकांची कमिटी म्हणते कीं, जर्मनींत सोनें कमी उत्पन्न झालें असून माल मात्र इतका उपजला आहे कीं, त्याला खप नाहीं. एकंदर देखावा असा आहे कीं, एखाद्या दुर्दैवी कुटुंबाजवळ असलेलें भरपूर अन्न खोलींत असून खोलीस कुलूप असावें, त्याची किल्ली कोठें तरी हरवली असून सापडण्याची निराशा व्हावी. आणि दार फोडण्याचें धाडस न होऊन कुटुंबांतील माणसानीं उपासानें स्वस्थ मरत राहावें.

या संकटावर जगांत जे उपाय सुरू आहेत त्यांनींच नेमकें तें वाढणार आहे. लोकांजवळ आज जिन्नस खरेदी करण्याची शक्ति नाहीं. आणि मोठ्या धैर्यानें पण मूर्खपणानें लोकांचे पगार कमी केले जात आहेत. बँका भारी व्याज आकारून कारखानदारांना संपत्ती कमी निर्माण्याची सक्ति करीत आहेत. त्यामुळें मजुरांची मजुरी कमी होत आहे. जिकडे तिकडे बँकांची हुकमत चालू आहे. आत्मनाशाचे मार्ग पद्धतशीर अवलंबिले जात आहेत. कांहीं काळानें बँकवाले आपल्या आज्ञाधारक शिष्यांना सर्टिफिकेट देतात. उदाहरणार्थ 'जर्मनीचें दिवाळें वाजलें' हें सर्टिफिकेट जर्मनीस मिळालें.

जगांतील निम्म्याहून अधिक सोनें फ्रान्स व अमेरिका या दोघांजवळ गेलें आहे. सोनें बाजारांतून

गेल्यामुळें १९२८ पासून मालांच्या किंमती सर्वत्र एकतृतियांशाहून कमी झाल्या आहेत. सोन्याची किंमत भरमसाट चढली आहे. कारण सोनें आधींच अमेरिकेंत एका जागीं साठलें आहे, आणि अमेरिकेनें जकाता वाढविल्यामुळें अमेरिकेचें कर्ज मालांनी फेडतां येत नाहीं म्हणून अमेरिकेला त्याबद्दल आणखी सोनेंच द्यावें लागत आहे. या सगळ्यावर उपाय काय ? आम्हा इंग्रजांना 'अमेरिकेनें कर्ज माफ करावें, आम्ही आमच्या कुळांना तें माफ करतो ' असें सहज म्हणतां येतें. आमचें याहून अधिक होतें तें कर्ज आम्हीं आधींचमाफ केलें आहे. पण अमेरिका कर्ज माफ करण्याचें औदार्य कोठून दाखविणार ? अमेरिकन काँग्रेसमध्यें एक सभासद म्हणतो, ' आमचें कर्ज सोन्यानें कां फेडत नाहींत ? ' सगळें सोनें अमेरिकेंतच गुंतलें आहे याची बिचाऱ्याला दखलच नाहीं काय ? दुसरा एक सुचवितो कीं, इंग्लंडांतील प्रसिद्ध पदार्थ-संग्रहालय आणि नॅशनल गॅलरी आपण कर्जफेडीदाखल अमेरिकेला आणूं. अमेरिकेंतील एक कोटी बेकारांना सोन्यानें अथवा पदार्थसंग्रहालयांतील खारवलेल्या प्रेतांनी (Mummies) जेवूं घालतां येईल असें या सभासदांस वाटतें काय ?

**कर्ज नाकारणें न्याय्य दिसेल**

अमेरिकन काँग्रेस कर्ज रद्द करीत नाहीं इतकेंच नव्हे तर कमीहि करीत नाहीं. तर आतां या ना त्या मार्गानें युरोपीयन राष्ट्रांनीं अमेरिकेचें कर्ज नाकारण्याच्या मार्गाला लागावें. आमच्या फडणिसांनीं, सोन्यांत कर्जे ठरलीं तेव्हां मालाच्या प्रमाणांत सोन्याचा भाव किती होता व आज त्याहून किती वाढला आहे याचा हिशेब करावा, म्हणजे त्या प्रमाणात कर्ज नाकारणे न्याय्य दिसेल. सालोसाल सोन्याची किंमत वाढली तसतसें मालाच्या हिशेबानें पाहातां कर्ज फुगलें आहे. १९२० पासून १९२८ पर्यंत हें कर्ज दुप्पट झालें. १९२८ पासून आतां १$\frac{१}{३}$ पट झालें आहे. अर्थात् आजवर फेडलेलें कर्ज पाहातां आंतरराष्ट्रीय कर्जांचे दस्तैवज फाडून टाकण्यास हें अगदीं पुरेसें कारण आहे.

पण अमेरिकेच्या सरकारी जमाखर्चांत ४० कोटी पौंडांची तूट आली आहे. तिची वाट काय ? येत्या नोव्हेंबरमध्यें अध्यक्षाची निवडणूक होणार-तेव्हां हाच प्रश्न महत्त्वाचा आहे. फ्रान्स, अमेरिकेनें त्यास कर्जमाफी दिल्यास,तेवढीच जर्मनीसहि नुकसान भरपाईची माफी देईल, अधिक देणार नाहीं. जर्मनीला इंग्लंड व अमेरिकेचीं खाजगी कर्जे आहेत. तशीं फ्रान्सची खाजगी कर्जे नाहींत तेव्हां फ्रान्स सहजच म्हणणार कीं, जर्मनीनें युद्धभरपाई आधीं द्यावी, मागून खाजगी खर्चाचा नंबर लागतो.

एवंच आर्थिक परिषदेंत निष्पन्न कांहींच होणार नाहीं. फार तर अमेरिकेनें दिलेल्या कर्जतहकुबीची मुदत आणखी थोडी वाढेल. पण फ्रान्स आणि अमेरिका यांना सुवर्णमान कार्यक्षम करण्याचा मार्ग काढणें शक्य असलें तरी तें घडण्याची आशा मुळींच दिसत नाहीं.

या सर्वांचा परिणाम काय होणार ? नाणें कमी होणार, खर्चास कात्री लागणार, मजूरी उतरणार, माल कमी उत्पन्न होणार, मालाच्या आयातीस आणि आंतरराष्ट्रीय देवघेवीस प्रतिबंध होणार, मालांनीं भरलेलीं जहाजें पडून राहून बंदरांत स्मशानशांतता पसरणार. एवढें होईपर्यंत कदाचित जर्मनात राज्यक्रांति होईल. निदान तसा प्रयत्न होईल. त्याचा फायदा कदाचित् फॅसिस्टच घेतील. कारण कर्जनोंदणीच्या ' मेणाच्या वड्या ' वितळण्याचें धैर्य दाखवील असा गरीबांचा पुढारी कोणीच दिसत नाहीं.

# विद्यामंदिराची मशीद बनविली!

' जातीसाठीं खावी माती ' हा लौकिकी न्याय तर खराच, पण तसें करतांना दुसऱ्याच्या भाकरींत माती कालविण्याचा दुष्टपणा जो कोणी करील, त्याच्या तोंडांत सारी जनता शेण घातल्याशिवाय राहाणार नाहीं. ज्ञातिविषयक पक्षपाताचा विटाळ ज्ञानदानासारख्या पवित्र व उपकारक कार्याला तिळमात्र होतां कामा नये. या तत्त्वाच्या दृष्टीनें विद्याखात्याचीं सूत्रें हातीं खेळविणाऱ्या अधिकाऱ्यांवर मोठीच जबाबदारी येऊन पडते. आतांपर्यंत मुंबई इलाख्याच्या शिक्षणमंत्र्याचे जागीं डॉ. परांजपे व ना. भास्करराव हे ब्राह्मण आणि ब्राह्मणेतर असे दिवाण होऊन गेले. त्यांच्या कारकीर्दीत कांहीं जणांना अप्रिय अशा गोष्टी घडल्या असतील, व कांहीं जणांना प्रिय अशा गोष्टी घडल्या नसतील. पक्षपाताचाहि आरोप त्यांच्यावर जवळून—दुरून, अधिक—उणा कोणीच केला नसल असें नाहीं. पण सध्यां ज्ञातिनिष्ठ धोरणाचा शिक्षणखात्यांत इतका धुमाकूळ सुरू आहे कीं, त्यापुढें पूर्वीच्या कारकीर्दींतील दोष कोणाहि निःपक्षपाती माणसाला कःपदार्थच वाटावे !

मौलाना रफीउद्दीन हे शिक्षणमंत्र्यांच्या गादीवर बसल्यापासून मुंबई इलाख्याच्या सर्व शिक्षणखात्यावर अर्धचंद्र चमकूं लागल्याचा भास होऊं लागला.

१०-१०, २०-२० वर्षें इमानेंइतबारें काम केलेल्या हिंदु नोकरांना व अधिकाऱ्यांनाहि एकदम अर्धचंद्र देणें आणि त्यांचे जागीं, इतरांचे हक्क पायाखालीं तुडवून एखाद्या अर्धबोबड्या शिक्षणाच्या, कोऱ्या करकरीत मुसलमान छोकऱ्याला आणून बसविणें हें तर जणुं नित्यक्रमांतीलच होऊन बसल्याचें दिसतें. हें हिरवें निशाण फडकूं लागतांच एका ब्राह्मण डेप्युटी इन्स्पेक्टराला एकदम असिस्टंट मास्तराच्या जागेवर गडगडत यावें लागलें ! ४७० रुपये पगाराऐवजीं २५० रुपयेच घेऊन बसावें लागलें ! आणि त्याचा गुन्हा कोणता ? तर कांहीं मास्तरांच्या बदल्या त्यानें केल्या ! गुन्हा कबूल केला तरीदेखील 'काकडीची चोरी नी फाशीची दोरी' अशी ही शिक्षा भयंकरच ठरते. कोंबडी चोरल्याबद्दल फेदेची शिक्षा इंग्लंडांत पूर्वी देत असत; तो कित्ता तर या शिक्षणमंत्र्यांनीं गिरवावयास घेतला नाहीं ? शंका घेण्याचें कारण एवढेंच कीं, मुसलमानांना इंग्रज हे हिंदूंपेक्षां अधिक जवळचे व जिव्हाळ्याचे वाटतात. याचें एक उदाहरण म्हणजे मि. कॅमेरॉन यांची नेमणूक. असि. इन्स्पेक्टराच्या जागीं एका हिंदूचें नांव निवडणूक–कमिटीनें सुचविलें. त्याला आपल्या स्वभावानुसार मौलवीमजकुरांनीं कसून विरोध केला. पण त्याच जागीं साहेबमहाशयांचें नांव दृष्टीस पडतांच त्यांनीं थोडीहि कुरकूर केली नाहीं.

निग्रह आणि अनुग्रह या दोन्ही अधिकारांचा उपयोग–किंवा दुरुपयोगच !–जात्यंध मौलवीसाहेब सढळ हातानें करीत आहेत. रत्नागिरीच्या ब्राह्मण ॲड. ऑफिसराच्या न्याय्य हक्कावर कशी गदा घालण्यांत आली हें महशूर आहेच. त्याच्या उलट, एका मुसलमान भाईच्याविरुध्द कलेक्टरानें खणसणीत रिपोर्ट केलेला असतांनाहि त्याला ॲड-ऑफिसर म्हणून नेमण्यास या जातिवेड्या शिक्षणमंत्र्यांनीं मान डोलवली. डायरेक्टरसाहेबांच्या कानाशीं लागून त्यांनीं एका मॅट्रिक झालेल्या छोकऱ्याला एकदम सुपरिंटेंडेंट नेमलें, आणि तेथून त्याला अलगद उचलून, तीन आठवड्यांचे आंत, डायरेक्टरांच्या रिपोर्टाचीहि वाट न पाहतां प्रॉव्हिन्शिअल सर्व्हिसमध्यें नेमून टाकलें, नव्हे कायमहि करून टाकलें ! इतकी झटपट बढती कोणीं कोणाची केल्याचें उदाहरण सुलभ आहे काय ? केवढें हें जातिवेड आणि धडाडी तरी केवढी ! एकादी स्त्री आपल्या धर्माची असली, आणि त्यांतहि आपल्या रक्तामांसाचीच असली, तर तिला इन्स्पेक्ट्रेस केल्याबद्दलचा दोष एवंगुणविशिष्ट शिक्षणमंत्र्याचे पदरीं कोण कसा बांधील ? हेडमास्तर नेमण्याचा नवा अधिकार कायदे–मंडळानें शिक्षणमंत्र्यांना बहाल केल्यापासून तर हें जातिपिसें धोरण मोकाट सुटलेलें आहे! सिंध प्रांत हा तर मुसलमानांचा बालेकिल्ला. तेथें प्रॉव्हिन्शियल सर्व्हिसच्या १६ जागा आहेत; त्यांपैकीं १० जागा मुसलमान बळकावून बसलेले आहेत.

आपल्या गोतावळ्यांना असा मलिदा चारल्यामुळें शिक्षणमंत्र्याला काटकसरीचा सुरा हातांत सहजच घ्यावा लागतो; आणि साहजिकच त्यांना तो गरीब बिचाऱ्या शाळामास्तरांच्याच गळ्यावरून फिरवावा लागतो ! त्या वेळीं त्यांनीं काढलेल्या ' बॅं बॅं ' कडे लक्ष कोण देणार ? 'ज्याला दाढी; त्याला जोडी, इतरांना मात्र झोडी ' अशाच धर्तीचा अंमल जेथें जारी आहे, तेथें न्याय कोठला ? हक्क कोठला? आणि निःपक्ष कारभार तरी कोठला ?

# 'स्वराज्याचा' ग्रस्तोदय कोणास आनंदवील ?

मुंबई सरकारचें नवीन वर्षाचें अंदाजपत्रक फडणीस सर गोविंदराव प्रधान यांनीं बुधवार ता. १७ रोजीं मुंबई कायदे कौन्सिलापुढें मांडलें. अंदाजपत्रक म्हटलें कीं, त्यांत नवें वर्ष चालू वर्षाला जुळ्या भावंडाप्रमाणें चिकटलेलें दिसावयाचेंच. चालू वर्षाचा जमेचा व खर्चाचा आकडा ठाम झाल्यासारखा असतो, व पुढील वर्षाच्या या दोन्ही आंकड्यांचा अंदाज बांधण्यांत येतो. यंदांच्या उत्पन्नाचे सरकारी अंदाज बहुतेक सारे चुकले. त्यांना जमीनमहसूल, इरिगेशन, स्टॅंप, जंगल इत्यादिकांचे जितकें उत्पन्न येईल अशी अटकळ होती, त्याहून तें कमी येणार असा रंग दिसतो. उदाहरणार्थ जमीनमहसुलांत १९ लक्ष रुपयांची सूट द्यावी लागेल, इरिगेशन वसूल ३५ लक्षांनीं कमी येईल, स्टॅंपाच्या उत्पन्नांत १० लक्षांची तूट पडेल व जंगलखातें अंदाजापेक्षां १२ लक्ष रुपये कमी आणील. यांतून इतर किरकोळ उत्पन्न वजा केल्यास सरकारच्या वसुलांत ७३ लक्षांची तूट येऊन एकंदरीनें तुटीचा आंकडा १ कोटी ११ लक्ष रुपयांच्या घराला जाईल.

चालू वर्षाची रडकथा या प्रकारची आहे. आतां पुढील वर्ष. पुढील वर्ष झालें म्हणून त्यांत यंदांच्या वर्षापेक्षां नवल–विशेष थोडेंच घडावयाचें आहे ! रघुराजाच्या रित्या खजिन्यांत कुबेरानें रातोरात द्रव्याचा पाऊस पाडून तो जसा तुडुंब भरून काढला, त्यांतला कांहीं चमत्कार

मुंबई सरकारच्या खजिन्यांत दृष्टीस पडण्याची आशा नाहीं. पुढील सालीं मुंबईसरकारचें उत्पन्न १४ कोटी ३५ लक्ष रुपये येईल असें फडणीस धरून चालले आहेत. हें उत्पन्न खर्चाच्या मानानें ७३ लक्षांनीं कमी पडणार आहे. त्या तुटीची भरती करण्याकरितां, व याहून अधिक तूट न येऊं देण्याकरितां त्यांनीं त्रिविध उपायांची योजना केली आहे. त्यांपैकीं एक उपाय वीज व स्टँप यांजवर नवीन कर बसविण्याचा, दुसरा कर्ज काढण्याचा व तिसरा काटकसरीचा. वीज व स्टँप यांजवरील करांतून सरकार २८लक्ष रुपये अधिक वसूल करणार म्हणतें; व बाकीच्या रकमेकरितां कर्ज काढण्याचा बेत करतें. काटकसर हें दरसालचें पालुपदच असल्यानें उरलीसुरली सारी भिस्त सरकारानें तिजवरच ठेवावी हें साहजिक आहे.

मुंबई सरकारच्या अंदाजपत्रकांत ही तूट यंदांच्याच वर्षी येत आहे असें नसून हा आंतबट्ट्याचा कारभार गेलीं सहा सात वर्षे अव्याहत सुरूच आहे. यंदांच्या बजेटांत तूट येणार अशी दवंडी सरकार गेलें सबंध वर्ष पिटीत आलें आहे. अशा रीतीनें जी बातमी वर्षभर हवेंत तरंगत होती ती फडणिसांच्या तोंडून आतां बाहेर पडली याचा जनतेच्या मनावर नवीन असा कांहींच परिणाम घडून आला नाहीं. जनतेला कुतूहल एकाच गोष्टीचें होतें. ती गोष्ट ही कीं, सरकार हा तुटीचा रोग कायमचा हटविण्याकरितां कोणता नवा इलाज शोधून काढतें. कारण काटकसरीचा तोडगा पूर्वीच्या कोणत्याहि वर्षापेक्षां गेल्या वर्षांत फार वेळां सरकारच्या तोंडांत घोळला. सरकारानें एक काटकसर कमिटीहि नेमली, व तिनें काटकसरीचे आंकडेहि सरकारास कळविले. कमिटींतील सर्व सभासदांनीं एकमतानें ३६ लक्षांचा काट सुचविला. शिवाय कमिटीच्या सभासदांत इतर बाबतींत मतभेद झाला असला तरी बहुसंख्य सभासदांनीं कपातीची ही रक्कम१२१ लक्षांवर नेली. तथापि कमिटीच्या या रिपोर्टानें सरकारच्या डोळ्यावरची झापड फारशी निघाली नाहीं. बसल्याजागीं तें पेंगत व डुकल्या खात तसेंच बसलें होतें.

याच सुमारास इंग्लंडांत न होणारी गोष्ट घडून आली. तुटीचा रोग मुंबई इलाख्याच्या अंगांत मुरलेला तरी आहे. पण मुंबई इलाख्यापेक्षां इंग्लंडची शरीरप्रकृति पुष्कळच सुदृढ व निकोप असतां तुटीच्या आजारानें इंग्लंडच्या शरीरास पछाडलें. व इंग्रज लोक आपलें आरोग्य कायम राखण्यांत फार दक्ष असल्यामुळें रावापासून रंकापर्यंत सर्वांनीं या आजाराचा पाय आपल्या भूमीवर टरूं न देण्याचा निश्चय करून खुद्द राजेसाहेबांनीं स्वतःच्या खासगी खर्चावर काट मारला; व त्यांचा कित्ता ब्रिटिश मंत्रिमंडळानेंहि गिरवून आपला पगार दहा टक्क्यांनीं कमी केला. प्रचंड कारखान्यांतील मोठें चाक फिरूं लागल्यावर त्याचा पट्टा ज्यांच्यावर चढविला आहे तीं शेंकडों बारीकसारीक चक्रें भराभर गिरक्या घेतात. त्याप्रमाणें मोठ्या कामगारांनीं आपले पगार कातरून घेण्याची फॅशनच पडून ती फॅशन विलायतेंतून हिंदुस्थानांत प्रवास करीत आली; व व्हाइसरॉय, गव्हर्नर, कार्यकारी मंत्री यांपासून तों तहत दरमहा चाळीस रुपये मिळविणाऱ्या कारकुनापर्यंत सर्वांचे पगार कातरले गेले.

या फॅशनचा फायदा मुंबई सरकारनें गेल्या नोव्हेंबर महिन्यांत घेतला व त्यामुळें ३५ लक्ष रुपयांची बचत झाली. पण चालू वर्षाची तूट एक कोटीच्या घरांत असल्यानें ३५ लक्षांची रक्कम फराळावारीच जाऊन बाकीच्या रकमेकरितां प्रत्येक खात्याचे खिसे चांचपून त्यांत जें सांपडेल तें सरकार बिनदिक्कत काढून घेऊं लागलें. सरकार या उपटाउपटीस यंदांच चटावलें आहे असें नसून ही खोड पांच सहा वर्षे त्यास जडली आहे. कोणा कारकुनास मुदत भरण्यापूर्वीच पेन्शनांत काढ, ज्याची नोकरी कायम खरी पण हंगामी या सदराखालीं आहे,त्याची नोकरी पेन्शन देण्याइतकी झाली असतांहि पेन्शनें किंवा ग्रॅच्युइटी यापैकीं कांहीं त्यांच्या पदरांत न टाकतां त्याला घरीं बसावयास सांग, किंवा पट्टेवाल्यांना कमी कर, हे चाळे काटकसरीच्या नांवाखालीं कित्येक दिवस चालू आहेत. पण ही काटकसर नव्हे, उपटाउपटी होय. खरी काटकसर ज्या वेळीं गव्हर्नरापासून कारकुनाच्या पगारापर्यंत काट बसला तेव्हांच झाली. परंतु तिचा परिणाम पेंगत बसलेल्या मुंबई सरकारच्या नाकाला तपकिरीची चिमूट लागावी इतक्यापुरताच जाणवला. त्या तपकिरीच्या झटक्याबरोबर मुंबई सरकारास एक जांभई आली व तिच्या पाठोपाठ झटाझट दोन शिंकाहि आल्या. तथापि कितीं म्हटलें तरी ही काटकसर. लहान पगार वगळल्यास मोठ्या पगारांतील थोडक्याशा रकमेला काट मारून काढलेली ही कसर आहे. या काटानें व कसरीनें तुटीची खांच कशी भरून निघणार !

गव्हर्नर, कौन्सिलर, दिवाण, कमिशनर, कलेक्टर, जज्ज, इंजीनियर इत्यादिकांचे पगार हजारांनीं मोजण्याइतके मोठे आहेत. ते त्यांच्या वजनाइतके किंवा त्याहूनहि अधिक भरतील. रौप्यतुला करण्याची पद्धत आज सार्वत्रिक असती तर या अधिकाऱ्यांपैकीं बहुतेकांची तुला दरमहाच्या दरमहा खात्रीनें झाली असती! इतका भारंभार पगार इंग्रजी राज्यापूर्वी हिंदुस्थानांत कोणास क्वचितच माहीत होता. सिव्हिल सर्व्हिस किंवा इंपीरियल सर्व्हिस यांमधील नोकरांचे पगार कितीहि लठ्ठ असले तरी त्यांच्या-

संबंधीं अवाक्षर बोलण्याचीहि हिंदी लोकांना चोरी. त्यांच्या पगारावर टीका करणें हें स्वर्गांतील देवांच्या अमरत्वावर टीका करण्याइतकेंच हास्यास्पद व विफल. त्यांचा स्टेट सेक्रेटरीकडून ठरून आलेला पगार हा ब्रह्मदेवानें जन्मास घातलेल्या मनुष्याच्या आयुष्याइतकाच मुक्रर. याकारणानें तो कमी झाल्याचें कोणाच्या पहाण्यांत व ऐकण्यांत नाहीं. पण यंदां तेंहि नवल घडलेलें पाहून पुष्कळ लोक चकित झाले यांत शंका नाहीं.

हा पायंडा केव्हां तरी पडावयास पाहिजे होता, तो यंदां पडला इतकेंच त्याचें महत्त्व व उपयुक्तता. असली काटकसर वगळल्यास मुंबई इलाख्याच्या सध्यांच्या डबघाईच्या स्थितींत कराच्या बाबतींत इकडचें तिकडे हलण्याची मुळींच सोय नाहीं. जमीन-महसुलासारखे जे कर सरकारनें गेल्या दहाबारा वर्षांत वाढवून ठेवले त्यांचा सगळाच्या सगळा वसूल होत नाहीं.इतकेंच नव्हे तर स्टँपाचें उत्पन्नहि उद्योगधंद्याच्या मंदीमुळें कमी येतें. अशा स्थितींत नवीन कर बसविल्यानें उत्पन्नांत भर पडेल ही समजूत चुकीची ठरते. आणि कर्ज काढणें यासारखा वेडेपणा दुसरा कोणताच नाहीं. तें फेडण्याची आशा असली तर कर्ज काढण्यांत अर्थ. ही आशा बाळगावयाची कशाच्या जिवावर, तर उत्पन्नाच्या. पण तें उत्पन्न चालू खर्चालाहि पुरेनासें झाल्यावर नव्या कर्जाची फेड करावयाची कोठून ?

मुंबई सरकारचे फडणीस सर गोविंदराव प्रधान यांनीं आपल्या भाषणांत बजावून सांगितलें आहे कीं, यंदांची दहा टक्के कपात भावी काळाच्या दृष्टीनें करून न केल्यासारखीच आहे. कारण नोकरवर्गाचे आज पगार छाटले असले तरी डोक्यावरच्या केसाप्रमाणें ते ठरलेल्या स्केलास अनुसरून पुनः वाढीस लागणार, व चार दोन वर्षांनीं त्यांजकडे वळून पहावें तो ते पूर्वीच्या आकाराला आलेले किंवा त्याहूनहि कोठें कोठें अधिक उगवलेले दृष्टीस पडणार.फडणीस म्हणतात ती अडचण अगदीं खरी आहे यांत शंका नाहीं. तिचें निवारण नुसत्या काटकसरीनें कधींहि व्हावयाचें नाहीं. यास्तव काटकसरीवर विसंबून न राहातां काटकसरीच्या ऐवजीं मोडतोड, कापाकापी किंवा चीरफाड करण्यासच सरकारानें धजलें पाहिजे. आतांपर्यंत खर्चाकडे डोळा टाकावयाचा व त्याला गांठील इतकें उत्पन्न वाढवावयाचें असा प्रघात पडला आहे. तो मोडून त्याऐवजीं आधीं उत्पन्नाचा व रूर त्या लोकोपयोगी खर्चाचा विचार करायाचा आणि त्यांच्या आहारीं रहातील इतकेंच किर वर्गाचे पगार आणून ठेवावयाचे असा प्रघात मलांत येणें अत्यंत जरूर झालें आहे.

सिव्हिल सर्व्हिस व इंपीरियल सर्व्हिस यांतील अधिकाऱ्यांचे पगार इतरांच्या पगारांना सांप्रत प्रमाणभूत मानले जातात. ती पगार मोजावयाची फूटपट्टी समजली जाते, व तिजवर इंचा–अर्ध्या इंचाच्या ज्या रेघा मारलेल्या असतात त्यांच्या मापांत इतर हिंदी लोकांच्या पगाराची मोजदाद होते. गव्हर्नराचें कार्यकारी कौन्सिलच घेतलें तर त्यांतील प्रत्येक मंत्र्याचा पगार सालीना चौसष्ट हजार रुपये. आमचे हिंदी दिवाण त्या मंत्र्याच्या दर्जाचेच समजण्यांत आले असल्यानें त्यांचा पगार मंत्र्याच्या पगाराइतका न ठेवल्यास तो दिवाणच काय पण इतर हिन्दी लोकहि स्वतःचा उपमर्द समजतील. तथापि या दिवाणांपैकीं कांहीं दिवाण असे सांपडतील कीं, ज्यांनीं पगाराची इतकी थोरली रास स्वप्नांतहि पाहिली नसेल. जी अवस्था दिवाणांची तीच इतर हिन्दी कामगारांची. गोऱ्या कामगारांचे तनखे मोठे म्हणून त्यांच्या योग्यतेच्या हिन्दी कामगारांचे तनखे मोठे. हीच परंपरा प्रॉव्हिन्शिअल सर्व्हिसमधल्या व त्याहि खालच्या नोकरांपर्यंत आणून भिडविल्यास सामान्य हिन्दी जनतेच्या प्राप्तीच्या मानानें सरकारी नोकरांचे पगार व भत्ते डोळ्यांवर येण्यासारखे किंबहुना डोळे फोडण्यासारखे असतात म्हटलें तरी चालेल. इतर कोणत्याहि कामधंद्यापेक्षां सरकारी नोकरींत शिरण्याचा मोह सर्रास हिंदी लोकांना आंवरत नाहीं याचें कारण दुसरें कोणतें असणार! या सर्वांचें मूळ गोऱ्या अधिकाऱ्यांच्या पगारांत असून ते पगार निम्यावर आणून सरकारानें सर्व दुःखांचें हें मूळच हरण केलें पाहिजे. राष्ट्रीय सभेनें कराचीस एक हजार रुपयांपेक्षां अधिक पगार कोणाचाच असू नये असा ठराव पास केला होता त्याचें रहस्य झालें तरी हेंच होय.

शेतसारा ही मुंबईसरकारची सर्वांत मोठी उत्पन्नाची बाब. तिचा पुढील म्हणजे १९३२–३३ सालचा वसूल अंदाजीं ४ कोटी ८८ लक्ष धरलेला आहे. पण त्या उत्पन्नाचा वसुली खर्च किती तर २ कोटी ७६ लक्ष रुपये. साऱ्या हिंदुस्थानांत मुंबईसरकाराइतकें उधळें सरकार दुसरें कोणतेंहि नाहीं असा त्याचा दुर्लौकिक आहे.हा दुर्लौकिक भ्रामक ठरविण्याचा प्रयत्न ना. प्रधान यांनीं आपल्या भाषणांत केला आहे, पण तो एकंदरीनें त्यांच्या गळ्यांतच आला आहे. मुंबई कार्पोरेशनच्या कर्जाचा दीड कोटीचा आंकडा व इनामी उत्पन्नाचा एक कोटीचा आंकडा बजेटांत घुसून इलाख्याचा खर्चाचा अंदाज विनाकारण फुगीर दिसतो अशी फडणिसांची तक्रार आहे. पण ती कबूल करूनहि ते आंकडे वजा घातल्यावर मुंबई इलाख्याचा दर माणसीं खर्च रु. ६·३ इतका बसतो व तो इतर

प्रांतांपेक्षां दीडपटीनें दुपटीनें किंबहुना जवळजवळ तिपटीनेंहि अधिक भरतो. या उधळपट्टीनें यापुढें निभाव लागण्याची आशा नसल्यामुळें मुंबईसरकारनें आपल्या ऐषआरामास व इतमामास रजा देण्याचें ठरविलें आहे.

उन्हाळ्यांत पुण्यामुंबईपैकीं कोणतेंच स्थळ पसंत न करतां गव्हर्नरसाहेबांनां व त्यांच्या बड्या अधिकाऱ्यांनीं दोन महिने महाबळेश्वरीं जाऊन राहणें हे जिवाचे निवळ चोचलेच होत, त्यांस यंदां फाटा मिळाला हा फरक इष्ट असाच झाला. गव्हर्नरसाहेबांचा स्वतःचा पगार सालीना १ लक्ष २० हजार रुपये आहे व त्यांचा घरगुती खर्च ५ लक्ष ८४ हजार रुपये आहे तो निराळाच.त्यांच्या भोंवतालचे बॉडीगार्ड व करमणुकीकरितां ठेवलेला बँड यांचा उपयोग फारसा नसल्यानें त्यांची गणना राजवैभवांत व पोकळ डामडौलांतच करावी लागेल. असला हा फुकट खर्च सव्वा लाखानें कमी झाला आहे. व महाबळेश्वरच्या यात्रेचेहि साठ हजार रुपये असेच वांचले आहेत पण या रकमा एकंदर तुटीच्या मानानें इतक्या लहान आहेत कीं त्या छाटून काढल्या, यावरून मुंबईसरकारास आपला सरंजाम व रहाता वाडाहि गहाण टाकून बसलेल्या जुन्या जहागीरदाराप्रमाणें स्वतःच्या इतमामाची व ऐषआरामाची लाज उत्पन्न झाली एवढेंच म्हणतां येईल; आपला काळ फिरला, सद्दी संपली, कष्टदशा येत चालली याची खूण सरकारास अन्तर्यामीं पटली इतकेंच त्यावरून सिद्ध होईल.

पण सरकार पूर्णपणें शुद्धीवर येऊन बचावाच्या मार्गाला लागलें हें जनतेला समजण्यास याहून अधिक पुरावा पुढें यावयास पाहिजे. गव्हर्नरसाहेबांनीं व सर गोविंदराव प्रधान यांनींहि आपल्या भाषणांत हिंदुस्थानसरकारचे माजी ऑडिटर जनरल सर फ्रेड्रिक गॉंटलेट या तज्ज्ञांना सर्व राज्यकारभाराचें निरीक्षण करून त्यांत कोणते खर्च पुनर्घटनेच्या दृष्टीनें अजिबात थांबविले पाहिजेत हें सुचविण्याकरितां नेमण्याचें योजिलें असल्याचें सांगितलें आहे. त्यांनीं योजना मांडली आणि ती सरकारानें अमलांत आणिली तरच या खटाटोपाचें सार्थक; नाहींपेक्षां काटकसर कमिट्या सरकारानें नेमाव्या व त्यांच्या सूचना रिपोर्टांच्या पानांत झांकून ठेवून भलतेच खर्च कापीत सुटावें अशी अंदाधुंदी सध्यांप्रमाणेंच सुरू रहावयाची. कारण सांप्रत सरकारनें कांहीं खर्च केवळ आडमुठेपणानें कमी केलेले दिसतात. शिक्षण हें अत्यंत उपयुक्त व पवित्र खातें. पण त्यावरील पैसा सरकारनें गेल्या तीन वर्षांत २ कोटींवरून पावणेदोन कोटींवर तोडीत आणिला आहे.

गेल्या वर्षांत या खात्यावर १ कोटी ९९ लक्ष रुपये टाकण्यांत आले होते. पण पुढच्या वर्षाला सदर खात्याच्या वांटणीला पुरते पावणेदोन कोटी रुपयेहि येत नाहींत. प्राथमिक शाळांची ग्रँट १५ टक्के कमी करण्यांत आली आहे. दुय्यम शाळा व कॉलेजें यांची ग्रँट ५ टक्क्यांनीं तोडली आहे. ही काय काटकसर म्हणावयाची कीं तिला कत्तल हें नांव द्यावयाचें ? सिव्हिल वर्क्स या सदराखालील खर्चांत १५ लक्ष रुपये खर्ची करून व रस्त्यांची दुरुस्तीच बंद ठेवून हाहाःकार उडवून दिला आहे. नवीन वर्षाच्या अंदाजपत्रकाची ही दैना मुंबई कौन्सिलांतील सभासदांच्या निदर्शनास आल्यानंतर त्यावरील तीन दिवसांच्या वादविवादांत कोणी उपरोधानें, कोणी उपहासानें, तर कोणी मर्मभेदकपणानें बजेटाला व तें बजेट मांडणाऱ्या प्रधानांना बोचबोचून घेतलें. एकानें विचारलें कीं तुम्ही प्रॉव्हिन्शियल सर्व्हिस मधील नोकरांची संख्या कमी करतां व इंपीरियल सर्व्हिसमधील नोकरांना धक्का लावीत नाहीं हें कसें ? दुसऱ्यानें सुचविलें कीं मुंबईसरकार पैशापायीं इतकें मेटाकुटीला आलें आहे तर सरकारच्या मदतीकरितां एखादी लॉटरी कां काढीत नाहीं ? या सर्व सूचनांत धर्मार्थ खेळ व मीना बाजारांतील मालाच्या विक्रीवरील नफा असल्या सूचना काय त्या यावयाच्या राहिल्या आहेत !

मुंबईसरकारची व त्याबरोबर पर्यायानें मुंबईइलाख्याचीहि होत असलेली विटंबना अत्यंत अनुकंपनीय आहे. तिच्याविषयीं मुंबईसरकारास खेद व लाज वाटावयास पाहिजे. गव्हर्नरसाहेबांनीं कौन्सिलांतील आपल्या प्रास्ताविक भाषणांत मुंबई इलाख्याला स्वायत्तता म्हणजे प्रांतिक स्वराज्य मिळणार असल्याची ग्वाही दिली आहे. तें स्वराज्य खरेंखुरें असेल तर त्या स्वराज्यरवीच्या उदयाच्या वेळीं इंग्रजी राज्यांत शिक्षण, व्यापार, उद्योगधंदे व इतर सुधारणा याबाबतींत मुंबई इलाख्यानें बाकीच्या प्रांतांवर आघाडी मारून जो उत्कर्ष करून घेतला तो अस्तास जाण्याची पाळी यावी हें चिन्ह कांहीं ठीक नव्हे. शरदतूंत निसर्गास प्राप्त झालेलें वैभव शिशिर ऋतूंत मावळावयास लागून हरिततृणांकुर पिवळे व्हावे, ओढ्यांचे ओघ आटावे, नद्यांचीं पात्रें निम्मीं उघडीं पडावीं व झाडांवरील पानें गळून त्यांचे खराटे बनावे हें दृश्य बरें नव्हे. अशा रीतीनें ग्रहण लागलेल्या स्वराज्यरवीचा इतक्या वर्षांनीं उदय होण्यापेक्षां तो पूर्ण आकारानें उदयाचलावर तळपतांना दृष्टीस पडणें राज्यकर्ते व प्रजाजन या उभयतांनाहि अधिक श्रेयस्कर नाहीं काय ?

प्रांतिक स्वराज्य मिळून मुंबई इलाख्याचा कारभार हिंदी लोकांच्या हातांत आल्यानंतर जमाखर्चाची घडी हिंदी लोकांना बसविणें भाग आहे व ते ती बसवितीलहि. पण ती सध्यांच्या नोकरशाहीनें बसवून इलाख्याचा कारभार हिंदी लोकांवर सोंपविण्यांत खरा भलेपणा आहे. तो भलेपणा आपखुषीनें दाखविण्याची नोकरशाहीला ही शेवटची संधि मिळणार आहे. थॉमस लॅंकेस्टर कमिटी काय किंवा पूर्वीच्या कमिटया काय, त्या शिफारशी करतां करतां सिव्हिल सर्व्हंटांच्या भिंतीपाशींच शेवटीं येऊन धडकावयाच्या हे ठरलेलेच आहे. यास्तव गव्हर्नरसाहेबांनीं या बाबतींत पुढाकार घेऊन नोकरशाहीचा पगार जरूर तर निम्यापर्यंत तोडावा; पण बजेटाची तोंडमिळवणी करण्यास साहाय्यभूत व्हावें अशी शिफारस भारतमंत्र्यांकडे केल्यास त्यांची हिंदुस्थानविषयक कळकळ वेगळी व ढोंगीपणाची नसून अंतःकरणपूर्वक आहे याचें प्रमाण हिंदी लोकांस आपोआपच मिळेल.

# गोलमेज कमिट्यांचा दौरा

गोलमेज परिषदेच्या सल्लागार कमिटीच्या कामाला ता. २२ रोजीं सुरुवात होईल. तेव्हां पुढील विषयांवर चर्चा करावी असें मुख्य प्रधान मि. रॅम्से मॅक्डोनाल्ड यांनीं ने. ना. व्हाइसरॉयांना सुचविल्यावरून ते विषय प्रथम चर्चेला घेण्यांत येतील असें ना. व्हाइसरॉयांनीं ठरविलें आहे. ते विषय खालीलप्रमाणें आहेत—

(१) सर्वसाधारण प्रश्न

(अ) नागरिकांचे मूलभूत हक्क

(ब) वरिष्ठ न्यायासन

(क) फेडरल राज्यघटनेंत सामील होण्यापूर्वी हिंदी संस्थानिकांशीं करण्यांत यावयाच्या कराराचे मसुदे.

(ड) कायदेमंडळांतील सभासदांनीं घ्यावयाची राजनिष्ठेची शपथ.

(२) अधिकार-विभागणी

(अ) संयुक्त, मध्यवर्ती व प्रांतिक विषयांची वर्गवारी.

(ब) मध्यवर्ती व प्रांतिक कायदेमंडळांच्या हक्कांची विभागणी.

(क) एक्स्ट्रॅडिशन. संस्थानें व खालसा मुलखांतील गुन्हेगारांना परस्परांच्या स्वाधीन करण्याच्या अर्थींचा कायदा.

(३) संयुक्त कायदेमंडळाची घटना

(अ) फेडरल कायदेमंडळांत आपले $\frac{1}{3}$ प्रतिनिधी असावेत, ही मुसलमानांची मागणी व आपले प्रतिनिधी आपणास नेमण्याचें स्वातंत्र्य असावें ही संस्थानिकांची मागणी, या मागण्या लक्षांत घेऊन त्यांतून सर्वांना समाधानकारक असा मार्ग सांपडतो कीं नाहीं याचा विचार करणें.

(ब) संरक्षण—हिंदुस्थानाच्या संरक्षणासंबंधांत सर्वसाधारणपणें आवश्यक असलेल्या खर्चाची योजना व लष्करी तज्ज्ञ प्रतिनिधींची कायदेमंडळांत नेमणूक.

(क) आर्थिक बंधनें.

(ड) कायद्यानें स्वतंत्र रेल्वे नियामक मंडळ स्थापन करण्याचा प्रश्न.

(इ) संस्थानी हद्दींत रेल्वेवरील नियमांचा अंमल.

(फ) मध्यवर्ती सरकारच्या प्रत्यक्ष नियंत्रणाखालील प्रदेश.

(४) मध्यवर्ती व प्रांतिक कार्यकारी मंडळांचा परस्परांशीं संबंध. प्रांतिक संघटना. या कमिटीचें कामकाज जसजसें चालेल तसतसे आणखी नवीन विषयहि चर्चेकरितां कमिटीपुढें ठेवण्यांत येतील.

इंडियन स्टेट्स कमिटी बडोद्याला ता. २६ रोजीं जाणार आहे. त्या वेळीं बडोदें—सरकार एक मसुदा सादर करणार आहे. त्यांत खालील मुद्दे आहेत—(१) गुजराथमध्यें नवीन बंदरें ठेवणें. (२) संस्थानाच्या हल्लींच्या बंदरांत सुधारणा करणें. (३) गुजराथमध्यें नवीन मिठागरें स्थापणें.' (४) जकाती बसविणें.

कलकत्त्याच्या मुक्कामांत मतदान कमिटीनें ता. १८ फेब्रुवारी रोजीं सकाळीं कोणाच्याच साक्षी घेतल्या नाहींत. गव्हर्मेंट हाऊसमध्यें कमिटीनें गव्हर्नर व एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलाच्या सभासदाशीं बंगालच्या मतदानपद्धतीविषयीं विचारविनिमय केला. प्रांतिक मतदान कमिटीनें शिफारस केल्याप्रमाणें अप्रत्यक्ष निवडणुकीचा कांहीं ठिकाणीं उपयोग करावा किंवा नाहीं याबद्दल सरकारचें मत जाणण्याची कमिटीनें इच्छा दर्शविली. दुपारीं २॥ वाजतां साक्षी घेण्यास सुरुवात झाली. अँग्लो-इंडियन व वसाहत केलेल्या युरोपियन संघाचे प्रतिनिधी, मारवाडी मंडळाचे प्रतिनिधी, सौ. कुमुदिनीबाई बसु, चितागांग म्युनिसिपालिटीचे व चितागांग जिल्हा बोर्डाचे अध्यक्ष सय्यद नाशरअली व अस्पृश्य समाजाचे प्रतिनिधी यांच्या साक्षी झाल्या.

सौ. बसूंची साक्ष स्त्रीसमाजातर्फे झाली. " मतदारांच्या नमूद केलेल्या यादींत स्त्रियांची संख्या फारच कमी आहे. हिंदूंच्या विशिष्ट चालीरीतींमुळें पुष्कळशा सुशिक्षित स्त्रिया मत देण्याला सुद्धां गेल्या नाहींत. पुष्कळ स्त्रिया सारा देत नाहींत, किंवा स्वतंत्र स्थावर मिळकत त्यांस नाहीं. पडद्याची चाल आतां कमी होत आहे. आणि स्त्रियांना मतदानाचा हक्क दिला तर मत देण्याला स्त्रियांचे थवेच्या थवे गोळा होतील." फार थोड्या मुसलमान स्त्रिया मत देण्याला जातात असें त्या म्हणाल्या.

# मुंबई कायदेमंडळाचें कामकाज

गुरुवारीं दिवाळखोर बजेटाची चर्चा सुरू झाली. त्याचें एका वाक्यांत वर्णन असें करतां येईल कीं, शपथेला एकाहि सभासदानें,मग तो सरकारी असो की बिनसरकारी असो, सरकारला बरें म्हटलें नाहीं.ज्यानें त्यानें बजेटाबद्दल सरकारची खूप हजेरी घेतली.पण चावून चिवट झाल्यावर टीकेचा काय उपयोग? ठाण्याचे श्री. कारभारी यांनीं सांगितलें कीं,गिरण्यांच्या संपाचे वेळीं जें जादा पोलीस बसविलें त्याचा खर्च मुंबईच्या गिरणीमालकांवर पडावा,सर्व इलाख्यावर पडूं नये.त्यानंतर नगरचे रा.ब. चितळे यांनी आपल्या टीकेंत म्हटलें कीं, "१९१९ सालीं सुधारणेचा मनु सुरू झाल्यापासून इलाख्याचा खर्च दुपटीनें वाढला! सुधारणा पाहिजेत ना घ्या ! ! सुधारणेच्या वाटचालींत एकीकडे डोळे फिरविणारा उंच कडा तर दुसरीकडे भयाण अथांग समुद्र असें दृश्य दिसूं लागलें. खर्चाचें तोंड मोकाट सुटलें असतां मुंबई इलाख्याचें क्षेत्रफळ फार मोठें पडलें अशी तक्रार करण्यांत अर्थ काय? नुसता सरकारी ऑफिसांचा वगैरे खर्च दोनतीन कोटी इतका वाढला व सरकारी कामगारांना राहण्याच्या जागेकरितां सुमारें पावणेसोळा लक्ष रुपये खर्च झाले! इतरत्र उपयोगांत येणारी कायद्याची भाषा योजून बोलावयाचें तर सरकार केव्हांच नादार ठरलें आहे!" अंगडी म्हणाले,ज्यांना शिक्षणाची गरज सर्वांत अधिक त्या बहुजनसमाजाला उपकारी होणाऱ्या शिक्षणखात्यांतूनच सरकारनें ५० लक्ष रुपये कापले.

पेटिट म्हणाले, काटकसर कमिटीनें सांगितल्याप्रमाणें कात्री जरा घसघशीत लावावयास पाहिजे होती. पण सरकारनें इतर ठिकाणीं मात्र कुचराई केली व मेडिकल व शिक्षण या दोन खात्यांवरच शस्त्रक्रिया प्रथम केली.

मुंबईच्या चेंबर ऑफ कॉमर्सचे सभासद मि. वुंइटर बोथॅम म्हणाले कीं,मॉंटफर्ड सुधारणा मिळाल्या तेव्हांच खात्यांच्यावरोबर आर्थिक वांटणी नीट झाली नाहीं. आतां सुधारणा म्हणजे प्रांतिक स्वायत्तता मिळणार. त्याच्या आधीं तरी हें गाडें नीट सुधारो ! काटकसरीच्या चौकशी कमिटीनें पुनः इत्थंभूत फेरतपासणी केली पाहिजे. पण बजेटाची तोंडमिळवणी व्हावयाची तर कितीहि नाहीं म्हटलें तरी नवे कर बसवून घेणें हा मार्ग प्राप्तच आहे.

सुरतेचे रा. ब. नाईक म्हणाले, गेल्या दहा वर्षांत जमिनीच्या साऱ्याचें उत्पन्नच घटलें असें दिसून आलें. तेव्हां नवे कर बसवून काय होणार? सरकारनें प्राप्तीच्या कराची पुनः फेरपाहणी केली पाहिजे.

सातारचे रा. ब. काळे म्हणाले, सरकारनें ऑर्डिनन्स पुकारले म्हणून त्याच्या सर्व शर्ती सर्वत्र सारख्याच अमलांत आणणें चूक आहे. जादा वटहुकूम असला तरी त्याचा अंमल करतांना एखाद्या सभ्य माणसाचा निष्कारण अपमान करणें बरें नाहीं. सरकार आतां काटकसरीला प्रवृत्त झालें. पण वेळ गेला व झोंपा केला असें म्हणावयाची आज पाळी आली. बाबांनों, ही गोष्ट यापूर्वीच करावयाची. इतके दिवस कां असे निजलां ? खुद्द बादशहांनीं आपला तनखा कमी केल्यावर मुंबईसरकारनें दहा टक्के कपातीचा ठराव आणला. तेव्हां या उशीरा सुचलेल्या सुधारणेबद्दल तुमचें कौतुक तरी कोण करणार व कोणता मूर्ख टाळ्या वाजविणार ? पण अजून तरी कांहीं खात्यांतले कांहीं नोकर अवाढव्य जागांवर चरतच आहेत. जरा चष्मा कपाळावर चढवून खोल पाहा, खात्याचें उत्पन्न व यांचा पगाराचा खर्च याला मेळ नाहीं असें तुम्हांला आढळेल.

यानंतर मौलवी सर रफिउद्दिन अहमद यांनीं शिक्षणखात्यांत सुधारणा व हल्लींच्या अडचणी सांगितल्या.

# स्फुट सूचना

१ काश्मीर संस्थानांत चालू असलेल्या मुसलमान गुंडांच्या बंडाळीची चौकशी करण्यासाठीं नेमण्यांत आलेल्या मिड्लटन कमिटीचा अहवाल वस्तुस्थितिनिदर्शक व महत्त्वाचा आहे. ता. २६ ऑगस्ट १९३१ रोजी काश्मीर संस्थानचे प्रधान व श्रीनगर येथील मुसलमान पुढारी यांच्यांत मुसलमानांच्या मागण्यांबाबत कांहीं तडजोड झाली. पण ही तडजोड दरबारानें मोडली अशी खोटीच हाकाटी करण्यास मुसलमानांनीं सुरुवात केली. मांत्रिकानें भारलेली छडी जमिनीवर हापटतांच भुतानें थैमान घालण्यास आरंभ करावा त्याप्रमाणें मुल्लामौलवींनीं क्षोभकारक भाषणें करतांच मुसलमान गुंड लागलेच थैमान घालावयाला. अशा रीतीनें दंग्याची आग बेजबाबदार मुसलमान पुढाऱ्यांनींच लावल्यानें हा दंगा भडकला. व तो मोडण्यास पोलिसांना गोळीबार करण्याशिवाय दुसरें गत्यंतरच राहिलें नाहीं ही गोष्ट मि. मिड्लटन यांनीं आपल्या अहवालांत निःसंदिग्धपणें नमूद केली आहे. गेल्या सप्टेंबरांत श्रीनगर, अनंतनाग व शोपियन या तीन गांवींच दंगेखोरांनीं मुख्यतः आपल्या लीला गाजविल्या. दंगा जों जों भडकूं लागला तों तों इस्लामी वृत्तपत्रांनीं महाराज, दरबार व हिंदु जनता यांच्यावर अत्याचाराचे, अतिक्रमणाचे व बलात्काराचे धादांत खोटे आरोप केले व दंग्याची चौकशी करण्यासाठीं गिल्ला चालविला.

---

२ मिड्लटन कमिशनचें काम गेले ३-४ महिने चालू असून त्यापुढे ३८४ साक्षीदारांच्या साक्षी झाल्या. श्रीनगर, अनंतनाग व शोपियन हीं तीन गांवें गेल्या सप्टेंबरांतील दंग्याचीं केंद्रस्थाने होतीं. तो दंगा मोडण्यासाठीं पोलिसांना एकंदर ४ वेळां गोळीबार करावा लागला. मुसलमानांचें म्हणणें असें कीं, पोलिसांनीं किंवा लष्करानें जो गोळीबार केला तो आकसानें केला, त्याची मुळींच जरूरी नव्हती. लष्करानें मुसलमानांवर अत्याचारहि केले; असाहि त्याच्यावर आरोप करण्यांत आला होता. परंतु आश्चर्याची गोष्ट अशी कीं, हे अत्याचार माझ्या देखत झाले असें कोर्टापुढें शपथेवर सांगण्यास एकहि साक्षीदार आला नाहीं ! अर्थातच हा अत्याचाराचा आरोप निराधार म्हणून तो कोलमडून पडला. दुसरा आरोप असा कीं, इतरांना जरब बसावी म्हणून पोलिसांनीं भरचव्हाट्यावर कांहीं दंगेखोरांना फटक्यांची शिक्षा दिली व ती इतक्या क्रूरपणें कीं, त्या फटक्यांनीं दोन इसम गतप्राणहि झाले ! या आरोपासंबंधीं मि. मिड्लटन म्हणतात कीं, ' कांहीं प्रसंगीं फटके मारण्यांत आले असल्यास तसें करणें दंगा अधिक न पसरण्याच्या दृष्टीनें अवश्यच होतें. परंतु त्याबाबत एवढा जो गवगवा करण्यांत येतो तो मात्र खोटा आहे, इतकेंच नव्हे तर अतिशयोक्तिपूर्णहि आहे. सत्य गोष्ट छपविण्यासाठींच धर्तीची ही कारवाई आहे; बाकी यांत कांहींच तथ्य नाहीं.' मुसलमानांच्या साक्षीसंबंधीं तर मि. मिड्लटनसाहेब विशेषच चिडलेले दिसतात. ' उघड उघड बनावट, ' ' ढळढळीत सत्यापलाप, ' ' सहेतुक असत्य ' अशा शेलक्या विशेषणांनीं त्यांनीं मुसलमान साक्षीदारांच्या साक्षींची शोभा केली आहे. काश्मीर दरबार व त्याचे अधिकारी यांच्याविरुद्धच हा कट करण्यांत आला होता असें मत मि. मिड्लटन यांनीं आपल्या अहवालाच्या शेवटीं दिलें आहे. या अहवालानें तेथील मुसलमानांच्या अत्याचारी व मवाली वृत्तीवर उत्कृष्ट प्रकाश पडला असून दंग्याचे प्रवर्तक व प्रवर्धक तेच कसे होते हें सिद्ध झालें आहे. वरील अहवालावरून काश्मीर-प्रकरणांतील दोष मुसलमानांचा का दरबाराचा याविषयीं खालसा मुलखांतील मुसलमानांना व हिंदूंनाहि शंका घेण्यास आतां जागा राहिलेली नाहीं.

---

३ जपाननें आपलें चतुरंग दल शांघायमध्यें उतरविल्यानंतर शांघायमधील फ्रेंच भागांत चिनी व जपानी प्रतिनिधींचा चालू परिस्थितीसंबंधानें विचार होऊन त्यांतून कांहीं तडजोड निघते कीं काय याबद्दल चर्चा झाली. परंतु जपानच्या अटी चीनला मान्य न झाल्यानें ही वाटाघाट फिसकटली. त्याबरोबर जपाननें चीनला निर्वाणीचा खलिता दिला. चीननें आपलें सैन्य ता.१९ च्या सायंकाळच्या आंत शांघायपासून बारा मैल दूर नेलें पाहिजे; जपानाविरुद्ध सर्व चळवळी बंद केल्या पाहिजेत; जपानी माणसांच्या जीवित–वित्ताची हमी घेतली पाहिजे; या जपानच्या अटी असून त्या चीननें न मानल्या तर जपान आपल्या इच्छेप्रमाणें योग्य तो मार्ग स्वीकारील असें चीनला कळविण्यांत आलें. या अटींना चीननें मुळींच संमति दिली नाहीं. जपाननें शांघाय टापूंतून आपलें सैन्य काढून घेतलें, तर आपणहि आपलें सैन्य परत घेऊं असें चीननें म्हणणें होतें. अशा रीतीनें तडजोड फिसकटल्याकारणानें ता. २० रोजीं सकाळीं जपानच्या तोफांनीं चापे–भागावर अग्निवर्षाव सुरू केला. दहा जपानी विमानेंहि उत्तर–चापेभागावर

आकाशांतून अग्निगोलकांचा वर्षाव करूं लागलीं व आरमारी माराहि सुरू झाला. जपानचा सर्व रोख वूसंग व उत्तर-चापेवर असल्यानें त्यावर इतकी घोर वृष्टि करण्यांत आली कीं, वूसंग गांव हें जवळ जवळ अग्निमय झालें. तरीहि चिनी झेंडा तसाच फडकत राहिला. कियांगवान खेड्यावर जपानी सैन्यानें हल्ला केला तेव्हां तर चिनी–जपानी सैन्याचें हातघाईचें तुंबळ युद्ध झालें. त्यांत उभय पक्षीं पुष्कळ हानि झाली व चिनी सैन्यानें जपानी सैन्याला तेथून हुसकून लावलें. या लढाईंत चिनी सैन्यानें इतकी मर्दुमकी गाजविली कीं, जपानी जनरल उएडा यानें टोकियोकडे जादा सैन्याची मागणी केली आहे. परराष्ट्रीय वसाहतींतून अधूनमधून एखाद–दुसरा बॉम्ब अगर तोफेचा गोळा पडतोच. तेव्हां नागरिकांनीं तो भाग सोडावा अशीं पत्रकें अमेरिकन व ब्रिटिश वकिलांनीं त्या भागांत डकविलीं आहेत. जरूर तर ब्रिटिशांनीं आपलीं बायकामुलें हलविण्याचीहि तयारी ठेविली आहे.

# 'मराठ्या'चा जामीन

कांहीं दिवसांपूर्वी 'मराठा' पत्राचे माजी संपादक रा. दिनकर वासुदेव दिवेकर यांचे जागीं रा. शंकर नरहर आगाशे यांचें नांव संपादक व प्रकाशक म्हणून घालण्यांत आलें. त्या निमित्तानें ' मराठा ' पत्राकडून एक हजार रुपयांची जामिनकी सरकाराकडून मागण्यांत आली व ती भरली गेली. त्यानंतर ता. १८ फेब्रुवारी रोजीं केसरी छापखान्याचे मुद्रक रा. धोंडो वासुदेव विद्वांस यांना सदर छापखान्याबाबतहि १ हजार रुपयांची जामिनकी पटविण्याबद्दल मुंबईसरकारचे सेक्रेटरी मि. मॅक्स्वेल यांजकडून नोटीस बजावण्यांत आली आहे. ही जामिनकी घेण्याचें कारण म्हणून सदर नोटिशींत असें म्हटलें आहे कीं, 'मराठा' पत्राच्या ता. १० व ता. २४ जानेवारी अंकांतलि ' आयरिश स्वयंसेवकांची चळवळ ' या विषयावरील लेख हे सरकारच्या दृष्टीनें आक्षेपार्ह ठरले आहेत. सदर जामिनकी पटविण्याची तारीख २९ फेब्रुवारी सांगण्यांत आली आहे. 'मराठा' पत्रांतील लेखांबद्दल केसरी छापखान्याकडून जामीन घेण्याचें कारण हें कीं, 'मराठा' पत्र हें केसरी छापखान्यांत छापलें जातें.

# ग्राम–संघटन

### को–ऑपरेटिव्ह संस्था

शेतकीमध्यें महत्त्वाची गोष्ट म्हणजे, भरपूर लांबमुदतीचें पण आटोपशीर व्याजाचें भांडवल मिळणें, ही होय. त्या भांडवलाचा योग्य उपयोग करणें, आपल्या पक्क्या व कच्च्या मालाला योग्य भाव मिळविणें, कर्जातून मुक्त होणें, एवढेंच नव्हे तर काटकसर करावयास शिकून आपल्या गांठीं चार पैसे शिल्लक पडतील असें करणें व शेवटीं आपला संसार बिनतारंबळीचा न होऊं देणें यासाठीं को. के. सोसायटी, को. स्टोअर, को. से. शॉप वगैरे संस्था काढावयास पाहिजेत. या कामीं कोऑपरेटिव्ह खात्याचा, को. इन्स्टिटयूटचा को. से. बँका वगैरे संस्थांचा पूर्ण उपयोग करीत असावा. असल्या संस्थांतून सहकारीपणें कामें करीत राहण्याची गोडी लागून पंच निवडणें, मताचा उपयोग नीट करणें, पंचाचे ताब्यांत राहून सहकारीपणानें कामें करीत राहणें, काटकसरीनें आपला उद्योगधंदा करणें, बाजारहाट करावयास शिकणें, शेतकी हिशेब वगैरे गुण गांवचे लोकांचे अंगीं बाणत जातात. व शेवटीं गांवगाडा चालविण्यास लागणाऱ्या अशा आवश्यक गुणांचा प्रादुर्भाव गांवांतील लोकांचे अंगीं होत जातो. हाच स्वराज्याचा ओनामा होय.

### आरोग्यमंडळ स्थापणें

पोटापाण्याचा प्रश्न सोडवीत असतांनाच लोकांचें व गांवचें आरोग्य सुधारणें, स्वच्छ व मुबलक पाण्याचा पुरवठा करणें, हवाशीर व प्रशस्त घरें बांधविणें, तालीम, संघ, खेळ, कवाईत वगैरे मर्दानी खेळांच्या सोई करणें, औषधपाणी, आरोग्यमंदिरें, पंगु व अनाथाश्रम काढणें, लोकांची राहाणी सुधारणें व लोकांचे अंगीं टापटीप व वक्तशीरपणा येईल वगैरे गोष्टी गांवच्या पुढाऱ्यांनीं हातीं घ्याव्या. आरोग्यमंडळ स्थापावें. या कामीं सरकारी आरोग्य कमिटीचा, दवाखान्याचा लोकल बोर्ड वगैरे संस्थांचा पूर्ण उपयोग करावा. हीं कामें संघशक्तीनेंच करावयाचीं असल्यानें त्या योगानें गांवच्या लोकांचे अंगीं ग्रामस्वराज्य चालण्याचे गुण सहजच येत जातात.

### शिक्षणमंडळ स्थापणें

या ग्रामशिक्षण मंडळानें कोणतीं कामें हातीं घ्यावींत याची चर्चा आरंभीं बरीच झालेली आहे.

सबब येथें थोडक्यांत सांगत आहे कीं, बालवर्ग, रात्रीच्या शाळा, शिक्षणवर्ग, वाचनमंदिर वगैरे गोष्टी अमलांत आणणें हें काम या मंडळाचें आहे. व या कामीं लोकल बोर्ड, सरकारी शिक्षणखातें, खासगी शिक्षण संस्था वगैरेंचा पूर्ण उपयोग करीत असावा.

## औद्योगिक मंडळ स्थापणें

गांवामध्यें हें मंडळ स्थापून त्याचे द्वारें शेतकी-विरहित इतर धंदे कोणते किफायतशीर करणें शक्य आहे, गांवाभोंवतालच्या नैसर्गिक सर्व शक्तींचा फायदा घेण्यास अनुकूल अगर प्रतिकूल काय व तें कोठें आहे वगैरे गोष्टींचा बारीक तपास करून व करवून, सूत काढणें, रंगविणें, विणणें, बीज उत्पन्न करणें, तिचा पुरवठा करणें, त्याचप्रमाणें पाण्याच्या व वाऱ्याच्या शक्तीचा उपयोग करणें, उपयुक्त यंत्रांची गोडी वाढविणें, खाणीचीं कामें काढविणें, वगैरे गोष्टींचा उपक्रम करावा. मनुष्यांची, जनावरांची व इतर नैसर्गिक शक्तीची मदत घेऊन उपयुक्त यंत्रकला व आधुनिक शास्त्रें यांच्या मिलाफानें अनेक तऱ्हेचे उपयुक्त धंदे सुरू केले जातील, असें काम या मंडळानें हातीं घ्यावें; व या कामीं सरकारी औद्योगिक मंडळाचा पूर्ण उपयोग करून घ्यावा.

ही संस्था गांवांत स्थापून तिच्यामार्फत ग्रामपंचायत, लोकल बोर्ड, कौन्सिल, असेंब्ली, राष्ट्रीय पार्लमेंट वगैरे संस्थांतून खेडेगांवचे योग्य पुढारी निवडून कसे येतील व त्यांचेमार्फत काळीचा वसूल अगर इतर प्रकारचे कर कमी करणें अगर जादा करणें व त्या पैशाचा उपयोग वाढत्या प्रमाणावर खेडेगांवच्या सुखसोयीकडे करणें व असल्या प्रकारचीं सार्वजनिक, राजकीय, शैक्षणिक, आर्थिक वगैरे कामें पार पाडण्याचें काम या मतदार-संघाचेमार्फत करीत असावें; व या कामीं लोकल सेल्फ-गव्हर्मेंटसारख्या संस्थांचा पूर्ण उपयोग करावा.

याच संघामार्फत गांवाला गांवगाडा व राष्ट्रगाडा कसा चालवावा, हें शिक्षण अनेक रूपांनीं गांवास देत जावें.

हें सर्व करीत असतांना, लोकांच्या जिव्हाळ्याचा म्हणजे पोटापाण्याचा प्रश्न विसरून चालणार नाहीं. इतर सर्व चळवळी याच प्रश्नाचे भोंवतीं फिरवीत असाव्या म्हणजे गांवांतील लोकांचे अंगीं, आनंद, हुरूप, महत्त्वाकांक्षा, चढाओढ, सहकारीपणा, स्वतःचे व गांवचे सर्वतोपरी संरक्षण करण्याची हिंमत वगैरे गुण ज्यांचे अंगीं बाणले आहेत अशा लोकांनीं गजबजून गेलेले गांव खाऊन-पिऊन सुखी होतील, व हळूहळू ते गांव भावी हिंदी स्वराज्याचा एक अवयव होतील. हीच गोष्ट गांवगटांचीहि होईल.

इतकें सर्व एकसमवाय पद्धतीनें झालें तरच गांव आर्थिक दृष्ट्या पूर्ण स्वावलंबी होईल.

| गांवचे अनेक उपयुक्त संघ व मंडळे | उपयुक्त सरकारी, निमसरकारी खातीं व खासगी संस्था |
| --- | --- |
| १ को. क्रे. सोसायटी | को. रजिस्टर खातें |
| २ ,, स्टोअर | ,, बंक |
| ३ ,, दुकान | ,, इन्स्टिटयूट |
| ४ ,, कामकरी संघ | ,, यूनिअन |
| ५ ,, औतसंघ | |
| ६ ,, बैल-संघ | |
| ८ शेतकी सुधारणामंडळ | शेतकी खातें |
| ९ डेअरी फार्म | को. शे.सु.अ. |
| १० अवलाद ११ पोल्ट्री | व्हेटरीनरी खा |
| १२ झाडें लावणें, १३ कुरणे राखणें | ब्रीडिंग खा. |
| १४ जमीन तालबंध करणें | शेतकी कॉ. |
| १५ नदी नाले अडाविणें | ,, शाळा |
| १६ विहिरी तळीं करणें | इरिगेशन खा. |
| १७ बीं-बियाणें, खतें, आउतें पुरवठा | |
| १८ को. फार्म | |
| १९ प्रयोग, प्रात्याक्षिक क्षेत्रें | |
| २१ फळफळावळ, भाजीपाला | |
| २२ नर्सरी. | |
| २३ शिक्षणमंडळ | सरकारी शिक्षण-खातें. |
| २४ बालवर्ग | लोकल बोर्ड |
| २५ प्रौढवर्ग—रात्रीची शाळा | सार्वजनिक शिक्षण-मंडळें. |
| २३ तोंडीं शिक्षणशाळा | म्यूझिअम्स. |
| २७ नाटक—गृह | नाटकमंडळ्या. |
| २८ भजनमंडळ | भजन-मंडळ्या. |
| २९ देवस्थान व उत्सव-मंडळ | देवस्थानें. |
| ३० आरोग्यमंडळ | सरकारी आरोग्यखातें |
| ३१ तालीम | ,, दवाखाने |
| ३२ दवाखाना | ,, लोकल बोर्ड |
| ३३ पंगू—अनाथगृह | |
| ३४ ग्रामपंचायत | लोकल सेल्फ—गव्हर्मेंट |
| ३५ मतदारसंघ | इन्स्टिटयूट. |
| ३६ कॉटेज इंडस्ट्रीज | सरकारी औद्योगिक खातें व खासगी औद्योगिक मंडळें. |
| ३९ बाजारहाट | |
| ४० रस्ते, घरें | लोकल बोर्ड |
| ४१ पाणी पिण्याची विहीर | ग्रामपंचायत |
| ४२ सार्वजनिक हॉल व इतर इमारती | रेव्हेन्यूखातें |

वर सांगितल्याप्रमाणें दरगांवीं व गांवगटांत सरकारी, निमसरकारी व सार्वजनिक त्याचप्रमाणें

खासगी लोकांची मदत घेऊन संस्था काढाव्या, व काढवाव्या. प्रथमारंभीं अनेक चुका व दिशाभूलहि होण्याचा संभव आहे. कर्त्या माणसांचा व पैशाचा पुरवठा कोठून करावा म्हणून थांबूं नये. कामें करीत राहणें हाच कामें पुरीं करण्याचा राजमार्ग होय. व हाच मार्ग स्वराज्याचाहि.

# हौशी जोडप्याचा आटोपशीर संसार

(१) ले. असेंब्लींत पं. मोतीलाल नेहरूप्रभृति स्वराज्य पक्षाचे पुढारी असतां त्यांनीं गोलमेज परिषदेची मागणी हिंदुस्थानसरकारापाशीं केली होती हें खरें आहे. इंग्रज मुत्सद्दी व हिंदी प्रतिनिधी यांनीं एकत्र बसावें आणि सरकार व राष्ट्रीय सभा यांमधील बेबनाव मिटवावा असा सदर परिषद मागण्यांत स्वराज्य पक्षाचा हेतु होता. परंतु इंग्रज लोकदेखील एखादे वेळीं हट्टाला पेटले म्हणजे एखाद्याला कोठून बोललों असें करून सोडतात ! गोलमेज परिषदेच्या बाबतींत त्यांनीं हाच नमुना केला. स्वराज्य पक्षानें गोलमेज मागितलें तेव्हां तें आपल्याला कधीं काळीं मिळेल असें सदर पक्षाच्या कदाचित् ध्यानींमनींहि नसेल. पण सरकारानें तें मनावर घेतांच गोलमेजांना काय तोटा ! एक गोलमेज सन १९३० सालीं भरलें. त्या मेजाभोंवतीं बसून हिंदी लोक उठले नाहींत तों दुसऱ्या मेजाची तयारी झाली; व हें दुसरें खलास झाल्यावर तिसऱ्या मेजाची आवर्ट आज आहेच.हे दुसरें मेज उचलून त्याच्या जागीं तिसरें मेज ठेवण्यापूर्वी ब्रिटिश सरकार हिंदी लोकांना किंचित् उसंत खाऊं देईल असें वाटलें होतें; पण तें त्यांना रिकामें करमूं बसूं देतें! तिसऱ्या टेबलाची आंत मांडामांड होईपर्यंत हिंदी लोकांना गुंतवून ठेवण्याकरितां मध्यंतरीं पडदा पाडून त्यांनीं चार कमिट्या हिंदी लोकांच्या अंगावर सोडल्या आहेत. पहिलीं दोन गोलमेजें विलायतेंत भरलीं त्या वेळीं त्यांचा लाभ अगदींच मोजक्या हिंदी प्रतिनिधींना झाला. पण पस्तीस कोटी हिंदी लोक यांना त्यांचा वांटा मुळींच मिळाला नाहीं. यांत पक्षपात होत असल्यामुळे या कमिट्या सर्व हिंदुस्थानभर मिरविण्याकरितां आणिल्या आहेत असें दिसतें. एखाद्याची खोड मोडावी तशी सरकारानें या परिषदांच्या व कमिट्यांच्या बाबतींत हिंदी लोकांची खोड मोडली असून पुनः ते त्याचें नांव काढणार नाहींत अशी अद्दल घडविण्याचा त्यांचा बेत आहे !

वरील कमिट्यांत काळे गोरे मिळून उणेपुरे पन्नास असामी असून त्याखेरीज त्यांच्या दिमतीला प्रांताप्रांतिक कमिट्या देण्यांत आल्या आहेत, त्या निराळ्याच. यांपैकीं सल्लागार कमिटी बैठी दिसते. तिचे अध्यक्ष व्हाइसरॉय असून सारे सभासद हिंदीच आहेत. फेडरल जमाखर्च कमिटीचीहि फारशी हालचाल होणार नाहीं. उरल्या दोन कमिट्या, एक मतदान कमिटी व दुसरी संस्थान कमिटी. या कमिट्यांचीं पर्यटणें मात्र सर्वत्र सुरू आहेत. कमिट्यांचे गोरे सभासद इंग्लंडांतून हिंदुस्थानांत आले आहेत. त्यांपैकीं पुष्कळजण हिंदुस्थान पूर्वी न पाहिलेले असेच आहेत. प्रवासाची हौस कोणाला नाहीं ? घरचें वडीलधारें माणूस गांवाला जावयाला निघालें कीं लहान मुलें ' आम्हांलाहि न्याना ? ' म्हणत त्यांच्या पाठीस लागतात. यांत तीं आपला भाव प्रांजलपणानें बोलून दाखवितात व मोठीं माणसें तो व्यक्त करीत नाहींत इतकाच दोघांतील फरक. बाकी प्रवासाची हौस लहानांना व थोरांना सारखीच. इंग्लंडांतून ज्या गोऱ्या सभासदांची हिंदुस्थानांत पाठवणी झाली आहे त्यांनींहि हिंदुस्थान पाहण्याची अमूल्य संधि मिळण्याकरितां तिकडच्या सरकारदरबारीं वशिले लावले नसतील असें नाहीं. कारण प्रवासखर्च परभारें,एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं जाण्यास स्टेशनावर खास गाड्या तयार व जेथें उतरतील तेथें सारी सरबराई सरकारमार्फत. अशा ऐषआरामांत स्वतःची सोय लावण्यास कोण सोडील !

इंग्लंडच्या सध्यांच्या सरकारानें राष्ट्रीय हें भव्य व उमदें नांव धारण केलें असलें तरी त्याच्या मन्त्रिमंडळांत बहुतेक सगळी भरती कॉन्झरव्हेटिव्ह पक्षाचीच असल्यानें सदर पक्षानें आपले बरेच पित्ये कमिट्यांतून घातले आहेत. एखाददुसरा पित्या मजूर पक्षाचा व लिबरल पक्षाचा आहे; पण तो अर्थातच त्या त्या पक्षाच्या भिडेखातर घेतलेला. कमिट्यांचे सगळेच सभासद जसे कॉन्झरव्हेटिव्ह पक्षाचे नाहींत तसे ते सगळे पुरुषहि नाहींत. त्यांत एखादी स्त्रीहि आढळते. पण स्त्रियांची ही संख्या तुलनेनें अगदींच अल्प वाटल्यामुळें कीं काय कित्येकांनीं आपल्या बायकांना व मुलांनाहि भरतीला घेऊन आपल्या प्रवासास सहलीचें मनोरंजक व विनोदप्रचुर स्वरूप आणिलें आहे. इंग्लंडहून हिंदुस्थानास येतांना त्यांना सोबतहि घरचीच मिळाली. लंडनपासून एडनपर्यंतच्या अर्ध्या वाटेवर डॉ. अंबेडकर होतेच; व एडनहून पुढच्या प्रवासांत मक्का-मदिनेची यात्रा संपवून परत येण्यास निघालेले मौ.शौकत अली यांची जोड मिळाली.काशी-

यात्रेस चाललेल्या हिंदूंना आगगाडींत यात्रा घेऊन जाण्यास आलेले पंडे भेटावे त्यांतलीच ही अवस्था!

सभासदांच्या एका बाजूला अंबेडकर व दुसऱ्या बाजूला शौकतअल्ली. समुद्रांतील तो प्रवास कंटाळवाणा वाटूं लागला म्हणजे त्यांनीं एकदां अंबेडकरांचें 'सुंदर मुख' पहावें व दुसऱ्यांदां अलींच्या 'तुंदिल तनू' वरून नजर फिरवावी. नजरेच्या तेवढ्या फेरफटक्यानंतर विधात्याच्या अगाध सामर्थ्याविषयीं मनांत येणाऱ्या विचारांत त्या मंडळींचा किती तरी काळ निघून जात असेल! खेरीज बाकीच्या वेळांत दोघांच्या श्रवणसुभग कथा होत्याच. डॉ. अंबेडकरांनीं स्पृश्य हिंदूंनीं अस्पृश्य हिंदूंच्या चालविलेल्या हालांचें वर्णन करून कमिट्यांना शोकरसांत बुडवून काढावें आणि त्यामागून मौ. शौकतअल्ली यांनीं मुसलमानांच्या प्राचीन पराक्रमांचीं व ऐश्वर्याचीं गीतें गाऊन त्यांस वीररसांत पोहावयास सोडावें. अशा शाहीरांच्या व भाटांच्या निकट सहवासांत दिवस केव्हां मावळला व रात्र केव्हां सुरू झाली याचें भानहि कमिट्यांना राहत नसेल.

अशा कमिट्यांतील कांहीं जणांचा परिचय झाल्यास तो कोणास नकोसा वाटेल! संस्थान कमिटी व मतदान कमिटी या दोन खास फिरत्या कमिट्या होत. संस्थान-कमिटी ही बहुतेक लहान मोठीं हिंदी संस्थानें धुंडाळणार; व मतदान कमिटी खालसा मुलूख तुडविणार. संस्थान कमिटीचे अध्यक्ष मि. डेव्हिडसन हे कॉमन्स सभेचे सभासद आहेत. कॉन्झरव्हेटिव्ह पक्षाचे पुढारी मि. बाल्डविन यांची त्यांच्यावर बहाल मर्जी. आपल्या पक्षाची जमवाजमव करण्याचें काम बाल्डविन साहेबांनीं डेव्हिड्सन यांजकडेच दिलें होतें. पण सदर पक्षाचे दुसरे पुढारी मि. नेव्हिल चेंबरलेन यांना हा माणूस जरासा थंड व सुस्त वाटला. म्हणून त्यांनीं त्याला बाजूला काढलें. तेव्हांपासून उद्योग नाहीसा झाल्यामुळें ही स्वारी अस्वस्थ मनानें बाल्डविनभोंवतीं पाटलोणीच्या खिशांत हात घालून उगीच तरंगत होती. त्यांची काय व्यवस्था करावी हें बाल्डविन यांना संकट पडल्यानें त्यांनीं त्यांना संस्थानी कमिटींत चिकटवून दिलें झालें. डेव्हिड्सनसाहेबांच्या ताफ्यांत सर रॉबर्ट हाचिन्सन नांवाचे एक गृहस्थ आहेत. हा गृहस्थ मोठा विनोदी व शौकीन आहे. थाटामाटानें राहण्याची त्याला आवड फार! संस्थानी कमिटींत असण्याला याहून अधिक लायकी कोणती पाहिजे? लिबरल पक्षाचे ते एक वेळ प्रतोद होते, हा त्यांचा एक गुण सांगण्यासारखा आहे. पण आयरिश बंड मोडण्यांत, ते आयर्लंडांत सेनापति असतां, त्यांचा करडा स्वभाव दिसून आला हें कळल्यावर मात्र त्यांजपासून दोन पावलें दूर राहावें असेंच कोणास झालें तरी वाटेल. या मनुष्याला हिंदी लोकांच्या आकांक्षांविषयीं काय सहानुभूति असणार हें दिसतेंच आहे.

फेडरल फायनान्स कमिटीचे अध्यक्ष लॉर्ड यूस्टेस पर्सी हे हचिन्सन यांसहि बरें म्हणावयास लावणारे आहेत. ते कॉन्झरव्हेटिव्ह पक्षाचे असून त्यांनीं कांहीं दिवस कॉन्झरव्हेटिव्ह पक्षाच्या हातीं राज्य-सूत्रें असतां शिक्षणसंस्थेचें काम केलें आहे. ते आपल्या उमरावपणाच्याच कुर्यांत असतात. पण हा माणूस बुद्धिमान व तरतरीत आहे म्हणतात. संस्थान कमिटीपेक्षांहि मतदान कमिटीची हालचाल सध्या विशेष असल्यानें तिचे अध्यक्ष मार्क्विस ऑफ लोथियन यांचें नांव बऱ्याच जणांच्या वाचण्यांत आहे. लोथियन यांनीं जगांतील पुष्कळ देशांतून प्रवास केला आहे. सुज्ञपणा, सहानुभूति, समंजसपणा, विचारक्षमता या गुणांत त्यांची बरोबरी करणारा दुसरा एखादा माणूस विलायतेहून आलेल्या कोणत्याहि कमिटींत सापडावयाचा नाहीं. पण त्यांच्याच कमिटींत मेरी पिकफोर्ड ही प्रतिगामी धोरणाची जहांबाज बाई आहे. सर जॉन कर हे पूर्वी आसाम प्रांताचे गव्हर्नरच होते, तेव्हां त्यांचीं मतें कशीं असतील याची अटकळ कोणासहि बांधतां येणार आहे. मिल्नर हा लायक व आनंदी प्राणी असून लोथियनचा उजवा हात शोभेल. कॉन्झरव्हेटिव्ह पक्षांतील तरुण गृहस्थ मि. बटलर हे लोथियन यांच्या होला होच ठोकणारे आहेत. सारांश, मतदान कमिटींतील लोथियनसुद्धां तिघे इसम एकविचाराचे दिसतात, व बाकीच्यांपैकीं प्रत्येक जण स्वतंत्र मताचा दिसतो. मतदान कमिटी घ्या किंवा दुसरी कोणतीहि कमिटी घ्या, तिच्यांत सभासदांचे विविध रंग एकमेकांत मिसळले म्हणजे कोणता रंग दृष्टीस पडतो असें विचारल्यास सर सॅम्युएल होअर यांच्या, किंबहुना सांप्रतच्या ब्रिटिश मंत्रिमंडळाच्या, अंगावर जो रंग चढला आहे तोच या कमिट्यांवर उतरलेला आढळल्यास त्यांत काय नवल? कारण जशी खाण तशी माती व जशी आई तशीच लेकी.

गोलमेज परिषदेंत हिंदुस्थानाची भावी राज्यपद्धति संयुक्त घटनेच्या म्हणजे फेडरल स्वरूपाची असावी इतकेंच ठरलें. पण तिच्यांत जातवारीचा तंटा मिटला नाहीं व संरक्षक अटींचा निर्णयहि खुलासेवार झाला नाहीं. संस्थानिकांना नवीन राज्यपद्धतींत समाविष्ट करून घ्यावयाचें ठरलें असलें तरी त्यांचे खालसा मुलखाशीं संबंध कसे असावेत, खालसा मुलूख व संस्थानें या उभयतांचे प्रतिनिधी हिंदुस्थानाच्या वरिष्ठ व कनिष्ठ कौन्सिलांत किती घ्यावेत, त्यांची निवड कोणत्या पद्धतीनें करावी, त्यांच्या ताब्यांत कोणतीं खातीं द्यावीं, लहान

संस्थानें व मोठीं संस्थानें यांचेंहि घटनेच्या दृष्टीनें नातें काय असावें याची छाननी व्हावयाची राहिली आहेच. यांपैकीं संरक्षक अटी व जातवारीचा तंटा यांचा विचार व्हाइसरॉय लॉर्ड विलिंग्डन यांच्या अध्यक्षतेखालीं नेमलेली सल्लागार कमिटी करीत आहे, आणि खालसा मुलूख व संस्थानें यांच्या परस्पर संबंधाच्या योजना ऐकून घेण्याकरितां संस्थान कमिटी फिरत आहे. जमाखर्च कमिटीनें मध्यवर्ती सरकार व प्रांतिक सरकारें यांच्या वसुली खात्यांची वांटणी करून प्रांतिक सरकारांच्या व मध्यवर्ती सरकारांच्या उत्पन्नांचा आंकडा निश्चित करावयाचा आहे. हिंदी संस्थानांची गणना प्रांतिक सरकारांतच व्हावयाची असल्यानें संस्थानी राजकारणांतील तज्ज्ञ या नात्यानें या छोट्या सहा सभासदांच्या कमिटींत निजाम--सरकारचे दिवाण नबाब सर महमद अकबर हैदरी यांना घेण्यांत आलें आहे.

वरील तीन कमिट्यांपैकीं प्रत्येक कमिटी आपापल्या परीनें महत्त्वाचीच आहे. व्हाइसरॉयांच्या अध्यक्षतेखालीं नेमलेल्या सल्लागार कमिटीच्या हातांत फेडरल सरकाराकडे स्वराज्याचे हक्क किती प्रमाणांत येऊं द्यावयाचे याचें धोरण मुख्य प्रधान मि. मॅक्डोनाल्ड यांजबरोबर वाटाघाट करून ठरविण्याचें काम असल्यामुळें ती कमिटी एकंदर कमिट्यांच्या कळसाच्या जागीं आहे असें समजलें पाहिजे. सल्लागार कमिटी हा जसा कळस तसा मतदान-कमिटी हा भावी राज्यघटनेचा पाया होय. त्या कमिटीस विलायतेहून निरोप देतांना कमिटीचे अध्यक्ष लॉर्ड लोथियन यांस मुख्य प्रधान मि. राम्से मॅक्डोनाल्ड यांनीं 'गुह्यात् गुह्यतर' असें रहस्य सांगितलें, तें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. त्यावरून भावी राज्यघटनेच्या पायाची कल्पना डोळ्यांसमोर उभी राहते. त्यावरून पुढील राज्यव्यवस्थेंत प्रांतिक कौन्सिलाकरितां प्रतिनिधी निवडून देण्याचा अधिकार सध्यांपेक्षां अधिक मतदारांना मिळेल; वयांत आलेल्या सर्वांना मतें देण्याचा अधिकार इतक्या लवकर न मिळतां हप्त्याहप्त्यानें मिळेल; मतदारांत व कौन्सिलांच्या सभासदांत स्त्रिया अधिक प्रमाणांत आढळाव्या अशी ब्रिटिश सरकाराची इच्छा असल्यामुळें त्यांना निवडणुकीच्या अटी पुरुषांपेक्षां कमी ठेवण्यांत येतील; अस्पृश्यांचे प्रतिनिधी सरकारनें नेमण्याची सांप्रत वहिवाट आहे, ती मोडून त्यांना स्वतःचे प्रतिनिधी स्वतःच निवडून देण्याचा अधिकार प्राप्त होईल.

खालसा मुलुखांतील जनतेच्या दृष्टीनें महत्त्वाच्या अशा ज्या दोन कमिट्या त्यांपैकीं व्हाइसरॉयांच्या अध्यक्षतेखालील सल्लागार कमिटींतील सर्व म्हणजे एकोणीस सभासद हिंदीच आहेत. त्यांची नेमणूक मुख्यतः जातवारीच्या पद्धतीवर केलेली आहे. जातवारींतहि पहिला भेद संस्थानें व खालसा मुलूख हा ठेवून दुसऱ्या भेदांत हिंदु, मुसलमान, शीख, ख्रिस्ती, मजूर पक्ष, नेमस्त पक्ष, हिंदुसभावाले, ब्राह्मणेतर हे पक्षोपपक्ष दृष्टीआड होऊं दिलेले नाहींत. सल्लागार कमिटींतील प्रतिनिधींची निवड कांहीं बरी आहे असें म्हणतां येईल. पण मतदान कमिटींत हिंदी प्रतिनिधींची निवड अगदींच असमाधानकारक आहे. तिच्यांत सात सभासद ब्रिटिश असून त्यांच्या गुणावगुणांची चर्चा वर केलीच आहे. पण उरलेल्या आठ हिंदी प्रतिनिधींत खणखणीत असा एकहि प्रतिनिधी आढळत नाहीं. हिंदूंची बाजू मांडणारे रा. तांबे एकटेच दिसतात. डॉ. अंबेडकर अस्पृश्यांचा बचाव करण्यासाठीं उभे आहेत व श्रीमती सुब्बारायन स्त्रियांचा कैवार घेण्यासाठीं आल्या आहेत. पण राष्ट्रीय पक्षाचा म्हणतां येईल असा एकहि माणूस तिच्यांत नाहीं.

काँग्रेसपक्षानें कमिट्यांवर बहिष्कार घातल्यामुळें व सरकारनेंहि काँग्रेसपक्षाचे व सर्वसामान्य अशा राष्ट्रीय पक्षाचे बहुतेक लोक तुरुंगांत टाकल्यामुळें सल्लागार कमिटीचें व मतदान कमिटीचेंहि काम फार सोपें झालें आहे. त्यांतील सरकारी धोरणास विरोध करणारा किंवा सरकारास अप्रिय अशीं मतें प्रतिपादणारा, थोडे अपवाद सोडल्यास, कोणी नाहीं; व मतदान कमिटीपुढें साक्षीला येणारांत तसा कोणीहि असण्याचा संभव नाहीं. सल्लागार कमिटींतील सभासदांनीं हिंदुमुसलमानांचा तंटा खासगी रीतीनें सोडविण्याचें काम आपल्या अंगावर पहिल्याच बैठकींत घेतलें होतें. पण त्यानंतर इतके दिवस वाटाघाट करूनहि त्यापासून कांहींच फलनिष्पत्ति न झाल्यामुळें कमिटींतल्या सभासदांनीं ह्या तंट्याचा निकाल मि. राम्से मॅक्डोनाल्ड यांनीं पंच या नात्यानें सांगावा अशी त्यांस मुखत्यारी नुकतीच दिल्याचें प्रसिद्ध झालें आहे.

मतदान कमिटी फिरत फिरत दिल्लीपासून कलकत्त्यापर्यंत गेली आहे. तिनें आतांपर्यंत महत्त्वाच्या अशा कोणाच्या साक्षी घेतल्या नाहींत. कमिटीचे सभासद एखाद्या शहरीं जाऊन त्याभोंवतालच्या खेड्यांना भेटी देतात, तेथें निवडणुकीच्या वेळीं पोलिंग स्टेशनावर जी व्यवस्था असते तिची त्यांच्याकरितां मुद्दाम केलेली नक्कल पाहतात व खेड्यांतील लोकांकडे नजर टाकून परत फिरतात. त्यांचा वेळ साक्षी घेण्यापेक्षां सरकारी अधिकाऱ्यांच्या भेटी घेण्यांत व आरामशीर हिंडण्यांतच अधिक जातो. कमिटीपुढें थोड्या साक्षी स्त्रियांतर्फे झाल्या व कांहीं अस्पृश्यांतर्फे देण्यांत आल्या. त्यांत कमिटीला नडणारें असें कांहींच नव्हतें. कांहीं

स्त्रियांनीं आपल्या निवडणुकीला वयाशिवाय दुसरीं कसलींहि बंधनें असूं नयेत, अशी मागणी केली. ती कमिटीनें ऐकून घेतली. कांहीं स्त्रिया चिकाच्या पडद्यांत बसून किंवा बुरखा घेऊन साक्षीस आल्या. त्यांची कमिटींतील सभासदांना गंमत वाटली. बंगाल्यांतील एका गांवीं कमिटी गेली असतां तेथील कांहीं लोकांनीं त्यांस काळीं निशाणें दाखविल्या-वरून पोलिसांनीं त्यांना पकडलें. कमिटीचे अध्यक्ष लॉर्ड लोथियन यांनीं आपल्या वजनानें पकडलेल्या लोकांना सोडून दिल्यामुळे लोथियन यांजपुढें सदर लोकांनीं आनंदानें पिटलेल्या टाळ्यांना साक्षीपेक्षांहि अधिक महत्त्व आलें ! डॉ. अंबेड-कर व मौ. शौकतअली यांनीं मुंबईपर्यंतच्या प्रवासांत कमिटीशीं जें हितगुज केलें त्याच्या अनुरोधानेंच कमिटी वागणार असें दिसतें. डॉ. अंबेडकर सर्व जातींच्या अस्पृश्यांचा एक संघ स्थापन करून व त्यामार्फत ठिकठिकाणीं अस्पृश्यां-च्या सभा भरवून कमिटीकडे स्वतंत्र मतदार-संघाची मागणी करणार असल्याचें प्रसिद्ध झालें आहे. अस्पृश्य स्वतंत्र मतदार-संघ मागणार, मुसल मान स्वतंत्र मतदार--संघ मागणार, स्त्रिया स्वतंत्र मतदार--संघ मागणार; यापेक्षां कमिटीला प्रिय असें दुसरें काय आहे ! त्याचकरितां कमिटी हिंदुस्थानांत आली आहे व तिच्या या उद्देशासच बहुतेक सर्व साक्षीदार हातभार लावीत आहेत.

सांप्रत ले. असेंब्ली व कौन्सिल ऑफ स्टेट यांतील प्रतिनिधी हिंदुस्थानांतील ठिकठिकाणचे मत-दारसंघ स्वतंत्रपणे निवडून देतात. सायमन कमि-शनास ही प्रत्यक्ष निवडणूक नको आहे. कारण त्यायोगानें राजकीय पक्षाचे वजनदार, थोर व देशभक्त पुढारी असेंब्लींत निवडून येऊन सरकारास डोईजड होतात. त्यापेक्षां ते उमेदवार कौन्सिलामार्फत निवडून आल्यास कौन्सिलांत जातवारीच्या तत्त्वावर नालायकांची खोगीरभरती होते, तशी खोगीरभरती वरिष्ठ कौन्सिलांतहि होऊन सरकाराला तेथील खिल्लार सहज हाकावयास सांपडेल. लोथियन कमिटी सायमन कमि-शनचेच हेत पुरविण्याकरितां अवतरली असल्या-कारणानें तिने अप्रत्यक्ष निवडणुकीचें तत्त्व उराशीं बाळगलेले असून त्या तत्त्वाला पुष्टि देणारे साक्षी-दारच तिच्यापुढें सध्यांच्या काळांत येणार हें उघड आहे.

अशा रीतीनें कमिटीचा कारभार हौशी नवरा व आज्ञाधारक बायको यांच्या संसारासारखा एकतंत्री चालला आहे. नवऱ्यानें खुणवावें व बायकोनें ओळ-खावें. दोघांशिवाय तिसरें घरांत कोणीच नाहीं. धाक घालण्यास आईबाप नाहींत, नांवें ठेवण्यास नणंदा-जावा नाहींत, विरोध करण्यास दीर नाहींत व डोकें उठवि-ण्यास मुलेंहि नाहींत. लॉर्ड विलिंग्डन, सर सॅम्युअल होअर व ब्रिटिश मंत्रिमंडळ यांनीं मतदान कमिटी-ची व साक्षीदारांचीहि ही केवढी सोय करून दिली. विरोधकांचे हरताळ नाहींत, मिरवणुकी नाहींत. सभा नाहींत, काळीं निशाणेंहि जवळ जवळ नाहींतच, बरें, कमिट्यांशीं विरोधकांनीं सहकार्य करावयाचें ठरविलें असतें तर त्यांच्याशीं उरस्फोड करण्याची व त्यांचे कठोर शब्द ऐकून घेण्याची कटकट सभासदांना सोसावी लागली असती तीहि नाहीं. या सर्वांमुळें कमिटी-पुढें यावयाचे साक्षीदार ते अगदीं मोजके व मनाजोगे या कारणानें कमिटीचा कारभार हा हौशी जोड-प्याच्या आटोपशीर संसारासारखाच झाला आहे, असें म्हणावें लागतें.

# मुंबईच्या खजिन्यांतील खडखडाट

(ले.—आत्माराम रावजी भट, एम्. कॉम्.)

## दिवाळखोरीची पूर्वपीठिका

मनुष्य स्वतःची कुवत न ओळखतां पुढें पुढें पोहत गेला म्हणजे त्याला दम छाटेनासा होतो व तो गटंगळ्या खाऊं लागतो. त्या वेळीं प्रसंगावधान राखून जर तो पाण्यावर नुसता तरंगत राहिला तर त्याला हळूहळू अवसान येतें व तो पुनः किनाराहि गांठूं शकतो. परंतु जर त्यानें वेळींच अवधान राखिलें नाहीं तर तो अधिकाधिक गटंगळ्या खाऊन शेवटीं जलसमाधि घेतो. मुंबईसरकारची स्थिति दम छाटेनासा होऊं लागलेल्या बुडल्यासारखी झाली आहे. सुधारणांच्या मन्वंतराला प्रारंभ झाल्या-वर स्वतःवरील जबाबदारीची जाणीव मुंबईसरकार-ला न राहून महायुद्धकालापासून डोईजड झालेला राज्यकारभाराचा खर्च कमी करण्याऐवजीं त्यांनीं उधळ-पट्टीच्या कारभाराला प्रारंभ केला. मॉंटेग्यु—चेम्सफर्ड सुधारणांमुळें उत्पन्नाचीं खातीं मध्यवर्ती सरकारच्या वांट्याला जाऊन राष्ट्रसंवर्धक व अतएव खर्चाचीं अशीं खातीं प्रांतिक सरकारच्या वांट्याला आलीं. अबकारी खातें प्रांतिक सरकारच्या हातीं देण्यांत येऊन "या खात्याचें उत्पन्न वाढवून म्हणजे मद्य-

पानाला प्रोत्साहन देऊन शिक्षण, आरोग्य वगैरे खात्यांवर पैसे खर्च करा " असें अप्रत्यक्ष रीत्या सुचविण्यांत आलें. परंतु कायदे-मंडळाच्या आमदार सभासदांना दारूबंदी करणें हें आवश्यक स्वरूपाचें जनहिताचें कार्य वाटत असल्यामुळें त्यांनीं सरकारची इच्छा नसतां दारूबंदीचें धोरण सरकारच्या गळ्यांत बांधलें व त्याचा परिणाम अबकारी खात्याचें उत्पन्न अंशतः का होईना घटण्यांत झाला. रिव्हिजन सेटलमेंट करून जमीन-महसूल वाढविण्याचा उपद्व्याप करूनहि प्रत्यक्ष व्यवहारांत जमीन-महसुलाचें उत्पन्न वाढलें नाहीं. त्यांतच सुधारणांच्या युगाला प्रारंभ झाल्यावर नवीन जागा निर्माण करून व असलेल्यांचे पगार बेसुमार वाढवून सरकारनें राज्यकारभाराचा खर्च वाढविला. तसेंच "डेव्हेलपमेंट"च्या नांवाखालीं कर्ज काढून तो पैसा सरकारनें खरोखरीच मुंबईच्या बॅकबेमध्यें ओतला. बॅकबेचा समुद्र आटवून जमीन तयार करण्याची योजना व्यापारीदृष्ट्या यशस्वी होणार नाहीं असें भाकित लोकपक्षीय पुढाऱ्यांनी केलें होतें. तेंच अखेरीस खरें ठरून ती योजना अयशस्वी ठरली व त्या योजनेकरितां काढलेलें कर्ज व त्यावरील व्याज जनतेच्या डोक्यावर पडलें. त्यांतच सक्कर बॅरेजची योजना निघाली, तिच्यापासून फायदा होईल तेव्हां होवो परंतु आतां तरी व्याजाचा व कर्जफेडीचा बोजा लोकांवर येऊन पडला आहे एवढें खरें. या सर्व गोष्टींचा परिणाम व्हावयाचा तोच झाला. १९२१-२२ पासून १९३०-३१ सालापर्यंत कोर्टफी व स्टँप यांचे दर वाढवून व मोटारी आणि करमणुकीची नाटक सिनेमा यांसारखी साधनें यांच्यावर कर बसवून सरकारनें आपलें उत्पन्न वाढविलें तरीहि या दहा वर्षांत सहा वर्षें तुटीचीं गेलीं व सरकारजवळ १९२१-२२ सालाच्या प्रारंभीं असलेल्या तीन कोटी सहा लक्ष रुपयांचा फन्ना १९३० ३१ सालाच्या अखेरीला उडाला होता.

### डोळ्यांत अंजन घातलें

अशा परिस्थितींत मुंबईसरकारचे फडणीस नामदार सर गोविंदराव प्रधान यांनीं गतवर्षी चालू १९३१-३२ सालाचें जें अंदाजपत्रक कायदेमंडळाला सादर केलें त्यामध्यें एकसष्ट लक्षांची तूट दाखविली होती. ती तूट करवाढ करून व कर्ज काढून भरून काढण्याचा त्यांचा विचार होता. परंतु खजिन्यांतील तूट भरून काढण्याकरितां मुंबईसरकार कर्ज काढणार असें म्हटल्याबरोबर कायदेमंडळाच्या आमदार सभासदांना मुंबईसरकारची आर्थिक स्थिति उधळपट्टीच्या कारभारामुळें किती हलाखाची झाली आहे याची कल्पना आली आणि त्यांनीं करवाढीच्या बिलांना संमति देण्याचें नाकारलें, व कर्ज काढण्याच्या भानगडींत न पडतां आपल्या खर्चांत काटकसर करा असेंहि सरकारला बजावलें. अर्थातच सरकारला काटकसर कमिटी नेमावी लागली. त्या कमिटीकडून चालू वर्षाच्या बजेटाची तोंडमिळवणी करण्याकरितां काटकसरीच्या सूचना सरकारनें मागविल्या. त्याप्रमाणें कमिटीनें चालचलाऊ स्वरूपाच्या कांहीं सूचना केल्या. त्या विचारांत घेऊन सरकारनें चालू वर्षी त्रेचाळीस लक्षांची काटकसर घडवून आणली. परंतु फडणिसांचा चाल सालाच्या उत्पन्नाचा अदमास मात्र चुकला. जमीनमहसूल, पाटबंधाऱ्याची पाणपट्टी, अरण्यें व स्टँप्स यांचें उत्पन्न अंदाजापेक्षां बरेंच घटलें व त्यामुळें १९३१ ३२ सालाच्या जमाखर्चांत एकसष्ट लक्षांच्या तुटीऐवजीं एकशेंअकरा लाखांची तूट आली आहे. आतां सरकारजवळ शिलकी पैसा नसल्यामुळें व पुढेंहि इतक्यांत शिल्लक पडेल अशी आशा वाटत नसल्यामुळें सरकारनें ही तूट प्रॉव्हिन्शिअल लोनफंडांतून कर्ज घेऊन भरून काढण्याचें ठरविलें आहे.

### राष्ट्रसंवर्धक खात्यांची गळचेपी

बुडत्याचा पाय अधिक खोलांत जावा त्याप्रमाणें मुंबई-सरकारची स्थिति होऊन १९३२ ३३ सालाच्या अंदाजपत्रकांतहि फडणिसांवर ७३ लक्षांची तूट दाखविण्याचा प्रसंग आला आहे नामदार फडणिसांनीं पुढील सालाच्या मुंबई-सरकारच्या खजिन्याचें जें चित्र कायदेमंडळापुढें रेखाटलें आहे तें अतिशय भेसूर आहे. १९३२-३३ सालांत येणारी तूट शक्य तितकी कमी करून दाखविण्याकरितां फडणिसांनीं शिक्षणखातें, शेतीखातें यांसारख्या राष्ट्रसंवर्धक खात्यांची गळचेपी करण्याचें ठरविलें आहे. लोकल बोर्ड व म्युनिसिपालिट्या यांना प्राथमिक शिक्षणावरील खर्चाकरितां सरकारकडून मिळणाऱ्या देणगींत पंधरा टक्क्यांचा व दुय्यम शिक्षणाच्या खासगी शाळांना मिळणाऱ्या देणगींत पांच टक्क्यांचा याप्रमाणें काट करण्यांत येणार आहे. गेल्या दहा-अकरा वर्षांत जी करवाढ मुंबईसरकारनें केली तिचें समर्थन शिक्षणवाढीच्या नांवावर केलें होतें. ही गोष्ट लक्षांत घेऊन फडणविसांनीं काटकसरीच्या कोयत्यानें शिक्षण खात्याचे लचके तोडावयास नको होते. परंतु तेवढेंहि भान फडणिसांना राहिलें नाहीं. सिव्हिल वर्क्सवर कमी खर्च करण्याच्या औत्सुक्यांत रस्ते व पाटबंधारे यांच्या दुरुस्तीवर प्रतिवर्षी होणारा खर्च पुढील वर्षी बराचसा कमी करण्याचें फडणविसांनीं ठरविलें आहे. परंतु वेळचे वेळीं दुरुस्त्या न करण्याचें धोरण अंतीं कितपत फायदेशीर ठरेल याबद्दल शंकाच आहे.

### उत्पन्नाचा फुगवून दाखविलेला अंदाज

१९३२–३३ सालच्या अंदाजपत्रकांतील तूट कमी करण्याकरितां एक बाजूनें राष्ट्रसंवर्धक खात्यांची गळचेपी करण्याचा मोह जसा फडणविसांना आवरला नाहीं तसाच पुढील वर्षी येणाऱ्या उत्पन्नाचा अंदाज बाजवीपेक्षां अधिक दाखविण्याच्या मोहापासूनहि ते अलिप्त राहूं शकले नाहींत. पुढील वर्षी जमीनमहसूल व अबकारी या खात्यांच्या उत्पन्नांत १९३१–३२ सालापेक्षां अनुक्रमें दीड लक्ष व पंचवीस लक्षांची वाढ होणार असें फडणविसांचें भाकित आहे. पूर्वीचा अनुभव जर भविष्यकालाचा मार्गदर्शक मानावयाचा असला तर जमीनमहसूल व अबकारी या खात्यांच्या उत्पन्नांत पुढील वर्षी वाढ होण्याऐवजीं खोट येण्याचा संभव अधिक आहे असें आम्हांला वाटतें. चालू सालच्या अखेरीला राष्ट्रामध्यें सुरू झालेल्या चळवळीचा मुंबईसरकारच्या तिजोरीवर होणारा परिणाम पुढील वर्षीच दृग्गोचर होणार आहे. गुजराथमधील कांहीं भागांत करबंदीची चळवळ सुरू झालेली आहे. तिचा थोडा तरी परिणाम जमीनमहसुलाच्या उत्पन्नावर झाल्याविना राहाणार नाहीं, व तसेंच शेतीच्या व इतर प्रकारच्या उत्पन्नाचा बाजारभाव न वाढल्यामुळे व शेतकऱ्यांची स्थिति दिवसेंदिवस बिकट होत असल्यामुळे यंदापेक्षांहि अधिक सूट अगर सारातहकुबी सरकारला करावी लागेल. मद्यपानबंदीची चळवळहि सर्वत्र जोरानें सुरू झालेली आहे. —अर्थातच त्याच चळवळीमुळे अबकारी उत्पन्नांत खोट येईल. अरण्यांचे उत्पन्न चालू साला पेक्षां तीन लक्षांनी कमी धरण्यांत आलें आहे. ठिकठिकाणीं जंगल–सत्याग्रह होत असल्याचीं वृत्तें येत आहेत. ही जंगलच्या कायद्याविरुद्ध होणारी चळवळ शांत करण्याकरितां जंगलाबाबत अधिक सवलती देणें सरकारला भाग पडेल. असें झालें म्हणजे अंदाजापेक्षां जंगलचें उत्पन्न कमी झाल्याविना राहाणार नाहीं. अर्थातच या सर्व गोष्टींचा संकलित परिणाम पुढील सालींहि प्रत्यक्ष व्यवहारांत अंदाजपत्रकांत दाखविल्यापेक्षां खजिन्यांत अधिक तूट येण्यांत होईल.

### खरी तूट केवढी आहे ?

ही गोष्ट भविष्यकालाबद्दलची झाली. परंतु सरकारच्या खऱ्या उत्पन्नाचा व सरकारवरील देण्याघेण्याच्या जबाबदारीचा विचार केला तरीहि सरकारच्या खजिन्यांत पुढील वर्षी येणाऱ्या तुटीचा आंकडा ७३ लक्षांहून अधिक आहे असें आढळून येतें. मुंबई सरकारनें मॉटफर्ड सुधारणांपूर्वी काढलेल्या कर्जफेडीचा वार्षिक हप्ता सोळा लाखांचा आहे. तसेंच प्रॉव्हिन्शिअल लोन फंडांतून घेतलेल्या कर्जाच्या परतफेडीचा हप्ता बारा लाखांचा आहे. या रकमा दरवर्षी अंदाजपत्रकांत खर्चखातीं समाविष्ट केलेल्या असतात; परंतु पुढील वर्षीच्या अंदाजपत्रकांत या रकमांशिवायच ७३ लक्षांची तूट येत असल्यामुळें कर्जफेडी व तीच तूट भरून काढणें मुंबई सरकारला स्वतःच्या आवाक्याबाहेर आहे असे वाटत असल्यामुळें मुंबई सरकारनें हिंदुस्थान सरकारजवळून पुढील वर्षाच्या हप्त्याची परत फेडीची एक वर्षपर्यंत तहकुबी मिळविली आहे. परंतु हें देणें एक वर्षपर्यंत तहकूब होणार असलें तरी ते पुढे द्यावें लागणारच आहे, अर्थात् मुंबई सरकारच्या १९३२ ३३ सालच्या अंदाजपत्रकांतील खरा तोटा एकशेंएक लाखांचा आहे.

### कर्जाचा गर्ह्य मार्ग

चालू सालच्या अंदाजपत्रकांतील एक कोटी अकरा लाखांचा तोटा कर्ज काढून भरून काढण्याचें मुंबई सरकारनें ठरविलें आहे. व तो तोटा कर्ज काढून भरून काढण्याव्यतिरिक्त आतां गत्यंतरहि नाहीं असेंहि क्वचित् कोणी म्हणेल. परंतु पुढील सालच्या अंदाजपत्रकांत येणाऱ्या तोट्याची व्यवस्था लावण्याकरितां जी योजना सर गोविंदराव प्रधान यांनीं मुंबई कायदेमंडळाला निवेदन केली आहे तिला कितपत पाठिंबा द्यावयाचा याचा मात्र कायदेमंडळानें पुरेपूर विचार करणें आवश्यक आहे. मुंबई सरकार पुढील सालच्या अंदाज पत्रकांत येणारी तूट भरून काढण्याकरतां (१) कर्ज (२) काटकसर व (३) करवाढ या तीन उपायांचा अवलंब करणार आहे. साधारणतः सरकारच्या जमाखर्चांत येणारी तूट जोंपर्यंत तें सरकार अब्रदार आहे तोंपर्यंत कर्ज काढून भरून काढूं नये तर त्याकरितां प्रथमतः काटकसर नंतर करवाढ यांचा अवलंब करावा असा राष्ट्रीय आयव्ययशास्त्राचा सिद्धान्त आहे. अपवाद म्हणून एखाद्या वर्षी इतर दोन मार्ग अशक्य झाले असतां राष्ट्रीय जमाखर्चांतील तूट कर्ज काढून भरून काढण्याची वेळ आली तर ती गोष्ट वेगळी. हा सिद्धान्त मुंबई सरकारच्या जमाखर्चाला लावल्यास चालू १९३१–३२ सालच्या जमाखर्चांत येणारी तूट अपरिहार्य अतएव अपवादात्मक म्हणून कर्ज काढून भरून काढली तरी त्याच मार्गाचा अवलंब पुढील सालीं येणारी तूट भरून काढण्याकरितां करणें तात्त्विक व व्यावहारिक दृष्ट्याहि गर्ह्य ठरेल. कारण त्याचा अर्थ मुंबई सरकार निर्ढावलेलें दिवाळखोर बनलें असून या इलाख्याच्या प्रगतीची आशा राहिलेली नाहीं असा होईल.

### करवाढीचें बिल फेंटाळा

पुढील सालच्या अंदाजपत्रकांत येणारी तूट भरून काढण्याकरितां कोर्ट–फी व स्टँप यांच्या

दरांत वाढ करण्याचा व विजेच्या खपावर नवीन कर बसविण्याचा सरकारचा विचार असून या तीनहि योजना एकाच करवाढीच्या बिलांत गोवून त्यांना एकदमच कायदेमंडळाची संमति मागण्यांत येणार आहे. असें करण्यांतील सरकारचा हेतु कौन्सिलच्या सभासदांना या तीनहि प्रकारच्या करवाढीचा जनतेवर कसा काय भार पडतो हें पाहणें सोपें जावें हा आहे असें फडणविसांनीं सांगितलें आहे. परंतु मूळ प्रश्न आमदार सभासदांनीं या करवाढीला संमति द्यावी कीं नाहीं हा आहे. या करवाढीचा उपयोग राष्ट्रसंवर्धक खात्यांची कार्यक्षमता वाढवून साक्षरतेचें प्रमाण वाढविण्याकरितां,खेडेगांवांतील आरोग्य सुधारण्याकरितां अगर दळणवळणाचीं साधनें वाढवून व्यापारवृद्धीला साहाय्य करण्याकरितां व्हावयाचा नसून सरकारचा उधळपट्टीचा कारभार चालू राहण्याकरितां व्हावयाचा आहे ही गोष्ट लक्षात बाळगून आमदार सभासदांनीं या करवाढीचें बिल पुढें आलें म्हणजे बहुमतानें तें फेटाळून लावून सरकारला योग्य तो धडा शिकविला पाहिजे.

### काटकसर हाच उपाय

अशा प्रकारें कर्ज काढण्याच्या फडणविसांच्या विचाराला आमदार सभासदांनीं विरोध केला व करवाढीचें बिल फेटाळून लावलें म्हणजे सरकारला अंतर्मुख बनून आपल्या उधळपट्टीच्या कारभाराला आळा घालणें भाग पडेल. १९२१–२२ सालापासून आजपर्यंत काटकसर सुचविण्याकरितां नेमलेल्या दोन कमिट्यांनीं व एका अंमलदारानें मिळून तीनदां मुंबई सरकारच्या कारभाराची चौकशी केली; व दोन कोटी सोळा लक्ष रुपयांची काटकसर सुचविली. मुंबई सरकारनें या सूचनांपैकीं कांहीं सूचना स्वीकारून व कांहीं बाबतींत स्वतःच्या प्रेरणेनें काटकसर करून या सालांत सुमारें दोन कोटींची बचत केली. हें खरें असलें तरी सरकारची आजपर्यंतची काटकसर बव्हंशीं राष्ट्रसंवर्धक खात्यांना भोंवली असून प्रत्यक्ष राज्यकारभाराचा ( ॲडमिनिस्ट्रेटिव्ह ) असा फारच थोडा खर्च कमी झाला आहे. इतर प्रांतिक सरकारांच्या खर्चाशीं तुलना केली असतां प्रत्येक खात्यांत मुंबई सरकारचा खर्च जास्त आहे असें आढळून येतें. पंजाब प्रांतांत मुंबई इलाख्यापेक्षां एक जिल्हा अधिक असून लोकसंख्या जवळ जवळ सारखीच आहे. परंतु जमीनमहसूल, जनरल ॲडमिनिस्ट्रेशन व पोलीस या खात्यांवर पंजाब सरकारचा खर्च मुंबईसरकारच्या खर्चापेक्षां अनुक्रमें तेवीस लक्ष, एक कोटी बारा लक्ष व चवदा लक्ष रुपयांनीं कमी आहे संयुक्त प्रान्ताचा आकार मुंबई इलाख्यापेक्षां मोठा व लोकसंख्या मुंबईइलाख्याच्या दुप्पट असूनहि पोलीस खात्यावरील संयुक्तप्रांतांत सरकारचा खर्च मुंबई सरकारपेक्षां चौदा लाखांनीं कमी आहे. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे मुंबई सरकारच्या खर्चांत काटकसरीला भरपूर वाव आहे. ही काटकसर कारकून शिक्षक वगैरेंच्या पगारांत काट करण्यानें होण्यासारखी नसून सरकारी खात्यांची पुनर्रचना करून बऱ्याचशा वरिष्ठ अधिकाऱ्यांच्या लठ्ठ पगाराच्या जागा नाहींशा करण्यानें व गव्हर्नर, कार्यकारी मंत्री, सनदी नोकर यांना निरनिराळ्या प्रकारचे मिळणारे भत्ते कमी करण्यानें होणार आहे. मुंबई सरकारनें हिंदुस्थान सरकारचे पूर्वीचे ऑडिटर जनरल सर फ्रेडरिक गॉटलेट यांच्या अध्यक्षतेखालीं याच कामाकरितां एक कमिटी नेमण्याचें ठरविलें आहे. ही कमिटी मुंबई सरकारच्या अंतर्बाह्य कारभाराची चौकशी करून काटकसरीच्या सूचना करणार आहे. मुंबई सरकारच्या फडणविसांनीं या कमिटीच्या सूचना बाहेर येईपर्यंत करवाढीची अगर कर्ज काढण्याची आपली योजना गुलदस्तांत ठेवली असती तर बरें झालें असतें.

# स्फुट सूचना

४ प्रतिवर्षाप्रमाणें चालू महिन्यांत बहुतेक सर्व प्रांतांचीं अंदाजपत्रकें त्या त्या प्रांतांतील कायदेमंडळापुढें मांडण्यांत आलीं. तीं सर्वच एकरंगी म्हणजे दिवाळखोरीनें ग्रासलेलीं आहेत; व पडत असलेली तूट भरून काढण्यासाठीं अगोदरच असह्य करभारानें त्रस्त झालेल्या जनतेवर नवीन करांचीं नाना प्रकारचीं ओझीं लादण्यांत येत आहेत. मुंबईसरकारला १ कोटी ११ लाखांची तूट आली ती अंशतः भरून काढण्यासाठीं वीज, स्टॅम्प यांवर कर वाढविण्याचें सरकारनें योजिलें आहे. बंगालसरकारला दोन कोटींची तूट आली असून ती तूट भरून काढण्यासाठीं त्यानें हिंदुस्थानसरकाराकडून कर्ज काढण्याचें ठरविलें आहे व तें कर्ज पन्नास वर्षांत हप्तेबंदीनें फेडण्यांत यावयाचें आहे. मद्रास सरकारला १ कोटी ३६ लक्षांची तूट आली आहे. संयुक्त प्रांत–सरकाराला तीन कोटींवर तूट आली आहे. तेथेंहि मुंबईसरकाराप्रमाणेंच कोर्टफी, स्टँप, रजिस्ट्रेशन, मोटारगाड्या यांवर जादा कर बसवून थोडेसें जास्त उत्पन्न वाढविण्यांत

येणार आहे. परंतु अशा रीतीनें दांत कोरल्यानें जो एखादा कण सांपडेल त्यानें पोट कसें भरणार? लोकांवर करांचा बोजा वाढवून जमाखर्चाची तोंड-मिळविणी करतां येईल अशी सरकारची कल्पना असल्यास ती मात्र चुकीची आहे. ही आपत्ति टाळण्याचा एकच उपाय हा कीं, हल्लींचें महागडें राज्ययंत्र उलगडून तें लोकसंमत होईल अशीच त्याची रचना करावयास पाहिजे. केवळ शाब्दिक पांडित्यानें हा प्रश्न सुटणार नाहीं.

---

२ शांघाय येथील रणक्षेत्र चापे, कियांगवान व वूसंगचा किल्ला येथपर्यंत पसरलें असून या तीनहि ठिकाणीं घनचक्कर युद्ध सतत चार दिवस सुरू होतें. कियांगवान गांवावर जपानी सैन्यानें दोन दिवस नेटाचा हल्ला केला. परंतु चिनी सैन्यानें त्यास तेथें मुळींच ठरूं दिलें नाहीं. तिसरे दिवशीं म्हणजे ता. २३ रोजीं जपानी सैन्यानें पुनः तोफांचा धडाका सुरू करून इर्षेनें हल्ला चढविला. त्या प्रसंगीं उभय पक्षांचें मोठेंच युद्ध झालें. पण त्यांत अखेरीस जपानी सैन्यासच माघार खावी लागली. जपानी सैन्यानें चापे ते कियांगवान या टापूंत एकदम चढाई केली. परंतु चिनी सैन्यानें हीं सर्व नाकीं अत्यंत चिकाटीनें व यशस्वीपणानें ताब्यांत ठेवलीं, इतकेंच नव्हे तर जपानी सैन्याचें तेथून उच्चाटन केलें. वूसंग किल्ल्यापासून चापेपर्यंत आघाडी पसरली असून या आघाडीवर चिनी सैन्य चिकाटीनें लढत आहे. त्यामुळें जपानचें सर्व राखीव सैन्यसुद्धां त्यांत गुंतलें गेल्यानें चिनी सैन्यापुढें त्याचा टिकाव न लागून त्यास माघार घ्यावी लागली. कियांगवान घेण्यासाठीं जपानानें आटोकाट प्रयत्न केले. परंतु चिनी सैनिकांनींहि इतकें अतुल शौर्य गाजविलें कीं, परस्थांनींहि आश्चर्यानें तोंडांत बोटें घातलीं. रणदेवतेच्या या तांडवनृत्यांत उभयपक्षांची मनस्वी हानि झाली. जपानला कियांगवान येथें माघारें पाऊल घ्यावें लागलें तरी जपानी विमानांनीं मर्दुमकी करून हंगजाच येथील चिनी विमानगृहावर बॉम्बचा वर्षाव केला. त्यामुळें तेथील बरींच विमानें नादुरुस्त झालीं असें जपानचें म्हणणें आहे. जपाननें चीनला चिडवून त्याजवर विना—आगळिक केलेल्या चढाईमुळें चीनमधील सर्वच पक्ष क्षुब्ध झाले आहेत व शत्रूशीं झुंजतांना 'वयं पंचाधिकं शतम्' या वृत्तीनें सर्व चिनी सेनानी युध्दास सज्ज झाले आहेत. जनरल फू—क्यूई हा आपलें पोलादी सैन्य (आयर्मसाईड्स) घेऊन बवूंग येथून शांघायला येण्यासाठीं निघाला आहे. यापुढें आपण सतत एक वर्ष हें युद्ध असेंच झुंझविणार असा चीनचा निर्धार असल्याचें जाहीर झालें आहे.

३ अशा प्रकारें चीननें जपानी सैन्याला एक तसूहि पुढें सरकूं न देतां उलट माघारच घ्यावयास लावली, या वार्तेनें टोकियोंत गडबड उडाली आहे. शांघाय रणक्षेत्रावरील जपानी सेनानी ॲडमिरल नोमुरा यानें जास्त मदत पाठविण्याबद्दल टोकियोला विनंति केली असून त्याप्रमाणें दोन विभाग सैन्य शांघायकडे पाठविण्याचें टोकियो सरकारनें ठरविलें आहे. तें सैन्य रणांगणावर दाखल होतांच यापेक्षांहि तुंबळ रणकंदन होणार हें निश्चित आहे. चिनी सैन्याच्या १९ व्या विभागाला बारा मैल मागें रेटल्यानंतर आपण पुढें चढाई करणार नाहीं. कारण प्रदेश जिंकणें हा आपला हेतुच नाहीं, चिनी सैन्य मागे रेटल्यानंतर आपण आपल्या अटी मान्य होईपर्यंत फक्त बचावापुरतीच लढाई करणार ही जपानची भाषा अद्याप सुरूच आहे, व आतां तर जपानच्या लोकसभेंत युद्धाला अनुकूल असणारा पक्ष प्रबल झाल्यानें चिनी-जपानी युद्धाला जास्तच रंग चढेल हें उघड आहे.

---

४ गेल्या गुरुवारीं दिल्ली येथील असेंब्लींत सर जॉर्ज रेनी यांनीं आणि कौन्सिल ऑफ स्टेटमध्यें रेल्वेचे चीफ कमिशनर मि. रसेल यांनीं रेल्वेचें अंदाजपत्रक सादर केलें. तें पाहिलें म्हणजे हिंदुस्थानांतील रेल्वेचा कारभार कसा आंतबट्ट्याचा होत चालला आहे हें दिसून येतें. अंदाजपत्रकावर असेंब्लीनें कपातींच्या सूचनांची सोमवती वाहिलेली आहे. १९३०-३१ सालीं ५ कोटी १९ लक्ष रुपयांची तूट आलेली होती तर १९३१–३२ सालीं तें खिंडार मोठें होऊन त्यांत ९ कोटी ४७ लक्ष रुपये गडप झाले. ही प्रचंड तूट आली त्या वर्षीच्या अंदाजपत्रकांत १ कोट २२ लक्ष रुपये फायदा होईल असा आशावादी अंदाज करण्यांत आला होता हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. कोठें सव्वा कोटीचा नफा आणि कोठें पावणेदहा कोटींची तूट! नोकरशाहीची लायखी ती हीच! चालू वर्षाच्या तुटीचा अंदाज ७ कोटी ५९ लक्ष रुपये इतका केलेला आहे; पण नोकरशाहीच्या अचूक तर्कशक्तीचा गुदस्तांचा अनुभव डोळ्यांपुढें ठेवला म्हणजे पुढील वर्ष नुकसान सोसण्याचे बाबतींत मागील वर्षाला हार जाईल असें समजावयास नको! आपल्या अनुमानाचा हा अचूकपणा विचारांत घेऊनच कीं काय, मि. रसेल यांनीं अशी कबुली दिली आहे कीं, 'माझे अंदाज म्हणजे बर्फावरील पळापळीचा खेळ. त्यांत माझा पाय निसरून मी सपशेल पालथा पडण्याचा संभव फार!' परक्या देशाच्या दिवाळखोरीची आग पसरत असतां मि. रसेल यांना थंडाईची अलंकारिक भाषा सुचते आणि एवंगुणविशिष्ट साहेब-

महाशयांवर मि. रेनीसाहेब हे असेंब्लींत स्तुतीचीं फुलें उधळतात हें ठीकच आहे !

---

५ सालोसाल वाढत जाणाऱ्या या भयंकर तुटीचें समर्थन—रसेल काय, किंवा रेनी काय—कसें करणार ? जागतिक व्यापारमंदीची ढाल पुढें करून तिच्याआड दडण्याचा खटाटोप मि. रसेल यांनीं केला आहे, पण तो फुकट आहे. आम्हीं २०० वरिष्ठ जागा रद्द केल्या, नोकरांचे पगार काटले, त्यांचे भत्ते छाटले इत्यादि चिल्लर काटकसरीच्या बाबींची त्यांनीं मोठी बढाई मारली आहे. पण ही निव्वळ धूळफेक आहे. कारण सरकारानेंच श्री. चेट्टी यांच्या अध्यक्षतेखालीं नेमलेल्या रेल्वे काटकसर कमिटीच्या सूचनांची अंमलबजावणी झाली असती, तर ७ कोटी ८० लक्ष रुपयांची बचत संभवनीय होती. पण हा मार्ग सरकारानें पत्करला नाहीं. चेट्टी कमिटीनें सुचविल्याप्रमाणें तज्ज्ञांची एक कमिटी नेमून रेल्वेंतील सारी घाण धुवून काढण्यास सरकारानें हात घातला नाहीं. एवढेंच नव्हे तर त्या कमिटीनें आंखून दिलेलें शें. ३॥ पासून २० टक्केपर्यंत कपात करण्याचें न्याय्य धोरण धाब्यावर बसवून 'सब घोडे बारा टके' या आडमुठ्या रीतीनें १० टक्क्यांचा काट, लष्ठ व रोड अशा दोन्हीहि पगारांत, सरकारानें सरसकट मारला. वरच्या गोऱ्या अधिकाऱ्यांना न दुखविण्याच्या या धोरणामुळें नुकसानीची खाच इतकी खोल जात चालली आहे कीं, गेल्या चार वर्षांत रिझर्व्ह फंडांतील १८॥ कोटि रुपये तिच्यांत गडप होऊन गेले आणि तो फंड ठणठणीत कोरडा झाला ! अशी अनवस्था करून घेतल्यामुळे रेल्वेखात्याला या वर्षी आपलें भिक्षापात्र डिप्रिसिएशन फंडाच्या दारीं न्यावें लागणार आहे. सरकारनें चालविलेल्या रेल्वेपेक्षां खाजगी रेल्वेवर अधिक नफा सुटतो हें लक्षांत घेतल्यास सरकारानें आपल्या उधळ्या कारभारास काटकसरीचा काटे—लगाम घातल्याशिवाय ही घसरगुंडी थांबणें शक्य नाहीं हें उघड आहे.

---

६ गेल्या आठवड्यांत दिल्लींत दोन महत्त्वाच्या गोष्टी घडून आल्या. हिंदु आणि मुसलमान यांजमधील वाद खासगी रीतीनें मिटत नसल्याचें पाहून गोलमेज परिषदेच्या सल्लागार कमिटीनें या वादाचा निकाल लावण्याचें काम मुख्य प्रधान मि. राम्से मॅक्डोनाल्ड यांजवर सोंपविलें. मि. मॅक्डोनाल्ड हें काम पत्करतील किंवा नाहीं व त्यांनीं पत्करलेंच तर काय अटींवर पत्करतील याचा अंदाज आजच करीत बसण्यांत अर्थ नाहीं. परंतु याच सुमारास हिंदुमहासभेनें आपला एक स्वतंत्र ठराव पास करून गोलमेज परिषदेंत डॉ. अंबेडकर यांच्या कारवाईनें मुसलमान व अस्पृश्य यांची गट्टी जमली होती, ती फोडण्याचे कामीं बरेंच यश मिळविलें आहे. मुसलमान व अस्पृश्य यांनीं आपणास स्वतंत्र मतदारसंघ पाहिजे अशी मि. मॅक्डोनाल्ड यांजपाशीं मागणी केली होती. ती मागणी पुढील राज्यघटनेंत अमलांत आल्यानें जसे मुसलमान तसे अस्पृश्यहि हिंदु समाजापासून फुटून निघून त्या योगानें स्पृश्य हिंदूप्रमाणें अस्पृश्यांचेंहि राजकीय व सामाजिक दृष्ट्या नुकसान झाल्यावांचून राहिलें नसतें. परंतु दिल्लीस अखिल भारतीय हिंदू महासभा व अ. भा. अस्पृश्य असोसिएशनचे अध्यक्ष खासदार राजा यांजमध्यें करार होऊन स्पृश्य व अस्पृश्य हिंदू यांचा मतदारसंघ संयुक्त असावा व अस्पृश्यांना त्यांच्या संख्येच्या प्रमाणांत राखीव जागा याव्या असें ठरलें. या समाधानकारक तडजोडीबद्दल हिंदु महासभेचे डॉ. मुंजे व अस्पृश्य असोसिएशनचे अध्यक्ष खासदार राजा यांचें अभिनंदन करणें आवश्यक होय.

---

७ पण या तडजोडीनें डॉ. अंबेडकर यांनीं गोलमेज परिषदेंत घातलेला घाट फिसकटत असल्यामुळें अंबेडकर व त्यांचे अनुयायी डॉ. सोळंकी यांच्या अंगाचा तिळपापड झाला आहे आणि ते उभयतां हवे तसे बरळू लागले आहेत. परंतु डोकें फिरलेला मनुष्य कित्येक वेळां गुप्त ठेवण्यासारख्या गोष्टीहि उघडपणें बोलूं लागतो त्याप्रमाणें सोळंकी यांची स्थिति झाली आहे. डॉ. सोळंकी यांनीं टाइम्स पत्राच्या प्रतिनिधापाशीं सांगितलें कीं, 'सनातनी हिंदु आम्हांस अत्यंत निर्दयपणें वागवितात. त्याची स्वाभिमानी व सुशिक्षित अस्पृश्य तरुणांना साहजिकच चीड येते त्यामुळें पुढील वीस वर्षे तरी अस्पृश्यांना स्वतंत्र मतदारसंघच पाहिजे. आणखी दहापांच वर्षांनीं स्पृश्य हिंदूंनीं आपली वर्तणूक सुधारली तर त्यानंतर अस्पृश्यांचा स्वतंत्र मतदारसंघ मोडून संयुक्त मतदारसंघ स्थापन करण्यास हरकत नाहीं.' डॉ. सोळंकी यांची ही विचारसरणी चुकीची आहे. अस्पृश्य हिंदूंस स्पृश्य हिंदूंपासून विभक्त केल्यानें स्पृश्य हिंदूंच्या मनोवृत्तींत इष्ट असा फरक पडावयाचा नाहींच. उलट त्यांचीं मनें बिथरून ते अस्पृश्यांच्या उन्नतीचे प्रयत्न सोडून देतील, किंबहुना त्यास विरोध करण्यापर्यंतहि त्यांची मजल गेल्यावांचून राहणार नाहीं.

---

८ डॉ. अंबेडकर यांनीं संतापाच्या भरांत वेगळाच मुद्दा उपस्थित केला आहे. अखिल भारतीय

अस्पृश्य असोसिएशनचे चिटणीस रा. गवई हे आहेत. ते मध्यप्रांत कौन्सिलाचे सभासदहि आहेत. त्यांना अंबेडकरांनीं तंबीवजा पत्र लिहिलें आहे. खासदार राजा स्वतंत्र मतदार संघाचेच पुरस्कर्ते असतां त्यांच्या मतांत एवढी क्रांति कशी झाली याविषयीं अंबेडकरांनीं आश्चर्य प्रदर्शित करून गोलमेज परिषदेंत या प्रश्नाचा निकाल लागला असल्यानें त्याची खपली फिरून काढतां येत नाही अशी त्यांनीं आमदार गवई यांस धमकी दिली आहे. यापुढे जाऊन अंबेडकर बजावतात कीं, राजा यांनीं सांगितलेल्या निर्णयास असोसिएशननें संमति दिल्यास तुमच्यांत व आमच्यांत सभा दावा सुरू होईल. डॉ.आंबेडकर एकीकडे धमक्या देत आहेत व दुसरीकडे तात्पुरत्या सभा स्थापन करून त्यांजमार्फत मतदान कमिटीकडे अस्पृश्यांचे ठराव पाठविण्यांत गुंतले आहेत. राजा यांची असोसिएशन ही सर्वांत वजनदार असल्यानें तिचे अध्यक्ष खासदार राजा हे हिंदु—महासभेस मिळाल्यामुळें अंबेडकरांचें धाबें दणाणलें आहे. त्यांनीं असोसिएशनला दिलेल्या धमकीचा तिजवर काय परिणाम होतो हें पाहणें मात्र या प्रसंगीं आवश्यक आहे.

---

९ वूसंगचा किल्ला म्हणजे यांगत्सी नदीवरील चीनचें अत्यंत महत्त्वाचें नाकें असल्यानें त्या ठिकाणाहून चिनी सैन्याला उखडून टाकण्याचा जपानी सैन्यानें गेल्या आठवड्यांत अट्टाहास केला; परंतु चंग-कैशेकच्या शूर शिपायांनी या कामीं जपानी सैन्याला चांगलीच धूळ चारली. शांघायच्या बाजूनें वूसंगचें संरक्षण करण्याला कियागवानचें क्षेत्र अत्युपयोगी पडतें हें जाणून तें ठाणें घेण्यासाठीं जपानी सैन्य शर्थ करीत आहे व ता. २४ रोजीं सकाळीं आरमारांतून, आकाशांतून व चिलखती मोटारींच्या साहाय्यानें जपानी सैन्यानें कियांगवानवर दारूगोळ्यांची वृष्टि करून तें ठाणें घेण्याची पराकाष्ठा केली; परंतु चिनी सैन्याने अत्यंत चिकाटीनें व विलक्षण मर्दुमकी गाजवून तें ठाणें आतांपर्यंत हातचें सोडलें नाहीं. परंतु यांगत्सीचा गळा हातीं ठेवावयाचा तर हें ठिकाण वाटेल ते प्रयत्न करून घेण्याचा जपानचा निर्धार झालेला दिसत असून जपानी सेनापतींचें लक्ष कियांगवानवर खिळून राहिलें आहे व त्यासाठीं जास्तीत जास्त आरमार, सैन्य व विमानें शांघाय केंद्रावर जमा करण्यांत येत असून जपानांतून सैन्याची एकसारखी भरती होत आहे. जपानी शंभर जहाजांचा ताफा शांघायमध्यें येऊन दाखल झाला आहे. जपानची अशी प्रचण्ड तयारी होत असतां त्या बाबतींत चीनहि बेसावध नाहीं. जपानला यांगत्सीचा गळा धरूं द्यावयाचा नाहीं, मग त्यासाठीं वाटेल तो त्याग करावा लागला तरी बेहेत्तर अशा निर्धारानें शांघायकडे चिनी फौजा जाऊं लागल्या आहेत. चिनी सैन्याचा येणारा लोंढा शांघायपर्यंत पोहोंचूंच नये म्हणून जपानी विनाशिका नानकिंगजवळच त्यांना अडथळा करणार असल्याची एक वार्ता प्रसृत झाली आहे. ती सत्य असल्यास युद्धाची आघाडी यांगत्सीच्या किनाऱ्यानें पुष्कळच विस्तृत होणार हें उघड आहे. परंतु कांहीं झालें तरी पुढील आठवड्यांत शांघायच्या रणक्षेत्रावर मोठेंच रणकंदन होणार ही गोष्ट स्पष्ट आहे.

---

१० उभय राष्ट्रामध्यें अशी हातघाईची लढाई सुरू आहे; जपानानें या युद्धासाठीं आतांपर्यंत ९०लक्ष पौंड खर्च केले व आणखी वीस लक्ष पौंडांची मंजुरी दिली; ज्यास्त सैन्यहि शांघायच्या रणक्षेत्रावर पाठविण्यांत येत आहे; तरीहि चीनचा वकील टोकियोंत आहे व जपानी वकील चीनमध्यें असून उभय राष्ट्रांमध्यें अद्यापि सामान्या वाटाघाटी सुरू आहेतच! जपाननें व जर्मनीनें युद्धापत्तीमुळें आपल्या वसाहती खालीं केल्या आहेत. चिनी—जपानी कलहांत जपानचा परस्पर शक्तिपात झाला तर तो बड्या राष्ट्रांना इष्टच असल्यानें हा कलह थांबविण्याचा मनापासून प्रयत्न अमेरिका, इंग्लंड इत्यादि राष्ट्रे करीत नाहीत असा एक आरोप केला जात आहे. परंतु राष्ट्रसंघ अगर इतर बडीं राष्ट्रें युद्ध थांबवूं शकत नाहींत तर आपण सत्याग्रहाचा मार्ग अवलंबून हें युद्ध थांबवूं असें म्हणणारा एक वर्ग इंग्लंडमध्यें निघाला आहे. या पंथांत मिस मॉड रॉयडन, लण्डनमधील लोकप्रिय पाद्री डीन शेपर्ड व धर्माधिकारी मि. हर्बर्ट ग्रे असे ख्रिस्तभक्त व लॅन्सबरीसारखे पुढारी आहेत. यांचा हेतु असा आहे कीं, चीन व जपान या दोन्ही युद्ध्यमान राष्ट्रांच्या मध्यभागीं निःशस्त्र व अहिंसा वृत्तीच्या लोकांची भिंत उभी करून उभय राष्ट्रांना कलह थांबविण्यास विनंति करावयाची मग त्यांत प्राण गेले तरी हरकत नाहीं. या नव्या शांतिपथकांत ब्रिगेडियर कोझीर नांवाचे लढवय्ये सपत्नीक सामील झाले असून बऱ्याच सैनिकांनीं आपलीं नांवें दिलीं आहेत व या कामीं त्यांनीं राष्ट्रसंघाचें साहाय्य मागितलें आहे. या अहिंसावादी अशा युद्धप्रतिबंधक लोकांच्या प्रयत्नाला किती यश येईल तें येवो; परंतु चिनी जपानी कलहांत जगांतील सहानुभूति मात्र चीनच्या बाजूची आहे एवढी गोष्ट खरी.

# स्वतःच्या पोळीसाठीं लोकहिताची होळी

एक वेळ मुंबई इलाख्याच्या कायदे कौन्सिलचा नांवलौकिक मोठा होता. त्यांत सर फेरोजशहा मेहता सिंहासारखे गर्जत, ना. गोपाळ कृष्ण गोखले बृहस्पतीसारखें वक्तृत्व गाजवीत, सर दिनशा वाच्छा व ना. ग. व्यं. जोशी आपल्या आंकडेपांडित्यानें सरकारी अधिकाऱ्यांनाहि लाजवीत आणि इतर लोकनियुक्त सभासद त्यांच्या तंत्रानें वागून सरकारावर वचक बसवीत. निस्पृहपणा, निर्भीडपणा, माहितगारी, लोकहिताविषयीं आस्था व समाजांतील स्वतःच्या श्रेष्ठ पदाविषयीं विश्वास या गुणांच्या जोरावर त्यांना समोर बसलेल्या बड्या सरकारी सभासदांपेक्षां आपण योग्यतेनें कमी आहों असें समजण्याचें कारण नसे. त्या काळीं लोकनियुक्त प्रतिनिधींचें कौन्सिलांत बहुमत नसतांहि त्यांचा सर्वत्र दबदबा राहून त्यांच्या टीकेला मान मिळे, याचें श्रेय त्यांच्या दानतीला व वजनदारपणालाच होतें हें उघड आहे.

पण मुंबई कौन्सिलाचा तो नांवलौकिक सांप्रत राहिला नाहीं. कौन्सिलांतील सरकारी व बिनसरकारी सभासदांची संख्या त्या काळापेक्षां पुष्कळच वाढली आहे, व लोकनियुक्त प्रतिनिधींचें बहुमतहि झालें आहे. तथापि त्यामुळें कौन्सिलांतील लोकपक्षाचें सामर्थ्य न वाढतां तो फुगीरपणा वातुळ मनुष्याच्या स्थूल शरीराप्रमाणें निरुपयोगी किंबहुना अपायकारक बनला आहे. वातुळ माणसाच्या पोटाचा परीघ त्याच्या मांड्यांना झेपत नाहीं, त्याच्या दुलदुलीत मांड्या त्याच्या पायांना आवरत नाहींत व त्याच्या चालणाऱ्या पायांची ओढ त्याच्या शरीराला सहन होत नाहीं. असलीं माणसें बसलीं म्हणजे सभेला किंवा दरबारला फार शोभादायक, पण उठलीं म्हणजे तितकींच कष्टदायक! त्यांचे कष्ट त्यांना होतातच, पण पाहणारांनाहि होतात हें अधिक. मुंबई कौन्सिलांत एकंदर सभासद ११४ आहेत. त्यांपैकीं कोणी सिंधचे, कोणी गुजराथचे, कोणी मुंबईचे, कोणी महाराष्ट्राचे, कोणी कर्नाटकाचे तर कोणी सरकारचे आहेत. ते कौन्सिलांतील आपापल्या जागेवर बसले असतां दिसणारी मजा काय विचारावी! प्राचीन काळीं एखाद्या राजकन्येच्या स्वयंवराकरितां छपन्न देशचे राजे जमत त्याप्रमाणें जिल्ह्याजिल्ह्यांतून आलेल्या या प्रतिनिधींचा थाट!

उंच व उभट टोप्या, प्रचंड व रंगी-बेरंगी फेटे, लांबट व ऐटबाज जरीकाठी रुमाल आणि त्या सर्वांत मधून मधून झळकणाऱ्या थोडथोड्या पगड्या, प्रतिनिधींचा प्रांतिक भिन्नपणाच दर्शवितात. त्यांत त्यांच्या भाषांचें वैचित्र्य मिसळलें म्हणजे एका एकमेला दुसऱ्या एकमेनें गुणल्यासारखेंच होतें. त्यांना एकमेकांचें बोलणें एकमेकांस समजण्याकरितां परकायाप्रवेशाप्रमाणें इंग्रजीसारख्या परभाषेंत प्रवेश करावा लागतो. पण तोहि प्रवेश करतां न येणारे हॅटीचे लाल सभ्यांच्या कौन्सिलांत कांहीं थोडे नाहींत. त्यांच्या कौन्सिलांतील भाषणाच्या वेळीं इतरांनीं झोंपा काढाव्या, व इतर बोलावयास उभे राहिले असतां यांनीं निद्रादेवीच्या स्वाधीन होऊन त्यांच्या उपकारांची फेड करावी! सिंधी प्रतिनिधींची दाद गुजराथ्यांना लागूं नये व गुजराथ्यांची वास्तपुस्त कर्नाटकवासीयांनीं करूं नये असा अनवस्था प्रसंग कौन्सिलावर ओढवत नाहीं असें कोण सांगूं शकेल? कौन्सिलाच्या एकंदर ११४ सभासदांत लोकनियुक्त सभासद ८६ आहेत. लोकनियुक्तांची ही संख्या लहान नव्हे. ती सरकारी फौजेच्या तिप्पट असल्यानें तिला यश हें हटकून ठेवलेलेंच असलें पाहिजे.

पण मुंबई कौन्सिलांत तसें कधीं घडतें काय? घडतें, पण चुकून. आंधळ्याचा हात एखाद्या वस्तूला चुकूनच नेमका लागावयाचा, तसेंच मुंबई कौन्सिलाच्या विजयाचें. कारण यश किंवा विजय हा विशिष्ट प्रकारच्या लढाईवांचून मिळत नाहीं. उभय पक्षांची शाब्दिकच पण गोळागोळी व्हावी, दोघांनीं हमरीतुमरीवर यावें, सरकार पक्षाचा रोष आपणावर ओढवून घ्यावा व आपल्या पक्षांत फूट पडूं देऊं नये; तेव्हां लोकपक्षाच्या अग्रभागीं विजयाची ध्वजा फडकूं लागावयाची. पण जो कौन्सिलांत लढाई खेळण्याकरितां जाईल तोच विजयाची फिकीर बाळगील. मुंबई कौन्सिलांतील बहुतेक सभासद असे आहेत कीं, त्यांच्या मनगटांत लढण्याची हिंमत नाहीं व अंतःकरणांत तशी इच्छाहि नाहीं. ते कौन्सिलाचें सभागृह हें रणांगण समजतच नाहींत, क्रीडाभुवन किंवा क्रीडांगण समजतात. स्वराज्यपक्षाचे, प्रतिसहकारपक्षाचे किंवा कॉँग्रेसचे पुढारी मुंबई कौन्सिलांत होते त्या वेळीं रणांगणांतील हत्यारें तेथें वारंवार झळकत असत, त्यांचें तेज फाकत असे व कौन्सिलचें सभागृह वाग्युद्धानें दणाणून जात असे. परंतु मागल्या निवडणुकींत राष्ट्रीय सभेनें कौन्सिलावर बहिष्कार घातला व राष्ट्रीय सभेच्या मुर्वतीखातर त्या सभेच्या मतांशीं ज्यांचीं मतें बहुतांशीं जुळतीं आहेत अशांनींहि कौन्सिलाकडे पाठ फिरविल्यामुळें किरकोळ लोकांनाहि आमदार म्हणवून घेण्याची हौस भागवून घेण्यास चांगलेंच फावलें.

सभा होऊन गेल्यानंतर रिकाम्या पड-

लेल्या खुर्चीवर बसून एखाद्या अनुकरणप्रिय मुलानें सभेचा अध्यक्ष म्हणून मिरविण्याची संधि साधावी त्यांतलाच हा प्रकार. सांप्रत जे लोक कौन्सिलांत आहेत त्यांपैकीं बऱ्याच जणांचा हेतु लोकहिताचें काम करण्याचा नाहीं म्हटलें तरी चालेल. एखाद्या जिमखान्याचे किंवा खेळाडू क्लबाचे मुलापासून म्हाताऱ्यापर्यंत सर्वजण सभासद होतात. म्हातारीं माणसें ब्रिज-बिलियर्ड खेळण्याकरितां, तरुण लोक टेनिस–क्रिकेटांत प्रावीण्य मिळविण्याकरितां व मुलें फुटबॉल उडविण्याकरितां क्लबांत जमतात. कौन्सिलाचेंहि तसेंच घडतें. जे लहान आहेत ते कौन्सिलांत गेल्यानें मोठे होतात. रिकामे आहेत त्यांना काम मिळाल्यासारखें वाटतें. वकील आहेत त्यांना वकिलीच्या पुढची आयुष्यांतील अधिक योग्यतेची पायरी चढल्याचें समाधान लाभतें. तरुण आहेत त्यांना आपलें नांव गाजविण्याची लांबची मामुली वाट कटाळवाणी वाटल्यामुळें ते या जवळच्या वाटेनें कीर्तीचा घाट चढतात. ज्यांना साहेब लोकांत रोज मिसळावयास सांपडून ओळखी पाडावयाच्या आहेत व वशिले लावावयाचे आहेत ते आपला कार्यभाग तेथें सहजी साधतात अशा रीतीनें आपल्या खाजगी व्यापांत गुंतलेल्या आमदारांना सार्वजनिक कामाची आस्था ती काय असणार व हे शेंदाडशिपाई लढाया त्या काय मारणार ?

मुंबई कौन्सिलांत परवांच्या फिनान्स बिलाच्या वेळीं हाच अनुभव आला. पुढील वर्षाच्या जमाखर्चांतील तूट भरून काढण्याकरितां फडणीस सर गोविंदराव प्रधान यांनीं गेल्या सोमवारीं विजेवर कर बसविण्याचें आणि कोर्ट फी व स्टँप फी वाढविण्याचें बिल कौन्सिलांत मांडलें, व त्याचें पहिलें वाचन प्रचंड बहुमतानें पास होऊन सदर बिल पुढील दुरुस्तीकरितां सिलेक्ट कमिटीकडे सोंपविण्यांत हि आलें. बिलांतील तीन करांपैकीं विजेवरील करापासून सालीना १२ लक्ष रुपयांचें आणि कोर्ट-फी व स्टँप यापासून अजमासें १३ लक्ष रुपयांचें उत्पन्न वाढेल असा सरकारी अंदाज आहे. पण सरकारचा अंदाज म्हटला कीं तो खोटा ठरावयाचा हें अनुभवसिद्ध आहे. कराच्या या तीन बाबींपैकीं विजेच्या कराचा बोजा विशेषतः शहरांतील रहिवाशांवरच पडणार आहे. आणि बाकीच्या दोन बाबी शहरें व खेडीं या उभयतांनाहि भोंवणार आहेत. मुंबईसारख्या शहरांत विजेचा विनियोग ट्रामगाड्या, गिरण्या व इतर लहानमोठे कारखाने चालविण्याकडे होतोच,पण त्याशिवाय घरोघरचे दिवेहि विजेनेंच लागतात व पंखे तिनेंच हालतात. या दिव्यांवर आणि पंख्यांवर नवीन कर बसणार असल्यामुळें त्यांची गरीबापासून श्रीमंतांपर्यंत सर्वांनाच तोशीस लागणार आहे.

शहरांत खासगी धंदेवाल्यांच्या व सरकारच्या काटकसरीमुळें कित्येक मध्यम स्थितींतील माणसांवर नोकऱ्या जाऊन पदरमोड करीत स्वस्थ घरीं बसण्याची पाळी आली आहे; व दहा टक्क्यांच्या कपातीमुळें बऱ्याच जणांचा दरमहाचा आदा तुटला आहे. दरमहाची आपली दिवाबत्ती तीन किंवा चार रुपयांत भागविणारे गरीब लोक शहरांतून थोडे नाहीत. त्यांच्या दिवाबत्तीचा खर्च नवीन करामुळें महिन्याचे काठीं रुपया आठ आण्यांनीं वाढल्याभ त्यांस तो जाणवल्यावांचून राहाणार नाहीं. कारण त्यांची प्राप्तीच इतकी तुटपुंजी असते कीं खर्चाच्या प्रत्येक बाबींत जेव्हां त्यांनीं कसोशी करावी तेव्हांच त्यांची महिनाअखेरची तोंडमिळवणी मोठ्या भाराकुटीनें व्हावी. यावर कोणी असें म्हणेल कीं, गरीबाला विजेच्या रोषनाईची मिजास हवी कशाला ! त्यानें रॉकेलच्या किंवा इतर तेलाच्या दिव्यावरच रात्र साजरी करावी. परंतु गोष्ट अशी आहे कीं, विजेनें खर्च माफक पडतो या समजुतीनेंच तो वीज वापरतो. खेरीज तो ज्या घरांत किंवा चाळींत राहातो त्याच्या मालकांनीं विजेची रोषनाई आगाऊच घेऊन ठेवली असल्यानें त्याला विजेचा मासिक आकार नाखुषीनेंहि भरावाच लागतो.

या दृष्टीनेंहि विचार केल्यास विजेच्या कंपन्यांनीं वीज वापरणारांपासून जो वाजवीहून अधिक नफा घेऊन आपल्या भागिदारांची भर केली आहे तो नफा कमी घेण्याचें न ठरविलें तर मध्यम स्थितींतील लोकांची व गरिबांची स्थिति नव्या करानें अधिक कष्टप्रद होईल यांत शंका नाहीं. तशांतूनहि कांहींना बरेच दिवस वीज वापरून आतां ती बंद करून तेलाच्या दिव्यावर येण्याचें मनांत आणिलें तरी तें शक्य नाहीं. कारण ज्याच्या डोळ्याला एकदां विजेच्या झगझगीत प्रकाशाची संवय झाली तो तेलाचे दिवे लावूनहि अंधारांत वावरल्याप्रमाणेंच बिचकत बिचकत व्यवहार करील. वीज ही शक्ति म्हणून वापरणाऱ्या कारखानदारावर नवीन कर न बसवितां विजेचे दिवे व पंखे घेणारावरच तो बसविण्यांत आपण चैन करणाऱ्या लोकांपासून हा कर वसूल करणार आहों अशी सरकारानें स्वतःची समजूत करून घेतली आहे, व सर हिदायतुल्ला यांनी याच विचारसरणीची री ओढली आहे. पण ती कशी भ्रामक आहे, हें शहराच्या एकंदर लोकवस्तींतील श्रीमंतांची अल्पसंख्या लक्षांत घेणारांना सहज कळून येणार आहे.

कोर्ट-फीचा दर सरकारानें शेंकडा ५ रुपये होता तो गेलीं कित्येक वर्षे ७॥ रुपये केला आहे. हा दर नवीन कायद्यानें कायम केला असला तरी दिढीनें वाढलेला

हा आकार सर्वांना जाचक होणारा असल्यामुळें तो तसाच ठेवला या म्हणण्यानें त्याच्या वाढीचें योग्य समर्थन होत नाहीं. त्या बाबतींत सरकारानें पुढें केलेला एक युक्तिवाद अजब आहे यांत शंका नाहीं. सरकार अशी सबब सांगतें कीं, कोर्ट-फीचा दर कमी होता त्यामुळें लोक कामें वाढवीत व सरकारी न्याय-खात्याचा गैरवाजवी फायदा घेत. पण या प्रति-पादनांत मुळींच तथ्य नाहीं. कारण पूर्वी जी कोर्ट-फी पडत होती ती पूज्य समजण्याइतकी खास कमी नसल्यानें त्या बाबतींत विनाकारण पदरचा पैसा घालविणाऱ्या माणसाची गणना कोणीहि मूर्खांतच केली पाहिजे. व असले मूर्ख समाजांत केव्हांहि क्वचितच आढळणार. स्टँप ॲक्टाची दुरुस्ती अशीच जाचक व त्रासदायक होण्याची व्यापारी वर्गास भीति पडली आहे. सांप्रत व्यापाऱ्यांचा बराचसा व्यवहार नुसत्या चिठ्याचपाठ्यांवर चालतो. हा सर्व देवघेवीचा व करार-मदाराचा व्यवहार स्टँप लावल्यावांचून मुळीं होऊंच नये अशी सदर बिलानें शक्ति सुरू झाल्यास व्यव-हारांत अत्यंत घोटाळे व अानगडी उपस्थित होतील आणि खर्चहि अधिक येईल अशी व्यापाऱ्यांची तक्रार आहे.

वरील तीन प्रकारच्या करांपासून सरकार सुमारें २५ लक्ष रुपयांच्या नव्या उत्पन्नाची अपेक्षा करीत आहे. पण त्यापासून सर्व वर्गांतील लोकांना करांचा कमीअधिक प्रमाणांत नवा भार उचलावा लागणार असून सध्यांच्या मंदीच्या व बेकारीच्या दिवसांत त्यामुळें रयतेची विपत्ति वाढणार आहे; या-संबंधीं सर्वांचें एकमतच दिसून येतें. तथापि या करवाढीस विरोध करण्याचें सबळ कारण एवढेंच नव्हे सरकार ही कराची वाढ कां करतें, तर पुढील वर्षाच्या बजेटांतील तूट भरून काढण्याकरितां. पण ती तटच बजेटांत पडूं नये यासाठीं करावयाची तेवढी कसोशी सरकारानें केली असें अद्यापि सिद्ध व्हावयाचें आहे. गव्हर्नरसाहेबांनीं मुंबई कौन्सिला-च्या सुरुवातीच्या भाषणांत या बाबतीत मोठी उडी मारण्याचा झोक आणिला होता. मुंबई सर-काराचे कार्यकारी मंत्री व दिवाण मिळून सात जणांचा तांडा आहे. पूर्वी जें काम चार इसमांवर भागत होतें तें काम उरकण्यासाठीं सन १९२० सालापासून एकाएकीं पावणेदोनपट इसम कां लागावे? त्या एकाच वर्षांत त्यांचें काम पावणेदोनपटीनीं वाढलें असें सरकारहि म्हणणार नाहीं. कारण तसें असतें तर सात इसमांऐवजीं चार इसम ठेवण्याचें सभाचें बोट गव्हर्नरसाहेबांनीं यंदांच्या वर्षी जनतेच्या तोंडाला लावलेंच नसतें. त्यावरून इतकें सिद्ध झालें कीं गेल्या बारा वर्षांनंतरहि हें काम चौघांकडून निभावून नेतां येण्यासारखें आहे. असें असतां ही संख्या नवीन सुधारणेचा कायदा १९२० सालीं अमलांत आल्याबरोबर कां वाढविली? रयतेच्या पैशाची कोणी विचारता नाहीं म्हणून अशी उधळपट्टी करण्यांत आली काय? आमच्या मतें या उधळपट्टीचें कारण एकच दिसतें. सरकारला आपल्या कार्यकारी कौन्सिलांतील गोऱ्या अधिकाऱ्यांची चंगळ कमी न होऊं देतां 'हलवायाच्या घरावर तुळशीपत्र' या न्यायानें परभारें रयतेचा पैसा उधळून हिंदी दिवाणांना आपल्या मंत्रिमंडळाच्या योग्यतेला आणिलें अशी शेखी मिरवून जनतेकडून भलेपणा मिळवावयाचा होता. मुंबई सरकारच्या कार्यकारी मंडळांतील हा जसा पावणेदोनपटीनीं खर्च वाढला तशीच व जवळ जवळ तितकीच सर्वत्र खर्चाची वाढ झाल्यानें सरकारानें आपल्या चुकीच्या धोरणा-ची संपादणी करण्याकरितां त्याचें प्रायश्चित्त कर रूपानें रयतेस देण्याचें ठरविलें आहे.

अशा अविचारी व निष्काळजी सरकाराचा चोहों बाजूंनीं कोंडमारा करणें हा त्यास ताळ्यावर आणण्या-चा रामबाण उपाय होय. नवीन करवाढीची बंदी त्याच सदरांत सांपडते. सरकारची ही पंचवीस लक्ष रुपयांची रसद मारून सरकारची खातीं उपाशीं ठेवण्याची अमूल्य संधि यंदां मुंबई कौन्सिलांतील लोकपक्षीय प्रतिनिधींना आली होती ती त्यांनीं आपल्या ऐदीपणानें, स्वार्थबुद्धीनें व तोंडपुजेपणानें गमावली, यांत त्यांनी मुंबई इलाख्याचें नुकसान करून आपल्या मतदारांना सपशेल फसविलें आहे यांत शंका नाहीं. गव्हर्नरसाहेबांनीं आपल्या भाषणांत ध्वनित केल्याप्रमाणें मंत्री व दिवाण यांची संख्या त्यांनीं चारांवर आणिली असती तर सरकारचा खरी काटकसर करून रयतेचें हित साधण्याचा हेतु प्रामाणिकपणाचा आहे या समजुतीनें त्यांची गय करण्यांत कांहींसा अर्थ होता. परंतु गव्हर्नरसाहेबांची ही केवळ हुलकावणी ठरली. अशा रीतीनें गनिमीकाव्यानें लढणाऱ्या सरकाराशीं निदान मराठ्यांनीं तरी आपला पिढीजात व इतिहास-प्रसिद्ध असा गनिमी काव्याचा गुण दाखवावयास पाहिजे होता.

पण स्वार्थासाठीं लाचार झालेल्या लोकप्रतिनिधीं-ना त्या गुणाची आठवण व्हावी कशी? त्यांना इला-ख्यांतील रयतेच्या कल्याणापेक्षां दिवाणांच्या पगा-राचीच काळजी जास्ती पडली. हें पंचवीस लक्षांचें बिल कौन्सिलानें पायाखालीं तुडविलें असतें तर सरकारास मंत्री व दिवाण यांची संख्या सातांवरून चारांवर आणण्याशिवाय गत्यंतरच नव्हतें. आणि तसें सरकारनें केलें असतें म्हणजे तीन दिवाणांपैकी दोघां दिवाणांना आपल्या भारंभार पगाराला अंचवून व अधिकारपदावरून च्युत होऊन सामान्य सभासदांच्या चिल्लर खुर्ची-नाण्यांत

येऊन पडावें लागलें असतें.या दिवाणांनीं दीनवाणीनें कौन्सिलांतील सभासदांची खासगी रीतीनें करुणा भाकली आणि मुसलमानांची व ब्राह्मणेतर पक्षाची मदत आपली पोळी जतन करण्यास घेतली असें दिसतें. बजेटावरील वादविवादांत खानदेशचे आमदार रा. ब. डोंगरसिंग पाटील यानीं नवीन सुधारणा अमलांत येईपर्यंत दिवाणांच्या पोटावर पाय कशाला आणितां असा सवाल आशाळभूतपणानें गव्हर्नरांस केला होता. त्यावरून दिवाणांना वांचविण्याकरितां पंचवीस लाखांचा बळी सरकारास अर्पण करण्याचें कारस्थान प्रथमपासून व कसें रंगत आलें होतें याची अटकळ बांधतां येते.

दि. ब. कंबळी यांनीं आपल्या ब्राम्हणेतर पक्षांतील बगलबच्चांना कह्यांत घेऊन त्यांचा पाठिंबा फिनॅन्स बिलाला कसा मिळविला हें आमच्या मुंबईच्या प्रतिनिधीनें आपल्या पत्रांत दाखविलेंच आहे. ब्राम्हणेतर पक्षांत आपल्या मताच्या बगलबच्चांचीच सरशी व्हावी याकरितां पक्षाचें ब्रीद गुंडाळून ठेवून त्यांनी सरकारनियुक्त सभासदांचीहि आयत्या-वेळीं खोगीर-भरती केली व लोकनियुक्त अशा एका ब्राह्मणेतरास मात्र मज्जाव केला. याचा परिणाम असा झाला कीं सदर पक्षाचे उपाध्यक्ष श्री. नवले व इतर कांहीं सभासद यांना ब्राह्मणेतर पक्षाचा राजीनामा देणें भाग पडून त्या योगानें दि.ब.कंबळी यांचें कारस्थान सिद्धीस गेलें. कंबळी यांनीं ब्राह्मणेतर पक्षास आपल्या लगामीं लावून घेतलें व मुसलमान दिवाण व मंत्री यांनीं सिंधच्या व इतर मुसलमानांपुढें साखर पसरून त्यांना आपल्या काबूंत आणिलें. अशा रीतीनें लालूच,फुसलावणी,गृहभेद व चिथावणी या शस्त्रास्त्रांचा प्रयोग सुरू झाल्यावर स्वार्थ साधण्यासाठीं कौन्सिलांत निवडून येण्याची दगदग ज्यांनीं सोसली त्यांनीं लोकहित लाथाडून दिलें असल्यास नवल काय ? बिलाला अनुकूल मतें ६८ व प्रतिकूल मतें फक्त २६ पडलीं. या २६ मतांत क्वचित् सरकार-नियुक्तहि सभासद आहेत. ते वगळल्यास ८६ लोकनियुक्त सभासदांपैकीं प्रतिकूल मत देणारांत राष्ट्रीय वृत्तीचे व थोडे ब्राह्मणेतर सभासदच काय ते होते ही गोष्ट डोळ्यांत भरते. यावरून कौन्सिलांतील सर्वसाधारण सभासदांची दानत किती खालावली आहे, त्यांच्यांत देशहितापेक्षां स्वार्थच कसा बोकाळला आहे व त्यांना स्वतःवरील जबाबदारीची चाड किती उरली आहे हें समजून येऊन गेल्या दहाबारा वर्षांत क्रमाक्रमानें कौन्सिलच्या होत चाललेल्या अधःपातामुळें मन उद्विग्न व विषण्ण झाल्यावांचून रहात नाहीं.

# मांच्यूरिया प्रकरण हें काय आहे ?

( ले. २ रा )

चीन व जपान यांचें प्रथम घर्षण स. १८९४–९५ सालीं कोरियाच्या बाबतींत झालें. त्यांत चीनला हार खावी लागून त्याचें कोरियावरचें अधिराज्य नष्ट झालें. या वेळेपासून जपानचें लक्ष मांच्यूरियाकडे वेधलें आणि या युद्धान्तीं झालेल्या तहांत मांच्यूरियांतील क्वान्टुंग हें द्वीपकल्प चीननें जपानला देऊं केलें. परंतु जपानचा हा वरचष्मा त्या वेळीं फ्रान्स, रशिया, इंग्लंड यांना न साहून त्यांनीं जपानला तें द्वीपकल्प घेऊं दिलें नाहीं. पुढें रशियानें तें १८९८ मध्यें चीनकडून पंचवीस वर्षांच्या करारानें घेतलें.

यानंतर १९०० सालीं चीनमध्यें बॉक्सर बंड झालें.त्या वेळीं रशियानें तें मोडण्यासाठीं आपलें सैन्य तेथें पाठविलें. परंतु बंड मोडल्यावरहि तो मांच्यूरियांतून सैन्य हालविण्यास टंगळमंगळ करूं लागला. तेव्हां त्याचें पर्यवसान रूसो–जपानी युद्धांत होऊन त्यांत रशियाचा सपशेल पराजय झाला व रशियाकडून क्वान्टुंग हें द्वीपकल्प जपानकडे गेलें. जपाननें चीनकडून तें द्वीपकल्प ९९वर्षांच्या करारानें आपणाकडे कायम केलें. यानंतर चीनमधील अस्वस्थतेचा फायदा घेऊन जपाननें सन १९१५ सालीं चीनवर मांच्यूरियाच्या ताब्यासंबंधानें अत्यंत नामुष्कीच्या अशा २१ अटी लादल्या. त्यामुळें मांच्यूरियावर चीनची सत्ता केवळ नाममात्र राहिली. आज मांच्यूरियन प्रश्नाला जें उग्र स्वरूप प्राप्त झालेलें दिसत आहे त्याचीं पाळें-मुळें इतकीं दूरवर गेलेलीं आहेत.

### जपानची कामधेनु

आज मांच्यूरियाचीं उघड उघड दोन छकलें झालेलीं दिसतात. उत्तर मांच्यूरिया रशियानें व्यापला असून द. मांच्यूरियांत जपाननें आपले पाय रोंवले आहेत. रशियांत झारशाहीचा अंमल असताना त्या सरकारनें उ. मांच्यूरियांत आपलें पाऊल बरेंच घुसविलें व हल्लीं त्या टापूंत रशियाच्या मालकीचा सुमारें ९०० मैल लांबीचा लोहमार्ग असून तो चिनी–पूर्व–रेल्वे नांवानें प्रसिद्ध आहे. चीन

व सोव्हिएट रशिया यांमध्यें झालेल्या करारान्वयें या लोहमार्गाची मालकी चीनकडे आणखी पंचवीस वर्षांनीं आपोआपच येणार आहे. सोव्हिएटांची तूर्त तरी आक्रमणाची प्रवृत्ति नसल्यानें चीनला त्याच्याकडून त्रास नाहीं म्हटलें तरी चालेल. परंतु द. मांच्यूरियाची मात्र ती स्थिति नाहीं. त्या टापूंत जपाननें आपले अनेक हितसंबंध उत्पन्न केले आहेत. १९१५ च्या करारानें त्याला मांच्यूरियांत जादा सवलती मिळाल्या आहेत. जपानच्या खास मालकीचा सुमारें ७०० मैलांचा लोहमार्ग असून त्याला अनेक फाटेहि जोडले आहेत. परंतु त्या सर्वांपेक्षांहि जपानला अत्यंत महत्त्व वाटतें तें तेथील कच्च्या मालाचें. त्या दृष्टीनें मांच्यूरिया म्हणजे जपानला केवळ कामधेनूप्रमाणें हातीं लागला आहे.

## कच्च्या मालाचें कोठार

जपान जगांतील पहिल्या दर्जाच्या राष्ट्रांत मोडतें. व्यापारधंदा, सैन्य, आरमार, राजकीय सुधारणा, मुत्सद्देगिरी या सर्व बाबतींत त्यानें कोणत्याहि पाश्चात्य राष्ट्राची बरोबरी केली आहे; किंबहुना कित्येक बाबतींत त्यापेक्षांहि त्यानें श्रेष्ठत्व संपादन केलें आहे. ही गोष्ट खरी असली तरी आजच्या यांत्रिक युगांत अवश्य असणारीं लोखंड, कोळसा, पेट्रोल यांसारखीं सामुग्री त्याच्या घरांत पिकत नाहीं. त्यासाठीं त्याला परकीयांच्या तोंडाकडे पहावें लागतें. अर्थात् असा कच्चा माल मुबलकपणें आपल्या परसामागें असलेला, जपाननें चाणाक्ष दृष्टीनें पाहून केवळ आपल्या लष्करी बळावर त्यानें मांच्यूरियावर आपलें आर्थिक प्रभुत्व स्थापन केलें. द. मांच्यूरियांत कोळशाच्या, लोखंडाच्या व पेट्रोलच्या खाणी असून त्यांची मालकी त्याच्या हातीं आली आहे. याशिवाय मांच्यूरियांत नाना प्रकारचीं धान्यें पिकत असल्यानें केवळ भातखाऊ म्हणून गाजलेल्या जपानी लोकांना आतां मांच्यूरियाचा गहूं खाण्याचीहि चटक लागलेली आहे. या सर्व कामीं त्यानें सुमारें तीन अब्ज रुपये तेथें गुंतविले आहेत. मांच्यूरियाची हवा थंड व ती जपानी लोकांस विशेष मानवणारी नसल्यानें जपानच्या वाढत्या लोकसंख्येस त्या भागाचा फारसा उपयोग होणार नाहीं. परंतु अवश्य अशा कच्च्या मालाची भरपूर निपज तेथें होत असल्यानें मांच्यूरिया म्हणजे आज जपानचें जीवनसर्वस्व होऊन बसला आहे. शिवाय तेथील हवा जपानी लोकांस न मानवली तरी कोरियन लोकांस ती मानवते. तेव्हां कोरियन लोकांस खो देऊन त्यांच्या जागीं बसण्यासहि जपानला सोयीचें आहे.

## अमेरिकेला उपरति कां झाली ?

अशा प्रकारचें जपानचें आक्रमण सुरू असतां चीनशीं निकट संबंध असलेली अमेरिका स्वस्थ बसेल हें शक्यच नव्हतें. द. मांच्यूरियांत जपानचा प्रवेश झाल्यापासूनच जपानी महत्त्वाकांक्षेला पायबंद लावण्याचे अनेक प्रयत्न अमेरिकेनें केले. झारशाही नष्ट झाल्यानंतर चिनी–पूर्व–रेल्वे आपल्या ताब्यांत घेण्याचाहि अमेरिकेनें दीर्घ प्रयत्न केला. परंतु सोव्हिएटांनीं आपल्या सत्तेचें पुनरुज्जीवन केल्यामुळें अमेरिकेचा तो डाव हुकला. जपानच्या वाढत्या सत्तेला विरोध करण्याचें अमेरिकेनें पुढें सहेतुकपणेंच सोडून दिलें. कारण युरोपीय महायुद्ध झाल्यानंतर अमेरिकेला अशी शंका येऊं लागली कीं, यानंतर आपणास केव्हांना केव्हां तरी इंग्लंडशीं युद्ध करावें लागणार. असें युद्ध झालें व इंग्लंडच्या बाजूला जपान गेला तर त्यांच्या संयुक्त आरमारांशीं आपणास टक्कर देतां येणार नाहीं. तेव्हां अमेरिकेनें १९२१ मध्यें वॉशिंग्टन परिषद भरविली व तींत जपानला खूष करण्यासाठीं व प्रसंगीं जपानचें साहाय्य मिळावें या बुद्धीनें, आपण फिलिपाईन व गुआम या बेटांत आरमारी तळ बांधणार नाहीं असें आश्वासन दिलें व जपानला आपलें आरमार वाढविण्यासहि हरकत घेतली नाहीं.

## मोकळें रान सांपडलें

अशा रीतीनें अमेरिकेच्या तटस्थपणामुळें जपानला मांच्यूरियांत वाटेल तो धुमाकूळ घालण्यास संधि सांपडली व तिचा फायदा जपाननें पुरेपूर घेतला. १९१५ तील एकवीस अटींप्रमाणें जपानला मांच्यूरियांत खाणींचे विशेष हक्क प्राप्त झाले. त्याने आपली रेल्वे तेथें बांधली, शेती सुधारली व तेथील सर्व साधनांच्या बळावर जगांतील पहिल्या प्रतीच्या राष्ट्रांच्या मालिकेंत आपला समावेश करून घेतला. त्याच्याच अधिराज्याखालील कोरियाला लागून मांच्यूरिया असल्यानें त्या प्रांतावर देखरेख ठेवणें व प्रसंगीं सुलभतेनें आणि चपळाईनें सैन्याच्या हालचाली करणें त्यास फार सोपें जात आहे. अशा रीतीनें कच्चा माल भरपूर पुरविणारें एक सुपीक क्षेत्र व पक्क्या मालाची भक्कम उतारपेठ या दृष्टीनें जपानला मांच्यूरियाचा हा गोड घास घेण्याची बुद्धि व्हावी यांत नवल काय ?

## इतर देश गप्प कसे ?

जपाननें एवढा मोठा घांस गिळण्याचा हा उपक्रम चालविला असतां आपल्यापेक्षां इतरांचें वर्चस्व न वाढूं देण्यांत दक्ष अशा पाश्चात्य राष्ट्रांनीं जपानला या कामीं विरोध कसा केला नाहीं, असा प्रश्न सकृद्दर्शनीं पुढें येतो. परंतु जगाच्या राजकारणाकडे थोडी दृष्टि दिली असतां याचें उत्तर सहज मिळतें. मांच्यूरियाबाबत

जपाननें चीनवर अटी लादल्या सन १९१५ मध्यें; म्हणजे युरोपीय महायुध्दाच्या ऐन धुमश्चक्रींत. त्यावेळीं युरोपीय राष्ट्रांना स्वतःच्या पलीकडे पहाण्यास सवडच नव्हती. पुढें महायुद्ध समाप्तीनंतर युरोपीय राष्ट्र थकून गेलीं असल्यानें त्यांना आपलीं घरें स्थिरस्थावर करण्यापलीकडे जास्त सवडच नव्हती. महायुद्धाची झळ न लागलेलें बलिष्ठ राष्ट्र एकटें जपानच. त्यानें ही सर्व स्थिति टेहळून आपली कारवाई शांतपणें व व अविरोधानें चालविली. आज तर सर्वच राष्ट्रें आर्थिक दृष्ट्या डबघाईस आलेलीं असल्यानें मनांत असूनसुद्धां त्यांना हातीं शस्त्र धरतां येत नाहीं. चीनहि जागृत झाला असला तरी अंतर्गत कलहानें तो जर्जर झालेला आहे. यापुढें ८।४ वर्षांत तो संघटना करील व मग त्याला तोंड देणें कठिण जाईल हें पुरें ओळखून जपान आजच यशस्वीपणें आपला डाव खेळत आहे.

### चीनची आशा

मांच्यूरियाचें नाममात्र स्वामित्व चीनकडे असलें तरी १९१५ च्या अटींप्रमाणें तेथील भूमिगत संपत्ति तो जपानला देऊन बसला आहे. जपान त्याचा पुरा फायदा घेत आहे. त्यानें तेथें सर्वत्र रेल्वेचें जाळें पसरलें आहे व तेथील सर्व व्यापार आपल्या आटोक्यांत आणला आहे. परंतु अशा रीतीनें आपल्या घरांत दुसऱ्यानें धनी म्हणून वावरावें ही गोष्ट जागृत झालेल्या चीनला सहन न होऊन त्यानें जपानी रेल्वेशीं चढाओढ करील असा आपला स्वतंत्र लोहमार्ग बांधला व त्याचा संबंध आपल्या स्वतःच्या मालकीच्या अशा एका नव्या बंदराशीं जोडला. ही गोष्ट अर्थातच जपानच्या व्यापाराला बाधक झाली व तेव्हांपासून वादाला खरा प्रारंभ झाला. द. मांच्यूरियामध्यें जपानच एकटा व्यापारी असला पाहिजे ही जपानची इच्छा. उलट आपणास अडचणींत गांठून जपाननें आपणाकडून नामुष्कीच्या अटी मान्य करवून घेतल्या म्हणून त्या मानण्यास आम्ही बांधले गेलों नाहीं व कोणतेंहि स्वाभिमानी राष्ट्र अशा अटी मान्य करणार नाहीं असें चीनचें म्हणणें. अर्थात हा वाद नुसत्या शाब्दिक समर्थनावर न. मिटतां तो मनगटाच्या जोरावर, रणभूमीवर रक्ताचे पाट वाहूनच मिटत असतो. तेंच प्रत्यंतर येथेंहि आलें. मांच्यूरियांतील राजकीय वातावरण चीनला प्रतिकूल असलें तरी एक गोष्ट त्याच्या पथ्याची आहे; व ती म्हणजे तेथील बहुसंख्य असलेली चिनी लोकवस्ती. पुढें मागें जपानचें उच्चाटन याच लोकांच्या बळावर चीनला करतां येणें शक्य आहे.

### अखेर विजयी कोण होणार ?

आज जपाननें चीनवर चालविलेल्या आक्रमणाच्या बुडाशीं वस्तुतः हें मांच्यूरियन प्रकरण आहे. परंतु तेथील आपलीं कारस्थानें इतर राष्ट्रांच्या डोळ्यांवर येऊं नयेत म्हणून शांघायवर चढाई करून मांच्यूरियन प्रकरणावर पडदा टाकण्याचा डाव जपान खेळत आहे. उलट चीननेंहि मांच्यूरियाला स्वातंत्र्य देऊन जपानला शह दिला आहे. परंतु लढ्याचा निर्णय अखेर रणभूमीच देणार हें निर्विवाद आहे. जपानसारख्या सुसंघटित राष्ट्राशीं टक्कर देण्याला जी एकजूट लागते ती आज चीनमध्यें नाहीं. मोठा वटवृक्ष खरा, परंतु त्याच्या शेंकडों पारंब्या जमिनींत घुसतात तेव्हांच प्रचंड झंझावात सुटला तरीहि तो त्याला दाद देत नाहीं. चीन देश विस्तृत, लोकसंख्या अफाट, लोकहि उद्यमशील या सर्व गोष्टी खऱ्या; परंतु त्या सर्वांना एकसूत्रांत गुंफणारी अशी बलिष्ठ मध्यवर्ती सत्ता नसल्यानें आज त्याला जपानच्या दटावणीस भ्यावें लागत आहे. हा सर्व प्रकार लक्षांत घेतला व एम्. ब्रियांद यांची पॅन–युरोपची कल्पना, त्याचप्रमाणें पॅन-आशियाची कल्पना, राष्ट्रसंघाची संस्थापना, निःशस्त्रीकरणाची बडबड या गोष्टी ऐकल्या म्हणजे तो केवळ शाब्दिक काथ्याकूट अगर महायुद्धानंतर आलेल्या स्मशान-वैराग्याची लहर असेंच कोणासहि वाटेल. अखेर जो देश सुसंघटित, सुसज्ज, स्वाभिमानी व स्वावलंबी असेल तोच या जीवनकलहांत विजयी होईल, ही एकच गोष्ट सत्य ठरते !

## ताजी बातमी

चितागांग येथील शस्त्रागारावर हल्ला केल्याबद्दल तीस इसमांवर १९ महिने खटला चालला होता. सदर खटल्याचा निकाल ता. १ रोजीं लागून (१) गणेश घोष (२) अनंत सिंह (३) लोकनाथ बाळ (४) आनंद गुप्त (५) फणींद्र नंदी (६) सुबोध चौधरी (७) सहायरामदास (८) लालमोहन सेन (९) फकीर सेन (१०) सुखेंदु दासीदार (११) सुबोध रॉय व (१२) रणधीरदास गुप्त यांना जन्मठेप काळ्यापाण्याची शिक्षा ठोठावण्यांत आली. शिवाय अनिलबंधु दास यांची तीन वर्षें बोरस्टल स्कूलमध्यें रवानगी झाली व नंदसिंह यास दोन वर्षांची स. म. कोर्टानें फर्माविली. बाकीच्या लोकांना निर्दोषी म्हणून मुक्त करण्यांत आलें. वरील आरोपींपैकीं नं. ९, ८, ११, १२ व १० यांची शिक्षा स्थानिक सरकारनें कमी करावी अशी स्पेशल ट्रायब्यूनलनें शिफारस केली आहे. खटल्यास किती खर्च आला हें बंगाल सरकार प्रसिद्ध करील काय ?

# बहिरंगाचा एक रंग; पण अन्तरंगाचे अनेक ढंग !

हिंदुस्थानसरकारच्या रेल्वे व व्यापार या खात्यांचे मंत्री सर जॉर्ज रेनी यांनीं रेल्वेचें बजेट दिल्लीस ले. असेंब्लींत ता. २५ रोजीं सादर केलें. सर जॉर्ज रेनी यांनी रेल्वेखात्याच्या मंत्रिपदावर पांच वर्षे घालविलीं आहेत व हिंदुस्थानांतील नोकरींत त्यांचीं तेहतीस वर्षे गेलीं आहेत. ते हिंदुस्थानांत आले त्या वेळीं त्यांच्या अंगाचा जो रंग होता तोच आज कायम आहे. पण त्यांच्या केसांचा रंग मात्र बदलला आहे. ते आले तेव्हां त्यांच्या केसांचा रंग काळ्यांत जमा होता तो आतां पांढऱ्यांत जमा झाला आहे. नोकरींत ज्यांच्या काळ्या केसांनीं पांढरा रंग धारण केला त्यांच्या बुद्धीनें व अन्तरंगानें किती ढंग आजवर खेळले असतील हें कोणीं सांगावें ? अशा मुरलेल्या मंत्र्यानें नोकरीच्या अखेरच्या पांच वर्षांत पांचदां बजेट मांडलें आहे. नोकरीचीं बाकीचीं वर्षे सोडून दिलीं तरी या पांच वर्षांत त्यांनीं असेंब्लींतील सभासदांच्या दोन किंवा कदाचित् तीनहि पिढ्या पाहिल्या आहेत. त्यांच्या इतकीच ज्यांचीं असेंब्लींत वर्षे गेलीं असे लोकनियुक्त सभासद आज त्या ठिकाणी हाताच्या बोटावर मोजण्याइतके सांपडतील कीं नाहीं याची शंकाच आहे.

बहुतेक सभासद असेच सांपडतील कीं पिढ्यांच्या मोजदादींत त्यांना सर जॉर्ज रेनी हे आजोबाच शोभतील. अशा पोक्त व अनुभवी अधिकाऱ्यानें यंदांचें बजेट मांडतांना कोणतें धोरण संभाळलें असेल याची अटकळ बांधणें कठिण नाहीं. त्यांतून त्यांचें हें शेवटचें वर्ष; त्यामुळें त्यांच्या बाह्य वर्तनांत शिष्टाचार, सहनुभूति, सौम्यपणा, सौजन्य आटोकाट भरलें असल्यास त्यांत नवल कसलें ? त्यांनीं बजेटाच्या मांडणींत गुदस्तांच्या सर्व आक्षेपकांचें म्हणणें ऐकून घेतल्यासारखें व समजल्यासारखें दाखविलें आहे. कोणीं म्हटलें खर्च फार वाढला आहे, त्यांत काटकसर केली पाहिजे, रेनींना ते कबूल; कोणीं सुचविलें, नुसत्या काटकसर कमिटीनें भागावयाचें नाहीं, तज्ज्ञांचीहि कमिटी पाहिजे. रेनींना तीहि कबूल; कोणीं प्रतिपादिलें शेतकऱ्याच्या भुसार मालाच्या वहातुकीसाठीं रेल्वेचें भाडें कमी झालें पाहिजे; रेनींना तें अमान्य नाहीं. काटकसरीच्या कात्रीनें गरीब नोकरांच्या लहान खिशांना मोठीं भोकें पडतात या हेतूनें त्यांजविषयीं कोणीं कळकळ दर्शविली; रेनी त्यांजबरोबरहि दुःखाचे दोन अश्रु ढाळण्यास तयार ! जगांत उन्हाळे—पावसाळे पुष्कळ पाहिलेला व टक्केटोणपे बरेच खाल्लेला मनुष्य आपला अभिमान पार गळाला आहे, आग्रह उरला नाहीं असें सर्वांच्या निदर्शनास आणीत असतो. त्याची बतावणी रेनी यांनीं आपल्या कारकीर्दीतील हें अखेरचें बजेट मांडतांना इतक्या चतुराईनें व खुबीनें केली कीं यंदांच्या तुटीच्या बजेटावरील भाषणाचा प्रारंभ त्यांच्या टीकाकारांनीं निंदेनें केला असला तर त्याचा शेवट स्तुतीनें केल्यावांचून त्यांच्यानें राहवलें नाहीं.

कित्येक पहेलवान मोठाल्या कुस्त्या मारणारे असतात असें नाहीं, पण त्यांचा खेळ पहाण्यासारखा असतो. तसा सर जॉर्ज रेनी यांनीं आपल्या बजेटाच्या आंकड्यांचा मांडलेला खेळ बघण्यासारखा आहे. लपंडावाचा खेळ व आंकड्यांचा खेळ जवळ जवळ सारखाच. लपंडावांत लपविलेली वस्तु सांपडूं द्यावयाची नसते. ती वस्तु एकजण लपवून ठेवण्यांत डोकें खर्च करतो व दुसरे ती हुडकून काढण्यांत आपली अक्कल लढवितात. रेनींनीं म्हणावें यंदां तूट आली ती व्यापारमंदीमुळें व इतरांनीं प्रतिपादावें, व्यापारमंदी असेली म्हणून काय झालें ? तुम्हीं मोठाल्या गोऱ्या नोकरांचे मोठाले पगार भरपूर काटले नाहींत त्यामुळें तूट आली. अशा आक्षेपकांनीं अंगलगट करून चालविलेल्या हिसकाहिसकीपासून रेनीसाहेब आपलें अंग शाबूत राखण्यांत गुंतले आहेत तों मुसलमानांनीं हातघाईला येऊन विचारावें, आमच्या मुसलमानबंधूंना पुरेशा नोकऱ्या कां दिल्या नाहींत त्याचें कारण आधीं सांगा; अस्पृश्यांच्या कैवाऱ्यांनीं हाताला हिसडा देऊन म्हणावें किती अस्पृश्यांना नोकरीवर घेतलें त्याचे आंकडे दाखवा; पण मुद्द्याच्या प्रश्नाशिवाय जातवारीचे जे क्षुल्लक प्रश्न त्यांचें निवारण, जेवावयाला बसलेला मनुष्य एका हातानें जेवीत असतो, तोंडानें 'गोविंद गोविंद' म्हणतो व दुसऱ्या हातानें माशा वारीत असतो त्याप्रमाणें, रेनी यांनीं लीलेनें करावें हें स्वाभाविक होय.

सर जॉर्ज रेनी यांच्या खेळांत जसा लपंडाव आहे तशी नजरबंदीहि आहे. पण तीं दोनहि त्यांस नीट साधलीं नाहींत हें त्यांचें कमनशीब होय. सर जॉर्ज रेनी यांनीं यंदांच्या बजेटांत १९३०-३१ सालचे जमाखर्चाचे जे आंकडे सांगितले आहेत ते त्यांस खात्रीनें भूषणावह नाहींत. कारण त्या सालीं व्यापारी व लष्करी रेल्वेवर ५। कोट रुपयांची तूट आली. रेल्वे खात्याकडून हिंदुस्थानसरकारच्या रेव्हिन्यू खात्यास वसूल म्हणून दरसाल कांहीं रक्कम द्यावी लागते. ती रेल्वेच्या भरभराटीच्या काळांत खर्च वजा जाऊन उरणाऱ्या शिलकेंतून भरणा करण्यांत येत असे. पण १९३० व ३१ सालीं शिल्लकच राहिली नाहीं तर रेनीसाहेब भरणा करणार कशांतून ! तेव्हां रेल्वे खात्यानें आपल्या रिझर्व्ह फंडांतून ११ कोटी रुपये काढून ते हिंदुस्थानाच्या जनरल रेव्हिन्यू खात्याला जमा केले. पण याचीहि रेनी फुशारकीच सांगतात. कां, त

म्हणे त्यांनीं आदल्या वर्षीं करून ठेवलेला अंदाज खरा ठरला म्हणून. खरें म्हटलें असतां याचा अंदाज त्यांना आधीं लागला होता तर त्यांनीं तूट भरून काढण्याची तजवीज करावयास नको होती काय ? त्या सालच्या दुरुस्त बिलांत त्यांनीं चालू खर्चाचा जो आंकडा निश्चित केला होता त्यापेक्षां एक कोटीनें सालअखेर खर्च जास्ती आला. याची मात्र त्यांनीं कोठें फुशारकी मारलेली दृष्टीस पडत नाहीं. कारण याहि बाबतींत 'माझें भविष्य मींच खोटें ठरविलें, पहा माझी कशी करामत आहे ती!' असें त्यांनीं म्हटलें असतें तर त्यांचें कोणीं काय केलें असतें ?

पुढें सन १९३१–३२ साल. मागील सालीं रेनीसाहेबांचे बहुतेक अंदाज खरे ठरले तर या सालीं ते खोटे ठरण्याची पाळी आली. तरी त्याबद्दल त्यांच्या मनाला कसली ती खंती वाटलेली दिसत नाहीं. व्यापार वाढेल म्हणून त्यांचें भविष्य होतें. पण व्यापारानें भविष्यास फसविलें. रेल्वेभाडें वाढल्यामुळें ३ कोटी रुपयांचें उत्पन्न जास्ती येईल व एकंदर ढोबळ उत्पन्न ६ कोटी रुपयांनीं चढेल हा त्यांचा कयास इतका फसला कीं ६ कोटी रुपयांनीं उत्पन्न वाढण्याऐवजीं तें ८ कोटींनीं कमीच झालें. म्हणजे त्यांच्या भविष्यांत व प्रत्यक्ष अनुभवांत १४ कोटी रुपयांचा फरका पडला. भविष्य चुकलें तरी किती चुकावयाचें ? चौदा कोटींनीं ? १९३०-३१ सालापेक्षां १९३१-३२ सालीं भविष्याच्या खरेपणाचें पाऊल पुढें पडावयाचें कीं मागें यावयाचें ! असला प्रगतिकारक मुलगा शाळेंत आढळला तर त्याच्या वर्गावरचे मास्तर त्याच्या प्रगतिपुस्तकांत 'मुलाचा अभ्यास वाईट आहे' असाच शेरा मारतील. मुलगा लहान म्हणून असा शेरा पाहूनहि पालक त्याची गय करतील. पण रेनीसारख्या बुढ्या व पेन्शनास टेकलेल्या माणसाची गय कोणी, कशी व कां करावी ?

यंदांच्या वर्षानें रेनीसाहेबांना अगदींच दगा दिला. या वर्षांत रेल्वे खात्याची सर्वच बाजूंनीं घसरगुंडी झाली. त्यांनीं भाडें वाढविलें तरी माणसांची व मालाची वाहतूक न वाढल्यामुळें त्यापासून होणारें उत्पन्न न वाढतां ८॥ टक्क्यांनीं कमी आलें. अशा स्थितींत अंदाजपत्रकामागून दुरुस्त–पत्रक तयार करतांना पुढीलप्रमाणें फरक पडला. अंदाजी जमा १०१ कोट रुपये होती, पण प्रत्यक्ष जमा ८६॥ कोटी हाताला लागली. खर्च ९८ कोटी व शिल्लक ३ कोटी धरली होती, त्याऐवजीं खर्च ९४ कोटी आला व ३ कोटींची शिल्लक न उरतां ७॥ कोटींची तूटच येऊन खऱ्या तुटीचा आंकडा १०॥ कोटींला गेला. त्यांतच लष्करी रेल्वेवरील दोन कोटींचें नुकसान भरीला घातल्यास तूट १२॥ कोटी होते. यामुळें काय घोटाळा झाला पहा. चालू खर्च भागून जी शिल्लक उरते तिच्यांतन रेल्वे खात्याला तीन खात्यांत रकमा टाकाव्या लागतात, एक हिंदुस्थानसरकारचें रेव्हिन्यू खातें; त्यास रेल्वेंत गुंतलेल्या कोट्यवधि रुपयांचें व्याज म्हणून सदर खातें दरसाल १टक्का व्याज देतें. त्याशिवाय रेल्वे खात्याची एक गंगाजळी असते व खेरीज मोडतोडीनें होणारी झीज भरून काढण्यासाठीं डिप्रिसिएशन फंड असतो. त्यांत रेल्वे खात्याच्या दरसाल कांहीं रकमा शिल्लक पडतात.

सन १९२२ पासून २९ पर्यंतचीं नऊ वर्षें रेल्वेला मोठी चलतीचीं गेलीं. त्यामुळें तीन वर्षांपूर्वीपर्यंत रेल्वे खात्याच्या गंगाजळींत १८॥ कोटी रुपये शिल्लक पडले व त्याखेरीज डिप्रिसिएशन फंड होताच. या सर्वांत रेल्वेकडून कोटींनीं मोजण्याजोग्या ज्या रकमा जात होत्या त्यांची भर घातली तर १२॥ कोटींचा तुटीचा आंकडा आणखी कित्येक कोटींनीं वाढवावा लागेल. पण यंदां वरील तीन प्रकारच्या रकमा देणें बाजूसच राहिलें; उलट रिझर्व्ह फंड व डिप्रिसिएशन फंड यांना या तुटीच्या खड्ड्यांत घालून तो भरून काढणें भाग पडलें आहे. सारांश, रिझर्व्ह फंडांत ५ कोटी रुपये उरले आहेत ते खलास होणारच ! शिवाय ४॥ कोटी रुपये डिप्रिसिएशन फंडांतून कर्ज काढन खर्चाची कशीबशी तोंडमिळवणी करण्यांत येणार. आणखी थोड्या वर्षांत हाहि फंड संपून गेला व उत्पन्न वाढलें नाहीं—व तें वाढणार नाहीं अशीच रेनी यांची अटकळ आहे—तर चालू खर्चाकरितां सरकार दरसाल कर्जच काढीत बसणार की काय हा प्रश्न आहे.

सन १९३२–३३ सालाचें अंदाजपत्रक तयार करतांना रेनीसाहेब बरेंच शहाणपण शिकलेले दिसतात. त्या वर्षाकरितां जमेचा आंकडा बेरमाप न धरतां तो ८८॥। कोटीच त्यांनीं धरला आहे व खर्च ९४। कोटींवर त्यांनी आणिला आहे. एक वर्षापूर्वीच्या अंदाजी उत्पन्नापेक्षां हें उत्पन्न अर्थातच १२। कोटींनीं कमी आहे हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. बरें, उत्पन्न इतकें कमी येणार तर खर्चहि त्याच्या आंतच आणावयास नको काय ? पण रेनीसाहेबांनीं तशी काटकसर न करतां उत्पन्नापेक्षां खर्च ५॥ कोटींनीं अधिकच ठेवला आहे. त्यांत पुनः लष्करी रेल्वेवरील तोट्याचे दोन कोटी रुपये. लष्करी रेल्वेवरील तोटा सहन करण्यास लष्करीखातें खबरदार असतां त्या तोट्याचा गठ्ठा व्यापारी रेल्वेच्या पाठीवर दरसाल कां ठेवण्यांत यावा हें समजत नाहीं. रिझर्व्ह फंड तर खलास झाला आहे. तेव्हां पुढील सालीं ७॥ कोटींचें कर्ज डिप्रिसिएशन फंडांतून काढून खात्याचा गुजारा करण्याचें रेनी यांनीं ठरविलें आहे.

रेनी यांनी आपल्या वरील धोरणाचें केलेले

समर्थन कोणासहि पटण्यासारखें नाहीं. ते म्हणतात कीं जीं वर्षे प्रातीच्या दृष्टीनें बरीं गेलीं त्यांत खात्यानें रिझर्व्ह फंड वाढविला. त्या फंडाचा हेतु तरी जेव्हां वाईट दिवस येतील तेव्हां तो खर्चाविषयास सांपडावा याशिवाय दुसरा कोणता होता ! त्याप्रमाणें सदर फंड अलीकडच्या दोनतीन वर्षांत कारणीं लागून संपला यांत कांहींच बिघडलें नाहीं. व्यापारमंदीनें हीं वर्षे अशीं खडतर लागलीं कीं त्यांची आगाऊ तरतूद करण्याची गोष्ट कोणाच्या ध्यानींमनींहि येण्यासारखी नव्हती. रेनी यांच्या या म्हणण्याचा झोक कोणाच्याहि लक्षांत आल्याशिवाय रहाणार नाहीं. त्यांच्या मतें काटकसरीनें हें संकट टळणारें नव्हे; झाली ही काटकसर पुष्कळ झाली, यापेक्षां अधिक काटकसर होणार नाहीं. व ती करणें रेल्वेचा कारभार चोख चालण्याच्या दृष्टीनें श्रेयस्करहि नाहीं. मग यावर उपाय काय? असें कोणी विचारल्यास त्यांनीं जें उत्तर तयार करून ठेवलें आहे ते त्यांच्या म्हातारपणास शोभणारें असेल; पण खात्याच्या मुख्य अधिकाऱ्यास खचित कमीपणा आणणारें आहे. रेनीसाहेब या कामांत अगदींच निराश झाले आहेत. ते मंदीच्या संकटास शरण गेले आहेत. 'जग अवाढव्य आहे; त्याचें रक्षण करणारा ईश्वर समर्थ आहे. तो लीलामात्रेंकरून जगाचीं सूत्रें चालवीत असतो. त्यानें जगताचा नाश करण्याचें मनांत आणिलें असलें तर पामर अशा मानवानें आपली अक्कल काय चालवावयाची ! संकटाच्या या फेऱ्यांत जें जगाचें होईल तेंच हिंदुस्थानाचें. हिंदी लोकांनीं त्याविषयीं कांहींहि खेद न मानतां जें जें होईल तें तें पाहावें हेंच योग्य.' रेनीसाहेबांच्या विचारांची ही दिशा थेट हिंदु लोकांसारखी आहे. त्यांनीं हिंदुस्थानांत आयुष्याचीं तीसबत्तीस वर्षे काढल्यानें हिंदूंच्या वेदान्ताचा त्यांच्या मनावर चांगलाच पगडा बसलेला दिसतो. त्यांनीं काशीस किंवा कांचीस जाऊन एखाद्या हिंदु संन्याशाला अथवा साधूला तर गुरु केलें नाहींना ?

त्यांच्या मतें जरी असें सारें बिघडलें आहे तरी त्या बाबतींत त्यांचा आग्रह नाहीं, दुरभिमान नाहीं, हेका नाहीं, स्वतःच्या शहाणपणाची घमेंड नाहीं किंवा दुसऱ्याच्या उपदेशाचा अनादर नाहीं. जसें चार लोक सांगतील त्याप्रमाणें वागण्याला त्यांची ना नाहीं असाच बहाणा ते करीत आहेत. त्यांनीं रेल्वेवरील माणसांचें व मालाचें भाडें चढविलें आहे, व कोळशावरील आकार वाढविला आहे; त्यामुळें पुढील वर्षांत एक कोटीचें उत्पन्न अधिक येईल. नोकरांचे पगार कापले आहेत; त्यामुळें १॥ कोटीचा खर्च कमी येईल. खेरीज इतर खर्चांत पन्नास लक्ष रुपयांची बचत त्यांनीं केली आहे व नवीं मोठीं कामें बंद ठेवलीं आहेत आणि कनिष्ठ प्रतीच्या नोकर लोकांची स्थिति सुधारण्याचे मार्गहि खुंटविले आहेत. शेतकीचा माल एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं नेऊन विकण्यास दराच्या सवलती द्याव्या असें कोणी म्हणतात, त्याप्रमाणें गव्हावरील भाड्यांत त्यांनीं कराची व कलकत्ता येथें फरक करून पाहिला पण तो यशस्वी न झाल्यामुळें इतर मालाला तशा सवलती देण्याचें त्यांनीं बंद केलें आहे. अशा रीतीनें सगळ्या गोष्टींचा आनंदीआनंद आहे !

गतवर्षी रा. षण्मुखं चेट्टी यांच्या अध्यक्षतेखालीं काटकसर कमिटी नेमण्यांत आली होती. पण तिच्या पायीं हजारों रुपये खर्च झाला. तरी तेवढयानें भागलें नाहीं म्हणून यंदांच्या वर्षी लाखों रुपये खर्च करून एक तज्ज्ञांची कमिटी नेमण्याचा सर जॉर्ज रेनी यांचा विचार होता. त्यासाठीं त्यांनीं युरोपांत तज्ज्ञांचा शोधहि केला. परंतु त्यांपैकीं कोणीहि इकडे येण्यास मोकळा नसल्यामुळें रेनीसाहेबांचा नाइलाज झाला. तथापि त्यांनीं या कामीं आपला धीर मुळींच खचूं दिलेला नाहीं. पुढच्या वर्षी ते कमिटी नेमणार आहेत व तिजकरितां लाखों रुपये खर्च करणार आहेत. काटकसरीनें खर्च कमी करण्याकरितां ते इतका खर्च जास्ती करण्यास तयार आहेत यापेक्षां हिंदी लोकांना अधिक समाधानकारक गोष्ट दुसरी कोणती आहे ?

काटकसर कमिटी नेमणें म्हणजे रोग्यानें आपली प्रकृति भिषग्वराच्या ताब्यांत देण्यासारखें आहे. पण भिषग्वरानें रोगनिदान ठरवून चिकित्सा केली व अनुपान सांगितलें तरी रोग्यानें दिलेलें औषध पथ्यपाणी संभाळून घ्यावयास नको काय ? रेल्वेचा रोगी असा आहे कीं तो वैद्याचीच परीक्षा घेत बसतो. शिक्षकाची परीक्षा विद्यार्थ्यानें घ्यावी त्यांतलीच ही तऱ्हा. पुष्कळदां असें होतें कीं विद्यार्थी मास्तरापेक्षांहि वयानें मोठा असला म्हणजे मास्तरानें दिलेले धडे पाठ करण्याऐवजीं उलट मास्तरलाच दोन गोष्टी शिकविण्याचा आव तो आणतो. हिंदुस्थानांत नेमलेल्या काटकसर कमिट्यांचें असेंच होतें. त्यांनीं दिलेलें गोड औषध सरकार पोटांत घेतें व कडू औषध थुंकून टाकतें. यामुळें रोगाबरोबरच औषधाचेंहि बिल वाढत जातें. रोग बरा करण्याची ही रीत विलायती नव्हे काय ? असला उपाय करण्यासाठींच रेनीसाहेब विलायतेहून डॉक्टरांना इकडे बोलावणार असल्यास त्यांना हात जोडून माफ करा पण तेवढें करूं नका असेंच सांगणें योग्य होईल.

कारण चेट्टी यांच्या काटकसर कमिटीनें सुमारें ८ कोटींची कसर सुचविली होती व पगारांची कपात लहानमोठ्या पगाराच्या मानानें ३॥ टक्क्यांपासून २० टक्क्यांपर्यंत ।सांगितली होती. त्यांची

वासलात रेल्वे बोर्डानें अगदींच असमाधानकारक रीतीनें लावली. काटकसर कमिटीनें कोणत्या सूचना केल्या होत्या व त्या आपण कितीशा अमलांत आणल्या याचा तक्ता रेल्वे-बोर्डानें प्रसिद्ध केला आहे. कौन्सिल-असेंब्लींत आमदार-खासदारांनी विचारलेल्या प्रश्नांना दिवाण-मंत्र्याकडून ज्या मासल्याची उत्तरें मिळतात त्याच मासल्याची रेल्वे बोर्डानें दिलेली उत्तरें सदर तक्त्यांत छापलीं आहेत. कांहीं किरकोळ सूचना अमलांत आल्या आहेत पण बाकीच्यांना 'विचार चालू केला आहे, विचार करण्याचें सोडून दिलें आहे, बोर्डाचें हें धोरणच आहे, अशा प्रकारच्या गंध, अक्षता व फुलें वाहण्यांत आलीं आहेत. कमिटीची एक सूचना अशी होती कीं, सबॉर्डिनेट सर्व्हिसमधील लोकांना इकडेच शिक्षण देऊन विलायतेहून होणारी भरती थांबवावी. या कमिटीच्या सूचनेस 'हें आमचें धोरणच आहे' अशा मिळालेल्या उत्तरावरून विचारणारानें काय समजावें? कमिटीनें अधिकाऱ्यांच्या पगारावर ४ लक्ष ८० हजार रुपये खर्च व्हावे असें म्हटलें होतें. बोर्डानें सांगितलें कीं, ५ लक्ष २० हजार रुपये हाच खर्च मुळीं कमी करून उरलेला आहे. अशा स्थितींत कमिटीच्या शिफारशींची शोभा काय राहिली? काटकसर हाच पहिला, हाच मधला व हाच शेवटचा इलाज आहे हे आजच न ओळखतां रेनीसाहेबांप्रमाणें नशिबावर हवाला ठेवला त्यांत त्यांची कर्तृत्वशून्यताच सिद्ध झाली. सर जॉर्ज रेनी आपले पांच वर्षांतील ढंग संपवून आतां लवकरच पडद्याआड होत आहेत हें बरेंच आहे. कारण त्यांच्यामागून येणाऱ्या मंत्र्यांत जर कांहीं कर्तृत्व असेल तर तें त्यांस दाखवावयास तरी सांपडेल.

# जर्मनीची राज्यपद्धति

जर्मनीची हल्लींची घटना १९१९ च्या ऑगस्टमध्यें बनविण्यांत आली. तिच्या पहिल्या परिच्छेदांतच असें म्हटलें आहे कीं, प्रत्येक बाबतींत लोकांचें हित पाहण्यांत येईल व सर्वश्रेष्ठ सत्ता प्रजेच्या हातीं राहील, सर्व स्त्री-पुरुषांना या घटनेप्रमाणें समान लेखण्यांत येईल. कुलाच्या उच्चनीचतेवर विशिष्ट हक्काची संपादणी कोणासहि करतां येणार नाहीं व त्याच कारणामुळें या घटनेनें मान्य केलेले कोणतेहि अधिकार हिरावून घेतां येणार नाहींत. जर्मन सरकार मानाच्या पदव्या देणार नाहीं. कोणाहि जर्मन रहिवाशानें परकीय सरकारनें दिलेल्या पदवीचा स्वीकार करूं नये. यामध्यें विद्यापीठाच्या पदव्यांचा समावेश होत नाहीं.

जर्मनीच्या कोणत्याहि भागांत वसाहत करून राहण्याचा प्रत्येक रहिवाशास अधिकार आहे. तेथें त्यांनीं जमीन संपादावी अगर कोणत्याहि धंद्यानें उपजीविका करावी, या बाबतींत बंधनें घालण्याचा जर्मन सरकारला अधिकार आहे. परस्थ जर्मन रहिवाशांना जर्मनीचें संरक्षण मिळण्याचा अधिकार आहे व कोणत्याहि रहिवाशाला त्याचा खटला चालण्याकरितां अगर शिक्षा देण्याकरतां परकीय सरकारचे हवालीं करतां येत नाहीं.

## नागरिकांचें स्वातंत्र्य

रहिवासी म्हणून जर्मनीमध्यें राहणाऱ्या पण परकीय भाषा बोलणाऱ्यांना आपल्या शिक्षणांत स्वतःची मातृभाषा माध्यम म्हणून वापरतां येईल. कायदेशीर कारणाशिवाय कोणाहि रहिवाशाच्या व्यक्ति-स्वातंत्र्यावर गदा येणार नाहीं व तसा प्रसंग आलाच तर आपली बाजू मांडण्याची व न्याय मागण्याची संधि प्रत्येकास देण्यांत येईल. कायद्यानें गुन्हा न मानलेल्या एखाद्या कृत्यास शिक्षा देतां येणार नाहीं. व्यक्तिस्वातंत्र्यांतच भाषणस्वातंत्र्याचा समावेश होतो. या अधिकाराला अनुसरून व कायद्याची बंधनें पाळून आपलीं मतें बोलून, लिहून, छापून अगर चित्ररूपानें प्रकट करण्यास प्रत्येकास पूर्ण स्वातंत्र्य आहे. या हक्कावर कोणताहि आळा घालतां येणार नाहीं. पण समाजस्वास्थ्यविघातक असें अश्लील व गर्ह्य वाङ्मय चित्रपट व बोलपट यांना कायद्यानें बंदी करण्याचा अधिकार लोकसभेस आहे. जर्मनीमध्यें प्रत्येकाचें घर हें पवित्र मंदिर समजलें जाईल व तेथें कोणत्याहि प्रकारचा भ्रष्टाकार होणार नाहीं अशी खबरदारी घेतली जाईल.

## वैवाहिक जीवन व मातृपद

विवाहाचे बाबतींत स्त्रीपुरुषांना समान हक्क आहेत. व्यक्तींचें कल्याण व शारीरिक स्वास्थ्य यांची काळजी राष्ट्रीय सरकार व स्थानिक अधिकारी यांनी घ्यावयाची आहे. वाढत्या मुलांच्या कुटुंब-पोषणाची जबाबदारी सरकारवर असून अशा कुटुंबांना सरकारकडून मदत मागण्याचा अधिकार आहे. प्रत्येक मातेच्या संरक्षणाची जबाबदारी राष्ट्रानें आपल्या शिरावर घेतली आहे. नवीन पिढीच्या शारीरिक, मानसिक व सामाजिक शक्तींचा विकास करणें हें मातापितरांचें कर्तव्य आहे व तें कर्तव्य पार पाडण्यास त्यांना समर्थ करण्याचें काम जर्मन सरकारनें करावयाचें आहे. कायदेशीर संततीइतकेंच

बेकायदेशीर संततीचें योग्य नियमन होत आहे कीं नाहीं हें जर्मन सरकार काळजीपूर्वक पाहत असतें.

### धार्मिक धोरण

प्रत्येकास स्वतःच्या इच्छेनुरूप कोणताहि धर्म अगर धर्मपंथ स्वीकारतां येईल. स्वतःच्या बुद्धीच्या कलाप्रमाणें वागण्यास अडथळा येणार नाहीं अशी सरकार हमी घेतें. व्यक्तीच्या धार्मिक मतावर त्याचे इतर कसलेहि हक्क अवलंबून नाहींत. म्हणजेच धार्मिक मतें नोकरी मिळण्याच्या अगर राजकीय हक्क मिळण्याच्या आड येत नाहींत. धार्मिक मताच्या ज्ञानावर ज्या वेळी विशिष्ट हक्क मिळणें अवलंबून असतें अगर ज्या वेळीं देशांतील धर्म-पंथाची माहिती गोळा करण्यांत येते त्याच वेळीं फक्त व्यक्तीच्या धर्मपंथाची चौकशी करतां येते. सरकारी असें प्रार्थना-मंदिर असणार नाहीं व तेथील लोकांनीं अमुक एक धार्मिक आचार पाळलेच पाहिजेत असा त्यांच्यावर जोर करतां येत नाहीं. लष्करांतील सैनिकांना धार्मिक आचरण करण्यास मोकळा वेळ देण्यांत येईल. प्रत्येक धार्मिक संस्था जर्मन सरकारचे संरक्षणास पात्र असून स्वतःच अंतर्गत व्यवस्थेच्या बाबतींत पूर्णपणें स्वतंत्र आहे. सर्व धार्मिक संस्था समान दर्जाच्या असून त्यांना आपला एक संघ बनविण्याची मुभा आहे. व या संघांना कांहीं मर्यादेपर्यंत लोकांवर कर बसविण्याची मोकळीक आहे. तत्त्वज्ञानप्रसारक संस्थांचा दर्जा धार्मिक संस्थांच्या बरोबरीचा समजण्यांत येईल व अशा सर्व संस्थांची मालमत्ता संरक्षण करण्याचें काम सरकारचें आहे. चालत आलेले सण पुढेंहि पाळण्यांत येतील. अशा संस्थांना धार्मिक प्रचारार्थ अगर लोकहितार्थ कामें करण्याकरितां लष्कर, दवाखाने, तुरुंग वगैरे ठिकाणीं प्रवेश मिळू शकेल.

### लायकीप्रमाणें नोकऱ्या

सर्व नोकऱ्यांवर सर्वांचा सारखा हक्क असून खासगी गोष्टींची तपासणी करण्याचा अधिकार अधिकारी वर्गास आहे. नोकऱ्या मिळण्याचे बाबतींत कोणत्याहि प्रकारची जातवारी आड येणार नाहीं. लष्करांतील सैनिकांना स्वहक्कांचें संरक्षण व आर्थिक बाबतींतील आपल्या तक्रारी दूर करून घेण्याचे उपाय यांची सरकारच त्यांना खातरजमा करून देते. अधिकारी वर्ग हा राष्ट्राचा नोकर असून एखाद्या पक्षाचा नोकर समजला जाणार नाहीं पक्षपालटानें त्याच्या कर्तव्यांत पालट पडणार नाहीं. तेथील सर्व नोकरांना स्वमतप्रदर्शनाचे बाबतींत पूर्ण स्वातंत्र्य असून त्यांना वाटेल त्या पंथाचे सभासद होतां येतें. लष्कराची घटना लष्करी कायद्यान्वयें करण्यांत आली आहे. सैनिकांनीं आपलीं कर्तव्यें पार पाडावींत म्हणून त्यांना दिलेल्या कांहीं हक्कांचा या कायद्यांत उल्लेख करण्यांत आला आहे.

### शिक्षण व सरकारची जबाबदारी

कोठल्याहि सरकाराचें मुख्य कर्तव्य जें शिक्षण त्या बाबतींत तर जर्मन सरकारनें फारच चांगली व्यवस्था केली आहे. वाङ्मय व शास्त्र यांचें शिक्षण मोफत देण्यांत येतें.प्राथमिक शिक्षण सक्तीचें व मोफत आहे. १८ वर्षांपर्यंतच्या शाळाशिक्षणाची व्यवस्था करण्यांत आली आहे सर्व शिक्षणसंस्थांची घटना संयुक्त स्वरूपाची आहे व त्यायोगानें सर्व राष्ट्रांतील शिक्षणाचा दर्जा सारखा राहतो हा फायदा आहे. शिक्षणाचें अधिष्ठान निरनिराळे उद्योगधंदे हे आहेत. मुलांना शिक्षणसंस्थेंत त्यांची नैसर्गिक प्रवृत्ति पाहून घेण्यांत येतें. पालकांच्या खर्चाचा वकूब पाहून नव्हे ! मध्यम वर्गातील लोकांनाहि आपल्या मुलांना दुय्यम व उच्च शिक्षण घेतां यावें अशी राष्ट्रीय सरकार, " सार्वजनिक " (Public School) शाळा व स्थानिक अधिकारी हे एक-मेकांच्या सहकार्यानें व्यवस्था करतातच. योग्य विद्यार्थ्यांच्या पालकांना शिक्षण-साहाय्यक म्हणून पैसे मिळतात.

" सार्वजनिक " संस्थाइतक्याच चांगल्या खाजगी शिक्षणसंस्था असतील तरच त्या चालू देतात. अशा शाळांतून शिक्षकवर्ग चांगला असल्या-बद्दल खात्री करून घेण्यांत येते. शिवाय शिक्षकांचा आर्थिक दर्जा चांगला राहील अशीहि हमी या संस्थांनीं द्यावी लागते. एकंदर राष्ट्रांतील शिक्षकांचें शिक्षण सारख्या दर्जाचें असतें यामुळें शिक्षणाची प्रगति राष्ट्रांत सगळीकडे सारखीच होते. शिक्षकांचा दर्जा सरकारी अधिकाऱ्यांच्या बरोबरीचा समजला जातो. खाजगी संस्थांतून विद्यार्थ्यांमध्यें गरीब-श्रीमंतांना सारख्याच प्रकारचें शिक्षण घेतां येईल अशी या संस्थांनीं खातरजमा करून देणें जरूर असतें व अशा संस्था जेथें अल्पसंख्याकांचे धर्मास अनुसरून शिक्षण देणारी सार्वजनिक संस्था नसते अगर तशा संस्थांचीच जरूर असते अशा ठिकाणीं काढून देतात.

### आर्थिक बाबी

आर्थिक बाबतींत जर्मनीमध्यें न्याय व पैशा-करितां मनुष्याचा यज्ञ न करणें या दोन तत्त्वांचा पुरस्कार करण्यांत आला आहे. प्रत्येक मनुष्यालाहि उत्तम तऱ्हेनें जगतां आलें पाहिजे या तत्त्वानुसार वैयक्तिक धन संपादण्याला स्वातंत्र्य ठेवण्यांत आलें आहे. कोणालाहि कोणताहि धंदा करण्याची मुभा आहे.

नैतिक दृष्ट्या दुष्ट असे कर्जरोखे, करार, अगर जबर व्याज यांना कायद्यानें बंदी करण्यांत आली आहे.

### मजूरवर्गाची व्यवस्था

मजूरवर्गाच्या व्यवस्थेवर सरकारचें नियंत्रण असून त्यांनीं या बाबतींत एक कायदा केला आहे. मजुरांचें पोषण व सुधारणा करण्याकरितां संघ स्थापन करण्याची त्यांना पूर्ण मोकळीक आहे.

मजुरांच्या आरोग्याचा विमा उतरण्याची योजना करण्यांत आली आहे. यायोगानें स्त्रियांच्या बाळंतपणाची सोय, वृद्धांची वृद्धापकाळाची चिंता व आयुष्यांत येणारी संकटें यांची आगाऊ तरतूद करण्यांत येते. राष्ट्राच्या उन्नतीला स्वतःच्या शक्तीचा उपयोग करणें प्रत्येकाचें कर्तव्य आहे. तसेंच प्रत्येक जर्मन मनुष्यास उपजीविकेचें साधन निर्माण करून देणें हें सरकारचें कांम आहे. त्याच-प्रमाणें मध्यम वर्गाची स्थिति निकृष्ट न होतां त्यांच्या हितसंबंधाचें रक्षण करण्याची घटनेंत तरतूद आहे. मजूर व भांडवलवाले यांनीं मजुरांच्या पगाराचा प्रश्न परस्परांच्या सहकार्यानें सोडविण्याची दोघांवरच जबाबदारी आहे. दोघांनीं केलेली घटना व योजना ही सरकारनें मान्य करावयाची आहे.

जर्मन घटनेंतील कांहीं मुख्य बाबींचा वर थोडक्यांत ऊहापोह केला आहे. याच घटनेच्या साह्यावर हतबल झालेला जर्मनी अवघ्या दहाबारा वर्षांचे आंत पुनः सर्व जगांत बलिष्ठ होण्याच्या मार्गाला लागला आहे, हें लक्षांत ठेवलें पाहिजे.

# होअर साहेब व दडपशाही

### पार्लमेंटांतील वादविवाद

ता. २९ रोजीं भारतमंत्री सर सॅम्युअल होअर यांनीं कॉमन्स सभेंत इंडिया ऑफिसचें अंदाजपत्रक दाखल केलें. त्या वेळीं त्यांनीं मोठें भाषण करून हिंदुस्थानांतील चळवळीचा आढावा घेतला. "पंधरा दिवसांपूर्वीं 'निळ्या बुकां'त मीं हिंदुस्थानांतील चळवळींचें सिंहावलोकन सविस्तरपणें केलें आहे" असें सांगून ते म्हणाले,

### मूठभर लोकांची चळवळ

" चळवळ सुरू करण्याचें खापर कॉंग्रेसच्याच माथीं फुटतें. तिचे कार्यकर्ते तहाच्या वेळीं देखील युद्धाचें वातावरण तयार करीत होते. त्यांच्या विरुद्ध सरकारानें जें धोरण स्वीकारलें आहे त्या-शिवाय दुसरा मार्ग कोणत्याच सरकारानें स्वीकारला नसता. कारण साक्षात् राजसत्तेच्या जीवितावरच ही चळवळ उठलेली आहे. ती साऱ्या हिंदुस्थानानें हातांत घेतलेली नाहीं; केवळ मूठभर अशा एका कंपूचें तें कर्तृत्व आहे. तें दडपून टाकण्यासाठीं आम्हांला विशेष सामर्थ्य प्रगट करावें लागत आहे. पण सरकार जादा अधिकारांचा दुरुपयोग कधींहि करीत नाहीं.हिंदुस्थानांतून परदेशांतील प्रतिष्ठित वर्तमानपत्रांना बातम्या पाठविण्यावर आम्हीं नियंत्रण घातलेलें नाहीं. हिंदुस्थानांतील वृत्तपत्रांना आम्हीं लगाम घातला आहे, पण तो मुद्रण—स्वातंत्र्याची गळचेपी करण्यासाठीं नव्हे, तर अत्याचार व अस्वस्थता यांना उत्तेजन मिळूं नये म्हणून. पोलिसांच्या अत्याचारांचीं जीं भडक वर्णनें वर्तमानपत्रांत येतात तीं सारीं खोट्या बातम्यांची माळ असते. मि. गॉर्डन यांनीं केलेल्या बांर्डोली चौकशीची हीच फलश्रुति आहे. लाहोरच्या एका पत्रानें तर बेधडक असें छापलें कीं, कोहटजवळ एके दिवशीं ४८१ लाल डगलेवाले ठार व ६५१ जण घायाळ करण्यांत आले. यांत सत्य एवढेंच होतें कीं, १४ ठार व २८ जखमी झाले होते, व हें सरकारनें प्रसिद्धहि केलें होतें. पराचा कावळा कसा होतो तो पहा.

### सर्वत्र आलबेल आहे

" दडपशाही करतांना सर्व अधिकाऱ्यांनीं सावधगिरी बाळगावी व शांतपणा ठेवावा असे हुकूम ता. ८ फेब्रुवारी रोजीं व्हाइसरॉयांनीं प्रांतिक सरकारांना पाठविले आहेत. कोठें जुलूम झाल्याची वर्दी आल्यास त्याची दाद घ्यावी असेंहि त्यांना कळविलें आहे. दडपशाही जरूर आहे असें मत मुत्सद्दी, व्यापारी वगैरेंच्या शिष्टमंडळांनीं प्रगट केलें असून त्याविरुद्ध निंदाव्यंजक ठराव असेंब्लींत काय, किंवा प्रांतिक कौन्सिलांत काय, कोठेंच मंजूर झालेला नाहीं! बंगालमधील कॉंग्रेसच्या कांहीं कार्यकर्त्यांचा हात तर अत्याचारी चळवळींत गोमुखींतून शिरलेला आहे. गेल्या थोड्या महिन्यांत खुनाचे प्रयत्न १९ झाले; आणि त्यांत मुलींहि भाग घेऊं लागल्या आहेत हा विशेष. म्हणून आम्हीं उग्र स्वरूप धरलें आणि आतां त्याचा सुपरिणाम दिसून येत आहे. सरहद्दीवरील 'लाल डगलेवाल्यांची' संघटना ढासळून पडत आहे आणि तेथील लोकांचें मत बदलून त्यांनी शत्रुत्व टाकलें आहे व सहकार्य सुरू केलें आहे. संयुक्त प्रांतांतील करबंदीची चळवळ बंदच झालेली आहे. इतरत्रहि आलबेल आहे. या यशाला गालबोटें काय तीं दोन. एक, बंगाल्यांतील अत्याचाराचें यंत्र उखडलें गेलें नाहीं; आणि दुसरें, मुंबईतील निरोधन व बहिष्कार यांची उचलबांगडी झालेली नाहीं. पण तीं लवकरच होईल अशी मला आशा आहे.

**साऱ्या जगांत हिंदुस्थान सुखी !**

"जातिविषयक तंटे व आर्थिक दुःस्थिति हीं दोन संकटें हिंदुस्थानाला सध्यां ग्राशीत आहेत. अल्पसंख्याकांनीं आमच्यावर विश्वास ठेवावा. त्यांतल्या-त्यांत मुसलमान राजनिष्ठेमुळें असहकारितेपासून अलिप्त राहले हें आमच्या लक्षांत आहे. आम्ही आमच्या कर्तव्याला चुकणार नाहीं. आर्थिक स्थितिहि सुधारत आहे. पदार्थांच्या किंमती चढत आहेत. तीन कोटि चौरस वार कापड इंग्लंडमधून हिंदुस्थानांत जानेवारीमध्यें गेलें. हा आंकडा डिसेंबरापेक्षां १२० लक्ष व गेल्या जानेवारीपेक्षां ९० लक्ष चौरस वारांनीं अधिक आहे. सरकारी अंदाजपत्रकें तुटीचीं असलीं तरी एकंदरींत जगांतील कोणत्याहि सरकारापेक्षां हिंदुस्थान सरकारची सांपत्तिक स्थिति चांगली आहे आणि ती सुधारतांहि आहे. रुपया पौंडाशीं जोडल्यामुळें फार फायदा झाला आहे. साडेतीन कोटि पौंडापेक्षां अधिक किंमतीचें सोनें हिंदुस्थानांतून रवाना झालें; आणि अजूनहि ती निर्यात चालूच आहे. कांहीं एक उसनवारी न करतां कांहीं दिवसांपूर्वी हिं. सरकारानें दीड कोटी पौंडांचें कर्ज निवारलें हें लक्षांत घ्या. हें जगाच्या पाठीवरील दुसऱ्या कोणत्या देशांतील सरकारला साधलें आहे ?"

**'कुत्रीं व काफिला'**

यानंतर मि. लॅन्सबरी यांनीं विचारलेल्या प्रश्नाला उत्तर देतांना सर होअर म्हणाले, "आमचे जादा अधिकार म्हणजे लोकांच्या सहकार्याची समाप्ती असा अर्थ नव्हे. इंग्लड व हिंदुस्थान यांत युद्ध सुरू झाल्याचें तें द्योतक नाहीं. ब्रि. सरकार व हिंदी जनतेच्या राजकीय आकांक्षा यांत खटका उडाला आहे असाहि त्यांचा अर्थ नाहीं. बेबंदशाही, अस्वस्थता व क्रांति याविरुद्ध सरकारनें चालविलेली ती मोहीम आहे एवढेच. आमचें सुधारणांचें कार्य पुढें चालू राहाणारच. आमच्या मार्गांत अडथळे आणील, तो गुन्हेगार ठरेल." मि. जोन्स यांनीं टीका केली कीं, "कुत्रीं भुंकलीं तरी काफिला पुढें जातोच" असे उद्गार भारतमंत्र्यांनीं काढले, ते बरे नाहींत. त्याच सरकाराच्या साहाय्यकांनींहि निषेध केला आहे. पं. मालवीय यांनीं ११०० शब्दांची तार मला केली असतां ती अडविण्यांत आली. मिस स्लेड यांच्याहि तारेची तीच वाट ! निदान पार्लमेंटच्या सभासदांना तरी सारी हकीकत कळण्याचा व त्यांच्या सर्व तारा पोंचत्या होण्याचा हक्क आहे.' या मुद्यावर खूप भवति-न-भवति झाली, व तसा विशेष हक्क नाहीं असें ठरलें !

दडपशाहीबद्दल मि. जोन्स म्हणाले, "मद्रासचे मिशनरी मि. पेटन यांना नाहक मार बसला. खेडा जिल्ह्यांतील एका गांवच्या माणसांना तळ्यांतील पाण्यामध्यें तब्बल दोन तास हातापायावर उभे करण्यांत येऊन चोपण्यांत आलें ! असे जुलमी प्रकार नित्याचे आहेत असें सिद्ध करणारा पुरावा माझेजवळ आहे !" या विधानांमुळें सभासदांत विलक्षण खळबळ उडाली. पण मि. जॉफ्रे लॉईड यांनीं भाकित केलें कीं, 'जोंपर्यंत सर होअर हे भारतमंत्र्याच्या गादीवर आहेत तोंपर्यंत हिंदुस्थानाचा कारभार कौशल्यानें चालेल यांत शंका नाहीं.' मेजर ॲटली यांनीं इषारा दिला कीं, "आजपर्यंत हिंदुस्थानाच्या व्यापाराचा ब्रिटिशांच्या हितासाठीं बळी देण्यांत आला. कॉंग्रेसला चिरडून टाकूं म्हणाल तर तिच्या झेंड्याखालीं उभा राहून सारा हिंदुस्थान तुम्हाला सामना देईल." सर स्माइल्स यांनीं कुरकूर केली कीं, मुंबई म्यु.नें ब्रिटिश मालावर बहिष्कार पुकारला आहे हें बरें नव्हे. तुरुंगांतील पुढाऱ्यांबरोबर तहाची वाटाघाट करणार नाहीं अशी हमी मेजर कॅडोगन यांनीं मागितली ! शेवटीं होअर यांनीं समारोप केला कीं, "गोलमेज कमिट्यांशीं प्रमुख हिंदी माणसें सहकार्य करीत आहेत व सुधारणांचें काम पुढे अबाधितपणें चाललें आहे." प्रश्नोत्तराचे वेळीं त्यांनीं सांगितलें कीं, मि. पेटन यांजसंबंधीं मी हिं. सरकाराशी पत्रव्यवहार चालू केला आहे.

# कुडचीच्या जैन-मुसलमानांमधील तंटा

बेळगांव जिल्ह्यांत कुडची या गांवीं मुसलमानांनीं तेथील जैन लोकांवर स. १९२९ सालीं केलेल्या अत्याचारांची माहिती केसरींत त्या वेळीं दिलेलीच आहे. त्या वेळीं मुसलमानांनीं केलेल्या अत्याचारांची चौकशी करण्यासाठीं—जैन युवक संघातर्फे एक कमिटी नेमण्यांत आली होती. त्या कमिटीनें आपला अहवाल साक्षीपुराव्यासह प्रसिद्ध केला होता. परंतु मुंबई—सरकारनें तो अहवालच जप्त केला !

पुढे १९३१ सालीं मुसलमानांनीं पुनः पुंडावा सुरू केला, तेव्हां महाराष्ट्र दिगंबर जैन सभेचे अध्यक्ष दिवाणबहादुर लठ्ठे यांच्या मध्यस्थीनें तेथील जैन–मुसलमानांत पुढील तडजोड ठरली:—

(अ) मूळच्या जैनमंदिरांतील मूर्तीचा भंग केला व मंदिर भ्रष्ट केलें, तेव्हां तें जैन-मंदिर म्हणून यापुढें समजूं नये.

(आ) दुसऱ्या जागीं नवें जैन—मंदिर एक वर्षांत बांधावें.

वरील तडजोडीप्रमाणें व बेळगांवच्या कलेक्टर-साहेबांची मंजुरी घेऊन जैनांनीं मंदिर बांधण्यास सुरुवात केली. पण ही गोष्ट मुसलमानांस आवडली नाहीं. परंतु जैनांनीं कराराप्रमाणें मंदिर बांधण्यासाठीं पाया खोदण्याचें काम सुरू केलें. या गोष्टीमुळें मुसलमान संतप्त होऊन त्यांनीं ता. २५ ते २९ जानेवारी १९३२ पर्यंत कुडची गांवांत जैनांवर अत्याचार केले. जैनांचीं पिकें कापणें, गुरें नाहींशीं करणें, स्त्रियांचा अपमान करणें व प्रसंगीं मारहाण करणें या गोष्टी सुरू झाल्या. अशा रीतीनें जैन लोकांना तेथें राहणेंच अशक्य झालें. कित्येकांनीं गांवहि सोडला. ता. ३१ जानेवारीपासून ता ५ फेब्रुवारीपर्यंत वरीलप्रमाणेंच अत्याचार झाले. पोलिसांनीं चौकशी केली, परंतु कोणासहि पकडलें नाहीं.

या अत्याचारांमुळें सर्व जैन समाजांत असंतोष उत्पन्न झाला असून स्थानिक सरकाराकडे ताराहि करण्यांत आल्या आहेत. या संबंधांत जैन समाजाची अशी मागणी आहे कीं, सरकारनें कुडचीसंबंधाची पूर्ण चौकशी करावी व खालील तक्रारीहि दूर कराव्यात.

१ नवें जैन-मंदिर बांधण्यास परवानगी द्यावी व पुढें त्याच्या संरक्षणाची व्यवस्था करावी.

२ कुडची येथील अत्याचारांची चौकशी करण्यासाठीं एक कमिटी नेमावी.

३ अपराध्यांना योग्य शासन व्हावें.

४ ज्यांचें नुकसान झालें असेल त्यांना भरपाई मिळावी व त्यांच्या संरक्षणाची खात्री पटवावी.

# ' अरसिकेषु कवित्वनिवेदनम्- '

भारतमंत्री सर सॅम्युएल होअर यांनीं सोमवार ता. २९ रोजीं ब्रिटिश पार्लमेंटांत विजयोत्सव साजरा केला. इंडिया ऑफिसच्या बजेटावर वादविवाद करण्याचा हा दिवस आगाऊच जाहीर झाला होता. या वादविवादांत हिंदुस्थानच्या राजकीय परिस्थितीचाच मुख्यतः खल व्हावयाचा असल्यामुळें होअर साहेबांनीं आपली बाजू खबीरपणानें मांडण्याकरितां कसून तयारी केली होती. या प्रसंगाकरितां एक ब्ल्यू बुकहि त्यांनीं छापून काढून पार्लमेंटांतील सर्व सभासदांस वांटलें होतें. सदर पुस्तकांत हिंदुस्थानांत गेल्या तीनचार महिन्यांत घडलेल्या हकीकतींचा वृत्तांतच त्यांनीं दिला आहे. या वृत्तान्ताची मांडणी स्वतःच्या धोरणाचें समर्थन करण्याच्या दृष्टीनेंच त्यांनीं केली असेल हें सांगावयास नकोच. त्या पुस्तकाच्या साहाय्यानें श्रोत्यांचा ग्रह आपणास अनुकूल करून घेऊन सर सॅम्युएल होअर यांनीं आपला विजयदुंदुभि पार्लमेंटांत वाजविला. तो ऐकून महायुद्धांत जर्मनीस धुळीस मिळविल्यावर ब्रिटिशांनीं इंग्लंडांत जो आनंदोत्सव साजरा केला त्याची कोणासहि आठवण झाल्यावांचून रहाणार नाहीं. जर्मन युद्धांत एवढें वैभवशाली ब्रिटिश साम्राज्य पाण्यावरील बुडबुड्याप्रमाणें लयास जाणार कीं काय अशी इंग्रजांना भीति पडली होती. त्या भीतीचें निवारण महायुद्धांतील विजयानें होऊन ब्रिटिश साम्राज्य बचावल्याची खात्री इंग्रजांना पटली.

इंग्रज लोक हिंदुस्थानास ब्रिटिश साम्राज्याच्या मुकुटांतील दैदीप्यमान कोहिनूर हिरा मानतात. इतकेंच काय, पण ते त्याला आपल्या प्राणापलीकडे समजतात. हा कोहिनूर कायदेभंगानें भंगला किंवा हा प्राण कायदेभंगानें हरण केला तर साम्राज्याचा अमोलिक मुकुट कवडीमोल ठरेल, ब्रिटिश साम्राज्य हें निश्चेष्ट कलेवर होऊन पडेल व तें वांचविण्यासाठीं जर्मन युद्धांत खर्चलेले कोट्यवधि पौंड व वेंचलेले लक्षावधि जीव फुकट जातील अशी इंग्लंडमधील साम्राज्यवादी कॉन्झरव्हेटिव्ह पक्षाची समजूत असल्यामुळें त्याच्या हातीं राज्यसत्ता येतांच त्यानें हिंदुस्थानावर आपली क्रुद्ध दृष्टि फिरविली. सर सॅम्युएल होअर हे साम्राज्यवादी पक्षाचे एक अग्रणी होत. त्यांनीं हिंदुस्थानचे स्टेट सेक्रेटरी झाल्यावर हिंदुस्थानांतील राजकीय चळवळ चारदोन आठवड्यांच्या आंत नेस्तनाबूद करण्याचा जणुं काय विडाच उचलला होता. त्या आपल्या प्रतिज्ञेप्रमाणें चळवळ गतप्राण झाली आहे याची ग्वाही जगास देण्याकरितांच त्यांनीं गेल्या सोमवारीं ब्रिटिश पार्लमेंटांत आपल्या मित्रमंडळासमोर व प्रतिपक्षाच्या देखत एक प्रचंड भाषण केलें.

सर सॅम्युएल होअर यांचें हें भाषण इंग्लंडच्या हातचें सुटून चाललेलें हिंदुस्थान जणुं काय आपण जिंकून इंग्लंडास परत मिळवून दिल्याच्या गर्वानें ताठलेलें आहे. त्यांत इंग्लंडच्या सामर्थ्याविषयीं घमेंड व हिंदी लोकांच्या दौर्बल्याविषयीं तुच्छता प्रत्येक वाक्यागणिक प्रत्ययास येत आहे. कायदेभंगाच्या चळवळीनें स्वराज्य किंवा स्वातंत्र्य संपादन करूं अशी हिंदी लोकांची समजून असली तर तो केवळ भ्रम आहे, इंग्रज लोक आपखुषीनें जेवढे राजकीय हक्क देतील तेवढे हक्क घेऊन सांगतील त्या जागीं हिंदी लोकांनीं संतोषानें स्वस्थ बसलें पाहिजे या अर्थाची

ताकीद त्यांनीं या भाषणामार्फत सर्वांना दिली आहे. त्यांच्या या दर्पोक्तीची तळी पार्लमेंटांतील कॉन्झरव्हेटिव्ह सभासदांनीं उचलून त्यांची पाठ थोपटण्यांत अहमहमिका दर्शविली. जॉफ्रे लॉइड यांनीं तर स्पष्ट सांगितलें कीं, सर सॅम्युअल होअर यांच्या धोरणास पार्लमेंट सभेचा जोरदार पाठिंबा असल्याचें हिंदी लोकांनीं पक्कें लक्षांत ठेवावें आणि होअरसाहेब जोंपर्यंत हिंदुस्थानचे स्टेट सेक्रेटरी आहेत, तोंपर्यंत हिंदुस्थानचा राज्यकारभार नेटानें हांकला जाईल याविषयीं इंग्रज लोकांनींहि बिनघोर असावें.

सांप्रत ब्रिटिश पार्लमेंटांत कॉन्झरव्हेटिव्ह पक्षाचें प्रचंड बहुमत असल्यामुळें होअर यांच्या पाठीशीं इंग्लंडचें सारें सामर्थ्य एकवटलें आहे याविषयीं होअर यांची स्वतःचीहि बालंबाल खात्री आहे. इतकेंच नव्हे तर त्या सामर्थ्याचा आधार भारतमंत्री सर सॅम्युएल यांजपासून तों थेट जिल्ह्याचे मॅजिस्ट्रेट व पोलीस अधिकारी यांस पोंचून त्या सर्वांचा मिळून एक बळकट लोखंडी साखळदंड तयार झाला आहे; त्यांचा एकजीव होऊन जो पराक्रम एकाचा तोच सर्वांचा अशा आवेशानें त्यांतील प्रमुख अधिकारी एकमेकांची साथ करीत आहेत. भारतमंत्री घ्या, व्हाइसरॉय घ्या किंवा कोणत्याहि प्रांताचे गव्हर्नर घ्या बोलण्याचा प्रसंग येईल तेव्हां एकाच धोरणाची व एकाच विचारसरणीची नक्कल म्हणून दाखवीत आहेत. त्या सर्वांचें पुढारीपण होअरसाहेबांकडे आलें असल्यामुळें त्यांनीं आपल्या भाषणांत ज्याच्या त्याच्या कामगिरीप्रमाणें ज्याला त्याला शाबासकी दिली आहे. ती शाबासकी देतांना होअरसाहेब हिंदुस्थानसरकार, प्रांतिक सरकार, ले. असेंब्ली, प्रांतिक कौन्सिलें यांपैकीं कोणासहि विसरले नाहींत. असेंब्ली व कौन्सिलें यांस शाबासकी कां? तर त्यांत सरकारच्या दडपशाहीचा निषेध करणारा एकहि ठराव पास झाला नाहीं म्हणून. असेंब्लींत निषेधाचा ठराव सर हरिसिंग गौर यांनीं मांडण्याचें धैर्य तरी दाखविलें, मग तो सभासदांच्या नादानपणामुळें पास होऊं शकला नाहीं ही गोष्ट वेगळी. असेंब्लीपेक्षां प्रांतिक कौन्सिलांचा दर्जा खालचा, तेव्हां त्यांनीं निषेधाचा ठराव आणून असेंब्लीच्या पायरीस पाय लावल्यावर राजकारणांत शिस्त ती काय राहिली? या समजुतीनें कीं काय बहुतेक प्रांतिक कौन्सिलें ठराव आणण्यासहि धजलीं नाहींत. मग तो पास करण्याची गोष्ट तर फारच दूर राहिली.

या शाबासक्यांबरोबरच होअरसाहेबांनीं कांहीं व्यापारी व राजकारणी लोकांच्या हातांत खाऊचे पुडे दिले आहेत. हे व्यापारी व राजकारणी लोक कोण? बहुतकरून खेड्यापाड्यांत सरकारी अधिकाऱ्यांनीं भरविलेल्या आमान सभेस हजर असलेले ते 'गोमा गणेश' असावेत. होअरसाहेबांपासून हजारों मैल दूर राहिलेले हे गोमा गणेश खरोखरच धन्य होत. कारण त्यांच्या नांवाचा उच्चार भारतमंत्र्यासारख्या उच्च दर्जाच्या मुत्सद्द्याच्या तोंडून ब्रिटिश पार्लमेंटाच्या भव्य इमारतींत झाला व तो सर्व सभासदांच्या कानीं पवित्र होऊन पडला. दडपशाहीच्या निषेधाचे ठराव हिंदुस्थानांत कांहीं थोडे पास झाले नाहींत. आणि होअर साहेबांस हवे असल्यास आणखीहि पास होतील. अखिल भारतीय नॅशनल फेडरेशन, वेस्टर्न इंडिया नॅशनल लिबरल असोसिएशन, सर्व्हंट्स् ऑफ इंडिया सोसायटी यांसारख्या अनेक संस्थांनीं निषेधाचे ठराव पूर्वीच पास केले आहेत. त्या संस्था व त्यांचे पुढारी एकदां सरकारास मान्य होते व आजहि मान्य असतील. पण त्यांची आठवण होअरसाहेबांना यावेळीं झाली नाहीं. त्यांच्यापेक्षां खेड्यापाड्यांत गोळा केलेले 'गोमा गणेशच' अधिक योग्यतेचे, जवळचे व त्यांच्या प्रीतीचे. कारण कवायतींत सरकारच्या बाजूनें हात वर करून ते त्यांच्या उपयोगी पडले आहेत.

पण ते मुसलमान व अस्पृश्य! गोलमेज परिषदेंत त्यांचे पुढारी मौ. शौकत अली व डॉ. आंबेडकर यांनीं आपआपल्या जातीकरितां स्वतंत्र मतदारसंघ मागून व हिंदी लोकांत फूट पाडून होअरसाहेबांना व त्यांच्या कॉन्झर्व्हेटिव्ह पक्षाला कायमचें ऋणी करून ठेवलें आहे. या ऋणांतून कसें मुक्त व्हावें या फिकिरींत होअरसाहेब पडले आहेत. अजून पुढील राजकीय सुधारणांचें पिलूं अंडें फुटून बाहेर येण्याला फार अवकाश आहे. आतां कोंठ तें उबेला घातलें आहे. तरी देखील होअरसाहेब मुसलमानांस व अस्पृश्यांस जवळ घेऊन व पाठीवरून मायेचा हात फिरवून सांगत आहेत कीं 'बाबानों! विशेषतः मुसलमान बाबानों! तुम्ही खरे राजनिष्ठ आहां. तुम्ही कायदेभंगाच्या चळवळींत न शिरतां आम्हांवर पूर्ण श्रद्धा ठेवून राहिलां याचें फळ इंग्रज देव तुम्हाला देईलच देईल.' त्या उभयतांना सवत्या मतदार-संघापेक्षां दुसरा मोठा वर कोणता पाहिजे आहे! तो व त्याशिवाय आनुषंगिक सवलतींचे वर त्यांना मिळाले असें त्यांनीं होअर साहेबांच्या वचनावर विश्वास ठेवून खुशाल समजून चालण्यास आतां मुळींच हरकत नाहीं!

शाबासक्या, बक्षिसें व वरदानें हा विजयोत्सवांतील समारंभ मुख्य व महत्त्वाचा असला तरी त्याच्या खालोखाल आपल्या साथीदारांचा कैवार घेऊन त्यांना पाठीशीं घालणें हें सॅम्युएलसारख्या सेनापतीचें आद्य कर्तव्य होय. त्यांनीं मॅजिस्ट्रेट

व पोलीस या दोघांना आपल्या दोन पंखांखालीं ओढलें आहे. वटहुकुमांचें शरीर स्थिरचर व्यापून दशांगुळें उरणारें असल्याची कबुली होअर यांनींच मोकळ्या मनानें दिली आहे. पण वटहुकुमांच्या अंमलबजावणीचे वेळीं पोलिसांनीं किंवा मॅजिस्ट्रेटांनीं बेताल सत्ता चालविली, तिचा दुरुपयोग केला, आणि लोकमत न्याय्य रीतीनें व्यक्त करण्यास व्यत्यय आला या दोषारोपास एक क्षणभरहि थारा देण्यास ते तयार नाहींत. पण या दोषाचें माप बांधून घेण्यास ते पदर पसरतील तर त्याचें ओझें होअर-सारख्या खंबीर माणसाला झेपणार नाहीं असें कोणीहि हिंदी मनुष्य त्यांस छातीवर हात ठेवून सांगूं शकेल. तेलिचेरी येथील प्रभूबाईच्या गळ्यांतून मॅजिस्ट्रेटानें काढवून घेतल्यामुळ तुटून पडलेलें मंगळसूत्र, स्वराज्य पत्राचे संपादक सुब्बाराव व रामस्वामी यांच्या पाठीवर पोलिसांच्या छड्यांनीं उठलेले वळ, व मुंबईस चौदा वर्षांच्या मुलाच्या अंगावर उडालेले फटके, यांनीं व असल्या इतर कृत्यांनीं केलेला आकांत ज्यांना कान आहेत त्यांना ऐकूं गेलाच आहे. होअरसाहेबांचे कान ऐकण्याकरितां नसतील व केवळ शोभेकरितां असतील तर मात्र गोष्ट वेगळी !

हिंदी वर्तमानपत्रकर्त्यांना व वक्त्यांना लोकमत न्याय्य रीतीनें व्यक्त करण्यास वटहुकुमांनीं व्यत्यय आला नाहीं हें विधान तसेंच भ्रामक आहे. वटहुकुमांनीं सरकारी अधिकाऱ्यांना प्राप्त झालेली सत्ता भयंकर व अत्यंत व्यापक होती या होअर यांनीं वटहुकुमांच्या केलेल्या वर्णनांतच त्यांचा लोकमतास व्यत्यय कसा आला याचें उत्तर सांठविलेलें आहे. कोणत्या शब्दाचा वटहुकुमांनीं काय अर्थ होईल याचा विश्वासच कोणास राहिला नाहीं. शिकारीस निघालेल्या कित्येक स्वैर बाळांना पूर्वी मनुष्यें अस्वलासारखीं दिसत असें म्हणतात, तशी सांप्रत कित्येक सरकारी अधिकाऱ्यांना दिव्य दृष्टि प्राप्त होऊन स्वदेशीच्या जागीं बहिष्कार आढळला, व खादी-भांडारांत खादीच्या कापडानें बेकायदा जमाव केलेला दृष्टीस पडला, म्हणून तर सर जेम्स क्रेरार या सायणाचार्यापासून स्वदेशीचा दुर्बोध अर्थ असेंब्लीच्या नेणत्या सभासदांना सुबोध करून घ्यावा लागला. गोकुळांत गोपाळांच्या व त्यांच्या गाईंच्या वाटेंत पसरलेल्या अघासुराप्रमाणें वटहुकूमांनीं आपले जबडे उघडून ठेवले आहेत. हे जबडे इतके लांब व रुंद आहेत कीं, ते मिटले म्हणजेच आपण त्या अघासुराच्या पोटांत चाललों आहों हें वृत्तपत्रकारांना व वक्त्यांना कळून येतें. यामुळे आपण लिहितों किंवा बोलतों हें ' न्याय्य ' मर्यादेच्या बाहेर आहे कीं आंत आहे, या विषाची परीक्षा पहातो कोण व आपला जीव धोक्यांत घालतो कोण ? अशा स्थितींत भाषणस्वातंत्र्याची व लेखनस्वातंत्र्याची मान वटहुकुमांनीं मुरगळली नाहीं हें होअरसाहेबांचें आश्वासन पोकळ ठरत नाहीं काय ?

वटहुकुमांच्या साहाय्यानें सरकारानें अमर्याद व भयंकर सत्ता हातीं घेतली याचें सर सॅम्युएल होअर यांनीं सांगितलेलें कारण हास्यास्पद व पोरकटपणाचें आहे. हें कारण एकट्या होअरसाहेबांनींच सांगितलें आहे असें नसून जो बडा अधिकारी बोलावयास उठतो तो तेंच कारण सांगत सुटतो. काँग्रेस आमच्याशीं युद्ध करण्यास उभी राहिली म्हणून आम्हांला वटहुकुमांच्या अस्त्रांचे मंत्र जपावे लागले असें सर्व छोटेमोठे लाट अलीकडे पाठ केल्याप्रमाणें म्हणत आले आहेत. काँग्रेसच्या पुढाऱ्यांनीं कायदेभंगाच्या चळवळीस युध्द या गंभीर नांवानें संबोधलें हें खरें आहे. पण त्या नांवांत मुख्यतः काव्य आहे ही गोष्ट होअरसारख्या मुत्सद्यास कळावयास पाहिजे ! श्री. सरोजिनी बाई चरख्यास सुदर्शन म्हणतात; पण सुदर्शन हें भगवान विष्णूचें शस्त्र असल्यानें हत्याराचा कायदा मोडून हिंदी लोक असलीं प्राणघातक शस्त्रें वापरू लागल्याबद्दल त्यांजवर सरकारी अधिकाऱ्यांनीं खटला भरून त्यांस तुरुंगांत पाठविल्याचें कोणाच्या ऐकण्यांत नाहीं. निरपराधी चरख्याच्या बाबतींत जी रसिकता ब्रिटिश मुत्सद्द्यांनीं दाखविली तीच 'युद्धा'च्या संबंधांत त्यांनीं दाखवावयास पाहिजे होती. युद्ध या शब्दाच्या पाठीशीं शांति उभी असल्यानें युद्धांतील दारूगोळा हत्यारपात्यार व रक्तपात तिनें पार हिरावून घेतला आहे. पण हें मर्म दृष्टीआड करून जर सरकारनें सैन्य जमाविलें व त्या सैन्याच्या पलटणी सत्याग्रही पथकांच्या समोर आणून उभ्या केल्या तर त्यांच्या शहाणपणाची कमाल झाली असेंच म्हणावें लागेल. मग इंग्रजी राज्यांत काव्यें देखील जप्त करावीं लागतील व कवींना रम्य उद्यानांत किंवा विशाल गिरिशिखरावर हिंडूंफिरूं देण्यापेक्षां तुरुंगाच्या अंधारकोठडींत बंदिवान होऊन पडणें भाग पडेल. मग कोणासहि सुंदर स्त्रीच्या चेहऱ्याची चंद्राबरोबर तुलना करण्याची सोय रहाणार नाहीं. कारण उपमानें व उपमेय यांचा घोटाळा उडवून हे अधिकारी या चेहऱ्याचें चांदणें चंद्रासारखें कोठें आहे ते दाखवा म्हणणार. आणि कोणी तरुण कामज्वरानें पीडित झाला असल्याचें वर्णन वाचतांच ते त्याच्या काखेत थर्मामिटर लावून त्याचा ताप मोजण्यास खरोखरच सिद्ध होणार !

काँग्रेसच्या पुढाऱ्यांनीं कायदेभंगाच्या चळवळीस दिलेल्या 'युद्ध' या नांवाच्या अर्थाचा होअरसाहेबांनीं

व तत्पक्षीयांनीं असाच अनर्थ करून स्वतःसच अरसिकांच्या कोटींत बसविलें आहे. त्यांनीं या वेळेस थोडेसें तारतम्यच चालवावयास पाहिजे होतें. एखाद्यानें वैतागानें किंवा त्राग्यानें डोकें फोडून घेतों म्हणावें आणि शेजाऱ्यानें 'फोड डोकें कसें फोडतोस तें' असें सांगून त्याच्यापुढें दगड आणून ठेवावा, किंवा दुसऱ्या कोणी 'अफू खाऊन जीव द्यावासा वाटतो' असे शब्द उच्चारतांच त्याच्या हातांत खरोखरच तोळाभर अफूचा गोळा ठेवण्यांत यावा, त्यासारखाच हास्यास्पद प्रकार सरकारानें युद्धाचें नांव पुढें करून सांप्रत चालविला आहे. तरी बरें, कीं इंग्लंडची फौज इकडील फौजेच्या मदतीस आणून सर्व मोठमोठ्या शहरांना त्यांनीं सैन्याचा वेढा अद्यापि दिला नाहीं, विमानांतून बॉंबगोळे टाकून घरांदारांचा चक्काचूर केला नाहीं, तोफा डागून लक्षावधि माणसांचे जीव घेतले नाहींत, किंवा आरमारानें मुख्य मुख्य बंदरांची नाकेबंदी करून हिंदुस्थानचा जगाशीं असलेला संबंध तोडला नाहीं. कायदेभंगाच्या चळवळीकडे लॉर्ड आयर्विन व्हाइसरॉय असतां ज्या सहानुभूतीच्या नजरेनें पाहत होते त्या नजरेनें न पाहतां सर सॅम्युअल होअर व लॉर्ड विलिंग्डन यांनीं युद्ध या शब्दावर अवास्तव जोर देऊन त्या शब्दाचा निर्दयपणानें छल मांडण्यांत चूक केली असून त्या चुकीचे दुष्परिणाम हिंदुस्थानाच्या राजकारणावर दीर्घकाल टिकल्यावांचून राहणार नाहींत शब्दांचा असा कीस काढण्यांत मुत्सद्दीपणा तर नाहींच, पण रसिकताहि नाहीं. अशा अरसिकांना कवित्व समजावून देण्याची पाळी येणें या.रखें दुर्भाग्य दुसरें कोणतें आहे ?

# पॅरोलचा हास्यास्पद कारभार

पॅरोलच्या कारभारांतील हास्यास्पदता पाहून क्षणभर हंसूं तर येतेच, पण त्याचा रागहि आल्याशिवाय राहात नाहीं. तो अशाकरितां कीं, ऑर्डिनन्सेसनीं दिलेल्या अधिकारांचा उपयोग केवळ लहरीप्रमाणें होतो, व विशेषतः त्यांत खुनशीपणा दिसून येतो. प्रस्तुत चळवळ फैलावूं नये म्हणून चळवळ्या अशा मानल्या जाणाऱ्या व्यक्तींना हल्लीं नोटिशीने देण्यांत येते ती एकटी एकच ताकीद आमच्या मतें पुरी आहे. ती हीच कीं नोटीस लावलेल्या गृहस्थानें चळवळीला उत्तेजनपर असें कांहीं एक करूं नये. कोर्टांत पुरावा करण्याच्या जोखमीच्या दृष्टीनेंहि अमुक माणसानें पोलीस चौकीवर जाऊन हजेरी दिली नाहीं हें शाबीत करणें जितकें सोपें किंवा अवघड तितकेंच त्यानें चळवळीला उत्तेजन देण्याचें कृत्य केलें हेंहि सिद्ध करणें सोपें किंवा अवघड ठरेल. मग व्यापक व सर्वसामान्य असें प्रतिषेधाचें कलम न घालतां, पोलीसचौकीवर जाऊन हजेरी देण्याचें कलम व तेंहि कांहीं निवडक लोकांवरच घालण्यांत येतें हें आश्चर्य नव्हे काय? किंवा आश्चर्य कसलें? त्यांत उघड उघड कांहीं कावा किंवा हेतु आहे.

जे लोक पळून जाऊन गुप्त होतील त्यांच्याकरितां हें कलम म्हटलें तर त्यांत कांहीं थोडा अर्थ आहे असें भासतें. पण तोहि अर्थ खरा नाहीं. कारण झुकांडी देणारच झाला तर त्यानें ती दिल्यावर प्रथम त्याला हुडकून काढला पाहिजे. आणि मग फिरून त्यानें हजेरी दिली नाहीं याचा पुरावा द्यावयाला पाहिजे. मगच खटला व शिक्षा होणार. पण तो जर सांपडला नाहीं तर अजीबात सुटलाच कीं नाहीं? त्याच्यावर अशा नोटिशींचा काय उपयोग झाला? पण अशा लोकांसंबंधानें आम्हीं कांहींच म्हणत नाहीं. 'यथा यक्षस्तथा बलिः' हा न्याय तेथें लागू पडतो असें म्हणून आम्ही कांहींच आक्षेप घेणार नाहीं. पण सातारचे सुप्रसिद्ध वकील रा. भाऊसाहेब सोमण किंवा सोलापूर येथील रा. रामभाऊ राजवाडे, खडकीकर, अशा लोकांना पोलिसकचेरीवर जाऊन हजेरी देण्याच्या नोटिसा लागतात, त्यांचा निषेध कोणत्या कडक शब्दांनीं करावा हेंच आम्हांस समजत नाहीं. अधिकाऱ्यांना ही चळवळ फैलावूं द्यावयाची नाहीं हें त्यांचें ध्येय आहे. व त्याला योग्य अशीं साधनें उपयोगांत आणण्याचा त्यांना हक्क आहे या गोष्टी आम्ही गृहीत धरतों. पण पोलिसठाण्यावर जाऊन हजेरी देणें हें वरील प्रकारचें साधन कसें होऊं शकतें हें किती विचार केला तरी आम्हांला समजत नाहीं हें आम्ही प्रांजलपणें सांगतों.

आम्हांला यांत समजतें तें इतकेंच कीं, अशा हुकुमांच्या बुडाशीं सद्गृहस्थांचा अपमान करण्याची व त्यांच्यावर असलेला इतर बाबतींतला राग उगवून घेण्याची संधि अधिकारी साधीत आहेत. आणि ऑर्डिनन्सेसचा दुरुपयोग होत आहे असें जें आम्ही म्हणतों त्याचें हें एक असें समर्पक उदाहरण आहे कीं, त्यासंबंधानें सरकारानें पदरांत चूक घेऊन निरुत्तरच झालें पाहिजे. आजकाल प्रत्येक माणसांच्या हालचाली समजून घेण्याकरितां सरकारानें गुप्त पोलिसांचें एवढें सैन्य उभारलें आहे कीं सोमण, राजवाडे, खडकीकर, वॅ. पुरुषोत्तमदास त्रिकमदास किंवा सॉ. खेर असे लोक कोठें केव्हां आहेत। नाहींत याची बातमी त्यांना सहजच

कळण्यासारखी आहे.ती या गृहस्थांनीं ठाण्यावर जाऊन हजेरी देऊनच कळवली पाहिजे असें नाहीं. असें असतां अशा हजेरीची ताकीद देणें हा अधमपणा होय. आतां हुकूम बोलून चालून अपमानास्पद असला तरी तो पाळणें न पाळणें हें ज्याच्या त्याच्या परिस्थितीवर अवलंबून राहातें. आणि असले हुकूम देणारे लोक स्वतः असल्या हुकुमांच्या तडाक्यांत सांपडतील तर त्यांच्याहि डोळ्यांपुढें काजवे चमकून काय करावें काय न करावें असा भ्रम त्यांनाहि उत्पन्न होईल. म्हणून अशा लोकांपैकीं एखाद्यानें असला अपमानास्पद हुकूम पाळला तर, त्यानें पोलीस ठाण्यावर जाऊन दिलेल्या हजेरीनें आपण कृतकृत्य झालों असें अधिकाऱ्यांनीं न मानतां आपण कोण हा अधमपणा केला असेंच त्यांना वाटावयास पाहिजे. पॅरोलच्या या शर्तीला नैतिक अत्याचाराचें स्वरूप येतें व आज सर्वत्र त्याचा निषेध होत आहे, ही गोष्ट लक्षांत घेऊन सरकारनें याची चौकशी करावी व हा प्रकार थांबवावा अशी आमची त्यांना आग्रहाची सूचना आहे. मनुष्य अमुक वेळीं अमुक ठिकाणीं आहे कीं नाहीं याची खरी माहिती मिळविणें इतकाच अधिकाऱ्यांचा हेतु असेल तर तो साधण्याला अनेक सोईचे व विश्वसनीय मार्ग काढतां येतील. पण अपमान करण्याचीच बुद्धि असेल तर मार्ग कोठून सुचणार ?

पुण्यांतील एका गृहस्थाला पॅरोलवर सोडतांना शहरांत न राहतां लष्कर हद्दींत राहावें अशी अट घालण्यांत आली.पण अशा माणसाला बिऱ्हाडाला जागाच त्या हद्दींत न मिळाली तर काय करावें ? असा प्रश्न सहजच उत्पन्न झाला. तेव्हां लगेच पोलिस.अधिकाऱ्यांनीं ही अडचण दूर करण्याच्या हेतूनें सहानुभूतिपूर्वक असें आश्वासन दिलें कीं, तुम्हाला बिऱ्हाड न मिळालें तर आम्ही तुम्हांला जागा देऊं. 'चोराच्या घरीं बिऱ्हाड' अशी म्हण एका वेगळ्या रीतीनें खरी होण्याचा योग दिसतो ! कदाचित हल्लींच्या पैशाच्या टंचाईमुळें लष्करांतील पोलिसच्या मुख्य कचेरीच्या मोठ्या इमारतींतील एखादी खोली भाड्यानें द्यावी असें पूर्वीपासून ठरलेंहि असेल. तसें झालें तर बिऱ्हाडाला जागा मिळून घर न सोडतां जागच्या जागीं हजेरीचीहि व्यवस्था झालीच म्हणावयाची !

विनायकबुवा मसूरकर यांना पॅरोलवर सोडतांना अशी अट घालण्यांत आली आहे म्हणतात कीं, त्यांनीं मसूर तर सोडूं नये, पण रोज सकाळीं चार मैलांवरच्या उंब्रज गांवच्या पोलिसठाण्यावर जाऊन हजेरी देत जावी ! या दोहोंचा मेळ घालण्याला बुवांना आतां आपल्या योगसिद्धीचाच उपयोग बहुधा करावा लागणार! मसुरास कोणी तरी जबाबदार पोलीस असेलच. असें असतां उंब्रजेस हजेरी कां हें कळत नाहीं. पण हें खरें असल्यास यांतहि असा सद्हेतु असण्याचा संभव आहे कीं बुवांना रोज चार मैल प्रवास करावा लागल्यास त्यांना व्यायाम होऊन अन्नपचन घडेल. पुढच्या वेळीं सर सॅम्युएल होअर यांना ऑर्डिनन्सशाहीचें समर्थन करण्याचे वेळीं, सरकार लोकांना सहानुभूतीनें कसें वागवितें हें दाखविण्याकरितां या उदाहरणाचा उपयोग फार होणार आहे.

दुसऱ्या एका गृहस्थास दोन अधिकाऱ्यांकडून दोन नोटिसा लागल्या. त्यांपैकीं एकींत त्याला राहतें गांव सोडूं नये अशी ताकीद दिली आहे, तर दुसरींत त्या गांवांत राहूं नये अशी ताकीद आहे म्हणतात. कदाचित् हें खरें नसेल, निदान समजुतीचा किंवा शब्दाचा कांहीं घोटाळा असावा. पण खरें असल्यास, त्या गृहस्थाला दोन्ही नोटिशींचे हुकूम पाळण्याला किंवा मोडण्याला एकच युक्ति दिसते. ती अशी कीं त्यानें राहत्या गांवच्या शिवेंत एक पाय व बाहेर एक ठेवून उभें राहावें. पण हें तो किती वेळ करणार ? या दोन नोटिसा खऱ्या असल्या तर मृच्छकटिकांतला शकार पुनः जन्माला आला असें समजलें पाहिजे. तो चेटाला आज्ञा करतो कीं 'नापि गच्छ नापि तिष्ठ इहैव झटिति पतित्वा म्रिय" "जाऊं नको व राहूंहि नको. अर्थात् जागच्या जागीं पडून एकदम मरून जा" !

# ब्रिटिशांचा आकाश जिंकण्याचा प्रयत्न

ता. १२ सप्टेंबर १९३१ रोजीं विमानांच्या शर्यतींतील ब्रिटननें श्रीडर बक्षीस संपादन करून सर्व जगांत विमानांच्या गतींत श्रेष्ठ स्थान संपादन केलें.

गेलीं ३५० वर्षें सागरावर आपलें वर्चस्व कायम राखण्याचें ब्रिटिशांचें धोरण आहे; व तें धोरण बऱ्याच अंशीं सिद्धीसहि गेलें आहे. १६व्या शतकांत स्पेन, १७व्या शतकांत डच, १९व्या शतकारंभीं नेपोलियन व विसाव्या शतकारंभीं जर्मनी यांचीं आरमारें नष्ट करून ब्रिटननें आपला हा हेतु सिद्धीस नेला आहे.

## आरमाराच्या ऐवजीं आकाशयानें

परंतु वैमानिकबळांत ब्रिटनला श्रेष्ठ स्थान अद्याप संपादन करतां आलें नाहीं व तें संपादन करण्यासाठीं ब्रिटन आपली पराकाष्ठा करीत आहे. कारण

यापुढें समुद्रवर्चस्वापेक्षांहि आकाश पादाक्रांत करणें ही गोष्ट फार महत्त्वाची होऊन बसली आहे. आतां तर युद्धशास्त्रांत आरमार हें जवळ जवळ निकामी अंग मानण्यांत येतें व त्याची जागा आकाश-यानांनीं पटकाविली आहे.

विमानाच्या बाबतींत श्रेष्ठ स्थान संपादन करण्याचा प्रयत्न ब्रिटिश तीन बाजूंनीं करीत आहेत. युद्धोपयोगी विमानांचीं अशीं इंजिनें तयार करावयाचीं कीं, त्यांची अश्वशक्ति दर पौंड वजनामागें एक अश्वशक्ति इतकी असावी; विमानें रात्रंदिवस चालणारीं असून तीं अत्यंत गतिवान असावीं. विमानांची रचना अतिशय साधी असावी.

या उद्देशत्रयींत आपलें वैमानिक दल सर्वश्रेष्ठ असावें हा हेतु नमूद नाहीं. याचें कारण उघड आहे. आज जगांतील राष्ट्रांत विमानाच्या बाबतींत ब्रिटिश साम्राज्याचा पांचवा क्रम आहे. तथापि वर जे हेतू सांगितले ते साध्य झाले म्हणजे सर्व जगांत ब्रिटनचें विमानदल अत्यंत बलवान असें होईल असें या धोरणाची बजावणी करणाऱ्या ब्रिटिशांचें म्हणणें आहे.

### ब्रिटिशांचा आटोकाट प्रयत्न

वरील तीनहि उद्देश हल्लीं बहुतेक साध्य झाले आहेत. दिवसा बॉम्ब फेकणारीं, रात्रीं बॉम्ब फेकणारीं, आकाशाप्रमाणेंच समुद्रांतहि विहार करणारीं या सर्व जातींच्या विमानांत रोल्स रॉईस 'केस्ट्रेल' इंजिनें बसविण्यात आलीं आहेत. हें इंजीन मूळ तयार करण्यांत आलें तेव्हां त्याची ८२५ अश्वशक्ति होती. पुढें स. १९२७ सालीं त्याची १९०० अश्वशक्तीपर्यंत मर्यादा वाढविण्यांत आली व हल्लीं ही शक्ति २३०० अश्वशक्तीपर्यंत वाढविण्यांत आली आहे. या यंत्रांत दिवसानुदिवस अनेक उपयुक्त सुधारणा करण्यांत आल्या असून श्नीडरशर्यत जिंकण्याला या सुधारणा उपयोगी पडल्याहि. खेरीज विमानासंबंधानें वाटणारा धोकाहि बऱ्याच अंशीं कमी झाला. रॉयल एअर फोर्समधील हॉकर, हॉर्ट, फ्यूरि हीं विमानें अत्यंत गतिवान असून युद्धकालीं योग्य अशा उंचीवर राहून त्यांना ताशीं २०० मैल गति ठेवतां येते.

### ब्रिटिश विमानांच्या हालचाली

सन १९३१ सालीं ब्रिटिश वैमानिक दलाच्या हालचाली करण्यांत आल्या व त्याहि अशा वेळीं कीं जगांतील सहा प्रमुख राष्ट्रांचे प्रतिनिधी इंग्लंडमध्यें आर्थिक अडचणींसंबंधीं वाटाघाट करण्यासाठीं जमले होते! या हालचालींत लंडन शहरावर दिवसाचे २४ व रात्रींचे ६८ हल्ले चढविण्यांत आले, व त्या वेळीं लंडनच्या आसमंतांत ५४ टन भयंकर स्फोटक स्वरूपाचे बॉम्ब टाकण्यांत आले. त्यांपैकीं ४६ टन बॉम्ब नेमके निशाणांवर अचूक पडले.

ब्रिटन अशा रीतीनें आपल्या युद्धसंभारांचें एक प्रभावशाली अंग सुसज्ज करण्यांत गुंतलें आहे; त्याचप्रमाणें अमेरिकाहि या दिशेनें आटोकाट प्रयत्न करीत आहे व या युद्धांगांत अमेरिका आज सर्व जगांत बलवान समजली जाते.

### अमेरिकेची ब्रिटनवर मात

स. १९३१ सालीं अमेरिकन वैमानिकदलाच्या ज्या लटुपटीच्या लढाया झाल्या त्या सर्व दृष्टींनीं अद्वितीय झाल्या. नुसत्या लढाया करूनच तें राष्ट्र न थांबतां विमानांच्या प्रचंड काफिल्याचा सर्व देशभर दौराच निघाला होता. या सर्व लढाऊ विमानांचें न्यूयॉर्कमध्यें जें संमेलन झालें त्या वेळीं ६७२ लढाऊ विमानें तेथें जमा झालीं होतीं. न्यूयॉर्कमध्यें हा काफिला जमला असतांना त्याला २ लक्ष ३० हजार गॅलन तेल खाद्यासाठीं पुरविण्यांत आलें. सर्व दंगलींत सर्व विमानांचा ३५००० तास प्रवास झाला. ब्रिटिशांच्या विमानांच्या गतीबाबत व संख्येबाबतच्या घमेंडीला अमेरिकेचें हें उत्तरच होतें. ब्रिटिशांच्यापेक्षांहि उत्तम व त्यांच्यापेक्षां पांच सहापट विमानें युद्धकाळांत आपण सहज उभारूं शकतों असें अमेरिकेनें प्रत्यक्ष कृतीनें दाखविलें. या कवायतींत फक्त लष्करी विमानांनींच भाग घेतला होता, ही गोष्टहि लक्षांत घेण्यासारखी आहे.

इंग्लंडचें सामर्थ्य ज्याप्रमाणें त्याच्या व्यापारी जहाजांत त्याप्रमाणें अमेरिकेचें खरें सामर्थ्य तिच्या व्यापारी दलांत आहे. स. १९३० सालीं अमेरिकेजवळ डाक व प्रवासी ९००० विमानें होतीं. अमेरिका सोडल्यास सर्व जगाजवळ अशीं ५००० च विमानें आहेत. अमेरिकन विमानांचा प्रवास ३ कोटी ४४ लक्ष मैलांचा झाला तर जगांतील इतर विमानांचा फक्त तीन कोटी मैल झाला.

### विमानांना सरकारी साहाय्य

व्यापारी व दळणवळणांच्या विमानांचा प्रसार होण्यास कुशल वैमानिक, तज्ज्ञ शास्त्रज्ञ व एका क्षणांत लढाऊ विमानें बांधण्यास तयार असे कारखाने लागतात. मुलकी विमानवाहतुकीला जास्त खर्च लागतो म्हणून या कामीं सरकारची मदत अवश्य लागते. या कामीं पुढीलप्रमाणें मदत करण्यांत आली.

( आंकडे हजार डॉलरांचे आहेत. )

| देश | १९२८-२९ | १९२९-३० | १९३०-३१ |
|---|---|---|---|
| बेल्जम | ५९५ | ...... | १४३० |
| ऑस्ट्रेलिया | ४८६ | १२२० | ...... |
| कानडा | ३३४५ | ...... | ३८९७ |
| ब्रिटन | ...... | २७६३ | ३३८६ |

| | | | |
|---|---|---|---|
| इटाली | २६०० | ३१४० | ...... |
| फ्रान्स | ...... | ७३१६ | ९२९१ |
| सं. संस्थानें | १४००० | .. ... | २६००० |

कोणत्याहि देशांतील विमानांचा नक्की आंकडा समजणें कठिण आहे. ब्रिटिशांच्या राखीव व शिकविण्याच्या विमानांचा आंकडा केव्हांच प्रसिद्ध होत नाहीं. अमेरिकन लोक नादुरुस्त विमानासुद्धां आंकडा सांगत असतात.

गेल्या दहा वर्षांपेक्षां आज ब्रिटनचीं विमानें २॥ पटीनें वाढलीं आहेत. ब्रिटिशांच्या रॉयल एअरफोर्स शिवाय, इतर काफिले आहेत. कानडा व आस्ट्रेलियामध्यें स्वतंत्र लढाऊ विमानें आहेत.

बेलजन राष्ट्र आपल्या विमानदलाची पुनर्रचना करीत आहे. लॅटेव्हियन,एस्थोनियन,फिनिश, व ग्रीक विमानदलांतील सर्व काफिले ब्रिटिश मेक विमानांचे आहेत. चंग–कैशेकनेंहि बरींच विमानें ब्रिटिशांपासून घेतलीं आहेत.

### फ्रेंच लोक मागें पडले

ब्रिटिश विमानांचा मुख्य भर शीघ्रतेवर आहे.तर फ्रान्सचा मुख्य भर लांब पल्ल्यावर आहे. ब्रिटननें आपल्या विमानांची गति दर ताशीं ३५७·७ होती ती दर ताशीं ३७९ केली. गतीच्या कामीं इंग्लण्डचा पाडाव करण्याचा फ्रान्सनें फार प्रयत्न केला तो साधला नाहीं. आतां फ्रेंच लोक अमेरिकेप्रमाणें मुलकी विमानें वाढविण्याच्या नादीं आहेत. एखादा फ्रेंच नागरिक विमान खरेदी करूं लागला तर सरकार त्याला विमानाच्या किंमतीच्या शें. ४६ इतकी मदत बहाल करतें. व विकत घेणारा जर सरकारच्या राखीव सैन्यांतील असेल तर त्याला शें. ५५ इतकी मदत सरकार देतें. इतकेंच नव्हे तर विमानानें क्रमिलेल्या प्रत्येक तासागणिक सरकार त्याला बोनस देतें म्हणजे अल्पावधींतच त्याला विमान फुकट पडतें.

फ्रेंच विमानांच्या हालचाली झाल्या तेव्हां त्यांनीं एक नवाच प्रयोग केला. त्यांनीं सरहद्दीचे सर्व जिल्हे विमानदलाच्या स्वाधीन केले. त्या टापूंत दिवे लावण्याची मनाई केली व सर्व शहरें, कारखाने आच्छादून टाकण्यासाठीं सर्वत्र कृत्रिम धुराचीं आवरणें उत्पन्न करण्यांत आलीं. हे धूम्रपट कित्येक मैल सारखे पसरत. त्यामुळें त्या भागांतील अनेक लोकांना त्या धुराची बाधा होऊन ते आजारी पडले. पुढें त्यांना औषधोपचार करावा लागला.

इटालीनें आपल्या विमानांच्या हालचाली केल्या त्या अमेरिकेच्या धर्तीवर केल्या. त्यासाठीं ८९४ विमानें–समुद्र विमानेंहि जमविलीं होतीं. या विमानांनीं तेथील शहरांवर, किल्ल्यांवर हल्ले केले.

अशा प्रकारची तयारी आज बडीं राष्ट्रें करीत आहेत. याचा हेतु काय असावा व अशी अफाट तयारी होत असतां युद्धबंदी शक्य आहे काय ! हे प्रश्न विचारणीय आहेत.

# रायफल क्लबांची आवश्यकता

हिंदुस्थानाच्या लष्करी खात्यासंबंधींच्या प्रश्नांवर फारच थोड्या लोकांकडून विचार केला जातो. आपले राजकीय पुढारी ह्यासंबंधीं बोलतांना सैन्याचें हिंदीकरण व लष्करी खर्चांत छाटाछाट ह्या दोनच मुद्दयांवर सर्व भर देतात. त्यांच्या मतें हे दोन प्रश्न सोडविले गेल्यास लष्करी खात्याबाबतचे सर्व प्रश्न आपोआप सुटतील. राष्ट्रीय सैनिक निर्माण करण्याचा उपाय नुसतें सैन्याचें हिंदीकरण हा नसून, लष्करी खात्याच्या अनेक अंगोपांगांचें राष्ट्रीकरण करणें हाच आहे हें थोडयाशा विचारांतीं कोणासहि समजून येईल. ह्याहिपेक्षां हल्लींच्या परिस्थितींत सर्व–सुलभ मार्ग म्हणजे सर्वांस हत्यारांचें ज्ञान देणें हा असून त्याकरितां ठिकठिकाणीं " रायफल क्लब्स" स्थापन होणें अत्यंत आवश्यक आहे.

### परदेशांतील स्वयंसैनिकांचीं दलें

हिंदुस्थानांतील सैन्याचें हिंदीकरण करणें हा राष्ट्रीय सैनिक तयार करण्याचा एकच एक मार्ग नसून फार तर ती एक काटकसरीची बाब होईल. हिंदुस्थानास इतक्या मोठ्या खड्या सैन्याची बिलकुल जरूर नाहीं. उदाहरणार्थ, अमेरिकेचें खडें सैन्य, तेथील स्वयंसैनिकांच्या संख्येच्या फक्त ½ इतकें आहे. ह्याचा अर्थ अमेरिकेची लढाईचे वेळची सर्व मदार ह्या असंख्य राष्ट्रीय स्वयंसैनिक दलावरच आहे हें उघड होतें. हिंदुस्थानाच्या संरक्षणाचा प्रश्नहि अशाच सुलभ व बिनखर्ची स्वयंसैनिक दलांच्या उभारणीनेच सुटणारा असल्यानें मोठ्या खड्या सैन्याची संख्या कमी करून सर्वांचें हिंदीकरण करणें फायदेशीरच होईल. इतर देशांनीं आपला संरक्षणाचा प्रश्न असाच स्वयंसैनिक दलें उभारून व सर्वसाधारण जनतेच्या राष्ट्रीय व लढाऊ मनोवृत्तीस हरप्रयत्नानें उत्तेजन देऊनच सोडविला आहे. इंग्लंडचे १९१२–१३ सालाचे युद्धमंत्री लष्करी प्रश्नांवर पार्लमेंटमध्यें बोलतांना म्हणाले " मला वाटतें कीं, ज्या ज्या देशांत प्रत्येक मनुष्याला हत्यारें वापरण्याचें पूर्ण ज्ञान मिळालें

असेल, त्या त्या देशाला स्वसंरक्षणाची काळजी वाटण्याचें कारण नाहीं. "

## हिंदुस्थानाचा शस्त्रसंन्यास

याच्या उलट गेल्या कित्येक वर्षांच्या "हत्यारांच्या कायद्या" च्या अस्तित्वामुळे आम्हा हिंदवासीयांतील क्षात्रवृत्ति नाहींशी होत आली आहे. हिंदी लोकांचा परकीय गोऱ्या लोकांविरुद्ध एक अत्यंत मोठा आरोप म्हणजे त्यांनीं आपल्यावर लादलेला "खुषी"च्या सक्तीचा शस्त्रसंन्यास हा होय. इतिहासामध्ये कधींहि आढळून न येणारा असा राष्ट्रीय अधःपतनाचा हा एक उत्कृष्ट नमुना आहे. परतु हा मनु पालटण्याचीं चिन्हें दिसूं लागलीं आहेत. अननुभूत अशा चालू राष्ट्रीय आंदोलनामुळें आपलें ध्येय(लष्करी सुधारणा) आपल्या आटोक्यांत येऊं पाहत आहे. हिंदुस्थानांत हिंदुस्थानाच्या संरक्षणाच्या जरूरीइतकेंच लष्कर हवें आहे, व ह्याला उपाय म्हणजे सर्व उपलब्ध साधनें उपयोगांत आणून अल्पमोली व सर्व-पोषक अशा राष्ट्रीय सैन्याचा पाया घालणें हा होय.

## वीरवृत्तीची जोपासना

अशीं राष्ट्रीय स्वयंसैनिक पथकें उभारावयाचीं म्हटल्यास 'रायफल क्लब्स,' हायस्कुलांस जोडून उघडण्यांत येणार 'ज्युनियर ऑफिसर्स ट्रेनिंग कोर्स,' कॉलेजांस जोडून असलेले' 'सीनियर ऑफिसर्स ट्रेनिंग कोर्स,' 'कॅडेट कोर्स' व अशाच इतर अनेक संस्था अस्तित्वांत आणून त्या मार्गानें लष्करी शिक्षण सर्वत्र जारीनें सुरू केलें गेलें पाहिजे. अशा संस्था जनतेंतील लढाऊ व शूर मनोवृत्तींस उत्तेजन देऊन त्यांची वाढ होण्याचे कामीं मदत करतात. राष्ट्रीय संरक्षणाचे दृष्टीनें राष्ट्रीय सैनिक तयार करणें, लोकांस अशा प्रकारचें शिक्षण देणें वगैरे गोष्टी साहजिकच अशा संस्थांच्या कक्षेंत येतात. इंग्लंडचे माजी युद्धमंत्री कर्नल सीले म्हणतात, "राष्ट्रीय संरक्षणाकरितांच केवळ नव्हे तर सर्वसाधारण राष्ट्रीय भावना जागृत ठेवण्यास आपल्या स्वयंसैनिकांचीं पथकें उपयोगीं पडावींत असा आमचा उद्देश आहे."

रायफल क्लबाची स्थापना प्रत्येक स्वतंत्र देशांत झाली आहे. अशा संस्थांस सरकारचें हरतऱ्हेचें सदोदित साहाय्य होत असतें हेहि लक्षांत ठेवण्यासारखें आहे व अशा संस्था बव्हंशीं लोकांच्याच विचारानें चालविल्या जातात. हिंदुस्थानांतील कमालीच्या दारिद्र्याचा विचार करतां सरकारनें अशा संस्थांस शक्य तितकें अधिक आर्थिक साहाय्य द्यावें अशी आमची सूचना आहे. सरकारी मदत मिळाल्यास अनेक लोकांस ह्याचा फायदा मिळेल ह्यांत शंका नाहीं. सभासदांचा नियमितपणा वगैरे गोष्टी सूत्रबद्ध ठेवण्यास एकंदर दारूगोळा, काडतुसें वगैरेंच्या खर्चाच्या ९/१६ इतकी फी रेंज, टार्जेट वगैरेंच्या सोयीसाठीं ठेवण्यांत यावी.

## कानडांतील सोयी

कानडा देशांत १६--६० ह्या वयांत कोणत्याहि मनुष्यास अशा रायफल क्लबसचा सभासद होतां येतें. ह्या सभासदांस राष्ट्रीय सैन्यांत अगर स्वयंसैनिक दलांतहि जरूरीचे वेळीं भरती करून घेतां येतें. दर चार सभासदांमागें १ बंदूक अशा प्रमाणानें सरकार ह्या संस्थांस फुकट बंदुका पुरवितें व त्याबरोबर प्रत्येकीं १५० काडतुसें देण्यांत येतात.

लष्करी रायफल क्लबांस त्या त्या युनिटस्च्या बंदुका असतातच. अशा संस्थांच्या सभासदांस प्रत्येकीं २०० काडतुसें देण्यांत येतात. ह्याखेरीज प्रत्येक स्थानिक सरकारनें सक्तीची कवायत व बंदुकीचा गोळीबार सर्व शाळा आणि कॉलेजांच्या अभ्यासक्रमांतच गोवून दिलेला आहे. १९२५-२६ सालीं कानडामध्यें खालीलप्रमाणें रायफल संस्था होत्याः—

| | | | |
|---|---|---|---|
| लष्करी रायफल क्लब्स | १५४ | सभासद | २५३८२ |
| सिव्हिल " | ११२ | " | ६८९८ |

कानडा हा एक इंग्रजी साम्राज्यांतील स्वतंत्र घटक आहे. म्हणूनच आम्हीं मुद्दाम कानडाचें उदाहरण वर दिलें आहे. हिंदुस्थानसरकार ह्या प्रश्नांवर विशिष्ट हेतूंनीं मुग्धता धरून बसलें आहे. वर्तुलाकार परिषदेनेंहि हा प्रश्न साम्राज्य—सरकारच्या डिफेन्स कमिटीकडे विचाराकरितां सोंपविला आहे. साम्राज्य-सरकारनें आज हिंदुस्थानाच्या उद्धारार्थ कसे व किती प्रयत्न केले त्याची द्विरुक्ति करण्याचे येथें कारण नाहीं! कानडाकडे पाहातां, हिंदुस्थानाला वसाहतीच्या स्वातंत्र्याचा दर्जा बहुतेक प्राप्त झालाच आहे असें वेळीं अवेळीं बोलणारे इंग्रज मुत्सद्दी कशी चूकभूल करतात हें सहज कळून येणार आहे.

## इतर राष्ट्रांतील स्थिति

| देश | रायफलक्लब्स | सभासद | लोकसंख्या |
|---|---|---|---|
| स्वित्सरलंड | ३७३२ | २,२०,९५१ | ३३,००,००० |
| इंग्लंड | १००० | ८०,००० | ४२०,००,००० |
| ऑस्ट्रेलिया | ११९८ | ४४५८३ | ५४३६७९४ |
| कानडा | २६६ | ३२२८० | ३७६९४८९ |
| द. आफ्रिका | १०८० | १३६३९९ | ७१६६६ |
| | | फक्त युरोपियन | १५४२२९० |
| हिंदुस्थान | ०( !! ) | ०(!!!) | ३५०००००० |

वरील आंकड्यांवरून स्वित्झलँडसारख्या एका चिमुकल्या देशांत ३६३२ रायफल क्लब्स असतांना हिंदुस्थानासारख्या एका खंडांत एकहि रायफल क्लब असूं नये ही गोष्ट काय दर्शविते?

### खुद्द इंग्लंडकडे पाहा

वर सांगितल्याप्रमाणें ' रायफल क्लब्स ' हा राष्ट्रीय सैनिक दलें तयार करण्याचा ओनामा आहे. परंतु लष्करी खातें म्हणजे केवळ सैन्य–संख्याच नव्हे. त्यांत अनेक गोष्टींचा समावेश होत असून विशेषतः जनतेमध्यें लष्करी वारें निर्माण करणें ही एक सर्वांत मुख्य बाब आहे. केवळ ह्याच हेतूनें इंग्लंडमध्यें 'नॅशनल सर्व्हिस लीग' ही संस्था निर्माण केली गेली व तिचे अध्यक्ष त्या वेळेचे युद्धमंत्री लॉर्ड हाल्डेन हे होते. ह्या संस्थेचें मुख्य ध्येय "नेशन इन् आर्म्स" हें होतें. ह्याशिवाय (१) बलिष्ठ आरमार (२) जय्यत खड्या सैन्याची तयारी. (३) हजारों स्वयंसैनिक दलें ह्याहि महत्त्वाच्या गोष्टी ही संस्था पार पाडीत होती. वरील तीन बाबींपैकीं एकहि गोष्ट रायफल क्लब्स सोडून दिले तरी हिंदुस्थानांत केली जाऊं नये ही फार खेदाची गोष्ट आहे.

### पांच हजार रायफल क्लब्स उघडा

रायफल क्लब्सची हिंदुस्थानास अत्यंत जरूर आहे. कारण—(१) इतर प्रत्येक लहानसान देशांत असे असंख्य रायफल क्लब्स आहेत.

(२) इंग्लंडला अत्यंत अवघड वाटणारी हिंदुस्थानाच्या संरक्षणाची जबाबदारी आपण हलकी केली पाहिजे.

(३) हिंदवासीयांस नागरिकत्वाचे हक्काची हल्लीं हळूहळू जाणीव होऊं लागली आहे.

(४) अगोदर इंग्रजांच्या आजपर्यंतच्या उपकारांचे ओझ्याखालीं वांकलेल्या हिंदुस्थानानें आपल्या पायांवर उभे राहण्यास शिकलें पाहिजे. कारण त्यायोगानें इंग्लंड व हिंदुस्थान ह्या दोघांसहि जरा हायसें वाटेल.

(५) आजपर्यंत इंग्रजांनी आमच्या संरक्षणाच्या जबाबदारीनिमित्त पुष्कळ कष्ट केले. परंतु वयांत येऊं पाहणाऱ्या मुलाप्रमाणें इंग्रजांनीं आतां हळूहळू ही जबाबदारी हिंदवासीयांच्या गळ्यांत अडकाविली पाहिजे, नव्हे हें इंग्लंडचें कर्तव्यच आहे. तेव्हां हिंदुस्थान देशाच्या विस्ताराच्या मानानें सर्व देशभर मिळून ५००० रायफल क्लब्स स्थापन करणें म्हणजे कांहीं फार अवघड काम नाहीं!

आपल्या ह्या देशांत एकंदर २५० जिल्हे आहेत. प्रत्येक जिल्ह्यांत १० तालुके सरासरीनें धरल्यास एकंदर २५०० तालुके होतात. सरासरीनें प्रत्येक तालुक्याची लोकसंख्या १००००० आहे. म्हणजे प्रत्येक तालुक्यांत २ रायफल क्लब्स स्थापन केल्यास ५००० क्लबांची भरती सहज होईल. अशा प्रत्येक क्लबामध्यें सभासदांची किमान मर्यादा ८० ठेवल्यास प्रत्येक ६०० लोकांत १ सभासद असे प्रमाण पडून दरवेळेस ४ लाख लोकांस ह्या क्लबांचे सभासद होतां येईल. हे चार लाख लोक निशाणबाजींत तरबेज झाल्यास अप्रत्यक्ष रीत्या हिंदी लष्कराचा प्रश्न सोडविण्यास मदत होईल.

# पोटांत मंद आणि कपाळाला गंध

देवालयास जावयाच्या रस्त्यांत दोन्ही बाजूला फाटक्या घोंगड्या पसरून त्यांवर भिक्षेकरी बसलेले असावे, त्यांनीं तोंडानें 'देव दाता' म्हणत दोन्ही हातांनीं आळीपाळीनें पोट बडवून घ्यावें, आणि त्यांच्या त्या दोन रांगांमधून एखादा सुखवस्तु दिसणारा माणूस जेवूनखाऊन व कपाळाला गंधाचा टिळा लावून पोटावरून हात फिरवीत स्वस्थपणानें डुलत डुलत निघून जावा याचा अनुभव अगदींच क्वचित् येतो असें नाहीं. सांप्रत हिंदुस्थानांतील प्रत्येक प्रांतिक सरकार अर्धपोटीं असल्याची हाकाटी करून नवीन करांचा कटोरा प्रजेच्या पुढें धरीत आहे. अशा या बुभुक्षितांच्या बाजारांत हिंदुस्थानसरकार हें एकटेंच असें घुसलें आहे कीं, तें कपाळावर केशरी गंधाचा लांबलचक पट्टा ओढून पोटांत मंद असल्याचें प्रसन्न वदनानें सांगत आहे. एखादा मनुष्य खाऊनपिऊन व वर दोन पैसे बाळगून असला तर त्यांत इतरांचें कांहींच बिघडत नाहीं. उलट कोणाचें झालें तरी बरेंच चालावें अशीच सर्वजण इच्छा करतील. पण आम्ही सगळे ठणठणपाळ असतां या बेट्याला नागवे कोल्हें कोठें भेटलें ही शंका त्या प्रत्येकाच्या मनाला शिवल्यावांचून मात्र खास रहाणार नाहीं.

हिंदुस्थान सरकारचे फडणीस सर जॉर्ज शुस्टर यांनीं दिल्ली येथें ले. असेंब्लींत सोमवार ता. ७ रोजीं यंदाचें जमाखर्चाचें अंदाजपत्रक मांडलें. तेव्हां ते म्हणाले, 'ऐका हो ऐका. जन हो! आनंदाची खबर ऐका. यंदा नवा कर नाहीं हो नाहीं!' शुस्टर यांच्या तोंडून वरील शुभ वर्तमान ऐकल्यावर त्यांच्या तोंडांत साखर पडावी असेंच सर्व म्हणतील; पण वरील वाक्य संपलें न संपलें तोंच त्यांनीं चालू वर्षाच्या तुटीचा जो आंकडा सांगितला तो ऐकून मात्र साखर घालणाराचें स्वतःचें तोंड किंचित् कडवट झाल्यावांचून रहाणार नाहीं. शुस्टर यांचें म्हणणें असें कीं, यंदांच्या वर्षअखेर हिंदुस्थानसरकारास १३ कोटि ६६ लक्षांची तूट येणार आहेच. परंतु कर व काटकसर यांच्या साहाय्यानें ती तूट

टळून पुढील वर्षाकरितां २ कोटि १५ लक्षांचा वाढावाच रहाणार आहे.

इतर प्रांतांपेक्षां हिंदुस्थानसरकारची ही सांपत्तिक स्थिति पुष्कळ बरी यांत शंका नाहीं. कारण इतर प्रांतांतून कोट्यवधि रुपयांची तूट येऊन ती भरून काढण्याकरितां नवीन करांची उभारणी करावी लागली. हिंदुस्थानसरकाराला कर उभारावे लागले नाहींतच, उलट सुमारें २। कोटी रुपये त्यांच्या हातांत खेळणार हें सध्यांच्या खडतर काळांत सकृद्दर्शनीं सुदैवच मानतां येईल. परंतु प्रांतिक सरकारांच्या डोळ्यांपुढें भुकेमुळें काजवे चमकूं लागले असतां हिंदुस्थानसरकाराच्या पोटांत तेवढें मंद कसें यांत थोड्या विचाराअंतीं नवल वाटण्यासारखें कांहीं नाहीं. कारण हिंदुस्थानसरकारानें यंदांच्या मार्च महिन्याच्या बजेटाची वाट न पहातां गेल्या सप्टेंबर महिन्यांतच पुरवणी बजेट आणून हात मारून घेतला आहे. त्या बजेटांत त्यांनीं या मार्चपर्यंतच्या सहा महिन्यांची तेवढीच पेगमी करून ठेवली आहे असें नव्हे तर पुढील सालच्या मार्च महिन्यापर्यंतचीहि सोय पाहिली आहे. यावरून प्रांतिक सरकारांपेक्षांहि हिंदुस्थानसरकारच अन्नाकरितां आधींपासून कसें हापापलेलें होतें हें दिसून येतें. त्या दृष्टीनें विचार केल्यास हिंदुस्थानसरकारांपेक्षां प्रांतिक सरकारेंच अधिक दमदार असें ओघानेंच कबूल करावें लागतें.

बिचाऱ्या प्रांतिक सरकारांचें पोट केवढें! फक्त वीसपंचवीस कोटी रुपये सालीना पुरतील इतक्या बेताचें. पण हिंदुस्थानसरकाराचें पोटहि मोठें व डोलहि मोठा. त्यांच्या दारांत लष्करी खात्याचे हत्ती झुलतात व त्यांच्या तिजोरींत रेल्वे, इनकमटॅक्स, कस्टम, मीठ इत्यादि खातीं पैशाची धार धरतात. हीं सर्व खातीं बहुतेक साजूक व शेलकीं आहेत. त्यांचें उत्पन्न हिंदुस्थानसरकार स्वतः फस्त करतें व तें जाऊन जमीनमहसूल, अबकारी व इतर किरकोळ उत्पन्नांवर प्रांतिक सरकारांना आपला गुजारा करावयास सांगतें. हिंदुस्थानसरकारचें सालीना उत्पन्न सव्वाशें कोटींच्या आंत बाहेर असून खर्चहि तितकाच आहे. या उत्पन्नांपैकीं सुमारें ४७।४८ कोटी रुपये एकट्या लष्करी खात्याकडेच जातात. हा खर्च उत्पन्नाच्या जवळ जवळ तिसऱ्या हिश्शाइतका असून उरलेल्या उत्पन्नांतून बाकीचा सगळा खर्च भागविण्यांत येतो. पण अलीकडे उत्पन्न व खर्च यांचा मेळ सुटून उत्पन्न कमी होत चाललें व खर्चाचें मान या प्रमाणांत उतरेनासें झालें. ही स्थिति गेल्या सप्टेंबर महिन्यांत इतकी विकोपास गेली कीं वाढ केल्यावांचून एकहि कर सरकारनें राहूं दिला नाहीं. गुदस्त सालच्या मार्च महिन्याच्या बजेटांत हिंदुस्थानसरकारानें दोन हजारांपुढील उत्पन्नावरील इन्कमटॅक्स वाढविला आणि विलायती दारू, मोटार, सिगारेट्स, फिल्म्स इत्यादि व्यसनांच्या, चैनीच्या व करमणुकीच्या वस्तूंवरील करांची वाढहि केली. पण तेवढ्यानें हुंडी भरत नाहीं असें आढळून आल्यावरून सप्टेंबर महिन्यांत करवाढीचा कळसच झाला.

मार्च महिन्याच्या करवाढींत चैनी व श्रीमंत लोक तेवढेच सरकारानें टिपून काढले होते. पण सप्टेंबर महिन्यांत गोरगरीब व श्रीमंत या सगळ्यांच्या टाळूवरून हात फिरविण्यांत आला. त्यांनीं इन्कमटॅक्स बसविण्याची मर्यादा दोन हजारांची एक हजारावर आणून गरिबांना श्रीमंतांच्या पटावर चढण्याचा मान दिला व त्यांचा कराच्या कात्रीनें खिसा कातरून त्यांना वास्तविक रीत्या गरिबाहून गरीब करून सोडलें. गेल्या कायदेभंगाच्या चळवळींत मीठ हा निसर्गसिद्ध पदार्थ हवापाण्याइतका मोफत मिळावयास पाहिजे, या हेतूनें चळवळीचा प्रारंभ मिठापासूनच झाला होता. त्या दृष्टीनें पाहिल्यास मिठावर होता तोच कर लोकमतास्तव सरकारनें माफ न म्हटला तरी कमी करणें आवश्यक होतें. तें पुण्य सरकारनें आपल्या पदरीं घेतलें नाहींच; उलट सप्टेंबर महिन्याच्या पुरवणी बजेटांत मिठावरचा पहिला कर सव्वापटीनें वाढवून गोरगरीबांचें मीठ तोडण्याचें नवें पाप मात्र सरकारनें जोडून ठेवलें.

हिंदुस्थानसरकारास पैशाची वखवख इतकी सुटली आहे कीं त्यांनीं पोस्टाच्या कार्डापाकिटांचे दर सवाई-दिडीनें वाढविले. हिंदुस्थानांतील ज्या मोठमोठ्या व्यापाऱ्यांनीं आपलें भांडवल परदेशांत गुंतविल्यामुळें इनकमटॅक्सच्या तावडींतून त्यांचा नफा बांचला होता त्या व्यापाऱ्यांना आपल्या वेसणींत पकडून त्यांजपासून दरसाल पन्नास लक्ष रुपये अधिक उकळण्याचा सरकारचा यंदां बेत होता. पण असेंब्लीच्या चालू बैठकींत काळेंगोरे सर्वच सभासद सरकारावर उठल्यामुळें तूर्त तरी सरकारनें तो लोभ आंवरून धरलेला दिसत आहे. अशा रीतीनें प्रांतिक सरकारांच्या आधीं नवे कर वाढवून पोटभर जेवलेल्या हिंदुस्थानसरकारानें इतर प्रांत रोटी पकविण्याच्या व ताटपाटाच्या तारांबळींत असतां या वेळीं वामकुक्षी करीत आडवें व्हावें यांत नवल नाहीं. त्यामुळें शुस्टरसाहेबांच्या चालू बजेटाचें मुखपृष्ठ नेहमींपेक्षां सुरेख दिसत असलें तरी त्या पुस्तकाचीं पुढील पानें उलगडीत गेल्यास त्यांत जिकडे तिकडे हाकाहाकच दृष्टीस पडते. चालू वर्ष व गेलें वर्ष हीं साधारणपणें सुबत्तेचीं वर्षे होत असें धरून चालण्यास हर-

कत नाहीं. ज्या वर्षी पीकपाणी चांगलें येतें त्या वर्षी शेतकरी एकंदरीनें सुखी राहून देशांतील व्यापारउदीमहि सुस्थितींत असतो. देशांतील गळिताच्या व इतर धान्यांची निर्गत परदेशांत होत असल्यानें शेतकऱ्याच्या हातांत पैसा खेळूं लागतो व पैसा हा स्वतः उड्या मारणारा व दुसऱ्यासहि उड्या मारावयास लावणारा असल्यामुळें शेतकरी जवळचा पैसा निरनिराळे जिन्नस खरेदी करून उडवून टाकतो. त्या योगानें परदेशचा माल हिंदुस्थानांत खपून सरकारचें आयातीवरील जकातीचें उत्पन्न वाढतें.

पण बजेटाचें साल सुरुवातेचें असूनहि मालाची आयात व निर्गत हीं दोनहि त्या सालीं निम्म्यावर आलीं. १९२९–३० साल व १९३०–३१ साल यांमधील फरक आश्चर्यकारक आहे. १९२९–३० सालच्या दहा महिन्यांत २६५ कोटींचा माल हिंदुस्थानांतून परदेशांत निर्गत झाला. पण १९३०–३१ सालीं म्हणजे बजेटाच्या चालू वर्षात त्याची निर्गत १३४॥ कोटींच्या पलीकडे जाण्याची आशा उरली नाहीं. आयात मालाची तीच वाट. गेल्या वर्षी मालाची आयात २०१ कोटींची होती, पण यंदां ती १०५ कोटींवरच येईल. हिंदुस्थानांतून होणारी निर्गत केवळ धान्याची व गळिताचीच असते असें नाहीं. धान्याप्रमाणेंच बंगाल्यांतून ताग व तागाचें कापड व इतर प्रांतांतून कापूस परदेशीं रवाना होतो. पण ताग व तागाचें कापड गेल्या वर्षी ६० कोटींचें रवाना झालें होते तो निर्गतीचा आंकडा यंदां २८॥ कोटींवर उतरला व कापूसहि ५१ कोटींवरून २०॥ कोटींवर घसरला. या घसरगुंडीनें बंगाल, मध्यप्रांत, वऱ्हाड या प्रदेशांतील लोकांची सांपत्तिक स्थिति फारच खालावली. बंगाल्यांत गोरगरीब लोक भिकेस लागले आणि मध्यप्रांत व वऱ्हाड यांची संपन्नता अगदीं मावळली. या हलाखीचें कारण दुहेरी आहे. परदेशांना मालखरेदीसाठीं पैसा खर्च करण्याची ऐपत राहिली नसल्यामुळे हिंदुस्थानचा माल परदेशांत खपला नाहीं.आणि परदेशांत मालाचा उठाव न झाल्यामुळें आयात माल खरेदी करण्याची ऐपत हिन्दी लोकांत न उरून तो माल हिंदुस्थानांत स्वाभाविकच कमी आला.

परदशाहून हिंदुस्थानांत येणाऱ्या जिनसांत कापड व साखर यांचें प्रमाण मोठें असतें. पण तेंहि प्रमाण यंदांच्या सालीं फार उतरलें ! गेल्या वर्षी कापडाची आयात सुमारें ४९ कोटींची झाली होती ती यंदां १६ कोटींवर आली. आणि साखर १३॥ कोटींवरून पांच कोटींवर उतरली. परदेशी कापड व परदेशी साखर यांचा खप यंदां जवळ जवळ एकतृतीयांश इतका झाला हें वाचून कोणासहि समाधानच वाटेल यांत शंका नाहीं. कारण स्वदेशी चळवळीचा तो मोठाच विजय होय. वरील दोन पदार्थांची भरपाई इकडे देशांतल्या देशांत होऊन स्वदेशी कापडास व स्वदेशी साखरेस उत्तेजन मिळाल्यानें या दोन धंद्यांची भरभराट झाली व मजूर वर्गांतील बेरोजगारीहि त्या प्रमाणात कमी पडली हा लाभ कमी नव्हे. तथापि त्याचें सोळा आणे श्रेय स्वदेशी चळवळीस मिळत नसून त्यांत कांहीं अंश जनतेच्या आर्थिक कमकुवतपणाचा असला पाहिजे हे कबूल करावें लागतें.पण सरकारच्या दृष्टीनें झाला हा तोटाच होय. कारण त्यामुळे त्यांच्या आयातीच्या उत्पन्नास चांगलीच चाट बसली. गेल्या वर्षी सरकारास आयातीचें उत्पन्न ९६ कोटींनी कमी आलें. हें उत्पन्न कमी येण्याचें आणखी एक कारण असें कीं हिंदुस्थानसरकारानें आयात मालावरील जकात बेताल चढविली. त्यामुळें जनतेला मालाची गरज असतांहि हवा तो माल खरेदी करतां आला नाहीं.

'जग सुखी तर आपण सुखी' ही म्हण एका अर्थानें खरीच आहे. जग सुखी असलें तरच हिंदुस्थानाच्या मालाचा बाहेर देशांतून खप होऊन इकडील शेतकरी व व्यापारी वर्गाच्या हातांत पैसा खेळत राहणार. कारण जग जसें हिंदुस्थानाचें गिऱ्हाईक आहे तसें हिंदुस्थानहि जगाचें गिऱ्हाईक आहे. पण जगाच्या सुखवस्तुपणापेक्षांहि अधिक प्रमाणांत हिंदुस्थानाचें सुख हिंदुस्थानसरकारावरहि अवलंबून आहे हे खोटे नाहीं. हिंदुस्थानसरकारानें रुपयाचा सोळा पेन्स भाव न ठेवतां १८ पेन्स केला या घोडचुकीमुळें हिंदुस्थानाचें वेरूपणें वाटोळें झालें आहे. त्या योगानें हिंदी निर्गत मालाची किंमत परदेशांत कमी होऊन स्वस्ताईच्या दरानें शेतकरी बुडाला आणि इंग्लिश व्यापाऱ्यांची तुंबडी भरण्यांत आली. उलटपक्षीं परदेशाहून हिंदुस्थानांत येणारा माल महाग पडून व्यापारी व कारखानदार यांचें नुकसान झालें.

जकातीचें उत्पन्न हिंदुस्थान सरकारास ती फाजील वाढल्यामुळें कमी येतच आहे,पण त्याखेरीज हुंडणावळीच्या भावामुळेंहि कमी येऊं लागलें आहे. सरकारानें यंदांचे वर्षी याची पगडी त्याच्या डोक्यावर ठेवून कसेंबसें निभावून नेलें. परंतु या हातचलाखीनें त्यांचा निभाव यापुढें लागणार नाहीं. मुंबई इलाख्याचें सरकार व इतर प्रांतिक सरकारेंहि आपला खर्च आपणास तोडून दिलेल्या खात्यांतून भागत नसल्यामुळें हिंदुस्थानसरकारावर रुष्ट असून तीं आपली कैफीयत गोलमेज कमिट्यांपैकीं जमाखर्च कमिटीपुढें मांडणार आहेत. त्या कैफियतीचा निकाल केव्हां व्हावयाचा असेल

तो होईलच. पण त्यापूर्वीहि मुंबईसरकारानें हिंदुस्थान-सरकारास भरावयाच्या कर्जाच्या हप्त्यापैकीं १६ लाख रुपयांची तहकुबी यंदांच मागितली आहे. त्याखेरीज इन्कमटॅक्सच्या उत्पन्नाचा वांटा आपणास मिळावा अशी त्यांची तक्रार आहेच.

रेलवे खातें हेंहि हिंदुस्थान--सरकाराच्या तिजोरींत पैशाची धार धरणारें एक खातें आहे. पण त्याहि खात्याकडून सरकारास व्हावयाची मिळकत हल्लीं बंद झाली आहे. देश हा एखाद्या आरसेमहालासारखा आहे. आरसेमहालांत गेलेल्या मनुष्याचें प्रतिबिंब एका आरशांत जसें पडेल तसेंच तें सर्व आरशांतूनहि आढळेल. हिंदुस्थानच्या गरिबीचाहि प्रकार त्यांपैकींच आहे ही गरिबी प्रांतिक सरकारें व रेलवेखातें यांप्रमाणेंच हिंदुस्थानसरकारासहि भोंवते आहे व ती अधिक भोंवेलहि. यासाठीं हिंदी लोकांची आर्थिक कुवत वाढण्यांत हिंदुस्थान देशाइतकाच हिंदुस्थान--सरकारचाहि फायदा आहे. कारण यापुढें हिंदुस्थानास कसें जगवावयाचें या चिंतेपेक्षां हिंदुस्थानसरकारानें व प्रांतिक सरकारांनींहि कसें जगावयाचें हें संकट दत्त म्हणून उभें राहिलें आहे. कर वाढविल्यानें उत्पन्न वाढत नाहीं व सरकारचा खर्च त्यावर भागत नाहीं याचा अनुभव हिंदुस्थानसरकारास आतां आला आहे. तेव्हां स्वतः जगावयाचें असल्यास सरकारानें देशासहि जगवावयास पाहिजे हें सिद्ध झालें आहे. देशास जगविण्याचा उपाय म्हणजे देशांतील उद्योगधंद्यांची अभिवृद्धि करून लोकांस सुस्थितीस आणणें हा होय. त्याचा प्रकाश सध्यांच्या प्रांतिक सरकारच्या उपासमारीनें व स्वतःच्या ओढघस्तपणानें हिंदुस्थानसरकारच्या डोक्यांत पडल्यास सध्यांच्या दुःखद स्थितींतहि वाइटांतून चांगलें निघाल्याचें सुख लोक मानतील.

# गोलमेज कमिट्यांचा दौरा

तारीख १ मार्च रोजीं बैठकीच्या कामाला फिरून सुरुवात झाली.सर हेन्री मॉन्क्रीफ स्मिथ यांनीं अध्यक्षस्थान स्वीकारलें होतें. प्रांतिक सरकारच्या व फेडरल सरकारच्या ताब्यांतील खातीं कोणकोणतीं हे कमिटीनें ठरविलें.

( १ ) रेल्वे आणि एक्स्ट्रॉ म्युनिसिपल ट्रामगाड्या यांचा प्रांतिक सरकारच्या खात्यांत समावेश होत नाहीं. हीं खातीं कोणाच्या ताब्यांत द्यावयाचीं याचा पुढें विचार व्हावा.

( २ ) **विमान खातें**—हें फेडरल सरकारच्या ताब्यांत असावें.

( ३ ) **देशांतील जलमार्ग**—एकापेक्षां जास्त प्रांतांतून जलमार्ग जात असेल तर तो मार्ग फेडरल सरकारच्या ताब्यांत असावा व त्याच्यावर फेडरल सरकारचें नियंत्रण असावें असें संयुक्त घटनामंडळानें ठरविलें आहे. सल्लागार कमिटीनेंहि असेंच मत प्रकट केलें.

(४) **देशांतील जलमार्गावरील नौकानयन**—हें खातें फेडरल सरकारच्या ताब्यांत असावें. वाफेनें व विजेनें चालणाऱ्या बोटींचाच या खात्यांत समावेश व्हावा. उतारूंच्या तिकिटाचा दर ठरविण्याचा व मालाचें भाडें ठरविण्याचा अधिकार फेडरल सरकारला असावा.

( ५ ) **पोर्टक्वारन्टाईन**—हें खातें फेडरल सरकारच्या ताब्यांत असावें.

( ६ ) **जकात**—हें खातें फेडरल सरकारच्या ताब्यांत असावें. या बाबतींत फेडरल स्ट्रक्चर कमिटीनें केलेल्या सूचना मान्य करण्यांत आल्या.

( ७ ) **मीठ**—हें खातें फेडरल सरकारच्या ताब्यांत ठेवावें. मात्र संस्थान चौकशी--कमिटीनें हिंदी संस्थानांच्या बाबतींत ज्या सूचना केल्या असतील त्यांचा विचार करावा.

(८) **रिझर्व्ह बँक**—हें खातें फेडरल सरकारच्या ताब्यांत असावें.

( ९ ) **व्यापारी कंपन्या आणि इतर कंपन्या**—हें खातें फेडरलकडे असावें.

( १० ) **अफू व स्टोअर्स आणि स्टेशनरी**—हीं खातीं फेडरल सरकाराकडे असावीं.

(११) **मध्यवर्ती पोलिस**—हें खातें फेडरल असावें.

(१२) **ऑल इंडिया सर्व्हिस व पब्लिक सर्व्हिस**—ज्या नोकऱ्यांचा फेडरलमध्यें समावेश होत आहे त्या फेडरल व ज्यांचा मध्यवर्तीमध्यें समावेश होत आहे त्या मध्यवर्ती समजाव्या असें ठरलें.

ता.३ रोजीं दिल्ली येथें सल्लागार कमिटीच्या कामाला पुढें सुरुवात झाली.रेल्वेच्या कारभाराकरितां स्टॅट्यूटरी बोर्ड नेमा, असें कमिटीनें ठरविलें. फेडरल कायदेमंडळाच्या सल्ल्यानुसार या बोर्डाचें काम चालावें. रेल्वे बोर्डानें उतारू गाड्यांचें भाडें वगैरे ठरविण्याचें धोरण एका स्वतंत्र ट्रायब्यूनलकडे सोपवावें. आमच्या मागण्या पुऱ्या केल्याशिवाय या बाबतींत आम्ही मत देत नाहीं असें मुसलमान सभासदांनीं सांगितलें. संस्थानिकांच्या प्रतिनिधींनीं संस्थानांचे

प्रतिनिधी नेमण्याच्या आपल्या हक्कावर गदा आणूं नये असें स्पष्ट सांगितलें.

( १ ) वैद्यक खातें आणि इतर धंदेवाईक खातीं हीं फेडरल सरकारच्या ताब्यांत असावीं.

( २ ) मापें कशा प्रकारचीं असावी हें प्रांतिक सरकारनें ठरवावें, पण वजनाच्या बाबतींतील धोरण फेडरल सरकारनें ठरवावें.

( ३ ) मादक पदार्थ, मोटारगाड्या, सिनेमा व नाटकगृहे या बाबतींत चालू असलेली व्यवस्थाच कायम रहावी.

( ४ ) वर्तमानपत्रें, पुस्तकें व छापखाने या बाबतींत हल्लींचीच व्यवस्था कायम रहावी.

(५) **गुन्हेगार लोक**—हें खातें प्रांतिक सरकारच्या ताब्यांत असावें. मात्र या बाबतींत प्रांतिक सरकार व मध्यवर्ती सरकार यांमध्यें विरोध येतां कामा नये.

( ६ ) **तुरुंग व कैदी**—हें खातें पूर्णपणें प्रांतिक सरकारच्या ताब्यांत असावें. मात्र राजकीय कैद्यांच्या बाबतींत मध्यवर्ती सरकारचाच अधिकार चालू रहावा.

ता. ४ रोजीं व्हाइसरॉयांच्या अध्यक्षतेखालीं बैठकीच्या कामाला सुरुवात झाली.

पोस्ट, टेलिग्राफ वगैरे खातीं फेडरल सरकारच्या ताब्यांत असावीं असें ठरलें.

स्थानिक टेलिफोन लाइन्सच्या बाबतींत सभासदांमध्यें मतभेद झाला. हिंदी संस्थानांतील टेलिफोनच्या कामचलाऊ लाइन्स असतील त्यांचा फेडरल सरकारच्या खात्यांत समावेश होऊं नये असें ठरलें.

यानंतर एक्स्ट्रॉडिशनचा प्रश्न चर्चेस निघाला. हल्लींची व्यवस्था चालू आहे तशीच पुढें चालू असावी असें सर्वानुमतें ठरलें.

### संस्थान—चौकशी कमिटी

ता.१ ते ३ मार्चपर्यंत या कमिटीचा मुक्काम कच्छ येथें झाला. तेथून समुद्रमार्गानें कमिटी नवानगर येथून कच्छमांडवीला गेली; व कंडला, नवलाखी हीं बंदरें आणि कच्छ अपलॅण्ड वॉटरवेज यांची पाहणी करून कमिटी परतली. येथें झालेल्या वाटाघाटींत नक्त देणगी, बंदरें, व्यापाराच्या सवलती, पोस्ट, तारखातें, अफू व मीठ इत्यादि विषय प्रमुख होते.

या कमिटीचा एक विभाग लॉर्ड हेस्टिंग्ज यांच्या अध्यक्षतेखालीं ता. २६ रोजीं पोरबंदरला गेला. या कमिटीनेंहि वाटेंत वेरावळ व मंगरोळ हीं बंदरें पाहिलीं. या ठिकाणीं बंदरच्या अधिकाऱ्यांशीं बंदराच्या व्यापाराविषयीं बरीच चर्चा झाली. यानंतर मिठागरें, कस्टम, अफू इत्यादि विषयावरहि चर्चा झाली. नंतर हेस्टिंग्ज कमिटी ता. २७ रोजीं नवानगरला गेली व बेडी आणि रोझी या बंदरांची पाहणी करून तेथून ओखा बंदरावर गेली. तेथें ता. २९ पर्यंत कमिटीचा मुक्काम होता.

संस्थान—चौकशी कमिटीपैकीं सर रॉबर्ट हाचिन्सन, सर रेजिनाल्ड ग्लान्सी व मि. पॅट्रिक हे ता. ९ मार्च रोजीं इंदूरला पोंहोचले. गुरुवारीं रा. ब. बापना यांची साक्ष झाली. शुक्रवारीं व शनिवारीं माळवा व बुंदेलखंडाच्या इतर संस्थानांच्या प्रतिनिधींशीं चर्चा होईल. ता.१४ रोजीं कमिटी भोपाळला जाईल.

# स्फुट सूचना

१ फर्ग्युसन कॉलेजांतून सेवानिवृत्त झालेली प्रोफेसर मंडळी मॉडर्न ए. सोसायटी नांवाची संस्था व एक नवीन आर्ट्स कॉलेज काढणार, ही बातमी ऐकतांच पुष्कळ लोकांच्या मनांत एकाच वेळीं एकच विचार येऊन गेला. तो हा कीं एर्वीतेर्वी सर्वस्वीं सरकारवश व अगदीं आधुनिक पद्धतीचें हें कॉलेज निघून, आहेत त्या प्रकारच्या इतर कॉलेजांच्या संख्येंत उगीच आणखी एकाची भर पडणार; त्यापेक्षां सरकारानें पुणें येथील डेक्कन कॉलेज बंदच कां करूं नये ? आणि म्हणूनच या गोष्टीचा उच्चार व उल्लेख मुंबई कायदे कौन्सिलच्या चालू बैठकींत परवां झाला. वास्तविक लोकांकडूनच सुचविल्या गेलेल्या या सोयीच्या सूचनेचा फायदा सरकारानें घेऊन, सरळ जबाबदारी किंवा दोष लोकांवरच टाकण्याला सरकारला आयती चांगली संधि आली होती. तथापि प्रत्यक्ष सरकारचा पगार न घेणाऱ्या प्रोफेसरांना, त्यांनीं आणा शपथा वाहिल्या तरी, कितपत सरकारजमा समजावें व त्यांच्यावर कितपत विश्वास टाकावा याविषयीं सरकाराला शंका वाटत असेल. किंवा दोनतीन युरोपियन प्रोफेसरांची चंदी तोडण्याचें धाडस त्यांना करवत नसेल. म्हणून शिक्षणखात्याच्या मुख्याधिकाऱ्यांनीं अशी एक भलतीच सबब सांगितली कीं पुण्याचें डेक्कन कॉलेज काय व मुंबईचें एल्फिन्स्टन कॉलेज काय, अशा संस्था चालू ठेवण्याविषयीं देणगी देणारांना आपण वचनबद्ध झालेलों आहों; यामुळें तीं कॉलेजें आपणांस बंद करतां येत नाहींत.

---

२ पण आज प्रश्न प्रथमतः पुण्याचें डेक्कन कॉलेज बंद करण्यापुरताच आहे. हें कॉलेज, पूर्वीच्या विश्रामबाग हायस्कूलप्रमाणे, बंद करण्याचा प्रश्न मागें एकदां

असाच निघाला होता.तेव्हां रँ. परांजपे हे दिवाण होते, व त्यांना कायदेपंडितांचा असा सल्ला मिळाला म्हणतात कीं डे.कॉलेजची इमारत ज्या पारशी गृहस्थानें बांधून दिली त्याला सरकार वचनबध्द होऊन गेलें आहे कीं तेथें कॉलेजच चालेल, त्या इमारतीचा इतर उपयोग केला जाणार नाहीं. पण असे असलें तरी फारशी हरकत नाहीं. कारण रँ. महाजनी व फ. कॉलेजची गव्हर्निंगबॉडी यांच्या रागावर नवें कॉलेज सर वाडिया हे काढणारच, व त्याकरितां लाख पन्नास हजार रुपये प्रो. जोग यांच्या पदरांत ओतणारच, तर हें नवें फॅशनेबल निमसरकारी कॉलेज लष्करांतील एका खाणावळीच्या किंवा भटारखान्याच्या इमारतींत निघण्यापेक्षां शिक्षणसंस्काराची पुटांवर पुटें बसलेल्या व विद्यावृद्धीचें वातावरण निर्माण झालेल्या डे. कॉलेजाच्या इमारतींतच नेऊन बसवावें म्हणजे झालें. इमारतीचा उपयोग कायदेशीर झाला. आवडत्या हस्तकांची तरतूद झाली. सर वाडिया यांनीं कधीं नव्हे ती केलेली निम्मी युनिव्हर्सिटीची घटना फलद्रूप झाली. आणि युरोपियन प्रोफेसरांचे पगार आज नाहीं उद्यां थाबून सरकारची बचतहि झाली. असे पुष्कळ फायदे या एका योजनेंत साधतां आले असते

---

३ किंवा याहिपेक्षां आणखी एक चांगली कल्पना आम्ही सुचवितों.प्रो. कानिटकर हे पूर्वीच्या महाराष्ट्र युनिव्हर्सिटीच्या वादांत एकावयवी (युनिटरी) युनिव्हर्सिटी करण्याच्या मताचे होते. त्यांनीं हें कंपांतील नवीन कॉलेज न काढतां डे. कॉलेजाची इमारत मिळवून महाराष्ट्र युनिव्हर्सिटीच कां काढू नये ? विलायतेहून अनेक प्रकारची शिक्षणकविषयक ताजी माहिती घेऊन ते आले आहेत.आणि आपल्या हाताला देणग्या मिळविण्याच्या कामीं यश असल्याविषयीं त्यांना मोठा विश्वास वाटतो व तोहि यथार्थ आहे.मग भरींत भर असें उगीच एक नवीन आर्ट कॉलेज काढण्यापेक्षां, कानिटकर यांनीं पूर्वी योजिलेलें पब्लिक स्कूल किंवा महाराष्ट्र युनिव्हर्सिटी असली एकादी वेगळ्या प्रकारची संस्था काढणें अधिक बरें नव्हे काय ? त्यांनीं कॉलेजच काढलें तरी त्यांचेंहि थोडेंबहुत चालेल, व फर्ग्युसन कॉलेजालाहि कांहीं हानि होणार नाहीं. आला तर डे. कॉलेजाच्या पोटावरच थोडाबहुत पाय यावयाचा. पण पब्लिक स्कूल किंवा युनिटरी युनिव्हर्सिटी निघाल्यास एक नवा शिक्षणविषयक प्रयोग तरी महाराष्ट्रांत होईल.

---

४ अहमदनगर जिल्ह्यांतील नेवासें गांवच्या श्रीज्ञानेश्वरमंदिराचें पश्चिमेकडील आवार कोणाच्या मालकीचें व वहिवाटींचें आहे याबद्दल उपस्थित झालेल्या हिंदु-मुसलमानांच्या दाव्याचा निकाल ता. ७-३-३२ रोजीं तेथील सबजज्ज श्री. कात्रे यांनीं हिंदूंच्यातर्फे दिल्याचें जाहीर झालें आहे. या निकालामुळें बृहन्महाराष्ट्रांतील सर्व हिंदूंना अत्यंत समाधान होईल यांत शंका नाहीं. या निकालावर अपील वगैरे होईलच, तथापि न्यायकोर्टांत पहिल्याच खेपेस आपला खराखुर न्याय्य हक्क शाबीत झाला व पुढेंहि तो तसाच कायम राहील अशी आशा करण्यास हिंदूंना जाग झाली आहे. हिंदूंचीं मंदिरें व मुसलमानांच्य मशिदी यांमध्यें तंटा लागला कीं हिंदूंच्याविरुद्धच निकाल होतो अशी अनेक उदाहरणांवरून लोकांची समजूत झाली आहे. पण या खेपेस तरी तसें झालें नाहीं. या दाव्याचा पूर्वेतिहास वाचकांस पूर्वीच आम्ही विदित केला आहे. निकालाची सविस्तर माहिती हातीं आल्यावर त्यासंबंधीं अधिक चर्चा केली जाईल. आमदार श्री. नारायणराव गुजाळ, महाराष्ट्रांतील अनेक पुढारी व खुद्द नेवासें येथील हिंदु पुढारी यांनां स्वतः प्रतिवादी म्हणून दाव्यांत आपणास सामील करून घेतलें याबद्दल त्यांचें व साताराचे प्रख्यात वकील श्री. दादासाहेब करंदीकर यांच्या श्रमाबद्दल त्यांचें आम्ही मनःपूर्वक अभिनंदन करतों.

# निवडणुकीचा नाद कसा जाणार?

(ले.—एक पड्या उमेदवार.)

जो तो ओंठावर बोट ठेवून मला विचारतो, 'गेल्या दोनहि खेपांस तुम्ही सपशेल 'पडलां' असतांना पुनः यंदां ताठ 'उभे' कसे राहिलां ?' शिशाचें बूड असलेली पातळ कातड्याची बाहुली पडली की उठते हें ह्या हरींच्या लालांनीं कधीं पाहिलेंच नसावें असें मला वाटतें ! लालांची ही स्थिति तर बालांची काय असेल! 'अजुनि खुळा हा नाद पुरेसा कैसा होईना !' हें प्रश्नात्मक गीत माझ्याकडे पाहून रस्त्यावरील टारगट पोरें आपले डोळे मिस्किलपणें मिचकावीत म्हणत असलेलीं मला तिन्हीत्रिकाळ आढळतात. पण हत्ती कधीं असल्या भुंकण्याकडे लक्ष देऊन आपली चाल सोडतो काय ? मी जो हा

निवडणुकीचा नाद लावून घेतला तो काय अशा चेष्टेकुचेष्टेनें आणि हंसण्या—उपहंसण्यानें सोडण्यासाठीं ? आणि मी विचारतों, न मळलेला जोडा, न भिजलेली छत्री व न पडलेली सायकल यांची शोभा ती काय ? तसाच न पडलेला उमेदवार !

* * *

कोणाला औषधाच्या निमित्तानें दारूचा नाद लागतो, घरांतल्या कटकटीमुळें कोणाला हरिभजनाचा नाद लागतो, तसा मला, खरं बोलावयाचें तर, रिकामटेकडेपणामुळें म्युनिसिपालिटीच्या निवडणुकीचा नाद लागला. म्हटलें, वडिलांनी चारी ठाव जेवणाची तरतूद केलेली आहेच. तेव्हां जसा अंगणांतील अड्डा तसाच हा म्यु. चा आखाडा आपण गांठूं या.

* * *

हे विचार डोक्यांत वळूं लागले मात्र, कीं मला निवडणुकीला उभें राहण्याचे फायदे सहस्र तुषारांप्रमाणें भराभर उडत असलेले दिसूं लागले. शास्त्रीबुवांच्या तोंडून लग्नांतील भोजनप्रसंगीं कधीं काळीं चुकून 'निष्काम कर्मयोग' हा शब्द माझ्या कानावर घसरला होता; तो आतां मनावर आरूढ झाला, नव्हे हातावर खेळूं लागला. शास्त्रीबोवा तर मला 'निष्काम कर्मयोगी' म्हणूनच हांक मारूं लागले आहेत. आणि त्यांनीं माझा तसा गौरव कां करूं नये ? मला निवडणुकीपासून कोणती कामनासिद्धि प्राप्त करून घ्यावयाची आहे ? सध्यांच्या काळांत म्यु. च्या सभासदाला आपल्या डोक्यावर कीर्तीचें एक तरी पीस लावावयाला मिळतें का ? तो आळोआळीं हिंडला तरी त्याला फुकटचा नमस्कारहि कोणी करीत नाहीं—जसा कांहीं शाळाखात्यांतील डेप्युटीच ! एकादा घरधनि सामोरा आलाच तर डोकीची शेंडी धरण्यासाठींच. खानदान घराण्यांतील घरंदाज बायकांनीहि त्या सभासदाचीं स्वागतपर पद्यें "काय बाई हें गटार तुंबले आहे !" "रस्त्यावरील दिव्याखालीं 'हा दिवा आहे' अशी पाटी लावण्यांत येणार आहे म्हणे" 'अग, पण ती पाटी पाहायला घरचा दिवा न्यायला पाहिजेना !' 'दिवट्या सभासदांनीं दिवे पाजळले म्हणजे करायचं काय ?' अशा शब्दांनीच गावींत. असा हा 'निष्काम कर्मयोगा'चा 'काळ' आहे.

* * *

ही झाली कीर्तीची कामना. बरें, प्रत्यक्ष लोकसेवेचें कांहीं काम म्यु. त करावें म्हटलें, तर तिकडूनहि 'ऊर्ध्वायै दिशे ब्रह्मणे नमः'च ! अगोदर साऱ्या सभांना हजर रहातो कोण? आणि ती तमदी घेतली तरी चौथींत नापास झाल्यापासून मी हातांत लेखणी धरली आहे कशाला ? तरी मी स्कूलबोर्डाचा चेअरमन म्हणून चोख काम करीन अशी मतदारांना हमी दिलेली होती. पण मी स्वतः मात्र ना कीर्तीचा, ना कामाचा, कशाचाच अभिलाष धरला नव्हता—खरा निष्काम कर्मयोग आचरीत होतों.

* * *

पण मतदारांना त्याचें काय होय ? येथून तेथून सारे गाजरपारखी. त्यांना 'निष्काम' नाहीं; आणि 'कर्मयोग' नाहीं. त्यांचा 'सकाम द्रव्ययोग' मात्र जोरानें चालू होता. माझी ही तिसरी खेप होती; म्हणून जरा नेटानें झटपटलों. सामदामादिक सारे उपाय योजले. खटपट्यांची, गटपट्यांची आणि लटपट्यांची पलटण उभी केली. तिच्यासाठीं दाणागोटा एका कोठारांत आणून ओतला; तांबडीं, हिरवीं, पिवळीं, पत्रकें, सिनेमाच्या जाहीरातींप्रमाणें, बॅंड लावून, गल्लोगल्ली वांटलीं. नाटकाच्या जाहिरातींप्रमाणें, नाक्यानाक्यावरील भिंतीवर माझें नांव फड कविलें. सर्कशींतल्या जनावरांप्रमाणें दारोदार हिंडलों. व्यंग चित्रें आणि अव्यंग चित्रें तारेच्या खांबाखांबावर चिकटविलीं; तात्पर्य, साऱ्या शहरांत मी भरून राहिलों, सारें शहर व्यापून मी माझ्या घरीं 'दशांगुळें उरलों.'

* * *

पोलिंग स्टेशनावर तर काय जत्राच भरलेली. मारुतिगणपतीसारखे देव तेथें पोरासोरांच्या हातांतील खेळणीं होऊन बसले होते. हत्ती आणि सिंह रिंगमास्तराशिवाय शांतपणें संचार करीत होते. 'हत्याराच्या कायद्याला' न जुमानतां तोफ व तलवार मतदारांच्या हातीं-खांदीं खुशाल वावरत होती. आपण आरोग्याचे भोक्ते आहोंत हें दाखविण्यासाठीं एकानें खराट्याचें चित्र आपल्या निशाणीसाठीं निवडलें होतें, तर एकानें आपला पुराणाभिमान प्रदर्शित करण्यासाठीं एक छकडा, एक पणती आणि भस्माचे कांहीं पट्टे चित्रित केले होते. बरें तर बरें कीं, निवडणूक होईपर्यंत ती पणती पेटली नाहीं आणि छकड्याचें भस्म होऊन तेथें महाबळेश्वरावरील ब्रह्मारण्याप्रमाणें भस्माचा ढीग सांचला नाहीं ! मी मात्र प्रांजलपणानें, चांगदेवाप्रमाणें, माझ्या निशाणीची जागा कोरीच सोडली होती. आशा होती कीं, एकादा तरी ज्ञानदेव मला ६५ मतें देईल !

* * *

पण आशा तेवढी खोटी हेंच खरें. निवडणुकीच्या दिवशीं मतदार म्हणजे जणुं ऐरावत. इनामदार--अंमलदार हे त्या वेळीं कोण्या झाडाचा पाला ! तो ऐरावत आणण्यासाठीं मोटारींच्या किती तरी मिरवणुकी काढल्या ! जांवयाप्रमाणे किती तरी रुखवतें त्यांना दिलीं !! मुलीच्या बापाप्रमाणें

दांताच्या कण्या करून किती आर्जवें नी किती विनवण्या केल्या. पण छट्! जहांबाज विहिणीचा रुसवा, मुरब्बी व्याह्याचा हिशेबीपणा, कुर्रेबाज करवल्यांचें घालून-पाडून बोलणें, हा सारा मीठमसाला मतदाराच्या अंगीं त्या दिवशीं आरपार भरलेला होता. एक वेळ सुलतानाच्या दरबाराचें छत फोडतां येईल; पण मतदाराच्या हातचें मत जोडतां येणें कठिण आहे असा माझा तरी अनुभव आहे; त्रिवार अनुभव आहे.

***

त्या अनुभवाच्या बळावर मी म्हणतों, धन्य मतदार! धन्य निवडणूक!! आणि धन्य म्युनिसिपालिटी!!! या तिकडीचा अजब प्रभाव काय सांगावा! साप्त्रेक्षांहि अद्भुत चमत्कार ही त्रिपुटी घडवून आणते! हाताला घट्टे पडलेली मोलकरीण मताधिकाराच्या सिंहासनावर महाराणीप्रमाणें शोभते आणि पायांतील बूट तयार करणाऱ्या चाभाराचे पाय उमेदवाराला धरावे लागतात! कवडीचुंबक मारवाडी निवडणुकीच्या शर्यतींत नांव नोंदवितांच ब्राह्मणाप्रमाणें स्वार्थत्यागी बनतो आणि उपरण्याच्या पदरांत तांदूळ बांधून आणणारे ब्राह्मण हे मतांचा भाव ठरवितांना मारवाडी हिशेब करूं लागतात. तोंड वेडेंवांकडें करावयास लावणारें कडूजहर औषध पाजणारा डॉक्टर मेवा-मिठाईचा पुडा व चहाकॉफीचा पेला बिल न मागतां देतो आणि हॉटेलांत गोड गोड पदार्थ खाऊं घालणारा वाढपी मतदार उमेदवाराला कडू शब्द ऐकवितो. 'म्यु. त गेलों कीं प्रथम मी मद्यपानबंदी करीन' अशी गर्जना करणारा उमेदवार मतदारांच्या घशांत, जणुं शेवटच्याच अशा, दारूच्या बाटल्या ओततो, तर एरवीं माशा मारीत बसणारा गप्पीदास मत देण्याचे वेळीं, दाराशीं मोटार उभी असतां, कामांत गर्क असल्याचा गर्विष्ठ बहाणा करतो! तात्पर्य, हलक्यांना वजनदार व वजनदारांना हलके करणारी, मगरूरांना मवाळ व मारखाऊंना मानकरी बनविणारी, वृद्धांना तरुणत्व व तरुणांना वृद्धत्व देणारी ही निवडणूक त्रिवार धन्य आहे, हे या 'पड्या वीरा' चे प्रचीतीचे बोल आहेत. लागतील त्यांनीं ऐकावे, न लागतील त्यांनीं सोडावे.

# प्रासंगिक बोल

## निजामांची उडवाउडवी

निजामाच्या राज्यांत हिंदु समाज बहुसंख्य असतां त्यांच्या शिक्षणाची सोय नाहीं, त्यांना आचारस्वातंत्र्य नाहीं, सरकारी नोकरींत प्रवेश नाहीं. तेव्हां हे अन्याय दूर करावे अशी तक्रार तेथील हिंदु प्रजेनें केली होती. त्याला उत्तर म्हणून निजामांनीं एक पत्रक प्रसिद्ध केलें आहे. संस्थानांत सवा कोटीवर हिंदु असून सुमारें पंधरा लक्ष मुसलमान आहेत; त्या प्रमाणात हिंदूंना नोकऱ्या मिळत नाहींत या तक्रारीला उत्तर देतांना हिंदु समाजांत भेद उत्पन्न करण्याचा अश्लाघ्य प्रयत्न करण्यांत आला आहे. संस्थानांत २४ लक्ष आदि-द्रवीड आहेत त्यांचा समावेश हिंदु समाजांत करतां कामा नये असें निजाम-सरकारचें म्हणणें आहे. शिवाय हिंदु लोक प्रामुख्यानें शेती करणारे असल्यानें त्यांना नोकऱ्या नको असतात असेंहि त्यांनीं विधान केलें आहे. मुसलमानांचा नोकऱ्यांत भरणा मोठा याचें कारण ते इतिहासपरंपरेनें सरकारी नोकऱ्या करण्यास जास्त लायक असतात हें दिलें आहे! शिवाय मुसलमानांची जात दरिद्री व त्यास इतर धंदेहि नाहींत तेव्हां त्यांनीं नोकरीशिवाय काय करावयाचें! 'मोठ्या नोकरीस हिंदु लोक लायकच नाहींत. पण ते अगदींच सरकारी नोकरींत नाहींत असेंहि नाहीं' असाहि खुलासा उत्तरांत आहे. खेड्याचा पाटील, पटवारी हा नोकरवर्ग सर्वस्वी हिंदु आहे. पाटील पटवारी हे जरी सरकारी नोकर समजले जात असले तरी त्यांच्या नोकऱ्या वतनी आहेत ही गोष्ट मात्र पत्रकांत नमूद नाहीं. इतिहासपरंपरेमुळें मुसलमान लोक मोठ्या नोकऱ्यांस लायख आहेत हें विधानहि धादांत खोटें आहे. संस्थानांत मुसलमानांना शिक्षणाच्या व इतर सवलती आहे तशा हिंदूंना कां नाहींत? संस्थान आपली जबाबदारी ओळखून हिंदूंच्या शिक्षणाची कांहींच सोय करीत नाहीं व उलट त्याजवर नालायकीचा छाप मारतें हा दुहेरी अन्याय आहे. श्री. कोरटकर हे संस्थानांतील गृहस्थ विमानविद्येंत पारंगत होऊन आले; परंतु त्यांना संस्थानांत आश्रय न मिळाल्यामुळें ब्रि. हिंदुस्थानाकडे पाहावें लागलें ही गोष्ट निजामांस भरणावहच समजावयाची काय? इतिहासपरंपरा काय हिंदूंना नाहीं? निजामी राज्य स्थिर करण्याला किती हिंदूंचे श्रम खर्ची पडले आहेत या गोष्टीकडे मुद्दाम डोळेझांक करून आपला निःपक्षपातीपणा निजाम सिद्ध करूं पाहात आहेत; पण त्यांचा तो प्रयत्न निष्फळ आहे. हिंदु व आदि हिंदु असा भेद पाडून दुहीच्या बीजारोपणाचा प्रयत्न तर अत्यंत गर्ह्य आहे. अशा युक्त्यांनीं लोकांची फसवणूक किती दिवस चालणार?

## आमदार मंडळीची निजामास विनंति

हैद्राबाद संस्थानचे अधिपति निजामसाहेब नुकतेच दिल्लीस गेले असतां के. असेंब्लींतील हिंदु सभासदांनीं हिंदु प्रजाजनांच्या स्थितीसंबंधानें त्यांजकडे खालील आशयाचें पत्रक पाठविलें आहे.

" आपण दिल्लीस आल्याची संधि घेऊन ता. २७ रोजीं आपणास हिंदुस्थामाच्या पार्लमेंटगृहामध्यें मेजवानी देऊन सत्कार करण्याचा योग लाभला याबद्दल आम्हांस आनंद होत आहे.

" आपण हिंदुस्थानाच्या संयुक्त घटनेंत सामील होण्यास सिद्ध आहां याबद्दल आम्हांस आनंद होत आहे. कारण या गोष्टीमुळें अखिल हिंदुस्थान हा अविभाज्य आहे ही कल्पना मूर्त स्वरूपांत येणार आहे.

" यासाठीं देशांतील सर्व हिंदी बांधवांत आपलेपणाचा प्रेमरज्जू उत्पन्न झाला पाहिजे व त्याकरितां सर्वांना राजकीय समानतेचे हक्क मिळाले पाहिजेत. विशेषतः सुसंघटित व राजकीय दृष्ट्या सुसंस्कृत अशा समाजाला जे मूलभूत हक्क असावयास पाहिजेत ते हक्क तरी सर्वांना समानतेनें प्राप्त व्हावयास पाहिजेत.

" या संबंधांत आपणाला आमची अशी विनंति आहे कीं, आपण शक्य तितक्या लवकर उदारपणानें एक फर्मान काढून त्यांत पुढील गोष्टींचा समावेश करावा:—

( १ ) प्रातिनिधिक व जबाबदारीचें स्वराज्य दिल्याचें जाहीर करावें.

( २ ) आपल्या प्रजेंतील सर्व पंथीयांना लेखन, भाषण व संघ यांच्या स्वातंत्र्याची हमी द्यावी.

३ शिक्षण व नोकऱ्या या बाबतीत धर्म, जाति अगर पंथ आड न आणतां सर्व जातींच्या प्रजाजनांना सारख्या सवलती द्याव्या.

४ सामाजिक चालीरीति, संस्कृति, पूजाअर्चा व धार्मिक आचार यासंबंधांत जातिभेद आड न आणतां सर्वांना सारखें संरक्षण मिळावें.

"शेवटची मागणी अशी कीं, निजामशहांनीं, हिंदु लोकांना परिषद भरविण्याला ताबडतोब परवानगी देऊन, त्यांना खुल्या दिलानें आपल्या धार्मिक, सामाजिक व राजकीय प्रश्नांचा विचार करण्याची सवड द्यावी व आपल्या राजनिष्ठ प्रजाजनांच्या तक्रारी दूर कराव्यात."

# काठेवाडांतील संस्थानिकांचा नवा उपद्व्याप

हिंदी संस्थानिकांनीं भावी हिंदी स्वराज्याच्या संयुक्त घटनेसंबंधीं विचारांचा जो खेळखंडोबा चालविला आहे तो पाहून कोणाहि स्वराज्यप्रेमी मनुष्यास सखेदाश्चर्य वाटल्याशिवाय राहणार नाहीं. ता. १ मार्च रोजीं नवानगरच्या जामसाहेबांनीं जो एक खलिता प्रसिद्ध केला त्यांत हिंदी संस्थानिकांचा एक सवता सुभा प्रस्थापित करण्याचा नवाच बूट काढून त्या योगानें संयुक्त घटनेच्या मूलभूत तत्त्वावरच कुठार चालविलेली आहे. या आठवड्यांत तर याच महाराजांची नरेंद्रमंडळाच्या प्रमुखाच्याच जागीं निवडणूक झाली व त्या सभेंत असाहि ठराव झाला कीं, ता.२४ मार्च रोजीं अखिल भारतीय संस्थानिकांची परिषद भरवून या प्रश्नाचा कायमचाच निकाल लावावयाचा! काठेवाडांतील संस्थानिकांनीं ठरविलेली योजना पूर्णपणें अमलांत आल्यास हिंदी स्वराज्याची पिछेहाट होऊन आज हिंदुस्थानास असलेले हक्कहि यापुढें अमलांत राहतील कीं नाहीं याचीहि शंका वाटते. एका बड्या संस्थानाच्या दिवाणांनीं तर नुकताच घूतकार केला आहे कीं, हिंदुस्थान प्रजासत्ताक राज्यपद्धतीस नालायक असल्यामुळें हल्लीं प्रचलित असलेलीं कायदेमंडळेंहि मोडून टाकून देशांत एकतंत्री सुलतानशाही सुरू करावी म्हणजेच जनतेचे खरें कल्याण होणार आहे! हे जे उद्गार बाहेर पडत आहेत अगर जामसाहेबांसारख्या संस्थानिकांच्या प्रेरणेनें ज्या नव्या शकली निघत आहेत त्यांच्या बुडाशीं कांहीं तरी भयंकर कारस्थान शिजत आहे, यांत शंका नाहीं. तेव्हां या प्रकरणाचे धागेदोरे नीट समजून घेणें जरूरीचें झालें आहे.

ब्रिटिश मुत्सद्द्यांच्या राजकीय डावांची हिंदुस्थानच्या बाबतींत तरी एक ठरीव चाकोरी आहे. गेल्या पंधरा-वीस वर्षांच्या अवधींत स्वराज्याच्या लढ्यांत जे अनेक पेंच ब्रिटिश मुत्सद्द्यांनीं टाकले, त्या सर्वांची जात एकच होती हें थोडीशी सूक्ष्म दृष्टि चालविल्यास कोणाच्याहि सहज लक्षांत येण्यासारखें आहे. राष्ट्रीय सभा व मुस्लीम लीग या देशांतील दोन प्रमुख संस्थांच्या अधिकृत प्रतिनिधींनीं हिंदुस्थानास प्रातिनिधिक पद्धतीचें स्वराज्य द्या अशी मागणी १९१६ सालीं करतांच ब्रिटिश पार्लमेंटातर्फे मँटेग्यूसाहेबांनीं

सांगितलें कीं, "छे, छे, प्रातिनिधिक स्वराज्य कसलें मागतां? आज जगांतील स्वतंत्र देशांत जबाबदार पद्धतीचें स्वराज्य जारी आहे व आम्ही तुम्हांला तसलें स्वराज्य देतों." झालें, राष्ट्रीय सभेची मागणी मागें पडून जबाबदार स्वराज्याच्या कल्पनेभोंवतीं राजकारणी विचारांचा पिंगा सुरू झाला व शेवटीं तेल व तूप दोन्हीहि जाऊन, द्विदल राज्यपद्धतीच्या दिवाणशाहीचें धुपाटणें हातीं शिल्लक राहिलें! पहिल्या गोलमेज परिषदेच्या पूर्वी ह्याच फसवणुकीची सुधारलेली आवृत्ति निघाली. जबाबदारीच्या स्वराज्याचें पूर्ण माप आपल्या पदरांत पाडून घेण्याच्या निश्चयाचें कंकण हातीं बांधून विलायतेच्या यात्रेस निघालेले राजकारणी प्रतिनिधी इंग्लंडच्या किनाऱ्यावर उतरत आहेत तोंच, विलायतेंत अशी घोषणा सुरू झाली कीं, संयुक्त राज्यघटना ठरविणें म्हणजेच जबाबदारीचें पूर्ण स्वराज्य मिळविणें होय! भूलभुलाई म्हणून मुंबईसारख्या शहरीं यात्रेच्या प्रसंगीं एक करमणुकीचा प्रकार तयार केलेला असतो. त्या चक्रव्यूहांत मनुष्य शिरला कीं तो आंत घोटाळूं लागतो व बाहेर पडण्याचा जो मार्ग कोणी बरोबरीचा अधिक शहाणा मनुष्य सांगेल त्या मार्गानें तो जोराजोरानें जातो पण शेवटीं निराशाच त्याच्या वांटणीस येते! त्याच पद्धतीनें इंग्रजी मुत्सद्द्यांनीं शाब्दिक भूलभुलाई पहिल्या गोलमेज परिषदेंत केली. हिंदुस्थान म्हणजे एक राष्ट्र. स्वराज्याची संस्थापना व्हावयाची तर त्यांत ब्रिटिश हिंदुस्थानाप्रमाणें संस्थानांचाहि समावेश झाला पाहिजे, ह्या विचारसरणीस कलाटणी मिळून पूर्ण स्वराज्याचा प्रश्न मागें पडला व ही संयुक्त संघटना कशी करावी याच प्रश्नाभोंवतीं वादचक्र सुरू होऊन संस्थानिकांना—संस्थानी प्रजेला नव्हे—न भूतो न भविष्यति असें महत्त्व प्राप्त झालें. स्वराज्यद्वेष्ट्या साम्राज्यवादी मुत्सद्द्यांची मुत्सद्देगिरी पूर्वीच्या चाकोरींतच याप्रमाणें चालूं लागून यशस्वीहि झाली!

संस्थानिकांचे पुढारी बिकानेरचे महाराज यांना एका धोंड्यानें दोनच नव्हे तर अनेक पक्षी मारावयाचे होते. त्यांना हिंदुस्थानांतील ब्रिटिश पोलिटिकल खात्याच्या कजाग सासुरवासांतून संस्थानिकांना मुक्त करावयाचें होतें. पण त्याबरोबरच आपली अनियंत्रित राजसत्ताहि अबाधित कायम ठेवावयाची होती. अर्थात् त्यांनीं व इतर संस्थानिकांनीं मोठ्या आवेशानें, देशभक्ति व राजनिष्ठा यांची सांगड घालून संयुक्त राज्यपद्धतीच्या घटनेस संमति दिली व दगडाखालीं सांपडलेला आपला हात काढून घेण्याच्या प्रयत्नास त्यांनीं प्रारंभ केला. सर तेजबहादुर सप्रू हे ब्रिटिश मुत्सद्द्यांच्या या नव्या डावास प्रथम बळी पडले व त्यांनींच या कल्पनेची तळी उचलून तिचा जोरजोरानें पुरस्कार केला. ना. शास्त्री ह्यांच्या कुशाग्र बुद्धीस ही कल्पना प्रथम पटेना; पण त्यांची बुद्धीसुद्धां व्यावहारिक राजकारणास बळी पडली! जे जामसाहेब आज संयुक्त घटनेच्या चक्रांत आपण सांपडूं नये म्हणून अंगचोरीच्या सर्व युक्त्याप्रयुक्त्या करीत आहेत. त्यांनीं सुद्धां त्यावेळीं असें वचन दिलें होतें कीं, "जोंपर्यंत आमचें स्वातंत्र्य अबाधित राहील व हल्लींच्या आमच्या अडचणी दूर होतील तोंपर्यंत आम्ही या संयुक्त संघटनेंत राहूं." अशा रीतीनें पूर्ण जबाबदारीच्या स्वराज्याची चर्चा अजीबात बंद होऊन या संयुक्त राज्यपद्धतीच्या घटनेच्या विचाराचें दळण सुरू झालें. मांजराच्या नाकाला थोडें लोणी लावून त्याला कोपऱ्यांत एका जागीं खिळून ठेवण्याची युक्ति या ठिकाणीं यशस्वी रीतीनें उपयोगांत आणली गेली अशी कबुली देणें प्राप्त आहे!

दुसऱ्या गोलमेज परिषदेच्या प्रसंगीं एक अकल्पित बनाव बनून गेला, व त्यामुळें पुनः सर्व गाडेंच उलटेंपालटें झालें. मजूरपक्षाचे मुख्य प्रधान मि. राम्से मॅकडोनाल्ड यांनीं पार्लमेंटांतील इतर प्रमुख पक्षांच्या पुढाऱ्यांच्या संमतीनेंच गोलमेज परिषद भरविली होती हें खरें. परंतु अधिकारारूढ असल्यानें त्यांचा मजूरपक्ष प्रभावी होता. दुसऱ्या गोलमेज परिषदेच्या वेळीं कट्टर साम्राज्यवादी हुजूर पक्षाला अभूतपूर्व असा विजय, पार्लमेंटाच्या निवडणुकींत मिळाला व त्यांनीं मजूर पक्षाला अधिकाराच्या सिंहासनावरून खालीं ओढलें व त्यामुळें गोलमेज परिषदेंतीलहि मजूर पक्षाचें अधिकाराचें घोडें त्यांच्या मांडीखालून निसटलें! स्वराज्यद्वेषी हुजूर पक्षीय मुत्सद्द्यांनीं अर्थात् या मोक्याचा चांगलाच फायदा घेतला. संस्थानिक पूर्णपणे या संयुक्त घटनेस आपली मान्यता देतील व अल्पसंख्याकांचें संरक्षण त्यांना समाधानकारक अशा रीतीनें होईल आणि संरक्षक बंधनें हिंदुस्थान बिनशर्त मान्य करील तरच हिंदुस्थानास आम्ही स्वराज्याचे हक्क देऊं असा त्यांनीं आपला दृढ निश्चय जाहीर केला. मुख्य प्रधान राम्से मॅक्डोनाल्ड हे उच्च विचारशील असले तरी त्या विचारांना व्यवहारांत उतरविण्याकरितां जी एक कडवी तत्त्वनिष्ठा लागते ती त्यांच्याजवळ नाहीं. त्यामुळें तेहि याच विचारांचा ग्रामोफोन बनले व आपल्या शेवटच्या भाषणांत त्यांनींहि वरील मुद्द्यावरच जोर दिला!

'गोलमेज परिषद ठार मेली असून तिला साजेसा दफनविधि करावयाचा आतां उरला आहे' असे उद्गार एका प्रमुख मजूरपक्षीय सभासदानें काढले होते ते या वरील कारवाईमुळेंच! स्वराज्यद्वेष्ट्या

साम्राज्यवादी हुजूर पक्षीय मुत्सद्दयांनीं भावी स्वराज्याच्या पायांतच वरील अटींचे सुरुंग भरलेले असल्यामुळें ते खेळ कसा खेळतील याची कल्पना सहज येण्यासारखी आहे. यापुढें या बुद्धिबळांतील डावांत संस्थानिक व अल्पसंख्यावाले या मोहोऱ्यांनाच फार महत्त्व आहे. मुसलमान व मानीव अस्पृश्य हे घोड्याच्या चालीनें अडीच घरें उडूं लागले तर संस्थानिक उंटाप्रमाणें तिरकसच निघाले. जामसाहेबांच्या नेतृत्वाखालीं काठेवाडच्या संस्थानिकांनीं व दिल्ली-सिमल्यास बसून नरेंद्र मंडळांतील सभसदांनीं जो नवा पंथ आतां आक्रमावयास सुरवात केली आहे त्याचा वरील दृष्टीनें विचार करतां त्यांचा बोलविता धनी वेगळाच आहे असें स्पष्ट म्हणावें लागतें!

काठेवाडांतील संस्थानिकांनीं जामसाहेबांच्या नेतृत्वाखालीं किंबहुना अधिक स्पष्टपणें म्हणावयाचें तर त्यांचे हल्लींचे नवे मंत्री मि. रशब्रुक वुइल्यम्स यांच्याच प्रेरणेनें जे ठराव केले आहेत त्यांची रूपरेषा जरी पाहिली तरी वरील सर्व विधानांस पुष्टि मिळणार आहे. लॉर्ड सँकी यांनीं गोलमेज परिषदेनंतर तयार केलेल्या संयुक्त घटनेंत अशी व्यवस्था आहे कीं, आस्ते आस्ते कां होईना, पण संस्थानें व ब्रिटिश हिंदुस्थान यांचा पुढेंमागें एकजीव व्हावा; परंतु ही नवी काठेवाडी योजना अशी आहे कीं, त्यांत व्हाइसरॉयसाहेब हे मध्यबिंदु असून त्यांच्या एका बाजूस संस्थानांची रांग व दुसऱ्या बाजूस ब्रिटिश हिंदुस्थानांतील प्रांतांची रांग आहे दोघांनींहि आपआपला कारभार स्वतंत्र करावयाचा. एकाचा दुसऱ्याशीं कांहींएक संबंध नाहीं. फक्त कांहीं बाबी म्हणजे कस्टम, रेल्वे, नाणें वगैरे—कीं ज्यांत दोघांचा संबंध येतो—तेवढ्यापुरता विचार करण्यास एक 'संयुक्त हिंदुस्थानची सभा' असावी. त्यांत संस्थानिकांचे पन्नास व ब्रिटिश हिंदुस्थानाचे पन्नास असे समानसंख्य प्रतिनिधी असावे. बहुमतानें सर्व गोष्टींचा निकाल व्हावा. समान मतें पडल्यास व्हाइसरॉयांनीं निकाल करावा. तात्पर्य, यांत मुख्य मेरुमणि म्हणजे व्हाइसरॉय! व त्यांच्या तंत्रानें चालणारी ही राज्यघटना आहे. लॉर्ड सँकी यांच्या मवाळ योजनेचीहि ही थट्टा आहे, मग पूर्ण स्वराज्याचा हा मृत्यु आहे हें सांगणें नकोच. याच ठरावांच्या तत्त्वावर उभारलेले इतर ठराव आहेत. तेव्हां त्यांचा अधिक विचार करावयास नको.

लॉर्ड सँकी यांच्या योजनेस संस्थानिक संमति देण्यास तयार नसतील तर संयुक्त घटनेचा विचारच संपला व त्याबरोबर स्वराज्याचीहि आशा संपली. ता. १० मार्च रोजीं सिमल्यास जी संस्थानिकांची सभा झाली त्या सभेंत पत्याळाच्या महाराजांचाच पक्ष जोरकस होता इतकेंच नव्हे तर त्यांचेच स्नेही व त्यांच्याहि पुढें जाऊन स्वराज्याच्या मार्गांत कांटे पसरणारे जामसाहेब व त्यांचे सल्लागार हे त्यांच्यापेक्षांहि प्रभावी ठरले. व म्हणूनच पत्याळाच्या महाराजांनीं माघार घेऊन जामसाहेबास 'चॅन्सेलर' निवडून येण्यास संधि दिली. ब्रिटिश मुत्सद्दयांच्या व येथील नोकरशाहीच्या कारस्थानाचीं चक्रें या मार्गानें आतां फिरत आहेत व त्यांचा हा डाव साधला तर हिंदुस्थानाच्या लोकांवरच दोषाचें खापर फोडून आपण मोकळे होण्याची त्यांना उत्तम संधि मिळणार आहे. लाहोरच्या 'ट्रिब्यून' पत्राच्या नव्या दिल्लीच्या खास प्रतिनिधीनें लिहिलें आहे कीं, "कन्सलटेटिव्ह कमिटीच्या कामाच्या नाटकाचा पहिला अंक संपला. सभासदांना तेथील वातावरण कोंदटलेलें आणि कपटव्यूह व कारस्थानें यानें बुजबुजलेलें आहे असें वाटत आहे. मुसलमान व संस्थानिक सरकारच्या हातचीं खेळणीं बनलीं असून लवकरच मध्यवर्ती जबाबदारी व संयुक्तघटना यांच्या मृत्यूची बातमी यावी लागेल." विलायतेहून ज्या बातम्या येत आहेत त्या वरील मतालाच पुष्टि देतात हें विशेष होय! या पुढें संस्थानिक मंडळ व ब्रिटिश मुत्सद्दी कोणतीं पगें टाकतात इकडे लोकांनीं दक्षतेनें पहावें एवढाच आमचा इषारा आहे.

# शुद्ध पंचांग व आरंभस्थान

( ले. भा. रा. जोशी, बेळगांव. )

[ या विषयावरील वाद प्रसिद्धच आहे. केसरी हा शुद्ध टिळक पंचांगवादी आहे; तथापि प्रतिपक्षाला केसरींत थारा मिळत नाहीं या आक्षेपास जागा राहूं नये एवढ्याचकरितां रा. जोशी यांच्या लेखाला स्थान दिलें आहे. —सं. के. ]

अश्विन्यादि गणना प्रचारांत कां आली असा प्रश्न उपस्थित करून पुढें श्री. जोशी लिहितातः—

आकाशांत अश्विनी नक्षत्राचे जे तारे दाखविले जातात त्यांपैकीं एकाजवळ वसंतसंपात आल्या वेळीं ही गणना चालू झाली असें स्पष्ट दिसतें. हा

विचारामध्यें असा प्रश्न पुढें येतो कीं, वसंतसंपाताच्या पीछेहाटीनुरूप तारा सन्निध असलेली नक्षत्रगणना ग्रंथोद्दिष्ट म्हणावयाची तर ती सांपातिक वर्षमानाची म्हणावी लागते आणि ग्रंथोक्त वर्षमानाच्या चुकीवर पांघरूण घालण्यासाठीं अयनगति आणि अयनभगण यांची कल्पना मागाहून केलेली आहे असें समजावें लागतें. या प्रश्नाचें उत्तर असें आहे कीं, वर्षमान चुकलें एवढ्यावरूनच ती गणना सांपातिक प्रधान ठरत नाहीं. फार प्राचीन काळीं पुनर्वस्वादि गणना होती, त्यानंतर मृगादि झाली. पुढें कृत्तिकादि व त्यामागून अश्विन्यादि गणनेचा प्रचार सुरू झाला. यावरून नक्षत्रचक्राचें विभागीकरण सांपातिक म्हणजे सायन व स्थिर म्हणजे निरयन अशा दोनही प्रकारचें तेव्हांच झालेलें आहे.

पुनर्वस्वादि गणना चालू असतांना दक्षिणायनीं चित्रा तारा व उदगयनीं त्यांच्या समोरचें स्थान होतें. म्हणजे स्थिर विभागपरत्वें तेव्हां उदगयन पौष्णान्तीं अर्थातच रेवत्यंतीं होत असे. पुढें संपाताची गति दोन नक्षत्रांइतकी म्हणजे २६ अंश ४० कला सुमाराची झाल्यावेळीं मृगादि गणना सुरू झाली व तेव्हां पूर्वाभाद्रपदा नक्षत्राच्या अंतीं उदगयन होत असे. त्यानंतर सुमारें २६ अंश ४० कला इतकें अयन मागें चळल्या वेळीं कृत्तिकादि गणना चालू झाली व तेव्हां उदगयन धनिष्ठाविभागाच्या अंतीं होत असें. त्यामागून अयनच्युति २६ अं. ४० कला झाल्यावेळीं अश्विन्यादीची गणना रूढ झाली आणि तेव्हां उदगयन उत्तराषाढेच्या अंतीं म्हणजेच श्रवणाच्या प्रारंभीं होत असे. निरयन गणना ही दोन नक्षत्र इतक्या अयनांशानंतर बदलण्याची वहिवाट या क्रमावरून सिद्ध होत आहे. खुद्द कै. लो. टिळक यांनीं सुद्धां पुण्याच्या आपल्या हयातींतील ज्योतिषसंमेलनांत अयनांशाची वाढ ३० अंशांपर्यंत झाल्यावर ते सोडून देण्याचें करावें म्हणून सुचवून ठेविलें आहेच. फरक एवढाच कीं, प्राचीन वैदिक ऋषींनीं ती वाढ दोन नक्षत्रांनंतर टाकली. व कै. लो. टिळकांनीं ती एक चरण जास्त केली इतकेंच. बाकी कांहीं ठरीव संख्येनंतर अयनांश सोडण्याच्या बाबतींत दोघांची विचारसरणी सारखीच ठरते.

कै. शं. बा. दीक्षित यांच्या लेखनावर लोकमान्य विशेषसे न विसंबते तर ते पुनर्वस्वादि, मृगादि व कृत्तिकादि ह्या प्राचीन गणना केवळ ‘ तारात्मक ’ असें विधान न करतां निरयनविभागात्मक त्या गणना होत असें स्पष्ट म्हणण्यास कमी न करते. कारण या पुनर्वस्वादि गणनेंत पुनर्वसूविभागारंभापासून १०व्या अंशावर त्याचा एक तारा येतो. याच विभागणीला अनुसरून मृगविभागारंभापासून १० अंशांवर मृगाची एक तारा मृगादि गणनेंत सांपडते आणि त्याच विभागणीनुसार कृत्तिकागणनेंत कृत्तिकाविभागारंभापासून १० अंशांवर कृत्तिका तारा संभवते. व त्यानंतरच्या सांप्रतच्या अश्विन्यादि गणनेत सुद्धां त्याच गतानुगतिक स्थिर विभागानुसार अश्विनीविभागारंभापासून १० अंशांवर ‘ बिटाऐरिटिज ’ या नांवाचा तारा अश्विनी ताऱ्यापैकीं एक आहे. याप्रमाणें प्रत्येक गणनेंत संपातसन्निध तारा असल्यानें ती गणना विभागात्मक नसावी अशी कित्येकांची समजूत झालेली दिसते. परंतु संपातीं येणाऱ्या गणनादींच्या तारका त्या त्या विभागारंभापासून १० अंशसन्निध संभवतात व एका गणनेनंतर दुसरी गणना दोन नक्षत्रांइतक्या अयनच्युतीनंतर चालू केली जाते, हा इतिहास जर कांहीं सुचवीत असेल तर स्थिर विभागीकरण सिद्धान्तादि ग्रंथापूर्वीच झालें आहे, म्हणून त्याच्याच अनुकरणासाठीं अयनांशांची मोजदाद करण्याची त्या ग्रंथांत रीति दिलेली आहे हें होय. वर्षमानांतील चुकीवर पांघरूण घालण्यास्तव निघालेली ही कल्पना नव्हे. उदगयनिक गणना ही सायन व नक्षत्र तारा सान्निध्यवशात् असणारी गणना ही निरयन. सायननिरयन अशा दुकलीनें ही प्राचीन परंपरागत गणना चालू असून तिचेंच अनुकरण सिद्धान्तादि ग्रंथकारांच्या मनांत करावयाचें होतें म्हणून त्यांत अयनांशासंबंधीं उल्लेख मिळतात. ‘ भारतीय ज्योतिषेतिहास ’ लेखक कै. दीक्षित यांच्या ध्यानांत वरील गोष्ट येती तर त्यांनीं सायनाचा आग्रह मुळींच धरला नसता. असो. वेदांगज्योतिषांत उदगयनिक गणना धनिष्ठादि असली तरी त्यांत निरयनगणनाहि कृत्तिकादि आहेच व तेव्हां अयनधनिष्ठान्तापासून एकच नक्षत्र मागें आलेलें होतें, असें त्यापूर्वीच्या विभागात्मक गणनेवरून ठरतें. गणना भिन्न म्हणून विभागात्मक स्थिर आरंभस्थानहि भिन्न अशा विचारानें ज्या कोणास प्राचीन वैदिक ऋषींच्या गणनाभेदाच्या विभागकृतींत विसंगतता वाटत असेल ती असो, ती मूलतः व तत्त्वतः तरी नाहीं खचित. लोकमान्यांनींसुद्धां असाच हेतु प्रकट केलेला दिसतो. ते आपल्या वैदिक क्रॉनॉलजी पुस्तकाचें पान २५।२६ वर म्हणतात,

‘ We have to see what kind of calendar was used in the time of the Brahmanas and the Vedic Samhitas and for this purpose we may well make the Vedang-Jyotisha as our starting point and see what elements of the system contained therein are found in the older Vedic works. ’

या मतावरून हें स्पष्ट आहे कीं, जें स्थिर नक्षत्र-विभागीकरण प्राचीन वेदांगोक्त तेंच त्यामागचें जसें उद्दिष्ट होतें तसेंच तें पुढच्या सिद्धान्तादि ग्रंथ-कारांचें देखील उद्दिष्ट असलें पाहिजे व तसेंच तें आहे. वरील विचारावरून वाचकांच्या ध्यानांत येईल कीं, अयनांशाची वाढ अवास्तव होऊन गणितविस्तार होऊं नये, कारण त्यामुळें श्रम जास्त व चुकीचा संभवहि अधिक असतो म्हणून मर्यादित अयनांश केले. अयनांशांची मर्यादा ठरविल्यानें गणना बदलणें भाग झालें. अयनाची गति मागें मागें होत असते, म्हणून गणनाहि मागच्या मागच्या नक्षत्रांवर न्याव्या लागल्या आहेत. पुनर्वसूच्या मागील नक्षत्र आर्द्रा टाकून मृगादि, मृगाच्यामागें रोहिणी सोडून कृत्तिकादि, व त्यानंतर भरणी सोडून अश्विन्यादि असा हा उलटा क्रम आहे. आणि या अश्विनीच्या 'बीटा' ताऱ्याजवळ वसंतसंपात असण्याचा काल म्हणजे शालिवाहन शकपूर्व ५०० वर्षांच्या सुमाराचा येतो. म्हणून त्या सुमारास अश्विन्यादि गणना प्रचारांत आली असें सिद्ध होत आहे व तत्कालीन सिध्दान्तामध्ये चित्राभोग सायन १८० अंश असणें शक्य नाहीं.तो निरयनच म्हणावा लागतो. आणि वरील श्रुत्यादि गणनेवरूनहि तो तितकाच येतो म्हणून केतकी पंचांगपद्धति 'शुद्ध' या संज्ञेला पात्र आहे.

# आंधळी गांवचा आगकाड्यांचा कारखाना

श्री. ग. चिं. भिडे यांनीं आज ४–५ वर्षें परिश्रम करून सांगली संस्थानापैकीं आंधळी या गांवीं कागदाच्या आगपेट्यांचा छोटासा कारखाना सुरू केला आहे व हल्लीं त्यांचा मालहि बऱ्यापैकीं निघूं लागला आहे. रा. भिडे यांनीं या धंद्यास सुरुवात प्रारंभीं फार लहान अशा प्रमाणावर केली आहे. त्याचप्रमाणें काड्या कापण्यासाठीं जें यंत्र तयार केलें आहे तेंहि साधें व सुलभ असें आहे. तें यंत्र घरच्या घरीं एखाद्या गांवठी सुतार अगर लोहाराचे मदतीनें तयार करून घेतां येईल.

सध्या या छोट्या यंत्रावरच रा. भिडे हे माल तयार करीत असतात. सतत आठ तास काम केल्यास हें यंत्र साठ हजार काड्या कापतें, इतकी या यंत्राची कर्षणशक्ति आहे. त्याचप्रमाणें यंत्रांत आणखी थोडीशी सुधारणा केल्यास याचें दुप्पट काम करतां येईल असें रा. भिडे यांचें म्हणणें आहे. यंत्राचे बाबतींत श्रीमंत बाळासाहेब मिरजकर यांनींच प्रारंभीं सर्व प्रकारचें साहाय्य केलेलें आहे. रा. भिडे यांचा प्रारंभीचा हेतु ठिकठिकाणीं लोकांनीं ही माहिती घेऊन घरच्या घरीं काड्याच्या पेट्या तयार कराव्या असा होता व त्याप्रमाणें त्यांनीं महाराष्ट्र व कर्नाटक या प्रांतांत आणि गोव्यापैकीं कांहीं भागांत प्रचार करून ठिकठिकाणीं जाहीर रीत्या आगपेटी तयार करण्याची सप्रयोग माहिती दिली व सदरहू माहिती देतांना त्याचे रसायनासंबंधीं प्रयोगहि करून दाखविले. परंतु त्यांचे इच्छेप्रमाणें त्यांना त्या वेळीं यश प्राप्त झालें नाहीं. तेव्हां रा. भिडे यांनीं स्वतःच एक कारखाना काढण्याचा विचार ठरविला. परंतु कोणतीहि गोष्ट ठरविणें जितकी सोपी असते तितकीच ती प्रत्यक्ष कृतींत उतरवून दाखविणें अवघड असते, याचाहि अत्यंत कटु असा अनुभव श्री. भिडे यांना लवकरच येऊं लागला.

कारखाना काढण्यास अंदाजीं दहा हजार रुपये तरी कमींत कमी भांडवल पाहिजे. त्याशिवाय हें कार्य शेवटास जाणार नाहीं म्हणून भांडवल गोळा करण्यास श्री. भिडे यांनीं सुरुवात केली. शेवटीं अनुकूल–प्रतिकूल अशा वातावरणांत फिरून श्री. भिडे यांनीं कांहीं थोडे भांडवल गोळा केलें; शिवाय त्यांनीं ठिकठिकाणच्या प्रदर्शनांत जाऊन आपला माल लोकांनीं घ्यावा याविषयीं बरीच खटपट केली व त्यांत त्यांना यश थोड्या–फार प्रमाणांत आलें. मुंबईसरकार व इतरत्र २–४ संस्थानिकांकडून त्यांना रौप्य व सुवर्णपदकें मिळालीं व कांहीं थोडें आर्थिक साहाय्यहि झालें. परंतु तेवढ्यावर कारखाना नियमित-पणें सुरू करणें शक्य नव्हतें. यामुळें श्री. भिडे यांना द्रव्यसाहाय्यार्थ आणखी बरेच दिवस फिरावें लागलें व अखेरीस १९३१ सालीं भिडे यांनीं 'शुद्ध स्वदेशी फिरती संस्था' हें नांव बदलून आंधळी या गांवांत 'भिडे इंडस्ट्रियल मॅचवर्क्स' या नांवाचा कारखाना सुरू केला. मध्यंतरीं चालू असलेल्या राष्ट्रांतील लढ्यामुळें श्री. भिडे यांना बाहेर कोठें संचार करतां येईना व अर्थातच त्यामुळें कारखान्याची द्रव्याची उणीव भरून काढण्यास, त्याचप्रमाणें मालाचा खप होण्यास, दुसरा एखादा उपाय शोधून काढल्याशिवाय हा कारखाना सुरळीतपणें चालणें शक्य नाहीं, असें दिसून आल्यावरून श्री. भिडे यांनीं द्रव्यसंपादनार्थ पुढील योजना अमलांत आणिली व त्या कामीं त्यांना थोडें साहाय्यहि मिळालें.

प्रत्येक व्यक्तीनें रुपये दहाचा एक भाग याप्रमाणें एक हजार व्यक्ती मिळाल्यास दहा हजार रु. भांडवलहि

मिळेल. शिवाय तयार झालेल्या मालास कायमचें गिऱ्हाईकहि मिळेल. दरसाल द. शें. २॥ टक्केप्रमाणें मुदलाची रक्कम परत करण्यांत येईल व दहा हजार रुपयांची भरती झाल्यावर जो कांहीं फायदा होईल तोहि सर्वांना देण्यांत येईल. त्याचप्रमाणे १० भाग जे घेतील ते सल्लागार, अशा रीतीनें श्री. भिडे यांना आतांपावेतों शंभर लोकांनीं साहाय्य केलें आहे. त्याचप्रमाणें श्री. भिडे यांनीं नियमाप्रमाणें गेल्या वर्षीचे लोकांस त्यांचे मुदलापैकीं २॥ टक्के रक्कम मालाचे अगर पैशाचे रूपानें ज्याच्या त्याच्या इच्छेप्रमाणें परत केली आहे. सध्या श्री. भिडे यांचे कारखान्यांत ४ माणसें काम करीत असून मासिक खर्च अंदाजीं ७०-८० रुपयांचा आहे व भांडवल अवघें हजार दीड हजार येवढेंच जमलेलें आहे; म्हणजे कारखाना स्वतःचे पायावर उभा राहण्यास त्यास अजून बऱ्याच द्रव्यसाहाय्याची आवश्यकता आहे. बाजारांत परदेशी मालाच्या चढाओढी-मुळें सध्या द्रव्यसाहाय्याची अत्यंत आवश्यकता आहे. व जनतेनें श्री. भिडे यांनी आतांपर्यंत चालविलेल्या कार्यास जी कांहीं थोडीफार मदत केली आहे, तशीच यापुढेंहि करावी असें आम्हास वाटतें. तशी मदत झाल्यास श्री. भिडे यांनाहि जास्त उमेदीनें काम करण्यास सोयीचें पडेल व सध्या रोज ७-८ रुपयांचाच माल तयार होतो तोच जास्त प्रमाणांत होईल असें आम्हांस वाटतें. मात्र चालकांनीं उत्तम तऱ्हेचा माल निघेल ही दक्षता सदैव घेतली पाहिजे.

# स्फुट सूचना

१ मुंबईच्या 'श्रीलोकमान्य' पत्राच्या ता. ७ मार्चच्या अंकांत एका 'नागरिकाचें' पत्र प्रसिद्ध झालें आहे. त्यांत त्यानें "चवथरा तयार झाला, पण पुतळा कोठें आहे?" असा प्रश्न करून "मुंबईतील टिळक-स्मारक कमिटीचे सभासद केव्हां जागे होणार?" असेंहि विचारलें आहे. पण यासंबंधानें आम्हांला जी माहिती मिळाली तिजवरून असें दिसतें कीं, स्मारक कमिटी मुळींच झोंपी गेलेली नसून ती पूर्णपणें जागृत आहे. कारण कराराप्रमाणें मूर्तिकार फडके यांना जी रक्कम आगाऊ द्यावयाची ती केव्हांच पुरी देऊन टाकून, पुतळा लवकर तयार व्हावा व आपल्या स्वाधीन करण्यांत यावा असा तगादा कमिटीनें फडके यांजकडे एकसारखा सुरू ठेवला आहे; व पुतळा हातीं येतांच उरलेली रक्कमहि रा. फडके यांना देण्याकरितां तयार ठेवण्यांत आली आहे. याहून कमिटी झाली तरी अधिक काय करणार! पुतळा पुरा करण्याचें काम आतां रा. फडके यांचेकडेच राहिलेलें आहे. तसेंच आमच्या माहितीप्रमाणें मुंबईस तयार झालेल्या मातीच्या पुतळ्यावरून काढलेले प्लास्टर ऑफ पॅरिसचे छाप तयार होऊन, ते कोल्हापूर येथील सुप्रसिद्ध चित्रकार व मूर्तिकार रा. बाबूराव मिस्त्री पेंटर यांचे हातीं जाऊन पडले आहेत. लवकरच त्यावरून मेणाचे छाप काढवून घेऊन, पुढें किर्लोस्करवाडी येथील लोखंडाच्या मोठ्या कारखान्यांत ब्रॉंझ धातूचा पुतळा ओतवण्याचें काम रा. बाबूराव पेंटर हे किर्लोस्कर बंधूंच्या साहाय्यानें करणार आहेत.

---

२ अशा रीतीनें पुतळा प्रत्यक्ष ओतण्यापर्यंत मजल आली असून, तो पुरा करण्याचें काम श्री. बाबूराव पेंटर हे चांगलें करून देतील व रा. फडके यांना आपला करार पुरा करण्यास समर्थ करतील असा भरंवसा आहे. फडके यांच्याशीं कमिटीनें करार केला त्यांतील मुदत टळून गेली ही गोष्ट खरी. पण पुतळा आज तयार असता तरी मुंबईत हल्लीची वेळ पुतळा उभा करण्यास सोईची नाहीं. म्हणून, अजून पुढील एक दोन महिन्यांत, पुतळा ओतून घासूनपुसून उभा करण्याच्या स्थितींत कमिटीच्या स्वाधीन झाला तरी, फारसें बिघडलें असें कोणी म्हणणार नाहीं. कसेंहि असो; पुतळा-कमिटीला हल्लींच्या स्थितींत रा. फडके यांच्या मागें तगादा सुरू करून फक्त वाट पाहाणें याशिवाय दुसरा मार्ग उरलेला नाहीं. कमिटीनें फडके यांस दिलेल्या रकमेचा कांहीं मोबदला आज सिद्ध झाला आहे असें म्हणता येईल. कारण पुतळ्याची मजल मेणाच्या छापापर्यंत पोहोंचलेली आहे. तथापि उरलेलें काम थोडें असलें तरी महत्त्वाचें आहे हें जाणून, प्रो. फडके व प्रो. बाबूराव पेंटर हे आपली कामगिरी शक्य तितक्या लवकर पार पाडतील अशी आम्हांला आशा वाटते. 'नागरिका'सारख्या टिळकभक्तांना इतकी उतावळी वाटावी हें त्यांच्या टिळकभक्तीचें निःसंशय लक्षण होय. पण यांत पुतळा-कमिटीकडे कांहीं दोष आहे असें आम्हांस तरी वाटत नाहीं.

---

३ गोमांतकांत नवहिंदूंना हिंदूंच्या स्मशान-भूमींत प्रेतें दहन करण्यास तेथील अधिकाऱ्यांनीं मनाई केली तेव्हां त्याबद्दल पुष्कळच गवगवा झाला,

आतां गोवें-सरकारतर्फे असें जाहीर करण्यांत आलें आहे कीं जुने हिंदु आपल्या स्मशानांत नवहिंदूंच्या प्रेतांना दहन करूं देत नाहीत त्यामुळे नवहिंदु आपल्या इच्छेप्रमाणें इतरत्र प्रेतांची व्यवस्था करतात, म्हणून सरकारनें त्यांच्या प्रेतांची व्यवस्था आपल्याकडे घेतली. हें उत्तर दिल्यानंतर, म्हणजे ता. २९ रोजीं, चिंबल येथें एक नवहिंदु वारला. तेव्हां पणजी अगर रायबंदर येथील हिंदू आपल्या स्मशानभूमींत नवहिंदूंच्या प्रेतांना दहन करण्यास जागा देण्यास तयार असल्याचें नवहिंदूंनीं सरकारी अधिकाऱ्यांस कळविलें व सरकार हिंदूंच्या स्मशानांत दहन करण्यास परवानगी देत नसेल तर ख्रिस्ती स्मशानभूमींतच पण हिंदूंच्या पद्धतीप्रमाणें भूमी शुद्ध करून दहन करण्यास परवानगी द्या अशी त्यांनीं मागणी केली. ख्रिस्ती स्मशानांत हिंदूंचीं प्रेतें दहन करूं देणें अधिकाऱ्यांस इष्ट वाटलें नाहीं, म्हणून असो अगर अन्य कारणानें असो, गोमांतकीय अधिकाऱ्यांनीं नवहिंदूंच्या प्रेतांना हिंदूंच्या स्मशान-भूमींत दहन करण्यास माघ व. ९ रोजीं परवानगी दिली व त्याप्रमाणे ता. १ रोजीं वरील मयत मनुष्याचें दहन हिंदु स्मशानभूमींतच करण्यांत आलें. अशा रीतीनें हिंदु समाजावरील एक मोठा अन्याय गोमांतकीय अधिकाऱ्यांनीं दूर केला याबद्दल ते अभिनंदनास पात्र आहेत. नवहिंदूंच्या मार्गांत अशाच प्रकारचीं आणखी असलेलीं विघ्नेंहि सदर अधिकारी दूर करून आपल्या लोकसत्तेचा गौरव वाढवितील अशी आम्हांस आशा आहे.



# फ्रान्सचे मुत्सद्दी एम्. ब्रियांद

(ले. श्री. मा. पं. सोमण बी. ए. (ऑनर्स) पुणें.)

शतेषु जायते शूरः सहस्रेषु च पण्डितः ।
वक्ता दशसहस्रेषु दाता भवति वा न वा ॥

फ्रान्सचे मुरब्बी मुत्सद्दी व जागतिक शांततेचे पुरस्कर्ते एम. ब्रियांद हे ता. ७ मार्च रोजीं पॅरिस येथें आपल्या वयाच्या ७० व्या वर्षी कालवश झाले हें वृत्त प्रसिद्ध झालेंच आहे. अमेरिकेचे प्रे. विल्सन, इंग्लंडचे रॅम्से मॅक्डोनाल्ड व फ्रान्सचे एम. ब्रियांद ह्या त्रिमूर्तीनें युरोप खंडांतच नव्हे तर साऱ्या विश्वांत शांतता प्रस्थापित करण्याचे मनः-पूर्वक प्रयत्न केले. अशा या शांतिदूताचें चरित्र अनेक दृष्टींनीं मार्गदर्शक होणारे आहे.

## गरिबांचा वाली

खाणींत रत्न सांपडावें त्याप्रमाणें पुरुषरत्नांचा जन्महि क्षुद्र कुळांत आणि विपन्न दशेंत झालेला पुष्कळदां दृष्टीस पडतो. सुप्रसिद्ध संशोधक थॉमस एडिसन किंवा भाषाप्रभु डॉ. जॉन्सन यांचा जन्म जसा हीन कुलांत झाला, तसाच फ्रान्सचे लोकप्रिय मुत्सद्दी एम्. ब्रियांद यांचा जन्महि ता. २८ मार्च १८६२ सालीं नान्टीज गांवीं एका खाणावळवाल्याच्या गरीब कुळांत झाला. परंतु जन्म हा दैवाधीन असला तरी पौरुष हें मानवाधीनच आहे. पौरुषाला किंवा कर्तृत्वाला वय किंवा वंश, जन्म किंवा जात रोखूं शकत नाहीं. एम्. ब्रियांद हे जन्मतःच तैलबुद्धीचे असल्यानें आपल्या बुद्धीचे जोरावर नशीब काढण्याचें त्यांनीं ठरविलें. बुद्धीचें लालित्य वाङ्मयांत जसें दिसून येत तसा तिचा पैलूदारपणा वकिलींत दृग्गोचर होतो. एम्. ब्रियांद हे जात्याच हुशार असल्यानें ते लवकरच वकीलींत पुढें आले; व वकील म्हणून त्यांचा विशेष नांवलौकिक होण्यास ' गस्टेव्ही हर्व्हो ' हा खटला कारणीभूत झाला. हा खटला मालक व मजूर यांजमधील असल्यानें व मजुरांच्या बाजूनें तो यशस्वीपणे लढला गेल्यानें एम्. ब्रियांद म्हणजे गरिबांचा वाली असें मजुरांना वाटूं लागलें. १८९४ सालच्या नान्टीज येथील मजूर परिषदेंत एम. ब्रियांदचा सार्वत्रिक संपाचा ठराव प्रचंड बहुमतानें पसार झाला. ब्रियांदवरील मजुरांचें प्रेम आणि विश्वास पाहून लोक त्याला फ्रेंच सोशॅलिस्ट पक्षाचा पुढारी समजूं लागले.

## धनाढ्यांची यक्षभूमि

नान्टीज येथें कांहीं वर्षे वकिली केल्यावर एम-ब्रियांद पॅरिसला आले. पॅरिस म्हणजे विश्वाची विलास-भूमि आणि धनाढ्यांची यक्षभमि. फ्रान्सची ती

राजधानीच असल्यानें आपल्या कर्तृत्वाला विशाल क्षेत्र मिळेल याच महत्त्वाकांक्षेनें ब्रियांदनें पॅरिसचा आश्रय केला. परंतु अमरावतीमध्यें शंकर गेला तरी तो कफल्लकच, तशीच ब्रियांदची स्थिति होती. पॅरिस शहर श्रीमंतीनें मुसमुसलेलें आणि ऐश्वर्यानें नटलेलें खरें; परंतु ब्रियांदवर अजून श्रीचें तेज चढलें नव्हतें. ब्रियांदकडे लक्ष्मीनें जरी पाठ फिरविली होती तरी सरस्वतीचा वरदहस्त मात्र त्यावर पूर्ण होता. श्रीमंती हाच कर्तृत्वाचा झरा असता तर किती तरी लक्ष्मीधर विक्रमसिंह बनले असते. परंतु विधात्याची योजना तशी दिसत नाहीं. ब्रियांदच्या अंगावर श्रीमंतीची शाल नव्हती तरी त्याच्या मुखश्रीवर उज्ज्वल वक्तृत्वाची कांति विलसत होती. वक्तृत्वाची मोहिनी कांहीं विलक्षणच ! सरस्वतीनें ब्रह्मदेवाला वेडावलें, बर्कनें पार्लमेंट सभेला भुलविलें आणि ब्रियांदनें साऱ्या फ्रान्सला आपल्या वक्तृत्ववेणूनें गुंगविलें. पॅरिसला आल्यावर त्यानें ट्रेड यूनियन्समध्यें प्रवेश केला. बोर्सी डी ट्रॅव्हेल हें ट्रेड यूनियन्सचें केन्द्र असल्यानें तेथें मजुरांच्या टोलेजंग सभा भरत व एम्. ब्रियांद आपल्या मधुर वक्तृत्वानें श्रोत्यांचे हृदयतंतू छेडून सर्व वातावरण स्पंदित करी. त्याच्या वक्तृत्वाच्या कीर्तीनें थोड्याच दिवसांत सर्व देश दुमदुमून गेला. घराचा उंबरठा, गांवाची शीव आणि प्रांताची मर्यादा ओलांडून त्याची कीर्ति हंसीप्रमाणें फ्रान्सभर डौलानें विहरूं लागली. वक्तृत्वगुणाच्या जोरावरच १९०२ सालीं सेंट चामोंड या विभागातर्फे ब्रियांद हा फ्रान्सच्या पार्लमेंट सभेंत लोकप्रतिनिधि म्हणून प्रथम निवडून आला व त्या दिवसापासून त्याची भाग्यश्री विकास पावूं लागली.

### अमोघ वक्तृत्व

योग्य संधि येतांच तीवर स्वार होऊन कर्तबगारीची दौड मारणें हें तर सुज्ञांचें लक्षण. प्रथम प्रथम एम. ब्रियांदनें पार्लमेंटाच्या चर्चेत त्रिदंडी संन्यासी अर्जुनाची भूमिका घेतली होती. काय काम चालेल तें पहावयाचें, कोणी कांहीं विचारतांच 'नारायण नारायण' हा मंत्र जपावयाचा, असा क्रम त्यानें चालू ठेवला होता. परंतु चिरवांछित अशी आपली प्रिया सुभद्रा येतांच छाटी, लंगोटी फेंकून अर्जुनानें आपलें सत्य स्वरूप प्रकट केलें व सुभद्रेला पळविली, त्याचप्रमाणें जेंडरमीज या सभासदानें खाण-मजुरांवर टीकास्त्रांचा वर्षाव करण्यास सुरुवात करतांच ब्रियांदनें आपल्या वक्तृत्वाचें अमोघ व तीक्ष्ण शस्त्र काढून ते कुशल योद्ध्याप्रमाणें इतक्या सफाईनें व परिणामकारक पद्धतीनें चालविलें कीं, त्या दिवशींच पार्लमेंट सभा त्यानें आपल्या काखेत मारली. त्याच्या वक्तृत्वाचा परिणाम इतका विलक्षण झाला कीं, जॉर्जेस क्लेमेंको यांनीं ताबडतोब एम. ब्रियांद याचा आपल्या मंत्रिमंडळांत समावेश करून घेतला. 'चक्रारपङ्क्तिरिव गच्छति भाग्यपङ्क्तिः' म्हणतात तें यालाच.

### पहिला विजय

सातव्या एडवर्ड बादशहाची अशी गोष्ट सांगतात कीं, तो युवराज असतांना मोठमोठ्या मुत्सद्यांनाहि बिकट वाटणारे आंतरराष्ट्रीय प्रश्न आपल्या मधुर भाषणानें सहज लीलेनें सोडवी. एम्. ब्रियांद यानींहि १९०६ सालीं राजसंस्था व धर्मसंस्था यांच्यांतील नाजूक भांडण मोठ्या चातुर्यानें सोडविलें. १९०६ सालीं एम्. सारियेनच्या मंत्रिमंडळांत शिक्षणमंत्री असतांना एम्. ब्रियांदची मुत्सद्देगिरी प्रथमच कसोटीस लागली. ब्रियांद हा सोशॅलिस्ट म्हणून गणला जात असे याचा उल्लेख वर एके ठिकाणीं आलाच आहे. अर्थात् लोकांचा समज असा कीं, 'देव म्हणजे दगड व मठ म्हणजे भोंदूंची शाळा' असेंच मत ब्रियांदचेंहि असेल. आतां ब्रियांद हा मुत्सद्दीच असल्यानें धर्मसंस्थेविषयीं त्यांचें खरें-खुरें मत काय होतें हें उघडकीस आलें नाहीं. तरी त्याची वागणूक मात्र अशी होती कीं, त्यानें धर्मसंस्थांना थोडेंसुद्धां न दुखवितां राजसंस्थेपासून त्यांची फारकत केली. या धोरणानें त्यानें धर्मसंस्था तर कायम ठेवल्याच, परंतु त्यांची समाजांतील प्रतिष्ठाहि अस्थिर होती तिला स्थिर स्वरूप आणून दिलें. तरुण ब्रियांदचा हा पहिला व मोठाच विजय होय.

### फ्रान्सचा मुख्य मंत्री

फ्रान्सच्या राजकारणाची तुलनाच करावयाची तर ती कमलपत्रावरील जलबिंदूशीं करतां येईल. चांचल्य आणि क्षणभंगुरत्व हे दोन दोष फ्रान्सच्या राजकारणांत किंवा मर्यादित अर्थानें त्याच्या मंत्रिमंडळांत दिसून येतात. एका क्षणांत मंत्रिमंडळ बनावें व दुसऱ्या क्षणीं जलबिंदूप्रमाणें तें विरून जावें इतकी त्याची चंचल स्थिति. अशा मंत्रिमंडळाचे ११ वेळां मुख्य प्रधान होणें व त्यांत २५ वेळां प्रधानपद मिळविणें हें कर्म फार कठिण आहे. परंतु ब्रियांदने तें शक्य करून दाखविलें. १९०९ सालीं क्लेमेंको-सरकार पदभ्रष्ट झाल्यावर एम्. ब्रियांदनें पहिल्यानेंच मंत्रिमंडळ बनविलें व तो त्याचा मुख्य प्रधान झाला. आपण आपल्या कारकीर्दीत राष्ट्रीय जागृति व शांततासंस्थापन या दोन गोष्टी करणार आहोंत असें त्यानें आपलें धोरण जाहीर केलें आणि हें धोरण त्याच्या स्वभावानुरूपच होतें. बोलाफुलाला गांठ पडावी त्याप्रमाणें किंवा काकतालीय न्यायानें १९०९ सालीं त्यानें शांततास्थापनेचें धोरण जाहीर करतांच १९१० सालीं रेल्वे-कामगारांच्या सार्वत्रिक संपाची भयंकर वावटळ उठली. या वावटळीमुळें

औद्योगिक जीविताच्या सर्व नाडया आंखडल्या गेल्या. आणखी कांहीं दिवस संप चालता तर मोठीच बेबंदशाही माजण्याचा सुमार होता. परंतु चमत्कार असा कीं, ब्रियांदच्या ' रिझार्व्हिस्ट ' या एका संबोधनाने संपाचा वणवा एकदम विझला ! क्षणात् स्मशान कीं क्षणात् उद्यान अशांतलाच हा विलक्षण प्रकार !

## मंत्रिमंडळांचे जन्ममृत्यू

एम्. ब्रियांदनें आपल्या कारकीर्दीत राष्ट्रोपयोगी कार्यांना आरंभ केला होता तरी त्याचें मुख्य मंत्र्याचें आसन स्थिर राहूं शकलें नाहीं. १९११ सालीं त्याला अधिकारभ्रष्ट व्हावें लागलें. समुद्रपृष्ठावर वीचीमागून वीचि उठून त्या सर्व समुद्रगर्भांत विलय पावतात, त्याप्रमाणें ब्रियांद-मंत्रिमंडळानंतर अनेक मंत्रिमंडळें उत्पन्न झालीं व लय पावलीं. १९१३ सालीं मात्र कांहीं कालापर्यंत फ्रान्सच्या क्षोभित समुद्रावर ब्रियांदनें आपली सत्ता चांगलीच गाजविली. महायुद्धाच्या उद्‌भवापर्यंत मंत्रिमंडळांच्या जन्ममृत्यूचें चक्र असेंच फिरत होतें. महायुद्ध सुरू होतांच एम. व्हिव्हियानी हे मुख्य प्रधान झाले व एम्. ब्रियांद यांना न्यायमंत्र्याची जागा मिळाली. १९१५ सालीं एम्. ब्रियांद हे पुनः मुख्य प्रधान झाले. परंतु या खेपेस प्रधानकीचें सुख त्यांना काय तें १२ महिनेच भोगतां आलें. १९१५ सालीं ब्रियांद हे मुख्य प्रधान असतां रुमानिया हा दोस्त राष्ट्रांना येऊन मिळाला आणि एम्. ब्रियांद यांच्या केवळ अनुनयानेंच दोस्त राष्ट्रांनीं सॅलोनिकाकडे आपलीं सैन्यें पाठवून रुमानियाला सक्रिय मदत केली. दोस्त राष्ट्रांची संघटना मजबूत राहण्यासाठीं एम. ब्रियांद यांनीं जिवापाड मेहनत घेतली व त्यांच्या वक्तृत्वाच्या पुंगीनें भारूनच फ्रान्सनें महायुद्धाचें दिव्य अखंडपणें चालविलें. १९२१ सालीं लेग मंत्रिमंडळ कोसळल्यावर एम. ब्रियांद यांनीं मंत्रिमंडळाची धुरा स्वस्कंधावर पुनः धारण केली व आपल्याकडे परराष्ट्रीय मंत्र्याचें जोखमीचें काम घेतलें. परराष्ट्रीय मंत्री असतांना व्हर्सेलीसच्या तहांतील अटीप्रमाणें नुकसानभरपाईच्या रकमा जर्मनीकडून सामोपचारानें घेण्यांत त्यानें आपलें सर्व लक्ष वेंचलें. त्याच वर्षी हिवाळ्यांत वॉशिंग्टन येथील नाविक निःशस्त्रीकरण-परिषदेच्या अधिवेशनाला फ्रान्सचे प्रतिनिधि म्हणून ते उपस्थित होते. परंतु त्या परिषदेंतील त्यांचें शस्त्रनियंत्रणाचें धोरण फ्रेंच लोकांना पसंत पडलें नाहीं. १९२२ सालीं या विरोधाचा पारा इतका वर चढला कीं, कॅनिस येथें लॉईड जॉर्ज यांच्याशीं अँग्लो-फ्रेंच संरक्षण कराराची चर्चा ते करीत असतांच एम. मिलरँड या मुख्य प्रधानांच्या तारेवरून त्यांना आपल्या मंत्रिपदाचा राजीनामा देणें भाग पडलें.

## शांतीचा दूत

ता. १२ जानेवारी १९२२ सालीं त्यांना आपल्या मंत्रिपदाचा राजीनामा द्यावा लागला तरी लोकमताच्या चक्रानें उलट खाऊन १९२५ च्या एप्रिलमध्यें पेनलीव्ह यांच्या मंत्रिमंडळांत ब्रियांद यांना पुनः परराष्ट्रीय मंत्र्याचें पद देण्यांत आलें. १९२५ सालच्या ऑक्टोबरमध्यें लोकार्नो करार झाला व त्यामुळें एम. ब्रियांद यांची कीर्ति युरोपियन राष्ट्रांतूनहि संचार करूं लागली. १९२६ सालीं परराष्ट्रीय मंत्री या नात्यानें एम. ब्रियांद यांनीं युरोप खंडांतील सर्व राष्ट्रांची आर्थिक संघटना करण्याची चळवळ चालविली. महायुद्धाच्या प्रळयांत सर्वच राष्ट्रें होरपळून निघालीं व त्यांत त्यांचें आर्थिक नुकसान अतोनात झालें. तरी यापुढें असला प्रसंग ओढवूं नये व सर्व राष्ट्रांच्या एकीकरणानें परस्परांतील व्यापारविषयक व राजनीतिविषयक व्यवहार सुरळीत चालून सर्वत्र शांतता स्थापन व्हावी हा या आर्थिक संघटनेच्या बुडाशीं हेतु आहे. परंतु ही कल्पना अजूनपर्यंत तरी कलिकावस्थेंतच आहे. एम. ब्रियांद यांची ही शांततास्थापनेची कल्पना इतकी सर्वसंमत झाली कीं, एम. ब्रियांद यांना शांततेचें 'पारितोषिक' (नोबेल पीस प्राइझ) देण्यांत आलें. एम. ब्रियांद यांचें सर्वच आयुष्य कर्तृत्वानें फुललेलें आहे. कुशाग्रबुद्धि, बृहस्पतितुल्य वक्तृत्व, दूरदृष्टि, मुत्सद्देगिरी, शांततास्थापनेची अहर्निश कळकळ, राष्ट्रहितेच्छा व कार्यक्षमता इत्यादि अनेक बहुमोल गुणांनीं एम. ब्रियांद यांनीं आपल्या बांधवांच्या अन्तःकरणांतील चल सिंहासनावर अढळ पद मिळविलें आहे. वक्तृत्वाचा गुण ही ईश्वरी देणगी आहे व कवीनें वर्णन केल्याप्रमाणें ती दुर्लभ आहे. परंतु त्याच सरस्वतीचा वरदहस्त एम्. ब्रियांद यांच्यावर पूर्ण होता. असा हा कार्यकुशल मुत्सद्दी, राष्ट्रसंघाचा कर्णधार, शांतीचा दूत व अप्रतिम वक्ता जगाच्या आर्थिक दुःस्थितीच्या काळांत व रेपरेशन परिषद भरण्यापूर्वी ता. ७ मार्च १९३२ रोजीं पॅरिस येथें कालवश झाला, याबद्दल फ्रेंच लोकांनाच नव्हे तर साऱ्या युरोप खंडाला हळहळ वाटणें साहजिक आहे.

# राष्ट्रसंघाचें अडतें कोठें ?

राष्ट्रसंघाच्या कारभाराचा विचार करतांना प्रथम एक गोष्ट लक्षांत घ्यावी लागते; ती ही कीं, राष्ट्रसंघानें द्यावयाचा निर्णय सभासदांच्या केवळ बहुमतानें द्यावयाचा नसून एकमतानें द्यावयाचा असतो. बहुमतानें निर्णय द्यावयाचा असला म्हणजे आपल्या मताकडे बहुमत मिळविण्याकरितां चढाओढ लागते. यामुळें वादविवाद, विचारविनिमय जलद होत जाऊन निर्णयहि लवकर होतो. एकाद्या मताचा विशेष आग्रह असणाऱ्या सभासदास इतर प्रत्येक सभासदाच्या सहकार्याची बहुमताकरितां गरज असल्यानें प्रत्येकास एकमेकांशीं आर्जवानें अथवा आग्रहानें वागून आपल्या बाजूस ओढून घेण्याची खटपट करावीच लागते. यामुळें अनुकूल, प्रतिकूल युक्तिवाद सभासदांपुढें झपाझप येऊन लहानसान मतभेदांच्या तडजोडी लवकर होतात व अखेर दोनच विरुद्ध पक्षांत वाद रंगतो; आणि निकाल बहुमतावर असल्यामुळे पुढें विशेष वादाची गरज रहात नाहीं. ज्याचें बहुमत त्याचें यश ठरून वाद निर्णयांत निघतो.

### एकमती निर्णय

एकमतानें निर्णय करण्याच्या पद्धतींत सर्व याच्या उलट घडतें. एकाद्या मताचा विशेष आग्रह असणाऱ्या सभासदास तें मत संघाकडून मान्य करून घेणें कठिण खरेंच; पण संघालाहि त्याच्या विरुद्ध जाणें तितकेंच कठिण असतें. कोणत्याहि मुद्दयावर एकाखेरीज बाकीच्यांचें एकमत झालें तरी या सर्वांना, विरुद्ध असणारा एकजणहि हाणून पाडूं शकतो. प्रत्येकाचें एकटें मत बाकीच्या सर्वांच्या एकमत्याशीं तुल्यबल असल्यानें कोणासहि इतरांचें मत आपणास अनुकूल करून घेण्याकरितां आग्रह, आर्जव अथवा तडजोड करण्याची गरज वाटत नाहीं. यामुळें कौन्सिलांत अथवा असेंब्लींत परस्परविरुद्ध अशीं दोनच मतें—दोनच पक्ष—एकाद्या मुद्यावर कधीं होतील असा कांहींच नेम नाहीं. प्रत्येक सभासदाचें वेगवेगळें मतहि असूं शकेल. केवळ स्वमताचा हट्ट आणि आडमुठेपणा असला म्हणजे सर्व राष्ट्रांना आपल्याविरुद्ध जाण्यास प्रतिबंध करतां येतो. आणि वादाचें भिजत घोंगडें कितीहि दीर्घ काल तसेंच ओलें राहूं शकतें. पंचनामा होईना म्हणून बेवारशी प्रेत जसें कुजत पडावें तशी राष्ट्रसंघापुढें आलेल्या वादाची गत होत असते, याचें प्रमुख कारण ही एकमती निर्णयपद्धति आहे.

### चेंगट कार्यपद्धति

कोणताहि वाद निर्णयाकरितां संघापुढें आला म्हणजे त्याचा निर्णय होईपर्यंत जो कार्यक्रम ( प्रोसीजर ) अमलांत यावयाचा असतो त्याचाहि चेंगटपणा हाच विशेष गुण आहे. हा कार्यक्रम असा:—

'असेंब्ली' हें संघाचें मोठें मंडळ असून 'कौन्सिल' हें त्याचें पोटमंडळ आहे. अमुक मुद्दा विचाराकरितां कौन्सिलपुढें यावा असें असेंब्लीनें ठरविलें म्हणजे कौन्सिल तो प्रश्न विचारांत घ्यावा असा ठराव करून त्या प्रश्नाचा अभ्यास करण्याकरितां कमिशन नेमावें असें ठरवितें. कौन्सिलाचें एक मोठें चिटणीसमंडळ आहे. या मंडळाकडून सदर प्रश्नाशीं संबंध असणाऱ्या सरकारांना कौन्सिलचा कमिशन नेमण्याचा ठराव कळविण्यांत येतो व कमिशनावर माणसें कोण देतां तीं कळवा, अशी त्यांना विनंति केली जाते. हीं नांवें मग जिनीव्ह येथील राष्ट्रसंघाच्या कचेरीकडे येतात. पुढें अभ्यास—समिति नेमली जाऊन, तिचे सभासद एकत्र जमतात. त्यांपुढें ज्या राष्ट्रानें सदर प्रश्न विचारार्थ मांडावयाचा त्याचें प्रतिनिधिमंडळ येऊन तो प्रश्न मांडतें. हे प्रतिनिधी म्हणजे वास्तविक 'प्रतिनिधि' ( रिप्रेझेंटेटिव्ह ) नसून 'डेलिगेट' म्हणजे उच्च दर्जाचे 'प्रेषित' असतात. कारण 'रिप्रेझेंटेटिव्ह'ला आयत्या वेळीं स्वतंत्र विचार करून हवी तशी तडजोड करण्याचा, आग्रह धरण्याचा जो व्यापक हक्क असतो तितका व्यापक हक्क या 'डेलिगेटां'ना नसतो. कोणताहि नवीन मुद्दा वेळोवेळीं उपस्थित होईल त्याप्रमाणें आपल्या प्रधानमंडळाचा सल्ला त्यास आणावाच लागतो.

पुढें चर्चा होऊन कमिटी कांहीं तरी निर्णय देते. हा निर्णय ज्या कौन्सिलपुढें यावयाचा त्याचे १४ सभासद १४ राष्ट्रांत असतात. हीं राष्ट्रें सर्व जगावर पसरलेलीं आहेत. या सर्वांकडे कमिटीचा निर्णय पाठविला जातो. कौन्सिल दर तीन महिन्यांनीं एकत्र जमतें. तेथें विचारविनिमय होतो. एकमत न झालें कीं, एकमत पुढें होईल या आशेनें निर्णय लांबणीवर टाकण्यांत येतो. कौन्सिलानें एकमतानें निर्णय दिला म्हणजे तो असेंब्लीपुढें येतो. असेंब्ली वर्षांतून एकदां भरते. पुढें असेंब्लीनें एकमतानें निर्णय दिला म्हणजे मग मात्र त्या निर्णयावर राष्ट्रसंघाचा शिक्का बसतो. एकमती निर्णयाची अट अभ्यास—समित्यांना अथवा सल्लागार-मंडळांना नाहीं. यामुळें चौकशीचें काम बरेंच लवकर होतें खरें; पण अखेर—निर्णय कौन्सिल व असेंब्ली यांनींच करावयाचा असल्यानें व तेथें एक-

मती निर्णयाची अट असल्यानें अखेर–निर्णयास दिरंगाई व्हावयाची टळत नाहींच.

### सभासदांची भिन्नता

बरें, ज्या सभासदांच्या ऐकमत्यावर वादनिर्णय अवलंबून असतो, त्या सभासदांची स्थिति कशी असते पाहा. एका राष्ट्रांत, एका परिस्थितीत, एका संस्कृतींत वाढलेल्या सभासदांत एकाद्या प्रश्नावर केवळ बहुमत मिळवावयाचें असलें तरी कोण सायास पडतात हें सर्वांच्या अनुभवाचेंच आहे. हिंदी कौन्सिलें तर पक्षभेदांनीं बुजबुजलेलींच आहेत. पण युरोप व अमेरिका एवढीं सुधारलेलीं राष्ट्रें ना, त्यांतील राष्ट्रसभांहि आज अनेक पक्षभेदांनीं फाटून गेलेल्या आहेत. राजकारणांत अग्रेसर मानलेल्या ब्रिटिश पार्लमेंटांतहि आज तीनहून अधिक पक्ष झालेले आहेत. एकराष्ट्रीय, सजातीय सभासद असलेल्या राष्ट्रसभांची ही कथा; मग जगभर पसरलेल्या, भिन्न अथवा परस्पर-विरुद्ध धर्म व संस्कृति असलेल्या कदाचित् अहि-नकुलांप्रमाणे एकमेकांस पाण्यांत पाहणाऱ्या, नकट्या, फेपट्या, काळ्या, ढवळ्या अशा भिन्नरंगी, भिन्नरूपी राष्ट्रांतील सभासदांनीं भरलेल्या राष्ट्रसंघाच्या असेंब्लीची व कौन्सिलची दशा काय होत असेल याची कल्पनाहि करणे कठिण आहे. अशा या पक्षभेदांनीं जर्जर झालेल्या कौन्सिलांत व असेंब्लींत एखाद्या मुद्दयावर बहुमत नव्हे तर एकमत व्हावें लागतें. अर्थात् पुष्कळदां तें शक्य होण्यापेक्षां अशक्यच होत असल्यास काय नवल !

### एकांतील अनेकत्व

पण या संकटपरंपरेच्या शाखा आणखीहि दूरवर पसरलेल्या आहेत. संघाच्या सभासद–राष्ट्रांचा आपण इंग्लंड, फ्रान्स, जर्मनी असा एकवचनी उल्लेख करतों; आणि हे घटक परस्पर–विजातीय आहेत एवढीच तक्रार वर गाइली आहे. पण आणखी जरा खोल पाहिलें म्हणजे काय आढळतें पहा. हे एकवचनोल्लिखित घटक तरी एकवचनी कोठें आहेत ! ते एकवचनी नसून बहुवचनी आहेत; इतकेंच नव्हे तर बहुधा परस्पर–विरुद्ध वचनीहि असतात. कोणत्याहि राष्ट्रातर्फेचा सभासद त्या राष्ट्रांत त्यावेळीं अधिकारारूढ असलेल्या पक्षाचा प्रतिनिधि असतो. पण पुढील खेपेस तोच किंवा त्या पक्षाचा व मताचा सभासद संघापुढें येईल अशी कांहीं शाश्वती नाहीं. यामुळे एका राष्ट्रातर्फे अमुक एक मत प्रतिपादन केलें गेलें किंवा मान्य झालें तरी तेवढ्यानें तें त्या राष्ट्रांतील राष्ट्रसभेचा शिक्का पडेपर्यंत कायम झालें असा कांहीं भरंवसा नाहीं. यामुळे निर्णयाची नौका वादाच्या वादळांतून मोठ्या कष्टानें तीराच्या जवळजवळ यावी व एका लाटेची थप्पड बसून पुनः अफाट वादळांत सांपडावी असा चमत्कार पुष्कळदां दृष्टीस पडतो. सॅल्वाडोर द मदेरिगा (Salvador de Madariaga) या संघाच्या शस्त्रसंन्यासखात्याच्या एका माजी संचालकानें असा एक चमत्कार नमूद करून ठेवला आहे. त्याची कथा अशी—

### करारनामे केराच्या टोपलींत कां पडले ?

१९२२–२३ सालीं इंग्लंडांत बाल्डविन यांचा कॉन्झर्वेटिव्ह पक्ष अधिकारारूढ होता. या पक्षांत लॉर्ड रॉबर्ट सेसिल हे एक बडें प्रस्थ आहे. हे गृहस्थ विद्वान्, बुद्धिमान व मोठे थोर मनाचे असून त्यांचें आंतरराष्ट्रीय राजकारणांत मोठेंच वजन आहे. यांनीं त्या वेळीं आपलें वजन खर्चून फ्रेंच सरकाराशीं शस्त्रसंन्यासासंबंधीं एक करार केला. तो त्यावेळीं 'ट्रीटी ऑफ गॅरंटी' या नांवानें प्रसिद्ध झाला होता. लॉर्ड रॉबर्ट (त्या वेळीं नुसते मि. रॉबर्ट) सेसिल हे कांहीं ब्रिटिश प्रधानमंडळाचे प्रतिनिधि म्हणून करारास बसले नव्हते खरे. पण त्यांनीं केलेली गोष्ट बाल्डविन व त्यांचे इतर मंत्री अमान्य करतील ही गोष्ट अशक्य होती. आणि या विश्वासानेंच फ्रेंच सरकार तरी करारांत सामील झालें होतें. पण हा करार होऊन ब्रिटिश पार्लमेंटाकडे मंजुरीस जाण्याच्या सुमारास बाल्डविन पदच्युत होऊन त्यांचे जागीं मॅकडोनाल्डचें मजूर प्रधान मंडळ आलें; आणि त्यांनीं सेसिल साहेबांच्या करारनाम्यास केराची टोपली दाखविली! झालेले श्रम आणि खर्चलेला पैसा व वेळ वाया जाऊन पुन्हां नव्या वाटाघाटी सुरू झाल्या. मॅकडोनाल्ड हेच आतां मुख्य प्रधान व परराष्ट्रीय मंत्रीहि होते. त्यामुळे आतां खासा स्वारीच वाटाघाट करीत होती व तीत सेसिल यांच्याप्रमाणें अप्रातिनिधिकपणा–खाजगीपणा नव्हता. मोठी त्वरा करून १९२४ मध्यें मॅकडोनाल्ड यांनीं एक नवा करार केला. पण हा करार पार्लमेंटच्या मंजुरीकरितां इंग्लंडला पोंचतो, इतक्यांतच मॅकडोनाल्ड यांची नाव उपडी झाली. पुन्हां बाल्डविन अधिकारावर आले. आणि त्यांनींहि उलट मॅकडोनाल्डचा करारनामा पूर्वीच्याच केराच्या टोपलींत टाकला. "राष्ट्रसंघाचा मार्ग" मदेरिगा लिहितो "हा असा जिकडे तिकडे थडग्यांनीं व्यापलेला आहे." अशा स्मशानांतूनहि राष्ट्रसंघ आज दहाबारा वर्षें लंगडत, थडग्याशीं ठेचकाळत, आपलें काम थोडेंबहुत करतो आहे. तेव्हां राष्ट्रसंघाची व्यवहार्यता अल्पांशानें तरी कबूल करावीच लागते. राष्ट्रसंघाच्या जन्मापूर्वीं राष्ट्रसंघाची कल्पना काढणार प्रेसिडेंट विल्सन यांस पुष्कळांनीं मूर्खांत व काढलें होतें. पण कल्पनासृष्टींत असंभाव्य वाटणाऱ्या घटना केव्हां केव्हां इतिहासांत प्रत्यक्ष घडून गेलेल्या दृष्टीस पडतात. तशीच राष्ट्रसंघ हीहि एक अद्भुत घटना आहे.

### सामर्थ्य वाढेल, पण वाढावें काय ?

असें हें जन्मास आल्यापासून रोज मरूं घातलेलें पोर अधिक समर्थ कसें व्हावें! आणि समर्थ होणारच नसेल तर एवढ्या खटाटोपानें जगवावें तरी कां ! असा प्रश्न येथें उत्पन्न होतो. राष्ट्रसंघाचें सामर्थ्य वाढण्यास करतां येण्यासारखी पहिली व महत्त्वाची गोष्ट म्हणजे संघाच्या निर्णयाची एकमताची अट काढून टाकून बहुमताची अट घालणें ही होय, असें कित्येकांचें मत आहे. यामुळें संघाचें सामर्थ्य पुष्कळ नाहीं तरी आजच्याहून अधिक वाढेल हें निश्चित. पण हें सामर्थ्य वाढण्यानें न्यायकर्तृत्वहि वाढेल असें मात्र वाटत नाहीं; उलट कदाचित् कमी होण्याचाच संभव आहे. कारण संघाची घटना मुळांतच सदोष आहे. राष्ट्रसंघ हा दुर्बळ व सबळ राष्ट्रांचा मिळून बनलेला आहे. आजच्या एकमताच्या अटींत दुर्बल राष्ट्रास आपला एकट्याचा हेका इतर सर्वांविरुद्ध चालवितां येतो. पण एकदां बहुमताची पद्धत पडली कीं, समर्थांना बहुमत आपल्या बाजूस वळविणें हें सोपें काम आहे. एक इंग्लंड म्हटलें कीं, वसाहतींमुळें सहासात मतांचा गठ्ठा त्याला प्रतिपक्षाच्या टाळक्यांत मारतां येतो. शिवाय समर्थ, श्रीमंत व कावेबाज यांना बहुमत मिळविण्याचे प्रलोभन, धाक, दडपशाही वगैरे अनेक मार्ग पूर्णपणें माहीत असतात. आणि दुर्बलांना मात्र यांतलें कांहींहि साधन नाहीं. न्याय, अन्याय कांहीं असो, समर्थांना हुकुमी बहुमत केव्हांहि मिळावयाचें. आणि संघापुढें वाद यावयाचे ते बहुधा दुर्बलांना समर्थ राष्ट्रांनीं गांजलें, असल्या तक्रारींचे. त्यांत बहुमतानें निर्णय करण्याची पद्धत पडली म्हणजे चोराकडे न्याय मागण्यासारखाच प्रकार घडावयाचा.

### आजचें दौर्बल्य पुरवलें!

एतावता, जोंपर्यंत जगांत समर्थ राष्ट्रें व दुर्बल राष्ट्रें असें वैषम्य आहे तोंवर बहुमतनिर्णयी पद्धत सुरू करून अथवा कांहीं लोक सुचवितात त्याप्रमाणें संघाच्या दिमतीस सैन्य देऊन संघाचें सामर्थ्य वाढविणें म्हणजे पिंजऱ्यांतून वाघास बाहेर काढून शेळीवर सोडण्यासारखेंच होणार आहे. यापेक्षां राष्ट्रसंघ आज दुबळा आहे तेंच बरें आहे संघाचें अन्याय करण्याचें सामर्थ्य वाढण्यापेक्षां आजचें दौर्बल्य पुरवलें. आजच्या स्थितींत दुर्बळ राष्ट्रांनीं संघाचा होईल तो उपयोग करून घ्यावा, पण अखेर भिस्त आपलें सामर्थ्य वाढविण्यावर ठेवावी हाच एक मार्ग येथें आहे. तसेंच राष्ट्रसंघ मोडून टाकूं म्हटल्यानें तो मोडणारहि नाहीं. समर्थ राष्ट्रांत स्पर्धा चालू असते, आणि द्वेषाची कोंडलेली वाफ बाहेर जाण्यास वाव नसला म्हणजे एकाएकीं युद्धाचा भडका होतो. हा कडू अनुभव आल्यावरून द्वेषाची वाफ थंड करण्याकरितां समर्थ राष्ट्रांनीं राष्ट्रसंघाचें वादपीठ निर्माण केलें आहे. त्यांनाच संघ नको वाटेल तेव्हां ते तो मोडतीलहि; पण तो आहे तोंवर त्यांना दुर्बल राष्ट्रांनीं त्याचा थोडा फार उपयोगहि करूं देणें भाग आहे. तेवढा तो करून घ्यावा. आणि स्वबलासारखा जगांत कोणीच त्राता नाहीं ही मात्र खूणगांठ त्यांनीं बांधून ठेवावी. हेंच दुहेरी धोरण चीननें फार कुशलतेनें सध्या चालविलें आहे. कालांतरानें सर्व राष्ट्रें जवळ जवळ सारख्या प्रमाणांत समर्थ आणि हल्लींहून अधिक सुज्ञ होतील त्या वेळीं राष्ट्रसंघ सर्वांसच हवा आहे व त्याचा पूर्ण फायदाहि तेव्हां सर्वांस मिळणार आहे.

# काश्मीरमधील हिंदूंची स्थिति

### भाई परमानंद यांचें पत्रक

भाई परमानंद व पंजाबचे आमदार रा. ब. सेवकराम हे ता. १ रोजीं काश्मीरला जाण्यासाठीं निघाले. निघण्यापूर्वी त्यांनीं पंजाब–सरकारची काश्मीरला जाण्याबद्दल संमति घेतली होती व पंजाबसरकारनें काश्मीरमधील दंगा झालेल्या विभागाची व्यवस्था करण्यास नेमलेले मि. सॅलिसबरी यांनाहि त्यांच्या आगमनाबद्दल सूचना दिली होती. मि. सॅलिसबरी यांनीं उभयतांना सर्वतोपरी मदत करण्याचें मान्य केलें. भाईपरमानंद यांनीं काश्मीर पाहिलेली परिस्थिति एक पत्रक काढून प्रसिद्ध केली आहे. सदर पत्रकाचा आशय खालीं दिला आहे.

### हे पहा अत्याचार

"मिरपूर या गांवीं निराधार झालेल्या कांहीं हिंदूंना आश्रय मिळाला असला तरी कित्येक पुरुष, स्त्रिया व मुलें हीं प्राणाच्या भयानें अन्नवस्त्रविरहित जानेवारीच्या कडक हिवाळ्यांत रानावनांतून अनेक दिवस हिंडत होतीं. झेलमपासून मिरपूर २५ मैल दूर आहे. या पंचवीस मैलांतील १५ मैल भाग संस्थानाचा आहे. मिरपूरपासून कोटिल गांव ४० मैल, कोटिलपासून पुंच २६ मैल आहे. या ऐशीं मैलांच्या पट्ट्यांतील एकहि गांव अगर त्यांतील एकहि हिन्दु, मुसलमान दंगेखोरांच्या हातून सुटला नाहीं. दंगेखोरांनीं हा प्रदेश उध्वस्त करण्याला ता. २१ जानेवारीपासून सुरुवात केली व नंतरच्या दहा दिवसांत येथें अगदीं प्रळय उडविला. त्यांनीं हिंदूंच्या घरांवर हल्ले चढविले, त्यांत

सांपडतील त्या वस्तू लांबविल्या व नंतर घरांना आगी लावून दिल्या.

"दोन गांवांत तर कित्येक हिंदु स्त्री–पुरुषांना जाळून मारण्यांत आलें. कारण काय, तर त्यांनीं स्वसंरक्षणार्थ गोळीबार केल्याने दंगेखोर चिडले! एका गांवीं १५–२० हजार रुपये किंमतीचीं घरें दंगेखोरांनीं जाळलेलीं आम्हीं पाहलीं. या घरांत पुरलेलें द्रव्य सांपडेल या आशेनें त्यांना खणत्या लावलेल्याहि आढळून आल्या. मिरपूर हें तालुक्याचें मुख्य ठिकाण, तेथे त्या तालुक्यातील हिंदू आश्रयार्थ गेले. तोच प्रकार राजोरी व कोटिल तालुक्यांतील हिंदूंनीं केला. या तालुक्यांतील शेंकडो हिंदु स्त्री-पुरुष आश्रयार्थ तेथें गेले आहेत. नौसेरा, नावशेरा, भिवानी, कंग्रा या गांवीं ३०० ते ४०० निराधार हिंदु आश्रयार्थ असून पुंच येथे दोन हजार हिंदु आहेत. या लोकांखेरीज ब्रिटिश हिंदुस्थानांत शेंकडों हिंदु आश्रयार्थ गेले आहेत. यांपैकीं झेलम येथे ३४०० व गुजरखान, गुजरनवाला, या ठिकाणींहि शेंकडों लोक आश्रयार्थ गेले असून त्यांच्या अन्नवस्त्राची सोय करावी लागत आहे या ऐशीं भलांच्या टापेत दंगेखोरांनी इतका प्रळय केला कीं, नष्ट करण्या सारखी वस्तु न राहिल्यानेच त्यांस हात आवरता घ्यावा लागला!

### अजूनहि अस्वस्थता आहेच

"आजहि या भागांत शांतता स्थापन झाली नाहीं. एका ठिकाणाहून दुसरीकडे जाणें म्हणजे जीव धोक्यांत घालणें आहे. मिरपूर व इतर ठिकाणांहून मदत पाठविण्याबद्दल पत्रें व निरोप सारखे येत आहेत. आम्हीं या सर्व गोष्टी मि. सॅलिसबरी यांच्या नजरेस आणल्या व त्यांनीं लोक मागतील ती मदत तात्काळ देऊं असें आश्वासन दिलें. निराधार लोकांना मदत देण्यासाठीं अनेक संस्था काम करीत आहेत. परंतु तें काम एकमार्गानें व्हावें म्हणून आम्हीं एक मध्यवर्ती कमिटी नेमिली आहे व तिचें मुख्य ठिकाण मिरपूर हे ठरविलें आहे.

"यानंतर आम्हीं पुनः मि. सॅलिसबरी यांची मुलाखत घेतली व आम्हीं पाहिलेली सर्व स्थिति त्यास सांगितली. मिरपूर येथील लोकांचें म्हणणें असें कीं, डे. कमिशनर व इतर मुसलमान अधिकारी बंड मोडण्याचा प्रयत्न न करतां त्यास प्रोत्साहनच देत होते, व मुसलमान गुंडांनी काय काय अत्याचार केले यांची रीतसर माहितीहि वरिष्ठ अधिकाऱ्यांना त्यांनीं दिली नाहीं. ही गोष्टहि आम्हीं मि. सॅलिसबरी यांचे नजरेस आणिली. मि. सॅलिसबरी यांनीं या सर्व गोष्टींची नोंद करून घेतली. हिंदूंवर मेहरबानी नको, पण त्यांना न्याय तरी मिळालाच पाहिजे असेंहि आम्हीं मि. सॅलिसबरी यांस सांगितलें."

### घरेंच आहेत कोठें?

लोकांनी आतां आपल्या घरीं परत यावें असें मि. सॅलिसबरी यांनीं म्हणतांच भाई परमानंद म्हणाले "आपल्या घरीं परत जाऊं नये असें कोणास वाटेल? परंतु घरेंच राहिलीं आहेत कोठें? सर्व घरें जाळून टाकण्यांत आलीं. त्या भागांत लुटारू मोकळे यांना मुळमुळाट झाला आहे. कोणाहि हिंदुस सुखानें कोठें जातां येत नाहीं. त्या भागांतील अत्याचारी लोकांना पकडून तेथें प्युनिटिव्ह पोलीस बसवून लोकांना जीवित व वित्त यांची शाश्वती पटली म्हणजे लोक आपोआप तेथे राहावयास जातील.

"अशा रीतीनें संस्थानाविरुद्ध व आपल्या देशबांधवांविरुद्ध शस्त्र उपसून हिंदु लोकांचा नायनाट करण्यासाठी चंग बांधलेल्या मुसलमानांनीं घरेंदारें सोडून टाकून दिलेले असे सुमारें ८-१० हजार हिंदु लोक आहेत. या लोकांपैकीं कित्येकांचे हजारो रुपयांचे व्यापार–व्यवहार होते. परंतु त्यांचीं घरें लुटून जाळून फस्त केल्यानें आज ते अन्नालाहि मोताद झाले आहेत. अशा स्थितींत त्यांनी जावें कोठें व करें!

"कोहाटच्या हिंदूंचीहि अशीच स्थिति झाली होती. ४५ हजार हिंदू तेथें अशाच निराधार झाले असतांना सरकारनें त्यांना धंद्यासाठीं पाच लक्ष रुपये कर्जाऊ दिले. काश्मीरच्या निराधार लोकांना काश्मीर दरबार काय मदत करतो व अत्याचारी लोकांना काय शासन करतो हें आतां पाहावयाचें आहे."

## संयुक्त मतदारसंघच पाहिजे

ता. १३ मार्च रोजीं पुणें येथे अ. भा. अस्पृश्य-मंडळाच्या मुंबई प्रांताच्या पुणेशाखेतर्फे अस्पृश्यांचे पुढारी श्री. पां. ना. राजभोज संपादक 'दलितबंधु' यांच्या अध्यक्षतेखालीं अस्पृश्य समजल्या जाणाऱ्या समाजाची जाहीर सभा होऊन मुंजे–राजा करारास मान्यता देण्यांत आली. सभेंत श्री. नात्याबा कारंडे, कदम, मकट, खडतरे, शिंदे वगैरे मंडळींचीं भाषणें झालीं. त्या वेळीं अध्यक्ष या नात्यानें श्री. राजभोज यांनी पुढील आशयाचें भाषण केलें.

"स्वतंत्र मतदारसंघासंबंधानें कोणी कांहींहि सांगितलें तरी अखेरीस स्वतंत्र मतदारसंघ आपल्या हिताला घातुक झाल्याखेरीज राहाणार नाहीं. या कल्पने-

च्या बुडाशीं कांहींहि हेतु असला तरी इंग्लंडमध्यें विभक्त मतदारसंघाला मिळालेला पाठिंबा लक्षांत घेतां त्याच्या पोटीं हिंदुसमाजांत दोन परस्पर विरोधी शकलें करण्याचा हेतु असल्याचा अंदेशा मात्र आम्हांस येत आहे. म्हणून आम्ही एकदांच स्पष्टपणें सांगून टाकतों कीं, स्पृश्य हिंदु समाज आम्हांला अस्पृश्य लेखतो व आम्हांवर धार्मिक वर्चस्व लादतो या गोष्टीला जितका आमचा विरोध आहे तितकाच हिंदु समाजांतून आम्हांला फोडण्याच्या कल्पनेलाहि आमचा विरोध आहे. आज समाजांत आम्हांला अस्पृश्य म्हणून लेखण्यांत येतें ही गोष्ट जर हानिकारक तर राजकारणांतहि विभक्त–अस्पृश्य–राहणें ही गोष्ट त्यापेक्षां अनेक पटींनीं हानिकारक आहे. विभक्तीकरणानें फारच हानि होणार आहे. आपण हिंदु समाजाचे अविभाज्य व महत्त्वाचे घटक आहोंत ही गोष्ट तर आमच्या सर्व सामाजिक व धार्मिक चळवळीचा प्राण आहे.राजकीय फायद्यासाठीं हा मूळ पायाच आपण सोडून दिला तर आपल्या धार्मिक व सामाजिक चळवळींतील न्याय व उपयुक्तताच नाहींशी केल्यासारखी होणार आहे. आणि या बाबतींत आपले हक्क मागण्याला आपल्याला अधिकारच रहाणार नाहीं. शिवाय आपल्या हक्कांचें संरक्षण करण्याला स्वतंत्र मतदार-संघ हा एकच उपाय नाहीं.

आमच्या हितसंबंधांचें संरक्षण झालें पाहिजे ही गोष्ट खरी. परंतु त्यासाठीं स्वतंत्र मतदारसंघ मागणें हा कांहीं रामबाण उपाय नव्हे, असा आमचा विश्वास आहे. यासाठीं आपण असा मार्ग शोधून काढला पाहिजे कीं, आपण हिंदु समाजापासून विभक्त न होतां, स्वतंत्र मतदारसंघ प्राप्त झाल्यानें जे फायदे आपणांस मिळतील ते मिळावे. व तो मार्ग म्हणजे राखीव जागा ठेवून संयुक्त मतदारसंघ घेणें हाच होय. अनादि कालापासून आपण हिंदु समाजाच्या पोटांत आहोंत व कांहींहि झालें तरी त्या समाजांतच रहाणार असा आमचा निग्रह आहे. स्वतंत्र मतदारसंघामुळें आपल्या सामाजिक एकींत बिघाड होईल व अगोदरच उत्पन्न झालेली दुही या राजकीय विभक्तीकरणानें मात्र जास्त होईल.

शिवाय आपण जर स्वतंत्र मतदारसंघाचें तत्त्व स्वीकारलें तर हिंदु समाजांत सामाजिक व धार्मिक बाबींत आपणाला स्पृश्य समाजाकडून जें स्थान प्राप्त करून घ्यावयाचें आहे त्या योग्य व समानतेच्या हक्कप्राप्तीसाठीं सत्याग्रहासारखे परिणामकारक उपाय मग अवलंबितां येणार नाहींत. हे माझे विचार कांहीं आजचे नाहींत. मागें पुण्यांत व गुरगांव (पंजाब) येथें भरलेल्या अ. भा. अस्पृश्य परिषदेंतच मीं त्यांची घोषणा केली आहे व ता. २१–२२ फेब्रुवारी रोजीं दिल्लीस भरलेल्या सभेंतहि हेच विचार मीं मांडले आहेत. आपणास संयुक्त मतदारसंघ मिळाल्यास आपल्या हिंदु बांधवांच्या साहाय्यानें प्रधानमंडळांतहि एखादी जागा आपल्यांतील लायख गृहस्थास मिळण्याचा संभव आहे."

# स्फुट सूचना

१ जर्मनीचे भीष्माचार्य, फील्ड मार्शल फॉन हिंडेन्बर्ग, यांना जर्मन लोकसभेच्या अध्यक्षाच्या निवडणुकींत एक कोटि शायशीं लक्ष, एकसष्ट हजार सातशें छत्तीस मतें पडलीं व त्यांचे इतर चार प्रति-स्पर्धी, या सर्वांना मिळून एक कोटि, एकुणनव्वद लक्ष, एकुणनव्वद हजार नऊशें बासष्ट मते मिळालीं. त्यांच्या प्रत्येक प्रतिस्पर्ध्यापेक्षां कितीतरी अधिक मते त्यांना एकट्याला मिळालीं असलीं तरी जर्मनीच्या अध्यक्षाच्या निवडणुकीच्या नियमांत असा एक नियम आहे कीं, जो उमेदवार नोंदलेल्या एकंदर मतांपैकीं निदान शेंकडा एकावन्न मतें मिळवील तोच अध्यक्ष निवडून येईल. या नियमान्वयें हिंडेन्बर्ग यांना निवडून येण्यास त्यांच्या चौघां प्रतिस्पर्ध्यांपेक्षांहि अधिक म्हणजे आणखी ३ लक्ष ३० हजार मतें मिळावयास पाहिजे होतीं! तीं त्यांना मिळालीं नाहींत म्हणून निवडणुकीच्या नियमाप्रमाणे पुनः एकवार निवडणूक व्हावयास पाहिजे. या दुसऱ्या निवडणुकीची तारीख १० एप्रिल नेमली आहे. या दुसऱ्या निवडणुकींत हिंडेन्बर्ग विजयी होतील अशी सर्व तज्ज्ञांची अटकळ आहे. त्यांच्या चार प्रतिस्पर्ध्यांपैकीं कर्नल डुस्टरबर्ग व हर वुईंटर हे पुनः निवडणुकीस उभे रहात नाहींत. कम्यूनिस्ट पक्षाचे पुढारी हर थॅलमन उभे रहात आहेत. परंतु त्यांना जय मिळण्याची आशा नसल्यामुळे कम्यूनिस्ट मतदार हिंडेनबर्गलाच आपलीं मतें टाकतील; कारण शिल्लक उमेदवार म्हणजे नाझी पक्षाचा पुढारी हर हिटलर याचे व त्याच्या नाझी पक्षाचें कम्यूनिस्ट पक्षाशीं साप-मुंगसाइतकें द्वेषाचें नातें आहे. जर्मनींत निवडणुकीच्या वेळीं ज्या मारामाऱ्या व रक्तपात झाले ते याच दोन पक्षांमध्यें. यावरून पाहतां हिंडेन्बर्ग

यांचीच निवडणूक पुनः होईल असें म्हणावयास हरकत नाहीं.

---

२ जर्मनींतील या निवडणुकीकडे महाराष्ट्रांतील लोकांचें लक्ष अनेक कारणांनीं वेधलें आहे. परावलंबी महाराष्ट्राला प्रत्यक्ष रणभूमीवर जाऊन इतर स्वतंत्र देशांप्रमाणें पराक्रम करण्याची संधि नसली तरी महाराष्ट्र शौर्याचा, रणभूमीवरील पराक्रमाचा व सेनानींच्या युद्धकौशल्याचा चाहता आहे. गेल्या महायुद्धांत वृद्धावस्थेंतहि आपल्या खांद्यावर रणधुरा घेऊन ज्या बहादुरानें टॅनेनबर्गच्या लढाईंत रशियास धुळीस मिळविलें व शेवटीं महायुद्धांत जर्मनीचा पराभव झाला तरी ज्यानें त्या मानधन राष्ट्राचा अपमान होऊं दिला नाहीं, त्या भीष्माचार्य फॉन हिंडेन्बर्गबद्दल कोणाला आदर वाटणार नाहीं ? युद्धकाळांत जरूरीचे सेनापतित्वाचे गुण जसे त्यांच्या अंगांत आहेत तसेंच शांततेच्या काळीं राज्यधुरा वाहण्यास लागणारा मुत्सद्दीपणा व राजकारणधुरंधरत्वहि त्यांच्या अंगांत आहे. म्हणून यापूर्वीच राष्ट्रावर आणीबाणीचा प्रसंग आला असतांना जर्मन राष्ट्रानें त्यांना अध्यक्षपद व राष्ट्राचा पुढारीपणा दिला व आजहि पुनश्च त्यांना वयाच्या पंचाऐंशीव्या वर्षींहि निवडणुकीस उभें रहाण्यास राष्ट्रानें विनंति केली आहे. त्यांचे प्रमुख प्रतिस्पर्धी हिटलर, हे सुलतानशाहीचे पुरस्कर्ते, ज्यू लोकांचे हाडवैरी व पार्लमेंटची प्रजासत्ताक राज्यपद्धति नष्ट करून एकतंत्री राज्यव्यवस्था चालवावी असें म्हणणारे आहेत. त्यांना अधिकार मिळाल्यास सर्व राष्ट्रीय कर्जांस नकारघंटा देऊन ते जर्मनीला पुनः एकवार युद्धाचें अग्निदिव्य करण्यास भाग पाडणारे आहेत. जर्मनीस आज तरी नवें युद्ध चालविण्याचें सामर्थ्य नाहीं व तें असलें तरी तशी इच्छा नाहीं. या दृष्टीनें जर्मनीस आज हिंडेन्बर्गच अध्यक्ष पाहिजे आहेत. जर्मनींतच नव्हे तर इतर अनेक देशांत राष्ट्राचें कल्याण लोकशाहींत आहे कीं सुलतानशाहींत आहे असा वाद चालू आहे. त्यामुळें या जर्मनींतील अध्यक्षाच्या निवडणुकीसहि एक चित्तवेधक तात्त्विक स्वरूप आलें आहे. पुढील महिन्यांत जर्मनी कोणत्या बाजूनें मत देतो हें समजेलच.

---

३ महात्मा गांधींचे निःसीम अनुयायी, राष्ट्रीय सभेचे मुख्य खजिनदार व वर्धा येथील श्रीमान् व्यापारी शेठ जम्नालाल बजाज यांना त्यांनीं पोलिसाकडे हजेरी देण्याचें नाकारलें, या गुन्ह्याबद्दल एक वर्ष सक्तमजुरी व ५०० रुपये दंड अशी शिक्षा ठोठावण्यांत आली ! शिक्षेनंतर तात्काळ त्यांना 'क' वर्ग देऊन त्यांची रवानगी ता. १५ रोजीं विसापूरच्या तुरुंगांत करण्यांत आली. नुकतेंच असेंब्लीमध्यें व कौन्सिल ऑफ स्टेटमध्यें 'राजकीय कैदी' ही कोणती जात आहे हें आम्ही जाणत नाहीं व म्हणून राजकीय कैद्यांसहि इतर सर्वसाधारण कैद्यांप्रमाणेंच वागविण्यांत येईल असें सांगण्यांत आलें. ठीक आहे. पण सामान्य कैद्यांनाहि नियमाप्रमाणे अ, ब व क वर्ग तरी देण्यांत यावयास पाहिजेत कीं नाहीं ? शेठ जम्नालाल यांना नियमाप्रमाणें 'अ' वर्ग द्यावयास पाहिजे. त्यांची राहणी, त्यांची श्रीमंती, त्यांचा सामाजिक दर्जा वगैरे पाहतां त्यांना दुसऱ्या कोणत्याहि वर्गांत घालणें नियमबाह्य आहे व म्हणूनच त्यांना विसापुरासारख्या तुरुंगांत ठेवून 'क' वर्ग देणें म्हणजे सरकारानें आपल्या खुनशीपणाचें प्रदर्शन करण्यासारखें आहे असें म्हणणें प्राप्त होतें ! मुंबई इलाख्याचे गृहमंत्री मि. थॉमस यांनीं गेल्या आठवड्यांत कायदेमंडळांत घोषणा केली कीं, चालू झगडा म्हणजे राष्ट्रीय सभेशीं युद्ध आहे व यांत दया माया वगैरे गुणांना वाव नाहीं. पण हें जर युद्ध आहे तर युद्धाच्या नियमाप्रमाणेंहि पाडाव झालेल्यास त्याच्या योग्यतेप्रमाणें सन्मानानें वागविणें हें युद्धनीतीस धरून नाहीं काय ? आमचें सरकारास एवढेंच सांगणें आहे कीं, त्यांनीं स्वतः केलेले नियम तरी स्वतःच मोडून नियमभंग करूं नये; कारण तोहि कायदेभंगाचाच भाऊ आहे, पण सरकारी आहे इतकेंच ! गेल्या वर्षी खुद्द सरकारनेंच त्यांना 'अ' वर्ग दिला होता. मग येदांच माशी कोठें शिंकली ? कराचीचे जयरामदास दौलतराम यांनाहि 'क' वर्ग दिला आहे व सर्वांवर कळस म्हणजे महात्मा गांधींच्या वृद्ध पत्नी सौ. कस्तुरबाई गांधी यांनाहि 'क' वर्गच दिला आहे! या व्यक्तींना त्याचें कांहींच वाटणार नाहीं. परंतु जनतेच्या मनावर या गोष्टींचा काय परिणाम होईल याचा सरकारनें विचार करावयास पाहिजे. जखमा भरून येतील पण वण जाणार नाहींत !

---

४ सुविचाराचा सडा तुटला म्हणजे नृपनीतीचा पतंग कसा धिरट्या खातो याचीं प्रत्यंतरें सांप्रतच्या वटहुकुमांच्या कारभारांत आजवर अनेक घडलीं; त्यांपैकींच मद्रास येथील डॉ. पेटन यांचें एक उदाहरण होय. मद्रास येथें डॉ. पेटन नामक एक ख्रिस्ती मिशनरी रहात असतात. ता. १५ जानेवारी रोजीं डॉ. पेटन हे शुभ्र खादी परिधान करून रस्त्यानें जात होते. त्या रस्त्यांत विलायती कापडावर कांहीं स्वयंसेवक निरोधन करीत होते. झालें. निरोधन व पांढरी खादी यांचा समवायी संबंध पोलिसांनीं आपल्या मनांत लावून डॉ. पेटन हे निरोधक स्वयंसेवकच

आहेत असें त्यांच्या मनानें घेतलें व त्यांना निरोधनाच्या कार्यापासून परावृत्त करण्याच्या उद्देशानें पोलिसांनीं डॉ. पेटन यांच्या अंगावर म्युनिसिपालिटीच्या आग विझविण्याच्या नळानें पाण्याचा एवढा स्रोत धरला कीं पाद्रीबुवा तेथल्या तेथेच गारठून जमिनीवर मूर्छित पडले ! या प्रकरणाचा प्रतिध्वनि वांछितरगन्यायानें पार्लमेंटसभेंत कांहीं दिवसांपूर्वी उमटला व आतां तर घमेंडनंदन सर सॅम्युएल होअर यांनीं मि. डंकन मिलर या पार्लमेंटाच्या सभासदाला ता. १४ रोजीं पत्र लिहून झालेल्या प्रकाराबद्दल माफी मागितली आहे ! ' डॉ. पेटन यांच्यावर जो अत्याचार पोलिसांच्या गैरसमजुतीनें झाला तो मोठाच घोडचूक होय. त्याबद्दल मी माफी मागतों ' असे मऊ उद्गार मगरूर भारतमंत्र्यांनीं आपल्या पत्रांत काढले आहेत. डॉ. पेटन हे युरोपियन मिशनरी म्हणून त्यांची एवढी तरी दाद लागली. सध्यांच्या सोटेशाहीच्या युगांत असले कित्येक पेटन–पटेल भरडले जात असतील, परंतु त्यांची दाद घेतो कोण ? पश्चात्तापाचे असले मानहानिकारक प्रसंग आपल्यावर पुनः ओढवूं नयेत असें भारतमंत्र्यांना वाटत असेल तर त्यांनीं सरकारी धोरण पुष्कळच सौम्य व सामोपचाराचें ठेवलें पाहिजे.

---

५ " शूलादवतार्य हस्तिस्कन्धे प्रतिष्ठापितः " म्हणजे वधस्तंभावरून सोडवून एकाद्या राजवंशाची हत्तीवरून मिरवणूक काढावी, त्याप्रमाणें फांशीची शिक्षा झालेला आयर्लंडचा नरवीर डी व्हॅलेरा आज आयरिश पार्लमेंटच्या अध्यक्षपदावर विराजमान झालेला पाहून देशभक्तांच्या अन्तःकरणांत आनंदाचा उमाळा आल्याशिवाय राहणार नाहीं. डी व्हॅलेरा निवडून आल्यामुळे अँग्लो–आयरिश तहांतील राजनिष्ठादर्शक शपथेच्या कलमाला मोठाच धक्का पोहोचणार आहे. सुमारें दहा वर्षांपूर्वी ग्रिफिथ-कॉलिन्स व इंग्लंडचे मुख्य प्रधान लॉईड जॉर्ज यांमध्यें समेट घडून आयर्लंडाला फ्री स्टेट म्हणून ओळखण्याचें ठरलें. परंतु त्या तहांत डी व्हॅलेराच्या प्रजासत्ताक तत्त्वांना म्हणजे संपूर्ण स्वातंत्र्याला हरताळ फांसण्यांत आल्यामुळें व आयर्लंडावरील इंग्लंडचें स्वामित्व मान्य करण्यांत आल्यानें कॉलिन्स व डी व्हॅलेरा यांच्यांत मतभेद होऊन ' डेल आयरेन ' विसर्जित करण्यांत आलें व डी व्हॅलेरा मंत्रिमंडळांतून बाहेर पडून ग्रिफिथ व कॉलिन्स यांनीं फ्री स्टेटच्या प्रतिष्ठापनेला अनुकूल असें मंत्रिमंडळ बनविलें. परंतु पुढें ग्रिफिथ लवकरच मेल्यानें व कॉलिन्स ठार मारला गेल्यानें कॉसग्रेव्हने फ्री स्टेटची धुरा आपल्या खांद्यावर घेतली व गेलीं दहा वर्षे आयर्लंडचा कारभार त्यांनीं हांकला. आयर्लंडाची एवढी पूर्वमाहिती देण्याचें कारण असें कीं, आयरिश जनतेचा कल कॉसग्रेव्हच्या मताकडे कसा झुकत होता हें दिसून येईल. परंतु आज डी व्हॅलेराचा भाग्यरवि पुनः उदयाचलावर येऊन सर्व राष्ट्रानें त्याला अध्यक्ष निवडून त्याजवरील आपलें प्रेम व्यक्त केलें. आतां प्रश्न असा कीं, डी व्हॅलेराचा पक्ष अँग्लो–आयरिश तहांतील अटींप्रमाणें राजनिष्ठेची शपथ घेणार कीं शपथेचा नवा मसुदा तयार करून त्याप्रमाणें तो वागणार ? ता. १५ रोजीं डब्लिन येथें डेल आयरेनच्या बैठकींत डी व्हॅलेरानें जाहीर केलें कीं, " आम्ही ही शपथेची शृंखला तोडून टाकणार. आयरिश पार्लमेंटमध्यें सर्व पक्षांचें प्रतिनिधित्व असावें म्हणून वाटेतील शपथेची ही धोंड बाजूस सारण्याचा आमचा विचार आहे. " दहा वर्षांपूर्वी प्रिय मित्रांच्या उपस्थितींत जी गोष्ट डी व्हॅलेराला करतां आली नाहीं व ज्यामुळें त्याला अज्ञातवास भोगावा लागला तीच गोष्ट प्रत्यक्ष कृतींत उतरण्याइतकें मतबल त्याला आज लाभलें आहे. ता. २४ एप्रिल रोजीं ' डेल'ची पुनः बैठक भरणार आहे. त्या वेळीं या प्रश्नाचा सोक्षमोक्ष लागेल. तूर्त डी व्हॅलेराच्या या आघातानें इंग्लिश जनतेंत काय खळबळ उडते हें पहाणें मनोरंजक होणार आहे.

*

# एका सरस्वतीभक्ताची शतसांवत्सरिक पुण्यतिथि



जर्मन महाकवि गटे

बरोबर शंभर वर्षांपूर्वी आज, म्हणजे ता. २२ मार्च १८३२ रोजीं, जगद्विख्यात जर्मन कवि गटे याचा अवतार समाप्त झाला. विद्येचें माहेरघर व पंडितांचें आगर अशा जर्मन राष्ट्रानें त्यालाच आजवर कवि-सम्राट असें मानलें आहे. त्या बहुमानाला व स्वतःच्या प्रेमभावनेला शोभेल अशा अनेक गतींनीं, जर्मनीचे स्वाभिमानी लोक गटेच्या पुण्यस्मरणाचा समारंभ साजरा करणार आहेतच. पण राष्ट्रीयत्वाच्या रूढ व्याख्येमुळे या कविवर्याला 'आपला' असें ज्यांना म्हणतां येणार नाहीं असे, म्हणजे जगांतील इतर देशांचे लोकहि, या वाङ्मय-क्षेत्रांतील विभूतीला आजच्या प्रसंगीं स्तुतिपुष्पें वाहून स्वतःस धन्य मानतील यांत शंका नाहीं. आपपरभाव हा मनुष्यमात्राला मोठा दुस्तर असतो हें तर खरेंच; पण राष्ट्रीयत्वाच्या गर्विष्ठ व दुर्दम भावनांचा जेथें निरास होतो अशाहि कांहीं जागा जगांत आहेत. आणि त्यांपैकींच वाङ्मय-क्षेत्र हें होय. 'स्वदेशे पूज्यते राजा, विद्वान् सर्वत्र पूज्यते' या वचनांत 'सर्वत्र' हा शब्द मोठा मार्मिकपणाचा पडला आहे. तो शब्द घालणारा जुना संस्कृत पंडित जरी 'नवखंड पृथ्वी व दहावें खंड काशी' असा भोळा हिशेब करून, सर्व जगाला आपल्या या भरतखंडांतच कोंबून मोकळा होण्याइतका भूगोलविषयीं अज्ञानी असला तरी, त्याचें अज्ञान त्याच्याबरोबरच संपलें आणि त्याचें हें सुभाषित वचन जरें त्रिकालाबाधित शिल्लक उरलें, तसाच 'सर्वत्र' शब्दहि, सन १९३२ सालापर्यंत शोध लागलेल्या, सर्व पृथ्वीला लागू पडणारा असा उरला.

हिंदुस्थानच्या लोकांनीं या जर्मन कवि-सम्राटाविषयीं प्रेमादर व्यक्त करणें म्हणजे गरिबांनीं श्रीमंतांशीं आपलें नातें जोडूं पाहण्यासारखें स्वाभिमानशून्यपणाचें ठरेल असें कदाचित् कोणाला वाटण्याचा संभव आहे. पण खरोखर तें तसें नाहीं. कारण जर्मन लोकांनीं एकंदर संस्कृत विद्येबद्दल किती प्रेमादर व्यक्त केला आहे हें पाहिलें म्हणजे, वरील प्रकारचा आक्षेप निर्मूळ ठरतो. निदान वैदिक वाङ्मयाच्या तरी आस्थेवाईक अभ्यासाच्या कामीं, आणि परिश्रमपूर्वक तत्संरक्षणाच्या कामीं, जर्मन आर्यांनीं भारतीय आर्यांना जें जवळ जवळ मागें टाकलें आहे, तें त्या वाङ्मयाविषयीं खरा प्रेमादर वाटत असल्याशिवाय टाकलें असेल काय? पण तो व्यापक विषय सोडून देऊन केवळ संस्कृत काव्यापुरतें पाहिलें तरीहि, जर्मन पंडितांनीं ती प्रेमादराची भावना निःसंशय प्रगट केली आहे. फार काय, आजच्या आमच्या अग्रलेखाचा विषय कविवर्य गटे यांचेंच उदाहरण घेऊं. अभिजात संस्कृत नाट्यवाङ्मयांत कालिदासाच्या शाकुंतलालाच अग्रपूजेचा मान भारतीय पंडित देतात. पण गटे यानें शाकुंतलाविषयीं ज्या उत्कट भावनेचे उद्गार काढले आहेत, तसे उद्गार खुद्द एखाद्या हिंदी पंडितानेंहि काढलेले आढळणार नाहींत. कोणत्याहि काव्य-नाटकाचें खरें अंतरंग भाषांतराच्या द्वारें प्रगट होणें बहुधा कठीण असतें. असें असतांहि, आंग्ल पंडित सर विल्यम जोन्स यानें केलेलें शाकुंतल नाटकाचें भाषांतर वाचून, गटे हा आनंदानें नुसता नाचूं लागला असें म्हणतात. आणि त्या आनंदाच्या भरांत त्यानें या कालिदास-कृतीविषयीं जे उद्गार काढले त्याचें भाषांतर खालीं दिल्याप्रमाणें करण्याचें आम्ही धाडस करतों. गटे म्हणतो:—

"नूतन वर्षाच्या तारुण्यागमीं प्रगट होणारे वृक्ष-लतांचे मोहोर व फुलोरे, आणि त्याच वर्षाच्या उतार-पणांत उतरलेले परिपक्क फळांचे घोस व लोंगर हे कधीं एकत्र पहावयास मिळतील काय? नेत्रांना सौंदर्यलाभ, अंतःकरणाला आनंद, रसिक रसवंतीला मेजवानी, आणि ज्ञानक्षुधेला पौष्टिक अन्नसमृद्धि, हीं एकाच वेळीं एकाच पदार्था-पासून लाभलेलीं कोणाला कधीं कोठें पहावयाला सांपडतील काय? त्याचप्रमाणें स्वर्ग आणि पृथ्वी

यांत मिळणारीं सुखें एकत्र कशीं लाभतील ? पण नाहीं. हा चमत्कार मला एके ठिकाणीं खराच पहावयास सांपडला आहे. तुम्हांला हें खरें वाटत नाहीना ? ठीक आहे. सांगतो तर ऐका. शाकुंतल नाटकांत हे सर्व एकत्र अनुभवाला येतें. आणि त्या नाटकाचें मीं नुसतें नांव घेतलें म्हणजे पुरें आहे. ते नुसतें नांवच तुम्हांला हें माझें म्हणणें परस्पर पटवील!"

वरील स्तुतिकलापांत गटे यानें अद्भुत म्हणून वर्णन केलेला एक प्रकार, म्हणजे वसंत ऋतूंतील कोमल फुलांचा बहर आणि शरदृतूंतील परिपक्व धान्यफळसमृद्धि यांचा समवाय होय. कित्येकांचें मत असें आहे कीं, शाकुंतल नाटकांत शकुंतलेच्या रूपानें प्रगट झालेली तारुण्यांतील सरस भावनांची ललित लीला, आणि तापस मुनींच्या रूपानें प्रगट झालेलें प्रौढवयांतील तत्त्वज्ञान व शहाणपण, यांना उद्देशूनच गटेनें वरील फुलफळांचें रूपक केलेलें आहे. पण वस्तुसृष्टि हीच कित्येक वेळां कल्पनासृष्टिलाहि लाजवितें असें म्हणतात; त्याप्रमाणें स्वतः गटे याच्या अंतःकरणांतच, अखंड तरुण अशी भावनांची लीला आणि अकाल-प्रसव अशा प्रौढ तत्त्वज्ञानाचा विकास हीं एकत्रित झालीं होतीं. कारण त्यानें विशीपंचविशीच्या आंत लिहिलेल्या कवितेंत तत्त्वज्ञानाची जितकी झाक उमटते, तितकीच पंच्याहत्तराव्या वर्षी लिहिलेल्या तत्त्वज्ञानांत उज्ज्वल कविप्रतिभा प्रगटलेली आहे. गटे याच्या सारखे दीर्घायुष्य लाभलेले सरस्वती-भक्त आधीं थोडे, व या सर्व दीर्घायुष्यभर ज्यांचे हातून अशी उज्ज्वल साहित्यसेवा घडली असे तर त्यांतूनहि फार थोडे.

अंधाऱ्या रात्रीं विमानांतून प्रवास करणारे लोक असा अनुभव सांगतात कीं, तासन् तास व शेंकडों कोस मजल मारावी तेव्हां कोठें, आसपासच्या प्रदेशावर स्वच्छ प्रकाश पाडणारी रोषनाई खालीं एखाद्याच ठिकाणीं दृग्गोचर होते. मधून मधून वाटेंत गांवें लागत असल्यामुळें दिवे अगदींच दिसत नाहींत असें नाहीं. पण ते दिवे अस्पष्ट लुकलुकणारे व फार तर स्वतःचें अस्तित्व प्रगट करण्याला समर्थ असे असतात. आपल्या भोंवतालच्या प्रदेशाची रूपरेखा दुरूनहि पाहणाराला स्वच्छ दाखविण्याइतका उज्ज्वल दीपराज क्वचितच भेटतो. जी गोष्ट दिव्यांची तीच प्रतिभासंपन्न महानुभाव कवींची. आकाशगंगेंतल्या हतप्रभ अंधुक तारकांसारखे वाङ्मयक्षेत्रांत प्रकाशणारे कवि जगभर इतस्ततः पसरलेले आहेतच. पण शेक्सपीयर, गटे, कालिदास असे फार थोडे कीं, ज्यांनीं एकदां पाजळून ठेवलेला दिवा पुनः पुनः त्यांत नवें तेल-तूप घातल्याशिवाय अखंड देदीप्यमान असा तेवत राहतो, व भोंवतीं आणखी इतर दिवे लावले काय, मालवले काय, स्वतः त्याच्या प्रकाशाला भर पडत नाहीं किंवा उणेपणा येत नाहीं. जगावर पसरलेलें अज्ञान व अरसिकत्व यांच्या अंधाऱ्या रात्रीं, मनोविमानांतून विश्वसंचार करावयास निघालेल्या वाङ्मयप्रेमी प्रवाशाला, भरतखंडांत दोन हजार वर्षांपूर्वी एखादाच कालिदास भेटतो, तर इंग्लंडांत सतराव्या शतकांत एखादाच शेक्सपीअर, व अठराव्या-एकोणिसाव्या शतकांत जर्मनीमध्यें एखादाच गटे आढळतो.

पहिल्या प्रतीचे कवि इतके दुर्मीळ असतात, म्हणूनच त्यांचें महत्त्व. पण खाणींतून क्वचित निघणारा एखादा कोहिनूर प्रत्यक्ष कोणाच्याहि ताब्यांत असो, ती मिळकत दुसऱ्या एका नात्यानें सगळ्या जगाची मिळकत होऊन बसते. त्याप्रमाणें कालिदासानें गीर्वाणवाणी सनाथ केली, किंवा शेक्सपीअरनें आंग्लभाषेला अमर केलें, किंवा गटे याच्या प्रतिभेनें जर्मनभाषा जगविख्यात केली, तरी या तिघांहि कवींचें कवित्व हा अखिल मानवजातीचाच ठेवा होय. मंगळाच्या ग्रहगोलावरून पृथ्वीकडे पाहाणाराला हिमालयाचीं, आल्पस पर्वताचीं किंवा रॉकी माउनटनचीं उत्तुंग शिखरें तेवढींच दिसतील. यामुळे त्यानें तीं एकाच पर्वताचीं शिखरें अशीं मानल्यास तें स्वाभाविकच आहे. आणि या तीनहि पर्वतशिखरांचें अधिष्ठान जी पृथ्वी ती कृत्रिम भेदानें कोणी त्रिखंड मानली तरी मुळांत अखंडच नव्हे काय ? अलेक्झांडर हंबोल्ट या जर्मन जगत्प्रवाशाला पृथ्वी अखंड वाटावी यांत आश्चर्य नाहीं. म्हणून त्यानें कालिदासालाहि एका विशिष्ट राष्ट्राचा कवि असे न मानतां पृथ्वीवरील सर्व कवींची एकच माला असें कल्पून तींत त्याला मानाचें स्थान दिलें आहे ( A high place among the poets of all nations. )

या महाकवीचा जन्म सन १७४९ सालीं जर्मनींत फ्रँकफुर्ट या गांवीं झाला. त्याच्या वरच्या तीन पिढ्यांतील पूर्वजांनीं नालबंदापासून मुत्सद्द्यापर्यंत अनेक धंदे केले होते. त्याची आई १८ वर्षांची असतांच तिला गटे हें पहिलें अपत्य झालें. तिच्यापासून त्याला कल्पना व प्रतिभा हीं मिळालीं. आणि भावनांवर ताबा चालवून त्यांची शिस्त राखणारा करारीपणा हा गुण त्याला आपल्या बापापासून लाभला होता. या दोन देणग्यांमुळें गटे याचें जीवनचरित्र, त्याचें वाङ्मय व त्याचें तत्त्वज्ञान या सर्वांमध्यें एक प्रकारची तालबद्धता, अनुच्छृंखलता, व्यापक दृष्टि व स्वयंनियंत्रण या गोष्टी दिसून येतात. वयाच्या १६ व्या वर्षांचे आंतच गद्य, पद्य, नाटक इत्यादि वाङ्मयप्रकार लिहिण्याला त्यानें सुरुवात केली होती. पुढें वैद्यकशास्त्र व कायदा यांचा त्यानें अभ्यास केला.

व थोडे दिवस वकिलीहि केली. सन १७७५ सालीं-म्हणजे वयाच्या २६ व्या वर्षी, वैमार येथील राजाकडून त्याला कायमचा आश्रय व उपजीविकेचें साधन मिळालें. त्या छोट्या राज्यांत प्रधानमंडळांतील एक प्रधान म्हणूनहि त्यानें कांहीं दिवस काम केलें. पण त्याचा मुख्य भर वाङ्मयावर होता; आणि खुद्द राजा हाच त्याचा मित्र व चाहता होता; यामुळें त्याला आपला हा आवडीचा उद्योग करण्याला स्वस्थपणा लाभला.

" विनाश्रया न शोभन्ते पंडिता वनिता लताः " हें वचन सर्वस्वीं खरें आहे. मुळांतच कोणात नसलेली प्रतिभा केवळ राजाश्रयानें उत्पन्न होत नाहीं हें खरें. पण प्रतिभेच्या बीजाला अंकुर फुटून तिचा वृक्ष होण्याला, आपत्तीच्या कोरड्या कडक उन्हाळ्यापेक्षां संपन्नतेची ऊबदार हवा व राजाश्रयांतून झिरपणाऱ्या संपत्तीच्या झऱ्याचा ओलावा हींच अधिक गुणकारी व फलप्रद होऊं शकतील हें काय म्हणून नाकबूल करावें? प्रतिभेनें आपत्तींशींहि झगडून जय मिळविला तर तिचा पराक्रम-गुण अधिक ठरेल. परंतु आजवरच्या वाङ्मयाच्या इतिहासांत, विद्वान शास्त्री-पंडितांना व प्रतिभासंपन्न कवींना मिळालेल्या राजाश्रयानेंच ज्ञान व काव्यानंद यांचा लाभ जगाला पुष्कळ व झालेला आहे. राजाश्रयानें विद्येला ठाव, नांव व वाव मिळतो. ठाव म्हणजे द्रव्याचा आधार, नांव म्हणजे कीर्ति, आणि वाव म्हणजे विस्तार व वैचित्र्य यांना लागणारा प्रांत. जगाच्या इतिहासांत ऑगस्टस, भोज, विक्रम, श्रीहर्ष, चवदावा व अठरावा लुई, एलिझाबेथ व व्हिक्टोरिया, इत्यादि राजे व राण्या यांचीं नांवें एकेका उज्ज्वल वाङ्मययुगाशीं निगडित झालीं आहेत, याचेंहि कारण विद्येला योग्य वेळीं मिळालेला राजाश्रय हेंच होय.

असो. गटे याचा बहुश्रुतपणा व बुद्धिमत्तेची आक्रमणशीलता एवढी होती कीं, त्यानें काव्यवाङ्मयाप्रमाणें गणित, भौतिकशास्त्र व वैद्यकशास्त्र यांचेंहि खोल परिशीलन करून त्या विषयांवर अनेक निबंध लिहिले. परंतु ज्ञानसाधन या दृष्टीनें त्यांचा उपयोग असला, व त्यामुळें गटेच्या प्रज्ञेचा व प्रतिभेचा अष्टपैलूपणा सिद्ध होत असला, तरी गटे याची खरी कीर्ति त्याच्या आत्मानुभूतीमुळेंच आहे, आणि त्याची आत्मानुभूतिच मुख्यतः त्याच्या वाङ्मयांतून प्रगट झालेली आहे. वैमार येथील दरबारांत त्यानें राज्यकारभाराचें काम केलें, व फ्रेंच राज्यक्रांतींतील एका युद्धांत आपल्या राजाबरोबर तो स्वारीवरहि गेला होता. पण राजकारणांत त्याचें खरें लक्ष नव्हतें. तत्त्वतः फ्रान्समधील राज्यक्रांति, व तींत दिसून आलेला मनुष्यस्वभावाचा उच्छृंखलपणा, ही त्याला पसंत नव्हतीं.

तथापि नेपोलियनाविषयीं त्याला आदर वाटे, त्यामुळें आपल्या देशाचा शत्रु म्हणून त्यानें त्याचा द्वेष केला नाहीं. गटेच्या अंगीं तीव्र देशभक्ति होती, पण ती संकुचित दृष्टीच्या राष्ट्रीय भावनेची नव्हती. तो सर्वस्वी विश्वबंधुच नसला तरी, मनुष्यस्वभावांतील स्वातंत्र्यबुद्धि व त्रैगुण्य हीं ओळखून मानणारा, व आपापल्या परीनें मिळेल ती आत्मानुभूति मिळवून जो काय मोक्ष साधेल तो मनुष्यानें साधावा किंवा गति मिळवावी अशा मनाचा तो होता. तसेंच संसारांत दुःखभावनेपेक्षां आनंद, सहानुभूति, सौंदर्य, अवलोकनाची मार्मिक दृष्टि, या हेतूवर त्याच्या जीवननौकेचें सुकाणू सर्व आयुष्यभर फिरत राहिलें. तो स्वतः सुंदर, देखणा, भव्य व प्रतिभेच्या तेजानें तळपणारा असा असल्यामुळें, नेपोलियन बोनापार्ट व गटे यांची भेट झाली तेव्हां नेपोलियनच्या तोंडून "वाहवा, हाच पुरुषश्रेष्ठ खरा" असे उद्गार निघाले म्हणतात.

वाङ्मयामध्यें अनेक पद्धती, पंथ, संप्रदाय असतात हें प्रसिद्ध आहे. प्रत्येक देशांत या पंथांना वेगवेगळीं नांवें मिळतात. परंतु त्यांतील भेदांचें व विरोधाचें तत्त्व एकच एक असतें. तें तत्त्व म्हणजे, परंपरेचें प्रेम व अभिमान ( अर्थात सुसंस्कृत असा अभिमान ) यानें प्रतिभेला स्फुरण मिळतें किंवा मिळावें? अथवा आत्मस्वातंत्र्याच्या उच्छृंखलताप्रियत्वानें तें स्फुरण मिळावें? असा हा वाद सनातन आहे. इंग्रजींत या पहिल्या पक्षाला किंवा संप्रदायाला 'क्लासिसिझम्' असें म्हणतात व दुसऱ्याला 'रोमॅंटिसिझम्' म्हणतात. वास्तविक पहिल्या पक्षाच्या तत्त्वांत स्थायीभावाला विशेष महत्त्व दिलेलें असतें, व दुसऱ्या संप्रदायाच्या तत्त्वांत त्वरित व अनिरुद्ध प्रगतिप्रियतेला महत्त्व दिलेलें असतें. पहिल्याची दृष्टि आहे तें सर्व जमेला धरून त्यांतूनच आत्म्याला प्रगति व आनंद वाढवून मिळवून देण्याची असते. आणि दुसऱ्याची तत्त्वाची दृष्टि, जुनें कोणतेंहि जमेला न धरतां, निराधार अंतराळीं जन्मलेल्या ( ! ) एखाद्या पक्षाप्रमाणें जिकडे दृष्टि जाईल तिकडे पंख हलवून आक्रमण करणें याकडे असते. सत्यनिष्ठा व सौंदर्यलालसा हीं दोघांनाहि असतातच. परंतु त्यांच्यांतील भेद हा केवळ स्वभावानुसार पडतो व त्यामुळें प्रत्येकाच्या आत्मानुभूतीचें स्वरूप वेगळें ठरतें.

वरील दोन संप्रदायांपैकीं कवि गटे हा पहिल्याचा अनुयायी म्हणतां येईल. तो केवळ डोळे मिटून शून्यसंशोधन करणारा नव्हता; तर सृष्टि व मनुष्यजीव हा सर्वस्वीं सत्य मानून त्याच्या विकासांतून दिसून येणाऱ्या आत्मविकासावर त्याची श्रद्धा अढळ होती. पण या विकासाची क्रिया किंवा कृति मूक असतांनाहि, प्रीति, आनंद व सौंदर्योपभोग यांची

मनुष्याला लयलूट करतां येईल व ती त्यानें अवश्य करावी अशा मताचा तो होता. नदीचें परतीर गांठण्याकरितां पाण्यांत पडलेला पोहणारा मनुष्य हा, प्रवाहाचें पाणी तोंडीत असतांनाच, स्नाना-वगाहनादि क्रीडा यथेच्छ करीत असतो. तसेंच मनुष्य-जीवानेंहि संसारांत करावें, आणि शक्य तितका भवितव्यतेवर विजय मिळवावा हें त्याचें तत्त्वज्ञान होतें. परंपरेचा पूर्ण अभिमानी व तिच्याशीं प्रेमबद्ध असल्यानें, ग्रीक व रोमन काव्य, तत्त्वज्ञान व कलाकौशल्य यांचा निकट परिचय गटे यानें करून घेतला होता. आणि वाङ्मयविहाराला प्रारंभ करतांना, जर्मन भाषेंत प्रसिद्ध असलेल्या 'ष्टुर्म व ड्रांग' म्हणजे 'स्टॉर्म अँड ऑप्रेशन' किंवा 'वादळ व उत्पात' या शब्दांनीं दर्शविलेल्या तत्त्वाकडे त्याचें लिखाण किंचित् झुकलें होतें तरी, त्याच्या प्रतिभेमध्यें जो स्थितिस्थापकतेचा मोठा गुण होता त्याच्या आधारावर त्यानें सर्व जन्मभर विचार व भावना यांच्यामध्यें तादात्म्य व तालबद्धता हीं दोनहि यशस्वीपणानें संभाळलीं. कवित्वाला भावनेचा उन्माद हा जरी अवश्य मानतात, तरी गटेच्या कवित्वांत इतर इतके मोठे व प्रभावी गुण होते कीं, उन्मत्त भावनेनें पराकाष्ठा बनलेल्या रोमँटिक संप्रदायांतील कवीपेक्षां गटे हाच जर्मनींत आजवर अधिक कीर्तिमान होऊन राहिला आहे.

त्याच्या काव्यनाटकादिकांची माहिती द्यावयाची हें काम त्याच्या परभाषेच्या आवरणामुळें फार कठिण. आणि गटेची वाङ्मय-संपत्ति एवढी विशाल आहे कीं, त्याच्या चरित्राविषयक अशा एखाद्या लेखांत तिचा ओझरताहि परिचय करून देणें कठिण. मग मर्म प्रतिपादन करणें तर अशक्यच. म्हणून आम्ही इतकेंच सांगतो कीं, ज्या आंग्ल भाषेच्या द्वारानें गटे याला शाकुंतल नाटकाची ओळख झाली, त्याच मध्यस्थाच्या द्वारें, गटेच्या कांहीं वाङ्मयखंडाची ओळख, निदान इंग्रजी जाणणाऱ्या हिंदी मनुष्याला, होऊं शकेल. म्हणून ज्यांना या दृष्टीची हौस असेल त्या वाङ्मयप्रेमी रसिकांनीं त्याच्या कादंबऱ्या, त्याचीं वीणा-काव्यें, व त्याचें सर्वोत्कृष्ट नाटक 'फौस्ट' हें अवश्य वाचावें. या नाटकाला आपलें प्रमुख राष्ट्रीय काव्य असें जर्मन लोक मानितात. इंद्रधनुष्याप्रमाणें त्यांत प्रगट झालेला आल्हादकारक सप्तरंगीपणा पाहून, कोणाहि वाचकाला आनंद झाल्याशिवाय राहणार नाहीं. कवि व नाटककार हे आपापल्या परीनें तत्त्वज्ञानीहि असतात. म्हणून गटेच्या काव्यांतून व नाटकांतून अंतिम स्वरूपाचे असेहि अनेक तात्त्विक प्रश्न सोडविण्याचा प्रयत्न केलेला आढळेल. आणि खरोखर कोणतेंहि 'तत्त्वज्ञान' म्हटलें म्हणजे, असले अंतिम प्रश्न सोडविण्याचा, समर्याद बुद्धीनें व समर्याद प्रतिभेनें, केलेला तो प्रयत्न याहून त्याला अधिक गौरवयुक्त असें नांव देतां येणेंच शक्य नाहीं. या दृष्टीनें पाहातां कवि व तत्त्वज्ञानी हीं दोनहि वर्णनें गटे याला लागू पडतात. तथापि ज्ञानसृष्टि वश करणारे लोक सहसा शब्दसृष्टि वश करूं शकत नाहींत ही गोष्ट अनुभवसिद्ध असल्यामुळें, जगानें गटे याला वरील दोहोंतून महाकवि हेंच उपपद लावण्याचें अधिक पसंत केलें आहे. कारण त्याला साधली अशी शब्द-किमया फार थोड्या कवींना साधते.

वर एके ठिकाणीं सांगितल्याप्रमाणें, जर्मनी हें विद्येचें माहेरघर व शास्त्रीपंडितांचें आगर आहे, ही गोष्ट जर्मनींत होऊन गेलेले ल्यूथर, लिबनिटस, लेसिंग, हेगेल, हाइन, शोपेनहूर, शिलर, हौप्टमन, कायसरलिंग, इत्यादि प्रसिद्ध महानुभाव ग्रंथकार ध्यानांत आणले असतां सहज पटण्यासारखी आहे. पण कवि गटे याच्या नांवानें जर्मनीच्या रसिकपणाचा व विद्वत्तेचा जो बोध जगाच्या मनावर होतो तो इतर नांवांवरून तितका होत नाहीं. आजची २२ मार्च ही तारीख, शंभर वर्षांच्या फरकानें कां होईना; पण, या जगविख्यात पराक्रमी वाङ्मयप्रकाशाची आठवण करून देणारी आहे. म्हणून प्रस्तुत लेखानें केसरीच्या वाचकांना त्याचें पुण्यस्मरण करून देण्याचा प्रयत्न आम्हीं केला आहे. कारण याहि बाबतींत वर सांगितल्याप्रमाणें, राष्ट्रीय भावना ही कोणत्याहि राष्ट्राच्या प्रगतीला अवश्य असली तरी ती संकुचितच असावी असें मात्र नाहीं. स्वाभिमान न सोडतांहि, विभूतिपूजेच्या तत्त्वानुसार, जगांतील कोणत्याहि भागांतून मिळणाऱ्या ज्ञानाचा, गुण-संपत्तीचा, ऊर्जितत्वाचा, विभूतिमत्वाचा प्रकाश घेऊन, आपलें मनोमंदिर पवित्र व प्रकाशमान करणारी तीच खरी राष्ट्रीय बुद्धि असें आम्ही तरी समजतों.

# महाराष्ट्राचा भाग्योदय

( ले. रा. प. सबनीस, एम्. ए. ( केंब्रिज ) प्रिन्सिपॉल, सर परशुरामभाऊ कॉलेज पुणें. )

व्यक्तीला त्याचप्रमाणें राष्ट्राला आपले गुण कोणते व आपले दोष कोणते, आपलें बल कशांत आहे व आपलें मरण कशांत आहे, याचें यथार्थ ज्ञान होणें जरूर असतें. या ज्ञानाच्या जोरावरच त्यांना आपला उत्कर्ष करून घेतां येतो. एक वेळ अशी होती कीं, आपल्या अवनत स्थितीकडे पाहून तिच्या कारणांची खोल मीमांसा करण्याच्या भानगडींत न पडतां आपले पुढारी आत्मनिंदेंत भूषण मानीत होते. त्यानंतर एक वेळ अशी आली कीं, बहुतेक पुढारी मराठ्यांच्या गतवैभवाचे पोवाडे गाऊन आजच्या अवनत स्थितीकडे दुर्लक्ष करूं लागले. आज पुनः महाराष्ट्रावर उदासीनतेची किंबहुना निराशेची छाया पसरलेली दिसते. सर्वसाधारण लोकांचें लक्ष केवळ नजरेंत भरण्यासारख्या गोष्टींकडे असल्यामुळें त्यांना निराशा वाटल्यास फारसें आश्चर्य करण्याचें कारण नाहीं. आज हिंदुस्थानांत जे जगप्रसिद्ध वाङ्मयलेखक किंवा शास्त्रज्ञ आहेत, त्यांच्यांत मराठा कोणी नाहीं, याविषयीं मराठ्यांना इतकें वाईट वाटलें नसतें; पण ज्या राजकारणाच्या क्षेत्रांत हिंदुस्थानाचे पुढारी होण्याची मराठ्यांना विशेष उत्सुकता, तें राजकारणहि आज इतरांच्या हातांत गेलें आहे. पण ही स्थिति विचारवंतांना देखील निराश करण्याइतकी दुर्धर नाहीं, हें सिद्ध करून दाखवितां येणें शक्य आहे.

मराठ्यांच्या गतकालीन मोठेपणाविषयीं प्रश्नच नाहीं. सर्व हिंदुस्थानभर मुसलमानांचें वर्चस्व बसून हिंदूंचें हिंदुत्व नष्ट होण्याची भयप्रद वेळ आली असतां मराठ्यांनीं त्यांचा प्रतिकार केला व जिकडे तिकडे हिंदु राज्यें स्थापून दाखविलीं. शतकानुशतकें दास्यांत लोळत पडलेल्या व म्हणून त्याची चीड येईनाशी झालेल्या लोकांना स्वतंत्र करणें किती दुर्घट काम आहे, हें कोणालाहि सांगावयास नको. मराठ्यांना ही कामगिरी त्यांच्या अंगीं कांहीं तरी विशेष सद्गुण असल्याशिवाय खास बजावितां आली नसती. ते सद्गुण आजहि सर्वसाधारण मराठ्याच्या अंगीं आहेत असें जर आपल्याला दिसून आलें, तर निराश होण्याची जरूर नाहीं. अलौकिक बुद्धिमत्तेचे पुढारी म्हणजे 'ईश्वराचें देणें' आहे, ते नेहमीं लाभतीलच असें नाहीं. पण ज्या सद्गुणांचें अस्तित्व म्हणजे शील, ते सद्गुण बऱ्याच प्रमाणांत व बऱ्याच लोकांत असलें म्हणजे झालें.

### मराठ्यांची त्यागवृत्ति

आम्हांला मराठ्यांचा सर्वांत प्रशंसनीय सद्गुण वाटतो तो हा कीं, केवळ उदरनिर्वाहापुरता मोबदला घेऊन समाजसेवा करण्याची त्यांच्यामधील बुद्धिमंतांची तयारी असते. या बाबतींत ज्ञानेश्वर आणि तुकाराम यांच्या अलौकिक वर्तनाची छाप कायमची महाराष्ट्रावर बसली आहे. चिपळूणकर, टिळक व आगरकर यांनीं अलीकडील काळांत तोच धडा महाराष्ट्राकडून पुनः एकदां गिरवून घेतला. समाजाची सर्व बाजूंनीं उन्नति घडवून आणण्याचें केसरीच्या संपादकाचें काम रा. न. चिं. केळकर यांनीं वीस–पंचवीस वर्षें केवळ शंभरसवाशें रुपयांवर केलें. जवळ जवळ दारिद्र्यांत दिवस कंठीत असतांहि कोणापुढें न नमतां रा. द. वि. आपटे यांनीं इतिहाससंशोधनाचें बहुमोल परंतु कीर्तीचा विशेष लाभ करून न देणारें काम वर्षानुवर्षे चालविलें आहे. रा. शेजवलकरांनीं आपलें बौद्धिक स्वातंत्र्य कायम ठेवण्याकरितां सर्वस्वावर आपण होऊन पाणी सोडिलें. डॉ. परांजप्यांच्यामागून प्रि. महाजनी हे त्यांच्याहून किती तरी पटींनीं कनिष्ठ लोक किती तरी पटींनीं जास्त पगार मिळवीत असतां दीडशें रुपयांवर राहण्यास आनंदानें तयार झाले. आज हयात असलेल्या पन्नास साठ, चाळीस-पन्नास, तीस-चाळीस, आणि वीस तीस या वयाच्या प्रसिद्ध लोकांचें एकएक उदाहरण पुरें आहे. पण अनेक वेळां स्वार्थत्यागानें थोरत्व पावलेले लोक अज्ञातहि रहात असतात. कारकुनीवर वीसपंचवीस रुपये मिळवीत असतां कै. गो. कृ. गोखल्यांना कॉलेजांतील शिक्षण मिळवून देणाऱ्या त्यांच्या वडील भावासारख्या निःस्वार्थी पुरुषाचें एखादे वेळीं तरी नांव घेतलें जातें. पण जे स्वतः अप्रसिद्ध व ज्यांनीं शिक्षित केलेले भाऊ किंवा मुलगेहि अप्रसिद्ध त्यांच्या स्वार्थत्यागाची किंमत कमी नसते. विचार करूं लागल्याबरोबर प्रत्येकाला अशीं उदाहरणें कितीं तरी आठवतील.

हीच गोष्ट कर्तव्यनिष्ठा, खरेपणा, करारीपणा, धैर्य इत्यादि सद्गुणांची. राष्ट्राचें शील थोर पुरुषांच्या वर्तनाचें अनुकरण करण्यानें बनत असतें. महाराष्ट्राच्या बाबतींत ही थोर पुरुषांची परंपरा अव्याहत कायम आहे.

### बीजारोपणाचें कार्य

परंतु राष्ट्राच्या आयुष्यांत कांहीं काळ असे असतात कीं, त्या वेळीं लोकांच्या डोळ्यांत भरण्यासारखे

प्रकार फार थोडे असतात. बीं जमिनींत टाकल्यानंतर जमिनीवर अंकुर दिसेपर्यंत कांहींच होत नाहीं, वाढ खुंटली असा भास होतो. प्रथम वाढीचा वेग अगदीं मंद असतो. झाड फोंफावलें म्हणजे पानें फुलें व फळें यांची समृद्धि पाहून मन आश्चर्यस्तिमित होतें. शिवाजीमहाराजांनीं स्वराज्यस्थापना करण्यापूर्वीचा काळ असाच होता. ज्ञानेश्वर, तुकाराम, रामदास यांसारख्या महात्म्यांनीं बीजारोपणाचें काम केलें होतें; अंकुर हळहळू येत होते. शिवाजीमहाराजांच्या हयातींत लायक मनुष्यांची वाण पडली नाहीं एवढेंच नव्हे. तर व्यसनाधीन संभाजीच्या नऊ वर्षांच्या कारकीर्दींतूनहि कळसास पोंचलेल्या मोगल साम्राज्याची धुळधाण उडविण्यास ते शिल्लक राहिले.लुई १५वा व लुई १६वा यांच्या कारकीर्दींत फ्रान्समध्यें असाच देखावा आपल्याला दिसतो. जिकडे तिकडे अव्यवस्था व गोंधळ. लोकांच्या पुढें असलेले फ्रेंच सेनापति व मुत्सद्दी सर्व नादान आणि फ्रान्सची जिकडे तिकडे नाचक्की. फ्रेंच विचारवंतांचें बौद्धिक पेरणी करण्याचें काम मात्र सुरू होतें. १७८९ च्या राज्यक्रांतीनंतर कर्तबगार व्यक्तींचें जणुं काय पेंव फुटलें. औषधाला सुद्धां सैन्यांत जेथें लायक सेनापति मिळत नव्हता, त्याच ठिकाणीं नेपोलियनला, घे शिपाई व कर त्याला शूरांतील शूर व कुशलांतील कुशल सेनापति, असा चमत्कार करून दाखवितां आला ( I made my marshals out of clay ).

तीच स्थिति कांहींशी आज महाराष्ट्रांत आहे. ज्ञानकोशाचें काम संपलें आहे. मराठी शब्दकोशाचें काम सुरू आहे. प्रो. मा. त्र्य. पटवर्धनांनीं 'फारसी-मराठी' कोशासारखें दीर्घव्यासंगाचें व किचकट काम एकट्याच्या बळावर संपविलें आहे. महाभारताच्या नव्या भाषांतराचे ग्रंथ वार्धक्याचा थकवा ज्यांना माहीत नाहीं अशा पंडितश्रेष्ठ चिं. वि. वैद्यांच्या देखरेखीखालीं तयार होत आहेत. ललितकलांच्या क्षेत्रांत शिवाजीमहाराजांचा भव्य पुतळा करून रा. करमरकरांनीं आपल्या प्रतिभेची साक्ष पटविली आहे. पण समाजाच्या सुधारणेचें कार्य करणारे पहिल्या प्रतीचे किती तरी लोक त्यांच्या योग्यतेच्या मानानें आज अगदीं अप्रसिद्ध आहेत. प्रो. लागू यांच्याशीं पांच मिनिटेंच बोलावयास पाहिजे, ते दहा हजारांत एक मनुष्य आहेत ही गोष्ट पटते. सर्व सुखांवर लाथ मारून सहस्रावधि ग्रंथांचा स्वतःचा संग्रह करणें व रात्रंदिवस आपल्या विषयाचा व्यासंग करीत राहणें याला कांहीं तरी अलौकिक लागत असतें. त्याचें लेखन असें अजून फार थोडें झालें आहे. पण त्यांनीं आपल्या मॅट्रिकच्या परीक्षेसाठीं निवडिलेल्या लघुकथासंग्रहाची नुसती प्रस्तावना घ्या ती पाहून इंग्लंडांतील पहिल्या प्रतीच्या विद्वान अशा टीकाकाराच्या कलमांतून बाहेर पडलेला लेख आपण वाचीत आहों असें वाटतें. मननामोदकर्ते भिडे यांच्या स्वैरकथांतून शास्त्रें निघावीं इतकी त्यांची योग्यता आहे. पण सर्वसाधारण लोकांच्या दृष्टीनें ते कोठेंच नाहींत. त्यांनीं पुष्कळ पुस्तकें लिहिलेलीं नाहींत, त्यांच्या जवळ पैशाची ऊब नाहीं, त्यांची राहणी साध्यांतली साधी आहे. रा. शं. रा. दाते यांनीं बी. ए.ची परीक्षा पास झाल्यानंतर दहा वर्षेपर्यंत लोकसंग्रह छापखान्याची जोपासना करून त्यांनीं तो संस्थेला अर्पण करावा या कृत्याची नैतिक योग्यता मोठी नाहीं काय? आतां मराठी टाइपांत सुधारणा केल्यामुळें रा. दाते यांची माहिती लोकांना झाली आहे.

राष्ट्राच्या उदयाच्या दृष्टीनें सार्वजनिक कार्यांना मदत करण्याची जनतेची किती तयारी आहे,या गोष्टीचें महत्त्व असतें.लो. टिळकांना १९१६ सालीं एक लक्ष रुपये व नंतर दोन लक्ष रुपये स्वयंस्फूर्तीनें अर्पण करण्यांत महाराष्ट्रीय जनतेनें जितकें थोर उदाहरण घालून दिलें, तितकेंच भूषणास्पद उदाहरण केसरीनें केलेल्या तीन लाखांच्या ट्रस्टचें आहे. ज्या समाजांत अशा घटना होऊं शकतात, त्यानें आत्मविश्वास बाळगण्यास मुळींच हरकत नाहीं.

### मराठ्यांतील अवगुण

मराठ्यांची चांगली बाजू आतांपर्यंत दाखविली. पण ज्या दुर्गुणांमुळें आपला अधःपात झाला, ते दुर्गुण लोपल्याशिवाय आपला उदय होणार नाहीं. (१) आपण मोठे दीर्घद्वेषी व मत्सरी आहों. भोसल्यांनीं शिरकाण करावयाचें व शिरक्यांनीं मोंगलांना मिळून मराठी राज्य मोडावयाला मदत करावयाची, अशी आपली वृत्ति राहील तोंपर्यंत आपल्या कपाळींचें परदास्य कसें चुकणार? सख्ख्या भावाचा किंवा शेजाऱ्याचा उत्कर्ष सुद्धां आपल्याला सहन होत नाहीं. आपल्यांतील इतर सर्व दृष्टींनीं वंद्य असे पुरुष देखील परस्परांविषयीं तुच्छताबुद्धि दाखवितांना दृष्टीस पडतात. (२) मनुष्यांत चांगली बाजू असते व वाईट बाजू असते. आपलें लक्ष वाईट बाजूकडे जास्त असतें, व त्यामुळें चांगल्या बाजूकडे आपण दुर्लक्ष करतों. एवढेंच नव्हे, तर तीहि वाईट आहे असें दाखविण्याचा आपण प्रयत्न करतों. मुलानें शेकडा पन्नास मार्क मिळविले तर 'चल मूर्खा,तुला शेकडा पंचावन्न मार्क सुद्धां मिळवितां येत नाहींत' असें म्हणण्याचा विचित्रपणा करून आपण स्वतःला मोठे धोरणी म्हणून शाबासकी घेत असतों. इंग्रज, फ्रेंच, अमेरिकन किंवा जर्मन बाप मुलाला पन्नास मार्क मिळाले तर त्याचें कौतुक करील. ज्याची भेट व्हावी म्हणून नेपोलिअनसारखा

जगज्जेता उत्सुक असे, त्या गटेनें फेलिक्स बर्टोल्डी नांवाचा बर्लिनमधील तेरा वर्षांचा यहुदी मुलगा पिआनो उत्तम वाजवितो, असें ऐकिल्याबरोबर त्याच्या शिक्षकाला लिहून त्याला वीमारला बोलाविलें व त्याचें कोडकौतुक केलें. फेलिक्सला त्यामुळे आपल्या गुणाचा परमोत्कर्ष करून दाखविण्यास केवढें उत्तेजन मिळालें! गटेनें स्वीकारिलेल्या फुलांच्या वाळलेल्या पाकळ्यांचें जतन फेलिक्सनें करून ठेविलें. पुष्कळ वेळां असा अनुभव येतो कीं, महाराष्ट्रांत टाकाऊ ठरलेले गृहस्थ युरोपांत किंवा अमेरिकेंत मान्यता पावतात. आपल्या सद्गुणांचें किंवा कर्तबगारीचें योग्य चीज होत नाहीं अशी समजूत झाली कीं गुणी मनुष्यहि चिडून जातो व त्याच्याकडून असमर्थनीय अशा गोष्टी होऊं लागतात.

### सहकार्याशिवाय भव्य कार्य नाहीं

(३) आपल्या प्रतिभासंपन्न लोकांच्या तुसडेपणामुळें व वरील दोन दुर्गुणांमुळें आपल्यांत सहकार्य दुष्कर होतें. पूर्वी श्रमविभाग इतका सूक्ष्म नव्हता तेव्हां एकांडे शिलेदार राहूनहि कार्य करणें शक्य होतें, पण हल्लीं सहकारितेशिवाय भव्य कार्य होणें शक्य नाहीं माणसें जोडावयास आपण शिकलें पाहिजे व माणसें तोडण्याची कला आपल्याला विसरून गेलें पाहिजे. मॉम्सेनच्या जवळ शिकण्यासाठीं युरोपांतून व अमेरिकेतून शिष्यांच्या झुंडी लोटत होत्या; राजवाड्यांच्याजवळून त्यांचे अत्यंत निकटचे स्नेही निघून जात असलेले दिसत होते. परिणाम हा कीं रोमच्या इतिहासाच्या क्षेत्रांत जेवढें काम झालें आहे,त्याच्या सहस्रांशहि काम मराठ्यांच्या इतिहासाच्या क्षेत्रांत झालें नाहीं. (४) निःस्पृहपणा म्हणजे जेव्हां तेव्हां 'मी कोणाचें कांहीं लागत नाहीं' अशी प्रौढी मिरविणें असा अर्थ आपण करतो. समाजांत ज्याला राहावयाचें आहे त्यानें अशी भाषा वापरणें म्हणजे निव्वळ मूर्खपणा होय. ज्या हवेंत आपण श्वासोच्छ्वास करतों, ती देखील दुसऱ्यांच्या श्रमानें झाली आहे. तर कोणाचें मी कांहीं लागत नाहीं या बडबडींत काय अर्थ आहे? युनिव्हर्सिटीनें आपण होऊन एकाद्या विद्वानाला त्याचें गौरव करण्यासाठीं परीक्षक नेमिलें तर परीक्षक होत नाहीं, म्हणून युनिव्हर्सिटीला कळविणें किंवा युनिव्हर्सिटीची मदत घेऊन हिशेब देत नाहीं म्हणणें हा निःस्पृहपणा नसून असभ्यपणा किंवा उर्मटपणा होय.

(५) मराठे साधारणतः काटक व तपस्वी वृत्तीचे खरें; परंतु त्यांच्यांतील कित्येक श्रेष्ठ पुरुष देखील संपत्तीच्या मोहाला बळी पडून वैभव मिळालें कीं, आपला बुभुक्षितपणा उघडा करून दाखवितात. वर्षानुवर्षे सुखोपभोगाच्या बाबतींत जणुं काय अर्धपोटीं राहिल्यामुळें त्यांना संपत्तीचा उपभोग गर्भश्रीमंताच्या प्रौढपणानें व उदारपणानें घेतां येत नाहीं. वेळीं अवेळीं लोकांच्यापुढें श्रीमंतीचें प्रदर्शन ज्यांमुळें होईल, अशीं व्यसनें किंवा विचित्र चाळे त्यांच्या मनाचा कबजा घेतात.अशा तऱ्हेची वृत्ति पेशवाईंत राज्यकर्त्यांत व जहागिरदारांतच--सन्मान्य अपवाद सोडून दिल्यास-दिसत असे आज त्यांच्या जोडीला मोठमोठे पगार मिळविणारे सरकारी नोकर, किंवा व्यापारावर व उद्योगधंद्यावर गबर होणारे व्यापारी व कारखानदार जाऊन बसले आहेत. (६) चैनीची प्रवृत्ति वाढली कीं सर्व सद्गुणांना ओहोटी लागते. त्यांतून दरिद्री देशांतील मनुष्यांनीं चैन करण्याची इच्छा धरणें या यासारखी घातुक गोष्ट नाहीं. तासचे तास नव्हे दिवसचे दिवस ब्रिज किंवा असलेच खेळ खेळणारे सुशिक्षित वृद्ध किंवा तरुण दिसतात तेव्हां खेद वाटतो. केसांची व पोषाकाची निगा करण्यांत फार लक्ष जाऊं लागलें म्हणजे महत्त्वाच्या गोष्टींकडे दुर्लक्ष होतें. चैनीची प्रवृत्ति वाढणें ही अतिशय अशुभसूचक गोष्ट आहे.

ज्ञानेश्वरांच्यापासून थोर पुरुषांची परंपरा महाराष्ट्रांत अखंड आहे. आजहि अभिमानास्पद घटना घडत आहेत. आपल्या दोषांची तीव्रता बोथटून व आपले गुण प्रभावी करून उत्कर्ष करून घेतां येतो, हें मराठ्यांनीं पूर्वी दाखविलें आहे. तेव्हां महाराष्ट्र स्वतःचा भाग्योदय करणार व हिंदुस्थानाच्या आणि जगाच्या प्रगतीला मदत करणार, याविषयीं तिळमात्र संशय आमच्या मनाला शिवला नाहीं व शिवत नाहीं. महाराष्ट्राचा भाग्योदय व्हावयाचा नसता, तर रानडे ऐषआरामांत लोळत पडले असते, चिपळुणकरांनीं निरपेक्षपणें समाजसेवा करण्याची परंपरा पाडिली नसती. शेंकडो वर्षांनीं फळ मिळालें तर मिळालें अशा तऱ्हेचे उद्योग हातीं घेण्याला राजवाडे सरसावले नसते, एक वेळ अशी होती कीं मराठ्यांचा मोठेपणा हिंदुस्थानानें कबूल केला; एक वेळ अशी येणारच येणार कीं, मराठ्यांच्या मोठेपणाला जगानेंहि मान्यता द्यावी.

# गोमांतकांतील नवहिंदूंचा चवथा महोत्सव

सालाबादप्रमाणें यंदां फा. शु. ६ रोजीं धर्मविजयमहोत्सवाचा चवथा वार्षिक वाढदिवस सर्व नवहिंदूंनीं चिंबल, नाझगर, कालापूर, करबळी, मेर्शी, पानवेल, पाळें, कर्जाळ, ताळगांव, प्रियोळ, सांवईवेरे, मंगेश, आर्ले, सत्तरी वगैरे गावड्यांच्या लोकवस्तीच्या गांवीं सामुदायिक रीत्या व घरोघर पाळण्यांत आला. या यंदांच्या उत्सवास हिंदुधर्मांतील मुख्य तत्त्व जें परमेश्वर-भक्ति त्यालाच प्राधान्य देऊन, कुठें धार्मिक प्रवचनें, तर कुठें भजनी मिरवणुकी, व कोठें कोठें सत्यनारायणपूजा, नामजप असे अनुकूलतेप्रमाणें विविध कार्यक्रम ठरविलेले होते. या दिवशीं सर्व नवहिंदूंनीं आपापल्या घरांवर धर्मजयी पताका ( गुढया ) उभारून धार्मिक स्वातंत्र्य व्यक्त केलें होतें. या दिवशीं घरोघर तुळशीची पूजा व तशीच, देवाची, गोमातेची पूजा करण्यांत आली. श्रेय, स्थैर्य, दीर्घायुष्य व आरोग्यवृद्धीसाठीं गोमांतकांतील प्रसिद्ध देवस्थानें श्रीमंगेश, श्रीनारसिंह, श्रीदेवकीकृष्ण, श्रीम्हाळसा, श्रीभगवती, चिमलकरीण, श्रीमहालक्ष्मी, श्रीमारुती, श्रीदुर्गादत्त, श्रीशांतादुर्गा, श्रीसातणकरीण अशा नऊ देवालयांत अभिषेक करवून प्रार्थना करण्यांत आल्या. नवहिंदूंनीं हा दिवस शुचिर्भूतपणें सात्त्विक अन्न खाऊन हरिभजनांत व ' हिंदुधर्मकी जय ' अशा जयघोषांत साजरा केला आणि अशा तऱ्हेनें आपली हिंदुधर्माविषयींची अचल श्रद्धा व्यक्त केली.

चिंबलच्या पतितपावन मंदिरांत रात्रौ दीपोत्सव, भजन वगैरे करून गांवांत 'रामगस्त' घालण्यांत आली. विजय नगरांतील शुद्धिकुंडास सामुदायिक रीत्या फुलें व अक्षता समर्पण करून प्रदक्षिणा घालण्यांत आल्या. या उत्सवास श्रीविनायकमहाराज मसुरकर यांनीं पाठविलेला प्रेमाचा संदेश वाचून दाखवून, तीं छापील पत्रकें सर्वांस वाटण्यांत आलीं. त्या वेळीं एकदोन वक्तयांनीं स्वधर्मावर स्फूर्तिदायक भाषणें केल्यावर भारतपत्रकार श्री. हेगडेदेसाई, पतितपावनकार रामभाऊ लवंदे आणि अनेक गृहस्थांचे आलेले संदेश वाचून दाखविण्यांत आले. त्यानंतर सर्वांकडून खालील प्रार्थना करण्यांत आली.

कल्याण होउ सर्वांचें, नासोन दुःख आपदा।<br>
शत्रु ते मित्र होवोत, वाराया संकटें सदा ॥ १ ॥<br>
आनंद होउ सर्वांतें, देवोनि धनसंपदा।<br>
पतितपावना देवा, हिंदुत्व विजयी करा ॥ २ ॥

अशा रीतीनें हा चतुर्थ वार्षिक सुवर्ण महोत्सव दिन साजरा करण्यांत आला. गेलीं दोन तीन वर्षें हा शुद्धिसुवर्णदिनोत्सव बाहेर गांवच्या लोकांस छापील निमंत्रण-पत्रिका पाठवून व मोठी सभा भरवून चिंबल गांवांत साजरा करण्यांत येत असे. गतवर्षीच्या सभेंत शुद्धिवीर रा. रामभाऊ लवंदे यांच्या धार्मिक आवेशयुक्त भाषणानें पाद्र्यांचें पित्त खवळून त्यांनीं त्यांजवर राजद्रोहाचा खोटा आरोप करवून त्यांना पकडाविलें होतें. त्या वेळेपासून त्यांच्यावर व इतर कांहीं पुढाऱ्यांवर त्यांची वक्रदृष्टि होती. हरप्रयत्नानें ही शुद्धीची चळवळ हाणून पाडण्याची त्यांनीं पराकाष्ठा केली.

जुलूमजबरदस्ती करून गावडे लोकांची शुद्धि करण्यांत येत असते, अशी खोटी समजूत वरिष्ठ अधिकाऱ्यांची करून देण्यासहि त्यांनीं मागें घेतलें नाहीं. पण खोटें हें केव्हांहि खोटेंच ठरणार, व खरें हें कधीं तरी खरेंच ठरणार.या गावडे लोकांस पूर्वी बाटविलें होतें, तें मात्र जुलूम-जबरदस्ती करून, व आतां ते शुद्ध झाले ते मात्र आपल्या राजीखुषीनें ही गोष्ट सूर्यप्रकाशाइतकी स्पष्ट आहे. मागच्या शुद्धीच्या चळवळींत कांहीं कारणानें मागें राहिलेले गावडेहि ह्या दोन महिन्यांत राजीखुषीनें शुद्ध झाले आहेत. यास्तव सार्वजनिक सभेच्या दृश्यानें पाद्री व सरकारी अधिकारी बुजून जाऊं नयेत,म्हणून यंदांचा सुवर्ण-महोत्सव दिन वर लिहिल्याप्रमाणें घरोघर साजरा करण्यांत आला.

# सरकार व व्यापारी यांजमधील लढ्याची मीमांसा

मुंबईसरकारची अशी ठाम समजूत झालेली दिसते कीं, गेल्या दोन महिन्यांत जो मुंबई शहराचा व्यापार गडगडला त्याच्या बुडाशीं राष्ट्रीय सभावाल्यांची व राष्ट्रीय सभेच्या कक्षेत खुषीनें अगर नाखुषीनें फिरणाऱ्या हिंदी व्यापाऱ्यांची बरीच कारवाई आहे! एक गोष्ट खरी कीं, सरकारानें राष्ट्रीय सभेवर वटहुकुमांचे अस्त्र सोडल्यादिवसापासून मुंबईच्या व्यापारास उतार लागला व परदेशी मालाचा व्यवहार करणारे हिंदुस्थानांतील इंग्रज व हिंदी व्यापारी व विलायतेंतील गिरणीवाले यांच्या नफेबाजीचा ओलेपणा सुकूं लागला. मुंबई शहराच्या व्यापारास लागलेली ओहोटी व अहमदाबाद वगैरे शहरांच्या गिरण्यांच्या उद्योगधंद्यास येणारी भरती हे दृश्य पाहून तर कित्येकांच्या कुटिल मनाला यांतहि कांहीं राष्ट्रसभावाल्यांचें कृष्णकारस्थान आहे अशी शंका येऊं लागली व त्यांनीं या गोष्टीचा पुकाराहि केला. गांवांतील एखादी टोलेजंग इमारत धुळीस मिळाली व आजूबाजूस नवीं घरें निर्माण होतांना दिसलीं म्हणजे अनेक बऱ्यावाईट कल्पनांचा खेळ मनांत सुरू होतो, तीच मनोवृत्ति वरील व्यापाराबाबत कित्येकांस प्रतीत होऊं लागली आहे. प्रामाणिकपणानेंहि असेल, पण सरकारच्याहि पोटांत एक भीति उभी राहिली आहे कीं, मुंबई शहराचा व्यापार व त्याच्या पाठोपाठ वाहणारा संपत्तीचा ओघ दुसरीकडे वळला आहे. या एका अगर वरील अनेक गुंतागुंतीच्या कारणांचा सामुदायिक परिणाम होऊन सरकारानें मुंबईच्या व्यापाऱ्यांवरच डोळे वटारले व ' एक घाव कीं दोन तुकडे ' या नीतीचा अवलंब करण्यास त्यांनीं प्रारंभ केला त्यामुळें व्यापारी व सरकार यांच्यामधील तेढ, गेल्या दोन आठवड्यांत विकोपास पोहोंचली.

मुंबई सरकाराच्या या धोरणास विलायतेंतील हुजूर पक्षीय स्टेटसेक्रेटरी सर सॅम्युएल होअर व इतर मुत्सद्दी मंडळी यांचा पाठिंबा आहेच. किंबहुना असेंहि म्हणण्यास हरकत नाहीं कीं, या सर्व कटकटीचें मूळ विलायतेंतच आहे. पार्लमेंटांत नुकत्याच झालेल्या प्रश्नोत्तरांवरून मुंबई शहरावर स्टेटसेक्रेटरींचा मोठाच घुस्सा आहे असें स्पष्ट दिसतें. एका प्रश्नास उत्तर देतांना ते म्हणाले कीं, " इतर सर्व प्रांतांतील राष्ट्रीय सभेची चळवळ थंडावली आहे, पण बंगाल व मुंबई येथील चळवळ आपल्या काबूंत अद्याप आली नाहीं. विशेषतः परदेशी कापडाचें निरोधन व व्यापारमंदी याबद्दल मुंबईसरकार जोराचे व धडाडीचे प्रयत्न लवकरच सुरू करील असें दिसतें. परिस्थिति बिकट आहे पण मार्ग निघेलच!" या उत्तरांतील मेख कोठें आहे याची आमच्या चाणाक्ष वाचकांस छाननी करून सांगण्याचें प्रयोजन नाहीं. मुंबई सरकारच्या हत्तीला स्टेटसेक्रेटरीकडूनच अंकुश लावला गेल्याचें मात्र यावरून उघड झालें !

हुजूर पक्षीय इतर मुत्सद्द्यांसंबंधीं तर बोलावयासच नको. राष्ट्रीय सभेचे प्रमुख महात्मा गांधी व त्यांचें कार्यकारी मंडळ यांना अटक केली, राष्ट्रीय सभेच्या सर्व संस्था बेकायदेशीर ठरविल्या, व जोमदार कार्यकर्त्या लोकांना तुरुंगांत डांबलें म्हणजे हिंदुस्थानच्या राजकीय आकाशांत आलेले काळेकुट्ट ढग निवळून जातील अशी अनेक हुजूरपक्षीय मुत्सद्द्यांची अटकळ होती. चर्चिलसाहेबांनीं गांधी व गांधींचीं तत्त्वें नष्ट केल्याशिवाय नवीन सुधारणांचें पाऊल पुढें पडणार नाहीं असें नुकतेच जाहीर केलें, त्यांतील मतलब या अटकळीच्याच जातींतील आहे. हिंदुस्थानाच्या खजिन्यांतून भलें लठ्ठ पेनशन खाणारे लॉर्ड मेस्टन यांनीं नुकतेच असे उद्‌गार काढले कीं, गांधींना तुरुंगाची हवा दाखविल्यानंतर आतां बाहेर व्यवहारकुशलत्वाची कामगिरी घडण्यास वाव उत्पन्न झालेला आहे ! सरकारची चढाई यशस्वी झाल्याचें यांना समाधानहि झालेलें दिसतें. त्यांची रुखरुख आतां इतकीच कीं, मुंबईच्या व्यापारमंदीनें यशाचें पुरेपूर माप आपल्या पदरांत पडत नाहीं. हें शल्य त्यांच्या अंतःकरणांत खुपतें आहे. म्हणून मुंबईच्या व्यापारमंदीला कारण तेथील व्यापारीच आहेत अशी समज करून घेऊन मुंबईसरकारनें व्यापाऱ्यांना वळविण्यास सुरुवात केलेली पाहून त्यांनाहि आनंद होणार आहे हें खास !

सरकार व व्यापारी यांच्यामधील या तेढीचा इतिहासहि लक्षांत ठेवण्यासारखा आहे. हिन्दी व्यापाऱ्यांची मुंबईतील प्रमुख संस्था म्हणजे 'इंडियन मर्चंट्स् चेंबर.' १९३०मधील लढ्याच्या इतिहासांत या संस्थेनें व्यापारी हिताच्या दृष्टीनें फार चांगले काम केलें व अनेक अन्याय या संस्थेच्या चिकाटीच्या प्रयत्नानें दूर झाले. परंतु 'नृपतिजनपदानां दुर्लभः कार्यकर्ता ' या कोटींत बसणाऱ्या या संस्थेची कामगिरी सरकारास पटेना. त्यांना ह्या संस्थेची कामगिरी म्हणजे ' बीचमें मेरा चांदभाई 'चा उपद्व्याप वाटूं लागला व त्यामुळें जवळ जवळ दोन वर्षें

सरकारी अधिकाऱ्यांचें व या संस्थेच्या चालकांचें सूत नीट नाहीं. व्यापारी महामंडळ ही त्यांची दुसरी संस्था. ती उघड उघड राष्ट्रीय सभेचा पुरस्कार करणारी असल्यामुळें ती तर सरकारच्या डोळ्यांत खड्यासारखी सलावी हें स्वाभाविक होय.मुंबईत सभाबंदीचा कायदा पुकारला गेल्यानंतर व वटहुकुमांचा अंमल जारी असतांना, या दोन संस्थांनीं इतरांच्या सहकारितेनें खुद्द मुंबईस जाहीर सभा भरवून महात्मा गांधींच्या अटकेबद्दल त्या सभेंत सरकारचा निषेध करण्याचा एक बूट काढला व त्या बाबतींत त्यांनीं सरकारशीं केलेल्या पत्रव्यवहारामुळें तर सरकारच्या नाकास मिरच्या लागल्या व सरकारच्या स्पष्ट व खोंचदार उत्तरानें या व्यापाऱ्यांना आपला अपमान झाल्यासारखें वाटलें !

या वेळीं सरकारच्या रांजणांत या व्यापाऱ्यांच्या दोषांचे खडे पुरे भरून त्याची शींग पोहोंचली ! गेल्या महिन्यांत वरील गोष्ट घडल्यानंतर, राष्ट्रीय सभावाल्यांच्या आज्ञेनुसार सर्व मोठमोठे बाजार हरताळामुळें बंद पडूं लागले. मुंबईचा शेअरबाजार, सोनेबाजार, कापडाच्या विक्रीचीं मार्केटें, दवाबाजार इतकेंच नव्हे तर मुंबईच्या व्यापाराचा प्राण ज्या कपाशीच्या व्यापारांत सांठविलेला आहे,तो कपाशीचा व्यापार व तो ज्यांच्या हातीं आहे ते व्यापारी व त्यांच्या 'ईस्ट इंडिया कॉटन असोसिएशन' 'कॉटनब्रोकर्स असोसिएशन' व 'कॉटन मुकादम असोसिएशन' वगैरे संस्था हरताळ मान्य करूं लागल्या अशी सरकारची समजूत झाल्यामुळें सरकारचा राग भडकला व त्यांनीं या तेढीचा निकाल लावून घेऊन जरूर तर या व्यापाऱ्यांची खोडकी जिरविण्यासाठीं कंबर बांधली. तेथूनच खऱ्या तंट्यास सुरुवात झाली !

सरकारची शक्ति म्हणजे हुकुमशाही. प्रथम वटहुकुमांखालीं चळवळ्या व संशयित व्यापाऱ्यांची उचलबांगडी करण्याचा उपक्रम पोलीस कमिशनरसाहेबांनीं केला. त्यांतल्या त्यांत कॉटन ब्रोकर असोसिएशनचे चिटणीस श्री. रतीलाल ठक्कर यांना चोवीस तासांत मुंबई सोडण्याचा हुकूम झाला ! आपली पेढी फार जुनी असून वीस लाखांचा आपला व्यापार असल्याने मुंबई सोडतां येत नाहीं अशी त्यांनीं तक्रार केली. पण त्या तक्रारीचा उपयोग झाला नाहीं व श्री. रतीलाल यांना दोन वर्षें तुरुंगवासाचें प्रायश्चित्त भोगावे लागलें ! श्री. दुर्गादास सावळकिया, श्री. रामकृष्ण मेथा वगैरे आणखी सात व्यापाऱ्यांना अशीच कमीजास्त शिक्षा भोगावी लागली! यामुळें कपाशीच्या व्यापाऱ्यांचें धाबें दणाणलें व त्यांना सरकारच्या दडपशाहीचा सात्विक संतापहि आला. हरताळ पाळणाऱ्या दुकानदारांना पुढें सरकारनें दुकानें सक्तीनें उघडावयास लाविलीं इतकेंच नव्हे तर हा हुकूम अमलांत असेपर्यंत ते पूर्वी जीं औषधें, जे जिन्नस व जो कपडा नेहमींच्या व्यापारी व्यवहारांत विकत घेत असत अगर विकीत असत त्याच जिनसा विकल्या पाहिजेत व विकत घेतल्या पाहिजेत, अशा अर्थाचे हुकूम पोलीस कमिशनरांनीं सर्वांवर बजावले ! या हुकुमांत वापरलेलें शब्दजाल कितीहि मोघम व दूरान्वयाचें असलें तरी त्यांतील गुपित, कांचेच्या कुपीत ठेवलेल्या जिनसाप्रमाणें स्पष्ट दिसतें. 'नेहमींचा व्यवहार' हे शब्द फार चव्हाटखोर आहेत व त्या शब्दांमुळें हुकुमांतील ध्वनीची संवेदना व अर्थाची उपपत्ति अचूक लागते!

हेंच धोरण पुढें चालवून सरकारनें सर्व व्यापाऱ्यांवर व त्यांच्या संस्थांवर चौफेर हल्ला चढवून त्यांची परीक्षाच पहावयाचें ठरविलें. निरनिराळ्या व्यापाऱ्यांच्या संस्थांना हुकूम लागूं लागले. हरताळ पाडूं नका अशीं पत्रें गेलीं. गिरणीवाल्यांच्या संस्थेलासुद्धां मुळजी जेठा मार्केट उघडण्याबद्दल विश्व प्रयत्न करण्यास हुकूम झाला. यांत सरकारनें कांहीं साधलें, कांहीं न साधलें. मार्केट उघडलें गेलें नाहीं. पण हरताळ बंद पडला. शेवटीं कपाशीचे व्यापारी व त्यांच्या प्रमुख संस्था यांना फडणिशी खात्याचे चिटणीस मि. वाइल्स यांचीं जेव्हां पत्रें गेलीं त्या वेळी हें प्रकरण बरेंच धसास लागलें ! या पत्रांत असा रोकडा सवाल, मि. वाइल्स यांनीं टाकला आहे कीं, कॉंग्रेसच्या आज्ञापत्रिका मानून हरताळ पाळणार का हरताळ बंद पाडण्याच्या कामीं सरकारशीं सहकारिता करणार? या पत्राचा अर्थच असा कीं जर व्यापाऱ्यांनीं सरकारच्या म्हणण्याप्रमाणें वागावयाचें नाकबूल केलें तर सरकार जरूरीप्रमाणें त्यांजवर कडक उपाय अमलांत आणल्याशिवाय राहणार नाहीं ! मि. वाइल्स यांच्याशीं झालेल्या वाटाघाटींत पुष्कळ व्यापाऱ्यांनीं सरकारास बजावलें कीं, "दंडुकेशाहीनें व्यापार चालू होणें शक्य नाहीं. देशांत सामोपचारानें शांतता उत्पन्न करा म्हणजेच व्यापारी भरभराट कायम राहील. शहराची परिस्थितिच अशी आहे कीं, व्यापार चालणेंच शक्य नाहीं. सरकारनें वटहुकुमांची सोटेशाही बंद केली तरच व्यापार चालेल, एरवीं नाहीं !"

यानंतर ता. २१ रोजीं मुंबईसरकारचे फडणीस सर गोविंद प्रधान यांच्या अध्यक्षतेखालीं, कापसाच्या व्यापाराशीं संबंध असलेल्या निरनिराळ्या संस्थांच्या जवळ जवळ पासष्ट प्रतिनिधींनीं सरकारी अधिकाऱ्यांशीं विचारविनिमय केला. त्यांत अनेक मतांचें आविष्करण झालें. परंतु त्यांतील निष्कर्ष पुढीलप्रमाणें होता. व्यापारी प्रतिनिधींनीं स्पष्ट सांगितलें कीं, आम्ही कोणत्याहि बाहेरच्या संस्थेचे अगर अशा संस्थां-

च्या अधिकाऱ्यांचे हुकूम ऐकतों ही गोष्ट वस्तुस्थितीस धरून नाहीं. सर पुरुषोत्तमदास यांनीं सांगितलें कीं, "पैसा कोणास नको? विशेष अडचणी नसतील तर व्यापारी पैशाकडेच लक्ष देतील. परंतु प्रस्तुतच्या परिस्थितींतून मार्ग काढण्याकरितां कोणीं कांहीं विधायक सूचना आम्हांस कराव्या. सरकारनें मात्र अधीर होऊन भलता सलता मार्ग पत्करूं नये." श्री. लालजी नारायणजी यांनीं देशांत शांतता झाल्याशिवाय कांहींहि करतां येत नाहीं असें स्पष्ट सांगितलें! वादविवादाचा निकाल म्हणून सरकारतर्फे मि. वाइल्स यांनीं सांगितलें कीं "वरचेवर हरताळ पाडून व्यापारांत अडथळा उत्पन्न करणें या गोष्टीविरुद्ध सर्वजणच आहेत. म्हणून सरकारनें असें गृहीत धरण्यास हरकत नाहीं कीं, सर्वजण शक्य तितका प्रयत्न करून सध्यांची परिस्थिति सुधारण्याचा प्रयत्न करतील." हें सर्वांस मान्य होऊन सभा बरखास्त झाली. व्यापाऱ्यांनीं हरताळ बंद करण्यास शक्य तितकी मदत करूं असें सांगितलें व सरकारानेंहि तें मान्य करून तूर्त तरी चढाईचें धोरण सोडून दिलें.

या वाटाघाटीचें प्रत्यक्ष फल काय दृष्टीस पडतें हें लवकर समजेलच! आम्हांला सक्तीचा मार्ग पसंत नसल्यामुळें सामोपचाराचा मार्ग सरकारनेंहि स्वीकारला ही गोष्ट तत्त्वतःहि अभिनंदनीय वाटते. कारण, मुंबईचे गृहमंत्री मि. थॅामस कांहींहि गर्जना करोत, लढाईची अगर मुष्टियुद्धाची धमकी देवोत, अगर या धमक्यांचें रूपांतर प्रत्यक्ष व्यवहारांत दयामायाविरहित अशा रीतीनें करोत, व्यापाराच्या बाबतींत तरी निदान हा मार्ग यशस्वी होणार नाहीं. साम करणें हाच एक रामबाण उपाय आहे, दुसरा नाहीं. सरकारी सामर्थ्याचा ताबा शरीरावर चालेल पण तो मनावर कसा चालणार? व्यापार ही गोष्टच खुषीची, मनाच्या प्रसन्नतेची व स्वतंत्र बुद्धीची असल्यानें तो सक्तीनें करवून घेणें शक्य नाहीं.

ह्याच सक्तीचा प्रश्न पूर्वी पार्लमेंटांत चर्चेस निघाला असतांना, माजी भारतमंत्री मि. बेन यांनीं अगदीं निःसंदिग्ध रीतीनें सांगितलें होतें कीं हिंदुस्थानांत केप कामोरिनपासून पेशावरापर्यंत सशस्त्र लष्करी लोकांचा अंमल बसविला तरी इच्छेविरुद्ध लोकांच्या गळ्यांत इंग्लंडचा माल बांधणें शक्य नाहीं! खरा उपाय म्हणजे लोकांच्या मागण्या मान्य करून सामोपचाराचा व सलोख्याचा मार्ग आक्रमण करणें हाच आहे. विलायतेंतील सुप्रसिद्ध 'इकॉनॉमिस्ट' पत्रानेंहि असेंच स्पष्ट लिहिलें आहे कीं 'बेयॉनेटींनीं कोणीहि मनावर ताबा गाजवूं शकत नाहीं...राष्ट्रीय सभेनें केलेल्या चुकीचा फायदा घेऊन या गडबडीच्या व धांदलीच्या काळांत केवळ सामर्थ्याच्या जोरावर ब्रिटिश माल खपविण्याचा व ब्रिटिश व्यापार वाढविण्याचा आम्हीं उद्योग केला तर तो आजपर्यंत मिळविलेल्या यशावर काळें फाशील! कायदेभंगाचीं उघड कृत्यें वटहुकुमांनीं बंद पाडणें शक्य आहे. परंतु परकीय व्यापाऱ्यांबरोबर देवघेव करण्याची सक्ती करण्याचें सामर्थ्य त्यांत नाहीं, तसेंच परकीयांशीं सहकार्यहि त्यानें मिळवितां येणार नाहीं. आज वटहुकुमांनीं लोकांचा उघड प्रतिकार बंद पाडला आहे. पण त्याचाच अर्थ असा आहे कीं, तो प्रतिकार गुप्तपणें काम करूं लागेल! उघड प्रतिकारापेक्षां गुप्त असंतोष फार भयंकर आहे हेहि खरें! म्हणून सरकारनें लॉर्ड आयर्विन यांच्या मार्गानें जावें हें उत्तम." 'इकॉनॉमिस्ट' पत्राचा हा कोटिक्रम निरुत्तर करणारा आहे. त्याने सांगितलेला सामोपचाराचा मार्ग हाच सरकारानें चोखाळला पाहिजे.

विलायतेंतहि, हुजूरपक्षीय लोकांशिवाय, इतर विचारी माणसांना सर सॅम्युएल होअर यांच्या दडपशाहीबद्दल आदर वाटत नाहीं. "हिंदुस्थानांतील चळवळ थंडावली असून राष्ट्रीय सभा ठार झाली व तेथील परिस्थिति अगदीं निवळली आहे" असें परवां ते बोलले. यावर, सुप्रसिद्ध व्यंगचित्रकार लो यानें एक अत्यंत मार्मिक, उद्बोधक व विचारास धक्का देणारें चित्र 'ईव्हिनिंग स्टॅंडर्ड' मध्यें प्रसिद्ध केलें आहे. 'ही पाहा जगांतील परिस्थिति' असा त्या चित्राचा मथळा असून चित्रांत हिंदुस्थान म्हणजे एक मोठा तुरुंग दाखविला असून त्यांत शेंकडों लोक डांबलेले आहेत, व त्यांवर फक्त एक पोलीस पहारा करीत आहे असें दाखविलें आहे. चित्राच्या खालीं लिहिलें आहे कीं, "हिंदुस्थान आतां शांत आहे. फक्त आणखी चार कोटींच लोकांना अटक करण्याचें राहिलें आहे!" या चित्राचा अर्थ सूचक पण स्पष्ट आहे. सरकारनें हल्लींचें दडपशाहीचें धोरण चालू ठेवल्यास त्यांत फारसें यश येणार नाहीं म्हणून सरकारनें शक्य तितक्या लवकर समेट करावा हें उत्तम, असें त्या पत्राचें स्पष्ट मत आहे. आतां सरकारानें व्यापाऱ्यांच्या बाबतींत हा समेटाचा मार्ग स्वीकारल्यानें सामोपचाराचें युग लवकरच सुरू होईल असा संभव दिसतो.

# पुरुषार्थाचा गीतांक

## अर्थाचा विपर्यास

श्लोक १० व ११ यांत ईश्वरार्थ कर्म व कर्मफलत्याग या विषयांचें प्रतिपादन आहे. ईश्वरार्थ कर्माचें विवेचन करतांना अहंता गेली पाहिजे असें नाहीं, ईश्वरार्थ कर्म केल्यानें मोक्ष प्राप्त होत नाहीं. मोक्षाचें साधन ज्ञाननिष्ठा व त्या ज्ञाननिष्ठेचें साधन जी चित्तशुद्धि तिलाच हें ईश्वरार्थ कर्म उपयोगी पडतें. या आपल्या म्हणण्याच्या समर्थनार्थ 'यत्करोषि यदश्नासि' हा श्लोक (९·२७) श्री. लवाटे यांनीं उद्धृत केला आहे. परंतु याच्याच पुढच्या श्लोकांकडे श्री. लवाटे यांनीं जाणूनबुजून डोळेझांक केली आहे. अशानें इतरांचेंहि त्या श्लोकांकडे लक्ष जाणार नाहीं अशी श्री. लवाटे यांची समजूत आहे काय? पुढच्याच श्लोकांत 'शुभाशुभफलैरेवं मोक्ष्यसे कर्मबंधनैः' (अ. ९·२८) या मागील श्लोकांत सांगितल्याप्रमाणें परमेश्वरार्पणबुध्दीनें कर्म केल्यास तूं सर्वकर्मबंधनापासून मुक्त होशील असें भगवंतांनीं स्पष्ट सांगितलें आहे. पण ईश्वरार्थ कर्मानें मोक्षप्राप्ति होणार नाहीं असें श्री. लवाटे यांचं म्हणणें आहे. तें भगवद्वाक्याशी सर्वस्वी विरुद्ध असल्यानें सर्वथैव त्याज्य आहे हें येथें निराळें सांगावयास नको. ईश्वरार्थ कर्मापेक्षांदेखील ११ व्या श्लोकांत सांगितलेला सर्वकर्मफलत्याग त्यांनीं कनिष्ठ प्रकारचा ठरविला आहे. आणि नुसती फलासक्ति टाकून कर्म करणें हाच कर्मयोग होय अशी कर्मयोगाची व्याख्या कर्मयोगवाद्यांच्या माथीं मारून तो कर्मयोग सर्वांत कनिष्ठ प्रतीचा किंवा खालच्या दर्जाचा आहे असें सिद्ध करण्याची आपली मनीषा त्यांनीं तृप्त करून घेतली आहे. अकराव्या श्लोकांत सांगितलेला कर्मफलत्याग प्राथमिक नसून पूर्ण स्वरूपाचा आहे असें सर्व या शब्दावरून सहज सिद्ध होतें. वासनांचा निःशेष निरास झाल्यावांचून असा पूर्ण फलत्याग संभवत नाहीं; आणि विषयोपभोगाविषयींचा रस अजीबात नष्ट झाल्याखेरीज वासनांचा पूर्ण निरास व्हावयाचा नाहीं व ही रसनिवृत्ति ब्रह्मसाक्षात्कार झाल्याशिवाय होत नाहीं असें स्वतः भगवंतांनींच सांगितलें आहे.

"रसवर्जं रसोऽप्यस्य परं दृष्ट्वा निवर्तते" (गीता २.५९) अशी ही त्यागाची कारणपरंपरा आहे. त्या दृष्टीनें विचार केल्यास सर्वकर्मफलत्याग हादेखील ज्ञानावांचून होऊं शकत नाहीं. परंतु श्री. लवाटे यांना या फलत्यागाला सर्वांच्या खालचा नंबर द्यावयाचा असल्यामुळें त्यांनीं या फलत्यागाच्या स्वरूपाचा विपर्यास केला आहे. हा विपर्यास आपल्या गळ्यांत येणार असें वाटूनच कीं काय कोण जाणे याच्याच पुढील १२वा श्लोक क्रमप्राप्त असतांना तो अजीबात टाळून या अकराव्या श्लोकावरच आपल्या विवेचनाची अर्थात् प्रकरणाची त्यांनीं समाप्ति केली आहे. असें करणें शास्त्रदृष्ट्या सर्वथैव दोषास्पद कसें आहे तें पूर्वी दाखविलेंच आहे. ईश्वरार्थ कर्म आणि सर्वकर्मफलत्याग हे दोनहि प्रकार कर्मयोगान्तर्गतच आहेत. परंतु फलत्याग हाच तेवढा कर्मयोग असें ठरवून लवाटयांनीं त्याला मोक्षमार्गातून जवळ जवळ हद्दपारच केलें आहे व हाच या लेखाचा मुख्य उद्देश आहे. प्रकरणसंदर्भ, पूर्वापरसंबंध, अनुवृत्ति इत्यादि वाक्यार्थातील महत्त्वाच्या प्रमाणांची पर्वा न करतां कोठल्या तरी चार श्लोकांच्या मोडक्यातोडक्या आधारावर त्यांनीं आपलें मत सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे. श्री. लवाटे यांचा हा प्रयत्न अगदींच निरुपयोगी व शास्त्रविरुद्ध आहे हें एखाद्या अर्धशिक्षित माणसालाहि सहज कळून येईल.

## कर्मयोगवादाचें खंडन

श्री. लवाटे यांनीं आपल्या लेखाच्या उत्तरार्धांत कर्मयोगवादाचें खंडन करण्याचा अव्यापारेषु व्यापार केला आहे. त्याचा व्हावयाचा तोच परिणाम झाला तर त्यांत फारसें नवल नाहीं. या उत्तरार्धाला सुरुवात करतांना 'कर्मयोग्यास आम्हीं उत्तर देण्यास बांधलेले नाहीं,' (पा. ५३) असें मोठ्या ऐटीनें म्हणून या कर्मयोगाचें आपण किती लीलेनें खंडन करतों तें लोकांना दाखविण्यास श्री. लवाटे या खण्डनास प्रवृत्त झाले आहेत. बाराव्या अध्यायांतील जे चार श्लोक त्यांनीं आपल्या मताच्या समर्थनार्थ घेतले आहेत त्यांच्या पुढचाच श्लोक क्रमप्राप्त असूनदेखील आपण त्या प्रकरणांतून काढून टाकला या गैरशिस्तपणाच्या मानसिक टोंचणीमुळेंच जणूं काय त्यांनीं हा श्लोक कर्मयोगवादांत घालून त्याचें खंडन करण्याचा प्रयत्न चालविला आहे. परंतु हा श्लोक लावतांना त्यांची जी तारांबळ उडाली आहे ती पाहून कोणालाहि त्यांची कींवच येईल. एकदां भाष्यकार तर एकदां वामन पंडित यांचा आळीपाळीनें आश्रय घेऊनसुद्धां लवाटे यांना आपल्या मनाचें समाधान करतां आलेलें नाहीं. ज्या श्लोकांबद्दल लवाटे यांची इतकी कुंचबणा झाली आहे तो श्लोक असाः—श्रेयो हि ज्ञानमभ्यासाज्ज्ञानाद्ध्यानं विशिष्यते । ध्यानात्कर्मफलत्यागस्त्यागाच्छान्तिरनन्तरम् ॥ भ. गीता अ. १२ श्लो. १२. अर्थः— अभ्यासापेक्षां ज्ञान श्रेष्ठ, ज्ञानापेक्षां ध्यान विशेष

( श्रेष्ठ ), ध्यानापेक्षां कर्मत्याग श्रेष्ठ असून त्यागापासून मध्यंतरीं कोणतेंहि व्यवधान न येतां शांति ( मोक्ष ) प्राप्त होते, असा या श्लोकाचा अर्थ आहे. श्लोकांतील ' हि ' या पदानें मागील श्लोकाचा संदर्भ स्पष्ट दर्शविला आहे. अभ्यास, ज्ञान, ध्यान व कर्मफलत्याग हीं भगवत्प्राप्तीचीं चार स्वतंत्र साधनें आहेत. या चारहि साधनांत ज्ञानयुक्त भक्ति अभिप्रेत आहे. या चार साधनांचा उल्लेख मागील अकरा श्लोकांच्या प्रकरणांत स्पष्टपणें आला आहे. त्या सर्वांत कर्मफलत्याग म्हणजे कर्मयोग हें श्रेष्ठ साधन असून तें मोक्षप्राप्तीचें प्रत्यक्ष साधन होय असा भगवंतांचा उपदेश आहे. परंतु तो श्री. लवाटे याना पचला नाहीं म्हणून ११ व्या श्लोकांतील कर्मफलत्याग आणि बाराव्या श्लोकांतील कर्मफलत्याग हे परस्परभिन्न आहेत असें म्हणून त्यांनीं आपल्या मनाची कशी तरी समजूत करून घेतली आहे. कर्मयोगवादाच्या खण्डनाकरितां म्हणून त्यांनीं १२ श्लोक उद्धृत केले आहेत आणि कर्मयोगवादी हे श्लोक ब्रह्मास्त्र म्हणून संन्यासवाद्यांवर नेहमीं टाकीत असतात असें लवाटे यांचें म्हणणें आहे. वस्तुतः संन्यासवादाचें खंडन करण्याचें कर्मयोगाला प्रयोजनच नाहीं. कारण संन्यासमार्ग मोक्षदायक आहे हें त्यांना मुळींच अमान्य करावयाचें नाहीं. पण कर्मयोग हा स्वतंत्रपणें मोक्षदायक नाहीं असें जें संन्यासवाद्यांचें म्हणणें आहे तें मात्र कर्मयोगवाद्यांनीं खोडून काढलें आहे. असें करण्यांत बारा श्लोकच काय पण सबंध गीताशास्त्रच कर्मयोगवादाच्या बाजूचें आहे हें श्री. लवाटे यांनीं पक्कें लक्षांत ठेवावें. श्री. लवाटे यांनीं जे बारा श्लोक पुढें केले आहेत त्यांपैकीं एकदोन खेरीजकरून बाकीचीं सर्व वचनें मोघम अर्थाचीं आहेत आणि त्यांचें खंडन करून आपण कर्मयोगवादाला चारीमुंड्या चीत केलें अशी त्यांनीं घोषणा केली आहे. कर्मयोगसिद्धान्ताचें स्पष्ट प्रतिपादन करणारीं नव्हत असलीं वाक्यें कर्मयोगवाद्यांच्या गळ्यांत बांधण्याचा स्वतः वेडेपणा करून तो वेडेपणा त्यांनीं लोकमान्य टिळकांच्या माथीं मारला आहे याला काय म्हणावें हेंच आम्हांस समजत नाहीं. कर्मयोगवादाचीं स्पष्ट प्रतिपादक वाक्यें गीतेंत आणखी किती तरी आहेत. उदाहरणार्थ, 'तस्मादसक्तः सततं कार्यं कर्म समाचर । असक्तो ह्याचरन्कर्म परमाप्नोति पूरुषः ' ( गी. ३–१९ ) ' कर्मणैव हि संसिद्धिमास्थिता जनकादयः ' ( गी. ३–२० ), ' अन्ये सांख्येन योगेन कर्मयोगेण चापरे ' ( गी. १३–२४), 'स्वे स्वे कर्मण्यभिरतः संसिद्धिं लभते नरः' ( गी. १८–४५ ), ' स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विन्दति मानवः ' ( गी. १८–४६ ) इत्यादि. परंतु श्री. लवाटे यांना खरी तत्त्वजिज्ञासा असती तर त्यांना या वाक्यांचा उपयोग झाला असता. त्यांना कर्मयोगवादाची थट्टा करून केवळ संन्यासमार्गाचें समर्थन करावयाचें आहे. अशा स्थितींत कितीहि प्रमाणें दिलीं तरी त्यांचा काय उपयोग होणार हें दिसतेंच आहे.

# मतदान कमिटीचें कामकाज

इंडियन ख्रिश्चन असोसिएशन पुणें, कॅथोलिक जिमखाना व मेसर्स खिस्ती, रामदास व रे. मोडक यांच्याकडून मतदान कमिटीकडे लेखी कैफियती आल्या होत्या. त्यांपैकीं इंडियन ख्रिश्चन असोसिएशननें आपल्या कैफियतींत असें म्हटलें होतें कीं, " प्रांतिक कायदेमंडळाची निवडणूक अप्रत्यक्ष पद्धतीनें होऊं नये. शक्य असेल तर अस्पृश्यांच्या बाबतींत साक्षरता, मागसलेल्या जातींच्या बाबतींत देशी भाषेचें चौथ्या इयत्तेपर्यंतचें शिक्षण व पुढारलेल्या वर्गांच्या बाबतींत व्हर्नाक्युलर फायनल परीक्षेतील यश यांवर मताधिकाराची पात्रता अवलंबून ठेवावी. अस्पृश्यांकरितां संयुक्त मतदारसंघांत जागा राखून ठेवावी व भरपूर उमेदवार पुढें न आल्यास तितक्या प्रमाणांत अस्पृश्यांचे प्रतिनिधी नेमले गेले जावेत." कॅथोलिक जिमखान्यानें आपल्या कैफियतींत असें म्हटलें होतें कीं, अँग्लो-इंडियन व हिंदी ख्रिश्चन यांना संयुक्त मतदारसंघांत राखीव जागा असाव्या. रे. मोडकप्रभृतींनीं आपल्या कैफियतींत असें सुचविलें होतें कीं, हिंदी ख्रिश्चनांना संयुक्त मतदारसंघांत राखीव जागा असाव्या. परंतु इतर अल्पसंख्याकांना स्वतंत्र मतदारसंघ देण्यांत आले तर हिंदी ख्रिश्चनांनाहि स्वतंत्र मतदारसंघ द्यावा. डॉ. आल्बन व रे. मोडक यांच्या तोंडीं साक्षी घेण्यांत आल्या. डॉ. डिसोझा यांनीं असें सांगितलें कीं, हिंदी ख्रिश्चनांना संयुक्त मतदारसंघांत राखीव जागा असाव्या व नेहरूरिपोर्टांत म्हटल्याप्रमाणें एक लाख लोकसंख्येला एक प्रतिनिधी मिळावा.

**सार्वत्रिक मताधिकाराला पाठिंबा**

गुरुवार ता. १० रोजीं दुपारीं मध्यवर्ती मतदान

कमिटीचे सभासद व मुंबई-सरकारचें कार्यकारी मंडळ यांचा गव्हर्मेंट हाऊसमध्यें विचार-विनिमय झाल्यावर २॥ वाजल्यानंतर पुनः तोंडीं साक्षी घेण्यास कमिटीनें प्रारंभ केला. प्रथमतः बॉंबे प्रेसिडेन्सी वुइमेन्स कौन्सिलतर्फे मिसेस डॉक्टर यांची साक्ष झाली. वुइमेन्स कौन्सिलनें आपल्या लेखी कैफियतींत असें म्हटलें होतें कीं, ज्या सुवासिनींच्या पतीला मालमत्तेच्या मालकी-मुळें मताधिकार प्राप्त झाला असेल त्या सुवासिनीला व ज्या विधवा स्त्रीच्या पतीला त्याच्या मृत्युसमयीं मताधिकार असेल त्या विधवा स्त्रीला मताधिकार मिळावा अशी जी सूचना सायमन कमिशननें केली आहे ती वुइमेन्स कौन्सिलला मान्य नाहीं. परंतु शैक्षणिक पात्रतेमुळें स्त्रियांना मताधिकार मिळावा ही सूचना मात्र कौन्सिलला मान्य आहे. तसेंच एकवीस वर्षांवरील स्त्रीच मताधिकाराला पात्र समजण्यांत यावी ही गोलमेज परिषदेची सूचना वुइमेन्स कौन्सिलला योग्य वाटते. "को-ऑप्शन" अगर "नॉमिनेशन" या पद्धतींनीं स्त्रियांच्या प्रतिनिधींची निवडणूक करण्याविरुद्ध कौन्सिलचें मत आहे.

वुइमेन्स इंडियन ॲसोसिएशनतर्फे मिस बहादुरजी यांची साक्ष झाली व वुइमेन्स इंडियन असोसिएशन व ऑल इंडिया वुइमेन्स कॉन्फरन्स यांनीं संयुक्त कैफीयत सादर केली होती. या लेखी कैफियतींत सार्वत्रिक मताधिकाराची मागणी करण्यांत आली असून मालमत्तेच्या मालकीवर अगर शैक्षणिक लायकीवर मताधिकार-प्राप्तीची पात्रता ठरविण्याच्या पद्धतीला विरोध दर्शविण्यांत आला होता. त्याचप्रमाणें स्वतंत्र मतदारसंघ कोणाकरितांहि निर्माण करण्यांत येऊं नयेत असें मत प्रदर्शित करण्यांत आलें होतें. मिस बहादुरजी यांनीं आपल्या साक्षींत वरील मुद्द्यांचें स्पष्टीकरण केलें. त्यानंतर ऑल इंडिया वुइमेन्स कॉन्फरन्सतर्फे मिसेस हमीदअली व डॉ. सौ. मालिनीबाई सुखटणकर यांच्या साक्षी झाल्या. सर झुल्फिकार अलीखान यांच्या प्रश्नाला उत्तर देतांना मिसेस हमीदअली यांनीं असें सांगितलें कीं, मुस्लीम स्त्रियांमध्यें शिक्षणाचा फैलाव होत आहे. त्यांनीं असेंहि सांगितलें कीं, स्त्रियांना मताधिकार प्राप्त झाल्यास मुंबई, अहमदाबाद, कराची यांसारख्या शहरांत मुसलमानहि संयुक्त मतदारसंघांतून निवडून येतील. स्त्रिया योग्य अशाच स्त्रीला अगर पुरुषाला मतें देतील. जातवारीनें मतें देणार नाहींत.

## विंटर बोथॅम गडबडले

शुक्रवार ता. ११ रोजीं बॉंबे चेंबर ऑफ् कॉमर्स व मुंबईचे स्थानिक युरोपियन असोसिएशन यांच्या प्रतिनिधींच्या साक्षी झाल्या. बॉंबे चेंबर ऑफ् कॉमर्सचे प्रतिनिधी मि. विंटर बोथॅम यांची श्री. चिंतामणी यांनीं कसून तपासणी केली. त्या वेळीं मि. विंटर बोथॅम अगदींच गडबडून गेले. बॉंबे चेंबर ऑफ् कॉमर्सच्या कमिटीनें आपल्या कैफियतींत असें म्हटलें कीं, कमिटी ग्रुप सिस्टिमच्या विरुद्ध असून स्वतंत्र मतदारसंघांना अनुकूल आहे. मतदानाची पात्रता ठरवितांना स्त्रियांना विशेष सवलती देण्याचें कारण नाहीं असें चेंबरला वाटतें. अस्पृश्यांकरितां काय करण्यांत यावें यासंबंधींच्या चेंबरच्या कमिटीमध्यें एकमत नाहीं. वजनदार मजूर संघांनीं प्रतिनिधि निवडून देण्याचा हक्क देण्यास चेंबरच्या कमिटीची अनुमति आहे. निवळ शैक्षणिक लायकी-मुळें मतदानाचा हक्क प्राप्त व्हावा असेंहि कमिटीला वाटत नाहीं.

श्री. चिंतामणी यांनीं मि. विंटर बोथॅम यांना बरेच महत्त्वाचे प्रश्न विचारले. बॉंबे चेंबर ऑफ् कॉमर्स व युरोपियन असोसिएशन यांचीं मतें सारखीं नाहींत असा कबुलीजबाब मि. विंटर बोथॅम यांनीं दिला. यावर श्री. चिंतामणी यांनीं असा प्रश्न विचारला कीं, या दोन संस्थांमध्यें फार मोठा मतभेद आहे काय? मि. विंटर बोथॅम यांची स्थिति केविलवाणी होणार असें पहातांच अध्यक्ष लॉर्ड लोथिअन त्यांच्या साहाय्यार्थ पुढें सरसावले. त्यांनीं श्री. चिंतामणी यांना तुमचा प्रश्न मतदान कमिटीच्या कक्षेंत कसा येतो असें विचारून असा प्रश्न न विचारण्याविषयीं सुचविलें. मि. विंटर बोथॅम यांनींहि प्रश्नाचें उत्तर देण्याचें धैर्य दाखविलें नाहीं. परंतु श्री. चिंतामणी पडले वस्ताद. त्यांनीं प्रश्नांची सारखी सरबत्ती सुरू केली. श्री. चिन्तामणींच्या प्रश्नाला उत्तर देतांना मि. विंटर बोथॅम यांनीं सांगितलें कीं, चेंबरचे थोडेसे सभासद हिंदी आहेत, परंतु कमिटीवर एकहि हिंदी गृहस्थ नाहीं. सर्व युरोपिअन सभासदच आहेत. कमिटी व चेंबर यांमध्यें मतभेद होता म्हणून कमिटीनें कैफीयत सादर केली हें खरें नाहीं. कमिटीनें चेंबरचें मत घेतलें होतें कीं नाहीं हें मला माहीत नाहीं. त्याबाबत अध्यक्षांना विचारलें पाहिजे. यानंतर श्री. चिंतामणी यांनीं चेंबरच्या कमिटीनें असोशिएटेड चेंबर ऑफ् कॉमर्सला पाठविलेल्या पत्रांत चेंबरमध्यें हिंदी व जपानी सभासद असल्यामुळें चेंबर व कमिटी यांच्यामध्यें एकमत होऊं शकत नाहीं असा उल्लेख आहे ही गोष्ट मि. विंटर बोथॅम यांच्या नजरेला आणली. लगेच मि. विंटर बोथॅम यांनीं या प्रश्नाची नोटीस पाहिजे असें दरबारी उत्तर देऊन आपला बचाव केला!

## कायदेमंडळें हास्यास्पद करूं नका

यानंतर दिल्ली युनिव्हर्सिटीचे प्रो. छब्लानी यांची साक्ष झाली. प्रो. छब्लानी यांनीं आपल्या लेखी

कैफीयतींत मतदानाच्या प्रश्नाची विस्तृत चर्चा केली होती. त्यांनीं सांगितलें कीं, सांप्रतच्या मतदारसंघांतील सर्वांत मोठा दोष असा आहे कीं, सुशिक्षित व चौकस बुद्धीच्या मतदारांची संख्या फारच कमी आहे. हा दोष नाहीसा करण्याचा प्रमुख उपाय साक्षरता, विशेषतः इंग्रजी भाषेंतील साक्षरता. साक्षरता हें मतदानाच्या हक्काच्या पात्रतेचें लक्षण समजण्यांत यावें. कायदेमंडळाच्या सभासदांविषयीं ते म्हणाले कीं, "सांप्रत कायदेमंडळाच्या निवडणुकीकरितां उभे रहाणाऱ्या उमेदवाराकरितांहि शैक्षणिक पात्रता ठेवलेली नाहीं. पहिल्या मुंबई कायदेमंडळाच्या सभासदांपैकीं शेंकडा वीस टक्क्यांहून अधिक सभासद अशिक्षित होते ! जगाच्या दृष्टीनें जर कायदेमंडळें हास्यास्पद ठरूं नयेत अशी इच्छा असली तर ही स्थिति पालटली जाणें आवश्यक आहे. माझ्या मतें आणखी कित्येक दशकेंपर्यंत तरी मॅट्रिकपर्यंतचें शिक्षण घेतलेल्या माणसाशिवाय इतर कमी शिक्षणाच्या माणसाला कौन्सिलकरितां अगर असेंब्लीकरितां उमेदवार उभे राहूं देऊं नये. निदान इंग्रजी साक्षरता तरी उमेदवाराला असलीच पाहिजे अशी अट कायद्यानें घालावी."

**सिंधमधील हिंदूंच्या बाबतींत अन्याय**

श्री. छब्लानी यांनीं सिंध प्रांतांतील हिंदूंना फारच कमी प्रतिनिधित्व दिलें गेल्याबद्दल तक्रार केली. ते म्हणाले कीं, सिंध प्रांतांत हिंदूंच्या संख्येच्या मानानें त्यांना प्रतिनिधि पाठवण्याचा हक्क मिळालेला नाहीं. सिंध प्रांतांतील मुसलमानेतर सिंधच्या जमीन-महसुलापैकीं सुमारें चाळीस टक्के जमीनमहसूल देतात. इतर करांच्या बाबतींत तीच स्थिति आहे. असें असूनहि सिंध प्रांतांतील हिंदूंना आपल्यातर्फे फक्त तीन सभासद निवडतां येतात. उलट मुसलमानांना चवदा प्रतिनिधी निवडण्याचा हक्क आहे ! लोकसंख्येच्या दृष्टीनें विचार केला तरी मुसलमान व मुसलमानेतर यांच्या प्रतिनिधींचें प्रमाण ७४:२६ असें असलें पाहिजे. १९११ च्या शिरगणतीप्रमाणें सोलापूरची लोकसंख्या एकसष्ट हजार असून त्या शहराला प्रतिनिधी निवडण्याचा हक्क मिळाला, परंतु सिंध प्रांतांतील हैद्राबादची लोकसंख्या पाऊण लाख असूनहि त्या शहराला प्रतिनिधि मिळाला नाहीं.

# आधुनिक राजपुत्रांचें लीलाचरित्र

राज्याभिषेक, पुत्रजन्मोत्सव, व्हाइसरॉयची भेट वगैरे प्रत्येक संस्थानांत घडणारे समारंभ सुवर्णाक्षरांनीं कोरून ठेवण्यासारखे असतात. अशा प्रसंगीं राजवैभवाचा दिमाख पहाण्यासारखा असतो. मेजवान्यांचा थाटमाट, मदिरेचें आकंठपान, पाहुण्यांचें मानपान, कलावंतिणींचे नाच, विजेचा लखलखाट यांनीं संस्थानी वातावरण दुमदुमून जातें. आणि हें सर्व कशाकरितां तर चार दिवस प्रजाजनांचे सुखसोहाळ्यांत जावे म्हणून ! काय म्हणे अन्नान्नदशेला पोचलेल्या प्रजेला चार दिवस पंचपक्वान्नांचें भोजन मिळावें म्हणून असे प्रसंग आम्ही मुद्दाम घडवितों. पण प्रजेच्या अंगाचे लचके तोडूनच नां ? काय म्हणे गायन-नृत्यकलांना राजाश्रय मिळावा म्हणून आम्ही नाचरंग करतों. पण लक्षावधि रुपयांचा हा आहेर म्हणजे केलेला प्रोत्साहन कां दुर्गुणांना आमंत्रण ? काय म्हणे खाशा पाहुणे मंडळींचे डोळे दिपावे म्हणून विजेचा लखलखाट; पण अशा प्रसंगीं प्रजेचे डोळे दिपतात, कां डोळे येतात, कां त्यांना रातंदळ लागतें?

संस्थानिकांच्या डोळ्यांवर संपत्तीचा धूर आला असला तरी या धुराच्या लोळांनीं प्रजेच्या डोळ्यांना पाणी येतें एवढेंच नव्हे तर प्रजा गुदमरून जाते. केव्हां एकदां आपणाला स्वातंत्र्याची शुद्ध हवा मिळते असें तिला होऊन जातें; असले समारंभ आले कीं, प्रजेच्या पोटांत धोंडच उभी राहातें. कारण तिच्या पैशाची अवाढव्य कराच्या रूपानें दिवाळीं काढूनच राजा असल्या दिवाळ्या साजऱ्या करतो. अशा प्रसंगीं हस्तनक्षत्राच्या पावसाप्रमाणें खर्चाच्या पैशाचा पाऊस पडतो. व ज्यांच्या पैशावर सरकार हे समारंभ साजरे करतें त्या प्रजाजनांचीं तोंडें वर्षाकालीन मेघांप्रमाणें काळजीनें काळवंडलेलीं असतात.

अशा प्रसंगीं सरकारच्या बजेटमध्येंहि फिरवाफिरव होते. दारुकामाला पैसे पाहिजेत, फिरवा आरोग्यखात्यावर वक्र दृष्टि; नवीन हत्ती विकत आणावयाचे आहेत ना, लावा शिक्षणखात्याला हरताळ; हजारों रुपये खर्च करून शिकारी कुत्रे विकत घ्यावयाचे आहेतना, द्या नोकरीवर असलेल्यांना भाकरीचे तुकडे ! व्हाइसरॉयाकरितां दोन लाखांचा नवा राजवाडा बांधावयाचा आहेना, करा सध्यां इतर इमारतींचें काम तहकूब. एक ना दोन ! काटकसरीची कातर लावून असले समारंभ साजरे होतात खरे. पण या कातरीनें राज्यव्यवस्थेच्या वस्त्राच्या चिंध्या होतात याची वाट काय ! कारण या चिंध्या ओघानेंच

प्रजेच्या अंगावर दिसतात. प्रजेच्या अंगावरच्या या लक्तऱ्या पाहिल्या म्हणजे कोणाला उद्वेग येणार नाहीं? खरें पाहतां प्रजा ही राजाला स्वतःच्या मुलांच्या ठिकाणीं, तेव्हां तिच्या तोंडांत मोठ्या प्रेमानें सुखाचा घास घालावयाचा. पण तें बाजूलाच राहून तिच्या तोंडांतील घास काढण्याची याची वृत्ति. अशा जुलमी राजाला कोणती उपमा द्यावी तेंच कळत नाहीं. शनीसारखा क्रूर ग्रह सुद्धां आपली रास सोडतो.पण प्रजेला असंतोषी ठेवण्याचें व्रत राजा कधींहि सोडत नाहीं.

नवीन छोटा बडा लाट हिंदुस्थानांत आला आणि त्याचा फेरफटका मोठ्या संस्थानांत झाला नाहीं असें कधीं झालें आहे का? नवीन व्हाइसरॉय हिंदुस्थानांत यावयाचाच, तो संस्थानांत जावयाचाच; व तेथून जातांना आहेर घऊन पण अंतःस्थिति हेरून जावयाचा हें अगदीं ठरून गेल्यासारखेंच आहे. संस्थानांना व्हाइसरॉय भेट देतो ती मुख्यतः राज्यव्यवस्थेची नाडी तपासण्याला, असें सकृद्दर्शनीं सर्वांना वाटतें. पण व्हाइसरॉयाच्या काय किंवा गव्हर्नराच्या काय आपण संस्थानची पहाणी करावयास जात आहों हें ध्यानींमनीं सुद्धां नसतें. सासरहून माहेरीं जातांना मुलगी कामाचें गांठोडें खुंटीला टांगून ठेविते. तशी हे कामाची चोपडीं बॅगमध्यें घालून ठेवितात. सासरच्या कामाला कंटाळून मुलगी माहेरीं चार दिवस हसण्याखिदळण्यांत घालविते. तसें हे श्रमपरिहारार्थ संस्थानांत पाय लांब करतात. आणि याची खात्री पटवायला दुसरीतिसरीकडे जावयाला नको. त्यांचे तेथील कार्यक्रम पहा म्हणजे तेव्हांच उमज पडेल. बागेमध्यें मोठ्या थाटाची मेजवानी झाली, शिकारीचा शोक पुरा झाला आणि एकदां संस्थानची राज्य व्यवस्था प्रगतिपर व प्रजेला आनंददायी आहे असा अभिप्राय दिला, कीं खेळ खलास !

पाहुणे मंडळी यावयाची असली म्हणजे सकाळीं उठल्यापासून बायकांची धांदल उडते. आज भाजी कोणती करूं, चटणी कोणती करूं, म्हणून बायकांत कुजबुज सुरू होते. तर ओटीवर लोड कोठें ठेवूं, गालिचा कसा अंथरूं म्हणून घरच्या मालकाची धांदल उडते. अंगणें साफ करण्याची व सारवण्याची गड्यांची धांदल उडते. सारांश पाहुणे-मंडळींना आपलें घर पाहून समाधान कसें होईल ही सर्वांची इच्छा. कोणी पाहुणा यावयाचा असल्यास सामान्य लोकांत ही धांदल. मग व्हाइसरॉयासारखा बडा पाहुणा यावयाचा असल्यावर संस्थानांत कोण धांदल उडत असेल कांहीं विचारूं नका! महिना महिना स्वागताची तयारी चालू. भालदारचोपदारापासून तों थेट राजाराणीपर्यंत सर्वांना आपण व्हाइसरॉयाच्या नजरेंत कसे भरूं याविषयीं काळजी. मुलगी दाखवायला आणली म्हणजे ती जशी नटूनथटून येते तशी ही मंडळी नटूनथटून येतात. अर्थात् मुलीच्या नाकांतील मोठी थोरली नथ, हातांतील गोटतोडे, कानांतील मोठ्या कुड्यांचा जोड किंवा गळ्यांतील चंद्रहार हे तिचे स्वतःचे नसतात. ती शोभेसाठीं कोणाचे तरी घालते. तसेंच संस्थानांत. सुनमुखाच्या दिवशीं मुलीच्या अंगावर पोतेपव्यासुद्धां दागिने पाहून मुलीच्या आईला मूठभर मांस चढतें; पण दुसऱ्या खेपेला मुलगी माहेरीं आल्यावर तिचे खरे दागिने किती हें न सांगतांहि कळतें. तोच प्रकार येथें. पाहुणा स्टेशनवर उतरल्यावर राजेरजवाडे त्याचें मोठ्या थाटानें स्वागत करितात. हारतुरे घातल्यावर स्वारी रुप्याच्या पत्र्याच्या गाडींत बसते. मागाहून श्रीमंतांची स्वारी तशाच गाडींत निघते. शरदृतूंत सृष्टिसुंदरी जशी प्रसन्न असते तशी राजमार्गाच्या दुतर्फा बागबगीच्यांतील हसरीं फुलें विनयानें माना डोलवून स्वागत करतात. आपला रहाण्याचा बंगला दुरून पाहिल्यावर व्हाइसरॉयाला तो झोपडीसारखा वाटतो. पण जवळ गेल्यावर त्या भव्य राजवाड्याचें कलाकौशल्य पाहून तो तोंडांत बोट घालतो. राजवाड्यांत सर्व तऱ्हेच्या सुखसोयी असतात. तेथील स्नानगृह पाहिलें तर पहिल्या प्रथम बॉलरूमचाच भास होतो. तेथील कारंजांचा लहरी स्वभाव कांहीं विचारूं नका! श्रावण मासांत पावसाची सर केव्हां येईल याचा नेम नसतो. कारंजांतील जलधारा केव्हां अंगावर बागडतील याचाहि नेम नसतो. त्या जलधारा-त्या जणुं काय शुद्ध रजताच्या तारा–अंगावर खेळूं लागल्या म्हणजे 'अंगे भिजलीं जलधारांनीं' या मृच्छकटिकांतील पदाची आठवण कोणाला होणार नाहीं? व्हाइसरॉय राजदरबारांत प्रवेश करतो तो दरबाराचा दिवाणखाना हजारों रुपये खर्च करून शृंगारलेला असतो. व्हाइसरॉयांची स्वारी द्वारप्रवेश करते तेव्हां पहिल्या प्रथम तोफांची सलामी होते; त्याच वेळीं मखमालीच्या झुली व सुवर्णमोहरा गळ्यांत घातलेले हत्ती सोंडा वर करून व्हाइसरॉयाला सलाम करतात. भालदार-चोपदारांपासून सर्व मानकरी मंडळी उंची वस्त्रें परिधान करून व्हाइसरॉयाकडे सस्मित मुद्रेनें पाहात असतात. दरबारांत व्हाइसरॉय व सरकारस्वारी सोन्याच्या खुर्चीवर बसतात. मग कलावंतिणींचें नाचकाम सुरू होतें. तें संपल्यावर व्हाइसरॉयांच्या पायाजवळ सोन्याचें ताट एक नोकर ठेवितो व सरकारस्वारी विनयशीलपणें या नजराण्याचा स्वीकार करण्यास विनंति करते. मग सोन्याच्या फुलांनीं गुंफलेले हार घातल्यावर हा समारंभ संपतो.

व्हाइसरॉयाला शिकारीचा फार शोक. विशेषतः त्यांना वाघाची शिकार करण्याची फार हौस. पण ती साधली नाहीं तर त्यांस दोष कोण देणार ? ते नेम मारतांना चुकले असें कोण म्हणणार ? नेम मारतांना त्यांना त्या वाघाची दया आली असेंच सर्व जण म्हणणार ! मग दुधाची तहान ताकावर भागविण्यासाठीं ते आपलें कौशल्य पक्षांची शिकार करण्यांत दाखवितात. शिकारीच्या शोकाप्रमाणेंच व्हाइसरॉयांना मासे मारण्याची फार आवड. आणि ते पकडण्यांत त्यांचें कौशल्य काय वर्णन करावें ? अवघ्या आठ दिवसांत एका व्हाइसरॉयांनीं वीस मासे पकडले ! आणि हे मासे पकडण्याला संस्थानाला खर्च किती आला? तर म्हणे रुपये वीस हजार !

अशा समारंभाच्या वेळीं राज्यव्यवस्थेचीं सर्व कामें बंद ठेवितात. सर्व खात्यांचे मुख्याधिकारी व इतर लहानसहान सर्व अधिकारी समारंभाची तयारी करण्यांत गर्क असतात. शाळा, कॉलेजें, कोर्टें, कचेऱ्या सुद्धां या दिवसांत बंद असतात ! आणि ते अधिकारी त्या इमारतींतून आलेल्या पाहुणे-मंडळींची रहाण्याची व्यवस्था करतात. निरनिराळ्या संस्थानिकांना व इतर बड्या पाहुण्यांना आमंत्रण देण्याकरितां सरकारी अधिकारी निर-निराळ्या ठिकाणीं दौऱ्यावर असतात.

या दिवसांत दारूच्या पिंपेंच्या पिंपे येऊन थडक-तात. तीं पाहून दारूबाजांनीं झिंगलेले लोक आनंदांत गाऊं नाचूं लागतात. दूरदूरच्या कलावंतिणींचे थवे-च्या थवे तेथें जमतात आणि आपल्या जादुगार डोळ्यांनीं लोकांना भुलवितात. त्या आल्यावर कित्येक पतिव्रतांच्या गळ्यांतील मंगळसूत्रांतील मण्यांना तडे जातात!

सारांश, या दिवसांत लक्षावधि रुपयांचा चुराडा होतो. रेचक घेतल्याप्रमाणें सरकारचा खजिना साफ धुवून निघतो. पाहुण्यांचें उखळ पांढरें होतें. त्यांच्या उदरीं शनिग्रह येतो. प्रजेला मात्र असले प्रसंग शेंडेनक्षत्राप्रमाणें भयसूचक वाटतात. धरणीकंपाच्या धक्क्याप्रमाणें प्रजाजनांची केविलवाणी स्थिति होते.

# रशियाची पंचवार्षिक योजना

संपत्ति कणशः आणि क्षणशः मिळवावी हें सांसारिकांचें सूत्रवाक्य बोलशेव्हिकांनीं आपल्या राष्ट्रीय संसारांत जारीनें व शब्दशः अमलांत आण-लेलें आहे. देशांतील भांडवलाचा कणन् कण अनेक युक्त्या योजून ज्याप्रमाणें ते एकत्र करतात त्या-प्रमाणें संपत्ति उत्पन्न करण्याशिवाय एक क्षणहि वायां जाऊं द्यावयाचा नाहीं असा त्यांचा दृढनिश्चय आहे. गॉस्प्लॅन ऊर्फ आर्थिक योजनामंडळ या संस्थेस रशियन सरकारानें १९२७ सालीं राष्ट्राच्या आर्थिक उत्कर्षाकरितां प्राथमिक म्हणून एक पांच वर्षांचा आर्थिक उन्नतीचा कार्यक्रम आंखण्याचा हुकूम केला. या आंखणीकरितां गॉस्प्लॅननें रशियांत आर्थिक उत्कर्ष करतां येण्यास अनुकूल-प्रतिकूल परिस्थिति एकंदरींत कशी आहे याची माहिती जम-विली. ती एकत्र छापली असून तिचे तीन जाडे ग्रंथ झाले आहेत. रशियांतील आर्थिक साधनांचा तो एक ज्ञानकोशच म्हणतां येईल इतके ते ग्रंथ बहु-मोल आहेत. या माहितीच्या आधारें तीन योजना आंखण्यांत आल्या. महायुद्धामुळें रशियाची उत्पा-दनशक्ति अगदींच नष्ट झाली होती ती बोलशेव्हिक अमलांत हळूहळू वाढून १९२७–१९२८ सालीं ही उत्पादनशक्ति युद्धपूर्व अवस्थेस येऊन पोचली. पंचवार्षिक योजनेनें यापुढें जोमानें प्रगति करावयाची होती. ज्या तीन योजना आंखल्या गेल्या त्यांत पहिली पांच वर्षांत ७७ टक्के, दुसरी १०८ टक्के व तिसरी १६३ टक्के उत्पादनशक्ति वाढविणाऱ्या होत्या. त्यांतली तिसरी मंजूर होऊन तिचा अम्मल १९२९च्या एप्रिलपासून सुरू झाला. रशिया देश मूळचाच अतिशय मागसलेला असल्या-मुळें अशा एक-दोन योजना पार पडल्या तरी तो इंग्लंड, अमेरिका या राष्ट्रांच्या बरोबरीस येणें एवढ्यानेंच शक्य नाहीं खरें. पण मागसलेल्या प्रजेकडून जे अचाट कर्तृत्व रशियन सरकारनें करून घेण्याचें ठरविलें तें धाडस विलक्षण आहे. ही पंच-वार्षिक आर्थिक योजना आतां चारच वर्षांत पुरी होत आली असून पुढील पांच व पंधरा वर्षांच्या योजना तयार होत आहेत व नंतर एकदम पन्नास वर्षांचीहि योजना आंखण्याचा तज्ज्ञांचा विचार चालू आहे.

### योजनेचा प्रचंड व्याप

१९२९ सालीं ज्या पंचवार्षिक योजनेचा अंमल सुरू झाला तींत राष्ट्राचें उत्पन्न पांच वर्षांत दुप्पट करावयाचें व त्याकरितां एकंदर सहाशेंसाठ कोटी रुबल भांडवल उभारून गुंतवावयाचें असें ठरलें. तसेंच उत्पादनाचा खर्च कमी करणें, रेल्वे व सडका बांधणें, वसाहत नसेल तेथें ती करणें, नव्या जमिनी लागवडीस आणणें, नवीं शहरें वसविणें, घरें बांधणें, शिक्षणप्रसार करणें, आरोग्य वाढ-विणें, लोकांची राहणी व सर्व प्रकारच्या सुख-सोयी, करमणुकीचीं साधनें वाढविणें या सर्व गोष्टींची

प्रगति या पंचवार्षिक योजनेंत आंखण्यांत आली होती. मानवी जीवनांतील बहुधा एकहि क्षेत्र या योजनेंतून सुटलें नव्हतें. असें सांगतात कीं, क्रीलेंको नामक एका सरकारी वकिलानें बुद्धिबळें खेळण्याचीहि एक पंचवार्षिक योजना आंखून दिली होती. राष्ट्रीय प्रगतीची पंचवार्षिक योजना हा राष्ट्राचा एकच एक सर्वंकष असा कायदा होऊन बसला आणि सर्व सामाजिक कर्तृत्व या एकाच धोरणानें वाहूं लागलें.

या पंचवार्षिक योजनेंतील एक साध्य असें कीं, मनुष्य व जनावरें यांच्या जागीं यंत्राची शक्ति उभी करावयाची, लाकडी नांगराच्या जागीं मोठमोठे ट्रॅक्टर आणावयाचे आणि जिकडे तिकडे विजेची शक्ति आणि विजेचे दिवे यांचा सुळसुळाट करावयाचा. लेनिन म्हणे कीं वाफेच्या शक्तीनें भांडवलशाही स्थापन केली तशी विजेमुळें समाजसत्ता स्थापन होणार. विजेचा प्रसार ( Electrification ) हा विजेचा भ्रम ( Electrofiction ) आहे अशी विदेशी लोक बोल्शेव्हिकांची थट्टा करीत. पण रशियांत हल्लीं विजेचा प्रसार कल्पनेबाहेर झाला आहे. पहिल्या दोन वर्षांत पंचवार्षिक योजनेस अंदाजाहून अधिक यश आलें व १९३१ सालांतील अनुभवावरून एकंदर योजना १९३२ सालअखेर म्हणजे चार वर्षांतच पूर्ण होणार असें एका तज्ज्ञानें नुकतेंच रशियन सरकारास कळविल्याचें जाहीर झालें आहे.

## सुशिक्षित कामगारांचा पुरवठा

ही पंचवार्षिक योजना पार पाडतांना रशियन सरकारला मुख्य अडचण आली ती तज्ज्ञ व सुशिक्षित कामगारांची. या कामीं सरकारानेंहि प्रयत्न कसून केले. महायुद्धापूर्वी रशियांतील बहुसंख्य प्रजा निरक्षर होती. बोल्शेव्हिकांनीं १९२६ पर्यंत ही निरक्षरता शें. ४३·३ इतकी कमी केली. १९३० सालीं सात वर्षांवरील फक्त शें. ३९ लोकच निरक्षर होते. पंचवार्षिक योजनेचे शेवटीं निरक्षरता शून्यावर यावयाची आहे.

तसेंच धंद्यांच्या निरनिराळ्या शाखांचें शिक्षणहि वाढविण्याची तजवीज रशियन सरकारनें पुष्कळच केली आहे. कारखान्यांना जोडूनच धंदेशिक्षणाच्या शाळा असल्यानें धंद्यांचें तात्त्विक व व्यावहारिक शिक्षण एकदमच मिळण्याची सोय तेथें होते. १९३० अखेर उद्योग-धंद्याच्या विद्यापीठाच्या दर्जाच्या शाळा १९८ होत्या, हायस्कूलच्या दर्जाच्या ६६३ व प्राथमिक ३२१ होत्या. या प्राथमिक शाळांत १८ ते ३० वर्षांच्या सामान्य मजुरांना शिक्षण देण्यांत येतें. शिवाय कारखान्यांच्या, व्यापाराच्या व लहान मुलांनाहि धंदे शिकविण्याच्या शाळा होत्या. शेतीच्या शिक्षणाकरितां विद्यापीठाच्या दर्जाच्या ६८ शाळा व माध्यमिक दर्जाच्या ३५२ शाळा होत्या. वैद्यक, बालशिक्षण, कला यांकरितां १२६ विद्यापीठें होतीं. या सर्व संस्थांतून १९३० अखेर एकंदर ११ लक्ष विद्यार्थी शिक्षण घेत होते. एवढ्या कर्तृत्वास बोल्शेव्हिकांना परंपरेचा आधार कांहींच नव्हता. या दृष्टीनें त्यांचें कर्तृत्व मोठें आहे. पण त्यांच्या आकांक्षांच्या मानानें हा सर्व सरंजाम अगदींच अपुरा असून नित्य नव्या संस्था निघतच आहेत. पंचवार्षिक योजनेच्या शेवटीं एकंदर ४४००० मामुली इंजीनियर्स, ५३००० हजार यंत्रज्ञ, ३५००० शेतीचे इंजीनियर्स व ४०००० शेतींतील सामान्य शास्त्रज्ञ तयार व्हावयाचे आहेत. इतर अनेक शाखांचे बाबतींत असेच संकल्प सुटले असून ते पूर्ण करण्याची खटपट जारीनें सुरू आहे.

उद्योगधंद्याच्या नफ्यांतून ३ टक्के धंद्याच्या शिक्षणाकरितां काढून ठेवण्यांत येतात. विद्यार्थ्यांना चैनी अथवा सुखसोयी कमी आहेत. पण शिक्षण घेत असतां छात्रवृत्ति मिळते. या सर्व शिक्षणांत घाई आणि गोंधळ बराच होत आहे. पण एकंदरींत लोकांचें औत्सुक्य व शिकण्याची हौसहि जोरानें वाढत असून ट्रामगाड्यांतून प्रवास करतांना, बागांतून विश्रांति घेतांना आणि थिएटरांमध्येंहि विद्यार्थी पुस्तकें घोकीत बसलेले दृष्टीस पडतात. एकदर लोकसमाजांत नवजीवनाचें वारें संचरलें आहे असा सर्वत्र भास होतो. केवळ देशांतल्या देशांत निर्माण होणाऱ्या तज्ज्ञांवर भागविलें जात नाही. करार करून हजारों परदेशी तज्ज्ञ नक्त पगारावर रशियांत काम करीत आहेत. १९३० सालच्या माहितीवरून पाहतां निवळ अमेरिकन तज्ज्ञांचाच वार्षिक पगार एक कोटी डॉलर्स होत आहे. १९३१ सालच्या योजनेंत १३००० नवीन धंदे-शिक्षक आणावयाचे होते. संशोधनाचीहि प्रगति चांगलीच होत आहे. १९२४ सालीं पेटंटचा कायदा झाला तेव्हांपासून पेटंटचे अर्ज दरसाल ३०००० पर्यंत गेले आहेत. यांत सामान्य मजुरांचे अर्ज शें. १२ असतात. पेटंटांत मिळकत फारशी नसते; तरी पण पेटंटवाल्यास सवलती पुष्कळ मिळतात. कामगारांच्या संशोधनशक्तीवरच रशियन सरकारची भिस्त मोठी आहे.

## शेतींतील प्रगति

१९३० सालीं एकंदर जगांतील शेतीची लावणी केलेली जमीन ६५ कोटी हेक्टर (१ हेक्टर=२·४७१ एकर) होती. त्यांत एकट्या रशियांत १३ कोटी हेक्टर जमिनीची लागण झालेली होती. १९३० सालीं सरकारी

शेतें ऊर्फ ' धान्याचे कारखाने ' १४२ होते. यांत ८९ लक्ष हेक्टर जमिनीची लावणी झाली होती. यांतून १० लक्ष टन धान्य निघालें. ते सर्व बाहेर देशीं पाठविण्याकरितां काढून ठेवण्यांत आलें. शास्त्रीय साधनांनीं या शेतांचें उत्पन्न जवळ जवळ दुप्पट वाढविण्यांत आलें आहे. १९३१ सालांत या शेतांवरील यंत्रसामुग्री दुप्पट वाढविण्यांत यावयाची होती.

खासगी मालकीचीं शेतें कायद्याच्या बळजोरीनें 'सरकारी' करण्यानें प्रजेत असंतोष फार माजूं लागला. म्हणून अलीकडे कायद्याचा मार्ग सोडून अप्रत्यक्ष दडपण, आमिष, समजूत यांचा अवलंब केला जात आहे. यांत्रिक साधनें व शास्त्रीय उपाय यांनीं शेतीचें उत्पन्न कसें वाढतें हें सरकारी शेतीच्या उदाहरणावरून खासगी मालकांना पटविण्यांत येतें. तें पाहून कांहीं गांवकऱ्यांनीं बहुमतानें साऱ्या गांवची शेती एकत्र करण्याचें ठरविलें असून सरकारशीं ठराविक दरानें धान्य विकण्याचा सामुदायिक करार केला आहे.या गांवकीत (Artel) आपली जमीन सामील करण्याकरितां दरघरटी जमिनीच्या किंमतीच्या मानानें २ ते १० टक्के व जमीन नसणाऱ्यास मजूर म्हणून प्रवेश मिळण्याकरितां मजुरीच्या दहा टक्के प्रवेश–फी द्यावी लागते. प्रत्येक घटकानें घातलेल्या भांडवलापैकीं निम्मे गंगाजळींत जातें व तो सोडून गेल्यास बाकीचें निम्में त्यास परत मिळतें. या गावकीच्या शेतीवरील सर्व काम सामुदायिक पद्धतीनें केलें जातें.कामाच्या लायकीप्रमाणें दरमाणशीं मजुरी आकारली जाते. जमाखर्च फार कडक शिस्तीनें ठेवण्यांत येतो. मजुरीचा निम्मा भाग चालू खर्चास मिळतो व निम्मा भाग वर्षअखेर एकदम मिळतो. अशा गांवकीच्या अनेक शेतांचे संघ ( Kolkhoz ) असून त्यांच्या बँका, नियंत्रणमंडळें, घाऊक खरेदी–विक्री करणारी मंडळें व संघाचें मॉस्को येथें मध्यवर्ती मंडळ असा यांचा प्रचंड विस्तार आहे. यांत शेतीची खाजगी मालकी अंशतः राहूनहि प्रचंड शेतीचे फायदे घेतां येतात. पण ही शेतीहि सरकारचे मालकीची होण्याचे मार्गांत आहे. पंचवार्षिक योजनेच्या शेवटीं सर्व शेती सरकारचे मालकीची व्हावयाची आहे. प्रचंड शेतीमुळें मोठ्या सडका, पूल, दुरुस्तीचे कारखाने याची गरज फार वाढली आहे. सैन्यांतून कमी केलेल्या लोकांकडून रस्ते, पूल बांधणें व दुरुस्तीचे कारखाने चालविणें ही कामें केली जातात.

### मजुरांची स्थिति

शेतीच्या मजुरांस आठ तास ठराविक वेळीं काम, मधल्या सुट्या, आठवड्याच्या सुट्या, रजा वगैरे मजूरसंघांचे नियम लागू झाले आहेत. लहान शेती सोडून या प्रचंड शेतीला आलेला शेत–मजूर मात्र असंतुष्ट झाला आहे. त्याला त्याच्याभोंवतीं भराभर होत असलेला बदल पाहून तो बावरल्यासारखा झाला आहे. हा बदल समजून घेण्याची फुरसतहि त्याला सांपडत नाहीं. त्याच्या पायाखालची वाळू भराभर कातरून चालली असून पोहायला शिकण्याआधींच पाण्यावर अधांतरीं झाल्यामुळें तोंडांत पाणी जाऊन त्याचा जीव अर्धामुर्धा झाला आहे. पूर्वी जोशीबुवांनीं पंचांगांतून मुहूर्त काढून दिल्याशिवाय तो पीक काढीत नसे. शेतातलें काम वेळीं अवेळीं करावें न करावें, याचा तो मुखत्यार असे. पण या बोल्शेव्हिक अमलांत हें सारें स्वातंत्र्य नष्ट झालें आहे. आतां घंटेबरोबर उठलें पाहिजे, जमावाबरोबर शिस्तीनें चाललें पाहिजे, चहाच्या पंक्तींत बसून चहा घेतला पाहिजे, दुसरी घंटा ऐकली कीं कामास जुंपलें पाहिजे. त्यांची जुनी अनेक कामें गेलीं. आतां एकच एक काम ठराविक पद्धतीनें ठराविक नमुन्याचें उठवून दिलें पाहिजे. देखरेखवाल्या अधिकाऱ्यांच्या पसंतीस उतरेल असें काम झालें पाहिजे. जिकडे तिकडे यंत्रें, मजुरांच्या तुकड्या, घड्याळें, तज्ज्ञ, हवालदार, वेळापत्रकें यांची गर्दी अकस्मात् उडालेली पाहून हा कोठला यमलोक कीं देवलोक आपणास वेढून बसला याचा शेत–मजुरास चमत्कार वाटत आहे. या नव्या परिस्थितीशीं सात्म्य पावण्यास त्यास विलक्षण सायास पडत आहेत.

उद्योगधंद्यांत मजुरांची रोज नव्यानें उणीव भासावी इतकी औद्योगिक प्रगतीची घाई रशियांत उडाली आहे. १९२९ अखेर एक कोटी पंचवीस लक्ष मजूर कारखान्यांत कामावर होते. १९३० सालीं आणखी १५ लक्षांची भर पडून एक कोटी चाळीस लक्ष झाले. १९३१ सालीं यांत आणखी वीस लक्षांची भर पडावयाची होती.

औद्योगिक प्रगति घाईनें करावयाची असल्यानें मजुरामजुरांत चढाओढ लावून सरस काम करणाऱ्यास थोडथोडें बक्षीस देण्यांत येतें. कामाचे तास दररोज आठ असून ते हळूहळू कमी करण्याचे उद्देशानें ⅓ मजुरांचें काम ७ तासांवर आणलें आहे. कारखान्यास सुटी केव्हांच नाहीं. दिवसाचे २४ तास व वर्षाचे १२हि महिने कारखाने सतत चालू आहेत. मजुरांना रोज तीन गटांनीं काम करावें लागतें. आठवडा ५ दिवसांचा केला असून दर पांचवे दिवशीं सुटी मिळते. कारखाने नेहमी चालू असल्यामुळें सर्वांची सुटी एका वारीं नसते. रोज ⅕ मजुरांना सुटी मिळते. यामुळे धान्यांच्या दुकानावर एकाच दिवशीं गर्दी होत नाहीं. रविवार व इतर धार्मिक

सण यांना या 'अधर्म' राज्यांत पुरा काट मिळाला आहे. वर्षांतून ७२ आठवडे कामाचे असतात. फक्त पांच दिवस मात्र सर्व कारखाने अजीबात बंद असतात. ते २२ जानेवारी लेनिनची मृत्युतिथि, १ व २ मे आंतर-राष्ट्रीय मजूरदिन आणि ७ व ८ नोव्हेंबर क्रांतीचा वाढदिवस हे दिवस होत. चार वर्षांनीं लीप इयरचा एक दिवस, औद्योगीकरणदिन म्हणून पाळला जातो.

कारखान्यांत मजुरास ठराविक काम नेमून दिलें जातें. वाईट काम करणें हा गुन्हा होतो. त्याबद्दल तुरुंगांत राहून सक्तमजुरी करावी लागते. काम न करतां कोणासच जगतां येणार नाहीं अशी स्थिति दिवसानुदिवस अधिकाधिक होत आहे. काम केलें पाहिजे व तें चांगलें केलें पाहिजे अशी सक्ती आहे. शिक्षणाच्या सोयी आहेत, बक्षिसें आहेत सर्व कांहीं आहे. पण कष्टावांचून सुटका नाहीं, व अमुकच काम करीन अमुक नाहीं असें म्हणतां येत नाहीं. रशियांत एकंदर लोकसंख्या सोळा कोटी आहे. यांतील असमर्थ माणसें व मुलें वगळल्यास सर्व स्त्री-पुरुषांचे श्रम खर्ची घालून ठराविक योजनेनुसार एका प्रचंड मागसलेल्या राष्ट्राचा संसार-गाडा पुढारलेल्या जगाच्या ओळीस थोड्याच अवकाशांत मोटारीच्या वेगानें दामटून भिडवावयाचा आहे. पुढेंमागें आंतरराष्ट्रीय युद्धाचा प्रसंग ओढवल्यास अथवा परकी राष्ट्रांनीं विघ्नें आणल्यास उन्नतीस अवसर मिळणार नाहीं म्हणून १६ कोटी प्रजेस सक्तीनें कार्यास जुंपून झपाट्यानें प्रगति करण्यास रशियन सरकारनें कंबर कसली आहे आपली कम्युनिस्ट पद्धतीची आर्थिक घटना जगांत सर्वश्रेष्ठ आहे असाहि त्यांचा अहंकार आहे. एवढ्या बहुसंख्य लोकांस सक्तीनें दावणीस बांधून आंखीव योजनेनुसार प्रगति करण्याच्या रशियाच्या या अपूर्व व अद्भुत प्रयोगाकडे जगाचे साहजिकच डोळे लागून राहिले आहेत.

# राजा यांचें प्रधानांना पत्र

अस्पृश्यांना स्वतंत्र मतदारसंघ पाहिजे अशी मागणी डॉ. आंबेडकरांनी केली. ती 'अखिल भारतीय अस्पृश्य संघा'ला पूर्ण नापसंत आहे. संयुक्त मतदारसंघ असावा आणि लोकसंख्येच्या प्रमाणांत जागा राखून ठेवाव्या असें त्या संघाचें मत आहे. त्यामुळें त्या संघाची आणि हिंदुमहासभेची एकवाक्यता झाली. हा सर्व वृत्तांत अस्पृश्यांतर्फे रा. ब. एम. सी. राजा व हिंदु महासभेतर्फे डॉ. बी. एस. मुंजे यांनी विलायतेस मुख्य प्रधान मि. राम्से मॅक्डोनाल्ड यांस तार करून कळविला. आतां श्री. राजा यांनी प्रधानांना स्वतंत्र पत्र पाठविलें आहे. त्यांत ते लिहितात.

"अस्पृश्यतेचें निर्मूलन करण्यास व सहकार्यानें काम करण्यास हिंदुमहासभेनें अस्पृश्यांच्या संघाला आतां प्रथमच पाचारण केलें. त्यांनी बंधुभावानें पुढें केलेला हात झिडकारणें अस्पृश्यांच्या उन्नतीला पोषक होणार नाहीं असें माझें मत आहे. अस्पृश्यांना समानतेची भूमिका प्राप्त व्हावी हा तर आमचा मनोरथ. त्याच्या वाटेंत धोंड टाकणें आत्मघातकीपणाचेंच ठरेल. अन्य अल्पसंख्याकांकडे पाहिलें म्हणजे तर माझी ही भीति दृढच होते आमच्या मागसलेपणाचा फायदा घेऊन ते आपल्या पोळीवर तूप ओढण्याची वासना धरतात; आणि अस्पृश्यांना असा आडमार्ग दाखवितात कीं, त्यामुळें हिंदु समाजांत फळ्या पडाव्या, त्याची खंबिरी खिळखिळी व्हावी आणि राजकीय काय, किंवा सामाजिक काय, सर्वच तऱ्हेचें ऐक्य धुळीस मिळावें! अस्पृश्यांनी स्वतंत्र्या मतसंघाची इच्छा मनांत धरली होती; तेव्हां सरकार हें पालकाप्रमाणें त्यांच्या हक्कांचें संरक्षण करील अशी कल्पना होती. पण प्रांताचा सर्वच्या सर्व कारभार कायदेमंडळाच्या काबूंत जाणार अशा वेळीं अस्पृश्यांनीं स्वतंत्र राहणें म्हणजे विरोधी पक्षाची भूमिका कायमची उचलणेंच होय. मुसलमानांची गोष्ट निराळी आहे. त्यांची संख्या मोठी आहे. तिच्यामुळें त्यांची उपेक्षा होणें शक्य नाहीं, पण ते आणि स्पृश्य हिंदु यांची गट्टी जमली तर अस्पृश्यांच्या पदरांत राजकीय हक्काचा कण तरी पडेल काय? अशी भीति वाटण्याचें कारण हें कीं, हिंदूंप्रमाणेंच मुसलमानदेखील आम्हांला वाईट तऱ्हेनें वागवितात. शिवाय अल्पसंख्य वर्ग सर्वसाधारण मतसंघांत मिसळले तरच त्यांना नोकऱ्या मिळण्याचा संभव. लंडन येथें अल्पसंख्याकांचा जो करार झाला होता, त्याअन्वयें अस्पृश्यांना लोकसंख्येनुसार कायदेमंडळांत जागा मिळत नाहींत. पण संयुक्त मतदारसंघामुळे पुरेशा जागा मिळतात, शिवाय जादा जागा लढवितां येतात आणि अस्पृश्यतानिवारणाला चालना मिळते ती निराळीच! हा सर्व विचार करून मी संयुक्त मतदारसंघ व राखीव जागा यांच्या योजनेस मान्यता देत आहे!"

# मुसलमानी अधिराज्याच्या कल्पनेचें खूळ

आज ना उद्यां सर्व हिंदुस्थानावर मुसलमानी अधिराज्य संस्थापन करण्याचें खूळ अनेक मुसलमान पुढाऱ्यांच्या डोक्यांत अलीकडे पुनः जोरानें खेळं लागल्याचें स्पष्ट दिसतें. तुर्कस्थान, इराण, अफगाणिस्थान व पंजाबांतील सिंधुनदापर्यंतचा प्रांत, तसेंच कराचीपासून कलकत्त्यापर्यंतचा प्रदेश यांत मुसलमानी सत्तेची सांखळी लागावी इतकेंच काय पण साऱ्या हिंदुस्थानावर मुसलमानी अधिराज्याचें अर्धचंद्रांकित निशाण फडकत राहावें ही कल्पना जुनी खरी; परंतु या बाबतींतील त्यांची महत्त्वाकांक्षा निष्फळ ठरली, सर्व आशा दग्ध झाल्या व ते विचार भूतकाळाच्या प्रचंड उदरांत जिरून्हि गेले अशी निःसंदेहपणें इतिहास साक्ष देतो. असें असतांहि ही गाडली गेलेली भुतें बाहेर पडून कांही मुसलमानी पुढाऱ्यांच्या अंगांत सांप्रत संचरलेलीं दिसतात. या पुढाऱ्यांचीं भाषणें, त्यांचीं लिखाणें व त्यांचीं कारस्थानें या सर्वांवर वरील कल्पनांचा अस्पष्ट अगर भडक रंग खुललेला आपल्यास आढळून येतो व त्यामुळें इतिहासाची पुनरावृत्ति आपल्या हिंदुस्थानांत होणार कीं काय अशी साधार भीति निदान हिंदु समाजास वाटूं लागली असल्यास नवल नाहीं. सर महमद इकबल यांनीं अखिल भारतीय मुसलमान परिषदेचे अध्यक्ष या नात्यानें लाहोरास केलेलें भाषण त्या थाटाचेंच झालें. त्यामुळें वरील भीति सकारण आहे हें सिद्ध होतें !

मुसलमानी अधिराज्याच्या भुतानें पछाडलेल्या या लोकांच्या बेफाम भाषणांतील युक्तिबुद्धीची तालबद्धता नष्ट होऊन तिची जागा तर्कशून्य विचारसरणी, अफाट बेलगामीपणा व पोकळ बढाईखोरपणा यांनीं घेतलेली असते. हे लोक राहतात हिंदुस्थानांत पण अरबस्थानांतील रखरखीत वाळवंटी हवेंत आपण श्वासोच्छ्वास करीत आहों असें यांना वाटतें. या विसाव्या शतकांतील अनेक शास्त्रीय शोधांमुळें मनुष्याच्या धर्मकल्पनांचा पायाच पोखरला गेला व अनेक धर्म-सिंहासनें कोलमडून जमिनीवर पडलीं हें माहीत असतांना, खुद्द तुर्कस्थानानें पायाखालीं चिरडलेली खिलाफत यांना पुनः उभारावीशी वाटते. राजकारणांतहि विचारक्रांति होऊन अनेक राजांचे व बादशहांचे मुकुट वितळले व लोकशाहीचें निशाण जगांत सर्वत्र रोवलें जाऊं लागलें. खुद्द हिंदुस्थानांतहि जाति, धर्म अगर वंश या कृत्रिम मर्यादा ओलांडून रयत हाच राजा अशी ग्वाही दिली जात आहे. अशा स्थितींत या मुसलमान मंडळींना केवळ मुसलमानांचेंच राज्य हिंदुस्थानांत व्हावें असें वाटतें ही एक विलक्षण गोष्ट नव्हे काय ?

पण या सर्व गोष्टी ज्यांनीं आपल्याकडे मुसलमानी समाजाचा पुढाकार घेतला आहे त्यांच्या वृत्तींत दिसतात खऱ्या. या बाबतींत प्रत्येकाचे नमुने घेऊन उदाहरणें दाखविण्याची आवश्यकता नाहीं. सुप्रसिद्ध बडे भाई शौकत अली, अलाहाबादचे डॉ. शफत अहमदखान, बंगालचे गझनवी, मुजफरपूरचे मौलवी शफी दाउदी, लाहोरचे फिरोजखान नून, सिंधचे अब्दुल हरून व मुंबईचे जिना यांचीं मतें कानांत वारें भरलेल्या शिंगराप्रमाणें चौखुरांनीं बेफाम कशीं धावतात हें सर्वांस माहीत आहेच. वर उल्लेखिलेल्या लाहोरच्या अखिल भारतीय मुसलमान परिषदेस, पहिले व शेवटचे पुढारी सोडून देऊन बाकी सर्व सज्जन हजर होते. या सर्व मंडळींच्या सभेत काय भाषणें झालीं असतील व काय ठराव पसार केले गेले असतील याचा ठाव तर्कानें सहज लावतां येण्यासारखा आहे. व जो जो तर्क केला जाईल तो तो खरा ठरण्याचा पूर्ण संभव आहे. फक्त तो तर्क वर उल्लेखिलेल्या खुळासंबंधीं असला म्हणजे पुरे !

स्वदेशाभिमान हा राजकारणाचा प्राण आहे. ज्या देशांतील लोकांस आपल्या देशाचा अभिमान वाटत नाहीं, ज्यांना आपला देश स्वतंत्र व्हावा, कीर्तिमान व्हावा, उन्नत व्हावा असें वाटत नाहीं तो देश चिरंतन गुलामगिरींतच राहणार यांत शंका नाहीं. अशा गुलामच राहूं इच्छिणाऱ्या लोकांचें राजकारण तें काय असणार ? हिंदुस्थानांतील मुसलमान हिंदुस्थानांत राहतात, त्यांचे वाडवडील येथेंच राहिले, त्यांचीं थडगीं याच देशांत आहेत व त्यांचीं मुलें-बाळेंहि याच देशांत नांदावयाचीं आहेत मग त्यांना स्वदेशाभिमान असावयास नको काय ? राजकारणांत या देशाभिमानाचीच किंमत मोठी ही गोष्ट सूर्यप्रकाशाइतकी स्पष्ट असूनहि सर महमद इकबल हे आपल्या अध्यक्षीय भाषणांत मुसलमानांना सांगतात कीं, "स्वदेशाभिमान हा एक नैसर्गिक सद्गुण आहे व मनुष्याच्या नैतिक वागणुकींत त्याला जागा आहे ही गोष्ट खरी ! परंतु ज्या गोष्टीला खरी किंमत आहे, ती गोष्ट म्हणजे देशाभिमान नव्हे. आपला धर्म, आपली संस्कृति व आपली ऐतिहासिक परंपरा

या सर्वांनाच खरें महत्त्व आहे. व याकरितां आपण जगलें पाहिजे व मेलेंहि पाहिजे. किंचित् कालपर्यंत ज्या जमिनीच्या तुकड्याशीं आपला संबंध येतो त्याचा अभिमान धरण्यांत हंशील काय?" धर्म, संस्कृति, व परंपरा यासंबंधींची ही विचारसरणी आम्हांसहि मान्य आहे; किंबहुना, आम्ही असेंहि म्हणूं कीं, या तीन गोष्टींचा अभिमान प्रत्येक हिंदूनेंहि अवश्य धरला पाहिजे व त्याकरितां प्राण द्यावयासहि त्यानें तयार झालें पाहिजे. पण या सर्व गोष्टींना मर्यादा आहेत. धर्म व राजकारण यांचीं क्षेत्रें निरनिराळीं आहेत. धर्म व राजकारण हातांत हात घालून खेळूं शकतात. प्रत्येकाचा प्रांत स्वतंत्र व त्यांत तो श्रेष्ठ आहे. परंतु धर्माच्या क्षेत्रांत राजकारणाची अगर राजकारणाच्या क्षेत्रांत धर्माची कुरघोडी होऊं लागली तर अनर्थ झाल्याशिवाय राहणार नाहीं हें निश्चित! सर महमद इकबल यांचा उपदेश दुधारी आहे. तो उपदेश गिरवून जर हिंदु व मुसलमान दोघेहि या शतकांत आपापल्या धर्माची संस्थापना व संवर्धन राजकारणाच्या क्षेत्रांत करूं लागले तर हें धर्मवेड घनघोर धर्मयुद्धें उत्पन्न करील व त्याचा परिणाम आतांप्रमाणें इंग्रजांच्याच राज्याची पक्कड कायम करण्यांत होऊन हिंदुस्थान चिरंतनचा गुलाम राहील! ही आपत्ति धर्म, संस्कृति व परंपरा यांच्या दृष्टीनेंहि अनिष्ट आहे.

आम्ही अल्पसंख्य, आम्ही मागसलेले म्हणून बहुसंख्यावाले आम्हांवर जुलूम करतील यामुळें आम्हांस स्वतंत्र मतदारसंघ पाहिजेत अशी मागणी मुसलमान करतात; पण त्याचा अर्थ हा कीं, बहुसंख्य हिंदूंवर त्यांचा विश्वास बसला म्हणजे ही स्वतंत्र मतदारसंघाची कुबडी फेकून देऊन, राष्ट्रीयत्वाच्या गंगेंत, भविष्य काळीं उडी घालण्यास हिंदूंबरोबर ते तयार होतील. पण हें त्यांचें एक ढोंग आहे असें सर महमद यांच्या भाषणावरून वाटतें! कारण ते स्पष्टच म्हणतात कीं, हे सर्व अधिकार आम्हांला कायमचेच पाहिजेत. कारण ते जर गमावले तर मुसलमान ज्ञाति नष्ट होईल! जगांत आज प्रचलित असलेली लोकसत्ताक राज्यपद्धति आम्हांस पाहिजे असा हिंदुस्थान टाहो फोडीत असतां हे सद्गृहस्थ स्पष्ट म्हणतात कीं पाश्चिमात्यांची लोकशाही आम्हांस नको. तिचें स्वरूप व आकार आम्हांस जुळेल असा बदलला पाहिजे!

सर महमद हे कवि आहेत. व कवींना सत्य-सृष्टीची भूमि सोडून देऊन कल्पनासृष्टींत विहार करण्याची संवय असते. किंबहुना पुष्कळ वेळां असा विहार म्हणजेच काव्य असें समजलें जातें. हें ठीक आहे. पण राजकारणासारख्या कठोर व्यावहारिक गोष्टींत जर असें गैरलागू काव्य वाहूं लागलें तर व्यवहार तर नासेलच, पण वरती काव्याची प्रतिष्ठा न होतां कवींची मूर्खता मात्र जगभर जाहीर होईल यांत शंका नको. सर महमद इकबल म्हणतात कीं, "हिंदुस्थानाच्या भावी राजवटींत इस्लामनें असें स्थान काबीज केलें पाहिजे कीं त्या स्थानाच्या आश्रयानें या देशांत इस्लामाचें ध्येय आम्ही गांठूं. धर्मश्रद्धेचा अग्नि तरुणांच्या अंतःकरणांत पेटला पाहिजे व त्यायोगानें जगभर आपल्या धर्माची दिवटी पेटविण्याकरितां नवा विचार व नवी क्रांति यांचें नवें जग निर्माण झालें पाहिजे!" स्वसंरक्षणार्थ, स्वतंत्र मतदारसंघाची मागणी करण्याच्या बुरख्याच्या आंत कट्टर मुसलमानांचें केवढें मोठें कारस्थान चालू आहे याची यावरून उत्तम कल्पना येणारी आहे.

या परिषदेंत केल्या गेलेल्या ठरावांतील मागण्या पाहिल्या म्हणजेंहि या परिषदेचे सभासद कोणत्या वेडाच्या लहरींत होते यावर उत्तम प्रकाश पडतो. जुलै १९३२ च्या आंत जर इंग्रज सरकारानें मुसलमानांना समाजाचे हक्क मान्य केले नाहींत तर ४ जुलैच्या कार्यकारी मंडळानें सरकारशीं युद्ध पुकारावें असें पहिल्या ठरावांत म्हटलें आहे! या युद्धाकरितां एक संघटना, स्वयंसेवक व पन्नास लाखांचा निधि, शाखा, उपशाखा या सर्वांची एका ठरावानें व्यवस्था लावण्यांत आली आहे. सदर परिषदेंत काश्मीरांतील मुसलमानांना राज्याधिकार द्यावेत असे ठराव झाले असल्यास नवल नाहीं! आम्ही मागतो ते प्रतिनिधी ग्लान्सी कमिशनवर नेमले पाहिजेत व आम्ही नांवें सांगूं ते अधिकारी काश्मीरांत नेमले पाहिजेत असा ठरावहि झाला आहे. मौज ही कीं, मद्रासरकारच्या कार्यकारी मंडळावरील मुसलमान सभासद नालायक आहेत त्यांना काढा व आम्ही सांगूं त्या मुसलमानाला तेथें नेमा अशी मागणी करावयासहि ही परिषद चुकली नाहीं! पण सर्वांत महत्त्वाचा ठराव म्हणजे आतां संयुक्त राज्यपद्धतीचें स्वराज्य देण्याच्या गोष्टी पुरेत; आम्हांला फक्त प्रांतिक स्वायत्तता द्या असा ताबडतोबीचा हुकूम इंग्रज सरकारास देणारा होय.

हे ठराव पाहिले म्हणजे या कट्टर मुसलमानांच्या अकलेची तारीफ करावी तेवढी थोडी असें वाटतें! हिंदुस्थानाला स्वराज्याचे हक्क मिळूं नयेत म्हणून कोणी शत्रु विश्वप्रयत्न करावयास निघाला तर तोहि यापेक्षां हिंदुस्थानाचें अधिक अहित करूं शकणार नाहीं! यांच्या मागण्या तर पहा. मुसलमानांस स्वतंत्र मतदारसंघ, ते ज्या प्रांतांत बहुसंख्य असतील त्या प्रांतांतील बहुसंख्याकांचे हक्क, सरहद्द प्रांताला मुंबई-मद्रासप्रमाणें हक्क, पूर्ण प्रांतिक स्वायत्तता, राजसत्ता पार्लमेंटाकडून काढून प्रांतांना देणें, सर्व प्रांतां-

ना सारखा अधिकार देणें, सिंध स्वतंत्र करणें व वरिष्ठ लोकसभेंत मुसलमानांचे एक-तृतीयांश सभासद असणें, या प्रकारच्या त्यांच्या मागण्या आहेत. मूळ जिनांच्या सुप्रसिद्ध चौदा मागण्या, पण त्या आतां मारुतीच्या शेपटीप्रमाणें वाढत जाऊन त्या चोवीस झाल्या व अजूनहि वाढतील! कट्टर मुसलमानांची जर अशी कल्पना असली कीं मागण्या वाढविल्या अगर असल्या दहशती घातल्या तर त्यांचें कार्य अधिक साधेल तर हा निवळ भ्रम आहे! आतां, हिंदु इतके भोळे राहिले नाहींत व इंग्रज सरकारनें तर रावींच्याच घुगऱ्या खाल्ल्या आहेत!

शेफारलेल्या मुसलमानांच्या या चढेल वृत्तीमुळें विलायतेंतील हुजूरपक्षीयांना मात्र वर्मी घाव बसल्यासारखा झाला आहे. या दुराराध्य स्वार्थी मुसलमान पुढाऱ्यांना प्रथम हातांत धरून त्यांच्याकरवीं गोलमेज परिषदेच्या कामाला त्यांनीं खो दिला. आगाखानांच्या हॉटेलांतील ते खानें, त्या बैठकी, या सर्वांचा इतिहास वाचकांना माहीतच आहे. या सर्व कारवाईमुळें म. गांधी पराभूत झाले, हिंदु-मुसलमानांची एकी होऊं शकली नाहीं व गोलमेज परिषदेचा डाव फिस्कटला! हिंदु-मुसलमानांच्या एकीशिवाय, आम्ही जबाबदार पद्धतीची राज्यव्यवस्था देऊं शकत नाहीं असें एकीकडे म्हणून दुसरीकडून ती एकी होऊं न देण्याची तजवीज करावयाची असा तो पेंच होता. 'आम्ही तुमच्या सर्व मागण्या मान्य करूं' असें हे मुत्सद्दी त्या वेळीं मुसलमानांना वर देत होते. पण आता हा पेच त्या हुजरपक्षीय मुत्सद्द्यांच्याच अंगावर उलटला आहे. कारण कन्सल्टेटिव्ह कमिटीनें ब्रिटिश सरकारने पंच या नात्यानें निकाल करावा व तो आम्ही मानूं असा निर्वाळा दिल्याकारणानें या बाबतींत निकाल देण्याचें काम ब्रिटिश सरकाराकडेच आलें. पण ज्या भस्मासुराला आपण वर दिला तो स्वतःवरच उलटल्याकारणानें ब्रिटिश मुत्सद्द्यांना मोठी अडचण पडली आहे. सर्व मागण्या देणें शक्य नाहीं व न दिल्या तर हे लोक जुलैपासून बंड करतों असें म्हणतात! द्याव्या तर ज्या कांहीं हिंदूंचा गोलमेज परिषदेस पाठिंबा आहे ते सर्व नाखुष होतील अशी आगींतून निघून फोफाट्यांत पडण्यासारखी परिस्थिति निर्माण झाली आहे. आतां बाजू अंगावर आलेली पाहून स्टेटसेक्रेटरी होअर हे पार्लमेंटांत गरजले कीं, आम्ही कोणाच्याहि असल्या धाकदपटशाला व दहशतीला भीक घालणार नाहीं! तरी पण मुसलमानांना चुचकारण्याचाहि त्यांनीं प्रयत्न केलाच आहे. त्या वेळीं आमच्यावर तुम्ही विश्वास ठेवलांत, मग आतांच अविश्वास धरण्याचें काय कारण, असाहि प्रश्न ते त्यांस टाकीत आहेत याचा अर्थ स्पष्ट आहे.

ब्रिटिश मुत्सद्दी आतां कोणते मोहोरें पुढें टाकतात हें पाहणें मोठें गमतीचें आहे. दुराराध्य मुसलमान पुढाऱ्यांशीं गट्टी करून हिंदुस्थानाच्या स्वराज्याचा प्रश्न लोंबत ठेवण्याचा मार्ग त्यांना मोकळा आहे. पण त्यांत त्यांचें खरें हित नाहीं. मुसलमानांच्या काठीवर भार ठेवून ब्रिटिश मुत्सद्द्यांना कांहीं दिवस काढतां येतील. पण ती काठी केव्हां हातची निसटेल व ते केव्हां जमिनीवर घसरून तोंडघशीं पडतील याचा नियम नाहीं. शिवाय, या युक्तीमुळें जी घटना तयार होईल ती हिंदूंना केव्हांहि पसंत पडणें शक्य नाहीं हीहि गोष्ट कमी महत्त्वाची नाहीं. घोडा पाहून त्याला नीट बसेल असें खोगीर तयार करण्याऐवजीं खोगिराप्रमाणें घोड्याची पाठ असली पाहिजे असें म्हणणें मूर्खपणाचें आहे. कारण असल्या खोगिरावर स्वार झालेल्याला घोडा केव्हां उलथून टाकील हें कोणीं सांगावें! हिंदु-मुसलमानांतील तंटा तोडण्याचें काम आपण पत्करलें, ही फार मोठी चूक झाली असें विलायतेतील मुत्सद्दी म्हणूं लागले आहेत. याचा अर्थ व असा कीं, या सगळ्या राजकारणांतून कांहींहि निष्पन्न होऊ नये अशीच त्यांची इच्छा आहे. विलायतेहून येणाऱ्या बातम्या तर अशा स्पष्ट आहेत कीं, प्रांतिक स्वायत्तताच फक्त द्यावयाची व बाकीचे सर्व प्रश्न लांबणीवर ढकलून त्या दोषाचें खापर मात्र हिंदुस्थानावर टाकावयाचें. पण प्रत्यक्ष काय होतें तें लवकर समजेलच.

तें कांहींहि असलें तरी मुसलमानी अधिराज्याचीं स्वप्नें पडत असलेले मुसलमान पुढारी मात्र तोंडघशीं पडल्याशिवाय राहणार नाहींत. 'मँचेस्टर गार्डियन' पत्रानें तर मुसलमानांच्या या कल्पनेला अफूबाजाचें एक स्वप्न असें म्हटलें आहे. या दृष्टीनें मुसलमानांच्या महत्त्वाकांक्षा शक्य कोटींत येणें संभवनीय नसलें तरी सर्व संकटांना तोंड देण्यास हिंदूंनींहि तयार असलें पाहिजे. हिंदुस्थान हा हिंदूंचा देश आहे. हिंदू बहुसंख्य आहेत, म्हणून त्यांनीं अल्पसंख्याकांच्या योग्य मागण्या मान्य कराव्या. परंतु स्वदेशाभिमानाला पारखे झालेल्या व धर्मवेडानें बेहोष बनलेल्या या मुसलमानांनीं हिंदुस्थानाच्या शरीरांत आपल्या जमातीचें स्तोम माजवून कायमचेंच शल्य निर्माण करण्याचें ठरविलें व तसा प्रयत्न केला तर त्याचा प्रतिकार हिंदूंनीं केला पाहिजे तेंहि उघड आहे.

# खाण्यासाठीं वापरण्यांत येणाऱ्या परदेशी वस्तू

( बॉंबे स्वदेशी लीगकडून )

जगांत पुढारलेल्या व संपन्न राष्ट्रांची आर्थिक स्थिति कल्पनेच्या बाहेर खालावलेली आज दिसून येत आहे. याची खात्री ग्रेटब्रिटन पटवून देत आहे. त्या राष्ट्रावर आर्थिक संकट कोसळतांक्षणींच ब्रिटिश मुत्सद्यांनीं खुल्या व्यापाराच्या तत्त्वाला तावडतोब फांटा दिला. तत्त्वनिष्ठ ब्रिटिशांनीं एक शतकापेक्षां अधिक चालत आलेलें आपलें आर्थिक धोरण एकदम बदलून टाकलें; व नवीन निवडून आलेल्या ब्रिटिश प्रधानमंडळानें आपलें या बाबतींतील धोरण जाहीर करून राष्ट्रामध्यें खपणाऱ्या चैनीच्या व अनवश्यक वस्तूंवर जकात बसविण्यासाठीं कायद्याची योजना लागलीच केली. या जबरदस्त संकटांतून हिंदुस्थान देश बगळला गेला नाहीं. परंतु आपल्या मातृभूमीच्या बाबतींत एक महत्त्वाची गोष्ट ध्यानांत ठेवण्याजोगी आहे. ग्रेटब्रिटनला आज खाण्यासाठीं लागणाऱ्या बऱ्याचशा वस्तूंकरितां इतर देशांच्या तोंडाकडे पाहाण्याची जरूरी आहे. तशी स्थिति हिंदुस्थानचे बाबतींत केव्हांहि नव्हती व ती आजहि नाहीं.

हिंदुस्थान देश ईश्वरकृपेनें सर्व दृष्टींनीं समृद्ध आहे. पीकपाणी, वस्त्रप्रावरणें यासाठीं लागणाऱ्या सर्व गोष्टी हिंदुस्थानांत विपुल आहेत. म्हणून कोणत्याहि संकटसमयीं या बाबतींत डगमगण्याचें आम्हांला बिलकुल कारण नाहीं.तरी पण गेल्या कांहीं वर्षांत शहरांत राहणाऱ्या बऱ्याच लोकांना परराष्ट्रांतून आलेल्या वस्तू वापरण्याची चटक लागून राहिलेली आहे ही दुःखाची गोष्ट आहे. निरनिराळीं तेलें व इतर अनेक अनवश्यक वस्तू परराष्ट्रांतून हिंदुस्थानांत बऱ्याच मोठ्या प्रमाणावर येतात. अशा वस्तूंची हिंदुस्थानांत जरूरी नसतांनाहि आम्हांला त्यांची संवय लावून देण्यांत आलेली आहे. याचा बराचसा दोष हिंदुस्थानांतील श्रीमान व मध्यम वर्गांतील लोक यांचेकडेसच जातो.

गेल्या तीन वर्षांत हिंदुस्थानांत निरनिराळ्या अनावश्यक वस्तू किती प्रमाणांत परराष्ट्रांतून आल्या याची कल्पना यावी म्हणून खालीं आंकडेवारीचा तक्ता दिला आहे. त्यावरून डोळे फिरविले म्हणजे झाल्या गोष्टीबद्दल खेद करण्याऐवजीं यापुढें या गोष्टीला कोणत्या व कशा रीतीनें आळा बसेल यासाठीं प्रयत्न करण्याची जाणीव हिंदवासियांना झाल्याशिवाय राहणार नाहीं.

| | रुपयांत किमती | | एप्रिल ते नोव्हेंबर |
|---|---|---|---|
| | १९२९-३० | १९३०-३१ | १९३१ |
| तेलं व इतर वस्तू | ५,६३,६१,१९० | ४,८७,७८,५३६ | २,३४,८१,९०७ |
| फळफळावळ व भाजीपाला | १,८२,८५,८०० | १,४८,८८,७८५ | ८०,०९,०८१ |
| मसाल्याच्या अवश्य वस्तू | ३,२५,७५,१५८ | २,५४,९४,४८२ | १,३६,१८,४८० |

परराष्ट्रांतून हिंदुस्थानांत आलेल्यांची तसेंच परराष्ट्रीयांचे राहण्याच्या व वागण्याच्या बाबतींत अनुकरण करणाऱ्या हिंदवासियांची संख्या आपल्या देशांत आज मोजकीच आहे. अशांच्या गरजा ध्यानांत घेतल्या तरी मोठ्या प्रमाणावर येणाऱ्या आयात मालाबद्दल समाधानकारक उत्तर वरील तक्त्यांतील आंकड्यांवरून मिळत नाहीं ही गोष्ट तितकीच सत्य आहे. तरी पण आनंदाची गोष्ट एवढीच आहे कीं, गेल्या वर्षापासून हें प्रमाण कमी होत असलेलें दिसून येत आहे. वरील तक्त्यांतील कोणकोणत्या वस्तू विशेषतः बाहेरून हिंदुस्थानांत येतात हें नीट ध्यानांत येण्यासाठीं त्यांची नांवनिशी प्रस्तुत स्थळीं देणें योग्य होईल. सबब त्या पुढें नमूद केल्या आहेतः—

( १ ) सुकीं, खारीं व राखीव फळें ( २ ) सुपारी ( ३ ) लवंगा ( ४ ) गोठीव दुधाचे डबे ( ५ ) बिस्किटे ( ६ ) केक्स ( ७ ) मिठाई ( ८ ) सुक्या माशांचे डबे ( ९ ) व्हेजिटेबल तूप व तेल यांचे डबे. तसेंच इतर अनेक प्रकारचे खाण्यासाठीं वापरण्यांत येणाऱ्या वस्तूंचे डबे इत्यादि.

वर दिलेल्या बहुतेक वस्तू आज हिंदुस्थानांत होऊं लागल्या आहेत. पैकीं कांहीं चैनीच्या वस्तूहि आहेत. अशांपैकीं बऱ्याच वस्तूंना आर्थिक ऱ्हासाच्या वेळीं फांटा दिलाच पाहिजे. हिंदुस्थानाचा आर्थिक ऱ्हास आटोक्याच्या बाहेर जात चालला असल्याचें सर्वांना माहीतच आहे. सबब सर्व हिंदवासियांनीं देशांत उत्पन्न होणाऱ्या खाण्याच्या वस्तूंचाच उपयोग करण्याचा निश्चय करून तें व्रत कडक रीतीनें पाळिलें पाहिजे.

## श्रीवर्धनचा हिंदु-मुसलमानांचा तंटा कसा मिटला?

रा. ब. एन्. बी. कोटक ह्यांची नेमणूक जंजिरा संस्थानाचे दिवाण म्हणून झाल्यास अद्याप फार दिवस झाले नाहींत तोंच त्यांनीं श्रीवर्धन येथील हिंदु-मुसलमानांचा लढा कायमचा मिटवून टाकला. नामदार बेगमसाहेबांनीं सुचविल्यावरून व श्रीयुत कार्लेकर, दांडेकर, केरो तात्या वगैरे मंडळींनीं विनंति केल्यावरून रा. ब. कोटक यांची प्रकृति अस्वस्थ असतांहि ता. १९ मार्च सन १९३२ रोजीं ते श्रीवर्धन येथें गेले, त्यांनीं तंट्याचें कबरस्थान व इतर सर्व कबरस्थानें पाहिलीं. हिंदु व मुसलमान या दोनहि समाजांतील पुढारी मंडळींना बोलावून त्यांच्या सर्व तक्रारी ऐकून घेतल्या व आपल्या मुत्सद्देगिरीनें व प्रेमळ स्वभावानें त्यांची समजूत घातली आणि ता. २० रोजीं नामदार बेगमसाहेब यांची स्वारी मुंबईहून आल्याबरोबर श्रीवर्धन येथील दोनहि समाजांतील लोकांच्या एकंदर हकीकतीचा बेगमसाहेबांकडे रिपोर्ट केला. बेगमसाहेबांना रा. ब. दिवाणसाहेब यांनीं सुचविलेली तडजोड पसंत पडून त्यांनीं त्या तडजोडीस मंजुरी दिली. नंतर ता. २१ सोमवार रोजीं सकाळीं ८॥ वाजतां रा. ब. दिवाणसाहेब हे स्वतः श्रीवर्धन येथें जाण्याकरितां मुरुडहून निघाले व श्रीवर्धन येथें तिसरे प्रहरीं पोहोंचल्यानंतर त्यांनीं आपलेसमक्ष मुसलमान लोकांनीं घातलेल्या तारा तोडून जाण्यायेण्याचा रस्ता व विहिरीवरील मार्ग खुला करून होळ्या लावण्यासंबंधीचे तंटे मिटवून एकी घडवून आणण्याचें श्रेय घेतलें. अशा प्रकारें माजी दिवाण कपाडिया यांनीं गेलीं तीन वर्षें सतत टिकविलेलें भांडण नामदार बेगमसाहेब यांच्या मंजुरीनें रा. ब. कोटक यांनीं अवघ्या तीन दिवसांत मिटविलें. या धोरणास अनुसरून संस्थानांत चालू असलेला सभाबंदीचा कायदा व इतर जाचक निर्बंध दिवाणसाहेब रद्द करतील अशी आशा आहे.

# फर्ग्युसन कॉलेजावरील संकटांचें आभाळ निवळलें

पुणें येथील फर्ग्युसन कॉलेजांत, गेल्या जुलै महिन्यांत, विद्यार्थी गोगटे यानें सर अर्नेस्ट हॉटसन यांच्यावर पिस्तुल झाडलें. त्या वेळेपासून त्या संस्थेच्या बिचाऱ्या चालकांच्या मागें 'ससेमिरा' लागला होता तो गेल्या आठवड्यांत सुटला हें कळविण्यास आम्हांस आनंद वाटतो. वास्तविक हा नुसता 'ससेमिरा' किंवा पाठीमागें जडलेलें नुसतें 'शुक्लकाष्ट'च नव्हतें, तर खिंडींत गांठून घातलेला दरवडा होता. कॉलेजला भेट देण्यास आलेल्या गव्हर्नरासारख्या बड्या निमंत्रित पाहुण्यावर कॉलेजच्याच विद्यार्थ्यानें पिस्तूल झाडणें, ही गोष्ट कॉलेजच्या अधिकाऱ्यांना मान खालीं घालावयास लावणारी होती यांत वादच नाहीं. दाक्षिण्य व शिष्टाचार यांना लांच्छनास्पद अशा प्रकारची गोष्ट कोणाहि स्वकीयांकडून घडली तर, जगांतल्या अत्यंत प्रबळ राष्ट्रानेंहि अत्यंत दुर्बळ अशा राष्ट्राचीहि क्षमा जवळ जवळ लोटांगण घालून मागावी अशी रीतच आहे. मग सरकारी ग्रँट घेत असलेल्या एका खासगी कॉलेजाच्या अधिकाऱ्यांनीं, गोगटे यानें केलेल्या अत्याचाराबद्दल, किती वेळां तोंडांत मारून घ्याव्या, व किती लोटांगणें घालावीं, याला सीमाच उरणें शक्य नाहीं. अर्थात् अशा प्रसंगीं जे कोणी कांहीं आपल्याला लावून बोलेल ते त्यांना निमूटपणें सोसणेंच प्राप्त होतें.

पण जगांत झाले तरी, शिष्टाचाराच्या नम्रतेला उलट शिष्टाचाराचा प्रतियोगी जाब मिळावा, ही देखील एक सर्वमान्य अशी रीतच आहे. "माझा पाय चुकून तुम्हांला लागला तर मीं तुम्हांला नमस्कार करावा; पण "झाली ही गोष्ट तुमच्याकडून बुद्धिपुरस्सर झाली नाहीं, केवळ चुकून झाली, तुम्ही तरी त्याला काय करणार!" अशी भावना व्यक्त करण्याकरितां, पाय लागलेला मनुष्यहि उलट नमस्कार करतो हीहि जगाची रीतच आहे. त्याप्रमाणें फर्ग्युसन कॉलेजच्या अधिकाऱ्यांनीं मुंबई-सरकाराकडे गोगटेकृत अत्याचाराबद्दल क्षमा मागितल्यावर, उलट सरकारी अधिकाऱ्यांनींहि कॉलेजच्या चालकांना असें म्हणावयास पाहिजे होतें कीं "दुर्दैवानें अशा गोष्टी अलीकडे घडतात खऱ्या! हवाच तशी उठली आहे! आणि मुलेंहि मुलांसारखीं अविचारीच असणार. त्याला तुम्ही काय कराल! मात्र अशा गोष्टीवरून काय बोध घ्यावयाचा तो घ्यालच."

आमच्या माहितीप्रमाणें मुंबई-सरकारचे विद्याधिकारी मि. बेकेट यांना जगाची व शिष्टाचाराची

ही रीत माहीत असल्यामुळें, त्यांनीं फर्ग्युसन कॉलेजच्या चालकांना विशेष त्रास दिला नाहीं. जाणवावयाचें तितकेंच जाणवून ते स्वतः गप्प बसले. पण कॉलेजच्या चालकांची ही शोचनीय स्थिति पाहून, ते बरे आयते खिंडींत सांपडले आहेत तेव्हां त्याना नागवून आपला हात उगवावा अशी दुर्बुद्धि, नव्हे दुष्टबुद्धि, संस्थेच्या कित्येक शत्रूंना झाली. आणि विशेष दुर्दैवाची गोष्ट ही कीं, या शत्रूंच्या मेळ्यांत शिरण्याची बुद्धि स्वतः संस्थेचे आजन्म सेवक असलेल्या अशाहि पांचचार प्रोफेसरांना झाली ! कोणीकडून तरी प्रि. महाजनी यांचा पाडाव व फजीति केल्यास आपल्या शत्रुत्वाचा सूड चांगला निघेल या तामसी भावनेनें त्यांना ग्रासून टाकल्यामुळें, हें करतांना स्वतः आपल्या संस्थेचें अनहित आपण किती करीत आहोंत याची शुद्ध त्यांना राहिली नाहीं, म्हणून गोगटेकृत अत्याचारानें जी आग पेटली त्यांतलें एक कोलीत सरकारनें हातीं घेतलें, त्याबरोबर दुसरेंहि एक कोलीत आपल्या हातीं घेऊन, हे घरचे शत्रू सरकारच्या जोडीला जाऊन उभे राहिले ! अशी सिद्धता झाल्यावर ज्यांचा या संस्थेशीं तसा प्रत्यक्ष जिव्हाळ्याचा संबंध नव्हता अशाहि कांहीं लोकांनीं एकेक कोलीत आपल्या हातीं घेऊन खेळविल्यास काय नवल ?

तात्पर्य, कॉलेजाच्या चालकांना, आपण मौनवृत्तीच्या खिंडींत पुरे गांठले गेलों, जो पाहावा तो एका हातानें आपणावर कोलीत खेळवीत असून दुसऱ्या हातानें शस्त्र उगारीत आहे असें कांहीं काळपर्यंत होऊन गेलें. पण त्यांच्या सुदैवानें, आणि इतरांच्या दुर्दैवानें, यासारखे अत्याचार इतर ठिकाणींहि यानंतर कांहीं दिवसांनीं घडले. उदाहरणार्थ, लाहोर युनिव्हर्सिटीचा पदवीदानसमारंभ व कलकत्ता युनिव्हर्सिटीचा पदवीदानसमारंभ हे प्रसंग अवांचत घडलेले नव्हते. म्हणजे पोलिसांचा कडेकोट पक्का बंदोबस्त तेथें आधींपासून होता. असे असतां दोनहि ठिकाणीं विद्यार्थ्यांकडूनच आणि गव्हर्नरावरच गोळ्या झाडण्यांत आल्या. अर्थात्, आगंतुक अत्याचाराबद्दलहि जर नांवें ठेवावयाचीं तर, या दोन युनिव्हर्सिट्यांच्या चालकांनाहि फर्ग्युसन कॉलेजच्या चालकांप्रमाणेंच नांवें ठेवावीं लागतील. पण तसें कांहींच घडल्याचें ऐकिवांत नाहीं. लाहोर व कलकत्ता येथील युनिव्हर्सिटयांची ग्रँट कमी झाली नाहीं, किंवा युनिव्हर्सिटीच्या अधिकाऱ्यांना शिस्त ठेवतां येत नाहीं या सबबीवर त्यांच्या चालकमंडळांवर होते त्याहून अधिक सरकारी प्रतिनिधीहि लादण्यांत आले नाहींत.

फार काय पण अशा प्रसंगीं शिस्त संभाळण्याची प्राथमिक जबाबदारी सर्वस्वी ज्यांच्यावर, त्या लाहोरच्या व कलकत्त्याच्या पोलीस अधिकाऱ्यांना देखील कांहीं शिक्षा दंड झाल्याचें ऐकिवांत नाहीं. असें असतां फर्ग्युसन कॉलेजच्या चालकांवरच तेवढा इतका गहजब कां ? तर त्यांच्यासंबंधीं कांहींचा दूषित पूर्वग्रह, व त्यांना असें खिंडींत धरून नागविण्याचा इतर कांहींचा आयत्या वेळचा उपद्व्याप ! यामुळें असें झाले कीं, कॉलेजच्या वतीनें एकादा शब्दहि कोणी बोलेल तो पापी ! तथापि, एकाची रीत सुटली म्हणजे दुसऱ्यालाहि रीत सोडण्याला विशेष संकट वाटत नाहीं. त्याप्रमाणें या प्रकरणांतून उद्भवलेला पत्रव्यवहार सरकाराशीं सुरू झाला, तेव्हां कॉलेजच्या गव्हर्निंग बॉडीनें, अर्थात् आपणाकडे घ्यावयाचा तो कमीपणा घेऊनच पण त्यांतल्या त्यांत थोड्या धिटाईनें, अशी तक्रार मांडली कीं कॉलेजांतील आकस्मिक अत्याचार व कॉलेजची नेहमींची शिस्त यांचा मेळ आम्ही कोणासहि घालूं देणार नाहीं ! कारण खरोखरच फ. कॉलेजची शिस्त इतर कोणत्याहि किंबहुना सरकारी कॉलेजाच्याहि शिस्तीपेक्षां केव्हांच कमी प्रतीची नव्हती.

पण मुलीकडील विहिणीचें नशीबच असें असतें कीं तिची बाजू कितीहि खरी असली तरी तिला वरपक्षाकडील विहिणीसमोर नाक घांसून पदर पसरलाच पाहिजे. सरकारी अधिकारी सरळ वादालाच उभे राहतील तर त्यांचा पराभव युक्तिवादानें करतां येईल. पण डेक्कन एज्युकेशन सोसायटीच्या एकंदर संस्थांना मिळून दरसाल जी सुमारें ६०-७० हजारांची ग्रँट ( मदत ) सरकाराकडून मिळते ती "आमच्या कांहीं अटी तुम्ही न मानल्या तर आम्ही देणार नाहीं," असें म्हणून जर सरकार आडमुठेपणानें आडवून बसलेंच तर मग काय करणार ? अर्थात् उत्तरें-प्रत्युत्तर सुरू झालीं. यापूर्वी सरकारी विद्याधिकारी यांनीं कांहीं गोष्टी सुचविल्या होत्या. उदाहरणार्थ, विद्यार्थी-वसतिगृहांवर देखरेख ठेवण्याकरितां नवीन बंगले बांधावे, व विद्यार्थ्यांशीं जिव्हाळ्याचा संबंध जोडण्यासाठीं एकेका प्रोफेसराच्या हाताखालीं शिकणाऱ्या विद्यार्थ्यांचें प्रमाण योग्य तें राहावें याकरितां शिक्षकांच्याहि कांहीं जागा वाढवाव्या. या सूचना आपापल्या परीनें योग्य होत्या म्हणून कॉलेजाच्या गव्हर्निंग बॉडीनें त्या मान्यहि केल्या.

पण एवढ्यावर न थांबतां खुद्द शिक्षणमंत्र्यांनीं कांहीं भलताच हट्ट घेतला, व कॉलेजाच्या नियामक मंडळावर यापुढें सरकारी प्रतिनिधी सरकाराकडून नेमले जावेत, तसेंच नियामक मंडळावर जातवारीच्या दृष्टीनेंहि कांहीं प्रतिनिधी अवश्य घ्यावे, अशा फाजील अटी सुचविल्या. तसेंच कॉलेजाच्या विद्यार्थ्यांची संख्या बाराशेंहून अधिक असूं नये अशी एक अट सुचविण्यांत

आली. याच सुमारास कॉलेजांतील घरच्याच कांहीं शत्रूंनीं मुंबईच्या वाडियाशेठजींच्या मागें दडून वरील अटींच्या मान्यास जथी–मथीची मदत करण्यास सुरुवात केली. त्यांनीं कोल्हापूरच्या महाराजांनाहि याच गर्दीत घोड्यावर घातलें. तात्पर्य, आकाश चोहोंकडून भरून यावें त्याप्रमाणें फर्ग्युसन कॉलेजाची स्थिति झाली. पेंच असा पडला कीं, सरकार म्हणेल ते सर्व निमूटपणें मान्य करावें तरी एक; नाहींतर दरसाल ६०--७० हजार रुपयांची मदत गमावण्यास सिद्ध व्हावें. अशा पेंचांत सांपडलेल्या, व विशेषतः तरुण पिढीला चांगलें व थोड्या खर्चांत शिक्षण सुलभ करून देणाऱ्या, संस्थेला काय चिंता उत्पन्न झाली असेल याची कल्पना कोणीहि करावी.

पण पराधीनता तर ओळखावी आणि स्वाभिमान तर सोडूं नये असें दुहेरी व व्यवहारकुशल धोरण कॉलेजाच्या चालक मंडळींनीं ठेवलें आणि शेवटीं त्यांना त्यांतच बरेंचसें यश आलें हें जाहीर करण्यास आम्हांला आनंद वाटतो. वर सांगितलेल्या तीन अटींपैकीं त्यांतल्या त्यांत विशेष वाईट अशा अटी दोन; म्हणजे कॉलेजाच्या नियामक मंडळावर सरकारी प्रतिनिधी नेमून घेणे, व त्याहूनहि वाईट अट म्हणजे संस्थेच्या कारभारांत जातवारीचें घातक तत्त्वें प्रविष्ट करूं देणें. या दोनहि अटींसंबंधानें गव्हर्निंग बॉडीनें सरकाराशीं पत्रव्यवहार करून विरोध व युक्तिवाद केला. त्याचा परिणाम असा झाला कीं या दोनहि अटी सरकारानें अखेर माघाऱ्या घेतल्या. "जातवार प्रतिनिधींसंबंधानें अट घालण्याचें खरोखर आपल्या मनांत केव्हांहि नव्हतेंच; फक्त ती बोलण्याचालण्यांत निघालेली अप्रत्यक्ष सूचना होती" असें बोलून या बाबतींत पदरीं पडणारा मूर्खपणा सरकारानें वाचविला. अर्थात् ती अट गेलीच; व "सरकारी प्रतिनिधी ग्रँट घेणाऱ्या संस्थांवर नेमणें तत्त्वदृष्ट्या योग्य असले तरी त्याचाहि आग्रह धरण्याचा सरकारचा विचार नाहीं," म्हणजे ती अटहि आज विनशर्त काढून घेतली असें सरकारानें कळविलें.

राहतां राहिली अट कॉलेजांतील विद्यार्थ्यांची संख्या १२ शेंवर आणून ठेवण्याची. ही अट देखील एका अर्थानें वाईटच, पण तितकीशी अपमानास्पद म्हणण्यासारखी नाहीं हें उघड आहे. शिक्षणाच्या दृष्टीनें कोणत्याहि संस्थेंत विद्यार्थ्यांची संख्या योग्य मर्यादेंत असणें इष्टच असते; व आपली साधनसामुग्री लक्षांत घेऊन कित्येक संस्था अशी मर्यादा आपली आपणच घालून घेतात. म्हणून केवळ त्या दृष्टीनें पाहतां या अटींत तितकें वाईट असें कांहीं नाहीं. किंबहुना फर्ग्युसन कॉलेजाचा आजपर्यंतचा इतिहास पाहिला तरी त्यांतील विद्यार्थ्यांची संख्या १५ शेंवर गेली, ती कदाचित् यंदांच पहिल्यानें असेल. पण या अटींत वाईट आहे तें इतकेंच कीं, मुंबईच्या सेंट झेव्हियरसारख्या कॉलेजांतहि आज विद्यार्थ्यांची संख्या बेसुमार आहे. असें असतां संख्यामर्यादेची ही अट त्याला न घालता फर्ग्युसन कॉलेजला घातली, याचा अर्थ जुलै महिन्यांत घडलेल्या अत्याचाराकरितां ही एक शिक्षा होय असा होतो. पण आम्ही वर सांगितल्याप्रमाणें, चोरांनीं खिंडींत गांठून हात बांधले व डोळ्यांपुढें कोलितें फिरवून डोळे दिपवले असतां, शीर सलामत राहून अंगालाहि एखादाच ओचकारा मिघण्यावर, जर चोरांच्या हातून सुटका झाली तर त्याबद्दल समाधानच मानून गप्प बसावें लागतें. त्याप्रमाणें फक्त विद्यार्थ्यांची संख्या मर्यादित करण्यावर हें गोगटे–हॉटसन प्रकरण एकदांचें संपलें असें पाहून कॉलेजाच्या कोणाहि हितचिंतकास हायसें वाटल्यावांचून राहणार नाहीं.

त्यांतहि आणखी मनाला बरें वाटण्याला थोडीशी जागा आहे. ती अशी कीं, संख्यामर्यादेची ही अट जरी आज ह्याच कॉलेजापुरती घालण्यांत आलेली आहे तरी, ती पुढेंमागें इतर कॉलेजांनाहि घालण्यांत येणारच नाहीं असें नाहीं, असें सरकारकडून आलेल्या अखेरच्या पत्रांत ध्वनित केलें आहे. म्हणजे या बाबतींत सरकार कांहीं एका नव्या धोरणाचें सूत्र वळण्याच्या विचारांत पूर्वीपासून आहे. आणि आज आयताच प्रसंग आला म्हणून तें सूत्र वळण्यांतील पहिला वळसा फर्ग्युसन कॉलेजच्या अंगावर बसला इतकाच याचा अर्थ होतो. यामुळें या अटीला शिक्षेचें जें स्वरूप एरवीं येणार तें थोडें कमी होतें. तात्पर्य, अशा रीतीनें या वादांत फर्ग्युसन कॉलेजला थोडासा चटका बसला, पण जखम झाली नाहीं, असें म्हटल्यास वावगें होणार नाहीं. प्रवाहांत वाहाणारें मातीचें भांडें व लोखंडाचें भांडें यांची गांठ पडली असतां धक्का लागला तर तो मातीच्या भांड्यालाच लागणार हें केव्हांहि सिद्धच आहे, तसेंच येथें घडलें. पण धक्का लागला त्यानें फक्त मातीच्या भांड्याच्या कांठाचा एक तुकडा गेला, खालील बाजूला किंवा तळांत भोंक पडून तें बुडण्याचा प्रसंग आला नाहीं, ही गोष्ट बरीच ह्मणावयाची. जमिनीवर शेण पडलें असतां तें थोडीतरी माती घेतल्याशिवाय कसें निघून निघेल! फर्ग्युसन कॉलेजच्या जिवावर आलेलें संकट शेपटीवर निभावून जाणार अशी चाहूल लागतांच, त्याच्या घरच्या शत्रूंपैकीं कांहीं लब्धप्रतिष्ठितांनीं सर्वश्रेष्ठ अधिकाऱ्याच्या कानाशीं लागून ते कान नीट करण्याचा म्हणजे पूर्ण दूषित करण्याचा प्रयत्न केला होता. पण असें समजतें कीं वाटेंतल्या द्वारपालानेंच त्यांचा निंदात्मक निषेध केला, व 'लष्कर सोडल्यावर तरी लष्करच्या भाकरी भाजण्याचें काम सोडणें योग्य नाहीं काय?'

असा यक्ष-प्रश्न करून त्यांना अपशकुन केला व तेथूनच मागें परतावलें.

असो; झालेल्या निकालांत आपण सर्वस्वीं यशस्वी झालों असें कॉलेजच्या चालकांना म्हणतांच येणार नाहीं. आणि आज साठसत्तर हजारांची ग्रँट बुडूं न देण्याकरितां विद्यार्थिसंख्या मर्यादित करण्याचा ओझरता वार त्यांनीं जाणून-बुजून अंगावर घेतला यांत शंका नाहीं. पण तो त्यांना नाइलाजानें घ्यावा लागला हें निश्चित आहे. म्हणून पुढें योग्य प्रसंग आल्यावर ही मर्यादा प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष रीतीनें उठवून लावण्याचा प्रयत्न कॉलेजचे चालक करतील असाहि आम्हांला भरंवसा वाटतो. हें सर्व बोलणें कॉलेजकडे पाहून झालें. पण सरकाराकडे पाहून बोलणें आहे तें शिल्लक उरतेंच. मात्र तें एका वाक्यांतच आम्ही असें म्हणून टाकतों कीं, हल्लींच्या शिक्षणमंत्र्यांनीं आपलें विकृत अंतरंग प्रगट करून आपली अब्रू बरीच गमावली. कुऱ्हाडीचे दांडे गोताला काळ अशी म्हण म्हणतात ती कांहीं खोटी नव्हे ! गेल्या डिसेंबरांत कॉलेजच्या गव्हर्निंग बॉडीचें अखेरचें उत्तर सरकाराकडे गेलें असतां त्याचें उत्तर शिक्षणमंत्र्यांकडून मार्चच्या शेवटच्या आठवड्यांत हातीं यावें ! यांत दिसून येणारा विलंब बुद्धिपुरस्सर नाहीं असें कोण म्हणेल ? कॉलेजच्या पत्राचा विचार करण्याला बेजबाबदार सरकाराला ३ महिने, पण ६०-७० हजार रुपयांची ग्रँट वांचवावी कीं बुडूं द्यावी याचा विचार करण्याला मात्र कॉलेजच्या तीनहि चालक मंडळांना मिळून अवघे आठच दिवस मिळावे, याला खिंडीत गांठून दरवडा घालणें अशी उपमा दिल्यास ती कोण वावगी म्हणेल ? हातीं अधिकार असला म्हणून सौजन्य सुटावेंच असें नाहीं. पण तें या कामीं शिक्षणमंत्र्यांनीं सोडलें ! व आपला खरा जातिस्वभाव प्रगट केला असेंच कोणीहि म्हणेल.

# जातिभेदाचें इष्टानिष्टत्व

( लेखक—गो. रा. राजोपाध्ये बी. ए. )

## लेखांक १

वरील विषयावर बॅ. सावरकर यांनीं केसरींत लेखमाला लिहून जातिभेदाचें प्रस्तुत काळीं अनिष्टत्व प्रतिपादन केलें; त्यावर श्रीयुत गो. म. जोशी यांनी जातिभेदाची दुसरी बाजू मांडून त्याचें मुख्यतः अनुवंशाच्या दृष्टीनें इष्टत्व सिद्ध केलें. जातिभेदाचा विचार व्यक्तिहितवाद व समाजहितवाद यांच्या दृष्टीनेंहि करतां येण्यासारखा आहे. सध्यां समाजहितवाद किंवा समाजसत्तावाद जोरानें व झपाट्यानें प्रसार पावत आहे.तेव्हां जातिभेद ही संस्था जुनीपुराणी म्हणून फेकून देण्यासारखी आहे किंवा या वादाच्या दृष्टीनें तींतून कांहीं घेण्यासारखें आहे हा विचार हिंदु समाजास अत्यंत महत्त्वाचा आहे. म्हणून या विचारास चालना देण्यासाठीं वरील विषयाची आणखी एक बाजू मांडण्याचें योजिलें आहे.

हिंदु तत्त्वज्ञानाचें कौतुक करणारे शेंकडो प्राचीन व पौर्वात्यच काय पण अर्वाचीन व पाश्चात्य पंडितहि आढळतात; पण हिंदु समाजरचना पाहून नाकें मुरडणारे पाश्चात्यच नव्हे तर खुद्द हिंदु सुशिक्षित लोकहि पुष्कळ सांपडतात. कोणत्याहि समाजाचें तत्त्वज्ञान व त्याचा आचार यांची सांगड असते हा सिद्धांत त्यांना पटतो; पण हिंदु तत्त्वज्ञान व हिंदु लोकांचा जातिभिन्नत्वानें प्रकट होणारा आचार यांची सांगड आहे कीं नाहीं हा प्रश्न पुढें आल्याबरोबर "कोणीकडे तें अद्वैताचें—अभेदाचें तत्त्वज्ञान आणि कोणीकडे हें जातिभेदरूपी द्वैताचें-भेदाचें साम्राज्य !" हे उद्गार चटकन् त्यांच्या तोंडांतून येतात. पण असे उद्गार येण्यास 'जातिभेद' या सामासिक शब्दांतील भेद या शब्दाशिवाय दुसरें कारण दिसत नाहीं. जातिभेद हा शब्द प्रथम Caste system या इंग्रजी सामासिक शब्दाचें भाषांतर म्हणून मराठींत आला. या चुकीच्या भाषांतरानें ही सर्व दिशाभूल केली आहे. यापेक्षां जातिव्यवस्था—पद्धति—संस्था हें भाषांतर अधिक बरोबर आहे. म्हणून या लेखांत ' जातिभेद या शब्दाऐवजीं 'जातिसंस्था ' हा शब्द योजण्यांत आला आहे.

### धर्माचें स्वरूप

जातिसंस्था हें हिंदु समाजव्यवस्थेचें प्रधान अंग आहे. हिंदु समाजव्यवस्था ही हिंदुधर्मानें लावून दिली आहे. भाषा बदलली असतां जसें व्याकरण बदलतें तसा व्यवहार बदलला असतां धर्म बदलला पाहिजे. अर्थात् जातिसंस्था मोडणें क्रमप्राप्त आहे. पण हा कोटिक्रम हेत्वाभासपूर्ण आहे. व्याकरणशास्त्र व धर्मशास्त्र हीं अगदीं भिन्न शास्त्रें आहेत. वस्तुस्थितीचें यथातथ्य वर्णन करणारें

(Descriptive of facts) हा एक शास्त्रांचा प्रकार व कोणती तरी इयत्ता ठरवून मानवी कृत्यांतील गुणदोष तिच्या कसोटीस लावणारीं (Appreciative of facts) हा दुसरा प्रकार. पहिल्यांत वस्तुस्थितिविषयक विचारांची (Is-Judgments) व दुसऱ्यांत कर्तव्यविषयक विचारांची (Ought-Judgments) व्यवस्थित मांडणी केलेली असते. व्याकरण शास्त्र पहिल्या वर्गांत मोडतें व धर्मशास्त्राचा अंतर्भाव दुसऱ्या वर्गांत होतो. भाषेची स्थिति दर्शविण्याकरितां व्याकरणशास्त्राची प्रवृत्ति आहे. परंतु मनुष्याच्या प्राप्तव्याच्या दृष्टीनें त्याचा आचार कसा असावयास पाहिजे हें दर्शविण्याकरितां धर्मशास्त्राची प्रवृत्ति आहे. तेव्हां भाषेच्यामागें जसें व्याकरणाला जावें लागतें तसें आचाराच्या किंवा व्यवहाराच्या मागें धर्मशास्त्राला जावें लागत नसून व्यवहारच बदलला असल्यास धर्मशास्त्राप्रमाणें तो कायम ठेवला पाहिजे असें ठरतें.

मनुष्याचें किंवा मनुष्य समाजाचें प्राप्तव्य कोणतें हें हिंदु तत्त्वज्ञानानें ठरविलें आहे. तें प्राप्तव्य करून घेण्यास साधनें कोणतीं हें निसर्गाचे नियम व मनुष्याच्या अंतःकरणाचे व इंद्रियांचे स्वभाव यांवरून ठरतें. तत्त्वज्ञानाचे सिद्धान्त, निसर्गाचे नियम व मनुष्यस्वभाव यांचा मेळ घालून धर्मशास्त्रानें मनुष्याचें व मनुष्यसमाजाचें आचरण कसें असावें यांचें विधान केलें आहे. धर्माच्या आधारभूत या तीन गोष्टी त्रिकालाबाधित म्हणजे सनातन असल्यामुळें धर्मालाहि सनातन अशी संज्ञा आहे. धर्म हा कोणत्याहि विशिष्ट राजकीय अगर सामाजिक परिस्थितीला अनुलक्षून बनविला नाहीं कीं, जी परिस्थिति बदलली असता धर्म बदलला पाहिजे. धर्म सनातन आहे तशी त्यानें लावून दिलेली समाजव्यवस्थाहि सनातन आहे. या समाजव्यवस्थेनें जातिधर्म व कुलधर्म यांची आवश्यकता निश्चित केल्यामुळें "जातिधर्माः कुलधर्माश्च शाश्वताः" अशी जातिधर्म व कुलधर्म यांना शाश्वत हें विशेषण देणारीं वचनें भगवद्गीता व स्मृती यांमध्यें आलीं आहेत.

जो प्रजा किंवा लोकधारणा करतो तो धर्म अशी धर्माची व्याख्याच आहे. लोकधारणेमध्यें समाजांतील सर्व व्यक्तींचें एकसमयावच्छेदानें ऐहिक व पारमार्थिक कल्याण व समाजाच्या वंशाचें व संस्कृतीचें रक्षण इतक्या गोष्टींचा समावेश होतो. इतक्या गोष्टी सिद्ध करण्यासाठीं धर्माची प्रवृत्ति आहे. या गोष्टी सिद्ध करणें हेंच मनुष्यसमाजाचें प्राप्तव्य आहे. हें प्राप्तव्य कोणत्याहि काळीं बदलत नाहीं. हें प्राप्तव्य ज्या आचरणानें प्राप्त होईल अशा आचरणाच्या नियमांचा संग्रह धर्मशास्त्रांत आहे. अर्थशास्त्र, नीतिशास्त्र, राज्यशास्त्र इत्यादि समाजविषयक व प्राणिशास्त्र, मानसशास्त्र इत्यादि व्यक्तिविषयक सर्व शास्त्रांचा अंतर्भाव धर्मशास्त्रांत आहे. धर्मशास्त्रानें या सर्व शास्त्रांची एकवाक्यता करून दिली आहे. "The great fact which science in all her branches shows is the universality of laws" हा सिद्धान्त पाश्चात्यांनींहि मान्य केला असल्यामुळें त्यावरून धर्माची व्यापकता कोणासहि पटण्यासारखी आहे.

वर जीं धर्माचीं लक्षणें आलीं आहेत तीं जगांतील इतर धर्मांस लागू पडत नाहींत. वरील अर्थानें इतर धर्म 'धर्म' या संज्ञेस पात्र नाहींत. बौद्ध, ख्रिस्ती, मुसलमानप्रभृति इतर धर्म सत्य, अहिंसा, अस्तेय, दान, दया इत्यादि व्यक्तिगत साधारण नियमच सांगून मोकळे झाले आहेत. हे साधारण नियम अर्थ, काम हे पुरुषार्थ साधीत असतांना व्यवहारांत पाळणें शक्य व सुलभ होईल अशा प्रकारच्या व्यवहारासाठीं समाजरचना कशी असावी व तत्संबंधीं विशेष नियम प्रत्येकानें कोणते पाळले पाहिजेत हें हिंदुधर्मानें सांगितलें आहे, तसे अन्य धर्मांनीं सांगितले नाहीं. हे विशेष नियम इतर धर्मीय समाज आपापल्या बुद्धयनुसार शोधून काढून त्याप्रमाणें आपला व्यवहार चालवितात. या बाबतींत पाश्चात्य समाजांचेंच अनुकरण चोहोंकडे होत असल्यामुळें त्या समाजांचीच स्थिति तुलनेस घेण्यास प्रत्यवाय नाहीं.

### पाश्चात्यांचा व्यवहार व त्यांची समाजस्थिति

पाश्चात्यांच्या एकंदर व्यवहाराचें निरीक्षण केलें असतां असें दिसून येतें कीं, त्यांच्या ख्रिस्ती धर्मानें घालून दिलेल्या नियमांची दिशा व त्यांच्या व्यावहारिक नियमांची दिशा हीं अगदीं भिन्न आहेत. इतकेंच नव्हे तर त्यांच्या व्यावहारिक नियमांचीहि परस्परसंगति नाहीं. त्यांच्या नीतिशास्त्राचे (Ethcis) सिद्धान्त अर्थशास्त्राच्या (Economics) सिद्धांताशीं जमत नाहींत. दोहोंचे राजनीतिशास्त्राच्या (Politics) सिद्धान्ताशीं जुळत नाहींत. सर्व प्रकारचीं ऐहिक सुखें व विषयोपभोग घेण्यास प्रत्येक व्यक्ति स्वतंत्र आहे. असा उपभोग घेणें हा तिचा हक्क आहे. मात्र त्या व्यक्तीनें दुसऱ्याच्या तसल्या हक्काच्या आड येतां कामा नये. अशा प्रकारें प्रत्येकानें आपापल्या हिताचा प्रयत्न केला असतां सहजच सर्व समाजाचें हित घडून येईल अशा प्रकारची पाश्चात्यांची विचारसरणी आहे व त्याप्रमाणें त्यांनीं हक्काच्या तत्त्वाचा स्वीकार केला आहे. हक्क हें त्यांच्या समाजाचें नियामक व त्यांच्या समाजास आधारभूत तत्त्व आहे, व या

तत्त्वाच्या आधारावर त्यांचा व्यवहार चालला आहे. त्यांची समाजस्थिति पाहिली तर संपत्तीची विषमता. अलोट संपत्ति व भीषण दारिद्र्य त्यांच्या समाजांत नांदत असल्याचें दिसून येतें. कांहीं थोडे लोक अतिशय संपन्न आढळतात तर हजारों कुटुंबें बेरोजगार असून त्यांस खाण्याची देखील पंचाईत पडते. रोजगारावर असलेले लोक संप वगैरे साधनांनीं मालकाशीं नेहमीं तंटे करीत असतात. तीव्र जीवनकलहामध्यें पुरुषांची तशीच स्त्रियांचीहि दैना उडत आहे. एकंदरींत ऐहिक सुखलाभ हें जें या लोकांचें ध्येय तेंही त्यांस प्राप्त होण्याचें कठिण पडत आहे; मग समाजस्थैर्याभावीं परमार्थाच्या किंवा आत्मोन्नतीच्या गोष्टी तर दूरच राहिल्या! इतर समाजांतील लोकांचें द्रव्यशोषण करून सुद्धां या समाजांची ही स्थिति; मग इतर समाजांनीं जागें होऊन त्यांचें द्रव्यशोषण थांबविल्यास या समाजांतील अंतःकलह व बेरोजगारी किती वाढेल व त्यांच्या माऱ्यापुढें त्या समाजाचा कसा निभाव लागेल याची कल्पनाच करवत नाहीं!

### हक्काच्या तत्त्वाचे परिणाम

वरील अनर्थ हक्काच्या तत्त्वामुळें कसे घडतात याचा थोडा विचार करूं. हक्काच्या कल्पनेचा संबंध मनुष्याच्या अहंकारवृत्तीशीं आहे. हक्क म्हटला कीं, त्याबरोबर अहंकार वृत्तीचा पुरस्कार (self-assertion) आलाच. या वृत्तीच्या पुरस्कारामुळें व्यक्तिव्यक्तींचा जो एकमेकांशीं संबंध येतो तो अर्थात् विरोधाचा येतो. हा व्यक्तिगत विरोध समान हिताहिताच्या व्यक्तींचे जे वर्ग बनतात त्या वर्गांत पसरतो व समाजांतील प्रेम व शांति नाहींशी करतो. प्रत्येकजण दुसऱ्याचा पाडाव करून आपलेंच घोडें पुढें दामटूं पाहतो व त्यामुळें समाजांत एकसारखी अहमहमिका-चढाओढ (Competition) माजून राहते. या झटापटींत जे मागें राहतात त्यांचे फार हाल होतात. व जे पुढें सरतात त्यांचाहि आयुःक्रम शांततेचा असतो असें नाहीं. कारण एकदां मिळालेली जागा कायम ठेवण्यास त्यांस पुनः झगडावें लागतें. अशा प्रकारें समाजांत सारखी खळबळ चालू राहते. या अशांतीमुळें सुखाचा तर पत्ता लागत नाहींच. मात्र अधम मनोवृत्तींस अवकाश सांपडून त्यांचेंच प्राबल्य माजतें. मनुष्यास कार्योन्मुख करणाऱ्या मानसिक प्रवृत्तींच्या उच्चनीच भावांची श्रेणी पाश्चात्य नीतिशास्त्रज्ञांनींच केली आहे. ती अशी—(१) औदार्य, दया, पूज्यभाव या मनोवृत्ति (२) आत्मोन्नतीची इच्छा (Love of culture) (३) स्वातंत्र्याची व सत्तेची हाव व इतर मनोवृत्ति (४) सर्वांत खालीं विषयसुखेच्छा (Martineu's table of springs of action). हक्काच्या तत्त्वानें व अहंकाराच्या पुरस्कारानें ज्या मनोवृत्तींचा विकास होऊं शकतो त्यांची मजल फार तर स्वातंत्र्याची इच्छा येथपर्यंत जाऊं शकते, या वरील मनोवृत्तीपर्यंत जात नाहीं व यावरील मनोवृत्ती तर मनुष्याच्या पूर्णत्वाच्या द्योतक आहेत. सारांश, हक्काच्या तत्त्वानें मनुष्याचें पूर्णत्व जें काय आहे त्याचा मार्ग खुटतो इतकेंच नव्हे, तर त्या दिशेनें त्याची प्रगति न होतां उलट अधोगतिच होते.

### हक्क का स्वधर्म?

सर्वांचें एकसमयावच्छेदानें ऐहिक व पारमार्थिक कल्याण साधावयाचें तर प्रपंच व परमार्थ, व्यक्तिहित व समाजहित यांना पोषक कर्में प्रत्येक व्यक्तीनें करावयास पाहिजेत. परमार्थानें त्यास पूर्णत्वाप्रत जावयाचें आहे. प्रपंच ही तिकडे जाण्याचे मार्गांतील पायरी आहे व प्राणिमात्राची प्रवृत्तिहि प्रपंचाकडेच आहे. तेव्हां तो साधणें इष्ट व अवश्य आहे. व्यक्तीनें समाजहित साधणें हाहि परमार्थच आहे व ते साधण्यांत व्यक्तीचे हितहि आहे. कारण समाजहितानें समाजस्थैर्य साधलें तरच व्यक्तीला आपले हित साधण्यास अवकाश मिळेल. समाजरूपी शरीराच्या सुस्थितीवरच व्यक्तिरूपी अवयवांची सुस्थिति अवलंबून आहे. अशा प्रकारें पाहिल्यास प्रपंच व परमार्थ आणि व्यक्तिहित व समाजहित यांत मुळींच विरोध नाहीं. अशा प्रकारच्या प्रपंचाशिवाय किंवा परमार्थाशिवाय सर्व व्यक्तींचें खरें हित एकसमयावच्छेदानें कधींच होणार नाहीं इतकेंच नव्हे, तर ऐहिक सुखलाभहि पुरता होणार नाहीं. 'धर्मादर्थश्च कामश्च' असें म्हटलें आहे त्याचें बीज हेंच.

प्रपंच, परमार्थ व समाजहित यांपैकीं हक्काच्या तत्त्वानें कोणतीच गोष्ट धड साधत नाहीं. तर मग कोणत्या तत्त्वाचा स्वीकार केला असतां या गोष्टी साधतील? ते तत्त्व म्हणजे शास्त्रांत ज्याला स्वधर्म म्हणतात तो स्वधर्म म्हणजे स्वतःचें विशेष कर्तव्य (Duty). हक्काचें रूपांतर कर्तव्यांत केलें पाहिजे. तें केल्याबरोबर अहंकारवृत्तीच्या पुरस्काराचें तिच्या संयमांत (Self-restraint) व चढाओढीचें सहकारित्वांत (Co-operation) रूपांतर होतें. या त्रयीचें महत्त्व समाजहिताच्या दृष्टीनें पाश्चात्यांनाहि मान्य करावें लागलें आहे. अहंकार वृत्तीचा संयम म्हणजे स्वातंत्र्याभाव असें कोणास वाटेल, पण तसें नसून खरें स्वातंत्र्य त्यांतच आहे. (Freedom does not consist in the absence of restraint, but in self-restraint —Wellis.) (The idea of duty is more

potent for social improvement than the idea of self-interest.—Henry George.) (Right is the formula of resistance and not of association. It may destroy; it cannot found.—Mazzini.)पाश्चात्यांनीं हक्काचें तत्त्व उराशीं धरलें आहे याचें कारण त्यांची आत्मविषयक कल्पनाच वैयक्तिक व आकुंचित आहे, हिंदु लोकांच्याइतकी उदात्त व व्यापक नाहीं हेंहि पाश्चात्य मान्य करूं लागले आहेत. (Our self is individualistic. It is a particular something, standing in a relation of perpetual competition, if not of conflict with other individuals. We have not that grand, lofty and universal conception of the self which has been developed in your Indian philosophies—Wellis.) या आत्मविषयक कल्पनेच्या भिन्नतेमुळें पाश्चात्य समाजांत हक्काचें तर हिंदु समाजांत कर्तव्याचें तत्त्व स्वीकारलें गेलें आहे व त्यामुळें दोनहि समाजांची रचना भिन्न बनली आहे.

# शिवाजीराजे व वतनें

( ले.—वत्स्य. )

महाराष्ट्रीयांत वतनाची आसक्ति अतिरिक्त आहे. वतनाकरितां ते वाटेल तें करतील, भांडतील, दिव्य करतील, खून करतील, धर्मान्तरहि पत्करतील पण वतन सोडणार नाहींत.जगण्याला जितकें महत्त्व तितकें त्याच्या साधनालाहि महत्त्व सहजच येतें. वतनलोभ हा फार पूर्वीपासून आम्हा महाराष्ट्रीयांस मनस्वी आहे असें म्हणतात; आणि शिवाजीमहाराजांच्या राज्यव्यवस्थेंत जुनीं वतनें अमानत करावयाचीं व नवीन तर द्यावयाचीं नाहींत असा दंडक दिसून येतो. अशा परस्परविरुध्द मनस्थितींत शिवरायांनीं त्याच लोकांसह एवढें मन्वंतर कसें केलें? याहून विशेष आश्चर्याची गोष्ट ही कीं, स्वतः शिवाजीमहाराज अन एखादें मोठें वतन संपादण्याच्या प्रयत्नांत होते! तेव्हां त्या संबंधांतील कांहीं उदाहरणें पुढें उद्धृत केली आहेत; तीं वाचून काय समजावयाचें तें वाचकांनीं समजावें.

शिवाजी राजांनीं ह्या वतनाच्या बाबतींतील आपला नियम काय तो एका प्रसंगानें स्पष्टच असा सांगितला आहे कीं, 'आपल्या राज्यांत वतनें द्यावयाचा दंडक नाहीं.' (शि. च. साहित्य खं. २ ले. ४३८.) आणि ह्या नियमानुसार 'महालोमहालाच्या देशमुख्या व देशपांडेपणाचीं वतनें सरकारांत अमानत आहेत' असेंहि ले.२३९ मध्यें आलें आहे. दुसऱ्याहि एका निमित्तानें 'नवे न करणें' असें श. १५८३ मध्यें शिवाजीनें आपल्या अधिकाऱ्यांस बजाविलें आहे. तात्पर्य, जुनें अथवा नवें वतन चालू करावयाचें नाहीं, हा शिवाजीचा शिरस्ता आहे. त्या नियमाच्या परिपालनाबरोबर त्याच्या अपवादांच्या अवलंबनानेंहि शिवाजीनें किती कार्य केलें हें पाहिलें पाहिजे. आणि हें पहात असतां असें दिसून येतें कीं, नियम आणि अपवाद हे दोनहि सिद्धसाधक आहेत; एकमेकांचे पूरक आहेत; ते खऱ्या कार्यकर्त्यांच्या आड येऊं शकत नाहींत; किंवा हे दोनहि एकमेकांच्या आड न येतां कसे लागू करावयाचे ह्यांतच कर्त्याची थोरवी आहे. वांकड्या मेढीस वांकडे नेम घेऊन शेवटीं मेढ व त्यावरील मंडप सरळ उभारावयाचा हेंच तर 'योगः कर्मसु कौशलम्' होय. याच दृष्टीनें पाहतां वतनाच्या बाबतींत शिवाजीमहाराजांचें धोरण भिन्नरूपी पण कार्यकारी दिसतें. कसें तें येणेंप्रमाणें—

(१) शिवाजीनें आपली मुलगी राजकुंवर ही ज्या घराण्यांत दिली व जेथील जिऊबाई ही आपली सून केली त्या शिर्क्यांनीं कोंकणांत वसाहत करून वसाहत करूं न देणाऱ्या लखम सावंतास गप्प बसविलें. ह्या कामगिरीमुळें शिवाजी संतुष्ट झाला. तेव्हां पिलाजी राजे शिर्क्यांनीं शिवाजीस विनंति केली, "स्वामी उर्जित करतात, तरी अक्षये उर्जित करावें. मामले दाभोळचें देशमुखीचें वतन देऊन चालवावें." ह्यावर शिवाजीनें वर उल्लेखिलेला स्वतःचा दंडक सांगितला. पण लगेच पुढें असेंहि सांगितलें कीं, "तुम्ही स्वामिकार्य केलें व सोयरीकहि तुम्हाशीं झाली. तरी चि. राजकुंवरबाईस पुत्र होईल तेव्हां हें देशमुखी वतन आपण देऊं." पुढें हें वतन खंडो बल्लाळ चिटणिसांस दिलें असतां त्यांजकडून काढून शिर्क्यांस दिलें आहे.

(२) आणखी एका प्रसंगानें पाटिलकीचें वतन नव्यानेंच चालू केलें आहे. तो प्रसंग हा. "शिवाजीमहाराज सिवापुराग येऊन बाग आमराई लावावयाकरितां धरणाचें काम लाविलें. ते समई प्रांत भोवरगांव म्हणजे आसपासचे व जागोजागाचे पाटील कामास जमा आले. धरणाचे पाणी

निघावयास धोंडा मोठा होता. त्याना पाणी निघेना. येस पाटील कोंढवेकरबु॥ ह्यानें धोंडा फोडून पाण्यास मार्ग केला. तेव्हा येस पाटलावर महाराज मेहरबान होऊन बक्षीस देऊ लागले. तेव्हां त्याने अर्ज केला की, वरकड बक्षीस दिले तर खाऊन जाईल. कोंढवेबु॥ येथील पाटिलकीचा कारभार आपणाकडे आहे. पण त्याबद्दलची इनाम जमीन नाहीं ती दिली पाहिजे. त्यावरून महाराजांनीं जमीन इनाम दिली. ही पाटिलकी मूळ मलिकशा मुसलमानाची होती."

(३) आरमाराची बाजू शिवाजी राजांनीं नवीनच व उत्तम सजविली. तेव्हां जंजिरे कुलाब्याकडील तांडेल कोळी मंडळीस नांवाजून, पालख्या, हुद्दे, रुमाल देऊन केवढा उत्साह व आपलेपणा उत्पन्न केला हें पाहण्यासारखें आहे. त्या प्रसंगीं मुसलमान पातशहाकडून मूळची ज्यास पाटिलकी होती त्या कोळ्याचा वरीलप्रमाणें बहुमान तर केलाच. शिवाय सरपाटिलकी नवीनच उत्पन्न करून तो अधिकार दिला. (त्रै. व.९ पृ. १३४-१३५.) एकदां तर असें झालें कीं खेडेंबारें येथील देशकुलकर्णी व त्याचा मुतालिक ह्यांत वतनाबद्दल तंटा लागला आणि मुतालिकाला शिवाजीमहाराजांच्या पदराच्या सरकारकुनानें पाठीशीं घातलें आहे असें तंट्याच्या हकीकतींत दिसून आलें. तेव्हां शिवाजीनें देशकुलकर्णाचा मूळ मालक जो त्यास म्हटले 'सखो भिकाजी, तुझे वतन खरे, पुढे साहेब तुझें तुला देतील परंतु चार दिवस राज्यकारभाराकरितां सरकार कोणाची मते मोडतां येत नाहीत. याजकरितां प्रस्तुत निवाडा करिता येत नाही' (कित्ता पृ. १५८) सर्जेराव जेधे यांचे वतन अमानत केलें होतें, पण जसेच्या तसेंच ते पुनः परत त्यांस बहाल करून चालू ठेविलें. हैबतराव सिलिमकरांकडे गुंजणमावळच्या देशमुखीचा कारभार पूर्वीप्रमाणें सोंपविला. पण वतनी जमिनीच्या उत्पन्नाऐवजीं सालिना एक हजार टक्के देण्याचें ठरविलें अथवा १०।१५ खंडी गल्ला धान्य देऊन त्याची किंमत ह्या हजार टक्क्यांतून वजा घालावयाची व उरेल ते टक्के द्यावयाचे असा नियम केला. प्रथम म्हणजे श.१५६९ मध्यें जें वतनी उत्पन्न सुरू ठेवलें तेंच पुढें श. १५७३ त शिवाजीनें अमानत केलें. पण राजमाता जिजाबाईनें 'चिरंजीव सिऊबाचे खुर्दखताचा उजूर न करणें' असें म्हणून तेव्हांच ते चालू राखिले आहे. अशीं आणखी भिन्नभिन्न प्रकारचीं बरींच उदाहरणें देतां येतील. इनामें जुनीं चालू ठेवण्याचीं उदाहरणें तर पुष्कळच आहेत.

वर नमूद केलीं आहेत त्या उदाहरणांवरून असें दिसून येतें कीं, शिवाजीनें जुनीं वतनें चालू ठेवणें, नवीं सुरू करणें, आप्त-स्वकीयांस इनामें देणें, एकाचे काढून दुसऱ्यास देणें, रोकड अथवा धान्याचे रूपानें इनामी व वतनी उत्पन्न देणें, प्रधानादिकांची भीड संभाळून त्यांचीं मनें न दुखावीं म्हणून न्याय देण्यास सबुरी करणें; इ. इ. प्रकारांतरानें आपला मामला थाटला आहे. शिवाजीच्या मनाचा कल, इनाम वंशपरंपरेनें देण्याच्याविरुद्ध आहे हें खरें; पण नियम हीच अडचणीची बाब होत असेल तर त्या नियमाचे अपवादच सढळ हातानें शिवाजीनें अनुसरिले आहेत. म्हणजे साधनसिध्दीसाठीं स्वराज्याचें उदाहरण त्यानें सोडवून दाखाविलें असें नाहीं. पण एवढ्यावरून त्याचा शिरस्ता असा कांहींच नव्हता असें म्हणणें केवळ चूक होईल.

•वतन ह्याचा पुरा व मूळ अर्थ गांवकीच वतन ह्यांतच व्यक्त होतो. वतनाचा लोभ आम्हांला अतिशय. तो प्राधान्यतः ह्या वतनाला अनुलक्षून आहे. कारण तें अधिक स्थिर शाश्वत व गोतमान्य असे. शिवाजीनें बकाजी फर्जंदास खामगांवची आपली वडिलार्जित पाटिलकी देतांना हें कबूल केलें आहे कीं, गोतांत इजत म्हणजे मान्यता पावावयाकरितां असले रयतमान्य वतन श्रेष्ठ आणि ह्या प्रकारच्या वतनांतील वरची श्रेणी म्हणजे देशमुखी होय. हीच देशमुखी मिळविण्यासाठीं स्वतः शिवाजीमहाराजांनीं प्रथमपासून प्रयत्न केला आहे. सरदेशमुखी ही देशमुखीपेक्षां वरची असली तरी रयतमान्य नव्हे व सरकारनिर्मित आहे. पेशव्यांनींहि पुढें ते स्वतः मूळचे व पिढ्यानुपिढ्यांचे देशमुख असतांना देशावर आल्यावर आणि मुख्य प्रधानाइतक्या श्रेष्ठ दर्जाच्या पायरीवर असतांनाहि सरदेशपांडेपणा मिळविण्याचा प्रयत्न केला आहे. गराडे गावाची पाटीलकीहि पेशव्यांनीं संपादिली होती तीच पुढें त्यांनीं पुरंदऱ्यांना दिली. सारांश, वतनप्रेम हें शिवाजीच्या पूर्वीपासून पेशवाईअखेर व छत्रपतीपासून तों राबत्यामहारापर्यंत सर्वांना सारखेंच होतें. त्या वेळच्या देशविभागांतहि वतनी व सरकारी असे दोन प्रमुख प्रकार असत. त्यांचीं नांवेंहि वेगवेगळीं आहेत. या वतनाच्या किंवा इनामाच्या बाबतींत विचारांत घेण्यासारखी गोष्ट ही कीं, शिवाजीमहाराजांस राज्याभिषेक झाला तेव्हां 'अवघे अष्टप्रधान उभे राहून विनंती केली, जे महाराज आपण शाश्वत नरेंद्र सिंहासनारूढ जाहले. तसेंच आमास तदांशत्व दिलें. परंतु या दतास शाश्वताभये असावे. यावर शिवाजीमहाराज बेल, भंडार व दवणा, आंबेचे हळद कुंकू व निर्माल्य आणून आपले हातीं घेऊन सिंहसनावरून बोलले जे 'ही पदे तुम्हास तुमचा यावत वंश असेल तावत खलेल न करता

दिल्ही' ( शि. च. सा. खं. १ ले. ९०) हा उतारा अप्रसिद्ध सभासदी बखरींतील आहे.

शिवाजीची राज्यपद्धति पुढील राज्यकर्त्यांनीं अवलंबिली नाहीं म्हणून जो एक भेद दाखविला जातो आणि ही चूक झाली असे म्हटलें जातें त्याचाहि सोदाहरण विचार व्हावयास पाहिजे. हा भेद गांवकामगारांची वतनें अथवा अग्निहोत्री, संत-महंत, अन्नछत्रें, औषधें देणारे वैद्य, शास्त्राभ्यासी इत्यादिकांना दिलेलीं किंवा चालविलेलीं वतनें इनामें ह्यांत दिसून येत नाहीं; तर सरकारी कामगार आणि फौजी अंमलदार ह्यांना तोडून द्यावयाच्या सरंजामी वगैरे उत्पन्नाच्या बाबतींत तो भेद दिसून येतो. आणि ह्याबद्दल स्वतंत्रच विचार करणें प्राप्त आहे. ह्याहि संबंधांत शिवाजीनें दिलेलीं इनामें व वतनें आहेत एवढेंच येथे लिहून ठेवणें इष्ट होय.

# महाराष्ट्राच्या राष्ट्रगुरूची पन्नासावी पुण्यतिथि

महाराष्ट्राचे राष्ट्रगुरु कै. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांच्या निधनास तिथीनें गेल्या रविवारीं पन्नास वर्षे पूर्ण झालीं. पारतंत्र्याच्या ११४ वर्षांच्या काळांत हा पन्नास वर्षांचा काळ फार मोठा व महत्त्वाचा होय. शास्त्रीबोवांच्या निधनापूर्वी व नंतरहि इंग्रजी अंमल महाराष्ट्रावर कायम असला तरी निधनानंतरच्या काळांत साऱ्या देशभर जनतेच्या विचारांत व आचारांत पुष्कळच स्थित्यंतर घडून आलें आहे यांत शंका नाहीं. या स्थित्यंतरास राजसत्ता व काळाची करणी हीं तर कारण आहेतच, पण त्याशिवाय शास्त्रीबुवांसारख्या विभूतीनें जीं बीजें महाराष्ट्रीयांच्या मनोभूमींत रुजत घातलीं तींहि अंशतः कारण आहेत. किंबहुना राजाच्या सत्तेस व काळाच्या करणीस न जुमानतां राष्ट्रहिताचीं जीं अनेक कामें महाराष्ट्रीयांनीं गेल्या अर्धशतकांत अंगावर घेऊन पार पाडलीं त्यांच्या यशाचा वांटाहि शास्त्रीबुवांकडेच जात असल्यामुळें त्याची अर्धशतसांवत्सरिक पुण्यतिथि महाराष्ट्रानें साजरी करावी ही गोष्ट त्या पुण्य पुरुषाचें उतराई होण्याच्या दृष्टीनें अत्यंत आवश्यकच समजली पाहिजे. अशा या पुण्यतिथीच्या प्रसंगीं राष्ट्राचे गुरु या नात्यानें त्यांच्या योग्यतेचा विचार करणें उचित होय.

### स्वराज्याचा अस्त

एकोणिसाव्या शतकाच्या पहिल्या पंचविशींत मराठ्यांचें राज्य लयाला गेलें. स्वराज्य गेलें तरी स्वराज्याचा विचार ज्यांच्या मनांतून गेला नाहीं असे मराठे सरदार अस्तंगत स्वराज्याचें स्मरण करून आपआपल्या ठिकाणीं झुरत असतील तेवढेच; बाकीच्या बहुजनसमाजास त्याचें काय ? स्वराज्य हें राजांनीं मिळवावें व राजांनीच गमवावें अशी त्यांची समजूत असल्यामुळें रोजच्या पोटाच्या व्यवसायांत त्यांना मराठी राज्याचा विसर पडावा यांत नवल नाहीं. स्वराज्य हें एकट्या राजाचें नसून लोकांचेंहि असतें आणि तें असलेलें राखण्याची व गेलेलें परत मिळविण्याची जबाबदारी राजांच्या खालोखाल समाजावरहि पडते, या कल्पनेचा उदय पेशवाई बुडाल्यानंतर सुमारें चाळीस वर्षांनीं महाराष्ट्रांत झाला. सन १८५७ सालीं युनिव्हर्सिटी स्थापन होऊन तिच्यांतून मराठ्यांच्या व इंग्रजांच्या इतिहासाचें परिशीलन केलेले तरुण विद्वान बाहेर आले व त्याच्या अगांत पूर्वीच्या कोणत्याहि पिढींत नव्हते असे नवेच वारे खेळूं लागले. त्याच्या वेळच्या व त्यांच्या आधींच्या महाराष्ट्रीयांना देवानें दोन डोळे दिलेलेच होते. परंतु या नव सुशिक्षितांना इंग्रजी विद्येनें स्वदेशाभिमानाचा नवा तिसरा डोळा दिल्यामुळे त्यांना इतरांना दिसत नव्हतें तें दिसूं लागलें. आणि 'तृतीय नेत्रांत दर्शन शक्तीपेक्षांहि दाहक शक्ति अधिक असते' हें पुराणांतरीं प्रसिद्धच आहे.

### सुशिक्षितांचा मुकुटमणि

अशा स्वदेशाभिमानी सुशिक्षित पिढीचे कै. न्या. महादेव गोविंद रानडे हे मुकुटमणि होत. त्याचें महादेव हें नांव सार्थ होण्याकरितां त्यांना तिसरा डोळा मिळाला तो त्यांच्या हक्काचाच म्हणतां येईल. पण त्या महादेवापासून जन्मलेल्या विष्णूलाहि तो डोळा लाभला त्यामुळें महाराष्ट्राचा राष्ट्रीय भाग्योदय समीप आला. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांच्या वेळच्या व पूर्वीच्या पुणेकरांनाहि पहावयास डोळे होते; त्यांना पुण्यांतील शनिवारवाडा दिसत होता; ते त्या वाड्याच्या उभ्या भिंती व पडका बुरूज पहात होते; पण तो वाडा नसून स्वराज्याच्या दग्ध झालेल्या वैभवाचें तें शोचनीय स्मशान आहे हें पाहण्याची शक्ति एकट्या विष्णुशास्त्री चिपळूणकरांच्याच डोळ्याला होती. त्यांना शनिवारवाड्याच्या ठिकाणींच काय, पण त्यांची पुण्यांत जिकडे नजर जाई तिकडे वस्तुस्थितींतून वेगळीच स्थिति दृष्टीस पडावी. बुधवार रविवार या पेठांतून रीघ नाहीं अशी माणसांची व गाड्याघोड्यांची गर्दी असतां त्यांना ते रस्ते शून्य असल्याचा भास व्हावा; त्यांना शनिवार वाड्यासमोरील विस्तीर्ण पण ओसाड मैदान घोडदळांनीं व पायदळांनीं गजबज-

त्यासारखें वाटावें; पेशवे मोहिमेवर जावयास निघाले आहेत, त्यांनीं आपले डेरे गारपिरावर दिले आहेत, त्यांचा भगवा झेंडा त्यांच्यासमोर फडकत आहे, त्यांचे सरदार, शिलेदार, बारगीर व सरंजामदार त्यांच्याजवळ जमत आहेत आणि भगव्या झेंड्याची बरोबरी करण्यास वैभवशाली जरीपटका पुढें सरसावत आहे असें दृश्य त्या दिशेनें एकटेच हिंडणाऱ्या शास्त्रीबुवांच्या नजरेसमोर उभें रहावें. त्यांची वृत्ति त्या काळाशीं तादात्म्य पावली असतां व त्यांची तंद्री लागून गेली असतां त्यांनीं देहभान विसरून मनानें पेशवाईच्या वैभवांत वावरावें. त्यांना गवयांचें गायन, नृत्यांगनांचे नाच, भाटाचे स्तुतिपाठ, विद्वानांचा सन्मान, हरिदासांची संभावना, कवींचा मानमरातब आणि वीरांचा गौरव ज्यांत चालू आहे अशा पेशव्यांच्या व इतर मराठे सरदारांच्या दरबारांच्या स्फूर्तिदायक प्रसंगांचीं स्वप्नें पडावीं.

### भावी स्वराज्याची पूर्व तयारी

मनानें व भावनेनें शास्त्रीबुवा स्वराज्याच्या काळांत इतके रमले व गमले कीं ते सर्व स्वराज्य त्यांनीं आपल्या हृदयमंदिरांत अल्पावधींत सांठविले; किंबहुना त्या स्वराज्याची शास्त्रीबुवांची मानवदेहधारी मूर्तिच नव्या स्वराज्यासाठीं महाराष्ट्रीयांना जागृत करण्याकरितां महाराष्ट्रांत अवतरली असेंहि म्हणण्यास हरकत नाहीं. जुनें स्वराज्य गेलें तें गेलें. त्याविषयीं नुसता शोक करीत बसण्यापासून फायदा काय? शास्त्रीबुवांना अस्तंगत स्वराज्याची जितकी हुबेहुब कल्पना होती तितकीच कालान्तरानें उदय पावणाऱ्या नवीन स्वराज्याचीहि अटकळ होती. त्यांनीं आपल्या धाकट्या बंधूपाशीं 'आपण मराठीचे शिवाजी आहों' असे एकान्तीं आवेशाच्या व उत्साहाच्या भरांत उद्गार काढल्याचें प्रसिद्ध आहे. पण शास्त्रीबुवा हे एकट्या मराठी भाषेच्या दृष्टीनेंच काय पण इतर अनेक दृष्टींनींहि शिवाजी होते. शिवाजीनें पारतंत्र्यापासून महाराष्ट्रीयांच्या शरीराला मुक्त केलें तर शास्त्रीबुवांनीं महाराष्ट्रीयांचीं मनें मुक्त केलीं. त्यांनीं वेगवेगळे व मोठमोठे उद्योग आरंभून स्वराज्यप्राप्तीची पूर्वतयारी करून ठेवली. निबंधमाला हा त्या उद्योगांपैकींच एक उद्योग होय.

### पद्यगंगा व गद्यगंगा

प्राचीन महाराष्ट्रास ज्ञानेश्वरांची ज्ञानेश्वरी तशी अर्वाचीन महाराष्ट्रास विष्णुशास्त्र्यांची निबंधमाला समजण्यास हरकत नाहीं. त्या ज्ञानेशांच्या मुखांतून पद्यगंगा उगम पावली, या विष्णूच्या पदापासून गद्यगंगा वाहूं लागली. ज्ञानेशांच्या पद्यगंगेचें स्वरूप आध्यात्मिक होतें, विष्णूच्या गद्यगंगेचें स्वरूप आधिभौतिक आहे. ज्ञानेशापासून उगम पावलेल्या पद्यगंगेस पावित्र्य प्राप्त करून देणारे संतमहंत व पंतपंडित महाराष्ट्रांत मुसलमानी अमदानीच्या आरंभापासून पेशवाईच्या अखेरीपर्यंत असंख्य होऊन गेले. त्यांनीं महाराष्ट्रीयांकरितां आध्यात्मिक शांतीच्या व समाधानाच्या चिरसुखाचा अक्षय ठेवा ठेवला. त्यामुळें पारमार्थिक मोक्षपदावर नाचण्याची तरतूद झाली असली तरी ऐहिक मोक्षाचें हरवलेलें अधिष्ठान मिळाल्याशिवाय त्या पारमार्थिक मोक्षपदापर्यंत आधुनिक महाराष्ट्राच्या नजरेचा पल्ला पोंचणें दुरापास्त होय; म्हणून सांप्रत पारमार्थिक पद्यगंगेपेक्षां ऐहिक गद्यगंगेसच पुरावर पूर लोटत आहेत. या गद्यगंगेसहि अनेक लहानथोर निबंधकार, ग्रंथकार, इतिहासकार, संशोधनकार, कादंबरीकार व चरित्रकार इत्यादि साहित्यसेवकांनीं आपली पुण्याई वाहिली आहे. या दोन महानद्या महाराष्ट्राच्या दोनहि अंगांनीं वाहत असून त्यांच्या दुआबामधील वाङ्मयक्षेत्राचें सौंदर्य व सामर्थ्य पूर्णता पावत आहे. एका अंगावर प्राचीन पद्यगंगेच्या फवाऱ्यांचे हबके बसत आहेत व दुसऱ्या अंगावर अर्वाचीन गद्यगंगेच्या लहरी झेलल्या जात आहेत.

### नरवीर बाजीराव

प्राचीन काळ पद्यगंगेचा व अर्वाचीन काळ गद्यगंगेचा असे कालाचे स्थूल भेद पडले तरी पद्यकाळांत क्वचित् गद्यहि चमकत होतें व चालू गद्यकाळांत पद्यहि जन्मास येत आहे. किंबहुना पद्यकाळांतील गद्यापेक्षां गद्यकाळांतील पद्याचें प्रमाण पुष्कळच मोठें आहे यांत शंका नाहीं. पद्यकाल हा बहुतेक निव्वळ पद्यकाळच होता; याचें मोठें प्रमाण पाहावयाचें तर पहिल्या बाजीरावाचें पहावें. पहिला बाजीराव हा शिपाई गडी होता. त्याला शोक शत्रूला तरवारीचें पाणी दाखविण्याचा व तें पाजण्याचा. तो जवळ यवनी बाळगणारा व तिचा पुत्र समशेरबहाद्दर याची ब्राह्मणांनीं मुंज लावावी म्हणणारा. असा हा बेहोष दिसणारा पुरुष लावण्या, छकड्या ऐकण्यांत गुंगून जात असेल व त्याला धर्मग्रंथाविषयीं काडीमात्र आस्था वाटत नसेल अशी कित्येकांची समजूत होण्यासारखी आहे. परंतु ती वस्तुस्थितीस धरून नाहीं. तो योद्धा असल्यामुळें रामायणांतील सुंदरकांड, युद्धकांड, उत्तर-कांड, इत्यादि भाग पिलाजी जाधवासारख्यामार्फत मुद्दाम मिळवून ते त्यानें वाचावेच, खेरीज वेदभाष्य आणून त्याचेंहि परिशीलन रणांगणावरील आपल्या छावणीच्या डेऱ्यांत त्यानें चालू ठेवावें. शृंगार व वीर या दोनहि रसांनीं नटलेल्या नरवीर बाजीरावाच्या काळांत, गद्यग्रंथ लिहिणारे चरित्रकार, नाटककार, इतिहासकार निपजले असते तर द्रव्य देऊन त्यांची त्यानें यथायोग्य संभावना केली नसती काय? परंतु तो मनुच गद्याचा नसून पद्याचा

असल्यानें त्याला सुंदरकांडाच्या किंवा वेदभाष्याच्या बाहेर पडतां आलें नाहीं.

सवाई माधवरावाचा शिक्षणक्रम ठरवितांना नाना फडणविसालाहि तीच अडचण पडली. पेशव्यास बोधप्रद, मनोरंजक व पौराणिक गोष्टी वाचावयास सांपडाव्या व मोडी वाचण्याचाहि सराव व्हावा म्हणून नानांनीं बापूजी गोविंद गोखले या नांवाच्या व्युत्पन्न गृहस्थाकडून भारत व भागवत यांच्या सारांशरूपानें मराठींत बखरी लिहविल्या आणि वेताळपंचविशी व शुकबहात्तरीप्रमाणें 'सारिकाशतक' नामक चमत्कारिक गोष्टींचा ग्रंथ रचविला. पेशवाईत गद्यग्रंथांची दुर्लभता किती होती याचें आणखी प्रमाण कोणतें पाहिजे ?

### गद्यांतील सौकर्य

पेशवाईत किंवा तत्पूर्वीच्या कोणत्याहि राजवटींत गद्यग्रंथ वरीलप्रमाणें क्वचित् निर्माण होत असत. तितकी पद्यग्रंथांची उत्पत्ति सांप्रत अगदींच आटली आहे असें नाहीं. काव्यें व संगीत नाटकें कितीतरी लिहिलीं जातात. परंतु एकंदर खुर्दा–नाण्यांत नोटांचें प्रमाण जितकें कमी तितकेंच काव्यग्रंथांचें यांत शंका नाहीं. म्हणून सध्यांच्या कालाला गद्यकाल या नांवानें संबोधणेंच यथार्थ ठरेल. पद्याच्या मानानें गद्यग्रंथांत सरसता, मधुरता, तालबद्धता व स्वरयुक्तता कमी हें खरें. पद्याच्या साच्यांत स्वतःस अडकवून घेतल्यावर झाडाच्या खांदीवर बसून झोके घेणें, अनन्त आकाशांत पंख पसरून तरंगणें व मुक्त कंठानें मनचे बोल बोलणें प्रत्येक लेखकाला साधणारें नाहीं. म्हणून सामान्यतः मनुष्याची प्रवृत्ति पद्यरचनेपेक्षां गद्याकडेच जास्ती असते. इतकेंच काय पण आधुनिक काळांतील कविहि गद्यांतील सौकर्य ओळखून छंदःशास्त्रांतील बंधनें झुगारून अंशतः गद्यासच अनुसरण्यांत आनंद मानीत आहेत. गद्याची सुलभता, लिहिलेलें प्रसिद्ध करण्याची मुद्रणालयांची तत्परता व विद्येचा प्रसार या त्रिविध साधनांनीं गद्यरचनेचा वेग इतका वाढला कीं, गेल्या साठपाऊणशें वर्षांतील ग्रंथसंपत्तीनें मागील पांचसहाशें वर्षांच्या काव्यसंपत्तीस संख्याबलांत पार मागें टाकलें आहे, हें निर्विवाद होय.

### वाङ्मयाच्या पर्वतप्राय राशी

पेशवाईपूर्वीच्या कवितेंत प्रायः न आढळणारे किती तरी प्रकार गद्यग्रंथांनीं अर्वाचीन मराठी भाषेंत प्रसृत केले आहेत. वृत्तपत्रें व मासिकें या चिजा तर अपूर्वच होत. तितकीच किंवा त्याखालोखाल अपूर्वाई निबंध, लघुकथा, कादंबऱ्या, नाटकें, चरित्रें, इतिहास व शास्त्रीय ग्रंथ यांची आहे. यांनीं लहानापासून थोरापर्यंत सर्व वाचकवृंदांना नादावून व आनंदवून सोडलें आहे. बहुजनसमाजाला वाचनाची गोडीच नव्हे तर चटक किंवा वेड लावलें आहे. तरुण काय किंवा वृद्ध काय एखादेवेळीं तहानभूक विसरतील पण वर्तमानपत्राला, लघुकथेला, कादंबरीला, चार–आठ आणे मालेला किंवा मासिकाला विसरणार किंवा विसंबणार नाहींत. कारण त्यामुळें त्यांची अननुभूत अशी करमणूक होते, आनंद लाभतो, चुटपूट लागते व बोधहि मिळतो. अशा प्रकारच्या वाङ्मयाच्या पर्वतप्राय राशी पडत असून त्या मनुष्यांनीं प्रतिष्ठेनें बसावयाच्या दिवणखान्यापासून तों त्यांनीं अवहेलनेनें वागवावयाच्या उकीरड्यापर्यंत लोळत आहेत. त्यांपैकीं कोणताहि एक कागद, त्याचा गुळगुळीतपणा, मोहरेदारपणा, त्यावरील सुंदर चित्र व त्याखालील सुबक छापलेला मोहक मजकूर पाहून सव्वाशें वर्षांपूर्वीच्या साक्षर महाराष्ट्रीयानें अमोलिक अलंकाराप्रमाणें जतन करून ठेवला असता. कारण त्या काळीं ग्रंथ अत्यंत दुर्मिळ असत. ते पहावयासहि मिळत नसत, मग वाचावयास कोठून मिळणार? त्यांची ज्यांना आस्था त्यांना त्यांच्या नकला करून घ्याव्या लागत व आज सबंध पोथी–पुस्तकाला जी किंमत पडते तितकी पोथीच्या एका पानाला पडावयास जाई. या अनेक कारणांनीं वाङ्मयक्षेत्रांतील जी भूमि सवाशेंदीडशें वर्षांपूर्वी उष्ण काळच्या माळाप्रमाणें प्रायः रिकामी दिसत होती ती सांप्रत नयनमनोहर अशा हरिततृणांकुरांनीं, शेतांनीं, तरुलतांनीं व फलपुष्पांनीं गजबजून गेली आहे.

एका बाजूला प्राचीन पद्यग्रंथ व दुसऱ्या बाजूला अर्वाचीन गद्यवाङ्मय यांच्या मधून वाचक विहरण्यास निघाला म्हणजे त्याला बागबगीच्यामधील वाटेनें चालत असल्याचा भास होतो. त्याच्या डाव्या हाताला उंच उंच नारळीपोफळीचीं आगरें, अननस–फणसाचीं झाडें, व काजू–खजुरीचीं बनें आणि दुसऱ्या हाताला हिरवेगार गवत उगवलेले बांध, त्या बांधांच्या मध्यभागीं रंगाच्या निरनिराळ्या छटा दाखविणारीं शेतें, त्यांच्या आजूबाजूस कलमी आंब्यांचीं झाडें, संत्र्यामुसंब्यांचे बाग, द्राक्षांचे वेल, अंजीरांचे घड, रंगीबेरंगी फुलांचे झुबके, त्यांत इतस्ततः उडणारे भुंगे आणि त्यांवर बसत उठत हिंडणारीं व मधुर बोल बोलणारीं लहान लहान चपळ पांखरें असा मनमोहक देखावा दृष्टीस पडतो. तो माडाच्या झाडाला उंच टांगलेला असोल्या नारळ पाहून निराशेनें दीर्घ उसासा टाकतो. हिरव्या काजूंना नाइलाजानें बाजूस सारतो, व आपल्या छानछोकीला डाग लावणाऱ्या फणसापासून दूर सरकतो. तीच उजव्या हाताकडे त्याची नजर गेली कीं त्याला काय कमी व काय अशक्य.

त्यानें हवा तर रानचा मेवा खावा, द्राक्ष भक्षावें, किंवा अंजीर तोडावा. त्यानें विश्रांतीसाठीं गवतावर निजावें अथवा फुलांचा रंग पहात व वास घेत तीं असतील तिकडे धावावें.

### बुद्धीचें असामान्यत्व

ज्ञानेश्वर ज्यांचे गुरु त्या पद्यवाङ्मयांत व विष्णुशास्त्री ज्यांचे गुरु त्या गद्यवाङ्मयांत हा फरक आहे. मनुष्याच्या जीवनास त्या उभयतांची गरज सारखी असून त्यांच्यावांचून त्याचें जीवितकार्य केव्हांहि पूर्ण होणार नाहीं.तथापि गद्यवाङ्मयाचा संबंध ऐहिक व्यवहाराशीं फार निकटचा असल्यामुळें त्याकडे मनुष्याचा ओढा नित्याचा आहे. त्यामानानें पद्यवाङ्मयाकडे विशेषतः पारमार्थिक पद्यवाङ्मयाकडे तो कार्याकारणच वळणार हें उघड होय. गद्यवाङ्मय वाढून तें लोकप्रिय होण्याचें बलवत्तर कारण याहून दुसरें कोणतें असणार ? कै. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनीं निबंधमाला लिहिली व ती फक्त सातच वर्षे चालविली, तरी तेवढ्यावर वरील प्रकारच्या वाङ्मयविशेषांत त्यांनीं गुरुत्व मिळविलें, यांतच त्यांच्या बुद्धीचें असामान्यत्व दिसून येतें.लेखनांतील तऱ्हेतऱ्हेचे खेळ व करामती दाखवून गरीब व दुबळी समजली गेलेली मराठी भाषा कशी श्रीमंत व सामर्थ्यवान आहे हें त्यांनीं सिद्ध केलें. विनोद, उपरोध, उपहास, आवेश, ऐट, नखरा, नाच, गर्व, गांभीर्य, भपका,भव्यपणा, सरलता, सभ्यपणा याचा थाट त्यांच्या निबंधमालेंत शिकण्यासारखा आहे. मराठी भाषेकडे तत्कालीन विद्याविभूषितांचें लक्ष लागण्यास ती तुच्छ व तिरस्करणीय नसून थोर व आदरणीय आहे हें त्यांच्या नजरेस आणणें अगत्याचें होतें.

### तलवारींचा खणखणाट

भाषा कशी लिहावी हें शिकविण्यापासून तों ग्रंथ कसा रचावा हें सांगण्यापर्यंतचें महत्त्वाचें कार्य शास्त्रीबुवांनीं केलें इतकेंच नव्हे तर त्यांनीं युद्धकलेच्या तोडीचें असें लेखनकलेचें सँढर्स्ट कॉलेज थाटून त्या कॉलेजांत लेखनकलेवरील निबंधमाला हा प्रमाणभूत ग्रंथ अभ्यासाकरितां ठेवला असें म्हटलें तरी चालेल. निबंधमाला वाचून तिच्यांतील डावपेंच व कोटिक्रम प्रतिपक्षावर लढविण्यास शिकलेले खंदे कलमबहादूर शास्त्रीबुवांच्या काळापासून गेल्या पन्नास वर्षांत महाराष्ट्रांत असंख्य निपजले आहेत. त्यांपैकीं कित्येकांनीं नोकरशाहीवर शस्त्र चालवून तिला जर्जर करून सोडलें, कित्येकांनीं जुन्या सामाजिक रूढींचे वाभाडे काढले, तर कांहींनीं आपसांत झुंजण्यासहि माघार घेतली नाहीं. जहाल-मवाळ, सुधारक--बिनसुधारक, नवे--जुने व ब्राम्हण-ब्राम्हणेतर या जोड्यांनीं परस्परांशीं किंवा स्वतंत्रपणें रणधुमाळी माजविली, धुळीचे लोट उठवून दिशा धुंद करून सोडल्या, पण समाज ढवळून व घुसळून काढला, त्याचें बरेंचसें श्रेय शास्त्रीबुवांसच दिलें पाहिजे. कारण त्या सर्वांचे साक्षात् अगर परंपरेनें शास्त्रीबुवाच गुरु होत. प्रि. आगरकर व लो. टिळक हे दोघेहि कौरवपांडवांप्रमाणें शास्त्रीबुवांचे शिष्य असतां त्यांनीं एकमेकांवर उगारलेल्या व चालविलेल्या तीक्ष्ण तरवारींच्या खणखणाटानें सारा महाराष्ट्र कैक वर्षे कसा दणाणून गेला होता याची माहिती सर्वांना आहेच.

रावबाजीनें पेशवाईचें उदक इंग्रजांच्या हातावर सोडलें त्या दिवसापासून महाराष्ट्रीयांतील जेत्यांचें तेज मावळून त्यांना जितांची ग्लानी आली. एका राजकीय लढाईत पराभव पावल्याबरोबर त्या रणांगणावर मराठ्यांनीं कच खाल्लीच, पण तेवढ्यावरच पराभवाचा दुष्परिणाम न थांबतां धर्म, नीति, संस्कृति इत्यादि नित्याच्या व्यवहारांतील प्रत्येक क्षेत्रावरून इंग्रजांपुढें नामोहरम होऊन मराठे पळत सुटले होते व त्यांची ती दाणादाण पाहून इंग्रज लेखकांनीं व मिशनऱ्यांनींहि मराठ्यांना हतप्रभ करण्याचे प्रयत्न चालविले होते. अशा हिंमत खचलेल्या व पळत सुटलेल्या मराठ्यांस धीर देऊन एका जागेवर थांबवून धरण्याचें व त्यांना पुढील संग्रामाकरितां हुरूप आणण्याचें अत्यंत अवघड व जबरदस्त कार्य विष्णुशास्त्री यांनीं अन्तःस्फूर्तीनें शिरावर घेतलें व तें निबंधमालेच्या द्वारें यशस्वीपणें तडीस नेलें. निबंधमालेनें बजावलेली ही फार महत्त्वाची कामगिरी होय.

शास्त्रीबुवांच्या पूर्वी होऊन गेलेल्या पिढीचें ज्ञान प्रायः एकतर्फी होतें. ते एक तर प्राचीन विद्येंत निपुण असत किंवा आंग्लविद्याविभूषित असत.शास्त्रीबुवांचें अध्ययन दोन्ही प्रकारचें झालें असल्यानें त्यांच्या अंगीं मिशनरी व इंग्रज ग्रंथकार यांचे आक्षेप खोडून काढण्याचें सामर्थ्य होतें. तें सामर्थ्य निबंधमालेंत प्रकट करून त्यांनीं स्वजनांच्या समोर प्रतिपक्षास मातींत घोळसलें आणि आपला धर्म हीन, आपली संस्कृति त्याज्य, आपले पूर्वज तुच्छ व आपला इतिहास गलिच्छ असा महाराष्ट्रीयांस नासर्द बनविणारा समज गाडून टाकून आपण पराभूत झालों असलों तरी शौर्यानें लढलों आहों, आपण आपलें राज्य घालविलें असलें तरी तें मिळविलें होतें, आतां जित असलों तरी पूर्वी जेते होतों व या दृष्टीनें इंग्रजांच्या बरोबरीचे आहों अशी त्यांनीं महाराष्ट्रीयांची खात्री पटविली व तिचाच उपयोग महाराष्ट्राच्या स्वराज्यस्थापनेच्या पूर्वतयारीस फार झाला.

### अन्तरात्म्याची तळमळ

वरील विवेचनावरून महाराष्ट्राचे राष्ट्रीय गुरु शास्त्रीबुवा कसे होत हें कळून येणार आहे. महाराष्ट्राची राष्ट्रीय उभारणी होण्याला शास्त्रीबुवांना ज्या गुणांची गरज वाटली त्यांचा सांगाडा

त्यांनीं आपल्या निबंधमालेंतून महाराष्ट्रीय वाचकांपुढें ठेवला. पण त्या सांगाड्याच्या एकएका अवयवांत एकएक गुण भरण्याचें कार्य व्हावयाचें राहिलें होतें. त्यांना नवीन महाराष्ट्राची जुन्या महाराष्ट्रापासून ताटातूट करावयाची नव्हती. महाराष्ट्राची जुनी परंपरा कायम ठेवून तिला नव्या काळाच्या गरजा भागविण्यासाठीं इष्ट असें नवीन वळण लावावयाचें होतें. राष्ट्रानें जगण्याचे दोन प्रकार असतात. एक प्रकार अभिमानानें जगण्याचा व दुसरा अभिमान सोडून जिवंत रहाण्याचा. शास्त्रीबुवांना पहिला प्रकार पसंत होता. त्यांनीं मराठ्यांचा धर्म, मराठ्यांची संस्कृति व मराठ्यांची समाजव्यवस्था हा पाया समजून त्यावर राष्ट्राची नवी इमारत रचण्याचें ध्येय आपल्या डोळ्यांसमोर ठेवलें होतें. तें ध्येय साध्य करावयाचें तर महाराष्ट्रीयांनीं आपला इतिहास आपण लिहिला पाहिजे; आपल्या मुलाना आपणच शिक्षण दिलें पाहिजे, व तें आपल्या धर्तीचें दिलें पाहिजे; आपल्या जुन्या काव्यांचा व ऐतिहासिक साधनांचा आपणच शोध लावून त्यांचें प्रकाशन केलें पाहिजे; जनतेच्या मताचा ओघ आपणास इष्ट अशा दिशेस वळविण्याकरितां आपण आपलीं च वर्तमानपत्रें चालविलीं पाहिजेत व त्यासाठीं छापखाने काढले पाहिजेत; जुनीं ऐतिहासिक चित्रें हुडकून व छापून आपली चित्रकला ऊर्जितावस्थेस आणिली पाहिजे; इतकेंच काय पण स्वराज्य गेलें याचा कमीपणा महाराष्ट्राची विद्या व कलाकौशल्य यांना भोवूं न देतां त्यांचा अभ्युदय करीत राहिलें पाहिजे; यासाठीं शास्त्रीबुवांचा अन्तरात्मा सतत तळमळत होता.

### राष्ट्रीय गुरुत्व

त्या तळमळीमुळें त्यांनीं ज्या बहुविध संस्था स्थापन केल्या त्या योगानें तर त्यांच्या राष्ट्रीय गुरुत्वास अष्टपैलुत्व व चिरस्थायित्व प्राप्त झालें. ती त्यांची कामगिरी लक्षांत घेतल्यास त्यांच्या शिष्यपरंपरेतून महाराष्ट्रांतील किती कर्ते पुरुष मुठतील याची शंकाच वाटते. कारण त्यांनीं निबंधमाला हें आपलें मासिक अत्यंत यशस्वी करून दाखविलें म्हणून ते मासिकांचे गुरुच ठरले. केसरी व मराठा या पत्रांची मांडणी त्यांनीं केली म्हणून वर्तमानपत्रांच्या गुरुत्वाचा मान त्यांच्याकडेच आला. न्यू इंग्लिश स्कूल स्वतंत्रपणें शिक्षण देण्याकरितां स्थापिलें म्हणून महाराष्ट्रांतील खासगी व राष्ट्रीय शिक्षणाच्या शाळांच्या अग्रेसरत्वाची माळ त्यांच्याच गळ्यांत पडली; काव्येतिहाससंग्रहाचे पुरस्कर्ते या नात्यानें काव्य व इतिहास यांच्या संशोधनाचें कार्य महाराष्ट्रांत इतक्या रंगारूपास आलें त्याच्या मूळ कल्पनेचें श्रेय त्यांच्याकडे गेलें. या विविध संस्थांचे वेल शास्त्रीबुवांनीं लावले, त्या वेलांना अनेक नवे वेल फुटले व त्या सर्वांचा विस्तीर्ण मंडप महाराष्ट्रभर पसरला असून त्याच्या सावलींत बसून असंख्य स्त्रीपुरुष राष्ट्रोद्धाराचें कार्य सांप्रत धिमेपणानें करीत आहेत.

शास्त्रीबुवांनीं ज्या स्वराज्याचा व स्वातंत्र्याचा जन्मभर ध्यास घेतला होता तें स्वातंत्र्य हिंदुस्थानास अद्यापि लाभलेलें नाहीं. त्यामुळें त्यांनीं काढलेल्या व स्फूर्ति दिलेल्या कित्येक संस्थांस भरपूर अन्नरस न मिळाल्यानें त्या तितक्या टवटवीत व तजेलदार राहिल्या नसतील, क्वचित् एखाद्या दुसऱ्या संस्थेचें कार्य अर्धवट झालें असेल किंवा तिला कालमानानुसार आपली दिशाहि बदलावी लागली असेल. तथापि शास्त्रीबुवांचा हात असा यशस्वी, व महाराष्ट्रीयांची कर्तबगारी इतकी नेटाची कीं त्यांनीं आपल्या कार्यांत मुळींच खंड पडूं दिला नाहीं. शास्त्रीबुवांचा आत्मा त्यांच्या या प्रिय महाराष्ट्रभूमीभोंवतीं अद्यापि संचरत असेल तर त्यांजकडून महाराष्ट्रास धन्यवाद व शुभाशीर्वादच मिळत असतील यांत शंका नाहीं. परंतु त्यांच्या त्या तळमळणाऱ्या आत्म्यास खरी शांति महाराष्ट्रास व साऱ्या हिंदुस्थानास स्वातंत्र्याचा लाभ होईल तेव्हांच मिळणार असल्यानें त्यांचा आत्मा तोंपर्यंत तसाच अतृप्त व संतप्त राहणार या दुःखद विचारानें कोणा महाराष्ट्रीयाचें अंतःकरण उद्विग्न होणार नाहीं ?

# विष्णुशास्त्री चिपळूणकरांचा अर्धशतक-स्मारकदिन

## ( पुण्यांतील संस्मरणीय सभा )

कै. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांना दिवंगत होऊन ता. ३ एप्रिल रोजीं तिथिमानाप्रमाणे पन्नास वर्षें पूर्ण झालीं. म्हणून त्यांच्या पन्नासाव्या श्राद्धदिनानिमित्त त्या दिवशीं सायंकाळीं ६ वाजतां पुणें येथें श्रीशिवाजी मंदिरांत जाहीर सभा भरली होती. शास्त्रीबुवांनीं प्रवर्तित केलेल्या संस्थांच्या प्रतिनिधींनीं तींत प्रामुख्यानें भाग घेतला होता. प्रोफेसर, वकील, विद्याव्यासंगी असे ठळक ठळक लोक उपस्थित असल्यानें सभेच्या वेळीं पुण्यनगरीनें आपलें बुद्धिवैभवच शास्त्रीबुवांच्या

स्मृतिपादुकांवर अर्पण केल्याचें दिसत होतें. स्त्रीपुरुष व तरुणवृद्ध नागरिकांचा समूहहि पुष्कळ मोठा जमला होता. सभेचें अध्यक्षस्थान दिवाणबहादुर का. रा. गोडबोले यांना देण्यांत आलें होतें. त्यांनीं तें स्वीकारावें अशी सूचना **श्री. य. रा. दाते** यांनीं मांडली आणि तिला **रा. वा. कृ. भावे** यांनीं पुष्टि दिली. नंतर

**अध्यक्ष दि. ब. गोडबोले यांचें भाषण**

झालें. तें इतकें स्पष्ट, ठेकेदार व खणखणीत झालें कीं, त्यावरून त्यांचें वय पंच्यायशीच्या घरांत गेलेलें असावें असें कोणाहि श्रोत्यास सांगूनहि खरें वाटण्यासारखें नव्हतें. ते आपल्या भाषणांत म्हणाले,

" आपल्या पुणें शहराचा लौकिक वाढविणाऱ्या ज्या महान् विभूति होऊन गेल्या, त्यांपैकी कै. विष्णुशास्त्री चिपळूणकर हे एक होत. त्यांनीं मराठी भाषेची अप्रतिम सेवा केली आणि तिची प्रतिष्ठा वृद्धिंगत केली. त्यांच्यासारखा मी भाषाप्रभु नाहीं. चुन्यावर वीट व विटेवर चुना घालून, इमारती बांधण्याचें माझें काम. पण विष्णुशास्त्र्यांशीं माझें नातें आहे आणि तें अगदीं जवळचें आहे. योगायोग असा जमून आला कीं, विद्यार्थी म्हणून व शिक्षक म्हणून आम्ही दोघे एकत्र आलों. त्यांच्यापेक्षां मी दोन वर्षांनीं वडील. मी शिक्षक म्हणून

**बाबा गोखल्यांच्या शाळेंत**

होतों, तेहि तेथें होते. नंतर पूना हायस्कूलमध्यें मी गेलों, तेथेंहि ते आले. आणि रत्नागिरीच्या शाळेंतहि दोघांचा योग पुनः जमून आला. त्यानंतर मात्र दोघांचे दोन मार्ग झाले. विष्णुशास्त्र्यांचे वडील कृष्णशास्त्री हे एक विद्वद्रत्न होते. त्यांचीं व्याख्यानें मीं ऐकलीं आहेत. त्यांचा संस्कृताचा व्यासंग गाढ होता. पण त्यांना प्रौढ वयांत त्यांच्या गुरूंनीं सांगितलें कीं, ' आतां वेदपठणाचा मनु संपला ' तेव्हां थोरले शास्त्रीबुवा इंग्रजी शिकले, व बोलूं लिहूंहि लागले. धाकटे शास्त्रीबोवा म्हणजे तर 'बापसे बेटा सवाई' असे होते. त्यांनीं मराठी भाषेचा दर्जा वाढीस लावला. त्यांच्या-आमच्या वेळेस मॅट्रिकसाठी क्रमिक म्हणून जीं मराठी पुस्तकें लावण्यांत येत, तीं आज अगदीं टाकाऊ वाटण्यासारखीं होतीं. पद्याची समृद्धि बरी होती; पण गद्याचीं पुस्तकें गचाळ असत. ही मराठी भाषेची निकृष्टावस्था दूर करून तिला सुप्रतिष्ठित करण्याचें श्रेय विष्णुशास्त्री यांजकडे आहे. त्यांचें पुण्यस्मरण करणें आपलें कर्तव्य आहे आणि तें आपण केलें पाहिजे. "

**यानंतर फर्ग्यूसन कॉलेजचें**

**प्रो. वि. ब. नाईक यांचें भाषण**

झालें. त्यांनीं शास्त्रीबोवांशीं असलेलें आपलें नातें निवेदन करून त्यांच्या शैक्षणिक कामगिरीचें विवेचन केलें. ते म्हणाले,

" शास्त्रीबुवांनीं जें जें हातांत धरलें, त्याचें सोनें झालें, असा प्रत्यक्ष अनुभव आज आपण घेत आहों. सर्व शास्त्रीय ज्ञानाचें उगमस्थान म्हणून न्यूटनचें नांव जसे पुढें येतें, तसें महाराष्ट्रीय कर्तृत्वाचें मूळ शास्त्रीबुवांपाशीं सांपडतें. एक शिक्षणक्षेत्रच घेतलें तरी त्यांचें कार्य किती तरी सफळ झाल्याचें दिसून येते. त्यांनीं १८८० सालीं १ जानेवारीला ' न्यू इंग्लिश स्कूल 'ची स्थापना केली. त्या वर्षाचा अहवाल त्यांच्या हातचा आहे. त्यांत त्यांनीं आपलें शिक्षणविषयक ध्येय विशद केलें आहे. सर्वसाधारण जनतेला शिक्षण सुलभ करणें हा एक हेतु त्यांनीं नमूद केला आहे. सरकारी हायस्कुलांपेक्षां त्यांनीं आपल्या शाळेंत फी कमी ठेविली, एवढेंच नव्हे तर, सरकारी शाळांत शें. ५ नादाऱ्या असत, त्या वाढवून त्यांनीं आपल्या शाळेंत शें. २० नादाऱ्या ठेवल्या व अकिंचन विद्यार्थ्यांची सोय केली. पण शिक्षण स्वस्त करणें एवढेंच त्यांचें ध्येय नव्हतें; तर तें शास्त्रीय दृष्ट्या सुगम करावें हेंहि साध्य त्यांच्या डोळ्यांपुढें होतें. अभ्यासक्रमांतील दोष दूर करून शिक्षणाचा पद्धति सोपी करण्याकडे त्यांचें लक्ष होतें. आणि हें

**सुलभ व सुगम शिक्षण**

राष्ट्रीय दृष्टीनें प्रसृत करण्याचा तर त्यांना निदिध्यास लागलेला होता. त्याच हेतूच्या पूर्ततेसाठीं त्यांनीं ' निबंधमाला ' काढली होती. ती वाचणारांना किती आनंद व उत्साह वाटे आणि त्यामुळें स्वाभिमान व स्फूर्ति यांना कशी प्रेरणा मिळे याचा अनुभव मीं आपल्या तरुणपणांत प्रत्यक्ष घेतलेला आहे. आणि तो आजमितीलाहि घेतां येण्यासारखा आहे. त्यांनीं जी शाळा काढली. तिच्या फांद्याखांद्या वर व पाळेंमुळें खालीं दूरवर पसरलीं. तिचें कॉलेज निघालें. डेक्कन एज्युकेशन सोसायटी अस्तित्वांत आली. तिनें दुसरीकडे कॉलेज स्थापलें, शाळा उघडल्या आणि मराठी शाळेचीहि जोड दिली. हे प्रत्यक्ष संबंध झाले. पण परंपरेनें त्यांच्या कर्तृत्वापासून प्रेरणा घेऊन उठलेलीं शाळा कॉलेजे पुष्कळच आहेत. "

नंतर **श्री. वामनराव पोतदार** यांचें खालील आशयाचें भाषण झालें. ते म्हणाले, "आजचे अध्यक्ष, कै. विष्णुशास्त्री चिपळूणकरांचे सहाध्यायी. मी शास्त्रीबोवांचा शिष्य व रत्नागिरी येथील शाळेंत मी ज्या वेळीं इंग्रजी पहिल्या इयत्तेंत होतों, त्या वेळीं विष्णुशास्त्री त्याच शाळेंत इंग्रजी सहावीला गणित शिकवीत होते. शास्त्रीबोवांना गणित विषयाचा जितका कंटाळा, तितकाच मराठी विषयाचा लळा, त्यामुळें आपणास मराठी विषय शिकवावयास मिळावा म्हणून त्यांनीं

आम्हांला जे शिक्षक मराठी शिकवीत त्यांना सहावीवर जाण्याची विनंति केली, व आपण स्वतः आमच्या वर्गावर मराठी शिकविण्यास सुरुवात केली. मला अजून पक्कें आठवतें कीं, मोरोपंताची 'पार्थ म्हणे तो कोण ब्रह्मर्षि असे मनोरमहि म्यां तें' ही आर्या ते दोन तास शिकवीत होते व त्यांतल्या त्यांत वरील आर्येतील 'ब्रह्मर्षि' या शब्दाचा अर्थ सांगण्यांत त्यांनीं एक तास खर्च केला. त्यांचें शिकवणें शाळेंतील पंतोजीप्रमाणें नसून कॉलेजांतील प्रोफेसराप्रमाणें असे. म्हणजे शब्दाचा नुसता अर्थच सांगून ते पुढें जात नसत तर त्या शब्दाची व्युत्पत्तिहि सांगत. त्यामुळें तासांत जरी थोड्याच आर्या होत तरी त्या विद्यार्थ्यांच्या मनावर पक्क्या बिंबत व आनुषंगिक माहितीहि त्यांना पुष्कळ होई. रत्नागिरीच्या शाळेचा राजिनामा देऊन ते जेव्हां पुण्यास यावयास निघाले, तेव्हां सर्वच विद्यार्थ्यांना दुःख झालें. कांहीं विद्यार्थी तर त्यांच्या पाठोपाठ पुण्यासहि आले. त्यांपैकीं मी एक होतों. अशा तऱ्हेची विलक्षण छाप त्यांनीं विद्यार्थ्यांवर पाडलेली होती. त्यांनीं सुरू केलेलें केसरी वर्तमानपत्र पुण्यांतील लोकांना मंगळवारीं मिळे, पण आमच्या हातीं तें गुरुवारीं येई. रत्नागिरी व राजापूर येथील लोकांना त्या पत्राची इतकी गोडी लागली होती कीं गुरुवार केव्हां एकदां उगवतो असें त्यांना होऊन जाई. शास्त्रीबोवांचें मराठी भाषेवरील प्रभुत्व व त्यांची विद्वत्ता ही त्यांच्या निबंधमालेंतील लेखावरून चांगलीच दृष्टोत्पत्तीस येते. अशा या थोर पुरुषाची आठवण सतत डोळ्यांपुढें राहण्याकरितां त्यांचें एखादें कायमचें स्मारक करावें अशी माझी सूचना आहे."

नंतर श्यामकवि आपल्या भाषणांत म्हणाले कीं, "स्वराज्याची मुहूर्तमेढ ॐ म्हणून जर कोणीं प्रथम रोवली असेल तर ती शास्त्रीबोवांनींच रोवली" लो. टिळकांच्या होमरूलची सुरुवात ॐ पासून आहे असें सांगून विष्णुशास्त्र्यांचेविषयीं असलेला आपला आदरभाव त्यांनीं एका पद्यपंक्तीनें व्यक्त केला.

### मराठीचा शक्तिपात

**प्रो. दत्तो वामन पोतदार** म्हणाले, "कै. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांच्याशीं सहकारी किंवा शिष्य यांपैकीं कोणत्याच नात्यानें माझा संबंध येणें शक्य नव्हतें. शास्त्रीबुवांपासूनच्या तिसऱ्या पिढींतला मी; अर्थात् त्यांच्या निबंधमालेंतील लेखनावरूनच त्यांच्या मोठेपणाची कल्पना करणें प्राप्त आहे. त्यांचे ग्रंथ मीं लहानपणीं वाचले तेव्हां त्यांच्या समकालीन माणसाला जितका आनंद वाटला असेल व त्यांपासून स्फूर्ति मिळाली असेल तोच आनंद व तीच स्फूर्ति मलाहि मिळाली; फार तर काय आजहि ते ग्रंथ वाचल्यावर त्यांच्यांतील शक्ति व प्रेरणा लेशतःहि कमी झालेली नाहीं असें आढळून येईल. शास्त्रीबुवांचा उदय झाला तेव्हां मराठीचा शक्तिपात झाल्यासारखी स्थिति होती. मराठीच्या पूर्वस्थितीचें वर्णन करतांना न्यायमूर्ति रानडे यांनीं 'ती सरस्वती राज्यक्रांति झाल्याबरोबर आतांच कोठें पळून गेली?' असा प्रश्न केला आहे. या प्रश्नांतील मर्म तरी हेंच कीं, त्या वेळीं मराठीची अगदीं दैना उडाली होती. अशा वेळीं शास्त्रीबुवांनीं आपल्या तेजस्वी लेखणीनें नेत्रांना सामर्थ्य दिलें व इतर ज्ञानेन्द्रियांना विकसित केलें.

### लेखणींतील प्रेरणाशक्ति

शास्त्रीबुवांच्या लेखणींत आत्मप्रत्यय उत्पन्न करण्याची प्रेरणाशक्ति होती. कोणतेंहि मोठें काम साहेबच करील, शाळेचा मुख्याधिकारी होण्यासहि तोच लायक; असली नादान वृत्ति आपल्या लोकांत खिळली होती. ती वृत्ति शास्त्रीबुवांनीं आपल्या लेखणीच्या तीक्ष्ण टोकानें नाहींशी करून त्यांच्या ठायीं स्वकर्तृत्वाचा आत्मविश्वास उत्पन्न केला. या बाबतींत 'आधीं केलें मग सांगितलें' हीच वृत्ति शास्त्रीबोवांनीं ठेवली होती. यासाठींच शाळा, वर्तमानपत्रें, छापखाना, चित्रशाळा हीं विविध कार्यें त्यांनीं सुरू केलीं. शास्त्रीबोवांच्या काळांत महाराष्ट्रांत रंगीत चित्रें छापण्याचा एकहि कारखाना नव्हता. देवादिकांचीं चित्रें छापून यावीं तींहि परदेशांतूनच. ही स्थिति पालटावी म्हणून त्यांनीं चित्रशाळा काढली, व त्या मानानें त्यांचें हें कृत्य मोठेंच धाडसाचें होय. किताबखाना काढला तोहि अशाच उद्देशानें. अशा तऱ्हेनें त्यांच्या सर्व कार्यांत आत्मप्रत्ययाचा एकच नाद निघत आहे.

### मराठीचे शिवाजी

आजच्या अध्यक्षांनीं विटेवर वीट रचून मोठमोठ्या इमारती उठविल्या. तर त्यांचे सहकारी शास्त्रीबुवा यांनीं शब्दांवर शब्द रचून विशाल ज्ञानमंदिरें निर्माण केलीं व त्याद्वारें जनतेंत ज्ञानशक्ति उत्पन्न केली. हीं विविध कार्यें करीत असतां शास्त्रीबोवांना कित्येक लोकांवर कडक टीकाहि करावी लागली. परंतु ती टीका द्वेषमूलक नसून लोकांना शिक्षण देण्याचाच तींत शुद्ध हेतु होता. शास्त्रीबोवा यांची मराठीची कामगिरी अत्यंत प्रचंड आहे. शास्त्रीबुवांच्या बंधूंनीं लिहिलेल्या त्यांच्या चरित्रांत शास्त्रीबुवांच्या तोंडीं I am the Shivaji of Marathi Language असे उद्गार घातलेले आहेत, ते निरर्थक नव्हेत. त्यांचा स्वसंस्कृतीचा व इतिहासाचा अभिमानहि तसाच जाज्वल्य होता. इंग्रजींतील सर्व

उच्च ज्ञान मराठींत यावें असा त्यांचा आग्रह होता. लोकशिक्षण हें तर त्यांचें ध्येयच होतें. लोकांना इतिहासाचें ज्ञान व्हावें म्हणून त्यांनीं एक 'काव्येतिहाससंग्रह' मासिकहि काढलें होतें. इतिहासाची स्फूर्ति आपल्याला शास्त्रीबुवांपासूनच मिळाली असें खुद्द कै. राजवाडे म्हणत. नूतन मराठी विद्यालय निघण्यासहि शास्त्रीबुवांची स्फूर्तिच कारण झाली. अशा तऱ्हेनें प्रत्येक बाबतींत त्यांनीं लोकांना आत्मस्वरूप दाखविलें, स्वतःची स्वतःला ओळख पटली. अल्पायुष्यांत शास्त्रीबुवांची एवढी महनीय कामगिरी पाहिली म्हणजे कौतुक वाटतें. 'मुहूर्तं ज्वलितं श्रेयो न च धूमायितं चिरम्' या उज्ज्वल वाक्यांत त्यांच्या चारित्र्याचें सार सांठविलें आहे. शास्त्रीबुवांच्या कामगिरीची ओळख दरसाल करून देण्याचा उपक्रम त्यांच्या निधनापासून सद्वर्तनप्रवर्तक मंडळीतर्फे कै. वामनराव तळवलकरप्रभृतींनीं सतत चालू ठेवला या गोष्टीचा उल्लेख करणें या प्रसंगीं जरूर वाटतें."

### मातीचें सोनें होतें

त्यानंतर **श्री. वामनराव पटवर्धन** यांचें भाषण झालें. ते म्हणाले, "शास्त्रीबोवांनीं जशा शाळा, वर्तमानपत्रें किंवा मासिकें काढलीं तसेंच छापखानेहि सुरू केले. जो आर्यभूषण छापखाना त्यांनीं सुरू केला त्या छापखान्याची व्यवस्था हल्लीं मजकडे आहे. इतकाच माझा व शास्त्रीबोवांचा संबंध. हल्लींच्या छापखान्याचें पूर्वीचें स्वरूप सांगावयाचें झालें तर येथील लोखंडाचे व्यापारी श्री. साठे यांच्या घरीं कोपऱ्यांत पडलेलें एक जुनें यंत्र, असें सांगतां येईल. हें यंत्र कै. विष्णुशास्त्री चिपळूणकर व त्यांची मित्रमंडळी यांनीं दोनशें रुपयांच्या हप्तेबंदीनें बाराशें रुपयांस विकत घेतलें. छापखाना सुरू करण्याचे वेळीं त्यांना अनेक अडचणी आल्या. पण थोर पुरुषाच्या हातांत जरी माती आली तरी त्याचें सोनें होतें असें म्हणतात तशीच स्थिति या छापखान्याची झाली. छापखान्याचे मूळ संस्थापक जरी आज दिवंगत झाले असले तरी त्यांच्या पुण्याईनें छापखान्याला आज आलेलें स्वरूप व त्यांच्याकडून होत असलेली लोकसेवा कशा प्रकारची आहे हें निराळें सांगावयास नकोच. या छापखान्याच्या केसेस त्या वेळच्या चालकांनीं आपल्या डोक्यावरून नेल्या होत्या. सांगण्याचा मुद्दा असा कीं, पूर्वीच्या लोकांना काम करण्याची हौस किती होती हें यावरून चांगलेंच नजरेस येतें."

### जिव्हाळ्याची स्मृति खरी आनंददायक

**श्री. न. चिं. केळकर** आपल्या भाषणांत म्हणाले, "केसरी–मराठा संस्थेचा प्रतिनिधि या नात्यानें मी बोलावयास उभा आहें. आजच्या सभेला दिवाणबहादूर गोडबोले हे अध्यक्ष लाभले ही अभिनंदनीय गोष्ट होय. जिवंत किंवा जिव्हाळ्याची स्मृति जो उत्पन्न करील असाच अध्यक्ष अशा प्रसंगीं असणें यांतच स्वारस्य आहे. 'मी शास्त्रीबुवांबरोबर काम केलें, त्यांच्याबरोबर बोललों, त्यांच्याबरोबर वागलों', इत्यादि अध्यक्षांनीं सांगितलेल्या आठवणींत अद्भुतपणा कांहीं नसूनहि त्यांत जिवंतपणा व जिव्हाळा असल्यानें ती माहिती विशेष आनंददायक वाटते. गेल्या ५० वर्षांचा जसा कांहीं इतिहासच बोलतो आहे असें त्यांच्या भाषणावरून अनुभवास आलें. मनुची नांवाच्या युरोपियन प्रवाशानें शिवाजीच्या वेळची एक हकीकत लिहून ठेविली असून तींत 'मी दक्षिणेवर चालून आलेल्या जयसिंगाबरोबर होतों. एके दिवशीं आम्ही गंजिफा खेळत बसलों असतां रात्रींच्या वेळीं शिवाजी आला. त्याचें आमचें बोलणें झालें व नंतर तो निघून गेला' असें वर्णन आहे. वर्णन किती साधें, परंतु तें मीं जेव्हां वाचलें तेव्हां त्यापासून मला किती आनंद वाटला हें मी शब्दानें सांगूं शकत नाहीं. या दृष्टीनें आज आपल्याला ८५ वर्षांचा पुराणपुरुष विष्णुशास्त्र्यासारख्या विभूतीची माहिती सांगण्यास लाभला, यांत मोठेंच स्वारस्य आहे. आतांच श्यामकाव यांनीं विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनीं स्वराज्याची गुढी उभारली असें त्यांच्या कार्याचें महत्त्व गाइलें. परंतु स्वराज्याच्या कार्यापेक्षां ग्रंथनिर्मितीच्या कार्यामुळेंच शास्त्रीबोवांचें नांव अधिक प्रसिद्ध आहे.

### राष्ट्रानें जगावें कसें ?

लोकमान्य टिळकांचें ग्रंथकर्तृत्व व त्यांची मराठीची कामगिरी ही शास्त्रीबोवांच्या ग्रंथकर्तृत्वापेक्षां कांकणभर अधिकच भरेल. तरीसुद्धां राजकारणामुळे त्यांचें नांव विशेष प्रसिद्ध आहे. त्याप्रमाणें शास्त्रीबुवांचा लौकिक हा त्यांच्या ग्रंथनिर्मितीमुळेच अधिक आहे. ग्रंथकर्तृत्व व राजकारणकर्तृत्व यांचा विचार करतां शास्त्रीबुवांनीं मराठीचा जो पायंडा घातला त्याबद्दल आपण आपली कृतज्ञता व्यक्त करीत आहों व तेंच उचित आहे. शास्त्रीबुवांच्या काळीं इंग्रजी भाषेचा जुलमानें स्वीकार झाला होता. नोकरीसाठीं ती भाषा शिकावी लागत असल्यानें लोकांच्या मनावर तिचा एवढा पगडा बसला होता कीं, नोकरीपायीं ते आपली भाषाहि विसरूं लागले होते. बाप मेल्यावर मुलाचें पालन आई करील व आईहि मेल्यावर त्याचें संगोपन दुसरा कोणी करील. परंतु मातृभाषाच मेल्यावर राष्ट्रानें जगावें कसें ? खुद्द शास्त्रीबुवा किंवा टिळक हेहि आपलीं खासगी पत्रें प्रायः इंग्रजींत लिहीत. एवढी त्या भाषेची संवय त्या पिढीला लागली होती. त्या वेळच्या

लोकांचें सर्व लेखन जेथें इंग्रजींत चालें तेथें त्यांचे विचारहि प्रथम इंग्रजींतच येत असले पाहिजेत हें काय सांगावयाला पाहिजे? कारण मानसशास्त्राचा असा सिद्धांतच आहे कीं, भाषेवांचून विचार होऊंच शकत नाहीं.

**सभागृह का रंगमहाल?**

आजहि कॉलेजांतील मुलांचा खासगी पत्रव्यवहार पाहिला तरी तो इंग्रजींतून चालतो. ही खोड अत्यंत वाईट आहे. इंग्रजींतून विचार आल्यामुळें शहाण्याशहाण्यांची कशी फजिती उडते याचें एक गमतीचें उदाहरण घडून आलें. एकदां हायकोर्ट जज्जाच्या जागेपर्यंत वाढलेल्या एका महाराष्ट्रीय गृहस्थाला सभेंत मराठींतून बोलण्याचा प्रसंग आला. सभेची वेळ झाल्यावर जजसाहेब बोलावयास उठले व म्हणाले, सभ्य स्त्री–पुरुषहो, आज आपण या 'रंगमहालांत' कशाकरितां जमलों आहोंत हें तुम्हांस विदितच आहे!" व्याख्यात्यांच्या डोक्यांत 'Ladies and gentlemen, you know why we are assembled tod.y in this hall' असे विचार आले व त्यांनीं Hall'चें भाषांतर 'रंगमहाल' असें करून सभेंत हंशाचा रंग मात्र उधळला! 'Hall' चा अर्थ सभागृह व रंगमहाल असे दोनहि असल्यानें विचाऱ्याला मराठी शब्दांतील स्वारस्य कळलें नाहीं व त्यानें भलताच शब्द वापरला. ही गेल्या दहापंधरा वर्षांतील स्थिति. परंतु आतां काळ पालटत चालला आहे. सध्यां विद्यापीठांत मराठीला स्थान मिळालें असून तिचा अभ्यास होऊं लागला आहे. प्रतिक्रियेला प्रारंभ झाला आहे. खेड्यांपर्यंत ज्ञानाचा प्रसार करावयाचा असल्यानें मराठीची प्रवृत्ति वाढत चालली आहे.

**इंग्रजी भाषेची नियमबाह्यता**

शास्त्रीबुवांना मी स्वतः पाहिलें नाहीं. परंतु मी १० वर्षांचा असतांना मिरजेस हरिभाऊ आपटे यांनीं तयार केलेलें 'शिष्यजन–विलाप' हें काव्य वाचलें. आमच्या वेळीं रा. ब. रानडे, रा. कुंटे व चिपळूणकर अशीं तीनच नांवें ऐकूं येत. मोठा माणूस कोणता हें आपल्याला पाहावयाचें असेल तर 'इन्डाक्टिव्ह' पद्धतीनें आपण लहान मुलांना विचारावें व ज्याचें नांव तो सांगेल तो खरा मोठा पुरुष असें म्हणण्यास हरकत नाहीं. हा नियम शास्त्रीबुवांच्या बाबतीतहि खरा ठरतो. शास्त्रीबुवांचें मराठीवर प्रेम होतें तरी इंग्रजीबद्दल त्यांना द्वेष वाटत नसे. त्यांचे ग्रंथ जो वाचील त्याला त्यांच्या संस्कृत व इंग्रजी अध्ययनाची चांगली कल्पना येईल. शास्त्रीबुवांचें इंग्रजी वाङ्मयाचें अध्ययन होतें तरी त्या भाषेबद्दल मात्र त्यांची नावड होती आणि ती भाषाहि तशीच unreasonable नियमरहित आहे तिला समानाधिकरण कसें तें नाहींच. सुप्रसिद्ध फ्रेंच लेखक व्हॉल्टेर याची एक अशी गोष्ट सांगतात कीं, तो इंग्लंडमध्यें गेल्यावर इंग्रजी शिकूं लागला. तेव्हां इंग्रजी स्पेलिंग व उच्चार हे किती अयुक्तिक आहेत हें त्याच्या नजरेस आलें. एके दिवशीं त्यानें आपल्या शिक्षकाला 'Plague' व 'Ague' या दोन शब्दांतील 'प्लेग' याचें एक सिलेबल कसें व 'ॲग्यू' यांत दोन सिलेबलं कशीं असा प्रश्न विचारला. त्यावर शिक्षक थोडा विनोदीच असल्यानें त्यानें 'Let the Plague take one half and let the Ague take the other half!' असें उत्तर दिलें. इंग्रजी भाषेची ही नियमबाह्यता जेथें व्हॉल्टेर याला नडली तेथें सामान्य लोकांची स्थिति काय होत असेल?

**बार्बेरियनांचा खुनशीपणा**

इंग्रजांनीं आम्हांवर इंग्रजी भाषा लादली. शिक्षण हें इंग्रजींतूनच देण्यांत येत असल्यानें इंग्रजीचें वर्चस्व साहजिकच वाढून मराठी भाषा मागें पडली. पण या बाबतींत इंग्रजांना तरी दोष कां द्यावा! 'जिताच्या डोक्यांत धोंडा' असाच जगाचा नियम दिसतो. याचें उदाहरण द्यावयाचें तर तें बार्बेरियन लोकांचें देतां येईल. बार्बेरियन लोकांनीं रोमवर स्वारी केली व तेथें त्यांनीं मनस्वी धुमाकूळ माजविला. 'आपण परत जा' अशी तेथील लोकांनीं विनंति केली असतां 'भारभार सोनें देत असाल तर परत जातों' असें त्यांनीं उलट कळविलें. शेवटीं सोनें भारंभार भरत आलें असें पाहून त्यांनीं वजनाच्या पारड्यांत तें खालीं बसावें म्हणून आपली तलवार टाकली, त्याप्रमाणें इंग्रजांनीं इंग्रजी भाषा आम्हांवर घातली आहे. सर्व जगांत त्या त्या देशांतील शिक्षण मातृभाषेंतून दिलें जातें. परंतु इंग्रजांनीं मात्र हिंदुस्थानांत शिक्षण मातृभाषेतून देण्यास अजूनहि सुरुवात केली नाहीं व म्हणूनच त्यांच्यावर एवढा माझा राग. आमच्या भाषेची माहिती इतर देशीयांना असल्यास मनाला तेवढेंच समाधान वाटतें. परंतु त्याहि बाबतींत निराशाच.

**खरें स्मारक महाराष्ट्र विद्यापीठच**

नुकतेच ऑक्सफोर्ड विद्यापीठाचे प्रो. टॉमसन हे येथें आले असतांना त्यांनीं माझी भेट घेतली व मला मराठी भाषेची ऐतिहासिक दृष्ट्या ते माहिती विचारूं लागले. तेव्हा मी त्यांना साहजिक महाराष्ट्रांतील प्रसिद्ध लेखकांची माहिती त्यांना आहे का हें पाहिलें. परंतु दुःखाची गोष्ट अशी कीं, एकाहि मराठी लेखकाची माहिती त्यांना सांगतां आली नाहीं. स्वराज्य तर नाहींच परंतु आमची संस्कृति, भाषा, आमचा खरा इतिहास

यांचा गंधहि परदेशस्थांना नाहीं हें समजल्यावर मला मेल्याहून मेलें झालें. अशा स्थितींत आपल्या भाषेची प्रतिष्ठा वाढवावयाची असेल तर त्यासाठीं महाराष्ट्र विद्यापीठाची स्थापना होणें आवश्यक आहे. माझ्या मतें तरी शास्त्रीबुवांचें तेंच खरें स्मारक होय. आनंदाची गोष्ट अशी कीं, ही विद्यापीठाची कल्पना महाराष्ट्रांत निघालेलीहि आहे. मग ती प्रत्यक्ष स्वरूपांत केव्हां उतरेल तेव्हां उतरो. पण एक गोष्ट मात्र सत्य कीं, कल्पना एकदां निघाली कीं, ती पाताळांत शिरून शेषाची टाळू फोडून बाहेर आल्याशिवाय राहणार नाहीं. शास्त्रीबुवांचा मोठेपणा विशेषणांनीं वर्णन करण्यापेक्षां अवघ्या ३२ वर्षांत त्यांनीं जीं कार्यें केलीं तीं मनांत आणली म्हणजे त्यांतून त्यांचें महत्त्व उमटल्याशिवाय राहत नाहीं. शाळा, चित्रें, इतिहास, छापखाना, व वर्तमानपत्रें इतके प्रगमनशील बुद्धीचे पैलू मनांत आणल्यावर त्यांचा मोठेपणा आपोआपच सिद्ध होतो." अशा आशयाचें भाषण झाल्यावर श्री. केळकर यांनीं स्मारकाची योजना मांडली. दरसाल एम्. ए. च्या परीक्षेंत मराठी विषयांत पहिला नंबर येणाऱ्या विद्यार्थ्याला सुमारें २५० रुपयांचें बक्षीस देण्यांत यावें असें स्मारकाचें सामान्य स्वरूप आहे. आतांपर्यंत स्मारकाला केसरी-मराठा संस्था, डेक्कन एज्युकेशन सोसायटी, शिक्षणप्रसारक मंडळी, चित्रशाळा व आर्यभूषण छापखाना यांनीं प्रत्येकीं ५०० रुपये देणगीदाखल दिले असल्याचें त्यांनीं जाहीर केलें.

### आभारप्रदर्शन

शेवटीं प्रि. महाजनी हे अध्यक्षांचे आभार मानतांना म्हणाले, "डेक्कन एज्युकेशन सोसायटी व शिक्षणप्रसारक मंडळी या दोनहि संस्थांचे जनक विष्णुशास्त्री चिपळूणकरच आहेत. या दोनहि संस्था अद्याप बाल्यावस्थेंत आहेत असें म्हणावयास हरकत नाहीं. लहान मुलांना जशीं दुखणींबाणीं येतात तशींच संस्थांनाहि येतात. जिवावरील दुखण्यांतून उठलेल्या मनुष्यामध्यें कांहीं दिवस दुखण्याचें व्यंग जसें राहातें तसेंच एक दुखणें एका संस्थेवर नुकतेंच येऊन गेलें आणि त्याचा परिणामहि या संस्थेवर थोडाबहुत राहिला. पण संस्थापकांच्या पुण्याईनें तो लवकरच निघून जाऊन संस्था अव्यंग होईल अशी माझी खात्री आहे. आजच्या सभेचे अध्यक्ष वडील या नात्यानें दोनहि संस्थांचें परिपालन करीत आहेत;तेव्हां त्यांच्या गळ्यांत हार घालून त्यांचा सन्मान करणें म्हणजे अप्रत्यक्ष रीतीनें कै. विष्णुशास्त्री चिपळूणकरांचाच सन्मान करणें असें मी समजतों. वरील आशयाचें प्रि.महाजनी यांचें भाषण झाल्यावर अध्यक्षांनीं सभा बरखास्त झाल्याचें जाहीर केलें.

# मराठीचे शिवाजी

( लेः— प्रो. लक्ष्मणशास्त्री लेले )

### शास्त्रीबुवांचीं अपत्यें

विष्णुशास्त्री चिपळूणकर दिवंगत होऊन आज पन्नास वर्षें लोटलीं. शास्त्रीबुवांचीं स्मारकें त्यांच्या हयातींत त्यांच्याच हातानें उभारलीं गेलीं. केसरी, मराठा, आर्यभूषण, चित्रशाळा, किताबखाना, न्यू इंग्लिश स्कूल व काव्येतिहाससंग्रह या सर्व संस्था त्यांच्या. परंतु या संस्थांचे ते जनक मात्र होते; पिते नव्हते. कारण शास्त्रीबुवा दुर्दैवानें अल्पायु झाल्यामुळें त्यांच्या हातून त्यांच्या धोरणाप्रमाणें सदरील संस्थांचें पालन, पोषण व संवर्धन होऊं शकलें नाहीं. या संस्थांची रूपरेषा शास्त्रीबुवांनीं आंखून ठेवली होती. तिच्यावरून त्यांच्या बहुविध व प्रचंड उद्योगाची, व्यापक दृष्टीची व देशहितचिंतनाची चांगलीच कल्पना होते. शास्त्रीबोवांचें खरें, पूर्ण व चिरंतन स्मारक म्हणजे त्यांची निबंधमाला होय. ही त्यांनीं स्वतः आरंभिली व पुरी केली. या मालेंत शास्त्रीबुवांचें यथावत् स्वरूप प्रतिबिंबित झालें आहे. निबंधमालेचा उद्देश स्वतः शास्त्रीबोवांनीं स्पष्ट लिहून ठेविला आहे. अज्ञानविध्वंसन, सन्मार्गदर्शन व सद्विचारप्रवर्तन हें तिचें स्वरूप आहे. हा उद्देश सिद्धीस नेण्याच्या हेतूनें त्यांनीं निबंधमाला गुंफली. या त्यांच्या लाडक्या मालेचा परिमल त्यांच्या हयातींतच अखिल महाराष्ट्रांत दरवळला. तरुण, विद्याप्रिय व रसिक वाचक मालेच्या अंकाची अतिशय उत्कंठेनें वाट पहात असत ही गोष्ट मला चांगली आठवते. शास्त्रीबोवांना लौकिक संतति नव्हती. तथापि तिची जागा निबंधमाला व केसरी या त्यांच्या अलौकिक अपत्यांनीं भरून काढली. पित्याच्या नितांत वत्सलतेचें अनिर्वचनीय सुख भाग्यशालिनी निबन्धमालेस पूर्ण लाभलें. पोरक्या केसरीचा अभ्युदय व उत्कर्ष मात्र शास्त्रीबुवांच्या कर्तृत्वशाली मित्रांच्या हातून व्हावा असा ईश्वरी संकेत होता. मराठी वाङ्मयांत या बहीणभावंडांचीं नांवें त्यांच्या विक्रमांकित चरित्रांनीं चिरस्मरणीय करून ठेविलीं

आहेत. निबन्धमाला आजमितीलाहि अगदीं टवटवीत असून ती महाराष्ट्राचें रंजन व उद्बोधन करीत आहे. शास्त्रीबोवांच्या पुण्याईनें त्यांचा प्रतापशाली पुत्र केसरी वारंवार गंभीर गर्जना करून महाराष्ट्र दणाणून सोडीत आहे व त्याच्या प्रतिध्वनीनें सह्याद्रीच्या दऱ्या निनादित होत आहेत. शास्त्रीबोवांच्या या अर्धशतकमहोत्सवप्रसंगीं त्यांच्या या पराक्रमी अपत्यांचें कौतुक कोणास करावेसें वाटणार नाहीं? तथापि वर सांगितल्याप्रमाणें निबंधमाला हाच ग्रंथ शास्त्रीबोवांच्या कीर्तीचा मुख्य आधारस्तंभ म्हणून त्याच्याविषयींच या लेखांत थोडा विचार करावयाचें योजलें आहे.

## निबंधमालेची पूर्वतयारी

निबंधमाला ही एक सुंदर व भव्य इमारत कल्पिली तर कविसार्वभौमाच्या सप्तांकी शाकुंतलाप्रमाणें सात वर्षांच्या सात मजल्यांचा हा टोलेजंग प्रासाद आहे असें वाटूं लागतें. याचा पाया फार भक्कम आहे. कृष्णशास्त्र्यांची असाधारण बुद्धिमत्ता, विद्येची पराकाष्ठेची हौस, लोकोत्तर रसिकता, व लोभनीय शरीरसंपत्ति विष्णुशास्त्री यांस निसर्गतः प्राप्त झाली. या गुणांचा परिपोष करणारी सामुग्री ही त्यांना घरांतच अनायासें उपलब्ध झाली. ती सामुग्री म्हणजे वडिलांचा विपुल व वेंचक ग्रंथसंग्रह, त्यांचें पुस्तक-परीक्षणात्मक लेख, त्यांचें काव्यप्रणयन, त्यांची आपल्या मित्रांशीं विविध विषयांवरील मार्मिक चर्चा इत्यादि अनन्यसाधारण गोष्टी होत. पुढें लेखनकलेच्या उपासनेला वडिलांच्या शालापत्रकांत शास्त्रीबुवांना अवसर मिळाला. वडिलांच्या तालमींतील ही तयारी शास्त्रीबोवांच्या पुढील उद्योगास फार उपकारक झाली. यापुढें डेक्कन कॉलेजांत उत्कृष्ट आचार्यांचा त्यांना योग आला. त्या विद्यालयांतील प्रचण्ड ग्रंथसंग्रह शास्त्रीबुवांची तीव्र वाचनतृष्णा भागविण्यास तयार होता. शास्त्रीबुवांनीं या संधीचा पुरा फायदा घेतला. ही सर्व तयारी निबंधमालेचा पाया होय.

डेक्कन कॉलेजामध्यें असतां शास्त्रीबुवांनीं परीक्षेच्या अभ्यासाकडे फारसें लक्ष दिलें नाहीं. यांत त्यांचें विद्येकरितां विद्या संपादन करण्याचें धोरण दिसून येतें. वाङ्मय व इतिहास हे त्यांचे फार आवडते विषय. यांवरील सर्व ग्रंथ त्यांनीं कॉलेजांत असतां वाचून टाकले. वाचलेल्या ग्रंथांवरील व्यासंगानें व परिशीलनानें त्यांना नव्या दिव्य दृष्टीचा लाभ झाला. त्या दृष्टीनें तें स्वदेशस्थितीकडे पाहूं लागले तेव्हां त्यांचें अन्तःकरण द्रवूं लागलें. स्वदेश, स्वधर्म व स्वभाषा यांच्या विपन्न स्थितीचें त्यांना बिनचूक निदान करतां आलें. इंग्रजी विद्येच्या संस्कारानें त्यांची दृष्टि निर्मल, उदार व विशाल झाली. त्यांच्या मनांत नवनवे विचार उद्भवले व ते स्वैर विहार करूं लागले. त्यांच्या वेळीं इंग्रजी शिकून बहकलेल्या पंडितांची चोहोंकडे दाटी झाली होती. इंग्रजांचा भरमसाट स्तुतिपाठ व स्वदेशधर्मादिकांची अवास्तव निंदा त्यांच्या भोंवतालीं चालू होती. ही स्थिति कशी बदलेल व आपल्या देशाला चोहों बाजूंनीं उन्नत अवस्था कशी प्राप्त होईल याविषयीं शास्त्रीबुवांच्या अंतःकरणांत तळमळ सुरू झाली. लोकांचें गाढ अज्ञान दूर करणें, त्यांस वस्तुस्थितीची जाणीव करून देणें व सर्वांगीण भावी उन्नतीचे विचार व मार्ग सुचविणें हाच आपल्या देशाचा तरणोपाय असें त्यांच्या मनानें ठाम घेतलें. शेवटीं याच साधनांचा अवलंब करून पुढें पाऊल टाकण्याचा त्यांनीं निश्चय केला. हा निश्चय निबंधमालेच्या पायावरील मजबूत फरसबंदी होय.

## पितापुत्रांमधील विरोध

पित्याचे कांहीं गुण पुत्राच्या उपयोगीं पडले ही गोष्ट जितकी खरी तितकीच हीहि गोष्ट खरी आहे कीं, पुत्राच्या स्वतंत्र विचारांचें व वृत्तीचें पित्यानें अभिनंदन केलें नाहीं! पितापुत्रांमधील कांहीं बाबतींतला विरोध ध्यानांत धरण्यासारखा आहे. पिता सरकारच्या नोकरींत व आश्रयांत आनंद मानणारा तर पुत्र सर्व प्रकारांनीं स्वतंत्रतेचा बाणा बाळगणारा; पिता केवळ ज्ञानसंग्राहक तर पुत्र मिळविलेल्या ज्ञानाचा फैलावा करणारा व वाचकांस नवनवी स्फूर्ति देणारा; पिता धर्मोदासीन व व्यसनी तर पुत्र धार्मिक बुद्धीचा व निर्व्यसनी. पिता इंग्रजांचे केवळ गुण गाणारा तर पुत्र इंग्रजांच्या गुणांच्या अभिनंदनाबरोबर त्यांच्या दोषांचेंहि आविष्करण करणारा पिता स्वतःची व स्वतःच्या कुटुंबाची सुखसोय पाहणारा तर पुत्र अल्पसंतुष्ट राहून विश्वकुटुंबी होऊं पाहाणारा. असा हा पितापुत्रांमधील विरोध बलवत्तर होता. तथापि शास्त्रीबुवांनीं त्याची पर्वा केली नाहीं. वडिलांना वाईट वाटूं नये म्हणून त्यांनीं प्रथम सरकारी नोकरी पत्करली. पण पुढें त्यांनीं आपला कृतसंकल्पच तडीस नेला. निबंधमाला लिहिण्याच्या बाबतींत त्यांनीं कोणाचीहि अल्पसुद्धां मदत मागितली नाहीं. माला ही त्यांच्या एकट्याच्या परिश्रमाचें फल आहे.

## मालेचा पहिला मजला

शास्त्रीबुवांच्या खऱ्या आवडीचा विषय म्हणजे काव्येतिहास होय हें वर आलेंच आहे. निबंधमालेंतील विषयांवर या त्यांच्या आवडीची दाट छाया पसरली आहे. मालेच्या आरंभीं मराठी भाषेची सांप्रतची स्थिति हा निबंध आहे, व तिच्या शेवटीं

'आमच्या देशाची स्थिति' हा लेख आहे. या दोन लेखांवरून मालेच्या द्वारें शास्त्रीबुवांस काय सांगावयाचें होतें याचा उलगडा होतो. 'मराठी भाषेची सांप्रतची स्थिति' व तदनुषंगी सर्व भाषाविषय या सर्वांचा मिळून मालाप्रासादाचा पहिला मजला समजण्यास हरकत नाहीं. मराठी भाषेच्या इतिहासाची कल्पना शास्त्रीबुवांस सुचली होती. परंतु तिचीं साधनें त्यांस अनुकूल नव्हतीं यामुळें त्यांस तें काम हातीं घेतां आलें नाहीं. तथापि कोणाला त्या विषयावर लिहिणें झाल्यास त्यानें तो कसा लिहावा हें दाखविण्याकरितां त्यांनीं 'इंग्रजी भाषा' हा सुंदर लेख लिहिला. हा निबंध व जॉनसनचें चरित्र मिळून मालाप्रासादाचा दुसरा मजला समजूं या. जॉनसन् याचें चरित्र लिहिण्याचा उद्देश चरित्रकारांनीं सांगितला आहे. तथापि माझी अशी कल्पना आहे कीं, कृष्णशास्त्री व जॉन्सन यांच्यांत कांहीं गोष्टी उभयसामान्य आहेत त्यावरून शास्त्रीबुवांना जॉन्सनचें चरित्र लिहिण्याची स्फूर्ति झाली असावी. गाढ पाण्डित्य, तर्कशुद्ध कोटिक्रम, अस्खलित वक्तृत्व, जबरदस्त विद्याव्यासंग, सूक्ष्म व विवेचकबुद्धि, टीका व निबंध लिहिण्याचा सतत व्यासंग, भाषाकोविदत्व, परम सहृदयता व सभा जिंकण्याची दुर्दम इच्छा हे गुण उपर्युक्त पंडितद्वयांत ठळक प्रमाणांत वास करीत होते. जॉनसन् याला बॉसवेल मिळाला. कृष्णशास्त्र्यांस विष्णुशास्त्री हेच बॉसवेल लाभले होते. पण महाराष्ट्राचें मोठें दुर्दैव कीं, अल्पायु झाल्यामुळें या मराठी बॉसवेलच्या हातून महाराष्ट्र जॉनसन् याचें चरित्र निर्माण झालें नाहीं! जॉनसन यांचे चरित्र मराठी चरित्र-ग्रंथांस आदर्शभूत आहे.

### मोरोपंतांची कविता

इतिहास हा निबंध मी मालामन्दिराचा तिसरा मजला समजतों. हा विषय शास्त्रीबोवांच्या अत्यंत आवडीचा. यांत त्यांचा बहुश्रुतपणा व सूक्ष्म अवलोकन हे गुण प्रकट झाले आहेत. शास्त्रीबुवा निबंधाची किंवा लेखाची निवड केव्हां वाचकांच्या सोयीकरितां व रंजनाकरितां करीत तर केव्हां स्वतःच्या सोयीप्रमाणें किंवा लहरीप्रमाणें करीत. 'मोरोपंतांची कविता' हा त्यांचा मोठा निबंध वाचकांच्या व स्वतःच्याहि आवडीमुळें तयार झाला. हा मालामन्दिराचा चवथा मजला होय. हा अत्यंत रमणीय आहे. मेकॉलेवर शास्त्रीबुवांचें एक प्रकारचे प्रेम होतें. मेकॉलेची बहुश्रुतता व त्याच्या लेखणीचें मुग्ध कटाक्षवीक्षण यांवर शास्त्रीबुवा खूप असत. हे मेकॉलेचे गुण पुष्कळ अंशीं शास्त्रीबुवांनीं उचलले आहेत. मेकॉलेचा मिल्टनवरील निबंध प्रसिद्ध आहे. मिल्टन व मोरोपंत यांच्यामध्यें कांहीं अंशीं साम्य आहे. मिल्टनच्या महाकाव्याचा पाया बायबल होय. मोरोपंतांच्या महाकाव्यांची उभारणी रामायण, महाभारतादि ग्रंथांवर झाली आहे. मिल्टन लॅटिन पंडित तर पंत संस्कृतसाहित्याचार्य; मिल्टनची भाषा प्रगल्भ शांत व गंभीर, पंतांची भाषाहि संस्कृतप्राचुर्यामुळें भारदस्त व यमकादिकांच्या करामतीमुळें घोटींव, डौलदार व नागर बनलेली; महाकाव्याचे गुण ज्याप्रमाणें मिल्टनच्या कृतींत त्याप्रमाणें पंतांच्या आर्याभारतांतहि अवतीर्ण झालेले आहेत. इंग्लंडांत मिल्टनच्या काव्यांना पंडितांची मान्यता मिळाली आहे, तर पंतांच्या काव्यांना काशीपासून रामेश्वरापर्यंत विद्वान हरिदासांच्या मुखांत आश्रय मिळाला आहे. अभिजातपणाची दोघांच्या भाषेवरहि छाप आहे. हें साम्य मनांत येऊन शास्त्रीबुवांनीं 'मोरोपंतांची कविता' हा निबंध लिहिला असावा असा माझा तर्क आहे. या निबंधांत शास्त्रीबुवांच्या परम रसिकता, गुणग्राहकता व भाषाप्रभुता या गुणांची अहमहमिकता सुरू झाली आहे. शास्त्रीबुवांचें पंतकाव्यवाचन जरी फार विस्तृत नव्हतें तरी तें इतकें मार्मिक होतें कीं, त्यांचा पंतकाव्यांवरील अभिप्राय पंतकाव्योदधीचें मंथन करणाऱ्या आजच्या विद्वानांस देखील पुष्कळ अंशीं मान्य होण्यासारखा आहे.

### देशस्थितीची मीमांसा

'लोकहितवादी' हा निबंध मालाप्रासादाचा पांचवा मजला असें मी समजतों. 'लोकहितवादी' हें टोपण नांव कै. गोपाळराव हरि देशमुख यांनीं धारण केलें होतें. या टोपण नांवानें त्यांनीं पुष्कळ पत्रें, निबंध व टांचणें लिहिलीं. लोकहितवादी यांच्यावरील निबंध बराच तिखट आहे हें खरें आहे. परंतु देशमुखांच्या परकट व भ्रांतिमूलक विचारांवर शास्त्रीबुवांचा मुख्य कटाक्ष होता हे स्पष्ट दिसून येतें. लोकहितवादीवरील टीकेच्या आरंभीं शास्त्रीबुवानीं लोकहितवादीच्या गुणांचा योग्य परामर्ष घेतला आहे. लोकभ्रमादि निबंधांचा गट हा मालामंदिराचा सहावा मजला होय. यांतील अपशकुनी मानल्या गेलेल्या बिचाऱ्या विधवेचें करुणामय शब्दचित्र आगरकरांच्या लेखसंग्रहांत प्रामुख्यानें शोभण्यासारखें आहे. यांत शास्त्रीबुवांची स्त्रीवर्गासंबंधाची उदार कल्पना अभिव्यक्त झाली आहे. लोकभ्रम या निबंधांत जुन्या वेडगळ समजुतींचें खंडन केलेलें आहे. 'आमच्या देशाची स्थिति' हा निबंध निबंधमालामंदिराचा सातवा मजला आहे. जित व जेते यांचा संबंध प्रायः मोठा विचित्र असतो. यांतील एकाचा जो विजय, लाभ किंवा उत्कर्ष तो दुसऱ्याचा पराभव, हानि किंवा अपकर्ष होत असतो. 'आमच्या देशाची स्थिति' यांतील देशस्थितीची मीमांसा भारतशासनकर्त्यांस मानवली नाहीं याचें

'बीज' या कल्पनेंत आहे. प्रजानुरंजन हेंच राजाचें मुख्य कर्तव्य ही कल्पना उदात्त असली तरी तिला रामराज्यांत मात्र अवसर मिळाला. ही गोष्ट केवळ अपवादात्मक होय. निबंधमालेच्या उपरि-निर्दिष्ट सातव्या मजल्यावर सरकारच्या अवकृपेचा अशनि कोसळावा ही मोठी खेदाची गोष्ट आहे! मालेच्या या उत्तमांगाचें दर्शन सध्यां तरी अशक्य आहे. जगप्रसिद्ध ताजमहालाच्या एका भागावर मागें ईश्वरी क्षोभामुळें वीज कडाडली. या गोष्टीची या प्रसंगीं आठवण झाल्यावांचून रहात नाहीं. दोन्हींतहि कलाविलासाचा उच्छेद झाला आहे. फरक इतकाच कीं, पहिला सुलतानीचा प्रभाव तर दुसरा अस्मानीचा. सुभाषितें, विनोद, महदाख्यायिका इत्यादि प्रकरणें मालामंदिरावरील नक्षी होत. शास्त्रीबुवां च्या धर्मविषयक कल्पनांस निबंधमालेंत फारसा अवसर मिळाला नाहीं. तथापि प्रार्थनासमाज, आर्यसमाज इत्यादि नवनवे धर्मग्रंथ किंवा संप्रदाय यांवर त्यांनीं हल्ले चढविले आहेत. त्यांत व्यक्त झालेल्या त्यांच्या विचारसरणीवरून धर्मकल्पनांच्या बाबतींत ते बरेचसे गतानुगतिक होते असें दिसते.

**मालेंतील टीका**

न्या. मू. रानडे यांनीं 'रिपोर्ट' या नात्यानें केकावली काव्यावर अभिप्राय दिला. त्यावर शास्त्री-बुवांनीं टीका केली नसती तर तो कोणास ठाऊक सुद्धां झाला नसता. सदर अभिप्रायांतील टीकाविषयीभूत महत्त्वाचा मुद्दा सारांशानें असा आहे कीं, केकावलींतील भक्तीचा प्रकार म्हणजे परमेश्वराशीं सलगी, मर्यादेचा अतिक्रम वगैरे खऱ्या भक्तीचा विध्वंसक होय व असा मार्ग उच्च संस्कृती-च्या भागवतांना मान्य होण्यासारखा नाहीं. यावर शास्त्रीबुवा म्हणतात कीं, एकाद्या कवीच्या काव्यांती-ल रस आस्वादावयाचा असल्यास अगर त्या काव्याची योग्यता ठरवावयाची असल्यास त्या कवीची संस्कृति व मनोभूमिका लक्षांत घेणें आवश्यक आहे, ही गोष्ट खरी आहे. तरी पण कवि व त्याचें काव्य यासंबंधीं टीकाकारानें आपल्या अभिरुचीप्रमाणें आपलें स्वतःचें मत बनवितां कामा नये हा शास्त्रीबोवांना अभिप्रेत असलेला निर्बंध अभिनंदनीय नाहीं. आणि या दृष्टीनें शास्त्रीबुवांचा माधवरावांवरील हल्ला समर्थनीय ठरत नाहीं. खुद्द शास्त्रीबुवांच्या रसिकवर्य वडिलांना मोरोपंत कवि आवडत नसे. शास्त्रीबुवांचा अभिप्राय याच्या अगदीं उलट होता. या वादांत रुचिवैचित्र्याच्या आधारावर शास्त्रीबोवांनीं विरोध मिटविण्याचा यत्न केला तशीच युक्ति या प्रसंगींहि शास्त्रीबुवांस योजतां आली असती. परंतु समा-जिष्टांचा समाचार घेण्याची संधि मिळाली तिचा मोह शास्त्रीबुवांस आवरला नाहीं. माधवराव केवळ निमित्तमात्र झाले. दयानंद सरस्वतीवरील शास्त्री-बोवांची मोहीम याच धोरणाची आहे. कुंटयांचा अचरटपणा व जोतिबा फुले यांचें अगाध ग्रंथकर्तृत्व यांवरील शास्त्रीबुवांचें शरसंधान अस्थानीं नाहीं.

**स्वतंत्र विचाराचे प्रवर्तक**

शास्त्रीबुवांच्या निबंधमालाप्रासादाचें निरीक्षण केलें असतां शास्त्रीबुवा निबंधकार, चरित्रकार व टीका-कार कशा प्रकारचे होते हें सहज लक्षांत येतें शास्त्री-बुवांचे पूर्वी बाळशास्त्री जांभेकर, कृष्णशास्त्री चिपळूण-कर अशांसारख्या अधिक विद्वान गृहस्थांनीं थोडी-बहुत ग्रंथरचना केली. तथापि विचाराचा नवीनपणा-स्वतन्त्रपणा, स्फूर्तिदायकता व तेजस्विता तिच्यांत नाहीं. म्हणून स्वतंत्र विचाराचे प्रवर्तक या दृष्टीनें शास्त्री-बुवांना आद्यस्थान देण्यांत येतें तें योग्य आहे. गेल्या पन्नास वर्षांत मराठीची अनेक प्रकारांनीं प्रगति झाली आहे. या कालांत कांहीं ग्रंथकार असा दर्जाचे निपजले आहेत कीं, खुद्द शास्त्रीबुवा स्वर्गांतून त्यांचें आनंदानें अभिनंदन करतील. तथापि असल्या ग्रंथकारांनाहि निबंधमालेपासून पुष्कळशी प्रेरणा झालेली आहे ही गोष्ट विसरतां येत नाहीं. याकरितांच शास्त्रीबुवांचें स्मरण व अभिवंदन करणें आवश्यक आहे.

# 'नवयुग'प्रवर्तक विष्णुशास्त्री

( ले. रामकृष्ण गोपाळ भिडे )

शास्त्रीबोवांनीं विविध स्वरूपाचीं कामें केलीं, त्यांत त्यांनीं मराठी वाङ्मयाची केलेली सेवा सर्व-तोपरी अपूर्व आहे. मराठी भाषेची शोचनीय स्थिति झाली असतां तिचा उद्धार करण्यासाठीं विष्णुशास्त्री यांच्या मालेचा उदय झाला व आपला देश, आपला इतिहास, आपल्या जुन्या विद्या, आपलें कलाकौशल्य इत्यादि गोष्टींविषयीं ज्या भ्रांतिमूलक व अहितकारक अशा कल्पना पसरल्या होत्या त्यांचें निरसन निबंध-मालेच्या द्वारें केलें. मालेच्या कार्यासंबंधानें खुद्द मालाकार म्हणतात,

**निबंधमालेनें काय कार्य केलें ?**

"आमच्या चतुरशीति पुष्पमालेकडे पाहून

आम्हांसच काय पण प्रत्येक भाषाहितेच्छूला व देशहितेच्छूला आनंद झाल्याविना राहाणार नाहीं असें आम्हांस वाटतें. आम्ही विद्यार्थीदशेंत असून आंग्लभौमनिर्मित विद्यापर्वतांत मार्ग क्रमीत असतांहि दोहों बाजूंच्या वृक्षलतांच्या पुष्पपल्लवांनीं कित्येक वेळां आकर्षितांतःकरण होऊन मध्ये मध्यें गमत होतों व विद्यालयांतील सोळा संस्कार लागून स्वतःसिद्ध होतसाते बाहेर पडतांच वरील वृक्षवाटिकांतच आराम पावून धन्यता जोडावयाची हा आमचा कृतसंकल्प होता. पुढें जगदीशकृपेनें तसाच योग धडवून आम्हीं ' टेंपेस्ट 'मधील एरियलाप्रमाणें बंधमुक्त होतांच त्याचाच क्रम स्वीकारला आणि त्याचें फळ प्रस्तुत पुस्तक होय.पूर्वीचें विद्वन्मंडळ हें फार झाले तर आपल्या ठिकाणींच आपण रममाण होऊन वरील पुष्पांचा मकरंद सेवीत असे. पण आम्ही आपल्या देशबंधूंची आठवण ठेवून त्यांस गीर्वाण व आंग्लभौम पुष्पाकरांतील मधुबिंदूंचा व सौरभाचा यथावकाश व यथाशक्ती लाभ करून द्यावा हें मनांत आणलें. विद्यापीठरूप महानींडांतून पंख फुटन भरारी मारल्यास आज आम्हांस दहा वर्षेच काय तीं झालीं पण या दहा वर्षांतच आमचा पूर्वोक्त संकल्प किती सिद्धीस गेला हें पाहून आम्हांस बरेंच समाधान वाटतें."

मालाकारांनीं आपल्या मालेविषयीं काढलेले हे उद्गार आजाह सर्वांस ग्राह्य होण्यासारखे आहेत.

### मालेचें चिरकालीन महत्त्व

शास्त्रीबोवांची निबंधमाला म्हणजे वैजयंती मालाच होय.कधींहि न कोमेजतां आनंददायी अशा सौरभानें अंतःकरण प्रसन्न व स्फुरित करण्याचें सामर्थ्य तिच्या ठिकाणीं असल्यानें सरस्वतीच्या उद्यानांत प्रवेश करूं इच्छिणारांनीं ती कंठस्थ करावी अशी तिची योग्यता व महत्त्व आहे. शास्त्रीबोवांनीं मराठी भाषेला घाटदारपणा, प्रौढता, रम्यता आणिली व आज अखिल हिंदुस्थानांत ज्या ज्या ठिकाणीं म्हणून मराठी भाषा वाचली जाते ती शास्त्रीबुवांनीं निर्माण केलेली मराठी भाषा होय व म्हणूनच ' मी मराठी भाषेचा शिवाजी आहे ' असे किंचित् आत्मप्रौढीचे उद्गार त्यांनी काढले असले तरी ते वस्तुस्थितिनिदर्शकच आहेत.

# महाराष्ट्राचे कुशल मालाकार

( ले. श्री. के. ना. वाटवे, एम्. ए. पुणें. )

उत्तम गुणांवरचे दडपण हें वाफेच्या दडपणाप्रमाणें त्यांस दाबून न टाकतां उलट अधिक उद्दाम व दुर्दम बनवितें. देशस्थितीनें दंश केलेला शास्त्रीबुवांचा स्वाभिमान व त्यांची कुशाग्रबुद्धि ही सरकारी दडपणाखालीं दृढनिश्चय व स्वावलम्बन या कणखर गुणांना जन्म देती झाली. तळमळ हें देशाभिमानाचें उष्णतामापक यंत्र आहे. आणि ज्या मानानें ही अधिक त्या मानानें लेखनशैली आपोआप स्फुरते. या बाबतींत लोकमान्यांनींच खुद्द शास्त्रीबोवांचें उदाहरण देऊन सांगितलें आहे कीं, तळमळीशिवाय सळसळीत शब्द बाहेर पडत नाहींत व वाचकांच्या चित्तांस झोंबत नाहींत. अजगरासारखी सुस्त व अवजड विद्वत्ता त्या काळीं काय महाग होती ! पण स्वतंत्रतेच्या चैतन्याविरहित ती वरील धुडासारखी निरुपयोगीच नव्हे तर प्रसंगीं राष्ट्राच्या गुणांना धूर्तपणें मटकावण्यासहि साधनभूत झाली. पण शास्त्रीबोवांनीं याच जोमदार व जिवंत विद्वत्तेचा भाला हातीं घेऊन, त्यास प्रमाणबद्ध लेखनशैलीचें पातें जोडलें व त्यास कधीं उघड त्वेषाचें तर कधीं प्रच्छन्न उपहासाचें तिखट पाणी देऊन त्याच्या सफाईदार फेंकींनीं प्रतिपक्षीयांची मर्मे विद्ध केलीं व त्यास हैराण करून टाकलें. त्यांतहि गम्मत ही कीं घायाळ झालेला इसम ही घावांच्या सफाईची तारीफच करी !! त्यांच्यासारख्या क्रिया-पंडिताचा व विचार-प्रवर्तक लेखकाचा महिमा उगीच नाहीं झाला.

शास्त्रीबोवांच्या गुण समुच्चयांत दोन भाग स्पष्ट दिसतात.एक रणांगणावर प्रकट होणारा व दुसरा शांततेच्या व समृध्दीच्या काळीं विलसणारा. पण त्यांत मौज ही कीं, एका हातानें लढत असतां दुसऱ्या हातानें त्यांनीं स्वस्थतेच्या काळाचा विलास निर्माण केला. इकडे मराठीच्या देशी विदेशी निंदकांचे वाभाडे काढीत असतांच तिचें रमणीय स्वरूप त्यांनीं व्यक्त केलें. नवीन ग्रॅज्युएटांच्या परावलंबी नेभळटपणाला नांवें ठेवीत असतां त्यांनीं आपला स्वावलंबी नवा संसार थाटला.

### कुशल मालाकार

शिक्षणाच्या मुस्कटदाबीला न्यू इंग्लिश स्कूलची तोंड उठविली, विचारस्वातंत्र्याला व प्रकाशनाला वाव म्हणून केसरी-मराठ्याची प्राणप्रतिष्ठा केली,

वाचनाच्या व विद्यावृद्धीच्या तहानेला किताबखान्या-ची पाणपोई घातली. शास्त्रीबोवा आपल्यास माला-कार ( माळी ) मोठ्या अभिमानानें म्हणवीत तें दुसऱ्या एका अर्थानेंहि खरें होतें. माळी जसा विषारी रोपटीं उपटीत व अडगळ काढीत काढीत त्याच ठिकाणीं नवा बगीचा उठ-वितो त्याचप्रमाणें शास्त्रीबोवांनीं विध्वंसक व विधा-यक अशी उभयविध कामगिरी एकदमच केली. निबंधमालेंतल्या खुद्द निबंधांतला झुंजार भाग जितका भीषण—रमणीय झाला तितकाच त्याच मालेंतील इतर भाग आल्हादक वठला. विनोदमहादाख्यायिका रम्य व मार्मिक सुभाषितें व अर्थसादृश्य हीं त्यांचीं प्रकरणें विद्वानांचीं व रसिकांचीं चित्तें प्रसन्न करून त्यांस डोलावयास लावणारीं आहेत. या सर्व प्रकरणांतून उच्च रसि-कता ही शास्त्रीबोवांच्या अंतरंगाची अधिष्ठात्री देवता दिसते. कविपंचक हें तर त्यांच्या अभिजात रसिकतेचें जिवंत स्मारक आहे. कवि-हृदय व सृष्टींतील विविध प्रसंगांतील काव्य कवीच जाणतो. या न्यायानें शास्त्रीबोवा कवीच होते असें म्हणावें लागेल. त्यांनीं वृत्तांत चार अक्षरांची जुळवाजुळव केली नसेल पण रसिकतेस व्यक्त काव्योद्गारांचा मुका पडसाद मानिलें तर हें त्यांचे काम कवींच्या निवडक भागांच्या संदर्श-नांत किती चोख पार पाडलें आहे हें दिसून येईल. रसिकतेनेंच त्यांना सौम्य व समतोल केलें. एकूण स्वाभिमान व रसिकता या मनोहर युग्मानें शास्त्री-बोवांच्या लेखनांला एवढी उच्च पदवी प्राप्त करून दिली आहे.

# विष्णुशास्त्री—वाङ्मय

( ले. प्रो. दत्तो वामन पोतदार )

आपणास स्वतः जरा अभिमानानें '**मराठी भाषेचे शिवाजी**' म्हणविणारे विष्णुशास्त्री यांच्या मृत्यूस पन्नास वर्षें पुरीं झालीं. तेव्हां या निमित्तानें त्यांचें स्वतःचें व त्यांच्या विषयींचेंच स्वतंत्र असे जें लिखाण मराठींत झालें आहे त्याचा संकलित विचार करणें बोधपर होईल.

### माला थांबली; पण कीर्ति पसरली

शास्त्रीबोवांचा जन्म शके १७७२ च्या सुमारास ( १८५० ) झाला.आणि वयाच्या अठराव्या वर्षाच्या सुमारासच लेखनाचा उद्योग त्यांनीं प्रारंभिला.डेक्कन कॉलेजांत शिकत असतांना त्यांनीं आठवडी सभांतून दोनतीन निबंध वाचल्याचें त्यांचे चरित्रकार लिहितात. याच सुमारास (सन १८६८) शके १७९० मध्यें रासे-लसाचे कांहीं भाग कृष्णशास्त्री यांनीं चिरंजिवांकडून लिहवून घेतले. ते कृष्णशास्त्री यांस पसंत पडून पुढील राहिलेलें भाषांतर त्यांनीं चिरंजीवांवरच सोपविलें ! आरबी भाषेंतील सुरस व चमत्कारिक गोष्टी,या ग्रंथाचा कांहीं भाग विष्णुशास्त्री यांनीं लिहून वडिलांच्या लिहिण्यास जोड दिली हें येथें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. दोनतीन वर्षांनीं विष्णुशास्त्री बी. ए. झाल्या-बरोबर त्याच महिन्यापासून मराठी ग्रंथरचना कर-ण्याचा आपला संकल्प तडीस नेण्यास त्यांनीं कंबर बांधली! 'संस्कृत कविपंचका'ची सिद्धता याच वेळीं झाली आणि या लेखमालेची छाप उत्तम तऱ्हेची पडली. यापुढे तीन वर्षांनीं म्हणजे शके १७९६त त्यांनीं आपल्या प्रख्यात निबंधमालेलाच प्रारंभ केला. माले-चे एकंदर ८४ अंक त्यांनीं काढून ' विश्रामं लभता-मिदं च शिथिलज्याबंधमस्मद्धनुः' म्हणून माला संपविली. पण आपली कीर्ति मात्र अमर केली! वरुणानें जशी नळ राजाला 'अम्लान माला' दिली तशीच विष्णुशास्त्र्यांनीं महाराष्ट्राचे गळ्यांत आपली अम्लान निबंधमाला घातली.

### निबंधमालेनंतर केसरी

प्रकटला. त्यांत कांहीं लेख शास्त्रीबुवांनीं लिहिले होते. ते व इतर कांहीं त्यांचे इंग्रजी मराठी लेख मिळून एक किरकोळ लेखसंग्रह कै. खंडेराव भिकाजी बेलसरे यांनीं दोन भागांत प्रसिद्ध केला. सांप्रत हा उत्कृष्ट संग्रह दुर्मिळ झाला आहे.

निबंधमाला आणि शास्त्रीबोवांचें संस्थासप्तक यांचा प्रभावच एवढा विलक्षण पडला कीं, एकाएकीं बत्तिसाव्या वर्षी त्यांचा अंत झाल्याचें कळतांच सर्वांस मोठा जबर धक्का बसला! शास्त्रीबोवांच्याच लेखनानें व कृतीनें स्फूर्ति झाली त्यांपैकींच प्रख्यात इतिहाससंशोधक राजवाडे होत. ते या प्रसंगीं लिहितात "विष्णुशास्त्री चिपळूणकर वारल्याची बातमी ऐकिली त्या वेळीं महादुःख झालें.... सर्व मनुष्यें व प्राणी अमर आहेत अशी माझी अस्पष्ट भावना होती, त्या भावनेला शास्त्रीबुवांच्या मृत्यूनें जबर धक्का बसला! शाळेंतून जातांना व येतांना आणि शहराच्या पश्चिम भागांत हिंडतांना शास्त्री-बुवांच्या सभ्य, भारदस्त व प्रौढ मूर्तीला मी अनेकवार पाहिलें होतें; शास्त्रीबुवा परम देशभक्त आहेत असें ज्याच्या त्याच्या तोंडून मी ऐकत होतों आणि त्यांनीं लिहिलेले निबंध वाचलेले माझ्या कानावरून गेले होते.

ह्या पुरुषासंबंधानें अशा अनेक गोष्टींचा माझ्या मनावर संस्कार झाला असल्यामुळें त्याच्या मरणानें मला थोर दुःख झालें !"

### निधनसमयींचीं शोकगीतें

हा जो जबर आघात लोकांस बसला, तो पद्यरूपानेंहि प्रकट झालेला आढळतो. विष्णुगुणादर्श नामक एक चरित्रपर आख्यानच रा. सरनाईक यांनी रचून चित्रशाळेनें प्रसिद्ध केलें ! 'वाहवा करूनि जगतांत । गमती लोकां जग-तात' । असा लौकिक शास्त्रीबोवांनी संपादलेला वर्णन कवीनें—

चौघाजणांसि नित बोलति शास्त्रि वाचे ।
हे मावळे जवळचे अमुचेचि साचे ।
ग्रामस्थ नाहीं कुणि यामधीं मी शिवाजी ।
आहें खरा सतत साधिन योग आजी ॥

असा अभिमान शास्त्रीबोवांचे तोंडीं घातला आहे. शास्त्रीबुवांच्या मृत्यूची वार्ता वाचतांक्षणींच मोगरे कवींच्या, 'हातांतून गळून शीघ्र पडला भूमीवरी केसरी' आणि सुन्न मनानें कपाळास हात लावून, 'अस्मत्प्रारब्धरेषा अघटित घडली काय तेथें करावें ?' असा शोक करीत बसले ! दुसऱ्या एका कवीला वाटलें कीं 'अंतर्यातस्त्वयि दिवमिते हन्त देशाभिमानः। नष्टो नष्टः शिवशिव महाराष्ट्रभाषाधिनाथः॥'

लेले व पाटसकर यांनीं विष्णुनिधनकाव्य, रचून नानापरींनें शोक केला आहे ! इतक्या तारुण्यांतच हा लोक सोडून जाण्याचें तुला कारण काय ?

बहुधा—ऐकोनियां तव यशास पदच्युतीचें ।
मानी बृहस्पति भय स्वमनांत सांच ! ॥
तेणेंच हो गमतसे तव घात केला ।
ऐसा विषाद सुरहो न बरा तुम्हांला ॥

अथवा—माला करीं धरुनि तत्त्वविचार केला ।
तों त्यांत बा तुजसि संशय एक आला ॥
हा प्रश्न जाउनि पुसूं अपुल्या पित्याला ।
गेलासि यास्तवचि का त्रिदशालयाला ? ॥

समशेरपूरकर शालिग्राम यांनींहि
'महाराष्ट्रवाणीपति नष्ट झाला ।
प्रदीप स्वहिंदूकुलाचा विझाला ॥
असा दीर्घ विलाप करून अखेर
'स्वदेशस्वविद्या स्वभाषा स्वधर्म ।
किती चांगले हें जनां दावि मर्म ॥

असें शास्त्रीबुवांच्या आयुष्याचें सार वर्णिलें आहे ! शिष्यजनविलाप या नांवानें शास्त्रीबुवांचे शिष्य कै. हरिभाऊ आपटे यांनींहि विलाप करून मन जरा हलकें करण्याचा प्रयत्न केला.

'माला ' गेली याची चुटपुट लोकांस फार लागून राहिली. याचा परिणाम असा आला कीं, माला गेली तरी तिची उणीव अगदीं भासूं द्यावयाची नाहीं असाच जणूं कांहीं कृतनिश्चय करून 'निबंध–चंद्रिका' जानेवारी १८८३ पासून प्रसिद्ध होऊ लागली! निबंधचंद्रिकेचा थाट निबंधमालेच्या धर्तीवर होता. तसाच पुठ्ठा, तसाच आकार, खिळ्यांचा नमुना तोच, तात्पर्य चंद्रिकेचा तोंडवळा थेट मालेवर गेलेला दिसतो ! यापुढें ज्ञानदीप वगैरे मासिकांचे उद्योगहि याच वळणांतले म्हणावयास हरकत नाहीं.

### लोकहि त्यांना शिवाजीप्रमाणें मानीत

वाङ्मयक्षेत्राबाहेरहि शास्त्रीबोवांचें स्मारक म्हणून नूतन मराठी विद्यालय या नांवाची मराठी शाळा स्थापण्याचें धाडस कित्येक तरुण मराठी शिक्षकांनीं केलें ! पण चंद्रिकादि मासिकें सोडलीं तर शास्त्रीबोवांच्या लेखांविषयीं व कामगिरीविषयीं पहिला स्वतंत्र विवेचनपर निबंध कै. खं. भि. बेलसरे यांनीं वि. कृ. चि. यांच्या 'चरित्राचें व लेखांचें साधारण स्वरूप ' या नांवानें इ.स. १८९१ त प्रसिद्ध केला तोच दिसतो. शास्त्रीबोवांविषयीं पूज्यबुद्धि ठेवनहि लेखकानें दोषाविष्करण केलें आहे. या निबंधांत एक मोठी लक्षांत ठेवण्याजोगी गोष्ट एका जागीं टीपेंत दिली आहे. तीवरून शास्त्रीबोवांना कांहीं तरुण मंडळी किती पूज्य मानूं लागली होती त्याचा अंदाज होतो. ही खासगी गोष्ट अशी. बेलसरे यांच्या कोणा एका मित्रास निबंधमालेचा व केसरीचा फार नाद लागला व त्यांच्या कार्याविषयीं पराकाष्ठेचें प्रेम उत्पन्न झालें. ते इतकें कीं, जर आपल्या देशाचें पुनरुज्जीवन होणें असेल व गीतेंत 'संभवामि युगे युगे' हें दिलेलें आश्वासन खरें होणें असेल तर तें याच पुरुषाचे हातून होईल असें तो वारंवार म्हणत असे. व शिवाजीमहाराजांप्रमाणेंच त्यांस तो मान देत असे. शास्त्रीबोवांच्या मृत्यूची वार्ता ऐकून या तरुणास रडें कोसळलें व तो म्हणाला ' यापेक्षां मला कां मरण देव देत नाहीं. '

पुण्यास सद्वर्तन प्रवर्तक मंडळी दरवर्षी शास्त्रीबुवांच्या श्राद्धाचे दिवशीं एक मेळा भरवीत असे. अशा एका प्रसंगीं रा. वासुदेवराव जोशी यांनीं दोनशें रुपयांचें बक्षीस विष्णुशास्त्री यांच्या चरित्रासाठीं जाहीर केलें आणि योग असा आला कीं, कै. शास्त्रीबुवांचे रसिक व मार्मिक बंधु यांनीं एक सुंदर, चटकदार व नमुनेदार असें चरित्र लिहून तयार केलें, तें इ. स. १८९४ त प्रसिद्ध झालें. मराठींतलें हें एक अत्युत्कृष्ट असें पुस्तक आहे.

### प्रकाशनाचीं विविध रूपें

निबंधमालेच्या प्रती शास्त्रीबोवा सातशेंच काढीत असत. त्यामुळें मालेचे अंक पुढें लोकांस वाचावयास मिळण्याची बरीच पंचाईत पडूं लागली. ही अडचण दूर करण्यासाठीं कै. कृष्णराव मांडे यांनीं तीन भागांत निबंधमालेंतील सर्व निबंध, पत्रव्यव-

हार, टीका वगैरे सर्व मजकूर इ. स. १८८८ ते १८९० या वर्षांत पुनः छापून काढला. हिला मालेची मांडेप्रत म्हणतां येईल. ही चांगली व संपूर्ण आहे. आर्यभूषणकडूनहि एक सुबद्ध प्रत दोन भागांत 'कुळकर्णी आणि मंडळी' यांनीं प्रसिद्ध केलेली उपलब्ध आहे. तिसरी प्रत अलीकडे चित्रशाळेनें छापली आहे. अशा मालेच्या तीन प्रती आजवर झाल्या. तथापि आतांच्या पिढीला समजण्यासारख्या भरपूर टीपा देऊन, मूळांतील सर्व मजकूर विषयवार लावून, सोबत विवेचन जोडून, अशी एक सर्वांगसुंदर आवृत्ति प्रसिद्ध होणें अवश्य असून या पन्नाशीच्या उत्सवानिमित्त तें काम हातीं घेण्यांत आलें तर मोठी उणीव दूर केल्याचें श्रेय मिळणार आहे. विष्णुशास्त्री वाङ्मयापैकीं निबंधमाला सोडली तर मागें उल्लेखिलेला किरकोळ लेखसंग्रह याचा पहिला भाग १८९६ त व दुसरा १९०१ त मिळून बेलसरे यांनीं प्रसिद्ध करून पुरा केला.

निबंधमालेंतील प्रकरणेंहि स्वतंत्र रूपानें प्रकाशित झालेलीं आहेत. १८८२ तच सुभाषित-संग्रह निबंधमालेंत आलेला चित्रशाळेने स्वतंत्रपणें प्रसिद्ध केला. १९०१ मध्यें 'विनोद व महदाख्यायिका' हा अत्यंत मनोरंजक संग्रहहि चित्रशाळेनेच प्रसिद्ध केला. तत्पूर्वी वाङ्मयविषयक लेख म्हणून एक संग्रह विद्यार्थ्यांसाठीं चित्रशाळेनें प्रसिद्ध केलाच होता व त्यांत वाचन, भाषादूषणादि सात निबंध प्रसिद्ध केले होते. १९०७ त मांडे यांनीं शास्त्रीबुवांचे दहा निवडक निबंध एकत्र छापले. इतिहास विषयावरील निबंधहि स्वतंत्र छापलेला आहे. 'आमच्या देशाची स्थिति' हाहि स्वतंत्र छापला होता असें कळतें. अलीकडे डॉक्टर जॉन्सन्चें निबंधमालेंतील आदर्श चरित्र चित्रशाळेने पुनर्मुद्रित केलें असून महाराष्ट्र पब्लिशिंग हाऊसकडून विद्यार्थ्यांसाठीं संस्करण करून छापलेलें आहे. अशा रीतीनें शास्त्रीबोवांचें वाङ्मय जनतेपुढें आणण्याचे प्रयत्न झाले असले, तरी अजूनहि पुष्कळ प्रयत्न करण्यास वाव आहे, इतकेंच नव्हे तर त्याची अत्यंत आवश्यकताहि आहे.

शास्त्रीबोवांचें चरित्र सोडलें तरी त्यांचेविषयीं व त्यांचे लेखांविषयीं स्वतंत्र विवेचनहि पुष्कळ झालेलें आहे. दरवर्षी त्यांच्या श्राद्धदिवशीं ज्या सभा होतात तेथें कधीं कधीं निबंध वाचले गेले आहेत आणि विचारपरिपूर्ण व्याख्यानें झालेलीं आहेत. असलें बरेंच वाङ्मय केसरीच्या अंकसंग्रहांतून गोळा करतां येईल, व जर तें एकत्रित करून छापलें तर चांगला वाचनीय असा एक ग्रंथ तयार होईल. टिळक, चांदोरकर, सानेप्रभृति पुष्कळ विद्वानांचे विचार यामुळें एकत्र पहावयास मिळतील. अशा एका प्रसंगीं रा. लक्ष्मणरावजी पांगारकर यांनीं 'निबंधमालेचें स्वरूप व कार्य' या नांवाचा एक विस्तृत, सुंदर व विवेचक निबंध वाचला होता (१९०४). तो मुंबईच्या 'सरस्वती-मंदिरांत' खंडशः प्रसिद्ध झाला होता. अलीकडे त्याची स्वतंत्र आवृत्ति लेखकांनीं छापली आहे. रा. गजाननराव माडखोलकर यांनींहि शके १८४५ त विष्णु कृष्ण चिपळूणकर (टीकात्मक निबंध) हा सुंदर भाषेनें नटविलेला आपला निबंध प्रसिद्ध केला आहे. हाहि लेख खंडशः विविधज्ञानविस्तारांतून प्रसिद्ध झाला होता. यांत विचारांची संगति साधावी तशी साधलेली नसली तरी कांहीं स्थळीं विचारांची दिशा नवी आहे.

शास्त्रीबोवा हे कांहीं प्रकरणीं एका विशिष्ट पंथाचे व प्रणालीचे जनक समजले जातात. त्यामुळें त्यांजवर टीकेचे हल्ले ते विद्यमान असतांना जसे झाले तसे पश्चातहि होऊन उत्तरप्रत्युत्तरांची खडाजंगीहि माजलेली आहे. कै. देव रा. मुंडले यांची असली एक खडाजंगी 'ग्रथमालेंत' आलेली आहे.

**भाषासुंदरी** अथवा विष्णुशास्त्री यांचें नाट्यावतरण या नांवाचें एक प्रकरण कै. ना. ह. भागवत या पुराणमतवादी लेखकांनीं लिहून केलेलेंहि नमूद करून ठेवण्यासारखें आहे.

वरील लेखांशिवाय प्रसंगोपात्त झालेले विष्णुशास्त्रीविषयक लिखाण बरेंच आहे. टिळक-आगरकर प्रभृतींच्या चरित्रांत शास्त्रीबोवांच्या कामगिरीचे उल्लेख येणें अपरिहार्य आहे. तसेंच अलीकडे वाङ्मयेतिहासाचीं वगैरे कांहीं पुस्तकें झालीं आहेत यांत या प्रकरणीं कमीअधिक मजकूर आढळतो. 'अर्वाचीन वाङ्मयसेवक' नांवाच्या अगदीं नुकत्याच प्रसिद्ध झालेल्या ग्रंथांत विष्णुशास्त्री यांजवर एक लेख आहे.

विष्णुशास्त्री वाङ्मयाचा अभ्यास करणाऱ्यास उपयोगी पडावी म्हणून येथें मिळाली ती माहिती संकलित करून दिली आहे. तींत कमी-जास्ती होण्यासारखें आहे. शास्त्रीबुवांच्या चरित्राचें व कार्याचें मनन मोठें उपयुक्त आहे यांत संशय नाहीं. इतकेंच नव्हे तर तें करणारास मोठें उद्बोधक व निःसंशय प्रोत्साहक होईल. त्यांनीं लाविलेलीं झाडें कितपत भरारलीं याचा आणि यापुढें आपलें पाऊल आपण कसें टाकावें याचा विचार आपणांस केलाच पाहिजे. शास्त्रीबोवा यांस बेलसरे यांनीं 'लोकनायक' अशी पदवी देऊन ते महाराष्ट्रांतील पहिले लोकनायक होते असें ठरविलें आहे, तर राजवाडे यांनीं त्यांचेमागें 'महात्मा' हें थोर उपपद लाविलें आहे. अशा थोर पुरुषाचें चरित्र सर्वदा मननीय होय यांत संशय नाहीं; आणि या मननास किती विविध सामुग्री आहे याचा कांहींसा बोध व्हावा हा या लेखाचा हेतु आहे.

# संस्थानिकांची स्वदेशभक्ति कसाला लागली

आपण हिंदुस्थानांत व्हाईसरॉय होऊन आलों याचा खरा सुखसंतोष लॉर्ड विलिंग्डन यांना गेल्या आठवड्यांत लाभला असेल. कारण त्या आठवड्यांत दिल्लीस हिंदी संस्थानिकांचा फार मोठा मेळा जमून व त्यांतील शेलक्या संस्थानिकानीं व्हाइसरॉयांपुढे फेर धरून त्यांच्या स्तुतीचा सोहळा साजरा केला. नरेंद्रमंडळाच्या बैठकीचे व्हाइसरॉय हे स्वयंभू अध्यक्ष आहेत. नरेंद्रांची ही बैठक सोमवार ता. २८ रोजीं सुरू झाली. दरवर्षी लग्नसराईच्या दिवसांत नडलेले किंवा हौस असलेले आईबाप कन्यादान करून त्याची भलीबुरी पुण्याई पदरीं पाडून घेतातच. पण कन्यागतसालीं कन्यादान करणाऱ्या आईबापांच्या पुण्याईची भलाई कांहीं वेगळीच असल्यामुळें त्या वर्षी लग्नसराई नेहमींपेक्षां अधिक गाजते. त्यांतलाच प्रकार यंदां दिल्ली येथें हिंदी संस्थानिकांचा घडला नरेंद्रमंडळांत आपल्याला स्थान मिळावें याविषयीं संस्थानिका—संस्थानिकांत चुरस असली तरी त्यांची बैठक भरते तेव्हां तिच्या सभासदांशिवाय इतर संस्थानिक दिल्लींत बहुधा घोटाळत नाहींत. परंतु यंदांची नरेंद्रमंडळाची बैठक अशीतशी नव्हती. तिच्यांत हिंदुस्थानाच्या भावी राज्यव्यवस्थेच्या दृष्टीनें फार मोठें राजकारण शिजावयाचें होतें. संयुक्त राज्यघटनेंत संस्थानिकांनीं सामील व्हावयाचें झाल्यास तें कसें सामील व्हावें याचा निर्णय ठरावयाचा होता व तो ठरलाहि.

संस्थानिकांवर पूर्वी कधीं आला नव्हता असा हा प्रसंग ओढवला. फेडरेशनमध्यें शिरतांना थोडेसे अधिक अधिकार मिळण्याची आशा आहे, तशीच आहेत या अधिकारांपैकीं कांहीं गमावण्याचीहि धास्ती आहे. यामुळें कोणी लाभाच्या लोभानें तर कोणी हानीच्या काळजीनें दिल्लीस जमल्यामुळें नवी दिल्ली ही मोगल बादशहांच्या जुन्या दिल्लीप्रमाणें दरबारी वैभवानें डोलूं लागली होती. लॉर्ड विलिंग्डन हिंदुस्थानांत येण्यापूर्वी कानडाचे गव्हर्नर—जनरल होते. कानडा हा स्वराज्य उपभोगणाऱ्या फ्रेंच व इंग्रज लोकांचा देश. त्यांच्यापैकीं जो तो स्वतःस आपल्या घरचा व आपल्या देशाचा राजा समजणारा असे हे धटिंगण लोक गव्हर्नर-जनरलाला मानणार तरी कां व विचारणार तरी कशाला? कानडांतून लॉर्ड विलिंग्डन हिंदुस्थानांत आले, पण हिंदुस्थानहि कानडाचाच भाऊ बनत चाललेला. येथें आल्यावरहि खालसांतील त्रलदंड व तंडेल पुढाऱ्यांशीं प्रसंग. कोणी कायदाच मोडतो, कोणी करच देत नाहीं म्हणतो, कोणी अधिकाऱ्यांचा हुकूम मानणार नाहीं म्हणून दटावतो, तर कोणी इंग्रजांचा राज्य करण्याचा अधिकारच ओळखत नाहीं म्हणून सांगतो. ही स्थिति पाहून अशा म्हातारपणीं कानडा सोडून हिंदुस्थानांत आल्यानंतर आडांतून निघून विहिरींत येऊन पडल्याप्रमाणें लॉर्ड विलिंग्डन यांस झालें असल्यास नवल नाहीं.

त्यांना सध्यां आधार संस्थानिकांचा व संस्थानिकांनाहि उलट आधार त्यांचाच. यामुळें संस्थानिकांची राजभक्ति तप्त होऊन व व्हाइसरांयांचाहि त्यांजविषयींचा प्रेमा उचंबळून त्यांनीं परस्परांस कडकडून मिठी मारणें स्वाभाविक होय. संस्थानिकांकडून व्हाइसरॉयास जो मान मिळतो त्याला जगांत कोठेंहि तोड आढळणार नाहीं. हल्लीच्या लोकसत्तेच्या प्रतिकूल काळांत सातशें राजेरजवाडे हिंदुस्थान सोडल्यास दुनियेच्या पाठीवर आहेत कोणत्या देशांत? खुद्द इंग्लंडच्या राजास सार्वभौमत्वाचा मानमरातब मिळावयाचा झाल्यास सात समुद्र ओलांडून व सहा हजार मैलांचें अंतर तोडून हिंदुस्थानांतच यावें लागतें. मोंगल बादशहांचें राजवैभव फार मोठें समजलें जातें. परंतु त्यांच्यापैकीं मी मी म्हणणारा औरंगजेब बादशहा घेतला तरी त्याच्या मांडलिकांत सातशें राजे होते कोठें? कारण त्यालाहि एकछत्री अंमल साऱ्या हिंदुस्थानावर कधींहि स्थापन करतां आला नाहीं. या दृष्टीनें विचार केला असतां जगांत पूर्वी कोणीं अनुभवला नाही व बहुधा पुढेंहि कोणी अनुभवणार नाहीं असा मानसन्मान सांप्रत हिंदुस्थानाच्या व्हाइसरॉयाला लाभतो यांत शंका नाहीं. त्यांतून व्हाइसरॉय हा राजाहि नसतो व राजपुत्रहि नसतो. तो राज्यहीन व छत्रचामरहीन असा इंग्लंडांतील एक साधारण माणूस. उलटपक्षीं संस्थानिक हे मात्र पिढीजात, वंशपरंपरागत राजवैभवसंपन्न खरे प्रजापति. एका अर्थानें त्यांची सत्ता व दर्जा व्हाइसरॉयापेक्षां किती तरी श्रेष्ठ. असें असतां इकडील श्रेष्ठ प्रतीच्या राजे-रजवाड्यांनीं आपल्याकरितां स्तुतिसुमनांची शेज घालावी व चवऱ्यामोर्चेलें ढाळावी यामुळें व्हाइसरॉयास केवढी सुखोत्पत्ति झाली तरी त्याचा जीव संकोचानें थोडाथोडा होत नसला तरच आश्चर्य!

दिल्लीस जमण्यांत प्रत्येक संस्थानिकाचा स्वतःचा म्हणून मतलब असेलच; पण त्याहिपेक्षां मोठा मतलब वेगळाच होता. गोलमेज परिषदेनें पाठविलेली संस्थान-कमिटी सांप्रत हिंदुस्थानांत हिंडत असून ती अनेक प्रकारचा पुरावा संस्थानिकांपासून गोळा करीत आहे. वास्तविक फेडरेशनमध्यें संस्थानिकांना

कसें गोवून घेतां येईल एवढेंच सदर कमिटीला पहावयाचें आहे. पण इंग्रज लोकांची तऱ्हाच अशी आहे कीं तिच्यांत मंत्रापेक्षा तंत्रच फार. म्हणून फेडरेशनसाठीं माहिती मिळवितांना त्यांनीं असे कित्येक प्रश्न उपस्थित केले आहेत कीं ते वाचून संस्थानिकांना आपल्याला पूर्वीपेक्षां अधिक हक्क देण्यांकरितांच ही कमिटी आली आहे असा भ्रम उत्पन्न झाला आहे. खेरीज हिंदुस्थानाच्या राज्यव्यवस्थेंत बदल व्हावयाचाच आहे तेव्हां या धांदलींत हात मारतां आला तर कां सोडा असा विचार बटलर कमिटीच्या वेळेपासूनच संस्थानिकांच्या डोक्यांत घोळत आहे. संस्थान कमिटीचें काम संपत आलें असून तिचा रिपोर्टहि महिन्याभरांत तयार होईल. त्यापूर्वी जें कांहीं उगवावयाचें तें उगवून घेण्याची संधि हीच अशा समजुतीनें संस्थानिकांची गर्दी वाजवीहून जास्ती प्रमाणांत दिल्लीस लोटली होती.

संयुक्त राज्यघटनेंत सामील होतांना आपण आपले कोणते अधिकार सोडण्यास व कमी करण्यास तयार झालें पाहिजे या प्रश्नाकडे कित्येक संस्थानिकांनीं ढुंकूनहि पाहिलें नाहीं असें कमिटीपुढें आलेल्या पुराव्यावरून उघड दिसून येतें. निजामसाहेब तर आपल्या प्रजेस स्वराज्याचे हक्क देण्याच्या विचारापेक्षां वऱ्हाडचें मागानें गिळलेलें माणिक परत कसें मिळवावें या विचारांत गर्क आहेत. श्रीमंत सांगलीकर हुबळी तालुका परत मागत आहेत तर कोणी संस्थानिक बंदरावर इंग्रज सरकाराकडून वसूल होणाऱ्या आयात मालाच्या जकातीवर आपला हक्क सांगत आहेत. संस्थानिकांची राजभक्ति हल्ली यासाठीं उतास येऊन वार्या चालली आहे. स्वराज्य म्हणजे स्वतःचें राज्य तें त्यांना आहेच; तें रहावें किंबहुना त्याचे अधिकार वाढले तर वाढावे एवढीच त्यांची महत्त्वाकांक्षा आहे. ती तृप्त झाली म्हणजे त्यांचें घोडें गंगेंत न्हालें. सारांश, ही त्यांची स्वराज्य भक्ति अथवा स्वार्थभक्तिच त्यांना राजभक्तीचा देखारा माजवावयास शिकवीत आहे.

कांहीं प्रमुख संस्थानिकांनीं लंडनमध्यें पहिल्या गोलमेज परिषदेस हजर असतां लॉर्ड रेडिंग व इतर बडे इंग्रज मुत्सद्दी यांनीं हिंदुस्थानाच्या स्वराज्याचें कोडें उकलण्याला फेडरेशन ही एकच तोड सुचवून संस्थानिकांच्या अंगावर बाजूच आणिल्यामुळें त्या भिडेला बळी पडून फेडरेशनच्या उभारणीस होय म्हणणें त्यांस भाग पडलें. कारण स्वदेशभक्ति हा पाश्चात्य राष्ट्रांत धर्म समजला जातो. हिंदुस्थानांतून कोणीहि माणूस इंग्लंडांत जावो त्याला वरील धर्माचारासाठीं आपण स्वदेशभक्तींत कोणासहि हार जाणार नाहीं असें अन्तर्यामीं त्या भक्तीचा मागमूसहि नसला तरी लौकिकांत सोंग आणावेंच लागतें. तें सोंग संस्थानिकांनीं पहिल्या गोलमेजपरिषदेंत आणिलें; पण त्याची बतावणी दुसऱ्या गोलमेजपरिषदेच्या वेळीं करण्याची मि. मॅक्डोनाल्ड व लॉर्ड सँके यांच्या समोर पाळी आली तेव्हां संस्थानिकांना कोठून या स्वदेशभक्तीच्या नादीं लागून या फेडरेशनच्या फंदांत आपण पडलों असे झालें. तेव्हापासून फेडरेशनच्या घटनेचा एक एक दुवा घडविण्याची व तो संस्थानिकांच्या पायांत अडकविण्याची वाटाघाट चालू झाली; तशी संस्थानिकांनीं एकएका मागच्या पावलानें फेडरेशनपासून दूर दूर सरण्यास सुरुवात केली. संस्थानिक जों जों दूर सरूं लागले तों तों फेडरेशन त्यांच्या अंगावर चाल करून येऊं लागलें. संस्थानिक इंग्लंडांतून हिंदुस्थानांत आले न आले तोंच फेडरेशनची संस्थान कमिटी त्यांचा पाठलाग करीत हिंदुस्थानांत आली व 'तुम्ही फेडरेशन हवें म्हणतांना? तर बोला, फेडरेशनच्या या अटी तुम्हांला कबूल आहेत ना?' या प्रश्नांनी तिनें त्यांचा पिच्छा पुरविला.

व्हाइसरॉयांच्या सल्लागार कमिटींत भावी स्वराज्यांतील हिंदी लोकांच्या मूलभूत हक्कांचा प्रश्न निघाला. आली संस्थानिकांच्या परीक्षेची वेळ. होय म्हटलें तर खालसांतील प्रजेबरोबर त्यांना आपल्या प्रजेसहि तो हक्क द्यावा लागणार. त्यांना आपल्या राज्यांतील प्रजाजन व गोठ्यांतल्या गाई सारख्याच वाटतात. यांच्या अर्थाचे व प्राणाचे धनी हे. त्यांचे हे हक्क कबूल केले कीं त्या हक्कांच्या जोरावर आज गाईप्रमाणें गरीब दिसणारी प्रजा उद्यां वाघाप्रमाणें गुरगुरूं लागावयाची. तेव्हां सल्लागार कमिटींतील संस्थानिकांच्या प्रतिनिधींनीं ज्या संस्थानिकांना पटेल ते हा प्रजेचा हक्क मानतील असें निसटतें उत्तर देऊन वेळ मारून नेली. तीच अडचण फेडरल कोर्टाच्या बाबतींतली. राज्यघटना फेडरल स्वरूपाची झाली म्हणजे खालसा प्रांत विरुद्ध संस्थानें किंवा एका संस्थानाविरुद्ध दुसरें संस्थान अशी सनदशीर तक्रार उपस्थित झाल्यास तिचा इन्साफ करणारें अखिल हिंदुस्थानाकरितां सर्वश्रेष्ठ असें फेडरल कोर्ट अवश्य पाहिजे व त्याची हुकमत फेडरल राज्यघटनेंत सामील होणारा संस्थानिक मग तो नाकानें वांगीं सोलणारा निजाम असो किंवा प्रजेच्या डोक्यावर मिरें वाटणारा पतियाळाचा महाराज असो त्यानें त्या कोर्टापुढें आपली मान वांकविलीच पाहिजे. अर्थात संस्थानिकाची तितकी सत्ता कमी झाली. त्याचप्रमाणें फेडरल कौन्सिल जे कायदेकानू करील ते संस्थानिकांनीं आपल्या प्रजेच्या बाबतींत गुंडाळून ठेवले तर त्यांच्या प्रजेस त्या अन्यायाविरुद्ध दाद मागण्याकरितां फेडरल कोर्टाकडे जाण्याचा मार्ग खुला पाहिजे. त्या बंधनाला निजामासारखे

अरेराव संस्थानिक खुषी नाहींत. अशा रीतीनें कोणी या बंधनाला तर कोणी त्या बंधनाला बुजून कान टवकारून पळण्याच्या बेतांत आहेत. असे बुजरट संस्थानिक अष्ट दिशांनीं निसटून गेले म्हणजे फेडरेशनचा ताबूत जागच्या जागीं थंडा झाला व स्वराज्याचा मांडा मनच्या मनांत चुरला गेला !

ब्रिटिश मुत्सद्द्यांनीं फेडरेशनचें खूळ उभें करून संस्थानिकांची स्वदेशभक्ति मात्र चांगलीच कसाला लावली आहे. हिंदुस्थानाला स्वराज्य देणें म्हणजे इंग्रजांनीं हिंदुस्थानावरील आपली सत्ता काढून घेणेंच आहे. हिंदुस्थान कांहीं इंग्रजांचा स्वदेश नाहीं, तेव्हां त्यांना हिंदुस्थानाविषयीं स्वदेशाभिमान बाळगण्याचें कारण नाहीं. हिंदुस्थानाविषयीं स्वदेशभक्ति वाटावयाची ती संस्थानिकांना. अशा हिंदुस्थानाच्या कल्याणाकरितां इंग्रजांनीं तेवढा स्वार्थत्याग करण्यास तयार व्हावयाचें आणि संस्थानिकांनीं मात्र आपल्या सत्तेला यत्किंचितहि कमीपणा येऊं द्यावयाचा नाहीं ही गोष्ट धूर्त इंग्रज मुत्सद्द्याना कशी सहन व्हावी ? म्हणून त्यांनीं संस्थानिकांपुढें फेडरेशनचा पेच टाकला आहे. ‘ हिंदुस्थान देश हा तुमचा ना ? तुम्ही आपल्याला स्वदेशभक्त म्हणवितांना ? मग त्या देशाच्या स्वराज्याकरितां या यादीवर घाला तुमच्या त्यागाचा पहिला आंकडा. आम्ही तर बोलूनचालून परकीय. तथापि तुमच्याबरोबरीनेंच काय पण तुमच्याहून जास्ती मोठा आंकडा आम्ही घालतो’ असें सांगून धूर्त इंग्रज मुत्सद्दी संस्थानिकांना सांप्रत लाजवीत आहेत.

लॉर्ड विलिंग्डन यांनीं नरेंद्र–मंडळाच्या बैठकीच्या प्रारंभीं जें भाषण केलें त्यांत त्यांनीं तेथें जमलेल्या संस्थानिकांना असेंच लाजविलें. संस्थानिकांशीं इंग्रज सरकारचे पूर्वी तहनामे झाले आहेत त्यांस अनुसरून त्यांना प्राप्त झालेल्या हक्कसंबंधांना आपण धक्का लावणार नाहीं असें आश्वासन विलिंग्डन यांनीं आपल्या भाषणांत दिलें व खालसा मुलुखांतील कायदेभंगाची चळवळ दडपून टाकण्याच्या कामीं संस्थानिक मदत करण्यास तयार असल्याबद्दल त्यांचे आभारहि मानले. परंतु नव्या मन्वंत आपण जुन्या मन्वंतील सुलतानाप्रमाणें वागत राहूं असा जर अद्यापि मनांत भ्रम असला तर तो काढून टाकून फेडरल राज्यघटनेंत सामील होऊन ती यशस्वी करण्याचा त्यांनीं त्यांस उपदेश केला. त्यांचा उपदेश अन्तःकरणपूर्वक होता कीं तोंडदेखला होता तो त्यांचा त्यांनाच माहीत.संस्थानिक फेडरेशनमध्यें आले न आले तरी त्याचें विलिंग्डन यांस सुखदुःख सारखेंच आहे. आले तर खालसांतील हिंदी लोकांच्या स्वराज्याच्या गळ्यांत संस्थानिकांचें आयतेंच लोढणें अडकलें; बरें, न आले तर स्वराज्याचा पट सहजच उधळला जाऊन स्वराज्य न दिल्याचें सरकारच्या कपाळचें अपेश चुकलें.

तथापि फेडरेशनचा घाट पहिल्या गोलमेज परिषदेंत ब्रिटिश मुत्सद्यांनीं घातला व त्या नादावर गेलें वर्ष दीड वर्ष हिंदी लोकांना त्यांनीं झुलवीत ठेवलें त्याअर्थी त्याची कशीबशी तड लावणें व्हाईसरॉयांस भागच आहे. व्हाईसरॉयांचा व ब्रिटिश सरकारचा हा कल पाहून संस्थानिक व त्यांचे दिवाण यांनीं रंगाचा बेरंग होऊं द्यावयाचा नाहीं असा मनाशीं संकल्प करून आपसांतील फूट मोडली व फेडरेशनला संमति दिली. फेडरेशनची बाजू संभाळण्यांत बिकानेरच्या महाराजांनींच पुढाकार घेतला. त्यांनीं पतियाळाच्या महाराजांची समजूत काढून त्यांची अनुकूलता संपादली. पण त्यांची ही अनुकूलता हिंदी राष्ट्राच्या अंगीं लागण्याची आशा फारच थोडी आहे. संस्थानिकांनीं ब्रिटिश सरकारापुढें संरक्षक अटी मांडल्या असून त्यांचा समावेश भावी हिंदी राज्यघटनेंत करण्यांत आला तरच संस्थानिक फेडरेशनमध्यें सामील होणार आहेत. ‘ आपल्या अन्तस्स्थ राज्यकारभारांत हात घातला जाणार नाहीं, व आपल्याबरोबर ब्रिटिश सरकारनें केलेले तहनामे अक्षरशः पाळले जातील याविषयीं ब्रिटिश सरकार व बादशहा यांजपासून ते ताम्रपट मागत आहेत. याशिवाय इतर शर्तीहि त्यांना घालावयाच्या आहेत, पण त्या कोणत्या हें त्यांस आज माहीत नाहीं याला त्यांचा नाइलाज आहे !

संस्थानिकांना फेडरेशनमध्यें गोवण्यांतील हेतु असा सांगण्यांत येतो कीं, खालसा मुलूख व संस्थानी मुलूख हीं दोनहि शकलें मिळून हिंदुस्थान हें एकराष्ट्र होत असल्यानें संस्थानिकांना वगळून एकट्या खालसा मुलखाला स्वराज्य देणें इष्ट नाहीं. या हेतूस अनुसरून हिंदुस्थानाचीं दोन शकलें एकत्र जोडलीं तरी त्यांचा राज्यकारभार लोकशाहीच्या समान तत्त्वावर उभारला गेला तरच त्यांचा पूर्ण मिलाफ लवकर होण्याचा संभव आहे. पण या संरक्षक अटींनीं आपल्या प्रजेस कोणत्याहि प्रकारानें वागविण्याचें स्वातंत्र्य संस्थानिकांनीं स्वतःकडे ठेवलें आहे. त्याचा अर्थच असा कीं, त्यांना आपल्या प्रजेस खालसांतील जनतेइतके राजकीय हक्क द्यावयाचे नाहींत. इतकेंच काय पण संस्थानिकानें आपल्या प्रजेला कसेंहि छळलें तरी भावी हिंदुस्थानसरकारानें त्यांच्या कारभारांत हात घालतां कामा नये. हा हात व्हाइसरॉयांनींदेखील घालूं नये अशी नरेंद्रमंडळांत पास झालेल्या ठरावावरून त्यांची इच्छा स्पष्ट दिसते, मग ब्रिटिश सरकार ती मानो अगर न मानो.

यावरून संस्थानांचा कारभार संस्थानिकांच्या मर्जी-

प्रमाणें चालणार व या कारभारांत हिंदुस्थानसरकारास कधींहि व कोणत्याहि प्रसंगीं ते हात घालूं देणार नाहींत. आणि उलटपक्षीं फेडरल कौन्सिलांत हिन्दी प्रतिनिधींच्याबरोबरीनें बसून हिन्दी प्रतिनिधीं- इतकी सत्ता ते खालसा मुलखावर गाजविणार. कित्येक संस्थानिकांचें म्हणणें असें आहे कीं, वरिष्ठ व कनिष्ठ अशीं दोन प्रकारचीं कायदेमंडळें मध्यवर्ती सरकारांत स्थापन झाल्यास वरिष्ठ कौन्सिलांत संस्थानिकांना निम्या जागा व कनिष्ठ कौन्सिलांत एकतृतीयांश जागा असाव्या. संस्थानी मुलख खालसा मुलखाच्या मानानें एकतृतीयांशहि नसतां संस्थानिकांनीं वरिष्ठ कौन्सिलांतील निम्या जागा मागाव्या यापेक्षां अधिक शिरजोरपणा तो कोणता ? कनिष्ठ कौन्सिलाकडे वळलें तरी त्यांत संस्थानिकांच्या $\frac{1}{3}$ जागा, मुसलमानांच्या $\frac{1}{3}$ जागा आणि उरलेल्या $\frac{1}{3}$ जागांत हिंदु, ख्रिस्ती, युरोपियन, पार्शी, शीख यांची बोळवण. खेरीज ब्रिटिश सरकारच्या संरक्षक अटींनीं खऱ्या राजकीय सत्तेचा गाभा काढून घेतला जाणार तो निराळाच. हा विचार मनांत आला म्हणजे फेडरेशन हें स्वराज्य नसून स्वराज्याची थट्टा आहे असें म्हटल्यावांचून राहवत नाहीं. गोलमेज परिषदेस गेलेल्या संस्थानिकांनीं स्वदेशाभिमानाच्या लांब लांब गप्पा इंग्लंडांत मारल्या खऱ्या; पण तो अखेर त्यांचा देशाभिमान बेगडी ठरून ते स्वदेशा- भिमानानें प्रेरित झाले नसून स्वार्थानें अंध बनले आहेत असेंच आतां दिसून येत आहे. अशा स्थितींत ब्रिटिश सरकारास स्वराज्याची पायाशुद्ध उभारणी करावयाची मनापासून इच्छा असल्यास त्यांनीं संस्थानिकांच्या संरक्षक अटींचें खूळ मोडून टाकून त्यांस फेडरेशनमध्यें बिनशर्त सामील होण्यास आपल्या सत्तेच्या जोरावर भाग पाडलें पाहिजे किंवा हें शक्य नसेल तर संस्थानिकांचें हें लोढणें ब्रिटिश हिंदुस्थानाच्या गळ्यांतून तोडून टाकून त्याच्या स्वराज्याचा प्रश्न स्वतंत्र रीतीनें सोडविला पाहिजे.

# जातिभेदाचें इष्टानिष्टत्व

## लेखांक २ रा

( ले.—गो. रा. राजोपाध्ये, बी. ए. )

कर्तव्यबुद्धि ही उच्च मनोवृत्तीला—सत्त्वगुणाला पोषक असल्यामुळें ती मनुष्याला आत्मोन्नतीकडे- पूर्णत्वाकडे नेणारी आहे. तसेंच समाजहित हे तिचें साध्य असल्यामुळें समाजहिताचें मुख्य साधन तीच आहे. समाजांतील प्रत्येक व्यक्तीनें स्वहिताबरोबर समाजहितासाठीं कांहीं विशेष कर्तव्य केलें तरच सर्वांच्या शक्तीचा उपयोग समाजहिताकडे होईल. समाजहिताकरितां पाश्चात्य लोक धडपड करतात, परंतु ती बरीच निष्फळ होते. याचें कारण त्यांच्यामध्यें या विशेष कर्तव्यबुद्धीचा अभाव हेंच होय. ( Hitherto all these forms have been sterile and deceptive; and they must remain so until the idea of special function has been raised to an equal level of importance with that of united forces working together to a single end to-common-social good—John Morley). आतां हें कर्तव्य ठरवावयाचें कसें व कर्तव्यतत्त्वावर समाज- रचना कशा प्रकारची होते याचा विचार करूं. सर्व व्यक्तींच्या ऐहिक व पारमार्थिक हिताचें पोषण होण्यास आधीं समाजहित ठाम करून समाजस्थैर्य संपादलें पाहिजे. या समाजहितास अनुसरूनच व्यक्तींचीं विशेष कर्तव्यें निश्चित केलीं पाहिजेत. प्रत्येक व्यक्तीस आपापला प्रपंच व परमार्थ शक्य तितका सुरळीत चालवितां येईल अशी समाजव्यवस्था रहाण्यास प्रत्येक व्यक्तीला जें काम करावें लागेल ते तिचें कर्तव्य होईल. हें कर्तव्य पाळून त्यांतच व्यक्तीनें स्वहित साधण्याची खटपट केली पाहिजे.

### वर्ण कसा ठरतो

एखाद्या व्यक्तीस आपला स्वार्थ कर्तव्यानें आंखून दिलेल्या मार्गावांचून अन्य मार्गानें जास्त साधतो असें वाटत असलें व तसा साधण्याची धमक तिला असली तरी समाजहिता- करितां आपल्या स्वार्थवृत्तीचा तेवढ्यापुरता निरोध करून तिनें आपलें कर्तव्य संभाळलें पाहिजे. स्वार्थ- वृत्तीच्या निरोधामुळें त्यांचा स्वार्थ थोडा बुडत असला तरी त्याची आत्मोन्नति होते व समाजांतील इतर अनेक व्यक्तींना आपापलें हित जें एरवीं साधतां येणार नाहीं ते साधतां येतें. अशा व्यवस्थेमुळें

कांहीं अधिक सामर्थ्यसंपन्न व्यक्तींना आपला अधिक स्वार्थ साधण्याची संधि न मिळाली तरी सामर्थ्य असूनहि चरितार्थ साधण्यास संधि मिळत नाहीं असें होणार नाहीं. 'व्यक्तीकरितां समाज' या तत्त्वाची सार्थकता या व्यवस्थेमुळें होते तशी 'समाजाकरितां व्यक्ति' याहि तत्त्वाची होते. कारण समाजाचीं जीं कार्यें त्यांपैकींच कोणतें ना कोणतें तरी प्रत्येक व्यक्तीस करावें लागतें. आतां समाजाचें कोणतेंहि स्वतंत्र कार्य कोणत्याहि एकाच व्यक्तीच्या हातून पार पडणें शक्य नाहीं व समाजांत जितक्या व्यक्ती असतात तितकीं भिन्नभिन्न कार्येंहि समाजाजवळ नाहींत. तेव्हां एकच समाज-कार्य करणाऱ्या अनेक व्यक्तींचे वर्ग अगर समूह बनणार व जितकीं पृथक् समाजकार्यें आहेत तितके हे वर्ग होणार हें उघड आहे. जो ज्या वर्गाचें कार्य करतो तो त्याचा वर्ण ठरतो.

आतां व्यक्तीनें कोणता वर्ण आपला समजावा ? कोणत्या वर्गाचें कार्य आपलें कर्तव्य समजून त्याचें आचरण करावें, हा प्रश्न उपस्थित होतो. कोणाचें म्हणणें व्यक्तीच्या गुणकर्मावरून त्याचें कर्तव्य निश्चित व्हावें, म्हणजे ज्या वर्गाचें कार्य करण्याची एखाद्या व्यक्तीची त्याच्या गुणकर्माप्रमाणें पात्रता असेल त्या वर्गाचें कार्य त्यानें आपलें कर्तव्य समजावें. पण ही गुणकर्माप्रमाणें असणारी पात्रता ठरवावयाची कोणीं, कशी व केव्हां हाच काय तो महत्त्वाचा प्रश्न आहे. तो सुटला म्हणजे कर्तव्याचे तत्त्वावर समाजरचना कशी असावी हा प्रश्न सुटल्यासारखाच आहे. आपल्या अंगीं कोणते गुण आहेत तें पाहून आपलें कर्तव्य निश्चित करण्याचें काम व्यक्तीकडेच सोंपविलें तर पहिली अडचण ही येईल कीं, प्रत्येकास आपले अंगीं काय गुण आहेत हें प्रथमपासून व बरोबर रीतीनें कळणें शक्य नाहीं. कळलेंच तर मोठेपणीं कळेल. पण तोंपर्यंत त्याचे शिक्षणाची वाट काय ? तें कोणत्या वर्गाचें ध्यावें ? शिक्षणाचे अभावीं त्याच्या अंगच्या नैसर्गिक गुणांचा विकास कसा व्हावा? दुसरी व मुख्य अडचण अशी कीं, कर्तव्य हें बंधनात्मक आहे. तेव्हां कोणत्याहि बंधनाचे अभावीं व्यक्तीची कर्तव्यबुद्धि उत्पन्न होणार नाहीं; झाली तर टिकणार नाहीं. कर्तव्यबुद्धीचे जागीं अहंकारवृत्तीचाच पगडा व्यक्तीचे मनावर बसणार व अशा रीतीनें हक्काच्या तत्त्वाचेच परिणाम समाजांत उत्पन्न होणार. व्यक्तीचें कर्तव्य निश्चित करण्याचें काम दुसऱ्याकडे सोंपवावें म्हटलें तर कोणाकडे सोंपवावें ? कोणत्या मनुष्यास सर्वांच्या गुणकर्मांची परीक्षा पूर्णपणें करतां येणार ? अशा मनुष्याचा अधिकार सर्व काळीं कसा चालणार व कोण मानणार ? व्यक्तीचे गुण पालटण्याचा संभव असतो. जसे गुण पालटतील तशीं कर्तव्यें पालटलीं तर अनवस्था प्रसंग येणार. कर्तव्यें निश्चित करण्याचें काम अनेक पुरुषांच्या मंडळाकडे दिलें तरी वरील अडचणी दूर होणें शक्य नाहीं. शिवाय अशा प्रकारें गुणकर्मांवरून निश्चित होणारीं हीं कर्तव्यें व समाज-हितोपयोगी कर्तव्यें यांचा मेळ कसा बसणार ? तेव्हां कोणत्याहि कृत्रिम उपायांनीं व्यक्तीचीं कर्तव्यें निश्चित करणें शक्य नाहीं. व्यक्तींचीं कर्तव्यें खालील गोष्टी लक्षांत घेऊन निश्चित्त व्हावयास पाहिजेतः—

१ व्यक्तीचें कर्तव्य स्पष्टपणें ठरलें पाहिजे. तें ज्याचें त्याला तर ओळखतां आलें पाहिजेच; पण इतरांनाहि कळलें पाहिजे. कारण तसें कळलें असतां इतरांस त्याला योग्य वेळीं मदत करतां येईल व तो तें कर्तव्य करीत चुकल्यास त्याला शासन करतां येईल.

२ व्यक्तीचें कर्तव्य कायम ठरलें पाहिजे. कोणतीहि गोष्ट एकाद्याला करणें झाल्यास तीच आपल्याला कर्तव्य आहे, अन्य नाहीं; अशी तीविषयीं भावना असावयास पाहिजे. तरच कोणत्याहि अडचणीस न जुमानतां ती करण्याचा त्याचा निश्चय होईल.

३ व्यक्तीचें कर्तव्य त्याचे लहानपणींच ठरलें पाहिजे म्हणजे त्याविषयींचें शिक्षण त्यास बाल्यापासून मिळवितां येईल.

४ व्यक्तीचे कर्तव्य त्याच्या स्वभावास साधारण अनुकूल असलें पाहिजे. कारण, तसें नसल्यास त्याच्या शक्तीचा व्यर्थ व्यय होईल. वरील सर्व गोष्टी घडून येण्यास—

५ व्यक्तीचें कर्तव्य कोणत्या तरी नैसर्गिक अवस्थेवरूनच ठरलें पाहिजे. कारण कोणत्याहि कृत्रिम उपायांनीं व्यक्तीला तें आपलेसें वाटणें शक्य नाहीं.

**समाजरचना जातिसंस्थायुक्तच असणार**

या पंचलक्षणांनीं युक्त असें व्यक्तीचें कर्तव्य निश्चित झाल्यानें समाजकार्य करणाऱ्या कोणत्या तरी वर्गात व्यक्ती कायम राहून आपलीं कर्तव्यें बजावतील. त्या योगानें समाजकार्यें करणारे वर्गहि कायम होतील व समाजाची वृद्धि होऊन जसजसें समाजकार्याचें क्षेत्र वाढेल तसतशीं समाजकार्यें उरकणाऱ्या वर्गांची पात्रताहि वाढेल व अशा रीतीनें समाजस्थैर्य साधेल. वरील लक्षणांनीं युक्त अशा कर्तव्याचा निश्चय करणारी नैसर्गिक गोष्ट कोणती ? तर जन्म किंवा जन्मानेच ठरलीं जाणारीं गुणकर्में. जन्मानें ठरलें जाणारें जें कर्तव्य तोच व्यक्तीचा स्वधर्म किंवा जो ज्या वर्गात जन्माला येईल त्या वर्गाचें जें कर्तव्य तोच त्याचा स्वधर्म. या स्वधर्मानें चालणाऱ्या व्यक्तींचे बनलेले व निरनिराळीं समाजकार्यें सहकारित्वानें पार पाडणारे समाजाचे अवयवभूत वर्ग समाजांत असणें म्हणजेच जातिसंस्था. कर्तव्याचे तत्त्वावर समाजरचना करा-

वयाची तर ती जातिसंस्थायुक्तच होऊं शकते. समाजस्थैर्य, कर्तव्यजागृति, सहकारित्व, वंशपरंपरागत गुणकर्मांचें व संस्कारांचें पोषण इत्यादि दृष्टींनीं सशास्त्र अशी समाजरचना जर कोणती असेल तर ती जातिसंस्थायुक्त हिंदुसमाजरचनाच होय.

### हिंदुधर्माचें लक्षण

हिंदु समाजाची रचना कर्तव्य-स्वधर्म-या तत्त्वावर झाली आहे. ती व्यक्तीची आत्मोन्नति, चित्तशुद्धि व समाज—लोकधारणा या उभयविध कार्यांकरितां झाली आहे. हिंदुधर्मशास्त्रानें लोकसंग्रह दृष्टीआड केलेला नाहीं. किंबहुना लोकसंग्रहाच्या दृष्टीनेंच त्यानें सत्य, दया इत्यादि साधारण धर्माबरोबर व्यक्तीच्या स्वधर्मांचेंहि विधान केलें आहे. इतर धर्मांनीं ही दृष्टि ठेवलेली नाहीं. त्यांनीं फक्त साधारण धर्मांचेंच विधान केलें आहे. स्वधर्मांचें विधान त्यांनीं केलें नसल्यामुळें हक्काचें तत्त्व व त्याबरोबर अहंकारवृत्तीचा पुरस्कार यांचें साम्राज्य त्यांच्या समाजांत माजून साधारण धर्मांचें पालन त्यांच्या समाजांतील व्यक्तींना करणें कठिण पडतें. स्वधर्मांच्या विधानामुळें हिंदु समाजांतील व्यक्तींना साधारण धर्म पाळणें सुलभ होत असल्यामुळें हिंदुसमाज इतका अध्यात्मप्रवण, आत्मतुष्ट व अंतःकलहापासून अलिप्त राहिला आहे. स्वधर्म, जातिधर्म व कुलधर्म-यांनीं हिंदुसमाजाच्या वंशाचें व संस्कृतीचें रक्षण आज हजारों वर्षेंपर्यंत केलें आहे. ज्ञात अशा वर्तमानकालीन व भूतकालीन सर्व समाजांहून हिंदु समाज जुना असून तो आजवर टिकला आहे याचें श्रेय पुष्कळसें जातिधर्म व कुलधर्म यांस आहे. जातिसंस्थेच्या उपपत्तीवरून जातिधर्म शाश्वत ठरतात. कुलधर्मांचा विचार येथें अप्रस्तुत आहे. जातिधर्म-स्वधर्म हें हिंदुधर्माचें अनन्यसाधारण लक्षण आहे. लो. टिळक यांनीं हिंदुधर्माचें लक्षण केलें आहे तें हिंदूंची प्रामाण्यबुद्धि व मोक्षप्राप्तीचा मार्ग यांस अनुलक्षून केलें आहे. श्रीयुत तुळजापूरकर यांनी तें हिंदूंच्या तत्त्वज्ञानाला अनुलक्षून केलें आहे. 'धारणाद्धर्मः' या धर्माच्या व्याख्येला अनुलक्षून हिंदुधर्माची व्याख्या करावयाची झाल्यास ती अशी करतां येईलः—

विधत्ते वेदमूलो यो धर्मान्साधारणानपि।
स्वधर्मांश्च पृथक्त्वेन स धर्मो लोकधारणात्॥

## श्रीछत्रपति संभाजी-चरित्रकार्यालय

श्रीछत्रपति संभाजीमहाराजांच्या चरित्रविषयक साधनांचें संशोधन करून तें प्रसिद्ध करण्यासाठीं गेल्या बुधवारीं सकाळीं पुणें येथें "श्रीछत्रपति संभाजीचरित्र-कार्यालय" नांवाची संस्था स्थापन करण्याचा समारंभ श्री. न. चिं. केळकर यांच्या अध्यक्षतेखालीं झाला. प्रारंभीं श्री. बावडेकर यांनीं जमलेल्या पाहुण्यांचे स्वागत केल्यावर अध्यक्षांची निवड झाली. त्यानंतर श्री. गुंजाळ, प्रो. पोतदार, श्री. यशवंतराव दाते, सरदार तात्यासाहेब मेहेंदळे, रा. सा. बाबासाहेब देशपांडे वगैरे गृहस्थांचीं भाषणें झालीं. सरदार चंद्रोजीराव आंग्रे, सरदार माधवराव किबे, रावसाहेब गो. स. सरदेसाई, रा. सा. पी. डी. कुलकर्णी वगैरे गृहस्थांचे संदेश वाचून दाखविण्यांत आले. सदरहू संस्था तीस हजार रुपयांच्या नियमित भांडवलावर उभारावयाची असून त्यासाठीं शंभर रुपयांचा एक असे तीनशें भाग काढले आहेत. प्रारंभीं दहा दहा रुपयांच्या दोन हप्त्यांनीं वीस रु. वसूल करण्यांत येतील व पुढें जसे भाग प्रसिद्ध होतील तसे पैसे वसूल करण्यांत येतील. कंपनीच्या डायरेक्टरांमध्यें प्रो. पोतदार, श्री. नारायणराव गुंजाळ, श्री. यशवंतराव दाते, श्री. आबासाहेब बावडेकर, श्री. बाळासाहेब घोरपडे वगैरे आहेत. श्री. बेंद्रे यांनीं मिळविलेलें संभाजीचरित्र विषयक साहित्य बरेंच मोठें असून त्यांत इंडिया ऑफिस व गोव्यांतील संग्रह यांची भर पडतांच ग्रंथप्रकाशनास सुरवात होईल. हें काम श्री. बेंद्रे यांच्या संपादकत्वाखालीं होणार असून पहिला भाग सुमारें सहा महिन्यांनीं प्रसिद्ध होईल. पुढील भाग दोनतीन महिन्यांच्या अंतरानें निघतील. एकंदर पृष्ठें १२ ते १५ हजार होतील. अशी कार्याची रूपरेखा सांगण्यांत आली. शेवटीं श्री. न. चिं. केळकर यांनीं समारोपादाखल भाषण करून मंडळ स्थापन झाल्याचें जाहीर केलें व आपण एक भाग घेण्याचें आश्वासन दिलें. तसेंच सरदार मेहेंदळे, श्री. आर. एस. दीक्षित, रा. सा. बाबासाहेब देशपांडे, समर्थ भारत प्रेसचे श्री. सरदेसाई वगैरे मंडळींनीं एक एक भाग घेण्याचें आश्वासन दिलें. नंतर पानसुपारी होऊन समारंभ आटोपला.

# विश्वसंचार

## रशियाची दुसरी पंचवार्षिक योजना

जगांतील १/६ भाग समृध्दावस्थेंत असून त्याची उत्पादनशक्ति दिवसानुदिवस वाढत आहे. परंतु ५/६ भाग आर्थिक आपत्ति, बेकारी, दारिद्य्र यांनीं ग्रस्त झाला आहे. हा ५/६ भाग भांडवलवाल्यांचा असून समाजसत्तावादी सोव्हिएटांचा रशिया हा १/६ भाग आहे.

स.१९३१ सालीं रशियाचें राष्ट्रीय उत्पन्न शें.१८·२ म्हणजे १/२ वाढलें. रशियांत मालाची निपज जास्त होते. परंतु त्यापेक्षां विशेष महत्त्व तयार झालेल्या मालाच्या वांटपाचें आहे. या वांटपावरून रशिया हा खराखुरा समाजसत्तावादी कसा आहे हें दिसून येतें.

स. १९३१ सालीं उत्पन्नापैकीं शें. १८·५ उत्पन्न रशियाचा जो भाग पूर्ण समाजसत्तावादी झाला आहे त्याकडे गेलें. शें. १८·५ उत्पन्न खासगी उद्योग–धंदे व व्यक्ती या विभागाकडे गेलें.

स. १९१७ मध्यें रशियांत कामकऱ्यांनीं क्रांति केली व त्यांनीं ताबडतोब महत्त्वाचे धंदे हस्तगत करून घेतले. परंतु खेड्यापाड्यांतून हजारों लहान लहान शेतें होतीं. त्यांतून भांडवल गुंतविण्यास भांडवलवाले टपून होते. त्यांना आळा घालणें हें कामकरी सरकारापुढें महत्त्वाचें काम होतें व हा आळा घालण्याला एकच उपाय होता व तो म्हणजे खासगी जमिनींचें एकीकरण करणें.

जमिनींचें एकीकरण केल्यानें त्यावर यंत्रसामुग्रीच्या साधनांनींच शेती करणें जरूर झाल्यानें सरकारनें प्रथम तो धंदा हातीं घेतला. त्याचा परिणाम असा झाला कीं, पूर्वी रशिया म्हणजे शेतीचा देश म्हणून समजला जाई, तें त्याचें स्वरूप पालटून तो एक औद्योगिक देश बनला. महायुध्दापूर्वी ( १९१३ ) रशियाची औद्योगिक बाबतींत उत्पादनशक्ति शें. ४२·१ इतकी होती. परंतु पंचवार्षिक योजनेच्या पहिल्याच वर्षी तें प्रमाण शें. ४८·७ वर आलें व तिसऱ्या वर्षी हें प्रमाण शें. ६३ वर गेलें.

रशियानें आपली औद्योगिक उत्पादनशक्ति कशी वाढविली हें पहाण्यासारखें आहे. त्यासाठीं राष्ट्रसंघानें आंकडे प्रसिद्ध केले आहेत. स.१९२६ चें प्रमाण १०० समजून त्याप्रमाणें आंकडे दिले आहेत.

| सन | उत्पन्न वाढ |
|---|---|
| १९२७ | १२७ |
| १९२८ | १४७ |
| १९२९ | १७० |
| १९३० | १९३ |
| १९३१ | २१९ |

हे आंकडे आश्चर्यकारक तर खरेच, परंतु त्यांत अतिशयोक्ति मात्र काडीची नाहीं. आंकड्यांत सन १९३१ ची २१९ ही दिलेली वाढ मात्र चुकीची असून खरी वाढ २७९ झाली आहे असें सोव्हिएटांचें म्हणणें आहे.

मालाची निपज जशी वाढली त्याच प्रमाणांत कामकऱ्यांची संख्याहि वाढली आहे. सन १९३१ मध्यें कामकऱ्यांची संख्या वीस लक्षांनीं वाढून आतां ती संख्या १ कोटी ८५ लक्षांवर आली आहे. सन १९३२ सालीं त्यांत आणखी १०–११ लक्षांची भर पडणार आहे. आज त्या सरकारापुढें प्रश्न आहे तो काम कसें पुरवावें हा नसून मजूर कसे मिळवावेत हा आहे.

उद्योगधंद्यांत वाढ झाल्यानें यंत्रसामुग्री वाढली. त्यामुळें शेतकीच्या यांत्रिक उपकरणांत वाढ होऊन सामुदायिक शेती सुलभपणें करतां येऊं लागली आहे. नोव्हेंबर १९३१ अखेर शें. ६२ इतकी शेतजमीन सामुदायिक करण्यांत आली. चालू वर्षांत हें प्रमाण शें. ७२ ते ७५ पर्यंत जाईल.

दुसऱ्या पंचवार्षिक योजनेचा मुख्य हेतु असा आहे कीं, राष्ट्रांतून भांडवलशाहीचीं बीजेंच नष्ट करून ज्यामुळें वर्गकलह उत्पन्न होण्याचा संभव आहे. त्या सर्व गोष्टी नष्ट करावयाच्या व आपण समाजशासित संस्थेचे जबाबदार घटक आहोंत ही जाणीव कामकऱ्यांत उत्पन्न करावयाची. यासाठी प्रथम शहरांतील जमीनदार वर्ग नष्ट करावयाचा. उद्योगाभिवृद्धि व शेतीची वाढ समाजसत्तेच्या पायावर करून राष्ट्राचे उत्पन्न वाढवावयाचें व तें सर्व कामगाराच्या हिताकडे खर्च करावयाचें.

स. १९३७ सालीं पुऱ्या होणाऱ्या दुसऱ्या पंचवार्षिक योजनेंत पुढील काम करण्याचें योजिलें आहे.

### विजेची वाढ

१९३२ सालीं १७ हजार १० लक्ष किलोवॅट तास.
१९३७ सालीं १० लक्ष दशलक्ष. ,, ,,

### लोखंड

१९३२ ,, ९० लक्ष टन
१९३७ ,, २ कोटी २० लक्ष टन.

### कोळसा

१९३२ ,, ९० दश लक्ष टन.
१९३७ ,, २५० ,, ,, ,,

स. १९३७ सालअखेर २५ ते ३० हजार मैल नवा लोहमार्ग तयार करवयाचें ठरलें आहे. तेलाचा पुरवठा २॥ ते ३ पटींनीं वाढविण्यांत येईल व यंत्रसामुग्री ३ ते ३॥ पटींनीं वाढविण्यांत येणार आहे.

यावरून भावी योजना किती भव्य आहे याची योग्य कल्पना येईल. ही योजना सफळ झाल्यास रशिया युरोपांत आर्थिक दृष्ट्या पहिलें स्थान संपादन करील.

अशा रीतीनें मालाची निपज झपाट्यानें होऊं लागतांच मालाचा खपहि म्हणजे लोकांत सहजच वाढेल. दुसरी योजना पूर्ण होतांच अन्नसमृद्धि आतांपेक्षां पुष्कळ होईल. कामकऱ्यांची मजुरीहि स. १९३१ सालीं शे. १६ प्रमाणें वाढली. स. १९३२ सालीं आणखी शे. ११ नें वाढेल.

ही जी औद्योगिक वाढ झपाट्यानें झाली त्यासाठीं यंत्रशास्त्रज्ञांची गरज सारखी वाढत आहे. यांत्रिक शिक्षणाचा प्रसारहि वेगानें होत आहे. स. १९३१ सालीं १ लक्ष ८० हजार इसम औद्योगिक (टेक्निकल) संस्थांतून शिक्षण घेत होते. त्यांतून २१ हजार तरुण तज्ज्ञ एन्जीनियर्स बाहेर पडले. स. १९३२ सालीं ३८ हजार तज्ज्ञ बाहेर पडतील व स. १९३७ सालीं हा आंकडा ८४ हजारांवर जाईल.

यांखेरीज कारखान्यांना ज्या उद्यमशाळा जोडलेल्या आहेत त्यांतील ५१ हजार तरुण स. १९३१ सालीं उद्यमशिक्षणांत उत्तीर्ण झाले. स. १९३२ सालीं ही संख्या ३५० हजारांवर जाईल.

या शिक्षणांत फक्त औद्योगिक (टेक्निकल) शिक्षणच धरलें आहे. याशिवाय इतर शिक्षणसंस्था धरल्यास सोव्हिएट रशियांत दर तीन माणसांत एक मनुष्य शिक्षणांत गुंतला आहे असें आढळून येईल. समाजसत्ता ही सर्वांत सोव्हिएट रशियांत मजबूत होईल. रशियांत समाजसत्तेचा पाया भरून ठेवला आहे. पुढील पंचवार्षिक योजना सिद्ध झाल्यानंतर त्यावर समाजसत्तेची सुंदर इमारत उभारलेली दिसेल. अशी सोव्हिएट सरकारास आशा आहे.

# जातिभेदाचें इष्टानिष्टत्व

## लेखांक ३ रा

( ले.—गो. रा. राजोपाध्ये, बी. ए. )

जातिधर्माचरण—स्वधर्माचरण—हा एक यज्ञ आहे. कारण यांत समाजांतील सर्व व्यक्तींच्या हिताकरितां प्रत्येक व्यक्तीला स्वार्थाचा थोडाबहुत निरोध करावा लागतो. जेणेंकरून सर्वांचें हित होईल अशीच कृति स्वधर्माचरणरूपानें प्रत्येक व्यक्तीला करावी लागत असल्यामुळें सर्वांवर सारखें प्रेम करावें हा जो नीतीचा किंवा तत्त्वज्ञानाचा सिद्धांत त्याचेंच स्वधर्म हें व्यावहारिक रूप आहे असे ठरतें. स्वधर्माचे बंधन हें कृत्रिम नसून निसर्गानें-ईश्वरानें-लावून दिलेलें आहे. तें पाळल्यानें ईश्वराची व समाजाची सेवाच घडते. त्यांत स्वार्थ-परमार्थ, व्यक्तिहित-समाजहित, चित्तशुद्धि—लोकसंग्रह हे सर्व एकसमयावच्छेदानें साधतात. सर्वांना सारखी सुरक्षितता समाजांत असणें हा न्याय आहे. इतर ऐहिक सुखें प्राप्त करून घेण्याचें सामर्थ्य सर्वांना सारखें नसतें. तीं सर्वांना सारखी मिळणें शक्य नाहीं व त्यांची मुख्य ध्येयाला आवश्यकताहि नाहीं. Nearly all other benefits that are needed by one person are not needed by another; and many of them can, if necessary, be cheerfully foregone or replaced by something else, but security no human being can possibly do without—T. S. Null' या इंग्रजी उताऱ्याचा अर्थ पुढीलप्रमाणे—' जे फायदे एका व्यक्तीला हवे असतात त्या सर्वांची दुसऱ्या व्यक्तीला गरज असतेंच असे नाहीं. त्यांतील कित्येक फायदे न मिळाले व त्यांच्याबद्दल दुसरे फायदे मिळाले तरी मनुष्य आनंद मानील. परंतु सुरक्षितपणा हा फायदा असा आहे कीं, त्यावांचून कोणाहि मनुष्याचें चालणार नाहीं. '

### सुरक्षितपणाचे दोन प्रकार

आतां सुरक्षितता दोन प्रकारची आहे. आपण कोणाचा अपराध केला नसतां दुसऱ्यापासून पीडा होण्याची भीति नसणें हा एक ( Negative ) प्रकार आणि उद्योगानें व प्रामाणिकपणानें चरितार्थ मिळविण्याची खात्री असणें हा दुसरा ( Positive ). शारीरिक शक्तीनें बलिष्ठ असणाऱ्यांना अशक्तांस पीडा देतां येऊं नये म्हणून जसे कायद्याचे निर्बंध असतात, तसे धन, बुद्धि, अधिकार एतद्रूपी शक्तीनें बलिष्ठ असणारांनी त्या बाजूनें अशक्त असलेल्या लोकांच्या व्यवसायांत आक्रमण करतां येऊ नये म्हणून स्वधर्माचे निर्बंध असणे अवश्य आहे. स्वधर्माचे निर्बंध नसून हक्का-

च्या तत्त्वाचा स्वैरसंचार पाश्चात्य समाजांत असल्यामुळे जे धनवान् आहेत ते दुसऱ्याच्या व्यवसायाचें आक्रमण करून अधिक धनवान् होत आहेत व इतरांना बेरोजगार व अधिकाधिक दरिद्री करून सोडीत आहेत. अशा प्रकारें समतेचें ब्रीद जरी तत्त्वतः पाश्चात्यांनीं स्वीकारलें आहे तरी व्यवहारांत त्यांच्यामध्यें विषमताच सारखी वाढत आहे. पाश्चात्य समाजांत सुरक्षिततेचा पहिलाच प्रकार फक्त शक्य आहे. स्वधर्माच्या निर्बंधामुळें व्यक्तीच्या निर्वाहाचें साधन निश्चित होऊन कायम रहात असल्यामुळें दोनहि प्रकारची सुरक्षितता फक्त जातिसंस्थायुक्त समाजांतच असूं शकते. तेव्हां न्यायाच्या दृष्टीनेंहि स्वधर्माचे निर्बंध अवश्य ठरतात.

## परधर्म भयावह कां ?

दहा अपराधी सुटले तरी चालेल, पण एका निरपराधी मनुष्यास शिक्षा होतां कामा नये अशी कायद्याची दृष्टि आहे. याचें कारण असें कीं, 'मीं अपराध केला नाहीं तर समाजांत मला कोणाची भीति नाहीं' अशी प्रत्येकाची खात्री असणें समाजाचे अस्तित्वास अवश्य आहे. तसेंच 'मीं उद्योग केला तर मला प्रामाणिकपणानें आपला निर्वाह करतां आला पाहिजे' अशी खात्री प्रत्येकाची असणे समाजाच्या सुस्थितीस अवश्य आहे. परधर्माचें आचरण करणारा मनुष्य ज्या व्यक्तीचा धर्म आचरतो त्या व्यक्तीच्या व्यवसायाचें आक्रमण करून तिची वरील खात्री नष्ट करतो व त्या द्वारानें समाजनाशाचें बीज पेरतो म्हणून परधर्म भयावह आहे. पाश्चात्य समाजांत परधर्मानुष्ठान यथेच्छ चालू असल्यामुळें त्यांच्या समाजास कीड लागली आहे. हिंदु समाजांत तसें फारसें नसल्यामुळें तो आजपर्यंत टिकून राहिला आहे.

## स्वधर्म आणि भूतदया

'जे कां रंजले गांजले' या तुकाराममहाराजांचे अभंगांत भूतदयेचें वर्णन आहे. या वर्णनाप्रमाणे भूतदया असावी हें जातिसंस्था नसलेल्या समाजांतील व्यक्तींनाहि मान्य आहे. 'रंजले गांजले' लोकांसाठीं कायदे करणें, त्यांस शिक्षण देणे, त्यांच्या अन्नाची सोय सार्वजनिक पैशांतून करणें इत्यादि खटपटी त्या समाजांतील राजसत्ता करते. हे सर्व भूतदयेनेंच प्रेरित होऊन केलें जातें असें नाहीं. या लोकांनी समाजांत गोंधळ उत्पन्न करूं नये हा त्यांत हेतु असतो. तथापि भूतदया हाच त्यांचा हेतु मानला तरी वरील खटपटी, मुळांत कीड लागलेल्या झाडास वर वर पाणी घालण्याच्या खटपटीप्रमाणे, निष्फळ होतात. पाश्चात्य समाजांत व्यक्तीच्या आस्तित्वाची ( Being ) फक्त व्यवस्था लागते, त्याच्या चरितार्थाची (well-being ) लागत नाहीं. चरितार्थाची व्यवस्था स्वधर्माचे निर्बंधानें लागते म्हणून हे निर्बंध पाळणें हीच खरी भूतदया होय. ( The only true benevolence is that which helps another to help himself.) नुसत्या शिक्षण वगैरे उपायांनीं चरितार्थाची सोय लागत नाहीं व जीवनार्थ कलहांत व्यक्तीचे हाल होण्याचे चुकत नाहींत. स्वधर्मनिर्बंधाचे अभावीं 'रंजले गांजले' लोकांच्या संख्येची वाढच होत जाते व भूतदयाप्रेरित खटपटींचा व्हावा तसा उपयोग होत नाहीं. स्वधर्माचे निर्बंधामुळें अशा लोकांची संख्या होतां होई तों कमी रहाते व भूतदयेचा योग्य उपयोग होतो.

## जातींचा एकीकरणास उपयोग

दुसरें असें की भूतदया किंवा प्रेम या भावनेचा जोर (Intensity) जितका जास्त तितकी ती भावना कार्यकारी व टिकाऊ असते. या भावनेचा जोर प्रेमाच्या मर्यादित क्षेत्रावर कायम राहतो, व्यापक क्षेत्रावर राहत नाहीं. मर्यादित क्षेत्रावरील जोरदार प्रेमामुळेंच व्यापक क्षेत्रावरील प्रेमाचे पोषण होतें. ( It is just the narrower ties that divide the allegiance which must surely foster the wider affections-J. Maccan ) तेव्हां समाजावरील व्यक्तीचें प्रेम कायम रहाण्यास कुटुंब, जाति हीं प्रेमाचीं लहानमोठी क्षेत्रें अवश्य आहेत. कुटुंबावरील प्रेमामुळे कुटुंबबाह्यव्यक्तीशीं विरोध येत नाहीं. त्याप्रमाणें जातीवरील प्रेमामुळें जातिबाह्य व्यक्तीशीं विरोध येत नाहीं. उलट जातीवरील प्रेमामुळें जातिहित लवकर साधतां येतें व अशा प्रकारें अनेक जातींचें हित साधण्यामुळें समाजहिताचा मार्ग सुलभ होतो. गवताचा भारा बांधण्यास त्याच्या लहान पेंढ्या बांधाव्या लागतात. तद्वत् समाजाचें एकीकरण करण्यास जातीच्या एकीकरणाचा उपयोग होतो. समाजांतून दारूचें व्यसन घालविण्यास जातिसंघाचा उत्तम उपयोग झाल्याचें उदाहरण गुजराथ वगैरे प्रांतांत नुकतेंच घडल्याचें प्रसिद्ध आहे. तात्पर्य, जाति हें क्षेत्र समाजहितास अत्यंत उपयोगी आहे.

ज्ञानेश्वर, एकनाथ, तुकाराम, रामदास प्रभृति सर्व संत—महात्म्यांनीं जातिसंस्थेची आवश्यकता मान्य केली आहे. 'वर्णाश्रम करिसी चोख, तरी तूं पावसि उत्तम लोक' इत्यादि वर्णाश्रमप्रशंसापर व 'याती अठरा चारी वर्ण, कर्दम करुनी विटाळले' इत्यादि वर्णसंकरनिंदापर अनेक उद्गार त्यांनीं काढले आहेत. याचें कारण स्वधर्माचरण केलें असतां समाजावर प्रेम केल्याचें श्रेय आपोआपच मिळतें असें त्यांच्या उद्गारांचा आशय आहे. मात्र हें आचरण

ज्ञानपुरःसर व्हावयास पाहिजे. 'अवघी एकाचीच वीण, तेथें कैचें भिन्न भिन्न' अशीं त्यांचीं वचनें आहेत, तीं जातिसंस्थेचा उच्छेद करण्याकरितां नसून त्यांतील तत्त्व लोकांचे लक्षांत येण्यासाठीं आहेत हें तत्त्व मनांत बाळगून स्वधर्म आचरावा असें त्यांचें सांगणें आहे.

### जातिसंस्था व समता

'Every duty has its corresponding right' या कायद्याच्या तत्त्वाप्रमाणें स्वधर्माचरण करणाऱ्या हिंदुसमाजांतहि हक्क संभाळले जातात. पण ते संभाळण्याची पद्धत पाश्चात्य पद्धतीहून अगदीं भिन्न आहे. हिंदुसमाजांत स्वधर्माचे निर्बंध प्रत्येकास पाळावे लागत असल्यामुळें प्रत्येकाचे हक्क अनायासेंच इतरांकडून पाळले जातात. पाश्चात्य समाजांत प्रत्येकास आपापल्या हक्कासाठीं स्वतः धडपड करावी लागते आणि या धडपडीमुळें सर्वांस समान हक्कांची प्राप्ति होत नाहीं! पाश्चात्य समाजांची समता सर्वांस सारखी संधि (Equal opportunity) देणें एवढ्यापुरतीच आहे. मुळांतच जेथें शारीरिक, मानसिक, आर्थिक शक्तींत विषमता आहे तेथें समान संधि दिल्यानें अधिकच विषमता उत्पन्न होते. कारण, वरील शक्तींनीं संपन्न असलेले लोक स्वार्थाच्या हावेनें त्या शक्तींनीं रहित असलेल्या लोकांचा पाडाव करून त्यांस अधिकाधिक दारिद्र्यांत लोटतात व आपण अधिकाधिक संपत्तींत लोळतात! त्यामुळें समान संधि समता निर्माण करूं शकत नाहीं व म्हणून खरी समता पाश्चात्यांचे दृष्टीचे टप्प्यांत आली नाहीं. (What we have entered into is not Democracy; it is yet far off. -Wellock) खरी समता कोणत्याहि राजकीय धोरणावर किंवा राज्यशासनपद्धतीवर अवलंबून नाहीं. प्रजासत्ताक राज्यांत ती असते असेंहि नाहीं व राजसत्ताक राज्यांत ती नसते असें नाहीं. ती शुद्ध व उदात्त मनोवृत्तीवर अवलंबून आहे. अशी मनोवृत्ति बनण्यास प्रत्येकानें स्वार्थाचा निरोध करून समाजहिताच्या दृष्टीनें अवश्य असणारीं कर्तव्यें आचरलीं पाहिजेत. (Democracy is not a question of political policy, of Government merely; but of mental attitude....Nothing so purifies and elevates the mind like the effort to love and serve men-Wellock.) हिंदु समाजांत स्वधर्माचे निर्बंधामुळें खरी समता नांदूं शकते व ती निर्वाहाच्या साधनाची सुरक्षितता या महत्त्वाच्या बाबतींत नांदूं शकते हें विशेष आहे.

### जातिसंस्था अद्वैताकडे नेते

तत्त्वज्ञानानें एकच अंतिम सत्य, 'एकमेवाद्वितीयम्' ठरविलें आहे. पण प्रत्यक्ष डोळ्यांपुढें दिसणारी स्थिति पाहिली तर ती भेदमय आहे. या दोहोंची सांगड धर्म घालतो. व्यक्ति व समाज यांत भेद दिसतो तसा व्यक्तिव्यक्तींतहि दिसतो. परंतु वास्तविक भेद कोठेंच नाहीं. अशा स्थितींत ही भेदबुद्धि नष्ट व्हावी म्हणून समाजहित व व्यक्तिहित यांत कोठेंहि विरोध न येईल व दोनहि एकसमयावच्छेदानें साधतील अशा आचरणाचे नियम धर्मानें विहित केले आहेत. मुळांत अभेद आहे पण अहंकारानें–स्वार्थबुद्धीनें तो दिसत नाहीं. हा अहंकार व स्वार्थबुद्धि कमी कमी होत जाऊन अखेरीस अद्वैताचें दर्शन होईल अशा नियमांची रचना धर्मानें केली आहे. प्रथम समाजांतील सर्व व्यक्तींना सुलभतेनें अर्थ संपादन करतां येईल अशा प्रकारें स्वधर्माची योजना करून स्वधर्मानेंच प्रत्येकानें अर्थ संपादन करणें, मिळालेल्या अर्थांतून इष्टापूर्त वगैरे समाजोपयोगी कामाकडे कांहीं खर्च करून राहिलेल्या अर्थाचा भोग घेणें, अन्नाचा भोग घेतांना सुद्धां आधीं त्याचा यज्ञ करून नंतर भोग घेणें अशा प्रकारचें त्यागपूर्वक अर्थसंपादन व त्यागपूर्वक भोग घेण्याचें विधान धर्मानें केलें आहे. या त्यागानें अहंकार व स्वार्थबुद्धि यांचा लय होऊन अद्वैतदर्शन सुलभ होतें. जातिसंस्था ही त्यागपूर्वक अर्थसंपादन करावयास लावणारी संस्था आहे ती भेद निर्माण करणारी नसून व्यक्तिगत भेदांचें एकीकरण करून अद्वैताकडे नेणारी संस्था आहे. नुसती सर्वांस सारखी संधि देणें हें अद्वैत नव्हे. अशासारख्या संधीमुळें अर्थसंपादन अहंकारपूर्वक स्वार्थबुद्धीनें होतें व त्यामुळें दोनहि वृत्ती बळावतात व द्वैताचें, भेदाचें, कलहाचें, साम्राज्य माजतें. याचें उदाहरण पाश्चात्य समाजांतील अंतःकलह हें होय.

# कैलास व मानससरोवराची यात्रा

## लेखांक ३ रा

( ले. प्रवासी )

### सुयासारखीं पानें

दिवस १५ वा. उजाडतांच मार्गाला लागलों. जरा पुढें गेल्यावर आपला रस्ता चुकला आहे असें कळून आलें. मग रस्त्याला लागण्याचे उद्देशानें तसेच चाललों. तों पुढे गेल्यावर स्लेट पाटीसारख्या पातळ कातळाचे थर असलेले असे काळेभोर मोठाले पहाड लागले. त्यांमधून रस्ता काढूं लागलों. असे पहाड व दऱ्याखोरीं ओलांडीत दहांचे सुमारास सपाटीला लागलों पाणी लागलें म्हणजे खाण्याचा विचार करूं असा बेत करून रस्त्याच्या दिशेनें मैदान तुडवीत चाललों. बारांच्या सुमारास एक रस्ता त्या बाजूला जाणारा लागला. त्या रस्त्यानें चालतांना समोरच भाताच्या शेतासारखें एक मोठें चौरस शेत दिसलें. तेथें गेल्यावर तें शेत नसून रानगवत असल्याचें कळून आलें. हें गवत वीत-दीड वीत उंच असून त्याच्या पानाचीं टोकें पायास सुईसारखीं टोंचत असत. असलें गवताचें रान मधून मधून कैलासापर्यंत लागत होतें. कोठें असलें रान, तर कोठें कांटेरी जळाऊ झुडपें, तर कोठें टणक रेताड मैदान मिळून सर्व रस्ता कंटकमय असाच लागला. मधून मधून चांगली जमीनहि लागत असे. सायंकाळपावेतों पाणी मिळालें नाहीं, व खाणेंहि नाहीं. सूर्यास्ताचे सुमारास 'शिपचिलम् गंगा' नदी लागली. तिच्या पलीकडच्या कांठी घळई-सारख्या जागेत जाऊन मुक्काम केला. आजची मजल कमींत कमी वीस मैलांची झाली. नदीच्या पात्रांतील व आसपास तिच्या कांठावरच्या प्रदेशांत जे गोटे पडले होते, ते इतके सुंदर व चित्र-विचित्र रंगाचे होते कीं, ते पाहिल्यावर जणं काय नाना प्रकारच्या रत्नांचा येथें कोणीं सडाच शिंपडला आहे असा भास झाला. असा देखावा आपल्या देशांत पाहण्यास अगदींच दुर्मिळ.

दिवस १६ वा. सकाळीं उठून नदीच्या कांठानेंच मोठाल्या दरडी चढत व उतरत दोनतीन मैल गेलों. त्या ठिकाणीं नदीचें पात्र रुंद होतें. त्या पात्रांत वरच्या बाजूस कांहीं तंबू दिसले. मग नदीवर खाणे-पिणें उरकून तंबूकडे निघालो. हे तंबू कैलासाच्या रस्त्यावरच होते. तेथें रा. वैद्य व धाप्यास राहिलेले दोघे संन्यासी भेटले. चौकशीअंतीं वैद्य आमची चुकामूक झाल्यावर परत 'दंफूस' गेले होते. तेथें ह्या संन्याशांचेबरोबर मग कैलासला निघाले होते. असें समजले. मग सर्व मिळून पुढें निघालों.

### जवारीवाल्याचा इशारा

या सर्व प्रदेशाला 'तकलाकोट' असें म्हणतात. सायंकाळपर्यंत पंधरा मैलांची मजल करून वस्तीस जवारीवाल्या व्यापाऱ्याचे सात-आठ तंबू लागले होते तेथें आलों. हा प्रदेश दलदलीचा होता. जवारी-वाल्यानें आम्हां सर्वांस तंबूंत रहाण्यास जागा देऊन दोनतीन बकऱ्यांचीं कातडीं स्वामींस दिलीं. पुढें अशींच 'छकडयास' बकऱ्यांचीं कातडीं मिळालीं होतीं. रात्रीं व्यापाऱ्यानें आमच्या वाटाड्याची बरीच हजेरी घेतली. त्यांनीं सांगितलें कीं, अशा उघडया ( तंबूशिवाय ) लोकांना बरोबर घेऊन तूं कसा आलास ? इकडे आतां बर्फ पडूं लागलें. रहदारी बंद होऊं लागली. डाकूंचें प्राबल्य जास्त. तुमच्या-जवळ ना हत्यार ना पात्यार. ना डेरा ना राहुटी. नाहीं सामान, नाहीं पैसा. कैलासाहून येणें आतां शक्य आहे काय? अशी वाटाड्याची बरीच कानउघाडणी करून आम्हांस विनंति केली कीं, आतां पुढें जाण्यापासून धोका आहे. बर्फ पडूं लागलें म्हणजे एकेका वेळेस दोन दोन फूट बर्फ पडतें. रस्ता अजीबात बंद होतो, मग तुमची काय दशा होईल हें सांगण्याची जरूरी नाहीं. मेहरबानी करून आमच्याबरोबर मागें फिरल्यास आम्ही तुम्हांस हिमालयाचे पायथ्याशीं नेऊन तुमच्या वाटेला लावून देऊं. जीव धोक्यांत घालणें चांगलें नाहीं, असें पुष्कळ प्रकारें सांगितलें. त्याचा आम्ही विचार करून शेवटीं 'अर्थं वा साधयेद्देहं वा पातयेत्' अशा निश्चयानें उद्दिष्ट हेतूच तडीस नेण्याचें ठरविलें.

दिवस १७ वा. सकाळीं उठल्यावर व्यापारी आपल्या मार्गास लागले व आम्हीं कैलासाची वाट सुधारली. संध्याकाळचे सुमारास कैलासाचें शुभ्र शिखर दिसूं लागलें. उत्तर-हिंदुस्थानाच्या नकाशांतील आकाराप्रमाणें किंवा शिवलिंगाप्रमाणें आकृति दिसत होती. शिखरदर्शनानें फार आनंद झाला. दहा-बारा मैलांचा प्रवास करून वाटेंत वस्ती केली.

### बर्फाचा कडाका

दिवस १८ वा. सकाळीं पुढें निघालों. सपाटीचा प्रदेश संपून पुनः पहाड लागून त्यांची चढ-उतार सुरू झाली. संध्याकाळीं 'छकड्यास' जाऊन पोंचलों.

तेथें पुष्कळ तंबू लागलेले होते. साधारणपणें या ठिकाणीं व्यापारी लोकांची बरीच देवघेव होते. वास्तविक ही देवघेव छकड्याचे उत्तरेस दोनचार मैल दूर असलेल्या 'गॅनवीमंडी'स होते. 'गॅनवीमंडी' व 'छकडा' हीं निरनिराळ्या स्थळांचीं नांवें होत. हीं गांवें नाहींत. 'गॅनवीमंडी'स बर्फ पडूं लागल्यानें व्यापारी लोकांचा तळ तेथून उठून छकड्यास पडला होता. सर्व व्यापारी तिबेटहून हिंदुस्थानांत चालले होते. आम्ही नऊदहा मैल चालून 'छकड्यास' व्यापारी लोकांच्या तंबूंत मुक्काम केला. येथेहि व्यापाऱ्यांनीं आम्हांस कैलासकडे जाऊं नका म्हणून सांगितलें.

दिवस १९ वा. आज 'छकड्यास' मुक्काम करून थोडेंसें सामान खरेदी केलें.

दिवस २०वा. सायंकाळीं चारचे सुमारास छकड्याहून पुढें निघून चारपांच मैलांवर मुक्काम केला.

दिवस २१ वा. सकाळीं उठल्यावर पुढचा रस्ता धरला. जातांना वाटेंत मेलेल्या बकऱ्यांचे बरेच सांगाडे मधून मधून आढळले. हीं बकरीं थंडीनें मेलेलीं होतीं. नऊदहा मैल चालून वस्ती केली. रात्रीं पाऊस पडून फार त्रास झाला. थंडीचें मान जास्त लागूं लागलें. भांड्यातील पाण्याचें सकाळीं बर्फ होत असे. कैलासाच्यानजीक येत चालल्यानें आसपास मोठाले पहाड लागूं लागले व देखावाहि फार मनोहर दिसूं लागला.

दिवस २२ वा. सरासरी आठ मैलांवरच मुक्काम झाला. रात्रीं पाऊस पडला होता.

## कैलासाच्या चतुःसीमा

दिवस २३वा. सुमारें आठ मैल चालून कैलासाच्या पश्चिमेस असलेल्या 'दार्चिन' नांवाच्या मंदिरांत वस्ती केली. कैलासाचे चारहि बाजूंस मोठाले पर्वत असून मध्यें कैलास पर्वत फार उंच आहे. कैलासाच्या उत्तर व पश्चिम बाजूंस खंदकाप्रमाणें मोठी खुली जागा असून त्यांतून एक मोठा पाण्याचा प्रवाह दक्षिणेकडे वाहत आहे. कैलास पर्वताची उत्तर व पश्चिम बाजू अगदीं भिंतीसारखी नीट असून दक्षिणेकडे पर्वताचें टोंक बरेंच लांबवर गेलें आहे. कैलास पर्वताच्या उत्तर टोंकावर पंचकोणाकृति शंकूप्रमाणें शुभ्र बर्फाचें उंच शिखर आहे. पूर्व बाजूचा पहाड कैलासाला अगदीं लागलेला आहे. पूर्व बाजूला 'गौरीकुंड' आहे. कैलासाचे शिखरावर कोणींच जाऊं शकणार नाहीं. फार प्रयत्नानें एखादा धाडसी व युक्तिमान् मनुष्य बर्फापर्यंत मोठ्या मुष्किलीनें जाऊं शकेल. कैलासाच्या सभोंवतीं चार मंदिरें आहेत. त्यांत 'लामा' व त्यांचे वीसपंचवीस अनुयायी प्रत्येक मंदिरांत रहातात. मंदिरें मागें वर्णन केल्याप्रमाणें डोंगराच्या पोकळींत असतात.

## 'लामा'चा पूजाविधि

दिवस २४ वा. सकाळीं उठून मंदिरांतील देवतांचें दर्शन व पूजा वगैरे पाहिली. 'लामा' (धर्मगुरु) हे हस्तलिखित मोठी पोथी वाचीत असतात. त्यांच्या शेजारीं एक मनुष्य भलें मोठें तीनचार फूट व्यासाचें ढोलके वाजवीत असतो व दुसरा मनुष्य दोनअडीच फूट व्यासाची मोठी झांज वाजवीत असतो. इंद्रादिक देवता, कालिका, खंडोबा अशा देवता वस्त्राभरणांनीं युक्त असतात. त्यांच्यापुढें ओळीनें लहानमोठ्या दहावीस वाट्या व पेले ठेवलेले असतात. त्यांत पदार्थ क्वचितच असतात. देवांपुढें दोनहि टोंकांस सुमारें तीन फूट उंचीचें व दीड फूट घेराचे असे पांढरें हस्तिदंत पुरलेले होते. देवतांचीं दर्शनें दिवा घेऊन आम्हांस करविलीं. काटातालपासून येथपर्यंतच्या प्रदेशांत वाटेंत जागजागीं तद्देशीय भाषेंत लिहिलेले बरेच शिलालेख पहाण्यांत आले. 'दार्चिन' मंदिरांतून दर्शनें करून पुढें मार्गाला लागलों. कैलासाच्या आसपासची सृष्टिशोभा फारच अप्रतीम असल्यानें आमचें मन अगदीं तल्लिन झालें होतें. इतका कष्टमय व बिकट मजलीचा प्रवास करीत असतांना आणि पोटभर अन्नहि खावयास नसतांना दररोज पंधरावीस मैलांची मजल करूनदेखील कधींहि थकवा वाटला नाहीं. नगाधिराजाची नित्य नवी शोभा पाहून सर्व शीण नाहींसा होत असे! मनाची वृत्ति सदोदित उल्लसित असे. रात्रीं अंगावर बर्फ पडून थंडीनें कण्हण्याची पाळी येई. सकाळीं उठल्यावर अंगावरचें बर्फ झाडूनझटकून कपडे सुकवावे व पुढचा मार्ग धरावा; असा प्रकार सुरुवातीपासून अनुभवीत होतों. सुमारें पाचसहा मैल चालून कैलासाच्या उत्तर बाजूला असलेल्या 'डिडीफू' नांवाच्या मंदिरात जाऊन उतरलों. रात्रीं बरेंच बर्फ पडलें होतें.

## 'डोल्मा' घाट

दिवस २५ वा. सकाळीं मंदिराबाहेर पाहिलें तों जिकडे तिकडे बर्फानें सर्व प्रदेश पांढरा शुभ्र दिसूं लागला. थंडी अतिशय पडली होती, धुकेंहि दाट पडलें होतें. आटांच्या सुमारास बर्फ वितळून रस्ता साधारण दिसूं लागतांच आम्ही वाटेला लागलों. एखादा मैल चालून जातों न जातों इतक्यांत पुनः बर्फ पडूं लागलें. वाराहि सपाटून सुटला. रस्ता अगदीं दगडाळ असून घाटाच्या चढणीचा लागला. ह्या घाटाला 'डोल्मा' घाट असें म्हणतात. निरुपायानें दोन प्रहरच्या सुमारास मध्येंच वाटेंत पावसामुळें आम्हांला थांबावें लागलें. पाऊस उघडल्यावर अंगावरचें सर्व बर्फ झटकून टाकून पुढें निघालों. मग थोडें ऊन्हहि पडल्यानें कपडे सुकले व चालण्यास हुरूप आला. घाटमाथ्यावर

आल्यावर कैलासाला लागून असलेलें सुमारें तीनशें फूट लांबीचें व दीडशें फूट रुंदीचें 'गौरी कुंड' लागलें. गौरीकुंडांतलें पाणी गोठलेलेंच होतें. फूट-दीड फुटाच्या बर्फाचा थर फोडून खालीं असलेल्या पाण्यानें स्नान केलें. स्नान करतांच सर्व अंग बधिर झालें. पुढें उतार लागला. आजहि पांचसहा मैलांची मजल करून वाटेंत एका गुंफेंत वस्ती केली.

दिवस २६ वा. घाटमाथा उतरून कैलासाचे आग्नेय टोंकास असलेल्या 'झिंडीफू' नामक मंदिरांत वस्ती केली. मजल चारपांच मैलांचीच झाली.

दिवस २७ वा. सर्व दिवस उतरण उतरून संध्याकाळीं सपाटीला येऊन वस्ती केली. प्रवास बारा मैलांचा झाला. आज अगदीं कैलासाचे दक्षिणेस आलों होतों.

### मानस सरोवराची मोहकता

दिवस २८ वा. सकाळीं सपाटीचाच सुमारें दहा मैलांचा प्रदेश ओलांडून 'मानससरोवरा'ला येऊन पोंचलों. मानससरोवराच्या पश्चिमेस असलेल्या मंदिरांत वस्ती केली. हें मंदिर डोंगरावर आहे. कैलासाच्या अगदीं दक्षिणेस वीसपंचवीस मैलांवर मानससरोवर आहे. त्याचा घेर जवळ जवळ पन्नास मैलांचा होईल. मानससरोवर हें खोलग्यांत असून त्याच्या सभोंवार बर्फाचे पर्वत व मोठ्या टेकड्या आहेत पूर्व व दक्षिणेकडील पर्वत बर्फाचे आहेत. उत्तर व पश्चिम बाजूला लहानमोठे डोंगर व टेकड्या आहेत. सरोवराच्या सभोंवार आठ मंदिरें आहेत असें सांगतात. सरोवराचें पाणी अगदीं स्फटिकाप्रमाणें स्वच्छ असल्यानें तळचा पदार्थ कितीहि लांबून पाहिलें तरी दिसतो. पाणी अगदीं गार असल्यानें स्नान करतांच अंग अगदीं बधिर झालें. ऑक्टोबरपासून सरोवराचें पाणी गोठून बर्फ बनतें. मानससरोवराची शोभा कैलासाप्रमाणेंच अवर्णनीय अशी आहे. हंस पक्षी असतात म्हणून चौकशी करून पाहिलें; परंतु तसें नसल्याचें आढळून आलें. मात्र घारीसारखे मोठाले अगदीं काळेकुळकुळीत व तुळतुळीत डोमकावळे पहाण्यांत आले.

### बद्रीनाथास पुनरागमन

दिवस २९ वा. आज रा. वैद्य व दोन संन्यासी 'अलमोडा' मार्गानें निघून गेले. मी, स्वामी भौमाश्रम व वाटाड्या असे तिघेजण दुपारून तीनचे सुमारास परत बद्रीनारायणाकडे जाण्याकरितां मानससरोवराहून निघालों. पश्चिमेस आठ मैल चालून आल्यावर 'राक्षस'तलावावर येऊन मुक्काम केला. येतांना वाटेंत शाडूसारखें पांढऱ्या मातीचे दलदलीत मैदान लागलें. त्या मैदानांत मात्र घारीपेक्षांहि मोठाले असे अगदीं पांढरे—शुभ्र पक्षी पहाण्यांत आले. 'राक्षसतलाव' हा मानससरोवरापेक्षां लहान असून लांबट व वेडावांकडा आहे.

दिवस ३०वा. राक्षसतलाव सोडून पुढें बद्रीनाथास परत सत्तेचाळीसावे दिवशीं येऊन पोंचलों. येतांना दररोज वीसपंचवीस मैलांची मजल करीत होतों. वाटेंत तंबू किंवा माणूस कोणीं भेटलें नाहीं. दोनतीन वेळेस २४ तासांत पाणी मिळालें. 'दफू' 'धापा' व 'थोलिंगमठ' येथील वस्तीहि बर्फामुळें देशांतराला निघून गेली होती. थोलिंगमठापासून स्वामी भौमाश्रम हे सोबत पाहून गंगोत्रीस आपल्या ठिकाणावर गेले. बद्रीनाथास तप्तकुंडावर स्नान करून श्रीबद्रीनाथाचे दर्शन करून मानससरोवराची यात्रा त्यांच्याच कृपेनें संपविली.

[हा व यापूर्वीचे लेख सोलापूरचे रा. जनार्दन विद्याधर कर्वे यांनीं लिहिले असून ते केसरींत छापण्याकरितां पाठविल्याबद्दल आम्ही त्यांचे आभारी आहों. कैलास व मानससरोवर यांचा कष्टाचा व धाडसाचा प्रवास रा. कर्वे यांनीं केला ही गोष्ट अभिनंदनीय होय. —**संपादक केसरी.**]

# पुस्तक—परीक्षण

**प्रो. बाळाजी प्रभाकर मोडक यांचें चरित्र**— (ले. ग. बा. मोडक, बी. ए. प्रकाशक वी. बा. मोडक, कोल्हापूर, किं. ६ आणे.) प्रस्तुत चरित्र, ग्रंथ या नात्यानें लहान व आटोपशीर आहे. चरित्रनायकाच्या मोठेपणाचें एक लक्षण हें कीं, कोल्हापूरसारख्या मागसलेल्या शहरीं राहून त्यांनीं आजन्म विद्याव्यासंग व ग्रंथनिर्मिती केली. त्यांचीं शास्त्रीय विषयांवरील २८ व ऐतिहासिक विषयांवरील १८ मिळून ४६ पुस्तकें प्रसिद्ध आहेत. या सर्वांची किंमत एकत्र केली असतां ५०।७५ रु. भरेल. यावरून कै. प्रो. मोडक यांना लहानसा चालताबोलता ज्ञानकोशच म्हणण्यास हरकत नाहीं. मिरज व कोल्हापूर यांचें सान्निध्य लक्षांत घेतां कै. वासुदेवशास्त्री खरे हे एकच गृहस्थ आम्हांला असे दिसतात कीं, त्यांची तुलना प्रो. मोडक यांच्याशीं करणें योग्य होईल.

प्रो. मोडक यांचा जन्म सन १८४७ सालीं ता. २२ मार्च रोजीं झाला व सन १९०६ सालच्या डिसेंबरच्या २ तारखेस ते कालवश झाले. म्हणजे त्यांना पुरतें ६० वर्षेहि आयुष्य लाभलें नाहीं.

इतक्या अल्पावधींत राजाराम हायस्कूल व राजाराम कॉलेज यांतील शिक्षकाचें काम करून उरलेल्या वेळांत त्यांनीं वर सांगित्याप्रमाणें सुमारें ४८ ग्रंथ लिहिले. या ग्रंथापैकीं सुमारें १० च ग्रंथ १ रुपया किंमतीच्या खालचे आहेत. पण बाकीच्यांतील कांहीं २, ३, ४, ४॥, ५ इतक्या किंमतीचे आहेत. या किंमती देण्याचें कारण इतकेंच कीं, त्यावरून ग्रंथ साधारणतः किती मोठे असतील याची कल्पना येईल.

कोल्हापूरसारख्या ठिकाणीं छापखान्यांची सोय प्रो. मोडक यांच्या वेळीं चांगलीशी नव्हती. तथापि त्यांनीं परिश्रमपूर्वक शिळा-छापावरील आपलीं पुस्तकें बरीचशीं सुबक काढ-विलीं व त्याहून विशेष हा कीं आपल्या शास्त्रीय ग्रंथांतून छापीव चित्रेंहि भरपूर घातलेलीं आहेत. ही सर्व कामगिरी त्यांनीं कोल्हापूर येथील आपल्या ३६ वर्षांच्या वास्तव्यांतच केली. ते बुद्धिमान व विद्याव्यासंगी असल्यामुळें राजाराम कॉलेजांत त्यांना प्रोफेसरीची जागा सहजच मिळाली. राजाराम कॉलेजांत प्रोफेसरी करून ज्यांनीं अखंड विद्याव्यासंग चालू ठेवला असे दुसरे गृहस्थ म्हटले म्हणजे प्रो. रघुनाथराव आपटे हे होत. या दोघांच्या नांवाशीं राजाराम कॉलेजाची कीर्ति अखंड निगडित आहे.

प्रो. मोडक यांच्या ग्रंथकर्तृत्वाविषयीं लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट ही कीं, त्यांनीं १८७५ सालीं रसायनशास्त्रावरील टिपणांचा ग्रंथ मराठींत प्रसिद्ध केला व तेथून पुढें शास्त्रीय विषयावरील ग्रंथमालेचा एक आराखडा मनानें तयार करून तो, शास्त्रीय ज्ञानकोशाचा नकाशा हळूहळू एक एक ग्रंथ लिहून, छापून बहुतेक भरून काढला. ‘ आपण भले कीं आपलें काम भलें ’ या न्यायानें जन्मभर वागून त्यांनीं ‘ अजातशत्रु ’ हें नांव मिळविलें होतें. सन १९०६ सालीं ते वारले त्या वेळीं लो. टिळकांनीं त्यांच्या-संबंधीं खालील उद्गार केसरींतून प्रगट केले आहेत.

### लो. टिळकांचे उद्गार

“ विद्वत्ता, साधें आणि निर्व्यसनी वर्तन हे यांच्या अंगचे मोठे गुण होते. कॉलेज सोडल्यानंतर नोकरी-करितां कोठेंहि राहावें लागलें तरी विद्याव्यासंग कायम ठेवल्यानें एकट्या गृहस्थास काय करतां येईल याचा यांच्या चरित्रापासून तरुण पिढीनें बोध घेण्यासारखा आहे. त्यांनीं ग्रंथलेखना-बरोबर कोल्हापूर येथील सार्वजनिक वाचनालय व सार्वजनिक पेढी म्हणजे बँक व स्वदेशी दुकान यांच्यासंबंधानें पुष्कळ खटपट केली होती. तसेच पदार्थसंग्रहालय व औद्योगिक प्रदर्शनें यांतहि ते लक्ष घालीत. कोल्हापूर येथें भरलेल्या पहिल्या लोकप्रतिनिधींच्या सभेचे अध्यक्षपद त्यांना देण्यांत येणार होतें व या कामीं त्यांना दरबाराची हरकत झाली नसती तर त्यांनीं आपल्या इतिहास-ज्ञानाचा योग्य उपयोग करून प्रातिनिधिक संस्थांचीं तत्त्वें कोल्हापूरच्या प्रजेला चांगलींच समजावून दिलीं असतीं यांत शंका नाहीं. पण तो योग आला नव्हता. आमच्या दरबारी पेन्शनरांना राजकारणी लोकसेवेचा मान याहून अधिक मिळणें फारसें शक्यच नाहीं. परंतु विद्या-क्षेत्रांतील ध्येयें व उद्योग हे संस्थानी दरबारांतहि पुष्कळसे निर्वेध चालू शकतात. यामुळें प्रो. मोडक यांनीं आपले ग्रंथलेखनाचें काम अव्याहत सुरू ठेवलें होतें. रॉयल केमिकल सोसायटीकडून फेलोशिप मिळाली असतां ती टिकविण्याइतकें द्रव्यसाहाय्य त्यांना नसल्यामुळें ती सोडावी लागली. यावरून श्री व सरस्वती यांचा विरोध त्यांना अनुभवावा लागला. पण त्यामुळें त्यांच्या उद्योगांत खळ पडला नाहीं व यांतील पुष्कळसा उद्योग त्यांनीं पैशापेक्षां विद्ये-च्याच हौसेनें केला.” प्रो. मोडक हे कै. विष्णुशास्त्री यांचे समकालीन होत व शास्त्रीबोवांनीं मोडक यांच्या रसायनशास्त्राचें परिक्षण निबंधमालेंत केलें होतें. त्यांतील खालील वाक्यें लक्षांत ठेवण्यासारखीं आहेतः—

### विष्णुशास्त्र्यांचा अभिप्राय

“ भाषापद्धतीसंबंधानें प्रस्तुत पुस्तकास नांव ठेवण्यास बिलकूल जागा नाहीं. भाषासरणी अगदीं सुबोध आहे. विषय इंग्रजी व प्रौढ यामुळें मोठ. मोठे संस्कृत शब्द घातले असतां जरी शोभणारे आहेत, तरी धेडगुजरी किंवा आक्लतेचा प्रकार यांत बिलकुल आणलेला नाहीं. गहन शास्त्रीय विषयां-वर सदरील ग्रंथकारानें अगदीं स्वतंत्र रचना केली ही गोष्ट अत्यंत अभिनंदनीय होय. वाचकांना अत्यंत सुलभ प्रवेश कसा होईल व कोणत्या प्रकारांनीं तो मनावर ठसेल या दृष्टीनें स्वतंत्र ग्रंथ अधिक योग्यतेचा ठरतो. ”

पण दुसऱ्याहि एका दृष्टीनें प्रो. मोडक यांची योग्यता आम्हांला विशेष वाटते. ती ही कीं, सुमारें ३० वर्षांपूर्वीच महाराष्ट्र विद्यापीठाची कल्पना त्यांनीं योजून पुढें आणली होती. ही कल्पना मुंबई येथील मराठी ग्रंथसंग्रहालयाच्या १९०४ सालाच्या वार्षिक समारंभाच्या वेळीं ते अध्यक्ष होते त्या वेळीं केलेल्या भाषणांत त्यांनीं ही कल्पना जाहीर-रीतीनें पुढें मांडलीच. पण त्यापूर्वींहि कोल्हापूर, बडोदें येथील दरबार आणि मुंबईचें शिक्षणखातें यांच्यापुढेंहि त्यांनीं ती मांडली होती. त्यांच्या-मतें मराठी भाषेंतून शिक्षण देण्याच्या दृष्टीनें विद्य-

मान ट्रेनिंग कॉलेजांना प्रथम व्हर्न्याक्युलर कॉलेजें बनवावीं. डक्कन एज्युकेशन सोसायटी मूळ निघाली तेव्हां तिचा उद्देश सर्व शिक्षण मराठीच्या द्वारें देऊन विषयपारंगतता सुलभ करावी असा मूळ विष्णुशास्त्री चिपळूणकरापासून हेतु होता ही गोष्ट प्रो. मोडक यांना पक्की माहीत असल्यामुळें, त्यांनीं डे. ए. सोसायटी व नूतन मराठी विद्यालय यांनीं या कामीं लक्ष घालावें असे सुचविलें होतें. स्वभाषेच्या द्वारें जें शिक्षण मिळतें त्यासच राष्ट्रीयशिक्षण म्हणता येईल हें त्यांचें ब्रीदवाक्य होतें, व त्यांच्या योजनेप्रमाणें सुमारें १५ हजार मुलांना देशी भाषेंतून उच्च प्रतीचेंहि शिक्षण मराठींतून देतां येईल असा त्यांचा अंदाज होता.

प्रो. मोडक हे भौतिक शास्त्राचे व्यासंगी होतेच, पण ते उपपत्तीपेक्षांहि प्रयोग व व्यावहारिक ज्ञान यांचे पुरस्कर्ते अधिक होते. यामुळें शाळा-कॉलेजांत ते शास्त्रीयप्रयोगांवर फार भर देत इतकेंच नव्हे, तर सुटीच्या दिवसांत ते शास्त्रीय प्रदर्शनें भरवून सामान्य मनुष्यालाहि शास्त्रीय ज्ञान इष्ट वाटून मनोरंजक करावें असा त्यांचा प्रयत्न होता. दुसरे पक्षीं शास्त्रीय ज्ञान व्यावहारिक करण्याची खरी हौस असल्यामुळें त्यांनीं महाराष्ट्राच्या औद्योगिक पाहणीकडेहि बरेंच लक्ष दिलें होतें व या उद्योगांत त्यांनीं कै. नामजोशी यांना बरीच मदत केली होती.

प्रो. मोडक यांच्या ऐतिहासिक ग्रंथासंबंधानें इतकेंच म्हणतां येईल कीं, त्यांचे हे ग्रंथ बरेचसे इतर ग्रंथांच्या आधारानें रचलेले आहेत. तथापि महाराष्ट्रांतील संस्थानांचा इतिहास, विशेषतः कोल्हापूर राज्याचा इतिहास लिहितांना त्यांनीं दरबारी दप्तरांतील कागदपत्रहि पुष्कळ वाचले होते. शिवाय सन १७२८ ते १८९३ पर्यंतची जंत्री त्यांनीं शक, सन, तिथि व तारीख यासुद्धां केली ती अभ्यासकांना विशेष उपयोगी आहे. असो.

अशा रीतीनें प्रो. मोडक यांच्या चरित्राचें अवलोकन केलें असतां त्यांचा विद्याव्यासंग व दुर्दम उद्योगप्रियता हीं फार चांगली नजरेस येतात. या दृष्टीनें रा. गणपतराव मोडक यांनीं लिहिलेलें आपल्या वडिलांचें चरित्र लहानच असलें तरी ते अत्यंत उपयुक्त व स्फुर्तिदायक असें वाटतें. या चरित्रलेखनाप्रमाणें प्रो. मोडकांच्या कांहीं कांहीं ग्रंथांचे पुनर्मुद्रण होणें ही गोष्ट देखील अत्यंत अवश्य आहे व उभयतां चिरंजीव तीहि गोष्ट करून आपलें पितृऋण फेडतील अशी आम्हांस आशा आहे.

# रँ. नारळीकर यांचें पूर्वचरित्र

( ले. **द. ल. कळेकर**, अध्यापक राजाराम हायस्कूल कोल्हापूर. )

श्रीयुत विष्णु वासुदेव नारळीकर हे राजाराम हायस्कूलमधून सन १९२४ सालीं मॅट्रिक परीक्षा उत्तीर्ण झाले. त्यांत त्यांचा पहिला नंबर येऊन त्यांनीं 'जेकब शिष्यवृत्ति' मिळविली. त्यानंतर त्यांनीं मुंबईच्या एल्फिन्स्टन कॉलेजमध्ये प्रवेश केला. व रॉयल इन्स्टिटयूटमध्यें बी. एस.सी.चा कोर्स सन १९२८ सालीं पुरा केला. बी.एस.सी.च्या परीक्षेंत ते मुंबई युनिव्हर्सिटींत पहिल्या वर्गांत पहिले येऊन त्यांनीं सायन्समध्यें पहिल्या नंबरचे गुण मिळविले. १९२८ सालीं ते पुढील अभ्यासाकरितां विलायतेच्या प्रवासास निघण्याचे वेळीं श्रीमंत सर राजाराम महाराज सरकार करवीर यांनीं ८००० रु. ची देणगी त्यांस शिक्षणाच्या उत्तेजनार्थ दिली. त्या देणगीचें योग्य चीज झालें. १९२८ सालीं सायन्स ट्रायपॉसमध्यें केंब्रिज विश्वविद्यालयांत ते पहिल्या वर्गांत आले. दोन वर्षांचा अभ्यासक्रम एका वर्षांत त्यांनीं पुरा केला, ही त्यांच्या बुद्धिवैभवाच्या श्रेष्ठतेची गोष्ट होय. शिवाय याच वर्षीं त्यांनीं ९० पौंडांची स्कॉलरशिप व अनुक्रमें ५० व २५ पौंडांचीं बाक्षिसें मिळविलीं. त्याखेरीज ३ पौंडांचा एक अमूल्य ग्रंथ त्यांना बक्षिस मिळाला. त्यांची बुद्धिमत्ता शुक्लेंदुप्रमाणें सारखी वाढत असून त्यामुळें त्यांच्या नांवलौकिकांत अधिक भर पडत आहे, हें राजाराम हायस्कूल संस्थेस, कोल्हापूर नगरीस, किंबहुना महाराष्ट्रास भूषणावह आहे.

केंब्रिज विश्वविद्यालयांत अभ्यास करीत असतांना ते १७ जून १९३० रोजीं बी स्टार रँग्लर झाले. त्या वेळीं त्यांना 'टायसन मेडल' मिळालें व टायसन प्राइझपैकीं पहिलें बक्षिस मिळालें या प्रसंगीं देखील त्यांनीं तीन वर्षांचा अभ्यास दोन वर्षांत पुरा केला. इतका अपूर्व मान मिळविणारे फिट्झ वुइल्यम कॉलेजचे श्री. नारळीकर हेच पहिले हिन्दी विद्यार्थी होत. या कॉलेजमध्यें ७५ वर्षांत असा अलौकिक मान मिळाला नव्हता. म्हणून कॉलेजाच्या चालकांनीं त्यांना फेलोशिप देण्याचें ठरविलें.

सन १९३१ सालीं सालिना २५० पौंडांची 'सर ऐझॅक न्यूटन' शिष्यवृत्ति संपादन करण्याचा

संस्थानांना सहकार्यानें एकच कमिटी नेमता येण्यासारखी आहे. या बाबतींत म्हैसूर कमिटी रिपोर्ट, बडोदा कमिटी रिपोर्ट तसेंच इतर लेख व ग्रंथ यामुळें सुधारणा काय काय पाहिजेत हें सयुक्तिक व तपशीलवार मांडण्याचें आतां एक साधन निर्माण झालें आहे. अशा स्थितींत दक्षिण महाराष्ट्रांत असलेल्या संस्थानांचा व्यवहार—धर्मशास्त्राच्या दृष्टीनें एकसूत्री मिताक्षराप्रांत निर्माण करितां आला तर महाराष्ट्रीय संस्थानिकांना ती एक भूषणाची गोष्ट होईल, इतकेंच नव्हे तर ज्यांना ज्यांना हिंदु—कायद्यांत सुधारणा ताबडतोब घडून यावी असें वाटतें त्यांना ती एक मोठी समाधानाची गोष्ट होईल. तरी या बाबतींत प्रातिनिधिक संस्था असलेल्या संस्थानांनीं प्रत्येकीं एकेक सभासद नेमून असें एखादें छोटें मंडळ स्थापावें व हा विषय हातीं घ्यावा अशी आमची कळकळीची जाहीर सूचना आहे. दक्षिणी संस्थानांचा संयुक्त मिताक्षरा प्रांत म्हणजे हिंदु-व्यवहारधर्मशास्त्राचे महाराष्ट्रीय फेडरेशनच होइल !

रावजी रामचंद्र काळे
ल. ब. भोपटकर
अनंत विनायक पटवर्धन
वा ना. देशपांडे

# स्फुट सूचना

१ भडोच व पंचमहाल जिल्ह्याचे सेशन जज्ज मि ठाकोर यांनीं गेल्या आठवड्यांत वटहुकुमाखालील एका खटल्याचा जो निकाल दिला आहे तो अनेक दृष्टींनीं अत्यंत महत्त्वाचा आहे. पंचमहालचे डॉ. माणिकलाल शहा यांची साबरमतीच्या तुरुंगांतून ता. २७-१-३२ ला सुटका झाली. सुटकेच्या अगोदर साबरमतीच्या जेल सुपरिंटेंडेंटने त्यांच्यावर पंचमहालचे डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट मि. मौलवी यांच्या सहीचा दुसऱ्या ऑर्डिनन्सच्या चौथ्या कलमाखालील, हुकूम बजावला. या हुकुमांत असे शब्द होते कीं, डॉ. शहा यांनीं एक महिनापर्यंत गोध्रा येथें राहावें व रोज दुपारीं १ ते ४ पर्यंत पोलिसाकडे हजिरी द्यावी. डॉ. शहा हे आपल्या जबानींत म्हणतात कीं, "या हुकुमाचा मी असा अर्थ समजतो कीं, मी गोध्रा येथें गेल्यानंतर पोलीसकडे एक महिनापर्यंत मीं रोज हजेरी द्यावी. या समजुतीनें मी आजारी असल्यामुळे अहमदाबादेहून मुंबईस गेलों. तेथें डॉक्टराकडून स्वतःस तपासून घेऊन ता. ४ ला बडोद्यास आलों व नंतर ता. ७ ला गोध्रा येथें गेलों. तोंच मला अटक होऊन मजवर खटला भरण्यांत आला. वास्तविक हजेरीचा हुकूम मोडण्याचीहि मला संधि मिळाली नाहीं." डॉ. माणिकलाल यांच्यावरील खटला डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट मौलवी यांच्यापुढेंच चालला व त्यांनीं डॉ. शहा यांना १८ महिने सक्तमजुरी व १००० रु. दंड ठोठावला. डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटांनीं आपल्या निकालांत म्हटलें आहे कीं, हुकुमांत साबरमतीहून गोध्रा येथें जा असे प्रत्यक्ष शब्द नसले तरी त्याचा अर्थ व उद्देश स्पष्ट होता. म्हणून डॉ. शहा यांनीं हुकूम तोडण्याचा गुन्हा केला. या निकालावर व शिक्षेवर श्री. ठाकोर यांच्याकडे डॉ. शहा यांच्या तर्फें अपील करण्यांत आलें. सेशन कोर्टांत कायद्याचे व शिक्षेचे प्रश्न उपस्थित करण्यांत आले, व त्यांचा निकाल डॉ. शहा यांच्या बाजूनें देऊन सेशन जज्जांनीं त्यांची शिक्षा रद्द केली. दंड परत करावयास लावला, व त्यांस निर्दोषी म्हणून सोडण्याचा हुकूम केला !

---

२ आपल्या निकालपत्रकांत न्यायाधीश ठाकोर यांनीं पुढील मुद्दे काढले होते. पहिला मुद्दा असा कीं १९३२ च्या दुसऱ्या ऑर्डिनन्सच्या चौथ्या कलमान्वयें सरकारास आरोपीस साबरमतीहून गोध्रा येथें जा असा हुकूम काढण्याचा अधिकार आहे काय? दुसरा असा कीं, पंचमहालचे डिस्ट्रिक्ट मॅजिस्टेटांनीं या कलमान्वयें मिळालेल्या सत्तेप्रमाणें आरोपीस साबरमतीहून गोध्रा येथें जाण्याचा हुकूम दिला काय ? या दोन मुद्द्यांचें उत्तर सेशन जज्जांनीं नकारार्थी दिलें व आरोपीची मुक्तता केली. पहिल्या मुद्द्याचा निकाल करतांना सेशन जज्ज म्हणतात कीं, चौथ्या कलमाची शब्दरचना पाहिली तर त्यांत स्थानिक सरकाराला कोणालाहि तूं अमुक ठिकाणाहून निघून अमुक ठिकाणीं जा असें सांगण्याचा अधिकारच नाहीं. 'ऑर्डिनन्स' हा एक फौजदारी गुन्ह्याचा कायदा आहे व असल्या कायद्यांतील शब्दांचा अर्थ कसा करावयाचा याबद्दल लॉर्ड हॅल्सबरी व मॅक्सवेल यांच्या कायदेपंडितांनीं निश्चित नियम घातले आहेत. त्यावरून अमुक हुकूम करतां येतो असे स्पष्ट शब्द असल्याशिवाय सरकारास नवीन अर्थ करण्याचा अधिकारच नाहीं ! "So conduct himself" म्हणजे कोणत्या तऱ्हेनें वागणूक ठेवावी याचा हुकूम करण्याचा अधिकार ४ थ्या कलमाखालीं आहे, असे सांगण्यांत आलें, पण तें बरोबर

नाहीं. या शब्दांचा अर्थ तसा करितां येत नाहीं हें विशद करून १९३१ च्या कलकत्याच्या शसमल विरुद्ध बादशहा या खटल्याच्या आधारानें असा हुकूम करणें बेकायदेशीर आहे; कारण त्या खटल्याच्या निकालपत्रकांत म्हटल्याप्रमाणें अमुक ठिकाणाहून अमुक ठिकाणीं जा असे स्पष्ट शब्द कायद्यांत असावयास पाहिजेत, व त्या इसमाच्या भाड्याचीहि सोय केली असली पाहिजे. परंतु ऑर्डिनन्सच्या कलमांत रेल्वेच्या भाड्याची सोय नाहीं म्हणून असा हुकूम करणें कायदेशीर नाहीं, असें त्यांनीं ठरविलें ! डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटच्या हुकुमांत तर प्रत्यक्ष तसे शब्द नाहींतच. तेव्हां तो हुकूमहि जज्जांनीं रद्द ठरविला ! गेल्या तीन महिन्यांत वट-हुकुमाखालीं शेंकडों हजारों लोकांना तुरुंगांतून परस्पर अमुक तासांत अमुक गांवीं जा असे डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटांनीं केलेले सर्व हुकूम या निकालानें बेकायदेशीर ठरतात असें स्पष्ट ठरतें. असल्या खटल्यांत तरी जनतेनें कायद्याची छाननी करून घेऊन हायकोर्टाचे निकाल घ्यावेत असें आम्हांस वाटतें. कारण हल्लींच्या सोटेशाहीच्या काळांत न्यायकोर्टाशिवाय दुसरीकडे न्याय मिळणेंच शक्य नाहीं.

# फिलिपाइन्सच्या गुलामगिरीचें ग्रहण सुटत चाललें !

अमेरिकेच्या लोकसभेनें दोन आठवड्यांपूर्वी फिलिपाइन्सला आठ वर्षांत पूर्ण स्वातंत्र्य देण्याचा ठराव केला हे वाचून हिंदुस्थानांतील प्रत्येक स्वातंत्र्यप्रेमी माणसाच्या अंतःकरणांत आनंदाची भरती आली असल्यास नवल नाहीं. कांहीं प्रसंगच असे असतात कीं, ज्यावेळीं कोणीहि सहृदय मनुष्य जसा परदुःखानें विव्हल होतो तसाच दुसऱ्याच्या आनंदानें आनंदितहि होतो. त्यांतलाच हा एक प्रसंग आहे. वास्तविक फिलिपाइन्सचा व हिंदुस्थानचा तसा अर्थाअर्थी कांहीं संबंध नाहीं. दूरान्वयानें तो लागणार नाहीं असें मात्र नाहीं. उदाहरणार्थ दोनहि देश पौर्वात्य म्हणून संबोधिले जातात. तसेंच ख्रिस्ती शकाच्या प्रारंभापर्यंत फिलिपाइन्समधील फिलिपिनो लोकांवर हिंदुस्थानांतील आर्य-संस्कृतीचा पूर्ण पगडा होता. अजूनहि त्यांच्या मूळ भाषेंत संस्कृत शब्द आढळतात व त्या भाषेचें व्याकरण संस्कृतच्या वळणाचें आहे. हिंदी संस्कृतीचीं चिन्हें अद्याप तेथील भूभागांत सांपडतात असें उत्खननशास्त्री सांगतात. परंतु हे सर्व संबंध जुनेपुराणे असल्यानें त्यांची स्मृतिहि नष्ट झाली आहे. फिलिपिनो लोकांना पूर्ण स्वातंत्र्य मिळालें म्हणून अन्तःकरणांत जी आनंदाची संवेदना होते किंवा फिलिपिनो लोकांच्या भावनांचा पडसाद आपल्या हृदयांत उठतो याचें खरें कारण म्हणजे दोन्ही देश राजकीय परिस्थितीच्या दृष्टीनें समान भूमिकेवर आहेत हेंच होय. फिलिपाईन्सला आठ वर्षांनीं कां होईना पण स्वातंत्र्य खास मिळणार. त्याचप्रमाणें हिंदुस्थानच्याहि भाग्यरवि असाच एक दिवस उदयाचलावर येईल ही आशाहि, पुसट पुसट रीतीनें मनांत उद्भवते हेंहि खरें. यापेक्षां अन्य रीतीनें या आनंदाची मीमांसा करतां येणार नाहीं.

फिलिपाइन्समधील फिलिपिनो लोकांच्या स्वातंत्र्याच्या लढ्याचा इतिहासहि मोठा मनोरंजक व बोधप्रद आहे. स्वातंत्र्याची देवता मोठी कडक व रुधिरप्रिय असल्याची साक्ष इतिहास देतो. म्हणून या देवीच्या उपासनेची तपश्चर्याहि मोठी कठीण असते. ज्यांनीं ज्यांनीं आजपर्यंत स्वातंत्र्य मिळविलें त्यांना रणभुमीची धूळ स्वतः खावी लागली व शस्त्रेंनाहि चारावी लागली. अत्यंत हालअपेष्टा, कमालीचा पराक्रम व हजारों लोकांचें आत्मार्पण इतकी किंमत दिल्याशिवाय 'श्रीमत् स्वातंत्र्य' पदरीं पाडून घेणें अशक्य आहे असाच आजपर्यंतचा अनुभव आहे. परंतु आधिभौतिक सृष्टींत अनेक नव्या शास्त्रीय शोधांनीं भूतकाळाला वर्तमानकाळ जसा खो देत आहे, तशाच राजकारणांतहि 'राष्ट्रसंघ' 'स्वसंमतीचें तत्त्व' 'निरपवाद लोकशाही' वगैरे नव्या नव्या कल्पना जुन्या युद्धाच्या, सुलतानशाहीच्या व एकतंत्री सत्तेच्या कल्पनांना उखडून टाकीत आहेत असें दिसतें; आणि आज अमेरिकेच्या लोकसभेनें नव्या बिलाच्या द्वारें फिलिपाइन्सला दिलेलें वचन खरें केलें व स्वतः-आपल्या हातानें फिलिपाइन्सवर स्वातंत्र्याचें बिनमोल स्वर्गीय लेणें चढविलें तर पूर्वीचा काल व त्यांतील राजकीय कल्पना बदलल्या व नवा मनु सुरू झाला असेंच कबूल करावें लागेल. मनुष्यांत आसुरी वृत्तीप्रमाणेंच दैवी संपत्ति असतेच. नव्या युगांत त्या दैवी संपत्तीचें प्राबल्य होऊन नवे चमत्कार जगांत दृष्टीस पडणार नाहींत असें कोणीं म्हणावें ! म्हणून फिलिपिनो लोकांना या नव्या युगांत प्रथम स्वातंत्र्य मिळत आहे याकरितां त्यांचें अभिनंदन जसें करावेंसें वाटतें तसेंच अमेरिकन लोकांनीं आपलें वचन पाळून नुसता बाहेरचा देखावा न करतां खरें खणखणीत वाजणारें स्वातंत्र्याचें नाणें फिलिपाइन्सच्या पदरांत टाकलें तर त्यांचेहि धन्यवाद गावे तेवढे

थोडेच आहेत आणि त्यांच्या मागील इतिहासावरून ही गोष्ट शक्य वाटते. त्या इतिहासावरून हिंदी लोकांनीं व हिंदुस्थानांतील इंग्रजी राज्यकर्त्यांनीं अनेक गोष्टी शिकण्यासारख्या आहेत यांत मात्र शंका नाहीं.

फिलिपाइन्स बेटें पंधराव्या शतकापासून स्पेनच्या आधिराज्याखालीं होती. स्पॅनिश लोकांच्या गुलामगिरीचें जोखड खांद्यावर वाहणाऱ्या फिलिपिनो लोकांनीं एकोणिसाव्या शतकाच्या शेवटीं तें फेकून देण्याचा निश्चय केला. तत्पूर्वी त्यांनीं पुष्कळ मामुली प्रयत्न केले होते. १८४७ सालीं वर्तमानपत्रें काढलीं. १८६९ त फिलिपिनो तरुण परदेशांतील विद्या आणण्याकरितां युरोप–अमेरिकेंत गेले, त्यांनीं अनेक देशांतील स्वातंत्र्याच्या परिस्थितीचा आस्वाद घेतला आणि आपल्या देशालाहि स्वातंत्र्य मिळावें म्हणून मायदेशांत येऊन खटपटी केल्या. १८७२ मध्यें एक लहानसें लष्करी शिपायांचें बंडहि झालें ! अशा रीतीनें सर्व प्रयत्न संपल्यावर रिझल, मार्सेलो पिलर लोपेझ जेना, माबिनी वगैरे तरुण पुढाऱ्यांनीं 'यंग फिलिपिनो पार्टी' किंवा फिलिपिनोंचा एक युवक संघ काढला. १८९१ त त्यांनीं हाँगकाँग येथें व पुढील सालीं मॅनिला येथें शाखा काढल्या. परंतु १८९६ त स्पॅनिश सरकारानें रिझलला अटक केली व चौकशीचा फार्स करून त्याला त्यांनीं फांशीं दिलें ! 'मातृभूमीचे सुपुत्र' या नांवाची दुसरी एक संस्था स्थापन झाली व तिचे चार लाख सभासद झाले. त्यांनींहि बंडाचें निशाण उभें केलें.

अशा रीतीनें स्वातंत्र्याकरितां लढत असतांना त्यांच्यावर एक दुसरीच अनपेक्षित आपत्ति आली. ती म्हणजे १८९८ च्या फेब्रुवारींत अमेरिकेनें स्पेनबरोबर युद्ध पुकारलें ही होय. ह्या युद्धाचा फायदा घेऊन त्या देशभक्तांनीं स्वतःची 'लोकशाही' स्थापन करून स्वातंत्र्य पुकारलें, लोकसभा स्थापन केली व न्यायदानास सुरुवात केली. हें सर्व केलें खरें, परंतु अमेरिकेनें स्पेनवर मोठा विजय मिळविला व फिलिपाइन्स बेटें आपल्या ताब्यांत घेतलीं यामुळें सर्वच डाव उलटला ! फिलिपाइन्सच्या लोकसभेचा अध्यक्ष अग्युनलरो यानें अमेरिकेबरोबर राष्ट्रीय युद्ध पुकारलें. पण शेवटीं अमेरिकेच्या सामर्थ्यापुढें गनिमी काव्याच्या लढाईचा प्रकार संपल्यावर त्यांना १९०२ मध्यें शेवटची हार खावी लागली. पारतंत्र्याची रात्र संपून स्पेनवर जय मिळविल्याकारणानें आपणास स्वातंत्र्यसूर्याचें दर्शन होईल म्हणून आशा करणाऱ्या फिलिपिनो देशभक्तांचे सर्व प्रयत्न बलाढ्य अमेरिकेनें उखडून टाकले व 'हा हंत हंत नलिनीम् गज उज्जहार' हा काव्यसृष्टींतील देखावा राजकारणाच्या सृष्टींत अनुभवास आला ! !

अमेरिकन लोक जात्या स्वातंत्र्याचे निरतिशय भोक्ते, लोकशाहीचे कट्टे पुरस्कर्ते व साम्राज्य-संस्थेचे पक्के द्वेष्टे असल्यामुळें आरंभापासूनच त्यांनीं फिलिपिनो लोकांना स्वातंत्र्य आज ना उद्यां खास देऊं अशीं आश्वासनें देण्यास सुरुवात केली. ज्यांच्या कारकीर्दींत फिलिपाइन्स बेटें अमेरिकेनें जिंकलीं त्या प्रेसिडेंट मॅकिनले यांनीं प्रारंभीच आपण स्वराज्य देऊं असें जाहीर केलें व आम्ही अमेरिकन लोक कोणास गुलाम करीत नाहीं, आम्हीं स्वातंत्र्याचें निशाण उभें केलें आहे, आम्ही प्रथम स्वराज्याचे हक्क देऊं व या हक्कांचा शेवट स्वातंत्र्यांतच होणार असा आपल्या धोरणाचा अर्थ त्यांनीं विशद करून सांगितला. प्रेसिडेन्ट टॅफ्ट यांनीं १९०३ मध्यें, प्रेसिडेन्ट रूझव्हेल्ट यांनीं १९०८ मध्यें व प्रेसिडेंट विल्सन यांनीं १९१३ मध्यें व महायुद्धानंतरहि असाच स्वातंत्र्याचा पुकारा आपल्या जाहीरनाम्यांतून केला ! फिलिपिनो लोकांचीहि चिकाटी व दृढनिश्चय मोठा. १९०७ मध्यें त्यांच्यांतील राष्ट्रीयपक्ष त्यांच्या लोकसभेंत अधिकारारूढ झाला तेव्हां त्या सभेचे स्पीकर किंवा अध्यक्ष यांनीं स्पष्ट जाहीर घोषणा केली. ती पुढीलप्रमाणें होती. "आमची ही सभा असें ठरवीत आहे कीं, आमची इच्छा आम्हीं स्वतंत्र व्हावें अशी आहे व इतर स्वतंत्र राष्ट्रांच्या पंक्तीस बरोबरच्या नात्यानें बसण्याचा आम्हांला हक्क आहे". लोकसभेनेंहि जयजयकारांत ह्या ठरावाला पुष्टि दिली. यानंतर अनेक वेळां स्वातंत्र्य मागण्याकरितां फिलिपिनो लोकांच्या राष्ट्रीय पुढाऱ्यांनीं अमेरिकेंत डेप्युटेशनें पाठविलीं ! शेवटचें शिष्टमंडळ तर जानेवारी १९३२ मध्यें गेलें व त्यानंतरच स्वातंत्र्यदानाचें नवें बिल पसार झालें.

फिलिपाईन्स व अमेरिका याच्या संबंधाचा व फिलिपिनो लोकांनीं केलेल्या स्वातंत्र्याच्या प्रयत्नाचा हा इतिहास वाचतांना, हिंदुस्थानांतील लोकांचे प्रयत्न व इंग्रजांचीं वचनें यांच्या इतिहासाची आठवण पुनः पुनः होते, किंबहुना हे सर्व प्रवाह एकाच दिशेनें व जवळ जवळ एकसारख्याच पात्रांतून वहात आहेत असाहि भास होतो फिलिपिनो लोकांच्या पुढाऱ्यांनी स्वातंत्र्याची कैफियत प्रसिद्ध केली आहे. ती पाहिली असतां हिंदी राष्ट्रीय सभेचा इतिहासच डोळ्यापुढें उभा राहतो इतकें त्यांत व राष्ट्रीय सभेच्या ठरावांत साम्य आहे. फरक इतकाच कीं, फिलिपिनो लोकांना फारच अल्पावधींत स्वातंत्र्य देण्याचें अमेरिकेकडून वचन मिळालें आहे व हिंदुस्थानाला अद्याप त्याचा एक किरणहि दृष्टीस पडलेला नाहीं !

फिलिपाइन्सच्या बाजूला इतकी अनुकूलता असतांना त्याचें स्वातंत्र्याचें घोडें कोठें पेंड खातें असा साहजिकच प्रश्न उत्पन्न होतो. वस्तुस्थिति अशी

आहे कीं, अमेरिकन लोकांना साम्राज्यें संस्थापन करण्याची बुद्धि नसली तरी त्यांना व्यापारी महत्त्वाकांक्षा जबरदस्त आहे.स्वातंत्र्याच्या खालोखाल डॉलरदेवतेचे ते अंधभक्त आहेत. पूर्वेकडील देशांत म्हणजे चीन वगैरे देशांत आपला व्यापार वाढावा, तेथील बाजार आपण काबीज करावे अशी त्यांना हाव आहे व या बाबतींत त्यांचा शत्रु म्हणजे जपान होय. फिलिपाइन्स जिंकल्याबरोबर जर कोणता एक विचार अमेरिकन व्यापारी, आणि आरमारी व लष्करी अधिकारी यांच्या मनांत आला असेल तर तो, जपानाला पायबंद घालण्यास फिलिपाइन्समध्यें आपली छावणी करणें, हा होय. या कल्पनेची छाप आजहि स्टिम्सन वगैरे मुत्सद्यांच्या मनावर आहे व म्हणूनच ते स्वातंत्र्याचें जें नवें बिल नुकतेंच पास झालें त्याविरुद्ध गिल्ला करीत आहेत. वास्तविक १९२१ च्या प्रे. हार्डिंज यांनीं बोलाविलेल्या सार्वराष्ट्रीय परिषदेंत अमेरिकेनें फिलिपाइन्समध्ये आरमारी व लष्करी तटबंदी करूं नये असें ठरलें व म्हणूनच जपान देश निःशस्त्रीकरणाच्या परिषदेंत सामील झाला! अमेरिकेच्या किनाऱ्यापासून सहा हजार मैलांवर असलेल्या फिलिपाइन्स बेटांचा उपयोग फार थोडा आहे इतकेंच नव्हे तर युद्ध सुरू झाल्यास आपल्यास तीं बेटें सोडून द्यावीं लागतील असाच अमेरिकेंतील मुत्सद्यांचा कयास आहे. परंतु इभ्रतीच्या कल्पनेला बळी पडल्यामुळें एकदम आपला ताबा अमेरिकेला सोडावा असें वाटत नाहीं हें या विलंबाचें मुख्य कारण आहे!

या विलंबाचें दुसरेंहि एक कारण आहे. स्वातंत्र्याच्या पात्रापात्रतेचा निरर्थक, एका तऱ्हेनें बाष्कळ व वावदूकपणाचा प्रश्नहि उपस्थित केला गेला. वास्तविक स्वातंत्र्य हें ईश्वरनिर्मित असल्यानें स्वातंत्र्यास प्रत्येक देश स्वतःसिद्ध पात्र आहे. ज्यांना आधुनिक पाश्चात्य शिक्षणाचा गंध नाहीं, सुधारणा व संस्कृति यांची कल्पना नाहीं, व राज्यशासनशास्त्र ज्यांच्या गांवींहि नाहीं अशीं अनेक राष्ट्रें केवळ आपल्या शौर्याच्या, स्वातंत्र्यप्रीतीच्या व शस्त्रांच्या बळावर स्वातंत्र्य भोगीत नाहींत काय? पण एकवार रणभूमीवर पराभव पावल्यानें परतंत्र बनलेल्या राष्ट्रापुढें हा पात्रापात्रतेचा घोळ घालणें हा एक आधुनिक कुटिल राज्यनीतींतील डाव होऊन बसला आहे. अमेरिकन मुत्सद्यांनींहि त्याचा उपयोग प्रारंभापासून केला. परंतु फिलिपिनो लोकांनीं त्याला चोख उत्तर दिले आहे. आज फिलिपाइन्समधील सर्व म्युनिसिपालिटया आपण यशस्वी रीतीनें चालवितों,लोकसभा अत्यंत चांगल्या रीतीनें १९१६ च्या जोन्स कायद्याप्रमाणें चालली आहे, न्यायकोर्टांत जवळ जवळ मुख्य न्यायाधिशाशिवाय बाकी सर्व फिलिपिनोच आहेत. इतकेंच काय पण खुद्द सिव्हिल सर्व्हिसमध्यें १९२६ सालीं ९८ टक्के फिलिपिनोच होते. वीस हजार सरकारी नोकरांत फक्त ४७० अमेरिकन आहेत. यावरून आमच्या स्वराज्याच्या पात्रतेची लायकी सिद्ध होत नाहीं काय? हा त्यांचा सवाल निरुत्तर करणारा असल्यानें त्यांची लायकी अमेरिकेला अखेर कबूल करावीच लागली.

शेवटचे बिनतोड म्हणून मानले जाणारे व शब्दापेक्षां कृतीनें ज्यांचीं उत्तरें द्यावयास पाहिजेत असे दोन प्रश्न फिलिपिनो लोकांपुढें मांडले गेले होते.हे प्रश्न हिंदुस्थानासहि परिचित आहेत. त्यांतील पहिला प्रश्न म्हणजे शेजारच्या बलाढ्य, सामर्थ्यवान व आक्रमणशील अशा देशांनीं हल्ला चढविला तर फिलिपाइन्सचे लोक स्वसंरक्षण कसें करणार हा होय. फिलिपाइन्स फक्त कोटी सवा कोटी लोकसंख्येचा चिमुकला देश व त्यांतहि लष्करी व्यवसायाला बरेच वर्षे मुकलेला. जपानसारख्या बलाढ्य राष्ट्रानें स्वारी केली तर त्याची चटणी-कोशिंबीर झाल्याशिवाय कशी राहील? या कोलदांड्याचा प्रतिकार करण्याकरितां फिलिपिनो मुत्सद्दी प्रथम असा उलट सवाल अमेरिकेला विचारतात कीं, युद्धच सुरू झालें तर तुम्ही तरी कोठें आमचें संरक्षण करणार आहां? तुमच्या लष्करी तज्ज्ञांनीं आगाऊच ठरविलें आहे कीं, युद्धाच्या परिस्थितींत फिलिपाइन सोडावें लागेल! मग एवींतेवीं तुम्ही सोडणारच, तर त्या भीतीच्या निमित्ताचा बागुलबोवा करून आम्हास कां भिववितां? शिवाय ते स्पष्ट असेंहि म्हणतात कीं, पूर्वीचें पाशवी सामर्थ्याचें युग संपून गेलें. स्वतंत्र फिलीपाइन देश राष्ट्रसंघाचा सभासद होईल व अमेरिका, जपान, चीन वगैरे देशांशीं तह करून त्यांची मैत्री संपादील. हें उत्तर अमेरिकेस बव्हंशीं पटलें. कारण त्यांच्याच प्रे. विल्सननीं राष्ट्रसंघाची कल्पना प्रथम मांडली व तिची थोरवी वर्णन केली.

दुसरा महत्त्वाचा प्रश्न म्हणजे सांपत्तिक परिस्थितीचा. हा मात्र बिकट असून त्याचें फिलिपिनो लोकांना नीटसें उत्तर देतां येत नाहीं.आज अमेरिकेच्या आधिपत्याखालीं फिलिपाइन्स असल्यामुळें त्याचा अमेरिकेशीं व्यापार मोकळेपणानें चालतो. पण उद्यां फिलिपाइन्स स्वतंत्र झाल्याबरोबर अमेरिका त्याजविरुद्ध जकातीच्या भिंती उभारणार हें निश्चित. नुकताच स्वातंत्र्यदानाचा ठराव झाला त्या वेळींहि अमेरिकेंतील दरोबस्त शेतकऱ्यांच्या प्रतिनिधींनीं अनुकूल मत दिलें.यांतलें खरें इंगित हेंच आहे कीं, फिलिपिनो लोकांच्या व्यापारामुळें त्यांचा बाजार थोडाबहुत बसल

आहे. फिलिपाइन्स स्वतंत्र झाल्याबरोबर आपण संरक्षक जकाती बसवूं व त्यांना अमेरिकेंत आर्थिक स्पर्धा करण्याकरितां येऊं देणार नाहीं असा त्यांचा निश्चय आहे. या सर्व कारणांनींच नोव्हेंबर ९, १९३१ ला फिलिपाइन्सच्या सेनेटचे अध्यक्ष मॅन्युएल क्विझो यांनी असें जाहीर केलें कीं, आपल्यास एकदम पूर्ण स्वातंत्र्य नको आहे. स्वराज्याचे पूर्ण हक्क देण्याचें कबूल करा व दहा वर्षांचा व्यापारी तह करा आणि दहा वर्षांत आम्हीं आमची प्रथम व्यवस्था लावल्यावर मग जरूर तर स्वतंत्र होऊं! अमेरिकेनें हा तह करण्याचें नाकबूल केलें, तर मात्र आपण पूर्ण स्वातंत्र्य आजच घेऊं. या सर्व लटपटींचा अर्थ असाच आहे कीं, आर्थिक दृष्टीनें फिलिपाइन्स आज पंगु आहे. स्वातंत्र्याची आवड कमी आहे असा अर्थ नाहीं. नुकतें पास झालेलें बिल याच धोरणानें केलेलें दिसतें. या बिलाचीं सर्व कलमें तपशीलवार प्रसिद्ध झाल्यावरच या प्रश्नावर अधिक प्रकाश पडेल. तथापि प्रत्यक्ष व्यावहारिक राजकारणांत कोणत्या व कशा अनपेक्षित अडचणी उत्पन्न होतात हें मात्र या गुंतागुंतीवरून चांगलेंच लक्षांत येतें.

फिलिपिनो लोकांपुढें असलेले गुंतागुंतीचे व अडचणींचे हे व्यावहारिक प्रश्न प्रत्यक्ष कारभार सुरू झाला म्हणजे सुटणारे असल्याने त्यांची फारशी मातब्बरी वाटत नाहीं. अमेरिकेने फिलिपाइन्सला पूर्ण स्वातंत्र्य देण्याचें अभिवचन दिलें ही गोष्टच इतकी अभूतपूर्व आहे कीं, गुलामगिरींत पिचणाऱ्या जगांतील सर्व राष्ट्रांना तो एक आशेचा संदेश आहे, असें वाटतें. स्वातंत्र्य कोणास नको ? स्वातंत्र्य ही अशी अमृतवल्ली आहे कीं, ती भ्याडाला शूर बनविते, राष्ट्रांतील सर्व सुप्त शक्ति जागृत करते, मृतवत् झालेल्या राष्ट्राला खडखडीत जिवंत करते व आपल्या वर्षावानें त्यास सुखी बनविते. उलट पारतंत्र्य म्हणजे शुद्ध नरकयातना होत हें काय सांगावयास पाहिजे ? अमेरिकेला जे धन्यवाद द्यावेसे वाटतात ते याचकरितां कीं, ती आपण होऊन स्वातंत्र्यदान करण्याची ही नवी प्रथा पाडी आहेत. आपल्या उज्ज्वल पराक्रमानें त्यांनीं स्वतःकरितां स्वातंत्र्य मिळविलें. पण विशेष हें कीं पारतंत्र्याचीं दुःखें स्वातंत्र्याच्या उन्मादांत तें विसरली नाहीं. म्हणूनच स्वातंत्र्य मिळविण्याचें स्वतः घालून दिलेले धडे दुसऱ्यांनीं गिरवून गुरूची विद्या गुरूच्या अंगावर उलटविण्याची संधि न देतां स्वतः-तिनें दुसऱ्या राष्ट्रास स्वातंत्र्याचें वचन दिलें ! हा अमेरिकन लोकांचा मोठेपणा अनुकरणीय आहे. हें रहस्य ओळखून इतरांनीं वागणें यांतच शहाणपणा आहे. कारण जगाच्या राजकारणाचा ओघच स्वातंत्र्याकडे वाहत आहे. फिलिपाइन्स बेटें आज स्पेनच्या ताब्यांत असतीं तरी स्पेनमधील राज्यक्रांतीबरोबरच तेथेंहि क्रांति होऊन स्वतंत्र लोकशाही स्थापन झालीच असती. आज आपल्या हातांनीं फिलिपाइन्सच्या स्वातंत्र्याचे निशाण चढविण्यानें अमेरिकेनें आपल्या खऱ्याखऱ्या स्वातंत्र्यप्रीतीची साक्ष पटविली म्हणून त्यांच्याबद्दल इतिहास धन्योद्गार काढील हे खास. हें भाग्य त्यांना लाभलें. तें त्यांच्या स्वातंत्र्य-देवीच्या निःसीम आराधनेचें हें फळ होय. हा त्यांचा कित्ता कोणतें राष्ट्र गिरवतें हें पुढें समजेल. तूर्त फिलिपाइन्सला लागलेलें पारतंत्र्याचें ग्रहण सुटावयास लागलें व त्याचा मोक्षकाल समीप आला इतकें मात्र म्हणावयास हरकत नाहीं !

# श्रीसमर्थ-मंदिराचा महोत्सव

लक्ष्मीप्रमाणें वास्तुदेवताहि मोठी लहरी आहे. कैक वर्षे कंगाल वेष तिनें जेथें धारण केला असेल, तेथेंच ती क्षणार्धांत संपन्न वेषभूषेनें मिरवूं लागते. या तिच्या चंचळ स्वभावामुळे 'देवो न जानाति कुतो मनुष्यः' अशा स्त्री-चरित्र, पुरुषभाग्य इत्यादि गोष्टींमध्यें तिचीहि गणना करावीशी वाटते. फरक इतकाच कीं, स्त्रीचें चरित्र व पुरुषाचें भाग्य हें देवांनाहि माहीत नसतें; पण वास्तुदेवतेचें दैव--निदान जांबगांवच्या वास्तुदेवतेचें दैव--रा. शंकरराव देवांना माहीत झालें, किंबहुना, त्यांनीं तें दैव परिश्रमानें उघडलें.

नाहीं तर मोंगलाईंतील जांब म्हणजे भांगेंतील तुळसच. मात्र त्या तुळशीला अशी पवित्र मंजिरी आली कीं, तिच्या पावन सुगंधानें अवघा महाराष्ट्र भरून गेला, व अजूनहि तो सुगंध कायम आहे. श्रीसमर्थ रामदासस्वामींसारखे 'ईश्वराचें देणें' जांबेला लाभलें आणि म्हणूनच तिचें नांव सर्वतोमुखीं व सार्वकालिक झालें. आपल्या जन्मभूमीचे पांग समर्थांनीं ज्या प्रकारें फेडलें, तसें करणें फारच थोड्यांना साधलें आहे. जांबेच्या कुशींत असा सुपुत्र निघाला कीं, त्यानें तिचें नांव चिरंजीव केलें. 'कुल समुन्नति ज्यास्तव घे, रमे' तोच खरा जन्माला आला असें म्हणण्याइतपतच वामनपंडितांची उडी गेली; पण रामदासांनीं आपलें कुलच नव्हे तर, आपलें सर्व गांवच्या गांव, राजा

रामचंद्रानें अयोध्यापुरीला विमानांतून स्वर्गी नेलें त्या-प्रमाणें,कीर्तीच्या उच्च शिखरावर नेऊन बसावलें. 'पतित-पावनाचे दास तेहि पावन करिती जनास' हे समर्थांचे बोल आधीं करून मगच सांगितलेले होत. त्यांनीं आपलें कुल व आपला देश हीं कीर्तिमान आणि पवित्र करून ठेवलीं. त्यामुळेंच ३०० हून अधिक वर्षें लोटलीं, तरी त्यांच्या जन्मग्रामीं गेल्या शुक्रवारीं चैत्र शु.९ ला—रामनवमीला—समर्थजयंतीला दूरदूरचे, भिन्नभिन्न जातींचे, शेंकडों हजारों लोक तारांगणाऐसे भक्तीनें, उत्साहानें, आदरानें गोळा झाले आणि जांब-गांवाकडे पाहून, तेथील राममंदिराकडे दृष्टि टाकून, नव्या समर्थमंदिराकडे टक लावून, म्हणूं लागले.

" धन्य तें कुळ, पावन तो देश । जेथें हरीचे दास, जन्म घेती ॥ "

जांब येथें श्रीरामाचें मंदिर प्राचीन कालापासून आहे, आणि तेथें रामनवमीचा उत्सव शेंकडों वर्षें होत आहे. त्याप्रमाणें यंदाहि रामनवमीच्या उत्सवा-साठीं म्हणून आजूबाजूच्या खेड्यापाड्यांतील दोन चार हजार लोक जमले होतेच. त्यांत या वर्षीं समर्थ मंदिराच्या स्थापने-प्रीत्यर्थ लांबलांबून आलेल्या ४–५ शे पाहुण्यांची भर पडली. त्यांत मुंबईचे तसे वांईचे, नागपूरचे तसे कोल्हापूरचे,पुण्याचे तसे धुळ्याचे असे ठिकठिकाणाचे भाविक, चिकित्सक, वृद्ध-तरुण, पुराणमतवाले-नवमतवाले, असे लोक दिसत होते. हैद्राबादकडील श्रीयुत वामनराव नाईक व गिरिराव आण्णा, चाळीसगांवचे भागवत वकील, जामनेरचे दुधमांडे शास्त्री, मुंबईचे न. र. फाटक व य. कृ. खाडिलकर, पुण्याचे स. वि. बापट व राष्ट्रीय कीर्तनकार पाटणकर वगैरे निरनिराळ्या प्रदेशाची व पेशाची मंडळी तेथें उपस्थित होती. शास्त्रीपंडितांचाहि समुदाय बराच मोठा होता. गोंदवलेकरांच्या मठाचे म्हणून श्री. दामले हजर होते. चाफळकर महाराज हे तर समर्थांचे वंशज व जांबचे जहागिरदार. ते आधींपासूनच उपस्थित होते. त्यांचे समर्थांशीं जसें रक्ताचें नातें,तसें समर्थांशीं कार्याचें नातें असलेले, त्यांच्या कार्याचा वंश आपल्या कृतीने चालविणारे श्री. विनायकबुवा मसूरकर महाराज हे आपल्या जटाधारी व दंडधारी अशा तेजस्वी व ब्रह्मवर्चस्वी शिष्यगणांसहवर्तमान उपस्थित झालेले होते. राज-सत्तेनें त्यांचें संचारस्वातंत्र्य सध्यां हिरावून घेतलेलें असलें तरी समर्थकृपेनें त्यांना या उत्सवास हजर राहतां आलें हें जसें त्यांचें सुदैव, तसें किंबहुना अधिक सुदैव तेथें जमलेल्या रामदासांच्या दासांचें होय यांत शंका नाहीं. तीन शतकांपूर्वी होऊन गेलेल्या समर्थ रामदासस्वामींची सगुणसाकार व चालती बोलती अशी मूर्तिच आपण पाहात आहों असें वाटून तेथील रामभक्तांना समर्थकालीन परि-स्थिति चित्तापुढें दिसूं लागे. याशिवाय जांबच्या महोत्सवास एक प्रमुख व्यक्ति हजर होती. पण तिचा नामनिर्देश करण्याचेंच कारण नाहीं. तेथील प्रत्येक कार्याच्या रूपानें दृश्यमान होणारी किंवा असेंच म्हणणें बरें कीं, प्रत्येक कार्यांत गढल्यामुळें कोणालाहि सहसा दृश्यमान न होणारी अशी, त्या महोत्सवाला प्राणभूत असणारी श्री. शंकरराव देवांची मूर्ति तेथें संचरत होती हें निराळ्या शब्दांनीं काय सांगावयास हवें ?

आपल्या गेल्या दोन तपांच्या समर्थसेवेवर कळस चढविणारा, समर्थमंदिर बांधण्याचा, हेतु त्यांनीं मनांत धरला आणि 'मनीं धरावें तें होतें। विघ्न अवघेंची नासोनि जातें । ही रघुनाथकृपेची प्रचीति अनुभविली. समर्थांचें माहात्म्य जनतेस पटवून व त्यांची शिकवण जनमनावर बिंबवून, त्यांनीं हा सोहळा घडवून आणला. त्यासाठीं महाराष्ट्राच्या कानाकोंपऱ्यांत हिंडून त्यांनीं सुमारें चाळीस हजार रुपये जमा केले, व समर्थांचें मंदिर उभारलें, त्यांत समर्थांच्या मूर्तीची प्राणप्रतिष्ठा केली, व त्या वेळीं ठायीं ठायींचीं मंडळी निमंत्रणें देऊन गोळा केली. त्यांची राहाण्याची जेवण्याची वगैरे सारी व्यवस्था चोख ठेवण्याचे कामीं त्यांनीं शक्य ती खटपट केली. जांबच्या निसर्गानें गैरसोईचेच खड्डे खूप खणून ठेवलेले होते आणि देवांनीं ते हाडाचीं काडें करून बुजवून टाकले. जणु काय त्यांनीं तेथील प्रतिकूल निसर्गाशी कुस्ती मारण्या-साठीं लंगोटच कसला होता. निसर्गानें जांब गांव आडवळणाच्या ठिकाणीं, वाहतुकीच्या साधना-पासून दूर ठेवलेलें; पण देवांनीं परतूड स्टेशनापासून वाहनांची सोय केली, एवढेंच नव्हे तर रस्ताहि दुरुस्त करून घेतला. परतूड हें स्टेशन निजाम स्टेट रेल्वेवर आहे. त्या रेल्वेच्या अधिकाऱ्यांकडून उत्सवाच्या चालकांनीं परतीच्या तिकिटांची सवलत मिळविली. परतूड स्टेशनापासून जांबगांव सहा कोसावर म्हणजे १२ नव्हे, १८ मैलांवर. तेथें बैलगाड्या ठेवल्या. पण त्या रमतगमत जाणार म्हणून त्यांनी मोटारींची खास सोय केली. तरी मोटारी दीड तास वेळ घेतच.

खुद्द जांब पाहिलें तर उण्यापुऱ्या शंभर उंबर-ऱ्याचें गांव. त्यापैकीं बहुतेकांच्या घरांत पाहुण्यांची उतरण्याची व्यवस्था चालकांनीं केली. पण तेवढ्यानें काम भागणार नसल्यामुळें त्यांना निरनिराळ्या ठिकाणीं मुद्दाम मंडप घालावे लागले. रात्रीं प्रकाशासाठीं किटसनचे दिवे आणावे लागले. पाण्याची सोय म्हणजे विहिरी. त्या

घरोघर होत्या आणि त्यांत पाणीहि अगदीं वर होतें. परंतु उपयोग काय ? दुर्जनांच्या वाणीप्रमाणें त्यांचें पाणी खारें-मचूळ. गांवाला वळसा घालून एक नाला वहात—किंवा पेंगत--आहे. 'गोदावरीच्या कांठीं जांब' हें वर्णन केवळ पुस्तकांतच राहिलें. कारण गोदाकांठ जांबेपासून चार मैल अंतरावर आहे. तेव्हां लोकांना जीवनदाता काय तो नालाच. त्याच्या कांठच्या एका विहिरीवर रहाट-गाडगें लावण्यांत आलेलें होतें. तें दोन माणसे फिरवीत व त्याच्याकडे पहात इतर लोक पाणी पीत व स्नान करीत. तें पाणी मात्र गार व तितकेंच गोड होतें. अरुंद बोळांतून वाकड्यातिकड्या रस्त्यांवरून धूळ व कडक उन्हाळा खात, जे प्रवासी त्या रहाटगाड्यापाशीं संत्रस्त होऊन येत ते आंघोळ करून व पाणी पिऊन संतुष्ट मनानें परत जात, भोजनाची व्यवस्थाहि चालकांनीं चांगली ठेवली होती. शेंकडों हजारों लोकांना मोफत अन्नदान चालू होतें. समर्थमंदिरासमोरच्या मंडपांत पंगती-मागून पंगती उठत होत्या. सर्व लोकांची ही व्यवस्था ठेवण्यासाठीं व पाहण्यासाठीं चालकां-नीं कांहीं माणसें योजिलीं होतीं. शिवाय नाशिकच्या अनाथ विद्यार्थी गृहाचे विद्यार्थी, परभणीच्या हनुमानमंडळाचे स्वयंसेवक, मसूरकर महाराजांचे शिष्य आणि स्वयंस्फूर्तीनें काम करणारे रामदासी इत्यादि मंडळीहि लहानशा गांवांतील या मोठ्या उत्सवाची व्यवस्था राखीत होती. त्यामुळें तेथें स्थिति अशी होती कीं,

"ग्रामसेवक जाति विजती फिरती।
आलयाचीं आतिथ्यें करिती।
कष्टल्याभागल्यांचे श्रम हरिति।
क्षुधिस्थ कोणी राहेना."

हें 'समर्थ-प्रतापां'तील वर्णन तिला लागू पडावें.

## कार्यक्रमाचें वर्णन

जांब येथील महोत्सवाचा मुख्य दिवस चैत्र शु॥. ९ हा असला तरी सोमवार चैत्र शु॥. ५ पासून त्यास सुरुवात झाली. सोमवारपासून स्वाहाकारास प्रारंभ झाला. त्यासाठीं क्षेत्रोक्षेत्रींचे ४०–५० वैदिक ब्राह्मण उपस्थित झाले होते. मंदि-रांत शिरतेवेळीं उजवे हाताला होमहवनासाठीं जागा तयार केलेली होती, आणि डावे हाताला श्रीसमर्थां-च्या मूर्तीवर अभिषेकादि विधि होत होते. होमकुंडांतून निघणारीं धूम्रवलयें व अग्निज्वाला त्या पावित्र्याच्या पताकाच भासत होत्या. हा वैदिक संस्कार पहाण्यासाठीं रोज गर्दी वाढत्या प्रमाणांत येत होती. जणुं कांहीं चारपांच दिवस ते वेदोमूर्ति तेथल्या वास्तुदेवतेस उद्देशून असेंच म्हणत होते कीं, "वैतानास्त्वां वन्हयः पावयन्तु"

## मिरवणुकीचा सोहळा

गुरुवारीं प्रातःकालीं मूर्तीची मिरवणूक निघाली, तो सोहळा कांहीं विशेषच होता. हजारों उत्सुक नेत्र समर्थांच्या मूर्तीवर खिळून राहिले होते. शिंगांचा कपायमान असा सुस्वर ध्वनि तेथील वातावरण निनादित करीत होता. तो श्रवण करून भाविकांना वाटलें कीं, हा समर्थांच्या यशःकीर्तिप्रतापाचाच जय-घोष चालला आहे. भजनी लोकांची दिंडी मिरवणुकी-च्या अग्रभागीं रामनामाचा गजरोळ करात होती. दोन धष्टपुष्ट व उत्कृष्ट बैल शृंगारून पुढें चालविले होते. तशाच दुसऱ्या बैलांच्या रथांतून समर्थांची मूर्ति, वर छत्र उभारलेलें असतां व मागेंपुढें शेंकडों भक्तजन जयजयकार करीत असतां, हळूहळू मिरवत चालली होती. उलट, समर्थ इतक्या त्वरित गतीनें चालत कीं, "जातां तीर धरिती मागिल्या करें." तसा विरोध मिरवणुकीचे वेळीं किती तरी प्रकारांनीं उमटून दिसत होता. तीन शतकांपूर्वीचें समर्थांचें जांबमधील वास्तव्य आणि सध्यांचें त्यांचें वास्तव्य यांत किती अंतर ! तें पाहून 'विप-र्यासं यातो घनविरलभावः' असेंच उद्गार कोणाहि सहृदय माणसाच्या मुखांतून निघावे. बोहोल्यावरून पळून गेलेला व मारुतीच्या मूर्तीआड दडलेला बारा वर्षांचा बटु कोणीकडे आणि तीनशें वर्षांनंतर महाराष्ट्राचें 'आनंदवनभुवन' करून आणि त्यांत रामकथेची चढती—वाढती गोडी पसरून जनतेच्या मस्तकीं मिरवीत जाणारी समर्थमूर्ति कोणीकडे ! तीन शतकांनंतर समर्थांची जन्मभूमीशीं प्रेमभेट होण्याचा तो प्रसंग रोमांचकारक होता. 'रघुनाथ–भजनें महत्त्व वाढलें' त्याचा तो पुरावा, रामदासांच्या कर्तृत्वाचा तो सोहळा, समर्थांच्या मूर्तीची ती मिरवणूक, नजरेंत सांठवीत असतांना जांब–भूमीला किती कृतकृत्यता, किती धन्यता, किती आनंद वाटला असेल ! नानासाहेब देवांची अवस्था तर विचारूंच नये. जणुं आपल्या अंतःकरणाचा गाभाच रथांतून मिरवीत आहे, अशा भावनेनें ते त्या मूर्तीकडे अनिमेष नेत्रांनीं, प्रेमानें, भक्तीनें, उत्कंठेनें पहात होते.

## मूर्तीचें कांतिमान सौंदर्य

मिरवणूक आठ वाजतां निघून दहाचे सुमारास निर्विघ्नपणें पार पडली व मूर्ति मंदिरांत सुखरूपपणें प्रविष्ट झाली. आणि मूर्ति साधलीहि मोठी सुंदर. औंधच्या श्रीमंत पंतप्रतिनिधींनीं विश्वसनीय छाया-चित्रावरून ती करवून दिली. घोटीव संगमरवरी दगड वापरला असल्यामुळे तिची धवलता विशेषच दिसत होती. तिला उपमा एक समर्थांच्या शुभ्र यशाचीच. शुकासारख्या धगधगीत वैराग्याचें तेज व वसिष्ठासारख्या विमल ज्ञानाची कांति यांचें मोहक मिश्रण मूर्तीच्या मुद्रेवर विलसत होतें.

समर्थांचें प्रसिद्ध असें 'भाळीं आवाळूं' तेथें पुण्यपुंज सांठविला असल्याचें जाहीर करीत होतें. मूर्तीच्या पायावरील पीळदार अशा सूक्ष्म रेषा समर्थांच्या शरीर—संपत्तीच्या द्योतक होत्या. कौपीन व माळ यांनीं भगवा रंग धारण केलेला आहे. अशी तेजस्वी व सुंदर समर्थमूर्ति पहाणाराचें चित्त उन्नत व उल्हसित करण्यास समर्थ अशी होती.

### प्रेक्षणीय मंदिर

मूर्ति मंदिरांत आल्यानंतर तिला अभिषेक करण्यांत आला. त्यासाठीं दूरदूरच्या नद्यांचें व समुद्राचें पाणी मुद्दाम आणलेलें होतें. त्याचप्रमाणें ठिकठिकाणची पवित्र मृत्तिकाहि आणलेली होती. त्या सर्वांचा मूर्तीवर विधिपूर्वक अभिषेक करण्यांत आला. मंदिरहि मूर्तीला शोभेसें प्रेक्षणीय असे बांधण्यांत आलें आहे. केवळ जन्मग्रामींच नव्हे, तर खुद्द ज्या स्थानीं समर्थ जन्मास आले; तेथेंच मंदिर उभारलेलें आहे. ३-४ हजार माणसें बसतील एवढा प्रशस्त प्राकार भोंवतीं असून त्यांत चोहोंकडे फरशी केलेली आहे. मागच्या दोन बाजूंस दोन खोल्या बांधलेल्या आहेत. सभामंडप बराच विस्तीर्ण असून आंतील गाभारा १२ फूट लांब रुंद आहे. गाभाऱ्याच्या दारावर

"समर्थें समर्थ करावें।<br>
तरीच समर्थ म्हणवावें।<br>
त्रैलोक्यासि पहिलें ठावें।<br>
सामर्थ्य ज्याचें॥

ही उचित ओंवी खोदलेली आहे. देवळाचें सारें बांधकाम घडीव दगडाचें आहे. मंदिराचें शिखर फार उंच आहे. त्यावर सोन्याचा कळस चकाकत असून चोहोंबाजूंना लहान लहान असे चांदीचे कळस तळपत आहेत.

### कीर्तनप्रवचनांचा गदारोळ

भजनकीर्तनप्रवचनादिकांच्या गदारोळानें मंदिरांतीलच नव्हे तर साऱ्या जांब गांवांतील वातावरण दुमदुमून गेलें होतें. सुप्रसिद्ध गोभक्त चौंडेमहाराज यांनीं कीर्तनें करून समर्थकालीन परिस्थिति, समर्थांचें कर्तृत्व व समर्थमंदिराचें माहात्म्य हें श्रोत्यांना मोठ्या जिव्हाळ्यानें पटवून दिलें. इतर गोभक्त व गोसेविका यांचींहि कीर्तनें झालीं. पुण्याचे धेनुदास रा. डोळे व राष्ट्रीय कीर्तनकार रा. पाटणकर यांनींहि समर्थांच्या चरणीं आपली सेवा रुजू केली. श्री. मसूरकर महाराजांचें प्रवचन ऐकण्यास हजारों लोक जमले होते. गुरुवारीं रात्रीं साडेआठ वाजल्यापासून दहा वाजेपर्यंत त्यांनीं निर्भय विचार निःसंदिग्ध भाषेंत श्रोत्यांना ऐकविले. समर्थांच्या काळीं कोसळणाऱ्या अस्मानीसुलतानीमुळें त्रस्त झालेले लोक देवापाशीं टाहो फोडूं लागले. तेव्हां देव 'शुचि व श्रीमत् अशा गेहा'चा अवतीर्ण होण्यासाठीं शोध घेऊं लागला आणि त्यानें ठोसरांचें सूर्योपासक घराणें निवडून काढलें, अशी उपपत्ति सांगून महाराज सद्यःस्थितीसंबंधानें म्हणाले, "प्रत्येक मानवाचे व्यक्तिधर्म, कुटुंबधर्म व समाजधर्म, असे तीन धर्म असतात. पितर, देव व ऋषि या तिघांचीं ऋणें त्याला फेडावयाचीं असतात. म्हणून शरीर व बुद्धि यांचा त्यानें विकास केला पाहिजे. अपराध्यांना क्षमा म्हणजे निव्वळ बावळटपणा आहे, समाजाची ती आत्महत्याच होय! क्षात्रवृत्ति अंगीं बाणली पाहिजे. "प्रसंग हा तडातडी। विवेक घ्या घडाघडी!" हा दास—बोध ध्यानीं आणून समाजाची वाढ होईल, गळती होणार नाहीं अशी खबरदारी घ्या. सध्यां चाललेली हिंदु समाजाची गळती अशीच पुढें चालू राहिली तर तो समाज ४२१ वर्षांत पूर्ण नामशेष होईल असें गणितावरून ठरतें. ती आपत्ति टाळण्यासाठीं शुद्धीकरणाचा प्रसार करा. आक्रमक नसलें तरी संरक्षक स्वरूप धर्माला आणलें पाहिजे. परदेशांतहि आपल्या धर्माचे प्रचारक गेले पाहिजेत. समर्थांसारखा जगभर चमकणारा हिरा जांबेच्या पोटीं जन्मास आला. त्यांचे कार्य चालविण्यासाठीं येथें समर्थ विद्यापीठ काढलें पाहिजे आणि घरोघर समर्थ निर्माण झाले पाहिजेत."

### जन्ममहोत्सव

शुक्रवारचा दिवस म्हणजे कार्यक्रमांतील मेरुमणि. प्रभूचा व दासाचा जन्म एकाच दिनीं, एकाच क्षणीं. 'टळटळित दुपारीं जन्मला रामराणा' आणि रामदासांचीहि जन्मवेळ तीच. मयूरकवींनीं वर्णिल्याप्रमाणें 'श्रीरामाची जैशी सत्कीर्ति तशीच रामदासांची' ही प्रचीति जांब येथें गेल्या शुक्रवारीं खचित आली.' आजपर्यंत समर्थांची स्थिति जनतेमध्यें अशी होती कीं, 'ठाईं ठाईं त्याच्या गोष्टी, कोठेंच पडेना दृष्टीं.' पण शंकररावासारख्या दासभक्तानें समर्थांना दृष्टिगोचर केलें, एवढेंच नव्हे तर 'जन्मस्थानीं मूर्तिमंत उभें केलें! त्यामुळें शुक्रवारीं दुपारीं रामभक्तांना कांहीं अनिर्वचनीयच आनंद लाभला. पुरातन अशा राममंदिरांत रामजन्म होत होता; तर नूतन अशा समर्थमंदिरांत दासजन्म होत होता. सकाळीं नवापासून स्वाहाकार सुरू होता. भक्तगणांची दाटी झाली. माध्यान्हीं सूर्यनारायण आला तेव्हां सूर्याजीच्या नारायणाची, समर्थ रामदास स्वामींच्या मूर्तीची चाफळकर महाराजांचे हस्तें प्राणप्रतिष्ठा होऊन स्थापना करण्यांत आली. शिंग वाजलें, वाद्यें गरजलीं, सर्वत्र गुलाल उधळला, लोकांचा रामनामाचा जयजयकार नभोमंडळ भेदून गेला आणि त्यांतच समर्थांचा जयजयकार एकरूप होऊन गेला. त्या वेळीं आपल्या नेत्रांचें

मान रँ. नारळीकर यांना मिळाला. त्यांचें संशोधन-कार्य समाधानकारक आढळल्यास ती पुढें तशीच चालावयाची होती. ही शिष्यवृत्ति ४॥ वर्षांत द्यावयाची असतां ती त्यांना अवघ्या दोन वर्षांत देण्यांत आली हें विशेष कौतुकास्पद होय.

त्याच सालीं मुंबई विश्वविद्यालयाकडूनहि त्यांचा सन्मान करण्यांत आला. मुं. वि. नें त्यांना ३५० रुपयांची देणगी दिली. डॉ. ए. एन. मेल्ड्रम यांच्या निरोपसमारंभाचे वेळीं डॉक्टरमजकुरांचें भाषण झालें. त्यांत त्यांनीं रँ. नारळीकर यांचा यथोचित गुण-गौरव करून नारळीकर हे जगांतील अद्वितीय गणितज्ञाचा मान पटकावतील अशी आशा प्रदर्शित केली होती.

त्यानंतर केंब्रिज ॲन्युअल कॉंग्रेगेशनच्या बक्षिस-समारंभाचे वेळीं हिंदुस्थानाचे माजी व्हाइसरॉय लॉर्ड आयर्विन यांनीं श्री. नारळीकरांचा चांगला गौरव केला. व इंग्लंडाचे माजी मुख्य प्रधान व कें. यू. चे व्हाइस-चॅन्सेलर सर स्टॅन्ले बाल्डविन यांचे हस्तें त्यांना 'टायसन मेडल' देण्यांत आले. सन १९३२ सालीं गणित विषयांतील नैपुण्याबद्दल केंब्रिज युनिव्हर्सिटीनें रँ. नारळीकर यांना 'रेले प्राइझ' अर्पण केलें. रँ. नारळीकर यांनीं पदार्थविज्ञान-शास्त्रांत लावलेल्या शोधामुळें प्रख्यात गणित-शास्त्रज्ञ एडिंग्टन लॅमर, स. जेम्स जीन्स इत्यादिकांमध्यें खळबळ उडाली आहे.

आजपर्यंत 'वेव्ह मॅकॅनिकन्स' च्या गणित शास्त्रीय शोधाप्रमाणें एकंदर **१३७ मूलतत्त्वें** आहेत असें शास्त्रज्ञांनीं सिद्ध केलें होतें. परंतु सध्यां उपलब्ध असलेलीं ९२ च मूलतत्त्वें आहेत असें रँ. नारळीकर यांनीं सिद्ध केलें आहे. ( Vide Nature 12th March 1932 or Morning Post 14th March 1932. )

# प्रासंगिक बोल

## अखेर संस्कृतला स्थान मिळालें

हिंदुस्थानांतील सर्व आर्य देशी भषांची जननी या नात्यानें संस्कृत भाषेस मोठें आदराचें स्थान या देशांत दिलें गेलें असल्यास नवल नाहीं. तथापि कन्नड भाषा बोलणारांची अशी समजूत झाली आहे कीं, आर्यवंशीय व संस्कृतोद्भव भाषा, यांनीं शेंकडो वर्षें त्यांच्या कानडी भाषेवर जुलूम केला, आणि म्हणून त्याच्या प्रतिकारार्थ, कन्नड प्रांतांत कानडीशिवाय दुसऱ्या कोणत्याहि भाषेचा अभ्यास होतांच कामा नये या आग्रहाच्या बऱ्यावाईट परिणामाच्या खोल पाण्यांत आपल्यास शिरावयाचें नाहीं. पण या दुराग्रहानें कांहीं वेळां अत्यंत हास्यास्पद प्रकार घडतात हें मात्र खरें. म्हैसूर म्हणजे कानडीचें माहेरघर. तेथील विद्यापीठांतील कॉलेजांच्या अभ्यासक्रमांत 'संस्कृत' ही दुसरी भाषा ठेवावी कीं नाहीं याबद्दल विद्यापीठांत झालेला विचित्र वादविवाद हा एक असल्या अतिप्रसंगाचा एक मासलाच होय. कानडीशिवाय दुसरी भाषा म्हणून उर्दू घ्यावी, पण संस्कृत नको असा कन्नडाभिमानी कट्टरांचा आग्रह होता ! पण शेवटीं अनेक सभासदांनीं निरनिराळ्या तऱ्हेनें समजाविल्यानंतर बहुमतानें संस्कृत ही दुसरी भाषा घेण्यास सेनेटनें मोकळीक दिली ही आनंदाची गोष्ट आहे. खुद्द म्हैसुरास एक चांगलें संस्कृत कॉलेज व कांहीं संस्कृत पाठशाळा आहेत. खुद्द महाराज संस्कृताभिमानी आहेत व दिवाण मुसलमान असतांहि संस्कृताबद्दल अनेकवेळां त्यांनीं अभिमान प्रगट केलेला आहे. अशा परिस्थितींत संस्कृताला अर्धचंद्र देण्याचा प्रयत्न व्हावा हें शोचनीय होय. तो अखेर साधला नाहीं ही गोष्ट वेगळी.

## फिलिपाईन्स स्वतंत्र होणार !

फिलिपाइन्स बेटांना आठ वर्षांत स्वातंत्र्य द्यावें असा ठराव वाशिंग्टन येथील अमेरिकेच्या लोकसभेत पसार झाल्याचें वाचून स्वातंत्र्यप्रिय देशभक्तांना आनंद झाल्याशिवाय राहणार नाहीं. फिलिपाइन्समधील लोकांनीं चालविलेल्या स्वातंत्र्याच्या लढ्याचा इतिहास अत्यंत उद्वेगकारक आहे. लहानसें चिमुकलें राष्ट्र, त्यांतहि मूठभरच लोक, हातावर शिर घेऊन लढणारे व गांठ अमेरिकेसारख्या धनाढ्य व प्रबल राष्ट्राशीं, त्यामुळें त्यांच्या स्वातंत्र्याच्या भिकेची झोळी शिंक्यावर चढावयाची कशी ? एकदां तर आतांच्या प्रमाणेंच स्वातंत्र्य द्यावें असें ठरलेंहि होतें. पण तो ठराव अमेरिकेंतील मुत्सद्द्यांनीं मानला नाहीं. या खेपेची गोष्ट थोडी वेगळी आहे. कारण फिलिपाइन्सच्या स्वातंत्र्याबद्दल खुद्द अमेरिकेंतच अनुकूल वातावरण आहे. मि. स्मिटसन-सारखे साम्राज्यवादी त्याविरुद्ध आजहि आहेतच. आशेला कांहीं काळानें फळ येईल, असें सांगण्याचा एक राजनीतिप्रवीणांचा संकेत आहे. त्यांतलेंच हेंहि प्रकरण असूं शकेल. परंतु,

या खेपेचा फिलिपिनो लोकांचा निश्चय पाहतां त्यांना स्वातंत्र्य मिळेल असें दिसतें! ब्रिटिश साम्राज्यांतील हिंदुस्थान, इजिप्त, आयर्लंड हे देश असेच ब्रिटिशांच्या पकडींत होते. पण त्यांतून आयर्लंड सुटला. अमेरिकेपैकीं फिलिपाईन्सचें ग्रहण सुटत चाललें व त्याचा मोक्षकाल जवळ आला. हिंदुस्थानची काय वाट? बाकीचे देश स्वातंत्र्यानें विभूषित होत असतां आम्हींच देवाच्या घरा काय पातक केलें? 'मग आम्हांलाच कां पारतंत्र्यपंजरीं कोंडिलें, राम' असें कवी गोविंद यांच्या शब्दांत विचारावेंसें वाटतें.

**मौ. शौकतअल्लींच्या धमक्या**

मुंबईस भरलेल्या कन्सिलिएशन कमिटीच्या वार्षिक सभेंत मौ. शौकतअल्ली यांनीं जे तारे तोडले ते एक प्रकारें सूचक आहेत असें म्हणण्यास हरकत नाहीं. मागें मुंबईंत हिंदु-मुसलमानांचा दंगा झाला तत्पूर्वी या बड्या भाईंनीं अशीच आगाऊ दंग्याची धमकी दिली होती; व प्रत्यक्ष दंगा होतांच उभय बंधूंनीं मुंबई-बाहेर पोबारा केला. या गोष्टी सर्वश्रुतच आहेत. आतां मुंबईंत विदेशी मालाच्या दुकानावर पिकेटिंग सुरू झाल्याचें पाहून बड्या भाईचें माथें खवळलें आहे व राष्ट्रीय सभेच्या अध्यक्ष सौ. सरोजिनी नायडू यांना लांबलचक पत्र लिहून "मुसलमान व्यापाऱ्यांच्या दुकानांवरील पिकेटिंग न थांबविल्यास आम्हांलाहि तोच मार्ग हिंदू दुकानदारांविरुद्ध योजावा लागेल; व असें करावें लागल्यास आजपर्यंत कधीं देखला नाहीं अशा प्रकारचा कलह माजून भयंकर अस्वस्थता उद्भवेल. आमचा कॉंग्रेस-वर काडीचाहि विश्वास नाहीं. कॉंग्रेस ही हिंदु सभेची एक शाखा आहे. तींत राष्ट्रीय वृत्तीचे लोक फारच थोडे आहेत. त्यांत नाना प्रकारच्या पांघरुणाखालीं जातवारीचाच गोंधळ घातला जात आहे. कॉंग्रेस सांगेल तसें वागण्यास आम्हीं कधींहि तयार नाहीं. परंतु ही सर्व आपत्ती टाळावयाची असेल तर आम्हा मुसलमानांशीं सन्मानानें तडजोड करण्यांतच शहाणपणा आहे," असें मौ. शौकतअल्ली यांनीं कळविलें आहे. त्यांनीं अलीकडे जें धोरण स्वीकारलें आहे त्यास अनुसरूनच त्यांचे वरील उद्गार आहेत. जी गोष्ट सरकार वटहुकुमांनीं बंद करण्याचा प्रयत्न करीत आहे, तीच गोष्ट मौलानासाहेब दंग्याची, शांतताभंगाची धमकी देऊन करूं पाहात आहेत, परंतु मौलानासाहेबांच्या धमकीप्रमाणें खराच दंगा झाला तर त्याला जबाबदार कोण? व मौलाना-साहेबांच्या अशा बेलगामीपणाला सरकार आळा घालणार कीं नाहीं?

# जातिभेदाचें इष्टानिष्टत्व

## लेखक ४ था

( ले. श्री. गो. रा. राजोपाध्ये बी. ए. )

**जन्मावरून जाति**

जन्म ही गोष्ट स्वायत्त नाहीं. तेव्हां स्वायत्त नसलेल्या जन्मावरून व्यक्तीचें कर्तव्य ठरविणें हा न्याय नव्हे असे कोणास वाटतें. व्यक्तीची बुद्धि, पौरुष वगैरे गुणांवरून तिचें कर्तव्य ठरवावें असें ते म्हणतात. निकृष्ट जातींत जन्माला येणें हा काय त्याचा दोष? त्या जन्मामुळें त्याची कुचंबणा कां? असा त्यांचा प्रश्न असतो. पण कोणत्याहि जातींत जन्म झाला तरी स्वधर्माप्रमाणें वागणाऱ्या सर्व व्यक्तींना फल सारखेंच मिळत असतें. कारण ते सर्व समाजहित साधण्याचें सारखेंच कर्म करीत असतात. दुसरें असें कीं, जन्म स्वायत्त नाहीं तसे बुद्धि वगैरे गुण हेहि स्वायत्त नाहींत; तेहि उपजतच आहेत. जन्मतः लोक निर्बुद्ध असतात हा काय त्यांचा दोष? या स्वायत्त नसलेल्या दोषांमुळें बुद्धिमान लोक जर परधर्म आचरून त्यांच्या चरितार्थाच्या साधनांचें आक्रमण करूं लागले तर हा न्याय कोठला? बुद्धिमान लोक जर स्वधर्मांत राहून आपल्या बुद्धीचा उपयोग करूं लागले तर तें उत्तमच होईल. तेव्हां कर्तव्य ठरवावयाचें तें बुद्धीवरून किंवा कोणत्याहि शक्तीवरून न ठरवितां तें नैसर्गिक अवस्थेवरून-जन्मावरून-ठरविणें प्राप्त आहे. "यो हि यं प्रतिविधीयते स तस्य धर्मः। न यस्तेनानुष्ठातुं शक्यः।" असें अद्वैतसिद्धांतशिरोमणि श्रीशंकराचार्य म्हणतात तें याचकरितां. 'सहजं कर्म कौंतेय सदोषमपि न त्यजेत्' या वचनावरून कर्म म्हणजे कर्तव्य जन्मसिद्ध-जन्मावरून-निश्चित होणारेंच आहे असें उघड होतें. 'शमो दमस्तपः शौचं,'...इत्यादि वचनांत ब्राह्मणादि चार वर्णांचीं स्वभावज कार्ये-जन्मसिद्ध कर्तव्यें-सांगितलीं आहेत. 'स्वधर्मे निधनं' या वचनांत जन्मसिद्ध कर्तव्य न

सोडण्याचाच उपदेश आहे व प्रत्यक्ष अर्जुनास तसाच उपदेश केला आहे. स्वधर्माचरणांतील लोकसंग्रहाचा हेतु भगवद्गीतेंत प्रामुख्यानें पुढें आणला आहे.

### पाश्चात्यांचा देशाभिमान

कोणत्याहि देशाच्या चरित्राची दोन अंगें असतात. स्वकीयांच्या केवळ परस्पर व्यवहारासंबंधीं एक व ज्यांचा रोख विशेषतः परकीयांकडे आहे अशा व्यवहारासंबंधीं दुसरें. पाश्चात्यांचा इतिहास पाहिला असतां असें दिसेल कीं देशाभिमानानें त्यांच्या चरित्राच्या दुसऱ्या अंगास जशी मदत केली आहे तशी पहिल्या अंगास केली नाहीं. देशाभिमानानें स्वकीयांची एकजूट करून अनेक प्रसंगीं परकीयांपासून देशाचें स्वातंत्र्य रक्षण केलें आहे व तें स्वातंत्र्य कायम राखण्याचें सामर्थ्य देशास दिलें आहे. देशाभिमानानें परकीयांशीं स्पर्धा करण्याची ईर्षा वाढवून देशाची भौतिक सुधारणा केली आहे व भौतिक सुधारणेंत मागासलेले देश पादाक्रांत केले आहेत. देशाभिमानानें स्वातंत्र्येच्छा जागृत ठेवून देशाचा राजकीय व सांपत्तिक बाजूंनीं उत्कर्ष केला आहे व साहस, दीर्घोद्योग, देशाकरितां स्वार्थत्याग इत्यादि सद्गुणांचें पोषण केलें आहे. हें सर्व खरें. पण देशाच्या चरित्राचें जें पहिलें अंग त्यास या देशाभिमानाचा कांहीं उपयोग झाला नाहीं. परकीयांशीं येणाऱ्या संबंधापुरतें स्वदेश हें एकीकरण उपयोगीं पडतें. परंतु स्वकीय समाजाचें स्थैर्य घडवून आणण्याचें सामर्थ्य या एकीकरणांत नाहीं. असें पाश्चात्यांच्याच इतिहासावरून दिसतें.

### संघटित लुटारू

उदाहरणार्थ इंग्लंडचा इतिहास घ्या. हा इतिहास म्हणजे राजे, बडे लोक व सामान्य लोक यांच्या तिरंगी सामन्याचा इतिहास. राजानें सत्ता आपली असें म्हणावें, ती बडे लोकांनीं जबरीनें त्याजपासून काढून घ्यावी, पुन्हां ती त्यांजकडून सामान्य लोकांनीं हिसकावून घ्यावी. असा क्रम चालू आहे. राजे, बडे लोक व सामान्य लोक यांचे कलह आजपर्यंत झाले. आतां धनिक व मजूर यांच्यांत हा कलह सुरू आहे. पाश्चात्यांनीं आजपर्यंत "स्वयंसत्तेपासून हक्काकडे" (From status to right) या मार्गानें आक्रमण केलें आहे. त्यांच्या इतिहासाचा रोख 'स्वतंत्र मनुष्याचें हक्कसंपादन' (Enfranchisement) याकडे आहे. यालाच ते मोक्ष (Emancipation) समजतात. वास्तविक म्हटलें म्हणजे समाजरचनेचा हा केवळ पाया होय. हा पाया घालण्यापलीकडे त्यांनीं आजपर्यंत कांहीं केलें नाहीं. समाजघटनेची इमारत यापुढें निर्माण व्हावयाची आहे. पाश्चात्यांचा देशाभिमान त्यांच्या समाजघटनेस निरुपयोगी आहे. इतकेंच नव्हे तर त्यास आज इतकें हिडिस स्वरूप प्राप्त झालें आहे कीं त्यानें पाश्चात्यांस संघटित लुटारू बनविलें आहे! तात्पर्य, देशाभिमान हा गुण अनुकरणीय असला तरी तो जातिसंस्थेचें काम करूं शकत नाहीं.

### जातिसंस्था व चतुर्विध पुरुषार्थ

धर्म, अर्थ, काम व मोक्ष हे चार पुरुषार्थ आहेत. परंतु यांपैकीं प्रत्येकाचा अंमल समाजाच्या सर्व अवस्थांमध्यें सारखा नसतो. समाजाच्या बाल्यावस्थेत-रानटी अवस्थेंत—कामाचा अंमल समाजावर असतो. अर्थाला पुरुषार्थ होण्यास समाजाची थोडी उत्क्रांति व्हावी लागते. अर्थ व काम हे अंगभूत पुरुषार्थ समजून धर्माला प्राधान्य येण्यास समाजाची पुष्कळ उत्क्रांति व्हावी लागते. समाजांत आत्मविषयक ज्ञान होऊन व्यवहारांत धर्माचें वर्चस्व कायमचें स्थापित होण्यास समाज पूर्ण उत्क्रांत्यवस्थेस पोचावा लागतो. या अवस्थेंत मोक्ष हा परमपुरुषार्थ मानला जातो. पाश्चात्य समाजांची उत्क्रांति, अर्थ हा पुरुषार्थ मानला जाण्याइतकी झाली आहे. प्रत्येकाला आपापला काम व अर्थ साधतां यावा एवढेंच त्यांच्या समाजाचें ध्येय आहे. समाजांत काम या पुरुषार्थाचें प्राबल्य असतांना सत्ताविषयक विषमता असते. त्याच्यामुळें अर्थाचें प्राबल्य झाल्यानें सत्ताविषयक विषमता पाश्चात्य समाजांत कमी झालेली आहे. पण अर्थाच्या अनिरुद्ध व्यापारानें संपत्तीची, उद्योगधंद्याची विषमता वाढून आर्थिक कलह उत्पन्न झाले आहेत. मिळून विषमता कायम आहे ती आहेच. किंबहुना ती अधिक उग्र स्वरूपांत दिसूं लागली आहे. (The development of our modern industrial system has given us back the essential evils of ancient slavery in a new, and in many ways, an aggravated form. Prof Seth.) ही स्थिति दूर करण्यास नीतिशास्त्राचे नियमांस प्राधान्य देऊन, समाजापुढें नीतीचें व धर्माचें ध्येय ठेवून, उद्योगधंद्याचे प्रश्न सोडविले पाहिजेत; तसे न सोडविल्यास आपली सर्व टोलेजंग भौतिक सुधारणा पार विलयास जाईल अशी पाश्चात्यांस भीति वाटूं लागली आहे. (Unless some way is discovered by which the deep ethical purpose of society can be brought to bear upon industrial questions, all our magnificent material civilization will crumble to ashes in our hands—Internatinal Journal of Ethics).

**पाश्चात्यांत जातिसंस्था केव्हां रूढ होईल ?**

पाश्चात्य समाज आतां धर्म हा पुरुषार्थ मानण्याच्या तिसऱ्या अवस्थेजवळ येऊं लागला आहे. व्यक्तीच्या स्वतःच्या जीवनाचाच विचार करून वाटेल तो उद्योग करण्याचें ध्येय समाजाच्या कल्पनेशीं विसंगत असून अशक्य कोटींतलें आहे हें त्यास कळूं लागलें आहे. जेणेंकरून सर्वांच्या जीवनाची सोय लागेल अशा प्रकारची उद्योगधंद्यांची समता ठेवणें हें सरकारचें काम असल्याचें त्यांस पटूं लागलें आहे. (The state must so far equalise the conditions of industrial life as to secure to each the opportunity of earning an honest livelihood.–Prof. Adams) व्यक्ति व समाज यांचें परस्परावलंबन हाच समाजाचा पाया असें टो म्हणतो व याच पायावर समाजघटना करावयास पाहिजे असें पाश्चात्य लोक आतां प्रतिपादूं लागले आहेत.( The mutual industrial dependence of each on all and of all on each which Plato found to be the basis of society has once more come to constitute a powerful plea for the necessity of political organisation.– Prof. Seth. ) पाश्चात्य लोक आतां स्वधर्मांचे निर्बंधाजवळ येऊं लागले आहेत. मोक्ष हा परमपुरुषार्थ मानणाऱ्या हिंदुसमाजाच्या उत्क्रांतावस्थेस येण्यास त्यांस अद्याप पुष्कळच अवकाश आहे. जातिसस्था त्याच वेळेस त्यांच्यांत रूढ होईल.

**जातिसंस्था व मानवी सद्गुणांचा आदर्श**

मानवी स्वभावांत अनेक सद्गुण आहेत. त्यांपैकीं परस्पर निकट संबंध असलेल्यांचे-एका व्यक्तीत सहज वाढूं शकणारांचे-वर्ग पाडले तर ते ( १ ) आध्यात्मिक (Spiritual) (२) वीर्यशाली ( Heroic ) ( ३ ) औद्योगिक ( Industrial ) ( ४ ) प्रेमळ ( Amiable ) असे होतात.हे सर्व मिळून पूर्ण मानवी स्वभाव होतो. यांपैकीं सर्वांचा वाढ एका व्यक्तींत पूर्णपणें होणें शक्य नाहीं व समाजांत तर हें सर्व प्रकट होणें अवश्य आहे. कारण पूर्ण मानवी स्वभाव समाजांत प्रकट झाला तरच त्या समाजाला पूर्णत्व येईल व प्रत्येक व्यक्तीला आपला आदर्श आपल्या अंगी आणवितां येऊन इतर आदर्शांची ओळख राहील. हे सर्व आदर्श समाजांत प्रकट न झाले तर एकाच विशिष्ट आदर्शाची समाजांत अयोग्य प्रमाणांत वाढ होईल व समाज एकांगी बनेल. अशा समाजांत व्यक्तींची वाढ अपूर्णच होईल. पाश्चात्य समाजांचा नैतिक इतिहास पाहिला तर ग्रीक व रोमन लोकांपासून आतांपर्यंत एकेक विशिष्ट आदर्शच त्यांच्या समाजांत प्रामुख्यानें क्रमशः प्रकट होत आला आहे. ग्रीकांचा प्रेमळ तर रोमन लोकांचा वीर्यशाली आदर्श. पुढें या राष्ट्रांचा लय झाल्यावर ख्रिस्तांचा धार्मिक किंवा तापस (Ascetic.)आदर्श नंतर शार्लेमन राजापासून मर्दुमकी ( Chivalry ) चा आदर्श, पुढें त्याची हास्यास्पद वाढ झाल्यावर औद्योगिक आदर्श अशा क्रमानें हे आदर्श बदलत आले आहेत. ज्याच्या योगानें मान, धन किंवा कोणत्याहि प्रकारचा स्वार्थ साधेल तिकडेच बहुजनसमाजाची प्रवृत्ति होत गेल्यामुळें कोणत्याहि एका काळीं एकच आदर्श बलवान होऊन बाकीचे लुप्त झाले. सध्यां बौद्धिक बाबतींत पाश्चात्यांनीं पूर्वीच्या लोकांवर ताण केली आहे. पण उदात्त स्वभाव व नैतिक गुण या बाबतींत त्यांनीं खास आपली अवनति करून घेतली आहे. ( It is unquestionable that the intellectual superiority is purchased by the sacrifice of some thing of dignity and elevation of character.–Lecky) पाश्चात्य सुधारणेचा ओघ नैतिक प्रगतीच्या अगदीं उलट आहे. मनुष्याचें बौद्धिक व भौतिक सामर्थ्य वाढविणारी कोणतीहि गोष्ट नैतिकदृष्ट्या खात्रीनें अनर्थकारक असली तरी पत्करावयाची या तत्त्वावर पाश्चात्य सुधारणेची इमारत उभारली आहे. ( The entire structure of civilisation is founded upon the belief that it is good to cultivate intellectual and moral capacities even at the risk of certain moral evils which we are often able accurately to foresee. —Lecky.)

या नैतिक अवनतीकडे नेणाऱ्या सुधारणेचा परिणाम कसा घातक होत आहे व तो थांबविण्यास नीतीचा आश्रय कसा करावयास पाहिजे हें त्यांस आतां समजूं लागलें आहे.वरील आदर्शांची साम्यावस्था समाजांत कायमची रहाण्याकरितां ते ज्यांचे योगानें प्रकट होत राहतील अशीं कर्तव्यें करणारे कायमचे वर्ग अगर वर्ण समाजांत असणें इष्ट आहे व याकरितां चातुर्वर्ण्याची योजना आहे. स्वभावांचे आदर्श व्यवसायानें कायम रहातात म्हणून (characters are governed by occupations) या चातुर्वर्ण्यास कायमचे जन्मतः व्यवसाय किंवा स्वधर्म लावून दिले आहेत.

**जातिसंस्था व व्यक्तिस्वातंत्र्य**

पाश्चात्यांनीं समाजांतील व्यक्तींचें परस्परांशीं बंधु-

त्याचें नातें मानलें आहे. हिंदु शास्त्रकारांनीं राष्ट्र व व्यक्ति यांचा संबंध अवयवी व अवयव असा मानला आहे. चार वर्ण हे राष्ट्रपुरुषाचे अवयव आहेत. त्यांतील व्यक्तींचा परस्पर संबंध बंधुत्वापेक्षांहि निकट आहे. या नात्यानें खऱ्या स्वातंत्र्याला बाध तर येत नाहींच; उलट त्याला मदत होते. मनुष्य व्यक्ति ( Individual ) या नात्यानें स्वतंत्र नसून पुरुष ( Person ) या नात्यानें स्वतंत्र आहे असें पाश्चात्य नीतिशास्त्रहि सांगतें. हें स्वातंत्र्य संपादण्यास प्रकृतीच्या आधीनत्वांतून सुटून स्वाधीनत्व ( Law unto oneself ) मिळविण्यास जातिसंस्थेची आवश्यकता आहे. तिच्या अभावीं अहंकार—स्वार्थबुद्धि, भौतिक सुखें-इकडेच मनुष्याची अधिकाधिक प्रवृत्ति होत जाते व तो प्रकृतीच्या पूर्णपणें ताब्यांत जातो. पाश्चात्य सुधारणेचा रोख प्रकृतीच्या आधीन होण्याकडे आहे. आर्य संस्कृतीचा रोख स्वाधीनत्वाकडे आहे. धर्म व नीति संभाळून जितकें भौतिक सुख साधतां येईल तितकेंच मिळवावयाचें या तत्त्वाच्या पायावर आर्य संस्कृतीची उभारणी आहे. खरें समाजहित व खरें स्वातंत्र्य साध्य करण्याची पात्रता या संस्कृतींत आहे व जातिसंस्थेची योजना यासाठींच आहे.

# सृष्टीनें तारलें, यंत्रानें मारलें (?)

( ले.—श्री. पां. वा. गाडगीळ )

" It was the best of times; it was the worst of times "(तें सत्ययुग होतें; तसेंच तें कलियुगहि होतें) असें डिकन्सनें फ्रान्सच्या प्रसिद्ध राज्यक्रांतीच्या पूर्वकालाचें चमत्कृतिपूर्ण वर्णन केलें आहे. हें वर्णन प्रस्तुत कालखंडास तंतोतंत लागू पडतें. मुत्सद्दी व पराक्रमी अशा माणसांना अमुक एक काल सुखाचा अथवा दुःखाचा असा असतच नाहीं हें खरें. सुखाचे दिवस आले कीं, दुःखें ओढून घेण्याच्या त्यांच्या खटपटी चालू होतात; आणि संकट ओढवलें कीं, संकटाशीं झगडणें यांतच त्यांना आनंद वाटतो. दिवाणखान्याच्या सावलींतून उठून अरण्यांत वाघाच्या शिकारीस जाणें आणि स्वदेशांत करमत नाहीं, म्हणून शेजारच्या राष्ट्रांच्या कुरापती काढणे हे खटाटोप पराक्रमी व मुत्सद्दी यांचे करमणुकीचे खेळ असतात. त्यांच्या मानसिक सौख्यास अस्वस्थ वातावरणच हवें असतें. पण सामान्य माणसाचें असें नाहीं. तो सरळ सडकेनें जाणारा, स्वास्थ्यप्रिय असतो. पाऊसपाणी ठीक झालें, पिकें भरपूर आलीं, दूधदुभतें रगड असलें आणि रोगराई, दगेधोपे नसले म्हणजे सामान्य माणसास तो काळ सत्ययुगासारखा आनंदमय वाटण्यास काय अडचण आहे ! म्हणून जगांतील मुत्सद्दी व पराक्रमी माणसें आज चिंतातुर दिसत असलीं तरी सामान्य नागरिकांच्या दृष्टीनें सत्ययुगाचीं लक्षणें आज बहुतेक दृष्टीस पडत आहेत, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

### स्वस्ताईचा पूर

पैशाची पिशवी बरोबर घेऊन बाजारांत गेलें कीं, दूध स्वस्त, तूप स्वस्त, लोणी स्वस्त, धान्य स्वस्त, भाज्या स्वस्त, टांगा-मोटारी स्वस्त, कापडचोपड स्वस्त, जिकडे तिकडे स्वस्ताईस नुसता पूर आला आहे. गिऱ्हाइकाच्या पदरांत माल टाकण्यास दुकानदार पुढे वांधून उभे आहेत—नव्हे शिकारीमागें धावावें त्याप्रमाणें माल घ्या म्हणून गिऱ्हाइकाचा पाठलाग करीत आहेत. आगगाड्या-मोटारींची सोय झाल्यामुळें गंगोत्रीपासून रामेश्वरापर्यंत देवदेवतांच्या गांठीभेटी ऐषआरामानें घेतां येऊं लागल्या आहेत. जगाच्या एका भागांतला माल दुसऱ्या भागांत अगदीं घरबसल्या मिळूं लागला आहे. शेतांत जा, बाजारांत जा, गिरणींत जा, स्वदेशांत पहा, परदेशांत पहा, जिकडे तिकडे भोग्य संपत्तीचा गर्दी उसळली आहे. अमेरिकेंत कापूस खपत नाहीं, म्हणून तो कमी पिकवा अशी ओरड चालली आहे; इंग्लंड, जपान यांचें भुरेख कापड माणसाच्या अंगावर जुलूम करून चढत आहे; कानडांतला गहूं युरोपावर व ऑस्ट्रेलियांतला गहूं हिंदुस्थानावर स्वारी करीत आहे. माणसा-माणसांतील युद्धास मानवजात कंटाळलेली दिसत असून जिकडे तिकडे शांततेचे मंत्रघोष ऐकूं येत आहेत. रोगराई नाहींशी करण्याकरितां राष्ट्रसंघानें वैद्यांचीं कमिशनें नेमलीं असून त्यांना पुष्कळच यश येत आहे. या सर्व देखाव्यास सुवृत्ता न म्हणावें तर काय म्हणावें? अनादि काळापासून माणूस सुखप्राप्तीकरितां सृष्टिदेवीची आराधना करीत होता, ती देवता आतां दीर्घकालानंतर अकल्पितपणें प्रसन्न झाल्यासारखी दिसत आहे. उपासमार, रोगराई आणि यादवी यांनीं हजारों वर्षें गांजून गेलेला मनुष्यप्राणी आज पोटभर जेवून तृप्तीची ढेकर देत असेल, आणि आरोग्य व शांतता यांनीं आनंदून बेहोष झाला असेल असाच तर्क, भूलोकावरील संपत्तीच्या उत्कर्षाचें वृत्त ऐकून, परलोकांतील प्राणी करतील!

### विपत्तीचे तरंग

पण तर्काच्या कसोटीवर घासून सत्ययुग ठरविलेला प्रस्तुत कालखंड अखिल मानव जातीचा प्रत्यक्ष अनुभव पाहूं जातां कलियुगासारखा भासत आहे हें यांतील आश्चर्य होय. तर्क आणि अनुभव यांत येथें जमीन–अस्मानाची तफावत दिसत आहे. भोग्य संपत्तीस जिकडे तिकडे पूर आलेला दिसत असला, तरी ज्या असंख्य मानव जातीनें ती संपत्ति भोगावी तिलाच नेमकी ती दुर्लभ झाली आहे. शीतल जलाशयाच्या मध्यभागीं बसूनहि अंगाचा प्रखर दाह होत असावा, त्याप्रमाणें अन्नवस्त्रांच्या राशीशेजारीं माणूस उपाशीं व अर्धनग्न असा तळमळत आहे. कधीं नव्हे तें धान्य ज्याच्या शेतांत पिकलें तो शेतकरी कर्जाच्या भाराखालीं दडपून गेला असून पोटभर खाऊन धन शिल्लक उरण्याऐवजीं सर्व उत्पन्न सरकारास व सावकारास देऊनहि त्याचें ऋण शिल्लक रहात आहे. व्यापारी, दुकानदार, कारखानदार यांच्या मालाला खप नाहीं; म्हणून नफा नाहीं; व म्हणून ते रोजच्या रोज अधिकाधिक दरिद्री होत चालले आहेत. एका बाजूस शांतिपाठ उच्च स्वरानें गाइलेले ऐकूं येतात, तर दुसरीकडे आपला माल परदेशावर जबरीनें लादण्याकरितां जिकडे तिकडे गुप्तपणानें युद्धाची तयारी चालू असल्याचा वास येत आहे. एकंदरीत सृष्टिदेवी प्रसन्न झाली असूनहि माणसास सुखप्राप्ति करून घेणें साधतेंसें दिसत नाहीं. अभाग्याच्या घरीं कामधेनु आली असतां तिला बांधण्यास येथें जागा नाहीं म्हणून त्यानें ज्याप्रमाणें तिला पिटाळून लावावें तसा मनुष्य आज आपल्या मूर्खपणानें संपत्तीचा अव्हेर करीत असेल काय ? बायको पाहिजे म्हणून देवाची तपश्चर्या करकरून कंटाळलेल्या भक्तानें देव अचानक प्रसन्न झाला असतां भांबावून जाऊन आणि बोबडी वळून ‘ कळत्र दे ’ म्हणण्याऐवजीं ‘ कलह दे ’ म्हणून भांडण मागून घ्यावें, त्याप्रमाणें आज कुबेर दाराशीं आला असतां मनुष्य त्याजपाशीं दारिद्र्य हवें म्हणून हट्ट धरून बसला आहे कीं काय ? सागरांत वडवानळ असावा त्याप्रमाणें संपत्तीच्या महापुरांत आज विपत्ति तरंगत आहे का ?

### देणगी सृष्टीची, वाटणी माणसाची

बाजारांत जाऊन याचें कारण विचारलें म्हणजे उत्तर मिळतें कीं, बाजारांत नाणें नाहीं. बाजारांत धान्य स्वस्त, भाज्या स्वस्त, दूधतूप स्वस्त गाड्या मोटारी स्वस्त; पण ही सर्व स्वस्ताई कोणाला? रोकडा पैसा मोजील त्याला. आणि तो मात्र आज कोणाजवळ उरलेला दिसत नाहीं. धान्य, दूधदुभत सृष्टिदेवतेचें देणें तें तिनें भरपूर दिलें. सृष्टीच्या देणगीची वाटणी करण्याकरितां माणसानें पैशाची युक्ति योजली. पण आज आपल्या या करणींतच मनुष्य फसलेला दिसत आहे. संपत्ति मिळाली, पण तिच्या वांटणीच्या साधनाची पैशाची घडी विसकटली म्हणून माणस संपत्तीपाशीं उपाशीं पडून राहिला आहे. देवानें द्यावें आणि कर्मानें न्यावें अशी त्याची गत होऊन बसली आहे. जवळ पैसा नाहीं, एवढेंच प्रत्येकाला समजतें. पण तो कां नाहीं, याचा चांगलासा उलगडा मुत्सद्द्यांना झाला असला तरी सामान्य माणसास होत नाहीं. आज जसा भोग्य संपत्तीस ऊत आला आहे, त्याप्रमाणें महायुद्धाचे शेवटीं पैशास ऊत आला होता. पण तेव्हां भोग्य संपत्ति नव्हती. आतां भोग्य संपत्तीचे वेळीं पैसा नाहीं. मिळन भट आणि तिथि यांची कांहीं युति जमत नाहीं. पसरट भांड्यांत ओतलेलें स्पिरिट पहातां पहातां उडून जावें अथवा विश्वासानें भरून ठेवलेला रांजण खालच्या गळतीनें गळून गेलेला आहे असें जलप्राशनाचे वेळीं आढळून यावें, त्याप्रमाणें महायुद्धाचे वेळीं पैशानें भरलेले खिसे आज एनवेळीं रिकामे झालेले पाहून सामान्य माणस बुचकळ्यांत पडला आहे. सुकाळी प्रदेशांतून दुष्काळी प्रदेशांत धान्य नेण्याची आज यंत्रयुगांत आगगाडीनें सोय केली, म्हणून माणस आपल्या कर्तृत्वाचे धन्यवाद गातो, तोंच उपाशी कंगाल लोकांनीं दंगाधोपा करूं नये म्हणून बंदोबस्त करण्याकरितां आगगाडींतून सैनिक उतरलेले पाहून तोच माणस भयचकित होत आहे. आपण उपाशी असतां बाहेरचें धान्य गांवांत आणण्याच्या ऐवजीं गांवांतलेंच धान्य ही आगगाडी बाहेर नेते हें पाहून गरीब लोक मनगटें चावीत आहेत. पण त्याजपाशीं पैसा नाहीं, तेव्हां त्यांना धान्य कोठून मिळणार? ज्या पैशानें धान्य घ्यावें तो पैसा कोठून आणावा ?

पैसा मिळण्याचें साधन मोलमजुरी. कष्ट करणाऱ्याला कशाचीहि वाण नाहीं अशी जुनी समजूत आहे. पण आज सर्वच जुन्या समजुतींना तोफेच्या तोंडीं देण्याचा काळ आलासा दिसतो. कष्ट करून पैसा मिळेल; पण कष्ट करायचे कुठें? आणि कशानें ? जमीन मेहनत करावी तर मालकीची जमीन राहिली नाहीं; ज्यानें आपली जमीन पिकविली त्याच्या मालाला गिऱ्हाईक नाहीं. खप नाहीं तर उत्पन्न कशाला काढायचें ? तें काढायचें नाहीं तर मजूर नकोत ! आणि मजूर कोणासच नकोत म्हणून मजुरांना पैसा मिळत नाहीं. मजुरांपाशीं पैसा नाहीं म्हणून त्यांना मालाची खरेदी करतां येत नाहीं. व मालाची खरेदी होत नाहीं म्हणून परत माल खपत नाहीं ! या चक्रव्यूहांतून माणूस कसा बाहेर पडणार ?

### सर्व अनर्थांचें मूळ

सामान्य नागरिकास एक गोष्ट दिसून येते.ती ही कीं, अन्न मिळण्यास जो पैसा हवा व तो पैसा मिळण्यास जी रोजगारी हवी ती माणसाची रोजगारी यंत्रानें काढून घेतली आहे रोज नवनव्या यंत्रांचा शोध लागून माणसाच्या श्रमावांचून संपत्ति निर्मिण्याची पद्धत अधिकाधिक वाढत आहे. मोटारी, आगगाड्या निघाल्यानें, पडक्या घराची दगडमाती वाहून नेणारे मजूर, प्रवासी बैलगाडीवाले, टांगेवाले निकामी झाले. कापडाच्या गिरण्या निघून थोड्या मजुरांत अधिक कापड निघाल्यानें असंख्य कोष्टी निकामी झाले. छापखाने निघाल्यानें जुने नकलकार स्वस्थ बसले. असे एक ना दोन, शेंकडों धंद्यांत यंत्र शिरून त्यानें माणसास त्यांतून हुसकून लावलें आहे. आपल्या यातना कमी व्हाव्या म्हणून माणसानें यंत्रास जन्म दिला. पण तेंच यंत्र आज त्याच्या उरावर बसल्यासारखें दिसत आहे. यापेक्षां, माणसास वाटूं लागलें आहे कीं, यंत्राच्या पूर्वीची स्थितिच एकंदरींत बरी होती. तेव्हां जें पिकेल तें दूरवर नेतां येत नव्हतें. म्हणून सर्वांसच तें खायला मिळत होतें. पैशाचें प्रस्थ आजच्यासारखें मुळींच नव्हतें. पण संपत्ति कमी, अपुरी निपजे, म्हणून माणसानें यंत्र निर्माण केलें. आतां संपत्ति जर भरपूर निपजून ती कोणासच मिळनाशी झाली आहे, तर यापेक्षां अपुरी संपत्ति असली तरी ती सर्वांसच मिळत असलेला यंत्रपूर्व कालच पुरवला असें सामान्य माणसास वाटूं लागलें आहे. माणसास आजच्या आर्थिक गोंधळाचें बेकारी हे स्वरूप चटकन कळतें. काम नाहीं म्हणून पैसा नाहीं, पैसा नाहीं म्हणून अन्न नाहीं, आणि यंत्र आहे म्हणून काम नाहीं. एवं च यंत्र हेंच सर्व अनर्थांचें मूळ आणि बेकारी हें सर्व अनर्थांचें व्यक्त स्वरूप असा आजच्या सर्व घोटाळ्याचा छडा आपल्या कल्पनेनें सामान्य माणूस लावीत आहे. आज जिकडे तिकडे नवीन यंत्रांच्या उपयोगाविरुध्द सर्वत्र लोकमत जें तीव्रतेनें व्यक्त होत आहे त्याचें हेंच कारण होय.

### यंत्राचें ओझें

यंत्राविरुद्ध माणसाला वैताग उत्पन्न होण्यास आणखीहि कारणें झालीं आहेत. यंत्रानें मानवी जीवनाचा सुटसुटीतपणा नाहींसा झाला आहे. जें पहावें तें आपलें प्रचंड प्रमाणानें होतें. गॅसची बत्ती अथवा स्टोव्ह पेटविला कीं एकादे वेळीं घरच पेटतें आणि घरास लागून दुसरें घर व गल्लीस लागून दुसरी गल्ली असल्यानें सारें गांव पेटण्याचा प्रसंग येतो. विजेच्या तारेचा धक्का चुकून लागला कीं एकदम मरणच ओढवतें. आगगाडींत, कारखान्यांतें जरा चूकभूल झाली कीं, पांच पन्नासांचा बळी पडलाच. ऑस्ट्रियाचा राजपुत्र सर्वियाच्या एका क्षुद्र नागरिकानें मारला कीं, एकदम जागतिक युद्धाला सुरुवात आणि कोटयवधि माणसांचा व जगानें पन्नास वर्षें कमाविलेल्या संपत्तीचा, संस्कृतीचा महायज्ञ! हें सर्व या यंत्रयुगापूर्वी नव्हतें व यंत्रयुगांत यंत्रामुळें आलें असें माणसाला वाटतें. एकादें भलें मोठें ओझें डोक्यावर दिलें असतां जसे माणसाचे हेलकावे जावे तसा या यंत्राच्या भाराखालीं माणूस हेलकावे खात असून एका बाजूस गेलेला तोल सावरावयाला जावें तों दुसऱ्या बाजूस त्याला सफा तोंडघशींच पडावें लागत आहे.

### पैशाचा अडसर

जुन्या काळीं अवर्षण पडून ओढवणारा दुष्काळ सर्वपरिचित होता. पाऊसपाणी फाजील होऊन पिकें वाहून जावीं व म्हणून दुष्काळ पडावा असला 'ओला दुष्काळ' हि परिचित होता. पण आज पाऊसपाणी पुरेसें होऊन आणि पिकें मुबलक येऊनहि दुष्काळाची छाया सर्वत्र पसरली हा दुष्काळाचा प्रकार अकल्पित आणि अगम्यच झाला आहे.वहातुकीचीं साधनें नव्हतीं तेव्हां फाजील पीक जेथें येई तेथें तें वाया जाई,आणि न पिके तेथें उपासमार होई. पण आज आगगाड्यांच्या काळीं सुपीक प्रदेशांतून आलेलें धान्य नापीक प्रदेशांत येऊनहि गरीबांना मिळत नाहीं. कां? तर त्यांजवळ 'खरेदी करण्याचें सामर्थ्य'- म्हणजे पैसा नाहीं. म्हणजे आगगाडीनें रस्ता केला पण पैशानें अडसर घातला असा चमत्कार झाला आहे.

पूर्वी दंडधारी राजांपासून दूरवरच्या खेड्याना उपसर्ग पोंचत नसे. पण आजच्या स्वातंत्र्यमय लोकशाहींत सर्व सत्ता धनिकांच्या व विद्वानांच्या ऊर्फ तज्ज्ञांच्या हातीं गेली असून शहरापासून खेड्यापर्यंत सर्वांचें जीवित यंत्रधारी धनिकांच्या चिमट्यांत सांपडलें आहे. पूर्वीचे राजे मूर्ख, आकाशांतील ताऱ्याकडे पाहून आपमतलबी ज्योतिषांच्या सल्ल्यानें धरणीचा कारभार हाकीत. पण आजचे मॅक्डोनाल्डसारखे शहाणेसुर्ते लोकनियुक्त प्रधान बँकांच्या गव्हर्नरांच्या हातच्या कळसूत्री बाहुल्याप्रमाणें वागत आहेत. मानवजातीवर ओढवणाऱ्या संकटास दयाघन ईश्वर निवारतो हा भोळा भाव पूर्वी थोडें तरी समाधान देत होता. पण आज 'विसाव्या शतकांत ईश्वर मेला' असून बँकवाले, मुत्सद्दी, परराष्ट्रीय प्रधान आणि सेनापति या निर्दयांच्या हातीं माणसाचें जीवित व वित्त सांपडलें आहे, व फुलपांखराच्या पायास दोरी बांधून पोरें खेळत खेळत त्याचा छळ करतात त्याप्रमाणें हे सत्ताधारी दीडशें कोट मानव जातीच्या वेसणीस हिसडे देऊन तिच्या जिवाचा खेळ खेळत आहेत.

सारांश, आजचें जागतिक संकट दुसरें कांहीं

नसून ही यंत्ररूपी राक्षसाची भयानक माया आहे. ती या राक्षसास गाडून टाकल्याशिवाय शमणार नाहीं असा निर्णय विचारी गणले जाणारे लोकहि देऊं लागले आहेत. पण सामान्य माणसास जसें यंत्र हें अनर्थावह वाटतें तसें तें मारून टाकणेंहि अशक्य-आपल्या शक्तीबाहेरचें वाटतें. यामुळें तो या संकटापुढें भयभीत व हताश होऊन गेला आहे.

# श्री. शं. रा. दाते यांचा जाहीर सन्मान

पुणें येथील अनाथ विद्यार्थिगृहाच्या लोकसंग्रह छापखान्याचे संचालक **श्री. शंकर रामचंद्र दाते** हे गुरुवार ता. ७ रोजी इंग्लंडहून परत आले. त्यांचा जाहीर सन्मान करण्यासाठीं रविवार ता. १० रोजीं श्रीशिवाजी-मंदिरांत **श्री. न. चिं. केळकर** यांचे अध्यक्षतेखालीं सार्वजनिक सभा, केसरी-मराठा संस्था व प्रेस-ओनर्स असोसिएशन या संस्थांच्या वतीनें जाहीर सभा झाली.

अध्यक्ष आपल्या प्रास्ताविक भाषणांत म्हणाले, " आज तीन संस्थांमार्फत श्री. दाते यांचा सन्मान होणार आहे. त्यापैकीं सार्वजनिक सभेचे ते एक सभासद व गुणी माणसांचा सन्मान करण्याचा सार्वजनिक सभेचा रिवाज म्हणून सार्वजनिक सभा त्यांचा सत्कार करीत आहे. केसरी-मराठा संस्थेनें त्यांचा सत्कार करण्याचें कारण असें कीं, मुद्रण-कला सोपी व्हावी अशाबद्दल लो. टिळकांनीं फार प्रयत्न केले. त्यांना आपली योजना अमलांत आणण्याला वेळ मिळाला नाहीं. परंतु त्यांचें कार्य श्री. शं. रा. दाते यांनीं पूर्ण केलें म्हणून त्या संस्थेतर्फे त्यांचें अभिनंदन करण्यांत येत आहे. प्रेस-ओनर्स असोसिएशनमार्फत त्यांचा सन्मान न व्हावा तर तो कोणीं करावा? कारण त्या धंद्यांत त्यांनीं क्रांति घडवून आणली आहे. ज्या मोनो-टाईप यंत्राचे द्वारें टाईप जुळण्याची त्यांनीं सुधारणा घडवून आणली त्या यंत्राच्या द्वारे तीन दिवसांचे काम एक दिवसांत होईल. या यंत्रामुळें एकट्या महाराष्ट्राचाच फायदा नव्हे तर सर्वांत मोठ्या अशा हिंदी भाषा बोलणाऱ्या प्रांताचाहि फायदा होणार आहे. कारण मराठी भाषा बोलणारे लोक फक्त दोन कोटी आहेत, तर हिंदी प्रांत आठ कोटींचा आहे. मराठीप्रमाणेंच हिंदी लिपी असल्यानें नव्या यंत्रावर हिंदी टाइपहि सुलभतेनें जुळणें शक्य आहे. गुजराथी टाइपामध्यें विशेष फरक नसल्यानें थोडया फरकानें ती लिपीहि या यंत्रावर चालेल.

श्री. दाते यांना छपाईच्या धंद्याची फार दिवसांची आवड आहे व आज त्यांनीं परिश्रम करून मराठी मोनोटाईप करून त्या धंद्यांत मोठी क्रांति घडवून आणली आहे. लो. टिळकांना तशी संधि मिळाली नाहीं. परंतु श्री. दाते यांनीं कंबर बांधून उद्योग केला व त्याचें यश त्यांना मिळालें. श्री. दाते अनाथ-विद्यार्थिगृहांत आल्यानंतर त्यांचा हा हेतु सफल झाला. आजपर्यंत महाराष्ट्रांतील कोणत्याहि संस्थेंतून पाठविले नाहींत इतके विद्यार्थी या संस्थेनें परदेशीं शिक्षणासाठीं पाठविले. यावरून त्या संस्थेंतच कांहीं जादू आहे कीं काय न कळे. नवीन कार्य करण्याचा उत्साह तरुणांना लागतो तो श्री. दाते यांच्यांत होता. व अनाथ विद्यार्थि-गृहांत आल्यावर श्रीमंत इचलकरंजीकरांसारख्यांच्या साहाय्यानें त्यांचा हेतु सफल झाला. त्यांनीं केलेल्या कार्याबद्दल आपणा सर्वांच्या वतीनें मी त्यांचें अभिनंदन करतों. "

अध्यक्षांच्या भाषणानंतर पुणें सार्वजनिक सभा, केसरी-मराठा संस्था, प्रेस-ओनर्स असोसिएशन, सकाळ-कचेरी या संस्थांच्या वतीनें श्री. दाते यांस पुष्पहार समर्पण करण्यांत आले.

# दक्षिणी संस्थानें व हिंदु-कायद्याची सुधारणा

प्रचलित हिंदुकायद्यामध्यें तावडतोब सुधारणा घडून येणें इष्ट आहे हें खरें. तथापि सध्यांची असेंब्लीची घटना, कामाची पद्धत, त्यांतच हिंदुव्यवहार-धर्मशास्त्राच्या पांच उपपंथांचा समावेश, सध्यांच्या राजकीय परिस्थितीमुळें लोकमताची झालेली विमनस्क स्थिति यामुळें सर्व हिंदुस्थानांत एकसूत्री सुसंबद्ध कायदा निर्माण होईल ही फार प्रयासाची व कालांतराची गोष्ट आहे. तथापि संस्थानांची गोष्ट तशी नाहीं; व यापूर्वी म्हैसूर, बडोदें, औंध, भोर इत्यादि अनेक दक्षिणी संस्थानांत कित्येक सुधारणा अंमलांत येऊन व्यवहारधर्मशास्त्राची सुधारणा होऊं लागली आहे. तथापि दक्षिणी संस्थानें हा सर्व एकच मिताक्षरा-शासित प्रांत असल्यानें, सुधारणेच्या बाबतींत कोल्हापूर, सांगली, मिरज, फलटण, औंध, भोर, जत, अक्कलकोट, म्हैसूर, बडोदें इत्यादि सर्वच

पारणें फिटलें व जन्माचें सार्थक झालें असें भक्तमंडळींना वाटल्याशिवाय खचित राहिलें नाहीं.

अशा प्रकारें प्रेमानें व भक्तीनें, उत्साहानें व उल्हासानें उत्सवाचा मुख्य कार्यक्रम आटोपला. तरी झालेल्या कार्याचा आढावा व पुढील कार्याची योजना करण्यासाठीं संध्याकाळीं एक दरबार म्हणजे सभा भरविण्यांत आली. रा. वामनराव नाईक व चाफळ संस्थानचे कारभारी रा. देशपांडे यांनीं भाषणें केलीं. रा. देव यांनीं साहाय्यकांचे आभार मानले आणि मंदिराच्या भवितव्याची चिंता सर्वांनीं जिवाला लावून घ्यावी असें विनविलें. रात्रीं सांगलीचे वकील ह. भ. प. कोटणीस यांचें दोन तास कीर्तन झालें. त्यानंतर पहाटेपर्यंत कीर्तनपोवाड्यांची गर्दी उसळली. जात्रेच्या प्रत्येक स्थानांतून, प्रत्येक दगडांतून, रामचंद्र आणि रामदास हे दोनच शब्द सतत उमटत होते. शनिवारीं सकाळीं मंत्रघोष होऊन वैदिक मंडळींची संभावना करण्यांत आली. दुपारीं पारणें करून रामाच्या भक्तांचा आणि रामदासांच्या दासांचा तो मेळा गांवोगांव परतला, आणि हा अपूर्व सोहळा समाप्त झाला.

# आयर्लंडानें शपथेचा वाद कां माजविला ?

आयरिश फ्रीस्टेटचे नवीन अध्यक्ष इमॉन डी व्हॅलेरा यांनीं राजनिष्ठेच्या शपथेचा जो वाद उपस्थित केला आहे तो ब्रिटिश साम्राज्याच्या इतिहासांत एक क्रांति घडवून आणणार असा रंग दिसत आहे. अठराव्या शतकाच्या अखेरीस अमेरिकेनें बंड करून ब्रिटिश साम्राज्यांतून अंग काढून घेतलें. पण पुढें कोणत्याच साम्राज्यघटकास अमेरिकेसारखें यश लाभलें नाहीं. इ.स.१८००च्या सुमारास कानडांत बंड झालें व ३५ वर्षांपूर्वी दक्षिण-आफ्रिकेंत युद्ध झालें. पण तीं दोन्ही ब्रिटिश सरकारनें मोडून काढून साम्राज्यभंगाचा आलेला प्रसंग मोठ्या हिंमतीनें टाळला. अमेरिकेनें साम्राज्यांतून फुटण्याविरुद्ध पार्लमेंटांत भाषण करीत असतां लॉर्ड चॅथॅम यास इतका उद्वेग आला होता कीं, बोलतां बोलतां मूर्च्छा येऊन तो सभेंतच खालीं पडला व त्या दुखण्यांतून पुनः उठला नाहीं. इतका इंग्रजांना साम्राज्य-संघटनेचा प्रश्न जिव्हाळ्याचा वाटतो. साम्राज्याच्या घटकांना अलीकडे साम्राज्याचें बंधन अडचणीचें वाटूं लागलें असून १९२६ सालीं भरलेल्या साम्राज्य परिषदेंत सर्व घटक हे परस्पर-स्वतंत्र व सारख्या दर्जाचे आहेत असा ठराव झाला तरी देखील इंग्लंडच्या राजासंबंधीं राजनिष्ठेची शपथ घेण्याचा प्रघात अद्यापि शिल्लक असून या नाजूक रज्जूनें साम्राज्य-घटकांस एकत्र बांधून ठेवलेलें आहे.

पण आतां हाहि बंध तोडून टाकण्याचा घाट डी व्हॅलेरानें घातला आहे. डी व्हॅलेरा यानें सशस्त्र बंड केलें असतें तर इंग्लंडनें अथवा आयरिश फ्रीस्टेटनें तें शस्त्रबलानें सहज मोडून टाकलें असतें. पण व्हॅलेरा यानें लोकमताचा आश्रय करून सनदशीर मार्गानें मताधिक्याच्या जोरावर आयरिश फ्री स्टेटचें अध्यक्षपद मिळविलें असून सनदशीरपणेंच राजनिष्ठेची शपथ रद्द करून घेण्याचा डाव टाकला आहे. प्रेसिडेंट डी व्हॅलेरानें उपस्थित केलेल्या वादांत दोन मुद्दे आहेत. पैकीं एक मुद्दा खंडणीचा. ब्रिटिश वसाहतमंत्री मि. थॉमस यांचें म्हणणें असें कीं, ही फ्री—स्टेटनें ब्रिटिश सरकारला द्यावयाची खंडणी नसून आयरिश शेतकऱ्यांना जमिनी खरेदी करण्याकरितां इंग्लंडनें जें कर्ज दिलें त्या कर्जफेडीदाखल द्यावयाची ही रकम आहे. इंग्लंड व आयरिश फ्री स्टेट या राष्ट्रांच्या फडणिसांनीं यासंबंधीं रीतसर करार केला आहे व त्याची चर्चा डेल आयरेनमध्यें झाली आहे. पण डेल आयरेननें ठराव करून त्यास संमति दिली आहे असें कांहीं थॉमस म्हणत नाहींत व तशी संमति मिळाली नसेल तर व्हॅलेरा 'रीतसर करार' झाल्याचें मला माहीत नाहीं म्हणतो तें खरें मानावें लागेल.

पण हल्लींच्या वादांत हा मुद्दा कांहींसा गौण आहे. कारण व्हॅलेरा असेंहि म्हणतो कीं, सावकार या नात्यानें इंग्लंडचें अथवा इतर कोणाचेंहि आपण जें कायदेशीर देणें लागतों तें देण्यास आपली ना नाहीं. वास्तविक एवढाच मुद्दा असता तर साम्राज्यघटनेच्या नियमानुसार एकादें कमिशन नेमून उभयतांना मान्य असा निर्णय पत्करण्यास इंग्लंडहि तयार झालें असतें, निदान इतर साम्राज्यघटकांनीं इंग्लंडला भागहि पाडलें असतें. पण राजनिष्ठेच्या शपथेचा जो मुद्दा व्हॅलेरानें उपस्थित केला आहे तो साम्राज्याचा पायाच उखडून टाकणारा असल्यानें इंग्लंडला व इतर साम्राज्यघटकांनाहि तो मान्य करणें जड जात आहे. उलटपक्षीं आयर्लंडच्या दृष्टीनेंहि हा प्रश्न बिनतोड झाला असावा. प्रे. डी व्हॅलेरा हा कितीहि आडमुठा व भावनाप्रधान असला तरी हा प्रश्न निवळ त्याचा एकट्याचाच नसून सबंध राष्ट्राचा आहे. त्यानें आज मिळविलेलें अध्यक्षपद अचानक छापा घालून मिळविलें नसून क्रांतिकारकांविरुद्ध कायद्याचें अस्त्र जारी

असतांहि राजरोस निवडणुकीच्या मार्गानें तो आज अध्यक्ष झाला आहे. आणि राजनिष्ठेची शपथ रद्द करतों या प्रतिज्ञेवरच त्याला अध्यक्षपद लाभलें आहे. व्हॅलेराचे जागीं दुसरा आडमुठा नव्हे तर खेळी-मेळीचा मनुष्य असता तर आज त्यास व्हॅलेरा-प्रमाणेच वागणें भाग होतें. खरें, डी व्हॅलेरा व त्याचे क्रांतिकारक अनुयायी यांजकडे एकदां राज्यसत्ता गेल्याशिवाय त्यांना व आयरिश जनतेला पूर्ण राजकीय शिक्षण मिळणार नाहीं असें माजी प्रेसिडेंट कॉसग्रेव्ह यांनीहि पूर्वी अनेकदां बोलून दाखविलें आहे. तेव्हां आज शपथेच्या वादांत कॉसग्रेव्ह व्हॅलेराच्या विरुद्ध असला तरी व्हॅलेराला अध्यक्षपद लाभलें यांत कांहीं गैर झालें असें कॉस-ग्रेव्ह यास वाटत नाहीं. आणि अध्यक्ष असेपर्यंत वचनबद्धतेमुळें व्हॅलेरासहि शपथ रद्द करून घेण्या-ची खटपट करणें भागच आहे.

कदाचित् डी व्हॅलेरानें आजच हा वाद उकरून काढण्यांत जरा घाई केली असेंहि ठरण्याचा संभव आहे. कारण केवळ मजूर—पक्षाच्या सहा सभासदांच्या बळावर डी व्हॅलेरा यांस लाभलेलें मताधिक्य अगदींच तोकडें आहे हें उघड आहे. शपथेचा ठराव डेल आयरेनमध्यें येऊन त्याचें पहिलें वाचन मंजूर झालें असलें तरी तो पुढील वाचनांचे वेळीं नापास होण्याचाहि संभव आहे. तसें होऊन मजूर सभासदांनीं दगा दिल्यास व्हॅलेरानें माजविलेला हा वाद एका क्षणांत शांत होऊन कदाचित् त्याचें जगभर हंसेंहि होईल. पण इंग्लंडनें लक्षांत घेण्याची मुद्द्याची गोष्ट ही आहे कीं, डी व्हॅलेरा व त्याचा पक्ष आज पदभ्रष्ट झाला तरी त्यानें हा शपथेचा वाद कायमचा मिटला असें मात्र होणार नाहीं.

यावर कोणी असें विचारील कीं, " राज्य आहे तेथें एकांतिक मतांचे क्रांतिकारक असावयाचेच. आज इंग्लंड, जर्मनी, फ्रान्स, अमेरिका, या देशांत क्रांतिकारक आहेतच कीं नाहीं ? तसेच ते आयर्लंडमध्येंहि आहेत; म्हणून त्यांचे लहरीखातर किंवा त्यांना भिऊन राज्य-घटना चालवावयाची अथवा बदलावयाची कीं काय?" पण हा युक्तिवाद आयर्लंडास तितकासा लागू नाहीं. इतर देशांत क्रांतिकारकांची संख्या थोडी व त्यांना लोकमताचा विरोधहि फार असतो. म्हणून चिखलांत पडलेल्या निखाऱ्याप्रमाणें त्यांची उपेक्षा केली तरी चालण्यासारखें असतें. पण आयर्लंडचा प्रकार वेगळा आहे. तेथें क्रांतिकारकांची परंपरा जुनी आहे, संख्या व संघटना मोठी आहे आणि बहुजनसमाजांत ब्रिटिशांविरुद्ध तीव्र द्वेष असल्यामुळें जनतेचा क्रांतिकारकांना पाठिंबाहि मोठा आहे. यामुळें डेल आयरेनद्वारां शपथ रद्द न झाली तर क्रांतिकारकास लोकमताचा पाठिंबा अधिकाधिक मिळत राहील व ते राज्यकारभारास आंतून व बाहेरून सारखे भुंगे लावून तो पोखरून टाकल्यावांचून राहणार नाहींत. प्रे. डी व्हॅलेरानें राजनिष्ठेची शपथ रद्द करून आयरिश क्रांतिकारकांचें समाधान करण्याचा जो आग्रह धरला आहे त्याचें कारण हें आहे. प्रस्तुत फ्री—स्टेटविरुद्ध बंड करून व्हॅलेरा यास पूर्वी एकदां अपयश आलें आहे. बंडखोर प्रवृत्तींनीं राज्यकारभार अडविण्याचें विध्वंसक कृत्य करतां आलें तरी कोणत्या तरी एका पक्षानें राज्यकारभार हातीं घेऊन लवकर शांतता निर्माण केल्याशिवाय राष्ट्रास स्वराज्याचीं मधुर फळें चाखतां येणार नाहींत हें जाणण्याइतका तो शहाणा खास आहे.

फ्रान्समध्यें सन १७८९ मध्यें राज्यक्रांति झाली ती इष्ट व अपरिहार्य होती. पण फ्रान्सांत लवकरच स्थिर-स्थावर न झाल्यानें बेबंदशाही फार वेळ चालू राहून, जे अनर्थ टाळण्याकरिता राज्यक्रांति करण्यांत आली त्याहून अधिक अनर्थ क्रांतीच्या काळांतच झाले. चिनांत १९११ त राज्यक्रांति झाली. पण अजून अंतर्गत स्वस्थता चिनी लोकांना निर्माण करतां न आल्यानें जपानसारख्या चिमुकल्या राष्ट्रासमोरहि त्यांची आज फजिती होण्याची वेळ आली आहे. उलट रशियन सरकारनें मोठ्या पराक्रमानें क्रांतीनंतर लवकरच सुव्यवस्था व कदर उत्पन्न केल्यानें पूर्वी जगाच्या मागें असलेले रशियन लोक आज जगाला मागें टाकीत आहेत. समाजाचें वैभव वाढावयाचें असल्यास अस्वस्थ वातावरण फार काळ टिकणें चांगलें नाहीं. शांतता व सुव्यवस्था असलेल्या हवेंतच वैभवाची वाढ होऊं शकते. हें जाणूनच, व्हॅलेरानें आपल्या संपूर्ण स्वातंत्र्यवादास बंडानें यश लवकर येणें अशक्य आहे, असें पाहून शस्त्र टाकून दिलें व लोक-मताची कास धरली. डेल आयरेनशीं असहकारिता करूनहि भागेना तेव्हां तो डेलमध्यें शिरला. व आज मताधिक्य मिळवून अध्यक्ष झाला आहे. यांत तो व त्याचे पुष्कळसे अनुयायी यांनीं अत्याचाराचे मार्ग सोडून सनदशीर मार्ग पत्करला हें उघड होतें. इतकेंच नव्हे तर क्रांतिकारक लोक मधूनमधून जे अत्याचार करतात त्यांचा तो तीव्र शब्दांनीं निषेध-हि करीत आला आहे. यावरून क्रांतिकारकांनीं हे वाम मार्ग सोडावे अशी त्याची इच्छा दिसते. राजनिष्ठेची शपथ रद्द करण्याच्या कामीं मतदारांनीं त्यास आज उचलून धरलें व उत्त-रोत्तर या कामीं सनदशीर मार्गानीं यश येत गेलें तर सनदशीर मार्गाची गोडी क्रांतिकारकांसहि लागण्याचा संभव आहे. तसें घडल्यास आयर्लंडांत कोणताहि

पक्ष अधिकारावर असला तरी राज्यकारभारास राज्य-क्रांतिकारक कटांचे आज जें एक संकट होऊन राहिलें आहे तें आपोआप नाहींसें होईल.

या विचारसरणीस आयर्लंडच्या जुन्या इतिहासांतहि दाखला सांपडतो. गेल्या शतकाच्या उत्तरार्धांत 'फेनियन ब्रदरहुड' नामक एक क्रांतिकारकांची संस्था आयर्लंडांत गुप्त कट व खून यांनीं स्वतंत्र होण्याचा प्रयत्न करीत होती. या वेळीं इंग्लिश पार्लमेंटांतील आयरिश सभासदांचें राजकारण इतकें नरम होत कीं त्याकडे स्वातंत्र्याच्या आशेनें पाहणें हें फेनियनांना शुद्ध गुलामगिरीचें वाटे. पार्नेल या प्रसिद्ध पुढाऱ्यानें फेनियनांची ही मनोवृत्ति जाणिली व पार्लमेंटरी राजकारणास तेजस्वी स्वरूप देऊन फेनियनांना आपले बंडाचे उपद्व्याप सोडून पार्लमेंटरी राजकारणाची गोडी लावतां येईल असा कयास बांधला. मग ब्रिटिश पार्लमेंटांतील बहुतेक सभासदांची एकजूट करून त्यानें पार्लमेंटांत तीव्र विरोधाचें व अडवणुकीचें धोरण सुरू केलें. यामुळें खरोखरच पार्नेलच्या कयासाप्रमाणें पुष्कळ कर्तबगार फेनियन पुढारी पार्नेलच्या पक्षास येऊन मिळाले. त्यामुळें पुढें फेनियनांची चळवळहि मंदावत गेली आणि इंग्लंडमध्यें खुद्द ग्लॅडस्टनसारख्या थोर मुत्सद्द्यानें पार्नेलचें हें कौशल्य ओळखून त्याचा पक्ष मोठ्या अभिनिवेशानें उचलून धरिला. पार्नेल यास पुढें जास्त कांहीं करतां आलें नाहीं हा प्रश्न वेगळा. पण त्यानें ज्याप्रमाणें सनदशीर राजकारण तेजस्वी करून फेनियनांस त्याची गोडी लावली तशी आज क्रांतिकारकांस सनदशीर राजकारणाची गोडी लावण्याचें काम, त्यांची बाजू डे व्हॅलेरा आयरेनच्या साह्यानें धसास लावून, डे व्हॅलेरा करीत आहे असे म्हणण्यास कांहींहि प्रत्यवाय नाहीं.

या स्वातंत्र्यवादी क्रांतिकारकांचें प्रस्थ आयर्लंडांत इतकें वाढूं देण्यास इंग्लंडचेंच चारशें वर्षें आयर्लंडांत अमलांत असलेलें जुलमी धोरण कारणीभूत झालें आहे. बाराव्या शतकांत आयर्लंड जिंकल्यानंतर पुढें १४९४ सालीं आयर्लंडच्या पार्लमेंटचें स्वातंत्र्य इंग्रजांनीं पूर्णपणें नष्ट केलें. पुढें इंग्लिश राजांनीं प्रॉटेस्टंट धर्म स्वीकारल्यावर आयर्लंडांतील बहुसंख्य रोमन कॅथॉलिकांचा छळ सुरू झाला. तो उणापुरा अडीचशें वर्षें चालला होता. त्यांना शिक्षण नाहीं, नोकऱ्या नाहींत, व्यापारधंद्यास परवानगी नाहीं; सारांश, जिवंत राहण्याचें कांहींहि साधन आयर्लंडांत त्यांना राहिलें नाहीं. कोणाहि पराक्रमी इंग्रजानें आयर्लंडांत जाऊन इंग्रज सरकारच्या वशिल्यानें जमिनी बळकावाव्या असा शिरस्ताच पडला होता. १६व्या व १७व्या शतकांत खरीं-खोटीं निमित्तें काढून इंग्रजांनीं मोठ्या सैन्यानिशीं आयर्लंडवर स्वाऱ्या करून चारपांच वेळां आयरिश लोकांच्या भयंकर कत्तली केल्या. रोमन कॅथॉलिक लोकांवर इतकी दडपशाही गाजत होती तरी त्यांची धर्मनिष्ठा तीव्र असल्यानें त्यांनीं गुप्तपणे फार मोठ्या प्रमाणावर शिक्षणप्रसार व इतर चळवळी चालविल्या होत्या. तेव्हांपासून आयर्लंडमध्यें गुप्त चळवळींची परंपरा आज तीनचार शतकें चालत आली असून आजतागायतहि ती कायमच आहे. १७८२ सालीं इंग्लंडनें आयर्लंडचें पार्लमेंट आयर्लंडला परत केलें. पण हजार कारस्थानें व लांचलुचपती करून १८०० सालीं तें पार्लमेंट इंग्लंडांत आणून ब्रिटिश मुत्सद्द्यांनीं इंग्लिश पार्लमेंटांत बुडवून टाकलें. हा दोन पार्लमेंटांचा संयोग रद्द करून आपलें स्वतंत्र पार्लमेंट स्थापित करण्याकरितां सतत एकशेंवीस वर्षें इंग्लंडशीं आयर्लंडचा झगडा चालू होता. त्यांत अर्ज, विनंत्या, पार्लमेंटांतील सहकारिता, अडवणूक, असहकारिता, गुप्त कट व सशस्त्र बंड या सर्व चळवळी अगदीं निकरानें झाल्या, पैकीं सनदशीर चळवळ करणाऱ्यांना नेहमीं अपयश येत जाऊन त्यांची इंग्लंडांत, आयर्लंडांत व इतर जगांत विटंबना झाली. सनदशीर चळवळ करणारे पुढारी जें मागत होते तें देऊन टाकण्याची संधि इंग्लंडनें आडमुठेपणानें अनेकवार गमावली आणि शेवटीं सर्व उपाय हरले तेव्हां बंडखोरांशींच उघड तह करून इंग्लंडला सनदशीर पुढारी मागत होते त्याहून पुष्कळच अधिक द्यावें लागलें.

पण त्या राजकीय हक्कांनींहि आयर्लंडचें समाधान झालेलें नाहीं. आयरिश जनतेंत इंग्लंडच्या वर्चस्वाविरुद्ध पांचशातशें वर्षें बसलेली अढी तें वर्चस्व पार उखळून लावल्याशिवाय जाणें शक्य नाहीं, ही गोष्ट आज दहा वर्षे वसाहतीचें स्वराज्य आयर्लंडांत नांदल्यानंतरहि सिद्ध झाली आहे. वसाहतीचें स्वराज्य व्यवहारदृष्टीनें स्वातंत्र्यप्राय आहे हें खरें. पण गेलीं दहा वर्षे वसाहतीचें स्वराज्य भोगूनहि राजनिष्ठेची शपथ रद्द करण्याचा हट्ट आयरिश जनतेनें सोडला नाहीं. त्या हट्टापुढें कोणत्याहि भौतिक हिताहिताचा विचार आयरिश जनतेस श्रेष्ठ वाटत नाहीं. स्वातंत्र्य हें आयर्लंडचें ध्येय असून हें ध्येयवादी मत दडपून टाकण्यांत इंग्लिश व आयरिश सरकारांना यश आलें नाहीं, अशी इतिहासाची साक्ष आहे. जोंपर्यंत हें क्रांतिकारक मतांचें शल्य आयरिश जनतेच्या व सरकारच्या आंतड्यांत सारखें सलत आहे तोंवर आयर्लंडला आरोग्य व वैभव प्राप्त होणें शक्य नाहीं.

साम्राज्यांतील इतर वसाहती इंग्लिश लोकांनीं स्थापिल्या आहेत व त्यांना स्वसंरक्षणाकरितां साम्राज्याचें कवच हवें आहे. पण 'आयर्लंड ही कांहीं' व्हॅलेरा

म्हणतो 'इंग्लिश वसाहत नाहीं', ती इंग्लंडनें जिंकलेली भूमि आहे. या जितपणाच्या वैराची अढी आयर्लंडनें आज सातशें वर्षें कायम राखली आहे. आणि या जितपणाचा पार मागमूससुध्दां नाहींसा होईपर्यंत लोकमतावर प्रभुत्व पावलेले आयरिश क्रांतिकारक वीर स्वस्थ बसतील अथवा आपल्या सरकारला व इंग्रजांना स्वस्थता मिळूं देतील असें वाटत नाहीं. बेल्जम, हॉलंड, स्वित्सर्लंड यांसारखीं लहान लहान राष्ट्रें जर युरोपांत स्वतंत्रपणें सुरक्षित राहूं शकतात तर स्वतःस कलंकभूत वाटणारें साम्राज्य-कवच आपणांस हवें कशाला, असें आयरिश लोकांस वाटतें. अशा वेळीं केवळ साम्राज्याच्या भ्रामक इभ्रतीस्तव आयरिश लोकांच्या काळजांत क्रांतिकारक मतांचें शल्य ठेवून त्यांच्या उन्नतीस विघ्न आणण्यापेक्षां साम्राज्याच्या इभ्रतीचा खोटा अहंकार व शपथेचा आग्रह वेळींच सोडून आयर्लंडला उन्नतीचा मार्ग स्वतंत्रपणें आक्रमिण्यास इंग्लंडनें मोकळीक देणें हें इंग्लंड, आयर्लंड, ब्रिटिश साम्राज्य व इतर जग या सर्वांच्या दृष्टीनें हिताचें आहे. 'जुन्या दुःखकारक आठवणी नकोत' असें जर वसाहत-प्रधान मि. थॉमस यांस वाटत असेल तर त्यांनीं शपथेचा हट्ट सोडण्याबद्दल ब्रिटिश जनतेचें मन वळवून त्यायोगें त्यांच्या पूर्वजांनीं केलेल्या जुलमाचें त्यास पूर्ण प्रायश्चित्त द्यावें. उद्यां कदाचित् आयरिश पार्लमेंटांत डी व्हॅलेराचें म्हणणें नापास होऊन तो पद-भ्रष्ट झाला व शपथेचा प्रश्न तूर्त मिटला तरी अंतःकरणांतून असंतोषाग्नीनें धुमसणारें अस्वस्थ आयर्लंड साम्राज्यांत ठेवून त्याचा अभिमान इंग्लंडनें बाळगणें म्हणजे साप उशाशीं ठेवून झोंप घेण्यासारखेंच आहे.

# हिंडेन्बुर्गच्या निवडणुकीचें महत्त्व

( ले. श्री. शंकर गणेश दवणे )

गेल्या रविवारीं म्हणजे ता. १० एप्रिल रोजीं जर्मनीचे अध्यक्षपदावर फील्ड-मार्शल पॉल व्हॉन् हिंडेन्बुर्ग यांची बहुमतानें निवडणूक झाली. वास्तविक गेल्या महिन्यांतील निवडणुकींतच त्यांस बहुमत लाभावयाचें. परंतु तसें घडून आलें नाहीं. एखादे देशांत लोकशाही कितीहि कां पुढारलेली असेना, ती तशी असली म्हणून त्या देशांतील व्यक्तींची जबाबदारी कमी होते असें नव्हे. ती उलट वाढतच असते. निवडणुकींची दंगल देशभर धूमधडाक्यानें चालली असतां खऱ्याखुऱ्या राष्ट्रभक्ताप्रमाणें देशाच्या आज्ञेची शांतपणें वाट पाहत बसणें हें जर्मनींतील भीष्माचार्यांस जरी शोभण्यासारखें असलें तरी लोकांनीं आपल्या कर्तव्याबद्दलची जाणीव थोडी तीव्रतेनें दाखविली असती तर जर्मनींत परवां झालेल्या निवडणुकीचीहि गरज भासली नसती. तें कसेंहि असो, दंडुकेशाहीचा पुरस्कर्ता हर हिट्लर याचा पराभव करून व आपली सात वर्षांची कारकीर्द संपवून हिंडेन्बुर्ग हे पुनः निवडून आले याबद्दल कोणासहि समाधान वाटेल.

पण हें समाधान युरोपांतील जित राष्ट्रांना निराळ्या तऱ्हेनें वाटतें. जर्मनींत दंडुकेशाहीची स्थापना झाल्यास या राष्ट्रांना त्याबद्दल कांहीं क्षिती वाटेल असें वाटत नाहीं. सध्यांचे आर्थिक हलाखीनें मी मी म्हणविणारीं राष्ट्रेंहि डबघाईस आलेलीं आहेत. इंग्लंड व अमेरिका यांसारख्या राष्ट्रांसहि या हलाखीनें चटका बसविला आहे. तेव्हां अशा स्थितींत आयरिश पुढारी डी व्हॅलेरा हे ज्याप्रमाणें इंग्लंडाची खंडणी नाकारीत आहेत, त्याचप्रमाणें जर हर हिट्लर यानें फ्रान्स, इटाली व इंग्लंड यांची कर्जफेड नाकारली असती तर तें या राष्ट्रांना मानवलें नसतें. तेव्हां जर्मनींतील हिंडेन्बुर्ग यांचे निवडणुकीचे योगानें या राष्ट्रत्रयीनें समाधानाचे सुस्कारे सोडले असतील यांत नवल नाहीं. हिंडेन्बुर्ग हे वृद्ध, विचारी व अनुभवी असल्यानें त्यांचा गेल्या सात वर्षांतील कारभार जर्मनीची इभ्रत वाढविणारा असाच झाला. व्हर्सेलिसचे तहानें जे जे निर्बंध जर्मनीवर घालण्यांत आले ते सर्व मान्यतेने संभाळून, युद्धकर्जाचे हप्ते भरून जर्मनीचा लौकिक त्यांनीं कायम राखला यांत शंका नाहीं.

*

# जातिभेदाचें इष्टानिष्टत्व

## लेखांक ५ वा

( ले. श्री. गो. रा. राजोपाध्ये, बी. ए. )

मनुष्याचें ध्येय कोणतें या बाबतींत पाश्चात्य नीतिशास्त्रज्ञांचीं तीन मतें आहेत (१) विषयसुख संपादन करणें ( Hedonism ), (२) केवळ बुद्धितंत्र होऊन वागणें (Rationalism), (३) शील वाढविणें, आत्मोन्नति करणें ( Eudoemonism ). पहिलें मत धारण करणारांनीं मनुष्य हा मुख्यतः संवेदनात्मक प्राणी ( Creature of sensibility ) आहे असें मानलें आहे. दुसऱ्या मताचे लोक मनुष्य हा केवळ बुद्धिविशिष्ट ( simply a rational being) प्राणी आहे असें मानतात. वास्तविक पाहिलें असतां मनुष्याच्या अंगीं संवेदना व बुद्धि या दोन्हींपैकीं एकच किंवा फक्त दोनच नसून याशिवाय आणखी कांहीं आहे. या दृष्टीनें पहिलीं दोन मतें चुकीचीं ठरतात. मनुष्याचे अंगचे सद्गुण वाढविणें—पशुवृत्ति सोडून देववृत्ति अंगीं आणणें हें तिसऱ्या मतवाल्यांचें ध्येय आहे व तेंच बरोबर आहे. दुसऱ्या मताचे लोक फारसे नाहींत. पहिल्या मताचेच लोक फार. त्यांचें व्यक्तित्वाचें नीतिशास्त्र (Ethics of individuality) व्यक्ति व समाज यांत विरोध उत्पन्न करणारें आहे. मनुष्य हा समाजनिष्ठ प्राणी असल्यामुळें हा विरोध उपस्थित करणारें नीतिशास्त्र कुचकामाचें आहे. (It is not proper to oppose society to individual—Martineu ) वैयक्तिक व सामाजिक अशीं एकाच जीवनाचीं दोन अंगें आहेत. या दोन्ही अंगांचा एकजीव करणारें आत्मत्वाचें नीतिशास्त्र (Ethics of personality) यासच श्रेष्ठ स्थान दिलें पाहिजे. यांत सुखास स्थान नाही असें नाहीं. पण तें आनुषंगिक आहे. तथापि सुखाच्या पाठीमागें लागून जें सुख मिळतें त्यापेक्षां आत्मोन्नतीच्या मार्गानें आत्मवशता प्राप्त होऊन मिळणारें सुख अनेक पटींनीं श्रेष्ठ आहे. जातिसंस्थेनें या सुखाचा मार्ग निर्वाहाची विवंचना दूर करून मोकळा तर केला आहेच. शिवाय त्या मार्गानें प्रगति करण्याचीहि व्यवस्था आश्रमधर्मानें केली आहे. पाश्चात्य समाजांत अशी आत्मवशता कोणासच साधतां येत नाहीं. ( Both the rich and the poor, educated and uneducated, lose opportunity for that self-fulfilment which is the aim of freedom- Nevinson ).

### जातिसंस्था व व्यक्तिस्वभाव

व्यक्तिहित म्हणजे संपत्तिसंपादन नसून व्यक्तीच्या स्वभावाची वाढ व आत्मिक उन्नति हेंच होय. संपत्तिसंपादन ( to have ) हें पाश्चात्य सुधारणेचें ध्येय आहे व आत्मोन्नति ( to be ) हें आर्यसंस्कृतीचें ध्येय आहे. प्रत्येक पिढी पुढील पिढीला आपली संपत्ति देऊं शकत नाहीं. पण आपली उच्च मनोवृत्ति वगैरे आत्मिक गुण संक्रान्त करूं शकते. त्यामुळें आर्यसंस्कृति जितकी स्थिर आहे तितकी पाश्चात्य संस्कृति नाहीं. आर्यसंस्कृतीनें व्यक्तीच्या स्वभावाची वाढ एकेका विशिष्ट आदर्शाला अनुसरून करण्याची योजना केली आहे. मग तो आदर्श कोणताहि असो. व्यक्तिस्वभावाचा आदर्श दोन गोष्टींवर अवलंबून असतो. ( The type of individual character depends partly upon inner temperament and partly upon external circumstances-Lecky) एक अन्तःप्रकृति व दुसरी बाह्य उपाधि. अन्तःप्रकृतींत पूर्व जन्मींचे संस्कार व अनुवंश (heredity) यांचा व बाह्य उपाधींत शिक्षण, परिस्थिति व व्यवसाय यांचा समावेश होतो. आर्य—संस्कृतीनें व्यक्तीच्या स्वभावाच्या वाढीच्या दृष्टीनें या सर्व गोष्टींचा ओघ एकाच आदर्शाकडे राहील अशी योजना केली आहे. यांत सृष्टिनियमांचा फायदा घेण्याचें शहाणपण आहे. पूर्वजन्मींचे संस्कार ठरलेले असतात, ते जन्मानें व्यक्त होतात. जन्मानें व्यक्त झालेल्या गुणकर्माप्रमाणें आनुवंशिक संस्कारहि आईबापांकडून प्राप्त होतात. शारीरिक गुण आईबापांपासून मिळतात यांत फारसा वाद नाहीं. शरीर व मन यांचा परस्परसंबंध असल्यामुळें शारीरिक गुणांबरोबर मानसिक गुणहि आईबापांपासून प्राप्त होतात हें मान्य करणें कठिण नाहीं. (Emotions are what are inherited–Max Nardau ). मुलाची परिस्थितिहि आईबापांसारखीच सामान्यतः असते व तो आपलें प्राथमिक शिक्षण त्यांचे-

पासूनच घेत असतो. या गोष्टी निश्चित असल्यावर त्याचा व्यवसाय त्यास अनुसरून असण्यांत सौकर्य आहे व त्या व्यवसायाविषयीं त्याची कर्तव्यबुद्धि उत्पन्न होण्याची शक्यता आहे. अशा प्रकारें स्वधर्माचे निर्बंध घालणारी जातिसंस्था व्यक्तिस्वभावास अनुकूल अशीच आहे.

**जातीसंस्था व उत्क्रांति**

स्वधर्माचे निर्बंध जन्मावरून-जातीवरून निश्चित करावयाचे तर जातीहि निश्चित असावयास पाहिजेत. जन्म या कार्याचे जनक आई व बाप हीं दोघें असतात. तीं एका जातीचीं असलीं तर जातीचा निश्चय चांगला होईल; याकरितां सजातीय विवाह अवश्य आहेत. तसेंच एका विशिष्ट आदर्शाला धरून स्वभावाची वाढ करण्यास व तो आदर्श कायम राखण्यासुद्धां सजातीय असणें अवश्य आहे. (To preserve a type, true breeding is essential–Watson ) समाजात जाति असणें हें उत्क्रांतीचें लक्षण आहे. मात्र त्या जाती नियत व संश्लिष्ट असल्या पाहिजेत. एकंदर विश्वांत द्रव्य आणि गति असे दोन पदार्थ आहेत. द्रव्याची प्रथमावस्था अनियत व असंश्लिष्ट अशा एकजातित्वाची असते. ती जाऊन त्यांस क्रमानें नियत व संश्लिष्ट अशा विजातीयत्वाची अवस्था प्राप्त होत असते. त्याच्या उलट प्रकार गतीचा असतो. अशा प्रकारचें द्रव्याचें संकिरण व गतीचें विकिरण यास उत्क्रांति म्हणावें अशी स्पेन्सरची उत्क्रांतीची व्याख्या आहे. (An integration of matter and concomitant dissipation of motion during which the matter passes from an indefinite, incoherent homogeneity to a definite, coherent heterogeneity and during which the retained motion undergoes a parallel transformation. ) ही व्याख्या सर्व संघटनांना (Organisms) लागू पडते. शरीराचीं निरनिराळीं कामें करणारे अवयव प्रारंभींच्या कृमिशरीरांत व सर्पशरीरांत व्यक्त होत नाहींत. मानवी शरीरांत विशिष्ट कार्यनिर्वाहक भिन्न भिन्न अवयव स्पष्टपणें व्यक्त होतात. म्हणून मानवी शरीर उत्क्रांत होय. याच न्यायानें विशिष्ट कार्यनिर्वाहक विजातीय वर्ग पाश्चात्य समाजांत स्पष्ट व्यक्त नाहींत व हिंदुसमाजांत ते व्यक्त आहेत म्हणून हिंदुसमाज अधिक उत्क्रांत आहे.

उद्योग-धंद्यांची समविभागणी करण्यानेंच पाश्चात्यांपुढील प्रश्न सुटणार आहे. ( The solution of the industrial problem can only be found in the decentralisation of industries—Wellock ) हिंदुसमाजांत अशी समविभागणी आधींच झाली आहे. समाजांतील व्यक्तींची समता स्थापित करण्यांत पाश्चात्यांनीं आजपर्यंत धडपड केली. यापुढें ते समाज–घटनेचे प्रयोग करून पहात आहेत. हिंदुसमाजाने समतेच्या पायावर आपली घटना पूर्वीच केली आहे; याहि दृष्टीनें हिंदुसमाज अधिक उत्क्रांत आहे.

**जातिसंस्था व समाजसत्ता**

( Socialism ) जातिसंस्था ही कोणाची स्वयंसत्ता ( Status ) कायम राखण्याकरितां निर्माण झाली नाही. तात्त्विक समतेस व्यावहारिक स्वरूप देण्याकरितां निर्माण झाली आहे. सध्यां पाश्चात्य समाजांत समाजसत्तावाद जोरानें व झपाट्यानें प्रसार पावत आहे. या वादाचे मुख्य प्रकार स्टेट सोशिॲलिझम, अनार्किझम, कम्युनिझम, सिंडिकॅलिझम, गिल्ड–सोशिॲलिझम असे आहेत. समाजघटनेचे हे निरनिराळे प्रयोग पाश्चात्य समाज करून पहात आहेत. बोल्शेव्हिझम् हा त्यांतलाच प्रकार आहे. या समाजिष्टांनीं मोक्षप्राप्तीचा विशिष्ट मार्ग या नात्यानें धर्माला गचांडी दिली असली तरी सर्व समाजांचे हिताला व्यक्तिहितापेक्षां प्राधान्य देऊन समाजधारणा करणारा या अर्थानें धर्माचा त्यांनी आश्रय केला आहे. अर्थात् पाश्चात्य समाजांची ते प्रगतीच करीत आहेत. हिंदुसमाजाइतकी त्यांची प्रगति मोक्ष हा परमपुरुषार्थ ते मानूं लागतील तेव्हांच होईल. जातिसंस्थायुक्त समाजरचना वरील सर्व प्रकारांच्या पुढची आहे. संपत्तीच्या उत्पादनाचें सर्व काम सरकाराकडे असावें असें स्टेट सोशिॲलिझम् म्हणतो, तर सरकार मुळींच नको असें अनार्किझम् म्हणतो. जातिव्यवस्थेनें किंवा वर्णसंस्थेनें सरकार कायम ठेविलें आहे,पण इतर वर्णांतच त्याला एक स्थान देऊन त्याची अंतिम सत्ता काढून घेतली आहे व ती धर्माला दिली आहे. अशा प्रकारें स्टेट सोशिॲलिझम् व अनार्किझम् यांतील ग्राह्य अंश घेऊन त्यांचा सुंदर मेळ वर्णव्यवस्थेनें घातला आहे. कम्युनिझम् हा संपत्तीची समविभागणी करण्याकरितां खाजगी मालकीचें तत्त्व झुगारून देतो; पण त्यामुळें सम्पत्तीच्या उत्पत्तीची प्रेरणाच खुंटून जाते. जातिसंस्थेनें संपत्तीची साक्षात् समविभागणी न करतां संपत्त्युत्पादनाच्या साधनांची सम-विभागणी केली आहे. त्यामुळें खाजगी मालकीचें तत्त्व व संपत्त्युत्पादनाची प्रेरणा कायम राहून संपत्तींत विषमता उत्पन्न होत नाहीं. सिंडिकॅलिझम, गिल्ड—सोशिॲलिझम् संपत्त्युत्पादनाचें सर्व काम मजुरांकडेच देतात. त्यामुळें मजुरांचीच एक प्रकारची आर्थिक सत्ता

समाजावर राहते. पण मजुरांस अन्य गोष्टींचा विचार करण्यास फारशी सवड नसल्यामुळें ही सत्ता अविचारानें दूषित होण्याचा संभव फार असतो. जातिव्यवस्थेनें अशी सत्ता मजुरांस न देतां त्यांचे हाल चुकविले आहेत. थोड्या श्रमांत पुष्कळ माल उत्पन्न करणारीं यंत्रें तोंपर्यंतच चांगलीं कीं जोंपर्यंत तीं दुसऱ्यांच्या निर्वाहाचें साधन नाहींसें करून त्यांस मजूर बनवीत नाहींत. या मर्यादेपलीकडील यंत्रें पाश्चात्य समाजांत आहेत; त्यामुळे मजुराची संख्या तिकडे वाढतच जात आहे. समाजघटनेचा वरील-पैकीं कोणताहि प्रकार घेतला तरी तेवढ्यानें मजुरांची संख्या थांबणार नाहीं. जातिसंस्थायुक्त समाजांत मजुरांची संख्या होतां होईल तो कमीच राहणार हें उघड आहे.

### उपसंहार

जातिसंस्था हिंदु समाजांत अनादि' म्हणजे वेद-कालापासून आहे. फार प्राचीन काळापासून हिंदुसमाज त्यागपूर्वक भोग घेत आला आहे. त्यागपूर्वक भोग म्हणजे यज्ञशिष्ट अमृताचा भोग. हें अमृत पिऊन हिंदु समाज अमर झाला आहे. पण अमृत त्यानें टाकून दिल्यास त्याचें अमरत्व टिकणार नाहीं. जातिसंस्थेनें हिंदु समाजाचें अहित झाले असा इतिहासाचा दाखला नाहीं. उलट जातिधर्म झुगारून दिल्यामुळें सध्यांची पारतंत्र्याची स्थिति आली असें म्हणतां येईल. हिंदु समाजानें आपापले जातिधर्म सोडून परकीय सत्तेशीं सहकारिता केली हे पारतंत्र्याचें मुख्य कारण आहे. जातिधर्म संभाळले असते तर ती असहकारिता झाली असती व परकीय सत्ता दृढमूल झाली नसती, व उद्योगधंदे कायम राहिले असते. पाश्चात्य समाजघटनेचें अनुकरण हिंदुसमाजानें करण्याचें कांहीं एक कारण नाहीं. कांहीं जातिधर्म सध्यांचे स्थितींत अशक्य असले तरी आपद्धर्म म्हणून कांहीं तरी सवड ठेविलीच आहे. तिचा फायदा पुनः घेऊन पूर्वस्थितीवर जाण्याकडे हिंदु समाजानें दृष्टि ठेविली पाहिजे. हिंदु समाजावर आलेलें संकट प्रासंगिक आहे.परंतु त्याची घटना मात्र कायमची आहे. घटना कायम ठेवून संकटनिवारण करणें शक्य आहे. तसे करण्यास अवधि लागला तरी चालेल पण सर्वांशीं हितकर व कायमची अशी घटना फेंकून देण्यांत अनर्थ आहे.व्यवसायाकरितां जातिधर्म पाळावे व राष्ट्रकार्याकरितां योग्य ते कोणतेहि उद्योग करावे असा सध्यांच्या परिस्थितीचा प्रश्न महात्मा गांधींनीं सोडविला आहे तो लक्षांत ठेवण्यासारखा आहे. जातिधर्मांचें विधान करणारी मनुस्मृतीची प्रत कोणीं जाळली तरी त्यांचें तत्त्व कोणाला जाळतां येणार नाहीं. तें अमर आहे व जातिधर्म शाश्वत आहेत. कुलधर्म, कुलसंस्था, विवाहसंस्था यांचाहि विचार असाच आहे. पण स्थलसंकोचास्तव यांचा विचार किंबहुना जातिसंस्थेचाहि अधिक विचार आंखडता घ्यावा लागला.

# प्रासंगिक बोल

**मुंबई सरकारच्या परागतिक सूचना**

मतदानाच्या अधिकाराचें क्षेत्र किती विस्तृत करावें, तो हक्क कोणाला द्यावा, संयुक्त मतदार-संघ असावे कीं नसावे, स्त्रियांना सदर बाबतींत अधिक अधिकार द्यावे कीं नाहीं वगैरे प्रश्नांवर मुंबईसरकारचें जें मत प्रसिद्ध झालें आहे, तें पाहिल्यास त्यांच्या पुच्छप्रगतीच्या प्रेमाचें कौतुक करावेंसें वाटतें. नव्या राजकीय सुधारणा जाहीर करून लोकशाहीचे व प्रातिनिधिक राज्यपद्धतीचे हक्क लोकांना द्यावे असें मॉंटेग्युसाहेबांनीं १९१७–१८ सालीं जाहीर केल्या-पासून मुंबई सरकारानें धडाडीनें मद्रासप्रमाणें कोणतीहि सुधारणा सुचविली आहे असें आजपर्यंत झाल्याचें माहीत नाहीं. राजकीय प्रगतीची हौस, लोकशाहीचें प्रेम व सुधारणांबद्दलची दीर्घसूचना या सर्वांचा अत्यंताभाव आल्यामुळें सदर बाबतींतील त्यांच्या बुद्धीचें क्षेत्र सहारा वाळवंटा-प्रमाणें रूक्ष वाटतें. त्यांच्यांत कसलाच ओलावा नाहीं. एखादा सांगकाम्या मनुष्य केवळ शब्दशः हुकुमाची अंमलबजावणी करतो तशीच मुंबई-सरकारची स्थिति आहे. मतदान कमिटीला लोक-संख्येच्या १०-११ टक्के मतदार असावे असें वाटलें, मतदानाचा हक्क असण्यास कर भरण्याचें जे प्रमाण असतें तें निम्में केलें व लोकसंख्येच्या १०–२९ टक्के भरतील इतके नवे मतदार तयार केले ! वयांत आलेल्या प्रत्येक मनुष्यास मतदानाचा हक्क असावा हें ध्येय बाजूला राहिलें. परंतु गोल-मेज परिषदेच्या मतदानकमिटीची २५ टक्केपर्यंत मतदारांची संख्या वाढविण्यास हरकत नाहीं ही शिफारसहि मुंबईसरकार विसरलें ! स्त्रियांना मतदानाचा अधिकार विस्तृत व्हावा हीहि गोष्ट आमच्या मुंबईसरकारास पटत नाहीं. प्रत्येक मत-दाराच्या पत्नीस हा अधिकार असावा अशी सूचना एका नवऱ्याला एकापेक्षां अधिक बायका करण्याचा हक्क आहे या सबबीवर फेटाळली गेली!

मतदानाला काहीं तरी शिक्षण पाहिजे अशा तऱ्हेच्या सूचनांचाहि विचार झाला नाहीं. ज्यांना आज मतें नाहींत व कर भरणें हाच मतदानाच्या हक्काची खूण समजली जाते तेथपर्यंत ज्यांना मत नाहीं अशांचे गट करून त्यांना अप्रत्यक्ष मतदानाचा हक्क यावा हेंहि त्यांना पटलें नाहीं. मुंबईसरकारच्या या मतांची छाननी होऊन या प्रांताच्या सरकारला त्यांच्या परागतीबद्दल जाब विचारावयास पाहिजे.

* * *

परंतु, यापेक्षां आश्चर्याची गोष्ट म्हणजे संयुक्त अगर स्वतंत्र मतदारसंघाबद्दलची त्यांची योजना होय. मुसलमानांना स्वतंत्र संघ द्यावे किंवा नाहीं हा प्रश्न बाजूस ठेवला तरी, पूर्वास्पृश्य, अँग्लो-इंडियन व देशी ख्रिस्ती यांची वाट काय करावयाची हा प्रश्न होताच. पूर्वास्पृश्याची लोकसंख्या १७५०४२४ आहे व आज त्यांच्यापैकीं २९९२८ मतदार आहेत. देशी ख्रिस्ती लोक २७४०३७ आहेत व त्यांच्यापैकीं १६८४७ मतदार आहेत. परंतु मुंबईसरकारनें असें ठरविलें आहे कीं, पूर्वास्पृश्यांना स्वतंत्र मतदारसंघ द्यावे. संयुक्त मतदारसंघ देऊन त्यांना ठरीव राखीव जागा निश्चित द्याव्या, ही गोष्ट अस्पृश्यांच्या बाबतींत सरकारास मान्य नाहीं. पण देशी ख्रिस्ती लोकांना मात्र संयुक्त मतदार संघ देऊन कांहीं ठरीव जागा त्यांच्याकरितां राखून ठेवाव्या असें सरकारनें ठरविलें आहे! मुंबईसरकारच्या मताच्या विचित्रपणाचें हें कोडें त्यांनीं दिलेलीं सर्व कारणे वाचूनहि सुटत नाहीं. अँग्लो-इंडियन्स तर जातभाई. त्यांना स्वतंत्र मतदारसंघ दिले गेले असल्यास नवल नाहीं. लोकसंख्येच्या मानानें प्रत्येक ज्ञातिसंघास जागा मिळाव्या हेंहि मत अमान्य ठरलें. परंतु एकच लोकसभा न ठेवतां, बड्या लोकांची आणखी एक सभा असावी हें मत मात्र मुंबई सरकारनें उचलून धरलें आहे. मुंबई सरकारच्या शिफारशी त्यांच्या कारणासुद्धां प्रसिद्ध झाल्यावर यांतलें बरेंसचें इंगित समजेल.

# भरतखंडाचा महिमा

हिंदुस्थानाच्या पूर्ववैभवाचीं स्तुतिस्तोत्रें हिंदवासीय गातात यांत कांहीं नवल नाहीं; परंतु अन्यदेशीय निःपक्षपाती विद्वानहि तेंच काम मुक्तकंठानें करीत असतात. रेव्हरंड वुइल हेज या लेखकानें भरतखंडाचा महिमा वर्णिला आहे आणि विशेष हें कीं तो पोकळ विशेषणांनीं वर्णन न करतां रोकड्या माहितीवर उभा केला आहे. हिंदुस्थानाला मोठेपणा येण्याचीं कारणें त्या लेखकानें पुढीलप्रमाणें दिलीं आहेत.—

(१) पांच हजार वर्षांपूर्वी हिंदुस्थानांत कुशल रचनेचीं शहरें पुष्कळ असून त्यांतील प्रत्येक घराला स्नानगृह जोडलेलें असे.

(२) जगांतील एक थोर कायदेपंडित मनु हा हिंदभूमीच्या कुशींत जन्मास आला.

(३) आयुर्वेदशास्त्राचा आरंभ हिंदुस्थानांत झाला व त्याचा पगडा अरबस्थान व ग्रीस या देशांच्या द्वारें सर्व पाश्चात्य राष्ट्रांवर बसला.

(४) प्राचीन कालापासून शस्त्रक्रिया चालू होती. शल्यतंत्राचे १२७ प्रकार पुरातन ग्रंथांत नमूद केले आहेत.

(५) दशांश अपूर्णांकांची पद्धत व त्रिकोणमिति हिंदुस्थानानें शोधून काढली.

(६) अंकगणित, भूमिति, इत्यादि प्रकारच्या गणितशास्त्रांत भारतवर्षीय लोक पुढारलेले होते. त्यांना पायथॉगरसचा सिद्धान्त त्याच्या जन्माआधीं दोनशें वर्षे माहीत होता.

(७) ३००० वर्षांपासून त्यांना खगोलशास्त्र अवगत होतें.

# दिल्लींत राष्ट्रीय सभेची वीज चमकून गेली !

गेल्या दोन दिवसांत हिंदी राष्ट्रीय सभेसंबंधानें जो प्रकार घडला तो त्या संस्थेच्या इतिहासांत अत्यंत अद्भुत असा होय. या अद्भुततेच्या दृष्टीनें त्या इतिहासांतील पूर्वीचे चार–दोन प्रसंगहि नमूद करण्यासारखे आहेत. मात्र त्यांतील प्रत्येकाची अद्भुतता वेगवेगळ्या प्रकारची ठरते. पहिला प्रसंग १८८९ सालीं मुंबई येथें भरलेल्या राष्ट्रीय सभेचा. त्या सालच्या संख्येइतकेच प्रतिनिधि, योगायोगानें, त्या अधिवेशनाला हजर होते. त्या काळच्या मानानें ती संख्या खरोखरच प्रचंड होय. पण या संख्येपेक्षा त्या वेळच्या खऱ्या उत्साहाचें कारण म्हणजे मि. चार्लस ब्रॅडलॉ साहेबांचें सभेला आगमन हें होय. मंडपाच्या बाहेरहि दूरवर ऐकूं जाणार त्यांचें खणखणीत वक्तृत्व लोकांना, आकाशांतून एखाद्या देवदूतानें तुतारींतून बोलावें त्याप्रमाणे, दिव्य वाटलें. ब्रॅडलॉ हे तत्कालीन पार्लमेंटरी पक्षांपैकीं अत्यंत स्वतंत्र व अत्यंत उदार मतवादी अशा एका लहानशा पक्षाचे पुढारी. पण त्यांचा दरारा पार्लमेंटला फार वाटे. आज डी व्हॅलेरा यानें राजनिष्ठेची शपथ काढून टाकण्याचा धाक घातला असता तो जसा साम्राज्यवाद्यांना दहशत उत्पन्न करणारा झाला आहे, त्याप्रमाणें पार्लमेंटांत बसतांना प्रत्यक्ष देवाच्या नांवानें शपथ न घेण्याचा ब्रॅडलॉ यांचा सत्याग्रह त्रिखाऊ धर्मनिष्ठांच्या त्या सभेंत क्षोभजनक झाला. पण शेवटीं भाग्यानेंच कायद्याला जिंकलें, व कायद्यानेंच माणसाशीं मिळतें घेतलें.

अशा कीर्तिमान मुत्सद्यानें मुंबईहून जाण्यापूर्वी एक चिरस्मरणीय वाक्य हिंदी लोकांना शिकविलें तें "गव्हर्न्मेंट ऑफ दि पीपल, फॉर दि पीपल अँड बाय दि पीपल" हें होय. यांतील मुख्य शब्दाच्या तीन जोड्यांत एकंदर स्वराज्यतत्त्वज्ञानाचें मर्म सांठविलेलें आहे; व हिंदी लोकांना तें प्राप्त करून देण्याकरितां ब्रॅडला साहेबांनीं, लोकनियुक्त कायदेकौन्सिलासंबंधीं एक बिल विलायतेस परत जातांच आपण पार्लमेंटांत आणूं असें जाहीर केलें. हिंदुस्थानाला स्वराज्य मिळण्याच्या त्या वेळच्या मार्गावर कायदेकौन्सिल हें एक महाद्वार आहे असें लोकांना वाटे. पण त्या द्वाराचीं कवाडें लावून घेऊन सरकारानें त्यांना अडसर घातला होता. 'तो अडसर मी काढणार' अशी ग्वाही छातीवर हात ठेवून पुकारणाऱ्या त्या माणसाबद्दल त्या वेळीं किती कौतुक वाटलें असेल, व असा साहाय्यकर्ता स्वतः ज्या राष्ट्रीय सभेच्या अधिवेशनांत उपस्थित झाला त्या सभेची अद्भुतता हिंदी लोकांना किती वाटली असेल, याची कल्पना कोणीहि करावी.

यानंतरचा दुसरा अद्भुत प्रसंग सजोड असून तो १९०६ सालच्या कलकत्ता येथील व १९०७ सालच्या सुरत येथील राष्ट्रीय सभेच्या अधिवेशनांचा होय. १८८९ सालच्या सभेला ब्रॅडलॉ यांच्या व्यक्तिमहात्म्यानें जसा अद्भुतपणा आला होता, तसाच कलकत्ता येथील सभेला महर्षि दादाभाई नवरोजी यांच्यामुळेंहि आला होता. १८८९ च्या सभेंत "लोकनियुक्त कायदे कौन्सिलाचें बिल" या शब्दांनीं जशी नेमस्त भावनेची वीज चमकून गेली, तशीच कलकत्त्याच्या सभेंत दादाभाई यांच्या एका वाक्यानें जहाल भावनेची वीज चमकून गेली. तें वाक्य असें "मी जन्मभर इंग्रज राज्यकर्त्यांच्या हातून इतक्या निराशा भोगल्या कीं मी तरुण असतों तर आज बंडच पुकारलें असतें." खरोखरच या शब्दांनीं राष्ट्रीय सभेच्या नव्या इतिहासाला सुरुवात झाली; आणि दादाभाई नवरोजी हे त्या शब्दामुळें भविष्यवादीच ठरले. याच सभेंत राष्ट्रीय तत्त्वज्ञानाच्या चतुः सूत्रीचा उगम झाला व तेथें उगम पावलेली चळवळीची नदी हल्लीं स्वराज्य–समुद्राला, गंगा जशी पूर्व सागराला मिळते त्याप्रमाणें, शंभर मुखांनीं मिळूं पहात आहे. दादाभाईनीं खऱ्या स्वराज्यविषयक भावना-नदीचा उगम प्रगट केला; पण महात्मा भगीरथ ज्याप्रमाणें भागीरथीच्या पुढें चालून, स्वर्गांतून पृथ्वीवर अवतीर्ण होतांना तिचा वाटाड्या होऊन, तिला हातानें मार्ग दाखवीत गेला, त्याप्रमाणे दादाभाई नवरोजी यांना वार्धक्यामुळें करितां आलें नाहीं. पण इमर्सननें म्हटल्याप्रमाणें "कोणतीहि ईश्वरी विभूति आपली चित्कला दुसऱ्या कोणत्या तरी महात्म्याच्या स्वाधीन करीपर्यंत स्वतः विराम पावत नाहीं" त्याप्रमाणें दादाभाई नवरोजी यांनीं केलें. आणि ज्यांच्या स्वाधीन दादाभाईनीं आपली भविष्यवाणी व चित्कला केली ते महापुरुष म्हणजे लो. टिळक हे होत.

यानंतरचा तिसरा अद्भुत प्रसंग म्हटला म्हणजे १९०७ सालच्या सुरतेच्या राष्ट्रीय सभेचा. १८८९ पुढील १७ वर्षांत एक प्रकारचीं कायदेकौन्सिलें व एक प्रकारची निवडणूक अमलांत आली होती. पण देशांतील मवाळ व जहाल पक्षांमध्यें चुरशीचा सामना सुरू झालेला असून, त्यांची पहिली लढाई सुरतेच्या रणमैदानावर झाली; व तिचें पर्यवसान

राष्ट्रीय सभेचें अधिवेशन उधळून लावण्यांत झालें. अध्यक्षांचें भाषण वाचलें सुद्धां गेलें नाहीं ! खुर्च्या हवेंत उडाल्या ! डोकीं फुटलीं ! पोलिसांनीं सभागृह ताब्यांत घेतलें ! मग मवाळांनीं एक नवी सोवळी शपथ निर्माण करून व तिचें जुंजगावणें राष्ट्रीय सभेच्या दारावर लावून जहाल पक्षाला स्वतःला बहिष्कृत करावयास लावलें. पण येथून राष्ट्रीय सभेला फारच उतरती कळा लागली. मवाळांनीं राष्ट्रीय सभेची संस्था व तिचें नांव कसें तरी जिवंत ठेवलें. इकडे लो. टिळक हे सहा वर्षे तुरुंगात डांबून राहिल्यानें, आणि या सोवळ्या सभेवर टिळक कायमचा बहिष्कार घालतील अशा समजुतीनें, त्यांच्या राष्ट्रीय पक्षानें तिला नऊसात वर्षे पुरीच वगळ दिली. पण रस्सीखेचीच्या खेळांत एका पक्षाच्या गड्यांनीं एकदम दोरी सोडून दिली असतां दुसऱ्या पक्षाचे गडी हातातला कोरडा विजय घेऊन कोसळून पडतात, त्याप्रमाणे नेमस्त पक्षाची स्थिति झाली. उदाहरणार्थ, १९१२ सालीं पाटणाबंकीपूर येथें कै. रा. ब. रंगनाथ नारायण मुधोळकर यांच्या अध्यक्षतेखालीं जी २७ वी राष्ट्रीय सभा भरली, तिला अवघे १७१ प्रतिनिधि असून, "अत्यंत सोवळ्यांतली सोवळी राष्ट्रीय सभा पण अत्यंत नीरसातली नीरस राष्ट्रीय सभा" असें तिचें वर्णन राष्ट्रीय सभेच्या इतिहासांत यथार्थतेनें करण्यात येतें. पण ओहोटी पुरी होताच भरती सुरू व्हावी त्याप्रमाणें, १९१६ साली लखनौ येथील राष्ट्रीय सभेंत टिळकांच्या पुरस्कर्तृत्वानें व नेमस्तांच्याहि संमतीनें स्वराज्याचें तोरण लटकावण्यांत आलें.

यानंतरचा अद्भुत प्रसंग म्हणजे १९२० साल हा. कारण त्या सालच्या कलकत्ता येथील जादा व नागपूर येथील मामुली अधिवेशनांत स्वराज्य-साधनाची राष्ट्रीय चतुःसूत्री फैलावली जाऊन, चळवळीच्या नदीला ध्येय-समुद्र दिसूं लागताच शेकडों फांटे फुटले; व राष्ट्रीय सभेला तोंपर्यंत साध्यवादी असें जें नांव होतें ते त्यापुढें साधनवादी असें नांव प्राप्त झालें. नुसतें स्वराज्य हा शब्द जाऊन स्वातंत्र्य हा शब्द राष्ट्रीय सभेच्या परिभाषेंत हळूहळू रूढ होऊं लागला. आणि १९२४ सालच्या राष्ट्रीय सभेंत झालेली कौन्सिल-प्रवेशाची सरशी, व १९२८ सालाच्या सभेंत नेहरू रिपोर्टाच्या रूपानें मर्यादित स्वराज्याला दिलेली संमति, या दोन गोष्टी वगळल्या तर स्वातंत्र्याच्या ध्येयाचा प्रवाह केव्हां गुप्त तर केव्हां प्रगट असा वहात राहिला. १९२९ सालीं लाहोर येथे भरलेल्या राष्ट्रीय सभेनें स्वातंत्र्याचा प्रत्यक्ष ठरावच केला; व सभेच्या मुख्य दिवशीं मध्यरात्रीं स्वातंत्र्याचें प्रत्यक्ष निशाणच उभारलें जाऊन स्वातंत्र्याची एक प्रकारें द्वाहीच पुकारली गेली. अशा रीतीनें १८८९ पासून १९२९ पर्यंत राष्ट्रीय सभेचा ४० वर्षांचा इतिहास पाहिला असतां, आम्ही वर वर्णन केल्याप्रमाणें, त्या इतिहासांतील अद्भुत प्रसंग एकामागून एक डोळ्यापुढून जातात. आणि शेवटीं लाहोरची राष्ट्रीय सभा लक्षांत घेतली असतां, विधायक स्वरूपाच्या अद्भुतपणाचा तो कळस झाला असें म्हणावें लागतें. त्या दिवशीं इंग्रज सरकारशीं हिंदी जनता घालीत असलेल्या स्वराज्यविषयक वाटांत सर्व बोलणें संपलें व कृतिच तेवढी उरली असें निखालस म्हणतां येतें.

तेथपासून सुरू आहे तें सर्व अद्भुतच ! आणि हे प्रकार अद्यापि न संपल्यामुळें त्याचें समालोचन करण्याची वेळ जरी आलेली नाहीं तरी कोणत्याहि युद्धांत ज्या गोष्टी दृष्टीस पडतात त्या हिंदुस्थानच्या राजकीय चळवळींतहि गेलीं तीन वर्षे दृष्टीस पडत आहेत असें म्हणण्यास हरकत नाहीं. युद्धांत ज्या ज्या म्हणून साधनाचा उपयोग करतां येणें शक्य आहे तीं सर्व सरकारानें अमलांत आणलेलीं आहेत. उलट राष्ट्रीय सभेपुरतें बोलावयाचें तर शस्त्रग्रहण निखालस वगळून इतर ज्या ज्या रीतीनें सरकारशीं सात्त्विक युद्ध करणें शक्य असेल त्या त्या रीतीनें जनतेनें तें चालू ठेवलें आहे. आणि दिल्ली येथें घडलेल्या ताज्या प्रकाराबद्दल म्हणावयाचें तर असें म्हणतां येईल कीं, सर्व रणमैदानभर संकीर्ण युद्ध सुरू असतां निशाणाच्या हातघाईजवळ सर्वांत अधिक निकराची झटापट सुरू असते, त्याप्रमाणें चांदणीचौकांतील घड्याळी मनोऱ्याजवळ झालेला प्रकार होय. कारण 'राष्ट्रीय सभा भरवूं' व 'राष्ट्रीय सभा भरवूं देणार नाहीं' अशा उभय पक्षीं प्रतिज्ञा होत असतां, परवां रविवारीं सकाळीं ९ वाजतां राष्ट्रीय सभा भरवूं म्हणविणारांनी ती हट्टानें भरविली, व ठराविक ठराव वाचूनहि दाखविले! अर्थात् धरपकड होण्याला उशीर लागला नाहीं. पण जे झालें ते क्षणांत होऊन गेलें, व झालें ते परतविणें अर्थात् कोणाच्याहि हातीं राहिलें नाहीं.

भूतकालाचें पाऊल इतकें जलद पडत असतें कीं तें वाऱ्याला किंवा मनालाहि पकडतां येत नाहीं असें म्हणतात. आणि हिंदुस्थानाच्या चारहि टोकांपासून या राष्ट्रीय सभेच्या अधिवेशनाची नाकेबंदी करीत करीत जाळें आवळीत येणाऱ्या, व खुद्द दिल्ली शहर हें पोलिसमय करणाऱ्या, सरकाराला चांदणी चौकांतील नऊ वाजतांचा मुहूर्त आगाऊ समजला नाहीं, व वेळींच संधि साधून बुडवितां आला नाहीं, ही राष्ट्रीय सभेच्या इतिहासांतील अद्भुतांतली अद्भुत गोष्ट होय असें कोणी वर्णन केल्यास तें चूक ठरणार नाहीं असें वाटतें. अलीकडे गूढ चिकित्सामंडळातर्फे होणाऱ्या शोधा-

मध्यें, मृताचा आत्मा किंवा लिंगदेह शरीरांतून निघून जातांना वाटेंत तो पकडतां येईल कीं नाहीं अशाविषयीं प्रयोग सुरू आहेत असें म्हणतात. त्याची आठवण चांदणीचौकांतील या राष्ट्रीय सभेच्या अधिवेशनानें आम्हांला तरी होते. मरणोन्मुख मनुष्याच्याभोंवतीं अदृश्यदर्शक किरणाच्या साहाय्यानें फोटो घेण्याकरितां कॅमेरे लावून ठेवलेले असतात. पण शेवटीं सर्व शरीरसंभार टाकून देऊन लिंगदेह व आत्मा हे अशा कांहीं अतर्कित रीतीनें परलोक-साधन करतात कीं, आजवर त्याचा खरा फोटो कोणालाहि घेतां आला नाहीं. त्याचप्रमाणें सर्व प्रकारचा पोलीस-बंदोबस्त असतां अतर्कित रीतीनें झटका देऊन,कांहीं राष्ट्रीय सभावाल्यांनीं चांदणीचौकांत नवाच्या ठोक्याबरोबर जें अधिवेशन भरविलें, तें 'होऊन मेलें !' अशा भूतकालवाचक सदरांतच घालणें हें सरकारलाहि प्राप्त आहे.

आत्मा किंवा लिंगदेह नवीन चरित्राच्या यात्रेला निघाला असतां, जुन्या जन्मांतील देहासंबंधीं सर्व आधिभौतिक उपभोगाच्या वस्तू तीं केवळ त्रासदायक अडगळ म्हणून टाकून देतो. त्याप्रमाणें राष्ट्रीय सभेच्या आत्म्याला किंवा लिंगदेहाला जुने शोभिवंत मंडप, व त्यांत उडणारीं वक्तृत्वाचीं कारंजीं इत्यादि सर्व गोष्टी टाकून देऊन मुद्द्याशीं म्हणजे शब्दमात्राच्या उच्चाराशीं गांठ घालावी लागली.आणि सरकारनेंहि पण दिल्लीचें अधिवेशन बटहुकुमानें बंद केलें तरी राष्ट्रीय सभा ही निखालस वस्तू अद्यापि बेकायदेशीर ठरविलेली नाहीं, ही त्यांची एकप्रकारें दूरदृष्टिच होय. म्हणून असें वाटतें कीं, लाहोर येथील स्वातंत्र्याच्या घोषणेनंतर व ध्वजारोपणानंतरहि, ज्याप्रमाणें म.गांधी लंडनांतील गोलमेज परिषदेला गेले, व "माझें स्वातंत्र्य हें स्वातंत्र्य नव्हे, पण माझें स्वराज्य हें स्वराज्य आहे" असें परोपरीनें तेथील मुत्सद्यांना समजावून सांगण्याचा त्यांनीं प्रयत्न केला, त्याप्रमाणें कांहीं तरी तसाच लोकोत्तर श्लेष निघून दिल्लीचें राष्ट्रीय सभेचें अधिवेशन बेकायदा ठरलें तरी, "राष्ट्रीय सभा ही बेकायदेशीर नाहीं" ही भूमिका शिल्लक राहील. आणि न जाणों पुढें कदाचित कोणत्याहि रीतीनें समेट झाल्यास ( कारण राजकारणांत अशक्य गोष्टीहि शक्य होतात ) फिरून कोठें तरी केव्हां तरी राष्ट्रीय सभा रीतसर भरेल, तेव्हां चांदणीचौकांतून अदृश्य झालेला आत्मा व लिंगदेह हे त्या अधिवेशनांत फिरून प्रगट न होतील हें तरी कोणीं म्हणावें ?

युद्ध चालू असे तोंपर्यंत सर्वच शत्रु, पण तें संपल्यावर आज खुद्द इंग्लंड व जर्मनी यांचाहि स्नेह झाला आहे ! त्याप्रमाणें गांधी व राष्ट्रीय सभा यांचा आणि सरकारचा स्नेह होईल असें कोणी म्हटल्यास त्याला अगदींच वेड्यांत काढण्याचें कारण नाहीं. तह हा शब्द युद्धाचा असा कांहीं प्रतियोगी शब्द होऊन बसला आहे कीं, तो प्रत्यक्ष युद्धांतहि कोणी विसरून जाऊं म्हटलें तरी विसरून जाऊं शकत नाहीं. कारण युद्ध ही गोष्ट कोठेंहि अशी अनुभवाला आलेली नाहीं कीं, तें एकदां सुरू झालें म्हणजे त्याला पुढें केव्हां अंतच नाहीं. वाईट इतकेंच वाटतें कीं, पं. मदनमोहन मालवीय व श्री. सौ. सरोजिनी नायडू यांच्याकडे दिल्ली येथील अधिवेशनाचें पुढारीपण असतां, अशा विचारी लोकांशींहि सामोपचार करण्याची संधि सरकारानें साधली नाहीं. ते ती साधते तर राष्ट्रीय सभा अशा पद्धतीनें भरली ती मुळींच भरली नसती, किंवा भरती तर उघड व पद्धतशीर रीतीनें भरली असती. झाला प्रकार यांत मात्र कोणाचेंच कांहीं साधलें नाहीं.

सौ. नायडू या सरकारशीं सहकारिता करूं शकतात याचें प्रत्यंतर, हल्लींची कायदेभंगाची चळवळ सुरू झाल्यानंतरहि अगदीं थोड्या दिवसांपूर्वीं सरकारला आलें होतें. खुद्द हिंदुस्थानसरकारतर्फे शिष्टमंडळाच्या एक सभासद म्हणून त्या दक्षिण आफ्रिकेला जाऊन आल्याला, व दिल्लीस सरकारी पाहुण्या म्हणून राहिल्याला, कांहीं फार दिवस झाले नाहीत. पंडित मदन मोहन यांची सुविचारी व शांतताप्रिय वृत्ति ही देखील सरकारला चांगली अवगत आहे. असें असतां अशा दोघां पुढाऱ्यांचेंहि मन सरकारला या प्रसंगीं आकलन करितां आलें नाहीं ही मोठी दुःखाची गोष्ट होय. लहान मुलें 'केऽस्तु' म्हटल्यानें सर्व संध्या केली असें मानतात, त्याप्रमाणें चांदणी चौकांत नऊ वाजतां जमून चार ठराव वाचल्यानें आम्ही राष्ट्रीय सभा भरविली या म्हणण्यांत जसें खरें स्वारस्य नाहीं, त्याचप्रमाणें ती सभा होऊन गेल्यावर सातशें नाहीं एक हजार लोक पकडून तुरुंगात घातले तरी आम्ही "राष्ट्रीय सभा भरूं दिली नाहीं" असें सरकारानें म्हणण्यांतहि कांहीं स्वारस्य नाहीं. खरें स्वारस्य यांतच होतें कीं, पंडितजी व सरोजिनीबाई यांच्यासारखीं माणसें हल्लींच्या चळवळींत सामील न होतां आजवर उरलीं होतीं,त्यांच्या मध्यस्थीचा उपयोग सरकारानें सामोपचाराकरितां करून घ्यावयाला पाहिजे होता.पण तो घेतला नाहीं! 'अती तेथें माती' या म्हणीचें शहाणपण सरकार लोकांना शिकवूं पहातें, तें थोडेसें स्वतःच शिकेल तर बरें नव्हे काय ?

# आयरिश फ्री स्टेटचीं दहा वर्षें

इ. स. च्या १२व्या शतकांत इंग्लंडनें आयर्लंड जिंकल्यापासून साडेसातशें वर्षें इंग्लंड व आयर्लंड यांचे दरम्यान एकसारखा झगडा चालू होता. एवढ्या दीर्घ कालांत इंग्लंडनें आयर्लंडवर इतका जुलम केला,व आयर्लंडनेंहि या सर्व काळांत निरनिराळ्या स्वरूपांत त्या जुलमाचा इतका निकराचा प्रतिकार केला कीं,तो परराज्याचा भयंकर जुलम आणि परत स्वातंत्र्येच्छूंचा प्रतिकार, स्वार्थत्याग व देशप्रेम यांस अर्वाचीन इतिहासांत क्वचितच तोड सांपडेल.शतकानुशतक एकसारख्या चिघळत चाललेल्या या कलहाचा एकदांचा शेवट करावा याकरितां ब्रिटिश प्रधानमंडळानें आयर्लंडच्या पुढाऱ्यांना बोलावून आयर्लंडला १९२१ सालीं वसाहतीचें स्वराज्य बहाल केलें व तेव्हांपासून हल्लींचें 'आयरिश फ्री स्टेट' अस्तित्वांत आलें. इतका दीर्घकाल पेटलेला वणवा या स्वराज्यदानानें एकदम विझणें अशक्यच होतें. विशेष जहाल स्वातंत्र्यवाद्यांना वसाहतीचें स्वराज्य पत्करणें आवडलें नाहीं. त्यांनीं या नवीन सरकाराविरुद्ध सशस्त्र बंड उभारून सात–आठ महिने या नवीन सरकारशीं मोठ्या आवेशानें सामना दिला.तथापि नवीन सरकारनें मोठ्या धिमेपणानें व निश्चयानें वागून सर्व बंडखोरांचा मोड केला व त्यांस शस्त्र खालीं ठेवण्यास भाग पाडलें. यानंतर १९२२ सालच्या अखेरपासून आयरिश फ्री स्टेटचा कारभार सुरळीत चालू झाला.

### चारशें वर्षांनंतर स्वराज्य

१४९४ सालीं इंग्लंडनें आयरिश पार्लमेंटची स्वतंत्रपणें कायदे करण्याची सत्ता काढून घेतली. ती १७८२ सालीं परत देण्यांत आली खरी, पण १८०० सालीं आयर्लंडांतील पार्लमेंट अजीबातच मोडून त्याचा ब्रिटिश पार्लमेंटांत समावेश केला गेला. म्हणून १७८२ ते १८०० हा १८ वर्षांचा काळ सोडल्यास १४९४ पासून चारशें वर्षांनंतर पहिल्यानेंच १९२१ सालीं आयर्लंडचीं राज्यसूत्रें पूर्णपणें आयरिश लोकांच्या हातीं आलीं.यावेळीं कोणाहि राज्यकर्त्यांवर जेवढे कठिण प्रसंग यावयाचे तेवढे सर्व एकदम या नवीन सरकारावर आले. ज्या सिनफेन पक्षाचे हातीं राज्यकारभार सोपविण्यांत आला त्यांना राज्यकारभाराचा काडीमात्रहि अनुभव नव्हता. इंग्रजी राज्यकर्त्यांविरुद्ध कट व बंड करून राज्ययंत्र मोडून कसें टाकावें एवढें विध्वंसक कसब मात्र त्यांना ठाऊक होतें. ही विध्वंसाची खोड स्वराज्यप्राप्तीनंतरहि गेली नाहीं. आणि असंतुष्ट सिनफेन पुढाऱ्यांनीं हें स्वराज्याचें रोपटें अंकुरावस्थेंतच भाजून टाकण्याचा प्रसंग आणला होता. पण तो आयर्लंडच्या सुदैवानें निभावला गेला.

### स्वराज्य–दानाचे वेळची स्थिति

शांतता स्थापण्याचें कर्तृत्व जसें फ्री–स्टेटवाल्यांनीं दाखविलें तसेंच अथवा त्याहून अधिक इष्ट व अवघड कार्य सुव्यवस्था व सुबत्ता निर्माण करण्याचें होतें.राज्यकारभारांत फ्री–स्टेटवाले अनभिज्ञ होतेच. पण ज्या स्वदेशाची त्यांनीं भरभराट करावयाची, तेथें अनुकूल परिस्थितीचा पूर्ण अभाव होता. परराज्याचा पायगुणच असा असतो कीं,त्याचा अंमल चालू असतां अंकित देश चरकांत घातल्याप्रमाणें पिळून निघून चिपाड होत असतो. आणि परकीयांचे पाय बाहेर निघत असतांनासुद्धां ते लोक अंकित देश जाळून–पोळून उध्वस्त करून एखाद्याच्या ओंजळींत निखारे द्यावे त्याप्रमाणें तो देश तद्देशीयांच्या हवालीं करतात. लढाईत जहाज शत्रूचे स्वाधीन करण्याचा प्रसंग आला असतां तें जसें पेटवून देऊन शत्रूच्या जहाजाकडे हाकारलें जातें, तशीच स्वराज्यदान करण्याची साम्राज्यवाद्यांची पद्धत आहे. इंग्रजांसारखे सुधारलेले राज्यकर्तेंहि यास अपवाद नाहींत. १९१६ सालीं सिनफेनरांनीं जें बंड केलें तेव्हांपासून १९२२सालीं प्रजासत्तावाल्यांनीं फ्री-स्टेटविरुद्ध उपसलेलें शस्त्र खालीं ठेवीपर्यंत सहा वर्षे सरकार व बंडवाले यांचे दरम्यान आयर्लंडांत सतत धुमश्चक्री चालू असून खून, हाणामारी, जाळपोळ याहून अधिक विधायक असा कांहींहि कार्यक्रम चालू नव्हता.

### तापलेला गोळा हातावर निवाविला

या काळांतच युरोपीय महायुद्ध चालू असतांच्या व तें संपल्यानंतरच्या सर्व आपत्तींनीं आयर्लंडमध्ये पेटून राहिलेल्या आगींत तेल ओतलें व आयर्लंडच्या शरीराचा अधिकच भडका उडविला. आणि शेवटीं ज्यांतील भौतिक संपत्ति उध्वस्त झाली आहे व ज्यांतील प्रजा त्रस्त, क्रुद्ध, वैतागलेली व दुराराध्य झाली आहे असा देश स्वराज्याची कर्तबगारी करून दाखविण्यास आयरिश लोकांचे हातीं इंग्रजांनीं दिला. तो देतांनाहि उद्योग--धंद्यांत पुढारलेला असा अल्स्टर प्रांत फ्री–स्टेटपासून वेगळा काढून स्वराज्याच्या कोवळ्या शरीरांतच सुरी खुपसून ठेविली व आरंभापासूनच दारिद्र्याच्या गर्तेंत आयर्लंडचा पाय रोवून ठेवला. वरदान मागितलें असतां शाप मिळावा-त्याप्रमाणें इंग्रजांनीं आयर्लंडवर राज्य करतां येईना तेव्हां स्वराज्य सुवर्णाचा तापून लाल झालेला गोळा आयरिश लोकांच्या टाळक्यावर फेकला.पण आनंदाची

आणि अभिमानाची गोष्ट अशी कीं, हा तापलेला गोळा-सुद्धां आयरिश लोकांनीं वरच्यावर हातांत झेलून हात पोळत पोळत निवविला आणि मोठ्या परिश्रमांनीं आणि ध्येयनिष्ठेनें राज्यकर्तृत्व सिद्ध करून जगांतील स्वतंत्र राष्ट्राच्या मालिकेंत आयर्लंडास आज मानाचें पद आयरिश मुत्सद्द्यांनीं प्राप्त करून दिलें आहे.

## विधायक कार्यक्रम

१९२२ सालीं प्रजासत्तावाल्यांचें बंड मोडल्यानंतर प्रे. कॉसग्रेव यांच्या नेतृत्वाखालीं फ्रीस्टेट सरकारनें मोठ्या इर्षेनें विधायक कार्यक्रमास सुरुवात केली. आरंभीं राष्ट्राची किती बाजूंनीं आणि कसकशी सुधारणा केली पाहिजे याची चौकशी करण्याकरितां सरकारनें तज्ज्ञांचीं पुष्कळशीं कमिशनें नेमिली. आणि या कमिशनांच्या सूचनांप्रमाणें सर्व बाजूनें देशाची मोठ्या हिंमतीनें भरभराट घडवून आणिली. सरकारनें शिक्षणाची जुनी पद्धत मोडून आमूलाग्र नवीन पद्धतीचा शिक्षण-क्रम देशभर सुरू केला. अनाथांच्या कायद्याची सुधारणा केली. स्थानिक स्वराज्याचें रूप पार बदलून तें अधिक कार्यक्षम केलें. पोस्ट ऑफिसचा उधळपट्टीचा मोकाट कारभार बंद करून त्याला शिस्त लाविली. न्याय व पोलीस खातें सुधारलें. उद्योगधंद्याचें सगळें वैभव अल्स्टरच्या वाट्यास गेल्यामुळें फ्री स्टेटजवळ फक्त निकृष्ट शेती तेवढी राहिली होती. पण तींतहि नाउमेद न होतां फ्री-स्टेट सरकारनें नवीन पद्धतींचा अवलंब करून सुधारणा केली व शेतीच्या उत्पन्नाचा निर्यात व्यापार पुष्कळच वाढविला.

## सरकार अप्रिय कां झालें ?

पण राज्यकारभारांत अजब कर्तबगारी दाखविणाऱ्यांना लोकप्रियताहि लाभतेच असें मात्र नाहीं. आयर्लंडची चोहोंकडून सुधारणा करावयाची तर पाण्यासारखा पैसा खर्चणें भाग होतें. हा पैसा राष्ट्रीय कर्ज वाढवून मिळवावा तर आयर्लंडचें वाढविलेलें वैभव सावकाराच्या दारीं गहाण पडून आयर्लंडच्या कपाळचें दारिद्र्य सुटते ना. म्हणून फ्री-स्टेटनें कर्जाऐवजीं कर वाढवूनच सुधारणेस अधिक पैसा उभा केला. पण सामान्य नागरिकांना सुधारणा हव्या असल्या तरी त्याचा खर्च करायला नको असतो. यामुळें आयरिश प्रजा करवाढीबद्दल असंतुष्ट झाली. अलीकडील ३/४ वर्षांत जगांतील व्यापारमंदीचा परिणाम आयर्लंडवरहि झाला असून त्यामुळें तेथें बेकारी वाढली. यामुळे प्रजेच्या असंतोषांत आणखी भर पडली आहे. ज्या प्रजासत्तावाल्यांचा नवीन सरकारनें मोड केला होता त्यांनीं या असंतोषाचा फायदा घेऊन सरकारविरुद्ध लोकमत अधिकच चेतविण्यास प्रारंभ केला. १९१६ सालीं आयर्लंडांत बंड झाल्यापासून पुढील ६ वर्षे आयर्लंडांत इतकीं धामधुमीचीं गेलीं कीं, वर्तमानपत्रांत आयर्लंडसंबंधीं कांहीं क्षोभजनक बातमी नाहीं असा बहुधा एकहि महिना लोटला नसेल. ही क्षोभकारक बातम्यांची दिवाळी अथवा शिमगा १९२२अखेर शमला.

पुढें आयर्लंडांत स्वराज्य व अंतर्गत सुधारणा चालू होऊन परदेशांत आयर्लंडाचें नांव फारसें ऐकू येईनासें झालें होतें व गेल्या १० वर्षांत परदेशास आयर्लंडचा विसर पडत चालला होता. अशा स्थितींत शांत समुद्रांत एकदम वादळ उठावें त्याप्रमाणें गेल्या वर्षी आक्टोबरमध्यें "आयर्लंडांत क्रांतिकारकांच्या चळवळींचा फैलाव फार झाला असून ती दडपून टाकण्याकरितां सरकारनें कांहीं काळ लोकशाही तहकूब करून सर्वाधिकार हातीं घेतले आहेत, धरपकड जोरांत सुरू होऊन क्रांतिकारकांनीं तुरुंग भरू लागले आहेत" अशा भयंकर बातम्या जगाच्या कानावर एकदम येऊन आदळल्या. यानंतर आयरिश डेल आयरेन नामक पार्लमेंटच्या नव्या निवडणुकी होऊन पूर्वी सिन-फेनर्सचा पुढारी व १९२१ सालच्या अँग्लो-आयरिश तहाविरुद्ध बंड करणारा इमॉन डी व्हॅलेरा यांस मताधिक्य मिळालें व आज तो आयरिश पार्लमेंटचा अध्यक्ष झाला आहे. आणि तहांतील अपमानकारक अटी उडवून लावण्याकरितां त्यानें हल्लींचा वाद उपस्थित केला आहे.

## हल्लींच्या पक्षभेदाचें स्वरूप

वास्तविक ग्रिफिथ, कॉलिन्स वगैरे ज्या पुढाऱ्यांनीं १९२१ सालीं इंग्लंडहून तह आणला त्यांना तो सर्वस्वी मंजूर होता असें नाहीं. ते संपूर्ण स्वातंत्र्यवादी पक्षाचे प्रतिनिधी म्हणूनच वाटाघाटीस गेले होते. पण आयर्लंडनें इंग्लंडचें आयर्लंडांतील राज्य कांहीं काळ अशक्य केलें असलें तरी इंग्लंडचा मोड केला असें कांहीं या प्रतिनिधींना वाटणें शक्य नव्हतें. आयर्लंडचा विध्वंस तरी यापुढें किती चालू द्यावा हाहि त्यांपुढें प्रश्नच होता. अशा स्थितींत उभयतांच्या संमतीनेंच राज्यघटना निर्मावयाची तर देवाण घेवाण करणें अपरिहार्य होतें. इंग्लंडचा साम्राज्य-अहंकार संभाळला तर बाकी सर्व कांहीं पदरांत पडेल असेंहि त्यांनीं पाहिलें. अल्स्टरला इंग्लंडची फूस खरी; पण आज इंग्लंडच्या फुशीनेंच कां होईना ब्रह्मदेश हिंदुस्थानापासून वेगळा होऊं इच्छीत असला तर राष्ट्रीय सभा जशी हरकत घेऊं इच्छीत नाहीं, तसेंच अल्स्टर फ्री-स्टेटमध्यें येऊं इच्छीत नसतां तो यावा असा आग्रह धरणें ग्रिफिथ-कॉलिन्स-प्रभृतींना अयोग्य वाटलें असलें तर ते सयुक्तिकच होतें. म्हणून अल्स्टर वजा करून उरलेल्या आयर्लंडचें स्वराज्य—इंग्लंडचा साम्राज्याहंकार न दुखावेल

एवढ्यापुरती राजनिष्ठेची शपथ कबूल करून—त्यांनीं आयर्लंडांत आणलें. या स्वराज्याच्याविरुद्ध राजनिष्ठेची शपथ अमान्य असणाऱ्या जहाल प्रजासत्ताकांनीं बंड उभारलें. तें ७-८ महिन्यांतच शमलें तरी क्रांतिकारकांचा मात्र बीमोड कांहीं झाला नाहीं. त्यांनीं राजनिष्ठेची शपथ घेण्याचें नाकारून डेल आयरेनवर बहिष्कार घातला, व सरकारविरुद्ध असंतोष फैलावण्याचें काम सतत चालू ठेवलें. कांहीं ज्वलज्जहालांचे गुप्त कटांचे उद्योगहि चालूच होते. पुढें एवढ्यानेंच सरकारचा पाडाव होत नाहीं असे पाहून डेल आयरेनमध्यें १९२६–२७ सालीं या स्वातंत्र्यवाद्यांनीं प्रवेश केला. या वेळीं अर्थातच त्यांना राजनिष्ठेची शपथ घ्यावी लागली. पण आपण 'मनाची नापसंती'(mental reservation) राखून ठेविली असून हातीं सत्ता येतांच शपथेची अट काढून टाकूं अशी डी व्हॅलेरानें ग्वाही दिली होती. एकंदर आयरिश लोकांसच या शपथेविषयीं तीव्र द्वेष असल्यामुळें त्यांनीं व्हॅलेरास आज बहुमतानें अध्यक्ष निवडलें आहे.व शपथ रद्द करून घेण्याचें वचन पूर्ण करण्याची तो आज खटपट करीत आहे.

गेलीं दहा वर्षे ज्या कॉन्स्झेव्ह पक्षानें राज्यकारभार मोठ्या हिंमतीनें व कौशल्यानें केला, तो पक्ष आज पदच्युत झाला आहे खरा. पण त्यानें डी व्हॅलेरा व त्याचे पुष्कळसे बंडखोर अनुयायी यांना सनदशीर राजकारणांत खेचून आणलें व राज्यकारभार सुयंत्र केला हें त्याचें यश कांहीं लहान नव्हे.

सत्तेचाळिसाव्या

# राष्ट्रीय सभेचें अधिवेशन

दिल्ली येथें ता. २४ एप्रिल रोजीं ४७ व्या राष्ट्रीय सभेचें अधिवेशन भरणार असल्याचें शिंग वाजतांच सरकारपक्ष व लोकपक्ष या उभयतांनीं आपापलीं सैन्यें व साधनें पुराणप्रसिद्ध इन्द्रप्रस्थाभोंवतीं गोळा करण्यास सुरुवात केली. इकडे सरकारनें ठिकठिकाणांहून पोलीस जमविण्यास आरंभ केला तर तिकडे गांवागांवांतून व शहराशहरांतून प्रतिनिधींचे थवे दिल्लीकडे जाऊं लागले. ता. २४ रोजीं चांदणीचौकांतील एका टोकापासून दुसऱ्या टोकापर्यंत पोलीस घोडेस्वार, लष्करी शिपाई सारखा पहारा करीत होते. सकाळीं नऊ वाजण्याच्या सुमारास क्लॉक टॉवरभोंवतीं शुभ्र खादी परिधान केलेले लोक जमा झाले. कांहीं वेळानें कांहीं लोकांनीं कॉंग्रेसचे ठराव वाचून दाखविण्यास प्रारंभ केला.शेठ रणछोडदास अमृतलाल हे त्या सभेचे अध्यक्ष होते असें कळतें. सभेंत कॉंग्रेसचा वार्षिक अहवाल व ठरावाच्या प्रती वाटण्यांत आल्या. वाचन-श्रवणाचा हा सोहळा साजरा होत आहे तोंच त्या जागेला पोलिसांनीं गराडा घातला व कित्येक लोकांना पकडलें. दुपारपर्यंत पकडले गेल्यांची संख्या सुमारं ७५० झाली असल्याचें कळतें. ता. २३ रोजीं रात्रीं अज्ञात स्थळीं कॉंग्रेसच्या विषयनियामक मंडळाची बैठक भरून पांच ठरावहि पसार करण्यांत आले!

ता. २४ रोजीं दुपारचे एक वाजेपर्यंत दिल्ली शहरांत बरीच धामधूम होती. लष्करी पोलिसांचा सर्व शहरभर अमदीं जागता पहारा होता. तोंडावाटें राष्ट्रपद्यें म्हणत दोन दोन स्वयंसेवक रस्त्यानें मिरवणूक काढीत व पोलीस त्यांना लगेच पकडीत असा अव्याहत क्रम चार वाजेपर्यंत चालला होता. ४॥ च्या सुमारास गुरुद्वारच्या बाजूनें १० स्वयंसेवकांची एक मिरवणूक क्लॉक टॉवरकडे चालली होती. मिरवणूक पाहून लोकांत उत्साहाचा संचार होऊं लागला व ते त्या रोखानें जाऊं लागले. लोक पुष्कळ जमत चाललेले पाहून पोलिसांनीं लाठीहल्ला केला व मिरवणुकींतील ३ स्वयंसेवकाना पकडलें. त्याबरोबर दुसरी मिरवणूक तेथें पोहोंचली. पुनः लाठीहल्ला करण्यांत आला. नंतर श्री. डी. गुप्त यांच्या नेतृत्वाखालीं सुमारें ४० कॉंग्रेस स्वयंसेवकांची एक मोठी मिरवणूक क्लॉक टॉवरचा ठाव घेण्यासाठीं निघाली. पुनः पोलिसांनीं लाठी चालविली व श्री. गुप्त यांसह ७ लोकांना अटक करण्यांत आली. पुढें एक लहान मिरवणक निघून तिनें तर चांदणीचौकांत ठाणच मांडलें, तेव्हां पोलिसांनीं कित्येकांना उचलून तुरुंगाकडे रवाना केलें. दुपारीं १ नंतर सुमारें ५० इसमांना अटक झाली असावी. सकाळीं ९ वाजतां क्लॉक टॉवरखालीं जमून सुमारें १०० लोकांनीं ५ ठराव पसार केले. ४७ व्या कॉंग्रेसचें हें अधिवेशन सारें १० च मिनिटें चाललें, यावरून तें जितकें अपूर्व तितकेंच चैतन्ययुक्त झालें. चांदणीचौकाच्या आसमंतात् उभें राहून सुमारें ५ हजार प्रेक्षकांनीं कॉंग्रेसचें हें अपूर्व अधिवेशन डोळ्यांत सांठविलें असेल.



जांब येथील समर्थांची प्रतिमा

# हनुमान-जयंतीची सभा

## काव्य, पुराण व इतिहास

बुधवार ता. २० रोजीं सायंकाळीं ७॥ वाजतां श्रीशिवाजीमंदिरांत लोकमान्य पंथातर्फे श्री. न. चिं. केळकर यांचें हनुमानजयंतीनिमित्त श्री. वामनराव पोतदार यांच्या अध्यक्षतेखालीं व्याख्यान झालें. प्रारंभीं अध्यक्षांनीं आपल्या प्रास्ताविक भाषणांत श्रीशिवाजीमहाराजांचा अस्त व हनुमंताचा उदय आजच्या तिथीला झाला असल्यामुळें तिला कसें महत्त्व आलें आहे हें सांगितलें. नंतर व्याख्याते श्री. केळकर यांचें पुढील आशयाचें भाषण झालें. "हनुमानजयंतीनिमित्त जशीं कीर्तनें होतात तसेंच आजचें व्याख्यानहि आहे. शिवाजीमहाराजांच्याविषयीं पुष्कळ माहिती आजवर व्याख्यानद्वारां आणि पुस्तकद्वारां बाहेर पडलेली आहे, तशींच मारुतीरायांच्याविषयीं नवीन कल्पना, नवीन माहिती जर कोणीं काढली तर तिचा जनतेला पुष्कळ उपयोग होण्यासारखा आहे. इमर्सन म्हणतो कीं, 'कोणताहि महान् आत्मा जगांतून सर्वस्वी नष्ट होत नाहीं. तर जातांना तो आपलें मोठेपण दुसऱ्या आत्म्याच्या स्वाधीन करून जातो.' श्रीशिवाजीमहाराज काय, मारुतीराय किंवा भीम, रामदास झाले काय सर्व महात्मेच होत.

संस्कृतीचे मुख्य मार्ग दोन असतात. एक आधिभौतिक व दुसरा आधिदैविक. शिवाजीमहाराजांचें चरित्र आधिभौतिक किंवा ऐतिहासिक आहे; आणि मारुतीरायांचें चरित्र आधिदैविक किंवा पौराणिक आहे.

ध्येयाच्या दृष्टीनें या पौराणिक कथेकडे पाहिलें तर त्यांत दोष नाहीं. सत्पुरुषाचें ध्येय कसें असावें असें जर कोणी विचारील तर आम्हीं मारुतीरायाकडे बोट दाखवूं. शक्ति, नीति, भक्ति या तीन गुणांनीं युक्त असा पुरुष दुसऱ्या कोणत्याहि पुराणांत हुडकूं गेलें असतां सांपडणार नाहीं. ग्रीक पुराणांत सॅम्सन नांवाचा एक मारुतीसारखा अत्यंत बलवान पुरुष आहे. पण दोघांत फरक इतका आहे कीं, मारुतीरायांच्या शक्तीचा उपयोग निर्बलांचें संरक्षण करण्यांत, त्यांना आधार देण्यांत झाला, तर सॅम्सनच्या शक्तीचा उपयोग त्याच्या स्वतःच्या मृत्यूंत झाला. तसेंच नीतींत आणि गुरुभक्तींत मारुतीरायासारखा पुरुष, ग्रीक काय, रोमन काय, किंवा दुसऱ्या कोणत्याहि पुराणांत सांपडणार नाहीं हें मी खात्रीनें सांगतो. ज्याच्या ठिकाणीं शक्ति आहे त्याच्या ठिकाणीं भक्ति नाहीं, नीति नाहीं. आणि ज्याच्या ठिकाणीं हे दोन गुण आहेत तो निर्बल आहे अशा तऱ्हेचे पुरुष इतर पुराणांतून आढळतात. पण या तिन्ही गुणांचा समन्वय ज्याच्या ठिकाणीं आहे असा फक्त मारुतीच. हा पुरुष आपल्या पुराणांत आहे ही सुदैवाचीच गोष्ट समजली पाहिजे. प्रत्येक तालमींत जशी मारुतीची मूर्ति असते, तसेंच प्रत्येक तालमीवर 'बलमार्तभयोपशांतये' हें ब्रीदवाक्य लिहून ठेवलें पाहिजे. म्हणजे शक्तीचा उपयोग निर्बलांचें संरक्षण करण्याकडे केला पाहिजे हें प्रत्येक तालीमबाज माणसानें लक्षांत ठेवलें पाहिजे." वरीलप्रमाणें व्याख्यात्यांचें भाषण झाल्यावर श्री. वामनराव पोतदार यांचें समारोपादाखल थोडेसें भाषण झालें. मग लोकमान्यपंथाच्या चिटणीसांनीं व्याख्यात्यांना व अध्यक्षांना हार घातल्यावर सभा समाप्त झाली.

# पुस्तक-परीक्षण

**इंग्लिश रेकॉर्डस् ऑन शिवाजी** ( १६५९-१६८२ ) इंग्रजी, ( शिवचरित्र-कार्यालय, पुणें. किंमत १२ रु. शिवाय टपालहंशील. )

त्रिशतसांवत्सरिक शिवस्मारक ग्रंथावलींतील हा सहावा ग्रंथ म्हणजे संपूर्णपणें स्वतंत्र असा साधन-ग्रंथ आहे. याचीं पृष्ठें सुमारें सवाआठशें असून त्यांपैकीं जवळ जवळ शंभर पृष्ठें प्रस्तावना ( विषयप्रवेश ) सूचि, शब्दकोश, स्थलकोश वगैरे अभ्यासाला साहाय्यक अशा मजकुरानें व्यापिलेलीं आहेत. यामुळें या ग्रंथाचें संपादन-कार्य विशेष काळजीनें झालें आहे असें म्हणण्यास हरकत दिसत नाहीं. आजपर्यंत प्रसिद्ध झालेल्या साधनग्रंथांतून फुटकळच साधनें प्रसिद्ध होऊं शकलीं. परंतु या ग्रंथांत एकगटानें सुमारें एक हजाराच्यावर पत्रें, व्यवस्थितपणें कालानुक्रमानें छापतां आलीं हें शिवाजीविषयक संशोधनांत अभिनंदनीय कार्य झालें असेंच कोणीहि म्हणेल.

नांवावरून हीं साधनें इंग्रजी म्हणजे इंग्लंडांतील आहेत हें ध्वनित होतें. शिवाजीमहाराजांचा उदय व इंग्रजी कंपनीचा व्यापाराचा प्रसार हिंदुस्थानाच्या पश्चिम किनाऱ्यानें सुमारें सतराव्या शतकाचे आरंभीं एकदम झाला.

त्या वेळीं दख्खनमधील प्रस्थापित सत्ता म्हणजे अहमदनगरची निजामशाही व विजापूरची आदिलशाही. उत्तरेकडील मोगली सत्ताहि या वेळीं प्रबळ होऊन सुरत-गुजराथ इकडे हातपाय पसरून बसली होती. इंग्रज लोक व्यापाराकरितां या सर्वांची मनधरणी करीत होते. शिवाजीला आपल्या स्वतःच्या स्वातंत्र्याकरितां यांच्याशींच झगडा करावा लागला होता. त्यांत तो यशस्वी होऊन मुंबईच्या व राजापूरच्या आसपासचा मुलूख त्याच्या हातीं येऊन पश्चिम किनाऱ्यावरील सत्ताधीशांत त्याचेंहि नांव चमकूं लागलें. अशा रीतीनें इंग्रजांचा संबंध प्रथम मुसलमान बादशहातीशीं आला तसाच तो शिवाजीशींहि आला. अर्थात् त्या संबंधांत त्या वेळच्या कंपनीच्या दप्तरांत कांहीं माहिती समाविष्ट होऊन राहिलीच. प्रत्यक्ष संबंध येण्यापूर्वींहि शिवाजी बराच प्रबळ झाल्यामुळें त्याचे पराक्रम व अचानक छापे वगैरे गोष्टी इंग्रज, फ्रेंच, डच, पोर्तुगीज वगैरे फिरंग्याच्या कानावर येऊं लागल्या होत्या. हजारों कोसांवरून व्यापार करण्याकरितां आलेल्या ह्या कंपन्यांचीं मुख्य केंद्रें व जबाबदार अधिकारी त्यांच्या मायदेशांत म्हणजे युरोपांत राहत असत. व येथील नोकरांनीं हिंदुस्थानांतील सर्व हकीकती आपल्यास कळवाव्या व त्यावरून आपण आपला बेत नक्की करावा असें त्यांचें धोरण राहिल्यामुळें हिंदुस्थानांतील नाना घडामोडींच्या हकीकती हिंदुस्थानांतून त्या वेळीं युरोपांत कळविल्या गेल्या. इंग्रजी कंपनीच्या अधिकाऱ्यांचा पत्रव्यवहार, सभाचे अहवाल वगैरे आज इंग्लंडमध्यें जपून ठेविले असून ते तेथें अभ्यासकांना मोकळेपणानें दाखविले जातात. त्या कागदांतून शिवाजीशीं ज्यांचा म्हणून संबंध आला ते सर्व उतारे या ग्रंथांत मोठ्या कसोशीनें संकलित केले आहेत.

या कागदांत अफजलखानाशीं युद्ध झालें त्यानंतरचींच पत्रें आहेत. यापूर्वीची शिवाजीची प्रगति पाश्चात्यांच्या नजरेंत भरण्यासारखी झाली नाहीं असेंच यावरून दिसतें. हीं पत्रें जुन्या इंग्रजी भाषेंत असल्यामुळें स्पेलिंग्ज वगैरे थोडीं निराळीं आहेत. परंतु थोड्याच वेळांत माणसाला सवय होऊन अर्थ ध्यानांत येण्यास अडचण पडत नाहीं. इंग्रजांचा हा पत्रव्यवहार वगैरे कचेरीच्या पद्धतीचा आणि व्यवस्थित असल्यामुळें तारखा वगैरे जुळून देतां येणें शक्य झालें. आपल्याकडील पत्रव्यवहारांत ह्या बाबतींत बरीच अनास्था आढळून येते तशी ती इंग्रजी पत्रांत दिसत नाहीं. या पत्रावरून केवळ इंग्रजांचाच नव्हे तर त्या वेळच्या इतर सत्तांचा शिवाजीशीं संबंध आला त्याचें वास्तविक स्वरूप ध्यानांत येतें. हीं सर्वच पत्रें वाचनीय आहेत. शिवाजी व इंग्रज या दोनही समकालीन सत्ता यावेळीं एकसारख्या भरभराटीस येत होत्या. त्यांच्या उदयाची वाढ सहज नजरेंत भरण्यास या पुस्तकाचा चांगलाच उपयोग होईल. पुस्तकांतील चित्रें, नकाशे यांचें व एकंदर साधनांचें महत्त्व लक्षांत घेतां कार्यालयानें सिद्धीस नेलेल्या या पुस्तकाच्या प्रकाशनाचें कौतुक वाटते.

इंग्रज व्यापाऱ्यांप्रमाणेच पोर्तुगीज, डच, फ्रेंच इत्यादि त्या वेळच्या व्यापारी कंपन्यांचें दप्तर हस्तगत होऊन छापलें गेल्यास हिंदुस्थानाच्या इतिहासांत अत्यंत महत्त्वाची भर पडल्यासारखी होणार आहे.

# मुंबईचे बातमीपत्र

### दादरच्या हिंदु पुढाऱ्यांची कैफीयत

श्रीहनुमानजयन्त्युत्सवाचे प्रसंगीं मुसलमानांच्या आगळिकीमुळें जो दंगा झाला व त्या वेळीं हिंदूंच्या बाबतींत जो अन्याय झाला तत्संबंधींची लेखी कैफीयत दादरच्या हिंदु पुढाऱ्यांनीं नामदार गव्हर्नरसाहेबांना सादर केली असल्याचें प्रसिद्ध झालें आहे. या कैफियतींत श्रीहनुमज्जयन्त्युत्सवाचे प्रसंगीं हिंदूंची मुसलमानांनीं आगळीक करूनहि हिंदू कसे शांततेनें वागले, हिंदूंची कुरापत काढण्याकरितांच श्रीबलभीमाचे देवालयासमोर मशीद कशी उभारली गेली, तडजोडीचे प्रयत्न मुसलमानांनीं आततायीपणानें कसे अयशस्वी केले, शौकतअलींच्या अनुज्ञेनें ठरलेल्या अटी धाब्यावर बसवून मुसलमानांनीं कसा दंगा केला, पोलिसांनीं प्रसंग ओळखून गोळीबार केला, परंतु शांतता प्रस्थापित झाल्यावरहि हिंदूंना मंजुळ वाद्यें वाजविण्याची कशी बंदी केली व ज्यांनीं श्रीहनुमज्जन्मप्रसंगीं सहज टाळ्या वाजविल्या त्यांना देवळाबाहेर कसें हुसकून काढलें, याबद्दलची सांग्रंत हकीकत अगदीं निःपक्षपातीपणानें दिली आहे. त्याचप्रमाणें मुसलमानांनीं वाटेल तेथें नवीन मशीद बांधणें याचा अर्थ हिंदूंच्या न्याय्य हक्कांची पायमल्ली करतां येणें असा होणें इष्ट नसल्यामुळें सरकारनें या बाबतींत मुसलमानांच्या चढेल वृत्तीला वेळींच आळा घालणें अत्यंत जरूरीचें आहे असेंहि त्या कैफियतींत स्पष्टपणें दर्शविण्यांत आलें आहे.

### दादरच्या हिंदूंची प्रचंड जाहीर सभा

श्रीहनुमज्जयन्त्युत्सवाचे प्रसंगीं मुसलमानांनीं गुंडगिरी करून हिंदूंच्यावर आक्रमण केलें तशा

प्रकारचा प्रसंग हिंदूंवर येऊन त्यांच्या जन्मसिद्ध व न्याय्य हक्कांची पायमल्ली केली जाऊं नये म्हणून उपाययोजना करण्याकरितां दादरच्या अखिल हिंदु बांधवांची जाहीर सभा धुरु हॉलमध्यें बॅ. जम्नादास माधवजी मेहता यांच्या अध्यक्षतेखालीं मंगळवारीं रात्रीं भरली होती. सभेला अतिशय गर्दी झाली असून रा. ब. सीतारामपंत बोले, श्री. डहाणूकर, श्री. वेद्क, श्री. नवलकर, श्री. नवरे, श्री. सहस्रबुद्धे ही मंडळी सभेमध्यें प्रामुख्यानें दिसत होती. श्री. सीतारामपंत बोले यांनीं बॅ. जम्नादास मेहता यांनीं अध्यक्षस्थान स्वीकारावें अशी सूचना करतांना श्रीहनुमज्जयन्त्युत्सवाचे प्रसंगीं मुसलमानांनीं कसा आततायीपणा केला याची हकीकत सांगितली. बॅ. जम्नादास मेहता यांनीं आपल्या भाषणांत हिंदु जात परकीय संस्कृतीचीं आक्रमणें होत असतां शतकानुशतकें जिवंत राहिली व ती तशीच जिवंत राहणार, श्रीहनुमज्जयन्त्युत्सवाचे प्रसंगीं मुसलमानांनीं जें दांडगाईचें वर्तन केलें तें निश्चितपणें हिंदूंच्या हक्कांची पायमल्ली करणारें होतें, हिंदु-मुसलमानांनीं सलोख्यानेंच वागणें आवश्यक आहे. सरकार दोघांमध्यें दुही पाडण्याचा प्रयत्न करीत आहे, भावी राज्यघटनेबाबत मुसलमानांना सरकार सवलती देत आहे, परंतु या सवलती देऊन सरकार आपलें थडगेंच खणीत आहे ही गोष्ट सरकार विसरत आहे वगैरे गोष्टींचा उल्लेख केला. यानंतर मुसलमानांच्या गुंडगिरीचा व पोलिसांनीं हिंदूंचीं वाद्यें बंद पाडण्याच्या बाबतींत केलेल्या अन्यायाचा निषेध करणारा व पुढील कार्याकरितां श्री. सहस्रबुद्धे, रा. ब. बोले, नवलकर, डहाणूकर, जोशीप्रभृति पुढाऱ्यांची कमिटी नेमणारा ठराव सभेनें एकमतानें संमत केला. अध्यक्षांनीं समारोप केल्यावर सभेचें काम संपलें.

# स्फुट सूचना

१ मुंबईस दादर येथें गेल्या हनुमानजयंतीच्या दिवशीं मुसलमानांनीं पुंडाई माजवून हिंदूंना त्यांच्या देवळांतहि वाद्यें वाजविण्यास हरकत केली. मुसलमानांची ही पुंडाई अशीच चालू दिली तर हिंदूंना स्वतःच्या धर्मकृत्यांस हळहळू मुकावें लागणार हें उघड आहे. ही गोष्ट हिंदूंच्या धर्माभिमानास व स्वाभिमानास लांछनास्पद असल्यानें ठिकठिकाणच्या हिंदूंनीं आपआपल्या ठिकाणीं तरी आपल्या धर्मरक्षणासाठीं जागरूक राहणें आवश्यक झालें आहे. दादर येथील हिंदूंनीं आपल्यावरील ही जबाबदारी वेळींच ओळखली याबद्दल त्यांचें कोणीहि अभिनंदनच करील. गेल्या मंगळवारीं दादर येथें धुरू दिवाणखान्यांत बॅ. जम्नादास मेहता यांच्या अध्यक्षतेखालीं हिंदूंची जाहीर सभा भरून तिच्यांत संघटित प्रयत्नाच्या दृष्टीनें विचार झाला. सदर सभेंत मुसलमानांच्या पुंडाईचा निषेध करण्यांत येऊन हिंदूंचें संरक्षण पोलिसांकडून नीट रीतीनें झालें नाहीं याविषयीं खेद दर्शविण्यांत आला. सदर सभेंत हिंदूंच्या रक्षणाकरितां एक कमिटी स्थापन झाली, तिचें महत्त्व विशेष होय. मुसलमानांच्या अतिक्रमणाचा प्रतिकार करणें, इतर जातींशीं विचारविनिमय करणें आणि मारुतीच्या देवळाच्या मिरवणुकीच्या हक्काच्या रक्षणासाठीं हर एक प्रकारचे उपाय अमलांत आणणें हीं कामें कमिटीनें आपल्या अंगावर घेतलीं असून सदर काम तिच्या हातून यशस्वीपणें पार पडतील अशी आम्हांस आशा आहे.

२ ज्या राज्यांत नागरिकांची मालमत्ता सुरक्षित राहात नाहीं, जीविताचा भरंवसा नसतो व जीवितापेक्षांहि अधिक महत्त्वाची अशी स्त्रियांची अब्रू शाबूद राहात नाहीं तें राज्य नसून ती रानटीबेबंदशाही आहे असें म्हणावें लागतें. इंग्रजी राज्याचा मोठेपणा हीं वरील दुःखें त्याच्या राज्यांत नाहींत यावर उभारलेला आहे. पण ती परिस्थिति बंगाल प्रांतांत तरी नाहींशी होत चालली आहे असें मोठ्या कष्टानें म्हणावें लागतें. आजच्या अंकांत छापलेल्या आमच्या कलकत्ता येथील बातमीदाराच्या पत्रावरून व हातीं आलेल्या कलकत्त्याच्या सुप्रसिद्ध 'अॅडव्हान्स'पत्राच्या ताज्या अंकांत आलेल्या हकीकतीवरून पूर्व बंगाल्यांत विशेषतः मैमनसिंग, जेसोर व रंगपूर या जिल्ह्यांत तरी, हिंदूंची मालमत्ता, जीवित व त्याच्या बायकांची अब्रू भरदिवसा लुटली जात आहे, असें स्पष्ट दिसतें. जेसोर जिल्ह्यांतील मणिरामपूरच्या पोलिसस्टेशन हद्दींतील उत्तरपाडा येथील भुवन सरदार या नांवाच्या नागरिकाची फुलमणी नांवाची विधवा मुलगी गुलाम रसूल, फाजल करीम वगैरे मुसलमान हत्यारी गुंडांनीं उचलून नेली वगैरे हकीकतीची फिर्याद गेल्या २३ तारखेस दाखल करण्यांत आली आहे! अशी एकच फुलमणी असती तर त्यांत विशेष कांहीं नव्हतें. परंतु सर्व बंगालभर अशा अनेक अभागी फुलमणी मुसलमानांच्या अत्याचारास बळी पडत आहेत हें पाहून

आपल्या पौरुषाचा अभिमान बाळगणाऱ्या कोणाहि हिंदूंस त्वेष आल्यावांचून राहणार नाहीं. बंगाल्यांतील हिंदू जागे होऊन या प्रश्नाकडे आपली दृष्टि केव्हां वळविणार समजत नाहीं. अपराध्यास कडक शासन करणें, गुन्हेगारांना दहशत बसविणें व अन्यायाचें परिमार्जन करणें हें काम सरकारचें आहे. तें काम सरकारकडून नीट होत नाहीं म्हणूनच वरील प्रकार घडतात. पण सरकारास बोल लावण्यांत काय हंशील? हिंदूंनीं सामर्थ्यवान व सुसंघटित होऊन स्वसंरक्षण केलें पाहिजे, हेंच खरें ज्याला आपली मालमत्ता रक्षण करण्याचें सामर्थ्य नाहीं अगर आपल्या बायकांची अब्रू संभाळतां येत नाहीं, त्या नादानांना ईश्वरसुद्धां साहाय्य करणार नाहीं! म्हणून हिंदूंनीं स्वावलंबनाचीच कांस धरली पाहिजे!!

---

३ अँग्लो-आयरिश प्रश्नाचें रूपांतर भीषण युद्धांत कीं सामोपचाराच्या कुंजवनांत होणार हें निश्चितपणें आतांच सांगतां येत नाहीं, इतक्या बेतानें प्रत्येक पक्ष आपलें मोहरें पुढें सरकवीत आहे. ता. २० रोजीं डी व्हॅलेरा यांनीं डेल आयेरनमध्यें राजनिष्ठेचा शपथविधि गाळून टाकण्याचें बिल मांडलें व त्याचें पहिलें वाचन मंजूरहि झालें. डी व्हॅलेरा यांचें हें आक्रमण अर्थातच ब्रिटनला अधिकाधिक असह्य होत आहे. या बिलाविरुद्ध इंग्लंडचे वसाहतमंत्री मि. जे. एच. थॉमस यांनीं ता. २६ रोजीं कॉमन्स सभेंत पुनः एकवार गर्जना केली. थॉमस म्हणतात, "या बिलाचा उद्देश राजनिष्ठेची शपथ काढून टाकणें एवढाच नसून अँग्लो-आयरिश तहाला कायद्याचें स्वरूप असून तो आयर्लंडवर बंधनकारक आहे, फ्रीस्टेटच्या राज्यघटनेंत सदर तहास सोडून जो फेरफार करण्यांत येईल तो रद्द समजला जाईल, या आशयाच्या तहांतील दुसऱ्या कलमालाहि वरील बिलानें हरताळ फासला जाणार आहे." मि. थॉमस यांच्या मतें आयर्लंडची राज्यघटना अपरिवर्तनीय आहे तर डी व्हॅलेरांच्या मतें ती परिवर्तनीय आहे. या खोड्यांतून सुटण्याचा सुलभ व श्रेयस्कर मार्ग म्हणजे सामोपचार व शिष्टाई हाच होय.

# प्रासंगिक बोल

**ख्रिस्ती धर्माचा प्रभाव !**

"ख्रिश्चन धर्म म्हणजे दयाक्षमाशांतीचें माहेरघर, त्यांतच साऱ्या जगाचें तारण होणार" अशी ग्वाही पाद्री मिशनरी देतात. पण मॉडर्न रिव्ह्यूच्या फेब्रुवारीच्या अंकांत मि. जॅबेझ टी. संडरलंड यांनीं जगांतील सात धर्मांच्या गुणावगुणांची छाननी करून ख्रिश्चन धर्माला पुढील आहेर सादर केला आहे. "पृथ्वीतलावर शांतीची शीतल छाया कोणत्या धर्मानें पसरली असें विचाराल तर 'ख्रिस्ती धर्मानें' असें उत्तर देण्याला आपल्याला तोंड नाहीं. गेल्या हजार वर्षांत ख्रिस्ती लोक जितकीं युद्धें जितक्या भीषणतेनें खेळले, तितकीं दुसऱ्या कोणत्याहि लोकांनीं केलीं नाहींत. याला अपवाद फक्त मुसलमानांचा. पण ते देखील गेल्या तीन-चार शतकांत ख्रिश्चनांपेक्षां अधिक सौम्यपणें वागले आहेत. चतुरंग दळ पदरीं ठेवून जगांत युद्धाचें वारें उत्पन्न करण्याचें सामर्थ्य कोणाच्या मुठींत असेल तर ख्रिश्चन राष्ट्रांच्याच. १९१४ चें महाभयंकर महायुद्ध हें तर त्यांच्याच कर्तृत्वाचें फळ! येशू ख्रिस्त हा शांतिदूत (Prince of peace) होता. परंतु ख्रिस्ती राष्ट्रें ख्रिस्ती धर्माला आपल्या वर्तनानें काळिमा फाशीत आहेत! परमतसहिष्णुतेच्या बाबतींतहि ख्रिस्ती धर्म नम्राचीच मान डोलवीत आहे. तीं 'चौकशीकोर्टें', (Inquisitions), त्या कत्तली (St. Bartholomew Massacres) आणि चेटकी म्हणून स्त्रियांना उभेच्या उभें जाळणें!! वृद्ध, गुरुजन इत्यादिकांबद्दल आदरभाव उत्पन्न करण्याचें कार्य ख्रिश्चन धर्मानें केलें काय? नाहीं हेंच त्याला उत्तर. बरें, दारूबंदीच्या बाबतींत? छे, नांव काढून नका! मदिरादेवीची षोडशोपचारें पूजा कोठें होते? ख्रिस्ताच्या अनुयायांत. आणि तिचा संप्रदाय वाढविण्याचें श्रेयहि त्यांच्याच पदरीं. तीच स्थिति अफूची. चीननें दोन रणसंग्राम केले तरी त्याच्या घशांत हट्टाहट्टानें अफूच्या गोळ्या कोणीं कोंबल्या असतील तर एका ख्रिश्चन राष्ट्रानेंच!"

# त्रिंबकजी डेंगळयाचा मृत्यु

ता. ३ जून १८१८ रोजीं पेशवा दुसरा बाजीराव यानें शरण जाऊन राज्याची सोडचिठ्ठी मालकम यास लिहून दिली. तेव्हां त्याचा साह्यकारी त्रिंबकजी डेंगळे उघडा पडला, आणि इंग्रजांनीं लगेच त्याचा पाठलाग करून एक महिन्याने त्यास वणी–दिंडोरीजवळ अहिरगांव येथें पकडलें; आणि बेड्या घालून प्रथम चांदवडचे ठाण्यांत ठेविलें. बाजीरावाशीं वर्षभर युद्ध चालविण्यांत जो खर्च व त्रास इंग्रजांस पडला त्याचें मुख्य कारण त्रिंबकजी असल्यामुळे त्यांचा त्याजवर अत्यत दांत होता. तथापि त्याचा शिरच्छेद न करितां त्यास त्यांनीं दूर नेऊन काशीच्या दक्षिणेस चुनारगडचे किल्ल्यांत बंदींत ठेविलें. तेथें त्याचा अंत कधीं झाला ही गोष्ट इतिहासात नमूद नाहीं तपास करतां असें कळतें कीं, याच चुनारगड किल्ल्यांत त्रिंबकजी डेंगळे ता. १६ ऑक्टोबर सन १८२९ रोजी सकाळीं ८ वाजता मृत्यु पावला. ही हकीकत चुनारगड किल्ल्यांतील लष्करी अंमलदार कर्नल जेम्स ओरिओल ( Col. James Auriol ) याने त्याच तारखेस वरिष्ठांस लिहून कळविली. ते कागद कलकत्त्याच्या इंपीरिअल रेकॉर्ड्स्मध्ये नमूद आहेत. त्रिंबकजीच्या मृत्यूची ही मिति जाणण्याची इच्छा माझ्याप्रमाणेंच इतर अभ्यासकांना असेल असें समजून त्यांच्या माहितीसाठीं ती आपण प्रसिद्ध करावी अशी विनंति आहे.

सन १८१८ पासून अकरा वर्षे त्रिंबकजी इंग्रजांच्या बंदींत होता. बाजीरावकालीन व्यक्तींच्या हकीगती आपणास अत्यंत विकृत स्वरूपांत अवगत झालेल्या आहेत. जिंकलेल्या राष्ट्रामध्यें जेत्यांस गुण असा सहसा दिसत नसतो.याच न्यायानें त्रिंबकजीच्या खऱ्या कर्तबगारीची ओळख अद्यापि आपणास झालेली नाहीं. तो समजला जातो तितका निर्बुद्ध, दुष्ट किंवा पराक्रमशून्य नव्हता. तो अक्षरशत्रु होता असें इंग्रज लेखक लिहितात, ते तर साफ खोटें आहे. सन १८०२ सालीं वसईचा तह घाटत असतां बाजीरावाची कांहीं नाजूक कामगिरी मोठ्या हिमतीनें व कल्पकतेनें त्यानें पार पाडली. तेव्हांपासून बाजीरावाची त्याजवर मर्जी बसली आणि पुढील १६ वर्षांत त्यानें आपल्या धन्यासाठीं नानाप्रकारचे कष्ट केले. राज्याची घसरलेली बाजू त्यांस संभाळतां आली नाहीं. याजबद्दल तो एकटाच जबाबदार आहे, असें नाहीं.ठाण्याच्या तुरुंगांतून पळून जाण्याची त्याची शिताफी अप्रतिम गणली जाईल.

चुनारगड येथें कैदेंत असतां ता. ११-९-१८२४ रोजीं इंग्रज प्रवासी बिशप हीवर यानें त्रिंबकजीची भेट घेऊन त्याचे वर्णन लिहिलें. त्यांत तो म्हणतो, "त्रिंबकजीस अत्यंत कडक बंदोबस्तांत ठेवलेलें आहे. बरोबर त्याचे चार नोकर आहेत. बाहेर जातांना व आंत येतांना त्यांचा कसोशीनें झाडा घेण्यात येतो. त्रिंबकजी हा लहानसा ठेंगू गृहस्थ असून, चेहऱ्यावरून चिडखोर दिसतो. अंगावर एक रेशीमकांठी धोतर अर्धे नेसलेलें व अर्धे गळ्यावरून खालीं सोडलेलें होतें. त्यानें मला आंत नेऊन स्वतः केलेली बाग व देऊळ होतें, तें दाखविलें त्यांतील थोडींशीं फुलें तोडून त्याने मला दिलीं. तुमच्यासारख्या सुप्रसिद्ध पुरुषांची भेट झाल्याबद्दल मला आनंद होतो असें मीं म्हटलें. तेव्हां तो किंचित् हांसून बोलला, ' ही भेट दुसऱ्या ठिकाणीं झाली असती तर मलाहि आनंदच झाला असता. कंपनी सरकारानें मोठा दंड घेऊन अद्यापि मला सोडावें आणि माझेकडून कांहीं सेवा घ्यावी. मी बाजीरावाची चाकरी केली त्याहूनहि जास्त निष्ठेनें मी सरकाराची नोकरी करून दाखवीन. मीं असे अर्ज वारंवार केले. पण त्यांचा कांहीं उपयोग होत नाहीं, याचें कारण एलफिन्स्टन साहेब होत. हेच गृहस्थ माझे परम दोस्त व हेच गृहस्थ माझे परम शत्रू. दोस्त म्हणण्याचें कारण यांनीच माझा जीव वांचविला व हेच माझ्या बायकामुलांची व घरादाराची काळजी घेत आहेत. परंतु मला येथें कायमचा डांबून ठेवणारेहि तेच. "

त्रिंबकजीचें मूळ ठिकाण सगमनेर तालुक्यांत निंबगांव जाळी हे असून तेथें अद्यापि त्याचा वंश नांदत आहे. त्याचा बाप मल्हारजी डेंगळे तेथील पाटील होता. त्रिंबकजीच्या आईचें नांव मानाबाई त्याचा बाप त्याच्या लहानपणींच वारला आणि आईनें कुटुंबाचें संगोपन केलें. त्याच्या आठ बायका झाल्या, पैकीं एकीसच एक मुलगा झाला.त्याचें नांव गणपतराव होय. या गणपतरावाची बायको थोड्याच वर्षांपूर्वी पुणें येथें शुक्रवारांत त्रिंबकजीचा वाडा होता तेथें वारली. निंबगांव–जाळीसहि त्रिंबकजीचा वाडा होता तो जळून गेला. त्यांत त्याचे सर्व कागद जळून गेले अशी माहिती मिळते. त्रिंबकजीचें सर्वच चरित्र विचित्र व अनेक दृष्टींनीं बोधप्रद आहे. कळावें ही विनंति.

**गो. स. सरदेसाई.**

# कोट्यधीश क्रूगरची आत्महत्या

जगांतील आगपेट्यांच्या धंद्याचा सम्राट् व स्वीडनचा प्रख्यात कुबेर आयव्हार क्रूगर यानें गेल्या मार्चच्या १२ तारखेस पॅरिस शहरांत स्वतःवर पिस्तुल झाडून घेऊन आत्महत्या केल्याचें वृत्त प्रसिद्ध होतांच सारें जग स्तंभितच होऊन गेलें. युरोप-अमेरिकेंतील नाणेबाजारांत विलक्षण उलटापालट घडून आली व अद्यापि ती चळवळ शांत झाली नाहीं. एका व्यक्तीच्या मृत्यूमुळें जगाच्या उद्योग-क्षेत्रांत क्रांति होण्यासारखें असले प्रसंग फार क्वचित् घडून येतात. क्रूगरचें प्रस्थच तसें होतें. जगांतील बहुधा प्रत्येक देशांतील कोणत्याना कोणत्या धंद्याशीं त्याचा प्रत्यक्ष संबंध होता. त्यांच्या 'क्रूगर अँड टोल' कंपनीचा व्यवहार तर जगव्यापी होता.

कोट्यधीश क्रूगरच्या आत्महत्येविषयीं लोकांच्या मनांत नाना प्रकारचे तर्ककुतर्क सुरू झाले आहेत. कोणी डॉक्टर लोक असें म्हणतात कीं, कामाच्या विलक्षण दगदगीमुळें मेंदूवर परिणाम झाल्यामुळें त्यानें कपाळमोक्ष केला. तर विवाहाभावीं एकलकोंड्या आयुष्यक्रमाला कंटाळून त्यानें मृत्यूला कवटाळिलें असें कोणी प्रपंची जन समजतात राजकारणी पुरुषांचें असें मत पडतें कीं, जर्मनी वगैरे देशांना स्वतः दिलेलें कर्ज परत मिळण्याची आशा नष्ट झाल्यामुळें क्रूगर भावनातिरेकाला बळी पडला. पण अलीकडे प्रसिद्ध होणाऱ्या बातम्यांवरून त्याच्या आत्महत्येवर निराळाच प्रकाश पडत आहे. क्रूगर-टोल कंपनीच्या इतर डायरेक्टरांनी अंतर्गत कारभारांत भयंकर अंदाधुंदी माजविली असून ती उघडकीला येऊन स्वतःची बेअब्रू झाल्याशिवाय रहात नाहीं असे आढळून आल्यामुळें 'न भीतो मरणादस्मि केवलं दूषितं यशः' या वचनानुरूप त्यानें जगाच्या पसाऱ्यांतून अंग काढून घेतलें असें मानण्यास जागा आहे. कारण त्याच्या मृत्यूनंतर क्रूगर-टोल कंपनीच्या व्यवहाराची सरकारी रीत्या चौकशी सुरू होऊन अनेक भानगडी बाहेर येत आहेत. जमाखर्च व शिल्लक यांत मेळ नाहीं, बनावट दस्तऐवज व त्यांवर डायरेक्टरांच्या सह्या, खाजगी कर्जाचे बोजे कंपनीच्या नांवावर चढवलेले! एवढ्याच नव्हे तर आणखी कांहीं गोष्टी उजेडांत येण्याचा संभव आहे. कसेंहि असो, क्रूगरच्या मृत्यूमुळें आंतरराष्ट्रीय महत्त्व असलेला एक उद्यमपुरुष जगांतून नाहींसा झाला यांत शंका नाहीं.

क्रूगरच्या औद्योगिक भरभराटीचें स्वरूप फार विस्मयजनक आहे. त्याचें भांडवल १३ कोटी पौंडांचें होतें. स्वतःच्या स्वामित्वाचे आगपेट्यांचे १५० कारखाने जगांतील ३५ देशांमध्यें त्यानें स्थापन केले. आपलें आगपेट्यांचें सम्राटपद कायम राखण्यासाठीं त्यानें जगाच्या सर्व बाजारपेठांत पाण्यासारखा पैसा ओतला असून जर्मनीला ३३ कोट रुपये व हंगेरीला १० कोट रुपये त्यानें कर्ज दिलें होते. याच नव्हे तर एकंदर १५ देशांचा तो धनको होता! आगपेट्यांच्या धंद्याव्यतिरिक्त इतर अनेक उद्योगसंस्थांशीं त्याचा संबंध होता. ५ प्रमुख बँकांचा तो डायरेक्टर होता. ४ दारूगोळ्याचे कारखाने, ७ शिल्पप्रतिष्ठानें, १३ टेलिग्राम-टेलिफोन कंपन्या यांत त्याचें वर्चस्व होतें.

क्रूगरचें हें वैभव त्याला आयतें लाभलें नसून त्यानें स्वतःच्या कर्तृत्वावर तें मिळविलें होतें. सन १९०० मध्यें म्हणजे वयाच्या २०व्या वर्षी क्रूगर अवघे २० पौंड बरोबर घेऊन अमेरिकेंत गेला. या वेळीं त्याची स्टॉकहोम विद्यापीठाची शिल्पविषयाची उच्च परीक्षा उत्तीर्ण झाली होती. पण अमेरिकेंतमन न रमल्यामुळें तो मेक्सिकोमध्यें गेला. तेथें त्याचे जोडीदार पीतज्वरानें मृत्युमुखीं पडल्यामुळें क्रूगर पुनः अमेरिकेंत परत आला. वाटेंत त्याच्या आगबोटीवरील एका उतारूचें मूल समुद्रांत पडलें असतां क्रूगरनें तात्काळ उडी मारून त्याला वर काढिलें इतकी परोपकारबुद्धि व धाडस त्याच्या अंगीं होतें. १९१३ मध्यें स्वीडनमध्यें आगपेट्यांच्या धंद्यांत रीप वगैरेमुळें बरीच खळबळ उडाल्यानें तो मातृभूमीला परत आला. परिस्थिति निवळतांच त्यानें वडिलांच्या २ कारखान्यांना जोडून नवे २ कारखाने काढिले. व दिवसानुदिवस त्या धंद्यांत त्याची भरभराट होत जाऊन अखेर १५० कारखान्यांचा तो स्वामी बनला! जपाननें जगाचें आगपेट्यांचें क्षेत्र पादाक्रांत केलें होतें तें क्रूगरनें चढाओढींत त्याच्यावर जय मिळवून स्वतः हस्तगत केलें. कित्येक देशांतील पेट्यांचे कारखाने त्यानें बुडविले किंवा विकत घेतले. कित्येक ठिकाणी आयात जकातीचा ससेमिरा चुकविण्यासाठीं नवे कारखाने काढले. हिंदुस्थानांतहि त्याचे २-३ मोठाले कारखाने चालू आहेत. इंग्रजांच्या व अमेरिकनांच्या कांहीं मोठ्या कारखान्यांस त्याच्याशीं सहकार्य करणें भाग पडलें. आगपेट्यांच्या बाबतींत जगाला आपला अंकित करण्याची महत्त्वाकांक्षा धरून स्थापन झालेल्या 'स्विस् अमेरिकन मॅच कंबाईन'चा तो प्रमुख

पुरस्कर्ता होता. या संघाविषयीं मागें आम्हीं केसरींत विवेचन केलें होतें तें वाचकांच्या स्मरणांत असेलच.

क्रूगरची आगपेट्यांच्या मिश्रणाची विशिष्ट गुप्त पद्धति एकदां कांहीं जपानी लोकांनीं चोरून नेली व जपानभर तिचा प्रसार केला. क्रूगरच्या थोर स्वभावाचा पुष्कळजण असा भलताच फायदा घेत. त्याची रहाणी अत्यंत साधी होती. दारू व तंबाखू यांचें सेवन त्यास माहीत नव्हतें. वयाच्या ५२ व्या वर्षीहि त्याच्या अंगीं असणारा उत्साह व कामाची धमक तरुणांस लाजविणारी होती. क्रूगरसारख्या जगप्रसिद्ध उद्यमसम्राटावर आत्महत्येचा प्रसंग यावा ही केवढी विचित्र विधिघटना म्हणावयाची !

# पुस्तक-परीक्षण

## एडिसन

नुकतेंच परलोकवासी झालेले अमेरिकेंतील जगविख्यात शास्त्रज्ञ थॉमस आल्हवा एडिसन याचे सुमारें चारशें पृष्ठांचें चरित्र श्रीयुत गुरुनाथ प्रभाकर ओगले यांनीं मराठींत लिहिलें आहे, व तें इतकें मनोरंजक व सरस उतरलें आहे कीं,एखाद्या कादंबरीप्रमाणें ते संपविल्यावांचून खालीं ठेववत नाहीं. एडिसन यांचें चरित्र म्हणजे एक नवलकथा किंवा रोमान्सच आहे! पहिली दहाबारा वर्षे सोडून त्यांचे पंचाऐशीं वर्षांचें आयुष्य भौतिक सुधारणेच्या प्रगतीला वाहिलें होतें. निरनिराळे शोध लावून त्यांनीं इंग्लंड अमेरिका यांत जीं पेटंटें घेतलीं त्यांची नुसती संख्याच दीड हजार आहे ! गेल्या शतकाला जें 'चमत्कार-युग' असें शास्त्रज्ञांनीं नांव दिलें आहे त्यांत एकट्या एडिसनचें कार्य प्रचंड आहे. आज सर्व जगभर जो विद्युद्दीपमालांनीं झगझगीत प्रकाश पाडला आहे तो मालवून सर्व जगभर अंधार केला, डोळ्यांत बोट घातलें तरी दिसणार नाहीं असे मिणमिणे दिवे पुनः लावले, हजारों मैल लांबवर पसरलेली टेलिफोन तारायंत्रांचीं जाळीं तोडून टाकलीं, सिनेमा गृहें बंद केलीं, सिमेंट कॉंक्रीटचीं घरें उध्वस्त करून तीं पुनः विटामातीचीं बांधलीं, ग्रामोफोन बंद झाला, विजेच्या गाड्या न दिसतां पुनः ऑइल एन्जिनें धावू लागलीं तर एडिसनपूर्वीच्या जगाची काहींशी कल्पना करितां येईल. नुकताच मुंबईसरकारनें विजेवर कर बसविला. तेव्हां 'हा रानटीपणा आहे' असें टाईम्सनें म्हटलें म्हणून सरकारची तुलना तेराव्या शतकांतील बिनसुधारलेल्या अशिक्षित दंडधारी सुलतानाशी केली. पण भौतिक सुधारणेच्या प्रगतीचा इतिहास पाहिला तर इतकेंहि लांब जावयास नको.वरील स्थिति खुद्द गेल्या एकोणिसाव्या शतकांतच नांदत होती. आजच्या विसाव्या शतकांत असलेली युद्धशास्त्रांतील अलौकिक सुधारणा पाहून खुद्द नेपोलियनलाहि जो आचंबा वाटेल, तीच स्थिति एकोणिसाव्या शतकांतील सामान्य माणसास आज इतर बाबतींतहि घडलेलें प्रचंड स्थित्यंतर पाहून प्रत्ययाला येईल.

एडिसनच्या शोधांनीं जी आधुनिक भौतिक सुधारणा झाली आहे तिचें **ऐतिहासिक विवेचन** या पुस्तकांत सांपडतें.आज ग्रामोफोन ऐकला, विजेचा दिवा लावला, टेलिफोन हातांत घेतला, सिनेमा बघण्यास गेले किंवा विजेच्या धांवत्या आगगाडींतून प्रवास केला तरी, त्यांत सुशिक्षित माणसास काय पण खेडवळ मनुष्यासहि आश्चर्य वाटत नाहीं. याला कारण केवळ 'अतिपरिचय' म्हणजे सराव. पण ज्या वेळीं यांपैकीं प्रत्येक सुधारणेनें एडिसनच्या प्रयोगशाळेंत जन्म घेऊन जगांत पहिले पाऊल टाकलें त्या वेळीं अमेरिकेंतील लोकांना कसें वेड लागलें होतें, यक्षभूमींत शिरल्याप्रमाणें भौतिक सुधारणेच्या प्रकाशानें प्रत्येक मनुष्य कसा भारून गेला होता, यांचे खरेंखुरें ऐतिहासिक चित्र या पुस्तकांत काढलें आहे. न्यूयॉर्क शहरावर दिसणाऱ्या तेजःपुंज शुक्राचा ताऱ्याकडे पाहून त्यावेळीं एक चमत्कारिक भ्रम लोकांत पसरला होता. कित्येकांस ही शुक्राची चांदणी आहे असें वाटे; कित्येक म्हणत सर्व न्यूयॉर्क शहराला दिसावा म्हणून लाखों कँडल पॉवरचा एक झगझगीत दिवा एका लांबट्या विमानाला टांगून एडिसननें आकाशांत सोडून दिला आहे! हा वाद कित्येक वर्षे चालू होता !!

पूर्वी लहान मुलांच्या क्रमिक पुस्तकांतील 'सूर्याच्या धड्यांत' पहिलेंच वाक्य असें असे कीं, "मुला मी कोण, व माझें नांव काय?" सृष्टींतील वस्तुजात लहान अर्भकाला अज्ञानामुळें कौतुकाची भासते. शास्त्रीय शोधांबद्दल आपणहि बहुधा लहान मुलांइतकें असेंच अज्ञानी नसतो काय? सिनेमा, विद्युद्दीप, तारायंत्र इत्यादिकांनीं आपलें जन्मवृत्त आपणास सांगितलें तर आपणास नवलच वाटेल. भौतिकशास्त्रांचा अभ्यास हल्लीं शाळाकॉलेजांतून

करवितात; पण भौतिक शोधांच्या ऐतिहासिक ज्ञाना शिवाय हें शिक्षण फुकटच जातें. शाळांतून क्रमिक पुस्तकांबरोबर एडिसनच्या चरित्रासारखें ऐतिहासिक दृष्टीनें लिहिलेलें शास्त्रीय पुस्तक इतर वाचनाकरिता म्हणून जरूर ठेवावयास पाहिजे. पण सध्यां मुंबई युनिव्हर्सिटींतच किती अंधेर व अज्ञान आहे याचें जातांजातां एकच उदाहरण सांगावेंसें वाटतें. ' ज्ञानसिंधु व इतर लघुकथा ' या नांवाच्या पुस्तकांत थॉमस हार्डीच्या गोष्टींचीं भाषांतरें आहेत. या शर्विलकी विद्येबद्दल वर्तमानपत्रांतून गवगवाहि झाला, व लेखकाची चोरी चवाठ्यावर आली. बरें, पुस्तकहि सामान्यच होतें. तथापि गतवर्षी मुंबई युनिव्हर्सिटींत तें मराठीकरितां एम्. ए. च्या परीक्षेकरितां लावण्यांत आलें!! अशा अंधेर-नगरींत ' एडिसन 'सारख्या शास्त्रीय विषयावरील पुस्तकांचा प्रकाश पडेल अशी आशा करणें व्यर्थ आहे. तथापि शाळांमधून हें पुस्तक शिक्षकांनीं खासगी रीतीनें जरूर वाचवून घ्यावें अशी सूचना करावीशी वाटते.

स्वतः एडिसनच्या चरित्राबद्दल सांगावयाचें कारण-च नाहीं. अविश्रांत उद्योग, कल्पकता इत्यादि गुणांमुळें 'भौतिक शास्त्रांतील विश्वकर्मा ' ही पदवी एडिसन याला देण्यास हरकत नाहीं. कारण भौतिक शास्त्रांच्या सृष्टींत स्थित्यंतर करून त्यानें एक प्रतिसृष्टिच निर्माण केली! एडिसन नुसता कल्पक नव्हता, शोधक होता. कल्पना व शोध यांत फरक आहे असे तो म्हणे. नुसती कल्पना अनेकांच्या डोक्यांत घोळत असते. पण प्रयोगशाळेंतून प्रत्यक्ष व्यवहारांत उपकरणाच्या साहाय्यानेंहि शक्य कोटींत ती उतरविणें म्हणजे शोध होय. कोण त्याहि गोष्टींस नाक मुरडणारे लोक प्रथम असता-तच. तसें ते एडिसनलाहि भेटले. नुसते शोध लावून व त्यांचीं पेटंटें घेऊन एडिसनच्या हातून आजची क्रांति झाली नसती. स्वतःच्या मनगटाच्या जोरावर कारखाने उभारून त्यांत क्रोडो रुपये एडिसननें घातले, तेव्हां आधुनिक जगाची सुधारणा पाऊलवाट चालूं लागली. व सर्वांत आश्चर्याची व त्याचबरोबर अभिमानाची गोष्ट अशी कीं निर्वाहासाठीं प्रथमतः आगगाडींतून वर्तमानपत्रें विकत फिरणाऱ्या 'पोऱ्या'नें केवळ दीर्घोद्योगाच्या जोरावर आपलें ' नशीब ' हस्तगत केलें व यशाचें कैलासशिखर गांठलें. हाच एडिसन यांच्या आयु-ष्याचा सर्व जगाला संदेश होय!

प्रस्तुत पुस्तकाची भाषा सुबोध आहे, व किंमतहि अगदीं स्वल्प आहे. असा उत्तम चरित्रविषय निवडून तो महाराष्ट्रवाचकां-पुढें ठेवल्याबद्दल श्रीयुत गुरुनाथराव ओगले यांचें अभिनंदन करणें उचित आहे.

(ले.–श्री. गुरुनाथ प्रभाकर ओगले. प्र. शंकर नर-हर जोशी, चित्रशाळा, पुणें. कि. १॥ रु. कागदी बांधणी व २ रु. कापडी बांधणी.)

# दोन महात्मे-वॉशिंग्टन व गांधी

[गेल्या 'फॉर्टनाइटली रिव्ह्यूच्या' अंकांत इंग्लंडांतील एक सुप्रसिद्ध लेखक मि. जी. के. चेस्टरटन् यांनीं जॉर्ज वॉशिंग्टन यांच्यावर एक लेख लिहिला आहे. त्यांत म. गांधी यांच्यासंबंधींहि बरेच उल्लेख आले आहेत. ते महत्त्वाचे व मौजेचे आहेत म्हणून त्या लेखाचा त्यापुरता सारांश खालीं दिला आहे.]

कांहीं महिन्यांपूर्वी लंडनच्या भेटीला एक बडा पाहुणा आला होता. एके वेळीं त्याचें वर्णन "अरण्यां-तला नागवा फकीर" असें लंडनच्या लोकांनीं केलें होतें. आणि जॉर्ज वॉशिंग्टनच्या वेळीं तिसऱ्या जॉर्ज राजाच्या कारकीर्दींत प्रधान-मंडळापुढें असा मनुष्य येऊन उभा राहिला असता तर, हा काय अमेरिकन रेड-इंडियन भाला मारायला आला आहे कीं काय असें वाटलें असतें, त्याला पाहून १८ व्या शतकांतल्या इंग्रज स्त्रिया भीतीनें किंचा-ळत उठल्या असत्या; आणि हा एखादा वेडापिसा किंवा मनुष्यभक्षक रानटी मनुष्य आहे असें वाटून धांवपळ सुरू झाली असती! सुदैवानें विसाव्या शतकांत ती भीति फारशी उरली नाहीं. कारण हल्लीं नग्नपणा हा पाश्चात्य नाटकांतील दृश्य कलेचा आत्माच मानला जातो. तसेंच वेडेपणाची झाक उमटल्यानें हल्लीं वाङ्मयाला तजेला येतो. असें असतांहि गांधींना पाहून लंडनचे लोक थोडेसे चम-कले व भ्याले खरे. पण हा नुसता एक महात्मा होता! याचें तत्त्वज्ञान लंडनच्या लोकांना कळण्या-सारखें नव्हतें. कमरेला एक फडकें आणि नाकावर एक चष्मा या दोनच वस्तू आपण पोषाक म्हणून वापरतों याचा त्या महात्म्याला अभिमान वाटे. आणि पुराण कवि होमर हा जो आपला दिलरुबा खांद्यावर टाकून भटकत असे, त्या दिलरुब्यापेक्षांहि जुनापुराणा असा चरखा त्या महात्म्याच्या हातीं होता आणि त्याचा त्याला अभिमान वाटे. कां, तर ती जुनी-पुराणी चीज म्हणून! त्याचें तत्त्वज्ञानच असें कीं, चरखा म्हणजे यंत्रकलेची सीमा झाली. त्याहून अधिक

सुधारलेलें, अधिक जलद फिरणारें, आणि अधिक भानगडीचें यंत्र माणसानें हातीं धरणें म्हणजे लोखंडी सांपळ्यांत आपण होऊन शिरून बसण्यासारखें आहे.

गांधी इंग्लंडला आले तेव्हां त्याचें काय करावें हेंच लोकांना समजेना. परत गेल्यावर त्याला तुरुंगांत घातलें असल्याचें मीं ऐकिलें. पण तेथें झालें तरी त्याचें काय करावें ही इंग्रज सरकाराला मोठी पंचाईतच पडली आहे ! पण महत्त्वाचा तथापि मौजेचा मुख्य मुद्दा हा कीं, गांधी हा एक मौजेचा विषय यापलीकडे लोकांची कल्पना किंवा भावना अधिक स्पष्ट होऊं शकली नाहीं. विनोदी लेखक व चित्रकार यांनीं त्याच्याबद्दल काय काय तरी लिहिलें ! येऊनजाऊन विषय काय तो त्याच्या साध्या पोषाकाचा किंवा बिनपोषाखाचा. गांधी विलायतेला आले, मोठी गोष्ट झाली, फार मोठी गोष्ट झाली, फार फार मोठी गोष्ट झाली, असें जो तो म्हणे. पण धरणीकंपाचा थोडासा धक्का बसून लगेच सर्व स्थिरस्थावर होतें तसेंच गांधींसंबंधानें शेवटीं विलायतेंत झालें. जगाच्या दुसऱ्या टोंकाहून एक अर्धनागडा मनुष्य आला, आणि गारेचा बाण किंवा दगडाची कुऱ्हाड यांच्या बरोबरीचें म्हणजे इतक्या पुराण काळचें एक हत्यार तो जवळ बाळगीत होता, इतकीच कल्पना लोकांच्या मनांत शिल्लक राहिली. प्रथम मौज वाटल्यानें त्याच्यासंबंधीं लोकांनीं चर्चा केली. पण पुढें हळू हळू ते त्याला विसरूनहि गेले! दीड दोनशें वर्षांपूर्वी असाच एक माणूस अमेरिकेच्या ब्रिटिश वसाहतींत जगापुढें आला. त्याचा धंदा प्रथम तंबाखूच्या शेतीचा होता. आणि तोहि असाच तऱ्हेवाईक होता म्हणतात! याचें नांव जॉर्ज वॉशिंग्टन!

चेस्टरटन म्हणतोः—"इंग्रज लोक वॉशिंग्टनशीं भांडले. त्यांनीं त्याच्याशीं युद्ध केलें. कारण त्याचें मन कसें आहे, म्हणजे तो नक्की काय हवें म्हणतो, हें त्यांना चांगलें कळत होतें. म्हणजे युद्ध करावयाचें तर त्याची रणभूमि निश्चित होती. आलटूनपालटून का होईना, पण एकाच ठिकाणीं दोघांचे बाण पडण्याचा संभव होता. उलट इंग्रज लोक गांधींशीं भांडत नाहींत, किंवा युद्ध करीत नाहींत. कारण तें त्यांना अशक्यच वाटतें. गांधींचा आत्मा व त्याचें मन स्वर्गांत, पृथ्वीवर, कीं पाताळांत कोठें शोधावें हेंच इंग्रजांना कळत नाहीं. कोणत्याहि शब्दाचा अर्थ काय करावा ? कशाची कसोटी काय मानावी ? आणि सत्य म्हणजे काय समजावें ? याविषयीं इंग्रज व गांधी यांची एकवाक्यताच होऊं शकत नाहीं. राजा, राष्ट्र, निशाण, सभ्य गृहस्थ, नागरिक, प्रजाजन असल्या शब्दांविषयीं वॉशिंग्टन व तिसऱ्या जॉर्ज राजाचे प्रधान यांच्यांत मुळींच मतभेद नव्हता. पण गांधींसंबंधानें तसें कांहींच शक्य दिसत नाहीं. मध्यें एक एवढा महासागर असतां इंग्रज मुत्सद्दी व वॉशिंग्टन हे जितके एकमेकांला जवळ होते, तितकेहि एका टेबलाजवळ बसलेले इंग्रज मुत्सद्दी व गांधी नव्हते. त्या दोघांना युद्ध म्हणजे काय हें माहीत होतें; पण या दोघांना तर युद्ध म्हणजे काय हेंच ठरवितां येईना. त्या दोघांत युक्तिवाद शक्य होता पण या दोघांत तो अशक्य झाला. आतां हें खरें कीं वॉशिंग्टन आला तरी मूळचा हाडाचा तो इंग्रजच; पण गांधींच्या नांवाचें बिनचूक स्पेलिंगहि इंग्रजांना अजून करतां येत नाहीं! इंग्रज लोकांना त्याचा धर्म व तत्त्वज्ञान हीं अजून कळत नाहींत, व आपलें हें अज्ञान नच आपल्या धार्मिक बाबतींतला निःपक्षपातीपणा म्हणून ते मिरवितात. वॉशिंग्टन, वॉलेस, जोन ऑफ आर्क हीं मंडळी हातांत शस्त्र घेऊन लढलीं म्हणून त्यांची कल्पना इंग्रजांना बरोबर होते. पण हिन्दी लोक हे हत्यारी नाहींत, फक्त विचारी आहेत. जग व जीवन यांविषयीं त्यांची उपपत्ति इंग्रजांना अजून कळत नाहीं.

वॉशिंग्टन हा इतका इंग्रजासारखा होता कीं, तो पार्लमेंटाच्या आसपास हिंडता तर त्याला हा कोणी अमेरिकन वसाहतवाला आहे असें कोणीं ओळखलें नसतें. इतका त्याच्या व इंग्लंडच्या इंग्रजांचा नखशिखांत सारखेपणा होता. पण खरोखरीच तो लंडनला जाता तर राजद्रोही बंडखोर म्हणून त्याला फांशींच देण्यांत आलें असतें! कारण त्याच्याकडे पाहून हा एक मौज आहे असें कोणीच म्हटलें नसतें. उलट गांधी हा एक वेडापिसा दिसतो असें इंग्रज म्हणत; तरी त्याला वेड्याच्या इस्पितळांत मात्र कोणीहि ठेवून घेतलें नसतें किंवा हद्दपार करावा असेंहि कोणी म्हटलें नसतें. कारण जो स्वदेशींचा असेल त्याला हद्दपार करावयाचा. पण जो बोलून चालून इतका परकीय कीं तो कधीं स्वकीय होऊंच शकत नाहीं त्याला हद्दपार काय करावयाचा ? वॉशिंग्टनला फांशी देण्याच्या वेळीं हजारों लोक तें पाहण्यास जमले असते; व टाळ्या वाजवून म्हणते कीं, बंडखोराला बरें प्रायश्चित्त मिळालें. पण गांधींबद्दल इंग्रजांना मुळीं रागच येत नव्हता. म्हणून कोणी एकादा विटकरीचा तुकडाहि उचलून त्याला मारील हें शक्यच नव्हतें. वॉशिंग्टनच्या वेळेपासून गांधींच्या वेळेपर्यंत इंग्रजांच्या चालीरीति व स्वभाव अर्थात बरेच सुधारले आहेत. तरी पण आजहि वॉशिंग्टनकडे जसें त्यांनीं पाहिलें असतें, तसें गांधींकडे त्यांनीं रागानें पाहिलें नाहीं. वास्तविक पश्चिमेच्या टोंकाला वॉशिंग्टननें साम्राज्य बुडविण्याचा उद्योग केला तसाच या टोंकाला गांधी करीत आहे. पण फरक हा कीं, वॉशिंग्टन

हा घरचा म्हणून त्याच्याशीं इंग्रज लढले, आणि गांधी हा बोलूनचालून परका वाटतो म्हणून त्याच्याशीं काय लढावयाचें आहे असेंच त्यांना वाटलें. वॉशिंग्टन हा शत्रु झाला नसता तर इंग्रजांचा तो उत्तम मित्र झाला असता. उलट गांधींना इंग्रज शत्रु मानीत नाहींत, आणि गांधी इंग्रजांना शत्रु मानीत नाहीं, तरी पण इंग्रजांची व गांधींची खरी मैत्री कधींच व्हावयाची नाहीं !"

# सुवर्णसंचय व स्वराज्य

( लेखक–श्री. ब. शं. दाबके, मुंबई. )

फार प्राचीन काळापासून हिंदुस्थानांत सुवर्णाची फार मोठ्या प्रमाणांत आयात चालू होती. प्राचीन काळीं हा देश उद्योगधंद्यानें समृद्ध असलेला, कलाकौशल्यानें गजबजलेला, आणि व्यापारात पुढारलेला असल्यामुळें हिंदुस्थानाचा आजूबाजूच्या देशांशींच नव्हे तर युरोप आणि आफ्रिका वगैरे देशांशीं दर्यावर्दी आणि खुष्कीचा व्यापार भरभराटलेला होता; व या देशांतील सर्व हरहुन्नरी पदार्थांस परदेशांतून विपुल मागणी असल्यामुळें या कलाकौशल्याचा मोबदला म्हणून परदेशांतून सुवर्णाचे ओघ या देशांत येऊन स्थिर होत असत, व त्यामुळें या देशास एका काळीं सुवर्णभूमि असें सार्थ नांव मिळाले होतें.

## सुवर्णाची आयात

फार प्राचीन काळची परिस्थिति वादग्रस्त असल्यामुळें ती वगळली तरी हिंदुस्थानसरकारच्या आंकडेशास्त्राच्या खात्याकडून दरवर्षी प्रसिद्ध होणाऱ्या इतिवृत्तांवरून असे स्पष्टपणें दाखवितां येतें कीं, गेल्या ३०–३२ वर्षांत हिंदुस्थानांत सुवर्णाची सारखी आयातच होत गेली आहे; निर्गत झाली असल्यास ती गेल्या ३०–३२ वर्षांत फक्त ४–५ वेळांच, व तीदेखील अत्यंत अल्प प्रमाणांत झाली आहे; त्यामुळें ती अपवादात्मक म्हटल्यास वावगें होणार नाहीं. गेल्या कांहीं वर्षांच्या सुवर्ण–आयातीच्या आंकड्यांवरून आमच्या या विधानाची सत्यता वाचकांच्या लक्षांत येईल. खालील आंकडे Review of the Trade of India in 1930-31 यावरून घेतले आहेत. आंकडे निव्वळ सुवर्णाच्या आयातीचे ( Net Imports ) आहेत. ( आंकडे लाख रुपयांचे आहेत. )

| | |
|---|---|
| लढाईच्या पूर्वीची पंचवार्षिक सरासरी | रु. २८·८७ |
| लढाईमधील पंचवार्षिक सरासरी | ७·६१ |
| लढाईच्यानंतरची पंचवार्षिक सरासरी (१९१९ ते १९२४ | –१२·५४ |
| १९२४।२५ ते १९२८।२९ ची सरासरी | ३३·५० |
| १९२६।२७ सालची आयात | १९·४० |
| १९२७–२८ सालची आयात | १८·१० |
| १९२८–२९ सालची आयात | २१·२० |
| १९२९–३० सालची आयात | १४·२२ |
| १९३०–३१ सालची आयात | १२·७५ |

वरील आंकड्यांवरून वाचकांची खात्री होईल कीं, लढाईपूर्वीची पंचवार्षिक सरासरी सुमारें २९ लक्ष रुपयांची असून लढाईनंतरची दुसरी पंचवार्षिक सरासरी ३३·५० लक्षांची आहे. परंतु माजी फडणवीस सर बेसिल ब्लॅकेट, यानीं हुंडणावळीचा दर १ शि. ४ पे. वरून १ शि. ६ पे. वर कायम केल्यावर मात्र सुवर्णाची आयात बरीच घटली, परंतु ती चालूच होती.

## धनसंचयाच्या आधुनिक साधनांचा अभाव

या सुवर्णाच्या आयातीचें मुख्य कारण विद्यमान फडणवीस सर शुस्टर यांनीं आपल्या गेल्या महिन्यांतील बजेटावर केलेल्या भाषणांत सांगितलें आहेच. सुधारलेल्या आणि पुढारलेल्या पाश्चिमात्य देशांप्रमाणें आपत्काळीं उपयोगी पडणारा धनसंचय करण्याच्या साधनांचा अभाव या देशांत आहे. पाश्चिमात्य देशांत लोकांच्या संग्रही प्रवृत्तीस पोषक होईल अशीं वेगवेगळीं साधनें उपलब्ध असतात. वरिष्ठ, मध्यम आणि कनिष्ठ दर्जाच्या सर्व लोकांस आपआपल्या मगदुराप्रमाणें धनसंचय करण्यास उपयोगी पडतील अशा विविध बँका, विमा कंपन्या, प्रॉव्हिडंट फंड कंपन्या आणि सेव्हिंग बँका वगैरेंचा तिकडील देशांत फार प्रसार झाला आहे. परंतु या साधनांचा हिंदुस्थानांत नुकताच कोठें प्रसार होऊं लागला आहे, व अजूनदेखील या आधुनिक साधनांवर लोकांचा असावा तितका विश्वास नसल्यामुळें यांचा प्रसार ज्या प्रमाणांत व्हावयास पाहिजे तितका होत नाहीं. त्याचें मुख्य कारण प्राथमिक शिक्षणाची या देशांत मागें झालेली व सध्यां चालू असलेली उपासमार व हेळसांड होय. या सर्वांचा परिणाम

सुवर्णाचा संग्रह करण्यांत होतो व तो दागदागिने, जडजवाहीर इत्यादि अनेक रूपांत होतो. अगदीं कनिष्ठ वर्गांतील लोक सुवर्णाऐवजीं चांदीच्या दागदागिन्यांचा या कामीं उपयोग करतात.

### मनुष्याची धनसंचयाची उपजत प्रवृत्ति

ही धनसंचय करण्याची प्रवृत्ति सर्व देशांत सर्वकाळीं अस्तित्वांत होती; व अजूनहि आहे. आज या धनसंचयाचें स्वरूप पाश्चिमात्य देशांत ( अमेरिका, फ्रान्स ) फार मोठ्या प्रमाणांत सुवर्ण-लगडीच्या रूपांत होत आहे. तर येथें तें दागदागिने आणि जडजवाहीर या रूपांत होत आहे. यावरून असें निर्विवाद ठरतें कीं, आपत्कालीं उपयोगी पडणारी धनसंचय करण्याची प्रवृत्ति मनुष्यस्वभावांत उपजतच असते. तेव्हां हिंदुस्थानांतील लोक आपत्कालीं उपयोगी पडणारें साधन म्हणून वर्तमान काळीं आपल्या गरजांचा त्याग करून सुवर्णसंचय करीत असल्यास त्यांत आश्चर्य करण्याचें कांहींच कारण नाहीं.

हुंडणावळीचा दर १६ पेन्सांवरून १८ पेन्सांवर आणल्यापासून या देशांतील लोकांची आर्थिक परिस्थिति दिवसेंदिवस खालावत चालली. आपत्तीस तोंड देण्याच्या शक्तीचा ऱ्हास होत चालला. सरकारास प्रजेवर गेल्या ६-७ वर्षांत निरनिराळ्या रूपानें निरनिराळे कर, हा १८ पेन्साचा हुंडणावळीचा दर टिकविण्याकरितां बसवावे लागले. करांचा बोजा सारखा वाढतच चालला आहे.

### जागतिक मंदीचे दुष्परिणाम

त्यांतच १९२९ सालापासून जागतिक मंदीची भर पडली व हिंदुस्थानांतील कच्चा माल खरेदी करणाऱ्या परदेशांतील गिऱ्हाइकांची स्थिति हलाखीची होत जाऊन कांहीं गिऱ्हाइकें हिंदुस्थानाच्या हातांतून तूर्त तरी गेलीं. त्याचप्रमाणें जगांतील इतर देशांत याच वेळीं फार मोठ्या प्रमाणांत कच्च्या मालाची पैदास झाल्यामुळें हिंदुस्थानाच्या कच्च्या मालास विशेषतः गहूं, कापूस आणि तांदूळ या पदार्थांस भाव येईनासा झाला व नुकसान सोसूनहि मालाचा उठाव होईना.

### विपद्ग्रस्त प्रजेची सुवर्णविक्री

अशी हलाखीची स्थिति चालू असतां सरकारनें या नव्या हुंडणावळीचा भाव स्थिर करण्याकरितां चलनाची बेसुमार घट सुरू केली आणि सरकारी कर्जास चढ्या दरांचे भाव देऊन व्याजाचे दर बेसुमार वाढविले. या सर्व आपत्तींचा रयतेवर फार वाईट परिणाम झाला आणि आपली पत सांभाळण्याकरितां विपद्ग्रस्त झालेल्या प्रजेस आपत्कालीं उपयोगी पडण्याकरितां ठेवलेलें सुवर्ण विक्रीस काढावें लागलें. असें हें विपद्ग्रस्त प्रजेचें सुवर्ण मार्चपासून १५ सप्टेंबर १९३१ पर्यंत सुमारें १० कोटी रुपयांचें कायद्यानें बांधलेल्या भावांत (रु.२१ ३-१०=१तोळा सोनें)सरकारच्या गंगाजळींत आलें. अशा रीतीनें विपद्ग्रस्त प्रजेचें संग्रहीं केलेलें सुवर्ण अगदीं अल्प भावांत सरकारच्या गंगाजळींत आलें; तरी व्यापाऱ्यांस याविरुद्ध तक्रार करण्यास जागा नव्हती; कारण या सुवर्णाची फक्त अदलाबदल होऊन तें प्रजेकडून सरकारकडे गेलें; परंतु या सुवर्णानें हिंदुस्थानचा किनारा सोडला नव्हता. पुढाऱ्यांनीं व व्यापाऱ्यांनीं त्या वेळीं एवढीच तक्रार केली कीं, प्रजेची शक्ति खालावत चालली आहे आणि प्रजेवर कर्जाचा बोजा वाढत आहे. करितां सरकारनें वेळींच याचा विचार करून आपल्या चलनाच्या धोरणांत व हुंडणावळींत बदल करावा.

ता. २० सप्टेंबर १९३१ च्या मध्यरात्रीपासून इंग्लंडांतील पौंडाची आणि सुवर्णाची फारकत झाली, त्याबरोबर येथेहि व्हाइसरॉयसाहेबांनीं २१ सप्टेंबर १९३१ रोजीं एक वटहुकूम काढून हिंदुस्थानसरकारावरील सोन्याची विक्री करण्याची जबाबदारी दूर केली. हाच वटहुकूम कायम ठेविला असता तर सुवर्णनिर्गतीचा प्रश्न उभा राहिला असता किंवा नाहीं हें निश्चयपूर्वक सांगतां येत नाहीं.

### ६० कोटींची सुवर्णनिर्गत

परंतु हा वटहुकूम रद्द करून भारतमंत्र्याच्या हुकुमावरून ता. २४ सप्टेंबर १९३१ रोजीं "हिंदी चलनाचा सोन्याशीं घटस्फोट करून त्याचा पौंडाशीं पाट लाविला." या नव्या वटहुकुमान्वयें हिंदुस्थानास सुवर्णाची आयात करण्याचा मार्ग खुंटला. रुपयाचा इंग्लंडांतील पौंडाच्या कागदी चलनाशीं संबंध जोडिल्यामुळें पौंडाबरोबर रुपयाची किंमतहि उतरली, आणि पदार्थांच्या किमती चढूं लागल्या, व त्याबरोबर सोन्याचा भावहि वाढूं लागला. हिंदुस्थानांतील सोन्याचा भाव, आणि परदेशांतील सोन्याचा भाव यांच्यात तफावत असल्यामुळें येथील सुवर्णाला परदेशीं चांगला भाव येऊं लागून त्याची येथून निर्गत सुरू झाली. गेल्या ६-६॥ महिन्यांत हिंदुस्थानांतून सुमारें ६० कोटी रुपयांवर सुवर्णाची निर्गत झाली.

### हिंदी व्यापाऱ्यांची दुहेरी मागणी

सुवर्णाची निर्गत दर आठवड्यास परदेशीं मोठ्या प्रमाणांत सुरू झाल्यामुळें हिंदुस्थानांतील यच्चयावत् व्यापाऱ्यांनीं ही सुवर्णाची निर्गत कायद्यानें बंद करून न्यूयॉर्क-लंडन आणि मुंबई-येथील रोजच्या "क्रॉस रेटच्या" भावानें सरकारनें सुवर्णाची खरेदी करावी, अशी दुहेरी मागणी केली.

अशाच रीतीनें जगांतील ज्या देशांमध्यें चलनाची सुवर्णाशीं फारकत झाली आहे, अशा स्वतंत्र देशांनीं त्या त्या देशांतील सुवर्णनिर्गतीवर बंधनें घातलीं. परंतु सरकारकडून व्यापाऱ्यांच्या न्याय्य व रास्त मागणीचा नुसता विचार करण्याचेंहि आश्वासन देण्यांत आलें नाहीं; व ही सुवर्णाची निर्गत चालूच आहे.

एवढ्या मोठ्या प्रमाणांत हिंदुस्थानांतून सोन्याची निर्गत आजपर्यंत केव्हांहि झाली नाहीं. वर दाखविलेंच आहे कीं, हिंदुस्थानांत जें सुवर्ण आहे तें नफेबाजी करण्याकरितां संग्राह्य केलेलें नसून, आपत्कालीं त्याचा उपयोग व्हावा या हेतूनें तें संचय केलेले सुवर्ण आहे. जें सुवर्ण सराफकट्ट्यावर विकावयास येत आहे, ते विपद्ग्रस्त प्रजेच असून दागदागिन्याच्या रूपांत विक्रीस येत आहे. एवढाच पुरावा रयतेच्या केविलवाण्या आणि हलाखीच्या स्थितीची साक्ष देण्यास पुरेसा आहे. करितां इतर देशांतील राष्ट्रीय सरकाराप्रमाणें या देशांतील सरकारानेंहि ही बेसुमार व अननुभूत होत असलेली सुवर्णाची निर्गत कायद्यानें बंद करावी.

**रिझर्व्ह बँकेची आवश्यकता**

या व्यापाऱ्यांच्या दुहेरी मागणीचा काय हेतु आहे त्याचे थोडेसें विवेचन येथें करूं. हिंदुस्थानाच्या चलन पद्धतीची सुधारणा जोंपर्यंत येथें रिझर्व बँकेची स्थापना झाली नाहीं, तोंपर्यंत होणें शक्य नाहीं. रिझर्व्ह बँक स्थापन करण्याच्या बाबत हिलटन यंग कमिटीनें ज्या अटी लादिल्या आहेत, त्यांतील मुख्य अट त्या कमिटीच्या रिपोर्टाच्या १३२ व्या कलमांत दिली आहे ती अशीः—

"In the light of the experience of other note-issuing banks which are working this proportional reserve system, it seems safe to provide for the gold and gold securities in the reserve to be not less than 40 percent of the liabilities, i.e. of the notes in issue *plus* the 50 crores on account of outstanding rupees. Sec.-132" याचा अर्थ असा कीं, रिझर्व्ह बँक स्थापन करितेवेळीं हिंदुस्थानसरकाराजवळ ६० कोटी रुपयांचें सुवर्ण अगर सुवर्णरोखे असून शिवाय एकंदर कागदी चलनाच्या ४० टक्के सुवर्ण अगर सुवर्णरोखे असावयास पाहिजेत. हिंदुस्थानसरकाराजवळ इतकें सुवर्ण २१ सप्टेंबर १९३१ रोजीं नसल्यामुळें सरकारला ही एक सुवर्णसंधिच मिळाली होती; आणि जर सरकारनें हिंदी व्यापाऱ्यांच्या दुहेरी मागणीचा तेव्हांच स्वीकार केला असता तर रिझर्व बँक स्थापन करण्याची अनुकूल परिस्थिति आज अनायासें निर्माण झाली असती.

**रिझर्व बँकेस अवश्य असणारा सुवर्णसंचय**

आजमितीला सरकाराजवळ जे सुवर्ण आहे त्याचे गेल्या चार वर्षांचे आंकडे खालीं दिले आहेत; त्यावरून सरकारची या बाबतींतील स्थिति कशी खालावत चालली आहे तें वाचकांच्या लक्षात येईल.

**कागदी चलनाच्या गंगाजळींतील सोनें**

( Paper Currency Reserve )

( आंकडे लक्ष रुपयांचे आहेत. )

| | |
|---|---|
| ३१ मार्च १९२९ | ३२·२२ |
| ३१ मार्च १९३० | ३२·२७ |
| ३१ मार्च १९३१ | २५·८४ |
| ३१ मार्च १९३२ | ५·२६ |

सुवर्णगंगाजळींतील सोन्याचे आंकडे

( Gold standard Reserve )

(ल. रु. आंकडे)

| | |
|---|---|
| इंग्लंडांत असलेलें सोनें ता. २९-२-३२ | ३·३४ |
| हिंदुस्थानांत असलेलें सोनें ता. २९-२-३२ | ३६·७८ |

वरील आंकड्यांवरून असें दिसून येईल कीं सरकाराजवळ आजमितीस फक्त ५·२६ लक्ष व ४०·१२लक्ष एकंदर ४५·३८ लक्ष, एवढ्या रुपयाचें सुवर्ण आहे; परंतु रिझर्व बँक स्थापन करण्यास कागदी चलनाच्या ४० टक्के ( ३१-३-१९३२ अखेर असलेल्या ) म्हणजे ७२ कोटी व ५० कोटी ( खेळत्या रोख रुपयांकरितां ) एकंदर १२२ कोटी रुपयांचें सुवर्ण पाहिजे. परंतु आतां सरकारजवळ ४५–४६ कोटी रुपयांचें सुवर्ण आहे, आणि सरकारानें गेल्या सप्टेंबर महिन्यापासून सुवर्ण–खरेदी चालू ठेविली असती तर आज सरकारला रिझर्व बँक स्थापन करण्यास लागणारें सुवर्ण सहज मिळालें असतें, आणि रिझर्व बँकेची स्थापना विचाराच्या कक्षेतून कृतीच्या क्षेत्रांत उतरली असती.

**रिझर्व बँक आणि फडणविशी खातें**

पहिल्या गोलमेज परिषदेच्या फेडरल स्ट्रक्चर सब–कमिटीपुढें केलेल्या आपल्या भाषणांत लॉर्ड रीडिंग यांनीं असें निक्षून सांगितलें कीं, "जोंपर्यंत हिंदुस्थानांत रिझर्व बँकेची स्थापना झाली नाहीं तोंपर्यंत चलनाची व हुंडणावळीची व्यवस्था आणि मध्यवर्ती सरकारचें फडणविशी खातें हें लोकप्रतिनिधींनें निवडलेल्या दिवाणाकडे सोंपविलें जाणार नाहीं." यावरून स्वराज्य मिळण्यास रिझर्व बँकेची किती आवश्यकता आहे व रिझर्व बँक, पुरेसा सुवर्णनिधि

असल्याखेरीज अस्तित्वांत येणें शक्य नाहीं हें उघड आहे. आणि स्वराज्य, रिझर्व बँक आणि सुवर्णसंचय या तीनहि गोष्टी कशा परस्परावलंबी आहेत हें, व या सुवर्णनिर्गतीचे धागेदोरे किती दूरवर पसरले आहेत हें, वाचकांच्या पूर्ण लक्षांत येईल. याच कारणाकरितां हिंदी व्यापाऱ्यांनीं सुरुवातीपासूनच सुवर्णनिर्गतीस कायद्यानें बंदी करून मिळेल तितकें सुवर्ण बाजारभावानें सरकारानें खरेदी करावें, अशी पोक्त आणि दूरदर्शीपणाची सल्ला सरकारास दिली होती; याचेंहि मर्म वाचकांच्या आतां लक्षांत आलें असेलच.

### संयुक्त हिंदी व्यापारीसंघाचा ठराव

प्रस्तुत लेखकानें संयुक्त हिंदी व्यापारी संघाच्या मार्चअखेर दिल्ली येथें झालेल्या अधिवेशनांत "सुवर्णनिर्गतीला तावडतोब बंदी करावी आणि रिझर्व बँकेची स्थापना करणे शक्य व्हावें, म्हणून सांप्रत बाजारांत येत असलेलें सोनें खरेदी करून स्वनांचा सुवर्णसंचय वाढवावा", या ठरावावर महाराष्ट्र चेंबर ऑफ कॉमर्स, मुंबई याचे तर्फे भाषण करतांना वर उल्लेखिलेल्या कांहीं महत्त्वाच्या मुद्द्यांवर विशेष भर दिला होता; याचेंहि कारण स्वराज्य, रिझर्वबँक आणि सुवर्णसंचय यांचा अन्योन्य संबंध हेंच होय.

# टागोरांचें ओजस्वी तत्त्वज्ञान

(लेखक—श्री. मारुति अनंत पै, कारवार.)

## पूर्वार्ध

कविवर्य महर्षि रवींद्रनाथ टागोर यांच्या वाङ्मयांत सूत्ररूपानें आढळणारें ओजस्वी तत्त्वज्ञान त्रोटकपणें सांगण्याचें या लेखांत योजिलें आहे.

रवींद्रबाबूंचें तत्त्वज्ञान मानवी जीवनांतील सत्य, सौंदर्य व प्रगतिप्रियता यांच्यावर मुख्यतः अधिष्ठित आहे. केवळ भौतिक सुधारणांची व मानवी गरजांची चक्रवाढीनें वाढ करीत राहिल्यानें खरी मानसिक, नैतिक व आत्मिक शक्ति लाभत नाहीं. तर "हविषा कृष्णवर्त्मेव भूय एवाभिवर्धते" या श्लोकार्धांत म्हटल्याप्रमाणें, अशा आधिभौतिक सुधारणांच्या एकांगीपणामुळें जगांत जिकडे तिकडे अशांतता, निराशा व दुःख यांचीच चलती झाली आहे असें त्यांचें मत आहे. खरी सांस्कृतिक सुधारणा व्हावयाची असेल तर ती सत्य, विश्वबंधुत्व व विश्वप्रेम या त्रयीमुळेंच होईल. नुसतें जड शरीर किंवा चंचल मन म्हणजेच कांहीं मानवांचीं निजस्वरूपें नव्हत कीं, ज्यांच्या लालनपोषणापासून त्यांस अखंड समाधान व शांति हीं लाभतील !

भौतिक सुखांच्या मागें लागलेल्या जनांना केवळ वैषयिक सुखोपभोगापासून एक प्रकारचा वीट येत असतो. मृगजलामागें लागल्यानें जशी तहान भागत नाहीं तशी त्यांची स्थिति असते. आत्मिक शाश्वत शांति उत्पन्न करण्यास समर्थ असें तत्त्वज्ञान ऐकण्यास व आचरण्यास ते अतिशय भुकेलेले असतात. आणि ती मिळेपर्यंत त्यांचे जीवन आलस्य, निराशा, अशांतता व दुःख यांनीं होरपळून निघत असतें. अशा वेळीं त्यांच्या आत्म्यांत सुप्त स्थितींत असलेलें सत्य, सौंदर्य व विश्वबंधुत्वाची निःस्वार्थी भावना यांची यथार्थ जाणीव करून देणाऱ्या ओजस्वी व जीवनदायक तत्त्वज्ञानाची त्यांना तीव्र जरूरी भासते. आत्म्याची प्रचंड अशी शक्ति एकदां ओळखली म्हणजे मग माणस आपला आपणच उत्कर्ष साधण्यास कसा समर्थ होतो याची शिकवणूक रवींद्रबाबूंनीं आपल्या अनेक ग्रंथांतून दिलेली आहे. प्रत्येकास त्याचा आत्मा व त्याची आध्यात्मिक शक्ति यांची पुरेपूर जाणीव व्हावी आणि ती तशी होतांच त्यानें लगेच आळस सोडून व अज्ञान झाडून आपल्या समाजाच्या, आपल्या देशाच्या आणि अखिल मानव जातीच्या सर्वांगीण उन्नत्यर्थ अहर्निश झटावें अशी त्यांची उद्बोधक शिकवणूक आहे आणि ती आर्यांच्या प्राचीन उपनिषदांतील उच्च तत्त्वज्ञानाला साजेशीच आहे.

कवींद्र रवींद्रबाबूंच्या मतें, पाश्चात्य तत्त्वज्ञान प्राधान्येंकरून बुद्धि, तर्क आणि जास्तींत जास्त लोकांचें हित यांच्यावर उभारलें आहे; तर पौर्वात्य तत्त्वज्ञानाची भूमिका केवळ आध्यात्मिक शांति व ऐक्य यांच्या पायावर अधिष्ठित झालेली आहे. जगांत आधिभौतिक सुधारणांचा अतिरेक होऊन सुखविलासाचीं यांत्रिक साधनें मुबलक मिळालीं तरी तीं उपभोगणारांच्या हृदयाचें बिलकुल समाधान होत नाहीं, हें दृश्य जिकडे तिकडे पाहण्यास सांपडतें. रवींद्रबाबूंच्या अनेक लघुकथा, कादंबऱ्या, नाटकें, काव्यें, टीकालेख, संदेश

वगैरे या आध्यात्मिक शांतितृप्तीच्या तत्त्वज्ञानानें पानोपानीं भरलेले आहेत. त्यांत श्रीमद्भगवद्गीतेंतील यज्ञ, दान, तप, भक्ति, कर्म, योग, ज्ञान यांचें महत्त्व अनुषंगानें पण अत्यंत कुशलतेनें रेखाटलेलें आहे. किंबहुना हें तत्त्वज्ञान रुक्ष किंवा कठीण होऊं नये म्हणून, त्यांतील 'ब्रह्मराक्षस'गिरीस आळा बसावा म्हणून, कादंबरीच्या कुशल पण नाजूक कुंचल्यानें, स्वभावचित्राच्या व स्थलदर्शनाच्या मिषानें, गद्यकाव्याच्या स्वातंत्र्यगर्भ लकेरींनीं, त्यांनीं तें अत्यंत हृदयंगम रीतीनें वाचकांच्या गळीं उतरविलें आहे. आणि म्हणूनच त्यांच्या या समन्वय-बुद्धीचें जितकें कौतुक करावें तितकें थोडेंच होणार आहे.

कोणतेंहि वाङ्मय केवळ एकांगी, बुद्धिनिष्ठ असल्यामुळें तें जनजीवनाला तितपत पोषक किंवा अचूक मार्गदर्शक होत नाहीं. उदा०—गणित किंवा भूमिति यांच्यासारख्या विषयांपासून होणारें मनाचें समाधान व एक प्रकारचा अननुभूत आनंद बुद्धिप्रधान म्हणतां येईल. कारण एखादें गणिताचें कठीण कोडें सोडविल्यानें होणारा आनंद बुद्धीला भिडत असल्यामुळें तो तितपत शाश्वत किंवा चिरपरिणामी म्हणतां येणार नाहीं! रवींद्रबाबूंचें म्हणणें असें आहे कीं जो विषय बुद्धीबरोबरच हृदयस्थ आत्म्याला भिडून जातो, ( That which touches both the head as also the heart and Soul of man ) तोच खरा मार्गदर्शक होय! भगवद्गीतेंतील उच्च तत्त्वज्ञानाचा विषय या दुसऱ्या कोटींतील आहे. स्वतःच्या आत्म्याचा थांग लावून घेतल्यानंतर त्याची खोली, त्याचें गांभीर्य व तत्‌-सामर्थ्य अजमावल्यानंतरच इतरांच्या आत्म्याशीं विचारविनिमय करणें सुकर होत असतें. नाहीं तर आपले वरवरचे विचार इतरांना जाऊन भिडणार कसे? आणि त्यांची सर्वांगीण सुधारणा होईल कशी? विहिरींतच नाहीं तर पोहऱ्यांत कोठून येणार? या न्यायानें रवींद्रनाथबाबूंचें ओजस्वी तत्त्वज्ञान कंठरवानें सांगत आहे कीं, लेखकांनो, विचारवंतांनो, समाजसुधारकांनो व व्याख्यात्यांनो आधीं आपआपलें आत्मिक व नैष्ठिक सौंदर्य शोधून हस्तगत करा आणि नंतर दुसऱ्यांस उपदेश करून त्यांची सुधारणा करण्याचें कंकण हातीं बांधा!

या बाबतींत टागोरांचीं मतें कर्मसंन्यासापेक्षां कर्मयोगाकडेच अधिक झुकतीं आहेत व तीं ब्र.स्वामी रामतीर्थ, रामकृष्ण परमहंस, ब्र. विवेकानंद व लो. टिळक यांच्या उज्ज्वल शिकवणुकीशीं जुळतीं आहेत. कर्मसंन्यासाच्या नांवाखालीं आळसांत वेळ घालवूं नका, जगाचा एकदम त्याग करूं नका, उलटपक्षीं त्यांतील सत्य, सौंदर्य व उच्च नीतितत्त्वें आत्मसात् करण्याचा प्रयत्न करून स्वतःची उन्नति व उत्कर्ष साधून घ्या आणि जगांतील वस्तुजाताचा उपयोग आपल्या तसेंच अखिल जीवसृष्टीच्या सर्वांगीण आत्मोन्नतीकरितां यथाशक्ति, निःस्वार्थबुद्धीनें, अहर्निश, अविरतपणें करा असा उपदेश रवींद्रबाबू आपल्या प्रत्येक संदेशांत करीत आले आहेत. या दृष्टीनें विचार केल्यास कर्मसंन्यासाच्या मोठ्या नांवाखालीं वृत्तित्याग करून दुबळ्या नैष्कर्म्यवादाकडे किंवा दैववादाकडे झुकणाऱ्या परंपराप्रिय हिंदु समाजास, प्रत्यक्ष तत्त्वज्ञानात्मक ग्रंथामुळें नसलें तरी, कादंबरी, काव्य, निबंध इत्यादि विविध वाङ्मयप्रकारांच्या योगानें त्यांनीं उज्ज्वल कर्ममार्गाकडे वळवून त्यांच्यांत न कळत मोठीच विचारक्रांति व आचारक्रांति अत्यंत यशस्वीपणें केली आहे यांत शंका नाहीं. म्हणूनच त्यांस भारताचे किंबहुना आशियाखंडाचे व जगाचेहि थोर कवि व मंत्रद्रष्टे ऋषि असें यथार्थतेनें संबोधण्यांत येतें.

त्यांचा दुसरा सिद्धांत असा कीं, कोणतीहि अज्ञेय वस्तु ज्ञेयांतूनच उत्तरोत्तर साध्य होत असते. ईश्वराशीं तादात्म्य पावण्यासाठीं अविरत ज्ञाननिष्ठापूर्वक प्रयत्न केल्यामुळें या ज्ञात स्थितींतून आतां अज्ञात आणि म्हणूनच प्रथमदर्शनीं दुर्गम भासणारी आत्म्याची आध्यात्मिक शांति पुढें क्रमानें ज्ञात होऊं लागते, ज्ञानाचा उज्ज्वल प्रकाश सावकाशीनें पण निश्चित पडूं लागतो आणि तेणेंकरून अज्ञानतिमिराचा संपूर्ण नाश होत जातो असें त्यांचें म्हणणें आहे. आणि म्हणूनच "अज्ञात" धर्माच्या गूढ नांवाखालीं राजरोसपणें होणाऱ्या अज्ञानजन्य सामाजिक "ज्ञात" अन्यायांविरुद्ध त्यांची लेखणी व जिव्हा सात्त्विक संतापानें जेवढी उठली आहे आणि त्यांनीं जितकीं टीकेचीं अंजनें चुकणाऱ्या समाजाच्या डोळ्यांत घातलीं आहेत, तितकीं इतर थोड्याच लेखकांनीं घातलेलीं असतील!

मानवी जीवन धार्मिक निर्बंधापेक्षां केव्हांहि उच्चतर होय हा त्यांचा आणखी एक ठाम सिद्धांत आहे! प्रमाणबद्धतेपेक्षां सौंदर्याचें महत्त्व जास्त आहे, तसेंच रुचिप्रिय वास्तववादापेक्षां निर्भेळ सत्य सदैव श्रेष्ठतर आहे असें ते प्रतिपादतात. अशा शाश्वत जीवनतत्त्वांचा योग्य तो परिपोष व विकास करून आपल्या वाङ्मयांत त्यांची जोड ते अशा बेमलुमपणानें करतात कीं, त्यांत विचारांच्या उघड व्यक्तीकरणापेक्षां तत्त्वगर्भ पण अव्यक्त विचारांना

आणि स्थायीभावापेक्षां अज्ञेय पण मनोविकास-दर्शक भावांना जें महत्त्व देण्यांत येतें त्याचें प्रत्यंतर ते ततोतंत पटवितात! त्यांचें तत्त्वज्ञान उच्च स्वरानें व धीरगंभीर भावाने सांगतें कीं, आपल्या रोमरोमांत असे मोठे विचार सतत भिनूं द्या कीं, जग हें मोठें आहे खरें, पण त्याचें आकलन करणारा कूटस्थ चिमुकला आत्मा आध्यात्मिक दृष्ट्या त्याहून किती तरी मोठा आहे!!

# पोंच व अभिप्राय

**प्राणायाम**—भाग १ ( श्रीमत् कुवलयानंदकृत, कैवल्यधाम, लोणावळा. किंमत २॥ रु. ) योगशास्त्र सामान्य जनांस सोप्या व सुलभ रीतानें शिकवण्यासाठीं श्रीकुवलयानंदांनीं जी "सुलभ योगमाला" सुरू केली आहे तिच्यापैकीं हें दुसरें पुष्प आहे. त्यांच्यासारख्या अधिकारी विद्वानांनं अगदीं सोप्या इंग्रजी भाषेंत सामान्य वाचकाला समजेल अशा रीतीनें ह्या शास्त्रावर ग्रंथ लिहिण्यास सुरुवात केली हें महाराष्ट्राचें भाग्यच समजलें पाहिजे. त्यांपैकीं प्राणायाम हे पुस्तक ह्या विषयावर सर्वसंमत होईल अशा अधिकारयुक्त वाणीनें पुष्कळशीं छायाचित्रे घालून पाश्चात्य वैद्यक, शारीर व इंद्रियविज्ञान ह्यांचा शक्य तितका आधार घेऊन जरूर तेथें क्ष–किरणांचा पुरावा देऊन सर्वांगसुंदर बनविण्याचा कुवलयानंदांनीं जो प्रयत्न केला आहे तो पुष्कळ अंशीं यशस्वी झाला असेंच कोणताहि सुज्ञ वाचक म्हणेल.

योगशास्त्र हें वास्तविक शारीरिक व्यायामासाठीं अवतीर्ण झालेलें शास्त्र नव्हे. मानवी देहांतल्या अत्यंत सुप्त पण अतिशय अद्भुत व प्रचंड अशा शक्ति जागृत करून त्यांच्याकरवी कर्तुमकर्तुं अन्यथा कर्तुम् सामर्थ्य अंगीं आणावयाचे व त्रिकालज्ञानित्व, अजरत्व, अरोगित्व व अंतीं मोक्षपद प्राप्त करून घ्यावयाचे अशासाठीं ह्या शास्त्राचा उदय जवळ जवळ ६ हजार वर्षांपूर्वी झाला, आणि श्रीविवेकानंदांचें चरित्र ज्यांनीं वाचलें असेल त्यांना अशा सामर्थ्याचे योगी अद्यापहि ह्या भरतभूमीवर आहेत अशाबद्दल खात्री पटल्यावांचून राहणार नाहीं. श्रीकुवलयानंदांनींहि ह्या ग्रंथाच्या अखेरीस तशीच ग्वाही दिलेली आहे. ( पृ. १२८ ) रंगूनला नुकतेच कैलासवासी झालेले हटयोगी नरसिंहराव ह्यांचे प्रयोग हा अगदीं हल्लींचा ह्या शास्त्रांतल्या अद्भुत शक्तीचा ताजा पुरावा होय. अशा अपूर्व व अद्भुत शास्त्राचा शारीरिक व्यायामासाठीं उपयोग होतो हें खरें असलें तरी तो त्याचा गौण भाग आहे. पण सामान्य जनांच्या नित्य व्यवहारांत नीति, धर्मशास्त्रासारख्या शास्त्रांतले महत्त्वाचे आचार ग्रथित केल्यास व्यवहार शास्त्रशुद्ध चालतो व इहपरलोकीं त्या व्यक्तींचें व जनसमुदायाचें कल्याण होतें ही गोष्ट ध्यानांत धरून प्राचीन आर्यांनीं मोठ्या कुशलतेनें हे आचार-विचार आर्यांच्या नित्य दिनचर्येत जसे घालून दिले, तसाच व्यायामाच्या निमित्तानें योगशास्त्र लोकांच्या नित्याचरणांत आणण्याबद्दल कुवलयानंदांनीं उपक्रम केला आहे. प्राणायाम हा संध्येंतला आवश्यक भाग ह्या धोरणास अनुसरूनच पूर्वी घालण्यांत आला होता. पण पाश्चात्यांच्या दिमाखी व दांभिक सुधारणेला मोहवश होऊन आम्ही आमच्या आचारविचारांस साफ खो दिल्यामुळें आम्ही आमच्याच पूर्वजांच्या ठेवीस कैक वर्षे मुकलों पण कालांतरानें कां होईना पाश्चिमात्यांची आमच्यावरची मोहमाया वितळून स्वस्वरूपाकडे दृष्टि अंतर्मुख होऊन आमच्यापैकीं कांहीं विद्वान जेव्हां पाहूं लागले तेव्हां प्राचीन शास्त्रांची महती आम्हांस कळूं लागली. आज पाश्चिमात्य शास्त्रें जेव्हां आरोग्यासाठीं दिनचर्या ठरवूं लागलीं तेव्हां प्रातःस्नान, सूर्योपासना ( Heliotherapy ), प्राणायामपर्याय (Breathing Exercise), शारीरिक व्यायाम (आसनपर्याय) वगैरे गोष्टी नित्याचरणांत घालणें त्यांनाहि भाग पडत आहे. असो. सांगण्याचा मुद्दा इतकाच कीं पाश्चिमात्य शास्त्रांचा वळसा घेतला तरी पुन्हां कांहीं कांहीं आचारविचारांत आम्हांस आमच्या पूर्वपदावरच येणें भाग पडत आहे असें दिसतें.

श्री. कुवलयानंदांनीं पुस्तक लिहिलें तें प्रत्यक्ष अनुभवावरून लिहिलें आहे. त्यांच्या कैवल्यधामांत ह्या योगशास्त्राचा अनुभव प्रत्यहीं घेणारे विद्यार्थी आहेत, त्यांच्या यौगिक व्यायामांनीं हजारों रोगी रोगमुक्त होत आहेत व झाले आहेत. पाश्चात्य शास्त्रांच्या कसोटीवर प्रत्येक प्रयोग शक्य तर घासून पाहण्याचा त्यांचा संकल्प आहे. त्यांनीं प्राणायामावरील पुस्तकांत ठिकठिकाणीं त्याबद्दल चर्चा केली असून योगमीमांसेंत त्याचें साकल्यानें वित्ररण केलेलें वाचकांना पाहावयास सांपडेल. पण योगशास्त्राला हल्लींच्या शास्त्रांची कसोटी लावणें म्हणजे सूर्याला दिवा दाखवण्यासारखेंच आहे. त्याला ते तरी काय करतील? योगशास्त्रानें प्राप्त होणाऱ्या अद्भुत शक्तींची मीमांसा हल्लींचीं शास्त्रें करूं शकतच नाहींत. म्हणून त्या शास्त्रां-

च्या निकषावर योगसिद्धान्त ताडून पहाण्याची अपेक्षा करणें चूकच आहे, तरीहि कुवलयानंदांनीं शक्य तेथे त्यांचा आधार घेतला आहे. अन्यत्र त्यांनीं अनुमानावरच भिस्त ठेवली तर त्यांत गैर वाटण्यासारखें कांहीं नाहीं. त्यांनीं ग्रंथाच्या अखेरीस इंद्रिय-विज्ञानशास्त्राच्या आधारानें प्राणायाम हा सर्वोत्कृष्ट व सर्वांगीण व्यायाम आहे, असें जें ठरविलें आहे, त्याला कोणताहि निःपक्षपाती मनुष्य आपली संमतिच देईल. इडा पिंगला व सुषुम्णा ह्यांच्या अर्थनिर्णयांत त्यांनीं शास्त्रीय दृष्टि ठेवली आहे. अशा रीतीनें सर्व प्राचीन व आधुनिक शास्त्रांचा आधार घेऊन त्यांनीं प्राणायामाचें सर्वांगपूर्णत्व नुसतें तत्त्वतःच सिद्ध केले असें नसून प्रत्यक्ष अनुभवानें तें निश्चित केले आहे. वाचकांनीं त्याचा मनमुराद फायदा घ्यावा म्हणून त्यांनीं किंमतहि शक्य तितकी कमी ठेवली आहे. तरी सुज्ञ वाचक ह्या इहपरलोकसाधनीभूत शास्त्राचा फायदा घेतील अशी आम्हांस आशा आहे.

**राजारामचरितम् अथवा जिंजीचा प्रवास**— (सं. वासुदेव सीताराम बेंद्रे प्र. भारत इतिहास-संशोधक मंडळ, पुणें शहर. किं. दीड रुपया.) मंडळाचे एक उत्साही सदस्य श्री. वा. सी. बेंद्रे हे छत्रपति संभाजीमहाराजांच्या चरित्रासंबंधींची साधनसामुग्री जमा करीत असतां प्रस्तुत संस्कृत काव्य त्यांस आढळलें. व तें त्यांनीं संशोधित करून महाराष्ट्रीय वाचकांस सादर केले आहे.

प्रस्तुत काव्य केशव कवि नांवाच्या पंडिताने रचलें आहे. हा कवि राजारामकालीन असून त्यानें काव्यांत वर्णन केलेल्या सर्व गोष्टी स्वतः पाहिल्या व त्या लागलीच काव्यरूपानें लिहिल्या त्यामुळें इतिहासदृष्ट्या या काव्यास महत्त्व आलें आहे.

या काव्याचे एकंदर पांच सर्ग असून त्यांत २७५ श्लोक आहेत. पहिल्या सर्गांत पुराणपद्धतीची रचना असून राजारामाचें अविंधांनीं राज्य घेतलें ते कसें परत मिळणार असा प्रश्न नारदानें शंकरास विचारला आहे. त्यावर शंकरानें आश्वासनपर उत्तर देऊन म्लेंच्छ राजाचा पराजय होऊन सर्व गिरिदुर्ग राजारामाच्या स्वाधीन होतील असें सांगितलें. अशा रीतीनें प्रथम सर्गांत प्रारंभ केल्यानंतर मात्र कवीनें घडल्या त्या गोष्टी निवेदन केल्या आहेत. मोंगलांनीं देशांत अनवस्था माजविली, रामचंद्रपंत अमात्यप्रभृतींनीं मोंगलांशीं टक्कर दिली हे प्रसंग व महाराष्ट्रांतील रामचंद्रपंतांच्या हालचाली, राजारामाचें कर्नाटकांत प्रयाण, शत्रूचा पाठलाग इत्यादि प्रसंग चांगल्या रीतीनें वर्णिले आहेत. केशव कवि हा खुद्द राजपरिवारांत वावरणारा असल्यानें त्यानें वर्णिलेले प्रसंग अविश्वसनीय नाहींत, शिवाय त्याच्या वर्णनांत अतिशयोक्तिहि नाहीं हे लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

या ग्रंथाचे रा. बेंद्रे यांनीं चार भाग केले आहेत. प्रथम इंग्रजींत समालोचन करून प्रो. सरकार-प्रभृति इतिहासकारांनीं राजारामासंबंधानें केलेली टीका कशी अयथार्थ आहे हें प्रस्तुत काव्यग्रंथाच्या आधारें सविस्तर दाखविलें आहे. दुसऱ्या भागांत काव्यग्रंथाची मराठींत समालोचना करून काव्याचें महत्त्व काय, तात्कालीन इतिहासाशीं काव्यवर्णन कितपत जुळतें, आतांपर्यंतच्या उपलब्ध वाङ्मयाला या काव्यानें कोठें पुष्टि मिळते तात्कालीन परिस्थिति कशी होती, यांची सुंदर चर्चा केली आहे.

तिसऱ्या भागांत मूळ संस्कृत काव्य व त्यावर टीपा दिल्या असून चौथ्या भागांत काव्याचें सरळ मराठी भाषांतर दिलें आहे. त्यामुळें काव्याचें एकंदर स्वरूप व त्याचें महत्त्व वाचकांच्या चांगल्या रीतीनें लक्षांत येतें.

श्री. बेंद्रे हे संभाजीचरित्राचीं साधनें जुळवीत असतां त्यांना अवचित हा लाभ झाला व त्यांनींहि तो महाराष्ट्रास योग्य संस्कार करून सादर केला त्याबद्दल ते अभिनंदनास पात्र आहेत.

# वाल्मीकिरामायणांतील नव-तारुण्य-संक्रमाचा उल्लेख

( ले. **का. न. केळकर.** )

नव-तारुण्य-संक्रम अर्थात् 'रीज्युव्हिनेशन' यासंबंधीं इंग्रजी वर्तमानपत्रांतून हल्लीं अनेक हकीकती व प्रयोग प्रसिद्ध होत असून, त्यांकरितां ग्रंथींचा उपयोग करण्यासाठीं हजारों वानरांचा हल्लीं नाश होत आहे हें प्रसिद्धच आहे. पण अनेक अश्विनीकुमारांचे हातून हा 'देवतारुण्या'चा प्रयोग अजून तरी सफल झालेला नाहीं. वाल्मीकिरामायणाच्या वाचनांत मला एक चमत्कारिक उल्लेख आढळला तो पुढें देत आहें.

अहिल्याशापाची हकीकत बालकांड सर्ग ४८-४९ मध्यें आलेली आहे. अहिल्येशीं जारकर्म केल्याबद्दल "तूं वृषणरहित होशील" असा गौतमानें इंद्राला शाप दिला व तत्क्षणींच इंद्राचे वृषण भूमीवर गळून पडले. नंतर इंद्राने सिद्ध, चारण, गंधर्व, अग्निप्रभृति देवांकडे

जाऊन अनुग्रह करण्याविषयीं विनंति केली. तेव्हां पितृदेव एकत्र जुळले व मेषाचें वृषण उपटून त्यांनीं इंद्राचे ठिकाणीं लावलें. महात्मा गौतमाचे प्रभावानें व तपानें तेव्हांपासून इंद्र 'मेषवृषण' बनला. ...

या संबंधींच्या उल्लेखाचे मूळ-ग्रंथांतील श्लोक असेः-

अग्नेस्तु वचनं श्रुत्वा पितृदेवाः समागताः
उत्पाट्य मेषवृषणौ सहस्राक्षे न्यवेशयन् ॥ ८ ॥
तदाप्रभृति काकुत्स्थ पितृदेवाः समागताः
अफलान्भुंजते मेषान्फलैस्तेजामयोजयन् ॥ ९ ॥
इन्द्रस्तु मेषवृषणस्तदाप्रभृति राघव
गौतमस्य प्रभावेण तपसा च महात्मनः ॥ १० ॥

वाल्मीकि-रामायण--बालकांड सर्ग ४९.

यांतील "उत्पाट्य मेषवृषणौ सहस्राक्षे न्यवेशयन्" हा उल्लेख फार स्पष्ट आहे. वैद्यकग्रंथांत माहिती पाहतां बस्ताण्ड अथवा 'मेषाण्ड' हें अत्यंत शुक्रवृद्धिकारक व वाजीकरण औषध आहे.

योगरत्नाकरांत पुढील श्लोक आढळतात--
बस्ताण्डसिद्धे पयसि भावितानसकृत्तिलान् ।
यः खादेत्समुपागच्छेत्स्त्रीणां शतमपूर्ववत् ॥
पिप्पलीलवणोपेते बस्ताण्डे घृतसाधिते ।

कच्छपस्याथ वा खादेत्तत्तु वाजीकरं भृशम् ॥

वरील दोन उल्लेखांत (१) मेषवृषण हें अत्यंत शुक्रकारक असून (२) त्यांचा धन्वंतरी लोक शस्त्रक्रियेनें मनुष्याचे ठिकाणीं संक्रम करीत असत, असें उघड दिसतें. सध्यांचे काळीं ही गोष्ट शक्य आहे कीं नाहीं याबद्दल मला चर्चा कर्तव्य नाहीं. आयुर्वेदविशारद शस्त्र-वैद्य व डॉक्टर लोक यांचाच तो अधिकार आहे. तथापि मला वरील दोन ग्रंथांत जो उल्लेख आढळला तो चमत्कृतिपूर्ण व कुतूहलजनक असा वाटल्यामुळें वाचकांस सादर केला आहे.

# स्फुट सूचना

१ डी व्हॅलेरा यांनीं ता. २७ एप्रिल रोजीं डेल आयरेनमध्यें राजनिष्ठेची शपथ रद्द करण्याचें बिल द्वितीय वाचनासाठीं मांडलें. बिलाच्या प्रथम वाचनाच्या चर्चेवरूनच सदर बिलाला कॉसग्रेव्ह पक्षातर्फे जोराचा विरोध होणार असें दिसत होतें. त्याप्रमाणें डी व्हॅलेरा यांनीं बिल लोकसभेला सादर करतांच मि. कॉसग्रेव्ह यांनीं त्यावर विरोधाचा बडगा तर खूप सरसावून उगारला. मनुष्य तावातावानें एखाद्या विषयासंबंधीं बोलूं लागला म्हणजे विचारापेक्षां विकाराची छटाच त्याजवर अधिक पडलेली दिसते. तीच स्थिति मि. कॉसग्रेव्ह यांची झाली. बिलाला विरोध करतांना मि. कॉसग्रेव्ह म्हणाले, "डी व्हॅलेरा यांच्या मूर्ख व बढाईखोर वर्तनामुळेंच पूर्वी आयर्लंडला यादवीचे चटके बसले व आजहि १९२१ सालच्या तहानें शांत झालेली यादवी ते पुनरपि माजविण्याचा खटाटोप करीत आहेत." डी. व्हॅलेरा यांनीं उत्तरादाखल केलेल्या भाषणांत पुनः एकवार स्पष्ट शब्दांत जाहीर केलें कीं, "शपथविधि काढून टाकण्यानें अँग्लो-आयरिश तहाला मुळींच बाध येत नाहीं व या बाबतींत कसल्याहि वाटाघाटीची जरूरी नाहीं. आम्हांला तरी एकदां या गोष्टीची शहानिशा करावयाचीच आहे कीं, ब्रिटिश साम्राज्यांतील घटकावयव हे समान दर्जावर अधिष्ठित आहेत असें जें वरचेवर सांगण्यांत येतें त्यांत कितीसा तथ्यांश आहे. आमच्या या बिलाविरुद्ध ब्रिटननें विरोधी शस्त्र उचललें तर त्याचें सर्व बोलणें कसें फोल आहे हें सिद्ध होईल."

२ शपथेच्या अटीमुळें एकराष्ट्रीयत्वाला कसे नख लागले व त्याचाच परिणाम म्हणजे आयर्लंडमध्यें माजलेली यादवी होय असें डी व्हॅलेरांनीं प्रतिपादिलें. 'आयर्लंड हा जर ब्रिटिश साम्राज्यांतील एक घटक आहे तर त्याला शपथविधि काढून टाकण्याचा पूर्ण हक्क आहे व अशा आशयाचें बिल ब्रिटिश हाऊस ऑफ् कॉमन्स, कॅनडा, ऑस्ट्रेलिया व दक्षिण आफ्रिका यांच्याहि कायदेमंडळांना पास करतां येईल. शिवाय तह म्हणजे राष्ट्रानें आपल्या कायदेमंडळांत पसार केलेला कायदा नाहीं. व म्हणूनच शपथेचा अडसर दूर केल्यापासून तहावर कोणताहि धोंडा पडत नाहीं" असेंहि त्यांनीं आपलें मत निवेदन केलें. अशा तऱ्हेनें बिलाच्या दुसऱ्या वाचनावर साधकबाधक, लागू-गैरलागू, अयुक्तिक-सयुक्तिक असा तीन दिवस कडाक्याचा वादविवाद होऊन ता. २९ एप्रिल रोजीं बिलावर मतें घेण्यांत आलीं; तेव्हां डी व्हॅलेरा यांना ७७ अनुकूल व ७१ विरुद्ध मतें पडून बिलाचें दुसरें वाचन मंजूर झाल्याचें टाळ्यांच्या कडकडाटांत जाहीर झालें. इकडे बिल पास होत आहे तों हाऊस ऑफ् कॉमन्समध्यें या बिलासंबंधीं इतर वसाहतींशीं कांहीं विचारविनिमय करण्यांत येणार आहे का अशी पृच्छा करण्यांत आली. तेव्हां वसाहतमंत्री मि.जे.एच्. थॉमस यांनीं हा १९२१च्या तहाच्या अर्थासंबंधींच उभय राष्ट्रांत वाद आहे असें उत्तर देऊन प्रश्नाला बगल दिली. इंग्लंड यानंतर काय धोरण स्वीकारील तें स्वीकारो, तूर्त तरी डी व्हॅलेरा यांनीं आपली प्रतिज्ञा खरी करीत आणिली असेंच कोणीहि म्हणेल.

# संस्थानिकांच्या 'खाजगी' खर्चाचा वाद

औंध संस्थान प्रजा-परिषदेचे अध्यक्ष प्रो. गणपतरावजी अभ्यंकर यांनीं, आपल्या भाषणांत, औंध संस्थानच्या अधिपतींच्या कारभारावर, विशेषतः त्यांच्या खाजगी खर्चावर, जी सडेतोड टीका केली ती खळबळ उडविण्यासारखीच होती. आणि तिनें अपेक्षेप्रमाणें ती खळबळ उडविलीहि. परंतु प्रो. अभ्यंकर यांचीं कांहीं विधानें जशीं सडेतोड होतीं, तशींच तीं कदाचित् थोडीशीं निराधारहि असावीं असें वाटतें. कारण, प्रजापरिषदेत नेहमीं आस्थेनें भाग घेणारे, व प्रजेच्या हक्काच्या दृष्टीनेंच प्रायः भाषणें करणारे, औंध कायदे कौन्सिलचे कांहीं सभासद यांना, प्रो. अभ्यंकर यांची ही टीका पटली नाहीं असें म्हणतात. तसेंच सातारा येथील 'ऐक्य' पत्रांत गेल्या आठवड्यांत प्रो. अभ्यंकर यांच्या टीकेवर प्रतिटीकारूप असा एक लेख आला आहे. 'ऐक्य' हें पत्रहि प्रायः संस्थानी प्रजेची बाजू घेणारेंच असल्यामुळें, या प्रतिटीकेवरूनहि प्रो. अभ्यंकर यांचीं कांहीं विधानें बिनचूक नसावीं अशी सहजच शंका आली. आणि त्यानंतर आतां तर खुद्द औंध संस्थानचे दिवाण यांच्याकडून यासंबंधीं अधिकृत असा खुलासाच जाहीर झाला, व तोच आम्हीं आजच्या अंकांत दिला आहे. अर्थात प्रो. अभ्यंकर हेहि आतां या खुलाशाला कांहीं उत्तर देतील असें वाटतें. कारण त्यांनीं केलेलीं विधानें तरी थोड्याबहुत माहितीच्या आधारेंच केलीं असतील.

अशा रीतीनें उत्तरें–प्रत्युत्तरें झाल्यावर 'वादे वादे जायते तत्त्वबोधः' या न्यायानें, तिऱ्हाईत मनुष्यास आपल्या मनाशीं निर्णय करण्याला पुष्कळच मदत होईल. प्रथम औंध संस्थानचे अधिपति यांच्या खाजगी खर्चाचें प्रमाण बेसुमार आहे अशी समजूत प्रो. अभ्यंकर यांच्या भाषणानें इतरांप्रमाणें आमचीहि झाली. पण तिजमध्यें कांहीं दुरुस्ती होण्याला कांहीं जागा आहे असें दरबारच्या खुलाशावरून उघड दिसतें. तथापि प्रो. अभ्यंकर यांचें उत्तर प्रसिद्ध झाल्यास मगच यासंबंधीं आम्हांस आणखी कांहीं लिहावयाचें असल्यास लिहूं. तूर्त आम्ही इतकेंच म्हणतों कीं, औंध दरबारानें हा जो खुलासा सरकारी रीतीनें, जाहीररीतीनें, व ताबडतोब केला त्याबद्दल आम्ही दरबारचें मनःपूर्वक अभिनंदन करतों.

या अभिनंदनाचें कारण हें कीं, अशा प्रकारचा खुलासा प्रसिद्ध करण्यास दरबारचा निर्भयपणा व प्रांजलपणा हे मुख्य दोन गुण कारणीभूत होतात. अलीकडे संस्थानी प्रजेची चळवळ सुरू झाल्यापासून संस्थानिकांवर अनेक प्रकारची टीका अनेकांकडून होऊं लागली आहे. त्यांतील कांहीं टीका उपेक्षणीयच असते. कारण तींत मुद्द्यापेक्षां किंवा युक्तिवादापेक्षां व्यक्तिनिंदा व बेसुमार बोलणें आढळतें. म्हणून इभ्रतीच्या दृष्टीनें संस्थानी दरबारांनीं अशा प्रत्येक टीकाकाराच्या तोंडीं लागणें हें अयोग्य ठरेल. म्हणून त्यापुरतें संस्थानिकांचें मौनव्रत समर्थनीय ठरेल. पण वरील प्रकारच्या टीकेंतील कोणचेहि दोष नसलेल्या, खऱ्या मनोभावानें म्हणजे प्रगतिप्रियतेइतकीच संस्थानाविषयीं सहानुभूति वाटणाऱ्या, टीकाकारांनीं गंभीरपणानें केलेल्या टीकेसहि कांहीं कांहीं संस्थानिक मुळींच दाद देत नाहींत. जणू काय ते असा बहाणा करतात कीं, वर्तमानपत्रांतील टीकाकार हे कोणी क्षुद्र प्राणी असून त्यांना उत्तर देणें म्हणजे आपली थोरवी गमावणेंच आहे! 'आम्ही केवढे मोठे व टीकाकार हे केवढे लहान. अर्थात त्यांना उत्तर देणें म्हणजे त्यांच्याशीं आपली बरोबरी करणें होय! शिवाय वर्तमानपत्रें म्हटलीं म्हणजे त्यांना राजकारणाचा वास असावयाचाच. आणि तें राजकारण प्रायः राष्ट्रीय वृत्तीचें असावयाचें. म्हणून अशा वर्तमानपत्राकडे आपला खुलासा पाठविणें म्हणजे, इंग्रज अधिकाऱ्यांच्या दृष्टीनें त्या वर्तमानपत्रकाराशीं सहकारिता केल्याचा दोष अंगीं लागतो.

हे सर्व दोष टाळण्याकरितां संस्थानिक लोक निदान आपल्या खास दरबारी गॅझेटांत जरी प्रमुख टीकाकारांच्या टीकेला अधिकृत उत्तरें देते, तरी त्या कामीं आम्हीं कांहीं गैर मानलें नसतें. अशानें तोंडातोंडी टळेल, व संस्थानिकांची व वर्तमानपत्री टीकाकारांची बरोबरी वांचेल. पण इभ्रतीचा बाहाणा करून 'मौनं सर्वार्थसाधकम्' या न्यायानें, कांहीं संस्थानिक वादांत उत्तर देण्याची ऐनजिनसी जबाबदारीच टाळूं पहातात.' पण त्यांचें हें करणें हास्यास्पद ठरतें. शिकारी मागें लागला असतां ऑस्ट्रिच पक्षी वाळूंत तोंड खुपसून, व अशा रीतीनें शिकारी दृष्टीआड करून, आपण निर्भय झालों अशी आत्मघातकी समजूत करून घेतो तसेंच कांहीं संस्थानिक करतात. पण अशानें टीका अर्थातच थांबूं शकत नाहीं. खुद्द महाराष्ट्रांतील अशा कांहीं संस्थानिकांचीं आम्ही उदाहरणेंहि देऊं शकूं. पण आज त्या भानगडींत आम्ही अधिक पडूं इच्छित नाहीं.

प्रस्तुत आम्ही इतकेंच म्हणतों कीं औंध दरबारानें हल्लींचा हा खुलासा ताबडतोब करून आपली निर्भयवृत्ति व प्रांजलपणा प्रगट केला. त्यावरून औंध दरबार लोकमताला मान देतों हें सिद्ध होत अस

त्याचें कोणालाहि कबूल करावें लागेल. दरबारच्या खुलाशांत एकहि वावगा शब्द नसून, त्यांतील युक्तिवाद बहुतांशीं बरोबर आहे असें दिसतें. या वादावरून एक गोष्ट मात्र सिद्ध होते ती ही कीं, हल्लीं संस्थानी प्रजेच्या टीकेची मुख्य बाब संस्थानिकांचा खाजगी खर्च ही होऊन बसली आहे. ही बाब अर्थातच निर्विवाद नाहीं. दरबारचा पैसा हा सर्व आपल्याच मालकीचा समजून संस्थानिकानें तो वाटेल तसा खर्च करावा हें जसें चूक ठरतें, त्याचप्रमाणें "संस्थानिक व्यक्ति झाली तरी संस्थानचा तो पहिला नागरिक आहे, त्याच्यांत व सामान्य प्रजाजनांत मिजासीचा थोडाबहुत फरक राहणारच.शिवाय संस्थानिकांचा दर्जा म्हणून कांहीं एक विशिष्ट गोष्ट संभाळण्याची असतेच, व तो दर्जा प्रजासत्ताक राज्यांतहि कांहीं विशेष खर्च करून संभाळला जातो, इत्यादि गोष्टी लक्षांत न ठेवतां, संस्थानिकांचा खाजगी खर्च फुगवून दाखवून जे लोक अज्ञानानें टीका करतात त्यांचीहि तीं चूकच होय. पुष्कळ वेळां असेंहि म्हणण्याचा प्रसंग येईल कीं, संस्थानिकावर खासगी खर्चाविषयीं टीका करण्यापूर्वी स्वतः आपण आपलें वार्षिक बजेट कधीं ठरवितों काय ? ठरविल्यास त्याप्रमाणें कितपत वागतों ? आणि केवळ आपणच मालक म्हणून कांहीं अवास्तव खर्च करतों कीं नाहीं ? याचीहि टीकाकारांनीं मनाला आठवण करून दिल्यास, संस्थानिकांवरील त्यांच्या टीकेस योग्य ती मुरड आत्मौपम्यानें घातली जाईल.

लॉर्ड कर्झन यांनीं संस्थानिकांचा खासगी व दरबारी खर्च यांचें कांहीं सयुक्तिक प्रमाण असावें असा पहिला इषारा दिला. तेव्हांपासून या प्रश्नाला महत्त्व येत जाऊन, टक्केवारीनें बोलतां येण्यासारखें कांहीं प्रमाण खाजगी खर्चाला असावें हें खुद्द संस्थानिकहि कबूल करूं लागले आहेत. पण केवळ टक्केवारीनें हें प्रमाण सर्वस्वी अबाधित ठरेल असें वाटत नाहीं. किमान कमाल मर्यादा ठरविणें हें सोपें असतें. पण जो काय वाद माजतो तो दरम्यानच्या कमी-अधिक होणाऱ्या मर्यादेबद्दल माजतो; व त्याचा निर्णय करावयाचा तर प्रत्येक दरबारची परिस्थिति वेगवेगळी घेऊन तपासूनच तो करावा लागेल. सुरुवातीला, निःसंशय दरबारी खर्चाच्या अशा बाबी, व निःसंशय खासगी खर्चाच्या अशा बाबी, बाजूला काढून ठेवून, उरलेल्या म्हणजे संमिश्र बाबींत प्रजा व दरबार यांच्यामध्यें, वेळोवेळीं प्रत्यक्ष करारच नसले तरी, कांहीं समजुतीनें खाजगी खर्चाचें प्रमाण ठरावयास पाहिजे.

उदाहरणार्थ, संस्थानिकाच्या तबेल्यांत असलेले घोडे मोटारी यांतील दरबारी कामाला किती आवश्यक ? व खाजगी कामाला किती आवश्यक ? याचा निर्णय तारतम्यानेंच झाला पाहिजे. संस्थानानें ब्रिटिश सरकारला देण्याची खंडणी, संस्थानांतील वतनी इनामी म्हणून खर्च पडणारीं उत्पन्नें, जुनाट देवस्थानें, बांधून दिलेले धर्मदाय, संस्थानिकाच्या इभ्रतीला योग्य असा नोकरचाकरांचा व वाहनादिकांचा खर्च, व कांहीं थोडा प्रवासखर्च, इत्यादि बाबी संस्थानिकांच्या नांवें खाजगी खर्च खात्यांत पडण्यासारख्या दिसल्या तरी त्या वास्तविक तशा नव्हेत. उलट पक्षीं, कोल्हापूर दरबारांतल्या प्रमाणें होणारा इंग्रज अधिकाऱ्यांच्या पाहुणचारावरील, व विशेषतः शर्यतीच्या घोड्यांवरील होणारा खर्च, हा 'दरबारी' थाटाचा दिसला तरी वास्तविक तो खाजगी स्वरूपाचाच ठरतो.दरपात्रीं शें-दोनशें रुपयांचा खर्च करून साहेब लोकांना दिलेल्या मेजवान्या यांना, दरबारी राजकारणाचें स्वरूप कितीहि रंगवून दाखविलें तरी तें पटणार नाहीं. तसेंच कोल्हापूर दरबाराकडून होणारा शर्यतीचा खर्च हा, घोड्यांची उत्तम अवलाद निर्माण करून रयतेचा फायदा करून देण्याकरितां आहे,असें कोणीं कितीहि कंठरवानें सांगितलें तरी त्यावर कोण विश्वास ठेवील ? तीच गोष्ट सांगली संस्थानांत होणाऱ्या पाहुणचाराच्या खर्चाची.

टीका होते ती असला कांहींच खर्च करूं नये असली होत नाहीं, तर उद्देशाच्या किंवा कर्तव्याच्या मानानेंहि होतो तो खर्च अधिक होतो अशीच टीका असते. उलट टीकाकारांनीं हेंहि लक्षांत ठेवावें लागेल कीं, लंडनच्या लॉर्ड मेयरला शहरच्या पाहुण्यांचा पाहुणचार करण्याकरितां दरसाल दहा हजार पौंड देण्यांत येतात व ते पुरत नाहींत! आणि हिंदुस्थानांत,व प्रजा परिषदांच्या चळवळीच्या दिवसांत झालें तरी, संस्थानी दरबारचा संसार हा गृहस्थाश्रमीच आहे; व दरबारच्या मानानें पाहुणचार व आदरातिथ्य थोडेंबहुत करावेंच लागतें. शिवाय विशेष प्रकारची विद्या, कला ही राजेलोकांची आवडती लहर दिसली तरी त्यांचीं इतर दुष्ट व्यसनें व अशा लहरी यांच्यामध्यें सारासार विचारानें टीकाकारानेंहि तारतम्य राखलेंच पाहिजे. तथापि, आम्हीं अशीं कितीहि उलटसुलट उदाहरणें दिलीं तरी त्यांवरून सामान्य सिद्धांत असा आम्हांसहि कांहीं मांडतां येत नाहीं ही गोष्ट आम्हांलाहि कबूल करणेंच आहे.

पण सुदैवानें आतां बहुधा महाराष्ट्रांतील प्रत्येक संस्थानाला कायदेकौन्सिल मिळालें असल्यामुळें, या विषयाची चर्चा संस्थानिक व या कौन्सिलांतील

पुढारी यांच्या दरम्यान खाजगी होणें बरें. तसें झाल्यास या विषयासंबंधीं वर्तमानपत्रांतील जाहीर चर्चा टळेल. या चर्चेला असें पडदपोशीचें स्वरूप आम्ही सुचवितों. याचें कारण असें कीं, खाजगी खर्चाची बाब खरोखर थोडी नाजूकच आहे; आणि लोकसत्तेला व लोकमताला आजव अपरीचित असणाऱ्या स्वायत्त, मनोमनस्वी, अशा संस्थानिकाच्या हातून प्रजेला हक्क मिळविण्याच्या या पहिल्याच युगांत, भर कायदेकौन्सिलांत खाजगी खर्जाचा आंकडा किंवा बाबी एकदम उघड चर्चेला घातल्यास संस्थानिकांना तें कसेसेंच वाटेल यांत शंका नाहीं.तसेंच कदाचित् या बाबतींत विलायतेंतील राजाचें सिव्हिल लिस्ट म्हणजे खाजगी खर्चाचा तनखा किती व कसा ठरवितात हें किंवा तसलेंच दुसरें एखादें सर्वसंमत उदाहरण समोर मांडून चर्चा केल्यास ती कदाचित् निर्विकारीपणाची होईल.

# टागोरांचें ओजस्वी तत्त्वज्ञान

( ले०—श्री. मारुति अनंत पै, कारवार. )

### उत्तरार्ध

रवींद्रनाथ टागोर यांच्या मतें धार्मिक नियम व रीतिरिवाज मानवी जीवन सत्य व सुयंत्रित होण्याकरितां रचण्यांत आले आहेत. अर्थात् ते शाश्वत नव्हेत. आणि त्यांच्याप्रमाणें मानवी जीवनाची दिशा बदलणें किंवा त्याच्या शांतींत व्यत्यय आणणें असा त्या नियमांचा उद्देश व अमलबजावणीहि नसावी. तर जीवनांतील आत्मिक शांतीला,सत्य दर्शनाला,सौंदर्यदृष्टीला, नीतिमत्तेला,परहिततत्परतेला आणि निःस्वार्थ लोकसंग्रहाला तो पोषक असावी.या गोष्टी तशा नसल्यास त्या झुगारून देणें व परिस्थित्यनुरूप आपल्या सदसद्विवेक बुद्धीस पटेल त्याप्रमाणें त्यांत इष्ट ते फेरफार करणें आपलें आद्य कर्तव्य होय. तसेंच अन्याय्य धार्मिक रूढीखालीं मुकाट्यानें भरडून निघणाऱ्या समाजांना तारणें व त्यांची सामाजिक, नैतिक, सांस्कृतिक व बौद्धिक स्थिति सुधारण्याकरितां निष्ठापूर्वक झटणें हेंहि ज्ञानी जनांचें कर्तव्यच आहे.

एखादें फूल एरवीं प्रमाणबद्ध असूनहि जर त्यांत सौंदर्य नसेल तर तें जसें प्रीतीस पात्र होत नाहीं, तद्वत् रवींद्रबाबूंच्या मतें जनजीवनाची गोष्ट आहे. एखादा न्यायनिष्ठुर किंवा कांटेकोर इसम आपलें नेमलेलें काम अत्यंत काटकसरीनें वेळच्या वेळीं करतो. तो मिताहारी आणि मितवचनीहि आहे अशीहि आपण कल्पना करूं. पण जर त्याच्या अंतःकरणांत सहनशीलता, मार्दव, आत्म्याची नैतिक सौंदर्यदृष्टि, सहानुभूति, प्रेम व वात्सल्य यांचा ओलावा नसेल तर त्याचें जीवन रुक्ष होईल आणि त्याला व त्याच्या कुटुंबांतील माणसांना मानसिक व आत्मिक शांति लाभणार नाहीं. म्हणून रवींद्रबाबूंचा संदेश असा आहे कीं, कांटेकोर टापटीप व कठोर न्यायानिष्ठुरता यांच्या जोडीला, किंबहुना त्यांच्यापेक्षां कांकणभर ज्यास्तच आत्मिक सौंदर्याला व भावनेंतील वात्सल्याला महत्त्व द्या आणि त्यांची महत्तर गोडी प्रत्यक्ष चाखण्य स व अनुभविण्यास शिका.

रवींद्रनाथांचें वाङ्मय व त्यांचा जीवनसंदेश हीं विश्वबंधुत्व व विश्वप्रेम यांनीं ओतप्रोत भरलेलीं आहेत. त्यांत (१) आध्यात्मिक जीवनांतील सत्य, सौंदर्य, सौजन्य व अन्तर्मुखता; (२) निष्क्रिय संन्यासवादाचा समाजघातकी फोलपणा; आणि (३) प्रेम, सहानुभूति व वात्सल्य यांचा यथाक्रम मिलाफ किंबहुना मधुर मीलन झालेलें असल्यामुळें त्यांचे विचार बंगाल्यांतीलच काय, पण अखिल जगांतील लोकांना मार्गदर्शक व शांतिदायक झालेले आहेत यांत नवल तें काय ?

कित्येक जित लोक, जयिष्णु किंवा जेत्या परक्या संस्कृतीच्या मोहानें भांबावून जाऊन आपलें जीवितकार्य, व्यक्तित्व, बुद्धि व आत्मा यांस विसरतात आणि आपलें सांस्कृतिक वैशिष्ट्य न कळत गमावून परकीयांच्या आहारीं जात असलेले दृष्टीस पडतात. रवींद्रनाथांचें तत्त्वज्ञान असलें क्षीणबल नाहीं. त्यांचा सिद्धांत असा आहे कीं, प्रत्येक राष्ट्रानें आपली विशिष्ट संस्कृति व व्यक्तित्व पूर्णपणें राखून व त्यांच्या पायावर उभें राहून नंतर इतर जागतिक भिन्न संस्कृतींचें चांगलें असेल तें जरूर घ्यावें. कारण तसें केल्यानें विश्वबंधुत्वाच्या त्यांच्या व्याख्येला बाध येत नाहीं किंवा कनिष्ठपणाची भावनाहि (Inferiority complex) उद्भूत होत नाहीं ! म्हणूनच त्यांच्या प्रत्येक लेखनांतून, संदेशांतून व व भाषणांतून आर्त मानवांना दुःखांतून दिव्य आत्मसुखाकडे आणि तेथून पायरीपायरीनें ईश्वर तत्त्वाकडे आकृष्ट करून नेण्यास समर्थ अशी विद्युत्-स्फुलिंगांप्रमाणें तेजस्वी विचारांची मालि-

काच लागलेली असते. आणि ती तारकापुंजाच्या तेजोवलयाप्रमाणें सर्वांचे लक्ष एकदम वेधून घेतल्याशिवाय रहात नाहीं ! जागतिक ऐक्याचा व विश्वप्रेमाचा संदेश मुक्तकंठानें सांगणारे रवींद्रनाथांसारखे तत्त्वज्ञ जातिनिष्ठ, प्रांतनिष्ठ किंवा देशनिष्ठ न रहातां ते संबंध जगाचाच ठेवा होतात तें यामुळेंच !

कित्येकांच्या मतें, टागोर आजकाल राष्ट्रीयत्वापेक्षां आंतरराष्ट्रीयत्वाकडे जास्त झुकत आहेत म्हणून त्यांचा भारतास पाहिजे तेवढा फायदा मिळत नाहीं. यास त्यांच्या शिष्यांचें उत्तर असें आहे कीं, रवींद्र बाबू पूर्णपणें राष्ट्रीयहि आहेत व आंतरराष्ट्रीयहि आहेत. म्हणजे ते जसे व्यक्तित्व व संस्कृति राखून भारताची काळजी वाहणारे आहेत, तसेच ते भारतासहित संबंध जगाच्या कल्याणार्थ थोर बुद्धीनें झटणारे असे तत्त्वज्ञानी पुरुष आहेत. परकी राष्ट्रांशीं रवींद्र बाबूंचें संघटन पुष्कळ वाढलें म्हणून ते स्वकीय संस्कृतीशीं पारखे होतात हा या आक्षेपकांचा समज चुकीचा आहे. वस्तुतः टागोरांचें तत्त्वज्ञान असें आहे कीं, आज जगांतील प्रत्येक व्यक्तीचा आपापल्या देशाव्यतिरिक्त निरनिराळ्या आंतरराष्ट्रीय व्यक्तीशीं, त्यांच्या संस्कृतीशीं व त्यांच्या शोधांशीं नको नको म्हटलें तरी हरघडीं संबंध येतोच येतो ! येथें केवळ अनाधिकारी संन्यासाची भूमिका पत्करून चालत नाहीं. तसें केल्यास कार्यनाश होतो ! आपली सनातन आर्यसंस्कृति विसरूं नये हें यथार्थ असलें तरी परकीय संस्कृति केवळ तुच्छ मानून अज्ञानी व पक्षनिष्ठ कूपमंडूकवृत्तींतच सारी इतिकर्तव्यता मानणाऱ्या अदूरदर्शी आत्मवंचित शिष्टांच्या विचारसरणीविरुद्ध मात्र ते निखालस आहेत. त्यांचें एतद्विषयीं म्हणणें असें आहे कीं, संपूर्ण समानत्वाच्या भावनेनें आपली बाजू कमी आहे असें उगाच न लेखतां व आपली संस्कृतीतहि न विसरतां, जगांतील कोणत्याहि इतर संस्कृतीमधील आपणांस इष्ट व अनुकूल असे गुणविशेष आपण कां घेऊं नयेत ?

त्यांच्या अभिजात राष्ट्रीयत्वाविषयीं शंका घेणारांनीं त्यांनीं पंचवीस वर्षांमागें बंगालच्या फाळणीविरुद्ध लेखनव्याख्यानद्वारां सर्वत्र केलेल्या जळजळीत जागृतीकडे किंचित् नजर द्यावी. आणि हल्लीं सुद्धां वार्धक्यामुळें (कारण त्यांस सत्तर वर्षे झाल्याबद्दलचा गौरव नुकताच झाला आहे.) ते प्रत्यक्ष धकाधकीच्या राजकारणांत भाग घेत नसले तरी बंगाल्यांतील हिजली व चितगांग येथील राजबंद्यांवर सरकारकडून झालेल्या अन्यायानें चिडून सात्त्विक संतापानें त्यांनीं केलेल्या खरमरीत टीकेकडे लक्ष द्यावें, म्हणजे आंतरराष्ट्रीयत्वाच्या कांचेमधून धगधगीतपणें प्रकाशणारा त्यांचा उज्ज्वल राष्ट्रीयत्वाचा प्रखर दीप गोचर झाल्यावाचून रहाणार नाहीं.

सारांश, रवींद्रबाबूंनीं भारतीय आध्यात्मिक संस्कृतीचें उच्चत्व प्रवास–व्याख्यानलेखनद्वारां सर्व जगभर प्रसृत केलें आहे. त्यांची ही विश्वबंधुत्वाची, आध्यात्मिक शांततेची व भारतीय संस्कृतिवर्धनाची तेजस्वी व ज्ञानपोषक शिकवणूक आणि बौद्धिक, शैक्षणिक, कलोपासक व निरनिराळ्या भिन्न संस्कृतींत ऐक्य घडवून आणून 'विविधत्वांत एकत्व' आणूं पहाणारें त्यांचें अत्यंत प्रचंड प्रचारकार्य खरोखर अपूर्व होय यांत शंका नाहीं !

# ब्रिटिश साम्राज्याचा उदयास्त

( ले. श्री. दामोदर नरहर शिखरे एम. ए., पुणें. )

" सर्वे क्षयान्ता निचयाः पतनान्ताः समुच्छ्रयाः " —म. भा.

( लेखांक १ ला )

ब्रिटिश साम्राज्य अनेक दृष्टींनीं अपूर्व आहे. त्याचा विस्तार फार मोठा; इतका कीं, त्यावर सूर्य कधींच मावळत नाहीं असें त्याचें वर्णन केलें जातें. रोमन साम्राज्य काय किंवा मोंगल साम्राज्य काय, हीं त्यापुढें अगदीं ठेंगणीं दिसतात. अशोक, समुद्रगुप्त वगैरेंच्या साम्राज्यांची तर त्याच्याशीं तुलनाच करणें कठिण ' या विराट–स्वरूपी साम्राज्याची अपूर्वाई अशी कीं, त्याचें आदिपीठ वामनी आकाराचें आहे. ब्रिटिश बेटें आणि ब्रिटिश साम्राज्य या दोहोंचें परस्परांशीं प्रमाण पाहिलें म्हणजे शतपुत्रा गांधारीहि तोंडांत बोटच घालील ! युरोपखंडाच्या खांद्यावर तिळाप्रमाणें शोभणारें चिमुकलें ब्रिटिश बेट कोठें आणि एकीकडे आस्ट्रेलियापर्यंत तर दुसरीकडे कॅनडापर्यंत चारी खंडांत ऐसपैस हातपाय पसरलेलें ब्रिटिश साम्राज्य

कोठें ! दामदुप्पटच काय, पण दामदसपट होण्याइतकी चलती ब्रिटिश बनियाची साम्राज्य-विस्ताराच्या व्यापारांत झाली आहे, यांत शंका नाहीं.

### साम्राज्याचा अद्भुत विस्तार

ब्रिटिश बेटांचें क्षेत्रफळ पुरतें सव्वालाख चौरस मैलदेखील नाहीं; पण ब्रिटिश साम्राज्याचें क्षेत्रफळ १ कोटि २० लक्ष म्हणजे सुमारें शंभरपट आहे. ब्रिटिशांची मायघरची संख्या ५ कोटींच्या आंतबाहेरच. पण त्यांच्या मुठींत ४५ कोटी लोकांचीं नशिबें आवळून बसलीं आहेत ! लोखंड व कोळसा यांशिवाय अधिक मौल्य-वान पदार्थ निसर्गानें आंग्लभूमीच्या ओटींत घातलेले नाहींत;पण साम्राज्यांतील सोन्याच्या आणि हिऱ्यांच्या खाणींचें स्वामित्व तिजकडे आलेलें आहे. चोहों बाजूंनीं समुद्राचा वेढा इंग्लडभोंवतीं पडलेला आहे; तरीहि पण त्याच्या यशाची पताका नगाधिराज हिमाल-यावर रोंवलेली आहे आणि नाईल नदीच्या चार हजार मैल लांबीच्या प्रवाहावरहि ती फडकत आहे. तळहाताएवढ्या बेटानें अवघें जग आपल्या तळ-हातावर खेळवीत ठेवलें हें केवढें आश्चर्य ! ब्रिटिशांच्या वसाहतींत गोऱ्या लोकांनीं व्यापलेली जागा खुद्द ब्रिटिश बेटांच्या ६ पटीनें मोठी आहे. युरोपच्या सांदीकोपऱ्याला पडलेल्या या लहानग्या बेटानें युरोप खंडाच्या पांचपट विस्ताराचें साम्राज्य आपल्या चिमटींत धरलेलें आहे. सर्व पृथ्वीच्या क्षेत्रफळाचा चौथा हिस्सा ब्रिटिश साम्राज्याखालीं मोडत आहे, अखिल मानव जातीपैकीं $\frac{1}{4}$ लोक त्यांत नांदत आहेत. आणि अवघ्या मनुष्यजातीला लागणाऱ्या खाद्य पदार्थांचा पाव हिस्सा त्यांत उत्पन्न होत आहे. प्रचंड वटवृक्ष व त्याचें मोहोरीएवढें बीं किंवा अफाट नदीमुख आणि तिचें करांगुळीएवढें उगमस्थान, या-सारखेंच चारी खंडांत पसरलेलें ब्रिटिश साम्राज्य व युरोपच्या कोपऱ्यांत बसलेलें इवलेसें ब्रिटिश बेट यांचें नातें अद्भुत आणि अपूर्व असें आहे.

### परतंत्र इंग्लंड

निरनिराळ्या देशांवर आपली सत्ता चालविणारें ब्रिटन परक्यांच्या सासुरवासाखालीं खूप वेळां नांदलें आहे हें लक्षांत ठेवलें पाहिजे. साम्राज्याचीं छत्रचामरें, त्याजवर यावच्चंद्रदिवाकरौ शोभत आहेत असें नव्हे. ख्रिस्तपूर्व ५४ ते ख्रिस्तो-त्तर १२१५ पर्यंत हजार-दीडहजार वर्षें इंग्लंड परक्यांच्या लाथाच खात होतें. कोणीहि यावें आणि इंग्लंडवर राज्य करावें अशी त्याची मूळची दुबळी वृत्ति. हे कोण ? रोमन आले, इग्लंड त्यांच्यापुढें वांकलें. हे कोण ? ज्यूट आले, त्यांना इंग्लंडनें पाठीवर घेतलें. मग आले अँगल्स् व सॅक्सन. त्यांच्यापुढेंहि इंग्लंडनें मान वांकविली. नंतर नॉर्थमेन व डेन्स यांची लाट आली. तिच्यापुढें इंग्लंडनें आपलें मस्तक नम्र केलें. आणि नॉर्मनांची स्वारी तर बराच काळ टिकली. अशा प्रकारें इंग्लंड पारतंत्र्याच्या जाळ्यांत अनेकवार भरडून निघालें आहे. पण गेलीं ५०० वर्षें इंग्रजांनीं स्वराज्य भोगलें, एवढेंच नव्हे तर साम्राज्यहि उभें करण्याचा प्रयत्न केला.

### साम्राज्याचें जन्मवृत्त

साम्राज्याचा प्रत्यक्ष उदय होण्यापूर्वी त्याचा प्रभात-काल बराच मोठा होता. रोमनपासून नॉर्मन-पर्यंत निरनिराळ्या लोकांनीं इंग्लंडवर स्वाऱ्या केल्या, तो काळ अंधाराचा असला तरी तो अंधार पहाटे-पूर्वीचा ठरला. त्या अंधाराला गिळून-म्हणजे आक्रमण करणाऱ्या परक्यांना आत्मसात् करून-इंग्लंडनें आपलें तेज एकीकृत केलें.इंग्लंडनें आपल्या-जवळच्या स्काटलंडला १७०७ मध्यें बगलेंत मारलें, व दुसऱ्या हेन्रीच्या कारकीर्दींत आयर्लंडलाहि दुसऱ्या बगलेंत मारलें. त्यामुळें आयर्लंड, स्कॉटलंड, वेल्स व इंग्लंड या चार भावंडांचें एकत्र कुटुंब बनलें. आतां त्यांच्या मागें परचक्राचें भय नव्हतें; पण साम्राज्याचें आमिष त्यांच्या डोळ्यांपुढें होतें. चवथ्या जार्जच्या कारकीर्दीपासून ' राज्य ' या शब्दाचे जागीं ' साम्राज्य ' या पदानें ठाणें दिलें. ' राजा ' जाऊन ' बादशहा ' आला आणि ' राजाला अर्ज दाखल केला' असें म्हणण्याऐवजीं 'अर्ज खाविंदांचे चरणार-विंदीं सादर केला' ही भाषा रूढ झाली. नदीप्रमाणें साम्राज्याचेंहि मूळ नेमकें बोट ठेवून सांगणें कठिण तर खरेंच; पण ब्रिटिश साम्राज्याबद्दल एवढें निश्चित सांगतां येतें कीं,एलिझाबेथ राणीच्या मृत्यूपर्यंत म्हणजे १६ व्या शतकाच्या अखेरीपर्यंत ब्रिटिश खाडी-च्या पलीकडे एक तसूभरहि जागा ब्रिटिशांच्या मालकीची नव्हती. त्याच्यापूर्वी म्हणजे १५८३ सालीं हंफ्रे गिल्बर्ट यानें व्यापाराच्या निमित्तानें वसाहत स्थापण्याचा प्रयत्न केला,पण तो अपेशी ठरला.त्या-नंतर या ना त्या कारणांनीं ब्रिटिश लोक आपल्या घरट्यांतून भराभर बाहेर पडूं लागले आणि निर-निराळ्या प्रदेशांत नवींनवीं घरटीं बांधूं लागले. जणूं आपल्या मुलांना धाडशी बनविण्यासाठींच आंग्ल-भूमि एकेकाला आपल्यापासून दूर लोटूं लागली ! मोठेपणाचीं जीं सहा विघ्नें एका संस्कृत कवीनें सांगितलेलीं आहेत त्यांत 'जन्मभूमिवात्सल्य' हें प्रमुख आहे. त्या वात्सल्याचे पाश ब्रिटिशांनीं तटातट तोडले आणि साम्राज्याचें वैभव जोडलें.

### ब्रिटिशांचा धाडसी स्वभाव

अर्थात् ब्रिटिशांच्या नसांतून खेळणारें धाडस साम्राज्यवृक्षाच्या मुळाशीं आहे, हें उघडच

आहे. पण आगींत टाकल्याशिवाय चंदनाच्या अंगचा गंध जसा दशदिशांना दरवळत नाहीं, त्याप्रमाणें ब्रिटिशांचें धैर्यहि संकटांच्या खाईमुळेंच प्रगट झालें. इंग्रज माणूस हा जात्या घरकोंबडा नव्हे, पाणकुत्रा आहे, हें खरें; पण घरची सावली सुखासुखीं कोण सोडतो ! ब्रिटिशांनाहि मायभूमीच्या बाहेर ढकलण्याला अनेक कारणें झालीं. लोकसंख्येची वाढ हें कारण आतांप्रमाणें पूर्वीहि होतेंच. प्रजेच्या संख्येप्रमाणें भूमीचें क्षेत्र कांहीं सारखें वाढत नाहीं. इंग्लंडची भूमिमर्यादा आकुंचित पण तेथल्या माणसांची संख्या मात्र सालोसाल फुगत चाललेली. जमीन कांहीं रबराप्रमाणें ओढतांताणतां येत नाहीं. त्यामुळें वाढलेल्या प्रजेचीच ओढाताण होऊं लागली. ती टाळण्यासाठीं कांहीं ब्रिटिश तरुण मातृभूमीला रामराम ठोकून दूरदेशीं गेले व वसाहती करून राहूं लागले. त्यांतूनच क्लाइव्हसारखे उनाडटप्पू साम्राज्य-संस्थापकाच्या पदवीला जाऊन पोहोंचले. पोट हें जगाच्या पाठीवर माणसाला कोठेंहि फिरवितें, पण जेथें पाय रोवला तेथें आपलें डोकें सदैव वरच ठेवावयाचें असा बाणा राखण्याला मनगटांत जोर व डोळ्यांपुढें ध्येय असावें लागतें.

### व्यापाराचा लोहचुंबक

वाढत्या लोकसंख्येला वाट करून देणें या कारणाप्रमाणेंच वाढत्या व्यापाराला बाजारपेठ मिळविणें हेंहि कारण साम्राज्य-विस्ताराच्या बुडाशीं आहे. दूरदूरच्या सफरी करून ब्रिटिश सौदागर आपल्या व्यापाराचें जाळें त्या देशांत टाकीत, आणि त्यांत गळाला लागलेली संपत्ति मायदेशीं आणून ओतीत. इतर राष्ट्रांतील सोनें, हिरे, चांदी वगैरे खनिज संपत्ति हीहि लोहचुंबकाप्रमाणें ब्रिटिशांचीं अंतःकरणें आकर्षण करून घेत होती. तिसरें कारण राजांच्या छळाचें. आज जरी इंग्लंडमध्यें लोकशाहीसारखी सुयंत्र राज्यव्यवस्था विकास पावलेली दिसत असली, तरी तेथेंहि सुलतानशाही गाजविणारे राजे होऊन गेले—त्यांच्यापैकीं एकाचें तर डोकें उडविण्यांत आलें, इतके त्याच्या जुलमाचे घडे भरलेले होते ! तशा जुलमाखालीं भरडून निघणाऱ्या कांहीं लोकांनीं परदेशीं जाऊन वसाहत केली. ऑस्ट्रेलिया खंडांत वसाहत होण्याचें मुख्य कारण कैद्यांची सोय करणें हें होतें. 'कैद्यांची वसाहत' ही पदवी त्यामुळेंच ऑस्ट्रेलियाला मिळाली आहे. पूर्वी इंग्लंड आपले कैदी अमेरिकेंत पाठवी. पण १७८३ सालीं अमेरिकन वसाहती स्वतंत्र झाल्या; आणि इंग्लंडला नवा कैदखाना पहावा लागला. म्हणून १७८८ सालीं १००० कैद्यांची रवानगी ऑस्ट्रेलियाकडे झाली. ही पद्धत १८४० पर्यंत चालू होती.

### साम्राज्याचे खरे पुरस्कर्ते

वरील तीन-चार कारणांमुळें बाहेरदेशीं जाणारे लोक कमी-अधिक प्रमाणानें खालच्या दर्जाचे होते. कोणी भुकेकंगाल, कोणी उनाडटप्पू, तर कोणी अट्टल गुन्हेगार, अशा खातेऱ्यांत उगवणाऱ्या फुलांचे अंगीं रंग असला, तरी रस आणि गंध कितीसा असणार ? पोटाची खळगी भरणें हें— किंवा हेंच—त्यांचें जीवितकर्तव्य होतें; पण कांहीं एका धर्मभावनेनें प्रेरित झालेले असे जे तत्त्वनिष्ठ, निग्रही व सदाचारी लोक अमेरिकेंत गेले, त्यांच्या डोळ्यांपुढें विशिष्ट ध्येय होतें आणि म्हणून त्यांनीं समाजाच्या उन्नतीचें कार्य आरंभिलें. आपल्या इच्छेप्रमाणें धर्माचरण ठेवतां यावें या उदात्त हेतूनें १०० कर्तबगार माणसें १६२० सालीं 'मे-फ्लॉवर' या गलबतांतून अमेरिकेकडे निघालीं. ब्रिटिश साम्राज्याचे लायकीचे व किंमतीचे असे खरे पुरस्कर्ते यांनाच म्हणतां येईल. सुमारें एका शतकाच्या आंत त्यांनीं आपल्या देशाला इंग्लंडपासून स्वातंत्र्य मिळवून दिलें.

# स्फुट सूचना

१ पंडित मदन मोहन मालवीयजी यांची या आठवड्यांत सरकारनें बिनशर्त मुक्तता केली ही शहाणपणाची गोष्ट केली यांत शंका नाहीं. पंडितजींनीं वटहुकुमाखालीं दिलेली नोटीस मोडली म्हणून त्यांना अटक झाली. श्री. सौ. सरोजिनी नायडू यांनींहि त्याच जातीची नोटीस मोडली. पण सरोजिनीबाईवर खटला होऊन त्यांना एक वर्षाची शिक्षा ठोठावली गेली व मालवीयजींना निर्दोष समजून बंधमुक्त करण्यांत आलें. राष्ट्रीय सभेच्या दृष्टीनें दोघांचाहि गुन्हा एकाच स्वरूपाचा होता. तेव्हां सरकारनें पंडितजींना सोडण्यांत जो दूरदर्शीपणा दाखविला तोच त्यांनीं श्री. सौ. नायडू यांच्या बाबतींत कां दाखवूं नये ? असो. पं. मालवीय यांची प्रकृति बरीच ढासळलेली आहे. तथापि सुटका होऊन अलाहाबादेस ते स्वगृहीं येतांच त्यांनीं स्वस्थ न बसतां राष्ट्रीय सभेचें काय म्हणणें आहे हें छातीठोकपणें जाहीर केलें आहे. पंडितजी म्हणतात कीं, हिंदुस्थानाला स्वातंत्र्याची तहान लागली

आहे व तें मिळाल्याशिवाय राष्ट्रांत सुख, शांति व स्वस्थता राहणें अशक्य आहे. राष्ट्रीय सभेनें आपलें हें ध्येय पूर्वीच जाहीर केलें आहे. अशा रीतीने ध्येयाचें स्पष्टीकरण केल्यावर पंडितजी म्हणतात कीं, हिंदुस्थान व ब्रिटिश साम्राज्य यांच्यामध्यें चालू असलेल्या राजकीय तंट्याचा निकाल पंचायतीनें व्हावा. युरोपांतील अगर अमेरिकेंतील कोणीहि तीन मोठ्या माणसांनीं बसून हा तंटा तोडावा. यानंतर ते म्हणतात कीं, ऐंशीं हजार लोक तुरुंगांत असतांना नव्या सुधारणा यशस्वी होतील अशी कोणीहि कल्पना करून घेणें म्हणजे स्वतःची फसवणूक करण्यासारखें आहे. पार्लमेंटांत हिंदुस्थानचे स्टेट-सेक्रेटरी यांनीं गेल्या आठवड्यांत जी गर्जना केली त्यालाच हें उत्तर आहे. या उत्तरास प्रत्युत्तर म्हणून ब्रिटिश मुत्सद्दी कोणता डाव टाकतात हें लवकरच समजेल. या सर्व उत्तर-प्रत्युत्तरांतून लढा बंद होऊन कांहीं सलोख्याची भाषा निघाली तरच राष्ट्राचा फायदा आहे!

---

२ सध्यांचा काळ फार धामधुमीचा असल्यामुळें न्याय देण्यास बसलेल्या अनेक मॅजिस्ट्रेटांकडून कायद्याच्या मर्यादा पाळल्या जात नाहींत व राष्ट्रीय सभावाल्या आरोपींना अन्याय होतो, ही गोष्ट सिद्ध करण्यास अपील कोर्टाच्या न्यायाधीशांच्या निकालपत्रिका पुरेशा आहेत. याचीं अनेक उदाहरणें यापूर्वी आम्ही प्रसिद्ध केलीं आहेत व आज आणखी एक देतों. नागपूरचे श्री. बळीराम निंबगांवकर यांना तेथील फर्स्ट क्लास मॅजिस्ट्रेटांनीं बेकायदा ठरविलेल्या मराठी मध्यप्रांताच्या राष्ट्रीय सभासमितीच्या युद्धमंडळास मदत केल्याच्या व बेकायदेशीर जमावाचा सभासद असल्याच्या आरोपावरून सहा महिने सक्त-मजुरीची शिक्षा फर्माविली होती. या शिक्षेविरुद्ध अपील करण्यांत आलें व नागपूरचे सेशन्स जज्ज मि. मेथा यांनीं खालच्या कोर्टाचा निकाल रद्द करून श्री. निंबगांवकर यांस दोषमुक्त करून सोडून दिलें! सेशन्स जजसाहेबांनीं आपल्या निकालपत्रकांत म्हटलें आहे कीं, "पुरावा संपून वकिलांचीं भाषणें झाल्यानंतर निकाल देण्याचेंच काम फक्त शिल्लक राहिलें. अशा स्थितींत पुनः साक्षीदारांना बोलावून नवा पुरावा घेणें हें अन्यायाचें आहे व या करण्याला कायद्याचा आधार नाहीं! ... मी अमुक संस्थेचा सर्वाधिकारी आहे असें आरोपी म्हणत होता असें दुसऱ्या एकानें आपल्या साक्षींत सांगितलें, एवढ्यावरूनच आरोपीला शिक्षा देणें गैर आहे. पुराव्याच्या कायद्याप्रमाणें यापेक्षां भक्कम व प्रत्यक्ष पुरावा असण्याची जरूरी आहे व या गोष्टीकडे मॅजिस्ट्रेटांनीं लक्ष दिलें पाहिजे... तसेंच पोलीस इन्स्पेक्टरानें एखादी सभा बेकायदा आहे असें सांगितलें म्हणून ती सभा बेकायदा होत नाहीं. कारण तसें करण्याचा त्याला अधिकार नाहीं. हा अधिकार दुसऱ्या अधिकाऱ्याकडे दिला गेलेला असतो. पोलीस अधिकाऱ्याला क्रि. प्रो. क. १२७ खालीं सभा मोडा असें सांगतां येईल. पण ती बेकायदेशीर होऊं शकत नाहीं.... सभेस हजर राहण्यानें बेकायदा सभेला मदत केली असें होतें, असेंहि मला वाटत नाहीं!" वरील लांबलचक उतारे देण्यांत आमचा हेतु इतकाच आहे कीं, हल्लीं राष्ट्रीय सभावाल्यांच्या विरुद्ध पुष्कळच खटले होत असल्यानें त्यांत आरोपींना नेहमीं न्याय मिळतोच असें नाहीं, म्हणून अशा वेळीं ज्यांना न्याय व्हावा असें वाटत असेल त्यांनीं किंवा ज्यांना मॅजिस्ट्रेटाकडून पुष्कळ वेळां अन्याय होतो तो दुरुस्त व्हावा असें वाटत असेल त्यांनीं वरिष्ठ कोर्टाकडे अपील करावें व न्याय मिळवून घ्यावा.

---

३ म्हैसूरचे महाराज व त्यांची प्रजा यांचा एकजीव असल्यानें महाराजांचें प्रजावात्सल्य व प्रजेची स्वामिनिष्ठा यांचें मधुर मीलन होऊन त्याचीं गोड फळें उभयतांसहि चाखावयास मिळत आहेत. म्हैसूर संस्थानची स्वतःची युनिव्हर्सिटी असून ती हिंदुस्थानांतील कोणत्याहि श्रेष्ठ युनिव्हर्सिटीच्या दर्जाची ठरेल. परंतु युनिव्हर्सिटीच्या मामुली शिक्षणक्रमांत म्हैसूर दरबारानें इतर युनिव्हर्सिट्यांशीं स्पर्धा करण्यांत फारसें भूषण आहे असें नाहीं. इतर युनिव्हर्सिट्यांना अनेक अडचणींमुळें जो अत्यंत निकडीचा शिक्षणक्रम सुरू करतां येत नाहीं त्याचा उपक्रम संस्थानिकांनीं आपल्या हद्दींत केला तरच संस्थान देशी असल्याचा खरा फायदा जनतेला होईल. या दृष्टीनें म्हैसुरांत औद्योगिक शिक्षण देण्याचें जें विद्यालय लवकरच स्थापन होणार त्याचें अभिनंदन करणें इष्ट आहे. म्हैसूरच्या महाराजांच्या कारकीर्दीची रौप्य ज्युबिली १९२७ सालीं झाली, त्या प्रसंगीं महाराजांच्या स्मारकाप्रीत्यर्थ तेथील प्रजेनें वीस लक्ष रुपये वर्गणी करून जमविले. त्या रकमेचा विनियोग कसा करावा हें ठरविण्यासाठीं महाराजांचे प्रायव्हेट सेक्रेटरी सर चॉर्लेस टॉडहंटर यांच्या अध्यक्षतेखालीं एक कमिटी नेमण्यांत आली. सदर कमिटीनें स्मारकाच्या पैशांतून एक टेक्नॉलॉजिकल इन्स्टिटयूट काढावी अशी शिफारस केली आहे. या विद्यालयांत मेकॅनिकल एन्जीनियरिंग, इलेक्ट्रिकल एन्जीनियरिंग, विणकला ( टेक्स्टाईल ) व तिला जोडून केमिकल टेक्नॉलॉजीचा विभाग इत्यादि शिक्षणविषयक सोयी केल्या जाणार आहेत. विण-

कलाशिक्षण गिरणीसारख्या उद्योगधंद्याच्या दृष्टीनें व देशी हातमागांच्या दृष्टीनेंहि देण्याची व्यवस्था होणार आहे. संस्थेचें एकंदर स्वरूप आकर्षक व उपयुक्त असून त्यामुळें देशांतील औद्योगिक शिक्षणाची गरज बऱ्याच अंशीं भरून निघेल अशा आशा करण्यास जागा आहे. म्हैसूरच्या या उदाहरणाचें अनुकरण मोठ्या हिंदी संस्थानिकांना करतां येणार नाहीं काय ?

# सुशिक्षित वर्ग आणि स्वराज्य

हिंदुस्थानांत सांप्रत राजकीय, सामाजिक, धार्मिक वगैरे विविध क्षेत्रांत जागृति दृष्टीस पडते. तिचें सर्व श्रेय सुशिक्षित वर्गासच दिलें पाहिजे. विवक्षित व्यवसाय विवक्षित जातींनीं करावयाचे या हिंदुधर्मांतील व्यवस्थेमुळें विद्यार्जन हा व्यवसाय कांहीं ठराविक जातींच्या वांट्यास आला आहे. या जाती वेगवेगळ्या प्रांतांत वेगवेगळ्या आढळतात. बंगाल्यांत कायस्थ, वैद्य व ब्राह्मण, संयुक्त प्रांतांत कायस्थ व ब्राह्मण, पंजाबांत वैश्य व ब्राह्मण आणि दक्षिणेंत सर्वत्र प्रायः ब्राह्मण या जाती सुशिक्षित गणल्या जातात. या जातींतून शिक्षणाचा इतका प्रसार झाला आहे कीं, त्यांतील पुरुषांत शिक्षितांचें प्रमाण शेंकडा नव्वद टक्के धरण्यास हरकत नाहीं. त्यांच्या स्त्रियांतहि शिक्षण फैलावलें असून पदवीधर, डॉक्टर, वकील झालेल्या स्त्रियांचीं उदाहरणें या वर्गांत थोडीं नाहींत.

गेल्या पन्नास वर्षांतील राजकीय चळवळीच्या इतिहासाकडे लक्ष दिल्यास राष्ट्रीय सभा स्थापन करण्यापासून तों स्वराज्याचे थोडेबहुत हक्क हिंदुस्थानाकरितां संपादन करण्यापर्यंत सर्व उद्योग याच वर्गानें चालविले आहेत. सुरेंद्रनाथ बानर्जी, लो. टिळक, अरविंद घोष, लाला लजपतराय, पं. मोतीलाल नेहरू, देशबंधु दास, पं. मालवीय, म. गांधी, ना. गोखले इत्यादि असंख्य पुढाऱ्यांना याच वर्गानें जन्म दिला. त्या सर्वांनीं सोसलेल्या क्लेशांचें, हालअपेष्टांचें व आत्मार्पणाचें फल देशास कांहीं प्रमाणांत मिळालें यांत शंका नाहीं. परंतु त्या फळाचा फारच थोडा वांटा त्या वर्गाच्या हिस्श्यास आला. कौन्सिलें, म्युनिसिपालिट्या, लोकल बोर्डे या संस्थांची सुधारणा होऊन लोकांस अधिक हक्क मिळाले तरी त्यांना हा वर्ग बहुतांशीं मुकलाच. याचें कारण एक तर असें कीं, सुशिक्षित मनुष्यास शहराशिवाय इतरत्र आसरा नसल्यामुळें तो लोकलबोर्डाच्या निवडणुकीस साहजिकच मुकतो. तो ज्या शहरांत राहतो त्यांची संख्या एकंदरीनें थोडी व अशा शहरांतहि त्याची गणना अल्पसंख्य जातींतच. त्यामुळें व त्याचा पोटाचा धंदा नोकरीचा असल्यामुळें शहर म्युनिसिपालिट्यांत त्याची निवडणूक अत्यंत अल्प प्रमाणात होऊन त्याच्या हातीं म्युनिसिपालिटींत सत्ता नाहीं; लोकल बोर्डांत सत्ता नाहींच नाहीं अशी स्थिति झाली आहे. सुशिक्षित वर्गाच्या पुढाऱ्यांनीं सरकाराशीं वाद घालावा, चळवळी कराव्या, तुरुंगवास भोगावा, हद्दपारीवर जावें, सरकारास अप्रिय व्हावें, इतकेंच नव्हे तर आपल्या सबंध जातीवर सरकारचा रोष ओढवून घ्यावा, पण त्यापासून निष्पन्न होणारीं फळें मात्र त्या जातीस किंवा वर्गास न लाभतां ज्यांनीं त्यासाठीं प्रायः मुळींच झीज सोसली नाहीं अथवा प्रयत्नहि केला नाहीं त्या जातींच्या मुखांत आयतींच पडावीं या सारखी आश्चर्यकारक किंबहुना विपरीत गोष्ट ती कोणती ?

माँटेग्यू-चेम्सफर्ड सुधारणा हिंदुस्थानास देण्यांत आल्या. त्यांचा गेल्या बारा वर्षांतील इतिहास या दृष्टीनें मननीय आहे. या बारा वर्षांत लोकलबोर्डे, म्युनिसिपालिट्या व कौन्सिलें हीं सर्व शिक्षणांत मागसलेल्या अशा वर्गाच्या ताब्यांत गेलीं व त्यांत सुशिक्षित वर्गाचें पूर्वी जें प्रमाण होतें तेंहि राहिलें नाहीं; मग त्याची वाढ होण्याची गोष्ट बोला कशाला ? याचें कारण सुशिक्षित वर्ग अल्पसंख्याक आहे हेंच होय. बरें त्यांच्या हातच्या या संस्था जाऊन मागसलेल्या वर्गाच्या हातीं पडल्यानें त्यांची कार्यक्षमता वाढली, निदान कायम राहिली असेंहि घडलें नाहीं. मुंबईचें कायदेकौन्सिल आपल्या पूर्वीच्या नांवलौकिकास आंचवून सरकारच्या ताटाखालचें मांजर होऊन बसलें आणि कित्येक म्युनिसिपालिट्या व लोकल बोर्डे यांच्या कारभारांत अफरातफर झालेली आढळल्यावरून यांपैकीं कांहीं स्थानिक स्वराज्यसंस्था सरकारानें परत आपल्या ताब्यांत घेतल्या व त्यांच्या अधिकाऱ्यांवर खटले करून त्यांना शिक्षाहि फर्मावल्या.

कायदेकौन्सिलें व स्थानिक स्वराज्यसंस्था अशिक्षितांच्या म्हणजे मागसलेल्या जातींच्या हातांत गेल्या ही गोष्ट सायमन कमिशनच्याहि नजरेस आल्यावांचून राहिली नाहीं. सदर कमिशनानें या गोष्टीचा निर्देश आपल्या रिपोर्टांतहि केला आहे. त्यांत म्हटलें आहे कीं, "ब्रह्मदेश वगळल्यास इतर प्रांतांतून साऱ्या मतदारांत साक्षर मतदारांचें प्रमाण शेंकडा अवघें १५॥-च आढळेल. शिक्षण हीच मताधिकाराची लायखी म्हटल्यास ती मुळींच टिकणार नाहीं. म्हणजे चालू

मतदारांत सुशिक्षितांचें किंबहुना साक्षरांचें प्रमाण फारच कमी आहे. इतकेंच नव्हे तर कित्येक सुशिक्षित अथवा साक्षर असे सांपडतील कीं, त्यांचीं नांवेंहि मतदारांत नाहीत." यावरून ज्या दर्जाचा मतदारसंघ त्याच दर्जाचे त्यांनीं कौन्सिलांत निवडून दिलेले उमेदवार हा नियम ओघानेंच सिद्ध होतो. मतदानाचा अधिकार विस्तृत प्रमाणावर मिळाला पाहिजे हें लोकशाहीचें आद्यतत्त्व होय. व सदर अधिकाराचा उपभोग घेणारा वर्ग शिक्षित असला पाहिजे हें तितकेंच महत्त्वाचें दुसरें तत्त्व होय. परंतु पहिलें तत्त्व लागू करतांना दुसऱ्या तत्त्वाची त्यास आडकाठी येणार असें दिसल्यावर सरकारानें दुसरें तत्त्व डावलून पहिल्याच तत्त्वाचा अंगीकार करण्याचें ठरविलें.

लोकशाहीची हिंदुस्थानांत विस्तृत पायावर उभारणी होण्याच्या दृष्टीनें सरकारास असें करणें इष्ट वाटलें असलें तर त्याबद्दल तक्रार करण्यांत अर्थ नाहीं. परंतु दिलेले राज्यकारभाराचे अधिकार नीट रीतीनें चालविले जाण्याकरितां सुशिक्षितांसहि त्यांच्या प्रमाणांत संधि देण्याचें सरकारानें मनांत आणिलें असतें तर त्यांना त्यांत अशक्य असें कांहींच नव्हतें. प्रातीवरील कर, जमीनधारा, घरभाडें याप्रमाणें विवक्षित मर्यादेपर्यंतचें शिक्षण याचाहि मताधिकाराच्या लायकींत समावेश केल्यानें सुशिक्षित वर्गाची सोय बरीच निघाली असती. व त्यांच्या शिक्षणाचा उपयोग लोकनियुक्त संस्थांना योग्य वळण लावण्याकडे झाला असता. परंतु सरकारास सुशिक्षित वर्गाविषयीं इतकी पर्वा आहे कोठें? सदर वर्ग त्यास आपला प्रतिपक्षी वाटत आहे. त्यांना या वर्गास दडपून टाकणेंच सोयीचें वाटतें. सरकारच्या राज्यकारभारांतील दोष हाच वर्ग दाखवीत आला आहे व लोकहिताच्या रक्षणासाठीं सरकारच्या अन्याय्य धोरणास विरोध करण्याचें कंकण याच वर्गानें बांधलें आहे. हा वर्ग मतदानाच्या पद्धतीने परभारें गळाल्यानें सरकारच्यामागची ब्याद मिटली व जे लोक त्यांच्याऐवजीं कौन्सिलांत व इतर लोकनियुक्त संस्थांत येऊन बसले त्यांपैकीं बहुतेकांना राज्यकारभारांतील मख्खी समजून घेण्याचें ज्ञान, सामर्थ्य किंवा धैर्य नसल्यामुळें लोकनियुक्त संस्था, विशेषतः कौन्सिलें यांतील कामकाज हा एक पोरखेळ किंवा थट्टेचा विषय होऊन बसला.

या संस्थांतून जातवारीनें हायदोस घातला असल्याची ओरड हिंदी सुशिक्षित वर्गच करीत आहे असें नव्हे तर तिची सत्यता सायमन कमिशनासहि पटली आहे. कमिशनानें आपल्या रिपोर्टांत यासंबंधानें पुढील उद्गार काढले आहेत. "हिंदी राजकारणांत जातवारीच्या कलहास फार उग्र स्वरूप प्राप्त झालें असून त्याचा दुष्परिणाम स्थानिक स्वराज्य-संस्थांसहि भोंवला आहे. या संस्थांच्या कारभारांतील चोखपणा हिंदु व मुसलमान आणि ब्राम्हण व ब्राह्मणेतर यांजमधील तंट्यानें बिघडून गेला आहे. त्यायोगानें लायक माणसांना सदर संस्थांतून नोकऱ्या मिळेनाशा झाल्या आहेत. आणि म्युनिसिपालिट्या व लोकल बोर्डें यांच्या सभासदांना हीं भांडणें भांडत बसण्यावांचून दुसरा महत्त्वाचा व उपयुक्त उद्योगच सुचेनासा झाला आहे. एकराष्ट्रीयत्वाची भावना हिंदी लोकांत वाढीस लागण्यास हा प्रचंड अडथळा होय यांत शंका नाहीं!"

म्युनिसिपालिट्या व लोकल बोर्डें यांतील दुरवस्थेचें हें चित्र यथार्थ नाहीं असें कोण म्हणेल? वरील एकंदर हकीकतीचा थोडक्यांत परिणाम असा कीं, गेल्या बारा वर्षांत सुशिक्षित वर्गाची स्थिति सर्व बाजूंनीं अत्यंत बिकट होऊन बसली. राज्यकारभारांतील सत्तेचा अंश पूर्वीइतकाहि त्यांच्यापाशीं राहिला नाहीं व मागसलेल्या वर्गास पुढें करून नोकरींतूनहि क्रमाक्रमानें सुशिक्षितांस हांकलून लावण्याचें धोरण सरकारानें स्वीकारल्यामुळें पोटापाण्यासहि हा वर्ग महाग होत चालला. कोणी म्हणेल कीं कनिष्ठ प्रतीच्या नोकऱ्यांतून त्यांची हांकलपट्टी सुरू असली तरी वरिष्ठ प्रतीच्या नोकऱ्या हिंदी लोकांस अधिक प्रमाणांत देण्याची योजना सरकारानें अमलांत आणिली असल्यानें त्यांत मागसलेल्या वर्गापेक्षां पुढारलेल्या अशा सुशिक्षित जातींनीं प्रवेश करण्यास हरकत काय? मँटेग्यू-चेम्सफर्ड सुधारणांच्या कायद्यापूर्वी वरिष्ठ प्रतीच्या सर्व नोकऱ्यांचा मक्ता जवळ जवळ युरोपियनांसच मिळाला होता. परंतु नवीन सुधारणेच्या कायद्यानें वरिष्ठ प्रतीच्या सर्व नोकऱ्यांचें हिंदीकरण हळूहळू करण्याचे तत्त्वास मान्यता दिली व त्या तत्त्वास ली कमिशनाचीहि मदत झाली. तथापि त्या धोरणाची अंमलबजावणी सुशिक्षित वर्गाच्या पथ्यावर पडली असें झालें नाहीं. एकंदरींत या जागा सुशिक्षित वर्गाच्या संख्येच्या मानानें फारच थोड्या आहेत. व त्यांपैकीं इंडियन सिव्हिल सर्व्हिससारख्या ज्या चढाओढीच्या परीक्षा आहेत त्यांतच सुशिक्षितांतील विशेष बुद्धिवान व ऐपतवान लोकांना नोकऱ्या मिळण्याची आशा आहे. बाकीच्या ज्या जागा भारतमंत्र्याकडून भरावयाच्या त्यांची वर्णी अँग्लो-इंडियन व ख्रिश्चन या इंग्रज सरकारच्या जातभाईंना लागून उरलेले तुकडे सुशिक्षित वर्गाच्या तोंडावर फेकण्यांत येतात.

ही व्यवस्था राखीव खात्यासंबंधाची झाली. परंतु जीं खातीं सोंपीव आहेत त्यांतील जागा भरण्याचा अधिकार प्रांतिक सरकारांस मिळाला

असला तरी प्रांतिक सरकारांचे दिवाण बहुधा मागसलेल्या वर्गांचेच असल्यामुळें ते आपल्या वजनाचा उपयोग आपल्या जातीच्या बगलबच्चांना हा मलिदा चारण्याकडेच करतात. सारांश, खालून व वरून अशा दोनही बाजूंनीं पुढारलेल्या वर्गास मागसलेल्या जाती रेटूं लागल्यानें त्यांतील तरुणांना सरकारी नोकऱ्यांचा नाद सोडून उदरनिर्वाहाकरितां इतर मार्ग हुडकण्यावांचून गत्यंतरच राहिलें नाहीं! बरें, ज्या प्रकारचें शिक्षण हिंदी तरुणांना मिळतें त्यांत चरितार्थाचें साधन सुशिक्षित तरुणानें स्वतःच्या हिमतीनें व अकलेनें मिळवावें अशा प्रकारची कुवत नाहीं.आर्ट्स् कोर्सांचें शिक्षण अगदींच परावलंबी असतें याची जाणीव सुशिक्षित वर्गाला झालेली नाहीं असें नाहीं परंतु कोणत्याहि मार्गांतील अडचण कळली म्हणजे तिजवर हटकून उपाय सांपडतोच असें नाहीं. उद्योगधंद्यास शास्त्रीय विषयांचें शिक्षण अधिक उपकारक या समजुतीनें विद्यार्थ्यांचा बराच मोठा ओघ गेल्या दहाबारा वर्षांत त्या दिशेकडे वळला आहे. परंतु त्या परीक्षा पास होऊन बाहेर पडलेले पदवीधर बी. ए. पेक्षां अधिक स्वावलंबी बनले नाहींत. कायद्याचा अभ्यासक्रम व वैद्यकाचा अभ्यासक्रम यांशिवाय बाकीचे बहुतेक सर्व अभ्यासक्रम असे आहेत कीं त्यांच्या परीक्षा दिलेल्या तरुणांना नोकरी हाच खरा आधार वाटतो. आणि नोकरी म्हटली म्हणजे ती बऱ्याच अंशीं सरकारी किंवा तत्सम असावयाची हें ठरलेलें आहे. सरकारी काय, निमसरकारी काय, किंवा खासगी काय, नोकऱ्या मिळत नाहींत अशी तरुणांची व त्यांच्या पालकांची खात्री झाली म्हणून तरुणांनीं शिकण्याचें सोडून द्यावयाचें काय असा प्रश्न या ठिकाणीं उद्भवतो.

प्रारंभीं ज्या जातींचा उल्लेख केला आहे त्या जातींचा पिढ्यानुपिढ्यांचा धंदा शिक्षण हाच आहे. नोकऱ्या मिळोत वा न मिळोत, त्या जातींतील तरुण विद्यार्जन करणारच व त्यांच्या मार्गांतील परीक्षेचीं कुपणें कितीहि उंच व रुंद केलीं तरी ते तीं उल्लंघून जाणारच. या अंगवळणीं पडलेल्या परिपाठामुळें पुढारलेल्या वर्गांमधील तरुणांचा विद्येकडील ओढा कमी न होतां वाढत आहे व त्यांतच मागसलेल्या जातींतील सुशिक्षित तरुणांची भर पडत आहे. सुशिक्षित मनुष्य व अशिक्षित मनुष्य या दोघांत एक महत्त्वाचा फरक आढळून येतो. सुशिक्षित मनुष्य महत्त्वाकांक्षी असतो तसा अशिक्षित मनुष्य नसतो. त्यामुळ सुशिक्षित मनुष्याची महत्त्वाकांक्षा सफळ न झाल्यास तो जसा असंतुष्ट राहतो तसा अशिक्षित मनुष्य असंतुष्ट राहत नाहीं. सुशिक्षिताची मजल अशिक्षिताच्यापुढें आणखी एका बाबतींत गेलेली असते. अशिक्षित मनुष्य आपल्या अडचणींचा दोष नशिबाला लावील. पण सुशिक्षित मनुष्य आपल्या अडचणींचें खापर त्यांचा उगम ज्या सरकारापासून होतो त्या सरकाराच्या माथीं मारून झुरत बसेल,संतापेल, डोकें फिरवून घेईल व त्या सरकाराविरुद्ध आपल्या शक्तीचा व बुध्दीचा उपयोग करील.

नवीन राजकीय हक्क मिळाल्यानंतर सुशिक्षित वर्गाची भूक निवाली पाहिजे, वृत्ति अमळ शांत झाली पाहिजे. पण तसें घडल्याचें गेल्या दहा–बारा वर्षांत मुळींच आढळून आलें नाहीं. सुशिक्षित वर्गानें आपली राजकीय सुधारणांसंबंधाची नापसंती अनेक रीतींनीं दर्शविली. ती त्यांनीं निषेधाचे ठराव पास करून दाखविली, असहकारिता करून दाखविली, कायदे मोडून दाखविली. हिंदुस्थानांतील राजकारणांत दोन पंथ आहेत हें सरकारास माहीत आहे. एक अनत्याचारी अशा कॉंग्रेसच्या पुढाऱ्यांचा पंथ व दुसरा खून करणारांचा पंथ. म. गांधी हे अनत्याचारी मार्गाचे पुरस्कर्ते आहेत. त्यांनीं अत्याचारी पंथास स्वतःचा उद्योग तहकूब ठेवून आपणांस आपल्या मार्गानें जाण्यास संधि देण्याचें सुचविलें होतें. त्याप्रमाणें अत्याचारी लोकांनीं त्यांस कांहीं दिवस संधि दिलीहि. पण गांधीजींचें अनुयायित्व पत्करून तुरुंगांत गेलेल्या अर्ध्या–पाऊण लाख लोकांनीं राजकीय दृष्ट्या कांहीं साधलें नाहीं अशी खात्री झाल्यामुळेंच कीं काय अत्याचारी लोकांच्या चळवळीला अलीकडे फिरून चेव आला असून ठिकठिकाणीं बॉंब उडत आहेत व खून पडत आहेत.

बंगाल प्रांत हें खुनी चळवळीचें माहेरघर होय. त्या घरात या चळवळीनें पंचवीस वर्षांपूर्वींच वस्ती केली. तेथून तिला उचलण्यासाठीं सरकारानें आपल्या प्रयत्नांची शिकस्त चालविली आहे. त्यांनीं पुढाऱ्यांना हद्दपार केलें, चौकशीवांचून कोणासहि गिरफदार करण्याचा व अटकेंत ठेवण्याचा कायदाहि सज्ज ठेवला, तरी बंगाल्यांतील खुनी चळवळीचा जोर तिळमात्रहि कमी न होतां ती चेकाळतच आहे. इतकेंच नव्हे तर संयुक्त प्रांत व पंजाब यांतूनहि जखमेप्रमाणें चिघळून ती पसरत आहे. या चळवळीत बंगाल्यांतील पुढारलेल्या जातींतील इंग्रजी शिकलेले तरुण लोक असतात याचा निर्वाळा सन १९१८ सालीं राजद्रोहाचा छडा लावण्यासाठीं सरकारानें रौलॅटसाहेबांच्या अध्यक्षतेखालीं नेमलेल्या सिडिशन कमिटीनें चौदा वर्षांपूर्वींच देऊन ठेवला आहे. सन १९०७ पासून १९१७ पर्यंतच्या दहा वर्षांत बॉंब तयार करणें, हत्यारें जमविणें, दरवडे घालणें व खून पाडणें

इत्यादि अनेक प्रकारचे असंख्य अत्याचार घडले. या अत्याचारांत सामील असणारांची संख्या १९६ धरली तर त्यांपैकीं ६८ विद्यार्थी, १६ शिक्षक, २३ उद्योगधंदेवाले व २० कारकून वगैरे असल्याचें कमिटीनें आपल्या रिपोर्टांत नमूद केलें आहे. जातवारीनें वर्गीकरण केल्यास ६५ ब्राम्हण, ८७ कायस्थ व १३ वैद्य या जातींचे लोक वरील गुन्हेगारांत होते असें आढळून आलें. ही संख्या १९१७ सालापूर्वीची. त्यानंतर या प्रकारच्या गुन्ह्यांस ऊत आल्यामुळें ते करणारांची संख्या किती तरी वाढली आहे.

सन १९१७ सालापर्यंतच्या अत्याचारांपासून सरकारानें कांहींच बोध घेतला नाहीं हे १९१९ च्या सुधारणांच्या कायद्यानें आतां सर्वांच्या प्रत्ययास आणून दिलें आहे. १९१९ नंतर फिरून तेरा वर्षें लोटलीं आहेत व नवीन राजकीय सुधारणा घाट चालत आहेत. त्या सुधारणांचा कायदा करतांना सुशिक्षित म्हणून गणल्या जाणाऱ्या वर्गांना अधिक नोकऱ्या देऊनच सरकारानें तात केलें पाहिजे असा कोणाचा हट्ट नाहीं व सरकारानें तसें मनांत आणिलें तरी सर्व सुशिक्षितांना सरकारी नोकऱ्या मिळणेंहि संभवनीय नाहीं. या ठिकाणीं मुख्य गोष्ट लक्षांत ठेवावयास पाहिजे ती ही कीं, सुशिक्षितांना भूक अन्नाची आहे, नोकऱ्यांची नाहीं. तें अन्न त्यांस स्वतंत्र रीतीनें व पोटभर मिळालें तर त्यासारखा दुसरा आनंद कोणता आहे? बंगालचे माजी गव्हर्नर सर जॅक्सन यांनीं बंगाल्यांतील अत्याचारांच्या मुळाशीं अन्नाची भूक असल्याचें विलायतेंत गेल्यानंतर प्रांजलपणें कबूल केलें आहे. कौन्सिल ऑफ स्टेटमध्येंहि हिंदुस्थान–सरकारातर्फे आश्वासन देतांना मि. इमर्सन यांनीं सुशिक्षितांच्या अन्नाची तरतूद नवीन राजकीय सुधारणांत होईल असें खात्रीपूर्वक सांगितलें आहे. यावरून हिंदी सुशिक्षित वर्गाला काय पाहिजे आहे या-विषयीं कोणाहि इंग्रज अधिकाऱ्यास व मुत्सद्यांस भ्रांति उरली आहे असें निश्चयानें म्हणण्यास हरकत नाहीं.

तेव्हां नवीन स्वराज्याच्या अधिकारास सरकार फेडरेशन हे नांव देवो किंवा दुसऱ्या कोणत्याहि नांवानें संबोधो, त्यांत संस्थानिकांना घेवो किंवा बाहेर राहावयास सांगो, मुसलमानांकरितां सवता सुभा उभारो किंवा समाईक सुभ्यानें त्यांची बोळवण करो, ला बाबी महत्त्वाच्या असल्या तरी प्रस्तुत मुद्द्यापुढें गौणच होत. प्रस्तुत मुद्दा अन्नाचा असून त्याच्या आड संस्थानिक, मुसलमान, फेडरेशन किंवा सेफगार्ड्स (संरक्षक अटी) यांपैकीं कोणतेंहि विघ्न आलें व त्यामुळें सुशिक्षितांची बेकारी व उपासमारी कायम राहिली तर यापुढें चळवळीचा व अत्याचाराचा ससेमिरा सरकारच्या मागचा सुटण्याची आशा नाहीं; उलट इंग्रजी शिक्षणानें देवाची, धर्माची, पापपुण्याची कदर तरुण पिढीच्या मनावरून उत्तरोत्तर कमी होण्याचीं चिन्हें सध्यां तरी दिसत असल्यानें गेल्या बारा वर्षां-पेक्षां पुढील बारा वर्षें सरकारास अधिकच भयप्रद व चिंताजनक जातील असा वेळींच इषारा देऊन ठेवणें हें आम्ही आपलें कर्तव्य समजतो.

# वसंत व्याख्यान–माला

(२) श्री. **गो. चि. भाटे** यांचें **'विलायतेंतील विश्वविद्यालयें'** या विषयावर श्री. एम्. आर. परांजपे यांच्या अध्यक्षतेखालीं सोमवार ता २ रोजीं व्याख्यान झालें. व्याख्याते आपल्या भाषणांत म्हणाले, "पूर्वी युनिव्हर्सिटी याचा अर्थ विश्वविद्यालय असा करीत असत; पण हल्लीं विद्यापीठ असा करतात आणि हाच अर्थ माझ्या मतें योग्य आहे. युनिव्हर्सिटी म्हटलें कीं आपल्या डोळ्यांपुढें मुंबई युनिव्हर्सिटी उभी राहते. आणि आपल्या समजुतीप्रमाणें आपण विश्वविद्यालय म्हणजे परीक्षा घेऊन पदव्या देणारी संस्था असा तिचा अर्थ करतों. पण विलायतेंतील युनिव्हर्सिट्या या विश्वविद्यालयें नसून विद्यापीठें आहेत हें लक्षांत ठेवा. आपल्या इकडील युनिव्हर्सिट्यांप्रमाणें तिकडील युनिव्हर्सिट्या या नुसत्या परीक्षा घेऊन पदव्या देणारीं यंत्रें नसून तिकडील विद्यापीठांत शिक्षक व विद्यार्थी एके ठिकाणीं राहून अध्ययन–अध्यापनाचें कार्य एकत्र करीत असतात. तसेंच समाजां-तील संस्कृति व ज्ञान कशा रीतीनें वाढेल याचें संशोधन व प्रयोग तेथें सारखे सुरू असतात.

युरोपांतील विद्यापीठें सातआठशें वर्षांपूर्वी स्थापन झालेलीं असून त्यांचें ध्येयहि आपल्या इकडील विश्वविद्यालयांपेक्षां उदात्त आहे आणि म्हणूनच इकडील विद्यार्थी पुढचें शिक्षण घेण्याकरितां व त्यांत पारंगत होण्याकरितां तिकडे जातात. विलायतेंतील विद्यापीठें स्वतंत्र आहेत. त्यांचे तेच नियम करतात, अभ्यासक्रम आंखतात, त्यांत सरकाराचा हात नसतो. त्यांना सरकारी ग्रँट नसते. पूर्वी ज्यांनीं हीं विद्यापीठें स्थापन केलीं अशा विद्वान गृहस्थांनीं तेथील शिक्षकांच्या पगाराची व तेथें राहून विद्या-ध्ययन करणाऱ्या विद्यार्थ्यांच्या राहण्याजेवणाची सोयहि केलेली आहे. ज्याला जितकें धनबल होतें त्यानें तितक्या कमी–जास्ती प्रमाणावर

एकेक विद्यापीठ स्थापन केलेलें आहे. कांहीं ऑक्सफर्ड, केंब्रीजसारखीं विद्यापीठें अत्यंत धनसंपन्न आहेत तर कांहीं त्या मानानें कमी आहेत. केंब्रीज हें एक विद्यापीठ असून त्याला जोडलेलीं २५ कॉलेजें आहेत. ऑक्सफर्ड हेंहि अनेक कॉलेजांनीं युक्त असें एक विद्यापीठ आहे, अशीं विद्यापीठें आयर्लंडमध्यें ४, स्कॉटलंडमध्यें ४ व खुद्द इंग्लंडांत १२ अशीं एकंदर २० आहेत. या बहुतेक विद्यापीठांचे उत्पादक धर्मोपदेशक असल्यामुळें प्रत्येक विद्यापीठाला एकएक उत्तम प्रार्थनामंदिर जोडलेलें असतें. पण कालेंकरून ही धर्मभावना कमी झाली व ज्या मानानें समाजाचा दर्जा वाढला, गरजा उत्पन्न झाल्या त्या मानानें औद्योगिक, शास्त्रीय, वाङ्मय वगैरेंचा अभ्यास जोरानें सुरू झाला.

आपल्याइकडे परीक्षांना व पदव्यांना महत्त्व जास्ती आहे. पण तिकडे याना महत्त्व कमी असून तो विद्यार्थी कोणत्या विद्यापीठांत शिकला, कोणाच्या हाताखाली शिकला, याला जास्ती महत्त्व आहे. आपल्या कॉलेजमधून विद्यार्थ्यांना क्रमिक पुस्तकें नेमलेलीं असतात व त्यांचा अभ्यास क्रमशः करून घेण्यांत येतो. तिकडे अशी पद्धत नाहीं. प्रत्येक विद्यार्थ्याला सर्व विषयांचें स्थूल ज्ञान असतें पण त्याला आवडत असलेल्या एकाच विषयाचा तो जास्ती अभ्यास करतो, व त्यांत तो प्रावीण्य मिळवितो. ऑक्सफर्ड–केंब्रीज विद्यापीठांत हजार-बाराशे विद्यार्थी आहेत, प्रत्येक कॉलेजला एक एक लायब्ररी जोडलेली असते. तेथील बोल्डियन लायब्ररी विशेष प्रसिद्ध आहे. ऑक्सफर्ड, केंब्रीज येथें इतकीं कॉलेजें आहेत कीं त्या गांवांना कॉलेजपेठा म्हटलें असतां जास्ती शोभेल. प्रत्येक विद्यापीठ एकेक विषयाकरितां विशेष प्रसिद्ध असतें. उदाहरणार्थ, केंब्रीज विद्यापीठ हे गणिताकरितां प्रसिद्ध आहे. मँचेस्टर येथील विद्यापीठ रंगकाम, सूत काढणें, कापड विणणें यांचें शिक्षण देण्यांत प्रसिद्ध आहे. तसेंच लंडन स्कूल ऑफ एकॉनॉमिक्स येथें अर्थशास्त्राचें व राज्यशास्त्राचें शिक्षण दिलें जातें.

आपल्याइकडील कॉलेजच्या नियमाप्रमाणें एका विद्यार्थ्याला एकाच कॉलेजांत राहून अभ्यास करावा लागतो. पण तिकडे तसें नाहीं. केंब्रीज विद्यापीठाच्या विद्यार्थ्याला वाटेल त्या कॉलेजांत जाऊन व्याख्यान ऐकण्याची परवानगी असते. तिकडील इंटरमीजिएटचे शिक्षण आपल्याइकडील कॉलेजप्रमाणें कॉलेजांतच दिलें जातें. पण पुढील ऑनर्स कोर्सचें शिक्षण मात्र व्याख्यान--मालेच्या द्वारें दिलें जातें. तेथील विद्यार्थ्यांत दोन प्रकार असतात. एक कॉलेजमध्यें राहून शिक्षण घेणारे विद्यार्थी व दुसरे आपल्या पोटापाण्याचा उद्योग करून शिक्षण घेणारे विद्यार्थी. अशी सोय असल्यामुळें केवळ विद्यार्जन करणाऱ्या विद्यार्थ्यांपासून तों कामें करणाऱ्या मजुरापर्यंत वाटेल त्याला शिक्षणाचा लाभ मिळल्यामुळें पूर्वीपेक्षां हल्लीं विद्यार्जन करणाऱ्या लोकांची संख्या पुष्कळ प्रमाणांत वाढली आहे. दुसरी एक अशी सोय असते कीं, आपल्या इकडील विद्यार्थ्यांप्रमाणें तिकडील विद्यार्थ्यांना टर्म म्हणजे अमुक दिवस भरावे लागत नाहींत, तर त्यानें आपल्या सवडीप्रमाणें अमुक इतकीं त्या त्या विषयावरील व्याख्यानें ऐकलीं व अमुक अमुक वेळीं त्यानें वादविवादांत भाग घेतला असें शिक्षकाचें प्रशस्तिपत्र घेतलें म्हणजे तीच त्याची पदवी असें समजलें जातें.

आपल्या इकडच्या मानानें तिकडे शिक्षणाचा प्रसार अधिक झाला आहे, याचें कारण शिक्षकाची व विद्यार्थ्यांची मातृभाषा इंग्रजीच असते. दोघांचीहि भाषा एकच असल्यामुळें शिक्षकानें शिकविलेला कोणताहि विषय विद्यार्थ्याला चांगला समजतो. आपल्याकडेहि जर मराठींतून शिक्षण देण्याची पद्धति सुरू केली तर इकडेहि विद्यार्थी चांगले तयार होतील, व शिक्षणाचा फैलावहि पुष्कळ होईल. तिकडील विद्यापीठांना एक व्यायामशाळाहि जोडलेली असते. शिक्षक विषय जितक्या काळजीपूर्वक शिकवितात तितकीच काळजी ते विद्यार्थ्यांच्या शारीरिक शिक्षणाचीहि घेतात. तिकडील शिक्षकांचें प्रमाण इतकें मोठें आहे कीं, दर १० विद्यार्थ्यांमागें एक शिक्षक असतो; त्यामुळें प्रत्येक विद्यार्थ्याची तो शैक्षणिक व शारीरिक गोष्टीची काळजी घेतो, व त्याच्या दोनहि गोष्टींतील अडचणी दूर करण्यास मदत करतो. पुण्यालाहि ऑक्सफर्ड किंवा केंब्रीजसारखें एकादें विद्यापीठ स्थापन करण्यास हरकत नाहीं. कारण येथें निरनिराळ्या शास्त्रांच्या संस्था आहेत, कॉलेजें आहेत. पण 'योजकस्तत्र दुर्लभः' या न्यायानें अद्यापि कोणी योजक पुढें येऊन अशा तऱ्हेचा प्रयत्न करीत नाहीं. पण अशा तऱ्हेचे योजक लवकरच निघतील अशी मला आशा आहे."

वरीलप्रमाणें भाषण झाल्यावर अध्यक्ष म्हणाले 'आपल्या विश्वविद्यालयांतून पास झालेले विद्यार्थी म्हणजे कमी योग्यतेचे व विलायतेला जाऊन शिक्षण संपादन करून आलेले विद्यार्थी अधिक हुषार व अधिक योग्यतेचे असतात हा जो आपला समज झाला आहे, तो ज्या दिवशीं दूर होईल त्या दिवसापासून आपलीं विश्वविद्यालयें त्यांच्या तोडीचीं होतील हें लक्षांत ठेवा. तसेंच स्वदेशीचा अभिमान हा कापडापुरताच न धरतां तो शिक्षणाविषयींहि धरला पाहिजे."

(३) श्री. **विठ्ठल रामजी शिंदे** यांचें **'अस्पृश्यांचें राजकारण'** या विषयावर बॅ. गो. का. गाडगीळ

यांच्या अध्यक्षतेखालीं ता. ३ रोजीं व्याख्यान झालें. श्री. शिंदे आपल्या भाषणांत म्हणाले, "हल्लीं अस्पृश्यांच्या राजकारणाला बरेंच महत्त्व प्राप्त झालें आहे. राजकारण हें अर्थशास्त्रावर आधारलेलें आहे; म्हणजे समाजांत शांतता व सुव्यवस्था राखण्याकरितां अर्थशास्त्राची जरूरी जास्त असून शासनपद्धति ही गौण आहे. पूर्वीं ज्या वेळीं पोटापाण्याचा प्रश्न विशेष जिकीरीचा नव्हता, समाजांत जीवनकलह नव्हते, तेव्हां राजकारण किंवा शासनपध्दति ही कमी महत्त्वाची समजली जात असे. पुढें कालांतरानें जेव्हां कनक, कांता व कीर्ति याबद्दल समाजांत झगडे सुरू झाले तेव्हां शासनपद्धतीची जरूर भासूं लागली. पुढें या शास्त्राची व्याप्ति इतकी वाढली कीं, शासनपद्धतिच प्रधान झाली व अर्थशास्त्र गौण ठरलें, आणि हीच स्थिति अद्याप चालू आहे.

आज माझ्या मतें अस्पृश्यांची राजकारणासंबंधीं मागणी इतकीच आहे कीं, सुखासमाधानानें राहण्याची सर्व व्यवस्था आपली आपणांस करतां यावी, आपल्याला आर्थिक स्वातंत्र्य असावें. इतक्या गोष्टीपुरतें त्यांचें समाधान झालें म्हणजे मग ते मुसलमानांसारखे फिरून भांडावयास उभे राहणार नाहींत. मुसलमानांना स्वतंत्र मतदारसंघ दिला, त्यांचा सवता सुभा झाला, तरी ते अजून सुखासमाधानानें राहत नाहींत. त्यांच्या अंगांत अस्पृश्यांच्यापेक्षां जास्ती रग आहे. तशी अस्पृश्यांची मनोवृत्ति नाहीं. आजपर्यंत ज्यांनीं हिंदूंना त्रास दिला, जुलूमजबरदस्ती केली, त्यांच्यावर सेफगार्ड्स् नाहींत, पण जे अगदीं गरीब निरपराधी असे लोक आहेत अशा लोकांच्यावर पोलिटिकल सेफगार्ड्सचें बंधन घालतां आहां याचा अर्थ काय ?

अस्पृश्यांचें राजकारण हें अस्पृश्यतेइतकेंच पुरातन आहे. १९१९ सालापासून त्यांच्यामध्यें विशेष जागृति होऊन त्याला वाचा फुटली इतकेंच. अस्पृश्य हे तरी कसे झाले ? एका राजानें दुसऱ्या राजाला जिंकलें म्हणजे त्याला, त्याच्या बायकापोरांना इतकेंच काय पण त्याच्याभोंवतीं असणाऱ्या लोकांना जेते सोडून देत नसत. तर त्यांना गुलाम म्हणून ठेवीत, व त्यांना अस्पृश्यासारखे वागवीत. ही चाल फार पुरातन कालापासून चालू आहे. आणि असे अस्पृश्य गुलाम नाहींत कोठें? प्रत्येक देशांत आहेत. ब्रह्मदेशांतहि तुवझाया म्हणून एक अस्पृश्यांची जात आहे. हल्लीं ते देवळे ( पॅगोडा ) झाडण्याचें काम करतात. पण त्यांची राहणी पाहिली तर ती राजांना शोभण्यासारखी असते, तसेंच मलबारांत पुलाया जातीचे अस्पृश्य आहेत. पण ते अस्सल क्षत्रियासारखे राहतात. त्यांच्या पूर्वजांनीं बांधलेले गड, किल्ले वगैरे अजून अस्तित्वांत आहेत. पूर्वीं ते स्पृश्यच होते. पण पुढें बौद्ध कालानंतर ते हिंदुधर्मांत लवकर येऊन न मिसळल्यामुळें बाहेर टाकले गेले व तेच पुढें समाजांत अस्पृश्य म्हणून गणले गेले. सांगण्याचा मुद्दा इतकाच कीं, अस्पृश्यतेला संस्कृतीचा अभाव हेंच कारण नाहीं. तसेंच पाहूं गेलें तर आपण सुसंस्कृत स्पृश्य लोक असताना आपली दक्षिण--आफ्रिकेंत काय स्थिति आहे? आपण तेथें अस्पृश्यच गणले जातों.

आजपर्यंत आपण अस्पृश्यांना गुलामाप्रमाणें वागविलें. पण आतां हळूहळू ही स्थिति पालटूं लागली आहे. लहानपणीं आपण आपल्या रोगांकडे दुर्लक्ष करतों. पण पुढें केव्हां तरी ते रोग आपल्याला त्रास देऊं लागतात व आपलें अस्तित्व प्रकट करतात. अशीच स्थिति आतां अस्पृश्यांची झालेली आहे. आपल्या ज्या अडचणी त्याच त्यांना आतां संधीसारख्या उपयोगी पडूं लागल्या आहेत. आपण मागील इतिहास पाहिला तर होत असलेला बदल स्वाभाविकच आहे असें आढळून येईल. तेव्हां अस्पृश्य समाजाकडे आपणाला कानाडोळा करून भागावयाचें नाहीं. समाजाची बळकटी ही अशा अल्पसंख्याकांना संतुष्ट ठेवण्यावरच अवलंबन आहे. जहाजाला पडलेल्या भेगेकडे जर नावाड्यानें दुर्लक्ष करून योग्य ती व्यवस्था केली नाहीं तर तिच्या अंगांत सबंध जहाज बुडविण्याचें सामर्थ्य येतें हें विसरून चालणार नाहीं! 'अल्पसंख्याक अस्पृश्यांना कसलें आलें आहे राजकारण व मतदान?' असें म्हणून भागणार नाहीं. या अल्पसंख्याकांना जर संयुक्त मतदारसंघ देण्यांत आला नाहीं तर राष्ट्राची बळकटी राहणार नाहीं. अस्पृश्यांवर जर जुलूम होत असेल तर तो राष्ट्राला विघातक आहे.

गोलमेज परिषदेपासून या अस्पृश्यांच्या प्रश्नाला बरेंच महत्त्व प्राप्त झालें आहे. पूर्वीप्रमाणेंच तुम्हांला अस्पृश्यांना बाहेर ठेवावयाचें असेल तर त्यांना स्वतंत्र मतदारसंघ द्या, आणि जर तुम्हांला संयुक्त मतदारसंघ द्यावयाचा असेल तर त्यांना आंत घ्या व आपल्या समाजांत मिसळा. याव्यतिरिक्त तिसरा मार्ग नाहीं. माझें मत असें आहे कीं, ज्या ठिकाणीं अस्पृश्यता मोठ्या प्रमाणावर आहे तेथें स्वतंत्र मतदारसंघ मान्य करावा. डॉ. मुंजे व राजा यांच्यामध्यें झालेल्या तडजोडीला माझी संमति आहे. हिंदु-महासभेची चळवळ राष्ट्राच्या बळकटीच्या दृष्टीनें उपयोगी पडण्यासारखी आहे. शीख, मुसलमान यांना सवलती मिळतात तर अल्पसंख्याक अस्पृश्यांना ते मागतात त्या सवलती कां मिळूं नयेत? म. गांधींनीं गोलमेज परिषदेंत अस्पृश्यांविषयीं जे उद्गार काढले व त्यांच्या हक्कासंबंधीं जो

विरोध प्रगट केला तो त्यांनीं कां केला हें मला समजत नाहीं ! ते थोर पुरुष आहेत ! त्यांचा यांत कांहीं तरी राजकारणी डाव असेल, पण त्यांचें अस्पृश्यांविषयींचें म्हणणें निदान मला तरी योग्य दिसत नाहीं." वरील आशयाचें व्याख्यात्यांचें भाषण झाल्यावर श्री. राजभोज व श्री. पाताडे यांचीं उपवक्ते म्हणून भाषणें झालीं. नंतर श्री.गाडगीळ यांचें समारोपादाखल थोडेंसे भाषण झालें.

# ब्रिटिश साम्राज्याचा उदयास्त

( ले. श्री. दामोदर नरहर शिखरे एम. ए., पुणें. )

( लेखांक २ रा )

### वसाहतींची संपन्नता

न्यूझीलंड, कॅनडा, ऑस्ट्रेलिया, दक्षिण-आफ्रिका व हिंदुस्थान या प्रमुख देशांत सध्यां ब्रिटिशांचें अधिराज्य चालू आहे. १९१४ सालच्या महायुद्धांत ब्रिटनला १० लाख माणसें आणि १००० कोटी पौंड इतकी हानि सोसावी लागली; तरी 'संरक्षण-समीक्षण' इत्यादि निरनिराळ्या नांवांनी ब्रिटिश साम्राज्याचा विस्तार ८० लाख चौरस मैलांनीं वाढला. ह्या निरनिराळ्या वसाहतींमधून इंग्लंडला खाद्यपेयादिकांचा पुरवठा होत असतो यांपैकीं बहुतेक वसाहतींची लोकसंख्या त्यांच्या विस्ताराच्या मानानें अत्यल्प असून तेथल्या जमिनी सुपीक व खनिज संपत्तीने समृद्ध अशा आहेत. एक ऑस्ट्रेलिया घेतला तरी हीच स्थिति दिसून येते. तें एक खंडच आहे. यापुढें ब्रह्मदेश स्वतंत्र झाल्यानंतर जेवढा हिंदुस्थान शिल्लक राहील त्याच्या दुप्पट ऑस्ट्रेलियाचें क्षेत्रफळ आहे. पण वस्ती पाहिली तर मुंबई इलाख्याच्या चतकोराइतकीच; १ कोटीच्या आसपासच. तेथला गहूं तर हिंदुस्थानाच्या-ि बाजारपेठांतून वाहूं लागला आहे. जगांतील एकंदर मेंढ्यांपैकीं शें. २० एकट्या ऑस्ट्रेलियांत आहेत. म्हणजे लोकरीची एक मोठी खाणच तेथें आहे म्हटलें तरी चालेल. तीच स्थिति सोन्याची. जगांतील सोन्याच्या ५व्या हिश्श्याची जन्मभूमि ऑस्ट्रेलिया ही आहे. शिवाय चांदी, तांबें, शिसें वगैरे खनिज पदार्थ मुबलक आहेत ते वेगळेच. निसर्गाच्या अशा उदार देणगींपैकीं ऑस्ट्रेलियांतून बराच माल बाहेरदेशीं जातो व स्वदेशाला खूप पैसा मिळवून देतो. प्रत्येक माणशीं निर्गत व्यापाराचें प्रमाण पाहिलें तरी हेंच दिसून येतें. महायुद्धापूर्वी ऑस्ट्रेलियांतील प्रत्येक माणसापाठीमागें निर्यात व्यापार १५ पौंडांपेक्षां अधिक होता.

### वसाहतींना राज्याधिकारांची प्राप्ति

ऑस्ट्रेलियाला स्वतंत्र राज्यकारभाराचे हक्क १९ व्या शतकाच्या मध्यकालापासून मिळूं लागले आणि १९०१ सालापासून ऑस्ट्रेलियन संघाची पहिली पार्लमेंट उघडण्यांत आली. तेव्हांपासून जबाबदारीच्या तत्त्वाचा विकास हळूहळू होतच आहे. आणि सध्यां तर इंग्लंडहून नेमलेल्या नामधारी गव्हर्नराखेरीज ब्रिटिश साम्राज्याची दुसरी कोणतीच खूण तेथें शिल्लक राहिलेली नाहीं. न्यूझीलंडमध्येंहि जबाबदार राज्यव्यवस्थेचा उदय त्याच सुमारास झाला. १८५२ सालीं तेथल्या लोकांना हक्क मिळण्यास सुरुवात झाली, १८७५ सालीं त्यांचा विकास झाला आणि १९०७ सालीं पूर्ण जबाबदारी देण्यांत आली. या सबंध बेटाची वस्ती कलकत्ता शहराएवढीच आहे. पण भूमीचा विस्तार मात्र हिंदुस्थानांतील कोठल्याहि प्रांताएवढा आहे. आफ्रिकेची स्थिति मात्र थोडी निराळी व उद्वेगजनक आहे. त्या देशाला इंग्रजांचा पाय १८२१ च्या सुमाराला लागला. त्यांच्यापूर्वीच बोअर लोक तेथें येऊन राहिले होते. या दोघांनीं मिळून तो देश आपल्या ताब्यांत ठेवला आहे व तेथल्या रहिवाशांना गुलामाच्या स्थितींत ठेवलें आहे.

### मायलेकी बहिणीबहिणी झाल्या

अमेरिकेची वसाहत ही तर बोलून-चालून इंग्रजांच्या रक्तामांसाची. तेथल्या शहरांचीं नांवें देखील इंग्लंडांतीलच; पण जरा नावीन्यदर्शक उपपद लावलेलीं. नांवांत तेवढा फरक झाला तरी तो नांवापुरताच म्हणतां येईल. मुलीच्या सासरच्या नांवासारखेंच तें. आणि प्रथम प्रथम आंग्लभूमि ही आई आणि वसाहती ह्या तिच्या लेकी असेंच नातें होतें. पण काळाची करणी अशी कीं, दिवसेंदिवस आई म्हातारी व दुबळी होत जाते; उलट मुली अंगापिंडानें इतक्या भरतात कीं, आईची चोळी त्यांना दाटूं लागते. तीच स्थिति इंग्लंड व वसाहती यांची झाली. मायलेकीचें नातें सरलें व बहिणीबहिणींचे बरोबरीचे संबंध उत्पन्न झाले. अमेरिकेनें तिसऱ्या जॉर्जच्या कारकीर्दींत "ना कारभार; ना करभार" ह्या तत्त्वाची तड लावली आणि संग्रामदेवतेकडून स्वातंत्र्याचा मुकुट आपल्या मस्तकावर ठेवून घेतला. कॅनडानेंहि आपलें स्वातंत्र्य संपादन

केलें, एवढेंच नव्हे तर अमेरिकेशीं एकजीव होण्याचाहि घाट घातला. पण इंग्लंडनें त्याला आपल्याशीं, कितीहि क्षीण तंतूनें का होईना, जोडून ठेवलें आहे. त्याच्या या स्वातंत्र्याचा पाया १८३७ सालीं घालण्यांत आला. त्या वर्षी त्याला "स्थानिक स्वराज्य" देण्यांत आलें. पण तेवढ्यानें त्याची भूक भागण्यासारखी नव्हती. थोड्याच वर्षांत तेथें अस्वस्थता माजली. तेव्हां डरहॅमचा "मॅग्नाचार्टा" म्हणजे महाधिकारपत्र जन्मास आलें. त्याचें महत्त्व असें कीं, जबाबदारीच्या राज्यपद्धतीला त्यांत मान्यता देण्यांत आली होती. त्यापूर्वी रसेल, वेलिंग्टन यासारखे लोक जबाबदार राज्यपद्धतीवर अव्यवहार्यतेचा शिक्का मारीत असत. खुद्द पार्लमेंटांत वसाहतींचा प्रश्न चर्चेला निघे; तेव्हां सभागृह जवळ जवळ शून्य असे.

## सत्ता कोणाची ?

कॅनडाला आर्थिक स्वातंत्र्य १८५९मध्यें मिळालें.त्यानंतर ५-१० वर्षांतच कॅनडानें आपले अधिकार वाढवितां वाढवितां इतके वाढविले कीं, त्यानें साम्राज्यविषयक सवलतीला मूठच मारली. त्या देशानें प्रथम जेव्हां संरक्षक जकातीची भिंत उभी केली; तेव्हां त्याविरुद्ध इंग्लंडमध्यें खूप गवगवा झाला.पण त्याला कॅनडानें रोखठोक उत्तर दिलें कीं, "आमच्या प्रजेच्या आकांक्षेपेक्षां साम्राज्याच्या गरजा मोठ्या मानावयाच्या म्हणजे स्वराज्याचें मूळच खणून काढण्यासारखें आहे." आयर्लंडचें स्वातंत्र्ययुद्ध तर जगप्रसिद्धच आहे. शेंकडो वर्षे जिवापाड झगडल्यानंतर १९३२ सालीं आयरिश फ्रीस्टेटचा करारनामा झाला. त्यांतील एक वाक्य अत्यंत अर्थपूर्ण आहे.तें असें कीं 'सर्व कायदेशीर हक्क प्रजेला परमेश्वरापासून प्राप्त झालेले आहेत.' या विधानांत वरवर दिसतो तसा वेदान्त भरलेला नाहीं. त्याचा ध्वन्यर्थ व मुख्यार्थ हाच कीं, सर्व अधिकारांचें उगमस्थान आयरिश लोकच होत, साम्राज्याचें पार्लमेंट कांहीं नव्हे. त्या करारनाम्यानें इंग्लिश राज्यपद्धतीला एका प्रकारें धाब्यावरच बसविलें असें म्हणावयास हरकत नाहीं. आणि डी व्हॅलेरानें तर कळसच केला. इतर वसाहतींहि कायदे करण्याचे व त्यांची अंमलबजावणी करण्याचें स्वातंत्र्य भोगीत आहेतच. तशीच तहनामे करण्याची व परराष्ट्राचे दरबारीं स्वतंत्र वकील ठेवण्याची त्यांना मुभा असून राष्ट्रसंघांत आपलें स्वतंत्र मत इंग्लंडविरुद्धहि देण्याचा अधिकार त्यांना आहे. आयर्लंडचें निशाण, नाणें, तिकिटें हीं सर्व आतांपर्यंत पृथक् होतींच. राजनिष्ठेच्या शपथेची नाळ काय ती शिल्लक होती. पण तीहि डी व्हॅलेरा कापून काढीत आहे. हें उदाहरण गिरविण्याचा अखत्यार साऱ्या वसाहतींना आहे. त्यांनीं त्याची अंमलबजावणी केली तर ब्रिटिश साम्राज्याचें वर्णन "पांडव किती ?" या वर्णनाप्रमाणेंच विनोदी स्वरूपाचें होणार नाहीं काय ? "बाजेच्या खुराइतके तीन" असे शब्द मुखावाटे काढून दोन बोटें दाखवावयाचीं व एक डोळा झांकून पायानें जमिनीवर शून्याची आकृति काढावयाची ही जशी पांडवांच्या खानेसुमारीची पद्धति, तिला अनुसरून असें म्हणावें लागेल कीं, ब्रिटिश साम्राज्य हें सदैव सूर्यप्रकाशित, चारहि खंडांत पसरलेलें, मात्र कांहीं देश 'मॅंडेटखालीं' आहेत, कांहींवर ब्रिटिशांचा गव्हर्नर तेवढा आहे, तर कांहींनीं ब्रिटिश साम्राज्याची झूल टाकली नाहीं म्हणूनच ती टिकून आहे!

## साम्राज्याचें मृत्युपत्र

ती झूल टाकण्याची वृत्ति ब्रिटिश साम्राज्यांतील सर्वच देशांत उसळूं लागली आहे आणि ती स्वाभाविकहि आहे. कारण ही इंग्लंडपासून विभक्त होण्याची इच्छा म्हणजेच स्वदेश स्वतंत्र करण्याची लालसा होय. डिझ्रेलीसारख्या उदार म्हणविणाऱ्या मुत्सद्द्यानेंहि १८५२ सालीं एके ठिकाणी असें बिनदिक्कत लिहिलें आहे कीं, "या द्वाड वसाहती थोड्याच वर्षांत स्वतंत्र होतील!" एकीकडे इंग्लंडच्या घटकावयवांची ही स्वातंत्र्याची इच्छा बळावत चालली आहे, तर दुसरीकडे इंग्लंडला आंतूनबाहेरून सुरुंग लागल्यामुळें त्याची त्यांवरील पक्कड ढिली होत चालली आहे. महायुद्धापासून इंग्लंडचें परावलंबन व दुबळेपण विशेष वाढलें आणि गेल्या वर्षी तर वेस्टमिनिस्टर कायद्याचा दिल्लीदरवाजा त्याला उघडून देणें भाग पडलें. त्यांतून कोणत्याहि वसाहतीला मनमानेल तेव्हां, उजळ माथ्यानें, राजरोस,ब्रिटिश साम्राज्यांतून पाय काढतां येईल. अमेरिकेनें जें स्वातंत्र्य मिळविण्यासाठीं आपल्या पुत्रांचें रक्त सांडलें, तेंच स्वातंत्र्य इतर वसाहतींना वेस्टमिनिस्टर कायद्याच्या शाईनें प्राप्त झालें आहे. किंबहुना तो कायदा म्हणजे ब्रिटिश साम्राज्याचें मृत्युपत्रच होय ! लंडनमध्यें गेल्या नोव्हेंबरांत इंग्लंडच्या व वसाहतींच्या प्रधानांनीं तो कायदा लिहून ब्रिटिश साम्राज्याचे दिवस भरले असेंच जणुं जाहीर केलें ! वाऱ्याची झुळुक यावी आणि पटापटा पिकलेलीं फळें पडावींत; त्याप्रमाणें वसाहतींची लहर लागली कीं,त्या वसाहती साम्राज्यापासून सहज तुटून पडतील. राजनिष्ठेच्या शपथेचा मेरुमणि काय तो शिल्लक राहिला आहे, पण ती शपथहि ऐच्छिक आहे. दुसरें बंधन व्यापाराचें. व्यापाराच्या अदृश्य अशा विद्युत्तंतूंनीं ब्रिटिश साम्राज्य बद्ध झालेलें आहे. पण तेंहि बंधन क्षीण होत चाललें आहे. ओटावा येथें जी साम्राज्यविषयक आर्थिक परिषद भरणार आहे तेथें त्याचा टणकपणा किती टिकतो हें ठरणार आहे.

म्हणूनच बाल्डविनसाहेबांनीं कांहीं दिवसां-पूर्वी असे जाहीर केलें कीं, "ही परिषद मोडली तर ब्रिटिश साम्राज्य पुढील पन्नास वर्षांत धुळीस मिळा-लेंच म्हणावयाचें !

म्हणून साम्राज्याचें यापुढील जीवन वसाहतींच्या मर्जीवरच अवलंबून राहिलें आहे. सबंध १९ वे शतकभर इंग्रजांचें साम्राज्य गाजलें.तत्पूर्वी जगांतील आट्यापाट्यांच्या खेळांत साम्राज्यसत्तेचा सूर धरण्याचें भाग्य १६ व्या शतकांत पोर्तुगीज व स्पॅनिश यांचे-कडे आलें होतें. १७ व्या शतकांत तें डच लोकांना प्राप्त झालें आणि १८ व्या शतकांत तें फ्रेंचांना लाभलें. असें हें रहाटगाडगें फिरतां फिरतां १९ व्या शतकानें ब्रिटिशांच्या पोहोऱ्यांत साम्राज्य-सत्तेचें पाणी भरलें. पण आतां तो पोहोरा रिता होत चालला आहे. आतां ब्रिटिश साम्राज्याची स्थिति कोळ्यासारखी झाली आहे. एखाद्या बारक्या-शा कोळ्यानें आपल्या तोंडांतून भराभरा धाग्या-मागून धागे काढून त्यांचें भलें मोठें जाळें भिंतीवर पसरवून द्यावें व त्यांत जवळ-दूरच्या दोन-चार माशांना अडकवून आपण बढाई मिरवूं लागावें; तोंच घरधनीण येते आणि उंचशी केरसुणी हातांत घेऊन तें जाळें झटाझट झटकून टाकते, तेव्हां तो बिचारा कोळी आपण विणलेलें जाळें व त्यांतील सुग्रास माशा यांचा लोभ सोडून भिंतीच्या कोपऱ्यांत धूम ठोकतो आणि पुनः पूर्ववत् एकटा व दुबळा असा राहतो; तशी स्थिति सध्यां ब्रिटिश साम्राज्याची होत आहे. आणि ती यापुढें सुधारणे शक्य नाहीं असेंच काळाचा ओघ सुचवीत आहे.

# स्फुट सूचना

१ गोलमेजपरिषदेनें नेमलेल्या चार कमिट्यां-पैकीं फेडरल फिनान्स कमिटीचा रिपोर्ट नुकताच बाहेर पडला आहे. सदर कमिटीचे लॉर्ड युस्टेस पर्सी हे अध्यक्ष असून मि. करशा, हैदरी, हक्सर, रॉबिन्सन व सुंदरम् हे सभासद होते. नवीन राज्य-घटना संयुक्त स्वरूपाची होऊन प्रांतांना स्वायत्तता देण्याचें घाटत आहे. ही घटना करतांना प्रांतिक सरकार व मध्यवर्ती सरकार यांजमध्यें वसुलाच्या वांटणीचे बाबतींत जीं जुनीं गाऱ्हाणीं आहेत तीं दूर करणें, नवीन घटनेस अनुसरून वसुली खात्यांत फेरबदल सुचविणें व नव्या वसुलाच्या बाबी नजरेस आणणें हीं कामें सदरील फिनान्स कमिटीकडे सोंपविण्यांत आलीं होतीं. फिनान्स कमिटीच्या अंदाजाप्रमाणें संयुक्त सरकारच्या कारभाराला सुरुवात होईल त्या वेळीं मध्यवर्ती सरकारचा खर्च भागून त्याजपाशीं ४॥ कोटी रुपये शिल्लक राहतील. परंतु प्रांतिक सरकारांपैकीं बऱ्याच सरकारांची स्थिति तितकी समाधानकारक दृष्टीस पडणार नाहीं. फक्त संयुक्त प्रांत व पंजाब यांजपाशीं खर्चवेंच जाऊन प्रत्येकीं २५ लक्ष व ३० लक्ष रुपये शिल्लक उरतील. पण मद्रास, मुंबई, बंगाल, बिहार-ओरिसा, मध्यप्रांत व आसाम या सर्व प्रांतांच्या बजेटांत तूट येईल. सर्वांत अधिक तूट बंगालच्या बजेटास जाण-वेल.ती तूट दोन कोटींच्या व मुंबई इलाख्याची तूट ६५ लक्षांच्या घराला जाईल अशी कमिटीची अटकळ आहे. यंदांच्या प्रांतिक बजेटाची हाकाहाक लक्षांत घेतल्यास कमिटीचा हा अंदाज गैरवाजवी आहे असें कोणीच म्हणणार नाहीं.

२ काटकसरीचा विचार तूर्त वगळल्यास बजेटांतील तूट भरून येण्याचे मार्ग दोन. एक मार्ग नवीन कर बसविण्याचा व दुसरा हिंदुस्थान-सरकार व प्रांतिक सरकार यांनीं परस्परांत करा-वयाच्या उत्पन्नाच्या देवघेवीचा. पहिल्या मार्गाचा अवलंब प्रांतिक सरकारांनीं यापूर्वीच केला आहे. परंतु तो कितपत फलद्रूप होईल याची शंकाच आहे. कमिटीनेहि तंबाखूवरील कर, टर्मिनल टॅक्स यांसारख्या किरकोळ करांहून अधिक साधनें सुचवितां आलीं नाहींत व त्यापासून पुरेसें उत्पन्न येईल अशीहि तिला आशा वाटत नाहीं. यावरून हिंदुस्थानाच्या अंगांत संपत्तीच्या नवीन उत्पादनाचें त्राण कसें उरलें नाहीं याविषयीं खात्री पटते. दुसरा मार्ग उत्पन्नांच्या देवघेवीचा. कांहीं उत्पन्नाचीं खातीं हिंदुस्थानसरकारानें आपल्याकडे ठेवलीं आहेत. त्यांत इन्कमटॅक्स हें महत्त्वाचें खातें होय. त्याचें उत्पन्न हिंदुस्थानसरकारास १८ कोटींचें येतें. या उत्पन्नाचा अंश आपणास मिळावयास पाहिजे अशी मुंबई-सरकारची ओरड असून गेल्या बजेटांत तूट आली त्या वेळीं मुंबईसरकारचे फडणीस सर गोविंदराव प्रधान यांनीं आपण या तक्रारीची दाद फिनान्स कमिटीकडून लावून घेणार आहों असें जाहीर केलें होतें. त्या प्रश्नाचा विचार कमिटीनें आपल्या रिपोर्टांत सर्व साधकबाधक अंगांनीं केला आहे. कमिटीचें म्हणणें कीं, इन्कम-टॅक्सच्या १८ कोटींच्या उत्पन्नांतून ८० लक्ष वसुलीचा खर्च वजा जातां १७ कोटी २० लक्ष रुपये शिल्लक राहतात. या रकमेपैकीं मध्यवर्ती सरकारचे कंपन्यांवरील सुपर टॅक्स, आदिकरून त्यांच्या हक्काचे

३ कोटी ७० लक्ष रु. वजा करून १३ कोटी ५० लक्ष रु. उरतात. यांची वांटणी प्रांतिक सरकारांत त्यांच्या त्यांच्या गरजा व हिस्सा लक्षांत घेऊन करण्यांत यावी व अशा रीतीनें त्यांची जमाखर्ची तूट भरून काढावी अशी कमिटीची शिफारस आहे. या शिफारशींप्रमाणें मुंबई इलाख्याची तूट भरून निघून त्याजपाशीं ५४ लक्ष रु. अधिक उरतील. पण बंगाल, बिहार व ओरिसा आणि आसाम यांना येणारी तूट कायमच राहील. म्हणून कमिटीनें त्यावर अशी तोड सुचविली आहे कीं मुंबईप्रभृति प्रांतांनीं इन्कमटॅक्सपैकीं एक कोटि रुपये कमी घ्यावे व ते मध्यवर्ती सरकारानें बंगाल-प्रभृति प्रांतांच्या तुटीच्या भरीला घालून त्यांची तोंडमिळवणी करावी. कमिटीची ही तोड मुंबई-प्रभृति प्रांतिक सरकारांना मान्य होईल कीं नाहीं याची शंकाच आहे. कारण त्यांना आपला खर्च चालविण्यास हक्काचे जितके रुपये मिळतील तितके हवेच आहेत.

---

३ हिंदु-मुसलमानांतील कलह सर्व हिंदुस्थानाच्या राजकीय व सामाजिक आयुष्यक्रमास पीडा देत आहेच; पण त्यांतल्या त्यांत पंजाब व बंगाल या प्रांतांत राहाणाऱ्या हिंदु समाजास त्याची बाधा विशेष होत आहे. बंगालचे हिंदु पुढारी या कलहाकडे द्यावें तसें लक्ष देत नाहींत. परंतु पंजाबांत तितकें औदासीन्य नाहीं ही समाधानाची गोष्ट होय. पंजाबच्या हिंदु पुढाऱ्यांत भाई परमानंद यांसारखा हिंदु समाजाच्या शाश्वत कल्याणाची काळजी वाहणारा पुढारी दुसरा नाहीं. त्यांच्या अध्यक्षतेखालीं कराची येथें ता. ७ मे रोजीं अखिल भारतीय हिंदु तरुणां-च्या अधिवेशनास सुरुवात झाली. या परिषदे-करितां सिंध हाहि प्रांत असा निवडण्यांत आला कीं, त्यांत मुसलमानांचें हिंदूंवरील संकट पंजाब व बंगाल या प्रांतांइतकेंच उग्र स्वरूपाचें आहे. भाई परमानंद यांनीं अध्यक्ष या नात्यानें परिषदेंत केलेल्या भाषणांत वादग्रस्त मुद्दे बरेच आहेत. परंतु ते मननीय आहेत हें नाकबूल करण्यांत अर्थ नाहीं. त्यांनीं राष्ट्रीय सभेच्या धोरणावर केलेली टीका तिच्या पुष्कळ भक्तांना आवडणार नाहीं. त्यांच्या मतें राष्ट्रीय सभेनें स्वातंत्र्य हें आपलें ध्येय पुकारलें व त्यास मं. गांधींनींहि संमति दिली ही चूक झाली.

---

४ राष्ट्रीय सभा स्वातंत्र्याच्या ध्येयास जों जों चिकटूं लागली तों तों सरकारचा राष्ट्रीय सभेशीं विरोध वाढत गेला व मुसलमानांस जवळ करण्याचें सरकारचें धोरण बळावत चाललें. कॉंग्रेस व सरकार यांच्या परस्परांशीं बांकून वागण्याचा परिणाम असा झाला कीं, ते दोघेहि मुसलमानास आपल्या बाजूस ओढण्याकरितां त्यांस अधिकाधिक सवलती देण्यास प्रवृत्त झाले. अशा-रीतीनें मुसलमानांच्या राजकीय आकांक्षेची हुंडी दोघांच्या भांडणांत आयतीच भरत आली; इतकेंच नव्हे तर हिंदूंपैकींच जे अस्पृश्य लोक त्यांच्याहि डॉ. अंबेडकर–प्रभृति पुढाऱ्यांस हिंदूंपासून फोडण्यां-त सरकाराला यश आलें. भाई परमानंद यांचें म्हणणें असें कीं, ब्रिटिश मुत्सद्द्यांना वळविण्याचें सामर्थ्य म. गांधींत आहे. ते मनांत आणतील तर आपल्या वजनानें व सामर्थ्यानें ब्रिटिश मुत्सद्द्यांस जातवारीचें खूळ गाडावयास लावून भावी स्वराज्याची उभारणी खंबीर पायावर करूं शकतील. परंतु गांधीजी स्वातंत्र्य-वादी बनल्यामुळें ब्रिटिश मुत्सद्द्यांची त्यांजवरील श्रद्धा उडून राष्ट्राचा व हिंदु जातीचा नाश होण्याची पाळी आली. अशा बिकट परिस्थितींत हिंदूंनीं अशा संघटनेच्या बळावर स्वसंरक्षणाच्या तयारीस लागलें पाहिजे असा परमानंद यांचा तरुण हिंदूंना उपदेश आहे. पण हा उपदेश हिंदूंवरील सामाजिक व धार्मिक संकटापुरता झाला. मुसलमानांचें राजकीय संकट त्या उपायानें टळणार नाहीं. हें संकट कायमचें टाळण्यास आपणहि असमर्थ आहों असें मुख्य प्रधान मि. राम्से मॅक्डोनाल्ड यांनीं पूर्वीच सांगून टाकलें असल्यामुळें त्यांचीहि आशा करण्यांत अर्थ नाहीं. या संकटाचें निवारण राष्ट्रसंघाकडून करून घेण्यास ब्रिटिश सरकार व मुसलमान यांची हरकत आहे. तेव्हा त्यावर भाई परमानंद यांनीं वेगळीच तोड सुचविली आहे. ते म्हणतात, "जातवारीचें भांडण राष्ट्रसंघाच्या कक्षेंत जात नसलें तरी निदान ब्रिटिश साम्राज्याच्या कक्षेंत पडतेंच पडतें. यास्तव हें भांडण तोडण्या-करितां इंग्लंडचे मुख्य प्रधान व वसाहतींचे मुख्य प्रधान यांना पंच नेमण्यांत यावें व ते जो निकाल देतील तो कायमचा समजण्यांत यावा." भाई परमानंद यांनीं सुचविलेला उपाय गैर नाहीं. पण भांडण मिटणें हें उपाय सुचविण्यावरच अवलंबून असतें तर उपाय थोडे नाहींत व ते सुचविणारांचाहि दुष्काळ नाहीं. यावर शंका एकच कीं निजलेल्याला जागें करतां येतें, पण निजल्याचें सोंग घेणाराला जागें कसें करावयाचें?

# प्रथम स्वराज्य व नंतर सवलती

ओटावा येथें येत्या जुलै महिन्यांत भरणाऱ्या साम्राज्य परिषदेंत, जो व्यापारी तह करून घेण्याचा घाट ब्रिटिश मुत्सद्द्यांनीं घातला आहे, त्याला हिंदी व्यापाऱ्यांची अगाऊ संमति घेऊन ठेवण्याकरितां कांहीं गोडीगुलाबीची साखर पेरून तर कांहीं दहशत घालून, हिंदुस्थानसरकारनें अनेक हिकमती केल्या खऱ्या.पण त्या जाळ्यांत हिंदी व्यापारी सांपडले नाहींत. त्यांनीं सरकारचा कावा ओळखला व अगदीं सडेतोड भाषेंत, सवलतींच्या जकातींच्या तत्त्वाचा त्यांनीं निषेध केला. इतकेंच नव्हे तर सरकारास व त्यांनीं नेमलेल्या प्रतिनिधींनाहि स्पष्ट बजावलें आहे कीं ओटावा येथें जे करारमदार होतील ते हिंदी व्यापाऱ्यांना व अखिल राष्ट्राला बंधनकारक आहेत असें मानलें जाणार नाहीं. मुंबई, कलकत्ता, महाराष्ट्र व कर्नाटक येथील व्यापारी संस्था व उत्तर हिंदुस्थानांतील नाणावलेले व्यापारी, आणि या सर्वांचा मिळून बनणारा अखिल भारतीय व्यापारी संघ या सर्वांनींच अगदीं एकसुरांत सरकारची काढलेली खरड पाहण्यासारखी आहे. या संस्थांकडून सरकारकडे गेलेल्या उत्तरांत या सवलतीच्या जकातीच्या बाबतींत हिंदुस्थानचे काय म्हणणें आहे हें आंकड्यांचे पुरावे देऊन व पूर्वीचे दाखले उपयोगांत आणून दाखविलें असल्या कारणानें त्यांना विशेष महत्त्व प्राप्त झालें आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

हिंदुस्थानसरकार व हिंदी व्यापारी यांच्यामध्यें या आर्थिक प्रश्नासंबंधीं हा जो मतभेद झाला त्यांत आश्चर्य वाटण्यासारखें कांहींच नाहीं. कोणत्याहि प्रश्नासंबंधीं ऐकमत्य होण्याला समान भूमिका व समानदृष्टि लागत असते.पण या सवलतीच्या जकातीच्या प्रकरणांत तसा प्रकार मुळींच नाहीं. इंग्लंड व हिंदुस्थान या देशांचा यदृच्छया जो संबंध आला तोच एक जेता व एक जित, एक व्यापारी व दुसरा गिऱ्हाईक, एक धनी व दुसरा गुलाम असाच आला. यामुळें सर्वच बाबतींत,विशेषतः आर्थिक बाबतींत तरी,एकाचें हित तें दुसऱ्याचें अहित व एकाचें अहित तें दुसऱ्याचें हित अशी परिस्थिति उत्पन्न झाली. हा सामान्य सिद्धांत यापूर्वी अनेक वेळां कसास लागला असून तो पूर्णपणें खरा ठरला आहे. उदाहरणार्थ,हिंदुस्थानांत स्वदेशी चळवळ जोरानें चालू झाली, कापडाच्या नव्या स्वदेशी गिरण्या निघाल्या व भरभराटीस आल्या कीं, इंग्लंडांतील गिरण्यांचें गिऱ्हाइक तुटल्यानें त्या ठार बुडूं लागतात. हिंदुस्थानांतील हात-मागावरील कापड एक वार खपलें कीं एक हिंदी मजूर पोटापाण्याची सोय झाल्यानें जगण्याच्या मार्गास लागतो तर एक इंग्रज मजूर बेकार बनतो.

हिंदुस्थानांत एक जिन्नस तयार होऊं लागला कीं त्या जिनसाचा तिकडील एखादा कारखाना बुडतो. अशीं एक काय शेंकडों उदाहरणें देतां येतील. तात्पर्य हें आहे कीं, इंग्लंडचें व हिंदुस्थानचें या आर्थिक बाबतींत अगदीं विळ्याभोपळ्याइतकें सख्य आहे. म्हणजे विळा चालला कीं भोपळा चिरला जातो ! अशा स्थितींत इंग्लंड व हिंदुस्थान या देशांतील व्यापारी यांचें जमावें कसें ? म्हणूनच हा सवलतीचा प्रश्न निघाल्याबरोबरच अखिल हिंदुस्थानांतून निषेधाचीच भाषा निघाली. सरकारला याची जाणीव नव्हती असें म्हणणें म्हणजे त्यांच्या राजकारणी कुशाग्रबुद्धीवर दोषाचे शिंतोडे उडविण्यासारखें आहे. ब्रिटिश सरकारला याची जाणीव पुरेपूर होती व आहे, व त्यांच्यापैकीं कांहीं पुढाऱ्यांनी तसे उद्गारहि काढले आहेत. तेव्हां अशा स्थितींत या सवलतींच्या जकातीला हिंदी व्यापारी लोकांची संमति मिळावी तरी कशी ? ती मिळाली नाहीं हें अगदीं सरळ झालें; मिळाली असती तरच विपरीत झालें असतें खास !

सवलतीच्या जकाती याचा गर्भितार्थ असा आहे कीं एकमेकांच्या हिताकरितां एकमेकांनीं सहकार करावयाचा. हा सरळ सहकार आहे. पण ब्रिटिश साम्राज्यांतील व्यापाऱ्यांशीं सहकार करून हिंदुस्थानचें हित साधत नसल्यामुळें हा सरळ सहकार शक्य नाहीं. आज ब्रिटिश सरकार ज्या प्रकारचा सहकार करावा असें म्हणतें त्याच्या निरनिराळ्या जाती आहेत. उदाहरणार्थ, तुमचे पोहे व आमचा कोंडा मिसळून आपण खाऊं असें म्हणणें हा एक सभ्य, पण दोषपूर्ण असा सहकाराचाच प्रकार आहे. घोडा व स्वार यांच्यामध्यें एकानें दुसऱ्यावर स्वार व्हावें व दुसऱ्यानें कायमची आपणावर स्वारी बसवून घ्यावी हाहि सहकाराचाच दुसरा प्रकार. तिसरा प्रकार म्हणजे लांडगा व कोंकरूं यांचा. लांडग्यानें कोंकरास स्वाहा करून आपल्या विशाल उदरांत कायमचें स्थान करून द्यावें व कोकरानें त्याला या कामीं मदत करावी यालाहि सहकारच म्हणतां येईल! आज आर्थिक बाबतींत तरी इंग्लंड व हिंदुस्थान यांच्यामध्यें जो सहकार चालू आहे तो अगदीं निखालस नसला तरी जवळ जवळ या तिसऱ्या प्रकारचा आहे. हिंदुस्थानानें साम्राज्यांत राहून वसाहती व इंग्लंड यांना व्यापारी सवलती द्याव्या व आपलें कल्याण करून घ्यावें असें सांगण्यांत येत आहे. परंतु ही विचारसरणी आज हिंदी व्यापाऱ्यांना पटणें शक्य नाहीं, त्याला काय इलाज ! वर सांगितल्याप्रमाणें आजपर्यंतचा अनुभवहि तसाच असल्याकारणानें हिंदी व्यापाऱ्यांनीं या सवलतीचा धिक्कार केला यांत आश्चर्यहि नाहीं.

हिंदी व्यापाऱ्यांनीं हिंदुस्थानसरकारच्या खलीत्या-

ला जीं उत्तरें दिलीं आहेत त्यांच्या बुडाशीं कोणती विचारसरणी आहे याचें दिग्दर्शन करण्याकरितां वरील ऊहापोह केला. खुद्द उत्तरांत जरी उल्लेख नसला तरी ती मनोभूमिका उत्तरावरून स्पष्ट दिसते. याशिवाय दुसरा एक विचार कोणाच्याहि मनांत आल्यावांचून राहात नाहीं. तो म्हणजे या अगर असल्या परिषदेंत हिंदुस्थानाला ज्या पद्धतीनें वागविलें जातें त्या पद्धतीचा होय. हें स्पष्ट करून सांगण्याकरितां आपण मागल्या एक दोन साम्राज्य-परिषदांचीं उदाहरणें घेऊं. महायुद्धापूर्वी भरलेल्या १९११साला-च्या साम्राज्य-परिषदेचीं अगर युद्धाच्या मध्यकालीं १९१७ सालीं भरलेल्या परिषदेची गोष्ट सोडून दिली तरी १९१९च्या पॅरिस येथें भरलेल्या तह-परिषदेंत हिंदुस्थानाला स्वतंत्र स्थान दिलें गेलें होतें. पण त्या वेळींहि अमेरिकेंतील लोकसभेंत एका सभासदानें स्पष्ट जाहीर केलें होतें कीं, ज्या हिंदुस्थानाच्या हातापायांत पारतंत्र्याच्या शृंखला खळखळ वाजत आहेत, त्याच्या प्रतिनिधींनीं आमच्याशीं बरोबरीचें नातें ठेवून तहाच्या खर्ड्यावर सह्या कराव्या हें आम्हांस पसंत नाहीं ! या वेळीं हिंदुस्थानाच्या स्टेट सेक्रेटरी-बरोबर लॉर्ड सिंह हे प्रतिनिधी होत. १९२१ सालच्या परिषदेंत ना. शास्त्री हे हिंदुस्थानाचे प्रतिनिधि नेमले गेले होते. त्या सालीं साम्राज्य-परिषदेनें "हिंदुस्थानचा दर्जा साम्राज्यांतील इतर घटकावयवांच्या बरोबरीचा असल्यानें हिंदी लोकांना वसाहतींमध्यें इतरांच्या बरोबरीचे हक्क आहेत असें समजलें जावें," असा ठराव केला; परंतु दक्षिण-आफ्रिकेचे प्रतिनिधि सेनापति स्मट्स् यांनीं उठून स्पष्ट घोषणा केली कीं, हा ठराव दक्षिण आफ्रिकेंतील कोणीहि नागरिक मानणार नाहीं !

हिंदुस्थानाव्यतिरिक्त इतर स्वतंत्र असणाऱ्या वसाहतींच्या बाबतींत असे उद्गार सभेंत कोणीं काढले असते तर साम्राज्य-परिषदेच्या ठिकऱ्या उडाल्या असत्या. पण बिचारा परतंत्र असणारा हिंदुस्थान काय करणार ? ना. शास्त्र्यांनीं खालीं मान घालून त्यावेळीं आपला अपमान सहन केल्याचें प्रसिद्ध आहे. १९२३ सालीं जी साम्राज्य-परिषद झाली तींत याच प्रकारची सुधारून वाढविलेली आवृत्ति निघाली. त्यावेळीं हिंदुस्थानाचे प्रतिनिधि सर तेजबहादूर सप्रू होते. वरील प्रश्न पुनः निघाला त्या वेळीं त्या बहादुरानें दिलेलें उत्तर प्रसिद्ध आहे. ते म्हणाले "मी किंग जॉर्जचा प्रजाजन या नात्यानें या साम्राज्याच्या खुद्द प्रासादांतच मानाची जागा मिळावी म्हणून लढेन. मी गुरांच्या गोठ्यांत राहाण्यास तयार नाहीं." अशी किती उदाहरणे सांगावीं ! हिंदी प्रतिनिधींवर असले अपमानाचे निखारे उडाले नाहींत असे या साम्राज्य-परिषदेंत क्वचितच घडलें आहे. असल्या अपमानांची माळ परिषदेंत जाऊन घालून घेणें हें स्वाभिमान-शून्यतेंच लक्षण मानलें गेल्यास नवल नाहीं. ह्या राजकीय परावलंबित्वाची लाज हिंदी व्यापाऱ्यांना वाटत नाहीं असें थोडेंच आहे ?

हिंदी व्यापारी संस्थांनीं दिलेल्या उत्तराची छाननी केली असतां कोणालाहि असें आढळून येतें कीं त्यांनीं या सवलतीच्या जकातीच्या प्रश्नांची आर्थिक दृष्ट्या उत्तम प्रकारें छाननी केली आहे. परंतु त्यांत खरा महत्त्वाचा भाग कोणता असेल तर त्यांनीं हिंदुस्थानाच्या राजकीय दुरवस्थेवर दिलेला भर हाच होय. कर्नाटकाच्या चेंबरनें म्हटलें आहे कीं, "हिंदुस्थानाला स्वराज्याचे अधिकार मिळून इतर वसाहतींशीं बरोबरीच्या नात्यानें बोलण्याचा हक्क ज्या वेळीं प्राप्त होईल त्या वेळींच 'देवाण-घेवाण' करून आपल्या पसंतीप्रमाणें हिंदुस्थान आर्थिक तह करील; तोंपर्यंत असले तह हिंदुस्थानानें करूं नयेत असें आम्हांस वाटतें." मुंबईच्या मर्चंट्स् चेंबरनें आपल्या उत्तरात लिहिलें आहे कीं, "वसाहती स्वतंत्र असल्यानें त्यांचे प्रतिनिधी व हिंदुस्थान-ब्रिटिश सरकारनें नेमलेले प्रतिनिधी यांची बरोबरी कशी होणार ? अगोदर हिंदुस्थानसरकार म्हणजेच साम्राज्य सरकारचें एक दुय्यम दर्जाचें खातें. त्यांनीं नेमलेले हे प्रतिनिधी ! पण ते असो. राजकीय परि-स्थितीचा विचार करतांना हिंदुस्थान स्वावलंबी व स्वतंत्र झाल्यावरच त्याच्या प्रतिनिधींनीं कोणाशीं व्यापारी तह करावयाचे हें ठरवावें. त्यावेळीं राष्ट्रीय हिताचीच दृष्टि राहिल्यानें साम्राज्यांत ज्याचा अंतर्भाव नाहीं अशा देशाशींहि कदाचित् त्यांना तह करावे लागतील. तेव्हां तूर्त ही घिसाडघाई उपयोगी नाहीं."

कलकत्ता चेंबरचे म्हणणें याहिपेक्षां स्पष्ट आहे. त्या चेंबरचे चिटणीस म्हणतात कीं "हिंदुस्थानाला आज 'डोमिनियन स्टेटस्' नसल्यानें तो स्वतंत्र नाहीं. त्याला साम्राज्यांत बरोबरीचें स्थान नाहीं. हिंदुस्थानाला अगोदर स्वराज्य द्या व मग सवलतीची भाषा बोला !" अखिल भारतीय हिंदी व्यापारी संघाचे अध्यक्ष श्री. वालचंद हिराचंद यांनींहि याच तऱ्हेचा युक्तिवाद केला असून शेवटीं त्यांनीं म्हटलें आहे कीं "भूतकाळाचा अनुभव पाहिला तर ब्रिटिश सरकार इंग्लंडच्या हिताकडे कसें लक्ष देतें व त्या हिताकरितां हिंदुस्थाना-च्या हिताची होळी कशी केली जाते याची आम्हांस प्रचीति आलेली आहे. मग राजकीय सुधारणांचें नवयुग लवकरच सुरू होणार अशी ग्वाही सरकारच देत असतांना, आजच हिंदु-स्थानाचे हातपाय या नव्या करारमदारानें बांधून टाकणें अनिष्ट होय. स्वराज्य मिळाल्यावर सवलतींचा विचार करतां येईल !" वरील सर्व उत्तरें

पाहतां असें खास म्हणतां येईल कीं, हिंदुस्थान आज कसल्याहि जकातीच्या सवलतीबद्दल वाटाघाट करण्यास तयार नाहीं!

साम्राज्यांतल्या वसाहतींतील इंग्रज व इतर गोरे लोक हिंदी लोकांना कसे वागवितात हाहि एक प्रश्न बऱ्याच अंशानें राजकीय प्रश्नांशीं निगडित झालेला आहे. वसाहतींत हिंदी लोकांना परकेपणानेंच नव्हे तर गुलामांप्रमाणे वागविलें जातें. त्यांच्या हाल-अपेष्टा ऐकवत नाहींत. दक्षिण आफ्रिकेंतील हिंदी लोकांवर जे अन्यायाचे व अपमानाचे डोंगर रचिले जातात त्यांची कहाणी ऐकून ज्या हिंदी मनुष्याचें रक्त सळसळत नाहीं असा मनुष्य विरळा. दक्षिण आफ्रिकेंतच काय पण इतर सर्व वसाहतींत हीच तऱ्हा आहे. ब्रिटिश साम्राज्यांतील या निरनिराळ्या वसाहतींत अत्यंत अपमानाचें म्हणून मेलेलें जिणें हिंदी लोक काढीत असतांना व या त्यांच्या दुरवस्थेस कारण त्या वसाहतींतील गोरे लोकच असतांना, त्या गोऱ्यांच्या वसाहती धष्टपुष्ट व्हाव्या म्हणून हिंदुस्थानानें त्यांचा माल सवलतीच्या जकाती ठेऊन आपल्या देशांत पेरावा हें सांगणेंच अत्यंत चीड आणणारें आहे. जर हिंदुस्थानानें वसाहतींना या सवलती दिल्या तर हिंदुस्थानाच्या नादानपणाला सीमाच राहाणार नाहीं. लाथ मारणाऱ्याच्या पायाला श्रम झाले म्हणून आपण होऊन लोणी चोळावयास लागणें जितकें नादानपणाचें आहे तितकेंच वसाहतींना सवलती देणें नादानपणाचें होणार आहे !

हिंदी व्यापाऱ्यांनीं दिलेल्या वरील उत्तरांत हिंदुस्थानच्या प्रचलित राजकारणाचा वास येतो म्हणून कोल्हेकुई करण्यास सरकारच्या पक्षपाती वर्तमानपत्रांतून आतांपासूनच सुरुवात झाली आहे. वास्तविक पाहतां या कोल्हेकुईंत अर्थ नाहीं. सरकार तरी आज आपल्या हातांत निरंकुश राजकीय सत्ता आहे त्याचा उपयोग करून आपल्या जातभाईच्या पोळीवर तूप ओढण्याचा प्रयत्न करीत आहे कीं नाहीं ? मग आपलाच दाम खोटा तर दुसऱ्याला नांवें ठेवण्याचा यांना काय अधिकार ? हिंदुस्थानांत राजकारण व अर्थकारण एकजीव आहेत. कारण, अर्थकारण हें सर्वस्वी राजकारणाचा भाग असून त्यांतच एकरूप झालें आहे; म्हणूनच हिंदी व्यापाऱ्यांचा आग्रह असा आहे कीं, प्रथम हिंदुस्थानाला स्वराज्य द्या. तें देण्याची इच्छाच नसली तर गोष्ट वेगळी. आजच्या पारतंत्र्याच्या परिस्थितींत तरी साम्राज्याचीं आहेत हींच बंधनें हिंदी लोकांस नकोशीं झालीं आहेत, मग नवीन बंधनें कोण घालून घेऊं इच्छील ? शिवाय या सवलतीच्या प्रश्नाबाबत इंग्लंडचें धोरण केवळ स्वार्थाचें आहे. ह्या धोरणास स्वार्थी म्हटल्यानें पुष्कळांना राग येतो. पण स्वार्थ शब्दास अधिक गोडस नांव दिलें म्हणून त्यांतील अर्थ कां बदलतो ? कांहींहि नांव दिलें तरी वाघाच्या अंगावरील पट्ट्याप्रमाणें हा स्वार्थाचा शिक्का केव्हांहि झांकतां येणार नाहीं. पण तो स्वार्थ असो कीं, परार्थ असो, हिंदुस्थानास या भानगडींत आज पडावयाचें नाहीं इतका अर्थ या व्यापारी लोकांच्या उत्तरांतून स्पष्ट निघत आहे. अगोदर स्वराज्य व नंतर सवलती असा हा नवा दंडक आहे. राजकारणाचा भाग सोडून देऊन केवळ आर्थिक दृष्टीने या प्रश्नाचा विचार केला तरी या जकातीच्या सवलती देण्यांत हिंदुस्थानाचें हित कसें नाहीं हें पहाणें जरूरीचें असून त्याचा ऊहापोह पुढील खेपेस करण्यांत येईल.

# वसंत व्याख्यानमाला, पुणें

## हिंदी संयुक्त राज्यघटना

(४) या मालेंतील ४ थें व्याख्यान ता. ४-५-३२ रोजीं प्रो. **ग. र. अभ्यंकर** यांचें 'फेडरेशन' या विषयावर झालें. अध्यक्षस्थानीं प्रो. **वामन गोविंद काळे** यांची योजना झाली होती. अध्यक्षांचे प्रास्ताविक भाषण झाल्यावर प्रो. अभ्यंकर म्हणाले, "ब्रिटिश इंडियास जी फेडरल म्हणजे 'संयुक्त घटना' मिळण्याचें घाटत आहे तींत संस्थानी प्रजाजनांस काय मिळणार यासंबंधीं मी आज बोलणार नाहीं. ब्रिटिश इंडियन लोकांनाच जें फेडरेशन मिळणार त्याचें स्वरूप काय हें मला आज सांगावयाचें आहे. गेल्या दोन वर्षांत हा फेडरेशनचा वाद उत्पन्न झाल्यापासून मोठमोठे पुढारी कसें तरी एकदां हें फेडरेशन येवो म्हणून उतावीळ झाले आहेत. पण हें फेडरेशन काय आहे याची प्रथम नीट तपासणी करा व मग हवें तर त्यास संमति द्या एवढीच माझी आपणांस विनंति आहे.

प्रांतिक स्वराज्याच्या मुद्द्यापासून या विषयाला मी आरंभ करतो. सध्यां ताबडतोब प्रांतिक स्वराज्य द्या व मध्यवर्ती फेडरल सत्ता सावकाश द्या असें म्हणणारे कांहीं लोक आहेत. यांत मुसलमानांचा पक्ष प्रमुख आहे. असें म्हणण्यांत मुसलमानांचा स्वार्थहेतु आहे. वायव्य सरहद्द प्रांत नुकताच स्वतंत्र झाला असून सिंधहि स्वतंत्र होऊं घातला आहे. पंजाबांत मुसल-

मान बहुसंख्य आहेतच. म्हणजे सिंध, पंजाब व सरहद्द हे सरहद्दीवरील तीन मुसलमानी प्रांत स्वतंत्र होऊन सर महंमद इक्बल यांच्या कल्पनेप्रमाणें सरहद्दीबाहेरचीं मुसलमानी राज्यें व हिंदुस्थानातील हे तीन मुसलमानी प्रांत मिळून मुसलमानी साम्राज्याची पूर्वतयारीहि होईल.

फेडरल अथवा संयुक्त घटनेमध्यें मध्यवर्ती सत्ता दोन प्रकारची असते. एक प्रकार असा. प्रांताकडे जरूर ती सत्ता येऊन अंतिमाधिकार—म्हणजे शेषाधिकार मध्यवर्ती फेडरल सरकारचे हातीं ठेवलेले असणें. या प्रकारांत प्रांताची स्वायत्तता बरीच मर्यादित राहून त्यावर फेडरल सरकाराची हुकमत पुष्कळ चालते. अशीच घटना कानडामध्यें आहे. मुसलमानांना हा प्रकार नको आहे. दुसरा प्रकार असा कीं, मध्यवर्ती फेडरल सरकाराकडे कांहीं नियमित विषयांची सत्ता ठेवून बाकीच्या क्षेत्रांत अंतिमाधिकारामुद्धां सर्व सत्ता प्रांतांना असते. यांत प्रांतांना आपल्या क्षेत्रांत जवळजवळ संपूर्ण स्वातंत्र्य असतें. अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांत अशी घटना आहे. मुसलमानांना हा प्रकार हवा आहे. या देशांत हिंदु बहुसंख्य असल्यानें मध्यवर्ती सत्तेंत हिंदु प्रमुख राहणार. पण शेषाधिकार स्वायत्त प्रांताकडे ठेवल्यानें मध्यवर्ती सत्तेचा जोर प्रांतावर चालणार नाहीं; आणि मुसलमानी प्रांत मध्यवर्ती सत्तेपासून फुटून निघून शेजारच्या मुसलमानी राज्यांत सामील होतील असा संभव आहे.

यापुढचा प्रश्न मध्यवर्ती सरकारचा. येथें दोन सभागृहें येणार. पैकीं खालच्या गृहांत ३०० सभासद असावयाचे आहेत. यांपैकीं १०० म्हणजे $\frac{1}{3}$ प्रतिनिधी पांचशें साडेपांचशें [illegible] अरेराव (Autocrat) हे आपल्याकरितां मागत आहेत. यांच्यातर्फेचे हे १०० प्रतिनिधी म्हणजे त्यांनीं नेमलेले मुनीम, निवळ त्यांच्या हातचीं बाहुलीं असणार. मुसलमान हे संख्येनें हिंदुस्थानांत $\frac{1}{4}$ हून कमी आहेत. पण ते मुसलमानांकरितां $\frac{1}{3}$ म्हणजे १०० प्रतिनिधी मागत आहेत. डॉ. अबेडकरांच्या अस्पृश्यांना २५—३० प्रतिनिधी जातील व ख्रिश्चन अँग्लो—इंडियन वगैरे ज्या इतर अगदीं क्षुल्लक लोकसंख्येच्या जमाती आहेत त्यांना सुमारें २५ प्रतिनिधी जातील. बाकी उरलेल्या सुमार ४५ जागा बहुसंख्य असे १६—१७ कोटी जे हिंदु त्यांच्या वांट्यास येतील. यावरून या बहुसंख्य समाजास कसलें स्वराज्य मिळणार आहे हें आपणच पाहा.

वरच्या सभेंत २०० प्रतिनिधी राहणार आहेत. यांतील ८० प्रतिनिधी म्हणजे $\frac{1}{3}$ हूनहि अधिक हे संस्थानिक—अरेराव मागत आहेत. शिवाय मुसलमानांना व इतर अल्पसंख्याकांना खालच्या सभेप्रमाणें येथेंहि प्रतिनिधी हवेतच. त्यावरून १६-१७ कोटी हिंदूंना किती जागा वरिष्ठ सभेंत उरतील तें पहा. जगांतल्या कोणत्याहि राज्य घटनेंत आढळून न येणारी गोष्ट म्हणजे वरच्या सभेस आर्थिक सत्ता येथें मिळावयाची आहे. आर्थिक बिलाला दोनहि सभांची संमति पाहिजे. तशी न मिळेल तर दोनहि सभांची एकत्र बैठक करून त्यांत आर्थिक बिल मंजूर झालें पाहिजे असे ठरत आहे. इंग्रजांनीं ज्यांना हवे तेवढे प्रतिनिधी देऊन खूष केलें ते अल्पसंख्याकांचे प्रतिनिधी व इंग्रज सरकारचे मिंधे असलेल्या संस्थानिकांचे मुनीम कधीं तरी सरकारचे विरुद्ध मत देतील काय ! म्हणजे लोकपक्षाची बाजू यापुढें नेहमीच पडती राहणार.

शिवाय या दोन कायदेमंडळांना मिळून तरी सत्ता कितीशी आहे ? ब्रिटिश पार्लमेंटांत मॅकडोनाल्डच्या विरुद्ध बहुमतानें निंदाव्यंजक ठराव पास झाला तर मॅकडोनाल्डचें प्रधानमंडळ कोसळतें. पण आमच्या येथें काय व्हावयाचें आहे ! पहा. दोनहि सभांच्या संयुक्त बैठकींत $\frac{2}{3}$ मताधिक्यानें प्रधानमंडळाविरुद्ध निंदाव्यंजक ठराव झाल्याखेरीज प्रधानमंडळ जागचें हलणार नाहीं. आणि एकदर दोनहि सभांच्या ५०० सभासदांपैकीं $\frac{1}{3}$ हून अधिक सभासद अल्पसंख्याक व संस्थानिक यांचेच आहेत. म्हणजे १६-१७ कोटी हिंदूंच्या वतीनें राज्यकारभार कसा काय चालेल तें पहा. शिवाय प्रधानमंडळ लायकीनें नव्हे तर जातवारीनें बनावयाचें असून त्यांतहि संस्थानिक आपली हिस्सेरशी मागत आहेत.

संस्थानिकांच्या हातीं ब्रिटिश इंडियाची एवढी सत्ता येत असूनहि ते आम्ही फेडरेशनमध्ये येतों हें ब्रिटिश इंडियावर उपकार करतो असें म्हणत आहेत! आणि ब्रिटिश सरकारने या पूर्वी आपले बरेच मुलख घेतले असल्यानें आपणांस फेडरल घटनेचा खर्च मुळींच पडूं नये अशी संस्थानिकांची इच्छा आहे. हल्लींच्या गव्हर्मेंट ऑफ इंडिया ॲक्टाच्या ३३व्या कलमांत ब्रि. इंडिया व संस्थाने यांची अधिसत्ता गव्हर्नर-जनरल-इन-कौन्सिल यांचे हातीं आहे. पण यापुढे आपला संबंध फक्त व्हाइसरॉयाशीच रहावा असें संस्थानिकांचें मागणें आहे. संस्थानिकांच्या एकेक वाढत्या मागण्या पाहून त्या पुरविणें कठीण आहे असें सर जॉन सायमनसारखे जबाबदार मुत्सद्दीहि म्हणूं लागले आहेत.

संस्थानिकांचा एवढा हट्ट आहे तर त्यांना वगळून ब्रिटिश इंडियापुरतेंच स्वराज्य कां देत नाहीं, असे आम्हीं पुष्कळांना म्हटलें. कॅनडांतील फेडरेशन करतांना सर्व घटक प्रथम एकदम येऊन मिळाले नाहींत. पण नवीन घटकांना नंतर सामील होण्यास घटनेंत सोय केली होती, तसेंच येथें करा. पुढें संस्थानिक हवे तेव्हां येवोत. पण

आमच्या कांहीं मुत्सद्यांना त्या फेडरेशनचें एवढें वेड लागलें आहे कीं संस्थानिकांना हवें तें घेऊं द्या, पण एकदां अखिल हिंदुस्थानाचें फेडरेशन होऊं द्या अशी त्यांना घाई झाली आहे. १८६१ पासून चारदां हिंदुस्थानाला सुधारणा मिळाल्या. पण त्या वेळीं या संस्थानिकांचें कोणीं नांवसुद्धां काढलें नाहीं. आतां इंग्रजांना हातची सर्व सत्ता सोडण्याची वेळ आली तेव्हां त्यांनीं हा संस्थानिकांचा व मुसलमानांचा घोळ घातला आहे. आमचे प्रश्न आम्ही मिटवितों, तुम्ही काय देतां तें एकदां स्पष्ट सांगा असा म. गांधींनीं व सप्रूंनीं गोलमेजमध्यें ब्रिटिशांना सवाल केला. पण ब्रिटिश सरकारनें त्यास दाद दिली नाहीं. गोलमेज-मध्यें हिंदुस्थानाचे लोक आहेत ते देशाचे प्रतिनिधी मुळींच नाहींत, ही गोष्ट म. गांधींनीं तेथेंच स्पष्ट केली होती. परिषदेचा जो रिपोर्ट 'सँकी रिपोर्ट' म्हणून प्रसिद्ध झाला आहे, त्यांत सरकारला जें मत अनुकूल तें एखाद्यानें सांगितलें असलें तरी त्यास महत्त्व दिलें आहे व सरकारच्या प्रतिकूल असलेल्या मतास सर्व हिंदी सभासदांचा पाठिंबा असला तरी त्याला महत्त्व दिलेलें नाहीं. फेडरल सुप्रीम कोर्टास घटनेच्या प्रश्नाप्रमाणे दिवाणी फौजदारी कामेंहि घेण्याचा असावा व प्रिव्ही कौन्सिल कडील अपीलाची सिव्हि-ल प्रोसीजरमधील कलमें काढून टाकावीं असें शफीपासून सप्रूपर्यंत सर्वांनीं सांगितलें. पण त्याचा सँकी रिपोर्टांत फक्त ओझरता उल्लेख आहे.

हिंदुस्थानाची पत जगांत राहावी म्हणून हे आर्थिक बंधनें घालणार. कोर्टांत नादार ठरेपर्यंत नादार मनुष्य आपण दार आहों असें म्हणत असतो असें असतां या आर्थिक बंधनास मान्यता देऊन तुम्ही जगापुढें नादारीची कबुली देणार काय ? आमचे संस्थानिक बादशहाबद्दलच्या राजनिष्ठेची शेखी मिर-वतात. पण यांची राजनिष्ठा जर खरी असेल तर ( दक्षिणेतील कांहीं संस्थानाखेरीज करून ) उत्तरे-कडील बऱ्या नरेशांनीं बादशहाप्रमाणें जबाबदारीच्या स्वराज्याच्या आश्वासनाचा जाहिरनामा कां काढला नाहीं ? इतकेंच नव्हे तर हे नरेश नागरिकांचे नैस-र्गिक हक्कहि अमान्य करीत आहेत.

हे फेडरेशन जे येणार आहे त्याला जगांतील कोणत्याहि राज्यघटनेंत तोड सांपडणार नाहीं. हें फेडरेशन येथें आल्यावर संस्थानिक व अल्प-संख्य यांच्या हातीं येथली राज्यसत्ता जाणार आहे. ही सुधारणा नव्हे इतकेंच काय, पण ही पीछेहाट आहे. आपल्या हातीं कांहींच नाहीं खरें, पण निदान वाटाघाट करा व स्पष्टपणें आम्हांस हें नापसंत आहे एवढें तरी जाहीर करा." याप्रमाणें व्याख्यात्यांचें भाषण झाल्यावर अध्यक्षांनीं समयोचित **समारोप करून** सभा संपविली.

## आमची प्राचीन राजनीति

(५) **श्री. पु. ग. नानलशास्त्री** यांचें 'आमची प्राचीन राजनीति' या विषयावर प्रो. **द. वा. पोतदार** यांच्या अध्यक्षतेखालीं पांचवें व्याख्यान झालें. व्याख्याते आपल्या भाषणांत म्हणाले, 'आमची प्राचीन राजनीति' हा विषय जरी प्रसिद्ध करण्यांत आला असला तरी आज मी 'कौटिलीय अर्थशास्त्र' या ग्रंथासंबंधीं ठोकळ माहिती सांगणार आहे. आर्य चाणक्य यानें भारतवासीय लोकांचें बलसंवर्धन, नीतिसंवर्धन, अर्थसंवर्धन कसें होईल, तसेंच राजा कसा असावा, त्याचीं कर्तव्यें काय, प्रजेचीं कर्तव्यें कोणतीं इत्यादि पुष्कळ विषयांची साग्र माहिती या अर्थशास्त्र ग्रंथांत अत्यंत मार्मिकपणानें दिली आहे. तेजस्वी व बुद्धिवान आर्य चाणक्याला तत्कालीन लोकांनीं कुटिल हें नांव दिलें. कौटिल्य म्हणजे, कुटिलनीति ज्याच्या अंगांत भरलेली आहे असा मनुष्य, असा निंदाव्यंजक अर्थ आपण करतों. पण तो बरोबर नाहीं. जशीं इतर गोत्रें आहेत, तसेंच कुटिल हें एक गोत्र त्या वेळीं होतें; व या गोत्रांत किंवा कुळांत जन्मलेला तो कौटिल्य, असा अर्थ या ठिकाणीं अभिप्रेत आहे.

आधुनिक काळांत अर्थशास्त्र म्हणजे चलना-संबंधींचें शास्त्र असा संकुचित अर्थ केला जातो. पण कौटिल्याच्या अर्थशास्त्रांत फक्त चलनपद्धतीचाच ऊहापोह केला नसून पूर्वी चतुर्विध पुरुषार्थ असें ज्याला म्हणत असत त्या धर्म, अर्थ, काम, मोक्ष या चारीहि प्रश्नांचा ऊहापोह केला आहे. आर्य चाणक्यानें हा ग्रंथ लिहिला तो संस्कृत भाषेंत असून सूत्ररूपानें लिहिलेला असल्यामुळें तो सर्वां-नाच समजण्यासारखा नव्हता. पण श्री. ज. स. करंदीकर व हिवरगांवकर यांनीं परिश्रम घेऊन त्याचें मराठींत सुबोध भाषांतर केल्यामुळें ही अड-चण दूर झाली आहे. कौटिल्यानें आपलें अर्थशास्त्र लिहितांना त्याच्या पूर्वी होऊन गेलेले चाळीस अर्थशास्त्रज्ञ गणले आहेत. त्यानें या निरनिराळ्या अर्थशास्त्रज्ञांचीं मतें तर आपल्या ग्रंथांत उध्दृत केलींच आहेत. पण जीं मतें ग्रंथकर्त्याला पटलीं नाहींत अशा ठिकाणीं त्यानें त्यावर टीकाहि केली आहे.

कौटिल्याचा काल इ. स. पूर्वी ३०० वर्षांचा आहे असें मानतात. हा सम्राट चंद्रगुप्ताचा समकालीन. त्याची चंद्रगुप्त राजाला बलाढ्य अशा नंदनृपतीचें राज्य मिळवून देण्याची तीव्र महत्वाकांक्षा व तळमळ होती. कौटिल्य इतका निर्लोभी व स्वार्थत्यागी होता कीं, प्रतिज्ञेप्रमाणें चंद्रगुप्ताला राज्य मिळवून दिलें तरी त्याची राहाणी शेवटपर्यंत झोपडींतच होती. त्यानें लिहिलेल्या या अर्थशास्त्र ग्रंथांत १५ अधिकरणें

असून त्याचे १५० अध्याय आहेत. कौटिल्याच्या मतें अन्वीक्षिकी विद्येला अर्थशास्त्रांत फार प्राधान्य आहे. कौटिल्य म्हणतो कीं, राजानें आपलें वर्तन धर्म, अर्थ, काम व मोक्ष हे चतुर्विध पुरुषार्थ साधण्यासारखें ठेवावें. राजानें संन्यासी होऊं नये असेंहि त्यानें सांगितलें आहे. राजा जरी बुद्धिवान व कुशल असला तरी कांहीं कांहीं प्रसंग त्याच्यावर असे अवघड येतात कीं त्यावेळीं त्यानें दुसऱ्याची सल्ला घेतली पाहिजे आणि म्हणून राजानें एक मन्त्रिमंडळ नेमावें. त्यांत चार अमात्य व एक गुरुजी किंवा पुरोहित नेमावा. अमात्य किंवा पुरोहित नेमावयाचा तो वंशपरंपरेचा नसावा. जर तो त्या कामाला योग्य असेल तरच नेमण्यांत यावा. हल्लीं गुप्तहेर खात्याला जितकें महत्त्व आहे. तितकेंच तें चंद्रगुप्ताच्या काळींहि होतें. गुप्तहेरांत दोन प्रकार सांगितले आहेत. एक फक्त राजधानींतील लोकांच्यावर लक्ष ठेवणारा व दुसरा परराज्यांत जाऊन बित्तंबातमी काढून आणणारा. जे पूर्णस्वामिभक्त व विश्वासू असतील अशांनाच या खात्यांत घेतलें जाई.

### राजाची दिनचर्या

कौटिल्यानें राजाची दिनचर्या कशी असावी याबद्दल एक प्रकरण लिहिलें आहे. त्यांत राजानें दिवसाच्या २४ तासांपैकीं फक्त तीन तासच झोप घ्यावी व बाकीचा सर्व वेळ राज्यकारभाराच्या कामांत घालवावा असें सांगितलें आहे. तसेंच त्यानें नगररचना कशी करावी, दुर्ग कसे बांधावेत, ते किती उंचीवर बांधावेत हेंहि सांगितलें आहे. तो म्हणतो, किल्ला चोरवाटांनीं व सर्व शस्त्रास्त्रांनीं संपूर्ण असा बांधावा; तसेंच त्यांत सर्व सैनिकाला ६ महिने पुरेल असा शिधा कायमचा तयार ठेवावा. राजाच्या उत्पन्नाच्या बाबीहि विविध प्रकारच्या सांगितल्या आहेत. काळीचा वसूल, खाणींचें उत्पन्न, जंगल, सराफकट्टा, जकात, शेतकी, अबकारी, नौखात, कत्तलखाना वगैरे अनेक लहानमोठीं खातीं होतीं. प्रत्येक खात्यावर एकएक अमलदार नेमलेला असून त्यानें दररोज वजन, माप, जकाती वगैरेसंबंधींची तपासणी करावी व ती राजाला कळवावी असा नियम होता. खाणी या प्रजाजनापैकीं कोणाच्या मालकीच्या नसून त्या राजाच्या ताब्यांत असत. तसेंच त्या वेळीं निर्गत मालावर जकात कमी असून आयात मालावर मात्र बरीच जकात ठेवलेली असे.

### जमाबंदी खातें

कौटिल्यानें आपल्या अर्थशास्त्रांत शेवटीं जमाबंदी खात्याविषयींचे नियम सांगितले आहेत. या खात्यावरील मुख्याला समाहर्ता म्हणत. चंद्रगुप्ताच्या काळीं पांचपांच गांवांचा एक एक गट केलेला असे. राजा फक्त पैशाच्या रूपानेच कर वसूल करीत नसे तर ज्या गांवांत जो पदार्थ चांगला निर्माण होई तोच कराच्या रूपानें वसूल करी. धान्य, मौल्यवान जिनसा, घोडे, हत्ती वगैरेंच्या रूपानें तो कर घेई; पण ज्या गांवांत धष्ट-पुष्ट माणसें निर्माण होत त्या गांवांतून आपल्या सैन्याची भरती करण्याकरितां तो कर म्हणून माणसें देखील नेत असे! त्या काळी पगाराचें प्रमाणहि मोठें होतें. समाहर्त्याला ४ हजार 'पण' (त्या काळांतील चलनी नाणें) पगार मिळे. अमात्य पुरोहिताला ५ पासून ७ हजारांपर्यंत पण पगार मिळे. समाहर्त्यानें वर्षांतील ८ महिने फिरतीवर राहून सर्व गांवांची हिशेब तपासणी व इतर व्यवस्थेचें अवलोकन केलें पाहिजे असा नियम असे. तसेंच राजानें लढाई कशी करावी, तह कसे करावेत, इतकेंच नव्हे तर यदाकदाचित् राजाला पिछेहाट करण्याचा प्रसंग आला तर ती त्यानें कशी करावी याचेहि नियम आर्य चाणक्यानें आपल्या अर्थशास्त्रांत सांगितले आहेत. तरी अशा तऱ्हेच्या बहुमूल्य ग्रंथाचा अभ्यास आपण प्रत्येकानें केला पाहिजे." वरील आशयाचें वक्त्यांचे भाषण झाल्यावर अध्यक्षांनीं समारोप करतांना सांगितलें कीं, "हा अर्थशास्त्राचा ग्रंथ जुना तर खराच, पण हा कित्येक वर्षे जो पडून राहिला होता तो आज लोकांचे हातांत पडला आहे ही सुदैवाचीच गोष्ट होय. शिवाजीच्या काळींहि या ग्रंथांतील नियमांचा उपयोग राजे लोक करीत असत. प्लेटोच्या रिपब्लिकप्रमाणें केवळ तात्त्विक विचार या ग्रंथांत सांगितले नसून रूढ असलेली समाजरचना यांत दिली आहे. राजनीतिशास्त्रावरील शुक्रनीति हा ग्रंथ ४०० वर्षांपूर्वीचा आहे. चिटणिसांचा राजनीतिशास्त्रावर एक धार्मिक ग्रंथ आहे."

# गांधर्व महाविद्यालय, पुणें

### उद्‌घाटनसमारंभ

ता. ८ रोजीं सायंकाळीं ६ वाजतां श्री. न. चिं. केळकर यांच्या अध्यक्षतेखालीं संगीतचूडामणि श्री. विनायकराव पटवर्धन यांनीं कै. विष्णु दिगंबर पलुस्कर यांचे स्मरणार्थ कन्हय्यालाल महालांत स्थापन केलेल्या पुणें गांधर्व महाविद्यालयाचा उद्‌घाटन-समारंभ नूतन मराठी विद्यालयाच्या दिवाणखान्यांत झाला. प्रारंभीं श्री. पटवर्धन व प्रो. गोविंदराव देसाई यांचें ईशस्तवनपर गायन झालें. नंतर वैद्यपंचानन कवडेशास्त्री यांनीं कै. विष्णुबुवांनीं सुशिक्षित समाजांत गायनविद्येच्या प्रसाराकरितां किती मेहनत घेतली हें सांगून आजच्या प्रसंगीं श्री. तात्यासाहेब केळकर यांनीं अध्यक्षस्थान स्वीकारावें अशी सूचना केली व या सूचनेला श्री. डांगे यांनीं आजचे अध्यक्ष गुणग्राही व टीकाकार असल्यानें या समारंभास अगदीं योग्य आहेत असें सांगून अनुमोदन दिलें.

### श्री. पटवर्धनांचें भाषण

अध्यक्ष स्थानापन्न झाल्यावर श्री. पटवर्धन यांचें प्रास्ताविक भाषण झालें. ते म्हणाले, "आजच्या समारंभाला श्री. केळकर यांनीं माझ्या विनंतीस मान देऊन अध्यक्षस्थान स्वीकारलें हें मी माझें भाग्यच समजतों. कांहीं लोक असें म्हणतील कीं, विनायकरावांनीं गांधर्व महाविद्यालय येथेंच कां स्थापन केलें? त्याला उत्तर असें कीं, मी जे आज विद्यालय स्थापन करीत आहें तें नवीन नसून जुनेंच आहे. येथें सन १९१३ सालीं गांधर्व महाविद्यालयाची एक शाखा उघडण्यांत आली होती आणि ती १९१८ पर्यंत सुरूहि होती. पण पुढें अवघड परिस्थिति उत्पन्न झाल्यामुळें येथील शाखा बंद करावी लागली, इतकेंच नव्हे तर मुंबई येथील गांधर्व महाविद्यालयहि बंद करावें लागलें! माझ्या अंगांत ताकद आहे तितकी, गुरुजींची सेवा करण्याकरितां, त्यांच्याजवळ जें मीं कांहीं वर्षे अध्ययन केलें त्याचा, त्यांच्या आज्ञेनें व त्यांच्या शिक्षणाप्रमाणें, सुशिक्षित स्त्री–पुरुष समाजांत प्रसार करण्याकरतां आणि गवई म्हटला कीं तो व्यसनी, समाजांत हलक्या दर्जाचा म्हणून ओळखला जाणार अशी जी गैरसमजूत पसरली आहे ती शक्य तितकी दूर करण्याकरतां येथील पूर्वीची शाखा, मध्यंतरीं जी कांहीं वर्षे बंद पडली होती, ती पुनः सुरू करण्याकरितां आज मीं हें विद्यालय स्थापन केलें आहे.

### विद्यालय पुण्यास कां?

हें विद्यालय पुण्यासच सुरू करण्याचें एक कारण पूर्वीं तें येथें स्थापन झालेलेंच होते. आणि दुसरें कारण असें कीं, कोणत्याहि कलेची संस्था काढावयाची तर ती पुण्यांतच काढावी असें माझें मन आहे. कारण पुण्याचा समाज हा जसा विद्येचा भोक्ता आहे तसाच गुणज्ञ टीकाकारहि आहे. शिवाय पुणें हें गुणिजनांचे आश्रयस्थान आहे. आमच्या मुंबई येथील विद्यालयांत लहानापासून प्रौढापर्यंत सर्व प्रकारचे स्त्री-पुरुष गाणें शिकावयास येत असत. पण तेथील गोष्ट वेगळी व येथील वेगळी. येथील समाज कोणत्याहि संस्थेचा चालक आपली कामगिरी कशी करतो इकडे लक्ष ठेवून त्याच्यावर अनुकूल प्रतिकूल टीका करणारा आहे.

### गुरुजींना दिलेलें वचन

गंधर्व नाटक मंडळींत जरी मी आज बरींच वर्षे काम करीत होतों तरी नेहमीं माझ्या मनाला अशी टोंचणी लागत असे कीं मीं गुरुजींनीं दिलेल्या शिक्षणाचें काय चीज केलें? आणि समाजालाहि माझ्या शिक्षणाचा काय उपयोग झाला? विष्णुबुवा आजारी असतांना म्हणत कीं, माझ्यापाठीमागें माझ्या गायनपद्धतीचा प्रसार करण्यास कोणीच कसा तयार नाहीं! हें ऐकून मीं त्याच क्षणीं त्यांच्या पायाची शपथ घेऊन सांगितलें कीं, मी तुमचें कार्य, तुम्ही घालून दिलेल्या पद्धतीनें पुढें चालवीन. हें ऐकून त्यांच्या मनाला जसें बरें वाटलें तशीच माझ्या मनाची बोचणीहि कमी झाली. मी त्यांच्याइतका कर्तृत्ववान नाहीं. त्यांच्याइतकी माझ्या अंगांत धडाडीहि नाहीं. तरी पण त्यांचा मार्ग अनुसरून मी त्यांचें कार्य पुढें चालविण्याचा शक्य तितका प्रयत्न करीन. या कामीं तुमचें मला साहाय्य पाहिजे. हल्लीं संगीत–विद्या मागसत चालली आहे. तिला समाजांत उच्च स्थान प्राप्त करून देणें हा माझा विद्यालय उघडण्याचा उद्देश आहे. येथें सुरू असलेल्या कोणत्याहि गायन-संस्थेला धक्का देण्याचा माझा बिलकुल हेतु नाहीं."

### विष्णुबुवांची कामगिरी

वरील आशयाचें श्री. पटवर्धन यांचें भाषण झाल्यावर त्यांनीं संस्थानिकांकडून, संस्थांकडून व सद्‌गृहस्थांकडून अभीष्टचिंतनपर जे संदेश आले होते ते वाचून दाखविले. तसेंच त्यांनीं विद्यालयाचें माहितीपत्रकहि वाचून दाखविलें. नंतर श्री. मेहेंदळे व श्री. मराठे यांचें पद्यगायन झालें. तदनंतर किर्लोस्कर नाटक मंडळी-

चे पूर्वीचे मॅनेजर श्री. त्रिंकबराव साठे यांनीं आपल्या भाषणांत सांगितलें कीं, 'खरें पाहूं गेले असतां कै. विष्णुबुवांनीं खस्ता खाऊन गायनकलेची सुशिक्षित समाजांत अभिरुचि उत्पन्न करून देऊन त्यांचें कार्य पुढें चालविणाऱ्या गृहस्थांना मार्ग चांगला तयार करून ठेवला आहे. तेव्हां विनायकबुवांना भीति वाटण्याचें कारण नाहीं.'

## पंडितजींनीं दिलेलें नवें वळण

त्यानंतर गीतावाचस्पति सदाशिवशास्त्री भिडे यांनीं संगीतविद्येसंबंधीं चार शब्द सांगितले. ते म्हणाले "पंडितजींनीं संगीतशास्त्रांत क्रांति घडवून आणली असें कांहीं म्हणतात. पण त्यांनीं शास्त्रांत क्रांति केली नसून त्यांनीं गवयांच्या धंद्यांत क्रांति केली. विष्णुबुवांच्या पूर्वी गायन हें वारांगनांना विशेषतः शिकविलें जाई आणि हीच परिस्थिति खुद्द विष्णुबुवा असतांनाहि होती. पण ती त्यांनीं अत्यंत परिश्रम घेऊन बदलली. त्यांनीं गाण्याची दिशा बदलली. त्यांच्यापूर्वी शृंगारिक चिजांना प्राधान्य असे. विष्णुबुवावरहि कांहीं लोक असा आरोप करीत कीं, ते आधुनिक पदें म्हणतात. असा आरोप करण्याचें कारण इतकेंच कीं, त्यांनीं पदांची दिशा बदलली होती. मुलुखमैदान चिजा सोडून त्यांनीं भजनें गावयास सुरुवात केली. ते ख्यालहि गात असत. पण फक्त खानदानी गाणें कसें असतें याची कल्पना समाजाला व्हावी म्हणून. हिंदुस्थानी शृंगारिक चिजांना त्यांनीं फांटा दिला आणि आपल्या अभ्यासक्रमांत भजनी चिजा घातल्या व त्याच ते विद्यार्थ्यांना शिकवूं लागले. ज्या गायनविद्येचा जन्म भक्तिमार्गात झालेला आहे, ती विद्या राजदरबारांत शृंगाराचें आवरण घेऊन शिरली. पुढें ती अन्तःपुरांतहि शिरली. त्यामुळें गाण्याचा मुख्य हेतु जो भक्तिरस तो लयाला जाऊन शृंगाररसाला प्राधान्य मिळालें. ती देवळांत अगदींच शिरेनाशी झाली. पण याच विद्येला पंडितजींनीं अत्यंत खस्ता खाऊन, दीर्घ परिश्रम करून भक्तिमार्गांत आणिली. इतकेंच नव्हे तर चोवीस तास तिला देवळांत पाहारे करावयाला लावलें. संगीत हें सर्वांनाच प्रिय असतें. पूर्वीच्या स्त्रियाहि जुन्या पद्धतीनें गाणीं म्हणत असत. त्यालाच शास्त्रोक्त शिक्षणाची जोड दिली कीं, अनुकूल परिणाम तावडतोब दिसूं लागतील. विष्णुबुवांनीं दोन गोष्टींनीं गायनामध्यें क्रांति घडवून आणली. पहिली म्हणजे त्यांनीं अभ्यासक्रम आंखला, नोटेशनची पद्धत सुरू केली, आणि संगीतामध्यें भक्तिरसाला प्राधान्य मिळवून दिलें. पंडितजींच्या पूर्वी ठराविक पद्धतीचा अभ्यासक्रम नसे व यामुळें शिकवणाऱ्याला व शिकणाऱ्याला ठराविक पद्धतीनें शिकतां येत नसे. ही अडचण पंडितजींनीं कायमची दूर करून टाकली पाहिजे.

## गायनशास्त्र वाढवा

त्याचप्रमाणें गवयांच्या प्रत्येक घराण्यांत एकेक वैशिष्ट्य म्हणून असतें. बाळकृष्णबुवांच्या घराण्यांत आलापजोड हा संगीतांतील अत्यंत अवघड भाग विशेष असे. तो विष्णुबुवांच्या गाण्यांतहि होता. तसाच तो विनायकबुवांच्या गाण्यांतहि दिसून येतो. हा भाग विशेष अवघड असल्यामुळें बुडत चालला आहे, तरी विनायकबुवांनीं परिश्रम घेऊन आपल्या घराण्याचें वैशिष्ट्य कायम ठेवण्याचा प्रयत्न केला पाहिजे. हल्लीं समाजांत भरधाव ताना घेणें ही आवड उत्पन्न झाली आहे. तेव्हां असल्याहि ताना सांगाव्यात. पण तवढ्यावरच थांबूं नये. हल्लीं खानदानी चिजा बुडत चालल्या आहेत तरी त्यांची नीट जोपासना करून त्या टिकविण्याचा प्रयत्न केला पाहिजे. हल्लीं नुसती कलाच झपाट्यानें वाढत आहे, शास्त्र मात्र वाढत नाहीं. स्त्रियांमध्यें संगीताची आवड जास्त जास्त उत्पन्न होत आहे ही चांगली गोष्ट आहे. त्यांनीहि या विद्यालयाचा फायदा करून घ्यावा."

## श्री. केळकर यांचें भाषण

वरील आशयाचें शास्त्रीबुवांचें भाषण झाल्यावर अध्यक्षांचें समारोपादाखल पुढीलप्रमाणें भाषण झालें. ते म्हणाले, "आजचा समारंभ संगीतासंबंधाचा म्हणून त्याचें अध्यक्षत्व श्रुतिप्रमाण व्हावें, शब्दप्रमाण होण्याचें कारण नाहीं. कोणतेंहि कार्य होण्याला कांहीं ठराविक जोड्या लागतात. धूर्त व मूर्ख यांची जोडी अनादि कालापासून प्रसिद्ध आहे. तशीच तज्ज्ञ व अज्ञ यांची जोडी समजावी. सगळेच तज्ज्ञ किंवा सगळेच अज्ञ जर मिळाले तर कांहींच कार्य होणार नाहीं. आजच्या समारंभांत कांहीं संगीताचे तज्ज्ञ आहेत तसेंच अज्ञ आहेत. माझें वर्णन उत्तम क्रिटिक किंवा टीकाकार असें केलें गेलें. टीकाकारांची परंपरा पाहिली तर दुष्टपणा व अज्ञान हे दोन स्वभाव पूर्वापार प्रसिद्ध आहेत. हल्लींच्या प्रसंगीं मी दुष्ट बुद्धीनें वागत नाहीं पण अज्ञ या बुद्धीनेंच वागत आहें. तथापि समारंभास अध्यक्ष होण्याचें माझें कारण असें कीं, विनायकराव पटवर्धन व त्यांचे गुरु विष्णुबुवा हे दोघे मिरजेचे आहेत त्याचप्रमाणें मीहि मिरजेचाच आहे. अशा रीतीनें गांवकीच्या स्नेहांतील हा प्रकार आहे. विशेषतः विष्णुबुवा हे माझे वर्गबंधु असल्यानें त्यांच्या स्मरणार्थ निघालेल्या गायन समाजाला उत्तेजन देणें हें मी मित्रकार्यच समजतों. येथील गोपाळ गायनसमाज विनायकबुवाप्रमाणें विष्णुबुवांच्या एका शिष्यानेंच म्हणजे

श्री. गोविंदराव देसाई यांनीं चालविला आहे. या दोन समाजांचीं नांवें वेगळीं असलीं तरी कार्य एकच आहे. याच बुद्धीनें त्यांनीं आजच्या समारंभांत सहकार्य केले आहे. तसेंच कै. भास्करबुवा यांचा स्मारकभूत भारत गायन समाज हाहि स्वतःची इमारत घेऊन स्थानाधिष्ठित झाला आहे. माझें नांव हल्लींच्या सल्लागार–मंडळांत घातलें आहे; तथापि गायनशास्त्राच्या दृष्टीनें, शिक्षणाच्या दृष्टीनें तें काम सल्लागार–मंडळाच्या वतीनें रा. जोशी व प्रो. आचरेकर हेच चांगलें करूं शकतील.

### तानबाजी नको

माझी एक सूचना मी मंडळांत करीन किंवा येथें बाहेरहि करतों कीं, पुढील पिढींत गायनविद्येच्या शिक्षणांत दोन मुख्य गोष्टी व्हाव्या. एक तानबाजी कमी होऊन आलापांची पद्धति अधिक वाढावी व दुसरी गोष्ट गायनाचें मराठीकरण व्हावें. तानेमध्यें गवयांच्या गळ्याची कसरत दिसते परंतु रागाचें शुद्ध स्वरूप रंगविलें जात नाहीं. व्याकरणशुद्ध भाषा सावकाश ऐकल्यानें जें स्वारस्य प्रगट होतें, त्याहिपेक्षां रागाचे विशिष्ट स्वर व त्यांतूनहि कोमल, अर्ध–कोमल वगैरे, हे स्वर बरोबर लावून राग आळविला तर त्याचें स्वारस्य व रंग अधिक भरेल. हल्लीं गाणारा एक पाय चिजेच्या तोंडांत तर दुसरा तानेच्या डोक्यावर देऊन गातो. ही पद्धति बदलली पाहिजे. या बाबतींत 'तानबाजीचें गाणें लोकप्रिय आहे' म्हणून गवई तसें गातात या म्हणण्यांत श्रोतृवर्गाची बदनामी होते असें मला वाटतें. कारण श्रोतृवर्गाला झालें तरी आलापयुक्त, जमल्यास जोडाचें, निदान रागाचें शुद्ध स्वरूप प्रकट करणारें, गाणें आवडत नाहीं असें म्हणणें म्हणजे त्यांना सदभिरुचि नाहीं असेंच म्हणण्यासारखें आहे. पण अगदीं कनिष्ठ वर्गाच्या अभिरुचीला वश होऊन हल्लीं जशी नाट्यकला बिघडूं लागली तशीच गायनकलाहि बिघडूं लागली आहे. म्हणून पुढील पिढींतील महत्त्वाकांक्षी गवयांनीं माफक तानबाजी करून, रागांचें शुद्धस्वरूप व चिजांचा अस्सल ढंग हाच लोकांपुढें ठेवींत जावा म्हणजे लोकांना हळूहळू श्रेष्ठ प्रतीची अभिरुचि आपोआप येईल. श्रोत्यानें गायकाला वश करण्यापेक्षां गायकानें श्रोत्याला आपल्या ताब्यांत ठेवणें हें अधिक बरें.

### मराठी चिजा गाव्या

माझी दुसरी सूचना गाण्याच्या मराठीकरणाबद्दल आहे. येथेंहि परंपरागत रूढींत गवई लोक पाय अडकून पडले आहेत. शिक्षणाचें माध्यम मराठी करीत नाहींत त्याबद्दल जर आम्ही सरकार किंवा युनिव्हर्सिटी यांना दोष देतों तर, भावनेला सर्वांत अधिक पोषक असें जें गायन त्याचें शिक्षण देशी भाषांतून न झालें तर त्याचा दोष गुलामगिरींत सापडलेल्या आमच्या मनाआच द्यावयास नको काय ? राजकारणाप्रमाणेंच येथेंहि 'स्लेव्ह मेंटॅलिटी' दिसून येतें. मराठींत शास्त्रीय संगीत चिजा होऊं शकत नाहींत अशी एक भ्रामक समजूत आहे ती खोडून काढण्याला मी केव्हांहि तयार आहें. त्या दृष्टीनें मुद्दाम मीं स्वतः कांहीं पद्यें तयार केलीं. तीं ग्वाल्हेरच्या एका गवयानें ख्यालाप्रमाणें मैफलींत गाऊनहि दाखविलीं. परंतु अद्यापि जुन्या रूढीची ओढ सुटत नाहीं. नव्या पद्यावर परिश्रम होत नाहींत म्हणूनच मराठीकरण मागसलेलें आहे. परंतु नव्या गायन समाजांनीं यांत लक्ष घातल्यास, माझ्यापेक्षां अधिक चांगले कवी व संगीतज्ञ असे पद्यकार वाटेल तितके नवे मराठी ख्याल, ठुमऱ्या, ध्रुपदें उत्कृष्ट करून देतील."

वरीलप्रमाणें अध्यक्षांचें भाषण झाल्यावर श्री. विनायकराव पटवर्धन यांनीं अध्यक्षाचे व या समारंभाचे कामीं ज्यांनीं मदत केली त्या सर्वांचे आभार मानले व "आज सकाळीं सात वाजून वीस मिनिटांनीं असलेल्या शुभमुहूर्तावर गांधर्व महाविद्यालय सुरू केलें" असें सांगून आजच पस्तीस विद्यार्थी शिक्षणाकरितां दाखल झाले असून पांच वर्ग सुरू केल्याचेंहि त्यांनीं सांगितलें. अध्यक्षांना हार घालण्यांत आल्यावर, विनायकरावांनीं 'वंदे मातरम्'पद म्हटलें व हा गोड समारंभ पार पडला.

# अज्ञानानें फसले पण अनुभवानें शहाणे झाले

सुशिक्षित वर्ग उठल्या-सुटल्या सरकाराशीं भांडणारा, उणें काढणारा, वर्दळीवर येणारा, जेथें जेथें अडविणारा, चारचौघांत टर उडविणारा व हरघडी मी–तूं करणारा म्हणून सरकारानें त्यास सत्तेच्या जोरावर पायाखालीं घालून राज्यकारभारांत निर्माल्यवत् करून सोडलें व त्याचें सरकारी नोकऱ्यांवर मिळणारें अन्न तोडून त्यास मोठ्या चातुर्यानें दीनदुबळें बनविण्याचें ठरविलें यांत सरकार कोठें चुकलें असें कोणी विचारील.पण या कुशंकेला उत्तर देणें फारसें अवघड नाहीं. सुशिक्षित वर्ग सरकारवर सुखासुखी उलटला नाहीं. तो प्रारंभीं सरकारच्या राज्यपद्धतीचा भजक नसला तरी चहाता होता. इंग्रजांचा बंदोबस्त, त्यांच्या कामाचा चोखपणा, त्यांची बुद्धिमत्ता, शहाणपणा व व्यवहारकुशलता यांची सुशिक्षित

लोक सहृदयतेनें व रसिकपणानें प्रशंसाच करीत आले होते. आणि अन्याय, विषमता, पंक्तिप्रपंच, जुलूम, बखेडा इंग्रजांच्या नजरेस आणण्याचा अवकाश कीं, त्याची ताबडतोब दाद लागून तक्रारींचें मूळ खणून निघालेंच पाहिजे अशी सुशिक्षितांची समजूत होती. परंतु अनुभवांतीं ती खोटी ठरली. इंग्रजांना अन्याय खपत नसला तर तो सोम्यानें गोम्यावर केलेला अन्याय खपत नाहीं, पण एका बाजूस इंग्लंड हें जेतें राष्ट्र व दुसऱ्या बाजूला हिंदुस्थान हा जित देश अशा प्रचंड तंट्यांत इंग्लंडच्या हिताकरितां हिंदुस्थानावर अन्याय होत असल्यास तो दूर करण्यासाठीं इंग्रजांचा अंमल नाहीं असा अनुभव मिळाल्यामुळेंच सुशिक्षित वर्गाला सात्त्विक संताप आला व त्यानें इंग्रजी राज्याचे स्तुतिपाठ गाण्याचें सोडून देऊन विरोधाला सुरुवात केली.

इंग्रजांचें बिंग कळल्यामुळें सुशिक्षित वर्ग इंग्रजी राज्यपद्धतीवर उलटला यांत सुशिक्षित वर्गाची मुळींच चूक नाहीं, असली तर आपलीच चूक आहे असें मानून चुकीचें माप आपल्या पदरांत घेण्यास व हिंदुस्थानाच्या राज्यकारभाराचें धोरण बदलून केवळ हिंदुस्थानाच्या हिताकरिता हिंदुस्थानचा कारभार पुढें चालू ठेवण्यास इंग्रज लोक कांहीं सत्पुरुष किंवा देवदूत लागून गेले नाहींत. त्यांना हिंदुस्थानरूपी गाईस पान्हवून तिच्यापासून जितकें दूध निघेल तितकें पिळून घ्यावयाचें असल्यानें धारेच्या वेळीं कासेंत तोंड खुपसून गाईचें स्तन-पान करूं पहाणाऱ्या सुशिक्षित वर्गाला गोठ्यांतील दूर खुंट्याला बांधून ठेवण्याचा कावा मांटेग्यू-चेम्सफर्ड सुधारणा कायद्यानें बऱ्याच अंशीं सिद्धीस नेला.

अशा रीतीनें सुशिक्षितांना थानतुटें करून सरकारनें गेल्या दहाबारा वर्षांत शेतकरी वर्गाला आपल्या ममतेंत घेतल्यासारखें केलें. ज्यास मागासलेला वर्ग म्हणतात तो प्रायः शेतकऱ्यांचाच वर्ग आहे. हिंदुस्थानांत शेंकडा ८० लोक शेतकरी असल्याचें जगप्रसिद्ध आहे. त्यावरून हिंदुस्थान हा सामान्यतः शेतकऱ्यांचाच देश समजला जातो, व सरकारलाहि तशी जगाची समजूत घालण्यांत मोठा संतोष वाटतो. कारण हिंदुस्थानास शेतकरी ठरविल्यानें हिंदुस्थानांत उद्योगधंदे वाढविण्याची आपणावरील जबाबदारी सहजच टळते याचा आनंद इंग्रजांना गुप्तपणानें मनांतून चाखावयास सांपडतो. इंग्लंड हा उद्योगधंद्यांचा देश आहे. त्याला ब्रिटिश साम्राज्यांत हिंदुस्थान हा उद्योगधंद्याचा प्रतिस्पर्धी देश उत्पन्न झाल्यास कंसास जसा श्रीकृष्णाचा जन्म तसा इंग्लंडास औद्योगिक हिंदुस्थानाचा जन्म आपल्या मुळावर आल्याप्रमाणें वाटावा यांत आश्चर्य कसलें ! त्याऐवजीं त्याच्या डोक्याला शेतकऱ्याच्या घोंगडीची खोळ घालून व हातांत विळा देऊन उभा केल्यानें आणि कसाबसा कुडींत प्राण ठेवून जगूं दिल्यानें इंग्लंडच्या कारखान्यांना सततचें गिऱ्हाईक कायम राहूनच्या राहून त्यानें पिकविलेल्या कच्च्या मालावर त्याच कारखान्यांचीहि निवांतता होण्यास हरकत नाहीं.

सुशिक्षित वर्गास सोडून सरकारानें शेतकऱ्यांस मायेंत घेतलें म्हणजे काय केलें ? त्यांनीं एवढेंच केलें कीं जें पद सुशिक्षित वर्गास लायखीमुळें मिळत होतें तें शेतकरी वर्गास लायकीनालायकीची दिक्कत न बाळगतां देऊन टाकलें. श्रीकृष्णास द्वारकेस भेटून परत आल्यावर सुदामदेवाला आपली नगरी सोन्याची झालेली दिसली त्यांतलीच अवस्था कांहीं अंशीं मागासलेल्या वर्गाची सन १९१९ नंतर घडून आली. ज्यांना लोकल बोर्डाच्या इमारतींत फार तर एका टेबलावरचा कागद दुसऱ्या टेबलावर नेऊन ठेवण्याचा अधिकार मिळाला असता, असे कित्येकजण लोकल बोर्डाच्या अध्यक्ष-स्थानीं निःशंकपणें जाऊन बसले. ज्यांना नुसतीं मराठी भाषणें समजण्याची मारामार पडे त्याच्या अंगीं कौन्सिलांत आमदारांच्या आसनावर अधिष्ठित होऊन इंग्रजी भाषणें ऐकण्याचें धारिष्ट आलें. म्युनिसिपालिटी हें शहाणपणाचेंऐवजीं मूर्ख-पणाचें प्रदर्शन मांडण्याचें मंदिर बनून 'म्युनिसि-पालिटी' नाटकांत रात्रीं रंगभूमीवर मोठ्या प्रयत्नानें वठविण्यांत येणारे प्रवेश दिवसा म्युनिसिपालिटी-च्या दिवाणखान्यांत अनायासानें व सफाईनें घडतांना दृष्टीस पडूं लागले. पण त्यामुळें झालें काय कीं, मागसलेल्या वर्गांना मोठेपणा मिळाला व गोऱ्या सरकारी अधिकाऱ्यांना त्यांत सहज साधणाऱ्या विनोदानें स्वतःची करमणूक करून घेतां आली !

मागासलेल्या वर्गास मिळालेल्या मानमरातबाचें हें वर्णन झालें. आतां त्यांच्यासाठीं राखून ठेवलेल्या नोकऱ्याचाकऱ्यांचें वर्णन. सर्वसत्ताधीश अशा सरकारानें कोणतेंहि कृत्य करण्यासाठीं हात उचलला असतां तो धरण्याचें सामर्थ्य कोणास आहे ? त्याचप्रमाणें त्यांनीं विचित्र तत्त्वें प्रतिपादण्याकरितां तोंड उघडलें तर त्यावर हात ठेवण्याचें सामर्थ्य तरी कोणांत आहे ? त्यांना या वेळीं नोकरींतील लायखीचा कंटाळा आला व मागसलेपणांतच लायखीहूनहि कांहीं विशेष गुण दिसूं लागला. म्हणून शाळा-कॉलेजांतून विशेष बुद्धिमान विद्यार्थ्यांसाठीं जशा शिष्यवृत्त्या राखून ठेवण्यांत येतात तशा मागासलेल्या वर्गाच्या हक्काच्या अशा लहानमोठ्या जागा बाजूला काढून त्यांवर पुढारलेल्या वर्गांतील याचकांची सावलीहि पडूं नये यासाठीं रखवाली

ठेवण्यांत आली. या एकंदर मसलतींत सरकारचा मतलब असा कीं देशांत ८० टक्के मागसलेल्या जातींच्या लोकांचीच वस्ती असल्यानें एवढा मोठा समाज आपला ऋणी व मिंधा राहिल्यास आपल्या राज्यकारभाराला बळकटी येईल आणि देशांतील बहुजन समाजांत शांतता व संतोष नांदूं लागेल.

सरकारच्या अटकळीप्रमाणें प्रारंभीं प्रारंभीं कांहीं तसे शकुन झाले खरे. त्याच सरकारी धोरणामुळें ब्राह्मणेतर या स्वतंत्र पक्षाची दक्षिण हिंदुस्थानांत स्थापना झाली. सुशिक्षित वर्गाचे एक वेळ अनुयायी म्हणविणारे अनेक लोक या पक्षाला मिळाले व असहकारितेच्या चळवळींत सरकारला वश होऊन व कॉंग्रेसला विरोध करून त्यांनीं सरकारची बाजू बरीच सावरून धरली. कित्येक ठिकाणीं ब्राह्मण-ब्राह्मणेतरांचे तंटे इतके विकोपाला गेले कीं ते पाहून ब्रिटिश अधिकाऱ्यांना व मुत्सद्द्यांना हिंदी राजकीय पुढाऱ्यांवर मात केल्याच्या आनंदाचे आंतून उमाळ्यावर उमाळे येत राहिले. त्याच आनंदाच्या भरांत सरकारानें प्रांतानिहाय शेतकीचीं मोठमोठीं प्रदर्शनें भरवून शेतकीस उपयोगी अशा प्रचंड यंत्रांचा व पुष्ट अशा गाई–बैलांचा भपका उडवून दिला. विलायतेहून शेतकींतील तज्ज्ञ व्हाइसरॉय लॉर्ड आयर्विन हिंदुस्थानावर राज्य करण्याकरितां आले व त्यांच्याबरोबर शेतकी कमिशनाचेंहि आगमन हिंदुस्थानांत झाल्यानें कमिशनच्या शिफारशी हिंदुस्थानसरकार अमलांत आणून हिंदी शेतकऱ्यांस चढवीत चढवीत स्वर्गलोकांत व त्यांच्या डोक्यांत अवघे दोन बोटांचेंहि अंतर राहूं देणार नाहीं असा भ्रम उत्पन्न झाला.

या वेळीं शेतकऱ्यांस म्हणजे मागसलेल्या वर्गास जितके ग्रह अनुकूल आले तितके इंग्रजी राज्यांत त्यापूर्वी कधींच आले नसतील. कारण लोकलबोर्डे मागसलेल्यांचीं, म्युनिसिपालिट्या मागसलेल्यांच्या, कौन्सिलें मागसलेल्यांचीं, दिवाण मागसलेल्यांचे, शेतकी कमिशन मागसलेल्यापाठीं व व्हाइसरॉयहि मागसलेल्याकरितां. हा सगळा मानसन्मान, थाटमाट व बडेजाव मोहून सोडणारा होता यांत शंका नाहीं. पण त्यापासून फायदा म्हणाल तर एकंदर मागासलेल्या वर्गाच्या दृष्टीनें काडीइतकाहि झाला नाहीं. एखाद्या गरीब मनुष्यास श्रीमंतानें आपल्या घरीं अगत्यपूर्वक बोलवावें, त्याच्या गळ्यांत ताज्या व सुवासिक फुलांचा कमालखानी हार घालावा, हातांत मोठा थोरला गुच्छ द्यावा, मनगटाला हीऱ्याचा फाया चोळावा आणि पानसुपारी देऊन व अंगावर गुलाब पाणी शिंपडून जेवणाखाणाची विचारपूस न करतां निरोप द्यावा याचें समाधान जितकें गरीब पाहुण्यास तितकेंच वरील बडेजावाचें समाधान आमच्या गरीब शेतकरी बंधूंना ! अंगावर शिंपडलेल्या गुलाबपाण्याच्या थेंबांनीं जशी पोटांत पेटलेली भुकेची आग विझत नाहीं तशी वरील भपक्यानें व मानमरातबानें शेतकऱ्यांची गरजहि भागली नाहीं.

एवढें मोठें शेतकी कमिशन सरकारानें सहासात वर्षांपूर्वी नेमलें व त्याचा हजारआठशें पानांचा रिपोर्टहि प्रसिद्ध केला; पण त्यामुळें शेतकींत विलक्षण क्रांति घडून येऊन शेतकऱ्यांचें नशीब फळफळलें असें अद्यापि तरी दृष्टोत्पत्तीस आलें नाहीं. कमिशनच्या शिफारशींची फलश्रुति इतकीच झाली कीं, हिंदुस्थानाकरितां एक शेतकीचें संशोधनमंडळ नेमण्याचें ठरलें व ते चालविण्याकरितां पन्नास लक्ष रुपयांचें वर्षासन मंजूर करण्यांत आलें. हें संशोधनमंडळ आणि एखाद्या देवळांत हिंदुराजानें ठेवलेलें रुद्राचें अनुष्ठान फलप्राप्तीच्या दृष्टीनें शेतकरी वर्गापासून सारखेंच दूर. फरक इतकाच कीं, अनुष्ठानाची दक्षिणा ब्राह्मणांना मिळत असे व संशोधनखात्याची दक्षिणा त्यांच्या शतपटीनें गोऱ्या ब्राह्मणांना व त्यांच्या शागीर्दशिष्यांना मिळणार ! खरें म्हटलें असतां शेतकऱ्याला शेतकी अंगी लागावयाची झाल्यास त्याच्या जमिनींत हल्लींच्या दसपट उत्पन्न आलें पाहिजे. किंवा शेतकीच्या बुडीत धंद्याला तारण्याकरितां हात देणारा दुसरा धंदा शेतकऱ्याच्या मदतीस धावला पाहिजे. गेल्या दहाबारा वर्षांत हिंदुस्थानांत यापैकीं कांहींहि घडलें नाहीं.

उलटपक्षीं जमिनीचा सारा सव्वा दीडपटींनीं वाढला, उत्पन्नाचे भाव दुपटीतिपटीनें उतरले, पतपेढ्यांचा व्यवहार अंगावर आला, बागाईतदारांच्या गुळाला व इतर मालाला व्यापारी लोक हातांत धरीनासे झाले आणि सरकार आपण बसविलेल्या साऱ्यांत रुपयांत चारदोन आणेहि सूट न देण्याइतकें निष्ठुर बनलें. यामुळें शेतकऱ्यांनीं होतें नव्हतें तें किडूक–मिडूक विकून रजपुतांप्रमाणें आर्थिक दृष्ट्या जोहार केला. जी रड अन्नपाण्याची व पैशाअडक्याची तीच रड शिक्षणाची. सक्तीच्या प्राथमिक शिक्षणाचा कायदा ना. परांजपे मुंबई इलाख्याचे शिक्षणमंत्री असतांना पास झाला. त्या वेळीं शिक्षणप्रसाराचीं गोडगोड सुखस्वप्नें पडावयास लागून जनतेचा आनंद पोटांत काय पण गगनांतहि मावेना आणि लोक इतके उतावळे बनले कीं पुण्यासारख्या शहरांत प्राथमिक शिक्षण सक्तीचें करण्याचा नुसता विचार सुरू होतांच ते प्रथम एकट्या मुलांना द्यावयाचें कीं मुलींनाहि द्यावयाचें याविषयीं सुशिक्षित स्त्रीपुरुषांत रणें माजून राहिलीं.

पण आज पहावें तों काय चमत्कार ! मुलामुलींच्या सक्तीच्या शिक्षणाचा खडाजंगी वाद आकाशांत गडगडणारे ढग जसे तेथल्या तेथेंच विरून जातात

त्याप्रमाणें जिरला आहे. इतकेंच नव्हे तर सक्तीच्या शिक्षणाचा प्रश्न अजीबात मागें पडून स्वाभाविक रीत्या वाढणाऱ्या प्राथमिक शाळांना जी ग्रँट सरकारापासून ठरल्याप्रमाणें मिळावयास पाहिजे तीहि दग्याचें सरकारनें नाकारल्यामुळें कांहीं स्थानिक स्वराज्यसंस्थांनीं त्याबद्दल सरकारावर फिर्याद करण्याची मजल गांठली आहे. अशा रीतीनें मॉंटेग्यू-चेम्सफर्ड सुधारणांच्या दहा वर्षांच्या अखेरीस सर्वतोपरी फजीत पावलेल्या शेतकरी वर्गास नोकऱ्यांचें दाखविलेलें तुटपुंजें आमिष कितीसें जिभल्या चाटींत बसूं देणार? हजार दोन हजार शेतकऱ्यांत एखाद्याच्या मुलाला नोकरी लागून तो पोटभर जेवीत असल्यास बाकीच्यांनीं उपास काढून त्याच्या तोंडाकडे पहात बसावयाचें काय? अशा प्रकारच्या खडतर अनुभवानें शेतकरी वर्गाचे डोळे खाडकन् उघडले व दहाबारा वर्षांपूर्वी सरकारच्या भजनाची दिंडी काढून टाळमृदंग वाजवीत नाचणाऱ्या ह्या प्रचंड वर्गानें सरकारी छावणींतून पळ काढला व तो राष्ट्रीय सभेच्या निशाणाखालीं येऊन उभा राहिला.

गेल्या कायदेभंगाच्या चळवळींत मुंबई इलाख्यांतील व इतर प्रांतांतील हजारों शेतकरी तुरुंगांत गेले, त्यांनीं राष्ट्रीय सभेच्या आज्ञेकरितां हजारों एकर जमिनींची व लाखों रुपयांच्या मालमत्तेची आशा सोडली आणि सुशिक्षित वर्गाशीं एकदिल होऊन ते सरकाराबरोबर कसून लढले आणि तसे चालू चळवळींतहि लढत आहेत. त्यावरून एक गोष्ट सरकारच्या निदर्शनास आली असेल; ती ही कीं, राजकीय हक्कांच्या व सवलतींच्या जोरावर हिंदी जनतेंत १९२० सालाच्या प्रारंभीं सुशिक्षित व अशिक्षित, पुढारलेले व मागसलेले या प्रकारची फूट पाडण्याचें जें राजकारण मोठ्या खुबीनें सरकारनें केलें तें १९३० सालाच्या प्रारंभीं सपशेल फसून राष्ट्रीय पुढाऱ्यांनाच यश लाभलें. आतां सुधारणेच्या हक्कांची नवी संधि आली असून नव्या कायद्यांत नवी फूट पाडण्याचें राजकारण सरकार खेळल्यावांचून रहाणार नाहीं. मागील खेपेस ब्राह्मणेतरांना सरकारानें घोड्यावर बसविलें होतें; या खेपेस अस्पृश्यांना किंवा दुसऱ्या कोणाला घोड्यावर बसविण्याचें कारस्थान ते रचतील.

गेल्या मांटफोर्ड सुधारणा कायद्यांत प्रांतिक कारभारांत द्विदल राज्यपद्धतीचा ब्रिटिश मुत्सद्द्यांनीं बोलबाला चालविला होता; येत्या सुधारणा कायद्यांत प्रांतिक स्वायत्ततेची तळी उचलण्याचा ब्रिटिश मुत्सद्द्यांनीं घाट घालीत आणिला आहे. मॉंटेग्यूसाहेबांनीं प्रांताचीं किरकोळ खातीं लोकांना देऊन टाकलीं होतीं, पण आतां सायमनसाहेब प्रांताचीं सगळींच खातीं लोकांच्या स्वाधीन करण्याचें बोलत आहेत. अर्थात् याहि वेळीं मागासलेल्या म्हणजे शेतकरी वर्गालाच राजकीय हक्क प्राधान्येंकरून मिळणार आहेत. प्रांतिक स्वायत्तता म्हटली कीं जमीनमहसुलाचें खातेंहि शेतकऱ्यांच्या ताब्यांत जाणार हें उघड आहे. जमीनमहसुलाचें खातें प्रांताच्या कारभारांत आतांपर्यंत इंग्रजसरकारचें मर्मस्थान होऊन राहिलें आहे. तेव्हां हें खातें आपल्या हातांत येतांच जमीनधारा आपण कमी करूं असा शेतकरी वर्गास जर भ्रम उत्पन्न झाला असेल तर तो बहुतांशीं पोकळ ठरणार आहे. कारण उत्पन्नापेक्षां अधिक खर्चाचें ओझें आतां प्रांतावर पडणार असल्यानें कोणत्याहि कराचा बोजा हलका करण्याची आशा व्यर्थच समजली पाहिजे. इतकेंच काय पण तो कदाचित् कमी झाला तरी तेवढ्यानें शेतकरी सुखी व संपन्न होतील असें मानणें चुकीचें आहे.

शेतकऱ्यांसारख्या मागसलेल्या वर्गाला काय किंवा सुशिक्षितांसारख्या पुढारलेल्या वर्गाला काय, काम करून पोटभर अन्न मिळावयास पाहिजे असेल तर मध्यवर्ती सत्तेंत ब्रिटिश सरकारानें पूर्ण आर्थिक स्वातंत्र्य हिंदुस्थानास देऊन देशांतील उद्योगधंद्यांना उत्तेजन देण्याचा व त्यांचें परकीय देशांपासून संरक्षण करण्याचा अधिकार हिंदी लोकांच्या स्वाधीन केला पाहिजे. कारण उद्योगधंद्यांची जोड मिळाल्याशिवाय नुसत्या शेतकीवर निर्वाह होण्याइतकी विपुल व सुपीक जमीन हिंदी शेतकऱ्यांपाशीं नाहीं. हें मर्म ओळखून नवीन कायद्यांत औद्योगिक अभिवृद्धीस जर ब्रिटिश मुत्सद्दी वाव ठेवणार नाहींत तर १९३२ सालाच्या प्रारंभीं हिंदुस्थानांत राजकीय चळवळीचें स्वरूप सरकारास जितकें भयंकर दिसत आहे त्याहिपेक्षां १९४२ सालाच्या प्रारंभीं त्याला प्रत्यक्ष राज्यक्रांतीचें स्वरूप प्राप्त झाल्याशिवाय रहाणार नाहीं याची खूणगांठ याच वेळीं त्यांनीं बांधून ठेवलेली बरी.

# ब्रिटिश साम्राज्याचा उदयास्त

(ले.—श्री. दामोदर नरहर शिखरे, एम्. ए. पुणें.)

लेखांक ३ रा

### बुडत्याची धडपड

ब्रिटिश साम्राज्याची टोलेजंग इमारत कोसळून पडूं नये म्हणून तिची डागडुजी करण्याचें काम बऱ्याच वर्षांपासून सुरू झालें आहे. ब्रिटिश साम्राज्यांतील राष्ट्रांना दृढ अशा प्रेमरज्जूनें निगडित करावें या हेतूनें १८८४ सालीं 'इंपीरिअल फेडरेशन लीग' नांवाची संस्था अस्तित्वांत आली. तिच्या कांहीं सभा भरल्या व सैन्याच्या खर्चासंबंधीं आणि व्यापारांत साटेलोटें (Reciprocal) धोरण ठेवण्यासंबंधीं कांहीं योजना झाल्या. पण १० वर्षांतच ती संस्था विलयास गेली. तथापि तिनें आपला वंश दोन संस्थांच्या रूपानें चालू ठेवला. सैन्याच्या खर्चाचा विचार करण्यासाठीं 'इंपीरिअल डिफेन्स कमिटी' निर्माण झाली. आणि दुसरें अंग जें व्यापाराचें, त्यासाठीं 'युनायटेड एम्पायर ट्रेड लीग' या संस्थेची प्राणप्रतिष्ठा करण्यांत आली. त्याची फलश्रुति म्हणूनच कीं काय, ब्रिटिश मालाला जादा सवलत (Preferential Treatment) देण्याचें तत्त्व न्यूझीलंड आणि दक्षिण-आफ्रिका यांनीं १९०३ सालीं व ऑस्ट्रेलियानें १९०७ सालीं अमलांत आणलें. कॅनडानें १८९८ सालींच ती सवलत दिली होती आणि १९०७ मध्यें ती अधिकच वाढविली. १९११ मध्यें पहिली साम्राज्य—परिषद भरविण्यांत आली आणि त्यानंतर तिच्या सभा अडी—अडचणीच्या वेळेस भरविण्यांत येत आहेत. त्या प्रत्येक सभेंत वसाहतीच्या स्वातंत्र्याची लाट पुढें पुढेंच जात आहे आणि त्यामुळें ब्रिटिश साम्राज्याचा अधिकार मागेंमागें हटत आहे. १९१३ सालापासून 'इंपीरिअल डिफेन्स कमिटी'मध्यें वसाहतीचे प्रतिनिधी घेण्यांत आले, आणि वसाहतींतील न्यायाधिशांना प्रिव्ही कौन्सिलाच्या ज्युडीशिअल कमिटींत बसण्याचा हक्क मिळाला.

### १९३१ चा क्रांतिकारक कायदा

गेल्या वर्षापर्यंत वसाहतींतील कायदे हे दुय्यम समजले जात; त्यांच्यावर अखेरची सत्ता ब्रिटिश पार्लमेंटाची चाले. त्या पार्लमेंटाला वसाहतीकरितां कायदे करण्याचा अखत्यार असे. उलट वसाहतीनें मंजूर केलेल्या कायद्यावर 'व्हेटो'चा सोटा उगारण्याची सत्ताहि गव्हर्नर—जनरलाला दिलेली असे. त्याशिवाय बादशहाच्या पसंतीकरितां म्हणून एखादा कायदा खुंटीला अडकवून ठेवण्याचा अधिकारहि ब्रि. पार्लमेंटाला असे. परराष्ट्रसंबंधाचें खातें म्हणजे वसाहतींना कुपथ्यच मानलें जात होतें. परंतु गेल्या ५-६ वर्षांपासून हा सर्व मनु पालटूं लागला. १९२६ सालीं बाल्फोरनें एक प्रसिद्ध तत्त्व प्रगट केलें. तें हे कीं, वसाहती या स्वयंसत्ताक असून त्यांच्यांत तरतमभाव असा मुळींच नाहीं. जो तो आपआपल्या नशिबाचा धनी होय. अर्थात् हिंदुस्थान देशाला या औदार्यातून वगळण्यांत आलें होतें! कॅनडा, ऑस्ट्रेलिया, न्यूझीलंड, दक्षिण-आफ्रिका, आयरिश फ्रीस्टेट आणि न्यूफाऊंडलंड यांना या सर्व अधिकारांचीं वस्त्रें मिळालीं, वसाहतीच्या गव्हर्नर—जनरलाची नेमणूकदेखील बादशहाच्या हातीं न राहतां वसाहतींच्या इच्छेवर राहिली आणि त्या अधिकाराची अंमलबजावणी ऑस्ट्रेलियानें केली देखील. तेथल्या मुख्य प्रधानाच्या सल्ल्यावरून एका ऑस्ट्रेलियन माणसाची नेमणूक गव्हर्नर—जनरलाच्या जागीं करण्यांत आली. तिला मॅक्डोनाल्डच्या मध्यस्थीची नड भासली नाहीं. ब्रिटिश पार्लमेंटाचा कोणताहि कायदा आपल्या वसाहतीपुरता बदलण्याचा किंवा अजीबात रद्द करण्याचा अधिकार वसाहतींना गतसालच्या वेस्टमिन्स्टर कायद्यान्वयें मिळाला आहे. उलट वसाहतींना मागणी केल्याशिवाय व संमति दिल्याशिवाय ब्रिटिश पार्लमेंटाला स्वतः कोणताहि कायदा त्यांच्यावर लादतां येत नाहीं. कायदे करण्याच्या या अधिकाराची कुऱ्हाड चालवून वसाहतींना साम्राज्याचे संबंधहि सहज तोडतां येतील, अशा प्रकारें ब्रिटिश साम्राज्याच्या वसाहती तत्त्वतः विभक्त झालेल्या असल्यामुळें ब्रि. साम्राज्य हें आज जगांतून उठलें म्हटलें तरी चालेल.

### व्यापाराची घट, कर्जाची वाढ

एकीकडे ब्रिटिश साम्राज्याच्या पायाखालची भूमि अशा क्रमानें ढांसळत आहे, तर दुसरीकडे त्याच्या व्यापाराचे वासे सारखे पोखरून निघत आहेत. महायुद्धापासून ब्रिटिशांच्या व्यापाराला मोठाच धक्का बसला असून त्यांच्या डोक्यावर कर्जाचे डोंगर चढलेले आहेत. व्यापाराची घट व कर्जाची वाढ यांच्या चिमट्यांत सांपडल्यामुळें आज इंग्लंडाची दैना उडाली आहे. त्याचें एक गमक असें कीं, इंग्लंडचा पौंड एकाया

पदभ्रष्ट राजाप्रमाणें निष्कांचन होऊन सैरावरा पळत सुटला आहे! इंग्लंडचें वार्षिक उत्पन्न तीन–सवातीनशें कोटी पौंड असतें; पण त्यांतील दहावा हिस्सा कर्जाचे हप्ते व व्याज भरण्यापायींच गडप होतो. ४६० कोटी डॉलरांचें युद्ध–कर्ज इंग्लंडनें अमेरिकेला द्यावयाचें ठरलें.खुद्द महायुध्दांत १००० कोटी पौंडांचा इंग्लंडनें फन्ना उडविला तो निराळाच. महायुद्धापासून इंग्लंडांतून लक्ष्मीनें काढता पाय घेतला असेंच दिसून येतें. शक्ति कमी होत चालली व रोग बळावत चालला अशी त्याची अवस्था दिवसेंदिवस होत आहे. इंग्लंडांतील प्रत्येक माणसाचे डोकीवर सरासरीनें पाहतां, १८५ पौंडांचें कर्ज १९२४ सालीं उभारलेलें होतें. त्याच वेळीं हें प्रमाण फ्रान्सच्या बाबतींत ११४,बेल्जममध्यें ६०,अमेरिकेंत ४८ व इटालींत ३० पौंड इतकेंच होतें.

महायुद्धाच्या मंथनांतून कर्जाचें हालाहल जसें निघालें; तसाच संरक्षणाचा खर्चहि तेव्हांपासूनच वाढला. स्मशान–वैराग्य, प्रसूति–वैराग्य याप्रमाणेंच युद्ध–वैराग्यहि असतें. त्या भरांत राष्ट्रसंघ जन्मास आला आणि शस्त्रसंभाराचा बोजा हलका करण्याचें ठरलें. त्यासाठीं वारंवार परिषदा भरत आहेत. पण जें तें राष्ट्र आपली मूठ जास्त जास्त घट्ट वळूनच तेथें हजर राहतें. त्यामुळें लष्कर, आर) मार, इत्यादि राष्ट्रसंरक्षणाचा खर्च प्रत्येक देशांत वाढतच आहे. ब्रिटिश साम्राज्याचा संरक्षणखर्च ८ कोटी ८० लक्ष पौंड असून तीन कोटींवर रक्कम साम्राज्यांतील आरमारापायीं खर्च होते. १९१२ सालीं जेव्हां ग्रेटब्रिटनचा संरक्षण–खर्च प्रत्येक माणशीं ३१ शिलिंग ९ पेन्स होता; तेव्हां फ्रान्सचा २७ शि. ५ पे., जर्मनीचा १८ शि. ९ पे. व कॅनडाचा ३ शि. ११ पे. होता. तेव्हांपासून त्यांत वाढच आहे; घट नाहीं. यावरून इंग्लंडांतील संपत्तीचा किती भाग झालेल्या युद्धाचा व होणाऱ्या युद्धाचा खर्च करण्यापायीं शोषला जातो हें उघड होतें.

### इंग्लंडचा व्यापार रोडावला

या द्रव्यशोषणाच्या हातांत हात घालून व्यापाराची मंदीहि इंग्लंडच्या घरीं चालून आलेली आहे आणि तिनें तेथें कायमचेंच बिऱ्हाड ठेवलेलें दिसतें. १७९१ सालीं इंग्लंडचा आयात–निर्यात मिळून वट व्यापार ३ कोटी ७० लाख पौंडांचा होता. त्याची भरभराट होऊन शंभर वर्षांनीं म्हणजे १८९१ सालीं त्याची वाढ ७ कोटी ४० लक्ष पौंड झाली. त्यानंतर १९१३ सालीं आयात ६५ कोटी पौंडांची व निर्यात ५२ कोटी पौंडांची झाली; म्हणजे एकंदर व्यापार ११७ कोटी पौंडांचा झाला. आणि १९२० सालीं ३४९ कोटी पौंडांपर्यंत हा आंकडा चढला. पण पुढच्याच वर्षी म्हणजे १९२१ सालीं तो १८९ वर घसरला आणि १९३० सालीं तर तो १५२कोटी पौंडांपर्यंत गडगडला. शिवाय यांत हें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, अलीकडे पदार्थांच्या किंमती वाढल्यामुळें हे आंकडे फुगलेले आहेत. पण वास्तविक मालाचा उठाव तितक्या प्रमाणांत वाढलेला नाहीं. १९१३ सालापेक्षां १९३० सालीं निर्यात मालाचें प्रमाण शें.३२ नीं व आयात मालाचें शें.१३नीं कमीच झालें.तेथील बेकारांची संख्या सालोसाल वाढत असून आतां तीस लाखांपर्यंत चढलेली आहे. कांहीं वर्षांपूर्वी ती१०लाखांच्या संख्येभोंवतीं घुटमळत होती. तेव्हां एका आंकडेपंडितानें असा हिशेब केला होता कीं, प्रत्येक कामकरी दरसाल २०० पौंड किंमतीचा माल पैदा करतो. या प्रमाणानें १० लाख लोक पांच वर्षें हात जोडून बसले याचा सरळ अर्थ १०० कोटी पौंडांला इंग्लंड मुकलें असाच आहे. त्यांत भरीला भर अशी कीं, या नुकसानीबरोबरच बैठ्या वेतनाचाहि खर्च इंग्लंडला सोसावा लागत आहे. आजारीपणांत प्राप्ति तुटावी आणि डॉक्टराचें बिल वाढावें तशी ही गत आहे. त्यामुळें इंग्लंडची आज फार पराधीनता झालेली आहे.

### इग्लंडच्या उड्या हिंदुस्थानाच्या जिवावर

इंग्लडला लागणाऱ्या खाद्य पदार्थांपैकीं शें. ६० परदेशांतून येतात. म्हणजे इतर देशांनीं बहिष्कार टाकला तर इंग्रज लोकांना दोन वेळां जेवून राहणेंहि कठिण पडेल. इतर राष्ट्रांकडून विमा, पेढ्या, जहाजवाहतूक वगैरे मार्गांनीं इंग्लंडला दरसाल १९ कोटी पौंड मिळत असून तेथें इंग्लंडनें गुंतविलेल्या भांडवलावरील व्याज म्हणून २७ कोटी पौंड त्याच्या पदरांत पडतात. एकट्या हिंदुस्थानांतून या दोनच साधनांच्या द्वारें १० कोटी पौंड इंग्लंडला दरसाल रवाना होतात. त्याशिवाय तेथल्या मालाचें गिऱ्हाईक होऊन इंग्लंडच्या किनाऱ्यावर हिंदी माणसाच्या खिशांतील कोट्यवधि रुपये ओतले जातात ते निराळेच. इंग्लंडच्या प्रत्येक पौंडाचें पोट फाडलें तर, साप चिरल्यानंतर त्याच्या पोटांत दिसणाऱ्या बेडकीप्रमाणें, त्यांत हिंदुस्थानाचे ४ शिलिंग आढळून येतील असें रॉदरमिअरनें मागेंच जाहीर केलें आहे. त्यांत थोडी अतिशयोक्ति असली तरी इंग्लंडचें सुमारें चतकोर पोट हिंदुस्थानाच्या शिदोरीवर भरत आहे हें निःसंशय.

### कॉमनवेल्थ ब्रिटनचें कीं हिंदुस्थानाचें ?

ही स्थिति एका परीनें हिंदुस्थानाला सध्यां हानिकारक असली तरी दुसऱ्या दृष्टीनें ती आशादायक आहे. हिंदुस्थानानें स्वदेशीच्या चिमट्यानें इंग्लंडचें नाक दाबलें कीं, त्याच्या मुखांतून राजकीय हक्क आपोआप

बाहेर पडतील असा त्या स्थितीचा उघड अर्थ आहे. हिंदुस्थानाच्या स्वदेशीची इंग्लंडला उपेक्षा करतां येणें शक्यच नाहीं. गेल्या वर्षाच्या लहानशा चमत्कारानेंच मँचेस्टरच्या नाड्या आंखडल्या गेल्या, बेकारांचे तांडे दंगे करूं लागले व मंत्रिमंडळाचें आसन डळमळलें. चीन, रशिया वगैरे देश इंग्लंडच्या गिन्हाइकीच्या ग्रहणांतून आतां मुक्त झालेले असून तेच इतरांना गिन्हाईक बनवीत आहेत. त्यामुळें इंग्लंडचें उखळ तिकडे पांढरें होण्याची आशाच नको. त्याचा सारा जीव टांगून राहिला आहे हिंदुस्थानावर. वसाहतींचा संबंध तुटलेला, व्यापार घटलेला व युद्धकर्ज आणि लष्करखर्च याखालीं वांकलेला इंग्लंड देश आपले जीवित सुरक्षित राखण्यासाठीं हिंदुस्थानांतील व्यापाराला जिवापाड जपत आहे. आणि म्हणूनच "स्वराज्य देतां कीं व्यापार तोडूं?" असा निर्वाणीचा प्रश्न हिंदुस्थानानें आतां इंग्लंडला टाकला तर इंग्लंडला स्वराज्यदान केल्याशिवाय तरणोपाय नाहीं, गत्यंतर नाहीं. साम्राज्यवादी चर्चिल यांनीं पार्लमेंटांत कितीहि गिल्ला करून वेस्टमिन्स्टर कायद्याच्या दिल्ली-दरवाजांतून हिंदुस्थानाला इतर वसाहतींप्रमाणें साम्राज्यांतून बाहेर जाण्याला मुभा न देण्याची कारवाई केलेली असली तरी हिंदुस्थानानें स्वदेशीचा 'तिळा, दार उघड' हा मंत्र जपतांक्षणींच त्याला स्वराज्यप्रवेश करतां येईल यांत संशय नाहीं. आपला व्यापार व त्यायोगें आपलें पोट जगविण्यासाठीं इंग्लंडच हिंदुस्थानाच्या हनुवटीला हात लावून म्हणेल कीं, 'बा हिंदुस्थाना, ब्रिटिश साम्राज्यांत किंवा (समानतेच्या गौरवपूर्ण भाषेंत म्हणावयाचें तर) ब्रिटिश कॉमनवेल्थमध्यें तूं ये.' आणि इंग्लंडनें हिंदुस्थानाला हाताशीं धरून ब्रिटिश कॉमनवेल्थच्या दरबारांत नेऊन बसाविलें म्हणजे मौज अशी होणार आहे कीं, त्याला इंडियन कॉमनवेल्थचेंच स्वरूप येईल! कारण ब्रिटिश साम्राज्यांतील ४५ कोटी लोकसंख्येपैकीं बहुसंख्या म्हणजे ३५ कोटि वस्ती हिंदुस्थानाची आहे!

(समाप्त.)

---

## प्रो. टुमणे यांचें नवें 'जगत्तान' तंतुवाद्य



प्रो० शामराव गोविंद टुमणे



**प्रो० टुमणे यांनीं तयार केलेलें 'जगत्तान' वाद्य**

कुलाबा जिल्ह्यांतील प्रो. शामराव गोविंद टुमणे यांचा आर्य संगीतावरील व्यासंग दीर्घकालीन आहे. अलीकडे नव्या नव्या कल्पना उदित होऊन अनेक प्रकारचीं तंतुवाद्यें निघालीं आहेत. प्रो. टुमणे यांनाहि आपली जुनी कला नव्या वेषांत आणण्याची कल्पना सुचून त्यांनीं स्वर व श्रुति यांविषयीं भारतीय संगीतशास्त्रांत जे सिद्धान्त सांगितले आहेत त्यांस अनुसरून 'जगत्तान' नावाचें मोठें कौतुकास्पद असें तंतुवाद्य बनविलें आहे. या वाद्याचा विशेष हा कीं, या एकाच वाद्यांत हिंदुस्थानांतील बहुतेक सर्व मुख्य मुख्य तंतुवाद्यांचें एकीकरण करण्यांत आलें आहे. म्हणजे त्यांत सतार, बीन, तंबोरा, मँडोलिन इत्यादि वाद्यांचा समावेश होतो. त्याची रचना ध्वनिशास्त्राचे तत्त्वावर केलेली आहे. बिनामध्यें सात सुरांची तान नाहीं व पेटीमध्यें आलाप घेतां येत नाहीं. परंतु हे दोनहि गुण जगत्तान वाद्यांत मात्र साधले असून तारांना अंगुलि-स्पर्श न करतां वरील दोन्ही गुण साधतां येतात, हा त्यांत विशेष आहे. वाद्यासाठीं भोपळ्याचा अगर पोकळ दांडीचा उपयोग केलेला नसून त्याची रचना फार सोपी आहे. या यंत्राबद्दल संगीतज्ञ प्रो. अबदुल करीम यांनीं प्रशंसोद्गार काढले असून कै. श्रीमंत माधवराव महाराज शिंदे यांनींहि यापूर्वी त्याची फार तारीफ केली आहे.

स. १९२९ मध्यें लाहोर येथें भरलेल्या संगीत परिषदेंत हार्मोनियम हें वाद्य बेसूर व धेडगुजरी असल्यानें टाकून देऊन हिंदुस्थानांतील वीणाप्रभृति तंतुवाद्यावरच गायन करावें असा ठराव झाला. मुंबईच्या आतिया बेगम यांनींहि वरील विधानास पुष्टिच दिलेली आहे. हे सर्व दोष टाळून प्रो. टुमणे यांनीं 'जगत्तान' हें खास देशी तंतुवाद्य तयार केलें आहे. हल्लींच्या स्वदेशीच्या काळांत अशा देशी संशोधनास व कारागिरीस उत्तेजन मिळावयास पाहिजे.

प्रो. टुमणे हे चांगले कवि असून संस्कृत, इंग्रजी व मराठी या भाषेंत त्यांनीं कांहीं काव्यरचनाहि केलेली आहे. त्यांच्या संस्कृत काव्याबद्दल म्हैसूरच्या विद्वानांनीं त्यांना चांगलीं प्रशस्तिपत्रें दिलीं आहेत.

प्रो. टुमणे यांनीं दीर्घ परिश्रम करून अगदीं अभिनव पद्धतीचें पण अल्प किंमतीचें असें नवें वाद्य तयार केलें, या त्यांच्या शोधाबद्दल ते अभिनंदनास पात्र आहेत. हिंदुस्थानांत शोधकबुद्धि अद्यापिहि जागृत आहे, याचें प्रो. टुमणे हें मूर्तिमंत उदाहरण आहे.

# मुंबापुरीच्या यमपुरींतून निर्वाणीचा निरोप

मुंबापुरी ही रात्रंदिवस पोटाच्या व्यवसायांत चूर असावयाची. पण ती गेले पांच-सहा दिवस हा नित्याचा व्यापार थांबवून आपलें पोट भरण्याऐवजीं मृत्यूचें पोट भरणारी यमपुरीच बनली. त्या पांच-सहा दिवसांत तेथील मनुष्यांनीं आपल्या घोर कृत्यांनीं यमदूतांनाहि लाजविलें. मनुष्य हा मनुष्यावर प्रेम करणारा प्राणी, पण त्या पांच-सहा दिवसांत त्याच्या काळजांतील कोमल भावना पार आटून त्यानें कठोरपणांत व क्रौर्यांत दैत्यांवरहि ताण केली. त्यानें मानवी जीवांच्या हालांचा नुसता खेळ मांडला. सुऱ्या खुपसून जीव घेण्याच्या, दुकानें फोडून त्यांतील मालमत्तेची धुळधाण उडविण्याच्या व घरांना काडी लावून त्यांच्या भडकलेल्या आगींत माणसांना तडफडत मारण्याच्या जेवढ्या नव्या-जुन्या आसुरी क्रीडा मुंबईच्या मुसलमानांना सुचल्या त्या त्यांनीं मनमुराद खेळल्या. दुष्मनहि दुष्मनावर चेव येऊन तुटून पडणार नाही इतक्या त्वेषानें मुंबईचा मुसलमान मुंबईच्या हिंदूवर तुटून पडला व त्याच्या हातून अनेक अनान्वित व अंगावर रोमांच उभे करणारे अनर्थ घडले तरी त्याची रक्ताची तहान शमली नाहीं.

मुसलमानांनीं हें क्रौर्य गाजविलें कोणावर ? तर निरपराध पुरुषांवर, अबला जनावर व कोवळ्या सुकुमार अर्भकांवर. कोकराची मुंडी चिरण्यांत सरावलेल्या खाटकाच्या हृदयालाहि एखादे वेळीं द्रव येत असेल, त्या कोकराचें धड गळ्यांतून गळणाऱ्या रक्तबिंदूंनीं नाहूं लागलेलें न पाहवल्यामुळें एखादे वेळीं अश्रुबिंदूंनीं भरलेल्या डोळ्यांवरून हात फिरविल्यावांचून त्याच्यानें रहावत नसेल व त्याच्या हातांतील तिखट सुरीहि त्या दुष्टपणाला विटून एखादे वेळीं गळून पडत असेल. पण तितकाहि द्रव, त्या खाटकाइतका किंवा त्याच्या सुरी इतकाहि द्रव, मुंबईतील मुसलमान सैतानांना अबलांचीं पोटें फाडतांना, ज्यांनीं डोळे उघडून दुनिया इतकी दुष्ट असते हें देखिलें-देखिल नाहीं अशा गरोदर स्त्रियांच्या गर्भांतील गोजिरवाण्या अर्भकांचीं राईराई एवढालीं खांडोळीं करतांना व अनेकांचे हात, पाय, डोकीं व नाकें कापतांना आला नाहीं. कदाचित त्यांच्या हातांतील निर्जीव सुरेहि दमले व द्रवले असतील पण सुऱ्यांहूनहि कठोर बनलेल्या त्या मुसलमानांचीं अंतःकरणें द्रवलीं नाहींत.

अथवा त्यांना द्रवावयास अंतःकरणेंच नव्हतीं. कारण त्यांना अन्तःकरणें असतीं तर निरपराध व निष्पाप अशा प्राण्यांची हत्या करण्यास त्यांचा हात कधीहि वाहाता ना. ज्याने आपणास गुद्दा लगावला त्याला उलट गुद्दा लगावण्यास मनुष्यास स्वाभाविकच चेव येतो व ज्यानें आपली खोडी काढली त्याचा सूड घेण्यासाठीं मनुष्याचे डोळे लाल होऊन ते रागाच्या ठिणग्या टाकतात; पण त्यांपैकीं कोणतीहि आगळीक हिंदूंकडून मुसलमानांची झाली नव्हती. किंबहुना ज्यांची ओळखदेखहि नव्हती अशा बायकापोरांचें व मुलामाणसांचें मुसलमान लोक हिंस्र पशूप्रमाणें केवळ लहरीखातर रक्त सांडीत होते. असला समाज मनुष्यवस्तीच्या शेजारीं राहूं देण्याच्या लायकीचा तरी समजावयाचा काय ?

कोणी रडत आहेत, कोणी विव्हळत आहेत, कोणी जखमांतील रक्त वाहून वाहून ग्लानि आल्यामुळें निश्चेष्ट पडले आहेत, कोणी बेदम माराखालीं जागचें न हालवल्यामुळें नवा मार चुकविण्याकरितां रस्त्याच्या बाजूला सरपटत चालले आहेत, एकाचा प्राण निघून गेला आहे तर दुसऱ्याचा प्राण जाण्याकरितां निघाला आहे, कोठें घरांतून आगीचे लोळ व धुराचे लोट निघत असतां त्या घरांत सांपडलेल्या मानवकुडी त्या आगींत उडी टाकून मृत्यूला भेटावें कीं घराबाहेर पडून रस्त्यांत उभ्या असलेल्या नराधमाच्या हातून येणाऱ्या मृत्यूला निराशेने मिठी मारावयास जावें या विवंचनेत आहेत; अशा प्रकारचीं काळजाचें पाणी व अंगाची लाही करून सोडणारीं भयंकर वर्णनें मुंबईच्या वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध होत आहेत. तीं वाचलीं म्हणजे प्रत्यक्ष कृतान्त मानवरूप घेऊन ब्रिटिश सरकारच्या सामर्थ्याकडे तुच्छतेनें पहात व मनुष्यांना किडामुंगीप्रमाणें क्षुद्र लेखीत गळ्यांत नरमुंडमाळा व हातांत नरकपाल धारण करून प्रेतांच्या राशीवरून व रक्ताच्या चिखलामधून मुंबईत गल्लोगल्लीं व रस्तोरस्तीं नाचत असावा अशी कल्पना होते.

मुसलमानांनीं इतके बेहोष होऊन हिंदूला खाऊं कीं गिळूं करण्याला निमित्त असें कांहींच घडलें नव्हतें हें वर सांगितलेंच आहे. निमित्त घडलें म्हणावयाचें तर तें एकच. कांहीं मुसलमान हिंदूच्या एका हॉटेलांत गेले व त्या हॉटेलाच्या मालकापाशीं मोहरमचा पोस्त मागूं लागले. पोस्त देणें न देणें ही हॉटेलवाल्याच्या मर्जीची गोष्ट असल्यामुळें त्यानें तो देण्याचें नाकारलें. तेवढें निमित्त मुसलमान गुंडांना मारामारीवर येण्याला बस्स होऊन तेथेंच त्यांनीं मारहाणीला सुरुवात केली. ती मारहाण वाढत

वाढत आज तिला घनघोर युद्धाचें स्वरूप येऊन मुंबई इलाख्याच्या राजधानींत, हिंदुस्थानांतील अव्वल प्रतीच्या नगरींत, एकट्यादुकट्याला हिंडतांना यमपुरींतून हिंडण्याइतकी भीतीची धडकी भरत आहे. यावरून दंग्याचा प्रसार साऱ्या मुंबईभर होण्याला मोहरमची चिरीमिरी हें केवळ सोंग होय, खरें निमित्त याहून निराळें असलें पाहिजे असा संशय ज्यांना गेल्या दोनतीन महिन्यांतील मुंबईचा इतिहास माहीत आहे त्यांना आल्यावांचून राहिला नसेल.

माधवबागेजवळ मुसलमानांनीं केलेली पिराची उठावणी, दादरच्या हनुमानजयंतीच्या वेळीं मुसलमानांस आलेली दंग्याची कुलुली व कॉंग्रेसच्या पिकेटिंगचा उपसर्ग कॉंग्रेसचें सुतकसोहेर नसलेल्या मुसलमान व्यापाऱ्यांस होत असल्याचा बोभाटा करून मौ. शौकतअल्ली यांनीं हिंदूंना दिलेली दटावणी या सर्वांचा विचार केल्यास मुंबईच्या मुसलमानांचा दंगा जादूगाराच्या पोतडीप्रमाणें हॉटेलच्या चहांतून किंवा चारदोन आण्यांच्या चिरीमिरींतून चमत्कारासारखा बाहेर पडला नसून मोहरमांतील कत्तलीच्या रात्रींच्या मुहूर्तानें हिंदूंवर दीन गाजवावयाचा आणि महमद पैगंबराचा नातू हुसेन याचा शिरच्छेद होऊन त्याचें शरीर ज्या तारखेस लाथांनीं तुडविलें गेलें त्या मोहरमच्या दहाव्या तारखेस मुंबईच्या काफीर हिंदूंचे मुडदे पाडून ते लाथेखालीं तुडवावयाचे असा बेत कांहीं माथेफिरू मुसलमानांनीं आगाऊ बरेच दिवस केला असल्यावांचून मुंबईचा दंगा भडकत भडकत इतक्या थराला पोंचला नसावा असें अनुमान बांधण्याकडे त्रयस्थाची सहाजिकच प्रवृत्ति होते.

हिंदु लोक सोशिक असल्याचा लौकिक आजचा नाहीं. ते कितीहि सोशिक असले तरी जीं दुःखें जिवंतपणीं सहन करणें अशक्य आहे, अशा दुःखांपुढे हिंदूंच्या सहनशीलतेचा तरी टिकाव कसा लागावा ? तेहि बिचारे अगदींच गळ्याशीं बेतलें तेव्हां आपलें सहनशीलतेचें ब्रीद विसरले व मुसलमानांच्या ठोशास ठोसा देण्यास कांहींसे प्रवृत्त झाले. हिंदू लोक फार संतापले तर लाठी उचलतील, ती मुसलमानाच्या पाठींत लगावतील किंवा डोक्यांत घालतील; परंतु मुसलमानांप्रमाणें त्यांना सुरा सहसा पाजळता येणार नाहीं व हसत-हसत दुसऱ्याच्या पोटांत सफाईनें तो खुपसतांहि येणार नाहीं. अशा नरम स्वभावामुळें हिंदूंनीं मुसलमानांस जो थोडासा प्रतिकार केला त्याचा मुसलमानांवर वचक न बसतां त्यांना अधिक स्फुरण आणण्यासच तो उपयोगी पडला.

तथापि या प्रसंगीं सरकारी अधिकाऱ्यांनीं दक्ष राहण्यांत बिलकुल दिरंगाई होऊं दिली नाहीं. मुंबईचे पोलीस कमिशनर मि. केली यांनीं बाहेरून पोलिसांची मदत मागवून व पुण्याहून पलटणी आणवून मुंबईंतील नाक्यांचीं ठिकाणें रोखलीं आणि आतां तर संशयित अशा गुंडांना गिरफदार करून अटकेंत ठेवण्यालाहि सुरुवात झाली आहे. मुंबईचे गव्हर्नर सर फ्रेड्रिक साइक्स व गृहमंत्री मि. थॉमस यांनीं महाबळेश्वर व लोणावळा येथील थंड हवेचा मोह सोडून ताबडतोब मुंबईस प्रयाण केलें यांत त्यांची कर्तव्यतत्परताच दिसून आली. सन १९२९ सालीं मुंबईंत झालेल्या दंग्याच्या वेळीं मुंबई सरकाराकडून ज्या चुका घडल्या त्या चालू दंग्याच्या वेळीं त्यांनीं बऱ्याच अंशीं होऊं दिल्या नाहींत ही सुधारणा महत्त्वाची होय.तथापि पोलिसांनीं व सरकारी वरिष्ठ अधिकाऱ्यांनीं इतकी कसोशी करूनहि दंगा जवळ जवळ आठवडाभर टिकला, त्यांत सव्वाशेंवर माणसें प्राणास मुकलीं, तितकींच घरें अग्निमुखांत पडलीं, पांचशेंवर दुकानें जळालीं, हजाराहून अधिक इसमांना जखमा झाल्या व दुकानांतील किराणा मालापासून तो जवाहिऱ्याच्या माणिकमोत्यापर्यंत दंगेखोरांनीं प्रजेची चीजवस्त दरोडेखोर बनून लुटली व लुटून उरलेली रस्त्यावर फेकली ही गोष्ट सरकारच्या बंदोबस्तास कमीपणा आणणारी आहे यांत संशय नाहीं.

मुंबईस दंगा उद्भवला म्हणजे तो कसा व किती भडकतो याचा अनुभव सरकारास यापूर्वीं अनेकवार आला आहे. तो लक्षांत घेऊन मुंबईसरकारानें दंग्याचें स्वरूप पहिल्या सलामीला पाहतांच दर दंग्यांत गुंडगिरीचा धिंगाणा घालण्यास सोकावलेल्या बदमाषांस ताबडतोब पकडून अटकेंत ठेवावयास पाहिजे होतें; व मोहरमचा सण संपण्याची वाट न पाहतां शहरास कर्फ्यू ऑर्डर लागू करून दंग्याची कंबर पहिल्याच तडाख्यास मोडावयास पाहिजे होती. तसें न घडल्यामुळें पांचसहा दिवसपर्यंत दंग्याची आग सर्व शहरभर पसरून ती पोलिसांच्या आटोक्याबाहेर गेल्यानें प्राणहानि व वित्तहानि परमावधीस पोंचली. आमच्या या विधानाची सत्यता पहाण्यास फार दूर जावयास नको. मंगळवारीं रात्रीं ८ वाजल्यापासून कर्फ्यूऑर्डर व बेकायदेशीर जमावास मनाई यांचा अमल चालू झाला; तो चालू होतांच त्याचा प्रभाव दिसूं लागून दंग्याला थोडासा उतार पडला. सरकारची आरंभीची ढिलाई त्यांच्या नजरेस आणून इतक्या भयंकर प्राणहानीच्या व वित्तनाशाच्या अपेशाचा वांटा मुंबईचे नागरिक सरकारच्या पदरांत कसा बांधीत आहेत याची ओळख सरकारास देण्याची जरुरी मुंबईच्या टाइम्स पत्रालाहि भासली. व अशा रीतीनें सरकारच्या धोरणावर दूषण ठेवण्यास जनतेला अखेर जागा राहिलीच.

या अपेशाचा वाटा कोणाकडे कितीहि प्रमाणांत जात असला तरी देशहितेच्छु मनुष्यास चिंता लागते ती ही कीं हिंदु व मुसलमान या हिंदुस्थानांतील दोन प्रचंड जातींचे लोक एकमेकांचीं डोकीं अशीं आणखी किती वर्षे फोडीत रहाणार ! हे अत्याचार हिंदु व मुसलमान यांना जितके लांछनास्पद आहेत तितके सरकारलाहि मान खालीं घालावयास लावणारे आहेत! इंग्रज सरकार आपणास सुधारलेलें म्हणवितें व त्यांच्या राज्यांत त्यांचे प्रजाजन वर्षानुवर्षे रानटी लोकांसहि न शोभणारे अमानुष प्रकार करीत रहातात याचा कमीपणा प्रजेप्रमाणें सरकारासहि वाटावयास नको काय ? दंगे झाले म्हणजे ते सरकार आपल्या पोलिसांच्या व सैनिकांच्या बळावर मोडतें हें ठीकच आहे. पण तेवढयानें शहाण्या व सुधारलेल्या राज्यकर्त्यांचें कर्तव्य संपत नाहीं. असले दंगे झाल्यावर राज्यकर्त्यांचें ते मोडण्यापेक्षां मुळांतच होऊं न देण्यांत खरें शहाणपण व थोरपण आहे.

दंगे होतात त्याला सरकारानें काय करावें असें कोणी विचारील. अशा शकेखोरानें गेल्या पाऊणशें वर्षांतील हिंदुस्थानचा इतिहास नीट वाचावा. तो वाचल्यास तितक्या वर्षांत हिंदु-मुसलमानांचा पहिला दंगा ठळकपणें सन १८९० मध्यें घडला असें त्यास आढळून येईल. सन १८९० पासून १९३२ पर्यंतच्या बेचाळीस वर्षांचे दोन खंड पाडले तर पहिला खंड १९२१ सालीं संपतो व दुसरा खंड १९३२ सालीं पुरा होतो. पहिल्या ३२ वर्षांच्या काळांत हिंदु-मुसलमानांत जितके दंगे झाले त्यापेक्षां शतपटींनीं अधिक दंग्यांनीं १९२१ सालानंतरचीं ११ वर्षे व्यापलीं आहेत. सन १९२० सालीं मॉंटेग्यू-चेम्सफर्ड सुधारणांचा कायदा अमलांत येऊन त्यानें सबंध राज्यकारभारांत हिंदु–मुसलमानांचे प्रतिस्पर्धी अशा सैन्यांच्या तळाप्रमाणें दोन तट निर्माण केले. ते अत्यंत मोठ्या प्रमाणावर निर्माण करण्यांत आल्यामुळें हिंदूंहून आपले राजकीय हितसंबंध भिन्न असल्याची भावना मुसलमानांत दृढावली. जे दोन समाज धर्मदृष्ट्या परस्परांहून मूळचेच भिन्न आहेत त्यांना एकाच देशात नांदावयाचें तर त्यांचा सामाजिक व राजकीय एकोपा व स्नेहसंबंध वाढविण्याचे जितके अधिक प्रसंग आणतां येतील तितके राज्यकर्त्यांनीं आणावयाचे कीं आहेत तेच प्रसंग कमी करावयाचे ? तसे स्नेहसंवर्धनाचे प्रसंग वाढविण्याऐवजीं त्यांजमधील दुही कायम राहण्याची किंबहुना वाढण्याची तरतूद स्वतंत्र मतदार संघांच्या योजनेनें करून ठेवल्यामुळें मुसलमानांच्या मनांत हिंदुसंबंधाची परकीय भावना, नव्हे शत्रुत्व कायमचें ठाणें देऊन बसलें व राजकीय दृष्ट्या हिंदूंचें जें हित तें आपलें अनहित अशी मुसलमानांची समजूत दृढ होत गेली.

मुसलमानांची शत्रुत्वबुद्धि मोपल्यांच्या दंग्यांत उघडपणें प्रकट झाल्यामुळें हिंदूंना आपल्या सामाजिक व धार्मिक संरक्षणासाठीं शुद्धि-संघटनेसारखे प्रतिकाराचे नवीन उपाय योजावे लागले. गेलीं दहा वर्षे हिंदू लोक या उपायांनीं आपल्यांतील प्रतिकारशक्ति वाढवीत आहेत व दौर्बल्य कमी करीत आहेत. त्यांचा हा उद्योग यशस्वी झाला असें केव्हां समजावयाचें ? तर जेव्हां मुसलमान दंगे करण्याचे थांबतील तेव्हां. झालेले दंगे सरकार आपल्या बळानें मोडीत असलें तरी दंगे चालू असतां प्रत्येक व्यक्तिमात्राचें संरक्षण करणें पोलिसांना व्यवहारतःच अशक्य असल्यानें हिंदुसमाजानें व त्यांतील व्यक्तींनीं स्वसंरक्षणास समर्थ बनलें पाहिजे हें कोणालाहि कबूल करावें लागेल. पण त्यामुळें होईल काय कीं हिंदु व मुसलमान हे दोन समाज परस्परांशीं हाडवैऱ्याप्रमाणें वागण्यास शिकतील. एकाच देशांत एकत्र नांदणाऱ्या या दोन समाजांचा हा चढता वैरभाव केव्हांहि हितावह नाहीं. त्याचीं मुळें सरकाराकडून सनदशीर रीतीनें उपटून निघण्याची वेळ हीच आहे. इंग्लंडचे मुख्य प्रधान मि. राम्से मॅक्डोनाल्ड यांनीं हिंदु–मुसलमानांमधील मतदारसंघ आदिकरून वादग्रस्त मुद्द्यांचा निर्णय देण्याची जबाबदारी आपणावर घेतली आहे व गोलमेज परिषदेच्या सल्लागार कमिटीनें ती त्यांजवर टाकलीहि आहे. त्या जबाबदारीचें महत्त्व व तिचे दूरवर पोंचणारे परिणाम ओळखून संयुक्त मतदारसंघासारख्या एकराष्ट्रीयत्वाची स्थापना व जोपासना करणाऱ्या हिंदुमहासभेच्या शिफारशी ते अंमलांत आणतील तरच हे दंगे थांबण्याची आशा आहे. नाहींपेक्षां ते उत्तरोत्तर वाढत जाऊन हिंदुस्थानांत या उभय जातींतील लोकांच्या रक्ताच्या नद्या वहातील अशी भीति वाटते. असें घडणें हिंदु–मुसलमानांस व तसेंच राज्यकर्त्यांसहि लांछनास्पद व अनर्थावहहि आहे.

हिंदु जातींतील पुढाऱ्यांतहि आज एकवाक्यता नाहीं. हिंदूंचे थोडे पुढारी हिंदुमहासभेच्या चळवळींत आहेत. परंतु जे तिजपासून अलिप्त आहेत अशा वजनदार हिंदु पुढाऱ्यांची संख्या फार मोठी आहे. राष्ट्रीय सभेंत हिंदु जातींच्या पुढाऱ्यांचें बहुमत असलें तरी ते तेथें हिंदू या नात्यानें न वागतां हिंदी या नात्यानें वागत आहेत.पण या वागणुकीचा राजकीयदृष्ट्या कांहीं फायदा न होतां हिंदूंचें नुकसान होत आहे अशी त्यांची खात्री झाल्यास हिंदू म्हणून नसली तरी परमेश्वरानें जन्माला घातलेलीं मनुष्यें म्हणून त्यांच्या प्राणाची व वित्ताची काळजी वहाण्याची जबाबदारी अंगावर घेऊन हिंदूंस प्रतिकारक्षम व स्वसंरक्षणक्षम बनविण्याच्या हिंदुमहासभेसारख्या संस्थेच्या

चळवळींत पडल्यावांचून त्यांना गत्यंतर राहणार नाहीं. कारण ब्रिटिश सरकारच्या धोरणांत बदल न झाल्यास मुसलमानांचे मतदारसंघ वेगळे रहाणार, त्यांचे प्रांत वेगळे होणार, त्यांच्या प्रांतांत अल्पसंख्याक हिंदूंना जगावें लागणार आणि त्यांच्यावर व अखिल हिंदु समाजावर प्रांतानिहाय वर्चस्व गाजवूं पहाणाऱ्या मुसलमानांपासून स्वतःचा बचाव करून घेणें हिंदूंना भाग पडणार. अशा वेळीं हिंदु जातींतील अखिल पुढाऱ्यांचें कर्तव्य हिंदु-मुसलमानांमधील दंगे थांबविण्याच्या दृष्टीनेंहि हिंदूंना धीट, संघटित, समर्थ व स्वसंरक्षणक्षम बनविणें हें एकच उरणार. पण त्याचा परिणाम मात्र हिंदुमुसलमानांचें वितुष्ट वाढण्यांत होऊन हिंदुमुसलमानांचे वारंवार असंख्य मुडदे पडतील, घरें लुटलीं जातील, कित्येक गांवें उजाड होतील, रक्ताचे पाट वहातील आणि साऱ्या देशभर कहर उसळून तैमूरलंगाचे, बल्बनाचे, नादिरशहाचे माणसाला माणूस खाणारे दिवस पुढील दहाबारा वर्षांत आठवावे लागतील असा निरोप मुंबापुरींत मातलेली यमपुरी अखिल हिंदी राष्ट्रास, हिंदूंस, मुसलमानांस, राज्यकर्त्यांस, सर्व जातींच्या प्रजाजनास, हिंदुस्थानसरकारास व ब्रिटिशसरकारास, लक्ष्मीच्या विटंबनेला, अग्नीच्या ज्वाळांना व मृतांच्या हळहळणाऱ्या आत्म्यांना साक्षी ठेवून सांगत आहे. त्यापासून आमचे राज्यकर्ते व मुसलमान बंधु शहाणे असले तर बोध घेतील. नाहींपेक्षां त्यांचें व सर्वांचें नष्टचर्य ठेवलेलेंच आहे.

# मुंबईतील मुसलमानांचा दंगा

सोमवारीं दंग्याचें स्वरूप पूर्वीपेक्षांहि जास्त भयानक झालें. लुटालुटी, आगी लावणें, खून, हाणामारी या प्रकारांनीं वातावरण क्षुब्ध होऊन सर्व शहरावरच मृत्यूची अवकळा पसरली. जिवाच्या भीतीनें शहर सोडून बाहेरगांवीं जाणारांची एकच गर्दी उसळली आहे.

घरें व दुकानें प्रथम लुटावयाचीं, त्यांतील माणसांना ते आसन्नमरण होईपर्यंत मारावयाचें व नंतर घरांना व दुकानांना आगी लावून द्यावयाच्या हा प्रकार सोमवारीं सारखा सुरू होता. कित्येक जळत्या घरांतून बायका--मुलांचे प्राण फायर ब्रिगेडच्या लोकांनीं मोठ्या शर्तीनें वांचविले.

भुलेश्वरीं मुसलमान गुंड हिंदूंचीं दुकानें लुटून लोकांना मारहाण करीत होते, पोलिसांचेंहि ते एकेनात तेव्हां पोलिसांस गोळीबार करावा लागला. ग्रँटरोडवर गाळपिठ्याजवळहि अशीं मारामारी झाली. एक हिंदु स्त्री आपल्या पतीसह गाडींतून जात असतां कांहीं अधमांनी त्या स्त्रीच्या पोटांत सुरी खुपसली व नवऱ्याच्या छातींत भोसकलें. ती स्त्री मरण पावली. तिचे पति अत्यवस्थ स्थितींत पडले आहेत.

सोमवारीं दंग्याची लाट गिरगांवभागांतहि पसरली. तेथें दुकानांची लूट झाली. तेथें मुसलमानांनीं एका मोटारींत बऱ्याच लाठ्या आणलेल्या उघडकीस आल्या. त्या बाबतींत बरेच लोक पकडण्यांत आले आहेत.

नंतर गुंडांची दृष्टि लोकल आगगाड्यांवरहि फिरली व त्यांनीं गाड्यांवर दगडांचा वर्षाव केला. सोमवारीं रात्रीं तर दंग्यास ऊतच आला. रात्रीच्या अंधाराचा फायदा घेऊन दंगेखोरांनीं बराच धुमाकूळ घातला. दंग्याच्या भागांत या रात्रींच ७ इसम ठार व १०० जखमी झाले. यावरून दंगेखोरांच्या अनन्वित अत्याचारांची कल्पना येईल! रात्रीं आगीहि पुष्कळ ठिकाणीं लावण्यांत आल्या. नळबाजारांतील बाबू खोटी रस्त्यावरील जैनमंदिर जाळून खाक करण्यांत आलें. मुसलमान गुंड हिंदूंच्या दुकानांतून चोरलेल्या कापडाच्या ठिकठिकाणीं होळ्या करूं लागले, अखेर त्यामुळें इतरत्र आगी लागूं नयेत म्हणून पोलिसांना त्या आगी विझवाव्या लागल्या.

कामाठीपुऱ्यांत एका पिराचें थडगें हिंदूंनीं फोडलें अशी मध्यंतरीं वार्ता पसरली. त्याबरोबर मुसलमानांच्या टोळ्या तिकडे धांवूं लागल्या. शेवटीं त्यांजवर पांच वेळां पोलिसांना गोळीबार करावा लागला. रात्रीं दहाच्या सुमारास सुमारें ५०० लाठीबंद मुसलमान मदनपुऱ्याच्या बाजूनें कामाठीपुऱ्यांत घुसले. पोलिसांनीं त्यांना उधळून लावतांच ते आसपासच्या गल्ल्यांत शिरले. तेव्हां त्या ठिकाणीं मशिनगनवाले लष्कर पहारा करण्यासाठीं ठेवण्यांत आलें. सोमवारच्या दंग्यांत पोलिसांना एकंदर वीस वेळां गोळीबार करावा लागला.

दंग्याच्या बंदोबस्तासाठीं बॉम्बे बॅटॅलियन सज्ज ठेवण्यांत आली असून खडकीहून तोफखान्यासह लष्कर पाठविण्यांत आलें आहे. खडकीच्या पांच चिलखती गाड्या सोमवारीं मुंबईस पोहोंचल्या. त्यांनीं सर्व शहरांत एक फेरी करून कांहीं ठिकाणीं दंगेखोरांवर गोळ्या झाडल्या.

मुंबईचे गव्हर्नर विश्रांतीसाठीं महाबळेश्वरीं गेले होते. त्यांस दंग्याची वार्ता समजतांच ते तांतडीनें पुण्यास येऊन विमानांत बसून पुण्याहून ५० मिनिटांत

लागलीच मुंबईस पोंचले. त्यांनीं सेक्रेटॅरिएटमध्यें सरकारी अधिकाऱ्यांच्या व मुसलमान पुढाऱ्यांच्या भेटी घेऊन त्यांच्याशीं विचारविनिमय केला !

सोमवारीं कॉर्पोरेशनमध्यें कन्सिलिएशन कमिटी भरून पोलिसांना मदत करण्यासाठीं एक हिंदु–मुसलमानांची संयुक्त कमिटी नेमण्यांत आली व दंग्याच्या भागातील हिंदु व मुसलमान कुटुंबांना कसें वांचवितां येईल याची चर्चा झाली.

सोमवारपर्यंत दंग्यांत ६६ माणसें ठार झालीं त्यांत ५२ हिंदू होते. एक हिंदु स्त्री गर्भवती असतां तिला भोकसून ठार करण्यांत आलें. मरण पावलेल्या लोकांत मुसलमानांच्या अत्याचारांमुळे मेलेल्या हिंदूंची संख्याच जास्त आहे. जखमी झालेल्या लोकांतहि हिंदूंची संख्याच जास्त आहे. पोलिसांनीं गोळीबार केला त्यांतील अठरा वेळां केलेला गोळीबार हिंदु वस्तींत झाला. अर्थात् त्यांत मेलेले व जखमी झालेले हिंदूच जास्त होत हें दिसून येतें.

मुसलमान मोहोल्यांतील हिंदूंच्या दुकानांची व वस्तीची मनस्वी नासाडी झाली आहे. चोर बाजारांत मुसलमान गुंड भिंती चढून हिंदूंच्या घरांत शिरले, व आंतील लोकांना भोसकून ठार करूं लागले. सोनापूरकडे जाणारी एक हिंदूंची प्रेतयात्राहि मुसलमानांनीं अडवली; अखेर पोलीसांनीं रस्ता मोकळा करून दिला.

गिरगांवांतील स्वदेशी गिरणीजवळ तर हिंदू-मुसलमानांची चांगलीच जुंपली. तेथें हिंदूंनीं पठाणांना खूप मार दिला. याखेरीज नळबाजार, गोलपिठा, खेतवाडी येथें मारामाऱ्या झाल्या. येथें पोलिसांना गोळीबार करावा लागला.नॉर्थब्रुक गार्डन-जवळ हिंदु-मुसलमानांत मोठी मारामारी झाली तेथेंहि पोलिसांस गोळीबार करावा लागला.

मशिदबंदर रोडवर मुसलमान व परदेशी भय्ये यांच्यामध्यें खूप कचाकची झाली. हिंदू मृतांची जाळण्याची व्यवस्था हिंदू रिलीफ कमिटी करीत आहे. सोमवारीं पोलिसांना नागपाडा, नळबाजार, महारबावडी. सँढर्स्ट रोड, भुलेश्वर, शेख मेमनस्ट्रीट, उमरखाडी,बेलासीसरोड, नॉर्थब्रुक गार्डन, कामाठीपुरा, खेतवाडी, मशिद बंदर रोड व मांडवी इतक्या ठिकाणीं वीस वेळां गोळीबार करावा लागला.

सोमवारीं पोलिसांनीं सुमारें २०० संशयित लोकांना अटक केली. दंग्याच्या भागांतील सुमारें १२ पोस्ट ऑफिसें तात्पुरतीं बंद ठेवण्यांत आलीं आहेत.

सोमवारीं लष्कर व पोलीस यांनीं विशेष दक्षता घेतली तरी दंगा थांबला नाहीं. सोमवारीं रात्रीं तर कहरच उडाला. सर्व रातभर शहरांतील दवाखान्यांतून जखमी माणसांचा प्रवाह सारखा वाहत होता. मोठमोठ्या राजरस्त्यांवरील चाळींना गुंडांनीं आगी लावल्या. शेंकडों दुकानें लुटण्यांत आलीं. जीवित व वित्त यांचें नुकसान तर कल्पनातीत झालें. प्राणाच्या भयानें दुकानदार आपली रोकड दुकानांत तशीच टाकून वाट सांपडेल तिकडे पळाले. शत्रूनें हल्ला करून शहराची जाळपोळ लूटमार केल्याची कल्पना मुंबईकरांस चांगलीच आली.

मंगळवारीं सकाळीं एकदम चार ठिकाणीं दंग्यास सुरुवात झाली. भेंडीबाजारांत मुसलमानांच्या अनेक टोळ्या जमून त्यांनीं पद्धतशीरपणें लुटालुटीस सुरुवात केली. हिंदूंचीं शेंकडो दुकानें लुटलीं. अनेक ठिकाणीं आगी लावल्या. दुपारीं उमरखाडी व भायखळा या भागांत दंग्याला विशेष जोर चढला. माधवबागेजवळ हिंदू राहत असलेल्या एका चाळीवर मुसलमानांनीं हल्ला करून ती पेटवून देण्याचा प्रयत्न केला. तेथें अखेर पोलिसांना गोळीबार करावा लागला.

भेंडीबाजाररस्ता ते पायधुणीपर्यंत सर्वत्र जाळपोळ, लुटालूट झाली. व आश्चर्य हें कीं या भागांत पोलिसाचा जागता पहारा होता. लोकांचीं घरे फोडून लुटालूट करण्यांत येत होती. लष्करी मोटारी दिसल्या कीं गुंड लोक लहान बोळांत शिरत, त्यामुळें त्यांचाहि नीट बंदोबस्त होईना. व गस्तवाले दृष्टीआड झाले कीं पुनः घरें दुकानें यांची लूट सुरू होई. अशा रीतीनें प्रत्येक दुकान टिपून लुटण्यांत आलें. हे मुसलमान लुटारू इतके धीट बनले कीं, आपलीं मुलेंलेकरें, स्नेहीसोबती बरोबर नेऊन त्यांना इच्छेस येईल तो जिन्नस दुकानांच्या लुटींतून त्याना देत.

परंतु गुंडांचें नुसत्या लुटीनें समाधान न होतां, जो माल नेतां येईना तो जाळून टाकीत. या भागांत पोलिसांना बराच वेळ गोळीबार करावा लागला तरीहि बदमाषांचे अत्याचार थांबले नाहींत. दुपारीं तर पुनः जोरानें लुटालुटीस सुरुवात झाली. सायंकाळीं सुरे व लाठ्या घेतलेल्या एका मुसलमानांच्या टोळीवर पोलिसांनीं हल्ला चढवून त्यांपैकीं तिघांना पकडलें.

अशीच परिस्थिति महमद अली रोड, मशीद बंदर, चकला, उमरखाडी, खोजा मोहोल्ला, चिंच बंदर या भागांत होती. पोलीस दिसले कीं गुंड पळावेत, पोलीस दृष्टीआड झाले कीं पुनः लुटालूट, मारहाण, जाळपोळ हे प्रकार चालावे. या भागांत पोलिसांनीं एकंदर सहा वेळां गोळीबार केला. परंतु तेवढ्यापुरते दंगेखोर पळत कीं पुनः जोरानें दंगा उसळे.

दंगेखोरांचा बेहोषपणा आतां वाढून त्यांनीं उमरखाडी पोस्टावर चाल करून तें जाळून टाकण्याचा प्रयत्न केला. गिरगांवांत विशेष दंगा झाला

नाहीं. कामाठीपुरा, बेलासिस रोड, फोरास रोड, फॉकलंड रोड या भागांत हिंदू-मुसलमानांची मिश्र वस्ती असल्यानें तेथें उभय पक्षांच्या सारख्या चकमकी झडत होत्या. तेथील दंग्यांत बरेच हिंदू व मुसलमान भोकसून मारण्यांत आले. कामाठीपुऱ्यांत कांहीं पठाणांनीं एका भय्याला ठार करून त्याला ओढीत आपल्या बिन्हाडीं नेलें. हा अघोरी प्रकार एका अँग्लो-इंडियन स्त्रीनें पाहिला व तिनें ही गोष्ट पोलिसांना कळविली. तेव्हां पोलिसांनीं १२ पठाणांना अटक केली. मदनपुराभागांत हिंदूंनीं एक मशीद लुटली अशी भुमका कोणीं उठविली. त्याबरोबर मुसलमान गुंड खवळल्यानें लुटालूट मारहाण यांस ऊत आला.

सर्व शहरभर मारो, काटो काफरिको असे शब्द मधून मधून सारखे ऐकूं येत होते. अशा रीतीनें परिस्थिति आटोक्याबाहेर जाणार असें पाहतांच मुंबईच्या चीफ प्रेसिडेन्सी मॅजिस्ट्रेटांनीं रात्रीं आठाच्या पुढें कोणीहि बाहेर पडतां कामा नये व पांच माणसांपेक्षां जास्त इसमांनीं रस्त्यांत जमाव करूं नये असा हुकूम काढला. हा हुकूम चौदा दिवस अमलांत राहणार आहे. मंगळवारच्या दंग्यांत ३२ माणसें ठार, २२८ जखमी, २४ ठिकाणीं जाळपोळ झाली व पोलिसांनीं २६ वेळां गोळीबार केला.

मंगळवार ता. १७ रोजीं हिंदू रिलीफ कमिटीच्या वतीनें सर पुरुषोत्तमदास प्रभृतींनीं ना. गव्हर्नरांची गांठ घेऊन कमिटीच्या कामीं कसे अडथळे येतात याची माहिती दिली. तेव्हां कमिटीच्या लोकांच्या संरक्षणासाठीं दहा लष्करी लोकांची मदत देण्याचें गव्हर्नरांनीं आश्वासन दिलें. मुंबई हिंदू रिलीफ, आर्यसमाज, इंडियन कॉटन एक्स्चेंज या संस्थांमार्फत हिंदु निराश्रितांना सर्व प्रकारची मदत देण्यांत येत आहे. मंगळवारीं रात्रीं सूटर रोडवरील विठ्ठलमंदिरावर मुसलमानांनीं हल्ला करून मूर्ती फोडून टाकल्या.

त्याच दिवशीं रात्रीं कर्फ्यू ऑर्डर लागू करण्यांत आली. परंतु दुसरे दिवशीं म्हणजे ता. १८ रोजीं सकाळीं पुनः दंग्यास सुरुवात झाली. गोल देवळाजवळ प्रथम दंगा उसळला, नंतर इतर भागांत तो पसरूं लागला. पायधुणी, नळबाजार, काळबादेवी, हेन्सरोड, भेंडी बाजार, क्वीन्सरोड या भागांत गोळीबार करावा लागला. लष्करी गस्त दिसेनाशी होतांच मुसलमान गुंड एकट्यादुकट्या हिंदूवर हल्ला करून त्यास ठार करीत. डिलाईलरोडवर दोन भय्ये ठार करण्यांत आले. हेन्स रोडवरहि दोन हिंदू ठार मारण्यांत आले.

सर्व शहराला अत्यंत भेसूर स्वरूप—स्मशानवत्—प्राप्त झालें आहे. जिकडेतिकडे आगी, मालाची नासधूस, रस्त्यावर दगड, विटा व दुकानांतील माल पडलेला दिसतो.

बुधवार ता. १८ रोजीं मुसलमान गुंडांनीं नवीच शक्कल काढली. हिंदूच्या वेषानें हिंदूंत मिसळावयाचें व संधि सांपडतांच एखाद्या हिंदूला भोसकून पसार व्हावयाचें, असा प्रकार कांहीं ठिकाणीं झाला.

अबदुल रहिमान स्ट्रीटवर मुसलमानांनीं एका राकेल तेलाच्या दुकानावर हल्ला केला व तें पेटवून देण्यापूर्वी प्रथम फोनच्या तारा तोडून नंतर दुकानास आग लावून दिली. आग विझविण्यास बंब आले असतां त्यांवर दगडफेक करण्यांत आली. गोलपिठ्यावरहि अनेक हिंदूंचीं दुकानें जाळण्यांत आलीं.

बंदोबस्तासाठीं आणलेल्या लष्कराचा मुक्काम राणीच्या बागेंत आहे.

बुधवारच्या दंग्यांत मध्यरात्रीपर्यंत २४ इसम ठार व ११५ जखमी झाले. शहरांतील ४० गिरण्या बंद पडल्या असून रेल्वे वर्कशॉपमधील कामगारहि बाहेर पडले आहेत! दंग्यानिमित्त सर्व प्रकारच्या दारूचीं दुकानें बंद करण्यांत आलीं आहेत.

दंग्यास सुरुवात शनिवारीं झाली व बुधवारपर्यंत त्याचा जोर कमी झाला नाहीं. शेंकडों माणसें प्राणास मुकलीं, हजारों जखमी झालीं. आगीमुळें झालेलें नुकसान व लूटमारींत झालेलें नुकसान याचा अंदाजच करणें कठिण आहे. परंतु एवढी गोष्ट निखालस खरी आहे कीं, या दंग्यांत प्राणाची व वित्ताची भयंकर हानि झाली असेल तर ती हिंदूंची होय.

शहराला कर्फ्यू ऑर्डर व १४४ कलम लागू केलें असल्यानें यापुढें दंग्यास उतार पडेल असें म्हणण्यास हरकत नाहीं.

### दंग्यांतील बळी व अत्याचार

| | ठार झालेले | जखमी झालेले |
|---|---|---|
| शनिवार | ५ | ९६ |
| रविवार | २९ | ३७१ |
| सोमवार | ३४ | ३०६ |
| मंगळवार | ३२ | २२८ |
| बुधवार | २४ | १५९ |
| एकूण | १२४ | ११६० |

**( टेलिफोनवरून )**

गुरुवार ता. १९ रोजीं सायंकाळीं ४ वाजेपर्यंत मुंबईहून आलेल्या बातमीवरून असें समजतें कीं त्या दिवशीं एकंदर १० इसम दंग्यामध्ये मृत्युमुखीं पडले व ५१ इसमांना जखमा झाल्या. दंगा गिरण्यांतील भागांत पसरत असून त्या दिवशीं ७० गिरण्यांपैकीं ४९ गिरण्या बंद पडून सुमारें ५० हजार मजूर रस्त्यानें हिंडत होते. इतरहि गिरण्या लवकरच बंद होतील अशीं चिन्हें दिसतात.

# वसंतव्याख्यानमाला

(६) श्री. व्ही. के. ताम्हने यांचें श्री. ल. ब. भोपटकर यांच्या अध्यक्षतेखालीं **'प्राचीन काळांतील गुन्हे आणि त्यांची शासन-पद्धति'** या विषयावर रविवार ता. ८ रोजीं व्याख्यान झालें. व्याख्याते आपल्या भाषणांत म्हणाले, "प्राचीन काळीं एकंदर समाजांत शांतता राहण्याकरितां गुन्हेगारांना कडक शिक्षा देण्याची चाल होती. स्त्रियांना अधिकारहि योग्य दिलेले असत. पूर्वीची शासनपद्धति उत्कृष्ट असल्यामुळें राजा व प्रजा यांमध्यें सलोखा नांदत होता. या शासनपद्धतींत धार्मिक बंधनेंहि होतीं. त्या काळीं धर्मयुद्धें होत, पण त्यांत पाश्चात्य राष्ट्रांप्रमाणें जाळपोळ, लूट वगैरे प्रकार होत नसत. पाश्चात्य देशांतील पार्लमेंट जनतेच्या बहुमताप्रमाणें होण्यास कित्येक वर्षें लागलीं व तीं तशीं होण्यास राजा व प्रजा यांच्यामध्यें कित्येक रणसंग्राम झाले. कित्येक लोक मृत्युमुखीं पडले. पण असा प्रसंग आमच्या देशांत मुळींच आला नाहीं. याचें कारण मनु, याज्ञवल्क्य वगैरे स्मृतिकारांनीं सर्व काळीं सर्व समाजाला आणि राजाला हितकारक होतील, त्यांच्यामधील सलोखा वाढेल असेच कायदे केले व दोघांनाहि ते कायदे पाळण्याची आज्ञा स्मृतिकारांनीं केलेली आहे. विदेशी धर्मानुयायाचे कित्येक हल्ले आर्यांच्यावर झाले, किती तरी उलाढाली त्यांनीं केल्या. पण अखेर आर्यांची शासनपद्धतिच सर्वांना पुरून उरली. इतकेंच नव्हे तर आज विसाव्या शतकांतील सुधारणाप्रिय अशा राष्ट्रांनाहि तीं संमत झाली." वरील आशयाचें वक्त्यांचें भाषण झाल्यावर अध्यक्षांचें समारोपादाखल भाषण झालें.

ते म्हणाले, "हल्लींच्या कायद्याचें स्वरूप कसें आहे हें मी तुम्हाला तीन प्रकारांनीं सांगणार आहें. चालू राज्यव्यवस्थेंत प्राचीन काळांतील कायदे आज पायाखालीं कसे तुडविले जात आहेत याचें विवेचन एकदोन उदाहरणें देऊन मी आज करणार आहें. खून करून तो सपशेल कसा पचवावा आणि प्रत्यक्ष फांशीं न जातां थोडक्या दंड किंवा शिक्षेवर कसें निसटून जावें याची युक्ति स्मृतिकारांनीं सांगितलेली नाहीं. पण आज असा मार्ग वकिलाला कायद्यांतून खात्रीनें शोधून काढतां येतो. तसेंच मोटारड्रायव्हरानें आपल्या मोटारीखालीं एखाद्या माणसाचा बळी घेऊनदेखील त्याला दंडावर किंवा शिक्षेवर कसा सोडवावा याचा मार्ग चालू कायद्यांतून वकिलाला बरोबर सांपडतो. दुसऱ्याकडून पैसे उसने म्हणून काढावयाला पाहिजेत आणि तें कर्ज परत फेडावयाची जबाबदारी जर ऋणकोला नको असेल तर त्यांतून त्याला सहीसलामत कसें बाहेर काढावें हेंहि आमच्या कायद्यानें आम्हांला शिकविलें आहे. तात्पर्य, सांगण्याचा आशय हा कीं हल्लींच्या कायद्यांत जनतेला स्वास्थ्य, संरक्षण अगर सुरक्षितता मुळींच नाहीं.

जंगलसत्याग्रहांत एखाद्या तरुणानें थोडें गवत कापलें कीं दे त्याला २ वर्षें शिक्षा! एखादें लहान मूल हातांत राष्ट्रीय झेंडा घेऊन विश्रामबागेंत गेलें कीं पाठीव त्याला दोन वर्षें तुरुंगाची हवा खावयाला! आणि अशी परिस्थिति राज्यकर्त्यांनीं कायदेशीरपणानें उत्पन्न केली आहे. मामलेदार, मॅजिस्ट्रेट किंवा न्यायाधीश होण्याला कायद्यांत प्रवीणच व्हावें लागतें असें मुळींच नाहीं. कोवळ्या आय. सी. एस.नें कायद्याचें अनुभविक ज्ञान नसतांना हायकोर्ट जज्ज व्हावें आणि त्याच्यापेक्षां अधिक वर्षें ज्यानें प्रत्यक्ष खटले चालवून अनुभविक ज्ञान प्राप्त करून घेतलें आहे त्याचा या पोरानें वाटेल तसा उपमर्द करावा! मनु याज्ञवल्क्य याना गोऱ्या साहेबाबरोबर हिंदी लोकांनीं नांवें ठेवावींत हें मला पसंत नाहीं. हिंदी लोकांना कायदा बनवितां येत नाहीं; पण हे साहेब लोक मनु—याज्ञवल्क्यांच्या स्मृतीविषयीं त्यांना पूर्ण अज्ञान असतांनासुद्धां दायविभाग आणि हिंदु कायदा यांविषयीं मन मानेल तसे प्रलाप काढून आपले अज्ञानमूलक अजब शोध कायद्याच्या रूपानें आम्हांवर लादतात. हा कायदेशीर अन्याय यापुढें आम्ही सहन करणार नाहीं. स्वराज्य मिळाल्यावर प्रथम जर कोणती गोष्ट करावयास पाहिजे असेल तर ती प्रचलित कायदे बदलणें ही होय.

हिंदुस्थानांत जी गोष्ट भयंकर गुन्हा म्हणून गणली जाते तीच रशियांत क्षुल्लक बाब म्हणून समजली जाते. ठराविक संपत्ति व ठराविक धान्य यांच्या नियमांचें जर कोणी अतिक्रमण करील तरच त्याला रशियांत फांशीची शिक्षा होते. आणि एकानें दुसऱ्या माणसाचा प्रत्यक्ष खून जरी केला तरी तो मौजेखातर केला म्हणून समजला जातो. लेनिनच्या तत्त्वज्ञानाचा खून करणारास प्रतिखुनाचें बक्षीस मिळतें. जी गोष्ट रशियांत तीच आयर्लंडमध्यें दिसून येते. कॉसग्रेव्ह, डी व्हॅलेरा यांचीं थोड्याफार फरकानें मतें भिन्न आहेत. ज्या डी व्हॅलेरांना अलीकडे समाजांत स्थान नव्हतें तेच व्हॅलेरा आज मुख्य प्रधान म्हणून निवडून आले. आजपर्यंत देशभक्तांना फांशी तुरुंग वगैरेंची शिक्षा

भोगावी लागली असती तरी माझे कायदे असे नाहींत. मी जो इतकी यातायात करून येथें आलों आहें ते माझ्या सुखाकरितां नसून जनता-जनार्दनाचें कल्याण करण्याकरितां आलों आहें. जसे रशिया व आयर्लंड यांचे कायदे आहेत तसेच कदाचित् पुढेंमागें हिंदुस्थानांतहि होतील. आजच्या कायद्यानें ज्या देशभक्तांना फांशी, तुरुंग वगैरे शिक्षा भोगावी लागत आहे तशाच शिक्षा हल्लींच्या न्यायासनाधिष्ठित व असले कायदे करणाऱ्यांना मिळणार नाहींत म्हणून कोणीं सांगावें ? भावी काल कसा पालटेल हें आज निश्चयानें काय सांगतां येणार ? प्राचीन कालाची राज्यपद्धति त्रिकालाबाधित टिकणारी होती. त्या कालीं गुन्ह्यांचें प्रमाणहि कमी असे. शिक्षा जबर व योग्य अशाच दिल्या जात असत. या आशयाचें अध्यक्षांचें भाषण झाल्यावर सभा संपली.

## पौर्वात्य राष्ट्रांवरील संकट

(७) श्री. पां. वा. गाडगीळ यांचें " पौर्वात्य राष्ट्रांवरील संकट " या विषयांवर श्री. वा. कृ. भावे यांच्या अध्यक्षतेखालीं गुरुवार ता. १२ रोजीं व्याख्यान सुरू झालें. व्याख्यात्यांनीं आपल्या विषयाची प्रास्ताविक माहिती सांगून मुख्य विषय सांगण्यास सुरुवात केली तोंच वादळ व पाऊस येण्याला सुरुवात झाली आणि या अस्मानी आपत्तीमुळें व्याख्यान बंद करावें लागलें.

## हिंदु कायद्याची सुधारणा

(८) श्री. ल. ब. भोपटकर यांचें 'हिंदु कायद्याची सुधारणा ' या विषयावर रावबहादुर चिन्मुळगुंद यांच्या अध्यक्षतेखालीं शुक्रवार ता. १३ रोजीं व्याख्यान झालें. अध्यक्षांचें प्रास्ताविक भाषण झाल्यावर व्याख्याते आपल्या भाषणांत म्हणाले, "अलीकडे हिंदु कायद्याची सुधारणा या विषयाकडे बऱ्याच लोकांचें लक्ष लागत चाललें आहे. दहा वर्षांपूर्वी आपली अशी कल्पना होती कीं, कोर्टांतून अमलांत येणारा हिंदूंच्या हक्कसंबंधींचा कायदा सर्वोत्तम आहे. पण कालांतरानें समाजाची जसजशी परिस्थिति बदलत चालली तसतशी या कायद्यांत सुधारणा व्हावी असें लोकांना वाटूं लागलें आणि याचें कारण म्हणजे कोर्टांतून या चालू कायद्याच्या आवरणाखालीं रोज धडधडीत अन्याय घडूं लागले हें होय !

समाजांत मुख्यतः कायद्याच्या दृष्टीनें तीन व्यक्तींचा मुख्यतः विचार करावयास पाहिजे. बायको, मुलगी व विधवा. या तीनहि व्यक्तींच्या बाबतींत कायद्याखालीं जे अन्याय चालू आहेत ते बदलण्याकरितां हल्लींच्या कायद्यांत सुधारणा करणें अत्यंत जरूर आहे. अशा तऱ्हेचा प्रयत्न बडोदें व म्हैसूर या दोन संस्थानांतून झाला. या संस्थानिकांनीं कायदेपंडितांच्या कमिट्या नेमून, त्यांच्या अभिप्रायाप्रमाणें कायद्यांत योग्य त्या सुधारणा घडवून ते कायदेहि अमलांत आणण्यास सुरुवात केली. त्याचप्रमाणें येथील मीमांसा विद्यालयातर्फेंहि याच विषयावर पांचसहा व्याख्यानें झालीं. पण त्यांचा इकडील कोर्टांच्या कायद्यांत सुधारणा होण्याकडे बिलकुल उपयोग झाला नाहीं. ज्या अर्थीं हिंदु कायद्यांत सुधारणा करावयास पाहिजे असें आपण म्हणतों त्याअर्थीं त्यांत कांहीं तरी वैगुण्य असलें पाहिजे हें खास. सुधारणा याचा अर्थ निवळ चांगली धारणा असा घेऊन चालणार नाहीं. कारण हल्लीं कुधारणाहि कायद्याच्या दृष्टीनें सुधारणा म्हणूनच गणल्या जात आहेत!

आतां प्रथम हिंदु कोणास म्हणावें हें पाहूं. आपली सामान्यपणे अशी कल्पना असते कीं, जो चातुर्वर्ण्य व आश्रमपद्धति मान्य करतो तो हिंदू. पण कायद्याच्या दृष्टीनें हा अर्थ बरोबर नाहीं. आजमितीला कायद्याप्रमाणें सनातनी, ब्राह्मो, ख्रिश्चन, मुसलमानहि हिंदू समजला जातो. हिंदू कोणास म्हणावें यावद्दलच्या वाटाघाटीला सर्व न्यायाधीश कंटाळले आणि परवां मद्रासच्या एका न्यायाधिशानें हा त्रास चुकवावा म्हणून असें सांगून टाकलें कीं, जो आपणाला हिंदू म्हणवून घेईल तो हिंदु समजावा. तेव्हां कायद्याच्या दृष्टीनें हिंदु या व्याख्येचा जो सावळागोंधळ उडालेला आहे त्यांत आपणास सुधारणा करावयाची आहे, हें लक्षांत ठेवा. एखादा मनुष्य ख्रिश्चन झाला तर त्याला बापाची इस्टेट मिळते आणि उलट एखादा युरोपियन जर हिंदू झाला तर त्याला मात्र बापाची मिळकत मिळत नाहीं. इंग्रजांनीं आपलें बूड येथें टेकल्याबरोबर हिंदु समाजावर अप्रत्यक्ष रीतीनें कसे घाले घालतां येतील इकडे लक्ष ठेवून कायदे तयार केले. हल्लींचा कायदा म्हणजे एक अनोळखी विचित्र जनावर आहे असें वाटतें. आमच्या वाडवडिलांनीं, मनु, याज्ञवल्क्य वगैरे स्मृतिकारांनीं जे कायदे करून ठेवले आहेत ते असे घेडगुजरी नाहींत. पण सरकारनें ते कायदे जवळजवळ नामशेष करून आणि कांहीं कांहीं कायद्यांचा अर्थ आपल्या मनाला वाटेल तसा करून चालू कायदे निर्माण केले आहेत. पण याच कायद्यामें लग्न, दत्तविधान, औरस, अनौरस संतती वगैरे गोष्टी खऱ्या कीं खोट्या हें ठरत आहे. जसा हिंदु या शब्दाचा कायद्यांत गोंधळ आहे, तसाच कायदा या शब्दाबद्दलहि असलेला आपणांस आढळून येईल.

हल्लीं कायदा या शब्दाचा सामान्यतः असा अर्थ

करण्यांत येतो कीं, जेत्यांनीं जितांवर घातलेलीं बंधनें. पण पूर्वी मनु किंवा याज्ञवल्क्य यांनीं कायदा या शब्दाचा निराळा अर्थ केला आहे आणि तोच बरोबर आहे. त्यांची व्याख्या अशी कीं, समाजांत सुव्यवस्था राहाण्याकरितां निःपक्षपातीपणाच्या दृष्टीनें घालून दिलेले नियम किंवा तत्त्वें म्हणजे कायदा. मनु किंवा याज्ञवल्क्य हे कांहीं राजे नव्हते. पण त्यांनीं केलेले कायदे हे समाजांतील व्यवस्थेला परिपोषकच होतील अशी समाजाची खात्री होती. हल्लीं कायदा मोडला कीं तुरुंगांची शिक्षा होते. पण पूर्वी राजदंडाची शिक्षा नसून अपराध करणाऱ्याला जातीबाहेर टाकून समाजच त्याला शिक्षा करी. या शिक्षेला लोक फार भीत आणि त्या काळचे कायदेहि असे परिणामकारक होते कीं, सहसा मनुष्य ते मोडीत नसे.

हल्लीं इंग्रज कायदेपंडितांची अशी एक प्रवृत्ति होत चालली आहे कीं, पूर्वीच्या कायद्यावरील हिंदु समाजाचा विश्वास शक्य तों कमी करावा. हिंदु कायदा बिन—आधारावर रचण्यांत आला आहे. बरें, या कायद्याचें खरें-खुरें ज्ञान खालच्या कोर्टापासून तों थेट प्रिव्ही कौन्सिलपर्यंत एकाला तरी असेल कीं नाहीं याची शंकाच. आणि अशा कोर्टापुढें हिंदु समाजांतील भांडणांचे खटले चालणार, आणि हे कायदेपंडित त्यांचा हिंदु कायद्याप्रमाणें निकाल देणार! हिंदुस्थानाबाहेर असा कोठेंहि कायदा नाहीं कीं,मुलानें बापाची ईस्टेट घेतली तर ती आब्सोल्यूट ईस्टेट म्हणून मानली जावी. पण हा कायदा येथें लागू आहे. आणि या कायद्याला प्रमाण काय तर मयूखामध्यें असलेलें एक लहानसें वाक्य! असाच ट्रस्टसंबंधीं एक विचित्र कायदा हिंदुस्थानात होता. ट्रस्टसंबंधीं जर खटला करावयाचा असेल तर तो मॅजिस्ट्रेटची परवानगी घेऊन करावा, असा मूळ कायदा. पण पुढें याला असें एक शेपूट जोडण्यांत आलें कीं, मॅजिस्ट्रेटच्या परवानगीबरोबर हिंदुस्थान सरकारचीहि परवानगी घेण्यांत यावी! पण कालांतरानें फारच तक्रारी होऊं लागल्या म्हणून वरील कायद्यांत पुनः दुरुस्ती करण्यांत आली. खरेदी खताप्रमाणें साठेखतहि रजिस्टर करण्यांत यावें असा एक कायदा झाला होता, पण पुढें सरकारला या अटीलाहि तिलांजली द्यावी लागली. पण हा कायदा अमलांत असतांना कित्येक लोकांचें जे भयंकर नुकसान झालें त्याला जबाबदार कोण?

आतां मला जर कोणी हिंदू कायद्यांत सुधारणा करावयास सांगितलें तर मी आतांपर्यंत जेवढे लॉ रिपोर्टस प्रसिद्ध झाले आहेत तेवढे प्रथम जाळून टाकून नामशेष करीन आणि मग प्रत्येक बाबतींत लोकमत घेऊन नवीन कायदे तयार करीन. हल्लीं सरकारची अशी वृत्ति आहे कीं, जेवढी जखम होईल तेवढ्यावरच मलमपट्टी बांधावयाची; पण सबंध शरीरच जेथें नासलें आहे तेथें अशा तात्पुरत्या उपायानें काय होणार? स्मृतींतील कायद्याप्रमाणें जर विधवांना हक्क दिले तर ते त्यांना इतके मिळतील कीं, यांपैकीं कांहीं हक्क कमी करावेत अशी उलट तक्रार करावी लागेल. पण आजच्या कायद्याप्रमाणें विधवांना धड अन्नवस्त्रहि मिळत नाहीं अशी शोचनीय स्थिति झाली आहे. प्रिव्ही कौन्सिलमधील कायदेपंडित, या हिंदु कायद्याच्या बाबतींत इतके ज्ञानी आहेत कीं स्त्रीधनासंबंधींच्या एकाच स्वरूपाच्या खटल्याचा निकाल चार निरनिराळ्या तऱ्हेनें देतात! तेव्हां अशा तऱ्हेनें बजावल्या जाणाऱ्या कायद्याला 'कायदा' तरी कां म्हणावें हेंच मुळीं समजत नाहीं. तसाच नवीन झालेला पार्टनरशिपबद्दलचा कायदा. या कायद्यांतील शब्द इतके लवचिक आहेत कीं, न्यायाधिशानें त्याचा अर्थ आपणास वाटेल तसा करावा!

असाच पोरखेळ हल्लीं दत्तविधानांत चालू आहे. मनुस्मृतींत मुलासारखा वागणारा, आपलें नांव राखणारा आणि आपल्या पाठीमागें श्राद्ध पक्ष वगैरे करणाऱ्या मुलाला दत्तक घ्यावा असें उच्च तत्त्व दत्तविधानासंबंधीं आहे. पण हल्लीं लहान मुलगी वाटेल त्या वयाच्या मनुष्याला दत्तक म्हणून मांडीवर घेते आणि अशा गोष्टीला कायद्याची संमति मिळते! कायद्याप्रमाणें या विधीला होमहवन कांहीं लागत नाहीं. फक्त देवघेव सिद्ध झाली कीं दत्तविधान कायदेशीर होतें. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे बाजारांतून जनावर विकत आणून आपल्या गोठ्यांत बांधण्यापैकींच हा प्रकार होतो. आमच्या हिंदु कायद्याचें मुख्य तत्त्व असें आहे कीं, मनुष्यानें आपलें व्यक्तित्व आपल्या कुटुंबाच्या अस्तित्वांत गुरफटून टाकलें पाहिजे. हें उच्च तत्त्व चालू कायद्यांत मुळींच दिसून येत नाहीं. हिंदु धर्माचें वैशिष्ट्य दत्तविधानांत आहे. इंग्लंडमध्येंहि महायुद्ध संपल्यानंतर दत्तक घेण्यास सुरुवात झाली आहे. आणि हिंदुस्थानांत पूर्वीपासून चालत आलेल्या या धार्मिक विधीचा असा खेळखंडोबा होत आहे! पूर्वीच्या कायद्याप्रमाणें जर अंमलबजावणी करावयाची असेल तर ज्या न्यायाधीशांना संस्कृत येत असेल व ज्यांनीं स्मृतीचा अभ्यास केला असेल असेच न्यायाधीश नेमण्यांत यावेत. व त्यांच्यापुढें खटले चालावेत.

आतां हिंदु कायद्यांत जर खरोखरी सुधारणा करावयास पाहिजे असेल तर ती माझ्या मताप्रमाणें

खालील गोष्टींत करावी. हिंदु कोणास म्हणावें याबद्दलचे जे नियम आहेत त्यांत येणारा मनुष्यच फक्त हिंदू म्हणून समजला जावा. व त्यालाच हिंदू कायदा लावण्यांत यावा. स्त्री–पुरुषांना सारखे हक्क यावेत. पण त्याबरोबरच स्त्रियांनीं पुरुषाइतकीच संसारांतील जबाबदारी आपल्या अंगावर घेतली पाहिजे. लग्न आणि घटस्फोट यांचें स्वातंत्र्य असावें. पुरुषांना जशा दोन बायका करण्याचा हक्क आहे तसा स्त्रियांना दोन पती करण्याचा हक्क असावा. स्त्रीधन कशास म्हणावें याबद्दल स्मृतींनें जें सांगितलें आहे तें सर्व धन स्त्रियांना मिळावें. दत्तविधानांस कांहीं तरी नियंत्रण घालण्यांत यावें. तसेंच मुलींनीं आपला नवीन संसार योग्य तऱ्हेनें सुरू करण्याकरितां आईबापाकडून हुंडा म्हणून किंवा सेटलमेंट म्हणून कांहीं पैसा अवश्य घ्यावा." वरील आशयाचें श्री. भोपटकर यांचें भाषण झाल्यावर अध्यक्ष समारोप करतांना म्हणाले, 'आतां व्याख्यात्यांनीं हिंदु कायद्यांत ज्या सुधारणा करा-व्यात म्हणून सांगितल्या त्या मलाहि मान्य आहेत. आणि या व असल्याच तऱ्हेच्या दुसऱ्या सुधारणा घडवून आणण्याकरितां वकिलांचें एक मंडळ नेमावें, पण या मंडळांत जे वकील नाहींत अशा गृहस्थांचें बहुमत असावें. म्हणजे कोणतीहि दुरुस्ती करावयाची झाली तर ती लोकमताप्रमाणें व्हावी. त्याचप्रमाणें व्याख्यात्यांनीं हुंड्याविषयीं जें सांगितलें तेंहि मला मान्य आहे." या आशयाचें अध्यक्षांचें भाषण झाल्यावर सभा संपली.

---



# बाबू बिपिनचंद्र पाल यांचा मृत्यु

राष्ट्रीय सभेने कलकत्त्यास १९०६ सालीं केलेल्या स्वराज्य व स्वदेशी या जोडमंत्राच्या घोषणेचा पुरस्कार आपल्या पहाडी व दणदणीत वक्तृत्वानें करून अखिल हिंदुस्थानाला गदगदा हालविणारे पहिल्या प्रतीचे देशभक्त श्री. बाबू बिपिनचंद्र पाल यांस शुक्रवार ता. २० मे रोजीं कलकत्ता येथे देवाज्ञा झाली. या बातमीने सर्व हिंदवासीयांचीं अंतःकरणें दुःखाने व्याप्त होतील यांत शंका नाहीं. सत्तावन सालच्या बंडानंतर म्हणजे १८५८ सालीं बिपिन बाबू यांचा बंगाल्यांत सिल्हट गांवीं जन्म झाला. त्यांचे वडील नामांकित वकील असून ते आपल्या बुद्धिचातुर्याने डिस्ट्रिक्ट मुनसफीच्या जागेपर्यंत चढले होते. बिपिन बाबू हे त्यांचे एकुलते एक पुत्र होत.

बुद्धिचातुर्य व कर्तृत्वशक्ति या गुणांत बिपिन बाबू हे आपल्या वडिलांस शोभेसे–किंबहुना 'सवाई'च–होते. मॅट्रिकची परीक्षा ते लहान वयांतच उत्तीर्ण झाले. त्यानंतर त्यांना पुढील शिक्षणासाठी वडिलांनी कलकत्ता येथे नेलें. तेथे असता त्यांचें लक्ष ब्राह्मो समाजाकडे लागलें. त्यावेळीं बंगाल्यांत ब्राह्मो पंथ मूळ धरून वाढीस लागत होता. आणि केशवचंद्र सेनांसारखे वक्तृत्वसंपन्न व्याख्याते तरुणांच्या मनांत त्या पंथाचीं बीजें पेरण्याचें काम झपाट्याने करीत होते. देवेंद्रनाथ टागोरांसारखे कित्येक विद्वान ब्राह्मो समाजाचे आत्यंतिक उपासक म्हणून तरुण पिढीच्या डोळ्यांपुढे दिसत होते. या परिस्थितीचा, आणि मुख्यतः केशवचंद्रांच्या व्याख्यानांचा, पगडा तरुण बिपिन बाबूंच्या मनावर फार बसला इतका कीं, त्यांनी त्या पंथाचा स्वीकार केला आणि तसें करतांना आपले वडील, आपले आप्तेष्ट, यांनी परावृत्त करण्यासाठी केलेल्या प्रयत्नांना त्यांनी मुळींच जुमानलें नाहीं. एखादें तत्त्व बुद्धीला पटलें कीं त्याची एकनिष्ठ उपासना करावयाची आणि तींत येणारा सर्व विरोध पचनीं पाडावयाचा हा निश्चयीपणा, करारीपणा पालबाबूंच्या पुढील आयुष्यांत जो दिसून येतो, तो प्रथमावस्थेमध्येहि तितक्याच तीव्रतेने आढळत होता.

या वेळीं त्यांचें वय अवघें अठरा वर्षांचें होतें. पण ब्राह्मो समाजाचें तत्त्व त्यांनी एकदा जें हृदयांत धारण केलें, तें कोणत्याहि आपत्तीला भिऊन त्यांनी सोडलें नाहीं. त्या काळीं ब्राह्मो समाजीय बनण्यांत पुराणमताभिमानी लोकांना बाटून ख्रिस्ती होण्याइतकेंच 'अब्रह्मण्यम्' वाटे. बिपिनबाबूंचे वडील तर मुलाच्या या 'अधार्मिक' वर्तनामुळे अगदी खवळून गेले. 'तुझें तोंडहि मी पहाणार नाहीं' असें

त्यांनी त्यांस सांगितलें आणि त्याप्रमाणे दहा वर्षें पितापुत्रांचें मुखावलोकनदेखील झालें नाही. एवढेंच नव्हे तर, जुन्या पिळाच्या त्या पित्याने जें मृत्युपत्र करून ठेवलें, त्यांत आपल्या एकुलत्या एक पण 'धर्मलंड' निघालेल्या मुलाला एक कपर्दिकहि ठेवलो नाही; तथापि त्यामुळे बिपिन बाबू डगमगले नाहीत. त्यांनी ब्राह्मो पंथाचा अभ्यास व आचरण अप्रतिहतपणे चालू ठेवलें. शेवटीं त्यांची तत्त्वनिष्ठा फळाला आली व ती वडिलांनाहि पटली. तिचें तेजस्वी स्वरूप पाहून वडील संतुष्ट झाले आणि अंतकालीं त्यांनी आपली पंचवीस हजार रुपयांची सर्वच्या सर्व जिंदगी बिपिन बाबूंच्याच हवालीं केली. यापुढेहि बिपिनबाबूंची ब्राह्मो समाजावरील निष्ठा अढळ राहिली. कांही वर्षांनंतर कलकत्त्याच्या नगरमंदिरांत बाबू कालीचरण बानर्जी यांची ख्रिस्ती धर्मावर व्याख्यानें झालीं; त्या वेळीं त्यांनी ब्राह्मो समाजाच्या मतावर हल्ला केला. त्याला तोंड देण्याचें काम बिपिन बाबूंनी बजावलें आणि सहा उत्कृष्ट व्याख्यानांची एक माला गुंफून ब्राह्मो समाजाचें समर्थन केलें.

धार्मिक क्षेत्रांतील या तत्त्वनिष्ठेप्रमाणेंच सामाजिक कार्यांतहि त्यांनी आचरण ठेविलें. आपल्या समाजांतील अन्याय पाहून त्यांना चीड येई, व्यंगे पाहून त्यांना कीव येई आणि ते अन्याय व तीं व्यंगें दूर करण्यासाठी त्यांचा अंतरात्मा तळमळत असे. समाजसुधारणेसंबंधीं त्यांचीं मतें पुढारलेलीं होतीं, एवढेंच नव्हे तर आपले वर्तनहि त्यांना अनुसरूनच ते ठेवीत. त्यांची पहिली पत्नी निवर्तल्यावर त्यांनी पुनः विवाह केला तो सुरेंद्रनाथ बानर्जींच्या विधवा पुतणीशीं केला आणि त्यामुळे ते कर्ते सुधारक' म्हणून गणले गेले.

त्यांची ही निर्भय तत्त्वनिष्ठा राजकीय भट्टींत तर विशेषच तावूनसुलाखून निघाल्यामुळे अधिकच चमकदार झाली. धर्मकारण व समाजकारण या प्रमाणेच राजकारणाकडेहि त्यांचें प्रथमपासून लक्ष असे, पण थोड्या प्रमाणांत. विद्यार्जन झाल्यावर, बहुतेक सर्व पुढाऱ्यांप्रमाणें, पंतोजीपणाच्या मांडवाखालून पालबाबूहि गेले. कटकच्या शाळेंत ते तीन वर्षे हेडमास्तर होते. नंतर त्यांनी आपल्या जन्मगांवीं म्हणजे सिल्हट येथे स्वतः एक विद्यालय स्थापलें आणि तें ५।६ वर्षे चालविलें. त्यानंतर बंगलोरच्या शाळेचे मुख्याध्यापक म्हणून त्यांनी काम केलें. अशा प्रकारें उणींपुरीं दहा वर्षे अध्यापकाच्या व्यवसायांत त्यांनी घालविलीं. कलकत्ता येथील ग्रंथालयाचे व्यवस्थापक म्हणूनहि कांही दिवस त्यांनीं काम केलें. पण त्यानंतर राजकारणाच्या रणांगणावर ते अवतीर्ण झाले; आणि तेथे लेख–भाषणांची गोलंदाजी त्यांनी चालविली. जवळ जवळ पंचवीस एक नियतकालिकांना त्यांचा हात लागला होता आणि व्याख्यानें तर शेंकड्यांनी मोजण्याइतकीं त्यांनी दिलीं. त्यांचें पहिलें संस्मरणीय राजकीय व्याख्यान १८८७ सालीं झालें. त्या वर्षी मद्रास येथें न्या. बद्रुद्दिन तय्यबजी यांच्या अध्यक्षतेखालीं राष्ट्रीय सभा भरली असता बिपिनबाबूंनी 'हत्यारांचा कायदा ' यासंबंधीच्या ठरावावर भाषण केलें. तें प्रारंभीं नर्मकारक असलें तरी शेवटीं मर्मभेदक झाल्यामुळे श्रोत्यांच्या मनावर त्याची विलक्षण छाप बसली.

बिपिनबाबूंची ही आवेशयुक्त व क्षोभकारक वक्तृत्वकला पुढे चांगलीच वृद्धिंगत झाली आणि तिच्या सकल कलांचें तेज हिंदुस्थानांतच काय, पण परदेशांतहि फांकलें. १९०० सालीं ते तौलनिक तत्त्वज्ञानाचा व्यासंग ऑक्सफर्ड विद्यापीठांत करण्यासाठी इंग्लंडला गेले असतांनाहि त्यांनीं भारतीय संस्कृतीची महति पटविणारीं व्याख्यानें पाश्चात्य श्रोत्यांपुढे दिलीं. कॉलेजांतील दोन वर्षांचा अभ्यासक्रम त्यांच्या कुशाग्रबुद्धीने एका वर्षांतच आटोपल्यानंतर त्यांनी इंग्लंड, फ्रान्स व अमेरिका येथे व्याख्यानांचे दौरे काढले आणि थोर थोर नियतकालिकांतून लेख लिहिले; त्या लेखांवर त्यांची उपजीविकाहि झाली. पुनः बिपिनबाबू १९०९ पासून १९११ पर्यंत इंग्लंडमध्ये असतां त्यांनी हिंदी राजकारणाचें चित्र मोठ्या कुशलतेने व यथार्थतेने इंग्रज श्रोत्यांपुढे उभें केलें. त्या वेळीं त्यांनीं इंग्लंडांत 'स्वराज्य' नांवाचें मासिकहि चालविलें होतें. शिवाय त्यापूर्वी हिंदुस्थानांत असतांना 'न्यू इंडिया' हें स्वतःचें साप्ताहिक इंग्रजी पत्र त्यांनी चालविलें होतें व खेरीज सुप्रसिद्ध 'वंदे मातरम्' या पत्राशींहि त्यांचा निकट संबंध होता.

अरविंदबाबूंवर खटला झाला त्या वेळीं बिपिनबाबूंचा निर्भयपणा लोकांच्या विशेष नजरेस आला. सरकारतर्फे अरविंदबाबूंविरुद्ध साक्ष देण्यास त्यांस बोलावण्यांत आलें असता त्यांनी साक्ष देण्याचें नाकारलें. कोर्टाने हा आपला अपमान मानला आणि त्यांना सहा महिन्यांची शिक्षा दिली. त्या वेळीं बिपिनबाबू इतके लोकप्रिय झाले होते कीं, कलकत्ता येथे त्यांच्याविषयीं सहानुभूतिपर अशी एक सभा भरून तींत एक हजार रुपये जमविण्यांत आले व ते त्यांच्या पत्नीकडे पाठविण्यांत आले. यांत विशेष लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट म्हणजे नेमस्तांचे नेते श्री. सुरेंद्रनाथ बानर्जी हे त्या सभेचे अध्यक्ष होते. बिपिनबाबूंना कारागृहवासाची दुसरी यात्रा १९११ त घडली; तेव्हां राजद्रोहाच्या आरोपाखाली त्यांना शिक्षा झाली.

वंगभंगाच्या चळवळीच्या वेळीं बिपिनबाबू राजकारणांत प्रामुख्याने शिरले. स्वदेशी, बहिष्कार, राष्ट्रीय शिक्षण आणि स्वराज्य या चतुःसूत्रीचा पुरस्कार बंगाल्यांत बाबू बिपिनचंद्र पाल यांनी व महाराष्ट्रांत लो. टिळकांनी जोरानें चालविला होता. तो काळ म्हणजे पालबाबूंच्या कर्तृत्वाचा मध्यान्ह काळच होय. त्यानंतर १९०८ सालापासून काळ फिरला व बिपिनबाबूंवर अनेक आपत्ति येऊन त्यांचें तेज मावळत चाललें. तथापि लो. टिळक मंडालेहून सुटून आल्यावर त्यांनी होमरूलची चळवळ सुरू केली, तिला पालबाबू येऊन मिळाले व ते फिरून स्वराज्यसंघाच्या प्रचाराकरिता पाठविण्यांत आलेल्या शिष्टमंडळाबरोबर विलायतेस गेले. पण लोकमान्यांच्या मृत्यूनंतर राजकारणास नवीन वळण लागलें त्यांत ते मागें पडले. प्रातःकाला-पासून प्रखर तेज पसरणाऱ्या सूर्याची प्रभा सायंकाळीं आकाशांत दाटलेल्या पावसाळी ढगांनी आच्छादून टाकावी तशी पालबाबूंच्या कर्तब-गारीची दशा शेवटच्या काळांत झाली. तो वार्धक्याचा काळ सोडल्यास त्यांचें बहुतेक आयुष्य धर्मसुधारक, समाज-सुधारक व राजकीय सुधारक या नात्यानें अत्यंत कर्तबगारीचें गेलें हें लक्षांत ठेविलें पाहिजे. अशा विद्वान, निग्रही व कर्त्या राष्ट्रधुरीणाच्या निधनाबद्दल प्रत्येक हिंदवासीयाला हळहळ वाटणें साहजिक होय.

---

# मुंबईतील मुसलमानांचा दंगा

मुंबईस गेल्या गुरुवारीं काळबादेवीवरून पाव-बिस्किटांची एक हातगाडी चालली होती. गाडी ढकलणारा दिसण्यांत तर हिंदु दिसे पण चेहऱ्याकडे पाहिलें तर मात्र इस्लामचा अनुयायी वाटे. कपडे हिंदुपद्धतीचे चढवून हा मुसलमान आपली हातगाडी पुढें ढकलीत होता. संशयपिशाचाचा प्रभाव फार मोठा. रस्त्याने जाणाऱ्या हिंदूंना त्या हिंदुवेषधारी मुसलमानाची शंका आली व त्यांनी गाडी उभी करून आंत डोकावलें तों तिच्यांत चाकू, दगड व इतर हत्यारें त्यांना आढळून आलीं! 'अरे हा मुसलमान, रे मुसलमान' असें हिंदू ओरडतांच गाडी तेथेंच टाकून पैगंबराच्या बच्चानें तेथून एकदम पोबारा केला!

गुरुवारीं सूर्य झोपेतून जागा होतो न होतो तोंच माधवबागेंत एका निरपराधी हिंदूवर पिसाट मुसल-मानांनी प्राणघातक हल्ला केला. इतर हिंदूंनीहि उलट त्या मुसलमानाला पिटून काढलें. नळबाजारा-मध्ये एका हिंदूच्या अंगांत मुसलमानांनी सुरा भोसकला. या बाबतींत दोघांना पकडण्यांत आलें. फोर्टच्या आजूबाजूला किरकोळ हल्ले चालू होते. डिलाइल रोडवरून पुष्कळशा हिंदु व मुसलमान कुटुंबां-नां रिलिफ कमिट्यांनी दुसरीकडे हालविलें. परेल येथे दोन पठाणांवर हल्ला झाला. त्यांपैकीं एक मरण पावून दुसऱ्याला हॉस्पिटलमध्ये पोहोंचविण्यांत आलें. सकाळीं पोलिसांनी सुमारें १२५ गुंडांना अटक केली. बुधवारीं सकाळीं पोलिसांना खिलाफत ॲम्ब्युलन्स गाडीमध्ये रक्तानें माखलेले कांही चाकू आढळून आल्यामुळें १० खिलाफतवाल्यांना पकडण्यांत आल्याचें कळतें.

गुरुवारीं सायंकाळीं डिलाइल रस्त्यावर पठाण व मध्ये यांच्यांत चकमक झडली. दगड व सोडा-वॉटरच्या बाटल्या एकमेकांवर स्वैरपणानें फेकल्या जात होत्या. १९ इसम जखमी झाले. पोलिसांनी ४४ इसमांना अटक केली. भायखळा पुलावर एका हिंदूवर चौघा मुसलमानांनी तो बेसावध असता हल्ला केला. कामाठीपुरा, मदनपुरा या मोहल्ल्यां-तून जितकी शांतता पाहिजे तितकी अजून झाली नाही.

शुक्रवारीं दंग्याला बराच उतार पडत असलेला दिसला. तुरळक चोरटे हल्ले, लुटालूट, जाळपोळ इत्यादि अत्याचार चालूच होते. भेंडी बाजार, नळ बाजार, राउंड टेंपल, अबदुल रहमान स्ट्रीट व त्याच्या आसपासचा भाग सोडून इतर ठिकाणीं दुकानें अर्धवट स्थितींत उघडूं लागलीं आहेत. शहरांत पोलिसांनी संशयित इसमांना पकडण्यास जोरानें सुरुवात केली आहे. पकडलेल्यांची संख्या त्या दिवशीं ४०० वर गेली. महारबावडी नाक्या वरील पोलिसांनी लष्कराच्या मदतीनें घोगरी मोहल्ल्यावर छापा घालून २०० मुसलमानांना पकडलें. कुंभारवाड्यांतील ८७ हिंदूंना पकडण्यांत आलें.

द्वेषाची भावना एकदा थैमान घालूं लागली म्हणजे स्वहितावरहि मनुष्य निखारा ठेवतो याचीं उदाहरणें सध्या मुंबईत घडत आहेत. अबदुल रहमान स्ट्रीटवर एका मुसलमानाच्या मालकीचेंच घर होतें. परंतु तेथे हिंदु व्यापारी भाड्यानें राहत असल्यामुळें त्यांच्या दुकानाला आग लावण्याची हुक्की कित्येक मुसलमानांना आली व त्यांनी दुकानांना खरोखरीच काडी लावून दिली. पाण्याचा बंब वेळेवर आला म्हणून घर वांचलें. परंतु मुसलमान दंगेखोरांना मात्र हिंदूवरील सूडबुद्धीमुळें एवढी अक्कल सुचली

नाहीं कीं, हिंदूंच्या दुकानांना आग लाविली तरी त्यामुळें एका मुसलमानाचेंच घर जळणार. कित्येक मुसलमान हिंदूंसारखा पोषाक करून गल्लीकुचींतून खुशाल हिंदूंवर चोरटे हल्ले करीत आहेत व सुऱ्या भोसकीत आहेत. प्रिन्सेस स्ट्रीट, जुम्मा मशीद इत्यादि ठिकाणीं असले हल्ले हिंदूंवर करण्यांत आले. गिरणीभागांत एकंदर २५० इसमांना संशयावरून अटक करण्यांत आली. त्या भागांत पोलिसांचा विशेष कडक बंदोबस्त आहे. शुक्रवारीं ३५ गिरण्या बंद होत्या. ट्राम गाड्यांची रहदारी आता सुरू झाली असून गाड्या व बग्याहि हिंडूंफिरूं लागल्या आहेत.

लोअर परेळ स्टेशनाजवळ 'बारा चाळ' भागांत शुक्रवारीं भय्ये आणि मुसलमान यांच्यांत सकाळीं मारामारीला चांगलीच सुरुवात झाली. दोन्ही पक्ष एकमेकांवर दगड फेकीत होते. दंगा रंगास येत चालला तोंच तेथे पोलीस उपस्थित झाले. पोलिसांनी अनेक दंगेखोरांस पकडलें. अब्दुल रहमान स्ट्रीटवरून दुपारीं १ वाजता ट्रामगाडी चालली असता मुसलमान गुंडांनी ती मध्येच अडवली व आंतील हिंदूंना चोपण्यास सुरुवात केली. पोलीस तावडतोब त्या ठिकाणीं आले व त्यांनी १० इसमांस अटक केली.

गेला आठवडाभर दंग्याच्या ज्वाळांशीं खेळ करून शनिवारपासून मुंबापुरीने शांतते मा श्वास आंगा-वर घेण्यास सुरुवात केली. महमदअली रोडशिवाय सर्व रस्त्यांनी ट्रामगाड्या दुडूदुडू पळूं लागल्या. १४ गिरण्या सोडून इतर गिरण्यांतून कामें चालू झाली. शनिवारीं एकंदर २५० संशयित इसमांना अटक करण्यांत आली. आगच कुठें नसल्याने पाण्याचा बंब थंडा पडला. पोलीस व लष्कर यांनी सरकारी तबेला, ठाकुरद्वार व सभोंवतालचा प्रदेश देहळणी करून सुमारें १२५ हिंदूंना पकडलें. सकाळीं ११॥ वाजण्याच्या सुमारास एक हिंदू रस्त्याने जात असता कांही मुसलमान बदमाषांनी त्याला गांठून चोपलें व भयंकर जखमा केल्या. पायधुणी येथे शुक्रवारीं पोलिसांनी एका घरावर रात्रीं छापा घातला व २० मुसलमानांना अटक केली. डिलाइल रोडवर एक मुसलमान दंगेखोर आपण अंध असल्याचें सोंग करून रस्त्यानें हिंडत होता. परंतु शेवटीं संशयावरून पोलिसांनी त्याला पकडताच त्याजवळ चाकू असल्याचें समजलें. संध्याकाळीं परेळ भागांत तीन मुसलमानांवर हिंदूंनी हल्ला चढविला. शनिवारअखेर दंग्यांत एकंदर मेलेल्यांची संख्या १५८ असून जखमी झालेल्यांची संख्या १६५७ आहे. या १६५७ त ८२९ हिंदु, ८०५ मुसलमान व अन्य जातींचे २३ आहेत.

# स्फुट सूचना

१ सिंध प्रान्त वेगळा करण्याचा तेथील मुसलमानांचा अट्टाहास असला तरी आर्थिक दृष्ट्या तो प्रांत वेगळा करणें हें काम बरेंच कठिण होऊन बसलें आहे. कारण आज सिंध प्रांताचें उत्पन्न १८४·४२ लक्ष रुपयांचें असून निवळ खर्च २७९. ८२ लक्ष रुपये होतो. म्हणजे आजच त्या प्रांताला ९५.४० लक्ष रुपयांची तूट येते; व ती मुंबई इलाख्याच्या तिजोरींतून भरून काढावी लागते. याशिवाय विभक्तीकरणाचा खर्च ११ लक्ष ५ हजार रु. वरील तुटींत मिळविला म्हणजे त्या प्रांताला एकंदर तूट १ कोटी ६ लक्ष ४५ हजार रुपयांची येईल. याखेरीज ऑडिट ऑफिसचा खर्च पूर्वीच्या खर्चांत धरला नव्हता तो धरल्यास एकंदर तुटीची रकम ११० लक्षांवर जाईल. ही अफाट तूट भरून कशी काढावी हा बिकट प्रश्न विभक्तीकरणवाल्यांपुढे आहे. आतापर्यंत अनेक खात्यांच्या खर्चांत काटकसर सुचविण्यांत आली आहे. तींत १३ लक्ष रुपयांची काटकसर कायम स्वरूपाची असून ८ लक्ष रुपयांची काटकसर तात्पुरती सुचविण्यांत आली आहे. याशिवाय अनेकांनीं काटकसरीच्या अनेक सूचना करून एकंदर काटकसर ६१ लक्षांची करता येईल असा अंदाज बांधला आहे. परंतु अशी काटकसर केली तरीहि जमाखर्चाची तोंडमिळवणी होत नाही. तथापि सिंधप्रांत वेगळा करण्याचा मुसलमानांचा आग्रह कायम असल्याने त्यांनी नाना प्रकारचे कर सुचविले आहेत.

---

२ त्यांत प्राप्तीवरील कर २१ लक्ष रु., जमीन महसुलांत रुपयास एक आणा वाढ करून सुमारें १२ लक्ष रु., कराचीमार्गें जाणाऱ्या कापसाच्या दर गांठीवर १ रुपयाप्रमाणे अंदाजी १० लक्ष रु., तमाखूवरील कर ५ लक्ष रु., विद्युत् २ लक्ष रु. याप्रमाणे कर सुचविले आहेत. परंतु यापेक्षांहि कराचे अनेक विक्षिप्त प्रकार सुचविण्यांत आले आहेत. ते म्हणजे वकील, माणसांचे डॉक्टर, गुरांचे डॉक्टर, सावकार, घरगुती नोकर इत्यादिकांवर बसविण्याचे कर होत. यापेक्षां मौजेची सूचना एकाने केली आहे; ती अशी कीं, सरकारने लॉटरीच काढावी, त्यामुळे दहा लक्ष रुपये उत्पन्न येईल; व वरील सर्व कर जमेंत धरल्यास ६९ लक्ष रुपये उत्पन्न येईल. तें

व काटकसरीची बचत ६१ लक्ष रुपये म्हणजे १३० लक्ष रुपये होतात. अशा रीतीने एकंदर तूट ११० लक्ष रु. ची वजा होऊन उलट २० लक्ष रुपये शिल्लकच राहतील! परंतु ही सर्व जमा शेख-महंमदी स्वरूपाची असल्याने तिचा व्यावहारिक दृष्ट्या फारसा उपयोग नाही. वर सुचविलेल्या करांत वीस लक्ष रुपये प्राप्तीवरील कराचे म्हणून सांगितले परंतु तो कर बऱ्हंशीं हिंदूंनाच भरावा लागतो. ही गोष्ट लक्षांत घेता सिंधच्या नव्या युगांतील कराखालीं हिंदूच बेदम होऊन त्यांच्या आर्थिक मदतीच्या प्रमाणांत त्यांस प्रतिनिधित्व मिळणार नाही तें नाहींच.

---

३ आयरिश डेलमध्ये ता. १९ रोजीं आयर्लंडच्या राज्यघटनेंतून राजनिष्ठेची शपथ गाळून टाकण्याचें बिल तिसऱ्या वाचनासाठीं मांडण्यांत आलें. सिलेक्ट कमिटीच्या मुशींतून तावूनसुलाखून बाहेर पडलेलें बिल तिसऱ्या वाचनांत बऱ्हंशीं जशाचें तसेंच स्वीकारलें गेलें. परंतु डी व्हॅलेरा यांचें हे बिलच असें क्रांतिकारक आहे कीं, त्याला प्रत्येक वाचनाच्या देवडींत विरोधाची ठेच लागावी व त्यानेहि विरोधाला न जुमानता त्यांतून शिरसलामत सुटावें. तिसऱ्या वाचनाच्या वेळींहि मि. मॅक्गिलिगन यांनी बिलाला विरोध तर केलाच, शिवाय डी व्हॅलेरा यांना खोटें पाडण्याचाहि प्रयत्न केला. मि. मॅक्गिलिगन म्हणाले, "अँग्लो-आयरिश तहावर आक्रमण करणारा असा कोणताहि फरक फ्री स्टेटच्या राज्यघटनेंत करण्याची आज्ञा डी व्हॅलेरा यांना जनतेकडून मिळालेली नाही." डी व्हॅलेरा यांनी मि. मॅक्गिलिगन यांना उत्तर देतांना स्पष्ट बजावलें कीं, "तहाच्या चौकटींत उभे राहून राजनिष्ठेला तिलांजलि देण्याचा पूर्ण हक्क आम्हांला आहे." शेवटीं उपसूचना मताला टाकता ६९ विरुद्ध ७७ मतांनी ती नापास झाल्याचें जाहीर झालें व मूळ बिल तिसऱ्या वाचनांतहि मंजूर झालें. आता सदर बिल राज्यघटनेंतील नियमानुरूप सीनेटकडे शिक्कामोर्तबीसाठीं पाठविण्यांत येईल. सीनेट ही सासू असल्याने बिल कांही दिवस लांबणीवर टाकण्याचा किंवा नापासहि करण्याचा अधिकार तिला आहे. "सीनेटने बिल आहे त्याच स्वरूपांत स्वीकारलें तर दुधांत साखर पडली; परंतु तें नापास केलें तर आपण तें बिल जनतेकडे पाठवूं व त्यावर अखिल राष्ट्राचें मत ( referendum ) घेऊं!' अशी सूचना डी व्हॅलेरा यांनी आगाऊच देऊन ठेविली आहे.

---

४ डी व्हॅलेरा यांनी आयरिश डेलमध्ये राजनिष्ठेचें जोखड झुगारून देण्याचें बिल पास करताच साम्राज्यांतील इतर वसाहतींतूनहि आता चलबिचल सुरू झाली आहे. ता. २० रोजीं दक्षिण आफ्रिकेच्या युनिअन पार्लमेंटमध्ये स्वतंत्र पक्षाच्या सभासदाने दक्षिण आफ्रिकेच्या राज्यघटनेंतून राजनिष्ठेची शपथ काढून टाकण्याचें बिल आपण आणणार आहों अशी नोटीस दिली. आयर्लंडप्रमाणेच दक्षिण आफ्रिकेंतहि सदर बिल पास होईलच अशीं चिन्हें आज तरी दिसत नाहीत. राजनिष्ठेच्या शपथेविरुद्ध चोहींकडे रान उठत असल्याचें पाहूनच कीं काय कोण जाणे इंग्लंडचे वसाहतमंत्री मि जे. एच. थॉमस यांनी ता. २० रोजीं हॉक येथें जें भाषण केलें त्यांतून नम्रतेचा अस्पष्ट शब्द निघत आहे. थॉमस म्हणतात, "आयरिश फ्री स्टेटचे भलें व्हावें, त्याचा उत्कर्ष व्हावा अशीच आमची अन्तःकरणपूर्वक इच्छा आहे. आता सर्वांनीं भूतकाळाकडे पाठ फिरवून भविष्यकाळाच्या उज्ज्वलतेकडे लक्ष द्यावें. मात्र आम्हांला अजूनहि असेंच वाटतें कीं, ब्रिटन व आयर्लंड यांच्या दृढ स्नेहरज्जूनेच उभय राष्ट्रांच्या सौख्याची व उत्कर्षाची माला गुंफिली जाणार आहे." मि. थॉमस यांच्या सदिच्छेप्रमाणे डी व्हॅलेरा पहिल्यापासूनच 'आम्ही ब्रिटिश साम्राज्यांतच राहणार' असें म्हणत आहेत. एक गोष्ट मात्र खरी कीं, डी व्हॅलेरा यांच्या अढळ निश्चयापुढे मि. थॉमस ऊर्फ ब्रिटिश सरकार यांचा नमतें घेण्याचा बेत दिसतो. मि. थॉमस यांच्या 'आता भविष्यकालाकडे दृष्टि द्या' या उद्गारांवरून इंग्लंड जुन्या करारमदारांचा झिजलेला ताईत उराशीं न बाळगता आयर्लंडशीं सामवादाचें बोलणें काढून उभय राष्ट्रांना आदरणीय व समाधानकारक असा नवीन करार करील असें अनुमान निघते. ओटावा येथील साम्राज्याच्या आर्थिक परिषदेला डी व्हॅलेरा जाणार असल्याने तींत उभय राष्ट्रें समेटाला किती अनुकूल आहेत हें आपोआपच दिसून येईल.

---

५ सांप्रत अस्पृश्य समाजांत दोन पक्ष निर्माण झाले आहेत. एका पक्षाचे अध्वर्यू डॉ. आंबेडकर हे आहेत व दुसऱ्या पक्षाचा पुढाकार रा. ब. राजा व आमदार गवईप्रभृतींनी घेतला आहे. डॉ. आंबेडकर हे अस्पृश्यांकरिता वेगळा मतदारसंघ पाहिजे असें म्हणणारे आहेत. तर राजा, गवई व राजभोजप्रभृतींना अस्पृश्यांचें खरें हित संयुक्त मतदारसंघाच्या स्थापनेनेच साधणार आहे अशी खात्री वाटते. वरील दोन पक्षांत या मुद्द्यावर मतभेद झाला असल्यानें एक पक्ष दुसऱ्या पक्षाहून आपलें संख्याबल अधिक

दाखविण्याच्या खटपटींत आहे. डॉ. आंबेडकर यांनी नागपुराजवळ कामठी येथे भरविलेली परिषद यांपैकींच एक उपद्व्याप होय. या उपद्व्यापानंतर आंबेडकर हे पुण्यांतील अस्पृश्यांचे मानपत्र मिळविण्याकरिता शनिवार ता २१ रोजीं पुण्याला आले. सदर मानपत्राविषयी आपली नापसंती दर्शविण्यासाठी श्री. राजभोजप्रभृतींनी मिरवणूक काढण्याचें ठरविलें होतें. परंतु सरकार मध्ये पडून येथील डि. मॅजिस्ट्रेटांनी त्यांच्या मिरवणुकीस शांतताभंगाच्या नांवाखाली मनाई केल्यामुळे मिरवणूक रहित झाली. तथापि तो मार्ग बंद झाला तरी अखिल अस्पृश्य समाजाची त्याच दिवशीं म्हणजे शनिवारीं सार्वजनिक सभेच्या दिवाणखान्यांत नागपूरचे अस्पृश्य पुढारी आमदार गवई यांच्या अध्यक्षतेखालीं जाहीर सभा भरून तींत संयुक्त मतदार-संघास पाठिंबा, कामठी येथील परिषदेचा निषेध, आंबेडकरांस द्यावयाच्या मानपत्राचा निषेध इत्यादि ठराव पास झाले. डॉ. आंबेडकर यांस डि. सी. मिशनमध्यें अस्पृश्यांतर्फे मानपत्र देण्याचा समारंभ उरकला. पण सदर मानपत्र केवळ महारांतर्फे देण्यांत आलें असून तें इतर अस्पृश्य जातींस मान्य नव्हतें ही गोष्ट वरील जाहीर सभेनें सिद्ध झाली असल्यामुळे त्या दृष्टीनें त्या सभेचें महत्त्व अधिक आहे. येथील डि. मॅजिस्ट्रेटांनी राजभोजप्रभृतींच्या मिरवणुकीस मनाईहुकूम काढला खरा. पण तो हुकूम काढण्यांत मिरवणुकीने शांतताभंग होऊं नये हाच जर येथील अधिकाऱ्यांचा हेतु होता तर तो नुसता पोलिसबंदोबस्त ठेवल्यानेंहि सफळ झाला नसता काय ?

---

६ हैद्राबादेचे प्रसिद्ध वकील ना. केशवराव कोरटकर यांस शनिवार ता. २१ रोजीं रात्रीं १०॥ वाजतां पुणें येथे देवाज्ञा झाली हें कळविण्यास आम्हांस अत्यंत खेद होतो. केशवरावजी आजारी असल्याचें कोणास माहीत नव्हतें. त्यामुळे त्यांच्या आकस्मिक मृत्यूची बातमी ऐकून पुष्कळांस आश्चर्यहि वाटल्याशिवाय राहणार नाहीं. मरणसमयीं त्यांचें वय सुमारें पासष्ट वर्षांचें होतें. त्यांचा जन्म हैद्राबाद संस्थानांत परभणी जिल्ह्यांतील एका खेड्यांत झाला. घरची अत्यंत गरिबी असताहि केशवरावांनी त्या अडचणीच्या परिस्थितींत जितकें शिक्षण मिळविता आलें तितकें मिळविलें व वकिलीची परीक्षा पास होऊन प्रथम गुलबुर्ग्यास व नंतर हैद्राबादेस आपल्या वकिलीच्या धंद्यास सुरुवात केली. इतर अनेक प्रसिद्ध वकिलांप्रमाणें याच धंद्यांतून केशवराव यांचाहि भाग्योदय झाला. या धंद्यावर त्यांनी संपत्ति व कीर्ति संपादन केली. आपला वकिलीचा धंदा संभाळून ते बाकीच्या वेळांत धार्मिक, सामाजिक व राजकीय चळवळींतहि मन घालीत. परंतु हैद्राबादेच्या कोंडलेल्या हवेंत राजकीय चळवळीस जीव धरण्यास फारशी सवड नसल्यामुळे ती अडवण केशवरावांसहि भासली असल्यास नवल नाही. ते धर्मदृष्ट्या आर्यसमाजिस्ट व सामाजिक दृष्ट्या सुधारक होते.

---

७ हैद्राबादेंत जीं हाताच्या बोटावर मोजण्याइतकीं अत्यंत थोडीं कर्तबगार व वजनदार माणसें आहेत त्यांत केशवरावांची गणना प्रामुख्याने करणे आवश्यक होय. त्यांच्या कर्तृत्वाचा व वजनाचा फायदा त्यांनी महाराष्ट्रीयांस व हिंदु जनतेस शक्य तितका करून दिला. हैद्राबादेंत कोणती उपयुक्त चळवळ अगर संस्था निघो, तिला केशवरावांचें हटकून साहाय्य व प्रोत्साहन असावयाचेंच. गेल्या वर्षी साहित्यसंमेलन हैद्राबादेच्या प्रतिकूल परिस्थितींत तेथे भरूं शकलें याचें पुष्कळसें श्रेय केशवरावांसच आहे. त्यांचें कायद्याचें ज्ञान, बहुश्रुतपणा व हिंदु समाजांतील वजनदारी यांची छाप निजामदरबारावरहि पडून दरबाराने त्यांची तेथील हायकोर्टांतील न्यायाधीशाच्या जागेवरहि नेमणूक केली. ना. केशवराव यांचें पुणें शहरावर फार प्रेम होतें. येथे बंगला बांधून ते वर्षांतून कांही महिने पुण्याचे रहिवासी बनल्यामुळें त्यांच्या औदार्याचा बराचसा ओघ पुण्यांतील संस्थांकडे साहाजिकच वळला. त्यांच्या मृत्यूमुळे हैद्राबाद संस्थानांतील एक फार वजनदार व कर्तबगार पुढारी नाहीसा झाला असल्यानें तिकडील महाराष्ट्रीय जनतेस आपला मोठा आधार तुटल्याचें दुःख होईल यांत शंका नाही. पण त्या दुःखाचा अखिल महाराष्ट्र वाटेकरी आहे हें विसरता कामा नये. त्यांच्या पश्चात् त्यांचे चिरंजीव सुविद्य व कर्ते असून ते आपल्या वडिलांचा नांवलौकिक पुढे चालवितील अशी आम्हांस उमेद आहे.

---

८ कांही दिवसांपूर्वी गोलमेजपरिषदेचे एक मुसलमान सभासद डॉ. शफत अहमदखान यांनी 'तूर्त प्रांतिक स्वायत्तताच पुरे' म्हणून टिमकी वाजविली व आता सर महमद याकूब यांनीहि आपलें तसेंच मत प्रकट करून खानांची बाजू सावरण्याचा प्रयत्न केला आहे. मध्यवर्ती सत्तेशिवाय प्रांतिक स्वायत्तता म्हणजे प्राणाशिवाय कुडी असल्याप्रमाणें निर्जीव होय हें तत्त्व याकुब यांनाहि अमान्य आहे असें नाही. परंतु हें तत्त्व मान्य असताहि ते प्रतिपादन मात्र असें करीत आहेत कीं, भारतीय संयुक्त घटना

प्रत्यक्ष व्यवहारांत येण्यास बराचसा कालावधि लागेल. तरी त्यापूर्वी प्रांतिक स्वायत्तता ताबडतोब देण्यांत यावी. 'वदतो व्याघाता'चें यापेक्षां दुसरें उत्कृष्ट उदाहरण कोणतें असूं शकेल ? शफत काय किंवा याकूब काय कोणीहि मुसलमान इंग्रजांच्या तालावरच नाचत असल्यानें त्यांचे विचार वेगळे कसे असणार ! जाता जाता याकूब यांनीं आपल्या मुलाखतींत मुसलमान हेच स्वराज्याविषयीं किती उतावीळ आहेत व १८५८ सालापासून म्हणजे हिंदुस्थानाचा राज्यकारभार ब्रिटिशांच्या हातांत गेल्यापासून मुसलमानांचाच आर्थिक, सामाजिक व राजकीय अधःपात केवढा झाला आहे,याचें मायावी चित्र उभें केलें आहे. हेतु हा कीं, नवीन राज्यघटनेंत रस्त्यांत पोटावर हात मारून पैसा मिळविणाऱ्या भिकाऱ्याप्रमाणे आपल्या जमातीच्या पदरांत सुधारणांचे दोन तुकडे किंवा दोन जादा सवलती पडाव्या.परमार्थाचें पुराण सांगत स्वार्थ साधण्याची ही मुसलमानांची एक युक्ति आहे.

---

९ कोणी कितीहि पक्षांध झालेला असो, तो सध्या हिंदुस्थानांतून एकदा फिरून गेला कीं, त्याला दोन सिद्धांत स्पष्टपणें दिसल्याशिवाय राहणार नाहींत. ते हे कीं, देशांत समेट होऊन शांतता पसरणें अत्यावश्यक आहे आणि तो समेट काँग्रेसच्या तुरुंगांतील पुढाऱ्यांशींच झाला पाहिजे. हे सिद्धांत 'चक्षुर्वै सत्यम्' या रीतीनें पटले तरी इंग्रज माणस ते प्रसिद्ध करतांना काँग्रेसची निर्भर्त्सना व दडपशाहीची गर्जना केल्याखेरीज राहत नाही. या दृष्टीनें मि. एडवर्ड थॉम्सन यांनीं गेल्या आठवड्यांत लंडन येथील 'रॉयल सेंट्रल एशिअन सोसायटी'मध्ये केलेलें भाषण म्हणजे एक नामी नमुना आहे. "बंगाल, संयुक्त प्रांत, सरहद्द प्रांत, गुजराथ व मुंबई शहर या ठिकाणीं काँग्रेसनें गांधी-आयर्विन कराराचा पदोपदीं भंग केला आणि अजून तेथेंहि सरकाराच्या दृष्टीनें वाइटांतील वाईट अशी परिस्थिति माजलेली आहे. हिजली-चितागांगबद्दल बंगालनें केवढें अकांडतांडव केलें, पण सरकारचें प्रसिद्धिखातें लंगडें असल्यामुळे त्याची बाजू यावी तशी पुढे आली नाही. तथापि गेल्या चळवळीप्रमाणे या खेपेस लोकांत खळबळ उसळलेली नाही." इत्यादि प्रकारच्या काँग्रेस-निंदेच्या ठरीव नांदीनें मि. थॉम्सन यांनीं आपलें भाषण सुरू केलें.

---

१० पण हिंदुस्थानांत त्यांनी पाहिलेल्या परिस्थितीचे त्यांच्या मनावर जे संस्कार उमटले ते त्यांना काँग्रेसची निंदा करूनच स्वस्थ बसूं देईनात. त्यांनीहि स्वच्छ शब्दांत असें कबूल केलें कीं,"हजारों लोकांना तुरुंगांत डांबलें म्हणजे सरकारचें राज्यशासनाचें काम संपलें असें होत नाही. कितीहि उत्कृष्ट राज्यघटना तुम्हीं तयार केली तरी तिची पालखी केवळ नेमस्ताच्या खांद्यावरून नेता येणार नाही. तुरुंगांत कोंडलेल्या पुढाऱ्यांशीं वाटाघाट केल्याखेरीज गत्यंतरच नाही. आणि ती सरकार करीलहि. पण तें जेव्हां कांहीं पेंचांत किंवा अडीअडचणींत सांपडलें असेल तेव्हां, सध्याच्या खंबीरपणाच्या स्थितींत नव्हे." अशी हिंदुस्थानाच्या व हिंदुस्थानसरकारच्या प्रकृतीची चिकित्सा मि. थॉम्सन यांनी केली आहे. ती करून त्यांनी सरकाराला कांहीं सूचनाहि केल्या आहेत. प्रांतिक स्वायत्तता व अल्पसंख्याकांचा निकाल सरकारनें तत्काळ सांगावा, प्राथमिक शिक्षण सार्वत्रिक करावें; पण माध्यमिक शिक्षण महाग करावें. पदवीधरांची संख्या निदान निम्मी खच्ची करावी. त्या सूचनांपैकीं कांहीं सूचना अशा आहेत कीं त्यांस कोणीं नांवें ठेवणार नाही. या राजकीय क्षोभाचें मूळ आर्थिक दुःस्थितींत रुजलेलें आहे हें मि.थॉम्सन यांनी आपल्या भाषणांत केलेलें निदान योग्य आहे. पण ती मूलभूत दुःस्थिति दूर न करता सरकारानें वटहुकुमांचे कांटेरी लगाम लोकांच्या तोंडांत अडकविले आहेत आणि अनुभवानें जागे होऊनहि मि. थॉम्सन त्यांचेंच समर्थन करीत सुटले आहेत ! देहस्वभाव म्हणतात तो यालाच !

---

११ इराक हा आशिया खंडांतील चिमुकला देश; परंतु महायुद्धाच्या उलथापालथींत त्याच्या स्वातंत्र्याचा पाया घातला गेला व तो आता स्वतंत्र झाला इतकेंच नव्हे तर त्या देशाला राष्ट्रसंघांत मानाचें व बरोबरीचें स्थान येत्या सप्टेंबरपासून द्यावें असें राष्ट्रसंघाच्या कमिटीनें नुकतेंच ठरविलें.हिंदुस्थानाला कोणताहि देश स्वतंत्र झाला व त्याला राष्ट्रसंघांत स्थान मिळालें तर आनंदच आहे. हिंदुस्थान राष्ट्रसंघाचा सभासद आहे पण स्वतंत्र नाही. तथापि यावरून प्रश्न एवढाच विचारावासा वाटतो कीं, राष्ट्रसंघाचे जे नियम व जीं तत्त्वें मान्य केल्याशिवाय कोणत्याहि देशाला राष्ट्रसंघांत स्थान मिळत नाही, ते नियम व तीं तत्त्वें हिंदुस्थानास कां लावलीं जाऊं नयेत? उदाहरणार्थ राष्ट्रसंघाच्या सभासदांना व्यापारी सवलती देणें, आंतरराष्ट्रीय करारांना मान्यता देणे, धार्मिक चळवळींत हात न घालणें परराष्ट्रांतील लोकांचे कायदेशीर हक्क पाळणें, पर-राष्ट्रांचीं कर्जे देणें वगैरे. पण या सर्व अटींत ज्याला मूर्धाभिषिक्त स्थान दिलें गेलें आहे. ती अट म्हणजे वंश, भाषा व धर्म यांच्या पायावर बनलेल्या

अशा आपल्या ताब्यांतील अल्पसंख्याक जातींना राष्ट्रसंघानें ठरविलेल्या नियमाप्रमाणे वागवूं असें प्रत्येक राष्ट्राने जाहीर करण्याची होय. इराकने वरील अट कबूल केली तेव्हांच त्याला राष्ट्रसंघांत घेण्याचें ठरलें. हिंदुस्थानांत मुसलमान, अस्पृश्य, ख्रिस्ती वगैरे अल्पसंख्यांकांचे गट आहेत. त्यांनाहि राष्ट्रसंघाने ठरविलेले नियम लावून हे प्रश्न निकालांत कां काढूं नयेत? नव्या होणाऱ्या सभासदांना जी अट मान्य करणें जरूरीचें पडते ती अट जुन्या सभासदांना मान्य करण्यास लावलीच पाहिजे. डॉ. मुंजे वगैरे हिंदुसभेचे पुढारी हीच गोष्ट वारंवार पुढे मांडीत आहेत कीं, राष्ट्रसंघाने हिंदु-मुसलमानांचा तंटा आपले नियम लावून तोडावा. पण हें म्हणणें हिंदुस्थान सरकार व विलायत सरकार मान्य करीत नाहींत. यावरून त्यांच्या पोटांत कांही तरी पाप आहे अशी भावना हिंदी लोकांची झाल्यास नवल नाही. इराकने राष्ट्रसंघाला मेजवानी दिली व हिंदुस्थानाने त्याचें घोडें मारलें असें थोडेंच आहे!

# अध्यक्ष डी व्हॅलेरा यांचें भाषण

आयरिश फ्री स्टेटच्या कायदेमंडळापुढें राजनिष्ठेची शपथ रद्द करण्याचें बिल मांडीत असतां अध्यक्ष डी व्हॅलेरा यांनीं खालील आशयाचें भाषण केलें.

डी व्हॅलेरा म्हणाले—

" माझ्या 'फियाना फेल' पार्टी ऑफ डेस्टिनी पक्षानें गेल्या निवडणुकीचे वेळीं मतदारांकरितां जो जाहिरनामा काढिला होता त्यांतील पहिला मुद्दा आयरिश फ्री स्टेटच्या राज्यघटनेंतून राजनिष्ठेची शपथ काढून टाकणें हा होता. आमच्या कार्यक्रमांतील ही गोष्ट पार पाडण्याकरितां हें बिल मी सभासदांपुढें मांडीत आहें. मतदारांकडून आम्हीं स्पष्ट स्वरूपाची आज्ञा मागितली होती. तशी ती आम्हांस मिळाली आहे. तिचें अतिक्रमण मतदारांची पुनः अनुज्ञा मिळविल्यावांचून आम्ही कधींहि करणार नाहीं.

आमच्या मतें अँग्लो-आयरिश तहांत राजनिष्ठेची शपथ ही कांहीं आवश्यक बाब नाहीं. आणि ब्रिटिश राष्ट्रसंघांतील सन्मान्य घटक या नात्यानें ही शपथ रद्द करणें पूर्णपणें आमच्या अखत्यारींत आहे, त्याबाबत ग्रेटब्रिटनला विचारण्याची कांहींच जरूरी नाहीं. कॉसग्रेव्हपक्ष अधिकारावर असतां कॅनडा, ऑस्ट्रेलिया, आफ्रिका, न्यूझीलंड इतकेंच नव्हे तर खुद्द ग्रेटब्रिटन यांच्याशीं आयरिश फ्री स्टेटचा समान दर्जा आहे असें म्हणत असे. या राष्ट्रांना राजनिष्ठेची शपथ रद्द करण्याचा अधिकार नाहीं असें कॉसग्रेव्हपक्षास म्हणावयाचें आहे काय? नसेल तर मग आम्हांसच हा विरोध कां?

या शपथ रद्द करण्याच्या मुद्द्यावर मी इंग्लंडाशीं कधींहि विचारविनिमय करणार नाहीं. राज्यघटनेंत आमच्या स्वातंत्र्यावर जर नियमन असेल तर 'समान दर्जा' हे शब्द निरर्थक आहेत. अँग्लो-आयरिश तह झाला त्या वेळीं कॅनडाची जी परिस्थिति होती तीच आयर्लंडानें निरंतर राहावें व कॅनडा इत्यादि इतर घटकांनीं मात्र खुशाल प्रगति करावी असा अँग्लो-आयरिश तहाचा हेतु असेल हे मी कधींहि मान्य करणार नाहीं. इंग्लंडशीं आधीं वाटाघाट केल्याशिवाय आम्हांस शपथ रद्द करतां येत नाहीं हें कोणीहि सिद्ध करून द्यावें असें मी आव्हान करतों. माझ्याजवळ तहाचे वेळीं आर्थर ग्रिफिथ्स यांस लॉइड जॉर्ज यांनीं पाठविलेलें एक पत्र आहे. त्यांत असें स्पष्ट म्हटलें आहे कीं, आयरिश फ्री स्टेटच्या दर्जासंबंधीं जी कलमें आहेत, तीं इतर कलमांपासून अगदीं स्वतंत्र आहेत. प्रिव्ही कौन्सिलकडील अपीलाचीं कलमें घटनेंतून काढून टाकण्याची योजना कॉस्ग्रेव्ह पक्षानें आपल्या राजवटींत ज्या अधिकारानें आणली होती त्याच अधिकारानें आज आम्ही वागत आहोंत. वेस्टमिन्स्टर कायद्यानेंहि हा आमचा अधिकार मान्य केला आहे. तह झाला तेव्हां 'स्वतंत्र होण्याचें स्वातंत्र्य' तुम्हांस मिळालें आहे, असें आम्हांस सांगण्यांत आलें होतें. असें असतां तोच तह आमच्या प्रगतीस कायमचा प्रतिबंध करणार आहे काय? १९२१ सालीं कांहींहि करार झाले असोत, आज १९३२ सालीं इंग्लंडलां विचारल्यावाचून शपथ रद्द करण्यास कोणतेहि जुने करार आड येऊं शकत नाहींत.

आयर्लंडमध्यें स्वस्थता निर्माण होण्यास ही शपथ रद्द होणें अगत्याचें आहे. लोकांच्या स्वातंत्र्यावर कमींत कमी बंधनें घालून व सक्तीचा कमींत कमी अंमल करून लोकांत शांतता व सुव्यवस्था राखणें कोणत्याहि राज्यसंस्थेचें आद्यकर्तव्य आहे. आमच्या गेल्या १० वर्षांतील इतिहासावरून निःसंशय सिद्ध झालें आहे कीं, दंडुक्याचे जोरावर येथील प्रश्न सोडविण्याची आशा करणें व्यर्थ आहे. व्यक्ति अथवा व्यक्तिसमूह यांना दंडुका दाखवून

कायद्यापुढें कांहीं वेळ नमवितां येईल; पण त्यानें क्रांतीचीं गुप्त बीजें नाहींशीं होत नाहींत. असंतोषाचीं कारणेंच नाहींशीं केल्यास दुडुक्याचेंहि कारण राहात नाहीं. कायद्यापुढें लोकांनीं खुषीनें नम्र व्हावें याला ही शपथ आड येत आहे. तहावर ज्या परिस्थितींत सह्या झाल्या व ज्या परिस्थितींत येथील कायदेमंडळानें तो मंजूर केला ती परिस्थिति लक्षांत घेतांहि शपथेच्या कामीं सक्ती करणें गैर आहे असेंच म्हणावें लागतें."

"कायदे-मंडळानें दुसरें वाचन मंजूर करण्याचे आधीं सरकारनें आपलें पूर्ण धोरण जाहीर करावें" या मॅक्डरमॉट यांच्या सूचनेस उत्तर देतांना डी व्हॅलेरा म्हणाले, "फियाना फेल पक्षाचें अंतिम ध्येय जगजाहीर आहे. पण सध्यां आम्ही मतदारांच्या आज्ञेबाहेर जाणार नाहीं. स्वतंत्र प्रजासत्ताक राज्य स्थापन करण्याची जेव्हां लोकांची तयारी होईल तेव्हां 'फियाना फेल' पक्ष त्यांचा पुढाकार घेईलहि. गेल्या १० वर्षांतील धाक-दपटशामुळें लोकांनीं 'फियाना फेल' पक्षास हवी तेवढी उडी घेतली नाहीं. आणि लोकांच्या आज्ञे-बाहेर वागण्याची सरकारचीहि इच्छा नाहीं."

# मुसलमानांच्या दंग्यास मुसलमान पुढारीच जबाबदार

मुंबईचा दंगा आता बहुतेक शांत होत आला आहे; तथापि आग निवाली तरी तिच्या राखेवरून चालणाऱ्याच्या पायाला राखेनें झाकलेल्या निखाऱ्याचे चटके बसावे तसल्या प्रकारचे दगेफटके मुंबईत तुरळक घडत आहेत. गुंड मुसलमान हिंदूंचा वेष धारण करून हिंदूंच्या वस्तींत शिरतात व एकटा दुकटा बेसावध हिंदू दिसला कीं त्याच्या अंगांत सुरा खुपसतात. असले दंगे क्वचित् होत असल्यामुळे हिंदूला मुसलमानांचा व मुसलमानाला हिंदूंचा विश्वास न येऊन नित्याप्रमाणें कामधंदा आरंभण्यास अजून कोणाचें मनच घेत नाहीं. या योगानें मुंबईचे मुख्यमुख्य बाजार अद्यापि बंदच आहेत व मुसल-मानांच्या मोहल्यांत राहणारे हिंदु व हिंदूंच्या गल्ल्यांत दुकानें घातलेले मुसलमान जिवाच्या भीतीनें मूळचीं बिऱ्हाडें सोडून देऊन आपआपल्या जातींच्या वस्तींत जागा शोधीत आहेत. मुंबईतील सर्वसामान्य जनतेनें इतकी दहशत घेतली आहे कीं तेथील हजारों लोक गेल्या आठवड्या-पासून मुलखावर निघून जात असून त्यांना आगगाड्यांतून जागा न मिळाल्यामुळे स्टेशनांवरच कित्येक तास बसून राहावें लागत आहे.

मनुष्याच्या अंगांतील सैतानी वारें जाऊन त्यास माणुसकीची आठवण थोडथोडी होऊं लागली आहे तेव्हांची ही स्थिति, मग ज्या वेळीं सैतानाचा अंगांत पूर्ण संचार होऊन तो भोंवतालच्या माणसांचा संहार करीत सुटला होता त्या वेळीं जीव जगवूं पहा-णारांची किती घाबरगुंडी उडाली असेल याची वाचकां-नीच कल्पना करावी. अशा प्रकारच्या संकटग्रस्त, निराश्रित व घरादारास मुकलेल्या हजारो बायका-माणसांच्या साहाय्याकरिता मुंबईतील धनिक, उदार व कनवाळू गृहस्थांनीं कमिट्या स्थापन करून त्यांच्या-मार्फत निराश्रितांच्या अन्नवस्त्राची व राहण्याची सोय लावली आहे. या सोयीचा फायदा पांच हजार हिंदु लोक सांप्रत घेत आहेत. शांतता कमिटीनेंहि हिंदु-मुसलमानांस शांत करण्याचे प्रयत्न चालू असून त्यांस थोडेंबहुत यशहि येत आहे. परंतु ज्यांच्या पशुतुल्य वर्तनानें हें घोर संकट मुंबईच्या लाखों नागरिकांवर गुदरलें त्यांना कडक शासन झाल्या-वांचून नागरिकांचे तळतळाट कधींहि थांबावयाचे नाहींत. दंग्यांत सामील असल्याच्या संशयावरून कित्येक धटिंगणांना पोलिसांनीं पकडलें असून त्यांच्यावर खटलेहि भरण्यांत आले आहेत व त्यांना रीतसर शिक्षाहि होतीलच.

परंतु हे धटिंगण निमित्तमात्र होत ! खरे कलि-पुरुष कित्येक वेळा त्यांच्याहून वेगळेच असतात. त्यांचा छडा लावण्याचें व दंग्याची मूलभूत कारणें शोधून काढण्याचें काम चौकशी कमिटीचें होय. सदर कमिटीची नेमणूक लवकरच होईल त्या वेळीं हिंदु व मुसलमान या दोन्ही जातींच्या विश्वासास पात्र अशाच गृहस्थांची तिच्यांत योजना करण्यांत आल्यास तिच्याकडून हें बिकट व जोखमी-चें काम निस्पृहपणें शेवटास जाण्याची आशा आहे. मुंबईच्या टाइम्सनें दंग्याचें खापर कॉंग्रेसच्या माथीं फोडण्याचा अट्टाहास चालविला आहे. कॉंग्रेसनें मुसल-मानांच्या दुकानांवर निरोधन व बहिष्कार यांचा प्रयोग सुरू केल्यामुळे मुसलमान लोक खवळले व त्याचें पर्यवसान दंग्यांत झालें असें मुसलमान पुढाऱ्यांच्या वचनाचा आधार घेऊन टाइम्सकार सांगत आहेत. टाइम्सकारांस अशा प्रकारचे प्रलाप काढण्यास ही वेळ फार सोयीची आहे. कारण कॉंग्रेसचें नांव जितकें बदू होईल तितका कॉंग्रेसवर गहजब करण्यास सरकारास चिथावणी देण्याचें टाइम्सकारांचें कार्य सहजच साधणार आहे. कॉंग्रेस ही संस्था सामान्यतः सर्व इंग्रज लोकांच्या डोळ्यांत सांप्रत कशी सलत आहे

याचा ताजा मासला पार्लमेंटांतहि दोनच दिवसांपूर्वी पाहावयास सांपडला. मुंबईच्या दंग्यासंबंधाने भारतमंत्री सर सॅम्युएल होअर हे खुलासा करीत असता मि. वॉर्डर मिल्ने या कान्झरव्हेटिव्ह पक्षाच्या सभासदाने एक सूचक प्रश्न विचारला. ते म्हणाले, 'कॉंग्रेसच्या स्वयंसेवकांचें हिंदू समाजावर वजन आहे. त्यांनी दंगा मोडण्याच्या कामीं सरकारास अंग मोडून मदत केलीच असेल नाही?' या प्रश्नाला होअरसाहेबांनी दिलेलें उत्तर त्यांच्या उद्दाम व खोडसाळ स्वभावाला साजेसेंच आहे. त्यांनी सांगितलें 'अहो, कसली मदत घेऊन बसलांत. त्यांचें तर लोकांना संकटच झालें. त्यांनी जी कांही वारंवार पीडा दिली ती विचारूंच नका.'

सर सॅम्युएल होअर यांच्या वरील उत्तरांतील प्रत्येक अक्षरन् अक्षर साफ खोटें आहे. दंग्याची सुरुवात होतांच कॉंग्रेसने व तिच्या स्वयंसेवकांनी आपली सगळी हालचाल बंद ठेवली होती. दंग्याच्या वेळीं जर कोणाच्या नांवाचा मुंबईंत खराखोटा बोभाटा झाला असेल तर तो खिलाफत स्वयंसेवकांच्या नांवाचा. पण प्रश्नोत्तरांच्या वेळीं होअर यांनी खिलाफत स्वयंसेवकांचा एका शब्दानेहि उल्लेख न करता ज्या कॉंग्रेसच्या स्वयंसेवकांचें दंग्याच्या मुदतींत अस्तित्वहि नाहीसें झालें होतें, त्यांजवर मात्र खुशाल आग पाखडली. सरकारचें हें धोरण पाहिलें म्हणजे कायदेभंगाच्या चळवळीने सरकारास अत्यंत अप्रिय होऊन राहिलेल्या कॉंग्रेसच्या माथीं दंग्याचें खापर फोडता आलें तर तें फोडण्यास सरकार कसें टपलेलें आहे हें स्पष्टपणें दिसून येतें.

मुंबईच्या कॉंग्रेस कमिटीकडून निरोधनाची व बहिष्काराची सक्ती कोणावर होत असली तर ती परदेशी मालाची देवघेव करणाऱ्या व्यापाऱ्यांवर. या व्यापाऱ्यांत जसे मुसलमान आहेत तसे हिंदूहि आहेत. आणि जे हिंदू आहेत त्या सर्वांनाच, कॉंग्रेसचा जाच होत असला तर,तो मोठ्या सुखाचा वाटला असेल असें नाही. बहुतेक सर्वच चळवळींत हिंदु अधिक असतात तसे कॉंग्रेसच्या चळवळींतहि आहेत. पण यावरून कॉंग्रेसची चळवळ झाडून साऱ्या हिंदूंना मान्य आहे असें कोणी अनुमान काढल्यास तें निखालस चुकीचें ठरेल. हिंदूंतहि कॉंग्रेसपक्षाचे, नेमस्तपक्षाचे, तटस्थपक्षाचे, हिंदुसभापक्षाचे असे पोटभेद आहेतच. त्यांपैकीं कॉंग्रेसपक्षीय व्यापारी सोडून दिल्यास बाकीच्या व्यापाऱ्यांचा बहिष्काराच्या किंवा निरोधनाच्या चळवळीपासून होणाऱ्या नुकसानास मुसलमानांइतकाच विरोध असणार हें उघड आहे. अशा स्थितींत दंग्याचा धाक हिंदुपुढाऱ्यांनी कॉंग्रेसला घालूं नये व मुसलमान पुढाऱ्यांनी घालावा याचा अर्थ काय?

दुसरी शंका अशी कीं, कॉंग्रेसचा मार्ग चुकीचा असो किंवा बरोबर असो तो कोणत्याहि कारणाने मुसलमानांस वावडा वाटत असला तर मुसलमानांनी आपला राग कॉंग्रेसवर काढावयाचा होता. कॉंग्रेस म्हणजे कांही अखिल हिंदु जात नव्हे. मग कॉंग्रेसच्या चुकीकरिता ज्यांचा कॉंग्रेसच्या चळवळीशी काडीचाहि संबंध नाहीं अशा पोटापाण्याच्या धंद्यांत निमग्न असणाऱ्या हजारों हिंदूंचीं मुसलमान गुंडांनी दुकानें कां लुटावीं, घरें कां जाळावीं, डोकीं कां फोडावीं व प्राण कां घ्यावे? बरें, नुकसानीबद्दल संतापून सूड घ्यावयाचा तर कॉंग्रेसच्या चळवळीपासून ज्या मुसलमान व्यापाऱ्यांचा धंदा बुडाला त्यांनी कॉंग्रेसवर सूड घेण्यांत सयुक्तिकपणा आहे असें कदाचित् म्हणता तरी आलें असतें. पण दंग्यांत पाहावें तों ज्यांना कॉंग्रेस कशाशीं खावी हेंहि माहित नाहीं असलेच गुंड व उपटसुंभ मुसलमान होते. ज्या मुसलमान पोरांनी फकिरी मिळण्यासाठी एका हिंदु हॉटेलवाल्याशीं कलागत करून मारहाणीचा प्रसंग आणला त्या पोरांचें कॉंग्रेसने काय घोडें मारलें होतें?

यावरून एकच तर्क निघतो. तो असा कीं, ज्या मुसलमान व्यापाऱ्यांची प्राप्ती सुलेमान कासम मिठा व मौ. शौकत अली यांच्या मताने कॉंग्रेसच्या बहिष्कारामुळे व निरोधनामुळे बुडाली त्यांनी पुढाकार घेऊन मुसलमान समाजांतील बेकार व मवाली लोकांना हाताशीं धरलें व त्यांजकडून मुंबईंतील हाडें खिळखिळीं केलीं. मुसलमान समाज जात्या अडेल व धर्मवेडा आहे ही गोष्ट खरी आहे. पण धर्मदृष्ट्या डोकें फिरावें असली कोणतीहि आगळीक हिंदूंच्या हातून या वेळीं घडली नव्हती. अलीकडच्या कांही दंग्यांचीं कारणें पाहिल्यास मुसलमान समाजाच्या डोक्यांत दंग्याचें वेड शिरण्यास हिंदूंच्या वाद्यवादनाचें किंवा देवाच्या मिरवणुकीचेंहि निमित्त लागत नाहीं असें आढळून आलें आहे. त्यांच्या पुढाऱ्यांचा त्यांना इशारा मिळण्याचा अवकाश कीं ते दंगा करण्यास एका पायावर तयार असतात!

तीन वर्षांपूर्वी मुंबईस दंगा झाला त्या वेळीं हिंदूंनी मुसलमानांची धर्मदृष्ट्या काय आगळीक केली होती? पठाण लहान मुलांना पळवून नेतात अशी हूल त्यावेळीं उठली होती. मुलें जशीं हिंदूंचीं तशींच मुसलमानांचींहि पळविलीं जात असल्याने हिंदु व मुसलमान हे दोनहि समाज पठाणांवर खवळले होते. पण त्या मुद्यावर हिंदु—पठाणांत मारामारी सुरू होतांच हिंदूंसारखीच ज्या मुसलमानांची पठाणांविरुद्ध तक्रार ते मुसलमान पठाणांना मिळून

हिंदू–पठाणांमधील दंगा हिंदु–मुसलमानांच्या दंग्याच्या वळणावर जाण्यास विलंब लागला नाही. गेल्या वर्षी कानपुरास भयंकर दंगा झाला तेथेहि हीच तऱ्हा. दंग्यापूर्वी कानपुरास कांही खिलाफत-वाल्यांच्या मुसलमानांस चिथावणी देणाऱ्या सभा व मिरवणुकी चालू होत्या. पण त्या वेळीं निमित्त सांगण्यांत आलें कीं, भगतसिंगप्रभृतींस सरकारने फाशी दिल्याचा निषेध प्रदर्शित करण्याकरिता कानपूरच्या कॉंग्रेस कमिटीने हिंदूंबरोबरच मुसलमानांनाहि दुकानें बंद ठेवण्यास सांगितलें व तेवढ्यावरून चारपांचशें लोकांचे मुडदे पाडण्याइतकें मुसलमानांचें डोकें भणाणलें; पण हीहि बाब असलीच तर मुसलमान दुकानदारांपुरतीच असल्याने एखाद्या धर्मविषयक तत्वाप्रमाणे सर्व मुसलमान जमातीचें मन व्यग्र करून सोडण्यासारखी ती खास नव्हती.

मुसलमानांस दंगा करण्यास अमुकच निमित्त लागतें असें आता उरलेंच नसून त्यांना कसलींहि निमित्तें पुरतात. कांही दिवसांपूर्वी सिंध प्रांतांत लारखाना येथे एका मुसलमान बाईस हिंदु सभेने शुद्ध करून घेतलें म्हणूनच मुसलमानांनी दंगा करून हिंदूंचीं दुकानें लुटलीं. कलकत्त्यास आर्य-समाजाने आपली मिरवणूक काढली ती मुसलमानांस सहन न झाल्यामुळे त्यांनी दंगा केला. हिंदु राजा-पासून काश्मिरांत राजकीय हक्क काबीज करण्या-करितां मुसलमानांना दंगा करण्याची पंजाबांतून स्फूर्ति मिळाली. अशा रीतीने ठिकठिकाणीं घडलेल्या मुसलमानांच्या दंग्यांचा बारकाईने विचार केल्यास मुसलमान लोक हे धर्मदृष्ट्या व राजकीय दृष्ट्याहि संघटित झाले असून त्यांच्यांतील पुढाऱ्यांच्या मनांत येताच बहुजनसमाजास हाताशीं धरून ते हव्या त्या कारणासाठी दंगा चेतवूं शकतात असेंच दिसून येतें. मशिदीवरून हिंदूंनी वाद्यें वाजवीत जाणें किंवा धार्मिक मिरवणुकी नेणें हे प्रकार कदाचित् सामान्य मुसलमानांसहि दंग्यास प्रवृत्त करीत असतील. परंतु कॉंग्रेसची बहिष्काराची चळवळ, व हिंदूंची शुद्धि-संघटनाची चळवळ या बाबी अशा आहेत कीं त्यांचें रहस्य समजून स्वयंस्फूर्तीने दंगा करूं लागणें हें सामान्य मुसलमानांच्या आटोक्याबाहेरचें आहे. तें पुढाऱ्यांनी त्यांच्या डोक्यांत भरवून दिल्याशिवाय त्यांना समजण्याजोगें नाही. या दृष्टीने विचार केल्यास मुसलमानांच्या दंग्याची जबाबदारी त्या जातींतील पुढाऱ्यांवर आहे हें कोणाच्याहि लक्षांत येईल. मुंबईत दंग्याची चौकशी करण्यास कमिटी बसेल त्या वेळीं तिला पुढाऱ्यांचा छडा लावतां आला नाही तर ती चौकशी होऊन न होऊन सारखीच असें म्हणावें लागेल.

परवाचा दंगा मुंबईत झाला त्याबद्दल तेथील दंग्याच्या उत्पादकांना शासन व्हावयाला पाहिजेच. परंतु तेवढ्याने या दंग्यांचा कायमचा नायनाट होणार नाही. जेथे दंगा होईल तेथे चौकशी कमिटी नेमणें हा दंग्याचा दफनविधि होय. सन १९२९ सालीं मुंबईस अशीच चौकशी कमिटी नेमली होती. तिचा नवे दंगे बंद पाडण्याच्या कामीं काय उपयोग झाला, तो दिसतच आहे. त्यानंतर पुनः दंगा व पुनः चौकशी ही ठेवलेलीच आहे. यावरून दंग्याच्या निवारणाचा चौकशी कमिटी हा उपाय नव्हे असेंच सिद्ध होतें. कारण दंग्याचें मूळ एकट्या मुंबईत असतें तर तें चौकशी कमिटीस खणून काढता आलें असतें. दंग्याचें मूळ एकट्या मुंबईत नसून सर्व हिंदुस्थानभर पसरलें असल्याने तें खणून निघाल्या-शिवाय मुंबईतील काय किंवा कोठलेहि काय मुसलमानांचे दंगे केव्हांहि थांबावयाचे नाहीत. आज मुंबईच्या दंग्यास कॉंग्रेसची चळवळ हें निमित्त टाइम्सकारांनी व मुंबईच्या मुसलमानांनी पुढे केलें आहे. पण बरेलीजवळच्या खेड्यांत दोनच दिवसांपूर्वी मुसलमानांनी हिंदूंचीं घरें लुटून व जाळून त्यांना झाडाच्या सावलीखेरीज निवाऱ्याची जागाहि राहूं दिली नाही याला काय कॉंग्रेसच कारण झाली म्हणावयाची? मोहरमच्या धुंदींत मुसलमानांनी ही लीला केली असेंच दिसून येते.

सारांश, मुसलमान समाजांत हिंदूविरुद्ध लढाऊ वृत्ति त्यांच्या पुढाऱ्यांकडून जागृत झाली असून ते हिंदूंशीं लढण्याकरिता कसल्याहि संधीची वाट पाहत असतात एवढेंच काय तें म्हणतां येतें. ऑस्ट्रियाच्या राजपुत्राचा खून सर्व्हियांत झाला हें दूरचें लहानसें निमित्त आपलें लढाऊ सामर्थ्य जय्यत वाढवून ठेवलेल्या जर्मनीस सतरा वर्षांपूर्वी रशिया, फ्रान्स व इंग्लंड यांजबरोबर युद्धास उभें ठाकण्यास पुरेसें वाटलें. हिंदूंचे बाबतींत मुसलमानांचीहि सांप्रत अशीच अवस्था झाली आहे. त्यांना हिंदूंपासून व कॉंग्रेसपासून जीनांच्या चौदा माग-ण्यांस कबुली मिळवावयाची आहे व हिंदूंची शुद्धिसंघट-नाची चळवळ बंद पाडावयाची आहे. या दोन्ही गोष्टी सुऱ्यांच्या जरबेखाली साध्य करून घेण्याचा मुसल-मानांचा इरादा उघड दिसतो. हिंदु लोक व कॉंग्रेसचे पुढारी आता सावध व शहाणे झाले असल्याने ते मुसलमानांच्या दरडावणीला किंवा फुसलावणीला बळी पडण्याजोगे लेचेपेचे राहिले नाहीत. यामुळें तर मुसलमान पुढारी अधिकच खवळले असून ते आकाशपाताळ एक करून सोडीत आहेत.

हिंदु, मुसलमान व कॉंग्रेसचे पुढारी यांची ही मनःस्थिति लक्षांत घेतल्यास हिंदु–मुसलमानांमधील यादवी किरकोळ, तात्पुरत्या व वरवरच्या उपायांनी थांबावयाची नाही असें स्पष्टपणें म्हणणें भाग पडतें. त्यासाठी मूलग्राहीच उपाय योजले पाहिजेत.

हिंदु, मुसलमान व सरकार यांनी न्यायबुद्धीस शरण जाऊन तिची आज्ञा शिरसावंद्य मानावयास तयार झालें पाहिजे. हिंदू तयार होतील व आहेतहि. पण मुसलमान तयार न झाले व सरकारनेंहि न्यायानें व निरपेक्षपणानें वागावयाचें धैर्य न दाखविलें तर एकट्या हिंदूंच्या किंवा काँग्रेसच्या सदिच्छेचा काडीमात्रहि उपयोग न होता हिंदु व मुसलमान या दोघांपैकीं एक समाज कायमचा हार जाईपर्यंत किंवा दोघांनाहि एकमेकांची दहशत बसेपर्यंत या पवित्र आर्यभूमीचें शरीर तिच्या लेकरांच्या रक्तानें असेंच वारंवार भिजत राहाणार अशीं दुश्चिन्हें सांप्रत सर्वत्र दिसत आहेत.

# औंध दरबारास अभ्यंकरांचें उत्तर

[ प्रो.गणपतराव अभ्यंकर यांनी औंध दरबारच्या खुलाशाला उत्तर म्हणून जो पहिला लेख आमचेकडे पाठविला तो केसरीच्या दोन अंकांत दिलाच आहे. हल्ली त्यांचेकडून आणखी दोन लेख याच खुलाशाचा उत्तरार्ध म्हणून आमचेकडे आले आहेत. परंतु ते दोन्ही मिळून फारच मोठे आहेत. आणि त्यांचा संक्षेप केला असताहि त्यांच्या तात्पर्याची हानि होण्यासारखी नाही. याकरिता ते सबंध देण्यापेक्षां थोडक्यांत त्यांचा सारांश आम्हीं खाली देत आहो. —सं. के.]

"औंध संस्थानाचें एकंदर उत्पन्न पावणेचार लक्ष, त्यांत निव्वळ खाजगी खर्च ७६ हजार असून देवस्थान, शिबंदी, पब्लिक वर्क्स, किरकोळ व महाबळेश्वर खर्च मिळून आणखी ९५ हजार इतर खर्च आहे. वरील पांच बाबींचा खाजगी कामाकडे कमीअधिक उपयोग होतो. व दौलतीकडेहि उपयोग होतो. परंतु दौलत व खाजगी ही किती किती हें नक्की समजण्यास मार्ग नाही. तथापि आमच्या मतें वजा करण्यासारख्या रकमा वजा करून आम्ही निवळ खाजगी खर्च १ लक्ष ४४ हजार धरला. पण दरबारच्या खुलाशांत तो आंकडा फक्त ५० हजार दाखविला आहे. याचा मेळ कसा घालावयाचा ? १२ हजार रुपयांची सालिना नेमणूक औंध राजघराण्याच्या एका शाखेला ब्रिटिश सरकारनें ठरवून दिली असली तरी तो खर्च औंधच्या प्रजेच्या काय उपयोगी ? म्हणून तो आम्ही खासगीच मानतों. तो खर्च चालू ठेवावा, पण खासगी म्हणावा. शिबंदीपैकीं किती खर्च खरोखरी दौलतीकडे होतो हें दरबारानें स्पष्ट करावें.

बँडचा खर्च कशाकरिता ? महाबळेश्वर खर्च व फरासखाना खर्च व पाहुणचार खर्च मिळून २१हजार रक्कम ही दरबाराकरिताच खर्च होते असें सर्टिफिकीट मिळाल्यास ती खासगी खर्चांतून आम्ही वजा देऊं. पण ती सर्व रक्कम वजा केली तरी खाजगी खर्चाचा आंकडा १। लाखापर्यंत जातो. म्हणजे निवळ खाजगी खर्च एकंदर दौलतीच्या उत्पन्नापैकीं जवळ जवळ $\frac{1}{3}$ इतका होतो.श्रीमंतांची इभ्रत, पागा वगैरेवर सालीना नऊ हजार रुपये खर्च हा दौलतीनें सोसावा असें म्हटलें तरी त्यांत प्रजेचा उपयोग काय होतो ? तो खर्च करण्याला आमची हरकत नाही. पण त्याला खाजगी खर्च म्हणण्याला औंधसंस्थानाधिपतींचीहि हरकत नसावी. लग्नमुंजीकरिता दरसाल ५।६ हजार रुपये खर्चीं पडतात. यांत दौलतीचा काय संबंध ? १९२८ सालीं तर फक्त एका मुंजीकरिता २० हजार रुपये खर्च झाला. अशा खर्चावर निर्बंध नको काय ? तसा न पडेल तर लाबोशेर यांनी इंग्लंडसंबंधी म्हटल्याप्रमाणे Limited monarchy (मर्यादित राजशाही) पण Unlimited Family (अमर्याद कुटुंबशाही) असा प्रकार होतो. येथेंहि वाटेल तर खर्च करा. पण त्याला खाजगी म्हणा इतकेंच आमचें म्हणणें आहे.

तीच गोष्ट दसरादिवाळीचा सालीना १३०० खर्च व खिल्लाराकरितां सालीना साडेनऊशें रुपये खर्च यांचीहि आहे. हुजूर धर्मादायाचा खर्च म्हणून होतो त्यांत तो पैसा लोकांचा, पण पुण्याई यजमानांची असें होतें ! राजा झाला म्हणून त्यानें देणग्या कोणत्या व किती द्याव्या याला निर्बंध असला पाहिजे.महाभारताला दिलेली वार्षिक देणगी फार मोठी आहे. तिनें श्रीमंत बाळासाहेब यांना मोठेपणा मिळेल पण औंधच्या अशिक्षित गरीब प्रजेला हा खर्च झेपण्यासारखा आहे काय ? हीहि देणगी वाटल्यास द्या पण त्याबरोबर खाजगी खर्चाचें प्रमाण वाढलें म्हणा म्हणजे झालें. तसेंच मूर्तिकारांचा पगार अडीच तीन हजार, पदार्थसंग्रहालय बाराशें, लायब्ररी दीड हजार, इतिहास आठशें हा सर्व खर्च श्रीमंतांच्या अभिरुचीला भूषणास्पद आहे व वाटल्यास करावा पण खाजगी म्हणावा. देवस्थानचा खर्च पूर्वापार चालत आला म्हणून तो कांहीं लोकोपयोगी ठरत नाही. तो कमी कां करूं नये ? कुलदेवतेनें यजमानांना राज्य मिळवून दिलें. पण ती जोंपर्यंत प्रजेला तसेंच स्वराज्याचें ऐश्वर्य मिळवून देत नाही तोंपर्यंत त्यावर होणारा खर्च खाजगीच म्हटला पाहिजे. बागबगीच्यावर ३-३॥ हजार रुपये खर्च होतो. त्यांचा उपयोग लोकांना काय ? पब्लिक

वर्क्सपैकीं १५ हजार रुपये इमारतदुरुस्ती खर्च आहे. पण त्यांत कोण राहतात? पब्लिक वर्क्सचा निंमा खर्च अशा इमारतींकडे काय म्हणून? बिजली बत्तीचा उपयोग कोणाला? तरी एकंदर पी. डब्ल्यू. डी. खात्यापैकीं खरा लोकोपयोगी खर्च किती हें दाखवावें.

तात्पर्य ३९ ते ४४ टक्के दौलतीचें उत्पन्न खासगीकडे खर्च होतें असें आम्हीं म्हटलें तें फार तर तेहतीस टक्के म्हणूं. रा. वामनराव पटवर्धन (फिनॅन्स कमिटीचे एक मेंबर) यांच्या मतें हा खर्च तेहतीस टक्के न धरता २५ टक्के धरावा. श्रीमंतांच्या म्हणण्याप्रमाणे त्यांचा खाजगी खर्च दरसाल ५० हजार इतकाच धरला तर त्यांचा पगार चार हजार रुपये ठरतो. पण दरमहा चार हजार रुपये मिळविणारा अधिकारी आपलें कुटुंब व आपली इभ्रत यांवर औंधकर हल्लीं खर्च करतात तितका करूं शकेल काय? प्रजेला मात्र रॉकेलऐवजीं करंजेल खर्च करा असें सांगावयाचें आणि स्वतः मात्र इतका खाजगी खर्च करावयाचा.श्रीमंतांच्या खाजगी खर्चापैकीं एक पैदेखील दुराचाराच्या चैनीवर खर्च होत नाही हें आम्ही एकदा सोडून दहादा प्रांजलपणे कबूल करतों. पण त्यामुळें खर्चाची येवढी रक्कम योग्य ठरत नाही. प्रजेचे ट्रस्टी व साधेपणाच्या राहणीच्या तत्त्वाचे पुरस्कर्ते या नात्यानें श्रीमंतांनी हा खर्च कमी केला पाहिजे. थोरल्या पंतसाहेबांचे वेळीं खर्च सुरू होते तेव्हा लोकसभा नव्हती. पण आता लोकसभा झाली आहे, व प्रजाहि पूर्वीपेक्षां अधिक कंगाल झाली आहे. इतर देशांतील राजे देखील इतका खासगी खर्च करीत नाहीत. इंग्लंड-मध्ये हा खर्च उत्पन्नाच्या दर हजारीं एकपूर्णांकाचा $\frac{६}{१०}$ आहे. बेल्जममध्ये हजारीं एक, इटालींत दोन डेन्मार्कमध्ये तीन–दशांश, जपानमध्ये अडीच, नेदर्लंड व नॉर्वेमध्यें दीड असा आहे. नरेंद्र–मंडळा-मध्ये निवळ व्यक्तिशः खासगी खर्च पांच किंवा सात टक्के असावा असें ठरलें आहे. तें प्रमाण घेतलें तरी औंधकरांच्या पन्नास हजारांतून पंचवीस हजार कमी करावे लागतील.

श्रीमंत औंधकरांसारख्या निर्व्यसनी, कुटुंब-वत्सल, विद्याव्यासंगी व कलाप्रेमी मनुष्याला हल्लीहून अधिक उत्पन्न व अधिक खर्च करण्याची पात्रता असती तर कोणालाहि आनंदच वाटला असता. एखादा मनुष्य निर्व्यसनी आहे व सत्प्रवृत्तीचा आहे तरी त्याने कुटुंबखर्च इतर रीतीने आयापेक्षा अधिक ठेवला तर कसें चालेल? श्रीमंतगरिबांना एकच नियम लागतो. तात्पर्य, खासगी खर्च ही वादग्रस्त बाब आहे. म्हणून तिची सर्वांगीण चर्चा होऊन काही तत्त्वें ठरावीं व सिद्धान्त प्रस्थापित व्हावे याच हेतूने मीं ही चर्चा केली आहे.

औंध संस्थानांत प्राथमिक शिक्षण लोकांवर कर बस-वून दिले जातें तर दुय्यम शिक्षणहि तशाच पद्धतीने द्यावें. त्यांत विषमता कां असावी? दुय्यम शिक्षणा-नेहि स्वावलंबी व्हावें. दवाखाना, व्हॅक्सिनेशन यांचा फायदा राजधानीच्या व तालुक्याच्या लोकांना मात्र होतो, गांवानिहाय गरीब प्रजेला होत नाही. प्राथमिक शाळा–तपासणीसंबंधाचा खर्च योग्य नाही असा ठराव औंधच्या परिषदेंतच पास झाला. कायदे–मंडळाने हा खर्च अनावश्यक ठरविल्यावर तो करण्याचा आग्रह यजमानांनी कां धरावा? औंध संस्थानाची बँक वाईट स्थितींत आहे असे ठराव प्रातिनिधिक सभेंत वेळोवेळीं झाले आहेत;ती लिमिटेड करण्याची सूचना ५।६ वर्षे चालू आहे, मग तसें कां होत नाहीं? बँकेच्या व्याजाचे दर ठराविक नाहींत व विवक्षित लोकांनाच कर्ज मिळतात अशी तक्रार आहे. बँकेच्या ७ लाख भांडवलापैकीं पहिल्या प्रतीच्या तारणांत अवघे १५ हजार रुपयेच गुंतविलेले असून बाकीचे गहाणावर व अंगावर दिले आहेत. तारण वसूल करण्याचा प्रसंग आल्यास किती बुड येईल हें कोणीं सांगावें? कांही ट्रस्टचे पैसे बँकेंत गुंतले आहेत त्यांना धोका नाही काय? बँकेच्या व्यापारांत प्रत्यक्ष रोख रक्कम व्याजाची दरसाल किती येते व कागदी तोंडमिळवणी किती होते? बँकेच्या उत्पन्नांतून संस्थानाच्या कर्जाची फेड निदान हप्तेबंदीने झाली तरच बँकेचा फायदा. किर्लोस्कर व ओगले यांच्या कारखान्यांना बँकेकडून खरी मदत अशी फार थोडीच झाली आहे. लँड मॉर्ट-गेज बँक काढणें ही गोष्ट सोपी नाही. ती औंध संस्थान कितपत करूं शकेल? तात्पर्य, बँकेसंबंधाचा दरबाराचा खुलासा समाधानकारक नाही. माझ्या एकंदर टीकेंत मी दोष दाख-विले आहेत. पण त्याबरोबरच औंधच्या प्रगतिपर कारभाराबद्दल अभिनंदनहि केलें आहे. दरबाराच्या खुलाशाला दिलेल्या उत्तराखेरीज मी आणखी समक्ष चर्चा करण्यासहि तयार आहें. तरी तशी चर्चा करण्याची दरबाराची इच्छा असल्यास मला आनंदच वाटेल.

# पुस्तक-परीक्षण

Shivaji the Founder of Maratha Swarajya—**मराठा स्वराज्याचे संस्थापक शिवाजीमहाराज**—(ले. व प्र. श्री. चिंतामण विनायक वैद्य पुस्तकें मिळण्याचीं ठिकाणें:—भा. इ. सं. मंडळ पुणें व बॉंबे बुकडेपो गिरगांव मुंबई. किं. तीन रुपये.)

प्रस्तुत पुस्तक बहुमोल झालें आहे असें आम्ही म्हणतों. शिवचरित्रकार्यालयानें प्रसिद्ध केलेलीं सर्व साधनें हातांशीं असल्यानें श्री. वैद्य यांनी त्यांचा भरपूर उपयोग करून ग्रँट-डफ व सर जदुनाथ सरकार यांच्या चरित्रांतील अनेक चुका दुरुस्त केल्या असून श्रीशिवाजीमहाराजांच्या चरित्रावर नवा प्रकाश पाडला आहे. शिवाजी-महाराजांना लिहितां वाचतां येत नसे असा ग्रँट-डफपासून एक समज उत्पन्न केला गेला आहे. या चरित्रग्रंथांत अनेक आधार देऊन श्री. वैद्य यांनी शिवाजीला लिहितां येत होतें असें सिद्ध केलें आहे. पुराव्यांत सुरतेहून रेव्हिंग्टन व गिफोर्ड यांच्या पत्रांतील उल्लेख महत्त्वाचे असून त्यावरून शिवाजीमहाराजांना लिहितां येत होतें ही गोष्ट सिद्ध होते.

शिवाजीमहाराजांचा जन्मकाळ हा एक मोठा वादाचा मुद्दा आहे. श्री. वैद्य यांनी जेधे शकावलि, १८०३ मधील तंजावरचा शिलालेख, शिव-भारतांत दिलेली मिति व जयपूरच्या संग्रहांत श्री. गौरीशंकर ओझा यांना मिळालेली शिवराम ज्योतिषी यांनी लिहिलेली जन्मकुंडली, यांवरून १८ फेब्रुवारी १६३० ही तारीख व हा सन मान्य केला असून त्याबद्दलचें आपलें म्हणणें उत्तम रीतीनें मांडलें आहे. त्याप्रमाणेच लहानपणापासून हिंदवी स्वराज्य संस्थापन करण्याची शिवाजीमहाराजांची कशी प्रवृत्ति होती हेंहि सनदा वगैरेंवरून सिद्ध केलें आहे.

### चंद्रराव मोरे प्रकरण

जावळीचे चंद्रराव मोरे यांचा खून शिवाजीनें केला ही गोष्ट तर यापूर्वीच्या इतिहासकारांनी इतक्या वेळां घोटली आहे कीं त्याच्या सत्यतेबद्दल कोणाला केव्हांच शंका आली नव्हती. फारतर शिवाजीनें केलें हेंच बरोबर केलें व असें करण्याचा त्या वेळीं प्रघातच होता म्हणून शिवाजीचे पक्षपाती बोलत असत. श्री. वैद्य यांनी त्यांच्या या चरित्रांत असें स्पष्ट सिद्ध केलें आहे कीं, हें चंद्रराव—प्रकरण आजवर भलत्याच तऱ्हेनें मांडलें गेलें आहे. चंद्रराव हें नांव नसून हा किताब आहे. या चंद्ररावाला शिवाजीमहाराजांनी मागणी घालण्यासारखी मुलगी नव्हती इतकेंच नव्हे तर दौलतराव चंद्रराव हा शिवाजीचा स्नेही होता व तो निपुत्रिक मेला! त्याच्या बायकोच्या मांडीवर दत्तक देऊन अफजलखानानें जहागीर सुरू ठेवली. कृष्णरावानें शिवाजीच्या कार्यास विरोध केला व त्यामुळे १६५६ च्या मे मध्ये कृष्णराव चंद्रराव याला पुण्यास आणिलें व त्यानें शिवाजीची नोकरी करण्याचें कबूल केलें. पण पुढे त्यानें फितुरी केल्यामुळे शिवाजीमहाराजांनी त्याचा शिरच्छेद केला. ही गोष्ट शिव-भारत, जेधे शकावलि व अफझलखानानें जेधे यांना लिहिलेल्या पत्रावरून श्री. वैद्य यानी सिद्ध केली आहे.

अफजलखान व शिवाजी यांची भेट व त्यात स्वसंरक्षणार्थ शिवाजीनें अफजलखानास कसें मारिलें याचेंहि साधार, सत्यपूर्ण व रसभरित वर्णन शिव-भारत व इतर पत्रें वगैरेंवरून श्री. वैद्य यांनी उत्तम प्रकारें केलें आहे. या प्रकरणांचा वाद फार वर्षें चालला असल्यानें व त्यांत अफजलखानाला शिवाजीनें विश्वासघात करून मारला हें म्हणणें यापूर्वीच खोटें ठरविलें गेलें असल्यामुळे या वादांत आम्ही शिरत नाहीं. त्याला श्री. वैद्य यांचे या प्रकरणावरील दोन भाग वाचावे एवढीच आम्ही शिफारस करतों.

### चरित्राचा भरदार ओघ

यापुढील शिवाजीच्या चरित्राचा ओघ भरदार-पणें महाराष्ट्रांतील नद्यांना पावसाळ्यांत जें स्वरूप येतें त्याप्रमाणे या चरित्रग्रंथांत वहातो आहे. पावनखिंडींतील बाजी देशपांडे यांचा पराक्रम, दक्षिण—कोंकणांतील विजय, शाहिस्तेखानावरील छापा, सुरतेवरील स्वाऱ्या, मोंगलांशीं झालेलीं युद्धें, शिवाजीमहाराजांचें आग्र्यास गमन व तेथून सुटका, सिंहगडावरील हल्ला, साल्हेरला झालेला मोंगलांचा पराभव, राज्याभिषेक, दक्षिणेंतील स्वारी वगैरे अनेक रोमहर्षण प्रसंग श्री. वैद्य यांनी उत्तम रीतीनें वर्णिले आहेत. ते मुळांतच पाहणें योग्य.

पुस्तकाच्या शेवटीं शिवाजीचें शील, शिवाजीचा मोठेपणा व शिवाजीचें महत्कार्य म्हणून जे तीन भाग आहेत ते सर्वोत्कृष्ट आहेत. त्यानंतरच्या टिप्पण्या अतिशय महत्त्वाच्या व माहितीनें भरलेल्या आहेत. तात्पर्य, आम्हीं प्रारंभीं म्हटल्याप्रमाणें एकंदरींत श्री. वैद्य यांचा हा चरित्रग्रंथ उत्तम असून त्यांच्या कीर्तीस साजेसा आहे यांत शंका नाही. चरित्र लिहिण्याची त्यांची पद्धति, महाभारतांतील प्रसंगांचा ठिकठिकाणीं उल्लेख करण्याची त्यांची तऱ्हा किंवा प्रति-प्रश्नानें आक्षेपकांचीं तोंडें बंद करण्याची त्यांची रीत ही सर्वांसच पटते असें नाही. पण हा दोष नसून तें एक या ग्रंथास भूषणच आहे असें शेवटीं वाटतें. शिवाजीमहाराजांच्या या चरित्रानें एक मोठी कामगिरी केली एवढी गोष्ट सिद्ध आहे. म्हणून हें पुस्तक सर्व महाराष्ट्रीयांनी संग्रहीं ठेवावें अशी आम्ही शिफारस करतों.

# वसंतव्याख्यानमाला

## कामकरी वस्तींतील अनुभव

(९) शनिवार ता.१४ रोजीं श्री.कृष्णाबाई खरे यांचें "कामकरी वस्तींतील अनुभव" या विषयावर श्री. दा.वि.गोखले यांच्या अध्यक्षतेखालीं व्याख्यान झालें. अध्यक्षाचें प्रास्ताविक भाषण झाल्यावर व्याख्यात्या आपल्या भाषणांत म्हणाल्या, "मी ज्या वेळीं शाळेंत काम करीत होते त्या वेळीं मला हिंदुस्थानच्या दारिद्र्याची खरी कल्पना नव्हती,पण जेव्हा मीं मुंबईस जाऊन चाळींत राहणाऱ्या मजुरांची स्थिति पाहिली तेव्हा मला हिंदुस्थान किती दरिद्री आहे याची बरोबर कल्पना आली. मजुरांची प्रत्यक्ष स्थिति पाहून त्यांना प्रत्येक बाबतींत योग्य ती मदत करणाऱ्या संस्था आज मुंबईत अनेक आहेत, अशाच एका संस्थेतर्फे मी काम करीत असतें. मजुरांची स्थिति कशी सुधारावी याचे मार्ग अद्याप निश्चित असे ठरले नाहींत.तसेंच या बाबतींतील मतेंहि पक्कीं बनलीं नाहींत. पण सुशिक्षित समाजाला या मजुरांची स्थिति बरोबर समजावी आणि ती शक्य तितकी सुधारण्यास कांहीं मार्ग आंखतां येतो का पाहावा म्हणूनच आज मी आपल्यापुढें माझे अनुभव सांगत आहें. समाजांत मजुरांचा भरणा मोठा असल्यामुळे स्वराज्याचें शिखर जर जलद गांठावयाचें असेल तर प्रथम मजुरांच्या दारिद्र्याचा प्रश्न सोडविला पाहिजे. त्याशिवाय तुम्हांला पुढें पाऊलच टाकतां यावयाचें नाहीं. आज मुंबईला गिरणींत काम करणाऱ्या मजुरांची संख्या दीड लाख असून स्त्रीमजूर ३० हजार आहेत. अशीच स्थिति सोलापूर, अहमदाबाद वगैरे शहरीं आहे. हिंदुस्थानांत जर औद्योगिक क्रांति घडवून आणावयाची असेल तर मजुरांची हल्लींची शोचनीय स्थिति सुधारल्याशिवाय गत्यंतर नाहीं. हा समाज अद्याप मुका आहे. पण त्याला लवकरच वाचा फुटणार यांत शंका नाहीं.

मजुरांच्या चाळींत जर तुम्ही गेलांत तर एकेका खोलींत दोन दोन तीन तीन बिऱ्हाडें एके ठिकाणीं राहत असलेलीं दिसतील. 'मुलखावरून' आलेल्या मजुरांना जर तुम्ही येथे कशाकरितां आलांत म्हणून विचारलें तर ते लगेच उत्तर देतात कीं, 'कांहीं काम मिळतें का पाहावें म्हणून.' मुलखावरून आलेल्या बहुतेक लोकांची अशी समजूत झालेली असते कीं, मुंबईला गेलें कीं, हमखास काम मिळणार आणि पैका जवळ करून आपल्याला परत मुलखांत जाऊन सुखासमाधानानें राहावयास सांपडणार. पण अलीकडे मजुरांमधील ही भ्रामक समजूत हळूहळू कमी होत आहे ही सुदैवाचीच गोष्ट समजली पाहिजे. त्यांना असें आढळून येत आहे कीं मुंबई शहर आपल्यासारख्या बेकार मजुरांनी ठेंचून भरलें आहे. खेडेगांवांतील स्वच्छ, शुद्ध हवेंतून आलेल्या मजुरांमध्ये मुंबईस आल्याबरोबर फरक पडूं लागतो आणि ते मुंबईला थोडे दिवस राहण्याकरिता आलेले लोक बिकट परिस्थितींत सांपडून त्यांना जन्मभर राहावें लागतें आणि विसाव्या शतकांतील यंत्रांतून सुटण्याचा जों जों ते प्रयत्न करतात तों तों 'बुडत्याचा पाय खोलांत' या म्हणीप्रमाणे ते जास्त जास्तच आंवळले जातात आणि त्यांचें मनुष्यत्व जाऊन गिरणींतील अनेक यंत्रांपैकीं, ते एक यंत्र बनतात!

आपण गिरणी पाहावयास गेलों म्हणजे चालू असलेली औद्योगिक क्रांति पाहून थोडें समाधान वाटतें,पण तेंच मजुराच्या घामानें डबडबलेल्या तोंडाकडे पाहिलें कीं, तितकेंच वाईट वाटतें आणि मजुरांच्या दारिद्र्याची कींव येते. आपल्याला एक दिवस सहा तासांपेक्षा सात तास काम पडलें म्हणजे इतका वैताग येतो कीं आपण ऑफिसच्या नांवानें सारखे खडे फोडतों. मग तुम्हीच विचार करा कीं ज्या मजुरांना उभे राहून १०–११ तास एकसारखें दररोज काम करावें लागतें त्यांची काय अवस्था होत असेल? शेतकरी आपल्या शेतांत १२ तासहि काम करतो पण त्याचें मन किती उल्हसित असतें? याचें कारण म्हणजे तो स्वतःच्या शेतात काम करतो हें एक आणि दुसरें म्हणजे त्याला निरनिराळ्या तऱ्हेचीं कामें करावीं लागतात यामुळे कंटाळा येत नाहीं. पण गिरणींतील मजुरांच्या कामांत दोन्ही गोष्टींचा अभाव. एकतर गिरणी त्याची नसते आणि दुसरें पहिल्या प्रथम तो ज्या एका विशिष्ट कामावर नेमला गेला असेल तेंच काम त्याला जन्मभर करावें लागतें. तसेंच शेतकरी स्वतः शेत नांगरण्यापासून तों तें पिकवून खाईपर्यंत सर्व काम आपण करतो आणि मजूर एका ठराविक यंत्राबरोबर पुढेमागे वर्षानुवर्षे सारख्या फेऱ्या घालीत असतो. त्या बिचाऱ्याच्या नजरेस सबंध कापड तयार झालेलें कधीच पडत नाहीं!

फोर्ड मोटार कंपनींतील एक मजूर आज २७ वर्षे मोटारीवर नंबर लिहिण्याचेंच काम फक्त करीत असतो. त्याच्या कामांत कधीच बदल होत नाहीं. अशीच स्थिति गिरणींत काम करणाऱ्या मजूर

वर्गाची. त्यांची आणि मालकाची कधी नजरेभेटहि होत नाही. दिवसभर त्याला आपलें यंत्र आणि काम एवढेंच पहावयास मिळतें. थोडक्यांत बोलावयाचें म्हणजे याने यंत्रावर जो ताबा चालवावयाचा तो उलट तोच यंत्राच्या आधीन होतो. आरोग्य-निरीक्षण खात्याने असें प्रसिद्ध केलें आहे कीं, सामान्य मनुष्य जितकीं वर्षें जगतो त्याच्या निम्मेहि आयुष्य मजुरांना लाभत नाही ! तेव्हा आपणच असा विचार करा कीं असल्या नीरस प्रकारचें १०-११ तास काम करून आलेला मजूर जर संध्याकाळीं जिवाला थोडा विरंगुळा पाडण्याकरिता ताडीच्या दुकानांत शिरला किंवा एखादा अश्लील चित्रपट पाहाण्यास गेला तर त्यांत काय आश्चर्य ? इतकें काम केल्यावर उत्तेजक पेय घेण्याची त्यांना साहजिकच इच्छा होते.

इतके दमूनभागून आल्यावर घरांत तरी विश्रांति मिळते का ? तसेंहि नाही. त्यांच्या राहण्याच्या खोल्या म्हणजे जरा मोठ्या अशा हवाबंद पेट्या! त्यांच्या खोल्यांत उजेड नाही कीं हवा नाही. एकेका खोलींत चारचार कुटुंबें एके ठिकाणीं राहतात. मग त्यांना खाजगी जागा ती काय मिळणार ! जितका हवा-उजेडाचा दुष्काळ तितकाच पाण्याचा दुष्काळ ! चारचार बिर्‍हाडांना मिळून एक नळ असतो. हेच मजूर खेडेगांवांत असताना ओढ्याचें पोटभर पाणी पिऊन आणि स्वतःच्या शेतांतील काय कोंडा-भाकरी मिळेल ती खाऊन किती तरी सुखासमाधानाने राहत असतात. पण ते एकदा मुंबईला आले कीं खेडेगांवच्या जीविताचीं नुसतीं सुखस्वप्नें पाहण्यापलीकडे त्यांना कांही करता येणेंच शक्य नसतें. तेव्हा अशा दूषित हवेंत राहिलेल्या, कित्येक कुटुंबांतील एकाच खोलींत एकत्रित राहत असणार्‍या मजुरांच्या मुलांना धार्मिक, नैतिक शिक्षण कोणत्या तर्‍हेचें मिळत असेल याची कल्पनाच केलेली बरी !

याहिपेक्षां कांकणभर जास्तच वाईट स्थिति स्त्रीमजुरांची पाहावयास सांपडते. त्याहि गिरणींत कामाला जातात. तेथील काम झाल्यावर घरीं येऊन मग तुकडापाण्याची व्यवस्था करावयाची. लहान अर्भकाला सकाळीं एकदा दूध पाजून त्या ज्या कामाला जातात त्या दोनप्रहरीं थोडा वेळ घरीं यतात. आणि इतका वेळ मूल गप्प राहणार नाही ही खात्री असल्यामुळेच त्या मुलाच्या तोंडांत अफूची गोळी घालून मग जातात. अफू हें विष आहे हें त्यांनाहि माहीत असतें. पण करतात काय ? अफूच्या कैफांत पोर दोनप्रहरपर्यंत पडून असतें. आई कामावरून परत आली कीं, पोराला कण्हेरीची पेज पाजते. कारण दुधाला लागणारे दोन पैसे तरी त्यांच्याजवळ कोठे असतात ? एक-दोन उदाहरणें तर मीं अशीं पाहिलीं आहेत कीं त्या कुटुंबांतील लहान मुलें केवळ कांही खावयाला नाही म्हणून मृत्युमुखीं पडलीं ! अशा तर्‍हेची दरिद्री स्थिति आणि दररोज नवरा ताडी पिऊन झिंगून आला असल्यामुळे होणारीं भांडणें यांचा परिणाम साहजिकच मुलांच्या मनावर होतो आणि लहानपणापासून त्यांना निरनिराळीं व्यसनें लागूं लागतात.

प्रत्येक गिरणींत तक्रारी अर्जांची एक पेटी लावलेली असते. पण पाहावें तो ती नेहमी रिकामी दिसते. याचा अर्थ असा नाही कीं मजुरांच्या तक्रारी नसतात; पण तक्रार येऊन जाऊन करावयाची जॉबरविरुद्ध; आणि त्याच्याच हातांत तर त्यांचें पोट ! मग कोण तक्रार करण्यास धजेल ? मजूर तक्रार तर करीत नाहीतच पण उलट दरपगारांतून थोडी चिरीमिरी म्हणून जॉबरला दक्षिणा देतात. नवीन मजूर कामावर घेतला कीं, प्रथम त्याला पगार मिळत नाही. दारिद्र्याशीं नेहमी गांठ असल्यामुळे त्याची साहजिकच कर्ज काढण्याकडे प्रवृत्ति होते आणि जबर व्याज असल्यामुळें तो जन्मभर काम करून मारवाड्यांचें आणि पठाणांचें फक्त व्याज फेडीत असतो. त्याच्या हयातींत त्याला मुद्दल कांही फेडता येत नाही.

ही दुःस्थिति सुधारण्याकडे सुशिक्षितांनी दुर्लक्ष करून चालावयाचें नाही. रशियाप्रमाणे त्यांच्यामध्ये सक्तीचें शिक्षण सुरू करण्याचा प्रयत्न केला पाहिजे. त्यांची हल्ली आहे ही धार्मिक भावना बदलून ती उच्च केली पाहिजे. हल्ली कोणत्याहि देशाकडे पाहाल तर भांडवलवाले आणि मजूरवर्ग यांच्यामध्ये कलह सुरू आहे. त्यांच्यामध्ये समेट घडवून आणणें हें देशाच्या हिताच्या दृष्टीने आपलें कर्तव्य आहे. आणि हें कर्तव्य पार पाडावयाचें असेल तर मजुरांची स्थिति सुधारली पाहिजे. त्यांना साक्षर करून त्यांचे हक्क कोणते आहेत व ते कसे मिळवावयाचे याचें ज्ञान त्यांना अगोदर करून दिलें पाहिजे !'

### संगीत लेखन-पद्धति

(१०) संगीतचूडामणि **श्री. विनायकराव पटवर्धन** यांचें सोमवार ता. १६ रोजीं 'संगीत-लेखनपद्धति' या विषयावर **श्री. विनायकराव रानडे** यांच्या अध्यक्षतेखालीं व्याख्यान झालें. व्याख्यानांत आपल्या आपणांत म्हणाले, "मनुष्याला चालतांना, बोलतांना, बसतांना शिस्त म्हणून कांही लागते. आणि अशा शिस्तीने न वागणार्‍या मनुष्याला आपण गबाळ्या, गैरशिस्त म्हणतो. अशीच स्थिति संगीताची आहे. गेल्या दीड-दोनशें वर्षांचा काळ पाहिला तर आपणांस असें आढळून येईल कीं, केवळ

संगीत- लखनपद्धति प्रचारांत नसल्यामुळे गायन. कलेची फार हानि झाली आहे. जे गायनाचार्य होऊन गेले व जे हल्ली विद्यमान आहेत त्यांनी जर आपल्याला येणाऱ्या चिजांचें संगीत लेखनपद्धतीनें नोटेशन करून ठेवलें तर तें त्यांना उपयोगी पडेलच. पण त्यांचे पाठीमागे पुढील पिढीला त्याचा फार उपयोग होईल.

आता संगीत–लेखनपद्धति म्हणजे काय ? गाण्यांतील स्वरांना जें एक ठराविक माप असतें तें शिक्षकाला आणि विद्यार्थ्याला समजलें पाहिजे आणि ही समजूत या लेखनपद्धतीनें लवकर पटवून देता येते. शिक्षकानें आज जी एक तान सांगितली ती जर स्वरपद्धतीनें लिहून ठेविली तर ती विद्यार्थ्याला घरीं बसूनहि घोटता येते व यदाकदाचित् तो विसरला तर शिक्षकाला आदले दिवशीची तान पुनः तशीच सांगता येते. तेव्हा ही अडचण दूर करण्याची जबाबदारी लेखकावर आहे. पूर्वी ही लेखनपद्धति नव्हती. त्यामुळे आदले दिवशीं गवयानें शिष्याला सांगितलेली तान, त्या वेळीं जर ती शिष्याच्या डोक्यांत नीट बसली नाही तर तो साहजिकच दुसरे दिवशीं गुरुजींना विचारी. पण गंमत ही कीं, त्या वेळीं लेखन- पद्धति नसल्यामुळे गुरूला आपण कोणती तान सांगितली हे आठवत नसे आणि पुनः तीच तान त्याला चटकन सांगतां येत नसे.

आज जसे पुष्कळ गवई आहेत तसेच गाण्याची आवड असणारे कित्येक श्रोतेहि आहेत; पण गवई आपल्या चिजेंत कोणती तान किती लांबवितो, समेला येऊन कसा मिळतो, जागा, मेंडा, खटके वगैरे कसे घेतो हें जर श्रोत्याला कळलें नाही, तर गाण्याचा काय उपयोग? आणि लेखनपद्धति रूढ नसल्यामुळे व तिचें महत्त्व किती आहे हें कळत नसल्यामुळे, तसेंच गवई आपल्या चिजेंतील शब्द स्पष्ट म्हणत नसल्यामुळें गवयाचे हावभाव तेवढे लक्षांत राहतात. शब्द आणि ताना मात्र विसरून जातात.

एखादें नाटक पाहून आलेला श्रोता विशेष आवड- लेलें पद नेहमी गुणगुणतो. पण तें बरोबर तालांत येतें का ? कांही स्वर उंच होतात, कांही खाली जातात.ज्या ठिकाणीं तान नको असते त्या ठिकाणीं तो तान घेतो आणि कशी तरी समेशीं गांठ घालून देतो. ज्यांना गाण्याची आवड आहे पण जे शिकलेले नाहीत त्यांचा असा गोंधळ उडूं नये म्हणून कित्येक गायनाचार्यांनी यासंबंधीं पुस्तकें लिहिलीं. कांहीनी याच विषयावर व्याख्यानें दिलीं. स्वतः कै.पं. विष्णु दिगंबर यांनी सर्व हिंदुस्थानभर दौरा काढून स्वरलेखनपद्धतीची किती जरूरी आहे हें पुस्तकांच्या व व्याख्यानांच्या रूपाने लोकांना पटवून देण्याचा आटोकाट प्रयत्न केला. मराठी शाळेंत मास्तर विद्यार्थ्यांकडून परवाचा म्हणून घेतो तोदेखील एका तालांत असतो. यामुळे एखादा मुलगा आपला स्वर कमीअधिक लांबवूं लागला तर तो इतक्या मुलांतहि चटकन ओळखता येतो. याचें कारण हेंच कीं, गाण्यांत काय किंवा परवचा म्हणण्यांत काय, ठराविक कालखंड लागतो आणि तसेंच आरोह–अवरोहांचें प्रमाण ठराविक लागतें.

पूर्वीच्या गवयांत व हल्लींच्या गवयांत लेखन- पद्धति असावी कीं, नसावी याबद्दल मोठा वाद आहे. पूर्वीचे गवई म्हणत कीं, लेखनपद्धति सुरू झाली कीं, गायनकला आणि आपल्या पिढीचें गायनाचें वैशिष्ट्य हें बुडालेंच म्हणून समजावें. उलट हल्लीचा गवईवर्ग म्हणतो कीं, विद्यार्थ्याला एकदा सांगितले- ली तान त्याला संगीतलेखनपुस्तकाच्या साह्याय्यानें वाटेल तेथें बसून घोटता येते. जुन्या गवयांना अशी भीति वाटते कीं, आपण घेतलेली तान किंवा आलाप जर दुसऱ्यानें लिहून ठेवले तर ते दुसऱ्याच्या हातीं जातील व आपल्या घराण्याचें जें वैशिष्ट्य तें नाहीसें होईल. पण ही भीति माझ्या मतें निराधार आहे. कारण एखाद्या उत्तम गवयाचें गाणें ऐकून त्यांतील आवड णाऱ्या चिजा, पदें आपण गुणगुणतों. ही जी लोक- प्रियता त्याला मिळते, ती त्याची निंदा कीं स्तुति समजावयाची याचा आपणच विचार करा.

मी ज्या वेळीं कै. गुरुवर्य बाळकृष्ण- बुवांच्या घरीं गाणें शिकावयास राहिलों होतों त्यावेळीं प्रथम कांही दिवस त्यांचे चिरंजीव मला शिकवीत. त्यांना मी नेहमी म्हणें कीं तुम्ही ज्या ताना घेता त्यांचे स्वर लिहून ठेवलेत तर बरें. प्रथम प्रथम त्यांना स्वर लिहून घेण्याची सूचनाच अतिशय आश्चर्यकारक वाटली. त्या वेळच्या गवयांची अशी ठाम समजूत असे कीं,पदांचें स्वरलेखन करतां येणेंच शक्य नाही. पण पुढे त्यांनी व मीं मिळून कांही स्वरलेखन तयार केलें, पण जेव्हा ही गोष्ट बाळकृष्णबुवांच्या कानावर गेली तेव्हा ते माझ्यावर इतके संतापले कीं, त्यांनी रागाच्या भरांत मला घराच्या बाहेर काढले. आणि आपल्या घराण्यांतील उत्तमोत्तम चिजांचीं अशीं स्वरलेखनें करून घराण्याचें वैशिष्ट्य आणि गायन- कला तुला बुडवावयाची आहे काय असेहि त्यांनी विचारावयास कमी केलें नाही. पण घराण्याच्या आणि गायनकलेच्या सुदैवानें बाळकृष्णबुवांना स्वरलेखना- ची किंमत कळली आणि पुढे तर आपल्या उत्तमोत्तम आणि अवघड अशा ताना सांगून ते स्वतः आमच्याकडून स्वरलेखन करून घेऊं लागले. स्वरलेखनांत फक्त ढोबळ

स्वरच लिहितां येतात असें नाही तर एका स्वराचा एकषोडशांश इतका सूक्ष्म स्वर लिहितां येतो.

आता दुसरा प्रश्न असा कीं, अखिल हिंदुस्थानांत लेखनपद्धति एकच असावी कीं नाहीं? आणि ती तशी करता येईल कीं नाही ? त्याचें उत्तर असें कीं, चोहोंकडे एक लेखनपद्धति करता येईल. कारण महाराष्ट्रांत जे स्वरसप्तक आहे तेंच कर्नाटकांत आहे, तेंच उत्तर-हिंदुस्थानांत आहे. आपण ज्या स्वराला सा म्हणतों त्या स्वराला सर्व प्रांतांतील गायक साच म्हणतात. आज अखिल हिंदुस्थानांत एकीची चळवळ चालली आहे. हिंदु-मुसलमानांची एकी घडवून आणण्याचा प्रयत्न आपली पुढारी मंडळी करीत आहे. मग आम्हीं गवयांनां आपल्यापुरती तरी उत्तर-हिंदुस्थानी आणि दक्षिणी गवयांची एकी कां करूं नये? याला कोणी हरकत घेईल असें मला तरी वाटत नाही. पण प्रत्यक्ष व्यवहारांत हिंदु-मुसलमानांची जितकी एकी तितकीच आम्हा गवयांची आहे. आणि एकी न होण्याचें कारण फक्त आपल्या घराण्याचें वैशिष्ट्य. आम्ही अमुक एक खूण अमुक मात्रेला म्हणून ठरविली कीं, उत्तर-हिंदुस्थानी गवयांनी त्यांत बदल केलाच म्हणून समजावें. सध्या अखिल हिंदुस्थानाचा प्रश्न जरी बाजूला ठेवला तरी निदान खुद्द पुण्यांतील गायन-समाजांना स्वरलेखनाची एक पद्धत ठेवावी अशी मी त्यांना विनंति करतों. उत्तर-हिंदुस्थानांत अलीकडे अशा तऱ्हेचें वारें गवयांत शिरूं लागलें आहे. कानडी प्रांतांत तर लेखनपद्धतीचा झपाट्यानें अवलंब केला जात आहे. युरोप, अमेरिका, जर्मनी वगैरे परदेशांत स्टाफ नोटेशन आहे. तसें आपल्या-कडे कां होऊं नये ?

कांही लोक असा आक्षेप घेतात कीं, आमच्या गायनांत स्वर फार आहेत. मी म्हणतों, परदेशी संगीतांत तरी कोठे कमी आहेत ? असें असता त्यांनी आपलें स्वरलेखन चोहोंकडे एका पद्धतीवर बसविलें; आणि आपल्याला स्वराचा एक-षोडशांश इतका सूक्ष्म स्वर लिहितां येत असताहि स्टाफ नोटेशन करता येत नाही हें आश्चर्य नव्हे काय? मी तर असें म्हणतों कीं, विलायती स्टाफ नोटेशनपेक्षा आपले स्टाफ नोटेशन शतपटींनी चांगलें करतां येईल. तसेच कांही कांही लोक असा आक्षेप घेतात कीं, गायनकला ही पुस्तकावरून कधी तरी शिकतां येईल काय ? मी उलट त्यांना असें विचारतों कीं, पुस्तकावर फक्त अवलंबून राहून जरी गायनकला अवगत झाली नाही तरी पण गुरुमुखांतून एकदा ऐकलेली चीज त्यांच्याच स्वरलेखनपद्धतीने पुस्तकावरून जर अभ्यासली तर ती बरोबर आणि चांगली येईल कीं नाही ? म्हणजे पुस्तक हे जरी प्रथमपासून गुरुप्रमाणे उपयोगी पडलें नाही तरी मार्ग-दर्शक म्हणून तें खास उपयोगी पडेल. हल्ली नोटेशनचीं पुस्तकें निघत आहेत. पण त्यांत स्वरांच्या ठोकळ्याशिवाय दुसरे सूक्ष्म स्वर दिलेले नसतात. अशा स्वरलेखनाचा उत्तम गवई होण्याला कितीसा उपयोग होणार ? श्री. बालगंधर्वांचें अगर मास्तर कृष्णरावांचें पद जर नोटेशनपद्धतीनें शिकावयाचें म्हटलें तर हल्लींच्या नोटेशन पुस्तकांचा काय उपयोग ? त्यांचें गाणें इतकें लोकप्रिय होण्याचें कारण म्हणजे त्यांच्या ताननताल स्वर न स्वर अगदीं स्पष्ट सुटा जणुं मोत्यांच्या दाण्या-सारखा असतो, तेव्हां अशा पदांचें नोटेशन बरोबर करणें कठिण नसून तें विद्यार्थ्यांना प्रसारित होणें जातें."

वरील आशयाचें श्री. विनायकराव यांचें भाषण चालू असतां त्यांनी उदाहरणादाखल सघन सघन शुद्ध ताना कशा असतात व अर्धवट शिक-लेल्या गवयाच्या विकृत स्वरूपाच्या ताना कशा असतात त्या प्रत्यक्ष म्हणून दाखविल्या. तसेंच त्यांनी गुरुवर्य कै. पलुस्कर यांनी परगांवाहून कांहीं शिष्यांना व तरुण्यांची स्वरलेखनें पाठविलीं होतीं तीं या लेखन-पद्धतीच्या साहाय्यानें अगदीं बरोबर म्हणतां आलीं असे सांगून त्या चिजा म्हणून दाखविल्या. नंतर श्री. नवाथे व रानडे यांचीं उपयुक्त म्हणून भाषण झाल्यावर अध्यक्षांचें समारोपादाखल भाषण झालें. अध्यक्ष म्हणाले, "गायन हें रानटी मनुष्यापासून तों सुधारलेल्या मनुष्यापर्यंत सर्वांना प्रिय असतें. फक्त कमीअधिक आवडीचा काय तो फरक. ताशाचा आवाज ऐकून मनुष्याला जितका आवडेल त्यापेक्षा अधिकांना गाण्याचा किंवा तंतुवाद्याचा आवाज आवडेल. याचें कारण इतकेंच कीं, ताशांतून एकच आवाज कानाला येतो तर गाण्यांत निरनिराळ्या स्वरांनी मिश्रित असे आलाप निघतात. तसेंच तंतुवाद्यांत एक षड्जाची तार वाजविली तर त्या स्वराशीं आनुषंगिक स्वरांचा मिलाफ होऊन तो स्वर ऐकूं येतो. एकदा षड्जाची तार छेडली तर त्या तारेचीं सेकंदाला २६१ आंदोलनें होतात आणि म्हणून तो कानाला जास्ती गोडहि लागतो. पण खालचा आणि वरचा षड्ज जर एकदम वाज-विला तर त्याचा संयुक्त आवाज कानाला अधिक गोड लागतो. आजच्या व्याख्यात्यांनी फक्त लयीची माहिती विशेष विस्तारानें सांगितली. माझ्या मतें लेखनपद्धतींत स्वर लिहिणें थोडें कठिण आहे. गाण्याचे नुसते ठोकळ स्वर लिहिले तर ते रेघांनीं काढलेल्या चित्राप्रमाणे होतील. म्हणजे चित्राचा जो

जिवंतपणा प्रकाश व छाया ( लाइट आणि शेड ) यांमध्ये असतो तो नुसत्या रेघोट्यांत येणार नाही. तसेंच नुसत्या ठोकळ स्वरांनी गाण्यांत जिवंतपणा येणार नाही. सूक्ष्म वादी-संवादी स्वर आणि लय यांचा संगीतलेखनांत जर बरोबर मिलाफ करतां येईल तर जिवंत चित्राप्रमाणे तें आकर्षक होईल यांत शंका नाहीं." या आशयाचें अध्यक्षांचे भाषण झाल्यावर सभा संपली.

# औंधच्या राजपुत्रांची मुलाखत



## औंधचे राजपुत्र श्रीमंत अणासाहेब

### विमानविद्येची माहिती

औंधचे राजपुत्र श्रीमंत अणासाहेब कराची येथे विमानविद्या शिकून लायसेन्स घेऊन नुकतेच कराचीहून औंध येथें विमानांतून आले. त्यांची महाबळेश्वर मुक्कामीं मुलाखत घेतली, ती येणेप्रमाणें—

प्र०—आपल्याला विमानविद्या शिकण्याची जिज्ञासा प्रथम केव्हा उत्पन्न झाली ?

उ०—१९२८ साली लिंडबर्गने अटलांटिक महासागर विमानांतून ओलांडला तेव्हापासून या विषयाची गोडी उत्पन्न झाली.

प्र०—मग तिची फलद्रूपता कशी होत गेली ?

उ०—सरदार जगन्नाथमहाराज यांचेमार्फत प्रसिद्ध वैमानिक श्री. कबाली यांची ओळख झाली. ते पुण्यास आपलें विमान घेऊन आले होते त्या वेळीं जास्त परिचय होऊन औंध संस्थानांत Gliding Association काढावी असा आमचा विचार ठरला. नंतर १९३२ चे फेब्रुवारीमध्ये मी विमानविद्येचें शिक्षण घेण्याकरिता कराचीस गेलों. तेथे १ महिना २२ दिवस होतों.

प्र०—तेथें प्रवेश मिळण्यास अडचण पडली काय ?

उ०—तेथील क्लबाचे उपाध्यक्ष श्री. लक्ष्मीचंद हे आमचे ओळखीचे असल्यामुळे मला प्रवेश मिळण्यास त्रास पडला नाही.

प्र०—फी वगैरे काय असते ?

उ०—शिक्षणाची फी दर तासास २५ रु. पडते व कमीत कमी ३० तास शिक्षण घ्यावें लागते. एकट्यानेंच जाण्याचें ( solo flight ) विमानाचें शिक्षण सुरू झालें म्हणजे दरताशीं २० रु. द्यावे लागतात. मी स्वतः एकंदर ६० तास विमानोड्डाणाचें शिक्षण घेतलें.

प्र०—हे शिक्षण कसें दिले जातें ?

उ०—ज्या विमानांत शिक्षण देतात त्यांत डबल कंट्रोल असतात. शिक्षक व शिष्य आपापले ठिकाणीं बसून शिक्षक टेलिफोननें शिष्यास निरनिराळे कंट्रोल्स (नियंत्रणाचीं साधनें) कसे वापरावे ते वर हवेंत गेल्यावर शिकवीत असतो. शिष्य जरी आपले कंट्रोल्स उपयोगांत आणावयास चुकला तरी शिक्षकाजवळ तेच कंट्रोल्स असल्याकारणाने तो चूक सुधारूं शकतो व त्यामुळे विमान खालीं येण्याची भाति नसते. याप्रमाणे अभ्यास चालू असतां शिष्य वर एकटाच सुरक्षित जाऊन परत येईल अशी शिक्षकास खात्री वाटली म्हणजे तो शिष्यास एकटाच वर पाठवितो.

मला स्वतःला पुस्तकें वाचून थोडीशी यांत्रिक माहिती पूर्वीच झाली होती व Glidingचाहि थोडा अनुभव होता. त्यामुळे हे शिक्षण घेणें सुलभ गेलें व सुमारे १५ दिवसात मी एकटाच ( सोलो-फ्लाईट ) विमानांत वर हवेंत जाऊं शकलों. तो पहिल्या खेपेचा अनुभव रोमांचकारक होता. पहिल्या खेपेस ५०० फूट उंच जाऊन एक चक्कर घेऊन वैमानिक परत येतो. दुसऱ्या खेपेस जमिनीवर उतरण्याचें जास्त शिक्षण मिळतें. कारण या विद्येंत विमान उतरण्याची क्रिया धोक्याची व अवघड असते. तिसऱ्या सफरींत सर्व गांवावरून फेरफटका करून यावें लागतें.

प्र०—विमानावर वैमानिक ताबा कसा ठेवतो ?

उ०—विमान चालविण्याकरिता तीन मुख्य कळी ( Controls ) असतात. १ थ्रॉटल-याने वेग कमी ज्यास्त करतां येतो १ सुकाणूं-( Rudder ) याने इष्टदिशेस विमान वळवितां येते व ३ Joy-stick-याने विमान कमी ज्यास्त उंचीवर नेण्याचा क्रिया करतां येते. मोटारींप्रमाणे विमानास ब्रेक वगैरे नसतात. तेलाचा पुरवठा थांबविला कीं इंजिन बंद होतें.

प्र०—आपणास परवाना किती अभ्यास झाल्या-वर मिळाला ?

उ०—२१ तास अभ्यास केल्यानंतर मला परवाना मिळाला. तत्पूर्वी खालील अभ्यासक्रम पुरा करावा लागला. त्यामध्ये इंजिन बंद करून उतरणं, इंग्रजी आठाचे आकड्याप्रमाणें दोन ठरलेल्या बिंदूंमधून विमान नेणें वगैरे गोष्टी कराव्या लागल्या. २६ तास अभ्यास झाल्यानंतर निरनिराळ्या अडचणींच्या परिस्थितींतून विमान नेतां येऊं लागलें व तीस तास अभ्यास झाल्यावर स्वतःबरोबर दुसरा इसम विमानांत नेण्याची परवानगी मिळाली. नंतर हैद्राबाद वगैरे ठिकाणीं मी विमानांतून जाऊन आलों.

प्र०—विमान उतरविणें कठिण असतें असें आपण म्हणालांत तें कसें ?

उ०—विमान ज्या दिशेने उतरावयाचे त्याचे उलट दिशेने वारा वाहात असेल तर विमान १०० यार्डांतसुद्धा उतरतां येतें. नाही तर ज्यास्त लांबीचें मोकळें मैदान लागतें. व असें मोठें मैदान जेथे असेल तेथे विमान उतरवितां येतें.

प्र०—आपण कोणाचे विमानांतून आलांत ?

उ०—श्री. लक्ष्मीचंद यांचे विमानांतून आलों. मी व चि. चन्द्रायणी असे दोघे आलों.

प्र०—कराचीहून औंधपर्यंत आपण विमान आणलें तो प्रवास कसा केलात ?

उ०—ता. १६ एप्रिल शनिवार रोजीं सकाळी ७ वाजतां आम्ही निघालों. आमचा पहिला मुक्काम राजकोट येथे व्हावयाचा होता. आमचे जवळ रेखांशाच्या ( longitude ) रेघा मारलेले हिंदुस्थानचे नकाशे होते. त्या नकाशावर कराची ते राजकोट या दोन टोकां-मध्ये रेघ मारून ही रेघ रेखांशांशी जो कोन करील त्याप्रमाणे Compass ची दिशा लावून त्या अनुरोधाने विमान आणावयाचें होतें. परंतु वाऱ्याच जोरामुळे आम्ही वढवाणपर्यंत वाहवत गेलों. तेथे वढवाण स्टेशनावर वढवाण स्टेशनची पाटी वाचून वढवाणहून राजकोटास जी रेल्वे जाते तिचे अनुरोधाने त्याच दिवशीं पाऊण वाजतां राजकोटास आलों. तेथे पेट्रोल घेऊन पावणेदोन वाजतां निघून वढवाणावरून सुरत येथे आलों. वाटेंत खंबायतचे आखातावरून ३६ मैल समुद्रावरून उड्डाण केलें. सुरतेहून थेट बी. बी. सी. आय. रेल्वेचे लायनीचे अनुरोधाने त्याच दिवशीं ५॥ वाजतां मुंबईस आलों व जुहू येथे उतरलों. पुढे मंगळवारीं १९ तारखेस १०॥ वाजतां मुंबईहून निघून पाऊण वाजतां औंधास आलों. राजकोट ते औंध मीच विमान हांकलें.

प्र०—औंधाला आल्यानंतर आपण कोठें गेलांत?

उ०-आटपाडी, कोल्हापूर, सातारा, जरंडा वगैरे ठिकाणीं मी विमानांतून गेलों.

प्र.—ज्यास्तीत ज्यास्त उंच किती गेलांत ?

उ.—कराचीस १३००० फूट गेलों. आमचे वडील श्रीमंत चीफसाहेब यांस १२००० फूट उंच घेऊन गेलों होतों तेव्हा ढगाचे वर गेलों होतों. ढगांवर विमानाची सावली पडून त्याभोंवती जें सप्तरंगी इन्द्रधनुष्य दिसतें तो एक प्रेक्षणीय देखावा आहे. ७०० फुटांवर गेल्यावर फार थंडी वाजते, १६००० फूट पर्यंत श्वासोच्छ्वासास त्रास होत नाहीं.

प्र—कराचीस उच्च वैमानिक शिक्षणाची काय सोय आहे ?

उ—नुकतेच लायसेन्सकरिता विद्यार्थी तयार करण्याची परवानगी मिळाली आहे. त्यामध्ये रात्रीचें विमान चालविणे, तसेच उतारूंची ने-आण करणें, विमानविद्येच्या यांत्रिक भागांची जास्त माहिती असणें यांचा अन्तर्भाव होतो.

प्र०—स्वतःचे विमान ठेवावयास किती भांडवल लागेल ?

उ०—एकंदर रु. १२००० विमान विकत घ्यावयास लागतात. एक ग्यालन पेट्रोलमध्ये विमान १७ मैल जातें. एक विमान घेतलें तर ते ६-७ वर्षें काम देईल.

प्र०—आपणास एकंदर शिक्षण घेण्यास किती खर्च आला?

उ०—६० तास शिक्षण घेण्यास सुमारें १५०० रु. खर्च आला. माझे आधीं सुमारें ३१३ इसम शिक्षण घेऊन गेले; कारण माझे लायसेन्सचा नंबर ३१४ आहे.

प्र०—आपणास दुसऱ्यास हें शिक्षण देण्याची परवानगी आहे काय?

उ०—नाही. शिक्षकाची परीक्षा इंग्लंडमध्ये होते. ती परीक्षा पास होणारासच हें शिक्षण देण्याची परवानगी आहे. श्री. धारगळकर, दस्तूर वगैरे हिंदी शिक्षक ती परीक्षा देऊन आलेले आहेत.

प्र०—मध्यां हे शिक्षण घेतल्याने तरुणास उपजीविकेचें एक नवीन साधन मिळाल्यासारखें होईल काय ?

उ०—पुढेमागे हिंदुस्थानांत वैमानिक दळण-वळण सुरू होईल या दृष्टीने ही विद्या अवगत असल्यास फायदा होईल.

प्र.—यापुढे या विद्येंतील उच्च शिक्षण मिळविण्याचे बाबतींत आपला काय विचार आहे ?

उ —विलायतेंत क्रॅन्वेल ( Cranwell ) येथे रॉयल एअरफोर्समध्ये प्रवेश मिळविण्याची खटपट आम्ही करणार आहों. त्याकरिता हिंदुस्थानसरकार-ची चढाओढीची प्रथम परीक्षा होते त्यास बसावें लागेल.

प्र०—औंधमध्ये याबाबत आपण काय उपक्रम केला आहे ?

उ०—आम्ही श्री. कवाली यांचे मार्गदर्शित्वा-खाली एका ग्लाइडिंग क्लबाची स्थापना केली आहे.

# पुण्यांतील स्वदेशीची जाहीर सभा

रविवार ता. २९ मे रोजीं सायंकाळीं ६ वाजतां महाराष्ट्र स्वदेशी संघाच्या विद्यमाने, स्वदेशी दिना-निमित्त, पुणें शहर व लष्कर येथील सर्वपक्षीय व सर्व जातींच्या नागरिकांची सभा श्रीशिवाजीमंदिरांत **श्री. न. चिं. केळकर** यांच्या अध्यक्षतेखाली झाली. प्रारंभीं महाराष्ट्र स्वदेशी संघाचे अध्यक्ष **श्री. ल. र. गोखले** यांचे प्रास्ताविक भाषण झालें. ते म्हणाले, "आजची सभा ही महाराष्ट्र स्वदेशी संघातर्फे बोलावण्यांत आली आहे. या संघाचे सभासद बरेच झाले आहेत. पण एवढ्या सभासदांनी या संघाचें कार्य पूर्ण झालें असें होत नाही. या संघानें आपल्या शाखा अलीबाग रत्नागिरी वगैरे जिल्ह्यांच्या ठिकाणीं उघडल्या आहेत; पण अशा शाखा प्रत्येक जिल्ह्यांत व प्रत्येक खेड्यांत उघडल्या पाहिजेत तरच हा संघ स्थापन करण्याचा उद्देश कांहीं अशीं तरी सफल झाला असें होईल.

" हिंदुस्थानाचें वर्णन सर्व लोकांनीं 'सुवर्ण-भूमि' असें केलें आहे. पण आज दुर्दैवानें अशी परिस्थिति प्राप्त झाली आहे कीं या सुवर्णभूमीतील जनतेला आज धड पोटभर अन्न तर मिळत नाहींच, पण अंगभर वस्त्रहि मिळत नाही ! आगगाड्या, आगबोटी, तारायंत्र यापासून तों तहत दररोज लागणाऱ्या आगकाड्यांपर्यंत सर्व माल परदेशांतूनच आलेला दृष्टीस पडतो. यामुळे आपल्या पैशाचा ऱ्हास फार झपाट्यानें होत आहे. या ओहोटीला कांहीं तरी आळा घालावा व आपल्या देशाची स्थिति शक्य तों समाधानकारक करावी म्हणून या महाराष्ट्र स्वदेशी संघाची स्थापना केली आहे. या संघाचें वैशिष्ट्य असें आहे कीं यांत पक्षभेद नाही. आम्हीं या संघाचें माहितीपत्रक व हेतु येथील कलेक्टरसाहेबां-कडे पाहण्याकरिता पाठविले होते. संघाचे नियम व हेतु पाहून त्यांनी या संघाविरुद्ध कोणत्याहि तऱ्हेचा आक्षेप तर घेतला नाहींच, पण उलट सहानुभूति व्यक्त केली आणि अशी सहानुभूति मिळाल्यामुळे महाराष्ट्र स्वदेशीसंघाचे आज सरदार, जाहगिरदार, सरकारी अंमलदार सभासद झाले आहेत. तेव्हा अशा संघाचे प्रत्येकाने सभासद होऊन स्वदेशीचा पुरस्कार करावा येवढें सांगून आजच्या सभेचें अध्यक्षस्थान श्री. तात्यासाहेब केळकर यांनी स्वीकारावें अशी मी महाराष्ट्र स्वदेशी संघातर्फे विनंति करतों."

वरील आशयाचें श्री. गोखले यांचें प्रास्ताविक भाषण झाल्यावर व अध्यक्षांची सूचना केल्यावर त्याला अनुमोदन देण्याकरितां **काशीबाई देवधर** यांचें भाषण झालें. त्या म्हणाल्या, "निदान पुण्याला तरी स्वदेशी म्हणजे काय व तिचा पुर-स्कार करणें किती जरूर आहे हें सांगण्याची आवश्य-कता नाही. पण जसा कोणत्याहि वस्तूला गंज चढतो तसाच या चळवळीला काळाच्या ओघांत थोडासा गंज चढला आहे. तो घालवून त्याला मधून मधून जिल्हई देणें येवढें काम करावें लागतें आणि हे काम महाराष्ट्र स्वदेशी संघ करीत आहे. प्रत्येक मनुष्याला तीन गोष्टींची विशेष जरूर लागते. एक घर, दुसरें अन्न व तिसरें वस्त्र. पण दुर्दैवाने आज आपण या तीनहि गोष्टींत किती परावलंबी आहोंत हें हे प्रत्येकाला माहीतच आहे. आपण आपल्या घरांत तुरुंगासारखें जीवन कंठीत आहो ! तरी जीवित सुखी करण्याकरिता व आपलें अज्ञान व दारिद्र्य नाहीसें करण्याकरिता या संघाचे सभासद होणें हें प्रत्येकाचें आद्य कर्तव्य आहे. आजच्या सभेचें अध्यक्षस्थान श्री तात्यासाहेब केळकर यांनी स्वीकारावें अशी जी श्री. तात्यासाहेब गोखले यांनी सूचना केली आहे तिला मी दुजोरा देतें." अशा रीतीनें अनुमोदन मिळाल्यावर अध्यक्ष स्थानापन्न झाले.

प्रारंभीं श्री. ग. स. मराठे यांच्या कन्येने स्वदेशीवर एक पद म्हटलें. नंतर श्री. **न. चिं. केळकर** यांचें अध्यक्ष या नात्याने प्रास्ताविक भाषण झालें. ते म्हणाले, "मी आज बँकेच्या सभेंतील माझें भाषण अर्धवट सोडून आल्यामुळे पुनः मला ही सभा संपूर्ण होण्यापूर्वी जावें लागेल; म्हणून मी माझें अध्यक्षीय भाषण प्रथम करीत आहें.

आज ही सभा कोणत्या कारणाकरितां बोलावण्यांत आली आहे हें सर्वांना विदितच आहे. आपल्याला प्रारंभीं श्री. गोखले यांनी महाराष्ट्र स्वदेशी संघाची माहिती व हेतु हे सांगितलेच आहेत. आजच्या सभेला गांवांतील सर्व पक्षांची व मतांची मंडळी जमली आहेत. त्यांपैकीं प्रमुख गृहस्थ आपणाला दोन ठराव वाचून दाखवून त्यांवर थोडथोडीं भाषणेंहि करतील. पण तत्पूर्वी मला जे कांही स्वदेशीबद्दल चार शब्द सांगावेसे वाटतात ते सांगतों. स्वदेशी ही एकच चळवळ अशी आहे कीं, ती परिस्थितीच्या अतीत, पक्षभेदातीत, त्रिकालाबाधित आणि सहज सुगम अशा तऱ्हेनें आचारांत आणण्याजोगी आहे." केळकर यांनी स्वदेशी ही वरील चारीहि गुणांनीं कशी मंडित झालेली आहे हें निरनिराळीं उदाहरणें घेऊन स्पष्ट करून सांगितलें. ते म्हणाले कीं "आता आपल्यापुढें जे ठराव मांडण्यांत येतील ते एकमतानें पास करून व या महाराष्ट्र स्वदेशी संघाचे प्रत्येकानें सभासद होऊन या संघाचें कार्य पूर्ण करावें एवढीच मी विनंति करतों." वरील आशयाचें अध्यक्षांचें भाषण झाल्यावर प्रो. वामनराव काळे यांनी पहिला ठराव वाचून दाखविला तो असा—

ठराव १ ला—कोणत्याहि राष्ट्रास आर्थिक सुस्थिति प्राप्त होण्यास त्या राष्ट्रांत उद्योगधंदे व व्यापार यांची प्रगति व भरभराट होणें अगत्याचें आहे आणि तसें होण्यास त्या राष्ट्रांतील लोकांनीं अंतर्बाह्य स्वदेशीव्रताचा अंगीकार करणें अत्यंत आवश्यक आहे. या तत्त्वाप्रमाणें हिंदुस्थानांतील लोकांनी स्वदेशीव्रत प्रामाणिकपणें आचरलें पाहिजे. स्वतंत्र व भरभराटलेलीं राष्ट्रेंदेखील हें व्रत निष्ठेनें पाळतात. हल्लींच्या परतंत्र व निकृष्ट आर्थिक परिस्थितींत तर या साधनासारखा हिन्दी लोकांना दुसरा तरणोपाय नाहीं, असें या सभेचें मत आहे.

वरील ठरावाला अनुलक्षून **प्रो. काळे** आपल्या भाषणांत म्हणाले, "सुमारें ४० वर्षांपूर्वी पुण्यांत स्वदेशीची चळवळ सुरू झाली मग या चळवळीला पुनः प्रोत्साहन देण्याचें कारण काय असें कोणी विचारतील. याचें उत्तर असें कीं, त्या काळची चळवळ व हल्लीची स्वदेशीची चळवळ यांत पुष्कळ अंतर आहे. पूर्वी हल्लीप्रमाणें स्वदेशी वस्तूंचीं प्रदर्शनें भरलीं जात होतीं पण त्यांत येणाऱ्या वस्तू थोड्या होत्या आणि याचें कारण म्हणजे त्या वेळच्या लोकांच्या गरजा कमी होत्या. पण हल्ली परिस्थिति पालटली आहे. लोकांच्या गरजा बेसुमार वाढल्या आहेत आणि त्या पुरविण्याइतक्या स्वदेशी वस्तु तयार करणें ही बाब दिवसेंदिवस अवघड होऊं लागली आहे. दांत घासण्यापासून तों हजामतीपर्यंत स्व वस्तु परदेशी दिसतात. पण आतां याहि वस्तू स्वदेशांत तयार होऊं लागल्या आहेत आणि त्यांचा फायदा आपण प्रत्येकानें करून घेतला पाहिजे. गेल्या पांचदहा वर्षांत व्यापारमंदीमुळे बेकारी फार वाढली आहे ती घालविण्याकरितां स्वदेशी धंद्यांना उत्तेजन देणें हा एकच उपाय आहे.

"पूर्वी इंग्लंडमधील लोकांचें असें मत होतें कीं स्वदेशी ही परिस्थितीच्या अतीत नाहीं. त्यांचें म्हणणें असे कीं ज्याला जो जिन्नस स्वस्त मिळेल तो त्यानें घ्यावा. मग तो स्वदेशी असो वा विदेशी असो. स्वदेशीचें कार्य वेड आहे कोण जाणे असें स्वतः अर्थशास्त्रज्ञ म्हणत आणि त्यांचीं पुस्तकें वाचून आपणहि तसेंच म्हणूं लागलों. पण त्यांची परिस्थिति वेगळी आहे आणि आमची वेगळी आहे. त्यांच्या उद्योगधंद्यांची इतके दिवस भरभराट होती. पण नुकतीच त्यांना व्यापारमंदीची झळ लागल्याबरोबर राजपुत्रापासून जो तो स्वदेशीचा उपदेश व प्रयत्न करूं लागला. मग आमच्या हिंदुस्थानांत आज जी शे—दीडशें वर्षे बेकारी आहे ती घालविण्याकरिता आपल्याला किती जोरानें चळवळ केली पाहिजे याचा विचार करा. पूर्वी आम्ही कच्चा माल परदेशीं पाठवावा व त्यांनी पक्का माल आमचेकडे पाठवावा या श्रमविभागाच्या तत्त्वाप्रमाणे क्रम चालू होता. पण आज दररोज लागणाऱ्या बहुतेक वस्तु हिंदुस्थानांत तयार होत आहेत. स्वदेशी वस्तूंची जर मागणी वाढविली तर भांडवल आपोआप वाढतें आणि धाडसी माणसें निघून कारखाने व उद्योगधंदे देशांत सुरू होऊन बेकारी नाहीशी होते. तेव्हा या सर्व गोष्टींचा विचार करून प्रत्येकानें महाराष्ट्र स्वदेशी संघाचे सभासद होऊन घेईन तर स्वदेशीच वस्तु विकत घेईन असा संकल्प करणें जरूर आहे."

या आशयाचें प्रो. काळ्यांचें पहिल्या ठरावावर भाषण झाल्यावर **डॉ. रघुनाथ पुरुषोत्तम परांजपे** यांचें भाषण झालें. ते म्हणाले, "स्वदेशीचा पुरस्कार सर्व पक्षांच्या व मतांच्या लोकांनी करणें अवश्य आहे हें दाखविण्याकरिताच मी आज भाषण करण्यास उभा आहें. आज व्यापारमंदीमुळे बहुतेक देशांतून बेकारी वाढत आहे, विलायतेंत सरकार बेकारांना दर आठवड्यास कांही ठराविक वेतन देतें पण तेवढ्यानें हा प्रश्न सुटेल असें त्यांना वाटत नाहीं. म्हणून त्यांचा हल्ली असा प्रयत्न चालू आहे कीं या बेकारांना कांही तरी काम देऊन देशाच्या संपत्तींत भर टाकावी. अशीच चळवळ आज आपल्याला केली पाहिजे. विदेशी मालाची आयात जितकी कमी कराल तितकी स्वदेशी उद्योगधंद्याला तेजी येईल व देशाची संपत्ति वाढेल. ही चळवळ

जशी लोकांनीं करावयास पाहिजे तसें सरकारनेंहि तिला उत्तेजन दिलें पाहिजे. आयात मालावर जास्ती जकात ठेवून सरकारनें स्वदेशी उद्योगधंद्यांस उत्तेजन दिलें पाहिजे.कारखानदारांनी पूर्वी स्वदेशीचा दुरुपयोग करून तिला नफेबाजीचें स्वरूप आणिलें होतें ते घालवून नफेबाजी शक्य तितकी कमी केली पाहिजे.यामुळे स्वदेशी वस्तू स्वस्त दरांत मिळूं शकतील व साहजीकच लोकांची प्रवृत्ति स्वदेशी वस्तू विकत घेण्याकडे होऊन स्वदेशी उद्योगधंद्याची भरभराट होईल. सचोटीने जर चळवळ चालविली तर तिचें पाऊल दिवसेंदिवस पुढेंच पडेल हें लक्षांत ठेवलें पाहिजे." यानंतर श्री. केळकर हे बँकेच्या सभेला गेल्यामुळे त्यांचें अध्यक्षस्थान डॉ. परांजपे यांनी स्वीकारलें व सभा पुढें चालू झाली. **श्री. बाळूताई खरे** यांनीं भाषण करून ठरावास अनुमोदन दिलें.

यानंतर अध्यक्षांनी पहिला ठराव मताला घातला व तो एकमताने पसार झाल्याचें जाहीर केलें. यानंतर श्री. **गोपाळ कृष्ण देवधर** यांनी दुसरा ठराव वाचून दाखविला तो असा:—

**ठराव दुसरा**

"स्वदेशीव्रताच्या प्रसाराचें कार्य अखिल हिंदी-राष्ट्राने एकजुटीने व संघटित पद्धतीने करणें इष्ट आहे, म्हणून या देशांत आज इतरत्र व इतर रीतीने होणाऱ्या स्वदेशीच्या कार्याला पुण्यास भरलेली ही सभा सहानुभूति व्यक्त करीत आहे. तथापि कोणतें-हि स्थानिक कार्य स्थानिक संघटनेनें व प्रयत्नानेच विशेष प्रकारें यशस्वी होऊं शकतें. सबब पुण्यास स्थापन झालेल्या महाराष्ट्र—स्वदेशी संघाला पुण्याच्या सर्व नागरिकांनी सर्वप्रकारें साहाय्य करावें अशी या सभेची विनंति आहे."

ठरावावर भाषण करतांना **श्री. देवधर म्हणाले**, "नुसत्या कारखान्यांना भांडवल देऊन भागावयाचें नाहीं तर दिलेल्या भांडवलांतून निघालेल्या स्वदेशी वस्तू लोकांनी विकत घेतल्या पाहिजेत.तशींच स्वदेशी वस्तूंची फिरतीं प्रदर्शनें ठेवून सदीप व्याख्यानेंहि दिलीं पाहिजेत !"

या ठरावास खासदार **नारायणराव गुंजाळ** व **सौ. तारकुंडे**, शेठ **हणमंतराम रामनाथ**, शेठ **महंमद इब्राहिम हरून जाफर** यांनीं अनुमोदन दिल्यावर सदर ठराव पास झाला.

नंतर डॉ. ग. स. सहस्रबुद्धे यांनी अध्यक्षांचे, वक्त्यांचे व श्रोतृसमाजाचे आभार मानले. सर्व मंडळी उठून उभी राहिल्यावर श्री. ग. स. मराठे यांच्या कन्येने 'वंदेमातरम्' हें पद म्हटलें व सभा बरखास्त झाल्याचें अध्यक्षांनी जाहीर केलें.

# सुरीच्या धारेला द्रव्यधारेचा आधार आहे काय ?

मुंबईचा मवाली ही चीज कांहीं वेगळी आहे. तिची कल्पना मुंबईबाहेरच्या लोकांना सहसा येणार नाहीं. हा मवाली म्हणजे उडाणटप्पू. त्याला ना बायको ना मूल, ना घर ना बिऱ्हाड. तो रात्रीचा मोठ्या रस्त्याच्या पाऊलवाटेवर निजेल, दिवसाचा भीक मागून पोट भरील आणि बाकीचा वेळ हॉटेलांत बसून, गप्पा मारून, हुक्का पिऊन किंवा शहरच्या गल्लीकुचींतून भटकत राहून घालवील. त्याचें कोणीकडून पोटाला मिळविणें व मजेंत राहणें हें ध्येय. त्याला आज कालचें स्मरण नाही, उद्याची काळजी नाही व जवळ संग्रह करून ठेवण्याची फिकीर नाही,अब्रूची चाड नाही व कोणत्याहि कृत्याची खातर नाही. तुरुंगांत जाणें व बाहेर राहणें त्याच्या दृष्टीने सारखेच. तुरुंगांत जाण्याने त्याचे हाल होत नाहीत व बाहेर राहण्याने त्याचें मोठेंसे हितहि साधत नाही. त्याच्यासाठीं हळहळणारें कोणी नाही, व त्याला कोणासाठीं हळहळण्याला काळीज नाही. तो नेहमी भीकच मागेल असें नाही. तो वेळ पडेल किंवा लहर लागेल तसा वागेल. कधी झोळी घेऊन दारोदार फिरेल, तर कधी चोरी करून उगवला दिवस साजरा करील; कधी गिरणींत कामाला जाईल तर कधी गोदींत हमाल होऊन राहील.

अफाट मुंबई शहरांत अशा प्रकारचे हजारों लोक आढळतात. ते अमूकच मुलखाचे किंवा अमूकच जातीचे असतात असें नाही. त्यांत सरहद्दीवरचे पठाण, काबूलचे अफगाण, मलबारचे मोपले, कानपूर—लखनौकडील पुरभय्ये आणि वारंगळ-बिझवाड्याकडील तेलंगे सांपडतील. ते शरीराने धिप्पाड असतात असें नाही किंवा त्यांचीं मनगटें विशेष मजबूत असतात असेंहि नाही. मात्र ते बेछूटपणांत कोणासहि हार जाणार नाहींत व कोणत्या-हि अत्याचारास मागे सरणार नाहींत. अशा लोकांत मुसलमानांचा भरणा विशेष असतो. मुंबईत उदार व श्रीमंत लोकांची वस्ती मोठी असल्यामुळे त्यांनी घातलेल्या भिक्षेवर व दिलेल्या आश्रयावर मवाल्यांचा गुजारा चालण्यास कधीहि पंचाईत पडत नाही. ते पोटाचे नोकर. जो त्यांच्या पोटाला भाकरी घालील त्याची चाकरी बजावण्यास ते एका पायावर तयार असतात. या कारणाने ज्यांच्याजवळ मुबलक पैसा आहे त्यांना आपल्या मनांतील दुष्ट बेत तडीस नेण्यास

मवाल्यांसारखें उत्तम साधन दुसरें नाही. त्यांना मारेकरी म्हणून कोणाच्याहि अंगावर घालावें व चोर म्हणून कोणाच्याहि घरावर सोडावें. ते कोणाहि सज्जनास चोपून काढतील किंवा चार-चौघांत त्याची अप्रतिष्ठा करतील. मुंबई, कानपूर, कलकत्ता, कराची हीं मोठीं व्यापारी व बकाली वस्तीचीं शहरें असल्यामुळे तेथील नित्याची राहणी शांततेची व सुरळीतपणाची दिसली तरी उपद्रवापी व पाताळयंत्री लोकांना त्यांची विस्कटाविस्कट करण्यास व त्यांत अंदाधुंदी माजवून देण्यास इतर शहरांपेक्षां केव्हांहि अधिक वाव मिळतो. इतर कोणत्याहि शहरांपेक्षां या शहरांत वारंवार दंगे उसळतात व त्यांत अगणित मनुष्यहानि व अर्थ-हानि होते याचें मुख्य कारण हेंच होय.

शांततेच्या काळांत मवाल्यांचे हातपाय सामाजिक व राजकीय शृंखलांनी कांहींसे बांधले गेले असल्याने मवाली दीनासारखा गरीब दिसतो. परंतु कांही कारणाने भोवतालची शांतता बिघडली म्हणजे त्याच्या सामाजिक व राजकीय शृंखला आपोआपच गळून पडून तो मन मानेल तशा उड्या मारण्यास मोकळा होतो. गेल्या पंधरा दिवसांत त्याला ही मोकळीक मिळून हवा तसा धिंगाणा घालावयास सांपडला. मनुष्यवस्ती उठून जाऊन ओसाड पडलेलीं गांवें व मनुष्यांनी गजबजलेलीं पण दंगल माजलेलीं शहरें बेछूट लोकांना स्वतःच्या मालकीचीच वाटतात. तेथील जनतेच्या प्राणांचे धनी ते व अर्थाचेहि धनी तेच. हातांत सुरे व अन्तःकरणांत क्रौर्य असल्यावर हे मवाली निःशस्त्र व शांतवृत्तीच्या समाजाला सहजच भारी होतात. खेरीज बहुजन-समाजापैकींच ते असल्याने अमका मवाली व तमका मामुली हा फरकहि सामान्य जनास समजण्यासारखा नसतो. तो सुरा काढून एखाद्याच्या पाठींत किंवा पोटांत खुपशील, घर पेटवील अथवा दुकान लुटील त्याच वेळीं तो दंगेखोर मवाली म्हणून ओळखला जाईल. तोंपर्यंत त्याची गणना सावांतच व्हावयाची. सावांत सामील झालेल्या चोरांच्या दगाबाजीची जनतेवर जितकी दहशत बसते तितकी उघड शत्रूचीहि बसत नाही. या कारणाने मुंबईतील मनुष्यांना कधी स्वतःच्या सावलीची भीति वाटली अगर कधी मित्र समजून शत्रूला कवटाळण्याची पाळी आली तर त्यांत नवल नाही. कारण शत्रु कोण व मित्र कोण हेंच त्यांस कैक वेळा समजेनासें होतें.

जनतेच्या या मनःस्थितीचा मवाल्यांस हवा तसा फायदा घ्यावयास सांपडतो. ते एकएकटे हिंडत असले म्हणजे एकएकट्यास बेसावध गांठून आपल्या सुऱ्याची तहान त्याच्या रक्ताने तृप्त करतात व टोळ्याटोळ्यांनी टेहळणी करीत असले म्हणजे दुकानें लुटतात, व देवळें पेटवितात. मुंबईतील दंगा गेल्या आठवड्याच्या प्रारंभा संपत आल्याचे सुचिन्हें दिसूं लागलीं होतीं. परंतु गेल्या शनिवारपासून ती स्थिति अजिबात पालटून जणुं काय दंग्याचा पहिलाच दिवस मुंबईत उगवल्यासारखा झाला आहे. दंगेखोर व सरकार या दोघांच्या सामन्यात सामान्य जनता सांपडली आहे. दंगेखोर निरपराधी लोकांचा प्राण घेत आहेत व वित्तहरण करीत आहेत; आणि सरकारचे पोलीस व लष्कर त्यांच्या प्राणाच्या व वित्ताच्या रक्षणार्थ धावत आहेत. सरकारानें आतां कर्फ्यू ऑर्डर कडक रीतीने जारी केली आहे. पांचांपेक्षां अधिक माणसें एकत्र जमण्याचा हुकूम कसोशीने अमलांत आणिला आहे. पोलिसांचे व सोजिरांचे फिरते पहारे ठेवले आहेत. त्यांच्या चिलखती गाड्या फेऱ्या घालीत आहेत व दंगेखोरांचे सुरे जप्त केले जात आहेत. परंतु दंगेखोर ओळखण्याचें स्पष्ट असें चिन्ह नसल्यानें इतक्याहि कैचींतून मुसलमान मवाली सुऱ्यांच्या साहाय्याने अत्याचारांची चैन चालवीतच आहेत.

मुंबईसारखें श्रीमान व गुलहौशी शहर. तेथे संपत्तीला व ऐषआरामाला काय तोटा ? लाखों रुपयांचें जडजवाहीर ज्यांत सांठविलें आहे, व नानाप्रकारचीं सुगंधी द्रव्यें ज्यांत ठेवून भरलीं आहेत अशीं शेंकडों दुकानें मुंबईत आहेत. दंग्याच्या पहिल्या अमदानींत एका हिंदु जवाहिऱ्याचें दुकान मुसलमानांनी लुटून त्यांतून नेवली तितकी संपत्ति कशी लांबविली हें वाचकास माहीत आहेच. दंग्याच्या या दुसऱ्या अमदानींत त्यांना सौगंधिक द्रव्यें हस्तगत करून त्यावर बादशाही ऐषआराम उपभोगण्याची लहर लागली. याकरिता त्यांनी फारच शिताफीची शक्कल काढली. त्यांनी दुकान फोडून त्याची लूट चालविली असल्याचा सुगावा आसपास न लागूं देण्याकरिता बाहेरून दुकानाच्या दरवाजाचें कुलूप जसेंच्या तसें कायम ठेवलें व खिडकी उघडून दुकानांत प्रवेश केला. सार्जंट शा याच्या नजरेला हें कृत्य आलें. त्याबरोबर पोलीस व लष्कर यांनी दुकानास अचानक गराडा घालून कुलूप काढलें आणि दार उघडून आंत पाहातात तो दरोडेखोर अत्तराच्या पेट्या व साबणाच्या वड्या जमवून नेण्याच्या बेतांत आहेत.

हे सर्व चोर व दरोडेखोर अर्थातच मुसलमान होते. ते इतके अट्टल कीं त्यांपैकीं एकजण पोलिसांची सांखळी तोडून व त्यांच्या हातावर तुरी देऊन निसटूं लागला होता. पण त्यास व इतर सर्व मुसलमानांस पोलिसांनी पकडलें

हें सांगावयास नकोच. एक पठाण तर एका घरास लागलेली आग विझविण्यास निघालेल्या बंबवाल्यापुढे सुरा दाखवून त्यास जिवाच्या भीतीने परत जावयास लावीत होता. अशा अट्टल व पटाईत पुंडांपुढे ज्यांना हातांत कधी हत्यार धरणें माहीत नाहीं कीं रक्ताची उडालेली चिळकांडी निर्भयपणें पहाण्याची ज्यांना सवय नाहीं अशा नाजूक मनाच्या व अशक्त शरीराच्या मुंबईतील हिंदूंचा निभाव कसा लागावा ? गाईच्या कळपावर कसाबांनी सुरे चालवावे, त्याप्रमाणे हिंदूंची मुसलमान मवाल्यांपुढे असाहाय्य व दुबळी स्थिति झाली असल्यास त्यांत आश्चर्य कसलें ? एक वेळ पुरुषाची गोष्ट राहो, पण कोमल व निर्बल अशा स्त्रियांच्या अंगावर सुरीचा वार निष्कारण करणाऱ्या नामर्दांस आपल्या पौरुषाची लाजच वाटावयास पाहिजे. पण त्या मवाल्यांना कसली लाज, कसली दया आणि कसली माया ? त्यांनी दंग्याच्या नव्या अमदानींतहि मुंबईहून जीव मुठींत घेऊन परगांवीं जावयास निघालेल्या एका हिंदु कुटुंबाच्या गाडीवर गर्दी करून नवरा-बायकोची ताटातूट केली व आई । यमसदनास पाठवून तिच्या लेकरास या जगांत पोरकें सोडण्याचा प्रयत्न केला. पण हें निघृण कृत्य दयाघन परमेश्वरासच न पाहवल्यामुळे मुलावरील आईची पाखर कायम राहिली.

मुसलमान मवाल्यांनी दुकानें लुटलीं तर त्यांत त्यांची द्रव्यतृष्णा होती असें तरी म्हणतां येईल.परंतु सुऱ्यांनीं बायाबापड्यांस व गोरगरिबांस मृत्यूची वाट दाखविण्यापासून त्या मवाल्यांना ऐहिक लाभ कोणता, हा प्रश्न सहजच उद्भवतो व त्याचा उलगडा या घोर कृत्याचा एखाद्या कृष्णकारस्थानाशीं संबंध जोडल्यावांचून करतां येत नाहीं. पंधरा न् पंधरा दिवस मवाल्यांचा सुरा रक्ताने नित्य न्हातो याला कारण एकट्या मवाल्यांची रक्ताची तहान खास नव्हे. मवाल्यांच्या हातांतील रक्तांजलीने कोणा तरी पाताळयंत्री दुष्टांच्या आत्म्याला शांति मिळत असली पाहिजे असा पुष्कळांचा तर्क वाहात होता, व शांतता कमिटीने सरकारास नुकत्याच दिलेल्या इषाऱ्यावरून तो तर्क दृढ होतो. कमिटीने मुंबई सरकारचे गृहमंत्री मि. थॉमस व मुंबईचे कमिशनर सर पॅट्रिक केली यांस असें स्पष्ट कळविलें आहे कीं, हे दंगे भुरट्या मवाल्यांचे आहेत या भ्रमांत तुम्ही राहूं नका. हें एक जबरदस्त व भयंकर कारस्थान असून त्याच्या बुडाशीं दुष्ट लोकांच्या अकलेचा व पैशाचा जोर आहे. कमिटींत एकट्या हिंदु जातीचे सभासद नसून मुसलमान आदिकरून इतर जातींचेहि सभासद आहेत. तिजपाशीं मुंबईतील बित्तंबातमी समजण्याचीं विपुल साधन आहेत व तिने दंगा शांत करण्याचे जेवढे उपाय सरकारास सुचविले तेवढे सगळे उपाय सरकारानें अमलांत आणले आहेत. अशा जबाबदार व वजनदार लोकांची ही कमिटी आहे. कमिटीने अमक्याच जातीच्या लोकांचा हा कट आहे असें स्पष्टपणें जरी म्हटलें नसलें तरी ज्याअर्थी सुऱ्यांच्या धारेला मुसलमानांकडून हिंदूंचे बळी पडत आहेत त्याअर्थी हा कट मुसलमानांचाच असला पाहिजे हे अनुमान सहज निघण्यासारखें आहे.

कमिटीने गेल्या मंगळवारीं आपलें वरील मत प्रदर्शित केलें व त्याच दिवशीं मुंबईचे गव्हर्नर सर फ्रेड्रिक साइक्स व गृहमंत्री ना. थॉमस मुंबईत येऊन त्यांनी आपल्या अधिकारी मंडळीशीं गुप्त खलबत केलें; आणि त्यानंतर मुंबईचे मेयर बॅ. विठ्ठलराव चंदावरकर, शांतिदास अस्करण, सरदार सुलेमान कासम मीठा यांच्या भेटी घेऊन त्यांजबरोबर व्यक्तिशः चर्चाहि केली. तिचा परिणाम काय झाला हें लवकर समजेलच. परंतु एक सिद्धान्त खरा कीं, सरकारने सध्यांहूनहि जालीम उपाय योजिल्यावांचून मुसलमानांनी उगारलेले सुरे गोरगरिबांच्या कुशींत शिरण्याचे थांबणार नाहीत. आज सामान्य जनतेपैकीं एखादा गवळी दुधाची कावड घेऊन जातांना सुरीने घायाळ होऊन मरून पडतो, किंवा एखादा मजूर कामावर चालला असता रोजच्या कारखान्याच्या दारांत पोंचण्याऐवजीं मृत्यूच्या दरबारांत दाखल होतो, हे प्रकार सकृद्दर्शनीं कदाचित् क्षुल्लक वाटतील. परंतु हे क्षुल्लक प्रकारच भयंकर प्रकारांना जन्म देत असतात. सरकारी नोकर व म्युनिसिपल नोकर सामान्य जनतेंतच जमा होतात. त्यापैकीं असंख्य नोकर हिंदूच असल्यामुळे त्यांच्या जिवास यापुढे धोका पोंचणार नाही कशावरून? फार लांब कशाला? आजच मुंबईत तशी स्थिति झाली आहे म्हटलें तरी चालेल! म्युनिसिपालिटीचे झाडू रस्ते साफ करण्याकरिता मुसलमानांच्या मोहल्यांत जाण्यास धजावत नसल्यामुळे त्यांना लॉऱ्यांत घालून बंदोबस्ताने न्यावें लागत आहे. आज जो प्रसंग झाडूंवर तोच उद्या परवा इतर लहानमोठ्या नोकरांवर आल्यास मुंबईतील लोकांचा व्यापारधंदाच काय, पण सरकारी कामकाजहि थांबून मुंबईत अंदाधुंदी माजेल. इतकेंच नव्हे तर हा दंगा मुंबईत फार दिवस घुमत राहिल्याने दंगेखोरानी सरकारावरहि जय मिळविला असा इतर शहरांतील पुंडांचा समज होऊन त्यांस एक प्रकारचें उत्तेजन मिळेल, व सर्वत्र क्रांतीच्या काळासारखी अराजकता माजेल. यासाठी जे कडक उपाय अमलांत आणावयाचे ते सरकारने ताबडतोब अमलांत आणिले पाहिजेत असें आम्हांस वाटतें.

ते उपाय कोणते हे सध्याच्या वटहुकूमां-

च्या काळांत सरकारास कोणी सांगावयास पाहिजे असें नाही. ज्यांनी कॉंग्रेसच्या फंडाचा कायदेभंगाच्या चळवळीस उपयोग होऊं नये म्हणून ठिकठिकाणचे फंड जप्त केले व कॉंग्रेसच्या कार्यकर्त्यांस संशयावरून पकडून अटकेत ठेवलें, ज्यांनी सरहद्दीवरील हजारों पठाणांची उचलबांगडी केली व बंगाल्यांतील अराजकांवर आपलें हत्यार तितक्याच निष्ठुरतेने चालविलें, त्या सरकाराला हे उपाय सहज सुचणारे आहेत. मुंबईतील मवाली क्रूर असतील, त्यांस काळीज नसेल, हें खरें असलें तरी त्यांनी नेमके हिंदूंनाच टिपून कां काढावें? त्यांना एकट्या हिंदूंच्याच रक्ताची तहान कां लागावी? मनुष्याच्या डोळ्यावर खून चढून तो बेहोष बनला तर तो हिंदुच काय पण पार्शी, ख्रिस्ती, युरोपियन या सर्वांचीच कत्तल करीत सुटेल. मुंबईची कत्तल अशी सर्रास नाही व अविवेकाचीहि नाही. ही कत्तल ज्याअर्थी एकट्या हिंदूंचीच होत आहे त्याअर्थी हिंदूंच्या रक्ताची धार धरणाऱ्या मुसलमान मवाल्यांच्या पाठीशीं एखाद्या संस्थेने द्रव्याची धार धरली असली पाहिजे हें शांतता कमिटीने केलेलें अनुमानच अधिक संभवतें. यासाठी सरकारनें आपल्या कुशल अशा गुप्त पोलीस खात्याकडून त्या संस्थेचा छडा लावून दंग्याचें मूळच उपटून काढलें म्हणजे मुंबईवर गुदरलेला कहर आपोआपच थांबेल हें उघड आहे. आतापर्यंत लाखों रुपयांच्या मालमत्तेची नासधूस झाली, सुमारें पावणेदोनशें माणसें मरण पावलीं व जवळ जवळ दोन हजार लोकांना जखमा झाल्या, हें नुकसान काय कमी झालें, म्हणून अधिक कडक उपायांकरिता वाट पहावयाची!

मुंबईतील दंग्याकडे बाहेरचे कित्येक मुसलमान कोणत्या दृष्टीने पहात बसले आहेत याचें एकच उदाहरण दिलें म्हणजे पुरे. दिल्लीस ता. २९ रोजीं ऑ. इं. मुस्लीम लीगच्या कौन्सिलाची सभा झाली. तिला जाफरउल्लाखान, सर महमद याकूब, अब्दुल अझीज व अकबर अली इत्यादि मुसलमानांचे पुढारी तेवढेच हजर होते. पण अशा पुढाऱ्यांच्या कौन्सिलाने पास केलेले ठराव कसे खोडसाळपणाचे आहेत इकडे लक्ष दिल्यास मुसलमानांच्या हृदयांत कोणतें कालकूट विष भरलें आहे तें समजते. त्यांनीं आपल्या पहिल्याच ठरावांत मुंबईचा दंगा हा हिंदूंच्या असहिष्णुतेचा व शिरजोरपणाचा द्योतक असल्याचें विधान बेधडक केलें आहे. या मुसलमानांच्या मनगटाला धरून असे विचारावयाला पाहिजे कीं, मुंबईचे हिंदू मुसलमानांचा मार सहनशीलपणानें खात आहेत ही त्यांची सहनशीलता व मऊपणा मानावयाचा कीं असहनशीलता व अरेरावी समजावयाची? ही जर हिंदूंची असहनशीलता व अरेरावी असेल तर याच्या उलट हिंदूंनी आपलें वर्तन ठेवले म्हणजे दिल्लीचे मुसलमान पुढारी हिंदूंना सहनशीलतेचें व नम्रपणाचें सर्टिफिकिट देणार आहेत काय?

जातीजातींत चीड उत्पन्न होत असेल तर ती असल्याच विषारी उद्गारांनी उत्पन्न होत असल्याने हिंदु-मुसलमानांत शांतता नांदण्याच्या दृष्टीने या आगलाव्याच्या तोंडालाच सरकाराने आधी खीळ घालणें जरूर आहे. त्या पुढचा ठराव तर मुसलमानांना दंग्याची उघड उघड चिथावणी देणारा आहे. त्यांत दिल्लीच्या मुसलमानांनी सरकारला अशी तंबी दिली आहे कीं, पहा, तुम्ही आमच्या राजकीय मागण्यांचा निकाल लवकर लावानात म्हणून असले अनर्थ घडतात. एकूण मुंबईत व इतरत्र होणाऱ्या दंग्यांच्या जोरावर हे मुसलमान आपले राजकीय हक्क संपादणार व ते हक्क आपल्या मनाप्रमाणें पदरांत पडेपर्यंत मुसलमान हिंदूंना सुऱ्यांच्या धारेवर धरणार असें हिंदूंनी समजावयाचें काय? हिंदु व मुसलमान हीं एकाच हिंदभूमीचीं लेकरें आहेत व त्यांना याच भूमींत एकत्र नांदून त्यांचीं हाडें याच भूमीवर पडावयाचीं असल्यामुळे त्यांनी परस्परांशीं स्नेहानें व बंधुत्वाच्या नात्यानेच राहणें श्रेयस्कर आहे हें मानीत असूनहि मुसलमान पुढारी वरील प्रकारची चिथावणीची भाषा वापरतात त्याअर्थी त्यांना हिंदु-मुसलमानांचे दंगे इष्ट आहेत, असेंच मानावयाचें काय?

# संयुक्त हिंदी राष्ट्राची आर्थिक मांडणी

(ले.—शंकर गणेश दवगे.)

हिंदुस्थानांत घडून येणाऱ्या भावी सामुदायिक राज्यपद्धतींत आर्थिक व्यवस्था कशी असावी, याची अजमावणी करण्यासाठीं विलायतेंत दुसऱ्या गोलमेज परिषदेचे वेळीं पील कमिटी नेमण्यांत आली होती. त्या कमिटीच्याच विचाराच्या दिशेने खुद्द हिंदुस्थानांत या विषयाची चर्चा होऊन शहानिशा झालेली बरी असें वाटल्यावरून पर्सी कमिटी नेमण्यांत आली. या कमिटीचा रिपोर्ट

नुकताच हातीं आलेला आहे. त्यावरून पुढील राज्यकारभारांत आर्थिक व्यवस्था कशी घडून येईल याची साधारण कल्पना येण्यासारखी आहे.

पर्सी कमिटीचा रिपोर्ट एकमताने सादर करण्यांत आलेला आहे हें विशेष होय. कमेटीचें धोरण पील कमिटीचे व पहिल्या गोलमेज परिषदेंतील फेडरल स्ट्रक्चर कमिटीचे धोरणावर पाऊल टाकणारें आहे हें ठीकच आहे; पण कमिटीने आपली विचारपरंपरा कांही आगंतुक गोष्टी गृहीत धरून बनविलेली दिसते यांत शंका नाही. कोणत्याहि का कारणानें असेना, हिंदुस्थानच्या औद्योगिक उत्कर्षाबद्दल कमिटीला शंका आहे. त्याजप्रमाणें कमिटीने आपले ठोकताळे सिंध-ब्रह्मदेशाचें विभक्तीकरण होणार असें गृहीत धरूनच ठरविले आहेत. कमिटीचें काम म्हटले म्हणजे तें न्यायदानाचें नव्हे. पुढें असलेल्या प्रश्नावर साधकबाधक विचार करून निष्कर्ष सुचवावयाचा एवढेंच तिचें काम असतें. पण पर्सी कमिटीनें आपली मर्यादा ओलांडली असेंच म्हणावें लागतें. तसें जर नसतें तर सिंध व ब्रह्मदेश हे आहेत तसेच राहिल्यास तपशिलांत काय फरक होतो हेंहि कमिटीनें दाखविलें असतें. पण तसें करण्यांत आलेलें नाहीं. असो.

कोणत्याहि राज्यपद्धतींत आर्थिक बाब महत्त्वाची असते, यांत नवल नाहीं. राजाचा खजिना रिकामा असणें हें त्याच्या राज्यकारभाराला लांछन आहे. राज्यांत असें एकहि खातें नसतें कीं, ज्यांचा आर्थिक बाबींशीं संबंध नसतो. फरक इतकाच कीं, कांहीं खातीं खजिन्यांत भर टाकीत असतात, तर कांहीं तो रिकामा करीत असतात. अलीकडील सुधारलेल्या राज्यपद्धतींत राज्याचें उत्पन्न वाढविणें ही जितकी महत्त्वाची बाब समजली जाते तितकीच महत्त्वाची बाब तें उत्पन्न योग्य रीतीने खर्चण्याचीहि समजली जाते. या दृष्टीने विचार केल्यास खर्चाच्या बाबी कमिटीचे अधिकाऱ्यांतल्या असूनहि त्यांचा तिने मुळींच विचार केलेला नाही. हिंदुस्थानसरकारच्या अवाढव्य खर्चांत बचत सुचविण्याचें सोडून देऊन करांची वाढच कमिटीनें सुचविली आहे. आणि या करवाढीने भावी राज्यघटनेंत ४५० लक्षांची बचत होईल असें कमिटीचें मनोराज्य आहे.

फेडरल राज्यपद्धतीचा असा एक नियम आहे कीं, तिच्यांतील प्रत्येक घटक तींत आपखुषीनें समाविष्ट असला पाहिजे. तसा तो होण्यासाठीं मध्यवर्ती सत्ता प्रत्येक घटकास पोषक असली पाहिजे हेंहि उघड आहे. या दृष्टीनें पाहतां आर्थिक बाबींना सहजच महत्त्व येतें. या शासनपद्धतींत घटकास संपत्तीचा वांटा व अधिकार योग्य प्रमाणांत मिळाल्याशिवाय तो संघांत सुखासमाधानाने राहूंच शकत नाही. या दृष्टीने हिंदुस्थानांतील प्रांत जे नवीन राज्यपद्धतींत सुरुवातीसच समाविष्ट व्हावयाचे, त्यास पर्सी कमिटीचा रिपोर्ट पाहून समाधान वाटेल असें नाही. ही त्यांची असंतुष्टता आजकालची नाही. प्रांतांस सुरुवातीस हिंदुस्थान-सरकार खर्चण्यासाठी म्हणून जी ठराविक वार्षिक रक्कम देत असे ती १८७० सालीं कमी करण्यांत येऊन पोलीस, जेल, वैद्यक, रजिस्ट्रेशन व शिक्षण हीं खातीं त्यांचे हवालीं करण्यांत आली. त्या सुमारास राज्यकारभाराचा खर्च बेताबाताच येत असल्याने, प्रांतिक सरकार तिजोरींतील शिल्लक मध्यवर्ती सरकारकडे पाठवीत असे. पुढें सात वर्षांनीं कांही दिवाणी खातीं उत्पन्नासकट प्रांतिक सरकाराकडे सोंपविण्यांत आली. याचें कारण असें कीं, वाढत्या व्यापामुळें मध्यवर्ती सरकारास प्रांतिक कारभार खातेवारीने पाहणें जड जाऊं लागलें. पुढें १८८२ सालीं लॉर्ड रिपन गव्हर्नर जनरल असतांना, प्रांतास देण्याची रक्कम बंद करण्यांत येऊन जंगल व रजिस्ट्रेशन या खात्यांच्या उत्पन्नांतील अर्धा भाग मध्यवर्ती सरकार उचलूं लागलें. यापुढें लष्करी खर्चांत वाढ झाल्यानें व रुपयाची किंमत उतरल्याने मध्यवर्ती सरकारची पैशाची तहान कधींच भागली नाही. प्रांतिक सरकारास नवीन खातीं मिळालीं हें खरें; परंतु त्याच्या उत्पन्नांतील बराचसा वांटा मध्यवर्ती सरकाराकडे जात राहिल्याने प्रांतांची सुधारणा होऊंच शकली नाही.

शेवटीं मध्यवर्ती बजेटांत तूट येऊं लागल्यावर सरकाराचे डोळे उघडले व मेस्टन कमिटी नेमण्यांत आली. या कमिटीचा अभिप्राय असा पडला कीं, प्रांतिक सरकाराचें उत्पन्न वाढविण्याचा प्रयत्न करावा व आजपर्यंत प्रांतिक सरकारने जी रक्कम मध्यवर्ती सरकारास दिली, ती परत करण्यांत यावी. कमिटीने अशीहि एक महत्त्वाची सूचना केली कीं, प्रांतांस आपण होऊन कांहीं कर बसविण्याची मोकळीक देण्यांत यावी. कमिटीच्या बहुतेक सूचना सरकारने अमलांत आणल्या. १९२८ अखेर प्रांताची रक्कम हप्त्याहप्त्यानें परत करण्यांत आली, व खर्चांतहि काटकसर करण्यांत आली. प्रांतिक सरकारच्या उत्पन्नाबरोबर नवीन खातीं हातीं आल्यामुळें खर्चहि वाढला. शिवाय मध्यवर्ती सरकारला द्यावयाचा वार्षिक हप्ताहि न चुकल्यानें प्रांताची स्थिति खालावत चालली, ती आजवर तशीच कायम आहे.

नवीन राजवटींत प्रांतांनी वरील अडचणींतून बाहेर कसें पडावयाचें, हा एक मोठा महत्त्वाचा प्रश्न आहे. प्रांतिक रयत कर्जाचे बोजाखाली इतकी

वाकून गेली आहे कीं, नवीन कर तिजवर बसविणें शहाणपणाचें होणार नाही, हें निराळ्या शब्दांत कमिटीनें कबूल केलें आहे. उलट फेडरल व्यवस्थेंत प्रांतांच्या सध्याच्या हलाखीचे स्थितीमुळे त्यांस दिवाळखोर अंदाजपत्रकें सुरुवातीस बघावीं लागतील असाहि कमिटीने इशारा दिला आहे. प्रांतिक सरकार व त्यांची प्रजा या दोघांच्याहि वाईट दशेची कमिटीला जाणीव आहे, परंतु तीस शेवटीं प्रांतिक सरकाराचीच दया येऊन नवीन करांचीच एकंदरीने तिने सूचना केली आहे. जाता जाता मुंबई सरकारने वारसावरील कराचे बाबतींत जो प्रयत्न केला त्याबद्दल त्या कमिटीने मुंबईसरकारची पाठ थोपटून पुढे असेंहि ध्वनित केलें आहे कीं, मध्यवर्ती सरकारने अशा प्रकारचा कर बसविणें युक्त ठरेल. वास्तविक आजपर्यंत प्रांतांनी मध्यवर्ती सरकारास आर्थिक मदत बरीच केली असल्याने त्यांना अडचणींतून मार्ग काढून देणें किंवा त्यांना आपले पायावर उभे करणें हें एक प्रकारें मध्यवर्ती सत्तेचे कर्तव्यच ठरतें. किंबहुना फेडरल राज्यपद्धतींत तसें होणें आवश्यकहि आहे. परंतु कमिटीने या गोष्टीकडे लक्ष न देतां प्रांतिक मदतीसाठीं तिने मध्यवर्ती खजिन्यास फारसा हात लावला नाही, असेंच म्हणावयास पाहिजे.

कमिटीने प्रांतांसाठी मुख्यतः दोन कर सुचविलें आहेत. त्यांपैकीं एक म्हणजे शेतीवरील उत्पन्नाचा. वास्तविक या कराचा समावेश मिळकतीवरील करांतच करावयास पाहिजे. आजपर्यंत शेतीचे उत्पन्नावर कर बसविण्यांत आला नाही. याचें कारण असें कीं, गरीब शेतकऱ्यांवर आधीच असलेल्या कराचे ओझ्यांत भर पडूं नये. पण कमिटीने तसें करण्यास प्रांतांस मोकळीक दिली आहे. दुसरा कर म्हटला म्हणजे तंबाखूवरील. तंबाखूवर कर सुचविण्यांत कमिटीचे डोळ्यांपुढे जगांतील इतर देश व हिंदुस्थानांतील संस्थानें असावींत असें वाटतें.

नाही म्हणावयास प्रांतांचे मदतीसाठीं निव्वळ मध्यवर्ती सरकाराकडून प्राप्तीवरील करांतील जादा हिस्सा यापुढें यावयाचा आहे. मेस्टन कमिटीचे शिफारशीवरून या करांतील कांही भाग मध्यप्रांत, बिहार-ओरिसा, व पंजाब या प्रांतांस मिळत असे; पण यापुढे सरसहा सगळ्या प्रांतांवर या वसुलांतील हिस्सा मिळावा असें कमिटीनें सुचविलें आहे. यापुढे १३ कोटी ५० लक्ष रुपयांची वांटणी प्राप्तीवरील कराचे वसुलांतून होणार आहे. त्यांपैकीं २ कोटींचा व्यक्तिगत सुपरटॅक्स प्रांतिक भरण्याचे प्रमाणावर वांटून देण्यांत येणार आहे. राहिलेल्या रकमेच्या सहासप्तमांश भाग व्यक्तिगत कराचे हिश्शाचे प्रमाणावर प्रांतानिहाय वांटून देण्यांत यावा असें कमिटीने सुचविलें असून त्याच रकमेच्या एकसप्तमांश हिस्सा प्रांतिक लोकसंख्येचे प्रमाणावर वांटून देण्यांत यावा असेंहि सुचविण्यांत आलेलें आहे. हा एकसप्तमांश हिस्सा म्हटला म्हणजे ब्रिटिश हिंदुस्थानाच्या बाहेर वावरणाऱ्या ज्या कंपन्या व व्यक्ति आहेत, त्यांचे उत्पन्नावरील कर होय. हा कर अशा प्रकारच्या कंपन्यांना व व्यक्तींना कधीं कधीं दुहेरीहि भरावा लागतो. उदाहरणार्थ, अशा प्रकारची एखादी कंपनी अगर व्यक्ति संस्थानांत राहत असल्यास तीस हा कर ब्रिटिश सरकाराप्रमाणें संस्थानिकांसहि भरावा लागतो. हा दुप्पट कर भरावा लागणे हें एक मिळकतीवरील करांतील न्यून आहे. तें काढून टाकण्याचे ऐवजीं कमिटीने तें तसेंच पुढे चालू ठेविलें आहे. त्याचप्रमाणे विलायतेंत पेन्शन उपभोगणाऱ्या व्यक्तीवर हा कर कां बसविण्यांत येऊं नये? प्रांतिक सरकारचे रिझर्व्ह फंडावर मध्यवर्ती सरकार कर बसवीत नाही. तशाच प्रकारची सूट संस्थानिकांचे रिझर्व्ह फंडास कां मिळूं नये? वगैरे महत्त्वाचे प्रश्नांचा खल कमिटीने केलेला नाही.

अशा प्रकारें मिळकतीवरील कराचा कांही भाग प्रांतांस देऊनहि त्यांची सुधारणा होणें नाही. याचें कारण उघड आहे. प्रांतांनी मध्यवर्ती सत्तेस द्यावयाची रक्कम तशीच चालू ठेवावयाची आहे. ती कमी केली असता मध्यवर्ती सत्तेच्या आर्थिक शक्तीस धोका पोंचेल असें कमिटीचें म्हणणें आहे. जे प्रांत आपल्या बजेटांत शिल्लक दाखवितील त्यांनी प्रमाणापेक्षां जास्त व जे प्रांत बजेटांत तूट दाखवितील त्यांनी प्रमाणापेक्षां कमी वार्षिक रक्कम मध्यवर्ती सत्तेस भरावी अशी कमिटीने तोड सुचविली आहे. नाही म्हणावयास प्रांतांना स्वतंत्र रीतीने कर्ज उभारण्यास परवानगी द्यावी असें सुचविण्यांत आलें आहे खरें; पण तसें करतांना त्यांनी मध्यवर्ती सत्तेची परवानगी मागावी व सल्लामसलत घ्यावी असेंहि सुचविलें आहे. दुष्काळांतून बाहेर पडलेला माणूस ज्याप्रमाणे वाटेल त्या खाण्याचे पदार्थांवर ताव मारतो, त्याचप्रमाणे डबघाईस आलेले प्रांत कदाचित् या सवलतीचा फायदा वेळ न दवडता घेतील असें वाटल्यावरूनच कीं काय कमिटीनें कर्जाबाबत जो खर्च येईल त्याने एकंदर खर्चांत भर पडून नवीन उत्पन्नाच्या बाबी निकामी ठरतील व प्रांतिक स्वायत्ततेचें रोपटें मुळांतच जळून जाईल अशी एक मेख मारली आहे. सारांश, कमिटीनें या आर्थिक व्यवस्थेंत प्रांत व मध्यवर्ती सरकार यांचे संबंध अगदीं तुटक ठेवून शेवटीं असें भाष्य केलें आहे कीं, जसजशी

मध्यवर्ती सरकारांत सुधारणा होत जाईल तसतशी प्रांतांचीहि आपोआप सुधारणा होईल.

आता प्रांतिक सरकाराकडून मध्यवर्ती सरकाराकडे वळल्यास कमिटीने मध्यवर्ती सरकारचे अवाढव्य खर्चाचा विचार न करता किंवा त्या सरकारच्या खर्चांत छाटाछाट न सुचविता उलट असेंच विधान केलें आहे कीं, मध्यवर्ती सरकारचे खर्चांत छाटाछाट होणेंच शक्य नाही. म्हणजे निदान या बाबतींत तरी हिंदुस्थान सरकारचें धोरण आहे तसेंच कायम ठेवण्याचा कमिटीचा विचार दिसतो. पुढे कमिटीचें असेंहि म्हणणें आहे कीं, मध्यवर्ती सरकारचें उत्पन्न वाढविण्याच्या बाबी आता खलास झालेल्या आहेत पण इतकेंहि असून कमिटीनें फेडरल इन्कम टॅक्स व त्याचे जोडीला तंबाखू व आगपेट्या यांवर कर सुचविले आहेत. आगपेट्यांचा धंदा हिंदुस्थानांत नुकताच कोठें मूळ धरीत आहे. अशा वेळीं ही कराची योजना अर्थातच योग्य नाही. सध्या हिंदुस्थानसरकारास असलेलीं कर्जे, सरकारी नोकरांस द्यावीं लागणारीं पेन्शनें व फेडरेशन उभारण्याचे बाबतींत जो खर्च येईल तो वगैरे बाबींसाठीं ही नवीन करवाढ आहे असें कमिटीचें म्हणणें आहे. शिवाय ब्रह्मदेश स्वतंत्र झाल्यानें हिंदी कर्जाचा बराच भाग ब्रह्मदेशाकडून उचलविण्यांत येईल व त्या योगानें हिंदुस्थानसरकारच्या तिजोरीला एक प्रकारें मदतच होईल, अशी कमिटीची उघड सूचना आहे.

प्रांतांकडून येणाऱ्या वार्षिक रकमेबाबत मध्यवर्ती सरकाराचे तिजोरीस कमिटीने तोशीस लागूं दिली नाही हें वर म्हटलेंच आहे. प्रांताभोंवतालची ही गांजणूक कमी करावयाची तर मध्यवर्ती सरकाराचें उत्पन्न वाढविलें पाहिजे. म्हणजे प्रांतिक रकमेची सरकारास गरजच भासणार नाही. या मुद्दयावर जोर देऊन कमिटीनें नवीन करांची तरफदारी केली आहे. असें करतांना कमिटीने आपली व मेस्टन कमिटीची तुलना केली आहे. पर्सी कमिटी ये म्हणणें असें कीं, प्रांतिक भरण्याचे बाबतींत आमचें व मेस्टन कमिटीचें ध्येय व मार्ग एक आहेत. पण वस्तुतः हें खरें नाही. मेस्टन कमिटीचे समोर हिंदुस्थानसरकारचें दिवाळखोर बजेट होतें, तर पर्सी कमिटीने आपलीं अनुमानें फेडरल बजेट शिलकी दाखवूनच काढलीं आहेत. मेस्टन कमिटीनें प्रांतिक रकमेचा प्रांतावरील बोजा कमी करण्यासाठीं प्रांताचें उत्पन्न वाढवावें असें सुचविलें तर पर्सी कमिटीनें फेडरल सरकारचें उत्पन्न वाढवून शिवाय प्रांतिक रक्कम चालू ठेवावी अशी सूचना केली आहे. मेस्टन कमिटीच्या कांहीशा व्यवहार्य सूचना अमलांत आणूनहि प्रांतांची सुधारणा होऊं शकली नाही तर तीं मध्यवर्ती सरकारचें उत्पन्न वाढवून होण्याचें मनोराज्य बांधणें कसें शक्य आहे हें समजत नाही.

सारांश, कमिटीची विचारपरंपरा डळमळीत आहे, ती भक्कम पायावर उभारलेली नाही. कमिटीच्या म्हणण्याप्रमाणें मध्यवर्ती बजेटांत जरी नवीन कराचे योगानें साडेचार कोटी रुपयांनी शिलक दाखविता आली तरी भावी राज्यपद्धतींत जमाखर्च व तिजोरीची किल्ली जनतेचे हातीं नसल्यानें या नवीन आर्थिक व्यवस्थेंत तीस परावलंबीच राहावें लागणार आहे. आणि तशांतून प्रांतिक स्वायत्ततेचें वचनहि वाफेसारखें हवेंत वर उडून गेल्यास बोलावयासच नको. तेव्हां भावी राजकीय सुधारणांचे काळेकुट्ट ढग आतापासून दिसूं लागले असें समजण्यास हरकत नाही.

# मतदान कमिटीच्या शिफारशी

गोलमेज परिषदेच्या चार कमिट्या हिंदुस्थानांत काम करीत होत्या. त्यांपैकीं व्हाइसरॉयांच्या अध्यक्षतेखालीं नेमलेल्या सल्लागार कमिटीखेरीज बाकीच्या तीन कमिट्यांचीं कामें संपलीं असून जमाखर्च-कमिटी व मतदान-कमिटी यांचे रिपोर्टहि बाहेर पडले आहेत. मतदान कमिटीचा रिपोर्ट आजच प्रसिद्ध झाला असून त्यांतील शिफारशींशीं हिंदुस्थानांतील सुशिक्षित–अशिक्षितांचा व गोरगरिबांचा निकट संबंध येणार आहे. कमिटीचे अध्यक्ष लॉर्ड लोथियन हे असून कमिटीच्या सभासदांत सर जॉन कर, डॉ. आंबेडकर, खा. ब. मौलवी अझीजउल हक्क, आमदार बखले, सर अर्नेस्ट बेनेट, मि. बटलर, श्री. सी. वाय. चिंतामणी, मार्किस ऑफ डफरिन अँड आवा, ना. मिलर, मेजर मिल्नर, दि. ब. ए. रामस्वामी मुदलियार, ना. पिकफर्ड, श्रीमती पी. सुबरायन, सर सुंदरसिंग, श्री. तांबे, सर महंमद याकूब व सर झुलफिकर अलीखान असे सतरा सभासद होते.

कमिटीने आपल्या रिपोर्टाचे तीन भाग ता. ३ जून रोजीं म्हणजे आज प्रसिद्ध केले असून उरलेले भाग ती मागाहून प्रसिद्ध करणार आहे. कमिटीने आपला रिपोर्ट बहुतेक एक मतानेच तयार केला आहे. मांटेग्यूचेम्सफर्ड सुधारणांप्रमाणे हिंदुस्थानांतील ७० लक्ष लोकांना मताधिकार मिळाला होता. लोथियन कमिटीने सदर अधिकार ३ कोटी ६० लक्ष लोकांस दिला आहे. वयांत आलेल्या प्रत्येक इसमास मताधिकार

असला पाहिजे, ही मागणी तूर्त अव्यवहार्य म्हणून कमिटीनें त्याज्य ठरविली आहे. ज्याला स्थावरजंगम मिळकत आहे त्याला मताधिकार पूर्वीपासून देण्याची वहिवाट आहे. तो अधिकार अधिक लोकांस मिळण्याची शिफारस कमिटीनें केली आहे. त्यामुळे जमीनदार, कुळें, भाडेकरी व गोरगरीब वर्ग या सर्वांना मताधिकार मिळेल. शिक्षण ही मताधिकाराची लायकी पूर्वीच्या राज्यघटनेंत नव्हती. कमिटीनें व्हर्नाक्युलर फायनल परीक्षा ज्याची पास झाली आहे त्या पुरुषास मताधिकार दिला आहे. स्त्रियांना साक्षरता हेच मताधिकाराचें प्रमाण ठेवलें आहे. एकंदर मतदारांत एकपंचमांश स्त्रिया असतील अशी तरतूद करण्यांत आली आहे. मजुरांकरिता मताधिकाराची योजना इतकी निकृष्ट केली आहे कीं, त्यांत शहरांतील कारखान्यांत काम करणाऱ्या मजुरांचा सहज समावेश व्हावा. त्याचप्रमाणे त्यांना कौन्सिलांत आपल्यातर्फे सभासद निवडून देण्याचाहि अधिकार देण्यांत आला आहे. व्यापार, उद्योगधंदे, विद्यापीठें व जमीनदार यांच्या कौन्सिलांतील प्रतिनिधींची संख्या वाढविण्यात आली नाही. पण इतरांची वाढून कौन्सिलें हल्लीपेक्षां अडीच तीनपट मोठीं होणार आहेत. प्रांतिक कायदे मंडळास सभासद निवडून देण्याचा अधिकार ३ कोटि ६० लक्ष लोकांस मिळणार आहे. त्यांत वयांत आलेल्या एकंदर पुरुषांपैकीं ४३.४ टक्के पुरुषांना व स्त्रियांपैकीं १०.५ टक्के स्त्रियांना हा अधिकार मिळेल. मुंबई इलाख्यांत ३७ लक्ष लोकांना म्हणजे लोकसंख्येपैकीं १७ टक्के इसमांना मताधिकार प्राप्त होईल. मध्यप्रांतांत हें प्रमाण ११ टक्के राहील. सरहद्द प्रांतांतील शहरांतील मतदारांचें क्षेत्र वाढविण्यांत आलें नाही. खेड्यांत तें १० टक्के करण्यांत आलें आहे.

कमिटीच्या मतें अस्पृश्यांची संख्या साऱ्या हिंदुस्थानांत ३॥ कोटी आहे. मुंबई इलाख्यांत १७ लक्ष आहे व मध्यप्रांतात २९ लक्ष आहे. स्पृश्य वर्गास मताधिकाराची जी लायखी ठेविली आहे तीच अस्पृश्यांस ठेवल्याने त्यांना योग्य प्रमाणांत मताधिकार मिळणार नाही, यासाठी त्यांची लायखी वेगळी ठेवण्यांत यावी असें कमिटीचें मत आहे. म्हणून तिनें गावची नोकरी, साक्षरता, घराची मालकी इत्यादि सहा प्रकारची लायखी सांगितली आहे.

प्रांतिक कौन्सिलाचा विचार केल्यानंतर कमिटी मध्यवर्ती कौन्सिलाकडे वळली आहे. तिच्या मतें फेडरल असेंब्लीचे सभासद जास्तींत जास्त ६०० पुरे झाले. ते प्रांतिक कौन्सिलांनी निवडून न देता खुद्द मतदारांनीच निवडून द्यावे असें कमिटीचें मत आहे. फेडरल स्ट्रक्चर कमिटीनें या सभासदांपैकीं २०० सभासद खालसा मुलखातर्फेचे असावे असे म्हटलें आहे. तें कमिटीस अमान्य असून तिनें ती संख्या ३०० असावी अशी शिफारस केली आहे. प्रांतिक कौन्सिलासाठी जो जनतेला पूर्वी मताधिकार मिळाला आहे तोच फेडरल असेंब्लीच्याहि बाबतींत असावा असें कमिटीस वाटतें. मात्र त्यास शिक्षणाच्या लायखीची जोड द्यावी. जातवारीच्या प्रश्नाचा निकाल अद्यापि लागला नसल्याने कमिटी त्या संबंधांत मुग्ध आहे. ती बाब वगळल्यास प्रत्येक प्रांतांतून एक स्त्री-प्रतिनिधि, ८ मजूर प्रतिनिधि व हल्लीइतकेच व्यापारी व जमीनदार यांचे प्रतिनिधि फेडरल असेंब्लींत राहावे असें कमिटीचें मत आहे.

फेडरल असेंब्ली हें कनिष्ठ सभागृह व सीनेट हें वरिष्ठ सभागृह. या सीनेटचे सभासद प्रांतिक कायदे कौन्सिलांनी निवडलेले असावे असें फेडरल स्ट्रक्चर कमिटीनें म्हटलें आहे. तेच मत या मतदार कमिटीसहि पसंत आहे.

# ब्रिटिश मुत्सद्दयांचीं विलायतेंतील कारस्थानें

हिंदुस्थानच्या भावी राज्यघटनेचें घोंगडें आणखी एक वर्षभर तरी असेंच भिजत राहणार असें विलायतेहून येणाऱ्या बातम्यांवरून व येथे हिंदुस्थानांत उत्पन्न होणाऱ्या नव्या नव्या वादविवादांवरून स्पष्ट दिसतें. तसें तें भिजत ठेवण्यानेच साम्राज्यवादी ब्रिटिश मुत्सद्दयांचा डाव साधणार असल्याने तें घोंगडें झाडून-झटकून लोकमताच्या भर उन्हांत वाळत घालण्याचे मुख्य प्रधान मि. रॅम्से मॅक्डोनाल्ड अगर त्यांचे उदारमतवादी स्नेही यांनी कितीहि प्रयत्न केले तरी हुजूरपक्षीय पुढारी ते हाणून पाडतात. बाकी मि. रॅम्से मॅक्डोनाल्ड यांच्या अंगींहि असलीं कारस्थानें चालूं न देतां स्वतःच्या योजना पार पाडण्यास जो वकूब, जी धमक व जे पाणी लागतें ते तितकें नाही हेंहि खरेंच आहे. या सर्व गोष्टींचा परिणाम मात्र असा झाला आहे कीं, ब्रिटिश राज्यकर्त्यांच्या उदार मनोवृत्तीवर व त्यांच्या वचनाच्या सत्यतेवर विश्वास टाकून स्वस्थ बसणाऱ्या प्रागतिक पक्षाच्या पुढाऱ्यांचेंहि धाबें दणाणलें आहे.

सर तेजबहादुर सप्रू, ना. शास्त्री व सर चिमणलाल सेटलवाड वगैरे प्रागतिक पुढाऱ्यांना असा बळकट संशय आता येऊं लागला आहे कीं, हुजूर पक्षीय मुत्सद्दी गोलमेज परिषदेच्या दोनहि बैठकींत झालेल्या कार्याला मूठमाती देऊन, त्या वेळीं लिहिलेल्या योजनांची पाटी पुरुस टाकून त्यावर एक नवीनच प्रतिगामी स्वरूपाची योजना लिहिणार व ती योजना हिंदुस्थानाच्या डोक्यावर लादणार. हा त्यांचा संशय निराधार मात्र नाही. कारण ज्यांच्या हातीं ह्या कारस्थानांचीं, प्रधान मंडळाचीं किंबहुना पार्लमेंटाचींहि सूत्रें आहेत त्या मुत्सद्द्यांनी आपल्या हिंदुस्थानांतील हस्तकांकरवीं नव्या कल्पनांचींच घोडीं दामटण्यास सुरुवात केल्याचे स्पष्ट दिसतें. हा नवा बनाव कसा बनत आहे व कोणत्या पार्श्वभूमिकेवर रेखाटला जात आहे हें प्रथम पाहूं.

गोलमेज परिषदेची पाहिली बैठक संपून अठरा महिने होऊन गेले. दुसऱ्या परिषदेवरहि विसर्जनाच्या अक्षता पडल्याला सहा महिने झाले. त्या परिषदेच्या अनुषंगाने नेमलेल्या कमिट्या गोगलगाईच्या गतीनें कां होईना पण काम करूं लागल्या. त्यांपैकीहि एका कमिटीचें काम अद्याप संपावयाचेंच आहे. बरें, काम संपलेल्या कमिट्यांनी ज्या शिफारशी केल्या त्या कांहीं आंधळ्या तर कांहीं लुल्या व कांहीं तर पाय नसल्यामुळे लंगड्याच दिसतात. कारण ह्या कमिट्यांच्या शिफारशी मुख्यतः ज्या प्रकारची पुढील स्वराज्यघटना बनणार आहे त्यावर पुष्कळशा अवलंबून आहेत; इतकेंच नव्हे तर मुसलमान, शीख, पूर्वास्पृश्य वगैरे लोकांना जे हक्क मिळणार आहेत त्यांवरच त्या उभारल्या जाणार आहेत. आज तर पुढील घटनेचें स्वरूप काय होणार याची खात्री नाही व अल्पसंख्याकांचा प्रश्नहि लोंबकळतच पडला आहे. यामुळे पायाखालची वाळू सारखी वाहून जात असता नदीच्या प्रवाहांत पाय स्थिर करणाऱ्या गृहस्थाप्रमाणेच या कमिट्यांचें इतिवृत्त लिहिणारांची स्थिति झालेली दृष्टीस पडते. काव्याच्या अणीवर दोन गांवें वसलीं, पण एक ओसाड व दुसरा वसेचना अशा तऱ्हेच्या चमत्कृतिपूर्ण कोड्याची आठवण वरील प्रकारावरून झाल्यावांचून राहणार नाही. या कमिट्यांच्या शिफारशींची छाननी करून त्यांत एकसूत्रता उत्पन्न करण्याकरिता जी एक बडी 'सल्लागार कमिटी' नेमली आहे, तिचाहि अलीकडे पत्ता नाही. या कमिटीचे अध्यक्ष खुद्द व्हाइसरॉय आहेत व त्यांनीच या कमिटीच्या सभांचीं दिलेलीं आमंत्रणेंहि रद्द केलीं असून पुनः केव्हां आमंत्रण करणार हें सांगितलें नाही. त्यामुळें या कमिटीचे प्रागतिक सभासद स्वस्थपणें मनांत मांडे खात बसलेले दृष्टीस पडतात.

हे मनचे मांडेहि त्यांना स्वस्थपणें खाऊं देण्याचा सरकारी हस्तकांचा विचार नाही. दोन आठवड्यांपूर्वी गोलमेज परिषदेचे एक सभासद व हुजूर पक्षाच्या खास विश्वासातील ज्ञातिनिष्ठ मुसलमानांचे पुढारी डॉ. शफत अहमदखान यांनी एक चिंधुडी सोडली कीं संयुक्त घटनेचा विचार पुढें सावकाशीनें करावा. आज प्रांतिक स्वायत्तता हिंदुस्थानाच्या प्रांतांस देणारें बिल पार्लमेंटानें पसार केलें म्हणजे पुरे. हें त्यांचें मत लंडनच्या 'टाइम्स' पत्रांत प्रसिद्ध झालें व त्यांत सर तेजबहादुर सप्रूंचा उल्लेख असल्यानें सप्रुबहादुरांनी त्याला खणखणीत उत्तर दिलें व प्रांतिक स्वायत्तता मिळाल्यानें हा लढा बंद होणार नाही, हिंदुस्थानाला त्या स्वायत्ततेबरोबरच हिंदुस्थानाच्या मध्यवर्ती राज्यकारभारांत पूर्ण जबाबदारीचे हक्क व शेवटीं संयुक्त राज्यघटना अशीच योजना पाहिजे असें त्यांनी बजावलें. त्यांच्या या मतास ना. शास्त्र्यांनीहि जोराचा पाठिंबा दिला. हीं उत्तरें प्रत्युत्तरें ठीक झालीं. पण त्यावरून विलायतेंतील मुत्सद्द्यांना प्रांतिक स्वायत्ततेपलीकडे तूर्त कांही द्यावयाचेंच नाहीं ही गुपित गोष्ट बाहेर पडली, व यामुळेच प्रागतिक पक्षाचे पुढारी खडबडून जागे झाले. संयुक्त घटनेच्या मार्गांत आपल्या अवास्तव व भरमसाट मागण्यांनी संस्थानिकांनी अपशकून करून ठेवलाच आहे. त्यांतच मुसलमानांच्या चढेल मागण्यांची भर पडली व शेवटीं प्रांतिक स्वायत्ततेपलीकडे हुजूरपक्षीय मुत्सद्दी कांहीहि द्यावयास तयार नाहीत अशीं चिन्हें दिसूं लागलीं. राष्ट्रीय सभा पूर्ण स्वातंत्र्याचें ध्येय डोळ्यांपुढे ठेवून लढत आहे. स्वातंत्र्य म्हणजे राष्ट्राचा प्राण असल्यामुळे ही प्राणशक्ति वाढविणाऱ्या राजकीय हक्कांचें घृतच राष्ट्रीय सभेस पाहिजे. परंतु राष्ट्रीय सभेस मिळून त्यांच्याबरोबर खांद्यास खांदा लावून लढण्याचें प्रागतिकांना मानवत नाही. वसाहतीच्या दर्जाचें स्वराज्य इंग्रज देऊं करितात तें घ्यावें, त्यांत संतोष मानावा व त्या देणगीच्या तेलावर गुजारा करावा अशी त्यांची भावना. पण हें प्रांतिक स्वायत्ततेचें नवें पिल्लूं ब्रिटिश मुत्सद्द्यांच्या प्रेरणेने सोडलें गेलेलें पाहताच त्यांना साहजिकपणेंच भीति वाटूं लागली कीं तेल व तूप दोन्ही जाऊन हें धुपाटणें आपल्या हातीं रिकामेंच येणार!

या कारवाईचीच भीति वाटल्यामुळे सर चिमणलाल सेटलवाड यांना मोठा घुस्सा येऊन त्यांनी सडेतोड शब्दांत प्रागतिकांच्या मागण्या गेल्या आठवड्यांत मांडल्या. सर चिमणलाल सेटलवाड यांचे उद्‍गार लक्षांत ठेवण्यासारखे आहेत. ते स्पष्टपणें म्हणतात कीं, "कमिट्या, परिषदा व बैठका यांची वेळ केव्हाच निघून गेली आहे. हिंदुस्थानाला काय पाहिजे हें ब्रिटिश सरकारला माहीत नाही काय! संयुक्त

राज्यघटना, मुख्य कारभारांत जबाबदारी, व प्रांतिक स्वायत्तता आम्हांस पाहिजे. मग हिंदुस्थानाच्या हिताच्या दृष्टीने कांही रक्षाबंधनें ठेविलीं तरी चालतील. परंतु, हें सर्व सोडून जर नुसतीच प्रांतिक स्वायत्तता देऊन हिंदुस्थानाच्या तोंडाला पानें पुसावयाचीं असतील तर या धोरणाचा परिणाम अत्यंत घातुक होणार आहे." सर चिमणलाल यांनी स्पष्टपणें बजावलें आहे कीं, सरकारानें जर या प्रागतिक पक्षाच्या मागण्या मान्य केल्या नाहीत तर सुधारणांचें गाडें चालविण्यास यापुढे कोणीहि प्रागतिक तयार होणार नाही. म्हणून त्यांची सरकारला विनंति आहे कीं त्यांनी प्रागतिकांना खूष करावें व त्यांच्या मागण्या मान्य कराव्या. वरील विचार त्यांनी ज्या पत्रकांत प्रसिद्ध केले आहेत त्या पत्रकाच्या शेवटीं शेवटीं तर सर चिमणलाल यांनी सरकारास सभ्य शब्दांत शिव्याशाप दिले आहेत व असें ध्वनित केलें आहे कीं, जर ब्रिटिश सरकारानें लवकर आपलें धोरण प्रसिद्ध केलें नाही तर राष्ट्रीय सभेनें इंग्रजांच्या वचनासंबंधीं दाखविलेला अविश्वास अगदी बरोबर होता असें मानावें लागेल !

सर चिमणलाल सेटलवाड यांचा वरील सात्त्विक संताप अनाठायीं आहे असें कोण म्हणेल ? पण त्यांच्या लक्षांत एक गोष्ट येत नाही ती ही कीं, आजपर्यंत ब्रिटिश मुत्सद्द्यांनी प्रागतिकांना पुढे करून राष्ट्रीय पक्ष नामोहरम करण्याचा उद्योग केला. आता त्याचीच छोटी आवृत्ति काढून ते मुसलमानांना पुढे करीत आहेत व त्यांच्याकरवीं प्रागतिकांच्या मागणीचा कांटा ते परस्पर काढूं इच्छित आहेत ! तूर्त प्रांतिक सत्ता या असें म्हणण्यांत मुसलमानांचा स्वार्थ आहे. आज प्रांतिक सत्ता चार प्रांतांत आपल्या बहुमताच्या जोरावर जारी करून घेऊन पुढे या चार प्रांतांच्या जोरावर आपल्या ज्ञातिविशिष्ट मागण्या पूर्णपणें मान्य करून घेतल्याशिवाय संयुक्त घटनेस अगर जबाबदारीच्या स्वराज्यास आपण संमति देणार नाही असा त्यांचा विचार स्पष्ट दिसतो. लास्कीसारख्या त्रयस्थ गृहस्थानें असें स्पष्ट लिहिलें आहे कीं, गोलमेज परिषदेच्या वेळींच मुसलमान पुढाऱ्यांनी राष्ट्रीय आकांक्षांचा व राष्ट्रीय जीवनाचा स्वतःच्या हिताहितबुद्धीला बळी दिला ! प्रो. लास्की म्हणतात, "त्या वेळींच, मुसलमान पुढारी हिन्दी स्वराज्याच्या शत्रूंच्या हातचीं बाहुलीं बनले व मुसलमानी अविराज्याच्या कल्पनेने ते भारून गेल्यासारखे दिसले. धार्मिक मताकरितां सवता सुभा उत्पन्न करण्याच्या त्यांच्या कल्पना ज्या उद्दामपणाच्या शब्दांत निघत होत्या त्यांस तोडच नाही. यांना प्रांतिक स्वायत्तता दिली तर त्या प्रांतांचें व या प्रयोगाचें वाटोळें होईल. अल्पसंख्याकांच्या हक्कांचें संरक्षण म्हणजे बहुसंख्याकांच्या हक्कांचें मरण नव्हे. म्हणून ज्या सरकारानें हे ज्ञातिनिष्ठेचे भेद उत्पन्न केले त्यांनीच ते घालविले पाहिजेत. राष्ट्रीय पक्षाला हाणून पाडण्याकरिताच हे भेद इंग्रजांना पाहिजे आहेत अशी समजूत असल्यामुळेच या चळवळीला जोर चढतो. म्हणून ही कल्पना जितक्या लवकर नष्ट होईल तितक्या लवकर ती नाहीशी केली पाहिजे." मुसलमानांचे पुढारी आज कोणता खेळ खेळत आहेत याची पूर्ण जाणीव प्रागतिक पक्षाच्या पुढाऱ्यांनी ठेवून आपलीं पावलें टाकलीं पाहिजेत असा त्यांना लास्कींचा इशारा आहे. वर प्रारंभींच आम्हीं जो नवा बनाव बनत चालला आहे असें म्हटलें आहे तो बनाव हाच होय.

प्रांतिक स्वायत्ततेचा तुकडा हिंदुस्थानाच्या अंगावर टाकून हल्लीं राष्ट्रांत चालू असलेल्या स्वराज्याची वासलात लावावयाची असा नवा डाव ब्रिटिश मुत्सद्दी टाकीत आहेत. राष्ट्रीय सभावाल्यांस तुरुंगांत डांबून ठेवून आज प्रांतिक स्वायत्तता देण्याचा कायदा पार्लमेंटानें पसार केल्यावर प्रागतिक व इतर पक्ष नाइलाज म्हणून तो कायदा पत्करतील व पुनः मुसलमानांच्या साहाय्यानें सरकारास आपलें आसन दृढ ठेवतां येईल अशी ही योजना आहे. अर्थात ही योजना यशस्वी होणें न होणें हे मात्र प्रागतिक पक्षाच्या निश्चयावर अवलंबून आहे. दिलेलें राज्ययंत्र कसें कां असेना आपण चालविलेंच पाहिजे असा कोटिक्रम त्यांनी सुरू केला म्हणजे सरकाराचा विजय झाला असें होईल, व सर चिमणलाल म्हणतात त्याप्रमाणें प्रागतिकांनी हें राज्ययंत्र चालविण्याची जबाबदारी पत्करली नाहीं तर मात्र लोकपक्षाचा जय होईल. राष्ट्रीयसभावाले निदान आजचा त्यांचा कल पाहतां या राज्ययंत्रास आपला पाठिंबा देणार नाहीत हें उघड आहे. तेव्हा इंग्रजांना यश येणें न येणें प्रागतिकांच्या मतावर अवलंबून आहे. म्हणून सर चिमणलाल यांची गर्जना वृथा ठरते कीं त्या गर्जनेमागें असलेला जोर कायम टिकतो हें पाहणें आहे.

त्यांनी जर आपला हट्ट खरा केला तर मात्र हें प्रांतिक स्वायत्ततेचें राज्ययंत्र चालणें अशक्य होईल. कारण लोकांचें सहकार्य हीच या यंत्राला चालविणारी वाफेची शक्ति असल्यामुळे हें सहकार्य संपलें कीं या यंत्राचाहि जीव गेला असें होणार आहे! प्रांतिक स्वायत्ततेचेंच घोडें दामटलें गेल्यास पुढे काय परिणाम होण्याचा संभव आहे याचें वरील चित्र ब्रिटिश मुत्सद्द्यांच्या डोळ्यांपुढें नसेल असें वाटत नाहीं. निदान हिंदुस्थानांतील त्यांच्या

पुरस्कर्त्यांना त्याची जाणीव चांगलीच असल्यामुळे 'प्रांतिक स्वायत्तता देऊन सरकार स्वस्थ बसेल ही गोष्ट अशक्य आहे' असा पुकारा ते वारंवार करीत असतात. मुंबईच्या 'टाइम्स ऑफ इंडिया'ने गेल्या आठवड्यांत त्याच्या विलायतेंतील खास बातमीदाराकडून आलेली जी बातमी प्रसिद्ध केली आहे तींत असें स्पष्ट लिहिलें आहे कीं, प्रांतिक स्वायत्तता प्रथम अमलांत येणार हें खरें. परंतु तिच्या मागोमाग तावडतोब संयुक्त घटनाहि अमलांत यावी अशी योजना ठरली असून एकाच कायद्यांत त्या दोहोंचा समावेश होण्याचें निश्चित ठरलें आहे.

या बातमींत कितपत तथ्य आहे हें लवकरच समजेल. त्यावरून कोणी भाळून जाण्याचें मात्र कारण नाही. चलचित्रपटाप्रमाणे राजकारणांतील हे क्षणोक्षणीं बदलणारे देखावे डोळ्यापुढे उभे करणें हेहि या कारस्थानाचें एक अंगच समजलें पाहिजे. कारण, संस्थानिकांच्या मागण्याचें स्वरूप आणि मुसलमान व इतर अल्पसंख्याक गटांच्या पुढाऱ्यांचा हटवादीपणा याकडे लक्ष दिलें असतां प्रांतिक स्वायत्ततेपुढे प्रत्यक्षपणे एकहि पाऊल पडेल असें वाटत नाही. यामुळेच 'टाइम्स' नें प्रसिद्ध केलेल्या बातमींत फारसें तथ्य आहे असें म्हणण्यास जागा नाहीं. संस्थानिकांचे पुढारी, मुसलमान वगैरे अल्पसंख्याकांच्या हक्कांचे पुरस्कर्ते व डॉ. आंबेडकरांसारखे राष्ट्रीय सभेचे कट्टे द्वेष्टे यांच्या विलायतेस ज्या खेपा चालल्या आहेत त्यावरूनहि विलायतेस शिजत असलेल्या राजकारणाची कल्पना येते. पण त्यांतून निघणारा निष्कर्ष मात्र इतकाच आहे कीं, त्यांच्या साहाय्यानें पूर्ण स्वराज्याची योजना कालावधीवर टाकावयाची व प्रांतिक स्वायत्ततेचा एक नवा कायदा पार्लमेंटांत पसार करून घ्यावयाचा.

राष्ट्रीय सभेच्या पुरस्कर्त्यांनीं सरकारशी सहकारिता करावयाची नाहीं हें पूर्वींच ठरविलें आहे. प्रागतिक पक्षाचे सर चिमणलालसारखे पुढारीहि आतां तीच भाषा वापरूं लागले आहेत. व अशा रीतीने हें असहकारितेचें पाणी समाजाच्या सर्व थरांतून भिनलें तर ब्रिटिश राज्यकर्त्यांना तो जबरदस्त पेच बसेल. रशियाच्या झारचा सगळा भरंवसा त्याच्या खास लष्करावर होता. परंतु ज्या दिवशीं या खास सैन्याच्या सेनापतीने झारला आपल्या सिंहासनावरून खाली उतरण्याचा सल्ला दिला त्या दिवशीं झारची सत्ता कोसळून पडली. ब्रिटिश राज्यकर्त्यांनीहि आपल्या भोंवतीं प्रागतिक, अल्पसंख्याक वगैरे गटाची तटबंदी उभारली आहे. त्यापैकीं प्रागतिकासारख्या वजनदार पक्षानें हातचें सोडल्यास आपली काय अवस्था होईल याचा विचार सरकारानें करण्याची वेळ हीच आहे.

# वसंतव्याख्यानमाला

## हिंदी चलन पद्धतींतील घोटाळा

(११) श्री. आ. रा. भट यांचें श्री. आप्पासाहेब तारकुंडे यांच्या अध्यक्षतेखाली 'हिंदी चलन पद्धतींतील घोटाळा' या विषयावर गुरुवार ता. १९ रोजीं व्याख्यान झालें. अध्यक्षांचे प्रास्ताविक भाषण झाल्यावर व्याख्याते आपल्या भाषणांत म्हणाले, "हिंदी चलन पद्धतीचा फारसा पूर्वेतिहास न सांगतां मी गेल्या सात आठ वर्षांतील हिंदी चलन पद्धतीचें समालोचन करून त्यांतील घोटाळ्याचें मुख्य सूत्र सांगणार आहे. १९२७ सालीं हिंदी व्यापाऱ्यांच्या सर्वसाधारण जनतेच्या व मध्यवर्ती विधि-मंडळांतील लोकनियुक्त सभासदांच्या इच्छेला लाथाडून हिल्टन यंग कमिशनच्या शिफारसीप्रमाणें हिंदुस्थान सरकारनें रुपयाचा भाव अठरा पेनी (सुवर्ण) अगर ८·४७ ग्रेन सुवर्ण इतका ठरविला. त्या वेळीं यंग कमिशनचे एक सभासद सर पुरुषोत्तमदास ठाकुरदास यांनी रुपयाचा भाव सोळा पेनी ( सुवर्ण ) अगर ७·५३ ग्रेन सुवर्ण एवढाच कायम करावा असें सुचविलें होतें, व जनतेने आणि व्यापाऱ्यांनी त्यांना पाठिंबाहि दिला होता. सुमारें तीस वर्षांपूर्वी फाऊलर कमिटीच्या सूचनांचा सरकारनें स्वीकार केल्यापासून हिंदी नाणें ७.५३ ग्रेन सुवर्णाचें ठरलें होतें. रुपया ही चांदीवर छापलेली नोट असून त्या नाण्याचें प्रतीक आहे. अर्थातच सरकारनें पांच वर्षांपूर्वी नाण्याच्या किंमतीला स्थिरता आणतांना ती पूर्वपदावरच स्थिर करावयास पाहिजे होती. तशी ती स्थिर केली गेली असती व रुपयाचा भाव १६ पेनी ( सुवर्ण ) अगर ७·५३ ग्रेन सुवर्ण इतका करण्यांत आला असता तर त्यामुळें शेती व उद्योगधंदे यांचा फायदा झाला असता. परंतु सरकारला हिंदुस्थानाचें हित पाहावयाचें नाहीं. त्यांच्या डोळ्यांपुढें मुख्य प्रश्न ग्रेटब्रिटनच्या हिताचा असतो.

### ग्रेटब्रिटनचें स्थान

गेलीं कित्येक वर्षें ग्रेटब्रिटनचें हिंदुस्थानाच्या व्यापारी पेठेंतील स्थान सारखें डळमळत चाललें आहे. रुपयाचा अठरा पेनी भाव करून परदेशी मालाच्या खपाला जोर आणावा म्हणजे आयात

व्यापारांत अजूनहि इतर देशांपेक्षां ग्रेटब्रिटनचा हिस्सा मोठा असल्यानें आपोआपच ब्रिटिश माल हिंदुस्थानांत अधिक खपूं लागेल असें स्टेट सेक्रेटरींना व त्यांच्या ताबेदार हिंदुस्थान सरकाराला वाटतें. त्याचप्रमाणें रुपयाचा भाव सोळा पेनीऐवजीं अठरा पेनी केल्याने परदेशी बँका, इन्शुअरन्स कंपन्या, आगबोट कंपन्या, कारखानदार व गोरे सनदी व इतर नोकर यांना हिंदुस्थानांतील कमाई विलायतेस रवाना करतांना रुपयामागें दोन पेनी अधिक मिळूं लागल्या. त्याप्रमाणे सोळा पेनींचा भाव असतां ठरविलेल्या जमीनधाऱ्यांत अप्रत्यक्षपणें साडेबारा टक्के वाढ झाली व हिंदुस्थान सरकारला तिकडील खर्चास पाठवावयाच्या रकमेंत बचत करतां आली. विलायतचा हिंदुस्थान बरोबरीचा व्यापार सुधारण्याकरितां, म्हणून रुपयाचा भाव अठरा पेनी करण्यांत आला खरा;परंतु या फरकामुळें इतर परदेशी मालापेक्षां ब्रिटिश मालाला अधिक कोणतीच सवलत मिळाली नसल्यामुळें गेल्या चार वर्षांत अठरा पेनींच्या भावाचा इतर राष्ट्रांनी विशेषतः जपानानें भरपूर फायदा घेऊन आपला स्वस्त माल हिंदुस्थानांत अधिकाधिक खपविण्यास प्रारंभ केला व या मारक चढाओढीमुळें जसें हिंदी उद्योगधंद्याचें नुकसान झालें त्याप्रमाणें नी चढाओढ न मानवून हिंदुस्थान बरोबरच्या ब्रिटिश व्यापारालाहि थोडी आहोटीच लागली. अर्थातच १९२७ सालीं मोठ्या कुशलतेनें इंग्लंडचें हित साधण्याकरितां टाकलेला हा डाव इंग्लंडच्याच आंगलट झाला. परंतु सोळा पेनी ऐवजीं रुपयाचा अठरा पेनी भाव केल्यामुळे शेतकऱ्याला व्यापारमंदीचा त्रास अधिक होऊन त्याचें उत्पन्न घटलें, सावकाराचें परंपरागत देणें व जमीनधारा यांत अप्रत्यक्ष दृष्ट्या वाढ झाली, परदेशी माल स्वस्त विकूं लागल्यामुळे देशी उद्योगधंदे बसले, कारखानदारांवर काटकसरीकरतां मजुरांच्या मजुरीला नख लावण्याची वेळ आली व त्यामुळें मालक व मजूर यांमधील तंटे वाढले, आणि अशा रीतीनें हिंदी लोकांचे सर्व बाजूंनी नुकसान झालें. सरकार कबूल करो अगर न करो, परंतु कारखानदारांना फायदा कमी होऊं लागल्यामुळे प्राप्तीवरील करांचे व परदेशीं मालाची किंमत रुपयांत कमी झाल्यामुळे जकातीचें उत्पन्न घटलें यांत शंकाच नाही. या सर्व आपत्तींचें मूळ विलायतच्या हिताकरितां हिंदी चलनपद्धतींत सरकारनें केलेला घोटाळा हें होय.

पांच-सात वर्षांपूर्वी हिंदुस्थानांतील ब्रिटिश व्यापाराची घडी सावरण्याकरतां सरकारनें केलेला प्रयत्न फसला असला तरी सरकारनें विलायतचें हित येन-केन प्रकारेण साधण्याचा विचार सोडून दिला नाहीं. १९२७ सालीं जें हुकलें तें १९३१ च्या सप्टेंबरांत ब्रिटिशसरकारनें साधून घेण्याचा यत्न केला. पौंड स्टर्लिंगची सुवर्णापासून फारखत करण्यांत आल्यामुळें इंग्लंडच्या निर्गत व्यापाराला साहजिकच चालना मिळाली. याच वेळीं हिंदुस्थानच्या व्यापारांतील आपलें डळमळणारें स्थान स्थिर करण्याचा विचार करून विसगतीचा आरोप पत्करनी पाडणें हिंदुस्थानसरकारला भाग पाडले. अठरा पेनींचा भाव टिकवितांना हिंदुस्थान सरकारच्या नाकीं नऊ आले होते. बाह्यात्कारी सर्व कांही ठीक आहे असें जरी हिंदुस्थासरकार दाखवीत होतें, तरी अठरा पेनींच्या सुवर्ण-भाव टिकविण्याची जबाबदारी केव्हां झुगारून देतां येईल याचीच सरकार वाट पहात होतें. वीस सप्टेंबरला इंग्लंडनें सुवर्ण चलन पद्धतीला फाटा देतांच इकडे एकवीस सप्टेंबरला व्हाइसरॉयांनीं वटहुकूम काढून हिंदुस्थान सरकारावरील ठराविक दरानें व्यापाऱ्यांना सोनें अगर सुवर्ण हुंड्या विकत देण्याची जबाबदारी झुगारून दिली व हिंदुस्थान सरकार रुपयाच्या भावांत ढवळाढवळ करणार नाही असेंहि जाहीर केलें. ह्या वटहुकुमाला हिंदुस्थान सरकार चिकटून राहतें तर त्यांत हिंदुस्थानचा फायदा होता. परंतु हिंदुस्थानचा फायदा--तोटा कशांत आहे हें न पाहता विलायतचें हित कशांत आहे हे पाहण्याची ब्रिटिश राजनीति असल्यामुळें स्टेट सेक्रेटरीसाहेबांनी हिंदुस्थान सरकारनें काढलेला वटहुकम धाब्यावर बसवून असें जाहीर केलें कीं रुपयाचा १८ पेनीचा स्टर्लिंग भाव टिकविण्याचें सरकारनें ठरविलें आहे. याचा अर्थ रुपयाचा सुवर्णापासून घटस्फोट करून त्याचा पाट बिनबुडाच्या पौंडाशीं लावण्यांत आला स्टेट सेक्रेटरींनीं अशी घोषणा करतांच त्यांच्या हिंदुस्थानांतील ताबेदारांनीं पहिला वटहुकम रद्द करून स्टेट सेक्रेटरींच्या इच्छेप्रमाणें दुसरा वटहुकम काढला. हिंदुस्थानसरकारच्या आर्थिक पारतंत्र्याचें हें अगदीं ताजें उदाहरण आहे.

### बिन बुडाच्या पौंडाशीं नातें

रुपयाची सुवर्णापासून फारखत होऊन त्याचें नशीब बिनबुडाच्या स्टर्लिंगशीं जोडल्यामुळे सोन्याचा भाव चढूं लागून परदेशांतील भाव व येथील भाव यांत बरोबर मेळ बसणें कठिण झालें. परदेशी सोनें पाठविणें फायदेशीर पडूं लागल्यामुळे सुवर्ण--निर्गतीला प्रारंभ झाला, व आजतागायत पासष्ट कोटींहून अधिक किंमतीचें सोनें परदेशीं गेलें. या परदेशी जाणाऱ्या सोन्यामुळे तिकडे बिनबुडाच्या स्टर्लिंगला आधार मिळाला, व इकडे स्टर्लिंग हुंड्या बाजारांत अधिकाधिक येऊं लागल्यामुळे रुपयाचा अठरा पेनी स्टर्लिंग भाव टिकविणें सरकाराला शक्य झालें. हिंदुस्थानां-

तून सुवर्णनिर्गत होऊं लागल्याबरोबर इर्ट्ले विदर्स सारख्या ब्रिटिश लेखकांना आनंदाचें भरतें आलें.

वरील गोष्टी अर्थातच हिंदुस्थानच्या अनहिताच्या झाल्या. पहिला वटहुकूम कायम ठेवून जर सरकारनें रुपयाच्या भावांत हात घातला नसता तर हिंदुस्थानच्या निर्गत व्यापाराला तेजी येऊन हिंदुस्थानचें हित साधलें असतें. रुपयाची सुवर्णा-पासून फारखत झाल्यावर सुवर्णनिर्गत होणें अपरि-हार्य असले तरी रुपयाचें नातें स्टर्लिंगशीं जोडल्या-मुळे जितकी सुवर्ण-निर्गत झाली तितकी झाली नसती. हिंदी व्यापारी संघाचे या बाबतींत असें म्हणणें होतें कीं, सरकारने रुपयाचा भाव स्टर्लिंगशीं जोडूं नये व कांही काळ हेलकावे खाऊन भाव स्थिर होण्याच्या मार्गास लागला म्हणजे सरकारनें तो स्थिर करावा. तसेंच सुवर्णाची निर्गत कायद्यानें बंद करू-न न्यूयॉर्क-लंडन क्रॉस रेटच्या अनुरोधानें बाजारांत येणारें सोनें खरेदी करून रिझर्व्ह बँकेच्या स्थापने-करितां लागणारा सुवर्णसंचय करून ठेवावा. या सर्व मागण्या हिंदुस्थानच्या हिताच्या असूनहि सरकारनें स्वीकारल्या नाहीत. कारण एकच, त्यांत विलायत सरकारचा व विलायती व्यापाऱ्यांचा डाव साधण्या-सारखा नव्हता.

### हिंदी व्यापाऱ्यांचा इषारा

सुवर्ण-निर्गत कमी होऊं लागतांच रुपयाचा अठरा पेनी स्टर्लिंग भाव टिकविणेंहि सरकारला अशक्य होईल असा इषारा हिंदी व्यापाऱ्यांनी सर-कारला दिला होता. सांप्रत सुवर्णनिर्गत थोडी कमी होऊं लागल्यामुळे रुपयाचा स्टर्लिंग भाव नरम पडूं लागला आहे. जर का सुवर्णनिर्गत अगदीं बंद झाली तर हा अठरा पेनी स्टर्लिंग भावहि सरकार-ला टिकवितां येणार नाही. व रुपयाला अधांत्री सोडावा लागेल. असो. या सर्व विवेचना-वरून एकच गोष्ट स्पष्ट होते. ती अशी कीं, इतर स्वतंत्र देशांत चलनपद्धतींत घोटाळे झाले तर त्याचें कारण आर्थिक अवनति अगर अर्थ शास्त्रज्ञांचीं चुकीचीं प्रमेयें हें असतें. परंतु हिंदुस्थानां-तील घोटाळे ब्रिटिशांच्या आर्थिक हिताकरितां हिंदी चलन पद्धतींत केल्या जाणाऱ्या प्रयोगामुळें होत असतात. हिंदुस्थानाला आर्थिक स्वातंत्र्य मिळाल्या-विना हे घोटाळे थांबणार नाहीत." अशा आशयाचे श्री.भट यांचें भाषण झाल्यावर प्रो. **डी.आर.गाडगीळ** यांचें उपवक्ते म्हणून भाषण झालें. प्रो. गाडगीळ म्हणाले कीं, "कोणताहि विषय लोकांना समजेल अशा सोप्या भाषेंत समजावून देण्याचा 'केसरी' संस्थेतील मंडळींचा हातखंडा आहे. अर्थशास्त्र व त्यांतल्या त्यांत चलन हा विषय रुक्ष व गुंतागुंतीचा असूनहि 'केसरी' संस्थेच्या परंपरेप्रमाणें श्री. भट यांनी तो अगदी सुलभ रीतीनें आपणापुढें मांडला आहे. दोन अर्थशास्त्रज्ञांची कोणत्याहि विषयावर सर्वस्वी मतें जमलीं असें सहसा होत नाही. त्या-प्रमाणे कांही तपशीलाबाबत माझा श्री.भट यांच्याशीं मतभेद आहे. उदाहरणार्थ सुवर्णनिर्गत बंद केली असता वाढत्या किंमतीचा फायदा आपल्या लोकां-च्या पदरांत पडणार नाही. आपद्ग्रस्त असल्यामुळे लोक सोनें विकतात असें आपण म्हणतों, तर मग त्यांना त्यांच्या सोन्याबद्दल जास्तींत जास्त किंमत मिळणें त्यांच्या हिताचें आहे. यामुळे सुवर्ण-निर्गतीला बंदी केली जावी असें मला वाटत नाही. अशा कांही बाबतींत श्री. भटांबरोबर माझा मतभेद असला तरी चलन पद्धतींतील घोटाळ्याचें मूळ ब्रिटिश हितप्रधान असें सरकारचें स्वार्थी धोरण हें आहे हें श्री. भटांच्या व्याख्यानाचें मुख्य सूत्र मला मान्य आहे." अशा आशयाचे प्रो. गाडगीळ यांचें भाषण झाल्यावर अध्यक्षांनी समयोचित शब्दांत समारोप केला.

# महाराष्ट्र चित्रकार संमेलन

### पुणें येथील प्रथमाधिवेशन

ता. २९ रोजीं पुणें येथे टिळक स्मारकमंदिरांत महाराष्ट्र चित्रकारांचें प्रथम संमेलन मुंबईच्या रि.-उदय आर्ट प्रेसचे मालक श्री. माधवराव जोशी यांचे अध्यक्षतेखालीं झालें. त्या वेळीं अध्यक्ष या नात्याने श्री.जोशी यांनी पुढील आशयाचें भाषण केलें.

### अध्यक्ष श्री. जोशी यांचें भाषण

"आपल्या देशांत निरनिराळ्या प्रांतांत तसेंच मोठमोठ्या शहरीं चित्रकारांचीं मंडळें आहेत. सदर संस्थाप्रमाणें आपणहि महाराष्ट्र चित्रकारमंडळ स्थापून महाराष्ट्रापुरती स्वतंत्र संस्था निर्माण करून एक महत्वाचें कार्य केलें आहे. बहुतेक सर्व मंडळांचे उद्देश व कार्यक्रम ठराविक म्हणजे प्रदर्शनें भरविणें, चित्रकारांमध्ये एकजूट करणें, चित्रसंग्रह करणें, चित्रकलेसंबंधी लोकांत अभिरुचि उत्पन्न करणें वगैरे प्रकारचा असतो. आपलें मंडळ अद्याप बाल्याव्यवस्थेंत आहे व त्यानेंहि वरीलप्रमाणेंच उद्देश व कार्यक्रम आपल्यापुढें ठेविले आहेत.

मी आज आपणांपुढे पौर्वात्य व पाश्चिमात्य पद्धतीविषयी दोन शब्द सांगणार आहें. स्थूल दृष्टीनें आपणास आढळून येईल कीं "वस्तु-स्थितिदर्शक" (रियॅलिस्टिक) आणि काल्पनिक

( आयडियॅलिस्टिक ) असे मुख्य दोन विभाग चित्रांचे होऊं शकतात; मग तीं चित्रें शिल्पकारांनीं बनविलेले पुतळे असोत अथवा चितान्यांनी रंगांत काढलेलीं असोत. अशीं चित्रें मुख्यतः चार प्रकारचीं असतात. ते म्हणजे ( १ ) प्रतिकृति आणि प्रतिमालेखन (पोर्ट्रेट व फिगर ड्रॉईंग) ( २ ) सृष्टिसौंदर्याचे देखावे, भूजलप्रदेशाचीं चित्रे (लॅन्ड स्केप व सीस्केप्स) ( ३ ) प्राणिविषयक चित्रें आणि ( ४ ) शोभात्मक चित्रें. चित्रांचे हे चार प्रकार वस्तुस्थितिदर्शक तसेच काल्पनिक चित्रांत असूं शकतात. परंतु पहिल्या तीन प्रकारच्या चित्रांचें वस्तुस्थितिदर्शक विभागांत विशेष महत्त्व असतें. कारण वस्तुस्थिति सोडून अशीं चित्रे काढलीं तर तीं केव्हाहि चांगलीं दिसणार नाहींत. शोभात्मक चित्रांचा जो चौथा प्रकार आहे, त्यांत वस्तुस्थितिदर्शकपणास गौण स्थान देऊन अलंकार व शोभा या त्यांतील मुख्य कार्यांस जरूर त्या कल्पनाचातुर्यास प्राधान्य दिलें जातें. परंतु ह्या चारहि प्रकारच्या चित्रांची उभारणी शुद्ध व सशास्त्र यथार्थदर्शक आलेखनावरच करावी लागते. एकदा चित्राचें आलेखन बरोबर वस्तुस्थितीला धरून झालें कीं, चित्रांत मोहकपणा आणण्यासाठी चित्रकलेचे रंग व रचना वगैरे संबंधाचे सिद्धांत उपयोगांत आणावेत, किंबहुना अशा सिद्धांतांचा उपयोग अवश्यमेव केला पाहिजे.

### यथार्थदर्शक आलेखन

चित्र काढणें म्हणजे निसर्गाचीच प्रतिकृति काढणे असल्यामुळे निसर्गास सोडून चालावयाचें नाहीं. चित्रविषयाचें आलेखन निसर्गाबरहुकूम झालेंच पाहिजे. ( Portrait ) म्हणजे प्रतिकृतीचा विचार केला तर ज्याचें चित्र काढावयाचें असेल त्याची ओळख पटेल इतकें शुद्ध व सशास्त्र आलेखन झालें पाहिजे. ह्या आलेखनासंबंधी कल्पनाचातुर्याचा कांही उपयोग होणार नाही. तें सर्वथैव वस्तुस्थितिदर्शकच असावें लागतें. आलेखन अशा प्रकारें झाल्यावर रंगाची योजना, चित्र–विषयाची जुळवाजुळव व मांडणी ठराविक सिद्धांतांना अनुसरून करावी.

भू-जल-प्रदेशाच्या देखाव्यांचे चित्रांत जो देखावा काढला असेल त्याची ओळख पटविण्याइतकें वस्तुस्थितिदर्शक शुद्ध आलेखन असावें लागतें, सिद्धांतांचा उपयोग आलेखनामध्ये कोणत्याहि प्रकारें करता येणार नाही. हीच गोष्ट प्राणिविषयक चित्रांचीहि आहे. शोभात्मक ( Decorative ) चित्रांची गोष्ट थोडी निराळी असते. वस्तुस्थितिदर्शकत्वाचे गुणासंबंधी जरी गौणत्व असलें तरी चित्रविषयाचें आलेखन शुद्ध व सशास्त्र असेंच असावें लागतें. विषयाची मांडणी व जुळवाजुळव वगैरे बाबतींत ठराविक सिद्धांताबरोबर कल्पकतेसहि स्थान मिळतें. असें जरी आहे तरी वस्तुस्थितिदर्शकत्व व निसर्ग ह्यांच्या समागमांतच कल्पकतेचा उपयोग करावयाचा असतो. ह्या विवेचनावरून मला इतकेंच सांगावयाचें आहे कीं, चित्र-कोणत्याहि प्रकारचें असो,त्याची उभारणी यथार्थदर्शक आलेखनावरच झाली पाहिजे. हा प्रकार वस्तुस्थितिदर्शक चित्रांचा झाला.

काल्पनिक अथवा भावनात्मक चित्रांसंबंधी विचार केला तर त्यांतील चार प्रकारच्या चित्रांतहि आलेखन शुद्ध व सशास्त्र असेंच असावें लागतें. अशीं चित्रें मूलतः काल्पनिकच असल्यामुळे यथार्थदर्शकपणास गौणत्व प्राप्त होतें. कदाचित असा प्रकार चित्रशास्त्राचे माहितीच्या अभावीं होत असावा असें मानण्यास पुष्कळच जागा आहे. आलेखनाच्या बाबतींत दोनहि मुख्य विभागामध्ये एकच नियम आहे तो हा कीं, आलेखन शुद्ध, सशास्त्र व निसर्गाला धरूनच असावें लागतें. वास्तविक पहाता पाश्चिमात्य पद्धति व पौर्वात्य पद्धति असा आलेखनशास्त्रांत भेद करण्यांत यावा हें मला संमत नाहीं; कारण आलेखन म्हटलें कीं तें सर्व ठिकाणीं सारखेंच असावें. परंतु जो भेद पडला आहे तो आलेखनावरून नसून चित्रांतील व्यक्ति, पोषाख, बाह्य रेषेवर भर देण्याची पद्धत, नक्षी, वगैरे गुणांवरून पडला असावा.

### हिंदी चित्रकला व धार्मिक भावना

पौर्वात्य पद्धतीविषयी विशेषतः हिंदी पद्धतीविषयी लिहिताना पाश्चिमात्यांनी अत्यंत गौरवयुक्त शब्दांनी त्यांचा उल्लेख केला आहे. हॅवेल, सरसी, परडन, क्लार्क, प्रो. वेस्ट मॅकोट व एम. ले. बोन वगैरे संशोधक व अभ्यासी लोकांनी आमच्या देशांतील प्राचीन चित्रकलेसंबंधीं काढलेल्या गौरवयुक्त विचाराबद्दल मला व आपणा सर्वांस अभिमानच वाटेल. ह्या व इतर विद्वान लेखकांनीं वरील प्रकारचे गौरवयुक्त उद्गार काढतांना त्याबरोबर असें म्हटलें आहे कीं, हिंदी चित्रकलेंत धार्मिक भावनांनाच प्राधान्य दिलें जातें. हिंदी चित्रकला बहुतांशीं काल्पनिक व भावनाप्रधान असल्यामुळे वस्तुस्थिति–दर्शक चित्रकलेचा उत्कर्ष फारसा झाला नाही. तशा प्रकारचीं चित्रें असलीं तरी फारच थोडीं आढळतात. पाश्चिमात्य लोक धार्मिक कल्पनांस आमच्यासारखें महत्त्व देत नाहीत. वेळोवेळीं जे शास्त्रीय शोध लागले त्यांचा त्यांनी उपयोग करून घेतला आहे. त्यामुळे युरोपियन चित्रकलेचें पाऊल हिंदी चित्रकलेच्या पुढें पडलेलें दिसत आहे.

### बंगाल व मुंबई

आपला हिंदुस्थान देश एका लहानशा खंडासारखा आहे. त्यांत प्रांतानिहाय त्या त्या प्रांताचें वैशिष्ट्य असावयाचेंच व त्या सर्वांमध्यें चुरस व चढाओढ असावयाचीच. अशी चुरस व चढाओढ प्रगतीस पोषकच आहे.परंतु त्याचा उपयोग दुसऱ्याचा पाडाव करण्याकडे न करता आपलें वैशिष्ट्य कायम ठेवण्याकडे करावा. पद्धतीबद्दल उगाच न भांडता आपलें वैशिष्ट्य कायम ठेवून यथार्थदर्शन व छाया--प्रकाश या शास्त्रांच्या प्रगतीकडे दुर्लक्ष न करता त्यांच्या प्रगतीचा संपूर्ण उपयोग करून पौर्वात्य पद्धतीने चित्रें काढावीं. विशेषप्रसंगीं चित्र--विषयास आपलेकडील पद्धति अनुकूल नसल्यास पाश्चिमात्य पद्धतीचा स्वीकार करण्यासहि हरकत वाटूं नये. असे केल्यास मला खात्री आहे कीं हिंदी चित्रकलेचा उदय झाल्यावांचून राहाणार नाही. मुंबईच्या आर्ट स्कूलमध्यें अशाच तऱ्हेनें पाश्चिमात्य व पौर्वात्य पद्धतींचें गोड संमेलन करून विद्यार्थ्यांना शिक्षण दिलें जाते.

बंगाल प्रांत व मुंबई प्रांत यांच्यामध्ये फार दिवस वाद चालू आहे. बंगाल प्रांत पुराणमतवादी असून मुंबई प्रांत जुन्याच्या अभिमानाबरोबर नवीन शोध व यथार्थदर्शनशास्त्र ह्यांचा उपयोग करावा अशा मताचा अनुयायी आहे. या दोहोंमध्ये मुंबई प्रांताने जी दिशा स्वीकारली आहे ती योग्य आहे अशी माझी समजूत आहे.बंगाल प्रांताची दिशाभूल झाली आहे व त्याने आपल्या मार्गासंबंधीं फिरून विचार करण्याची जरूरी भासते अशा आशयाचे विचार मि. चौधरी ह्या बंगाली चित्रकाराने विलायतेहून परत आल्यावर काढले आहेत. यापेक्षां ह्या गोष्टीस दुसऱ्या पुराव्याची जरूरी नाही.

आपल्याकडे पूर्वी तेलाच्या रंगांत चित्रें काढीतच नसत. पाश्चिमात्य लोकांनी मात्र तैलचित्रे काढण्याची कला पूर्णत्वास नेली आहे. हल्लींच्या काळांत तैलचित्रें काढण्याची कला अवगत झाली आहे, तसेंच यथार्थदर्शन शास्त्राचा अभ्यासहि चित्रकारांना करावा लागत आहे. पोर्ट्रेट्स म्हणजे प्रतिकृति काढणें झाल्यास रफ पद्धत जास्त अनुकूल अशी वाटते. परंतु काल्पनिक चित्रांस एतद्देशीय पद्धतिच योग्य आहे. शिवाय म्यूरल पेंटिंगविषयी लोकांमध्ये अभिरुचि उत्पन्न होत आहे. त्या चित्रासहि आपल्याकडील पद्धतिच जास्त सोयीस्कर अशी आहे. इकडील चित्रांमध्यें जी एक विशेष पद्धत आहे, त्यांत बाह्य रेषेवर (औटलाईन) विशेष भर दिलेला दिसतो. पण छाया प्रकाश यांकडे पाश्चिमात्य चित्राप्रमाणें लक्ष पुरविलें जात नसे. पौर्वात्य चित्रांत हें वैशिष्ट्य अद्यापहि कायम आहे.छायाप्रकाशांचा उपयोग चित्रांत योग्य प्रकारे केल्याशिवाय चित्रांत यथार्थदर्शकत्वाचा गुण येत नाही.”

# अखिल म. हिंदु–धर्म–मठ पुणें

### पदवीदान–समारंभ

उपरोक्त मठा ( मिशन )च्या विद्यमाने गेल्या मे महिन्यांत धर्मप्रचाराचें शिक्षण देण्याकरिता जो वर्ग भरविण्यांत आला होता त्या वर्गातील विद्यार्थ्यांचें व शिक्षकांचें संमेलन ता. ३१–५–३२ रोजीं श्री. न. चिं. केळकर यांचे अध्यक्षतेखाली झालें. प्रथम प्रार्थना, मग रसपान, नंतर प्रचारक वर्गाचे निरनिराळे भाग दाखवून नंतर फोटोचा कार्यक्रम झाला. उत्तीर्ण झालेल्या विद्यार्थ्यांना ‘धर्मजिज्ञासु’ पदवी देण्याचा समारंभ सार्वजनिक सभेच्या दिवाणखान्यांत झाला.

सभेस व्यापारी, विद्यार्थी, वकील वगैरे मंडळी हजर होती. वे. शा. सं. उपासनीशास्त्री, चित्रावशास्त्री, श्री. डावरे श्री. पाषाणकर, श्री. मिरासदार, पाठक व अनगळ मास्तर, श्री. दिनकर वकील, अॅडव्होकेट केळकर व देशमुख सेठ दलपतराम दवे, अकोल्याच्या सरस्वतीमंदिरांतील शिक्षक व प्रचारक श्री. आचार्य वगैरे मंडळी प्रामुख्याने दिसत होती. संस्थेचे संचालक वैद्य वा. कृ. दाणी यांच्या सूचनेवरून व अॅडव्होकेट देशमुख यांच्या अनुमोदनावरून श्री.तात्यासाहेब अध्यक्षस्थानी विराजमान झाले.

अध्यक्षांच्या आज्ञेवरून धर्मप्रचारक वर्गाचे व्यवस्थापक श्री. काळे वकील यांनी थोडेसें भाषण केलें. त्यांनी संस्थेच्या स्थापनेपासून मिति-मजकूरपावेतोंचा सर्व इतिहास, संस्थेची कामगिरी, जनतेची सहानुभूति, कार्यव्यापकतेची आवश्यकता वगैरे गोष्टी मुद्देसूद रीतीनें पुढे मांडल्या. शुद्धि-संघटण, मोफत दवाखाने, अनाथांचे परधर्मीय गुंडांकडून संरक्षण, गुन्हेगार जातींना केलेली मदत, धर्मचर्चा, मोफत वाचनालयें व खेडोपाडींचे धर्मप्रचारार्थ दौरे वगैरे विविध कार्यक्रम मठाने वैद्यराज दाणी यांच्या प्रेरणेने पार पाडिला.

३७ विद्यार्थ्यांनी प्रवेश मिळण्यासाठी अर्ज केले. २२ विद्यार्थ्यांनीं शिक्षण घेतलें, पैकीं दोन विद्यार्थिनी होत्या. एकंदर २६ लोकांनी अध्यापनाचें काम केलें. अभ्यास एकंदर १५० तास झाला. विद्यार्थ्यांची

उपस्थिति दररोज १७-१८ असे. विद्यार्थ्यांच्या जेवणाराहण्याची सोय संस्थेने केली होती. तिचा कांहींनी फायदा घेतला. वक्तृत्व, संभाषण, प्रवचन व निबंध यांचें प्रत्यक्ष शिक्षण दिलें गेलें. विद्यार्थ्यांना येथील निरनिराळ्या संस्था दाखविल्या. मॅजिक लॅंटर्न,वनभोजन, जवळील क्षेत्रदर्शन, व्याख्यानें वगैरे उपयुक्त कार्यक्रम पार पाडले. विद्यार्थ्यांची ईशप्रार्थना, नित्यकर्मे व शिस्त यांवर कडक नजर असे. वर्गाची सुरुवात स्वामी केवलानंद यांचे हस्तें झाली व समारोप ता. २८–५–३२ रोजीं श्री.बाबासाहेब पोतदार यांचे हस्तें झाला. परीक्षेस बसलेले २० हि उमेदवार यशस्वी झाले. त्यांना 'धर्म-जिज्ञासु' पदवी देण्यांत येत आहे.

नंतर अध्यक्षांनी पदवीदानपत्रकें देऊन अल्पसें भाषण केलें. त्यांत त्यांनी वैद्यराज दाणींचा गौरव केला. ते म्हणाले 'शिक्षणाचे बाबतींत महाराष्ट्र नेहमीच पुढें सरसावलेला असतो. पुण्यास सर्व प्रकारचें शिक्षण मिळण्याची सोय आहे. व्यायाम–शिक्षणाची महाराष्ट्रीय मंडळाने व धर्मशिक्षणाची वैद्यराज दाणी व त्यांच्या मठानें सोय करून या उणीवा भरून काढल्या आहेत. ज्याची स्फूर्ति त्याचा उद्योग व बाकीच्यांची सर्व प्रकारें सहानुभुति असली कीं यश खात्रीने मिळतें.'

विद्यार्थिवर्गाच्या वतीने वैद्यराज दाणींचे आभार श्री. बोधलेबुवा यांनी मानल्यावर श्री. काळे वकिलांनी अध्यक्षांना व बाबासाहेब पोतदारांना हार घालून आभार मानले व वैद्यराज दाणी यांना धर्म-जिज्ञासु बोधलेबुवा यांनी हार घातल्यावर समारंभ समाप्त झाला.

संस्थेतर्फे चाललेल्या प्रचारक वर्गाच्या परीक्षेचा निकाल लागून त्यांत पुढील उमेदवार पास झाले—

१ काळे, २ कुलकर्णी, ३ बोधलेबुवा, ४ वि. कृ. जोशी, ५ भोळे, ६ ल.र.देशपांडे, ७ चंपूताई जोगळेकर, ८ लोंढे, ९ दिडभाई, १० व्ही.व्ही. जोगळेकर, ११ शं. जा. घाग, १२ मा.य.माटे, १३ श्रीयुत पुरवंत, १४ सौ. तारादेवी दाणी, १५ रुद्रकार, १६ पवार.

# सर दोराबजी टाटा यांचा मृत्यु

शुक्रवार ता. ३ जून रोजीं सकाळीं जर्मनींतील एका आरोग्यभवनांत मुंबईचे प्रसिद्ध कारखानदार व दानशूर सर दोराबजी टाटा हे गृहस्थ कालवश झाले, ही वार्ता ऐकून कोणाहि हिंदवासीयास खेद वाटल्याशिवाय राहणार नाहीं. सर दोराब टाटा हे मुंबईचे श्रीमान व देशाभिमानी व्यापारी परलोकवासी जमशेट टाटा यांचे चिरंजीव होत. यांचा जन्म मुंबईत १८५९ सालीं ऑगस्टच्या २७ व्या तारखेस झाला. वयाच्या १६ व्या वर्षीच शिक्षणाकरिता परदेशांत जाण्याचा योग त्यांना आला. चार वर्षे तिकडे राहून परत आल्यावर ते १८८२ सालीं सेंट झेव्हिअर कॉलेजांतून बी. ए.च्या परीक्षेस बसले, व तिच्यांत उत्तीर्ण झाले. लहानपणीं खेळाकडे यांचा ओढा विशेष दिसून येई. क्रिकेटचें वेड तर त्यांना फार होतें. त्यांच्या मर्दानी खेळांच्या या आवडीमुळे मुंबईत बऱ्याच व्यायाम-संस्था जन्मास आल्या.सबंध आयुष्यांत त्यांनी चिरंतन चालू ठेवलेली गोष्ट म्हणजे दानधर्म. अनेक संस्था आज त्यांच्या दानद्रुमाच्या शीतळ छायेंत वाढीस लागून उत्तम कार्य करीत आहेत. त्यांचें दान सत्पात्रीं झालें असल्यामळे तर त्याचें श्रेय अधिक आहे. हिंदुस्थानांतील उद्योगधंद्याचें क्षेत्र काबीज करून अखिल हिंदुस्थानची औद्योगिक उन्नति करण्याचा अपूर्व मान या पार्शी गृहस्थाने मिळविला आहे.

पदवीधर होऊन दोन वर्षे झालीं नाहीत तोंच ते आपल्या वडिलांनी आरंभिलेल्या प्रचंड कापसाच्या उद्योगांत शिरले. धंद्याचें कसब हस्तगत करून प्रामाणिकपणाच्या नैतिक पाठिंब्यावर ते आपल्या धंद्यांत यशस्वी झाले. वडिलांच्या मृत्यूनंतर त्यांच्या उद्यमक्षेत्रांतील प्रतिष्ठेमुळे दोराबजी टाटा यांचा इतर अनेक नव्या कंपन्यांशीं निकट संबंध आला. हळूहळू सर दोराबजी यांच्या धंद्याचा पसारा इतका वाढला कीं, उभ्या हिंदुस्थानांत त्यांची पेढी मोठी ठरली. इतकेंच नव्हे तर त्यांच्या शाखा लंडन, पॅरिस, न्यूयॉर्क, शांघाय इत्यादि परदेशांतहि निघाल्या. परंतु लोकांच्या लक्षांत अखंड ।जागृत राहणाऱ्या त्यांच्या संस्था निराळ्याच आहेत. 'टाटा' शब्द उच्चारताच जमशेठपूरचा आयर्न ॲण्ड स्टीलचा प्रचंड कारखाना डोळ्यांसमोर उभा राहतो. हा कारखाना व बंगलोरची रिसर्च इन्स्टिटयूट ह्या दोनहि संस्था त्यांनी आपल्या वडिलांच्या पश्चात् दहा वर्षांच्या आंत स्थापन केल्या.त्यांच्या स्टील कंपनीचें भांडवल आज दहा कोटींहून अधिक आहे. यावरून तिच्या प्रचंड स्वरूपाची कल्पना सहज बांधतां

येणार आहे. तिसरी एक स्मरणीय संस्था म्हणजे लोणावळ्याची हायड्रो इलेक्ट्रिक कंपनी होय. हिचेंहि भांडवल तीन कोटींच्या वर आहे!

उत्तम गुणांचा विकास शुक्लेंदूप्रमाणे होत होत त्यांची दानशक्ति पूर्ण विकास पावून मरणापूर्वी थोडेच दिवस त्यांनी तीन कोटी रुपयांचा ट्रस्ट करून ठेविला आहे! खेरीज त्यांनी २५ लक्ष रुपये निराळे काढून ठेविले असून त्यांचा विनियोग पंडुरोगासारख्या भयंकर व असाध्य रोगाचें संशोधन करण्याकडे व्हावयाचा आहे. त्यांच्या दानाचा ओघ विशेषतः शास्त्रीय संशोधन व वाङ्मयसंशोधन याकडे होता. केंब्रिज विश्वविद्यालयाला त्यांनी नुकतेच २५००० पौंड देणगीदाखल दिले! ही अवाढव्य रक्कम तेथील एंजीनियरिंग कॉलेजची लायब्ररी जय्यत करण्याकरिता खर्च व्हावयाची आहे. कला, क्रीडा व शास्त्र या तिहींचेहि ते मार्मिक भोक्ते होते व ही मार्मिकता कल्पनातीत द्रव्यसाहाय्य करून त्यांनी प्रगट केली. स्त्रीशिक्षणासाठीहि त्यांनी प्रयत्न केले. त्यांना मिळालेल्या यशाची गुरुकिल्ली पाहावयाची तर ती त्यांच्या एकमार्गी व एकनिष्ठ आचरणांतच सांपडेल. वास्तविक जन्मतः त्यांच्या घराण्याचा दर्जा इतका उच्च व उज्ज्वल होता कीं ते राजकारणाच्या आखाड्यांत उतरते तर कदाचित् अधिक लोकप्रिय होऊन कर्तबगारी करूनहि दाखविते. तथापि आपल्या उद्योगक्षेत्राच्या पलीकडे पाऊलभरसुद्धा न जाता आपलें तन मन धन एकाच अंगीकृत कार्यांत वेंचण्याचें त्यांनीं ठरविल्यामुळे ते उद्यमसम्राट बनले! १९१० सालीं त्यांना सर हा किताब मिळाला.

पार्शी जात ही प्रायः धनिक असून तिच्या ठिकाणीं दातृत्वबुद्धिहि मोठ्या प्रमाणांत आढळते. तथापि सर्वांत सर दोराबजी यांनी मिळविलेला लौकिक केवळ अपूर्व आहे! पार्शी जातीला ललामभूत होणारा हा उद्यमशील हिंमतवान् पुरुष वयाच्या ७३ व्या वर्षीं इहलोक सोडून गेला! त्यांच्यामागे त्यांच्या द्रव्यजीवनावर जीव धरणाऱ्या अनेक संस्था त्यांचें अखंड स्मरण कृतज्ञताबुद्धीने ठेवतीलच. परंतु अखिल हिंदुस्थान त्यांचा ऋणी राहून त्यांची आठवण काढील यांत तिलप्राय शंका नाही.

---

# भावी स्वराज्याची शरीररचना

कायदे-मंडळ हें स्वराज्याचें शरीर होय. हें शरीर एकजीव, बांधेसूत व मजबूत असण्यावर स्वराज्याचा पराक्रम व उत्कर्ष अवलंबून आहे. प्रांतिक व मध्यवर्ती कायदेकौन्सिलें यांच्या समुच्चयाने हिंदी स्वराज्याचें शरीर बनतें. मि. मॉटेग्यू व लॉर्ड चेल्म्सफर्ड यांनी १९१८ सालीं हिंदुस्थानच्या भावी राज्यघटनेसंबंधी रिपोर्ट लिहिला. त्याच्या आधाराने ब्रिटिश पार्लमेंटाने हिंदुस्थानास स्वराज्याचे अधिकार पूर्वीपेक्षां वाढवून दिले, त्या वेळीं प्रत्येक प्रांताला एक लेजिस्लेटिव्ह कौन्सिल आणि सबंध ब्रिटिश हिंदुस्थानाला लेजिस्लेटिव्ह असेंब्ली व कौन्सिल ऑफ स्टेट देऊन या त्रिवर्गांत स्वराज्याची सत्ता वांटण्यांत आली. त्या राजकीय हक्काचा भलाबुरा अनुभव हिंदुस्थानाने आठ वर्षे घेतल्यावर त्या हक्कांचा फेरविचार करण्याकरिता सर जॉन सायमन यांच्या अध्यक्षतेखाली नवीन कमिशनाची नेमणूक झाली व सदर कमिशनाने आपला रिपोर्टहि १९३० सालीं प्रसिद्ध केला. पण या कमिशनावर हिंदुस्थानांतील प्रमुख राजकीय पक्षांनी बहिष्कार घातल्यामुळे त्यांच्या समजुतीकरिता ब्रिटिश सरकारानें गोलमेज परिषदेची टूम काढली.

गोलमेजपरिषदेची योजना हिंदी लोकांचा रुसवा घालविण्यासाठीच होती. सदर परिषदेस ब्रिटिश मंत्री व मुत्सद्दी हे शिळोप्याच्या गप्पांहून अधिक महत्त्व देण्यास मनांतून केव्हाहि कबूल नव्हते. त्यांचा स्मृतिग्रंथ म्हणजे सायमन कमिशनाचा रिपोर्ट. तो रिपोर्ट व नेहरू रिपोर्ट हे दोनहि आम्हांस सारखेच वावडे असें सांगत, चोरून सायमन कमिशनच्या रिपोर्टाचींच पानें चाळावीं व त्यांतून एकएक पिलूं हळूच बाहेर काढून तें अचानकपणें गोलमेजावर सोडून द्यावें अशी हात-चलाखी परिषदेच्या दोन्ही बैठकींत ब्रिटिश मुत्सद्द्यांनी चालविली होती. आजकाल गाजणारी फेडरेशनची कल्पना त्याच गारोड्याच्या पोतडींतून निघाली; इतकेंच नव्हे तर लॉर्ड लोथियन यांच्या अध्यक्षतेखाली नेमलेल्या मतदान कमिटीची जन्मकथाहि सायमनसाहेबांनी आपल्या पोथींतच लिहून ठेवली होती. अशा रीतीनें गोलमेज परिषदेचा मधला तमाशा सोडून दिल्यास आतांपर्यंत सरकारच्या बाजूने जेवढ्या म्हणून महत्त्वाच्या राजकीय हालचाली झाल्या तेवढ्या सायमनसाहेबांना वाट विचारीतच झाल्या आहेत ही खूणगांठ प्रत्येकाने आपल्या मनाशीं बांधून ठेवण्यास हरकत नाही.

लोथियन कमिटीच्या रिपोर्टांत वैगुण्यें अनेक आहेत.

सर्वांत मोठें वैगुण्य हें कीं फेडरल असेंब्ली व सीनेट हीं जीं मध्यवर्ती सभागृहें त्यांत खालसा मुलुखांतील प्रतिनिधींबरोबर संस्थानांचे प्रतिनिधि बसणार आहेत. त्यांची संख्या ठरविण्याची अखत्यारी लोथियन कमिटीला नाही. ब्रिटिश सरकार संस्थानिकांच्या सल्ल्याने जो आंकडा ठरवील तो शेवटचा समजावयाचा. खेरीज संस्थानांचा अन्तर्गत कारभार भावी हिंदुस्थान-सरकारच्या हुकमतीबाहेरचा असल्यामुळे स्वराज्याचें नवीन शरीर एकरूप व एकजिनसी न राहता त्याचा एक भाग हाडामांसाचा व त्यास जोडावयाचा दुसरा भाग लांकडाचा असणार. एखाद्या मनुष्याचा पाय मोडला किंवा तुटला तर त्याला लांकडाचा खूर लावून त्याचा अडलेला व्यवहार कसाबसा सुरू करण्यांत येतो. परंतु हिंदी स्वराज्याच्या शरीराची ही घडण नुसती हातापुरती किंवा पायापुरती न राहता थेट मेंदूपर्यंत पोंचणार असल्याने हें व्यंग हिंदुस्थानास अर्धांगवायूपेक्षाहि अधिक भोवणारें आहे. त्याशिवाय दुसरा दोष मुसलमान, अस्पृश्य व अँग्लो-इंडियन आदिकरून अल्पसंख्य जातींस कायदेमंडळांतून द्यावयाच्या जागांचा. त्या बाबतींत हिंदी लोकांची आपसांत तडजोड न झाल्यामुळे व्हाइसरॉयांच्या सल्लागार कमिटीने त्याचा निर्णय देण्याचें काम ब्रिटिश मंत्रिमंडळावरच सोंपाविलें आहे. ब्रिटिश मंत्रिमंडळाकडून त्याचा शेवट अद्यापि लागलेला नाही. या कारणाने लोथियन कमिटीला त्याहि महत्त्वाच्या विषयास बगल देणें भाग पडल.

वरील बाबींचें महत्त्व रुपयांत बारा आण्यांइतकें आहे. ते बारा आणे वगळून जे चार आणे उरले त्यांची व्यवस्था लोथियन कमिटीने लावली आहे. ती योजनाहि कमिटींतील सर्वच सभासदांस सर्वस्वी मान्य आहे असें नाही. त्यासंबंधींहि कमिटीच्या सभासदांत कित्येक मुद्द्यांवर मतभेद होऊन त्यापुरत्या त्यांनी भिन्न मत-पत्रिका लिहिल्या आहेत. बरें, अशा रीतीने कमिटीच्या मुख्य रिपोर्टाशीं ज्यांचा मतभेद झाला त्यांचें आपसांत एकमत आहे असेंहि नाही. मध्यप्रांत-सरकारचे माजी गृहमंत्री व हंगामी गव्हर्नर रा. तांबे, संयुक्तप्रांत सरकाराचे माजी दिवाण सी वाय. चिंतामणी व सर्व्हंट्स ऑफ इंडिया सोसायटीचे एक सभासद रा. बखले यांनी आपली भिन्नमतपत्रिका एकमताने लिहिली आहे. पण त्याखेरीज सर महमद झुलफिकार अल्लीखान, अझिझूलहक, मेजर मिल्नर, मिसेस् पी. ओब्रायन, डॉ. आंबेडकर यांनी वेगवेगळ्या मुद्द्यांवर वेगवेगळीं मतें दिलीं आहेत. तथापि मुख्य रिपोर्टाच्या मानाने त्यांच्या शिफारशी गौण स्वरूपाच्या असल्याने तूर्त त्यांकडे न वळता प्रकृत स्थळीं मुख्य रिपोर्टांतील शिफारशींचाच विचार करण्याचें योजिलें आहे.

मांटेग्यू चेम्सफर्ड रिपोर्टास अनुसरून झालेला प्रचलित कायदा अनेक दृष्टींनी दोषपूर्ण व असमाधानकारक आहे. लोकशाही राज्यपद्धतीचें तत्त्व असें आहे कीं ती राज्यपद्धति खरी लोकमतनिदर्शक व लोकमतास जबाबदार व्हावयाची तर तिच्या कायदेमंडळांत सर्व प्रकारचे हितसंबंध प्रतिबिंबित झाले पाहिजेत. हिंदी लोकांचे हितसंबंध आपणास वेगवेगळ्या रीतींनी दर्शवितां येतील. पुरुष व स्त्रिया, शिक्षित व अशिक्षित, जमीनदार व कुळें, कारखानदार व मजूर या हितसंबंधांच्या भिन्न भिन्न जोड्या होत. त्याखेरीज कारागीर, व्यापारी व गोरगरीब इत्यादिकांचे हितसंबंध आहेतच. या सर्वांचा समावेश ज्यांत होईल अशी मतदान-पद्धति एकच; व ती वयांत आलेल्या सर्व स्त्री-पुरुषांस मताधिकार देण्याची होय. त्या पद्धतींत एक फायदा असा आहे कीं त्यायोगाने अमुक वर्गांतील प्रतिनिधि त्यांच्या संख्येच्या प्रमाणाहून कमी निवडून आले तर त्याबद्दल कुरकूर करून राज्यपद्धतीस दोष लावण्यास कोणत्याहि वर्गास जागाच राहात नाही. तथापि त्या पद्धतीने मुसलमान, अस्पृश्य इत्यादि वर्गांच्या पुढाऱ्यांचीं तोंडें मिटतील असें मात्र कोणी समजू नये. कारण मुसलमानांना मुंबई, मध्यप्रांत यासारख्या प्रांतांतून त्यांच्या संख्येहून अधिक प्रमाणांत प्रतिनिधि पाहिजेत ते वरील मताधिकाराने त्यांस मिळणार नाहीत. त्याचप्रमाणें अस्पृश्यादि वर्गांतील मतदार निवडणुकीचे वेळीं मतें देण्यास योग्य प्रमाणांत गेले नाहीत किंवा त्यांचे प्रतिनिधिहि त्याच प्रमाणांत निवडणुकीस उभे राहिले नाहीत तर त्यांचेहि भरपूर प्रतिनिधि कायदेमंडळांत दृष्टीस पडणार नाहीत. म्हणून त्यांचें समाधान या उपायाने होणार नाही हें उघड आहे. तथापि असले अपवाद वगळल्यास सर्व मतदानपद्धतींत ही पद्धति सरस यांत शंका नाही.

हिंदी जनता पुष्कळ अंशीं अशिक्षित, लोकसंख्या अपरंपार, मतदारांची संख्याहि अमर्याद, त्यांचीं मतें नीटपणें नोंदलीं जाण्यास सरकारापाशीं मनुष्यबळ थोडें व त्यासाठी येणारा खर्च मोठा इत्यादि अडचणींचा विचार करून लोथियन कमिटीने वयांत आलेल्या सर्व प्रौढ स्त्री-पुरुषांस मताधिकारास पात्र ठरविण्याचें अजिबात टाळलें. ही पद्धति नाही तर नाही, पण निदान एखाद्या गांवाने किंवा ग्रामसमूहाने आपले प्रतिनिधि निवडावे व त्या प्रकारच्या अनेक प्रतिनिधींनी आपल्यातर्फे कायदेमंडळासाठी सभासदांची निवड करावी हाहि एक

मतदानपद्धतीचा प्रकार आहे. पण निवडणुकीची ही पद्धति सरळ व प्रत्यक्ष नसून आडपडद्याची व परोक्ष असल्याने तिचाहि अंगीकार कमिटीने केला नाही. तथापि या दोनहि पद्धति त्याज्य व अव्यवहार्य ठरवून ज्या एका अर्थी जुन्याच पण व्यापक स्वरूपाच्या पद्धतीचा कमिटीने स्वीकार केला ती पद्धति अगदीच टाकाऊ किंवा असमाधानकारक आहे असें कोणी समजूं नये.

मॉंटेग्य-चेल्म्सफर्ड सुधारणा कायद्यापेक्षां या लोथियनकमिटीच्या योजनेंत काय फरक आहे हें सांगितलें म्हणजे पहिल्या पद्धतीपेक्षां ही पद्धत सरस व समाधानकारक कशी आहे याची कल्पना चटकन येण्यासारखी आहे. पहिली पद्धत पाहिली तर सध्याच्या प्रांतिक कौन्सिलांत २० टक्के सरकार-नियुक्त सभासद व ८० टक्के लोकनियुक्त सभासद आहेत. हे लोकनियुक्त सभासद मुख्यतः शेतसारा भरणाऱ्या व घरभाडें देणाऱ्या मतदारांनी निवडले असून जमीनदार, कारखानदार, व्यापारी, पदवीधर असे मतदार एकंदरीने थोडे व त्यांनी निवडलेले प्रतिनिधिहि फारच थोडे. याचा परिणाम असा झाला कीं, प्रांतिक कायदेमंडळे हीं प्रायः अशिक्षित व मागासलेल्या अशा वर्गांचींच बनलीं. कौन्सिलांच्या सभासदांवर जबाबदारी फार मोठी असते. त्यांना दोनतीन कोट लोकवस्तीच्या सुखदुःखाची विल्हेवाट लावावयाची असते. कायदेकानू त्यांच्या मताने करण्यांत येतात व राज्यकारभाराच्या मुख्य मुख्य बाबतींत त्यांचा सल्ला घेतला जातो. प्रांताचीं कांही खातीं दिवाणांकडे सोपवून लोकांच्या स्वाधीन केलीं असल्यामुळे दिवाणांच्या नेमणुकीची व त्यांच्या खात्यांची जबाबदारी लोकनियुक्त सभासदांवरच पडते. हें काम इतक्या जोखमीचें असतां तें ज्यांच्यावर सोंपविण्यांत आलें ते प्रतिनिधि अशिक्षित व मागासलेल्या वर्गांनी निवडल्यामुळे त्यांजकडून वरील कामगिरी चोखपणें पार पडली नाहीं. सायमन कमिशनाच्या व लोथियन कमिटीच्याहि लक्षांत सदर चूक येऊन त्यांनी ती दुरुस्त करण्याची उपाययोजना सुचविली आहे.

त्याला आणखी एक महत्त्वाचें कारण असें घडलें आहे कीं, नवीन राज्यघटनेंत कांही खातीं सोंपीव न राहतां सर्वच खातीं प्रांतिक कायदे कौन्सिलाच्या स्वाधीन व्हावयाचीं आहेत. ही जबाबदारी पूर्वीपेक्षा किती तरी पटींनी अधिक महत्त्वाची व जोखमीची आहे. ती पार पाडणारें कौन्सिल अधिक लायक, अधिक विचारी, अधिक सुशिक्षित व अधिक जाणत्या सभासदांचें बनलें पाहिजे. कारण प्रांताचा कारभार पाहण्याकरिता सगळे प्रधान त्यांतूनच निवडले जावयाचे आहेत. जमीनमहसूल, कोर्टें, तुरुंग, पाटबंधारे, पोलीस, शिक्षण, जंगल, उद्योगधंदे, अबकारी इत्यादि सर्व कामें याच प्रधानमंडळाकडे यावयाचीं असल्याने त्या माणसांचा पुरवठा कायदेकौन्सिलांत निवडून आलेल्या सभासदांतूनच झाला पाहिजे. या दृष्टीने सर्व प्रकारच्या योग्यतेचे व गुणांचे लोक मतदारांत असतील तरच त्यांपैकीं कांही कौन्सिलांत प्रतिनिधि या नात्याने निवडून येण्याचा संभव आहे. वास्तव कमिटीने जनतेपैकीं ज्या कित्येकांस मताधिकार नव्याने देण्याचें योजिलें आहे त्यांत सुशिक्षित वर्गहि धरला आहे ही समाधानाची गोष्ट होय. या बाबतींत शिक्षणाची पात्रता तिने इतकी किमान ठेवली आहे कीं, तिच्याविरुध्द कुरकुरण्याचें मागासलेल्या वर्गास कारण राहणार नाही. पुरुष मतदारांकरितां अप्पर प्रायमरी एज्युकेशनची म्हणजे व्हर्नाक्युलर फायनलच्या परीक्षेची लायकी सुचविली आहे. कित्येक लोक शिकलेले असताहि त्यांना मताधिकार नाही असें सायमन कमिशनच्या नजरेस आलें होतें. सन १९२६ सालीं बंगाल्यांत प्रांतिक कौन्सिलांची निवडणूक झाली, त्या वेळीं मतें देणाऱ्या मुसलमानांपैकीं निम्मे मुसलमान व हिंदूंपैकीं एकतृतीयांश हिंदु निरक्षर होते, असें लोथियन कमिटीनेहि आपल्या रिपोर्टांत म्हटले आहे. याविरुद्ध गेलीं १०।१२ वर्षे सुशिक्षित वर्गाची ओरड चालू असून तिची दाद अखेर लागली हें पाहून कोणासहि संतोष वाटेल.

चालू मतदानपद्धतींत पुरुष मतदारांच्या मानाने स्त्रीमतदार फारच अल्प प्रमाणांत आहेत. त्यांची संख्याहि कमिटीने अनेक उपायांनी वाढविली आहे. त्या उपायांपैकींच शिक्षण हा एक उपाय होय. त्यायोगाने लिहितांवाचतां येणाऱ्या सर्व स्त्रियांना मताधिकार मिळणार आहे. स्त्रियांत पुरुषांइतका शिक्षणप्रसार अद्यापि झाला नसल्यामुळे साक्षरता ही लायकी तूर्त योग्य आहे असें समजण्यास चिंता नाही. मिळकतवाल्या स्त्रियांना सांप्रत मताधिकार आहेच. खेरीज ज्या पुरुषांना मिळकतीमुळे मताधिकार मिळणार आहे, त्यांच्या बायकांनाहि तो अधिकार आपोआपच प्राप्त होणार आहे. अशा निरनिराळ्या कारणांनी स्त्रीमतदारांची संख्या वाढून ती पुरुषांशीं चारांबरोबर एक या प्रमाणांत आहलेल.

मुंबई इलाख्यांत दरसाल ३२ रु. शेतसारा देणारास प्रांतिक कौन्सिलाचा मताधिकार आहे. लोथियन कमिटीने तो आंकडा ८ रु. केला आहे. म्हणजे ८ रु. सारा किंवा खंड भरणारास यापुढे मुंबई कौन्सिलांत आपल्यातर्फे प्रतिनिधी निवडून देण्याचा अधिकार मिळणार आहे. कोंकणासारख्या कनिष्ठ प्रतीच्या भागांत साऱ्याचें प्रमाण सोळा रुपयांवरून चार रुपयांवर

आणिलें आहे. ही झाली खेड्यांतील शेतकरी वर्गाची गोष्ट. खेड्यांत मजूर लोकहि राहतात. पण ज्यांना शेतभात नाहीं व ज्यांचें पोट केवळ मजुरीवर आहे अशीं माणसें खेड्यांत थोडीं. अशा मजुरांचा भरणा मुंबई, अहमदाबाद, करार्ची, सोलापूर यांसारख्या मोठमोठ्या उद्योगधंद्याच्या शहरांतच मोठा. शहरांत दरमहा तीन रुपये भाड्याखाली राहावयास कोणास सहसा घर मिळत नाहीं. अशा भाडेकऱ्यांना शहरांत आजहि कौन्सिलाचा मताधिकार आहे. लोथियन कमिटीनें भाड्याचा हा आंकडा निम्यावर आणण्याची शिफारस केली असल्यानें यापुढें ज्यांस मत नाहीं अशा कांही व्यक्ती शहरांत आढळतील, पण कुटुंबाचे मुख्य सहसा आढळणार नाहींत. स्पृश्यांपेक्षां अस्पृश्यांविषयीं कमिटीस सहानुभूति साहजिकच अधिक वाटते. तिनें अस्पृश्यांची भरती मतदारांत शक्य तितकी मोठ्या प्रमाणांत व्हावी या उद्देशानें त्यांच्याकरितां मताधिकाराचे अनेक मार्ग सुचविले आहेत. अस्पृश्यांपैकीं, जे गांवनोकर असतील त्यांना, साक्षर असतील त्यांना, घराचे मालक असतील त्यांना, कमिटीनें मताधिकार देऊं केला आहे व त्याशिवाय मिळकतीची किमान मर्यादा स्पृश्यांपेक्षां कमी ठरवितां आली तर तीहि ठेवावी असेंहि तिनें सुचविलें आहे.

जमीनमहसूल, घरभाडें, शिक्षण हे मताधिकाराचे विविध पर्याय आहेत, त्यांखेरीज प्राप्तीवरील कर, लष्करी नोकरींतील पेन्शन व जमीनदारी किंवा इनामदारी हेहि पर्याय आहेतच. अशा रीतीनें एकटा मुंबई इलाखाच घेतल्यास त्यांतील कौन्सिलच्या मतदारांची संख्या ३७,२६,६२७ इतकी भरेल. एकंदर मतदारांत स्त्रियांचें प्रमाण २० टक्के राहील. मुंबई कौन्सिलांतील सभासदांची आजची संख्या ११४ आहे ती २०० होईल.मजुरांकरिता सरकारनियुक्त प्रतिनिधि सांप्रत तीन आहेत त्यांऐवजीं त्यांस लोकनियुक्त सभासद आठ मिळतील.

प्रांतिक कौन्सिलचा येथपर्यंत विचार झाला. त्यापुढचीं कायदेमंडळें म्हणजे सीनेट व असेंब्ली. कौन्सिल ऑफ स्टेटची जागा इतउत्तर सीनेट पटकावणार.सीनेटमध्ये २०० सभासद असावे, त्यांपैकीं ८० संस्थानिकांचे व १२० खालसा मुलखाचे असावे असें गो. मे.परिषदेंतील फेडरल स्ट्रक्चर कमिटीनें मत दिलें होतें. त्यासच लोथियन कमिटीची मान्यता मिळाली असून निवडणुकी प्रांतिक कौन्सिलामार्फत करण्याचें तत्त्वहि सदर कमिटीस कबूल आहे. त्यांच्या या योजनेप्रमाणे सीनेटमध्ये मुंबई इलाख्याच्या वांट्यास १७ जागा येतील. फेडरल स्ट्रक्चर कमिटीनें असेंब्लीच्या ३०० सभासदांपैकीं २०० जागा खालसा मुलखाच्या वांट्यास दिल्या आहेत. लोथियन कमिटीनें एकंदर जागा ६०० पर्यंत वाढवून या २०० जागांऐवजीं ३०० जागा खालसा मुलखास देऊं केल्या आहेत. असेंब्लीची निवडणूक प्रांतिक कौन्सिलामार्फतच व्हावी, साक्षात् मतदारांकडून होऊं नये असें सायमन कमिशनानें आपल्या रिपोर्टांत नमूद केलें आहे. लोथियन कमिटीनें ही शिफारस फेटाळून लावली असून साक्षात् मतदानपद्धतीसच उचलून धरलें आहे.त्या बाबतींतील मताधिकारहि बराच विस्तृत करण्यांत आला आहे.म्हणजे सध्याच्या पद्धतीप्रमाणे प्रांतिक कौन्सिलाकरिता ज्यांना मताधिकार आहे, त्या सर्वांना यापुढें असेंब्लीचा मताधिकार मिळणार आहे. त्याखेरीज सुशिक्षित वर्गासहि त्यांत वाव ठेवण्यांत आला आहे. मॅट्रिक्युलेशन अगर स्कूल लीव्हिंग परीक्षा ज्यांची पास झाली आहे त्या पुरुषास असेंब्लीचा मताधिकार आहे. सध्या ज्या स्त्रिया साक्षर आहेत त्यांना व पुढें व्हर्नॅक्युलर फायनल झालेल्या स्त्रियांना हा अधिकार देण्यांत आला आहे. खेरीज पुरुषांच्या चढाओढींत स्त्रिया निवडून येणार नाहींत आणि मिळकतवाल्या व सुशिक्षित अशा उमेदवारांच्या चढाओढींत मजूर निवडून येणार नाहींत अशी शंका कमिटीस वाटल्यावरून तिनें प्रत्येक प्रांतातर्फे एक स्त्री व आठ मजूर यांकरितां असेंब्लींत जागा राखून ठेवल्या आहेत. लोथियन कमिटीच्या रिपोर्टांतील कांही महत्त्वाच्या शिफारशींचा विचार या अंकांत केला आहे. त्याखेरीज सदर रिपोर्टांत इतरहि कित्येक मुद्दे आहेत त्यांचा व भिन्न मत पत्रिकेंतील कित्येक मुद्द्यांचाहि विचार करावयाचा आहे तो पुढील खेपेवर टाकणें भाग आहे.

# आमचे व्यवसाय-बंधु

### संस्थानी नोकरीची शाश्वती

एकतंत्री राज्यपद्धतींत नोकरांची कशी अवघड व अधांत्री परिस्थिति असते याचा उत्तम दाखला म्हणून मिरजमळ्याकडे बोट दाखवितां येईल. या संस्थानांत गेल्या दहा वर्षांत चार कारभारी झाले. एक मुनसब, एक हुजूर चिटणीस, एक जेलर व एक खाजगी कामगार व दोन ओव्हरसिअर इतक्यांना नोकरीस मुकावें लागलें! प्रत्येकानें ५ ते १० वर्षे पर्यंत तरी नोकरी केलेली होती. परंतु यांपैकीं एकालाहि पेन्शन, ग्रॅच्युइटी अगर अन्य कांही

अधिक सवलत न मिळता नोकरीस रामराम ठोकावा लागला. युवराजांचे टयूटर तर सालागणिक बदलले जातात ! एके प्रसंगीं तर एप्रिल महिन्यांत एका टयूटरला कामावरून कमी केलें व फिरून जुलैमध्ये कामावर घेतलें. हा झाला मोठमोठ्या नोकरांचा प्रकार ! मग चिल्लर कारकून, शिपाई, कोचमन इत्यादिकांना आपलीं बिन्हाडें सदा पाठीवरच धारण करावीं लागलीं तर काय नवल !

—**दक्षिणमहाराष्ट्र** ( सांगली ) ३०-५

**नाशिक नांव कां मिळालें ?**

नापीक, नादार व नादान या शब्दसमुच्चया-मध्यें नाशिक शब्दाचा अंतर्भाव होत असल्याचें पाहून कोणताहि शब्द अर्थाला सोडून होत नाहीं हेंच सिद्ध होतें. ना-शीक. शिकलेले नाहीत अर्थात् अशिक्षित जेथे राहतात तें स्थान. या अन्वर्थक नाशिक नांवाला प्रसिद्धि मिळून जनस्थान नांवाचा लोप झाला तो योग्यच झाला. जनस्थान याचा अर्थ पुण्यक्षेत्र. परंतु पुण्यक्षेत्रांत म्यु. चे परवानगीने गोवध सुरू झाल्यावर पुण्यक्षेत्रवाचक जनस्थान हें नांव मागें पडणें साहजिकच आहे. तेव्हा सुपीक, संपन्न व सुशिक्षित अशा नगरीची उलटापालट झाली व नाशिक नांव मिळालें.

—**लोकसत्ता** ( नाशिक ) ता. २९–५

**रिकामपणाची कामगिरी**

लेखक प्रतिभाशाली असला कीं, त्याला एखादा महाग्रंथ निर्माण करावयाला बारीक-सारीक सुध्दां कारण पुरे होते. डोंगराच्या उदरांत पाणी तुडुंब भरलेलें असतें तें बाहेर पडण्याला बारीकसें कां होइना, तोंड तेवढे लागतें आणि एकदा असें तोंड मिळालें कीं लागलीच जलधारा वहायाला ! तशीच स्थिति प्रतिभावन्तांची असते. मातेच्या उत्तरकार्याला पैसा नाहीं म्हणून जॉन-सनने कांहीं कागद खरडले व त्याच खर्ड्याचा जगमान्य रासेलस झाला. आजारीपणांत कसा बसा वेळ जावा म्हणून टागोरांनी गीतांजलीचें इंग्रजी भाषांतर केलें आणि त्यावरच त्यांना नोबेल पारितोषिक लाभलें. 'अॅन अनसोशॅलिस्ट सोशॅलिस्ट' कादंबरीनंतर गेल्या ५० वर्षांत शॉ–मजकुरांनी कादंबरीचें एक पान लिहिलें नाहीं. पण परवा आफ्रिकेंत त्यांच्या पत्नीला मोटारचा अपघात झाला आणि या बाईचा रुग्णावस्थेंत वेळ जावा म्हणून शॉने एक कादंबरी लिहिली. या कादंबरीचें अजून नाम-करणहि झालेलें नाहीं. पण कोणी सांगावें ? ही या विराट पुरुषाची 'रिकामपणाची कामगिरी' वाङ्मयां त पट्टराणीहि होऊन बसायची !

—**वैनतेय** ( सावंतवाडी ) ३१-५

**मुंबई व बंगाल**

परवा मुंबई विद्यापीठाच्या प्रवेशपरीक्षेचा निकाल जाहीर झाला. आणि जेमतेम शेंकडा ३७।३८ असें पास विद्यार्थ्यांचें प्रमाण पडलें. या बाबतींत परीक्षक-वर्गास निष्ठुर, अन्यायी व नालायक म्हणण्यास आम्हांस बिलकूल संकोच वाटत नाहीं. बंगालचे सर्व विद्यार्थी एथून तेथून हुषार आणि मुंबईचे मात्र सर्वथा मठ्ठ असें सरसकट विधान कोणीं केल्यास तें रॅशनॅलिस्ट म्हणविणाऱ्या विचारी मंडळीस सहसा पटणार नाहीं. पण वस्तुस्थिति काय आहे पहा. सर आशुतोष मुकर्जी कलकत्ता विद्यापीठाचे व्हाइस-चॅन्सेलर होताच त्यांनी असा धारा घालून दिला कीं, बंगालमध्ये मॅट्रिक परीक्षेंत पास विद्यार्थ्यांचें प्रमाण शेंकडा सत्तर व कधी कधी अधिकच पडूं लागलें. साहेब लोकांनी या बाबतींत खूप तक्रार व आरडाओरड करून पाहिली. गव्हर्नर व व्हाइसरॉयांपर्यंत तक्रारी गेल्या. पण सर आशुतोष यांना कोणासहि दाद दिली नाहीं. आणि पास विद्यार्थ्यांचें प्रमाण कमी होऊं दिलें नाहीं.

—**प्रभात** ( मुंबई ) ता. २–६

**उत्तीर्ण विद्यार्थ्यांनीं काय करावें ?**

मोठ्या कष्टाने मिळालेलें द्रव्य शिक्षणाच्या अघाशी खाईत टाकण्यापेक्षां त्याचा विनियोग पुष्कळ चांगल्या प्रकारांनी करिता येईल. एकवार साऱ्या हिंदुस्थानचा प्रवास संथपणाने केल्याने जें शिक्षण मिळूं शकेल तें या पुस्तकी शिक्षणापेक्षां अधिक उपयुक्त व कमी खर्चाचें ठरेल. गुजराथी, कानडी, हिंदी, उर्दू वगैरे अन्यप्रांतीय भाषा व फ्रेंच, जर्मन, इटालियन यांसारख्या आंतरराष्ट्रीय भाषा यांपैकीं, कांहींचा अभ्यास करण्या-पासून फार फायदा होईल व त्याला कॉलेजच्या अभ्यासक्रमाइतका काळ व खर्चहि लागणार नाहीं. सहा वर्षे शरीर कष्टवून व वित्त वेंचून शेवटीं फशीं पडण्याऐवजीं या तरुणांनी खेड्यांतील शिक्षणाचें कार्य अंगीकारिलें तर त्यापासूनहि त्यांचें स्वतःचें हित व समाजाचें कल्याण होईल. खेडेगांवांत जाऊन तेथील लोकांत काम करणाऱ्या माणसाला जें एक विशिष्ट वळणाचें शिक्षण लागतें तें या तरुणांना दीडदोन वर्षांत संपादितां येईल. वैद्यक विषयाचें प्राथमिक ज्ञान, तांत्रिक ज्योतिष वगैरे ग्रामोपयोगी माहिती मिळवून, कांहीं तरुण खेडेगांवांत शिक्षकाचा पेशा पत्करून राहतील तर ते आपला प्रपंच तर सुखाने चालवतीलच. शिवाय, हे तरुण 'अंतरीं प्रेमळ, वाचेचे रसाळ' अशा प्रकारचे असतील तर, ते खेडेगांवांचा व पर्यायाने हिंदुस्थानाचा उद्धार करण्याला निःसंशय कारणीभूत होतील.

—**सकाळ** ( पुणें ) १-६

# आर्थिक संकटाचें मूलभूत कारण

( ले.—श्री. पां. वा. गाडगीळ )

नाईल, सिंधू आणि यांगत्से या प्रचंड नद्यांना कालवे मुळींच नव्हते तेव्हां, ज्यावेळीं त्यांना महापूर येई त्या वेळीं तीरावरील दूरवरचीं गांवेंहि वाहून जाऊन उध्वस्त होत. आणि एरवीं या प्रदेशांना पाण्यावांचून माशाप्रमाणें तडफडून मरावें लागे. पुढें या नद्यांना लहानमोठे कालवे झाल्यावर महापुरानें गांवें वाहून जाणें आता कमी झालें असून महापुरांचें पाणी या कालव्यांतून जाऊन तें आतां सर्व प्रदेश सुपीक करतें. नुसता महापूर हे अवर्षणाइतकेंच मोठें संकट आहे. तो महापूर वाटण्याची सोय झाली तरच तो फलदायी होतो. हाच न्याय आर्थिक विषयींहि लागू आहे. यंत्रानें संपत्तीस महापूर आणला असला तरी त्या संपत्तीच्या वांटणीची व्यवस्था नीट आहे कीं नाही याची खबरदारी घ्यावयाला पाहिजे. आर्थिक व्यवहाराचा विचार करतांना संपत्तीच्या उत्पत्तीबरोबर तिच्या वांटणीचाहि विचार महत्त्वाचा आहे. उत्पत्ति आणि वांटणी हीं सांपत्तिक व्यवहाराचीं दोन चाकें आहेत. त्यांतील एक चाक घासूं लागलें तरीहि हा गाडा तिरपागडा होणारच. आज जागतिक आर्थिक व्यवहाराचा गाडा असाच अडून पडल्यासारखा झाला आहे. त्याचा संपत्तीच्या उत्पादनाचा प्रश्न यंत्रानें सोडविला आहे. तेव्हा वांटणीचें चाक कोठे घासतें आहे कीं काय हें पाहिलें पाहिजे. हे पाहण्याकरिता, सर्व जगावर आर्थिक क्षेत्रांत आज जें अरिष्ट कोसळलें आहे असें आपण म्हणतों त्याचेंच पृथक्करण करून पाहूं.

## महायुद्धानें काय केलें ?

प्रस्तुत साऱ्या जगभर आर्थिक क्षेत्रांत जो अनर्थ माजलेला दिसत आहे त्याचें प्रमुख व मोठें कारण म्हणजे महायुद्ध, व तें संपविणारा तह होय. १९१४च्या ऑगस्टपासून १९१८च्या नोव्हेंबरपर्यंत जगांतील सर्व कर्तबगार माणसें गेल्या दोन तीन पिढ्यांनीं महापरिश्रमाने संचिलेली आणि वाढविलेली संपत्ति बेचिराख करण्यांत गुंतलीं होतीं; आणि युद्धांत अखेर एकाच पक्षाचा विजय झाला असला तरी संपत्तिनाशाची कर्तबगारी उभयपक्षांनीहि मोठ्या यशस्वीपणानें पार पाडिली. उभय पक्षांनी गेल्या दोन अडीच पिढ्यांचेच संचय जाळून भस्म केले असें नव्हे, तर पुढील दोन-तीन पिढ्यांनाहि कर्जांत टाकलें आणि अशा प्रकारें सर्व राष्ट्रांत दारिद्र्य आणि उपासमार इतकी वाढली कीं, युद्धांत विजयी झालेल्यांना आपलाहि पराभव झाला असेंच वाटूं लागलें. युद्धाचे वेळीं सरकारला कर्ज देण्याचें ज्या थोड्यांना सामर्थ्य होतें त्यांनी राज्यकर्त्यांना कर्जे देऊन बहुसंख्य गरिबांना अधिक गरीब व सरकारच्या द्वारें कर्जबाजारी करून ठेवलें. वास्तविक राष्ट्रीय युद्ध म्हटलें कीं तें सार्वजनिक संकट. त्याचा निर्वाह सर्वांनी एक कुटुंब या भावनेनें करायला हवा. म्हणजे सरकारनें कर्जाचा बोजा समाजावर न वाढविता धनिकांची अथवा गरीबांची संपत्ति जरूर तितकी, कर–रूपानें घ्यावी व युद्ध खेळावें. पण यानें श्रीमंत लोक नाखूष होतील म्हणून भारी कर लादण्याच्या भानगडींत न पडता राज्यकर्त्यांनी कर्जे काढून लढाईचा खेळ केला. यामुळे कर्जदाते सावकार युद्धाच्या संकटानें अधिकच श्रीमंत झाले आहेत. आणि युद्धानंतर सरकारी कर्ज-फेडीकरिता त्यांच्यावर कर लादले असले तथापि गरिबांवरहि ते लादले असल्यानें बहुसंख्य गरीब समाज सर्वत्र युद्धकर्जाच्या भाराखाली चेंपून गेला आहे युद्धानंतर व्हर्सेलिसचा तह झाला. या तहानें जर्मनी व इतर पराभूत राष्ट्रांवर, पाउणशें वर्षे गुलामाप्रमाणें अहोरात्र कष्ट करून आपल्या श्रमाचा मोबदला, जवळ जवळ गुलामाप्रमाणें जगण्यापुरता आपणाजवळ ठेवून बाकीचा सर्व, सावकारांना द्यावा लागेल एवढी नुकसानभरपाई लादली आहे.

हीं कर्जे व भरपाई सोन्यांत फेडावयाचीं आहेत. आजवर यांच्या फेडीदाखल जगांतील निम्में सोनें फ्रान्स व अमेरिका येथें जाऊन बसलें आहे. या सावकारांना आपलीं कर्जे सोन्यांतच फेडून घ्यावयाचीं असतील तर त्यांनी पुनःपुनः ऋणको राष्ट्रांचा माल खरेदी करून त्याच्या किमतीदाखल सोनें परत केलें पाहिजे. व पुनः पुनः कर्जफेड म्हणून परत घेतलें पाहिजे. पण तरीसुद्धा वस्तुतः ही कर्जफेड अखेर सोन्यांत न होता मालांत झाली असेंच होईल. कारण सर्व कर्जाच्या रकमेइतकें सोनें जगांत नाहीच. अशी ऐनाजिनशी कर्जफेड करावयाची म्हटलें तरी पाऊणशें वर्षे ऋणको व पराभूत राष्ट्रांतील कोट्य-

वधि प्रजेने गुलामाप्रमाणे, जनावराप्रमाणे अकिंचन राहून अहोरात्र जिवापाड कष्ट केलेंच पाहिजेत.

## पैसा व धारण यांचें नातें

अवाढव्य कर्जे व भरपाई यामुळे ऋणको व पराभूत यांजवर असा अनर्थ गुदरला आहे. पण सावकारांचे तळघरांत जगांतील पुष्कळ सोनें अडकून पडल्यामुळे विजयी राष्ट्रांतहि कहर उसळला आहे. त्याचा प्रकार असाः—व्यवहारांत आपण ज्याला पैसा पैसा ( Money ) म्हणून म्हणतों त्याचे आजच्या यंत्रयुगांत खुद्द सोनेंचांदीच्या नाण्यांहून भिन्न असे अनेक प्रकार झाले आहेत. सोन्याचा सॉव्हरिन व चांदीचा रुपया यापुढला सामान्य लोकांस माहीत असलेला पैशाचा प्रकार म्हणजे पौंडाची–रुपयांची कागदी नोट. यापुढला बँकांशीं व्यवहार करणाऱ्या लोकांना माहीत असणारा प्रकार म्हणजे बँकांचा चेक. शिवाय मालाची नेआण करणाऱ्या व्यापाऱ्यांच्या परिचयाचा पैशाचा रूढ प्रकार म्हणजे हुंड्यांचे कागद. चेक व हुंड्या हें कायदेशीर चलन नसलें तरी रूढीनें त्यांचा पैशासारखा देवघेवीस उपयोग होतो. व्यापारी व्यवहारांत आणखीहि पैशाचे कांही प्रकार आहेत. उदाहरणार्थ, कर्जखतांच्या व्याजचिठ्या ( Interest Coupons ) वगैरे यांपैकीं नोटा व चेक यांची संख्या सोन्याच्या परिमाणाहून अधिक पण ठराविक प्रमाणांत असतें. सोनें कमी झालें कीं नोटा व चेकहि कमी होतात. त्याबरोबरच पैशाचे इतर प्रकार हि परिमाणांत कमी होतात. म्हणजे पैशाचा व्यवहार खुद्द सोन्याने थोडाच होत असला तरी एकंदर कागदी पैशाची संख्या सोन्याशीं प्रमाणानें बांधलेलीं असल्यामुळे सोनें कमी झालें कीं एकंदर पैसा कमी होतो, व उलटपक्षीं वाढतो. सर्व प्रकारचा विकाऊ माल व पैसा यांचा सामान्यतः असा संबंध असतो कीं, पैसा संख्यनें वाढला कीं धारण महाग होते व उलट पक्षीं स्वस्त होते. म्हणजे असे कीं सर्व गिऱ्हाइकांपाशीं नाणें, नोटा, चेक हुंड्या वगैरे अधिक वाढल्या कीं पूर्वीइतक्या पैशास पूर्वीहून माल कमी मिळूं लागतो, व पैशाची संख्या कमी झाली कीं अधिक मिळूं लागतो. हल्ली सावकारांनी जगांतलें सर्व सोनें अडवून टाकल्यामुळे जगांतील वरील सर्व प्रकारचा पैसा कमी झाला आहे व सर्वत्र धारणी स्वस्त होण्याचें तें एक कारण आहे. यापासून एक तोटा होत आहे, तो असा. महायुद्धाचे शेवटीं धारणी फार कडकल्या होत्या. म्हणजे उलट मालाच्या भाषेंत असें म्हणावयाचें कीं, पैसा स्वस्त होता. आज जगभर फेडावीं लागत असलेलीं बहुतेक कर्जे त्या वेळचीं–स्वस्त पैशाचीं आहेत. तीं आजच्या महाग पैशाने फेडावीं लागत आहेत. यामुळे कारखानदार, व्यापारी व शेतकरी हा जो कर्जे काढून व्यवहार करणारा वर्ग, तो नागवला जात आहे.

## व्यापार कसा रोडावला ?

पैसा हें देवघेवीचें एक साधन आहे. कांही अंशीं मालाच्या प्रवासाचें तें वाहन आहे म्हटलें तरी चालेल. प्रवासाचीं साधनें–वाहनें वाढलीं अथवा कमी झालीं म्हणजे जशी जा–ये वाढते अथवा कमी होते, त्याप्रमाणे पैसा वाढला अथवा कमी झाला म्हणजे देवघेव व्यापार वाढतो अथवा कमी होतो. हल्लीं सोन्याच्या कमताईनें पैसा कमी झाला म्हणून जिकडे तिकडे व्यापार डबघाईस आला आहे. माल स्वस्त आहे म्हणजे उलट पैसा महाग आहे म्हणून नक्तपगारी लोकांचा फायदा आहे खरा. पण व्यापारधंदा वाढेल तर नक्तपगारी मजूर अथवा नोकर लोकांची गरज. आजच्या व्यापारमंदींत आगगाड्या, आगबोटी, कारखाने व दुकानें यांतून लाखों मजुरांची हकालपट्टी होत असून त्यांना स्वस्त झालेला माल घेण्यास पैसाच नाही. बेकारीमुळे काम मिळविण्यांत चढाओढ लागून जे कामावर आहेत त्यांचे पगार कमी होत आहेत. व्यापारधंदा वाढण्यावर अवलंबून असणारे छकडेवाले, टांगेवाले, मोटारवाले, आगगाडीवाले, आगबोटीवाले यांचे धंदे बसत चालले आहेत. प्रजेंतील सांपत्तिक व्यवहार असा गोठल्यामुळें सरकारांचीं उत्पन्नें कमी झालीं आहेत; आणि या कमी उत्पन्नांतून आंकड्यांत नक्की ठरलेलीं कर्जे द्यावीं लागत आहेत. भर्सीत भर अशी कीं, महायुद्धाच्या नगाऱ्यानें जगांतील मागासलेल्या वर्गांत जागृति झाली असून त्यांची खर्चिक व सुधारलेल्या राहणीची भूक वाढूं लागली आहे. त्यांची ती भूक शमविण्याकरिता व पुरी न शमल्याने त्यांचा वाढणारा असंतोष दडपण्याकरितां अनुक्रमें शिक्षण, आरोग्य यांसारख्या राष्ट्रसंवर्धक खात्यांवरील आणि पोलीस, लष्कर यासारख्या बंदोबस्ताच्या खात्यावरील सरकारी खर्च वाढत आहे, आणि पुनश्च त्यामुळे कर्जेहि फुगत आहेत.

महायुद्धापूर्वी निरनिराळ्या राष्ट्रांत निरनिराळा माल निर्माण होई व त्यांची आंतरराष्ट्रीय देवघेव चाले. पण युद्धाचे वेळीं ही देवघेव थांबली व परदेशी मालाविना सर्वांचें अडूं लागलें. म्हणून प्रत्येक देशांत जरूर तो माल पुष्कळसा स्वदेशीं करण्याची पद्धत पडली. तसेंच पक्का माल बनविणारी जर्मनी, इंग्लंडसारखीं बलिष्ठ राष्ट्रें कच्चामालवाल्या दुर्बल राष्ट्रांवर प्रभुत्व गाजवितात यामुळें त्यांच्या तावडींतून सुटण्याकरिता कच्च्या मालाचीं, हिंदुस्थान, चीन सारखीं राष्ट्रें पक्का मालहि बनवूं लागलीं. म्हणून इंग्लंडसारख्या राष्ट्रांचें परदेशी गिऱ्हाईक कमी झालें. म्हणून पक्क्या मालाच्या मोबदल्यांत येणारी अन्नसंपत्ति कमी येऊं लागली. तेव्हां इंग्लंड, जपान, जर्मनी

यांसारख्या पक्क्या मालाच्या राष्ट्रांत जगांतील बाजार काबीज करण्यास चढाओढ लागली असून पुनः महायुद्धाची भीति वाटूं लागली आहे. एवंच महायुद्धांत झालेला संपत्तीचा विध्वंस, युद्ध, कर्जे व युद्धभरपाई, त्यामुळे आलेला सोन्याचा व म्हणून एकंदर पैशाचा तुटवडा आणि बाजार काबीज करण्याची स्पर्धा म्हणजे एकंदरींत अखेर महायुद्ध यानेच एवढा सर्व अनर्थ ओढवला आहे असें उघड दिसतें.

## 'तेजी–मंदी'ची फेरी

पण इतकी उघड न दिसणारी दुसरी एक सूक्ष्म गोष्ट या अनर्थास मूल कारण आहे. महायुध्दानें केलें तें इतकेंच कीं, हा अनर्थ इतका निकरावर आणला.आज झाला आहे याच प्रकारचा आर्थिक व्यवहारांतील अनर्थ गेल्या पाऊणशें ऐंशी वर्षांपासून दर आठ ते दहा वर्षांनी सर्व जगभर पसरत आला आहे. त्या वेळीं आजचे वर वर्णिलेले सर्व घोटाळे थोड्याशा कमी प्रमाणांत होत आले आहेत. या नियतकालिक अनर्थास ' व्यापार-मंदीची फेरी ' ( Cycle of trade crisis ) असें अर्थशास्त्रांत नांव आहे.

युद्धापूर्वीच्या ' व्यापारमंदीच्या फेरी 'चा विचार करतांना आजच्या मंदींतील कर्जे व भरपाई यांच्या फेडीमुळे आलेला सोन्याचा तुटवडा व म्हणून एकंदर पैशाचा तुटवडा हें आगंतुक कारण नव्हतें, एवढी बाब ध्यानांत ठेवली पाहिजे. आता जग सध्या मंदींत असल्यामुळे युद्धापूर्वी येत असणाऱ्या फेरींतील मंदीपासून सुरुवात करून मंदींतून तेजी व तेजी ओसरून पुनः मंदी अशी एक ' फेरी ' कशी पूर्ण होत असे तें पाहूं.

बाजारांत जिकडे तिकडे माल तुडुंब भरला कीं त्या मानाने गिऱ्हाइक नसल्यामुळे माल खपविण्याच्या चढाओढींत धारणी उतरूं लागत, व अर्थात् नफ्याचें मान कमी होई. नवीन माल काढण्याची जरूरी नसल्यामुळे कारखान्यांतून, व मालाची वाहतूक कमी झाल्यामुळे आगगाड्या,आगबोटी यांतून मजूर कमी होऊन बेकारी वाढे. मग रोजगारींत चढाओढ लागून कामावर असलेल्या मजुराचे पगारहि कमी होत. आणि कांही दिवस नफा कमी, पगार कमी, रोजगारी कमी अशी जिकडे तिकडे कमताईची हुल्लड उठे. मालाच्या धारणी उतरल्या तरी नफा, पगार व रोजगारी कमी झाल्यामुळे एकंदर पैसा-अर्थात लोकाजवळील खरेदी करण्याची शक्तिच कमी होई. व तुंबलेल्या मालाचा उठाव लवकर होत नसे. सुमारे २-३ वर्षे अशीं मंदाईचीं गेल्यावर, नवीन मालाची भरती न केल्यामुळे शिल्लक माल हळूहळू खपून एकदाचा बाजार मोकळा होई. आता पुनः मालास भाव येणार असें हेरून व्यापारी कारखानदारांकडे माल मिळविण्याविषयी करार करीत. मंदाईच्या काळीं कच्चा माल, मजुरी व वाहतूक स्वस्त झाल्यामुळें या मंदाईतील स्वस्ताईने कारखानदाराला माल काढण्यास बरकत येई. व्यापारी तो माल घेतल्यानंतर रिकाम्या बाजारांत सडकून भाव चढवून विकावयास काढीत. कारखाने सुरू होऊन एकंदर रोजगारी वाढल्यामुळे मालास गिऱ्हाईक सपाटून येई, व कारखानदार, व्यापारी व वाहतूकवाले यांना नफा सपाटून होई. मग हळूहळू मजुरी वाढविण्याबद्दल मजुरांत खळबळ सुरू होई. हो ना हो ना करता करता वर्षे निघून जात, व एकदांची मजुरी वाढे. ही वाढ नफा होऊं लागल्यानंतर पुष्कळ काळाने होई. नफ्याच्या वाढीच्या प्रमाणांतहि ती वाढत नसे. व इतकें होत आहे तों मालांनी बाजार तुंबून जाऊं लागत व पुनः मंदी सुरू होई. कारखाने, वाहतुक थंडावत आणि वाढल्या पगाराचा पेला मजूर लोक तोंडाला लावणार तोंच बेकारी, व रोजगारीच्या चढाओढीमुळे येणारी पगारांतील कपात यांच्या धक्क्याने तो पेला लवंडला जाई. पुनः तेजी व मंदी यांची दुसरी फेरी फिरूं लागे. मंदीच्या काळीं जी माल खपविण्याची चढाओढ लागे, तीमुळे राजकीय वर्चस्वाने बाजार काबीज करण्याची चढाओढ लागून साम्राज्यवाढीकरिता गेलें महायुद्ध झालें. म्हणजे हल्ली अनर्थ अगदीं निकरावर येण्यास जें महायुद्ध कारण झालें तें महायुद्धहि या 'तेजीमंदीच्या फेरी'तूनच निघालें आहे.

## नफा व मजुरी यांतील विषमता

गवताची डोंगराएवढी गंज पेटविण्यास जशी बारीक बोटाएवढी लांब आगकाडीहि पुरी होते, त्याप्रमाणे सर्व जगास आर्थिक संकटांत टाकणाऱ्या व युद्धाचाहि वणवा लावणाऱ्या ' तेजी--मंदीच्या फेरी'स नफा व मजुरी यांची विषमता हें दिसण्यांत क्षुल्लक असे कारण आहे. ज्या वेळीं मंदींतून तेजी सुरू होते त्या वेळीं नफ्याला भर येऊं लागतो. पण पगार वाढवून घेण्यापेक्षां मंदीच्या वेळची बेकारी घालविणें हेंच मजुरास इष्ट वाटतें; आणि तेजीचा पुष्कळसा काळ कमी मजुरी व भरपूर नफा असा जात असून नफा वर्षानुवर्षे सांचतच जातो. तेजीच्या शेवटच्या दिवसांत मजूरी वाढते, इतक्यांत मंदी येऊं लागल्यामुळे बेकारी येते व मजूराच्या चढाओढीमुळे मजुरी कमी होऊं लागते. आणि नफावाल्यांचा नफा कमी झाला तरी मजुरी कमी झाल्यामुळे त्यांचें नुकसान होत नाही. आणि सांचलेला नफा पुनः तेजीच्या वेळी भांडवलास बाहेर निघून पुनः पुनः नफ्याच्या राशी वाढवीतच जातो.

यांत समजा, नफ्याचें क्षेत्र अरुंद करून व मजुरांचें

रुंद करून नफ्याबरोबरच मजुरीचीहि भरपूर वाढ केली तर काय परिणाम काय होईल? परिणाम असा होईल कीं, मजुरी वाढल्यामुळें लोकांची खरेदी करण्याची शक्ति वाढेल व मंदीच्या वेळीं मालाचा उठाव लवकर लवकर होईल. तसेंच तेजीच्या वेळचा नफ्याचा संचय बेताचा झाल्यामुळे भांडवल बेताचें राहील व बाजार तुंबण्याइतका अफाट माल निर्माण होऊन बाजारावर केव्हांच लादला जाणार नाहीं. सारांश, मजूरी व नफा यांचा ताळवा बराच समतोल राखल्यास माल व गिऱ्हाईक यांचें समीकरण बसेल. तेजी-मंदीचे चढउतार अधिक सपाट होतील, बेकारी कमी होईल आणि मालास भरपूर गिऱ्हाईक लाभल्यामुळे बाजार जिंकण्यासाठीं युध्दें होणार नाहीत. याचा अर्थ थोडक्यांत असा कीं, प्रस्तुतचीं दुःखें नफा व मजुरी यांच्या विषमतेचीं आहेत, म्हणजेच संपत्तीची वांटणी आज सदोष होत आहे.

# शिवाजीचें हस्ताक्षर

( ले.—दिनकर विनायक काळे एम्. ए. पुणें. )

शिवाजीमहाराजांचें हस्ताक्षर दृष्टीस पडावें म्हणून आपण सर्व महाराष्ट्रीय अत्यंत उत्सुक आहोंत. परंतु आजपर्यंत कोणीहि तें निश्चयानें आपल्याला दाखवूं शकला नाही हेहि तितकेंच खरें आहे. निरनिराळ्या वेळीं निरनिराळ्या माणसांनी शिवाजीचे अस्सल कागद पुढें मांडून त्यांतील अमुक एक शब्द शिवाजीच्या हातचे असावे असे तर्क मांडले, परंतु असे तर्क खरे मानणे भाग पडण्यासारखा पुरावा अद्यापि कोणालाच दाखविता आला नाही ही गोष्ट या बाबतींत विशेष विचारांत घेतली पाहिजे. अगदीं अलीकडे रा. सा. गोविंदराव सरदेसाई यांना पाटगांव येथील मौनीबावांच्या मठांतील कागदपत्र मिळाले, त्यांत शिवाजीचें हस्ताक्षर आहे असा त्यांचा शोध म्हणून गेल्या एप्रिलमध्ये प्रसिद्ध करण्यांत आला. त्या सुमारास हे कागद भारत इतिहास संशोधक मंडळांतील प्रमुख संशोधकांना दाखविण्यांतहि आले. परंतु त्यांचें रावसाहेबांच्या मताप्रमाणें मत बनूं शकलें नाही. प्रतिकूल मत होण्याचीं आपलीं कारणेंहि त्यांनी सांगितलीं होतीं असें कळतें. परंतु रावसाहेबांनी मंडळाच्या संमेलनप्रसंगीं पुनः तीं पत्रें सभेंत मांडतांना आपला शिवाजीच्या हस्ताक्षराबद्दलचा सिद्धांत पूर्ववत कोणतीहि अधिक कारणें न दाखविता पुनः त्याच स्वरूपांत मांडला. अर्थात साधार चर्चा होऊन संमेलनांत तो पक्ष मान्य झाला नाही. इत्यादि त्रोटक माहिती यापूर्वीच संमेलनाबद्दल थोडक्यांत जे वृत्तांत प्रसिद्ध झाले आहेत त्यांत आलेली आहे. परंतु हा सर्वच विषय जिज्ञासू जनतेपुढें मांडण्यासारखा असल्यामुळे ह्या प्रसंगीं थोडा अधिक विस्तार करून देण्याचें योजिलें आहे.

### शिवरायाच्या साक्षरतेचा वाद

शिवरायाचें हस्ताक्षर शोधूं पाहत आहेत त्यांना शिवाजीची साक्षरता अर्थात मान्य आहे; परंतु वाचकांच्या आठवणींत असाहि एक काळ होता कीं, ज्यावेळीं शिवाजीला लिहितां वाचतां येत नव्हते अशीच समजूत सर्वांची करून देण्यांत आली होती. महाराष्ट्रीय लेखकांचा, बखरींचा वगैरे निष्कर्ष महाराजांच्या शिक्षणाला अनुकूल असा असतांहि ग्रँट डफने प्रथम शिवाजिला स्वतःची सही देखील करतां येत नव्हती असें विधान केलें. तें करण्यास त्याचे जवळ कोणताच सबळ आधार होता असें नाही. 'मराठ्यांना लिहितां वाचतां येत नाही आणि आलें तरी ते, तें कारकुनाचें काम, हलकें, असें समजतात' अशी आपली झालेली—पण वास्तविक निराधार समजूत विधानाला जोडून देऊन त्याने आपलें काम भागविलें आहे. (ग्रँट डफ १९१२ ची आवृत्ति पृ. ९९)

हाच निराधार तर्क सर्वत्र महाराष्ट्राच्या लहान मोठ्या इतिहासकारांनी डोळे मिटून उचलला. शिवाजीचें चरित्र लिहिणारे सर जदुनाथ सरकार यांनाहि त्यांत कांही वावगें दिसलें नाहीं. मात्र त्यांनी निरक्षरतेच्या बाबतींत अकबर, हैदर अल्ली आणि रणजितसिंग यांच्या पंक्तीला शिवाजीला बसवून आपल्या मतानें त्याचा गौरव केला! [ चरित्र आ. ३ री पृ. २७ ] आपल्या विधानाच्या पुष्ट्यर्थ त्यांनी कांही निषेधात्मक पुरावेहि दिले आहेतः—

### निषेधात्मक पुरावे

( १ ) सभासदाने आपल्या चरित्रांत शिवाजीच्या शिक्षणाबद्दल कांही लिहिलें नाही. ( २ ) तारीख—इ—शिवाजींत त्याच्या शिक्षणाबद्दल लिहितांना युद्धकला व अश्वविद्या एवढ्यांचाच उल्लेख आहे. ( ३ ) पुष्कळ युरोपिअन लोक त्याच्या भेटीस गेले. परंतु त्यांपैकीं एकालाहि शिवाजी कांही लिहीत असतांना दिसला नाही. ( ४ ) केव्हांहि त्याच्या हातांत अर्ज दिला असतां तो नेहमी

ती अर्ज एखाद्या प्रधानाकडे वाचण्यास देई. (५) त्याच्या हातचा असा एकहि हस्तलेख अस्तित्वांत असल्याचें दिसत नाही. हें जदुनाथ सरकारांचें कारणपंचक बहुशः निषेधात्मक आणि म्हणून हास्यास्पद आहे हें तेव्हांच लक्षांत येईल. सभासदांतील ' अनुल्लेख ' व तारीख-ई-शिवाजींतील ' अभाव ' हीं दोनहि प्रमाणें तितकीं शास्त्रीय नाहीत. युरोपियन वकीलांशीं आधीं समय ठरवून बोलणें करण्याकरिता बसलेला शिवाजी कांहीं लिहितांना इंग्रजांच्या नजरेस पडला नसेल, याचें कारण उघड आहे. एक तर तो लिहिण्याचें काम फार करील असा कारकुनी दर्जाचा मनुष्य नव्हता. आणि दुसरें असें कीं, त्याची निशाणी अवश्य असलेले कागदपत्र तो निवांत वेळीं—इंग्रज वकील चोवीस तास त्याचे जवळ बसत असल्याचा दाखला नाहीच !—केवळ प्रधानांच्या समक्ष पाहत असावा. तसेंच राजाच्या सभोंवार अनेक हस्तक वावरत असतांना शिवाजीनें लोकांचे अर्ज स्वतः कशाकरितां पहावे व वाचावें हें आम्हांस समजत नाही. अनेक साधारण दर्जाच्या माणसांनाहि वाचक लागतात व उपलब्धहि असतात हें आपण प्रत्यहीं पाहत असतां शिवाजीसारख्या राजानें प्रधानाकडून अर्ज वाचवून घेण्याची खबरदारी घेतली असल्यास तो अनाठायी मुळींच वाटत नाहीं. त्याच्या हातचा असा एकहि हस्तलेख आस्तित्वांत नाही हेंहि म्हणणें तितकेंसें खात्री पटविणारे नाही. विशेष महत्त्वाचे असे शिवकालीन कागदच इतके थोडे उपलब्ध झाले आहेत कीं, तेवढ्यावरून खात्रीलायक असा कांहीं सिद्धांतरूप निर्णय जाहीर करण्याची वेळ आलीं आहे असें म्हणता यावयाचें नाही. एका बाजूनें सांपडलेल्या मराठी कागदपत्रांत कांहींच अर्थ नाही, किंबहुना त्यांत कांहीं बनावटहि आहेत असें बोलून ते क्षुद्र आहेत असें सांगावयाचें आणि दुसरीकडून त्यांच्याच जोरावर आपल्याला अनुकूल असें एकादें गमक प्रमाणभूत म्हणून मांडावयाचें, हें सरकारांचें धोरण वरवर पाहाणारासहि आक्षेपार्ह वाटल्या शिवाय राहाणार नाहीं.

तात्पर्य, जदुनाथांनीं आपल्या अगदीं नव्या ग्रंथांत मांडलेलीं प्रमाणें निरर्थक आहेत. परंतु दुसऱ्या एका ठिकाणीं ' शिवाजीवर नवा प्रकाश ' पाडण्याचा त्यांनी प्रयत्न केला आहे (मॉडर्न रिव्ह्यू मार्च १९१८) त्यांत ' शिवाजी निरक्षर होता काय ?' असाच प्रश्न विचाराकरितां त्यांनी घेतला आहे. त्यांत आधार म्हणून घेतलेलीं प्रमाणेंहि छाननी केली असता त्यांच्या विरुद्धच जाण्यासारखीं आहेत.

गेल्या वर्षी शिवचरित्र कार्यालयानें संपादून प्रसिद्ध केलेल्या English Records on Shivaji ह्या ग्रंथांत जदुनाथ सरकार यांच्या हातांत त्यावेळीं आलेलीं साधनें आतां संपूर्णच छापलीं असल्यामुळे वाचकांनी त्यांचा स्वतंत्र अभ्यास करण्यास हरकत नाही. जदुनाथांची मॉडर्न रिव्ह्यूंतील शिवाजीच्या निरक्षरतेची इमारत त्या पत्रांतील कांही उताऱ्यांवर उभारलेली आहे. ते उतारे व त्यांवरील जदुनाथांचें भाष्य ( कंसांत ) असें—

(१) महाराजांच्या राज्याभिषेकाच्या सालीं इंग्रज व शिवाजी यांचीं सलोख्याचीं कलमें ठरलीं त्यावर ११ व १२ जून सन १६७४ या दिवशीं निराजी पंडित व इतर प्रधान यांच्या सह्या झाल्या. पण शिवाजीनें सही केल्याचा त्यांत उल्लेख नाही. (तेव्हां शिवाजीला लिहितां येत नव्हतें हेंच खरें दिसतें.)[भा.१पृ.३७६]

(२) १६६३ त राजापुरचा सुभेदार रावजी पंडित यानें शिवाजीचें पत्र दाखविलें. A writing from his master with his own chop...as also the print of the Rajas hand done with Sandal. [भा. १ पृ. ४६.]

( त्यांत ' शिवाजीचें पत्र ' असें भाषांतर होईल असे शब्द आहेत. त्यावरून शिवाजीला लिहितां येत होतें, असा सरळ अर्थ कोणी घेईल तर त्यास सरकार म्हणतात कीं, Chop म्हणजे तोंड किंवा जबडा. शिवाजीनें हें पत्र तोंडी जबानीनें सांगितलें व तें कारकुनानें लिहिलें. ) शिवाजीला जर लिहितां येतें तर मग त्यानें त्या पत्रावर हाताची म्हणजे निशाणी कां केली असती असा प्रश्न सर जदुनाथ सरकारांना उपस्थित करावयाचा आहे कीं काय न कळे! श्री. जदुनाथांनी आणखीहि दोन उतारे त्याच अंकांत दिले आहेत. त्यांचा विचार करण्यापूर्वी वरील दोन उताऱ्यांवरील त्यांच्या म्हणण्याची छाननी करूं.

### तहावरच्या सह्या

तहावर सह्या करण्याबाबतचेंच पहिलें विधान घेऊं. शिवाजीसारख्या राजानें तहावर सही करावी असा प्रघात शिवाजीच्या वेळेस होता हें प्रथम सिद्ध करावें लागेल आणि नंतर महाराजाच्या सहीच्या अभावामुळें काय निष्कर्ष काढावयाचा तो काढतां येईल. औरंगजेबादि मोंगल बादशाह व सुलतान वगैरे अशा प्रकारचे करारांना स्वतः सही करून मान्यता दर्शवीत होते अशाबद्दल पुरावा पुढें आणण्याची जबाबदारी जदुनाथांवर पडते. तसा पुरावा ते किंवा कोणींहि खात्रीलायक रीत्या पुढें मांडीपर्यंत त्यांच्या निष्कर्षाला मान्यता देतां येणार नाही. त्यांतून सर जदुनाथ सांगतात तो एवढा तह तरी कसला आहे ? तो काय बरोबरीच्या सत्तेशीं केलेला आहे ? १६७४ तील इंग्रज म्हणजे शिवाजीच्या दरबारचे

एक अर्जदार होते. त्यांच्या मागण्यांपैकीं कांही नाकबूल आहेत म्हणावयाचें व इतर कांही कबूल आहेत म्हणावयाचें. याला, राजाची सही कशासाठीं लागावयाची होती ? त्याची मान्यता प्रधानांनी आधीं घेतल्याचा स्वतंत्र उल्लेख त्याच पत्रांत आहे. तो जिज्ञासूंनी पहावा. ( २ ) दुसऱ्या उताऱ्यावरील Chop बद्दलची मल्लीनाथी विनाकारणच आहे. Chop म्हणजे छाप, सील, शिक्का. हा साधा अर्थ [ इति. ऐति. शके १८४० चैत्र कै. राजवाडे यांचा लेख ] असतां जबडा असा विलक्षण अर्थ करण्याची आपत्ति सरकारांनी निष्कारण ओढवून घेतली आहे, असें म्हणावें लागतें. हा अर्थ कोठल्याहि जुन्या नव्या कोशांत नाही हें आम्ही स्वानुभवानें सांगू शकतों. त्याच पत्रसंग्रहांत निदान पांचसहा ठिकाणीं तरी छाप सील अशा अर्थाचाच हा शब्द आहे. एकदोन उताऱ्यांत 'हेन्री केर्नी बेट अखाताच्या तोंडांत आहे' असें भाषांतर केल्यास चालेल अशा एकदोन ठिकाणीं Chopps [ chop नव्हे ] हा शब्द पडला आहे,, [ Engl. R. भा. २ पृ. २०२ व ३३४] आहे, त्यावरून सरकारांनी हा स्वकपोलकल्पित अर्थ लाविला आहे व तो कायम धरून वरील उताऱ्यांत त्या शब्दाचा अर्थ कारण नसतांना जबडा, तोंड असा लाविला आहे. हाताचा, चंदनाच्या गंधांतील ठसा, मोंगल बादशहा महत्त्वाच्या फर्मानांवर करीत असत हें ज्यांना माहीत आहे त्यांना त्यावरून निरक्षरतेचा अर्थ काढण्याची मुळींच आवश्यकता नाही हें लक्षांत येईल.

### इंग्रजहि शिवाजीला साक्षर म्हणतात

पण जदुनाथांना हा अर्थ लावण्याचा द्राविडी प्राणायाम करण्याचें खरें कारण असें आहे कीं, इंग्रजी साधनांतीलच कांही उतारे शिवाजी साक्षर होता असे म्हणतां येण्यास अनुकूल आहेत. ते जदुनाथांनी वर उल्लेखिलेल्या मॉडर्न रिव्ह्यूच्या अंकांत देऊन वरील त्यांच्या जबडासिद्धांतानुसारें अग्राह्य किंवा अन्यथा समर्थनीय ठरविले आहेत. ते उतारे खाली देतों—

( ३ ) Yesterday arrived a letter from the Raja written himself to Raoji Pandit [ भा. १ पृ. ५३ ] (४) The French ( at Surat )...had been informed by an autograph letter of his ( Shivaji's ) ( पत्रसार सं. ले. १३५१ )

ह्या दोन उताऱ्यांतील उल्लेख स्पष्टपणें साक्षरतेला पुष्टि देणारे आहेत. एकात राजानें स्वतः लिहिलेलें पत्र असे उघड शब्द असून दुसऱ्यांत स्वहस्तलेखन दर्शविणारा (autograph letter) आटोग्राफ लेटर हा परिचित शब्द आहे. हे उल्लेख सहजासहजीं उडविणें अशक्य आहेत असें सरकार यांच्या लक्षांत आलें तेव्हां ह्या शब्दांचा सरळ अर्थ घ्यावयाचा असेल तर शिवाजीला लिहितां-वाचतां येत होतें ह्याबद्दल हा पुरावा निर्णायक समजला पाहिजे अशी त्यांना मांडणी करणें भाग पडलें आहे. परंतु ह्या शब्दाचा अर्थ तसा सरळ घेण्याला प्रतिकूल असेच त्यांचे पूर्वग्रह असल्यामुळे शिवाजीचें पत्र ह्याचा अर्थ शिवाजीचें म्हणून प्रथम पुरुषी भाषाप्रयोग करून लिहिलेलें पत्र केवळ त्यांच्या सांगण्यावरून किंवा त्यांच्या नावाने लिहिलेलें पत्र असाच अर्थ करण्याचें सरकार ह्यांनी ठरविलें आहे व त्यासाठीं चॉप या शब्दाचा ओढाताण केली आहे.

ज्या पुराव्यांचा भार शिवाजीला (unlettered) अनलेटर्ड ठरविण्याला निर्णायक वाटतो तो पुरावा जदुनाथांचेच म्हणण्याप्रमाणें वर मांडला आहे. आमचे मतें किंवा सरळ कोणाहि वाचकाच्या मतें तो आहे त्या स्वरूपांत आपला भार विनाविरोध सरकारांचे बाजूस टाकील असा दिसत नाहीं.

### इंग्रजांचा पुरावा ग्राह्यच नाही

येथपर्यंत पुराव्याची झालेली आणि केलेली ओढाताण दाखविली. ग्रँट डफ यांनी कोणताच आधार न देतांना केवळ मनचे एक विधान ठोकून दिलें. सर जदुनाथ सरकार ह्यांना आधारपद्धति मान्य असल्यामुळे त्यांनी कांही मनःपूत आधार दिले. पण ते सहजच अंगाशीं येण्यासारखे आहेत. शिवाजी साक्षर होता हा पक्ष खरोखर दुर्बल करावयाचा तर यापेक्षां प्रबल पुरावे पाहिजेत. तो निरक्षर होता असा एक पक्ष केवळ मनाने कल्पावयाचा आणि पुराव्याचा बोजा दुसऱ्या पक्षावर टाकावयाचा असा प्रकार या बाबतींत झालेला आहे हे सांगण्याकरिताच शिवाजीच्या निरक्षरतेचे जनक ग्रँटडफ् आणि आग्रही पुरस्कर्ते श्री. सरकार यांच्या भूमिका येथपर्यंत सविस्तर वर्णन केल्या.

शिवाजीच्या साक्षरतेबद्दल खरा पुरावा आमच्या मतें इंग्रज वगैरे परकीयांचा ग्राह्य नसून शेजारचे मुसलमान व स्वराज्यांतील लेखक इत्यादिकांचाच शोधून व पडताळून घेतला पाहिजे. आम्हीं सरकार यांच्या आधारांचा एवढा सविस्तर परामर्ष घेतला तो तशा प्रकारचा पुरावा आम्हांला निर्णायक वाटतो म्हणून घेतला असा त्याचा खरा अर्थ नाहींच. किंबहुना कांही शब्दांचा अर्थ सरळ करूनहि आमचे पक्षाला त्यांतून अनुकूल ध्वनि निघत असेल तरीहि त्या ध्वनीवर भिस्त ठेवणें आम्हांला शास्त्रीय वाटत नाही.

कारण कोणत्या प्रकारच्या विधानांना कोणत्या साधनांतून बल मिळवावयाचें आहे ह्या गोष्टी बहुतांशीं निर्णीतच आहेत. शिवाजीबद्दल इंग्रज आपल्या पत्रांत लिहितात तेव्हां ते मुख्यत्वें करून आपल्या हितसंबंधांबद्दल लिहितात. त्यांचा पुरावा तेवढ्या बाबतींत विश्वसनीय धरलाच पाहिजे. परंतु इतर बाबती ज्या त्यांच्या लिखाणांतून अप्रत्यक्ष-पणें व लांबून सिद्ध होतात त्या निश्चित समजण्या-पूर्वी इतर पुराव्यांची सहजच अपेक्षा राहते.

आतां शिवाजीचें वर्णन करावयासच एखादा सतराव्या शतकांतील इंग्रज बसला, त्यानें शिवाजी साक्षर होता कीं नाहीं हाहि एक मुद्दा विचारांत घेतला असता आणि तसा विचार करून त्याबद्दल अस्ति पक्षीं किंवा नास्ति पक्षीं सरळ विधान केलें असलें, तर मात्र तें ग्राह्य समजावें लागेल. सर जदुनाथ ह्यांनीं उध्दृत केलेले सर्व उल्लेख ह्या दृष्टीने अगदींच दुय्यम व केवळ अप्रत्यक्ष स्वरूपाचे असल्यामुळे ते ग्राह्य आहेत असें आम्ही समजत नाहीं. आणि जर ते ग्राह्य म्हणून समजावयाचे असतील तर ते सर सरकारांच्या निरक्षर पक्षापेक्षां साक्षरता पक्षाकडेच विशेष झुकणारे आहेत हें जें आम्हीं वर दाखविलें आहे तें सर्वांनाच पटेल अशी आमची खात्री आहे. वरील विवेचन वाचून महाराष्ट्र व शिवाजी यांचे इतिहास आजपर्यंत ज्यांनी लिहिले त्यांच्या पूर्वग्रहदूषित वृत्तीबद्दल वाचकांना कांहीं कल्पना आली तर या लेखाचें सार्थक होईल.

**शिवाजीमहाराज निःसंशय साक्षर होते**

निरक्षरतापक्षाचीं विधानें खोडून काढल्यानेंच केवळ दुसऱ्या पक्षाचें मंडण होऊं शकत नाहीं. तर अस्तिपक्षीं असलेला पुरावा पुढें मांडण्याची अर्थातच अपेक्षा राहाते. त्या बाबतींत कै. राजवाडे यांनीं सरस्वतीमंदिर ह्या त्रैमासिकांत आणि रा. आबा चांदोरकर यांनीं भा. इ. सं. मंडळाच्या त्रैमासिकांत ( वर्ष २ पृ. ११२--१२३ ) पुष्कळ चर्चा केली आहे. रा.सा. सरदेसाई यांनीहि आपल्या रियासतींत या विषयावरील सर्व साधक प्रमाणें दिलीं आहेत. मराठे हे अक्षरशत्रु होते हे ग्रँट डफचें असमर्थ-नीय व सामान्य स्वरूपाचें विधान शिवपूर्वकाला-पासून तों तहत ग्रँट डफच्या समकालीन व्यक्तीं-पर्यंतचीं सर्व वर्गांतील व सर्व जातींचीं व दर्जाचीं उदाहरणें दाखवून उभयतांनी खोडून दाखविलें आहे. शहाजी व पुढें संभाजी, राजाराम, शाहू त्या सर्व छत्रपतींच्या साक्षरतेबद्दल निःसंशय पुरावे उपलब्ध आहेत. बखरकार आणि समकालीन कवि शिवाजीच्या शिक्षणाबद्दल व विद्या-भिरुचीबद्दल स्पष्ट भाषेत गौरवपर लिहितात. आतां बखरींतील संस्कृत श्लोकात्मक औपरोधिक उतारे अशासारखे प्रकार थोडे भोळेपणाचे म्हणून वगळले तथापि एकंदर साक्षरता व विद्याभिरुचि या काळांत दिसणारा रोख स्वकीयांच्या परिचयाचा साहजिक आणि अनेक अप्रत्यक्ष पुराव्यांनी सिद्ध म्हणून ग्राह्यच समजला पाहिजे.

आतां इतकीं प्रत्यंतर प्रमाणे असतांहि अद्यापपर्यंत खास महाराजांचे हस्ताक्षर सर्वांना मान्य होईल असें कोणी दाखवूं शकत नाहीं तें कां? असाहि प्रश्न साहजिक उद्भवतो. परंतु त्या बाबतींत सर्व साधक बाधक प्रमाणांची चर्चा करण्याचें काम पुढील लेखांकावरच सोपविलें पाहिजे.

# वसंतव्याख्यानमाला

### वाङ्मय आणि अश्लीलता

(१२)प्रो. **मा. दा. आळतेकर** यांचें 'वाङ्मय आणि अश्लीलता ' या विषयावर श्री. **श्री. म. माटे** यांच्या अध्यक्षतेखालीं शनिवार ता. २१ रोजीं व्याख्यान झालें. अध्यक्षांनी थोडक्या शब्दात व्याख्यात्यांची ओळख करून दिल्यावर व्याख्याते आपल्या भाषणांत म्हणाले, "वाङ्मय आणि अश्लीलता" हा विषय आज समाजापुढे बरींच वर्षे आहे. सहासात वर्षांपूर्वी पुण्याला जे साहित्य संमेलन भरलें होतें त्यांत वऱ्हाडमधील एका कवीनें आपल्या कवितेंत अश्लीलता गायली असा त्यांच्यावर आरोप करण्यांत आला, व त्याबद्दल त्या संमेलनांत बरीच चर्चाहि झाली.

अश्लीलता लेखांत असूं शकते.तशीच कादंबऱ्यांत आणि चित्रांतहि असू शकते. आज प्रश्न असा आहे कीं, वाङ्मयांत जी अश्लीलता येते ती नाहींशी कशी करावी. नुकत्याच एका लेखकाला अश्लील वाङ्मय लिहिल्याबद्दल दंड करण्यांत आला. संस्कृतमध्ये श्ली असा धातू नसून श्री असा धातू सापडतो. या श्रीला र लावून श्रीर असा शब्द तयार होतो.मधु+र=मधुर; तसेच श्री+र=श्रीर म्हणजे सौंदर्यसंपन्न असा अर्थ होतो. मग श्रीर याचें रूपांतर श्लील असें झालें! सौंदर्य, शोभा, ज्यांत नाहीं तें अश्लील असें ठरलें. अश्लीलता फक्त वाङ्मयांतच सापडते असें नाहीं, तिची व्याप्ति इतरत्रहि आढळून येते. श्रमलेल्या जीवाला विसावा देण्यासाठीं पत्ते खेळण्याचे किंवा गप्पा झोडण्याचे जे अनेक क्लब स्थापन झाले आहेत त्यांत कित्येक

विद्वान गृहस्थ भाग घेतात. अशा क्लबांमधून अश्लील कोट्यांचा जणुं कांहीं पूर वाहात असलेला दिसतो. आणि त्याचाच ओलावा वाङ्मयांत झिरपलेला असतो. वाङ्मयांतील अश्लीलतेला आळा घालावयाचा असेल तर ती कोठून उगम पावते हें प्रथम पाहिलें पाहिजे आणि तेथेच तिचा शक्य तितका बंदोबस्त केला पाहिजे.

वाङ्मयांत रस असावा. जगांतील सर्व कवींचा कुलगुरु कालिदास याने काव्य कसें असावें याचें एके ठिकाणीं फार सुंदर वर्णन केलें आहे. रघुवंशाच्या प्रारंभीं तो म्हणतोः—

" वागर्थाविव संपृक्तौ वागर्थःप्रतिपत्तये।
जगतः पितरौ वंदे पार्वतीपरमेश्वरौ ॥

पार्वतीप्रमाणें काव्यांतील भाषा तेजस्वी व सुंदर असावी, आणि तिचा अर्थ शंकराप्रमाणें गंभीर व वीर्यशाली असावा. भाषासौंदर्य व अर्थगांभीर्य यांचा विजोड असतां कामा नये असा वरील श्लोकांतील भावार्थ आहे. अश्लीलता नसावी हें सर्वांनाच मान्य आहे. पण अश्लील या शब्दाचा अर्थ भाषेंत माणसागणिक वेगळा आहे.

अश्लीलता ही लेखांत योजलेल्या शब्दावर अवलंबून असते की ते शब्द वाचून अर्थ करण्यावर अवलंबून असते, हा एक विचार करण्यासारखा प्रश्न आहे. तसेंच अश्लीलता ही स्थलानुरूप बदलत असते. तशीच ती काळाप्रमाणेंहि बदलत असते. ती सामाजिक परिस्थितीवरहि बरीचशी अवलंबून असते. अरेबियन नाइट्स्मधील गोष्टींचें यथातथ्य इंग्रजी भाषांतर सर रिचर्ड बर्ट यांनी केलें आहे. त्यांची इंग्रजी भाषा जरी गोड आहे, तरी त्यांत अश्लीलता बरीच पसरलेली दिसते अशी त्यांच्याविरुद्ध समाजाची तक्रार आहे. कालिदासप्रणीत वाङ्मयावर अद्याप अशा तऱ्हेचा प्रयोग करण्यांत आला नाहीं, ही एक सुदैवाचीच गोष्ट समजली पाहिजे! श्री. तात्यासाहेब कोल्हटकरांनी ज्या वाङ्मयाला स्त्रीवाचकांची मान्यता मिळेल तें सुश्लील समजावें असें म्हटलें आहे. पण अशिक्षित, सुशिक्षित, त्यांतहि विलायतेला जाऊन आलेल्या अशा विविध स्त्रियांच्या अभिप्रायांत फरक पडल्याशिवाय कधींच राहावयाचा नाही. अश्लीलता कोणती हें ठरविण्याचें प्रमाण चंचल असतां कामा नये. तें कोठेंहि सारखेंच लागू पडणारें असावें.

वाङ्मयांत ज्या गोष्टी सांगावयाच्या त्या स्पष्ट शब्दांत सांगाव्यात असें मला वाटतें. त्यांत भाडभीड उपयोगी नाही. एकदा कां भिडस्तपणाने लिहिण्याची खोड जडली कीं, प्रामाणिकपणाने लिहिण्याची सवय नाहीशी होते. याला प्रमाण म्हणून संस्थानिकांच्या चरित्रांचीं पुस्तकें पहा. लेखकाला पूर्ण उक्तिस्वातंत्र्य असणें अत्यंत जरूर आहे. राजकीय बाबतींत आपण ही गोष्ट मान्य करतों व एखाद्या लेखकावर १२४ अ किंवा १५३अ कलमाखाली खटला झाला तर सर्व वर्तमानपत्रें काहूर करून सोडतात. मग प्रश्न असा निघतो कीं, नियंत्रणावर अधिक भर द्यावा कीं स्वातंत्र्यावर अधिक द्यावा? तुम्हांला एका बाबतींत नियंत्रणें नको असतील तर बाकीच्या बाबतींतहि नियंत्रणें असावींत असा हट्ट धरतां उपयोगी नाही. वाङ्मयाच्या बाबतींत फाजील शुष्ककाष्ठ मागें लावून न घेता स्वातंत्र्याच्या मार्गानेच जाणें श्रेयस्कर आहे. बारीकसारीक गोष्टींनेहि मनुष्याच्या मनोवृत्ति दुखविल्या जातात हें बंद नाहींसें झालें पाहिजे. सौंदर्यहीन वाङ्मय उत्पन्न होणे हें चांगलें नाही. ज्या लेखकाला आपल्या वाग्वधूच्या अंगावर एखादादुसराहि अलंकार चढविता येत नाही त्याने आपली लेखणी थांबवावी व विद्या वळावा! भाषा सोपी पण प्रसादयुक्त असावी! कै. शिवरामपंत परांजपे यांनी ' कोकिळा-स्वयंवर ' नांवाचा एक लेख लिहिला होता. त्यांतील सुधारकांवरील टीका अत्यंत मार्मिक आहे. टीका अशी असावी कीं, तिच्यापासून सौंदर्यप्रचीति झाली पाहिजे. यानंतर असा प्रश्न निघेल कीं, टीकेतील शब्दयोजना अश्लील असली तर? या प्रश्नाला उत्तर भर्तृहरीच्या वैराग्य शतकाचें देतां येईल. त्यानें त्यांत स्त्रियांचें वर्णन अत्यंत सुंदर केलें आहे. जरी असें असलें तरी त्यांत अश्लीलता दिसत नाहीं. तें वर्णन वाचून वाचकांच्या मनांत वैराग्याचीच भावना उत्पन्न होते. ज्ञानेश्वरांनी १३व्या अध्यायांत कामुक मनुष्य गाढव कसा बनतो याचें वर्णन केलें आहे. त्यांत एक प्रकारचा सडेतोडपणा आहे. पण त्यांतून अश्लीलतेचा वास निघत नाही हें लक्षांत ठेवलें पाहिजे.

अश्लीलतेची तक्रार करण्याची दुसरी जागा म्हणजे बीभत्स रसाची. पण बीभत्स रसाचा तरी हेतु काय असतो? समाजांतील त्याज्य अशा वस्तु किंवा चालीरीती आहेत त्याविरुद्ध तिटकारा उत्पन्न करण्याजोगें वर्णन करणें हा बीभत्स रसाचा प्रधान हेतु आहे. मात्र अशा वर्णनाने वाचकांच्या मनावर अनिष्ट परिणाम न होऊं देण्याची खबरदारी घेतली पाहिजे. कै. हरिभाऊ आपटे यांच्या 'मधली स्थिती' या कादंबरींतील कांहीं वर्णनाबद्दल तक्रार ऐकूं येते. पण मला तरी त्यांत वावगें असें कांहींच दिसत नाहीं. काव्यांत शृंगार असूं नये असें कांहीं पंडित म्हणतात. कॉलेजांत शाकुंतल शिकवूं नये अशीहि कांहीं लोक ओरड करतात. विनोदांत अश्लीलता असतां कामा नये असेंहि कांहींचें म्हणणें

आहे! पण उत्तम लेखकांनी विनोदाची उत्कृष्ट धाटणी कशी असावी याचें खरें ज्ञान समाजाला करून दिलें पाहिजे.

कवी शब्दसृष्टीचे परमेश्वर असतात, नोकर नसतात. त्यांच्या काव्यांतील अभिप्रेत हेतु काय आहे हें प्रथम पाहिलें पाहिजे. कुमारसंभवांतील रतिविलासाचें वर्णन जरी खूप शृंगारिक असलें तरी त्यांतील प्रधान हेतु काय आहे इकडे लक्ष दिलें पाहिजे. कवि कुलगुरु कालिदासाच्या शृंगाराचा ओघ भागीरथी नदीप्रमाणे उदात्त आणि गंभीर असा आहे. आपल्या समाजाला खरा विनोद कशाला म्हणतात याची बरोबर कल्पनाच नाही. आपल्याकडे विनोदाचें शास्त्र किती हीन दर्जाला पोहोचलें आहे हें सर्वसामान्य नाटकांतील विनोदावरून चांगलेच नजरेस येतें. उलट उदात्त व समयसूचक असा विनोद केळकर, कोल्हटकर, गडकरी वगैरे नाटककारांनी आपल्या नाटकांत ठोकेठोके दाखविला आहे. लोकांच्या वृत्ति साफसूफ करणें हें ग्रंथकारांवर व टीकाकारांवर अवलंबून असतें म्हणून त्यांना पूर्ण स्वातंत्र्य द्यावें."

उपवक्ते म्हणून श्री. ग. म. जोशी यांचें भाषण झालें. ते म्हणाले, "व्याख्यात्यांनी वाटेल त्या शब्दाचा वाटेल तसा अर्थ केला आहे. अश्लील शब्दाची जी व्युत्पत्ति त्यांनी केली आहे, ती नियमाला सोडून आहे. अनुत्तम तेवढें अश्लील ही व्याख्या माझ्या मतें चूक आहे. मम्मटाच्या व्याख्येप्रमाणे व्रीडा, जुगुप्सा, अमंगल विकार ज्या वाङ्मयामुळें उत्पन्न होतात तें अश्लील समजावें." दुसरे उपवक्ते श्री. पां. वा. गाडगोळ म्हणाले, "अर्थकारणांत, राजकारणांत जर आपण स्वातंत्र्य मागतों तर वाङ्मयांत तरी तें कां असूं नये? विवाहसंस्था नको म्हणणाऱ्याला आपलें मत प्रतिपादण्याचें स्वातंत्र्य असावें. आपणहि विरुद्ध मत मांडून विवाहाचें समर्थन करावें. जर विवाह-संस्था टिकाऊ असेल तर ती टिकेलच. वाङ्मय स्वातंत्र्यानें व टीकेनें सुधारतें, नियंत्रणानें नव्हे. वाङ्मयांतच व्यक्ति-स्वातंत्र्य पाहिजे व राजकारण व अर्थकारण यांत तें नको आहे, पण वस्तुस्थिति मात्र याच्या उलट आहे!" एवढें भाषण झाल्यावर पाऊस येण्यास सुरुवात झाल्यामुळें अध्यक्षांनी पुढील चर्चा पुढे लवकरच होईल असें जाहीर करून सभा तहकूब ठेवली.

# सायंकाळची शुक्राची कोर

( ले.—प्रो. सखाराम विनायक आपटे, एम्. ए.)

अलीकडे बरेच दिवस सूर्यास्तानंतर कांही काल-पर्यंत दिसणारा शुक्र बहुतेकांनी केव्हा ना केव्हा तरी पाहिलाच असेल. गेले सात आठ दिवस तर तो केवढा थोरला तेजाचा लोळ दिसत होता! आतां त्याचा तो तेजाळपणा कमी होत चालला आहे. हा तेजाचा लोळ खरोखरी वाटोळा ताटलीसारखा नसून चन्द्रकलेसारखा आहे ही गोष्ट कित्येकांना माहित नसते आणि कित्येकांना नुसतीच माहित असते पण त्यांनी ती गोष्ट प्रत्यक्ष पाहिलेली नसते.

सध्या सुटी असून आकाशस्थ ज्योति ज्या विशेष *लक्षणीय आहेत त्यांचीहि अनुकूल परिस्थिति* आहे. तेव्हा आभाळ साधारण स्वच्छ आपल्या कामापुरते सापडतां क्षणींच जागरूकतेने दूरदर्शाचा (दुर्बिणीचा) जितका उपयोग करता येईल तितका तो करणें फार इष्ट आहे.

साधारण ३ इंची दूरदर्शाच्या साहाय्याने ज्या गोष्टी नीटपणें पाहतां येण्यासारख्या आहेत त्या येथे थोडक्यांत दिग्दर्शित करतों—

१ सूर्य. सूर्यावरील डाग चांगले दिसूं शकतात. ते पाहण्याची सोइस्कर वेळ उदयानंतर तास दीडतास, व अस्तापूर्वी तास दोन तास. कांही दिवस मधूनमधून पाहात राहिल्यास त्याचें परिवलनहि लक्षांत आल्याशिवाय राहात नाहीं. अर्थात् सूर्याकडे पाहातांना निबिड काळी काच वापरण्यास कोणीहि विसरता कामा नये.

२ चंद्र. चंद्राचा पृष्ठभाग फारच पाहण्यासारखा असतो, विशेषतः शुद्ध द्वितीये—तृतीयेपासून अष्टमी-पर्यंत डोळे दिपून जाण्याइतकें तेज नसल्यामुळें छायाप्रकाश हे द्वन्द्व फारच सुरेखपणें व सावकाश-पणें पहातां येतें.

३ ध्रुव. *ध्रुवतारा म्हणून आपण ज्याला म्हणतों* त्याच्यावर दूरादर्श रोखून तो अगदीं दृष्टिक्षेत्राच्या मधोमध आणून ठेवावा. आणि घटका दोन घटका मधून मधून बघत रहावें. त्यालाहि दैनिक फेरीचें चक्कर आहे हें दिसून आल्याशिवाय रहात नाहीं.

४ गुरु. सध्या आवर्शीस पाहण्यासारखा आहे. तो येत्या १९ तारखेला सिंहस्थ होणार आहे हें सर्वांना माहितच आहे. त्याच्यावर दूरादर्श रोखतांच तो आपल्या चार उपग्रहासह सहज प्रकट होतो. गुरूचा चपटेपणा (त्याच्या ध्रुवस्थानाकडील)

तेव्हाच दिसून येतो. सगळ्या ग्रहांत गुरूची चपटे-पणा विशेषच आहे. त्याच्या विषुववृत्तापाशीं एकाद्या बैदुलावर जशा वाटेल्या रेघा काढलेल्या असतात तशा रेखाहि दिसतात. त्याच्या विषुवांतून आंसाशीं काटकोनात काढलेल्या सरळ रेषेंत त्याचे चारहि उपग्रह चार तेजस्वी टिकल्या मांडल्या-प्रमाणें व्यवस्थित दिसून येतात. दोन तीन दिवस हा देखावा पाहिल्यास या उपग्रहांची मांडणी पालटत चाललेली असते हें तेव्हाच दिसून येतें. आज सगळे चारहि उपग्रह एका बाजूला तर उद्या तीनच एका बाजूला व एक दुसऱ्या बाजूला, कधीं दोन दोन एकेका बाजूला तर कधीं त्यातला एखादा उपग्रह गुरूच्या मागे गेल्यामुळें फक्त तीनच दिसावे अशी मौज पाहण्या-सारखी आहे.

५ शनि आणि त्याचीं वलयें पाहण्यास मात्र पहाटेच्या प्रहरीं उठलें पाहिजे. जिच्यांत माणीक-मोतीं जणु काय उधळून दिलेलीं आहेत अशा त्या आकाशगंगेचा किंवा दीर्घिकेचा देखावाहि त्या-वेळीं पाहावयास मिळत असल्यामुळे कोणीहि सुजाण माणसांनीं ही तसदी घ्यावीच इतकी रमणीयता त्या देखाव्यांत खचित आहे.

पण सगळ्यांत दर्शनीय गोष्ट आणि जिची मौज दोन चार दिवसांतच नाहींशी होईल म्हणून ती आज उद्याच पाहण्याची संधि साधणें इष्ट आहे ती म्हटली म्हणजे शुक्र पाहण्याची होय.

६ शुक्र हा हल्ली सूर्याच्या आणि आपल्या पृथ्वीच्या मधून चाललेला आहे आणि याच कारणाने म्हणजे अत्यंत सान्निध्यामुळे तो एवढा मोठा लोळ असल्या-सारखा दिसत आहे. सध्या त्याचा व्यास मोठा आहे खरा, पण प्रकाशित पूर्ण बिंब आपणास दिसत नसून द्वितीयेच्या चंद्राच्या कोरीसारखी एक कोरच काय ती दिसत आहे. कांहीं दिवसापूर्वी तो अष्टमी-च्या चंद्रासारखा दिसत होता, पण आता त्याची लवकरच अमावास्या व्हावयाची असल्यामुळें ज्याला ज्याला दूरदर्शांतून पाहण्याची संधि मिळण्या-सारखी असेल त्याने ती संधि दवडूं नये.

# कुलाबा जिल्ह्यांतील खेडीं

## प्राचीन व अर्वाचीन आर्थिक स्थिति

( ले.—रा. ल. घरत आवास, जि. कुलाबा. )

ता. ८।१२।३१ च्या केसरींतील "कोंकणांतील शेती" या माझ्या लेखांत म्हटल्याप्रमाणे कुलाबा जिल्ह्यांतील कांहीं गांवांतून मिळालेली माहिती देत आहे. सांप्रतच्या राजवटींत सरकार-साऱ्याच्या बोजामुळे व अन्य कारणांनी मध्यम स्थितींतील जमीनदार व शेतकरी यांची स्थिति फारच खालावली आहे हें सप्रमाण सिद्ध व्हावें व सरकारने करांचें ओझें कमी करून प्रजेंतील असंतोष कमी करावा म्हणून प्रश्नपत्रिका पाठवून कुलाबा जिल्ह्यांतील सात तालुक्यांतून माहिती मागितली होती. अलिबाग, पेण, रोहें व महाड या चार तालुक्यांतून दहा सद्गृहस्थांनी माहिती पाठविली. कांहींनी पत्रें पाव-ल्याचें कळवून आपल्या अडचणी पुढें आणल्या व कांहींनी कांहीच कळविलें नाही.

अलिबाग तालुक्यांतील श्री. कृ. ल. दातार यांनी आवास, श्री. कृ. मु. देवल यांनीं झालखंड व परहुरपाडा आणि श्री. प. रा. म्हात्रे यांनी पेझारी या गांवांची माहिती दिली आहे. आवास गांव बागायती व बाकीचे वरकसी जिरायत आहेत. मिळालेल्या माहितीवरून आंग्रयांच्या राज्यांत शेतकरी वगैरे अधिक सुखी होते असें दिसतें. इंग्रजांचें राज्य झाल्यानंतर बहुते-कांनी आपल्या जमिनी घालविल्या व ते निवळ उपरी कुळें होऊन बसले. ज्यांच्याजवळ थोड्या जमिनी उरल्या आहेत तेहि कर्जापायीं बेजार झाले आहेत. पुष्कळांस पोटभर अन्न मिळत नाही. व तरुण शेतकरी मुंबईस रोजगारा-करिता जाऊन राहिल्यामुळे शेतीची आबाळ होऊन येणाऱ्या उत्पन्नांतून मक्ताहि फिटत नाही. आवास गांवांत ७६५ एकर भातशेती, १५५ बागायती, ५२० रब्बी, ३८७ वरकस, ३४० गुरचरण, ३८ जंगल, २६ आकारी पडित, ३१ पुळण व ७२ इतर (खाडी नाले वगैरे) इतकी जमीन आहे. यांत सोडलेले गुठे मिळविले म्हणजे एकंदर क्षेत्र २३३८ एकर असून त्यांचा जमीनबाब आकार किंवा सर-कारसारा ८७९२ रुपये सहा आणे आहे. साऱ्याचे कमाल दर दरएकरीं पुळण रु. १–५–४, रब्बी व वरकस रु. ३–७–०, बागायत रु. २०, गोडी भातशेती रु. ११–५–४, खारी भातशेती रु. ६-१२-० येणेंप्रमाणे आहे.

### वरकस जमिनीस रब्बीचा आकार

आरंभींच्या वरकस जमिनींतील सपाट जमिनीस सन १८९३ त रब्बी नांव देऊन तिचा आकार वाढविला. त्यांत ज्यांनी स्वकष्टाने व पुष्कळ खर्च करून कांही भातशेती केली आहे त्याच्या भातशेतीस गेल्या फेरपाहणींत जिरायत (भातशेती) म्हणून तिचा आकार आणेवारी वाढवून तीन रुपयांपर्यंत केला आहे. जमीनमहसुलाच्या कायद्याच्या १०७ व्या कलमाप्रमाणे जमीनदाराने पदर खर्चून केलेल्या सुधारणेचा फायदा सरकारास घेतां येत नाही. असें असूनहि सरकारनें तो अन्यायाने घेतला आहे. फक्त खडकाळ व उंच-वट्याच्या जमिनीस वरकस म्हणून तीवरहि एक रुपयापर्यंत आकारणी केली आहे. रब्बी म्हणून म्हटलेल्या जमिनीचा इकडे गुरचरणीकडेच उपयोग होतो, व रब्बी पीक होत नाही. आवासांतील माझ्या मालकीच्या तीन एकर चौदा गुंठे रब्बी जमिनीच्या गुरचरणीचे मला चारपासून सहा रुपये मिळतात. पण त्या जमिनीचा सारा ५ रु. १४ आणे भरावा लागतो! त्याप्रमाणेच सुमारें सवातीन एकर रब्बीची मी व माझ्या कै. वडील बंधूंनी पुष्कळ खर्च व मेहनत करून भातशेती बनविली. तिला १०७ व्या कलमाविरुद्ध जिरायत नांव देऊन व तिच्यावर रब्बीहून बराच अधिक धारा वाढविला असून गेल्या टेबल सर्व्हेंत ती जुन्या भातशेतींत सामिल करून सर्व जमिनीचा एकच नंबर व हिस्सा करण्यांत आला आहे यांत असा मतलब दिसतो कीं, पुढच्या फेरपाहणीच्या वेळीं जमीनदाराने पदरच्या मेहनतीने व खर्चाने केलेल्या सुधारणेचें नांवसुद्धां राहूं नये व ती सर्वच जमीन आरंभापासून भातशेती आहे असें समजून तीवर मनसोक्त धारा वाढवितां यावा. हल्लीहि कांही ठिकाणीं असें करण्यांत आलें आहे.

आवास गांवांत सन १८९४ च्या पहिल्या रिव्हिजन-मध्ये वरकसाला रब्बी व नवकीर्द (नवीन केलेली भातशेती) म्हणून एकरास चार आणे सारा होता, त्या ठिकाणीं जमीनदाराच्या स्वकष्टाने केलेल्या सुधारणेस बाजूस ठेवून आणि १०७ वें कलम धाब्यावर बसवून दीडपासून तीन रुपयांपर्यंत आकारणी केली. १९२४ तल्या रीव्हिजनच्या वेळीं भाताचे भाव वाढले व जमीनदारास अधिक फायदा झाला व तो पुढे तीस वर्षे तसाच होईल असें गृहीत धरून सेटलमेंट ऑफिसर मे. हूडसाहेबांनी ३३ टक्के सारावाढ करण्याची शिफारस केली. त्याप्रमाणे तितकीच वास्तविक वाढ व्हावी, पुनः मोजणी करावयाची नाही. (कलम १०६ पाहा.) पण सरकारने लोकांच्या डोळ्यांत धूळ फेकण्यासाठी टेबल सर्व्हे नांव देऊन नवकीर्द शोधून काढून तीवर ३३ टक्क्यांपेक्षां अधिक वाढ केलीच. एकट्या आवास गांवांतील पुढील उदाहरणं पाहा:—

| सर्व्हे नं. | हिसा | रिव्हिजन सर्व्हे (१८९४) आ. रु. आ. | रीरिव्हिजन सेटलमेंट (१९२४) आ. रु. आ. | शेकडा वाढ टक्के |
|---|---|---|---|---|
| ४७ | ० | ४ - २ | ६ - ३ | ५० |
| ७१ | ० | ४ | ५ - १४ | ४६ ७/८ |
| १३७ | ० | २६ | ३६ - ६ | ३९ ४/१२ |
| १८८ | ० | २४ - २ | ३३ - २ | ३७ ९/१३ |
| २२० | ० | ६ - १२ | ९ - ९ | ४१ १/३ |
| २४८ | ११ | ७ | ९ - १४ | ४१ १/८ |
| ३०१ | ५ | ४ | ५-१४ | ४६ ७/८ |
| ३२७ | १ | ५ | ७-१ | ४१ १/४ |
| ३३६ | ० | ११ - ८ | १६-३ | ४० ३/४६ |
| ३३९ | ० | १० | १३-१० | ३६ १/४ |
| ३४७ | ६ | १-७ | २-१४ | १०० |
| ३५७ | ० | २-१ | ४-६ | ११२ ४/३३ |
| ३८३ | २ | २-८ | ३-१० | ४५ |
| ३८६ | १ | ५ | ७-४ | ४५ |

सर्व जिल्ह्यांत अशीं शेंकडो उदाहरणे सांपडतील. टेबल सर्व्हेंत जुने पोटनंबर मोडून एक नवा सर्व्हे-नंबर करून त्याची पुनः फाळणी करून पोट-नंबराऐवजीं हिस्से असें नांव दिलें. पण असें करतांना एकाची जमीन दुसऱ्याच्याच नांवें घातली. आवासांत अशी २५ उदाहरणें आहेत. सासवन्यास रा. कृ. रा. कुंटे यांची कांही जमीन रा. भा. हि. पुरो यांच्या नांवीं घातली. कुंटे जाणते असल्यामुळे त्यांना ही चूक सुधारता येऊन बिचाऱ्या पुरोंचे फुकट भरावे लागणारे पैसे वांचले. पण सर्वांसच अशा चुका कळत नाहींत. वास्तविक ह्या टेबल सर्व्हेचें कांहींच कारण नव्हतें. कायद्याप्रमाणे फायदा झाला असल्यास जुन्या आकारावर कचेरींत बसून त्रैराशिकाने वाढवावयाचे टक्के वाढविले असते म्हणजे झालें. पण सरकारास लोकांवर खर्च बसवून व नवकीर्दीवर जास्त आकार लादून पैसे मिळवावयाचे होते असें दिसतें; नाही तर ३३ टक्क्यांऐवजीं उदाहरणांत दिलेले ५०, १००, ११२ इतके टक्के कां वाढले असते? हें केवळ अन्यायी टेबलसर्व्हेचें फळ.

### भाताच्या रूपाने सारा

आवासास उत्तम जमिनीचा दर एकरीं एक खंडी भात मक्ता असून तिची किंमत ६०० रुपया-पर्यंत आहे, व तीवर अकरा रुपयांपर्यंत सारा आहे. कनिष्ठ जमिनीचा मक्ता बारा मणांपर्यंत असून तिची

किंमत दर एकरीं चारशें रुपये असते, व सारा तीन-पासून सहा रुपयांपर्यंत असतो. आप्तफितुरीचें तत्त्व मक्तयांत मान्य असल्यामुळे अलीकडे सर्व मक्ता जमीनदारांच्या पदरांत प्रायः क्वचित पडतो. चालू सालीं साडेतीन खंडी मक्तयापैकीं माझ्या पदरांत फक्त एक खंडी सतरा मण भात पडलें व आवासास पुष्कळांचा असाच अनुभव आहे. गेल्या वीस वर्षांत मला फक्त १९१९ सालीं पुरा मक्ता मिळाला. पण सरकार मात्र एक खंडीचे ५० किंवा ६० रुपये धरून त्या धोरणाने फायदा आकारतें.मी अलिबाग तालुक्यांतील श्रीकनकेश्वर संस्थानाचा एक ट्रस्टी आहें.त्या संस्थानाच्या इनाम गांवाच्या कुळांस चालू सालीं आम्हांस दरखंडीस पावणेचार मण सूट द्यावी लागली.भाताचा भाव तर जवळ जवळ निंमेवर येऊन बसला आहे. पूर्वीच्या राज्यांत पिकांचा निमताना काढून सरकार ऐनजिनसीं सारा घेत असे, व त्यामुळे सरकार, जमीनदार व कूळ या सर्वांस हिस्सेरशीनें आपापला हिसा मिळत असे. चालू सालीं लोकांनी सरकाराकडे अर्ज पाठवून भाताच्या रूपाने सारा घेण्यास विनंति केली. पण सरकारचें लक्ष तिकडे कशास जाईल ? त्यांना माहीत आहे कीं, कांहीं झालें तरी आमचा वसूल आमच्या पदरांत पडावयाचाच.

### तहकुबी कोणास मिळाली ?

मागच्या राज्यांत पीक बुडालें असता सरकारासहि कांहीं मिळत नसे.परंतु हल्लीं पाऊस पडो वा न पडो, पीक येवो वा न येवो,भाताचे दर निंम्यावर येवोत किंवा त्याच्याहि खालीं जावोत, सरकारचा ठरलेला नक्त धारा जमीनदाराने कर्ज काढून अथवा पाहिजे तें करून भरलाच पाहिजे. या जिल्ह्यांत दुष्काळ असो किंवा शेतकऱ्यावर आणखी आपत्ति कसलीहि येवो,साऱ्यांत तहकुबी किंवा सूट कशी देतात हें आजतागायत कोणासच माहीत नव्हतें. अर्ज–विनंत्या केवळ अरण्यरुदनवत् झाल्या. चालू सालीं मात्र काय झालें कोण जाणे, नोकरशाहीच्या हृदयाला पाझर फुटून सरकारसाऱ्यांत एक रुपयांत एक वर्षापुरती तीन आण्यांची तहकुबी मंजूर करण्यांत आली आहे. पण ती फक्त ज्या तालुक्यांत अलीकडेच रीरिव्हिजन होऊन बेसुमार सारावाढ झाली आहे त्या तालुक्यासच-म्हणजे पिकें कमी आलीं किंवा भाताचा भाव कमी झाला म्हणून ही सवलत दिली आहे असें नसून-रिव्हिजनमध्यें सरकारने अन्यायाने बेसुमार धारावाढ केली यासाठीच ही सवलत देण्यांत आली आहे. अन्यायानें असह्य सारा वाढविण्यांत आला ही गोष्ट जर सरकारास कबूल आहे तर त्या अन्यायाचें परिमार्जन करण्याचा खरा मार्ग म्हणजे राहिलेल्या तालुक्यांची री-रिव्हिजन जशी तहकूब केली आहे त्याप्रमाणेच री-रिव्हिजन झालेल्या तालुक्यांवर वाढविलेला सर्व सारा पुनः पाहणी होईपर्यंत अजीबात माफ करणें हा एकच होय. पण जो सारा वाढविला तो कमी करणें सरकारास केव्हाच न्याय्य वाटत नाही असा अनुभव आहे. तीन आण्यांची तहकुबी ही केवळ डोळ्यांत धूळफेक आहे. आम्ही कांहीं तरी केलें इतकेंच दाखविण्याचा यांत हेतु दिसतो. कित्येक जमीनदार तर असेंच म्हणत आहेत कीं, ही तहकूब झालेली रक्कम पुढील सालीं भरणें फार जड जाणार आहे. आम्ही जवळची चीजवस्त विकून सारा भरणार. त्यांत दोन पैसे उरले, तर आम्हांस ते प्रपंचाच्या अडचणी भागविण्यासाठी खर्च करण्याचा मोह झाल्यावांचून राहत नाही.

आवास गांवाची लोकसंख्या १७०६ असून त्यांत ८१० पुरुष ८९६ स्त्रिया आहेत. यांपैकीं २०० इसम गांव सोडून धंद्यासाठी इतर ठिकाणीं गेले आहेत व ४५० शेती आणि मोलमजुरी करणारे आहेत. सरकारसारा भरणारे खातेदार ४८० असून त्यांतील ९० इतर गांवीं राहणारे आहेत.१०० रुपयांवर सारा भरणारे खातेदार १५; ५० ते १०० भरणारे २७, २५ ते५०भरणारे६४,५ते २५ भरणारे १५२, १ ते ५ भरणारे ९९ व १ रुपयाचे खालीं सारा भरणारे १२३ आहेत. बाहेरच्या ९० खातेदारांत १०० रुपयांवर सारा भरणारे ५, ५० ते १०० भरणारे ८, २५ ते ५० भरणारे २७, व २५ पेक्षां कमी भरणारे ५० आहेत. अधिक सारा भरणारांत अलिबाग, मुंबई इत्यादि ठिकाणीं राहाणारे व कांहीं वर्षांपूर्वी आवासास येऊन तेथेच स्थाईक झालेले बरेच खातेदार आहेत. या सर्वांनी मूळच्या शेतकरी जमीनदारांपासून कर्जापायीं अथवा अन्य कारणानें त्यांच्या मालकीच्या जमिनी खरेदी केल्या आहेत. हे मूळचे शेतकरी जमीनदार आंग्रयांच्या वेळीं चांगले संपन्न होते, व त्यांना पोटभर अन्नवस्त्र मिळे. कमी सारा भरणारे १५२ व ९९ हे प्रायः कर्जबाजारीच आहेत व एक रुपयापेक्षा कमी सारा भरणारांत जुन्या संपन्न जमीनदार शेतकऱ्यांचेच बहुतेक वंशज असून ते आपल्या झोंपड्यांच्या आसपासच्या थोड्या जमिनीचा बागायती सारा भरणारे आहेत. या गांवांत थोडया वर्षांपूर्वी मोठे जमीनदार असून आतां गरीब झालेल्यांची संख्या ५० आहे वं गुजराथ वगैरे ठिकाणांहून येऊन श्रीमंत झालेले ५ आहेत.जमिनीच्या उत्पन्नांतून निर्वाह करून सारा भरण्यास समर्थ असे फक्त चारच जमीनदार आहेत. इतर खातेदार कर्ज काढून किंवा नोकरीच्या पगारासारख्या इतर उत्पन्नांतूनच सारा भरतात. १८३०–३१ चा सारा दागिने वगैरे विकून भरणारे ९५होते, व याशिवाय प्रायः बाकीचे मध्यम स्थितींतील

सर्व जमीनदार अंगावर व गहाणावर कर्ज काढून सारा भरणारे होते. गुदस्त सालीं धाकदपटशानें लोकांनीं कसाबसा सारा भरला.वसुलासाठी स्वतः मामलतदार गांवांत तीन वेळां, व सर्कल इन्स्पेक्टर पंधरा वेळा आले होते. गतवर्षी भातास पौष माघांत ३५ते ४० रुपये भाव होता, तो वैशाखांत २८ ते ३० व भाद्रपदांत ३० ते ३१ होता. चालू सालीं पीक आठ आणेहि नसून भाव २८ ते ३० रुपयेच आहे. जमीन गहाण दिल्यास व्याज दरसाल दरशेंकडा ९ ते १२ रुपये पडतें, दागिने गहाण दिल्यास १२ ते १८॥ व अंगावर १८॥ ते ३७॥ द्यावे लागतें.जमीनदार असून कर्जदार असलेल्यांची संख्या २५० आहे व जमीनदार नसून कर्जदार १० आहेत.

**झालखंड व परहुरपाडा**

अलिबाग तालुक्यांतील झालखंड व परहुरपाडा या दोन गांवीं मिळून भातशेती ७५ एकर व वरकस ६५ इतकी जमीन असून तेथें ११२ पुरुष व ११४ स्त्रिया आहेत. धंद्यासाठी गांव सोडून गेलेले ५४ व मोलमजुरी करणारे ९० आहेत. १०० रुपयांवर सारा भरणारे फक्त चार. शंभर भरणारे दोन. ५ ते १५ भरणारे पांच आहेत. अकरा खातेदारांशिवाय सर्व उपरी कुळेंच आहेत. व्याजाचे दर १२,१५,३६ असे आहेत. पेझारींत २४७ पुरुष व २५६ स्त्रिया असून त्यापैकीं ८६ बाहेर धंद्याकरिता गेले आहेत व ६४ मजुरी करतात. गोड्या जमिनीचा मक्ता एकरीं एक खंडी, सारा १२ व किंमत८००रु. पर्यंत असते, खाऱ्या जमिनीचा मक्ता १२ मणांपर्यंत, सारा६ रु. १२ आणे व किंमत४००रु. पर्यंत असते. जमीनदार असून कर्जबाजारी वीस व जमीनदार नसून ५२आहेत. व्याजाचे दर जमीनगहाणावर १५, १८,२०, दागिने-गहाणावर १५ ते २० व अंगावर २५ ते ३५ असे आहेत. या गांवीं पूर्वी जमीनदार असून आता गरीब झालेले ४० व बाहेरून येऊन श्रीमंत झालेले ४ आहेत. १०० रुपयांत सारा भरणारे ५, ५० ते १०० भरणारे २,२५ ते ५० भरणारे ८,५ ते २५ भरणारे ४१, १ ते ५ भरणारे १० व एक रुपयापेक्षा कमी भरणारे चार खातेदार आहेत. अलिबाग तालुक्यांतील इतर गांवांची स्थिति जवळ जवळ वर दिलेल्या गांवांसारखीच आहे.

# आजचें कौन्सिल आणि उद्याचें कौन्सिल

लोथियन कमिटीच्या शिफारशींप्रमाणे प्रत्येक प्रांताला जें कायदे--कौन्सिल मिळणार त्याचा आकार बदलणारच, पण प्रकारहि निराळा दिसणार. या दोहोंत कोणते फेरबदल होणार याची कल्पना आजच्या कौन्सिलाशीं उद्याच्या कौन्सिलाची तुलना केल्यानें नीट येणार आहे. प्रत्येक प्रांताच्या कौन्सिलाची रचना कांहीशी वेगळ्या प्रकारची आहे. परंतु त्या सर्वांत भेदापेक्षा साम्यच अधिक असल्याने त्यांपैकीं उदाहरणार्थ एक मुंबई इलाखाच घेतला तरी त्याचें वर्णन इतर प्रांतांनाहि लागू पडण्यास हरकत नाही. मुंबईच्या प्रांतिक कायदेमंडळाचे सभासद सांप्रत ११४ आहेत. त्यांत सरकारी अधिकारी, सरकाराने लोकांपैकीं नेमलेले सभासद व लोकांनी आपल्यांतील निवडून दिलेले सभासद असे तीन ठोकळ वर्ग पडतात. लोकनियुक्त सभासदांत बिगर--मुसलमान व मुसलमान हा ठळक भेद आहे. त्याशिवाय मतदानाच्या विशिष्ट तऱ्हांमुळे इतर लहान लहान भेद उत्पन्न झाले आहेत ते निराळेच !

वरील ११४ सभासदांत सरकारी अधिकारी या नात्याने हक्काने बसणारे सभासद २० आहेत. अस्पृश्य, अँग्लो-इंडियन, हिंदी ख्रिस्ती, मजूर व इतर किरकोळ यांना आपल्या वतीचे सभासद निवडून देण्याकरितां वेगळे मतदारसंघ नसल्यामुळे सरकार आपणास योग्य वाटतील त्या सभासदांची त्या त्या वर्गाच्या हितसंरक्षणार्थ नेमणूक करतें. त्याप्रमाणे अस्पृश्यांकरितां दोन, अँग्लो-इंडियनाकरिता एक, हिंदी ख्रिस्त्यांकरिता एक, मजुरांकरिता तीन व कापसाचा धंदा करणाराकरिता एक असे एकंदर आठ सभासद सरकार नेमतें. मुसलमानांसाठी जसा वेगळा मतदारसंघ आहे, तसा हिंदूंसाठी नसला तरी बिगर-मुसलमान या विस्तीर्ण मतदारसंघात मुख्यतः हिंदूच असून पार्शी वगैरे हिंदूबाहेरील जातींचे लोक फार थोडे आहेत. बिगर--मुसलमानांत शहरांचे व खेड्यांचे असे दोन वर्ग पाडण्यांत आले आहेत. शहरांच्या वतीचे ११ व खेड्यांच्या वतीचे ३५मिळून बिगर-मुसलमान सभासद ४६ भरतात. त्यांतच मराठा जातीकरिता शहरातर्फे १ व खेड्यातर्फे ६ अशा ७ जागा राखून ठेवलेल्या आहेत. शहरांचे मुसलमान ५ व खेड्यांचे मुसलमान २२ आहेत. त्याखेरीज युरोपियन मतदारसंघाने २, जमीनदारांच्या व इनामदारांच्या मतदारसंघाने ३, युनिव्हर्सिटीने १ आणि व्यापारी व कारखानदार यांच्या मतदार-संघांनी ७ सभासद निवडून दिलेले असतात.

मुंबई कौन्सिलांत एकंदर सभासद ११४ आहेत.

त्यांपैकीं २० सभासद सरकारी अधिकारी असल्यामुळे सरकारची बाजू डोळ्यांत तेल घालून संभाळण्यास ते कायमचे बांधले गेले आहेत. सरकारानें नेमलेले सभासद ८ आहेत.. लोकपक्ष व सरकारपक्ष यांजमध्ये महत्त्वाच्या मुद्यावर वाद माजून राहिल्यास यांपैकीं बहुतेक सभासदांनी मिंधेपणामुळे आपली पुण्याई सरकाराच्या वतीनें खर्चावी यांत नवल नाहीं. मुंबई इलाख्यांतील सगळ्या लोकसंख्येंत मुसलमान २० टक्क्यांहूनहि कमी आहेत, पण त्यांना कौन्सिलांत मिळालेल्या जागा त्या प्रमाणापेक्षा किती तरी अधिक आहेत. म्हणजे कौन्सिलांतील लोकनियुक्त सभासदांशीं त्यांचें प्रमाण ३७॥ टक्के पडतें. मुंबई कौन्सिलांत मुसलमान या नात्यानें निवडून आलेले सभासद २७ आहेत. त्यांतच व्यापारी,कारखानदार, इनामदार व जमीनदार या व्यवसायात्मक नांवाखाली आलेल्या दोन–तीन सभासदांची भर घातल्यास मुसलमान सभासदांची संख्या तिसाच्या घरांत सहजच जाते. सरकारपक्षाशीं लोकपक्षाचें जेव्हां भांडण लागतें तेव्हां वीस सरकारी अधिकाऱ्यांच्या कंपूस तीस मुसलमानांची तुकडी मिळण्यास बहुधा अडचण पडत नाही. या मुसलमान सभासदांत सिंधचे मुसलमान बरेच आहेत. सिंध प्रांत विशिष्ट हितसंबंधाच्या दृष्टीने बाकीच्या मुंबई इलाख्यापासून तुटक आहे. या कारणानें सिंधच्या मुसलमानांस सिंध प्रांतांत वेगळा मलिदा चारण्याचें आश्वासन सरकारापासून मिळालें कीं उरलेल्या इलाख्याच्या मानेला नख लावण्यास सिंधचे मुसलमान सहसा कचरत नाहीत.अशा रीतीने सरकार पक्षाचा सुमारें पन्नास इसमांचा पुड्डा जय्यत उभा राहिला असता बारीक सारीक तुकड्यांच्या आशेनें ब्राह्मणेतरांतील दहापांचजणांची भर घातली कीं लोकपक्षाचा चक्काचूर सरकारास हुकुमी उडवितां येतो. यामुळे मुंबई कान्सिलांत लोकपक्षाचें प्रचंड बहुमत असताहि तें दुर्बल व निर्माल्यवत् ठरून त्याचा फायदा गेल्या दहाबारा वर्षांत या इलाख्याला फारच थोड्या वेळा मिळाला आहे.

मुंबई कौन्सिलांत लोकपक्ष कमजोर असण्याचें मुख्य कारण सर्वसमर्थ अशा नोकरशाहीची एकजूट आणि तिला आशाळभूत अशा मुसलमानांची व ब्राह्मणेतरांची मिळणारी मदत हेंच होय. बंगाल किंवा मध्यप्रांत येथील कौन्सिलाप्रमाणे मुंबई कौन्सिलास कोणचाहि महत्त्वाचा राजकीय डाव याचमुळे अलीकडे साधतां आला नाहीं. पण नव्या कौन्सिलांतून सरकारी अधिकाऱ्यांचा तळ आजिबात उठणार आहे. गव्हर्नराच्या मंत्रिमंडळाची नेमणूक लोकनियुक्त सभासदांतूनच होणार आहे व हे मंत्री हल्लीप्रमाणे सात न राहतां चारावर येणार आहेत. त्यांच्यामधील हे मंत्री व हे दिवाण हा जातिभेद मोडून सर्वजण एकजात गणले जाणार. सरकारी अधिकाऱ्यांची एक धोंड अशा रीतीने दूर झाल्यावर दुसरी धोंड सिंधच्या मुसलमानांची. सिंध प्रांतांतील मुसलमान आपण मुंबई इलाख्यापासून विभक्त होणार म्हणून नाचत आहेत, व त्या नाचानें स्वतःची करमणूक करून घेण्याकरिता ब्रिटिश सरकारानेंहि तेथील मुसलमानांच्या पायांत चाळ बांधले आहेत. त्यामुळे हा नाच ऐनरंगांत आला असून खर्चाच्या तोंडमिळवणीवर हवी ती तोड निघतांच सिंध प्रांत मुंबई इलाख्याशीं पिळ्या तोडणार हें ठरल्यासारखेंच आहे.या नवीन व्यवस्थेने सिंधमधील हिंदूंची मुसलमान काय कंबक्ती काढतील ती काढोत, परंतु मुंबई इलाख्यास मात्र ही तैनाती फौज कमी झाल्याबद्दल हायसेंच वाटेल यांत शंका नाहीं.

सिंधचे मुसलमान मुंबई इलाख्यांतून फुटून गेल्यावर मुंबई कौन्सिलांतील मुसलमानांची संख्या अगदींच रोडावून सदर कौन्सिल प्रायहिंदूंनीच गजबजून जाईल. सभासदांच्या संख्येचा आकडा लोथियन कमिटीने दोनशेंचा धरला आहे. हा आकडा सिंधी सभासदांसुद्धां असल्यानें सिंध विभक्त झाल्यावर दोनशे सभासदांऐवजीं दीडशें पासून पावणेदोनशेंपर्यंत कौन्सिलमधील सभासद राहातील असें समजून चालण्यास हरकत नाहीं.परंतु हे सिंधी मुसलमान गेले तरी त्यांच्या जागीं अस्पृश्यांचे प्रतिनिधी कौन्सिलच्या आखाड्यांत उतरण्याकरितां आतापासून कंबर बांधूं लागले आहेत. ते किती झाले तरी हिंदूच. तेव्हां त्यांना सिंधी मुसलमानांइतका राष्ट्रहिताशीं कडवा विरोध करण्याचें कसलें साधावयाला? तशांत डॉ. आंबेडकरांचा विभक्त मतदारसंघाचा पेगम हुकून संयुक्त मतदारसंघामार्फत अस्पृश्यांचे प्रतिनिधी निवडून आल्यास ते स्पृश्य हिंदूंशीं गोडीनें वागण्याचा संभव अधिक आहे. पण जर का आंबेडकरांच्याच हाताला यश आलें तर आंबेडकरांचा कंपू रोडावलेल्या मुसलमान कंपूला पुष्टि आणील व या उभयतांचें सूत कदाचित् ब्राह्मणेतर कंपूशीं जमून हे त्रिवर्ग कौन्सिलांतील इतर पक्षांपेक्षा बलिष्ठ बनतील.तशांत ते जर गव्हर्नरांच्या आहारीं गेले तर सरकारी पुड्डा कौन्सिलांत असल्यानें लोकपक्षाला जें नुकसान पोंचत होतें तितकें जरी नसलें तरी त्याच्या खालोखाल नुकसान करण्याचें पुण्य हे त्रिवर्ग जोडतील.

सायमन कमिशनच्या शिफारशी अमलांत आल्यास मंत्रिमंडळाची जबाबदारी समाईक राहून कोणत्याहि एका किंवा दोन मंत्र्यांवर

कौन्सिलाचा राग झाला तरी त्यांजः विरुध्द अविश्वासाचा ठराव आणून त्यांस राजीनामा देण्यास भाग पाडण्याचा अधिकार कौन्सिलास मिळणार नाही. अविश्वासाचा ठराव आणावयाचा तर सबंध मंत्रिमंडळाविरुद्धच त्यांनी आणिला पाहिजे. पण तेथपर्यंत मजल येणें अशक्यप्राय असल्यानें मंत्रिमंडळ एकदा नेमून झालें कीं तें तीन वर्षेपर्यंत अबाधित टिकेल, व त्यांतील सभासद वर सांगितलेल्या पक्षांतील नेमले असले म्हणजे तर पाहावयासच नको. तीं सर्व गव्हर्नराच्या हातांतील बाहुलीं बनून कौन्सिलचा कारभार बहुतांशीं सर्कशींतील रिंगमास्तराप्रमाणे गव्हर्नराच्या नजरेच्या इषाऱ्यावर चालू राहील अशी भीति वाटते. असें झाल्यास इलाख्याला स्वराज्य मिळून न मिळून सारखेंच!

नवीन कौन्सिलांत एक अभूतपूर्व गोष्ट घडून येणार आहे. तिचा परिणाम काय होईल याचा अंदाज आज करणें कठीण आहे. हल्लीं कौन्सिलच्या मतदारांत कांहीं स्त्रिया आहेत. परंतु मुंबई कौन्सिलांत स्त्रीसभासद एकहि नाहीं. याचें कारण निवडणुकीच्या वेळीं मतें देण्यास स्त्रिया बहुधा जात नाहींत, व गेल्या तरी त्यांजकडून निवडून येण्याच्या हेतूनें स्त्रिया उमेदवार म्हणून उभ्या राहत नाहीत. पण यापुढे स्त्री—मतदारांची संख्या त्यांस दिलेल्या सवलतीमुळे पुष्कळच वाढणार आहे. पुरुष मतदारांच्या एक-चतुर्थांश स्त्री मतदार असें प्रमाण ठरणार आहे. प्रारंभीं स्त्रिया फार करून मतें देण्यास धजणार नाहीत व उमेदवार होण्याच्या भरीसहि पडणार नाहीत, अशी कमिटीने आपल्या मनाची अटकळ बांधून कौन्सिलाच्या पहिल्या दहा वर्षांत एकंदर जागांपैकीं दोन ते पांच टक्के जागा स्त्रियांकरिता राखून ठेवण्याची शिफारस केली आहे. त्याप्रमाणे मुंबई कौन्सिलांत स्त्रियांकरितां चारसहा जागा राखून ठेवण्यांत येतील.

परंतु तसें पाहूं गेल्यास स्त्रियांत शिक्षणाचा प्रसार कांहींसा झाला आहे. किंबहुना शिक्षणाच्या दृष्टीनें पुरुष मतदारसंघ ज्या प्रतीचा निर्माण होईल त्याच्याशीं तुलना करता स्त्री—मतदारसंघ म्हणण्यासारखा कमी दर्जाचा ठरणार नाही. अशा स्थितींत स्त्री—मतदारांचें पुरुष-मतदारांशीं चारास एक असें जर प्रमाण पडत आहे तर जवळ जवळ त्या प्रमाणांत कांहीं कालानें स्त्रिया सभासद या नात्यानें कौन्सिलांत दृष्टीस पडाव्या. ही गोष्ट स्त्रियांचा मतदारसंघ वेगळा केला तरच सिद्धीस जाणार आहे. पण कमिटीनें इतक्या खोल पाण्यांत न शिरतां चारसहा जागा स्त्रियांकरिता राखून ठेवण्याच्या सूचनेवर वेळ मारून नेली आहे. एक मात्र भीति वाटते ती ही कीं, पुरुषांप्रमाणे स्त्रियांसहि जातवारीचा कलहाग्नि पेटविला जाईल. आणि मुसलमान स्त्रिया मुसलमान पुरुषांच्या गटांत व हिंदु स्त्रिया हिंदु पुरुषांच्या गटांत अशीहि स्त्रियांची विभागणी होईल. कदाचित् हिंदु स्त्रियांचा मतदारसंघ वेगळा व मुसलमान स्त्रियांचा मतदारसंघ वेगळा असे दोन तट पडण्याचाहि संभव आहे. तें पाप करण्यास ब्रिटिश सरकार आज कदाचित् प्रवृत्त न झाल्यास निदान मुसलमान स्त्रियांकरिता कौन्सिलांत जागा वगळल्या जातील यांत संदेह नाही. कारण कौन्सिलच्या सभासदांत अमुक इतके सभासद मुसलमानांचे असलेच पाहिजेत असें ठरल्यानंतर तें प्रमाण कायम राहण्याकरिता स्त्रियांच्या जागाकडेहि तीच दृष्टि फिरणें अपरिहार्य आहे

सध्याच्या कौन्सिलांत मजुरांकरितां वेगळ्या लोकनियुक्त जागा नाहीत. सरकाराला सभासद नेमण्याचा जो अधिकार आहे, त्यास अनुसरून सरकार तीन इसमांची मजुरांकरिता म्हणून नेमणूक करतें. आणि हे सभासद प्रत्यक्ष मजूर नसले तरी मजुरांच्या संघटनेंत लक्ष घालणारे व त्यांची काळजी वाहणारेच असतात. नव्या कौन्सिलच्या मतदारांत मजूर मतदार बरेच दाखल होतील. त्यांच्यांत शेतमजूर व कारखान्यांतील मजूर असे दोन वर्ग पडतील. पण कारखान्यांतील मजुरांचा जसा निश्चत वर्ग दाखवितां येतो तसा शेतमजुरांचा दाखविता येण्यासारखा नसल्याने कारखान्यातील मजुरांचा मतदार—संघ वेगळा बनविण्यांत यावा अशी कमिटीची शिफारस आहे. मतदार—संघ वेगळा म्हटला कीं त्याच्या जागाहि वेगळ्या व राखीव व्हावयाच्या. म्हणून त्यांजकरिता मुंबईच्या कौन्सिलांत आठ जागा राखून ठेवाव्या असें कमिटीनें सुचविलें आहे. अशा रीतीनें नव्या कौन्सिलांत नवीन राखीव जागा म्हटल्या म्हणजे अस्पृश्य, स्त्रिया व मजूर यांच्या होत. त्याखेरीज मुसलमान, मराठे, इनामदार, व्यापारी, कारखानदार, युरोपियन, अँग्लो-इंडियन, युनिव्हर्सिटी व हिंदी ख्रिस्ती यांच्याकरिता राखीव जागा आहेतच. किंबहुना स्त्रिया वगळल्यास ज्या जागा पूर्वी सरकारी नेमणुकीच्या होत्या त्या जागा निवडणुकीच्या होणार इतकाच फरक.

अतिशय मोठ्या प्रमाणांत जर कोणता मतदारसंघ वाढणार असेल तर तो बिगर—मुसलमानांचा म्हणजे प्रायः हिंदूंचा. त्यांत गरीबापासून श्रीमंतांपर्यंत सर्व दर्जांच्या व जातींच्या मतदारांची गणना होईल. स्त्रियांकरितां वेगळा मतदारसंघ न दिल्यास शिक्षित व अशिक्षित अशा स्त्रियांचीहि त्यांत गर्दी झालेली दृष्टीस पडेल. महाराष्ट्रांत मोठी संख्या मराठ्यांची आहे. त्यांचे प्रतिनिधी

सध्याच्या कौन्सिलांत भरपूर निवडून येतात. कारण जातीने जातीला ओळखावें असा संप्रदायच अलीकडे पडल्यामुळे मराठे मतदार साहजिकच मराठा उमेदवारासच निवडून देतात. अशा रीतीने मराठे लोक कौन्सिलांत योग्य प्रमाणांत निवडून येतात हें अनुभवास आलें असतां कमिटीने त्यांजकरितां आणखी सात जागा यापुढेहि कां राखून ठेवाव्या हें आम्हांस समजत नाहीं. कारण सर्वसामान्य रीतीनें मराठे उमेदवार इतरांबरोबर निवडून येणारच. खेरीज राखीव पाटांवरहि येऊन बसणार. यांमुळे त्यास इतरांपेक्षा फाजील सवलती मिळून इतरांच्या जागा विनाकारण अडविल्या जाणार. खरें पाहूं गेलें असतां जातवार निवडणुकीची ही दुष्ट पद्धति निदान हिंदूंमध्ये तरी फैलावावयास नको आहे. कारण तिचें वळण त्यांस अंगचेंच असून तें लोकशाही राज्यपद्धति सर्वांस सुखावह होण्याच्या दृष्टीने कायम न ठेवता किंवा वाढूं न देता कमीच केलें पाहिजे. या दृष्टीनें कमिटीच्या या शिफारशीचा परिणाम निवडणुकीवर अनिष्ट झाल्याशिवाय राहणार नाही.

मराठ्यांशिवाय इतर मतदार असें म्हणतील कीं, मराठ्यांकरिता कौन्सिलांत जागा राखलेल्या आहेतच, त्यामुळे मराठे सभासद हटकून निवडून येणारच, मग आम्ही आपलीं मतें मराठ्यांना कां द्यावी व आपल्या जातीचे सभासद निवडून येण्याची संधि कां गमवावी ! ही विचारसरणी एकदां रूढ झाली म्हणजे माळी, सोनार, सुतार, गवंडी, तांबट, परीट, कासार लोहार, धनगर, ब्राह्मण इत्यादि हिंदूंतील अठरापगड जातींत ती बोकाळून ते आपापले उमेदवार निवडणुकीकरिता उभे करून व आपल्या जातीची अल्पसंख्या लक्षांत घेऊन इतर कोणास आपलीं मतें न देता आपल्याच जातीच्या उमेदवारांस तीं देतील व त्यांस निवडून आणण्याचा आटोकाट प्रयत्न करतील. त्याचा परिणाम असा होईल कीं, मुंबईच्या कौन्सिलांत जुन्या कौन्सिलांतील सुधारून वाढविलेली बजबजपुरीच दृष्टीस पडेल. सदर कौन्सिलांतील अँग्लो-इंडियन, युरोपियन, मजूर, मुसलमान इत्यादिकांचे प्रतिनिधी आपापल्या हितास जपण्याकरिताच मुख्यतः बसणार असून सर्वांच्या म्हणजे राष्ट्राच्या हिताची काळजी वाहणारा असा बिगर–मुसलमानांचा अर्थात् हिंदूंचा तेवढा एकच मतदारसंघ आहे. त्या संघाचे प्रतिनिधीहि वेगवेगळ्या जातींचे म्हणून निवडून येतील तर कौन्सिलाचे लोकपक्षीय सामर्थ्य कमजोर होऊन कर्तबगार, हुषार, धूर्त, बाणेदार, शहाणे, विद्वान व वाकबगार अशा सभासदांचा दुष्काळ कौन्सिलास जाणवल्यावांचून राहणार नाहीं. भलेंबुरें, खरेंखोटें स्वराज्य तूर्त तरी फक्त प्रांतांनाच मिळण्याची बोलवा सांप्रत ऐकूं येत असल्यानें तें स्वराज्य संभाळणारे सभासद स्वार्थाने खाल्लेले, दुहीने पिंजलेले व अज्ञानाने पीडलेले असले तर कौन्सिलाचा मोठा आकार, त्याचा बोजवारा तितक्याच मोठ्या प्रमाणांत उडविण्यास कारण होईल अशी भीति मनांत उभी राहते.

# कवि अनंततनयांचा स्मृतिदिन

शनिवार ता. ११ रोजीं नूतन मराठी विद्यालयच्या सभागृहांत श्री. **वा. कृ. भावे** यांच्या अध्यक्षतेखाली कवि **अनंततनय** यांचा तिसरा स्मृतिदिन साजरा झाला. प्रारंभीं **प्रो. चाफेकर** यांनी आपल्या प्रास्ताविक भाषणांत कवि अनंततनय यांच्याविषयी माहिती सांगून आजच्या प्रसंगीं श्री. भावे यांनी अध्यक्षस्थान स्वीकारावें अशी विनंति केली; नंतर कवि श्री. **लोहोकरे** यांनी कवि अनंत तनय यांच्या अनेक कवितांपैकीं 'गरीब गोवऱ्यावाली' व 'श्रीकृष्णदर्शनोत्कंठित राधा' या दोन स्फुट कविता वाचून दाखविल्या; तदनंतर प्रो. चाफेकर यांनी कवि अनंततनय यांचे एक चहाते व मित्र श्री. **शं. ग. तळेकर** यांनी स्मृतिदिनानिमित्त पाठविलेला संदेश वाचून दाखवून पुढील आशयाचें भाषण केलें.

ते म्हणाले, "स्मृतिदिन साजरा करण्याचा मुख्य उद्देश हा असतो कीं त्या व्यक्तीची आठवण जनतेला सारखी राहावी व तिने केलेल्या कार्याची चर्चा विद्वान लोकांकडून व्हावी; आणि याच उद्देशाने आज कवि अनंततनय यांचा स्मृतिदिन साजरा करावयाचा आहे. कवि अनंततनय यांनी आपलें सर्व आयुष्य गरिबींत काढलें; त्यांना मिळालेलें शिक्षणहि पूर्ण नव्हतें; इतकें असून देखील त्यांनी आपल्या ठिकाणीं असलेला ईश्वरदत्त असा जो प्रतिभेचा अंकुर तो अशा बिकट परिस्थितींतहि वाढविला. त्यांचा प्राचीन कवींवर पुष्कळ व्यासंग असे. अनंततनयांचा मुख्य गुण म्हणजे त्यांना रात्रंदिवस वाटत असलेली स्वदेशाबद्दल काळजी आणि या गुणामुळेच त्यांच्या काव्यांत जिवंतपणा आला. तसेंच त्यांनी आपल्या काव्याने जनतेला आपल्या जीवितांत स्थाईभाव कसा निर्माण करावा हें शिकविलें. या कवीने आपल्या

काव्यांत प्राचीन व अर्वाचीन काव्यपद्धतीचा उत्तम मिलाफ केला आहे. जशीं त्यांनी भगवद्गीतेवर 'मुलींची गीता' 'झोपाळ्यावरील गीता' वगैरे स्फुट काव्यें केलीं तशींच अगदी अर्वाचीन विषयांवरहि स्फुट कविता, सुनीतें लिहिलीं आहेत. त्यांनी प्राचीन धर्तीवर केलेल्या आर्या मोरोपंती थाटावर झालेल्या आहेत.

अनंततनय हे जसे राष्ट्रीय बाण्याचे प्रातिनिधिक कवि होते तसेच ते शिशुवत्सलहि होते. त्यांनी जशा स्फुट कविता केल्या तशींच तिलकविजय, माधव वगैरे खंड-काव्येंहि लिहिलीं. त्यांची कांही खंडकाव्यें दुर्दैवाने अर्धवट राहिलीं; पण जेवढा भाग त्यांनी लिहिला तेवढाच जरी आपण वाचला तरी या कवीची योग्यता कळून येते. अनंततनयांचें काव्यक्षेत्रांत फक्त काव्यमय आचरण नसून त्यांचे व्यावहारिक जगाशींहि काव्यमय आचरण होतें आणि म्हणूनच ते सर्वांना आवडत." या आशयाचें प्रो. चाफेकर यांचें भाषण झाल्यावर कवि अनंततनय यांनी आपल्या शेवटच्या आजारीपणांत लिहिलेली ' जल देईं आधी त्यास ' ही कविता त्यांच्या कन्येने म्हणून दाखविली.

नंतर अध्यक्ष **श्री. भावे** यांचें समारोपादाखल भाषण झालें. ते म्हणाले, कवि अनंततनय यांचें बहुतेक आयुष्य गरिबीशीं व शेवटीं तर रोगाशीं झगडण्यांत गेलें! पण त्यांची प्रतिभाशक्ति इतकी जाज्वल्य कीं त्यांनी आपल्या शेवटच्या आजारीपणातहि करुणरसप्रधान अशी एक कविता केली आणि ती किती सरस झाली आहे हें आपण आता ऐकलेंच. मनुष्य नुसता बुद्धिमान असला म्हणजे विद्वान होतो असें नाही. त्याला अध्ययनाची जोड द्यावीच लागते. तसा कवि फक्त प्रतिभाशाली असून भागत नाही तर त्याने आपली प्रतिभाशक्ति प्राचीन व अर्वाचीन काव्यांचा व वाङ्मयाचा अभ्यास करून वाढविली पाहिजे व तिचा उपयोग जनतेला करून दिला पाहिजे तरच त्याच्या प्रतिभेचा उपयोग होणार आहे. मुक्तेश्वर, तुकाराम, महिपति, व तत्कालीन इतर कवींनी विद्येचा व वेदांताचा व्यासंग केला म्हणूनच त्यांना आपल्या काव्याच्या द्वारें अज्ञ जनतेला वेदांतील उच्च तत्त्वें शिकवितां आलीं, आणि उच्च तत्त्वांनी युक्त व म्हणून भरीव अशीं त्यांचीं काव्यें असल्यामुळे त्यांपासून आल्हाद तर होतोच, पण पुनःपुनः तीं वाचावींशीं वाटतात. मराठी कवींनी जशीं आपल्या काव्यांतून उदात्त तत्त्वें विखुरलीं तशींच कालिदासासारख्या संस्कृत कवींनीहि मेघदूत, शाकुंतल वगैरे काव्य, नाटकें लिहून त्याच प्रकारचीं तत्त्वें लोकांना शिकविली. कवींनी आपल्या काव्याने जनतेची नुसती करमणूकच करावयाची नाही तर बोधप्रद तत्वेंहि शिकवावयाचीं आहेत हें लक्षांत ठेवलें पाहिजे.

पण आधुनिक कवींपैकीं पुष्कळांत वरील गुणांपैकीं कोणताच गुण दिसून येत नाही. आधुनिक कवींच्या कविता वाचून घटकाभर करमणूक होते इतकेंच! त्यांत नीतितत्त्वें नसतात. उत्तम काव्याचे जे अनेक गुण सांगितले आहेत त्यांत करमणूक हा शेवटचा गुण आहे. पण अर्वाचीन कवींनी याच गुणाला प्राधान्य दिले आहे. या कारणाने आधुनिक कवींचें काव्य एकदा वाचलें म्हणजे पुनः वाचावेंसें वाटत नाही. त्यांत उच्च तत्त्व नसतें आणि प्राचीन वाङ्मयाच्या अभ्यासाचा अभाव असतो. उदात्त तत्त्वें जनतेला सांगणाऱ्या कवींची मनोभूमिका सुसंस्कृत असावी लागते. आणि भूमिका तयार होण्याला व त्यानंतर काव्य लिहिण्याला प्राचीन वाङ्मयाचा पद्धतशीर अभ्यास करावा लागतो. आधुनिक कवींच्या काव्याला यांपैकीं कशाचाच आधार नसतो. कवीला कोणतें तरी तत्त्वज्ञान असावें लागतें.

कालिदासाने मेघदूतांत पतीचें पत्नीवरील प्रेम वर्णन आपलें काव्य नीतीच्या पायावर रचलें म्हणून त्यांतील सृष्टिशोभेस तेज चढलें व जिवंतपणा आला. शाकुंतलांत शकुंतलेची पतिनिष्ठा कसोटीस लागली आहे. त्या योगाने सदर नाटकांतील काव्यविलासास जिवंतपणा आणिला. यामुळे त्याच्या कृती पुनःपुनः वाचल्या तरी नव्याच भासतात. ज्याला समाजाविषयी कळकळ वाटते, जो दुसऱ्याच्या सुखदुःखांशीं समरस होतो व ज्याचा वाङ्मयाशीं दृढ व्यासंग असतो तोच खरा कवि होऊं शकतो. रवींद्रनाथ टागोर यांना नोबेल प्राईझ मिळालें याला कारण त्यांचे वेदान्त. विचार होत. त्यांच्या कवितांतून उदात्त तत्त्वेंच आढळून येतात. त्यांच्या कविता वाचल्याने आल्हादाबरोबर उच्च तत्त्वांची शिकवणूकहि मिळते.

प्राचीन कवींत आणखी एक गुण विशेष दृष्टोत्पत्तीस येतो. तो म्हणजे काव्यांतील गांभीर्य. स्फुट कविता असो वा खंडकाव्य असो, प्रत्येकांत गांभीर्य दिसून येतें. रवींद्रनाथ टागोरांसारख्या कांही अर्वाचीन कवींतहि प्राचीन कालच्या कवीप्रमाणे हा गुण आढळून येतो; पण असे कवि थोडे. वेरूळचीं लेणीं किंवा आग्र्याचा ताजमहाल पाहण्यास एखादा कवि गेला व त्याला इतिहासाचें ज्ञान नसलें तर तो सदर वस्तूंशीं समरस होणार नाही व त्याच्या कवित्वशक्तीला स्फुरणहि चढणार नाही. त्यास शिल्पकलेचें ज्ञान असले तर दुधांत

साक्षरत्व पडल्याप्रमाणें होईल.सारांश, कवि हा विद्वान पाहिजे.पण आज महाराष्ट्राची परिस्थिति अशी चमत्कारिक झाली आहे कीं, काव्याच्या वांटयाला विद्वत्ता बहुधा येत नाही. म्हणूनच आधुनिक कवींना समाजांत प्राचीन कवीइतका दर्जा मिळत नाही. अनंततनय यांचें विद्यालयीन शिक्षण कमी झालें असलें तरी त्यांनी आपलें ज्ञान खाजगी परिश्रमांनी वाढविलें होतें असें त्यांच्या काव्य-ग्रंथावरून सिद्ध होतें. त्यांचा हा गुण विशेष असून तो होतकरू कवींनी घेण्यासारखा आहे." या आशयाचें अध्यक्षांचें समारोपादाखल भाषण झाल्यावर प्रो. चाफेकर यांनी त्यांचे आभार मानले व सभा संपली.

# निराधार ( काश्मीर ) हिंदु–साहाय्यक–निधि

ता. १५ एप्रिलच्या केसरीमध्ये वरील फंडाची पोंच दिली आहे. आतां सदर निधि बंद करण्यांत आला असून तो ऑडिटरकडून तपासून घेतला आहे.

हा फंड जमविण्यास पुढील स्वयंसेवक संघांनी व व्यक्तींनी मनःपूर्वक साहाय्य केलें त्याबद्दल महाराष्ट्र हिंदु सभा त्यांची कृतज्ञतापूर्वक आभारी आहे. पुणें अनाथ विद्यार्थिगृह; शिवाजीपथक (डॉ. आबासाहेब नातू); टिळक व तानाजीपथक (श्री. भाऊसाहेब देशमुख, ॲडव्होकेट); महाराष्ट्र व्यायाम मंडळ (श्री. कुशाभाऊ जेजुरीकर); समर्थ व्यायाम मंदिर (वैद्य ल.ब.शिराळकर); श्री. श्री. म. माटे व त्यांचे विद्यार्थी,भारत हायस्कूल (श्री. गो.चिं.अनगळ); हिंदुमिशन (वैद्यराज वा. कृ. दाणी), श्री. प्र. वा. बापट व त्यांचे विद्यार्थी,श्री. एम्.आर केळकर,(बी.जे. मेडिकल स्कूल) ह. भ. प. पाटणकरबुवा बी. ए. (कीर्तनें करून;) याप्रमाणें पुणे येथील संस्थांनी व व्यक्तींनी मदत केली. तशीच पर ठिकाणच्याहि अनेक सद्गृहस्थांनी स्वयंस्फूर्तीने मदत केली आहे. त्यांत मलकापूर (सं. कोल्हापूर) येथील श्री. ना. गो. कोळवणकर; गं. रा. सनगर व श्री. ह. रा. कोलते; खेड (पुणें) येथील के. वाय. मुद्गल, विलेपार्ले येथील ध्रुवपथक यांनीं बरीच मदत केली. याशिवाय श्रीवर्धन, येवलें, सोलापूर, जमखंडी येथील मंडळींनी स्वयंस्फूर्तीने साहाय्य केलें त्याबद्दल सभा त्यांची उपकृत आहे.

ता. १५ एप्रिलच्या पोंचीनंतर सभेकडे जमा झालेल्या रकमाः—५० रु. मलकापूरकर (सं. कोल्हापूर) मंडळी; प्रत्येकीं पांच रु. देणारे महादेव लक्ष्मण रानडे वकील इस्लामपूर; श्री. ना. वि. गोडबोले; शे. मुरारदास पितांबरदास खंबायत; श्री. विनायकराव दाते (हिंद सेवक छापखाना पुणें.) ६।८ न्हावी बंधु समाज नानाची पेठ पुणें हस्ते श्री. शंकर बाबाजी सूर्यवंशी.

महाराष्ट्र हिंदु-महासभेतर्फे जमविलेल्या (काश्मीर) निराधार हिंदु-साहाय्यक निधीचा जमाखर्च—

| जमा | रु. |
|---|---|
| एक रुपयाचीं कुपन पुस्तकें | ३५६ |
| चार आण्याचीं कुपन पुस्तकें | ६४।६।४ |
| इतर रकम | ४८०।३।९ |
| | १४८२।७।९ |

| खर्च | रु. |
|---|---|
| छापणावळ | ४१।१२ |
| 'सकाळ' अंक स्वयंसेवकांच्या माहितीसाठी | ।१५ |
| गाडीभाडें | १ |
| टपालखर्च | ३।२ |
| | ४६।१३ |
| *डॉ. बा. शि. मुंजे यांजकडे पाठविले | १०५० |
| बँकेंत शिल्लक | ३८०।१०।९ |
| हातांत | ५ |
| | १४८२।७।९ |

हिशेब तपासला. बरोबर आहे.

(सही) गो. मं. लाड (बी. कॉम.) ता. ६।६।३२

सिद्धेश्वरशास्त्री चित्राव,
अध्यक्ष महाराष्ट्र हिंदु महासभा पुणें.
रा. गो. भिडे,
चिटणीस महाराष्ट्र हिंदु-महासभा, पुणें.

*डॉ. मुंजे यांजकड एकंदर अकराशें रुपये पाठविले. त्यांतील सभेच्या पावतीपुस्तकावरून जमा झालेले १०५० व विलेपार्लें येथील ध्रुवपथकानें रु. पन्नासचा चेक पाठविला तो मिळून अकराशें. ध्रुवपथकाच्या रकमेबद्दल सभेच्या पावत्या दिल्या नसल्यानें ती रकम यांत धरली नाही.

वरील हिशेब तपासून झाल्यानंतर 'मध्य-भारती' यांजकडून रु. २७५ आले आहेत.

**सिद्धेश्वरशास्त्री चित्राव, अध्यक्ष**
**रा. गो. भिडे चिटणीस**
**महाराष्ट्र हिंदु–महासभा पुणें.**

# ग्रामसंघटनेचें ध्येय व कार्य

गेल्या रविवारीं डेक्कन ॲग्रिकल्चरल असोसिएशनच्या विद्यमानें ग्रामसंघटना परिषदेची बैठक पुणें येथे श्रीमंत राजे आप्पासाहेब पटवर्धन, सांगली संस्थानचे अधिपति, यांच्या अध्यक्षतेखालीं भरली. परिषदेंत औपचारिक भाषणें, प्रश्नोत्तरें, विचारविनिमय, खेडेगांवांतील सहल, कार्यप्रदर्शन वगैरे गोष्टी झाल्या. हल्लीच्या कायदे–भंगाच्या विध्वंसक चळवळीच्या काळीं, आणि जुलमी कायद्यांच्या अमलांतहि, स्वदेशीप्रमाणें ग्रामसंघटनेच्या विधायक कार्याकडे लोकाचें लक्ष राहावें व त्याचा यथोचित उपक्रम व्हावा ही आनंदाची गोष्ट आहे. विध्वंसक व विधायक चळवळींचीं सूत्रें चालविणारे, आणि त्या चळवळींत प्रत्यक्ष भाग घेणारे लोक वेगवेगळे असले तरी त्यांतील प्रत्येक चळवळ करणाराला आपण ही चळवळ देशकार्य म्हणून करीत आहों असेंच प्रामाणिकपणें वाटत असतें. आणि इतक्यापुरताच त्या दोहोंचा संबंध असला तरी तो कांही कमी महत्त्वाचा नाही. विधायक व विध्वंसक या चळवळींतील तत्त्वें जशीं परस्परांहून दूर अशा दोन टोकांशीं संलग्न असतांहि त्यांचा अदृश्य भावनारूप संबंध असूं शकतो, त्याप्रमाणे स्वदेशी व ग्राम–संघटना या विधायक चळवळींतहि समाजाच्या दोन टोकांचे दोन घटक, म्हणजे श्रीमंत व गरीब, यांचाहि अदृश्य भावनारूप संबंध असतो ही गोष्ट ध्यानांत ठेवण्यासारखी आहे. श्रीमंत सांगलीकर हे एका मोठ्या संस्थानाचे अधिपति आहेत. त्यांच्या प्रजेवरील त्यांच्या सत्तेला जवळ जवळ मर्यादा नाही. आणि त्यांचें उत्पन्न व त्यांची संपत्ति ही सर्व त्यांच्या प्रजेनें दिलेल्या करांच्या रूपाची असली तरी, जोंपर्यंत त्यांतील पैसा खर्च करण्याच्या त्यांच्या इच्छेला किंवा तारतम्याला सत्तीने मर्यादा घालणारा कोणी उभा राहूं शकत नाही तोंपर्यंत त्यांच्या राज्यांत संपत्तीच्या दृष्टीने सर्वश्रेष्ठ अशी व्यक्ति म्हणजे तेच ठरतात. अर्थात् एका मोठ्या संस्थानांतील सत्ताधीश व पहिल्या प्रतीचा श्रीमंत नागरिक जर आपल्या राज्यांतल्या खेडेगांवांतील गरिबांतील गरीबांचें हित साधण्याकरिता ग्रामसंघटनेच्या कार्याला खऱ्या मनाने प्रवृत्त होईल, तर राष्ट्राच्या भाग्याचा उदय जवळ आला असें म्हणण्यास हरकत नाही.

श्रीमंत व गरीब, सत्ताधीन (म्हणजे सत्तेच्या आधीन नव्हे तर सत्ता ज्याच्या आधीन आहे असा) व सत्ताहीन या जोड्या म्हणजे धनविद्युत् व ऋणविद्युत् या जोडीसारख्या होत. आणि या दोन प्रकारच्या विजेचीं टोकें परपस्परांना स्पर्श करताच ज्याप्रमाणें दिव्य प्रकाश व कार्योपयोगी उष्णता निर्माण होते त्याप्रमाणें विध्वंसक व विधायक चळवळीची जोडी, श्रीमंतगरिबांची जोडी, आणि सत्ताधीन व सत्ताहीन यांची जोडी, यांतील दोन टोकें परस्परांना मिळालीं, म्हणजे राष्ट्रीय भावनेचा प्रकाश आणि समाजहितवर्धक उपयुक्त कार्य हीं निष्पन्न झाल्याशिवाय कशीं राहतील? मात्र हीं दोन टोकें संलग्न झाल्याचा नुसता आभास उपयोगी नाही. त्यांचा खराखुरा जिव्हाळ्याचा स्पर्शच झाला पाहिजे.

एकंदर राजकीय चळवळीला सरसकट रीतीने विध्वंसक हें नांव देण्याचें कारण नाही. कारण राजकीय चळवळींत वास्तविक बराचसा भाग सुविवेक व सुविचार यांनी प्रेरित अशा सूचनांचा व प्रत्यक्ष कार्याचाहि असतो. परंतु राजकीय चळवळीला कोणतेंहि नांव दिलें तरी एवढी गोष्ट खचित आहे कीं, ही चळवळ हिंदुस्थानांतील सुशिक्षितांतील अतिश्रेष्ठ नागरिकांपासून सुरू होऊन आता ती खेड्यापाड्यांतील अतिकनिष्ठ लोकांतहि शिरली आहे. खेड्यांतील लोकांना राजकारणाचें व्याकरण सोपपत्तिक सांगतां आलें नाही तरी राजकारणाची भाषा त्यांना शुद्ध व अस्खलित बोलतां येते; व खेडेगांवांतील लोकांपासून यापलीकडे कोणी अधिक अपेक्षाहि करीत नाही. कारण ते लोक जी राजकारणांतील शुद्ध भाषा बोलतात ती अंतरंगांतील राजकीय असंतोषामुळे व क्षोभामुळेच बोलतात. इतकेंच नव्हे, तर सुशिक्षिताइतकेंच किंबहुना किंचित् अधिक प्रखरतेने ते स्वार्थत्यागाला तयार होऊं शकतात.

अशा रीतीने राजकीय चळवळ साम्राज्याच्या शेवटच्या थरापर्यंत पोंचल्यानंतर राजकीय चळवळीने तोंड फिरवून, उलटया दिशेने, ग्रामसंघटनेपासून विधायक कार्य करण्यास प्रारंभ करून, त्याच दिशेने वरपर्यंत जाऊन भिडण्याची आकांक्षा तिने धरावी यांत आश्चर्य नाही. सूरपाटीच्या खेळांत सर्वांत खालच्या कोंडींत खेळगडी गेला म्हणजे त्याच्या हाताला लोण लागतें; व मग तो उलट तोंड फिरवून क्रमाने एकेक वरची कोंडी फोडून तें लोण सुराच्या पहिल्या पाटीपर्यंत नेण्याची आकांक्षा धरतो; आणि तसें झालें म्हणजे त्या खेळांत विजय मिळाला असें मानण्यांत येतें. हा दाखला घेतला असता हिंदी राजकारणांतील यशःसिद्धीचें लोण, पहिल्या पाटींतील गडी आता शेवटच्या कोंडीपर्यंत पोंचल्याने, गड्याच्या हाताला लागलें आहे.

आणि यापुढें ग्रामसंघटना, शेतकी–सुधारणा, स्वदेशीची चळवळ, सहकारी चळवळी, समाईक भांडवलाचे उद्योग, आणि सार्वत्रिक शिक्षण अशा विधायक स्वरूपाच्या कार्यांनी तें लोण वर नेण्याची बुद्धि त्या गडयाला होत आहे. श्रीमंत राजे सांगलीकर यांनी आपल्या भाषणांत असहकारितावादी जहाल पुढारी बाबू चित्तरंजन दास यांच्या ग्रामसंघटनेच्या आकांक्षेचा उल्लेख केला त्यावरूनहि हेंच सिद्ध होतें. आणि अशा राजनिष्ठोत्तम संस्थानिकानें अशा ज्वलज्जहाल पुढाऱ्याचें नांव घेऊन ग्रामसंघटनेच्या विधायक कार्याच्या उपदेशांत त्याचा गौरवपूर्वक उल्लेख करावा, यावरूनहि विजेचीं दोन टोकें जोडण्याचा जो दाखला आम्ही वर दिला तोच फिरून सिद्ध होत नाही काय ?

असो. ग्रामसंघटनेचें कार्य मुख्यतः व उद्देशतःहि विधायक स्वरूपाचें आहे ही गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे. विध्वंसक व विधायक हीं दोनहि साधनें आपापल्या परीनें इष्ट आहेत, म्हणून तीं अभेदरूपहि आहेत ही समजूत मात्र चुकीची होईल. पण ही भोळी समजूत मुद्दाम नजरेला घालण्याचें कारण असें कीं, खेडेगांवच्या लोकांना असहकारितेच्या किंवा कायदेभंगाच्या चळवळीला ताबडतोब किंवा बेसावधपणें प्रवृत्त करणें या गोष्टीला ग्रामसंघटना असें नांव कांहीं लोकांनी दिलेलें आढळतें. हें त्यांचें कृत्य अविवेकाचें आहे. चळवळ सर्वव्यापी व्हावी म्हणून ती खेड्यांतील लोकांकडूनहि करविली पाहिजे हें म्हणणें सयुक्तिक ठरेल; व ती करणारे तसें करतातहि. पण अशा ठिकाणीं ग्रामसंघटना या नांवाचा दुरुपयोग केल्यानें जगाची दिशाभूल होते. विध्वंसक कार्य करावयाचें तर तें तसें स्पष्ट नाव देऊनच करावें. त्यांत त्यांचा हात कोण धरणार? पण मिष ग्रामसंघटनेचें आणि आमिष कायदेभंगाच्या चळवळीचें असें करण्यांत दोनहि कार्यांची हानि होते.

ही हानि जागच्या जागीं बसून केवळ विचार करणाराच्या तर लक्षांत येतेच. पण खऱ्या ग्रामसंघटनेचें कार्य जे करूं पाहतात व करूं चाहतात त्यांच्या लक्षांत ही हानि अधिक ढळढळीतपणें आल्यास नवल नाही. म्हणूनच, 'चित्रमय कृषीवला'मधील 'ग्रामसंघटनेचें कार्य' या विषयावरील आपल्या लेखमालेच्या प्रारंभींच प्रो. शंकर रामचंद्र भागवत यांनी ही गोष्ट मुद्दाम नमूद केली आहे. या संघटनेच्या कार्याच्या ध्येयासंबंधानें ते लिहितात, " गांवांतील सर्व लोक जेणेंकरून सुखांत राहतील अशा रीतीनें कामें करण्याची, व गावचा कारभार चालविण्याची, शक्ति व कार्यक्षमता गांवकऱ्यांमध्ये आणून देणें हें ग्रामसंघटनेचें ध्येय होय." पण इतकें सांगून पुढें ते म्हणतात, " गांवकरी आपल्या पायावर उभे राहिल्यावर व आपलें हिताहित कशांत आहे हें त्यांना कळूं लागल्यावर ते आपल्या पंथाकडे येतील किंवा नाही हें आधी पाहण्याचें काम ग्रामसंघटनेच्या कार्यकर्त्यांचें असता कामा नये. किंवा गांवच्या लोकांमध्ये असंतोष पसरवून देशांत क्रांति घडवून आणणें हेंहि 'ग्रामसंघटनेचें' ध्येय नाही. स्वराज्य मिळविण्यासाठी ग्रामसंघटनेची जितकी जरूरी तितकीच स्वराज्य मिळाल्यावरहि ग्रामसंघटनेची जरूरी आहे."

तात्पर्य, शेतकरी आपल्या पायावर उभा राहूं शकला म्हणजे पुढे राजकारणाच्या दृष्टीने ज्या पक्षाला मिळावेसें वाटेल त्या पक्षाला तो खुशाल मिळो. परंतु तोंपर्यंत ग्रामसंघटनेचें कार्य व खेडेगांवांतील राजकीय चळवळीचें कार्य हीं एकमेकांपासून दूर ठेवण्यांत फायदा आहे. एकाच वेळीं दोनहि कार्यें चालू राहिलीं तर काय हरकत, असें कोणीं विचारलें तर, त्याला निदान इतकें उत्तर तरी देतां येईल, व तें त्याला पटावें कीं, दोनहि चळवळी एकदम सुरू असल्या तरी त्या करणारीं माणसें वेगळीं असावीं आणि त्यांच्या हेतूबद्दल खेडेगांवच्या लोकांच्या मनांत गोंधळ माजूं नये. हल्लीच्या राजकीय स्थितींत खेडेगांवच्या लोकांचें हित सोळा आणे सिद्ध होण्यास ज्या कायद्यांची आवश्यकता आहे, ते कायदे करण्याची सत्ता अजून सर्वस्वी जनतेच्या हातीं आलेली नाही; आणि कारभाराची पद्धतहि सर्वस्वी बेजबाबदार अशीच आहे. अशा स्थितींत बीजवृक्षन्यायाने आधीं काय वाटेल तें करून सत्ता मिळवावी, कीं आधी ग्रामसंघटनेचें विधायक कार्य करावे, असला अडवणुकीचा प्रश्न उत्पन्न करून त्यावर वाद घालीत बसण्यांत अर्थ नाही.

स्वराज्याचें साधन म्हणून विध्वंसक व विधायक दोनहि प्रकारचीं कार्यें एकदम चालूं शकतात, व हल्ली तशीं चालू आहेत हें आम्ही प्रारंभीं सांगितलेंच आहे. पण प्रो. भागवत यांच्या लेखाचा पुनः एकवार उच्चार करून, व त्यांतच थोडीशी सुधारणा करून, आम्ही असें म्हणूं कीं, खेडेगांवांतून पसरलेल्या जनतेचे जे प्राणभक्षक वावरत आहेत त्यांचा परिहार करून, जे प्राणरक्षक आज थोडेंबहुत खेडेगांवांतच काम करीत आहेत त्यांना उत्तेजन देणें, हें ग्रामसंघटनेच्या कार्याचें मुख्य ध्येय असलें पाहिजे. प्रो. भागवतांनी या प्राणभक्षकांना एक्स्प्लॉइटर्स व प्राणरक्षकांना टॉइलर्स असे शब्द वापरले आहेत. पण त्याबरोबर आणखीहि एक वर्ग खेडेगांवांतून आहे. त्याला शब्दानुप्रासाच्या मोहानें लॉइटरर्स असें म्हणूं. हे लॉइटरर्स म्हणजे आळशी व स्वेच्छेनें बेकार असलेले लोक. आणि स्वराज्य

केव्हांहि मिळो, कसेंहि मिळो, तूर्त तरी या एक्स्प्लॉइटर्सपासून जनतेचा बचाव करणें, टॉइलर्सना उत्तेजन देणें व मदत करणे, आणि लॉइटरर्सना सक्तीने किंवा खुशामतीने धनोत्पादक कार्याला लावणें, या प्रकारचें ग्रामसंघटनेचें त्रिविध रूप आहे असें म्हटलें असतां तें निरपवाद व समर्पक ठरेल. तथापि असलें हें रेखीव व कातीव असें ग्रामसंघटनेचें कार्य झालें तरी तें कोणीं करावें व कसें करावें हा प्रश्न शिल्लक उरतोच. म्हणून त्या प्रश्नाचें उत्तर पुढील अंकीं देऊं.

# शिवाजीचें हस्ताक्षर

( ले. दिनकर विनायक काळे, एम. ए. )

(पूर्वीचा लेखांक ता.१४-६-३२ रोजीं प्रसिद्ध झाला.)

पहिल्या लेखांकांत दर्शविल्याप्रमाणे शिवाजीची साक्षरता सप्रमाण सिद्ध झाली. तथापि त्याचें हस्ताक्षर मिळविण्यासाठी निरनिराळ्या संशोधकांनी केलेला खटाटोप अद्यापि यशस्वी झाल्याचीं चिन्हें दिसत नाहीत. यासाठी हस्ताक्षर–संशोधनाच्या बाबतींतील प्रयत्नांचा व निष्कर्षांचा इतिहास थोडा पाहणें जरूर आहे. 'पुरातत्त्वभूषण' कै. राजवाडे यांनी इ. स. १९०० मध्येच आपल्या साधनांच्या चौथ्या खंडाच्या प्रस्तावनेंत शिवाजीच्या विद्यासंपन्नतेच्या बाबतींत ग्रँट डफचीं विधानें सपशेल खोटीं ठरविलीं. त्या वेळीं त्यांना हस्ताक्षराचा एखादा नमुना उपलब्ध झाला होता असें दिसत नाही. नाही तर त्यांनी तसा उल्लेख खास केला असता.

## साक्षरतेचें प्रत्यक्ष प्रमाण

यानंतर चारपांच वर्षांनी 'सरस्वतीमंदिर' त्रैमासिकांत त्यांनी 'शिवाजीची साक्षरता' या मथळ्याचा लेख लिहिला. त्या वेळीं मात्र साक्षरतेचें प्रत्यक्ष प्रमाण म्हणून 'एका महाराष्ट्रेतिहासाभिमानी प्रभू मित्राने बडोद्याच्या चिटणिसांच्या दप्तरांतून' एका 'मूळ पत्राची नक्कल' अर्पण केली होती ती त्यांनी प्रस्तुत लेखांत सादर केली. हें पत्र शि.च.कार्यालयाच्या पत्रसारसंग्रहांत ले. १९०१ म्हणून छापलें आहे. हें पत्र, विजापूरचा बहलोलखान पठाण याच्या गोटांतून मालोजी राजे घोरपडे ह्यांस फोडण्याकरिता शिवाजीने लिहिलें असून त्या दृष्टीने फार महत्त्वाचें आहे. त्या पत्राच्या शेवटीं 'बहुत काय लिहिणें' एवढीं अक्षरें खुद्द खाशांचीं म्हणजे शिवाजीराजांचीं असलीं पाहिजेत असा राजवाड्यांचा तर्क आहे. राजारामापासून पुढच्या छत्रपतींचीं अस्सल पत्रें त्यांच्या पाहण्यांत आलीं होतीं. त्यांवरून शेवट म्हणजे पत्राची समाप्ति खाशांच्या हातची असते असा त्यांनी साधार निष्कर्ष काढून शिवाजीच्या पत्राकडे त्यांनी तो लाविला. त्याबद्दल स्पष्टपणें नकार देण्याइतपत पुरावा अद्यापि जमा झालेला नाही. परंतु प्रस्तुत पत्राचें अस्सलहि आजपर्यंत आपल्यापुढे आलेलें नाही, यामुळे त्यांतील शिवाजीचें हस्ताक्षर संशोधकांना अजून दिसलेलें नाही.

ही रुखरुख राजवाड्यांच्या मनाला शेवटपर्यंत लागलेली होती. आणि जेव्हा जेव्हा संधि आली तेव्हा त्यांनी शिवाजीचें हस्ताक्षर पाहण्याची उत्सुकता दाखविली. ता १३ फेब्रु.१९१२च्या केसरीमध्ये श्री. आठल्ये यांनी 'वडिलांचे सेवेसीं' हें शिवाजीचें सुप्रसिद्ध पत्र [ पत्रसारसंग्रह ले. १०४६ ] प्रसिद्ध करून सावताच्या तहाबद्दल चर्चा केली. तें पत्र राजवाड्यांच्या नजरेस येताच लगोलग पुढच्या २० फेब्रु. च्या केसरींत राजवाड्यांनी आठल्यांना त्याच्याबद्दल सवाल केला. आठल्यांनी आपल्याला अस्सल पत्र उपलब्ध झालें असल्याबद्दल जाहीर केल्यामुळे राजवाड्यांनी त्या पत्राची प्रतिमा छापण्याची सूचना केली. त्यांच्या स्वभावाप्रमाणें त्या कामा येणारा सर्व खर्चहि ते देण्यास तयार होते. कारण हें पत्र जर अस्सल असल तर त्यांतील समाप्तीचीं 'हे विज्ञापना' हीं पांच अक्षरें शिवाजीच्या हातचीं असलीं पाहिजेत असें त्यांचें स्पष्ट व साधार मत होतें. त्याहि बाबतींत त्यांची आणि सर्वांचीच निराशा झाली. एवढ्या महत्त्वाच्या या पत्राचेंहि अस्सल आजपर्यंत कोणाच्याच नजरेस पडलें नाही.

## अस्सल पत्र ?

पुढच्याच वर्षी इतिहाससंग्रहामध्यें ऐतिहासिक स्फुटलेख भाग ४ पृ. ३–९ यांत श्री. य. रा. गुप्ते यांनी थोरल्या शिवाजीचें एक अस्सल पत्र, त्याच्या छायाचित्रासह छापलें. [ पत्रसारसंग्रह ले. २३३२ ] शिवाजीनें हे पत्र यंकोजी राजे यांस तंजावरपैकीं अर्धा वांटा मागण्याकरिता लिहिलें असल्यामुळे त्यांतील समाप्ति 'बहुत काय लिहिणें' ही शिवाजीच्या हातची असली पाहिजे अशी विचारसरणी होती. ही

गृहीत धरण्याच्या विरुद्ध विशेष प्रबळ पुरावा नसल्यामुळे आज त्या पत्राचें छायाचित्र पाहाणारास शिवाजीचें म्हणून समजलें जाणारें हस्ताक्षर समाप्तीच्या अष्टाक्षरांत पाहावयास मिळण्याचें साधन सुदैवानें उपलब्ध आहे. आज पत्राचें मूळ अस्सल सहज उपलब्ध नाही. सातारा येथे पारसनीस म्यूझिअममध्ये तें आहे असें समजतें. छापलेलें छायाचित्र मुळापेक्षा बरेंच लहान आणि शेवटीं अस्पष्ट असल्यामुळे नव्या व समप्रमाण अशा छायाचित्राची अपेक्षा अर्थातच आहे. श्री. गुप्ते यांनी एकदा सदर पत्र भा. इ. सं. मंडळांत चर्चेकरिता आणिलें होतें. त्या वेळीं पुढे मांडलेलें पत्र ही बहुशः समकालीन नक्कल असावी असें मानण्याकडे मंडळींचा कल झाला होता. शिवाय त्यांतील सर्वच अक्षरें एकटांकी वाटलीं. त्यामुळेहि शिवाजीचें हस्ताक्षर अस्सल पत्रांत असणें अपरिहार्य असलें तथापि ह्या नकलेंत तें संभवनीय दिसलें नाही.

१९१३ त प्रसिद्ध झालेल्या वाड यांच्या सनदा पत्रांत पिराजीराव राजे घाटगे सर्जेराव यांस दिलेलें महत्त्वाचें राजपत्र छापलेलें आहे.(पृ.११९–२०) त्यांतहि समाप्ति ' बहुत काय लिहिणें जाणिजे ' अशी केलेली आहे. तीहि महाराजांच्या हातची असावी असा तर्क संभवतो. हेंहि पत्र प्रत्यक्ष किंवा छायाचित्ररूपानें पाहावयास मिळाल्यास या प्रश्नावर अधिक प्रकाश पडण्यासारखा आहे. त्यांतून सनदापत्रांतील सामान्यतः सदोष छपाई लक्षांत घेतां ह्या पत्राच्या मजकुरांतील शब्दांबद्दल तितकी खात्रीहि देतां येत नाही.

हीं पत्रें प्रसिद्ध होण्यापूर्वी एकदोन वर्षे व प्रसिद्ध झाल्यानंतर सुमारें सातआठ वर्षेपर्यंत महाराजांच्या हस्ताक्षरशोधनाचा प्रश्न बहुतांशीं राजवाडे यांनी सुचविलेल्या सिद्धांताच्या आसपासच घोटाळत होता. परंतु इ. स. १९२१ मध्ये ह्या सर्व प्रश्नांचा फिरून एकवार श्री. आबा चांदोरकर यांनी खल केला. शके१८४३ च्या मंडळाच्या वाढदिवशीं 'श्रीशिवरायांची साक्षरता' या नांवाचा निबंध त्यांनी वाचला. त्यांत पूर्वोक्त सरस्वतीमंदिरांतील राजवाडे यांच्या सिद्धांतांचें पुनरुच्चारण करून महाराजांच्या साक्षरतेबद्दल त्यांच्या लक्षांत आलेलें असें नवें व त्यांच्या मतें स्वतंत्र व महत्त्वाच असें प्रमाण पुढें मांडलें.

राजवाड्यांच्या म्हणण्याप्रमाणे 'बहुत काय लिहिणें ' ' हे विज्ञापना ' अशा केवळ अल्पाक्षरी समाप्त्याच शिवाजीच्या हातच्या असाव्यात असें ठरलें होतें. परंतु एखाद्या व्यवहारांत दिव्यानें निकाल करणें इष्ट ठरल्यावर तें दिव्य होण्यासाठी लागणारी परवानगी छत्रपतींनी हातरोखा लिहून दिली पाहिजे असा दंडक असल्याचें श्री. चांदोरकर यांच्या लक्षांत आलें. ' वतनपत्रें व निवाडपत्रें ' या पुस्तकांत पृ. २४ वर शिवाजीमहाराजांचा एक हातरोखा उल्लेखरूपानें आला आहे. त्यांतहि खासदस्तक म्हणजे छत्रपतींच्या हातची निशाणी असली पाहिजे एवढें श्री. चांदोरकर यांनी दिलेल्या आधारावरून निश्चितपणें सिद्ध होईल. यापलीकडे हे हातरोखे सर्वच्या सर्व अथपासून इतिपर्यंत एकूणएक अक्षरें छत्रपतींच्या हातानें लिहिलीं जात हें त्यांचें विधान त्यांच्याच आधारांनी लटकें पडण्यासारखें आहे. परंतु असे अस्सल हातरोखे पाहावयास मिळेपर्यंत शिवाजीच्या साक्षरतेचा एक पुरावा यापलीकडे त्यांचा फायदा घेतां येण्यासारखा नाही.

### निकाल अस्सल पत्रावरूनच लागेल

१९२१ पर्यंत साक्षरताप्रकरणींच अधिक पुरावे मांडण्यांत आले त्यांचा इतिहास हा असा आहे. वास्तविक केवळ तर्कारूढ होऊन ह्या प्रश्नाचा निकाल लागणें अशक्यच होतें. शिवाजीचीं अस्सल पत्रें मिळतील तेवढीं एकत्र घेऊन, पाहून, तपासून मग तुलनात्मक दृष्टीनें हस्ताक्षराबद्दल कांही विधान केलें तरच त्याला कांही वजन येणारें होतें. शिवाजीमहाराजांचीं कांही अस्सल पत्रें भारत इतिहाससंशोधक मंडळांत आहेत. त्यांवरून विचार कांहीसा झाला आहे व होत आहे. त्याचें दिग्दर्शन येथे करणें अर्थात् क्रमप्राप्त आहे. त्याच अनुषंगानें रा. सा. गो. स. सरदेसाई यांच्या अगदी अलीकडील तर्काबद्दलहि थोडेसें लिहावें लागेल.

आजपर्यंत शिवाजीच्या नांवानें सुटलेलीं अशीं पत्रें सुमारें दीडशेंपर्यंत मिळालीं असून त्यांपैकीं सुमारें ११५ इतकीं १९३० मध्ये छापलेल्या पत्रसारसंग्रहांत समाविष्ट झालीं आहेत. राजवाडेप्रभृतींना नकला वगैरे मिळाल्या त्या त्यांनी छापून काढल्या. या सर्व पत्रांचीं अस्सल मूळें पाहावयास मिळालीं नाहीत. छायाचित्ररूपानें आणि प्रत्यक्ष अशीं त्यांपैकीं सुमारें तीसचाळीस पत्रें, किंवा कांहीशीं अधिक अशीं आजच्या अभ्यासकांना पाहावयास मिळालीं आहेत असें म्हणण्यास हरकत नाही. एखादें पत्र दाखल करावयास मिळालें तर त्याबद्दल दाखल करणारास धन्यता वाटावी आणि इतरांस कौतुक वाटावें ही परिस्थिति अजूनहि बहुतांशीं कायम असल्यास नवल नाही. तेव्हा एखादें अस्सल पत्र मिळालें कीं त्यांतील शिवाजीच्या हस्ताक्षरांचें नक्की ठिकाण दाखविण्यास झटावें अशी सर्वांचीच तीव्र इच्छा असल्यामुळे त्या बाबतींत अनेकांचे अनेक तर्क होते. एखादा तर्क उत्साहानें पुढे मांडावा पण अनेक दृष्टींनी तो

निराधार ठरावा असाच क्रम सारखा चालत असला तरी इतिहास म्हणून ह्याहि गोष्टीचा परामर्ष घेतलाच पाहिजे.

मराठींतील अस्सल पत्र हें सामान्यतः कारकूनच लिहितात. परंतु हल्लीप्रमाणें त्या वेळीं स्वतःचें नांव लिहून सही करण्याची पद्धत नसल्यामुळे खाशांची निशाणी (नामयुक्त सही नव्हे) स्वहस्ताने करण्याचीं एकदोन ठिकाणें बहुतांशीं ठरलेलीं असत. बहुधा सर्व मजकूर संपल्यावर 'बहुत काय लिहिणें,' 'हे विनंति' अशासारखे किंवा त्या वेळच्या प्रघातानुरूप अन्य शब्द खुद्द खाशांनी लिहावे अशी परंपरा असे. कित्येक वेळां श्रीकारापुढील दैवतांचीं नांवें खास स्वहस्ताने लिहीत. एवढी निशाणी झाली म्हणजे त्या पत्रांवर सही (हल्लीच्याहि अर्थाने) झाली असें समजण्यांत येई. शिवाजीसारखे राजेदेखील क्वचित् एखादें अत्यंत महत्त्वाचें पत्र सर्वच्या सर्वच स्वहस्ताने लिहिणार नाहीत असें नाही. परंतु तसें पत्र सहज उपलब्ध होण्यासारखें नसल्यामुळे शिवाजीच्या म्हणून उपलब्ध झालेल्या पत्रांत चालू हस्ताक्षराव्यतिरिक्त निराळें असें जें हस्ताक्षर दिसेल तें शिवाजीचें असें मानण्याकडे सहजच कल होई. अशा रीतीने शिवाजीचीं म्हणून जीं पत्रें उपलब्ध आहेत त्यांतील समाप्त्या व श्रीकाराजवळील दैवतांचीं नांवें ही बाब अभ्यसनीय होऊन बसली.

### शिवाजीच्या पत्रांच्या समाप्त्या

राज्याभिषेकाच्या पूर्वीच्या पत्रांत पत्राचे समाप्तीचे ठिकाणीं मोर्तबसूद किंवा मोर्तबसुद असे शब्द 'मर्यादेयं विराजते' या समानार्थक मोर्तबाचे पूर्वी येतात ते मूळ पत्रांतील अक्षरापेक्षां निराळ्या अक्षरांत येतात. राज्याभिषेकाच्या पूर्वी त्यानंतर अमलांत आलेली अष्टप्रधानांची पद्धति व जबाबदारी चालू नसली तर हे शब्द खुद्द शिवाजीने लिहिणें संभवतें असें कोणीं म्हणणें शक्य आहे. परंतु पत्रें प्रत्यक्ष ताडून पाहाता निरनिराळ्या पत्रांवरील मोर्तबसूद हीं अक्षरें अनेक वळणांचीं असल्याचें दिसून येतें. फक्त वळण निराळें आहे एवढेंच नव्हे तर कित्येक ठिकाणीं 'मोर्तब सूद' तर इतर ठिकाणीं 'मोर्तब सुदु' असा लेखनाचाहि ठळक फरक दिसून येतो. यावरून हीं अक्षरें शिवाजी लिहीत नसला पाहिजे. एकच मनुष्य इतक्या भिन्न वळणाचीं व एकाच स्वरूपाचीं अक्षरें भिन्न भिन्न शुद्धलेखनाचीं काढणें शक्य नाही. यावरून मोर्तबसूद ज्या पत्रांवर लिहिलें जातें अशा, म्हणजे इनाम, देणगी, ताकीद वगैरे राजकीय हुकूम अशा स्वरूपाचीं पत्रें शिवाजीकडे निशाणीकरिता जात नसावीं असाहि प्रकार असण्याचा संभव आहे. राज्याभिषेकाच्या वेळीं सर्व राज्यकारभाराची घटना निश्चित करण्यांत आली. त्या वेळचा कोणी कोणतीं कामें करावीं, कोणी कोणतीं पत्रें लिहावीं अशा तऱ्हेचा जाबता निदान तीनचार ठिकाणीं छापलेला आहे. काव्येतिहाससंग्रह-पत्रें, यादी, सनदापत्रें, राजवाडे खंड ६ वगैरे यांवरूनहि ह्याच बोध होतो. महाराजांच्या कचेरीकडून सुटणारीं पत्रें निरनिराळ्या प्रधानांच्या जबाबदारीने सुटत व त्यांवर त्यांचीं स्वतंत्र चिन्हें किंवा निशाण्या केल्या जात. फक्त कांहीं नाजूक राजकारणीं पत्रें व कित्येक खासदस्तकी म्हणजे खाशांच्या निशाणीचे हातरोखे एवढेच काय ते छत्रपतींच्या निशाणीनें तयार होत असें वाटतें. तेव्हा अशा खासदस्तकीपत्रांचे येथे सांगितलेले दोन किंवा अशांसारखे असतील ते इतर प्रकार सांपडले तरच महाराजांचें हस्ताक्षर पाहावयास मिळणार हें उघड आहे. या बाबतींतील कै. राजवाडे यांचे तर्क व तीं तीं अस्सल पत्रें मिळण्याचे कामीं आलेलें अपयश यांचा पाढा पूर्वी वाचलाच आहे.

### श्रीकाराजवळील दैवतनाम

मोर्तबसूदप्रमाणेच श्रीकाराजवळ असलेलीं अक्षरें शिवाजीमहाराजांचीं असावीं असाहि एक दुसरा प्रबळ ग्रह कित्येक संशोधकांचा झाला होता. परंतु त्याहि बाबतींत खरेपणा मानतां येणार नाही. श्रीकाराजवळ कुलदेवताचें नांव कित्येक खासे नियमाने लिहितांना आढळतात. हा प्रकार पेशवाईंतील पत्रांतील आहे. शिवाजीचीं जीं एकदोन पत्रें 'श्री'काराजवळ महादेव किंवा 'महादेव तुळजा भवानी' अशीं अक्षरें असलेलीं आढळलीं त्या पत्रांवरून हीं देवाचीं नांवें पत्रांतील मजकुरांतीलच आहेत असें सिद्ध करून देणें शक्य आहे. जुन्या पत्रांची लेखनपद्धति येथे थोडी स्पष्ट करून सांगितली म्हणजे हा मुद्दा उघड होईल. पत्रांतील मजकुरांत कोणा देवाबद्दल किंवा आदरणीय व्यक्तीबद्दलहि उल्लेख आला तर त्या देवाचें अगर त्या व्यक्तीचें नांव मजकुरांत न लिहितां त्या नांवाची जागा मोकळी सोडून तेवढेंच नांव सर्व मजकुराच्या वरच, देवाचें असेल तर श्रीकाराला जोडून लिहिण्याचा प्रघात होता. शिवाजीच्या ह्या नमुन्याच्या आमच्या पाहण्यांत आलेल्या सर्वच पत्रांत हीं देवांचीं नांवें मजकुरांत सहज बसतात. यामुळे शिवाजीचें हस्ताक्षर तेथेहि पाहण्यास मिळण्याची आशा सोडलीच पाहिजे अशी परिस्थिति आहे.

### रावसाहेब सरदेसायांचा लेखनालंकार

वरील विवेचनावरून रा. सा. सरदेसायांचा पत्रांच्या शेवटील 'लेखनालंकार' अशाच कारणा-

करिता प्रस्तुत शोधाचे दृष्टीने कसा निकामी ठरतो हें ध्यानांत येईल. ' लेखनालंकार ' म्हणजे लेखन पुरें झालें ( अलंकृ यावरून ) याचें चिन्ह-लेखनसीमा. ' मोर्तबसूद ' हा आपल्या परिचयाचा जुनाच शब्द होय. राज्याभिषेकानंतर म्हणजे फारसीचे शब्द रद्द करून संस्कृत प्रघात रूढ झाले त्या वेळीं हा लेखनालंकार म्हणजे मोर्तबसूदचें संस्कृत स्वरूप चालू झालें. यामध्ये शिवाजीचें हस्ताक्षर असण्याच्या शक्यते-बद्दल व राजकारणी पत्रांवरील याच्या उपयुक्तते-बद्दल मागे लिहिलें आहेच. तथापि मंडळांत जेव्हा या तर्काबद्दल चर्चा झाली तेव्हा आणखीहि प्रत्यक्ष प्रमाणें दाखविलीं गेलीं तीं येथे विस्तारानें सांगून ठेविलीं पाहिजेत.

प्रस्तुत प्रश्नाचा विचार करण्यासाठी रा. सा. सरदेसाई यांच्या तर्कानुरोधाने खालील मुद्दे काढूं.

शिवाजी ' लेखनालंकार ' हीं अक्षरें स्वतः लिहीत असेल तर त्याच न्यायाने संभाजी, राजाराम, शाहू हे सर्वच लिहीत असले पाहिजेत असें मानणें भाग पडतें. पण तसें दिसत नाही. इतर कोणाचें नसलें तरी शाहूचें हस्ताक्षर आपल्या सर्वांच्या डोळ्यांत ढळढळीत भरलेलें आहे. शाहूकालीन पत्रांवरील ' लेखनालंकार ' शाहूचे हातचा नाही हें दोनहि अक्षरें ताडून पाहतांच दिसेल. संभाजीचे कारकीर्दीतीलहि कागद अस्सल उपलब्ध आहेत. विशेषतः प्रो. पोतदार यांस उपलब्ध झालेलें संभाजीचें एक संस्कृत दानपत्र आहे त्यावर 'लेखनालंकार' केलेला असून तो त्या वेळचे अमात्य रा. रघुनाथ नारायण हणमंते यांनी केला आहे असा स्पष्ट उल्लेख संस्कृतमध्ये त्याच दानपत्रांत व लेखनालंकार ह्या शब्दाचे लगेच पूर्वी केलेला आहे. हा लेखनालंकार व रा. सा. सरदेसाई यांचे पत्रांतील लेखनालंकार जुळता आहे. तेव्हा तोहि अमात्यांच्या हातचाच आहे ह्यांत शंका नाही. ज्या अर्थी शाहू, संभाजी यांचे पत्रांवरील लेखनालंकार हे प्रत्यक्ष पाहून आणि प्रत्यक्ष उल्लेखामुळे छत्रपतींचे नाहीत असें साधार सिद्ध होतें, त्या अर्थी त्याच न्यायाने शिवाजीच्या पत्रावरील लेखनालंकार हा शिवाजीच्या हातचा नाहीच हेंहि सप्रमाण व साधार सिद्ध होतें असेंच म्हणणें प्राप्त आहे.

### शिवाजीचें हस्ताक्षर आज उपलब्ध नाही

ह्या सर्व म्हणण्याचें तात्पर्य हेंच कीं, शिवाजीचें हस्ताक्षर कोठें तरी असलेंच पाहिजे ही गोष्ट अनेक प्रमाणांनी सिद्ध करून देण्यासारखी व कोणालाहि पटणारी अशी असली तथापि तें प्रत्यक्ष पाहण्याचें भाग्य आजपर्यंत तरी प्रस्तुत संशोधकां-पैकीं कोणाला लाभलेलें नाही हें कबूल करण्या-शिवाय गत्यंतर नाही, आणि याबद्दल आश्चर्यहि वाटण्याचें कारण नाही. कारण दादोजी कोंडदेवा-सारखा फर्डा लेखक कीं, ज्याच्या साक्षरतेबद्दल कोणालाच शंका असूं नये, त्याचेंहि हस्ताक्षर निश्च-यानें कोणतें हें आपल्याला सांगतां येत नाहीच.

वर उल्लेख केले त्याशिवाय आणखी एके ठिकाणीं म्हणजे धुळ्यास श्री. शंकर श्रीकृष्ण देव ह्यांचेहि प्रयत्न ह्या दृष्टीने चाललेले आहेत. त्यांचे मताने कांही अक्षरें शिवाजीचीं म्हणून ते समजत आहेत. ह्याचा अर्थ एवढाच कीं, प्रयत्न सर्व बाजूंनी व कसोशीने चालू आहेत. कदाचित् आपल्या-जवळ कागद आहेत, त्यांतहि आपल्या सर्वांना आशा वाटते त्याप्रमाणें,महाराजांचें हस्ताक्षर असेलहि. परंतु हें तें हस्ताक्षर म्हणून बिनधोकपणें बोट ठेवून दाखविण्यासाठी पत्रांचा संग्रह, परीक्षण, निरीक्षण व तुलना करून मग तज्ज्ञांनी ह्या बाबतींत कोणता तो निर्णय दिला पाहिजे.

### मंडळाकडे अस्सल पत्रें पाठवा

भा. इ. सं. मंडळासारख्या संस्थांनी शिवाजी-महाराजासारख्यांच्या हस्ताक्षराबद्दल जनतेची अपेक्षा पूर्ण करावयाची तर सर्वसाधनसंपन्न सद्गृहस्थांनी मंडळाला आस्थेने मदत केली पाहिजे. जेथे जेथे अस्सल पत्रें असतील तेथे तेथे तीं मंडळांतील अभ्यासकांना मिळवून देण्याची खटपट झाली पाहिजे. पत्रें एकदां पाहून झालीं म्हणजे त्यांचें काम संपतें असें नाही. हस्ताक्षरें, लेखनपद्धति, अक्षररचना इत्यादि भिन्नभिन्न शास्त्रांच्या कक्षेंत येणाऱ्या गोष्टींचा अभ्यास पौनःपुन्येन करावा तेव्हाच कांही गमकें सुचतात व निष्कर्ष काढतां येतात. तेव्हा अशी साधनसंपत्ति अधिकाअधिक उपलब्ध होईल आणि ती आस्थेने मंडळाला देण्यांत येईल तेव्हाच अशा कामीं लोकांच्या अपेक्षेप्रमाणे सेवा करतां येईल. तरी सर्वांना शक्य तेव्हा अस्सल कागदपत्र मंडळाकडे पाठविणें इष्ट आहे एवढें सुचवून ठेवतों.

# दलित वर्गाच्या चळवळीचें सामाजिक व राजकीय स्वरूप

( ले. आत्माराम रावजी भट, एम्. कॉम. मुंबई )

## पूर्वार्ध

या महिन्याच्या ता. २५-२६ जून रोजीं, अखिल हिंदुस्थानांतील दलित वर्गाची परिषद त्या समाजाचे प्रसिद्ध पुढारी रा. ब. एम. सी. राजा यांच्या अध्यक्षतेखाली भरण्याचें निश्चित झालें आहे. सांप्रत दलित वर्गाच्या पुढाऱ्यांत मतदारसंघाच्या प्रश्नावर दोन तट पडलेले आहेत. मुंबईस भरणाऱ्या परिषदेंत दलितवर्गाकरितां स्वतंत्र मतदारसंघ असावे कीं संयुक्त मतदारसंघांत त्यांच्याकरितां राखीव जागा असाव्या या महत्त्वाच्या प्रश्नाचा निर्णय होणार आहे. अशा वेळीं या प्रश्नाचें स्वरूप जनतेपुढें यावें म्हणून या प्रश्नाचा येथे विचार करण्याचें योजलें आहे.

### दलित कोण ?

या प्रश्नाचा विचार करतांना प्रथमतःच प्रश्न असा उद्भवतो कीं दलित असें समजावें तरी कोणाला व दलित वर्गाची संख्या तरी केवढी आहे ? दलित वर्ग हा हिंदु समाजाचा एक भाग आहे व 'दलित' या शब्दावरून या वर्गाच्या प्रचलित सामाजिक दर्जाची कल्पना येण्यासारखी आहे. १९१६ सालीं सर माणेकजी दादाभाई यांनी दलित वर्गाची पाहणी करावी अशा आशयाचा ठराव इम्पीरिअल लेजिस्लेटिव्ह कौन्सिलांत मांडला होता. त्या ठरावावरील वादविवादाच्या वेळीं या देशांतील मूळच्या लोकांच्या टोळ्या, गुन्हेगार व उनाड जाती आणि अस्पृश्य वर्ग या सर्वांचा समावेश पाहणीच्या कामाकरितां दलित वर्गात करावा असें सुचविण्यांत आलें होतें. त्या वेळीं या प्रश्नाकडे केवळ सामाजिक दृष्टीनेंच पाहण्यांत येत असल्यामुळे दलित वर्गात कोणाचा समावेश केला जातो याबद्दल कोणीं फारशी चर्चा केली नाही. परंतु ज्या वेळीं या प्रश्नाला राजकीय स्वरूप येऊन दलित वर्गाचा प्रतिनिधि लोकसभेंत असावा किंवा नाहीं, दलित वर्गाला लोकसंख्येच्या मानानें किती प्रमाणांत मताधिकार असावा वगैरे प्रश्न विचारार्थ येऊं लागले. त्या वेळीं दलितवर्गात कोणत्या जातींचे लोक येतात या गोष्टीकडे लोकांचें व सरकारचें अधिक लक्ष गेलें.

मॉंटफर्ड सुधारणांच्या वेळीं साऊथबरो मतदान-कमिटीने अस्पृश्य समजल्या जाणाऱ्या जाती दलित वर्गात मोडतात असें ठरविलें. सायमन कमिशनाने ज्यांच्या स्पर्शाने अगर जे लोक विशिष्ट मर्यादेच्या आंत आले असतां हिंदु लोक विटाळ झाला असें मानतात त्यांची गणना दलितवर्गात करावी अशी सूचना केली. सायमन कमिशनशीं सहकार्य करण्याकरितां नेमलेल्या नायर कमिटीनें दलितवर्गात फक्त अस्पृश्य समजल्या जाणाऱ्या लोकांचीच गणना केली, आणि अगदी अलीकडे लॉर्ड लोथिअन यांच्या अध्यक्षतेखाली नेमलेल्या मतदान कमिटीनेहि दलितवर्गात फक्त अस्पृश्यांचाच समावेश केला. अर्थातच आता दलितवर्ग व अस्पृश्य वर्ग हे शब्दप्रयोग समानार्थी झाले आहेत. यानन्तर अस्पृश्य कोणाला समजावें असा प्रश्न उद्भूत झाल्यास त्याचें थोडक्यांत परंतु निर्णायक उत्तर सर्वसाधारणपणें असें देतां येईल कीं ज्यांना चातुर्वर्णीय हिंदूप्रमाणें देवालयांत देवदर्शनाकरितां जातां येत नाही अगर ज्यांचा स्पर्श झाला असता अगर विशिष्ट अंतराच्या आंत जे लोक आले असता चातुर्वर्णीय हिंदु स्वतःला विटाळ झाला असें मानतात त्यांना अस्पृश्य समजावें. अस्पृश्य गणल्या जाणाऱ्या लोकांची संख्या हिंदुस्थानांतील बहुतेक प्रांतांत कमीअधिक प्रमाणांत आहे व आजपर्यंत निरनिराळ्या वेळीं त्यांच्या संख्येची निरनिराळी मोजदाद अगर अंदाज प्रसिद्ध झाले आहेत. यापैकीं कांही आंकडे पुढे दिले आहेत.

| | | | |
|---|---|---|---|
| साऊथबरो मतदान कमिटी | १९१९ | ४२२ | लक्ष |
| शिरगणति | १९२१ | ४३३ | ,, |
| मुडिमन कमिटी | १९२४ | ४३३ | ,, |
| हर्टाग कमिटी | १९२८ | २९७ | ,, |
| सायमन कमिशन | १९२९ | ४३६ | ,, |
| नायर कमिटी | १९२९ | ४४५ | ,, |
| लोथियन कमिटी | १९३२ | ३५० | ,, |

वरील आंकड्यांचा विचार करतां ब्रिटिश हिंदुस्थानांत सुमारें सवाचार कोटी अस्पृश्य गणले गेलेले लोक आहेत असें धरून चालण्यास हरकत नाही.

### अस्पृश्यांचा सामाजिक दर्जा

हिंदु समाज शतकानुशतकें अस्पृश्यता पाळीत आला आहे. परंतु अस्पृश्यांचा प्रश्न आज ज्या स्वरूपांत आपणापुढे उभा आहे त्या स्वरूपांत नवधर्मविचारांच्या लाटा उत्पन्न होईपर्यंत तो कधींहि पुढे आला नाही. याचें कारण असें दिसतें कीं त्या काळच्या सामाजिक व्यवस्थेच्या

कल्पना सध्यापेक्षां निराळ्या होत्या. देव आपल्या भक्तांमध्ये उच्चनीच भाव ठेवीत नाही अशी घोषणा वेळोवेळीं साधुसंत करीत आले आहेत; खुद्द अस्पृश्यांतहि महाराष्ट्रांत चोखामेळा व रोहिदास, औधमध्ये रविदास, बंगालमध्ये ठाकूर, तामील नाडूंत कपिलार यांच्यासारखे अनेक संतकवि निर्माण झाले व त्यांनी रचिलेलीं भक्तिपूर्ण कवनें भक्तिमार्गी लोकांनी कधींहि त्याज्य मानलीं नाहीत. रामानुजाचार्यांनी कांही अस्पृश्यांना आपले शिष्य बनविल्याचें प्रसिद्धच आहे. ग्रामव्यवस्थेंतहि अस्पृश्यांना निश्चित असें स्थान होतें. तसेंच हिंदुपदपादशाहींत महार लोकांना सन्यांत शिरकाव होता व महारांची छावणी पेशव्यांच्या छावणीनजिक असे या गोष्टीची साक्ष इतिहास देत आहे. परंतु या गोष्टी खऱ्या असल्या तरी त्या काळीं अस्पृश्यांचा दर्जा कमी लेखण्यात येत होता व जे लोक रूढीच्या मर्यादा सोडून पुढे जात त्यांचा सामाजिक छळ करण्यांत येत असे या गोष्टी दृष्टीआड करून चालणार नाही.

कालमानाबरोबर सामाजिक विचारपरंपरा बदलूं लागणें साहजिक असतें. पाश्चिमात्य लोकांचे पाय या देशाला लागून त्यांचे बूड येथे स्थिर झाल्यावर ख्रिस्ती धर्मोपदेशकांनी आपल्या कळपांत परधर्मीयांना सामील करून घेण्याचा चंग बांधला व त्यांना अस्पृश्य समाज हें चांगलेंच क्षेत्र मिळालें. अस्पृश्य मनुष्य ख्रिस्ती बनतांच स्पृश्य बनतो हा जादूचा खेळ त्यांनी करून दाखविण्यास प्रारंभ केला. परंतु ख्रिस्ती लोकांच्या या कारवाईला हिंदुधर्मीयांमध्येच जे नवधर्ममतवादी लोक निघाले त्यांनी अस्पृश्यांच्या समाजसुधारणेचा प्रश्न हातीं घेतल्यामुळे पायबंद बसला. सत्य समाज, आर्य समाज, ब्रम्हो समाज, प्रार्थना समाज यांच्या कार्यनिष्ठ अनुयायांनी अस्पृश्यता नष्ट करण्याचा सक्रिय प्रयत्न केला. परंतु नवधर्ममतवाद्यांबद्दल हिंदु समाजांतील बहुसंख्य लोकांना फारसा आदर नसल्यामुळे अस्पृश्यतानिवारणाचे कार्याला जितक्या जोराचा पाठिंबा मिळावयास पाहिजे होता तितका मिळाला नाही. एवढी गोष्ट मात्र खरी कीं या प्रयत्नामुळे सामाजिक समतेच्या कल्पना समाजांत दृढमूल होत गेल्या व श्री. विठ्ठल रामजी शिंदे यांच्या सारख्यांच्या प्रयत्नांनी अस्पृश्यतानिवारणाच्या विधायक कार्याची दिशा लोकांना दाखवून दिली.

### अस्पृश्यतानिवारणाचे प्रयत्न

परंतु बहुजनसमाज अस्पृश्यतानिवाणाच्या कार्याकडे सहानुभूतीने पाहूं लागण्याकरता हिंदु-समाजाच्या विश्वासास पात्र झालेल्या अशा स्वार्थत्यागी, धडाडीच्या व सनातनी पुढाऱ्यांची या कार्यास सहानुभूति मिळणें आवश्यक होतें. व पुढें ती तशी मिळालीहि. लोकमान्य टिळकांनी अस्पृश्यतानिवारणाच्या कार्याला पाठिंबा देऊन प्रत्यक्ष परमेश्वराने जर अस्पृश्यता मानली पाहिजे असें सांगितलें तर मी त्या परमेश्वरास अस्पृश्य मानीन असे उद्गार काढले. महात्मा गांधी यांनी आपल्या चतुःसूत्री विधायक कार्यक्रमांत अस्पृश्यतानिवारणाच्या कार्याचा समावेश केला. आणि पंडित मदन मोहन मालवीय यांच्यासारख्या सनातनी तपोधनानें अस्पृश्यतानिवारणाचा प्रश्न उचलून धरला. उपरिनिर्दिष्ट तीन व्यक्ती हिंदु समाजाला विशेष आदरणीय असल्याने त्यांच्या मताचा हिंदुसमाजांतील बहुसंख्य लोकांवर इष्ट असा परिणाम झाला. जबलपूर येथें १९२८ च्या एप्रिलमध्ये श्री. न. चिं. केळकर यांच्या अध्यक्षतेखाली भरलेल्या हिंदु अ. भा. महासभेच्या अधिवेशनांत "अस्पृश्यांना सार्वजनिक शाळा, पाणवठे, सभागृहें व रस्ते, यांचा उपयोग करण्याचा हक्क स्पृश्य हिंदूंइतकाच आहे; सार्वजनिक देवालयांत स्पृश्य हिंदूंप्रमाणेच देवदर्शनाचा अधिकार आहे; पुरोहित, नापित व परीट यांनी स्पृश्यांप्रमाणेंच अस्पृश्यांचेंहि काम करावें; सर्व हिंदूंचा सामाजिक व राजकीय दर्जा सारखाच आहे; म्युनिसिपल बोर्डांनी अस्पृश्यांना विशेषतः झाडूवाल्यांना चांगल्या जागा राहण्याकरिता देण्याची व्यवस्था करावी" असा महत्त्वाचा ठराव केला व तेव्हापासून ठिकठिकाणच्या हिंदु सभा हा ठराव अमलांत आणण्याचा प्रयत्न करीत आहेत. या बाबतींत बॅ. विनायकराव सावरकर यांच्या नेतृत्वाखाली रत्नागिरी हिंदु-सभेने बरें कार्य चालविलें आहे.

### अस्पृश्यांनी चालविलेले प्रयत्न

वरील सर्व कार्य स्पृश्य हिंदूंनी कांही अंशीं भूतदयेने व पतितांचा उद्धार करण्याच्या बुद्धीनें आणि कांही अंशीं कर्तव्याच्या जाणिवेमुळे केलें; परंतु आज अस्पृश्यांच्या प्रश्नाला जें महत्त्व प्राप्त झालें आहे त्याचें एक प्रमुख कारण नवविचारांचे वारे अस्पृश्यसमाजाला लागून तो समाज स्वतःची उन्नति करण्याकरिता स्वतःची संघटना करूं लागला हें होय. १८९२ सालीं श्री. पी. व्ही. सुब्रम्हण्यम् पिल्ले यांनी मद्रास आदि द्रवीड जनसभा ( त्यानंतर या संस्थेचें नांव बदलून रेजिस्टर्ड ऑल इंडिया आदि द्रवीड महाजन सभा असें करण्यांत आलें आहे ) या नांवाची संस्था स्थापन केली व ही संस्था वेळोवेळीं अस्पृश्यांच्या हितसंबंधाचें रक्षण करण्याबद्दल सरकारपुढे आपली बाजू मांडूं लागली. याशिवायहि हिंदुस्थानांत ठिकठिकाणीं अस्पृश्यांच्या संस्था निघून त्याहि आपआपल्या परीने अस्पृश्यांच्या उन्नतीकरिता यत्न

करूं लागल्या. सांप्रत अस्पृश्यांची सर्वांत मोठी राजकीय संस्था ऑल इंडिया डिप्रेस्ड क्लसेस असोसिएशन ही असून ती संस्था अस्पृश्यांच्या राजकीय हक्कांकरिता झगडत असते.

**सरकार दलितांचे कैवारी !**

ब्रिटिश सरकार दलितांचें कैवारी आहे, अस्पृश्यांची जी आजतागायत प्रगति झाली आहे ती त्याच्यामुळेंच झाली व ब्रिटिश सरकार नसतें तर अस्पृश्यांच्या उन्नतीची आशाच नव्हती असा एक लोकविभ्रम आहे. परंतु त्यांत कांहीच अर्थ नाही. ही गोष्ट अस्पृश्यांना प्रातिनिधिक सभांतून सरकारने भरपूर प्रतिनिधित्व दिलें नाही व सरकारी नोकऱ्यांतहि त्यांचा सुलभ रीतीने शिरकाव होईल अशी व्यवस्था केली नाही यावरूनच सिद्ध होते.स.१८६१ सालीं कायदेमंडळांत हिंदी सभासदांचा समावेश झाला, मोर्लेमिंटो सुधारणांनी हिंदी सभासदांची कायदेमंडळांतील संख्या वाढली तरीहि त्यांत अस्पृश्यांतर्फे एकहि सभासद नेमला गेला नाही. मद्रास इलाख्यांत अस्पृश्यांची राजकीय संघटणा विशेष चांगली असल्यामुळे व मॉंटफर्ड सुधारणांची बोलभाषा चालू असता त्यांनी आपल्या मागण्या नेटाने पुढे मांडण्यास प्रारंभ केल्यामुळे एकंदर परिस्थिति लक्षांत घेऊन लॉर्ड विलिंग्डन यांनी १९१९ सालीं अस्पृश्यांचा एक प्रतिनिधि मद्रासच्या कायदेमंडळांत नेमला. मॉंटफर्ड सुधारणांच्या वेळीं अस्पृश्यांनी बरेचसे पाय हलविल्यामुळे सर्व प्रांतिक कायदेमंडळांत मिळून एकंदर फक्त वीस जागा अस्पृश्यांना देण्यांत आल्या. अस्पृश्यांच्या लोकसंख्येच्या मानाने त्यांना दिलेलें प्रतिनिधित्व फारच कमी होतें. मध्यवर्ती कायदेमंडळांत रा. ब. एम. सी. राजा यांची नेमणूक होईपर्यंत अस्पृश्यांचा एकहि प्रतिनिधि नव्हता!

**सरकारचाहि पक्षपातच**

अस्पृश्यांना कायदेमंडळांत योग्य तें प्रतिनिधित्व देण्याच्या कामीं सरकारने जसा क्षुद्रपणा दाखविला तसाच अस्पृश्यांना सरकारी नोकऱ्या देण्यांत दाखविला आहे. पंजाब कौन्सिलांत लाला मोहनलाल यांनीं सरकार दलितवर्गांतील लोकांना पोलीस खात्यांत घेतें का, असा प्रश्न विचारला असता त्याला सरकारतर्फे अशा आशयाचें उत्तर देण्यांत आलें कीं ज्या वेळीं इतर जाती दलितवर्गांतील लोकांना समानतेने वागवतील किंवा ज्या वेळीं दलितवर्गांतील लोक इतर लोकांप्रमाणे तरतरीत व हुषार आहेत व त्यांचा पोलिसांत शिरकाव होणें पोलीसखात्याच्या व्यवस्थेच्या दृष्टीनें योग्य आहे अशी सरकारची खात्री होईल त्यावेळीं सरकार अस्पृश्य लोकांची पोलिसांत जरूर भरती करील. आसामच्या इन्स्पेक्टर जनरल ऑफ पोलिसकडे तेथील दलितवर्गाच्या संस्थेने आपल्या ज्ञातीपैकीं एम. ए. झालेल्या गृहस्थाला डेप्युटी सुपरिंटेंडेंट ऑफ पोलीसची जागा मिळावी असा अर्ज केला होता. त्या अर्जाला अशा अर्थाचें उत्तर देण्यांत आलें कीं, समाजाच्या सद्यःस्थितींत ज्या जाती सामाजिक दृष्ट्या कमी लेखल्या जातात त्या ज्ञातींपैकीं कोणीहि मनुष्य डेप्यूटी सुपरिंटेंडेंट ऑफ पोलीसचें काम यशस्वी रीतीने करूं शकेल असें वाटत नाही. खानदेशांतील श्री. मेढी या दलितवर्गांतील गृहस्थांनी आपली नेमणूक ऑनररी बेंच मॅजिस्ट्रेट म्हणून व्हावी असा अर्ज कलेक्टरकडे केला असतां दलितवर्गाच्या लोकांना ऑनररी मॅजिस्ट्रेट नेमण्याची वेळ अजून आली आहे असें साहेबमजकुरांना वाटत नाही असें उत्तर मिळालें.

अशाच प्रकारचीं कित्येक उदाहरणें निरनिराळ्या प्रांतांत घडलीं आहेत. हीं सर्व उदाहरणें लक्षांत घेता असें दिसतें कीं, जोंपर्यंत दलितवर्गाची अस्पृश्यता जात नाही तोंपर्यंत सरकार सर्व प्रकारच्या सरकारी नोकऱ्यांत अस्पृश्यांची भरती करण्यास तयार होणार नाही. परंतु अस्पृश्यांना योग्य तें प्रतिनिधित्व देणें व अस्पृश्याना सर्व सरकारी खात्यांत नोकरी धरण्यास सवड ठेवणें या बाबतींत ज्याप्रमाणे सरकारने अनुदारपणा दाखविला त्याप्रमाणेंच अस्पृश्यांच्या शिक्षणाकरित पैसा खर्च करण्यांतहि दाखविला. १९२८ सालच्या फेब्रुवारीमध्ये मुंबई प्रांतिक हिंदुसभेचे अध्यक्ष बॅ. मुकुंदराव जयकर यांनी हिंदुस्थान-सरकारने प्रांतिक सरकारांना त्यांनी अस्पृश्यांच्या शिक्षणाकरिता विशेष सोयी कराव्या अशी सूचना करावी असा ठराव मांडला होता. या ठरावाला पंजाबचे प्रसिद्ध हिंदु पुढारी कै. लाला लजपतराय यांनी अशी उपसूचना मांडली कीं सरकारने अस्पृश्यांच्या शिक्षणाकरिता एक कोटी रुपये रुपये बाजूला काढावे. सरकारतर्फे श्री. वाजपेयी यांनी या उपसूचनेला विरोध केला. या सर्व विवेचनावरून ज्या गोष्टी सिद्ध होतात त्या अशा कीं, स्पृश्य हिंदूंनी अस्पृश्यांच्या उन्नतीकरिता गेलीं पंधरावीस वर्षें जोराने खटपट चालविली आहे. सरकार अस्पृश्यांकरिता विशेष असें कांहीहि करावयास तयार नाही; अस्पृश्यांनी आपली सुधारणा स्पृश्य बांधवांशीं सहकार्य करून करून घेणें त्यांच्या हिताचें आहे.

उत्तरार्ध

मॉंटफर्ड सुधारणांच्या वेळीं योग्य प्रतिनिधित्व मिळण्याच्या बाबतींत जसा अन्याय झाला तसा होऊं नये म्हणून सायमन कमिशनची नेमणूक होण्याच्या वेळेपासून अस्पृश्य पुढाऱ्यांनी अस्पृश्यांच्या मतदारसंघाबाबतच्या व प्रतिनिधित्वाबद्दलच्या मागण्या पुढें मांडण्यास प्रारंभ केला. आज हिंदुस्थानांत अस्पृश्यांचे जे पुढारी आहेत त्यांमध्ये रा. ब. एम्. सी. राजा व डॉ. भीमराव आंबेडकर हे प्रमुख आहेत. या दोन पुढाऱ्यांचे दृष्टिकोण व मनोवृत्ति भिन्न प्रकारच्या आहेत. रा. ब. एम्. सी. राजा यांची प्रवृत्ति शक्यतों उच्चवर्णीय हिंदूंशीं मिळतें घेऊन अस्पृश्यांची अस्पृश्यता कशी नष्ट होईल हें पाहण्याकडे आहे. डॉ. आंबेडकर यांची एका काळीं समतोल विचारसरणीबद्दल ख्याति होती व त्यांचीहि मतें रा. ब. राजा यांच्या सारखींच होतीं. परंतु अलीकडे त्यांची दृष्टि कलुषित झाली आहे व त्यामुळे आपण काय करीत आहों व त्याचे दुष्परिणाम आपल्या ज्ञातीला किती भोवणार आहेत याबद्दलची त्यांची सारासारबुद्धिहि नष्ट झाली आहे असें म्हणावें लागतें.

## निरनिराळ्या कमिट्यांचीं मतें

सायमन कमिशन व त्याच्याशीं सहकार्य करण्याकरिता नेमलेली नायर कमिटी व इतर प्रांतिक कमिट्या यांच्यापुढे हिंदुस्थानांतील ठिकठिकाणच्या अस्पृश्यांनी आपली बाजू मांडली. कमिट्यांपुढे आपलें म्हणणें मांडतांना त्यांनी आपणांवर होणाऱ्या सामाजिक जुलमाचीं हृदयद्रावक परंतु सत्यचित्रें काढलीं. या सर्व गोष्टी विचारांत घेऊन सायमन कमिशन व नायर कमिटी यांनी आपले रिपोर्ट लिहिले. प्रांतिक कमिट्यांनीहि आपले रिपोर्ट कमिशनला सादर केले. यांपैकीं सायमन कमिशनने संयुक्त मतदारसंघांत अस्पृश्यांकरिता जागा राखून ठेवाव्या अशी सूचना करतांना असें स्पष्टपणें नमूद करून ठेवलें आहे कीं, स्वतंत्र मतदारसंघामुळे स्पृश्यांपासून होणारी फारकत टाळणें अस्पृश्यांच्या हिताचें आहे. नायर कमिटीने दहा वर्षेपर्यंत मद्रास प्रांतांत अस्पृश्यांना स्वतंत्र मतदारसंघ द्यावे परंतु इतर प्रांतांत संयुक्त मतदारसंघांत अस्पृश्यांकरिता जागा राखून ठेवाव्या असें मत दिलें. या कमिटीच्या रिपोर्टला खासदार रा. ब. एम्. सी. राजा यांनी स्वतंत्र मतपत्रिका जोडून त्यामध्ये अस्पृश्यांच्या प्रश्नाची सांगोपांग चर्चा करून अस्पृश्यांकरिता दहा वर्षेपर्यंत सर्वत्रच स्वतंत्र मतदारसंघ असावे अशी सूचना केली. परंतु अशी सूचना करतांना रा. ब. राजा यांचा हेतु अस्पृश्यांकरिता सवता सुभा निर्माण करून त्यांची व स्पृश्य हिंदूंची फारकत करण्याचा अगर दोघांमध्ये द्वेषभावना उत्पन्न करण्याचा नव्हता. दहा वर्षेपर्यंत अस्पृश्यांकरिता स्वतंत्र मतदारसंघ असावे अशी सूचना करतांना त्यांनी असें स्पष्ट लिहून ठेवलें आहे कीं, संयुक्त मतदारसंघ हें ध्येय असावें व तें शक्य तितक्या लवकर अमलांत यावें याबद्दल मतभेदाला जागा नाही.

## डॉ. आंबेडकरांचीं मतें

कांहीं मुदतीपर्यंत मागासलेल्या लोकांना स्वतंत्र मतदारसंघ देण्यांत आले तर त्यामुळे त्यांना राजकीय शिक्षण मिळून त्यांच्यामधील आत्मविश्वास वाढेल. भिन्न प्रकारच्या हितसंबंधाचा परिपोष व्हावा हें दलित वर्गाचें ध्येय नाही. वस्तुतः आज दिसणारें भिन्नत्व नष्ट व्हावें अशीच त्यांची इच्छा आहे. अस्पृश्यांच्या चळवळीचें ध्येय अस्पृश्यता नष्ट व्हावी हें आहे. सांप्रत अस्पृश्य वर्ग हा हिंदु समाजाचा तुटक भाग समजला जातो. परंतु अस्पृश्यांनी हिंदु समाजाशीं एकजीव होण्याचा यत्न केला पाहिजे. अस्पृश्यांचें ध्येय हिंदु समाजाचा अंगभूत भाग बनणें एवढेंच नसून हिंदु समाजांत विलीन होऊन जाणें हें आहे. धर्मांतराने अस्पृश्यांना अंशतः इतरांच्यासारखे सामाजिक व राजकीय हक्क मिळतात असें विधर्मीय युरोपिअन धर्मोपदेशकांनी दाखविलें आहे. परंतु धर्मांतर हा राजकीय विषय नाही व तो होतांहि कामा नये. डॉ. आंबेडकर यांनी मुंबई प्रांतिक कमिटीच्या रिपोर्टला जी स्वतंत्र मतपत्रिका जोडली होती ती बरीचशी समतोल बुद्धीने लिहिलेली होती. त्यांमध्ये त्यांनी स्वतंत्र मतदारसंघ लोकसत्ताक राज्यपद्धतीशीं कसे विसंगत आहेत हें दाखवून युरोपियन लोकांखेरीज इतर सर्व ज्ञातींचा समावेश संयुक्त मतदारसंघांत करून अस्पृश्यांसुद्धा अल्पसंख्याकांकरिता जागा राखून ठेवाव्या अशी सूचना केली होती. नागपूर येथे भरलेल्या पहिल्या अखिल भारतीय दलितवर्ग परिषदेचे अध्यक्ष या नात्यानेहि त्यांनी अस्पृश्यांचा संयुक्त मतदारसंघांत समावेश करून त्यांच्याकरिता जागा राखून ठेवाव्या याच मताचा पुरस्कार केला होता.

## डॉ. आंबेडकरांनीं रंग पालटला !

परंतु काय झालें कोणाला ठाऊक? गोलमेज परिषदेला सरकार त्यांना पाठवणार असें ठरल्यापासून त्यांच्या विचारांत फरक पडलेला दिसूं येऊं लागला. दुसऱ्या गोलमेज परिषदेंत तर त्यांनी महात्माजींवर वाटेल तसें तोंडसुख घेऊन शौकतअलीप्रभृति अल्पसंख्याकांच्या अराष्ट्रीय, स्वार्थी व ज्ञातिनिष्ठ पुढाऱ्यांनी अल्पसंख्याकांच्या मागण्यांसंबंधी केलेल्या

करारपत्रकाला मान्यता दिली. या अल्पसंख्याकांच्या करारपत्रांत अल्पसंख्याकांकरिता स्वतंत्र मतदारसंघ व मध्यवर्ति आणि प्रान्तिक कायदेमंडळांत अल्पसंख्याकांकरिता ठराविक जागांची मागणी केली आहे. या करारपत्रकाप्रमाणे अस्पृश्यांच्या वांट्याला कांही प्रांतांत त्यांच्या लोकसंख्येच्या प्रमाणापेक्षा कमी जागा येतात व या जागा कमी येण्याचें कारण मुसलमानांना वाजवीपेक्षा फाजील प्रातिनिधी दिले गेले हें आहे. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे डॉ. अंबेडकरांनी अस्पृश्यांच्या वांट्याला येणाऱ्या कांही जागा मुसलमानांच्या पदरांत टाकल्या व त्यांच्याच मताप्रमाणें जे स्वतंत्र मतदारसंघ लोकसत्ताक राज्यपद्धतीशीं विसंगत आहेत असें त्यांचें ठाम मत होतें त्यांनाच उदोउदो करण्याला प्रारंभ केला. अस्पृश्यांची हिंदु समाजापासून फारकत करण्याची व अस्पृश्यांच्या वांट्याला येणाऱ्या कांहीं जागा मुसलमानांच्या पदरांत टाकण्याची डॉ. आंबेडकर यांनी चालविलेली कारवाई पाहून हिंदुमहासभेचे कार्याध्यक्ष डॉ. मुंजे यांनी ती गोष्ट अस्पृश्यांना स्पृश्य हिंदूंच्या बरोबरीचा दर्जा प्राप्त करून देण्याकरिता झटणारे ऑल-इंडिया डिप्रेस्ड क्लासेस असोसिएशनचे अध्यक्ष रा. ब. एम. सी. राजा यांच्या नजरेस आणली व हिंदुसभा संयुक्त मतदारसंघांत अस्पृश्यांकरिता लोकसंख्येच्या प्रमाणांत जागा राखून ठेवण्याच्या योजनेला मान्यता देण्यास तर तयार आहेच, परंतु या राखीव जागांखेरीजहि इतर जागा काबीज करण्यास अस्पृश्यांना मोकळीक देण्यास तयार आहे असें सांगितलें. जबलपूरच्या हिंदुमहासभेच्या ठरावांचा रा. ब. राजा यांच्या मनावर इष्ट असा परिणाम झालेला होताच. डॉ. मुंजे यांनी सुचविलेल्या नवीन योजनेमुळे तर हिंदुसभा अस्पृश्यांना मनःपूर्वक जवळ करूं इच्छिते याबद्दल रा. ब. राजांची खात्री झाली व इतःपर स्वतंत्र मतदारसंघाची अस्पृश्यांना आवश्यकता नाहीं असें वाटून त्यांनी ऑल-इंडिया डिप्रेस्ड क्लासेस असोसिएशनतर्फे डॉ. मुंजे यांच्या म्हणण्याला मान्यता दिली.

## डॉ. अंबेडकरांचा अनुदारपणा

रा. ब. राजा यांनी वरीलप्रमाणे डॉ. मुंजे यांच्याशीं जो करार केला त्याला ठिकठिकाणच्या अस्पृश्य संस्थांनी पाठिंबा दिला. यामुळे डॉ. अंबेडकर यांना आपली बाजू लुळी पडली असें वाटूं लागलें व त्यांनीं अस्पृश्यांची दिशाभूल करण्यासाठी रा.ब. राजाप्रभृति संयुक्त मतदारसंघाच्या पुरस्कर्त्यांना शिव्याशाप देण्यास प्रारंभ केला. कामटी येथे त्यांनी नुकतीच आपल्या साथीदारांची मजलस अखिल भारतीय अस्पृश्य–परिषद या गोंडस नांवाखालीं भरवली. परंतु या परिषदेला त्यांनी मद्रासचे रा. ब. राजा, नागपूरचे श्री. गवई, मुंबईचे श्री. बाळू वगैरे अस्पृश्यवर्गाच्या सन्मान्य पुढाऱ्यांना बोलावलें नाही, एवढेंच नव्हे तर पुण्याचे श्री. राजभोज हे परिषदेचें स्वरूप कसें प्रातिनिधिक नाहीं हें दाखविण्याकरिता परिषदेंत बोलावयास उभे राहिले असता त्यांना मारहाण करण्यांत आली व स्वतंत्र मतदारसंघांना व आंबेडकर–शौकतअल्ली कराराला विरोध करण्याकरिता श्री. खांडेकरप्रभृति पुढारी परवानगी मागत असतां त्यांना ती दिली गेली नाही. एवंगुणाविशिष्ट अशा या परिषदेंत अंबेडकर–शौकतअल्ली कराराला मान्यता देण्यांत येऊन स्वतंत्र मतदारसंघांना पाठिंबा व राजा–मुंजे कराराचा निषेध केला गेला असल्यास नवल नाही.

वरील परिषद प्रातिनिधिक नसल्यामुळे अस्पृश्यांचें मतदारसंघाबाबत खरें मत काय आहे हें अजमावण्याकरिता मुंबईस अखिल भारतीय दलित वर्ग परिषद भरावयाची आहे. या परिषदेमध्ये सर्व पक्षांच्या लोकांना बोलूं देण्यांत येणार आहे. अशा वेळीं अस्पृश्यांचें खरें हित मुंजे–राजा कराराने झालें आहे अगर आंबेडकर--शौकतअल्ली कराराने झालें आहे याचा पुरता विचार अस्पृश्यांनी करणें अगत्याचें आहे.

## राजा–मुंजे कराराचें महत्त्व

स्वतंत्र मतदारसंघ लोकसत्ताक राज्यपद्धतीशीं विसंगत असल्यामुळे त्याज्य आहेतच, परंतु स्वतंत्र मतदारसंघामुळे अस्पृश्यांची उच्चवर्णीय हिंदूंपासून फारकत होऊन त्यांचे एकमेकांमधील संबंध अधिक दुरावण्याचा विशेष संभव असल्यामुळे अस्पृश्यांची अस्पृश्यता नाहींशी करून त्यांचा हिंदु समाजांतील दर्जा वाढविण्याला त्यांचा उपयोग होण्यासारखा नाही. यामुळे अस्पृश्यांच्या दृष्टीने तर तें विशेषच त्याज्य आहे. याउलट संयुक्त मतदारसंघांत स्पृश्यांना अस्पृश्यांची व अस्पृश्यांना स्पृश्यांच्या मतांची आवश्यकता असल्यामुळे त्यांचें एकमेकांमधील संघटन वाढून परस्पर प्रेम वृद्धिंगत होण्याचा संभव आहे. अर्थातच संयुक्त मतदारसंघ अस्पृश्यांच्या उन्नतीच्या दृष्टीने त्यांच्या हिताचे आहेत. उच्चवर्णीय हिंदू बहुसंख्य असले तरी लोकसंख्येच्या प्रमाणांत अस्पृश्यांकरिता राजा–मुंजे कराराप्रमाणे जागा राखून ठेवलेल्या असल्यामुळे व इतरहि जागा काबीज करण्याची अस्पृश्यांना मुभा असल्यामुळे अस्पृश्यांचे प्रातिनिधि त्यांच्या लोकसंख्येच्या प्रमाणांत तर निवडून येतीलच परंतु कांही प्रांतांत अधिकहि येतील. याकरून राजा–मुंजे करारांत अस्पृश्यांचें

हितसंबंधांकडे पूर्णपणें लक्ष पुरविण्यांत आलें आहे हें उघड आहे.

शौकतअल्ली–अंबेडकर करारांत स्वतंत्र मतदार-संघाची मागणी केलेली असल्यामुळे अस्पृश्यांची स्पृश्यांपासून फारकत होणार आहे व त्यामुळे अस्पृश्यांची अस्पृश्यता नष्ट होण्याऐवजीं वाढण्याचा संभव आहे. तसेच शौकतअल्ली–अंबेडकरांच्या कराराप्रमाणे अस्पृश्यांच्या वांट्याला राजा–मुंजे करारापेक्षा कांही प्रांतांत कमी जागा येत आहेत हें खालील कोष्टकावरून कळून येईल. राजा–मुंजे कराराप्रमाणे अस्पृश्यांना राखीव जागाशिवाय संयुक्त मतदार संघांत इतर जागा काबीज करण्यास मुभा आहे. परतु तशी मुभा शौकत-अंबेडकर करारांत नाहीं.

| | | अस्पृश्यांकरिता | |
|---|---|---|---|
| कायदेमंडळ | प्रतिनिधींची संख्या | राजा–मुंजे करारा-प्रमाणें राखीव जागा | शौकत–अंबेडकर-करारा-प्रमाणें राखीव जागा |
| मध्यवर्ती—वरचें | २०० | ३८ | २० |
| —खालचें | ३०० | ५७ | ४५ |
| प्रान्तिक—आसाम | १०० | १३ | १३ |
| ,, बंगाल | २०० | ४९ | ३५ |
| ,, बिहार–ओरिसा | १०० | १४ | १४ |
| ,, मुंबई | २०० | १६ | २८ |
| ,, वऱ्हाड मध्यप्रांत | १०० | २४ | २० |
| ,, मद्रास | २०० | ३० | ४० |
| ,, पंजाब | १०० | १३ | १० |
| ,, संयुक्तप्रांत | १०० | २६ | २० |
| | १६०० | २८० | २४५ |

वरील कोष्टकांत मुंबई व मद्रास या दोन इलाख्यांत अस्पृश्यांना शौकतअल्ली–अंबेडकर कराराप्रमाणें लोकसंख्येच्या प्रमाणापेक्षां अनुक्रमें दहा व दहा जागा अधिक मिळतात असें दिसतें. परंतु या अधिक जागा डॉ. अंबेडकरांनी इतर प्रांतांतील अस्पृश्यांच्या वांटणीच्या जागांचे उदक मुसलमानांच्या हातावर सोडून मिळविल्या आहेत ही गोष्ट ध्यानांत घेतली म्हणजे डॉ. अंबेडकरांची दृष्टि अखिल हिंदुस्थानांतील अस्पृश्यांच्या हिताकडे नसून त्यांनी शौकतअल्लीबरोबर कांही गुप्त करार केला असावा असाहि संशय येतो. मुंबईस भरणाऱ्या अखिल भारतीय दलित वर्गाच्या परिषदेनें वरील सर्व गोष्टी ध्यानांत घेऊन राजा–मुंजे कराराला पाठिंबा देणें उचित आहे.

# ग्रामसंघटनेचें ध्येय व कार्य

मागील लेखांत ग्रामसंघटनेचें ध्येय काय असावें व काय असू नये याचें विवेचन झालें. आतां ग्रामसंघटनेच्या अडचणी कोणत्या आहेत व तें कार्य यशस्वी व्हावयाचें तर तें करण्याला सत्पात्र कार्यकर्ते कोण याविषयी विचार करूं. पण त्याहिपूर्वी आणखी एका गोष्टीचा विचार केला असतां वरील दोनहि मुद्द्यांवर थोडासा प्रकाश पडण्यासारखा आहे. ग्रामसंघटना ही गोष्ट हिंदुस्थानांत तरी नवी नाही. मात्र याचा अर्थ असा कीं पूर्वी ती होती पण आतां नाहीं! ती पूर्वी कशा प्रकारची व कितपत यशस्वी होती हें पाहावयाचें असेल तर कौटिलीय अर्थशास्त्र, व्हिन्सेंट स्मिथ याचा ‘प्राचीन हिंदुस्थानाचा इतिहास, बाबू रमेश चंद्र दत्त यांचे लेख, व महाराष्ट्रापुरतें बोलावयाचें तर मौंट स्टुअर्ट एल्फिन्स्टन व माल्कम् याचीं पुस्तकें व लेख वाचावे. या सर्व संदर्भ–ग्रंथांतील उतारे देऊन आम्ही जागा अडवीत नाही. पण याविषयी प्राचीन काळची स्थिति वर्णन करणारें कौटिलीय अर्थशास्त्र, आणि महाराष्ट्र हा देश इंग्रज सरकारच्या अमलाखाली गेला, त्यानंतर लिहिलेला मौंट स्टुअर्ट एल्फिन्स्टन यांचा रिपोर्ट–यांतील थोडीशी माहिती देतों. म्हणजे या विस्तीर्ण कालखंडाच्या दोन टोकांला ग्रामसंस्थेची व संघटनाची स्थिति जवळ जवळ एकच होती हें दिसून येईल. आणि त्यावरूनच हेंहि अनुमान बांधतां येईल कीं या सर्व कालावधींत तीच व्यवस्था टिकून होती.

स्थित्यंतर जें झालें तें खरोखर ब्रिटिश अमदानीच्या उत्तर--कालांत झालें. आणि ग्रामसंघटनेची घडी खरी बिघडविण्याला जर कोणी जबाबदार असेल तर तें इंग्रज सरकार होय. आता वाटेल तर हेंहि म्हणावें कीं इंग्रज सरकारच्या राज्यकारभाराच्या एकीकरणाचें घातकी धोरण व या देशाच्या किंबहुना जगाच्या भौतिक प्रगतीचा उत्कर्ष, हीं एकाच वेळीं घडत राहिल्याने या दुसऱ्याचाहि परिणाम पहिल्यावर झाला. पण वेगळेपणा दाखवावयाचा तर तो असें म्हणून दाखविता येईल कीं, ग्रामसंघटना ही देशी राजांच्या अमलांत अखंड संगीन व प्रबळ राहिली, इतकेंच नव्हे तर परकी मुसलमान राजांच्या शेंकडो वर्षांच्या अमलांतहि ती बिघडली

नाही.म्हणूनच १९व्या शतकाच्या प्रारंभापर्यंत टिकून राहिली. राजे केवळ परकीय असले म्हणजे अर्थातच पुष्कळ जुन्या गोष्टींचा नाश होतो हें खरें आहे.तथापि मुसलमानांच्या राज्यांत सर्वसामान्य रीत्या विदेशी संस्कृतीचा प्रसार झाला, व त्याहूनहि विशेष म्हणजे धर्मछळ झाला, तरी ग्रामसंघटना बिघडली नाही ही गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे. किंबहुना ही गोष्ट लक्षांत घेऊन, एल्फिन्स्टन व माल्कम यांनी महाराष्ट्रांतील जुनी ग्रामसंघटना अबाधित ठेवूनच तिजवर इतर राज्यकारभाराची रचना करावी अशी विलायतेंतील आपल्या वरिष्ठाकडे कळकळीची शिफारस केली होती.

पण काळ जसजसा गेला तसतसें जुनें अधिकार–विभागणीचें धोरण बदलून त्याच्या जागीं अधिकाराच्या एकीकरणाचें धोरण प्रबळ झालें. यामुळे ग्रामसंस्था व संघटना बिघडली. ती पुनः परत यावयाची तर ग्रामपंचायतींच्या द्वारें येऊं शकेल. ग्रामपंचायती हव्या तशा बनण्याला व त्यांना अवश्य ती सत्ता लाभण्याला तशा प्रकारचे कायदे झाले पाहिजेत. पण ते होण्याला प्रांतिक कायदे--कौन्सिलांत खेडेगांवांतील ग्रामणीचें लोकमत प्रकट झालें पाहिजे. या गोष्टीला अर्थात थोडा अवकाश आहे, पण त्या गोष्टीची वाट बघत बसणें हें योग्य नाही. अवतार व्हावयाचा तरी त्याची पूर्वतयारी असतेच. किंवा पर्जन्यावर अवलंबून राहणारा परतंत्र व दैववश शेतकरी हा आपले शेत नांगरून वाफे करून तयार राहतो.त्याचप्रमाणे पुढें प्रांतिक स्वायत्तता व तींतून लोकमताच्या जोरावर निष्पन्न होणारे ग्रामपंचायतींचे व ग्रामसंघटनेचे कायदे हातीं पडण्याच्या आधीं, ते कायदे वापरण्याची पात्रता खेडेगांवच्या लोकांच्या अंगीं यावयाला पाहिजे. ही पात्रता शिक्षणानेच येणार. म्हणून हें शिक्षण देण्याला सत्पात्र लोक कोण व तें शिक्षण त्या लोकांना कसें मिळेल याचा विचार तांतडीने हल्लीच्या काळींच समाजाच्या पुढाऱ्यांनी केला पाहिजे.

कौटिलीय अर्थशास्त्रावरून असें दिसतें कीं त्या काळीं देशाच्या राज्यव्यवस्थेसाठी जनपदविभाग व नागरविभाग असे दोन विभाग कल्पिले होते. तेव्हा खेड्याची वस्ती हल्लीहून पुष्कळ असे व क्षेत्रमर्यादा एक किंवा दोन कोसाची असे. गांवाच्या हद्दीचा तंटा प्रतिष्ठित पंच निकालांत काढीत; आणि वहिवाटीच्या मार्गांना प्रतिबंध करणारास शिक्षा होई.मुबलक गायरानें ठेवून गांवांतील गुरांच्या चाऱ्यापुरती व्यवस्था केली जाई.ग्रामोपयोगी अशा सर्व धंदेवाईक लोकांना जमिनी इनाम असत. नवी लागण करणाऱ्या कुळाला कांही वर्षे कराची माफी व नवी वसाहत करणाऱ्या पुढाऱ्याला जमीन इनाम मिळे. गांवच्या सार्वजनिक कृत्यांत प्रत्येक ग्रामस्थावर कांही कामाचा बोजा सक्तीने ठेवला जाई. गांवांतील जमिनी विकावयाच्या तर त्या वृद्ध संभावित गृहस्थांच्या अनुमतीने विकल्या जात. गांवांतील लोकांचा दंड गांवकामाकरिताच राखून ठेवण्यांत येई. आणि देवळें विहिरी तलाव यांची दुरुस्ती सार्वजनिक वर्गणींतून होई. कोणी जमीन पडीत टाकील तर ती त्याजकडून काढून घेण्यांत येई. जमिनीच्या मालकांची अर्थातच नोंद असे. खानेसुमारी करीतच; पण आल्या–गेल्याहि माणसागुरांची नोंद होई. अज्ञान व अनाथ यांची मिळकत गांवच्याच वृद्ध पुढाऱ्याच्या देखरेखीखाली राही. चोरीचा माग गांवापर्यंत लागला पण माल मिळाला नाही तर तो गांवाला भरून द्यावा लागे. धरण बांधून पाट काढणाऱ्या उद्योगी लोकांना सरकाराकडून कांही सामान फुकट मिळे. अनाथाच्या पोषणाची जबाबदारी राजाकडे असे. चैनीच्या गोष्टी खेळ नाटकें वगैरेंपासून शेतीच्या कामाला हरकत येते, सबब अशा लोकांना खेडेगांवांत राहण्याला बंदी होई. खेडेगांवांतहि वस्ती करण्यापूर्वी रस्ते आंखण्यांत येत.

यापुढे ज्या कांही गोष्टी नमूद करणार त्या अर्थात् शहरासंबंधाच्या आहेत. पण त्यावरून तत्कालीन नगरव्यवस्थेप्रमाणे खेडेगांवांतील व्यवस्थेवरहि तसेंच लक्ष असेल असें संभवतें. गांवांतलें घाण पाणी गटारांनी काढून देत. बाजारी रस्ते बाजारांतील व्यापार व वजनें मापें यांवर सरकारची देखरेख असे. शहरच्या रस्त्यांत केरकचरा टाकणारांना किंवा मलमूत्रविसर्जन करणारांस दंड होई. दर कांही घरांमागे एकेक सार्वजनिक विहीर असे. आग विझविण्याकरितां प्रत्येक रस्त्यांतून व प्रत्येक घराच्या दरवाजांत पाण्याचे हौद व घागरी भरून ठेवण्यांत येत. आगींतून माणसें वांचविण्याकरितां लागणारें सामान म्हणजे शिड्या, दोऱ्या, टोकांस आंकडे असलेल्या काठ्या वगैरे तयार ठेवण्यांत येत व आग विझवावयाला जो मनुष्य जाणार नाही त्याला दंड होई. अशाच रीतीने शेतकीला उपयोगी अशा अनेक गोष्टींची तरतूद सरकार लक्ष घालून त्या प्राचीन काळीं करी. पण सांगण्याची मुख्य गोष्ट ही कीं यांतील पुष्कळ गोष्टी झाल्या न झाल्या, चांगल्या झाल्या वाईट झाल्या, तर त्यासंबंधीं अधिकार गांवगन्ना गांवपंचायतींना असे.

वर ही जी माहिती दिली तिजवरून इतक्या जुन्या काळींहि या देशांत सामाजिक सुव्यवस्थेच्या कल्पना किती विस्तृत व खोल गेल्या होत्या हें दिसून येईल. आजहि या कल्पना शिकलेल्या

लोकांस सुचतात; पण त्या काळच्या व आजच्या काळच्या स्थितींत मुख्य फरक असेल तर तो हाच कीं, पूर्वीइतकीं आज खेडेगांवें स्वायत्त व अधिकारपूर्ण नाहीत; तीं अधिकारपूर्ण नाहीत म्हणून साधनसंपन्न नाहींत; व साधनसंपन्न नाहीत म्हणून पूर्वीसारखीं सुखी नाहीत. कित्येकांच्या मतें हल्लीं ग्रामसंघटना न होण्याचें कारण खेडेगांवांतील लोकांशीं शहरवासी लोकांनी आपला संबंध सोडला. आमच्या मतें हें कारण सयुक्तिक नाही. यासंबंधांत दळणवळण आणि मालवाहतूक हा जर एक भाग असेल तर पूर्वीपेक्षा हल्ली तो अधिक वाढला आहे असेंच आम्हांला वाटतें. उलट असेंहि म्हणतां येईल कीं, पूर्वी लहानसहान गांवें अल्पसंतुष्ट होतीं असें कदाचित् म्हणावें, पण आहे त्यांत सुख मानून तीं स्वावलंबी राहत. हल्ली मात्र नागरिक लोकांच्या दळणवळणामुळे शहर व खेडीं यांचा संबंध अधिक येऊं लागला आहे व शहरांतील व्यसनें वगैरे गोष्टींचा उपसर्ग खेड्यांतील लोकांना होऊन त्यांची अल्पसंतुष्टता गेली आहे. आधुनिक अर्थशास्त्रीय परिभाषेने बोलावयाचें तर त्यांचें "स्टँडर्ड ऑफ लिव्हिंग" वाढलें असें म्हणतां येईल. पण त्याचा सरळ मराठींत अर्थ खर्चिकपणा वाढला असाच होतो; त्या खर्चिकपणाबरोबरच त्यांचें ऐनउत्पन्नहि वाढलें कीं काय हा प्रश्न करावा लागतो व त्याचें मात्र उत्तर समाधानकारक रीतीने देतां येत नाही.

पूर्वीपेक्षां हल्ली नगरच्या लोकांचा संबंध खेड्यांतील लोकांशीं अधिक आहे हें सहज सिद्ध करतां येईल. पण तो संबंध, प्रो. भागवत यांनी म्हटल्याप्रमाणे, एक्सप्लॉइटर्स लोकांचा म्हणजे प्राणभक्षकांचा, म्हणजे खेडेगावांतील लोकांकडून पैसे मिळविणारांचा ! पण याच्या उलट आपले पैसे घेऊन खेडेगांवांत राहून तेथें ते निदान स्वत:करिता तरी खर्च करणारे नागरिक लोक हल्ली किती सांपडतील ? मग खेड्यांत जाऊन आपले पैसे खेडेगांवांतील लोकांकरिता परोपकारबुद्धीनें खर्च करणारे लोक त्याहूनहि विरळा असणार हें काय सांगावयाला पाहिजे ! पण आमचें म्हणणें असेंहि नाही कीं अशा प्रकारचे नागरिक जुन्या काळीं अधिक असतील. मनुष्यस्वभाव केव्हांहि झाला तरी सारखाच. सांगण्याचा मुद्दा इतकाच कीं, हल्ली नागरिक लोकांचा संबंध खेडेगांवाशीं तुटला म्हणून खेडेगांवांची दुःस्थिति झाली हें म्हणणें खरें नाही. आमच्या मतें पूर्वीच्या व हल्लीच्या स्थितींत फरक पडण्याला खरें कांही कारण असेल तर तें हें कीं खेडेगांवांची जुनी स्वाधीनता म्हणजे साधनपूर्णता व अधिकारपूर्णता हीं दोनही हल्ली नाहींशीं होऊन खेडेगांवचे लोक पराधीन झाले आहेत. आणि साधनपूर्णता व अधिकारपूर्णता या दोहोंतून पाहिलें तर दुसरें कारण असून पहिलें त्याचें कार्य आहे.

मौंट स्टुअर्ट एल्फिन्स्टन याने आपल्या रिपोर्टांत ग्रामपंचायतिसंबंधाने फार अनुकूल अभिप्राय प्रकट केले आहेत आणि ही ग्रामसंस्थापद्धति व तिच्या हातून होणारें ग्रामसंघटनेचें काम शक्य तितके दिवस चालूं ठेवावें व होतां होईतोंवर तें मोडूं नये अशी शिफारस त्याने आपल्या वरिष्ठाकडे केली होती. तो म्हणतो कीं,

"The village communities were little republics having nearly everything they wanted within themselves and almost independent of foreign relations. They seemed to last where nothing else lasted!"

ग्रामपंचायतीच्या अधिकारांत एल्फिन्स्टनला जी मर्यादा किंवा मुरड घालावयाची होती ती फक्त मोठे गुन्हे व भानगडीचे दिवाणी दावे यांच्या चौकशी–इन्साफापुरतीच होती. पण दिवाणी फौजदारी न्यायदानासंबंधी बरेचसे अधिकार ग्रामपंचायतीकडे ठेवण्यास हरकत नाही असें त्याचें मत होतें. कारण ग्रामपंचायतीकडून आपल्या अधिकारांची अंमलबजावणी सुधारलेल्या पद्धतीप्रमाणे होत नसली तरी एकंदरीने न्यायदानाचें काम चांगलें होतें ही गोष्ट ठिकठिकाणच्या चौकशींत त्याला आढळून आली होती. पण वरिष्ठ प्रतीच्या न्यायदानाचें काम सोडलें तरी इतर हरएक प्रकारची गांवची व्यवस्था गांवाकडेच राहावी व तींत बाहेरच्या लोकांनी फारशी ढवळाढवळ करूं नये असें त्याचें मत निःसंशय होतें. म्हणूनच त्याने ग्रामपंचायतीला 'रिपब्लिक' हें नांव दिलें आहे.

असो. अशा रीतीने कौटिल्यापासून एल्फिन्स्टनपर्यंत चालत आलेलें ग्रामसंघटन आजहि कां चालू ठेवूं देऊं नये, व चालू ठेवूं दिलें तर कां चालूं नये, हा प्रश्न आहे; व त्या दोहोंचें मिळून आमचें उत्तर असें कीं तें अवश्य चालूं द्यावें व तें चालू दिलें असता पूर्वीप्रमाणे आजहि सुपरिणामकारक होईल. कौटिलीय अर्थशास्त्रांतील जी माहिती वर दिली तिजवरून हेंहि लक्षांत येईल कीं दोन हजार वर्षांच्या अंतराने ग्रामसंघटनेचा विषय पुढे घेऊन त्याचें कार्य तपशीलवार मांडावयाचें झालें असतां जुना कौटिल्य व आजचे प्रो. भागवत यांनीं रेखाटलेला नकाशा बहुधा एकरूपच आहे. प्रो. भागवत यांनी या विषयावर जें पुस्तक प्रसिद्ध केलें आहे

त्यांत तपशिलाची कांही बाकी ठेविलेली नाही; व हें एक पुस्तक वाचलें म्हणजे ग्रामसंघटनेच्या कार्याविषयी कोणास आणखी कल्पना देण्याचें असें कांही शिल्लक उरत नाही. म्हणून या विषयांत लक्ष घालणाऱ्या प्रत्येक मनुष्याने तें मिळवून अवश्य वाचावें अशी आमची सूचना आहे. तथापि ग्रामसंघटनेच्या कार्याची कल्पना बरोबर आली तरी तें कार्य कोणाच्या हातून पार पडेल हाच खरोखर अधिक चिकित्सेचा व खरी काळजी वाटण्यासारखा मुद्दा आहे. कार्यकर्त्यांची ही अडचण प्रो. भागवत यांच्या लक्षांत आलेली आहे. म्हणून त्याविषयी त्यांनी काय सूचना केल्या आहेत व त्याविषयीं आमचे काय विचार आहेत हें पुढील लेखांत सांगून हा विषय संपवूं.

# परराष्ट्रांतील लष्करी शिक्षण

स्कीन कमिटीने हिंदी तरुणांना लष्करी शिक्षणाचा दरवाजा किती प्रमाणांत उघडून दिला आहे हें प्रसिद्धच आहे. एकीकडे त्यांतील मुंगीच्या पावलाची गति पाहावी आणि दुसरीकडे इतर राष्ट्रांतील लष्करी शिक्षणाची झपाट्याची वाढ ध्यानीं घ्यावी म्हणजे परतंत्र व स्वतंत्र स्थितींतील महदंतर लक्षांत येतें. व्हर्सेलिसच्या तहान्वयें जर्मनीला आपल्या तरुण पिढीला लष्करी शिक्षण देण्यास मनाई करण्यांत आली व विद्यालयें आणि लष्करी अधिकारी यांचा तेथे काडीमात्र संबंध असता कामा नये अशी अट जर्मनीच्या माथीं मारण्यांत आली. परंतु हिंदुस्थान, जर्मनी यांसारखे अभागी अपवाद दूर केले, तर इतर बहुतेक सर्व देश महायुध्दानंतर आपल्या युवकवर्गाला लष्करी कवचकुंडलें जोराने चढवीत असल्याचाच देखावा दृष्टीस पडतो. इटाली, फ्रान्स आणि अमेरिका या तीन देशांत या बाबतींत झालेली क्रांति विशेष चिंतनीय आहे.

इटालीमध्यें मुसोलिनीचा एकतंत्री अम्मल चालू आहे. प्रत्येक तरुणाने दोन वर्षें लष्करी शिक्षण घेतलेंच पाहिजे असा तेथे कायदाच आहे. तें शिक्षण प्राथमिक स्वरूपाचें असून तें फॅसिस्ट सैनिक देत असतात. तें शाळांतून न देता फॅसिस्टांच्या संस्थांतून देण्यांत येतें. ८ ते १४ व १४ ते १८ या वयाच्या मुलांसाठी दोन वर्ग असतात. या वयांत हत्यारें वापरण्याचें शिक्षण दिलें जातें. १८ वर्षांनंतर मात्र दोन प्रकारांचे अभ्यासक्रम सुरू होतात. त्यांत, प्रत्येकीं तीन तासांचें शिक्षण असे ४० दिवस तरी शिकावें लागतें. यानंतर प्रत्यक्ष सैन्यांत काम करावें लागतें. या सर्व योजनांना सरकारी साह्याचा भरपूर पुरवठा होतो. यामुळे १९३३ सालापासून परिणाम असा दिसून येणार आहे कीं, प्रतिवर्षी जो जो सैनिक लष्करांत दाखल करून घेण्यांत येईल तो कोरा करकरीत ' रंगरूट ' न येता प्राथमिक तयारी झालेलाच येईल.

इटालीप्रमाणेंच आपल्या देशांतहि सक्तीच्या लष्करी शिक्षणाचा कायदा जारी करावा असा फ्रान्सचा मनोदय आहे. १९२८ सालींच त्या कायद्याचे डोहाळे फ्रान्सला लागले होते. परंतु निःशस्त्रीकरणाच्या परिषदांचे वारे मध्यंतरीं सुटले म्हणून तो कायदा अजून बाहेर आला नाही. तथापि सध्याहि तेथील शाळांतून, विद्यापीठांतून व सरकारमान्य संस्थांतून लष्करी शिक्षण देण्यास सरकार प्रोत्साहन देत असतेंच. सरकारी अधिकारी मुलांची षाण्मासिक शारीरिक परीक्षा घेत असतात आणि त्यांच्या देखरेखीखालीं मुलें लष्करी शिक्षण घेतात. त्यासाठी शिक्षक व द्रव्य यांचा पुरवठा सरकार करतें आणि हत्यारें, दारूगोळा, क्रीडांगणें इत्यादि साधनसामुग्रीहि पुरवितें. मुलाच्या ६ व्या वर्षापासून शारीरिक शिक्षणाला प्रारंभ होतो व तें १६ व्या वर्षापर्यंत दिलें जातें. त्यानंतर प्राथमिक लष्करी शिक्षणाचे धडे दिले जातात व नंतर प्रत्यक्ष लष्करी शिक्षण त्याला देतात. प्रत्येक वर्षी विद्यार्थ्याला निदान २४० तास शिक्षण घ्यावें लागतें.

अमेरिकेने मध्यम मार्ग स्वीकारला आहे. इटालीप्रमाणें सक्तीचा सोटा तिने सर्वत्र हातांत घेतलेला नाही कीं फ्रान्सप्रमाणें ' यथेच्छसि तथा कुरु ' असें तिनें विद्यार्थ्यांना म्हटलेलें नाही. आता हें खरें कीं, अमेरिकेंतील कांही कॉलेजांत ' युद्धयस्व ' असा आज्ञार्थी उपदेशहि विद्यार्थ्याला केला जातो. पण त्यांची संख्या फारच मर्यादित आहे. बहुतेक सर्व महाविद्यालयांत लष्करी शिक्षण हा ऐच्छिकच विषय आहे. मात्र तेथील अध्यापक विद्यार्थ्यांचें मन वळवून, किंवा त्यांवर वजन पाडूनहि, त्यांना लष्करी शिक्षण घ्यावयास लावतात. त्यांच्या लष्करी शिक्षणाचा सारा खर्च अमेरिकन सरकार सढळ हातानें करीत असतें. तेथील 'डिफेन्स ॲक्टाप्रमाणें' नागरिकांना ऐच्छिक लष्करी शिक्षण देण्यासाठी निरनिराळ्या संस्था उघडल्या जातात. गणवेष, हत्यारें, दारूगोळा, वाहतुकीचीं साधनें, वगैरे सर्व सोयी सरकार करतें.

नागरिकांच्या संस्थांचे चार अभ्यासक्रम असतात. त्या सर्वांचे हेतु म्हणजे, शरीरबलाचें संवर्धन, युद्धकलेचें शिक्षण व देशाभिमानाचें पोषण हे होत. शिक्षण-क्रम तीस दिवसांचा असून तो संपादन करणाऱ्याला 'राष्ट्रीय सैन्यांत' प्रवेश मिळतो. दरसाल ४६००० नागरिक असें शिक्षण घेत आहेत. याशिवाय, बंदूक—शाळांसारख्या लष्करी शिक्षणाच्या उपांगभूत संस्था अमेरिकेंत किती तरी आहेत! तात्पर्य, आंतरराष्ट्रीय कायद्याला चकविण्यासाठी सक्तीचें लष्करी शिक्षण चालू असल्याचा अमेरिकेंत बोभाटा नसला, तरी तेथील ऐच्छिक लष्करी शिक्षण हें बहुतेक प्रत्येक तरुणास मिळतेंच मिळतें.

# स्फुट सूचना

१ गेल्या जानेवारींत वटहुकुमांचा अंमल सुरू होतांच महाराष्ट्रांत ज्या संस्थांचा बळी सरकारानें प्रथम घेतला त्यांपैकीं मसूरचा ब्रह्मचर्याश्रम ही प्रमुख संस्था होय. ही संस्था सरकारानें बेकायदेशीर ठरवून तिचे चालक व विद्यार्थी यांना देशोधडीस लावलें आणि संस्थेची मालमत्ता ताब्यांत घेऊन तिला कुलूप ठोकलें. परंतु वटहुकुमांची मुदत येत्या जुलई महिन्यांत संपल्यावर आश्रमावरची ही धाड उठून आश्रम चालकांच्या ताब्यांत येईल अशी आशा बाळगण्यास जागा होती. परंतु हातीं आलेल्या बातमीवरून त्याहि आशेची राखरांगोळी झाली आहे. सोमवार ता. २७ रोजीं मसूरच्या आश्रमांतील सर्व सामानाचा जाहीर लिलाव साताऱ्याचे डि. मॅजिस्ट्रेट यांच्या हुकुमानें होणार असल्याचें समजतें. तो हुकूम अमलांत आल्यास मसूरच्या आश्रमासंबंधानें सरकारानें जो प्रारंभापासून जुलूम चालविला आहे त्यावर कळस चढणार आहे. अशा रीतीनें मसूर आश्रमावर सरकारानें इतकी बरकशी कां धरावी याचें मनास गूढ पडल्यावांचून राहत नाही. सध्याचे वटहुकूम कायदेभंगाची चळवळ जमीनदोस्त करण्याकरितां जारी करण्यांत आले आहेत असें सरकारच म्हणतें; तें खरें मानल्यास त्यांची पीडा व्हावयाची तर फक्त काँग्रेससारख्या राजकीय संस्थांना. मसूरचा आश्रम ही राजकीय संस्था नव्हे हें तिच्या ब्रह्मचर्याश्रम या नांवावरूनच सिद्ध होत आहे. आश्रमाचा आजपर्यंतचा इतिहासहि तेंच सांगत आहे. आश्रमाचें कार्य धार्मिक व सामाजिक स्वरूपाचें होय. आश्रमाच्या छापखान्यांतून प्रसिद्ध होणारें मासिकहि दासबोधासारख्या धार्मिक विषयासच वाहिलेलें आहे. विद्यार्थ्यांस मिळणारें शिक्षणहि धार्मिकच आहे. अलीकडे गांवोगांवीं जाऊन शारीरिक शिक्षण देण्याचा उपक्रम आश्रमानें केला होता. पण नमस्कार घालणें, जोर-बैठका काढणें, आखाडे स्थापणें हे शरीरबलवर्धक प्रकार अद्यापि राजद्रोहात्मक ठरले नसून निरुपद्रवीच गणले जातात. इतकेंच काय पण बंगाल्यांत तेथील सरकारानें त्यांस उत्तेजन देण्याचें कार्य स्वतःच्या शिरावर घेतलें आहे. त्या दृष्टीनें विचार केल्यास मुंबई-सरकारानें मसुराश्रमाच्या आयुष्याचे दिवस कमी करण्याऐवजीं ते वाढविण्याच्या उद्योगासच लागणें आवश्यक होतें.

२ परधर्मांत गेलेल्या हिंदूंना शुद्ध करून घेण्याचें कार्य मसूराश्रमानें ज्या नेटानें, स्वार्थत्यागानें व यशस्वी रीतीनें चालविलें त्यास दक्षिणहिंदुस्थानांत तरी तोड सांपडणार नाही. पण हें कार्यहि निवळ धार्मिक स्वरूपाचें असल्यानें त्यास उघडपणें आक्षेप घेण्याची सरकारची छाती नाही. कारण इंग्रज सरकार हे धर्मानें ख्रिस्ती असले तरी धर्माच्या बाबतींत तटस्थ असल्याचा टेंभा मिरवितें. तथापि त्यांच्या गुप्त इच्छेमुळे असो किंवा पोर्तुगीज हद्दींतून त्यास प्रेरणा मिळाल्यामुळे असो, गोमांतकांत शुद्धीची प्रचंड लाट मसुराश्रमानें उठवून दिल्यापासून सदर आश्रम सरकारच्या डोळ्यांवर आला असला पाहिजे असें उघड दिसतें; पण तेवढ्या सबबीवर आश्रमाच्या गळ्याला फास लावण्याची सरकारला लाज वाटून किंबहुना त्यांचा त्या कामीं निरुपाय होऊन तें योग्य संधीची वाट पाहत बसलें असावें असा बळकट संशय येतो. ती संधि वटहुकुमांनी आणून देताच सरकारानें आपला दीर्घ द्वेष आयताच उगवून आश्रमावर झडप घातली. कारण वटहुकूम म्हणजे एक प्रकारचें मरणच. मराणाविरुद्ध जशी तक्रार चालत नाही तशीच वटहुकुमाविरुद्धहि चालत नाही. वटहुकुमांच्या सत्तेपुढे मुंबई हायकोर्टानेंहि हात टेकले आहेत. आश्रमाच्या चालकांच्या या असाहाय्य स्थितीचा फायदा घेऊन सरकारानें आश्रमावर हा वज्राघात केला आहे. राजकीय दडपशाहीकरितां परजलेल्या हत्यारानें निरुपद्रवी व निवळ धार्मिक अशा आश्रमाची हत्या करणें हा अन्याय व कठोरपणा अपूर्व आहे. जनता दुबळी असल्यामुळे ती हा अन्याय तळमळत सोशील. पण तिच्या हृदयास त्यामुळे जीं घरें पडतील तीं भरून येणें मात्र अशक्य आहे. मसूरच्या आश्रमांतील छापखाना, उद्योगमंदिर, पुस्तकसंग्रह व इमारत या

मालमत्तेची किंमत पन्नास हजार रुपयांहून सहज अधिक आहे. ही मिळकत आश्रमाने हाडांचीं काडें करून मूठ मूठ भिक्षेवर संपादन केली आहे. ती मिळकत हिरावून घेतलेली पाहत असता आश्रमाच्या चालकांच्या अंगाचा एक एक लचका तोडल्याचें दुःख त्यांस होईल व त्याबरोबर साऱ्या महाराष्ट्रासहि तें झाल्यावांचून राहणार नाही. सरकारास न्यायाची व नीतीची कांही चाड असेल तर त्यांनी आश्रमावर असा चोरटा हल्ला न करतां आश्रमाच्या चालकांवर आरोप ठेवून त्यांची उघड चौकशी करावी व त्यांस आपली बाजू मांडण्यास संधि द्यावी हेंच उचित होय.

# ग्रामसंघटनेचें ध्येय व कार्य

या जोड–विषयाचा विचार करतांना खरी अडचण भासते ती तात्त्विक कल्पनांची नाही, तर प्रत्यक्ष ध्येय व कार्य नीट समजून घेऊन तें पार पाडणारांची. ग्रामसंघटनेसंबंधाने आजवर वर्तमानपत्रांनी लिहिलें त्यांचे कागद एकत्र केले तर गाडीभर होतील. व्याख्यानें इतकीं झालीं आहेत कीं त्यांचीं पुस्तकें छापलीं असतां त्यांनी एखादें मोठें कपाट सहज भरेल. शेत-सुधारणेसंबंधी व पतपेढ्यांविषयी सरकारी खात्यांनी इतकी माहिती अहवालांच्या व प्रयोगवर्णनांच्या रूपाने छापून प्रसिद्ध केली आहे कीं, तिच्या संग्रहाकरिता किती तरी जागा अडवावी लागेल. हें शिक्षणात्मक कार्य सर्व अवश्य आहे. त्याची किंमत कोणी कमी मानीत नाही. याच्याहि पुढें जाऊन ग्रामसेवक कसे शिकवून तयार करावे याविषयी अनेक गृहस्थांनी विचार करून, कांही कल्पनारम्य पण कांही व्यावहारिक उपयुक्ततेचे असे अभ्यासक्रम तयार केले आहेत. हे अभ्यासक्रम ज्यांत शिकवितां येतील अशा शाळांच्या खर्चाचे हिशेब सहज तयार करतां येतात.

प्रो. भागवत यांनी दहा मैल लांब व दहा मैल रुंद अशा क्षेत्रांत ग्रामसंघटनेचें कार्य करून करावयाचें तर स्वयंसेवकांचीं किती कुटुंबें वस्ती करून त्यांत राहावीं लागतील, त्यांच्या चरितार्थाला किती खर्च येईल, व त्यांनी ग्रामसंघटनेचें कार्य यशस्वी केल्यास या शंभर चौरस मैल क्षेत्रांतील लोकांच्या ऐन उत्पन्नांत किती भर पडेल याचाहि अंदाज करून दाखविला आहे. या क्षेत्रांत चाळीस गांवें असतील, चार हजार स्थायिक कुटुंबें असतील, व या सर्वांच्या सामुदायिक हिताकरिता ग्रामसंघटना व क्षेत्रसंघटना यांवर दरसाल अवघा दहा हजार रुपये खर्च केला तर नुसत्या शेतीचें उत्पन्न दरएकरीं दीडमणाऐवजी दोन मण होऊं लागेल, व त्यांच्या उत्पन्नांत वाढ होऊन दरसाल सुमारें सवालक्ष रुपयांची भर पडेल. हा निवळ आर्थिक फायदा झाला. इतर फायदेहि त्याप्रमाणेंच समजावे. अशा प्रकारचे हिशेब उपलब्ध असून त्यांचाहि उपयोग निर्विवाद आहे. कारण कोणत्याहि कार्याच्या आंखणींत खर्चाचा अंदाज व नफ्याचा अंदाज ही गोष्ट आवश्यक आहे हें कोणीहि कबूल करील.

तात्पर्य, वर दर्शविल्याप्रमाणे अनेक प्रकारांनी ग्रामसंघटनेच्या कार्याविषयी ज्ञानाची सामुग्री सिद्ध आहे. परंतु खरी अडचण हें कार्य अंगावर घेऊन पार पाडणाऱ्या सत्पात्र ग्रामसेवकांचीच होय. ग्रामसेवक म्हटला म्हणजे अर्थात् तो स्वतः खेडेगांवांत जाऊन राहाणारा असला पाहिजे याविषयी कोणाचाहि मतभेद होईल असें वाटत नाही. कारण खेडेगांवासंबंधाने शहरांत बसून कितीहि चर्चा केली तरी ती व्यर्थ होय. ती चर्चा केवळ सुशिक्षित लोकच एकत्र जमून झाली तर ती अगदीच फुकट; पण ती ऐकण्याला खेडेगांवांतील लोक मुद्दाम बोलावून आणून त्यांच्याकडून ती ऐकविली तरीहि ती जवळ जवळ फुकटच. आता शहरगांवचे लोक हे, खेडेगांवाशीं त्यांचा अर्थाअर्थी संबंध नसता ग्रामसंघटनेची चर्चा करतात हा देखावा पाहून खेडवळ लोकांना स्वतःविषयी धन्यता व ही चर्चा करणाराविषयी कृतज्ञता वाटेल. पण ग्रामसंघटना ही कार्यरूप आहे, केवळ भावनारूप नाही. खेडवळ लोक व नागरिक लोक यांच्यामध्ये एकमेकांसंबंधाने असलेला गैरसमज दूर होण्यास अशा प्रसंगांनी उत्पन्न होणारें ज्ञान व सात्त्विक भावना उपयोगी पडतील; पण हा ग्रामसंघटनेच्या कार्याचा पाया असें म्हटलें तरी प्रत्यक्ष इमारतीचें कार्य वेगळेंच असणार, व तेंच काम खरें आहे. या चर्चेचें ठिकाण शहरांत न ठेवता नागरिक लोकांनी उठून खेडेगांवांतच जाऊन ती चर्चा तेथील लोकांसमक्ष करणें ही योग्य दिशेने पुढची पायरी होय. तिच्यायोगाने वर सांगितलेली धन्यतेची व कृतज्ञतेची भावना अधिक प्रबळ होईल, व उलटपक्षीं नागरिकांनाहि स्थानिक परिस्थिति पाहून व वातावरण हुंगून खेडेगांवाविषयी प्रत्यक्ष ज्ञान अधिक होईल.

अर्थात् खेडेगांवांत जाऊन ही चर्चा करावयाची तर आपण त्यांच्यांतीलच म्हणजे जवळ जवळ त्यांच्या दर्जाचे आहों असें दर्शवितां येईल तर अधिक चांगलें. नागरिकांनी खेडेगांवांत जाऊन

पंगत करून सबाह्यात केळीचें पान मांडून त्यावर सुग्रास पक्वान्नांची मेजवानी झोडली तर, हें पाहून खेडेगांवच्या लोकांमध्यें आपलें वैभव वाढविण्याची सात्त्विक महत्त्वाकांक्षा अधिक वाढेल कीं या मेजवानांविषयीं हेवा वाटून त्यांना दृष्टिदोष बाधेल हें सांगतां येणें कठिण आहे. पण तें कसेंहि असो. केवळ नैमित्तिक प्रसंगानें खेडेगावचे लोक शहरांत बोलाविल्याने किंवा शहरचे लोक उठून खेड्यांत गेल्याने ग्रामसंघटनेचें कार्य यशस्वी होणार नाही. या नैमित्तिक भेटी देण्याचा अधिकार फक्त सरकारी कामगार व तज्ज्ञ यांच्यापुरताच मानला पाहिजे. सरकारी कामगाराने जावें तें सामान्य रीत्या खेडेगांवच्या लोकांच्या सुखदुःखाची चौकशी करावयाला जावें. तो तेथें स्थायिक राहाण्याचें कारण नाही, किंबहुना तो तसा न राहिलेलाच बरा. जिवंत शरीरांत दगड, लोखंड इत्यादि पचनीं न पडण्यासारखा, किंवा विषाप्रमाणें पचनीं पडल्यास घातक दाह व क्षोभ उत्पन्न करण्यासारखा पदार्थ, यांचा शिरकाव होणें अनिष्ट व दुःखमूल होते, त्याप्रमाणें खेडेगांवांत सरकारी कामगार हा समजावा. तो खेडेगांवच्या समाजाच्या शरीरांत पचण्यासारखा नसल्यामुळे, व त्या शरीराला पुष्टि देणारा नसेल तर, खेडेगांवांत त्याचें काम नाही. निदान त्याचा संपर्क आला तरी तो झाडून टाकतां येण्यासारखा असावा. तज्ज्ञांची गोष्ट मात्र वेगळी आहे. त्यांच्या ज्ञानाचा उपयोगच खेडवळ लोकांना होणार, उपद्रव होणार नाही. असे तज्ज्ञ लोक अर्थात वरिष्ठ प्रतीचे खेडेगांवांतून कायमचे राहिले तरी हवे. पण ते तसे नशिबाला किंवा वांट्याला कसे येणार ? परंतु हे दोन वर्ग सोडून दिले असता इतर रीतीनें गांवाला उपयोगी पडणारे लोक खेडेगांवचे कायमचे रहिवासी असलेलेच बरें. पांखराप्रमाणें उडते नसावेत.

पुण्यास सुमारें दोन वर्षांपूर्वी झालेल्या या विषयावरील व्याख्यानमालेंत रा. श्री. द. नागपूरकर यांनीं शहरांतील लोक खेड्यांत कां जातात व खेड्यांतील लोक शहरांत कां येतात याची आपल्या अनुभवानें बारीक व बोधप्रद चिकित्सा केली होती. त्यांनी शहरांतून खेडेगांवाकडे जाणाऱ्या लोकांचे दहा वर्ग कल्पिले; पण त्यांतले दोनच ग्रामसंघटनेच्या कार्याच्या दृष्टीनें उपयुक्त ठरतात, इतर तसे ठरत नाहीत. उदाहरणार्थ ( १ ) शहरांत पैसे मिळवून शहरवासाचा कंटाळा आला म्हणून विश्रांतीकरितां चार दिवस खेडेगांवात गेला. (२ ) शहराची हवा वाईट, जागा संकुचित, म्हणून खेडेगांवांत जाऊन राहिला. ( ३ ) शहरांत नोकरी वगैरे बघितली, पण मिळाली नाही म्हणून खेडेगांवांत धंदा शोधावयाला गेला. ( ४ ) शहरांतील आचारभ्रष्टतेला व धर्मभ्रष्टतेला कंटाळून खेडेगांवीं एकांत मिळतो म्हणून तो भोगण्याला गेला. ( ५ ) शहरांत धंदा होता, पण खेडेगांवांत तो अधिक चालण्याचा संभव म्हणून गेला. ( ६ ) कोणी शिक्षणाला कंटाळला व थोडेंबहुत घरचें खावयाला खेड्यावर आहे तेवढ्यावरच भागवावें म्हणून गेला. ( ७ ) शहरापेक्षां खेडेगांवांत राजकीय चळवळ अधिक यशस्वी होते म्हणून गेला. (८) कौन्सिलांच्या निवडणुकींत खेडेगांवांत मतदारांची संख्या अधिक असते तरी तेथें जाऊन घर केल्यास लोकप्रियता व मतें अधिक मिळतील म्हणून गेला. (९) शहरांत राजकारण करून थकला-भागला, म्हणून खेडेगांवांतहि तें यापुढें करावयाचें नाही, पण शहर टाळावें म्हणून गेला. (१०) देशांतील लोक अज्ञानी व कंगाल आहेत, त्यांची स्थिति सुधारावी व या सुधारणेला खेडेगांवांपासूनच प्रारंभ होणें योग्य म्हणून गेला. या दहांपैकीं नंबर १० व नंबर ७ हे लोक निःस्वार्थी भावनेनेंच खेडेगांवीं जाणारे. यामुळे त्यांच्यांतूनच मिळाले तर ग्रामसंघटना यशस्वी करण्याला सत्पात्र असे लोक मिळतील. परंतु हें काम खरोखर इतकें अवघड आहे कीं, केवळ हेतूच्या निःस्वार्थीपणानेंहि तें भागणारें नाही. किंबहुना आम्हीं पूर्वीच्या एका लेखांत दर्शविल्याप्रमाणें राजकारण व ग्रामसंघटना या दोन विषयांचा प्रत्यक्ष घोटाळा करणें योग्य नाही.

लोकहितकारक अशी कोणतीहि गोष्ट नाही कीं अंतिम स्वरूपांत तिचा राजकारणाला उपयोग होत नाही. ग्रामसंघटनेचाहि तसाच उपयोग होईल. पण प्रत्येक कामाची जात वेगवेगळी असते. म्हणून तें यशस्वी व्हावयाचें तर त्याच कार्यावर मुख्य नजर ठेवून, इतर कामें हीं त्या वेळेपुरती उपाधी किंवा उपद्रव असें मानून, तें काम एकाग्रतेनें केलें तरच यशस्वी होईल. आता गांवचे लोकच असे भेटले कीं ज्यांना राजकारणांतूनच ग्रामसंघटनेची गोडी उत्पन्न होईल तर तें सोन्याहून पिवळें समजावें. आणि अशा स्थितींत ग्रामसंघटनेबरोबर राजकारण शिकविणें हें सर्वस्वी योग्य होईल. पण शहरगांवच्या लोकांपेक्षांहि खेडेगांवच्या लोकांना दैन्य सामान्यतः अधिक भोगावें लागतें यामुळे कोणत्याहि नवीन शिकवणीपासून हें दैन्य कमी कसें होईल, म्हणजे जेथे गवताची एक काडी उगवते तेथें दोन कशा उगवूं लागतील किंवा धान्याचा कण जेथें पूर्वी एक पिकत होता तेथें दोन कसे पिकूं लागतील, हेंच खेडेगांवच्या लोकांचें मुख्यतः पाहणें असतें. म्हणून राजकारण

व ग्रामसंघटना या दोहोंपैकीं राजकारण हें त्यांना प्रथम प्रत्यक्ष पटण्यासारखें नसतें. आणि ग्रामसंघटनेपासूस कदाचित् ती गोष्ट पदरीं पडण्याचा अधिक संभव असतो. म्हणून राजकारणापेक्षां ग्रामसंघटना ही त्यांना अधिक प्रिय वाटण्याचा संभव उघड आहे.

आपण अन्न खातों, त्यांत देखील भूक भागविण्याच्या त्याच्या गुणाला पहिला नंबर व त्यांतून उत्पन्न होण्याऱ्या पौष्टिक रसाला दुसरा नंबर नाइलाजानें द्यावा लागतो. केवळ पौष्टिक म्हणून अगदी थोडा पदार्थ खाऊन भूक भागत नाही. उलट भूक भागविणाराहि असा कोणताच पदार्थ नसतो कीं ज्यांतून पौष्टिक रस थोडाना थोडा तरी निघूं शकत नाही. तोच न्याय राजकारण व ग्रामसंघटन यालालावितां येईल. खेड्यांत जाऊन शेतकरी लोकांना निवळ राजकारण शिकविल्यानें तेथील लोकांची धनोत्पादकता प्रत्यक्ष वाढणार नाही. पण जो मनुष्य त्यांना एका काडीच्या ठिकाणीं दोन काड्या व एका धान्यकणाचे ठिकाणीं दोन धान्यकण उत्पन्न करण्याला शिकवील त्याला ते देवासारखा उपकारकर्ता सहजच मानतील; व त्यानेंच जर एखादे वेळीं त्यांना राजकारणाला प्रवृत्त केलें तर तें कार्य घडवून आणण्याला त्याला मुळीच परिश्रम पडणार नाहीत.

हा सूक्ष्मभेद आम्ही मुद्दाम करतों. याचें कारण कायदेभंगापैकीं करबंदीची चळवळ निघाली असता ती करणारांची नजर एकदम खेडेगांवांकडे वळते. पण त्यांना हें कळत नाही कीं खेडेगांवाप्रमाणे शहरांतूनहि कर देणारे लोक असतातच. मग करबंदीची चळवळ इतर प्रगतिपर गोष्टींप्रमाणे शहरांतच आधी सुरू कां होऊं नये? शहरांतील मध्यम प्रतीचे किंवा श्रीमंत पुढारी प्राप्तीवरील कराची बंदी करून आपली मालमिळकत जप्तीला व विक्रीला निघूं देतात असें पाहिल्यावर खेडेगांवचे लोक शेतसाऱ्याची बंदी न सांगताहि करतील. पण तीच चळवळ शहरांत न करतां खेडेगांवांत झाली तर खेडेगांवचे लोक त्याचा असा अर्थ करतील कीं "बरे, आपले खेडेगांवचे भोळे लोक हातीं सांपडले, करा त्यांना करबंदीच्या चळवळीला उभे. पण आमच्या शेत--जमिनी उद्या लिलांव झाल्या तर आम्हांला मजुरीशिवाय दुसरें कांहीच चरितार्थाचें साधन उरणार नाही. शहरचे लोक सुशिक्षित असतात यामुळे त्यांच्या बुद्धीची एक वाट बंद झाली तर ती दुसरी वाट काढूं शकते. आमचें तसें नाही." असे विचार खेड्यांतील लोकांच्या मनांत आल्यास यांत राजकारणाच्या फायद्यापेक्षां वर्गविद्वेषाचा तोटा अधिक ठरेल. तात्पर्य, खेडेगांवच्या लोकांना राजकारण शिकवूं नये किंवा त्यांना चळवळींत घालूं नये असें आमचें मुळीच म्हणणें नाही. आमचें म्हणणें इतकेंच कीं, हें काम करणारा मनुष्य त्याच कामाचा उघडाउघडी उपदेश करणारा असावा. ग्रामसंघटनेच्या मिषानें तें कार्य त्यानें करूं नये, व ग्रामसंघटनेच्या कार्यकर्त्यांनीहि तें करूं नये.

पण ग्रामसंघटनेच्या सेवकासंबंधानें हें बोलणें अकरणरूप झालें. करणरूप व विधायक असें सांगावयाचें तें आणखी आहे व तें असें. ग्रामसंघटनेचा प्रचारक हा खेडेगांवांतच कायमचा राहणारा असावा. आणि तेथे खेडवळ लोकांत राहूनच त्यांची सुधारणा करण्याचा प्रयत्न त्यानें करावा. तो करारी व निस्स्पृह असावा. तो करारी नसेल तर त्याच्या वर्तनांत इतरांना शिस्त दिसणार नाही व ती त्याचेपासून त्यांना शिकतां येणार नाही. त्याच्या उपजीविकेचा बोजा स्थानिक लोकांवर पडूं नये. तसें झालें तरच तो निस्स्पृह बनेल; व तो निस्स्पृह राहील तरच त्याच्या शिकवणीला मान मिळेल किंवा तेज राहील. पण तो जसा उपजीविकेकरितां खेडेगांवच्या लोकांवर अवलंबून असूं नये, त्याप्रमाणे बाहेरच्या कोठल्याहि लोकांचा तो पोष्य व आश्रित आहे असेंहि गांवच्या लोकांना न दिसलेलें बरें. त्याच्या शिक्षणांतील मुख्य भाग धनोत्पादकता हा असावा यांत शंकाच नाही. पण हें शिक्षण त्यानें आपल्या स्वतःच्या उदाहरणानेंच लोकांना पटवून दाखविलें तर तें त्यांच्या गळीं चांगलें उतरेल व अंगीं भिनेल. शिकवणींत विश्वास उत्पन्न करणें हा मुख्य गुण आहे. 'सर्वः सगंधेषु विश्वसिति' हें अगदी खरें आहे. येथे सगंध याचा अर्थ 'आपल्यासारखा' इतकाच घेतला तरी चालेल. आणि जो ग्रामसेवक स्वतः खेडेगांवांत राहून तेथल्या परिस्थितींतच धनोत्पादन अधिक करून दाखवील तीच लोकांना अनुकरणीय ठरेल. अर्थात् बाहेरून येणारा उक्ता पगार, दर महिन्याला मनिऑर्डरीवर दोन सह्या करून, घेऊन त्यावर उपजीविका करणारा प्रचारक हा लोकांना धनोत्पादन कसें शिकविणार?

तज्ज्ञ म्हणविणाऱ्या लोकांचीहि हीच गत. कारण बाहेरून जाऊन एखादे वेळीं शेतीच्या किंवा कारागिरीच्या पद्धतींत ते खेडवळ लोकांना कांही सूचना करतील. त्या सूचनांचा फायदेशीर परिणाम झाला तर ठीकच. पण तसें न घडलें आणि उलट सूचनांचा प्रयोग करून पाहणारांचें नुकसान झालें, तर त्या तज्ज्ञाबद्दल त्यांना काय वाटेल याचा विचार करावा. म्हणून तोच ग्रामसेवक उत्तम, कीं जो लोकांना सांगण्याच्या सूचना किंवा सुधारणा स्वतःच्या जबाबदारी-

वर त्याच क्षेत्रांत त्याच परिस्थितींत करून दाखवितो. राजकारणांत जबाबदारीच्या तत्त्वाला जें महत्त्व तेंच ग्रामशिक्षणाच्या कार्यांतहि आहे. ग्रामसेवकाने शक्य तितकें खेडेगांवच्या लोकांशीं समरस झालें पाहिजे. पण एक 'समरस' म्हटलें म्हणजे त्यांत पुष्कळ गोष्टी येतात. पैकीं समान परिस्थितींत निस्स्पृहतेने व स्वावलंबनाने राहून भोव-तालच्या लोकांहून विशेष प्रकारचें धनोत्पादक काम करून दाखविणें हें वर सांगितलेंच; पण त्याशिवाय स्वभावाचे इतर चांगले गुणहि त्याजमध्ये असावेत. खेडेगांवच्या लोकांपेक्षां आपणाला कांही अधिक गोष्टी कळतात असें वाटत असलें तरी तसें त्याने दाखवूं नय. तसेंच आपल्या ज्ञानामुळे किंवा शिक्षणामुळे आपली देशभक्ति अधिक व या गुणांच्या अभावामुळे खेडवळ लोकांची देशभक्ति कमी अशी भावनाहि त्याने दर्शवूं नये. उलट आपण शिक्षणाने अधिक म्हणून त्याने त्यांच्या ग्राम्य दोषांकडे सदयतेनेच पाहिलें पाहिजे. स्वतः त्याच्या मध्ये तितिक्षा पाहिजे, त्याप्रमाणेच कलहप्रियतेचाहि पूर्ण अभाव असावा. पक्षभेद हे शहराप्रमाणे खेड्यां-तहि असतात. पण या पक्षभेदामुळे, व त्यांतूनहि पुढाऱ्याने कोणत्याहि एका पक्षाकडे मिळाल्यामुळे खेड्यांत जितकी हानि होते तितकी शहरांत होत नाही.

प्रो. भागवत यांनी आपल्या पुस्तकांत यासंबंधी आणखीहि कांही सूक्ष्म नियम दिले आहेत. ते या विषयांत लक्ष घालणाऱ्या लोकांनी अवश्य वाचावे. कारण अशा नियमांनी वागणाऱ्या ग्रामसेवकांची गरज आज पूर्वीपेक्षां अधिक भासते. पूर्वी खेड्यांतील समाज विस्कळित व बहिर्मुख नव्हता. मागील लेखांत आम्हीं सांगितल्याप्रमाणे तो सर्वाधिकारपूर्ण व सर्व-साधनपूर्ण पण निदान स्वावलंबी व अल्पसंतुष्ट असा होता. या सर्वच बाबतींत आजची स्थिति बदलली आहे. म्हणूनच ग्रामसेवेचें काम करूं इच्छिणाऱ्या स्वयंसेवकांवर अधिक जबाबदारी पडते. वरीलपैकीं पुष्कळसे गुण मनुष्यस्वभावाशीं संलग्न आहेत, व निर्दोष स्वभावाचा मनुष्य शाळेंत शिकवून तयार होत नसतो.तथापि ग्रामसंघटनेसंबंधाने ज्ञान व विषयाभ्यास शिकविण्याला शाळा लागतातच, व त्या बहिरंग शिक्षणाबरोबरच हें अंतरंग शिक्षणहि देण्याची थोडी-बहुत आकांक्षा या चळवळीच्या पुढाऱ्यांनी धरल्यास ती वावगी म्हणतां येणार नाही. आणि त्याच दृष्टीने या विषयाचें विवेचन आम्हीं मुद्दाम केलें आहे.

## प्रो. डॉ. जोशी यांचें विद्युत् यंत्र

काशी विश्वविद्यालयांतील रसायनशास्त्राचे प्रोफेसर डॉ. जोशी डी. एससी. ( लंडन ) यांनी एक नवीन तऱ्हेची विजेची फर्नेस ( भट्टी ) शोधून काढली आहे. आतापर्यंतच्या कोणत्याहि फर्नेसच्य-मानाने यांत इष्ट ते उष्णतामान अतिशय अल्पा वधींत उत्पन्न करितां येतें. फर्नेसच्या अंतर्भागाची रचना परवलयिक परावर्तकांच्या ( Parabolic rejelectors ) नियमावर बसवली आहे. त्यामुळे उष्णता सर्वत्र न पसरता केंद्रित होते, व उष्णता-मान अतिशय लवकर मिळून विजेचा खर्च फार कमी होतो. यांत आणखी एक कल्पना म्हणजे, फर्नेस-मधील विद्युत्प्रवाह प्रचलित चालीप्रमाणें केवळ तारां-तूनच न नेता, त्यांबरोबर कांही विशिष्ट ऑक्साइड व क्षारद्रव्यें बसवलेलीं आहेत; हीं द्रव्यें विद्युत्जन्य उष्णतेमुळे फार प्रदीप्त होतात, व त्यापासून उद्भव-लेला प्रकाश, उष्णतेबरोबर, परावर्तकांच्या साहाय्याने केंद्रीभूत होतो. रासायनिक क्रियेचा वरील तऱ्हेने उपयोग करण्याची कल्पना ही महत्त्वाची व सर्वस्वी नवीन आहे.

या केंद्राचें फर्नेसमध्ये एकदा कायमचें स्थान ठरवून बरोबर नेमकें तेथें अग्निमापक यंत्राचें अग्र बसविलें आहे. या यंत्राची अशी रचना आहे कीं, द्रवें त्या वेळीं, उद्दीप्त करण्याचीं द्रव्यें या अग्रांत आपोआप उतरवितां येतात. यामुळे एक अतिशय मोठा फायदा होतो. तो असा कीं, अग्निमापक यंत्राग्राची व फर्नेस-मध्यें प्रयोगाकारिता ठेवलेल्या द्रव्याची तप्तता ही नेहमीं पूर्णपणें एकच असतात. सामान्यतः हा हेतु साध्य करण्याकरितां अतिशय क्लिष्ट व खर्चा-च्याहि योजना पुरेशा पडत नाहीत; व या अपूर्णतेमुळे उष्णतारसायनविषयक वाङ्मयांतील अनेक महत्त्वाचे हिशेब व पुष्कळ मापनें आता केवळ ठोकळ मानांत च उपयोगितां येतील.

या फर्नेसचें महत्त्व जरी प्रामुख्येंकरून शास्त्रीय संशोधनाकरिता असलें तरी त्याची उपयुक्तता यंत्रें व शास्त्रीय उपकरणें तयार करणाऱ्या कांही एतद्दे-शीय व युरोपियन कंपन्यांना पटली आहे. लंडनच्या गॅलनकँप नामक एका सुप्रसिद्ध शास्त्रीय कंपनीने वरील योजनेचा कांही अंशीं जिच्यांत अन्तर्भाव केला आहे अशा एका फर्नेस-विषयीचें पत्रक त्या रचनेचें वैशिष्ट्य शास्त्रीय वर्गाच्या नजरेस यावें याकरितां प्रसिद्ध केलें आहे, व त्यांत त्या फर्नेसच्या उपयोगपद्धतींतील साधे-

पणा व सूक्ष्ममापनाच्या योजना, यांचा उल्लेख करून सदर योजनेचा श्रेष्ठपणा मुद्दाम दाखविला आहे.

अंतर्भागांतील परावर्तक व उष्णतेमुळे कार्य करणारीं प्रकाशविसर्जक द्रव्यें ( Thermommines-cent ) यांची योजना या नवीन फर्नेसमध्यें केल्यामुळे ही फर्नेस वरील कंपनीच्या फर्नेसपेक्षांहि अधिक सुधारलेली आहे.

# चिनी युवकसंघाचें कार्य

' हिंदुस्थान रिव्ह्यू ' या मासिकांत श्री. टी. के. मुजूमदार यांनी 'चीन देशांतील युवकांची चळवळ' या मथळ्याखाली एक लेख लिहून त्यांत चिनी विद्यार्थ्यांच्या चळवळीमुळे चीनचा भाग्योदय कसा झाला, याची माहिती दिली आहे. ती माहिती हिंदुस्थानांतील विद्यार्थ्यांनाहि मार्गदर्शक होणार असल्याने त्या लेखाचें रूपांतर पुढे देण्यांत येत आहे.

## युवकसंघाच्या कार्याचा ओनामा

लेखक म्हणतो, "चीनमध्ये झालेली सामाजिक सुधारणा व इतर सार्वजनिक चळवळी या नेटाने चालण्यास युवक संघाची चळवळ मुख्यतः कारणीभूत झाली. युवकसंघाच्या चळवळीचा इतिहास पाहता चिनी विद्यार्थ्यांना परकीय साम्राज्यवाद्यांशीं सतत दोन हात करावे लागले असें दिसून येतें. चीनमध्ये ' पीपल्स पार्टी ' ( लोकपक्ष किंवा राष्ट्रीय पक्ष ) नांवाच्या पक्षाने स्वातंत्र्याच्या लढ्याला आरंभ केलाच होता. युवक संघाने त्या पक्षातर्फे राष्ट्रांतील जनतेचा प्रत्येक थर प्रचाराच्या भेरीनादाने जागृत केला. नूतन तत्त्वज्ञानाचा पुरस्कार करूनच चीनला परकीय राष्ट्रांच्या मगरमिठींतून सोडविता येईल अशी चिनी विद्यार्थ्यांनी मनाशी खूणगांठ बांधून प्रथम लोकशिक्षणाचें कार्य अंगीकारलें, व त्याप्रमाणे त्यांनी लाखों स्वबांधवांना निरक्षरतेच्या गर्द काळोखांतून साक्षरतेच्या उज्ज्वल प्रदेशांत आणून सोडलें. चीनची एकंदर लोकसंख्या ४०।४२ कोटी. त्या देशांत खनिज संपत्ति जशी विपुल तद्वत् सुपीक जमीनहि पुष्कळ. म्हणजे द्रव्यबळ व मनुष्यबळ या दोन्ही साधनांनी संपन्न असतां अर्धांग वायू झाल्याप्रमाणें चीन दुबळा होऊन पडला होता. या निश्चेष्ट पडलेल्या कुडींत चैतन्य खेळवून ती उभी करणें लहान कार्य नव्हतें. चिनी तरुणांनी स्वाभिमानाची ज्योत पेटवून तिजवर राष्ट्रीय वृत्तीचें तैलसिंचन अखंडपणें केलें व राष्ट्रांत नवचैतन्य निर्माण केलें.

## चळवळीस प्रारंभ

१९११ सालच्या क्रांतिकारक चळवळींत चिनी विद्यार्थ्यांनीं आपलें खरें कर्तृत्व निदर्शनास आणलें. जपान, अमेरिका इत्यादि देशांत शिक्षणासाठी म्हणून अनेक चिनी विद्यार्थी जात असत. दोन्ही देश स्वतंत्र असल्याने तेथून शिकून आलेले विद्यार्थी स्वातंत्र्याच्या कल्पनेने भारून येत. अशा विद्यार्थ्यांपैकीं कांही विद्यार्थ्यांनीं मांचू घराणें राजपदभ्रष्ट करण्याच्या मोहिमेंत प्रमुखपणें भाग घेतला. १९१४-१८सालच्या महायुद्धानंतर चिनी विद्यार्थ्यांनी आपली संघटना मजबूत पायावर उभी केली व सामाजिक आणि आर्थिक प्रश्न सोडविण्याचें त्यांनी ठरविलें. चिनी विद्यार्थी स्वतंत्रपणाने विचार करूं लागले होते तरी प्रथम प्रथम त्यांच्या मनावरील पाश्चात्य कल्पनांचें दडपण कमी झालें नव्हतें. कम्यूनिझमच्या नव्या तत्त्वज्ञानानें कित्येक विद्यार्थ्यांचीं मनें आकर्षून घेतलीं व त्याच तत्त्वज्ञानाने झाला तर आपल्या राष्ट्राचा उद्धार होईल असेंहि कित्येकांना वाटूं लागलें.

## खेड्यांकडे चला

कोणत्याहि चळवळीचें प्रचारकार्य हें अमोघ साधन आहे. हिंदुस्थानांतील विद्यार्थ्यांप्रमाणें ग्रामसुधारणेचा व ग्रामसंघटनेचा नुसता डंकाच न वाजविता चिनी विद्यार्थी संघशः खेडेगांवांत शिरले व तेथे त्यांनी शेतकऱ्यांना प्रथम व्यवहारक्षम शिक्षण देण्यास सुरुवात केली. कार्याच्या पोटींच पैसा निपजत असल्याने विद्यार्थ्यांना लोकांकडून द्रव्यसाहाय्यहि चांगलें मिळूं लागले. द्रव्याच्या ओलीवर अर्थातच युवकसंघाचें, ग्रामसुधारणेचें व लोकशिक्षणाचें कार्य वाढीस लागलें. भूगोल, राजकारण, यंत्रशास्त्र व राष्ट्राभिमान हे चार विषय विद्यार्थ्यांनी शेतकऱ्यांना शिकविले व थोड्याच काळांत त्याचा अनुकूल परिणाम दिसूं लागला. वरील चार विषयांशिवाय त्यांनी जपानाविषयीं द्वेषाचें बीज अशिक्षित लोकांच्या मनांत पेरून जपानी मालावरील बहिष्काराची दीक्षा त्यांना दिली. फोरमोसा व कोरिया हे चीनचे तुटलेले अवयव पुनरपि चीनला जोडावयाचे असतील तर त्याला बहिष्कार हेंच परिणामकारक साधन आहे हें तत्त्व त्यांनी जनतेच्या मनांत बिंबविलें.

## बहिष्काराचें अमोघ शस्त्र

विद्यार्थ्यांच्या चळवळीचा परिणाम असा झाला कीं, आतां दऱ्याखोऱ्यांतून राहणारा शेतकरी, बाजार पेठांतून वावरणारा व्यापारी व कारखान्यांतून

खवणारे कामगार हेहि राष्ट्रीय व आन्तरराष्ट्रीय प्रश्नांचा विचार करूं लागले आहेत. बहिष्काराची मोहीम जोमानें चालविण्यासाठी विद्यार्थ्यांनीं सर्वत्र बहिष्कार-मंडळें स्थापन केलीं. 'वुइकली रिव्ह्यू ऑफ दि फार ईस्ट' या पत्रानें ता.२८ जून १९१९ सालच्या अंकांत चिनी विद्यार्थ्यांनी चालविलेल्या बहिष्कारमोहिमेचें सिंहावलोकन करून तिचें सूत्ररूपांत पुढीलप्रमाणें परिणाम सांगितले आहेत. "(१) चिनी विद्यार्थ्यांनी चीनमधील जपानी मालावर कडकडीत बहिष्कार पुकारून ती चळवळ इतकी तीव्रतेनें चालविली कीं, जपानचा व्यापार निम्म्यापासून एक-तृतीयांशावर येऊन ठेपला. (२) चीनची औद्योगिक सुधारणा करण्यासाठीं व्यापारी लोकांचीं मनें त्यांनी तयार केलीं. व ( ३ ) जपानचें राजकीय महत्त्व कमी केलें."

### मजूर–संघटना

मजुरांची स्थिति सुधारण्याचेंहि कार्य त्यांनी आपल्या शिरावर घेतलें. प्रथम मजूरसंघ स्थापन करून त्यांनी त्या संघातर्फे चळवळीला प्रारंभ केला. कित्येक संघांचे सेक्रेटरी म्हणून किंवा सल्लागार म्हणून त्यांनीं प्रत्यक्ष काम करण्यास सुरुवात केल्यानें मजुरांनाहि त्यांच्याविषयी आपलेपणा व आदर वाटूं लागला व तेहि त्यांनी सांगितल्याप्रमाणें वागूं लागले. शांघाय येथें १९२५ सालच्या जूनमध्यें नॅशनल स्टूडंट्स फेडरेशनचें अधिवेशन होऊन मजुरांच्या चळवळीला सुसंघटित स्वरूप देण्याचें ठरलें. (१) भांडवलवाल्यांच्या विरुद्ध भांडण्यास व सरकारापासून संरक्षण मिळण्यास मजुरांना मदत करणें, ( २ ) सर्वत्र मजूरसंघ स्थापन करून त्यांतर्फे चळवळ चालविणे, ( ३ ) रात्रीच्या शाळा उघडून व कामगारांसंबंधी वाङ्मय प्रसिद्ध करून त्यांना राजकारणाची ओळख करून देणे व ( ४ ) संपकाळीं बेकार झालेल्या मजुरांना आर्थिक साहाय्य करणें", या चतुःसूत्रीप्रमाणे मजुरांच्या संघटनेची चळवळ चालविण्याचें सदर परिषदेंत ठरलें. गेल्या दोनतीन वर्षांत चँग कैशेक यांच्या कर्तृत्वानें चीनची जी पुनर्घटना करण्यांत आली तींतहि त्यांना विद्यार्थ्यांच्या चळवळीचाच विशेष उपयोग झाला. एकंदरींत राष्ट्राचा अभ्युदय होण्यास तरुणांनीच सर्वांगीण चळवळीची धुरा स्वशिरावर घेतली पाहिजे हेंच चिनी विद्यार्थ्यांच्या चळवळीवरून दिसून येतें"

## औंध संस्थान प्रातिनिधिक सभा

औंध संस्थान प्रातिनिधिक सभेची बैठक ता. २० ते ता. २३ पर्यंत झाली. या प्रातिनिधिक सभेत ३९ सभासद असून त्यांत लोकनियुक्त २३, सरकारी अधिकारी ८ व सरकारनियुक्त ८ अशी त्याची रचना आहे. त्यांत दोन स्त्रीसभासदहि आहेत. या अधिवेशनांत बँकिंग वगैरेसारखे प्रश्न निघाले असल्यानें सातारा सहकारी संस्थांचे इन्स्पेक्टर इस्लामपूरचे श्री.काळे यांची तज्ज्ञ म्हणून सभासदांत योजना करण्यांत आली होती. अध्यक्षस्थानी साताऱ्याचे रा. ब. काळे यांची निवड करण्यांत आली होती. या बैठकीस बाहेरगांवचे बरेच गृहस्थ उपस्थित होते.

प्रथम अध्यक्ष रा. ब. काळे यांचे प्रास्ताविक भाषण झालें. त्यानंतर प्रश्नोत्तरें झालीं व संस्थानाच्या दिवाणांनी पुढील सालचें अंदाजपत्रक सादर केलें. त्यावर पं. सातवळेकर वगैरे सभासदांनी निर्भीड व मुद्देसूद चर्चा केली. नंतर सरकारी बिलें, नगरसभेच्या व ग्रामसभेच्या कामकाजासंबंधी नियम, बजेटावरील खातेवार मागण्या, पुरवणी मागण्या, खासगी बिलें याजवर चर्चा होऊन बिलें व ठराव पास झाले.

ता. २३ रोजी श्री.सातवळेकर यांच्या भौगोलिक पुनर्घटनेच्या ठरावावर चर्चा होऊन तो पास झाला. यानंतर श्रीमंत बाळासाहेब पंत प्रतिनिधि यांचें समारोपादाखल भाषण झालें. त्यांत त्यांनी प्रथम सभासदांचे आभार मानले व दिवाणी दाव्याचें बिल, न्यायकोर्टाच्या पंचांचें बिल, स्टेट बँक बिल, विमान बिल, बालविवाहप्रतिबंधक बिल यांना संमति दिली. शेवटीं झालेल्या कामाचें समालोचन करतांना ते म्हणाले, "पुढाऱ्यांनी खेड्यांत जाऊन लोकांचा विश्वास संपादन केल्यास ग्रामसभेचें काम चांगलें यशस्वी होईल. लोकांनी संस्थानची उत्पादनशक्ति व अन्नसामुग्री वाढविली पाहिजे. त्याप्रमाणे बलसंवर्धनहि केलें पाहिजे व रयतेला त्यांचें महत्त्व सभासदांनी समजावून दिलें पाहिजे. धान्याची निपज व कस वाढविण्यासाठी शेतकरी वर्गास बिनव्याजी कर्ज द्यावें व तें हप्तेबंदीनें फेडून घ्यावें या योजनेस आमची मान्यता आहे. द. महाराष्ट्रांतील ( कोल्हापूर वगळून ) पंधरा संस्थानांचें एक फेडरेशन असावें व त्यांचें एक हायकोर्ट असावें. प्रारंभीं ५-६ संस्थानांनी या योजनेस आरंभ करावा. ही गोष्ट शक्य झाल्यास त्या हायकोर्टानें फिरती करावी. या हायकोर्टांत दोन– तीन नामांकित न्यायाधीशांची नेमणूक करावी म्हणजे न्याय मिळण्याबाबत प्रजेला विश्वास उत्पन्न होईल."

अशा आशयाचें समारोपादाखल भाषण झाल्यावर अधिवेशन समाप्त झालें.

# विलायतेंतील हिंदी विद्यार्थी

[ १९३०-३१ च्या अहवालावरून ]

या वर्षी ग्रेटब्रिटनमध्ये विद्यार्जन करणाऱ्या परदेशस्थ विद्यार्थ्यांची संख्या ५४०८ असून त्यांत हिन्दी विद्यार्थ्यांची संख्या १८९१ होती. त्यांची वर्गवारी पुढीलप्रमाणें होतीः--ऑक्स्फर्ड ४२, केंब्रिज १११, ग्लासगो ८३, एडिंबरो १३८, लंडनचें युनिव्हर्सिटी कॉलेज १४४, लंडनचें किंग्ज कॉलेज ७४, दि स्कूल ऑफ ओरिएंटल स्टडीज ९३, शेफिल्ड ७४ व डब्लिनचें ट्रिनिटी कॉलेज १३. यांपैकीं बहुतेक विद्यार्थ्यांनी आपलें तेज चांगल्या प्रकारें प्रगट केले. १६ विद्यार्थ्यांना सन्मानपूर्वक पहिला वर्ग लाभला असून २५० विद्यार्थ्यांनी शिक्षण, स्थापत्य, वैद्यक वगैरे विषयांत 'प्रावीण्यपत्र' ( Diploma ) मिळविलें. संशोधनासारख्या कार्यांतहि त्यांनी मोठें यश संपादन केलें. डी. एस्. सी. पी. पदवी पाच जणांनी पटकाविली असून एम्. एस्. सी. पर्यंत अकरा जणांचे हात पोचले. पी. एच्. डी. होण्याचा मान ४२ विद्यार्थ्यांनी मिळविला असून २० विद्यार्थ्यांनीं निरनिराळ्या विषयांत उच्च दर्जाची पदवी हस्तगत केली. रॉयल कॉलेज ऑफ सर्जन्स्च्या फेलोशिपचा बहुमान दहा विद्यार्थ्यांच्या पदरांत पडला असून त्यांत दोन विद्यार्थिनी आहेत. वैद्यकीचें शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांचा आंकडा बराच फुगला आहे.

धंदेशिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या १४९ असून त्यांची वांटणी पुढीलप्रमाणें होतीः-- सीव्हिल एंजीनियरिंग ११, मेकॅनिकल एंजीनियरिंग ३६, इलेक्ट्रिकल एंजीनियरिंग ४१, ऑटोमोबाईल एंजीनियरिंग ४, मरीन एंजीनियरिंग ३, विमानविद्या १०, रेल्वे ३१, मुद्रण ४, इतर ९.

या विद्यार्थ्यांवर देखरेख ठेवण्याचें काम लंडनमधील हाय कमिशनरकडे असतें. त्यांचें शिक्षणखातें म्हणून निराळें खाते असतें. त्यामार्फत आजारी विद्यार्थ्यांना औषधपाणी दिलें जातें किंवा जरूर तर रुग्णालयांत पोंचविलें जातें. बारा विद्यार्थी अगदीं अकिंचन अवस्थेंत सांपडले. त्यांना परत मायदेशीं रवाना करण्यांत आलें. कांही विद्यार्थी आर्थिक अडचणींत पडले. त्यांनाहि हातभार लावण्यांत आला. बरेच विद्यार्थी विशिष्ट अभ्यासक्रम डोळ्यापुढे न ठेवतांच विलायतेची वारी करतात. त्यांनी आधीं हिंदुस्थानांत आपल्या विषयांतील उच्च पदवी संपादन करावी. कोवळ्या वयांत उगाच विलायतेला धूम ठोकणाऱ्या अशा विद्यार्थ्यांना परावृत्त करण्याचें काम हिंदुस्थानांतील सरकार, विद्यापीठें, वृत्तपत्रें व समाजनेते यांनी जोराने केलें पाहिजे. हिंदी विद्यापीठांत पराक्रम गाजविणाऱ्या बुद्धिमंतांनी विलायतेंत भराऱ्या मारण्यास चिंता नाहीं हें सांगणें नकोच.

दरसाल विलायतेहून सुमारें ४०० विद्यार्थी हिंदुस्थानाला परत येतात. त्यापैकीं बहुतेकांच्या पाठीवर परीक्षेंतील यशाचें गांठोडें बांधलेलें असतें. पण त्याच्या किंमतीवर सर्वांना नोकरी मिळण्याचे दिवस आता कोठें राहिले आहेत? पुष्कळ विद्यार्थी आजारी पडतात किंवा निर्धन होतात. ही आपत्ति टाळण्यासाठी पालकांनी आपल्या मुलांची वैद्यकीय तपासणी नीट करून घ्यावी, पुरेसे पैसे पाठविण्याची तरतूद करावी व मुख्य म्हणजे मुलाला पाहिजे असलेलें शिक्षण हिंदुस्थानांत दुर्मिळ आहे काय व त्यामुळे त्याने विलायतेची यात्रा करणें अवश्य आहे काय याचा पुरेपूर विचार करावा.

## एका मानपत्राची कहाणी

आटपाट नगर होतें. तेथे म्युनिसिपल कमिटी होती. मारवाडी अध्यक्ष होता. कलेक्टर युरोपियन होता. गव्हर्नर त्या बाजूला फिरकण्याची बातमी होती. त्याबरोबर कलेक्टरला चाळा सुचला. तो म्हणे, म्युनिसिपालिटीने गव्हर्नरसाहेबांना बोलावून या पर्वणीस मानपत्राच्या रूपाने वेणीदान करावें. ता. १५ जून रोजीं सभा भरली. स्वतः मामलेदार हजर. फौजदारसाहेबहि सभासदांच्या दृष्टीपुढून चमकून गेले. ते म्हणाले 'अजून ।ऑर्डिनन्स अमलांत आहे. मानपत्राला विरोध कोण करतो पाहूं.' खानबहादूर, दिवाणबहादूर, रेल्वेकडील फालतू साहेब, मिशनरीसाहेबासुद्धां हजर. बिनड्रेस पोलीसहि काम पहावयाला हजर होते. मानपत्राचा ठराव पुढें आला. खर्चाकरितां पांचशें रुपयांची मागणी झाली. तेव्हां स्थिर बुडाचे एक सभासद म्हणाले, "दोन हजार वर्षांनी प्रगट झालेल्या येशू-

ख्रिस्ताला (गांधीना) तुरुंगांत ठेवणाऱ्या गव्हर्नरला मानपत्र देऊं नये." मिशनरी म्हणाले, "स्वतः येशू ख्रिस्ताने फांशी देणारावर प्रेमच केलें, मग तें आपण त्याला तुरुंगांत घालणाऱ्या अधिकाऱ्यांवर का करूं नये? येशू ख्रिस्ताने करबंदीच्या चळवळीला उत्तेजन दिलें नव्हतें. उलट राजाचें देणें राजाला द्या, देवाचें देवाला द्या असाच उपदेश त्याने केला." दिवाणबहादुर म्हणाले "अहो ! मागण्या मिळविण्याला मानपत्राचा लांच देणें हीच खरी मुत्सद्देगिरी आहे. पूल मागितला, विचार चालू आहे म्हणून सांगितलें. पाण्याचा नळ मागा, तसेंच फिरून सांगण्यांत येईल. मागणीच्या अक्रोडाचें बीं असेंच पुढच्या आशेने रुजत घालावें लागतें. साठ वर्षांनी कां होईना पण फळ येईल." खानबहादूर म्हणाले, "मानपत्राने मान गव्हर्नरसाहेबांचा होत नाही, आपलाच होतो. मग स्वतःच्या मानाकरितां पांचशे रुपये कां खर्चूं नये?" मद्दा हरसाहेब म्हणाले, "अहो, पांचशें रुपयांची काय कथा! त्याचा बूटच पांचशें रुपयांचा असेल! टोपीला तीनशे रुपये पडतात असें म्हणतात!" उत्तरादाखल स्थिर बुडवाले म्हणाले, "ज्याच्यावर प्रेम करावें त्याला मानपत्र द्यावें असें म्हटलें तर नवराबायकोंनी रोज एकमेकांला मानपत्रें द्यावीं लागतील."

अखेर कमिटीच्या पैशाऐवजीं सभासदांनी पदरचे पांचपांच दहादहा रुपये खर्चाला द्यावे अशी सूचना येतांच खरें प्रेम किती हें कळून आलें. शेवटीं ठरावावर उघड मतें घ्यावीं अशी सूचना पास झाली. कारण बॅलटने गुप्तपणें मतें देणें हा नामर्दपणा होतो! शेवटीं उलट-सुलट मतांची संख्या सारखी होण्याचा रंग आला. तेव्हा एकाने आपलें नीतिधैर्य व मर्दपणा प्रगट करून मानपत्राला अनुकूल मत दिलें. पांचशें रुपये मंजूर झाले. मानपत्र केव्हा देणार हें लवकरच कळेल.

# ओटावा येथील साम्राज्यपरिषद्

## मेजर सी. आर. अटली एम्. पी. यांचें मत

हल्लींच्या ब्रिटिश कॉमन्स सभेंतील मजूरपक्षाचे दुय्यम पुढारी व जुन्या मजूर मंत्रिमंडळांतील पोस्ट मास्टर जनरल यांनी ओटावा येथील साम्राज्य परिषदेसंबंधी मद्रासच्या हिंदूंत खालील आशयाचे विचार प्रदर्शित केले आहेत.

मेजर अटली म्हणतातः—

"ओटावा येथील साम्राज्यपरिषदेंत साम्राज्यास फारच हितकर असें आर्थिक धोरण आंखलें जाईल अशी पुष्कळांनी आशा बाळगली आहे. लॉर्ड बिव्हरब्रुक यांच्या भडक आशा फोल आहेत असें जरी सर्व तज्ज्ञांस वाटतें, तरी निदान एकंदर साम्राज्य आर्थिक बाबींत बरेंच स्वावलंबी होईल अशी बहुतेकांची कल्पना आहे. ब्रि. साम्राज्यांतील सर्व घटकांत सहकारिता उत्पन्न होऊन आर्थिक आपत्ति नष्ट झाली तर तें खरें साम्राज्य होईल. पण अशा साम्राज्यशाहीमुळे नवीं संकटें येतील अशी आम्हांस भीति वाटते. शिवाय उच्च ध्येय व वस्तुस्थिति यांत अडचणींचे डोंगर आहेत. विशेष प्रकारच्या आर्थिक परिस्थितीमुळे वाटाघाटींचें क्षेत्र अगदी संकुचित झालेलें आहे. आणि ही परिस्थिति साम्राज्याबद्दल वाटणाऱ्या केवळ्याहि अभिमानाने बदलतां येणार नाही.

पूर्वी वसाहती कच्चा माल व अन्नद्रव्यें इंग्लंडला देऊन त्या मोबदला इंग्लंडचा पक्का माल घेत. अशा प्रकारें उभयतांचे आर्थिक व्यवहार परस्परपूरक होत असल्याने या वस्तुस्थितीवर मातृदेश व वसाहती यांच्या सहकार्याची कल्पना आधारलेली होती. त्या काळीं ती खरीहि होती. पण ती कल्पना आज पन्नास वर्षांनंतर निरुपयोगी झाली आहे. पहिल्याने वसाहती निर्माण झाल्या तेव्हा इंग्रजांनी मोठ्या उत्साहाने रेलवे, यंत्रें, कारखाने वगैरे कामी वसाहतींत भांडवल गुंतवलें. पण याला केव्हातरी मर्यादा पडणार होतीच. आपली लोकसंख्या व आपल्या देशाचें उत्पादनसामर्थ्य हीं लक्षांत घेता परकीयांच्या भांडवलाचें ओझें आता फाजील झालें असें वसाहतींना केव्हा तरी वाटणार होतेंच. शिवाय आपणहि औद्योगिक क्षेत्रांत पुढे यावें अशी वसाहतींना इच्छा होऊन केवळ कच्चा माल व अन्न पुरविणारे देश एवढ्याच पदवीवर ते तृप्त राहणें हि शक्य नव्हतें व तसें आता घडलेंहि आहे. अन्न व कच्चा माल यांचे भाव जगभरच उतरल्यामुळे वसाहतींना परकी भांडवलाचें कर्ज डोईजड झालें. आणि ऑस्ट्रेलिया वगैरे वसाहतींत शहरांची वाढ होऊन औद्योगिक उत्कर्षाकरिता वसाहतींनी संरक्षक जकाती बसविल्या. एकंदर साम्राज्यांतील आर्थिक कारभाराला शिस्त लावण्याचा काळ पूर्वी कधी असला तरी आता मात्र तो खास उरलेला नाही. वसाहतींतील मुत्सद्दी

स्वच्छ सांगतात कीं, 'आम्ही आमचें हित आधीं पाहणार.' म्हणून आपल्या धंद्यांचे संरक्षणास जकाती उभारण्याचा त्यांनी निश्चयच केला आहे. ब्रिटिश सरकारनेहि आता खुल्या व्यापाराचें धोरण सोडलें असल्याने त्यास शेतकऱ्यांना संरक्षण देतां येत नाहीं असें कसें म्हणतां येईल ? हल्ली अमलांत असलेल्या सवलतींचें परीक्षण करता त्यांतील पुष्कळशा निरुपयोगी आहेत असें उघड दिसतें. ब्रिटिश राष्ट्राविरुद्ध वसाहतींनी उभारलेल्या भिंती या ब्रिटिशेतरांविरुद्ध उभारलेल्या भिंतींहून ठेंगण्या आहेत खऱ्या, पण दोनहि प्रकारच्या भिंती दुर्लंघ्यच आहेत.

आम्हांला आमचें लोखंड, पोलाद, यंत्रें आणि कापड खपण्याला बाजार पाहिजे आहे. वसाहतींत यांपैकीं जे प्रकार होत नाहीत ते वसाहती घेतीलहि. पण आमचा जो माल खपत नाही तोच वसाहती मोठ्या प्रमाणावर निर्माण करूं लागल्या आहेत. उलट हल्ली ब्रिटिश सरकारने मांस, अंडीं, दुधाचे पदार्थ, सुकीं फळें यांचा धंदा इंग्लंडांतच वाढविण्याचें धोरण ठेविल्यामुळे वसाहतींचा मुख्यतः न्यूझीलंडचा हा माल येथे खपेनासा होणार आहे. वसाहतींना मुख्य अन्नद्रव्याबाबत सवलती पाहिजे आहेत. पण याने येथील मजुरांवर अन्नखर्चाचा बोजा वाढेल.वसाहतींनी इंग्लंडच्या पक्क्या मालालाहि उलट सवलती दिल्याशिवाय इंग्लंड तरी मजुरांवरील हा बोजा कां वाढवील ?

पुढील तीन मुद्दे विचारांत घेतले पाहिजेत. (१) इंग्लंडाचा सगळा पक्का माल वसाहतींत अथवा वसाहतींचा सगळा कच्चा माल इंग्लंडांत खपूं शकत नाही. म्हणजे दोघांनाहि जगांतील इतर बाजार शोधलेच पाहिजेत. (२) अर्जेंटाइनसारख्या देशांत इंग्लंडचें पुष्कळ भांडवल गुंतलें आहे, त्याचें व्याज इंग्रजांनी मालाच्या रूपाने पत्करलें तरच तें मिळूं शकेल. (३) निरनिराळ्या राष्ट्रांतील भांडवलवाल्यांनी आंतरराष्ट्रीय संघ करून जगांतील बाजार आपसांत वांटून घेतले आहेत हें अजून फारसें कोणाच्या लक्षांत येत नाहीं; आणि कानडांतील बहुतेक धंदे साम्राज्याबाहेरील भांडवलाने वाढले आहेत. ज्या राष्ट्रांतील धंदे सरकारी मालकीचे झाले आहेत अशा राष्ट्रांचा प्रश्न असता तर ओटावा परिषदेचें काम सोपें होतें. पण येथे प्रश्न आहे खासगी भांडलवशाहीचा. खासगी भांडवलाला स्वदेशाभिमान नाही. भांडवलवाला रोकड रक्कम ओळखतो.तो अंतःकरणाच्या नाजूक भावना मुळीच जाणत नाही. अशा परिस्थितींत ओटावा येथे फार तर थोड्याशा जकातींची तडजोड होईल, याहून अधिक तेथे कांहीहि निष्पन्न होणार नाही.

ओटावास होणाऱ्या निर्णयासंबंधी ब्रिटिश मजूरपक्षाचें धोरण कसें राहील ? अन्नद्रव्यावर जकाती बसवून मजुरांवर खर्चाचें ओझें लादण्यास मजूरपक्ष विरोध करील. तसेंच वसाहतींत भांडवल गुंतविलेल्या भांडवलवाल्यांचा फायदा व्हावा म्हणून तेथील मजुरांची राहणी हलाखीची करण्यास मजूरपक्ष संमति देणार नाही. ब्रिटिश साम्राज्याभोवती आर्थिक तट उभारण्याचा प्रयत्न चालू आहे असें दिसतें. त्याचें मजूरपक्ष चिकित्सापूर्वक परीक्षण करील. कारण आर्थिक स्वदेशाभिमानाने आर्थिक युद्धें होतात व त्यांतूनच पुढे शस्त्रयुद्धें जन्मास येतात. आम्हांसारख्या हरतऱ्हेचा माल निष्पन्न करणाऱ्या राष्ट्रास जगाचा बाजार खुला राहील तरच आमच्या लोकांचा निभाव लागेल. ओटावाच्या निर्णयाकडे पाहण्याची मजूरपक्षाची आणखी एक दृष्टि आहे ती म्हणजे सर्व जगांतील आर्थिक कारभाराची योजना आंखली जाऊन अखिल मानवजातीस शास्त्रीय शोधांनी जी उच्च राहणी सुलभ करून दिली आहे ती सर्व लोकांना मिळण्यास ओटावा येथील निर्णयांनी कितीशी मदत होईल ? खुल्या व्यापाराचें म्हणजे व्यापारी चढाओढीचें तत्त्व नष्ट झालें आहे हें खरें. पण त्या जागीं आंतरराष्ट्रीय युद्धें उत्पन्न करणें योग्य नाही; तेथें आंतरराष्ट्रीय सहकार्य उत्पन्न झालें पाहिजे.या शुभकार्याच्या सिद्धीसाठी, सर्व साम्राज्यघटकांचें सारखेंच हित होईल अशी आर्थिक योजना आंखून ब्रिटिश राष्ट्रसंघ जगास उदाहरण घालून देईल काय ?

# पाठींत बडगा आणि ताटांत रोडगा

जुलै महिन्याच्या प्रारंभीं वटहुकुमांची मुदत संपत असल्यामुळे त्यापूर्वी ब्रिटिश सरकारास आपलें राजकीय धोरण जाहीर करणें भागच होतें. सदर धोरण जाहीर करतांना भावी राजकीय सुधारणांचा उलगडा होणार व हिंदु-मुसलमानांच्या वादग्रस्त मुद्द्यांचा निकालहि बाहेर पडणार असें सांगण्यांत आल्याने त्याची बातमी कधी कानीं पडते अशी उत्कंठा हिंदुस्थानांतील सर्व जनतेला लागून राहिली होती. सरकारच्या वरील धोरणाचें स्वरूप काय असेल याविषयी विलायतेंत मंत्रिमंडळाच्या खलबतखान्याभोवतीं हुंगत हिंडणाऱ्या व उडत्या पांखरांचीं पंखें मोज-

णाऱ्या कांहीं इंग्रज चौकसखोरांनी आपल्या अंदाजाचीं पार्सलेंहि इकडे आगाऊच पाठवून दिलीं होतीं. त्या पार्सलांतील अंदाज अशुभसूचक असल्या कारणाने हिंदी जनता साहजिकच हवालदिल झाली. अशुभ अफवा बहुधा खऱ्या ठरतात असा अनुभव आहे. तोच अनुभव याहि प्रसंगीं प्रत्ययास येऊन हिंदी लोकांचीं मनें निराशेने व उद्वेगाने काळवंडून गेलीं.

आधी विषय हिंदुस्थानाचा व त्यासंबंधी कॉमन्स सभेंत बोलावयाचे भारतमंत्री सर सॅम्युअल होअर. नाऱ्याला शुभ बोलावयास सांगितलें तरी तो मांडवाला आग लागली म्हणून हटकून म्हणावयाचा. अशा स्थितींत त्याला अशुभ बोलावयास मुद्दाम सांगितल्यावर तो मांडवाला आग लावूनच काय पण नवरानवरीलाहि फुंकून मोकळा झाल्यास नवल कसलें? प्रस्तुत प्रसंगीं होअरसाहेबांची अवस्था अशीच झाली. होअरसाहेब वटहुकुमांना आपला जीव कीं प्राण समजतात. शंकराचें जसें पाशुपतास्त्र, विष्णूचें सुदर्शन चक्र, इंद्राचें वज्र, बळरामाचा नांगर, परशुरामाची कुऱ्हाड व भीमसेनाची गदा तसे सॅम्युएलाचे वटहुकूम. किंबहुना वरील सर्व वेगवेगळ्या हत्यारांचे गुण एकट्या वटहुकुमांत सांठविलेले आहेत अशी सॅम्युएलांची कल्पना आहे. त्या वटहुकुमांच्या जोरावर एवढी सामर्थ्यवान कॉंग्रेस पण तिलाहि आपण गतप्राण करून सोडली अशी होअर यांची समजूत असून त्या समजुतीने पोटांतून उठणाऱ्या आनंदाच्या उकळ्या केवळ शिष्टाचार म्हणूनहि दाबून ठेवण्याचें भान त्यांना कॉमन्स सभेंतील आपल्या भाषणांत राहिलेलें दिसत नाहीं.

वटहुकुमांची वेसण टोंचून कॉंग्रेसची कायदेभंगाची चळवळ पूर्णपणें कह्यांत ठेवतां आली इतकेंच नव्हे तर कित्येक ठिकाणीं तीं कल्पनातीत मोडून पडली अशी होअरसाहेबांनी हर्षवायु झाल्यासारखें करून अभिमानपूर्वक आरोळी ठोकली आहे. सर सॅम्युएल होअर यांना आपल्या पराक्रमाचा इतका उन्माद चढला आहे कीं कॉंग्रेस व सरकार यांजमधील चालू युध्द-प्रसंगांत दोघांची बरोबरी सुटली असें कोणीं म्हटलेलेंहि त्यांना विषतुल्य वाटतें. म्हणून कॉंग्रेस व सरकार यांची युद्धांत बरोबरी सुटून सरकारचे डोळे कधींहि निवणार नसल्याचें होअरसाहेब सांगत आहेत. कॉंग्रेस चारी मुंड्या चीत होऊन तिची पाठ सपशेल धुळींत मळल्यावांचून विजयानंदाने धुंद झालेल्या होअरसाहेबांच्या जिवाला चैन पडणार नाहीं. यासाठी त्यांनी वटहुकुमांची कट्यार हिंदी राष्ट्राच्या मानेवर तशीच ठेवण्याचें ठरविलें आहे. मात्र अनेक वटहुकुमांना एकत्र करून त्यांचा एकच आसूड वळण्यांत येणार आणि तो प्रांत व जिल्हे यांच्या चालचलणुकीकडे लक्ष देऊन त्यांच्या पाठीवर कमी-अधिक प्रमाणाने उडविला जाणार.

वटहुकुमांच्या अंमलबजावणींत या प्रकारचा फेरबदल करण्याची लालूच दाखविली असली तरी तिचा वस्तुतः म्हणण्यासारखा उपयोग नाहीं. कारण वटहुकुमाने मिळणारे अमर्याद अधिकार आपखुषीने सोडण्यास फारच थोडे प्रांताधिपति व जिल्हाधिपति कबूल होतील. वटहुकुमांचा कारभार हा अंधारांतील कारभार होय. कायद्याच्या उजेडांत जीं कृत्यें करण्याची अधिकाऱ्यांना छाती व शक्ति नसते तीं कृत्यें करण्यास त्यांना अंधारांत कचरण्याचें कारण उरत नाहीं. त्यांच्या बळावर त्यांना मागच्यापुढच्या बत्तीस कुळ्यांचें ऋण फेडून घेतां येतें. फक्त संशयाची सबब पुढे केली कीं मनांतील कोणतेंहि दुष्ट बेत तडीस नेण्याचा मार्ग त्यांना सुलभ होतो. एखादी संस्था हिंदु संघटनेची चळवळ नेटाने व निर्भयपणाने चालवीत असल्याचें कोणा जिल्हाधिकाऱ्याला दिसलें कीं घाल तिच्यावर धाड, ठरीव तिला बेकायदेशीर, आणि फिरीव तिच्यावरून नांगर. एखादा श्रीमान माणूस नोकरशाहीला मेजून न राहतां प्रत्यक्ष कायदेभंगाच्या चळवळींत सामील नसला तरी राष्ट्रीय चळवळीचा पूर्वीपासून पुरस्कर्ता आहे याची कोणा जिल्ह्याच्या अंमलदाराला माहिती असली कीं धर त्याला वटहुकुमांच्या पेचांत, भर त्याजवर खटला व उकळ त्याजपासून वीस वीस हजार रुपये दंड. एखाद्या पुढाऱ्याला सहजासहजीं कैदेची जबर शिक्षा द्यावयास सांपडत नाहीं तर काढ त्याच्यावर हजेरीची नोटीस व स्वाभिमानाखातर त्याने आपल्या अंदाजाप्रमाणे ती मोडली कीं ठोठाव त्याला दोन वर्षांची सक्तमजुरीची शिक्षा. अशा प्रकारचीं जुलमी कृत्यें कोणकोणत्या जिल्ह्यांतून कसकशीं घडलीं आहेत हें सर्वांना माहीतच आहे. कित्येक जिल्हाधिकारी या उदाहरणास अपवाद आहेत हा गुण असला तर त्यांचा आहे, वटहुकुमांचा खास नव्हे. सारांश, देशांतील प्रत्येक व्यक्तीच्या गळ्याभोंवतीं वटहुकुमांचा फास कायमचा अडकवून ठेवलेलाच आहे. फक्त तो आवळून त्या व्यक्तीचे डोळे पांढरे केव्हा करावयाचे हें त्या त्या जिल्ह्याच्या वरिष्ठ अधिकाऱ्याच्या लहरीवर व भलेपणावर अवलंबून आहे.

गेल्या सहा महिन्यांत या वटहुकुमांनी बऱ्याच जिल्ह्यांतून खराटा फिरवून तेथील जनतेला हीनदीन बनविलें आहे. प्रत्यक्ष कायदेभंगाच्या चळवळींत भाग न घेतलेल्या व्यक्तींबद्दल व संस्थांबद्दल हें आमचें विधान आहे. मग

जे त्या चळवळींत पडले त्यांच्यापैकीं पुष्कळांच्या घरादारांचा उन्हाळा झाला असल्यास त्याबद्दल मुळी बोलावयासच नको. संपलेल्या सहा महिन्यांत वटहुकुमांनी देशांत जर इतका हाहाःकार उडवून दिला तर पुढच्या सुरू होणाऱ्या सहा महिन्यांत जनतेच्या हरएक प्रकारच्या हालचालीच्या दृष्टीने सारा देश सदर हुकूम उजाड करून सोडतील कीं काय अशी भीति वाटते. होअरसाहेब निक्षून सांगतात कीं ३ जुलै रोजीं वटहुकुमांची मुदत संपत असली तरी गरज संपत नसल्याने सदर शस्त्र म्यानांत न घालतां हातांत ठेवणें सरकारास भाग आहे. परंतु होअरसाहेबांत किंवा सध्याच्या ब्रिटिश मंत्रिमंडळांत मुत्सद्दीपणाचा व दूरदृष्टीचा लवलेश जरी असता तरी ज्या क्षणीं वटहुकुमांची मुदत संपली त्या क्षणींच त्यांजवर अमृतसिंचन करून त्यांस जिवंत राखण्याची घाई न करता त्यांनी महिन्या दोन महिन्यांची काँग्रेस पक्षाला सवड दिली असती व त्या मुदतींत काँग्रेसच्या पुढाऱ्यांनी कायदेभंगाचें व्रत अखंड चालूच ठेवलें असतें तर वटहुकूम फिरून जारी करण्याला सरकारचे हात कोणीं धरले नसते. पण इतकी मुर्वत, इतकी दूरदृष्टि, इतका समंजसपणा, इतकी लोकमताविषयीं दिक्कत सध्याच्या ब्रिटिश मंत्रिमंडळांत उरली आहे कोठें ?

ब्रिटिश सरकारला जशी इभ्रत व स्वाभिमान आहे तशी इभ्रत व स्वाभिमान राष्ट्रीय सभेच्या पुढाऱ्यांनाहि आहे. सरकारानें ज्या अर्थी काँग्रेसचें सत्त्वहरण करण्याचा पण केला आहे, त्या अर्थी काँग्रेसच्या पुढाऱ्यांनाहि सत्त्वरक्षण करणें आपलें पवित्र कर्तव्य वाटत आहे. वटहुकुमांना सहा महिने झाले तरी राष्ट्रीय सभेतर्फे तुरुंगांत जाणारांची रांग मोडत नाही, याच्या अनेक महत्त्वाच्या कारणां पैकीं सत्त्वपालन हें एक प्रमुख कारण होय. त्या सत्त्वाला हिंदी लोक टिकले याबद्दल ब्रिटिश मंत्रिमंडळालाच काय पण सर सॅम्यूएल होअर यांना देखील अभिमानच वाटला पाहिजे. कारण उदार व थोर मनाचे राज्यकर्ते आपले प्रजाजन स्वाभिमानशून्य, सत्त्वहीन व नादान असण्यांत भूषण मानतील कीं ते तेजस्वी, बाणेदार व मर्द म्हणून गणले जाण्यांत अभिमान बाळगतील ? इंग्रज लोक आपली प्रजा पायाखालच्या धुळीप्रमाणें तुडविली जाण्यांतच आपल्या राज्यपद्धतीचें चीज झालें असें समजत असतील तर राज्यकर्ते या दृष्टीने त्यांच्या नालायखीचें प्रमाण दुसरें कोणतें पाहिजे ! या रीतीने विचार करतां वटहुकुमांची उत्तरध्रुववरील सहा महिन्यांची रात्र वर्षभर वाढविण्यांत ब्रिटिश सरकारच्या हातून अक्षम्य चूक घडली असेंच कोणीहि म्हणेल.

बरें, होअर यांचा विजयाचा कोटिक्रम घेतला तरी तो त्यांच्यावर असाच उलटतो. खरें म्हटलें असतां विजयाची भाषा त्यांनी तोंडांतून काढूंच नये. राज्यकर्त्यांनीं आपल्या प्रजाजनावर विजय तो काय निराळा मिळवावयाचा? त्यांनी प्रजेस जेव्हां जिंकून गुलाम बनविलें त्याच वेळी ज्याला विजय म्हणतात तो त्यांनी मिळविला. तथापि विजयाचा वाद त्यांनी काढला म्हणून तो चालवावयाचा झाल्यास त्यांच्या सध्याच्या कृतीवरून काँग्रेसनेच विजय मिळविला व सरकारच पराभव पावलें असेंच अनुमान काढावें लागेल. कारण वटहुकुमांचा अंमल सहा महिने चालवूनहि काँग्रेसने हार खाल्ली नाही म्हणूनच सरकारास वटहुकुमांचें आयुष्य आणखी सहा महिने वाढविणें भाग पडलें असें होअर साहेबच म्हणत आहेत. उलटपक्षीं सहा महिन्यांची मुदत संपतांच वटहुकुमांचें आयुष्यहि संपवून मामुली कायद्याची प्रभा फाकूं दिली असती तर सरकारची विजयाची घमेंड हल्लीहून कदाचित् अधिक क्षम्य ठरली असती.

सरकारपक्ष व काँग्रेसपक्ष यांच्या झगड्यांत हजारों स्त्री-पुरुषांनी तुरुंगवास पत्करला. या दोन पक्षांत सरकारचा पक्ष प्रबल व काँग्रेसचा पक्ष दुर्बल आहे. सामान्य जनतेस कायदेभंगाची चळवळ गेल्या जानेवारी महिन्यांत कां सुरू झाली याचें सूक्ष्म कारण माहीत नसलें तरी काँग्रेस हिंदुस्थानाच्या स्वराज्याकरिता म्हणजे हिंदी लोकांच्या शाश्वत कल्याणाकरिता लढत आहे व सरकार तिचा त्यासाठींच छळ करीत आहे अशी जनतेची सर्वसाधारण समजूत असल्याने तिला काँग्रेसच्या चळवळीविषयीं साहजिकच सहानुभूति व कळवळा वाटतो व सरकारच्या दडपशाहीविषयीं तिच्या मनांत संताप व तिरस्कार उत्पन्न होतो. बरें, तुरुंगांत जाऊन हालअपेष्टा सोसणारे हजारों स्त्रीपुरुष दुसरे तिसरे कोणी नसून जनतेपैकींच कोणाचे आप्त, कोणाचे मित्र, कोणाचे पुत्र तर कोणाचे गुरू आहेत. यामुळे कोणत्या ना कोणत्या कारणाने काँग्रेसची चळवळ ही साऱ्या बहुजनसमाजाचीच चळवळ होऊन बसली आहे. अशा स्थितींत काँग्रेसपक्षास सोडून आपल्या पक्षाकडे जनतेच्या मताचा कांटा सरकारास झुकवावयास हवा असला तर स्वराज्याचे खरेखुरे व भरीव हक्क सरकार हिंदुस्थानास देत आहे, पण काँग्रेसचे पुढारी केवळ हटवादाने ते हक्क न स्वीकारता आपला छळ करून घेत आहेत अशी सरकारच्या कृत्यांवरून जनतेची खात्री पटावयास पाहिजे. पण ती खात्री होअरसाहेबांच्या भाषणावरून मुळींच पटत नाही. त्यांनी आपल्या भाषणांत स्वराज्याचा थांग लागू दिला नाहीच; उलट तिसरी गोलमेज परिषद

स्वराज्याच्या अखेरच्या योजनेपूर्वी बोलावण्याचें मुख्य प्रधान मि. रॅम्से मॅक्डोनाल्ड यांनी दुसऱ्या गोलमेज परिषदेच्याअखेरीस स्पष्टपणें सांगितलें असतां होअरसाहेबांनी तेंहि आश्वासन धाब्यावर बसवून वचनभंगाचें नवें पातक जोडल्यामुळे हिंदुस्थानांतील सर्व पक्षांचे लोक व कित्येक इंग्रज लोकहि होअर यांच्या व मंत्रिमंडळाच्या विश्वासघातकीपणाबद्दल त्यांचा धिक्कार करीत आहेत.

होअर यांनी स्वराज्याविषयीं सांगितलें तें एवढेंच कीं, प्रांतिक स्वराज्य व फेडरेशन यांचीं दोन वगवेगळीं बिलें पार्लमेंटापुढे न मांडतां त्यांचा एकच मसुदा ठेवण्यांत येईल; फेडरेशनची उभारणी हा पल्ला लांबणीचा असल्यामुळे तो गांठण्याची वाट न पाहतां प्रांतिक स्वराज्याचा आरंभ शक्य तितका लवकर होईल; फेडरेशनच्या बाबतींत खालसा मुलूख, संस्थानें व ब्रिटिश सरकार यांच्या परस्परांमधील संबंधापैकीं बऱ्याच भानगडीच्या विषयांची निखालसता झाली नाहीं, ती त्वरेने करून घेण्यासाठीं तिसरी गोलमेज परिषद किंवा तिची कन्या जी फेडरल स्ट्रक्चर कमिटी तिची बैठक भरविण्यांत अधिक वेळ न गमावतां व्हाइसरॉय आपली सल्लागार कमिटी बोलावतील. त्यानंतर विलायतसरकार संस्थानी तज्ज्ञांशीं जमाखर्चाच्या बाबीसंबंधीं वाटाघाट करतील. कॉमन्स सभा व लॉर्डांची सभा यांतील सभासदांची जोड कमिटी (जॉइंट पार्लमेंटरी कमिटी) बनवून ती हिंदुस्थानाच्या राज्यघटनेंत करावयाचे फेरबदल ठरवील व तिजपुढे आपलें मत सांगण्याकरितां हिंदुस्थानाच्या प्रतिनिधींना बोलावण्यांत येईल.व त्यांचें मत ऐकून घेतल्यावर सदर कमिटीने बनविलेला बिलाचा मसुदा पार्लमेंट सभेपुढे मंजुरीकरिता ठेविला जाईल.यांत हिंदु-मुसलमानांच्या ज्ञातिविषयक तंट्याचा विषय उरतो. त्या बाबतींत ब्रिटिश मंत्रिमंडळ आपला निर्णय चालू उन्हाळ्यांत म्हणजे या जुलै महिन्यांत सांगेल असा होअर यांच्या भाषणाचा निष्कर्ष आहे.

या त्यांच्या निष्कर्षांतून तक्रारींचे अनेक मुद्दे निघतात. त्यांनी प्रांतिक स्वराज्याचा उच्चार आपल्या भाषणांत केला आहे तसा मध्यवर्ती सत्तेंत लोकांस मिळावयाच्या राजकीय हक्काचा उच्चार मुळींच केलेला नाहीं. फेडरेशनमध्ये त्याचा अन्तर्भाव होतो असें कोणी म्हणेल व तें तसें एरव्हीं मानतांहि आलें असतें. पण प्रस्तुत प्रसंगीं गांठ आहे होअरसारख्या भिस्किल माणसाशीं. त्यांनी हा मुद्दा अजिबात डावलला असल्यामुळे फेडरेशनचा डोलारा धीरे धीरे रचण्याच्या हिंदी लोकांना झुलवीत ठेवून नुसत्या प्रांतिक स्वराज्यावर वेळ मारून नेण्याचा त्यांचा डाव उघड दिसतो. ब्रिटिश सरकाराने पूर्वी वचन दिल्याप्रमाणे राज्यघटनेच्या बिलांत कोणते विषय घ्यावयाचे हें ठरविण्यापासून तों सदर बिल पार्लमेंटाकडे जाईपर्यंतच्या मार्गांतील प्रत्येक टप्प्यावर हिंदी प्रतिनिधींचा सल्ला घेण्यास सरकार बांधलें गेलें आहे. त्याने त्याकरितां पुनः गोलमेज परिषदच बोलावली पाहिजे, नुसत्या व्हाइसरॉयाच्या सल्लागार कमिटीकडे बोट दाखवून किंवा कोणी तरी चार गोमाजी केव्हांतरी बोलावून त्यांजवर परिषदेची बोळवण करतां कामा नये.

या कामीं उशिराची सबब सांगण्यांतहि कांहीं हंशील नाहीं.आतां तपशिलाचा भाग संपून संरक्षक बंधनासारख्या मुख्य बाबीच काय त्या उरल्या असल्याने ते मुद्दे गो.मे. परिषद आठबारा दिवस बसली तरी सहज संपवून टाकील व जेथे गेलीं दोनतीन वर्षें नुसती हुजत घालण्यांत खर्च झालीं तेथे आणखी आठबारा दिवसांची मुदत कांहीं मोठी नाहीं. तिसरी तक्रार ज्ञातिविषयक तंट्यांची. ज्ञातिविषयक तंट्यांचा निकाल मंत्रिमंडळाने सांगितला व तो मुसलमानांना पटला नाहीं तर राज्यघटनेचा मसुदा तेवढ्यासाठीं खुंटून राहणार कीं काय? होअर यांच्या भाषणावरून हा संशय दृढ होतो. तो खरा ठरल्यास केवळ एखाद्या जातीच्या हेक्याकरिता सगळेंच मुसळ केरांत घालविणें त्यांना किंवा मंत्रिमंडळाला योग्य वाटत असलें तर त्यांच्या या शहाणपणाची तारीफच करावयास पाहिजे!

सर सॅम्युएल होअर व ब्रिटिश मंत्रिमंडळ यांच्या वरील चालढकलीवरून व उडवाउडवीवरून फेडरेशनच्या मिषाने केवळ प्रांतिक स्वराज्य देऊन हिंदी लोकांच्या तोंडाला पानें पुसण्याचा त्यांचा इरादा उघड दृष्टीस पडतो. प्रांतिक स्वराज्य हा नुसता कळण्या-कोंड्याचा रोडगा आहे. त्यांत अन्नाचा अंश असलाच तर तो फारच थोडा असल्याने तेवढा खाऊन हिंदी लोकांचा प्रदीप्त झालेला जठराग्नि मुळींच शान्त होणार नाहीं. त्यायोगाने पाठींत वटहुकुमांचा बडगा व ताटांत कळण्या-कोंड्याचा रोडगा अशी दुहेरी आपत्ति हिंदी राष्ट्रावर गुदरणार आहे. यांपैकीं वटहुकुमांची आपत्ति सध्याच्या दुश्चिन्हावरून आणखी सहा महिनेच काय पण नव्या सुधारणांचा कायदा पार्लमेंटांत पास होऊन त्याच्या अनुरोधाने नवीन कायदेमंडळें निवडणुकीनंतर भरूं लागेपर्यंत वर्षानुवर्षं हिंदुस्थानाच्या मानगुटीवर बसून राहील असें वाटतें. कारण अशा सुधारणेवर कॉंग्रेस बहिष्कार घालणार हें ठरल्यासारखें असल्याने सरकार त्या बहिष्काराचा प्रचार करण्यास वटहुकूम काढून घेऊन कॉंग्रेसला मुळींच सवड ठेवणार नाहीं. या आपत्तीला तोंड देण्याच्या अनेक उपायांपैकीं एक उपाय

असा कीं, हिंदुस्थानांतील सर्व राजकीय पक्षांनी एक होऊन गोलमेज परिषदेच्या बाबतींत सरकारास आपलें वचन पाळण्यास भाग पाडलें पाहिजे. बिल पास होईपर्यंत तें सुधारून घेण्याचे जेवढे म्हणून प्रयत्न आहेत त्यांची त्यांनी शिकस्त करून सोडली पाहिजे; कारण ही संधि एकदा गेली म्हणजे ती पुनः लवकर येण्याची आशा नाही. कॉंग्रेसच्या कुंपणाबाहेर असलेल्या पुढाऱ्यांतहि कल्पक, बुद्धिमान, पराक्रमी व समयज्ञ पुढारी अनेक आहेत. त्यांनीहि नवा मार्ग काढून या एकजुटीच्या कार्यास हातभार लावल्यास यशःप्राप्तीच्या दृष्टीने त्याचा प्रभाव विशेष दिसेल हें सांगावयास नकोच.

# आशियांतील स्त्रीवर्गाची स्थिति

दोन वर्षांपूर्वी आशियाखंडांतील अखिल स्त्रियांची परिषद लाहोरास भरली होती. त्या प्रसंगीं सीलोन, ब्रह्मदेश, जपान, अफगाणिस्थान वगैरे देशांतील स्त्रीप्रतिनिधि जमले होते. प्रत्येक प्रतिनिधीने आपल्या देशांतील स्त्रियांच्या सामाजिक जीवनाचें चित्र रेखाटलें. विवाह, शिक्षण, मतदान वगैरे स्त्रियांना जिव्हाळ्याचे वाटणारे प्रश्न परिषदेने विचाराकरिता घेतले होते. सदर परिषदेचा वृत्तांत अलीकडे नुकताच प्रसिद्ध झाला आहे. तो वाचून प्रत्येक देशांतील स्त्रिया प्रगतीच्या मार्गावर कोठवर गेल्या आहेत, हें चांगलें कळून येतें. म्हणून पुढे संकलित स्वरूपांत त्यांतील माहिती दिली आहे.

### ब्रह्मदेश

ब्रह्मदेशांत स्त्रियांना सर्व बाबतींत समान दर्जा असून कुटुंबांत, पति अथवा पत्नी यांपैकीं जो आपल्या अंगच्या गुणांनी श्रेष्ठ ठरेल त्याचेंच वर्चस्व असतें. बायका आपला संसार स्वतंत्रपणें काटकसरीने चालवितात. त्यांत त्यांना नवऱ्याची सल्ला घ्यावयाची मुळीच जरूर नसते. त्यांच्या विवाहकल्पनेंत धर्मभावनेचा अंशसुद्धा नसून, विवाहप्रसंगीं भिक्षूचें कांहीच काम नसतें! इतकेंच नव्हे तर विवाहपूर्तीला कोणत्याच समारंभाची आवश्यकता नसून स्त्रीपुरुष परस्परांच्या संमतीने नवरा—बायको म्हणून एकत्र राहूं लागलीं कीं इतरांनी त्यांचें लग्न झालें म्हणून खुशाल समजावें! जशी केवळ संमतीने लग्नें सहज जुळूं शकतात तशीच केवळ संमतीनेच तीं सहज मोडूं शकतात. मात्र एखाद्या वेड्याला अथवा अज्ञानाला अशी संमति देतां येत नाही. तेथे अनेकपत्नीत्वाची चाल जवळ जवळ नाहीच असें समजण्यास हरकत नाही. कारण ह्या चालीविरुद्ध लोकमतच इतकें तयार आहे कीं, कोणी ह्या सोईचा फायदा घेऊं म्हणेल तर त्याची किंमत समाजांत शून्य होण्यास उशीर नाही. मात्र राजेरजवाडे अनेक स्त्रियांशीं विवाह करूं शकतात. त्यांत सुद्धा पतीबरोबर समारंभांतून मिरविण्याचा मान फक्त प्रथम पत्नीचाच असतो! प्रघात असा पडला आहे कीं, कोणी दुसरी बायको केली तर पहिल्या बायकोला काडीमोड मागतां येतें. नाही तर पतिनिधनानंतर पतीने आपल्या हयातींत काय दिलें असेल त्याव्यतिरिक्त दुसऱ्या बायकोची सत्ता कशावरच नसते.

वेश्याव्यवसाय या देशांत मोठ्या प्रमाणांत चालू आहे. याला कारण तेथील नीतिशून्य व स्वार्थांध पोलीसच! कुंटिणखाने पोलिसांच्या मदतीने राजरोस उघडे असतात. कारण दर एक कुंटिणखान्यामागे पोलिसाला दोन एक रुपयांची प्राप्ति असते.

स्त्रियांच्या आरोग्यरक्षणासाठीं असावी तितकी चांगली सोय या देशांत नाही. दवाखाने आहेत, परंतु ते थोडे पडतात. बालमृत्यूची संख्या या देशांत फार मोठी आहे. मोठमोठ्या शहरांतून मात्र इन्फंट वेलफेयर सोसायटीज स्थापन झाल्या आहेत. गरिबांच्या घरांतून अडलेल्या बायकांना सुखप्रसूतीकरिता रंगून कॉर्पोरेशनने दोन फिरत्या नर्सेस ठेविल्या आहेत. शाळांतून मुलांची आरोग्य-तपासणी नुकतीच सुरू केली आहे. नाक, दांत व गळा या विषयींचे रोग अधिक प्रमाणांत दिसून आले. क्षयरोगाचा प्रसारहि या देशांत विशेष आहे आणि दुःखाची गोष्ट म्हणजे क्षयी लोकांसाठी कोठेच रुग्णालयांची सोय नाही.

अफू, दारू यांसारखे मादक पदार्थ सेवन करण्याची त्यांच्या धर्माने बंदी केली असता आणि इंग्रज लोकांचें आगमन होण्यापूर्वी हे पदार्थ पिकविण्याची अथवा विकण्याची मुळीच सोय नसता आज पहावें तों, ब्रह्मी स्त्रियासुध्दा या व्यसनांच्या आधीन झाल्या आहेत.

शाळांतून स्त्रीशिक्षक मिळणें दुरापास्त असल्यामुळे पालक आपल्या मुलींना शाळेंत पाठविण्यास धजत नाहीत. यामुळे स्त्रीशिक्षणाची वाढ फार थोडी झाली आहे.

मालक व मजूर असे हितविरोधी तट पडून आपलेकडे त्यांच्यांत कलहाग्नि चिरंतन धुमसत राहून प्रसंगीं तो पेटहि घेतो. असा मजुरांचा प्रश्नच ब्रह्मदेशांत अजून उपस्थित झाला नाही. स्त्री हीच

पुष्कळ कुटुंबांत मुख्य असून कुटुंबाची पोशिंदीहि कैक वेळां तीच असते.

ब्रह्मदेश ब्रिटिशांच्या सत्तेखाली आल्यापासून अनेक परदेशी लोक या देशांत कायम वस्ती करून राहिले. त्यांच्याशीं सहकारिता करण्याच्या आड ब्रह्मी लोकांचा धर्म येत नसल्यामुळे तंटा-बखेडा होण्यास अवसर नव्हता. बुद्धधर्मीय ब्रह्मी पति-पत्नींचा हक्क मिळकतीवर सारखाच राहून ज्याने कमाई केली असेल त्याला थोडा अधिक वांटा मिळतो. जर बुद्धधर्मीय ब्रह्मी स्त्री एखाद्या मुसलमान, हिंदु अगर ख्रिश्चन पुरुषाशीं विवाह करील तर मात्र मिळकतींतील समान हक्क, काडी-मोडीचा हक्क वगैरे तिचे विशिष्ट हक्क हिरावून घेतले जातात. म्हणजे मिश्रविवाह परिणामीं ब्रह्मी स्त्रियांना अहितकारक ठरतो.

**सीलोन**

या देशांत एकपत्नीव्रताचाच निर्बंध बहुतांशीं पाळला जातो. अनेकपत्नीत्वाची चाल अजून रूढ आहे, परंतु ती मुसलमान लोकांत आढळून येते. कांहीं वर्षांपूर्वी या देशांत अनेकपतित्वाची चाल अस्तित्वांत होती! दोघां-चौघां भावांत मिळून एक बायको करण्याची वहिवाट होती. त्या भावांपैकीं फक्त एकाचीच ती लग्नाची बायको असे. मुलींचीं लग्नें बहुधा त्यांच्या पालकांच्या संमतीनें होतात. क्वचित एकमेकांच्या संमतीनेंहि होतात. या देशांत मातृपद मोठें भाग्याचें समजून आई पूज्य आहे अशाच भावनेचें शिक्षण लहानपणीं मुलांना दिलें जातें. संततिहीन स्त्री दुर्दैवी गणली जाते.

स्त्रियांचा अनीतीचा व्यापार चोरूनमारून थोड्या प्रमाणांत चालू आहे. अनीतिकारक वाङ्मय प्रसृत न करण्याबद्दल कडक कायदेशीर निर्बंध आहेत. अज्ञान मुली फूस लावून कुंटिणखान्यांत रवाना होऊं नयेत म्हणून उत्तर सिलोनांत एक संस्था स्थापन झाली आहे. अशा मुलींचा तपास काढून त्यांना त्यांच्या घरीं पोहोचविण्याची प्रशंसनीय कामगिरी ही संस्था करते. राजरोस कुंटिणखान्यांना बंदी असून खाजगी कुंटिणखाने तुरळक आहेत. १५-२० वर्षांपूर्वी कायद्याने कुंटिणखाने बंद केले आहेत. अलीकडे पाश्चात्य देशांशी संघटन अधिक झाल्यामुळें मिश्र विवाहाची दुष्ट प्रथा साथीसारखी पसरूं लागली आहे. तिजमुळें देशाचें समाजस्वास्थ्य मात्र बिघडत आहे. विलायतेंत शिक्षणासाठीं गेलेले तरतरीत बुद्धीचे तरुण, येतांना गौरकाय बायकोच्या हातांत हात घालून किनाऱ्यावर पाय ठेवतात! बालमृत्यूची संख्या या देशांत मोठी आहे. वास्तविक देशाची नैसर्गिक रचना आरोग्यवर्धक असून उत्तम हवापाण्यामुळे रोगांना अवसर नसावा. तथापि दारिद्र्य, अज्ञान, घरांची वाईट बांधणी, अपुरी मजुरी इत्यादि अनेक कारणांमुळे हवेची अनुकूलता असतांनासुद्धा बालमृत्यूचा आंकडा कल्पनेच्या बाहेर गेला आहे.

शिक्षणाची व्यवस्था चांगली आहे. अनेक सरकारी व खाजगी शाळा शिक्षणदानाचें पवित्र कार्य उत्तम रीतीनें करीत आहेत. सहशिक्षण या देशांत नाहीं म्हटलें तरी चालेल.

या देशांतील मजुरांची कहाणी इकडील मजुरांसारखीच करुणरसाने भरलेली आहे. लहान वयाच्या मुलांना व्यापारी लोक खुशाल आपल्या दुकानांतून राबवितात.

स्त्रियांना मतदानाचे हक्क पुरुषांइतके असून राजकारणांत स्त्रिया आपला प्रभाव दाखवूं शकतात आणि गंमत ही कीं, स्त्रियांच्या आकांक्षा पुऱ्या करण्याकरिता पुरुषवर्ग मनापासून झगडतो. क्रीडांगणावरसुद्धा आता सिंहली स्त्रिया पुरुषांच्या बरोबरीनें चमकूं लागल्या आहेत. खेडेगांवांत राहणाऱ्या स्त्रियांना मात्र अजून आपल्याला मिळालेल्या स्वातंत्र्याच्या हक्कांची जाणीव नाही.

# १९३० चें पुणे

सध्या १९५० चें पुणे लोकांच्या डोळ्यापुढे ठेवण्यांत येत आहे; अशा वेळीं १९३० चे पुणें कसें होतें याकडे मागें वळून नजर टाकणें पुढील कार्याला हिताचें आहे. चालू वर्षाच्या मे महिन्यांतील दुसऱ्या आठवड्यांत पुणे शहर म्युनिसिपालिटीनें आपला १९३०-३१ सालचा वार्षिक अहवाल प्रसिद्ध केला आहे. त्यावरून पुढील गोष्टी प्रामुख्याने दिसतात.

**आरोग्याची हालहवाल**

प्रथमच एक ठळक गोष्ट दृष्टींत भरते. ती ही कीं, आरोग्याची ग्रँट मोठ्या प्रमाणांत घटली. १९२९-३० मध्यें तिची रक्कम २४४२७० रुपये होती, ती १९३०-३१ मध्यें ५५१२५ रुपयांवर घसरली म्हणजे जवळ जवळ दोन लाख रुपये म्यु. ला कमी मिळाले. पुणे शहरांत बालमृत्यू हजारीं ३५४ आणि एकंदर मृत्यू ५ हजारांचेवर म्हणजे हजारीं ३७.६९ झाले. गोंवराने ५० मुलें यमाच्या तोंडीं दिली, कालऱ्याने ३८ जणांना इहलोक सोडावयास लावला आणि देवीनें २६ माणसांचा बळी घेतला.

आरोग्याच्या बाबतींत पुणे शहरांत ज्या ठळक उणीवा आहेत, त्यांकडे वाचकांचें लक्ष वेधण्यासाठी त्यासंबंधीचा अहवालांतीलच मजकूर पुढे सादर करतों.

"गरीब वर्गास विशेष तीव्रपणें भासणारी गरज म्हणजे बायकांच्या दवाखान्याची होय. तसेच वेश्यांकरिता उपदंशाचें रुग्णालय (हॉस्पिटल) काढल्यास पुष्कळ तरुण पुरुषांस उपदंशाच्या त्रासांतून सोडवितां येईल. दाट वस्तीच्या भागांत असलेले दुभत्या जनावरांचे गोठे दूर नेण्याकडे म्युनिसिपल सभासदांनी विशेष लक्ष दिलें तर फार उपयोग होईल. हल्ली शहरांतील कोणत्याहि भागांत कोणासहि जनावरांचा गोठा करता येतो. जर सभासदांस गुरांचे गोठे शहराच्या हद्दीच्या बाहेर नेणे पसंत नसेल तर निदान शहराच्या विरळ वस्तीच्या भागांत तरी गोठ्यांस जागा नेमून द्यावी. शहराच्या मध्यभागीं विशेषतः पावसाळ्यामध्ये गोठ्यांतील शेणाचा ढिगारा सांचणे हे शहराच्या आरोग्यास अत्यंत धोक्याचे आहे. कॉलरा सुरू होण्याचा संभव असतांना तर हा धोका विशेषच भयंकर आहे. शुद्ध दुधाचा पुरवठा व त्यासंबंधींच्या नियमांची अमलबजावणी चीफ ऑफिसरांच्या संमतीने मेडिकल ऑफिसर ऑफ हेल्थ यांनीच करावी असें ठरवावें, व या कामीं इतरांनी कोणींहि हात घालूं नये. हॉटेलें व रेस्टॉरंट यांना परवानगी देण्याचें काम चीफ ऑफिसरकडे असावें. कारण सध्या ही परवानगी रद्द करण्याचा अधिकार मे. कलेक्टरसाहेब यांचेकडे असल्यामुळे हॉटेल वगैरेंवर चांगली देखरेख करता येत नाही. हॉटेल सुरू करण्यापूर्वी मालकाने चीफ ऑफिसरांची परवानगी घेतली पाहिजे."

शिक्षणासारखीं कांही खातीं तरी अशीं खास आहेत कीं, ज्यांना आर्थिक मदत करणें अत्यावश्यक आहे.

### सक्तीचें शिक्षण व खमंग पालक

शिक्षणाची प्रगति म्यु. ने आपल्या ऐपतीच्या मानाने समाधानकारकपणें केली. म्युनिसिपालिटीच्या एकंदर २२ लक्ष ८२ हजार रुपये खर्चापैकीं ४ लक्ष १८ हजार रुपये शिक्षणाच्या नांवें पडलेले आहेत. ही रक्कम गुदस्तापेक्षां १७ हजारांनी अधिक आहे. प्राथमिक शिक्षणाच्या शाळा व त्यांतील विद्यार्थी यांतहि गतसालापेक्षां वाढ होऊन शाळा ५८ व विद्यार्थी ११०१२ झाले. त्यांत ६१६४ मुले व ४८४८ मुली होत्या. विशेष प्रगतीचा व अभिनंदनीय असा उपक्रम म्हणजे सक्तीच्या प्राथमिक शिक्षणाचा. मागसलेल्या पांच पेठांतून सक्तीचें शिक्षण सुरू केलें आहे. नाना, गंज, गुलटेकडी व घोरपडे या पेठांत मराठी शाळा असून भवानी पेठेंत मराठी, उर्दू व तेलगू अशा तीनही भाषांच्या शाळा चालू आहेत. स्वतंत्र व जोडलेल्या अशा सर्व शाळांतून सक्तीचें शिक्षण घेणाऱ्या मुलांची संख्या ७०६ व मुलींची संख्या ६५४ होती. त्यांतहि खटल्याची धमकी देण्यापर्यंत पाळी आणणारे खमंग पालक बरेच निघाले! कांहीं पालकांनी तर ही सक्ति टाळण्यासाठीं त्या पेठांतून आपलीं बिऱ्हाडेंच हलविलीं!

### रात्रींच्या शाळामधील अंधार!

उर्दू शाळांची संख्या १५ असून त्याप्रीत्यर्थ ३६ हजार म्हणजे गुदस्तापेक्षां दोन हजार रुपये जास्त खर्च झाले आहेत. यातून १ हजार मुलें व त्यांच्या निम्म्या मुली उर्दू शिक्षण घेत होत्या. रात्रींच्या शाळांबाबत मात्र 'यश कांही येत नाही' असा शेरा अहवालांत मारलेला आहे. अहवालाच्या वर्षी त्यांची संख्या ११ च होती. पण १९२९-३० सालीं ती संख्या १५ होती; यावरून त्या दृष्टीने विशेष आस्थापूर्वक प्रयत्न होणें जरूर दिसतें. प्रौढ माणसांना व कामकऱ्यांना हिशेब ठिशेव व लिहिणें-वाचणें एवढेंच शिक्षण द्यावयाचें म्हटलें तरी किती तरी रात्रींच्या शाळा अजून निघावयास पाहिजेत! मताधिकाराचें क्षेत्र रुंदावलें जाण्याच्या सद्यःकालीं तर त्यांची नड तीव्रच. म्यु.च्या हाताखाली एकंदर ३३० शिक्षक काम करीत आहेत, त्यांपैकीं १३० शिक्षकिणी आहेत. मात्र सरकार शिक्षणाच्या चाकांना गति देण्याऐवजीं खीळच घालतें, हें टीकास्पद आहे. या बाबतींत अहवाल म्हणतो—

"जरी या इलाख्यांत शिक्षण सक्तीचें व मोफत असावें अशा हेतूने प्राथमिक शिक्षणाचा कायदा पास करण्यांत आला, तरी त्याची अंमलबजावणी यशस्वी रीतीने करण्यासाठी अनेक कारणांमुळे पैसा उभारण्यास सरकार असमर्थ झालें आहे. शिक्षणाचा ताबा घेण्यापूर्वी ज्या खर्चाच्या बाबी ग्रँटसाठी मान्य केल्या जात असत, त्या आता अमान्य करण्यांत येत आहेत. सरकार सर्व ठिकाणीं खर्चाचा निम्मा हिस्सा देत नसल्याने विपरीत परिस्थिति प्राप्त झाली आहे. उदाहरणार्थ, आता शारीरिक शिक्षणासारख्या बाबींवर होणारा खर्च सरकार मान्य करीत नाही; परंतु तोच ताबा घेण्यापूर्वी मान्य केला जात असे. सांपत्तिक स्थिति बाजूस ठेवून विचार केला तरी कायद्यांत मुळांतच कांही दोष आहेत. सरकारने ठरविलेल्या प्रमाणांतच चालू खर्च वाढल्यास त्यास आगाऊ मंजुरीची अट लादण्यांत येऊं नये. हल्लींच्या योजनेमुळे स्कूलबोर्डास पैशासाठीं लोकल ॲथॉरिटी व सरकार अशा दोघांकडे पाहाणें भाग पडतें. कायद्यामध्ये स्कूलबोर्ड, लोकल ॲथॉरिटी आणि सरकार यांचे परस्पर अधिकार स्पष्टपणें नमूद

केलेले नाहींत. यामुळे बोर्डाच्या कारभारांत बऱ्याचशा अडचणी उत्पन्न होतात." लहान मुलांच्या शिक्षणाप्रमाणेंच नागरिकांच्या शिक्षणाचेंहि एक द्वार म्यु. ने उघडलेलें आहे. तें म्हणजे म्यु.चें गॅझेट. तें बहुधा प्रत्येक घरास मोफत दिलें जातें. या कामीं सुमारें ७ हजार रुपयांची झीज म्यु.ने सोसली. नागरिकांनी या स्तुत्य व उपयुक्त उपक्रमाचा अधिक उपयोग करून घेणें त्यांना उपकारक होणार आहे.

### साखरेंत स्वदेशी

१९३०-३१ सालीं म्यु.ची एकंदर जमा १५ लाख म्हणजे त्या आधीच्या वर्षापेक्षां १ लक्ष ३३ हजार रुपयांनी कमी झाली आहे. गेल्या सालीं व्यापार-मंदीचा कडाका जोराचा होता. तरी गंमत अशी कीं, करमणुकीवरील कराचें उत्पन्न १५० रु. नी वाढलें. रस्त्यावरील दिव्यांची संख्या ४५७ वरून ५३८ वर गेली असली तरी विजेची कंपनी म्यु.शीं खुषीने सहकार्य करीत नाही अशी तक्रार अहवालांत केलेली आहे. साखरेची आयात २ लक्ष मण झाली. पण पुणें शहरांतीलच वर्तकी साखरेच्या कारखान्याला लेवणें पडूं लागलीं; ही विपरीत परिस्थिति स्वदेशीच्या धामधुमींत विशेषच गर्ह्य होय.

'आधीं पोटोबा, मग विठोबा' या म्हणीप्रमाणें अहवालाच्या शेवटीं दिलेल्या तक्त्यांत दानधर्माचे आंकडे मांडलेले आहेत. वेदशास्त्रोत्तेजक सभा (२००), संस्कृत पाठशाळा (१००), वेदपाठशाळा (२००), गायनसमाज (२००), नगरवाचनमंदिर (५००), मराठी ग्रंथालय (५००), बहिरे व मुके यांची शाळा (५००) अशा देणग्या म्यु. ने दिलेल्या आहेत. असा द्रव्यवर्षाव चालू असतां यंदा म्हणजे १९३२ सालीं पुण्यास चालू असलेलें एकुलतें एक असें अर्धविद्यार्थिगृह मदतीच्या अभावीं बंद पडलें हें पाहून कोणालाहि हळहळच वाटेल ! त्याचें संजीवन करण्याचें कार्य म्यु. ने आपल्या अंगावर घ्यावें.

## भविष्य !

भटकत वेड्यापरी ।
भविष्या । दृष्टि खिळुन तुजवरी ॥ध्रु॥
घरदाराची केली माती ।
गवत उगवतें जोत्यावरती ॥
धुळीस मेळविली ही शेती ।
बोचत कांहीं तरी ॥१॥
अन्नावांचुन तडफडतो जरि ।
कांहि न वाटे त्याचेंही परि ॥
लज्जेस्तव हें वस्त्र शरीरीं ।
करपे वरचे वरी ॥२॥
तुटोत सारे धागेदोरे ।
मरोत तिकडे सखे-सोयरे ॥
हृदयपटल हें केलें कोरें ।
नवेंच लेखन वरी ॥३॥
लिहित असें मी एकच लिहिणें ।
हृदयावर तें तेंच कोरणें ॥
तेंच वाचणें तेंच पढविणें ।
ध्यास ह्याच अंतरीं ॥४॥
भूतकाळ छातीवर बैसे ।
म्हणुन कधी देतोंहि उसासे ॥
वर्तमान आशेने हासे ।
जगें तेवढ्यावरी ॥५॥
दूर तुझें नच मंदिर आता ।
जाणिव ही दे धैर्यच चित्ता ॥
तुझ्याकडे ज्या जाती वाटा ।
साफसूफ त्या करीं ॥६॥

—अज्ञातवासी.

# मुंबईचे परोपकारी मुसलमान !

म. गांधी यांच्या अंगीं योजकता हा गुण प्रामुख्याने आढळतो. हिंदुस्थानांत मनुष्यबळ अगणित आहे. पण तें कारणीं लावण्याच्या युक्त्या सद्यःस्थितींत बहुधा कोणास सांपडत नाहींत. या नियमास सांप्रत म. गांधी हे एक अपवाद होत. त्यांनी खादीचा प्रसार, असहकारितेची चळवळ, सत्याचा आग्रह व कायद्यांचा भंग इत्यादि बहुविध उद्योग या देशांत आल्यापासून गेल्या पंधरा वर्षांत सुरू केले. त्या प्रत्येक उद्योगांत त्यांनी शक्य तितक्या पुष्कळ लोकांना गुंतविण्याचें श्रेय घेतलें. त्यांच्या अंगची योजकता याच उद्योगांत दृष्टीस पडते. विशेषतः कायदेभंगाच्या गेल्या चळवळींत ती पराकाष्ठेला जाऊन पोंचली. त्या चळवळींत मुलें, मुली, वृद्ध, तरुण, स्त्रिया व पुरुष या सर्वांस त्यांनी राबविलें. मिठासारखे कांही कायदेभंग त्यांनी असे काढले कीं मुंबईसारख्या शहरात दहा-बारा वर्षांचीं मुलें व मुली समुद्राचें खारें पाणी गाणीं म्हणत घरीं आणून कायदा मोडूं लागलीं. म. गांधी यांच्या तालमींत आता हिंदूंतील पुष्कळ लोक तरबेज झाले असून त्यांनी मुंबईत गेल्या सहा महिन्यांत कायदेभंगाची चळवळ नाना प्रकारांनीं करून सरकारास अगदीं दमवून सोडलें आहे.

एकदा हिकमती शोधण्यांतच डोकें चालविण्याचा प्रघात पडला म्हणजे तो हिंदूंना तेवढाच साधावा व मुसलमानांना साधूं नये असा पंक्तिप्रपंच परमेश्वराच्या घरीं कसा असूं शकेल ? मुसलमानांनी त्या दिशेनें आपलें डोकेंच काय पण दाढीदेखील खाजवून अलीकडे अशा हिकमती काढल्या आहेत कीं, हिंदूंनी त्यांना यापुढें आपलें गुरुच मानावें ! मुसलमानांनी फार मोठी हिकमत लढविली. ती ही कीं, तें स्वराज्याच्या ऊर्फ स्वातंत्र्याचा चळवळीपासून अलिप्त राहिले. त्यांत त्यांनी दुहेरी फायदा पाहिला. हिंदु लोक स्वराज्यासाठी आत्मार्पण करीत आहेतच. ते स्वराज्य कांही आपल्या एकट्याकरितां मागत नसून साऱ्या हिंदी लोकांकरिता मागत आहेत. हिन्दु लोक संख्येने फार मोठे असल्यामुळे त्यांच्या प्रयत्नाने हिंदुस्थानास स्वराज्य मिळाल्यास स्वराज्याचा पर्जन्य एकट्या हिंदूंच्या तेवढ्या शेतावर पडेल आणि त्या शेताला खेटून असलेलें मुसलमांनाचें शेत मात्र पारतंत्र्याच्या उन्हाने करपून निघेल हा भेदभाव इंग्रजांच्या घरीं नाही. या कारणाने मुसलमानांनी स्वराज्याच्या चळवळीची गंमत दुरून पाहाण्याचें ठरविलें.

अशा रीतीने तटस्थ रहाण्यांत त्यांचा दुसराहि एक मतलब साधला. स्वराज्यासाठी केलेली चळवळ इंग्रज लोकांना कधीहि सहन व्हावयाची नाही. ती चळवळ करणाऱ्या समाजास इंग्रज लोक पाण्यांत पहावयाचे व शत्रूप्रमाणें लेखावयाचे हे अगदी उघड आहे. अशा उपद्व्यापांत सामील होऊन सरकारची खप्पा मर्जी करून घेण्यापेक्षा त्यापासून फटकून राहण्यांत, किंबहुना सरकारची कृपा संपादन करण्यासाठी जरूर त्या ठिकाणीं सदर चळवळीला विरोध करण्यांतच, त्यांना शहाणपणा वाटला. त्या योगाने इंग्रजांना हिंदुस्थानांत आपले कोणी मित्र असतील तर ते मुसलमानच काय ते होत याचा जामीन पटल्यासारखा झाला व त्या उपकाराची फेड आपणाकरिता विशेष हक्क व अधिकार मिळविण्याच्या रूपाने करून घेण्याचा मार्ग मुसलमानाना राजरोस खुला राहिला. मुसलमानांचें लक्ष सध्या स्वराज्यापेक्षां स्वराज्यांतील विशेष हक्कांवर व अधिकारांवर आहे त्याचें कारण हेंच होय.

हा प्रयत्न मुसलमानांचे पुढारी अत्यंत दक्षतेने करीत आहेत. ना. आगाखानप्रभृति मुसलमान पुढाऱ्यांनी मुसलमान समाज एखाद्या पतिव्रता स्त्रीप्रमाणें इंग्रज सरकारशीं एकनिष्ठपणाने आजपर्यंत वागत आल्याचा पाढा ब्रिटिश मुत्सद्द्यापाशीं विलायतेंत वाचला हें सर्वांस माहीतच आहे. त्यांनी आपल्या गळ्याची शपथ वाहून इंग्रजांस बजावलें कीं " आमची राजनिष्ठा बावन्नकशी सोन्याप्रमाणे आहे बरें. यासाठीं पहा हवी तर हिंदुस्थानांतील राजकीय खुनी इसमाची नामावळी वाचून.त्यांत एक तरी मुसलमान खुनी इसम तुम्हाला दिसतो का? छे नांव कशाला घेना. पहा पहा ती सारी यादी पहा. तिच्यांतील सारे लोक एकजात हिंदूच आहेत." सांप्रतच्या राजानिष्ठेच्या दुष्काळी दिवसांत मुसलमानांची ही दिव्य राजनिष्ठा व हें निष्कलंक चारित्र्य पाहून कोणा इंग्रजास त्यांची दृष्ट काढण्याकरिता मीठमोहऱ्या ओवाळून टाकाव्याशा वाटणार नाहीत ? मुसलमानांची ही पुण्याई इतकी थोर आहे कीं त्यांनी हक्कांचा व अधिकारांचा मागितलेला वर त्यांस ब्रिटिश सरकारपासून मिळणार याविषयी त्यांनी निर्धास्त असावें.

तथापि मुसलमान हे दीर्घोद्योगी आहेत. ते शेवटच्या क्षणापर्यंत पुण्याई जोडण्याचा यत्न करीतच राहणार. सरकारच्या वटहुकुमांस न जुमानता हिंदूंनी कायदेभंगाची चळवळ गेले सहा महिने जिवंत ठेवली आहे. त्या चळवळीस तोडीस तोड अशी दंग्याची

चळवळ मुसलमानांनी चालविलेली आहे. गेलीं दोन तीन कां, आठदहा वर्षे मुसलमान लोक कोठेना कोठे हिंदूविरुध्द दंगे करून पुण्याच्या राशी रचीत व आहेत. पण ते दंगे सप्ताहाप्रमाणे किंवा अनुष्ठानाप्रमाणे अखंड सुरू नव्हते. कानपुरास गतवर्षी दंगा झाल्यावर काश्मिरांत नरमेधाचा यूप रोवला जाईपर्यंत मध्यंतरीं कांही महिने दंग्यावाचून सुने गेलेच कीं नाही? पण व्रत म्हटलें कीं त्यांत खंड काय कामाचा ! काश्मिरापासून मात्र अनुष्ठान नीट सावलें खरें. काश्मिरांत कैक महिने दंगा गाजला व त्याची होळी विझत आली नाही तोंच मुंबईची होळी धडाडली. राष्ट्रीय सभेच्या कायदेभंगाचा मुख्य जोर मुंबईतच आहे. त्याच मुंबई शहरांत मुसलमानांच्या दंग्यानेहि जोर धरल्यामुळे कॉंग्रेस व मुसलमान यांचा हा चुरशीचा सामनाच लागून राहिला आहे कीं काय असा भास होतो. मुंबईतील दंग्याची होळी जी दोन महिन्यांपूर्वी पेटली ती आजतागायत विझली म्हणून नाही. आठचार दिवस ती चांगली धडाडल्यावर बैराग्याच्या धुमीप्रमाणें ती पुनः आठचार दिवस धुमसत राहते व मागाहून फिरून पेट घेते असा क्रम अव्याहत सुरू आहे.

मुसलमानांच्या प्रस्तुत चळवळीच्या बाबतींत तिच्या चालकांनी पोलिटिकल इकॉनमीचा फारच सूक्ष्मपणें अभ्यास केलेला दिसून येतो. प्रकृत स्थळीं पोलिटिकल इकॉनमी या शब्दाचा रूढार्थ घ्यावयाचा नसून शब्दार्थ घ्यावयाचा आहे. त्या दृष्टीने पोलिटिकल इकॉनमी म्हणजे राजकीय अर्थात् राजकारणांत करावयाची काटकसर होय. म. गांधींच्या राजकारणांत ही काटकसर नाही. ते राजकारणांत शक्य तितकी बायका–मुलांसुद्धा अधिक माणसें ओढून त्यांना राबवितात. त्यांचाच कित्ता त्यांच्या अनुयायांनी प्रस्तुत कायदेभंगांत गिरवून हिंदुस्थानांत जिल्हानिहाय कायदेभंग चालू ठेवला आहे. मुसलमानांनी आपलें संख्याबळ कमी असल्याचें ओळखून आपल्या चळवळीचें क्षेत्र त्या त्या वेळीं मर्यादित राखण्याचा धूर्तपणा दाखविला आहे. ते हिंदुस्थानभर एकाच वेळीं जिकडे तिकडे दंगे करीत बसत नाहीत. तर कानपूरचा दंगा झाला म्हणजे मग काश्मीरचा, काश्मीरचा संपत आला म्हणजे मग मुंबईचा, असा त्यांनी दंग्यांचा व्यवस्थित क्रम लावलेला दिसतो. अशा रीतीने कार्यक्षेत्र आटोपशीर ठेवल्यानें मुसलमानांच्या चळवळीचा आकार चिमुकला दिसत असला तरी त्यांनी चळवळीच्या उष्णतेला कांचकारखान्यांतील भट्टीप्रमाणे अत्यंत तीव्रता आणण्याची अतिशय खबरदारी बाळगली आहे.

आता मुंबईचा दंगाच घेतला तर त्यांत जाळपोळ काय, लुटालूट काय, भोसकाभोसकी काय हीं चळवळीचीं सारींच अंगें मोठीं परिणामकारक आहेत. त्यांपैकीं नुसतें एक अंग उत्तम प्रकारें साधलें तरी चळवळ जगाचें लक्ष वेधण्याच्या दृष्टीने यशस्वी व्हावयाची, मग तिच्या तीनहि अंगांनी तीनहि बाजूंनी एकदमच पेट घेतल्यावर त्या परिणामाला काय पाहावयाचें आहे ! सोळा आणे काम फत्ते! असा दंगा एकट्या मुंबईत चालू राहिला तरी जगांत जिकडे तिकडे अशी एकच हाकाटी होण्यास काय उशीर कीं, 'हिन्दु-मुसलमानांचीं भांडणें काय हो विकोपाला गेलीं आहेत! त्यांच्या मारामारीला एक दिवस खळ नाही कीं. काय मुसलमान धीट, शूर व स्वार्थासाठी हवा तितका परार्थच काय पण परप्राणहि घेण्यास व गमावण्यास तयार! अशा शूरांना संतोषित न करता त्यांना असेच पराक्रम गाजवीत ठेवल्यास तें हिंदुस्थानांत हिंदूंना अजबखान्यांत संग्रहीत करण्यासाठीहि उरू देणार नाहींत." तशांत चळवळीचा हा प्रयोग अव्वल दर्जाच्या राजधानीच्या शहरांत सुरू केल्यानें चळवळ करणारांचें धाडस, शौर्य, क्रौर्य इत्यादि गुण अधिकच कसाला लागून जगाला त्यांची किंमतहि नीट कळते. इतकेंच काय पण तिची तुलना कायदेभंगाशीं सहजच होऊन या दोन चळवळींत अधिक उग्र स्वरूपाची चळवळ कोणती याचा उलगडा आपोआपच होतो.

कायदेभंग हा तसा निरुपद्रवी. कायदेभंगवाला कधी हात उगारावयाचा नाही, डोळे वटारावयाचा नाही किंवा अधिकउणे रागाचे शब्द उच्चारण्याकरिता तोंड उघडावयाचा नाही. त्याच्या अंगावरून कोणीहि जावें. अशा शेंकडो कायदेभंगवाल्यांना एका पोलीस शिपायानेंहि पकडून न्यावें इतके ते लोक आज्ञाधारक. पण मुसलमान दंगेवाला त्या जातीचा नव्हे. तो घर जाळावयाच्या वेळीं लहान–मोठें पाहावयाचा नाही, दुकान लुटावयाच्या वेळीं तें सौगंधिक द्रव्यांचें कीं चांदीसोन्याचें यांत तफावत करीत बसावयाचा नाही, किंवा माणसास भोसकावयाच्या वेळीं तें चार वर्षांचें कोंवळें पोर आहे, ती आठ महिन्यांची गरोदर स्त्री आहे कीं तो सत्तर वर्षांचा म्हातारा आहे याचा विचार करण्यांत वेळ घालवावयाचा नाही. आतां हें खरें कीं, ही तिहेरी चळवळ सतत चालवीत राहण्याला पुष्कळ मुसलमानांना फुरसत नाही. म्हणून त्यांपैकीं भोसकाभोसकीचें एक अंग तेवढें गेले दोन महिने मवाल्यांनी लहानमोठ्या प्रमाणावर कां होईना देवळांतील नंदादीपाप्रमाणे अबाधित सुरू ठेवलें आहे. तें अर्थातच थोड्या लोकांना निभावून नेतां येण्यासारखें आहे. पण

परिणामाच्या दृष्टीने ते फार जालीम आहे भेंडी-बाजारांत किंवा दुसऱ्या एखाद्या बाजारांत एका हिंदु पुरभय्या गवळ्यास सुरा भोसकून ठार करण्यांत आलें ही एकच बातमी साऱ्या मुंबईस हवालदिल करून सोडण्यास व साऱ्या जगास मुसलमानांच्या क्रौर्याची कल्पना आणून देण्यास पुरेशी आहे. मवाल्यांनी आपल्या अंगावर घेतलेलें हें काम ते चोखपणाने बजावीत आहेत. पण ती कांही म्हटलें तरी बैराग्याची धुमी. ती तशीच धुमसत असली तर लवकर विझल्यावांचून राहणार नाही. यासाठी तिला विझूं न देण्याकरितां तिच्यांत चार-आठ दिवसांनी ओंडके आणून घातलेच पाहिजेत. हें महत्त्वाचें सार्वजनिक कार्य त्यांचे मुसलमान भाई हातचें प्रापंचिक काम बाजूस सारून व वेळांत वेळ काढून मधून मधून कुशलतेने पार पाडीत असतात. त्यांनी दिलेल्या एवढ्या गतीवर भोसकाभोसकीचा नित्य क्रम पुढें धकलण्यास फारशी पंचाईत पडत नाही.

गेल्या आठवड्यांत मुसलमान भाईनी दंग्याचा सोहळा मोठ्या प्रमाणावर घडवून आणतांना शिवाजीच्या शिताफीस व म. गांधींच्याहि हिकमतीस मागे टाकलें ही गोष्ट कोणाहि इतिहासज्ञास किंवा म. गांधींच्या भक्तास प्रांजलपणें कबूल करावी लागेल. जिवंत शिवाजी मिठाईच्या पेटाऱ्यांत बसून औरंगजेबाच्या पहारेकऱ्यांच्या हातावर तुरी देऊन निसटून गेला याची इतिहासज्ञ तारीफ करतात व सारे हिंदु लोक त्याचें कौतुक करतात. म. गांधींनी बायकामुलांना राजकीय चळवळींत स्थान मिळवून दिलें याचीहि वाहवा होते. पण शिवाजी हा जिवंत होता व राजकीय चळवळीस गांधींनी लावलेलीं बायकामुलेंहि जिवंतच आहेत. परंतु त्यांना कधी मेलेल्या माणसाच्या प्रेताकडून चळवळी करतां आल्या आहेत काय ? ही करामत गेल्या आठवड्यांत मुंबईस एकट्या मुसलमानांनीच करून दाखविली ! अलीकडे दंगे होऊं लागल्यापासून मुंबईत जमावाने हिंडण्यास पोलीस प्रतिबंध करतात. विशेषतः मुसलमानांच्या जमावाला हिंदूंच्या वस्तींतून व हिंदूंच्या जमावाला मुसलमानांच्या वस्तींतून जाण्यास मज्जाव होतो. कारण त्या गर्दीत उभयतांना एकमेकांची कांहीना कांही कुरापत काढावयास सांपडून त्या कुरापतीच्या बीजांतून दंग्याचा वटवृक्ष उगवून दाखवितां येतो. आणि एकदा दंगा पेटून जिकडे तिकडे दाणादाण झाली म्हणजे ती पुण्याई पुढे आठपंधरा दिवस पुरवून पुरवून खावयास सांपडते.

अलीकडे बरेच दिवसांत मुसलमान समाजाला या पुण्याईची भर घालण्यास सरकारच्या कैचीमुळे संधिच मिळेना. तेव्हा त्यांनी गेल्या आठवड्यांत अजब शकल काढली. ती शकल काढणाऱ्या मुसलमानाचें डोकें मास्तिष्क–शास्त्रज्ञाने एकवार पाहून ठेवलेलें बरें ! त्या मुसलमानांनी प्रेतास पुढे करून व त्याची ढाल बनवून त्याच्या आश्रयाने हिंदूंच्या वस्तींतून प्रेतयात्रा, नव्हे प्रेताची मिरवणूक काढण्याचें ठरविलें. कारण ती इतरांना खेदकारक अशी प्रेतयात्रा असली तरी मुसलमानांना दंग्याची हौस पुरविणारी ती उत्साहवर्धक मिरवणूकच होती. अशा मनुष्याच्या प्रेतयात्रेस आडकाठी करणारा प्राणी मनुष्यप्राण्यांत तरी आढळणार नाही अशी मुसलमानांची खात्री. म्हणून अशा प्रेतयात्रेबरोबर पांच–पांचशें हजार-हजार मुसलमानांचा जथा जमला. परंतु मुंबईचे पोलीसहि भले वस्ताद कीं त्यांनी त्या प्रेतयात्रा हिंदूंच्या वस्तींतून जात असतांना अडवून धरल्या. तरी एक यात्रा पोलिसांनाहि गचांडी देऊन अखेर हिंदु वस्तींत घुसली व ती जात असता सोडावॉटरच्या बाटल्या व दगड फेकले जाऊन मुसलमानांना मनपसंत असा दंगा घडवून आणतां आला.

म. गांधींनी आपल्या चळवळींत बायकामुलांना राबवून घेतलें, पण प्रेतांना राबवून घेण्याचें त्यांना सुचलें नाही. काय करतील बिचारे ! त्यांची कल्पकताच मुसलमानांपुढे अगदीच तोटकी !! मुसलमान जिवंतपणीं दंगा करतोच; पण मेल्यानंतरहि दंग्याच्या सेवेला लागतो तो असा. आपली संख्या अल्प असल्याने मुसलमानांनी जिवंताप्रमाणे मेलेल्यांचाहि आपल्या कार्यासाठी उपयोग करूं नये तर काय करावें ? आतां तें प्रेत हिंदूचें होतें कीं मुसलमानाचें होतें कोण जाणे ! कारण एखादा हिंदु सुऱ्याने भोसकल्यामुळे घायाळ होऊन मुसलमान वस्तींत मरून पडला असला व त्याला दफन करण्यास मुसलमानांनी उचललें व खांद्यावर घेतलें असलें तर तो मुसलमानांना काय हरकत करूं शकणार ? या युक्तीने मुसलमानांचा दुहेरी फायदा झाला. एक तर परस्पर हिंदु मरून दंग्याचें एक अंग साधलें व त्याला जाळण्याऐवजीं पुरावयास काढून हिंदूचा उपयोग मुसलमानांच्या दंग्यास करून घ्यावयास सांपडला. कदाचित् ही युक्ति मुसलमानांस अद्यापि सुचली नसेल, पण ती त्यांस लवकर सुचल्यावांचून मात्र खास राहणार नाही.

मुसलमानांना सांप्रत आपल्या जातीकरिता विशेष हक्क व सवलती मिळवावयाच्या आहेत. त्यासाठी त्यांचा सांप्रतचा दंगा दिसतो व दंग्याचा तोच हेतु असेल तर हिंदु–मुसलमानांमधील वादाचा निकाल ब्रिटिश मंत्रिमंडळ देईपर्यंत प्रस्तुत दंग्याची ही धुमी मुंबईत धुमसत राहणार.

हा निकाल चालू महिनाअखेर लागेल असें मानल्यास मुंबईच्या दंग्याची मुदत आणखी एक महिना वाढली असें तूर्त मानून चालण्यास हरकत नाही. असो. आपला हा स्वार्थ साधतांना मुसलमान लोक परोपकाराचा एकहि प्रसंग वांया जाऊं देत नाहींत हे त्यांचें थोरपणच समजावयास नको काय! हिन्दूंचें लक्ष दंग्याकडे वेधलें म्हणजे त्यांचें कायदेभंगावरील लक्ष साहाजिकच उडणार व त्यांचा परदेशी कापडावरील बहिष्कार ढिला पडणार. यांपैकीं पहिला उपकार मुसलमान लोक सरकारावर करीत आहेत. बहिष्काराची चळवळ मोडून काढण्यास सरकार खंबीर आहे. त्यांस मुसलमानांच्या या उपकाराची मुळीच गरज नाही. तथापि मुसलमान राजनिष्ठ प्रजाजन या नात्यानें आपले कर्तव्य समजून उपकार करीत राहिले तर ती सरकारास निरुपायाचीच गोष्ट समजावी लागेल. दुसऱ्या उपकाराचें ओझें ते युरोपियन व्यापाऱ्यांवर लादीत आहेत, व त्याबद्दल त्यांनीहि मुसलमानांचें कृतज्ञ राहूं नये तर काय करावें! अशा परोपकारी, राजनिष्ठ व हिकमतबाज लोकांचे मनोरथ, ईश्वराच्या घरीं न्याय असेल तर, पूर्ण झाल्यावांचून कसे राहतील!

# भावी सुधारणांचें रूपदर्शन

### सर सॅम्युअल होअर यांचें भाषण

सिमला येथे ता. २७ रोजीं व्हाइसरायसाहेबांनी एक पत्रक काढून त्यांत भारतमंत्री सर सॅम्युअल होअर यांनी हाऊस ऑफ कॉमन्समध्ये जें भाषण केलें तें दिलें आहे. त्या पत्रकाचा मसुदा असा—

" गोलमेज परिषदेचेंच राहिलेलें काम पूर्ण करण्याकरितां तीन कमिट्या नेमण्यांत आल्या होत्या. कमिट्यांचें हिंदुस्थानांतील चौकशीचें काम संपून त्या नुकत्याच इंग्लंडला परतल्या आहेत. त्या तीनहि कमिट्यांचे अहवाल हाताशीं आल्यावर पुढील कार्यक्रमाची रूपरेषा दाखविणें सोयीचें पडेल. ब्रिटिश सरकारानें प्रांतिक स्वायत्तता व संघात्मक मध्यवर्ती सत्ता यांची योजना एकाच बिलांत करण्याचें योजिलें आहे. या बिलान्वयें प्रांतिक स्वायत्तता प्रथम देण्याचें ठरविण्यांत आलें आहे. प्रांतिक स्वायत्तता स्थापण्यास संघात्मक सत्तेची आवश्यकताच आहे असें म्हणतां येत नसल्यानें संघात्मक सत्तेसाठी प्रांतिक स्वायत्तता देण्याचें अडवून ठेवणें योग्य नाही.

" ब्रिटिश सरकारचें धोरण हिंदुस्थानांत संयुक्त राज्यपद्धति ( फेडरेशन ) स्थापण्याचें असल्यानें व ती राज्यपद्धति अखिल हिंदुस्थानाची होणार असल्यानें तींत सामील होण्यासाठी प्रत्येक घटकाची तयारी झाली असली पाहिजे. या दृष्टीनें पार्लमेंटापुढें मांडण्यांत येणारी योजना स्वयंपूर्ण पाहिजे हें बिल मांडतांना प्रांत, संस्थानें, संयुक्त सत्ता व पार्लमेंट यांच्यांत एकसूत्रीपणा राहील अशीच आर्थिक बंधनांची योजना करण्यांत येईल. तसेंच विशिष्ट हितसंबंधांचेहि रक्षण करण्याची तरतूद त्यांत करणें अवश्य आहे. या सर्व नाजूक प्रश्नांचा विचार करून शक्य तितक्या लवकर आपल्या धोरणाला प्रत्यक्ष कृतीचें स्वरूप देण्याचें ब्रिटिश सरकारनें ठरविलें आहे. उपर्युक्त प्रश्नांचा आपल्या दृष्टीनें निकाल लावण्याचें सरकारनें ठरविलें असलें तरी तें काम करीत असता हिंदी लोकांच्या सल्ल्याचा व सहकार्याचा अवश्य उपयोग केला जाईल! मात्र सद्यःस्थितीचा विचार करतां गोलमेज परिषद किंवा घटना-मंडळ यांचीं अधिवेशनें भरविण्यांत अधिक कालक्षेप करणें सरकारला श्रेयस्कर वाटत नाही. कारण उपस्थित प्रश्नांचा निकाल तांतडीनें होण्यांतच उभय पक्षीं हित आहे. मग त्यासाठी पूर्वयोजित पद्धति थोडीशी बदलावी लागली तरी हरकत नाही.

" ब्रिटिश सरकारापुढे आज जे भानगडीचे प्रश्न आहेत, त्यांत अल्पसंख्याकांचा प्रश्न महत्त्वाचा आहे, व म्हणूनच प्रथम तो सोडविण्यास घेण्यांत येणार आहे. इतर उपाधी मध्येच उपस्थित न होतील तर येत्या जुलै–ऑगस्टमध्ये तो प्रश्न हातावेगळा करण्याचा आमचा इरादा आहे व त्या खटपटीस आम्ही लागलोंहि आहों. जातीय प्रश्न समाधानकारक रीत्या सुटला म्हणजे मग सल्लागारमंडळाची बैठक बोलावण्यांत येईल. गोलमेज परिषदेला किंवा तिनें नेमलेल्या कमिट्यांना ज्या बाबींचा विचार करता आला नाही अशा बाबींसंबंधी या मंडळाचा सल्ला घेण्यांत येईल. सल्लागार–मंडळानें इतर प्रश्नांचा विचार केल्यावर संस्थानांच्या आर्थिक रक्षण-बंधनाचा जो प्रश्न शिल्लक राहील त्याचा विचार मोजक्या तज्ज्ञांच्या मामुली बैठकींत करणें सुलभ होईल. इतक्या गोष्टी झाल्यावर बिल तयार करून तें पार्लमेंटाकडे नेतां येईल. पुढें कॉमन्स सभा व लॉर्डांची सभा यांतील सभासदांची एक सिलेक्ट कमिटी नेमण्याचें सरकारनें ठरविलें असून हिंदी प्रतिनिधींशीं महत्त्वाच्या प्रश्नाबाबत विचार-विनिमय करण्याचा अधिकार तिला

देण्यांत येणार आहे. अर्थातच ही कमिटी पार्लमेंटमध्ये बिल आणण्यापूर्वी नेमण्यांत येईल. हिंदी लोकांना ही पद्धत रुचेल अशी आम्हांला आशा आहे. पार्लमेंटला बिल सादर करण्यापूर्वी हिंदी राष्ट्राची भावी राज्यघटना घडविण्याच्या कामीं हिंदी लोकांच्या सहकार्याचा जितका जास्तींत जास्त उपयोग करून घेता येईल तितका करून घेण्याचा सरकारचा मानस आहे.

"सल्लागार-मंडळाचें कामकाज झाल्यावर पार्लमेंटरी सिलेक्ट कमिटी नेमिली जाईल, या दृष्टीने भावी कार्यक्रमाची रूपरेषा मीं रेखाटली आहे. परंतु समजा, सल्लागार मंडळाचें कामच मुळी खुंटलें; तर मात्र सरकारला फेरविचार करावा लागेल व मग कालक्षेप करावा लागला तरी सरकार पुनः एकदा परिषद बोलावील. मात्र तिचें स्वरूप व प्रतिनिधींची संख्या नियमित ठेवावी लागेल. या पद्धतीने हिंदी राष्ट्राचा सुधारणाविषयक गाडा भरधाव गतीने धावत जाईल, अशी ब्रिटिश सरकारला आशा आहे."

# पेशवे–दप्तरावर व्याख्यान

रविवार ता. ३ रोजीं सायंकाळीं ७ वाजता भारत इतिहाससंशोधक मंडळाचे मंदिरांत प्रो. **दत्तो वामन पोतदार** यांचें 'पेशव्यांचें दप्तर' या विषयावर श्री. **चिंतामणराव वैद्य** यांचे अध्यक्षतेखाली जाहीर व्याख्यान झालें. सभेस शहरांतील अनेक विद्वान व इतिहासज्ञ गृहस्थ उपस्थित होते.

व्याख्याते आपल्या भाषणांत म्हणाले. "पेशवे दप्तर अत्यंत महत्त्वाचें असताहि त्याची साधार माहिती आतापर्यंत उपलब्ध नाही. अलीकडे श्री. गो. स. सरदेसाई यांनी २०-२२ पुस्तकें प्रसिद्ध केलीं आहेत तेवढींच. पण त्या पलीकडे लोकांस त्याची माहिती नाही. पण ती होणें अनेक दृष्टींनी उपयुक्त व इष्ट आहे.

स. १८१७ सालीं एल्फिन्स्टनच्या हातीं पेशवाई आली व तेव्हांपासून स. १८२६ पर्यंत पुण्यास कमिशनरी अंमल होता. त्या वेळीं एकंदर राज्यव्यवस्था लावण्याबाबतचे व हक्क ठरविण्याचे महत्त्वाचे प्रश्न उपस्थित झाले. इनामी हक्क ठरविण्यासाठी मि. मॅक्लिऑड यांना नेमण्यांत आले. त्यांनी दप्तराच्या याद्या तयार केल्या व त्या जिल्ह्याजिल्ह्याच्या कलेक्टरांकडे पाठविण्यांत आल्या. पेशव्यांचें दप्तर स. १७२९ पासून शेवटच्या बाजीरावापर्यंत नीट लावलेलें होतें. नाना फडणविसांची दप्तरव्यवस्था चोख होती. शेवटच्या बाजीरावाच्या कारकीर्दीत त्याची थोडी अव्यवस्था झाली. कारण त्यांच्या कारकीर्दींत शनिवारवाड्यांतच आग लागली. तेव्हा दप्तर शनिवारवाड्यासमोरील बाबूजी नाईक बारामतीकर व गोविंदराव काळे यांच्या वाड्यांत विभागून ठेवलें. तेथून ते खासगीवाले यांचे वाड्यांत व तेथून नाना फडणविसांच्या वाड्यांत याप्रमाणे त्याचें अनेक वेळां स्थलांतर झालें. दप्तरासाठी नवी इमारत बांधल्यावर नानावाड्यांतून ते नव्या सरकारी इमारतींत नेण्यांत आलें.

मॅक्लिऑडनंतर दप्तराची व्यवस्था चॅप्लीन नांवाच्या गृहस्थाकडे स. १८२६ मध्ये गेली. त्याने दप्तरासंबंधी जो रिपोर्ट केला त्यांत दप्तराची व्यवस्था अत्यंत चोख असल्याचें स्पष्ट नमूद केलें आहे. यानंतर दप्तराची व्यवस्था सरदाराच्या एजंटाकडे गेली. जॉन वॉर्डन यांची दप्तरावर देखरेख असे. दप्तराची व्यवस्था स्वतंत्र ठेवावी अशी सूचना १८३५ सालीं करण्यांत आली व सरकारने गांवांतील दोन प्रतिष्ठित गृहस्थ, जज्ज व रेव्हेन्यू कलेक्टर यांचे प्रतिनिधी यांच्या स्वाधीन दप्तराची व्यवस्था करण्याचें योजन त्याप्रमाणे ती बाळाजीपंत नातू, रामचंद्र पांडुरंग ढमढेरे, मोरो त्रिंबक सहस्रबुद्धे, नरसो लक्ष्मण व विसाजी गोपाळ या पंचाकडे ती व्यवस्था सोपविली. या व्यवस्थापकांस अमानतदार असें म्हणत.

या पंचानी १८४१ पर्यंत व्यवस्था पाहिली. पहिल्या आठ महिन्यांत १९०५ रुमालाचे फेरिस्त व नंतरच्या सत्तावीस महिन्यात ५८०० रुमालांचे फेरिस्त त्यांनी लावले व ९०० रुमाल लावले. त्या वेळीं गोल्डस्मिथ नांवाचा साहेब दक्षिणभागांत होता. त्याने या पंचांविरुद्ध तक्रार केली कीं पंचाकडून कागद वेळेवर मिळत नाहीत; त्यांत कांही भानगड होत असावी वगैरे. तेव्हा गोल्डस्मिथसाहेबाला बोलावून त्याजकडे व्यवस्था सोंपविण्यांत आली. त्याने अहवाल सादर केला. त्यांत त्याने पंचांना कांही दोष दिला नाही. दप्तरासंबंधी एक पुस्तक १८५६ सालीं प्रसिद्ध झालें. त्यांत दप्तराची सामान्य माहिती आहे. पुढें स. १८४३ सालीं इनाम कमिशन नेमण्यांत आलें. हें कमिशन १८६१ सालापर्यंत सुरू होतें. हें कमिशन नेमल्यापासून लोकांपासून जबरीने कागद नेण्यांत येऊं लागले व त्या कागदांची भर या दप्तरांत पडूं लागली.

या वेळेपर्यंत सरकारी अंमल पक्का बसला. इनाम कमिशनाने लोकांचे हक्क ठरविले. त्यासंबंधी कायदेहि झाले व दप्तराबाबत सरकाराचा हेतु एका प्रकारें सफल झाला. पुढें १८९० सालीं दप्तरासाठी नवी इमारत होऊन तेथे दप्तर नेण्यांत आलें. तथापि लोकांचें लक्ष या दप्तराकडे गेलेलें नव्हतें. परंतु न्या. माधवरावजी रानडे यांनी इतिहासाच्या अभ्यासकांचा दप्तरांत प्रवेश व्हावा असे प्रयत्न डेक्कन व्हर्नाक्युलर ट्रान्स्लेशन सोसायटीमार्फत केले. मध्यंतरी म्हणजे १८८६ सालीं रा. ब. वाड हे नेटिव्ह कमिशनर होते. त्यांनी दप्तरांतील कांही उतारे काढण्याचें काम केलें. रा. ब. रानडे यांनी हें काम साताराचे श्री. पारसनवीस यांनी करावें असें सुचविलें व साताराचे श्री. दादासाहेब करंदीकर व बळवंतराव सहस्रबुद्धे यांनी साताऱ्यास सहस्रकर नांवाचा छापखाना काढण्याचें ठरवून रा. ब. पारसनवीस यांनी निवडलेले कागद त्या छापखान्यामार्फत प्रसिद्ध करावे अशी ही योजना होती. त्या वेळीं सरकार स्वतःच्या खर्चाने हें दप्तर छापण्यास तयार होतें. परंतु वरील योजनेमुळे तसें झालें नाही. रा. ब. पारसनीस यांस दप्तरांत प्रवेश मिळाला, परंतु त्यांजकडून अपेक्षेप्रमाणे काम मात्र झालें नाही. आपण दहा हजार कागद निवडून ते नकलले असें रा. ब. पारसनीस म्हणत, परतु ते कागद प्रसिद्ध मात्र झाले नाहीत.

सरकारने इनामदार व इतर हक्कदार यांच्या हक्कासंबंधीचे कागद निवडल्यानंतर सुमारें ५५–५७ पोतीं कागद वेगळे करून ठेवले होते. त्यांस चिटणीसी कागद म्हणतात. त्या कागदांपैकीं कांही रा. ब. पारसनवीस यांनी निवडले व इतिहासाच्या दृष्टीने खरे महत्त्वाचे कागद हेच होत. पुढें पुरुषोत्तम विश्राम मावजी यांनी कांही कागद छापले. अशा रीतीने मावजी, वाड व पारसनवीस यांनी त्यांतील थोडेसे कागद प्रसिद्ध केले. रा. ब. पारसनवीस यांना दप्तर उपलब्ध होऊनहि त्यांनी त्याचा उपयोग करून घेतला नाही. कै राजवाडे व कै. खरेशास्त्री यांनी या दप्तराखेरीज अन्यत्र माहिती मिळवून ऐतिहासिक साधनांत अत्यंत उपयुक्त भर टाकली आहे.

सरकारने ५५।५७ पोत्यांत भरून बाजूला ठेवलेल्या या दप्तरास चिटणिशी दप्तर म्हणतात. हें दप्तर पाहण्यास मिळावें असा ठराव १९१५ सालीं या मंडळाने केला. पुढे १९१९ सालीं हिंदुस्थानसरकारने एक खलिता प्रसिद्ध करून सरकाराच्या संग्रहीं असलेली ऐतिहासिक माहिती इतिहासाच्या अभ्यासकांना उपलब्ध असावी असें जाहीर केलें.

त्यांतूनच इंडियन हिस्टॉरिकल रेकॉर्ड्स कमिशनची स्थापना झाली व गेल्या सालपर्यंत देशांत अनेक ठिकाणीं कमिशनाच्या बैठकी भरल्या. स. १९२१ सालीं मुंबईस कमिशनाची बैठक भरली असतांना मी तेथे हजर होतों. तेथे श्री. जदुनाथ सरकारांच्या मार्फत पेशवेदप्तराबद्दल ठराव करण्यांत आला. अशा ऐतिहासिक दप्तराची माहिती उपलब्ध करून देण्याचीं साधनें पुढीलप्रमाणे असतात— कॅलेंडर, प्रेसलिस्ट, हँडलिस्ट व हॅण्डबुक. पुण्यास कमिशनची सभा भरली तेव्हा असा ठराव झाला कीं, जें दप्तर लावलेलें नाही त्याचें तज्ज्ञाकडून हॅण्डलिस्ट तयार करवावें. असे ठराव कमिशनाच्या बैठकींत अनेक वेळां झाले. मुंबईचे माजी गव्हर्नर सर लेस्ली विल्सन यांनी आपल्या भाषणांत असें सांगितलें कीं, लोकांची मागणी हॅण्डलिस्टाबद्दल नाही, हॅण्डबुकाबद्दल आहे. ती माहिती प्रसिध्द करण्यास दरसाल १२ हजार रुपये खर्च येऊन वीस वर्षे लागतील !

कमिशनाने ठरावावर ठराव केले तरी तिकडे सरकारने लक्ष दिलें नाही. पुढें रा.सा.सरदेसाई यांची सरकाराने दप्तराच्या कामावर नेमणूक केली. त्यांनी २०–२२ पुस्तकें प्रसिद्ध केलीं तींहि उपयुक्त नाहीत असें नाही. परंतु लोकांच्या दृष्टीने इतर कागदहि उपयुक्त आहेत. ते पाहण्यास मोकळे कां ठेवूं नयेत ? मीं हे कागद पाहण्यास परवानगी मागितली; अर्थात योग्य नियम पाळून. पण मलाहि ती देण्यांत आली नाही.

लोकांची मागणी होती हॅण्डबुकाची. ती पुरविण्यांत आली असती तर कागदपत्र तरी काय आहेत हें लोकांस कळलें असतें. परंतु सरदेसाई यांनी तें काम केलें नाही. तेव्हा स. १९३० सालीं मुंबई कायदेमंडळांत प्रश्न विचारण्यांत आले. त्यांना उत्तरें अगदी मासलेवाईक देण्यांत आलीं. सरकारी छापखान्यांत काय छापून प्रसिद्ध होतें याची दखलहि सरकारास नव्हती असें ना. हडसन यांच्या उत्तरावरून दिसून आलें. प्रश्न होता हॅण्डबुक तयार करण्याबद्दलचा. प्रसिद्ध होतात पुस्तकें आणि उत्तरें मिळतात हॅण्डबुकाचें काम होत आहे म्हणून !

कमिशनाच्या ग्वाल्हेरच्या बैठकींत दप्तराची कच्ची वर्गवारी करा अशी पुनः मागणी झाली असता पेशवे दप्तराचें हॅण्डबुक तयार करावें असा ठराव करणारे यदुनाथ सरकार यांनी त्याला विरोध केला.

मागे लोगन नांवाचे कमिशनर होते. यांनी म्हटलें होतें कीं दप्तराचें इंडेक्स अगदीं पूर्ण व चोख आहे, मग आजच तें अपूर्ण कसें झालें ? श्री. सरदेसाई यांनी दहा हजार कागद तपासून त्यांतील २०-२२ पुस्तकें तयार केलीं. तेव्हा त्यांनी तपास-

लेले कागद तरी अभ्यासकांस पाहण्यास कां मिळूं नयेत ! कागद काय आहेत याची यादी नाही व पाहण्यास परवानगी नाही. ज्या कागदांत हक्कासंबंधीचा भाग नाही व जे कागद सरकारला बाधक होणार नाहीत अशा कागदांचे ८०० रुमाल आहेत. खेरीज ४७१ रुमाल लोकांचे परत देण्यासाठी म्हणून ठेवले आहेत, ते व पागापथकी, लष्कर यासंबंधाचे कागद पाहण्यास मिळाले पाहिजेत.

मूळ कागदाचे रुमाल १४ हजार असून पुढे त्यांत इनाम कमिशनाच्या वेळीं पुष्कळ भर पडली. हक्कनोंदणीचा संबंध नाही असे हजारों रुमाल आहेत. ते सर्व लोकांस पाहण्यास मिळाले पाहिजेत, कागद फार महत्त्वाचे आहेत. त्यांचें हँडबुक तयार करावें अशी लोकांची मागणी फार दिवसांची आहे. हें दप्तर इतिहासाच्या अभ्यासकांस खुलें असावें असें यदुनाथ सरकारांनी वेळोवेळीं प्रतिपादन केलें आहे. परंतु दप्तराचा इतिहासच लोकांस माहीत नव्हता तो समजावा यासाठी मुद्दाम मीं तो जाहीरपणें सांगितला आहे"

याप्रमाणें भाषण झाल्यावर सभा समाप्त झाली.

# मुंबई इलाख्याचा वटहुकूम

ता. १ जुलै रोजीं मुंबईसरकारानें जादा गॅझेट काढून नवा वटहुकूम प्रसिद्ध केला आहे. त्यांतील २, ३, ४ आणि ६ हे भाग सर्व इलाख्याला लागू आहेत. ७ वा विभाग मुंबई शहर व त्याचीं उपनगरें आणि कराची, खेडा, अहमदनगर, पूर्वखानदेश, पश्चिमखानदेश, रत्नागिरी, आणि कारवार या जिल्ह्यांना लावलेला आहे. ५वा विभाग केवळ कारवार जिल्ह्याला लागू आहे. या निरनिराळ्या विभागांतील महत्त्वाच्या कलमांचा सारांश पुढें दिला आहे.

## दुसरा विभाग

(१) सार्वजनिक शांतता किंवा सुरक्षितता यांना बाध येईल असें वर्तन कोणा इसमाने केलें आहे, करीत आहे, किंवा करूं पाहत आहे असें मानण्याला पुरेसा आधार मिळाला असें वाटल्यावर सरकारी अधिकाऱ्याने त्याला वारंटाशिवाय स्वतः पकडावें किंवा दुसऱ्याला पकडण्यास सांगावें. अशा धरपकडीच्या वेळीं जरूर ते सर्व उपाय योजावे. नंतर प्रांतिक सरकाराला याची वर्दी देण्यांत यावी; आणि त्यांच्याकडून जी व्यवस्था ठेवण्याबद्दल हुकूम होईल ती ठेवावी. पकडलेल्या इसमास कच्च्या कैदेंत पंधरा दिवसांपासून दोन महिन्यांपर्यंत ठेवतां येईल.

( २ ) सार्वजनिक सुरक्षितता किंवा शांतता यांना धोक्यांत आणणाऱ्या चळवळीला मदत करण्याचा वहीम एखाद्या इसमावर ठेवण्याला आधार असल्यास अधिकाऱ्याने त्याला पुढील हुकूम करावे.

( अ ) विशिष्ट ठिकाणीं तुम्हीं जाऊं नये किंवा राहूं नये.

( ब ) विशिष्ट ठिकाणीं तुम्हीं जावें किंवा राहावें.

( क ) विशिष्ट ठिकाणांहून तुम्हीं जावें व तेथे परत येऊं नये.

( ड ) तुमच्या ताब्यांतील मालमत्तेचा उपयोग विशिष्ट तऱ्हेनेच करावा.

या वरील हुकुमांची मुदत सामान्यतः एक महिना आहे.

( ३ ) एखादी जागा किंवा इमारत आपल्या नोकरांच्या कचेरीसाठी किंवा घरासाठीं अथवा पोलीस किंवा लष्कर यांच्या सोयीसाठी उपयोगी पडेल असें स्थानिक अधिकाऱ्याला वाटेल; तर त्याने ती जागा किंवा इमारत जरूर तर आंतील सामानसुमानासह मालकाकडून घ्यावी आणि आपल्याला योग्य वाटेल तशी तिची विल्हेवाट करावी.

( ४ ) सरकारी इमारत किंवा जागा, आरमारी, लष्करी, वैमानिक किंवा पोलिसी खात्याची इमारत किंवा जागा, तसेंच रेल्वेच्या अधिकारांतील इमारत किंवा जागा यांत किंवा यांच्या सन्निध प्रवेश करण्याला डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट बंदी करूं शकेल. तसेंच तो एखाद्या रस्त्यावरून, पुलावरून किंवा दुसऱ्या मार्गावरून रहदारी करण्याला प्रतिबंध करूं शकेल. त्याचप्रमाणे तो वाहतुकीचीं साधनें कोणाहि इसमाकडून आपल्या ताब्यांत घेऊं शकेल. हत्यारें, स्फोटक पदार्थ, दारूगोळा वगैरे विकत देण्याला किंवा घेण्याला तो बंदी करूं शकेल, किंवा तीं बाळगणारांकडून त्यांचा ताबा घेऊं शकेल; तसेंच सरकारच्या किंवा रेल्वेच्या कोणत्याहि मालाला किंवा माणसाला इजा किंवा दुखापत करणारीं साधनेंहि तो आपल्या ताब्यांत घेऊं शकेल.

( ५ ) कायदा व सुव्यवस्था यांचें पालन करण्यासाठी आणि सरकारच्या व रेल्वेच्या मालमत्तेचें संरक्षण करण्यासाठी जमीनदार, इनामदार, जहागीरदार, पाटील व शिक्षक यांना आपल्याला मदत करावयास सरकारी अधिकारी लावूं शकेल.

( ६ ) पोस्ट, तार, टेलिफोन व बिनतारी संदेश

यांच्यावर डि. मॅ. हुकमत चालवूं शकेल, आणि पत्रें तारा वगैरे पाहून तीं अडवून ठेवूं शकेल, तसेंच रेल्वेच्या कोणत्याहि गाडींतून जरूर तितकी जागा आपल्या कामासाठी तो रिकामी करूं शकेल व त्यासाठी पूर्वी प्रवास करीत असलेल्या कोणाहि मालाला किंवा माणसाला दूर करूं शकेल. कोणाहि उतारूला गाडींतून जाण्याला तो बंदी करूं शकेल व कोणतीहि गाडी कोणत्याहि स्टेशनावर थांबविण्याची किंवा थांबण्याला बंदी करण्याची तो योजना करूं शकेल.

(७)एखाद्या सार्वजनिक सभेचा रिपोर्ट घेण्याकरिता हेडकॉन्स्टेबल किंवा त्याच्यावरचा अधिकारी यांना पोलिसाच्या साहाय्यानिशीं डि. मॅ. पाठवूं शकेल—खासगी जागेंत तिकिटें लावून सभा भरविली तरी ती सार्वजनिकच होय.

(८) कोणत्याहि जागेची झडती किंवा ताबा घेण्याचें वॉरंट काढतां येईल.

(९) वरील हुकमांच्या अंमलबजावणीमुळे कोणाचें कांहीं नुकसान झाल्यास त्याची भरपाई करण्याबद्दल दोन महिन्यांचे आंत दावा आणतां येईल.

दुसऱ्या कलमांतील हुकूम मोडणारास दोन वर्षेपर्यंत शिक्षा दिली जाईल. वरील इतर हुकूम मोडणारास सहा महिनेपर्यंत शिक्षा देण्यांत येईल.

## तिसरा विभाग

( १ ) जो कोणी सरकारच्या किंवा रेल्वेच्या नोकराला आपल्या कामापासून परावृत्त करील त्याला एक वर्षापर्यंत शिक्षा मिळेल. पोलीस किंवा लष्कर यांमध्ये नोकरी धरूं नये म्हणून जो कोणी दुसऱ्याचे मन वळवील त्यालाहि हीच शिक्षा. तसेच लोकांना भय उत्पन्न करण्यासारखी किंवा सरकारी नोकराबद्दल द्वेष अथवा तिरस्कार पसरविण्यासारखी कंडी जो पिकवील त्यालाहि हीच शिक्षा.

( २ ) ज्या भागांतील रहिवासी कायदा व सुव्यवस्था किंवा सरकारी खजिना यांना धोक्यांत आणण्यासारखीं कृत्यें करीत असतील किंवा तीं करणाऱ्याला आश्रय देत असतील, त्या भागांतील सर्व रहिवाश्यांवर सामुदायिक दंड लादण्यांत येईल. त्या भागांत न राहणाऱ्या पण तेथे शेती किंवा स्थावर मिळकत असणाऱ्या माणसांनाहि रहिवासी गणण्यांत येईल.

( ३ ) जप्त केलेल्या वाङ्मयाचा उतारा प्रसृत करणाऱ्याला सहा महिन्यांपर्यंत शिक्षा मिळेल.

( ४ ) सोळा वर्षांच्या आंतील मुलाला या वटहुकमान्वयें दंड झालेला असल्यास तो त्याच्या पालकांनी भरावा असा हुकूम कोर्ट देऊं शकेल, आणि तो मोडल्याबद्दल पालकांना तुरुंगाची शिक्षाहि देऊं शकेल.

## पांचवा विभाग

( १ ) सारा, खंड, कर, जकात वगैरे सरकारदेणें देऊं नका म्हणून चिथावणी देणें हा विशिष्ट भागांत गुन्हा मानण्यांत आल्याचें प्रांतिक सरकार जाहीर करील आणि तो गुन्हा करणारास ६ महिनेपर्यंत शिक्षा मिळेल. मात्र त्यासाठी सबइन्स्पेक्टर किंवा त्यावरचा अधिकारी यानी कोर्टाला लेखी कळविलें पाहिजे.

## सहावा विभाग

( १ ) बेकायदा संस्थेच्या जागेचा ताबा डि. मॅजिस्ट्रेट घेऊं शकेल व तेथून कोणाहि इसमाची हकालपट्टी करूं शकेल. त्या जागेंतील जंगम मालाचाहि कबजा घेण्यांत येईल व त्या मालाची यादी अधिकाऱ्याकडे पाठविण्यांत येईल. त्यांपैकीं जरूर तो माल जप्त करतां येईल किंवा त्याची योग्य ती विल्हेवाट लावतां येईल.

(२) प्रां. सरकाराने जाहीर केलेल्या जागेंत जो कोणी डि. मॅ. च्या परवानगीवांचून प्रवेश किंवा वास्तव्य करील; त्याने मर्यादा ओलांडण्याचा फौजदारी गुन्हा केला असें मानण्यांत येईल आणि तो गुन्हा बिनवॉरंटाचा व बिनजामिनाचा समजण्यांत येईल.

(३) बेकायदा संस्थेच्या कामीं जे पैसे किंवा रोखे उपयोगांत आणले जातात असें प्रां. सरकारास आढळेल, ते जप्त करण्यांत येतील; आणि त्यासाठी सरकारी अधिकाऱ्याला कोणत्याहि ठिकाणीं प्रवेश करतां येईल व झडती घेतां येईल.

( ४ ) सार्वजनिक शांतता किंवा कायदा-व्यवस्था यांना धोक्यांत आणण्याचे काम एखादी संस्था करीत आहे असें आढळून आल्यास गव्हर्नर जनरल ती संस्था सर्व ब्रिटिश हिंदुस्थानभर बेकायदा ठरवील.

## सातवा विभाग

( १ ) दुसऱ्याला जें कृत्य करण्याचा हक्क आहे, यांत जो कोणी अडथळा आणील, त्यासाठी धाकदपटशा दाखवील, त्याच्या घराच्या, कारखान्याकचेरीच्या किंवा दुकानाच्या आसपास हिंडेल, त्यांत प्रवेश करण्यास कोणाला प्रतिबंध करील, किंवा अशाच कांहीं मार्गांनी इतरांना उपद्रव देईल अगर देण्यास चिथावणी देईल त्याला सहा महिन्यांपर्यंत शिक्षा मिळेल.

(२) हीच शिक्षा सरकारी नोकरांवर बहिष्कार घालणारांस किंवा तो घालण्यास चिथावणारांस मिळेल. तसेंच प्रेतयात्रा वगैरे काढून त्यांची कोणी चेष्टा केली तरी त्यालाहि वरील शिक्षा देण्यांत येईल.

## सर्व हिंदुस्थानास लागू असणारे विभाग

हिंदुस्थानसरकाराने पुढील विभाग सर्व हिंदुस्थानाला लागू केले आहेत:—

(१) कायदा, सुव्यवस्था किंवा शांतता यांना बाध आणण्याचें काम एखादी संस्था करीत आहे असें गव्हर्नर–जनरलाला वाटल्यास तो ती संस्था बेकायदा म्हणून जाहीर करील; आणि तिचा बेकायदेशीरपणा १९०८ च्या 'इंडियन क्रिमिनल लॉ अमेंडमेंट ॲक्टा'ला धरून मानण्यांत येईल.

(२) वटहुकुमाखालील गुन्हे बिनवारंटाचे व बिनजामिनाचे समजले जातील.

(३) प्रेस ॲक्टाचीं पूर्वीचीं कलमें लागू असून त्यांत पुढील मजकुराची भर घालण्यांत यावी —

(अ) सरकारी नोकराला आपल्या कामापासून परावृत्त करणें.

(आ) ब्रिटिश सरकार, हिंदुस्थानसरकार, हिंदी संस्थानिक इत्यादिकांविषयी तुच्छभाव प्रकट करणें.

(इ) प्रजेंत वर्गकलह उत्पन्न करणें.

(ई) कर, सारा, वगैरेंच्या बंदीचा उपदेश करणें.

(४) वटहुकुमान्वयें दिलेल्या हुकुमाबद्दल कोणाहि कोर्टाला शंका किंवा अमान्यता दर्शवितां येणार नाही. पण वटहुकुमांत सवड दिली असल्यास कोर्टांत अपील करतां येईल.

# मुंबईतील दंग्याचें पर्यालोचन

मोहरमाकरिता एका मुलतानी हिंदु व्यापाऱ्याकडे कांही मुसलमान मवाली पैसे मागावयास गेले असता त्याने त्या मवाल्यांना नकार दिला. या क्षुल्लक कारणावरून १४ मे पासून मुंबईतील मुसलमानांनी दंगलीला प्रारंभ केला; व तेव्हांपासून आजतागायत तो दंगा चालू असून गेल्याच्या मागील बुधवारीं त्याने फिरून उग्र स्वरूप धारण केलें. १४ मेपासून मंगळवार सकाळपर्यंत या दंग्यामुळे २१५ लोक ठार व २६१९ जखमी झाले. यांपैकीं मागील बुधवारपासून मंगळवार सकाळपर्यंत मृत्युमुखीं पडलेल्यांची संख्या २९ व जखमी झालेल्यांची ५५५ आहे. मागील बुधवारीं दंगेखोरांनी पुनः उचल खाल्ल्यानन्तर मुंबईच्या पोलीस अधिकाऱ्यांनी फारसे जादा उपाय न योजतां दंगा आवांक्यांत आणण्याचा यत्न केला; परंतु दंगेखोरांचें पारिपत्य करण्यास आपलें सामर्थ्य अपुरें आहे असे अधिकाऱ्यांना वाटल्यामुळे कर्फ्यू ऑर्डर मुंबई शहराला पुनः लावण्यांत आली व ठिकठिकाणचे साधे व हत्यारबंद पोलीस मुंबईस आणण्यांत आले. याशिवाय लष्करी पलटणहि शहरांत खडी ठेवण्यांत आली. एवढ्या बंदोबस्तानंतर शांतता पुनः प्रस्थापित होईल अशी आशा आतां वाटूं लागली आहे. परंतु तशी शांतता प्रस्थापित होऊन बाहेरचे पोलीस व लष्कर परत गेल्यावर दंगेखोर पुनः डोकें उचलणार नाहीत असा विश्वास जनतेला तरी वाटत नाही. यामुळे या दंग्याचा खोल विचार करणे आवश्यक झालें आहे.

या दंग्याचा विचार करतांना जे बरेच महत्त्वाचे प्रश्न उत्पन्न होतात त्यांत मुंबईच्या दंग्यांत हिंदु-मुसलमानांच्या भूमिका कोणत्या आहेत हा सर्वांत महत्त्वाचा प्रश्न होय. मेच्या १४ तारखेला मुंबईत जो प्रक्षोभ झाला त्याचीं कारणें मुसलमानांचा आततायीपणा व वरचढ वृत्ति हीं होत ही गोष्ट आता सूर्यप्रकाशाइतकी स्पष्ट झालेली आहे. मुसलमानांनी हिंदूंकडे मोहरमाकरिता पैसे मागावयाला जाणें हें योग्य कीं अयोग्य हा प्रश्न जरी आपण बाजूला ठेवला तरी मुसलमानांच्या सणाला हिंदूंनी पैसा द्यावा अगर नाही हा सर्वस्वैव हिंदूंच्या खुशीचा प्रश्न आहे हें कोणीहि कबूल करील. मुसलमान पैसा मागावयाला आले असता हिंदूंनी पैसा देत नाही असें म्हटलें तर त्यामुळे पैसा मागावयाला गेलेल्या मुसलमानाला घुस्सा येण्याचें यत्किंचितहि कारण नाही. बरें, जरी त्या विवक्षित मुसलमानाला आपला अपमान झाला असें वाटलें तरी त्याच्या जातभाईंनी त्याचा कैवार घेऊन हिंदूंवर चढाई करण्याचें कोणतेंच कारण नाही. परंतु मुंबईतील दंग्याच्या प्रारंभाकडे लक्ष दिलें म्हणजे याच्या उलट परिस्थिति आढळते. मुसलमानाला हिंदू मुलतान्याने मोहरमाकरिता पैसा दिला नाही म्हणून त्याला त्याचा घुस्सा आला व त्याचा कैवार इतर मुसलमानांनी घेऊन स्वभावतःच शांत वृत्तीच्या हिंदूंवर आक्रमण केल्यामुळे दंग्याला प्रारंभ झाला.

दंग्याला प्रारंभ झाल्यावर प्रथम कांही वेळपर्यंत हिंदू जवळ जवळ स्वस्थच राहिले. हिंदूंना असा विश्वास वाटत होता कीं प्रजेच्या जीविताचें व मालमत्तेचें संरक्षण करण्याची जबाबदारी सरकारावर असल्यामुळे सरकार जरूर ते उपाय योजून मुसलमान गुंडांना आपल्या काबूंत ठेवील. अधिकाऱ्यांचा दंग्याबद्दलचा अदमास चुकला असो अगर अन्य कारण घडलें असो, परंतु मुसलमानांचा दंगा एकदोन दिवसांत त्यांना शमवितां आला नाही व मुसलमानांची वृत्ति अधिकच बेताल झाली. आतां स्वसंरक्षण केलें नाही व मुसलमानांच्या आक्रमणाला तोंड दिलें नाही तर आपला निभाव लागणार नाही

अशी बालंबाल खात्री झाल्यावर हिंदूंनीहि परिस्थितीला तोंड देण्याचें ठरविलें. दंग्याची आग अधिकच भडकत चालली. दंगा शमत नाही असें आढळून आल्यावर कर्फ्यू ऑर्डर काढणें, लष्कर बोलावणें वगैरे गोष्टी सरकारनें केल्या. तरीहि दंग्याची परिस्थिति निवळूं लागण्यासच महिना सवा महिना लागला.

या मुदतींतील दंग्याचा इतिहास पाहिला तर असें आढळतें कीं हिंदू शक्य तोंवर स्वसंरक्षणच करीत होते व अगदीं निरुपाय झाला त्या वेळींच मुद्दाम घराबाहेर येऊन त्यांनी मुसलमानी हल्ल्याला तोंड दिलें. या दंग्यांत कामाठीपुऱ्यांतील कामाठी व गिरगांव–फणसवाडी भागांतील कोकण्ये यांनीं हिंदूंचें संरक्षण करण्यांत पुढाकार घेतला आहे. व यामुळे त्यांच्यावर चिडून जाऊन ते लोक दंगेखोर आहेत असा कांगावा कांही लोक करीत आहेत. परंतु या बोभाट्याकडे कोणीहि लक्ष देण्याचें कारण नाही. कामाठी अगर कोकण्ये यांनी मुद्दाम कोठेहि आततायीपणाचीं कृत्यें केल्याचा दाखला नाही. मात्र प्रत्येक वेळीं विधर्मीयांचें आक्रमण झालें असता ते धीर वृत्तीने पुढे आले आहेत. या दंग्याचे बाबतींत असें म्हणावें लागतें कीं जर कोकण्ये, कामाठी वगैरे लोकांनी वेळींच जागरूकता दाखविली नसती तर मुसलमान गुंड हिंदु-वस्तींत बेधडक शिरून त्यांनी अत्याचार केले असते व ते करण्यास आयतेंच निर्वीर क्षेत्र त्यांस मिळालें असतें. या लोकांनी वेळींच मुसलमानी आक्रमणांना तोंड दिलें म्हणूनच मुंबईंतील हिंदूंचा अंशतः बचाव झाला. मुसलमानांप्रमाणें हिंदु लोक मूलतःच अत्याचारी नसल्याने ठार झालेल्या हिंदूंचा आंकडा मुसलमानांच्या जवळ जवळ दुपटीवर गेला. मुसलमानांनी हिंदूंना केलेल्या बहुतेक जखमा सुऱ्याच्या आहेत व त्या क्रूरपणाने केलेल्या आहेत. तसेंच मेच्या १४ तारखेला दंगा झाल्यापासून पहिले एकदोन दिवस ठार झालेले व जखमी झालेले बहुतेक लोक हिंदूच आहेत यावरून पहिले दोन दिवस हिंदूंनी फारसा प्रतिकारहि केला नव्हता हें उघड होतें.

या दंग्याला प्रारंभ झाल्यापासून मुसलमानांची चढेल वृत्ति दृष्टोत्पत्तीस येत आहे. परंतु मागील बुधवारीं दंग्याने उचल खाल्यापासून तर त्या वृत्तीने मोठीच उसळी मारली आहे. प्रेतयात्रा हिंदुवस्तींतून नेण्याचा हट्ट मुसलमानांनी गेल्या शुक्रवारीं धरला. काळबादेवी रस्त्याने प्रेतयात्रा गेली तर दंग्याला प्रारंभ होईल याची जाणीव पोलिसांना असल्यामुळे त्यांनी मुसलमानांना काळबादेवी रस्त्याने न जाण्याविषयी बजावलें. परंतु मुसलमानांनी तो हुकूम धाब्यावर बसवून काळबादेवी रस्त्याला ते लागले व अपेक्षेप्रमाणे दंगाहि झाला. आमचा पहिला प्रश्न असा आहे कीं, विशिष्ट परिस्थिति लक्षांत घेऊन दिलेला हुकूम पोलीस अधिकाऱ्यांनी कां मोडूं दिला ? दुसरा प्रश्न असा कीं पांच माणसांपेक्षां अधिक माणसांनी एकत्र जमूं नये असा चीफ प्रेसिडेन्सी मॅजिस्ट्रेटचा स्पष्ट हुकूम असता शेंकडो मुसलमानांना एकत्र येऊं देऊन त्यांना प्रेतयात्रा कां काढूं दिल्या ? प्रेतयात्रेबरोबर जाणाऱ्या लोकांच्या संख्येवर तरी प्रथमपासून नियंत्रण कां घालण्यांत आलें नाही ? कर्फ्यू ऑर्डर चालू असता संख्येवर नियंत्रण घालून कां होईना परंतु सोमवारीं मध्यरात्रीनंतर अधिकाऱ्यांनी मुसलमानांना प्रेतयात्रा कां काढूं दिली ? मुसलमान दिवसाढवळ्या पोलिसांचे हुकूम मोडण्यास टपलेले आहेत असें दिसत असता व मिरवणुकीबरोबरच्या हिंदु पोलिसांना ते अपशब्द बोलत असता पोलिस अधिकारी एवढें मनःसंयमन कां दाखवीत आहेत ? असे एक ना अनेक प्रश्न आज लोकांपुढे आहेत.

मुसलमानांच्या दंग्याला प्रारंभ होऊन आज पावणेदोन महिने होऊन गेले. तरी अजूनहि हा दंगा शमत नाही व जरी सध्याच्या कडक बंदोबस्तामुळे शमला तरी तो बंदोबस्त कमी केल्यावर पुनः तो डोकें वर केल्याशिवाय राहणार नाही अशी भीति वाटते. मुंबईंतील चालू दंग्याचा इतिहास पाहिला तर असे आढळतें कीं, दंगेखोरांच्या हालचाली एखाद्या वेळापत्रकाप्रमाणे चालू आहेत. एका क्षुल्लक कारणावरून सुरू झालेला दंगा सरकार आपल्यापरी शिकस्तीचे प्रयत्न करीत असूनहि शमत नाही यावरून या दंगेखोरांना कोणाचा तरी चांगला आश्रय आहे असा संशय लोकांना येत आहे. मुंबईच्या नागरिकांच्या शांतता–कमिटीनेहि या दंगेखोरांना पैशाचा पुरवठा असावा असें मत प्रदर्शित केलें आहे. ज्या अर्थी दोन महिनेपर्यंत पद्धतशीर रीतीने दंगेखोर हा प्राण घेण्याचा डाव खेळत आहेत त्याअर्थी त्यांना कोणा तरी पैसेवाल्या संस्थेचें अगर व्यक्तीचें साहाय्य असावें असें आम्हांलाहि वाटतें. परंतु या दंग्यांतील मुसलमान गुंडांची भाषा ऐकली म्हणजे या दंग्याच्या बुडाशीं कांही राजकीय हेतु असावा असेंहि वाटूं लागतें. मुसलमानांची प्रेतयात्रा हिंदुवस्तीजवळून चालली कीं हिंदूकडे बघून व हातवारे करून खुनशी दृष्टीने मुसलमान मवाली "सौराज ले जाव"! असें ओरडत सुटतात आडमुठ्या मुसलमानांच्या तोंडींहि हें वाक्य असावें यावरून या दंग्याचे सूत्रचालक राष्ट्रीय चळवळीचे विरोधक असे कोणी तरी असावें असाहि एक विचार मनांत आल्याविना राहात नाही. मुंबईंतील

दंगा जर कायमचा शान्त व्हावा असें सरकारास वाटत असेल तर त्यांनी दंगेखोरांच्या पाठीशीं कोण आहेत याचा खासगी रीतीने शोध घेऊन जे लोक दंगा चालविण्यास जबाबदार असतील त्या सर्वांचें--मग ते कोणीहि असोत--शक्य तितकें कडक पारिपत्य केलें पाहिजे.

मुंबई शहर हिंदुस्थानाच्या परराष्ट्रीय व्यापाराचें व उद्योगधंद्यांचें पहिल्या प्रतीचें केंद्र आहे. चालू दंग्यामुळे तें उजाड झाल्यासारखें दिसत असून लोकांना जीविताची व मालमत्तेची सुरक्षितता वाटेनाशी झाली आहे. व्यापारधंद्याचें तर कमालीचें नुकसान झालें असून शहराच्या वैभवाला उतरती कळा लागली आहे. दंगा सुरू झाल्यापासून ट्रॅम कंपनीचें उत्पन्न सुमारें चार-पांच लाखांनी घटल्याचें समजतें. यावरून इतर व्यापार-उदिमाची काय स्थिति असेल याची कल्पना येण्यासारखी आहे. अशी परिस्थिति उत्पन्न करणारा दंगा मुंबईसारख्या इलाख्याच्या राजधानींत पावणेदोन महिने चालतो व त्याचें कायमचें उच्चाटन होण्याचें निश्चित चिन्ह कांहीच दिसत नाही ही गोष्ट आपल्या सामर्थ्याची घमेंड मारणाऱ्या इंग्रज सरकाराला कमीपणा आणणारी नाही काय? कॉंग्रेसची अनत्याचारी चळवळ मोडून काढण्याकरिता सरकार लोकमताला न जुमानता वाटेल तेवढे वटहुकूम काढून आपल्या अधिकाऱ्यांना अनिर्बंध सत्ता देतें. परंतु अत्याचारी दंगेखोर सर्वत्र थैमान घालीत असता त्याचा बींमोड करण्यास जादा अधिकारांचा उपयोग करीत नाही यास काय म्हणावें?

# पाणाड्याचें कसब

( ले.—श्रीपाद महादेव माटे. )

या विषयावरील प्रसिद्ध ग्रंथ जो "डिव्हायनिंग रॉड्" त्यांतून पुढील हकीकत दिलेली आहे. ती वाचून वाचकांस करमणूक होईल, इतकेंच नव्हे तर आपल्याकडील पाणाडे भूमींतील गुप्त प्रवाह शोधून काढण्याच्या कामीं काय इलाज योजतात हें पाहावें अशीहि जिज्ञासा त्यांस उत्पन्न होईल असें वाटतें. वस्तुतः अशी जिज्ञासा व्हावी यासाठीच ही माहिती दिली आहे. लेख वाचून जर कोणी आपापले या विषयावरील अनुभव प्रसिद्ध केले तर अवहेलनेंत सांपडलेलें व अशास्त्रीय या नांवामुळे दिपून गेलेलें हें उपयोगी ज्ञान लोकांपुढे विचारासाठी येईल असा भरंवसा वाटतो. शेतकी खात्यांतील माणसांना पुढील माहिती नवी नाही. अर्थात् त्यांनीहि या विषयासंबंधाने जाहीर चर्चा आरंभिली तर ती अतज्ज्ञ माणसांच्या चर्चेपेक्षां जास्त अधिकाराची ठरेल हें स्पष्ट आहे.

युरोप खंडांत फार प्राचीन काळापासून जमिनींतील धातूंचा शोध लावणें, गुन्हेगार हुडकून काढणें, पुरलेलें धन हुडकून काढणें इत्यादि कामीं डिव्हायनिंग रॉडचा ( हेरणाराची यष्टि ) उपयोग करीत असत. १४३० सालच्या लेखांत खाणीचा शोध लावण्यास रॉडचा उपयोग होतो, असा उल्लेख आहे; पण ही विद्या सामान्य प्रकारच्या लोकांच्या हातांतच राहिलेली होती. आपण काय करतों व म्हणून आपल्याला भूगर्भातील हीं धनें माहीत होतात हें त्यांस सांगतां येत नसल्यामुळे व आपली यष्टि चालवितांना त्यांच्या अंगांत कांही संचार होतोसा दिसत असल्यामुळे या माणसाने भुताखेताशीं ओळख करून घेऊन तिच्या द्वारा हें ज्ञान संपादिलें आहे असें सामान्य लोक समजत असत. आधुनिक शास्त्रविचार हा अजून उद्भवलाच नसल्यामुळे आपल्याला न कळणाऱ्या अशा अद्भुताची मीमांसा देव किंवा सैतान यांच्या आश्रयानेच ते करीत असत. पण समाजांतले जे प्रतिष्ठित, उच्च दर्जाचे व धर्माचा अभ्यास करणारे लोक ते या कामांत पडले नसल्यामुळे त्यांत पडलेल्या लोकांच्या हीन दर्जाकडे पाहून लोकांनी असें ठरविलें कीं, या कसबी लोकांना सैतानाचाच आश्रय असावा. आता सैतानाचा आश्रय जरी म्हटला तरी त्याची फलश्रुति फायद्याची असल्यामुळे लोक आपलीं कामें या कसबी लोकांकडून थोड्या गुप्तपणानेच का होईना, पण करून घेत.

### पाणाड्यांचा धिक्कार

देवाची मर्जी या प्रकरणीं काय असेल हें आपल्याला माहीत आहे असें ज्यांना वाटत होतें त्यांनी या कसबी लोकांचा व त्यांच्या कसबाचा केवळ धिक्कारच चालविला होता. गमतीची गोष्ट ही कीं, खुद्द मार्टिन ल्थर याने, हें कसब जे कोणी चालवितात ते परमेश्वराच्या आज्ञादशकांतील पहिली आज्ञा मोडतात असा अधिकारवजा अभिप्राय प्रकट केला होता! मग इतर सटरफटर उपाध्याय लोक काय बोलत असतील हें सहज उमगण्यासारखें आहे. पण उपाध्यायाचे अभिप्राय बाजूस राहून लोकांचा प्रत्यक्ष फायदा करून देणारें हें कसब काय आहे या-

कडे वरिष्ठ दर्जाच्या लोकांचेंसुद्धा लक्ष जाऊं लागलें. इ. स. १५५६ त ॲग्रिफोला याने या प्रकरणाचा विचार केला, व "सर्वांच्याच हातीं रॉड फिरत नाही, त्याअर्थी पाणी किंवा खनिज व रॉड यांचा अंतःस्नेह नसून ज्या माणसाच्या हातांत तो चलित होतो, त्याच्या अंगच्या गुणांचा म्हणजे देहधर्माचा कांही गुण असावा" हें त्याने प्रतिपादिलें. १६ व्या शतकाच्या मध्यकाळांत सोन्यारुप्याच्या खाणी शोधून काढण्याच्या कामीं असल्या यष्टीचा उपयोग सरसहा चालू होता. हा उपयोग इतका सार्वत्रिक झाला कीं, यष्टीच्या उपयोगांतील नवीनपणा आणि "भुताटकी" अजीबात नष्ट होऊन शोधकांच्या धंद्यांत तिला चांगली प्रतिष्ठा आणि संभवितपणा हीं प्राप्त झालीं. फ्रान्स देशांतील बोसोलीद येथील जहागीरदारणीने खनिज द्रव्यें व पाणी हीं हुडकून काढण्याच्या कामीं असल्या यष्टीचा उपयोग फारच केला, व पुढील लोकांच्या माहितीसाठी या पद्धतीने आपण कोण-कोणत्या खाणी हुडकून काढल्या त्यांचीं नांवेंहि तिने लिहून ठेवलीं आहेत. इतकें झाले तरी उपाध्यायांचे शिव्याशाप चालूच होते.

### जॅक्स अझाद्

खनिज किंवा पाणी सांपडत नाही असें त्यांस म्हणतांच येण्यासारखें नव्हतें. पण हें सगळें सैतानाच्या द्वारां प्राप्त होतें ही त्यांची तक्रार होतां होतां जॅक्स अझाद हा पाणाड्या जोराने पुढे आला. कांही विशिष्ट ठिकाणीं आपल्या हातांतील रॉड जोराने वळतो हे त्याने पाहिले इतकेंच नव्हे तर कांही विशेष प्रकारचीं माणसें आपल्यासमोर असतांनाहि तो वळतो, असेंहि केव्हा केव्हा त्याला दिसूं लागलें. आपल्या अंगीं ही काय शक्ति आहे याचें जरी त्याला सोपपत्तिक ज्ञान होईना तरी ती आहे याची प्रतीति मात्र त्याला चांगलीच झाली. मोठमोठाले गुन्हेगार हुडकून काढण्याच्या कामीं त्याने या यष्टीचा उपयोग केला व त्याला या कामीं अद्भुत यश मिळालें. इतकें कीं, शेवटीं त्याला राजदरबारीं पाचारण झालें. त्याने केलेल्या शोधांच्या हकीकती सरकारी दप्तरांतहि नमूद आहेत. सतत दहा वर्षें-पर्यंत या जॅक्सच्या संबंधाच्या हकीकती फ्रेंच पत्रांतून भरभरून येत होत्या. शेवटीं लोकांना एवढी गोष्ट कळून चुकली कीं, कांही कांही माणसांना प्राप्त होणारी का होईना, पण ही एक उपयोगी विद्या आहे.

अठराव्या शतकाच्या मध्याच्या सुमारास ब्लेटन हा प्रसिद्ध पाणाड्या जन्माला आला. सातआठ वर्षांचा असतांना तो सहज एका दगडावर बसला होता; तेथे त्याला भोंवळ आली; लोकांनी त्याला दूर उचलून नेतांच भोंवळ गेली; पुनः त्या दगडावर तो येऊन बसतांच पुनः भोवळ आली. तेव्हा इतक्या लहानपणींच त्याच्या ध्यानांत आलें कीं, रॉड चालविणारे पाणाडे असतात म्हणून जें आपण ऐकतों त्यांतलेच आपणहि कदाचित् असूं. दगडाखाली खणून पाहतां तेथे प्रत्यक्षच पाण्याचा प्रवाह सांपडला! मग तो याच नादास लागला. रॉड हातीं घेतांच त्याला आंचके बसत. हवा कोरडी असली तर व जेवणाच्या आधीं हें फार होई. जमिनीवरचें वाहतें पाणी किंवा भुईंतील सांठलेलें पाणी याचा त्याच्यावर काहीच परिणाम होत नसे. पण भुईच्या पोटांत जर पाण्याचा प्रवाह असला तर मात्र त्याला आंचके बसूं लागत. या लहानग्या पाणाड्याची परीक्षा नानाप्रकारें पाहण्यांत आली. त्याला माहीत नसलेल्या पाणप्रवाहावरील भूपृष्ठावरून डोळे बांधून त्याला चालत नेलें तरी त्याचें अंग थडथडूं लागे व तो म्हणे कीं, खाली पाणी असलें पाहिजे. इतकें होतांच शेंकडो गरजू लोक आपापल्या शेतवाडयावर त्यास नेऊं लागले व आश्चर्य हें कीं, अनेक केवळ माळरान जमिनी त्याने पाणी दाखवून दिल्यामुळे अतिशय सुपीक बनून गेल्या. हें बोलणें केवळ सांगोपांगी नाही तर ज्यांचा असा फायदा झाला त्यांच्या स्वदस्तुरच्या लेखी जबान्या शिल्लक आहेत. अनेकांनी अनेक शंका काढल्या. शास्त्रज्ञांनी त्यांचें ज्ञान अशास्त्रीय आहे असे शेरे दिले. पण त्याच्या अंगीं पाणी दाखवून देण्याची शक्ति आहे ही जी प्रयोगसिद्ध गोष्ट ती कोणास नाकबूल करतां येईना.

पेरॅमिल नांवाचा दुसरा एक मोठा पाणाड्या होऊन गेला. त्याच्या गांवचें सरकार १८४३ सालच्या आपल्या दप्तरांत म्हणतें, "पेरॅमिलचें दाखवून दिलेल्या एकंदर ३३८ जागीं आम्ही विहिरी काढल्या. पैकीं ३०५ जागीं बख्खळ पाणी लागलें." पंचवीस वर्षांत १०,००० ठिकाणीं त्याने पाणी आहे असें सांगितलें व लोकांचा त्याच्यावरील विश्वास इतका कायम झाला होता कीं त्यांपैकीं९,००० ठिकाणीं लोकांनी विहिरी खोदल्या. फ्रान्समध्ये ३० परगण्यांत मिळून त्याने एकंदर ६००० ठिकाणीं पाणी सांपडवून दिलें.

### भूगर्भशास्त्र्याचें मत

या सर्व गोष्टींना सरकारी कागदोपत्रीं भक्कम पुरावा आहे. कित्येक भूगर्भशास्त्री त्याच्या ज्ञानाची हेटाळणी करीत. पण कांही जाडया पंडितांनी त्याची शक्ति खरी मानिली आहे व तसें लिहून ठेविलें आहे. सर आर्चिबाल्ड गीका हा जो महान् भूगर्भशास्त्री आहे त्याने एकदा म्हटलें कीं, माझी या प्रकरणीं अजून खात्री झाली नाही. पण या बाबतींत पुढे आलेला पुरावा इतका मनांत भरतो कीं याच्याविरुद्ध

बोलणें बरोबर वाटत नाही ! पुढें अनेक शास्त्रवेत्त्यांनी या कलेवर पूर्ण विश्वास असल्याचें कबूल केलें व शेवटीं कॉनकॅलमधील रॉ. ए. स्त्रे. अध्यक्ष जो एनिस तो स्वतःच ही कला शिकला व पाणाड्याचे प्रयोग करूं लागला !

सर हेन्री हार्बेन याच्या मळ्यावर पाण्याची टंचाई फारच भासूं लागली. इतर सटरफटर इलाज करून पुष्कळ पैसा नासल्यावर प्रसिद्धीस चढूं लागलेला पाणाड्या जो मुलिन्स त्यास त्याने बोलाविलें. इकडच्या परगण्यांत मुलिन्स हा पहिल्यानेच आला होता. त्याने आपला रॉड हातीं घेऊन या जमिनदाराच्या मळ्याची बारकाईने पाहाणी चालू केली. एके ठिकाणीं भुईच्या पोटांतून एक लहानसा प्रवाह झुळझुळत जात होता. तो पुढे पुष्कळ खाली प्रकट झाला होता. पण हें त्याला माहीत नव्हतें. जमिनदार व तो अमुक एके ठिकाणीं येतांच त्याच्या हातांतील दुबेळकें ( रॉड ) थडथडूं लागलें. तो म्हणाला खालीं पाणी असले पाहिजे हार्बेनला आश्चर्य वाटलें. मग चांगली पाहाणी करून मुलिन्सने जेथे जेथे दाखविले तेथे तेथे विहिरी खोदल्या व त्यांस भरपूर पाणी लागलें, विशेष हें कीं, किती हातांवर पाणी लागेल, किती जोराचें लागेल याहि बाबी मुलीन्स अचुकपणें सांगूं लागला ! कित्येक प्रसंगीं असें झालें कीं, भूगर्भशास्त्रवेत्त्यांनी निर्वाळा द्यावा कीं,अमूक ठिकाणीं पाणी कधीहि लागावयाचें नाही आणि मुलिन्सने सांगावें कीं, येथे लागेलच लागेल; व खणून पाहावें तों त्याने सांगितलेल्या खोलीवर जोराचें पाणी लागावें ! हा मुलिन्स १८९४ सालीं वारला.

शास्त्रचिकित्सा फार जोराची चालू झाल्यानंतरच्या काळीं हा झालेला असल्यामुळे व त्याच्या प्रयोगाच्या खरेपणाबद्दल शेंकडो अमीरउमरावांनी व शिष्ट गृहस्थानी स्वदस्तुरची जबानी लिहून ठेवलेली असल्यामुळे पाणी हेरून काढणें ही एक विश्वास्य विद्या आहे हें मत संभावितांत कायम झालें. याच सुमाराचा दुसरा पाणाड्या जो लॉरेन्स त्यानेहि जवळ जवळ सत्तर वर्षे आपल्या या शक्तीचा उपयोग जनतेस करून दिला. त्याच्या प्रयोगाबद्दल शेकडों लोकांनी निर्वाळा दिला आहे. कार्डिफ येथील कागदाचे कारखानदार म्हणतात,"तुम्हीं दाखविलेल्या जागीं आम्हीं विहिरी खोदल्या. एक ३१ फूट खोल जाताच तासीं २०००० गॅलन्स इतकें पाणी सांपडलें. दुसरीला तासीं १४००० गॅलन्स इतकें लागलें !" ब्रिस्टल येथील म्यु. चॅरिटी ट्रस्टीजनी त्यास लिहून कळविलें कीं तुमचा अजमास अगदी सोळा आणे खरा ठरून विहिरीला बख्खळ पाणी लागलें आहे. येथे पाणी लागेल असें कोणीं म्हटलें असतें तर खरेंसुद्धा वाटलें नसतें.

## पाश्चात्य पाणाडे

विल्यम स्टोन, बेंजामिन, टॉम्किन्स,लीस्टर गॅटॅकर वगैरे पुष्कळ पाणाडे इंग्लंडांत झाले, व सध्याहि आहेत. युरोपच्या भूमीवरहि अनेक झाले व आहेत. त्यांचीं नांवे किंवा त्यांनी केलेल्या प्रयोगांचीं वर्णनें देण्याची जरूरी नाही. पाणाडे जो रॉड करतात तो म्हणजे एक दुबेळकें असतें. कुबडीचा भुईवर टेकावयाचा दांडा बहुतेक छाटला व तिचीं शिंगें थोडीं वाढविलीं तर हा रॉड होईल. यूल नांवाच्या झाडाची फांदी तोडून आणून तिचा हा बनवितात. शिंगांचीं टोकें दोन हातांनीं धरून रॉडचा बुंधा आपल्या विरुद्ध दिशेला क्षितिजाकडे धरावयाचा. खाली पाणी असलें तर कांही लोकांच्या हातांत हा रॉड थडथडूं लागतो, व त्याच्या अंगांत कांही चमत्कारिक वेदना होतात. वेदना होताच पाणाड्या ठासून सांगतो कीं, या ठिकाणीं म्हणजे जमिनीच्या ज्या टवक्यावर तो उभा असले तेथ पाणी आहे. सरावाने हें पाणी किती खोलीवर लागेल व किती पुष्कळ लागेल हेंहि त्यास सांगतां येऊं लागतें. मात्र हे पाणी प्रवाही असले तर मात्र सांगतां येतें. नुसतें साचवणीचें असेल तर सांगतां येत नाही.

आता पाणाडे आहेत, ते पाणी कोठें सापडेल हें दाखवूं शकतात, व हजारों प्रयोगांनी हें सिद्ध झालेले आहे, इतक्या बाबी गृहीत धरावयास हरकत नाही. तसेच भूगर्भशास्त्रज्ञ अजून या कलेवर नाकें मुरडतात व हें सर्व अशास्त्रीय आहे असें म्हणतात. पण प्रयोगाची सत्यता त्यांना नाकारतां येत नाही हेंहि खरेंच आहे. या पाणाड्यांना कांही उपपत्ति सांगा म्हटलें तर ती नीटशी सांगता येत नाही हेंहि खरें आहे. मग यानी उपपत्ति काय ? अजून कांहीच सांगतां येत नाही. किर्बाप्टस्यालाया, असें एक नांव या प्रकाराला देण्यांत आलें आहे. पण यानेहि फारसा बोध होत नाही. पहिल्या परिच्छेदांत सुचविल्याप्रमाणे पाणाड्यांनी स्वतः किंवा त्यांच्या माहितगारांनी आणि शेतकी खात्यांतील हा विषय जाणणारांनी यासंबंधाने कांही लिहावें अशी त्यांस विनति आहे.

# आशियांतील स्त्री-वर्गाची स्थिति

### इराण

पूर्वी या देशांत बालविवाह रूढ असून मुलामुलीं-च्या संमतीचा प्रश्नच उपस्थित होत नसे. परंतु आतां इराणांत नहाई पंथाचा प्रसार झपाट्याने होत असून एकपत्नीव्रताचा अवलंब केला जातो. मुली-च्या संमतीवाचून तिचा विवाह होणे आतां अशक्य झालें आहे. काडीमोड विशेष कारणावाचून करू दिली जात नाहीं. अखिल पर्शिया ( इराण ) इस्लामधर्मी आहे. इस्लाम धर्माची शिकवणूक पाहिली तर स्त्री व पुरुष हे दोनहि घटक समान हक्क उपभोगणारे आहेत. या धर्माप्रमाणें स्त्रियांवर पुरुष कोणतीच गोष्ट जुलमाने लादूं शकत नाही. स्त्रिया त्यांच्या स्वतंत्र वैयक्तिक नांवावरून ओळखल्या जातात. विवाहप्रसंगीं आपल्या हक्कांची पायमल्ली न होता ते मानले जावेत या हेतूने वधू कोणत्याहि अटी घालूं शकते; आणि या अटी पाळल्या न गेल्या तर तिला कायदेशीर काडीमोड मागतां येते !

आपल्या धर्माने आपल्याला संपूर्ण स्वातंत्र्य दिलें आहे ही भावना स्त्रीच्या हृदयांत जागृत असते. त्यामुळे सामाजिक जीवनांतील संपूर्ण स्वातंत्र्याचा उपभोग त्या घेतल्यावांचून राहत नाहीत. इकडे हिंदुस्थानांतील मुसलमान स्त्रिया पाहिल्या तर त्या घराबाहेर पडून जरा पडदा दूर सारून भोंवतालची सृष्टि डोळ्यांनी पाहतील तर शपथ. वास्तविक या पडदा-नशीन मुसलमान स्त्रियांचाहि धर्म 'इस्लाम'च. उत्तम वस्त्रालंकार जवळ असून त्यांचा उपयोग न करणाऱ्या भोळ्या स्त्रीप्रमाणें हिंदुस्थानांतील मुसलमानाची तऱ्हा आहे ! फार प्राचीन काळापासून बाजारहाट करण्या-करिता बाहेर पडण्याची पर्शियांतील स्त्रियांची वहिवाट आहे. रोज देवळांत होणाऱ्या कथाकीर्तनाला, अथवा एखाद्या भोजनसमारंभाला किंवा सार्वजनिक कार्याला त्या जातीने हजर राहतात. पुरुषांशीं अगदीं मोकळ्या मनाने संभाषण करून विचारविनि-मय करण्यास किंवा हास्यविनोद करण्यास त्यांना लाज वाटत नाही. थोडक्यांत म्हणजे या सामाजिक व्यवहारांत थेट पाश्चात्यांसारखी अनिर्बंध वागणूक त्यांची दिसते. स्त्री-पुरुष एकत्र जमा झाले असता स्त्रियांच्या सहवासामुळे अनीतिकारक शब्द उच्चारण्याची पुरुषांची छाती होत नाही. म्हणूनच तिकडे नाटकगृहांत अथवा इतर सार्व-जनिक समारंभांत नीट पोषाखांत आलेल्या स्त्रियांची केव्हांहि कुचेष्टा होत नाही. एकंदरींत स्त्रिया सुशिक्षित असून, पुष्कळ स्त्रिया उच्च शिक्षणाची आकांक्षा धरून फ्रान्सांत अथवा युरोपांतील दुसऱ्या कोणत्याहि देशांत जातात. परदेशांतून उच्चशिक्षण यशस्वी रीतीने संपादन करून आलेल्या बऱ्याच स्त्रियांनी स्वदेशीं येऊन स्त्री-शिक्षणाची सुधारणा करण्याचें श्रेय घेतलें आहे. खेडेगांवांतूनसुध्दा पडद्यांत पडलेल्या स्त्रिया सांपडणार नाहीत. तेथेहि स्त्री-पुरुषांच्या वागणुकींत मनमोकळेपणा दिसून येतो.

इतकी संघटनेची राहणी असूनसुद्धा नीतीचीं बंधनें मुळीच ढिलीं नाहीत ही प्रशंसनीय गोष्ट होय. विलायतेंतील स्वैराचार त्यांच्या समाजाचा केवढा अधःपात करीत आहे तें पाहिलें म्हणजे, पर्शियाने आपली नीतिमत्ता कमी होऊं दिली नाही याचें आश्चर्यच वाटतें.

### जपान

जपानी मुलींचीं लग्नें १३ ते २० वर्षांच्या दरम्यान केव्हा तरी त्यांचे पालक स्वतःच्या संमतीने उरकून टाकतात. किंवा पुष्कळ वेळां मुलामुलींच्या संमतीनेहि विवाह घडून येतात. या देशाची कुटुंबां-तील एक विचित्र चाल अशी आहे कीं, फक्त ज्येष्ठ चिरंजीव वडिलांच्या घरांत राहूं शकतो. बाकीच्या चिरंजिवांना आपला गाशा गुंडाळून स्वतंत्र बिऱ्हाड करावें लागतें !

सहा वर्षांपर्यंत मुलामुलींना एकाच शाळेंत सक्तीचे प्राथमिक शिक्षण दिलें जातें. माध्यमिक शिक्षणक्रमांत मुलींना गृहकृत्याला उपयुक्त अशा गोष्टींचें शिक्षण मिळतें. स्त्रियांसाठी धंदेशिक्षण देणारीं कॉलेजें आहेत. परंतु पदव्या बहाल करणारें एकहि महाविद्यालय स्त्रियांसाठी नाही. जपानांत साक्षरतेचें मान ९५ टक्क्यांवर गेलें आहे. परंतु आश्चर्य हेंच कीं, इतक्या दिवस जपानी स्त्रियांना सभा भरविणें व राजकारणाचा विचार करणें ह्या गोष्टी कायद्याने मना केल्या होत्या ! दोन वर्षांपासून ही मोकळीक त्यांना मिळाली आहे. मात्र अजूनसुद्धा मतदानाचा हक्क स्त्रियांना नाही.

जपानांत सक्तीच्या प्राथमिक शिक्षणामुळे सुशिक्षित स्त्रियांचें प्रमाण शेंकडा ९९ टक्के असून-सुद्धा स्त्रियांना सामाजिक व राजकीय स्वातंत्र्य नाहीच म्हटलें तरी चालेल. जपानांत राजकीय सुधारणा घडून आली तरी स्त्रिया हक्कांच्या दृष्टीने यथापूर्वच राहिल्या आहेत. उदाहरणार्थ काडीमोड करण्याचा अधिकार फक्त पतीला असून तो मन मानेल तेव्हां काडी मोडून विवाहबंधनांतून मोकळा होऊं शकतो. परंतु हा काडीमोडीचा

हक्क स्त्रीला ठेविला नाही. कांही दिवसांपूर्वी न्यायकोर्टात असा अधिकार स्त्रीला पोहोचतो, असा निर्णय दिला गेला. परंतु कायदेमंडळाने अजून ही सुधारणा मान्य केलेली नाही. स्त्रियांना वकिलीचा धंदा करण्याची मनाई आहे. एवंच स्त्रियांचा दर्जा पुरुषापेक्षां कनिष्ठ मानला जातो हें निर्विवाद दिसतें.

# मुंबईचा दंगा व टाइम्सकार

सध्या मुंबई शहरांत भडकलेल्या दंग्याचें कारण काय असूं शकेल व तो कसा शमेल यासंबंधी निरनिराळ्या लोकांचे तर्क चालू आहेत. अशा वेळीं 'टाइम्स ऑफ इंडिया' या पत्रासारखीं अँग्लो-इंडियनी पत्रें काय बोलतात हें पाहणें विशेष बोधप्रद आहे. ता. ४ जुलै रोजीं मुंबईच्या टाइम्सने 'आमची त्रस्त नगरी' या मथळ्याखाली अग्रलेख लिहून त्यांत दंगा कसा शांत होईल व तो कां भडकतो याची चिकित्सा केली आहे. टाइम्स म्हणतो, "मुंबईत दंग्यास पुनः जोर चढला आहे. या वेळीं प्रत्येक नागरिकापुढे मुंबई नगरींत पुनः कधी शांतता स्थापन होईल का, व्यापार पुनः सुधारेल का व या दंग्याच्या बुडाशीं कोण असूं शकेल आणि तो अजूनहि कां थांबूं नये इत्यादि प्रश्न उभे राहतात. या प्रश्नांपैकीं पहिल्या प्रश्नाचें उत्तर देणें कठिण असलें तरी दुसऱ्या प्रश्नाचें म्हणजे दंगा शमूं शकेल का, या प्रश्नाचें उत्तर देणें फारसें कठिण नाहीं. कित्येकांच्या मतें दंग्याच्या चौकशींत फारसा वेळ घालवूं नये असें आहे. ते म्हणतात, चौकशीचें काम एकाच बाजूला राहून दोनही जमातींचे साक्षीदार एकमेकांचे वाभाडे मात्र काढतील व त्याचा परिणाम जातिवैमनस्य अधिक वाढण्यांत होईल. परंतु ही विचारसरणी सदोष आहे कारण शांतता-मंडळानें एक महिन्यापूर्वीच आपलें असें मत दिलें होतें कीं, दंग्याच्या बुडाशीं धनिक व बुद्धिमान लोकांचा हात असावा. त्याच वेळीं या गोष्टीचा तलास लावण्यासाठी सरकारने ताबडतोब बारकाईने चौकशी करण्यास सुरुवात करावी असेंहि त्या मंडळाने सुचविलें होतें. परंतु दुःखाची गोष्ट अशी कीं, सरकारने त्या सूचनेकडे दुर्लक्ष केलें. आज शहरांत अत्यंत क्षोभजनक अशीं जीं पत्रकें मधूनमधून वांटण्यांत येत आहेत त्यांमुळे शांततामंडळाच्या संशयाला बळकटीच येते. आता तर ही गोष्ट नुसत्या कागदावर राहिली नसून मुसलमान लोक मृतांच्या यात्रा ( का मिरवणुकी ? ) भर हिंदुवस्तींतून नेण्याचा हट्ट धरीत आहेत. अशी मवाली वृत्ति सर्वत्र धिंगाणा घालीत असता दंग्याचें मूळ हुडकण्यासाठी एखादें चौकशीमंडळ कां नेमण्यांत येऊं नये हेंच आम्हांस समजत नाही. आतापर्यंत अवलंबिलीं नसतील अशा भयंकर व कठोर साधनांचा सरकार जोंपर्यंत अवलंब करणार नाही तोंपर्यंत मुंबईत कधी काळीं शांतता नांदेल अशी आशा करणें वेडेपणाचें ठरेल. सरकारला सुव्यवस्था स्थापन करणें कठिण आहे असे समजणें शुद्ध मूर्खपणा होय. तशी सुव्यवस्था स्थापन करणें सरकारला सुतरां अशक्य नाही. शंभर वर्षांपूर्वी सर्व देशांत निवडुंगाप्रमाणे मूळ धरून असलेली ठगांची बंडाळी तेव्हाच्या साधनांनी ज्या सरकारला उखडून टाकतां आली त्याच सरकारला आधुनिक शस्त्रास्त्रांनी एखाद्या शहरांत सुव्यवस्था स्थापन करतां येत नाही हें म्हणणें कोणाला तरी खरें वाटेल काय ? अर्थात् ही गोष्ट घडून येण्यास सरकारजवळ परिस्थित्यनुकूल अशीं भरपूर शस्त्रें व त्यांचा उपयोग करण्याचा पूर्णाधिकार मात्र असला पाहिजे. या दृष्टीने विचार करता मुंबई शहरांत सध्या पोलीस अपुरे आहेत. म्हणून पोलीस कमिशनरला लागतील तितके जादा पोलीस आणण्यांत आले पाहिजेत व तेहि त्याला सुरक्षिततेचें चिन्ह दिसेपर्यंत ठेवण्याची मुभा असली पाहिजे. तसेच मुंबई शहरांतील व शहराच्या बाहेरील गुंडांना कडक शासन करण्याची अधिक सत्ता पोलीस कमिशनरला देण्यांत आली पाहिजे. सध्या अवलंबिण्यांत आलेली गुंडांच्या निर्वासनाची पद्धति म्हणजे केवळ चेष्टा होय. या सर्वांच्या आधी आमच्या मतें सरकारने पूर्वींच भरलेल्या खटल्यांचे निकाल दिरंगाई न करता ताबडतोब लावावेत व त्यांत गुंडांना व मवाल्यांना अशा कडक शिक्षा ठोठावण्यांत आल्या पाहिजेत कीं त्यांची जरब इतर गुन्हेगारांना बसेल. एकंदरींत कडक उपाययोजना करण्यांत आली तरच मुंबईचा दंगा शमेल असें दिसतें."

# दी बॉम्बे शेअर-होल्डर्स असोसिएशन व देशी गिरण्या

हिंदुस्थानांतील कापडाचा धंदा ऊर्जितावस्थेस येण्याच्या मार्गांत कोणत्या अडचणी आहेत व त्या अडचणींचा परिहार कसा करतां येईल या प्रश्नाची खोल चौकशी टॅरिफ बोर्डाकडून चालली असून या बोर्डाच्या चौकशीला बॉम्बे शेअरहोल्डर्स असोसिएशनने आपले सविस्तर विचार नुकतेच कळविले आहेत. त्यांचा सारांश खालीं दिला आहे.

परदेशी मालाच्या चढाओढीमुळे सांप्रत आपला कापडाचा धंदा जिवंत राखून त्याचे भवितव्य निश्चित करावयास त्यास संरक्षणाची आवश्यकता निर्विवाद आहे. डायरेक्टरांची निवड करणें अथवा खरेदी-विक्रीवर कमिशन देणें यासंबंधी टॅरिफ बोर्डाला बॉम्बे मिल-ओनर्स असोसिएशनने पुरवलेली माहिती अपूर्ण व चुकीची आहे. याकरिता अशी माहिती प्रत्यक्ष कारखाना चालविणारालाच विचारावी म्हणजे ती अचूक व संपूर्ण येण्याचा संभव अधिक आहे, असें या असोसिएशनचें मत आहे.

टॅरिफ बोर्डाच्या शिफारशींना नुसतीच पसंती-दर्शक मान डोलवून बॉम्बे मि. ओ. अ. ने खालील बऱ्याच गोष्टींत बोर्डाच्या शिफारशी अमलांत आणिल्या नाहीत—(१) दलालामार्फत कापसाची खरेदी करण्याचा प्रघात अद्याप बंद पडला नाही. (२) ऑडिटराकडून गिरणींतील तयार मालाची तपासणी होत नाही (३) कच्च्या मालाच्या पुरवठ्याबद्दल पोट-मंडळ निवडण्याचें अजून कांहींच ठरलें नाहीं. (४) एजंटापैकीं एकास तरी शास्त्रीय शिक्षण दिलें पाहिजे अशी शिफारस असता, अद्याप अशा शिक्षणाची व्यवस्था नाही. (५) एकाच एजंटामार्फत, एका कंपनीचें भांडवल दुसऱ्या कंपनींत गुंतविण्याची पद्धत बंद पडलेली नाही. (६) विक्रीच्या व्यवस्थेंतील दोष अद्याप दूर झाले नाहीत. (७) मॅनेजिंग एजंटांना ब्रोकर्सचा धंदा करण्याची सवलत नसावी अशी सूचना होती तिचाहि विचार केलेला नाही.

या असोसिएशनची मुख्य तक्रार अशी आहे कीं आज मॅनेजिंग एजंटांच्या हातांत इतकी अमर्याद सत्ता आहे कीं जवळजवळ तेच मालक झाले असून बोर्डाचा त्यांच्यावरील ताबा म्हणजे नाममात्र उरला आहे! यासंबंधी अशी सूचना आहे कीं, मालाच्या निर्मितीवर व विक्रीवर देण्यांत येणारें कमिशन बंद करून व उतरलेल्या किंमतीचा विचार करून जो प्रत्यक्ष नफा म्हणून उरेल त्यावर या कमिशनाची आकारणी करावी. कारखाना बंद पडल्यास एजंटांना नुकसानभरपाई मागण्याचा अधिकार आहे त्याबद्दलसुद्धा या असोसिएशनने नापसंती व्यक्त केली आहे. प्रत्यक्ष कमिशन उकळून शिवाय अन्य वाममार्गाने, फायदा मिळविण्याची एजंटाची पद्धत उघड सिद्ध झाली असून तिच्याकडेहि या संस्थेने बोर्डाचें लक्ष वेधलें आहे.

कंपनीला रुपयांच्या कर्जाचें पौंडांत रूपांतर करावयास लावून, या मॅनेजिंग एजंटांनी, एक्स्चेंजच्या भावांतील फरकाने कंपनीला विनाकारण ८५ लक्षांच्या गोत्यांत आणल्याचीं उदाहरणें संस्थेने बोर्डाला दाखवून दिलीं आहेत. त्याचप्रमाणे कापडाच्या व्यापाऱ्यांपासून, खासगी स्वतःच्या नांवावर डिपॉझिट घेणाऱ्या मॅ. एजंटांचीं उदाहरणें सादर केलीं आहेत.

कापसाची खरेदी करतांना असें आढळून आलें आहे कीं, हे मॅनेजिंग एजंट सट्टेबाजी करून प्रसंगीं कंपनीला कल्पनातीत खोट आणतात! आणि ही खरेदी डायरेक्टरांच्या संमतीनेहि होत नाही. या दोनहि गोष्टी संस्थेन स्पष्टपणें उजेडांत आणल्या आहेत.

मॅ. एजंटासच सेलिंग एजंट नेमण्याची वहिवाट विघातक आहे. कारण सेलिंग एजंट म्हणून काम करणाऱ्या या मॅनेजिंग एजंटांनी कंपनीचा पैसा परस्पर खासगी उचापतीला उपयोगांत आणल्याचा भरपूर पुरावा आहे.

शिवाय सेलिंग एजंटाच्या रकमा मॅ. एजंटाकडे पडून राहिल्यामुळे हे सेलिंग एजंट कंपनीशीं होणारा हिशेब चुकता करूं शकत नाहीत व याचा दुष्परिणाम म्हणजे कंपनीचें येणें वसूल होत नाही!

ह्याकरिता बोर्डाने निरानिराळ्या गिरण्यांची विक्रीची पद्धत कशी आहे याची चौकशी करावी अशी या संस्थेने सूचना केली आहे. हे मॅनेजिंग एजंट अधिक जमा होणारें कमिशन रिफंडहि करण्याची काळजी करीत नाहीत.

मिल एजंट म्हणून काम करणाऱ्या मिल सुपरिंटेंडेंटच्या पगाराचा भार कंपनीने सोसूं नये व खर्चांत काटकसर व्हावी याकरिता व एकंदर काम अधिक कसोशीने व्हावें याकरिता फोर्टमध्ये असणाऱ्या कचेऱ्या गिरण्यांच्या आवारांतच न्याव्या अशी असोसिएशनने आपली इच्छा दर्शविली आहे. त्याचप्रमाणे स्टॉकच्या किंमतीसंबंधी व गिरणीच्या हिशेबतपासणीसंबंधीं असोसिएशनने अनेक सूचना केल्या आहेत. डायरेक्टर्स हे भागीदारांच्या सत्तेखाली असतात असा जो सर्वसाधारण समज आहे तो चुकीचा असून असोसिएशनच्या नियमामुळे भागीदारांच्या तशाच हक्कांना काट बसली आहे असें या असोसिएशनने स्पष्ट सिद्ध केलें आहे.

# नेमस्त पस्तावले आणि मवाळ खवळले !

विलायतेंतील कॉन्झर्व्हेटिव्हप्रमुख राष्ट्रीय प्रधानमंडळ अनेक रीतींनी विजयी झालें व होत आहे. त्याचा फायदा ब्रिटिश जनतेला किंवा युरोप खंडांतील राष्ट्रांना काय मिळावयाचा तो मिळो किंवा न मिळो; पण हिंदुस्थानाला मात्र हा विजय म्हणजे एक मोठी आपात्तिच आली आहे. या प्रधानमंडळाने खुला व्यापार झुगारून देऊन परदेशी मालावर जबर जकाती बसविल्या, त्यामुळे ब्रिटिश लिबरल पक्षाला आपली तत्त्वहानि झाली असें वाटेल, पण विलायतेंतील स्वदेशी धंद्यांना संरक्षण व उत्तेजन मिळेल. राष्ट्रीय कर्जरोख्यांच्या व्याजाचा दर पांचांवरून खाली उतरवून साडेतीन टक्क्यांवर आणतां आला, यामुळे रोखेवाल्यांचें नुकसान होईल, पण वार्षिक बजेटाची तोंडमिळवणी करण्याला फडणवीसमहाशयाला मदत होईल. लॉसेन येथे जर्मनीवरील कर्जफेडीचा बोजा कमी केल्याने इंग्लंडास फ्रान्सला थोडेसें नाखूष करावें लागेल, पण जर्मनीची कृतज्ञता लाभेल. पण या प्रधानमंडळाने गोलमेज परिषदेच्या आंखीव कार्यक्रमांत फेरबदल करण्याचा जो डाव टाकला आहे, त्याने इंग्लंडाला कसलाच लाभ होण्याची फारशी आशा नाही. कारण हिंदुस्थानांत निर्वाणीच्या प्रसंगीं ज्यांच्या तोंडाकडे थोडेंबहुत तरी आशेने पाहण्याची जागा सरकाराला असते त्यांचाहि राग प्रधानमंडळाच्या हल्लीच्या उपद्व्यापाने होणारा आहे. येथे प्रधानमंडळ याचा अर्थ त्यांतील वरचढ व शिरजोर कॉन्झरव्हेटिव्ह अरराव असाच घ्यावयाचा आहे. कारण मजूरवर्गीय मुख्य प्रधान रॅम्से मॅक्डोनाल्ड व लिबरल पक्षीय लॉर्ड रेडिंग यांनाच काय, पण कॉन्झर्व्हेटिव्ह पक्षाचे प्रधान मि. बाल्डविन व सभासद लॉर्ड आयर्विन यांनाहि हा उपद्व्याप कितपत आवडला असेल याची शंकाच आहे !

सर सॅम्युअल होअर यांनी असा उपद्व्याप केला कीं, भावी हिंदी राजकीय सुधारणांचें बिल कसें असावें हें गोलमेज परिषदेंतील चर्चेवर व निरनिराळ्या पक्षांच्या संमतीवर अवलंबून राहावें असा मूळचा संकेत असता, तो एकदम झुगारून देऊन, गोलमेज परिषदेला कुलूप ठोकलें, स्वयंनिर्णयाचे तत्त्वाला मूठमाती दिली, व बिल तयार करण्याचा अधिकार सर्वस्वीं सरकाराकडे घेतला. गोलमेज परिषद कडेला पोंचली असती तरी शेवटीं सुधारणांचें 'मर्तिक' व्हावयाचेंच. तथापि श्राद्धविधि, मूळ आरंभिल्याप्रमाणे, पिंडदान व तिलतर्पण होऊन यथाविधि समाप्त झाला असता म्हणजे सरकारच्या कोणा मित्रांना बोलण्याला फारशी जागा राहिली नसती. पण श्राद्ध अशा रीतीने सुरू असता, पिंडाला शिवावयाचे कावळे यजमानाच्या पोटांतच आधी कोकावूं लागले, म्हणून, मध्येच उपाध्यायाला चटावर श्राद्ध उरकून घेण्याचा हुकम सुटावा त्याप्रमाणे, प्रधानमंडळाने मूळचा विधि बदलला. यामुळे हिंदुस्थानातील लिबरल पक्षालाहि राग आला, श्रीनिवास शास्त्री, सप्रू व जयकर यांनी 'सल्लागार कमिटीं'तील आपल्या जागांचे राजीनामे दिले, व त्या पक्षांतील इतर पुढाऱ्यांनी सरकाराच्या या कृत्याचा उघड निषेध चालविला आहे. गेल्या शनिवारीं व रविवारीं मुंबईस गोलमेज परिषदेच्या प्रतिनिधींची सभा भरली. सदर सभेस जे प्रमुख पुढारी हजर होते त्यानी शास्त्री, सप्रू, जयकर याना अनुसरून सल्लागार कमिटीचे राजिनामे देऊन, भारतमंत्र्यांना असें कळविण्याचें ठरविलें कीं, "ब्रिटिश सरकारच्या पूर्वीच्या धोरणांत फरक करण्यांत आला आहे असें दिसून आल्यामुळे, यापुढे हिंदी राज्यघटना तयार करण्याच्या कामीं सरकाराला साहाय्य देणे आम्हांला अशक्य झालें आहे. या बदललेल्या धोरणाचा फेरविचार करण्यांत आल्याखेरीज सरकारशीं यापुढे सहकारिता करणें शक्य नाही." दुसऱ्या दिवशीं नॅशनल लिबरल फेडरेशनच्या कौन्सिलची बैठक मुंबईस भरली. तींतहि खालील ठराव सर्वानुमतें मान्य करण्यांत आलः—

(१) सरकारने जाहीर केलेलें नवें धोरण पूर्वीच्या धोरणापेक्षां निराळें आहे, व तें समान दर्जा व सहकार्य यांना फाटा देणारें आहे, याबद्दल या कौन्सिलची सभा सरकारचा निषेध करते, व नवीन राज्यघटनेच्या योजनेंत कोणीहि सरकारशीं सहकारिता करूं नये असा ठराव पास करते. (२) प्रांतिक स्वायत्तता व मध्यवर्ती जबाबदारी हीं एकदमच देण्यांत यावीं. (३) कॉंग्रेसचें कायदेभंगाचें धोरण कौन्सिलाला नापसंत आहे. त्याचप्रमाणे सामान्य कायदे सोडून ऑर्डिनन्सचा अधिकार सरकारने चालविला आहे त्याचा ही सभा निषेध करते. (४) गव्हर्नर-जनरल यांनी आपल्या सत्तेचा दुरुपयोग केला आहे, असें या कौन्सिलचें मत आहे.

हिंदुस्थानांतील लिबरल पक्षाने आपल्या रागाचें जें हें प्रदर्शन किंवा आविष्करण केलें त्यांत त्याचा अदमास असा आहे कीं, या रागाला भिऊन सरकार हल्लीच्या ठरावांत कांही फेरबदल करील. असला

कांही अदमास आधीं केल्याशिवाय लिबरल लोक सरकारावर रागावण्याच्या भानगडींत फारसे पडत नाहीत. आणि हा अदमास करतांना ते सरकारांच्या अंतरंगांतील कांही तज्ज्ञांना विश्वासांत घेऊन काय होईल याचा सुगावा काढतात व मग्न्व आपलें धोरण सावधपणें ठरवितात.यामुळे त्यांच्या क्रोधाविष्करणाचा उपयोग झाल्यासारखें कांही तरी जगाला दिसतें. या नेहमीच्या अनुभवावरून कांही दूरदेशी लोक आपल्या मनाशीं असा तर्क करूं लागले आहेत कीं, सल्लागार कमिटीच्या सभासदत्वाचा राजीनामा जयकर, सप्रू, जोशी या तिघा प्रमुख सभासदांनी दिल्यामुळे होअरसाहेब गोंधळांत पडतील, व गोलमेज परिषदेला तिचें पूर्वस्वरूप असें ना तसें लाभेल. तसें झालें तर ठीकच. पण गोलमेज परिषदेची मोडलेली घडी फिरून थेट पूर्वीसारखी बसेल असें स्वतः आम्हांला फारसें वाटत नाही.

कारण सप्रू व जयकर यांनी तरी एक गोष्ट आधीच अशी करून ठेवली आहे कीं,विधायक सूचना करण्याच्या दृष्टीने म्हणून त्यांनी आपण होऊनच असें सुचविलें आहे कीं सल्लागार कमिटीचें काम संपल्यावर व जॉइंट पार्लमेंटरी कमिटीचें काम सुरू होण्याचे आधी, गोलमेज परिषदेच्या सभासदांतून एक लहानशी कमिटी नेमावी, व तिने तोंपर्यंत झालेल्या गो. मे. परिषदेच्या कामाचा आढावा घ्यावा. याचा अर्थ द्वितीय गो. मे. परिषदेच्या सर्वच्या सर्व सभासदांना लंडनला न बोलावलें तरी त्यांना चालेल व नेमस्तांनीहि आता तेंच ठरविलें आहे.पण आमच्या मतें होअरसाहेबांनीहि अशी एक पळवाट आधीच काढून ठेवलेली आहे; कारण 'जरूर वाटल्यास कन्सल्टेटिव्ह (सल्लागार)कमिटीपेक्षां अधिक औपचारिक रीतीने सहविचार करूं' असें त्यांनी आपल्या भाषणांतच म्हटलें आहे. अर्थात् तीच गोष्ट अधिक स्पष्ट ठासून निश्चितपणें होअरसाहेबांनी आणखी एकदा सांगितली, (म्हणजे यांविषयी 'जरूर तर व कदाचित्' हे शब्द त्यांनी काढून टाकले,) तर सप्रू-जयकर किंवा नेमस्त काय म्हणणार ?

पण तसें केल्याने दुसऱ्या गोलमेज परिषदेचें मूळचें स्वरूप कायम राहील काय? या सूचनेमुळे "सगळ्याच्या सगळ्या द्वितीय गोलमेज परिषदेच्या सभासदांना न बोलावलें तरी चालेल" अशी एक गर्भित संमति संक्षिप्त गोलमेज परिषद मागणारांच्या अंगीं चिकटते; व तिचा अर्थ कांही लोक तरी असा करतील कीं कॉंग्रेस पक्षातर्फे कोणी न बोलावले न आले तरी त्यांना चालेल ! त्याऐवजीं जर ते मोघम म्हणते कीं, गोलमेज परिषद जशीच्या तशी पुनः भरविलीच पाहिजे, तर त्यांना हव्या त्या फेडरल कमिटीचा त्यांत समावेश झाला असता, व "गांधी येत नाहीत त्याला आम्हीं काय करावें" असें सरकारला म्हणतां आलें असतें !

पण हें झालें तरी सप्रू-जयकरांच्या व नेमस्त पक्षाच्या दृष्टीने झालें. आम्हांला तर असें वाटतें कीं, दुसऱ्या गोलमेज परिषदेला गांधी हजर राहिल्यामुळें त्यांच्याशिवाय तिसरी गोलमेज परिषद भरणें हें आधीच गौण, आणि मूळच्या सभासदांची संख्या सप्रू-जयकरांच्या गर्भित अशा संमतीने कमी होणें हें त्याहूनहि गौण ! आता कदाचित् कोणी असें म्हणेल कीं, "महात्मा गांधींमी झालें तरी भर गोलमेज परिषदेंत बसून इतर सर्व सभासदांच्या तोंडावर त्यांना म्हणावें काय कीं, 'हे सारे लोक उपटसुंभ आहेत. त्यांना प्रतिनिधित्व आहे कोठे? मीच काय तो एकटा एक कॉंग्रेसचा खरा प्रतिनिधि. आणि कॉंग्रेस हीच काय ती एकटी एक खरी हिन्दी जनतेची प्रतिनिधि. तेव्हा या इतर कोणाचें न ऐकतां मी काय सांगतों हेंच हिन्दी राष्ट्राचें अधिकृत मत असें माना.' गांधीजींनी जर सप्रू-जयकरादिकांची अशी भर तोंडावर अप्रतिष्ठा केली तर, त्यांनी तरी 'गांधी आले तरच गोलमेज परिषद भरवा, तरच आम्ही तिला येऊं' असें कसें म्हणावें ? त्यांनाहि कांही स्वाभिमान आहेच कीं नाही ? राष्ट्रीय सभेचें म्हणून अमूक एक म्हणणें ढोबळ रीतीने मांडण्यापलीकडे गांधींनी तरी परिषदेच्या विधायक विचारविनिमयाला देवघेव करून काय मदत केली ? मग त्यांनी तरी गांधी हजर राहण्याचा आग्रह कां धरावा ?"

या युक्तिवादाचें मर्म आमच्याहि लक्षांत येतें. पण आम्हांला फिरून असें वाटतें कीं, गोलमेज परिषदेच्या पद्धतीलाच जर हे लोक इतकें महत्त्व देतात,(आणि देतात हें ते योग्यच करतात ) तर त्यांनी दुसऱ्या गोलमेज परिषदेची संख्या कमी करून एक लहानशी कमिटी नेमण्याची सूचना करावयास नको होती. पहिल्या गोलमेज परिषदेंत म्हणजे गांधी नव्हते तेव्हा तरी असें काय मोठें काम झालें, कीं ते हजर राहिल्यास तें आणखी बिघडेल ? पहिल्या परिषदेला जाण्याच्या आधी ज्यांनी डोमीनियन स्टेटसचा प्रश्न परिषदेंत चर्चेला निघण्याचा आग्रह धरला होता त्यांनी तेथे त्या मुद्द्याला अर्धचंद्र मिळाल्यावरहि परिषदेंत पुढें काम केलेंच कीं नाही ! लष्करी सत्तेचा गळा डोमीनियन स्टेटसच्या गळ्यांत सरकारानें अडकविलेला, असें असता लष्करी सत्तेच्या प्रश्नाची चर्चा पहिल्या किंवा दुसऱ्या परिषदेंत कितीशी झाली ?

तात्पर्य, गोलमेज परिषदेविषयीं कांहीं लोकांचा आग्रह " आम्ही तुम्ही आपले एकत्र तरी बसूं या, मग तुम्हीं आमचें कांहींएक न ऐकलें तरी आम्हांला चालेल, " असें म्हणण्यासारखाच आहे. ठराव प्रत्यक्ष नसला तरी गोलमेज परिषद भरवून त्यांत सायमन कमिशनचा रिपोर्ट मंजूर केला तरी चालेल, असें म्हणण्यासारखें हें दिसतें. ' छोटी गोलमेज परिषदहि' न भरविली तर पुढें होतील त्या सुधारणा एकतर्फी, मग त्या कशा का असेनात, त्यांवर आम्ही बहिष्कार घालूं, असें त्यांनी म्हटल्याशिवाय त्यांच्या रागाला स्वारस्य किंवा निषेधाला संगति राहणार नाहीं. पण तें तसें म्हणण्याचा तूर्त संभव दिसत नाहीं.

कसेंहि असो. हल्लीचा हा राग–लोभाचा प्रकार सरकार व हिंदुस्थानांतील नेमस्तादि कांहीं पक्ष यांच्यांतलाच आहे; पण यांच्या रागानेंहि जरी कांही कार्य झालें तरी तें सर्वांना इष्टच आहे. मात्र लोक आपल्या ठिकाणीं आश्चर्य करीत राहणार कीं, कॉंग्रेसच्या चळवळींत पन्नास हजार लोक तुरुंगांत जातात त्या रागाची उष्णता ज्या सरकाराला जाणवत नाही, तसेंच हातावर शीर घेऊन आपल्या कार्याला प्रवृत्त होणाऱ्या शेंकडो क्रांतिकारक लोकांच्या संतापाची उष्णता ज्या सरकाराला जाणवत नाही, पण ज्याला नेमस्त लोकांच्या नुसत्या रुसण्याफुसण्याची उष्णता सहन न होऊन " घेउन ये पंखा वाळ्याचा जा जा जा झणी " असें ज्याला होऊन जातें, त्या सरकाराचें शरीर आहे तरी कशाचें ? किंवा नेमस्तांच्या रागांत तरी अशी काय जादू आहे कीं, सरकारानें लोच त्यांच्या समजुतीला धावून यावें ? आणि अशा रागाची उष्णता मोजण्याचा अलौकिक थर्मॉमीटर तरी कोणत्या मानसशास्त्र्यानें घडविला आहे ?

पण एकाच कारखान्यांत तीन निरनिराळ्या ठिकाणीं तीन निरनिराळ्या प्रमाणांत उष्णता राहते, व ती मोजण्याचे तीन निरनिराळे थर्मॉमीटर असतात असें आपण पाहतोंच. उदाहरणार्थ, कांचेचा कारखाना घेतला तर कांचेचा रस तयार करणाऱ्या भट्टीची उष्णता हजारों डिग्री असली, तर 'आनीलिंग चेंबर' मधील, म्हणजे कांचेचें भांडें तयार केल्यावर तें हळूहळू निवांवण्याकरिता ठेवण्याच्या भट्टींतील, उष्णता त्याहून शेंकडो डिग्रींनी कमी असते. आणि या दोनही भट्ट्यांसमोर अस्तन्या सारून उभा राहणारा कांचकारखानदार आपल्या कचेरींतील खुर्चीवर जाऊन बसला म्हणजे तेथली मात्र नव्वद-शंभर अंशाइतकीहि उष्णता त्याला सहन न होऊन तो पंखा सोडून वारा घेऊन हाशहुश करीत असतो. क्रांतिकारकांनी निर्माण केलेल्या चळवळीची उष्णता कांच वितळविण्याच्या भट्टींतल्या उष्णतेसारखी आहे. कॉंग्रेसच्या चळवळीने निर्माण केलेली उष्णता 'आनीलिंग चेंबर' मधील उष्णतेसारखी आहे. आणि नेमस्तादि सहकारी लोकांच्या रागानें निर्माण केलेल्या चळवळीची उष्णता कचेरींतील खुर्चीवर बसून लागते तशी आहे असें म्हटल्यास शोभण्यासारखें आहे. तथापि खुर्चीवर बसल्यावरच कारखानदार पंख्याचा उपयोग करतो याचा अर्थ काय करावयाचा हें ज्यानें त्यानें मनांत समजण्यासारखें आहे.

असो. जातिविषयक प्रश्नावर अखेर निर्णय देण्याची जबाबदारी सरकारानें आपणावर घेतली आहे, त्याप्रमाणे तो निर्णय लवकरच बाहेर पडेल. आणि त्या वेळीं या राजकारणाच्या कारखान्यांत आणखी एक निराळ्या प्रमाणांत भासणारी उष्णता अनुभवाला यावयाची आहे. त्याहि वेळीं सरकाररूपी कारखानदार कशा प्रकारचें वर्तन करतो हें दिसून येईलच. त्यावरून सरकारच्या मनःशरीराची ओळख आणखी एका रीतीनें पटेल. तूर्त नेमस्त पक्षानें त्याच्या आवाक्यांत होती ती गोष्ट तरी केली याबद्दल व यापुरतें त्याचें अभिनंदनच केलें पाहिजे.

# अखिल भारतीय अस्पृश्य परिषद

या परिषदेचें दहावें अधिवेशन जुलईस ता. १० रोजीं मद्रासचे रा. ब. राजा यांच्या अध्यक्षतेखालीं भरलें. सदर परिषदेंत पुढील ठराव पास झाले.

परिषदेनें सुमारें पंधरा ठराव केले. ह्या ठरावांत परिषदेचे स्वागताध्यक्ष व अध्यक्ष यांच्या भाषणांतील सूचना समाविष्ट करण्यांत आल्या आहेत. ठरावांवर निरनिराळ्या प्रांतांतून आलेल्या अस्पृश्य प्रतिनिधींचीं भाषणें झालीं. विशेषतः राजा–मुंजे कराराला पाठिंबा देण्याच्या ठरावावर तर सर्व प्रांतांतील व अस्पृश्यांमधील निरनिराळ्या जातींतील पुढाऱ्यांचीं भाषणें झालीं. परिषदेंत पुढील ठराव पास झाले. ( १ ) बादशहांबद्दल राजनिष्ठा ( २ ) राखीव जागांसह संयुक्त मतदारसंघाला व हें तत्त्व समाविष्ट केलेल्या राजा–मुंजे कराराला पाठिंबा. ( ३ ) फेडरल व प्रान्तिक मंत्रिमंडळांत अस्पृश्यांचा प्रतिनिधि असावा अशी योजना राज्यघटनाविषयक कायद्यांत करणें शक्य नसलें तरी या गोष्टीच्या इष्टतेबद्दल ब्रिटिश मंत्रिमंडळानें गव्हर्नरजनरल

व प्रांतांचे गव्हर्नर यांना " इन्स्ट्रुमेंट ऑफ इन्स्ट्रक्शन " मध्ये सूचना कराव्या (४) डॉ. आंबेडकर यांनी लंडनमध्ये इतर अल्पसंख्याकांबरोबर ( शौकतअलीप्रभृतींबरोबर ) केलेल्या अनधिकृत व सर्वथैव अस्पृश्यवर्गहितविघातक " मायनॉरिटी पॅक्टचा " ( अल्पसंख्याकांच्या कराराचा ) निषेध ( ५ ) अस्पृश्य वर्गांतील कांही लोकांनी चालविलेल्या ज्ञातिहितविघातक चळवळीचा निषेध व अस्पृश्यांमधील विविध पक्ष एक होऊन काम करतील अशी आशा. ( ६ ) अस्पृश्यांपैकीं वीस ते एकवीस वर्षांवरील वयाच्या लोकांकरितां मताधिकाराची मागणी. ( ७ ) अस्पृश्यांची बरोबर शिरगणती करण्याबद्दल मागणी व सरकार तशी व्यवस्था लवकर करील अशी आशा. ( ८ ) नवी राज्यघटना तयार करतांना अस्पृश्यांना त्यांच्या संख्येच्या प्रमाणांत सर्व प्रकारचे हक्क मिळतील अशी व्यवस्था करण्याबद्दल मागणी. ( ९ ) अल्पसंख्याकांच्या प्रश्नाचा ब्रिटिश मुख्य प्रधानांनीं निकाल सांगण्याच्या वेळीं अस्पृश्यांचा अधिकृत प्रतिनिधि लंडनला पाठविण्याची आवश्यकता व त्या कामाकरिता रा. ब. राजा यांची निवड. (१०) उच्चवर्णीयांनी आजपर्यंत अस्पृश्यांना केलेल्या साहाय्याबद्दल त्यांचे आभार व केवळ अस्पृश्यता नष्ट केल्यानेच दलित वर्गाच्या उन्नतीचा प्रश्न सुटत नसल्यामुळे उच्च-वर्णीयांनी अस्पृश्यांच्या मुलांच्या उच्च शिक्षणाकरिता द्रव्यसाहाय्य करावें अशी विनंति. (११) मुंबईतील उच्चवर्णीय हिंदूंनी अस्पृश्यांच्या देवालयप्रवेशाला दिलेल्या मान्यतेबद्दल त्यांचे आभार व इतर ठिकाणच्या उच्चवर्णीय हिंदूंनी मुंबईतील आपल्या बांधवांचें उदाहरण गिरवावें अशी विनंति. (१२ ) रा. ब. राजा यांनी अस्पृश्य बांधवांच्या उन्नतीकरिता चालविलेल्या प्रयत्नाबद्दल कृतज्ञता व त्यांच्या प्रयत्नांना पाठिंबा.

# अश्लील वाङ्मयाचा वाद

[पुणें येथे यंदा झालेल्या वसंतव्याख्यानमालेंत प्रो. आळतेकर यांनी हा विषय व्याख्यानाकरिता घेतला होता. त्यावर बरीच चर्चा व उत्तरप्रत्युत्तरें झालीं. त्याची हकीकत केसरींत देतांना रा. केळकर यांचे भाषणाचा सारांश दिलेला नव्हता. हल्ली तोच स्वतंत्र रीतीने आणि म्हणून जरा विस्तृत असा मुद्दाम दिला आहे. —सं. केसरी. ]

पुणें येथे, पांच वर्षांपूर्वी भरलेल्या मराठी साहित्य-संमेलनप्रसंगीं, नागपूरचे कवि रा. रा. उपाध्ये यांनी कवींची थट्टा करणारी एक विनोदी कविता वाचून दाखविली. त्यांत उठल्यासुटल्या मासिकांतून प्रसिद्धीस येणाऱ्या कवींची प्रतिभा 'मासिक स्राव' करते अशी उपमा दिलेली होती. ती पुष्कळ लोकांना अश्लील वाटली, व त्या निमित्ताने अश्लीलतेची चर्चा त्या संमेलनांत बरीच जोराची झाली. त्यानंतर कै.प्रो. शिवरामपंत परांजपे यांनी रत्नाकरांतील एका बंगाली 'प्रणयिनीचा मनोभंग 'च्या चित्राचा अर्थ समजावून सांगण्याकरिता लेख लिहिला.त्यांत शृंगारिक भाषेची व अश्लीलतेची कमाल केली होती.त्याविषयीहि बराच गवगवा झाला. तसेच 'ओलेती ' या चित्रासंबंधानेहि सडकून टीका झाली. तो लेख नव्हता,तें चित्र होतें. तथापि अश्लीलतेच्या दृष्टीने शब्दचित्रकार, रेखाचित्रकार, रंगचित्रकार हे सर्व एकच असें मानून टीकाकारांनी अश्लीलतेच्या दोषाची चर्चा केली. तोच विषय पुनः गेल्या वसंत-व्याख्यानमालेंत प्रो. माधवराव आळतेकर यांनी व्याख्यानाकरिता घेतला. त्याहि वेळीं त्या विषयावर पुरे दोन दिवस चर्चा झाली, व या चर्चेला जितके श्रोते लाभले तितके मालेंतील इतर कोणत्याहि व्याख्यानाला कदाचित् लाभले नसतील. तात्पर्य,आधुनिक वाङ्मयांतील व चित्रांतील अश्लीलता हा विषय बराच वादग्रस्त होऊन बसलेला आहे. म्हणून त्या विषयावरील विचार स्थूलपणें व थोडक्यांत खाली देण्यांत येत आहेत.

### अश्लीलता या शब्दाची व्याख्या

'अश्लीलता' या शब्दाची व्याख्या करतां आली नाही, किंवा त्याचा मूळ शब्दार्थ बसवितां आला नाही, तरी फारशी अडचण नाही. कारण आता अश्लील हा शब्दच पूर्णपणें रूढ झालेला आहे; व तो उच्चारला असता कोणता अर्थ घ्यावयाचा हें कोणालाहि न सांगता समजतें. अडचण काय ती उदाहरणें देऊन, किंवा एरवी, अश्लीलतेची मर्यादा ठरविण्यासंबंधाने असते. अमुक शब्द अश्लील कां मानावा किंवा कां मानूं नये हें ठरविण्याला कांही गमकें आहेत; व कोणत्याहि उदाहरणांत त्यांतील कोणतीं गमकें लागू पडतात, कोणतीं पडत नाहीत हें ठरवितांनाच जो काय मतभेद होतो तो होतो. अश्लील हा शब्द संस्कृत असल्याबद्दल वाद नाही. याची शब्दसिद्धि करतांना कित्येकांनी ती 'अश्रीर' असा मूळ सामासिक शब्द घेऊन केली आहे. श्री म्हणजे शोभा ती ज्यांत नाही ते अश्रीर. 'र' हा एक प्रकारचा शब्दसाधक व्याकरण-प्रत्यय समजावा. आणि रचा अपभ्रंश ल हा होतो. मिळून अश्लील, म्हणजे अश्रीर, म्हणजे ज्यांत कांही शोभादायक उज्ज्वल म्हणजे अर्थात् काव्य-

श्रीयुक्त अर्थ किंवा अभिप्राय नाही असा शब्दसमूह. पण हा अर्थ थोडा अतिव्याप्त असा होतो. कारण तो शब्दशः घेतला तर कोणताहि 'नीरस' शब्द-प्रबंध हा अश्लील या शब्दाखाली येईल. पण अश्लील म्हणजे निर्गुण असा अर्थ अभिप्रेत नसून गुणसंपन्न असला तरीहि कांही विशिष्ट कारणांमुळे अपवादास्पद असा त्याचा अर्थ अभिप्रेत आहे. आणि सामान्यतः ही अपवादास्पदता शब्दांतून विशेष प्रकारची शृंगार-विषयक भावना प्रगट किंवा सूचित केल्याने येते, असा सर्वसामान्य नियम घेऊन चालण्यास हरकत नाही.

### अश्लीलत्व हा काव्यदोष आहे

अश्लीलत्व हा एक काव्यदोष होय. हल्ली त्याची जी चर्चा होते ती मात्र काव्यदोष या अर्थाने म्हणजे साहित्यशास्त्रांतील एक कूट प्रश्न, या अर्थाने होत नाही; तर सामाजिक वाङ्मयांतील एक दोष व विषादकारण या अर्थाने ती चर्चा होत असते. तथापि ऐतिहासिक दृष्टीने पाहता अश्लीलतेचा हा दोष केवळ आधुनिक काळांतच व उच्छृंखल लेखकांनीच निर्माण केलेला आहे असें नाही. त्याची परंपरा खुद्द काव्याच्या परंपरेइतकी जुनी आहे. आणि त्याबरोबरच असेंहि म्हणतां येईल कीं, बहुधा असा एकहि अभिजात म्हणजे 'क्लासिकल' कवि दाखवितां येणार नाही कीं, ज्याच्या काव्यांत अश्लीलतेची कांही तरी उदाहरणें सांपडणार नाहीत. असें असल्यामुळे अश्लीलतेची सोपपत्तिक व सोदाहरण अशी चर्चा संस्कृत साहित्य-शास्त्राच्या ग्रंथांतूनहि केलेली आढळते. वर जी अश्ली-लतेची शब्द सिद्धी किंवा व्याख्या सांगितली ती वामन या साहित्य ग्रंथकाराने स्वीकारलेली आहे. अश्रीर हा शब्द संस्कृत आहे, इतकेंच नव्हे तर तो वैदिकहि आहे. काव्यप्रदीपकार गोविंद याने अश्लील याची व्युत्पत्ति अश्रीर अशीच स्वीकारली आहे. पाणिनीच्या नियमाप्रमाणे र ल हा प्रत्यय येथे लागतो कीं नाही असा प्रश्न कदाचित् उत्पन्न होऊं शकेल. पण त्यांत आपणाला शिरण्याचें कारण नाही. केशवमिश्र याने अश्लील या वा अर्थ उज्ज्वलते-चा अभाव असणारा असा दिला आहे. तो अश्रीर या शब्दसिद्धीलाच धरून आहे असें दिसतें. कसेंहि असो, वामन याने अश्लील याची व्याख्या खालीलप्रमाणे दिली आहे—

"असभ्य-अर्थान्तरम् असभ्य, स्मृतिहेतुः च अश्लीलम्"

अश्लील म्हणजे असभ्य. मग अर्थांतरामुळे असभ्य गोष्टींची आठवण सहज होवो किंवा असभ्य गोष्टींची आठवण मुद्दाम करून देण्याचा लेखकाचा हेतुच असो. असभ्य शब्द म्हणजे सभेत न उच्चारण्यासारखे, उच्चारूं नयेत, असे. आता सभा म्हणजे कोणती हा प्रश्न सहजच उत्पन्न होतो. पण सभा याचा अर्थ आपण सामान्यपणे समजतों तसा घेऊन चालावयाचें नाही. त्याला जवळचा शब्द इंग्रजींत फार चांगला आहे. तो 'प्रेझेंट कंपनी' हा होय. म्हणजे "शब्दप्रयोग होत असता जी मंडळी तो ऐकण्याला हजर असतील ती" हा अर्थच सभ्य या शब्दांत गर्भित आहे. म्हणून या सभेचे प्रकार पांचपंचवीस होतील. उदाहरणार्थ (१) वाचक हा आपला आपणच मनाशीं वाचीत असेल; (२) वाचक एकट्या–दुकट्या कोणाला वाचून दाखवीत असेल; (३) समवयस्क मुलें, प्रौढ-वृद्ध, स्त्री-पुरुष सुसंस्कृत असंस्कृत तरुण, यांच्या निरनिराळ्या जोड्या; (४) गुरु व शिष्य यांज-मधील शिक्षणाचा प्रसंग; (५) कोर्ट–कचेरीचा प्रसंग; (६) वाङ्मयविषयक किंवा शास्त्रीय चर्चेचा प्रसंग इ. या प्रत्येक प्रसंगीं एकत्र असणारी मंडळी ही 'सभा'च मानली पाहिजे. त्या प्रत्येक प्रसंगाची औचित्यमर्यादा वेग-वेगळी असणार. यामुळे सभ्य कोणतें, असभ्य कोणतें, अर्थात् कोणतें अश्लील व कोणतें अश्लील नव्हे, हें त्या त्या परिस्थितीप्रमाणे तारतम्याने ठरवावयाचें असतें. अश्लील शब्दप्रयोग हा तरी एक इतर रीतीने सदोष खरा; तथापि तो मनुष्याच्या तोंडात कां येतो, याचा विचार केला तर असे दिसून येईल कीं त्यांत स्पष्टोक्ति किंवा अर्थाची समर्पकता हा तरी एक गुण असतो. म्हणून बोलणारा तो शब्दप्रयोग करण्याच्या मोहांत सांपडतो. स्वतः बोलणाराला, लिहिणारालाहि, अश्लील म्हणजे काय हें कळत नाही असें नाही. आणि अश्लील बोलावयाचेंच म्हणून, किंवा त्यातच गोडी वाटते म्हणून, बोलणारा लिहिणारा निराळा. ज्यांच्या तोंडीं ग्राम्य व अश्लील शब्द स्वभावतःच बसलेले असतात, त्यांना ते शब्द उच्चरताना त्यातील वाईट अर्थाचें भानच असत नाही. आणि ज्यांच्या तोंडीं असले शब्द स्वाभाविकपणें येत नाहीत, म्हणजे जे तसले शब्द जाणूनबुजून वापरतात, त्यांचा हेतु, वर सांगितल्याप्रमाणे, आपल्या बोलण्या-लिहिण्याला स्पष्टोक्ति, ठसकेदारपणा, समर्पकता मार्मिकता इत्यादि प्राप्त व्हावी असाच प्रायः असतो. तथापि त्या हेतूमुळे तसल्या शब्दांचा उपयोग करण्याचा दोष टळतो असें मात्र नाही.

### गालबोट लावण्याची चाल

जें वाईट, तें जातिस्वभाव म्हणून केलें किंवा मुद्दाम होऊन केलें, तरी तें वाईटच. प्रस्तुत वाङ्मयापुरतें बोलावयाचें तरी त्यांतहि अश्लील शब्दप्रयोग स्वाभाविक किंवा बुद्धिपुरस्सर असेच येतात, आणि तें वाङ्मय म्हणूनच त्यांत आलेल्या अश्लील शब्दप्रयोगाचा अधिक गवगवा होतो हें उघड आहे. वाङ्मय निर्माण करणाऱ्या मोठमोठ्या लेखकांनाहि हा दोष जर पूर्णपणें टाळतां येत नाही,

तर लहानसान लुंग्यासुंग्या किंवा असल्या शब्दप्रयोगामुळे मिळणाऱ्या चटकदारपणावर ज्यांची द्रव्यप्राप्ति अवलंबून असते अशा लेखकांच्या हातून तो दोष सर्रास घडत असेल तर त्यांत काय नवल ? असल्या लेखकांच्या वाङ्मयांत इतर गुण म्हणण्यासारखा नसेल तर अश्लीलत्व ही दोषांच्या भरींत भरच होते. पण इतर गुणांनी संपन्न असलेल्या वाङ्मयांतहि तो दोषच म्हणावा लागतो. त्या गुणांना हें गालबोट म्हटलें तरी त्याचा काळेपणा नाहींसा होत नाही. गालबोट लावण्याच्या चालींत देखील काजळाला काळेंच मानतात, व दृष्ट लागूं नये म्हणून तें मुद्दाम लावतात. कोणतीहि वाईट गोष्ट अपरिहार्य असली म्हणजे तिला समर्थनाच्या समाधानाकरिता अळेंबळेंच चांगलेपणा देण्याची रीत असते. उदाहरणार्थ, चंद्रावरचा कलंक पुसून काढता येणें शक्य असेल तर तो कोण काढून टाकणार नाहीं ? पण निघत नाहीं म्हणून, ‘ Making a virtue of necessity ’ या इंग्रजी म्हणीप्रमाणे, त्याची कशी तरी संपादणी करतात. एरवी सर्वच्या सर्व चंद्र, निरपवाद रीतीने शुभ्र तेजोमय असा दिसला तर तो कोणाला नको ? कालिदासानेंहि याविषयी लिहितांना ‘एको हि दोषो गुणसंनिपाते निमज्जति इंदोः किरणेषु इव अंकः।” म्हणजे चंद्रावरील ‘काळा डाग’ त्याच्या किरणांत ‘झाकून जातो’ असेंच म्हटलें आहे. तो त्याची शोभा वाढवितो असें म्हटलें नाही. आणि गालबोट याचाहि अर्थ तसाच आहे. म्हणून मोठमोठ्या ग्रंथकारांकडून व कवींकडून अश्लीलत्वाचा दोष घडला तर तो घडलाच नाही असें म्हणणें बरोबर नाही. फार तर त्याची कमजास्त संपादणी करावी.

### कालिदासाची प्रवृत्ति

स्वतः कालिदासाने असे किती तरी दोष केलेले आहेत. त्याची प्रवृत्तिच शृंगारिक लिहिण्याकडे होती. यामुळे त्याने ते दोष टाळण्याचा प्रयत्नच केला नाही. तीच गोष्ट शेक्सपिअरची. याविषयी उदाहरणें देणें म्हणजे लिहिणारानें स्वतःच अश्लीलत्वाचा दोष जाणूनबुजून करणें असा अर्थ होतो. म्हणून त्या भानगडींत आम्ही पडत नाहीं. कालिदास व शेक्सपिअर वाचणारांना हे दोष कोठे कोठे कसे कसे घडले आहेत हें ठाऊकच आहे. कोणी या दोषांचें समर्थन असें करूं पाहतात कीं, अश्लील शब्दप्रयोगाने मुख्यार्थाची हानि न झाली तर त्याला दोष म्हणतां येत नाही. पण हा युक्तिवाद बरोबर नाही. कारण मुख्यार्थ हाच अश्लील असेल तर मुख्यार्थाची हानि होत नाही म्हणून अश्लील नव्हे हें समर्थन योग्य ठरत नाही.

कवि मोरोपंत यांच्याहि हातून असले दोष पुष्कळ घडले. आणि आधुनिक मराठी कविता ही पुष्कळशी भावनाप्रधान, स्पष्टोक्तिप्रिय, व शृंगारप्रवण असल्यामुळे तींत अश्लीलत्वाचे दोष सांपडल्यास नवल नाही. पण मुद्दा हा कीं, ग्रंथकार लहान किंवा थोर हा भेद जसा यांत होऊं शकत नाही, तसाच प्राचीन अर्वाचीन हा भेदहि होऊं शकत नाही.

असो. पण ही चर्चा पुढें करण्यापूर्वी प्रथम अश्लीलत्व कोठें घडूंच शकत नाही, किंवा एकाच्या दृष्टीने तें घडलें नाही पण दुसऱ्याच्या दृष्टीने तें घडलें तरी तें क्षम्य अपवादात्मक कां मानतां येतें, कसें मानतां येतें याविषयी कांही उदाहरणें देऊन तो मुद्दा बाजूस काढला पाहिजे. (१) शब्दप्रयोग अश्लील असतील, पण ते इतके रूढ झाले असतील कीं त्यांच्या उच्चाराने कसल्याच प्रकारची वाईट ऊर्मि म्हणजे लाजलज्जेची छटा ऐकणाराच्या मनांत उठणार नाही. (२) विशिष्ट मातृभाषा असणाऱ्या समाजापुढे, एखादी इतर भाषा ही मातृभाषा असणारा मनुष्य बोलत असला तर या दुसऱ्याच्या तोंडून असे शब्द स्वतः त्याच्या भाषेंतले निघूं शकतील कीं ते या पहिल्याच्या कानाला अश्लील भासतील. पण येथे अश्लीलतेचा दोष उत्पन्न होणार नाही. म्हणजे तो बोलणाराने जाणूनबुजून केलेला नाही. किंवा तो देहस्वभावाने झाला असेंहि म्हणतां येत नाही. अशा प्रसंगीं ऐकणारा जर हसेल तर बोलणारापेक्षां स्वतः ऐकणाराच अश्लीलतेचा दोष आपल्या पदरीं बांधून घेईल. उ. गुजराथी व हिंदी भाषेंत असे कांही शब्द आहेत कीं ते मराठींत उच्चारले असतां अश्लील वाटतात. (३) शास्त्रीय प्रतिपादनांत अश्लील शब्द आले तरी तो दोष मानला येत नाही. उ. अशा शब्दप्रयोगाशिवाय वैद्यकशास्त्र शिकवितांच येणार नाही. (४) शब्दकोशकाराला भाषेंतला प्रत्येक शब्द कोशांत समाविष्ट करावा लागतो. तें त्याचें कर्तव्यच ठरतें. म्हणून ती अश्लीलता नाही. (५) साहित्यशास्त्रावरील ग्रंथांत अश्लीलत्व हा काव्य-दोष मानल्यामुळे तो कसा घडतो, हें ग्रंथकाराला उदाहरणें देऊन समजवावें लागतें. म्हणून तेथेहि तो दोष नाही. उदाहरणार्थ, मम्मटाने, क्षेमेंद्राने, विश्वनाथाने या काव्यदोषाचीं उदाहरणें हुडकून हुडकून मोठमोठ्या ग्रंथकारांच्या ग्रंथांतूनहि काढून दिलीं आहेत. (६) उपदेशाचा जोर चालू असता उपदेशक देहभान विसरून जाऊन बोलत असता त्या उन्मनस्थितींत त्याच्या हातून अश्लील शब्दप्रयोग होऊं शकेल. पण तेथे उपदेशाची पवित्रता व उपदेशकाची पवित्रता हीं इतकीं प्रबल असतात कीं ती अश्लीलत्वाच्या भावनेला

मारक होतात. मात्र बोलणाराची योग्यता जितकी मोठी असेल त्या मानानेच त्याला ही माफी मिळूं शकेल. सामान्य माणसाला ती मिळणार नाहीं. तुकारामाचे अभंग, कबिराचे दोहरे काही कांही फारच अश्लील आहेत. अर्थात् त्यांचा उपयोग सामान्य माणसापुढे करूं नये म्हणजे झालें. मग ते शब्द मूळ अभगांत किंवा दोहऱ्यांत राहिलेले मुद्दाम हुडकून काढून त्यांना कोण नांवें ठेवणार?

(७) अश्लीलत्वाला मारक अशी भावना उत्पन्न करणाऱ्या प्रतिभावनेचें किंवा गांभीर्याचें उदाहरण म्हणून केव्हा केव्हा न्यायकोर्टांतून होणाऱ्या अश्लील शब्दोच्चारांचें देतां येईल. समजा, एखाद्या स्त्रीवर बलात्कार झालेला आहे. त्यासंबंधी खटला कोर्टांत चालू असता त्या बिचाऱ्या स्त्रीला स्वतःच कोर्टांत येऊन साक्ष देण्याचा प्रसंग आहे. अशा ठिकाणीं रडत रडत का होईना पण न्यायकोर्टाचें कार्य सिद्धीस जाण्याकरिता तिला आपल्या तोंडाने अश्लील शिव्या किंवा कृत्यें यांचे वर्णन करावें लागेल. येथे न्यायकोर्टाचें गंभीर वातावरण व त्या स्त्रीविषयी दया अनुकंपा या भावना अश्लीलत्वाला मारक होतील. म्हणून तेथे अशा शब्दप्रयोगांचा दोष मानता येत नाही.

## अश्लीलत्वाचा दोष कोठे मानावा ?

इतकीं उदाहरणें दिलीं म्हणजे अश्लीलत्वाचा दोष कोठे मानावा कोठे मानूं नये याचे स्थूल तारतम्य सांगितलें असें होईल; व खरा वाद किंवा खरी चर्चा जी व्हावयाची ती वरील अपवादस्थळें सोडूनच करावयाची असते. या विषयासंबंधाने इंग्रजी किंवा युरोपियन वाङ्मयापेक्षां संस्कृत शास्त्रीय वाङ्मयांत पुष्कळच व्यापक व खोल चर्चा केलेली आढळून येते. या नाजूक चर्चेत आमच्या इकडील साहित्यशास्त्रकार इतर देशांतील शास्त्रकारांना हार जाणार नाहीत असें यथार्थ गर्वाने म्हणतां येईल. मम्मट वगैरे साहित्यशास्त्रकारांनी अश्लीलता तीन प्रकारची मानली आहे. ती (१) व्रीडा (२) जुगुप्सा व (३) अमंगलत्व या तिहींपैकीं व्रीडा हें गमक सर्वस्पर्शी आहे. जुगुप्सा व अमंगलत्व हीं गमकें कमी व्यापक आहेत. क्षेमेंद्र पंडिताने 'औचित्यविचारचर्चा' म्हणून एक ग्रंथ लिहिला आहे. त्यांत अनौचित्याचे चौसष्ट प्रकार वर्णिलेले आहेत. ते पाहिले म्हणजे, कित्येक वेळा मलखांबाचा खेळ करून दाखविणारा निष्णात मनुष्य आपलें कौशल्य दाखविण्याकरिता तरवारी व सुऱ्या बांधलेल्या उभ्या चौकटींतून उडी मारतो तिचीच आठवण होते. आणि असें म्हणावेंसें वाटतें कीं, या चौसष्ट दोषांपैकीं आपल्या हातून एकहि न घडतां जो काव्य व फिरून तें सरस काव्य निर्माण करील तो खरोखर भाग्यवानच असला पाहिजे. अनौचित्य व अश्लीलत्व हीं मोजण्याचा संस्कृत साहित्यशास्त्रकारांचा ताजवा किंवा काटा इतका सूक्ष्म व नाजूक आहे कीं त्याला केसाइतकेंहि अलीकडे पलीकडे खपत नाही. आणि तोच खरा धर्मकाटा! कारण केसाच्या फरकाने धर्माचा अधर्म होऊं शकेल. अर्थात् हें तात्त्विक चर्चेचें अंतिम स्वरूप होय. इतकी मोठी कसोटी काव्यव्यवहारांत किंवा भाषाव्यवहारांत लागूच शकत नाही, व तशी ती कोणी लावीतहि नाही. पण असें उंची ध्येयवादित्व ठेवणें हें संस्कृतीला मोठें भूषण होय असें तरी खास म्हणतां येईल.

## संस्कृत नाट्यशास्त्र

सभ्य या शब्दाचा अर्थ वर सांगितलाच आहे. पण विशेष सांगावयाचें तें असें कीं त्या त्या अर्थाने सभा जितकी अधिक मोठी किंवा मिश्र, तितकी अश्लीलत्वाविरुद्ध खबरदारी घेण्याची जबाबदारी कोणावरहि अधिक पडते. मिश्र किंवा मोठ्या सभांतून पुष्कळ लोक ग्राम्य अभिरुचीचे व कांही लोक संस्कृत अभिरुचीचे असले, तर अशा ठिकाणीं राजकारणाप्रमाणे बहुमताने निर्णय करावयाचा नाही. कारण सभेचा नियम असा असतो कीं, सभेंत जास्तींत जास्ती संस्कृत अभिरुचीचा मनुष्य असेल त्याला उद्वेग विद्वेष न वाटेल असेंच कोणीहि बोललें पाहिजे. तें इतर पुष्कळांना चालतें ही सबब टिकत नाहीं. अपकृत्य किंवा फौजदारी गुन्ह्याचें कृत्य याविषयी निर्णय करावयाचा असता कोर्टाला प्रतिवादीचें कृत्य योग्य खबरदारीने व काळजीने ( With due care and caution ) केलें आहे कीं नाही हें पाहावें लागतें. संस्कृत नाट्यशास्त्रातहि असेंच सांगितलें आहे कीं नाटक कसें असावें? तर घरचीं लहानथोर सर्व पिढीचीं माणसें एकत्र बसून तें पाहत असता त्यांतील कोणालाहि लज्जा उत्पन्न होऊं नये. म्हणजे जितक्या निरनिराळ्या अधिक पिढ्यांचे लोक एकत्रित असतील त्या मानाने लज्जा उत्पन्न करणाऱ्या गोष्टी टाळाव्या असा त्यांचा अभिप्राय आहे. आणि जशा निरनिराळ्या पिढ्या तसेच एकत्रांत बसलेले निरनिराळ्या संस्कृतीचे लोक असें समजावें.

कोणी असें म्हणतात कीं, आता जुना प्रतिष्ठितपणा उरला नाही. तर डिमॉक्रसीचे म्हणजे लोकसमाजसत्तेचे दिवस आले आहेत. कोणचीहि गोष्ट पूर्वी जेथे एका दोघांकरिता होत असेल तेथे ती आतां शेंकडो लोकांकरिता होत आहे व झाली पाहिजे. पण या युक्तिवादाने अश्लीलतेचें समर्थन न होता उलट संकोचच होणार.

कारण वर सांगितल्याप्रमाणे लोकसमाजाचें राज्य झालें याचा अर्थ लोकसमाज पूर्वीहून अधिक मोठा व अधिक संमिश्र झाला असाच होतो. पूर्वी वाङ्मय ही गोष्ट फार थोड्या लोकांनी सेवन करण्याची होती. वाङ्मय हा पंडितगिरीचा मामला होता.म्हणजे तें थोड्यांनी थोड्याकारता लिहावें व थोड्यांनी वाचावें असा प्रकार होता. आता ती स्थिति पालटली आहे. जुनीं संस्कृत नाटकें व काव्यें तरुण विद्यार्थ्यांनी भरलेल्या वर्गांतून प्रोफेसर किंवा शास्त्री यांना शिकवावयाचीं असता कशी अडचण उत्पन्न होते याचा अनुभव शाळा व कॉलेजे यांतील विद्यार्थ्यांना व शिक्षकांना हल्ली येतोच. तसेच आता मुद्रणकला फैलावली असल्यामुळे नाटकें व कादंबऱ्या हजारांनी छापल्या जातात व त्या वाटेल त्या लोकांच्या हातीं पडतात. यामुळे लिहिणाराची जबाबदारी 'योग्य काळजी व खबरदारी' घेण्याची पूर्वीपेक्षां वाढलीच पाहिजे. लोकसत्तेचें पर्यवसान लोकांवर अधिकाधिक बंधनें घालण्यांतच झालेलें आपण राजकारणांत पाहत नाही काय ? त्याप्रमाणे साहित्यकारणांतहि लोकसत्तेचें पर्यवसान लोकांची संस्कृति व अभिरुचि संभाळली जाण्याविषयी अधिकाधिक बंधनें घालण्यांतच होणार हें उघड आहे.

## स्पष्टोक्ति व स्वैरोक्ति

लोकसत्तेंत स्पष्टोक्तीच्या हक्काचा अंतर्भाव होतो पण स्पष्टोक्ति म्हणजे स्वैर उक्ति असें नव्हे. गूढ विषयासंबंधानें मनांतील विचार स्पष्टपणें प्रगट करण्याची स्वतंत्रता असावी हें ठीक आहे.आणि अशा प्रकारचे गूढ सामाजिक विषय नव्या युगांत अधिकाधिक उत्पन्न होणार हेंहि खरें आहे. तथापि प्रश्न आहे तो हाच कीं, 'अश्लील' शब्दप्रयोग केल्याशिवाय गूढ विषयावरील स्पष्ट विचार प्रगट करतां येतात कीं नाही ? 'सामाजिक कादंबऱ्यांतून आम्हांला सामाजिक स्थितीचे कूट प्रश्न सोडवावयाचे असतात' असें कित्येकांकडून म्हणण्यांत येतें.पण हल्लींच्या स्थितींत अगदीं मोठ्यांत मोठे कूट प्रश्न घेतले तरी प्रौढविवाह, मिश्रविवाह,सहवासोत्तर विवाह,पुनर्विवाह, घटस्फोट,संतातीनियमन याहून अधिक कूट व कठीण असे प्रश्न कोणते असणार ? पण नाटकें किंवा कादंबऱ्या यांतून असल्या प्रश्नांचा परामर्ष घेण्याला अश्लील भाषा अपरिहार्य आहे असें म्हणवत नाही.उलट असेंहि म्हणतां येईल कीं, असल्या बिकट प्रश्नासंबंधी लोकमत आपल्या बाजूचें करावयाचें असेल तर भाषा सभ्य व गोड अशी लिहिण्यानेंच या कार्यांत यश येण्याला अधिक मदत होईल.

योग्य भाषेची खबरदारी न घेतली तर विरोधी लोकांना तीच एक सबब विरोधाला पुरते,व वड्याचें तेल वांग्यावर काढावें त्याप्रमाणें नुसत्या अश्लील भाषेकडे बोट दाखवूनच सुधारणेचे विरोधक म्हणूं लागतात कीं, 'हे पाहा तुमचे समाज सुधारक. असे बाष्कळ आहेत!' समाजसुधारणा करूं इच्छिणाराने सुधारणेचा प्रश्नच तेवढा वादग्रस्त अशा स्थितींत पुढे मांडावा. इतर कोणत्याहि रीतीने टीकाकारांना व विरोधकांना आपल्यावर हल्ला चढविण्याला त्याने जागा देऊं नये. इंग्रजींत याला (Isolation of the Phenomenon) 'आयसोलेशन ऑफ दी फिनॉमेनन' असें म्हणतात. सूक्ष्मदर्शक यंत्रांत एखादा पदार्थ पाहावयाचा तर त्यांतील अगदी लहानांतला लहान भाग त्या यंत्राखाली घालून पाहतात. बाकीचा भाग अदृश्य ठेवतात. त्याप्रमाणे नेमका वादग्रस्त असेल तेवढाच मुद्दा सामाजिक सुधारणेच्या वादांत लेखकाने पुढे मांडावा. फालतू वादग्रस्त किंवा अप्रिय गोष्टी विनाकारण पुढे आणून नसती टीका आपणावर ओढून घेऊं नये.

दिवसेंदिवस समाजाचा किंबहुना जगाचा कल आचारविचारांच्या स्वातंत्र्य कडे झुकत आहे ही गोष्ट खरी पण त्याविषयी स्पष्टोक्ति म्हणजे स्वैर उक्ति नव्हे. मतस्वातंत्र्याच्या गोष्टीहि बिनमुरवतखोरपणानेच मांडल्या पाहिजेत असें नाही. वाङ्मय या पदवीला पोंचूं इच्छिणारे सर्व कांही शक्य तितकें सुंदर व नाजूक असावें. त्यांत दिल खुला दिसावा, पण जिभेचा अत्याचार नसावा.अश्लीलतेवर आक्षेप घेणारे लोक स्वतःला लब्धप्रतिष्ठित समजतात असें नाही. अश्लीलता हें धर्मदृष्ट्या पाप नव्हे. अश्लील बोलेल तो नरकांत जाईल असें कोणी म्हणत नाही. तसेच अश्लील शब्दांचा संबंध अनीतीशींच जोडला जातो असें नाही. नीतिमान मनुष्याच्या तोंडीं किंवा नैतिक विषयांच्या चर्चेत अश्लील शब्द येऊं शकतील. उलट अनीतिमान मनुष्य अश्लील भाषेपासून आलिप्त असूं शकेल व अनीतिदर्शक विषयांची चर्चा अश्लील शब्द वापरल्याशिवाय करूं शकेल. अशीं उलटसुलट दोनहि प्रकारचीं उदाहरणें सांपडतील.

## मृच्छकटिक नाटक

शूद्रकाने मृच्छकटिक नाटक लिहिलें त्यांत मूळ कथा गणिकेसंबंधाची घेतली आहे.पण औदार्यामुळे दारिद्र्य प्राप्त झालेला सद्गुणी नायक आणि निर्लोभी गणिका ही नायिका, अशी 'अलौकिक' जोडी त्याने वर्णन केल्यामुळे, आणि अश्लील ठरण्यासारखी शृंगारिक भाषा कोठेंहि न वापरल्यामुळे, वाचक व प्रेक्षक मूळच्या कथानकांतील रूढ अनीतीचा प्रश्न विसरून जातात. उलट नैतिक व धर्म्य लग्नसंबंधांतील पिता माता व मुलगा असे तीन प्राणी घेतले तरी मुलाला 'तुझे वडील दाखीव' असें न म्हणतां 'तुझ्या आईचा नवरा दाखीव' असें म्हणण्यांत अश्लीलता

आपोआप प्रगट होते! संबंध नैतिक पण शब्दांच्या वरील दोन जोड्यांपैकीं एक शिष्ट कां व दुसरी अशिष्ट किंवा अश्लील कां हें कोणासहि न सांगतां समजण्यासारखेंच आहे. तात्पर्य, अश्लीलतेचा प्रश्न हा अनीतीचा प्रश्न नव्हे तर केवळ सदभिरुचि व सुसंस्कृति (Good taste and refinement) यांचा प्रश्न आहे. प्रत्येक कालांतील सदभिरुचि व सुसंस्कृति यांची मर्यादा एकाच ठराविक रेषेवर पडेल असें नाही. त्या मर्यादा बदलणें शक्य आहे. पण त्या मर्यादांचें अतिक्रमण ज्या शब्दांनी होईल त्यांना त्या त्या काळांत अश्लील हें नाव मिळाल्याशिवाय राहणार नाही. फाजील लब्धप्रतिष्ठितपणाचा टेंभा मिरविणें हें जितकें वाईट तितकेंच, स्पष्टोक्तीच्या व मतस्वातंत्र्याच्या नांवाखालीं चावटपणाच्या सनदेचा दिमाख मिरविणें हेंहि वाईटच नव्हे काय ?

# वाङ्मय व जीवित

[ प्रो. वामन मल्हार जोशी यांनी ठाणें येथील मराठी ग्रंथसंग्रहालयाच्या गेल्या वार्षिक सभेच्या प्रसंगीं अध्यक्ष या नात्यानें भाषण केलें. त्यांतील महत्त्वाचा भाग पुढें दिला आहे.—सं. के. ]

"माझें असें ठाम मत आहे कीं, वाङ्मयामुळे मानवी जीवित दिवसेंदिवस अधिकाधिक रम्य होत आहे, संसार अधिकाधिक विवेकयुक्त होत आहे व शुद्धतेचें आणि औदार्याचें राज्य चढतें–वाढतें आहे. शास्त्रांतले पूर्वीचे सिद्धान्त खोटे ठरूं पाहत आहेत. तेव्हां शास्त्राचा सर्व खटाटोप व्यर्थच नव्हे तर अपकारक झाला आहे असा मीं क्षणभर पूर्वपक्ष केला; पण मानवी उन्नतीच्या आड येणाऱ्या अडचणींनी चिडून न जातां आपण शान्तपणें विचार केला तर असें दिसून येईल कीं, या अडचणींमुळे निराश होण्याचें कांहीं कारण नाही. पूर्वीच्या ग्रंथांतील पुष्कळ सिद्धान्त चुकीचे ठरले असतील; पण चुकीचे ठरले ही देखील एक प्रगतीची पायरी आहे. मानवी मन ज्या ज्ञानात्मक, नीतिविषयक व रसास्वादविषयक पूर्णतेच्या शोधांत आहे, त्याकडे जाणारे खरे मार्ग सांपडले नसले तरी विशिष्ट मार्ग तिकडे जात नाहीत ही माहिति उपयुक्त आहे. दुसरी गोष्ट अशी कीं, विद्येचा शोध काय, सुखाचा शोध काय, किंवा दुसरा कोणताहि शोध काय, त्यांच्या सिद्धीपेक्षां शोधांतच अधिक मौज आहे. निरनिराळे शास्त्रकार व वाङ्मयभक्त हाडाचीं काडें करून जी बौद्धिक धडपड करीत असतात, ती हौस म्हणून करीत असतात, आकुंचित फलप्राप्तीच्या किंवा यशःसिद्धीच्या अपेक्षेनें नव्हे. फळ किंवा यश नको असतें असें नाही, तर तें आवश्यक नसतें. तिसरी व महत्त्वाची गोष्ट अशी कीं, शास्त्रकारांच्या व वाङ्मयभक्तांच्या ग्रंथांचा व त्यांतील जुनाट झालेल्या (किंवा जुनाट वाटणाऱ्या) विचारांचा किती जरी वीट आला तरी ही गोष्ट खरी कीं, ग्रंथाच्या द्वारें मानवी प्रगतींत एकंदरींत भरच पडली आहे. कांहीं ग्रंथांतलीं प्रमेयें चुकीचीं ठरलेलीं असतील, पण ही चूक केव्हा तरी व कोणी तरी करणें अपरिहार्य होतें व ती झाली म्हणून एका अर्थी खऱ्या मार्गाचें आक्रमण शक्य झालें. ग्रंथालयें म्हणजे पूर्वकालीन प्रमादांचा संग्रह, पुरावा व प्रदर्शन असें जरी आपण वादाकरिता क्षणभर मानलें तरी पूर्वकालीन प्रमादांचा संग्रह करणारीं ग्रंथालयें उपयुक्तच मानलीं पाहिजेत. कारण हा संग्रह केल्यानें पूर्वीच्या प्रमादांची (ग्रंथालयांचा उपयोग करणाऱ्या लोकांकडून तरी) पुनरावृत्ति व्हावयाची नाही !

## इतिहास हा पाहिजेच

पांडित्याचा निर्वेद कित्येक वेळां येतो, ही गोष्ट खरी आहे. पण आपण ही गोष्ट नेहमीं ध्यानांत धरावी कीं, मनुष्याला जिज्ञासा दिलेली आहे विचारशक्ति दिलेली आहे, सौंदर्यलालसा आहे, रसास्वादलोलुपता आहे व एतद्विषयक प्रेरणा इतक्या प्रबळ आहेत कीं, परिणाम कांहीहि होवो, यशःसिद्धि होवो किंवा न होवो, त्यांनी प्रेरित होऊन मनुष्य ते ते व्यापार करीत राहणारच. उदाहरणार्थ, इतिहास कितीहि जरी अपुरा किंवा चुकीचा असला तरी मनुष्याचें मन कांहीं वेळ तरी मागे वळून भूतकाळाकडे पाहात राहणारच. खरा इतिहास लिहिणें शक्य नाही म्हणून सर वॉल्टर रॅलेप्रमाणे सर्व विद्यमान इतिहासकारांनी इतिहासग्रंथ लिहिण्याचें बंद केलें व ग्रंथालयांतील ऐतिहासिक ग्रंथ झाडून सारे जाळून टाकले तरी मानवी जातीची इतिहासापासून सुटका होईल असें नव्हे. होईल काय, तर बरावाईट थोडासा कांही जो इतिहास आहे तो जाऊन त्याऐवजी दंतकथांचा, लोकप्रवादांचा व आजीबाईच्या गोष्टींचा कांही काळ सुळसुळाट होईल, व कालान्तरानें त्यांतल्या त्यांत जो कोणी उद्योगी व विशेष चौकस असेल तो आपण ऐकलेल्या गोष्टी लिहून ठेवील व असे अनेक लोक एकापाठीमागून एक येऊन व एकमेकांच्या माहितीची छाननी करून पुनः इतिहासग्रंथ लिहितील. हा इतिहास नसून इतिहासाभास

असेल, पण आभास असो किंवा नसो, मागे वळून पाहण्याची खोड मानवी मनाला जोंपर्यंत आहे तोंपर्यंत ऐतिहासिक असें नांव धारण करणारें कांही तरी त्याला पाहिजे, व तो तें निर्माण करणार अशी ही स्थिति असल्यामुळे, पूर्वीचीं ऐतिहासिक प्रमेयें चुकीचीं ठरलीं म्हणून आता इतिहासच नको असा आग्रह न करता मनुष्याने असा विचार करावा कीं, इतिहास आवश्यकच जर आहे, तर शक्य तेवढा खरा व परिपूर्ण असावा; व तो सदोष जरी असला तरी तो अजीबात न टाकता पुढील पिढ्यांकडून दुरुस्त होईल या आशेने त्याचें रक्षणच करावें; व हें रक्षण योग्य रीतीने व्हावें म्हणून या ग्रंथालयासारखीं ग्रंथालयें काढावीं. इतिहासासंबंधाने जें म्हटलें तेंच तत्त्वज्ञान, शास्त्रें, काव्यें, कादंबऱ्या वगैरे संबंधाने मला म्हणावयाचें आहे. हीं सर्व सदोष असतील, पण वैराग्याने किंवा वैताग्याने त्यांचा त्याग न करता विवेकपूर्वक व तारतम्याने त्यांचा भोग घेणें हाच सुज्ञतेचा मार्ग होय.

### विद्याव्यासंग

कित्येक लोक हें कबूल करतात, पण असें म्हणतात कीं, ग्रंथ व ग्रंथालयें हीं करमणुकीचीं व चैनीचीं साधनें म्हणून उपयुक्त आहेत. त्यांची अधिक योग्यता नाही. Literature is a luxury असें तीव्र जीवनकलहाच्या या दिवसांत वाटणें साहजिक आहे. बुभुक्षित लोकांना व्याकरणावर दुपारची वेळ भागवितां येत नाही. तहान लागली असता काव्यरस पिऊन चालत नाही.

बुभुक्षितैर्व्याकरणं न भुज्यते
पिपासितैः काव्यरसो न पीयते ।

हें खरें आहे. त्याचप्रमाणे अति वाचनाने किंवा अति विचाराने कर्मविकलता उत्पन्न होते आणि कित्येक वेळां तर आपल्या इकडील अर्जुनाप्रमाणे किंवा शेक्सपियरने वर्णिलेल्या हॅम्लेटप्रमाणे व्यामोह उत्पन्न होऊन अकीर्तिकर अशी कर्मशून्यता प्राप्त होण्याची भीति असते, हेंहि खरें आहे. उपवर वधूसाठी वरशोधन चाललें असता तत्त्वनिरत वेदान्त्यांना वर म्हणून निवडूं नये अशीं कांही वचनें आहेत. त्यांतील भावार्थ हाच कीं, विद्याव्यासंगी व तत्त्वचिंतनरत लोक संसाराला नालायक ठरतात. परंतु या सर्व गोष्टी जरी खऱ्या असल्या तरी त्यांचा अर्थ एवढाच होऊं शकेल कीं, फाजील तत्त्वचिंतन हें घातुक आहे व तें शक्य तोंवर टाळावें. विद्याव्यासंग हा केवळ करमणुकीचा किंवा चैनीचा प्रकार असावा असें त्यापासून अनुमान काढतां येणार नाही.

### ललितवाङ्मयांत आनंद

ललितवाङ्मय हें ज्ञानवृद्धीकरिता नव्हे किंवा उपदेशाकरिता नव्हे, तर तें आनंदाकरिता आहे, रसास्वादाकरिता आहे असें कांही लोक जें म्हणतात, त्यामुळे वाङ्मयभक्ति हा एक बौद्धिक भुक्तीचा, म्हणजे सुखोपभोगाचा व चैनीचा प्रकार आहे या म्हणण्याला पुष्टि येते. पण ललितवाङ्मयाचें ध्येय आनंद आहे,—सरस्वती देवी ही मयूरासनावर बसलेली आहे, व्यासपीठावर नव्हे—हें जरी मान्य केलें तरी सरस्वती मयूरावर बसून जें नृत्य करते किंवा ती जें गायन-वादन करते, तें सर्व केवळ मनोविनोदनार्थ आहे असें मानतां येत नाही. विद्येचा जो ब्रह्मानंद-तुल्य आनंद आहे तोच विद्येचा प्रमुख हेतु हें खरें; पण या आनंदाच्या अनुषंगाने मनोवृत्ति शुद्धतर व उन्नततर होणें शक्य आहे. कांही कांही कोटया, विनोदी पदें, कविता, प्रहसनें वगैरेंचें कार्य म्हणजे तात्पुरता एक प्रकारचा आनंद देणें व घटकाभर मनाची करमणूक करणें एवढेंच असूं शकेल, हें मी जाणतों पण अशा कोटया, कविता, प्रहसनें वगैरे त्याज्य किंवा निंद्य आहेत असें म्हणणाऱ्यांपैकीं मी नाही. अशा प्रकारचें वाङ्मय हें उच्चतम नव्हे. त्या योगाने आत्म्याचें परिपूर्ण समाधान होत नाही हेंहि तितकेंच खरें आहे असें माझें मत आहे. आनंदाकरिताच वाङ्मय असलें तरी आनंदा-आनंदामध्ये फरक असतो व पायऱ्या असतात हेंहि विसरून चालावयाचें नाही. विद्यानंद हा ज्या ब्रह्मानंदाचा भाऊ आहे म्हणून वर्णन करतात, त्या ब्रह्मानंदाची योग्यता सांगतांना तैत्तिरीय उपनिषदांत म्हटलें आहे कीं,

सैषा आनंदस्य मीमांसा भवति ।
युवा स्यात् साधुयुवाध्यापकः ।
आशिष्ठो बलिष्ठो द्रढिष्ठः ।
तस्येयं पृथिवी सर्वा वित्तस्य पूर्णा स्यात् ।
स एको मानुष आनंदः ।
ते ये शतं मानुषा आनंदाः स एको मनुष्यगंधर्वाणामानंदः ।
ते ये शतं प्रजापतेरानंदाः ।
स एको ब्रह्मणो आनंदः ।

### आनंद व गुणवर्धन

निरनिराळ्या वाङ्मयकृतींपासून किंवा कलाकृतींपासून प्राप्त होणाऱ्या आनंदाच्या देखील अशाच प्रकारच्या पायऱ्या थोड्याबहुत लावतां येतील. उत्तम वाङ्मयकृतींपासून आनंदाचीच अपेक्षा करावयाची हें तत्त्व खरें आहे, पण या दृष्टीने पाहता उच्चतम वाङ्मयकृतीपासून जो आनंद होईल त्याच्या बरोबर सद्वासनांचें पोषण व सत्प्रवृत्तींचें उत्तेजन होईल, आणि मन अधिक शुद्ध, सुसंस्कृत व उन्नत होईल. विलायती फुलें सुंदर असतात पण त्यांच्या जोडीला वास नसतो; तरी

पण तीं त्याज्य नव्हेत, तर त्यांचें सौंदर्य अभिनंदनीय असतें. तथापि सौंदर्याबरोबर सुवासाची जोड मिळाली तर तें फूल अधिक रमणीय व आदरणीय होणार नाही काय? उत्तम हरदासाचें कीर्तन ऐकतांना ज्याप्रमाणें तेथील परिस्थितीमुळे इंद्रियें तृप्त होतात, गायनाचा लाभ मिळतो, हास्यरसाचा आस्वाद घेता येतो, सदुपदेश मिळतो, अध्यात्माकडे प्रवृत्ति होते व एकंदरींत अनेकविध सात्विक व उन्नतस्वरूप आनंदांचा लाभ घडतो; त्याचप्रमाणे उत्तम वाङ्मयकृतीपासूनहि जो आनंद होतो त्यांत अनेक सद्वस्तूंचा लाभ होऊं शकतो. ऑथेल्लोसारखें नाटक व रघुवंशासारखें काव्य किंवा ज्ञानेश्वरीसारखा अध्यात्मावरचा काव्यात्मक ग्रंथ यांचें परिशीलन आनंदाकरताच केलें तरी त्यायोगें करून मनोवृत्तीचें शोधन व उन्नतीकरण होणार नाही काय? आणि हें नैतिक पोषणच नव्हे तर काय? सद्ग्रंथांतील नैतिक उपदेश वगैरे अप्रत्यक्ष असेल, पण हवेप्रमाणे अप्रत्यक्ष असला किंवा लांबून येणाऱ्या सुवासाप्रमाणें तो कशापासून उत्पन्न होत आहे हें जरी कळत नसलें तरी तो कमी परिणामकारक असें मात्र नव्हे. कला कृतिकरिताच असते, कलाविलासाचा हेतु कलाविलासच असतो, काव्यानंद हा काव्यानंदाकरिताच असतो, असें किती जरी आपण कंठशोष करून म्हटलें तरी ज्या काव्यनाटकादि कृतीपासून सन्मनोवृत्तीचें परिपोषण होत नाही, सद्गुण अधिक प्रिय होत नाही, मनाचें औदार्य वृद्धिंगत होत नाही, थोर लोकांच्या थोर मनाचें आकलन अधिक सुलभ होत नाही, सौजन्यामुळे उत्पन्न झालेल्या आपत्ती पुरविल्या, पण दौर्जन्यामुळे प्राप्त होणारी हर-तऱ्हेची संपत्ति नको अशी मनोभूमिका तयार होत नाही, जगांतील विविध प्रसंगांतील मर्म ओळखण्याची अधिक पात्रता येत नाही अशा वाङ्मयकृति क्षणभर किंवा घटकाभर आनंददायक झाल्या तरी त्या खालच्या दर्जाच्या होत, यांत काडीमात्र शंका नाही. या कृति 'खालच्या दर्जाच्या' असें मीं म्हटलें आहे, त्याज्य किंवा निंद्य म्हटलेलें नाही, हें ध्यानांत धरावें. करवंदीचीं फुलें हीं गुलाबाची सर पावूं शकलीं नाहींत, किंवा जांभळांना द्राक्षांची सर आली नाही, म्हणून तीं टाकाऊ ठरवावयाचीं हें केव्हांहि उचित नव्हे. टाकाऊ तर नव्हतच उलट तीं देखील आस्वाद्य आहेत असेंच मी म्हणेन, व फुला-फळांची भाषा सोडून ग्रंथांची भाषा वापरावयाची म्हणजे मीं म्हणेन कीं, प्रस्तुत ग्रंथसंग्रहालयासारख्या संस्थेंत लहान-थोर, खालच्या दर्जाच्या व वरच्या दर्जाच्या सर्व ग्रंथांचा संग्रह झाला पाहिजे. कारण प्रसंगभेदाने व अभिरुचिभेदाने सर्व ग्रंथ आस्वाद्य व उपयुक्त, किंबहुना आवश्यक होऊं शकतात.

### वाचकांची जबाबदारी

आता आपणाला उच्च दर्जाचे जे ग्रंथ पाहिजेत ते कसे उत्पन्न होणार हा प्रश्न आपल्यापुढे उभा राहील. याला माझ्या मतें उत्तर असें आहे कीं, आपण वाचक जे आहोंत ते उच्च झाल्याशिवाय उच्च वाङ्मय निर्माण होणें अशक्य नसलें तरी कठिण आहे. काव्यामध्ये 'ध्वनिकाव्य' उत्तम असें समजतात. व केवळ शब्दालंकारादिप्रचुर काव्यें अधम समजतात. पण काव्यांतील ध्वनि समजण्याची पात्रता जर श्रोत्यांच्या किंवा वाचकांच्या अंगीं नसेल, तर ध्वनिकाव्यें पुष्कळ प्रमाणांत निघावींत कशीं? व्यवहारांत आपण ज्याप्रमाणे म्हणतों कीं योग्यतेप्रमाणे जें मिळावयाचें तेंच त्याला मिळतें (Every man gets what he deserves) किंवा अलीकडच्या राजकारणांत ज्याप्रमाणे 'यथा राजा तथा प्रजा' ही म्हण जाऊन 'जशी प्रजा तसा राजा' अशी म्हण रूढ होऊं पाहाते आहे. त्याप्रमाणेच वाङ्मय-साम्राज्यांत देखील वाचकांच्या सामर्थ्याला अनुसरूनच पुस्तकांची निर्मिती होत असतें असें म्हणण्यास कांही हरकत नाही.

### जीवित व वाङ्मय

एखाद्या राष्ट्राचें वाङ्मय त्यांतील लोकांच्या जीवितावर अवलंबून असतें हें दोन दृष्टींनी मला सांगवयाचें आहे. एक दृष्टि अशी कीं, आडांत नसेल तर पोहऱ्यांत कोठून येईल, या न्यायाने लोकांच्या जीवितांतच जर राम नसेल, तें जर काव्यशून्य, ध्येयशून्य, साहसशून्य, विविधताहीन, सद्गुणसंपत्तिरहित असेल, तर त्यांचें वाङ्मयहि उच्चगुणविहीनच असणार. आपलें लोक जर दूर देशाचे प्रवासच करीत नसतील तर मनोवेधक प्रवासवर्णनें आपल्या वाङ्मयांत कशीं मिळतील? आपण जर नौकागमन केलें नाही, नौका-युद्धें कशीं होतात तीं लांबून देखील पाहिलीं नाहींत, तर त्यांचीं वर्णनें आपण कशीं करावयाचीं? आपल्या जीवितांतच जर ध्येयवादित्व नसेल तर वाङ्मयांतच तेवढें ध्येयवादित्व कसें दिसेल? आपल्या जीवनांतच काव्य नसलें तर काव्यांत काव्यत्व कसें दिसावें? आपल्या जीवनक्रमांत जर विविधता नसेल, तर आपल्या कादंबऱ्यांच्या व लघुकथांच्या कथानकांत विविधता कोठून येणार? आपला इतिहास बनविणें आपल्या हातांत नाही, आपण परकीयांच्या ओंजळीने पाणी पितों, अर्थात् आपणांस वाचण्यास मिळणारा इतिहास देखील उष्टा असतो. राष्ट्राचा नवा इतिहास करण्याचें सामर्थ्य असलेले भारत-सेवक लोकमान्य महात्मे निघाल्याशिवाय उत्तम इतिहास निर्माण होणें कठिण. आधीं इतिहास करावा म्हणजे मग इतिहासकार निघतात.

रामाने किंवा मारुतीने पराक्रम केला म्हणजे मग वाल्मीकि, कालिदास वगैरे त्यांचे पराक्रम वर्णन करणारे निघणें सुलभ होतें. आपण स्वतः आधीं केलें मग सांगितलें असें रामदास म्हणतात. पण स्वतः नाहीं तर नाहीं, आपल्या राष्ट्रांतील दुसऱ्याने का होईना कांहीं ना कांहीं तरी सांगण्यासारखें केल्याशिवाय सांगणाऱ्याने काय सांगावें? वाङ्मय म्हणजे राष्ट्रांतील जीवनाचा प्रतिध्वनि असंच केवळ मला म्हणावयाचें नाहीं. व्हाल्टेअरसारख्यांच्या लेखणीनें तलवारीपेक्षां पराक्रम केला आहे हें मला ठाऊक आहे. पण राष्ट्रांतील जीवनाच्यापुढे कांहीं पावलें वाङ्मयाने उडी मारली व राष्ट्राला उडी मारण्यास शिकविलें तरी ही उडी बऱ्याच अंशांनी राष्ट्राच्या जीवनावर अवलंबून असते यांत शंका नाहीं. अर्थात् उच्च, विविध, स्वयंज्योति व तेजस्वी वाङ्मयाची अपेक्षा असेल तर आपल्या राष्ट्राचें जीवितहि तशाच प्रकारचें पाहिजे. कांहीं लोकांना असें वाटतें कीं, आपण कांहीं लिहीत नाहीं, वाचीत देखील नाहीं. आपल्या जीविताचा व वाङ्मयाचा संबंध काय? पण तसें नाहीं. राष्ट्रांतील लोकांचें जीवन जर सुधारलें व तें विविध, उत्साहपूर्ण ध्येयनिष्ठ व साहसयुक्त झालें तर असे लोक वाङ्मयोपकारक आहेत असें मी समजतों,–मग त्यांनी एकहि ग्रंथ लिहिलेला नसो, किंवा काव्यें, नाटकें, कादंबऱ्या वगैरे वाचलेल्याहि नसोत !’

# सरकार व शिक्षक

## गुप्त हेरांचें काम

हिंदुस्थानांत सध्या चालू असलेला राजकीय हक्कांचा झगडा हा नैसर्गिक मानवी हक्कांच्या संपादनाकरिताच आहे अशी खात्री पटल्यामुळे सदर झगड्यांत हिन्दी लोकांना मदत करणारे अनेक उदारधी इंग्रज व युरोपियन आढळतात. अशा इंग्रजांपैकींच अलाहाबाद येथील एका हायस्कूलचे हेडमास्तर मि. डंकन ग्रीनलेस हे गृहस्थ होत. ते स्कॉच असून स्वतः शुद्ध खादी वापरतात, राष्ट्रीय सभेच्या अनेक कार्यक्रमांचें सूक्ष्म दृष्टया अवलोकन करून त्यांपैकीं धार्मिक व नैतिक बाबी स्वतः अमलांत आणतात व आपल्या विद्यार्थ्यांना त्या आचरणांत आणण्याचा उपदेश करतात. अलाहाबादेला ज्या अनेक मिरवणुकी निघाल्या व कांहीं वेळां लाठीहल्ले झाले त्या वेळीं ते स्वतः प्रेक्षक या नात्याने हजरहि राहत असत. असा गृहस्थ गोरा स्कॉचमन असला तरी पोलिसांच्या व सरकारी अधिकाऱ्यांच्या डोळ्यांत खुपला तर त्यांत नवल काय ? नुकताच त्यांच्यावर नव्या वटहुकुमाखालील प्रेस ॲक्टाच्या अठराव्या कलमान्वयें खटला भरण्यांत आला असून तो मॅजिस्ट्रेटपुढे सुनावणीसहि निघाला आहे. फिर्यादी पक्षातर्फे जो पुरावा पुढें आला त्याची उलटतपासणी मि. ग्रीनलेस यांनी करून केली. परंतु, यापुढे मात्र त्यांनी खटल्यांत भाग घेतला नाहीं. खटल्याचें काम कोर्टापुढे चाललें असल्याने आम्ही यासंबंधी कांहीं लिहूं इच्छित नाहीं. परंतु मि. ग्रीनलेस यांनी जी लेखी कैफीयत वाचली ती मात्र मननीय आहे.

सदर कैफियतींत मि. ग्रीनलेस म्हणतात, “मी राष्ट्रीय सभेचा सभासद नाहीं. तथापि मी जणुं सभासदच आहें असें समजून काम करतो.कारण वटहुकुमांनी लोकमताची गळचेपी केली आहे. ती पाहता मला राष्ट्रीय सभेचें काम करणें नैतिक दृष्टया बेकायदेशीर वाटत नाहीं.” आपण स्वतः अनत्याचाराचें व्रत अत्यंत कडक रीतीने लहानपणापासून पाळत आलों असून त्या तत्त्वावर आपला विश्वास असल्याचें सांगून प्रेस ॲक्टाच्या ज्या अठराव्या कलमाप्रमाणे अत्याचाराला प्रोत्साहन देण्याचा गुन्हा होतो त्या कलमाखाली गुन्हा आपण केला नाहीं असें मोठ्या आवेशाने सांगून पुढें ते म्हणतात “शिक्षक व विद्यार्थी यांचे संबंध अत्यंत पवित्र आहेत असें मी समजतों. म्हणून ता. ३ फेब्रुवारी १९३२ रोजीं मला त्या वेळच्या कलेक्टराकडून पत्र आलें कीं, मी माझ्या विद्यार्थ्यांवर लक्ष ठेवून राजकीय सभांना कोण हजर असतात व कोण कसला भाग घेतात याची माहिती गुप्त रीतीने सरकारला द्यावी. त्या वेळीं माझ्या मनाला धक्का बसला.हें हेरांचें म्हणजे चहाडखोरीचें काम नीतिदृष्टया मी गर्ह्य मानतों म्हणून हें काम करण्याचें मी साफ नाकारलें. पुष्कळ हेडमास्तरांनी हें निंद्य काम करण्याचें कबूल केलें याची मला लाज वाटते!ज्या मुलांनी देशहिताच्या कामीं भाग घेतला असेल त्यांचा शाळेंत प्रवेश होऊं देऊं नये असेंहि कळविण्यांत आलें होतें.” मि. ग्रीनलेस यांच्या या वरील जबाबावरून या युरोपियन गृहस्थाचे चालू चळवळीसंबंधींचे विचार स्पष्टपणें निदर्शनास येतात. त्यांची अधिक फोड करून सांगण्याचें कारणच नाहीं !

# श्रीजिवाजी वेधशाला, उज्जयिनी

( ले. श्री. गोविंद सदाशिव आपटे सुपरिंटेंडेंट, श्रीजिवाजी वेधशाळा, उज्जयिनी. )

### नक्षत्रांचे कालांश

या विषयासंबंधी आजपर्यंत घेतलेल्या व प्रसिद्ध केलेल्या वेधांच्या आधारें सुचलेले विचार या लेखांत प्रसिद्ध केले आहेत.

सूर्याभोंवती पृथ्वी परिभ्रमण करीत असल्यामुळे म्हणा किंवा प्रतिपादनाच्या सोईकरिता आपण असें म्हणूं कीं सूर्य नक्षत्रांतून भ्रमण करीत असता तो ज्या नक्षत्राच्या जवळ येतो तें नक्षत्र त्याच्या तेजांत लोपून जातें म्हणजे त्याचा "अस्त" होतो व तो पुढें निघून गेल्यावर तें नक्षत्र पुनः दिसूं लागतें, तेव्हा त्याचा "उदय" होतो. तार्‍याचें रोजचें पूर्वेस उगवणें व पश्चिमेस मावळणें यांस नित्योदयास्त म्हणतात. त्यापासून अस्तोदय भिन्न आहेत. ते ह्या तार्‍याच्या कालांवर अवलंबून असतात. ते कालांश ठरविण्याची रीति अशी. तो तारा सूर्य मावळल्यानंतर किती वेळाने मावळतो हें रोज टिपून ठेवावें. ज्या दिवशीं तो सूर्यतेजांत अदृश्य होईल त्याचे आदले दिवशीं तो सूर्यास्तानंतर जितकीं मिनिटें मावळला असेल त्यांना ४ नीं भागावें म्हणजे अस्ताचे कालांश येतात. चारांनी भागण्याचें कारण इतकेंच कीं नक्षत्रचक्र दर चार मिनिटांनी अथवा दहा पळांनी एक अंश पूर्व क्षितिजाचे वर येतें. तारा सूर्यतेजांतून बाहेर येऊन दिसूं लागतो त्या दिवशीं सूर्याच्या व तार्‍याच्या नित्योदयकालांत जें अंतर पडतें त्यावरूनहि त्याचप्रमाणे उदयाचे कालांश काढितां येतात. हे दोन्ही कालांश साधारणतः सारखेच असले पाहिजेत. परंतु अस्ताचे कालांश सूर्याचे अस्तानंतर रात्र वाढत असता निश्चित केलेले असतात, व उदयाचे कालांश पहाटे सूर्यतेजाच्या सान्निध्यांत ठरवावयाचे असतात. त्यामुळे या दोनहि कालांशात काही अंतर पडणें अनिवार्य असतें.

सूर्यसिद्धान्त अध्याय ९ मध्ये नक्षत्रांचे कालांश दिले आहेत. कांही नक्षत्रांचे कालांश १३, कांहींचे १४, कांहींचे १५, कांहींचे १७, कांहींचे २१ असे सांगितले आहेत. याप्रमाणें कालांशांवरून त्यांचे ५ वर्ग केले आहेत. हल्लीच्या ज्योतिषपुस्तकांत नुसत्या डोळ्यांनी दिसणार्‍या तार्‍यांच्या तेजस्वितेप्रमाणे तार्‍यांच्या ६ प्रती केल्या आहेत. या प्रतींच्या थेट प्रमाणांत कालांशांचे वर्ग असावेत असें सकृद्दर्शनीं वाटतें; परंतु अनुभव निराळा आहे. प्रत ही केवळ तार्‍यांच्या तेजस्वितेवर अवलंबून असते; परंतु कालांश हे त्या तार्‍याचें तेज, त्याचा शर, त्याची क्रांति, सूर्याच्या संधिप्रकाशाचा अवधि, ऋतु व अक्षांश अशा अनेक गोष्टींवर अवलंबून असतात. यावरून अमुक प्रतीच्या तार्‍याचे कालांश अमुकच असले पाहिजेत असें त्रैराशिकानें काढतां येत नाही.

याबद्दल आणखी एक प्रमाण असें दाखवितां येतें कीं प्रतिदर्शक अंक एकएकाने चढते आहेत. वर्गदर्शक अंक १३, १४, १५ हे जरी एकएकाने वाढते आहेत तरी पुढे १७ हा दोहोंनी व पुढे २१ हा चारांनी अधिक आहे. याप्रमाणें त्रैराशिक बसूं शकत नाही. ही गोष्ट स्पष्ट करण्याकरिता सूर्यसिद्धांतोक्त कालांश तार्‍यांच्या प्रतीसह खाली दिले आहेत. प्रती कंसांत लिहिल्या आहेत.

श्लो. १२, कालांश १३. स्वाती ( ०·२४ ), अगस्त्य ( –०·८६ ), व्याध (–१·५८ ), चित्रा ( १.२१ ), ज्येष्ठा ( १·२२ ), पुनर्वसु ( १·२१ ), अभिजित् ( ०·१४ ), ब्रह्महृदय ( ०·२१ ).

श्लो. १३, कालांश १४. हस्त (३·११), श्रवण (०·८९), पूर्वाफाल्गुनी (३), उत्तराफाल्गुनी (३·४१), धनिष्ठा (३·८६), रोहिणी (१·०६), मघा (१·३४), विशाखा (४·६६), अश्विनी (२·२३).

श्लो. १४, कालांश १५. कृत्तिका (२·९६), अनुराधा (२·५४), मूळ (१·७१), आश्लेषा (४·५७), आर्द्रा (१·२), पू. षा. (२·८४), उ. षा (२·१४).

श्लो. १५, कालांश १७. शततारका (३·८४), पू. भा. (२·५७), उ. भा. (२·१५), रेवती (५·२७), वन्हि (१·७८), ब्रह्मा (३·१५), अपांवत्स (४·६६), आपः (३·४४).

श्लो. १५, कालांश २१. भरणी (३·६८), पुष्य ( ४·१७ ), मृगशीर्ष ( ४ ).

श्लो. १८ लुप्त न होणारे तारे. अभिजित् ( ०·१४ ), ब्रह्महृदय ( ०·२१ ), स्वाती ( ०·२४ ), श्रवण ( ०·८९ ), धनिष्ठा ( ३·८६ ), उ. भा. ( २·१५ ).

शाकल्योक्त ब्रह्मसिद्धांत, सोमसिद्धांत, बृहद्वसिष्ठसिद्धांत, यांतहि बहुतेक वरीलप्रमाणेंच कालांश दिले आहेत. पितामहसिद्धांतांत "नक्षत्राणां तेषां द्वादश दृश्यांशाः" म्हणजे नक्षत्रांचे कालांश सरसकट १२ सांगितले आहेत. यावरून तेजस्विता व कालांश यांच्यामध्ये कोणत्याहि प्रकारचें प्रमाण बसत नाही हें उघड आहे.

सूर्यसिद्धांतांतील कालांशासंबंधी कांही गोष्टी आपोआप लक्षांत येतात. त्या बर्जेसचें सू. सि. भाषांतर पृ. ३६८, ३६९ वर दिल्या आहेत. त्यांचा सारांश खालीलप्रमाणें.

"कालांशांप्रमाणें केलेलें हें ताऱ्यांच्या चाकचक्यानें वर्गीकरण फार चमत्कारिक व विलक्षण आहे. १३ कालांशांचे वर्गामध्ये बहुतेक पहिल्या प्रतीचे तारे आहेत. तरी १४ कालांशांचे वर्गांत रोहिणी, मघा, उत्तराफाल्गुनी, श्रावण, हे पहिल्या प्रतीचे तारे सांगितले आहेत. १५ कालांशांत ज्यांचें चाकचक्य १ पासून २ प्रतीपर्यंत बदलत असते, असा आर्द्रातारा सांगितला आहे. उत्तराभाद्रपदा हा दुसऱ्या प्रतीचा व सूर्यतेजांत न लोपणारा असा तारा असून त्याचेहि कालांश १७ सांगितले आहेत. २१ कालांशाच्या यादींतील तारे १७ कालांशांच्या ताऱ्यांपेक्षां कमी ठळक नाहीत. अशा प्रकारच्या विसंगतीमुळे असे म्हणणें भाग पडतें कीं, हें वर्गीकरण फार काळजीपूर्वक व दीर्घ निरीक्षणाने केलेलें नाही. प्रथम तें घाईघाईने व फार स्थूलपणे ठरविलें असून पुढे कदाचित् अडाणी लेखकांच्या व अनुयायांच्या प्रमादानें अधिक विकृत झालें असेल."

यावरून हें उघड आहे कीं, केवळ ताऱ्यांच्या चाकचक्यावरून त्यांच्या कालांशांचें अनुमान करतां येत नाही. कालांश हे वेधानेच ठरविले पाहिजेत. जर कांही फरक नजरेस आला तर आपण त्यांत दुरुस्ती केली पाहिजे. पूर्वग्रंथोक्तमानांत वेधाने जेव्हा अंतर दिसलें तेव्हां पूर्वाचार्यांनी त्याप्रमाणे दुरुस्ती केली व पुढेंहि तशी करावी अशी त्यांनी आज्ञा दिली आहे. परमक्रांति, वर्षमान, अयनगति, ग्रहणें, अस्तोदय, ग्रहसाधन यांत आपण तशी दुरुस्ती करीत आहों. त्याप्रमाणेच कालांशांतहि करणें आपलें कर्तव्य आहे. आम्ही (वेधशाळेंतील निरीक्षकांनी) येथील वेधशाळेंत आज सहा महिने नुसत्या डोळ्यांनी वेध घेऊन या दिशेनें प्रयत्न चालविले आहेत. त्यावरून ज्या गोष्टी नजरेस आल्या त्या वेध घेणाऱ्या वाचकांच्या माहितीकरिता प्रसिद्ध करीत आहों. आम्हांला जे कालांश ठरविता आले ते खालील कोष्टकांत त्यांच्यासंबंधी इतर माहितीसह निर्दिष्ट केले आहेत.

| नक्षत्र | सूर्याशी विषुवांशयुतीची तारीख | युतीपूर्वी अस्त दि. | युतीनंतर उदय दि. | अस्ता–उदया- वरून कालांश | अस्ता–उदया- वरून कालांश | सू. सि. कालांश |
|---|---|---|---|---|---|---|
| शततार. | १ ३-३२ | १८ | २४ | २० | १७ | १७ |
| पूर्वाभाद्र. | ४-३-३२ | २ | १५ | ११ | १७॥ | १७ |
| उत्त.भाद्र. | २३-३-३२ | ६ | १७ | ११॥ | १९ | १७ |
| रेवती (वैजयंती) | ६-४-३२ | ९ | ३० | ११ | १९ | १७ |
| अश्विनी | २०-४-३२ | १३ | २२ | १६॥ | २३ | १४ |
| भरणी | ५-५-३२ | १६ | १६ | २० | १८॥ | २१ |
| कृत्तिका | १९-५-३२ | १० | १६ | ११ | १५ | १५ |

वरील नक्षत्रांपैकीं कृत्तिकेचा अस्त पाहण्याचे वेळीं शेवटीं २-३ दिवस अभ्र येत होतें.

वरील कोष्टकावर नजर टाकिली असता असें लक्षांत येतें कीं, अस्तावरून व उदयावरून काढलेल्या कालांशांत अंतर आहे. याचें कारण आमचे लक्षांत येतें तें असें. तारा सूर्याचे तेजांत अदृश्य होण्यापूर्वी आपण सारखा पहात असतों त्यामुळें तो अगदी अंधुक दिसेपर्यंत आपल्यास पाहतां येतो. पुढे सूर्याचे उदयापूर्वी तो जेव्हा सूर्यतेजांतून बाहेर येतो तेव्हा तो फार अंधुक असल्याकारणाने प्रथम कांही दिवस दिसत नाही. तो पश्चिम क्षितिजावर असता ज्या इतर ताऱ्यांच्या सापेक्ष अंतराने व आकृतीने आपण त्याला लक्षांत ठेवितों त्यांची दिशा पूर्वक्षितिजावर तो उदित होतो तेव्हा अगदीं उलट झालेली असते. प्रथम त्यांपैकीं कांही तारे, हा तारा उगवला तरी पूर्वक्षितिजाच्या खालीच असतात. परंतु पुढे सूर्यापासून त्यांचें अंतर वाढून ते पुरते व स्पष्ट दिसूं लागतात तेव्हा त्यांची ओळख पटते. यामुळे तारा व सूर्य यांची विषुवांशयुति होण्यापूर्वी जितके दिवस ताऱ्याचा लोप नजरेस येतो त्यापेक्षां युतीनंतर ताऱ्याचा उदय नजरेस येण्यास अधिक दिवस लागतात. या कारणाने अस्तावरून काढलेल्या कालांशांपेक्षां उदयावरून काढलेले कालांश बहुधा अधिक असतात. सदरील निरीक्षण करण्याचें आमचें हें पहिलेंच वर्ष असल्याकारणाने इतकी विसंगति दिसली असावी. अभ्यासानें ही विसंगति कमी

होईल अशी आमची खात्री आहे. तथापि एक गोष्ट निःसंशय आमच्या लक्षांत येते ती ही कीं आम्हीं अस्तावरून जे कालांश ठरविले आहेत, त्यांपेक्षां कालांश कमी होऊं शकणार नाहीत. उदयावरून साधलेले कालांश मात्र अभ्यासांने कमी दिसूं लागतील असें वाटतें.

जर श्लोक १८ मध्ये सांगितलेलीं नक्षत्रें लुप्त होत नाहीत असें मानिलें तर त्यांचे कालांश तरी कसे ठरवितां आले हें एक गूढच आहे. ते अलुप्त असण्याचें कारण असें दिलें आहे कीं, त्यांचा विक्षेप (शर) फार मोठा आहे. परंतु अगस्त्याचा शर त्यांच्या शरांपेक्षांहि मोठा असून तो अलुप्त असणाऱ्या ताऱ्यांच्या यादींत सांगितला नाही. आमचा अनुभव तर असा आहे कीं, अगस्त्याप्रमाणे इतर तारेहि सूर्यतेजांत लुप्त होतात. कालांश बहुतेक ग्रंथांत पठित केले असतात व त्यांचा अस्त व उदय काढण्याचें गणितहि दिलें असतें.

रेवतीचा जो वैजयंती अथवा झीटापिशियम तारा शास्त्रोक्त भोग व शर यांच्या लक्षणानुसार आकाशांत दिसत आहे त्याचेवर आक्षेप घेण्याकरितां चित्रापक्षीयांकडून असें एक प्रमाण पुढें करण्यांत येतें कीं, या ताऱ्याची प्रत ५.५७ असल्या कारणाने त्याचे कालांश १७ होऊं शकत नाहीत. याकरितां वैजयन्ती हा शास्त्रोक्त रेवती ताराच नव्हे, मूळचा रेवतीतारा नाहींसा झाला आहे! परंतु प्रतीचा व कालांशांचा संबंध जोडणें किती असमंजसपणाचें आहे याचें विवेचन आतांपर्यंत केलेंच आहे. हा मुद्दा अधिक स्पष्ट करण्याकरिता आणखीहि प्रमाणे देतां येतात. उदाहरणार्थ आश्लेषातारा ५ वे प्रतीचा असून त्याचे कालांश १५, विशाखाहि ५ वे प्रतीचा असून त्याचे कालांश १४ सांगितले आहेत. त्या मानाने रेवती ५॥ प्रतीचा आहे तर त्याचे कालांश १७ सांगणें कांहीच आश्चर्य करण्यासारखें नाही. अपांवत्स ५ वे प्रतीचा असून त्याचे कालांश १७, वन्हि २ऱ्या प्रतीचा असूनहि त्याचे कालांश १७, भरणी, पुष्य, मृगशीर्ष हे चवथ्या प्रतीचे असून त्यांचे कालांश २१ सांगितले आहेत. ही केवढी विसंगति आहे? आणखी एक गोष्ट अस्वाभाविक अशी दिसते ती ही कीं १३, १४, १५ या कालांशाच्या ताऱ्यानंतर १७ कालांशांचे तारे सांगून नंतर बाकीच्यांचे कालांश २१ समजावेत असें सांगावयास पाहिजे होतें, तसें न करतां २१ कालांशांचे तारे सांगून नंतर बाकीचे १७ कालांशांचे समजावें असें सांगितले आहे.

वर निर्दिष्ट केलेल्या वेधाबद्दल आम्ही जबाबदार आहों. त्यासंबंधी कोणाचे मनांत कांही शंका आल्यास आम्ही तिचें प्रत्यक्ष निराकरण करण्यास तयार आहों.

" **प्रत्यक्षानुभवं न लुम्पति वचोयुक्तिः** "

असें जे एका वेधकुशल सिद्धांतकाराने म्हटलें आहे तें लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

रेवतीसंबंधीं वर जो प्रत्यक्षानुभव दिला आहे त्यावरून आक्षेपकारांनी आपला आक्षेप परत घेणेंच योग्य आहे. रैवत पंचांग हेंच एक सर्व प्रकारें शास्त्रशुद्ध पंचांग होय याचें हें एक दृढतर प्रमाण होय.

शेवटीं एक महत्त्वाची विनंति करून हा लेख पुरा करतों.

विलायतेस जाऊन आलेले व तेथे जाणारे जे अनेक देशबंधु आहेत त्यांस अशी विनंति आहे कीं, ग्रीनवुइच वेधशाळेसंबंधी जेवढी माहिती प्रसिद्ध करतां येईल तेवढी त्यांनी अवश्य प्रसिद्ध करावी. ती माहिती खालील प्रकारची असावी—

(१) वेधशाळेचे चित्र, तिचा विस्तार, सभोंवतालचें दृश्य व ग्रीनवुइच येथेंच वेधशाळा स्थापन करण्याचीं विशेष कारणें.

(२) वेधशाळेचा इतिहास, तींतील यंत्रांची माहिती, तीं कशीं बसविलीं आहेत याबद्दल विवरण.

(३) गणिताच्या कामाची वांटणी.

(४) रोज नियमाने व वेळोवेळीं कोणते वेध घेतले जातात व त्यांचा उपयोग काय केला जातो.

(५) वेधशाळेचें बजेट व स्टाफ, वेधशाळेपासून कांही उत्पन्नाची बाब शक्य झाली आहे काय?

(६) या वेधशाळेंत हवामानाची व भूकंपाची वेधशाला समाविष्ट आहे काय?

(७) या सर्व माहितीचें एखादें पुस्तक असल्यास त्याचें नांव, किंमत व ते मिळण्याचा पत्ता.

(८) असें एखादें पुस्तक मिळत असलें तरी वरील माहिती थोडक्यांत कोणीं प्रसिद्ध केल्यास ती फार उपयुक्त होणार आहे.

# स्वदेशीचें महत्त्व

(ले. धनंजय रामचंद्र गाडगीळ.)

स्वदेशीची कल्पना खरोखर पाहता फार साधी व सुगम आहे. पण स्वदेशीचें व्रत आचरणांत आणण्याची इष्टता व व्यवहार्यता यांकडे चिकित्सेने पाहूं लागलों म्हणजे कित्येक शंका मनांत येऊं लागतात, व बऱ्याच भानगडी उपस्थित होतात. आर्थिक व्यवहारांत स्वदेशी म्हणजे आपल्या देशांत हिंदी पैशाने व मजुरीने उत्पन्न झालेल्या व बनविलेल्या मालाची खरेदीविक्री करणें असा सरळ अर्थ घेता येईल. पण अगदीं १६ आणे स्वदेशी कोणासहि आचरणांत आणणें जवळजवळ अशक्यच आहे. आपण आगगाडींत अथवा मोटारींत बसलों म्हणजे लागलीच आपण या व्रताचा भंग केला हें निर्विवाद आहे. तेव्हां स्वदेशी कोठपर्यंत व्यवहार्य आहे, याचा विचार ज्याला त्याला करणे जरूर आहेच. तसेंच १६ आणे स्वदेशी हें आपलें ध्येय तरी असावें काय? आपल्या राष्ट्रापुरताच विचार करणें हें कोतेपणाचें लक्षण नव्हे काय? अशा प्रकारचेहि मुद्दे अनेक वेळां उपस्थित करण्यांत येतात.

या मुद्दयाचा विचार करतांना एकंदर जागतिक परिस्थितीकडे लक्ष देणें जरूरीचें आहे. आजचा राष्ट्रसमूह निरनिराळ्या भिन्नवर्णीय, भिन्नजातीय, भिन्न आर्थिक व राजकीय परिस्थितींत असलेल्या घटकांचा बनलेला आहे. असल्या परिस्थितींत अनिर्बंध व्यापार सुरू ठेवणें मागसलेल्या राष्ट्रास किती घातुक आहे, हें गेल्या शतकांत सर्व जगास नीट कळून आलें आहे. राष्ट्राराष्ट्रांत भेद मानू नयेत, विश्वकुटुंबाची कल्पना प्रसृत करावी हें म्हणणें अयोग्य नव्हे. पण या सर्व बाबींत कांहीं 'दे वाण घे वाण' असावें लागतें. अमेरिकेचा माल आमच्याकडे अनिर्बंध यावा अथवा अमेरिकेच्या भांडवलवाल्यांना आमच्या देशांतील धंदे काबीज करण्यास पूर्ण मुभा असावी असें म्हणणें अमेरिकेंत काळ्यागोऱ्यांत भेद मानीत नसले तर एकवेळ शोभेल; पण जेथे जगभर सर्व गोरे लोक हा भेद मनांत बाळगतात व कृतींत उतरवितात तेथे जित काळ्यांस आपल्या मनोधैर्याचें निरर्थक प्रदर्शन करण्याचें कांहींच कारण नाही. बरें! आपल्या राष्ट्राची आजची अशीहि स्थिति नाहीं कीं, आम्हीं मोठेपणाचें उदाहरण घालून दिल्याने त्याचा इतर राष्ट्रांवर कांहीं परिणाम होईल. मानव जाति आज एक नाही. त्यांतील निरनिराळे समूह गुण्यागोविंदाने नांदत नसून एकमेकांकडे संशयित दृष्टीने पाहात आहेत, व शक्य असल्यास बळजबरीने एकमेकांस आपल्या राजकीय अथवा आर्थिक पकडींत आणण्याचा प्रयत्न करीत आहेत. ही परिस्थिति अत्यंत अनिष्ट आहे. पण आज हिंदुस्थानचा जगांतील दर्जा, मान व वजन हीं इतक्या कमी प्रतीचीं आहेत कीं, आपल्या राष्ट्रास हा कलह तोडणें अशक्य आहे. केवळ यांतून जीव बचावून कसें बाहेर पडतों हेंच आपणांस पाहणें आहे.

### जगाचीं सूत्रें कोणाच्या हातीं?

आज स्वसंरक्षणार्थ निरनिराळीं राष्ट्रें निरनिराळ्या उपायांची योजना करीत आहेत. त्यापैकीं आर्थिक बाबींत हरतऱ्हेचा प्रयत्न करून स्वावलंबी बनणें हें सर्वांचेंच ध्येय आहे. सर्वांचेंच ध्येय पूर्णपणें सिद्धीस गेलें तर राष्ट्राराष्ट्रांतील दळणवळण थांबलेंच असे होईल. म्हणून हा प्रयत्न सर्वस्वी सिद्धीस जाणें केव्हाच शक्य नाही. तरी बहुतांशीं सर्व राष्ट्रांची इच्छा अशी आहे हें लक्षांत ठेवलें पाहिजे. गेल्या पंपन्नास वर्षांत राजकीय वर्चस्व व पकड यापेक्षां आर्थिक वर्चस्वाचें महत्त्व जास्त मानण्यांत येऊं लागलें आहे हें सर्वश्रुत आहे. कोणताहि मुलूख प्रत्यक्ष ताब्यांत घेण्यापेक्षां तेथील गिऱ्हाईकी काबीज करण्याबाबत प्रमुख राष्ट्रांची चुरस हल्लींच्या वेळीं आहे. या आर्थिक बंधनाचा प्रभाव इतका आहे कीं, आज पेढीवाले व भांडवलवाले हेच जगाचीं सूत्रें हलवितात असें म्हणणें अतिशयोक्तीचें मानलें जात नाही. मोठमोठ्या भांडवलवाल्यांच्या संघांची (Trust) भीति प्रमुख राष्ट्रांतील राज्यकर्त्यांनाहि वाटूं लागली आहे. त्यांच्याशीं टक्कर देणें व इतर देशांतील भांडवलवाल्यांची जी मगरमिठी बसली आहे ती सोडवणें हें काम खरोखर अत्यंत बिकट आहे. विशेषतः राजकीय सत्ता आपल्या हातांत नसल्यामुळे आपण अगदी असहाय आहों असें वाटणें साहाजिक आहे. पण अगदी असाहाय्य आपण खास नाही. कारण स्वदेशीचें एक अस्त्र आपले हातांत आहे. त्याचा अवलंब केल्यास काही बाबींत तरी स्वतंत्र होण्याचे मार्गास आपण निश्चित लागलों असें समजावें. परदेशी माल विकत न घेणें, परदेशी कंपन्यांशीं व्यवहार न करणें, परकीय भांडवल ज्यांत गुंतलेलें आहे अशा हिंदुस्थानांतील कंपन्याहि परदेशी समजणें ह्या सर्व गोष्टी आपल्या हातच्या आहेत. कायदेशीर नियंत्रण न घालतां केवळ स्वेच्छेने पण एकजुटीने काम केलें असता आपलें आर्थिक स्वातंत्र्य परत

मिळवणें आपणांस बिलकुल अशक्य नाही. शिवाय आपल्या राज्यकर्त्यांनीहि या मार्गांत अजून अडथळे उत्पन्न केलेले नाहीत.

### सोळा आणे स्वदेशी

अर्थात् हा मार्ग एकदोघांचा नाही. प्रयत्न सर्व राष्ट्राने एकदम केला पाहिजे. खेड्यांत अथवा शहरांत श्रीमंतांनी व गरिबांनी सर्वांनीच आपले परीने स्वदेशीचे प्रसारास हातभार लावणें अवश्य आहे. सर्व राष्ट्रानेच स्वावलंबी व्हावयाचें म्हटलें म्हणजे कोणीहि परदेशी वस्तूंवर अथवा कारखानदार अगर व्यापारी यांचे साहाय्यावर अवलंबून राहून उपयोगी नाही. शक्यतोंवर स्वदेशी अमलांत आणिली पाहिजे. खादी हो सोळा आणे स्वदेशी. कारण ती बनविण्यांत परदेशी यांत्रिक सामुग्रीचेंहि मोठें साहाय्य घ्यावें लागत नाही. याच हिशेबाने मोटारचे प्रवासापेक्षां बैलगाडीचा प्रवास जास्त इष्ट आहे. अर्थात् प्रत्येकास व्यवहार्यतेचा प्रश्न पहावा लागेलच. पण सोळा आणे स्वदेशीचें ध्येय हें असें आहे हें लक्षांत ठेवणें जरूर आहे

आज आपण किती तरी बाबींत परदेशी मालाचे गिऱ्हाईक आहों. अगदी प्रामुख्याने कपडा व सूत हें परदेशांतून आपण विकत घेतों. पण इतरहि अशा अनेक बाबी आहेत कीं, त्यांत परदेशी मालाशिवाय सहज चालण्यासारखें आहे. साखर, रेशमी व लोकरीचे कपडे, कागद व स्टेशनरी सामान, बिस्किटें व डब्यांत भरलेलीं फळे, मोटारगाड्या व मोटार सायकली, सिगारेट, सिगार, कांचकाम, रंग, अत्तरें, तेलें, औषधें, साबण, खेळ असा हरतऱ्हेचा परदेशी माल आज या देशांत खपत आहे. यांतील बहुतेक वस्तू स्वदेशांत तयार होत आहेत; व ज्या तयार होत नसतील त्यांचा त्याग करणें विशेष कठीण नाही. तसेच परदेशी व्यापारी, विमा कंपन्या, बँका, जहाज कंपन्या, चहाचे मळेवाले, आगकाड्यांचे कारखानदार, वगैरे अनेक परदेशी भांडवलवाले आपल्या देशांतून नफा ओढून नेत आहेत. या सर्व मालाचा खप कमी करणें, हा नफा त्यांच्या पदरांत पडूं न देणें, याबद्दल एकजुटीने प्रयत्न करणें याचेंच नांव स्वदेशी. यांत्रिक सामुग्रीहि आपल्या देशांत परदेशांतून फार येते. पण त्या बाबतचा विचार थोडक्यांत करणें शक्य नाही. त्याचाहि त्याग शक्य असल्यास करणें हें सोळा आणे स्वदेशीचें एक अंग आहे एवढेंच दर्शविलेलें पुरें.

### स्वदेशीपासून फायदा कोणाचा ?

आता बऱ्याच स्वदेशी वस्तू महाग पडतात, त्या ओबड धोबड असतात, क्वचित प्रसंगीं टिकाऊहि नसतात हें खरें आहे. जेथें त्या बनविण्याचा प्रयत्नच नवीन, कारखानदार व मजूरवर्ग दोन्ही अनभिज्ञ व अडाणी तेथें हें घडून यावयाचेंच. पण याकरिता स्वदेशी टाकून देणें युक्त होणार नाही. कारण प्रथमपासून जर स्वदेशी धंद्यास गिऱ्हाइकी मिळाली नाही तर ते पुढे तरी नांवरूपास कसें येणार? याहि पलीकडे स्वदेशीचे नांवाखालीं बरेच वेळां फसवेगिरी होण्याचा संभव असतो, असेंहि म्हणता येईल. पण याबाबत गिऱ्हाइकानेच सावधगिरी बाळगली पाहिजे. शक्य असेल तोंपर्यंत खात्रीलायक दुकानांतून व कंपन्यांकडूनच माल खरेदी करावा व दुकानदाराचे शब्दावर अवलंबून न राहता आपण हुडकून खडसून चौकशी करावी. याबाबत स्वदेशी संघाला माहिती गोळा करून ती प्रसृत करण्याचे काम बरेंच करण्यासारखें आहे व ते करण्याचा प्रयत्नहि केला जात आहे. शेवटीं एक असा आक्षेप घेण्यांत येतो कीं, स्वदेशी व्रताने फायदा होतो, तो केवळ कारखानदारांचा, पण सर्व जनतेने महाग वस्तू घेतल्या तर केवळ भांडवलवालेच श्रीमंत होतील एवढेंच नाही, तर त्यामुळे नवीन प्रकारचे उद्योगधंदे आपल्या देशांत प्रस्थापित होण्यास मदत होईल, व त्यामुळे राष्ट्राचें आर्थिक जीवन आज जें केवळ एकांगी आहे त्याचें स्वरूप बदलेल. आणि दुसरें असें कीं, जरी आज भांडवलवाले गबर झाले तरी ते भांडवलवाले हिंदीच आहेत तोंपर्यंत हरकत नाही. कारण आज त्यामुळे आपला प्रश्न अर्धा तरी सुटेल. परकीय भांडवलवाल्यांचे कचाटींतून आपण आज निसटलों तरी पुरें आहे. पुढे आपले हातांत सत्ता आल्यावर हिंदी भांडवलवाल्यांचें नियन्त्रण करणें आपणांस इतकें अवघड जाणार नाही. पण जोंपर्यंत परदेशी मालावरच आपण सर्व बाजूंनी अवलंबून आहों, तोंपर्यंत आपणास कांहीच करणें शक्य नाही.

एकदम आज सर्वांनीच खादी घेऊं म्हटलें तर तेवढी आज पैदा होत आहे काय ? अथवा आम्हांस सोळा आणे स्वदेशी व्रत अंगीकारतां येत नाही तेव्हां थोडेंथोडकेंच करून काय फायदा ? अशा तऱ्हेचेहि आक्षेप कांही वेळेस काढण्यांत येतात. पण यांचा विचार करण्यांत अर्थ नाही. कारण ज्यांस कांहीच करावयाचें नाही अशांचेच असले आक्षेप असतात. हे राष्ट्रकार्य आहे या बुद्धीने सर्वांनीच यास हातभार लाविला पाहिजे. आपणास शक्य असेल तितकें स्वदेशी व्रत आचरणांत आणिलें पाहिजे. ज्यास तें अगदीं सोळा आणे साधेल तो भाग्यवान; पण सोळा आणे न साधेल तर शक्य तितकें साधण्याची प्रत्येकाने पराकाष्ठा करणें जरूर आहे.

आपण जित आहोंत व परावलंबी आहोंत. आपल्या राज्यकारभारावर आपली हुकमत आज चालत नाही. आर्थिक व्यवहारावर नियंत्रण घालणें, राष्ट्रीय आर्थिक जीवनास इष्ट तें वळण लावणें या

गोष्टी आपणास करतां येत नाहीत. इतर राष्ट्रें परकीय मालावर जकाती बसवून अथवा परदेशी कंपन्यांच्या व्यवहाराबद्दल कायदे करून जें साधत आहेत ते साधण्याचा आपला एकच मार्ग म्हणजे स्वदेशी हा होय. स्वावलंबन हाच स्वातंत्र्याचा खरा पाया आहे. जे समर्थ आहेत, जे बलवान आहेत त्यांचेच जग ऐकतें. आपणास समर्थ होणें असल्यास प्रथम आपले पायावर उभें राहण्यास शिकलें पाहिजे व सर्व राष्ट्रानें स्वदेशी व्रत अमलांत आणलें तरच तें पूर्ण होणें शक्य आहे.

आजपर्यंतची झालेली हिंदुस्थानाची औद्योगिक प्रगति अत्यल्प व एकांगी आहे ही गोष्ट महशूरच आहे; पण आपल्या हल्लींच्या स्थितीचें यथार्थ चित्र डोळ्यापुढे येण्याकरिता खालील माहिती उपयोगी पडेल. खानेसुमारीचे वेळेस जें वर्गीकरण केलें जातें त्याबरहुकूम $\frac{3}{4}$ लोकांचा निर्वाह शेतीवर होतो, व उद्योगधंद्यांत $\frac{1}{10}$ लोक गुंतले आहेत असें म्हणतां येईल. पण या उद्योगधंद्यांत गुंतलेल्या लोकांचें बारकाईनें निरीक्षण केलें असता असें आढळून येईल कीं, त्यांतील बहुतेक सर्व भरणा खेड्यांपाड्यांतील कारागीरवर्गाचा आहे. उद्योगधंद्यांत मोडले जाणारे संख्येने फार मोठे वर्ग म्हणजे अर्थात्, प्रथम हातमागावरील विणकर वर्ग व त्याचेनंतर सुतार, चांभार, न्हावी, परीट, कुंभार हे होत. आधुनिक पद्धतीनें व यंत्रसाहाय्यानें चालणारे उद्योगधंदे पाहावयास गेले तर ते फार थोडे आहेत. मजूर कमिशननें (लेबर कमिशननें) यांत्रिक साहाय्य घेऊन बारमहा चालणाऱ्या कारखान्यांत सर्व हिंदुस्थानांत मिळून जवळजवळ साडेअकरा लाख मजूर १९२९ सालीं काम करीत होते, असें नमूद केलें आहे. याशिवाय खाणींतून दोन लक्ष सत्तर हजार मजूर काम करीत असत. येणेप्रमाणे नवीन पद्धतीच्या उत्पादनांत नेहमी गुंतलेली लोकसंख्या अखिल हिंदुस्थानांत अवघी चौदा लाखांहून थोडीशी अधिक एवढीच आहे.

## कारखान्यांचे आंकडे

हें औद्योगिक प्रगतीच्या अभावाचें गमक झालें. पण जेवढी कांहीं औद्योगिक वाढ झाली आहे, तीहि फार एकांगी आहे. याबाबत १९२७ सालांतील जे तपशीलवार हजारीं आंकडे मिळतात ते खालीलप्रमाणे आहेत. कापडांच्या गिरण्या ३७४, गोणपाटाच्या गिरण्या (Jute Mills) ३४५, कोळशाच्या खाणी १६५, आगगाड्यांचे कारखाने (Workshops) १४७, चहाच्या मळ्यांतील कारखाने ६०, एन्जिनियरिंग कारखाने ४४, लोखंड व पोलाद यांचे कारखाने ३७, छापखाने वगैरे ३६, मँगेनिजच्या खाणी २७, गोद्या व नावा बांधणें २४, बंदुकीचे कारखाने २१, अभ्रकाच्या खाणी १७, साखरेचे कारखाने १४, पेट्रोल गाळणें १३, तेलाच्या गिरण्या १३, आगकाड्यांचे कारखाने ११.

अखिल हिंदुस्थानांत दहा हजारांवर मजूर कामास लावणाऱ्या उद्योगधंद्यांची ही पूर्ण यादी झाली. खरें म्हटलें तर कापड व गोणपाटाच्या गिरण्या, कोळशाच्या खाणी व अलीकडे निघालेला टाटाचा जमशेटपूर येथील कारखाना याशिवाय आपले देशांत महत्त्वाच्या उद्योगधंद्यांची अथवा कारखान्यांची वाढ झालेलीच नाही हें उघड आहे. त्यांत टाटांचे कारखान्याबद्दल लक्षांत ठेवण्याची गोष्ट ही कीं, गेल्या आठदहा वर्षांत हिंदुस्थानसरकारचें धोरण कांहींसें बदलून संरक्षक जकाती बसविण्यास सुरुवात झाली नसती तर तोहि आज अस्तित्वांत न राहता. आगकाड्यांचा धंदा हिंदुस्थानांत अलीकडे प्रस्थापित होण्यास व जरतारी धंद्याचे पुनरुज्जीवन होण्यास संरक्षक जकात हेंच कारण होय. साखरेचे कारखाने अथवा रासायनिक द्रव्यांचे कारखाने जकातीशिवाय टिकून राहणें शक्य नाही असें टॅरिफ बोर्डानें आपलें मत नमूद केलें आहेच. तरी संरक्षक जकातीचें प्रमाण व व्याप हीं हिंदुस्थानांत अमेरिकन व युरोपांतील सर्व देशांपेक्षा किती तरी पटींनी कमी आहेत.

## सहाशें कोटी रुपये परक्यांचें भांडवल

बरें, जो थोडाबहुत आधुनिक पद्धतीचा व्यापार व उद्योग हिंदुस्थानांत चालतो त्यापैकीं हिंदी माणसांचे हातांत किती आहे याचा विचार केला तर एकंदर परिस्थिति अत्यंत खेदजनक आढळून येईल. परकीयांचें एकंदर भांडवल आपले देशांत किती गुंतलें आहे, हें अजमावणें अशक्य आहे. प्रो. शहा यांनीं हा आंकडा सहाशें कोट रुपये असावा असा एकदां अंदाज केला होता. हा अंदाज बरोबर असो वा नसो, हें भांडवल फार मोठें आहे हें निर्विवाद आहे आणि यानें व्यापलेला प्रदेशहि फार विस्तीर्ण आहे. उद्योगधंद्यांत पाहिलें तर गोणपाटाच्या (ज्यूटच्या) सर्वच गिरण्यांचे व्यवस्थापक (मॅनेजिंग एजंट) परकीय आहेत असें म्हणण्यास हरकत नाही. शिवाय या गिरण्यांमधील बरेच भागीदार परदेशी आहेत. कोळशाच्या खाणींपैकीं बऱ्याच मोठ्या व किफायतशीर खाणी परकीयांच्या हातीं आहेत. रॉकेलचा सर्व धंदा विदेशी आहे. कांही काही कापडाच्या गिरण्या, बहुतेक सर्व लोकरीच्या कापडाच्या गिरण्या, कातड्याच्या सामानाचे बरेच कारखाने, साखर तयार करण्याचे पुष्कळ कारखाने,

चहा कॉफीचे बहुतेक मळे, आगगाड्यांचा हिंदुस्थानांतील सर्वांत मोठा कारखाना हे सर्व परदेशी लोकांनी स्थापिलेले, आपल्या हातांत राखलेले अथवा काबीज केलेले आहेत.

### परकीयांचा सार्वत्रिक व्याप

हिंदुस्थानांतील सर्व बिनसरकारी आगगाड्यांचा कारभार लंडनहून चालविला जातो. या परदेशी भांडवलाचा शिरकाव उद्योगधंद्यांतच नव्हे तर व्यापारांतहि फार झालेला आहे. विदेशी विमा कंपन्यांनी आपल्या देशांतील मोठें क्षेत्र बळकाविलें आहे व हें क्षेत्र बळकाविण्यास त्यांस विदेशी बँकांचा फार उपयोग झाला आहे.इम्पीरियल बँकेच्या भांडवलापैकीं अर्ध्याहून अधिक भांडवल परकीयांचे हातांत आहे. परदेशी व्यापाराचा सर्व व्यवहार विदेशी बँकांच्याच ताब्यांत आहे.आणि शिवाय अंतर्गत व्यवहार पाहिला तर विदेशी बँकांच्या हिंदुस्थानांतील ठेवी इम्पीरियल बँकेच्या बरोबरीने व हिंदी बँकांच्याहून बऱ्याच अधिक आहेत. कापूस, भुईमुग, गोणपाट इत्यादि वस्तूंच्या निर्गत व्यवहारांतहि मोठमोठ्या परकीय व्यापारी मंडळींचे गुमास्ते थेट शेतकऱ्यां-पर्यंत जाऊन पीक खरेदी करतात. एकूण उद्योगधंदा अथवा व्यापार यांत असा एकहि प्रांत नाहीं कीं, ज्यांत विदेशीयांचा हात नाही आणि बहुतेक प्रांतांत तर ते आज शिरजोर आहेत. यासंबंधी सरकारी धोरण काय आहे हें सर्वश्रुतच आहे. स्वदेशी म्हणजे केवळ हिंदुस्थानांतलिच माल असें नव्हे तर ज्यांत हिंदी भांडवल व हिंदी मजूर यांचा प्रामुख्याने संबंध आलेला असेल तेवढेच स्वदेशी असा आग्रह धरण्याचें कारण काय, हें वरील विवेचनावरून स्पष्ट होईल.

हिंदुस्थानांतील आयात होणाऱ्या वस्तूंपैकीं कांही विशेष लक्षांत ठेवण्याजोग्या आहेत, त्या खालील-प्रमाणे—

(वस्तूंच्या किंमतीचे आंकडे लक्ष रुपयांत दिले आहेत) एकंदर आयात १६४८२, सूत व कापड २५२५, साखर १०९६, वाहनें १७३१, किरकोळ माल ४८८, दारु ३३२, रेशीम व रेशमी कापड ३०८, कागद व पुठ्ठे २८७, रासायानिक द्रव्यें वगैरे (Chemicals) २६१, रंग २५९, लोकर व लोकरी कापड २३१, औषधें १९४, कांच व कांचकाम १६५, तंबाखू १६१, साबण ११२, बूट वगैरे ८८, स्टेशनरी ८१ हे आंकडे १९३०–१९३१ सालाबद्दल आहेत. या सालांतील आयात, विशेषतः कापड वगैरेची, सार्वत्रिक मंदी, बहिष्कार इत्यादि गोष्टींमुळे नेहमीपेक्षां फार कमी होती.

(१) ५ लाख रुपये किंमतीच्या मोटारगाड्या, लॉऱ्या व सायकली आहेत.

(२) 'किरकोळ माल' यांत मुख्यत्वें पॅकबंद डब्यातील फळें, भाज्या इ.डब्यांतील दूध, बिस्किटें, केक्स् यांचा समावेश होतो.

(३) कापूर, क्विनीन व ४३ लाख रुपयांचीं पेटंट औषधें.

(४) बांगड्या ५० लाख रु., मणी व खोटीं मोतीं १६ लाख रु., बाटल्या २० लाख रु. इत्यादि.

(५) सिगारेट १२२½ लाख रु.

# निर्बळ मवाळ खुशाल खवळोत!

सुमारें तीन आठवड्यांपूर्वी भारतमंत्री सर सॅम्युअल होअर यांनी ब्रिटिश पार्लमेंटांत भाषण करून तिसरी गोलमेज परिषद लंडन शहरीं पुनः भरणार नसल्याचें सांगितलें. व्हाइसरॉयांची सल्लागार कमिटी, फेडरल स्ट्रक्चर कमिटी व त्यावरची गोलमेज परिषद अशा तीन पायऱ्या ( बाकीच्या कमिट्या वगळल्यास ) गेल्या वर्षाच्या अखेरीस विलायतेंत गोलमेज परिषदेचें काम संपल्यावर रचण्यांत आल्या. या तीन पायऱ्यांपैकीं वरच्या दोन पायऱ्या मंत्रिमंडळाने आतां मोडून टाकण्याचें ठरविलें व सल्लागार कमिटी ही खालची पायरी तेवढी शिल्लक ठेवली. सल्लागार कमिटींत फक्त हिंदी प्रतिनिधी असून तिचे अध्यक्ष व्हाइसरॉय आहेत. हिंदुस्थानाच्या भावी राज्यघटनेशीं एकट्या हिंदी लोकांचा संबंध येत असता तर गोष्ट वेगळी होती. पण वस्तुस्थिति अशी आहे कीं, खालसा मुलुखांतील हिंदी प्रतिनिधि, हिंदी संस्थानिकांचे प्रतिनिधि व ब्रिटिश सरकारांचे प्रतिनिधि या त्रिवर्गांनी एकत्र बसून एकमेकांच्या सल्ला-मसलतीने व अनुमतीनें विशिष्ट योजना ठाम केल्यावांचून स्वराज्याचें कोडें सुटण्यासारखें नाही. पण तशी सोय सल्लागार कमिटींत नाही.

वरील तीनहि पक्ष एकत्र जमण्याचें पहिलें स्थान फेडरल स्ट्रक्चर कमिटी व दुसरें स्थान खास गोलमेज परिषद. फेडरल स्ट्रक्चर कमिटी ही संस्था साऱ्या कमिट्यांत श्रेष्ठ प्रतीची असली तरी ती गोलमेज परिषदेची एक पोटकमिटी असल्यानें तिच्यापेक्षां गोलमेज परिषदेचें महत्त्व अधिक होय यांत शंका नाही. फेडरल स्ट्रक्चर कमिटींत काय किंवा गोलमेज परि-

षदेंत काय, खालसा मुलुखाचे हिंदी प्रतिनिधि, संस्थानिकांचे प्रतिनिधि व ब्रिटिश सरकारचे प्रतिनिधि एकमेकांशेजारीं बरोबरीच्या नात्याने बसण्याची व स्वराज्याचें कोडें सोडविण्याची व्यवस्था होती. त्यांनी ठरविलेली योजना ब्रिटिश मंत्रिमंडळाकडे जावयाची व तिचा विचार करून ब्रिटिश मंत्रिमंडळाने स्वराज्याचा मसुदा लिहून काढून तो पार्लमेंटापुढे मंजुरीकरिता मांडावयाचा. सायमन कमिशनांत कोणाहि हिंदी प्रतिनिधीस न घेता तें केवळ पार्लमेंटाच्या गोऱ्या सभासदांचें बनविण्यांत आलें, यांत आपला अपमान झाला असें वाटून हिंदुस्थानांतील सर्व पक्षांनी त्यावर बहिष्कार घातला होता. तो रुसवा काढण्याकरिता माजी व्हाइसरॉय लॉर्ड आयर्विन यांच्या रदबदलीने ले. असेंब्लीने पूर्वी अनेकवार केलेल्या मागणीस अनुसरून मुख्य मंत्री मि. राम्से मॅक्डोनाल्ड यांनी गोलमेज परिषदेचा घाट घातला. त्याचा हेतु स्वराज्यघटना बनविण्याऱ्या बाबतींत वाटाघाट करण्यास हिंदी लोकांस इंग्रजांच्या बरोबरीचा दर्जा देण्याचाच होता.

पहिल्या गोलमेज परिषदेच्या वेळीं काँग्रेस पक्षाचें सहकार्य ब्रिटिश सरकारास न मिळालें तरी दुसऱ्या गोलमेज परिषदेंत तें मिळालें व अशा रीतीने मि. राम्से मॅक्डोनाल्ड व लॉर्ड आयर्विन यांचा मनसुबा सिद्धीस गेला. इंग्लंडांत मजूर पक्ष अधिकारारूढ होता म्हणून जबाबदार ब्रिटिश मुत्सद्द्यांनी हिंदी राष्ट्राची इतकी तरी मुरवत राखली. पण पुढे मजूर पक्ष गडगडून पडून राष्ट्रीय पक्षाच्या म्हणजेच कॉन्झरव्हेटिव्ह पक्षाच्या हातीं राज्यसूत्रें गेल्यामुळे हिंदी राष्ट्राची मुरवत राखणारे मुत्सद्दी मावळले अगर निर्माल्यवत् झाले आणि सर सॅम्युएल होअरप्रभृति नव्या उमेदीचे व ताज्या रक्ताचे तडफदार मुत्सद्दी पुढे आले. त्यांना हिंदी लोकांचा, विशेषतः मजूर पक्षाने विनाकारण माजविलेला हा देव्हारा वाटला व ते सदर देव्हाऱ्यावरून हिंदी लोकांस खालीं ओढून दूर लोटण्याच्या उद्योगास लागले. त्यांचें हें कारस्थान वटहुकुमांच्या प्रभावानें गेल्या सहा महिन्यात चांगलें रंगल्यासारखें वाटून त्यांनी हिंदी लोकांस देव्हाऱ्यावरून उचलून दाराबाहेर धक्के मारीत हाकलून देण्यासाठी अस्तन्या सारल्या आहेत. तीन आठवड्यांपूर्वी होअरसाहेबांनी भाषण करून हिंदी लोकमताला शेवटची गचांडी दिली व सायमन कमिशनच्या अपमानास्पद खड्यांत त्याला ढकललें.

हिंदुस्थानांतील मवाळ पक्ष याच अपमानामुळे खवळला. होअरसाहेबांनी गोलमेज परिषद व फेडरल स्ट्रक्चर कमिटी यांचे ताबूत थंडे करून जी सल्लागार कमिटी गठडी न आवळता शिल्लक ठेवली ती अगदीच कनिष्ठ प्रतीची. तिचें कार्यक्षेत्र अगदींच आकुंचित. व्हाइसरॉयांनी विचारलेंच तर तिनें सल्ला द्यावयाचा. गोलमेज परिषद थंडी झाल्यामुळे कर्ज, जमाखर्च इत्यादि आर्थिक बाबींची चर्चा इतःपर हिंदी राजकारणी प्रतिनिधींना ब्रिटिश व संस्थानी प्रतिनिधींबरोबर करण्याची संधि मिळणार नाही. जॉइंट पार्लमेंटरी कमिटी मूठभर हिंदी गृहस्थांना बोलावील व तिला योग्य दिसेल तेच विषय सदर गृहस्थांपुढे चर्चेकरितां ठेवील. हे हिंदी गृहस्थ प्रमुख राजकीय पुढाऱ्यांपैकीं बहुधा निवडले न जाता व्यापारी, पेढीवाले व संस्थानिक या वर्गांचे असतील. ते फक्त साक्षीदार होत. विचारल्या प्रश्नांचीं उत्तरें त्यांनी द्यावीं. कमिटीने कर्ज, जमाखर्च वगैरे बाबींतून कांही बाबी गाळल्या तर त्या कां गाळल्या म्हणून कमिटीस रोखठोक विचारण्याचा अधिकार वरील गृहस्थांना नाही. अर्थात् कमिटीने प्रांतिक स्वराज्यावर व फेडरेशनच्या पोकळ व दिखाऊ डोलाऱ्यावर हिंदी लोकांच्या राजकीय आकांक्षांची बोळवण केली व हिंदुस्थानाच्या मध्यवर्ती सत्तेचें नांवहि घेतलें नाही, तर असें कां म्हणून उलट प्रश्न विचारण्याला हिंदी प्रतिनिधींना तोंड नाही. मवाळ पक्षाचे धाबें यामुळेच दणाणलें असून त्यांतील कित्येकांनी सल्लागार कमिटीचे राजीनामे सरकाराच्या अंगावर फेकले व सरकाराशीं या बाबतींत संबंध आणण्याचें नाकारलें.

हिंदुस्थानांत पंधरा वर्षांपूर्वी जहाल–मवाळ हे दोनच पक्ष होते. त्या वेळीं सरकार जहालावर चवताळलें म्हणजे मवाळांना आपल्या मायेच्या पंखाखाली घेत असे. सरकाराशीं आर्जवाने व नम्रपणाने वागून साधेल तेवढे देशहित साधून घेणें हाच मवाळांचा मुख्य गुण असल्यामुळे तेवढ्या गुणावर सरकार खूष होऊन त्यांस मानमरातबाने वागवीत असे. पण ती स्थिति गेल्या पंधरा वर्षांत एकसारखी पालटत चालली व अलीकडे दोन वर्षांत राष्ट्रीय सभेने कायदेभंगाची चळवळ सुरू केल्यापासून ती अगदीच बदलली. कॉंग्रेस पक्ष हा क्रियावान पक्ष आहे. काँग्रेस पक्षाने कायदेभंगाची क्रिया सुरू करताच इतर पक्षांना राजकारणांत जिवंत राहावयाचें तर त्यांनी प्रत्यक्ष क्रियाच केली पाहिजे. अशी क्रिया करणारा प्रतिपक्षी काँग्रेस पक्षाला यंदाच्या कायदेभंगांत भेटला. हिंदूंत जसे अनेक पक्ष आहेत तसे मुसलमानातहि अनेक पक्ष उत्पन्न झाले आहेत. त्यांपैकी एक छोटासा पक्ष काँग्रेसशीं मिळतें घेणारा आहे व दुसरा पक्ष काँग्रेसशीं शत्रुत्व करणारा आहे. त्याला स्वातंत्र्याच्या अगर स्वराज्याच्या चळवळीची गरज नाही. स्वराज्य वाटलें तर हिंदूंनी मिळवावें आणि मुसलमानांनी फाजील हक्क व अधिकार संपादण्यासाठी झटावें असें या पक्षाचें मत आहे. सरकारापासून फाजील हक्क–अधिकार प्राप्त

करून घ्यावयाचें तर त्याजवर उपकारांचें ओझें करून ठेवलें पाहिजे अशी त्यांची समजूत असल्या-मुळें त्यांनी काँग्रेसच्या परदेशी मालावरील बहिष्कारास विरोध करण्याचें ठरविलें आहे. हा विरोध मुसल-मानांतील एक पक्ष बहिष्काराविरुद्ध नुसती ओरड करून दर्शवीत असतो. परंतु कित्येक लोक असे असतात कीं, केवळ शाब्दिक ओरडीनें त्यांचें मन समाधान पावत नाही. असा एक अघोर पंथ किंवा संप्रदाय मुसलमानांत अलीकडे जन्मास आला आहे.

बंगाल्यांतील हिंदूत क्रांतिकारकांचा एक पंथ उत्पन्न झाला आहे, त्याच धर्तीचा हा मुसलमानांतील नवीन पंथ होय. क्रांतिकारकांचा जसा हिंदूंतील इतर राजकीय पक्षांशी संबंध नाही तसा मुसलमानांतील अघोर पंथीयांचा मुसलमानांच्या इतर राजकीय पक्षांशीं संबंध दिसत नाही. अराजक हिंदु व अघोरी मुसल-मान या उभयतांत मुख्य फरक हा आहे कीं, अरा-जक हिंदूंचीं पिस्तुलें युरोपियन अधिकाऱ्यांवर रोखलेलीं असतात; तर अघोरी मुसलमान सांप्रदा-यिकांचे सुरे हिंदूंच्या कुशींत खुपसण्यासाठी उगार-लेले असतात. काँग्रेस पक्षाचीं साध्य–साधनें हीं अघोरपंथीय मुसलमानांच्या साध्य–साधनांहून अगदीं भिन्न आहेत. काँग्रेसचें ध्येय स्वराज्य किंवा स्वातंत्र्य हें आहे आणि अघोरपंथीय मुसलमानांचें ध्येय सरकारला व हिंदूंना धाकांत ठेवून फाजील राजकीय अधिकार मिळविणें हें आहे. काँग्रेसचें धोरण अहिंसा आहे, अघोरपंथीयांचें धोरण हिंसा आहे. काँग्रेसचें साधन कायदेभंग करून तुरुंगांत जाण्याचें आहे. तर अघोरपंथीय मुसलमानांचे साधन हिंदूंना कंठस्नान घालण्याचें आहे.

या साधनांचा अवलंब गेल्या पांचसहा वर्षांत व विशेषेंकरून गेल्या पांचसहा महिन्यांत मुसलमानांनी इतक्या धडाक्याने केला आहे कीं त्यांत प्रकट केलेल्या क्रौर्याबद्दल त्यांचें नांव आज दिगंत गाजत आहे! निरपराध हिंदु बायका-माणसांचे लीलेनें जीव घ्यावे तर एकट्या मुसलमानांनीच असें जगांतील प्रत्येक जिवंत माणूस छातीवर हात ठेवून म्हणत आहे. डायरेक्ट ॲक्शन म्हणतात ती हिलाच! होअरसाहेब मोठें शतकृत्य करतील तर हिंदुस्थान-सरकारास वटहुकूम काढण्यास सांगतील. पण किती झालें तरी ते कागदावर छापलेले वटहुकूम. त्यांच्यामुळे स्थानिक अधिकाऱ्यांना अनियंत्रित सत्ता अशी किती-शी मिळेल? हजारों रुपये दंडाची व कित्येक वर्षांच्या शिक्षेची. पण वटहुकूमांचे दोन हंगाम संपून तिसरा हंगाम सुरू झाला असताहि कोणी एखाद्याने काँग्रेसचा तिरंगी झेंडा फडकविला किंवा काँग्रेस कमिटीचा सर्वाधिकारी या नात्यानें उच्च स्थानीं उभें राहून भाषण करण्याकरिता तोंड उघडलें म्हणून त्याला कोठल्या तरी मॅजिस्ट्रेटाने फांशीची शिक्षा सुनावल्याचें निदान एक उदाहरण तरी दृष्टीस पडावें ! असलें उदाहरण दृष्टीस पडणार कसें ! पण तेच अघोरपंथीय मुसलमान पाहा. त्यांच्या वटहुकुमांत एकच शिक्षा. व ती म्हणजे ज्या हिंदूने कोणाहि मानवाचा किंवा देवाचा लिखित अगर अलिखित असा कायदा मोडला नाहीं त्याच्या उरांत सुरा खुपसण्याची.

अशा प्रकारचा क्रियावान पंथ मुसलमानांत उत्पन्न झाला असून त्याने काँग्रेसच्या क्रियावान पक्षालाच काय पण सरकारच्या वटहुकुमांनाहि मागे टाकलें आहे. हा पंथ व मुसलमानांचे इतर विविध पंथ यांनी आपल्या सामुदायिक कामगिरीने जगावर व इंग्लंडावर विलक्षण परिणाम घडविला आहे. त्यांची राजनिष्ठा अतुलनीय आहे. त्यांच्या-पैकीं पुष्कळांचा देशद्रोह अपूर्व आहे व क्रौर्य अचाट आहे. ते आपल्याकडून इंग्रजांवर व इंग्रज सरकारावर उपकार करीत आहेत. मग ते उपकार इंग्रजांना पसंत असोत वा नसोत. ही कामगिरी लोकमताला न जुमानता व निंदेची पर्वा न करता त्यांनी चालविली असल्याने उग्रपणांत व भयप्रदतेत त्यांना काँग्रेसलाहि मागे टाकतां आलें आहे. काँग्रेसने स्वतःचे हजारो लोक फक्त कायद्याने तुरुंगांत घातले. पण मुसलमानांनी दुसऱ्याचे—हिंदूंचे शेकडो लोक जीवें मारले. मुसलमानांची काँग्रेसवरील ही सरशी कोणाच्या लक्षांत येणार नाही? तात्पर्य, मुसलमा-नांच्या विविध अंगांनी वाढत चाललेल्या चळवळींचा विचार करता त्यांचा अत्याचाराचा मार्ग इंग्रजांस ना-पसंत असला तरी त्यांच्या राजनिष्ठेमुळे व त्यांनी कायदे-भंगाविरुद्ध चालविलेल्या उघड चळवळीमुळे हिंदु-स्थानांत इंग्रजांच्या दौलतीचा बळकट खांब जर कोणता असेल तर तो मुसलमान समाजच होय. अशी इंग्रज लोकांची समजूत झाल्यास त्यांत आश्चर्य कसलें ?

मुसलमान समाजावरून दृष्टि काढून ती मवाळांवर लावली असता काय दिसतें ? मुसलमानांच्या वरील कर्तबगारीपैकीं लेशमात्र कर्तबगारी तरी मवाळांनी दाखविली आहे काय ? कायदेभंगाची चळवळ हाणून पाडण्याच्या कामीं त्यांनी सरकारला कोणती मदत केली आहे ? उलट केला असला तर विरोधच केला आहे. त्यांनी ब्रिटिश मालावरील बहिष्कार उठ-विण्याची साधी चळवळदेखील हातीं घेतली नाही ! उलट सरकारने कायदेभंगाविरुद्ध वटहुकूम काढले, त्यांच्या निषेधाची एकहि संधि त्यांनी गमावली नाही. असल्या ना–कर्त्या व काँग्रेसविषयी सहा-नुभूति बाळगणाऱ्या या मवाळ पक्षाचें ब्रिटिश

मुत्सद्द्यांपाशीं वजन राहावें कसें ? मवाळ विद्वान आहेत, विचारी आहेत व राजनीतिविशारदहि आहेत. हे अमोलिक व दुर्मिळ गुण होअरसाहेबांनीहि मवाळांस दिलेल्या उत्तरांत कबूल केले आहेत. पण त्या गुणांनी इंग्रजी राज्यावरील कॉंग्रेसचें संकट टळणारें नसल्यामुळे होअरसाहेबांना त्यांची प्रतिष्ठा वाटत नाही, व म्हणून ते त्यांच्या निषेधाची पर्वा बाळगीत नाहीत.

पहिली गोलमेज परिषद काय किंवा दुसरी गोलमेज परिषद काय जबाबदार ब्रिटिश मुत्सद्द्यानी मवाळां करिता भरविली नसून कॉंग्रेसकरिता, म. गांधींच्या सहकार्याकरिता भरविली होती. गांधीजींचें सहकार्य दुसऱ्या गोलमेज परिषदेप्रमाणे तिसऱ्या गोलमेज परिषदेस मिळण्याची खात्री असती तर तिसरीहि गोलमेज परिषद कदाचित् भरली असती. कॉंग्रेसच्या मनोधारणेच्या खालोखाल सरकारास मुसलमानांची मनोधारणा करावयाची आहे. पण हिंदु व मुसलमान यांजमधील हक्कांचें भांडण आपसात न मिटता तें मिटविण्याची जबाबदारी ब्रिटिश मंत्रिमंडळावरच पडली असल्याने मुसलमानांकरिताहि गोलमेज परिषद भरविण्याचें आता कारण उरले नाही. अशा स्थितींत सदर परिषद एकट्या मवाळांसाठीच भरवावयाची. पण त्यांच्याकरिता ती भरविली तरी परिषदेंतून ज्या राजकीय सुधारणा निष्पन्न होण्याचा संभव आहे त्यांवर कॉंग्रेस पक्षाचा नवीन कायदेमंडळे उघडण्याच्या वेळी बहिष्कार पडणार हें जर ठरल्यासारखें आहे, तर केवळ मवाळ रागावले व रुसले म्हणून त्यांच्याकरिता सध्याच्या काटकसरीच्या काळांत पोकळ थाटमाटांत पैसा उधळतो कोण, व मवाळांचें विनाकारण स्तोम माजवितो कोण असा होअरसाहेबांच्या उत्तराचा आशय आहे.

होअर यांचें काम अगदी रोखठोक आहे. त्यांच्यापाशीं आडपडदा असा कांही नाही. गोलमेज परिषद देखील हिंदी लोकांची फसवणूकच होती. तथापि तिच्यांत कांही जरी ठरलें असतें तरी स्वराज्याचे कोणते अधिकार हिंदुस्थानास द्यावे हें अखेर ठरविणारें पार्लमेंटच, म्हणजेच ब्रिटिश मंत्रिमंडळ, म्हणजेच सर सॅम्युअल होअर. ते अधिकार काय द्यावयाचे याचा बेत त्यांनी आपल्या मनाशींच करून ठेवला असल्याने, गोलमेज परिषद ही फसवणूक आहे, थोतांड आहे, भपका आहे, कालहरणाची युक्ति आहे असें होअर यांनी आपल्या उत्तरांत सांगून टाकलें आहे. मग त्याबद्दल तुम्ही त्यांना खट्याळ म्हणा, प्रतिगामी म्हणा, शत्रु म्हणा, सहानुभूतिशून्य फत्तर म्हणा किंवा जागचा न हलणारा खुंट म्हणा; त्यांचें सुखदुःख ते मानीत नाहीत. सारांश, होअरसाहेबांनी कॉंग्रेसची देखील पर्वा केली नाही, मग ते मवाळांची पर्वा काय करणार, हें दिसतच आहे. त्यांच्या हातांत वटहुकुमांची सत्ता आहे, व त्यांच्या पाठीशीं मुसलमानांचें प्रचंड सामर्थ्य आहे. त्यांच्या बळावर हिंदुस्थानाचा राज्यशकट असाच दामटीत न्यावयाचा व दडपशाहीनें चळवळीचीं हाडें मोडीत शांतता प्रस्थापित करावयाची असें त्यांनी धोरण ठरविलें असून त्या संकटांतूनच हिंदुस्थानास पुढचा मार्ग आक्रमावा लागणार असें तूर्त समजून चालण्यास हरकत नाही.

# श्रद्धानंद अनाथ महिलाश्रम

( शांतिकुंज, नायगांव क्रॉसरोड, दादर मुंबई )

मुंबईस अनाथ हिंदु स्त्रियांसाठीं वरील महिलाश्रम स्थापन झाल्यास चार वर्षे पूर्ण झालीं. व आश्रमाचा चतुर्थ वार्षिक वृत्तांत नुकताच प्रसिद्ध झाला आहे त्यावरून महिलाश्रम किती उपयुक्त कामगिरी करीत आहे याची उत्तम कल्पना येईल. हिंदुसमाज संख्येने अफाट असला तरी संघटनेंत अत्यंत कमकुवत झाला आहे, त्यामुळे कोणीहि त्यावर हल्ले करावेत, व इतर अनेक प्रकारांनीं त्याची मानहानि करावी असे प्रकार नित्यशः सुरू आहेत.

विशेषतः स्त्रियांसंबंधाने समाजाचें अत्यंत औदासीन्य दिसून येतें. चुकून वाईट मार्गांत पडलेल्या, नवऱ्याने टाकलेल्या, पालकांनी सोडलेल्या व इतर कारणांनी अनाथ झालेल्या स्त्रियांची हिन्दु समाजांत संख्या कांही थोडी नाही व समाज त्यांची कांहीच व्यवस्था करीत नसल्यानें कित्येक कायमच्या पतित होतात, वा स्वधर्मभ्रष्ट होतात. एवंच समाज त्यांना मुकतो.

इतर समाज या आपल्या कर्तव्याविषयीं अत्यंत दक्ष असून जागरूकपणें कार्य करीत असतात. तशा प्रकारचें कार्य हिंदु समाजांत होणें अत्यंत आवश्यक वाटून मुंबईस चार वर्षांपूर्वी अनाथ महिलाश्रम स्थापन करण्यांत आला या आश्रमांत कोणत्याहि कारणाने आश्रयहीन व अनाथ झालेल्या सर्व जातींच्या हिंदू स्त्रियांना व निराधार हिंदु बालकांना आश्रय देण्यांत येतो. या योजनेचा आतांपर्यंत चार वर्षांत

म्हणजे स. १९२८ सालीं २९ स्त्रिया व २१ मुलें
१९२९ सालीं ७० स्त्रिया व ३९ मुलें
१९३० सालीं ५३ स्त्रिया व १९ मुलें
आणि १९३१ सालीं ७८ स्त्रिया व ५७ मुलें
इतक्यांनी फायदा घेतला. त्यांत १०६ पतित, ४४ अनाथ, ६२ संकटांतून सोडविलेल्या, २८ नवऱ्यांनी टाकलेल्या, ३४ नवऱ्यांना टाकलेल्या, ४७ मॅजिस्ट्रेट अगर पोलीसकडून आलेल्या व ४४ फक्त प्रसूतीसाठी आलेल्या अशी वर्गवारी करतां येईल.

### आश्रमांतील शिक्षण

अशा प्रकारची अनेक स्थित्यंतरांतील मुलें व स्त्रिया आश्रमांत येत असल्याने ज्या स्त्रियांचे पति असतील अगर ज्यांचे पालक असतील त्यांचा तपास लावून स्त्रियांना व मुलींना त्यांच्या स्वाधीन करण्याची कामगिरी आश्रमाच्या व्यवस्थापकांना करावी लागते व आश्रमांत कांही स्त्रिया नुसत्या प्रसूतीसाठीच येतात त्यामुळे त्यांना स्वावलंबी होण्याजोगें शिक्षण देतां येत नाहीं किंवा आश्रमांत विशेष अभ्यासक्रम आंखून त्याप्रमाणे अभ्यास करवून घेतां येत नाही. तेव्हा साहजिकच शिक्षणाचा मुख्य भर नैतिक व धार्मिक आचारात्मक शिक्षणावरच देण्यांत येतो. व संस्थेंत जाणाऱ्या स्त्रियांमध्ये विशेष भरणा बहकलेल्या व आचारहीन स्त्रियांचाच असल्याने असल्याच शिक्षणाची त्यांना विशेष जरूरी असते. आश्रमाच्या व्यवस्थापिका श्री. लक्ष्मीबाई कोल्हटकर या आस्थेने तसें शिक्षण देत असतात. त्यामुळे पुष्कळ स्त्रियांचा सामाजिक पुनर्जन्मच होतो. याखेरीज शिवणकलाहि शिकविण्यांत येते.

अनाथ स्त्रियांप्रमाणें अनाथ मुलांची स्थितिहि अत्यंत करुणास्पद असते. अशांना आश्रम हें माहेरघर झालें आहे. हिंदु समाजाच्या विस्ताराच्या मानाने हें कार्य अल्प असलें तरी बिनमोल आहे. व हिंदु समाजाच्या अभिमान्यांनी मुक्त हस्ताने मदत केल्यास आश्रमाच्या कार्याचा व्याप वाढवितां येईलहि. आश्रमांत एका अर्भकालयाच्या शाखेची अत्यावश्यकता आहे. संस्थेचे अध्यक्ष बॅ. जयकर असून चिटणीसद्वय डॉ. मा. भै. उदगांवकर व श्री. शं. नवरे हे आहेत. कार्यकारी मंडळांतहि राजा गोविंदलाल शिवलाल, शे. रामेश्वरदासजी बिर्ला यांसारखी प्रतिष्ठित मंडळी आहेत. अशा अत्यंत उपयोगी संस्थेविषयीं उदासीनता न ठेवता हिंदु समाज कर्तव्य बुद्धीने मदत करील काय?

या संस्थेंत येणाऱ्या स्त्रियांची व बालकांची स्थिति कशी असते त्याची संक्षिप्त माहिती अहवालांत जोडली आहे. त्यावरून स्त्रियांच्या व बालकांच्या स्थितीची कल्पना येईल. नमुन्यासाठी त्यांपैकीं कांही कहाण्या खाली दिल्या आहेत.

### मी देवदासी होणार नाही

देवदासी जातींत मुलींचीं लग्नें करीत नाहीत. एखाद्या देवळांत देवाची सेवा करावी व लग्नाच्या नवऱ्याप्रमाणे एखाद्या पैसेवाल्या यजमानाकडे राहावें, ही रीत प्रसिद्धच आहे. सावंतवाडीकडील देवदासी जातीच्या एका १६ वर्षांच्या मुलीची आई ती लहान असतांनाच वारली. ती वयांत येतांच तिचा 'मामा' तिला 'यजमान' शोधूं लागला. पण मुलीला देवदासीचें आयुष्य घालविणें कसेसेंच वाटूं लागलें. सरळ लग्न कोणी करीना किंवा शिकण्याचीहि व्यवस्था होईना. शेवटीं तिच्या वडील भावानें तिला या आश्रमांत आणून ठेवली. ती लेखन-वाचनाचें व शिवणकामाचें शिक्षण घेत असते. मुलीची वागणूक अगदीं कुलीन घराण्यांतील मुलीप्रमाणें आहे.

### सोडचिठ्ठी मिळाली व लग्न झालें

मराठा जातीची २० वर्षांची मुलगी. घर ठाणें जिल्ह्यांत. आईबाप, भाऊ सर्व हयात आहेत. १२ व्या वर्षी लग्न झालें. सासरीं सासू, नणंदा, होत्या. पण त्यांच्याकडून नित्य मारहाण होऊं लागली. २–३ वर्षे मुलगी हाल सोसून माहेरीं येऊन राहिली. इकडे नवऱ्यानें दुसरें लग्न केलें. पण दुसरी बायको अनुभवाने नापसंत ठरल्यामुळे नवऱ्यानें पहिल्या बायकोला माहेराहून घरीं आणलें. एके दिवशीं सासूने तिला डागलें. कोर्टांत खटला झाला. मुलगी पुनः माहेरीं निघून गेली ४-५ वर्षे माहेरीं होती. नवरा बाळगीना, विचारपूस करीना किंवा सोडचिठ्ठी देईना. माहेरीं नित्य ये–जा करणाऱ्या इसमाशीं तिचा परिचय वाढूं लागला. त्याच्या मदतीने आईबापाला न कळवितां ती आश्रमांत आली. आम्हीं आईबापांना कळविल्यावरून ते तिला भेटावयास आले. एके दिवशीं आश्रमांत कोणाला न कळवितां मुलगी पूर्वपरिचित गृहस्थाकडे निघून गेली. त्याने तिला पुनः आश्रमांत आणली. पुढे तिच्या नातेवाइकांनी व परिचित गृहस्थांनी अनेक खटपटी करून नवऱ्याकडून कायदेशीर सोडचिठ्ठी मिळविली. मुलीचें तिच्या इच्छेप्रमाणें लग्न झालें. आश्रमांत असतांना मुलीची वागणूक चांगली होती. सोडचिठ्ठी न मिळती तर मुलीचें काय झालें असतें ?

### बायको लहान म्हणून नवऱ्यानें दुसरें लग्न केलें

सोमवंशी क्षत्रिय ज्ञातीची २२ वर्षांची मुलगी. सातव्या वर्षी आईबापांनी गांवांतच एका पोक्त वयाच्या माणसाशीं तिचें लग्न लावून दिलें. लवकरच २ वर्षांनी आईबाप वारले. मुलगी नवऱ्याकडे राहूं लागली. ती लहान म्हणून नवऱ्याने दुसरें लग्न केलें.

मुलगी चुलत्याकडे गेली. तिकडे ७-८ वर्षे होती. पुढे तिच्या नातेवाइकानें तिला शीलभ्रष्ट केलें. जवळच एका हॉस्पिटलमध्ये तिचें बाळंतपण झालें. कोणी नातेवाईक तिला परत घरांत घेईनात. तेव्हा हॉस्पिटलच्या डॉक्टरांनी तिला मुलासह आश्रमांत पाठवून दिलें. मुलगी नाका-डोळयाने नीटस स्वभावाने गरीब, राहणीने स्वच्छ आणि नीटनेटकी, मर्यादशील आणि हुषार आहे. तरुण असताहि सोडचिठी न मिळाल्यामुळे तिचें लग्न करतां येत नाही. आश्रमाने तुर्त तिला एका घरंदाज कुटुंबांत काम मिळवून दिलें आहे.

**टेलीफोनमधून**

एके दिवशीं सकाळीं एका पार्शी गृहस्थाने संस्थेचे एक ट्रस्टी शेठ वेलजी लखमसी यांना फोन केला— " ३ हिंदु मुलें, २ मुली व १ मुलगा, १ मुलगी ६ वर्षांची, दुसरी १० वर्षांची, मुलगा ३ वर्षांचा वरळीच्या एका चाळींत असहाय स्थितींत पडलेलीं आहेत. हिंदु नसलेला कोणी मनुष्य त्यांना घेऊन जात आहे. कृपा करून या मुलाच्या बाबतात कांही तरी करा." ताबडतोब आश्रमाच्या सेक्रेटरींना ही बातमी कळली. त्यांनी २ स्वयंसेवक पाठवून मुलाना ताब्यांत घेतलें. सर्वांत लहान मूल इतकें क्षीण झालें होतें कीं, आश्रमांत पोहोचण्यापूर्वीच मोटारीमध्ये त्याने 'राम' म्हटला. बाकीचीं २ मुलें आश्रमांत आहेत. बाप वारल्यावर आई मोलमजुरी करून पोरांचा सांभाळ करीत असे. पण दुर्दैवाने तीहि वारल्यामुळे मुलें उघडीं पडलीं ! आता आश्रमावांचून त्यांचा त्राता कोणी नाही.

**स्टेशनवर सांपडलेली मुलगी**

ही अस्पृश्याची १८ वर्षांची मुलगी. पुण्याकडील राहणारी. घरांत आई सख्खी, पण बाप सावत्र. फार हाल होऊं लागले. कामधंदा मिळविण्याकरिता कोणा ओळखीच्या माणसाबरोबर ती मुंबईला आली. पण लवकर काम मिळेना. तेव्हा तिला माटुंगा स्टेशनावर सोडून, आणणारा मनुष्य कोठे नाहीसा झाला. कर्मधर्मसंयोगाने माहीम हिंदुसभेच्या सेक्रेटरीने तिला पाहिले आणि आश्रमांत तिची रवानगी केली. आश्रमांत जवळ जवळ ती वर्षभर होती. आईबापाशीं पत्रव्यवहार केला; पण ते तिची वास्तपुस्त देखील करीनात. आश्रमाने महिना १०० रुपये प्राप्ति असलेल्या एका सुशिक्षित स्पृश्य माणसाबरोबर तिचा विवाह लावून दिला. हल्ली ती सुखांत आहे. आश्रमांतील राहाणीमुळे उच्च वर्गांत ती सहज शोभूं लागली.

**पिकेटिंग करणारी बाई**

साबरमती येथे राहणारें एक गुजराथी जोडपें. बायकोचें वय २८. पंधरा वर्षे दोघांनी सुखाने संसार केला. बायकोला छानछोकीने राहण्याची मोठी हौस. ही हौस नवरा ऐपतीप्रमाणे शक्य तितकी पुरवीत असे. पण पुढे त्याची नोकरी गेली. १९३० सालच्या चळवळींत दोघेहि दारूच्या दुकानावर पिकेटिंग करूं लागलीं. दारूच्या पिठ्याजवळ एक मुसलमान कसाई राहत होता. त्याने नवऱ्याशीं प्रथम परिचय वाढविला. त्याच्या घरीं याची ये-जा सुरू झाली. हळूहळू बायकोशींहि परिचय वाढूं लागला. तो मुसलमान या दोघांनाहि पिकेटिंगमध्ये मदत केल्यासारखें दाखवूं लागला. नवऱ्याला नोकरी नाही आणि बायको मोठी गुलहौशी हें परिचयाने त्याच्या लक्षांत आलें. त्यावरून सुंदर कपडा किंवा चांगली वस्तू तो त्यांच्या घरीं नित्य पाठवूं लागला. यामुळें बायको त्या मुसलमानाशीं अधिकच सलगीने वागूं लागली आणि याचें पर्यवसान ती शीलभ्रष्ट होण्यांत झालें. नवऱ्याच्या लक्षांत ही गोष्ट आली, पण त्याने एकदम डोकें फिरवून न घेतां समजुतीच्या गोष्टी सांगून तिला परावृत्त करण्याचा प्रयत्न केला; पण उपयोग झाला नाही. तेव्हा त्याने एके दिवशीं घरांतून बायकोला हालवून मुंबईला एका नातेवाइकाकडे आणून ठेविलें. पण येथूनहि तिने मुसलमानाशीं चोरून पत्रव्यवहार चालू ठेवला. त्यावरून एकदां तो तिला भेटावयाला मुंबईत आला. नवऱ्याला हें समजलें. तेव्हा कोठे तरी सुरक्षित जागीं ठेवण्याच्या उद्देशाने एके दिवशीं बायकोला त्याने आश्रमांत आणून ठेवलें. येथे कांही दिवस राहिल्यावर झालेली चूक कबूल करून नवऱ्याजवळ नीट राहण्याचें तिनें कबूल केलें. तेव्हा नवरा येऊन तिला घेऊन गेला. आश्रम सोडल्यावर हें जोडपें मधून मधून आश्रमाकडे येऊन आपलें ठीक चालल्याचें सांगत असे. या कथेपासून चाणाक्ष वाचक योग्य तो बोध घेतीलच.

**मांत्रिकाने बायको पळविली**

तंजावराकडे द्राविड ब्राह्मण जातींत जन्मलेली मुलगी. आईबाप मुखवस्तु. थोडेसें प्राथमिक शिक्षण झालेलें. वयाचे दहावे वर्षी लग्न झालें. नवरा पदवीधर असून नोकरीनिमित्त मुंबईत राहत असतो. नवराबायको संसार करूं लागलीं त्या वेळीं घरांत ४०-४५ वर्षांचा एक पोक्त गृहस्थ राहत होता. आपण साधु मांत्रिक आहों असें सांगून लोकांना तो औषधें, गंडा, दोरा देत असे. घरांत नवरा-बायकोवर हळूहळू त्याने ताबा चालविण्यास सुरुवात केली. एके दिवशीं नवऱ्याच्या गैरहजेरींत बायकोला भुरळ पाडून स्वारीने तिच्यासह पलायन केलें. जवळचे पैसे संपले. तेव्हा बाईच्या अंगावरील दागिने विकून हजार रुपये केले. प्रयागची यात्रा करून ते चित्रकूटला गेले. तेथे या बाईचें जुलमाने केशवपन करून त्याने तिला पुरुषाचा वेश दिला. कपाळाला त्रिपुंड्र व मुद्रा, अंगांत मुंडेछाट कुडतें

व वर छाटी अशा वेषांत यात्रेकरूंप्रमाणे तिला तो फिरवूं लागला. देवळांत किंवा धर्मशाळेंत राहवें, भजन करावें, भिक्षा मागावी आणि पुनः संशय येतो असें दिसतांच दुसऱ्या गांवचा रस्ता सुधारावा, असें चाललें होतें. मांत्रिक अघोर संप्रदायी होता. केव्हा केव्हा मुलीला रात्रीं स्मशानांत नेऊन तिच्याकडून जळत्या प्रेताला प्रदक्षिणा घालवीत असे. ती नाकबूल झाली किंवा भ्याली तर मारहाण करीत असे. असा ३ वर्षें प्रवास चालला होता. शेवटीं म्हैसूरकडे प्रकरण उघडकीस येऊन मांत्रिकास पोलिसांनी पकडलें. पोलिसांनी नवऱ्याचा शोध करून मांत्रिकावर खटला भरला. खटला संपेपर्यंत बाई आश्रमांतच होती. तिचे अंगावर मारहाणीच्या जखमांचे वण तिने दाखविले. खटल्याचा निकाल होऊन मांत्रिकाला शिक्षा झाल्यावर बायको नवऱ्याकडे नांदावयास गेली.

# जगांतील नवीन महायुद्ध

युरोपांत चौदा वर्षांपूर्वी संपलें तें जगाच्या स्मरणांतील फार मोठें युद्ध, म्हणून त्याला महायुद्ध म्हणतात. परंतु त्या महायुद्धाचा पायगुण असा आहे कीं तें स्वतः समाप्त झालें तरी त्याने सुरू करून दिलेलें दुसरें महायुद्ध जगांत केवढे अनर्थ घडवून आणील याची कल्पनाहि करवत नाही. सदर युद्ध वाढत वाढत गेल्या तीनचार वर्षांत त्याचा प्रभाव फारच भयंकर दिसूं लागला आहे. या महायुद्धाचें क्षेत्रहि अतिशय विस्तीर्ण आहे. पूर्वीचें युद्ध युरोपांत सुरू झालें व युरोपांतच संपलें. पण हें युद्ध युरोपाबाहेरील जगांत सुरू होऊन युरोपांत संपणार आहे. महायुद्धापूर्वी सबंध युरोप खंड एका बाजूला व जग दुसऱ्या बाजूला अशी स्थिति होती. पण महायुद्धांत युरोपांतील इंग्लंड, फ्रान्स, रशिया, इटालीप्रभृति देश एका बाजूला आणि जर्मनी, ऑस्ट्रिया, हंगेरी, तुर्कस्थानप्रभृति देश दुसऱ्या बाजूला अशी दुफळी पडून जें रणकंदन माजलें त्यामुळे युरोपांत एकदां पेटलेला हा कलहाग्नि साऱ्या युरोप खंडाची होळी केल्यावांचून विझेल अशीं चिन्हें दिसत नाहीत.

पंधरा–वीस वर्षांपूर्वी युरोप खंड सर्वभक्षक होतें आणि आशिया, आफ्रिका इत्यादि खंडें त्याचीं भक्ष्य होतीं. या खंडांना जिंकून व लुटून युरोप खंडाचें प्रचंड पोट जोंपर्यंत भरत होतें तोंपर्यंत युरोपांत एकजूट दिसत होती. पण दिवसेंदिवस आशिया व आफ्रिका या खंडांतील खाद्य युरोपच्या वाढत्या पोटास पुरेनासें झाल्यामुळे युरोपची जूट महायुद्धाच्या काळांत उघडपणें मोडली व गृहकलहास सुरुवात झाली. गृहकलह हा नेहमींच अनर्थावह असतो. त्याच्या योगाने भांडखोरांचें मूळचें सामर्थ्य कितीहि मोठें असलें तरी तें आपसांत लढून संपतें व त्यांचा परकीयांना धाक वाटेनासा होतो. युरोप खंडाने परवापर्यंत साऱ्या जगाला चळचळा कापावयास लावलें होतें. पण अलीकडे त्याचीं घरचींच भांडणें इतकीं चिघळलीं आहेत कीं त्यांपुढे इतर जगाकडे लक्ष देण्यास त्याला फुरसतच राहिली नाही. चीन देशांत गेल्या सहा–सात महिन्यांत जपानाने आपलें किती तरी प्रस्थ माजविलें, मांच्यूरिया प्रांत घशांत टाकला. तरी चिनांत हितसंबंध असलेलीं सारीं बडीं बडीं युरोपियन राष्ट्रें नुसतीं दुरून गुरकावीत राहिलीं. त्यांनी राष्ट्रसंघामार्फत जपानाला पोकळ धमक्या दिल्या; पण त्या धमक्यांत कांही धमक नाही हें युरोप खंडाचें पाणी जोखलेल्या जपानास माहीत असल्यामुळे जपानाने इकडे तिकडे न पाहता चीनचे घास गिळण्याचें काम अव्याहत सुरूच ठेवलें आहे.

पूर्वीच्या महायुद्धांत युरोपच्या दोन फळ्या पडून एक फळी दुसऱ्या फळीशीं लढत होती. पण या नव्या महायुद्धांत युरोपांत दोन फळ्या न राहतां युरोपचे जितके देश तितक्या फळ्या पडल्या असून त्या आपसांत निकराने लढत आहेत. युद्धांत आत्मसंरक्षण आणि पराक्रम या दोहोंवर सारखें लक्ष ठेवावें लागतें. गड, कोट व किल्ले बांधून परचक्रापासून आपला बचाव करणें आणि तोफा डागून, चर खणून, मशीनगन्स चालवून व विमानांतून बॉंब गोळे फेकून शत्रूची व शत्रूच्या मुलखाची दाणादाण उडविणे ही लढाईची दुहेरी रीत आहे. या रीतींत महायुद्धाच्या काळांत पुष्कळच सुधारणा झाली यांत शंका नाही. पण महायुद्ध झालें तरी तें चौदा वर्षांपूर्वीचें जुनें. त्यानंतरच्या काळांत युद्धकलेंत कित्येक नवनवे फेरफार घडून आले आहेत. तोंपर्यंत किल्ले व तट मर्यादित असत. बेलजममधील लीज व नामूर हे किल्ले फार अजस्र समजण्यांत येत. असले किल्ले झाले तरी चार-पांच मैल परिघाचे व शहरासभोंवार उभे केलेले तट वीस–पंचवीस मैल लांबीचे. पण या नव्या महायुद्धासाठी बांधलेले किल्ले व तट सारा देशचा देश व्यापून टाकीत आहेत. पूर्वीच्या तटबंदीला चुना, दगड व विटा यांवर लक्षावधि रुपये खर्चावे लागत; पण या नव्या तटबंदीला तितका खर्च येत नाही, इतकेंच नव्हे तर ही बांधलेली तटबंदी नुसत्या डोळ्यांनीच काय पण दुर्बिणीनेहि दिसण्यासारखी नाही.

तथापि शत्रूच्या तोफांतून सुटणारे गोळे थोपवून धरण्याचें सामर्थ्य त्यांत जुन्या तटबंदीपेक्षां निःसंशय जास्ती असतें. नव्या तटबंदीची ही नवी करामत पाहून तोफांनी व तोफांतून सुटणाऱ्या गोळ्यांनीहि आपला आकार व आपल्यांतील स्फोटक द्रव्याचे गुणधर्म अजीबात बदलले आहेत. तोफखान्याचें काम कारखान्यांनी आपल्याकडे घेतलें आहे व त्यांतील गोळ्यांनी सोरा, गंधक या ज्वालाग्राही पदार्थांचा त्याग करून कापड—कागदासारख्या सौम्य वस्तूंचीं रूपें धारण केलीं आहेत. या वस्तु परदेशाभोंवतीं उभारलेल्या जकातीच्या तटबंदीला दाद न देता परदेशांत बॉंब गोळ्याप्रमाणे अचानक जाऊन पडतात व सर्वत्र नासधूस मांडतात. शत्रूचा प्रत्यक्ष जीव घेणें ही क्रिया जुन्या पद्धतींत फार महत्त्वाची समजली जात होती. पण नवीन काळांत युद्धसाधनाप्रमाणें युद्धनीतींतहि मोठा फरक घडून आला आहे. या नव्या युद्धांत फेकलेल्या गोळ्यांना शत्रूचा जीव घेण्याची जबाबदारी पत्करावी लागत नाहीं. त्यांनी जीव घेण्यापेक्षां शत्रूचा जीव जाण्याची जोखीम ज्याची त्या राष्ट्रावरच पडत असली तर त्याहून युद्ध्यमान राष्ट्रास अधिक भूषणावह व श्रेयस्कर दुसरें काय आहे?

कापड, कागद, साखर, साबण, सिगार, सिगारेट आणि चिरूट, बिस्कीट या जिनसा चैनीने खाण्याच्या व मिजासीने वापरण्याच्या आहेत. पण त्या खाऊन व वापरून एक मनुष्य सुदृढ व सुंदर दिसत असता त्याच्या शेजारचीं दहा माणसें झिजून व झुरून मरावीं ही कला पांडवांच्या सैन्यांतील घटोत्कचाच्या मायेला देखील साधली नाहीं. वरील माणसें ताबडतोब मेल्याने त्यांच्या हत्येचें पाप शत्रुराष्ट्राला लागलें तरी त्या देशाचा भूभार हरण होऊन परिणामीं त्या देशास तें हितप्रदच ठरेल. तथापि असें झाल्यास शत्रुराष्ट्राची सुधारणेच्या व कल्पकतेच्या दृष्टीने बहादुरी ती काय उरली? म्हणून या व्यापारी युद्धांत मनुष्यांचा कामधंदा काढून घेऊन त्यांना जिवंत ठेवण्यांत येतें व त्यांच्या पोषणाची जबाबदारी राष्ट्रावर पडून त्या भाराखाली सदर राष्ट्र चिरडून जातें. अशा प्रकारच्या अद्भुत संकटांत सांपडल्यामुळे युरोपियन राष्ट्रांना अल्पावकाशांत टांचा घाशीत मरावें लागणार असा संभव दिसतो.

इंग्लंड, फ्रान्स, अमेरिका व आशियांतील देशांपैकीं जपान हीं राष्ट्रें उद्योगधंद्यांत अत्यंत भरभराटीस पोंचलीं असल्याचा त्यांचा लौकिक आहे. त्यांनी आपल्या घरावर सोन्याचीं कौलेंच तेवढी घालण्याचीं ठेवलीं आहेत. त्या देशांतील मजूर जे ऐषआराम भोगतात ते हिंदुस्थानांत सामान्यतः श्रीमान समजल्या जाणाऱ्या लोकांच्या वांट्यासहि येत नाहींत. मजुरापासून अमिरापर्यंत प्रत्येकजण आपल्या गरजा वाढवून बसला आहे. अमेरिकन लोकांच्या गरजा इतक्या वाढल्या आहेत कीं दरमहा एक हजार रुपयांची ज्यांची प्राप्ति नाहीं त्यांना अविवाहित स्थितींतून बाहेर पडतां येत नाहीं असें म्हणतात. ही गोष्ट ओळखीच्या शब्दांनी सांगावयाची झाल्यास एक माणूस पांच—पांच दहादहा माणसांस साध्या राहणींत पुरणारी संपत्ति स्वतःकरिता राखून ठेवतो असें म्हणावें लागेल. सुधारलेल्या पाश्चात्य देशांत अशीं माणसें कोटींनी मोजण्याइतकीं असल्याने तितक्या माणसांनी आपल्याभोंवतालच्या पांचपट किंवा दसपट माणसांचें अन्न तोडल्यासारखें झालें आहे.

असें आहे तर यापूर्वी युरोपांतील मोठ्या राष्ट्रांतून खालपासून वरपर्यंत सर्व लोकांचें आयुष्य ज्याच्या त्याच्या योग्यतेप्रमाणे ऐटींत चाललें कसें? याचें उत्तर फारसें कठिण नाहीं. आशिया, आफ्रिका यांतील सर्व देश आणि युरोप व अमेरिका यांतील कांहीं देश यांजपासून व्यापाररूपाने संपत्ति लुबाडून ते सुखी होत असत. परंतु युरोपांत जीं राष्ट्रें कारखानदारी करीत नव्हतीं तीं अलीकडे करूं लागलीं, ब्रिटिशांच्या कानडा, आफ्रिका, ऑस्ट्रेलिया इत्यादि वसाहतीहि कच्चा माल उत्पन्न करून स्वस्थ न बसता उद्योगधंद्याच्या क्षेत्रांत उतरल्या आणि आशियांतील जपान, चीन, हिंदुस्थान हे देश युरोप खंडाचें गिऱ्हाईक न राहतां कमीअधिक प्रमाणांत कारखानदार बनत चालले त्यामुळे सातशें लष्कर व नऊशें न्हावी अशी जगाची स्थिति होऊन कारखानदारांचा माल खपेनासा झाल्यामुळे त्यांनी आपले धंदे बंद ठेवले व आपल्या कामगारांना निरोप दिला. इंग्लंडांत अशा बेकारांची संख्या सुमारे ३० लाख आहे. जर्मनीचें साम्राज्य महायुद्धांत रसातळास गेल्यापासून त्या राष्ट्रास फ्रान्स-इंग्लंड प्रभृतींची अब्जावधि पौंडांची खंडणी फेडण्याकरिता व स्वतःचें पोट भरण्याकरिता उद्योगधंद्यावरच भिस्त ठेवणें भाग पडलें आहे.

जर्मनी कारखानदारीच्या बाबतींत सर्व पाश्चात्य राष्ट्रांचा अग्रेसर, पण त्याच जर्मनींतील कारखानादारांनी धंदा चालत नसल्यामुळे गेल्या मे महिन्यांत साठ लाख लोकांस घरीं स्वस्थ बसण्यास सांगितलें. जर्मनींत सामान्यतः पगारी नोकर व मजूर यांची संख्या १ कोटी ८० लक्ष धरली जाते. त्यांच्याशीं वरील बेकारांचें प्रमाण तिन्हीस एक असें पडतें. नोकर किंवा मजूर म्हटला कीं तो स्वतःच्या मिळकतीवर स्वतःचें पोट भरतोच; पण त्याशिवाय स्वतःच्या बायका मुलांचाहि पोशिंदा तोच असतो. त्यांची संख्या जमेस धरल्यास ती कोटी सव्वाकोटीवर जाऊन जर्मनींतील सात कोटी लोकवस्तीपैकीं एकषष्ठांश लोकवस्ती अन्नास मोताद झाली

असल्याचें हिशेबावरून सिद्ध होतें. अशा रीतीने जे लोक अन्नास मोताद झाले त्यांच्या पोटास देण्याचें पाश्चात्य राष्ट्रें आपलें कर्तव्य समजतात. पण त्यांस पोसण्याची शक्ति जर्मन सरकारांत सध्याच्या बिकट परिस्थितींत राहिली नसल्यामुळे जर्मनींत आज जिकडे तिकडे दंगे व हाणामाऱ्या माजून राहिल्या आहेत. यावर निरनिराळ्या युक्त्या सुचविण्यांत येत आहेत. त्यांपैकीं एक युक्ति अशी कीं, कामावरील लोकांचे आठवड्याचे तास कमी करून ते चाळीस ठेवावे व तें काम बेकारांना वांटून देऊन त्यांच्या एक वेळच्या अन्नाची तरी सोय लावावी. तें न जमल्यास सगळ्यांनाच अर्धे बेकार व अर्धे कामगार बनवून समदुःखी करावें. या सुमारास कोणा तरी श्रद्धाळू हिंदु गृहस्थाने जर्मनींत जाऊन एकादशी, शिवरात्र, प्रदोष, संकष्टी इत्यादि उपवासांचें धर्मदृष्ट्या महत्त्व काय आहे हें तेथील जडवादी जनतेस समजून सांगावें! अनायासेंच चातुर्मास्य इकडे सुरू झालें आहे. त्यांत हिंदु लोक अनेक उपोषणें व व्रतवैकल्यें आचरतात. त्यांपासून पुण्यसंचय होतो हें तत्त्व जडवादी बनलेल्या जर्मन लोकांच्या मनावर बिंबविण्याची वेळ हीच आहे!

महायुद्धापासून जर्मन राष्ट्र खालावलेलें व दरिद्री ठरलेलें आहे. त्या काळांत जर कोणाचें उखळ पांढरें झालें असलें तर तें अमेरिकेचें. अमेरिकेसारखा धनकनकसंपन्न देश पृथ्वीच्या पाठीवर आज दुसरा नाही. जगांतील बहुतेक सगळें सोनें अमेरिका म्हणजे संयुक्त संस्थानें व फ्रान्स यांनीच सांठवून ठेवलें आहे. पण अशा या अमेरिकन राष्ट्राची बेकारीने मति गुंग केल्याचें ऐकून कोणासहि चमत्कार वाटल्यावांचून राहणार नाही. अमेरिकेंत कोट सव्वाकोट लोक रिकामे आहेत. त्यांना पोटाला घालण्याचा पत्कर अमेरिकन सरकाराने घेतला नसल्याने त्यांपैकीं पुष्कळांना मोठमोठ्या शहरांत रस्त्यांतून भीक मागत हिंडावें लागत आहे. न्यूयॉर्क व शिकागो या शहरीं चौदा लक्ष लोक धनिकांच्या धर्मादायावर पोट भरीत आहेत. शेतकऱ्यांना शेतसारा भरण्यास पैसा नसल्यामुळे ते जमिनी विकून टाकीत आहेत. मध्यम वर्गाला बेकारीचा तडाखा जबर बसला आहे. त्या वर्गांतील कारकुनी व कारागिरी करून राहणाऱ्या लोकांपाशीं सध्याच्या बेकारीच्या दिवसांत घरभाडें भरण्यापुरताहि पैसा राहिला नाही. हजारों विद्यार्थ्यांनी गरिबीमुळे कॉलेजें सोडलीं आहेत व श्रीमंतांनीहि चाळीस चाळीस मजली इमल्यांचीं प्रचंड कामें बंद ठेवलीं आहेत.

महायुद्धापूर्वी जीं पाश्चात्य राष्ट्रें आपसांत व्यापारी चुरस किंवा मत्सर उत्पन्न होऊं न देतां एकजुटीने वागल्याप्रमाणें तऱ्हेतऱ्हेचा पक्का माल बनवून पौर्वात्य देशांत पाठवीत असत, तींच राष्ट्रें पूर्वीची स्वाभाविक व्यवस्था मोडून टाकून परस्परांचें शत्रुत्व करूं लागलीं आहेत. एकाच जातीचा माल अनेक युरोपियन राष्ट्रें उत्पन्न करूं लागलीं असून त्यांनी एकमेकांचा माल बाहेरच्या बाहेर तटवून धरण्याकरिता आपल्या देशाभोवती संरक्षक जकातीचे भरभक्कम तट उभारले आहेत. तरी त्या तटावरून ती एकमेकांच्या गोटांत तोफांचे गोळे टाकीतच आहेत. वर सांगितलेले बेकार लोक हे युद्धांत मृत्युपंथास लागलेले सैनिक होत. जगांतील औद्योगिक प्रगतीचा विचार करता युरोपियन राष्ट्रांना पूर्वीसारखे बरे दिवस येतील अशी आशा बाळगावयास नको. विशिष्ट जातीच्या जिनसाखेरीज करून बाकीच्या जिनसा ज्या त्या राष्ट्राने स्वतःपुरत्या बनवाव्या व स्वतःच संपवाव्या असा काळ आता प्राप्त होत असल्याने युरोपची श्रीमंती, ऐश्वर्य व वैभव इतःपर क्रमशः कलेकलेने मावळत जाणार ही गोष्ट ठरल्यासारखी आहे.

पाश्चात्य राष्ट्रें आज औद्योगिक उन्नतीच्या शिखरावर आहेत आणि हिंदुस्थान देश अद्यापि तान्ह्या मुलाप्रमाणें तिच्या पायथ्याशीं रांगत आहे. अशा बाल्यावस्थेंत त्याच्या संरक्षणासाठी फारच उंच व मजबूत भिंती उभारावयास पाहिजेत. इतकेंच नव्हे तर त्याला पौष्टिक अन्न खाऊं घालून सशक्त व सुदृढ बनविलें पाहिजे. पण या पोरक्या बालकाचें इतक्या कळकळीने रक्षण व पोषण करणार कोण? इंग्रज सरकाराने अलीकडे टॅरिफ बोर्डाच्या शिफारशींवरून कापड, साखर इ. परदेशांतून येणाऱ्या मालावर संरक्षक जकाती बसविल्या आहेत. परंतु त्या भिंती अगदींच ठेंगण्या असल्यामुळे पाश्चात्य देश व जपान यांनी त्यांवरून आवेशपूर्वक मारगिरी चालविली आहे. हिंदुस्थानापासून फार दूर असलेल्या पाश्चात्य देशांतून सुटणारे गोळे देशी उद्योगधंद्यांची जितकी होळी करीत आहेत त्यापेक्षां जपानकडून होणारी हानि अतिशय भयप्रद आहे. त्याने मूळ किमतीपेक्षांहि स्वस्त दराने आपला माल हिंदुस्थानांत विकून हिंदी कारखानदारीची धूळधाण मांडली आहे.

जपानचे उद्योगधंदे हिंदुस्थानाच्या मानाने पुष्कळच सुधारलेले व अत्यंत काटकसरीने चालविलेले आहेत. त्याने हिंदुस्थानाशीं व्यापारी युद्ध पुकारल्यास हिंदुस्थानाची त्याच्यापुढे मुळीच धडगत लागावयाची नाही. पाश्चात्य राष्ट्रें जपानाइतकींच युद्धकलेंत तरबेज असल्यामुळे जपान त्यांच्या राशीस फारसा न लागता सांप्रत असमर्थ व असंरक्षणक्षम अशा हिंदुस्थानाच्या राशीस लागला आहे. हिंदुस्थानांत थोडेसे धंदे आता कोठे चलनवलन करण्याच्या प्रथमावस्थेंत आहेत. त्यांची शक्ति वाढण्यापूर्वींच त्यांचा प्राण घेण्याची जपानाने शिकस्त चालविली आहे. जपानाने त्याला ज्या

किमतीस माल तयार होऊन पडतो, त्याहूनहि कमी दराने तो हिंदुस्थानांत विकण्यापर्यंत प्रयत्नांची मजल आणिली आहे; व खेरीज त्याने आपल्या येन नाण्याची किंमत मुद्दाम कमी केल्यामुळे त्याच्या मालाचा भाव हिंदुस्थानांत अधिकच उतरला आहे.

शस्त्रास्त्रांनीं माणसांना मारण्याची विद्या नवी नाही. पण शस्त्रास्त्राइतक्या व्यापारी जिनसाहि मनुष्यवधास पर्यायाने उपयोगी पडतात, ही कल्पना हिंदी लोकांना तरी अद्‌भुत व अजब वाटण्याजोगी आहे. जपान हिंदुस्थानच्या अंगावर आपलीं सीमेंटचीं पिपें व रंगाच्या पेट्या फेकून मारीत आहे. या मारगिरींत कोणत्या जिनसांचा चोप बसेल याचा मुळीच नेम सांगवत नाही. सभ्य माणसें आधी आपसांत मारामारी करावयाचीं नाहींत. त्यांतून तितकीं संतापलींच तर नुसते हात व हातच्या मुठी व हातांतली काठी यांजवरच आपली भांडण्याची ऊर्मी भागवितील. पण तीं पायांतला जोडा खात्रीने हातांत घेणार नाहींत! पण जपानाने तितकाहि सभ्यपणा ठेवला नाही! त्याने हिंदुस्थानाला पायांतले जुने जोडे नसले तरी हातांनी किंवा यंत्रावर शिवलेले नवे जोडे मारण्यास सुरुवात केली आहे. त्यामुळे कापडाच्या गिरणीवाल्यापासून तों तहत स्वदेशी पादत्राणें विकणाऱ्या मोच्यापर्यंत सर्व धंदेवाले जपानाविरुद्ध ओरडत उठले आहेत. जमशेटपूर येथील पोलादाच्या कारखान्याचे मालक टाटा हेहि असाच टाहो फोडीत आहेत. फ्रान्स, जर्मनी, अमेरिका इत्यादि पाश्चात्य राष्ट्रांतून येणाऱ्या लोखंडापुढे व पोलादापुढे टाटाचा कारखानाहि डबघाईस आला आहे. युरोपियन राष्ट्रें आपसांत व्यापारी युद्ध लढून केव्हा जमीनदोस्त होतील तीं होवोत, पण तूर्त हिंदुस्थानासारख्या दुर्बल देशाचे सर्वांच्या आधी मरण ओढवलें असून त्याला वांचविण्याची जबाबदारी मुख्यतः हिंदुस्थानसरकारावरच आहे. हिंदुस्थानसरकाराकडे या बाबतींत काळ्या-गोऱ्या कारखानदारांनी आपलें शिष्टमंडळ नेऊन जीवदान मागितलें आहे, व सरकारानेहि त्यांना सहानुभूति दाखविली आहे. तिचा काय उपयोग होतो पाहावें.

# खंडणी, नुकसानभरपाई, कर्जफेड

### दोस्त राष्ट्रांची टांगती तलवार!

लॉसेन येथे जो प्रश्न निकालांत निघाला तो फक्त जर्मनीकडून वसूल करण्याच्या खंडणीचा. वास्तविक त्याला खंडणी हें नांव नसून नुकसानभरपाई हें नांव आहे. खंडणी म्हणजे दंड; शिक्षेदाखल बसविलेला भुर्दंड. व शिक्षा कां तर निष्कारण युद्ध सुरू करण्याचा गुन्हा जर्मनीच्या हातून घडला म्हणून. व्हर्साइल येथे तह झाला, त्यांत युद्धाचा दोष जर्मनीवर विजयी राष्ट्रांनी लादल्याचें कलम आहे. जित व जेते या दोघांच्या सहीने एखादा तह झाला तरी त्यांत जेत्यांचेंच म्हणणें त्यांच्या शब्दांनी नमूद असावयाचें. तीच गोष्ट या तहासंबंधानें घडलेली आहे. वास्तविक स्वर्गांतून उतरलेला एखादा न्यायाधीशच येऊन त्याने चौकशी करून महायुद्धांतील दोष खरा कोणाकडे हें ठरविणें शक्य आहे. परंतु तें कसें होणार? हातांत नागव्या तलवारी धरून उभ्या असणाऱ्या विजयी राष्ट्रांनी तहाचे शब्द लिहिले. जर्मनीच्या डोक्यावर नागवी तलवार टांगलेली आहे.एका शब्दाबरोबर किंवा खुणेबरोबर ती कपाळमोक्ष करील. अशा स्थितींत असलेल्या जर्मनीने त्या तहावर सही केली. पण विजयी राष्ट्रांनी तहांत दंडादाखल खंडणी असे शब्द न घालतां नुकसानभरपाई असे सोज्वळ शब्द घातले आहेत; पण त्यामुळे खरें स्वरूप थोडेंच झांकून राहतें? नुकसानभरपाई म्हटली म्हणजे त्याला न्यायाचें स्वरूप येतें. मग तिचा आंकडा किती कां मोठा असेना. ज्या त्या विजयी राष्ट्राने आपल्या नुकसानीची यादी १३ वर्षांपूर्वी व्हर्साईल येथे झालेल्या तहाचे वेळीं पुढे केली व एक विजयी राष्ट्र आपल्या दुसऱ्या सोबती विजयी राष्ट्राला हरकत कशी घेणार? यामुळे सर्व याद्या तेव्हा दाखल करून घेण्यांत आल्या. १९२१च्या एप्रिलांत नुकसानभरपाई कमिटीने जर्मनीकडून मिळण्याची रक्कम १३२०० कोटी मार्क्स किंवा ६६० कोटी पौंड इतकी ठरविली. सुमारे ५० वर्षांपूर्वी जर्मनीने फ्रान्सवर विजय मिळविला, तेव्हा जर्मनीने फ्रान्सवर लादलेली नुकसानभरपाईची रक्कम याच्या चौथ्या पांचव्या हिश्शानेहि नव्हती. पण या युद्धांत एकटा फ्रान्स सामील नसून बेलजियम, इंग्लंड, अमेरिका वगैरे इतर अनेक राष्ट्रें सामील असल्यामुळे व युध्द तीन वर्षे चालू असल्यामुळे नुकसानभरपाईची रक्कम सहजच वाढली, व ती अधिक वाढविण्याला दोस्त राष्ट्रांना सबब सांपडली. पण नुकसानभरपाईच्या दंडाचीं रक्कम जर्मनीवर लादणें जितकें सोपें होतें, तितकेंच ती त्यापासून वसूल करणें कठिण झालें.

### खंडणीची वांटणी

सर्व रक्कम एकदम वसूल करण्याची तर गोष्टच बोला-

वयास नको, पण वार्षिक हप्तादेखील एवढा मोठा बसला कीं, पहिल्या १२ वर्षांतच जर्मनीला तो देतां येईनासा झाला. आणि अशीं वर्षे अगदीं सौम्य हिशेबाप्रमाणें १९६० पर्यंत जावयाचीं असें ठरलें. परंतु तीं जाणार कशीं? प्रथम कांही वर्षे फ्रान्सने असा बहाणा केला कीं, जर्मनी मुद्दाम होऊन विजयी राष्ट्रांना बुडविण्याच्या हेतूने हप्ते पुरे करण्याचें टाळीत आहे; अर्थात् त्यावर जरब बसविली पाहिजे, व ती जरब फ्रेंच सैन्य जर्मन मुलखांत बसवून ठेवल्याशिवाय जर्मनीला भासणार नाही. पण या सैन्याचा खर्च फिरून जर्मनीवरच. यामुळे जर्मनीने दिलेले कांही पहिले हप्ते या सैन्याच्या खर्चांतच फ्रान्सने जिरविले. कर्जदारांच्या वसुलीकरिता भय्या किंवा पठाण बसवावा आणि कर्जदाराने दिलेला हप्ता या तगादेवाल्यानें खाऊन टाकावा म्हणजे मग कर्जफेड होतेच कशाला? १९६० नाही १९९९ पर्यंत मुदत दिली तरी हेंच चालावयाचें. पण जर्मनीप्रमाणें इतर राष्ट्रांनाहि हप्ते मिळवावयाचें होते. ते मिळेनातसे झाले तेव्हा इतर राष्ट्रांनी हें तगादेदार सैन्य फ्रान्सकडून उठविलें. तेव्हापासून त्यांना हप्त्यांत थोडथोडी वाटणी मिळू तरी लागली. परंतु खऱ्या कर्जफेडीला हातच लागेना. जर्मनी हा पैसा आणणार कोठून ? त्याच्या भूमींत सोन्याच्या खाणी नव्हत्या किंवा शिलकी सांठविलेलें सोनेंहि नव्हतें. जर्मनी आपल्यापरीने श्रीमंत असला तरी देशांतील धनोत्पादक धंदे करून प्रजेने पैसा मिळवावा, त्याचा ठराविक अंश कराच्या रूपाने तिने सरकाराला द्यावा व त्या सरकाराने त्या पैशांतून आपल्या कारभाराचा खर्च भागवून काटकसरीने पैसा उरवून त्यांतून कर्जफेड करावी; याशिवाय दुसरा मार्ग नव्हता. पण जो पैसा उरविला व दिला तो परराष्ट्रांच्या पदरांत फुकट ओतावयाचा, म्हणजे त्याला मोबदला कांही एक मिळावयाचा नाही. असा बुडित व्यवहार चालण्याला मर्यादा पडणारच. ती लवकरच पडली.

## जर्मनीचा कर्जबाजारीपणा

जर्मन सरकाराने खर्चाची काटकसर इतकी केली कीं, अंगावरचें सगळें मांस खरडून निघालें व हाडें खरडून निघत नाहीत म्हणूनच थांबलीं. धनोत्पादक धंदे पैशाच्या उलाढालीवर चालतात. वस्तु उत्पन्न करण्यावर घातलेला पैसा जर कोणत्याहि रूपाने परत न येता कर्जाच्या हप्त्यांतच जाऊं लागला तर धंदेवाले दरवेळा नवीन भांडवल कुठलें घालणार, व मजुरांचे मजुरीचे दर कमी करून तरी किती व्याज भरणार? तितक्यांतूनहि जर्मनीच्या राष्ट्रीय नाण्याची किंमत कमी झाली यामुळेंहि परदेशी माल पाठविणाऱ्या कारखानदारांचें नुकसान अधिक होऊं लागलें; व त्यांना प्रमाणाबाहेर माल परदेशीं पाठवावा लागला. पण त्यांतहि पुन्हा बखेडा आपोआप असा निर्माण झाला कीं, जर्मनीकडून पुष्कळ माल स्वस्त दराने विजयी राष्ट्रांत जाऊं लागल्यामुळे त्या राष्ट्रांतील कारखानदारांना आपले मालाचे दर कमी करावे लागले. म्हणजे नुकसानभरपाईचा पैसा रोख येऊं शकत नाही म्हणून जर्मनीचा माल स्वीकारावयाचा, व त्या मालाच्या पुरांत देशी कारखाने बुडावयाचे हा क्रम टाळण्याकरिता या राष्ट्रांनी आपल्या सरहद्दीवर जबर जकाती बसविल्या. या जकातींमुळे विजयी राष्ट्रांतील उद्योगधंद्यांना थोडेंबहुत संरक्षण मिळालें असेल हें खरें, पण जर्मनीवर त्याचा वाईट परिणाम झाला. आधाच आंतडीं पिळवटून, काटकसर करून, मजुरीचे दर छाटून माल तयार करून पाठवावा व या जबर जकातीमुळे त्याची किंमत चढून महाग झाल्यामुळे परदेशांत विकूं नये अशी स्थिति झाली. शेवटीं हाहि उपाय फुकट गेलेला पाहून जर्मनीला केवळ वार्षिक हप्ते भरतां यावेत म्हणून रोखीने कर्जे याच राष्ट्रांकडून काढावीं लागलीं.

## कमिटयांचीं अनुष्ठानें

सावकाराच्या कर्जफेडीचा हप्ता देण्याकरिता स्वतःजवळ पैसा नाही म्हणून त्याच सावकाराकडून पुनः कर्ज काढावयाचें अशीहि स्थिति फलप्रद तर नव्हेच पण उघड उघड हास्यास्पद ठरली; जर्मनीच्या नांवावर कर्ज दिलें व हप्ता फेडून घेतला, अशा हिशोबाने प्रत्यक्ष कर्जफेड तर झाली नाहीच; पण जर्मनीच्या नांवावर कर्जाची बाकी मात्र अधिकाधिक फुगत चालली. तेव्हा विजयी राष्ट्रांचे डोळे उघडले व यांतून कांही तरी मार्ग काढला पाहिजे असें त्यांना वाटूं लागलें. पण मुळांत जर्मनीला अधिक द्रव्योत्पादन करतां येणेच अशक्य, तर कर्जफेडीच्या योजना आलटून पालटून कितीहि केल्या तरी काय उपयोग ? १९२१ पासून १९२९ पर्यंत ८ वर्षांत या कर्जफेडीच्या विचाराकरिता कमींत कमी ३५ कमिटया किंवा परिषदा बसल्या. पण खरी तोड अशी कांहीच निघेना. कोणी नुकसानभरपाईचा हिशेब पुनः एकदा करून रक्कम कांही ऐनजिनशी कमी होते का पाहिली. कोणी हप्ते लहान करून मुदत वाढवून पाहिली. कोणी हप्त्यांतच दोन प्रकार करून पाहिले. एक प्रकार जर्मनीने सालोसाल रक्कम बिनशर्त मोजण्याचा व दुसरा प्रकार वरील रक्कम दिल्यावर दुसरी काही रक्कम विशेष परिस्थिति असेल त्याप्रमाणें देण्याची किंवा न देण्याची असें ठरविण्याचा; पण मूळ आडांतच पाणी नसेल तर घागर सोडून पाहिली, बादली सोडून पाहिली तरी काय फरक पडणार? गाईच्या कासेंत दूधच नसेल तर आलटून पालटून

**सज हातांत धरून पिळल्याने दूध कसें निघणार?**
**जर्मनी तरला तरच युरोपियन राष्ट्रें तरणार !**

अखेर जर्मनी तर कर्जबाजारीच्या मरणाच्या दारीं बसलाच; पण त्याबरोबर आपलाहि नाश होऊं नये असें विजयी राष्ट्रांना वाटूं लागलें. तेव्हा विशेष कांही करावें अशी सुबुद्धि त्यांना सुचली. कर्जफेडीचा हप्ता बुडाला तरी चालेल; पण त्या फेडीकरिता जर्मनीचा माल घरात घेणें नको. कर्ज न फिटल्याने आपण भिकारी होत नाही; पण कर्जफेडीकरिता येणाऱ्या मालाने आपले धंदे एकदां बसविले म्हणजे ते पुनः आपल्या पायावर उभे राहाणार नाहीत अशी या राष्ट्रांची खात्री होऊन चुकली. यामुळेच लॅासेन येथील परिषद पूर्वीच्या सर्व परिषदांहून अधिक यशस्वी झाली. जर्मनीला कर्जाच्या पायीं पुष्कळ सूट मिळाली, हप्ते हलके बसले व कर्जफेड करून आपण या दलदलींतून कसे तरी कां होईना पण जिवंत बाहेर पडूं असें जर्मनीला आता वाटतें आणि तो या दलदलींतून बाहेर पडणार म्हणजे इतर राष्ट्रें वांचणार. कारण या कर्जाच्या साखळदंडाने हीं राष्ट्रें व जर्मनी हीं घट्ट बांधलीं गेलीं होतीं, म्हणून जर्मनी बुडला तर तींहि त्यांचेबरोबर बुडणार व तो तरला तर तींहि तरणार असा आशाप्रद प्रसंग दिसूं लागला आहे. कर्जफेड आपल्याला घातुक होते म्हणून सावकारानेच आपण होऊन तिची पावती द्यावी ही गोष्ट दिसण्यांत मोठी चमत्कारिक दिसते, पण ती तशी युरोपांत घडली खरी.

# कंगालांचा दंगा राजसत्तेला भोवला

सध्या सारें जग आर्थिक आपत्तीच्या चरकांत अडकलें आहे. चरकाचे बैल जसजसे एक एक वळण पुरे करतात; तसतसा चरकांतील ऊंस पुढें पुढें सरतो, तो जास्त जास्त पिळून निघतो आणि दुसऱ्या बाजूला पडणाऱ्या चिपाडांचा ढीग उंचउंच होतो. त्याप्रमाणे राजकीय महत्त्वाकांक्षा व व्यापारी लोभ यांचे वेढे जसजसे अधिकाधिक बसत आहेत, तसतसे जास्त जास्त देश आर्थिक दुःस्थितींत सांपडत आहेत, त्यांच्यांतील द्रव्यसंचय पिळून निघत आहेत, आणि त्यामुळे काम व दाम या उभयतांना मुकलेल्या बेकारांचा आंकडा फुगत आहे. महायुद्धाचा खर्च—कर्ज, व्याज, पेन्शन वगैरे रूपांनी बहुतेक सर्व राष्ट्रांच्या माथ्यावर एवढा मोठा बोजा उभारला गेला आहे कीं, लॅासेन परिषदेंत मि. मॅक्डोनाल्ड यांनी सर्व जगच या आक्काबाईच्या फेऱ्यांत सांपडलें आहे, असे उद्गार काढले. आणि त्याचें एक गमक म्हणून असें सांगितलें कीं, आज पृथ्वीच्या पाठीवर बेकारींत खितपणारांची संख्या दोन कोटी आहे ! बेकारांचा हा आंकडा कोणाहि दूरदर्शी माणसाच्या छातींत धडकी भरण्यासारखा असला तरी तो सत्यस्थितीचे मानाने फार तोकडा आहे हें विसरून चालावयाचें नाहीं. हिंदुस्थान व चीन हे दोनच देश डोळ्यांपुढे धरले तरी त्यांत वरील संख्येच्या दुप्पट—चौपट बेकारांचीं छिद्रें पसरलेलीं आढळतील. पण मॅक्डोनाल्ड यांच्या डोळ्यांपुढील पृथ्वीचा परिघ पाश्चात्य राष्ट्रांपुरताच होता असें दिसतें. आपल्याकडे पूर्वी 'नवखंड पृथ्वी' म्हणत त्यांतलाच हा प्रकार ! तेव्हा मॅक्डोनाल्डसाहेबांच्या आंकड्याबद्दल खळखळ न करता, जगाला गिळत चाललेली आर्थिक आपत्ति आणि तिचें अपत्य बेकारी, यांचें त्यांनी रंगविलेलें भीषण चित्र कोणीहि स्वीकारलें पाहिजे.

आपल्या देशांत बेकार आहेत आणि ते दिवसेंदिवस वाढत आहेत ही स्थिति कोणाहि दूरदर्शी राज्यकर्त्यास स्वस्थ बसूं देणारी नाही. कारण दिसण्यांत बेकार हे बलहीन, धनहीन, साधनहीन असे दिसले तरी ते म्हणजे राज्याच्या इमारतीला लागलेले भुंगे होत. इमारतीखाली लावलेल्या सुरुंगाप्रमाणे ते मोठा आवाज करीत नसले किंवा सर्व इमारत क्षणार्धांत उडवून टाकीत नसले तरी आपला सूक्ष्म गुंजारव करीत भुंगे एकदा का इमारतीच्या खांबातुळयांत शिरले व आपलें गिरमिट चालवून ते पोखरूं लागले म्हणजे कालांतराने पण निश्चयाने तो सारा इमलाच्या इमला कोसळून जमीनदोस्त झाल्याशिवाय राहत नाही; तसें कार्य ते कार्यहीन बेकार करूं शकतात. त्यांच्या पोटांतील आग ही तोफेच्या तोंडांतील आगीपेक्षां अधिक दाहक असते आणि त्यांना पुढें जिवाची आशा नसल्यामुळे ते आपल्या कार्यासाठी जिवावर सहजीं उदार होतात. त्यांच्या अशा निर्वाणीच्या वृत्तीमुळे ते राजसत्तेलाहि उलथीपालथी कशी करतात याचा ताजा दाखला न्यूफौंडलंड देशांत पाहावयास मिळाला. तेथे गेल्या मे महिन्याच्या ७ तारखेस मुख्य प्रधान सर रिचर्ड स्क्वायर्स याला आपली पार्लमेंट बरखास्त करावी लागली आणि राज्यकारभाराचीं सूत्रें कॉन्झर्व्हेटिव्ह पक्षाच्या हातीं द्यावीं लागलीं. ही सर्व क्रांति बेकारांच्या दंग्याने घडवून आणली. ही दंग्याची आग कसकशी लागत व पसरत गेली याचा इतिहास पाहण्यासारखा आहे.

न्यूफौंडलंड हें बेट अमेरिकेंत कानडाच्या जवळ आहे. सर्वांत मोठ्या साम्राज्याची सर्वांत जुनी अशी ही वसाहत आहे. तिचा विस्तार साधारणपणें मुंबई इलाख्याइतका भरेल; पण लोकसंख्या मात्र अडीचतीन लक्षांइतकीच आहे. पण तेथील जमिनीच्या पोटांत खनिज संपत्ति विपुल असल्यामुळे त्या वसाहतीचें महत्त्व ब्रिटिशांना विशेष आहे. आजपर्यंत तेथील मुख्य धंदा मासळीचा असे व तो इतक्या मोठ्या प्रमाणावर चाले कीं, दरसाल साठ लक्ष डॉलर त्याद्वारें न्यूफौंडलंडच्या पदरांत पडत. परंतु १९२८ सालापासून तेथे गेलेले इंग्रज, स्कॉच्, आयरिश व फ्रेंच सौदागरांनी शिसें, तांबें, जस्त, लोखंड वगैरे धातूंच्या खाणी शोधून काढल्या आणि त्यांचा व्यापार जोराने सुरू केला. त्याशिवाय, कागदाचा धंदाहि डोकें वर काढता काढता तो आता मासळीच्या धंद्यापेक्षांहि मोठा झाला व दरसाल कोटि–सवा कोटि डॉलर न्यूफौंडलंडला मिळवून देऊं लागला.

या औद्योगिक उन्नतीच्या हातांत हात घालून न्यूफौंडलंडची राजकीय सुधारणाहि होत होती. तेथील मूळचे रहिवासी ब्यूथक्स् यांच्याशीं इंग्रजादि गोऱ्या उपऱ्यांनी, अंगावर शहारे आणण्यासारखी वर्तणूक प्रारंभीं केली. त्यांना काय, जसे नीग्रो तसे ब्यूथक्स. जंगली जनावराप्रमाणे त्यांची शिकार करून जाणूनबुजून त्यांना ठार करण्यांत आलें! 'या प्रकाराबद्दल जितकें कमी लिहावें तितकें बरें' असे इंग्रज लेखकांनीच उद्गार काढले आहेत. यावरून तेथे वसाहतीच्या प्रारंभीं माणुसकीचा कसा खून करण्यांत आला असेल याची कल्पना येते.

हें प्राथमिक 'अंधारयुग' दीर्घकाल टिकलें. इंग्लंडने १५८३ मध्ये तेथे वसाहत केली तरी प्रातिनिधिक राजसत्तेचा उदय होण्यास दोन–अडीचशें वर्षें जावीं लागलीं. १८३२ सालीं तिची प्राणप्रतिष्ठा तेथें करण्यांत आली आणि जबाबदार राज्यपद्धति तेथील लोकांना लाभण्यास १८५४ साल उजाडावें लागलें. परंतु त्याबरोबरच राष्ट्रीय कर्जहि तेथील लोकांच्या वांट्यास आलें. एकोणिसाव्या शतकाचे अखेरीस त्याची रक्कम ९० लक्ष डॉलरांपर्यंत होती. ती १९२८ सालीं पावणेसात कोटींपर्यंत चढली. राष्ट्राच्या डोक्यावरील कर्जाचा हा डोंगर उतरविण्यासाठी तेथील सरकारने आपला एक प्रांत कॅनडाला विकला आणि तेवढ्यानेहि तूट भागेना म्हणून रयतेवर जबर कर बसाविले. त्याबरोबरच व्यापारमंदीची वावटळ उठली. न्यूफौंडलंडमधील जो मासोळीचा मुख्य धंदा, त्याला किंमत कमी येऊं लागली. त्यामुळे तेथील रहिवाश्यांच्या हातांत प्राप्ति थोडी, पण डोक्यावर कर भारी अशी दुःस्थिति उत्पन्न झाली. पूर्वी तेथील शें. ९० लोक मच्छीमारीच्या कामावर उपजीविका करीत; पण आता शें. ५० लोकांचेंहि पोट त्यावर भरेनासें झालें. याचाच अर्थ असा कीं, शें. ४० लोक बेकारीच्या उंबरठ्यावर ठेचाळले. त्यांपैकीं कांही लोकांनी पोट भरण्यासाठी आपले पाय जवळच्या कानडा देशाकडे वळविले. पण बाकीच्यांचा जठराग्नि जास्त जास्त पेटत चालला. उलट सरकाराच्याहि तिजोरींत घोटाळा अधिकच माजत चालल. तो दूर करण्यासाठी इंग्लंडाहून तज्ज्ञ मागविण्यांत आला. पण त्याचा कांही उपयोग झाला नाही. दरसाल अंदाजपत्रकांत तुटीचें खिंडार मोठें मोठें पडत चाललें. बुभुक्षित लोकांची संख्या वृद्धिंगत झाली. सरकारावर दांतओंठ खाण्याशिवाय दुसरें कांही खावयास मिळेना अशी त्यांची स्थिति झाली. तेव्हा चिडून–वैतागून ता. ११ फेब्रुवारी रोजीं बेकारांचा तांडा कौन्सिल चेंबरवर चालून गेला आणि तेथील सामानसुमानाची त्यांनी नासाडी केली. एवढेंच नव्हे तर, प्रधान सर रिचर्ड यालाहि ठोसे लगावण्यांत आले. शेवटीं त्याजकडून सुस्थितीचें आश्वासन घेऊन ते बेकार परत गेले.

परंतु प्रधानाच्या पापाचा घडाच भरला होता. तेथील फडणवीस मि. कॅशिन याने राजीनामा दिल्यावर असा उघड आरोप केला कीं, प्रधानाने सार्वजनिक पैशाची अफरातफर केली. बेकारीच्या आगींत हें तेल पडतांच चळवळीच्या ज्वाळा उसळल्या. ता. ५ एप्रिल रोजीं शेंकडो लोक असेंब्लीच्या इमारतीवर चालून गेले. राष्ट्रीय जमाखर्चाची चौकशी करा असा अर्ज त्यांनी नेला होता. पण त्यांची दाद घेण्याला थोडा उशीर लागला. हें कालहरण पाहतांच, त्या बेफाम झालेल्या बेकार लोकांनी इमारतीला गराडा घातला, तिचे दरवाजे फोडले व खिडक्या मोडल्या आणि आंतल्या सामानाची व दफ्तराची नासधूस करून सर रिचर्ड यांजवर ते चालून गेले आणि कोणी कोणी असेंहि म्हणतात कीं, त्याला पाण्यांत भिरकावून देण्यांत आलें! त्यांत तथ्य असो वा नसो, पण त्याला इतकी धडकी भरली कीं, त्याने आपण राजीनामा देणार असल्याचें जमलेल्या लोकांना सांगितलें. बिचारी कंगाल रयत आश्वासन घेऊन परतली. वचनभंग करणाऱ्या राजांची मालिका लोक विसरले. रिचर्डने आपल्या राजीनाम्याचा बेत बदलल्याचें जाहीर केलें. पण इंग्लंडच्या पहिल्या चार्लसचें उदाहरण व लोकक्षोभाचें विराट स्वरूप ध्यानीं आणून गेल्या मे महिन्यांत त्याने स्वतः राजीनामा दिला व पार्लमेंट

दुसऱ्या पक्षाच्या स्वाधीन केली. यापुढे तेथील आर्थिक स्थितीची घडी नीट बसून त्या देशातील बेकारी नष्ट होते कीं नाही हें कालान्तराने कळणार आहे. पण सध्या झालेल्या घडामोडीवरून इतर देशांनी एवढा बोध घेण्यास हरकत नाही कीं, बेकार लोक देश- भर वावरत असता राज्यकर्त्यांनी गाफील राहणें म्हणजे उशापायथ्याशीं सापनाग फिरत-फूत्कारत असता झोंप घेणेंच होय.

# स्फुट सूचना

१ मुंबईस दहा बारा दिवसांपूर्वी आखिल भारतीय अस्पृश्य परिषदेचें अधिवेशन रा. ब. राजा यांच्या अध्यक्षतेखाली यशस्वी रीतीने पार पडलें, याबद्दल आम्ही त्यांचें अभिनंदन पूर्वी केलेंच आहे. अस्पृश्य पक्षाच्या पुढाऱ्यांनी परिषद भरवून व हिंदु समाजास अनुकूल व हितावह असे ठराव मंजूर करून आपलें कर्तव्य, योग्य प्रकारें बजावलेंच आहे. अस्पृश्य समाज हा कांही झाला तरी हिंदु समाजाचा एक पोटवर्ग आहे. तो स्पृश्य हिंदूशीं किती जरी भांडला तरी ते भांडण मायलेकरांच्या भांडणापैकींच होय. हिंदु धर्म व स्पृश्य हिंदु समाज यावर संकट आल्यास त्याचें आंतडें ममतेने तडतड तुटणारच. तीच मानसिक स्थिति उलटपक्षीं स्पृश्य हिंदू समाजाचीहि आहे. त्याचाहि जीव अस्पृश्य समाजाकडे ओढतो. याचीं अनेक उदाहरणें दाखविता येतील. स्पृश्य वर्गानें आपल्याकडून अस्पृश्योद्धाराकरिता पुष्कळ प्रयत्न चालविले आहेत. एका बाजूस जुने शेकडो वर्षांचे पिढीजाद संस्कार व दुसऱ्या बाजूस जवळ ओढण्याविषयीं वाटणारी आतुरता यांच्या कात्रींत स्पृश्य हिंदु समाज सांप्रत सापडला आहे. स्पृश्य हिंदु समाजाच्या पुढाऱ्यांचे अस्पृश्याविषयी काळीज कितीहि तुटलें तरी अस्पृश्य समाजाला एकदम स्पृश्य बनविण्याची सत्ता त्यांच्या हातीं नाही. रा. ब. राजा यांनी ब्राह्मणांना राजे म्हटलें हा केवळ त्यांचा विनय असून त्या शब्दाचा अर्थ कोणीहि लक्षणेनेच घ्यावयाचा आहे. ब्राह्मणांना किंवा स्पृश्य समाजांतील कोणत्याहि जातीला तशी सत्ता नसल्यामुळे त्यांनी करावयाच्या सुधारणेचें व प्रयत्नांचें स्वरूप परिमित असणार हें उघड आहे. स्पृश्य वर्गांतील पुढाऱ्यांना स्पृश्यांतील बहुजन समाजाचीं मनें दुखवून व त्यांना सर्वस्वी सोडून पुढे पाऊल टाकणें कोणत्याहि दृष्टीने अपायकारकच असल्याने त्यांनी अमलांत आणलेल्या सुधारणांनी अस्पृश्य समाजांतील उतावळ्या व्यक्तींचें समाधान होणें शक्य नाही. तथापि त्यांनी स्पृश्य पुढाऱ्यांच्या मनःस्थितीचा व सामर्थ्याचा सहानुभूतिपूर्वक विचार केल्यास तेहि स्पृश्य पुढाऱ्यांस दोष देण्यास धजतील असें वाटत नाही.

---

२ या दृष्टीने पाहिल्यास सोमवार ता. ११ रोजीं रा. ब. राजा प्रभृति अस्पृश्य पुढाऱ्यांस ब्राह्मण युवक संघ व बॉंबे नॅशनल युनियन यांनी केलेल्या पानसुपारीकरिता ब्राह्मण सभेने आपला दिवाणखाना दिला ही गोष्ट महत्त्वाची व अभिनंदनीय झाली असेंच म्हटलें पाहिजे. सदर पानसुपारी ब्राह्मणसभेच्या वतीने करण्यांत आली नसली तरी अस्पृश्य पुढाऱ्यांस पानसुपारीस बोलावणारा संघ ब्राह्मण युवकांचाच होता, इतकेंच नव्हे तर सदर समारंभांत भाषण करणारे प्रो. काणे यांजसारखे गृहस्थ युवक नसून पोक्त, विद्वान व सर्वमान्य असेच ब्राह्मण सद्गृहस्थ होते, हा मुद्दा लक्षांत घेतल्यास सन्मान समारंभास ब्राह्मण सभेची मुकी नव्हे तर कांही अंशीं बोलकीहि अनुमति होती असे समजून चालण्यास हरकत नाही. चारच वर्षांपूर्वी कुमार विनय मंदिराच्या अस्पृश्य मेळ्यास श्रीगणेशोत्सवाचे वेळीं ब्राह्मण सभेंत येऊं देण्याच्या बाबतींत जीं रणें माजलीं तीं ज्यांच्या स्मरणांत आहेत, त्यांना अवघ्या चार वर्षांत ब्राह्मणसभेच्या धोरणांत घडून आलेल्या या सुधारणेबद्दल समाधान व आनंद वाटल्याशिवाय राहणार नाही. काळ एकसारखा बदलत चालला असल्याने त्यानें आज एकास जागें केलें तर तो उद्यां दुसऱ्यास जागें करील इतकाच फरक. बाकी सर्व हिंदु क्रमाक्रमानें जागे होणार व अस्पृश्यसमाजाची वाजवी गाऱ्हाणी दूर करणार हें निश्चित. मात्र अस्पृश्य समाज अगदीं घातघाईवर व चिडीला आल्यावर त्याच्या तक्रारी दूर करण्यापेक्षा त्या आधीच दूर करण्यांत अधिक शहाणपण व दूरदृष्टि आहे यांत शंका नाहीं. या सर्व दृष्टींनी ब्राह्मण सभेने आपल्या धोरणांत जो इष्ट असा बदल केला, तो आमच्या मतें अभिनंदनीय होय.

# प्रथमग्रासे मक्षिकापातः

कानडांत भरणाऱ्या ज्या साम्राज्य-परिषदेचा गवगवा व गाजावाजा गेलें वर्ष-सहा महिने जोरजोरानें चालू होता, त्या परिषदेस ओटावा येथील पार्लमेंटाच्या भव्य दिवाणखान्यांत, गुरुवार ता. २१ रोजीं अगदी शास्त्रोक्त पद्धतीनें सुरुवात झाली. प्राचीन काळचे राजे, महाराजे व सम्राट नष्ट झाले व त्यांच्याबरोबरच त्यांचे भालदार-चोपदार, हलकारे-ललकारे, व बंदीजनहि गेले! तथापि, सध्याच्या लोकशाहीच्या युगांतहि नांवापुरतें कां होईना, पण इंग्लंडनें राजाचें सिंहासन शाबूत ठेवलें आहे; त्यामुळे बरोबरीच्या नात्यानें खुर्चीस खुर्ची लावून बसणाऱ्या साम्राज्यांतील वसाहतींच्या प्रतिनिधींच्या या व्यापारी परिषदेसहि दरबारी स्वरूप आलें होतें. म्हणून साहजिकच भालदार-चोपदारांची व इतरांची उणीव तोफांच्या धडाक्यानें व बंदुकांच्या फैरींनीं भरून निघाली. कानडाचे गव्हर्नर अर्ल ऑफ बेसब्रो यांनीं अगदीं लष्करी थाटांत बरोबर अकरा वाजता दिवाणखान्यांत प्रवेश केला व सर्वांची खडी ताजीम स्वीकारून त्यांनीं राजांचा संदेश वाचून दाखविला. त्यानंतर सर्व प्रतिनिधींचें योग्य शब्दांत स्वागत करून त्यांनीं परिषदेस सुरुवात करून दिली व आपण निघून गेले.

परिषदेचा प्रारंभ अशा या दरबारी थाटानें झाला खरा. परंतु या परिषदेच्या सुरुवातीपासूनच तिच्यांतील पोकळपणा स्पष्टपणें दिसून येऊं लागला. राजेसाहेबांच्या संदेशाचीच गोष्ट घेऊं. राजेसाहेबांनीं आपल्या संदेशांत परिषदेचें महत्त्व इतक्या अतिशयोक्तीनें सांगितलें कीं, परिषदेच्या फलश्रुतीसंबंधीं साहजिकच शंका उत्पन्न व्हाव्या. राजेसाहेब म्हणतात कीं "सध्या आपत्तींच्या बोजाखालीं आपणच नव्हे, तर सर्व जग चिरडून गेलें आहे. त्या आपत्तींचा निरास करण्याच्या निश्चयी प्रयत्नांची नोंद ज्या इतिहासांत लिहिली जाणार, त्या इतिहासाचें पहिलें पान आज आपण उघडीत आहां. ब्रिटिश साम्राज्य हें सहकार्याच्या, एकमेकांस साहाय्य करण्याच्या तत्त्वावर उभारलें आहे व म्हणून आर्थिक बाबतींतहि सर्वांच्या हिताकरिता याच तत्त्वाची पूर्ण अम्मलबजावणी करण्याचा तुमचा हेतु आहे. या आर्थिक सहकार्यानें अशी एक मोठी शक्ति उत्पन्न होणार आहे कीं, तिचा सर्व जगावर परिणाम होईल हें निश्चित."

बोलून-चालून ब्रिटिश साम्राज्यांतील वसाहतींची ही परिषद. तिचें सामर्थ्य व कार्यक्षेत्रहि मर्यादित. म्हणून तिच्यामार्फत जगाच्या आर्थिक आपत्तींचा निरास करण्याची भाषा बोलणें म्हणजे स्वतः आपले पाय उलटे करून त्यावर आकाशाचा भार सावरूं इच्छिणाऱ्या टिटवीप्रमाणें स्वतःस हास्यास्पद करून घेण्यासारखें आहे. तसेंच साम्राज्यांतील ज्या सहकार्याच्या तत्त्वाचे एवढे ढेंढारे बादशाही संदेशांत माजविले आहेत, त्या तत्त्वाला आयर्लंड व इंग्लंड या साम्राज्यापैकींच दोन देशांतील आर्थिक मारामारीनें परिषदेला सुरुवात होण्यापूर्वीं चांगलाच हरताळ फांसला आहे. आपली खंडणी वसूल करण्याकरिता इंग्लंड आयर्लंडाच्या मालावर जबर जकाती बसवीत आहे, तर उलटपक्षीं आयर्लंड इंग्रजी व्यापार ठार करण्याकरिता जादा कर, स्वदेशीचा प्रचार व परकीय राष्ट्रांशीं व्यापारी संधानें, हीं व दुसरीं अनेक साधनें उपयोगांत आणीत आहे. हा देखावा साम्राज्यास अभिमानास्पद तर नाहीच; उलट तो परिषदेला एक मोठा अपशकुनच झाला असें म्हटले पाहिजे.

या परिषदेची मुख्य उभारणी सध्या तरी इंग्लंडकडून झाली. याचें कारण इंग्लंड स्वतः मोठ्याच आर्थिक संकटाच्या कैचींत सांपडलें आहे. इंग्लंडाची आजची मुख्य गरज अशी आहे कीं, इंग्लंडांतील उद्योगधंद्यांचें संरक्षण होऊन आपल्या मालाला गिऱ्हाईक मिळावें. पण त्याबरोबरच दुसरी गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे. ती ही कीं, इंग्लडांत येणाऱ्या कच्च्या मालावर अगर अन्नसामुग्रीवर इंग्लंड जकाती बसवूं शकत नाही. अन्नाच्या पुरवठ्याच्या बाबतींत इंग्लंड सर्वस्वी इतर देशांवर अवलंबून असल्यामुळे अन्नसामुग्रीवर जर जकात बसविली तर अन्न महाग होऊन इंग्लंडमधील लोकांचेच हाल होणार आहेत. ही परिस्थिति व हा इंग्लंडाला पडलेला पेंच दृष्टीपुढे ठेवल्याशिवाय या परिषदेंत झालेल्या भाषणांचा ग्रंथ नीट लागावयाचा नाही. स्वतःला मोठें गिऱ्हाईक मिळण्याकरिता वसाहतींच्या नव्या बाजारपेठांत इंग्लंडचा माल स्वस्त दरानें विकला गेल्याशिवाय गत्यंतर नाही. म्हणून इंग्लंडची मुख्य मागणी अशी आहे कीं, साम्राज्याबाहेरील परकीय देशांच्या मालावर वसाहतींनीं जबर जकाती बसवाव्या व इंग्लंडाच्या मालाला सवलती द्याव्या. इंग्लंडाचें हें म्हणणें ठीक आहे. पण वसाहतींचे प्रतिनिधि या सवलतीबद्दल मोबदला मागतात त्याची वाट काय? वसाहतींतून जो माल बाहेर जातो तो बहुतेक कच्चा माल असतो. पण ह्यापेक्षां वसाहती अन्न व धान्य मोठ्या प्रमाणांत बाहेर पाठवितात. तेव्हा वसाहतींचें इंग्लंडाला म्हणणें कीं, वरील सवलतींचा मोबदला म्हणून इंग्लंडानें साम्राज्याबाहेरील परकीय देशांतून येणाऱ्या धान्यावर व अन्नसामुग्रीवर

जबर जकात बसवावी व वसाहतींच्या मालाला सवलती देऊन इंग्लंडची बाजारपेठ वसाहतींच्या स्वाधीन करावी. तथापि आज इंग्लंडला अशा रीतीने अन्नसामुग्रीवर कर बसविणेंच शक्य नाही. अशा परिस्थितींत ओटावा येथील परिषदेंत इंग्लंडाला हा कठिण पेच सोडविणें दुरापास्त झाल्यास नवल नाही.

कानडाचे मुख्य प्रधान मि. बेनेट यांनी आपल्या पहिल्या भाषणांत स्पष्टपणे सांगितलें कीं, कानडांतील उद्योगधंदे चांगल्या परिस्थितींत असल्याने त्यांचा प्रश्न नाही. पण कानडामधून इंग्लंडमध्ये पाठविल्या जाणाऱ्या धान्यावर विशेषतः गहूं व गव्हांचे जिन्नस यांवर इंग्लंडने कर घेऊं नये, मात्र साम्राज्याबाहेरील देशांतून येणाऱ्या गव्हांवर जबर जकाती बसवाव्या. इंग्लंडचें मरण जर कशांत असेल तर या अन्नावरील जकातींत आहे. म्हणून कानडाने उघडपणें टाकलेल्या या सवालास बाल्ड्विन यांना इंग्लंडतर्फे समाधानकारक उत्तर देतां आलें नाही. मि. बाल्डविन यांनीं उडवाउडवी करण्याच्या हेतूने इतकेंच सांगितलें कीं, "इंग्लंडला जकातींच्या भिंतीची उंची वसाहतींपुरती कमी करता येईल. कारण साम्राज्यांतील देशांना सवलती दिल्या तरी त्यांचा आपापसांतील व्यापार फक्त ३० टक्केच होतो. म्हणून साम्राज्यात खुला व्यापार सुरू करण्याची कल्पना कोणालाच पुढ मांडणें शक्य नाही. फक्त एकमेकांचा व्यापार आपण वाढवूं शकूं. एकमेकांनी एकमेकांना सवलती किती दिल्या व किती घेतल्या याचें मोजमाप धारवाडी कांट्याने करण्यांत हशील नाही, व त्याची जरूरीहि नाही." मि. बाल्डविन यांच्या या शेवटच्या वाक्यांतील मेख कोणाच्याहि लक्षांत येण्यासारखी होती. इंग्लंडचें मोठेंच व्यंग या भाषणांत दिसून आल्याकारणाने यापुढील सर्व प्रतिनिधींच्या भाषणांचा रोख त्यावर होता, व यामुळे इंग्लंडवर मोठीच जबाबदारी येऊन पडली.

मि. बाल्डविन यांच्या भाषणानंतर दक्षिण आफ्रिकेचे प्रतिनिधि मि. हेवेंगा यांनी स्पष्ट सांगितले कीं, "आमच्या देशांत शेतीचा माल म्हणजे धान्यधुन्य विपुल होतें. म्हणून साम्राज्याबाहेरील जे देश आमचें धान्य घेतात, त्या देशांच्या पक्क्या मालावर जर आम्हीं जकाती बसविल्या व त्याच वेळीं इंग्लंडच्या मालाला सवलती दिल्या तर त्यांत दक्षिण–आफ्रिकेचा फायदा होणार नाही. कारण ते देश आफ्रिकेच्या धान्यादिकावर व कच्च्या मालावर जबर जकाती बसवितील." आयर्लंडच्या प्रतिनिधीने इंग्लंडने पुकारलेल्या आर्थिक युद्धाचा उल्लेख करून त्याचा निषेध केला व सांगितलें कीं, आयर्लंडांतील लोकांचें व्यापारी हित साधणें हा आमचा प्रमुख हेतु आहे; व या हेतूला पोषक असेच सर्वसाधारण स्वरूपाचे करारमदार आपण मान्य करूं, इतर मान्य करणार नाही. आयर्लंड व दक्षिण आफ्रिका या दोन देशांनी अशा रीतीने कानडाच्या स्वरांत स्वर मिळविल्याने इंग्लडांतील प्रतिनिधींच्या पुढे मोठेंच कोडें येऊन पडलें असेल यांत शंका नाही.

हिंदुस्थानातर्फे म्हणून तेथे हजर असलेले सरकारनियुक्त प्रतिनिधि, सर अतुलचंद्र चतर्जी यांनी समय ओळखून हिंदुस्थानाची बाजू निराळ्या शब्दांत पण स्पष्टपणें मांडली. इतर वसाहती स्वतंत्र आहेत. त्या इंग्लंडच्या ताबेदार नाहीत. त्यामुळे त्यांच्या प्रतिनिधींनी आपलें म्हणणें स्वतंत्र बाण्याने व निर्भयपणाने सांगून टाकलें. सर अतुल हिंदुस्थानसारख्या ताबेदार देशाचे प्रतिनिधि. त्यांची नेमणूकहि सरकारकडूनच झालेली. शिवाय धोरणाच्या बाबतींत त्यांची वेसण हिंदुस्थानसरकारच्या हातीं. तथापि सर अतुल चतर्जी हे मोठे अनुभविक व अघळपघळ बोलणारे असल्यामुळे त्यांनी मुख्य मुद्याभोवतीं अनेक चक्रा घेत घेत कां होईना, पण हिंदुस्थानास या सवलतींच्या बाबतींत फारसें कांही करतां येणार नाही असें सांगण्याला कमी केलें नाही. त्यांचे जें भाषण प्रसिद्ध झालें आहे त्यांत त्यांनी हिंदुस्थान तूर्त तरी कोणत्याहि देशाला फारशा सवलती देऊं शकणार नाही असेंच दर्शविलें आहे. त्यांची ही कामगिरी कांही कमी महत्त्वाची नाही. सर अतुल चतर्जी यांनी असें सांगितले कीं "या परिषदेंत आजपर्यंतच्या वहिवाटीप्रमाणें हिंदुस्थानाचे प्रतिनिधि म्हणून हिंदुस्थानाचे स्टेट सेक्रेटरी यावयाचे; पण ते आले नाहीत. या एकाच गोष्टीवरून हिंदुस्थानाचें पाऊल पूर्ण स्वराज्याच्या मार्गावर पुढे पडलें आहे असें दिसून येतें." यापुढे इंग्लंडाच्या ओंजळीने पाणी पिणारे आम्ही राहिलों नसून आम्ही स्वतंत्र वृत्तीचे आहोंत, तेव्हा आमच्याशीं करारमदार करतांना त्या दृष्टीने पहा. असें सांगण्याचा त्यांचा वरील विधानांत उद्देश असला तर तो स्तुत्य आहे. पण ही वस्तुस्थिति नसून तिचा विपर्यास आहे. सदर परिषदेंत हिंदुस्थानाच्य स्वातंत्र्याभावाचा उल्लेख करून मग हिंदुस्थान आस्ते आस्ते स्वराज्याच्या मार्गावर पावलें टाकीत आहे हें दैन्य सांगणें, अप्रशस्त, अप्रस्तुत व अनावश्यक होतें. शिवाय, हिंदुस्थानचे प्रतिनिधि म्हणून स्टेट सेक्रेटरी बसले नसले तरी त्याच स्टेटसेक्रेटरींच्या संमतीने हिंदुस्थानसरकाराने नेमलेलेच सर अतुल चतर्जी त्यांच्या जागीं आले. यांत मोठासा फरक तो कोणचा? हिंदुस्थानाच्या स्वराज्याचा त्यांत कांहीच संबंध नाही.

त्यांनी आपल्या भाषणांत दुसरेंहि असें विधान

केलें कीं, हिंदुस्थानास आर्थिक स्वायत्तता मिळाली आहे ! याचें स्पष्टीकरण करतांना त्यांनी सांगितलें कीं ज्या वेळीं हिंदुस्थानसरकार व कायदेमंडळ यांचें आर्थिक बाबतींत ऐकमत्य होतें त्या वेळीं स्टेट सेक्रेटरींना त्या निर्णयांत हात घालतां येत नाही. सर अतुल चतर्जींच्या हें लक्षांत आलें नाही कीं, स्टेटसेक्रेटरींच्या मताविरुद्ध हिंदुस्थानसरकार जाईल कसें व त्याचे कायदेकौन्सिलाशीं एकमत होईल कसें ? पण याहिपुढें जाऊन आम्ही म्हणतों कीं, गेल्याच वर्षी या आर्थिक स्वायत्ततेला अर्धचंद्र दिला गेला तो चतर्जी यांस माहीत नाही काय ? गेल्या वर्षी भारतमंत्र्यानी हिंदुस्थानच्या रुपयाचें नातें पौंडाशीं जोडलें त्या वेळीं हिंदुस्थानसरकारास विचारलेंहि नाही; मग हिंदुस्थानसरकार व हिंदी कायदेमंडळें यांच्या ऐक्याची गोष्ट अगदीच दूरची. सर अतुलचंद्र यांनी हिंदुस्थानच्या आर्थिक स्वातंत्र्याचा उल्लेख केला, तो इतर सभासदांना हिंदुस्थानाचें मोठेपण पटवून देण्याकरिता केला असेल. पण तो सत्य नव्हे इतकेंच आम्हांस म्हणावयाचे आहे. शिवाय असल्या भाषणांनी फसण्याइतके तेथील प्रतिनिधी दुधखुळे नव्हते हेंहि त्यांनी लक्षांत ठेवावयास पाहिजे होतें !

मुख्य मुद्द्यासंबंधी बोलतांना मात्र सर अतुल चतर्जींनी हिंदुस्थानची परिस्थिति स्पष्टपणें मांडली याबद्दल ते स्तुतीस पात्र आहेत. या चालू परिषदेंत हिंदुस्थानाकडून खुद्द इंग्लंडला अगर वसाहतींना कांही लभ्यांश होईल असें दिसत नाही व त्याची त्यांनी अपेक्षाहि करूं नये इतके इतरांच्या मनावर बिंबविण्याचा त्यांनी केलेला प्रयत्न यशस्वी झाला. त्यांनी जीं कारणें मांडलीं व हिंदुस्थानाची जी परिस्थिति परिषदेच्या डोळ्यांपुढें उभी केली ती अगदी यथार्थ होती. ते म्हणाले कीं, "हिंदुस्थान हा कृषिप्रधान देश असून तेथील लोकांच्या दारिद्र्याची कल्पना आणून देणें शक्य नाही. शिवाय सध्याच्या आर्थिक हलाखीमुळे हिंदी लोकांची क्रयशक्ति अगदीच क्षीण झालेली दिसते. उद्योगधंद्यांचीहि स्थिति समाधानकारक नाही व ते सर्व उद्योगधंदे बाल्यावस्थेंत असल्यामुळे त्यांचें संरक्षण व त्यांची जोपासना संरक्षक जकाती बसवूनच करणें हिंदुस्थानाचें कर्तव्य ठरतें. म्हणून १९२४ पासून बसविलेल्या जकाती कोणत्याहि देशाला सवलती देण्याकरिताहि कमी करणें शक्य नाही. हिंदुस्थानाच्या उद्योगधंद्यांचें संरक्षण करण्याची योजना पक्की व मजबूत करूनच भावी स्वराज्याचे हक्क हिंदुस्थानास दिले पाहिजेत. शिवाय, हिंदुस्थानसरकाराचे उत्पन्न थोडें व उत्पन्नाच्या बाबाहि थोड्या व खर्च मात्र अवाढव्य. लष्करी खर्चच बरेंच उत्पन्न गट्ट करतो. अशा परिस्थितींत जकातीच्या सवलती दिल्यास उत्पन्न बुडून अनवस्था प्रसंग उत्पन्न होईल. पण या सर्वांपेक्षां महत्त्वाचा मुद्दा हा कीं, आतां लवकरच, अखिल भारतीय पूर्ण स्वराज्याची संस्थापना होणार आहे. तेव्हा त्या नव्या सरकाराला आपलें आर्थिक धोरण ठरविण्याची संधि आपण दिली पाहिजे. ते वाटेल त्या नव्या जकाती बसवितील अगर उठवितील. आपण त्यांचे हात काय म्हणून बांधून ठेवा !"

सर अतुल चतर्जींच्या या चतुर व मुत्सद्दीपणाच्या भाषणाचा त्या परिषदेवर अपेक्षित असा परिणाम झालाच असेल. हिंदुस्थानाचें म्हणणें त्यांनी स्पष्ट मांडलें याबद्दल त्यांना धन्यवाद दिले पाहिजेत. हिंदुस्थानाच्या बाबतींत तरी ही परिषद म्हणजे मराठी क्रमिक पुस्तकांत दिलेल्या कोल्ह्याने सपाट ताटांतील मेजवानीचें करकोच्यास दिलेलें निमंत्रणच होतें. कोल्ह्याने तेथे सर्व मेजवानी आपणच मटकावली व करकोचाच्या पोटांत चार शितेंच फक्त गेलीं ! या क्रमिक पुस्तकांतील गोष्टींत करकोच्याने ह्या मेजवानीचें पुढे उट्टें काढलें. पण प्रत्यक्ष राजकारणाच्या सृष्टींत हिंदुस्थानास तशी परतफेड करतां येणें शक्य नाही. म्हणूनच सर अतुल चतर्जींनी मोठ्या कुशलतेने प्रारंभींच आपण ब्रिटिशांच्या मोहजालांत पडणार नाही हें स्पष्ट केलें हें चांगलें झालें.

वरील परिषदेंत इंग्लंडची स्थिति मात्र केविलवाणी झाली. वसाहती स्वार्थाच्या घोड्यावर स्वार असल्यामुळे भरपूर मोबदला दिल्याशिवाय कांहीच सोडावयास तयार नाहीत. हिंदुस्थानाची ही वर वर्णिलेली स्थिति. तेव्हां या परिषदेंत इंग्लंडला कितपत फायदा होतो हें सांगणें कठिण आहे. तथापि इंग्रज व्यापारी वस्ताद असल्याकारणाने त्यांनी खासगी करारमदार करण्याचें काम सुरू केलें आहे. त्यापासून होईल तेवढाच फायदा त्यांच्या पदरांत पडणार असें दिसतें. एकंदरींत एवढा मोठा व्यूह इंग्लंडने रचला, पण त्याला प्रथमतःच अपशकून झाला. इतकेंच नव्हे तर मक्षिकापातहि झाला असें म्हणण्यास हरकत नाही. आता कमिट्यांचीं कामें सुरू झालीं आहेत. तेव्हा त्यांतून काय निष्पन्न होतें हें क्रमाक्रमाने समजेलच.

# लॉसेन परिषदेचें यशापयश

( ले.—आत्माराम रावजी भट, एम्. कॉम. )

### परिषदेंतील वैगुण्य

शिमगा संपला तरी ज्याप्रमाणें कवित्व मागें राहतें त्याप्रमाणें महायुद्ध संपलें तरी त्याचे दुष्परिणाम युरोपला व पर्यायानें सर्व जगाला गेलीं दहा–बारा वर्षे भोगावे लागत आहेत. सांप्रतची व्यापारमंदी व वाढती बेकारी यांचें मूळ महायुद्ध-खंडणी व कर्जे यांत आहे ही गोष्ट महायुद्धाच्या जेत्यांना कळून चुकल्यामुळे व जर्मनीनें यापुढे युद्धखंडणीची फेड करणें शक्य नाही हें अनेकवार जाहीर केल्यामुळे यापुढील तरी अनर्थपरंपरा टाळावी म्हणून पूर्वपापांचें प्रक्षालन करण्याच्या बुद्धीनें लॉसेन येथे महायुद्ध खंडणीशीं व कर्जाशीं संबंध असलेल्या राष्ट्रांची परिषद बोलावण्यांत आली. या परिषदेंत भाग घेण्याकरितां अमेरिकेनें आपले प्रतिनिधी पाठविले नाहींत फक्त परिषदेंत काय घडतें हें पाहण्याकरितां आपले कांही निरीक्षक पाठविले. लॉसेन परिषदेंत जें मुख्य वैगुण्य होतें तें हेंच होय.

### युद्धकर्जे व खंडणी यांचा संबंध

महायुद्धखंडणी व कर्जे यांच्या प्रश्नाचें स्वरूप असें आहे कीं, महायुद्ध चालू असता अमेरिकेनें इंग्लंडला व युरोपियन राष्ट्रांना कोट्यवधि पौंडांचें कर्ज दिलें. इंग्लंडनें अमेरिकेकडून जितकें कर्ज घेतलें त्याहून दुपटीनें कर्ज युरोपियन मित्र राष्ट्रांना दिलें. महायुद्धामुळे जी विशेष नासधूस झाली ती मित्रराष्ट्रांपैकीं युरोपियन राष्ट्रांची. तेव्हां जर्मनीवर तह लादतांना मित्र राष्ट्रांनीं नासधुशीची भरपाई दामदुपटीनें नव्हे परंतु दामदसपटीहून अधिक करण्याची व मित्रराष्ट्रांचें युद्ध-कर्ज फेडण्याची सर्व जबाबदारी जर्मनीवर टाकली. व प्रेसिडेंट वुइल्सन यांच्या चौदा तत्त्वांवर विसंबून आगाऊच शस्त्र खाली ठेवलेल्या जर्मनीला अवाढव्य खंडणीला संमति द्यावी लागली. हा युद्ध–खंडणीचा आकडा प्रथम वाटेल तितका मोठा ठरविण्यांत आला होता. प्रो. जे. एम. कीन्स यांनी फ्रान्सच्या युद्धखंडणीच्या मागणीचें स्वरूप स्पष्ट करून दाखवितांना असें लिहिलें आहे कीं, फ्रान्सनें तहपरिषदेंत नासधूस झालेल्या घरामागें जर्मनीकडून प्रत्येकीं दोन हजार पौंड आणि त्यांतील सामानाकरितां प्रत्येकीं एक हजार पौंड मागितले होते. परंतु नासधूस झालेल्या घरांपैकीं बऱ्याच तर मजुरांच्या झोंपड्या होत्या! प्रथम जरी नाइलाजानें जर्मनीनें जबरदस्त खंडणी मान्य केली तरी हळूहळू दोस्त राष्ट्रांना असें कळून चुकलें कीं, जर्मनीकडून मागितली एवढी नुकसानभरपाई होणें शक्य नाही. जर्मनीकडून हप्ता थकण्याची वेळ आली कीं, थोडी खंडणी कमी करावी असा क्रम गेलीं दहाअकरा वर्षे चालू होता. शेवटची जी जर्मन खंडणीची योजना १९२९–३० मध्ये करण्यांत आली. ती करतांना मित्र-राष्ट्रांना आपल्या धनकोंना किती देणें द्यावयाचें आहे व नासधूस भरून निघण्याकरितां दोस्त राष्ट्रांच्या मतें किती पैसा आवश्यक आहे या गोष्टी विचारांत घेण्यांत आल्या. ही शेवटची योजना यंग योजना या नांवानें प्रसिद्ध आहे. पुढील कोष्टकांत या योजनेप्रमाणे जर्मनीनें दोस्त राष्ट्रांना वार्षिक किती खंडणी द्यावयाची व दोस्त राष्ट्रांनीं आपल्या धनकोंना किती पैसे द्यावयाचे हें दाखविलें आहे फ्रान्सला देण्यापेक्षा जर्मनीकडून येणें अधिक आहे असें त्यावरून दिसेल. फ्रान्सला इतके अधिक पैसे मिळावे असें ठरण्याचें कारण फ्रान्सची नासधूस भरून निघावयाची होती.

आंकडे लक्ष पौंडांचे आहेत

| वार्षिक | इंग्लंड | फ्रान्स | इटली |
|---|---|---|---|
| युद्धखंडणी ( जर्मनीकडून ) | १८८ | ५१४ | १०५ |
| इतर राष्ट्रांकडून ( त्यांना दिलेल्या ) युद्धकर्जाच्या परत-फेडीबाबत येणारे | १७० | ५ | —— |
| | ३५८ | ५१९ | १०५ |
| युद्धकर्जाची परतफेड— | ३४४ | ३१८ | ९० |
| | १४ | २०१ | १५ |

वरील कोष्टकावरून दोस्त राष्ट्रांची कर्जफेड जर्मन खंडणी येण्यावर कशी अवलंबून आहे हें स्पष्ट दिसतें. अर्थातच लॉसेन परिषद यशस्वी होणें न होणें हें अमेरिकेनें मित्रराष्ट्रांना व मित्र राष्ट्रांनीं जर्मनीला सूट देण्यावर अवलंबून होतें. परंतु मित्र-राष्ट्रांचे धनको राष्ट्र जें अमेरिका त्यानेंच या परिषदेंत भाग घेण्याचें नाकारलें होतें.

### अमेरिकेचें धोरण

प्रेसिडेंट विल्सन यांच्या चवदा तत्त्वांना हरताळ फासून ज्या वेळीं मित्रराष्ट्रांनीं–विशेषतः फ्रान्सनें–जर्मनीचे लचके तोडण्याचा आणि जर्मनीला राज-

कीय व आर्थिक दृष्ट्या जमीनदोस्त करण्याचा घाट घातला, तेव्हांपासून युरोपियन मित्रराष्ट्रांच्या हेतूबद्दल अमेरिका साशंक आहे. व शक्य तितकें महायुद्ध–समाप्तीनंतर अमेरिकेने युरोपच्या राजकारणापासून अलिप्त राहण्याचें धोरण अमलांत आणलें आहे. व्हर्सेलिसच्या तहावर अमेरिकेने सही केली नाही व राष्ट्रसंघांतहि अमेरिका सामील झाली नाही. महायुद्धाला एकटा जर्मनीच कारणीभूत होता. हा युरोपियन मित्रराष्ट्रांचा आरोप खरा नाही असें अमेरिकेला वाटूं लागलें होतें. अमेरिकन विद्वानांनी महायुद्धाच्या कारणांचा जो शोध चालविला होता, त्यांनाहि हीच गोष्ट आढळून आली होती. महायुद्धाचें मूळ कारण या विषयावरील आपल्या ग्रंथांत सुप्रसिद्ध अमेरिकन प्रोफेसर सिडने फे यांनी असें लिहून ठेवलें आहे कीं, जर्मनी व त्याचीं साहाय्यक राष्ट्रें हींच काय तीं महायुद्धाला कारणीभूत झालीं हें व्हर्सेलिसच्या तहाचें सूत्रवाक्य आपण टाकून दिलें पाहिजे. या सूत्रवाक्याचें अधिष्ठान अपुऱ्या व शंकास्पद पुराव्यावर होतें. जगांतील सर्व देशांतील इतिहासाचार्यांनीं तें सूत्र चुकीचें आहे असें कबूल केलें आहे. ऐतिहासिक दृष्ट्या तें अविश्वसनीय असल्यामुळे व्हर्सेलिसच्या तहाचा पाया सुधारला पाहिजे! दोस्त राष्ट्रांनी तहाच्या नांवाखालीं जर्मनीची जी कुतरओढ आरंभिली त्यामुळे महायुध्दांत सामील होतांना अमेरिकेला युद्धमान राष्ट्रांबद्दल जी सहानुभूति वाटत होती ती नष्ट झाली. आणि महायुद्धानन्तर युद्धकर्जफेडीचा प्रश्न निघाल्यावर इंग्लंडचे त्यावेळचे मुख्य प्रधान मि. लॉइड जॉर्ज यांनी त्या वेळीं प्रेसिडेण्ट विल्सन यांना असें कळविलें कीं तुम्ही इंग्लंडला युद्धकर्जफेडीबाबत सूट दिली तर इंग्लंड, फ्रान्स वगैरे आपल्या ऋणको राष्ट्रांना सूट देईल. त्या वेळीं प्रेसिडेण्ट वुइल्सन यांनीं मि. लॉइड जार्ज यांना व अप्रत्यक्ष रीत्या दोस्त राष्ट्रांना असा रोखठोक जबाब दिला कीं ब्रिटिशांनी इतर मित्र राष्ट्रांना सूट द्यावी अगर मित्र राष्ट्रांनी खंडणीबाबत जर्मनीला सूट द्यावी म्हणून अमेरिका ग्रेटब्रिटनला अगर इतर मित्र राष्ट्रांना मुळीच सूट देण्यास तयार नाही. १९२० सालीं प्रेसिडेण्ट वुइल्सन यांनी युद्धकर्जाच्या परतफेडीबाबत जें धोरण एकदा जाहीर केलें तें १९३१ सालीं प्रेसिडेण्ट हूव्हर हे युद्धकर्ज-परतफेडीची एक वर्षाच्या मुदतीची तहकुबी जाहीर करीपर्यंत जसेच्या तसें कायम होतें.

### अलिप्त राहूनहि झळ लागली

युरोपियन राष्ट्रांच्या राजकारणापासून अमेरिका अलिप्त राहिली खरी, परंतु जर्मन खंडणीबाबत जें अव्यवहार्य व खुनशी धोरण फ्रान्सच्या हट्टामुळे मित्र राष्ट्रांनी अमलांत आणलें, त्यामुळे व महायुद्धामुळे आधीच कोरम झालेल्या युरोपची आर्थिक घडी अधिकाधिक बिघडत चालली व त्याचे दुष्परिणाम जगाच्या आर्थिक परिस्थितीवर होऊन त्यांची झळ अमेरिकेला लागल्याविना राहिली नाहीं. युरोपला पर्यायानें जगाला या अनर्थापासून वांचवण्याकरिता तात्पुरती म्हणून का होईना, अमेरिकेला युरोपियन मित्र राष्ट्रांना युद्धकर्जे परतफेडीची एक वर्षपर्यंत तहकुबी द्यावी लागली. प्रेसिडेंट हूव्हर यांच्या युद्धकर्जाच्या परतफेडीच्या एक वर्षाच्या तहकुबीला मान्यता देताना अमेरिकेच्या कॉंग्रेसने पुनः एकदा असा ठराव केला कीं, युद्धकर्जपरतफेडी बाबत ऋणकोंना सूट देणें अगर कर्जाची मुदलांतच माफी देणें या गोष्टी अमेरिकेच्या धोरणाशीं विसंगत आहेत. अमेरिकन काँग्रेसने जरी पुनः एकदा प्रेसिडेण्ट विल्सन यांच्या घोषणेचा अशा प्रकारें उच्चार केला असला तरी प्रे. हूव्हर यांच्या योजनेला मान्यता देऊन एक प्रकारें युद्धखंडणी व युद्धकर्जे हे प्रश्न प्रथम बाह्यतः निरनिराळे दिसल व अमेरिकेने ते निराळे ठेवण्याचा यत्न केला असला तरी युरोपियन राष्ट्रांनी त्यांची सांगड घातल्यामुळे ते परस्परावलंबी बनले आहेत, ही गोष्ट अमेरिकन कॉंग्रेसने मान्य केली हें विसरून चालणार नाही.

### अमेरिकन योजनेला वाटाण्याच्या अक्षता

जगाची विस्कटलेली आर्थिक घडी नीट बसविण्याकरिता युद्धखंडणी व युद्धकर्जे हे प्रश्न व्यावहारिक दृष्ट्या सोडवले गेले पाहिजेत, ही गोष्ट प्रेसिडेंट हूव्हर यांच्या व अमेरिकेच्या ध्यानीं आलेली आहे. परंतु अमेरिकेला युरोपियन राष्ट्रांबद्दल जी भीति वाटते ती अशी कीं, जर का अमेरिकेने युध्दकर्जफेडीबाबत युरोपियन मित्रराष्ट्रांना सूट दिली तर एकमेकांबद्दल अविश्वास वाटणारीं युरोपियन राष्ट्रें जरा परिस्थिति सुधारतांच कांही तरी कारण शोधून काढून परत महायुद्धाला प्रवृत्त होतील व पुनश्च महायुद्धाच्या वणव्याने जग होरपळून निघेल; आणि असें झालें म्हणजे एकापरि युरोपियन आंतर राष्ट्रांकडील येणें वसूल केलें नाहीं व जगाची स्थितिहि सुधारली नाहीं म्हणून पश्चात्ताप करण्याची वेळ येईल. सध्याच्या आर्थिक हलाखीच्या काळांतहि इंग्लंड फ्रान्स वगैरे राष्ट्रें जो लष्करावर खर्च करीत आहेत व शस्त्रनियंत्रणाच्या प्रयत्नांना या अगर त्या बुरख्याखाली विरोध करीत आहेत, त्यावरून अमेरिकेला वाटणारी भीति निराधार आहे असें म्हणतां येत नाही. शस्त्रनियंत्रणाच्या परिषदा वारंवार भरवूनहि आज युरोपांतील इंग्लंड, फ्रान्स, इटाली-प्रभृति राष्ट्रें म्हणजे जणुं कांही युद्धासाठी शस्त्रा-

स्त्रांचा भरणा करून ठेवलेलीं सेनाशिबिरें बनलीं आहेत. ही परिस्थिति लक्षांत घेऊनच जिनीव्हा येथें चालू असलेल्या शस्त्रनियंत्रण परिषदेंत अमेरिकेचे मुख्य प्रतिनिधि मि. गिब्सन यांनी असें जाहीर केलें कीं, जर युरोपियन राष्ट्रें आपला सैनिक खर्च ताबडतोब दहा टक्क्यांनीं कमी करून त्यांना जागतिक शांततेची व आर्थिक परिस्थिति सुधारण्याची तळमळ लागली आहे हें प्रत्यक्ष कृतीने दाखवण्यास तयार असतील तरच अमेरिका युद्धकर्जाच्या प्रश्नाचा विचार करण्यास तयार होईल. प्रेसिडेंट हूव्हर यांची हीं सूचना पुढे मांडतांना मि. गिब्सन यांनी युरोपियन राष्ट्रांना असा टोला लगावला कीं, आज जोंपर्यंत तुम्ही सैन्यावर अमेरिकेच्या देण्यापेक्षांहि अधिक खर्च करीत आहां तोपर्यंत तुम्ही कोणत्या तोंडाने अमेरिकेला सांगणार कीं, आम्हांला युद्धकर्ज—परतफेडीबाबत सूट द्या ? आज युरोपांत कोणत्याहि न्याय्य योजनेला जर कोणाकडून हरताळ फासला जात असेल तर तो फ्रान्सकडून. प्रे. हूव्हर यांच्या सैनिक खर्च कमी करण्याबाबतच्या सूचनेला वाटाण्याच्या अक्षता लावण्याचा अग्रमान अर्थातच एम. हेरिअट यांनी घेतला.

### तडजोडीचें स्वरूप

प्रेसिडेण्ट हूव्हर यांची सूचना धुडकावून लावण्यांत एम. हेरिअट यांनी जी मगरुरी दाखविली तीच मगरुरी लॉसेन परिषदेंत जर्मनीची पददलित स्थिति लक्षांत घेऊन जर्मनीकडून किती रक्कम घ्यावी व खंडणीचा प्रश्न निकालात काढावा याचा विचार करतांनाहि त्यांनी दाखविली. जर्मनीने लॉसेन परिषदेपुढे आपलें म्हणणें मांडतांना सप्रमाण असें दाखविलें कीं यापुढें जर्मनीच्या अंगांत खंडणी म्हणून एक कपर्दिकहि देण्याचें त्राण राहिलेलें नाहीं. जर्मनीकडून दोस्त राष्ट्रांनी काय काय लुबाडलें यांची तपशीलवार यादी १९ जुलै १९३२ च्या केसरींत जर्मनीविषयी नवा ग्रंथ या लेखांत देण्यांत आली आहे ती पाहिली म्हणजे जर्मनी किती निःसत्त्व झालेला असेल याची कल्पना वाचकांना येईल. अशा परिस्थितींतहि खंडणीच्या ऐवजीं एक रक्कम म्हणून दहा कोटी पौंड कांही हप्त्यांनी जर्मनीने कसेबसे देण्याचें कबूल केलें. परंतु त्याबरोबर अशा दोन अटी घातल्या कीं व्हर्सेलसच्या तहांत युद्धाची जबाबदारी जर्मनीवर टाकणारें जें कलम आहे तें रद्द करण्यांत यावें व जर्मनी जो पैसा यापुढे देईल तो युरोपच्या पुनर्घटनेकरिता उपयोगांत आणला जावा. फ्रान्सने खंडणीच्याऐवजी निदान ३५ कोटी पौंड तरी जर्मनीने दिले पाहिजेत, असा हेका धरला. फ्रान्सच्या या हटातटामुळे परिषद मुळांतच फिस्कटते कीं काय अशीहि भीति वाटूं लागली होती. परिषदेचे अध्यक्ष मि. मॅक्डोनाल्ड यांच्या बुद्धिचातुर्यामुळे त्यांनी जर्मनी व फ्रान्स यांची तडजोड घडवून आणली. व त्या तडजोडींत यापूर्वीचे खंडणीबाबतचे तहनामे रद्द करण्यांत येत आहेत व जर्मनीने कांही ठराविक पद्धतीने युरोपच्या पुनर्घटनेकरिता पंधरा कोटी पौंड द्यावे असें ठरलें.

### परिषदेचें यश ' जरतारी ' आहे

लॉसेन येथे ह्या तडजोडीवर सर्व प्रतिनिधींच्या सह्या होताच खुद्द बादशहा पंचम जॉर्ज यांनी मि. मॅक्डोनाल्ड यांना अभिनन्दनाचा संदेश पाठविला. मॅक्डोनाल्ड यांचें वृत्तपत्रांनी लॉसेन परिषदेचा नायक असें वर्णन केलें. लॉसेन परिषद यशस्वी झाल्याची बातमी पसरताच जगांतील ठिकठिकाणचे बाजार तेज झाले. सर्वत्र आशेचें वातावरण निर्माण झालें. या सर्व गोष्टी लॉसेनच्या परिषदेंत युद्धकर्ज व खंडणी यांचा प्रश्न अखेरचा सुटला व जगांत नव्या युगाला प्रारंभ झाला या भरंवशावर झाल्या. परंतु सोन्याचा भपकेदार मोठा दागिना सदैवच जसा भरीव नसतो त्याप्रमाणें लॉसेन परिषद यशस्वी झाली असें वरवर दिसलें तरी आता उजेडांत आलेल्या गोष्टींवरून लॉसेन परिषदेचें यश ' जरतारी ' आहे असें कळून चुकलें आहे. जर्मनींतील नाझीपक्ष लॉसेन तडजोडीचें वर्णन एक नवीन प्रॉमिसरी नोट असें करीत असून ती तडजोड राष्ट्रीय पक्षावर बंधनकारक नाही असें म्हणूं लागला आहे. नाझीपक्ष तडजोडीचें वर्णन कसेंहि करो, परंतु नवीन निवडणुकींत तो पक्ष यशस्वी झाला असेंहि गृहीत धरलें तरी पूर्वीच्या सरकारने केलेले तहनामे एक तर त्याला पाळावे लागतील अगर युरोपिअन राष्ट्रांशीं युद्ध करण्याची तयारी तरी करावी लागेल. यांपैकीं दुसरी गोष्ट आज तरी शक्य कोटींतली दिसत नसल्यामुळें नाझीपक्ष निवडून आला तरी आढेवेढे घेऊन का होईना त्याला लॉसेनची तडजोड मान्य करणें भाग पडेल.

### करार कीं कागदाचें चिटोरें ?

परंतु लॉसेन परिषदेंतील तडजोडीचें महत्त्व जें कमी झालें आहे तें नाझी पक्षाच्या गुरगुरण्यामुळे नसून प्रेसिडेंट हूव्हर यांनी लॉसेनच्या तडजोडीचा दोस्त राष्ट्रांनी अमेरिकेला युद्धकर्जाच्या परतफेडीबाबत द्यावयाच्या सुटीशीं कांही संबंध येत नाही असें जाहीर केलें आहे त्यामुळे अमेरिका लॉसेन परिषदेमध्ये झालेल्या करारला मुळीच बांधली नाही असें जेव्हा बाहेर आलें त्या वेळीं लोकांच्या मनांत सहजच अशी शंका आली का अमेरिकेने जर मित्र राष्ट्रांना कर्जफेडी-

बाबत सूट दिलीच नाही तर मित्र राष्ट्रें लॉसेन कराराला चिकटून राहतील अगर नाही ? या बाबतींत पार्लमेंट सभेत जीं प्रश्नोत्तरें झालीं त्यांत असें बाहेर आलें आहे कीं जर मित्र राष्ट्रांच्या धनकोंनी म्हणजे मुख्यतः अमेरिकेनें मित्र राष्ट्रांना युद्धकर्जाबाबत जरूर ती सूट दिली नाही तर लॉसेन करार मित्र–राष्ट्रांवर बंधनकारक नाहीं. अर्थातच लॉसेन कराराची किंमत करार लिहिलेल्या कागदाच्या चिटोऱ्याइतकीच कीं, त्याहून कांही अधिक हें ठरणें सर्वथैव अमेरिकेच्या मर्जीवर आहे.

### जर्मनीचें काय होणार ?

यानंतर प्रश्न उद्भवतो तो असा कीं, लॉसेन कराराकडे ढुंकूनहि न पाहण्याचें जर अमेरिकेनें ठरवलें तर जर्मनीचें काय होणार ? दोस्त राष्ट्रांच्या कराराप्रमाणें पूर्वीची यंग योजना अमलात येणार हें त्याचें सरळ उत्तर आहे. यंग योजनेप्रमाणे जर्मनीनें जेत्या राष्ट्रांना १९६५–६६ सालापर्यंत सरासरी दहा कोटी पौंड व त्यानंतर १९८७–८८ सालापर्यंत प्रतिवर्षी सरासरी सात ते साडेसात कोटी पौंड द्यावयाचे असें ठरलें आहे. परंतु आज जर्मनीच्या अंगीं कर्जफेड करण्याची कुवतच नसल्यामुळे यंग योजना अमलांत येणें अशक्य आहे. अर्थातच अमेरिकेनें युद्धकर्जफेडी बाबत दोस्त राष्ट्रांना अपेक्षित सवलत दिली नाही तर पुढे काय करावयाचें हें ठरविण्याकरिता पुनः एकदा एक परिषद भरवून परिस्थितीचा फेर विचार करावा लागेल. परंतु ब्रिटिश मुत्सद्द्यांना अशी आशा आहे कीं, अमेरिका दोस्त राष्ट्रांच्या कर्जाच्या फेडीचा सहानुभूतिपूर्वक विचार करील.

### अमेरिकन धोरणाचा अंदाज

आता अमेरिकेकडे दृष्टि टाकली असता काय दिसतें तें पाहूं. प्रेसिडेण्ट हूव्हर यांनी शस्त्रनियंत्रणाबाबत सुचविलेली योजना फ्रान्सने लाथाडल्यामुळे प्रेसिडेंट हूव्हर यांनीहि लॉसेनच्या करारार्शी आमचा कोणताहि संबंध नाही व अमेरिकेच्या वतीने लॉसेन परिषदेच्या कामाकडे लक्ष ठेवण्याकरिता हजर राहलेल्या प्रतिनिधींनीहि लॉसेन करार होण्याच्या वेळीं दोस्त राष्ट्रांच्या युद्धकर्जाच्या फेरविचाराबाबत अमेरिकेतर्फे शब्द गुंतवलेला नाही असें जाहीर केलें तें युक्त असेंच झालें. परंतु पुढें अमेरिका काय करणार इकडे जगाचे डोळे लागणें साहजिकच आहे. अमेरिकेच्या नवीन प्रेसिडेण्टाची निवडणूक होण्यास ३ महिने राहिले आहेत व ती निवडणूक होऊन नवीन प्रेसिडेंटाची कारकीर्द सुरू होईपर्यंत हा प्रश्न असाच लोंबकळत राहणार हें उघड आहे. परंतु एक गोष्ट स्पष्ट आहे व ती ही कीं जागतिक आर्थिक अनवस्था प्रसंग टाळण्यासाठी ज्याप्रमाणे एक वर्षाची कर्जफेड–तहकुबी अमेरिकेला जाहीर करणें भाग पडलें त्याप्रमाणे कांही अटींवर युद्धकर्जाबाबत सूट देण्याच्या प्रश्नाचा विचार करणें अमेरिकेला अपरिहार्य आहे. असा विचार करण्यास तयार होण्यापूर्वी शस्त्रनियंत्रणाच्या योजनेला युरोपिअन राष्ट्रांना संमति देण्यास अमेरिका भाग पाडल्याविना राहणार नाहीं असें म्हणणें अप्रस्तुत ठरणार नाही.

## हिंदूंचा भयंकर ऱ्हास

आपल्या जातीची उन्नति व्हावी, व आपल्या समाजाचे वर्धन व्हावें असें जगांतील प्रत्येक जातीला वाटणें अगदीं स्वाभाविक आहे. आपल्या जातीची धार्मिक, राजकीय, सामाजिक व आर्थिक उन्नति व्हावी, त्याचप्रमाणे जातीचें संख्याबल वाढावें हीहि महत्त्वाची गोष्ट आहे. आणि कोणत्याहि समाजाच्या जिवंतपणाचें चिन्ह म्हणजे त्या समाजाची सतत वाढ होत जाणें. जो समाज उन्नतिपथावर अग्रेसर होण्याचा प्रयत्न करीत नाही तो जगांत जिवंत राहणेंहि कठिण, बहुधा अशक्य असतें. एखाद्या जातीला एकसारखी गळती लागली, त्याची वाढ खुंटली तर तो समाज केव्हा ना केव्हा तरी नष्ट होणार यात तिलमात्रहि शंका नाही. केवळ इतिहासांत फार तर अशा जातीचा उल्लेख राहील.

आजकाल या प्रश्नाला विशेष महत्त्व प्राप्त झालें आहे. आपल्या जातीची सतत वाढ व्हावी असें म्हटलें तरी राजकीय बाबतींत स्वतंत्र मतदारसंघ असावेत असा मात्र याचा अर्थ नाही. कारण समाजधर्म व राष्ट्रधर्म यांत भेद आहे. राष्ट्रधर्म हा राष्ट्रांत नांदणाऱ्या सर्व जातींना बंधनकारक असतो. आणि समाजधर्म त्या समाजापुरताच असतो.

परंतु राजकारणांत जातवारीचें खूळ उत्पन्न झाल्याने समाजधारणेवर, विशेषतः हिंदु समाजाच्या अस्तित्वावरच, एक प्रकारें घाला घालण्यांत येत आहे. कारण या पद्धतीमुळे प्रत्येक जमात आपापल्या जातीची संख्यावृद्धि करण्याचा अट्टाहास करूं लागेल, नव्हे लागली आहे व ही

गोष्ट खानेसुमारीच्या आंकड्यांवरून सिद्ध करतां येण्याजोगी आहे. त्यावरून हिंदु जातीचा केवढा प्रचंड ऱ्हास होऊं लागला आहे, याची चांगली कल्पना येईल.

हिंदुस्थानाची लोकसंख्या स. १९२१ सालीं ३१ कोटी ८९ लक्ष होती ती १९३१ च्या खानेसुमारींत ३५ कोटी १० लक्ष झाली. परंतु ही जी वाढ झाली, तींत हिंदु समाजाच्या पदरांत किती माप पडलें, हें पाहण्यासारखें आहे.

जगांत चार मोठे धर्म प्रचलित आहेत. ख्रिस्ती, बुध्द, मुसलमान व हिंदु. व हाच अनुक्रम लोकसंख्येंतहि लागतो. स. १९२१ मध्ये हिंदुस्थानांत हिंदूंची लोकसंख्या २१६७३४५८६ इतकी होती. आता स. १८८१ पासून आतापर्यंत झालेल्या खानेसुमारींत हिंदूंची संख्या कशी घटूं लागली हें पाहा—

हिंदूंची शेंकडा संख्या

| | |
|---|---|
| स. १८८१ | ७४·६ |
| स. १८९१ | ७३·४ |
| स. १९०१ | ७१·८ |
| स. १९११ | ६१·२ |

स. १९२१ मध्ये ही संख्या शें. ६८.६ इतकी झाली. म्हणजे केवळ चाळीस वर्षांत शें. ६ इतकी हिंदूंची संख्या घटली व हेंच प्रमाण कायम राहिल्यास हिंदु समाज जगांतून नष्ट होण्यास फार काळ लागणार नाहीं हें उघड आहे.

सन १९११ सालीं एकंदर हिंदु २१७५८६८९२ होते. १९२१ ,, ,, ,, २१६७३४५८६ राहिले म्हणजे दहा वर्षांत ८॥ लक्ष हिंदु कमी झाले. आता ख्रिस्ती समाजाकडे पाहा.

स. १९११ सालीं ख्रिस्ती संख्या ३८७६२०३ होती. स. १९२१ मध्ये ही संख्या ४७५४०७९ झाली. व स. १९३१ मध्ये तर ६२ लक्षांवर गेली आहे. सरकारी रिपोर्टावरून पाहता दररोज २४४ लोक ख्रिस्तीधर्मांत जातात.

स. १८८१ मध्ये पंजाबांत फक्त ३७९ ख्रिस्ती होते. स. १९२१ मध्ये त्यांची संख्या ३४६२५९ झाली ! ख्रिस्ती मिशनऱ्यांचे प्रयत्नच जबरदस्त सुरू आहेत. हिंदुस्थानांत त्यांचीं ५१ कॉलेजें, ६१० शाळा, ६१ ट्रेनिंग स्कूल्स आहेत. याखेरीज छापखाने, शाळा, कारखाने यांचा व्याप फार मोठा आहे.

हिंदु धर्मावर दुसरा मोठा आघात म्हणजे इस्लामियांचा. उचित अनुचित वाटेल त्या मार्गांनी भ्रष्टीकरण सुरू असतें. स. १९११ मध्ये मुसलमान ६ कोटी ५४॥ लक्ष होते. स. १९२१ सालीं ही संख्या ६ कोटी ८० लक्ष झाली.स.१९३१ मध्ये ६७६७७५४५ झाली.स.१९११ ते १९२१ पुढीलप्रमाणें लोकसंख्येंत वाढ अथवा घट झाली.

| | | | |
|---|---|---|---|
| मुसलमान | शें. | ३ | वाढ |
| शीख | ,, | ७॥ | वाढ |
| बौद्ध | ,, | ८॥ | वाढ |
| ख्रिस्ती | ,, | २२॥ | वाढ |
| हिंदु | शें. | ३९ | घट |
| जैन | शें. | ५·५८ | घट |

सन १९३१ च्या खानेसुमारीप्रमाणे हिंदुस्थानांतील लोकसंख्या ३५२८३७७७८ होती त्यांत—

| | |
|---|---|
| हिन्दु | २३९१९३६३५ |
| मुसलमान | ७७६७७५४५ |
| शीख | ४३३५७७१ |
| जैन | १२५२१०५ |
| बुद्ध ( ब्रह्मदेशासह ) | १२७८६८०६ |
| ट्रायबल | ८३९१०६५ |
| ख्रिस्ती | ६२९६७६३ |
| झेरोस्टोरियन | १११८५३ |
| ज्यू | २४१४१ |
| इतर | ४५९८७३ |

वर स.१९२१ मध्ये ख्रिस्ती व मुसलमान समाजांची वाढ किती झाली ती पाहिली व स. १९३१ चे आंकडे पाहिले म्हणजे ते समाज सारखे कसे फुगत चालले आहेत व हिंदु समाज कसा रोडावत चालला आहे हें पाहिलें म्हणजे कोणाहि हिंदूंचें हृदय पिळवटल्याखेरीज राहणार नाहीं. हिंदु समाजास अशी अफाट गळती लागली असूनसुद्धा कित्येकांस हिंदु संघटनेचें व शुद्धीकरणाचें कार्य पटूं नये यासारखी शोचनीय स्थिति कोणती ?

# नवीं मोहरीं आणि नवा खेळ

गोलमेज परिषदेने नेमलेल्या लोथियन कमिटीच्या शिफारशींप्रमाणे प्रांतिक कौन्सिलांची रचना कशी होईल याचें विवेचन ता. १७ जूनच्या केसरीच्या अग्रलेखांत केलें आहे. त्या शिफारशींचा परिणाम हिंदुस्थान सरकाराच्या वरिष्ठ कौन्सिलांवर कसा दृष्टीस पडेल या विषयाचा विचार अद्यापि व्हावयाचा राहिला असल्याने त्याच विषयावर आज लिहिण्याचें योजिलें आहे.

मांटेग्यू-चेल्म्सफर्ड सुधारणांचें युग अवतरण्यापूर्वी प्रांतिक कौन्सिलांप्रमाणे हिंदी वरिष्ठ कायदेकौन्सिलाचेंहि एकच सभागृह होतें परंतु त्यांत सरकारनियुक्त सभासदांचें मताधिक्य असल्यामुळे लोकनियुक्त सभासदांना यशाच्या अभावीं तें एक केवळ तालिमखाना वाटावा यांत नवल नाही. सदर कौन्सिलांत लोकनियुक्त सभासदांच्या सरकारी अधिकाऱ्यांशीं कुस्त्या अशा क्वचित् लागत असत. त्यांनी सरकारी सभासदांपाशीं डावपेंच काय ते शिकावे व ते नीट साधल्याबद्दल त्यांच्यापासून वाहवा मिळवावी. पण मॉंटेग्यू-चेल्म्सफर्ड रिपोर्टाप्रमाणे १९१९ सालीं जन्मास आलेल्या राज्यघटनेनें हिंदी सभासदांना लढण्याकरिता लेजिस्लेटिव्ह असेंब्लीचें वेगळें रणमंडळच बांधून मिळालें. असेंब्लीचे एकंदर सभासद १४५ पर्यंत वाढविण्यांत आले. त्यांपैकीं १०४ सभासद लोकांनीं निवडावयाचे असें ठरलें. त्यांच्याशीं सामना देण्यास २६ सरकारी सभासदांची पलटण व तिच्या मदतीस १५ सरकारनियुक्त सभासद असा जंगजोड जमला. हीं दोनंहि पक्षांचीं दळें पाहिल्यास लोकपक्षाचा फौजफाटा एवढा अफाट दिसतो कीं त्याने सरकारी पलटणीची सहज चटणी उडवावी.

परंतु जें पिवळें दिसतें ते सगळें सोनेंच असतें असें नाही. पूर्वीच्या कंपनीसरकाराच्या पलटणींत व हिंदी राजांच्या लष्करांत जो फरक तो सांप्रतच्या सरकारपक्षांत व लोकपक्षांत आढळतो. सरकारी चमू चिमुकली असली तरी तो कवायती व शिस्तवार कंपू आहे. हिंदी सैन्य प्रचंड दिसलें तरी तें गैरशिस्त, फितुरी व फुटीर आहे. यामुळे एकशिस्तीच्या, एक-दिलाच्या व एक-ध्येयाच्या सरकारी कवायती कंपूपुढे त्याच्या बहुधा ठिकऱ्या ठिकऱ्या उडतात. तशांतूनहि त्यांस चतुर व विश्वासपात्र सेनापति भेटला तर या विस्कळित फौजेस शिस्त मिळून ती केव्हा केव्हा असामान्य पराक्रमहि करून दाखविते. याचा अनुभव स्वराज्य पक्षाच्या अमदानींत कित्येक वेळां आलेला आहे. परंतु असे प्रसंग विरळाच दृष्टीस पडावयाचे. हें मॉंटेग्यूप्रभृति तत्कालीन ब्रिटिश मुत्सद्द्यांस माहीत असल्यामुळे त्यांनी केवळ कुतूहलपूर्वक लोकपक्षाकरिता असेंब्लीचें रणांगण बांधून दिलें.

पण या रणांगणावर लोकपक्षाची एखादे वेळीं फत्ते झाली व ती सरकारास गैरसोयीची वाटली तर या विजयी सैन्याची चाल थोपवून धरण्याकरिता तिच्यापुढे एकाहून एक चढ असे खंदक व तट बांधले आहेत. कौन्सिल ऑफ स्टेट ही त्यांपैकींच एक तटबंदी होय. तिचे एकंदर ६० सभासद आहेत. त्यांतील सरकारी व सरकारनियुक्त सभासद २७ आहेत. पण बाकीचे ३३ लोकनियुक्त सभासद बहुधा असे वेचक असतात कीं जिगरदोस्त समजून त्यांच्यावर सरकाराने आणीबाणीच्या प्रसंगीं डोळे मिटून विश्वास टाकावा. आधी त्यांच्यांत हिंदु-मुसलमान काळे-गोरे अशा प्रकारचे पक्षभेद आहेतच. पण त्याखेरीज कोणी जमीनदार, कोणी जहागिरदार, कोणी शेठ सावकार अशा प्रकारच्या सरकारी कृपेस आळविणाऱ्या मण्यांची माळ असल्याने ती सरकारास बांधून घालण्याऐवजीं शोभविण्याकरिताच गुंफली गेली आहे हें कोणाच्याहि सहज लक्षांत येण्यासारखें आहे.

तथापि या बड्या बापांच्या बेट्यांना सरकारास दगा देण्याची लहर लागणार नाही कशावरून? तशी त्यांना लहर लागून अडळ समजलेलें पद धरणीकंपाने हादरलें तर शेवटचे सर्टिफिकिटाचें ब्रह्मास्त्र व्हाइसरॉयाच्या हातांत प्रचलित राज्यघटनेनें ठेवलेंच आहे. मांटेग्यू-चेम्सफर्ड रिपोर्टांत मूळ योजना कौन्सिल ऑफ स्टेटमध्ये सरकारचें हुकुमी बहुमत राखण्याचीच होती. म्हणजे सर्टिफिकेशनच्या वेळीं असेंब्लीचा नसला तरी स्टेट कौन्सिलाचा आधार आपणास आहे इतकें जगास दाखविण्याचें साधन हिंदुस्थान सरकारापाशीं असावें अशी वरील दुकलीची इच्छा होती. पण जॉइंट पार्लमेंटरी कमिटीस ही पळवाट पसंत पडली नाही. स्टेट कौन्सिलच्या पाठीशीं गव्हर्नर जनरलाने दडण्यांत सदर कमिटीस नामर्दपणा वाटला. सरकाराने आणिलेले एखादें बिल असेंब्लींतच काय पण कौन्सिल ऑफ स्टेटमध्येंहि नापास झालें तरी गव्हर्नर जनरलाने राजरोसपणें स्वतःच्या जबाबदारीवर आपलें सर्टिफिकीट देऊन तें पास करावें असें पार्लमेंटरी कमिटीने ठरवून स्टेट कौन्सिलांत बिनसरकारी बहुमताचीच योजना केली. तें बहुमत किती तकलुपी, ढिसूळ व पोकळ आहे याचा अनुभव गेल्या बारा वर्षांत हिंदुस्थानाने भरपूर घेतलाच आहे.

सरकारी सभासदांचा कंपू सांप्रत असेंब्लींत आहे व स्टेट कौन्सिलांतहि आहे. आणि तोच कंपू प्रतिपक्षीय लोकमताचा बुरूज ढासळून टाकून नोकरशाहीस विजय मिळवून देण्यास पुष्कळ वेळां उपयोगी पडतो. लोथियन कमिटीच्या शिफारशी अमलांत आल्यास ले. असेंब्लीचें नांव हल्लीप्रमाणे पुढे कायम राहील.मात्र कौन्सिल ऑफ स्टेटचें नाव बदलून त्यास सीनेट म्हटलें जाईल. स्टेट कौन्सिलाचे सभासद सांप्रत साठ आहेत. त्यांची संख्या नव्या सीनेटमध्ये दोनशेंपर्यंत वाढावी अशी गोलपरिषदेच्या फेडरल स्ट्रक्चर कमिटीने सूचना केली होती.तीच सूचना लोथियन कमिटीलाहि मान्य आहे.त्या सभासदांपैकीं ४० टक्के म्हणजे ८० जागा संस्थानिकांना द्याव्या असें फेडरल स्ट्रक्चर कमिटीने ठरविलें आहे. हल्ली कौन्सिल ऑफ स्टेटच्या ६० सभासदात २० सरकारी अधिकारी व ६ सरकारने नेमलेले सभासद असतात. त्यांचें प्रमाण एकंदर संख्येशीं ४३ टक्क्यांहून थोडें अधिक पडतें. भावी सीनेटमध्ये सरकारी सभासदांना मताधिकार नाही. तथापि त्याची परपरा दत्तक पुत्राप्रमाणे संस्थानिकांनी चालू ठेवावी, यासाठीच फेडरेशनचें खूळ उभें करून त्यांच्यांत त्यांना घुसडून देण्याचें सायमनसाहेबापासून सर्व जबाबदार ब्रिटिश मुत्सद्द्यांनी गुप्तपणें योजिलेलें दिसतें.

वास्तविक संस्थानांतील लोकसंख्येचें प्रमाण खालसा मुलुखांतील लोकसंख्येशीं वरील प्रमाणांत नाही. त्याहून तें फारच कमी आहे. तशांत संस्थानांतील प्रजाजनांचे प्रतिनिधि सिनेटमध्ये यावयाचे असते तर चिंता नव्हती. कारण त्यांचें व ब्रिटिश हिंदुस्थानांतील प्रतिनिधींचें पुष्कळ बाबतींत एकच धोरण राहण्याचा संभव होता. पण सध्याच्या योजनेप्रमाणे संस्थानिक व संस्थानिकांचे प्रतिनिधिच सीनेटमध्ये बसणार असल्याने त्यांच्याकडून हिंदी प्रतिनिधींना मदत मिळण्याऐवजी पुष्कळ वेळां विरोधच होईल अशी भीति वाटते. संस्थानी प्रतिनिधि फक्त आपल्या हितसंबंधास डोळ्यांत तेल घालून जपतील आणि जेथे ब्रिटिश सरकार व हिंदी लोक यांचा हितविरोध येईल तेथे ते बहुधा हिंदी लोकमतास तोंडघशीं पाडून आपण सरकारचीच पाठ राखतील. सध्याच्या स्टेट कौन्सिलाइतकेंच भावी सीनेट हिंदुस्थानच्या राजकीय प्रगतीस खीळ घालील.

वस्तुतः संस्थानांचे प्रतिनिधि हे साधारणपणें संस्थानाचे अधिपति अथवा संस्थानांचे अधिकारीच होत. त्याची खालसा मुलखाशीं तुलना करावयाची झाल्यास इंग्रज सरकारच्या अधिकारी वर्गाशींच केलेली शोभेल. त्यांना संस्थानांचे प्रतिनिधि नेमणें व इंग्रजी अधिकाऱ्यांस खालसा मुलखाचे प्रतिनिधि समजणें सारखेंच. इंग्रज अधिकाऱ्यांवरच खालसा मुलखाचें प्रतिनिधित्व भागण्याजोगें असतें तर जनतेस आपल्यातर्फे सभासद निवडून देण्याचा व त्यांचें कायदेमंडळांतून पूर्णपणें मताधिक्य करण्याचा सरकारचा खटाटोप हवा होता कशाला! कांही संस्थानिकांनी आपल्या प्रजाजनांस कौन्सिलें दिलीं आहेत. ते आपल्यातर्फे आपल्या अधिकाऱ्यांना प्रतिनिधि या नात्याने सीनेटमध्ये व असेंब्लीमध्ये पाठवितांना कदाचित् काही लोक-प्रतिनिधींनाहि पाठवितील. परंतु अशीं संस्थानें फारच थोडीं असल्याने बहुतेक गर्दी संस्थानी अधिकाऱ्यांचीच होईल असें समजून चालण्यास हरकत नाही.

ले. असेंब्ली व कौन्सिल ऑफ स्टेट यांची सांगड सांप्रत जमली आहे; तशीच असेंब्ली व सीनेट यांचीहि पुढे जमणार असल्याने भावी सीनेटस्टेट कौन्सिलाप्रमाणेंच असेंब्लीचा पाय दरखेपेस मागे ओढील. फेडरल स्ट्रक्चर कमिटीने असेंब्लीचे सभासद तीनशें असावे अशी शिफारस केली आहे. याहि रूमाग्रहांत, हिंदी लोकमताच्या पायांत संस्थानी प्रतिनिधींचा खोडा घालण्यांत आलाच आहे. फेडरल स्ट्रक्चर कमिटीने सदरील तीनशें सभासदांपैकीं शंभर सभासद संस्थानिकांचे असावे असें म्हटलें आहे. म्हणजे असेंब्लींतील एकतृतीयांश जागा एकट्या संस्थानिकांच्याच झाल्या. हिंदुस्थानाच्या एकंदर लोकवस्तीशीं संस्थानी वस्तीचें प्रमाण एकचतुर्थांशापेक्षां थोडें अधिक आहे. सीनेट व असेंब्ली यांत संस्थानांचे प्रतिनिधी घेतांना त्यांना हेंच प्रमाण लागू करावयास नको काय? तसें न करता फेडरल स्ट्रक्चर कमिटीने संस्थानिकांना सीनेटमध्ये पंचवीस तीस टक्क्यांऐवजी चाळीस टक्के जागा देण्याचें ठरविलें आहे. मात्र असेंब्लींत हें प्रमाण बदलून ४० टक्क्यांऐवजी ३३ टक्क्यांवर आणिलें आहे. म्हणजे सीनेट व असेंब्ली यांतहि असेंब्लीच्या बाबतींत प्रतारणा झालीच आहे. सीनेटच्या वेळीं विंचवाच्या वेदनांप्रमाणे प्रतिनिधींचें प्रमाण चढावें व असेंब्लीच्या वेळीं मात्र मंत्र घातल्यासारखें तें उतरावें याचें कोणासहि आश्चर्य वाटल्याशिवाय राहणार नाही.

वरील भेदभाव सहजासहजीं झाला आहे असें म्हणवत नाही. त्याला तशींच महत्त्वाचीं कारणें आहेत. सीनेटमधील सभासद संपत्तीने व इतमामाने फार श्रेष्ठ दर्जाचे असल्यामुळे त्यांच्यांतील हिंदी सभासदांत हिंदु व मुसलमान अशी दुफळी असली तरी ती सहसा दृष्टीस पडणार नाही. ही दुफळी सांप्रतच्या स्टेट कौन्सिलांतहि बहुधा आढळत नाही. पण त्यांत सरकारी सभासदांचें बळ मोठें असल्याने त्यांच्या वजनाने सरकारची

मसलत सहज साधते. नव्या सीनेटमध्ये सरकारी सभासद नाहीत. तेव्हा संस्थानी प्रतिनिधींचें प्रमाण असेंब्लीपेक्षा सीनेटमध्ये अधिक ठेवल्यास सरकारचा कार्यभाग हल्लीसारखा यापुढेहि अनायासें उरकणार आहे.

असेंब्लीच्या सभासदांपैकीं एकतृतीयांश जागा संस्थानिकांनी आटोपल्यावर ब्रिटिश हिंदुस्थानाच्या वांट्यास फक्त दोनशेंच जागा उरतात. या जागा लोथियन कमिटीस ब्रिटिश हिंदुस्थानाच्या विस्ताराच्या मानानें अपुऱ्या वाटल्यामुळे तिनें दोनशेंऐवजीं तीनशें जागा सुचविल्या आहेत. लोथियन कमिटीच्या शिफारशींप्रमाणे हिंदी प्रतिनिधींची संख्या वाढल्यास त्याच प्रमाणांत संस्थाना प्रतिनिधींची संख्या वाढून त्यांच्या वांटयास १०० जागांऐवजी १३३ जागा येणार हें उघड आहे. हल्ली असें, ब्लीच्या १४५ सभासदांत सरकारी सभासद २६ व सरकारानें नेमलेले बिनसरकारी सभासद १५ मिळून सरकारच्या वतीचे सभासद ४१ आहेत. भावी असेंब्लींतून सरकारी सभासदांची छावणी उठणार असल्यानें त्यांच्या तळावर दुसरी कोणाची तरी छावणी पडलीच पाहिजे. ती छावणी यापुढे गोऱ्या सैन्याऐवजी काळया म्हणजे संस्थानी सैन्याची पडणार इतकाच फरक. कारण गोऱ्या सैन्याच्या खालोखाल ब्रिटिश सरकाराशी इमानानें वागतील असे संस्थानिकांइतके राजनिष्ठ सैनिक दुसरे कोण आहेत! कदाचित् त्यांच्यापैकीं कांहीं, जातीला जात मिळावी त्याप्रमाणें हिंदी प्रतिनिधींना फितूर झाले तरी इमानी सैनिकांचा कंपू मोठा रहावा, यासाठी त्यांचें प्रमाण सध्याच्या गोऱ्या सैनिकांपेक्षां बरेंच वाढविलेलें दिसतें. हल्ली गौर व गौरप्राय सभासदांचे प्रमाण एकंदर सभासदांशीं एकषष्ठांशास थोडें कमीच पडतें. परंतु संस्थानी सैन्याचें प्रमाण एकतृतीयांश म्हणजे सध्याच्या दुप्पट होणार हा संस्थानिकांच कसला, हिंदुस्थानसरकारचा फायदा फेडरल स्ट्रक्चर कमिटींत लॉर्ड सँके यांनी काय थोडा साधला !

गोऱ्या सैनिकांच्या बराका काळया संस्थानी सैनिकांनी दुपटीनें भरून काढल्यावर त्यांना बलकबुलीचे वेळीं कुमक करण्यास मुसलमानांचा गोट शेजारीं ठेवण्यांत येणारच आहे. हल्ली असेंब्लींत लोकनियुक्त मुसलमान सभासद तीस आहेत. म्हणजे असेंब्लींतील सभासदांच्या एकंदर संख्येशीं त्यांचें प्रमाण एकपंचमांशापेक्षां थोडें जास्ती आहे. नव्या असेंब्लींत त्यांना एकतृतीयांश म्हणजे संस्थानिकांसारख्या १०० ते १३३ पर्यंत जागा देण्यांत याव्या अशी हिंदुस्थान सरकारानें आपल्या खलित्यांत पहिल्या गोलमेज परिषदेच्या वेळींच शिफारस करून ठेविली आहे. येत्या ऑगस्ट महिन्यांत ब्रिटिश मंत्रिमंडळ हिंदु-मुसलमानांच्या वादाचा निकाल सांगेल, तेव्हां तें हिंदुस्थानसरकारच्या पावलावर पाऊल टाकून मुसलमानांस ममतापूर्वक उचलून उराशीं धरणार हें निश्चित होय. तसें झाल्यास हिंदूंच्या म्हणजे खऱ्या हिंदी राष्ट्राच्या छातीवर सारख्या व[illegible]नाच्या दोन चिपा एकावर एक रचल्या जाणार यांत शंका नाही. तशांत मुसलमानांना संयुक्त मतदारसंघाऐवजीं विभक्त मतदारसंघ देण्यांत आल्यावर तो मुसलमानांचा व नोकरशाहीचा आनंद काय वर्णावा !

हिंदुस्थानांत मुसलमान सात कोटी व संस्थानी प्रजाजन सात कोटी मिळून त्यांची चौदा कोटींची शिरगणति होते. त्यांना असेंब्लींतील दोनतृतीयांश जागा आणि उलटपक्षीं हिंदू, पार्शी, यहुदी, ख्रिस्ती, शीख इत्यादि अठरा कोटी लोकसंख्येस अवघ्या एकतृतीयांश जागा हा काय न्याय म्हणावयाचा कीं न्यायाची चेष्टा म्हणावयाची, समता समजावयाची कीं समतेची कुचेष्टा मानावयाची, हें ठरविणें आम्ही वाचकांवरच सोंपवितों. अस्पृश्य वर्गाकरिता वेगळा मतदारसंघ असावा कीं संयुक्त मतदारसंघ असावा याचा निर्णय मुख्य प्रधान मि. राम्से मॅक्डोनॉल्ड येत्या महिन्यांत सांगणार आहेत. त्यांनीहि डॉ. अंबेडकर यांना हवा तसा कौल दिल्यास अस्पृश्यांकरिता वेगळा मतदारसंघ व राखीव जागा हा सोहळा थेट मुसलमानांच्या थाटावर उडून अस्पृश्यांनी आपले डेरेराहुट्या शौकतअलीप्रभृति मुसलमानांच्या शेजारीं ठोकल्या म्हणून समजावें. अशा रीतीनें राजैश्वर्यसंपन्न संस्थानिक, महमुदानुयायी मुसलमान व अंबेडकरांच सवंगडे अस्पृश्य असे त्रिवर्ग दोस्त एका बाजूला आणि स्पृश्य हिंदु प्रभृति सभासद दुसऱ्या बाजूला असा सामना जुंपल्यास त्यांत हिंदु आदिकरून सभासदांचा मोड खास ठरलेला. नव्या डावांतील नव्या मोहऱ्यांची रचना या प्रकारची असल्यानें नवीन सीनेट हें जुन्या स्टेट कौन्सिलाचेंच भावंड शोभणार, पण नवी असेंब्ली ही जुन्या असेंब्लीपेक्षांहि कमजोर ठरून राजकीय प्रगतीच्या दृष्टीनें हिंदुस्थानाचें पाऊल पुढे न पडता मागेंच हटणार असा रंग दिसतो.

# चित्रपटावरील नियंत्रण

## कोठें, किती आहे ?

भिन्न रुचीच्या सर्व जनांचें समाधान करणारें नाटक सर्वत्र प्रसार पावलेलें आहे; त्याप्रमाणें किंवा त्यापेक्षांहि कांकणभर अधिक प्रसार चित्रपटांचा झालेला आहे. अशा चित्रपटांचें नियमन करण्याची व्यवस्था कोणत्या देशांत कोणत्या प्रकारची आहे, हें पुढे दिलें आहे.

### हिंदुस्थान

हिंदुस्थानांतील प्रत्येक प्रांतांत चित्रपटांचें एक नियंत्रक मंडळ असतें. तसें तें मुंबई इलाख्यांतहि आहे. त्याचे महत्त्वाचे नियम पुढे दिले आहेत. त्यांच्या कसोटीवर कोणताहि चित्रपट पारखून प्रेक्षकांना त्या मंडळाकडे आपलें मत कळवितां येण्यासारखें आहे. त्या मंडळानें पुढील प्रकारच्या चित्रपटांना बंदी केलेली आहे—

(१) गुन्ह्याला उत्तेजन देणें, चोरी, दरोडे, अत्याचार यांना प्राधान्य देऊन त्यांचीं साधनें तरुण प्रेक्षकांच्या डोळ्यांपुढे ठेवणें.

(२) नीतिविषयक कल्पना ढासळणें, दुर्गुणांचें वर्णन चटकदारपणें करणें, दुःस्थितींतून बाहेर पडण्यासाठी दुष्ट मार्गाचा अवलंब करणें अनीतीचें नाही असें दाखविणें, विवाहसंस्था व कौटुंबिक भावना यांविषयी तिरस्कार उत्पन्न करणें आणि स्त्रीपुरुषसमागमाच्या भ्रष्ट कल्पना रंगविणें.

(३) नग्नावस्था दर्शविणें—याला अपवाद लहान मुलें.

(४) सार्वजनिक अधिकारी—न्यायाधीश, पोलीस, उपाध्याय वगैरे—यांजबद्दल तुच्छभाव उत्पन्न करणें.

(५) एकाद्या देशाच्या किंवा धर्माच्या भावना दुखविणें.

( ६ )समाजांत अस्वस्थता व असंतुष्टता चेतविणें, गरीबीची राहणी दर्शविण्यास चिंता नाही, पण मजूर व भांडवलवाले यांच्या झगड्यांतील अत्याचारांचें वर्णन करणें.

( ७ ) सरकाराबद्दल अप्रीति अथवा विरोध उत्पन्न करणें किंवा कायदा व व्यवस्था यांच्या उल्लंघनाला उत्तेजन देणें.

( ८ ) प्रेमाच्या उथळपणाचे प्रसंग, स्त्रीपुरुषांच्या एकत्र शयनाचे देखावे, वेश्याव्यवसायाचें वर्णन, व्यभिचाराचे परिणाम, स्नानाचे असभ्य देखावे, अप्रशस्त नृत्य, अर्भक, अबला, जनावरें इत्यादिकांशीं क्रौर्याचें वर्तन, युद्धप्रसंगाची भीति, संततिनियमनाचे उल्लेख, स्वैरप्रेम आणि लघु–विवाहपद्धति.

### जर्मनी

जर्मनीमध्ये १९२० सालीं चित्रपटांचा कायदा झाला. तो संयुक्त सरकारचा असल्यामुळे सर्व संस्थानांना लागू आहे. परंतु त्याची अंमलबजावणी करण्याची जबाबदारी प्रत्येक संस्थानाकडे सोंपविलेली आहे. प्रत्येक संस्थान पांच माणसांचें एक नियंत्रक मंडळ नेमतें. त्यांत सार्वजनिक कार्य व शिक्षणविषयक कार्य करणारे दोघे जण, कलेचा तज्ज्ञ असा एक, चित्रपटाच्या धंद्याचा प्रतिनिधी एक आणि अध्यक्ष म्हणून सरकारी अधिकारी एक असे अधिकारी असतात. याशिवाय बर्लिनमध्ये एक ' खास मंडळ ' असतें. त्याकडे अपील करतां येतें.

सार्वजनिक शांतता आणि सुरक्षितता, धार्मिक भावना, नीतिविषक कल्पना, परराष्ट्रसंबंध यांना दुखविणाऱ्या चित्रपटांना परवानगी मिळत नाही. एखादा चित्रपट कला किंवा शास्त्र या दृष्टीने महत्त्वाचा असल्यास वरील अटी मोडूनहि तो कांहीं नियमित श्रोतृवर्गास दाखविण्याला मुभा देण्यांत येते. उद्दीपक, नीतिविघातक किंवा शारीरिक हानि करणारा चित्रपट १८ वर्षांच्या आंतील मुलांना दाखविला जाऊं देत नाहीत. सर्व जगांत जर्मनीच्या नियंत्रक मंडळाचें धोरण अत्यंत उदार आहे.

### फ्रान्स

सरकारी नोकर, नाट्यनिरीक्षक, कलाकोविद इत्यादिकांचें मिळून एक नियंत्रक मंडळ असतें. चित्रपटाच्या धंद्याचा प्रतिनिधी त्यावर घेतलेला नसला तरी ज्या चित्रपटासंबंधी चर्चा चालली असेल त्याच्या मालकाला आपला प्रतिनिधी पाठवितां येतो. नियंत्रक मंडळानें प्रसिद्ध केलेल्या चित्रपटाला मज्जाव करण्याचा अधिकार स्थानिक अधिकाऱ्यांचे हातीं आहे. पण मंडळानें नाकारलेल्या चित्रपटाला स्थानिक अधिकारी परवानगी देऊं शकत नाहीत. दरसाल सुमारें चार-पांचशें चित्रपटांना हरकत घेतां येते; पण त्यांना अजीबात बंदी करण्यापेक्षां त्यांतील आक्षेपार्ह भाग गाळून टाकण्याकडेच नियंत्रकांचा कल असतो. सर्वांपेक्षां राजकारणाच्या चष्म्यांतून ते अधिक पाहात असतात. लष्करासंबंधी आदर, राष्ट्रीय संस्था, सरकारी नोकर यांचा मान, देशभक्तीच्या भावना इत्यादिकांना धक्का देणाऱ्या चित्रपटाना विरोध करण्यांत येतो. युद्धाची चेष्टा केली तरी ती हरकतीला कारण होऊं शकते. रशियांतील

चित्रपटांना परवा परवापर्यंत पूर्ण अडसर लावलेला होता, आणि अजूनहि त्याविरुद्ध भावना प्रबळ आहेत. दहा वर्षांखालील मुलांना बरोबर कोणी असल्याशिवाय चित्रगृहांत जाऊं देत नाहीत. खास मुलांकरिता पॅरीसमध्ये एकदोन चित्रगृहें आहेत. तेथे दर फार कमी ठेवलेले असतात आणि मुलांना उपयुक्त असेच चित्रपट दाखविण्यांत येतात.

### इटली

इटालीमध्ये नियंत्रण संस्थेचा जन्म फार पूर्वी म्हणजे १९१३ सालीं झाला. तेथील नियंत्रण मंडळांत अध्यक्ष म्हणून एक पोलीस अधिकारी, एक मॅजिस्ट्रेट आणि एक माता यांचा समावेश केलेला असतो. राष्ट्रीय मातृशिशुहितेच्छु संस्थेने सुचविलेल्या सहा नांवांपैकीं एका मातेचें नांव पसंत केलें जातें. पुढील प्रकारच्या चित्रपटांना बंदी करण्यांत येते.

(१) सार्वजनिक नीतिमत्ता आणि सुव्यवस्था यांना धोक्यांत आणणारे.

(२) राष्ट्राची इभ्रत किंवा परराष्ट्रांशीं संबंध यांना धक्का पोंचेल अशा प्रकारचें राजकारण दाखविणारे.

(३) धार्मिक भावना दुखविणारे.

(४) गुन्ह्याला उत्तेजन देणारे.

(५) माणसें व जनावरें यांच्याशीं क्रूरतेचे वर्तन दाखविणारे.

(६) आत्महत्त्या, शस्त्रक्रिया आणि वशीकरण यांचें हिडिस स्वरूप चित्रित करणारे.

गुप्त शिपायांच्या किंवा विषय–वासनेच्या चित्रपटांना लहान मुलांना बंदी करण्यांत येते.

### हॉलंड

१९२८ सालीं नियंत्रणमंडळ अस्तित्वांत आलें. त्यांत निरनिराळ्या राजकीय व धार्मिक संस्थांचे प्रतिनिधी घेतले जातात. सार्वजनिक शांतता व नीतिमत्ता याची कसोटी लावण्यांत येते. त्याशिवाय स्थानिक अधिकाऱ्यांसहि आपली कात्री चालवितां येते. मुलांनी कोणते चित्रपट पहावे हें ठरविण्यासाठी कांही शहरांमध्यें शिक्षकांचें मंडळ स्थापलेलें असतें.

### स्वित्झर्लंड

चित्रगृहांची संख्या २५० वर आहे. त्यांचें नियंत्रण करण्याची सत्ता प्रत्येक प्रांताला आहे. मध्यवर्ती संयुक्त सरकारला नाही. त्यामुळे निरनिराळ्या प्रांतांत निरनिराळीं नियंत्रणें आढळतात. कांही कॅथोलिक प्रांतांत विषयविषयक चित्रपटांवर करडी नजर ठेवण्यांत येते. आणि व्यभिचाराचे प्रसंग दाखविण्यास प्रतिबंध केला जातो.

दुसऱ्या कांहीं प्रांतांत राजकीय मतावर विशेष कटाक्ष ठेवतात. रशियांतील चित्रपट कांही प्रांतांत संचार करतात, तर कांही प्रांत त्यांना मज्जाव करतात. अशा 'नानात्वामधूनही' कांही नियमांचें 'एकत्व' आढळतें. ते नियम म्हणजे.

( १ ) चित्रगृहाचे मालक आणि व्यवस्थापक सद्वर्तनी असले पाहिजेत ( २ ) अनैतिक चित्रपट बंद केले पाहिजेत. ( ३ ) सर्व चित्रपटांवर स्थानिक पोलीस अधिकारी नियंत्रण ठेवतील. ( ४ ) कांही धार्मिक सणांचे दिवशीं चित्रगृहें बंद ठेवावीत. ( ५ ) कांही कांही प्रसंगीं १६ वर्षांखालील मुलांना त्यांचे पालक बरोबर असले तरी मज्जाव करण्यांत येईल. ( ६ ) चित्रपटांवर जबर जकात बसविली जाईल आणि त्यांनी कांही नियमांचें उल्लंघन केलें तर कडक शिक्षा केली जाईल.

### स्पेन

पोलीस खात्याच्या हातीं नियंत्रणाची सत्ता आहे. आणि ती चालविण्यासाठी ते तज्ज्ञ नोकर नेमतात असतात. रशियासंबंधीच्या सर्व चित्रपटांना पूर्ण मनाई आहे. मुलांकरिता गुरुवारीं आणि सणावाराचे दिवशीं विशिष्ट चित्रपट दाखविले जातात. ते बहुधा बोधप्रद किंवा विनोदी असतात. तेथील पालकवर्ग विशेष नीतिभ्रष्ट चित्रपट दाखविणाऱ्या चित्रगृहांवर बहिष्कार घालतात. त्यामुळे चित्रगृहाचे मालकहि जपून वागतात.

### रशिया

शिक्षणखात्याला जोडून एक नियंत्रण–मंडळ असतें. प्रेक्षकांच्या मनावर समाजसत्तावादाचा ठसा उमटावा हें उद्दिष्ट त्यांच्यापुढे असतें. १६ वर्षांच्या आंतील मुलांना वैषयिक चित्रपट दाखविले जात नाहीत. पाश्चात्य देशांत गरीब श्रीमंत हा भेद कसा नांदतो याचें वर्णन करणारे प्रसंग चित्रपटांत असतात. नास्तिक्य वाद आणि मार्क्सचीं तत्त्वें यांचा पुरस्कार करण्याच्या कामीं चित्रपटांचा उपयोग केला जातो.

### ऑस्ट्रिया

येथे नियंत्रणमंडळ नाही. पण १६ वर्षांच्या आंतील मुलांना कोणते चित्रपट दाखवावे हें सांगण्याकरिता एक सल्लागार—मंडळ आहे. चित्रपट तयार करण्याबाबत कांही नियम घालून देणारा कायदा १९३० सालीं पसार झाला. चित्रपट दाखविण्यापूर्वी तो पोलिसांच्या नजरेखालून जावा लागतो, हें जरी खरें तरी त्याला नियंत्रणाचे स्वरूप नाही. पूर्वी तेथे 'पोलीसशाही' होती. तिचा तो एक अवशेष आहे इतकेंच. १९३० च्या कायद्यामध्ये एक कलम असें आहे कीं, १३ माणसांचें एक सल्लागार–मंडळ असावें आणि त्यानें मुलांसाठी चित्रपट निवडावे. त्या मंडळांत अध्यापक,

प्राध्यापक, व्हिएन्ना म्युनिसिपालिटींतील एक अधिकारी आणि तेथील पोलीस खात्यांतील एक अधिकारी इत्यादि लोक असतात. अपील करावयाचें तें व्हिएन्ना येथील नगराध्यक्षांकडे करतां येतें; हॉलीवूड-मधील बहुतेक चित्रपटांना तेथें मज्जाव आहे, पण शास्त्रीय स्वरूपाच्या चित्रपटांना प्रोत्साहन देण्यांत येतें आणि उत्कृष्ट चित्रपट तर मुलांना फुकट दाखविले जातात.

# जर्मन पंडित नित्शे याचें तत्त्वज्ञान

( लेखक—श्री. रामचंद्र बाळकृष्ण जोशी )

जर्मन पंडित नित्शे याचें तत्त्वज्ञान सद्यःकालीन कल्पनांना अनुकूल नाही; किंवा आजचें प्रचलित तत्त्वज्ञान समजावून देऊन तेंच सिद्ध करण्यासाठी निराळीं प्रमाणें देणारें नाही. तर त्या विचारांच्या व तदनुरूप आचारांच्या प्रचंड ओघाला प्रतिरोध करण्यासाठी तें लिहिलें गेलें आहे. येशू ख्रिस्ताला संत समजून त्याची शिकवण प्रचारांत आणण्याचा आटोकाट प्रयत्न युरोपांत आणि इतर देशांतहि होत आहे. युरोप तर कित्येक शतकें त्याचें अनुयायित्व स्वीकारून समता, बंधुता वगैरे तत्त्वें प्रस्थापिण्यासाठी फ्रेंच राज्यक्रांतीसारख्या मोठमोठ्या खटपटी करीत आले आहे. सामाजिक, राजकीय वगैरे बाबतींत त्या तत्त्वांना मान्यता मिळून आता आर्थिक हितसंबंधांतसुद्धा त्यांचा प्रयोग रशिया करून पाहत आहे. ख्रिस्ती मत विजयी होऊन समतेच्या व बंधुभावाच्या कल्पनांवर जगाच्या सर्व घडामोडी बसविण्यांत येत असतांना त्याला विरोध करण्यासाठी नित्शेनें आपली तत्त्वप्रणाली अनुस्यूत केली आहे. ख्रिस्ताची लाट थोपवून धरण्यासाठीं नित्शे उभा ठाकला आहे.

### ईश्वराचेंहि अस्तित्व नष्ट केलें !

प्रचलित व सुप्रतिष्ठित अशी विचारसरणी उखडण्यासाठी म्हणून जेव्हा प्रयत्न करावयाचा असतो त्या वेळीं प्रतिकारहि तसाच बळकट व्हावा लागतो. रोमन शौर्याच्या कल्पना मारून टाकतांना ख्रिस्तानें भूतदया जशी आत्यंतिक टोकाला नेऊन भिडविली, त्याचप्रमाणे नित्शेनेंहि ही भूतदया हाणून पाडण्यासाठी ‘ युद्धाची ’ घोषणा करून बलोपासना दुसऱ्या टोकाला खेंचली आहे. त्याचे बोल जोरदार आणि शब्दागणिक जुन्या कल्पना हादरून सोडणारे आहेत. “मनुष्य पातकी असून त्याने ईश्वराला भिऊन वागलें पाहिजे; प्राणिमात्रावर दया करावी, शत्रूवरसुद्धां प्रेम करावें, नाहीं तर नरक प्राप्त होईल” अशा प्रकारची शिकवण येशूनें दिली आणि भक्तिपर संन्यासमार्ग उपदेशिला. परंतु त्यामुळे उत्पन्न होणारी निष्क्रियता सहन न होऊन ख्रिस्तमतावर नित्शे तुटून पडला आहे. ही चढाई करण्याच्या आवेशांत भीतिविषय होऊन राहिलेल्या ख्रिस्ताच्या ईश्वरावरहि आघात करून त्याचें अस्तित्व त्याने नष्ट केलें आहे ! आणि आयुष्याचा कर्मपर अर्थ लावून मानवाच्या कर्तृत्वाला वाव मिळवून दिला आहे !

### पूर्वसंस्कृतींचा पाठिंबा

ख्रिस्त—विरोधाच्या या मानसिक अवस्थेप्रमाणेंच दुसरीहि एक गोष्ट नित्शेचे ग्रंथ अभ्यासतांना ध्यानांत येते. ती ही कीं, त्याच्या मतावर ग्रीक व रोमन संस्कृतींचा अतिशय पगडा बसला आहे. त्यांचीं तत्त्वें वर्तमान काळाशीं विसंगत दिसलीं तरी त्या तत्त्वांना भूतकालाचा पाठिंबा आहे. आणि तो म्हणजे या दोन प्रचंड संस्कृतींचा ख्रिस्तपूर्व काळाचें पुनरुज्जीवन करावयाचें व तशा प्रकाराची समाजस्थिति निर्मावयाची असाच त्याचा हेतु आहे; आणि असा जीर्णोद्धार निदान भविष्य—कालांत तरी शक्य आहे अशी त्याची निष्ठा आहे. म्हणून तत्त्वज्ञान, कला वगैरे सर्व गोष्टींत या जुन्या विचारांना त्यानें चालना दिली आहे. ग्रीकांच्या ईश्वरविषयक कल्पना ख्रिस्तमतांहून निराळ्या होत्या. देव आणि भक्त यांमध्ये फारसे अंतर नाही. मानव म्हणजे पातकी प्राणी नसून त्याला इहलोकीं पराक्रम गाजविणें शक्य होईल. ग्रीकांची नीतिमत्ताहि ख्रिस्तनीतीहून जास्त नैसर्गिक असल्यामुळें तेथे वीरांची निपज अधिक झाली. ख्रिस्त— शिकवणीमुळे मानवाची आत्मश्रद्धा नष्ट झाली. नीतिबंधनें इतकीं कृत्रिम झालीं कीं, वीरपुरुषाला थोडेंसुद्धा हालतां येईनासे झालें. आयुष्याचा असा विकृत अर्थ लावल्यामुळे माणसाची अधोगति झाली आहे, व अजूनहि होईल असें त्याचें मत आहे. भूतकालीन ग्रीक व रोमन वीरांवर त्याची दृष्टि खिळली आहे.

### नीत्शे व गीता

अवघ्या येशूनिष्ठ युरोपाला आपले विचार पेलणार नाहीत याची जाणीव त्याला स्वतःलाहि होती त्यानेच सांगून ठेवलें आहे कीं, “ माझे विचार वाचणाराच्या लक्षांत ही गोष्ट येईल कीं, ते फार उंच प्रदेशावरून आलेले वारे आहेत; आणि ते सोसण्यास सामर्थ्यवान् मनुष्य पाहिजे. इतर दुबळे या झंझावातांत गुदमरून

जाण्याचा संभव आहे." परंतु मनुष्याला पातकी म्हणणाऱ्या व स्वर्गनरकांच्या कल्पनांवर विश्वसून त्याला भिणाऱ्या ख्रिस्तानुयायी माणसाला हे विचार जरी धक्का देतील, तरी भगवद्गीतेचें परिशीलन करणाऱ्या हिंदु मनाला ते तितकेसे भिववणार नाहीत. कारण गीतेच्या व नित्शेच्या विचार–सरणींत पुष्कळ ठिकाणीं साम्य आहे. गीतेप्रमाणे त्याने जरी विश्वाच्या गूढ तत्त्वाचें आविष्करण विशेष केलें नसलें तरी जगांत वागावयाचें असल्यास कर्म कसें करावें या विषयावरच त्यानें विचार प्रदर्शित केले आहेत. आणि या अर्थानें त्याला तत्त्वज्ञानी म्हणण्यापेक्षां नीतिवेत्ता म्हणणेंच अधिक सयुक्तिक दिसेल.

नित्शे व श्रीकृष्ण यांचें नीतिशास्त्र 'द्वंद्वांवर' उभारलें आहे. जगांतील घडामोडी व प्राणिमात्राचा जीवनक्रम यांचा ख्रिस्ताप्रमाणे नित्शेने केवळ एकांगी विचार केला नाही. बर–वाईट, सुख–दुःख, सुष्ट–दुष्ट, वगैरे द्वंद्वें विचारांत घेतलीं आहेत. सृष्टिक्रम आहे हा असा आहे, याचा सत्कारणीं उपयोग कसा करतां येईल एवढाच विचार केलेला आहे. श्रीकृष्णानेहि अर्जुनाला वेळोवेळीं 'तूं निर्द्वंद्व हो' असाच उपदेश केला आहे. नित्शेचे "स्वतंत्रात्मे" ( Free spirits ) सुद्धां या द्वंद्वांच्या पलीकडे गेलेले आहेत.

**ख्रिस्तांची एकांगी शिकवण**

अशा उच्च भूमिकेवर उभे राहिल्यामुळे युद्धासारख्या घोर कर्माची भीति श्रीकृष्ण व नित्शे दोघांनाहि राहिली नाही, आणि सुखदुःखाची मीमांसा करतांना इंद्रियसुख सोडून ते अतींद्रिय अशा सुखाकडे वळले. उलटपक्षीं येशूख्रिस्ताने एकच बाजू विचारांत घेऊन त्यावरच आपल्या नीतीचा डोलारा उभारला असल्यामुळे त्यांत कृत्रिमपणा आला आहे. निसर्गातील भूतदयेबरोबरच त्याला क्रौर्य दिसलें नाही व तें पाहण्याचें त्यानें साहस केलें नाही. अर्थात् तो द्वंद्वातीत होऊं शकला नाही.

**'दया हा दुर्गुण आहे'**

नित्शे हा फार भयंकर प्राणी आहे अशी भीतिप्रद कल्पना करून देणारें त्याचें तत्त्व म्हणजे 'दया हा दुर्गुण आहे' हें होय. गीतेच्या सात्त्विक, राजस व तामस दानांची मीमांसा पाहिली असतां दयेला दुर्गुण म्हणण्यांत नित्शेची व गीतेची एकवाक्यताच आहे. कारण 'अदेशे अकाले अपात्रे' दान म्हणजेच नित्शेची दया होय. तें दान नेहमी असत्कृत, अवज्ञात असेंच असणार; सत्पात्र आणि अपात्र हे जर एकाच मापानें मोजले जातील तर समाजांत अनवस्था माजेल. अदेश अकाल आणि अपात्र म्हणजेच ज्याचा कांही उपयोग नाही, अर्थात् जें जगण्यास योग्य नव्हे तें. अशांविषयी प्रेमाने हळहळणें याचें नांव दया ! हें द्वंद्वातीत न झालेल्या एकट्या त्या प्रेमळ येशूलाच शक्य आहे. नित्शेसारख्या कणखर हृदयाच्या माणसाला त्याचा वीट येईल. सर्व माणसें हीं एकाच ईश्वराचीं लेकरें आहेत, या पोकळ सबबीवर श्रीकृष्ण व नित्शे हे समाजांत समतेचें प्रस्थ माजवीत नाहीत. जन्मतः सर्व माणसें जरी सारखीं असलीं तरी प्रत्येकाच्या संस्कृतीमुळे व प्रकृतीमुळे त्यांच्यांत भेद पडत जाऊन उच्चनीच भाव निर्माण होतो. गीतेंत जसें गुणकर्मशः चातुर्वर्ण्य मानिलें आहे तसें नित्शेनेहि तें मान्य केलें आहे.

अशा रीतीने पडताळून पाहता नित्शे व गीता यांच्यांतील हें साम्य चटकन ध्यानांत येईल. ख्रिस्ताने युध्द अगदीच तिरस्कृत केलें, तर नित्शेने युद्धावरच भर दिला. परंतु गीतेंत युद्धाचें स्थान योग्य दाखविलें आहे. कारण नित्शेपेक्षांसुद्धा गीता अद्वैताच्या उच्च भूमिकेवर उभी आहे.

# गोलमेज परिषदेच्या संस्थान कमिटीचा रिपोर्ट

या कमिटीचे अध्यक्ष ना. जे. सी. डेव्हिडसन हे असून कमिटींत सर रेजिनाल्ड ग्लान्सी, लॉर्ड हेस्टिंग्ज, लॉर्ड हचिन्सन ऑफ मांटरोज, सर मॉरिस गेयर, सर चार्लस स्टुअर्ट विल्यम्स व मि. जे. आर. मार्टिन असे सहा सभासद होते. इंग्लंडचे राजे व हिंदुस्थानसरकार, यांजबरोबर संस्थानिक यांचे आर्थिक संबंध काय आहेत याची चौकशी करून राज्यघटनेंतील आर्थिक व्यवस्था लावण्याच्या मार्गांतील अडचणी दूर करणें हें कार्य प्रस्तुत कमिटीवर सोपविण्यांत आलें होतें. ही व्यवस्था लावतांना संयुक्त घटनेंतील घटकांनी म्हणजे प्रांतांनी व संस्थानांनी संयुक्त अशा हिंदुस्थान सरकारास जो खर्चाकरिता पैसा पुरवावयाचा तो सर्वांना एकाच प्रकारच्या पद्धतीने पुरवितां यावा अशी योजना सुचविण्यास मुख्य प्रधान मि. रॅम्से मॅक्डोनाल्ड यांनी कामिटीचे चेअरमन ना. डेव्हिडसन यांस सुचविलें होतें.

कमिटीनें याहि सूचनेचा विचार करून आपला रिपोर्ट एकमताने प्रसिद्ध केला आहे. या बाबतींत कमिटीला एक ठळक भेद दिसून आला. तो असा कीं, कांही संस्थानें हिंदुस्थान सरकारला रोख रकमा देतात. त्या प्रकारच्या रकमा कोणत्याहि प्रांताने हिं. सरकारास दिलेल्या नाहींत. कांही संस्थानांना

पोस्ट, टेलिग्राफ, नाणें व चलन इत्यादि बाबतींत हिंदुस्थान सरकाराकडे कोणतेच कर भरावे लागत नाहींत आणि हें तर हिंदुस्थान सरकाराचें मुख्य उत्पन्न आहे. या प्रश्नांची नीट तपासणी करण्याकरिता कमिटीनें ता. २९ जानेवारीपासून ३० एप्रिलपर्यंत संस्थानांतून दौरा काढून दहा हजार मैलांचा प्रवास केला, ८८ संस्थानिकांची किंवा त्यांच्या दिवाणांची भेट घेतली व लहान संस्थानिकांच्या शिष्टमंडळांना मुलाखती दिल्या. त्यांत कमिटीला असें दिसून आलें कीं संयुक्त राज्यघटनेची कल्पना अलीकडे निघाली असली तरी कांहीं विषय संस्थानांच्या बाबतीतहि संयुक्त विषयांच्या स्वरूपाचे पूर्वीच झाले आहेत. रेल्वे,चलन,पोस्ट,तार व मीठ हीं खातीं या जातीचीं होत. परतु या खात्यांवर संस्थानिकांची अशी कांहीच हुकुमत हल्लीं चालत नाही आणि ब्रिटिश सरकारानें खालसा प्रजाजनांस या बाबतींत स्वराज्याचे अधिकार देण्याचें ठरवूनहि टाकलें आहे. त्यामुळे संस्थनिकांना स्वतः-च्या हक्कसंबंधाविषयी वटहुकुमतीविषयीं काळजी उत्पन्न झाली आहे. म्हणून हिंदी लोकांना जबाबदार राज्यपद्धति ज्या वेळीं देण्यांत येईल त्या वेळीं त्या जबाबदारीचा वाटा संस्थानिकांनाहि मिळणें जरूर आहे असें कमिटीचें मत आहे. सस्थानिक दोन प्रकारच्या रकमा सरकारास देतात. रोख रकम खंडणीच्या स्वरूपाने ते देतात व त्यांनी आपला कांहीं मुलूख खंडणीऐवजीं सरकारास तोडून दिला आहे त्याचें उत्पन्न सरकारास मिळतें ते वेगळे. उलटपक्षीं त्यांना कांहीं करांची माफी मिळाली आहे. त्यांना मिठावरील कर द्यावा लागत नाही व समुद्रावरून येणाऱ्या त्यांच्या मालावर त्यांना आयात जकात पडत नाही.

अशा प्रकारच्या प्रत्यक्ष व परोक्ष रकमांची कमिटीनें जमेची बाजू व खर्चाची बाजू अशी सोयीकरिता विभागणी केली आहे. संस्थानिकांना ज्या रकमा सरकारास द्याव्या लागतात त्यांचे ७२५ वर्ग पडतात. उदाहरणार्थ नुसती खंडणीच घेतली तर सार्वभौम सरकार म्हणून द्यावयाची रक्कम, संस्थानिकांना सैन्य बाळगण्याची माफी देण्यांत आली म्हणून त्यांजकडून त्या खर्चाचा मोबदला म्हणून मिळावयाची रक्कम, ब्रिटिशांची तैनाती फौज संस्थानिकांनी ठेवून घेतली म्हणून त्यांनी भरावयाची रक्कम, एखाद्याला त्याचें गेलेलें संस्थान परत मिळालें किंवा त्याला अधिक मुलूख मिळाला म्हणून त्याने उपकाराची फेड करण्यासाठीं द्यावयाची रक्कम अशी ही वर्गवारी वाढत जाते.फेडरल स्ट्रक्चर कमिटीची सूचना अशी होती की, ही खंडणी सरंजामी (फ्यूडल) पद्धतीची असल्यामुळे ती माफ करून तिच्या ऐवजीं इतर प्रांताप्रमाणें संस्थानांनी संयुक्तराज्याचे घटक या नात्याने जें आर्थिक साहाय्य संयुक्तराज्यास करावयास पाहिजे तें करावें; पण ही रक्कम संस्थानाच्या वटवसुलाच्या ५ टक्क्यापेक्षां अधिक नसावी. डेव्हिडसन कमिटीच्या मतें या सर्व खंडण्या फ्यूडल पद्धतीच्या नाहींत. त्यांपैकीं दोन खंडण्यांचें स्वरूप निराळें आहे.मध्य हिंदुस्थान व राजपुताना यांत माळवा भिल कोअर व मिना कोअर अशा दोन पलटणी आहेत. त्यांच्या खर्चाकरिता कोटासंस्थान २ लाख रुपये व जोधपूर संस्थान १ लक्ष १५ हजार रुपये सरकारास देते.ही रक्कम सदर संस्थानांना माफ झाली पाहिजे. त्याचप्रमाणें एका संस्थानिकाकडून दुसऱ्या संस्थानिकास खंडणीची रक्कम जावयाची असता दुसऱ्या संस्थानिकास इंग्रज सरकारचे देणें असल्यामुळे सदर रक्कम पहिल्या संस्थानिकाकडून त्याजकडे भरणा होण्याच्या ऐवजीं इग्रज सरकारकडे वळवून घेण्यांत आली. ती अद्यापिहि घेण्यांत येत आहे. हीहि खंडणी माफ झाली पाहिजे असें कमिटीचें मत आहे. असली रकम ११ लक्ष रुपयांची असून ती ताबडतोब माफ व्हावी. बाकीची खंडणीची रक्कम ५९ लक्षांची आहे. ही रकम सार्वभौम सरकारास मिळावयाची आहे. तथापि ती संयुक्त सरकाराकडे सार्वभौम सरकारानें दिल्यास तिला संस्थानिकांनी हरकत घेऊं नये.

हैद्राबाद, बडोदें, ग्वाल्हेर, इंदूर इत्यादि संस्थानिकांनी आपला कांहीं मुलुख इंग्रज सरकारास दिला आहे. त्या मुलखाच्या उत्पन्नांतून सरकारने फौज ठेवून सदर संस्थानिकांचे रक्षण करावें अशी अट होती. तें उत्पन्न सदर संस्थानिकांना आता यापुढे परत मिळणें जरूर आहे. ही रक्कम ३७ लक्ष रुपयांपर्यंत जातें. कांहीं संस्थानिकांपाशीं फौजा आहेत व त्यांचा ब्रिटिश सरकारास उपयोगहि झाला आहे. पण त्यांचा खर्च संस्थानिकांच्या नांवें यापुढे जमा करावयास पाहिजे. हें काम सदर संस्थानिक संयुक्त राज्यघटनेंत सामील होण्यावर अवलंबून ठेवावें.

दारू, अफु, इत्यादि मादक पदार्थांपासून येणारें उत्पन्न त्या त्या प्रांतांकडे जमा व्हावें. हिंदुस्थान सरकारचें मिठाचें उत्पन्न ४० लक्ष पौंड म्हणजे वटउत्पन्नाच्या ६॥ टक्क्याइतकें आहे. त्या बाबतींत हिंदुस्थान सरकारने साठ वर्षांपूर्वीच सर्व संस्थानांपासून आपल्याकडे मक्ता घेतला आहे. त्याला अपवाद फक्त काठेवाड व कच्छ या प्रांतांचा. तेथील संस्थानांनी मीठ बनवावें पण तें स्थानिक गरजेपुरतेच बनवावें असें ठरलें आहे. या संस्थानांशी झालेल्या कराराची उजळणी

ताबडतोब करण्यांत यावी. पण बाकीच्यांची संयुक्त सरकाराने आपल्या सोयीप्रमाणे करावी. तथापि परदेशाहून येणाऱ्या मिठास आळा बसण्याकरितां व कित्येक संस्थानांना इंग्रज सरकार भरपाई देतें तो बोजा कमी होण्याकरितां इतर संस्थानिकांशीं झालेल्या करारांचीहि छाननी जितकी लवकर होईल तितकी बरी. संस्थानिकांना मिठावरील कराची माफी मिळाली आहे. त्याच्या उत्पन्नाची गणती केली तर ती ४६०६०५७ रु. भरेल.

समुद्रावरून आलेल्या मालाची किंमत ३ अब्ज ६१ कोटी ८२ लक्ष आहे. यापैकीं संस्थानी बंदरांत उतरणाऱ्या मालाची किंमत १५॥ कोटी आहे. संस्थानी बंदरांतील जकातीचें उत्पन्न २ कोटी ८० लक्ष रु.आहे. एकंदर जकातीच्या उत्पन्नापैकीं ४ टक्के उत्पन्न संस्थानांना मिळतें त्याखेरीज कित्येक संस्थानिकांच्या मालाला जकातीची माफी आहे ती वेगळीच. अशी माफी काश्मीर संस्थानासहि मिळाली असून एकूण माफीची रक्कम १ कोटी ८२ लक्ष रु. भरते.

जकातीचा हक्क संस्थानिकांपासून सरकारने घेतला आहे. त्याच्या मोबदल्याची रक्कम किती धरावी हे ठरविणें कठीण आहे. तथापि असा मोबदला त्रावणकोर व कोचीन या संस्थानांना तरी मिळणें जरूर आहे. म्हणून त्यांच्याशी या बाबतींत ताबडतोब बोलणें सुरू व्हावें.

पोस्ट व तार या खात्यांच्या संबंधांत कांही संस्थानिकांना त्यांच्या पत्रव्यवहाराकरितां मोफत स्टँप मिळतात. त्याबद्दल त्यांच्या नांवें १०२७०२५ रु. लिहावे. स्वतःचें चलनी नाणें २० संस्थानांचें आहे. पण त्यांतल्या त्यांत हैद्राबाद संस्थानाची चलनपद्धति व्यवस्थेशीर आहे व त्याच्या ९ कोटी रुपयांच्या नोटाहि आहेत, त्यामुळें सदर संस्थानाची संयुक्त सरकाराशीं चढाओढ होत असल्याने त्याच्या खर्चाच्या बाजूस १७ लक्ष रु. घालावे. कमिटीच्या वरील सूचना हिंदी संस्थानें फेडेरेशनमध्यें सामील होणार असतील तरच अमलांत याव्या अशी कमिटीची शिफारस आहे.

# लो. टिळकांच्या स्वदेश-भक्तीची मीमांसा

लो. टिळक हे हाडाचे खरे मराठे होते. दूरदृष्टि, विचारशीलता, सावधानता, धूर्तपणा, साधेपणा, पीळदारपणा, स्वाभिमान, धैर्य आणि जरूर तो स्वार्थत्याग व उद्योग हे महाराष्ट्रीयाचे सद्गुण त्याच्या ठिकाणीं जन्मसिद्ध होते. याच गुणांना पाश्चात्य विद्वत्तेची जोड मिळाल्यामुळे त्यांना आपल्या नैसर्गिक गुणांचा उपयोग देशहिताकडे करण्याची प्रेरणा झाली. त्यांच्या बुद्धीवर पाश्चात्य विद्येप्रमाणेंच पौर्वात्य विद्येचेहि योग्य प्रमाणांत संस्कार घडले होते हा विशेष होय त्यांच्या बालपणांत व विद्यार्थिदशेंतहि घरचें परंपरागत धार्मिक वळण कायम असल्याने तें त्यांस सहजच लाभलें. त्या वळणांतून संस्कृत विद्येची आवड उत्पन्न होऊन ती कॉलेजांतील शिक्षणाबरोबर वाढत गेली व पुढील आयुष्यक्रमांत व्यवहारांत पडल्यावर त्यांनी अनेक उद्योग हातीं घेतले असले तरी ती आवड आमरण टिकली. महाभारत, वेदग्रंथ व श्रीमद्भगवद्गीता या क्रमाने त्यानी आपला व्यासंग फावल्या वेळांत अव्याहत चालू ठेवला.

त्यांची बुद्धि कुशाग्र व शोधक होती. सृष्टीच्या मुळाशीं असलेल्या गूढ तत्त्वांचें संशोधन करण्यांत ती गढून जाणारी होती. तिजवर विचाराचें नियंत्रण असल्यामुळे व्यवहारांत वागतांना कोणतीहि नवी गोष्ट ते फार सावधगिरीने ग्रहण करीत असत. आपल्या भोवतालचें जग एकसारखें बदलत चाललें असल्याचा प्रत्यय त्यांना विद्यार्थिदशेपासून येत होता व त्या जगाबरोबर आपणहि बदललें पाहिजे याची ओळख त्यांना इंग्रजी विद्येचा अभ्यास सतत करून देत होता. टिकवावें काय व सोडावें काय याचें द्वंद्व त्यांच्या डोक्यांत निरंतर माजून राहिलें होतें. इंग्रजी विद्येने यांना देशाभिमान ही नवी भावना शिकविली. पण देशाभिमान म्हणजे तरी काय? ज्या देशांत आपण जन्मलों त्या देशाचा अभिमान हा देशाभिमानाचा वाच्यार्थ होय. पण देशाभिमान या सामासिक शब्दांतील देश या शब्दाचा अर्थ फार खोल आहे. देश म्हणजे विवक्षित भूविभागावरील जमीन, डोंगर, झाडें, नद्या व नगरें नव्हत. त्याविषयी अभिमान वाटत असला तरी तो गौण होय. त्याहिपेक्षां अधिक अभिमान देशांतील समाजाविषयी वाटणे जरूर असल्याने लो. टिळकांच्या देशाभिमानाकडे त्या दृष्टीनेच पाहिलें पाहिजे.

लो. टिळक यांचा सारा जन्म स्वदेशभूमीस पारतंत्र्यांतून सोडविण्याच्या राजकीय प्रयत्नांत गेला. त्यासाठी त्यांनी सहा वर्षांची काळ्या पाण्याची शिक्षाहि सोसली. त्यावरून त्यांना स्वातंत्र्याचें किंवा स्वराज्यप्राप्तीचें महत्त्व कोणाहि इतर हिंदी स्वातंत्र्यभक्ताहून किंवा स्वराज्यभक्ताहून अधिक नसलें तरी त्यांच्या-

इतकें पटलें होतें हें निर्विवाद होय. परंतु त्यांना स्वातंत्र्याची तळमळ लागण्याचीं कारणें फार खोल होतीं. त्यांनी हिंदुस्थानास स्वातंत्र्य कां पाहिजे याचा विचार आपल्या मनाशीं फार काळजी-पूर्वक केला होता. केवळ स्वातंत्र्याकरिता स्वातंत्र्य त्यांना नको होतें. सध्याचें पारतंत्र्य हें देशाच्या धार्मिक, सामाजिक व आर्थिक उन्नतीच्या आड येत असून त्या योगानें हिंदुधर्माचा व हिंदुसमाजाचा नाश होत असल्यानें तो नाश थांबून हिंदूंना आपल्या विशिष्ट पद्धतीनें व धोरणानें स्वतःचा उत्कर्ष करून घेण्यास सवड मिळावी यासाठी त्यांना स्वातंत्र्य पाहिजे होतें. परंतु पुष्कळ स्वातंत्र्यभक्तांची नजर इतक्या पल्ल्यापर्यंत पोंचूं शकत नाहीं. त्यांचीं स्वातंत्र्यप्राप्तीचीं कारणें वरवरचीं असतात.

पारतंत्र्यांत राहण्यांत मानहानि वाटत असल्यानें ते स्वातंत्र्यप्राप्तीसाठीं हातावर शीर घेऊन सरसावतात. पण स्वातंत्र्य मिळाल्यानंतर तुम्ही त्याचा उपयोग काय करणार असें विचारल्यास त्याचें समर्पक उत्तर त्यांच्यानें देववत नाहीं. त्यांची स्वातंत्र्यभक्ति निवळ भावनारूप असल्यामुळे ते स्वतंत्र झाले कीं त्यांचें मन कदाचित् समाधान पावेल. आज हिंदुस्थानांतहि असल्या स्वतंत्रतेच्या उपासकांची संख्या थोडी नाहीं. बहुधा या प्रकारचे स्वातंत्र्यभक्त एकट्या हिंदुसमाजांतच आढळतील, मुसलमान व शीख या समाजांत आढळणार नाहींत. कांहीं हिंदूंना आपल्या हिंदु समाजाचा अभिमान नसून त्या समाजाची घडी कितीहि व कशीहि बिघडली तरी त्याची त्यांना पर्वा नाहीं. कांहीं हिंदु आपल्याला नाइलाजानें हिंदु म्हणवतात इतकेंच, बाकी उद्या हिंदु-मुसलमानांच्या ऐक्यासाठीं त्यांना स्वतःच्या हिंदुधर्मास मुकावें लागल्यास त्याबद्दल त्यांना विषाद वाटणार नाहीं. कदाचित् ते त्यास आनंदानेंहि तयार होतील. असे लोक अल्लड तरुणांत तसे पोक्त वयस्कांत आणि स्वातंत्र्यभक्तांत तसे नुसत्या साम्राज्यान्तर्गत स्वराज्यवाद्यांतहि आहेत.

वास्तविक हिंदु धर्म व हिंदु समाज यांचा ज्यांना अभिमान उरला नाहीं त्यांनी हिंदुस्थान देश स्वतंत्र करण्यासाठीं आपला जीव धोक्यांत कां घालावा हें समजणें कठिण आहे. त्यांना पारतंत्र्यांत राहण्याचा वीट आला असल्यास त्यांनी इंग्लंड, फ्रान्स, स्वित्झरलंड व शक्य तर अमेरिका यासारख्या एखाद्या देशांत खुशाल जाऊन राहावें. तेथेहि हिंदुस्थानाप्रमाणेंच सुंदर वनश्री आहे, विशाल पर्वत आहेत, रम्य नद्या आहेत व मनोहर एकांत स्थळें आहेत. इतकेंच नव्हे तर तिकडील समाज हिंदी समाजापेक्षां अधिक गुलहौशी, बंधनरहित व छानछोकीचा आहे. त्यालाच भुलून इकडील कित्येक राजेरजवाडे पाश्चात्य देशांत तेथील युवतींच्या नेत्रकटाक्षांचें व कोमल सहवासाचें सुख भोगीत चैनींत राहिले आहेतच कीं नाहीं ! कांहीं वर्षें त्या देशांत वस्ती केल्यानंतर परकीयास राष्ट्रीयत्वाचे हक्क प्राप्त होऊन तो तेथील जनतेच्या बरोबरीचा नागरिक समजला जातो व त्यास स्वातंत्र्याचे सर्व लाभ अनुभवावयास सांपडतात. परंतु ज्या अर्थी अशा फंदांत न पडता हिंदुस्थानांत राहूनच हिंदुस्थानाच्या स्वातंत्र्यासाठीं ते झटतात त्या अर्थी त्यांनी आपल्या स्वातंत्र्यभक्तीचा तितका चिकित्सापूर्वक विचार केला नसला पाहिजे, इतर व्यावहारिक अडचणींमुळे त्यांचें या देशांतून पाऊल निघत नसलें पाहिजे किंवा चिरसहवासानें त्यांचें येथील मानवजातीवर प्रेम जडल्यामुळे त्यांच्या उद्धाराकरितां आत्मार्पण करण्यांत त्यांस भूषण वाटत असलें पाहिजे; याहून इतर रीतीनें या कोड्याचा उलगडा करणें अशक्य आहे.

परंतु अशा प्रकारच्या स्वातंत्र्यभक्तांची देशभक्ति उथळ व अशास्त्रीय होय. लो. टिळकांची स्वदेशभक्ति अशी उथळ व अशास्त्रीय नव्हती. त्यांच्या देशभक्तीला हिन्दुसमाजाचा व हिंदुधर्माचा पाया होता. पारतंत्र्यामुळे आपणांस आपल्या हिंदुसमाजाचें व हिंदुधर्माचें रक्षण करतां येत नाहीं याबद्दल त्यांचा आत्मा अहर्निश तळमळत होता. त्यांच्यापुढे इंग्लंडचा इतिहास होता व हिंदुस्थानाचाहि इतिहास होता. त्यांनी हिंदुधर्मतत्त्वांचा अभ्यास केला होता व ख्रिस्ती धर्मतत्त्वांचेंहि सूक्ष्म परीक्षण केलें होतें. त्यांनी पाश्चात्य समाजव्यवस्थेविषयीं वाचलें होतें व हिंदुसमाजव्यवस्था स्वतः अनुभवून तिचें चिंतनहि चालविलें होतें. किंबहुना गीतारहस्य हें त्या तौलनिक व्यासंगाचेंच परिपक्व फल होय यांत शंका नाहीं. गीतारहस्य लिहिण्यापूर्वी तीसचाळीस वर्षें या दोन पद्धतींच्या बरेवाईटपणाविषयीं त्यांच्या डोक्यांत द्वंद्व माजून राहिलें असून त्या दोनहि पद्धतींतील गुणदोषांची छाननी ते आपल्या मनाशीं करीत आले होते. एखादे वेळीं त्यांच्या मनाचा कल पाश्चात्य पद्धतींतील कोणत्या तरी अंगाकडे झुकलाहि असेल, नाहीं असें नाहीं. परंतु मागची ओढ ठेवून पुढचें पाऊल टाकण्याचें त्यांचें सावधगिरीचें धोरण असल्यामुळे सार्वजनिक कामें ते जबाबदारीनें करूं लागल्यापासून त्यांनी आपल्या सामाजिक व धार्मिक वर्तनांत जनतेच्या अविश्वासास स्वतःला कधींहि प्राप्त करून घेतलें नाहीं. कारण संशयाचा फायदा परकीयांपेक्षां स्वकीयांना देण्याकडेच ते

आपल्या बुद्धीचा कांटा ढळता ठेवीत. अशा संक्रमणावस्थेंतून त्यांचें मन जात असता त्यांनी जनतेच्या दृष्टीने सामाजिक व धार्मिक बाबतींत जें वर्तन स्वीकारलें त्यास अनुसरूनच त्यांच्या वृद्धावस्थेंतील परिपक्व बुद्धीने सामाजिक व धार्मिक प्रश्नांचा शेवटीं निकाल सांगितला हा हिंदुधर्माचा व हिंदुसमाजाचा असाधारण विजय होय असेंच म्हटलें पाहिजे.

लो. टिळकांच्या आयुष्यक्रमांत त्यांनी तीन प्रमुख चळवळी सुरू केलेल्या आढळतात. एक श्रीगणपत्युत्सवाची चळवळ, दुसरी श्रीशिवजयंत्युत्सवाची चळवळ व तिसरी होमरूल लीगची चळवळ. पहिली चळवळ धार्मिक व सामाजिक स्वरूपाची होती, दुसरी राष्ट्रीय व ऐतिहासिक अभिमानाची द्योतक होती व तिसरी केवळ स्वराज्यप्राप्तीकरिता आस्तित्वांत आली होती. सन १८९४ सालीं त्यांनी गणेशोत्सव सुरू केला, त्याच्या दुसऱ्या वर्षी त्यांनी शिवाजीउत्सवास चालना दिली आणि त्यानंतर सुमार एकवीस वर्षेपर्यंत त्यांच्या होमरूलच्या चळवळीस वाट पाहावी लागली. पहिल्या दोन चळवळींचे वेळीं त्यांची उमर सुमारें ४० वर्षांची होती. हें वय मध्यम असून त्यांत मनुष्याच्या विचारांना व मतांना साहजिकच स्थिरता येते. आंग्लविद्याविभूषित मनुष्य धार्मिक बाबतींत सामान्यतः संशयग्रस्त व डळमळीत असतो. याचें कारण त्याने धर्माचा तितक्या कळकळीने व अभ्यासपूर्वक विचारच केलेला नसतो. पण लो. टिळक धर्मविषयांत केव्हाच बेपर्वा व उदासीन नव्हते हें त्यांचे केसरींतील त्यापूर्वीचे व त्यानंतरचेहि लेख वाचले असतां कळून येणार आहे. त्या काळांत राजकीय विषयांपेक्षां धार्मिक व सामाजिक विषयांचाच महाराष्ट्रांतच काय पण साऱ्या हिंदुस्थानांत खल चालत असे. महाराष्ट्रांत न्यायमूर्ति महादेव गोविंद रानडे व डॉ. रामकृष्ण गोपाळ भांडारकर यांजकडे वरील विषयांचें नेतृत्व होतें. त्याखेरीज परदेशांतहि मॅक्समुल्लरप्रभृति पाश्चात्य पंडित व आनी बेझंट प्रभृति थिऑसॉफिस्ट हिंदुधर्माचा व वेदान्तशास्त्राचा अभ्यास करून हिंदुधर्मांतलि उज्ज्वल तत्त्वांचे गोडवे गाऊं लागले होते.

रानडे व भांडारकर मूर्तिपूजेचे द्वेष्टे व एकेश्वरी पंथाचे पुरस्कर्ते समजले जात. त्यांच्याशीं लो. टिळकांचीं धार्मिक व सामाजिक मतें मिळतीं नव्हतीं. त्यांना मूर्तिपूजा त्याज्य व सुशिक्षितपणास दूषणास्पद आहे असे वाटत नसल्याचें प्रत्यंतर त्यांनी नवीन पद्धतीवर प्रवर्तित केलेल्या गणेशोत्सवांत पाहावयास सांपडतें. मूर्तिपूजेवर त्यांची श्रद्धा नसती तर केवळ ढोंग म्हणून गणपत्युत्सवाचें स्तोम माजविण्याचें धैर्य त्यांना त्या काळांतहि झालें नसतें. एकेश्वरी पंथाची श्रद्धा करतांना ते लिहितात 'कोणी मूर्तिपूजा सोडून देऊन निर्गुण परमेश्वराचें ध्यान करण्याचा आव घालतात; परंतु आपल्या आचरणाने मूर्त्युपासक जितके आग्रही असतात तितकेच आग्रही निर्गुणोपासक स्वतः असताहि आपण तसें नाही असें दाखवितात.' या वाक्यावरून ते सगुणोपासना सोडून निर्गुणोपासना स्वीकारण्याच्या विरुद्ध असल्याचें स्पष्टपणें सिद्ध होतें. सन १८९५ सालचा गणपत्युत्सव पार पडला. त्यावरील अग्रलेखाच्या अखेरीस त्यांनी सगुणोपासनेसंबंधी प्रकट केलेले विचार मननीय आहेत. "उपासनेपासून चित्त शुद्ध होतें असें जें आपल्या जुन्या ग्रंथकाराचें म्हणणें आहे तें अगदीं यथार्थ आहे. कोणत्याहि देवतेचें सर्वांनीं एकनिष्ठपणें आराधन करणें यानेच उपासकांच्या मनास एक प्रकारचें वळण लागून त्यांच्यामध्ये उपासकबंधुत्वाची बुद्धि जागृत होते." ही सगुणोपासनेकडे पाहण्याची लो. टिळकांची दृष्टि मार्मिक व बिनचूकहि नाही असें कोण म्हणेल?

हिंदु धर्मावरील त्यांची श्रद्धा अढळ होती व तिला दीर्घकालीन विचाराने व अध्ययनाने स्थिरता आली होती. 'जीवाचे धर्म ईश्वरांत कोणते आहेत अगर असणें शक्य आहे, ब्रह्मज्ञानाचा आचाराशीं कितपत संबंध आहे, धर्माचें खरें स्वरूप बाह्याचार होय का तत्त्वज्ञान होय इत्यादि प्रश्नांचा उलगडा आमच्या वेदांत ग्रंथांतून फार चांगल्या रीतीने केला आहे, निवळ धर्मतत्त्वांचें इतर असारभूत गोष्टींपासून पृथक्करण करून सदर तत्त्वांचा केवळ सत्य दृष्टीने ज्यांत विचार केला आहे असा आर्यधर्माखेरीज इतर धर्म क्वचितच सांपडेल.' अशा रीतीने आर्यधर्माची व त्यांतील तत्त्वांची थोरवी गाऊन 'आमचे सर्व विचार आधिभौतिक विद्यांकडे वळल्यामुळे अध्यात्मविद्येचा हल्ली आम्हास कंटाळा आला आहे' अशी त्यांनी आधुनिक सुशिक्षित वर्गाच्या धर्मौदासीन्याविरुद्ध तक्रार केली आहे. धर्माच्या आधारावांचून समाज टिकणार नाही आणि त्याचें ऐहिक व पारमार्थिक हितहि साधणार नाही अशी त्यांची बालंबाल खात्री झाली असल्यामुळे हिंदुधर्माच्या रक्षणासाठी व त्याच्या पुनरुज्जीवनासाठी त्यांचें हृदय तिळतिळ तुटत होतें. श्रीगणेशोत्सवास सामुदायिक स्वरूप देण्यापासून त्यांना हिंदु समाजाच्या व हिंदु धर्माच्या पुनरुज्जीवनाचेंच कार्य अल्पस्वल्प का होईना साधावयाचें होतें. म्हणूनच 'स्वधर्माच्या श्रेष्ठत्वाचा ज्यांस अभिमान वाटत नाही त्यांस स्वराष्ट्राच्या श्रेष्ठत्वाचा अभिमान तरी कोठून वाटणार?' असा सवाल आपल्या धर्मबंधूंस विचारल्यावांचून त्यांच्याने राहवेना.

स्वदेशभक्ति झाली तरी ती एक प्रकारें सगुणो-

पासनाच आहे. ज्या देवतेंत कोणताच श्रेष्ठ गुण नसेल त्या देवतेची उपासना भक्त करतो कशाला व त्याला त्या उपासनेपासून फायदा तरी कसला? स्वदेशांतहि कांहीं श्रेष्ठत्व नसेल तर त्याची भक्ति कोणता शहाणा मनुष्य करील? स्वदेशाचें श्रेष्ठत्व जितक्या अंशांनी भक्ताला पटलें असेल तितक्या अंशांनी त्याच्या भक्तींतहि गाढपणा व निस्सीमपणा उतरेल. देश धनधान्यानें समृद्ध असताहि केवळ परकीय अमलामुळे आपण अन्नास महाग झालों आहों अशा क्षुद्र समजुतीने स्वराज्याच्या किंवा स्वातंत्र्याच्या मार्गास लागलेल्या मनुष्याच्या पोटापाण्याची सोय बडी सरकारी नोकरी मिळून उत्कृष्टपणाने लागतांच त्याची स्वदेशभक्ति व स्वातंत्र्यभक्ति जागच्या जागीं थिजून जाण्यास वेळ लागणार नाही. पण स्वधर्माच्या किंवा स्वसमाजव्यवस्थेच्या रक्षणाचें एक साधन म्हणून जो मनुष्य स्वदेशभक्तीने प्रेरित झाला असेल त्याचें समाधान स्वराज्य किंवा स्वातंत्र्य यांच्या प्राप्तीखेरीज दुसऱ्या कोणत्याहि अल्पस्वल्प लाभाने होणार नाही हे उघड आहे.

लो. टिळकांस स्वधर्माप्रमाणेंच स्वसमाजरचनेविषयी अभिमान वाटत होता. त्यांना धर्मांतील व समाजांतील कित्येक दोष समजले नव्हते किंवा त्यांच्या सुधारणेची गरज भासत नव्हती असें नाही. त्यांच्या डोळ्यांपुढे पाश्चात्यांची समाजरचना व हिंदूंची समाजरचना असून त्या दोहोंतील गुणदोष त्यांना स्पष्टपणें दिसत होते. चातुर्वर्ण्य हा हिंदु समाजाचा पाया आहे व इच्छेस येईल त्याप्रमाणे वागण्याची मोकळीक हें पाश्चात्य समाजरचनेचें तत्त्व आहे. हिंदु समाजाची इमारत चातुर्वर्ण्याच्या पायावरून उचलून पाश्चात्य पद्धतीवर उभारावी असें न्या. रानडेप्रभृतींचें मत होतें. त्यांस लो. टिळकांनीं समर्पक उत्तर दिलें. त्यांचें म्हणणें असें कीं, 'पाश्चात्य पद्धति पत्करावयाला पाश्चात्य समाज हिंदु समाजापेक्षां कोठे अधिक सुखी आहे? त्यांचा समाज चढाओढीच्या तत्त्वावर रचला असल्याने त्यांच्यांत संपत्तीची विषम वांटणी झाली आहे. विवाहसंस्कारास कराराचें स्वरूप आल्यामुळे आपल्याकडील विधवांच्या ऐवजीं त्यांच्याकडील कुमारिकांची संख्या फाजील वाढून त्यांस गृहस्थाश्रमांतील सुखास आंचवावें लागलें आहे. म्हणून पाश्चात्य समाजरचना हिंदु समाजरचनेपेक्षां अधिक सुखाची समजणें अविचाराचें होय. पाश्चात्य राष्ट्रांत स्वतंत्रतेचा किंवा राष्ट्रीयत्वाचा अभिमान व जोम जोंपर्यंत जागृत आहे तोंपर्यंत त्यांची समाजरचना कितीहि सदोष असली तरी ती त्यांच्या उन्नतीच्या किंवा भरभराटीच्या आड येणार नाही. पण तो जोम एकदा संपला कीं तीं राष्ट्रें जगाच्या उपहासास पात्र होतील. असा टिळकांच्या प्रतिपादनाचा झोक होता.

पाश्चात्य समाजाचा या सरणीने विचार झाल्यावर त्यांनी हिंदु समाजरचनेविषयी प्रकट केलेल्या अभिप्रायांतील सार वाचून आचंबा वाटल्याशिवाय राहत नाहीं. ते म्हणतात 'वर्णव्यवस्थेमुळेच हजारों वर्षें आम्ही आपला आपलेपणा कायम राखून एकसारखे स्वतंत्र नाही तरी जिवंत राहिलों आहों. हा आपलेपणा एकदा सोडून या म्हणजे आमचेजवळ आहे तें आम्ही गमावून बसूं; इतकेंच नव्हे तर 'इदं च नास्ति परं च न लभ्यते' अशी आमची स्थिति होऊन इसापनीतींतील भाकरीचा तुकडा तोंडांत धरून जाणाऱ्या कुत्र्याप्रमाणें आम्ही अन्नासहि मोताद होऊन जाऊं' हें वाचून टिळक समाजसुधारणेस सर्वथैव विरुद्ध होते अशी कोणाची समजूत न व्हावी यासाठी 'सुधारणा कोणास नको आहे असें नाही. पण तिचे मार्ग सुधारकांच्या मार्गाहून अगदी भिन्न असल्याचें' त्यांनी वरील विधानाच्या अखेरीस बजावून ठेवलें आहे.

हिंदुधर्म व हिंदुसमाज यांविषयी त्यांच्या अंतःकरणांत गाढ आदर वसत असल्यामुळे त्या धर्माच्या व त्या समाजाच्या रक्षणासाठी ज्यांनी स्वराज्य स्थापण्याचा भगीरथ प्रयत्न सिद्धीस नेला त्या श्रीछत्रपति शिवाजीमहाराजांच्या महोत्सवाची उभारणी करण्याची स्फूर्ति लो. टिळकांसारख्या राष्ट्रपुरुषास होऊं नये तर कोणास व्हावी? ते शिवाजीमहाराजांस अवतारी पुरुष समजत. त्यांजवर ईश्वराची कृपा असून तो ईश्वरच त्यांचा साहाय्यकर्ता असल्याविषयी त्यांची भावना होती. त्यांच्या उत्सवाने एकराष्ट्रीयत्वाची लाट महाराष्ट्रांत टिळकांनी उठवून दिलीच, पण त्याशिवाय आपल्या थोर पूर्वजांविषयीं अभिमान बाळगण्याचें वळण त्यांनी महाराष्ट्रीयांस लावलें. त्यांतच पूर्वपरंपरा न सोडण्याचा गर्भित इषारा आपोआपच सांठविला गेला हें विसरतां कामा नये. होमरूल लीगची म्हणजे स्वराज्यप्राप्तीची चळवळ त्यांनी आपल्या आयुष्याच्या शेवटच्या दिवसांत हातीं घेतली. तिच्या पाठीशीं गणपत्युत्सव व शिवाजीउत्सव या आधीच्या दोन चळवळी उभ्या केल्या असता त्यांना स्वराज्य किंवा स्वातंत्र्य हें हिंदुधर्म व हिंदु समाज यांच्या रक्षणाकरिता कसें पाहिजे होतें हें नीट लक्षांत येतें.

लो. टिळकांच्या स्वदेशभक्तीची मीमांसा या प्रकारची आहे. त्यांची स्वदेशभक्ति उठवळ, उपरी, उथळ व उल्लूपणाची नसून हिंदुधर्म, हिंदुसमाज व हिंदु परंपरा यांच्या खंबीर व शुद्ध पायावर आधिष्ठित होती. त्यांना स्वराज्य किंवा स्वातंत्र्य हिन्दु धर्म व हिन्दु

समाज यांच्या रक्षणाकरिता व उत्कर्षाकरिता हत्ये होतें. केवळ अन्नाकरिता किंवा विषयोपभोगाकरिता नको होतें. हीच शिकवण जन्मभर देऊन त्यांनी महाराष्ट्रांतील आपल्या वेळची तरुण पिढी वाढविली.अभिनव महाराष्ट्र या शिकवणीस पारखा झाल्यामुळे महाराष्ट्राच्या ब्रीदापासून ढळत चालला आहे ही अत्यंत खेदाची गोष्ट होय. त्यास महाराष्ट्रीयाचें खरें पाणी चाखावयाचें असलें तर त्यानें परमवंद्य लोकमान्य टिळकांच्या विचारसरणीचेंच परिशीलन केलें पाहिजे हे उघड आहे.

# लो. टिळकांच्या केसरीचीं गेलीं पन्नास वर्षें

## ( ले.—श्री. शंकर गणेश दवणे )

केसरीस सन १९३० अखेर पन्नास वर्षें पुरीं होऊन आता त्याचें बावन्नावें वर्ष सुरू आहे. इतकी मजल विद्यमान राजवटींत त्याने मारली ही परमेश्वराची कृपाच समजली पाहिजे. पन्नास वर्षांचेहि वर जगलेलीं वर्तमानपत्रें महाराष्ट्रांत नसतील असें नाही. पण केसरीचें अविश्रांत कार्य व तें सुरू असता कारणपरत्वे, स्वभावपरत्वें आणि परिस्थितीस अनुसरून त्यावर पडलेली अनर्थपरंपरा व संकटपरंपरा लक्षांत घेता त्याच्या प्रत्येक हितचिंतकास हायसें वाटून आनंदहि व्हावा यांत विशेषसें नवल नाही. या आनंदाचें व्यक्त स्वरूप ज्युबिली–महोत्सवाने व "केसरीप्रबोधा"सारख्या वाङ्मय स्मारकाने निदर्शनास आलेलें आहे.

केसरीचा जन्म १८८१ सालीं झाला. आमचे देशांत अँग्लो–इंडियन लोकांनी वर्तमानपत्रांचा प्रचार १७८० पासूनच सुरू केला होता. तीं पत्रें अर्थात् इंग्रजींत असत. केसरीच्या अगोदर हिंदुस्थानांत या दृष्टीने केवळ हिंदी लोकांनी सुसंघटित रीतीने केलेला प्रयत्न म्हटला म्हणजे बंगाल व मद्रासकडील. मद्रासचा 'हिंदु' हा निवळ इंग्रजींत तर बंगालकडील 'अमृतबझार–पत्रिका' बंगाली–इंग्रजी अशी सरमिसळ. पुढें तिचें रूपांतर इंग्रजींत झालें ही गोष्ट वेगळी. आपल्या इकडेहि मुंबईस 'इंदुप्रकाश' व त्याचे अगोदर पंधरा वर्षें पुण्यास 'ज्ञानप्रकाश ( १८४९ ) हीं पत्रें चालू होतीं. परंतु तींहि मराठी–इंग्रजी अशा गंगाजमनी थाटाचींच असत. अशा स्थितींत केसरीसारखे पत्र निवळ मराठी भाषेंत निघणें यांत वैशिष्ट्य होतें. दुसरें केसरीचें वैशिष्ट्य असें कीं, हा वेळपावेतों देशी वर्तमानपत्रांत स्थानिक प्रकरणें, इतर ठिकाणच्या बातम्या व व्यापारासंबंधी माहिती इतकेच विषय येत असत. पण केसरीने विलायतेंतील बातम्या, जगांतील इतर ठिकाणचीं उपयुक्त जुजुबी वर्तमानें, देशी भाषेंतील ग्रंथांवरील टीका, चालू देशस्थितीचें सर्वांगीण आविष्करण हेहि विषय उचलले.

### केसरीचे संपादक

केसरीस विष्णुशास्त्री चिपळूणकर, टिळक, आगरकर, केळकर, खाडिलकर यांसारखे संपादक लाभले हें त्याच्या भावी यशाचें चिन्ह होय. सरकार व वृत्तपत्रें या दोहोंमधील उभा वांधा देशोदेशीं आढळतो. त्यांतून जित देशांतील वृत्तपत्रांस तर तो हटकून जागवतो. असें जरी असलें तरी वृत्तपत्रांची संख्या कमी न होतां ती वाढतच असते. यावरून राष्ट्राच्या घटनेस वर्तमानपत्रांची किती जरूरी आहे हें कळून येईल. स्थूल मानाने पाहता वर्तमानपत्रें तीन प्रकारचीं असूं शकतील. केवळ एकाच व्यक्तीने प्रेरित असलेलीं चालू कर्तव्याला जाणणारीं व लोकरंजन करणारी. पहिल्या प्रकारच्या पत्रांचा प्रसार व्यक्तिमाहात्म्यावर अवलंबून असतो. महात्मा गांधींचें 'नवजीवन' आगरकरांचा 'सुधारक' हीं पत्रें याच धर्तीचीं होत. देशाची परिस्थिति सतत डोळ्यापुढें ठेवून प्रगतीची पुढची पायरी कोणती तें बिनचूक दाखविणारीं पत्रें दुसऱ्या सदरांत पडतील. केसरीची गणना याच सदरांत करावी लागेल. केसरीचे धोरणाचा परिभ्रम एका ठराविक बिंदूच्या भोंवतीं होत असलेला दिसतो, याचें कारण हेंच होय. तो जनतेच्या पुढेहि लांबवर जात नाही, मागेहि राहत नाही तर तो एखाद्या कुशल वाटसरूप्रमाणे जनतेच्या पुढे राहून मार्ग दाखवीत असतो. म्हणजे तो प्रगतिप्रियच आहे. टिळकांनीच एके ठिकाणीं म्हटलें आहे कीं, " "A newspaper must be like a good balance, stable and sensitive at the same time." हें वर्णन केसरीस तंतोतंत लागू पडतें. लोकरंजन करणाऱ्या पत्रांचें धोरण उघड आहे. पण पत्राचा प्रकार कोणताहि का असेना, सरकारी धोरणाचे आड तो येऊं लागल्यास दडपशाहीचा वरवंटा त्यावरून फिरल्याशिवाय राहत नाही हें दुर्दैव होय. आमचे देशांत सरकारने जे प्रेस ॲक्ट व ऑर्डिनन्स निर्माण केले त्यांचे पाश केसरीवरहि

टाकण्यांत आले. या पाशांतून तो मोठ्या शिताफीने निसटला इतकेंच काय तें.

**मेकॉलेचें वर्णन**

असो. इंग्रजांचे हातीं हिंदुस्थान आला त्या वेळच्या हिंदुस्थानाच्या स्थितीचें वर्णन लॉर्ड मेकॉले याने केलें आहे तें असें—

"The people of India when we subdued them, were ten times numerous as the Americans whom the Spaniards vanquished, and were at the same time quite as highly civilised as the victorious Spaniards. They had reared cities larger and fairer than Saragossa or Toledo, and buildings more beautiful and costly than the Cathedral of Seville. They could show bankers richer than the richest firms of Barcelona or Cadiz, Viceroys whose splendour far surpassed than that of Ferdinand the Catholic, myriads of cavalry and long trains of artillery which would have astonished the great captain."

पण इंग्रजी राज्यपद्धतीचा अम्मल सुरू झाल्यावर ही स्थिति टिकली नाही. नवीन राज्यामुळे क्रांति घडन आली. त्याबरोबर विचारक्रांतिहि घडून येऊं लागली. नवा मनु उत्पन्न झाला असेंहि म्हणण्यास हरकत नाही. पारतंत्र्यामुळे राष्ट्रांतील तेज हळूहळू नाहीसें होऊं लागले. इंग्लंडमध्ये वाफेच्या शक्तीचा शोध लागून यंत्रकलेचा उद्भव झाला. यामुळे हिंदुस्थानांतील कलाकौशल्य व व्यापार यांस जबर धक्का बसला. मुख्य गंगाजळीवर सरकाराचा ताबा राहिल्याने देशांतील जुन्या पेढ्या नाहीशा होऊन भांडवल सर्वस्वी सरकारचे हातीं गेलें. हिंदी पेढ्या इंग्रज पेढ्यांच्या चढाओढींत टिकेनाशा झाल्या. पुढें चांदीचा भाव कमी झाल्यामुळे रुपायाची किंमत कमी झाली. यामुळे परदेशांशीं व्यवहार करतांना बट्टा जास्त भरावा लागूं लागला. हुंडणावळ अस्थिर राहिली. लष्करी खर्च बेसुमार वाढविण्यांत आला. यामुळे अर्थातच सरकारास पैशाची तूट पडूं लागली. शेवटीं खर्चाची तोंडमिळवणी करण्याकरिता सरकारने शेतसारा वाढविण्यास सुरुवात केली. मोजणी खातें निर्माण करण्यांत येऊन जमिनीची मोजणी वरचेवर करण्यांत येऊं लागली.

पण ही मोजणीहि अन्यायाने होऊं लागली. यामुळे शेती सुधारण्याकडे शेतकऱ्याचे लक्ष लागेना. गोरक्षणास सरकारने फाटा दिल्याने शेतीला उपयुक्त अशा चांगल्या बैलांची निपज थांबली. यामुळे खताचाहि तुटवडा भासूं लागला. शेतकऱ्यांचे पैशाला ओहोटी लागून ते कंगाल बनले. अशा स्थितींत एखादे वर्षी पाऊस न पडल्यास दुष्काळ आपलें उग्र स्वरूप धारण करी. अशा वेळीं पाटबंधारे, फॅमिन रिलीफ, जंगल या बाबतींत सरकारने चांगले कायदे केले खरे, पण अधिकारी त्यांचा अंमल जुलमाने करीत. दुष्काळांत शेतकऱ्यास योग्य ती साऱ्याची सूट व तगाईहि मिळेना. अशा स्थितींत देशांत दरवडेखोर वाढल्यास किंवा शेतकरी दंगा करतील अशी भीति वाटल्यास नवल नाही. इतकेंहि करून सरकार थांबलें नाही. तर हिंदी प्रजेस त्याने निःशस्त्र केलें. लष्करी खातें हें साम्राज्याच्या हितासाठी आहे अशी दृष्टि सरकारने ठेवून त्यांतहि काळा गोरा असा भेद ठेविला. हिंदी सुशिक्षित लोकांस लष्करांत मज्जाव करण्यांत आला. इतर खात्यांत अधिकाराच्या जागा गोऱ्या सनदी नोकरांसच देण्यांत येऊन हिंदी लोकांस कनिष्ठ प्रतीच्या नोकऱ्या देण्यांत आल्या. रेल्वे, तारायंत्र वगैरे आधिभौतिक सुधारणा ज्या इकडे आल्या त्यांचा उपयोगहि इंग्रज व्यापारी व सरकार यांसच जास्त झाला. सारांश, हिंदुस्थान हा देश गरीब शेतकऱ्यांचा व कनिष्ठ दर्जाच्या नोकऱ्या करणाऱ्या लोकांचाच राहिल्यास नवल नाही. अशा स्थितींत १८५८ सालीं राणीसरकारचे जाहीरनाम्याने आश्वासन मिळाले खरें, पण तेंहि नोकरशाहीने पाळलें असें म्हणतां येत नाही. अशा स्थितींत सुशिक्षित लोक क्रांतिकारक बनल्यासहि नवल नाही.

**इंग्रजी शिक्षणाचा परिणाम**

हिंदी लोकांस इंग्रजी शिक्षण देण्यांत सरकारचा कोणताहि का हेतु असेना, एवढें मात्र खरें कीं त्याचा ज्यांनी फायदा घेतला तेच समाजाचे पुढारी बनले आणि तें योग्यच होते. हे पुढारी पाश्चात्य सुधारणांनी दिपून गेले. पण हा दोष त्यांचा नसून परिस्थितीचाच समजावयाला पाहिजे. या पुढाऱ्यांचें म्हणणें असें कीं, "आपले राज्यकर्ते आपल्या कल्याणाकरिताच आलेले आहेत. ही एक ईश्वरी योजनाच आहे. तेव्हा त्यांचे सहवासाने आपण लवकर शहाणे झालें पाहिजे." ही अशा प्रकारची स्थिति देशांत चालू असतांनाच केसरीचा १८८१ सालीं जन्म झाला; व त्यानें आपली सुरुवातीची कारकीर्द गाजविली. ही वर दिलेली देशाची राजकीय दुःस्थिति केसरीस बदलावयाची होती. समाजातील पुढाऱ्यांचे राजकीय विचार चुकीचे आहेत हें त्यास दाखवावयाचें होतें. हें काम केसरीने उत्तम रीतीने करून दाखविलें. "इंग्रज कांही परमार्थाकरिता येथे आलेले नाहीत. ते स्वार्थीच आहेत. इंग्रजांना जें एवढें मोठें साम्राज्य प्राप्त झालें

आहे तें त्यांची सामाजिक किंवा धार्मिक स्थिति उच्च आहे म्हणून नव्हे, तर आज सुधारलेलीं राष्ट्रें ज्या लोकसत्तात्मक राज्यपद्धतीचा अवलंब व पुरस्कार करतात त्यामुळेच होय. तेव्हा लोकांनी मुकाट्याने न बसतां राज्यकारभारांतील आपला हक्क पुढे निर्भयतेने मागावा. यांत राज्यद्रोह नाही. उलट अशा मागणीने इंग्रजी साम्राज्यास बळकटी येणार आहे. इंग्रजी शिक्षणाने तुम्हांस जी धार्मिक व सामाजिक सुधारणा करावीशी वाटते ती शिक्षणाने आपोआपच होईल. तिच्याकरिता अडून बसूं नका." हा केसरीचे शिकवणीचा आशय आहे.

## केसरीचें कार्यक्षेत्र

केसरीची कामगिरी मर्यादित नाही. त्याचें कार्यक्षेत्र विस्तृत झालेलें आहे. हिंदुस्थानांत भाषाभिन्नत्वामुळे विचारांचे उलाढालींस मर्यादा येते ही केसरीची तक्रार फार जुनी. लोकशाहीचें तत्त्व इंग्रजी शिक्षणाने इकडे उदित झालें होतें. तें महाराष्ट्रास अर्थात् नवीन होते. तेव्हा तें तत्त्व त्यास शिकवून खऱ्या लोकमताचें दिग्दर्शन व्हावयाला पाहिजे होतें. तें काम केसरीने आत्मविश्वासाने, लोकसेवेचें कंकण हातीं बांधून, लोकांना आपल्या राजकीय अवस्थेची जाणीव करून देऊन केलें. पूर्वी जनसमूहाला कांही लोकमत आहे अशी समजूत सरकारची नव्हती. परंतु ही स्थिति साफ बदलून लोकमत शुद्ध व स्वच्छ असें स्रवूं लागलें आहे! ही कामगिरी केवळ केसरीचीच होय यांत शंका नाही. इंग्रजांच्या व्यापारी धोरणाबरोबरच त्यांची राजकीय सत्ता अनियंत्रित राहिल्यास हिंदी लोकांवर अतिप्रसंग ओढवेल हें जाणूनच केसरीने लोकशाहीचा पुरस्कार केला.

केसरीचे जन्मकाळीं मराठी भाषा बाल्यावस्थेंत होती असेंच म्हणावयाला पाहिजे. ज्ञानेश्वर, तुकाराम, एकनाथ, मुक्तेश्वर, मोरोपंत, वामन पंडित वगैरे कवींनी तिला मंडित केलें होतें हें खरें. परंतु स्वतंत्र गद्यरचना करण्याचा पाठ तींत अजून पडला नव्हता. गद्यरचित अशा भाषाग्रंथांनी भाषेची भरभराट अर्थातच झपाट्याने होते. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनी आपल्या निबंधमालेचे रूपाने हा उपक्रम यशस्वी करून दाखविला होता. परंतु निबंधमाला एक तर मासिक व त्यांतून येणारे निबंध भारी. ते फक्त सुशिक्षितांसच समजावयाचे. तेव्हा आठवड्याचे आठवड्याने आपल्या रोजच्या व्यवहाराचा खल केवळ देशी भाषेंत होणें भाषावृद्धीचे दृष्टीने अगत्याचें होतें. ही कामगिरी केसरीने सतत पन्नास वर्षे करून महाराष्ट्राची बिनमोल सेवा केलेली आहे. पण असें करीत असता भाषेच्या बाल्यावस्थेची नड केसरीस सुरुवातीस भासल्याशिवाय राहिली नाही. शब्दसमुच्चयाचें भांडवल बेताचेंच असल्याने विषयानुरोधाने पारिभाषिक शब्द त्यास निर्माण करावे लागले. आज पन्नास वर्षांचे सहवासाने ते शब्द महाराष्ट्राने आत्मसात् केले आहेत. इंग्रजी भाषेचा उपयोग आपले विचारांचे परिपोषणाचे कामीं करवेल तितका करून घ्यावा, तिचा वृथाभिमान मात्र बाळगूं नये, मराठी भाषा ही वाढती असल्याने तिचे भोवतीं बंधनांचें वलय न घालतां परभाषेंतील शब्द व विचार आत्मसात् करावे असें भाषाविषयक धोरण केसरीचें आहे असें म्हणतां येईल. भाषेला मंडित करणारे जे नवरस त्यांचें प्रदर्शन ज्या ज्या वेळीं मराठी भाषेंत होई त्या त्या वेळीं केसरी अशा यशस्वी प्रयत्नांस प्रोत्साहन देतो. मात्र लोकांचे मनावरील इष्ट परिणामांची तो त्यांस कसोटी लावतो. वीररस हा राष्ट्राभिमानास पोषक, तेव्हा केसरीने त्यास प्रोत्साहन दिल्यास नवल नाही. शिवाजी उत्सव याच हेतूने प्रसृत झाला असें म्हणावयास पाहिजे. पण स्वाभिमानाचा अतिरेक टाकून जनतेने अंतर्मुख असावें म्हणून केसरीने इतिहास-संशोधन व चर्चा यांस प्राधान्य व प्रोत्साहन दिलें असेंहि म्हणण्यास हरकत नाही. पण केसरीचें समाधान एवढ्यानें होणारें नव्हतें. मराठी भाषेचा प्रसार खरोखरी होण्यास सरकारानेच मनापासून प्रयत्न करावयाला पाहिजे हें जाणून केसरीने मराठीची योजना सरकारी कोर्ट व कचेऱ्यांत करण्यांत यावी, शिवाय युनिव्हर्सिटींतील अभ्यासक्रमांतहि तिचा समावेश करण्यांत यावा असें वेळोवेळीं जोराने प्रतिपादिलें. निवळ महाराष्ट्राकरिता मराठी युनिव्हर्सिटी असावी ही मागणी केसरीने केलेली आहे. त्याचप्रमाणे सर्वसाधारण लोकांनाहि मराठी ग्रंथसंग्रहालयें स्थापण्याचा व व्यवहारांत शक्य तोंवर मराठीचा उपयोग करण्याचा उपदेश केसरीने वेळोवळीं केलेला आहे.

## स्वकीयांशीं झगडा

कार्यक्षेत्रांत उतरल्याबरोबर केसरीस सुरुवातीसच स्वकीयांशीं झगडावें लागलें. हे स्वकीय म्हणजे समाजसुधारक व पुराणमताभिमानी लोक होत. हे दोनहि प्रकारचे लोक म्हणजे त्या काळीं महाराष्ट्र समाजाचीं दोन टोंकें होतीं. हीं दोनहि टोंकें जवळ आणण्याचा केसरीचा विचार होता. हा केसरीचा विचार कितपत फळाला आला ही गोष्ट सध्याच्या समाजाचें निरीक्षण करणाऱ्यास कळून येणार आहे. पुराणमताभिमानी लोक केवळ जुन्याला चिकटणारे तर सुधारक हे नवें तेवढे सगळेंच चांगलें असें म्हणणारे. सुरुवातीस या दोनहि पक्षांस केसरी त्यांच्या मिलाफी धोरणामुळे शत्रुवत् वाटे. पण केसरीचें धोरणच प्रभावी ठरल्याने तो पुढे उत्कर्ष पावला. पुराणमताभिमान्यांस केसरी

म्हणे कीं, " इंग्रजांचें राज्य आपणांस टाळतां येणें शक्य नाही. करिता तुम्ही त्यांचें चांगलें तेवढें घेतलें पाहिजे. " उलट समाजसुधारकांस केसरी म्हणे कीं, "सामाजिक सुधारणा करणें चांगलें, परंतु ती देशस्थितीला व समाजस्थितीला अनुरूप अशी असावी." समाज सुधारकांचे अग्रणीं जे आगरकर त्यांचा तर असा ठाम सिद्धान्त होता कीं, सामाजिक सुधारणेशिवाय आपली राजकीय सुधारणा होणें नाही. परंतु ही समजूत केसरीने खोटी पाडून सुधारकांस बजाविलें कीं, समाजसुधारणा हिंदुधर्माचे पायावरच करावयाला पाहिजे. आणि याच दृष्टीने केसरी जातिभेद, स्पृश्यास्पृश्य, स्त्रीशिक्षण, विवाह वगैरे सामाजिक व धार्मिक बाबींकडे पाहतो. समाजसुधारकांनी समाजसुधारणेवर एकांगी जोर दिला नसता तर पुराणमताभिमानी जुन्यास चिकटून न राहता परिस्थित्यनुरूप पुढे आले असते. परंतु तसें व्हावयाचें नव्हतें. किंवा केसरीस आणखी एका क्षेत्रांत चमक दाखविण्यास काळाने संधि दिली असेंच म्हणावें लागतें. सामाजिक सुधारकांचा दुसरा एक तोडगा असा होता कीं सुधारणेला मदत म्हणून सरकारी कायद्यांची मदत असावी. केसरीने या कल्पनेचा वेळींच निषेध केला. सरकारचा हात जो आमच्या राजकारणांत शिरला आहे तेवढाच पुरे; आणखी समाजसुधारणेंत व धार्मिक सुधारणेंत तो नको असें वाटूनच कीं काय, केसरीने या कल्पनेस आपला विरोध दर्शविला. सुशिक्षित लोक बुद्धीचे कसोटीस लावून एखादी सुधारणा अमलांत आणीत असल्यास केसरी त्यास प्रोत्साहनच देतो.

### वैदिक धर्माची कांस

या सामाजिक धोरणाचें पाठीमागे असलेली धार्मिक मनोरचना लक्षांत घेतल्यास या मनोरचनेची परिणति कशी स्वाभाविक होय हें चांगलें समजतें. वैदिक धर्माची कांस केसरीने कधीच सोडलेली नाही. हिंदुधर्म हा स्वभावतःच व्यापक असल्याने हिंदुस्थानांत इंग्रजांचे सहवासाने व शिक्षणाने जे धार्मिक पंथ निर्माण झाले, त्यांस दूर न करता केसरीने त्यांचेबद्दल समावेशक धोरणच स्वीकारलें आहे. या धोरणानुसार थियॉसफीचे तत्त्वांवर त्याने कधी चढाई केली नाही. यावरून परधर्मीयांशीं तो सहिष्णु असेल यांत नवल नाही. परंतु गोवध, मुसलमानांची हिंदूंवरील चढाई या गोष्टी जेव्हा हिंदुधर्मास घातक होऊं लागल्या तेव्हा त्याने गोरक्षणाचा, हिंदु-संघटनेचा जोराने पुरस्कार केला. योग्य तो धर्माभिमान हिंदूंचे अंगीं बाणावा म्हणून संस्कृत वाङ्मयाच्यॉ, विशेषतः महाभारत-रामायणासारख्या महाकाव्यांच्या अभ्यासाची तरफदारी केसरीने केली. एवढेच नव्हे तर हा अभिमान जागता राहावा म्हणून त्याने गणेशोत्सव उचलून धरला. त्याचप्रमाणे कीर्तनकार व प्रवचनकार यांनी ख्रिस्ती मिशनऱ्याप्रमाणे हिंदुधर्माचा ध्वज घेऊन धर्मप्रसार करावा असेंहि केसरीचें म्हणणें आहे.

केसरीचे जन्मकाळीं म्हणजे १८८१ सालीं व यापुढे जी राष्ट्रास निकृष्टावस्था प्राप्त झाली होती तिला इंग्रजांचे राज्यापेक्षां त्यांची राज्यपद्धतिच कारणीभूत होती हें निःसंशय होय. ही राज्यपद्धति अनियंत्रित असून तिच्यावर लोकमताचा दाब नाही. राष्ट्रीय सभेचा जन्म १८८५ सालीं झाला. आणि याच सुमारास केसरीने देशाची राजकीय सुधारणा झाल्याशिवाय देशाचा जगांत टिकाव लागणें शक्य नाही हें महत्तम तत्त्व महाराष्ट्र जनतेस सांगितलें हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. ह्यूम, वेडरबर्न, ब्रॅडला, कॉटन, जार्डिन, दादाभाई नौरोजी, डिग्बी वगैरे राष्ट्रसभाभिमान्यांचे संदेश केसरीने जनतेस मोठ्या गौरवाने कळविले आहेत. पहिल्या राष्ट्रीय सभेंत कौन्सिलांचे वाढीवर जो ठराव झाला त्यावर टीका करतांना केसरीने असें म्हटलें आहे कीं कौन्सिलांत लोकनियुक्त सभासदांचें बहुमत असावें. पुढें राष्ट्रीय सभेंत ह्यूमसाहेबांचे सूचनेनुसार इंग्लंडांत चळवळ करावी असें ठरविण्यांत आलें. ही सूचना केसरीने उचलून धरली. परंतु इंग्लंडांतील लोक राष्ट्रीय सभेचें गाऱ्हाणें ऐकत नाहीत असें समजल्यावर केसरीने असें प्रतिपादन केलें कीं, राष्ट्रीय सभेची घटना तयार करून तिच्या धोरणाची माहिती खेडोपाडीं लोकांना करून द्यावी.

परंतु या वेळीं राष्ट्रीय सभेच्या आकांक्षेचें वैषम्य सरकार, अँग्लो-इंडियन लोक व अँग्लो-इंडियन वृत्तपत्रें यांस वाटूं लागलें. हे लोक जेते म्हणून अहंकाराचे व हेटाळणीचे स्वरांत हिंदी राष्ट्रीय आकांक्षेस तुच्छ लेखीत. पण केसरीने यांचा योग्य वेळीं समाचार घेतला. पुढे पुढे तर राष्ट्रीय सभा पूर्ण राष्ट्रीय झाल्यावर केसरी व अँग्लो-इंडियन वृत्तपत्रें यांचे संबंध व्यक्तिशः वैरभावाचे आले. पण केसरीची भूमिका लेचीपेची नसल्याने या वृत्तपत्रांस त्याचेपुढे नमावें लागलें. मुंबईचा टाइम्स, विलायतेंतील टाइम्स व ग्लोब यांच्या माफीवरून ही गोष्ट लक्षांत येते. येवढेंच नव्हे तर सर व्हॅलेंटाइन चिरोल या प्रमुख अँग्लो-इंडियन प्रतिपक्षाने केसरीचे प्रमुख संपादक टिळक यांस Father of Indian unrest असें सर्टिफिकेट दिलें! यापेक्षां दुसरा विजय कोणता!

### दोन मोठ्या चळवळी

असो. १८९२ चे सुमारास कायदेकौन्सिलांवर पार्लमेंटसभेने एक ठराव केला. त्यावर टीका करतांनाहि केसरीने लोकांची बाजू पुढे मांडली

आणि म्हटलें कीं, "सध्या मिळाला तेवढाच लाभ समजून पुढील उद्योगास लागलें पाहिजे." पुढें प्लेग व दुष्काळ हीं संकटें आल्याने राजकारणाची पीछेहाट झाली. परंतु लॉर्ड कर्झन यांचे अरेरावीमुळे राष्ट्रांत जबर असंतोष पसरला होता. या वेळीं केसरीने असें प्रतिपादिलें कीं, राष्ट्रीय सभेंत पुढाऱ्यांनी जमून नुसते जुने ठराव पास करण्यांत अर्थ नाही; तर ते ठराव अमलांत आणण्याचा प्रयत्न करावा. पुढे लवकरच १९०५ सालीं बंगालचे फाळणीचे रूपाने लॉर्ड कर्झन यांनी आपले अरेरावी वर्तनावर मुकुट चढविला. लोकमताचीहि चांगलीच परीक्षा या वेळीं झाली. बंगालचे लोक खडबडून जागे झाले व त्यांनी ब्रिटिश मालावर बहिष्कार व राष्ट्रीय शिक्षण या दोन चळवळी मोठ्या प्रमाणावर हातीं घेतल्या. ही वेळ केसरीने साधून वंगभंगाची चळवळ उचलून धरली. स्वदेशीच्या व्रताची ओळख महाराष्ट्रास सार्वजनिक काकांनी १८८०च्या अगोदरच करून दिलेली होती. तिच्याच आधारावर केसरीने बहिष्काराचा पुरस्कार केला. विलायतेंतील मँचेस्टरचे कापडाचे व्यापारी जे हिंदुस्थानांतील व्यापार बुडवून गबर झाले त्यांस म्हणजे पर्यायाने सरकारास नमविण्याकरिता अशा रीतीने लोकांचे हातीं बहिष्काराचें एक नवीनच परिणामकारक शस्त्र आलें.

## राष्ट्रीय शिक्षण

दुसरी बंगालने स्वीकारलेली चळवळ म्हणजे राष्ट्रीय शिक्षणाची. ती केसरीने पूर्णपणें उचलली. महाराष्ट्रांत खासगी शिक्षणसंस्थांस ग्रँट देऊन सरकारने त्यांचें स्वातंत्र्य हिरावून घेतलें होतें. नवीन युनिव्हर्सिटी बिलाने सरकाराने शिक्षणाचीं सूत्रें आपल्या हातीं ठेविलीं. शिवाय सरकारचें शिक्षणविषयक धोरण एकांगी, तेव्हा ही कोंडी फोडण्याकरिताच केसरीने राष्ट्रीय शिक्षणाची चळवळ उचलून धरली आणि असें प्रतिपादिलें कीं, राष्ट्रीय शिक्षणांत वाङ्मयाचें अनेकांगी त्याचप्रमाणे धार्मिक, शास्त्रीय व औद्योगिक शिक्षण द्यावें. याच हेतूने केसरीने प्राथमिक शिक्षण, शाळा व कॉलेजांतील अनेकांगी अभ्यासक्रम, बनारसची हिंदु युनिव्हर्सिटी, वंगभंगाच्या चळवळींत निघालेल्या शिक्षण-संस्था, समर्थ विद्यालय, असहकारितेच्या अमदानींतील शाळा व कॉलेजें यांचा पुरस्कार केला.

पुढें १९०६ सालीं राष्ट्रीय सभा कलकत्त्यास दादाभाई नौरोजी यांच्या अध्यक्षतेखाली भरली. दादाभाई या वेळीं पार्लमेंटाचे मेंबर होते. इंग्लंडमधील लोकमताची त्यांनी परीक्षा केली होती. राष्ट्रीय सभेंत त्यांनी सांगितलें कीं, स्वराज्य शिवाय हिंदुस्थानाला तरणोपाय नाही. सभेच्या मुख्य ठरावांत बहिष्कार, स्वदेशी, राष्ट्रीय शिक्षण आणि स्वराज्य यांचा समावेश करण्यांत आला. या वेळीं केसरीनें म्हटले कीं यंदाचे राष्ट्रीय सभेवर केसरीच्या मताची पूर्ण छाप बसली असून राष्ट्रीय सभा यंदा केसरीच्या मताकडे पूर्ण झुकली आहे असें म्हणण्यास हरकत नाही. हें केसरीचें म्हणणें सर्वस्वी खरें होतें.

## असहकारिता

पण मेथा, वाच्छा, बानर्जी, गोखले वगैरे जुन्या पुढाऱ्यांना हे ठराव मानवणारे नव्हते. किंबहुना असे ठराव पास होऊं नयेत म्हणूनच दादाभाईस विश्वासाने हिंदुस्थानास आणण्यांत आलें. पण अनुभव मात्र उलटा आला! या योगाने राष्ट्रीय सभेंत तट पडून १९०७ सालीं सुरतेस राष्ट्रीय सभा मोडली गेली. यापुढे सभा जुन्या पुढाऱ्यांनी नियमांचें बंधन घालून आपल्या हातीं ठेविली. या जुन्या पुढाऱ्यांचें मत असें कीं, सरकारचे न्यायबुध्दीवर व दयाशीलतेवर अवलंबून राहावें, त्यास राग न येईल असें वागावें आणि आशा बाळगून गोडीगुलाबीने राहून जे हक्क तें देईल ते पदरांत पाडावेत. या त्यांच्या धोरणामुळे त्यांस मवाळ व नव्या राष्ट्रीय पक्षास जहाल अशीं नांवें प्राप्त झालीं. केसरी अर्थात् राष्ट्रीय पक्षाचा पक्षपाती बनला. १९१६ पर्यंत या दोनहि पक्षांची एकी झाली नाही. या वेळीं राष्ट्रीय पक्षाने हिंदी स्वराज्य-संघ स्थापन केला त्याचा केसरीने जोराने पुरस्कार केला. मद्रासकडील बेझंट बाईंनी स्थापिलेल्या स्वराज्य—संघालाहि त्याने संमति दिली. पुढें मुस्लीम लीगचीहि योजना होऊन लखनौ येथील राष्ट्रीय सभेंत एकमताने ठराव पास झाल्यावर केसरीने सर्व पक्षांचें अभिनंदन केलें. पण याचें फळ म्हणून देण्यांत आलेल्या मॉंटफर्ड सुधारणा त्या अपुऱ्या, असमाधानकारक व निराशाजनक आहेत, परंतु त्यांचा उपयोग करून पुढील चळवळीस लागावें असेंच केसरीने आपलें मत दिलें. आणि १९१९च्या अमृतसर येथील राष्ट्रीय सभेंत याच अर्थाचा ठराव पास झाला. पुढे १९२० सालीं म. गांधींचे योजनेनुसार सरकाराशीं असहकारिता पुकारण्यांत आली. केसरीस ती मान्य नव्हती. परंतु राष्ट्रीय सभेचा ठराव 'मान्य करून त्याचा आदर करणें ही गोष्ट राजनिष्ठेच्या दृष्टीने शिष्टाचाराची आहे' असें समजून त्या ठरावास केसरीने मान्यता दिली; परतु लगेच असेहि बजाविलें कीं, 'पुढे मागे ठराव दुरुस्त करून घेण्याचा आग्रह सोडण्याची सक्ति किंवा नैतिक बंधनहि कोणावर नाही. असहकारितेंत सामुदायिक व्यवहार्यता नव्हती म्हणून केसरीचा तिला विरोध होता. शिवाय असहकारिता हा एक प्रयोग असून त्या प्रयोगास कालमर्यादाहि होती. म. गांधींनी माघार घेतल्यावर

व प्रयोगाची कालमर्यादा संपल्यावर पुढे केसरीने असहकारिताच सुरू ठेविली; परंतु तिला त्याने व्यापक स्वरूप दिलें. केसरीच्या या कामगिरीनेच पुढे स्वराज्यपक्ष व त्यांतून प्रतिसहकारपक्ष यांचा उदय झाला. सध्या केसरी राष्ट्रीय सभेच्या ठरावाा योग्य तो मान देऊन त्यांतील ग्राह्याग्राह्यतेची शहानिशा करतो असें म्हणण्यास हरकत नाही.

केसरीचें कार्यक्षेत्र राजकारण हें खरें. पण त्याची कामगिरी बहुविध आहे असेंच म्हणावयाला पाहिजे. ही कामगिरी म्हटली म्हणजे राजकीय, धार्मिक, सामाजिक, वाङ्मयविषयक, शिक्षणविषयक, ऐतिहासिक, औद्योगिक, अर्थशास्त्र व पंचांगविषयक होय. पण त्यांतल्या त्यांत राजकीय कामगिरी केसरीचीच बहुविध आहे असेंच म्हणावयाला पाहिजे. केसरीनें जनतेस 'स्वराज्य' हा शब्द शिकवला असे जें म्हणतात तें कांहीं खोटें नाहीं. १८५८ सालीं राणीचा जाहीरनामा प्रसिद्ध झाला तरीं "राजानें झोडलें व पावसानें भिजविलें" ही म्हण लोकांत रूढ होती. ही समजूत केसरीने बदलली. इंग्रजांचे राज्यांतील वरवरची शांतताच लोकांना दिसत असे. पण केसरीस हें पूर्ण माहीत कीं, ही वरील शांतता बेगडी आहे. खरा राज्यकारभार, परराष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय, व्हाइसरॉय, स्टेटसेक्रेटरी व पार्लमेंट यांचेच हातीं आहे. आणि हिंदुस्थानांतील राज्ययंत्र प्रजेपासून जितकें तुटक ठेवतां येईल तितकें तुटक ठेवण्यांत आलेलें आहे. हें जाणूनच केसरीने सतत पन्नास वर्षे लोकमताचा पुरस्कार केला. पण असें करीत असतां केसरीचा संबंध बलाढ्य सरकाराशीं पोंचत होता, पण सरकारी शक्तीचीं त्याने पर्वा कली नाही हें त्याला आज एकावन्नावें वर्ष चालू आहे, यावरूनच सिद्ध होतें. तो सरकारी सत्तेस बजावितो कीं ज्या राज्यांत लोकमतास मान नाही तें राज्य टिकत नाही. एकदा वाढीस लागलेली राष्ट्राची महत्त्वाकांक्षा थांबवून धरतां येत नाही. जगाचा इतिहास पाहतां लोकमताचा विजयच जिकडे तिकडे दिसतो.

## केसरीची टीकापद्धति

केसरीची टीकापद्धति विशाल आहे. प्रतिपक्षास तें एक प्रकारचें दिव्यच आहे. तो चढाईची वाट पाहत नाहीं, तर प्रतिपक्षी हुडकून काढून त्याचे मार्गावर तो घाव घालतो. आपल्यापेक्षा हीन असलेल्यावर तो झडप घालीत नाही. परंतु प्रसंग पडल्यास त्यासहि सोडीत नाहीं. सुरुवातीस केसरीची मूठ राणीसरकारचे जाहिरनाम्याने बळकट असे. सरकारी कायदे केसरीचे वाटेस जात नसत तर उलट केसरीचे निमित्ताने कायदे फिरत. केसरीचे योगानेच लोकमत बनतें हें खरें, पण त्यांत त्याचा अट्टाहास असत नाही. तर जे चांगली किंवा पुढारलेलीं मतें प्रतिपादितात त्यांचीहि वेळीं स्तुति करून प्रगतीचें पाऊल कोठें रोवावयाचें हें तो बिनचूक सांगतो.

राष्ट्रीय पक्षाची वाढ केसरीने केलेली आहे. केसरीचे शिकवणीनुसार आज कित्येक व्यक्ति स्वयंस्फूर्तीनें राष्ट्रकार्य करीत आहेत. एवढेंच नव्हे तर आज महाराष्ट्रांत जीं वर्तमानपत्रें दिसतात तीं केसरीनेंच स्फूर्त झालेलीं होत असें म्हणण्यांत अतिशयोक्ति नाही. केसरीची शिकवण अशी कीं, राष्ट्रकार्य ज्याने अंगावर घेतलेलें आहे त्याने निराशा हा शब्द विसरून राष्ट्रांत नेहमी नवजीवन व चैतन्य संचारण्याकरिता प्रयत्न करावा. तसें करीत असताना आपल्या देशबांधवांत पक्षोपपक्ष व मतभिन्नत्व दिसावयाचेंच. पण मतभेदांतून मतैक्य, बेकीमधून एकी शोधून काढून सबंध राष्ट्राने आपली मागणी एकमुखी करावी. राजकारण हा कधीहि न संपणारा खेळ आहे असें समजून प्रतिपक्षाशीं वागावें; आणि तडजोड करण्याचा प्रसंग येईपर्यंत चळवळ करून तडजोड घडून आल्यावर ती प्रतिपक्षावर लादावी आणि आपलें चढाईचें धोरण कायम ठेवावें.

केसरीवर आपत्तीचे प्रसंगहि आजवर पुष्कळच आले. टिळक, आगरकर, केळकर, खाडिलकर वगैरे संपादकांस तुरुंगवास घडला, सुरुवातीस छापखान्याची नड भासली, अग्निनारायणाची अवकृपाहि झाली, अन्यायमूलक खासगी फिर्यादीहि करण्यांत आल्या. या व अशा प्रकारच्या अडचणींतून केसरी निभला ही ईश्वराची कृपाच होय. शिवाय बृहन्महाराष्ट्राने लो. टिळकांस जी संकटप्रसंगीं आर्थिक मदत केली ती केसरीनें व्याजासकट तीन लक्षांचे ट्रस्टने फेडली हें त्याच्या वाढत्या उत्कर्षाचेंच चिन्ह होय. असो.

अशा प्रकारें केसरीची विविध कामगिरी लक्षांत घेतां केसरीचे कामगिरीच्या स्थूल मानानें प्रत्यंतर येऊन आपणांस केसरीने पन्नास वर्षे पुढे आणलें असें वाटून मोठा अभिमान व आनंद वाटतो. जगांत इंग्लंड, अमेरिकेसारख्या बलाढ्य राष्ट्रांत केवढालीं व मोठालीं वर्तमानपत्रें असेनात केसरीचें महत्त्व महाराष्ट्रास फार आहे, व याच दृष्टीने महाराष्ट्र हा केसरी चिरंजीव व्हावा असें इच्छील.

# देशाचें नष्टचर्य कशानें संपेल ?

हिंदुस्थानांतील प्रांतांना स्वायत्तता म्हणजे स्वराज्य देण्याचें केव्हाच ठरून चुकलें आहे. पण त्या योगानें कोणत्याहि जबाबदार हिंदी राजकीय पक्षाचें समाधान होण्यासारखें नाही. कारण महत्त्वाच्या सत्तेचा खरा अंश प्रांतिक सरकारापाशीं फार थोडा आहे. हिंदुस्थानाची सांपत्तिक स्थिति सुधारणें, सैन्य ठेवून हिंदुस्थानाचें परचक्रापासून व अन्तस्थ दंग्याधोप्यापासून रक्षण करणें, परराष्ट्रांशीं तह ठरविणें किंवा युद्ध पुकारणें, आयात–निर्गत मालावर जकाती बसविणें, कर्ज काढणें, हुंडणावळीचे भाव बदलणें इत्यादि बाबी महत्त्वाच्या असून त्यांच्या सत्तेचें उगमस्थान मुख्यतः हिंदुस्थानसरकारापाशीं आहे. ही सत्ता तेथें असल्यामुळे ती हिंदी लोकांच्या हवालीं झाल्यावाचून प्रांतिक सरकारांना स्वायत्तता मिळाली तरी हिंदुस्थानच्या सद्यःस्थितींत विशेष फरक दृष्टीस पडणार नाही. खरें स्वराज्य हेंच असून त्यासाठीच इंग्रज लोक व हिंदी पुढारी यांच्यामध्यें घासाघीस लागून राहिली आहे.

स्वराज्यासंबंधानें अनेकांनी अनेक योजना मांडल्या. त्यांत पं. मोतीलाल नेहरू यांच्या अध्यक्षतेखाली नेमलेल्या सर्वपक्षीय कमिटीनें एक योजना प्रसिद्ध केली. तिच्या इतकी सर्वमान्यता अद्यापि दुसऱ्या कोणत्याहि योजनेला लाभली नाही. या योजनेंत ब्रिटिश साम्राज्यांतील वसाहतीस स्वराज्याचे जे अधिकार प्राप्त झाले आहेत, त्यांचीच मागणी केली असल्यानें सदर योजनेवर ब्रिटिश पार्लमेंटानें आपल्या मान्यतेचें शिक्कामोर्तब ठोकल्यास राष्ट्रीय सभेसहि कायदेभंग किंवा असहकारिता यासारखें हत्यार उचलून सरकाराविरुद्ध उठण्याचें कारण राहणार नाही. ब्रिटिश सरकार नेहरू रिपोर्टांत नमूद केलेलें स्वराज्य हिंदुस्थानास आज देण्यास तयार नाही ही गोष्ट आतापर्यंत अनेकवार स्पष्ट झाली आहे. मात्र तशा प्रकारचें स्वराज्य देण्यानें इंग्लंडचा स्वार्थ बुडतो अशी सबब ब्रिटिश मुत्सद्दी मुळीच सांगत नाहीत. कारण तशी सबब ते सांगतील तर हिंदुस्थानचें राज्य इंग्रज लोक हिंदुस्थानच्या कल्याणाकरितां चालवीत आहेत या शेंदीडशें वर्षें आणिलेल्या सोंगाची संपादणी कशी होईल ?

यासाठी नाटकांतल्याप्रमाणें त्या सोंगाची ऋषीसारखी लांब दाढी व तोंडावरची सात्त्विकपणाची रंगसफेती कायम राखण्याकरितां त्यांनी निरनिराळ्या प्रकारचीं मिषें सुरू ठेवलीं आहत. फेडरेशन म्हणजे संयुक्त राज्यघटना हें त्यांपैकींच एक मिष होय. साऱ्या हिंदुस्थानची संयुक्त राज्यघटना तिच्यांत संस्थानिक सामील झाले तरच सिद्ध होणार. या संयुक्त राज्यघटनेची क्लृप्ति सायमन कमिशनाच्या रिपोर्टांत घातली असली तरी तिला लवकर व्यावहारिक स्वरूप येईल अशी कल्पना हिंदुस्थानसरकारासहि नव्हती. म्हणून हिंदुस्थानसरकारानें सायमन कमिशनचा रिपोर्ट वाचून त्यावरील आपला अभिप्राय प्रसिद्ध केला आहे त्यांत संयुक्त राज्यघटनेकडे लक्षच दिलें नाही. मात्र पहिल्या गोलमेज परिषदेंत हिंदुस्थानसरकारची सत्ता लोकमतास जबाबदार झाली पाहिजे असा आग्रह सर्व हिंदी प्रतिनिधींनी धरला त्या वेळीं संयुक्त राज्यघटनेस जर हिंदी प्रतिनिधि मान्यता देतील व संस्थानिक संयुक्त राज्यघटनेंत शिरण्यास कबूल होतील तर हिंदुस्थान सरकारची म्हणजे मध्यवर्ती सत्ता हिंदी कायदेमंडळास जबाबदार करण्याचें ब्रिटिश सरकार मनावर घेईल अशा तऱ्हेची भाषा माजी व्हाइसरॉय लॉर्ड रेडिंग यांनी काढली व परिषदेंतील सर्व प्रतिनिधींना हिंदुस्थानाला त्वरित स्वराज्य मिळवून देणारा हा परीसच सापडला असें आश्चर्यपूर्वक वाटलें. बिकानेरचे महाराज प्रभृति संस्थानिक व हिंदी प्रतिनिधि यांनी सदर कल्पना झेलली आणि तिच्या भोंवतीच सर्वांनी गेलें वर्ष दीड वर्ष फेर धरला आहे.

दुसऱ्या गोलमेज परिषदेनंतर तीन कमिट्या इंग्लंडहून येऊन हिंदुस्थानांत फिरल्या. त्यांपैकींच डेव्हिडसन कमिटी ही एक होय. हिंदुस्थानची भावी राज्यघटना फेडरेशनच्या म्हणजे संयुक्त पद्धतीवर व्हावयाची तर तिच्या घटकांत दोन जातींचे घटक उत्पन्न होतात. खालसा मुलखांतील प्रांत ही घटकांची एक जात व संस्थानें हा दुसरी जात. खालसा प्रांत व हिंदुस्थान सरकार यांचे देण्याघेण्याचे संबंध जुनेच आहेत. तेच संबंध थोड्याशा फरकानें संयुक्त राज्यघटनेंत जवळ जवळ जसेच्या तसेच पुढे चालू राहण्याला अडचण पडणार नाही. हिंदुस्थान सरकारास प्रांतिक सरकारें आपल्या उत्पन्नाचा बराच मोठा भाग तोडून देऊन पाशांत असतात, किंबहुना हिंदुस्थान सरकार सत्तेच्या बळावर अखिल भारतीय स्वरूपाचीं खातीं स्वतःच्या ताब्यांत ठेवून व अशा रीतीनें प्रांतिक सरकारांच्या टाळूवरून हात फिरवून आपली पोळी पिकवीत असते. अशा प्रकारची हिंदुस्थान सरकाराचीं खातीं म्हटलीं म्हणजे, जकात, मीठ, अफू, रेल्वे, चलन, टांकसाळ, इन्कमटॅक्स व संस्थानिकांपासून मिळणारी खंडणी हीं होत. त्यावरच

लष्कर, सिव्हिल सर्व्हंटांचें पेन्शन बड्या अधिकाऱ्यांचा पगार, कर्जावरील व्याज इत्यादि हिंदुस्थान सरकारचे खर्च चालतात. आता संस्थानिक संयुक्त घटनेंत आले असता त्यांनी हिंदुस्थान सरकारच्या खर्चाचा वाटा खालसा प्रांतांच्या बरोबर उचलला पाहिजे हें ओघानेंच कबूल करावें लागतें. परंतु त्या फांदीस हात लावला कीं किती तरी डोंगळे हाताला डसतात. गोलमेज परिषदेनें डेव्हिडसन कमिटीवर हेच नाजूक काम सोपविलें होतें. कमिटीच्या रिपोर्टावरून तिच्या सभासदांचें संस्थानिकांनी बरेंच रक्त आटाविलेलें दिसतें.

आधी संस्थानिक म्हणजे इंग्रजसरकाराचे व त्यामुळे खालसा मुलखांतील हिंदी लोकांचे मानकरी. ते त्यांच्या धर्माला आलें तरच संयुक्त राज्यघटनेंत सामिल व्हावयाचे. त्यांच्यावर जोरा कोणाचाच चालावयाचा नाही. अगदी वरपक्षाकडील जशा कांही त्या विहिणी! त्यांनी फेडरेशन पत्करावयाचें तें हिंदी लोकांवर उपकारांचा डोंगर रचण्याकरिता. कारण ते आले तरच हिंदी लोकांना स्वराज्य मिळावयाचें; त्यांत यांना स्वतःला म्हणण्यासारखा कांहीच लभ्यांश नाही. उलट ढवळ्या शेजारीं पोवळा बांधल्यामुळे वाण न लागला तरी गुण लागून आज ना उद्या लाजेकाजेने आपल्या प्रजाजनांच्या तोंडावर खालसा मुलखांतल्या धर्तीवर प्रातिनिधिक राज्यपद्धति त्यांना टाकावी लागून स्वतःची कांही सत्ता आपखुषीने सोडणें भाग पडावयाचें! ते पडले इंग्लंडच्या बादशहांचे तहनाम्याच्या जोराबर दोस्त. जरी मांडलीक असले तरी ते राजेच. देव्हाऱ्यांत देखील कोणी गंडकींतील शाळिग्राम असतात तर कोणी नर्मदेतील गोटे असतात. त्यांना बाळकृष्णाची किंवा सांबाची सर येत नसली तरी त्यांची गणना देवांतच करण्यांत येते. तोच न्याय संस्थानिकांनाहि लागू असल्यामुळे त्यांना हिंदी लोकांवर उपकार करावासा वाटला किंवा स्वदेशभक्तीचा उमाळा आला तरच ते फेडरेशनवर आपले कृपाकटाक्ष फेकणार.

हिंदुस्थानांत सुमारें सातशें संस्थानिक आहेत. पण तहनाम्याच्या दृष्टीने एकाचा मेळ दुसऱ्याशीं नाहीं. जितके पुरुष्ये तितके चुले; तसे जितके संस्थानिक तितक्या त्यांच्या तऱ्हा. कांही संस्थानिक इंग्रज सरकारला दरसाल उचलून खंडणीची रक्कम देतात, कांही संस्थानिकांपासून लष्करी खर्चाकरितां सरकारने मुलूखच तोडून घेतला आहे. कांहींवर खंडणी बसली आहे व मुलूखसहि मुकावें लागलें आहे. कांही संस्थानिक खंडणी भरतात व त्याच वेळीं सरकारपासून कांही सवलतीचाहि उपभोग घेतात. कित्येक संस्थानिकांपासून इंग्रज सरकाराला लाभ मुळींच नसून उलट सुखासुखी सवलती मात्र द्याव्या लागल्या आहेत. हे शेवटचे संस्थानिक फेडरेशनमध्ये शिरल्यास त्यांजवर हिंदुस्थान सरकारच्या खर्चाचा बोजा पडल्याने त्यांचा आर्थिक दृष्ट्या तोटाच होणार. डेव्हिडसन कमिटीने आपल्या रिपोर्टांत संस्थानिकांपासून त्यांच्या उत्पन्नापैकीं पांच टक्क्यांहून अधिक रक्कम हिंदुस्थान सरकाराने आपल्या खजिन्यांत घेऊं नये असें फर्मावलें आहे. पण कांही संस्थानिक असे आहेत कीं त्यांच्या जवळून हिंदुस्थान सरकारास पाच टक्क्यांहून जास्ती रक्कम पूर्वीपासूनच मिळत आहे. हे संस्थानिक फेडरेशनमध्ये आल्यावर त्यांना बरीच मोठी रक्कम परत करण्याची जबाबदारी हिंदुस्थानसरकारावर पडेल.

ही रक्कम एक कोटी रुपयांपर्यंत जाईल असा कमिटीचा अंदाज आहे. या दृष्टीने विचार करता कित्येक संस्थानिकांचा फेडरेशनमधील प्रवेश हिंदी जनतेस नव्या भुर्दंडामुळे संकटाचा वाटेल व कांही संस्थानिकांना फेडरेशन हेंच नसतें बिकट संकट होऊन बसेल. अशा रीतीनें सर्व संस्थानिकांशीं समान असा एकच देण्याघेण्याच्या वजावटीचा करार करून फेडरेशनमध्ये घेणें अशक्य असल्याने प्रत्येक संस्थानिकाबरोबर वेगवेगळा करार करणें अपरिहार्य ठरणार. बरें, इतकेंहि करून संस्थानें व खालसा प्रांत एकाच स्वरूपाचे व साचाचे बनतील असें मुळींच नाही. खालसा प्रांत प्रांतिक स्वराज्य बहुतांशीं पूर्णपणाने उपभोगणार आणि संस्थानांत तेथील अधिपतीचा एकतंत्री अमल सुरू राहणार. फेडरेशनचें हें शिंगरूं असें चोहोबाजूंनी हिंडून न्याहाळून पाहिल्यास बत्तीस लक्षणी दिसतें. त्याच्या तोंडाला घालावयाला लगाम नाही, त्याच्या पाठीवर एकदम चढून बसावयाला खोगीर नाही, पाय अडकवावयाला रिकिब्या नाहीत. तें पुढून चावतें व मागून लाथा झाडतें. आणि त्याजवर उडवावयाला चाबूकहि नाहीं. असल्या शिंगरावर हिंदुस्थान स्वार झाले तर इंग्रज लोक कृपाळू होऊन त्याला स्वराज्याची खोळ घालणार. हा साराच प्रकार इतका अवघड आहे कीं तो मूर्तस्वरूपांत दृष्टीस पडण्यास किती काळ लागेल याचा मुळी नेमच सांगवत नाही.

हें फेडरेशन होऊं शकलें नाही तर त्याच्याऐवजी सायमन कमिशनाच्या रिपोर्टांत व हिंदुस्थानसरकाराच्या खलित्यात गोवलेली योजना शिल्लक उरते. सायमन साहेबांनी आपल्या योजनेंत हल्ली प्रांतिक सरकारांत चालू असलेल्या द्विदलराज्यपद्धतीचेंच स्वरूप थोड्या फरकाने दाखविलें आहे. सांप्रत गव्हर्नर-

जनरलच्या कार्यकारी मंडळांतील सर्व सभासदांची नेमणूक भारत मंत्र्याकडून होते व त्यांपैकीं एकहि ले. असेंब्ली किंवा कौन्सिल ऑफ स्टेट यांतील लोकनियुक्त सभासदांतून घेतलेला नसतो. ही वहिवाट अंशतः मोडून टाकून त्याऐवजी कार्यकारी मंडळाचे सभासद नेमण्याचा अधिकार व्हाइसरॉयाकडेच असावा असें सायमन कमिशनचें मत आहे. त्या योगानें सदर मंत्र्यांना केव्हा नेमावें व केव्हा काढावें हें व्हाइसरॉयास आपल्या मर्जीप्रमाणे ठरवितां येईल. मात्र व्हाइसरॉयानें ज्या मंत्र्यांची निवड करावयाची त्यांपैकीं निदान तीन मंत्री तरी ज्यांनी कमींत कमी दहा वर्षे सरकारी नोकरींत घालविलीं आहेत असे असावे व बाकीचे एकदोन मंत्री असेंब्ली व स्टेट कौन्सिल यांच्या लोकनियुक्त सभासदांतून निवडून घ्यावे अशी अट घातली आहे. तसेच ते नेमणुकीनंतर कायदेमंडळाला जबाबदार राहूं नयेत! द्विदल राज्यपद्धतीपेक्षां या नव्या पद्धतींत फरक आहे तो हाच होय. त्यामुळे पार्लमेंटाची हुकमत थोडी कमी होऊन ती हिंदुस्थानसरकाराकडे येईल, सर्व मंत्री व्हाइसरॉयास जबाबदार राहिल्यामुळे तेथील कारभार सध्यासारखा एकमुखीच चालेल; पण दोन मंत्री कायदेमंडळाच्या लोकनियुक्त प्रतिनिधींपैकीं असल्यानें व्हाइसरॉयाच्या कौन्सिलात लोकमताचा किरण पडून कायदेमंडळें व हिंदुस्थानसरकार यांचा वारंवार महत्त्वाच्या प्रसंगीं उडणारा खटका टळेल आणि राज्यकारभारांतील बखेडा मोडेल अशी सायमन कमिशनची समजूत आहे.

परंतु या पद्धतीनें बखेडा मोडण्याची आशा हिंदुस्थानसरकारास वाटत नाही व तें खरेंहि आहे. कारण प्रांतिक कौन्सिलांत दिवाण हे कौन्सिलाला जबाबदार असताहि जर प्रांतिक सरकार व कायदेकौन्सिल यांजमध्ये खटके उडतात तर हिंदुस्थानसरकाराचे जे एक दोन हिंदी मंत्री वरिष्ठ कौन्सिलांना जबाबदार नाहीत ते केवळ लोकनियुक्त आहेत म्हणून तेथे उडावयाचे खटके कसे थांबतील असा हिंदुस्थानसरकारचा सवाल आहे. सारांश कारभार तर बिनहरकत चालला पाहिजे; पण त्यावर हुकमत मात्र लोकमताची बसावयास नको हे दोन परस्परविरोधी मतलब एकाच वेळीं साधावे कसे? या अडचणींतून सफाईनें सुटण्याकरिताच सायमन साहेबांनी संस्थानिकांचा शिकारखाना कौन्सिलांत घुसडून खरें हिंदी-लोकमत त्यांच्या टापांखाली, पंजाखाली व खुराखाली चिरडून टाकण्याची कृति काढलेली असावी. हें गोजिरवाणें दिसणारें पिलूं सायमनच्या पोतडींतून गोलमेजपरिषदेंत उडी मारून येताच त्याला मांडीवर घेऊन लॉर्ड रेडिंग प्रभृतींनी कुरवाळलें व त्याला हिंदुस्थान तितक्याच लडिवाळपणानें कडेवर बसविण्यास तयार असेल तर सनिर्बंध असें जबाबदारीचें स्वराज्य देण्यास ब्रिटिश मुत्सद्दी कबूल असल्याचें भासविण्यांत आले.

पण फेडरेशनचा ब्रह्मघोटाळा असा आहे कीं त्यानें भुलून स्वराज्यावरची आपली दृष्टि हिंदुस्थान कधीहि चळूं देणार नाही. हिंदुस्थानानें आपली स्वराज्याची मागणी फेडरेशनवर कधींच अवलंबून ठेविलेली नाही. हिंदी लोक फेडरेशनला ओळखीत नाहीत. फक्त स्वराज्याला ओळखतात. तेव्हा इंग्रजसरकारच्या मनांत खरेंखुरें स्वराज्य देऊन हिंदुस्थानाला संतुष्ट करावयाचें असेल तर डॉ. मुंजे यांनी एक तोड सुचविली आहे ती सरकारानें जरूर अमलांत आणावी. त्या योगानें हिंदुस्थानास आजच्या पुरतें समाधान लाभून सर्व सूत्रें आताच हिंदुस्थानच्या स्वाधीन केल्यानें राज्यशकट चालता चालता मध्येंच कोठें तरी अडून अनवस्था प्रसंग ओढवेल असा ब्रिटिश मुत्सद्दी जो धाक घालतात तो साहजिकच उरणार नाही. डॉ. मुंजे यांचें म्हणणें असें कीं फेडरेशनचा आराखडा आज काढून ठेवावा, संस्थानिकांकरिता लोड मांडून व गालिचे घालून ठेवावे, पण त्यांची येण्याची वाट न पाहता एकदम स्वराज्याच्या कारभारास सुरुवात करावी. सैन्य व परराष्ट्रीय संबंध यांचा इंग्रजांना एवढा बाऊ वाटतो तर तीं खातीं गव्हर्नर जनरलच्या हातीं असूं द्यावीं. भारतमंत्र्यावर ज्या देण्याघेण्याची जबाबदारी आहे ती त्यांजकडेच रहावी. हिंदुस्थानांत इंग्रज वगैरे व्यापारी आहेत ते अल्पसंख्य असल्यानें त्यांच्या हक्कसंरक्षणाची हमी त्यांना देण्यांत यावी. व्हाइसरॉयाचें मंत्रिमंडळ कायदेमंडळाना जबाबदार करावें. मात्र संरक्षणाच्या नांवाखाली कांही महत्त्वाचे हितसंबंध भारतमंत्री व गव्हर्नरजनरल यांजकडे ठेवण्यांत यावयाचे त्याची मुदत फक्त दहा वर्षांची असावी व त्यानंतर त्यांचा ताबा हिंदी लोकांस मिळावा. सैन्यांत युरोपियन सोल्जर व अधिकारी बरेच असल्यानें त्यांत हिंदी लोकांची पूर्णपणे भरती होण्यास तीस वर्षांचा अवधि लागेल. तरी ती मुदत संपताच हिंदी सैन्य हिंदुस्थानाच्या ताब्यांत यावें.

डॉ. मुंजे यानी काढलेल्या योजनेनें दोघांच्याहि अडचणींचा निर्वाह होणारा आहे. त्यांनी म्हटल्याप्रमाणें संरक्षक अटींची मुदत दहा वर्षांची ठेवण्यांत आल्यास आज नसलें तरी दहा वर्षांत पूर्ण स्वराज्य आपणास मिळेल अशी जनतेच्या मनाला खात्री पटून ती संतुष्ट राहील. आणि तितक्या मुदतींत राज्यकारभाराचा अनुभव लोकप्रतिनिधींस मिळाल्यानें उरलेली जबाबदारी उचलण्यास ते समर्थ होऊन सरकारास ती

जबाबदारी टाकण्याचा जो आज बाऊ वाटत आहे तो वाटणार नाही. डॉ. मुंजे यांनी सुचविलेली सैन्याची मुदतहि गैरवाजवी नाही. राष्ट्रीय सभा वसाहतींचें पूर्ण स्वराज्य आजच पाहिजे असा आग्रह धरून बसली आहे खरी. परंतु सरकार आपला हात सढळ सोडून मुंजे म्हणतात त्या धर्तीवर स्वराज्ययोजना देऊं करतील तर राष्ट्रीय सभाहि आपली मागणी आखडती न घेण्याइतकी दुराग्रही नाही. सरकाराने आपली झाकली मूठच उघडून दाखविली नसल्यामुळें राष्ट्रीय सभेलाहि एकदा केलेली मागणी जशीच्या तशी उराशीं घट्ट धरून बसण्यावांचून गत्यंतर राहिलें नाही. ब्रिटिश मुत्सद्द्यांना गेल्या बारा वर्षांच्या झोंबाझोंबीच्या अनुभवानंतर हा सुविचार सुचला तरच या देशाचें व त्याबरोबरच सरकारचेंहि नष्टचर्य संपण्याची आशा आहे, एरव्ही नाही.

# डॉ. मुंजे यांची योजना

### दहा वर्षांत पूर्ण स्वराज्य

प्रांतिक स्वायत्तता प्रथम व संयुक्त राज्यघटना मागाहून असा ब्रिटिश मुत्सद्यांचा मंत्र आहे. या मंत्रांत अंतर्भूत असलेला त्यांचा डाव हाणून पाडण्याकरिता डॉ. मुंजे यांनी जबाबदारीचें तत्त्व प्रथम अमलांत आणा व संयुक्त घटना सावकाश करीत बसा असा आपला अभिप्राय प्रकट केला आहे. डॉ. मुंजे यांच्या नव्या प्रसिद्धिपत्रकाकडे या दृष्टीने पाहिलें पाहिजे. डॉ. मुंजे या पत्रकांत म्हणतातः—

### राजकीय असंतोष

हिंदुस्थानांतील सध्याचा असंतोष पूर्णपणें राजकीय आहे. आर्थिक दुःस्थिति, हिंदु-मुसलमानांतील तंटे हीं कारणें आहेत. नाही असे नाही. परंतु तीं मुख्य कारणें नसून राजकीय असंतोषाच्या आपत्तींत त्यांची भर पडली आहे इतकेंच. ज्या लोकांना गोलमेज परिषदेंत काम करण्याची संधि मिळाली व ज्यांनी त्यांत आपल्या विधायक बुद्धीचा उपयोग शक्य तितका केला, त्यांना एक गोष्ट आढळून आली आहे कीं, सध्याचा हिंदुस्थानांतील राजकीय लढा टाळणें सरकारास, त्यांनी मनांत आणलें असतें तर, शक्य होतें. दोनहि परस्परविरोधी पक्षांनी एकमेकांस सांभाळून घेऊन एकमेकांमधील गैरसमज पसरूं दिले नसते अगर नाहीसे केले असते तर पुष्कळ काम झालें असतें. परंतु तसें झाले नाही हें दुर्दैव होय. लोकांना काय पाहिजे आहे? त्यांना वसाहतीच्या धर्तीवरचें स्वराज्य ऊर्फ 'डोमीनियन स्टेटस' पाहिजे आहे, व तें गोलमेज परिषदेंत बहुतांशांनीं मिळालें आहे. परंतु एकमेकांसंबंधी अविश्वास व संशयी वृत्ति यायोगाने जें गोलमेज परिषदेने मिळविलें तें झांकून गेलें आहे इतकेंच.

### काय मिळाविलें?

सध्याचें अधिकारारूढ प्रधानमंडळ व पार्लमेंट यांनी पुढील गोष्टी देण्यासंबंधी आपल्यास वचनबद्ध केलेलें आहे. त्या गोष्टी अशा —

(अ) संयुक्त स्वराज्यघटनेच्या पायावर उभारलेल्या मध्यवर्ती व प्रांतिक कायदेमंडळाकडे भविष्यकाळीं हिंदुस्थानाचा राज्यकारभार सोंपविला जाणार. याचाच अर्थ नोकरशाही कायदेमंडळाला जबाबदार होणार. मधील संक्रमणकाळांत फक्त पुढील बाबी इंग्रज सरकार आपल्याकडे राखून ठेवणार आहे. (१) परदेशी राजकारण व राष्ट्रीय संरक्षण म्हणजे लष्कर यांचा ताबा गव्हर्नर-जनरल यांच्याकडे राहील. (२) आर्थिक बाबतींत अशा अटी घालण्यांत येणार आहेत कीं, ज्यामुळे सेक्रेटरी ऑफ स्टेट यांनी जे यापूर्वी आर्थिक करारमदार केले असतील ते त्यांना पार पाडता येतील व तसेच हिंदुस्थानाची आर्थिक पत व जरूर तो द्रव्यनिधि कमी होणार नाही व तो आहे त्या स्थितींत राहील.

(ब) अल्पसंख्याकांच्या राजकीय स्वातंत्र्याबद्दल व राजकीय हक्काबाबत कायद्याने हमी दिली जाईल.

गोलमेज परिषदेने वरील (अ) आणि (ब) यांत समाविष्ट केलेल्या राजकीय तत्त्वांना प्रधानमंडळाची व पार्लमेंटाचीहि संमति मिळविली आहे ही गोष्ट लहानसान मानता यावयाची नाही.

गोलमेज परिषदांमधून इतक्या गोष्टी जर ठाम मिळविल्या गेल्या आहेत असें सिद्ध असेल तर मग पुढील गोष्टी सोप्या आहेत. लोकांच्या मनांतील अविश्वास व संशयी वृत्ति नाहीशी करावयाची असेल तर प्रधानमंडळाने अगर साम्राज्यांतील मुख्य मुत्सद्यांनी वरील दोन तत्त्वांचें स्पष्टीकरण करावें व आपल्यास काय मान्य आहे व आपण काय देणार आहों हें स्पष्ट जाहीर करावें व तें पुढीलप्रमाणे करावें असें माझें मत आहे.

### संस्थानिक सावकाशीने येतील

(अ) नोकरशाहीने आपल्या सर्व कृत्यांबद्दलचा जाब कायदेमंडळाला दिला पाहिजे व कायदेमंडळाने ती जबाबदारी घेतली पाहिजे हें मुख्य तत्त्व आहे व यालाच जबाबदारीचें स्वराज्य म्हणतात. मग हें स्वराज्य संयुक्त घटनेच्या योजनेवर सर्वस्वी अवलंबून का

ठेवावें ? त्यावर अवलंबून ठेवूं नये. संयुक्त राज्यघटनेपासून किती फायदे आहेत हें आम्हांला माहीत आहे. म्हणूनच अशा संयुक्त राज्यघटनेचें आम्हीं मनापासून स्वागतच करूं. परंतु ही संयुक्त घटना अमलांत केव्हा येणार हें समजत नाही. कारण तशी घटना अमलांत येऊं नये म्हणून अनेक प्रयत्न चालू आहेत व त्यामुळे निदान तिचा अंमल होण्यास पुष्कळ अवकाश लागेल, निदान तिच्या मार्गांत अडचणी तरी खूप येतील. संस्थानिकांनीहि निश्चित व ठाम अशा रीतीने आपला निर्णय सांगितलेला नाही. परंतु ‘ कालाची घाई ’ आपल्यामागे लागली आहे, असें जें मुख्य प्रधान म्हणतात तें खरें आहे. म्हणूनच आमचें असें म्हणणें कीं, ब्रिटिश हिंदुस्थानापुरतें तरी “ जबाबदारीचें स्वराज्य ” संस्थापन करा. संस्थानिक सावकाश मागाहून मिळतील. घटनेमध्ये अशी वाव ठेवावी म्हणजे आपले अधिकार, आपला दर्जा वगैरे बाबतींत ते व्यवस्था करून घेतील व मग संयुक्त घटनेंत सामील होतील. या योगानें वेळ वांचेल, व मुख्य गोष्टींना विलंब लागणार नाही. व जें ध्येय गांठावें म्हणून लोकांनी आपलें सर्वस्व पणाला लावलें आहे व ज्याचा ध्यास त्यांनी घेतला आहे, तें स्वराज्याचें ध्येय व उद्दिष्ट आपण मिळविणार अशी त्यांना खात्री पटेल !

## दहा वर्षांत स्वराज्य

( ब ) संक्रमणकालामध्ये जरी कांही बाबी राखून ठेवल्या जाव्या या तत्त्वास लोकांनी मान्यता दिली आहे तरी त्या बाबी कायमच्याच अनिर्णीत स्वरूपांत व अनिश्चितावस्थेंत लोंबकळत राहाव्या असा त्याचा अर्थ नाही. म्हणून या अटींचा स्पष्टार्थ पुढीलप्रमाणे करावा. ( १ ) हा संक्रमणकाल दहा वर्षांपेक्षा अधिक नसावा.

( २ ) स्टेटसेक्रेटरींनी हिंदुस्थानाच्या वतीने जें देणें अगर जे करारमदार केले असतील त्यांची निस्स्पृह व निःपक्षपाती अशा पंचांकडून साग्र छाननी व्हावी.

(३) जबाबदारीच्या स्वराज्याचा अनुभव दहा वर्षें घेतल्यानंतर देशाची सर्व राज्यव्यवस्था लोकांकडे सोंपवावी. व ती सोंपवितांना राष्ट्राची आर्थिक पत कमी होऊं नये व राष्ट्रीय निधि कायम राहावा अशी व्यवस्था करावी.

(४) संक्रमणकालांत सुद्धा राखीव खात्यांचा कारभार ज्या मंत्र्याकडे सोंपवावयाचा तो मंत्री जरी गव्हर्नर-जनरल यांना आपल्या कारभाराबद्दल जबाबदार राहील तरी तो लोकनियुक्त सभासदांपैकीं असावा व त्याची नेमणूक मुख्य प्रधानाच्या संमतीने व्हावी. यायोगाने त्या खात्यांवर ताबा कसा ठेवावयाचा व त्या खात्यांचा कारभार कसा चालवावयाचा याचें शिक्षण लोकांस घेतां येईल.

## लष्कराचा प्रश्न

( ५ ) गोलमेज परिषदेने नेमलेल्या लष्करी पोटकमिटीने जें तत्त्व पूर्णपणें मान्य केलें तें असें होतें. “ हिंदुस्थानांत स्वराज्याची संस्थापना होऊं लागल्यानंतर वाढत्या प्रमाणांत हिंदुस्थानाच्या संरक्षणाची जबाबदारी लोकांवर टाकली जावी, व ती ब्रिटिश सरकारावर नसावी. कारण तो लोकांचाच प्रश्न आहे ” या तत्त्वाचें स्पष्टीकरण पुढीलप्रमाणे करावे हें युक्त होय.

( अ ) फार फार तर, तीस वर्षांत लष्कराचें पूर्ण हिंदीकरण होईल अशी व्यवस्था करावी. मरहूम लॉर्ड रॉलिन्सन यांच्या लष्करी तज्ज्ञांच्या कमिटीने तीस वर्षांत लष्कराचे पूर्ण हिंदीकरण करण्याची योजना हिंदुस्थानसरकाराकडे सादर केली होती. हिंदुस्थानाचे सरसेनापति लॉर्ड रॉलिन्सन यांच्यापेक्षां दुसरा तज्ज्ञ कोण आहे ? त्यांच्या मताला अनुसरूनच मीं ही तीस वर्षांची मर्यादा घातली आहे. कारण यापेक्षां अधिक काल नको असें त्यांचें म्हणणें होतें. मिलिटरी कॉलेज कमिटीच्या रिपोर्टाला जोडलेल्या माझ्या भिन्न मतपत्रिकेंत मीं हीच गोष्ट नमूद केली होती. या गोष्टीकडे लक्ष पुरवून ही तीस वर्षांची मर्यादा कबूल केली पाहिजे.

(ब) हिंदुस्थानांतील लष्करी कॉलेजांत घेतल्या जाणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या हल्लीप्रमाणे साठ अशी मर्यादित न करता जितक्या जागा रिकाम्या होतील तितक्या जागांकरिता जरूर ते हिंदी विद्यार्थी जाहीर परीक्षा घेऊन लष्करी कॉलेजांत घ्यावे. अट एकच ठेवावी कीं हे उमेदवार ब्रिटिश उमेदवाराप्रमाणेच योग्य व कार्यक्षम असावे. असे लायक उमेदवार न मिळाले तरच सरकाराने जेवढे कमी पडतील तेवढ्याच उमेदवारांची भरती इंग्लंडमधून करावी, व तीहि लॉर्ड रॉलिन्सन यांच्या तीस वर्षांच्या योजनेनुरूप करावी.

## सैन्यांत सर्वांसच येऊं द्या

( क ) लढाऊ व बिनलढाऊ असा कृत्रिम भेद करून हल्लीं कांही वर्गांना व जातींना सैन्यांत शिपाई होण्यास मज्जाव केला जातो. ही अडचण तात्डतोब दूर करावी. हिंदुस्थानांतील सर्व नागरिकांना सैन्यांत दाखल होण्यास परवानगी मिळेल असे नियम करावे. अर्थात्, सैन्यांत दाखल होतांना त्यांच्या योग्यतेची व कार्यक्षमतेची परीक्षा जरूर घेतली जावी. अशी व्यवस्था केली तरच लष्कर खरोखरीचें राष्ट्रीय होईल. हल्लीच्या सैन्याला राष्ट्रीय म्हणतां यावयाचें नाही.

वर सांगितल्याप्रमाणे जीं तत्त्वें मान्य केलीं गेलीं आहेत त्यांचीच अंमलबजावणी विस्ताराने केली तर त्यांत आपण कांही नवेंच प्रकरण उभें

केलें असें होणार नाही. गोलमेज परिषदेच्या दोन्हीही बैठकींत या तत्त्वांस मान्यता दिली आहे, इतकेंच नव्हे तर दुसऱ्या गोलमेज परिषदेच्या शेवटीं सरकार-तर्फे जें मुख्य प्रधान यांनी भाषण केलें, त्या भाषणांतही हीं मतें ग्रथित केलीं आहेत. म्हणून त्यांवर कोणासच आक्षेप घेतां येणार नाही.

# चालू राजकारणाचा कुजलेला डाव

## पुण्याच्या नागरिकांची जाहीर सभा

बुधवार ता. ३ रोजीं सायंकाळीं ६ वाजता पुणे सार्वजनिक सभेच्या विद्यमाने टिळक स्मारक मंदिरात श्री. **न. चिं. केळकर** यांच्या अध्यक्षतेखाली पुण्यांतील नागरिकांची जाहीर सभा भरली होती. अध्यक्षांनी आपल्या प्रास्ताविक भाषणांत सांगितलें कीं, "हल्ली देशांत जी परिस्थिति निर्माण झाली आहे ती समाधानकारक आहे कीं नाही व जर नसली तर ती कशी बदलावी यासंबंधी लोकमत प्रगट करण्याकरिता आजची सभा आहे. चालू राजकीय परिस्थिति ही समाधानकारक नाही हें कोणीहि कबूल कराल. एका बाजूला सरकार वटहुकुमाने राज्य करीत आहे; तर दुसऱ्या बाजूला राष्ट्रीय सभा कायदेभंगाची चळवळ करीत आहे. म्हणजे दोघेहि असंतुष्टच. बरें, इतके दिवस असें वाटत होतें कीं मवाळ तरी संतुष्ट असतील पण तेहि संतुष्ट नाहीत आणि याचें प्रत्यंतर त्यांनी नुकतेच प्रसिद्ध केलेल्या पत्रकावरून चांगलें नजरेस येतें. मग संतुष्ट तरी कोणता वर्ग आहे?

बंगाल्यांतील क्रांतिकारकांविषयी तर बोलावयालाच नको. कारण तेथे एकापेक्षा एक वरचढ व जुलमी वटहुकूम सरकारला काढावे लागतात. याचा अर्थ तेथे असंतोष आहे. आज क्रांतिकारक पक्ष पुढे आहे. हा पक्ष सरकारला आपल्या काबूंत ठेवणें दिवसेंदिवस कठिण होत चाललें आहे. क्रांतिकारकहि आपली चळवळ स्वराज्यप्राप्तीचा हेतु डोळ्यांपुढे ठेवूनच करीत आहेत. हेतूशिवाय कोणी कोणतीच गोष्ट करीत नाही. सरकार आपण विजयी आहोंत म्हणून स्वतःच आपली पाठ थोपटून घेवो. पण जयाचें माप, सरकारने किती नवीन तुरुंग बांधले, किती नवीन वटहुकूम जारी केले किंवा गुन्हेगार कैद्यांना सोडून देऊन कोठड्या रिकाम्या करून राजकीय कैद्यांची किती आस्थेने सोय लावली यावर मोजावयाचें नसतें हें कोणीहि सांगेल. तेव्हा ही चालू असंतोषाची परिस्थिति बदलून देशांत पुनः शांततेचें वातावरण कोणत्या मार्गाने निर्माण करता येईल याची साधारण रूपरेषा आज सभेपुढे मांडण्यांत येणाऱ्या ठरावावरून कळून येईल. या ठरावांत कोणीं तरी जबाबदार मनुष्याने कॉंग्रेस व सरकार यांच्यामध्ये पूर्वीप्रमाणे समेट घडवून आणण्याचा प्रयत्न करावा, दोघांनीहि आपले हात आखडते घ्यावे वगैरे गोष्टी घातल्या आहेत आणि तो ठराव श्री. भालचंद्र महेश्वर गुप्ते हे आपल्यापुढे मांडतील." या आशयाचें श्री. केळकर यांचें प्रास्ताविक भाषण झाल्यावर **श्री. गुप्ते** वकील यांनी पुढीलप्रमाणें ठराव वाचून दाखविला.

## सभेंतील मुख्य ठराव

"( अ ) ( १ ) वटहुकुमामुळे झालेलें नेहमीच्या कायद्याच्या राज्याचें उच्चाटन ( २ ) सर सॅम्युअल होअर यांनी कॉमन्स सभेंत नुकतेंच जें भाषण केलें त्यावरून व्यक्त होणारें सरकारचें प्रतिगामी राजकीय धोरण व ( ३ ) वटहुकूम व इतर दडपशाहीचे हुकूम यांचा सात्त्विक निषेध म्हणून चालू असलेली कायदेभंगाची चळवळ या सर्वांमुळे हिंदुस्थानाच्या राजकीय परिस्थितींत जी एक कुचंबणा उत्पन्न झाली आहे ती लौकर नाहीशी व्हावी, अशी पुण्यांतील नागरिकाच्या या जाहीर सभेची मनापासून इच्छा आहे. ( आ ) हा हेतु मनांत धरून या सभेची अशी शिफारस आहे कीं, ज्यांना ज्या साधनांची अनुकूलता असेल व ज्यांना जशी संधि मिळेल त्या सर्व जबाबदार लोकांनी पुढील गोष्टी एकसमयावच्छेदेंकरून घडवून आणून देशांत शांततेचें वातावरण निर्माण करण्याकरितां शक्य तितक्या लवकर तडजोडीचें बोलणे सुरू करवावें. ( १ ) सरकाराने वटहुकूम परत घ्यावे. त्यामुळे तात्कालिक कारण नाहीसें होत असल्यानें कॉंग्रेसने कायदेभंगाची चळवळ तहकूब करावी. ( इ ) ( १ ) संयुक्तराज्यघटना ( फेडरेशन ) व ( २ ) प्रांतिक स्वायत्ततेबरोबरच मध्यवर्ति जबाबदारीचें स्वराज्य, या बाबतींची योजना व तिची अंमलबजावणी यांचा कायमचा सर्वसंमत निकाल करण्याकरिता गोलमेज परिषदेची पद्धति पूर्ववत् सुरू करावी. ( ई ) या सभेचें असें स्पष्ट मत आहे कीं, देशाच्या उच्चतम हिताच्या दृष्टीनें प्रस्तुत कोडें समाधानकारकपणें सुटेपर्यंत, राज्यघटना तयार करण्याच्या पुढील कामीं ज्यांना साहाय्य करण्यास निमंत्रण येईल, अशा सद्गृहस्थांनी सहकार्य करूं नये."

श्री. गुप्ते यांनी वरील ठराव सभेपुढे मांडून पुढील आशयाचें भाषण केलें, " वटहुकूम हा लोकांच्या संमतीचा कायदा नाहीं. सरकार स्वतःला कायदेशीर राज्य करणारें ह्मणे पण खरें पाहिलें तर त्यांनी स्वतःच कायदेभंग करून बेबंदशाही माजविली आहे. वटहुकुमासारख्या जुलमी कायद्यांच्या जोरावर कॉंग्रेसची चळवळ नेस्तनाबूत करण्याचा सरकारचा विचार आहे; पण अशाने देशांत शांतता राहात नाही; जर राहिलीच तर स्मशानशांतता राहाते. पण अशी शांतता सरकाला फार दिवस राखतां येणार नाही. अशा धोरणाने कॉंग्रेस मरणार नाही.कॉंग्रेस हा एक दैवी अवतार आहे. गोलमेज परिषदेचा पट होअर साहेबांनी विस्कटून टाकला आणि जनतेच्या असंतोषांत अधिक भर घातली. सरकारने किंवा कॉंग्रेसने दोघांनीहि एकमेकांचा अंत न पाहतां पण स्वाभिमान न सोडतां आपला पाय मागें घ्यावा, असें मला वाटतें.

श्री. गुप्ते यांचें भाषण झाल्यावर श्री. दा. न. शिखरे आपल्या भाषणांत म्हणाले, " वाच्यार्थाने पाहतां हा ठराव केवळ शांतताप्रस्थापनेच्या इच्छेचाच आहे. पण नातवाच्या डोक्यावर छत्रचामरें ढाळलेलीं मीं पाहावीं असा वर मागणाऱ्या आंधळ्याप्रमाणें त्याच्या गर्भितार्थात राजबंद्यांची मुक्तता, गोलमेज परिषदेचें पुनरुज्जीवन व वसाहतीचें स्वराज्य हें सर्व सांठविलेलें आहे.हिंदुस्थानांतील जनता तर चालू राज्यपद्धतीला कंटाळली आहेच, पण जे होअरसाहेब दररोज नवे नवे वटहुकूम काढीत आहे त्याच्या हाडामासाचे इतर लोकहि होअरसाहेबांच्यावर नाखूष आहेत. अँड्रूज, लॅन्सबरी, फादर एल्व्हिनयांसारखे लोक तर सरकारच्या कानींकपाळीं सारखे ओरडत आहेत व होअरसाहेबांच्या राजकीय धोरणाचा निषेध करीत आहेत.सायमन कमिशनने नेमस्तांनाहि जहाल बनविलें होतें, तीच स्थिति आज आहे. हा ठराव सरकारला विनंतीवजा केला आहे असें कोणीं समजूं नये तर हा ठराव इषारेवजा आहे हें लक्षात ठेवावें." या आशयाचें श्री. शिखरे यांनी भाषण करून त्यांनी ठरावाला अनुमोदन दिलें.

त्यानंतर श्री. ग. स. मराठे यांचें अनुमोदनार्थ भाषण झालें. ते म्हणाले, "खरें पाहूं गेलें असता आता दोनहि पक्ष कंटाळले आहेत. पण 'आम्ही कंटाळलों, आता समेट होऊं द्या ' असें प्रथम म्हणण्यास मात्र कोणीच तयार होत नाही आणि याचें कारण ज्याचा त्याचा स्वाभिमान आडवा येतो. पण या वेळीं कॉंग्रेसने थोडा अधिक विचार करून, थोडा पाय मागे घेतला तरी कॉंग्रेसने स्वाभिमान सोडला असें होत नाही. आर्थिक दृष्ट्या चालू लढ्यांत इंग्लंडचें नुकसान तर फारच झालें आहे. इंग्लंडमध्ये उत्तरोत्तर अधिकाधिक बेकारी वाढत आहे. आपला पक्ष जरी कंटाळला असला तरी समेट करावयाचा तो अभिमानाला धरूनच केला पाहिजे"

त्यानंतर श्री. ना. रा. गुंजाळ यांनी ठरावाला अनुमोदन देतांना सांगितलें कीं "लहान मुलांचा भांडणें जशीं त्रयस्थ मनुष्य दोनहि पक्षांना खूष करून सोडवितो तशीच स्थिति आज राजकारणाच्या लढ्यांत झाली आहे.तेव्हा कॉंग्रेस व सरकार यांच्यामध्ये कोणी तरी जबाबदार पुढाऱ्याने मध्यस्थी करून समेट घडवावा."

त्यानंतर श्री. भोंडे वकील यांचें भाषण झालें. ते म्हणाले, "कोणताहि वटहुकूम ६ महिन्यांपेक्षां अधिक दिवस अमलांत ठेवूं नये असा पार्लमेंटच्या कायद्यांत निर्बंध असतांहि सरकार स्वतःचा कायदा पायाखालीं तुडवून वटहुकुमाची मुदत वाढवितें याचा अर्थ काय करावयाचा ? तसेंच अमुक गोष्ट करूं नका हें एक वेळ कोणी ऐकेल, पण तुम्ही अमुकच गोष्ट केली पाहिजे असा निर्बंध कोण घालून घेईल? पण तसा निर्बंध वटहुकुमांत दिसून येतो. मौ.महंमदअली वारले त्याबद्दल दुःखाचा ठराव म्युनिसिपालिटीने आणला तो सरकारला मानवला; पण म. गांधी विलायतेस निघाले असतां त्यांचा प्रवास सुखरूप होवो असा ठराव आणला असता त्याला मात्र सरकारने हरकत घेतली, यावरून सरकारची बेबंदशाही व पक्षपातीपणा चांगलाच नजरेस येतो. तेव्हा ही परिस्थिति सुधारण्याकरिता व देशांत शांतता होण्याकरिता शाब्दिक मानाची बुद्धि सोडून जर समेट घडत असेल तर अवश्य घडवून आणावा असें मला वाटतें."

त्यानंतर श्री.वा.कृ.भावे ठरावाला अनुमोदन देतांना म्हणाले, "सुधारणेच्या कायद्याने लोकांची निराशा होऊन कायदेभंग सुरू होणार अशी सरकारची आधीपासून खात्री होती तोंपर्यंत कॉंग्रेसला तयारीकरिता सवड मिळूं न देता तिचा स्वाभिमान इरेस घालून तिला कायदेभंग लवकर करण्यास भाग पाडावयाचें या उद्देशाने विलिंग्डनसाहेबांनी म.गांधींची भेट घेण्याचें नाकारलें. वास्तविक म. गांधींची भेट घेण्याचें विलिंग्डन यांनी कबूल केलें असतें म्हणून कांही बिघडत नव्हतें ! भेटींत वटहुकुमांचें समर्थन करून गांधीजींना वाटेला लावणें सोपें होतें. परंतु तसें केल्याने कायदेभंगावर प्रकरण गेलें नसते तें जावें व कॉंग्रेसवाल्यांचा नुकताच दम उखडलेला असल्याने त्यांस भरडून काढावयास सांपडावें आणि अशा रीतीने सुधारणा अमलांत येतील तेव्हा देशांत कायदेभंगाचें

नांव निघूं नये या उद्देशानें गांधीजींची भेट घेण्याचें नाकारून त्यांजवर कायदेभंग लादण्यांत आला. ही चळवळ सहा महिने चालली. वटहुकुमांची मुदतहि सहा महिनेच असते. म्हणजे ती मुदत जून-अखेर संपली. तेव्हा सरकारास कांही दिवस वटहुकुमा-वांचून जाऊं देऊन कॉंग्रेस आपला कायदेभंग तसाच सुरू ठेवते कीं काय याचा रागरंग पहातां आला असता. पण होअर व त्यांचे सहकारी यांची इच्छा देशांतील दडपशाही थांबवावी अशी मुळीच नव्हती. कॉंग्रेस आपली तयारी कशी करात आहे हें सरकारला कळत होतें पण सरकारहि आपली तयारी करण्यांत कसें गुंतलें होतें याची बातमी जगास कळण्यास मार्ग नव्हता. पण 'कोंबडा कितीहि झांकून ठेवला तरी सूर्य उगवावयाचा राहत नाही.' या न्यायानें त्यांचें बिंग अचानक बाहेर पडलें. दक्षिण भाग कमिशन-रानें एक खाजगी सर्क्युलर आपल्या हाताखालच्या अधिकाऱ्यांना काढलें होतें. त्यांत कॉंग्रेसच्या चळ-वळींत भाग घेणारांच्या नांवांच्या याद्या तयार करण्या-स सांगितलें होतें. याचा हेतु इतकाच कीं, चळवळ सुरू झाली तर या लोकांना प्रथम जाळ्यांत पकडावें. यावरून सरकार आपली तयारी कशी जय्यत करून ठेवीत होतें हें दिसून येतें. हिंदुस्थानांत कायदेभंगाचें पुनः नांव देखील निघतां कामा नये असा चळवळ दडपून टाकण्यांत सरकारचा स्पष्ट इरादा दिसतो. तसेंच तिसऱ्या गोलमेज परिषदेचा मार्ग होअर साहेबांनी बंद करून आम्ही हिंदी लोकांना कःपदार्थ मानतों असें सुचविलें आहे. इलीच्या राज्ययंत्रांत चळवळ करणारे लोक तर भरडून निघतच आहेत. पण सरकारानें मसूर ब्रह्मचर्याश्रमासारख्या राजकारणाबाहेरील सोवळ्या संस्थांचें तळपट उड-विलें आहे. शेठ गुलाबचंद दोशीसारख्या माणसाला जबरदस्त दंड करून जेरीस आणिलें आहे. पण सरकारच्या क्रियेस लोकांची प्रतिक्रिया सुरूच आहे व ती प्रस्तुत दडपशाही अशीच सुरू राहिल्यास वाढत जाणार हें उघड आहे. अशा रीतीनें उभयतांनाहि उपद्रवकारक झालेल्या या परिस्थितीचा शेवट समेटानें जितका लवकर होईल तितका तो होणें इष्ट आहे!" अशा आशयाचें रा. भावे यांचें भाषण झाल्यावर अध्यक्षांनीं समारोप केला व सभेचें काम संपविलें.

# ज्ञातिविषयक निर्णयाचे डावपेच

या महिन्याच्या शेवटच्या आठवड्यांत किंवा तत्पूर्वीहि हिंदुस्थानाच्या भावी स्वराज्याच्या घटनेमध्ये बहुसंख्य व अल्पसंख्य समाजांना, त्यांच्या त्यांच्या ज्ञातीच्या दृष्टीनें कोणते राजकीय हक्क दिले जाणार आहेत या बाबतींत निर्णय, ब्रिटिश सरकारातर्फे मुख्य प्रधान मि. राम्से मॅक्डोनाल्ड हे जाहीर कर-णार असल्याचें प्रसिद्ध झालें आहे. या निर्णयाचें प्रत्यक्ष स्वरूप काय आहे याचें सम्यक् ज्ञान कोणासहि असणें शक्य नाही. परंतु या गुप्त गोष्टींना अशी वाईट खोडच असते कीं, त्यांना एक ना शंभर तोंडांनी वाचा फुटते व त्यांच्यावरचें आवरण आपोआपच इतकें पारदर्शक होतें कीं, असले निर्णयच काय पण त्यांच्या मागचे हेतु, त्यांची घडण व त्यांचे पुढील परिणामहि लोकांस आगाऊच दिसूं लागतात. या नव्या बाळाच्या जन्मस्थ ग्रहाची पापदृष्टि अनेक ज्योतिष्यांना माहीत असल्यामुळे त्यांनीहि या निर्णया-ची कुंडली केव्हाच उतरली आहे. या ज्योतिष्यांचे कयास फारसे चुकतील असें कोणासच वाटत नसल्या-मुळे अखिल हिंदुस्थानांत व विशेषतः पंजाबमध्ये हिंदु, शीख व मुसलमान यांच्यामधील भावनांना पावसाळ्यांतील खवळलेल्या समुद्राच्या लाटांचें भीषण स्वरूप आजच प्राप्त झालें आहे. त्यावरून या निर्णयाचें अभूतपूर्व महत्त्व वाचकांच्या लक्षांत येणार आहे.

पंजाबचाच विशेष रीतीनें उल्लेख करण्याचें कारण इतकेंच कीं, या ज्ञातिविषयक प्रश्नाचे तीव्रतम स्वरूप त्या प्रांतांतच दृष्टीस पडतें. लोकसंख्येच्या मानानें त्या प्रांतांत मुसलमान बहुसंख्याक आहेत यांत शंका नाही. तथापि लोकसंख्येनें अल्पसंख्य ठरत असले तरी आर्थिक, सामा-जिक व राजकीय दृष्टीनें तेथील हिंदु व शीख समाज यांचें वजन मुसलमानांच्या बरोबरीचें आहे. या दोनही समाजांतील लोक व त्यांचे पुढारीहि सुविद्य, सुसंपन्न व बलशाली असल्यानें, त्यांची सरकार-दरबारांतहि मानमान्यता मोठी आहे. शीखांची गोष्ट तर अगदीच वेगळी. इंग्रजांपूर्वी त्यांचेंच राज्य पंजाबांत होतें व सर्व मुसलमानी समाज त्यांच्या राजाला नम्रपणें कुर्निसात करीत होता या गोष्टीची त्यांची स्मृतिहि ताजी आहे. इंग्रजांनी मुसलमानांना अगदी अलीकडे जवळ केलें. पण शीख समाजाची व इंग्रजांची दोस्ती १८५७ सालापासूनची म्हणजे दीर्घ कालाची आहे ही गोष्टहि लक्षांत ठेवली पाहिजे. या सर्व कथनाचा मथितार्थ हा आहे कीं, मुसलमानांशीं तुलनेच्या दृष्टीनेंच पाहावयाचें असल्यास पंजाबातील शीख व हिंदु या समाजांस सरकारानें लाथाडणें वाटतें तितकें सोपें नाही. म्हणून धर्मदृष्टीनें लोकसंख्येची विभागणी करून राज्य-

कारभाराचीं सूत्रें बहुसंख्य समाजाच्या, तो केवळ बहुसंख्य म्हणून, स्वाधीन करण्याचा बूट काढणें म्हणजे त्या प्रांतांत यादवी युद्ध सुरू करणें आहे.

ब्रिटिश सरकाराचा ज्ञातिविशिष्ट राजकीय हक्काबाबतचा निर्णय पुढे काय अनर्थ घडवून आणील याचा प्रत्यय पंजाबांत गेल्या दोन आठवड्यांतच या प्रश्नासंबंधी लोकमत प्रक्षुब्ध झाल्यामुळे ज्या घडामोडी झाल्या, त्यांवरून स्पष्ट येतो. मुसलमानांना स्वतंत्र मतदारसंघाच्या द्वारें अधिकाराचीं सूत्रें कायमपणें कायद्यानेच दिलीं जाणार व कायदेकौन्सिलांतील त्यांच्या बहुमताने त्यांचें राज्य चिरंतन होणार या गोष्टीची जाणीव झाल्याबरोबर सर्व शीख समाज खवळला. मुसलमानांच्या अमलाचें जोंखड आपल्याला खांद्यावर वाहावें लागणार ही कल्पनाच शीखांना असह्य वाटली. लोकशाहींत प्रत्येक राजकीय पक्षास मतदारांना वळवून आपलें बहुमत व बहुमताच्या जोरावर राजकीय सत्ता हातीं घेतां येते. पण जेथे राजकीय पक्षाचें अस्तित्वच नाही, बहुमत केवळ धर्ममतावर अवलंबून राहावयाचें तेथे राजकीय सत्ता इतर–धर्मीयांच्या हातीं यावी कशी ? साहाजिकपणेंच शीखांनी या नव्या योजनेचा निषेध कडक शब्दांनी करून आपण मुसलमानांच्या सत्तेला मान वांकविणार नाही असें जाहीर केलें. मुसलमान समाजहि प्रतिकाराच्या गोष्टी बोलूं लागला. बंगालच्या वाचिवीर गजनवींनी हिंदुस्थानावर अनेक वेळा स्वाऱ्या करून देशाची धूळधाण उडविणाऱ्या महमद गजनवीची आठवण करून दिली व त्याला उत्तर म्हणून महाराज रणजितसिंहाच्या समाधीजवळ जमून शीख पुढाऱ्यांनी एक लाख शीखांचे शाहिदी जथे उभे करण्याच्या व आपल्या हक्कांकरिता प्राणांच्या आहुति देण्याच्या शपथा घेतल्या ! जुलैच्या ३१ तारखेस पंजाबांत सर्वत्र गुरु नानक यांच्या ग्रंथसाहेबाचें 'अखंड पारायण' झालें. हिंदूंनीहि आपल्या सभा भरवून शीखबंधूंना या प्रसंगीं साहाय्य करण्याचें ठरविलें. अशा रीतीने ब्रिटिश सरकार जो निर्णय जाहीर करणार आहे त्याच्या बातमीने एवढा अनर्थ उडाला तर मग हा प्रत्यक्ष निर्णय कोणता प्रलय उडविणार आहे कोण जाणे !

ज्ञातिविषयक निर्णयाचा प्रश्न वरून दिसतो इतका सोपा नाही हें दर्शविण्याकरिता आम्ही वरील पंजाबांतील धामधुमीच्या चुणुकेचा उल्लेख केला इतकेंच. या प्रश्नाचीं पाळेंमुळें इतकीं खोल गेलीं आहेत कीं, आतां जो निर्णय दिला जाणार आहे त्याची पार्श्वभूमिका काय आहे हें पाहण्याकरिता थोडी इतिहासाची उजळणी केल्याशिवाय, त्याची नीट कल्पना येणार नाही. म्हणून हिंदी राजकारणाच्या बुद्धिबलपटावर ब्रिटिश मुत्सद्दी ज्या मोहऱ्यांच्या व प्याद्यांच्या साहाय्याने आपले डाव टाकीत आहेत त्या मोहऱ्याकडे व डावाकडे आपली दृष्टि प्रथम वळविली पाहिजे. गेल्या कांही वर्षांत हिन्दुस्थानांतील स्वराज्यवादी राष्ट्रीय पक्षाने चळवळींतलि निर्वाणीचीं शस्त्रास्त्रें उचलल्यामुळे इंग्रजी राज्यकर्त्यांना मोठा पेंच पडला ही गोष्ट खुद्द राज्यकर्त्यांनाहि नाकबूल करून चालणार नाही. या पेचांतून सुटून या लढ्याच्या चिखलांत रुतलेला राजकारणाचा गाडा पुनः सनदशीरपणाच्या, सामोपचाराच्या व सलोख्याच्या मार्गावर आणण्याकरिता लॉर्ड आयर्विनसाहेबांनी केलेल्या प्रयत्नांना यश आलें. त्या वेळच्या अधिकारारूढ असलेल्या मजूर पक्षाचे मुख्य प्रधान मि. मॅक्डोनाल्ड यांच्या प्रेरणेने व संमतीने त्यांनीं असें स्पष्ट जाहीर केलें कीं, "१९१७ सालांतील पार्लमेंटच्या जाहिरनाम्याचा स्पष्ट अर्थ असाच आहे कीं, हिंदुस्थानास डोमिनियन स्टेटस देणें हेंच आमचें ध्येय आहे" याचा योग्य तो परिणाम झाला हें सांगावयास नकोच.

पण ही परिस्थिति फार वेळ टिकली नाही. इंग्लंडांत मजूर पक्षाला खो देऊन गादीनशीन झालेल्या कॉन्झरव्हेटिव्ह साम्राज्यवादी पुढाऱ्यांना हिंदुस्थानास वसाहतीसारखें स्वराज्य देणें म्हणजे आपल्या हाताने आत्मघात करून घेण्याइतकें भयंकर वाटतें. यामुळे त्यांनी लॉर्ड आयर्विन व मजूरपक्ष यांनी पुढे टाकलेलीं पावलें मागे घेण्याचा अट्टाहास चालविला व पूर्वीच्या बोलण्यांतील स्वराज्याचा विषय जवळ जवळ गाळून 'सेफगार्ड्स'चा किंवा संरक्षक बंधनांचाच घोळ घालीत ते बसले ! एखादा कुशल सेनापति प्रतिपक्षाचें उद्दिष्ट साध्य होऊं न देण्याकरिता एकापेक्षां एक मोठे खंदक आपल्या गोटाभोंवतीं खणतो त्याप्रमाणें त्यांनी या संरक्षकांचे खंदक खणले. संस्थानिक व त्यांच्या तद्दाप्रमाणें उत्पन्न होणारे त्यांचे अधिकार व हक्क यांच्या संरक्षणाचा पहिला खंदक आहे. हा खंदक ओलांडणें मुष्किलीचेंच. पण तो कदाचित् सर झालाच तर भावी स्वराज्याची चीरफाड करण्याकरिता दुराराध्य मुसलमानांचा व त्यांच्या कच्छपीं लागलेल्या इतर ज्ञातिनिष्ठ अल्पसंख्यांच्या पुढाऱ्यांचा दुसरा फारच भयंकर खंदक पहिल्याच्या मागे ठेवला आहेच. सर्व राज्यकारभाराचा आत्मा म्हणजे खजिना व व्यापार व तो लोकांच्या हातीं लागूं नये म्हणून त्यांच्या संरक्षणाचा तिसरा खंदक होय. स्वराज्यसंरक्षणाकरिता अत्यंत जरूर असलेल्या सैन्यावरील ताब्याचा दुर्लंघनीय असा चौथा खंदक शेवटीं

आहे. या सर्व खंदकांच्या साहाय्याने ब्रिटिश मुत्सद्दी लढाई देऊं इच्छितात. म्हणून ज्ञातिविषयक निर्णयाचा प्रश्न म्हणजे दुसऱ्या खंदकाजवळचे डावपेच आहेत हें लक्षांत ठेवल्याशिवाय त्याचें मर्म समजणार नाही. ज्ञातिविषयक निर्णयाने एकदां यादवीची मुतावळ उठविली कीं त्यांच्या मारामारीमुळे उडणाऱ्या धुळीनेच राष्ट्रीय उन्नतीचे प्राण गुदमरल्याशिवाय राहणार नाहीत ही त्यांची खात्री आहे ! या दृष्टीनेच या प्रश्नाकडे पाहिलें पाहिजे.

ज्ञातिविषयक निर्णय देण्याचा अधिकार ब्रिटिश सरकाराने आपल्याकडे कोणत्या व किती युक्त्याप्रयुक्त्यांनी घेतला हेंहि पाहण्यासारखें आहे. दुसऱ्या गोलमेज परिषदेच्या वेळीं महात्मा गांधींनी जातीजातींतील राजकीय हक्कांच्या वाटणीचा प्रश्न आपसांत तोडण्याची फार खटपट केली. पण कॉन्झरव्हेटिव्ह पक्षाने मुसलमान पुढाऱ्यांना हाताशीं घेऊन त्यांच्या सर्व मागण्या मान्य करण्याचें आमिष त्यांजपुढे ठेवल्यामुळे गांधींच्या प्रयत्नाला यश आलें नाही. आपसांत प्रश्न सुटला नाही तर निःपक्षपाती तिऱ्हाइताकडे त्याचा निर्णय सोंपविणें ही सर्वमान्य रीति आहे. परंतु डॉ. मुंजे यांनी हा ज्ञातिविषयक प्रश्न राष्ट्रसंघाकडून सोडवून घ्यावा असें म्हणताच, ब्रिटिश मुत्सद्द्यांच्या इभ्रतीवर गदा येते या सबबीवर त्यांनी व त्यांच्या शिकवणीने मुसलमानांनी नन्नाची मान हालविली. पुढें व्यक्तिशः मि. रामसे मॅक्डोनाल्ड यांनी स्वतःच्या जबाबदारीवर निर्णय द्यावा असें ठरलें. तिला हिंदूंनींहि संमति दिली. मि. मॅक्डोनाल्ड यांनीहि ती कामगिरी अंगावर घेण्याचें कबूल केलें. परंतु मध्यंतरीं कॉन्झरव्हेटिव्ह पुढाऱ्यांची माशी शिंकल्यामुळे, मुसलमानांनी याहि साध्या गोष्टीस आपली संमति दिली नाही ! मि. राम्से मॅक्डोनाल्ड यांनी त्यांचें कोणतें घोडें मारलें होतें ह्याचें उत्तर त्यांच्या स्वार्थांत आहे.

गोलमेज परिषदेंत शेवटीं असें ठरलें कीं, हिंदी पुढाऱ्यांनी हिंदुस्थानांत जाऊन या प्रश्नाचा निर्णय गोलमेजपरिषदेला हजर नसलेल्या इतर पुढाऱ्यांच्या साहाय्याने करावा. व महात्मा गांधी हा सलोखा हरप्रयत्नाने घडवून आणण्याच्या निश्चयाने परत आल्याचें प्रसिद्ध आहे. १९३२ च्या प्रारंभीं पुनः सत्याग्रहाच्या लढ्यास सुरुवात होऊन खुद्द गांधी व इतर राजकीय पुढारी सरकारचे पाहुणे बनले व त्यामुळे त्यांचे प्रयत्न साहजिकच थांबले. इतर पक्षांच्या पुढाऱ्यांनी या बाबतींत लक्षहि घातलें नाही व त्याबद्दल प्रयत्नहि केले नाहीत. गांधींच्या किंवा इतर पुढाऱ्यांच्या प्रयत्नाला यश आलेंच असतें असें म्हणणें नाही. पण एक गोष्ट निश्चित कीं हा ज्ञातिविषयक निर्णय ब्रिटिश सरकाराने द्यावा असें राष्ट्रीय सभेच्या पुढाऱ्यांनी केव्हाहि म्हटलें नाही. सल्लागार कमिटींत हा प्रश्न चर्चेसाठी काढण्यांत आला व त्या कमिटीकडून ब्रिटिश सरकाराने हा निर्णय करण्याचा अधिकार आपल्याकडे घेतला. म्हणून असा सरळ सवाल विचारला पाहिजे कीं या सरकारनियुक्त सल्लागार मंडळाला हा निर्णय ब्रिटिश सरकाराकडे सोपविण्याचा अधिकार कोणीं दिला ? व ब्रिटिश सरकाराने असा निर्णय दिला तरी तो हिंदु अगर मुसलमान यांच्यावर बंधनकारक कां ठरावा ? ब्रिटिश प्रधानमंडळाची हल्लींच्या राजवटींतील रचना पाहिल्यास त्यांत मुसलमानांचे पक्षपाती अधिक आहेत व तसें त्यांनी उघडपणें सांगितलेंहि आहे. म्हणूनच हिंदु समाजाचें स्पष्ट आव्हान आहे कीं, या निर्णयाने आम्ही बांधले जाणार नाही. आमच्या सर्व मागण्या जर मंजूर झाल्या तरच आम्ही हा निर्णय मानूं असें मुसलमान पुढारीहि म्हणतात ! अशा परिस्थितींत दंडुकेशाहीच्या सामर्थ्याव्यतिरिक्त आपल्याला कोणत्याहि समाजाचा पाठिंबा आहे असें म्हणावयास ब्रिटिश सरकारला तोंड नाही ! तथापि भांडणाचीं भुतें उठविण्यांत त्यांचे काय नुकसान ?

ब्रिटिश मुत्सद्द्यांचे वर उल्लेखिलेले डावपेंच डोळ्यापुढे ठेवले म्हणजे ब्रिटिश सरकार जो ज्ञातिविषयक राजकीय हक्काबाबतचा निर्णय देणार आहे त्यांतील मेख लक्षांत येते. पंजाबांतील मुसलमानांना तेथील कौन्सिलांत कायद्याने मताधिक्य मिळणार अशी खात्री असल्यामुळे त्या निर्णयासंबंधाने प्रेमाचा उमाळा येत आहे तर शीख व हिंदु त्याच्यावर तुटून पडत आहेत. अल्पसंख्याकांच्या संरक्षणाची हमी कायद्यानेच स्वराज्यघटनेंत अंतर्भूत केल्याशिवाय पूर्ण जबाबदारीचें स्वराज्य आम्हांस नको असें मुसलमान म्हणतात व त्यांच्या या हट्टाला ब्रिटिश मुत्सद्दी मान डोलवतात. तेव्हा या डावपेचांचा अगदी सरळ व साधा अर्थ हिंदुस्थानांत भविष्यकाळींहि राष्ट्रीय हितबुद्धि उत्पन्न होऊं द्यावयाची नाही हा आहे असें म्हणण्यास प्रत्यवाय कोणता ? हिंदुस्थानांत जोंपर्यंत ज्ञातिविशिष्ट भावना तेवत आहेत तोंपर्यंत अल्पसंख्याक जातींना स्वसंरक्षण करण्याकरिता ब्रिटिश साहाय्याची अपेक्षा साहजिकच वाटणार. संस्थानिकांचा सर्व भरंवसा ब्रिटिश सरकारावर; हिंदुस्थानांतील बादशहाचे प्रतिनिधी हे त्यांचे आधार. अर्थात् त्यांच्याकरिता ब्रिटिशांना येथे राहणें भाग व त्यांच्याकरिता सैन्यावर आपला ताबाहि कायम ठेवणें भाग. ज्ञातिनिष्ठ अल्पसंख्याकांचाहि भार त्यांच्यावरच; त्याचप्रमाणे त्यांच्या हिताहिताच्या संरक्षणाचीहि जबाबदारी त्यांच्यावरच. अर्थात् 'परस्परं भावयन्तः श्रेयः परमवाप्स्यथ'

या न्यायाने, ब्रिटिश सरकार, संस्थानिक व अल्पसंख्य यांची व्यवस्था त्यांना हवी तशी लागत आहे. या प्रकरणांत राष्ट्रीय बुद्धीचा व त्याबरोबरच बहुसंख्य लोकांच्या राजकीय हक्कांचा मृत्यु आहे हें मात्र निश्चित दिसतें.

मुसलमानांच्या सुप्रसिद्ध चौदा मागण्या कोणत्या व त्यांतील प्रमुख मागण्या कोणत्या याकडे नुसतें लक्ष टाकलें तरी वरील विधानाची सत्यता सहज पटण्यासारखी आहे. म्हणून या मागण्या तरी काय आहेत तें पाहूं. मि. जिन्हा यांच्या नांवाने प्रसिद्ध असलेले जिन्हांचे चौदा मुद्दे म्हणजेच त्या मागण्या होत. हे मुद्दे पुढीलप्रमाणे आहेत. ( १ ) भावी स्वराज्याच्या घटनेचें स्वरूप संयुक्त पद्धतीचें असलें पाहिजे व प्रत्येक प्रांताकडे, आपण होऊन संयुक्त सरकाराकडे दिलेल्या अधिकाराखेरीज सर्व शिलकी अधिकार ठेवले पाहिजेत, ( २ ) प्रांतिक स्वायत्ततेचे हक्क सर्व प्रांतांना एका मापाने दिले पाहिजेत, ( ३ ) कायदेमंडळांत अल्पसख्याकांचे प्रतिनिधि भरपूर प्रमाणांत पाहिजेत; पण हें उद्दिष्ट साध्य करण्यासाठीं त्या प्रांतांतील बहुसंख्य लोकांना अल्पसंख्य लोकांच्या किंवा इतरांच्या बरोबरचीहि स्थिति आणली जाता कामा नये, ( ४ ) वरिष्ठ लोकसभेंत मुसलमानांचे प्रतिनिधि एक-तृतीयांशापेक्षां कमी असतां उपयोगी नाही. ( ५ ) अल्पसंख्याकांचे प्रतिनिधी स्वतंत्र मतदारसंघातर्फे निवडून दिले गेले पाहिजेत, ( ६ ) पंजाब, बंगाल व सरहद्द प्रांत यांतील मुसलमानांचें बहुसंख्यत्व कोणत्याहि प्रांताच्या विभागणीमुळे कमी होतां उपयोगी नाही, ( ७ ) सर्व समाजांना पूर्ण धार्मिक स्वातंत्र्य दिलें जाईल अशी हमी मिळाली पाहिजे, ( ८ ) कोणत्याहि समाजांतील तीन-चतुर्थांश प्रतिनिधींनी कोणताहि ठराव अगर बिल आपल्या ज्ञातिहिताला घातक आहे असें म्हटल्यास तें बिल अगर तो ठराव पसार केला जाणार नाही, ( ९ ) मुंबई इलाख्यापासून सिंध वेगळा करावा, ( १० ) सरहद्द प्रांत व बलुचिस्थान या प्रांतांत इतर पुढारलेल्या प्रांतांप्रमाणे राज्यपद्धति सुरू व्हावी (११) सरकारी नोकऱ्यांमध्ये व स्थानिक स्वराज्यसंस्थांच्या नोकऱ्यांमध्ये मुसलमानांना योग्य तो वांटा मिळाला पाहिजे, (१२) मुसलमानी संस्कृति, शिक्षण, भाषा व धर्म यांचें संरक्षण व संवर्धन होईल अशीं संरक्षक बंधनें घटनेंत नमूद केलीं पाहिजेत, (१३) वरिष्ठ अगर प्रांतिक प्रधानमंडळांत कमींत कमी एक-तृतीयांश तरी जागा मुसलमानांना मिळाल्या पाहिजेत, (१४) संयुक्त राज्यघटनेतील घटकावयवांच्या संमतीशिवाय घटनेंत लोकसभेने कोणताहि फरक करतां कामा नये.

वरील चौदा मागण्यांपैकीं, कोणत्या मागण्या ब्रिटिश सरकार मान्य करणार आहे हें लवकरच समजेल. व त्यावरून त्यांच्या धोरणाची दिशाहि कळून येईल. परंतु मुख्य प्रश्न हा आहे कीं, राष्ट्रहिताच्या दृष्टीने या मागण्या तरी ब्रिटिश सरकाराने मान्य करणें युक्त आहे काय? या मागण्यांपैकीं कोणतीहि मागणी मान्य करणें हें राज्यशास्त्राच्या दृष्टीने चुकीचें ठरणार आहे. त्याचा विचार यथाक्रम पुढे करण्यांत येईलच.

# शिवाजीची 'साक्षरता'

( ले. श्री. वि. आठल्ये, शिपोशी, रत्नागिरी )

सा. न. वि. विशेषः—तारीख १४ व २१ जून सन १९३२ चे केसरीचे अंकांत रा दि. वि. काळे. एम्. ए. यांनी ' शिवाजीचें हस्ताक्षर ' या मथळ्याखाली आजपर्यंत प्रसिद्ध झालेल्या चर्चाविषयक वाङ्मयाचा संकलित आढावा घेऊन शिवाजीस निःसंशय लिहितांवाचतां येत होतें असें बड्या लेखकांच्या नुसत्या नांवाचा हवाला देऊन आपले मतें सिद्ध केलें आहे! परंतु शिवाजी पत्र लिहिण्यास समर्थ असताहि त्याचें हस्ताक्षर आजपावेतों कोठेहि उपलब्ध झालेलें नाही हें पाहून त्यांस मनापासून फार हळहळ वाटते असें त्यांचे लेखावरून दिसून येतें. शककर्ते शिवाजी महाराज यांचें चरित्र लोकोत्तर असल्यामुळे त्यांची साक्षरता, त्यांची विद्याभिरुचि, त्यांचें राजकारण, त्यांची युद्धकला इत्यादि विषयाची योग्य चर्चा झाल्यास ती अत्यंत महत्त्वाची असल्यामुळे रा. काळे यांचे विस्तृत लेखास आपण केसरीचे सुमारें सहा रकाने दिले हें योग्यच झालें. परंतु पत्राच्या समाप्तीचीं नुसतीं दहापांच अक्षरें लिहिण्यास शिवाजी समर्थ होता असें सिद्ध करण्यास सुद्धा रा. काळे यांनी निःसंशय आधार किंवा समाधानकारक प्रमाणें दिलीं नाहींत. त्यामुळे शिवाजी निःसंशय साक्षर होता असा जो सिद्धांत त्यांनी बेधडक बांधला आहे तो माझ्या मतें योग्य व खात्रीलायक पुराव्यावर प्रस्थापित केलेला नसल्यामुळे सर्वमान्य होण्याजोगा नाहीं व त्यांनी माझ्यासबंधाने सदरहू लेखांत एकदोन भ्रामक व गैरसमजूत उत्पन्न करणारीं

विधानें केलीं आहेत तीं खरीं नाहींत. या दोन गोष्टी स्पष्ट करण्याच्या हेतूने हा लेख मी आपलेकडे प्रसिद्ध होण्याकरिता मुद्दाम पाठवीत आहें. तरी त्यास पुढील केसरींत जागा मिळेल अशी उमेद बाळगतों.

### रा. काळे यांचें विधान

रा. काळे आपले लेखांत म्हणतात कीं, ता. १३।२।१९१२ चे केसरीचे अंकांत "आठल्यांनी आपल्याला (शिवाजीचें) अस्सल पत्र उपलब्ध झालें असल्याबद्दल जाहीर केलें" व तें वाचून राजवाडे यांनी लगोलग सदरहू अस्सल पत्राची प्रतिमा केसरींत छापण्यास जो खर्च लागेल तो देण्याचें कबूल केलें असताहि "आठल्यांकडून त्या बाबतींत त्यांची व सर्वांचीच निराशा झाली!" रा काळे यांच्या या विधानावरून आपले वाचकांची अशी समजूत होईल कीं, ज्याअर्थी आठल्यांनी सदरहू अस्सल पत्राची प्रतिमा, खर्चाच्या बाऊचा ससेमिरा नसता, राजवाड्यांच्या सवालाप्रमाणे प्रसिद्ध केली नाही त्याअर्थी त्यांनी आपल्या लेखांत दिलेलें पत्र खरें नसून बनावट तयार केलेलें असावें!! परंतु येथे मीं हें नमूद करून ठेवितों कीं, मीं माझ्या सबंध लेखांत तें पत्र अस्सल माझेपाशीं आहे असें कोठेंहि म्हटलें किंवा जाहीर केलें नाही! मी फक्त पूर्वीच प्रसिद्ध झालेल्या अस्सल पत्राचा आधार घेतला आहें व तसें दाखविण्यास पत्राचे शेवटीं, माझ्या नेहमीच्या पद्धतीप्रमाणे '—सरदे. वि.' असें लिहिलें होतें; परंतु छापतांना तें चुकून राहिलें त्यास माझा नाइलाज आहे. या माझ्या लेखावर संपादकीय हात फिरून त्यांत छाटाछाटहि झालेली त्या लेखांतील शेवटच्या परिच्छेदावरून दिसून येईल.

मी या लेखांत शिवाजीच्या हस्ताक्षराचा प्रश्न चर्चेस घेतला नसून कारण त्यांतच अस्सल पत्राची जरूर आहे—बाजी घोरपड्याच्या मृत्यूचें साल नक्की ठरविण्याचा घेतला होता, व या गोष्टीस अस्सल पत्र पाहण्याची मुळींच जरूर नसून नुसता मजकूर पाहण्याची जरूर होती. या पत्रांतील भाषा व मजकूर यांच्या दृष्टीने विचार करता तें अस्सलबरहुकूमच आहे असें ठरवून मीं तें माझ्या लेखांत आधार म्हणून घेतलें होतें. छापलेलें पत्र 'अस्सल आहे, नक्कल नव्हे' व तें मजपाशीं आहे अशाबद्दलचा चकार शब्दहि मीं काढलेला नसता राजवाड्यांनी उतावीळपणें म्हटल्याप्रमाणे रा. काळे यांनीहि आपल्या लेखांत अस्सल पत्र मजपाशीं असल्याबद्दल मी जाहीर केलें असें विधान बळेंच माझ्यावर लादलें आहे. काळे यांनी स्वतंत्रपणें माझा लेख काळजीपूर्वक वाचला आहे असें यावरून दिसून येत नाही. 'वडिलां'चे सेवेसीचें सदरहू पत्र सावंतवाडी येथे निघणाऱ्या सरदेसाई-विजयांत थोडें अशुद्ध छापलेलें मी प्रथम सन १९०७ सालीं पाहिलें व ते शिवाजीनेच पाठविलें आहे अशी त्यांतील अंतर्गत पुराव्यावरून व त्यांतील सर्व माहितीचा उपयोग सभासद, चिटणीस वगैरे महत्त्वाचे बखरकारांनी आपल्या बखरींत केलेला आढळल्यावरून माझी त्या पत्राचे प्रामाणिकतेबद्दल खात्री झाली व मी त्या पत्राचा तें सबंध देऊन व एक दोन ठिकाणीं दुरुस्त करून आपल्या लेखांत आधार घेतला.

### राजवाड्यांचा संशय

राजवाड्यांनी मात्र आपले पत्रांत त्याचे प्रामाणिकतेबद्दल संशय प्रगट केला; कां, तर भाषा म्हणे आधुनिक दिसते! पण ती कोणती याचें त्यांनी एकहि उदाहरण दिलें नाही. त्यांच्या नेहमींच्या विचित्र स्वभावाविषयी मी येथें जास्त विस्तार करीत नाही. हें शिवाजीचें पत्र मला कोठे मिळालें त्याबद्दलची माहिती मी त्यांस पत्रद्वारें लागलीच कळविली होती; पण पृथ्वीवरील कोणत्याहि स्थलीं हें पत्र मिळविण्यास जाण्याची आपली तयारी असल्याचें वर्तमानपत्रांस जाहीर करणारे राजवाडे जवळच्याच ठिकाणीं म्हणजे सावंतवाडीस जाऊन सरदेसाई-विजयकारांकडून तें पत्र मिळवून अस्सल असल्यास त्याची प्रतिमा त्यांनी कोठे प्रसिद्ध केली नाहीं, किंवा या अत्यंत महत्त्वाच्या पत्राच्या प्रामाणिकतेसंबंधाने शहानिशाहि केली नाही! रा. सा. गो. स. सरदेसाई बी. ए. यांनी मला विचारल्यावरून तें कोठे मिळालें तें मीं त्यांस येथें आल्यावेळीं सांगितलें होतें. त्यांनी मात्र २४-१-१९२६ रोजीं बडोद्याहून पत्र पाठवून मला कळविलें कीं, "बाजी घोरपडे याचे संबंधाने शिवाजीने आपले वडिलांस लिहिलेलें पत्र आपण केसरींत छापलें आहे तें अस्सल असून खरें आहे. सावंतवाडीहून त्याचा शोध आणविला. सावंतवाडीचा इतिहास सन १९११ सालीं रा. पिंगुळकर यांनी छापलेला आहे त्याचे शेवटीं सुमारें १२५ अस्सल कागद छापलेले आहेत. त्यांत हें पत्र लेखांक ६ यांत छापलें असून तें एक दोन शाब्दिक फरकाच्या तफावतीनें अगदी आपण छापलेल्या पत्राशीं मिळतें. मीं ताडून पाहिलें. अद्यापि तें पत्र राजवाडे खोटें मानीत असतील तर त्यांची खात्री करण्यास मी तयार आहें." हें 'वडिलांचे सेवेसी'चें पत्र पांचसहा वर्षांपूर्वी सरदेसाई-विजयांत व एक वर्षापूर्वी सावंतवाडीचे इतिहासांत असें दोनदा दोन जागीं अगोदरच प्रसिद्ध झालें असताहि मी त्याचा उपयोग सन १९१२ सालांत केल्याबरोबर राजवाड्यांस त्याच्या प्रामाणिकतेसंबंधाने एकदम संशय आला ही खरोखर आश्चर्याची गोष्ट आहे. पत्रसारसंग्रहांत हें बिनमितीचें

पत्र खरें म्हणून समाविष्ट केलें असून त्याची तारीख सन १६६४।६५ ही दिली आहे! शाहाजी १६६४चे जानेवारींत मृत्यु पावला असता त्याचा मुलगा शिवाजी १०।१२ महिन्यांनी त्यास पुढे पत्र पाठविणार कसा हें माझ्या अल्प बुद्धीस आकलन होत नाही. कोणी कोणास हें पत्र लिहिलें आहे इकडे दुर्लक्ष करून पत्रसार-संग्रहकार येथे जेधेशकावलीच्या मानिलेल्या प्रामाणिकतेस बळी पडले आहेत! कारण तींत बाजी घोरपडे सन १६६४ चे कार्तिकांत अगर नवबर महिन्यांत मारला गेला असें म्हटलें आहे!

आतां ग्रांट डफ व सर सरकार म्हणतात त्या-प्रमाणे शिवाजी निरक्षर होता कीं रा. काळे म्हणतात त्याप्रमाणें साक्षर होता या प्रश्नाकडे वळूं.

कै. राजवाडे, आबा चांदोरकर, रा. सा. सर-देसाई वगैरेसारख्या विद्वानांनी या संबंधांत आज-पर्यंत केलेल्या चर्चेकडे आणि बखरकार व समकालीन कवि यांनी शिवाजीच्या शिक्षणाबद्दल व विद्याभि-रुचीबद्दल केलेल्या गौरवपर उल्लेखांकडे बोट दाख-वून व सर्वांचा रोख शिवाजी साक्षर होता इकडे झुकतो एवढ्यावरून हा अप्रत्यक्ष पुरावा सिद्ध अत-एव ग्राह्यच समजला पाहिजे अशी जबरदस्ती करून रा. काळे यांनी आपल्या पहिल्या लेखाचे शेवटीं व दुसऱ्या लेखाचे आरंभीं शिवाजीची साक्षरता सप्रमाण सिद्ध झाली अशी आपली भोळी समजूत करून घेतली आहे यांत आश्चर्य वाटण्याचें कांही कारण नाही. कारण त्यांनी आपले लेखाचे आरंभींच असें म्हटलें आहे कीं, " शिवाजीचें हस्ताक्षर शोधूं पाहात आहेत त्यांना शिवाजीची साक्षरता अर्थात् मान्य आहे "! कोणत्या सबळ, भक्कम व निर्विवाद पुराव्यावर मान्य आहे? तर भक्तांस कांही पुराव्याची जरूर लागत नाही; हें त्या प्रश्नाचें उत्तर! शिवाजीस लिहितां-वाचतां येत होतें असें त्यांनी आपल्या सबंध लेखांत कोठेंहि निःसंशय पुराव्याने सिद्ध केलेलें नाही. शिवाजी साक्षर होता असें ठरविण्यास राजवाडे, चांदोरकर, सरदेसाई वगैरे कसलेले लेखक व विद्वान चिकित्सक त्याचें हस्ता-क्षराची काळजीपूर्वक अपेक्षा करतात याचें कारण बाकी कितीहि आगंतुक व लंगडे पुरावे पुढे आणिले तरी त्याचे हस्ताक्षराचे प्रत्यक्ष पुराव्याशिवाय त्याची साक्षरता निर्विवाद सिद्ध होत नाही हें त्यांस पक्कें माहित असावें. शिक्षण व विद्याभिरुचि यांत लिहितां-वाचतां येण्याचा अंतर्भाव झालाच पाहिजे असा कोणीहि दंडक बांधलेला नाही! लिहितांवाचतां आल्याशिवाय बुद्धिवान मनुष्यास सुशिक्षितपणा व विद्याभिरुचि श्रवणाचे योगाने कमावितां येते हा अनुभव आहे. अर्थात रा. काळे यांनी दिलेले पुरावे शिवाजीची साक्षरता ठर-विण्यास केवळ दुर्बळ अत एव असमर्थ ठरतात!

### वखारवाला गिफर्ड

परंतु रावजी पंडितास शिवाजी ' राजाने स्वतः लिहिलेलें पत्र आलें ' असें राजापुरचा वखारवाला गिफर्ड या नावाचा इंग्रज सन १६६३ सालांत राजापुराहून लिहितो; व सुरतेच्या फ्रेंच वखारवाल्यांस शिवाजीने ' स्वहस्ताने पत्र लिहिलें ' असें सन १६७० त एक तेथे राहणारा डच इसम लिहितो; या दोन तत्कालीन स्वतंत्र पुराव्यांवरून शिवाजीस लिहितां येत होतें असें सकृत्‌दर्शनीं वाचकांस वाटण्याचा संभव आहे. पण विचारांतीं हे दोनहि पुरावे निखा-लस टाकाऊ आहेत असेंच ठरतें. कारण या दोनहि इसमांनी लिहिलेल्या लेखांत, शिवाजीने पाठविलेलीं पत्रें आपण स्वतः पाहिलीं व तीं त्याचेच हातचीं आहेत अशी आपली खात्री करून घेतल्याबद्दल त्यांनी एक शब्दहि लिहिलेला नाही! ते ऐकीव माहिती देतात ती शिवाजीच्या साक्षरतेसारख्या महत्त्वाच्या प्रश्नाचा निर्णय करण्यास अगदीं निरुपयोगी आहे.

इंग्रजी अमलाचे पूर्वीचे राजे, आपल्या बरोबरीचे राजे लोकांस, आपल्या कुटुंबांतील माणसांस, आपले जिवलग मित्रांस व साधुसंत इत्यादिकांस आपले हातचीं पत्रें किंवा निदान त्याच्या समाप्त्या तरी आपल्या हातच्या लिहीत व हीच चाल अजूनहि थोड्याबहुत प्रमाणांत देशी संस्थानांत अमलांत आहे. शिवाजीस जर खरोखर लिहितांवाचतां येत असेल तर त्याचें हस्ताक्षर अशा प्रकारच्या पत्रांतच पाहावयास सांपडेल; इतरत्र कोठेंहि सांपडणार नाही. अशा प्रकारचीं सहा पत्रें हल्लीं प्रसिद्ध झालेलीं आहेत तीं हीं—( १ ) शिवाजीने शाहाजीस पाठ-विलेलें; ( २ ) त्याने मालोजी घोरपड्यास पाठवि-लेलें; ( ३ ) एकोजीपाशीं वांटा मागितल्याबद्दलचें; ( ४ ) मसउदखानास मदत दिल्याबद्दलचें; ( ५ ) एकोजीस पाठविलेलें उपदेशपर पत्र व ( ६ ) हणमंत्यांची नेमणूक करण्याबद्दलचें पत्र. हीं सहाहि पत्रें शिवाजीने पाठविलीं असून त्यां-पैकीं पहिलीं दोन खेरीज करून बाकीचीं चार अस्सलच ग्रांट डफ यास पाहावयास सांपडलीं होतीं व तीं अस्सलच असल्याबद्दल त्याची बालंबाल खात्री झाली होती. हीं चारहि पत्रें शिवाजीचा चिट-णीस बाळाजी आवजी याचे हातचीं आहेत असें तो म्हणतो. शिवाजीस जर लिहितां येत असते तर बंधुस लिहिलेल्या या चारहि पत्रांत निदान त्याचे हातची बहुत काय लिहिणें सुज्ञ असा ' ही समाप्ति तरी अवश्य आढळली असती. कारण, लिहावयास येत

असतां तशी ती केली नाही तर ज्यास पत्र लिहिलें त्याबरोबरीच्या थोर गृहस्थाचा आपण जाणूनबुजून अपमान केला असें होतें. परंतु सदरहू पत्रांत चालु अक्षराशिवाय दुसऱ्या प्रकारचें अक्षर नाही हा डफचे लिहिण्याचा भावार्थ आहे व म्हणूनच शिवाजी निरक्षर होता असें त्याने म्हटलें आहे.

वरील बिनमितीच्या सहा पत्रांपैकीं, चार अस्सल पत्रें सातारा येथील राजाचे चिटणीसांपाशीं डफनें पाहिलीं होतीं, असें त्यानेंच म्हटलें आहे. या चार अस्सल पत्रांपैकीं, निदान शेवटचीं तीन पत्रें तरी रा. ब. पारसनीस यांनी चिटणिसांजवळून हस्तगत केलीं असून त्यांपैकीं, दोन पत्रें त्यांनीं सन १९०८-०९ सालचे इतिहास संग्रह या मासिकाचे पु. १ अंक ५-७ यांत प्रसिद्ध केलीं आहेत; परंतु छापील प्रतींत अनेक चुका झालेल्या आहेत. ते आपल्या टीपेंत म्हणतात कीं, "हीं पत्रें शिवाजीचे चिटणीस बाळाजी आवजी ह्यांच्या हातचीं आहेत, यांत शिवाजीच्या अगर दुसऱ्या कोणाच्या हातचें अक्षर असल्याबद्दल ते लिहीत नाहीत."

### दोन अस्सल पत्रांचा प्रत्यक्ष पुरावा

सन १९०२ सालीं 'मुत्सद्दी नाना फडणीस' या मथळ्याखालचा माझा लेख केसरींत एप्रिल महिन्यांत प्रसिद्ध झाल्यावर रा. पारसनीस इंदूर छावणींत श्री. मा. वि. किबेसाहेब एम. ए. यांचे येथे आल्यावेळीं त्यांचे जवळ असलेलीं वरील सहा पत्रांपैकीं शेवटचीं दोन अस्सल पत्रें मी व श्रीमंतसाहेब यांनी प्रत्यक्ष पाहिलेलीं आहेत. तीं दोनहि सबंध एककलमीच आहेत. त्यांत बाळाजीच्या अक्षराखेरीज शिवाजीच्या अगर इतर कोणाच्याहि हातचें अक्षर मुळीच नाही. हीं पत्रें निः-संशय खरीं असल्याचा अत्यंत महत्त्वाचा जास्त पुरावा जो ग्रँटडफ पारसनीस यांनी नमूद करून ठेविला नाही तो- मी येथें नमूद करून ठेवितों— आम्हीं प्रत्यक्ष पाहिलेलीं हीं दोनहि अस्सल पत्रें साध्या कागदावर, लिहिलेली नसून सुवर्णरेखांकित वेलबुट्टीदार उत्तम कागदावर लिहिलेलीं आहेत व पत्राच्या शेवटीं 'सुज्ञ असा' या शब्दांपुढेंच षट्कोनी शिक्का असून त्यांत तीन ओळींत 'मर्यादेयं विराजते' अशीं अक्षरें आहेत. या पत्रांच्या मी त्याच वेळीं स्वतः करून घेतलेल्या नकला हल्ली मजजवळ आहेत. व या पत्रांच्या अस्सलपणाच्या मी वर दिलेल्या दोन बाबी त्याच वेळीं त्यांत नमूद करून ठेविल्या आहेत.

'वडिलांचे सेवेसी' चें पत्र सरदेसाई विजयांत सन १९०७ सालीं प्रसिद्ध झालें. शिवाजीने एकोजीस पाठविलेलीं दोन अस्सल पत्रें पारसनीसांनी सन १९०८।०९ सालांत इतिहास-संग्रहांत प्रसिद्ध केलीं आणि ग्रांट डफ साहेबाने आपण पाहिलेलीं चार अस्सल पत्रें सातारा येथील राजाचे चिटणीसांपाशीं आहेत, असें शंभर वर्षांपूर्वी जगजाहीर केलेलें माहीत असतां, काळे यांचे म्हणण्याप्रमाणें शिवाजीच्या अस्सल पत्राकरिता शेवटपर्यंत मनास रुखरुख वाटून घेणारे व वाटेल तो खर्च करण्यास तयार असणारे राजवाडे अगर महाराष्ट्रांतील उत्सुक लोक जवळच्या सातारा-शहरीं हीं अस्सल पत्रें हस्तगत करण्यास आजपर्यंत तडकाफडकीं धांवत गेले नाहीत व त्या पत्राच्या प्रतिमा त्यांनी कोठे प्रसिद्ध केल्या नाहीत; इतकेंच नव्हे तर शिवाजीची साक्षरता अगर निरक्षरता एकदांची कायमची ठरविण्यासाठीं अशा प्रकारचा उद्योग हल्लीच्या विद्वान उत्कंठित व तृषित संशोधकांपैकीं कोणीहि केला नाही हें पाहून अत्यंत आश्चर्य वाटतें.

### शिवाजी निरक्षर होता

शिवाजी साक्षर असता तर त्याने आपल्या बंधूस लिहिलेल्या प्रत्येक पत्रावर समाप्ती तरी स्वतःचे हातची अवश्य घातली असती; तशी घातलेली मुळीच आढळत नाही. सर्व शिक्क्यावर व चिटणीसाचे अक्षरावर भागविलें आहे! म्हणून शिवाजीने "स्वतः लिहिलेलीं दोन पत्रें" रावजी पंडितास व फ्रेंचांस आलीं असल्याचे राजापुराहून गिफर्ड व सुरतेहून एक डच रहिवासी असे दोघेजण लिहितात त्यांचे पुराव्यास फुटक्या कवडीचीहि किंमत देतां येणें शक्य नाही! आपल्या हातची पत्रे लिहून अनोळखी व हलक्या दर्जाच्या परदेशी व्यापाऱ्यांचा शिवाजी मान करील व प्रत्यक्ष आपले प्रिय बंधूस पाठविलेल्या पत्रांत आपलें हातचें एकहि अक्षर न लिहून त्याचा अपमान करील ही गोष्ट कदाकाळीं संभवत नाहीं. सारांश, या तत्कालीन युरोपियन व्यापाऱ्यांच्या शिवाजीच्या साक्षरतेबद्दलच्या साक्षी बेभरंवशाच्या व टाकाऊ आहेत. प्रत्यक्ष पाहिलेली हकीकत लिहून ठेवणारे दुसरे दोन युरोपियन गृहस्थ मात्र भरंवशाचे आहेत. या दोन गृहस्थांपैकीं एकजण, टेलर हा लिहितो. (सन १६६३) कीं रावजी पंडितास आलेल्या(दुसऱ्या) पत्रावर राजाचा शिक्का व चंदनी गंधाचे पंजाचा ठस्सा होता व तें पत्र आपण पाहिलें होतें. शिवाजीचे हातचें अक्षर त्यावर असल्याबद्दल तो अवाक्षर काढीत नाही हें लक्षांत ठेवण्याजोगें आहे. दुसरे गृहस्थ राजापूरचे वखारवाले हे सन १६७५ सालांत राजापूरला शिवाजीस भेटले, त्या वेळीं त्यांनी दिलेली अर्जी शिवाजीने दुसऱ्याकडून वाचविली, त्याने आपण स्वतः वाचली असें ते म्हणत नाहीत! या दोन तत्कालीन युरोपियन लेखकांनी आपण स्वतः पाहिलेली हकीगत दिली

आहे ती विश्वासार्ह आहे. तिच्यावरूनच शिवाजीस लिहिता वाचता येत होतें असें बव्हंशीं ठरत नाही आणि आपल्या प्रत्यक्ष बंधूस लिहिलेल्या पत्रांतसुद्धा त्याचें हातचें अक्षर मुळींच आढळत नाहीं. त्याअर्थी तो डफ व सर सरकार म्हणतात त्याप्रमाणें निरक्षरच होता असें माझेंहि मत आहे.

# तिरंगी सामन्यांतून तिरंगी समेट निघेल काय ?

गेल्या जानेवारीपासून सरकार व राष्ट्रीय सभा यांच्यामध्ये दुरंगी सामना सुरू होता. सरकारानें ऑर्डिनन्सेस सुरू केले व राष्ट्रीय सभेने कायदेभंग सुरू केला. या दोनहि गोष्टी जवळ जवळ इतक्या समकालीन घडल्या कीं,त्यांतली आधीं कोणती घडली व मागाहून कोणती घडली याचा मोठा वाद चालतो, आणि प्रत्येक पक्ष आपल्या कृत्याची जबाबदारी दुसऱ्यावर टाकूं पहात असतो. याचा अर्थ इतकाच कीं,प्रत्येकाला आपण आरंभिलेली गोष्ट मनांतून करावयाचीच होती. फक्त दुसऱ्यावर निमित्त ठेवून ती करिता आली तर पहावी याकरितां तो निमित्ताला टपून बसला होता. सरकारच्या मनांत ऑर्डिनन्सेसमध्ये उडी घ्यावयाची नसती तर त्यांनी ते आधीपासून लिहून छापून तयार ठेवलेच नसते उलट राष्ट्रीय सभेला कायदेभंगांत उडी घ्यावयाची नसती तर तिने, म्हणजे तिच्या सर्वाधिकारी वर्किंग कमिटीने, म. गांधी हे विलायतेच्या बोटींतून खाली पाय टाकतांच सभा भरवून कायदेभंगाचा ठराव केला नसता. असो; दोन्ही पक्षांना इष्ट होतें तेंच घडलें व अजूनहि त्यांनी तें चालविलें आहे. फरक इतकाच कीं सरकारानें भलेपणा मिळविण्याकरितां असें जाहीर रीतीनें म्हणून ठेवलें आहे कीं, "काँग्रेस जर कायदेभंग बंद करण्याचें ठरवील तर आम्ही ऑर्डिनन्सेस हे त्या पुढे एक दिवसहि सुरू ठेवणार नाही." काँग्रेसने मात्र ऑर्डिनन्सेसचें निमित्त प्रथम केलें असलें तरी आताहि ती असें स्पष्ट म्हणत नाही कीं, "ऑर्डिनन्सेस निघून गेले तर आम्हीहि कायदेभंग थांबवूं." कारण क्रिमिनल लॉ अमेंडमेंट ॲक्ट शिल्लक राहणारा आहे. तो नैमित्तिक नसून त्याला आतां नित्यपणाचें स्वरूप आलें आहे. आणि त्या कायद्याअन्वये सरकारनें इतक्या सभा, संस्था, संघ, विशेषतः काँग्रेस कमिट्या बेकायदा करून ठेवल्या आहेत कीं कोणी जरा कांहीं इकडे तिकडे केलें कीं, बेकायदेशीर काम केल्याचा आरोप न कळतहि यावयाचा.

असो, अशा रीतीनें हा दुरंगी सामना आज सहा–सात महिने चालू आहे. पण सर सॅम्युअल होअर यांनी ता. २७ जून रोजीं तोंड उघडल्यापासून हा सामना तिरंगी झाला आहे. हिंदुस्थानांतील लिबरल पक्षानेहि राज्यघटना बनविण्याच्या कामीं सरकाराशीं असहकारिता पुकारली आहे. त्यांचें म्हणणें असें कीं, "पूर्वी १९३१ अखेर सरकारचें जे धोरण होतें ते बदललें. पूर्वी लिबरलप्रमुख लोकांना गोलमेज परिषदेत पार्लमेंटच्या प्रतिनिधींच्या बरोबरीच्या नात्यानें व अधिकारानें बसून चर्चा करता येत होती. पण प्रशस्त असे पूर्वीचें गोलमेज मोडून त्याच्या जागीं सरकारानें जें दुसरें एक मेज माडलें आहे, त्यांत दोन मजले असून त्यातील खालच्या मजल्यावर हिंदी प्रतिनिधी बसावयाचे व वरच्या मजल्यावर इंग्रज प्रतिनिधि बसावयाचे; यांत आपला अपमान आहे." होअर साहेबांनी त्यावर मखलाशी चालविली आहे. व आतां लिबरल लोकांच्या विश्वासाचे लॉर्ड आयर्विन हेहि त्या कटात सामील झाले आहेत. ते दोघेहि म्हणतात, "कार्यपद्धति बदलली, पण मूळचें धोरण कांही बदललेलं नाही." पण हें म्हणून कोण ऐकतो ? त्यावर पहिलाच प्रतिप्रश्न हा कीं, धोरण जर टिकून आहे तर कार्यपद्धति बदलण्याचें तरी काय कारण ? हिंदी प्रतिनिधींनी ही पद्धति बदलण्याची सूचना किंवा शिफारस केली नव्हती. चिरपरिचयाच्या लिबरल लोकांनाहि आता इंग्रजांच्या अंतरंगाची चांगली परीक्षा होऊं लागली आहे. काँग्रेस पक्ष सरकारच्या कोणत्याहि कृत्याकडे नेहमी संशयानें व वाकड्या नजरेनेच पाहणारा, यामुळ सरकारला अशी बनावणी तरी करतां येईल कीं, "कुत्र्याचे शेपूट किती केलें तरी वाकडें तें वाकडेंच राहणार. मग तें सरळ करण्याच्या भरीला पडाच कशाला? स्वतः आमचें तरी शेपूट कोठें सरळ आहे ? तेव्हा दुसऱ्याच्या या वाकड्या वळणाचें निमित्त करून वाम मार्गाचें काम साधूं या म्हणजे झालें.पण लिबरलांची गोष्ट कांही तशी नाही. नियमामुळेच अपवाद फार जाचक होतो. जे नेहमीं सरकारचा शब्द खरा मानणारे त्यांनी जर एखादे प्रसंगीं तो खरा मानण्याचें नाकारलें तर पुराव्याच्या बोजाचें पारडें एकदम उलटतें. म्हणजे लिबरलांची समजूत पटेपर्यंत खात्री करून देण्याची, आणि खात्री पटेना तर आपली कार्यपद्धति बदलण्याची, जोखीम सरकारवरच पडतें. अजून यापैकीं एकहि गोष्ट घडलेली नाही. यामुळे सरकार व काँग्रेस यांमध्ये जो दुरंगी

सामना होता तो आता सरकार, कॉंग्रेस व लिबरल असा तिरंगी झाला आहे.

सकृत्दर्शनीं दुरंगी सामन्याचा तिरंगी सामना झाला म्हणजे मूळचा बिकट प्रश्न अधिक बिकट झाला असें दिसतें. पण जगांत अनुभव उलट येतो. तो असा कीं, कित्येक वेळां भानगडी अधिक झाल्यानेच सोक्षमोक्ष होण्याला मदत होते. प्रस्तुतचेच उदाहरण घेतलें तर असे दिसून येईल कीं, लिबरल पक्षाने स्वराज्य घटनेच्या कामीं सरकाराशीं असहकारिता पुकारल्यामुळें आपल्या पायाखालचा एक आधार गेल्यासारखें सरकाराला वाटूं लागलें आहे. सरकारला ज्या दोन पायांचा आधार नेहमी वाटतो, त्यांतील एक लिबरल पक्ष व दुसरा मुसलमानादि पक्ष. यांपैकीं सरकारचा मुसलमानांचा आधार अजून तुटलेला नाहीं; किंबहुना मुख्य प्रधानांनी जातिविषयक प्रश्नाचा निर्णय दिला म्हणजे आपण मागतों त्यांतलें बरेंच मिळालें असें वाटून तो त्यांचा आधार खंबीर होण्याचा संभव आहे पण दोन पायावर उभें राहण्यास शिकलेला मनुष्य एका पायावर किती दिवस उभा राहणार ? एका पायावर उभें राहणें म्हणजे जवळ जवळ तो एक प्रकारचा हटयोग किंवा तपश्चर्या होय. आणि सरकार हे कांही योगी किंवा तापसी नाही. तो लोकव्यवहारांतला जीव आहे. सायमन कमिशनच्या वेळीं लिबरलपक्षाने असहकारिता पुकारली. तिला भिऊन सरकारानें तें कमिशन रद्द केलें नाही ही गोष्ट खरी. तथापि पुढे त्या कमिशनचे चेअरमन सायमनसाहेब यांच्याकडूनच सूचना मिळाल्याचें निमित्त करून, सरकाराने राउंड टेबल कॉन्फरन्स भरविण्याचें निश्चित केलें; इतकेंच नव्हे तर कॉंग्रेसनें आपला प्रतिनिधि म्हणून म. गांधी यांना राउंड टेबलला पाठवावें अशाविषयीं तिचें मन लॉर्ड आयर्विन यांना वळविता आलें. राउंड टेबलच्या निर्णयांना स्वयंनिर्णयाचें स्वरूप, ओढून ताणून चंद्रबळाने किंवा दिखाऊ रीतीनें कां होईना आहे असें सरकाराला भासविता आल्यामुळे लिबरल पक्षाचें तर समाधान झालेंच, पण कांही थोडेसें कॉंग्रेसचेंहि समाधान झालें. पण राउंड टेबल कॉन्फरन्सची पद्धति उलथून टाकण्याची दुर्बुद्धि सर सॅम्युअल होअर यांना झाल्यामुळे लिबरल पक्षाच्या दृष्टीने फिरून सायमन कमिशनवरील बहिष्काराचाच प्रसंग निराळ्या रीतीनें उद्भवला. त्यांत दुरंगी सामन्याचा तिरंगी सामना बनला. याचा अर्थ सरकाराच्या आधाराच्या दोन पायांपैकीं एक तुटला असा होतो.

इतर दृष्टींनीहि समेट आता व्हावा अशी वेळ आली आहे. ऑर्डिनन्सच्या जोरावर सरकार राज्य चालवीत असलें तरी त्यांना जगांत आपली बअब्रू होत आहे, ही गोष्ट रोज निरनिराळ्या तोंडांतून ऐकूं येतें. आज लिबरल बोलला, उद्यां युरोपियन बोलला, परवां अमेरिकेन बोलला, असें सुरूच आहे. लोकमताला भिण्याचा दृष्टीनें सरकारने नेसतें सोडून डोक्याला गुंडाळलेलें नाही. म्हणूनच सरकारच्या तोंडून पुढील दोन विधानें केव्हा केव्हा उच्चारलीं तरी जातात. एक विधान हे कीं, ऑर्डिनन्सने राज्य चालविणे ही गोष्ट स्वतः सरकारलाहि मोठीशी प्रिय नाही. दुसरा उद्गार वर दर्शविल्याप्रमाणे असा कीं, जरूरीपेक्षा एकहि अधिक दिवस सरकार ऑर्डिनन्सेस राहूं देणार नाही, तीं परत घेईल. प्रत्यक्ष भांडणच जुंपल्यावर "या! तुरुंगांत जाण्याला किती येता ते या! आम्ही हवे तितके तुरुंग बांधण्याला व याल तितक्या लोकाना शिधा पुरविण्याला समर्थ आहों" असें सरकार म्हणे. आणि भांडणांत आपण कमी पडूं शकत नाही असें दाखविण्याकरिता त्यांनी कांही नवे तुरुंग बांधले, जुने मोठे केले, पोलीस रखवालदारांची संख्या वाढविली, व तुरुंगाच्या वाढत्या खर्चाला मंजुरी दिली. पण तुरुंगांत जाणें व घालविणें या लढ्याला जसें एक भौतिक अंग आहे तसेंच एक मानसशास्त्रीयहि अग आहे. तें असें.

तुरुंगांत जातों म्हणून आले त्यांना तुरुंगांत खुशाल घेतलें; त्यांत कमी पडूं दिल नाहीं; किंबहुना तुरुंगांतील व्यवस्थाहि, खरे बोलावयाचें तर, हल्ली बऱ्या प्रतीची ठेऊन सरकाराला कॉंग्रेसवर नैतिक विजय मिळविल्याचा एक प्रकारचा बहाणा करता आला. तरी पण इतके लोक तुरुंगांत जातात कां ? या प्रश्नाच्या खऱ्या उत्तरांतून जो निंदाव्यंजक ध्वनि निघतो त्याचा परिहार सरकाराला केव्हांहि करिता आलेला नाही. एरवी पहावें तों आरोपी आपल्या बचावाचा आटोकाट प्रयत्न करून तो नाही नाही म्हणत असतां त्याला तुरुंगांत घालण्याचा खटाटोप व परिश्रम जेथे सरकाराला करावे लागतात, तेथें ज्यांत आपला कांही स्वार्थ नाहीं अशा बाबतींत लोक तुरुंगांत जाण्याला अहमहमिकेने पुढे येतात यामध्ये सत्याचें अधिष्ठान असेल तर तें कोणत्या बाजूला असेल याची परीक्षा जग बसल्या जागीं केल्याशिवाय राहात असेल काय ? तुरुंगांत मुद्दाम जाणाऱ्या लोकांकरिता सरकार तुरुंगाची व्यवस्था करूं शकलें म्हणजे त्यामुळे तुरुंगांत जाण्याच्या खऱ्या कारणाचें निर्मूलन झालें असें कधीच होत नाही असेंच जग म्हणणार. तुरुंगांत जाणें हा सत्याग्रह नसून आततायीपणा आहे असें सरकारानें म्हटलें तरी, मूळ जो चांगला मनुष्य त्याची आततायी बनण्यापर्यंत पाळी आली याचें खापर सरकारच्या डोक्यावर

फुटणारच. जोराची प्रतिक्रिया झाली म्हणून तिने फार तर आतताई मारून निघेल. पण कसल्या तरी हानीच्या दुःखाने तो तळमळला हें असिद्ध होत नाही;व क्रिया प्रतिक्रिया यांची वजाबाकी झाली तरी तळतळाटाचें कारण शिल्लकच उरतें.

असहकारितेच्या चळवळीपूर्वी राजकारणामुळे किंवा सरकारच्या जुलुमामुळे तुरुंगांत गेलेले असेहि कांहीं कैदी असत. पण ते थोडे असत. म्हणून सामान्यतः इतर बहुसंख्य अशा कैद्यांच्या कारणाने तुरुंगाच्या वातावरणांत स्वार्थमूलक अनीति व अत्याचार यांचेच मानसिक ध्वनि उमटत असतील. पण आज त्या स्थितीची उलटापालट झाली आहे. तुरुंगाच्या मामुली कैद्यापक्षां राजकीय कैद्यांचीच संख्या अधिक झाली आहे. अर्थात् हल्लीं तुरुंगाच्या वातावरणांत स्वार्थाऐवजी स्वार्थत्यागाच्या, व्यक्तिस्वार्थाऐवजी राष्ट्रीय स्वार्थाच्या, आणि तामसी अत्याचाराऐवजी सात्विक अनत्याचारांच्या, लहरींचे निनादच घुमत असतील. जेथे वास्तु आहे तेथे वास्तु देवताहि आहे. तेव्हा तुरुंगांतील वास्तुदेवतांना पूर्वी शभर दीडशें वर्षांत जो अनुभव कधी आला नसेल असा अपूर्व अनुभव हल्ली येत असेल यांत काय शंका ! आणि वास्तु आहे तेथें वास्तुदेवताहि आहे त्याचप्रमाणे जेथे देवता आहेत तेथे देव आहे. म्हणून या देवता हा आपला नवा अनुभव त्या देवाच्या कानांवर घातल्याशिवाय कशा राहातील ? तात्पर्य ऑर्डिनन्सेस काढून तुरुंगाचीं दारें मोकळीं केल्याने सरकारने आपला राजकीय 'प्रेस्टीज' जगापुढे संभाळला असला,तरी नैतिक व आध्यात्मिक दृष्ट्या त्यांचा तो अध:पातच होय. व तो त्यानी लवकर थांबविलेला बरा.

आता राष्ट्रीय सभेकडे वळूनहि थोडें पाहूं. राउंड टेबल कॉन्फरन्सहून परत आल्याबरोबर गांधींनी काँग्रेस वर्किंग कमिटीची सभा बोलाविली. तींत कायदेभंगाचा ठराव झाला व त्या ठरावाला अनुसरूनच हल्लीची कायदेभंगाची मोहीम सुरू आहे.तथापि "तेव्हा घाईने झालें तें ठीक किंवा नीट झालें नाही, झालें नसते तर अधिक बरें" अशा प्रामाणिक समजुतीचे अनेक लोक आहेत.पूर्वी थांबविलेली कायदेभंगाची चळवळ पुन: उपस्थित करण्याला त्यांच्या मतें १९३२च्या प्रारंभीं गांधींना खरोखर अनिवार्य असे कारण घडलें नव्हतें. गांधी आगबोटींतून हिंदुस्थानात उतरण्यापूर्वीच संयुक्त प्रांतांत जवाहरलाल नेहरू प्रभृतींनी करबंदीची चळवळ सुरू केली होती व तींत ते तुरुंगांतहि गेले. वास्तविक गांधी जर विलायतेहून चार आठ दिवसांत परत येणार होते, तर करबंदीची ही चळवळ सुरू करून गांधींचे हातपाय आधी बांधून टाकण्याचें खरोखर त्यांना कारण नव्हते. करबंदीची चळवळ उत्पन्न करून स्वतः तुरुंगांत जाऊन जवाहरलाल नेहरू यांनी गांधींच्या इतर सर्व वाटा बुजविल्या व कायदेभंगाची तेवढीच वाट त्यांना मोकळी ठेविली. मग त्या वाटेने जाऊन विलायतेहून आल्यानंतर बरोबर चार पांच दिवसांत त्यांनी तुरुंगाची कोठडी गांठली यांत काय नवल ? जवाहरलाल यांच्या या कृत्याने वातावरणच असें उत्पन्न करून ठेवलें कीं गांधींना सामोपचाराच्या कोणत्याहि मार्गाचें संशोधन करणें शक्यच राहिलें नाही. अभिमन्यु रणांत पडल्यावर जयद्रथाला दिवस बुडण्याच्या आंत मारीन नाहीतर अग्निकाष्ठ भक्षण करीन अशी प्रतिज्ञा जर अर्जुनाने केली नसती तर त्याला अर्जुन कोणीं म्हटलें असतें ? "जवाहरलाल तुरुंगांत गेले आतां राउंड टेबल कॉन्फरन्स मोडलें काय उरलें काय दोनहि सारखीच!या तेजस्वी तरुणाच्या सहानुभूतीपुढे स्वराज्यघटनेचें विधायक कार्य पुरें करण्याची क्षिति कोण बाळगतो ?" असा नादच वर्किंग कमिटींत घुमूं लागल्यावर गांधींनीहि कायदेभंगाच्या ठरावाला संमति द्यावी यांत आश्चर्य नाही. आणि आपण केलेलें निमित्त भरदार दिसावें म्हणूनच कीं काय त्यांनी बंगाल ऑर्डिनन्सची आठवण केली व तेंहि कलम युद्धाच्या जाहीरनाम्यांत युद्धाचें कारण म्हणून घालून दिलें.

पण युद्धाचीं कारणें मनुष्य लिहूं लागला म्हणजे त्याला हवीं तितकीं सुचतात. कारण जुना इतिहास पाहिला तर गांधींना बंगाल्यांतील राजकीय कैद्यांची नेहमीच आठवण वेळेवर राहात होती असें दिसत नाही. कित्येक वेळां बार्डोलींतील कांही खातेदारांच्या करबंदीकरिता जप्त झालेल्या जमिनींची किंमत बंगाल्यांतील राजकीय कैद्यांच्या मुक्ततेहून अधिक भरल्याचें दिसून आलें आहे. पूर्वी येरवड्याच्या तुरुंगांतून गांधींनी तहाच्या ज्या अटी सप्रू—जयकरांजवळ सांगितल्या, किंवा दिल्ली येथे प्रत्यक्ष तहच झाला त्यांत ज्या अटी ठरल्या त्यांमध्ये बंगाल्यांतील राजकीय कैद्यांचा उल्लेख कितीसा आहे ? आता याचें एक कारण असें म्हणता येईल कीं बंगाल्यांतील तरुणांची चळवळ महात्माजींना प्रिय असलेल्या अनत्याचाराच्या तत्त्वांवर अधिष्ठित नाही.तेव्हा ज्यांची चळवळ सशस्त्राने किंवा अत्याचारित्वाने दूषित झालेली आहे अशांविषयी त्यांना मनांतून सहानुभूति वाटली तरी त्यांच्या सुटकेची मागणी करणें हें आपल्या सत्याग्रहाच्या म्हणजे सत्याग्रह थांबविण्याच्या तहाच्या कलमांत बसत नाही अशीच महात्माजींची प्रामाणिक समजूत दिसते. उलट बंगाल्यांतील तरुण लोकहि असेच आत्मनिष्ठ, आत्मविश्वासू व भक्कम दिसतात कीं त्यांनी काँग्रेसच्या पुढाऱ्यांच्या मदतीची तर राहोच पण सहानुभूतीचीहि अपेक्षा ठेविली नाही. बंगा-

त्यांतील तरुणांनी सरकाराशीं नेहमीच युद्ध पुकारलेलें आहे. त्यांच्या धोरणाच्या कक्षेंत तहाची कल्पना किंवा भाषेंत समेटाचा शब्द येतच नाही. यामुळे गांधींच्या धोरणालाच ते नांवें ठेवतात. ते त्याला धरसोड म्हणतात. त्यांना गांधींचे पॅक्ट समजत नाहीत, व तुमचें सरकाराजवळ येवढें वजन आहे तर आमच्याकरिता अमुक एक रदबदली करा अशी त्यांनीं कधी गांधींच्याकडे मागणीहि केली नाही. हें सर्व सांगण्याचें कारण इतकेंच कीं, मुंबईच्या वर्किंग कमिटींत सर्व हिंदुस्थानास लागणारे वटहुकूम म्हणजे ऑर्डिनन्सेस जाहीर होण्यापूर्वीच कायदेभंगाचा ठराव करतांना संयुक्त प्रांतातील करबंदीबरोबर बंगाल्यांतील ऑर्डिनन्सची आठवण महात्माजींना कशी कोठून झाली याचेंच पुष्कळांना आश्चर्य वाटलें.

पण तें असो. जानेवारींत राष्ट्रीय सभेच्या वर्किंग कमिटीनें सात्त्विक रागाच्या भरांत कायदेभंग पुकारला तो अगदीं सकारण होता, त्यांत दोष कांहीं नव्हता असें घेऊन चाललें तरी, इतके दिवस कायदेभंग चालल्यावर, व जगाच्या दृष्टीनें कॉंग्रेसनें त्यांत वर सांगितल्याप्रमाणे यश मिळविल्यावर, आता निराळी युक्ति लढविण्याकरिता म्हणून तरी कां होईना कॉंग्रेसने कायदेभंग थांबविणें अयोग्य होईल काय, असा प्रश्न पुष्कळांच्या मनांत आल्याशिवाय राहत नाही. पहिली गोष्ट ही कीं, कायदेभंगाची जी चळवळ सुरू आहे ती मूळ कशामुळे सुरू झाली ? ती प्रत्यक्ष स्वातंत्र्य पदरांत पडण्याकरिताच असेल तर मग तें पदरांत पडेपर्यंत ती थांबवितांच येत नाही. पण कायदेभंगाचा प्रत्यक्ष संबंध स्वातंत्र्याशीं जोडलेला नाही. कारण कॉं. वर्किंग कमिटीच्या ठरावांत स्वातंत्र्याचा उल्लेख नाही तर पेशावर, अलाहाबाद, बंगाल या प्रांतांत लागू झालेल्या कांही वटहुकुमांचा व आहे. स्वातंत्र्याशीं प्रस्तुतच्या सत्याग्रहाचा संबंध असता तर म. गांधी हे राउंडटेबलच्या चर्चेला गेलेच नसते. कारण राउंडटेबलपुढे निखालस स्वातंत्र्याची चर्चा होणें अशक्य होतें, व ती होणार नाही हें त्याना माहीत होतें. आणि सरहद्द-प्रांत संयुक्त-प्रांत व बंगाल यांना लागू केलेल्या ऑर्डिनन्सेसना उद्देशून हा कायदेभंग सुरू केला असला तर यांपैकीं दोन बाबतींत ऑर्डिनन्सेसमध्ये नसला तरी प्रांतांतील स्थितींत फरक पडलेला आहे. म्हणजे असंतोषाची तीव्रता तरी इतर कांही कारणांनीं कमी झाली आहे, किंवा ऑर्डिनन्सेसचें प्रयोजन संपलें आहे. यामुळे कायदेभंग व हे ऑर्डिनन्सेस एकदम थांबण्यास हरकत नाहीं.

बंगालची गोष्ट थोडी निराळी आहे. ती कां हें स्पष्ट करून सांगण्याचें कारण नाही. दुसऱ्या एका दृष्टीनें पाहता कायदेभंगाच्या चळवळीचें जें एक कार्य म्हणजे सरकाराला राष्ट्राचें तेज दाखविण्याचें, तें गेल्या सात महिन्यांत इतकें पुष्कळ झालें आहे कीं परदेशांतील व इंग्लंडमधील लोकहि हिंदी जनतेनें केलेल्या स्वार्थत्यागाची वाखाणणीच करीत आहेत. पण नुसती वाखाणणीच नव्हे तर ते दहशत खाऊन बसले आहेत. तोंडानें ते कितीहि धीटपणाचे शब्द बोलोत, पण मनांतून त्याना असें खचित वाटूं लागलें आहे कीं, कॉंग्रेसच्या शब्दाखातर पाच पन्नास हजार मनुष्य ज्या अर्थी तुरुंगांत जातें, त्या अर्थी कॉंग्रेसचें ध्येय जनतेला पटलेले असून एका लाटे मागून तिच्याहून मोठी लाट उठते त्याप्रमाणे हल्लीच्या चळवळीहून अधिक जोरकस अशीच चळवळ यापुढें होणारी ती होईल. पण एका बाजूला जसें हें खरें, तसें दुसऱ्याहि बाजूला हे खरेंच आहे कीं हल्लीचा हा राजकारणाचा डाव असाच कुचंबत ठेवण्यांत फायदा नाही. तर जुनें धोरण सोडून एखादें नवें धोरण लढविण्यांतच देशाचा फायदा आहे.

कॉंग्रेस कायदेभंग थांबवील तर आम्ही वटहुकूम परत घेऊं असें बोलून सरकार ज्याप्रमाणे कॉंग्रेसवर जबाबदारी टाकूं पाहाते, त्याप्रमाणे राष्ट्रीय सभेनेहि सरकार आक्षेपाई वटहुकूम थांबवील तर आम्हीहि कायदेभंग थांबवूं असें म्हणून सरकारावर उलट जबाबदारी टाकण्याला पुढे आलें पाहिजे. तारतम्य हें सर्व गोष्टींत असतेंच; व पूर्वी एक दोन वेळा म. गांधी यांनी समेट करण्याचा विचार ठरविला तेव्हा जसें तारतम्य दाखविलें तसेंच तें त्यांनी आताहि दाखविण्यास हरकत नाही. उदाहरणार्थ, दोन वर्षांपूर्वी महात्माजी येरवड्यास असता सप्रू—जयकरांनी समेटाचें बोलणें केलें तेव्हा "हिंदुस्थानाला वाटेल तर साम्राज्यांतून फुटून निघण्याचा हक्क आहे अशी कबुली सरकारानें द्यावी तरच आपण राऊंड टेबल कॉन्फरन्सला येऊ" असें महात्माजींनी ओढून धरलें होतें. पण पुढें दिल्ली पॅक्ट झाला तेव्हां महात्माजींनी ही अट घातली नाही हें प्रसिद्ध आहे. तसेंच बार्डोलींत सरकारनें अत्याचार केले त्यांची चवकशी झाली पाहिजे अशीहि एक मागणी प्रथम जोराची होती; आणि कित्येक लोकांच्या माहितीप्रमाणें सप्रू-जयकरांचे या मुद्द्यावर लॉर्ड आयर्विन यांच्याशीं थोडेसें घासलेंच. पण एक्झिक्युटिव्ह कौन्सिलमध्येंहि या चवकशीच्या मागणीला किंचित अनुकूलता दिसत होती. तथापि खाजगी मुलाखतींत लॉर्ड आयर्विन यांनी महात्माजींची समजूत घातली ती त्यांना इतकी पटली कीं, या चवकशीचा आग्रह महात्माजींनी सोडून दिला, व सप्रू-जयकरहि या अकल्पित परिवर्तनाने आश्चर्यचकित

झाले म्हणतात. आणि अखेर दिल्ली-पॅक्ट पक्का झाला. त्याच्या अटी पाहिल्या तर त्याहि स्वराज्याचा मुख्य प्रश्न सुटण्याच्या दृष्टीने कांहीं विशेष महत्त्वाच्या नव्हत्या. म्हणून हल्लीहि असें वाटते कीं, एकंदर परिस्थिति महात्माजींना समजावून देणारा कोणी भेटला तर त्या वेळेप्रमाणे या वेळेसहि आतां कायदेभंगाची चळवळ थांबवावी असें त्यांना वाटण्याचा संभव आहे. नाहीं असें नाहीं. आणि ही गोष्ट कोणीं तरी करावी असें जेव्हा आम्ही म्हणतों तेव्हा, पुण्याच्या जाहीर सभेने आपल्या ठरावांत म्हटल्याप्रमाणे, कोणी प्रतिष्ठित व जबाबदार अशा तिऱ्हाइतांनीच या गोष्टींत पुढाकार घेतला पाहिजे व सरकारनेहि तो त्यांना घेऊं दिला पाहिजे.

खुद्द राष्ट्रीय सभेसंबंधाने अशी गोष्ट आहे कीं, वर्किंग कमिटी आदिकरून तिचीं अधिकारी मंडळें बेकायदा ठरविण्यांत आलीं आहेत. फक्त राष्ट्रीय सभा या नांवाची अमूर्त संस्था तेवढी शिल्लक आहे. पण अधिकारी उपमंडळाशिवाय ती स्वतः काहीच करूं शकत नाही. नाहीं म्हणावयास तिचें सर्वाधिकारित्व महात्माजींकडे आहे, व त्याच्याशीं बोलणेंचालणे झालें असता ते इतका तरी तह घडवून आणूं शकतील कीं, ज्यामुळे काँग्रेसच्या अधिकारी मंडळावरील बेकायदेशीरपणाचा शेरा निघून जाऊन वर्किंग कमिटीची सभा भरूं शकेल. महात्माजींची अशा प्रकारची तयारी दिसल्यास लिबरल पक्षाने आपल्याकडून राउंड टेबल कॉन्फरन्सबाबत जें भाडण चालविलें आहे त्याला पाठिंबा मिळेल. आणि १९३१ अखेर म्हणजे महात्माजी राउंड टेबल कॉन्फरन्सहून परत येण्याच्या सुमारास जी स्थिति होती ती पुनः प्रस्थापित होईल. ती तशी प्रस्थापित झाली तरी स्वराज्याच्या चळवळीचा निकाल अमुकच रीतीने लागेल असें आजच सांगतां येणार नाही. पण उलटपक्षीं राउंड टेबल कॉन्फरन्स मोडून तिकडे कॉन्झरव्हेटिव्ह पक्षाच्या मनाप्रमाणें सर्व गोष्टी घडून आल्या, व इकडे हल्लीं चालू आहे तशा प्रकारचा कायदेभंग सुरू राहिला, तरी देखील स्वराज्याच्या चळवळीचा निकाल आजच कांहीं वेगळ्या रीतीने लागेल असें तरी निश्चयाने कोण सांगूं शकेल?

तात्पर्य, युक्त्याप्रयुक्त्या बदलणें ही गोष्ट केव्हा केव्हा फायदेशीर होण्याचा संभव असतो त्याप्रमाणे याहि बाबतींत घडावें असें वाटतें. क्रिकेटच्या खेळांत डाव कुजला म्हणजे चेंडू फेकणारा गडी बदलून पाहतात. किंवा क्रीडांगणांतील खेळाडूंची रचना बदलून पाहतात. तोच दाखला येथेहि घेण्यास हरकत नाही. अर्थात समेट घडवून आणण्याचा अधिकार व जबाबदारी ही शेवटीं महात्माजींची असली तरीहि तो करावा असें सुचविण्याचा लहानसा अधिकार तिऱ्हाइतांना खचित आहे. विशेषतः ज्या लोकांनी या कायदेभंगाच्या चळवळींत भाग घेतला व त्याबद्दल शिक्षा भोगून मोकळे झाले, त्यांना तरी हा लढा संपवावा असे खरोखर वाटत असल्यास त्यांनी तसें म्हणण्याला पुढे यावें. म्हणजे त्या सूचनेला विशेष महत्त्व येईल. एका बाजूला, रणक्षेत्रावर पडल्याप्रमाणे जे लोक या कायदेभंगाच्या चळवळींत पडून आज प्रत्यक्ष तुरुंगांतच आहेत, त्यांना याविषयी मत प्रगट करण्याला अवसर नाही हें उघड आहे. उलटपक्षीं वाटेल तर असें खुशाल म्हणावें कीं, जे या युद्धांत सामील झालेच नाहीत त्यांना तें थांबवा म्हणण्याचा अधिकार पोचत नाही पण जे या दोहोंमधल्या स्थितींत आहेत, म्हणजे जे या चळवळींत एक वेळ सामील झाले पण आता तारतम्य दाखवून मोकळे राहिले आहेत त्यांना जर युक्तिप्रयुक्तीने हा कुजलेला डाव संपवावा असें वाटत असेल तर त्यांच्या म्हणण्याला अर्थातच अधिक मान मिळेल.

दुसरीहि एक गोष्ट ध्यानांत घेण्यासारखी आहे ती अशी कीं, लिबरल पक्षाचें कोणत्याना कोणत्या रीतीने समाधान करून राउंड टेबल कॉन्फरन्ससारखे कांहीहि भरलें, व त्यांत म. गांधी नसले तर त्यांतून काय निष्पन्न होईल याची कल्पना कोणालाहि होईल. पण सुदैवाने लिबरल पक्षांतील लोकांचीहि अशी इच्छा दिसते कीं फिरून राउंड टेबल कॉन्फरन्स भरवावें; व त्याचा अर्थ पर्यायाने असा कीं, म. गांधी हे पूर्वीप्रमाणे या कॉन्फरन्समध्ये स्वस्थानीं असावे. महात्माजी व लिबरल पक्षाचे पुढारी दोघेहि मिळून ठराविक एकच वाक्य राउंड टेबलाशीं बोलत नसले तरी, महात्माजींचें सान्निध्य व त्यांची अमर्याद मागणी याचा स्वतः आपण व आपली समर्याद मागणी यांना किती मोठा आधार असतो हे लिबरल लोक जाणतात. तर त्याहि दृष्टीने महात्माजी राउंड टेबलला हजर असलेले चांगले. आम्हीं सुचविल्याप्रमाणे जर समेट न झाला तर सरकार सहजच म्हणूं शकेल कीं "आम्ही राउंड टेबल कॉन्फरन्स पुनः भरविलें खरें, पण तेथे हजर राहण्याकरिता जो तह अवश्य झाला पाहिजे तो करण्याला गांधी तयार होत नाहीत त्याला आम्हीं काय करावें?" महात्माजींच्या गैरहजेरींत राउंड टेबलचा गडबडगुंडा उरकून घेण्याला सरकारानें तत्पर असावें हें स्वाभाविकच आहे. तेव्हा ही त्यांची युक्ति फसावयाची तर तदनुरूप प्रतियुक्तिच कांहीं तरी योजणें अवश्य आहे. जुन्या पद्धतीने राउंड टेबल कॉन्फरन्स

भरवावें हें जो जो कोणी तोंडानें म्हणतो तो तो समेट घडावा व म. गांधी बंधमुक्त व्हावे असें अप्रत्यक्षपणे म्हणतोच म्हणतो, हें कोणाच्या लक्षांत चटकन येत नसलें तरी तें सर्वस्वी खरें आहे; याचाहि विचार राउंड टेबल कॉन्फरन्स भरवावें असा पाठ घोकणारांनी लक्षांत ठेवला पाहिजे !

# होअरसाहेबांच्या निषेधाचा जाहीरनामा

भारतमंत्री सर सॅम्युएल होअर यांनी ता. २७ जून रोजीं भाषण करून यापुढे गोलमेज परिषद भरणार नसल्याचें जाहीर केलें. त्या गोष्टीचा निषेध करण्याकरितां खाली दिल्याप्रमाणें हिन्दी लोकपक्षातर्फे जाहीरनामा प्रसिद्ध झाला आहे.

" भारतमंत्री यांनी ता. २७ जून रोजीं जाहीर केलेलें धोरण गोलमेज परिषदेच्या पद्धतीशीं इतकें विसंगत आहे कीं तें कोणासहि पसंत पडणार नाहीं. हिंदी प्रतिनिधि व ब्रिटिश प्रतिनिधि हे समान दर्जाचे आहेत व त्यांच्यामध्ये ज्या बाबींसंबंधीं एकवाक्यता होईल त्या बाबी पार्लमेंटपुढे मांडावयाच्या स्वराज्यविषयक योजनेचा पाया म्हणून समजल्या जातील ही कल्पना होअर यांच्या धोरणानें उलथून पाडली आहे. गोलमेज परिषदेचा बूट वरील दोन कल्पना साध्य करण्याच्या हेतूनें काढण्यांत आला होता. व परिषदेच्या त्याच पद्धतीचा मेळ स्वराज्याची योजना लवकर सिद्ध होण्याच्या इच्छेशीं घालतां आला असता. गोलमेज परिषदेच्या पद्धतीनें पार्लमेंटाच्या श्रेष्ठपणास कसा धक्का बसतो हेंच आम्हांस समजत नाहीं. म्हणून अशा परिस्थितींत गोलमेज परिषदेच्या अभावीं नवीन राज्यघटना बनविण्याच्या कामात आमच्या देशबांधवांपैकीं ज्या कोणाची सरकाराकडून सहकारिता मागण्यांत येईल त्यांनी सहकार्य करूं नये असें आमचें मत आहे. "

ने. ना. श्रीनिवास शास्त्री, सर सय्यदअली इमाम, सर तेजबहादुर सप्रू, श्री. न. चिं. केळकर, श्री. सी. वाय. चिंतामणी, श्री. एम. आर. जयकर, ना. राजा सर रामपाल सिंह, श्री. गो. कृ. देवधर, पं. हृदयनाथ कुंझरू, राय राजेश्वर बली, श्री. ए. पी. सेन, मि. सय्यदअली झईर, ना. मुनशी, नारायणप्रसाद अस्थाना, मि. रालिया राम, श्री. सच्चिदानंद सिंह, श्री. के. के. सकट, प्रो. गुलशनराय, रायबहादुर दुर्गादास, मि. आर. पी. मसानी, मि. एच. व्ही. पोचखानवाला, मि. मूळचंद मालवीय, सद्दीक हसन एम. एल. ए., रायबहादुर बिहारीलाल, सरदारबहादुर मेहेताबसिंग, लाला गणपतराय, भाईलाल तुळसीदास पटेल, अमरनाथ आग्रवाला, बॅ. बदरुल इस्लामअल्ली, बॅ. अबदुल कयूम, हशमसुद्दीन हशम, मि. एम. एस. कॅप्टन, मुनशी गजधर प्रसाद, डॉ. एम. एच. फरुकी, लाला संगमलाल आग्रवाला, लाला गिरधारीलाल आग्रवाला, श्री. शरच्चंद्र चौधरी, श्री. निरंजनलाल भार्गव, मि. एस. जे रुस्तुमजी, सरदार निहालसिंग, भगत गोविंददास, डॉ. निहालचंद, मि. व्ही. एन. शेट्टी, सरदार करतारसिंग, शा. केशरलाल हरिलाल, मि. एन. जी. जिनवाला, डॉ. ए. एन. पाठक, मि. एस. के. परळीकर, मि. सी. एस. पटेल, मि. जे. सी. त्रिवेदी, बॅ. लाभसिंग, लाला भानराम, डॉ. र. पु. परांजपे, श्री. बा. सि. कामत, श्री. वि. रा. शिंदे, सर कावसजी जहांगीर, ना. सर फिरोज सेठना, डॉ. आर. के. नायडू, रा. ब. हणमंतराम रामनाथ, श्री. ल. र. गोखले, बॅ. व्ही. एन. चंदावरकर, सर वसंतराव दाभोळकर, श्री. ना. म. जोशी, मि. बमन बेहराम, पं. रमाकांत मालवीय, मि. एम्. ए. खान, बॅ. गो. का. गाडगीळ, डॉ. व्ही. सी. गोखले, डॉ. जी. एस. सहस्रबुद्धे, श्री. वा. कृ. भावे, श्री. पां. ना. राजभोज, मि. कृष्णाराम मेहता, मि. मथुरादास बसनजी, मि. बी. एन. गमाडिया, दि. ब. दौलतराय, ठाकूर हनुमानसिंग. रायबहादुर कांताप्रसाद, महमद नस्सीम (लखनौ), महमद अमीन मलिक, मि. एम. एल. पुरी, श्री. इंदुभूषण बानर्जी, मुनशी हरनंदन प्रसाद, मि. जे. ए. डीलो, मि. ए. पी. डुबे, मि. सुरेंद्रनाथ वर्मा, सैय्यद हैदर मेहेदी, मि. जे. एन. बसू, श्री. कमलाकांत वर्मा, डॉ. जयराज बिहारी, पं. बी. एन्. गुर्तु, रायबहादुर सोहनलाल, लाला फकीरचंद, देवराज सोहनी, मि. महमद दिन जाम, मि. एस. सी. चतर्जी, ठाकूर राजेंद्रसिंग, मणिलाल हरिलाल मेहता, मि. तेहेरअली अबदुल अली, मि. मणिलाल दलाल, मि. करसनदास हिरालाल, मि. आर. पी. पारख, मि. एस्. आर. दावर, लाला मोहनलाल, ॲडव्होकेट मुकुंदलाल ( लाहोर ).

# हिंदुस्थानांतील शेतीची सुधारणा

## सर टी. विजयराघवाचार्य यांचें व्याख्यान

पुसा येथील 'इम्पीरियल कौन्सिल ऑफ ॲग्रिकल्चरल रिसर्च' या संस्थेचे मुख्याधिकारी सर टी. विजयराघवाचार्य हे पुणे येथे आले असता त्या संस्थेच्या कामगिरीसंबंधी व शेतीच्या सुधारणेसंबंधी त्यांचें एक व्याख्यान 'सेवासदना'च्या सभागृहांत ता. ६ रोजीं सायंकाळीं ६ वाजता 'डेक्कन ॲग्रिकल्चरल असोसिएशन' व 'सेवासदन' या संस्थांतर्फे करण्यांत आलें. श्री. देवधर व कामत यांनी विनंति केल्यावर दि. ब. कंबळी हे अध्यक्षस्थानीं विराजमान झाले आणि नंतर व्याख्यात्यांनी आपल्या भाषणास सुरुवात केली. स्वतःसंबंधी विनोदप्रचुर उल्लेख करून ते म्हणालेः—

" शेतकी कमिशनच्या शिफारशीस अनुसरून तीन वर्षांपूर्वी 'इंपीरियल कौन्सिल' स्थापन करण्यांत आलें. त्याचा उद्देश असा कीं, हिंदी शेतकीला उपयोगी पडणारे शास्त्रीय शोध करण्यास प्रोत्साहन देण्यांत यावें.तो उद्देश साध्य करण्यासाठी कौन्सिलचे दोन भाग केले आहेत; पैकीं एक " सल्लागारमंडळ", तें केवळ तज्ज्ञांचें बनलेलें असतें. त्यांची संख्या ४१ असते. शेतकीविषयक संस्थांचे चालकहि त्यांत समाविष्ट केलेले आहेत. हे सर्व तज्ज्ञ कौन्सिलकडे येणाऱ्या साऱ्या योजना शास्त्रज्ञानाच्या निकषावर घासून पाहतात आणि त्यांत ज्या योजना योग्य ठरतील त्यांची शिफारस सल्लागारमंडळ प्रशासकमंडळाला करतें.

प्रशासकमंडळाचे सभासद २१ असून त्यांत निरनिराळ्या प्रांतांतील तसेच हैद्राबाद म्हैसूर व बडोदे या संस्थानांतील शेतकी-दिवाण व व्यापारी संघाचे शेठ वालचंद हिराचंद यांसारख्या प्रतिनिधींचा समावेश केलेला असतो. व्यावहारिक तारतम्य चालवून व आर्थिक स्थितीकडे लक्ष पुरवून हें प्रशासकमंडळ कोणत्याहि योजनेची छाननी करतें. बहुधा या मंडळाचे सभासद शेतकीचे तज्ज्ञ नसतात, तर सर्वसामान्य व्यवहारज्ञान बाळगणारे असतात. तरी त्यांचा उपयोग आम्हांला विशेष होतो हें लक्षांत ठेवलें पाहिजे. शास्त्रज्ञाप्रमाणेच व्यवहारज्ञानीहि आवश्यक असतो. किंबहुना कधी कधी तोच अधिक कल्याण करूं शकतो. इंग्लंडाचा युद्धमंत्री बंदुकीच्या घोड्याला हातहि न लावलेला असत नाही काय ? तीच गोष्ट भारतमंत्र्याची. हिंदुस्थानांत वास्तव्य न केलेला इंग्रज त्या जागेला लायक ! आणि त्याला हिंदुस्थानाच्या परिस्थितीची तोंडओळखहि नसेल तर तो विशेषच लायक !! उगाच तज्ज्ञांची सुलतानी तरी काय कामाची ?

सुदैवाची गोष्ट अशी कीं, आमच्या कौन्सिलाचे तज्ज्ञ व व्यवहारज्ञानी यांच्यांत कधी छत्तिसाचा आंकडा आला नाही. आमच्या प्रशासकमंडळाने तर हिंदी राजकारणाच्या पुढेहि आघाडी मारली आहे ! कारण त्यात संस्थानांचे प्रतिनिधी असल्यामुळे तें एक प्रकारची संयुक्त घटना म्हणजे फेडरेशनच होय. संयुक्त राज्यघटना जेव्हा अवतीर्ण व्हावयाची असेल तेव्हा होवो पण तिच्या कल्पनेच्या आधी तीन वर्षे आमचें फेडरेशन अस्तित्वांत आलें आहे आणि तें यशस्वी रीतीनें चाललें आहे.

आमच्या कौन्सिलाने एक कार्य असें केलें कीं, शेतकी क्षेत्रांतील सरकारी तज्ज्ञ व जनतेंतील तज्ज्ञ यांची गांठ घालून दिली. त्याच्याशीं विद्यापीठानेंहि सहकार्य केलें आहे. संशोधन करण्याचें दुसरें काम कौन्सिलनें चालविलें आहे. शेतकींत लक्ष घालणाऱ्या कोणाहि संस्थेला व कोणाहि व्यक्तीला आमच्या कौन्सिलाचा फायदा घेतां येण्यासारखा आहे. एका प्रोफेसराने शेतींतील एका रोगाचें संशोधन करण्यासाठीं कांही मदत मागितली असता ती आम्हीं त्याला दिली व तिच्या साहाय्याने त्याने संशोधन करून कांही शोधहि लावले आहेत. ते शोध लवकरच जगापुढे येऊन जगविख्यात होतील. त्याचप्रमाणे मुंबई, डाक्का, अलाहाबाद, आग्रा, पंजाब, मद्रास, म्हैसूर, अन्नामलया वगैरे विद्यापीठांनाहि आम्हीं देणग्या दिलेल्या असून बनारस विद्यापीठालाहि देणार आहों. एम्. एससी.-सारख्या पदव्या धारण करणारांना प्रोत्साहन देण्याचें कार्यहि चालू आहे. सुमारें १४० पदवीधर तरुण आज हिंदुस्थानाच्या चतुःसीमेंतच नव्हे, तर इराण बलुचिस्थान वगैरे परदेशांच्या सीमेवरहि शेतकीच्या संशोधनाचें कार्य बिनबोभाट चालवीत आहेत.

निरनिराळ्या पोटमंडळांमार्फतहि कौन्सिलाचें काम जोराने चालू आहे. साखरेचेंच एक उदाहरण घ्या. पूर्वी मुंबई, सं.प्रांत वगैरे प्रांतिक सरकारांनी हिंदुस्थान-सरकाराला असें कळविलें होतें कीं, जावा येथील साखरेशीं टक्कर देणें येथील साखरेला परवडत नसल्याने तिची धडगत दिसत नाही ! पण १९२९ सालींच आम्हीं साखरेचा प्रश्न हातीं

घेतला. आम्हीं हिंदुस्थानसरकारला सूचना केल्या-प्रमाणे तो प्रश्न टॅरिफ बोर्डाकडे गेला व त्याच्या शिफारशीनुसार गेल्या वर्षी असेंब्लीने संरक्षक जकात बसविलीहि. आमची अपेक्षा अशी आहे कीं, पंधरा वर्षे संरक्षण मिळालें तर हिंदुस्थान साखरेच्या बाबतींत स्वतंत्र होईल. सध्या दरसाल जावाहून ९ लक्ष टन साखर येथे येते व ती १५–२० कोटी रुपये नेते. ते पैसे वांचून बेकारीहि कमी होईल.

कारखाने काढण्यासंबंधीहि आम्ही खटपट करतों. एका गृहस्थाला मुद्दाम परदेशाला पाठवून नव्या नव्या यंत्रांची माहिती त्याजकडून मागविली. तिच्या अनुरोधाने उत्तर–हिंदुस्थानांत २४ कारखाने निर्माण होत आहेत. त्याचप्रमाणे शेतींतील मालाचे गुण व प्रमाण वाढविण्याच्या दृष्टीनेहि प्रयत्न होत आहेत. एका संशोधकाने उंसाचे पीक अवघ्या सहा महि-न्यांत येईल अशी योजना केलेली आहे. या सर्व उपायांसमवेत इतरहि कांही साधनांचा अवलंब केल्याशिवाय शेतीची सुधारणा होणें शक्य नाही. माझ्या मतें तीं साधनें अशीं—एकरीं उत्पन्न होणाऱ्या मालाचें प्रमाण वाढवावें व त्याचा खर्च कमी करावा. वाहतुकीचीं साधनें वाढवावीं व विक्रीचा त्रास कमी करावा. कानडांत पांच पांच मैलांच्या अंतरावर 'कोठारें' असतात आणि तेथील संस्था शेतकऱ्याचे पदरांत मालाच्या किंमतीचा शें. ३५ इतका हिस्सा माल विकण्यापूर्वी एक आठवड्याचे आंत टाकतात व बाकीची रक्कम हप्त्यांनी देतात. त्यामुळे शेतकऱ्याची आर्थिक कुंचबणा होत नाही. जरुरीपुरतें म्हणजे वर्तमानपत्रें वाचण्याइतकें शिक्षण शेतकऱ्यांना मिळालें पाहिजे. तसेंच त्यांच्या जीवनांत उल्हास उत्पन्न होण्याच्या कांही सोयी झाल्या पाहिजेत. कानडाच्या प्रत्येक खेड्यांतील लोक-रंजनाचें काम बिनतारायंत्रानें केलें जातें.त्याचप्रमाणें शिक्षक मोटारींतून पुस्तकें नेऊन 'फिरती शाळा' चालवीत असतो. अशी स्पृहणीय स्थिति हिंदी शेतक-ऱ्याला लवकर प्राप्त झाली पाहिजे."

विजयराघवाचार्य यांच्या या मुख्य भाषणानंतर त्यांना कांही प्रश्न विचारण्यांत आले. दि. ब. गोडबोले म्हणाले, "जमिनीची चीरफाड होत आहे तोंपर्यंत जमिनीच्या मालकाची सुधारणा होणार नाही. अर्धा गुंठा जमीन व एक नारळीचें झाड एवढा वांटा धारण करणारे शेतकरी कोंकणांत पुष्कळ आहेत. इंदापूर, पाटस वगैरे तालुक्यातहि अशी दुःस्थिति आहेच. वास्तविक नळीखालील एक एकर जमीन किंवा कोरडवाहू १० एकर जमीन हातीं असेल तरच शेतकऱ्याचा तरणोपाय असतो. तरी या बाबतींत कौन्सिलने काय केलें आहे?" हा प्रश्न कायद्याचा असून गुंतागुंतीचा आहे आणि फ्रान्स वगैरे देशांत निरनिराळे अनुभव घेऊन हिंदी वारसापद्धतिच स्वीकारण्यांत आली असें उत्तर व्याख्यात्यांनी दिले. कोरडवाहू शेतीच्या सुधारणे-संबंधीच्या प्रश्नाला त्यांनी उत्तर दिले कीं, त्याबाबत ४-५ योजना अमलांत आलेल्या आहेत. कौन्सिलच्या आर्थिक स्थितीबद्दल व्याख्याते म्हणाले, "प्रारंभीं २५ लाख रुपयांची देणगी हिंदुस्थानसरकारानें मंजूर केली व त्यांपैकीं १५ लाख आतापर्यंत मिळालेहि आहेत. शिवाय दरसाल ५ लाखांचीहि देणगी मिळते. पण ती फार तुटपुंजी आहे. ऑस्ट्रे-लियांत तिच्या तिप्पट व अमेरिकेंत ५०पट देणगी दिली जाते."

आभारप्रदर्शनानंतर सभेचें काम आठच्या सुमा-रास समाप्त झालें.

# ज्ञातिविषयक प्रश्नांवर राष्ट्रसंघाचा तोडगा

अल्पसंख्याकांच्या हिताहिताचा प्रश्न हिंदुस्थानांत प्रथमच नव्याने निघाला व यापूर्वी तो दुसऱ्या कोणत्याहि राष्ट्राच्या ओळखीचा नव्हता अशी वस्तुस्थिति नाही. उलट असें म्हणतां येईल कीं, महायुद्धानंतर ह्या प्रश्नाला विराट स्वरूप प्रथम युरोपांत आलें व मगच त्याची परिभाषा हिंदुस्थानांत उचलण्यांत आली. युरोपांत हा प्रश्न अगोदर सुटल्यामुळे वास्तविकपणें हिंदुस्थानांतहि तो एका अर्थानें सुटल्यासारखाच वाटावयास पाहिजे होता. परंतु राजकीय गुलामागिरीच्या मगरमिठींत सांपडलेल्या या हतभागी देशांत त्याला एवढें तीव्र स्वरूप शत्रुपक्षानें आणिलें आहे कीं, स्वराज्याचा झगडाहि बाजूस पडून या ज्ञातिविषयक हक्कांच्या भांडणांतच बुद्धि व शक्ति यांचा अपव्यय व्हावा! मागील खेपेस सांगितलेल्या मुसलमानांच्या चौदा मागण्या ऊर्फ मुद्दे, त्याकरिता मुसलमानांनी चालविलेला अट्टाहास व चौदाहि मुद्द्यांचे गाठोडें त्यांच्या पदरांत पडलें नाहीं तर राष्ट्रांत यादवी युद्ध सुरू करण्याचा ते घालीत असलेला धाक पाहिला म्हणजे कांही वेळा ज्ञातिविषयक हितबुद्धीपेक्षां त्याचा स्वराज्यद्रोहच अधिक जोराचा आहे असें वाटल्याशिवाय राहत नाही.

मुसलमानांचा कांगावा पाहून कोणालाहि असें वाटेल कीं, या गरीब, अश्राप व अल्पसंख्य मुसलमानांना ते मागतात ते हक्क दिले नाहीत तर बहुसंख्य हिंदु लोक स्वराज्याच्या नव्या अमदानींत त्याच्यावर अनंत जुलूम करून त्यांना गारद केल्याविना राहणार नाहीत; पण वस्तुस्थिति मात्र याच्या अगदी उलट आहे. अल्पसंख्य मुसलमान समाज बहुसंख्य हिंदूंपेक्षां सर्व प्रांतांत अधिक शिरजोर असलेला दृष्टीस पडतो. मग मुसलमानी प्रांतांत तर तो घोड्यावर असल्यास नवल काय! अल्पबलवाल्यांना संरक्षणाची जरूरी अधिक हें तत्त्वतः कबूल. परंतु अल्पसंख्याकांचें संरक्षण करण्याची योजना प्रत्येक घटनेंत पाहिजे या युरोपियन सिद्धांतांतील अल्पसंख्य एवढाच शब्द मुसलमानांनी व राज्यकर्त्यांनी उचलला व त्यांत ग्रथित केलेल्या तत्त्वाला मात्र धाब्यावर बसविलें! त्या दोघांनाहि हिंदी राष्ट्रीय पक्षाचा एकच सवाल आहे तो हा कीं, जर राष्ट्रसंघाची शब्दयोजना तुम्ही उचलतां तर या बाबतींतील राष्ट्रसंघाचा दंडक कां मानीत नाही? सर्व जगांतील शहाणे मुत्सद्दी एकत्र जमून त्यांनी जी व्यवस्था करून ठेवली, जे नियम घातले व जीं तत्त्वें मान्य केलीं ती व्यवस्था, ते नियम व तीं तत्त्वें इंग्रज सरकाराने कां मानूं नयेत हा एक मोठा प्रश्नच आहे. पण सरकारने तसें केलें असतें तर स्वराज्याचा मार्ग मोकळा झाला असता व ब्रिटिश मुत्सद्द्यांच्या कुटिल नीतीस वावरण्यास क्षेत्रच मिळालें नसतें! युरोपांतील अल्पसंख्याकांचे प्रश्न सोडविण्याकरिता राष्ट्रसंघाने अतिशय मेहनत घेतली, निरनिराळ्या सर्व बाजूंनीं त्यांची छाननी केली व शेवटीं अगदी निश्चित स्वरूपाचे ठाम निर्णयहि करून टाकले. राष्ट्रसंघ इतर राष्ट्रांना हे निर्णय मान्य करण्यास भाग पाडतो, मग त्या संघाच्या मूळच्या संस्थापकांपैकीं एक अशा हिंदुस्थानाला ते नियम संघाने कां लावूं नयेत किंवा हिंदुस्थानाने तरी आपण होऊन त्या नियमांचें बंधन आपल्यावर कां घालून घेऊं नये?

राष्ट्रसंघाने घालून दिलेल्या तत्त्वानुसार ज्यांनी आपली घटना केली असे देश पुष्कळ आहेत. अल्बेनिया-ऑस्ट्रिया, बल्गेरिया, इस्थोनिया, फिनलंड, ग्रीस, हंगेरी, लटाव्हिया, लिथुनिया, मेमेल, पोलंड, रुमानिया, सर्ब क्रोट राज्य, वरचा सायलेशिया, झेकोस्लोव्हाकिया व तुर्कस्थान या सोळा देशांत हा अल्पसंख्याकांचा प्रश्न तीव्र स्वरूपांत होता. व त्या सर्वांनी आपआपले प्रश्न राष्ट्रसंघाने घालून दिलेल्या तत्त्वानुसार सोडविले आहेत. अर्थात् हिंदुस्थानांतील मुसलमान, शीख, अस्पृश्य वगैरे अल्पसंख्याकांचे प्रश्नहि त्याच तत्त्वावर सोडविले पाहिजेत. म्हणून राष्ट्रसंघाने घालून दिलेल्या दंडकांतील तत्त्वें काय आहेत हें आता पाहूं.

अल्पसंख्य या नामाभिधानाचा अर्थ करतांना राष्ट्रसंघाने असा निर्बंध घातला आहे कीं, वंश, भाषा व धर्म या तीनहि बाबतींत बहुसंख्य समाजांत जे लहान गट मिळूं शकत नाहीत ते अल्पसंख्य समजावे. अल्पसंख्य लोक त्या देशांत कायमचे राहणारे असले पाहिजेत म्हणजे त्यांचें राजकीय भवितव्य बहुसंख्य लोकांशीं निगडित झालें पाहिजे. अल्पसंख्याकांचें लोकसंख्येशीं प्रमाण काय असावें तें त्यांनी ठरविलें आहे. अशा रीतीने अल्पसंख्याकांची व्याख्या केल्यानंतर त्यांना दिल्या जाणाऱ्या हक्कांचीहि मर्यादा व क्षेत्र राष्ट्रसंघाने आंखून दिलें आहे. अल्पसंख्याकांची भाषा, संस्कृति व धर्म यांच्या संरक्षणाची व संवर्धनाची व्यवस्था राष्ट्राने केली म्हणजे संपलें. तसेच त्यांना नागरिक या नात्याने इतरांबरोबरच सर्व हक्क सारखे दिले म्हणजे अल्पसंख्याकांना आपल्या पराक्रमाने राष्ट्राशीं एकजीव होतां येतें व त्यांना इतरांबरोबरच स्वोन्नतीची संधि मिळते असें राष्ट्रसंघाचें मत आहे. याशिवाय निषेधार्थक अशींहि बंधनें राष्ट्रसंघाने

घातलीं आहेत. जे आपल्यास कायमचेच परकीय समजतात त्यांना अल्पसंख्याकांचे हक्क देण्यांत येत नाहीत; कारण तसें केलें तर एका राष्ट्राच्या पोटांत अनेक राष्ट्रेंच उत्पन्न होतील. अल्पसंख्याक म्हणजे कांही विशिष्ट हक्क कायमचे भोगणाऱ्या लोकांची जात नव्हे. आज ना उद्या त्या राष्ट्राच्या राजकीय भवितव्यतेंत त्या अल्पसंख्याकांनी आपलें भवितव्य एकजीव केलेंच पाहिजे. अल्पसंख्य म्हणविणारांना स्वतःपुरती स्वतंत्र अशी राजकीय संघटना करण्याचाहि अधिकार नाही. एरव्ही हे लोक संघटित होऊन सबळ होताच मुख्य राज्याधिकारच पटकावतील. तसें होऊं नये म्हणून अशा अल्पसंख्याकांना प्रथमतःच स्वतंत्र असे राजकीय हक्क दिले जात नाहीत. तसेंच अल्पसंख्याकांना जर इतरांपेक्षां अधिक सवलती दिल्या तर त्यांचाच जुलूम बहुसंख्याकांवर होईल इकडेहि लक्ष ठेविलें पाहिजे अशा तऱ्हेची संघाची योजना आहे.

ग्रीसमध्ये मुसलमानांची वस्ती बरीच आहे. तेथे मुसलमानांचे धार्मिक कायदे त्यांना लागू केले आहेत. तसेंच त्यांच्या मशिदी, कबरी व स्मशानें यांची व 'वक्फ' देणग्यांची स्वतंत्र व्यवस्था केली आहे. मुलांच्या शिक्षणाचीहि विशेष योजना केली आहे. पण येथेच या हक्कांची परिसमाप्ति होते. बाकीचे सर्व हक्क इतर नागरिकांप्रमाणेंच त्यांना मिळतात. श्री. सरोजिनी नायडू या झेकोस्लोव्हाकियाच्या अध्यक्षाना भेटल्या होत्या व त्यांनी तिकडून असा संदेश आणला होता कीं, हिंदुस्थानांत जर शांतता नांदावयाची असली तर तेथील अल्पसंख्याकांना संतुष्ट ठेवलें पाहिजे. हें तत्त्व प्रत्येक राष्ट्रीयास मान्य आहे व झेकोस्लोव्हाकियांत मुसलमानांसारख्या अल्पसंख्य समाजाला जे हक्क देण्यांत आले आहेत ते सर्व द्यावयास हिंदुस्थान तयारच आहे. पण एकदा तीं तत्त्वें मान्य केलीं म्हणजे मुसलमानांच्या चौदा मागण्यांपैकीं पुढील सहा तर उडूनच जातात—(१) स्वतंत्र मतदारसंघ (२) कायदेमंडळांत राखीव जागा ठेवणें (३) लोकसंख्येच्या प्रमाणापेक्षां अधिक प्रतिनिधि (४) नोकऱ्यांची लोकसंख्येच्या प्रमाणांत वांटणी (५) प्रधानमंडळांतील प्रतिनिधि (६) सर्व अधिकार प्रांताकडेच राहावयाचे. प्रांतांनी सोडून दिलेले तेवढेच हक्क मुख्य संयुक्त सरकारास मिळावयाचे. या मुसलमानांच्या प्रमुख मागण्या राष्ट्रसंघाने घालून दिलेल्या चौकटींत बसत नाहीत.

भाषा, संस्कृति व धर्म यांच्या संरक्षण-संवर्धनाची एकदा तजवीज केल्यानंतर राजकीय बाबतींत अल्पसंख्याकांना स्वतंत्र मतदारसंघ अगर जातवार प्रतिनिधि देणें राष्ट्रसंघास मान्य नाही. कारण जर देशांत राष्ट्रीय हितबुद्धीचा विकास होऊन एकराष्ट्रीयत्वाची भावना वाढवावयाची असली तर राजकीय क्षेत्रांत आकुंचित अशा ज्ञातिनिष्ठ कल्पनांची राजकारणावर कुरघोडी होऊं देतां उपयोगी नाही, हा सर्वमान्य असा सिद्धान्त आहे. नेहरू रिपोर्टांत व सर्वपक्षीय परिषदेच्या ठरावांत याच एका बलिष्ठ कारणाकरिता जातवारीच्या तत्त्वाला अर्धचंद्र मिळाला. खुद्द मॉंटेग्यू चेल्म्सफर्ड रिपोर्टांत, जाइंट पार्लमेंटरी कमिटीच्या शिफारशींमध्ये या जातवार मतदारसंघाविरुद्ध मत दिलें आहे. राष्ट्राची उभी-आडवी चीरफाड धर्म व जात या तत्त्वावर केली तर भविष्यकाळीं कधीहि एकराष्ट्रीयत्वाची भावना उत्पन्न होणें शक्य नाही असा त्यांचा स्पष्ट शेरा आहे. सायमन कमिशनलासुद्धा हे स्वतंत्र मतदारसंघ मान्य नाहीत असें त्याच्या रिपोर्टांत नमूद आहे. याहिपेक्षां अधिक महत्त्वाची गोष्ट म्हणजे मुख्य प्रधान मि. राम्से मॅक्डोनाल्ड आता जातवारीच्या प्रश्नाचा निर्णय देणार आहेत, त्यांचें मत तरी याला अनुकूल असावयास पाहिजे होतें. पण तें तसें नाही. त्यांनासुद्धा या योजनेंत राष्ट्राचें मरण दिसतें.

कॉमन्स सभेंत भाषण करतांना मि. राम्से मॅक्डोनाल्ड म्हणाले होते कीं, "निवडणुकी करतांना जातवार गट तयार केले तर राजकीय तत्त्वावर पक्षांची संघटना होणार कशी? स्वराज्य जर भक्कम पायावर उभें करावयाचें असलें तर जात, धर्म व वंश यांच्या तत्त्वावर पक्ष उत्पन्न करून चालणार नाही. राजकीय दृष्ट्या सर्व जाती व धर्म सारख्या दर्जाचे असले पाहिजेत, तरच राष्ट्र या दृष्टीने राष्ट्रीय प्रश्नाकडे त्यांना पाहतां येईल. मतदारसंघ संयुक्त असावे, परंतु जागा राखून ठेवाव्यात असेंहि सांगतात. पण हेंहि मला मान्य नाही. तसेंच एका जातीला प्रमाणापेक्षां अधिक जागा द्याव्या असेंहि सांगण्यांत येतें. परंतु या लोकांच्या लक्षांत हें कसें येत नाही कीं, लोकसंख्येच्या प्रमाणाबाहेर जागा एका जातीला द्यावयाच्या असें ठरलें तर दुसऱ्या एखाद्या जातीला लुबाडल्याशिवाय या जादा जागा आणावयाच्या कोठून? या सर्व गोष्टींचा विचार केला म्हणजे ही जातवारीची कल्पना मान्य करणें म्हणजे दगडाच्या भिंतीवर डोकें आपटून घेण्यासारखें आहे!" हीं मतें स्पष्टपणें मांडणारे मि. मॅक्डोनाल्ड हेच जर उद्या जातवारीच्या तत्त्वावर उभारलेल्या स्वतंत्र मतदार संघाची तळी उचलूं लागले तर ब्रिटिश राजकारणांत प्रामाणिकपणा राहिला नाही असाच सर्वांचा समज झाल्यास नवल काय?

हें झालें मि. मॅक्डोनाल्ड यांचें मत. या प्रश्नाकडे स्वतंत्र दृष्टीने पाहणारे मि. ब्रेल्सफोर्ड यांनी तर जातवारीच्या तत्त्वाचा कडक शब्दांनी निषेधच केला आहे. ते

म्हणतात, "लोकशाहीचीं सर्व तत्त्वें प्रत्यक्ष व्यवहारांत जर आणलीं नाहीत तर हिंदुस्थानची राजकीय प्रगति होणें शक्य नाही. एका गोष्टीबद्दल तरी कुचराई नको.स्वतंत्र मतदारसंघ लोकशाहीच्या मुळावरच घाव घालणारे असल्यामुळे पार्लमेंट किंवा लोकसभा जातवारीवर निर्माण झालेल्या पक्षाकडून चालणेंच शक्य नाही. कारण त्या व्यवस्थेत राजकीय पक्षांच्या संघटनेला वाव नाही. व त्या दृष्टीने लोकमत सुशिक्षित करणेंहि अशक्य आहे. जातवारीवर उभारलेला प्रत्येक पक्ष आपल्या ज्ञातिबांधवांकरिता प्रधानाच्या जागेपासून तों पोलीस पट्टेवाल्याच्या जागेपर्यंत, किती अधिक नोकऱ्या पटकावितां येतात इकडेच अधिक लक्ष देईल. यामुळे एकराष्ट्रीयत्वाची भावना तर उत्पन्न व्हावयाची नाहीच; परंतु भांडणें व कलह मात्र माजतील." सर चिमणलाल सेटलवाड हे तर हिंदुसभावाले नाहीतच. पण तेहि म्हणतात कीं, "राजकीय मतभेदाच्या तत्त्वावर पक्षभेद न होता जर ते जातवारीच्या तत्त्वावर झाले तर स्वराज्यसंस्था स्वातंत्र्य मिळविण्याच्या बुद्धीने चालविणें अशक्य होईल. प्रधानमंडळ जो आतां निकाल देणार आहे तो अल्पसंख्याकांना खुष करण्याकरिता दिला जाईल असें मला वाटत नाही. पण तो तसा दिला गेल्यास सुधारणांचा गाडा पुढे ढकलणें शक्य होणार नाही हें खास."

वरील सर्व मतांचा निष्कर्ष पुढीलप्रमाणें काढता येतो. (१) जातवार मतदासंघ मान्य करणें म्हणजे लोकशाहीच्या मुळावरच घाव घालण्यासारखें आहे. कारण, जबाबदार राज्यपद्धति प्रत्यक्षपणें अमलांत येईल तेव्हा जीं प्रधानमंडळें बनतील तीं एकाच धर्मीयांचीं बनतील, एकाच राजकीय पक्षाचीं अशीं बनणार नाहीत. (२) जातवारीचें तत्त्व मान्य केलें तरी अल्पसंख्याकांचें संरक्षण उत्तम तऱ्हेने होईलच असें नाही. कारण, बहुमतहि त्याच तत्त्वानुसार बनणार. (३) बहुसंख्यावाल्या संघाने आपल्यास कायद्याने निर्दिष्ट केलेलें बहुमत कायमचेंच मिळावें असा आग्रह धरणें युक्त नाही. (४) अल्पसंख्यावाल्यांनी आपल्यास इतरांना लुबाडून जादा जागा द्याव्या असें म्हणणें हा अन्याय आहे. (५) अल्पसंख्याकांचें संरक्षण जरूर झालें पाहिजे. पण त्याचें स्वरूप राष्ट्रसंघाने दाखविल्याप्रमाणे मर्यादितच असलें पाहिजे.

या जातवारीच्या प्रश्नाचा निर्णय ब्रिटिश सरकार उद्याच जाहीर करणार असें सरकारी रीत्या प्रसिद्ध झालें आहे. हा निर्णय कोणत्या स्वरूपाचा होणार याचें दिग्दर्शन करण्याकरिताच एक सरकारी पत्रक प्रसिद्ध झालें आहे. त्यावरून स्वतंत्र मतदारसंघास सरकारानें मान्यता दिली असल्याचें स्पष्ट दिसतें. तथापि प्रत्यक्ष निर्णय हातीं पडल्यावरच त्याची विस्तृत चर्चा करणें युक्त होईल.

# सर गोविंद माडगांवकर

ता. ९ऑगस्टच्या केसरींत, सर गोविंद माडगांवकर यांनी अहमदनगर येथे केलेल्या भाषणांतील एका मुद्द्यासंबंधाने, आम्ही कांहीं टीका केली होती. परंतु ज्या आधारावर आम्हीं ती केली तो आधार बरोबर नव्हता अशा अर्थाचें एक पत्र खुद्द सर गोविंदराव माडगांवकर यांच्याकडून केसरीकडे प्रसिद्धीकरिता आलें आहे. केसरींतील टीकेंत सर गोविंदराव यांजबद्दल एरवी सर्वस्वी बहुमान व आदरच आम्हीं प्रगट केला होता. फक्त लोकमान्य टिळकांसंबंधी त्यांनी एक विशिष्ट विधान केलें अशी माहिती एका गृहस्थांकडून मिळाल्यामुळे तितक्यापुरतीच टीका व तीहि सूचनात्मक होती. पण तें विशिष्ट विधान त्यांनी केलेंच नाही असें त्यांनी स्वतःच कळविल्यावर, तें विधान निराधार ठरतें हें उघडच आहे. त्याबद्दल आम्हांला अत्यंत आनंद वाटतो. त्या विधानाबरोबर त्यावरील सूचनात्मक टीकाहि आम्ही निखालस परत घेतों. झाल्या गोष्टीबद्दल आम्हांला खरोखरच खेद वाटतो. कारण सर गोविंदरावें यांचेबद्दल आमचे मनांत विशेष प्रकारची आदरबुद्धि आहे. असो. सर गोविंदराव यांचें पत्र खाली दिल्याप्रमाणे आहे—

वि. वि.—"ता. ९ ऑगस्टच्या केसरींत आपण मजविषयी लिहिलेला काही मजकूर कोणाच्या तरी गैरसमजुतीमुळे लिहिला गेला असें दिसतें. हिंदु लॉ रिसर्च अँड रिफॉर्म असोसिएशनतर्फे अहमदनगर येथे जी सभा व चर्चा झाली, तींत मीच काय पण इतर कोणीहि कै. लो. टिळक यांचा मुळींच उल्लेख केला नव्हता. टिळकांच्या सामाजिक सुधारणेविषयीच्या मतांचा संबंध तेथे कोणीच आणला नव्हता. मग त्यांच्यावर टीका करणें, किंबहुना त्यांच्याविषयी अनादरयुक्त उद्गार काढणें, हें तर दूरच ! तेथील सर्व भाषणांचा सारांश हिंदु लॉ त्रैमासिकांत लवकरच प्रसिद्ध होईल. तूर्त, तेथील लघुलेखकाने माझ्या भाषणाचीं जीं टिपणें घेतलीं त्यावरून या मुद्द्याला लागू पडणारीं अशीं कांही वाक्यें देतों. 'जुन्या काळीं राजकीय सुधारणा

ही सामाजिक सुधारणेच्या आधीं व्हावी कीं मग व्हावी या प्रश्नावर नेहमी वाद होत असे. पण ते दिवस आता गेले आहेत; व हें निश्चित झालें आहे कीं, या दोहोंना फोडून वेगवेगळें मानून चालणार नाही. त्यांनी हातांत हात घालूनच चाललें पाहिजे. शिवाय क्रिया--प्रतिक्रिया रूपानें दोहोंचाहि परस्परांवर सुपरिणामच होईल. किंबहुना इतर कोणतींहि ध्येयें, कल्पना, सवयी, संस्था, कायदे यांचेंहि असेंच होतें. हिंदुस्थानांतील राजकीय प्रगति आणि आर्थिक व नैतिक लोकस्थिति यांचा अत्यंत निकट संबंध आहे ही गोष्ट कोणाला एक क्षणभरहि नाकबूल करतां येणार नाही.'

आपण सर्व जे हिंदु आहों त्यांजवर हिंदु व्यवहार-धर्मशास्त्राचें नियंत्रण आहे. यापुढे कोणत्याहि प्रकारची राज्यघटना निर्माण होवो, परंतु उद्या किंवा आजहि विद्यमान हिंदु व्यवहारधर्मशास्त्रांत योग्य ती सुधारणा करण्याचें स्वराज्य म्हणजे स्वतंत्रता त्या घटनेनुसार आम्ही मागणारच. हिंदु लॉ रिसर्च अँड रिफॉर्म असोसिएशन या संस्थेचें सर्व हिंदु लोकांना इतकेंच सांगणें आहे कीं, या प्रश्नाचें महत्त्व त्यांनी ओळखावें. आणि हल्लींच्या कायद्यांत योग्य त्या कोणत्या सुधारणा करून आपण इतर हिंदी समाजाच्या बरोबरीनें राहूं याविषयी विचारविनिमय करून मतैक्य संपादण्याचा प्रयत्न करावा. मला अशी आशा वाटते कीं निदान या कार्यक्षेत्रांत तरी आपण सर्व हिंदु बांधव मिळून एक होऊन सर्वानुमतें कार्य करूं. मग त्यांतील कोणाची जातपात किंवा कोणाचें राजकारण कसेंहि असो. आणि या विश्वासावरच मीं सदर संस्थेचें अध्यक्षपद स्वीकारण्याचें धाडस केलें आहे. इतर सर्वांप्रमाणें अर्थात् मलाहि व्यक्तिशः, राजकारण व सामाजिक सुधारणा यांवरील मतें बनविण्याचा व बोलून दाखविण्याचा हक्क राहीलच. तथापि या संस्थेच्या अध्यक्षपदाचा फायदा घेऊन कोणाहिविषयीं निंदात्मक किंवा अनादरात्मक उद्गार मी काढीन तर, मजकडून माझ्या अधिकाराचा दुरुपयोग झाला आणि मीं अत्यंत असदभिरुचीचें काम केलें असेंच मला वाटेल. आणि त्यांतूनहि लोकमान्य टिळकांसंबंधाने तर हें घडणेंच शक्य नाही. कारण त्या दिवंगत देशभक्ताने आपलें सर्व जीवन व आपल्या स्वातंत्र्याचीं इतकीं वर्षे स्वराज्याच्या कार्याकरिता खर्च केलीं आहेत !"

मुंबई
ता. १३।८।३२. } गो. दी. माडगावकर.

# मि. मांटेग्यू व लो. टिळक

[ हिंदुस्थानचे माजी स्टेट सेक्रेटरी मि. मांटेग्यू हे स. १९१७ सालीं इकडे आले होते. त्या वेळच्या कांही आठवणी त्यांच्या आठवणींच्या पुस्तकांत छापलेल्या आहेत. त्यांतील लो. टिळकांसंबंधाचा भाग खाली दिला आहे. ] —सं. के.

मि. मॉंटेग्यू ता. १० नोव्हेंबर १९१७ रोजीं अपालो बंदरावर उतरले. बंदरावर प्रथम त्यांनी त्यांच्या स्वागतपर आलेल्या तारा वाचल्या. त्यांतील थोड्या नांवाची त्यांनी नोंद केली आहे. त्यांत लो. टिळकांच्या नांवापुढें (!) असें उद्गारचिन्ह घालून आनंद व आश्चर्य प्रदर्शित केलें आहे.

"रविवार ता. १८ नोव्हेंबर रोजीं लॉर्ड चेम्सफोर्ड यांनी ठरविलेल्या कार्यक्रमाप्रमाणें मि. टिळक हे मला त्यांच्या शिष्टमंडळाबरोबर भेटणार आहेत. मला त्यांची मुलाखत ( Interview ) घेतां येणार नाही.'

सोमवार ता. २६ नोव्हेंबर रोजीं सकाळीं होमरूललीगच्या शिष्टमंडळाची आम्हीं भेट घेतली. शिष्टमंडळाच्या योजनेच्या मसुद्याच्या नकला आम्हांला देण्यासाठी हातांत पुष्पहार घेऊन मिसेस बेझंट व मि. टिळक पुढे आले. मिसेस बेझंट यांना "तुमच्या गळ्यांत हार घालूं का?" म्हणून व्हाइसरॉयांना विचारलें "नको" म्हणून आपले हात पुढे करून त्यांनी तो हार हातांत घेतला. मि. टिळक यांनी तसें कांहीं मला न विचारतां आपल्या हातांतील हार माझ्या गळ्यांत घातला. अशासाठीं कीं ही गोष्ट जर बाहेर पडली तर स्वतःच्या वर्तमानपत्रांतील लेखामुळे एका सरकारी अमलदाराच्या खुनाशीं अप्रत्यक्षरीतीने संबंध जडल्यामुळे हद्दपारीचीं सहा वर्षे शिक्षा भोगून नुकतेच थोड्या वर्षांपूर्वी सुटून बाहेर आलेल्या प्रख्यात टिळकांनी माझ्या गळ्यात हार घातला हें जाहीर व्हावें."

"मंगळवार ता. २७ नोव्हेंबर रोजीं दुपारीं जेवणानंतर आम्हीं टिळकांची भेट घेतली. हिंदुस्थानांतील राजकारणी पुरुषांत टिळकांचें वजन सर्वांत जास्त आहे; व त्यांचीं राजकीय मतें ज्वलज्जहाल आहेत. कॉंग्रेस-लीग योजनेचे खरे जनक टिळक आहेत. त्यांच्या वादविवादाची पद्धत जरी मला परिणामकारक वाटली नाही तरी ते शास्त्रीय पद्धतीचे महाविद्वान व व्यवहारज्ञ गृहस्थ आहेत. मला दिल्लींत भेटण्यास येतांना जी त्यांची मिरवणूक निघाली तें खरोखर त्यांच्या विजयाचें एक मोठें

चिन्ह होतें. काँग्रेसच्या मागणीव्यतिरिक्त कशानेंहि त्यांचें समाधान होणार नाही हें अगदीं उघड दिसत होतें. ते म्हणाले, " सरकार जें आम्हांला देईल तें आम्ही घेऊं. पण कमींत कमी काँग्रेसच्या मागणीइतके जर तें नसलें तर त्याने कांही आमची तृप्ति होणार नाही."

"गुरुवार ता. २९ नोव्हेंबर रोजीं मँचेस्टर गार्डियन पत्राचा प्रतिनिधि वॉकर मला भेटला. इकडच्या तिकडच्या गोष्टी सांगतांना तो म्हणाला, " मुंबईंत जिना काय तो एक बुद्धिमान् माणूस आहे. त्याच्या राजकीय चळवळीच्या मुळाशीं महत्त्वाकांक्षा आहे. मिसेस बेझंट व टिळक अस्तास गेल्यावर आपण पुढारी होऊं असा त्याचा समज आहे."

"सोमवार १५ एप्रिल १९१८—एक गोष्ट नोंदून ठेवली पाहिजे. टिळक व त्यांचे स्नेही होमरूल मिशन घेऊन विलायतेला जाण्यासाठी निघाले असतांना त्यांना विलायत सरकारने कोलंबोला अडवून परत पाठविलें ही अगदी लक्षांत राहण्यासारखी गोष्ट झाली आहे. मला न विचारतां त्यांना जाण्याचे परवाने दिले पण मला असें वाटतें कीं सरकारने तसे परवाने दिले हें योग्य केलें. टिळकांना चिरोल केस चालविण्यासाठी विलायतेस जावयाचें होतें व लॉर्ड सिडेनहॅमच्या चळवळीने वर्तमानपत्रांचे रकाने भरून निघत. अशा वेळीं टिळकांना जाऊं न देणें ही घोड्याएवढी चूक झाली असती. पण केवळ दुष्टाव्याने किंवा अत्यंत मूर्खपणाने त्यांना विलायतेस जाण्याचे परवाने देऊन व्हाइसरॉयाच्या होम डिपार्टमेंटने, व्हाइसरॉयाला न विचारतां, टिळकांच्या पूर्वचरित्राचें व त्यांच्या विलायतेंत होणाऱ्या भावी चळवळीचें काळेंकुट्ट चित्र तयार करून त्याची तार विलायत सरकारला पाठविली. त्यामुळे तें सरकार घाबरलें असल्यास मला आश्चर्य वाटणार नाही. तथापि परवाना देण्याचा अधिकार असलेल्या माणसाने दिलेले परवाने, त्याला न विचारता रद्द करणें हें जरा विलक्षण दिसतें. पण ही गोष्ट झाली खरी. ह्याबद्दल नापसंतीच्या तारेचा मसुदा व्हाइसरॉयांना मी करून दिला. ती तार अखेर पाठविण्यांत आली व ह्या गोष्टीचा फिरून विचार व्हावा अशी त्या तारेंत विनंति करण्यांत आली होती. ती फुकट गेली. विलायत सरकारने टिळकांना विलायतेस जाऊं देण्याचें नाकारलें. ह्याचें कारण मुख्यत्वेंकरून जनरल स्टाफचा त्याला विरोध होता हें आहे. म्हणजे हेन्री वुइल्सन हा इंग्लंडचें राज्य चालवीत आहे असें दिसतें. विलायत सरकारचा हा निकाल मान्य करून त्यांना सिडेनहॅमच्या चळवळी बंद ठेवण्याबद्दल सूचनेची तार करण्याबद्दल मीं सांगितलें पण ते हें करणार नाहींत, व माझी खात्री आहे कीं, टिळक आल्यावर त्यांच्याशीं हे अविचाराने वागतील."

"आज दुपारानंतर व्हिन्सेंटबरोबर माझी मुलाखत झाली. टिळकांबद्दलच्या काळजीने तो फार व्यग्र झाला आहे. तो म्हणाला 'टिळकाला तूं गिळंकृत केलें पाहिजे ' असें क्लीव्हलंडने मला सांगितलें आहे. तो क्लीव्हलंड व्हिन्सेंटला म्हणाला, तुझ्यापेक्षां अधिक मोठ्या माणसांनी ह्यापेक्षांहि फार कठिण गोष्टी पचनीं पाडल्या आहेत. व्हिन्सेंट मला म्हणाला, हें केल्यावर महमद अलीला व इतर अनेक कैद्यांना मी तुरुंगांतून मोकळें करीन. तसा प्रसंग आल्यास हें त्यांच्या हातून घडेल असें मला वाटत नाही. पण आज तरी त्याच्या डोक्यांत हे विचार भरले आहेत."

" गुरुवार ता.१८ एप्रिल १९१८ बसू, रामस्वामी अय्यर, जिना, टिळक ह्यांनी मदत देऊं केली आहे. ह्यांच्यापेक्षां अधिक चांगल्या माणसांची मदत मिळणे शक्य नाही. पण आयरिश लोकांच्या राष्ट्रीय आकांक्षांना जी मान्यता मिळणार आहे ती आपल्या राष्ट्रीय आकांक्षांना मिळावी हा हेतु ही मदत देऊं करणारांच्या मनांत आहे, ह्या समजुतीने हे लोक ती देऊं केलेली मदत धुडकावून लावतील."

"शनिवार ता.२७ एप्रिल १९१८—दिल्ली येथील परिषदेला चांगलीं माणसें पाठवीत आहेत टिळकांना पाठवीत नाहीत. पण गांधींना पाठवीत आहेत. मी जर व्हाइसरॉय असतों तर वाटेल तें करून टिळकांना सभेंत हजर ठेवलें असतें. ह्या क्षणीं सगळ्या हिंदुस्थानांत बहुतकरून सर्वांहून अधिक वजनदार टिळक आहेत. त्यांनी मनांत आणलें तर लढाईच्या कामीं आम्हांला फार महत्त्वाची मदत करणें त्यांच्या हातीं आहे. व उलटपक्षीं, मदत देऊं म्हणतांना तिला जर त्यांनी राजकीय प्रकरणाच्या अटी घातल्या तर अशा परिषदेंतील वादांत हिंदुस्थानांतील त्यांचें वजन कायमचें नाहीसें होईल असें मला वाटतें. अशा अटी टिळक घालतील हे संभवनीय आहे. टिळक तेथे नसले तर अत्यंत वजनदार माणसाला पसंत करण्याचें आम्हीं नाकारलें असे नेहमीं म्हणण्यांत येईल व टिळक असें भाषणांतून म्हणूंहि लागले आहेत. एक हिंदी पुढारी म्हणून त्यांचें मत घेण्यास बोलावलें असतें तर त्यांना तक्रारीला कारण राहिलें नसतें. 'अशा बाजूकडून मदत नको ' असें कोणालाहि नेहमी म्हणतां येईल. पण अशी वस्तुस्थिति आहे. मीं बोटीवर टिळकांचें भाषण वाचलें. आमच्या सूचना उघड उघड त्यांना कबूल होणार नाहीत, हेंहि सर्व

ठीक आहे असें मला वाटतें. कारण विरुद्ध बाजूचे ते पुढारी आहेत."

"मंगळवार ७ मे १९१८--चेम्सफोर्डची तार मिळाली. दिल्लीपरिषदेच्या हकीकतीचा सारांश त्यांनी दिला आहे. मी भविष्य वर्तविल्याप्रमाणे आजला सर्वांत अधिक वजनदार असे पुढारी टिळक हे त्या सभेंत हजर नसल्यामुळे, त्याचा वाईट परिणाम झाला व एकमत होणें कठिण गेलें."

# प्राथमिक शिक्षणाचा खल

( ले. नारायण रामचंद्र गोखले )

## शिकवूं नका शिकूं द्या

प्राथमिक शिक्षण हा सर्वांच्या जिव्हाळ्याचा प्रश्न आहे. प्राथमिक शिक्षणाचा प्रसार होत आहे त्यापेक्षां तो किती तरी जास्त व्हावयास पाहिजे आहे. त्यासाठी योगपद्धतीचा मार्ग, सद्यःस्थितींत आढळून येणारे दोष, शिक्षकांचें व शिक्षणसंस्था चालविणाऱ्यांचें कर्तव्य आणि शालोपयोगी पुस्तकें यासंबंधी विचार करून लिहिण्यासारखें पुष्कळच आहे. शिक्षक ह्या नात्यानें व त्या अनुभवानें माझें जें मत बनलें आहे तें निवेदन करीत आहे.

प्राथमिक शिक्षणाचा पाया बालवर्ग ( Infant Class ) होय. ह्या वर्गांत मुलांची कुचंबणा फार होते. नवीन पद्धति व अभ्यासक्रम सुरू होऊन जवळ जवळ तीस वर्षें झालीं. पूर्वीच्या मानानें ट्रेण्ड शिक्षकांची पैदास जास्त झाली आहे. बालवर्गांत मुलें जास्त दिवस राहूं नयेत असा खात्याचा कटाक्ष आहे. पण सामान्यपणें निम्मीं तरी मुलें एक वर्षाचेवर वर्गांत असून त्यांची प्रगति दहा अंक व दहाबारा मूळाक्षरें यांच्या पुढे न झालेलीं अशी स्थिति दिसून येते याचें कारण काय? एका शिक्षणशास्त्रवेत्त्याचें तत्त्व 'शिकवूं नका. त्यांना शिकूं द्या.' असें आहे. हें तत्त्व नुसत्या वाच्यार्थानें पाहावयाचें नाही, 'त्यांना शिकूं द्या, म्हणजे मुलें शिक्षण घेतील अशी परिस्थिति तयार करा. ज्ञानग्रहण करण्यासाठीं आकर्षक वस्तु, खेळ, व्यवसाय यांचा उपयोग करा. त्यांना बघूं द्या बोलूं द्या त्यांना असेच प्रश्न करा कीं ज्यांची उत्तरें त्यांना देतां येतील किंवा देण्याची जरूरी भासेल.'

बालवर्गाचें शिक्षण 'त्यांना शिकूं द्या' ( Let them learn ) ह्या दंडकाप्रमाणें कितीशा संस्थांतून चालत असेल? प्रत्येक जिल्ह्यांतून बोटांनीं मोजण्याइतके असले वर्ग सांपडण्याची मारामार पडेल. बालवर्गाचें इयत्तापत्रक वाचून त्यांतील निरनिराळ्या विषयांचा ( Heads) परस्पर-संबंध काय आहे व त्यांपैकीं साध्यरूप व साधनरूप कोणते, अगोदर सुरुवात कोठून करावी, याचा विचार कितीशा मुख्य शिक्षकांनी किंवा निरीक्षकांनी (Inspecting officers) केला असेल? परीक्षक हा खेळ व्यवसाय हे विषय स्वतंत्र म्हणून पाहत असतो. नवशिक्या मुलांची तपासणी करतांना किती अंक किती मुळाक्षरें झालीं हेंच सुपरवायझर पाहतात. खेळ, व्यवसाय यांची जोड घेऊन कांही शिक्षण झालें आहे कीं नाही, हें पाहण्याची दृष्टिच नसते. ती सुपरवायझरांत नाही. मुख्य शिक्षकांत नाही; मग उपशिक्षकांत तरी कोठून येणार? शाळेत सकाळीं तीन तास व दुपारीं तीन तास आकर्षक असा कांहीच व्यवसाय न करता मुलें बसतात व जातात. हेडमास्तराच्या बोचणीसाठी किंवा मुलांच्या हुटहुटीसाठी पाटीवर एखादें अक्षर काढून द्यावें, मुलांनी गिरवावें व म् मकीचा (मकेचा) न् नथीचा ( नथेचा ) अशा अशुद्ध शब्दप्रयोगांची वाचणी द्यावी म्हणजे शिक्षकांचें काम संपलें बालवर्गापैकीं ज्याला इन्फंट म्हणतात त्याची ही स्थिति. शाळेंत येण्याची सवय लागण्यासाठी अशा रीतीनें ५।६ महिने घालविल्यावर शिकवूं नका ( Do not teach ) च्या कचाटींतून मुलगा सुटतो; पण त्याला बशेपणाची वाईट सवय मात्र लागलेली असते.

शहर गांवांत पुढारलेल्या वर्गाच्या मुलांची स्थिति कदाचित् वर वर्णिल्याप्रमाणे नसेल; व कदाचित् खासगी शिकवणीमुळे मुलांची प्रगति होत असलेली पालकांस आढळून येत असेल. पण मध्यम गांवांतून व खेडेगांवांतून खासगी शिकवणीचा प्रचार नसल्यामुळे मुलांच्या आयुष्यांतील पांचसहा महिने नव्हे जवळ जवळ वर्ष फुकट जातें. शिक्षकाचा १००—१५० रुपये पगाराचा बोजा बोर्डावर बसतो.व याचा मोबदला काय तर मुलें बशीं बनलेलीं. सुशिक्षित पालक व शिक्षणसंस्थांचे चालक यांनी या बाबतींत कांही विचार करावयास नको काय?

## बालवर्ग एक वक्त भरवावा

मुलें बशीं, निरुत्साही बनतात ह्याचा अर्धा दुष्परिणाम टाळण्यासाठी प्रत्येक स्कूल बोर्डानें बालवर्ग शाळेंत एकवक्त भरविण्याचा परिपाठ ठेवावा. एक वक्त म्हणजे जास्तींत जास्त तीन तास. प्रस्तुत

लेखकाने अनुभव घेऊन पाहिलें आहे कीं, सामान्य प्रतीच्या गांवांत सर्वसाधारणवर्गाचीं व सामान्य बुद्धीचीं मुलें दोन अडीच तासांच्या शिक्षणाने एक वर्षांत पहिलीचा टप्पा गांठण्यास लायक होतात.

एक वक्त वर्ग बोलावण्याचा अनुभव सध्या पुणें प्रॅक्टिसिंग स्कूलमध्ये शिक्षणशास्त्रज्ञ व उत्साही प्रिन्सिपॉल मे. तावडे घेत आहेत तो यशस्वी होत आहे असेच आढळून आले पाहीजे. बार्शी म्युनिसिपालिटीच्या नं. २ च्या शाळेंत सहा महिन्यांत ( दुवक्त वर्ग भरवून ) इन्फंट क्लास तयार केल्याचें उदाहरण आहे. पुष्कळशा मुख्य शिक्षकांशीं वाटाघाट केल्यावर सार असेंच निघेल कीं बालवर्गाचा शिक्षक ( Do not teach ) 'शिकवू नका' ही आज्ञा वाच्यार्थाने पाळतो. मुख्य शिक्षक आपण मार्ग दाखविला नाहीं किंवा दाखविण्याची जरूरी होती का नव्हती ह्याचा मात्र विचार करीत नाहीं.

**बालवर्गाची हेळसांड कां होते ?**

बालवर्गाचा हेळसांड होण्यास जीं अनेक कारण आहेत त्यांपैकीं शाळाखात्याने व स्कूलबोर्डानें हेड-मास्तराचा जेवढा बोज ठेवावयास पाहिजे तेवढा न राखल्योंन प्राय: हेडमास्तर लोक त्या वर्गाचें काम उदासीनपणें पाहतात हें एक आहे.

बालवर्ग नव्या धर्तीवर कसे चालवावयाचे याची सामान्य रूपरेखा पुढे दिली आहे. प्रथम प्रथम मुलांना दोन तासहि शाळेंत बसूं द्यावयाचे नाही. बैठा खेळ, खडा खेळ, कवाईत, हस्तव्यवसाय, चित्रदर्शन, चित्रांचें वर्गीकरण असे कांही तरी क्रीडन त्यांच्याकडून करवून घ्यावयाचें तें तीं हौसेने करतात. नियमित वेळ शाळेत बसणें व तो वेळहि करमणुकींत घालविणें ह्या प्रचीतीनें मुलें बोलावणें न घेतां शाळेंत हजर राहतात. तीं नव्या नव्या गोष्टींची माहिती घेण्याविषयीं उत्सुक असतात. ह्या क्रमाने दोन महिन्यांत मुलांना सर्व मुळाक्षरें ओळखतां येतात व दहा अंकांची समजूत होते. पाटीपेन्सिल हातांत द्यावयाची नाही हा तर मुख्य कटाक्ष. मूळाक्षरांचीं ओळख झाल्यावर मूळाक्षरांवरून होणारे परिचयाचे शब्द वाचणें, शब्दा-वरूनच वाक्यें वाचणें ह्या बाबतींत प्रि. कारखानीस ह्यांचें पुस्तक आदर्शरूप आहे.

बालवर्गाचें पुस्तक चांगल्या रीतीने वाचतां येत नाही तोपर्यंत मुलांकडून कांहीहि लिहवून घ्यावयाचें नाहीं हा दंडक देण्यांत दोन हेतु आहेत. मुलांना चांगलें वाचतां येत नसल्यामुळें शब्दार्थ किंवा वाक्यार्थ ग्रहण करण्याची शक्ति नसते त्यामुळे उखळ, चिमणी हे शब्द उ–ख–ळ ची–म–णी असे तुटक सांगण्याची जरूरी शिक्षकास भासते. मुलांच्या वाचनावरहि त्याचा परिणाम होऊन उखळ असा शब्द न वाचतां ऊ–ख–ळ असाच ते वाचतात. तें बिघडलेलें वाचन सुधारण्यास जास्त वेळ लागतो. बदसूर तोंडांत बसलेल्या मुलापेक्षा कांहीच संस्कार नसलेला मुलगा गायनशिक्षक जास्त पसंत करतो ह्याचें रहस्य वरील नियमांत आहे. पांच किंवा सहा शब्द सांगून लिहून घेण्यास अर्धा तास तरी मोडतो; पण तेवढ्या वेळांत दोन धडे निदान एक तरी उत्तम रीतीने वाचून घेता येतो. वेळेची बचत सदुपयोग आणि वाईट वळण टाकणें ह्या गोष्टी प्रथम लेखनास सुरुवात न करण्यानें साध्य होतात. शिवाय मुलांची लिहिण्याची जिज्ञासा वाचनांत गुंतविल्याने तीं आपण लवकर चांगलें वाचून दाखवावें अशी ईर्षा धरितात.

खात्याचें बालवर्गाचें पुस्तक तीस वर्षां-पूर्वी तयार झालेलें. त्यात कांही किरकोळ सुधारणा झाल्या असल्या तरी तें तयार करतांना प्रथम लेखन ही तयार करणारांची दृष्टि होती. वर्णमालेचा क्रम बदलणें, सारख्या अक्षरांचे गट करणें हें सर्व लेखनसौलभ्याकरितां त्यांनी केलें. अगोदर वाचन नंतर लेखन ही कल्पना त्यांना त्या वेळींहि अर्धवट आली होती. '**वाचा आणि लिहा**' ही सूचना प्रत्येक धड्याखाली देण्यांत त्यांच्या मनःस्थितीचे चित्र आहे.

**वर्ग कसे भरवावे**

Lower Primary Standards म्हणजे ज्यांना खालच्या इयत्ता असें म्हणतात त्यापैकीं बाल वर्ग, इयत्ता पहिली, दुसरी व तिसरी हे वर्ग. एक वक्त म्हणजे सकाळींच तीन तास बोलावून त्यांचे शिक्षण दिलें जावें असें प्रस्तुत लेखकाचें मत आहे. पद्धतशीर व आस्थापूर्वक शिक्षण दिल्यास तेवढ्या वेळांत ते ते वर्ग तयार होतील हें कोणीहि विचारी व सुशिक्षित पालक व शिक्षणसंस्थेचे चालक कबूल करतील. एक वक्त शाळा खालच्या वर्गाची भरविण्यांत पुढील फायदे आहेत. सहा तास मुलें शाळेंत डांबून ठेवल्याने मोकळी हवा व मनाचा मोकळेपणा यांना तीं पारखीं होतात, तीं तशीं होणार नाहीत. शेतकऱ्यांचीं अथवा कामकऱ्यांचीं मुलें आपल्या किरकोळ कामधंद्यास उपयोगी पडतील. म्हणजे पालकांना त्यांच्या कामधंद्यास घरचीं मुलें मिळाल्यानें वंशपरंपरागत चालत आलेल्या धंद्यांत खोट न येता शिक्षणकार्य चालेल. त्यांची शरीरप्रकृति चांगली राहील.

खालचे वर्ग सकाळीं एकवक्त बोलावल्यावर त्या वर्गाच्या शिक्षकांनी दुपारीं काय करावयाचे हा प्रश्न राहतो. Shift System ( शिफ्ट सिस्टीम ) प्रमाणें त्यांना दुपारीं दुसरा वर्ग द्यावा असें कांही

शिक्षणसंस्थांचे चालक म्हणतात. पण एका वर्गावर तीन तास राहण्याचें काम केल्यावर दुपारीं तीन तास पुन्हा दुसऱ्या वर्गावर तितकेंच काम करण्याचा त्याला उत्साह राहत नाहीं. त्यापेक्षां दुसरे दिवशीं जें काय काम करावयाचें त्याची पूर्वतयारी करण्यास त्याने वेळ घालविल्यास तो जास्त फायदेशीर होईल. शिवाय खेड्यांमधून सहकारी संस्था, शेतकी, उपयुक्त वैद्यक यांचें ज्ञान देण्यास त्या त्या शिक्षकाचा तास दोन तास वेळ गेल्यास त्या त्या विषयासंबंधीं आज ज्या गरजा आहेत त्या थोड्या प्रमाणांत तरी भागतील.

## क्रमिक पुस्तकांची सुधारणा

शालोपयोगी पुस्तकें या सदरांत (Text Book committee) क्रमिक बालबोध पुस्तकें आणि इतर मंजूर व नामंजूर पुस्तकें येतात. क्रमिक पुस्तकें तयार होऊन पंचवीस वर्षे होऊन गेलीं. त्यांत किरकोळ सुधारणा झाल्या असल्या तरी आजच्या स्थितींत त्यांमध्ये आमूलाग्र सुधारणा व्हावयास पाहिजेत. हें एका बालवर्गाच्या पुस्तकावरूनच सर्वांस कळून येणार आहे. व त्याचें थोडेंसें दिग्दर्शन वर केलेंच आहे. शब्दार्थाची पुस्तकें, गाथाज्ञान, भाषादर्पण, भाषेचे राजमार्ग, इतिहास भूगोल याचे सोबती का तयार होतात, मुलें तीं कां घेतात ह्याचा विचार खात्याने किंवा शिक्षणसंस्थेच्या चालकांनी करावयास नको काय? ह्या पुस्तकांनी घोकंपट्टीसच उत्तेजन मिळत नाहीं काय? त्यामुळे शिक्षक हलगर्जी व मुलें शाळेतील शिक्षणाकडे दुर्लक्ष करणारीं निपजत नाहीत काय ?

मंजूर पुस्तकांपैकीं बरींचशीं पुस्तकें हलगर्जीपणामुळे तपासलेलीं आहेत असा भास होतो. निबंध मुक्ताहार, अरगडे, लोखंडे व बोरवणकर ह्यांचे हिंदुस्थानचे इतिहास हे सुशिक्षित पालकांनी वाचून पाहावे हीं पुस्तकें वर्गांतून चालविण्यास मंजूर झालेलीं आहेत. शिकविण्याच्या दृष्टीने तीं तशीं लायकीं आहेत काय याचा सुशिक्षित पालकांनी अथवा विद्वान गृहस्थांनी आपला प्रांजल अभिप्राय द्यावा. ज्यांचें वाचन व अध्ययन बेताचें, लेखनाचीं मूलतत्त्वें जेमतेम ज्यांना समजलेलीं, भाषेचा व्यासंग बेताचा व विवेचनशक्तीचा जवळ जवळ अभाव अशा गृहस्थांनी पुस्तकें लिहावीं व तीं बिनधोक मंजूर व्हावीं हे जनतेचें दुर्दैव होय. हंटर, मार्सडेन ह्यांचे भाषांतरित इतिहास त्यांची दृष्टि सोडून दिल्यास किती मनोरंजक आहेत ? सरदेसायांचा भारतवर्ष, मोडकांचा मुलांचा महाराष्ट्र व हिंदुस्थान, कै. भावे यांचा हिंदुस्थानचा आढोपसर इतिहास हे निरनिराळ्या दृष्टींनी किती तरी चांगले आहेत; व त्यांच्या जोडीला अरगडे, लोखंडे व बोरवणकर बसविले आहेत.

व्याकरणाचा अभ्यासक्रम कमिटीने ठरवून देतांच चिपळूणकर, मोने, नारगोळकर, काटे, फडतरे हे प्रायमरी शिक्षक व जोशी ( दीक्षित ) सबनीस व वैद्य हे पदवीधर यांनी जे व्याकरणाच्या अभ्यासाचे पापड लाटले व भाजले आहेत ते कमजास्त मानाने सुबक व स्वादिष्ट असतील, पण उपयोग काय ? ते शिक्षकांकरिता कीं विद्यार्थ्यांकरिता ? हीं व्याकरणाचीं पुस्तकें शिक्षकाकरिता म्हणावीं तर नामाची, प्रयोगाची, समासाची व्याख्या किंवा प्रकार ह्यांची शिक्षकांना इतकी कां फोड करून द्यावयास पाहिजे ? शिक्षक म्हणजे त्या त्या वर्गाचे विद्यार्थी कीं काय ? ट्रेन्ड शिक्षक व्याकरण शिकविण्यास नादान असाच हीं पुस्तकें पाहून सुशिक्षित पालकांचा समज होईल. कै. रा. भि. जोशी ह्यांचा व्याकरणावर व्यासंग चांगला होता, पण त्याच्याच पुस्तकांनी व्याकरण विषय शिकविण्याचे बाबतींत शिक्षकांस नादान बनविलें. तीच क्रिया जास्त प्रमाणावर पुढें चालू राहणार कीं काय अशी शंका येते. विद्यार्थ्यांच्या दृष्टीने हीं पुस्तकें असावीं तशीं स्वावलंबी नाहीत. शिक्षणांत मनोरंजकता असावी ही कल्पनाहि उदयास आली नव्हती त्यावेळीं म्हणजे १८९५सालीं विद्यार्थीमित्र नांवाचें एक मासिक पुस्तक निघत असे; त्यांत शब्दांच्या जाती ( व्याकरणदृष्ट्या ) यावर एक लहानशी रूपकपर गोष्ट आली होती. तिच्यांत जो आकर्षकपणा वाटला तितकाहि ह्या एका पुस्तकांत कोठें दिसला नाही.

अंकगणिताचीं पुस्तकें पांचसहा जणांनी केलीं आहेत. त्यांपैकीं मोडक गोखले यांचें प्रौढबोध अंकगणित सरस आहे. त्यांनी उदाहरणें देतांना व्यवहारांतील बहुतेक प्रसंग व कल्पना यांची मांडणी चांगली दिली आहे. बाकीचीं पुस्तकें जुन्या व नव्या अंकगणितांचीं प्रतिबिंबें आहेत. चाफेकर यांचे अंकगणित गर्भावस्थेंत आहे; पण सर्व अंकगणितांत एक उणीव दिसते. भूमितीच्या प्रमेयात जसें पक्ष साध्य असते तशा प्रत्येक उदाहरणांत कांही गोष्टी दिलेल्या असतात व त्यावरून एक निश्चित गोष्ट ( उत्तर ) काढावयाची असते. उदाहरणांत ज्या अनेक गोष्टी दिलेल्या असतात त्यांचा परस्पर संबंध काय व तें उदाहरणाचें कोडें सोडविण्यास कोठून सुरुवात करावयाची याचा ऊहापोह किंवा ही दृष्टि ह्या अंकगणितांतून असती किंवा येईल तर ती शिक्षकास व विद्यार्थ्यांस उपयुक्त होईल.

# हिंदुस्थानाचें तारण तेंच संस्थानिकांचें मरण

हिन्दी लोक व हिन्दी संस्थानिक यांची धार्मिक व ऐतिहासिक परंपरा एक आहे. परंतु दैवयोग असा विचित्र कीं, जे इंग्रज लोक परकीय त्यांनी हिन्दी लोकांस जिंकल्यामुळे त्यांच्याशीं हिन्दी लोकांचें नवें नातें जडलें व संस्थानिकांशीं होतें तें नातें तुटून एकमेक एकमेकांना अंतरले. तरी देखील खालसांतील हिन्दी लोकांना मागील इतिहासाचें व परंपरेचें स्मरण वारवार होऊन संस्थानिकांविषयीं जिव्हाळा वाटतोच. खालसा मुलुखांत हिन्दी लोक निर्माल्यवत् आहेत. सर्वसत्ता इंग्रजांच्या हातीं आहे. इंग्रजांनी पोरक्या पोराप्रमाणे त्यांचें रक्षण करावें आणि अधिकाराच्या मोठमोठ्या जागा आपल्याकडे ठेवून हिंदी लोकांना त्यांच्या दौर्बल्याविषयी पदोपदीं हिणवीत असावें. अशा असहाय स्थितींत त्यांना आशेचा किरण व उमेदीचें उत्तेजन जर कशापासून मिळत असेल तर तें संस्थानिकांना पाहून. कोट्यवधि रुपये उत्पन्नाच्या गादीवर आपलेच राजे विराजमान झाले आहेत. त्यांच्या हाताखालीं गव्हर्नराच्या, प्रधानाच्या, हायकोर्ट जजाच्या कलेक्टराच्या वगैरे सर्व मोठमोठ्या हुद्द्यांचीं कामें आपलेच देशबांधव पाहत आहेत. सैन्य आपल्याच देशबांधवांचें आहे व त्यावरील सेनापतिहि आपल्याच हाडामांसाचे आहेत, या अभिमानपूर्ण विचारांनी त्यांचें खचलेलें मन स्फुरण पावतें, तेथील गजान्त लक्ष्मीनें, ब्रिटिश हद्दींतील रखरखींत शिणून थिजलेल्या डोळ्यांचें पारणें फिटल्यासारखें वाटतें व एकंदरीनें त्यांच्यांत आत्मविश्वास उत्पन्न होतो.

संस्थानिकांसंबंधानें हिंदी लोकांची वृत्ति या प्रकारची असल्यामुळे कोणत्याहि संस्थानिकावर एखादें संकट गुदरलें कीं, तें आपल्यावरच गुदरल्याप्रमाणे समजून तन्निवारणार्थ खालसांतील पुढारी आजपर्यंत हरप्रयत्न करीत आले आहेत. याचा अनुभव बडोद्याचे मल्हारराव गायकवाड, कोल्हापूरचे शिवाजीमहाराज, इंदूरचे शिवाजीराव होळकर यांच्या बाबतींत आलाच आहे. हिंदी लोकांच्या संस्थानिकांसंबंधाच्या भावनेविषयीं हें विवेचन झालें. उलटपक्षीं संस्थानिकांना खालसा मुलुखांतील जनतेसंबंधानें काय वाटतें त्याचाहि विचार करणें इष्ट आहे. संस्थानिकांच्या मनांत खालसांतील हिंदी जनतेविषयीं आपलेपणाची भावना वसत असेल यांत काय नवल? पण त्या भावनेचें स्वरूप मात्र वेगळें असतें. ते स्वतःच्या प्रजाजनाप्रमाणेच खालसांतील हिंदी जनतेकडे प्रजाजनाच्या नात्यानेच पाहतात; बरोबरीच्या नात्यानें पाहत नाहीत. कारण तसें पाहण्याची त्यांना सवयच नाहीं. राजकीय अधिकार देऊन स्वतःच्या प्रजेला जेव्हा ते बरोबरीच्या दर्जाला आणतील तेव्हाच खालसांतील जनतेशीं बरोबरीच्या दर्जानें वागण्यांत ते कमीपणा मानणार नाहीत. याचा अर्थ असा नव्हे कीं हिंदी संस्थानिक हे हिंदी जनतेच्या राजकीय आकांक्षांचे शत्रू आहेत. तसें हितशत्रुत्व बाळगण्याचें त्यांना कांहीच कारण नाही. परभारें ब्रिटिश हद्दींतील हिंदी लोकांनी इंग्रजांपासून स्वराज्याचे हक्क मिळवून ते उपभोगले व त्यामुळे त्यांची सर्वांगांनी भरभराट झाली तर त्याबद्दल संस्थानिकांना मुळीच विषाद वाटणार नाही. त्यांची अपेक्षा इतकीच कीं ब्रिटिश हद्दींत कांहीहि घालमेली झाल्या तरी त्यांची झळ आपल्या ऐश्वर्यास, अधिकारास, इभ्रतीस, इतमामास व सुखोपभोगास लागू नये.

परंतु हें व्हावें कसें? कारण हिंदी लोकांनी इंग्रजांशीं झगडून पूर्ण स्वराज्य मिळविलें तर इंग्रज सरकारची जी सत्ता हिंदुस्थानांत आहे ती सहजच हिंदी लोकांच्या स्वाधीन होऊन संस्थानिकांवरील प्रभुत्व हिंदी जनतेकडेच येईल. पण सत्तेच्या या संक्रमणाला संस्थानिक कबूल नाहींत. आपण हातपाय न हालविता स्वस्थ बसलो तर हें संक्रमण घडल्याशिवाय राहणार नाही अशी संस्थानिकांना धास्ती वाटूं लागल्यामुळेच त्यांनी सायमन कमिशनच्या नेमणुकीच्या सुमारास बटलर कमिटीची मागणी ब्रिटिश सरकारापाशीं केली. संस्थानिकांनी इंग्रजांचें मांडलिकत्व कबूल केलें त्या वेळीं त्यांचे सर्व तहनामे ईस्ट इंडिया कंपनीशीं म्हणजे परंपरेनें इग्लंडच्या राजाशीं झाले आहेत. म्हणून इंग्रज सरकार आपली सत्ता हिंदी जनतेच्या स्वाधीन करील तेव्हा त्यांनी संस्थानिकांच्या संमतीवांचून संस्थानिकांवरील प्रभुत्व हिंदी लोकांच्या हातीं देता कामा नये अशी संस्थानिकांनी आपली मागणी बटलर कमिटीपुढे मांडली होती. बटलर कमिटीनेहि आपल्या रिपोर्टांत या मागणीस मान्यता दिली व कमिटीचें हें धोरण ब्रिटिश सरकारनेंहि स्वीकारलें.

संस्थानिक व ब्रिटिश सरकार यांनी हिंदी स्वराज्याला हा एक प्रकारचा खोडाच घालून ठेवला आहे यांत शंका नाही. त्याचा परिणाम असा झाला आहे कीं संस्थानिकांच्या साहाय्यावांचून हिंदुस्थानाच्या महत्त्वाच्या राजकीय सुधारणेचें पाऊलच पुढे पडत नाही. ब्रिटिश मंत्र्यांनी गेल्या १७ तारखेस जातवारीच्या वादाचा आपल्या समजुतीप्रमाणे निकाल सांगितला, त्यांतहि प्रांतापलीकडे

निकालाची मर्यादा जाऊं दिली नाही. कारण संस्थानिकांचे हातपाय प्रांतिक कारभारांत अडकलेलेच नाहीत; हिंदुस्थानाच्या मध्यवर्ती राज्यकारभारांत ते ऐसपैस पसरले असल्यामुळे संस्थानिक संयुक्त राज्यघटनेंत शिरतात किंवा नाही हें खास समजेपर्यंत मंत्रिमंडळाने मध्यवर्ती कायदेमंडळांतील मुसलमानप्रभृति जातींचें संख्याप्रमाण गुलदस्तांतच ठेवलें आहे. स्वराज्याच्या बाबतींत संस्थानिकांच्या अनुमतीस किती महत्त्व प्राप्त झालें आहे याची वाचकांस या एकाच उदाहरणावरून सहज कल्पना करतां येईल.

इंग्रजसरकारानें हिंदुस्थानाचा राज्य-कारभार हिंदी लोकांच्या स्वाधीन करण्यास संस्थानिकांची संमति मिळणें एकाच गोष्टीवर अवलंबून आहे असें सांगण्यांत येतें; ती गोष्ट ही की संयुक्त राज्यघटनेंत जबाबदार राज्यपद्धतीचा वांटा हिंदी प्रतिनिधींच्या बरोबर संस्थानिकांच्या प्रतिनिधींना मिळाला तरच संस्थानिकांची स्वराज्याच्या वाटेंतील आडकाठी दूर होईल. पण संस्थानिक पडले राजे. त्यांना बसावयास सिंहासनें पाहिजेत व त्यांच्या मस्तकावर चवऱ्यामोर्चेलें ढळलीं पाहिजेत. त्यांच्या या डामडौलापुढे बिचाऱ्या हिंदी जनतेचा तो काय पाड? त्यांच्यापैकीं कोणाला राज्य असलें तर चार खुंटांवरचें व अंबारी असली तर ती उलटी केलेली ! अशांच्या शेजारीं बसतांना संस्थानिकांना त्यांचा विटाळच वाटावयाचा व वाड्यांत परत आल्यावर कपडे बदलण्याची जरूरी भासावयाची ! ही अडचण वरिष्ठ कायदे कौन्सिलांत संस्थानिक येऊन बसतील तेव्हा उत्पन्न होईल. पण त्यापूर्वीच्या अडचणी काय थोड्या आहेत? त्या अडचणीच्या रांगा गोलमेज परिषदेनें नेमलेल्या डेव्हिडसन कमिटीचा रिपोर्ट वाचला असता डोळ्यांसमोर एकापुढे एक उभ्या राहतात.

संयुक्त राज्यघटना ऊर्फ फेडरेशन म्हणजे राज्यांचा संघ हिंदुस्थानांतील प्रांत हीं प्रकृत स्थळीं राज्येंच समजावयाचीं. त्यांच्याकडे खालचा अधिकार राहून वरचा अधिकार मध्यवर्ती संघात्मक सत्तेकडे जावयाचा. ज्या कांहीं पाश्चात्य देशांत या प्रकारची संघात्मक राज्यपद्धति अस्तित्वांत आहे तेथे राज्यांनी अथवा हिंदुस्थानांतील हल्लीच्या भाषेप्रमाणें बोलावयाचें झाल्यास प्रांतांनी सर्व अधिकार आपल्याकडे घेऊन सर्व प्रांतांना एकत्र ठेवावयास जरूर तो अधिकार त्यांनीच निर्माण केलेल्या मध्यवर्ती सत्तेकडे देण्यांत आला आहे. हिंदुस्थानास तोच नसला तरी तसलाच न्याय लागू व्हावयास पाहिजे. त्या दृष्टीनें पाहता प्रांतांची रचना एकंदरीनें ठीक आहे. कारण त्यांना जे अधिकार मिळाले आहेत ते समान आहेत. ते सगळे प्रांत ज्या देशांत आहेत त्या हिंदुस्थान देशाचें सैन्य, परदेशांशीं करावयाचा करारमदार, काढावयाचें कर्ज, पाडावयाचें नाणें इत्यादि मुख्य अधिकार मध्यवर्ती अशा हिंदुस्थानसरकाराकडेच आहेत. त्याशिवाय मीठ, जकात, रेल्वे, पोस्ट, तार वगैरे साऱ्या हिंदुस्थानास समान असणारीं खातींहि हिंदुस्थानसरकारच्याच स्वाधीन आहेत, त्यामुळे त्यांचा संयुक्त संघ बनण्यास कठिण नाही. परंतु खरी अडचण आहे ती संस्थानांचीच. संस्थानिकांना फेडरेशनमध्ये मनापासून यावयाचें असेल तर त्यांनी आज ना उद्या हरएक बाबतींत प्रांतिक सरकाराचा दर्जाच पत्करला पाहिजे. याचा अर्थ असा कीं, त्यांचा अन्तर्गत कारभार प्रांताप्रमाणे चालावा व प्रांतापेक्षा त्यांना जे अधिकार अधिक असतील ते त्यांनी हिंदुस्थानसरकाराच्या स्वाधीन करावे.

वरील तत्त्व जास्ती मोकळेपणानें सांगावयाचें तर संस्थानिकांनी आपला अन्तर्गत राज्यकारभार प्रांतिक सरकाराप्रमाणे लोकनियुक्त कौन्सिलास जबाबदार करावा व स्वतःस गव्हर्नराच्या जागीं समजून जे अधिकार नवीन राज्यघटनेस अनुसरून गव्हर्नराकडे राहतील तेवढेच अधिकार संस्थानिकांनी आपल्या हातीं ठेवावे. अर्थात् हा त्याग फार मोठा आहे. तो किती मोठा आहे याची कल्पना संस्थानिकांपाशी हल्ली केवढी अपरिमित सत्ता आहे हें समजलें तरच करतां येणार आहे. संस्थानिकांना हल्ली जितके अधिकार आहेत तितके खालसांतील अधिकार गव्हर्नरालाच काय पण खुद्द गव्हर्नर–जनरलला सुद्धा नाहीत. गव्हर्नर काय किंवा गव्हर्नर जनरल काय हे खालून कांहीं अंशीं हिंदी लोकमतास जबाबदार आहेत व वरून बऱ्याच अंशीं ब्रिटिश पार्लमेंटास जबाबदार आहेत. उलटपक्षीं आमचे संस्थानिक कोणासच जबाबदार नाहीत. त्यांची सत्ता एक प्रकारें निरंकुश व एकमुखी आहे. ते वाटल्यास कायदेकौन्सिल नेमतील, नाहीपेक्षां कौन्सिलाशिवायहि राज्यशकट हाकतील. तुमच्या राज्यांत कौन्सिलें कां नाहीत असें संस्थानिकांना दरडावून विचारण्याची अखत्यारी ब्रिटिश सरकारासहि नाही. संस्थानिकांची हुकमत हिंदुस्थानसरकारपेक्षाहि जास्ती आहे असें सांगून टाकलें म्हणजे त्यांची हुकमत निदान हिंदुस्थानसरकाराइतकी आहे हें वेगळें सांगण्याची गरजच राहत नाही.

हिंदुस्थानसरकार आपल्या प्रजेपासून इनकमटॅक्स वसूल करतें तसा तो संस्थानिकांनाहि वसूल करतां येतो. मुंबई इलाख्याच्या पश्चिम किनाऱ्यावर गांवगन्ना मिठागरें आहेत व त्यांवरील करापासून सहा कोटी रुपयांचें उत्पन्न सरकारास मिळतें. कित्येक संस्थानिकांपासून मीठ बनविण्याचा

हक्क इंग्रज सरकाराने हिरावून घेतला असला तरी काठेवाडांतील भावनगर, जंजिरा, जुनागड, बडोदें, पोरबंदर, नवानगर, मोर्वी, ध्रांगध्रा इत्यादि संस्थानिकांनी आपला हा हक्क गमावला नाही. त्यांचे मिठाचें उत्पन्न ३८ लक्ष रुपयांवर आहे. हैद्राबादेच्या निजामाची स्वतःच्या मालकीची आगगाडी आहे आणि पोस्ट व तारखातेंहि आहे. झिंद, कोटा, नवानगर, कच्छ, पतियाळा व रेवा येथील अधिपतींनाहि तारखात्याच्या उत्पन्नाचा वांटा मिळतो. ज्यांना आपल्या नांवाचें नाणें पाडतां येतें असे संस्थानिक हिंदुस्थानांत कमींत कमी वीस आहेत. हैद्राबाद संस्थानचीं नाणीं असून नोटाहि आहेत. या नोटा ९ कोटींच्या आहेत. नोटा म्हणजे निवळ कागदाचे कपटे. रुपयाचें नाणें म्हटलें कीं, त्याकरिता राजसत्तेला रुपयागणिक ८।९ आण्यांची चांदी खर्चावी लागते; परंतु नोटांना कागदांच्या चिवट तुकड्यांहून अधिक खर्च फारसा नाही. अशा रीतीने या चलनापासून निजामसरकारास दरसालाची प्राप्ति १७ लाखांची आहे.

त्रावणकोर, कोचीन, भावनगर, जुनागड, पोरबंदर, बडोदें, नवानगर, मोर्वी व कच्छ या संस्थानांचीं बंदरें असून त्यांपैकीं कित्येक बंदरांतून लाखों रुपयांचा माल दरसाल जात येत असतो. या सर्व बंदरांची उत्तम रीतीने वाढ झाल्यास कोट्यवधि रुपयांच्या मालाची आयातनिर्गत त्यांतून होईल; इतकेंच नव्हे तर संस्थानिक ब्रिटिश हद्दीपेक्षा आपल्या हद्दींतील व्यापाऱ्यांच्या सोयीकडे आस्थापूर्वक लक्ष पुरवितात व जकातहि माफक घेतात या कारणाने मुंबई, कराची, मद्रास यांसारखीं जंगी बंदरें मागे पडून व्यापाराचा ओघ संस्थानी बंदरांकडे वळण्याचा संभव फार आहे. फार काय पण ओखा वगैरे काठेवाडी बंदरांचा प्रभाव आजच मुंबईसारख्या मोठ्या बंदरास जाणवूं लागला आहे. बंदरांची वाढ संस्थानिकांस किती किफायतशीर होणार आहे याला दुसरें प्रमाण कोणतें पाहिजे?

वरील सर्व बाबी संस्थानिकांस फायद्याच्या आहेत तशा भूषणाच्याहि आहेत; परंतु कित्येक गोष्टींत मनुष्यास फायद्यापेक्षा भूषणाचीच भुरळ अधिक पडते. आमच्या संस्थानिकांस फौजफाट्यापासून तादृश फायदा म्हणण्यासारखा नाही. परचक्र आलें तरच त्यांना पदरीं बाळगलेल्या सैन्याची गरज. पण इंग्रजी राज्य असेपर्यंत संस्थानिकांना परचक्राची भीति मुळीच बाळगण्याचें कारण नाही. त्यांनी आपल्या फौजेस फाटा देऊन व पोलीस शिपायांवर विसंबून खुशाल निर्धास्त राहावें. असें असताहि सालिना लाखों रुपयांचा खर्च ठेवून शिंदे, होळकर, गायकवाड, निजाम यांनी पदरीं सैन्य बाळगलें आहे तें एक वेळ आपले पूर्वज महान पराक्रमी सरदार होते याचें स्मृतिचिन्ह म्हणूनच ना! अशा प्रकारचें सैन्य ४९ संस्थानिकांपाशीं असून त्यांना ४३ हजारांपर्यंत तें बाळगण्याची परवानगी आहे. त्यांनी इतकें सैन्य न ठेवता ३७हजारांपर्यंतच ठेवलें आहे; तरी त्याप्रीत्यर्थ त्यांना दरसाल दोन कोटि रुपये खर्च येतो. एकट्या ग्वाल्हेर दरबाराचाच लष्करी खर्चाचा आंकडा चाळीस लाखांवर आहे. संस्थानिकांचें वैभव या प्रकारचें आहे; त्याची सर व्हाइसरॉयाच्या वैभवासहि येणार नाही. असे हे संस्थानिक फेडरेशनमध्ये सामील झाल्यास त्यांना हळूहळू कृष्णपक्षांतील चंद्राप्रमाणे वरील वैभवास कलेकलेने मुकावें लागून त्याचें सारें तेज अखेर अमावास्येच्या निबिड अंधारांत गडप होणार! व ते नेमणूक खाणारे नाममात्र राजे उरणार. संस्थानिकांचें हें मरणच असल्यामुळे त्यास सताड्या डोळ्यांनी कवटाळावयास धावणारे संस्थानिक थोडेच आढळल्यास त्यांत आश्चर्य कसलें? नवानगरचे महाराज नरेंद्रमंडळाचे चान्सेलर आहेत. त्यांनी संस्थानिकांना डेव्हिडसन कमिटीच्या शिफारशींप्रमाणे फेडरेशनमध्ये सामील होणें पसंत पडणार नाहीं म्हणून म्हटलें आहे ते या अर्थाने खरें आहे.

# मि. मॅक्डोनाल्ड याचा खुलासा

इंग्लंडाचे मुख्य प्रधान मि. राम्से मॅक्डोनाल्ड यांनी जातवारीसंबंधाने जो निकाल दिला त्याविषयी त्यांनी पुढीलप्रमाणे खुलासा केला आहे. ते म्हणतात— "माझा गेल्या दोन वर्षांत मुख्य प्रधान व हिंदुस्थानाचा मित्र या नात्याने हिंदुस्थानाशीं संबंध आला असून त्या काळांत अल्पसंख्याकांच्या प्रश्नाकडे मी कळकळीने पाहत आलों आहें. हिंदुस्थानांतील जातवारीच्या तंट्याच्या भानगडींत पडावें असा आमचा केव्हाहि हेतु नव्हता. गोलमेज परिषदेमध्ये हिंदी लोकांनीच हा बखेडा मोडावा याविषयीं आम्हीं जे प्रयत्न केले त्यावरून आमचा हा हेतु सिद्ध झाला आहे. आम्ही जो निकाल देऊं त्या निकालावर जी ती जात आपल्यापुरतीच पाहणारी असल्यामुळे तिजकडून टीका होईल हें आम्हांस आरंभापासून पक्कें माहीत आहे. परंतु हिंदी लोक नवीन राज्यघटनेशीं सहकारिता करून ब्रिटिश साम्राज्यांत

नवें स्थान मिळवून घेण्यास कबूल असतील तर त्यांना हिंदुस्थानाच्या गरजा काय आहेत याचा विचार शेवटीं करावा लागेल असा आमचा विश्वास आहे. आमचें कर्तव्य अगदी स्पष्ट होतें. हिंदुस्थानाची सनदशीर रीतीने प्रगति होण्याच्या मार्गांत जाति-जातींचें ऐक्य न घडल्यामुळे अपरिहार्य विघ्न उपस्थित झालें. अशा स्थितींत त्यांतून मार्ग काढणें सरकारास भागच पडलें. हिंदी प्रतिनिधींनी गोलमेज परिषदेमध्ये मला वारंवार विनंति केली, त्या वेळीं सरकाराच्या वतीने मी त्यांना वचनें देत गेलों. माझें धोरण ब्रिटिश पार्लमेंटाला पसंत पडलें. त्या सर्वांचा परिणाम म्हणजेच आम्ही प्रसिद्ध करीत आहोंत ती योजना होय. जातिजातींत ऐक्य होऊन आम्हीं सुचविलेल्या मार्गाहून अधिक प्रशस्त मार्ग न निघाल्यास आमची योजना पार्लमेंटाकडे मंजुरीकरिता जाईल.

## नवी योजना करा

हिंदी राज्यघटनेचें नवें बिल तयार होईपर्यंत हिंदी लोकांत ऐक्य होऊन जर आपली योजना त्यांनी आम्हांपुढे मांडली तर त्यासारखा आम्हांस आनंद दुसरा कशाचाहि वाटणार नाही. परंतु आजपर्यंतच्या अनुभवावरून सरकाराची अशी खात्री झाली आहे कीं या बाबतींत सरकाराने होऊन हिंदी लोकांशीं बोलणें करण्यापासून कांही फायदा होणार नाही, म्हणून ते या भानगडींत पडणार नाहीत. तथापि हिंदुस्थानांतील एखाद्या प्रांतामधील लोकांत ऐक्य होऊन त्यांनी आपल्यापुरती तोड सुचविली तर तिचा अंगीकार करण्यास आम्ही कबूल होऊ. इतकेंच काय, पण सगळ्या ब्रिटिश हिन्दुस्थानाकरिताहि अशी तोड निघाली तर आम्ही तीहि पत्करूं. सरकार आपला जो निर्णय देत आहे त्याचें रहस्य कळण्याकरिता तो निर्णय कोणत्या स्थितींत दिला जात आहे हें लक्षांत घेतलें पाहिजे. आतापर्यंत सनदशीर रीतीने जी प्रगति झाली त्या प्रगतीचा प्रत्येक टप्पा स्वतंत्र मतदारसंघाच्या साहाय्यानेच गांठला आहे. सर्वत्र निवडणुकीची पद्धत एकच असावी हें तत्त्व सरकाराला कबूल आहे. पण अल्पसंख्याक जाति संरक्षक बंधनांना इतकें महत्त्व देतात कीं त्यापुढे सर्वत्र एकच पद्धत स्वीकारणें आम्हाला अशक्य झालें आहे. गोष्टी या थराला कां आल्या याच्या कारणांची चिकित्सा करण्यापासून कांहीच फायदा नाही. मी विचार करतों तो भविष्य कालासंबंधाचा. लहान-मोठ्या सर्व जातींनी शांततेने व गोडीने एकत्र काम केलेलें पाहावें, त्यांच्या संरक्षणाची यापुढे गरज उत्पन्न होऊं नये. अशी माझी इच्छा आहे. दरम्यानच्या काळांत आहे ही स्थिति लक्षांत घेऊन प्रातिनिधिक पद्धतीचा हा विचित्र नमुना कायम राखलाच पाहिजे.

## अस्पृश्य वर्ग

मला दोन गोष्टींचा निर्देश करावयाचा आहे. एक गोष्ट अस्पृश्य वर्गासंबंधाची व दुसरी स्त्रियांच्या प्रतिनिधींची. या दोघांकरिता जें करणें जरूर आहे तें न केलें तर सरकारने अन्याय केला असें होईल. अस्पृश्यांना आपापल्या प्रांतिक कौन्सिलांत त्यांची बाजू मांडतील असे त्यांचे पुढारी आम्हांला मिळवून दिलेच पाहिजेत. पण त्याबरोबरच अस्पृश्य लोक स्पृश्य हिंदु समाजापासून तुटून निघणार नाहीत यालाहि जपलें पाहिजे. यासाठी हिंदूंच्या सर्वसामान्य मतदारसंघांत अस्पृश्य मतदार आपलें मत देतीलच आणि ते जे प्रतिनिधी या रीतीने निवडून देतील त्या प्रतिनिधींच्या कामगिरीवर अस्पृश्य वर्गाच्या हिताची जबाबदारी पडेल. पुढील वीस वर्षांत ज्या भागांत अस्पृश्य मतदार पुष्कळ आहेत त्या भागांत अस्पृश्यांकरिता स्वतंत्र जागा ठेवण्यांत येतील. व त्या जागांचे प्रतिनिधी अस्पृश्य मतदारांकडूनच निवडले जातील. याचा परिणाम असा होईल कीं, कित्येक अस्पृश्यांना दुबार मतें मिळतील. परंतु अस्पृश्यांच्या विशेष हक्कसंबंधाच्या रक्षणासाठीं ही व्यवस्था करणें भागच आहे.

## स्त्रियांचे प्रतिनिधि

हिंदुस्थानाच्या प्रगतीची स्त्रियांची चळवळ ही एक किल्ली आहे. सुशिक्षित आणि वजनदार नागरिक या नात्याने हिंदी स्त्रिया आपलें योग्य तें कार्य करूं लागेपर्यंत हिंदुस्थान, जगांत जें स्थान आपणास मिळावें असा प्रयत्न करीत आहे, तें स्थान त्यास प्राप्त होणार नाही. स्त्री प्रतिनिधींची निवडणूकहि जातवारीच्या पद्धतीवरच व्हावी याला मोठमोठे आक्षेप घेण्यांत येतील. पण स्त्रियांकरिता जर वेगळ्या जागा राखावयाच्या आहेत आणि त्या जागा सर्व जातींतील स्त्रियांना योग्य प्रमाणांत मिळणें जरूर आहे तर जातवार निवडणुकीचें तत्त्व त्यांनाहि लागू करण्याशिवाय दुसरा मार्ग काय ?

## सरकारची आशा

एवढा खुलासा करून मी आपली योजना एक प्रामाणिकपणाचा प्रयत्न समजून हिंदी जातींच्या हवालीं करीत आहें. त्या जातींपैकीं प्रत्येक जातीच्या मागण्या या योजनेंत पूर्णपणें मान्य करण्यांत आल्या नसल्या तरी ती योजना हिंदुस्थानच्या राज्यघटनेच्या मार्गांतील एक कामचलाऊ योजना आहे असेंच समजून चालण्यास हरकत नाही. या बाबतींत हिंदी लोकांनी

एक गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे ती ही कीं,त्यांना आम्हीं वारंवार बजावलें असता त्यांनी आपली अशी योजना आमच्यापुढे मांडली नाही.सरकारला एवढीच आशा आहे कीं, भावी राज्यघटनेच्या मार्गातील ही अडचण दूर झाल्यामुळे जे इतर कित्येक विषय अडून पडले होते त्यांच्याकडे लक्ष देण्यास आता हिंदी लोकांना फुरसत सांपडेल. या आणीबाणीच्या वेळीं राजकीय प्रगतीस जातिजातींमधील सहकारिता आवश्यक असल्याने नवीन राज्यघटना यशस्वी करून दाखविण्याची जबाबदारी आपण ओळखतों असें हिंदी पुढारी आपल्या वर्तनाने सिद्ध करतील अशी मला आशा आहे."

# हिंदुस्थानांतील ज्ञातिविषयक तंट्याचा निकाल

ज्ञातिविषयक राजकीय हक्कांसंबंधी मुख्य प्रधान मि. राम्से मॅक्डोनाल्ड यांनी ब्रिटिश सरकारच्या वतीने जो निर्णय दिला तो पुढीलप्रमाणे आहेः—

( १ ) दुसऱ्या गोलमेजपरिषदेच्या शेवटीं ब्रिटिश सरकारातर्फे म्हणून गेल्या डिसेंबरच्या पहिल्या तारखेस मुख्य प्रधान यांनी समारोपादाखल भाषण केलें होतें. हौस ऑफ कॉमन्स व हौस ऑफ लॉर्ड्स या दोनहि सभांकडून त्या भाषणाला मान्यताहि मिळाली होती. 'ज्ञातिविषयक तंट्याचा निकाल गोलमेज परिषदेस करतां आला नाही; यापुढेहि सर्व पक्षांना संमत होईल अशी तडजोड जर हिंदुस्थानाला करतां आली नाही तर हिंदुस्थानाची राजकाय हक्कांबद्दलची प्रगति थांबून राहूं नये याकरिता एक तात्पुरती हंगामी योजना ब्रिटिश सरकार स्वतःच तयार करील व प्रगतीच्या मार्गात आलेली अडचण दूर करील' असें मि.मॅक्डानाल्ड यांनी आपल्या भाषणांत म्हटलें होतें.

( २ ) हिंदुस्थानांतील निरनिराळ्या समाजांनी आपल्या राजकीय हक्कांसंबंधी तडजोड करण्यांत आपणास अपयश आलें असून त्यामुळे राज्यघटना तयार करण्याच्या कामाची प्रगति थांबली आहे असें ब्रिटिश सरकारला कळविलें. त्यावर 'आम्ही सदर अडचणींचा विचार करीत आहों, नवीन घटनेमध्ये अल्पसंख्याकांच्या राजकीय हक्कविषयक प्रश्नाच्या कांही बाबतींत तरी निश्चित निर्णय दिल्याशिवाय नवीन घटना तयार करण्याच्या कामांत कांहीहि प्रगति होऊं शकत नाही अशी आता आमची खात्री झाली आहे,' असें ता. १९ मार्च रोजीं ब्रिटिश सरकाराने उलट उत्तर पाठविलें.

### प्रांतिक कायदेमंडळें

( ३ ) म्हणून ब्रिटिश सरकाराने असें निश्चितपणें ठरविलें आहे कीं, पार्लमेंटपुढे योग्य वेळीं हिन्दुस्थानाच्या राज्यघटनेसंबंधी कायद्याचा जो मसुदा मांडला जाईल त्यामध्ये खाली दिलेली योजना अंमलांत आणण्याचीहि तजवीज केली जाईल. या योजनेची आंखणी मुद्दामच अशी केली कीं, त्यांत फक्त प्रांतिक कायदेमंडळांत खालसांतील निरनिराळ्या ज्ञातींचें प्रतिनिधित्व कोणत्या प्रमाणांत राहील एवढेंच दाखविलें आहे.खाली दिलेल्या विसाव्या पॅरिग्राफांत जीं कारणें नमूद केलीं आहेत त्या कारणांकरिता मध्यवर्ती कायदेमंडळांतील प्रतिनिधित्वाचा विचार पुढे ढकलला आहे. नवीन घटना तयार करतांना अल्पसंख्याकांना अत्यंत जरूरीच्या अशा दुसऱ्या अनेक प्रश्नांसंबंधीं निश्चित निर्णय करणें अत्यंत आवश्यक आहे याची जाणीव आम्हांस नाही किंवा हे प्रश्न सोडविण्याच्या कामीं आम्हांस अपयश आलें असा कयास, आम्हीं आमच्या योजनेचें क्षेत्र मर्यादित केलें, यावरून कोणींहि काढूं नये. निकालाचें स्वरूप मर्यादित करण्याचें कारण इतकेंच कीं आम्ही प्रतिनिधित्वाचें प्रमाण व तें ठरविण्याची पद्धति या मूलभूत प्रश्नासंबंधी आपलें स्पष्ट मत एकवार दिलें असता निरनिराळे समाज इतर ज्ञातिविषयक प्रश्नांचा त्या त्या तत्त्वानुसार निकाल कसा करावयाचा याचा मार्ग शोधून काढतील अशी आम्हांस बळकट आशा वाटते. या राहिलेल्या प्रश्नांची छाननी ज्या पद्धतीने व्हावयास पाहिजे त्या पद्धतीने अद्याप झाली नाही असें वाटतें.

(४) लोकांनी जी एक गोष्ट स्पष्टपणें ध्यानांत ठेवली पाहिजे ती ही कीं, हा जो निर्णय दिला आहे तो बदलून घेण्याकरिता यापुढे जे प्रयत्न केले जातील त्यांत ब्रिटिश सरकार केव्हाहि व कसलाहि भाग घेणार नाही व या निर्णयांत फेरबदल करावा म्हणून जी मागणी केली जाईल त्या मागणीला जर सर्व पक्षांचा पाठिंबा नसेल तर त्या मागणीचा विचार करण्यासहि सरकार तयार होणार नाही. परंतु सुदैवेंकरून निरनिराळ्या पक्षांत ऐकमत्य झालेंच तर असल्या तडजोडीचा अंमल केला जावा यासाठी सरकारी संमतीचा दरवाजा अजीबात बंद करून टाकावा अशी मात्र सरकारची इच्छा नाही. म्हणून हिंदुस्थानसरकारचा नवा कायदा पार्लमेंटांत पसार होण्यापूर्वी जे प्रांत गव्हर्नरांचे म्हणून समजले जातात त्या प्रांतांपुरती किंवा अखिल हिंदुस्थानाला लागू पडेल अशी एक व्यावहारिक योजना तयार केली गेली व तिला सर्व समाजांचा पाठिंबा मिळाला

आहे अशी सरकारची खात्री झाली तर मात्र, आज तयार केलेल्या योजनेच्या ऐवजीं, ही दुसरी योजना मान्य करावी अशी पार्लमेंटाकडे शिफारस करावयास सरकार तयार होईल.

(५) गव्हर्नरांचे म्हणून जे प्रांत समजले जातात त्या प्रांतांपैकीं कांही प्रांतांना वरिष्ठ सभा देण्यांत आली तर त्या प्रांतांच्या कनिष्ठ सभेंत खाली दिलेल्या २४व्या पॅरिग्राफांत वर्णन केल्याप्रमाणे जागांची वांटणी केली जाईल.

## जातवार मतदारसंघ

( ६ ) मुसलमान, युरोपियन व शीख मतदारसंघांना ज्या जागा दिल्या आहेत त्या जागांकरिता प्रतिनिधींची निवडणूक व्हावयाची ती जातवार स्वतंत्र मतदारसंघांतील मतदाराकडून केली जाईल. त्या मतदारसंघांची व्याप्ति सर्व प्रांतभर राहील. 'मागसलेला' म्हणून जेवढा भाग ठरविला जाईल त्याचा अंतर्भाव मात्र त्या संघांत होणार नाही.

हल्ली तयार केलेल्या मतदारसंघाच्या योजनेंत जर फरक करावयाचा असला अगर दुसरे फेरफार सुचवावयाचे असले तर, दहा वर्षांनंतर सर्व जातींच्या अनुमतीने तसा फरक करण्यात येईल व अशा प्रकारची अनुमति त्यास आहे कीं नाही हे अजमावण्याचेहि मार्ग घटनेंत सांगितले जातील.

( ७ ) ज्या मतदारांना मुसलमान, शीख, हिंदी ख्रिस्ती ( १०.वा पॅरिग्राफ पाहा ) ॲंग्लो इंडियन (११ वा पॅरिग्राफ पाहा) किंवा युरोपियन मतदारसंघांमध्ये समाविष्ट केले जाणार नाही, त्या मतदारांना सर्वसाधारण संघातर्फे मत देण्याचा अधिकार आहे.

( ८ ) मुंबई इलाख्यांतील कांही जिल्ह्यांत मराठ्यांकरिता सात जागा राखून ठेवण्यांत येतील.

## अस्पृश्य वर्ग

( ९ ) अस्पृश्य वर्गांतील ज्या गृहस्थांना मतदानाचा हक्क आहे त्यांनी सार्वत्रिक मतदारसंघातून मत द्यावें. परंतु या पद्धतीमुळे त्या वर्गांना कायदेमंडळांत योग्य प्रमाणांत प्रतिनिधित्व मिळण्यास कालावधि लागण्याचा संभव असल्याने २४ व्या कलमांत सांगितल्याप्रमाणें त्यांच्याकरिता खास जागा राखून ठेवण्यांत आल्या आहेत. या जागांसाठीं जे प्रतिनिधि निवडावयाचे ते केवळ ज्यांना मतदानाचा अधिकार आहे अशाच अस्पृश्य वर्गांतील इसमांकडून निवडले जातील. या मतदारसंघांत मत देणाऱ्या अस्पृश्य जातींतील मतदारांना सर्वसामान्य मतदारसंघांतहि मतें देतां येतील. अर्थातच ज्या भागांत अस्पृश्य वर्गांतील लोकांची संख्या पुष्कळ असेल अशाच विशिष्ट भागांत अस्पृश्य जातीसाठी वरील प्रकारचे स्वतंत्र मतदारसंघ अस्तित्वांत येतील. या नियमाला मद्रास इलाखा अपवाद आहे. म्हणजे मद्रास इलाख्याखेरीज इतर प्रांतांतून असलेल्या स्वतंत्र मतदारसंघांची व्याप्ति सर्व प्रांतभर असूं नये असा आमचा हेतु आहे.

बंगालचा विचार करता असें दिसतें कीं, त्या प्रांतातील कांही ठिकाणच्या सामान्य मतदारसंघांत मागसलेल्या मतदारांची संख्या अधिक भरण्याचा संभव आहे. म्हणून त्या प्रांतांतील अस्पृश्यांच्या स्वतंत्र मतदारसंघांतून किती प्रतिनिधि निवडून यावे हे निश्चित ठरलेलें नाही. यासंबंधी एवढीच दृष्टि ठेवावयाची कीं, त्या प्रांताच्या कायदेमंडळांत अस्पृश्य वर्गांना १० पेक्षा कमी जागा मिळूं नयेत.

अस्पृश्य वर्गांच्या स्वतंत्र मतदारसंघाचें सभासद होण्यास लायकीचें प्रमाण व व्याख्या अजून निश्चित ठरली नसली तरी मतदान-मंडळाने (फ्रँचाइज कमिटी ) जीं तत्त्वे मान्य केलीं आहेत तींच प्रमाणभूत मानण्यास तूर्त हरकत नाही. उत्तरहिंदुस्थानांतील कांही प्रांतांतून सदर तत्त्व-मालिकेंत थोडासा फरक करणें आवश्यक वाटेल. वीस वर्षांनंतर हे स्वतंत्र मतदारसंघ अस्तित्वांत राहूं नयेत अशी ब्रिटिश सरकारची इच्छा आहे. मात्र त्या मुदतीपूर्वीहि ६ व्या कलमांत निर्दिष्ट केल्याप्रमाणे हे स्वतंत्र मतदारसंघ नामशेष झाले तर उत्तमच.

## हिंदी ख्रिस्ती

(१०) कायदेमंडळांतून हिंदी ख्रिस्त्यांना ज्या जागा देण्यांत आल्या आहेत त्या जागांच्या निवडणुकी त्यांच्यासाठीं उभारलेल्या स्वतंत्र मतदारसंघांतर्फेच होतील. मद्रासशिवाय इतर प्रांतांतून सर्व प्रांताला व्यापूं शकतील असे ख्रिस्त्यांचे स्वतंत्र मतदारसंघ स्थापणें कठिण जाईल. म्हणून अशा प्रांतांच्या कांही विशिष्ट भागांत एक किंवा दोन स्वतंत्र मतदारसंघ स्थापण्यांत येतील व तेथे ख्रिश्चनांना आपलीं मतें देता येतील. त्यांना सामान्य मतदारसंघातर्फे आपलें मत नोंदतां येणार नाही. मात्र अशा विशिष्ट भागाबाहेरच्या ख्रिस्त्यांनी आपलीं मतें सामान्य मतदारसंघातर्फें नोंदवावीं. बिहार आणि ओरिसा या प्रांतांत कांही खास व्यवस्था करावी लागेल. कारण त्या प्रांतांतील बरेचसे ख्रिस्ती लोक रानटी जातींपैकीं आहेत.

## ॲंग्लो-इंडियन

(११) ॲंग्लो-इंडियनांना ज्या जागा देण्यांत आल्या आहेत त्या जागांच्या निवडणुकी त्या वर्गाकरिता उभारलेल्या स्वतंत्र मतदारसंघातर्फे होतील. त्यांचीं मतें गुप्त मतदान पद्धतीने पोस्टामार्फत नोंदविण्यांत यावीं. मात्र याबाबत अखेरचा निर्णय लागलेला नाही.

(१२) मागसलेल्या भागांना द्यावयाच्या

जागांचा अजूनहि विचार होत असल्याने सध्या दिलेल्या जागा केवळ तात्पुरत्या समजण्यांत याव्या.

**स्त्रियांसाठी स्वतंत्र प्रतिनिधित्व**

( १३ ) नवीन कायदेमंडळांतून स्त्री सभासदांसाठी कांहीं जागा असाव्या असें सरकारास वाटतें. यासाठी त्यांच्याकरिता कांहीं खास जागा राखून ठेवण्यांत येतील. एकाच जातींतून प्रमाणातीत स्त्री सभासद निवडले जाणार नाहींत याबद्दल मात्र दक्षता ठेवण्यांत आली पाहिजे. ही दक्षता कशी ठेवावी यासंबंधी आम्हांस ( म्हणजे सरकाराला ) योग्य उपाय न सांपडल्यामुळे २४ व्या कलमांत निरनिराळ्या जातींतील स्त्रियांना कसें प्रतिनिधित्व देतां येईल हें दाखविलें आहे. स्त्रियांसाठी मतदारसंघ कसा बनवावा यासंबंधी अजून विचार चालू आहे.

(१४) मजुरांसाठी राखून ठेवलेल्या जागा बिनजातवार मतदारसंघांतून भरल्या जातील. बहुतेक सर्व प्रांतांमध्ये गोलमेज परिषदेच्या मतदान कमिटीनें सुचविल्याप्रमाणे मजुरांचे मतदारसंघ हे अंशतः ट्रेड यूनियन, अंशतः विशिष्ट मतदारसंघ अशा स्वरूपाचेच राहतील.

(१५) व्यापार, उद्योगधंदे, खाणी व मळे यांना दिलेल्या जागा व्यापारी वगैरे संघातून निवडणुकीच्या पद्धतीने भरल्या जातील यासंबंधाची तपशीलवार माहिती पुढे देण्यांत येईल.

( १६ ) जमीनदारांना दिलेल्या जागा त्यांच्या खास मतदारसंघांतून निवडणुकीनें भरण्यांत येतील.

( १७ ) विद्यापीठाच्या जागा भरण्याच्या पद्धतीचा विचार चालू आहे.

( १८ ) प्रांतिक कायदेमंडळांतील प्रतिनिधित्वाचा प्रश्न सोडवितांना सरकाराला तपशीलांत शिरणें अपरिहार्य झालें. तथापि मतदारसंघांची योजना निश्चित करण्याचें काम उरलें आहेच. हें काम हिंदुस्थानांत झटपट उरकण्यांत यावें अशी सरकाराची इच्छा आहे. निवडून द्यावयाच्या जागांत कमीजास्त करून मतदारसंघाच्या मर्यादा बदलतां येतील तसे फरक करण्याचा हक्क सरकाराने आपल्याकडे ठेवला आहे. अर्थात् ते फरक करतांना जातवारीच्या वांटणींत म्हणण्यासारखा फेरबदल होणार नाही. बंगाल व पंजाब या प्रांतांत कोणतेहि फरक करण्यांत येणार नाहीत.

(१९) प्रांतांतील वरिष्ठ कायदेमंडळें ( अप्पर चेंबर) कसें बनवावें आणि तें कोणकोणत्या प्रांतांत असावें याचा व्हावा तितका खल झालेला नाही. तो झाल्याशिवाय त्या बाबतींत कांहीं निर्णय करतां येत नाही. मात्र सरकारानें मत असें आहे कीं, प्रांतांत वरिष्ठ कायदेमंडळ ( अप्पर चेंबर ) स्थापून जातिजातींतील अधिकारांची घडी विसकटतां कामा नये.

(२०) मध्यवर्ती कायदेमंडळाचा विस्तार व घटना यांचा विचार सरकार तूर्त करीत नाही. कारण त्याचा संबंध संस्थानिकांच्या प्रवेशाशीं आहे आणि त्या प्रवेशाबद्दल अजून वाटाघाट व्हावयाची आहे. अर्थात् त्या कायदेमंडळाची घटना ठरवितांना सर्व जातींच्या हक्कांचा सरकार पूर्ण विचार करील.

(२१) आर्थिक दृष्ट्या सिंधप्रांत स्वावलंबी होत असल्यास त्यास वेगळा करावा हें तत्त्व सरकारला मान्य आहे. पण आर्थिक प्रश्नाची अजून पुरी छाननी व्हावयाची आहे. म्हणून मुंबई इलाख्याचें सध्याचें स्वरूप डोळ्यापुढे ठेवून सरकाराने जागांची वांटणी केली आहे आणि त्याखेरीज मुंबई इलाखा व सिंध यांच्या पृथक् कायदेमंडळांतील जागांची वांटणीहि नमूद केली आहे.

(२२) ओरिसा प्रांत स्वतंत्र करण्याचा प्रश्नहि निकालांत निघाला नसल्यामुळे बिहार व ओरिसा यांच्या सध्याच्या स्वरूपानुसारच आंकडे दिले आहेत.

( २३ ) मध्यप्रांतासंबंधी जे आंकडे पुढें दिले आहेत, त्यांत वऱ्हाडाचाहि समावेश केला आहे. पण त्यावरून वऱ्हाडचें भवितव्य आज ठरलें आहे असें कोणीं समजूं नये.

**मुंबई इलाख्यांतील जागांची वाटणी**

( मुंबई सरकारचा खुलासा )

वरील निकालपत्राचें महत्त्व समजण्यासाठी मुंबईइलाख्यांतील जागांच्या वांटणीचा परिणाम काय होतो हं पाहिलें पाहिजे. सध्या मुसलमान व मुसलमानेतर यांमधील जागांची वांटणी लखनौ करारानुसार केलेली आहे. ज्या कायदेमंडळात लोकनियुक्त सभासदांची संख्या ८६ आहे त्यांत जागांची वांटणी मुसलमानेतर ४६ मुसलमान २७ व युरोपियन २ अशी होते. अस्पृश्यांतर्फे दोन सभासद असून ते सरकारानें नेमलेले असतात. अँग्लो इंडियन व हिंदी ख्रिस्ती यांनाहि प्रत्येकीं एक जागा असून ती सरकारच्या नेमणुकीनेच भरण्यांत येते. याशिवाय सार्वत्रिक मतदार संघांतून निवडून येण्यास या तीनहि वर्गांना सवड आहेच. व्यापार व उद्योगधंदे यांच्या सात जागा निवडणुकीने भरतात आणि कापसाच्या व्यापाऱ्यांतर्फेची एक जागा सरकारी नेमणुकीने भरते. मजूर वर्गाच्या तीन जागाहि तशाच भरतात. जमीनदारांना तीन व विद्यापीठाला एक जागा आहे. मुसलमानेतर मतदारसंघामध्यें मराठ्यासाठीं सात जागा राखून ठेवल्या आहेत.

वरील निकालपत्रान्वयें अशी स्थिति येणार कीं, कायदेमंडळांतील २०० जागांपैकीं ९७ जागा अस्पृश्ये-

वर अशा मुसलमानेतरांना मिळतील. सध्या लोकनियुक्त सभासदांपैकीं सुमारें शें. ३१ जागा मुसलमानासाठी आहेत. जवळजवळ तेंच प्रमाण पुढे राहील. हल्लीं अस्पृश्यांना सरकारनियुक्त अशा २ जागा आहेत. निकालपत्रान्वये त्यांना १० जागा मिळणार आहेत. युरोपियन, अँग्लोइंडियन व हिंदी ख्रिस्ती यांच्या प्रतिनिधींच्या जागांत कांहीच वाढ केलेली नाहीं. तीच स्थिति व्यापारी, जमीनदार, विद्यापीठाचे सभासद यांची. मजुरांना सध्या तीन जागा असून त्या सरकार भरते. त्याऐवजीं त्याना आठ जागा मिळतील व त्याकारेता उमेदवार निवडण्याचा अधिकार मजुरांना राहील. मराठ्यासाठी जागा राखून ठेवण्याचा जुनाच क्रम पुढे चालू ठेवला आहे.

## श्री. केळकरांचें मुंबईतील अभिनंदन

श्री. न. चिं. केळकर यांच्या वयास साठ वर्षे संपून ६१ वें वर्ष लागत आहे. या शुभप्रसंगीं श्री. केळकरांचें अभिनंदन करण्याकरिता मुंबई येथे केळकर वाढदिवस मंडळ मुंबई, महाराष्ट्र चेंबर ऑफ कॉमर्स, यंग मेन्स हिंदु असोसिएशन, मराठी ग्रंथसंग्रहालय, पाठारे प्रभु सोशल समाज, मराठी ग्रंथसंग्रहालय, ब्राह्मण सभा, स्वस्तिक लीग, लोकमान्य सेवासंघ, दैवज्ञ असोसिएशन, ग्रंथसंपादक व प्रसारक मंडळ, ब्राह्मण भगिनी समाज, निरनिराळ्या कॉलेजांतील मराठी वाङ्मय मंडळें वगैरे संस्थांच्या विद्यमाने, ब्लॅव्हॅटस्की लॉजमध्ये सोमवारीं सायंकाळीं (ता. २२ रोजीं) सर चुनीलाल मेहता यांच्या अध्यक्षतेखाली जाहीर सभा होणार आहे. मुंबईतील केळकर वाढदिवस मंडळाचे डॉ. वेलकर हे अध्यक्ष असून डॉ. आठवले, डॉ. सावरकर व श्री. नवरे हे सह–कार्यवाह आहेत.

# ही ‘ पंचायत ’ नव्हे, तर मोठी पंचाईत झाली !

भावी हिंदी राज्यघटनेत प्रत्येक प्रांतिक कायदे कौन्सिलाचा विस्तार हल्लीहून बराच मोठा होणार म्हणजे त्यांतील सभासदांची संख्या हल्लीच्याहून निदान दुप्पट होणार. या संख्येंत हिंदुस्थानांतील काळे गोरे निमगोरे, व फिरून काळ्यांमध्ये दाढीवाले बिनदाढीवाले, स्पृश्य, अस्पृश्य, तराजूवाले, तरवारवाले, अशा सर्व वर्गांना किंबहुना स्त्री-पुरुष भेदानेहि सर्व वर्गांना आपले प्रतिनिधि निवडून पाठविण्याचा हक्क मिळावा ही आकांक्षा अगदीं स्वाभाविक होय. पण मनुष्याचा स्वभावच असा स्वार्थी कीं, आपल्याला आपला योग्य हिस्सा तर मिळावाच, पण जमल्यास ‘ येन केन प्रकारेण ’ योग्यतेहूनहि अधिक हिस्सा मिळावा असें त्याचें पाहणें असतें. अशा स्थितींत योग्य म्हणून किती द्यावें, व मग योग्यतेहून अधिक मिळवायाचें तर तें किती मागावें, हें ठरविण्याचें काम बरेंच कठिण जातें. वास्तविक पाहतां सुप्रतिष्ठित सुधारलेल्या राज्यसंस्थेंत प्रजाजनांची योग्यता मुख्यतः कर किंवा सरकारदेणें देण्याची त्यांची जी पात्रता तिजवरून ठरविणें हेंच न्यायाचें समजतात. सरकारी कर देण्याची पात्रता व लोकतंत्र राज्यपद्धतींत मिळणाऱ्या प्रतिनिधींचें प्रमाण या दोहोंची बहुधा सर्व देशांत सांगड घालण्यात आलेली आढळते.

पण हिंदुस्थानांत ही सांगड घालण्याची वेळ अद्यापि आली नाही. तर लोकसंख्येवर प्रतिनिधींचें प्रमाण ठरविलें जावें, इतकेंच नव्हे तर आम्हां अल्पसंख्य लोकांचें हित एरवीं संभाळलें जाणें शक्यच नाहीं, म्हणून लोकसंख्येच्या प्रमाणापलीकडे जाऊनहि आम्हाला विशेष मोठी प्रतिनिधिसंख्या दिली पाहिजे, असा आग्रह धरण्याला मुसलमानांनी प्रथम सुरुवात केली; व तो आग्रह इतक्या विकोपाला गेला कीं, त्याचे दुष्परिणाम हिंदुस्थानाला यापुढे किती वर्षे भोगावे लागतील हें सांगवत नाही. मुसलमानांचें उदाहरण पाहून, म्हणजे आग्रहाला यश येतें असें पाहून, अस्पृश्य लोकांनीहि तीच मागणी मागण्यास सुरुवात केली. आणि या दोन मागण्या कबूल केल्यानें बिनहिशेबी प्रतिनिधि-दानाचें तत्त्वच जवळ जवळ कबूल केल्यासारखें होतें. मग ही बिनहिशेबी देणगी ती मागेल त्यालाच काय, पण न मागेल त्यालाहि द्यावी अशा मताचा वारा हळूहळू वाहू लागला. पण या वाऱ्याची पुढे वावटळ झाली; आणि तिच्या जोरानें न्याय, तारतम्य, राष्ट्रीय बुद्धि इत्यादि सर्व गोष्टी केरकचऱ्यासारख्या उडून गेल्या.

सुमारें २५ वर्षांपूर्वी एकट्या मुसलमानांचें तेवढें भूत उठवावें, व तें हिंदुस्थानांतील स्वराज्यवादी लोकांच्या माथ्यावर बसवावें, असा इंग्रज सरकारचा पहिला बेत होता. पण पुढें त्याच २५ वर्षांच्या अवधींत स्वराज्यवादी लोकांनी फार जोर करून त्राहि त्राहि करून सोडल्यामुळे, आपणाला हस्तगत झालेली भुतें उठविण्याची विद्या मुसलमानांशिवाय इतर वर्गांसंबंधानेहि उपयोगांत आणावी अशी बुद्धि इंग्रज सरकारला झाल्यास त्यांत नवल तें काय ? परस्पर भांडणानें व स्वार्थमूलक कलहानें जर स्वराज्य मागणारे लोक आयतेच नादान ठरवितां येतात, त्यांतल्या कांहींना जातिस्वार्थापुढे स्वराज्य दिसेनासें होतें, व एकाला छू: म्हणून दुसऱ्याला पाठशिवणीला धाडल्यानें आपल्याला सुखासनावर स्थिर बसून हातांतला खाऊ बिनधोक खातां येतो, तर स्वराज्य देण्याला नाखूष असलेल्या सरकारानें भुतें उठवून कलागत लावण्याचा हा मंत्र जपण्याला मागें पुढें कां पाहावें ?

या कपटनीतीचा दुष्परिणाम आज अनेक वर्षे नजरेस येतच आहे. पण स्वराज्याची प्रत्यक्ष घटना रचण्याला लोक कागद शाई घेऊन पुढें सरसावूं लागले तेव्हांपासून तर हे दुष्परिणाम अगदीं उघडपणें प्रत्ययास येऊं लागले. ‘कोऱ्या चेकवर सही करून देतों’ म्हणणाऱ्या परोपकारी किंबहुना परधार्जिणी वीरांचेहि दानशौर्य फुकट गेलें. सोईचें म्हणून कांहीं बोलण्याची सोयच राहिली नाहीं. आणि अजगराच्या तोंडांत दिलेला हात सगळा आंत ओढला जाऊन, शेवटीं सगळा मनुष्यचा मनुष्य आंत ओढण्यास सुरुवात व्हावी त्याप्रमाणें, मुसलमानांच्या मागणीची ओढ वाढूं लागली. आणि अखेर हिंदी लोकांतील सर्व वर्गांनी परस्परांत भांडावें, आणि मॅक्डोनाल्ड सँकी प्रभृति विशेषतः कॉन्झरवेटिव्ह पक्षानें ती गंमत पाहात केव्हां उघड तर केव्हां मनांत हसत बसावें, अशी सर्वस्वी लज्जास्पद स्थिति गोलमेज परिषदेपुढे १९३१ च्या डिसेंबरांत झाली.

परिषदेचा निकाल लावण्याची घाई ब्रिटिश प्रधानमंडळाला नव्हतीच. तेव्हां त्याला मानभावीपणानें, सहजच म्हणतां आलें कीं, “ बाबांनो, तुम्हाला विलायतची हवा समेट करण्याला मानवत नसली तर आपल्या मातृभूमीच्या प्रसादयुक्त हवेंत परत जा, व तेथें समेटाचा प्रयत्न फिरून करून पहा. ” त्याप्रमाणें व्हाइसरॉय साहेबांनी कन्सल्टेटिव्ह कमिटीची सभा बोलावली. पण तींत

झालें तरी काय निष्पन्न होणार ? तेव्हां शेवटीं या जातिविषयक तंट्याचा निकाल ब्रिटिश प्रधान मंडळाने लावावा अशी साळसूदपणाची सूचना पुढें आली. तिला डॉ. मुंजे यांनी हरकत घेतली म्हणतात ! पण इतरांनी संमति दिली. मुसलमानांना व्यक्तिशः रॅम्से मॅक्डोनाल्ड यांच्या निर्णयाला हरकत घ्यावी, आणि हिंदु समाजातर्फे म्हणून बोलणाऱ्या डॉ. मुंजे यांनी प्रधान–मंडळाच्या निर्णयाला हरकत घ्यावी, या गोष्टींचें स्वारस्य कोणाहि चाणाक्ष मनुष्याच्या लक्षांत आल्याशिवाय राहणार नाही. पण एका मुंज्यांशिवाय बाकी सर्वांनी ज्या मंत्रिमंडळाला पंच म्हणून स्वीकारलें,त्याकडे तो निर्णय देण्याचा अधिकार उजळ माथ्यांने जावा यांत काय आश्चर्य ? अशा रीतीने मंत्रिमंडळ 'पंच' या नात्याने स्वीकारलें जाऊन त्यानें जो निर्णय दिला, तो गेल्या बुधवारीं प्रसिद्ध झाला; व तो आता सर्वांनी वाचलाच आहे. तेव्हा तो कसा काय आहे हें पाहिलें पाहिजे.

एका वाक्यांत सांगावयाचें तर असें म्हणतां येईल कीं, "ही पंचायत नव्हे, पण ही मोठी पंचाईतच झाली!" पंचायत व पंचाईत हे दोनहि शब्द मराठी आहेत व अर्थाच्या दृष्टीने ते रूढहि झाले आहेत. पण या दोहोंचे रूढार्थ इतके भिन्न आहेत कीं, त्यांतील विरोध या विलायती शहाण्यांच्या निर्णयाचें स्वरूप व्यक्त करून दाखविण्याला उपयोगी पडण्यासारखा आहे; आणि फिरून त्या दोन शब्दांचा ध्वनि जवळ जवळ एकच असता त्यांच्या अर्थांत मात्र फारच तफावत आहे ! म्हणून त्यांचा एकत्र उपयोग करण्यांत एक प्रकारें स्वारस्यहि आहे. कसें तें पाहा. पंचायत या शब्दाचा अर्थ पंच व पंचांनी दिलेला निर्णय असा दोन्ही प्रकारचा होतो. पंच म्हटलें म्हणजे ते उभय पक्षांनी पसंत करून दिलेले असतात. यामुळे व इतर कारणांनीहि पंचायतीचा निर्णय हा न्यायाचा असतो अशी समजूत असते व ती अनुभवालाहि येते. अर्थात् स्वतः निवडून दिलेल्या न्यायाधीशांचा निर्णय कोण अवमानील ? उलट, पक्षकाराला असेंच वाटतें कीं, हीं पांच निःस्वार्थी माणसें न्यायबुध्दीने जो निर्णय देतात तोच बरोबर असला पाहिजे. चुकत असलें तर माझेंच कांही चुकत असलें पाहिजे.अशा विचाराने तो निर्णय नाखुष न होता अदबीने व आदराने स्वीकारतो.म्हणजे पक्षकाराला निर्णय करण्याची जी अडचण पडलेली असते ती पंचायतीने निघून जाते.

'पंचाईत' हा रूढ शब्द घेतला तर त्याचा अर्थ अडचण असा होतो. यामुळे अडचण काढून टाकणारा पंचांचा निर्णय व खुद्द ती अडचण या दोहींत जमीनअस्मानाची तफावत नाही काय? तेव्हा अर्थातच प्रश्न उत्पन्न होतो कीं,ब्रिटिश मंत्रिमंडळाने दिलेल्या निर्णयाला पंचायत हा शब्द लावावा कीं पंचाईत हा शब्द लावावा ? त्याचें उत्तर पचाईत हा शब्द लावावा असेंच येणार. कारण हिंदी प्रजा एकजीव व्हावी, आणि धर्म व जाति यांचें संकुचित हित विसरून जाऊन राष्ट्रीयत्वाच्या वाढत्या भावनेवर स्वराज्य--घटना प्रस्थापित व्हावी, ही गोष्ट बाजूला राहून राष्ट्रीयत्वाचे शतशः तुकडे मात्र या निर्णयाने झाले आहेत. त्याला दाखला खरोखर हाच कीं,संजीवनी विद्या मिळविण्याकरितां कच शुक्राचार्याकडे जाऊन राहिला, व त्याचें बस्तान बसत चाललें हें पाहून राक्षसांनी त्याला मारून--जाळून त्याची राख शुक्राचार्यांला मद्यांत मिसळून पाजली. हेतु हा कीं, एका कचाचे अनंत कच म्हणजे कण व्हावे. अर्थात् ते पुनः सर्व एकत्र होऊन देहधारी कच कसा बनावा ? त्याप्रमाणे हिंदुस्थानात मुसलमान, अस्पृश्य, युरोपियन, अँग्लोइंडियन, ख्रिश्चन, मागसलेले, राखीव जागावाले,स्त्रिया अशा रीतीने अनेक संघ बनल्यावर, राष्ट्रीय बुद्धी वा कच फिरून देहधारी व जिवंत कसा व्हावा ?

पुराणांतल्या शुक्राचार्याने स्वतःचें देहपतन पत्करलें व संजीवनी मंत्र जपून कचाला पुनरुज्जीवित केलें.तसा प्रकार या हिंदुस्थानांतील राजकीय समाजाचा केव्हा होईल तो होवो; पण आज तरी त्या समाजाचे असे तुकडे पाडल्यामुळे त्याला पराकाष्ठेचा कमकुवतपणा येणार, व प्रजा कमकुवत झाली म्हणजे तिला अधिक अधिकार न देता आपल्या तंत्राने खुशाल हवें तसें राज्य चालविण्याला ब्रिटिश सरकारला आणखी किती तरी वर्षें संधि मिळणार, हें चित्र काढल्याप्रमाणे अगदी स्पष्ट आहे. कारण, जातवार मतदार संघ केले म्हणजे दरखेपेला जात्याभिमानी व धर्माभिमानी प्रतिनिधि निवडून येणार, कायदेमंडळांतून हाच अभिमान नंगा नाच घालणार, आणि निग्रहानुग्रहाचा खेळ करण्याला एकाऐवजीं दहा वर्ग सरकाराला लाभले, म्हणजे ते कोणाचेंच कांही चालूं न देता त्या सर्वांच्या अंगावरून सरकार आपला चारचाकी रथ डौलाने ओढीत नेणार !

ब्रिटिश प्रधानमंडळाने दिलेला निर्णय खरोखर कोणत्याहि रीतीने पंच-कयासासारखा नसून, वादांतील एका पक्षकाराच्याच पदरांत न्यायाधीश होण्याचें श्रेय पडावें तसेंच कांहीसें येथे घडलें आहे. या निर्णयाचें खरें स्वरूप उघडेंनागडें करून दाखविणें अशा करिताच अवश्य आहे कीं, पंचकयास किंवा पंचायतीचा निर्णय म्हटला म्हणजे त्याला नांवें कशीं ठेवावीं अशीच एक प्रकारची सात्त्विक बुद्धि उत्पन्न होऊं

लागते. ती होणें इष्ट नाही. आणि तें स्वरूप खरें समजावून सांगितलें म्हणजे, पंचाईत म्हटल्या जाणाऱ्या या निर्णयानें खरी पंचायत मात्र कशी उभी केली हें लोकांच्या लक्षांत तेव्हाच येण्याचा संभव आहे. आता या निर्णयाला लोकांनी नांवें ठेविलीं म्हणून तो थोडाच ताबडतोब बदलण्यांत येणार आहे ? तेव्हा उगीच त्याला नांवें कां ठेवा ? असला प्रश्न व त्याचें संमतिगर्भ उत्तर हें आम्हांला समजतें. तथापि दुर्दैवानें ह्या निर्णयच काय धिंगाणा घालावयाचा तो घालो, तो नाइलाजानें म्हणून सोसावा लागेल. पण बुद्धिभ्रंश होऊन लोकांची भलती समजूत न व्हावी इतकी तरी खबरदारी घेणें हें लोकमताच्या पुढाऱ्यांचें या वेळीं कर्तव्य ठरतें.

# सार्वजनिक सभेकडून केळकरांचा सत्कारसमारंभ

श्री. दे. भ. **नरसिंह चिंतामण** ऊर्फ **तात्यासाहेब केळकर** यांस साठ वर्षें संपून एकसष्टावें वर्ष लागलें म्हणून पुणें येथील सार्वजनिक सभेच्या विद्यमानें सोमवार ता. २२ रोजीं सकाळीं ८॥ वाजता सभेच्या दिवाणखान्यांत श्री. **वामन मोरेश्वर पोतदार** यांच्या अध्यक्षतेखालीं सभेच्या सभासदांची व नागरिकांची सभा भरली होती. सदर प्रसंगीं लोकनायक माधवराव अणे, श्री. दादासाहेब करंदीकर, श्री. भाऊसाहेब सोमण, श्री. पांडुअण्णा शिराळकर वगैरे मंडळी परगांवांहून आली होती.

### श्री. भावे यांचें भाषण

प्रथम श्री. पिंपळखरे यांनी स्वागतपर पद गाऊन दाखविल्यावर सभेचे चिटणीस श्री. **वासुदेवराव भावे** यांनी सभेचा उद्देश लोकांना सांगितला. ते म्हणाले "आज सभेपुढे दोन महत्त्वाचीं कामें आहेत. एक दे. भ. तात्यासाहेब केळकर यांच्या तैलचित्राचें अनावरण करणें व दुसरें त्यांना मानपत्र देणें. श्री. तात्यासाहेब यांचा या सभेशीं १८९६ सालापासून संबंध आला. त्यांनी सभासद, चिटणीस, उपाध्यक्ष व अध्यक्ष या नात्यानें गेलीं ३६ वर्षें सभेची जी बहुमोल सेवा केली तिजबद्दल संस्थेस अभिमान वाटत आहे. ३६ वर्षें एकाच संस्थेची अशी सेवा करण्याचें भाग्य थोड्यांच्याच वांट्यास येतें. सभेचे सभासद असतांना त्यांना प्रथम दुष्काळांत कामगिरी करावी लागली व फॅमिन रिलीफ कोड लोकांना समजावून देण्यासाठी महाराष्ट्रांत निरनिराळ्या ठिकाणीं दौरा काढावा लागला. आतापर्यंत त्यांनी या संस्थेची बहुमोल सेवा केली आहे. पुणें शहराचीहि त्यांनी सेवा पुष्कळ प्रकारांनी केली आहे. रेमार्केटपुढील लो. टिळकांचा पुतळा उभारण्यांत आला त्या वेळचा सरकारी विरोध लक्षांत घेता श्री. तात्यासाहेबांची कामगिरी चटकन लक्षांत येते. त्यांनी केसरी संस्थेतर्फे दहा हजार रुपये आगाऊ देऊं करून पुतळा उभारण्याच्या वाटेंतील मुख्य अडचण दूर केली. श्री. केळकरांनी महाराष्ट्राची किंबहुना आखिल हिंदभूमीची जी अनेक रीतींनी सेवा केली तिजबद्दल कृतज्ञता दर्शविण्यासाठी आज हा समारंभ घडवून आणण्यांत आला आहे.

सार्वजनिक सभेंत ज्या थोर पुण्य पुरुषांचीं तैलचित्रें आज आपल्यापुढें दिसत आहेत त्या चित्रांवरून आपल्यास बोध घेतां येतो, हें आपलें भाग्य आहे. ते आज जडदहानें आपल्यापुढें नसले तरी त्यांची दिव्यस्मृति आपल्या अंतश्चक्षूंपुढें उभी आहे. कै. अण्णासाहेब पटवर्धनांकडे पाहिलें असता त्यांची तपश्चर्या मनांत येते. कै. परांजपे यांच्याकडे दृष्टिक्षेप केला असता त्यांच्या वक्रोक्तीचें स्मरण होतें. लो. टिळक म्हणजे मूर्तिमंत राजकारणच होय. अशाच प्रकारची पवित्र भावना इतरांच्या तैलचित्रांकडे पाहूनहि मनांत उद्भवते. अशीच पवित्र भावना दे. भ. केळकर यांचें तैलचित्र पाहून आपणांत उत्पन्न होईल. तें चित्र श्री. बाबासाहेब पोतदारांनी अनावृत करावें अशी मी सभेच्या वतीनें त्यांना विनंति करतों."

वरील आशयाचें भाषण झाल्यावर श्री. पोतदार यांनी तैलचित्राचें टाळ्यांच्या गजरांत अनावरण केलें. ( भाषण पुढील अंकीं देण्यांत येईल ).

नंतर श्री. तात्यासाहेब हे सभास्थानीं उपस्थित झाले तेव्हा त्यांचें सर्वांनी टाळ्यांच्या गजरांत स्वागत केलें. श्री. गोडबोले यांनी 'वंदन नरसिंहास' हें पद गोड स्वरांत गाऊन दाखविलें. नंतर श्री. पोतदार यांनी मानपत्र देण्याचे अगोदर प्रास्ताविक भाषण केलें. (भाषण पुढील अंकीं देण्यांत येईल.) अध्यक्षांचे भाषण झाल्यावर श्री. **सदाशिवराव बापट** यांनी मानपत्र वाचून दाखविलें ( मानपत्र पुढील अंकीं छापण्यांत येईल. ) व तें अध्यक्षांनी श्री. केळकर यांस रौप्यकरंडकांतून समर्पण केलें. श्री. केळकर यांस आहेर अर्पण करण्यांत आला. मानपत्रास उत्तर देतांना श्री. केळकर यांनी पुढील आशयाचें भाषण केलें.

### श्री. केळकर यांचें भाषण

"या सभेचा हा कार्यक्रम माझ्या परोक्ष ठरला पण तो ठरल्यावर मला कळविणें सभेस भाग पडलें. या प्रसंगीं

मला बोलावें लागणार नाही अशी माझी अपेक्षा होती, पण आपण मजवर स्नेही या नात्याने स्तुतीचा जो वर्षाव केला आहे त्यामुळे भाषण करण्याचा मी आता आग्रह धरणार आहें. माझें तैलचित्र मी हजर नसतांना उघडण्यांत आलें, तसाच मानपत्राचा समारंभहि साजरा होता तर बरें. आता आपण माझ्या गुणांची जी स्तुति केली त्याबद्दल मला एवढेच म्हणावयाचें आहे कीं स्नेहाच्या ठिकाणीं सर्व संभवतें. पण मी कांही भोळा माणूस नाही. अंतर्दृष्टि ठेवून माझी किंमत काय आहे हें मी बरोबर ओळखून सर्वांशीं वागतों. माझ्यावर प्रेम करणारीं इतकीं माणसें आहेत हें माझें भाग्य आहे असें समजून मी हा सत्कार स्वीकारतों. सार्वजनिक सभेंत ज्या थोर सज्जनांच्या तसबिरी लावल्या आहेत त्यांत माझें तैलचित्र लावून मला त्यांच्यामध्ये स्थान दिलें ह्या गोष्टीबद्दल मला समाधान वाटतें. संस्थेची योग्यता व्यक्तीपेक्षा मोठी असते, ती मनुष्याच्या अनेक पिढ्यांना पुरून उरण्यासारखी असते. या सभेच्या वास्तूस अनेक पुण्यपुरुषांचे पाय लागले व तिच्या कार्यास त्यांचे हातहि लागले आहेत. येथील दिवाणखान्यांत ज्या प्रतिमा दिसतात त्यांच्या चरित्रापासून अनेक तऱ्हेने बोध घेतां येण्यासारखा आहे. न्यायमूर्ति रानडे यांनी राजकारणाचें बीज रोवून महाराष्ट्रास हिंदुस्थानांत अग्रस्थान मिळवून दिलें. लो. टिळक यांनी अखिल भारताचें राजकारण झपाट्याने पुढे नेलें. न्यायमूर्ति रानडे यांनी पेरलेल्या बीजाचें तें फळच होय. 'ना. गोखले, प्रो. शिवरामपंत परांजपे व रा. ग. व्यं. जोशी यांचीहि अशीच भरीव कामगिरी आहे. येथे श्रीमंत संस्थानिकांचे फोटो आहेत. त्यांचीहि पूर्वकालीन कामगिरी लक्षांत घेता त्याबद्दल एक प्रकारें अभिमान वाटेल. हल्ली जरी कांही संस्थानिकांनी राष्ट्रविन्मुख असें धोरण पत्करलें असलें तरी कोणी सांगावें ते फेडरेशन झाल्यावर उपयोगी पडणार नाहीत? शिंदे, होळकर यांचा गत इतिहास काय सांगत आहे? त्यांचा इतिहास म्हणजे महाराष्ट्राचाच इतिहास होय. संस्थानिक व सार्वजनिक पुढारी यांच्या पंगतींत आपण मला स्थान दिलें याबद्दल आपले माझ्यावर अत्यंत उपकार आहेत. राजकारणाची प्रगति झपाट्याने झाली ही गोष्ट खरी आहे. त्या मानाने या सभेने आपलें वैशिष्ट्य संभाळून अस्तित्व कायम ठेवलें आहे ही अभिमानाची गोष्ट आहे. हिंदुस्थानांत ज्या जुन्या चारदोन संस्था आहेत त्यांत ही संस्था अग्रगण्य आहे. आपण आज माझा जो सत्कार केला त्याबद्दल मी सर्वांचा आभारी आहें."

वरील आशयाचें श्री. केळकर यांचें भाषण झाल्यावर **श्री. दादासाहेब करंदीकर** यांनी विनोदी शब्दांत श्री. केळकर यांचें अभीष्ट चिंतिलें. नतर सभेचे उपाध्यक्ष **श्री. ल. ब. भोपटकर** यांनी श्री. केळकर व इतर पाहुण्यांचे आभार मानून अध्यक्षांना हार घालण्यांत आल्यावर राष्ट्रगीत होऊन हा गोड समारंभ समाप्त झाला.

# अल्पसंख्याकांचा विलायतेंतील करार

दुसऱ्या गोलमेज परिषदेच्या शेवटीं शेवटीं गोलमेज परिषदेकरिता गेलेले मुसलमान, युरोपियन, अँग्लो-इंडियन, हिंदी ख्रिस्ती, अस्पृश्य वगैरे अल्पसंख्याकांच्या पुढाऱ्यांनी आपल्या सर्वांची मिळून एक योजना मुख्य प्रधानांच्या हातीं दिली. मुख्य प्रधान यांनी जो सध्या निर्णय दिला आहे तो जवळ जवळ या योजनेची प्रतिकृति असल्यामुळे या योजनेला महत्त्व दिलें पाहिजे. या योजनेंतील बाकीचा भाग आज गैरलागू असल्यामुळे मतदार-संघ व त्यांचे प्रतिनिधि एवढ्याच बाबीपुरता त्या योजनेंतील सारांश खाली दिला आहे.

### स्वतंत्र मतदार-संघ

हल्ली कोणत्याहि कायदे-मंडळांत ज्या ज्या अल्पसंख्याकांचे लोकनियुक्त अगर सरकार-नियुक्त प्रतिनिधि आहेत, त्या त्या सर्व अल्पसंख्याकांना स्वतंत्र मतदार-संघातर्फे प्रतिनिधि पाठविण्याचा हक्क असला पाहिजे. पुढे दिलेल्या कोष्टकांत नमूद केल्याप्रमाणे त्यांचे प्रतिनिधि तितक्या संख्येने कायदेमंडळांत असले पाहिजेत. परंतु ज्या प्रांतांत त्यांचें बहुमत असेल तेथे कोणत्याहि कारणाने ते इतरांपेक्षा कमी किंवा इतरांच्या बरोबरीचेहि केले जाता कामा नये; म्हणजे त्यांचें बहुमत कायमचें पाहिजे.

दहा वर्षांनंतर पंजाब व बंगाल यांमधील मुसलमानांनी अगर इतर प्रांतांतील अल्पसंख्यांनी आपणास पसंत असल्यास संयुक्त मतदार-संघाची पद्धति स्वीकारावी अगर संयुक्त मतदारपद्धतीबरोबरच आपल्याकरिता जागा राखून ठेवाव्या. पण हें त्या त्या संघाच्या संमतीनेच केलें पाहिजे. तसेंच वरिष्ठ लोकसभेंतहि वरीलप्रमाणेच संयुक्त मतदारसंघाची अगर राखीव जागेसह संयुक्त मतदारसंघाची पद्धति मान्य

करणें न करणें त्या त्या संघाच्या अनुमतीवर राहील. अस्पृश्यांच्या बाबतींत मात्र ही मुदत वीस वर्षांची असावी व त्यांतहि वयांत आलेल्या प्रत्येक नागरिकास मतदानाचा हक्क मिळाल्याशिवाय त्यांना संयुक्त मतदारसंघ देऊं नयेत.

याशिवाय युरोपियन व अँग्लो–इंडियन लोकांकरिता स्वतंत्र मतदार-संघ पाहिजेत असें या करारांत म्हटलें आहे.

### सिंधमधील हिंदूंना सवलती

सिंधमधील हिंदु व सरहद्द प्रांतांतील हिंदु व शीख यांना, ज्या प्रांतांत मुसलमान अल्पसंख्य असल्यामुळे तेथे त्यांना जादा हक्क दिले आहेत, तेच जादा हक्क दिले जातील.

### प्रतिनिधींची संख्या

या सर्व योजनेंत प्रतिनिधींची संख्या ही बाब मुख्य आहे. या संख्येंत बदल केलेली योजना मान्य होणार नाहीं. कारण ही संख्या हाच या योजनेचा प्राण आहे. ही योजना हिंदुस्थानांतील बेचाळीस टक्के लोकांस मान्य आहे असें समजण्यास हरकत नाहीं.

### प्रतिनिधींचें संख्याबल

| कायदेमंडळाचें नांव | स्पृश्य हिंदु | अस्पृश्य | मुसलमान | ख्रिस्ती | शीख | अँग्लो इंडियन | युरोपियन | एकूण संख्या |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| बंगाल कायदेमंडळ | ३८ | ३५ | १०२ | २ | ० | ३ | २० | २०० |
| मुंबई कायदेमंडळ | ८८ | २८ | ६६ | २ | ० | ३ | १३ | २०० |
| मद्रास-कायदेमंडळ | १०२ | ४० | ३० | १४ | ० | ४ | ८+२ दोन जागा जंगली जातींकरिता | २०० |
| पंजाब कायदेमंडळ | १४ | १० | ५१ | १·५ | २० | १·५ | २ | १०० |
| संयुक्त प्रांत | ४४ | २० | ३० | १ | २ | ० | ३ | १०० |
| मध्यप्रांत | ५८ | २० | १५ | १ | १ | २ | २ | १०० |

या योजनेखाली आगाखान, अंबेडकर, पानियार, सर हेन्री गिडने व सर ह्यूबर्टकार यांच्या सह्या आहेत.

### गांधींची योजना

राष्ट्रीय सभेतर्फे म. गांधी हे एकटेच गोलमेज परिषदेस प्रतिनिधि म्हणून गेले होते. त्यांनी जाण्यापूर्वी राष्ट्रीय सभेच्या वर्किंग कमिटीचा सल्ला घेतला होता. व त्या सल्ल्यानुरूप राष्ट्रीय सभेची म्हणून एक योजना त्यांनी गोलमेज परिषदेपुढे मांडली. त्यांतील सध्याच्या प्रश्नाला लागू तेवढाच भाग खाली दिला आहे.

### राष्ट्रीय सभेचें मत

( १ ) मतदानाचा हक्क सर्व वयांत आलेल्या स्त्रीपुरुषांस दिला जाईल.

( २ ) हिंदुस्थानाच्या भावी घटनेंत संयुक्त मतदारसंघ हाच प्रतिनिधित्वाचा पाया मानला जाईल.-

( ३ ) सिंधमधील हिंदु, आसामांतील मुसलमान, पंजाबांतील शीख आणि ज्या ज्या प्रांतांत हिंदु अगर मुसलमान यांची लोकसंख्या २५ टक्क्यांपेक्षा कमी असेल त्या त्या सर्व प्रांतांत लोकसंख्येच्या प्रमाणांत त्यांच्याकरिता जागा राखून ठेवण्यांत येतील. व शिवाय त्यांना सर्वसाधारण मतदार–संघातर्फे उभे राहण्याचाहि हक्क राहील. या योजनेवर म. गांधींची सही आहे.

### सायमन कमिशनाच्या शिफारशी

सायमन कमिशनने या सर्व प्रश्नांची खूप चर्चा केली आहे. पण त्यांतील आजला लागू व महत्त्वाचा भाग तेवढाच सारांशरूपाने खाली दिला आहे.

### स्वतंत्र मतदारसंघ

(१) हिंदु, मुसलमान वगैरे समाजांत जर ऐकमत्य नसेल तर स्वतंत्र मतदार-संघ ठेवले पाहिजेत हें आम्हांस नाखुषीने म्हणावें लागत आहे.

( २ ) शीख लोकांची मागणी आपल्यास ३० टक्के जागा द्याव्या अशी आहे. पण ती मान्य करतां येत नाही. त्यांना आज ज्या जागा दिल्या गेल्या आहेत तेवढ्या मात्र त्यांना मिळाल्याच पाहिजेत.

### मद्रासेंतील ब्राह्मणेतर व मुंबईचे मराठे

( ३ ) मद्रास इलाख्यांतील ब्राह्मणेतरांकरिता जागा राखून ठेवण्याचे कारण नाही. मुंबईतील मराठ्यांकरिता पूर्वीप्रमाणेंच जागा राखून ठेवण्यास पाहिजेत असें नाही. पण ही पद्धत अजीबात बंद करणें बरोबर नाही. म्हणून परिस्थितीप्रमाणें कांही जागा राखीव ठेवाव्या व कांही काढून टाकाव्या.

### अस्पृश्य

( ४ ) अस्पृश्यांना स्वतंत्र मतदारसंघ देऊं नयेत. त्यांनी सर्वसाधारण मतसंघांत सामील व्हावें. परंतु त्याच्याकरिता जागा मात्र राखीव असाव्या. त्यांना योग्य प्रतिनिधित्व मिळण्याकरिता कांही नियम तयार करून त्या बाबतींतील अधिकार गव्हर्नराकडे द्यावे.

### युरोपियन

( ५ ) युरोपियनांकरितां स्वतंत्र मतदार संघ तयार करावे. व त्यांच्या प्रतिनिधींचें हल्लींचेंच प्रमाण कायम ठेवावें. मुंबई इलाख्यांत फार तर तें थोडें वाढवावें इतकेंच.

### अँग्लो-इंडियन

( ६ ) अँग्लो-इंडियन लोकांचा स्वतंत्र मतदार-संघ द्यावे. मुंबई व मद्रास या प्रांतांत त्यांना दोन प्रतिनिधि अधिक द्यावे. इतर प्रांतांतील प्रमाण आहे तेंच असावें.

### हिंदी ख्रिस्ती

( ७ ) हिंदी ख्रिस्ती लोकांना स्वतंत्र मतदारसंघ न देतां त्यांच्याकरितां जागा राखून ठेवाव्या.

### मुसलमान

( ८ ) सहा प्रांतांत मुसलमानांना हल्ली मिळणाऱ्या जादा जागा कायम ठेवाव्या. परंतु, द्या ठेवूनहि बंगाल व पंजाब या प्रांतांत त्यांना कायद्यानेच कायमचें बहुमत मिळावें अशी जी त्यांची मागणी आहे ती मान्य करूं नये. या बाबतींत हिंदु, मुसलमान व शीख यांचें ऐकमत्य असल्यासच कांहीहि फरक करावा, एरव्ही करूं नये.

### स्त्रिया

( ९ ) स्त्रियांनी सर्वसाधारण मतदारसंघातर्फे उभें राहावें. त्या निवडून येतीलच अशी खात्री न वाटल्यास गव्हर्नरांनी त्या बाबतींत कांही नियम करून अधिकार द्यावे.

### नायर कमिटीचें मत

जातवार स्वतंत्र मतदारसंघाबद्दल नायर कमिटी म्हणते, 'आम्हांपैकीं बहुतेकांचें मत असें कीं, जातवार मतदारसंघाचें तत्त्व अत्यंत सदोष व असमर्थनीय आहे. जितक्या लवकर तें तत्त्व गाडलें जाईल तितकें आम्हांस हवें आहे. कांही अपवादभूत परिस्थितींतच तें तत्त्व ठेवण्यास आम्ही तयार आहों. विशिष्ट संरक्षणाखेरीज अल्पसंख्याकांना प्रतिनिधित्व मिळणें दुर्घट दिसेल तेथे त्यासाठी सर्वसामान्य मतदारसंघांत कांही खास जागा राखून ठेवण्यांत येतील. या जागांव्यतिरिक्तहि अल्पसंख्य जातींतील उमेदवारांना उघड निवडणुकींत भाग घेण्यास हरकत नाही.

### मुसलमानांचें प्रतिनिधित्व

ब्रह्मदेशाखेरीज इतर सर्व प्रांतांतून मुसलमानांना स्वतंत्र मतदारसंघ देण्यांत आले आहेत. खालील सहा प्रांतांमध्ये मुसलमानांना त्यांच्या लोकसंख्येच्या प्रमाणापेक्षा अधिक जागा मिळालेल्या आहेत. पंजाब आणि बंगाल या दोन प्रांतांत मात्र मुसलमानांना त्यांच्या लोकसंख्येच्या प्रमाणापेक्षा कमी जागा मिळाल्या आहेत.

| प्रांत | कायदे मंडळांत मुसलमानांना मिळालेलें प्रतिनिधित्व | लोकसंख्येच्या प्रमाणांत पडणारें प्रतिनिधित्व शेकडा |
|---|---|---|
| मद्रास | १३ | ७ |
| मुंबई | २७ | १७ |
| संयुक्त प्रांत | २९ | १४ |
| बिहार व ओरिसा | १८ | ८ |
| मध्यप्रांत | ७ | २ |
| आसाम | १२ | ११ |

### संयुक्त मतदारसंघच असावे

हिंदुस्थानातील बहुसंख्य मुसलमानांचे जातवार स्वतंत्र मतदारसंघ ठेवावेत असें मत आहे. परंतु आमची अशी खात्री झाली आहे कीं, हिंदु व मुसलमान हे दोन समाज संयुक्त मतदारसंघांत एकत्र आल्याशिवाय जबाबदार राज्यव्यवस्थेला आधारभूत असलेलें समान नागरिकत्वाचें तत्त्व हिंदुस्थानांत रुजणेंच शक्य नाही. या प्रश्नासंबंधी आमच्या कमिटींतील सर्वसाधारण मत असें कीं, मद्रास, मुंबई, संयुक्तप्रांत, बिहार आणि ओरिसा, मध्यप्रांत व आसाम या प्रांतांतील मुसलमानांचे जातवार स्वतंत्र मतदारसंघ आता नामशेष करावे. त्यांना त्याऐवजीं संयुक्त मतदारसंघांतच लोकसंख्येच्या प्रमाणावर किंवा मतदानशक्तीच्या प्रमाणावर राखीव जागा द्याव्या. शिवाय सार्वत्रिक निवडणुकींतहि भाग घेण्यास त्यांना सवलत असावी.

### बंगालचा प्रश्न

उपर्युक्त सहा प्रांतांत अल्पसंख्य मुसलमानांना कायदेमंडळांत ज्या पद्धतीने जागा मिळाव्या म्हणून आम्हीं म्हटलें त्याच पद्धतीने पंजाबमध्ये अल्पसंख्य हिंदूंना व शीखांना जागा मिळाल्या पाहिजेत. बंगाल प्रांताच्या बाबतींत मात्र निराळ्याच तत्त्वाचा अंगीकार करण्याचें आम्हीं योजिलें आहे. बंगालमध्ये मुसलमान हे बहुसंख्य असल्यामुळे त्यांना त्या प्रांतांत खास संरक्षण देण्याचें कारणच उरत नाही. हिंदूंचा विचार करता ते या प्रांतांत बरेच असून शिवाय ते वजनदारहि आहेत. म्हणून या प्रांतांत कोणत्याच जमातीसाठी स्वतंत्र मतदारसंघाची आवश्यकता राहात नाही. एतदर्थ हिंदु व मुसलमान या दोनहि जमातींनी सार्वत्रिक मतदारसंघातर्फेच आपली मतें नोंदवावीं.

### शिखांची मागणी

शिखांचा विचार करता त्यांची संयुक्त मतदारसंघांत समाविष्ट होण्यास मुळींच हरकत नाही. परंतु त्यांची एक अट मात्र अशी कीं, हेंच तत्त्व सर्व जमातींच्या बाबतींत सारखेंच पाळण्यांत यावें. इतर जमातींना जर स्वतंत्र प्रतिनिधित्व देण्यांत

आलें तर आपल्या ज्ञातींच्या पायांवर दगड पाडून घेण्यास अर्थातच ते तयार नाहीत. अशा परिस्थितींत वयांत आलेल्या सर्व स्त्री-पुरुषांना मताधिकार देण्याचा काल येईपर्यंत शिखांना तें ज्या प्रांतांत अल्पसंख्य असतील तेथे लोकसंख्येच्या प्रमाणावर किंवा मतदानशक्तीच्या प्रमाणावर राखीव जागा देण्यांत याव्या.

## अस्पृश्यांना संयुक्त मतदारसंघ

'डिप्रेस्ड क्लासेस' या शब्दाने आम्ही 'अस्पृश्यां'ना (अन्टचेबल्स) संबोधितों. अखिल हिंदुस्थानांत त्यांची लोकसंख्या किती असावी यासंबंधी मतभेद असल्याने आम्ही आमच्यापुरती ती संख्या सुमारें ४॥ कोटी घेऊन चालतों. त्यांना प्रतिनिधित्व देण्याच्या बाबतींत ( १ ) नेमणूक ( २ ) स्वतंत्र मतदारसंघ व ( ३ ) संयुक्त मतदारसंघ असे तीन उपाय सुचवितात. पैकीं अस्पृश्यांच्या बाबतीत पहिला उपाय उपायांत यावयाचा म्हणून त्याज्य. आता दुसऱ्या उपायाचा विचार करता केवळ मद्रास प्रांतामध्येंच त्यांची बरीच संख्या असल्यानें तेथे त्यांना स्वतंत्र मतदार-संघ देण्यास हरकत नाही. मात्र तो १० वर्षेच राहावा. १० वर्षांनंतर तो मतदारसंघ नष्ट करण्यांत यावा, व अस्पृश्यांना संयुक्त मतदारसंघांतच राखीव जागा द्याव्या असें आमचें स्पष्ट मत आहे. इतर प्रांतांत त्यांना पुढीलप्रमाणें राखीव जागा देण्यांत याव्या.

| | सुचविलेलें प्रतिनिधित्व | संख्या असलेलें प्रतिनिधित्व |
|---|---|---|
| मद्रास | १४ | १० |
| मुंबई | ८ | २ |
| बंगाल | ८ | १ |
| संयुक्त प्रांत | १० | १ |
| पंजाब | ६ | ० |
| बिहार व ओरिसा | ६ | २ |
| मध्यप्रांत | ८ | ४ |

मागसलेल्या भागांचा विचार करता मद्रास व आसाम या प्रांतांत त्या भागांतर्फे कायदेमंडळांत एक जागा सरकारच्या निवडणुकीने भरण्यांत येते. ही पद्धत त्या प्रांतांत पुढेंहि अशीच चालू राहावी. संयुक्त प्रांतांत या मागसलेल्या लोकांची ( बॅक्‌वर्ड क्लासेस ) वस्ती बरीच असल्यामुळे अस्पृश्यांच्या ( डिप्रेस्ड क्लासेस) दहा जागांखेरीज मागसलेल्या लोकांसाठी त्या कायदे-मंडळांत आणखी पांच जागा संयुक्त मतदारसंघांत राखून ठेवण्यांत याव्या अशी आम्ही शिफारस करतों. बिहार आणि ओरिसा या प्रांतांमध्ये या लोकांसाठी तीन जागा संयुक्त मतदारसंघांत राखून ठेवण्यांत याव्या.

## हिंदी ख्रिस्ती

इंडियन ख्रिश्चन यांना स्वतंत्र मतदारसंघ न देता त्यांना पुढीलप्रमाणें प्रत्येक प्रांतिक कायदेमंडळांत संयुक्त मतदारसंघांमध्ये राखीव जागा देण्यांत याव्या. याशिवाय त्यांना सार्वत्रिक मतदार संघातर्फेहि निवडणुकींत उमेदवार म्हणून उभें राहण्यास मुभा असावी.

| प्रांत | | राखीव जागा |
|---|---|---|
| मद्रास | | ६ |
| मुंबई | मुंबई शहरापुरतीच | १ |
| बंगाल | | २ |
| संयुक्तप्रांत | | ३ |
| पंजाब | | २ |
| बिहार आणि ओरिसा | | २ |
| आसाम | | १ |

## युरोपियनांचा सवता सुभा

युरोपियनांना स्वतंत्र मतदारसंघ देण्यांत यावा. प्रत्येक कायदेमंडळांत त्यांचें प्रतिनिधित्व पुढील-प्रमाणें राहील.

| प्रांत | जागा |
|---|---|
| मद्रास | २ |
| मुंबई | २ |
| बंगाल | ७ |
| संयुक्त प्रांत | २ |
| पंजाब | १ |
| बिहार आणि ओरिसा | २ |
| आसाम | १ |
| ब्रह्मदेश | २ |

मध्यप्रांतांत युरोपियन व अँग्लोइंडियन यांचा मिळून एक मतदारसंघ बनविण्यांत येऊन त्यातर्फे दोन सभासद निवडण्यांत यावे.

अँग्लो-इंडियनांनी आपण हिंदभूचेच नागरिक आहों असें वास्तविक समजून संयुक्त मतदारसंघांतच स्वतःला सामील करून घ्यावयास पाहिजे. परंतु तूर्त त्यांच्या जागांची आम्ही पुढीलप्रमाणें वांटणी करतों. मद्रास प्रांतांत एक सभासद स्वतंत्र मतदार संघा-तर्फे निवडण्यांत येऊन दुसऱ्या सभासदासाठी संयुक्त मतदारसंघांतच एक जागा राखून ठेवण्यांत यावी. मुंबई प्रांतांत त्यांच्या दोन जागा स्वतंत्र मतदारसंघातर्फे भरण्यांत याव्या. संयुक्त प्रांतांत ३, पंजाबमध्ये १, बंगालमध्ये ४ आणि बिहार-ओरिसामध्ये १ अशा राखीव जागा संयुक्त मतदार-संघांत देण्यांत याव्या.

मद्रासमध्ये इतके दिवस ब्राह्मणेतरांसाठी जागा राखून ठेवण्याची जी पद्धत चालू होती ती आता यापुढे बंद करण्यांत यावी. तसेंच मुंबई प्रांतांतील मराठ्यांसाठी ज्या जागा राखून ठेवण्यांत येत असत त्याहि बंद करण्यांत याव्या.

## हिंदुस्थानसरकाराचा खलिता

सायमन कमिशनाच्या रिपोर्टावर हिंदुस्थानसरकारने जो खलिता प्रसिद्ध केला त्यांत जातवार प्रतिनिधित्वासंबंधीं असें म्हटलें आहे कीं, सायमन मंडळालाहि मुसलमानांसाठी स्वतंत्र जातवार मतदारसंघ कायम ठेवण्याची आवश्यकता वाटली. आता जातवार मतदारसंघ कायम ठेवावयाचे तर प्रत्येक कायदेमंडळांत मुसलमानांना किती जागा देण्यांत आल्या पाहिजेत हा प्रश्न शिल्लक उरतो. आज आठ प्रांतांपैकीं सहा प्रांतांत मुसलमानांना त्यांच्या संख्येच्या प्रमाणापेक्षा जें अधिक प्रतिनिधित्व (वेटेज) देण्यांत आलें आहे तें कायम ठेवण्यांत आलें पाहिजे. मात्र हें वेटेज इतर प्रांतांत कायम ठेवूनहि बंगाल व पंजाब या प्रांतामध्ये लोकसंख्येच्या प्रमाणांत अधिक जागा वाढविण्यांत याव्या ही जी मुसलमानांची मागणी आहे ती मान्य करतां येत नाही. सायमन-कमिशनने दोन मार्ग असे सुचविले कीं, सहा प्रांतांतील वेटेजवर पाणी सोडून मुसलमानांनी बंगाल व पंजाबमध्ये आपल्या लोकसंख्येच्या प्रमाणांत जागा वाढवून घ्याव्या किंवा सहा प्रांतात वेटेज ठेवून बंगाल व पंजाब यांमध्ये संयुक्त मतदारसंघाला कबूल व्हावें. परंतु मुसलमानांनी या दोन मार्गांपैकीं कशालाच आपली मान्यता दर्शविली नाहीं. अशा स्थितींत प्रांतिक सरकारांच्या मताप्रमाणे सहा प्रांतांत मुसलमानांना असलेला वेटेजचा हक्क काढून घेण्यांत येऊं नये असें हिंदुस्थानसरकारचेंहि मत आहे. तसेंच विशिष्ट जमातीच्या कायदेमंडळांतील सभासदांच्या दोन-तृतीयांश मताखेरीज सध्या चालू असलेले स्वतंत्र मतदारसंघ बंद करण्यांत येऊं नयेत. बाकी इतर प्रांतांत मुसलमानांना वेटेजचा हक्क आहे. म्हणून बंगाल व पंजाब या दोन प्रांतांत मुसलमानांना त्यांच्या लोकसंख्येच्या प्रमाणांत जागा कां मिळूं नयेत हें आम्हांस समजत नाही.

## शिखांचा प्रश्न

शिखांचा प्रश्न प्रामुख्याने पंजाबमध्येच उत्पन्न होतो. त्यांना पंजाबमध्ये ९४ जागांपैकीं १२ जागा देण्यात आल्या आहेत. परंतु कायदेमंडळांतील सर्व जागांच्या ३० टक्के जागा आम्हांस देण्यांत आल्या पाहिजेत अशी शिखांची मागणी आहे. पंजाब सरकारने याबाबत जी योजना केली आहे तीत फरक करण्याचें कारण आम्हास दिसत नाही.

## युरोपियनांना स्वतंत्र मतदारसंघ

युरोपियनांचे स्वतंत्र मतदारसंघ कायम ठेवण्यांत आले पाहिजेत. सध्या अँग्लो-इंडियनांना ज्या जागा देण्यांत आल्या आहेत त्या प्रांतिक सरकारांनी अधिक वाढवाव्या. जमल्यास त्यांचे प्रतिनिधि स्वतंत्र मतदारसंघातर्फे निवडून येतील अशीहि प्रांतिक सरकारांनी व्यवस्था करावी. मद्रास प्रांतांत हिंदी ख्रिस्त्यांचे जे स्वतंत्र मतदारसंघ उभारण्यांत आले आहेत ते तसेच चालू ठेवावे. इतर प्रांतांत सरकारी निवडणुकीने त्यांचे प्रतिनिधि कायदेमंडळांत घेण्यांत यावे. डिप्रेस्ड क्लासेसच्या बाबतींत आम्ही एवढेंच म्हणतों कीं, त्यांचें प्रतिनिधित्व कायदेमंडळांत जितक्या चांगल्या तऱ्हेनें प्रतिबिंबित होईल असा प्रयत्न प्रांतिक सरकारांनी करावा. बाकी दिवसेंदिवस आपल्याला स्वतंत्र मतदारसंघ असावेत असें त्या वर्गाचें मत होत असल्याचें दिसतें. मद्रासमध्ये ब्राह्मणेतरांसाठी जागा राखून ठेवण्याची गरज आता राहिली नाही. मुंबई प्रांतांत मात्र मराठ्यांसाठी राखून ठेवण्यांत आलेल्या जागा नामशेष करण्याची वेळ अजून आलेली नाही.

## हिंदुमहासभेची राष्ट्रीय भूमिका

(१) एकाच राष्ट्राचे नागरिक व घटकावयव म्हणून सर्व जातींच्या मतदारांचा एक सामान्य मतदारसंघ असावा.

(२) जातिप्रधान व विभक्त असे मतदारसंघ स्थापण्यांत येऊं नयेत.

(३) कोणत्याहि कायदेमंडळांत एखाद्या जातीसाठीं जागा राखून ठेवण्यांत येऊं नयेत.

(४) कोणत्याहि जातीला संख्याप्राधान्य ( Weightage ) देण्यांत येऊं नये.

(५) प्रांतांतील मतदानपद्धति सर्व जातींसाठीं एकरंगी (युनिफॉर्म) असावी.

(६) राष्ट्रसंघाने ठरविल्याप्रमाणे भाषा, धर्म आणि वर्ण एतत्संबंधीं राज्यघटनेंतच अल्पसंख्यांना रक्षण देण्यांत यावें.

(७) बहुसंख्यांना कोणत्याहि सबबीवर ( राखीव जागा वगैरेसंबंधीं ) संरक्षण देण्यांत येऊं नये.

(८) भाषा, राज्यघटना, आर्थिक प्रश्न वगैरे बाबींचा बारकाईने विचार केल्याशिवाय सध्या असलेल्या प्रांतमर्यादा बदलण्यांत येऊं नयेत.

## मुसलमानांच्या जातिविषयक मागण्या

(१) भावी स्वराज्याच्या घटनेचें स्वरूप संयुक्त पद्धतीचें असलें पाहिजे व प्रत्येक प्रांताकडे आपण होऊन संयुक्त सरकाराकडे दिलेल्या अधिकारांखेरीज सर्व शिलकी अधिकार ठेवले पाहिजेत (२) प्रांतिक स्वायत्ततेचे हक्क सर्व प्रांतांना एका मापाने दिले पाहिजेत (३) कायदेमंडळांत अल्पसंख्याकांचे प्रतिनिधि भरपूर प्रमाणांत पाहिजेत. पण हें उद्दिष्ट साध्य करण्यासाठी त्या प्रांतांतील बहुसंख्य लोकांना अल्पसंख्य लोकांच्या किंवा इतरांच्या बरोबरीचीहि स्थिति आणली जातां कामा नये (४) अल्पसंख्याकांचे प्रतिनिधि स्वतंत्र मतदार संघातर्फे निवडून दिले गेले पाहिजेत

(५) पंजाब, बंगाल व सरहद्द प्रांत यांतील मुसलमानांचें बहुसंख्यात्व कोणत्याहि प्रांताच्या विभागणीमुळे कमी होतां उपयोगी नाही (६) मुंबई इलाख्यापासून सिंध वेगळा करावा (७) सरहद्द प्रांत व बलुचिस्थान या प्रांतात इतर पुढारलेल्या प्रांताप्रमाणे राज्यपद्धति सुरू व्हावी (८) वरिष्ठ अगर प्रांतिक प्रधानमंडळांत कमींत कमी एक-तृतीयांश तरी जागा मुसलमानांना मिळाल्या पाहिजेत.


देशभक्त नरसिंह चिंतामण केळकर

# तात्यासाहेबांच्या अखंड देशसेवेचें असाधारण स्वरूप

अन्या जगद्धितमयी मनसः प्रवृत्तिः । अन्यैव कापि रचना वचनावलीनाम् ॥
लोकोत्तरा च कृतिराकृतिरार्तहृद्या । विद्यावतां सकलमेव गिरां दवीयः ॥

पंडित जगन्नाथराय.

दे. भ. तात्यासाहेब केळकर लो. टिळकांना सन १८९६ सालीं येऊन मिळाले. लो. टिळकांच्या सार्वजनिक आयुष्य-क्रमाला तोंपर्यंत पंधरा वर्षें झालीं होतीं. या काळांत त्यांची सामाजिक, धार्मिक व राजकीय मतें सर्वांना कळून चुकलीं होतीं. महाराष्ट्रांत त्या वेळीं जे कोणी अग्रगण्य समजले गेले होते, त्या सर्वांशीं टिळक लढाया देत आले होते. सामाजिक सुधारणेच्या बाबतींत टिळकांशीं झगडत। झगडतांच गोपाळराव आगरकर मृत्यु पावले. त्यापूर्वी व त्यानंतरहि न्यायमूर्ति रानडे व डॉ. भांडारकर यांजबरोबर टिळकांचें तुंबळ युद्ध माजून राहिलें असून टिळक हे धर्मदृष्ट्या हिंदु-धर्माचे कैवारी व राजकीय दृष्ट्या जहाल मतांचे अध्वर्यु अशी त्यांची सर्वत्र प्रसिद्धी झाली होती. न्या. रानडे व डॉ. भांडारकर ही जोडी महाराष्ट्रांत सर्व दृष्टींनी मोठी. दोघेहि जाडे विद्वान म्हणून सुविख्यात. दोघेहि बड्या पगाराचे सरकारी हुद्देदार. दोघांनाहि राजदरबारीं मोठा मान. लोकांतहि त्या दोघांची विलक्षण चहा. माधवरावजी रानडे हे पदवीधरांचे मुकुटमणी व राष्ट्रीय सभेचे गुप्त अग्रणी आणि डॉ. भांडारकर हे विद्यागुरु या कारणानें सुशिक्षित वर्गाच्या मतावर त्यांची छाप.

वरील भीष्म–द्रोणापुढे टिळकांना त्यांच्या बरोबर-च्या व त्यांच्या पूर्वीच्या पिढीनें अपरिपक्व व अननु-भवी समजावें यांत आश्चर्य काय ? तथापि त्या सर्वांचे डोळे अर्जुनाप्रमाणे टिळक आपल्या पराक्रमानें दिपवूं लागले होते, इतकेंच नव्हे तर टिळकांहून वयानें लहान अशा नव्या तरुणांत टिळकांचा अनुयायी वर्ग वाढत चालला होता हें विसरता कामा नये. तरी पण त्यांना अद्यापि लोकमान्य ही पदवी मिळाली नव्हती, व त्यांच्या पाशीं ऐहिक मोठेपणा-हि डोळ्यांत भरण्याजोगा जमला नव्हता. केसरी व मराठा हीं दोन पत्रें १८९६पूर्वी पांचच वर्षें त्यांच्या मालकीचीं झालीं होतीं. तरी त्यांनी टिळकांना कांहीं पैशाचा गठ्ठा आणून दिला नव्हता. त्यांनी गठ्ठा आणलाच असला तर तो कर्जाचा होता. फार काय पण त्या दोन पत्रांवर त्यांना स्वतःचा संसारहि धड चालवितां येत नसल्यामुळे लॉक्लासाची जोड देऊन दुपारची वेळ साजरी करावी लागत होती.

### वकीली किंवा सरकारी नोकरी

रा. केळकर टिळकांना मिळाले त्या वेळीं टिळकां-ची स्थिति या प्रकारची होती. ती स्थिति लक्षांत घेतली असतांना टिळकांना येऊन मिळ-ण्यांत केळकरांचा काय हेतू असावा याचा सहजच उलगडा होतो. तेव्हां केळकर वयानें २४ वर्षांचे म्हणजे टिळकांपेक्षां १६ वर्षांनी लहान होते. त्यांनी त्यापूर्वी साताऱ्यास वकिलीची सनद काढून वकिली सुरुहि केली होती. त्यांना पैसा मिळवावयाचा असता तर एकीकडे वकिलीचा मार्ग मोकळा होता व दुसरीकडे सरकारी नोकरीहि महाग नव्हती. त्याकाळीं वकिलीच्या धंद्यांत हल्लीप्रमाणे तोबा उडाला नसल्यानें त्यांनी वकिली-च्या धंद्यासच यावज्जीव चिकटून राहण्याचें मनांत आणिलें असतें तर आजच्या घटकेस लाख पन्नास हजारांची माया जवळ करणें त्यांना अशक्य नव्हतें. उलट पक्षी त्यांचे दोन बंधू सरकारी नोकरींत होते. त्यांचा कित्ता गिरवून न्याय-खात्यांत शिरल्यानेहि त्यांच्या बरोबरच्या सहा-ध्यायांनी फर्स्ट क्लास सब–जजाच्या जागेपर्यंत चढून हजार बाराशें रुपये पगारावर पेन्शन घेतलें तसें घेणें यांनाहि कठीण नव्हतें. त्यांची बुद्धिमत्ता व उद्योगशीलता गेली छत्तीस वर्षें महाराष्ट्री-यांच्या डोळ्यासमोर आहेच. ती ध्यानांत बाळगल्यास वरील विधानांत काडीमात्रहि अतिशयोक्ति नाहीं हें कोणासहि कबूल करावें लागेल.

### लाभ दारिद्र्याचा व मान कारागृहाचा

बरें, धनलाभाविषयीं उदासीन रहावें अशी त्यांची गृहस्थितिहि समाधानकारक नव्हती. एका हातानें मिळवावें व दुसऱ्या हातानें खावें हा क्रम त्यांच्या घराण्यांत वाडवडिलापासून चालत आला होता. त्यांनी एल्एल्. बी. पर्यंत शिक्षण संपादन केलें. पण त्या शिक्षणाची वाट इतकी निरुंद होती कीं परीक्षेनें दगा दिल्यामुळे जर कोठे मुक्काम करण्याची पाळी आली असती तर पुढील शिक्षणक्रमास रामराम ठोकून त्यांना निर्वाहाकरिता मिळेल ती नोकरी पत्करण्याशिवाय दुसरा उपायच नव्हता. इतक्या प्रयासानें शिक्षण

हस्तगत केल्यानंतर वकिलीच्या किंवा मोठ्या पगाराच्या आशेने सरकारी नोकरीच्या लोभास गुंतून न पडतां टिळकांना येऊन मिळाले ते स्वार्थत्यागपूर्वक देशकार्य करण्याची त्यांना अनिवार हौस होती म्हणूनच नव्हे काय? कारण टिळकांपाशीं राहिल्याने लाभ असला तर दारिद्र्याचा व मान असला तर कारागृहाचा ही गोष्ट स्पष्ट होती. ते टिळकांचे अनुयायी बनले यांत किती तरी मोष्टी कबूल केल्यासारख्या झाल्या. त्यांनी सर्व प्रकारच्या चळवळींत राजकीय चळवळीस प्राधान्य दिलें हें दिसून आलेंच. त्याशिवाय टिळकांचीं नुसतीं राजकीयच काय पण सामाजिक व धार्मिक मतेंहि त्यांना स्थूलपणाने मान्य होतीं याची साक्ष पटली. टिळकांस उघडपणे मिळण्यापूर्वी ते मनाने राजकीय दृष्ट्या जहालांत मोडणारे कसे होते याचें एक उदाहरण आजच्या अंकांत छापलेल्या त्यांच्या चरित्रांत रा. सदाशिवराव बापट यांनीं सांगितलेंच आहे. १८९३-९४ सालीं मुंबई इलाखा हिंदु-मुसलमानांच्या दंग्यांनी दणाणून गेला होता. तेव्हाचे मुंबई इलाख्याचे गव्हर्नर लॉर्ड हॅरिस हे अगदींच खुशालचेंडू. त्यांना क्रिकेटच्या खेळाचा विलक्षण शोक. त्यांनी चेंडू उडवून आपली कारकीर्द खुशाल खेळून घालविली असती आणि क्रिकेटपटु एवढेंच नांव मिळवून व सदर नांव त्या खेळाबरोबर मुंबई इलाख्यांत कायम ठेवून ते विलायतेस गेलेहि असते.

### तारुण्यांतील जहालपणा

परंतु या इलाख्याच्या दुर्दैवाने हिंदु-मुसलमानांच्या दंग्याचें संकट प्रभासपट्टण, मुंबई, पुणें इत्यादि ठिकाणांवर ओढवलें. या संकटावस्थेंत हॅरिससाहेबांच्या हातून दंगा मोडण्याचें काम बिनबोभाट पार पडलें नाहीच, उलट मुसलमानांच्या बाबतींत पक्षपाताचें धोरण पत्करून हिंदु-मुसलमानांत वैमनस्य वाढविण्याचें पातक मात्र त्यांनी जोडलें. या पातकाचा जाब विचारणारा परमेश्वर बसलाच आहे अशी वेदान्तांतील भाषा बोलून भागण्याचे ते दिवस नव्हते. सरकारी अधिकाऱ्यांना त्यांच्या पातकाचीं फळें परलोकांत भोगावयास सांगण्याऐवजी याच देशांत याच जन्मास भोगावयास लावणारे लो. टिळक लेखणी घेऊन येथेच बसले होते. त्यांनी प्रत्यक्ष कोरडे ओढून व पाठीचीं सालडीं काढून होणार नाहीत इतक्या वेदना हॅरिससाहेबांस आपल्या लेखणीने सोसावयास लावून त्यांना मुंबई इलाख्यांत तोंड काढण्यासहि जागा ठेवली नाही. त्यांच्या त्या निर्दय फटकाऱ्यांनी लोकमत इतकें प्रक्षुब्ध झालें कीं, १८९५ च्या मुंबई विद्यापीठाच्या पदवीदानसमारंभांत युनिव्हर्सिटीचे चॅन्सेलर लॉर्ड हॅरिस यांच्या हातून पदवी घेण्याचेंहि कित्येक तरुणांनी नाकारलें. त्या तरुणांत रा. केळकर होते. टिळकांच्या तरुण अनुयायांस शोभणारा जहालपणा केळकरांत त्या वयांत कसा होता याचें हें एक गमकच होय.

### टिळकांचे सरदार

रा. केळकर पुण्यास आले तेव्हा विशी पंचविशीच्या भरांत होते. त्यांची शरीरसंपत्ति उत्कृष्ट. शरीर बाह्य सौंदर्याने नटलें असून त्याची बरोबरी अन्तःसौंदर्यहि करीत होतें. आधी वनश्रीची गोडी व ती पुरविणारी साताऱ्यासारखी रम्य नगरी. यवतेश्वरावर किंवा अजिमतारा किल्ल्यावर हिंडता फिरतांना नवयौवनसुलभ अशी स्फूर्ति उत्पन्न होईल त्याप्रमाणे कविता रचाव्या व त्या हरिभाऊ आपट्यांच्या करमणूक पत्रांत प्रसिद्धीकरिता पाठवाव्या. नवरदेवाच्या जोडगोळीचें कथानक मनांत आणावें व तें तसेंच कागदावर वठवतां येतें का पाहावें, भाषणें पाठ करावीं व तीं यूनियन क्लबांत सभेच्या वेळीं म्हणून दाखवावीं, पारसनिसांपाशीं बसावें व त्यांच्या झांशीच्या राणीचें चरित्र लिहिण्यास मदत करता करता, आपण लिहावयाच्या भावी चरित्राचे कळत न कळत धडे घ्यावे. टेनिस खेळावें व त्यांत पहिली जागा पटकावावी. आणि मटंगे बोवांचें गायनवादन श्रवण करून तसें गाता वाजवितां न आलें तरी कसें गावें वाजवावें याचें मार्मिक ज्ञान मिळवावें. असा पुण्यास येण्यापूर्वी त्यांनी साताऱ्यास अधूनमधून चारपांच वर्षे क्रम चालू ठेवला होता. जणुंकाय पुण्यांस लो. टिळकांजवळ येण्याची ती कित्येक बाबतींत पूर्वतयारीच होती. लो. टिळक त्या वेळीं पुण्यास आपलें राज्य स्थापण्यांत गुंतले होते. पेशवाई बुडाल्यानंतर महाराष्ट्राच्या जड भूमीवर नसलें तरी महाराष्ट्रीयांच्या मनोभूमीवर राज्य स्थापन करणारे पहिले चक्रवर्ती लो. टिळकच होत. एकीकडे इंग्रजांचें राज्य तर दुसरीकडे टिळकांचें राज्य. टिळकांच्या राज्याचा आतां प्रसार होऊं लागला असून तें यानंतर सारख्या क्रमाने कळसास पोंचलें. या राज्यास युवराज पाहिजे होता, व तेंच स्थान केळकरांनी आपल्या गुणांनी कालान्तराने काबीज केलें. केळकर आले ते टिळकांचे सरदार म्हणून आले. तलवारबहादुरीऐवजी कलमबहादुरी व धनुष्यबाणाऐवजी वाग्बाण हीच नवीन राज्य कमावण्याची साधनसामग्री!

### टिळकांच्या कामाचा कचका

लो. टिळक कामाला वाघ. ते प्रचंड व धाडसाचे उद्योग उत्पन्न करीत; आणि श्रमवेळ, दिनरात, तहानभूक यांकडे न पाहता पार पाडीत. असलीं

कामें सांगणारे व तीं करणारे केळकर यांची गांठ पडल्यावर काम सांगणारा कंटाळतो कीं काम करणारा हात टेकतो याची जशी कांहीं त्या उभयतांत अहमहमिकाच लागून राहिली. टिळकांच्या कामाचा कचका कसा असे याचा अनुभव पुष्कळांना असेल. त्या कचक्याला टिकले असे केळकरच. सन १८९६ सालचा दुष्काळ. त्यानंतर प्लेग, त्यांतून उद्भवलेला केसरीवरील खटला, त्या खटल्यांत शिक्षा भोगून बावनकशी सोन्याप्रमाणें तावूनसुलाखून बाहेर पडलेल्या टिळकांना अन्ननिर्शी धुळीस मिळविण्यासाठी सरकाराने टिळकांविरुद्ध उभारलेलें ताईमहाराज प्रकरण, तें प्रकरण पाठीवर घेऊन टिळकांनी चालविलेली स्वदेशी-बहिष्काराची मोहीम, सरकारास नैतिक पेचांत घालण्यासाठी त्यांच्यामागे टिळकांनी लावलेला दारूच्या पिकेटिंगचा ससेमिरा, ज्या शिक्षेवरून टिळक कदाचित् जिवंतपणीं परतहि आले नसते अशी त्यांस केसरीवरील दुसऱ्या खटल्यांत सरकारानें काळे पाण्याच्या नांवाखाली सुनावलेली देहान्तशिक्षा, तिच्यांतून जगून, वांचून, सुटून आल्यावर स्वराज्य या शब्दानें सरकारास गांगरून सोडणारी होमरूलची चळवळ, चिरोलवरील दावा व तो दावा चालविण्याकरिता विलायतेची सफर या कथांचें आता जवळ जवळ रामायणच झालें असून त्या रामायणांत टिळक या रामाला लक्ष्मणाप्रमाणें साहाय्य झालें असले तर तें केळकरांचेंच होय. त्या कामांत टिळकांबरोबरच केळकरांचींहि तब्बल दोन तपें अत्यंत जिकिरीचीं, कष्टाचीं, काळजीचीं व त्रासाचीं गेलीं. मुख्य कष्ट टिळकांवर पडले खरे, पण त्यांच्या खालोखाल ते केळकरांनाहि भोगावे लागले.

## मुख्य साहित्यसेवा कीं राजकारण

केळकरांची सर्वत्र साहित्यसेवक म्हणून स्तुति करण्यांत येत व त्या स्तुतीस ते सर्वथैव पात्रहि आहेत. परंतु त्या स्तुतींतून थोडासा निंदेचा गर्भित ध्वनि निघतो हें पुष्कळ चाणाक्ष लोकांच्या लक्षांतहि आलें असेल. सदर स्तुतीचा अर्थ असा होतो कीं केळकरांची राजकीय कामगिरी महत्त्वाची नसून त्यांची मुख्य देशसेवा म्हणजे साहित्यसेवाच होय. परंतु ही समजूत चुकीची आहे, इतकेंच नव्हे तर अन्यायाचीहि आहे. टिळक असतांना व नसतांनाहि केळकरांनी मुख्यतः जर कोणत्या कामास वाहून घेतलें असेल तर तें राजकारणासच होय. लो. टिळकांच्या ह्यातींत महाराष्ट्राच्या किंबहुना हिंदुस्थानाच्या राजकारणाची जबाबदारी टिळकानी स्वतःच उचलली होती. तरी राजकीय प्रश्नांचें त्यांच्याइतकेंच चिंतन व मनन केळकर स्वतः करीत व त्याबद्दल त्यांनी स्वतंत्रपणें बनविलेल्या मतांची योग्यता ओळखून त्यांचा योग्य तो फायदा टिळक करून घेत. जो राजकारणांत केवळ सांगकाम्या आहे, परप्रत्ययनेय आहे किंवा बेपर्वा आहे तो इतक्या खोल पाण्यांत शिरेल कशाला? ज्या वेळीं जो कोणी राजकीय कर्णधार असेल त्याच्या नावेंत बिनधोकपणें बसावें व लोकनिंदेच्या संकटकक्षेंत न सांपडता परतीर गांठावें असेंच तो आपलें सुरक्षित धोरण ठेवील. केळकर राजकारणाविषयीं बेपर्वा व बेजबाबदार असते तर त्यांनी आपल्या आवडीच्या अशा साहित्यसंगीतांत बुद्धि व मन रमवून वरील कमी कष्टाचा व अधिक लोकप्रियतेचा धोपट मार्ग चोखाळला असता.

## केळकरांची खरी कसोटी

लो. टिळकांच्या मृत्यूनंतर गांधीयुग अवतरलें, तें केळकरांच्या खऱ्या कसोटीचें होतें. ज्यांच्या सहवासांत व अनुयायित्वांत केळकरांनी आपला बहुतेक जन्म घालविला व ज्यांच्याशीं त्यांचीं राजकीय मतें कार्यपद्धतीच्या बाबतींत जुळतीं होतीं ते टिळक मरून गेल्यावर अगदींच भिन्न कार्यपद्धतीच्या व भिन्न स्वभावाच्या म. गांधींशीं त्यांची गांठ पडली. अशा वेळीं गांधींबरोबर कैक गोष्टींत येणाऱ्या मतविरोधास बगल देऊन व प्रवाहपतित बनून केळकरांना गांधिजींच्या अनुयायी वर्गांत बरेंच वरचें स्थान मिळविणें व तेणेंकरून राष्ट्रीय सभेच्या अध्यक्षपदावरहि आरूढ होणें कठिण नव्हतें. एकतर टिळकांच्या पश्चात् त्यांची धुरा वाहणारे पट्टशिष्य म्हणून त्यांना मान लाभलाच होता. त्यावर व केळकरांच्या पूर्वचरित्रावर नजर देऊन म. गांधींनी असहकारितेच्या चळवळीच्या प्रारंभीं त्यांना जवळहि केलेंच होतें. गांधीजींच्या कलाने घेऊन ते गांधीजींच्या अनेक लहानथोर अनुयायांप्रमाणे त्यांस चिकटून राहते तर त्यांच्यापासून राष्ट्रीय सभेचे अध्यक्षस्थान चार दोन वर्षांच्या टप्प्यावरच होतें. सन १९२० सालापासून गेल्या बारा वर्षांत राष्ट्रीय सभेच्या अध्यक्षस्थानीं ज्या व्यक्ति बसून गेल्या त्यांपैकीं, कितीतरी व्यक्ति राष्ट्रीय सेवेच्या, विद्वत्तेच्या, राजकीय अनुभवाच्या व वयाच्या दृष्टीने केळकराहून कमी योग्यतेच्या होत्या. पण मानापेक्षा आपल्या प्रामाणिक मताचीच मातब्बरी केळकरांना अधिक वाटत असल्यामुळे ते असल्या कोणत्याहि मोठ्या लोभास गुंतून पडले नाहीत. म. गांधींशीं ज्या बाबतींत त्याचें जमलें त्या बाबतींत त्यांची त्यांनी साथच केली. पण कौन्सिलें, कोर्टें, कॉलेजें यांवरील बहिष्कारासंबंधाने त्यांचा तत्त्वतः विरोध येताच तो विरोध दर्शविण्यास मात्र त्यांनी योग्य वेळ आल्यावर मागे घेतलें नाही. त्यांच्या राजकीय सूक्ष्म अभ्यासाचा प्रत्यय जनतेस याच वेळीं आला.

### बहिष्कारत्रयी विरुद्ध चळवळ

केळकरांनी ही बहिष्कारांची त्रयी उठविण्याचा मतप्रचार केसरींतून सुरू केला. तेव्हा गांधीजींचा अनुयायी वर्ग त्यांजवर साहजिकच रुष्ट झाला. अशा वेळीं त्यांनी अत्यंत संथपणाने व सूक्ष्म चिकित्सेने ही बहिष्कारत्रयी अव्यवहार्य कशी आहे याचा आपल्या लेखांतून इतका कीस काढला कीं, राष्ट्राची त्यांच्या युक्तिवादाविषयी खात्री पटून या तिन्ही बहिष्कारांचीं हत्यारें म्यानांत ठेवणें राष्ट्रीय सभेला इष्ट वाटलें. केळकरांची ही कामगिरी साऱ्या राष्ट्रांत अपूर्व समजली गेली. त्यांच्याच नेतृत्वाने प्रथम स्वराज्यपक्षाची व नंतर प्रतिसहकारपक्षाची उभारणी झाली. केळकरांच्या प्रतिपक्षांत म. गांधी, पं. मोतीलाल नेहरू, सी. राजगोपाळाचार्य इत्यादि राजकारणांतील अतिरथी महारथी होते. त्यांजवर मात करणें राजकारणांत पूर्ण लक्ष व वाकबगारी असल्यावांचून शक्य आहे काय, याचा ज्याचा त्यानेच आपल्या मनाशीं विचार करावा. केळकरांच्या आयुष्यक्रमांत अग्रस्थान साहित्यसेवेला व दुय्यम स्थान राजकारणाला आहे असें म्हणणाराचा युक्तिवाद उलथून पाडण्यास याहून बलवत्तर पुरावा दुसरा कोणता पाहिजे ?

ब्रिटिश अमदानींत महाराष्ट्रांत लहानथोर राजकारणी पुरुष अनेक होऊन गेले. पण त्या सर्वांत विरळा आढळणारा गुण केळकरांत उत्कटत्वानें दृष्टीस पडतो. राष्ट्रांत कळत न कळत दुही माजविणारे पुढारी पुष्कळ सांपडतील. केळकर स्वतः दुही उत्पन्न करणार नाहीतच. उलटपक्षीं ती उद्भवली असल्यास तिचा बीमोड करण्यांत त्याचा अगदीं हातखंडा आहे. देशांत कोणतीहि चळवळ सुरू होवो, तिच्यांत राष्ट्र—हितसंवर्धक जो गुण असेल तो त्यांच्या बुद्धीला नेमका टिपतां येतो. गांधीजींची असहकारितेची चळवळ त्यांस तत्त्वत: पसंत नव्हती, तरी बुद्धिभेदाच्या पापास भिऊन प्रारंभीचे कांही दिवस ते सदर चळवळीस चिकटून असता तिच्यापासून देशांत राजकीय असंतोष व लोकजागृति वाढते या फायद्यावर नजर देऊनच त्यांनी करवेल तितका तिचा पुरस्कार केला. यांत त्यांचें ऐक्यप्रेम व राष्ट्रहितबुद्धिच दिसून आली. त्याची ही कार्यपद्धति एकट्या राजकारणांतच काय पण सामाजिक, धार्मिक, औद्योगिक, वाङ्मयिक वगैरे सर्व हालचालींत प्रतीत होते. कोणत्याहि हालचालींतला जो गुण आपणास पटेल तो निवडावा व त्याच्या जोपासनेस लागावें असें त्यांनीं आपल्या स्वभावास व्यापक वळण लावलें असून तें महाराष्ट्राच्या सर्वांगीण उन्नतीस अत्यंत उपकारक झालें आहे.

त्यांचे सुधारक, बिनसुधारक, जहाल, मवाळ, ब्राह्मण, ब्राह्मणेतर, स्पृश्य, अस्पृश्य, सनातनी व नवमतवादी या परस्परांशीं विसंगत दिसणाऱ्या जोड्यांशीं जमतें व त्या उभयतांत शिरून त्यांना कांहीना कांही विधायक कार्य करतां येते यातील इंगित हेंच होय. गेलीं दहाबारा वर्षे विविध कारणांनी मतभेद विकोपास जाण्याचीं असताहि महाराष्ट्रांतील ब्राह्मण-ब्राह्मणेतरांतील, जहाल—मवाळांतील आणि स्पृश्यास्पृश्यांतील कलह मावळण्याच्या पंथास लागले याचें श्रेय केळकरांनी योग्य व इष्ट दिसेल त्या मुद्द्यावर दृष्टि ठेवून त्या त्या लोकांबरोबर सहकार्य करण्याची जी तत्परता दाखविली तिलाच दिलं पाहिजे.

### वागणकीचें रहस्य

यावरून त्यांना कोणत्याच तत्त्वाचा अभिमान नाही असें मात्र कोणीं समजूं नये. ब्राह्मणेतरांनी अत्याचार आरंभले तेव्हा त्यांनी ब्राह्मण वर्गाचीच बाजू उचलली. राष्ट्रीय सभेने हिंदूंच्या हिताची अनास्था चालविली. तेव्हा त्यांनी हिंदुसभेचाच पुरस्कार केला. मुसलमान लोक हिंदूंस बाटविण्याच्या व स्वतःची संघटना करण्याच्या उद्योगास लागले तेव्हा केळकर मसूरकर महाराज प्रभृतींच्या शुद्धिकरणाच्याच चळवळीस मिळाले. अस्पृश्यांची अस्पृश्यता दूर व्हावी या गाऱ्हाण्यास त्यांनी अस्पृश्यपरिषदेच्या वेळीं अस्पृश्यांना पुण्यांत आपल्या घरांत उतरण्यास जागा देऊन व नुकतेंच टिळक पर्स ट्रस्टच्या व्याजांतून त्यांनी पुणें जिल्ह्यांतील अस्पृश्यांकरितां दोन विहिरी बांधण्यासाठी द्रव्यसाहाय्य पुढे करून आपली सक्रिय सहानुभूति दाखविलीच आहे. पण अस्पृश्यांचा मंदिरप्रवेश त्यांस विवक्षित मर्यादेपर्यंत मान्य असताहि त्यांच्या सत्याग्रहास त्यांनी मान्यता दिली नाही हा त्यांच्या धोरणांतील तरतमभाव लक्षांत ठेवण्यासारखा आहे. याच धोरणास अनुसरून ते स्वतंत्र टिळक राष्ट्रीय विद्यापीठ स्थापण्यांत पुढाकार घेतात व सरकारी मान्यतेच्या महाराष्ट्र विद्यापीठाकरिता चळवळहि चालवितात. सारांश सुवर्णमध्य किंवा गोल्डन मीन हें त्यांच्या वागणुकीचें रहस्य असल्यामुळे परिणामीं हानिकारक वाटणाऱ्या आत्यंतिक अशा मताचा किंवा पक्षाचा पुरस्कार न करता कोणत्याहि कार्यांत व पक्षांत न्याय, सत्य, भूतदया व देशहित यांपैकीं जें कांहीं दिसेल त्याचे केळकर हे वाली असतात. या विलक्षण व असाधारण गुणामुळे ते अजातशत्रुच होऊन राहिले आहेत. त्यांना खरा वैरी असा कोणीच नाही. सर्व पक्षांच्या, मतांच्या व व्यवसायांच्या लोकांत त्यांचे चहाते व ऋणानुबंधी आहेत. त्यामुळे त्यांना महाराष्ट्राचा किती तरी प्रकारांनी उत्कर्ष साधता आला आहे. प्रत्येक लहान थोर रचनात्मक कार्यांत त्यांचा हात आहे व त्या

झालेला सर्व आहे. पुणें म्युनिसिपालिटी, पुणें सेंट्रल को-ऑपरेटिव्ह बँक, कॉमनवेल्थ विमा कंपनी, टिळक स्मारक मंदिर, शिवाजी मंदिर, भा.इ.सं. मंडळ, टिळकांचा पुतळा, फर्ग्युसन कॉलेज, हिंदी महिला विद्यापीठ, टिळक पर्स ट्रस्ट, हिंदुमहासभा, साहित्य परिषद इत्यादि नामांकित संस्थांपैकीं कांहीं त्यांनी स्वतःच्या जबाबदारीवर स्थापन केल्या, कांहींच्या स्थापनेस साहाय्य केलें, कांहींच्या वाटेंतील संकटें निस्तरलीं व कांहींना सल्लामसलत व पैसाअडका पुरवून त्यांना भरभराटीस आणिलें.

## सार्वजनिक कार्याचें जीवन

हा केळकरांचा क्रम वर्ष नव्हे दोन वर्षे नव्हे तर सतत छत्तीस वर्षे अव्याहत चालू असून तो त्यांच्या वयाबरोबर व अनुभवाबरोबर वृद्धिंच पावत आहे. इतकें काम केलेला मनुष्य महाराष्ट्रांतील पुढाऱ्यांत दुसरा नाहीं असें म्हणावयास हरकत नाहीं. या सेवेस देशसेवा म्हणावयाची नाहीं तर देशसेवा तरी कोणती हें सांगणें कठिण आहे. हिंदुस्थानच्या सद्यःस्थितींत देशसेवेमध्ये राजकारणाला प्रमुख स्थान देण्यांत येतें व तें स्वाभाविकहि आहे. तें राजकारण अहर्निश करूनहि त्यांनी देशाची इतर अनेक लोकोपयोगी कृत्यांनी सेवा बजावली आहे. त्यांनी तीन लक्ष रुपयांचा टिळक पर्स ट्रस्ट उभारला त्याची योग्यता व उपयुक्तता प्रस्तुत राजकीय दंगलीच्या काळांत फार थोड्यांच्या लक्षांत आली असेल. परंतु मोठ्या नदीचें पावसाळ्यांतील चार दोन महिन्यांत वहालेलें पाणी अडवून त्याला धरण बांधावें व त्या धरणापासून कालवा काढून तो दुष्काळी व निर्जल प्रदेशांत नेऊन त्यावर फळझाडें फुलबागा व शेतमळे यांना बारा महिने हुकुमी जीवन मिळण्याची सोय करावी त्याप्रमाणें वरील फंडाच्या व्याजाचा विनियोग महाराष्ट्र, कर्नाटक वऱ्हाड व नागपूर या देशांत सांप्रत होत असून त्याचे सुपरिणाम भविष्य काळांत जसजसे दृष्टीस पडतील तसतशी फंडाच्या उत्पादकाविषयीं जनतेची आदरबुद्धि दुणावत जाईल यांत शंका नाहीं.

तात्यासाहेब केळकर श्रेष्ठ प्रतीचे साहित्यभक्त आहेत हें खरें; पण ते आधी देशभक्त आहेत, व मग साहित्यभक्त आहेत हा फरक त्यांच्या कोणाहि चहात्यांनी किंवा मित्रांनी, दृष्टीआड करता कामा नये. त्यांची महत्त्वाकांक्षा केवळ साहित्यसेवेनें तृप्त होणारी असती तर त्यांना आपला सुखाचा असा वकिलीचा धंदा सोडून टिळकांसारख्या धडाडीच्या व संकटांशीं झुंजत असलेल्या राजकीय पुरुषाचें सहकारी अनुयायित्व स्वीकारण्याची आवश्यक नव्हती. राजकारण वगळून घेऊन उरलेली साहित्यसेवा ही प्राणानें सोडलेल्या कुडीप्रमाणे प्रेतवत् होय. अशा निर्जीव व मृतप्राय साहित्यसेवेपेक्षां, खळबळीच्या, धडपडीच्या, उलथापालथीच्या संकटग्रस्त राजकारणाची व देशहिताची महती केळकर ओळखून असल्यामुळेच त्यांनी राजकारणाच्या खाईंत ऐनतारुण्याच्या व उमेदीच्या काळांत उडी घेतली हें उघड आहे.

## संपादकाचें कर्तव्य

ते वर्तमानपत्राच्या व्यवसायांत पडण्यापूर्वी मराठी वर्तमानपत्रांतील लेखन बऱ्याच अंशीं भुंडें होतें. त्या व्यवसायास लो. टिळकांनी ऊर्जितावस्थेस आणण्यास नुकतीच सुरुवात केली होती. टिळकांचे केसरींतील लेख, विद्वत्ताप्रचुर, जोरदार, आवेशयुक्त, स्फूर्तिदायक, मुद्देसूद, सडेतोड, कोटीबाज, तेजस्वी, सामर्थ्यवान व प्रखर असत. त्यांचा भर उपमा, अलंकार, दृष्टान्त, शब्दांचें सौष्ठव व पदांचें लालित्य यांवर नसून आपला दिव्यसंदेश बहुजनसमाजास देदीप्यमान भाषेने सांगून त्यांस सचेतन करण्यावर असे. केळकरांनी केसरीस हस्तस्पर्श केल्यावर त्याच्या सौंदर्याकडे विशेष लक्ष पुरविलें. त्यांनी आपलें कलाकौशल्य त्याला सजविण्यांत खर्च केलें. वर्तमानपत्राचा संपादक कितीहि हौशी व अभ्यासी असला तरी त्याची सत्त्वपरीक्षा पाहण्यास दुर्वास ऋषीसारखा हट्टी विषय त्याजसमोर अचानकपणें उभा राहून त्याला केव्हा भयचकित करील याचा भरंवसा नसतो. त्याला ज्या विषयांवर लिहावें लागतें ते सर्व विषय त्याला सद्भावाने भेटावयास आलेले नसतात. त्यांतील कांहींच्या अंगावर आकड्यांचे अणकुचीदार काटे उभे असतात तर कांहींचीं भोंडस अंमलोटा ऐवजीं हाडेंच बाहेर डोकावतात. पण त्यांपैकीं, कोणासहि विन्मुख न पाठवितां त्यांचें मंदहास्यपूर्वक आदरातिथ्य करणें हें संपादकाचें कर्तव्य होऊन बसतें.

अशा उग्र भयप्रद नीरस विषयांचें आपल्या करामतीच्या सुरेख व ऐटबाज कपड्यांनी दोष झांकण्यांत व त्यांस मनोहर रूप देऊन नाचण्या-बागडण्यास लावण्यांत गुणवान व प्रतिभासंपन्न संपादकाचें खरें कसब साठविलेलें असतें. नाटक मंडळ्यांना सर्वच नट नीटस व सुस्वरूप लाभत नाहींत- तरी पण नाटकमंडळीचा शिक्षक ज्याला त्याला त्याच्या भूमिकेस साजेल अशा प्रकारचा वेष देऊन रंगवून व मनोवेधक बनवून प्रेक्षकापुढें उभा करतो, व त्यांजकडून टाळ्या मिळवून देतो. त्याच जातीचें कौशल्य संपादकास नसल्यास त्याला आपलें पत्र लोकप्रिय करण्याचें साधणार नाहीं. केळकरांच्या संपादकीय लेखनात हा गुण प्रमुख आहे. त्यांनी कसलाहि खड्याळ विषय रंगविण्यास लेखणी उचलली की तो विषय चटकदार

बनविला नाही असें सहसा घडत नाही. विनोदाची तार अशी आहे कीं, ती ज्याला हुकुमी छेडता आली त्याला रडतोंड्या विषयांवरहि हास्याची लकेर उठविण्याचें साधतें; मग जे विषय आत्याच मधुर, रम्य व सुंदर आहेत ते विषय खुलवून वाचकांना आनंदानें डोलावयास लावण्याविषयी बोलावयासच नको. केळकरांनी ही कला पराकाष्ठेस पोंचविली असल्यामुळे त्यांना मराठी संपादकांत अद्वितीय स्थान मिळविता आलें आहे.

### दूषण कीं भूषण ?

तथापि त्यांनी ही कला राजकारणाच्या क्षेत्रांतच कमावली व मुख्यतः राजकारणासच वाहिली. लो. टिळकांचें चरित्र, आयर्लंडचा इतिहास, गॅरीबाल्डीचें चरित्र इत्यादि ग्रंथांची गणना वाङ्मयांत होत असली तरी त्यांचें स्वरूप राजकीयच आहे. त्यांचीं नाटकें, लघुकथा, सुभाषित आणि विनोद, विलायतविहार, इंग्रज व मराठे ही कृति प्रामुख्यानें साहित्यरूपी असून ती त्यांनी मनोविनोदार्थ राजकारणांतून फावलेल्या वेळांत रचली आहे. नित्याचा उद्योग आटोपल्यावर गायनवादनप्रिय मनुष्य ताना मारतो, आलाप घेतो किंवा दिलरुब्यांतून मधुर बोल काढतो त्याप्रमाणे साहित्यप्रेमी केळकरांचे साहित्यग्रंथ मनाच्या आनंदमय स्थितींत जन्मास आले आहेत. वर्तमानपत्रांत तयार झालेल्या लेखणीस साहित्यांतील उच्च वाङ्मय निर्माण करण्याची खुमखुमी उत्पन्न होते व उच्च वाङ्मयांत वरची कसरत खेळलेल्या त्याच लेखणीला वर्तमानपत्रांतील मामुली लेख हृदयंगम करून सोडणें हातचा मळ वाटूं लागतो. अशा रीतीनें अन्योन्याश्रयामुळे केळकरांची लेखणी ही एक अजब चीज होऊन बसली आहे. तिच्यावर फिदा असलेले लक्षावधि वाचक महाराष्ट्रांत आहेत. त्यांना वाटतें कीं केळकरांचें खरें महत्त्व कशांत असेल तर त्यांच्या साहित्यसेवेंतच आहे. जनतेस या प्रकारची भुरळ पडणें हें एका अर्थी केळकरांना दूषणास्पद नाही, इतकेंच नव्हे तर राजकारणाच्या आखाड्यांत नित्य कुस्त्या चालू असतांहि त्यांबरोबर अगदी विसंगत अशा वाङ्मयक्षेत्रांत त्यांनीं एवढें श्रेष्ठ स्थान पटकावलें यासारखें त्यांस भूषणावह असें दुसरें काय आहे ?

### छत्तिसाचा आंकडा त्रेसष्टाचा झाला

साहित्य-सेवकाला राजकारणाचें कुपथ्य वाटतें व राजकीय पुढाऱ्याला साहित्यसेवेनें नांव काढलें कीं, त्याच्या कपाळावर आठ्यांचें जाळें पसरतें. इतका या दोन विषयांचा छत्तिसाचा आंकडा आहे. तो बदलून त्याच्याऐवजी त्रेसष्टाचा आंकडा त्यांनी घातला व जनतेंत केळकरांचें राजकारण श्रेष्ठ कीं साहित्यसेवा श्रेष्ठ याविषयीं वाद माजावा इतकी दुतर्फी कामगिरी बजावली याबद्दल त्यांची करावी तितकी स्तुति थोडीच आहे. परंतु त्यांचें कार्य नुसतें राजकीय नाही किंवा नुसतें साहित्य-विषयकहि नाहीं. शिरोभागीं उद्धृत केलेल्या श्लोकांत पंडित जगन्नाथराय यांनीं म्हटल्याप्रमाणें केळकरांची मनःप्रवृत्ति आपल्या हातून सर्व बाजूंनी देशाचें होईल तितकें हित व्हावें अशीच असल्यानें त्यांना सामाजिक, धार्मिक, औद्योगिक, शैक्षणिक अशा शेंकडो मार्गांनी देशहित साधता आलें आहे. तें साधीत असता त्यांच्या विद्वत्तेस शोभेल अशा रीतीनें मराठी भाषेस त्यांनी प्रतिष्ठेस चढविलें, कृति लोकोत्तर केली व पंडित जगन्नाथ राय यांची उक्ति त्यांस सर्वस्वी लागू पडावी म्हणूनच कीं काय त्यांना देवाच्या दयेने आकृतिहि सुंदर अशीच लाभली.

## नरसिंह

(ले. विनायक लक्ष्मण वर्वे, एल्एल्. बी. चिपळूण.)

अनादि अनंत अशा कालालाहि साठ वर्षांच्या एका घुटक्याचें महत्त्व वाटतें. कपिलाषष्ठियोग हें त्याचें एक ज्ञात असणारें गमक होय. क्षणभंगुरत्वानें व्याप्त असणाऱ्या सामान्य माणसाला तर या साठ वर्षांच्या एका आयुष्याचें महत्त्व हजारों कपिलाषष्ठ्यांच्या एकाच दिवशीं उदित होणाऱ्या योगाइतकेंच मांगल्यमय वाटतें. त्यांतल्यात्यांत जर एखाद्या लोकोत्तर माणसाच्या आयुष्याचा हा दिवस तद्देशीयांच्या हाताला लागला तर गंधाक्षतांच्या ओंजळीच्या ओंजळी फेकल्याशिवाय त्यांच्यानें राहवत नाही. जगांतील प्रत्येक लहानमोठ्या देशांत माणुसकीचा मोठेपणा असा उज्ज्वल तऱ्हांनी हरहमेश व्यक्त होत असतो. हिंदुस्थान देशाच्या वांट्याला मात्र हे शुभप्रसंग फारच थोडे येतात. आधीच हिंदुस्थानांत दीर्घायुष्य फक्त आशीर्वादापुरतें ! त्यांतल्या त्यांत अलौकिक पुरुषांना तर फुलाचेंच आयुष्य लाभलेलें! महाराष्ट्रांत तर हीं दोनही प्रमाणें आणखी सेडावत जाणारीं ! अशा परिस्थितींत "होएन झोलार्न" या अद्वितीय ग्रंथांतील It is only great individual minds,

conscious of their aims that influence & direct the history of Nations and never the masses या माजी कैसरनें लिहिलेल्या वर्णनाबरहुकूम असणाऱ्या जिवंत केळकरांचें, ऐन दिलदारीने जर महाराष्ट्रीयांनी गुणगायन केलें, त्यांच्यावर आशीर्वादांची खैरात केली, पूजासंभार सहर्ष समर्पण केला अगर वाक्सुमनांच्या मुठीच्या मुठी उधळल्या तर त्यांत माणुसकीची शोभाच जास्त वृद्धिंगत होणार आहे. हें खुल्या दिलाचें लेणें देणें दोघांनाहि सारखेंच प्रफुल्लित करणारें आहे. अलौकिक व्यक्तींचा योग्य तो सन्मान न झाला तर त्यांत त्यांची मानहानि काडीमात्रहि नसते. मात्र योग्य सन्मान न करणाऱ्याचीच परीक्षा होऊन राहते. अशा स्थितींत हिंदुस्थानाच्या भावी स्वराज्याचे फडणीस, जगांतील कोणत्याहि पट्टीच्या लेखकाला तोडीस तोड देण्याइतके समर्थ असणारे कलमबहाद्दर, टिळकांच्या महाराष्ट्राचे एकमेवाद्वितीय पुढारी, अस्सल राज्यशास्त्री, अभिजात विनोदपंडित, व या सर्वांच्यावर म्हणजे प्रत्येक हालचालींत स्वतःचे बाणेदार व्यक्तिवैशिष्ट्य व्यक्त करणारे श्रीयुत **तात्यासाहेब केळकर** यांच्या ६१ व्या वर्षप्रतिपदेनिमित्त महाराष्ट्रानें जो उत्सव करण्याचें ठरविलें आहे त्यांत रत्नागिरी जिल्ह्यातर्फे चिपळूणचा प्रतिनिधि म्हणून प्रस्तुत लेखाच्या स्वरूपांत, अत्यंत मिनतवारीनें पण उत्कट आनंदानें मी भाग घेत आहें.

## केळकरांचा स्वार्थत्याग

दरमहा १२ रुपये पगार असणाऱ्या वडलांचे हे **नरसिंह** एलएल. बी. होऊन प्रथम सातारयास वकिली करूं लागले. वकिली सोडून केसरीला येऊन मिळण्यांत श्री. केळकरांनी प्रथमारंभींच द्रव्यविषयक अलोट स्वार्थत्याग केला. आजपर्यंत जर ते नुसत्या वकिलीच्याच क्षेत्रांत असते तर दादासाहेब करंदीकरांप्रमाणे ते मुंबई इलाख्यांतील पहिल्या दर्जाचे वकील तर ठरलेच असते, पण त्याहूनहि कदाचित् हिंदुस्थानाच्या पहिल्या पांच वकिलांत द्रव्यदृष्टीने व कीर्तिदृष्टीने त्यांनी बरेंच वरचें स्थान पटकावलें असतें. एकाच वस्तूचा सांगोपांग अभ्यास, सांगोपांग विवेचन, मुद्देसूद विश्लेषण करून तें सफाईने मांडण्यांत वकिलीकलेचा खरा प्रकर्ष असतो. हे सर्व गुण केळकरांच्या प्रत्येक कृतींत हमखास दिसून येतात. एवढ्यावरूनच आमचें वरील विधान विश्वासार्ह असल्याचें दिसून येईल. केळकरांच्या या स्वार्थत्यागाने महाराष्ट्राचें मात्र फार मोठें हित झालें आहे. एक प्रख्यात वकील म्हणून महाराष्ट्राला केळकरांबद्दल फारतर एकांगी आनंद झाला असता, पण आज केळकरांच्या अष्टपैलुत्वाच्या किरणावलींत महाराष्ट्र नुसता न्हाऊन निघत आहे. A single beautiful line has wrought the world more good than all the masterpieces of mechanism या फ्रान्सचा अभिजात लेखक बॅनोटेल याच्या प्रसिद्ध उक्तीप्रमाणे म्हणजे केळकरांनी नुसती वकिली न करतां लेखनाचा धंदा स्वीकारण्यांत निदान महाराष्ट्राचें तरी मुबलक कल्याण केलें आहे.

## बोधात्मक वाङ्मय

"खूप लिहिण्याची हौस" म्हणूनच मी १८९६ सालीं केसरीला येऊन मिळालों असें ते पुष्कळदां म्हणाल्याचें त्यांचे स्नेही सांगतात. या त्यांच्या खूप लिहिण्याच्या हौसेतूनच लेखनकलेचे निरनिराळे नमुने आजकाल आदर्शभूत होऊन राहिले आहेत. साधारणतः वाङ्मयाचे दोन भाग असतात. एक विचारप्रधान बोधात्मक वाङ्मय (Literature of Knowledge) व दुसरे कलाप्रधान आनंदात्मक वाङ्मय ( Literature of Power ) या दोनहि वाङ्मयांच्या शाखेत केळकरांची कामगिरी पहिल्या दर्जाची आहे. यांतील पहिल्या दर्जाच्या वाङ्मयांत मराठे व इंग्रज, गॅरिबाल्डीचें चरित्र, आयर्लंडचा इतिहास, सुभाषित व विनोद, टिळकांचें चरित्र व केसरींतील गेल्या ३० वर्षांत त्यांनी लिहिलेले अग्रलेख यांचा प्रामुख्यानें समावेश केला जाईल. या प्रत्येक पुस्तकाबद्दल महाराष्ट्रातील प्रमुख टीकाकारांनी अत्यंत थोर असे उद्गार काढलेले आहेत. एखादा लहानसा विषय घेऊन त्याचा सांगोपांग अभ्यास कसा करावा याचा "मराठे व इंग्रज" हें पुस्तक आदर्श आहे असें सर्व टीकाकारांचें ठाम मत आहे. "विनोद विनोद म्हणता, पण विनोद म्हणजे तरी काय ? करा पाहूं व्याख्या !" असें एकजण सहज म्हणाल्यावरून लिहिलें गेलेल्या "सुभाषित व विनोद" या पुस्तकाबद्दल संस्कृत साहित्यविशारद श्री काणे म्हणतात कीं, "प्रस्तुत ग्रंथाला अनेक दृष्टींनी अग्रस्थान दिलें पाहिजे. अर्वाचीन मराठी साहित्यशास्त्रावर जर प्रमाणभूत व मार्गदर्शक ग्रंथ लिहावयाचा असेल तर तो कोणत्या पद्धतीनें लिहिला पाहिजे हें या ग्रंथावरून शिकावें." केसरींतील अग्रलेखाबद्दल तर लिहिण्याचें कारणच नाहीं. केसरीला वाङ्मयिक दर्जा केवळ केळकरांमुळेच प्राप्त झालेला आहे. आज मराठींत सुमारें ७० वृत्तपत्रें आहेत त्यांतील सुमारें ४० केसरीपक्षाचीं, ६ मवाळपक्षाचीं, १३ सत्यशोधकी,

७ संस्थानी व ४ गोमांतकीय. केसरीपक्षाचीं ४० असण्याचें मुख्य कारण म्हणजे केसरीच्या ठराविक धोरणाला केळकरांनी दिलेल्या प्रशांत मुत्सद्देगिरीची व लेखन-वैभवाची जोड हेंच होय. गॅरिबाल्डिचें चरित्र व आयर्लंडचा इतिहास हीं दोन्ही पुस्तकें मराठी वाचकाला स्वातंत्र्यलोलुप करण्याइतकीं हृदयंगम आहेत.

### आनंदात्मक वाङ्मय

कलाप्रधान आनंदात्मक वाङ्मयांतहि नरसिंहाचें सव्यसाचित्व पुरेपूर व्यक्त झालें आहे. कलाप्रधान वाङ्मयांत नाटकें, निबंध, लघुकथा, काव्य आदिकरून साहित्याचा समावेश होतो. त्यांत कला व त्या योगाने साधणारा आनंद हाच प्रमुख असतो. कोणत्याहि कलेवर नीतिप्रसाराची अगर बोधात्मकतेची विशेष प्रकारची अशी जबाबदारीच नसल्यामुळे कलेकरितां कला व त्यापासून निष्पन्न होणाऱ्या आनंदाकरितां आनंद एवढीच त्याची अव्वल व्याप्ति असते.ललित वाङ्मय म्हणजेच वर सांगण्यांत आलेलें, काव्यप्रधान आनंदात्मक वाङ्मय. या प्रकारच्या वाङ्मयापुरतें बोलायचें म्हणजे प्रो. फडक्यांनी आपल्या प्रतिभासाधनांत म्हटल्याप्रमाणे "सरस्वती पुराणिकाच्या व्यासपीठावर बसली नसून प्रमत्त मयूरपिच्छांच्या सुबक सिंहासनावर अधिष्ठित" असल्यामुळे, केळकर यांनी आपल्या नाटकांवर भाषण केलें असता "माझ्या नाटकांत कलाविलासावांचून कोठलाहि माझा हेतु नाही. भावी टीकाकार त्यांतून कांहीहि काढोत" असें स्पष्ट सूचित केलें. त्यांच्या नाटकांत, त्यांतल्यात्यांत 'तोतयाचें बंड' 'कृष्णार्जुन-युध्द' यांत नाट्यजात आनंदाची अनुभूति ठाईंठाई प्रत्ययास येते. चंद्रगुप्तांतील सी. आय. डी. वरील अन्योक्ति, तोतयाच्या बंडांतील विठोचें उपकथानक अगर कृष्णार्जुन युद्धांतील बरेचसे पेंच प्रसंग केळकरांच्या नाट्यकला वैभवाची भरपूर साक्ष देतात. विलायतेचीं बातमीपत्रें,सिमल्याचीं बातमीपत्रें,केसरींतील लेख, व निरनिराळ्या वेळीं लिहिलेलीं इतस्ततः स्फुटें यांतून जितका सत्याचा व प्रत्यक्षाचा बोध होतो, तितकाच कलावैभवाच्या पोटीं जन्म घेणाऱ्या आनंदाचाहि प्रत्यय होत राहतो. आजकाल फैलावणाऱ्या लघुकथांतहि त्यांचें प्रावीण्य सहज निदर्शनास येतें. "माझी आगगाडी कशी चुकली ?" "कपड्यांचीं अदलाबदल" वगैरे गोष्टींची उत्तम विनोदी लघुकथा म्हणून नोंद करण्यासारखी आहे. काव्याच्या बाबतींतहि केळकरांचा प्रतिभाविलास अव्वल दर्जाचा आहे. कवितेचें नवीन तंत्र (Technique) जरी त्यांच्याजवळ नसलें तरी मंत्र, म्हणजेच प्रतिभेचें साध्य जो ध्वनि तो त्यांच्या काव्यांत पुरेपूर आहे. सन १९२७ सालीं प्रसिद्ध झालेला "काव्योपहार" जरी घेतला तरीहि त्यांतील प्रत्येक कवितेंत अर्थ व ध्वनि यांची गाढ अनुरक्तिच दिसून येते. विरहिणीच्या दोन निरनिराळ्या प्रणयपत्रिका, दिव्य मोटार, दोन जुळीं भावंडें, हें पहा आमचें नवें राज्य वगैरे कवितांत प्रतिभेचा मनमुराद चाललेला आनंदमय विलासच अनुभवाला येतो. "हें पहा आमचें नवें राज्य" या कवितेंत तर अर्थ व ध्वनि यांच्या समरसतेची कमाल झाली आहे.

### अर्थ व ध्वनि यांची समरसता

"गाढवा गुपित पोलिस, नेमुन दिला आम्ही खास-
त्यो उकिरडा फुंकुन येई, चोरिचा तपास लावून
कोल्होबा केला न्याधीश, वादी परतिवादीबी खुश
न्हाइ मुदमालाची तक्रार, समदा बिळांत गेला पार
हत्तिला केला वाकनिस, खंडीचा येकच घांस
काटकसरी हाय त्यो फार,खायाचाच तुडवून पार
बैलाला मास्तर कयेला, कदि मारि न इद्यार्थ्याला
घेउन शिकसान खास,करून सोडी आपल्या सरिस"

याचप्रमाणे "दिव्य मोटार" वरीलहि रूपक अत्यंत समर्पक आहे. परिपक्व शब्दयोजना, सप्रयोजक उपमा, दृष्टांत, गंभीर अलंकार यांची केळकरांच्या कोठल्याहि लेखनांत कलापूर्ण मांडणी असायचीच. नाजुक भावनाहि केळकर अत्यंत हलक्या हाताने चित्रित करतात. विरहिणीच्या प्रणयपत्रिकेंत एका सोज्ज्वल आर्य महिलेच्या पती-बद्दलच्या भावना अत्यंत पवित्र विचारसरणींतून केळकरांनी व्यक्त केल्या आहेतः—

"पोथी वाचुनियां जपासि बसते ध्यानस्थ मी होउनी
बोटें चाळवितें तरी न सरती माळेंतले ते मणी
देवाचें जरि नाम घेइन म्हणे, येतें तिथे आपुलें
घेतां तें मन लाजवोनि म्हणतें 'हें काय गे हा खुळे!"

हें जसे नाजुक भावनांचें कोमल चित्रीकरण झालें तसेंच हें भडक भावनांचें विनोदपूर्ण चित्रीकरण पाहा."आधीं अंथरुणावरोनि उठतें आठानवांच्या पुढें
सांगे डॉक्टर कीं, प्रभातहिम ते हो नाजुका वावडें
पेले मांडुनि बैसतें मग चहापानास मेजावरी
देते बैसवुनी समोरच तुझ्या खुर्चीमध्यें मांजरी"

कित्येक लेखक नुसत्या नाजुक भावनाच कलावान हाताने व्यक्त करणारे असतात. कित्येक लेखक नुसत्या भडक भावना विनोदी पद्धतीनेच मांडणारे असतात. पण या दोन्ही पद्धतींचा गोड, समतोल व समर्पक मिलाफ करून लिहिणारा वैभवशाली लेखक, श्री. कोल्हटकरांचें नांव वगळल्यास, केळकरांशिवाय कोणीहि नाही. केळकरांच्या प्रत्येक लेखनांत श्रावणांतील झऱ्यांच्या झुळझुळ वहाणाऱ्या रुपेरी पाण्याप्रमाणे हास्यरस सारखा निनादत असतो.

## टीका वाङ्मय

वर लिहिलेल्या दोन्ही प्रकारच्या वाङ्मय विशेषाव्यतिरिक्त अथवा वरील दोन्ही प्रकारच्या वाङ्मय विशेषांनीं समव्याप्त असणारा असा वाङ्मयविशेष म्हणजे टीका वाङ्मय या प्रदेशाचें तर केळकर म्हणजे अनभिषिक्त राजेच आहेत. इतिहासाचा, वाङ्मयाचा, समाजाचा व व्यक्तीचा, केळकरांसारखा सहृदय व टीकाकार मराठींत आजपर्यंत झालेला नाहीं असें एका प्रसिद्ध होतकरू टीकाकाराचें मत आहे. तो पुढे म्हणतो, " त्यांची आत्मौपम्य बुद्धि जितकी विशाल तितकीच न्यायबुद्धि उत्कट आहे. ते शत्रूच्याहि गुणांचा गौरव करण्याला केव्हांहि चुकत नाहींत." हेच केळकरांचें अलौकिकत्व आहे. मराठींत प्रसिद्ध होणाऱ्या पुस्तकांपैकीं ¾ पुस्तकांवर केळकरांचा कोणत्या ना कोणत्या प्रकारें अभिप्राय असतोच. लेखकप्रकाशकांपैकीं कोणीना कोणी नरसिंहाचा अभिप्राय हा घेणारच ! व केळकरहि तो विशाल अंतःकरणानें देणारच ! आजकालचे इतिहाससंशोधक इतिहासाचें कोणतेंहि दालन आपणाबरोबर केळकरांनी तपासावें अशी इच्छा करतातच करतात. इतिहाससंशोधनाचें कार्य केळकरांच्या नजरेशिवाय अपुरें राहील असेच बहुतेक संशोधकांना वाटतें. गेल्या तीस वर्षांतील समाजाच्या प्रत्येक बऱ्यावाईट संस्थेला असें वाटतें कीं, केळकरांची आपणाशीं सहकारिता असावी. त्यांच्या विश्लेषणशीलत्वाचा फायदा प्रत्येक संस्थेला मिळावा, असें जें त्या त्या चालकांना वाटतें त्याचा अर्थच हा कीं केळकर शत्रूच्याहि गुणांचें कौतुक करायला चुकत नाहींत. प्रत्येक बऱ्या वाईट संस्थेचा केळकर कसून समाचार घेतात, योग्य दिसल्यास परामर्ष घेतात व अयोग्य दिसल्यास टीकेची झणझणीत फोडणीहि देतात. व्यक्तीचाहि परामर्ष केळकरांकडून असाच घेतला जातो. प्रत्येक कृतीकडे सहृदयतेनें पाहणें हा त्यांचा सद्गुण जाहीर असल्यामुळे कोणताहि नवा लेखक केळकरांकडे प्रथम धाव घेतो. त्यांनी पाठ थोपटली कीं महाराष्ट्र पाठ थोपटील असेंच त्याला वाटतें व त्याप्रमाणेंच घडून येतें. कित्येक नवशिके लेखक आपल्या शंका प्रथम केळकरांनाच—केवळ त्यांच्या अगाध मार्मिकतेवर—भिस्त ठेवून विचारीत असतील.

## प्रतिमावाद

प्रस्तुत लेखकानें अशीच एक शंका १९३० सालीं केळकरांना पत्रानें विचारली होती. त्या वर्षी लेखकाच्या आसपासच्या प्रत्यक्षांत अशा कांहीं सामाजिक गोष्टी घडून आल्या कीं लेखकाच्या दृष्टीनें त्या माणुसकीला कमीपणा आणणाऱ्या होत्या. त्यांसंबंधी लेखकाच्या मनांतून दुःखपूर्ण व कलावान अशीं शब्दचित्रें काढावयाचीं होतीं, पण त्यांचा विदग्ध वाङ्मयांत समावेश होईल कीं नाही याचें भय वाटून त्याबद्दलची शंका त्यानें केळकरांना विचारली. त्याचें उत्तर आल्यानंतर प्रस्तुत लेखकानें त्याच आसपासच्या प्रत्यक्षांवर चांगल्या ४–५ लघुकथा लिहिल्या. तें उत्तर असें " वाङ्मयाला ऐतिहासिक प्रसंगाप्रमाणें प्रत्यक्ष संसारसृष्टींतील चमत्कार वर्ज्य नाहीत. किंबहुना प्रतिमावादाचें (Realistic School) चालती संसारसृष्टि हेंच मुख्य भांडवल असतें. त्याच्या वर्णनाला प्रतिबंध दोन.बेअब्रुकारक मजकूर असल्यास पिनल कोड व ग्राम्य मजकूर ठरल्यास सदभिरुचि. नांवें बदलून लिहिल्यास शेजारच्याच काय पण घरांतल्या माणसांबद्दलहि कथानकें लिहितां येतील. मात्र तीं सदभिरुचीला सोडून नसावीं. याची खूण एकच कीं, तीं वाचकाच्या कुटुंबांत स्त्री, पुरुष व मुलें एकत्र बसून वाचूं शकतील." या उत्तरानें प्रस्तुत लेखकाला प्रतिमावादाचें अंतरंग तर समजलेंच, पण शिवाय, केवळ केळकरांच्या पत्राधारावर पिनल कोडालाहि न जुमानतां त्यानें त्या सामाजिक अन्यायांना चांगलें चवाठ्यावर टांगलें.

## केळकरांचा अत्युच्च गुण

प्रस्तुत प्रसंगांत केळकरांची विश्लेषणशीलताच प्रामुख्यानें विजयी झाली असल्यामुळे त्यांचा लेखनांत उपयोग केला आहे. पृथक्करणाच्या हौसेमुळेच केळकर नव्या नव्या लेखकांचा परामर्ष घेऊं शकतात. प्रत्येक छोट्या–बड्या गुणी लेखकाची केळकर आपण होऊन पाठ थोपटतात. १९१९ सालीं स्वराज्याच्या दौऱ्यावर केळकर चिपळूण येथे आले असता त्यांच्या व्याख्यानापूर्वी प्रस्तुत लेखकाची " कुर्निसात " ही कविता कांही विद्यार्थ्यांनी म्हणून दाखविली. त्या वेळीं प्रस्तुत लेखक कॉलेजच्या दुसऱ्या वर्षाचा विद्यार्थी होता. कविता म्हणून होताच कै. चितळे वकील यांना कवितेच्या कर्त्याचें नांव गांव विचारून प्रस्तुत लेखकाच्या कवितेचा आपल्या गोडवाणीनें मूठभर मांस चढेल, इतका गौरव त्यांनी केला. त्यानंतर गेल्या ५ वर्षांतहि केळकरांनी प्रस्तुत लेखकास वेळोवेळीं प्रशस्तिपत्रें पाठविलीं आहेत. त्यांतहि केळकरांची रसिकताच व्यक्त होते. 'विधवा कुमारी' चे लेखक केळकरांच्या जवळ जवळ शत्रुपक्षांतीलच पण त्या कादंबरीचा गुणगौरव प्रथम केळकरांनीच मुक्तकंठानें केला आहे. यांतच केळकरांचें खरें अलौकिकत्व !

रम्यत्व (The beautiful) म्हणजेच मृदुता क्रमविकासिता, सौम्यता, सौकुमार्य, अनुरूपता, विभ्रम इत्यादि होय. यानेच बव्हंशीं कलाप्रधान आनंदात्मक वाङ्मय नटलेलें असतें. या

वाङ्मयांतील विचारपद्धति आणि भाषा यांमध्ये जें प्रमाणाबाहेर शैथिल्य होतें तें केळकरांनी सविकल्प समाधि, सुभाषित, विनोद, अश्लीलता वगैरे शब्दांच्या यथातथ्य व्याख्या करून कायमचें नाहीसें केलें आहे. ही त्याची कामगिरी जगाच्या वाङ्मयांतहि महत्त्वाचीच ठरेल.

उदात्त (The sublime) म्हणजेच विशालता, दुःखप्रदायित्व, गुरुत्व, सामर्थ्य, अनंतत्व, भव्यता, आकस्मिकता, उज्ज्वलता इत्यादि होय. यानेंच विचारप्रधान व वाङ्मय बहुधा चितारलें गेलेलें असतें. मराठे व इंग्रज, टिळकांचे चरित्र, गेलीं पांच वर्षे, तोतयाचें बंड, व कित्येक पुस्तकांवरील त्याचे अभिप्राय व टीका, सामाजिक संस्थांच्या बाबतींतील त्यांचें धोरण व हरएक व्यक्तीबद्दल त्यांच्या ठिकाणी वास करीत असणारी सहृदयता हें सर्व पुरुषोत्तमतेच्या दृष्टीने उदात्त ठरेल.

## कांही आक्षेप

आतापर्यंत सोपपत्तिक विस्तारानें दर्शविल्याप्रमाणे या नरसिंहाचें आजपर्यंतचें जीवन म्हणजे नरसिंह अवताराप्रमाणेच रम्यत्व व उदात्तत्व यांचा मधुर संगम आहे. अवतारी नरसिंह जसा प्रल्हादाच्या रम्यत्वाबरोबरच त्याच्या उदात्तत्वाखातर स्तंभांतून प्रगट झाला, तद्वतच हा आजचा नरसिह वाङ्मयाबरोबरच राजकारणासाठी केसरीच्या स्तंभांतून गेल्या ३०।३५ वर्षे प्रगट होत आहे. कित्येक आकुंचित दृष्टीच्या राजकारणी माणसांना असें वाटतें कीं, केळकरांच्यांत धडाडी नाही, केळकरांच्यांत सडेतोड वृत्ति नाही, केळकर तुरुंगांत जात नाहींत, केळकर हे राजकारणी पुरुषच नाहींत, केळकर साहित्यसम्राट आहेत, केळकर राष्ट्रसेवक आहेत, केळकर अष्टपैलू आहेत–पण पण केळकर राजकारणी पुरुषच नव्हत !! प्रस्तुत लेखकाला विद्युत्शास्त्राइतकेंच राजकारणहि समजत नाही. तरी पण वरीलप्रमाणें लोकांचे बोल म्हणजे मूर्तिमंत अयुक्ताभास (Paradox) आहेत असेंच लेखकाला वाटतें. राजकारणी पुरुष म्हणजे प्रामुख्याने पक्षांध, एकसूत्री, आपल्या तत्त्वांचा एकांतिक अभिमान बाळगणारा, दुसऱ्याचा यत्किंचितहि सद्गुण न पाहणारा, अत्यंत स्वार्थी, अहंकाराने काळवंडलेला, मिळतील ते हार स्वतःच्या गळ्यांत चढवून राहतील ते दोष आपल्या इतर साथीदारांच्या डोक्यावर लादणारा, ढोंग हेंच भांडवल असणारा, न्याय व सत्य यांचें वावडें असणारा !! हे सारे गुण ज्याच्या अंगीं असतील तोच लौकिक दृष्टीने राजकारणी पुरुष ठरतो. पण हे सारे राजकारणी पुरुषाचे गुण वैयक्तिक दृष्ट्या खास खास दुर्गुण ठरतील. विन्स्टन चर्चिलच्या प्रत्येक भाषणांत या सर्व गुणांचा बुजबुजाट असतो म्हणूनच तो कॉन्झरव्हेटिव इंग्लंडचा प्यार होऊन राहिला आहे. केळकर वैऱ्याचाहि गुणगौरव करणारे असल्यामुळे पक्षांध होणें त्यांना शक्य नाही.

## प्रशांत मुत्सद्दी

सामाजिक सुधारणेचा इनकार करणें हा टिळकपक्षाचा–खुद्द टिळकांचाच नव्हे–एका काळचा विशेष होता. त्याविरुद्ध केवळ न्यायीपणामुळे केळकरांनी स्वकृतीने वेळोवेळीं हल्ला चढविला. स्वभावतःच विश्लेषणशील असल्यामुळे केळकरांना ढोंग करताच येत नाही. मनांत कांहीहि असलें तरी खादी टोपी व खादी पैरण घालून गेल्या ५।१० वर्षांत जर केळकर तुरुंगाच्या पाठीस लागत गेले असते तर त्या ढोंगाच्या भांडवलावर त्यांना सहज हिंदुस्थानचें पुढारी होता आलें असतें. निव्वळ ढोंगाच्या भांडवलावर हिंदुस्थानचें पुढारीपण अलीबंधूंनी नाही का गाजवलें ! धादांत असत्याला सत्य म्हणण्याची समयज्ञता केळकरांच्या अंगीं असती तर सुताच्या स्वराज्याची री ओढून त्यांना टिळकांचें राजकारण सहज मागें टाकतां आलें असतें. पण केवळ अचल तत्त्वनिष्ठेखातरच त्यांना म. गांधींविरुद्ध मोहीम करावी लागली. व तत्त्वनिष्ठेखातरच क्षणिक हारहि खावी लागली. तत्त्वनिष्ठ हा वैयक्तिक गुण पण राजकारणांत दुर्गुण समजला जातो. आणि केळकरांच्या वैयक्तिक सद्गुणामुळेच लौकिक दृष्टीला ते राजकारणी पुरुष नाहीत असें भासलें. तुरुंगांत खेचीपर्यंत सारखें मीठ करीत जर केळकर राहिले असते तर त्या आततायीपणाला लोकांकडून खास खास धडाडी हें नांव मिळालें असतें.

पात्रे त्यागी, गुणे रागी, संविभागी च बंधुषु
शास्त्रे बोद्धा रणे योद्धा पुरुषः पंचलक्षणः

या सुभाषितांतील, पुरुषाच्या सर्व वैयक्तिक गुणांनी रोमरोमांत भरून राहिलेल्या नरसिंहाच्या अंगीं 'वारांगनेव नृपनीतिरनेकरूपा' नसल्यामुळे, बहुरूप्याचा अहंकार नसल्यामुळे, एकांतिक व अल्पजीवि असें गुणगान करण्याचें कोकिळेचें ढोंग नसल्यामुळे, कसलाहि विधिनिषेध न बाळगण्याची बेफाम वृत्ति नसल्यामुळे, न्यायाचा धारवाडी कांटा सदाच हातीं असल्यामुळे, व्यक्तिवैशिष्ट्याची खरीखुरी आवड असल्यामुळे व नेहमीच सदभिरुचीच्या कलासक्तींत गुंग असल्यामुळे कांही कोत्या दृष्टीच्या महाराष्ट्रीयांकडून पूर्वी नमूद केलेले अपलाप ऐकूं येतात. मात्र हिंदुस्थानांतील बहुतेक मुत्सद्दी व इंग्लंडमधील बरेच सुविचारी राजकारणी पुरुष केळकरांना 'एक धिम्मा व प्रशांत मुत्सद्दी' असेंच वेळोवेळीं म्हणत आले आहेत.

**निस्सीम व्यक्तिवैशिष्ट्य**

केळकरांच्या व्यक्त असणाऱ्या कोणत्याहि जीवनकृतीकडे पाहिलें तर त्यांत निस्सीम व्यक्तिवैशिष्ट्यच दिसून येतें. त्यांच्या हरएक जीवनप्रसंगांत हरएक लेखन–कृतींत, अगदी क्षुल्लक हालचालींतहि व्यक्तिवैशिष्ट्याच्या विकासी छटाच मुद्रित होतात. दिसेल त्या प्रत्येक कलेंतून, दिसेल त्या प्रत्येक विद्येतून, दिसेल त्या प्रत्येक शास्त्रांतून अधिकांत अधिक असें सारें उचलून घेऊन आत्मसात् करायचें, या प्रकारच्या कलासक्तींतूनच व्यक्तिवैशिष्ट्याचा जन्म होत असतो. सहवासांत येणाऱ्या प्रत्येक अणुपरमाणूशीं, प्रत्येक निसर्ग छटेशीं, प्रत्येक व्यक्तीशीं, प्रत्येक संस्थेशीं, सहानुभवशक्तीच्या जोरावर समरस होऊन त्यांतील बारीकसारीक गतीपासून स्थूल स्थितीपर्यंत सर्वस्वाची उचल करून स्वतःत विलीन करून घेतल्याशिवाय व्यक्तिवैशिष्ट्याचा विशेष असा प्रकर्ष होणारच नाही. याच सर्वव्यापी सहानुभवशक्तीमुळे केळकरांना असलें व्यक्तिवैशिष्ट्य अंगीं बाणवतां आलें असावें. चौदा विद्या, चौसष्ट कलांत त्यांचे स्वतःचें असें कांही सांगण्यासारखें त्यांच्याजवळ नेहमींच असतें. ते उत्तम चौरस वक्ते आहेत, उत्तम गानाभिज्ञ आहेत, मुद्रणकलेंत निष्णात आहेत, टीकाकारांचे अग्रणी आहेत, संपादकांचे सेनानी आहेत आणि हें सर्व असूनहि प्रत्येक बाबतींत नवविचारप्रक्षोभक आहेत. सर्वसंमत व सर्वसंमानित रूढीला नरसिंह, मध्येंच पण हम्मेश, जोराचा धक्का देतात. आणि या सर्वांचें कारण म्हणजे नरसिंहाचें निस्सीम व्यक्तिवैशिष्ट्य! देशाच्या संस्कृतीवर नवे पैल पाडण्याचें कार्य अथवा संस्कृतीला उजळा देण्याचें कार्य एकांगी राजकारणी पुरुषाकडून अगर एखाद्याच गुणाने पूर्ण मंडित असलेल्या व्यक्तीकडून केव्हांच होत नसतें. संस्कृति हीच मुळी कित्येक गुणसमुच्चयांमुळे व कित्येक शतकांमुळे संकलित होते, तर असल्या एखाद्या विशिष्ट संस्कृतीला निराळे नवे पैलू पाडणारा माणूस तर बहुगुणसंपन्न व अनेक शतकांचा शहाणपणा संकलित करणारा असाच असावा लागेल. म्हणजेच व्यक्तिवैशिष्ट्याने परिपूर्ण असावा लागेल. महाराष्ट्रापुरतें बोलावयाचें म्हणजे कै. रानड्यांच्या पाठीमागे मराठी संस्कृतीला नवे पैलू पाडणारा पुरुष नरसिंहाशिवाय दुसरा झाला नाही व म्हणूनच प्रस्तुत लेखाच्या अल्प सुरुवातीनंतर माजी कैसरच्या "होएन् झोलार्न" या ग्रंथांतील It is only great individual minds conscious of their Aims, that influence & direct the history of Nations, and never the Masses. (राष्ट्राराष्ट्रांच्या इतिहाससंस्कृतीला आपल्या विशिष्ट महत्त्वाने रंगवून संचालना देण्याचें कार्य प्रत्येक हालचालीची पूर्ण जाणीव असणाऱ्या थोर व्यक्तींकडूनच होत असतें. समाजाकडून हें कार्य केव्हांहि होत नसतें.) हा उतारा नरसिंहाच्या जीवनाचा मुख्य वृत्तांत म्हणून उद्धृत केला आहे.

मनुष्य हा जात्याच उत्सवप्रिय आहे. भिन्न संस्कृतीच्या मानाने भिन्न धर्मीय माणसामाणसांत उत्सवप्रियतेचे निरनिराळे नमुने दिसून येतात. साधारण महाराष्ट्रीय माणसाची उत्सवप्रियता प्रामुख्याने भूत काळच्या विभूतीबरोबरच प्रफुल्ल होणारी असल्यामुळे, वर्तमानकाळचा केवढाहि लोकोत्तर पुरुष असो, त्याच्याकरिता एखाद्या पाश्चिमात्य माणसासारखें, महाराष्ट्रीयांचें अंतःकरण मस्त आनंदाने नाचेलच असा भरंवसा नाही. जिवंत माणसाच्या विभूतिमत्वाचा प्रकर्ष अद्यापहि होण्यासारखाच असतो म्हणून म्हणा किंवा फक्त कळस दिसला तरच आंत प्रवेश करावयाचा, या वृत्तीमुळे म्हणा तो नरसिंहाच्या ६१ व्या वाढदिवसानिमित्त प्रचंड मिरवणूक काढा असें म्हणणार नाही, गंधाक्षतांचा वर्षाव करा असेंहि म्हणणार नाही, उत्साहवारुणीने बेहोष होणें त्याला खपणार नाही, अखिल महाराष्ट्राला आनंदाच्या उकळ्या फुटलेल्या त्याला पहवणार नाहीत, फुलांची खैरात झालेली त्याला आवडणार नाही, तरीहि उदयोन्मुख बृहन्महाराष्ट्राला नरसिंहाच्या गेल्या साठ वर्षांनी इतकें कलासक्त, इतकें उत्कर्षाभिमानी, इतकें स्वाभिमानी, इतकें गुणग्राही व इतकें उत्साही करून सोडलें आहे कीं त्यांच्या ६१ व्या वाढदिवशीं सदिच्छांच्या अक्षता, अभिनंदनाचा सुगंधवर्षाव, मानपत्रांच्या लाखोल्या, वाक्सुमनांचे मोहरदार हार, गुणगायनाचे सर्वोपचार व दीर्घ जीवनाचे मंत्रपुष्प यांचा जयघोष झाल्याशिवाय खास खास राहणार नाही.

उत्साहाने प्रमत्त झाल्यावेळीं माझ्या गरीब लेखणीची जाणीव होऊन मी शेवटीं एवढेंच म्हणतों कीं:—

Among the mightier offerings
Here are mine!




[ चित्रकार—र. बा. केळकर, धुळें.]

**श्री० न० चिं० केळकर,—**

वागीश्वरि देवी गे वाक्सुमने अर्पिलीं तुला मम हीं ।
स्वीकारुनि त्या प्रेमें आशिर्वच देई धन्य होइन मी ॥ १ ॥

**श्रीसरस्वती,—**

पाहुनिया त्वत्सेवा मन्मन हर्षें प्रफुल्ल होइ सदा ।
'सम्राट—साहित्या'चा हो जगिं या तूंच एक योग्य पदा ॥ २ ॥

**—र. बा. केळकर, धुळें.**

# पुण्यांतील 'केळकर' ग्रंथसमर्पणसमारंभ

वरील समारंभाची हकीकत पृष्ठ ९ वर दिलेली आहे. सदर समारंभांत श्री. केळकर यांनी उत्तरादाखल भाषण केलें तें येणेप्रमाणे—

## श्री. न. चिं. केळकर यांचें भाषण

"वाढदिवस मंडळाचे अध्यक्ष, चालक, सभासद व या ठिकाणीं उपस्थित झालेले सर्व सज्जन स्त्री—पुरुषहोः—

"आज या ठिकाणीं असा व एवढा मोठा समारंभ करून, आपण सर्वांनी माझा ६१ व्या वर्षाचा वाढदिवस साजरा केला, याबद्दल मी आपणा सर्वांचा अत्यंत ऋणी आहें. त्यांतूनहि प्रथमतः व मुख्यतः या मंडळाचेच आभार मला मानले पाहिजेत. कारण या समारंभाची मूळ कल्पना त्यांचीच असून ती सिद्धीस नेण्याला त्यांना किती श्रम पडले असतील, व किती खर्च आला असेल, याची कल्पना मला आहे, व ती आपणा सर्वांनाहि सहजच करतां येईल. वास्तविक मजसंबंधी असला कोणताहि समारंभ होऊं नये असा प्रथमपासून माझा आग्रह होता. कोणाला हें माझें म्हणणें विश्वसनीय वाटो वा न वाटो; परंतु आहे ती खरी गोष्ट मला जाहीर रीतीने सांगितलीच पाहिजे. मी सामान्यतः अगदी रुक्षच नसलों तरी फारसा भावनायुक्त असा मनुष्य नाही. आदर, स्नेह, प्रेम यांची भावना व जाणीव हीं असलीं तरी तीं मनोमन साक्ष असावीं, त्यांचें दृश्य बाह्य स्वरूपांत भडक रंगांत दाखविलेंच पाहिजे असें नाही, या मताचा मी आहें. आणि माझी खरी माहिती असणारे लोक सांगूं शकतील कीं, माझ्या स्वभावाचा हा तऱ्हेवाईकपणा किंवा विशेष मी खासगी व सार्वजनिक अशा दोनहि खात्यांमध्ये शक्य तितका सारखाच अमलांत आणण्याचा प्रयत्न यथाशक्ति करीत असतों. यामुळे या समारंभाची कल्पना गेल्या नोव्हेंबरांत, म्हणजे देशांत पूर्ण शांतता नांदत असता, प्रथम निघाली तेव्हांहि तिला मीं जोराचा विरोध केला; व गेल्या जानेवारींत कायदेभंगाची चळवळ सुरू झाली तेव्हा तर ती कल्पना रहित करविण्यांत मला प्रत्यक्ष यशहि आलें. पण फिरून गेल्या एप्रिलपासून या कल्पनेचें पुनरुज्जीवन झालें. व शेवटीं मित्रप्रेमाची सरशी होऊन, हें नाही तें नको असें म्हणत म्हणत असतांहि त्या कल्पनेला आजच्या या समारंभाचें स्वरूप आलें. त्यांत अकृत्रिम मित्रप्रेमाचा विजय आहे, व भिडस्थ स्वभावाचा पराजय आहे. पण हल्ली समाजाची स्थिति सर्वच बाजूंनी विपन्न असल्यामुळे असल्या समारंभाचा आनंद सेवन करतां येण्यासारखी आपली किंवा माझी कोणाचीहि मनःस्थिति नाही. म्हणून आज जरी हा समारंभ घडून येत आहे तरी आपणा सर्वांप्रमाणेच माझेंहि अंतःकरण या प्रसंगीं थोडेबहुत उदासीन व व्यग्रच आहे!

### हक्काचा माल नव्हे

आताच मानपत्र वाचलेलें आपण ऐकलें. त्यांत माझा इतका गुणगौरव केलेला आहे कीं, तो माझ्या हक्काचा माल असें मला मानतां येत नाही. किंवा तो स्वीकारतां येत नाही.तर त्यांत मित्रप्रेमाचा कांही पक्षपात व कांही अतिशयोक्ति आहे असेंच मला म्हणावें लागतें. उपचारांची भाषाच ठरून गेल्यासारखी असते, म्हणूनहि कदाचित् तें लिहिणारांचा नाइलाज होत असेल. तथापि सुदैवाने मला लोकनिंदा व दूषणें हीं स्तुतिबरोबर निराळ्या रीतीने इतकीं ऐकावयास मिळतात कीं, आज येथे होणाऱ्या, किंबहुना या चारसहा दिवसांत महाराष्ट्रांत अनेक ठिकाणीं होणाऱ्या, गुणगौरवाने मला मानसिक अजीर्ण होण्याचा संभव नाही. जेथे रोग तेथेच औषध किंवा जेथे विष तेथेच त्याचा उतारा निर्माण करण्याची सृष्टीची रीतच आहे. म्हणून ज्या कानांनीं स्तुति त्याच कानांनी निंदा ऐकण्याचा सराव मला पडला आहे. आणि गणित हा जरी माझा अद्यापि कच्चा राहिलेला असा एक शिक्षणविषय आहे, तरी मनाच्या रेघेच्या वरच्या बाजूला स्तुतीच्या निरनिराळ्या रकमा, आणि तिच्या खाली निंदेच्या निरनिराळ्या रकमा, अशा मांडल्या गेल्या असता, अंशाचा छेद जाईल तितका संक्षेप देऊन व्यवहारी अपूर्णांकाचें हें उदाहरण मी बरोबर सोडवूं शकतों याविषयीं अनेक तज्ज्ञ लोक साक्ष देऊं शकतील असा भरंवसा मला वाटतो. पण अशा उदाहरणाच्या सर्वच उत्तरांत सगळाच संक्षेप न जाता कांही थोडी बाकीहि केव्हा केव्हा उरूं शकते; व प्रस्तुत उदाहरणांत ती मला अनुकूल अशी उरते असें मला वाटतें. म्हणूनच आजच्यासारखे समारंभ, अप्रिय असले तरी ते केवळ दुःसह असे वाटत नाहीत. ते तसे दुःसह वाटण्याइतका खरोखरच मी नादान आहें असें माझें मन मला सांगतें तर मी या ठिकाणीं आलोंच नसतों. कित्येक वेळा निंदेविरुद्ध मनांत प्रतिक्रियाहि आपोआप घडते. आणि असेहि प्रसंग मनुष्यावर येऊं शकतात कीं, शेवटीं विनयाला मर्यादा घालून, आत्मविश्वासाने आत्मसमर्थन करणें ही गोष्ट स्वतःसंबंधानेहि अहंकाराची न ठरतां, केवळ न्यायाच्या आग्रहाची वाटावी, व ती त्याने करावी.

### व्यवहारी अपूर्णांकाचें उदाहरण

कोणताहि मनुष्य घेतला तरी, मी वर दर्शविल्याप्रमाणें. तें एक व्यवहारी अपूर्णांकाचें उदाहरणच असतें. ईश्वराशिवाय पूर्णगुण असें कोण असूं शकेल? म्हणून कोणीहि मनुष्य अपूर्णच; पण सर्वसाधारण रीत्या एकंदरीनें कसा काय आहे, हें ठरवूनच निर्वाह करून घ्यावा लागतो. आत्मनिरीक्षण करण्याची मला नुसती पात्रताच नव्हे तर सवयहि आहे; म्हणून माझ्या स्वभावांतले व माझ्या कामांतले गुणदोष माझे मलाहि कळतात. तथापि इतक्या उतारवयांत अंगीं असलेले दोष हटकून टाळणें व नसलेले गुण हटकून अंगीं आणणें, ही गोष्ट मला इतरांप्रमाणेंच दुःसाध्य वाटते. कसेंहि असो, आपण माझा जो गौरव करीत आहां त्यामुळे मला धन्यता वाटते ही गोष्ट मी नाकबूल करीन तर मी ढोंगी ठरेन. म्हणून मी ती करीत नाही. माझ्या अंगच्या ज्या गोष्टींना विशेष अनुलक्षून आपण माझा गौरव केला त्या तरी आपल्या या उत्तेजनानें वाढोत इतकीच माझी प्रार्थना आहे.

असो. 'वाढदिवस' या शब्दाला प्रेमाच्या पण मनुष्याच्याच बाळपणाच्या आठवणी चिकटून राहत असल्यानें, "६१वा वाढदिवस" हा शब्दच मनाला मोठा मौजेचा वाटतो. मनुष्यसृष्टीच्या रंगभूमीला एकच दार आहे. आणि तें बाळपण हेंच होय. त्यांतूनच त्या रंगभूमीवर अवतरणाऱ्या पात्रांनी प्रवेश व निर्गम करावे अशी ईश्वरी योजना दिसते. उतार वय हें दुसरें बाळपणच होय. "Old age is second childhood" हें कविवर्य शेक्सपीयर याचें वचन सुप्रसिद्ध आहे; व तें खरेंहि आहे. क्षुधा हटलेला, दांत पडलेला, टक्कल पडलेला, पोंक आलेला, काठीच्या आधाराशिवाय चालतांना लटपटणारा, स्मृतिभ्रंश झालेला, चिरचिरा बनलेला वृद्ध मनुष्य,व एतद्गुण विशिष्ट लहान मूल यांत किती तरी साम्य आहे! व ही गोष्ट मनाला पटल्यामुळेंच बहुधा बाळपणाप्रमाणें ६१ व्या वर्षापासून वाढदिवसांचे समारंभ पुनः करण्याची आठवण होत असावी. पण इतर रीतीनें समारंभ साजरा झाला तरी मुलाला घुसळखांबावर म्हणजे धारण्यावर चढवितात, तसा साठ वर्षांच्या मुलाला चढवितां येत नाहीं, म्हणून त्या प्रसंगीं त्याची स्तुति करून त्याला लक्षणेनें हरभऱ्याचे झाडावर चढविण्याची कल्पना सुचली असावी! पण नेणतें मूल घुसळखांबावर चढतांना खळखळ करतें तसें जाणतें महतारें होऊं घातलेलें मूलहि हरभऱ्याच्या झाडावर चढण्याला खळखळ करतें हा अनुभव या ठिकाणीं आताच आपणाला आला आहे!

### नेणतें बाळ व जाणतें बाळ

नेणतें बाळपण व जाणतें बाळपण यांतील अधिक चांगलें कोणतें हें ठरविणें कठीण आहे. लहान मूल हें या जगांतल्या अनुभवासंबंधी नेणतें असेल, पण त्याला तेव्हा पूर्वजन्माची आठवण असते म्हणतात. त्याच्या अकारण हास्यरुदनाची मीमांसा तत्त्ववेत्ते वरील मोहक कल्पनेनें करतात. माझ्या गतजन्माची आठवण मलाहि केव्हा असली तरी ती लहानपणीं नष्ट झाली. आता पुढच्या जन्माचीच "तयारी" करावयाला लागलें पाहिजे. पण त्या जन्माविषयीं झाले तरी अज्ञानच! रेल्वेहून दूर असणाऱ्या गांवीं जाण्याकरिता रेल्वेच्या प्रवासाला निघावें, आणि रेल्वे-गाइडच घरीं विसरावें तशी या मधल्या जन्मांत मनुष्यजीवाची स्थिति होते.

वर्डस्वर्थ कवि मनुष्याच्या जीवयात्रेसंबंधानें म्हणतोः—

"Not in entire forgetfulness
Not in utter nakedness,
But trailing clouds of glory
Do we come from God
Who is our home"

एखाद्या अपघातानें स्मरणशक्ति नष्ट झालेला मनुष्य घरून निघतो व फिरून त्याला घरींच परत जावयाचें असतें, तथापि मार्ग मात्र सांपडत नाही, तसाच हा प्रकार होय. मनुष्याच्या अंगावरचें बाळलेणें, वर्डस्वर्थनें म्हटल्याप्रमाणे ईश्वराघरचेंच घातलेलें आहे. पण रस्त्यांत चुकलेल्या मुलाच्या अंगावरील केवळ दागिन्यांवरून त्याचें घर नक्की सांपडणें जसें हुशार पोलिसालाहि कठिण जातें, त्याप्रमाणे पुढच्या जन्मघराची ओळख या जन्मींच्या कृत्यांवरून आपली आपणांस जेथे लागत नाही तेथे इतरांना कशी लागणार? अर्थात् भूत व भविष्य दोहोंचा नाद सोडून विद्यमान स्थितीकडे पाहावें यांतच समाधान आहे.

या दृष्टीनें पाहता माझ्या आयुष्यांत माझ्या हातून जेवढे कांही मला करता आलें त्याबद्दल मला समाधान वाटतें. आत्मतुष्टि हा अहंकाराचा एक प्रकार होऊं शकेल. पण मायावी कांगावखोर असंतुष्टता दर्शविणें हा त्याच अहंकाराचा एक अधिक मोठा व दोषास्पद प्रकार होऊं शकतो हे विसरतां येत नाही. "केलें यापेक्षा अधिक करतां आलें असतें व अधिक करावयास पाहिजे होतें" या शेऱ्यांतून कोणीहि सुटणार नाही. तसाच मीहि. तथापि आपण मजविषयी काढलेल्या उद्गारांत योग्य तो नागपुरी आंकडा बाद घातला असता, "मीं यथाशक्ति थोडेंबहुत समाजसेवेचें काम केलें" असली आत्मतुष्टतेची भावना त्या उद्गारावरून समर्थनीय ठरेल असें मला वाटतें.

### सावधगिरीची सूचना

'यापुढे काय ?' हा प्रश्न सहजच उत्पन्न होतो. त्यासंबंधाने मी इतकेंच सांगतों कीं आजवर चालल्याप्रमाणे पुढेहि होईल तें करीत राहावें अशी मनांतून इच्छा आहे. तथापि प्रकृतीला कमकुवतपणा आताच भासूं लागला आहे ही गोष्ट खोटी नाही. आपण मला आयुरारोग्य लाभावें अशी प्रार्थना मानपत्रांत केली ती ठीकच आहे. पण अशी प्रार्थना करण्याची वेळ आली हेंच हा वाढदिवसाचा समारंभ सुचवील नाही काय ? आजच्या समारंभाला टाइपरायटरवर वाजणाऱ्या घंटेची उपमा द्यावीशी वाटते. या घंटेचा नाद गोड असतो, घंटा वाजल्यावरहि चार-दोन अक्षरें लिहितां येतील इतकी जागा असते. यामुळे आरंभिलेला शब्द तरी पुरा करूं, सोडून द्यावा लागणार नाही, अशी खात्री असते. पण मात्र तो तेवढाच शब्द! यामुळे या मंजुळ घंटानादाला धोक्याचें निदान सावधगिरीच्या सूचनेचें स्वरूप येतें. आजच्या ६१व्या वाढदिवसाच्या समारंभांतील भाषणें टाइपरायटरच्या घंटेसारखीच नादमधुर होती. पण त्यांना माझ्या हातून झालेल्या कामगिरीच्या समारोपाचें स्वरूप आहे, उपक्रमाच्या सूचनेचें स्वरूप नाही, असें मी समजतों. अर्थात् जो थोडा काल यापुढे उरला त्याचा उपयोग कसा करावयाचा हा प्रश्न मनांत आल्यावर मन असें सांगतें कीं, आजवरची कामाची मामुली पद्धति म्हणजे अनेक कार्यें एकाच वेळीं करीत राहण्याची पद्धति सोडून द्यावी, व कोणतें तरी एखादेंच काम हातीं घेऊन, मिळेल तो सर्व सवडीचा वेळ खर्चून तेंच करावें, म्हणजे तें कदाचित् मनासारखें होईल, व त्याला कांही स्वरूपहि येईल. आजवर माझ्या मुख्य व्यवसायाशिवाय, लोकांच्या शिफारशी करणें, कित्याचपाठ्या लिहून देणें, हस्तलिखितें वाचणें, अभिप्राय देणें, प्रस्तावना लिहिणें इत्यादि गोष्टी मीं इतक्या केल्या व निरनिराळ्या संस्थांच्या कार्यकारी मंडळांवरहि इतकें काम केलें कीं, आता यापुढे सर्व सोडून दिलें आहे, असें मीं म्हटल्यास निराशा होणारे लोकहि यापुढे मला क्षमाच करतील. केसरीचा संचालक म्हणून शक्य असेल तें राजकारण व लेखन आणि अद्यापि लिहिण्याचे राहिलेले कांही वाङ्मयप्रकार या दोन कामांवरच मिळेल तो वेळ व शक्ति यापुढे खर्च करावी अशी निदान इच्छा आहे. काय घडेल तें खरें!

### महाराष्ट्र विद्यापीठास देणगी

वाङ्मयप्रेम ही एक प्रकारची खोड आहे. "जित्याची खोड मेल्याशिवाय जात नाही" ही म्हण प्रसिद्धच आहे व ती मलाहि लागू पडणार असें वाटतें. वर आत्मसंतुष्टतेचा जो मीं उल्लेख केला त्यांत मुख्य भाग वाङ्मयसेवेलाच उद्देशून होता. म्हणून शेवटीं या समाधानाच्या उद्गाराला केवळ वाचेपेक्षां कांही निराळ्या प्रकाराने स्वरूप द्यावें असें वाटतें. तरी त्यासंबंधी दोन शब्द सांगून हें आभारप्रदर्शक भाषण मी पुरें करणार आहें. वाङ्मयसेवेचा आनंद मला सर्व जन्मभर पुरला. प्रथम कांही वर्षें माझी सेवा कसोटीला लावण्याकरिता, वाङ्मयाने मला कांहीच वेतन किंवा मुशाहिरा दिला नाही. या ३६ वर्षांतील जवळजवळ निम्मा काळ तसा गेला असें म्हणतां येईल. पण नोकराची सेवा पसंत पडल्यास नेहमीच ती निर्वेतन घेण्याचें निष्ठुर काम वाङ्मय झालें तरी कां करील? त्याप्रमाणे पुढील १९–२० वर्षांत वाङ्मयाने मला सुमारें ३० हजार रुपयांची प्राप्ति करून दिली. अद्यापि महाराष्ट्रांत केवळ वाङ्मयावर उपजीविका करणें अशक्य किंवा निदान फार कठिण आहे. अशा स्थितींत झाला या द्रव्यलाभाबद्दल मला कृतज्ञताच वाटली पाहिजे. आतां कृतज्ञता या शब्दाचा अर्थ एका विनोदी इंग्रज ग्रंथकाराने "अधिक लाभ होण्याची आकांक्षा" असा केला आहे. पण थट्टा म्हणून ही सोडून दिली तर, किंवा तो अर्थ अंशतः बरोबर म्हणून स्वीकारला तरीहि, कृतज्ञता याचा अर्थ 'उपकाराची फेड' असाच केला पाहिजे. म्हणून वाङ्मयाच्या उपकाराची फेड करण्याची एक योजना मीं केली आहे. ती अशी:– महाराष्ट्र युनिव्हर्सिटीची कल्पना अद्यापि असिद्ध आहे व अमूर्तहि आहे. तिला निश्चित रूप व प्रत्यक्ष सिद्धि केव्हा लाभेल ती लाभो. पण ती केव्हा तरी लाभेल अशी माझी श्रद्धा आहे. ती गोष्ट माझ्या हयातींत होऊं शकत नाही; तथापि ती होईल तेव्हा माझा कांहीं तरी पै पैसा तिच्या कारणीं खर्च पडावा अशी माझी इच्छा आहे. महाराष्ट्र विद्यापीठ स्थापन झालें म्हणजे मराठी भाषेचें दैन्य संपलें, तिचे पांग फिटले, व सर्व प्रकारच्या उच्च संस्कृतीचा सुलभ लाभ तिच्या द्वारें समाजांतील सर्व वर्गांच्या लोकांना होण्याची कायम व्यवस्था झाली असें मी मानतों. म्हणून त्या भावी कार्याला मदत करण्याकरिता आज मीं पुणें येथील भारत इतिहास-संशोधक मंडळाचे पांच टक्के व्याजाचे आठ हजार रुपयांचे कर्जरोखे खरेदी केले; आणि वरील उद्देशाने त्या रकमेची स्वत्वनिवृत्ति करण्याकरिता ते कर्ज–रोखे (१) सेक्रेटरी डेक्कन एज्युकेशन सोसायटी (२) सेक्रेटरी शिक्षणप्रसारक मंडळ यांचे नांवें मालकी लिहून त्यांचे स्वाधीन केले आहेत.

महाराष्ट्र युनिव्हर्सिटी ज्या वेळीं सरकारी कायद्याने अस्तित्वांत येईल त्या वेळीं ही सर्व रकम त्या

युनिव्हर्सिटीच्या अधिकृत मंडळाच्या स्वाधीन केली जाईल. तोंपर्यंत दरसाल–निधिधारकांकडून त्या रकमेवरील व्याज घेऊन तें मी मराठी वाङ्मयाच्या अभिवृद्धीकरिता खर्च करीत जाईन. शिष्यवृत्ति, पारितोषिक, सुवर्णपदक किंवा ग्रंथप्रसिद्धीला मदत, यांपैकीं कोणत्या ना कोणत्या रूपानें दरसालच्या व्याजाची रक्कम पुढे ठरेल त्याप्रमाणें खर्च होईल. ही रक्कम मी माझ्या वडीलमातोश्रींच्या स्मरणार्थ देऊं इच्छीत आहें. म्हणून त्यासंबंधानें कांही कायमची योजना मित्रमंडळीचा सल्ला घेऊन मी सवडीनें करीन. आज मी इतकेंच सांगू इच्छितों कीं वडील मातोश्रींच्या स्मरणार्थ आठ हजार रुपयांची रक्कम मी बाजूस काढून ती स्वतंत्र निधिधारकांचे हातीं देऊन मी त्यावरील स्वत्वनिवृत्ति केली आहे. त्याच्या खर्चाची योजना होईल ती मागाहून प्रसिद्ध करीन. तशाच इतर दोन देणग्याहि या प्रसंगीं मला द्यावयाच्या आहेत. माझ्या कुटुंबाची श्रद्धा गोरक्षणाच्या कार्यावर आहे, म्हणून त्याकरिता गोभक्तिपरायण श्री. चौंडेमहाराज यांच्या गोरक्षणसंस्थेला माझे कुटुंबाची म्हणून एक हजार रुपयांची देणगी मी देत आहें. दुसरी देणगी सातशें रुपयांची प्रो. कर्वे यांनी स्थापिलेल्या महिला विद्यापीठाला मला द्यावयाची आहे. या संस्थेला मीं पूर्वी तीनशें रुपये दिले आहेत. त्यांचे भरतीला सातशें रुपये घालून मी आज त्या संस्थेचा आश्रयदाता झालो आहें.

## देणग्यासंबंधी खुलासा

या देणग्यासंबंधानें मला हें मुद्दाम सांगावयाचें आहे कीं, ही नऊ हजार सातशें रुपयांची रक्कम केवळ मला स्वतंत्र ग्रंथ-लेखानें मिळालेल्या पैशांतूनच मी खर्च करीत आहें. त्यांत केसरीकडून मिळणाऱ्या पगाराचा कांही संबंध नाही. कोणत्याहि उद्योग-धंद्यानें मिळालेल्या पैशापैकीं कांही अंश त्या उद्योग-धंद्याला करभार म्हणून प्रत्येक मनुष्यानें देणें योग्य आहे. शिवाय धंद्यांतली मिळकत परत धंदा वाढविण्याकडेच खर्च व्हावी हा अर्थशास्त्राचा एक नियम आहे. म्हणून इतर अनेक सत्कार्ये डोळ्यांपुढे येत असताहि ही माझी लहानशी देणगी वाङ्मयाच्या अभिवृद्धीकडेच मी स्वाभाविकपणें देत आहें. ही देणगी वाङ्मय लिहून मिळालेल्या पैशांतून देण्या-इतकी सुस्थिति मला प्राप्त झाली त्याचेंहि श्रेय मनानें मी सर्वस्वीं कै. लो. टिळक यांचेकडेच देत आहें. सत्संगतीचा लाभ केव्हांहि श्रेयस्कर व फलप्रदच होतो. मला केसरी–मराठा संस्थेला येऊन मिळण्याची संधि देण्याची इच्छा लो. टिळकांना व्हावी; ती संधि घेण्याची इच्छा मला व्हावी, आणि या संस्थेंत ३६ वर्षांहून अधिक काळपर्यंत मी स्थिरपद होऊन तिची सेवा मला करता यावी, हा सर्वस्वी सुदैवयोग होय. आणि आपल्या सुदैवाबद्दल आनंदानें उल्लेख करणें यांत कोणत्याहि प्रकारें अहंकारबुद्धि नाही. आज ३६ वर्षे माझी लोकयात्रा नीट चालली. माझ्या आवडीचा व्यवसाय सतत भरपूर माझ्या हातून घडला. लौकिक दृष्ट्या यश किंवा कीर्ति ज्याला म्हणतात त्याचा थोडाबहुत लाभ मला झाला; व समाजोपयोगी असें कांही कार्य माझ्या हातून झालें; हें सर्व लो. टिळकांचा व त्यांच्या संस्थेचा संबंध मला दैवयोगानें जडवून दिल्यामुळेच घडलें. म्हणून यांत माझा भाग्योदय असेल तो सर्वच एक प्रकारचें माझें 'हलवायाच्या घरावर तुळशीपत्र' म्हणण्यास हरकत नाही; किंवा तसें उघड म्हणण्याला मी आनंदानें तयारहि आहें; कारण अहंकारबुद्धि धरल्याशिवाय तें मला म्हणतां येतें. जगांत मित्रसंबंध हा पुत्रसंबंधासारखाच जिव्हाळ्याचा मानितां येईल. एखाद्या भाग्यवान पुरुषाच्या पोटीं पुत्र म्हणून जन्माला येणें काय, व सहकारी विश्वासू मित्र म्हणून त्याचा संगतिलाभ घडणें काय, हे दोनहि यदृच्छालाभ होत. कदाचित् फरक असला तर तो इतकाच म्हणतां येईल कीं भाग्यवानाच्या पोटीं जन्माला येण्याला स्वतः पुत्रानें कांहीच केलेलें नसतें; पण मित्राचा संबंध येऊन तो टिकणें टिकविणें या गोष्टीला मनुष्याचा कांही तरी स्वतःचा म्हणून उद्योग, बुद्धिमत्ता, सत्प्रवृत्ती इत्यादि गुण खर्चीं पडावे लागतात. एवढी गोष्ट लक्षांत घेतली असता, उपयुक्त व उपकारक अशा स्वरूपाचें जें जें म्हणून मला कांही करतां आलें तें तें, लो. टिळकांच्या पुण्याईच्या हलवाई दुकानावर मी माझें तुळशीपत्र ठेवलें असेंच समजतों. लोकमान्यांच्या ह्यातींत तीन लक्ष रु. जमवून त्यांचें चिरोल केसचें कर्ज फेडलें व त्यांच्या मागे १२ वर्षे केसरीसंस्था टिकवून फिरून तीन लक्ष रुपये देऊन मित्रऋणहि मीं फेडलें हें जसें त्या लोकमान्य हलवायाच्या घरावर तुळशीपत्र, तसेंच आज दोन–तीन देणग्यांच्या रूपानें मी जे सुमारें १० हजार रुपये खर्च करीत आहे हेंहि एका अर्थानें लोकमान्यांच्या पुण्याईच्या व प्रसादाच्या हलवाई दुकानावर तुळशीपत्रच होय. असो.

इतकें सांगून व फिरून वाढदिवसमंडळांतील सर्व कार्यकारी लोकांचें व त्यांच्या उत्साहाचें चीज करण्याकरितां जमलेल्या आपणा सर्व मंडळीचे मी कृतज्ञतापूर्वक आभार मानून हें भाषण संपवितों."

# साहित्यसंस्थांतर्फे मानपत्र

## साहित्याचार्य श्री. नरसिंह चिंतामण ऊर्फ तात्यासाहेब केळकर

श्रीपरमेश्वरकृपेनें आपणांस नुकतेंच एकसष्ठावें वर्ष लागलें याबद्दल आपलें अभीष्टचिंतन व अभिनंदन करण्याकरिता आज आम्ही महाराष्ट्रांतील अनेक साहित्य-संस्थांचे प्रतिनिधि व स्थायिक व परस्थ मराठी साहित्यसेवक येथे जमलों आहों. आपणांवर आम्हां साहित्यसेवकांचा जितका हक्क आहे तितका दुसऱ्या कोणाचाहि नाही, ही गोष्ट आपणांसहि मान्य होईल. कारण आपण प्रथम साहित्य-प्रणेते व नंतर सर्व कांही आहां.

विष्णुशास्त्री चिपळूणकर, टिळक व आगरकर या थोर पुरुषांप्रमाणे आपणहि वकिलीचा किंवा सरकारी नोकरीचा मोह आवरून वाङ्मयाच्या द्वारा देशसेवेचें पवित्र व्रत स्वार्थत्यागपूर्वक स्वीकारिलें व तें आजपर्यंत अखंड पाळलें. यांत आपल्या सात्त्विक मनोवृत्तीचें व एकांत वाङ्मयोपासनेच्या दृढ निश्चयाचें बीज आहे. इ. स. १८९४ पासून तों आजपर्यंतची आपली वाङ्मयात्मक कामगिरी सर्वश्रुत व सर्वसंमत आहे. या दीर्घ कालांतील आपला वाङ्मयप्रपंच विस्तृत, विविध व बहुरंगी आहे. यात आपली विद्वत्ता, व्यासंग, लेखनकौशल्य, बुद्धिस्वातंत्र्य व विचारवैशिष्ट्य हीं दिसून येतात. सात्त्विकपणा, उदात्तपणा, रंजकता, बोधपरता व ज्ञानसंग्राहकता हे अभिजात वाङ्मयाचे प्रधान गुण आपण निर्मिलेल्या वाङ्मयांत चोहोंकडे दृष्टीस पडतात. हें वाङ्मय स्फूर्तिदायक, विचारप्रवर्तक, ज्ञानसंवर्धक, आनंददायक आणि म्हणूनच आदर्शभूत आहे. तें निरंतर टिकणारें व उपकारक आहे.

आपण वाङ्मयाच्या कोणत्याहि शाखेंत निर्भयपणें संचार करतां हा आपल्या ग्रंथकर्तृत्वाचा अनन्य-साधारण विशेष आहे. काव्य, नाटक, इतिहास, कथा, साहित्य ग्रंथ व टीका, ग्रंथपरीक्षण, पुस्तकप्रस्तावना, वृत्तपत्रांतील लेख व अनेक मासिक पुस्तकांत लिहिलेले विविध लेख अशा सर्वच ठिकाणीं आपली लेखणी लीलेने विहार करते. तशीच आपली रसनाहि अनेक वाङ्मयविषयांचा परामर्श घेण्यास समर्थ आहे. लेखणी व रसना हीं दोनहि आयुधें कुशलतेनें योजणारे आपल्यासारखे सव्यसाची वाङ्मयवीर फार विरळा !

सुंदर कल्पना, प्रतिभेची चमक, चमत्कृतिजनकता व सभ्य विनोद हे वाङ्मयाचा उत्कर्ष करणारे गुण आपल्यांत सहजच आहेत. आपण त्यांचें संवर्धन करून त्यांचा चातुर्याने उपयोग केला आहे. सदभिरुचि व औचित्य याचा भंग आपण कोठेंहि केलेला नाही, हा आपल्या वाङ्मयाचा एक विशेष आहे. प्रसादगुणप्रधान वैदर्भी रचनापद्धति आपल्या वाङ्मयांत सर्वत्र आदरिलेली आहे. यामुळे आपलें सर्व लिखाण रसिकमान्य झालेलें आहे.

प्रतिपाद्य विषयाची पुरी माहिती, तिचा सांगोपांग, समतोल व समंजस विचार व तिची तर्कशुद्ध, प्रमाणबद्ध व सुबोध मांडणी हा कोणत्याहि चांगल्या ग्रंथाचा प्राणभूत अंश होय. अभिनव कल्पनांनी, मनोहर अलंकारांनी व संभावित विनोदाने नटलेल्या आपल्या वाणीचा या प्रमाणभूत अंशाशीं केव्हाहि वियोग होत नाही. यामुळे आपला कोणताहि लेख सरस, रमणीय व उद्बोधक वाटतो.

मराठी वाङ्मयातील टीकेचें दालन पूर्वी फार संकुचित व एकदेशीय होतें. तें विशेषत: आपण विस्तृत व सर्वांगपरामर्शी केलें. आपले टीकालेख भारदस्त, समतोल, माहितीने भरलेले व ग्रंथकारास व लेखकांस प्रोत्साहक असतात. कित्येक पुस्तकांना आपण लहानमोठ्या प्रस्तावना लिहिल्या आहेत. त्या मार्मिक, सुंदर, सारग्राही व उद्बोधक आहेत.

प्रस्तुतच्या लहानशा मानपत्रांत आपल्या प्रचंड वाङ्मयनिर्मितीचा ओझरतासुद्धा योग्य परामर्श घेता येणें शक्य नाही. तथापि टिळकचरित्र, तोतयाचें बंड, सुभाषित आणि विनोद, मराठे व इंग्रज, विलायत व सिमला येथील बातमीपत्रें, आयर्लंडाचा इतिहास, बडोद्याच्या साहित्यसंमेलन प्रसंगीं आपण अध्यक्ष या नात्याने केलेले भाषण व नाट्याचार्य श्री. कृ. कोल्हटकर यांच्या नाटकांचें परीक्षण एवढेंच आपलें लिखाण कोणी वाचले तरी त्यावरूनसुद्धा आपल्या बहुश्रुतपणाची, विद्वत्तेची, लेखनकुशलतेची, रसिकतेची व सहृदयत्वाची एकदम ओळख पटल्याशिवाय राहणार नाही. अर्थशास्त्र, हुंडणावळ, सुवर्ण-लचन, शुद्धलेखन, छन्दोरचना अशासारखे स्वभावत: रुक्ष व दुर्बोध विषयसुद्धा आपल्या सरस लेखणीने सुगम व मनोरम करून सोडले आहेत.

श्रीसरस्वतीची दिव्य उपासना आपण जातीनें केली इतकेंच नव्हे तर महाराष्ट्र भाषाभिवृद्धीसाठीं जे जे प्रयत्न झाले आणि ज्या ज्या संस्था स्थापण्यांत आल्या त्यांना आपण 'केसरीद्वारा' व इतर रीतीनें अनेक प्रकारचें बहुमोल साहाय्य दिलेलें आहे, हेंहि कृतज्ञतापूर्वक येथे नमूद करणें आमचें कर्तव्य होय. सारांश, आपली वाङ्मयसेवा सर्वांगीण व सर्वमान्य आहे. हिच्याबद्दल आमच्या मनांत वसणाऱ्या आदराचें

चित्र म्हणून हें मानपत्र आपणांस आजच्या शुभप्रसंगीं प्रेमपूर्वक अर्पण करीत आहों. त्याचा स्वीकार व्हावा अशी विनंति आहे.

सरतेशेवटीं परमेश्वराजवळ एवढीच प्रार्थना आहे कीं, त्याने आपणांस दीर्घ आयुष्य व आरोग्य द्यावें व आपल्यासारख्या अभिजात व अष्टपैलू ग्रंथकारांची परंपरा कायम ठेवून तिच्या द्वारें मराठी वाङ्मयाचा उत्कर्ष व महाराष्ट्राचें कल्याण करावें. ही सदिच्छा तो सफल करो अशी आशा प्रदर्शित करून आम्ही आपली रजा घेतों. पुणें, शनिवार ता. २७ ऑगस्ट १९३२ इ.

आपले,

संस्थाः—
महाराष्ट्र साहित्य परिषद,
भारत इतिहास-संशोधक मं. पुणें,
महाराष्ट्र शब्दकोश मंडळ पुणें,
भाषाशास्त्र मंडळ पुणें,
सरस्वती-मंदिर पुणें,
श्रीमहाराष्ट्र शारदामंदिर पुणें,
मयूर-मंडळ पुणें,
भारतवर्षीय चरित्रकोश मंडळ,
गोमांतक साहित्यसेवक मं.पणजी,
महाराष्ट्र साहित्य सभा, इंदूर,
राजवाडे संशोधन मंडळ धुळें,
देवल क्लब सांगली,
कविमित्र मंडळ दादर,
साहित्य मंडळ, सांगली,
काव्यरत्नावलि संस्था जळगांव,
व्यापारी मोफत वाचनालय सांगली
नगर वाचनमंदिर कोल्हापूर,
जुम्मा दादा व्यायाम मंडळ बडोदें,
साहित्यसेवामंडळ कऱ्हाड,
विदर्भ साहित्य संघ नागपूर,
धर्मकोशकार्यालय प्राज्ञ.शाळा वांई,
शारदा-मंडळ नागपूर,
वाङ्मयोपासक मंडळ अहमदनगर,
भारत कविमंडळ कोल्हापूर,
वाचनालय संस्था विटें,
महाराष्ट्र भाषासंवर्धक मं. नागपूर,
साहित्यसेवा मंडळ इचलकरंजी,
वाङ्मयचर्चा मंडळ बेळगांव,
साहित्यसरोज मंडळ औंध,
पाठारे प्रभु सोशल समाज मुंबई,
मित्रमंडळ बेळगांव,
महाराष्ट्र वाचन मंदिर नाशिक,
वाङ्मय विहारमंडळ नाशिक,
ताम्रे मंडळ, ग्वाल्हेर,
मराठी ग्रंथसंग्रहालय ठाणें,
महाराष्ट्र मंडळ कराची,
मठग्रामस्थ हिंदु मंडळ मडगांव,
ऐक्यसंवर्धक मंडळ पुणें,

साहित्यसेवकः—
चिंतामण विनायक वैद्य,
श्री.सरदार माधवराव विनायक किबे
सौ. कमळाबाई किबे,
श्रीपाद कृष्ण कोल्हटकर,
वामन मल्हार जोशी,
माधव श्रीहरि अणे,
कृष्णाजी प्रभाकर खाडिलकर,
नारायण गोविंद चापेकर,
लक्ष्मण रामचंद्र पांगारकर,
दत्तो वामन पोतदार,
श्रीकृष्ण नीलकंठ चाफेकर,
पांडुरंग वामन काणे,
द्वारकानाथ गोविंद वैद्य,
गोविंद सखाराम सरदेसाई,
दाजी नागेश आपटे,
लक्ष्मण गणेशशास्त्री लेले,
जनरल जानासाहेब शिंदे,
प्रो. माणिकराव,
नारायण केशव बेहेरे,
वसंत नारायण नाईक,
माधव दामोदर आळतेकर,
रामचंद्र काशिनाथ तटणीस,
माधव त्र्यंबक पटवर्धन,
चिंतामण विनायक जोशी,
बाळकृष्ण गणेश खापर्डे,
वासुदेव विनायक जोशी,
विनायक सदाशिव वाकसकर,
जगन्नाथ रघुनाथ आजगांवकर,
शंकर दामोदर पेंडसे,
विठ्ठल सखाराम गुर्जर,
विष्णु सखाराम खांडेकर,
नारायण बाळकृष्ण पराडकर,
नारायण हरि आपटे,
रे. भास्कर कृष्ण उजगरे,
सुंदरराव भास्कर वैद्य,
रघुवेल ल्यूकस जोशी,
भास्कर रामचंद्र ताम्बे,
चंद्रशेखर राजकवि बडोदें,
यशवंत,

वासुदेव गोविंद मायदेव,
प्रल्हाद केशव अत्रे,
साधुदास,
काव्यविहारी,
आनंदराव टेकाडे,
सदाशिव अनंत शुक्ल,
विनायक लक्ष्मण बर्वे (आनंद),
केशव महादेव सोनाळकर,
केशव लक्ष्मण टेंभुर्णीकर,
ज. वा. पाटणकर,
वासुदेव कृष्ण भावे,
गणेश गंगाधर जाम्भेकर,
रामकृष्ण गणेश हर्षे,
गजानन विश्वनाथ केतकर,
प्रि. वै. का. राजवाडे,
केशव सीताराम ठाकरे,
नारायण रामलिंग बामणगांवकर,
दत्तात्रय गणेश सारोळकर,
नारायण नरसिंह फडणीस,
अनंत हरि गद्रे,
केशव वासुदेव साठे,
नारायण महादेव भिडे,
दत्तात्रय विष्णु आपटे,
अनंत भा. प्रियोळकर,
दामोदर मोरेश्वर भट,
शेषाद्रि गोविंद कानडे,
द. वि. पारखे,
रामचंद्र गोविंद कानडे,
वि. धों. कुलकर्णी,
ग. स. जोग,
प. स. देसाई,
वा. ना. शाहा,
भालचंद्र लक्ष्मण पाटणकर,
रा. ल. घरत
दत्तात्रय व्यंकटेश पै,
गोविंदराव उपळेकर,
यादव शंकर वावीकर,
कृष्णजी पांडुरंग कुळकर्णी,
चिंतामण गणेश कर्वे,
यशवंत रामकृष्ण दाते.

संपादकः—ज्ञानप्रकाश, लोकशिक्षण, आनंद, रत्नाकर, स्फूर्ती, चित्रमय जगत्, बालबोध, ज्ञानमित्र, माला, गोरक्षण, दीनबंधु, भद्रायु—पुणें; मनोरंजन, खेळगडी, विविधवृत्त, प्रभात, भारत गौरव ग्रंथमाला, नवाकाळ, मौज, मुंबई; महाराष्ट्र, नागपूर, किर्लोस्कर व स्त्री, किर्लोस्करवाडी, सद्दविचार बडोदें, सुबोध-आर्यविज्ञान गोवा, रामकृष्णनिकेतनमाला रत्नागिरी, वागीश्वरी नागपूर, सत्यवादी कोल्हापूर, विजय सांगली, निजामविजय दक्षिण—हैद्राबाद, समर्थ सातारा, उदय उमरावती, टणत्कार विलेपारलें, वैनतेय सावंतवाडी, प्रबोध धुळें, बलवंत रत्नागिरी.

# श्री. तात्यासाहेब केळकर यांच्या प्रतिभेचा एक पैलू

(ले. श्री. के. ना. वाटवे, एम्. ए. पुणें)

"मराठींतील एक प्रतिभावान् लेखक" हें तात्यासाहेबांचें वर्णन हिंदुस्थानांतील एक उंच पर्वत या हिमालयाच्या वर्णनाप्रमाणे आतां कोणासहि वाटतें. कारण हिमालयाच्या उंचीप्रमाणेच त्यांच्या लेखनाची प्रतिभा हा एक स्वभावसिद्ध धर्म म्हणूनच महाराष्ट्रीयांस परिचित आहे. आणि त्यामुळेच सूर्य म्हटला कीं त्याचें तेज किंवा समुद्र म्हटला कीं त्याची खोली हीं जशीं त्या त्या शब्दोच्चाराबरोबरच प्रतीत होतात, त्याचप्रमाणे तात्यासाहेबांचें वाङ्मय व त्यांची प्रतिभा यांचें झालें आहे. 'प्रतिभासंपन्न' हें त्यांचें नुसतें वर्णन मेकॉलेनें एका ठिकाणीं विनोदानें उल्लेखिलेल्या एका आङ्ग्ल पंडिताच्या "Relations are related" या महासिद्धान्ताप्रमाणे ठरून तसें विधान करणारा माणूस एक सर्वपरिचित साधीच गोष्ट (Platitude) मोठा आव आणून सांगतों आहे असें लोकांस वाटण्याचा संभव आहे.

तरी पण वस्तूच्या धर्माचें नुसतें विधानें कोणास नवें वाटलें नाही तरी त्या धर्माचा प्रत्यक्ष अनुभव मात्र परिणामकारक होत नाही असें नाही. त्यांतूनहि तुलनेनें किंवा इतर उपलक्षणादि साधनांनीं त्या स्वभावसिद्ध धर्माचेंच कोणी विवेचन करूं लागला तर त्याच धर्माची नीट प्रतीति येऊन नव्या आनंदाचा अनुभव येतो. हिमालय उंच म्हणून आपल्यास माहीत असला तरी अनेक टेकाडें, पहाड, डोंगर, पर्वत व शिखरें यांच्या तुलनेनें त्या नगाधिराजाची "प्रोत्तुङ्गतमता" सांगितली असता किंवा त्याच्या उंचीच्या इतर गमकांचा उच्चार केला असता त्याच्या मोठेपणाचें सानन्द कौतुक वाटतें. तोच प्रकार तात्यासाहेबांच्या प्रतिभेचा आहे.

### विरोधांतील साम्यदर्शन

सदर लेखांत त्यांच्या उज्ज्वल प्रतिभारत्नाचा एकच पैलू खुलासेवार वर्णून त्याच्या तेजाचें नयनमनोहर दर्शन करून देण्याचा अल्पसा प्रयत्न केला आहे. प्रतिभारत्न हें पूर्वसंस्कारानुरूप आपोआप मिळणारें परमेश्वराचें देणें आहे. त्यावांचून खरें, अस्सल दर्जाचें वाङ्मय निर्माण होत नाही व हट्टानें उत्पन्न केलें तर उपहासनीय होतें. याच प्रतिभेचें जुन्या अलंकारिकांनीं 'प्रज्ञा नव-नवोन्मेषशालिनी प्रतिभा' असें मोठें बहारीचें लक्षण केलें आहे. या प्रतिभारूप रत्नाला अनेक पैलू असून त्यांतून निघणाऱ्या तेजाचें ठिकाणीं दर वेळीं नवीन मोहकपणा अनुभवून देण्याचा गुण असतो. त्याच्यामुळेच प्रतिभावान भाग्यवानाला इतरांस न दिसलेल्या गोष्टी दिसतात, इतरांस न उकललेलें उकलतें, न अनुभवलेलें अनुभवास येतें. खुद्द तात्यासाहेबांच्या विषयीं बोलावयाचें तर, त्यांना त्यांच्या प्रतिभारत्नाच्या एका विशिष्ट पैलूंतून त्याच्या तेजाच्या साहाय्यानें या अफाट संसारांत भरलेल्या अनेक विषम वस्तूंतील साम्य शोधतां येतें. तुम्हाआम्हांस जेथे विरोधाचा किंवा भेदाचा अंधकार भासतो तेथे त्यांना त्या विरोधाच्या किंवा भेदाच्या अंधकारमय उदरांत साम्याची लुकलुक उमगते, व त्या लुकलुकीला आपल्या लेखनकौशल्याच्या परावर्तक भिंगांतून वाचकांसमोर आणून प्रकट स्वरूपांत ते व्यक्त करतात. त्यांचे वाङ्मयविषयक किंवा इतरहि लेख कोठेहि पहा त्या ठिकाणीं आपणास असें साम्यदर्शन अचानकपणें घडलेलें दिसून येईल. या विरोधांतील साम्यदर्शनाला रूढ भाषेंत 'उपमा' म्हणतात. साम्यसंदर्शनाला सामान्यपणें उपमा म्हणण्याचा प्रघात असला तरी तें साम्य प्रगट करण्याच्या प्रकारावरून अलंकारशास्त्रांत त्यास उत्प्रेक्षा, अपन्हुति, रूपक, संदेह, दीपक अशीं बरींच नांवें आहेत. तात्यासाहेबांनीहि यांतील बऱ्याच प्रकारांनी साम्यें दाखविलीं आहेत. तरीहि हा बारीक भेद येथे ध्यानांत न घेता उपमाशब्दच सामान्यार्थी वापरला आहे.

तात्यासाहेबांचें लिहिणें व बोलणें उपमेनें नेहमींच नटलेलें असतें. त्यामुळे लोकांस तें कांहीं विशेष आनंदाचा अनुभव देतें. हा आनंद कां व्हावा ? किंवा

हा चमत्कार एखाद्या उपमेनेच कां व्हावा ? एक उपमा दुसरीपेक्षा सरस कां वाटावी ? याचा विचार करावयास उपमेच्या बुडाशीं असलेल्या कांही गोष्टींचा विचार करावा लागतो. हें जगच मुळी विरोधांत साम्य व साम्यांत विरोध दर्शविणाऱ्या वस्तूंचें बनलें आहे; त्यामुळे वस्तूंच्या ठिकाणचें झाकलेलें साम्य किंवा विरोध हुडकून काढीत बसण्याची मनुष्याच्या बुद्धीची एक नैसर्गिकच प्रवृत्ति आहे. लहान मुलेंसुद्धा चंद्राकडे पाहून त्यास कोणी चेंडू तर कोणी बिस्किट म्हणतात. बुद्धिरपुःसर साम्य सांगितलें तर त्यांत परिचितावरून अपरिचिताकडे जाण्याचा हेतु असतो. पण काव्यांत किंवा वाङ्मय–पदवीस चढलेल्या लेखनांत या ज्ञान देण्याच्या हेतूपेक्षा कांही चमत्कार, कांही नावीन्य, कांही अपूर्वाई उत्पन्न करावयाची असते. हा चमत्कार जेथे साम्याचा लवलेशहि नाही अशा वस्तूंत साम्य सहज व अचानक दाखविल्यास होतो. म्हणजेच अतिविरोधांत साम्य दर्शविणें हा उपमेचा पहिला गुण म्हणूनच मूर्ताची अमूर्ताशीं तुलना मनोहर वाटते. अटलांटिक महासागराच्या अखंडित विशाल पण निःशब्द फेनविहीन लाटांकडे पाहून तात्यासाहेबांच्या साम्यसंशोधक बुद्धीला धीरोदात्त पुरुषाचें ऊर भरून आल्याचा देखावा दिसूं लागला. पण तेथेच न थांबता आपल्या सूक्ष्म बुद्धीच्या दुसऱ्या एका कुंचलीने या पुरुषाच्या दुःखाशीं स्त्रियांचा ऊर भरून येण्याचा विरोध त्यांनी चितारला आहे. कारण ते म्हणतात, "समुद्रांतल्या लाटा फेसाळ, खळबळ करणाऱ्या, वारंवार तुटणाऱ्या आणि स्त्रियांच्या दुःखावेगाचें प्रदर्शनहि असेंच नसतें का ?" (विलायतचीं बातमीपत्रे पान २१) उपमेंत रसानुकूलताहि लागते. या ठिकाणीं उदात्ततेचा अनुभव येतो, व शूद्रक कवीने मृच्छकटिकांत दिलेल्या एका उत्प्रेक्षेची आठवण होते. तेथे चारुदत्ताच्या भव्य वाड्यास कुंभाकार भोंक पाडून शर्विलक आंत गेला त्या प्रकारास अयोग्य–पुरुषप्रवेशाने त्या विशाल व मानी प्रासादाचें हृदय जणों फुटलें असें म्हटलें आहे.

### चंची व अडकित्ता

गमतीने किंवा थोडासा आदरयुक्त विनोद करण्याच्या बुद्धीने दिलेली रसानुकूल व अनपेक्षित साम्य दाखविणारी दुसरी उपमा पाहा. लो. टिळक व वाईचे लेले यांचे वादविवाद मोठे रंगत. दोघेंहि पानसुपारीचे मोठे भोक्ते. त्यामुळे त्यांच्या वादप्रसंगांस नाटक कल्पून तात्यासाहेबांनी उगीच सहज जाता जाता त्यांच्या चंचीस व अडकित्यास नटी व सूत्रधाराची मोठी मार्मिक उपमा दिली आहे.

त्याचप्रमाणे स्पेनच्या किनाऱ्यावरील 'नेव्हाडा' पर्वतावर थोडें थोडें बर्फ पडलेलें पाहून तात्यासाहेबांच्या विनोदी वृत्तीला खोबरें पेरलेल्या वांगीभाताची उपमा सुचली. पर्वत दुरून धुरकट रंगाचा दिसे व मधून डोंगराळपणामुळे पुढे आलेले गोटे व वर त्रोटक विखुरलेलें बर्फ. त्यामुळें बनला वांगीभात !! गोटे म्हणजे (गोट्याचीं !) वांगी व पांढरें बर्फ हें खोबरें. हें सोडून दिलें तरी कित्येक प्रसंगीं अगदी नेहमीच्या वस्तूंमध्ये सुद्धा सहजपणें ते साम्य दाखवितात. रे. टिळकांच्या कवितेच्या प्रस्तावनेंतील गोष्ट. टिळकांच्या चांगल्या चांगल्या बऱ्याच काव्यांचे उतारे त्यांच्या गुणासहित उल्लेखिल्यावर तात्यासाहेब म्हणतात, "प्रस्तावनाकाराने असे उतारे घेत राहणें म्हणजे मासल्यावारी गिऱ्हाइकाने पाटींतील सर्वच अंबे कापून खात बसण्यासारखे आहे."

आता विरुद्ध पक्षावर चिडून जाऊन त्यावर भडिमार करण्याच्या त्वेषांत सुचलेल्या एकदोन उपमांचा मासला देतों. "कुलकर्णी लीलामृताचें" स्वरूपाविष्करण चाललेलें. तात्यांच्या पद्धतीप्रमाणे वाङ्मयाचा एक प्रकार म्हणून त्यांनी या काव्याचें कौतुक केलें. पण पुढे लगेच म्हणतात "दुर्दैवाने अशा ग्रंथाकडे वाङ्मयाच्या निर्विकार दृष्टीने पाहूनच स्तब्ध बसता येत नाही. त्यांचा हेतु व परिणाम यांकडेहि लौकिक दृष्टीने पाहिलें पाहिजे." येथे तीनचार मोठ्या सुंदर उपमा त्यांनीं दिल्या आहेत. (पाठीवर आंकडा वळवून तरतर चालणारा विंचू चित्रकलेच्या दृष्टीने पाहत बसून चालत नाही, त्याला लगेच चित्रकाराने खेटराने ठेचला पाहिजे.) तसेंच 'चिरोलभाष्यभाषान्तरांत" वंदनीय असलेल्या शाहुमहाराजांच्या आश्रयाने खेळ करणाऱ्या डोंगऱ्यांना शिवाच्या पिंडीवर चढलेला विंचू म्हटलें आहे. आणखी एकच उदाहरण. असहकरितेच्या काळांत राष्ट्रीय शिक्षणाबाबत एक अप्रिय वाद निघाला. त्यांत आपल्यास निंदणाऱ्या एका प्रोफेसराची त्यांनी हजेरी घेतली. सरकारी शिक्षणास दारूचे गुत्ते म्हणून स्वतः ते मात्र एम्. ए. वगैरे पदव्या डोक्यात अद्यापि खोवतात असा प्रस्ताव करून तात्यासाहेब म्हणतात, दुकानांत दारू ओतून दारूचें पीप रिकामें होऊन परत चाललें तरी शिंदीची एखादी फांदी तें आपल्या डोक्यांत खोचतेंच ! आतां दारूचा गुत्ता हा प्रतिपक्षाचाच शब्द उचलून तोच पदवीला शिंदीच्या खांदीची उपमा देऊन सव्याज कसा परत केला आहे तो पहा. तात्यांच्या अशा सुंदर उपमा पाहिल्या म्हणजे असें मनांत येतें कीं पराभूत प्रतिपक्ष्यालाहि "मला यांनी मारलें तरी हरकत नाही. पण अशा सुंदर उपमेच्या चाबकांनी मारलें यांतच समाधान" असें वाटत असावें !! म्हणजे थोबाडींत खाल्ली खरी पण मारणाऱ्याच्या हातांत हिऱ्याची आंगठी होती अशांतलेंच हें समाधान !!

### उपमेंतील सूक्ष्म नाद

साम्य हुडकण्याची व तें पूर्णपणें लावून दाखविण्याची यांची भट्टी एकदा पेटली कीं त्यांत इंग्रजी शब्द व म्हणी हीं भाजून निघतात. प्रतिसहक हा शब्द सर्वांच्या परिचयाचा. तो त्यांनी असा लावला ते म्हणाले, "प्रतिसहकार हा शब्द पाहून लोक बुजतात. पण न कळत त्या पक्षाचीं तत्त्वें आपल्याकडून निराळ्या शब्दांनी लोक आचरून घेतात हें त्यांस कळत नाही. बैल तांबड्या चिंधीला बुजतो पण त्या चिंधीच्या कापडाची एक मोठी झूल करून पाठीवर टाकली असतां त्या नंदीला समजत नाही. त्याला तें चालतें." या उपमेतले सर्व सूक्ष्म नाद पहा कसे आहेत ते.

उपमेवरून माणसाच्या मनाची संस्कृति कळते, त्याच्या विद्वत्तेचा अंदाज येतो व त्याच्या हृदयाची खोली कळते. कोंकणस्थ ब्राह्मणास ते चित्पावन म्हणून त्यांनी दिलेली फिनिक्स पक्षाची उपमा जशी समर्पक तशी ती तात्यांच्या विस्तृत वाचनाची साक्ष देते. लो. टिळकांच्या उपमा बहुतकरून वेदवाङ्मयांतील किंवा महाभारतांतील असावयाच्या. वाग्युद्धांत त्यांच्या उपमेने प्रतिपक्षी कायमचा जायबंदी होई. कै. शिवरामपंत परांजपे यांचा कल लहानसान उपमा देण्याकडे नसे. ते प्रदीर्घ रूपकच विस्तारून दाखवीत ( सूर्याच्या गैरसोई, विंध्याचल इ. ) व त्यांतून उपरोधाचे तिरपे बाण फेंकीत असत. त्यांची कल्पना धाडसी व वृत्ति उत्कट पण नेहमीं उपरोधाने वावरणारी! तात्यासाहेबांचे सर्वच मोठें नेमस्त, हिशेबी व प्रमाणबद्ध. कलाविलासाकडे अधिक ओढा, बऱ्याच बाबतींत त्यांचा सर्व थाट कालिदासाच्या उपमांसारखा.

# श्रीमंत नारायणराव पेशवे यांचा खून

(ले. बा. मो. कानिटकर, एलएल. बी. वकील नाशिक)

### ता. ३० आगस्ट १७७३

दख्खनचा दिवा मालवला हिरा हरपला।
काय गुपित घाला केला नारायणरावाला।
कशि करुणा नव्हती आली राघोबाला।
अपघात करुनि मारिलें सख्या पुतण्याला ॥ १ ॥

असा ज्यांच्या खुनाबद्दल तत्कालीन शाहीराला ( पोवाडेकाराला ) टाहो फोडावा लागला तो खून सुमारें १५९ वर्षापूर्वी आजच्याच तारखेला म्हणजे ३० ऑगस्टलाच घडला. कोणतीहि गोष्ट ताजी असतांना तिच्याबद्दल पुष्कळदा स्पष्ट बोलतां येत नाही. परंतु तीच काळाच्या उदरांत समाविष्ट होऊन बराचसा अवधि लोटला कीं, त्या गोष्टीबद्दल निःपक्षपातपणाने विचार करतां येतो. परंतु दे. भ. तात्यासाहेब केळकर यांनी लोकमान्यांच्या चरित्राच्या प्रस्तावनेंत म्हटल्याप्रमाणें अशा या विलंबामुळे आज स्मरणांत ताज्या असलेल्या गोष्टी त्यावेळपर्यंत नाहीशा व्हावयाच्या......काळाचीं दोन टोकें धरावयास जावें तर कोणतें तरी एक हातीं येतें व दुसरें सुटून जातें ( टि. च. पूर्वार्ध प्र. २ ). तथापि या गोष्टी अपरिहार्य म्हणूनच सोडल्या पाहिजेत. असो.

आज ऑगस्टची ३० तारीख आहे. तेव्हा गतकालीन गोष्टीची स्मृति होऊन आपण क्षणभर थांबल्यास व श्रीमंत नारायणराव पेशवे यांच्या खुनासंबंधी आपणास काय काय माहिती आहे, कोणती नवीन कळली आहे वगैरेंचा आढावा घेतल्यास अप्रस्तुत होणार नाही.

### खुनाची हकीकत

श्रीमंतांच्या खुनाची त्रोटक हकीकत आपणा सर्वांच्या चांगल्या परिचयाची आहे. गारद्यांनी दंगा करून श्रीमंत नारायणराव दुपारची वामकुक्षी करीत होते तिकडे ते गेले. नारायणराव दादासाहेबांच्या गळीं पडून आपला प्राण वांचविण्याबद्दल काकळत करूं लागले. परंतु सुमेरसिंग गारदी व महंमद इसब यांनी दादासाहेबांनाहि प्राणाचा धाक घातला. इतकेंच नव्हे तर सुमेरसिंगाने त्यांच्यावर प्रत्यक्ष वारसुद्धां केला. त्यामुळे दादासाहेबांना कपाळास व हातास जखम झाली. तेव्हा दादासाहेबांनी श्रीमंतांस ढकलून दिलें. तुळाजी पवाराने पूर्व वैरामुळे त्यांचे ( श्रीमंतांचे ) पाय धरून ओढले व खालीं पाडलें. गारदी आता वार करणार तोंच चापाजी टिळेकर श्रीमंतांच्या अंगावर बचावासाठी पडला. परंतु गारद्यांनी दोघांनाहि तोडले. इच्छारामपंत ढेरेहि तेथेच मारिला गेला. ( याबद्दलचे विस्तृत वर्णन ऐ. ले. सं. खं. ४ च्या प्रस्तावनेंत आहे.)

### कैदेचा कट व त्याचीं कारणें

याप्रमाणे भाद्रपद शु॥. १३ शके १६९५ या दिवशीं ( खऱ्यांच्या शब्दांत ) ज्यांचा हुकूम होतांच लक्षावधि मराठ्यांच्या तरवारी म्यानातून उपसल्या जाव्या व देशाचे देश ओस पडावे त्या पेशव्यांच्या जिवावर प्रसंग आला; तो एकदम आलेला

नाही. त्याच्या मागें घरगुती भाऊबंदकी, स्वार्थ आणि परकीयांचें राजकारण येवढ्या गोष्टी होत्या.

दादासाहेब व आनंदीबाई यांच्या मनांत नारायणरावास पेशवाईचीं वस्त्रें मिळालीं याबद्दल वैषम्य होतेंच. त्यामुळे त्यांच्याबद्दल नारायणरावांच्या मनांतहि संशय च होता. त्यांतच त्यांच्या फंदफितुरीबद्दल पेशव्यांस कोणी कळविलें. त्यावरून क्रुद्ध होऊन पूर्ण चौकशीहि न करता त्यांनी दादा व त्यांचा परिवार यांस पुन्हा कैदेंत टाकलें. ही गोष्ट नाना फडणीस वगैरे मुत्सद्द्यांच्या मनास आली नाही. परंतु पोरपणामुळे व माधवरावांच्या फक्त तापट स्वभावाचें अनुकरण करून पेशव्यांनी कोणाचेंहि ऐकलें नाही. पुढे १७७२ च्या जानेवारी महिन्याच्या सुमारास आपली आई गोपिकाबाई इजला भेटावयास जावें व तिकडेच कांही दिवस राहावें म्हणून नारायणराव गंगापुरास गेले. ही त्यांची गैरहजेरी पाहून दादांनी पळून जाण्याचा प्रयत्न केला. परंतु याबद्दलची बातमी श्रीमंतांस समजून ते तातडीनें परत आले व दादासाहेब आणि त्यांचा परिवार यांस जास्तच कडक प्रतिबंधांत ठेवलें. यामुळे दादांच्या स्नानसंध्येस अडथळा येऊं लागला. म्हणून दादांनी अन्नत्याग केला. अर्थातच आनंदीबाईसहि उपास पडूं लागले. त्याबद्दल रा. खरे यांचें मत प्रतिकूल आहे. त्यांचें म्हणणें असें कीं, प्रतिबंध कडक केला हें खरें; पण अनन्वित छळ केला ही गोष्ट खोटी (म. रा. उ. खं. १ पृ. २६२ ). अर्थातच या प्रतिबंधापेक्षां निदान पळून तरी जाण्याची तयारी दादासाहेब व तत्पक्षीय यांनी केली.

त्याचप्रमाणें हैदरअली व रोहिले यांचेहि प्रयत्न माधवरावांच्या मृत्यूमुळे खिळखिळ्या झालेल्या पेशवाईचे तुकडे करण्यासाठीं चालूच होते. दादासाहेबांना पेशवेपदाचा अभिलाष वाटत होता. अर्थातच त्यांनी अदूरदर्शीपणानें या परकीयांची मदत मिळविण्याची खटपट चालविली. दादांचा व इंग्रजांचा ऋणानुबंध प्रसिद्धच आहे.

## कटाचें तात्कालिक कारण

याप्रमाणे नारायणरावांच्या विरुद्ध सर्व बाजूंनी परिस्थिति बिकट होत चालली होती, हें खरें; पण त्यांना कैद करून दादांनी कारभार करावा या कटाला जोर येऊन ताबडतोब त्याप्रमाणे प्रयत्न होण्यासहि कारण भाऊबंदकीच झाली. नागपूरकर जानोजी याने मरणापूर्वी मुधोजीचा मुलगा रघोजी यास दत्तक घेतलें होतें. माधवराव पेशव्यांच्या संमतीने ही गोष्ट झाली होती. परंतु ही व्यवस्था फार वेळ टिकली नाही. मुधोजीराव व त्याचा बंधू साबाजी यांजमध्ये वितुष्ट होतें. साबाजी नारायणरावाच्या मर्जीतला होता आणि मुधोजी दादासाहेबांच्या पक्षापैकीं प्रमुख होता. १७७२ च्या जानेवारींत नारायणरावानें सेनासाहेब पद व जहागीर मुधोजीकडून काढून साबाजीस दिली. अर्थातच उभयतां भोसले बंधूंत झटापट सुरू झाली. साबाजीस पेशव्यांचें पाठबळ चांगलेंच होतें. यांत मुधोजीची सरशी होते असें पाहून स्वतः पेशव्यांनी स्वारीवर जाण्याचें ठरविलें. अर्थातच मुधोजी व दादासाहेब पक्षीय लोकांनी पेशव्यांविरुद्ध पुण्यांतल्या पुण्यांतच कट उत्पन्न केला. या कटाचें स्वरूप भयंकर नव्हतें. दादांस कैदेंतून सोडवून पुण्याबाहेर न्यावें व फौज ठेवण्यास त्यांस मदत करावी. त्यांनी फौज जमवून धामधूम सुरू केली कीं, पेशवे इकडेच (पुण्याकडेच) अडकले जातील व मुधोजीवर स्वारी करण्याचा बेत त्यांस सोडून द्यावा लागेल. इतकेंच या मसलतीचे स्वरूप होतें. परंतु बडीं बडीं प्रस्थें, मूळ उत्पादक व्यंकटराव काशी, लक्ष्मणराव काशी आणि सखाराम हरि, यांस मिळतांच पहिला रंग बदलून निराळीच मसलत ठरली. ती ही कीं दादासाहेबास कैदेंतून काढावयाचें; इतकेंच नव्हे तर त्यांस पेशव्यांच्या गादीवर बसवून नारायणरावास कैदेंत टाकावयाचें.

मूळ मसलत अशी असतांना 'ध' चा 'मा' करून (गारद्यांच्या हुकुमांत धरावेंऐवजीं मारावें असा फरक करून) श्रीमंतांच्या खुनाचा कट कोणी व कसा केला हें अजूनहि गूढच आहे.

## नवी माहिती

पेशवे दप्तरांत श्री. सरदेसाई यांनी 'आनंदीबाईची दिनचर्या' दर्शविणारीं पत्रें संग्रहित केलीं आहेत. त्यांतील नं. ४१ च्या पत्रांत ( ता. १९-५ १७८८ ) आनंदीबाईनें आपल्यावरील आरोपाचा स्पष्ट इनकार केलेला आहे. त्याचप्रमाणे मेणवली दप्तरांतील अस्सल पत्रांवरूनहि 'ध' चा 'मा' करून नारायणरावाचा खून करवण्याचा आरोप आनंदीबाईविरुद्ध नाना फडणवीस वगैरेसहि सिद्ध करता आला नाही. इतकेंच काय पण ग्रँटडफ म्हणतो त्याप्रमाणे रामशास्त्र्यांना राघोबाचें अस्सल पत्र उपलब्ध झाले होतें, तरी 'ध'चा'मा' कोणी केला हें त्यांसहि गूढच राहिलें. गारद्यांच्या हातून श्रीमंतांचा खून करण्याची भयंकर मसलत कोणाहि मराठी मुत्सद्याच्यानें करविली नसती. यावरून अल्पबुद्धि लोकांच्या संमतीनें व चिथावणीनें ती आयत्या वेळीं ठरली असावी हें निःसंशय होय. ( ज्ञानकोश )

## कारभाऱ्यांची गाफिली

श्रीमंतांच्या वाड्यांत भरदिवसा त्यांचा खून व्हावा ही कारभारी मंडळींना लाजिरवाणी गोष्ट झाली. परंतु नाना फडणविसासारखा चतुर मुत्सद्दी असतांना ही गोष्ट घडावी हें केवढें आश्चर्य?

इतकेंच काय पण आज गारदी दंगा करणार आहेत ही बातमी कळूनहि हरिपंत स्वस्थ राहिले ( जेवण झाल्यावर पाहतां येईल अशा कल्पनेनें स्वस्थ राहिले. ), ही गोष्ट आश्चर्य व खेद करण्यासारखी दिसते. परंतु थोडा विचार केल्यास आपणांस असें दिसेल कीं, मूळ मसलत नारायणरावास कैद करण्याबद्दल होती आणि कारभारी मंडळीला या कैदेच्या कटांची क्षितीच वाटत नाहीशी झाली होती. खुद्द माधवराव एक वर्ष तर दादासाहेब पांच वर्षें कैदेंत होतेच. खुनाच्या कटाचा सुगावा दादासाहेबांच्या पक्षासहि नसावा, मग इतरांस कोठून असणार? वर म्हटल्याप्रमाणे तो कट आयत्या वेळचा व हलक्या लोकांचा असला पाहिजे. अर्थात् नुसत्या कैदेच्या कटाबद्दल कारभारी उदासीन राहिले हे तितकेसें अक्षम्य ठरत नाही.

### खुनाबद्दल दोष

असो. शेवटीं या खुनाबद्दल दोष पर्यायाने दादासाहेबांच्याच माथीं येतो. त्यांनीहि दारणा नदीकाठीं सांगवीस याबद्दल जें प्रायश्चित्त घेतलें त्या वेळीं 'रायास' धरावें असा निश्चय राजकारण करणाराशीं केला. ते समयीं त्यांनीं विचारलें न जाणों धरूं जातां कलागत घडली आणि त्यांत मारले गेले तर दोष ठेऊं नये. असें सोडवून घेऊन ते कर्मास प्रवर्तले ... तेव्हां धरण्याचे संकल्पांत कलागती पडून मारला गेला असा उच्चार करून प्रायश्चित्त घेतलें. ( ज्ञानकोश )

### खुनाचे परिणाम

असो. या खुनामुळे जे परिणाम झाले त्यांचे खऱ्यांच्याच शब्दांत वर्णन देऊन हें विवेचन आटोपतें घेऊं. "या दुर्दैवी व अल्लड पेशव्याच्या खुनानंतर मराठी मुत्सद्दी व सरदार यांमध्ये फितुरी, विश्वासघात, वचनभंग, आपलपोटेपणा, अंगचोरपणा या राष्ट्रनाशाला कारण होणाऱ्या दुर्गुणांचा बेमुरवत संचार सुरू झाला, आणि परकीयांच्या स्वाऱ्या व अंतस्थ बंडाळ्या, दंगे व धामधुमी यांच्यायोगाने सर्व मराठी साम्राज्य खिळखिळें होऊन गेलें." ( म. राज्याचा उ. खं. पहिला २७०. )

# जातवारीचा निर्णय स्वराज्यास भोवणार !

हिंदुस्थानांतील कोणत्याहि वर्गापेक्षां हिंदूंची, विशेषतः पुढारलेल्या हिंदूंची स्थिति फार बिकट झाली आहे. त्यांना स्वराज्य हवें व स्वधर्महि हवा. स्वराज्य शक्य तितकें लवकर मिळविण्यासाठी ते उत्सुक असले तरी जें स्वराज्य मिळेल तें खरेंखुरें असावें व त्याची उभारणी राष्ट्रीयत्वाच्या बळकट पायावर होऊन त्याचा उपभोग हिंदी लोकांना चिरकाल लाभावा या धोरणाने त्यांच्या सर्व हालचाली चालू असतात. हिंदूंतहि धर्माभिमानी हिंदु व काँग्रेसवाले हिंदु असा सूक्ष्म फरक आहे. काँग्रेसवाल्या हिंदूंचीं मनें स्वराज्याकरिता इतकीं आतुर झालीं आहेत कीं त्यापुढे धर्म वगैरे बाबी ते गौण मानतात. किंबहुना हिंदी आधीं व हिंदु कधीमधीं अशी त्यांची विचारसरणी आहे. याचा अर्थ ते सर्वजण हिंदुधर्म झुगारून देण्यास एका पायावर तयार आहेत असा नव्हे; तर स्वराज्य हें केवळ मुसलमानांच्या किंवा इतर कोणाच्या हट्टाने अडून पडल्यास व त्याप्रीत्यर्थ हिंदु समाजाच्या विशिष्ट हक्कांचा बळी द्यावा लागल्यास हिंदूंनी त्यालाहि तयार राहिले पाहिजे, असें काँग्रेस पक्षीय हिंदु पुढाऱ्यांचें मत दिसतें.

हिंदुसभापक्षीय हिंदूहि काँग्रेसपक्षीय हिंदूंइतकेंच मुसलमानादिकांशीं मिळतें घेण्यास तयार होतील. त्यांना मुसलमानांच्या हातीं हिंदूंपेक्षां अधिक सत्ता गेल्याचें दुःख वाटणार नाहीं. मात्र त्यांची अट एवढीच कीं मुसलमानानी त्यांजबरोबर सहिष्णुतेने वागावें व त्यांच्या उन्नतीच्या आड येऊं नये. लखनौ येथील राष्ट्रीय सभेंत लो. टिळकप्रभृति राष्ट्रीय पुढाऱ्यांनी मुसलमान पुढाऱ्यांशीं राजकीय हक्कांचे बाबतींत करार करून मुसलमानाना त्यांच्या लोकसंख्येच्या प्रमाणाबाहेर सवलती दिल्या त्या वेळीं मुसलमानांसंबंधाने त्यांचें मत वरील प्रकारचें होतें. राजकीय सत्ता इंग्रजांपाशीं आहे, ती सत्ता त्यांच्या हातून सुटून हिंदुस्थानांत कायमची वस्ती करून राहिलेल्या कोणाहि समाजास मिळाली तरी ती सर्व हिंदी लोकांच्या पदरांत पडल्यासारखीच आहे. कारण सदर सत्तेच्या जोरावर जे कायदेकानू व सुधारणा व्हावयाच्या त्यांचा फायदा विशिष्ट वर्गालाच प्राप्त होईल व इतरांना त्यास अंतरावें लागेल असें सहसा घडणार नाही, अशी लो. टिळकप्रभृतींची समजूत होती.

परंतु त्या करारानंतर मॉंटेग्यू-चेल्म्सफर्ड सुधारणांचा कायदा पास झाला व त्याचा अम्मल गेलीं बारा वर्षे सुरू आहे. त्यावरून मुसलमान वगैरे समाज अखिल हिंदुस्थानाच्या हिताकडे न पाहता केवळ स्वतःच्या हितावर नजर देऊन राजकारणांत वागतात; त्यांना स्वराज्य प्राप्तीपेक्षां स्वजातीच्या किरकोळ उन्नतीचीच मातब्बरी अधिक वाटते; किंबहुना

स्वराज्याच्या हक्कासाठी हिंदूंनी सरकाराबरोबर परभारें झगडावें, पण त्या झगड्यानंतर जे अल्पस्वल्प अधिकार देण्यास इंग्रज लोक तयार होतील त्या अधिकारांचा जास्तीत जास्त वांटा आपणांस कसा उपटतां येईल एवढ्यावरच आपण टपून बसावें असें धोरण मुसलमान पुढाऱ्यांनी पत्करल्याचें दिसून आलें. इतकेंच नव्हे तर मुसलमान लोक हिंदुस्थानांत अल्पसंख्याक असताहि त्यांनी आपलें राजकीय वर्चस्व हिंदूंवर कायमचें राखावें या दृष्टीने त्यांचे सर्व बाजूंनी प्रयत्न सुरू झाले. स्वराज्यासाठी इंग्रजांबरोबर भांडून त्यांचें शत्रुत्व संपादावयाचें नाही, मात्र परभारें हिंदूंनी झगडून जे कांही राजकीय हक्क मिळतील त्यांचा जास्तींत जास्त वांटा तेवढा आपण उचलावयाचा ही मुसलमानांनी स्वीकारलेली कार्यपद्धति फार सोयीची ठरली. कारण त्यामुळे इंग्रज सरकारास त्यांजविषयीं एक प्रकारचें ममत्व उत्पन्न झालें. खेरीज त्यांच्या मागण्याहि अशा होत्या कीं त्या सरकाराने मान्य केल्यास त्यापासून इंग्रजी अम्मल हिंदुस्थानांत दीर्घकाल टिकण्यास मदतच व्हावयाची होती.

इंग्रजी सत्तेस बाध न येता कौन्सिलांत ज्या जागा द्यावयाच्या त्या हिंदूंच्या जागांतून दहावीस कमी करून मुसलमानांस दिल्या व हिंदूंना नोकरीवर न नेमता त्यांच्याऐवजीं मुसलमानांना नोकरीवर ठेवलें तर त्यांत इंग्रज सरकारांचें काय बिघडलें? उलट त्यापासून हिंदु-मुसलमानांत कलह माजून राज्यकारभारांत जेथे तेथे इंग्रजांचीच मदत लागल्याने इंग्रजी सत्तेस आपोआपच बळकटी येऊन इंग्रजांचा कार्यभाग आयताच साधणार आहे.

इंग्रज सरकारास मुसलमानांचें धोरण पटतें व मुसलमान इंग्रज सरकाराच्या कच्छपीं लागतात त्याचें खरें इंगित हेंच होय. हें धोरण मुसलमानांच्या चांगलेंच पथ्यावर पडल्याचें पाहून डॉ. आंबेडकरप्रभृति अस्पृश्य पुढाऱ्यांनी त्यांचेंच अनुकरण केलें व विलायतेस गोलमेज परिषदेकरिता गेले असता ते मुसलमानांच्या कटांत सामील झाले. मौ. शौकतअली, डॉ. आंबेडकर, बॅ.जीना यांनी तेथे स्वतःच्या समाजाला एक प्रकारें लिलावासच काढलें होतें म्हटलें तरी चालेल. एका बाजूस म. गांधी, पं. मालवीय, डॉ. मुंजे व दुसऱ्या बाजूस सर सॅम्युएल होअर, लॉर्ड सँके प्रभृति ब्रिटिश मुत्सद्दी यांच्याशीं खासगी वाटाघाट करतांना त्यांच्या वागणुकीचें स्वरूप या प्रकारचें होतें. गांधीजी हे राष्ट्रीय सभेचे पुढारी व डॉ. मुंजे हे हिंदुमहासभेचे पुढारी असा त्यांच्यांत फरक असला तरी मुसलमानांच्या मागण्यांस मान्यता देतांना ते केव्हाहि राष्ट्रीय ऐक्यास धक्का पोंचूं नये याविषयीं ब्रिटिश-मुत्सद्द्यांपेक्षा अधिक काळजी बाळगणार हें उघड असल्याने त्यांनी मुसलमानास देऊं केलेल्या सवलती ब्रिटिश मुत्सद्द्यांच्या सवलतींपुढे केव्हाहि क्षुल्लक व फिक्याच दिसाव्या यांत नवल नाही. अशा स्थितीत गांधीप्रभृति पुढाऱ्यांनी शौकतअली आदिकरून मुसलमानांच्या दाढीस किती हात लावला तरी त्या दोघांचा समेट होऊं नये व दुसऱ्या कोणाहि तिऱ्हाइताकडून तडजोड करून घेण्यास कबूल न होता ब्रिटिश मंत्रिमंडळ जो निकाल देईल तोच आम्हांस मान्य आहे असें मुसलमानांनी व अस्पृश्यांच्या आंबेडकरांनी आपल्या कृतीने दर्शवावें यांतहि नवल नाही.

जातवारीच्या तंट्याचा निकाल सांगतांना इंग्लंडचे मुख्य प्रधान मि. राम्से मॅक्डोनाल्ड यांनी मोठ्या साधुत्वाचा व सरळपणाचा आव आणिला आहे. हिंदी लोकांना आम्ही आपसांत तंटा तोडा व मग आम्हांकडे या असें कित्येकदा सांगितलें असताहि त्यांची तडजोड निघेना म्हणून त्यांच्याच विनवणीवरून आम्हांला आमच्या पद्धतीने तंट्याचा निकाल लावणें भाग पडलें, हा मॅक्डोनाल्ड यांच्या कोटिक्रमाचा आशय आहे. पण तो निवळ ढोंगीपणाचा आहे. मॅक्डोनाल्ड व इतर ब्रिटिश मुत्सद्दी यांनी हिंदी लोकांना दोष देण्याची कितीहि बतावणी केली तरी दोषाचे खरे अधिकारी तेच आहेत हें थोड्या विचाराअंतीं कोणाच्याहि सहज लक्षांत येणार आहे. शौकतअली आंबेडकरप्रभृति जातवारीचे पुरस्कर्ते ब्रिटिश मुत्सद्द्यांच्या कानाशीं लागत त्या वेळीं लोकसत्ताक राजनीतितत्त्वास जातवारीच्या हक्कांच्या कल्पना विसंगत असल्यामुळे त्यांना स्वराज्याच्या घटनेत आम्ही होऊन थारा देणार नाही असे ब्रिटिश मुत्सद्द्यांनी निक्षून सांगितलें असतें तर शौकतअली–आंबेडकर यांना गांधी–मुंजे ज्या सवलती देत होते त्या सवलती कबूल करण्याशिवाय गत्यंतर नव्हतें. परंतु त्याच्या उलट हिंदुसभा व राष्ट्रीय सभा यांपासून मिळतील त्यांहून अधिक सवलती इंग्रज सरकार मुसलमानादि अल्पसंख्याकांना देईल असें आमिष ब्रिटिश मुत्सद्द्यांनी आगाऊच लावून ठेवलें असल्यावर त्यांच्या गळाला मुसलमान, अस्पृश्य एवढेच काय पण अँग्लो–इंडियन यांसारखे लहानमोठे व रंगीबेरंगी मासे लागावे व त्यांनी आपल्यापुरता एक तडजोडीचा खर्डा तयार करून तो गोलमेज परिषदेंत मि. मॅक्डोनाल्ड यांच्या हातीं द्यावा ही गोष्ट क्रमप्राप्तच होय.

हा खर्डा हातीं पडला तेव्हा मॅक्डोनाल्ड यांनी खूष होऊन त्या खर्ड्यासंबंधाने कांहीसे गौरवपर उद्गार काढले. त्यावरून सदर खर्डा बनविण्याची प्रेरणा मुसलमान, अस्पृश्य व अँग्लो–

इंडियन यांस ब्रिटिश मुत्सद्दयांपासूनच मिळाली होती याविषयीं शंकाच राहत नाही; अथवा हिंदु मुसलमान आदिकरून पुढाऱ्यांचें आपसांत एकमत होऊं नये व अखेर सदर प्रकरण निकालाकरिता आपल्याकडेच यावें अशा रोखानेच ब्रिटिश मुत्सद्दयांनी अथपासून इतिपर्यंत आपली कारवाई सुरू ठेवली होती असेंहि म्हणण्यास प्रत्यवाय नाही. कारण त्यामुळे त्यांचा कावा दुहेरी साधत होता. एक तर तुमच्यांत एकमत होईना म्हणून कांही अंशीं तुमच्याच सांगण्यावरून आम्ही या भानगडींत पडलों असें म्हणून परोपकाराचें पुण्य आयतेंच संपादावयाचें व दुसरें हें कीं आम्ही स्वतः तत्त्वतः जातवारीच्याविरुद्ध असताहि केवळ तुमची जातवारीवर खिळलेली दृष्टि हलत नसल्याने तुमच्याकरिता जातवारीच्या पद्धतीचा मोठ्या नाखुषीने स्वीकार करतों असा तिऱ्हाइतपणाचा बहाणा करावयाचा. इंग्रजी कावा म्हणतात तो हाच. अशा रीतीने पंचकयासाकरिता प्रस्तुत प्रकरण आपल्याकडे घेऊन इंग्रजांनी आपले सर्व मतलब त्यांतून पूर्णपणें उगवून घेतले आहेत.

कौन्सिलांतील जागांची वांटणी जातवारीच्या पद्धतीवर व्हावी ही ज्यांची मागणी होती त्या मुसलमानांना, अस्पृश्यांना व अँग्लो-इंडियनांना जातवार जागा दिल्याच आहेत; पण स्त्रिया, ख्रिस्ती लोक यांनी आपल्याकरिता जातवारीच्या तत्त्वावर वेगळ्या मागण्या मागितल्या नसताहि ब्रिटिश मंत्रिमंडळाने त्या बळेच त्यांच्या गळ्यात बांधल्या हा त्यांचा सरळपणा समजावयाचा कीं खोडसाळपणा म्हणावयाचा ? त्यांचें हें कृत्य पाहिले म्हणजे इंग्रज लोक जातवारीच्या तत्त्वाचे शत्रु आहेत या त्यांच्या वचनावर कोणाचा तरी विश्वास बसेल काय ? जर ते जातवारीच्या तत्त्वाचे खरे शत्रु असतील तर हिंदी लोकांत शक्य तितकी अधिक फाटाफूट उत्पन्न करून त्यांचा विचका उडविण्याचा आपला अन्तःस्थ दुष्ट बेत मॅक्डोनाल्डप्रभृतींनी आपल्या तत्त्वाच्या विरुद्ध आचरणाने मोठ्या धूर्तपणाने व भोंदूपणाने तडीस नेला असें म्हणणें ओघानेच भाग पडेल.

इंग्रजांनी हिंदी लोकांमधील फाटाफुटीचाच फायदा घेऊन आपली राजकीय सत्ता येथे स्थापली. व आता तीच सत्ता ही फूट कायम राखण्यास व त्या योगें स्वसत्तेला चिरस्थायित्व आणण्यास आजहि त्यांच्या उपयोगी पडत आहे. मॅक्डोनाल्ड यांनी जातवारीचा निवाडा म. गांधी आदिकरून राष्ट्रीय सभेचे पुढारी तुरुंगांत असता सांगितला ही गोष्ट अनिष्ट अशीच झाली यांत शंका नाही. परंतु राष्ट्रीय सभेचे हे पुढारी मोकळे असते तरी त्यांना आपसांत तडजोड घडवून आणतां आली असती अशी आशा बाळगण्यास फारशी जागा नाही. कारण सायमन कमिशनाच्या नेमणुकीपासून राष्ट्रीय सभेचे वरील दिशेने प्रयत्न सुरू असताहि तिला या कामांत यश आलें नव्हतें हें विसरता कामा नये. खेरीज गोलमेज परिषदेच्या निमित्ताने विलायतेस गेलेल्या जातवार पुढाऱ्यांना ब्रिटिश मुत्सद्दयांच्या कानास लागण्याची संधि लाभून त्यांचा कयास बांधावयास मिळाला असल्याने इंग्रज सरकार जें द्यावयास कबूल आहे त्याहून अधिक सवलती राष्ट्रीय सभेच्या व हिंदू महासभेच्या पुढाऱ्यांपासून जातवाल्यांना मिळतील तरच ते सदर पुढाऱ्यांच्या म्हणण्यास मान देतील. जातवाल्या पुढाऱ्यांना आज देशाहिताची पर्वा नाही व स्वराज्याचीहि पर्वा नाही. ते बोलूनचालून स्वार्थसाधु. जो त्यांचा स्वार्थ साधून देईल तो त्यांचा मित्र. म्हणून मॅक्डोनाल्ड यांनी निकाल सांगितला त्यापूर्वी तडजोडीची आशा नव्हती व त्यानंतरहि तिची आशा नाही. कारण मॅक्डोनाल्ड यांनी दिलें त्याहून राष्ट्रीय सभा व हिंदुसभा अधिक कांही देईल तरच जातवाले त्यांच्या वाऱ्याला उभे राहतील. मिळून निकडूनहि मार्ग खुंटलेलाच.

मॅक्डोनाल्ड यांनी आपले निकालपत्रक प्रसिद्ध केल्यास पंधरा दिवस होऊन गेले असल्याने त्यासंबंधाने हिंदुस्थानातील भिन्न भिन्न वर्गांस आपलीं मतें बनविण्यास भरपूर फुरसत मिळाली आहे. मॅक्डोनाल्ड यांच्या निवाड्याचा बरावाईट परिणाम मुख्यतः स्पृश्य हिंदु, अस्पृश्य हिंदु, मुसलमान, स्त्रिया, मजूर, शीख, ख्रिस्ती, अँग्लो इंडियन, युरोपियन यांजवर होणार आहे. संख्याबलाच्या दृष्टीने पाहता हिंदूंचा नंबर पहिला व युरोपियनांचा प्रायः शेवटचा लागतो. परंतु इंग्रज सरकाराची दृष्टि या बाबतींत केव्हाहि स्वार्थबुद्धीचीच असणार. म्हणून त्यांनी आपल्या कृपेचें पूर्ण छत्र युरोपियनांवर धरलें आहे व हिंदूंना मात्र अवकृपेच्या उन्हांत उभें केलें आहे. त्यांच्या दरबारी यादींत प्रथम युरोपियन, मग अँग्लो इंडियन व पुढे ख्रिस्ती, मुसलमान, अस्पृश्य असा क्रम लागतो. कारण ते सर्व त्यांना आपल्या दौलतीचे कमीअधिक प्रमाणांत आधारस्तंभ वाटतात. मॅक्डोनाल्ड यांच्या निवाड्यावर भिन्न भिन्न वर्गांनी जे अभिप्राय प्रकट केले आहेत त्यांतहि हाच क्रम दृष्टीस पडतो.ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. युरोपियन व अँग्लो-इंडियन यांमधील फरक इंग्रजांच्या दृष्टीने सख्या-सावत्र भावाइतकाच. तेव्हा त्यावर आपल्या कृपेची पूर्ण सावली पसरण्यास त्यांना सर्वांत अधिक संतोष वाटावा हें मनुष्यस्वभावास अनुरूपच होय.मुसलमानहि मनांतून अगदी

खुष आहेत. पण तोंडावर रागाचा आविर्भाव न आणता आनंदाचा तजेला दर्शविल्याने दृष्ट लागेल अशा मुत्सद्दयांस शोभणाऱ्या धूर्तपणाने त्यांनी प्रथम दांतओठ चावले असले तरी त्यांच्या प्रमुख संस्थांनी व पुढाऱ्यांनी आपल्या अनुयायांस सबूर करण्यास आता इषारा दिला आहे. अस्पृश्यांच्या पोट-जातींच्या कांही तक्रारी आहेत.पण अस्पृश्य समाजाचें गाऱ्हाणें तितकें तीव्र स्वरूपावें नसल्यामुळे त्यांनाहि निकालाविरुद्ध हातपाय हलविण्याची गरज उरलेली नाही. स्त्रियांना विभक्त मतदारसंघ नको होता. पण त्यांस तो आता मिळाला आहे. त्यास श्री. सोब्रायन व मिस ॲग्नीस खेमचंद यांनी नाजूक विरोध दर्शविला आहे. पण त्या विरोधाचें तितक्याच शालीनतेने कौतुक करण्यास स्त्रीदाक्षिण्यनिपुण इंग्रज लोक कधीहि मागे घेणार नाहीत.

नेमस्त पक्षाच्या पुढाऱ्यांना मॅक्डोनाल्ड यांचें निकालपत्र मान्य नसलें तरी आपला विरोध धसाला लावण्याइतकें त्यांना त्याचें महत्त्व वाटत नाही. खरा विरोध काय तो शिखांचा व हिंदूंचा. शीख लोक चढाईची भाषा वापरीत आहेत व हिंदूंचें धोरण हिंदुमहासभेच्या बैठकींत लवकरच ठरावयाचें आहे. परंतु एकंदर परिस्थितीचा विचार करता विभक्त मतदारसंघाच्या अवस्थेंतून हिंदुस्थानास त्यांतील राष्ट्रीय व लिबरल पक्षाची खुषी नसताहि जावें लागणार याविषयी मात्र शंका उरत नाही. मुसलमान व अस्पृश्य यांची संख्या हिंदुस्थानांत सुमारें पंधरा कोटी आहे. म्हणजे निदान निम्मी लोकवस्ती विभक्त मतदारसंघ मागणारी आहे. मुसलमानांचे कडवे पुढारी सर महमद इक्बल यांनी विभक्त मतदारसंघाचा उपयोग मुसलमान लोक आपल्यांतील निरक्षरता घालविण्याकडे व आपली आर्थिक सुधारणा करण्याकडे करतील असें सांगितलें आहे. अस्पृश्यांना तें कार्य साधावयाचें आहेच; शिवाय आपली अस्पृश्यता नष्ट करून स्पृश्य हिंदूंच्या बरोबरीचा सामाजिक दर्जा त्यांना मिळवावयाचा आहे. हीं कार्ये पुढील दहावीस वर्षांत उरकलीं तर त्याहून श्रेष्ठ राजकीय आकांक्षा तृप्त करून घेण्याकरिता ते राष्ट्रीय पक्षाच्या झेंड्याखाली उभे राहतील व न उरकलीं तरी विभक्त मतदारसंघावरचा विश्वास उडाल्यामुळे त्यांना राष्ट्रीय पक्षाच्या निशाणाकडेच वळावें लागेल. सारांश,हिंदुस्थानास पूर्ण स्वराज्य मिळण्याची मुख्य शर्त हिंदु–मुसलमानांचें व स्पृश्यास्पृश्यांचें ऐक्य ही आहे. ती शर्त पुरी होण्याचें कार्य जर आणखी दहावीस वर्षे लांबणीवर पडणार असेल तर पूर्ण स्वराज्य तितकींच वर्षे लांबणीवर पडणार असें खेदपूर्वक म्हणावें लागतें.

# ओटावा परिषदेची फलश्रुति

ब्रिटिश साम्राज्याच्या विशाल पोटांत असणाऱ्या अनेक वसाहती व हिंदुस्थानासारखे ताबेदार देश यांच्या प्रतिनिधींची ओटावा येथे भरलेली आर्थिक परिषद यशस्वी रीतीने पार पडून सर्व प्रतिनिधि हसतमुखाने आपल्या देशीं परत गेल्याचें वृत्त प्रसिद्ध झालें आहे. कानडाचे गव्हर्नर लॉर्ड बेसबरो यांनी ता. २१ जुलै रोजीं या परिषदेचा पडदा उघडला व ता. २० ऑगस्ट रोजीं निरनिराळ्या बारा प्रतिनिधींच्या व्यापारी तहावर सह्या झाल्यावर परिषदेच्या कामावर पडदा पडला. या एक महिन्याच्या अवधींत प्रतिनिधींनी केलेल्या बऱ्याचशा कामाला पडदानशीन स्वरूप दिलें गेल्याने ओटावा येथील समुद्रमंथनांतून कोणतीं रत्नें निघालीं व त्यांपैकीं हिंदुस्थानाच्या वांटणीस कोणतीं आलीं याबद्दल कोणासहि उत्कट जिज्ञासा उत्पन्न झाली असल्यास नवल नाही. एक गोष्ट खरी कीं,या परिषदेच्या आवाहनाच्या वेळीं अपेक्षित यशाच्या ज्या तुताऱ्या वाजविल्या गेल्या अगर ज्या नाबती झडल्या त्या या परिषदेवर विसर्जनाच्या अक्षता पडल्या त्या वेळीं मूक बनल्या होत्या. यावरून योग्य तें अनुमान निघतेंच.तथापि या मंथनांतून हिंदुस्थानाच्या वांटणीला लक्ष्मीचा धाकटा भाऊ व देवापुढील अडणीवर स्थित झालेला शंखच आला कीं काय याची चिकित्सा होणें जरूर आहे.

या परिषदेपुढें मुख्यतः जे पांच महत्त्वाचे प्रश्न होते ते असेः–(१) ब्रिटिश साम्राज्यांतील देशांच्या परस्परांमधील व्यापाराची अभिवृद्धि, (२) जकात खात्याचा कारभार, (३) परकीय देशांशीं असलेले व्यापारी संबंध, (४) आर्थिक सहकार्याची पद्धति आणि (५) चलन व भांडवल. या पांच प्रश्नांचा विचार करण्याकरिता व त्याबद्दलचे निश्चित निर्णय ठरविण्याकरिता पांच कमिट्या नेमण्यांत आल्या होत्या. या कमिट्यांच्या कामाची व्यवस्था अशी असे कीं, प्रत्येक प्रतिनिधीने आपल्या देशाची आर्थिक परिस्थिति व आपल्या मागण्या काय आहेत हें मांडावें. इंग्लंडाच्या प्रतिनिधींचें मत सांगण्यांत आल्यावर विवक्षित जिनसांची आयात व निर्गत यांशीं संबंध

असणाऱ्या देशांच्या प्रतिनिधींनी आपआपसांत वाटाघाट करावी व मग देवाण–घेवाण या तत्त्वावर व्यापारी तह घडवून आणावे. या पद्धतीस अनुसरून ऑस्ट्रेलिया, कानडा, दक्षिण-आफ्रिका वगैरे देशांच्या प्रतिनिधींनी आपआपल्या गरजा पुढे मांडल्या आणि इंग्लंडबरोबर व आपसांत व्यापारी तह केले. हिंदुस्थानाच्या प्रतिनिधींनीहि आपलें म्हणणें व आपल्या मागण्या मांडल्या. पण शेळीचे कान गोसाव्याच्या हातीं,या न्यायाने सरकार-नियुक्त हिंदी प्रतिनिधींनी हिंदुस्थानसरकाराच्याच मताला मान देऊन त्यांच्या आज्ञेप्रमाणे आपल्या माना हलविल्या असें दिसतें !

साम्राज्यांतील इतर वसाहतींनी कोणत्या प्रकारचे तह केले व त्यांत आपला लग्गा कोणता व कसा साधला याचा विचार करण्याचें आपल्यास तितकेसें कारण नाही.कारण एक तर या सर्व वसाहतींची आर्थिक व राजकीय परिस्थिति, हिंदुस्थान देशाच्या परिस्थिती-हून अत्यंत भिन्न आहे.आपण एकच गोष्ट घेऊं.कानडा, ऑस्ट्रेलिया वगैरे वसाहती हिंदुस्थानाप्रमाणेच कृषि-प्रधान असून त्यांचा इंग्लंडाशीं असलेला निर्गत व्यापार मुख्यतः कच्चया मालाचाच आहे. परंतु धान्य व अन्न, हा कच्चा माल ते देश इंग्लंडामध्ये इतक्या मोठ्या प्रमाणांत पाठवितात कीं, इंग्लंडाहून त्यांच्या देशांत जो पक्का माल जातो त्याचें प्रमाण फार थोडें आहे. याच्या उलट हिंदु-स्थानाची परिस्थिति आहे. हिंदुस्थान, इंग्लंडमध्ये जितका कच्चा माल पाठवितो त्यापेक्षा तो इंग्लंडाचा अधिक किंमतीचा पक्का माल खरेदी करतो. ही झाली व्यापाराची गत. राजकीय दृष्ट्या वसाहतींना कोणत्याहि परदेशांशीं स्वतंत्र व्यापारी तह करण्याचा अधिकार आहे. पण आर्थिक दृष्ट्या ताबेदार व राजकीय दृष्ट्या परतंत्र असणाऱ्या हिंदुस्थानाला असले व्यापारी तह करण्याचा अधिकारच नाही. सारांश, ओटावा परिषदेंत इतर वसाहतींप्रमाणेच हिंदुस्थानाला सवलती मिळाल्या व त्यांनी केलेल्या तहांत व हिंदुस्थानाने केलेल्या तहांत बिलकुल अंतर नाही हें म्हणण्यांत अर्थ नाही. मोर नाचतो म्हणून लांडोर नाचूं लागेल खरी, पण ईश्वर-दत्त स्वातंत्र्याचा पिसारा जसा वसाहतींच्या तहांना शोभा आणील तशी शोभा हिंदुस्थानासारख्या पंखच तोडलेल्या देशाच्या तहाला कशी येणार ?

हिंदुस्थानसरकाराने या तहाबाबत जें एक प्रसिद्धि-पत्रक काढलें आहे त्यानें या नव्या तहावर उत्तम प्रकाश पडला आहे. या पत्रकांत असें म्हटले आहे कीं, हिंदी प्रतिनिधींनी दोन तत्त्वें प्रामुख्याने आपल्या डोळ्यांपुढे ठेविलीं होतीं. त्यांपैकीं पहिलें तत्त्व हें कीं हिंदुस्थानाचा निर्गत व्यापार शक्य तितका वाढवावा व दुसरें तत्त्व हें कीं, ज्या हिंदी उद्योगधंद्यांना आज संरक्षण मिळत आहे त्यांच्या संरक्षणास कोणत्याहि तऱ्हेचा बाध येऊं नये. या तत्त्वानुसार आता नव्या तहाने असें ठरलें आहे कीं,हिंदुस्थानांतून ग्रेट-ब्रिटनमध्ये जाणाऱ्या कोणत्याहि मालावर इंग्लंड जकात घेणार नाही व हिंदुस्थानांतून ग्रेटब्रिटनमध्ये जो माल जातो त्या-सारखा माल इंग्लंडांत साम्राज्याबाहेरून आला तर त्याच्यावर मात्र इंग्लंड अधिक जकाती बसवील. उदाहरणार्थ, लिनसीड किंवा अळशी हा माल हिंदु-स्थानांतून आयात झाला तर, इंग्लंड जकात घेणार नाही. इतकेंच नव्हे तर परदेशीय अळशीवर दहा टक्के जकात इंग्लंड बसविणार आहे. हिंदुस्थानांतून निर्गत होणाऱ्या जिनसांपकीं फक्त कापूस व कच्चें पोलाद यांच्यावर जकाती बसवाव्या कीं नाही या प्रश्नाचा निर्णय लागला नाही. उलटपक्षीं इंग्लंडांतून हिंदु-स्थानांत येणाऱ्या मोटारी व मोटार–सायकली यांवरील जकाती साडेसात टक्क्यांनी कमी करावया-च्या, व इतर सर्व पक्क्या मालांपैकीं कांहीच्या दहा टक्के उतरावयाच्या व कांही जातींच्या परदेशी मालावर दहा टक्के जादा जकात बसवून विलायती मालाची हिंदुस्थानाच्या बाजारांत सोय करावयाची असें या व्यापारी तहाचें सर्वसामान्य स्वरूप आहे.हिंदुस्थानां-तून इंग्लंडाकडे जाणारा कच्चा माल व विलायतें-तून इकडे येणारा पक्का माल यांच्या याद्या या तहांत अगदीं तपशीलवार दिल्या आहेत. त्या सर्व येथे देण्याचें कारण नाही. या तहाचा निष्कर्ष आमच्या दृष्टीने हा आहे कीं या ओटावा परि-षदेने जकातीच्या सवलतींचें लोढणें हिंदुस्थानाच्या गळ्यांत अडकविलें व त्यामुळे हिंदुस्थानाच्या व्यापा-री प्रगतीस अडथळा उत्पन्न झाला.

विशेष तपशिलांत न शिरता सर्वसाधारण दृष्ट्या विचार करता जी पहिली गोष्ट लक्षांत येते ती ही कीं,१९०३ सालापासून ज्या ज्या वेळीं ह्या जकातीं-चा प्रश्न चर्चेला निघाला त्या त्या वेळीं हिंदुस्थान सरकाराने व फिस्कल कमिशनने अशा सवलती हिंदुस्थानाने देऊं नयेत असें ठरविलें होतें. अगदी अलीकडे म्हणजे १९३० सालीं लेजिस्लेटिव्ह असें-ब्लींत हा प्रश्न निघाला होता त्या वेळींहि सर्व लोक-नियुक्त सभासदांनी या तत्त्वाचा निषेधच केला. मग १९३२ सालींच अशी कोणती परि-स्थिति उत्पन्न झाली कीं ज्यायोगाने या सवलतीमुळे हिंदुस्थानाचें कोटकल्याण होणार आहे ? फार लांब कशाला, ओटावा परिषदेच्या प्रारंभींच सर अतुल चतर्जींनी जें भाषण केलें त्यांत असें स्पष्ट नमूद केलें होतें कीं, हिंदुस्थान आर्थिक दृष्ट्या अगदी गरीब असल्याने जकातीचें उत्पन्न त्याला

गमावितां येणें शक्य नाही. शिवाय लवकरच हिंदुस्थानाला स्वराज्य मिळणार असल्यामुळे नवीन स्वराज्यांतील सरकाराचे हातपाय आपण आगाऊ बांधून टाकूं नयेत. दुसऱ्या अनेक दृष्टींनीहि हिंदुस्थानाचें नुकसान होणार आहे असें सर चतर्जी यांनी बजावून सांगितलें होतें. हें जर प्रथमारंभींच सांगितलेलें त्यांचें मत खरें होतें तर अशी कोणती यक्षिणीची कांडी फिरली कीं, ज्या योगानें त्यांनी स्वतःच्या ठाम बनलेल्या मतांना सोडचिठी देऊन मि. बाल्डविन यांच्या मताला कवटाळावें? ईश्वरी इच्छेनें विषाचें अमृत व अमृताचें विष होऊं शकतें असें कविकुलगुरु कालिदासानें म्हटलें आहे त्याप्रमाणें हिंदुस्थानसरकाराच्या इच्छेनुरूप या सरकारनियुक्त सभासदांना नुकसानींत फायदा व फायद्यांत नुकसान दिसूं लागलें असें म्हणावयाचें कीं काय? सर अतुल चतर्जी यांच्याकडून अगर हिंदुस्थानसरकाराकडून कोणत्या तत्त्वांच्या आधारावर या सवलती दिल्या गेल्या अगर कोणते आंकडे देऊन ते या सवलतींचें समर्थन करतात हें कळणें जरूरीचें आहे व अशा तऱ्हेचें आव्हान मुंबईच्या व्यापारी संघानें सरकारास दिलेंहि आहे.

ओटावा येथे हा जो तह झाला त्याचा हिंदी व्यापाऱ्यांनी कडक निषेध केला आहे. सर पुरुषोत्तमदास ठाकुरदास, शेठ घनश्यामदास बिर्ला, सर नलिनी रंजन सरकार या व्यापारी प्रतिनिधींनी आपलीं मतें स्पष्ट करून या तहानें हिंदी शेतकऱ्यांचें फार नुकसान होणार आहे असें आपलें मत दिलें आहे. याचें कारण अगदी उघड आहे. हिंदुस्थानांतून जो माल परदेशीं जातो त्यांतला फक्त २१ ते २७ टक्के माल इंग्लंडांत रवाना होतो, व बाकीचा इतर देशांत जातो. महायुद्धापूर्वी हिंदुस्थानांत जो माल बाहेरदेशांहून येत होता त्यापैकीं चौसष्ट टक्के माल इंग्लंडाचा येत असे. १९२४–२५ सालीं त्याचें प्रमाण चोपन्न टक्क्यांवर आलें व १९३१–३२ या सालांत तर तो फक्त पस्तीस टक्के आला. १९३१–३२ चेच आंकडे घेतले तर त्या सालीं हिंदुस्थानांतून जो माल बाहेरदेशीं पाठविला गेला त्यांपैकीं फक्त सत्तावीस टक्के माल इंग्लंडानें घेतला व उलट जितका माल हिंदुस्थानानें परदेशांकडून घेतल त्यांपैकीं पस्तीस टक्के माल इंग्लंडकडून घेतला! म्हणजे आठ टक्के तरी इंग्लंडचा माल हिंदुस्थानानें अधिक घेतला. आता या तहानें दहा टक्के जकातीची सवलत इंग्लंडाला दिली तर इंग्लंडाचाच फायदा तितक्या प्रमाणात उघड उघड होऊन हिंदुस्थानाला मात्र त्याबद्दलचा कांहीच मिळणार नाही. उलट इतर परकीय राष्ट्रांनी जर हिंदुस्थानाच्या मालावर जकाती बसविल्या तर मात्र हिंदुस्थानाची धडगत राहणार नाही असें सर पुरुषोत्तमदास यांचें मत आहे.

सर अतुलचंद्र चतर्जी व त्यांचे दुसरे सहकारी यांनी या बाबतींत आज तरी मौनव्रत स्वीकारलेलें दिसतें. तथापि न्यूयॉर्कच्या 'स्टेट्स्मन' पत्राला मुलाखत देतांना त्यांनी सांगितलें कीं, या तहामुळे हिंदुस्थानांत उत्पन्न होणारा शेतीचा माल आम्हांस सवलतीच्या दरानें विलायतेंत पाठवितां येईल. या सवलतीचा तपशील विचारता मात्र त्यांनी आपल्या तोंडास कुलूप ठोकलें, व या गुप्त गोष्टी आपण फोडल्या तर हिंदुस्थानसरकारच्या पुढील अंदाजपत्रकावर त्याचा परिणाम होईल असें सांगितलें. या सर्व गौडबंगालाचा अर्थ काय हें समजणें कठिण आहे. तथापि, त्यांनी गव्हाचें उदाहरण दिलें म्हणून त्याची तेवढी छाननी करून त्यांच्या म्हणण्यांत कांही अर्थ आहे कीं काय हें पाहूं. प्रथम जी एक गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे ती ही कीं, हिंदुस्थानाचा गव्हाचा व्यापार इंग्लंडशीं फार थोडा असून तो दिवसेंदिवस कमीच होत आहे. जशी गव्हाच्या बाबतींत ओटावा येथे हिंदुस्थानाला सवलत मिळाली आहे, तशी कानडा व आस्ट्रेलिया यांनाहि मिळाली आहे. म्हणून यापुढे हिंदुस्थानाचा खरा प्रतिस्पर्धी आरजेंटिना हा देश राहाणार नसून कानडा व आस्ट्रेलिया हेच देश प्रतिस्पर्धी राहतील. मग यांत ओटावा येथील तहानें गव्हाच्या बाबतींत तरी विशेष सवलती मिळाल्या असें म्हणण्यांत स्वारस्य काय!

पण याहिपेक्षां गळिताच्या धान्याबाबत या तहापासून हिंदुस्थानाचा कोणता फायदा झाला हें पाहणें अधिक महत्त्वाचें आहे. हिंदुस्थानांत जीं गळिताचीं धान्यें पिकतात तीं इंग्लंडांत फारशीं खपत नाहीत. व तीं इंग्लंडला पाठविण्यांत हिंदुस्थानाचा फायदाहि नाही. दरवर्षी हिंदुस्थानांतून दहा लक्ष टन इतका हा माल परदेशीं जातो व त्याची किंमत तीस कोटी रुपयांवर हिंदुस्थानास येते. या गळिताच्या निर्गतीपैकीं दोन-तृतीयांश निर्गत भुईमुगाची असते. पण त्यांत विलायतेंत हा माल किती जातो हें पाहिलें म्हणजे या सवलतीचा फोलपणा लक्षांत आल्याशिवाय राहत नाही.

**१९३१–३२ सालांतील भुईमुगाची निर्गत**

| देश | टन |
|---|---|
| युनायटेड किंग्डम ( विलायत ) | ७१००० |
| जर्मनी | १५४००० |
| नेदरलँडस् | १४२००० |
| फ्रान्स | २१९००० |
| इटाली | ३०००० |
| इतर देश | ३४००० |
| | ६,५०,००० |

वरील कोष्टक पाहतां एक गोष्ट चटदिशी लक्षांत येते कीं, हिंदुस्थानांतील भुईमुगाचें खरे गिऱ्हाईक इंग्लंडपेक्षा इतर देशच आहेत. व साडेसहा लक्ष टनांच्या निर्गतीपैकीं फक्त ७१,००० टनच विलायतेंत जातात! मग या सवलतींचा फायदा हिंदुस्थानास इंग्लंड कसा देणार ! उलटपक्षीं विलायती मालाला हिंदुस्थानानें सवलती दिल्यास त्याचा प्रतिकार करण्याकरितां म्हणून फ्रान्सने जर भुईमुगावर जबर जकाती बसविल्या तर हिंदुस्थानाच्या व्यापारावर मात्र फार मोठा परिणाम झाल्याशिवाय राहाणार नाही !

हिंदुस्थानांतून ज्या मालाची निर्गत परदेशीं होते त्यांत ज्यूट म्हणजे ताग वगैरे पदार्थ असे आहेत कीं, त्या व्यापारांत हिंदुस्थानास प्रतिस्पर्धीच कोणी नाही. तेव्हा या मालाच्या बाबतींत सवलती दिल्या काय किंवा न दिल्या काय सारखेंच. कापसाचा मोठा भाग हिंदुस्थानांतून परदेशीं रवाना होतो. पण या कापसाच्या बाबतींत इंग्लंड सवलती देण्यास तयार नाही ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. एकंदरींत या ओटावा येथे झालेल्या तहामुळे शब्दावडंबराच्या मोठ्या आवरणाखाली इंग्लंडच्या मालाचा हिंदुस्थानांत सवलतीच्या दरानें प्रवेश करवून इंग्लंडचा पडता व्यापार सावरून धरण्यांत आला व हिंदुस्थानाला मात्र त्या प्रमाणांत कांही लाभ झाला नाही हें स्पष्ट आहे. आवळा देऊन कोहळा काढण्याच्या हिकमतीचा हा एक उत्तम मासलाच आहे!पण हा व्यवहार करतांना आमच्या प्रतिनिधींच्या हातावर कोणतें गुळखोबरें ठेवलें हें समजणें जरूरीचें नाही काय?ओटावा परिषदेची फलश्रुति जर सांगावयाची तर ती एका वाक्यांत सांगतां येण्यासारखी आहे.ब्रिटिश मुत्सद्द्यांनी सरकार-नियुक्त हिंदी प्रतिनिधींच्या सहाय्यानें हिंदुस्थानाच्या पायांत जकातीच्या सवलतींच्या शृंखला अडकविल्या, एवढ्यांतच या परिषदेचें सार सांठविलें आहे असें म्हणण्यास हरकत नाही.लेजिस्लेटिव्ह असेंब्लीपुढे हा प्रश्न नोव्हेंबरांत येणार आहे. त्या वेळीं त्याची पूर्ण चर्चा होईलच. म्हणून असेंब्लीमधील लोक-प्रतिनिधींनी आतापासून लोकमत जागृत करून हा ब्रिटिश मुत्सद्द्यांचा डाव हाणून पाडणें जरूरीचें आहे. ओटावा येथे ज्या दुसऱ्या प्रश्नांची चर्चा झाली त्यांचा विचार पुढे करण्यांत येईल.

# शारदा–देवीचा दरबार

रा. तात्यासाहेब केळकर हे देशभक्त आहेत व शारदा-भक्तहि आहेत. त्यांचा एकसष्टावा वाढदिवस साजरा करतांना त्यांच्या भक्तांना, मित्रांना व चहात्यांना त्यांच्या देशसेवेप्रमाणें शारदोपासनेचेंहि स्मरण व्हावें यांत नवल नाही. या वाढ-दिवसाचा आहेर म्हणून त्यांना गेल्या आठ-दहा दिवसांत अनेकांनी अनेक मौल्यवान वस्तू नजर केल्या. फुलांचे हार व गुच्छ ताजेपणीं टवटवीत दिसतात, गळ्यांत रुळतात, हातांत खेळतात व आपल्या सुगंधाने दशदिशा दरवळून सोडतात. त्यांची खरोखरच कोमल शय्या बनवितां येईल इतक्या त्यांच्या राशी केळकरांच्या भोंवतीं पडल्या. पण त्या फुलांचें जीवित किती क्षणभंगुर! ते हार व ते गुच्छ त्यांच्या गळ्यांत घातले नाहीत व हातांत दिले नाहीत तोंच त्यांचें आयुष्य संपूनहि गेलें आणि त्यांची दिवाणखान्यांतून व सभागृहांतून केरांत गणना होऊन त्यांना प्रेमानें व आनंदानें हातांत झेलून धरण्याऐवजी त्याच हातांनी केरसुणीच्या फटकाऱ्यानें जो अरसिक अशा प्राण्यांचा क्रीडाशैल, त्या केराच्या राशीवर पोंचविलें.

वाढदिवसाच्या याच समारंभांत त्यांना कागदावर छापलेलीं असंख्य मानपत्रें चांदीच्या करंडकांतून, नक्षीदार तबकांतून व जडावाच्या पेट्यांतून नजर करण्यांत आलीं. वस्त्रोपवस्त्रांचेंहि आहेर इतके आले कीं आजचें वस्त्र उद्या वापरावयाचें नाही असें एखाद्या विलासप्रिय जहागिरदाराप्रमाणे त्यांनी ठरविल्यास त्यांचें हें व्रत कित्येक दिवस सहज चालेल. समारंभ म्हटला कीं, त्याचा प्रारंभ भाषणानें व शेवटहि भाषणानेंच व्हावयाचा. इतकेंच काय पण एक एका समारंभांत दहा–पांच वक्ते आपआपल्या वाणीला शिणवावयाचेच. त्यांची गेल्या आठ दहा दिवसांतील गणती केल्यास ती एकावर एक काढलेल्या तीन आंकड्यांपर्यंत सहज

जाईल. या सर्व सन्मानविशेषांचें आयुष्य फुलांच्या क्षणभंगुर आयुष्यापेक्षां अधिक इतकेंच. बाकी त्यांचा जगाला विसर आज ना उद्या पडावयाचाच. कारण त्या वेळीं झालेलीं भाषणें वर्तमानपत्रांच्या ज्या कागदावर छापलीं त्या कागदाबरोबरच दृष्टीआड होतील, मानपत्रें करंडकांत कोंडून बसतील, व करंडक पेट्यांच्या बंदोबस्तांत राहतील. परंतु ग्रंथांचें मात्र तसें नाही. ग्रंथ हे चिरंजीव होत. व त्यांच्या रूपानें झालेला सन्मान हें एक प्रकारचें इनाम होय. येथील केळकर-वाढदिवस-मंडळानें आपला 'केळकर' ग्रंथ प्रसिद्ध करून केळकरांना शारदेच्या राज्यांत एक कायमचें नवें इनामच मिळवून दिलें यांत शंका नाही. सदर मंडळाला केळकरांना प्रिय काय आहे याची बरोबर कल्पना असल्यामुळे त्यानें त्यांस ग्रंथ अर्पण करण्याचें ठरविलें व त्या ग्रंथाची रचनाहि समयोचित अशीच केली.

तात्यासाहेब केळकर गेलीं छत्तीस वर्षे मराठी वाङ्मयाची सेवा करीत आले आहेत. त्यांनी या काळांत किती वाङ्मय निर्मिलें याची मोजदाद इतरांना तर राहोच, पण त्यांना स्वतःलाहि कागदपेन्सिलीच्या साहाय्यावांचून करतां येईल कीं नाही याची शंकाच आहे. त्या वाङ्मयासंबंधानें ग्रंथ रचण्याकरिता मंडळ निर्माण झालें तरी त्यालाहि त्यांच्या समग्र वाङ्मयाचा थांग लागला नसावा. त्यानें त्यांचें ठळक वाङ्मय मिळविलें व तें मराठींतील नामांकित लेखकांच्या स्वाधीन करून त्याजकडून एक एका विषयावर निबंध लिहवून घेतला. त्यांत मंडळानें राजकीय, सामाजिक, धार्मिक वगैरे चळवळीहि गोवल्या व खेरीज केळकरांच्या विविध लेखन-विशेषांचे मासले निवडून काढून वाचकांना त्यांचा परिचय करून देण्याचें श्रेय जोडलें. त्यामुळे प्रस्तुत ग्रंथास शारदादेवीच्या दरबाराची शोभा आली आहे. या दरबारांत केळकर व त्यांचें ग्रंथ-वैभव यांस अग्रस्थान मिळालें असलें तरी त्या वैभवा-बरोबरच निरनिराळ्या विद्वान लेखकांनी प्रकट केलेलें स्वतःचे वैभव डोळे दिपविणारें आहे असेंच कोणीहि म्हणेल.

केळकरांनी ज्या ज्या विषयावर निबंध व ग्रंथ लिहिले त्या त्या विषयांतील तज्ज्ञ त्यांतील मर्म सांगण्यास या ग्रंथास लाभलेले आहेत. त्यांच्या वाङ्मयाविषयक चिकित्सेची चिकित्सा करण्यांत प्रो. वामनराव जोशी यांनी आपली मार्मिक व चिकित्सक लेखणी चालविली आहे. त्यांच्या कवितेची परीक्षा कवि मायदेव यांनी केली आहे. त्यांच्या ऐतिहासिक लेखनाच्या छाननीस इतिहाससंशोधक प्रो. दत्तोपंत पोतदार सरसावले आहेत. त्यांच्या राजकारणास राजकारणी असे प्रो. अण्णासाहेब भोपटकर यांनी कसोटीस लावलें आहे. त्यांची लेखनशैली 'महाराष्ट्र'चे लेखन-कुशल सहसंपादक श्री. माडखोलकर यांनी वर्णिली आहे व त्यांचें संपादकत्व श्री. माटे यांनी पारखून पाहिलें आहे. अशा रीतीनें त्यांचा एक एक विषय त्या त्या विषयांतील निपुण लेखकांनी परीक्षून सोडला आहे. अर्थात् हे सर्व लेखक समयज्ञ आहेत. रा. केळकर यांच्या वाढदिवसानिमित्त प्रस्तुत ग्रंथाची रचना आहे याची जाणीव त्यांस असल्यानें त्यांच्या लेखांतील, कवितांतील व विविध ग्रंथांतील दोष दाखविण्यापेक्षां गुण नजरेस आणण्याकडेच त्यांच्या परीक्षणाचा कल असावा हें स्वाभाविक होय.

हे लेखक स्वतः ग्रंथकार, निबंधकार व टीकाकार असून त्यांनी आपल्या क्षेत्रांत कमीअधिक प्रमाणांत नांवलौकिक मिळविला आहे. इतकेंच नव्हे तर त्यांना वगळल्यास मराठी भाषेंतील होतकरू व प्रसिद्ध लेखक फार थोडे उरतील असें म्हटलें तरी चालेल. या कारणानें प्रस्तुत ग्रंथाचें नांव मात्र 'केळकर' ग्रंथ असें असताहि तो उघडून वाचूं लागतांच त्यांत पंचवीस उत्कृष्ट लेखकांची अचानक गांठ पडते व केळकरांच्या स्तुतीबरोबर त्यांचीहि स्तुति वाचकांच्या तोंडीं सहजीं येते. केळकरांचें ग्रंथकर्तृत्व व लेखनपटुत्व स्वयंसिद्ध आहेच. परंतु त्याची साथ तशाच विद्वान व कुशल लेखकांनी केल्यामुळे केळकरांच्या गुणांना विशेष शोभा आली आहे. रत्न स्वतः तेजस्वी असतेंच, पण त्याला सुवर्णाच्या कोंदणांत बसविल्यानें त्याचें तेज अधिक खुलून दिसतें. गुलाब-पाण्याला स्वतःचा सुगंध असतोच, पण तेंच पाणी गुलाबदाणींतून अंगावर उडविण्यांत आल्यानें त्यापासून अधिक आल्हाद उत्पन्न होतो. रेशमी वस्त्राचें जातीचें सौंदर्य कांही कमी नाही, पण त्याला जरतारीच्या काठाची जोड मिळाल्यानें त्या वस्त्राची अपूर्वाई विशेषच वाटूं लागते. केळकरग्रंथाचे बाबतींत हाच प्रकार घडल्यामुळे ह्या ग्रंथानें मराठी वाङ्मयांत बहुमोल भर पडली आहे.

एकंदर ग्रंथाचे भाग तीन असून त्याचीं पानें अद-मासें सातशेंच्या आंत-बाहेर आहेत. पहिल्या भागांत निबंध आहेत व त्यांनी तीनशेंहून अधिक पानें व्यापलीं आहेत. दुसऱ्या भागाचीं पानें तीनशें-चाळीस असून त्यांत इतिहास, साहित्य, टीका, वर्णन, चरित्रें, लेख इत्यादि केळकरांच्या विविध वाङ्मयापैकीं निवडक उतारे घेतले आहेत. हा भाग एखाद्या दुकानांत मालाचे नमुने दाखविण्याकरिता प्रदर्शनाचा खण (शोरूम) ठेवावा त्याप्रमाणे सजला आहे. आणि तिसरा म्हणजे शेवटचा भाग चरित्रविषयक आहे. त्यांतच त्यांच्या आयुष्यांतील निरनिराळ्या प्रसंगीं

घेतलेल्या छायाचित्रांची भर घातली असता ग्रंथास नांव दिल्याप्रमाणे प्रस्तुत पुस्तक हस्तगत झालें कीं केळकर हस्तगत झाले असेंच प्रत्येकास वाटल्या. वांचून राहणार नाही. पोलिसांनी मुद्देमालाकरिता आरोपीची झडती घ्यावी तशी टीकाकार लेखकांनी त्यांची झडती घेतली आहे. पोलीस झाले तरी अंगावरचे कपडेच तेवढे चाचपून तपासतात. पण केळकर-ग्रंथांतील टीकाकारांनी व संपादकांनी त्यांच्या जवळचा सगळा मुद्देमाल तपासून आणि मन, बुद्धि व आत्मा यांत हात घालून त्यांच्याहि व्यापारांचे क्ष किरणाहूनहि अधिक भेदक अशा किरणांनी जणुंकाय फोटोच काढले आहेत.

अशा प्रकारचे ग्रंथ मोठमोठ्या गृहस्थांना अर्पण करण्याचा प्रघात पाश्चात्य देशांत आहे. त्याचेंच अनुकरण आपल्याकडेहि होऊन अलीकडे महाराष्ट्रांतील प्रख्यात पंडित डॉ. भांडारकर, बंगालचे विद्वान गृहस्थ कै. सर अशुतोष मुकर्जी, कविवर्य डॉ. रवींद्रनाथ टागोर, हिंदु युनिव्हर्सिटीचे संस्थापक पंडित मदन मोहन मालवीय यांना त्या त्या विषयांतील तज्ज्ञांनी लिहिलेल्या निबंधांचे ग्रंथ समारंभाने नजर करण्यांत आले आहेत. शिवाजी-महाराजांच्या त्रिशतसांवत्सरिक उत्सवाच्या प्रसंगीं असलेच ग्रंथ प्रसिद्ध झाले. त्यांच्या तोडीचा हा ग्रंथ केळकर वाढदिवस मंडळाने निर्माण केला ही गोष्ट सदर मंडळाला तशीच महाराष्ट्र भाषेलाहि भूषणावह होय यांत शंका नाही.

# स्फुट सूचना

१ तळेगांव दाभाडे येथे तीन-चार वर्षांपूर्वी श्रीपांडुरंगाच्या मिरवणुकीवरून तंटा उपस्थित होऊन मिरवणुकीस विघ्नें आलीं होतीं. परंतु स. १९२९ सालापासून मशिदीपुढे नमाजाच्या वेळीं वाद्यें वाजवू नयेत एवढ्या प्रतिबंधावर मिरवणुकीस परवानगी मिळाली. मुसलमानांच्या धर्मभावना निष्कारण दुखवाव्या अशी हिंदूंची इच्छाच नसल्याने तेथील समाजाने ही अट तत्काळ मान्य केली व त्याप्रमाणे सन १९२९, १९३० व १९३१ या सालीं मिरवणुकी निर्विघ्नपणें पार पडल्या. ही मिरवणूक गांवांतील प्रत्येक प्रमुख देवालयापुढे जाऊन परत येण्याचा प्रघात फार प्राचीन असल्याने ती एक ग्रामप्रदक्षिणाच होते व मिरवणूक परत स्वस्थळीं येण्यास निदान पांच तास तरी लागतात. म्हणजे सायंकाळीं ६॥ ते ७ पर्यंत मिरवणूक स्वस्थळीं परत येते. हा प्रघात अधिकाऱ्यांस माहीत असल्याने स. १९२९, १९३० व १९३१ या सालीं परवानगी देतांना मिरवणूक सायंकाळीं ६॥ वाजतां स्वस्थळीं परत आणावी असा खुलासा केला होता. परंतु यंदा हें कालमान बदलून परत येण्याची वेळ ४॥ वर आली. मिरवणूक २ वाजतां निघून ४॥ वाजतां संपविली पाहिजे असे परवानगींत शब्द आहेत. म्हणजे पांच तासांचा कार्यक्रम अवघ्या अडीच तासांत उरकला पाहिजे असें या फर्मानावरून ठरतें. परवानगी देणारे अधिकारी डे. सु. ऑफ पोलीस यांस ग्रामस्थांनी भेटून त्यांना परिस्थिति समजावून सांगितली. तेव्हा 'अर्ज करा म्हणजे प्रतिवर्षाप्रमाणे परवानगी देऊं' असें त्यांनी उत्तर दिलें. त्याप्रमाणे अर्ज केला.परंतु ता. २९ रोजीं मिरवणूक निघेपर्यंत उत्तर आलें नाही व मिरवणूक अर्ध्या वाटेवर येताच, लवकर चला, म्हणून अधिकाऱ्यांचा तगादा सुरू झाला. तेव्हा तेथे मावळ तालुक्याचे मामलेदार व डि. सु. ऑफ पोलीस यांस ग्रामस्थांनी सर्व हकीकत सांगितल्यावर प्रतिवर्षाप्रमाणे मिरवणुकीस तोंडीं परवानगी मिळाली व नेहमीप्रमाणे ६॥ वाजण्याच्या सुमारास देवालयांत मिरवणूक परत आली. उभय अधिकाऱ्यांनी वेळींच समंजसपणा दाखविल्यामुळे लोकांचा विरस न होता मिरवणूक शांततेने पार पडली हें ठीकच झालें. परंतु यापुढे मिरवणुकीची वेळ ठरविणें हें अधिकाऱ्यांच्या मर्जीवर न ठेवता ती पूर्वापर पद्धतीप्रमाणे कायमचीच ठरवून टाकावी हें बरें. कारण अधिकारी वरचेवर बदलतात, त्यांना पूर्वीची रूढि माहीत नसते, यासाठी वरीलप्रमाणे स्पष्ट निर्णय होणें जरूर आहे.

# अन्नाच्या घासाबरोबर विषाचा घोट

हिंदुस्थानास लोकसत्तात्मक पद्धतीचें पूर्ण स्वराज्य देण्याचा इंग्रजसरकारचा संकेत आहे. व गेल्या चाळीस पन्नास वर्षे जी राजकीय घटना हिंदुस्थानांत निर्माण करण्यांत येत आहे, तिचा डौलहि लोकसत्तात्मकच आहे. हिंदुस्थानसरकाराची मध्यवर्ती सत्ता लोकमतास जबाबदार होऊन हिंदुस्थानास पूर्ण स्वराज्याचा पूर्णोदय केव्हा दृष्टीस पडावयाचा असेल तो पडो, परंतु प्रांतांना तरी स्वायत्तता म्हणजे स्वराज्य मिळणार असा डंका मुख्य प्रधान मि. मॅक्डोनाल्ड यांच्यापासून तों थेट मुंबईचे गव्हर्नर सर फ्रेड्रिक साइक्स यांच्यापर्यंत सर्व छोटे मोठे जबाबदार ब्रिटिश मुत्सद्दी व अधिकारी हिंदी लोकांच्या कानींकपाळीं पिटीत आहेत. अशा रीतीनें हिंदुस्थानच्या राजकीय प्रगतीचा रथ स्वराज्याची शीव किंवा वेस गांठीत चालला आहे यांत शंका नाही. स्वराज्याची ही प्रगति होत असता ती स्वराज्याची इमारत ज्या पायावर उभी राहावयाची तो पाया सदर स्वराज्य टिकवून धरण्यास समर्थ आहे कीं नाही याचा विचार करणें अवश्य आहे.

स्वराज्यदानाच्या पायऱ्या एकापुढे एक मोजावयाच्या झाल्यास त्यांचा क्रम मोर्ले-मिंटो सुधारणा, मॉंटेग्यू-चेल्म्सफर्ड सुधारणा व सायमन सुधारणा असा लागतो. सुधारणेच्या या प्रत्येक पायरीबरोबर राजकीय हक्कांना थोडथोडी भरती जसजशी येत गेली तसतशी लोकसत्तात्मक राज्यपद्धतीस विघातक अशा जातिभेदाची भरतीहि त्या हक्काबरोबर करण्यांत आली. एकीकडे उपासमारीनें रोड झालेल्या मुलाला अन्नाचे अधिकाधिक घास खाऊं घालावयाचे व दुसरीकडे त्या अन्नाच्या घासागणिक त्यास पाण्याऐवजी विषाचा एक एक घोट जास्ती पाजावयाचा अशी कारवाई इंग्रज सरकारानें मोठ्या धूर्तपणानें सुरू ठेवली आहे. हिंदी लोकांत कौन्सिलांतील जागांच्या वांटणीसंबंधानें एकवाक्यता होत नाही असें पाहून इंग्लंडचे मुख्य प्रधान मि. मॅक्डोनाल्ड यांनी सरपंच या नात्यानें निवाडा सांगितला. त्याविरुद्ध देशांतील सर्व विचारी व राष्ट्रहितेच्छु लोक हाकाटी करीत आहेत त्याचें कारण झालें तरी हेंच होय. तथापि मुसलमान, अस्पृश्य, अँग्लो-इंडियन व युरोपियन यांना त्या निकालापासून अन्तर्यामी एक प्रकारचा संतोष वाटत असून ते मॅक्डोनाल्ड यांना शिव्या न देता उलट ओव्याच गात आहेत. हा विरोधी देखावा विस्मयजनक नाही असें कोण म्हणेल?

वरील स्तुतिपाठकांपैकीं युरोपियन, अँग्लो-इंडियन हे पूर्ण व अर्धे अधिक परकीय असल्यानें त्यांचा विचार सोडून दिल्यास मुसलमान व अस्पृश्य यांच्या प्रमुख पुढाऱ्यांना मॅक्डोनाल्ड यांचा निकाल पसंत पडावा इतकेंच नव्हे तर महाराष्ट्रांतील मराठ्यांनी आम्हां मराठ्यांना पूर्वीच्या सातच जागा कां ठेवल्या, त्या मुंबई कायदेमंडळांतील एकंदर सभासदांच्या वाढीबरोबर जास्ती कां वाढविल्या नाहीत याबद्दल ब्रिटिश मंत्रिमंडळावर रुसून बसावें याचें इंगित काय अशी शंका कोणाहि सामान्य मनुष्याच्या अंतःकरणांत उद्भवल्यावांचून राहणार नाही. कारण राष्ट्रीय, नेमस्त, हिंदुसभावाले व शीख काय आणि मुसलमान, अस्पृश्य व मराठे काय एकाच हिंदभूमीच्या पोटीं जन्मास आले असून त्या सर्वांचें सुखदुःख राजकीय दृष्ट्या एकच आहे; असें असता त्यापैकीं पहिल्या वर्गानें राष्ट्राचा प्राणघात झाला या समजुतीनें डोळ्यांत आसवें आणून सुतक पाळावें व दुसऱ्या वर्गानें दिवाळीचा दीपोत्सव करावा या भिन्न मनोवृत्तींचा ठाव पाहणें अत्यंत जरूर आहे.

लोकसत्ताक राज्यपद्धतीचा उगम पाश्चात्य राष्ट्रांत झाला असल्यानें त्या राष्ट्रांत सदर पद्धति चिरस्थायी होण्यास ज्या तत्त्वाची आवश्यकता लागण्यांत येते तींच तत्त्वें हिंदुस्थानासारख्या पौर्वात्य देशांत प्रमाणभूत समजलीं जावीं हे स्वाभाविक होय. लोकसत्ताक राज्यपद्धतींत देशाच्या राज्यकारभाराचीं सूत्रें मुत्सद्द्यांच्या हातीं येत असून त्यांची निवडणूक लोकांनी निवडून दिलेल्या प्रतिनिधींमधूनच केली जाते. इंग्लंडचेंच उदाहरण घेतल्यास इंग्लंडचें मंत्रिमंडळ ब्रिटिश जनतेनें आपल्यातर्फे पार्लमेंटांत पाठविलेल्या प्रतिनिधींतूनच बनविण्यांत आलें आहे. अर्थात् सदर मंत्रिमंडळांत निवडणुकींत यशस्वी झालेल्या लोकप्रतिनिधींपैकीं शेलक्यांतील शेलकीं माणसें मंत्र्याच्या अत्यंत श्रेष्ठ दर्जापर्यंत जाऊन पोचलीं आहेत. सध्याच्या ब्रिटिश मंत्रिमंडळांतील मि. राम्से मॅक्डोनाल्ड हे मुख्य प्रधान काबाडकष्ट करणाऱ्या यःकश्चित् मजुरांतून वाढले आहेत. मॅक्डोनाल्ड हे मजूर, तर त्यांचे जोडीदार मि. बाल्डविन हजारों मजुरांना कारखान्यांत राबवून त्यांच्या घामाच्या सहस्रावधि बिंदूंबरोबर एक सुवर्णबिंदु या हिशेबानें लक्षाधीश बनून प्रचंड भांडवलवाले म्हणून मिरवीत आहेत. तथापि मॅक्डोनाल्ड स्वतः मजूर असूनहि इतके हुषार व आटोकाट मुत्सद्दी आहेत कीं त्यांचा हात

बाल्डविन यांच्यानेंहि धरवणार नाही. अशा प्रकारचे पहिल्या प्रतीचे राजकारणी पुरुष इंग्लंडच्या राज्यकारभार आपल्या अक्कलहुषारीवर हाकीत आहेत व त्यांतील कर्मापणा दाखविण्याकरिता त्याच पार्लमेंटांतील प्रतिनिधी डोळ्यांत तेल घालून तक्षकासारखे टपून बसले आहेत. या प्रतिपक्षाचीहि राज्यकारभार चोख व बिनचूक चालण्याच्या दृष्टीने मंत्रिमंडळाइतकीच गरज आहे. आखाड्यांत चड्डी चढवून उतरलेला एक जवान दुसऱ्या जवानाला पेचांत धरून मातींत उताणा पाडण्यासाठीं आपल्याकडून करून मेहनत करीत असतो, त्याप्रमाणे ब्रिटिश मंत्रिमंडळाचे प्रतिपक्षी कंबर बांधून सज्ज असल्याने सोनाराच्या भट्टींतून काढलेल्या सोन्यांत जसा सहसा हिणकसपणा राहात नाही तशीच पार्लमेंटच्या राज्यकारभाराची चाळणी होऊन सदर कारभार शक्य तितका निर्दोष राखला जातो. अर्थात् पार्लमेंटांतील हे दोनहि पक्ष एकंदरीने तुल्यबळच असून त्यांनी एकमेकांवर चालविलेले डावपेच एकंदरींत ब्रिटिश राष्ट्रास परिणामीं कल्याणप्रदच ठरतात. देशहित साधण्याचा दोघांचा हेतु अभिन्न, पण तो साधण्याचीं दोघांचीं धोरणे मात्र भिन्न अशी स्थिति आहे.

लोकसत्ताक राज्यपद्धतींतील चोखपणा पक्षभेदावर अवलंबून आहे हे प्रमेय वरील विवेचनापासून निष्पन्न होणार आहे. या प्रकारच्या पक्षभेदाची उभारणी कायदेमंडळांत तशी मतदारसंघांतहि झालेली आढळते. इंग्लंडांत कान्झरव्हेटिव्ह, लिबरल व मजूर हे तीन पक्ष आहेत; आणि ते प्रत्येक निवडणुकींत एकमेकाशीं लढून आपल्या बाजूचे प्रतिनिधी पार्लमेंटांत अधिक निवडून आणण्यासाठीं झटतात, व त्यात ज्याचें संख्याबल वरचढ ठरेल त्या पक्षाच्या हातीं राज्यसूत्रें जातात. आयर्लंडांत गेलीं दहा वर्षे राज्यसत्ता बळकावून बसलेल्या कॉसग्रेव्हच्या पक्षास थप्पड मिळून डी व्हॅलेराचा पक्ष सत्ताधीश बनला यालाहि हें संख्याबलच कारण झालें. पाश्चात्य देशांत ज्या पक्षामध्ये या प्रकारच्या राजकीय उलाढाली चालतात, त्या पक्षांना त्यांचें धोरण त्यांचीं राजकीय तत्त्वेच आंखून देतात. आयर्लंडांतील कॉसग्रेव्ह पक्ष इंग्लंडबरोबर झालेल्या तहास अनुसरून ब्रिटिश साम्राज्यांतील वसाहतींचें स्वराज्य उपभोगीत राहण्यांत संतोष मानणारा आहे, तर डी व्हॅलेराचा फियाना फेल पक्ष ब्रिटिश साम्राज्याबाहेर पडून पूर्ण स्वातंत्र्याचीं सुखें अनुभवण्यासाठीं धडपडणारा आहे.

इंग्लंडचा कॉन्झरव्हेटिव्ह पक्ष चालू राजकीय धोरणांत फारसा फरक करू इच्छित नाही, लिबरल पक्ष हिंदुस्थानासारख्या पराधीन देशास उदार मनाने वागविणें आपलें ब्रीद समजतो आणि मजूर पक्ष भांडवलवाल्यांचें प्राबल्य कमी करून गरीब मजुरांना अधिक सुखसोयी मिळवून देणें हें आपलें ध्येय मानीत असून हिंदुस्थानाच्या राजकीय आकांक्षांविषयी लिबरल पक्षाहून तो जास्ती सहानुभूति बाळगतो. हिंदुस्थानांत अद्यापि जबाबदार राज्यपद्धति सुरू झाली नाही हें खरें; तथापि जी थोडीबहुत सत्ता जनतेच्या स्वाधीन करण्यांत आली आहे तिचा पूर्ण फायदा जनतेस मिळावा यासाठी ले. असेंब्ली व प्रांतिक कौन्सिलें यांत स्वराज्य पक्ष, प्रतिसहकारपक्ष, डेमोक्रॅटिक पक्ष, इंडिपेंडंट पक्ष इत्यादि पक्ष राजकीय पुढाऱ्यांनीं आपल्या अनुयायांच्या मदतीने वेळोवेळीं स्थापन केले आहेत. सरकारपक्षाचा मोड करून त्याची सत्ता ताबडतोब मिळविण्याची आशा वरील राजकीय पक्षांपैकीं कोणाहि पक्षास नसताहि स्वराज्यपक्षाने ले. असेंब्लींत सरकारी पक्षाला अनेकवार रडकुंडीस कसें आणिलें होतें हें लक्षांत घेतल्यास राजकीय तत्त्वावर उभारलेल्या पक्षाचें बळ किती प्रभावशाली असतें याची अटकळ बांधतां येते. हिंदुस्थानाच्या राजकीय प्रगतीच्या दृष्टीने येथील पक्षांची उभारणी निवडणुकीसाठी, तशीच कौन्सिलांतील कामकाजासाठीहि राजकीय तत्त्वावर होणें अत्यंत आवश्यक आहे यांत शंका नाही. येथील जनतेला प्रांताच्या व देशाच्या कायदेकौन्सिलांत पूर्ण सत्ता अद्यापि प्राप्त करून घ्यावयाची आहे. ती शक्य तितकी लवकर कबजांत येण्यासाठी प्रतिनिधींच्या बहुमताचा नोकरशाहीभोवती वेढा घालून तिचा कारभार जरूर तेव्हा खुंटवून टाकणें हा मुख्य सनदशीर उपाय होय.

मोर्ले-मिंटो व मॉंटेग्यू–चेम्सफर्ड यांच्या शिफारशीप्रमाणे राजकीय सुधारणेचे जे कायदे ब्रिटिश पार्लमेंटाने पास केले त्या अन्नाबरोबर जातीभेदाच्या विषाचे घोट हिंदुस्थानास पाजण्यांत आले तरी देशांतील राष्ट्रीय वृत्तीच्या उफाळ्याच्या वाढीने त्या विषाचे दुष्परिणाम पचनीं पाडून हिंदुस्थान सरकारच्या ले. असेंब्लींत आणि बंगाल व मध्यप्रांत यांच्या कौन्सिलांत राष्ट्रीय पक्षाने गेल्या दहा वर्षांतील असहकारितेच्या अमदानींत विजय मिळवून नोकरशाहीची अक्कल गुंग करून सोडली. राष्ट्रीय पक्षाच्या वीरांनी चालविलेले हे भाले नोकरशाहीच्या काळजांत घुसल्याने इंग्लंडच्या मंत्रिमंडळाने जालीम विषाचा मोठा प्याला पाजून असेंब्लींतील व प्रांतिक कौन्सिलांतील राष्ट्रीय वृत्तीचा प्राण घेण्याचा गुप्त बेत अत्यंत निर्दयपणाने आता तडीस नेला आहे.

हें अघोर कृत्य त्यांनी कसें साधलें आहे याचा विचार करण्यासारखा आहे. इंग्रज सरकारची वागण्याची खुबी ही आहे कीं ते कोणतीहि नवीन

हिकमत स्वतःच्या फायद्यासाठी करीत आहों असें दिसूं देत नाहीत. दुसऱ्याचा फायदा दाखवून त्यांत आपला स्वार्थ साधावयाचा अशी त्यांची राजनिति असून ती परोपकाराच्या मिषामुळेच आतापर्यंत यश मिळवीत आली आहे. कौन्सिलांत जातिभेद नको म्हणून तोंडानें म्हणत तो हातानें घुसडून देण्याची त्यांची मसलत या प्रकारचीच आहे. जातिभेद हा राष्ट्रीय ऐक्याच्या आड येणारा आहे या उदात्त तत्त्वाचा प्रत्येक ब्रिटिश मुत्सद्दी, भाविक हिंदु परमेश्वराचें नामस्मरण करतो त्याप्रमाणें, जप करीत आले असले तरी मागसलेल्या जातींच्या तात्कालिक हिताकरिता या घातक पद्धतीचा आरंभीं कांहीं वर्षें अवलंब केल्याशिवाय भागणार नाही, ही बी त्यांनी आपल्या हातानें खोचून ठेवलीच आहे.

बरें ज्यांच्या नांवावर ते हा डाव खेळतात त्यांनाहि तो हानिकारक न वाटता हितकारकच वाटतो. कारण मुसलमानांना स्वराज्य आजच मिळणार असें कोणीं म्हटलें कीं त्यांच्या छातींत धडकी भरते. त्यांच्या मनांत येते की, लोकसत्तात्मक स्वराज्य म्हणजे बहुसंख्य वर्गाचें स्वराज्य. हिंदुस्थानात बहुसंख्य वर्ग हिंदूंचा. हिंदु लोक संख्येनें अधिक, शिक्षणानें पुढें व संपत्तीनेंहि मुसलमानांपेक्षां श्रेष्ठ. तेव्हा स्वराज्य आजच मिळाल्यास मुसलमानांस त्यांच्या संख्येच्या प्रमाणांत राज्यकारभाराचा वांटा पदरांत पडण्याची आशा नसल्यानें स्वराज्य हें सुखाचें आगर न समजता संकटांचें माहेरघर असेंच आज मुसलमानांचे पुढारी समजतात. यासाठी तूर्त आपल्या जातीनें शिक्षणप्रसार करून व नोकऱ्याचाकऱ्या मिळवून सामाजिक व सांपत्तिक दृष्ट्या हिंदूंची बरोबरी करण्याच्या उद्योगांत गर्क असावें आणि ही बाजू मनाजोगी मजबूत झाल्यावर मग स्वराज्याच्या मागें लागावें अशी मुसलमानांची विचारसरणी आहे. म्हणून हें कार्य साध्य होण्याकरिता निवडणुकीच्या बाबतींत हिंदूंशीं जुंपणारी चढाओढ टाळण्यासाठी ते वेगळा मतदारसंघ व ठराविक जागा मागतात आणि आपल्या संख्येच्या प्रमाणांत नोकऱ्यांचा हट्ट धरतात. मुसलमानांचा हाच कित्ता ब्राह्मणेतर व अस्पृश्य हेहि थोड्याबहुत अंशांनी गिरवीत असल्यानें त्या सर्वांचें राजकीय धोरण जवळजवळ सारखें झालें आहे. मुसलमानांकरिता वेगळा मतदारसंघ व कौन्सिलांतील ठराविक जागा अशी सोय लागली. तीच सोय कांहींशी अस्पृश्यांनीहि स्वतःची लावून घेतली आणि ॲंग्लोइंडियन, युरोपियन व ख्रिश्चन इत्यादिकांची सरकारानें लावली. त्याचा परिणाम कौन्सिलांच्या निवडणुकीवर कसा होईल याचें चित्र आजच डोळ्यांपुढे स्पष्ट उभें राहतें.

भावी प्रांतिक कौन्सिलांत सरकारानें नेमलेल्या गव्हर्नराच्या हातांत पुष्कळ राजकीय सत्ता राहून त्याच्या मदतीस लोकनियुक्त मंत्री यावयाचे आहेत. हे मंत्री, हुशार, बुद्धिमान व आपल्या कामांत वाकबगार असून त्यांना गव्हर्नराचे डावपेच बरोबर समजले पाहिजेत. त्या मंत्र्यास गव्हर्नराशीं भांडतांना ज्यांचा पाठिंबा हवा ते कौन्सिलांतील इतर लोकनियुक्त सभासदहि खंबीर, धीट, शीलवान, मुत्सद्दी व वादविवादात पटाईत हवे. मंत्री व लोकप्रतिनिधी जितके निष्णात, तेजस्वी अगतील तितका त्यांचा नैतिक दाब गव्हर्नरावर बसून त्याचा कारभार लोकप्रतिनिधींच्या तंत्रानें चालेल व राजकीय हक्कांचीं फळें जनतेस चाखावयास मिळून उरलेले अधिकार मिळविण्याचा नेट सरकारच्या मागें लागेल. हें घडून येण्यास एकंदर समाजांत जे अत्यंत लायक, विश्वासू व श्रेष्ठ प्रतीचे लोक असतील, मग ते कोणत्याहि धर्माचे, जातीचे व पंथाचे असले तरी, निवडून येणें आवश्यक होय. अशा वेळीं मतदारसंघ मिश्र व संयुक्त असल्यास हिंदू मतदार लायक अशा मुसलमान उमेदवारास निवडतील; ब्राह्मण ब्राह्मणेतरास व ब्राह्मणेतर ब्राह्मणास मतें देतील; स्पृश्यांचीं मतें अस्पृश्यांस मिळतील, व अस्पृश्यांचीं मतें स्पृश्यांच्या पेटींत पडतील. अशा रीतीनें सर्व समाज राष्ट्रीय दृष्ट्या एकजिनसी बनूं लागून लायक तेच प्रतिनिधि कौन्सिलांत निवडून येतील.

परंतु विभक्त मतदार संघांत हा स्पृहणीय देखावा आढळणार नाही, इतकेंच नव्हे तर आपल्या धर्मबंधूंस व जातभाईंस ओळखण्याचें हें वळण मुसलमान, मराठे, अस्पृश्य, ख्रिस्ती यांच्यापाशींच न थांबता ज्यांना विभक्त मतदारसंघ नाहीत अशा इतर जातींवरहि त्याचे परिणाम घडून प्रत्येक जातीनें आपल्या जातींचीं माणसें उभीं करावीं व निवडून आणावींत, ही खोड सर्व जातींना लागेल आणि निवडणुकींत उमेदवाराच्या पात्रतेकडे न पाहिल्यामुळे जातीलाजात मिळून नालायकांचीच खोगीरभरती कौन्सिलांत झाल्यानें नोकरशाही हल्लीप्रमाणेंच पुढेंहि बेफामपणानें सत्ता गाजवील व कौन्सिलमधील प्रतिनिधींच्या हातून सर्वसामान्य जनतेचें हित फारसें साधणार नाही. जातवारीनें नोकरशाहीला व परंपरेनें ब्रिटिश सरकारला मोकळें रान सांपडणार असल्यामुळेच मॅक्डोनाल्ड यांनी जातिभेदाच्या विषाचा प्याला हिंदुस्थानाला पाजला. त्या विषानें धुंदलेल्या व आपसांतील फाटाफुटीनें दुर्बळ बनलेल्या जनतेस खरें स्वराज्य लाभूं न देता इंग्रज सरकार आपल्या सत्तेच्या दाबाखाली आणखी किती वर्षें कण्हत ठेवील हें कोणीं सांगावें !

# जनावरांची उपासमार टाळा

( लेखक श्री. यादव शंकर वावीकर )

महाराष्ट्रांत बहुतेक ठिकाणीं पाऊस तीनच महिने पडतो. हल्ली हिरवा चारा सर्वत्र पसरलेला दिसतो आणि त्यामुळे जनावरांची चरण्याची व तशीच पाणी पिण्याची सोय मुबलक झालेली दिसते. परंतु आक्टोबरअखेर गवत गुरांच्या चरण्यामुळे संपतें किंवा तें वाळून जातें. लहानसान नद्या-नाल्यांतील पाणी आटतें. फाल्गुनपासून आषाढांत बरसात सुरू होईपर्यंत जनावराना पुरेसा चारा आणि पुरेसें पाणी सुद्धा मिळत नाही. खेड्यांतील लोकांना त्यांची दुःसह स्थिति दिसत नाही असें नाही. परंतु स्वतःच्या देण्यामुळे आणि चालू खर्चामुळे ते फारच हलाखींत असतात. शेतीस लागणारा पैसा, आउतें व श्रम यांची कशी तरी तरतूद करून पीक काढण्याचे भानगडींत ते असतात. जनावरांना थोडी फार वैरण घालून ते त्यांना जगवितात. त्यांचीं जनावरें पाहिलीं तर अस्थिचर्म व मरतुकडीं अशीं असतात. रोगांची सांथ आली म्हणजे त्यांना औषधपाणी देण्याची सोय ठिकठिकाणीं नाही. अशीच अनास्था जर पुढे कित्येक वर्षे चालू राहिली तर घटत असलेली जनावरांची संख्या अगदी कमी होईल आणि शेती करण्यास जनावरेंहि पुढे मिळणार नाहीत. या बाबतींत शेतकऱ्यांनी कसून प्रयत्न केल्यास ही जनावरांची दुःस्थिति पुष्कळ अंशीं कमी होईल अशी आम्हांस खात्री वाटते. त्याच दृष्टीने आम्हीं कांही सूचना खाली केल्या आहेत.

### वाईट गवत नाहींसें करा

प्रत्येक गांवच्या शिवारांत, गायरानांत, बांधांशीं, नदी किंवा ओहोळ यांचे कांठीं, तसेंच खराब व पडित जमिनींत चांगलीं चांगलीं गवतें येत नाहीत. सकस उंच वाढीचीं व पुष्कळ कापण्या देणारीं गवतें जेथे असतात तेथे तीं खाण्याकरिता गुरांचे कळप त्यांवर पडतात. खुरटीं गवतें, टाकळा, आघाडा, हरळी, गोखरू, धोतरा व इतर कांटेरी गवतें व झुडपे यांना जनावरें तोंड लावीत नसल्यामुळे त्यांचें बीं तयार होतें आणि तें वर्षानुवर्ष भोंवतालच्या जमिनी व्यापीत चालतें आणि तेथे पुढे चांगलीं गवतें येत नाहीत. हीं सर्व ठिकाणचीं वाईट गवतें दरवर्षी जाळून टाकिलीं पाहिजेत. चांगल्या गवताचें बीं रुजलें म्हणजे खुरटीं गवतें आपोआप नाहींशीं होतील. ही सार्वजनिक बाब असल्यामुळे गांवपंचायतीनेच या कामीं अवश्य खटपट केली पाहिजे. हल्ली निसर्ग–स्थितीमुळे जें गवत येतें त्यावर गुरांचें पोषण होईल तेवढेंच. या कामीं कोठेंहि कसोशीने प्रयत्न होत नाहीत ही मोठी दुःखाची गोष्ट होय. सरकारी अमलदारांनी व खासगी जमिनीच्या मालकांनी जंगलांत, माळरानांत, वरकस जमिनींत किंवा कुरणांत चांगलीं गवतें लावण्याचा प्रयत्न केल्यास त्यांवर जनावरांची चरण्याची पुष्कळच सोय होईल.

### मुरलेली वैरण

कुरणामध्ये एकदम गुरें चरण्यास सोडल्याने तीं सर्व कुरणाचा नाश करून टाकितात; तीं व्यवस्थेने चरत नाहीत. याकरिता गुरांची संख्या पाहून व कुरणांचे विभाग करून त्यांत हारोहारीने झाडें लावून किंवा खांब ठोकून त्यांना तीन बाजूंनी दोनतीन दोर बांधले पाहिजेत.म्हणजे गुरें तेवढ्याच भागांत चरतील. त्या भागांतील गवत संपल्यावर त्यांना दुसरा भाग खुला करावा व नंतर तिसरा करावा. म्हणजे दैवयोगाने चांगला पाऊस झाला कीं, मागल्या गवताची फूट उत्तम होईल. कुरणांतील कांहीं गवत तें फुलावर आलें म्हणजे त्याची कापणी करून मुरलेली वैरण तयार करावी. कांही भागांत उत्तमोत्तम गवतें लावून त्याचें बीं धरावें. शेतकरी शेतीकरितां धान्याचें, भाजीपाल्याचें जसें बीं सांभाळून ठेवतो व तें पेरतों, तसेंच चांगल्या गवतांचें बीं धरून तें आपल्या शेतांच्या बांधांशीं किंवा माळजमिनींत अवश्य पेरावें. जेथें जमीन चांगली आहे व पावसाचें मान पुष्कळ आहे, अशा ठिकाणीं गवताच्या दोन किंवा तीन कापण्या मिळण्यास हरकत नाही. गवताच्या कापण्या करण्याचा प्रघात कोंकण भागांत कित्येक ठिकाणीं आहे. परंतु जेथे वर लिहिल्याप्रमाणें चांगली स्थिति असेल तेथे गवताच्या कापण्या वाढ पाहून कराव्या. पावसाळ्यांत जनावरांस चोहोकडे जो हिरवा चारा मिळतो तोच त्यांना पुढे हिवाळ्यांत व उन्हाळ्यांत मिळावा म्हणून हिरवा चारा फुलावर येतांच तो कापून आणावा किंवा विकत घ्यावा, आणि पावसाळ्यांत, हिंवाळ्यांत किंवा जमिनींत विटांच्या विहिरी करून त्यांत तो चांगला दाबून भरावा. प्रत्येक वितीवर मिठाचा थोडासा थर टाकावा. याप्रमाणे शीग येईतोंपर्यंत खड्डा दाबून भरल्यावर त्यावर वाळलेलें गवत व पालापाचोळा टाकून तो बंद करावा, आणि त्यावर चिखलाचे गोळे

ठेवून तो लिंपून टाकावा. अशा गवताच्या विहिरींना अवेळीं पडणाऱ्या पावसाचा त्रास होऊं नये म्हणून त्यावर छप्पर असावें. तसेंच जमिनीवरील पाणी आंत जाऊं नये म्हणून बाजूंनी ओघळी काढून द्याव्यात. ही मुरलेली वैरण जनावरांना वाळलेल्या गवतापेक्षा चांगली आवडते व मानवते. युरोप, अमेरिका या देशांत अशी मुरलेली वैरण पुष्कळ करतात. तशी ती इकडे केल्याशिवाय गुरांचे हाल टळणार नाहीत.

### सकस कडबा सांठवा

धान्याचीं पिकें करतांना आपल्या जनावरांना वर्षभर सकस कडबा मिळेल अशी व्यवस्था प्रत्येक शेतकऱ्याने केली पाहिजे आणि नेहमीं वैरणीचा एक वर्षाचा संग्रह करून ठेविला पाहिजे. वाळलेलें गवत वेळींच विकत घेऊन ठेविलें पाहिजे आणि पैशाची टंचाई असो किंवा कांहीं असो, घरचा कडबा विकून गुरांची उपासमार करण्याची दुर्बुद्धि प्रत्येक शेतकऱ्याने सोडून दिली पाहिजे. कपाशी, शेंगदाणा, करडई, मोहरी, तीळ, जवस, एरंडी व धणें इत्यादि पिकापासून जनावरांना वैरण मिळत नाही. भात आणि गहू यांचें काड निःसत्त्व असतें. तरी अशीं पिकें करतेवेळींच सकस कडवा किंवा कडधान्यांचीं पिकें करण्याचा आळस करूं नये. शेंगदाणा, करडई, तीळ अशीं पिकें एकदम विकल्याने शेतकऱ्यांच्या गुरांना पेंड मिळत नाही. या पिकांच्या तारणावर पैसे काढून पुढे त्याने त्यांचें तेल काढून विकावें व पेंड आपल्या गुरांना ठेवावी. या पिकांवर हल्ली दुसऱ्या लोकांची जी चैन चालू आहे ती बंद झाली पाहिजे. म्हणजे शेतकरी व त्यांचीं जनावरें उपाशीं मरणार नाहीत.

### मोकाट गुरें

कित्येक ठिकाणीं भाताची कापणी केल्यावर गुरें मोकाट सोडण्याची वहिवाट आहे. त्यामुळे त्या शेतांत दुसरीं पिकें करतां येत नाहीत. कित्येक वर्षी मागला पाऊस चांगला असून दुसरीं पिकें येण्याची संधि असतांना लोक एकजुटीने तसा प्रयत्न करीत नाहीत व मोकाट गुरांचा बंदोबस्त करीत नाहीत. यामुळे दुसऱ्या पिकांना अंतरून ते आपली व आपल्या गुरांची उपासमार करतात. पाटस्थळें, विहिरी, तलाव यांच्या कांठीं जेथे बागा व मळे आहेत तेथे गिनी ग्रास, एलिफंट ग्रास, होपस ग्रास, बारसीम व ल्युसर्न ( विलायती गवत ) या बहुत कापण्या देणाऱ्या गवतांची लागवड होण्यासारखी असून ती कोणी फारशी करीत नाही, ती अवश्य करावी. हिवाळी, खोंडी, काळबोंडी, सुदाया व वालखड यांची लागवड हिरव्या चाऱ्याकरिता करितात. ती जास्त करावी म्हणजे कांही चारा विकतां येईल व कांही वर सांगितल्याप्रमाणे पेवांत दाबून टाकून मुरलेली वैरण करतां येईल.

### द्विदल वनस्पति

गवत वाळून गेल्यावर कित्येक द्विदल वनस्पति हिरव्या गार असतात व त्या गुरें आवडीने खातात. अशा वनस्पति माळरानांत व डोंगरकडेवर उतारास आडव्या दिशेने नांगरट करून व तीन-चार सरींचे एकत्र वरंबे करून त्यांवर लावाव्या. शेवरी, बरवटा, रान शेवरा, रानतीळ, गोधडी, कुरडू, बांवची, फुली, पेटारी, दुधानी, माका, गंगावती, उन्हाळी, वासणवेल इत्यादि लावाव्या. म्हणजे गवत संपल्यानंतर गुरांची चरण्याची सोय अंशतः तरी होईल व मालकानाहि त्यांत फायदा होईल. अशी खटपट केल्यास त्या जमिनीवरील फूल ( बारीक माती ) वाहून जाणार नाही व वाहत जाणारें खत तेथेच राहून जमिनी सुधारतील. अशा वरंब्यावर वरील वनस्पतींशिवाय ज्यांचा पाला गुरें खातात अशीं झाडेंहि लावतां येतील. अशीं शंभर—सवाशें झाडें आहेत.त्यांचा पाला बारीक करून गुरांना भुश्यांत किंवा फोलांत घालावा. ही वहिवाट सुरू झाल्यास गुरांची उपासमार पुष्कळ अंशीं कमी होईल.

ओहोळ, नाले, लहानमोठ्या नद्या यांना बंधारे नसल्यामुळे पावसाळ्यांत पावसाचें पाणी तेव्हाच वाहून जाते.पुढे मनुष्यांना व गुरांना पिण्यालासुद्धा पाणी मिळत नाही.जेथे शें दीडशें इंच पाऊस पडतो अशा ठिकाणीं आम्हीं ही स्थिति पाहिली आहे. मग जेथे थोडा पाऊस पडतो तेथे मनुष्यांना पिण्याला पाणी मिळूं नये आणि गुरांना तृषाक्रांत राहण्याचा प्रसंग यावा यांत नवल तें कसलें? गांवपंचायतीने ही स्थिति लक्षांत घेऊन नद्यानाल्यांना बंधारे घालून आपल्या गांवीं पाणीपुरवठा बारा महिने टिकेल अशी व्यवस्था करावी. ही दुःस्थिति लोकल बोर्डाला कळवून त्यांची मदत मिळवावी.

# कम्यूनिझम हाहि 'धर्म'च आहे!

( अनुवादक पां. वा. गाडगीळ )

अफू जशी माणसास भ्रमांत पाडते त्याप्रमाणे धर्म बुद्धीवर भ्रमाचें पांघरूण घालतो असें रशियांतील क्रांतीचा प्रसिद्ध पुढारी लेनिन याचें मत होतें. क्रांतीनंतर स्थापन झालेल्या कम्यूनिस्ट राज्याचें 'धर्म ही मनुष्यसमाजास अफू आहे' हें ब्रीदवाक्यच होऊन राहिलें आहे. या ब्रीदवाक्यानुसार रशियांत हल्ली ख्रिश्चन धर्माची चोहोंकडून पीच्छेहाट होत असून जिकडेतिकडे निरीश्वरवाद बोकाळला आहे. पण कोणत्या तरी प्रकारच्या धर्मभावनेवांचून मनुष्य प्राण्यास शांति वाटणें शक्य नसल्यामुळे म्हणा किंवा इतर कांही कारणाने म्हणा 'कम्यूनिझम' हें जें समाजव्यवस्थेचें मत रशियांत आज पुरस्कारिलें जात आहे. त्यांतहि धर्मामध्ये कम्यूनिस्टांना दिसणारे सर्व गुणदोष शिरलेले इतरांना दिसत आहेत. या दृष्टीने हेन्री रेमंड मुसे या अमेरिकन लेखकाने न्यू यॉर्क येथील 'नेशन' पत्रांत रशियांतील आपला अनुभव लिहिला आहे. तो बोधप्रद वाटल्यावरून त्याचा आशय खाली दिला आहे.

### ख्रिस्तमंदिरें इतिहासजमा झालीं

मि. मुसे म्हणतात,—

"रशियांत जेथे जेथे क्रांतीचा प्रसार होत आहे तेथे तेथे प्रथम प्रार्थनामंदिरें बंद केलीं जात आहेत. कांही मंदिरांतून क्लब व पदार्थसंग्रहालयें उघडलीं जातात. कांहींत बिनतारी संदेशाच्या सामानाचे कारखाने चालू झाले आहेत. कोठे कोठे तर हीं मंदिरें पाडून साफ जमीनदोस्त केलीं आहेत. भाविक शेतकऱ्यांचे समूह तुरळक कोठे कोठे मनोभावाने प्रार्थना करीत असल्याचे नजरेस येतें. पण एकंदरींत शहरांत व बहुधा खेड्यांतहि ख्रिस्तमंदिरें हीं ऐतिहासिक गोष्टच झाली आहे. हल्लीची तरुण पिढी हीच कम्यूनिझमचें आघाडीचें सैन्य असून ते सर्व पुरे निरीश्वरवादी आहेत. ख्रिस्ती धर्म म्हणजे जुन्या लोकांचा बावळटपणा असें त्यांचें मत आहे. मीं एका कम्युनिस्ट तरुणास म्हटलें 'आमच्या अमेरिकेंत प्रार्थनामंदिरांची एवढी धुळवड झालेली नाही' तेव्हा तो म्हणाला, "खरेंच आमच्याइतके प्रागतिक तुम्ही नाहीच मुळी!" रशियांत अजून जुनीं माणसें कोठे कोठे प्रार्थना करतांना दिसतात तें पाहून 'काय हा मूर्खपणा' असें तरुणांना वाटतें. वडील माणसें प्रार्थनेस बसलीं तरीसुद्धा लहान मुलें बसत नाहींत. कारण आपण प्रार्थनेस बसलेले आपल्या सवंगड्यांनी पाहिलें तर ते आपली कुचेष्टा करतील अशी त्यांना भीति वाटते. कांही मुलें आपल्या आईबापांचीहि प्रार्थनेबद्दल थट्टा केल्यावांचून राहात नाहीत. अवघ्या पंधरा वर्षांपूर्वी जेथे धर्मपुरोहिताचें सर्वत्र अधिराज्य होतें त्या रशियांत तरुण मुलें आज स्वच्छ सांगतात कीं, 'येथे धर्म मेला आहे.' आणि तेथील परिस्थिति पाहिली म्हणजे या म्हणण्याची लागलीच साक्ष पटते.

### खरा धर्म कोठे नांदत आहे ?

ख्रिस्ती धर्माची रशियांत अशी सर्व बाजूंनी पीच्छेहाट झालेली दिसली तरी रशिया पाहून परत फिरतांना माझा एकंदरींत ग्रह झाला तो असा कीं, जगांत आज जर कोठे खरा जिवंत धर्म आचरण्यांत येत असेल तर तो एक रशियांत. 'ख्रिस्ती धर्म नुसता रशियांतच बुडाला असें नव्हे. एकंदर युरोपांत यहुदी व ख्रिस्ती या दोनहि धर्मांची करुणास्पद स्थिति आहे' असे रे. जॉन होम्स यांचें मत आहे. माझ्या मतें साऱ्या जगांत जिवंत, वाढता व कार्यकर्ता असा धर्म फक्त एकट्या रशियांत असून तो धर्म म्हणजे कम्यूनिझम् होय. 'धर्म' हा शब्दहि कम्यूनिस्टांना वावडा असल्यानें ते कम्यूनिझमला 'धर्म' म्हटल्याबद्दल माझा उपहास करतील. पण रशियांत पूर्वी रूढ असलेल्या ख्रिस्ती धर्मामुळे धर्म म्हणजे भ्रामक समजुतींचें गांठोडें अशी कम्यूनिस्टांची समजूत झालेली असली तरी समाजहितदृष्ट्या 'धर्म' या संज्ञेत फारच अधिक अर्थ आहे. आणि या अर्थानें विसाव्या शतकांतील धर्मांत कम्यूनिझमला बरेंच महत्त्वाचें स्थान आहे. कोणत्याहि धर्मासंबंधी समाजदृष्ट्या महत्त्वाची गोष्ट अशी कीं, त्यांतील समजुती इंद्रियगम्य ज्ञानावर आधारलेल्या नसूनहि अनुयायांस त्या मोठ्या उत्साहाने कार्यप्रवृत्त करीत असतात. धर्मसमजुतींत हें सामर्थ्य नसेल तर तो धर्म व्यर्थ होय. युरोपांत ख्रिस्ती धर्म बुडाला असें होम्स म्हणतात ते बहुधा याच अर्थाने. कारण ख्रिस्ती लोकांचे आचारविचार हे व्यवहारांत ख्रिस्ती नसणाऱ्या लोकांसारखेच झाले तर ख्रिस्ती धर्मांतील समाजनियन्त्रणाचें सामर्थ्य संपलें असेंच म्हटलें पाहिजे. ख्रिस्ती धर्माची आज अशी अवस्था झाली आहे हें कबूल केलेंच पाहिजे. कम्यूनिझमची आज अशी स्थिति नाही. कम्युनिस्ट नसणाऱ्याहून कम्यूनिस्टांच्या भावना, विचार व आचार भिन्न आहेत. जुन्या लोकांच्या सर्व समजुती त्यांस

अमान्य आहेत. कम्युनिस्टांच्या श्रद्धेंत अतिमानुष शक्तीला वाव नाही. पण तरीसुद्धा त्यांची श्रद्धा ही धर्मश्रद्धा नव्हे असें म्हणतां येणार नाही. कारण जगांतील मोठमोठे धर्म भरज्वानींत असतांना त्यांच्या अनुयायांत जी एक गूढ श्रद्धा असे तशी गूढ श्रद्धा आज कम्यूनिस्टांतहि आहे. ती इतकी दृढ आहे कीं, व्यवहारांत प्रत्यक्ष अनुभवास येणाऱ्या गोष्टीहि या श्रद्धेशीं विसंगत असल्या तर कम्यूनिस्ट त्यांना खोट्या मानण्यास तयार होतात. पर्वतासहि हलवून सोडील असें श्रद्धेचें प्रचंड सामर्थ्य आज फक्त रशियांतच आढळतें.

कम्युनिस्टांमध्ये इतर धर्मांत आढळणारी ही गूढ अंतःश्रद्धा व भावनेचा जोर आहे इतकेंच नव्हे तर जुन्या मोठमोठ्या धर्मांत आढळणारे इतरहि विशेष कम्यूनिझममध्ये आढळतात. कम्युनिस्टांची विशिष्ट तत्त्वें व सिद्धांत यांचा सांगाडा आहेच. तसेंच त्यांचे महर्षि, प्रेषित व वीरहि आहेत. इतकेंच काय पण कम्यूनिस्ट धर्माचे पुरोहित व पोपहि तेथे आहेत. पोप चूक करीत नाही म्हणजे तो करील तेंच बरोबर ही जी रोमन ख्रिस्त्यांची निष्ठा तितकी जहाल निष्ठा जरी कम्यूनिस्टांची नाही तरी पण कम्यूनिझमविषयीं अश्रद्ध असणारांना रशियांत जेवढा कडक बहिष्कार आहे तेवढा जगांत आज कोणाहि नास्तिकावर कोठेहि घातला जात नाही. सर्व मोठ्या धर्मांप्रमाणे कम्युनिस्ट धर्माचीहि एक विभूति आहे. विभूतिपूजेविरुद्ध असलेल्या विसाव्या शतकांतील सर्व ज्ञानास पचनीं पाडूनहि कम्यूनिस्टांनी लेनिनला नुसता धर्मसंस्थापकच नव्हे तर जवळ जवळ देव बनविला आहे. या लेनिनने अवघ्या १० वर्षांत जगांतील एक-दशांश लोकांचे नशीब पार फिरवून टाकलें. म्हणून रशियन लोक ज्या गाढ भक्तीने लेनिनला पूजितात तिला जगांत आज दुसरी जोड नाही. एक हात उभारून लेनिन मोठ्या त्वेषाने व्याख्यान देत आहे असे त्याचे पुतळे सर्व शहरांत आणि गांवांत ठळक जागीं उभारले आहेत. शाळांत, क्लबांत व नाटकगृहांत मार्क्स, एन्जल्स व लेनिन या कम्युनिस्टांच्या त्रिमूर्तीचे अर्धपुतळे ठेवलेले असतात. दुकानांतून लेनिनचे लहान लहान पुतळे विकावयास ठेविले असून लोक नेहमी ते खरेदी करून जुन्या जागीं पुनः पुनः नवे ठेवितात. या कम्यूनिस्ट धर्माचे वीर तर शेंकडो-हजारों आहेत. शहरांत व खेड्यांत 'क्रांतींतील हुतात्म्यास' अशीं अक्षरें कोरलेलीं स्मारकें दिसून येतात. क्रांतींत व नंतरच्या यादवींत ज्यांनीं ज्यांनी आपले प्राण खर्ची घातले त्यांच्या नांवाचे फलक त्यांच्या दफनस्थळीं लाविले आहेत. त्यांचीं नांवें चिरंजीव करण्याकरिता तीं रस्त्यांना व चौकांना देण्यांत येतात. त्यांचीं शूर कृत्यें व मृत्यु यांचे पुण्यदिवस पाळले जाऊन त्यांचे उत्सव केले जातात. त्या प्रसंगीं मोठमोठीं व्याख्याने देऊन त्या शूरवीरांची कीर्ति तरुणांपुढे गाइली जाते.

## आसुरी वृत्ति

सर्व मोठ्या धर्मांत जो एक आसुरीपणा दिसून येत असतो तोहि कम्यूनिझममध्ये पुरेपूर भरलेला आहे. प्राचीन ख्रिस्ती लोक ख्रिस्तीधर्माबद्दलच्या खऱ्या निष्ठेने चेटक्यांचा छळ करीत, त्यांना बुडवीत अथवा जाळीत. त्याप्रमाणे कम्यूनिस्ट लोकहि भांडवलशाहीस अनुकूल असलेल्या लोकांची उपासमार करतात, त्यांना वनवासांत घालतात अथवा त्यांचा शिरच्छेदहि करतात. कुलक म्हणजे रशियांतील धनिक जमीनदार तसेच रशियांतील विद्याजीवी (Intellectuals) यांचा जो रशियांत छळ होतो त्यावरून ही कम्युनिस्टांची आसुरी वृत्ति प्रत्ययास येते. इतर सर्व धर्मांप्रमाणे आप्तवाक्य-प्रामाण्याबद्दल आग्रह धरणारा भिक्षुक वर्गहि कम्यूनिस्टांत आहे. ' कम्यूनिस्ट पार्टी ' म्हणून रशियांत जी बलिष्ठ संस्था आहे तिचे सर्व सभासद इतके हट्टी व आग्रही आहेत कीं, ' पार्टी ' च्या मताहून एखाद्या सभासदाचें मत थोडें भिन्न झालें कीं त्याचा जो छळ सुरू होतो त्याला उपमाच नाही. खुद्द राज्यक्रांति घडवून आणणाऱ्या ट्रॉट्स्कीचाहि ' पार्टी ' शीं मतभेद होताच कसा छळ सुरू झाला आहे हें सर्वांस ठाऊक आहे. गेल्या १०।१२ वर्षांत आणखीहि पुष्कळ अशीं उदाहरणें घडलीं आहेत.

इतर धर्मांशीं कम्यूनिझमचें आणखीहि एका बाबतींत साधर्म्य आहे. इतर धर्मांत परलोकीं सुख मिळेल या आशेवर लोकांना इहलोकची नाना दुःखें व अन्याय निमूटपणें सोसावयास लावले जातात. म्हणून लेनिन धर्म ही अफू आहे असें म्हणे. पण कम्युनिस्ट लोक परलोक मानीत नसले तरी भविष्यकाळांत सर्व लोकांस भरपूर सुखाचा लाभ होणार आहे असें आश्वासन देऊन चालू पिढीकडून मनस्वी कष्ट करून घेतात. ते म्हणतात "ज्यांना आजच वैभव पाहिजे असेल त्यांना रशियांत तें मिळणार नाही. उद्यां औद्योगिक योजना अमलांत आली म्हणजे लवकरच ज्यांत सर्व वस्तूंचें वैपुल्य आहे असा कम्युनिझमचा स्वर्ग आपल्या हातीं येईल. या आशेनें त्याकडे डोळे लावून आज कष्ट करण्यास जरा जोरानें कंबर बांधा " आणि रशियन लोकहि जुन्या धर्मनिष्ठांप्रमाणे उद्या आपल्या आशा सफल होतील या भरंवशावर आज उत्साहाने व धीराने कष्ट करून हालहि सोशीत आहेत.

# श्री. केळकर व सुभाषबाबू

बंगालचे सुप्रसिद्ध पुढारी श्री. सुभाषचंद्र बोस यांनी मद्रासच्या तुरुंगांतून केसरीचे उपसंपादक श्री. आ. रा. भट यांना एक पत्र पाठवून श्री. तात्यासाहेब केळकर यांच्या ६१व्या वाढदिवसानिमित्त त्यांजविषयींची आपली प्रेमादरपूर्ण भावना व्यक्त केली आहे. ते लिहितातः—

" आपले सार्वजनिक पुढारी सामान्यतः अल्पायुषी असतात. त्या दृष्टीने मातृभूमीची सतत व अविरत अशी सेवा करीत श्री. केळकर यांनी साठीची मजल गांठली याबद्दल त्यांचें अभिनंदन करितांना माझ्या मनाला अत्यंत आनंद व समाधान वाटत आहे. श्री. केळकर याची सेवा मुख्यतः व प्रथमतः महाराष्ट्रभूमीच्या चरणीं रुजू झालेली आहे हें तर खरेंच; पण अखिल हिंदुस्थानाच्या सार्वजनिक कार्यांतहि त्यांनी प्रमुख स्थान मिळविलें आहे हेंहि तितकेंच खरें आहे. लोकमान्य टिळकाचे एक विश्वासू सेनापति म्हणून ते हिंदी जनतेला प्रथम परिचित झाले आणि तेव्हापासून ते जनतेच्या नजरेसमोर आहेतच. त्यांची भेट होण्याचा लाभ मला प्रथम घडला तेव्हा ते काँग्रेसच्या वर्किंग कमिटीचे सभासद होते. १९२४ सालीं देशबंधु दास यांच्या नेतृत्वाखाली बंगाल्यांतील काँग्रेस पक्षाने कलकत्ता कार्पोरेशन काबीज केली, तेव्हा त्या पक्षाने ज्या तीन लोकनायकांचें सुस्वागत करण्याचें ठरविलें ते पं. मोतीलाल नेहरू, श्री. विठ्ठलभाई पटेल आणि श्री. न. चिं. केळकर हे होत. स्वागतसमारंभाची व्यवस्था करण्याचें काम मजकडे आलें होतें. पण त्या वेळीं श्री. केळकर हे कांही अपरिहार्य कारणामुळे येऊं शकले नाहींत आणि त्यामुळे देशांतील एका दूरच्या प्रांतांत त्यांच्या देशभक्तीबद्दल कृतज्ञता व्यक्त करणारा स्वागतसमारंभ होण्याचें राहिंलें.

लोकमान्यांचे निधनानंतर श्री. केळकर यांचें महाराष्ट्रांतील सार्वजनिक कार्यांशीं अभिन्न असें नातें जडलें आहे. लोकमान्यांनी त्यांच्यावर टाकलेल्या विश्वासाप्रमाणे त्यांनी जें कार्य केलें त्याबद्दल महाराष्ट्रांतील त्यांचे सहकारी व अनुयायी हेच माझ्याहून अधिक अधिकारवाणीने बोलूं शकतील; पण त्या कार्याशिवाय स्वराज्य पक्षांत त्यांनी बजावलेली कामगिरी मोठी आहे. देशबंधु दास यांच्या पुढाकाराखाली बंगाल्यांत जें कार्य चालत होतें त्याबद्दल श्री. केळकरांना किती आस्था वाटे हें मीं प्रत्यक्ष पाहिलें आहे.

केळकर म्हटले कीं बारा महिने अठरा काळ भरीव स्वरूपाचें कार्य अखंड करीत राहण्याचा गुण डोळ्यांपुढे उभा राहतो. वाङ्मय, इतिहास, समाजशास्त्र वगैरे विषयांकडे त्यांनी किती लक्ष पुरविलें आहे हें त्यांच्या लेखन–भांडारावरून कळून येतें. त्यांची कर्तव्यनिष्ठा तर एखाद्या पर्वताप्रमाणे अचल आहे. स्थिर–गंभीर अशा वृत्तीची त्यांची स्मृति त्यांच्या देशबांधवांना एक मोठी जिंदगीच वाटेल यांत शंका नाही. मुख्य सांगावयाचें तें हें कीं, श्री. केळकर हे तरुण पिढीचे मित्र आहेत. परिस्थिति शीघ्र गतीने बदलावी याबद्दल घाई व गडबड करणाऱ्या तरुणांनी डोळे मिटून आपलें म्हणणें ऐकावें, व आपली बुद्धिमत्ता आपल्यापाशीं गहाण टाकावी, अशी त्यांची कधीच इच्छा नसते."

# तिरंगी सामन्याच्या समाप्तीची संधि दवडूं नका

भारतमंत्री सर सॅम्युएल होअर हे वयाने तरुण व स्वभावाने धाडशी आहेत. हिंदुस्थानांतील कायदेभंगाची चळवळ वटहुकुमांच्या धडाक्याखाली सहा सात महिन्यांच्या अवधींत होती कीं नव्हती अशी करून टाकतां आली या समजुतीने त्यांना आपल्या कर्तबगारीविषयी फाजील घमेंड उत्पन्न होऊन ते मंत्रिमंडळांतील वृद्ध मुत्सद्दयांना तुच्छ लेखूं लागले. धाडशी माणूस नेहमी विचाराने वागतोच असें नाही; किंबहुना पुष्कळ वेळा त्याच्या हातून विचारापेक्षा अविचाराचींच कृत्यें अधिक घडतात. होअरसाहेबांचा प्रकार यांपैकींच झाला. साऱ्या मंत्रिमंडळांत शहाणा व कर्तबगार काय तो मी या ऐटींत हिंदुस्थानासंबंधाने राजकीय धोरण ठरविण्याचा सगळा मक्ता त्यांनी आपल्याकडे घेतला व त्यांस मंत्रिमंडळांतील तरुण पक्षाचाहि पाठिंबा मिळाला. ता. २७ जून रोजीं कॉमन्स सभेंत त्यांनी केलेलें भाषण त्यांच्या फाजील घमेंडखोरीचेंच द्योतक होतें. त्यांनी आपल्या भाषणांत अनेक वटहुकुमांचा एकच आसूड वळण्याचें जाहीर केलेंच; पण त्याखेरीज गोलमेज परिषदेचा गाशा गुंडाळल्याचें सांगून हिंदुस्थानांतील नेमस्त पक्षाचीहि टवाळखोराप्रमाणे पगडी उडविली.

परंतु या टवाळीचा परिणाम हिंदी राजकारणावर काय होईल याची त्यांना कल्पना आली नाही. नेमस्त पक्ष हा दोरींत धरल्याप्रमाणे नाकासमोर चालणारांचा पक्ष आहे. ते राष्ट्रीय सभेप्रमाणे कायदेभंगाची भाषा बोलावयाचे नाहींत, बंगाल्यांतील अराजकांच्या वाऱ्यालाहि उभे राहावयाचे नाहींत, हिंदु-मुसलमानांच्या जातिविषयक तंट्यांत पडावयाचे नाहींत, किंवा सनदशीर व कायदेशीर मार्ग सोडून इकडे तिकडे रेसमात्र वळावयाचे नाहींत. इंग्रज लोकांनी ज्याच्यावर खुशाल विश्वास टाकावा असा हा पक्ष आहे व त्याजवर पूर्वी अनेक आणीबाणीच्या प्रसंगीं सरकारने तसा विश्वासहि टाकला आहे. अशा पक्षाची कुचेष्टा सर सॅम्युएल होअर यांनी केली यासारखी अक्षम्य चूक दुसरी कोणतीहि नव्हती. या चुकींत नेमस्तांच्या कुचेष्टेपेक्षा इंग्रजांच्या स्वतःच्या प्रतिष्ठेचा भाग अधिक होता. गोलमेज परिषदेचा बूट इंग्लंडामधील या किंवा त्या पक्षाने काढला नव्हता. सायमन कमिशनमध्ये कोणाहि हिंदी गृहस्थास सभासद म्हणून घेतले नाही यांत आपलें राजकारण फसलें असें कमिशनावर सार्वत्रिक बहिष्कार पडला तेव्हा कॉन्सरव्हेटिव्ह, लिबरल व मजूर या पार्लमेंटांतील तीनहि पक्षांच्या पुढाऱ्यांना वाटलें. पुढें मजूर पक्ष अधिकारावर आला त्यावेळीं त्याने कॉन्झर्वेटिवाकडून फसलेलें राजकारण सावरण्याकरिता गोलमेज परिषदेचा व्यूह रचला. त्यास लिबरल व कॉन्सरव्हेटिव्ह या दोनहि पक्षांच्या पुढाऱ्यांनी पाठिंबा दिला. अशा रीतीने जें गोलमेज एकदा उभें करण्यांत आलें तें त्याचे कार्य संपेतोंपर्यंत टिकवून धरण्यास इंग्लंडांतील तीनहि पक्ष नैतिक दृष्ट्या बांधले गेले. पहिली गोलमेज परिषद मजूर पक्षाच्या कारकीर्दींत भरली. पण दुसरी परिषद तीन पक्षांचें एक मंत्रिमंडळ बनलें त्यावेळीं भरली. तेंच मंत्रिमंडळ आजहि कायम आहे. तेव्हा दोन परिषदांत अपुरें राहिलेलें काम पुरें करण्याकरिता तिसरी परिषद भरविणें ब्रिटिश मंत्रिमंडळास क्रमप्राप्त होतें.

पण होअरसाहेब पडले फाजील शहाणे! त्यांनी परिषद भरविण्यांत कालाचा अपव्यय व पैशाचा चुराडा उडतो अशी सबब सांगून गोलमेजाचे पायच मोडले. होअरसाहेबांनी केला हा धडधडीत वचनभंग व विश्वासघात होता. तो मंत्रिमंडळांतील मि. राम्से मॅक्डोनाल्ड, बाल्डविन प्रभृति वृद्ध मुत्सद्दयांस कळला नव्हता असें नाही. परंतु विजयाच्या खोट्या कल्पनेने शेफारलेल्या तरुण पक्षापुढे त्यांचें कांही चालेनासें झाल्यामुळे म्हणा किंवा होअरसाहेबांनी परिषदेच्या ऐवजीं खाजगी सल्लामसलतीची जी शक्कल काढली होती तिला हिंदुस्थानांतील नेमस्त पक्ष फसतो कीं काय याची परीक्षा त्यास पाहावयाची होती म्हणून म्हणा, वृद्धांनी मूग गिळून ज्या नेमस्तांची पगडी होअर यांनी उडविली ते नेमस्त चिडून जाऊन होअर यांची टोपी उडवितात किंवा कसें इकडे लक्ष लावण्याचें ठरविलें.

शब्दांचा कीस काढण्यांत नेमस्तांइतके पटाईत लोक हिंदुस्थानांत दुसरे क्वचितच सांपडतील. त्यांनी होअरसाहेबांचें बिंग ताबडतोब उघडकीस आणून वचनभंगाचें खापर ब्रिटिश मंत्रिमंडळाच्या माथीं फोडलें. एवढेंच करून नेमस्त पक्ष थांबला नाही तर व्हाइसरॉयाच्या सल्लागार मंडळांतील सर तेज बहादूर सप्रू, श्री. जोशी व बॅ. जयकर यांनीं आपल्या जागांचे राजिनामे देऊन आपला सक्रिय विरोध दर्शविला. तथापि होअरसाहेबांनी शहाणपणाच्या घमेंडींत लाथेने मोडून पाडलेलें गोलमेज जोडलें जाणें नेमस्तांना देशहितदृष्ट्या इष्ट वाटत असल्याने त्यांनी ब्रिटिश मंत्रिमंडळास कांही विधायक सूचनाहि केल्या. त्यां-

पैकीं गोलमेज परिषदेची पद्धत सरकारानें सोडता कामा नये या त्यांच्या सूचनेविषयी कोणाचाहि मतभेद असण्याचें कारण नाही. तरी पण सर तेज बहादुर सप्रू व बॅ. जयकर या दोघांनी अधीरपणाने विस्तीर्ण गोलमेजाच्या जागीं गोलच पण लहान मेज मांडण्याचें ब्रिटिश मंत्रि-मंडळास सुचविलें तेवढी गोष्ट मात्र त्यांनी आंगलट येण्यासारखी केली. त्यांनी त्यांत अशी सोय पाहिली कीं दुसऱ्या गोलमेज परिषदेंतील सर्व सभासदांना पुनः इंग्लंडास बोलावल्यापासून जो सरकारला अधिक खर्च सोसावा लागेल तो वांचावा व त्याच अडचणीकरिता होअरसाहेब परिषद भरविण्याचें टाळीत असतील तर त्या सबबीच्यामागे त्यांस दडावयास सांपडूं नये.

पण द्रव्याचा अपव्यय ही होअर यांची खरी तक्रारच नव्हे. त्यांना गोलमेज परिषदेंत इंग्रज प्रतिनिधींच्या बरोबरीचा हिंदी प्रतिनिधींस मिळालेला दर्जा देखवत नव्हता. माजी भारतमंत्री मि. वेजवूड बेन व माजी व्हाइसरॉय लॉर्ड आयर्विन यांनी हिंदी पुढाऱ्यांना समानतेच्या दर्जानें वागविण्याचा प्रघात पाडून त्यांचें विनाकारण स्तोम माजविलें असें श्रेष्ठपणाच्या गर्वानें फुगलेल्या कॉन्सरव्हेटिव्ह पक्षाच्या होअर-प्रभृति तरुण बांडांच्या मनानें घेतलें होतें. सायमन कमिशनाची नेमणूक इंग्लंडांत कॉन्सरव्हेटिव्ह पक्ष अधिकारारूढ असता करण्यांत आली होती. कॉन्सरव्हेटिव्ह पक्ष उलथून पडून इंग्लंडाचीं राज्यसूत्रें मजूर पक्षाच्या स्वाधीन झाल्यावर मजूर पक्षानें गोलमेज परिषदेचा घाट घालून सायमन कमिशनच्या रिपोर्टास मागे सारण्यांत सायमन कमिशनाचीच नव्हे तर कॉन्झरव्हेटिव्ह पक्षाचीहि मानखंडना झाली याचें शल्य होअर साहेबांच्या हृदयांत सलत होतें. त्याचं उट्टें काढण्यासाठी होअर यांनी तिसऱ्या गोलमेज परिषदेस गचांडी देण्याचें ठरविलें. होअर यांनी काळाच्या किंवा द्रव्याच्या अपव्ययाचा उल्लेख आपल्या भाषणांत केला असला तरी तो गौण होता. त्यांना वास्तविक हिंदी प्रतिनिधींचा नक्षाच उतरावयाचा होता. या दृष्टीनें मोठ्या गोलमेजाऐवजीं भीत भीत छोटें गोलमेज सुचविण्यांत सप्रू–जयकरांचा डाव कसा चुकला हें आम्हीं त्याच वेळीं केसरींत दर्शविलें होतें. कारण त्यायोगानें त्यांनी आपल्या हातानें दुसऱ्या परिषदेऐवढी तिसरी परिषद मागण्याचा आपला हक्क गमावला.

तथापि त्या वेळीं सप्रू व जयकर यांनी व नेमस्त पक्षाच्या इतर सभासदांनी सरकारशीं या बाबतींत सहकार्य करण्याचें बाणेदारपणानें नाकारलें याबद्दल त्यांचें सर्वांकडून अभिनंदन झालें इतकेंच नव्हे, तर त्यांनी काढलेल्या जाहीरनाम्यावर इतर पक्षांतील प्रमुख गृहस्थांनी सह्या करून व ठिकठिकाणीं सभा भरवून आपली मान्यताहि दर्शविली. त्या योगानें होअरसाहेबांनी केला हा अपमान एकट्या नेमस्तांचा नसून अखिल राष्ट्राचा होता असा त्या उपक्रमास साहजिकच रंग चढला व त्याचा आता इष्ट तो परिणामहि घडून आला. मॅक्डोनाल्ड व बाल्डविन-प्रभृति अनुभविक मंत्र्यांना झालेला वचनभंग डाचतच होता. त्यांस होअरसाहेबांचे दांत त्यांच्या घशांत घालावयास ही संधि चालून आली व ती त्यांनी दवडूं दिली नाही. त्यांनी माजी व्हाइसरॉय लॉर्ड आयर्विन याना मंत्रिमंडळांत याच सुमारास स्थान देऊन आपल्या पुष्ठयांत घेतलें व हिंदुस्थानांत आतापर्यंत तटस्थ राहिलेल्या असंख्य लोकांचींहि मनें दुखाविणें कसें मूर्खपणाचें आहे याचें माप होअर यांच्या पदरांत बांधलें.

ही वेळ इंग्रज सरकारास बरीच अडचणीची होती. कॉंग्रेसच्या हजारों अनुयायांस तुरुंगांत टाकल्यामुळें हिंदुस्थानांतील बहुजनसमाज उद्विग्न झाला होता. ज्ञातिविषयक प्रश्नाचा निर्णय न लागल्यामुळें मुसलमानांचे कित्येक पुढारी सत्याग्रहाच्या पोकळ कां होईना धमक्या सरकारास देत होते व डॉ. आंबेडकरांच्या पक्षाचे अस्पृश्य सत्याग्रहाची भाषा बोलत नसले तरी सरकारावर उलटण्याच्या मनःस्थितींत होते. आणि बंगाल्यांतील क्रांतिकारकांनी खून पाडण्याचें व्रत अखंड चालूच ठेवलें होतें. त्यांतच होअरसाहेबांच्या अविचारानें नेमस्तांची व इतर तटस्थांची भर पडल्यास इंग्रजांचे हिंदुस्थानांतील लोकमताचे सगळे आधार तुटून त्यांनी आपल्या मनानें गेल्या दोन वर्षांत रचीत आणलेलें कारस्थान ढासळल्याशिवाय राहिलें नसतें. म्हणून त्यांनी गेल्या महिन्यांत एकएका प्रश्नाचे तडकाफडकी निकाल लावण्याचें ठरविलेलें दिसतें.

जातिविषयक निर्णय सांगून त्यांनी मुसलमान व अस्पृश्य यांचा बळकट आधार स्वतःस जोडला आणि व्हाइसरायांनी ता. ५ सप्टेंबर रोजीं ले. असेंब्लींत केलेल्या भाषणांत तिसरी गोलमेज भरविण्याचा ब्रिटिश सरकाराचा इरादा जाहीर करून नेमस्तांचा रुसवा काढून टाकण्याचा प्रयत्न सुरू केला. नेमस्तांनी ज्या अटी घातल्या त्यांपैकीं मुख्य अटी सरकारास मान्य झाल्याच आहेत. तिसऱ्या गोलमेज परिषदेचा दर्जा पहिल्या व दुसऱ्या गोलमेज परिषदेसारखाच राहील असें सरकारानें आश्वासन दिलें आहे. तथापि सदर परिषदेस पूर्वीइतके प्रतिनिधि न बोलावता कमी बोलावण्यांत येतील असें व्हाइसरॉय सांगत आहेत. सप्रू-जयकरांनी आपखुषीनें ही मागणी आगाऊच आखडून धरली तर तिचा फायदा ब्रिटिश सरकारानें कां

घेऊं नये ! परंतु तिसरी गोलमेज परिषद भरवावयाची ती एकट्या नेमस्तांकरिता नसून सगळ्या हिंदुस्थानाकरिता आहे हें व्हाइसरायांनी किंवा इतर जबाबदार ब्रिटिश मुत्सद्द्यांनी विसरतां कामा नये. दुसऱ्या गोलमेज परिषदेस काँग्रेससुद्धा सर्वच पक्षांतील प्रतिनिधि गेले असल्याने सदर परिषद रहित करण्यापासून एकट्या नेमस्त पक्षाचाच नव्हे तर सर्व पक्षांचा अपमान झाला आहे. तेव्हा नेमस्तांतील कांही पुढाऱ्यांनी परिषद छोटी बनविण्यास आपली कबुली दिली असली तरी तिला सर्व पक्षांची संमति आहे असें समजणें चुकीचें आहे. यासाठी परिषद पुनः भरविण्याचें ठरल्यानंतर तिचा आकार कृपणपणाने लहान न धरता पूर्वीइतकाच मोठा ठेवणें जरूरीचें आहे

व्हाइसरायांच्या नव्या योजनेंत आणखी एक पिलूं घुसडण्यांत आलें आहे. ही तिसरी गोलमेज परिषद जाहीर रीतीने न भरवता पडदा-नशीन ठेवण्यांत येणार आहे. आणि याला निमित्त काय तर म्हणे परिषदेंत फाजील वेळ न मोडता तिचें काम झटपट उरकले पाहिजे. पण याहि सबबींत कांही हशील नाही. परिषदेकरिता जो कार्यक्रम ठरेल तो ब्रिटिश मंत्रिमंडळाने स्वतंत्रपणे न ठरविता सर्व प्रतिनिधींच्या अनुमतीने ठरविल्याने उरलेल्या विषयांपैकीं महत्त्वाचा विषय गळणार नाही. व अशा रीतीने तयार झालेला कार्यक्रम त्याला वेळेची मर्यादा ठेवली असता हवा तेव्हा सहज संपू शकेल. वाद-ग्रस्त बाबींपैकीं जातिविषयक निर्णय भलाबुरा लागलाच आहे. उरलेल्या बहुतेक गोष्टी आता संरक्षित विषयांत ( सेफगार्डस् ) मोडतात. त्या सर्व बाबी इतक्या महत्त्वाच्या आहेत कीं, त्यांस स्वराज्याचा गाभा समजण्यास हरकत नाही. त्यांतील एकहि बाब न गळतां सर्वच बाबींचा ऊहापोह भरपूर न झाला तर दोनच काय पण तीनहि परिषदा भरवून निष्फळ ठरतील. परिषद लहान व पडदानशीन ठेवण्यांत मंत्रिमंडळाचा हेतु दिसतो तितका शुद्ध व सरळ नाही. तिसरी परिषद सर सॅम्यु-अल होअर यांच्या इच्छेविरुद्ध भरविण्यांत येत आहे. तेव्हा होअर यांचा पूर्ण हिरमोड होऊं नये व हिंदी जनतेच्या हाकाटीस मान दिल्याचा देखावा शाबूत राहावा असे दुटप्पी धोरण संभाळून परिषदेच्या तोंडावर बुरखा घालण्याचा विचार आहे. पण त्या-मुळे तिसऱ्या परिषदेस पहिल्या दोन परिषदांचा दर्जा दिला, या व्हाइसरॉयांच्या उद्गारांना पोकळ बडबडीपेक्षां अधिक किंमत कोणीहि देणार नाही.

व्हाइसरायांनी आपल्या भाषणांत सगळा राग म. गांधी व त्यांची कायदेभंगाची चळवळ यांवर काढला आहे. सदर चळवळ गेले आठ महिने सरकाराने वटहुकुमांच्या शिलेखाली दाबून धरली आहे. या चळवळीचा जोर व तिजविषयी हिंदुस्थानांतील सर्व सुशिक्षित वर्गास वाटत असलेली सहानुभूति व्हाईसरॉयांनी प्रांजलपणें कबूल केली आहे. कारण प्रस्तुत कायदेभंगासंबंधाने कोणाचा कितीहि मतभेद असला तरी सदर चळ-वळीचे पुढारी प्रामाणिक, देशाभिमानी व कोणाचा घातपात न करता स्वार्थत्याग करणारे आहेत याविषयीं प्रत्येकाची खात्री झाली आहे.त्यांच्या या सद्गुणांची छाप अखिल हिंदवासीयांवर इतकी बसली आहे कीं त्यांचें साहाय्य न घेता केलेली राज्यघटना जयास जावयाची नाही व ती अमलांत आणावयाचें सरकाराने मनांत आणिलें तरी बहुजन-समाजास ती रुचावयाची नाही. अशा या अत्यंत वजनदार व आदरास पात्र झालेल्या राष्ट्रीय सभेस सरकार पाण्यांत पहात असून व्हाइसरॉयांनी वटहुकुमांची मुदत संपली नाही तोंच असेंब्लींत व प्रांतिक कायदेकौन्सिलांत कायमचे कायदेच पास करून घेऊन कायदेभंगाचें डोकें पुन्हा कधीहि वर निघणार नाही असा बंदोबस्त करण्याची तंबी दिली आहे.

सत्तेच्या जोरावर सरकारास बाह्यतः प्रस्तुत प्रयत्नांत यश येईल, नाही असे नाही. परंतु जनतेचीं मनेंच जर असंतुष्ट राहिलीं तर तिचा क्षोभ कायदेभंगाच्या ऐवजीं त्याहून दुसऱ्या उग्र व भयंकर स्वरूपाने बाहेर पडणार नाही अशी खात्री व्हाइसरॉय तरी बाळगू शकतील काय ? यासाठी आमची सूचना अशी आहे कीं समेटाचा प्रयत्न सरकाराने करून पाहावा व तो करून पाहण्याची वेळहि हीच आहे. गेल्या गोलमेज परिषदेस म. गांधी राष्ट्रीय सभेचे प्रतिनिधि या नात्याने हजर होते. म. गांधी म्हणजेच राष्ट्रीय सभा अशी सांप्रत व्याप्ति असल्याने तिसऱ्या गोलमेज परिषदेस दुसऱ्या गोलमेज परिषदे-इतकेंच प्रातिनिधिक स्वरूप येण्याच्या दृष्टीने त्यांना-हि सरकाराने निमंत्रण करणें क्रमप्राप्त आहे. अशा प्रकारचें निमंत्रण आल्यानंतर म. गांधींनीहि सरकाराने वटहुकूम परत घेतल्यास कायदेभंग बंद ठेवून गोलमेज परिषदेस जाण्यास संमति द्यावी. आधी कोणी माघार घ्यावी यासंबंधी उभय पक्षांच्या मनांत आढी बसली असेल तर ती या युक्तीने दूर होऊन दोघांचाहि बोज राहील व सध्याच्या उद्विग्न मनःस्थितींतून राष्ट्र एकदाचें बाहेर पडेल. देशांत तिरंगी सामना सांप्रत सुरू आहे. त्यापैकीं मवाळांच्या एका सामन्याचा शेवट लागल्यासारखा आहे. त्याचप्रमाणें दुसऱ्या म्हणजे काँग्रेसच्या सामन्याचा शेवट लागण्याचा वर सांगितला हा एकच उपाय आहे. मात्र त्यासाठी उभय पक्षांनी आपला थोडथोडा आग्रह सोडून मिळतें घेण्याचा समंजस-पणा दाखविला पाहिजे.

# डॉ. मुंजे यांचें मुंबईस आगमन

मुंबई ता. ७ सप्टेंबर १९३२.

हिंदुमहासभेचे कार्याध्यक्ष डॉ. बाळकृष्ण शिवराम मुंजे हे 'व्हिक्टोरिया' बोटीने गेल्या सोमवारीं मुंबईस आले

### डॉ. मुंजे यांचें भाषण

डॉ. मुंजे आपल्या भाषणांत म्हणाले, "मीं विलायतेला गेल्यावर माझ्या गैरहजेरींत अनेक प्रकारचे माझ्याबद्दलचे गैरसमज पसरविले गेले आहेत. त्या सर्वांची जंत्री मला माझ्या स्नेह्यांनी करून दिली आहे. त्या सर्व आक्षेपांचे खंडन मी आता साधार करणार आहें. माझ्यावरील पहिला आक्षेप असा आहे कीं, सर सॅम्युएल होअर यांनीं राज्यघटना तयार करण्याकरिता गोलमेजाची पध्दति टाकून नवीन पध्दति स्वीकारली तिचा मीं इतरांप्रमाणे स्पष्ट निषेध केला नाही. या आक्षेपाला उत्तर म्हणून मी मुख्य प्रधान, भारतमंत्री व लॉर्ड सँकी यांना जें याविषयी पत्र लिहिलें तेंच पत्र आपणास दाखवितों. त्या पत्रांत मीं असें लिहिलें आहे कीं 'सर सॅम्युएल म्हणतात कीं हिंदी लोक माझ्याबद्दल नाहक गैरसमज करून घेत आहेत. सर सॅम्युएल यांना जर हिंदी लोकांचा गैरसमज होऊं नये असें वाटत असेल तर त्यांनी गोलमेज परिषदेची सल्लागार कमिटी व संयुक्त पार्लेमेंटरी कमिटी यांचें परिणामकारक सहकार्य गोलमेज परिषदेच्या पद्धतीने जोडूं व अखेरच्या निर्णयाचा विचार करण्याकरिता गोलमेज परिषद बोलावूं असें जाहीर करावें; कारण मुख्य प्रधानांनी तसें वचन दिलेलें आहे. एवढें जर सर सॅम्युएल न करतील तर मुसलमानांशिवाय इतर कोणाचेंहि सहकार्य त्यांना पुढील राज्यघटनाविषयक कामांत मिळणार नाही.' या पत्रांत मी निव्वळ सर सॅम्युएल यांनी काय केलें नाही एवढेंच दाखवून स्वस्थ बसलों नाही तर सर सॅम्युएल यांनी काय करावें व तें न केल्यास त्याचे परिणाम काय होतील हेंहि स्पष्ट केले. सर सॅम्युएल यांना मुसलमानांविना इतर कोणाचे सहकार्य मिळणार नाही असें मीं म्हटले याचा अर्थ माझें सहकार्य मिळणार नाही असा सहजच होतो. कोणीहि सहकार्य करणार नाही म्हणजे मीहि करणार नाहींच.

दुसरा आक्षेप होअरसाहेबांच्या धोरणाचा निषेध म्हणून मी कन्सल्टेटिव्ह कमिटीच्या सभासदत्वाचा राजीनामा दिला नाही असा आहे. परंतु त्या आक्षेपांत कांहीच अर्थ नाही. कारण मी बोटीवर असतां आठ दिवसांपूर्वीच भारतमंत्री व मुख्य प्रधान यांचेकडे माझा कन्सल्टेटिव्ह कमिटीचा राजीनामा पाठविला आहे. आता मी मवाळांप्रमाणे ताबडतोब राजीनामा कां दिला नाहीं हें सांगतों. मवाळांना असें वाटतें कीं, त्यांच्यावर फक्त राज्यघटनाविषयक प्रश्न सोडविण्याची जबाबदारी आहे. परंतु माझ्यावर दोन जबाबदाऱ्या आहेत. एक जबाबदारी राज्यघटनेच्या कामाची व दुसरी जबाबदारी हिंदुमहासभेच्या वतीने हिंदूंच्या हक्कांकडे लक्ष पुरविण्याची. मवाळ एकच जबाबदारी मानीत असल्याने राज्यघटनाविषयक बाबी ठरविण्याकरिता अमलांत आणलेल्या गोलमेज परिषदेच्या पद्धतीचा भारतमंत्र्यांनी त्याग केल्यावर त्यांनी आपल्या जागांचे राजीनामे दिले. परंतु ज्ञातिविषयक निर्णय तोंपर्यंत जाहीर झाला नसल्याने मी तो जाहीर होईपर्यंत करावयाचें तें काम करून तो निर्णय जाहीर होताच राजीनामा देण्याचें ठरविलें व त्याप्रमाणे मीं राजीनामा दिलाहि.

तिसरा आक्षेप असा आहे कीं, मुसलमान ज्याप्रमाणे सरकाराशीं संगनमत करून जातीय हित पाहात आहेत त्याप्रमाणे मीहि मुसलमानांवर मात करण्याकरिता सरकाराशीं अधिक संगनमत करीत आहे. या प्रश्नाबद्दलचीं माझीं मतें मी वेळोवेळीं जाहीर केलींच आहेत. हिंदुस्थानाचा अभिमान बाळगणारा तो हिंदु, मग तो धर्माने कोणीहि असो. हिंदूंना हिंदुस्थानाचें स्वराज्य मिळवावयाचें आहे हिंदूंना झगडा करण्याविना गत्यंतर नाही. मुसलमानांना मी सांगत आलो आहें कीं तुम्हांला स्वराज्याकरिता भांडावयाचें नसेल तर निदान स्वस्थ बसा. आमच्याशीं भांडावयाचें असेल तरी खुशाल भांडा. तेंहि आम्हांला परवडेल. परंतु जर कां आमच्याविरुद्ध स्वतःचा फायदा करून घेण्यासाठी इंग्रज सरकाराशीं संगनमत कराल तर मात्र लक्षांत ठेवा कीं, आमच्याशीं गांठ आहे. एकाच वेळीं तीन शत्रूंशीं लढून स्वराज्य ज्यांनी राखलें अशा मराठ्यांचे आम्ही वंशज असून त्यांचें रक्त आमच्या अंगांत खेळत आहे. डोक्यावर दिल्लीचे मोगल, समोर बंगालमधील ईस्ट इंडिया कंपनीचे इंग्रज व पाठीमागे गोव्याचे पोर्तुगीज अशा तीन शत्रूंशीं एकाच वेळीं सामना देऊन आम्हीं कांहीं काळ कां होईना पण स्वराज्य राखलें आहे याची स्मृति आम्हांला आहे. मुसलमानांना मी बजावून ठेवतों कीं, जर तुम्ही इंग्रजांशीं संगनमत कराल तर तुम्हां दोघांशींहि आम्ही एकदम झगडूं, परंतु स्वराज्य मिळवूं. सरकाराच्या कच्छपीं लागून आपला जातीय फायदा करून घेण्याचा प्रश्न हिंदूंच्या बाबतींत संभवत नाही.

माझ्यावरील चवथा आक्षेप मी राज्यघटनाविषयक मागणी मांडणारें जें पत्रक पुढे मांडलें तत्संबंधी आहे. आक्षेपकांचें असें म्हणणें आहे कीं, फायनॅन्सकरिता मीं पंधरा वर्षांचा व लष्करी

खात्याकरिता तीस वर्षांचा संक्रमणकाल सुचविला आहे. परंतु ही गोष्ट सर्वथैव खोटी आहे. मी जें पत्रक प्रसिद्ध केलें तें मीं माझ्याबरोबर आणलें आहे. त्या पत्रकांत संक्रमणकाल दहा वर्षांपेक्षां अधिक नसावा असें स्पष्ट म्हटलें आहे. महात्मा गांधींपासून यच्चयावत् सर्व पुढाऱ्यांनी मध्यवर्ती सरकारांत पूर्ण स्वराज्य मिळेपर्यंत संक्रमणकाल असणार असें म्हटलें आहे. हा संक्रमणकाल केवढा असावा हें मात्र कोणीच बोललेला नाही. संक्रमणकालाची मर्यादा ठरविली गेली पाहिजे असें मला वाटतें व ती दहा वर्षांपेक्षां अधिक नसावी असेंहि माझें मत आहे. माझें मत असें कीं, जास्तींत जास्त दहा वर्षांनंतर लष्करी खात्यासुद्धा सर्व खातीं हिंदी लोकांच्या हातीं देण्यांत यावीं. बरें संक्रमणकालांतहि व्हाइसरॉयांनां हिंदी मुख्य प्रधानाच्या सल्ल्यानें लोकनियुक्त सभासदांतून युद्धमंत्री निवडावा असें मी म्हटलें आहे. याचें कारण असें कीं, व्हाइसरॉयांचा अधिकार जर अशा रीतीनें मर्यादित केला नाही तर युद्धमंत्र्याच्या जागेवर ते एखादा सिव्हिलियनहि नेमतील. त्यांस असें करतां येऊं नये म्हणून मीं त्यांच्या निवडीचें क्षेत्र मर्यादित असावें असें सुचविलें आहे. लष्कराचा ताबा दहा वर्षांत हिन्दी लोकांच्या हातीं यावा असें मीं म्हटलेंच आहे. परंतु मी तेवढेंच म्हणून न थांबता लष्कराचें पूर्ण हिंदीकरण तीस वर्षांत करावें असें सांगितलें आहे. ही गोष्ट मीं यापूर्वीहि वेळोवेळीं पुढें मांडली आहे. व तीस वर्षांत लष्कराचें हिंदीकरण कसें करतां येईल याबद्दल हिंदुस्थानचे पूर्वीचे एक सेनापति लॉर्ड रॉलिन्सन, यांनी तयार केलेली योजना व सरकारापुढे मांडून त्यांचें तोंड बंद केलें आहे. माझ्या योजनेप्रमाणे तीस वर्षांत हिंदुस्थानाच्या सैन्याचें हिंदीकरण होऊन हिंदी सैन्याचें सेनापतित्वहि हिंदी माणसांच्या हातीं येईल. आपणापुढे मीं माझी बाजू स्पष्ट मांडली आहे. मीं केलें तें योग्य कीं अयोग्य हें आपणच ठरवा. माझें म्हणणें पटत नसेल तर मला खुशाल समुद्रांत बुडवा. परंतु मीं केलें तें बरोबर केलें असें आपणाला वाटत असेल तर मग आपण मला पाठिंबा दिल्यावांचून राहूं नका.

आपल्याला कॅनडा, ऑस्ट्रेलिया व आयर्लंड यांच्या दर्जाचें वसाहतीचें स्वराज्य पाहिजे आहे. स्वराज्य भीक मागून मिळत नसतें. तें त्याकरिता झुंजून मिळवावें लागतें. माझ्या स्वराज्यसंपादनाच्या कार्यांत मला साहाय्य करण्याकरिता महाराष्ट्रानें एक लाख स्वयंसेवक दिले पाहिजेत. माझी हाक ऐकतांच समोरचें जेवणाचें ताट टाकून माझ्या हाकेला ओ देणारे एक लक्ष स्वयंसेवक मला मिळाले पाहिजेत. मध्यप्रांताच्या चार जिल्ह्यांत दहा हजार स्वयंसेवक तयार आहेत. वऱ्हाडांतहि तितकेच स्वयंसेवक तयार ठेवण्याचें आश्वासन श्री. कोकर्डेकर हे मला देत आहेत. महाराष्ट्रानें ही माझी मागणी पूर्ण केली पाहिजे. दिल्लीला भरणारें हिंदुमहासभेचें अधिवेशन आटोपतांच महाराष्ट्रांतील कार्यकर्त्यांशीं चर्चा करून पुढील कार्यक्रम निश्चित करण्याचें मीं ठरविलें आहे.'' अशा आशयाचें डॉक्टर मुंजे यांचें भाषण आटोपल्यावर टाळ्यांचा प्रचंड गजर झाला. हिंदुमहासभेचे सेक्रेटरी श्री. गणपत राय यांनी सर्व मंडळींना दिल्लीला होणाऱ्या हिंदुमहासभेच्या अधिवेशनाला यावें अशी विनंति केल्यावर सभेचें काम संपलें.

# डॉ. मुंजे यांचें भाषण

पुणें येथील हिंदु महासभेतर्फे बुधवार ता. ७ रोजीं सायंकाळीं ६। वाजतां टिळकमंदिरांत वे. शा. सं. **चित्राववशास्त्री** यांच्या अध्यक्षतेखालीं डॉ. **बाळकृष्ण शिवराम मुंजे** यांचें 'विलायतेतील कामगिरी' या विषयावर भाषण झालें. सभेस श्रोतृसमुदाय प्रचंड जमला होता.

''मनांत उत्कट इच्छा असताहि गेल्या खेपेस मला पुण्यास येतां आलें नाही. कारण वेळ अगदींच थोडा होता. अंतःस्फूर्ति व आशीर्वाद घेण्यासाठी प्रथम गुरुगृहीं येण्याची माझी वहिवाट आहे. ती स्फूर्ति व आशीर्वाद पुण्यासच मिळतो. निवळ आशीर्वाद घेण्याचा असेल तेव्हा मी पंडित मालवीय यांजकडे जातो. पण स्फूर्ति ही मात्र गुरुगृहींच मिळते. असो. या खेपेस हें साधलें नाही. मी नागपुराहून पंजाबकडे एका साध्या कामाकरिता गेलो. तें काम कोणतें होतें हें आपणांस माहीत आहे. गो. मे. परिषदेंत जातवारीच्या प्रश्नाबाबत तेढ उत्पन्न झाल्यामुळे अडचण उत्पन्न झाली होती. देशांतील सर्व अल्पसंख्य म्हणविणारांनी आपला एक गट करून आपल्यास राजकीय हक्क काय पाहिजेत याची मागणी केली होती. व या शे. ४८ लोकांची मागणी बहुसंख्य हिंदूंना अमान्य करून चालणार नाही असाहि एक देखावा उत्पन्न केला होता. यामुळे महात्मा गांधींसारख्या मनुष्यास सात्विक संताप आला. 'ज्या लोकांनी ही मागणी केली आहे ते त्या त्या अल्पसंख्य म्हणविणारांचे प्रतिनिधि आहेत कीं नाही हें मी हिंदुस्थानांत गेल्यावर दाखवीन. ते

अल्पसंख्याकांचे खरे प्रतिनिधिच नव्हत' असें जेव्हा महात्माजींनी सांगितलें तेव्हा मला फार आनंद झाला. महात्माजी अगोदर हिंदुस्थानास आले. मी १५ दिवसांनंतर येथें आलों. वरील प्रश्नाची वाटाघाट करण्यासाठी महात्माजींची भेट घ्यावी अशी इच्छा होती. पण महात्माजींना बंदिवास घडल्यामुळे सर्वच राहिलें. पुढे काँग्रेसवाल्यांना या बाबतींत कांही करतां येईल की नाही याबद्दल विचारलें. पण त्यांच्याकडून नकार आल्यावर हें काम करण्यास मी तयार झालों. पुढे अस्पृश्य समाजाबद्दल विचार करूं लागलों, तेव्हा ऋषिप्रणीत सनातन धर्मांत अस्पृश्य शब्दास स्थान नसल्याची खात्री झाली. तेव्हा धीर आला. हिंदुसमाजांतील हा दोष विदेशांत फार अडतो. तेथे आपल्या धर्मावर या बाबतींत विनाकारण हल्ले चढविले जातात, व त्याचा परिणाम तिकडील लोकांवर फार होतो. असो, पण या बाबतींत आता माझी खात्री झाली आहे की आपला सनातन धर्म नामशेष होणार नाही.

पुढे दिल्लीस कन्सल्टेटिव्ह कमिटीच्या बैठकीस गेल्या वेळीं रा. ब. राजा यांची भेट घेतली. त्यांनीहि आपल्या मतांत परिवर्तन झाल्याचें कबूल केलें. त्यांनी संयुक्तमतदारसंघच राष्ट्रास उपकारक असल्याचें कबूल केल्यामुळे आम्ही दोघांनी एक पत्रक त्याबाबत प्रसिद्ध केलें.

### राजा–मुंजे करार

या पत्रकाचा परिणाम अपेक्षेप्रमाणे झाला. एका युरोपियन गृहस्थाने मला याबद्दल कुटिलकारस्थानपटु मॅकेव्हिली याची पदवी बहाल केली. मीहि तोच आहेर त्यांस तसाच परत केला हें सांगणें नकोच. उत्पन्न झालेल्या परिस्थितीशीं झगडण्याकरिता कांही तरी तोड सुचविण्यासाठी मी जातिनिष्ठ अशा पंजाब प्रांतांत गेलों. लाहोरास मुक्काम केला. तेथील हिंदू, शीख व ख्रिश्चन यांमध्ये तडजोड करण्याचा प्रयत्न केला. तो कांहीसा यशस्वी झाला. पण मध्यंतरीं डॉ. अंबेडकर हे विलायतेस गेल्याची हकीकत मीं पत्रांतून वाचली. तेव्हा विजेचा धक्का बसतो तसें मला एकदम झालें. म्हणून लगेच पुढच्या तयारीबद्दल राजा नरेंद्रनाथ यांच्याबरोबर वाटाघाट करून १३ तारखेस आगबोट गांठली व जातांना लोकांच्या माहितीसाठी एक पत्रक प्रसिद्ध केलें. त्यांत इंग्रज सरकार हिंदुस्थानचें राज्य आपल्या स्वाधीन केव्हा करील याबद्दल माझें म्हणणें काय आहे याचें दिग्दर्शन केलेलें आपल्यास माहित असेल. क्लाईव्हसारख्या मुत्सद्यांनी ज्या कारवाईनें हें राज्य कमावलें ती सर्व कारवाई खर्ची पडून तिचा कांही उपयोग होणार नाही अशी जेव्हा राज्यकर्त्यांची खात्री होईल तेव्हा ते राज्य आपल्या स्वाधीन करून चालते होतील असें मीं त्या पत्रकांत म्हटलें होतें. हें मी सहज आपल्या आता ध्यानांत येण्यासाठीं सांगितलें. विलायतेस जातांना मी रा ब. राजा यांना मुंबईस अ. भा. अस्पृश्य वर्गाची परिषद भरवून राजामुंजे करारास पाठबळ मिळविण्यास सांगितलें होतें. त्याप्रमाणे तेथे सभा होऊन त्यांस यश आलें. पण ही हकीकत विलायतेच्या पत्रांत प्रसिद्ध झाली नाही. तेव्हा या बाबतींत मी लंडन टाईम्सच्या संपादकाची गांठ घेऊन त्यास ती बातमी दिली. त्याने डॉ. मुंजे असें असें सांगतात म्हणून मुंबईच्या परिषदेची बातमी आपल्या पत्रांत दिली. मुंबईच्या परिषदेंत पास झालेल्या ठरावाची एक नक्कल कॅबिनेटचे सभासद व मुख्य प्रधान यांच्याकडे मी पाठविली.

नंतर कांही दिवसांनी एक दोन युरोपियन मुत्सद्दयांची गांठ पडून त्यांच्याबरोबर संयुक्त मतदार संघ दिला तर काय परिणाम होईल या प्रश्नाची वाटाघाट झाली. एकाने तर मला असें स्पष्ट विचारलें कीं, 'अहो, जर संयुक्त मतदारसंघ दिला तर डॉ. अंबेडकर निवडून येतील काय?' डॉ. अंबेडकर हे हुषार व त्यांच्या जातींमध्ये नाणावलेले गृहस्थ असल्याने निवडून येण्यास हरकत येणार नाही असें मीं त्यांना सांगितलें. मुसलमानांच्या प्रश्नासंबंधानेहि वाटाघाट झाली. मुसलमानांतील एक पुढारी तेथे तळ देऊन बसलेले आपल्यास माहित आहेतच. त्यांची गांठ पडली. त्यांच्याबरोबर सुखदुःखाच्या गोष्टी होऊन नंतर मुद्दयाच्या प्रश्नावर चर्चा झाली. त्या वेळीं मीं त्यांस स्पष्ट बजावलें कीं नैतिक विजय आम्हांस मिळेल, व व्यावहारिक विजय तुम्हांस मिळेल. याप्रमाणेच आता झालें हें सांगण्याची कांही गरज नाही.

इंग्लंडमध्ये राहून मला जें कांही हिंदु समाजाबद्दल करतां येण्यासारखें होतें तें मी केलें व मला सांगण्यास आनंद वाटतो कीं, अस्पृश्य समाज हा हिंदुसमाजांत कांहीसा अंतर्भूत झाला ही मी परमेश्वराची कृपा समजतों. हिंदुमहासभेच्या पुण्याईने ही गोष्ट पार पडली असें मला वाटतें. इतर देशांकडे पाहिलें असता तेथील धर्माच्या व संस्कृतीच्या रक्षणाची जबाबदारी तेथील राज्यकर्त्यांवर असते. पण येथील परिस्थिति अगदीच वेगळी. हिंदुमहासभेसच ही गोष्ट अंगावर घेणें भाग आहे व खरोखर त्याच सभेच्या पुण्याईने हिंदु समाजाचे आणखी लचके पडले नाहीत ही संतोषाची गोष्ट आहे. असो, जी परिस्थिति येईल तिच्याशीं टक्कर देण्याची महाराष्ट्राची चाल जुनीच आहे व महाराष्ट्र ती स्फूर्ति आपल्यास देवो, अशी परमेश्वराची प्रार्थना करून मी आपली रजा घेतों."

# सर्वारिष्टशांत्यर्थ श्रीगणपत्यथर्वशीर्ष–जपानुष्ठान

हें अखिल महाराष्ट्रांत सुरू करण्यांत आलेलें अनुष्ठान १ कोटी जपसंख्या होईपर्यंत सतत चालावयाचें आहे. यासंबंधी श्रावण महिन्यांत नाशिक येथे श्रीस्वामी १०८ श्रीउत्तराधि मठाधीश श्रीमान देवनायकाचार्यजी महाराज यांच्या अध्यक्षतेखाली भरलेल्या अखिल भारतीय स्वरूपाच्या वैदिक मंत्रशास्त्रीय परिषदेंत खालीलप्रमाणें ठराव पास झाला आहे—

" यह सभा अखिल भारतीय जनतासे अनुरोध करती है कि आजके समयमें अखिल भारत वर्षके कल्याणार्थ वर्णाश्रमधर्मानुसार विघ्नहर्ता श्रीगणेशजीके मंत्र का अनुष्ठान करनेके लिये शीघ्रातिशीघ्र प्रारंभ करें. "

याचा सारांश हा कीं, अखिल हिंदुस्थानाच्या कल्याणार्थ सर्व जनतेने श्री. सिद्धि विनायक गजाननाच्या मंत्राचे (श्री गणपति अथर्वशीर्षाचें) अनुष्ठान ताबडतोब सुरू करावें अशी ह्या परिषदेची जनतेस विनंति आहे.

या ठरावास अनुसरून श्रीक्षेत्र नाशिक येथें श्रीगणेशचतुर्थीपासून श्री बाळकृष्ण महाराज यांच्या नेतृत्वाखाली श्रीगणपतिअथर्वशीर्ष जपानुष्ठान सुरू करण्यांत यावयाचें आहे.त्याचप्रमाणे अद्याप ज्या ज्या ठिकाणीं हें अनुष्ठान सुरू झालें नसेल त्या त्या ठिकाणच्या धर्माभिमानी व्यक्तींनी पुढाकार घेऊन ताबडतोब हें अनुष्ठान आपल्या गांवीं सुरू करण्याची व चालू ठेवण्याची तसदी घ्यावी अशी सर्वांस नम्र पण आग्रहाची विनंति असून ज्या ज्या ठिकाणीं हें अनुष्ठान सुरू आहे त्यांनी तें तसेंच चालू ठेवावें अशी प्रार्थना आहे.

पंडित **रघुनाथशास्त्री पटवर्धन**
**शुक्रवार पेठ,पुणे.**

# औद्योगिक शिक्षणाकरिता शिष्यवृत्त्या

( ले.—एक माहितगार )

ता. १०–४–३२ रोजीं पुण्यास श्रीशिवाजीमंदिरांत श्री. शंकरराव दाते यांचा ते परदेशांतून मोनोटाईपचें यंत्र बनविण्याची विद्या संपादन करून परत आले त्याबद्दल जाहीर सन्मान झाला त्यावेळीं त्यांनी आपलें भाषणांत केलेली सूचना फार महत्त्वाची आहे. ते म्हणाले " परदेशांत शिक्षणासाठी जाण्याची इच्छा करणारे अनेक विद्यार्थी असतात;परंतु द्रव्याभावामुळे त्यांना जातां येत नाही. पुष्कळजणांजवळ या कार्यास देण्यासाठी फंडहि असतात. परंतु उभयतांची गांठ पडत नाही. त्यामुळे कोणाचाच हेतु साध्य होत नाही. तरी उभयतांची गांठ घालून देणारी एखादी संस्था असणें फार जरूर आहे. लोकांनी विशेषतः कॉलेजांतील अध्यापकांनी या सूचनेकडे अवश्य लक्ष द्यावें."

वरील प्रकारच्या संस्थेच्या अभावीं पुरेसे विद्यार्थी शिष्यवृत्त्या मागण्यास न आल्यामुळे भुसावळचे कै. बाळकृष्ण हणमंत वकील यांच्या फंडांतील शिष्यवृत्तीची बचत रक्कम रु. १०,०९५ वाया गेली व यापुढेहि मागणीदाराचे अभावीं सदर शिष्यवृत्तीचे दरसाल रु. २७२० व्यर्थ जाऊं नयेत म्हणून त्या फंडाची खालील हकीकत कळवीत आहें.

भुसावळ येथील सुप्रसिद्ध वकील कै. बाळकृष्ण हणमंत यांनी आपले मृत्युपत्रान्वयें दरसाल रु. ६०० ची औद्योगिक किंवा शेतीचे शिक्षणास परदेशीं जाणारे विद्यार्थ्यांकरिता एक शिष्यवृत्ति ठेविली व आपलें कुटुंब व सुना वगैरेकरिता ठेविलेल्या दरसालच्या रकमाहि त्यांचे हयातीनंतर सदर शिक्षणाकरिता दर विद्यार्थ्यास दरसाल रु. ६०० प्रमाणें शिष्यवृत्त्या देण्यांत खर्चाव्या अशी योजना करून ठेविली. त्याप्रमाणे हल्लीं दरसाल रक्कम रु. २७२० शिष्यवृत्त्या देण्यासाठी तयार असते. व मागील सालांत मागणी करणारे पुरेसे विद्यार्थी पुढे न आल्यामुळे रु. १००९५ शिल्लक राहिले.

**शिष्यवृत्तीच्या शर्ती**

(अ) ज्या धंद्याचें शिक्षण घेण्यास परदेशीं जाणें असेल त्या धंद्याचें हिंदुस्थानांत मिळण्यासारखें असेल तें सर्व ज्ञान विद्यार्थ्यानें येथेंच मिळवावें व जास्त ज्ञानाकरिता परदेशीं जावें.

(ब) परदेशांतून विद्या मिळवून आल्यावर सरकारी नोकरींत न शिरतां ज्या धंद्याचें ज्ञान त्याने मिळविलें असेल तो धंदा येथे उभारण्याचा प्रयत्न करून तो चालवावा.

(क) त्याला जेवढी स्कॉलरशिपद्वारा रक्कम मिळाली असेल तेवढी रक्कम त्याने आपल्या हयातींत दुसऱ्या विद्यार्थ्यास वरील एखादा धंदा शिकवून आणण्यास खर्च केली पाहिजे. स्कॉलरशिप देण्या-

पूर्वी या कलमांतील शर्ती पाळण्यासंबंधाने त्याचे-कडून कायदेशीर बंधन करून घ्यावें व तें शक्य नसल्यास निदान नैतिक बंधन तरी करून घ्यावें.

( ड ) स्कॉलरशिप सामान्यतः दरविद्यार्थ्या-संबंधानें ३ वर्षे चालू राहावी.

सदर फंडाचे ट्रस्टी जळगांवचे श्री. जुवेकर वकील, भुसावळचे श्री. पाटणकर, दास्ताने व कानडे हे वकील व मूळचंद धनजीशेठ व्यापारी असे आहेत.

या स्कॉलरशिप फंडांतील वर लिहिलेली बचत रु. १००९५ ही मयताचे इस्टेटींतील खर्च न झालेली रक्कम आहे व तिचे आपण वारस आहोत सबब ती आपणांस मिळावी असा कै. बाळकृष्ण हणमंत यांचे दत्तक पुत्रानें जळगांव डि. कोर्टांत अर्ज केला व त्याचा निकाल त्याचे वतीनें झाला.

देशांतील ठिकठिकाणचे वरील प्रकारचे मदत फंड व त्यांच्या शर्ती यांची संकलित माहिती देणारी एखादी संस्था, छापील पत्रक अगर पुस्तक नसल्यानें त्या फंडाची व्यक्तिशः निरनिराळी माहिती काढण्यांतच धंदेशिक्षणार्थ परदेशीं जाणाऱ्या गरीब परंतु हुषार अशा होतकरू विद्यार्थ्यांचीं ऐन उमेदींतील प्रत्येकीं एक-दोन वर्षे फुकट जातात.

# एका पाणाड्याचा अनुभव

( ले. विठ्ठल हरि मोहोळकर, डेंटिस्ट पंढरपूर )

ता. ८ जुलै १९३२ च्या केसरींत ‘पाणाड्याचें कसब’ हा लेख श्री. श्रीपाद महादेव माटे यांचा आलेला आहे. त्यांत अनुभविक पाणाड्यांनी आपली माहिती द्यावी अशी सूचना केलेली आहे. तिला धरून पुढील माहिती मी देत आहे.

मी एक पाणाडी आहें. गेल्या १४।१५ वर्षांपासून मी बऱ्याच विहिरी दाखविलेल्या आहेत. ही विद्या नैसर्गिक मजजवळ आहे याची मजला प्रथम खात्रीच पटेना !! पण ग्रेटनप्रमाणे मलाहि रान फिरतांना कोठे कोठें सूक्ष्म आचके बसत. असें ठराविक स्थळींच कां होतें याचा अनुभव घेण्यास ४।५ वर्षे लागलीं. नंतर मी लोकांस पाणी सांगू लागलों; पण माझेवर विश्वास ठेवून विहिरीचा खर्च करण्यास कोणीच धजेना. मग लक्ष ठेवून नव्या विहिरी कोण कोठें खोदतो याचा तपास ठेवून त्या जागीं जाऊन तेथील झऱ्याचा व पाण्याचा अजमास आपले मनाशीं ठरल्यावर त्यांना तो आगाऊ सांगावा व नंतर विहिरीचें काम पूर्ण झाल्यावर लोकांस खरें दिसावें. याप्रमाणे ३–४ वर्षे गेल्यावर माझी व लोकांची खात्री झाली. माझा अंदाज शेंकडा ८० टक्के बरोबर येऊं लागला.

जशी चित्रकला नैसर्गिक असूनहि अभ्यासानें तिला पूर्णत्वाला नेतां येते, त्याप्रमाणे ही पाणी शोधण्याची कला नैसर्गिक असून अभ्यासानें बरीच वाढवितां येते असा माझा अनुभव आहे.

ही पाणी पाहण्याची पाणाड्यांची विद्या जडशास्त्रांतली नाही, हा एक योगशास्त्राचा भाग आहे, ही माझी खात्री झालेली आहे. हा योग कित्येकांना जन्मतःच असतो व तिचा संबंध मागील अनेक जन्मांशीं असावा. ज्यांना ही नैसर्गिक देणगी नाही अशांनी योगशास्त्राचा म्हणजे मनाचे एकीकरणाचा अभ्यास करून मग ही विद्या नैसर्गिक पाणाड्याकडून हस्तगत करून घेता येणें शक्य आहे असा माझा समज आहे.

### पाणाड्यास पाणी कसे समजते ?

भूगर्भांतून जलप्रवाह वाहत असतात व त्या प्रवाहाबरोबर विद्युत्चैतन्यहि वाहात असतें व त्याचें सूक्ष्म आंदोलन भू–पृष्ठावरहि सूक्ष्मपणें अनुभवास येतें.

ज्या मानानें झऱ्याची वाहाणी कमी अधिक जोराची व लहान मोठी असते त्या मानानें कमी अधिक जोरानें आंदोलन भू–पृष्ठावर होत असतें. व ज्या मानानें तें कमी जास्त बळानें येत त्या मानानें पाणी वर किंवा खोल असतं; पण हीं आंदोलनें जाणण्यास भूमीशीं योगयुक्त समरस व्हावें लागतें. म्हणजे मी आणि भूमि भिन्न नाही, अखंड एकच आहोंत अशी भावना व्हावी–किंवा असावी लागते; म्हणजे मग भूर्भातील पाण्याच्या विद्युत्चे प्रवाह थेट आपल्या पायामधून मस्तकापर्यंत पोंचतात व पाणी पाहणाऱ्या पाणाड्यास झटके बसतात किंवा मेंदूच्या सूक्ष्म रक्तवाहिन्यांस भूमिगत ज्ञान होतें.

शेतकीखात्यानें पाणी शोधण्याचें वॉटर–फाइंडर म्हणून जें यंत्र काढलें आहे, तें जवळ जवळ याच विद्युत् तत्त्वावर आहे. पण तें हमखास पाणी दाखवीत नाही. माझ्या मतें या कामीं जड यंत्रापेक्षां मानवी जिवंत यंत्रच अधिक खात्रीनें काम करील.

पाणी शोधतांना जवळ रॉड किंवा तसलेंच एखादें विद्युत्–वाहक हत्यार असावेंच लागतें, असा कांही नियम असावा असें मला वाटत नाहीं. मनुष्य

स्वतःच विद्युत्-वाहक आहे, हा रॉडचा प्रश्न भावनेचा आहे.

आपल्या इकडे फार जुन्या देवीच्या अगर खंडोबाच्या देवळामागे एका मोठ्या साफ धोंड्यावर मध्ये थोडा खोलगा करून त्यावर दगडाची भली मोठी गोटी बसविलेली असते. श्रद्धाळू लोक गोटीवर शकून पाहात असतात. शकून पाहतेवेळीं त्या गोट्यास दोहोंकडून दोन्ही हातांनी हलका स्पर्श करून ठेवतात व मनांत घोकतात कीं, काम होणार असेल तर उजवी दे नाही तर डावी दे... ... ...

थोड्याच वेळांत तो गोटा उजवीकडून किंवा डावीकडून गरगरा फिरल्याचें स्पष्ट दिसतें. हा प्रयोग बहुतेकांनी पाहिलेलाच असेल; वास्तविक ती शक्ति त्या गोट्याची नसून शकून पाहणाऱ्याच्या मनोभावनेचीच असते.त्याच गोट्याप्रमाणें पाश्चिमात्य पाणाड्यांचा रॉड फिरत असला पाहिजे.

चार-पांच वर्षांपूर्वी मुंबई सरकारानें दरमहा दोन-अडीच हजार पगारावर रॉड चालविणारे इंग्रज पाणाडी मि. फॉकसन यांना नेमलें होतें. त्यापेक्षा नैसर्गिक पाणाड्यासाठी द्रव्य खर्च केलें तर जनतेचा कायमचा अधिक फायदा होईल व एका इंग्रज पाणाड्याच्या पगारांत ५०-६० पाणाडी उत्तम कायमचे तयार राहतील. पाश्चिमात्य या कामीं सैतानास महत्त्व देतात तसेंच इकडेहि पाणाड्यास कर्णपिशाच अनुकूल असतें व तें त्याच्या कानांत पाणी सांगते असा कांहींचा समज आहे. कांहींचा समज असा आहे कीं, पाणी पाहणारा पाणाडी पायाळू असतो. त्याशिवाय त्याला भूमिगत पाणी, द्रव्य वगैरे दिसत नाही पण माझ्या मतें या दोनहि कल्पना फोल आहेत. मी स्वतः पायाळू नाही व पुष्कळ पायाळू माणसें या हेतूनें मी तपासलीं आहेत.

# इंग्लंडच्या हिताकरिता हिंदुस्थानचा बळी

सुप्रसिद्ध इंग्रज कवि व कादंबरीकार गोल्डस्मिथ यानें 'व्हिकार ऑफ वेकफील्ड' नांवाची एक सुंदर कादंबरी लिहिली आहे. या कादंबरींतील मोझेस नांवाच्या मुलाला त्याच्या घरचा एक उमदा व देखणा घोडा शेजारच्या गांवीं भरणाऱ्या जत्रेंत विकण्याची कामगिरी सांगण्यांत आली. आपला मोझेस मोठा हुशार असून व्यापाराच्या व देवघेवीच्या कामांत तर तो फारच चाणाक्ष आहे अशी त्याच्या आईची समजूत असल्यामुळेच त्याची या सौद्यावर नेमणूक झाली होती. तिची कल्पना थोडीबहुत खरीहि होती. परंतु या खेपेस जत्रेच्या जागीं एक जटाजूटधारी पायघोळ संत त्याला भेटला. व त्या संताच्या उपदेशाप्रमाणे त्याने घोडा देऊन त्याच्या बदली शेंकडो हिरवे चष्मे विकत घेतले. या चष्म्यांना चांदीच्या कडा होत्या, व त्यांची घरेंहि सुरेख होतीं. हा सौदा करून मोझेसची स्वारी घरीं परत आली तेव्हा सर्वांस आश्चर्य वाटलें! ओटावा येथील परिषदेंत सर अतुल चतर्जी यांच्या नेतृत्वाखाली गेलेल्या हिंदी प्रतिनिधींचा सौदा व वर सांगितलेला मोझेसचा सौदा यांत म्हणण्यासारखा फरक नाही असें तेथे झालेल्या व्यापारी कराराचा जितका अधिक विचार करावा तितकें अधिक वाटूं लागतें; पण मौजेची गोष्ट ही कीं, या असल्या आंतबट्ट्याच्या व सर्वस्व लुबाडन नेणाऱ्या सौद्याची हिंदुस्थानसरकाराचे सध्याचे व्यापारी मंत्री सर सी. पी. रामस्वामी अय्यर व व्हाइसरॉय मनमुराद स्तुति करीत आहेत!

व्हाइसरॉयसाहेबांनी गेल्या आठवड्यांत केलेल्या भाषणांत या ओटावा परिषदेची कुळकथा थोडीशी सांगून हिंदुस्थानाचे प्रतिनिधि असल्या या महत्त्वाच्या परिषदेला हजर राहणें किती जरूरीचें होतें हें विशद केलें. हिंदुस्थानसरकारानें या व्यापारी तहाच्या बाबतींत त्यांना कुलमुखत्यारी दिली होती,व आज जो तह सर अतुल चतर्जी यांनी केला आहे तो त्यांना हिंदुस्थानाच्या दृष्टीने हितावह वाटतो म्हणून केला असेंहि सांगून व्हाइसरॉयसाहेब उपरणें झाडून मोकळे झाले आहेत. ह्या तहानें हिंदुस्थानाचें कोटकल्याण होणार असलें तरी लेजिस्लेटिव्ह असेंब्लीनें पसंत केल्याशिवाय नव्या जकाती बसविल्या जाणार नाहीत अगर जुन्याहि कमी केल्या जाणार नाहीत असेंहि आश्वासन त्यांनी दिलें व आपला निस्पृहपणाचा टेंभा मिरविला. सरकार लवकरच नवें बिल पुढे आणील. तें तुम्ही पसार करावा न करा; पसार केलें तरी कोणत्याहि पक्षानें सहा महिन्यांची नोटीस देऊन हे करार रद्द करता येण्याची व्यवस्था त्या तहांतच असल्याकारणानें नव्या राज्यघटनेच्या अमदानींत हा तह त्या वेळच्या सरकारानें त्यांना पसंत असेल तर राहूं द्यावा नाही तर तो रद्द करावा असें व्हाइसरॉयसाहेबांचें मत आहे.

या राजकीय डावपेचाच्या गोष्टी येथेच सोडून देऊन ओटावा येथील व्यापारी तहाचें थोडेसें पृथक्करण करून पाहिल्यास या तहानें खोबरें इंग्लंडच्या पोटांत जाणार व त्या खोबऱ्याची आई हिंदुस्थानाच्या हातीं राहाणार असें दिसतें. सर सी. पी. रामस्वामी व व्हाइसरॉय म्हणतात कीं, हिंदी

मालाला यापुढे इंग्रजी बाजारपेठ जकातीव्यतिरिक्त मोकळी झाली हा फायदा फार मोठा आहे. परंतु या कोटिक्रमांत फारसा अर्थ नाही. इंग्लंडचा मुख्य व्यापार हा आहे कीं, बाहेरून कच्चा माल आणवावा व त्याचा पक्का माल बनवून तो पुनः परदेशांत पाठवावा. या उलाढालींत पक्क्या मालाची म्हणून वाढलेली किंमत घ्यावयाची व त्याबरोबरच स्वतःच्याच गलबतांतून तो माल जावयाचा असल्यामुळे त्याच्या वाहतुकींतील नफा, शिवाय ह्या मालाचा विमा व हुंड्या पाठविण्यांत मिळणारी हुंडणावळ वगैरे बाबतींतील नफ्याचें लोणीहि गट्ट करावयाचें. अशा परिस्थितींत हिंदुस्थानाच्या कच्च्या मालावर जकाती बसवून तो माल तेथील कारखानदारांना महाग पडेल अशी व्यवस्था करण्याइतके इंग्रजी मुत्सद्दी व व्यापारी कांही दुधखुळे नाहीत. हिंदुस्थानाच्या मालाला आपले दरवाजे सताड उघडे ठेवण्यांत इंग्लंडचें हितच आहे. आमचा कोंडा व तुमचे पोहे हे आपण सरमिसळ करून खाऊं असें म्हणणाराच्या धूर्तपणावर कडी करणारा हा कावेबाजपणा आहे यांत शंका नाही.

याहिपुढे जाऊन या प्रकरणाची शहानिशा केली असता इंग्लंडच्या आणखी खुब्या नजरेस येतात. इंग्लंडने हिंदुस्थानाला व हिंदुस्थानाने इंग्लंडला जकातीच्या सवलती सारख्या प्रमाणांत द्यावयाच्या असें ठरलें आहे. १९३०—३१ च्या आंकड्यांवरून स्थूल मानाने असें म्हणतां येईल कीं, हिंदुस्थानाच्या साडेएक्केचाळीस कोटी रुपयांच्या मालावर इंग्लंड जकात बसविणार नाही. याचाहि अधिक खोल दृष्टीने विचार केल्यास असें आढळून येतें कीं, या साडेएक्केचाळीस कोटींपैकीं वीस कोटी रुपयांचा चहाच आहे. चहाच्या व्यापारापैकीं शेंकडा नव्वद टक्के व्यापार इंग्रजांच्या हातीं आहे. मळेवाले इंग्रज, भांडवल इंग्रजी, मळ्यावरील व कारखान्यांवरील मोठ्या पगाराचे नोकर इंग्रज, वाहतूक इंग्रजी जहाजांतून आणि विमा व पैशाची देवघेव हीहि इंग्रजी कंपन्यांतून व इंग्रजी बँकांतून. चहाचे मळे हिंदुस्थानांत आहेत व काम करणारे मजूर हिंदी यापलीकडे त्या व्यापारात हिंदुस्थानाचा संबंध नाही. तेव्हा अशा परिस्थितींत जो साडेएक्केचाळीस कोटींचा आंकडा दिसतो त्यात या चहाचा वीस कोटींचा आंकडा बाद केलाच पाहिजे. जो दहा टक्के चहाचा व्यापार व पैदास हिंदी माणसांच्या हातीं आहे त्यांतहि भांडवल युरोपियन व नोकरवर्गहि युरोपियनच आहे. तात्पर्य, हे दहा टक्के फारसे लक्षांत घेण्याइतक्या महत्त्वाचे नाहीत. चहानंतर जो हिंदी कच्चा माल मोठ्या प्रमाणांत परदेशीं जातो त्यात कमावलेलीं व कच्चीं कातडीं, ताग व इतर बारीकसारीक जिन्नस, गळिताचीं धान्यें वगैरे येतात. पण या सर्व जिनसांना इंग्रजी बाजारपेठेंत दुसरा कोणी प्रतिस्पर्धीच नसल्याने यावरील जकात माफ केली काय व न केली काय सारखीच आहे. कारण इंग्लंडाला या बाबतींत हिंदुस्थानाशिवाय सत ना गत अशी स्थिति आहे. तात्पर्य, ह्याहि मालाचा अंतर्भाव या सवलतींत न केल्यास शिल्लक काय तो दहा कोटींचाच माल राहतो. पण एवढ्या आवळ्याकरिता केवढा कोहळा इंग्रज हिंदुस्थानाकडून काढीत आहेत हें पाहिलें म्हणजे हिंदी प्रतिनिधींच्या भोळेपणाची व या तहाची स्तुति करणाऱ्या व्हाइसरॉयांच्या वस्तादगिरीची मात्र साक्ष उत्तम पटते !

हिंदी उद्योगधंद्याच्या उन्नतीच्या दृष्टीनेहि या प्रश्नाकडे पाहिलें पाहिजे. कलकत्त्याचे सुप्रसिद्ध व्यापारी श्री. घनश्याम दास बिर्ला यांनी या बाबतींत एक मोठें पत्रक काढून ह्या प्रश्नांची उत्तम छाननी केली आहे. त्यांत ते म्हणतात कीं, हिंदी उद्योगधंद्याची वाढ करून शेतकीवरील बोजा उठविणें अत्यंत अगत्याचें आहे. हा स्वदेशी उद्योगधंद्याचा प्रश्न हिंदुस्थानाच्या जिव्हाळ्याचा आहे. परंतु या व्यापारी तहाचा नीट विचार केला असता असें स्पष्ट दिसतें कीं, आमच्या स्वदेशी कारखान्याशीं टक्कर देण्याचीहि सवलत त्यांत गर्भित आहे. आजच इंग्रजी पोलाद व लोखंड यांना सवलत आहे व यापुढे या तहाच्या जोरावर जर इंग्रजी कापडावरील जकात कमी झाली तर मात्र २६ कोटी रुपयांहून अधिक किंमतीच्या स्वदेशी मालाला ठोकर बसल्याशिवाय राहणार नाही असें आंकडे देऊन श्री. बिर्ला यांनी सिद्ध केलें आहे. ते म्हणतात कीं " इंग्लंडमध्ये ज्या आमच्या मालाला सवलत मिळणार आहे त्या मालामुळे इंग्लंडाच्या धंद्याला धक्का बसत नाही. पण हिंदुस्थान ज्या मालाला सवलती देणार आहे त्या मालामुळे हिंदी उद्योगधंद्याला मात्र मोठीच ठोकर बसेल !" सोन्याचीं अंडीं घालणारी ही हिंदी धंद्याची हंसी अगोदरच रुग्णशय्येवर आहे व या करारामुळे तर ती मृत्युशय्येवर पडणार असें भाकित श्री. बिर्ला यांच्या या पत्रकावरून एका आंकडेशास्त्रज्ञाने केलेलें आहे तेच बरोबर वाटतें. अशा रीतीने इंग्रजी कारखान्यांच्या सोयीकरिता व इंग्लंडाचें स्वयंपाकघर खाण्याच्या जिनसांनी भरलेलें राहावें याकरिता इंग्रज व्यापारी व मुत्सद्दी प्रयत्न करीत असता आमच्या या नामधारी प्रतिनिधींनी मात्र इंग्रजांकडून मिळणाऱ्या काल्पनिक नफ्याच्या मनोराज्यांत गर्क होऊन हिंदुस्थानाचें गिऱ्हाईक घालविलें जाईल व स्वतःच्या उद्योगधंद्यांत अड-

चणी उभ्या राहतील असला तह करावा ही केवळ शोचनीयच नव्हे तर लाजिरवाणी गोष्ट होय.

ओटावा येथील व्यापारी तहाचा आणखी एका दृष्टीने विचार करणें प्राप्त आहे. १९३० सालीं हिंदुस्थानांत परदेशांतून अठरा कोटी सत्तर लक्ष पौंड किंमतीच्या मालाची आयात झाली. यापैकीं आठ कोटी वीस लक्ष पौंड किंमतीचा माल इंग्लंडाचा होता. बाकीचा म्हणजे दहा कोटी पन्नास लक्षांचा माल इतर देशांचा होता. हे इतर देशच हिंदुस्थानाचा कच्चा माल मोठ्या प्रमाणांत विकत घेतात. आता यापुढे इंग्लंडाच्या मालाला सवलती मिळाल्या तर हे इतर देश पूर्वीइतका हिंदुस्थानाचा माल घेणार नाहीत. तसेंच नव्या जकातींचा प्रतिकार करण्याकरिता म्हणून जर त्यांनी हिंदुस्थानांतील मालावर बहिष्कार घातला तर हिंदुस्थानाची वाट काय होणार ? या तहाच्या वेळीं कानडा वगैरे वसाहती व खुद्द इंग्लंड यांचे प्रतिनिधि फार सावध होते. पण हिंदी प्रतिनिधींचें मात्र अवधान ठिकाणावर नव्हतें. कानडाने अशी अट स्पष्ट घातली आहे कीं, जकाती कमी करावयाच्या अगर वाढवावयाच्या हें कानडाच्या त्या त्या वेळेच्या आर्थिक परिस्थितीवर अवलंबून राहील. शिवाय कानडाने इतर देशांशीं स्वतंत्र तह करण्याचा आपला हक्क या तहाने गमाविला नाही. इंग्लडने तर या दुसऱ्या बाबतींत सावधगिरी ठेवली आहे इतकेंच नव्हे, तर ओटावा परिषद संपताच त्याने इतर राष्ट्रांशीं तह कसे करावयाचे याची वाटाघाटहि सुरू केली आहे. पण या दृष्टीने हिंदुस्थानाची स्थिति काय ? हिंदुस्थानास इतर देशांशीं तह करतां येत नाहीत व हिंदुस्थानसरकार जकातीचा प्रश्न निकालांत निघाल्यावर या प्रश्नाकडे अगर हिंदी उद्योगधंद्याच्या वाढीकडे मुळीच पाहणार नाही ही गोष्ट अनुभवाचीच आहे. म्हणून इतर देशांबरोबर हिंदुस्थानसरकार कोणते करार करीत आहे याचें ज्ञान करून घेतल्याशिवाय या व्यापारी तहाला हिंदी कायदेमंडळाच्या लोकप्रतिनिधींनी संमति देऊं नये, असा श्री. मनु सुभेदार यांचा आग्रह आहे.

हिंदुस्थानाच्या सध्याच्या सांपत्तिक स्थितीकडे पाहता या ओटावा येथील तहाच्या अटीप्रमाणे इंग्रजी मालावरील जकाती उठवून किंवा परकीय मालावर त्या अधिक बसवून, हिंदुस्थानसरकाराचा कसा काय निभाव लागणार समजत नाही. जकाती कमी केल्या तर उत्पन्न बुडतें. तेव्हा ह्या जकातीमध्ये फेरबदल न करता ब्रिटिशेतर मालावरील जकातीच वाढविणें श्रेयस्कर आहे. पण हें केलें असता त्यामुळे हिंदुस्थानांत इंग्लंडशिवाय इतर देशांतून जो माल येतो तो महाग विकला जाईल. म्हणजे हा सर्व बोजा हिंदी रयतेच्या डोक्यावर बसणार आहे. किंबहुना हें एक अप्रत्यक्ष कराचें नवें ओझेंच हिंदी लोकांवर लादलें जाणार आहे. स्वदेशी उद्योगधंद्याला संरक्षण देण्याकरिता जकाती बसवा असें म्हणतांच जे रयतेच्या गरिबीची सबब सांगून अशा जकाती बसविण्याला विरोध करितात ते या बाबतीत मूग गिळून कां बसतात हें समजणें कठिण आहे. या सर्व गोष्टींचें तात्पर्य एकच आहे कीं, हिंदुस्थानाचा वाली कोणी नसल्याने व इंग्रजांचें राज्यच हिंदुस्थानावर असल्याने असला अन्याय होऊं शकतो, व तो पचतोहि. मुंबईच्या इंडियन मर्चेंट्स् चेंबरनेहि नुकतेंच सरकारकडे पत्र लिहून वरील सर्व अन्यायांचें यथातथ्य चित्र त्यांच्यापुढे उभें केलें आहे. पण निजलेल्यास जागें करतां येतें, तसें मुद्दाम झोंपेचें सोंग घेणाराला कसें जागें करतां येईल ?

असला हा लुळापांगळा व हिंदुस्थानाच्या हिताचा होम करणारा व्यापारी तह येत्या नोव्हेंबरमध्ये असेंब्लींत मांडून पसार करून घेण्याचा सरकारचा इरादा दिसतो, व असेंब्लीची आजची घटना पाहतां तो पसार होईलहि. परंतु या सर्व कृत्यांची नैतिक जबाबदारी मात्र सरकारच्या डोक्यावर लादल्याशिवाय भावी इतिहासकार राहणार नाहीत. व्हाइसराय लॉर्ड विलिंग्डन या पापाची निष्कृति करण्याच्या उद्देशाने अगदीं साळसूदपणें सांगतात कीं, स्वराज्याचे हक्क मिळाल्यावर सहा महिन्यांची आगाऊ सूचना देऊन हिंदी राष्ट्रास हा तह मोडतां येईल. सर अतुल चतर्जींनी आपल्या पहिल्या भाषणांत असले तह स्वराज्याच्या संधिकालांत करणें योग्य नाही असें ठासून सांगितलें होतें. पण पुढे त्यांनी पगडी फिरवून तह केला तो या वरील नव्या गुरूपदेशाच्या जोरावर केला असें स्पष्ट दिसतें. सहा महिन्यांच्या नोटिशीच्या मात्रेचा हा वळसा अत्यंत मुत्सद्देगिरीचा आहे यांत शंका नाही. पण ती मात्रा सर अतुल चतर्जींनी कां स्वीकारावी व असेंब्लीने तरी कां घ्यावी ? म्हणून सरकारच्या कुटिल कपटनीतीपेक्षा हिंदी लोकांच्या भोळसटपणाचाच राग अधिक येतो. असेंब्लींत या तहाची कशी वासलात लागते हें पुढे समजेलच. लोकपक्षाने मात्र या तहाला केव्हांहि मान्यता देऊं नये. व तो तशी देणारहि नाही अशी आम्हांस उमेद आहे.

# मुलांच्या वाढीसंबंधाने अनुभव

( ले.–दि. धों. परांजपे, केळशी रत्नागिरी. )

आक्टो. १९३० ते जून १९३१ पर्यंतचे आठ महिन्यांचे अनुभव गेल्या वर्षी केसरी, पुरुषार्थ, ज्ञानप्रकाश, सत्यशोधक वगैरे नियतकालिकांत प्रसिद्ध झालेले आहेत. आता त्यापुढील ता. १ जुलै १९३१ ते १ जुलई १९३२ पर्यंतचे एक वर्षाचे उद्बोधक अनुभव विचारासाठी प्रसिद्ध करीत आहों.

मागील वर्षी इ. ४ पासूनचे ८४ मुलांची नोंद ठेविली होती, तर या वर्षी इ. १ पासूनचे २१० मुलांची नोंद ठेविली होती. यांपैकीं मध्यंतरीं जा–ये करणाऱ्या मुलांची अर्धवट माहिती सोडून गेल्या वर्षी ५८ मुलांची नोंद विचारांत घेता आली. तर या वर्षी १५४ मुलांची नोंद विचारासाठी मिळाली. या नोंदीवरून पुढील गोष्टी दिसून आल्या.

मार्च १९२५ च्या 'मराठी शिक्षकांत' शारीरिक आरोग्य तपासण्याचें कोष्टक देण्यांत आलें आहे. त्याप्रमाणे पाहिल्यास गेल्या वर्षी शेंकडा ६६·६ मुलांची वाढ प्रमाणाइतकी किंवा त्यापेक्षा अधिक झालेली दिसून आली. परंतु चालू सालीं हें प्रमाण अवघें ३१·२ पडलें. असें होण्याचें कारण काय? याविषयीं आम्ही विचारपूर्वक पाहूं लागलों तेव्हां पुढील कारणें आम्हांस दिसून आलीं.

(१) चहा पिणारांचे संख्येमध्यें झालेली कल्पनातीत वाढ (२) शाळेजवळील मोकळ्या जागेवर नवीन इमारत झाल्याने मुलांची खेळण्याची व मोकळ्या हवेंत अध्ययन करण्याची झालेली गैरसोय (३) कांही वर्गांतून पूर्वीपासून सुरू असलेला साष्टांग नमस्कारांचा व्यायाम नियमित घेतला न जाणें (४) मुलांची वाढ प्रायः दिवाळी व मेचे सुटीमध्यें अधिक होते. मागील अनुभव ८ महिन्याचे होते. त्या आठ महिन्यांत या दोन्ही मोठ्या सुटया समाविष्ट झाल्या होत्या.

या कारणांपैकीं, पहिल्या, तिसऱ्या व चौथ्या कारणांविषयीं आंकडेवार पुरावाच पहा. प्रत्येक मुलाची वर्षांतील सरासरी वाढ या वर्षी ५·६ पौंड आहे; पण एकटया मेमध्ये ती सरासरी १·८ पौंड आहे. परंतु या कारणाचा विचार करून फार तर असें म्हणतां येईल कीं, गेल्या वर्षाचे वाढीचें प्रमाण शेंकडा ६६·६ आहे, त्या ऐवजी तें शेंकडा ६० पर्यंत खालीं घसरलें परंतु तरीहि वाढीचें प्रमाण या वर्षी पुष्कळ घटलें आहे, व याचीं मुख्य कारणें पहिलीं तीन आहेत. तिसऱ्या कारणास आंकडेवार आधार असा कीं, ज्या वर्गांतून नियमित नमस्कार चालू होते त्या वर्गांतील प्रत्येक मुलाची या वर्षीची पहिल्या आठ महिन्यांची वाढीची सरासरी ५·२ पौंड किंवा त्याच्यावर एकदशांश इतक्या फरकाने आहे. उलट साष्टांग नमस्कार आठ महिने नियमित चालू नसलेल्या वर्गांतून ती ३·७ पौं. या पेक्षांहि कमीच पडते. आतां पहिल्या कारणासंबंधाचे आंकडे पुढील कोष्टकांत पाहा.

**कोष्टक पहिलें**

वाढ झाली

| वर्षे | मुलांची संख्या | वाढ झाली पाहिजे | ब्राह्मण मुलांची: जास्तींत जास्त | कमींत कमी | सरासरी | चहा पिणारे मुलांची सरासरी वाढ | चहा न पिणारे मुलांची सरासरी वाढ | ब्राह्मणेतर मुलांची: जास्तींत जास्त | कमींत कमी | सरासरी | चहा पिणारे मुलांची सरासरी वाढ | चहा न पिणारे मुलांची सरासरी वाढ |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ६–७ | १ | ५ | ६ | ... | ६ | ... | ... | ... | ... | ... | ... | ... |
| ७–८ | ९ | ६ | ६ | ४ | ५·२ | ५ | ५·६ | ७ | ४ | ३·५ | ... | ... |
| ८–९ | १५ | ५ | ७ | ३ | ४·७ | ४·५ | ५ | ५ | ३ | ३·६ | ... | ... |
| ९–१० | २४ | ७ | ६ | १·५ | ४ | ३·६ | ४·३ | ६ | ३ | ४·७ | ... | ... |
| १०–११ | २१ | ५ | ६ | १ | ३·२ | ... | ३·६ | १२ | ३ | ५·९ | ... | ... |
| ११–१२ | १६ | ४ | ८ | २ | ४·४ | ३·५ | ४.८ | ७ | २ | ४·३ | ३· | ५· |
| १२–१३ | २३ | ६ | ८ | १ | ५·१ | ३· | ६· | ११ | –१ | ४·८ | ३·८ | ६·८ |
| १३–१४ | १९ | १० | १४·५ | १.५ | ६·४ | ७·६ | ५·१ | ११ | २ | ६·९ | ७·१ | ९· |
| १४–१५ | १६ | १० | १७ | ५ | ११·३ | ७ | ११·९ | १५ | १ | ६·७ | ७·१ | ... |
| १५–१६ | ५ | १७ | १० | ८ | ९ | ... | ९ | ११ | ७ | ९·३ | ... | ... |
| १६–१७ | ३ | १२ | ३ | ... | ३ | ... | ३ | १० | ७ | ८·५ | ... | १० |
| १७–१८ | २ | ६ | ... | ... | ... | ... | ... | ९.५ | ५ | ७·३ | ... | ... |

ज्या मुलांची वाढ वर्षामध्ये १० पौं. किंवा त्यापेक्षां अधिक झाली अशीं मुलें १६ असून त्यांत ७६ ब्राह्मण मुलांपैकीं ९ व इतर ७८ मुलांपैकीं ७ अशी वर्गवारी आहे.

कोष्टक दुसरें

| वय | वजन पाहिजे | वजन आहे जास्तींत जास्त | वजन आहे कमींत कमी | वजन आहे सरासरी |
|---|---|---|---|---|
| ८ | ५५ | ५० | ३८ | ४३·१ |
| ९ | ६० | ५६ | ३८ | ४६·७ |
| १० | ६७ | ५९ | ४१ | ४६·६ |
| ११ | ७२ | ७६·५ | ४१·५ | ५५·६ |
| १२ | ७६ | ७२·५ | ४५ | ५६ |
| १३ | ८२ | ७६ | ५१·५ | ६०·१ |
| १४ | ९२ | ९५ | ५३ | ७३·८ |
| १५ | १०२ | १०१ | ६४ | ८१ |
| १६ | ११९ | १०० | ८६ | ९३·२ |
| १७ | १३१ | १०४·५ | ९६ | १०·२ |

टीप—(१) वजनाचे आंकडे पौंडाचे आहेत.

(२) कोष्टक १ लें वय १३-१४ ब्राह्मण मुलांमध्ये चहा पिणारे मुलांची वाढीची सरासरी ७·६ पडली आहे. पण ती एका विशिष्ट उदाहरणानें पडली आहे. त्या मुलाचें वजन चहा सोडलेल्या मुदतींत ता. ३-७-३१ ते ४-८-३१ चे दरम्यान २॥ पौंड वाढलेलें असून नंतर एक महिन्यानें मुलगा चहा पिण्यास लागल्यावर ता. १-११-३१ ते १-१२-३१ (यांत दीपावलीची सुटी) या मुदतींत ३॥ पौं. व ता. ४-४-३२ ते ४-६-३२ (यांत मे महिन्याची सुटी, हा परीक्षेनंतरचा काल व आंबे फणसादि कोंकणी फळांचा हंगाम) या मुदतींत ६ पौंड मिळून १२ पौंड वाढ असून मुलाची वर्षांतील वाढ १४॥ पौंड आहे.

(३) चहा पिणारे व न पिणारे मुलांचे वाढीची सरासरी काढतांना मधून मधून चहा पिणारे मुलांची माहिती कोणत्याच सदरासाठीं विचारांत घेतलेली नाहीं.

(४) गेल्या वर्षीची ब्राह्मण–ब्राह्मणेतर मुलांच्या वाढीची सरासरी अनुक्रमें ७ व ८·२ होती. ती चालू वर्षी अनुक्रमें ५·५ व ५·६ म्हणजे जवळ जवळ बरोबर आहे. याचें कारण ब्राह्मणांपेक्षा ब्राह्मणेतरांमध्ये चालू सालीं चहाचा प्रसार अधिक झाला हें होय. जेथें जवळ जवळ सर्व ब्राह्मण–ब्राह्मणेतरांचा चहा सुटला होता तेथें आतां ब्राह्मणेतरांमध्ये फक्त १३–१४ मुलें कधींहि चहा न पिणारीं शिल्लक राहिलीं आहेत. ब्राह्मण मुलांमध्येहि चहाचा प्रसार पुष्कळ झाला आहे, परंतु तो इतका झाला नाहीं एवढेंच.

(५) दोनही कोष्टकांतील 'वाढ झाली पाहिजे' व 'वजन पाहिजे' हे आंकडे मार्च १९२५ च्या मराठी शिक्षकांतून उतरले आहेत.

**निष्कर्ष**—मागील अनुभवांत म्हटल्याप्रमाणें या वेळींहि आम्ही असेंच म्हणतों कीं, 'अनुमानें काढण्यास पुष्कळ मुलांची नोंद झाली पाहिजे.' परंतु झालेल्या नोंदीवरून आम्हांस पुढील गोष्टी आढळून आल्या.

(१) गेल्या वर्षी काढलेले सर्व निष्कर्ष बरोबर होते अशी अनुभवानें निश्चिती पटली. दिवाळी व मे महिन्याचे सुट्यांतून घटीचें प्रमाण जितकें गेल्या वर्षी दिसून आलें तितकें या वर्षी दिसून आलें नाही.

(२) योग्य लक्ष दिल्यामुळें इ. ५ ते ७ मधील इंग्रजी शिक्षण घेणारे व न घेणारे मुलांच्या वाढीचें प्रमाण विशिष्ट उदाहरणें सोडून पाहिलें तर तें सरासरीं ७·३ व ७·४ असें किंचित् फरकाचें पडलें आहे.

(३) मागील अनुभवाचे वेळीं ब्राम्हणेतर मुलांची सरासरी वाढ ब्राह्मण मुलांपेक्षा अधिक आढळून आली होती. परंतु चहाचे प्रसारानें या वर्षी ती फार घटली आहे. गेल्या वर्षी आम्हीं म्हटलें होतें कीं, वैयक्तिक उदाहरणाकडे लक्ष दिल्यास शाकाहारी मुलाची वाढ मांसाहारी मुलाइतकीच शाकाहारानें होणें शक्य दिसतें. या वर्षी आंकडेवार माहिती पाहिल्यास मांसाहारी मुलांपेक्षा शाकाहारी मुलांची वाढ प्रायः अधिक झालेली दिसून येते.

(४) अनुभवानें आमची निश्चिती झाली आहे कीं, प्राथमिक शाळांतून व्यायाम करून घेण्याची आवश्यकता आहे.

(५) प्रत्येक मुलाची वाढ एका विशिष्ट कालांत फार जलदीनें होते. हा काल दोन वर्षांच्या कोष्टकावरून १४ ते १६ वयाचा दिसून येतो. परंतु या बाबतींत अधिक अनुभव घेणें अवश्य आहे.

(६) ज्या घरीं पुरुष मनुष्यांच्या अभावीं सर्व कारभार स्त्रियांना पाहावा लागतो त्या घराच्या मुलांची वाढ प्रायः सर्वांत कमी आढळून येते. हें विवेचन फक्त ब्राह्मण मुलापुरतें आहे.

(७) नियमित व्यायाम घेणाऱ्या मुलांचा व्यायाम बंद पडला तेव्हा (कांहीं काळ) कांहीं मुलांची वाढ खुटलेली आणि पुष्कळांची घटलेलीच दिसून आली!

या वर्षीच्या अनुभवावरून एक गोष्ट ठळकपणें दिसून येते कीं, शरीराचे वाढीस चहाची अवश्यकता नाही. परंतु याचा अर्थ असा नव्हे कीं, चहा सोडला म्हणजे शरीराची वाढ भराभर होऊं शकेल. शरीराच्या वाढीला पौष्टिक अन्नाची मुख्यतः दुधाची आवश्यकता आहे. ते नसेल तर मुलांस

सकाळीं भात किंवा भाकरी द्यावी; पण शक्य तोंवर चहा देऊं नये, असें आम्हांस वाटते. वडील माणसें लक्ष देतील तर मुलांचा चहा सुटणें अशक्य नाही.

**सामुदायिक कार्यकर्त्यांस विनंति**

चहाचे दुष्परिणाम आम्हांस दिसून आले ते आंकडेवार माहितीसह पुढे मांडले आहेत.या अनुभवांत तथ्य असेल असें ज्यांना वाटेल त्यांनीं स्वतः या बाबतींतले अनुभव घेऊन पाहावें आणि आमच्या प्रमाणेंच अनुभव आले तर सार्वत्रिक चहापानास कसा आळा घालावा याचा विचार करावा, अशी नम्र विनंति आहे.

# पुनः एकदा रफिउद्दिन अहमद

कोणाहि मनुष्याच्या भाषणांतील हेतु त्याच्या पूर्वचरित्रावरूनच ठरवावयाचा असतो. मुंबई सरकारचे माजी दिवाण सर रफिउद्दिन अहमद यांनी कांही दिवसांपूर्वी येथे नवीनच स्थापन झालेल्या वाडिया कॉलेजांत भाषण केलें.सदर भाषणावर आम्ही ता. ६ सप्टेंबरच्या अंकांत दोन स्फुट सूचना लिहिल्या. त्यांत मौलवी रफिउद्दिन यांनी आपल्या भाषणांत कांही खऱ्या विधानांबरोबर खोटींहि विधानें केलीं होतीं व त्यांच्या भाषणाचा रोख शिरजोरपणाचा होता असें म्हटलें होतें. या आमच्या लिहिण्यास रफिउद्दिन यांनी स्वतः आक्षेप घेतला असता व आमची टीका पुराव्याने सिद्ध करण्यास किंवा ती खोटी असेल तर परत घेण्यास आव्हान केलें असतें तर त्याचें आम्हांस आश्चर्य वाटलें नसतें. कारण मराठ्यांच्या इतिहासाचे ज्ञान मौलवीसाहेबांस किती आहे याची आम्हास अटकळ आहे. परंतु त्यांच्याऐवजीं त्याच वाडिया कॉलेजांतील एक प्रोफेसर रा. चिं. ब. जोशी यांनी मौलवींची फुकट वकिली करण्यास पुढें सरसावावें व आम्हांस आमची बाजू मांडण्यास सांगावें यासारखी विपरीत गोष्ट ती कोणती ?

रा. जोशी हे महाराष्ट्रीय आहेत व ते इतिहासाचेच प्रोफेसर आहेत असें समजतें. तेव्हा मौलवी रफिउद्दिन यांच्यापेक्षा मराठ्यांच्या इतिहासाचे बिनचूक ज्ञान त्यांना असेल अशी अपेक्षा करणें चुकीचें ठरेल काय ? परंतु ते ज्ञान त्यांना रफिउद्दीन यांच्याइतकेंच अपुरें व असत्य आहे असें दु:खानें म्हणणें आम्हांस भाग पडत आहे. रफिउद्दीन यांनी मराठ्यांच्या इतिहासांतील पुष्कळच हकीकती आपल्या भाषणांत सांगितल्या आहेत. त्यांपैकीं दोनच मुद्द्यांचीं विधानें घेऊन आम्ही रफिउद्दीन व त्यांचे मानसपुत्र प्रो.जोशी यांच्या पदरांत पुराव्याचें माप टाकतों. रफिउद्दिन यांच्या भाषणाचा रिपोर्ट टाइम्स पत्राच्या ३ सप्टेंबरच्या अंकांत प्रसिद्ध झाला आहे. सदर भाषणांत रफिउद्दिन म्हणतात कीं, 'पहिल्या बाजीरावाने मस्तानीशीं लग्न लावलें होतें. व बाजीराव मरण पावल्यावर मस्तानी सती गेली.पण बाजीरावाची ब्राह्मण बायको मात्र सती गेली नाहीं.'

आता आम्ही रफिउद्दिन यांस असें विचारतों कीं मस्तानीचें लग्न बाजीरावाशीं लागलें होतें हा वृत्तान्त त्यांनी कोणत्या इतिहासांत वाचला ? हिंदुधर्माप्रमाणें लग्न या शब्दाचा अर्थ काय होतो हें रफिउद्दिन यांस माहीत आहे काय ? मस्तानी ही बाजीरावाची केवळ राख होती. रखेलीला पत्नी समजत नाहीत याचें ज्ञान रफिउद्दीन हे मुसलमान मौलवी असल्यामुळे त्यांना कदाचित् नसेल, पण रा. जोशी यांस असावयास नको काय ? का जोशी हेहि मौलवींइतकेच हिंदु चालीरीतीसंबंधाने अडाणी आहेत ? ही मस्तानी बाजीरावासाठी म्हणे सती गेली ! बाजीराव नर्मदेच्या कांठीं रावेरखेडी येथे मरण पावला, व तेथेच त्याचें दहनहि करण्यांत आलें. मस्तानीनें त्याजबरोबर सहगमन करावयाचें तर नर्मदातीरींच स्वतःस जिवंतपणीं जाळून घ्यावयास पाहिजे होतें. पण तसें घडल्याचा दाखला इतिहासांत कोठेहि नाही. बरें, त्यानंतर त्याच्या मृत्यूची बातमी ऐकून मस्तानी जेथे होती तेथे तिनें स्वतःचें जिवंतपणीं दहन करून घेतलें यालाहि ऐतिहासिक आधार नाही. एखाद्या बखरींत मस्तानी मागाहून सती गेल्याचें विधान असल्यास ऐतिहासिक अस्सल कागदपत्रांच्या अभावीं अशा प्रकारचीं विधानें कवडीमोल होत. हा नियम मौलवी रफिउद्दीन यांना माहीत नसला तरी प्रो. जोशी यांना माहीत असणें अगत्याचें आहे. कोणाहि सर्वमान्य इतिहासकारानें वरील विधान खरें मानलें नाही, इतकेंच नव्हे तर अलीकडे इतिहासकार रावसाहेब गोविंदराव सरदेसाई यांनी पेशवे दप्तरांतील जीं शेकडों पत्रें छापून काढलीं आहेत त्यांतहि सदर विधानास पुष्टिकारक असें एकहि पत्र नाही. अशा स्थितींत जोशी यांनी मौलवींचे विकत श्राद्ध घेऊन पिंड पाडीत बसावें या अधिक प्रसंगीपणास काय म्हणावें ?

मौ.रफिउद्दिन यांस आम्हीं शिरजोर म्हटलें याबद्दल जोशीबुवा आमच्यावर गरम झाले आहेत. पण आमची ही टीका हेतुपुरस्सर आहे हें प्रो. जोशी यांनी लक्षांत ठेवावें. रफिउद्दिन यांचें टाइम्समध्ये

प्रसिद्ध झालेलें समग्र भाषण जो लक्षपूर्वक वाचील त्यालाच आमच्या वरील शब्दांतील खोंच समजून येईल. पूर्वीचे मराठे मुसलमानांशीं नम्रपणाने मिळून-मिसळून वागले तसेंच हल्लीच्या महाराष्ट्रीयांनी वागावें म्हणजे उभयतांत तंटे-बखेडे उत्पन्न होणार नाहीत असा मौलवींच्या उपदेशाचा आशय आहे. व तें सांगतांना मौलवी सुचवितात काय, तर एम. ए. च्या परीक्षेकरिता मुसलमानी रियासतीचा अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्यांनी पर्शियन भाषेचें अध्ययन जरूर करावें. खरें पाहूं गेलें असता इतिहासाच्या विद्यार्थ्यांना भाषेचा अभ्यास करण्यास सांगण्याची आधीं गरज काय ? त्यांना कांही इतिहाससंशोधन करावयाचें नसतें. फक्त त्या विषयावरील इतिहास-ग्रंथ वाचावयाचे एवढेच त्यांचें काम. त्या ग्रंथकारांना पर्शियन भाषेचा अभ्यास करण्यास सांगितलें तर तें उचित ठरेल. पण इतिहासाच्या विद्यार्थ्यांना तसा उपदेश करणें अप्रासंगिक होय.

बरें, भाषेच्या अभ्यासाचा उपदेशहि एकट्या महाराष्ट्रीय विद्यार्थ्यांनाच व तोहि पर्शियन भाषेचाच कशाला ? पर्शियन भाषेंत जशीं इतिहासाचीं साधनें आहेत तशीं मराठी भाषेंतहि आहेत. आणि इतिहासाचे अभ्यासक जसे महाराष्ट्रीय आहेत तसे मुसलमान विद्यार्थीहि आहेत त्याअर्थी त्या मुसलमान विद्यार्थ्यांनाहि मराठी भाषेचा अभ्यास करण्याची गरज महाराष्ट्रीयांइतकीच आहे. याहिपुढे जाऊन असेंहि म्हणण्यास आम्हांस हरकत वाटत नाही कीं, खुद्द व्याख्याते मौलवी सर रफिउद्दिन अहमद यानीहि मराठी इतिहासाचा अभ्यास हल्लीहून अधिक काळजीपूर्वक करावा व मराठी भाषेचें ज्ञान त्यांस निर्दोष नसेल तर तें जरूर करून घ्यावें. म्हणजे त्यांनी वाडिया कॉलेजांतील आपल्या भाषणांत ज्या चुका केल्या त्या पुनः त्यांजकडून घडणार नाहीत. सांप्रत हिंदु व मुसलमान या दोन जातींत एकमेकांनी एकमेकांच्या इतिहासाचें, धर्माचें व संस्कृतीचें ज्ञान करून घेण्याची जर अधिक गरज कोणाला असेल तर ती मुसलमानांनाच आहे. कारण शिरजोरीच्या व दंडेलीच्या आगळिकी जर कोणाकडून होत असतील तर त्या मुसलमानांकडूनच होतात. यासाठीं आपल्या मुसलमान बंधूंना या प्रकारचा उपदेश करण्याचें सोडून बिचाऱ्या गरीब व मनमिळाऊ अशा महाराष्ट्रीय विद्यार्थ्यांनाच उपदेश करण्यास मौलवीसाहेबांनी उद्युक्त व्हावें याला शिरजोरी म्हणूं नये तर काय म्हणावें ? प्रो. जोशी हे बोलून चालून शिक्षक. त्यांना राजकारणांत अनेक कपटप्रयोग खेळण्यांत ज्यांचे काळयाचे पांढरे केस झाले त्या मौलवी साहेबांचें अंतरंग काय कळणार ? म्हणून आमच्या मतें त्यांनी सभ्याच्या वादांत पडून आपलें विनाकारण हसें करून घेतलें आहे. आम्ही केली त्याच प्रकारची टीका इतर मराठी पत्रांतूनहि आली असून ती प्रो. जोशी हे वाचतील तर मौ. रफिउद्दिन यांच्या भाषणाबद्दल गैरसमज झाला असल्यास तो जोशी यांचा झाला आहे, इतरांचा झाला नाही हें त्यांच्या लक्षांत येईल.

# मालेगांवांत मुसलमानांची अरेरावी

मालेगांवांत विणकर मोमीन लोकांची फार मोठी वस्ती आहे, व त्या मानाने हिंदु लोक अल्पसंख्य आहेत. अलीकडे जातिविषयक वारें त्यांच्यांत फार खेळूं लागलें असून वरचेवर हिन्दु लोकांना त्रास देण्याची त्यांची वृत्ति वाढत चाललेली स्पष्ट दिसत आहे. त्यांच्यांतील थोड्या शिकलेल्या लोकांनी मालेगांवाच्या हिंदु लोकांस सळो की पळो करून सोडण्यास सुरुवात केली आहे. थोड्या दिवसांमागे हिंदूंच्या मूर्ति फोडण्यांत आल्या. म्युनिसिपालिटींत बहुमताच्या जोरावर जातिविषयक अरेरावीच्या मार्गाने मुसलमान चीफ ऑफिसराची नेमणूक करून घेतली. व याच तत्त्वासाठी 'मुसलमान हेडमास्तर नेमाल तर हायस्कूल पुरें होऊं देऊं 'अशी केवळ आडदांड अट घालून अद्याप तें प्रकरण तसेंच भिजत ठेविलें आहे. सारांश, प्रत्येक कामांत जातिविषयक तत्त्व दाखल होत चाललें आहे.

गेल्या गणेशचतुर्थीच्या दिवशीं येथील मातामठांत नेहमीप्रमाणे गणपति स्थापन करण्यासाठी तेथील चालकांनी पालखी आणली. तोंच कांही मुसलमान म्हणूं लागले कीं, जवळच आमची मशीद आहे, त्या मशिदीच्या समोरून पालखी नेऊं नका. ह्या रस्त्यावरून वाद्यें न वाजवितां मुकाट्याने जाण्यासमुद्धां मनाई होत असलेली पाहून त्यांनी तो चढेल हुकूम ऐकण्याचें नाकारलें. तोंच सर्व गांवभर बायसिकलीवर लोक पाठवून मुसलमानांनी हजारों गुंड जमा केले. मातामठांतील मुलें व २५-३० लोक होते ते अगदी भेदरून गेले व त्यांनीं आपणास कोंडून घेतलें. पोलीस ऑफिसर हजर झाले. मुसलमान गुंडांचा जमाव एकसारखा वाढतच होता. अशा वेळीं एखाददुसरा हिंदु भेटला कीं त्यास चोपण्यास त्यांनी सुरुवात केली आसपासच्या घरांवर दगडफेकीसहि सुरुवात केली. त्यांत पोलीस लोकांनाहि दगड लागले असें म्हणतात.

'आंतील लोकांना आमचे ताब्यांत द्या, आह्मी त्यांचें वाटेल तें करूं' अशी मुसलमानांनी निर्लज्जपणाची मागणी सुरू केली. फौजदारांनी त्यांची परोपरीने समजूत घालण्याचा प्रयत्न केला. पण त्यांच्या मागण्या-सारख्या वाढतच गेल्या. मठांत हिंदूंनी हत्यारें लपविलीं आहेत असा एक नवीन कांगावा त्यांनी केला. सायंकाळीं वरिष्ठ अधिकारी पोलीसपार्टी घेऊन आल्यानंतर त्यांनी मुसलमान पंचांना बोलावून मठांत कोणत्याहि प्रकारचें हत्यार किंवा कांहींसुद्धां नाहीं अशी खात्री करून दिली. तरीहि त्यांची अरेरावी एक रेसभरहि कमी झाली नाही. मालेगांवीं हिंदु अधिकारी मुळीच नकोत अशी ओरड सर्व गांव-भर सुरू आहे. सारांश, त्यांना केवळ मुसलमानी गुंडांचें बेबंदशाहीचें राज्य पाहिजे आहे.

वरिष्ठ अधिकाऱ्याजवळ गणपतीच्या मिरवणुकीची परवानगी मागितली तेव्हां या गुंडांच्या भीतीनें त्यांनी परवानगी देण्याचें नाकारलें. 'पुढील वर्षी तुम्ही उत्सव करा' असा मानभावीपणाचा फुकट उपदेश अधिकारी हिंदु लोकांस करीत आहेत. मुसलमानाच्या मतें हिंदु ऑफिसर अन्याय करतात. तो कोणता? तर रीतसर वागा असें म्हणतात. शांतता राखा असें म्हणतात. मुसलमान म्हणतील तो न्याय असें म्हणणारा असेल तोच खरा अधिकारी अशी त्यांची वृत्ति वाढत आहे. अधिकाऱ्यांच्या कानीं लागावें, खोट्या भरमसाट हकीकती सांगत सुटावें व बहुसंख्येच्या जोरावर त्यांनाहि भेडसावावें असा प्रकार चालू आहे. मुसलमानांतील पुढारी लोक अशा गुंडांना उत्तेजन देतात हें अगदी उघड आहे. कांगावखोरपणा करून हिंदूंना सर्वस्वी दाबून वाटेल तसा धुमाकूळ घालण्याचा त्यांचा स्पष्ट इरादा दिसतो. वरिष्ठ अधिकाऱ्यांनी याची उघड चौकशी करावी हें इष्ट आहे. हल्ली येथे इंग्रजांचें राज्य नसून मुसलमान गुंडांचें राज्य आहे असा समज पसरत चालला आहे. याचा वेळींच विचार व्हावा.

चार—पांच हजार लोकांच्या खवळलेल्या समा-जांत सबइन्स्पेक्टराचें जीवित केवळ धोक्यांत होतें. परंतु त्यांनी युक्तीने मदत येईपर्यंत लोकांस थोप-वून धरून मोठा अनर्थ टाळला यांत शंका नाही. मि. पिंगळे सब इ. यांनी फारच प्रसंगावधान ठेवल्याने हिंदूंवरील पुढील अनर्थ टळला.

# सोलापूर जिल्हा स्कूल बोर्डाचा कारभार

## सुपरवायझरांच्या जागा

सोलापूर जिल्ह्यांत गेलीं बरींच वर्षे प्राथमिक शिक्षकांच्या सुपरवाझरच्या जागा ब्राम्हण प्राथमिक शिक्षकांचे हक्क बुडवून ब्राम्हणेतर शिक्ष-कांना मिळाल्या आहेत. आतांपर्यंत त्या मि. टोणपे, मि. मुंडफण, मि. पाटील व मि. पोरे या चार ब्राम्हणेतर शिक्षकांना मिळाल्या. शिवाय मुसल-मानांची जागा स्वतंत्र आहे. अस्पृश्य शिक्षक मि. कांबळे यांनाहि सुपरवायझरची जागा मिळाली होतीच. ब्राह्मण प्राथमिक शिक्षक अधिक नोकरी केलेले हुषार लायक असून त्यांची दाद लागत नाही. ब्राह्मण शिक्षकांचे हक्क असे किती दिवस बुडत राहणार याचा विचार आतां सरकारनें जरूर केला पाहिजे. सोलापूर जिल्हा स्कूल बोर्ड १९२३ ते १९२६ च्या कारभाराबद्दल सस्पेंड झालें होतें, यामुळें ते पुनः येतांच मागील ठेंचेमुळे शहाणें होईल असें वाटलें होतें. पण त्याच्या सहा महिन्यांच्या कारभारावरून तसें होईलसें दिसत नाही. ब्राह्मण लोकांस सरकार इतर खात्यांत वागवीत आहे त्या-वरून ते ब्राह्मणास वरिष्ठ प्रतीच्या जागा मुळींच देत नाही, असेंहि नाही. किंवा सरकारनें ब्राह्मण प्राथमिक शिक्षकांस सुपरवायझरची जागा मुळींच देऊं नये, असा कायदाहि केलेला नाही. इतर जिल्ह्याचीं स्कूलबोर्डेहि ब्राह्मण प्राथमिक शिक्षकांना सुपरवाय-झरची जागा मुळीच देत नाहीत, असें नाही. असें असतां सोलापूर जिल्हा स्कूल बोर्डच असे का वागतें याचें कारण काय तें समजत नाही. याचा सरकारने जरूर विचार करावा. हल्ली मि. मुंडफण यांची रिकामी जागा मि. मोरे या ब्राह्मणेतर शिक्षकासच दिली आहे. तरी सरकारने याची सर्व चौकशी करावी, त्याशिवाय सदर जागेस मंजूरी व ग्रँट देऊं नये, तसें केल्यावाचून सोलापूर जिल्हा स्कूल बोर्डाची दांडगाई बंद पडणार नाही. ब्राह्मण प्राथमिक शिक्षक संघानेहि या गोष्टीचा शेवट लावणें भाग आहे. सोलापूर जिल्हा स्कूलबोर्डाचें प्राथमिक शिक्षकावरचे प्रेम पेन्शनसह अलावन्स बंद करून जी काटकसर केली तीमुळें प्रगट झालेलें आहेच. ब्राह्मण नको असतील तर पुढे घेऊं नका, पण जे पूर्वीच नोकरींत आले, त्यांना योग्य त्या हक्कानें वागविणें जरूर नाही काय ?

# या अभागी राष्ट्रावरील एक नवें संकट !

## " दे दान सुटे गिराण " !

गेल्या मंगळवारीं सर्व हिंदुस्थान देश मानसिक विजेच्या एका मोठ्या धक्क्याने हादरून गेला. हा धक्का खुद्द म. गांधी यांनीच दिला असून, त्याचें कारण त्यांनी केलेली एक दारुण प्रतिज्ञा हें होय. नुकताच ब्रिटिश मंत्रिमंडळाने अल्पसंख्या लोकांच्या हितसंरक्षणार्थ म्हणून जो एक ठराव प्रसिद्ध केला त्यांत, अस्पृश्यांचा वेगळा गट करून त्यांना दिलेल्या एकंदरींपैकीं कांही जागा त्या स्वतंत्र गटाकडून भरवाव्या असा निकाल दिला आहे. ही योजना अस्पृश्य वर्गालाच घातक आहे, याकरिता "आपण प्राण देऊं पण ती योजना सिद्धीस जाऊं देणार नाही " अशी म. गांधी यानी सर सॅ. होअर यांना गेल्या मार्चांतच धमकीवजा सूचना देऊन ठेवली होती. पण ती न मानून ब्रि.मंत्रिमंडळाने वरीलप्रमाणे निकाल अखेर जाहीर केला. तेव्हा आता म. गांधींनीहि मुख्य प्रधान मि. रॅम्से मॅक्डोनाल्ड यांस असें कळविलें आहे कीं, ता. २० सप्टेंबरपासून आपण प्रायोपवेशन घेऊन बसणार; म्हणजे मृत्यु आला तरी अन्नग्रहण करणारच नाही !

महात्मा गांधी हे जसे लोकोत्तर पुरुष आहेत त्याप्रमाणे त्यांचें नीतिशास्त्रहि लोकोत्तर असल्यास काय नवल ? त्या नीतिशास्त्रांत प्रायश्चित्ताला फार महत्त्व दिलेलें आढळतें. आणि ज्या कोणीं त्यांचें आत्मचरित्र, किंवा हृदय उकलून दाखविणारे तशाच प्रकारचे त्यांचे इतर लेख, वाचले असतील त्यांना हें आढळून आलेंच असेल कीं, त्यांनी मनाने मानलेले नैतिक गुन्हे ज्यांच्या ज्यांच्या हातून आजवर घडले त्यांना त्यांना महात्माजींनी त्या त्या गुन्ह्यांना अनुरूप अशीं लहानमोठीं प्रायश्चित्तें दिलीं. त्यांच्या पिनल कोडांत गुन्ह्यांच्या जाति अनेक असल्या तरी त्यांच्या शिक्षेचा प्रकार बहुधा एकच असतो. तो म्हणजे देहदंडन. आणि तेंहि प्रायोपवेशनाने, म्हणजे उपोषणाने. उघडच आहे. कां कीं, एका जठराला दंडन केलें म्हणजे पर्यायाने सर्व देहालाच तें दंडन ठरतें. " पाठीवर मारावें पण पोटावर मारूं नये " ही म्हण प्रसिद्ध आहे. इसाप नीतींतील " पोट आणि अवयव " या कथेवरूनहि हेंच सुचविलें जातें. हिंदु स्मृतींतील आचाराध्यायातहि तेच धोरण असतें. क्षौरादि प्रायश्चित्तें प्रकट मानखंडनाकरिता सांगितलीं असलीं तरी, उपोषण हेंच प्रायश्चित्त सर्वांत महत्त्वाचें व आत्मशुद्धीकरिता असतें.

महात्मा गांधी हे जसे प्रायश्चित्ताकरिता दुसऱ्या-लाँ उपवास घडवितात तसे ते स्वतःलाहि घडवितात. त्यांचा पिनल कोड सर्वांकरिता सारखाच जागृत असतो. पण त्यांतूनहि ते क्षमा करावयाची व झाली तर इतरांना करतील, स्वतःला करणार नाहीत ! फार काय, पण ते कित्येक प्रसंगीं इतरांच्या गुन्ह्याकरिता स्वतःलाच शिक्षा करून घेतात हेंहि प्रसिद्ध आहे. काणाला वाटेल कीं, गुन्हेगाराचें आपले आयतें बरेंच झालें. लाभ स्वतःला झाला, शिक्षा दुसऱ्याला झाली. पण हें दिसतें इतकें कांही साधें नाही. मनुष्याला काळीज म्हणून कांही असतें. आणि आपल्या अपराधाकरिता दुसऱ्याने शिक्षा सोसली असें पाहताच, स्वतःला शासन झाल्या-पेक्षांहि तो अधिक विरमतो. निदान महात्मा गांधींचा तरी तसा विश्वास आहे. म्हणून त्या प्रमाणे ते वागतात. पण आत्मदंडनाप्रमाणे प्रतिकाराकरिताहि ते प्रायोप-वेशनाचा उपयोग करतात. निःशस्त्र व अनत्याचारी राहून प्रतिकार करण्याचा तो एक उत्तम मार्ग आहे असें त्यांनी फार दिवसांपासून ठरविलेलें [illegible] आहे.

पाचसहा वर्षांपूर्वी हिंदु-मुसलमानांचे तंटे थांब-विण्याकरिता म्हणा, किंवा अशा तंट्यांविषयी आपली नापसंती दाखविण्याकरिता म्हणून म्हणा त्यांनी एकवीस दिवसांचा उपवास केला होता, हे प्रसिद्धच आहे. हल्लीचा त्यांचा नियोजित उपवासहि अन्यायप्रतिकारार्थच आहे, स्वतःच्या एखाद्या अपराधाकरिता नव्हे. तथापि या दोहोंत एक मोठा फरक आहे तो असा कीं, तो पूर्वीचा उपवास बोलून-चालून एक-वीस दिवसांचाच होता. आणि नैसर्गिक आरोग्याचे डॉक्टर लोक असे मोठे उपवास आपल्या रोग्यांना घालून त्यांना बरेंहि करतात. पण म. गांधी यांनी प्रस्तुत जो उपवास योजिला आहे, तो बिनमुदतीचा म्हणजे खरोखर मरणान्त असाच आहे ! यामुळे पूर्वीच्या त्यांच्या कोणत्याहि उपवासाची व या उपवासाची तुलना करतां येत नाही. आणि दुसरी अडचण अशी कीं, एकदा कोणत्याहि गोष्टीची प्रतिज्ञा त्यांनी केली म्हणजे ती पार पाडण्याचा त्यांचा निश्चय बहुधा अढळ असतो !

तात्पर्य, अशा रीतीने आपल्या हिंदी राष्ट्रावर हे

ऐक नवें संकटच अवतरलें असें म्हणण्यास हरकत नाही. पूर्वी संकटें नव्हतीं असें नाही. किंबहुना संकटांच्या काटेरी दाट झाडींतूनच आपलें राष्ट्र वाट काढीत चाललें आहे. आणि त्यामुळे त्याचें अंग ठिकठिकाणीं कसें ओरबडून निघत आहे, व त्यांतून रक्तस्राव कसा होत आहे हें आपण नित्य पाहतोंच. पण असें असूनहि, म. गांधींसारख्या देशभक्तांने आपले प्रत्यक्ष प्राणच पणाला लावले हें संकट म्हणजे नुसती भरींत भर नसून, राष्ट्राच्या काळजाला धक्का बसण्यासारखी ती गोष्ट आहे. पूर्वी महात्माजींनी २१ दिवसांचा उपवास केला तेव्हा एवढा मोठा उपवास अशा क्षीण प्रकृतीच्या मनुष्याला बहुधा झेपणार नाही, अशा भीतीमुळे लोक चिंताग्रस्त होते. पण वर दर्शविल्याप्रमाणे उपवासहि एकदा पचनीं पडला म्हणजे तो पुढे बरेच दिवस निभावूं शकतो असे कांही कांही जुने दाखले तेव्हा डोळयांपुढे होते. आणि इतर हरएक रीतीने गांधीजींची काळजीपूर्वक शुश्रूषा करण्यांत येईल तर कदाचित ते निभावूनहि जातील अशी एकंदरीने थोडी तरी आशा वाटत होती. परंतु प्राणांतिक उपवास म्हटला म्हणजे अशी आशा करण्याला मुळी जागाच नाही असा उघड अर्थ होतो.

उपवास करूनहि पुष्कळ दिवस लोक केवळ पाण्यावर जगतात हें खरें असलें तरी, त्यालाहि कांही कालावधीची मर्यादा आहे. पण मुद्दाम मरणाचें ठाणच मांडून जो बसला, तो पुढे वैतागाने किंवा निराशेने पाणीहि त्यागणार नाही कशावरून अशीहि भीति उत्पन्न होते. "अस्पृश्यांना हिंदु समाजांतून फोडून वेगळे काढण्याला मी प्राण जाईपर्यंत प्रतिकार करीन" (With my life) असे शब्दच त्यांनी होअरसाहेबांना लिहिलेल्या पत्रांत आहेत. आणि गांधीजींचे शब्दार्थ करण्याचें मीमांसाशास्त्र मोठें खडतर असतें हें प्रसिद्धच आहे. म्हणून हल्ली जरी त्यांनी असें जाहीर केलें आहे कीं, उपवासाला प्रारंभ केल्यावर मी थोडें पाणी व त्यांत मीठ किंवा सोडा याशिवाय दुसरें कांहीहि घेणार नाहीं; तरी पुढे मिठा-पाण्यानेहि प्राण जाण्याला प्रतिबंध होतो असें वाटल्यास मूळच्या प्रतिज्ञेच्या आधारावर ते मिठा-पाण्याचाहि त्याग करतील अशी भीति सहजी कोणासहि वाटणार नाही काय ?

शिवाय एकदा प्रतिज्ञेंत गुंतल्याने स्वाभिमानाचा प्रश्न उत्पन्न झाल्यावर महात्माजी ज्या कोणाची भीड ऐकतील असा कोणीच मनुष्य जगाच्या पाठीवर नाही असें म्हणतां येईल. मार्चमध्ये होअरसाहेबांना पत्र लिहून मरणान्त प्रतिकाराची धमकी दिली तेव्हा व परवा मुख्य प्रधान रॅम्से मॅक्डोनाल्ड यांना पत्र लिहून त्यांत महात्माजींनी प्रतिज्ञेचें स्पष्टीकरण केलें तेव्हा वल्लभभाई व महादेवभाई हे त्यांचे स्नेही त्यांच्याजवळच होते ! गांधींना या कामीं त्यांनी उत्तेजन तर दिलेंच नसेल; पण कदाचित् जोराचा प्रतिकारहि केला असेल असें आम्हांला वाटतें. परंतु त्यांच्या या प्रतिकाराचा कांही उपयोग झाला नाही ही गोष्ट आता उघड दिसते. म्हणूनच सर्व बाजूंनी विचार करता आजवर केव्हाहि न आलेलें असेंच हें संकट होय असें म्हणण्यास काय हरकत ?

या विषयासंबंधाने उलट बाजूने कोण काय म्हणूं शकेल याची कल्पना आम्हांला नाही असें नाही. कोणी म्हणेल कीं "स्वतः गांधींनी आपल्या पत्रांत मि. रॅम्से मॅक्डोनाल्ड यांना दर्शविल्याप्रमाणे, कम्यूनल अवॉर्डीतील अस्पृश्यांची ही एकच बाब काय, पण त्याच अवॉर्डीतील इतर कित्येक बाबी अशा आहेत कीं, त्या गांधींना तितक्याच अप्रिय व निंदास्पद वाटत असतील. आणि त्या तशा त्यांना वाटतातहि. पण या अवॉर्डाच्या पलीकडे जाऊन पाहिलें तरी, गोलमेज परिषदेपुढील प्रश्नहि तितकेच बिकट असून त्यांचाहि निकाल कोणाला कितपत पटण्यासारखा होईल हेंहि उघड दिसत आहे. मग एकट्या अस्पृश्यांकरिता व त्यांतूनहि एका बाबीच्या अर्ध्या बाबीकरिता आपल्या प्राणाची आहुति देण्यापर्यंत महात्माजींनी मजल कां आणावी ?" पण हा प्रश्न विचार करण्यासारखा असला तरी, त्याचा विचार करण्यांत आता कांहीच अर्थ उरलेला नाही. कारण "गांधींनी अशी प्रतिज्ञा कां केली?" यापेक्षा "ती आता केल्यानंतर पुढे काय ?" म्हणजे काय होणार व कोणी काय करावें याच प्रश्नाला खरें व्यावहारिक महत्त्व उरतें. प्रतिज्ञा म्हणजे तो धनुष्यावरचा बाण. एकदा हातचा सुटून गेल्यावर तो सोडणाराने कां सोडला या प्रश्नाच्या चर्चेपेक्षा तो कोणाला लागला किंवा लागला असेल, व त्याने होणारा घात थांबविण्याला कांही उपाय आहे कीं नाही, हाच विचार अधिक उपयुक्त नव्हे काय ?

या दृष्टीने विचार करता प्रथम हिंदुस्थानसरकार काय म्हणतें व डॉ. आंबेडकर काय म्हणतात हें लक्षांत घेतलें पाहिजे. सरकार हें म्हणणार, व त्यांनी तें म्हणूनहि टाकलें आहे कीं, कोणाहि सरकार म्हणविणाराला असल्या धमकीला भीक घालून चालणार नाही. आणि तेंहि खरेंच ! ब्रिटिश सरकारने मॅकस्विनी, किंवा जतींद्रनाथ दास यांसारख्यांना प्रायोपवेशन करून मरेपर्यंत तुरुंगांतच डांबून ठेविलें, तें काय उगीच ? ते म्हणणार कीं, "आम्हीं आज गांधींना तुरुंगांतून सोडून देतों म्हणतों हें तरी पुष्कळच नव्हे का ?" गेंड्याच्या अंगाला कांटा खुपत नाही.

आमच्या सरकाराच्या काळजाला खुपेल असा निर्दयतेचा कांटा कोणता तरी आहे काय ?

सरकारचें हें एक असो. पण डॉ. अंबेडकर यांनी या प्रसंगीं जे उद्गार काढले आहेत त्यांचें मात्र आश्चर्य वाटतें. त्यांनी सरकारी अधिकाऱ्यांइतकें देखील सौजन्य आपल्या उद्गारांत दाखविलें नाही ! "गांधी मेले तरी त्याची मला पर्वा नाही. हें कांही नैतिक युद्ध नव्हे, तर राजकारणाचा हा एक डोंबारी खेळ आहे. अस्पृश्येदखील जिवावर उदार होऊन! हक्कसंरक्षणार्थ लढतील हें गांधींनीहि लक्षांत ठेवावें." गांधी कोणत्या अर्थाने जिवावर उदार झाले आहेत? आणि डॉ. आंबेडकरांचे लोक कोणत्या अर्थाने जिवावर उदार होणार ? पण फिरून तोहि परस्पर हवाला! जीव देण्याचे कामीं गांधींचें व्याकरण प्रथम पुरुषी एकवचनी, तर आंबेडकरांचें तृतीय पुरुषी अनेक वचनी आहे हें ध्यानांत ठेवलें म्हणजे, नैतिक युद्ध कोणाचें आणि डोंबारी कोण हें तेव्हांच लक्षांत येईल. आंबेडकर कंबरेला ढोलगें बांधून वाजविणार ! आणि दोरावर चढून पडणार दुसरेच ! पण आंबेडकरांचा हा खेळ पाहात कौतुक करीत बसणारें सरकार जोंपर्यंत हातांत दिडकी घेऊन वरच्या मजल्यावर उभें आहे तोंपर्यंत हा खेळ रंगणारच.

म्हणून हिंदु जनतेच्या पुढाऱ्यांनीच आता मदतीला धावलें पाहिजे. महात्मा गांधींच्या प्राणाला ग्रहण लागण्याचा योग उघड दिसतो. आणि राहू केतु आदिकांचा पाश सोडवावयाचा तर कांही दान करावें लागतें असा भाविक हिंदु लोकांचा या विसाव्या शतकांतहि विश्वास आहे. आणि तो तरी कां नसावा ? उपवासाने राजकारणाचे प्रश्न सुटतील इतका आत्मविश्वास महात्माजींसारख्या श्रेष्ठ प्रज्ञेच्या पुरुषाचाहि जर या युगांत जिवंत आहे, तर प्रायश्चित्ताप्रमाणे दानादिकांच्या अतींद्रिय फलश्रुतीवर भाविक लोकांचा विश्वास कां नसावा ? तात्पर्य, महात्माजींच्या प्राणाचा ग्रास करण्यास सरसावणारा राहू, त्याच्या जातीच्या लोकांना कांही विशेष प्रकारचें दान केल्याशिवाय, मागें फिरणार नाही हे उघड दिसतें. गोलमेज परिषदेच्या समुद्रमंथनांतून निघणाऱ्या अमृताचा पेला अस्पृश्य वर्गाच्या तोंडाला लागलेला असता, महात्मा गांधी तो हिसकावून घेऊं पाहत आहेत असें आंबेडकरांना वाटल्यावरून, त्यांनी वर दर्शविलेले बिनमुरवतखोरपणाचे उद्गार काढले असावे. राहूला येऊन जाऊन वैषम्य व चिंता ही कीं, देवांच्या पंक्तींत मला बसावयाला कसें मिळणार ? पण ही बाब फार मोठीशी नाही. इतकी कुचेष्टा केल्यावर आंबेडकरांना तेवढी प्रतिष्ठा मिळणें अवश्यच आहे. तरी " दे दान सुटे गिराण " हा मंत्र डोळ्यांपुढे ठेवून, हिंदु पुढाऱ्यांनी या कामीं स्वार्थत्यागाची परमावधि करून महात्माजींचे प्राण कसे वांचवावयाचे याच्या विचाराला ताबडतोब लागलें पाहिजे.

# यंदाचा श्रीगणेशोत्सव

यंदाचा पुण्यांतील श्रीगणेशोत्सव थाटाने पार पडला. गणरायाचें आगमन मेघराजाच्याच रियासतींत होत असल्याने उत्सवाच्या आरंभीं किंवा अखेरीस एकमेक एकमेकांच्या नजरेस पडून उत्सवाच्या बेरंगाचा प्रसंग बहुधा येतो. परंतु त्या योगाने उत्सवकर्त्यांची गैरसोय झाली तरी जनतेचीं अन्तःकरणें आनंदाने फुललेलींच असतात. त्याप्रमाणे यंदा उत्सवाच्या पहिल्या चार पांच दिवसांत पर्जन्याने झोड उठवून उत्सवांतील बहुतेक कार्यक्रम बंद पाडले. पण पुढच्या चारपांच दिवसांत त्याने उघाडी दिल्यामुळे जनतेने आपली उत्सवप्रियता द्विगुणित हौसेने व उल्हासाने प्रकट केली. यंदा गणपतींची व मेळ्यांची संख्या सामान्यतः नेहमीप्रमाणेच असून अनंतचतुर्दशीच्या दिवशीं एवढी प्रचंड मिरवणूक निघाली कीं, तशी मिरवणूक अलीकडे पुष्कळ वर्षांत लोकांच्या पाहण्यांत नाही. याला कारण सर्वत्र झालेली आबादानीच होय. सालाबादप्रमाणें उत्सवाचा समारोप डेक्कन जिमखान्याच्या मैदानांत मंगळवार ता. १३ रोजीं सायंकाळीं ६॥ वाजता करण्यांत आला. सदर प्रसंगीं अध्यक्षस्थान **श्री. वा. कृ. भावे** यांनी स्वीकारल्यावर गणेशोत्सव मंडळाचे चिटणीस **रा. दंडवते वकील, दत्तोपंत गुप्ते वकील, ल. ब. भोपटकर** यांचीं भाषणें झालीं. दंडवते वकील यांनी गणेशोत्सवाचे बाबतींत व विशेषतः मेळ्यांसंबंधाने परिस्थिति काय आहे याचें विवेचन केलें. आणि गुप्ते, भोपटकर व भावे यांनी हिंदू जनतेस तिच्या कर्तव्याची आठवण करून दिली.

गणेशोत्सवास सार्वजनिक स्वरूप देण्यांत लो. टिळकांचा हेतु हिंदु समाजाचें संघटन करण्याचाच होता. हा हेतु गेल्या अडतीस वर्षांत बऱ्याच अंशीं तडीस गेला असला तरी त्यामार्फत

व्हावयाचीं कांहीं कामें अद्यापि शिल्लकच आहेत. गणेशोत्सवास सार्वजनिक स्वरूप येण्यापूर्वीच्या चार-पांचशें वर्षांचा विचार केल्यास राज्य हिंदूंचें असो कीं अहिंदूंचें असो, हिंदू लोक मुसलमानांशीं धार्मिक बाबतींत नमतें घेऊनच वागत आलेले दृष्टीस पडतात. मुसलमानांच्या मोहरमाच्या सणांत हिंदूंनी सामील होणें व त्यांच्या पिरास हिंदूंनी भजणें हें त्या वृत्तीचेंच द्योतक होय. मुसलमानांचा विशिष्ट स्वभाव लक्षांत घेऊन हिंदूंनी धोरण म्हणून या पद्धतीचा अंगीकार केला असेल, नाहीं असें नाहीं. परंतु उलटपक्षीं मुसलमानांनीं हिंदूंच्या सणांत भाग घेऊन या प्रकारची दिलजमाई न दाखविल्यामुळे हिंदूंच्या वरील वर्तणुकीचा उलगडा त्यांच्या भ्याडपणाच्या व गुलामगिरीच्या दुर्गुणाशिवाय दुसऱ्या कोणत्याहि रीतीने करतां येईना.

अडतीस वर्षांपूर्वी लो. टिळकांच्या लक्षांत हिंदूंचा हा भित्रेपणा व ही स्वाभिमानशून्यता आल्यामुळेच सार्वजनिक गणेशोत्सवाची मुहूर्तमेढ रोवून त्यांनी एक प्रकारची प्रतिक्रियाच सुरू केली असें म्हणण्यास हरकत नाहीं. या प्रतिक्रियेने हिंदु समाजांत जागृति घडवून आणिली व तिलाच आर्यसमाज व हिंदू महासभा यांनी प्रवर्तित केलेल्या हिंदुसंघटनेचा दुजोरा मिळाल्यामुळे तिचा जोर पुष्कळच वाढला यांत शंका नाहीं. तथापि हिंदूंतील तेजस्वितेचा व टणकपणाचा अभाव हा जो ठळक व जबरदस्त दोष आहे तो अद्यापिहि दूर झाला नाहीं. यंदाच्या उत्सवांत घोडेपिराच्या जागीं त्या जागेच्या हिंदू मालकाने आपला गणपति नव्याने बसविला असता त्याला मुसलमानांनीं हरकत घेतली व सदर गणपति तेथून हलवून दुसरीकडे नेऊन ठेवण्यांत आला. या संबंधाची तक्रार पोलीस अधिकाऱ्याकडे गेली होती, तरी पोलिसांनी शांतताभंगाची सबब सांगून या धार्मिक गोष्टींत हात घालण्याचें नाकारलें. घोडेपिराच्या जागेंत त्या जागेचा मालक दरसाल ताबूत बसवितो व त्याने यंदाच गणपति बसविण्यास सुरुवात केली हें कांहीं खोटें नाहीं. परंतु तो दरसाल ताबूत बसवितो म्हणून त्याचा गणपति बसविण्याचा धार्मिक हक्क कसा नष्ट होतो हें आम्हांस समजत नाहीं. त्याने केलेली गणपतीची स्थापना केवळ मुसलमानांच्या डोळ्यांवर येते म्हणून त्याला आपल्या धार्मिक हक्कास मुकावें लागत असेल तर हिंदूंचें जीवित मुसलमानास खूष राखण्याकरितांच आहे, असाच त्याचा अर्थ करावा लागेल.

पुण्यांतच काय, पण मालेगांवांतहि अधिकाऱ्यांनी याच मुद्यावर जोर देऊन तेथील मातामठांतील गणपतीची प्राणप्रतिष्ठा करण्यास मदत देण्याचें नाकारलें. या दोनहि उदाहरणांवरून हिंदु जनतेने 'देवोदुर्बलघातकः' या वचनांत सांठविलेला अर्थ लक्षांत घेणें जरूर आहे. हिंदूंची संख्या महाराष्ट्रांत मुसलमानांच्या ७–८ पट असेल. पण संख्या हें बळ नसून सामर्थ्य हेंच बळ आहे, याचा प्रकाश हिंदूंच्या डोक्यांत आता तरी पडला पाहिजे. महाराष्ट्रांत गणेशोत्सव गेलीं ३८ वर्षे सुरू असताहि सामर्थ्याचें बळ महाराष्ट्रीय हिंदूंत उत्पन्न झालेलें नाहीं. त्यावर उपाय हिंदूंनी अधिक संघटित होणें हाच आहे. हिंदुसमाज एवढा प्रचंड असला तरी त्यांतील प्रत्येक व्यक्तीस आपण एकटे व असहाय आहों असें अंतर्यामीं भय वाटतें. या कारणाने त्याला स्वतःच्या जबाबदारीवर पुढे पाऊल टाकण्याची हिम्मतच होत नाहीं यासाठी ज्या ज्या गांवीं मुसलमानांच्या अतिक्रमणाची भीति असेल त्या त्या गांवांतून हिंदूंनी आपलीं स्वयंसेवक दलें स्थापून स्वतःच्या व स्वतःच्या हक्कांच्या रक्षणार्थ प्रतिकाराची तयारी ठेवणें अत्यंत आवश्यक आहे. हिंदूंची ही नुसती तयारी दृष्टीस पडली तरी त्यांची अर्धी अधिक फत्ते झाली असें समजून चालण्यास हरकत नाहीं. सरकारास तरी हिंदु-मुसलमानांच्या वादांत हिंदूंची बाजू घेतल्याने मुसलमान दंगा करतील अशी भीति वाटते. यांचें कारण तरी त्यांच्या सामर्थ्याची जाणीव याशिवाय दुसरें कोणतें असणार ? तेंच सामर्थ्य हिंदूंतहि दिसूं लागलें असता सरकार सध्याची तटस्थ वृत्ति टाकून देऊन उभयतांची बाजू न्यायाची त्याला उचलून धरल्यावांचून रहाणार नाहीं.

गणेशोत्सवाच्या प्रवर्तकांचा हेतु हिंदूंची संघटना घडवून आणण्याचा होता, हिंदूंना केवळ करमणुकीचें एक नवें साधन मिळवून देण्याचा नव्हता. या दृष्टीने विचार केल्यास सध्या गणेशोत्सवास जें वळण लागूं पाहात आहे तें मूळ उद्देशास सोडून असल्याचें कोणासहि दिसून यईल. व्याख्यानें, मेळे व प्रवचनें हीं गणेशोत्सवांतील लोकशिक्षणाचीं प्रमुख अंगें होत. त्यांपैकीं व्याख्यानांचा फायदा उत्सवाच्या कार्यकर्त्यांनी जसा करून घ्यावयास पाहिजे तसा ते करून घेत नाहींत. यामुळे व्याख्यानें जवळ जवळ गळाल्यासारखींच आहेत. मेळ्यांना पदें तपासणाऱ्या कमिटीकडून सार्वजनिक प्रश्नांची चर्चा करण्याच्या बाबतींतहि जरूर तें स्वातंत्र्य मिळत नसल्याने प्रासादिक कवींना पद्यें रचण्यास हुरूप येत नाहीं आणि वैयक्तिक टीका करण्यांत व क्षुल्लक विषयांनी श्रोत्यांना रंजविण्यांत मेळेवाल्यांना समाधान मानून राहावें लागत आहे. हीच स्थिति प्रवचनांचीहि. हीं तिन्ही अंगें लुलीं पडत चालल्याने उत्सवाची उपयुक्तता कशी नष्ट होत आहे याची कल्पना वाचकांस येईल. यासाठी मुख्य सुधारणा

व्हावयास पाहिजे ती ही कीं, उत्सवमंडळाचे चिटणीस, मेळेवाले व सार्वजनिक गणपतीवाले यांचें मोडलेलें सहकार्य पुनः जोडलें गेलें पाहिजे व त्यांनी परस्परांच्या मदतीने उत्सवांतील दोष झाडून टाकून त्यास बदलत्या काळाच्या अनुरोधाने कार्यक्षम करण्याचा मार्ग शोधून काढला पाहिजे.

# कांही चमत्कारांचें सत्य स्वरूप

(लेखक—चिटणीस, गूढचिकित्सामंडळ, पुणें ४)

बऱ्याच चमत्कारांमध्ये परमेश्वराची खास कृपा किंवा निसर्गनियमोल्लंघन असते अशी कांहींची समजूत आहे; पण या बाबतींत शास्त्रज्ञांची दृष्टि निराळी आहे. ती अशी कीं, चमत्कार हे नियमांस अनुसरूनच होतात; मात्र ते नियम आपणांस माहीत नसतात. विश्वामध्ये चमत्कार अनंत आहेत; त्यांपैकीं मनुष्यांना दिसलेले असे थोडे आहेत व ज्यांची उपपत्ति समजली आहे असे त्याहूनहि थोडे आहेत; हें शास्त्रज्ञांना मान्य आहे. पण त्यांचें मुख्य म्हणणें हें कीं, जे चमत्कार लोकांमध्ये प्रसिद्ध असतात त्यांसंबंधाने वस्तुस्थिति लोकांस वाटते त्याहून भिन्न असते व हे चमत्कार कांहीं नियमास अनुसरूनच असतात. अलीकडे घडलेल्या कांही चमत्कारासंबंधाने वस्तुस्थिति पुढे दिल्याप्रमाणें आहे—

**( १ ) निखाऱ्यांवरून चालत जाणें**—चरांत लांकडें जाळून त्यांचा निखारा करून त्यावरून चालत जाण्याचा प्रयोग कांही ठिकाणीं करतात. ह्या प्रयोगांत निखाऱ्यांवरून चालत जाणारांचे पाय भाजत नाहीत हा मंत्राचा किंवा तेथील देवतेच्या विशेष कृपेचा प्रभाव असें समजलें जातें. पण वस्तुस्थिति अशी आहे कीं, तशा स्थितींत व तसें चालत जाण्याने केव्हांहि व कोणालाहि विशेष इजा होत नाही. याचीं कारणें पुढील होत. ( १ ) पायाची जाड कातडी, ( २ ) पाय निखाऱ्यांवर फार वेळ रहात नाही म्हणून भाजण्यास पुरता वेळ मिळत नाही. ( ३ ) भाजणें म्हणजे जळणें यांस हवा लागते ती सपाट पाऊल निखाऱ्यावर पडतें तेव्हा निखाऱ्यांस मिळत नाही.

यासंबंधाने पुण्यास डेक्कन जिमखान्यावर मंत्रावांचून प्रत्यक्ष प्रयोग केला होता तेव्हा वरील वस्तुस्थिति शेंदीडशें सुशिक्षित लोकांच्या अनुभवास आलेली आहे.

**( २ ) साप खाणें**— सर्व साप विषारी असतात व साप खाल्ला असता मनुष्य मरतो या दोन्ही समजुती निराधार आहेत. सापाचें विष पोटांत गेल्यास पोटांतील पाचक रसामुळे विष निरुपद्रवी होतें. म्हणून विषारी साप खाल्ला तरी मृत्यु येत नाही. तथापि हे ध्यानांत ठेवावें कीं, साप खाण्याचा प्रयोग करणारे लोक सामान्यतः बिनविषारी साप खातात. दोन तीन प्रसंगीं ही गोष्ट तज्ज्ञांनी पाहिलेली आहे.

**( ३ ) सर्परूपधारी पूर्वज किंवा देवता**—कांहीं ठिकाणीं जे साप निघतात ते माणसांना चावत नाहीत एवढेंच नव्हे तर ते माणसांनी हातांत घेतले तरीहि चावत नाहीत यावरून ते ( १ ) देवता, किंवा ( २ ) त्या ठिकाणीं राहणाऱ्या लोकांचा कोणी पूर्वज असावा अशा कल्पना प्रचलित आहेत व ह्या कल्पनेने त्यांचा पूजाहि करण्यांत येते. ह्यांपैकीं दुसऱ्या विधानाबद्दल आम्हांस कांहीहि म्हणावयाचें नाही. आम्हास सांगावयाचें ते एवढेंच कीं, हे साप चावत नाहीत व हात लावूं देतात हा ह्या समजुतीला जो आधार घेतला आहे, त्यांत तथ्य नाही. कोणताहि साप माणसास चावण्यास टपलेला असतो व त्यास हात लावला कीं, तो चावावयाचाच ही समजूत चुकीची आहे. मंत्रावांचून केवळ युक्तीने नाग धरून त्याचा खेळ करणारे अनेक लोक आहेत. यावरून व सातारा जिल्ह्यांतील शिराळें गांवीं नागपंचमीच्या दिवशीं नायकुळे जातीचे साप वाटेल तो मनुष्य—मुलेहि—हातांत धरतो व तो साप बहुधा चावत नाही यावरून वरील गोष्ट समजून येईल.

**( ४ ) काच, खिळे खाणें, ॲसिड पिणें इ.**—या पदार्थांपासून कांही इजा होते हें सामान्यतः खरें आहे; पण सवय व युक्ति यांच्या साहाय्याने ह्यांपासून होणारी इजा पुष्कळच कमी करणें शक्य आहे. या बाबतींत पुढील गोष्टी लक्षांत ठेवाव्या: —

काचेचे तुकडे पोटांत गेले असता लागलीच आजार होतो किंवा मृत्यु येतो ही गोष्ट अगदी खोटी आहे. गमतीने काच खाल्ली पण कांहीहि झालें नाही अशीं सामान्य माणसांचीं प्रत्यक्ष उदाहरणें दाखवितां येण्यासारखीं आहेत.

सवय केल्याने भाजणाऱ्या पदार्थांची दाहकता पुष्कळ कमी होते. सैपाक करणारीं माणसें निखारे, कढत भांडीं सहज उचलतात हा नेहमीचा अनुभव

आहे. १०–२० माणसें मरतील इतकी अफूाव सोमल रोज खाणारीं माणसें आहेत. डीक्विन्से हा प्रसिद्ध इंग्लिश ग्रंथकार एके दिवशीं लॉडेनम म्हणजे अफूचा द्राव याचे दहा हजार थेंब कधी कधी घेत असे ! संवय केल्याने व अल्कलीसारख्या प्रतिकारक औषधांचा आधीं किंवा मागाहून उपयोग केल्याने, ॲसिडपासून होणारी इजा पुष्कळ कमी करतां येण्यासारखी आहे.

यासंबंधाच्या हकीकतींत कधी कधी वर्तमानपत्रकर्त्यांच्या चुकीमुळे अथवा अन्य कारणांनी अतिशयोक्तिहि होते. प्रो. राव हे मुंबईच्या प्रयोगांत एक औंस नायट्रिक ॲसिड प्याले अशी 'टाइम्समध्ये' बातमी होती; पण खरोखरी एक ड्राम ॲसिड घेतलें होतें अशी वस्तुस्थिति आहे व हिला प्रत्यक्ष हजर असलेल्या माणसांच्या साक्षीचा आधार आहे.

सराव करण्याने काच, खिळे वगैरे गिळलेले जिन्नस कांही वेळानंतर बाहेर काढून टाकतां येतात व त्यायोगे त्यापासून होणारी इजा टाळतां येते. ह्या व असल्या कृतींत धाडस, कौशल्य आहे हें नाकबूल नाही. फक्त यांत कांही गूढ योगसामर्थ्य किंवा मंत्रसामर्थ्य नाही असें आमचे म्हणणें आहे.

वरीलसारखे प्रयोग करणारे बंगालमधील नरसिंगस्वामी हे शेवटीं अशा एका प्रयोगानंतर वारले. यावरून हा सर्कशींतील वाघसिंहाच्या खेळासारखा एक धाडसाचा व कौशल्याचा खेळ आहे असें दिसून येईल.

सर रामन् हे प्रख्यात शास्त्रज्ञ नरसिंगस्वामींच्या प्रयोगाचे वेळीं हजर होते; व त्यांची त्यांच्या यौगिक सामर्थ्याबद्दल खात्री झाली वगैरे जी बातमी वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध झाली होती ती यथार्थ नाही. श्री. रामन् यांना ह्या बाबतींत पाठविलेल्या पत्राच्या उत्तरांत ते म्हणतात—

"I entirely agree with you that there is no question of Nar Singhaswamy possessing any occult powers. The other explanations suggested by you are entirely correct."

(५) **जादुगारांमधील सामना**—जादुगारांमध्ये सामना होऊन एका जादुगाराने दुसऱ्याची पुंगी बंद करणें वगैरे चमत्कार घडल्याच्या बातम्या वर्तमानपत्रांतून मधून मधून येतात. असल्या चमत्कारांमध्य सिद्धसाधकपणाचा भाग बहुधा असतो. पुणे येथे असे प्रयोग करून 'हा प्रयोग अमक्या ताइताच्या साहाय्याने होतो" असें सांगून ताईत विकण्यांत येतात व भोळे लोक ते विकत घेतात. जादूने पुंगी बंद करतां येत असेल तर आमच्या माणसाकडून वाजाविलेलें वाद्य बंद करण्याचा प्रयोग पुण्यास कोणींहि जादुगाराने करून आमच्या समक्ष दाखविण्याचें कबूल केल्यास त्यास पारितोषिक देण्याची आमच्या मंडळीची तयारी आहे.

(६) **वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध झालेलें सर्पविषावरील मोराच्या पिसाचें औषध**—हें निरुपयोगी आहे असें हाफकिन इन्स्टिटयूटमध्ये झालेल्या प्रयोगांवरून आढळून आलें आहे.

(७) **भुताटकी**—ससून इस्पितळांत होणारे व प्रथम अतर्क्य असे वाटणारे भुताटकीचे प्रकार पोलिसांचा पहारा १०-१२ दिवस ठेविला तेव्हा उघडकीस आले.

(८) **मुंगसाने चाऊन तोंडांत घातलेल्या औषधाने सर्पदष्ट मनुष्य बरा होणें**—हैदराबाद येथें घडलेल्या ह्या चमत्कारासंबंधाने वर्तमानपत्रांतून कांहीं दिवसांपूर्वी जी बातमी प्रसिद्ध झाली होती तिजसंबंधाने विश्वसनीय बातमी देण्याबद्दल केसरी पत्रांतून केलेल्या विनंतीला उत्तर नाही. यावरून ह्या बातमींत कितपत तथ्य आहे याचाहि विचार करावा.

### सूचना व विनंति

चमत्कार करणारांचे नादीं लागून फसूं नये म्हणून आमची लोकांस विनंति आहे कीं, त्यांनी संशयी व चिकित्सक दृष्टीने चमत्कारांकडे पाहावें व तज्ज्ञांची खात्री झाल्यावांचून चमत्कारांवर फाजील विश्वास ठेवूं नये, आणि चमत्कार करणारांचे दास होऊन द्रव्यापव्यय करूं नये. अशा चिकित्सक बुद्धीमुळे सर्व चमत्कार नाहीसे होऊन आस्तिक्यबुद्धि कमी होते असें कांहींना वाटतें. पण त्यांत विशेष तथ्य नाही. 'नास्ति सत्यात् परो धर्मः' हें वचन खरें असेल तर चमत्कारांचें सत्य स्वरूप दृष्टीस पडल्याबद्दल कोणास खेद करण्याचें कारण नाही. शिवाय हेंहि लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, कांही चमत्कार खोटे ठरले तरी माणसास थक्क करणारे खरे चमत्कार जगांत थोडे थोडके नाहीत. रेडिओसारखे शास्त्रीय चमत्कार सोडून दिले तरी प्राण्यांतील गर्भोत्पत्ति व अपत्यजनन, पुष्पफलोत्पत्ति, सूर्योदय हे नित्य घडणारे चमत्कार काय थोडे आहेत? विश्वावर ताबा चालविणाऱ्या शक्तीचें अतर्क्य व प्रचंड सामर्थ्य मनुष्याच्या प्रत्ययास आणून देण्यास हे चमत्कार पुरेसे नाहीत काय ?

# कुलाबा जिल्ह्यांतील खेडीं

## प्राचीन व अर्वाचीन आर्थिक स्थिति

( लेखक—**रा. ल. घरत**, आवास, जि. कुलाबा. )

### रोहें तालुका मेढें व घोसाळें

श्रीयुत नारायण वामन जोशी यांनी मेढें गांवची पुढील माहिती दिली आहे—गांवांत भातशेती २४९ एकर, रबी १९, वरकस ४६, गुरचरण २४, फॉरेस्ट १३९ व आकारीं पडीत ६ मिळून सोडलेले गुंठे धरून ४८५ एकर जमीन असून तिचा सरकारसारा रु. १९०५–६–९ आहे. भातशेतीचा सारा एकरीं रु. ८ ते १० असून मक्ता दहा मणापासून सोळा मणांपर्यंत आहे, व किंमती पूर्वी रु. ६०० ते ८०० होत्या त्या आता रु. ३०० ते ४०० इतक्या उतरल्या आहेत. गांवांत ४२१ पुरुष व ४७२ स्त्रिया असून त्यांत मजूर ३५, मक्त्याने जमीन कसणारे १४२ व धंद्यासाठी बाहेर गेलेले १६५ आहेत. जमीनदार असून कर्जदार ३२ व नसून १२८ आहेत. व्याजाचे दर शेंकडा रु. ९, १२,१५,२५ असे आहेत. पूर्वीचे जमीनदार असून आता गरीब झालेले १० व बाहेरून येऊन जमीनदार झालेले ७ आणि सावकार ६ आहेत. एकंदर ८१ खातेदारांपैकीं २७ बाहेरगांवीं राहतात. १०० रुपयांवर सारा भरणारे ४ खातेदार, ५० ते १०० भरणारे ६, २५ ते ५० भरणारे १०, ५ ते २५ भरणारे २८, १ ते ५ भरणारे १० व एकापेक्षां कमी भरणारे २३ आहेत. १९३०-३१ सालीं २५ जणांनी दागिने विकून सारा भरला.

घोसाळें गांवांत ४४५ एकर भातशेती, २ रबी, १०९४ वरकस, १३५ जंगल व २३७ संरक्षित जंगल असून बागायती फक्त ६ गुंठे आहे. राखीव जंगलांत गुरें चरतात व सर्व गांवाचे क्षेत्रफळ जवळ जवळ अडीच हजार एकर आहे. गांवांत ७१९ पुरुष व ६९३ स्त्रिया असून त्यांत निव्वळ मजुरी करून पोट भरणारीं माणसें ५३२, मक्त्याने जमिनी करणारीं २०१ व धंद्यासाठीं बाहेर गेलेलीं १५० आहेत. दर एकरीं मक्ता ४ पासून १२ मण असून सारा रु. ४ ते ८ आहे. जमीनदारांत १०० कर्जदार असून इतर २०० आहेत. व्याजाचे दर जमीनगहाणावर शेंकडा १२ ते १५, दागिन्यांवर १५ ते १८ व अंगावर २० असे आहेत. पूर्वी जमीनदार असून हल्ली गरीब असलेल्यांची संख्या २०० आहे. व बाहेरून येऊन श्रीमंत झालेले ४ आहेत. २०० खातेदारांत १०० रुपयांवर सारा भरणारे ३, ५० ते १०० भरणारे १४,२५ ते ५० भरणारे २२, ५ ते २५ भरणारे ७१, १ ते ५ भरणारे ४९ व एक रुपयापेक्षा कमी भरणारे ४१ आहेत. बाहेर गांवीं राहणाऱ्या खातेदारांत १०० रुपयांवर सारा भरणारा १, ५० ते १०० भरणारे ३, २५ ते ५० भरणारे ३ व १ ते २५ भरणारे ५६ आहेत.

### तालुका महाड

महाड तालुक्यांतून श्रीयुत गोविंद नारायण धार्या यांनी दासगांवची व श्रीयुत शंकर विठ्ठलदास धार्या यांनी नातें या गांवाची माहिती दिली आहे. दासगांवाचें क्षेत्रफळ २४५६ एकर असून सारा रु. २३७२-२-९ आहे. गांवांत ७५१ पुरुष व ८०० स्त्रिया असून त्यांत निव्वळ मजुरी करणारीं माणसें २००, मक्त्याने जमिनी करणारीं ९०० व धंद्यासाठीं बाहेर गेलेलीं १५० आहेत. एकरीं मक्ता ८ पासून १५ मणांपर्यंत असून सारा रु. ५ ते ८ आहे. जमीनदारांत शेंकडा ८० कर्जदार असून इतर कर्जदार २०० आहेत. किंमतीचें मान एकरीं रु. ४०० ते १००० आहे. व्याजाचे दर जमीनगहाणावर शेंकडा ६ ते ९, दागिन्यावर १२ व अंगावर शेंकडा १५ ते २४ असे आहेत. पूर्वी जमीनदार असून नंतर गरीब झालेले शेंकडा १० निघतील. नातें गांवाचें क्षेत्रफळ १५३७ एकर असून सारा रु. ३०३२–९–९ आहे. गांवांत सुमारें ५४० पुरुष व ६१० स्त्रिया असून त्यांपैकीं धंद्यासाठीं बाहेर गेलेले ५०, मजुरीवर निर्वाह करणारे व मक्त्याने जमिनी करणारे प्रत्येकीं २०० हून अधिक आहेत. एकरीं मक्ता ४ ते १४ मण, सारा २ ते ७ रु. व किंमत १५० ते ५०० रु. आहे. प्रायः सर्वच जमीनदार कर्जबाजारी असून फक्त ५।६ पेन्शनर कर्जदार नाहीत. जमीनगहाणावर व्याज शेंकडा ९ ते १२, दागिन्यांवर १२ ते १८ व अंगावर १५ ते २० आहे. जमिनी जाऊन गरीब झालेलीं कुटुंबें २० व बाहेरून येऊन श्रीमंत झालेले एकच गृहस्थ आहेत. गरीब झालेल्या २० कुटुंबांत १२।१३ प्रभु व बाकीचे

महार आहेत. २७५ खातेदारांत १०० रुपयांवर सारा भरणारे ३, ५०ते १०० भरणारे ९, २५ते५० भरणारे १५, ५ ते २५ भरणारे ५०, १ ते ५ भरणारे १५० व १ पेक्षा कमी भरणारे ४८ आहेत. बाहेरगांवीं राहणाऱ्या ३० खातेदारांत २५ रुपयांवर सारा भरणारे ७ व त्यापेक्षा कमी भरणारे २१ आहेत. सुमारें २०० खातेदार कर्ज काढून सारा भरतात व १९३०–३१ सालीं दागिने विकून सुमारें १५ जणांनी धारा भरला. वसुलीसाठीं एक नोटीस झाली होती. परंतु स्वतः मामलतदार एकदा व सर्कल इन्स्पेक्टर अनेक वेळां येऊन आणि चौथाई दंडाचा धाक घालून गेले. टेबल पाहणीमुळे शेंकडो लोकांत एकाची जमीन दुसऱ्याच्या नांवीं घातल्यामुळे वाद उत्पन्न झाले असून हल्लींच ५० इसमांनी नांवे बदलण्यासाठी अर्ज केले आहेत.

### माहितीचा गोषवारा

मागील दोन लेखांत व या तिसऱ्या लेखांत दिलेल्या कुलाबा जिल्ह्याच्या चार तालुक्यांतील पंधरा खेड्यांच्या आर्थिक माहितीवरून असें दिसून येईल कीं, या खेड्यांतील शेतकऱ्यांचीं कुटुंबें शेंकडा १०, १५, २०, ४०, ५०, ९५ व ९७ इतकीं पूर्वी जमीनदार असून इंग्रजी अमलांत जमिनी घालवून गरीब झालीं आहेत. सुमारें दोन हजार खातेदारांपैकीं बाराशेंपेक्षा अधिक आजच कर्जबाजारी आहेत, व बाकीच्यापैकीं बरेचजण केवळ कर्ज काढूनच सारा भरणारे आहेत. जमिनीच्या उत्पन्नांतून सारा भरणारांची संख्या दोनशेंच्यावर नाही. व्याजाचे दरहि जमीनगहाणावर शेंकडा ९ ते १८॥। व अंगावर १८॥। ते ३७॥ आहेत. सन १९३०–३१ चा सारा आवाग[illegible] शेंकडा ९५ खातेदारांनी दागिने विकून भरला. वाशी, नातें वगैरे खेड्यांतहि दागिने विकन सारा भरणारांची संख्या फार मोठी होती. अंगावर कर्ज काढलेल्यांची संख्या सहाशेंपेक्षां अधिक आहे. एकंदर खातेदारांत १०० रुपयांवर सारा भरणारे फक्त ६० च असून त्यांतील बरेच बाहेरचे आहेत किंवा बाहेरून गांवात येऊन श्रीमंत झालेले आहेत. रु. ५० ते १०० भरणारे खातेदार १२६, रु. २५ ते ५० भरणारे १९६ व ५ ते २५ भरणारे ६०६ आहेत. परंतु या सर्वांतहि बाहेर राहणारांची व बाहेरून येऊन गांवांत राहून श्रीमंत झालेल्यांची संख्याहि मोठी आहे.रु. १ ते ५ सारा भरणारे, व १ रुपयापेक्षांहि कमी सारा भरणारे म्हणजे जे केवळ नामधारीच खातेदार आहेत, अशांची संख्या जवळजवळ साडेसहाशे आहे. लहान मुलें धरून सुमारें आठ हजार लोकसंख्येंतील एक हजार माणसें आपल्या गांवीं पोट भरत नाहीं म्हणून मुंबईसारख्या ठिकाणीं धंदा शोधण्यासाठी गेलीं आहेत. चार हजारांपेक्षां अधिक स्त्रीपुरुष केवळ मोलमजुरी किंवा इतरांच्या जमिनी मक्त्याने राबून कसाबसा निर्वाह करीत आहेत, आणि फक्त सुमारें एक हजार स्त्रीपुरुष घरच्या मालकीच्या जमिनी स्वतः राबून अथवा मक्त्याने दिलेल्या मालकीच्या जमिनींचें मक्त्याचें भात घेऊन आपला व आपल्या मुलांचा त्यावर गुजारा करीत आहेत.सात गांवांच्या मिळलेल्या माहितीवरून तेथे १६०० एकरांपेक्षा अधिक जंगल आहे. बाकीच्या बऱ्याच गांवांत शेंकडों एकर जंगल आहे. या पंधरा खेड्यांच्या स्थितीसारखीच प्रायः जिल्ह्यांतील इतर खेड्यांची स्थिति आहे.

### रोठ खुर्द (रोहें)

पाच वर्षांपूर्वी प्रसिद्ध झालेल्या कुलाबा जिल्ह्यांतीलच एका खेड्याच्या आर्थिक स्थितीचा गोषवारा येथे देत आहें. यावरूनदेखील वरील विधानास पुष्टि मिळते. सन १९२७ सालीं कोंकण एज्युकेशन सोसायटींतील श्रीयुत वा. ग. रानडे, एम. ए बी. एस्‌सी. यांनी रोहें तालुक्यांतील रोठ खुर्द या खेड्याचें आपल्या एम. ए. च्या परीक्षेकरितां १९२४ सालीं लिहिलेलें आर्थिक व सामाजिक निरीक्षण मुंबई प्रांतिक सहकारी संस्थेने छापून प्रसिद्ध केलें आहे. संस्थेचें खेड्यांतील आर्थिक स्थिति दाखविणाऱ्या ग्रंथमालेंतील हें तिसरें पुस्तक आहे. अलिबागच्या 'कोंकण' साप्ताहिकाच्या ता. २२–८–२७ च्या अंकात मीं सदर पुस्तकाचें विस्तृत परीक्षण केलें आहे. श्रीयुत रानडे आपल्या निरीक्षणांत म्हणतात, "या खेड्यांत लागवडीखाली असलेल्या १९१ एकरांपैकीं २४ बिगर शेतकरी खातेदारांजवळ ११३ एकर व २८ शेतकरी खातेदारांजवळ फक्त ७८ एकरच आहेत...एक दोन एकर किंवा त्यापेक्षा कमी जमिनीचे मालकच अधिक आहेत. मालकीच्या दृष्टीने पाहतां ४० एकर जमीन वडिलोपार्जित हक्काने आलेली, व ९२ एकर खरेदीहक्कानें मिळालेली असून बाकीची कबजेगहाण वगैरे प्रकारांनी आलेली आहे. खेड्यांची स्थिति खालावत चालली असून मक्तेदारीने लागवड करण्याची पुष्कळांवर पाळी येत आहे. कारण जमिनी कर्जापाई सावकारांकडे जाऊं लागल्या आहेत. २६ शेतकऱ्यांजवळ स्वतःचे नांगर नाहीत. शेंकडा १८ शेतकऱ्यांजवळ शेतकीसाठी स्वतःचीं जनावरें नाहीत. गांवांत निर्वाह होत नसल्यामुळे ६७ लोक मुंबई वगैरे ठिकाणीं गेले आहेत. गांवांत पुरुष, स्त्रिया व मुलें मिळून ३४६ माणसें असून त्यांतील फक्त तिघांस लिहितांवाचतां येतें."

### इतर जिल्हे व प्रांत

मुंबई इलाख्याच्या इतर जिल्ह्यांतील व हिंदुस्थानाच्या इतर प्रांतांतील खेड्यांची आर्थिक स्थिति कुलाब्यांतील खेड्यांच्या स्थितीपेक्षा अधिक समाधानकारक असेल असें वाटत नाही.

यासंबंधांत ( 1 ) Life and Labour in a Deccan Village, Study No. 1. ( 2 ) Ditto Study No. 2, by Dr. H. Mann and Kanitkar. ( 3 ) Some South Indian Villages by Dr. Gillert Slater. ( 4 ) Report on the investigation of Economic Condition of the two Villages of the Sholapur and the East Khandesh Districts by Rothfield and Patwardhan, इत्यादि माहिती देणारीं पुस्तकें उपलब्ध आहेत.

### माहितीवरून निघणारीं अनुमानें

वरील माहितीवरून असें स्पष्ट होत आहे कीं, इंग्रजी अंमल सुरू झाल्यानंतर कुलाबा जिल्ह्यांतील खेड्यांत राहणारे बरेच शेतकरी आपल्या वडिलार्जित जमिनी घालवून दरिद्री झाले आहेत. अनेकांस पोट भरण्यासाठी गांव सोडून इतर ठिकाणीं जावें लागले आहे, पुष्कळ कर्जबाजारी झाले आहेत आणि फारच थोड्यांस कर्ज न काढतां सारा भरतां येतो. सरकारनें हजारों एकर जमीन जंगलाकडे ठेवल्यामुळे सरकारचें उत्पन्न वाढलें. परंतु गुरचरणीच्या कमतरतेमुळे पुरेशीं गुरें पाळतां येत नाहीत व गुरांच्या अभावीं दुधाची वाण पडून शेतीची जोपासना बरोबर होत नाही असें झालें. तात्पर्य बहुसंख्याक शेतकऱ्याच्या स्थितीवरूनच देशाच्या सुस्थितीचें किंवा दुःस्थितीचें अनुमान काढावयाचें ते शेतकरीच दिवसेंदिवस अधिकाधिक विपद्ग्रस्त होत आहेत. व त्यामुळे हल्लींचें राज्य त्यांस तरी सुखावह झालें नाही असे म्हणावें लागतें.

### शेतकऱ्यांच्या दुःस्थितीचीं कारणें

पूर्वींच्या स्वराज्यांत शेतकरी आपल्या मालकीच्या जमिनींच्या उत्पन्नावर आपलें व आपल्या कुटुंबाचें पोषण करण्यास समर्थ असून त्यास धंद्यासाठी दुसऱ्या गांवीं जाण्याचा प्रसंग फारसा येत नसे. शेतांत पिकेल तरच सरकार त्याचा योग्य हिस्सा घेत असे. त्यामुळे त्यांस निर्वाहापुरतें राहून कर्ज काढण्याचा प्रसंग येत नसे. पण हल्लीं पहावें तों शेतांत पिको वा न पिको, कायमपणाने ठरविलेला डोईजड सारा नियमित वेळीं शेतकऱ्यानें भरलाच पाहिजे, म्हणून त्यास येईल त्या कमी दरानें भात विकावें लागतें, किंवा सावकाराकडून तो मागेल तें व्याज कबूल करून कर्ज काढावें लागतें! त्यांत गतवर्षाप्रमाणे व चालू सालाप्रमाणे पाऊस आपल्याच लहरीप्रमाणे पडूं लागला म्हणजे तर शेतकऱ्याच्या होणाऱ्या हालांना सीमाच नसते यदा ऑगस्ट महिन्याच्या उत्तरार्धांत पावसानें डोळे वटारल्यामुळे शेतकऱ्यांच्या तोंडचें पाणी पळालें. मागाहून पडणारा पाऊस थोड्या ओढाणाच्या जमिनींस मात्र उपयोगी पडतो; परंतु कडक उन्हामुळे ज्या उथळी जमिनींस भेगा गेल्या त्यातील पिकाचें फार नुकसान होतें. पूर्वींच्या राज्यांत प्रत्येक शेतांतील पिकाची वगळी आभावणी होत असे, त्यामुळे हल्लीप्रमाणे उथळी जमिनींचा सारा भरावा लागत नसे. हल्लीं थोड्या चांगल्या जमिनींत पीक असलें म्हणजे उथळी जमिनीच्या मालकांस कर्ज काढूनच सारा भरणें भाग पडते.

पूर्वीं बागायत जमिनींत पाणी असून उत्पन्नाचीं झाडें असतील त्या मानानें सारा द्यावा लागे. हल्लीं जमीन समुद्रकांठीं व राहत्या घराशेजारीं असली म्हणजे सरकार तीवर बागायतीचा जबर सारा बसवून लोकांस आळशी ठरविणार! अशा बागायती जमिनीचा सारा गरीब शेतकऱ्यांस कर्ज काढूनच भरावा लागतो. पूर्वीं नसलेले मीठ, स्टँप, रेजिस्ट्रेशन वगैरे नवे कर व दिवाणी, फौजदारी फिर्यादींचा अतिशय मोठा खर्च व त्रास यामुळेहि शेतकरी हैराण झाले आहेत; आणि सर्वांवर कळस म्हणजे चहा व दारू पिणें हीं व्यसनें फारच बोकाळलीं आहेत. या व्यसनांमुळेहि अनेक शेतकरी दरिद्री झाले आहेत. पूर्वीं इकडे चहाचें नांवहि नव्हतें. औषधाप्रमाणे केव्हा पाती चहाचा उपयोग करण्यांत येई. पण आता पाहावें तर चहा हे आदरातिथ्याचें एक प्रमुखांग होऊन बसलें आहे. ब्राह्मण, ब्राह्मणेतर, कुळंबी, माळी, गडी, मजूर, शेतकरी, महार, चांभार, स्त्री, पुरुष, मुलें, वृद्ध, तरुण, श्रीमंत, गरीब, विद्वान्, अविद्वान् इत्यादि सर्वांसच चहानें वेडें करून सोडलें आहे. सन १९१५ सालीं मी महायात्रेस गेलों होतों. त्या वेळीं दोन महिन्यांत उत्तर हिंदुस्थानात मला चहा कोठेच आढळला नाही. पण तेथे भांगेचें प्रस्थ फारच आहे. इकडे उजाडल्याबरोबर जसा प्रथम चहाचा नैवेद्य लागतो तसा तिकडे भांगेचा असतो. पूर्वीं गांवांतच भंडारी माडाचा रस काढून त्याची दारू बनवीत; पण ती फार स्वस्त असे. भंडाऱ्याच्या घरीं थोडें काम केलें तरीहि शेतकऱ्यास ती मोफत मिळे. हल्लीं सरकारनें दारूच्या विक्रीचे मक्ते देऊन दारूच्या व्यसनापासून कोट्यवधि रुपयांनी आपलें उत्पन्न वाढविलें आहे.

पूर्वीं शेतकरी मुलांच्या लग्नासाठीं कर्ज काढीत असत, पण मुलांना कर्जफेडीसाठीं सावकाराकडे चाकरीस ठेवीत. साठ रुपये कर्ज काढलें

तर मुलांस सात-आठ वर्षें चाकरी करावी लागे. साध्या कागदावर करार लिहून त्यांत असें म्हटलेलें असे कीं, मुलानें धन्याची इमानेंइतबारें नोकरी करावी, व रुपयांस व्याज न आकारता सावकारानें अमुक वर्षांत रुपये फिटले असें म्हणून मुलास मोकळें करावें. तसेंच मुलगा नोकरीवर असतांना सावकारानें त्याच्या पोटासाठी प्रथम थोडीं वर्षें दरमहा एक मण व नंतर दीड मण भात द्यावें आणि वर्षास एक धोतर, एक टोपी, एक किंवा वयाच्या मानानें दोन घोंगड्या, एक काचवा ( घोंगडीचा कबजा ) एक वाहाणांचा जोड व जरूर तितका तंबाखू द्यावा. या व्यवस्थेनें चाकरीचीं वर्षें पुरीं होण्याच्या सुमारास मुलगा चांगला वयांत येऊन आपल्या घरीं आपला संसार कुशलतेनें थाटण्यास लायख होत असे. शेतकामांतील शिक्षण त्याला आपल्या धन्याच्या घरीं मिळाल्यामुळें तो शेताची निगा चांगली राखी, व पाऊसपाणीहि हंगामशीर पाहिजे तसाच पडे. यामुळें त्याला शेतांत चार दाणे हटकून लाभत असत. आणि त्याचा आणि त्याच्या कुटुंबाचा निर्वाह सुखानें होत असे; परंतु हल्लीं जमीन गहाण देऊन लग्नाकरितां कर्ज काढावयाचें आणि तें फेडण्याकरितां मुंबईसारख्या ठिकाणीं रोजगारासाठी जावयाचें. पण तेथें चैनबाजींत व व्यसनांत पैसे घालवावयाचे; अशी त्यांची स्थिति झाल्यामुळें घरच्या शेतीची आबाळ होऊन व्याज वाढून जमीन सावकाराकडे जाते. म्हाताऱ्यांस घरीं ठेवून मक्त्याची जमीन करणारे व मुंबईस धंद्यासाठी जाणारे देखील अशाच कारणामुळें मक्ता फिटण्याइतकें भात कधी कधी आपल्या जमिनींत पिकवूं शकत नाहींत. हा कालमहिमा आहे !

## कुलाबा जिल्ह्याची चीरफाड

डोईजड वाढविलेला सारा थोडा तरी कमी व्हावा म्हणून जमिनीच्या मालकांनी सरकारची अर्जविनंत्या वगैरेंच्या द्वारें नानापरींनी विनवणी केली, पण सरकारला दया म्हणून आली नाहीं. त्यामुळें लोकांत असंतोष उत्पन्न होणें साहजिक आहे. परंतु जणूं काय हा असंतोष कमीच आहे असें वाटून त्यांत भर घालण्यासाठी सरकारनें काटकसरीच्या निमित्तानें कुलाबा जिल्ह्याची चिरफाड करण्याचें योजिलें आहे. हें नवीन खूळ अमलांत आलें तर लोक अधिक असंतुष्ट होतील हें उघड आहे. कुलाबा जिल्हा नष्ट झाला तर कुलाबा हें नांवच या बाजूला अस्तित्वांत राहणार नाहीं, कारण त्या नांवाचें शहर किंवा खेडें नाहीं. अलिबाग येथील आंग्र्यांच्या कुलाबा नांवाच्या किल्ल्यावरून तें नांव जिल्ह्यास देण्यांत आलें आहे. जिल्हा मोडला तर कुलाबा नांव फक्त मुंबईच्या कुलाब्याचें तेवढेंच राहील, पण त्यामुळें कुलाबा जिल्ह्यांतील लोकांचा आंग्र्यांच्या कुलाब्याचा आपलेपणाचा अभिमान कायम राहणें शक्य नाहीं. शिवाय अलिबाग हें जिल्ह्याचें ठिकाण असून तीं पूर्वी आंग्र्यांची राजधानी होती, म्हणून तेथें येणाऱ्या प्रत्येकास आंग्र्यांच्या गतवैभवाचें स्मरण होतें, तें कुलाबा जिल्हा नष्ट झाल्यास पुष्कळांना अलिबागेस येणें अशक्य होऊन आंग्रे स्मरणपथांतूनच जातील याबद्दलहि लोकांस वाईट वाटणें अपरिहार्य आहे. आज सात तालुक्यांतील लोक एकजीव झालेले आहेत त्यांस विभागणीमुळें एकमेकांकडे पाठ फिरवावी लागेल, आणि रत्नागिरी वगैरे जिल्ह्यांत जाणाऱ्या तालुक्यांतील लोकांची फारच गैरसोय होणार आहे. या विभागणीच्या संबंधांत जिल्ह्यांतील कमिटीमार्फत विभागणी न होण्याबद्दल योग्य ते उपाय करण्यांत येत आहेतच.

## सरकारचें कर्तव्य

" राजा कालस्य कारणम् । " या न्यायानें शेतकऱ्यांच्या दुःस्थितीची बरीचशी जबाबदारी सरकारावर येत असल्यामुळें लोकांत होणारा असंतोष वाढूं न देता तो शक्य तितका कमी करणें हें आज सरकारचें मुख्य कर्तव्य आहे. असंतोषाचें मुख्य कारण जी बेसुमार सारावाढ सरकारनें केली आहे तिचाच प्रथम विचार झाला पाहिजे. यासाठी जिल्ह्यांतील कांहीं तालुक्यांची रीरिव्हिजन ( दुसरी फेरपाहाणी ) जशी सरकारनें नवीन कायदा होईपर्यंत तहकूब केली आहे, तशीच ज्या तालुक्यांतील ती होऊन त्यांवर असह्य सारावाढ झाली त्यांसहि तीच सवलत देऊन निदान यापुढें तरी वाढलेला संबंध सारा घेण्याचें तहकूब करावें. कांहीं वर्षें मोठ्या संकटानें भरलेला वाढलेला सारा लोक परत मागणार नाहींत. कुलाबा जिल्हा विभागण्याच्या भानगडींत सरकारनें न पडता अन्य उपायांनी काटकसर करावी. मुंबईत रेल्वे, गिरण्या, पोर्टट्रस्ट वगैरे खात्यांत असलेल्या कामगारांच्या कल्याणासाठीं योग्य ते कायदे करून त्यांची योग्य अम्मलबजावणी करावी. शेतकऱ्यांस लिहिणें वाचणें शिकवून त्यांची राजनिष्ठा संपादावी. राजनिष्ठेच्या सभांनी खरी राजनिष्ठा उत्पन्न होणें दुरापास्त आहे. पतपेढ्यांचा विस्तार करावा व त्यांचें महत्त्व शेतकऱ्यांस समजण्यासाठीं त्यांच्या मुलांच्या शिक्षणाची योग्य ती तजवीज करावी. या कामासाठीं थोडें सक्तीचें तत्त्व अमलांत आलें पाहिजे असें मी आपल्या अनुभवावरून सांगूं शकतों. मी पुढें सुचवीत आहें तशी योजना केल्यास शेतकऱ्यांवर जुलूम होण्याचें टळेल.

## शेतकऱ्यांच्या शिक्षणांतील माझा अनुभव

सुमारें ३५ वर्षांमागें मीं आवासास मे महिन्या-

च्या सुटींत गुरें राखणाऱ्या मुलांस लिहिणें वाचणें शिकविण्यासाठी एक खासगी वर्ग काढला. एका स्थानिक स्वयंसेवकाने हा वर्ग थोडे महिने चालविला. परंतु मी मुंबईस असल्यामुळे तो लवकरच बंद झाला. मी मुंबई सोडून आवासास येऊन राहिल्यावर सन १९१३ सालीं कांही गांवकऱ्यांच्या मदतीने पुनः तो वर्ग सुरू केला. पहिल्याच महिन्याच्या अखेरीस पटावर ३९ विद्यार्थी दाखल झाले. दोनप्रहरीं ११ पासून २ वाजेपर्यंत लहान गोवारी शिकत व रात्रीं ८ ते १० प्रौढ वयाचे विद्यार्थी येत. पाटया, पेन्सिली, पुस्तकें, कागद आम्हीच त्यांस फुकट देत असूं. कांहीं महिने हा वर्ग उत्तम रीतीने चालवून दाखविल्यावर सरकारी शाळाखात्याने एका मराठी सातवी इयत्ता उत्तीर्ण झालेल्या शिक्षकाची त्या वर्गावर नेमणूक केली. सुमारें पांच वर्षे वर्ग उत्तम चालला, पण पुढे मला उरणास जाऊन राहावें लागल्यामुळे तो वर्ग रोडावत गेला, व शेवटीं शाळाखात्याने तो बंद केला. मी आवासास असता मुलांच्या घरीं जाऊन त्यांस व त्यांच्या पालकांस विद्येचें महत्त्व समजावून सांगें. सक्तीचें तत्त्व अमलांत असतें, तर वर्ग बंद झाला नसता. वर्गाबद्दल सरकारी अधिकारी व अनेक थोर गृहस्थांनी समाधान व्यक्त केलें आहे. त्या वेळचे कुलाब्याचे कलेक्टर मि. इमॅन्युएल यांनी पुढील शेरा लिहून ठेवला आहे:—"I have spent a most interesting half hour here. Mr. Gharat's work among these boys is most praiseworthy and is the sort of thing which calls out for imitation all over India. Unfortunately there are few villages which contain such unselfish workers or which are sufficiently united to follow the lead of the latter as Avas has done. The boys here look happy and orderly, and the school is managed on well-regulated lines. Mr. Gharat organises religious and similar addresses to the boys. The best boys read and add up well, and they can sing tunefully and with self-control... Avas, 12th April, 1915."

### शेतकऱ्यांच्या शिक्षणाची माझी योजना

प्राथमिक शिक्षणाच्या हल्लीच्या लोकल बोर्ड शाळा आहेत तशाच ठेवून त्यांत जाणाऱ्या विद्यार्थ्यांपासून हल्लीप्रमाणेच फी घेण्यांत यावी, परंतु ज्यांस घरच्या कामामुळे त्या शाळांत जाणें शक्य नसेल अशा शेतकरी, कारागीर, मजूर वगैरे लोकांच्या मुलांकरिता दिवसा तीन तास व रात्रीं दोन तास चालणारे व मोफत शिक्षण देणारे स्वतंत्र वर्ग काढून त्यांवर स्वतंत्र शिक्षक नेमावेत. एका शिक्षकास दिवसाचा व रात्रीचा हे दोनहि वर्ग चालवितां येतील. कोंकणांत खेड्यांतील बहुतेक शाळा सकाळीं तीन तास व संध्याकाळीं तीन तास अशा दुवक्त भरतात. म्हणून दुपारीं ११ पासून २ वाजेपर्यंत व रात्रीं शाळेची जागा व जरूर तें सामान या नव्या वर्गाकरिता सहज मिळेल. कोंकणांत मुलें सकाळीं तीन तास व सायंकाळीं तितकाच वेळ गुरें राखण्यास जातात; म्हणून त्यांस मधल्या वेळांत शाळेंत जाण्यास हरकत नाही. दोनही वेळां बरींच मुलें आपली गुरें मोकळ्या जमिनीवर एकत्र चरण्यास लावून आपण स्वच्छ व मोकळ्या हवेंत मनसोक्त खेळतात, त्यांस खेळण्यासाठी निराळ्या वेळेची आवश्यकता नाही. अल्पवयी मुलें दिवसाच्या वर्गात व प्रौढ मुलें रात्रीच्या वर्गात जाऊं शकतील. या योजनेने मुलें शाळेंत गेल्यामुळे शेतकऱ्यांची अडचणीची तक्रार पुढे येणार नाही. जेथे शाळा ११वाजतां भरतात किंवा मुलांना आपल्या पालकांस दोन प्रहरीं मधल्या वेळांत मदत करावयाची असेल तेथे स्थानिक स्थिति पाहून वेळांत फरक करावा लागेल. व क्वचित् स्वतंत्र जागेची व सामानाची व्यवस्था करावी लागेल. तथापि मुलें शाळेंत येण्यासाठी सक्तीचें तत्त्व कायद्याने अमलांत येणें जरूर आहे. लोकलबोर्डास निवडक गांवांत असे वर्ग काढून सक्तीने मुलें शाळेंत आणण्याचा कायद्याने अधिकार मिळाला पाहिजे. मला मिळालेल्या १५ खेड्यांच्या व मोठ्या गांवांच्या माहितींत शाळेंत जाण्यासारखें वय असून शाळेंत न जाणाऱ्या मुलांची संख्या पुढीलप्रमाणे आहे.—आवास ९७, परहूर व झालखंड ३२, पेझारी ४२, वाशी १२५, बोर्डे १८, शिरकी ३५, वावोशी १००, गोरठण ४०, सालिंदे २५, खारपाटणी ७०, मेढें ४८, घोसाळें २५०, दासगांव १०० व नातें १००; याशिवाय रात्रीच्या वर्गात येण्यासारखे अशिक्षित प्रौढ वयाचे मुलगे व गडीहि बरेच आहेत.

### गोवारीवर्ग अस्तित्वांत आणण्याबद्दल माझे प्रयत्न

सन १९११ सालीं कै. नामदार गोपाळराव गोखल्यांनी वरिष्ठ कायदे कौन्सिलांत प्राथमिक शिक्षणाचें बिल आणलें त्यावेळीं मी मुंबई सरकारामार्फत हिंदुस्थानसरकाराकडे माझ्या योजनेच्या धोरणाने उपसूचना पाठविल्या होत्या; पण तें बिलच त्या वेळीं मागें घेण्यांत आलें. ना. भास्करराव जाधव मुंबई इलाख्याचे शिक्षणमंत्री असतांना ते सासवन्यास वैश्य विद्याश्रमांत आले असता मीं त्यांस माझी वरील योजना सांगितली; तेव्हा ते म्हणाले,

तीन तासांत कितीसें शिक्षण होईल ? पण यावर माझें असें म्हणणें आहे कीं,कायद्यानेच६पासून ११ वर्षांच्या वयापर्यंत दिवसाच्या वर्गांत व नंतर १५ किंवा १६ वर्षे वय होईपर्यंत रात्रीच्या वर्गांत मुलानें गेलेच पाहिजे अशी सक्ती केल्यास विद्यार्थ्यास जरूर तितकें शिक्षण मिळेल. पुढें रावसाहेब देसाई शिक्षण-मंत्री झाल्यावर मीं त्यांच्याशीं पत्रव्यवहारहि केला. सन १९२६ त ठाण्यास स्कूलबोर्डांची पहिली परिषद भरली त्यावेळीं तिच्यापुढे विचाराकरिता मीं आपली योजना पाठविली होती ती त्यांच्या अहवालांत प्रसिद्धहि झाली आहे. परिषदेच्या चिटणिसां-बरोबर मीं पत्रव्यवहारहि केला. कुलाबा स्कूल बोर्डानें मात्र दोन वर्षांपूर्वी हा प्रश्न हातीं घेऊन अलिबाग तालुक्यांत माझ्या सूचनेप्रमाणें प्रयोगा-दाखल दोन वर्ग काढण्याचें ठरविलें. परंतु पुरेशी मुलांची संख्या मिळवून देण्यासाठी कोणताच गांव पुढे आला नाही. सरकार कायदा करून अल्पखर्चांत होण्यासारखी ही योजना अमलांत आणून शेत-कऱ्यांस शिक्षण देईल तर पुढे ते सरकारास खास दुवा देतील. ता. ४-२-१९२६ च्या मुंबई क्रॉनिकल पत्रांतहि या विषयावर माझा एक लेख प्रसिद्ध झाला आहे. तथापि पैशाच्या टंचाईमुळे या महत्त्वाच्या विषयाकडे कोणाचेंच जावें तसें लक्ष जात नाहीं.

# गांधीजींनी घोर प्रतिज्ञा कां केली ?

म. गांधी हे सत्पुरुष आहेत. त्यांच्याकडे हिंदु-स्थानच काय पण सारें जग याच दृष्टीनें पाहतें हिंदु-स्थान सोडून जगांतील इतर कोणत्याहि देशाच्या राजकीय स्वातंत्र्याकरिता त्यांचे प्रयत्न नाहीत. असें असताहि सगळ्या देशांत त्यांस अद्वितीय मान मिळत आहे याचें कारण त्यांच्या साधुत्वा-शिवाय दुसरें कोणतें असणार ? हिंदुस्थानांत अनेक राजकीय पुढारी पूर्वी होऊन गेले व आजहि आहेत. परंतु म. गांधींविषयी सर्व जातींच्या, धर्मांच्या व पक्षांच्या लोकांत पूज्यबुद्धि वसत आहे, त्या प्रकारची पूज्यबुद्धि हिंदी लोकांनी यापूर्वी इतर कोणाहि पुढाऱ्याबद्दल प्रगट केली नाही. त्यांच्या राजकीय, सामाजिक व धार्मिक विचारांसंबंधानें हिंदी लोकांत कितीहि सकारण मतभेद असला तरी गांधी ही व्यक्ति डोळ्यांसमोर उभी राहिली कीं तिच्या बाबतींत द्वेष, मत्सर यांपैकीं कोणताहि दुष्टविचार मनांत उद्भवत नाही, याचें कारणहि त्यांचें साधुत्व हेंच होय. अशी ही थोर विभूति अस्पृश्य वर्गाच्या हिताकरितां अन्नत्याग करून प्राण देणार ही बातमी ऐकून अखिल हिंदी जनतेच्या तोंडचें पाणी पळावें यांत आश्चर्य काय !

म. गांधींचें आजचें लौकिक ध्येय राजकीय स्वातंत्र्य हें आहे.त्या स्वातंत्र्याकरिता त्यांनी अलीकडे हिंदुस्थानांत तीन वेळा कारागृहवास पत्करला आहे. गांधीजींनी आपली असहकारिता, आपला सत्याग्रह व आपलें कायदेभंगाचें युद्ध ज्या स्वातंत्र्यासाठी सुरू केलें त्या स्वातंत्र्यासाठीच ते अन्नत्यागानें प्राणत्याग करण्यास सिद्ध झाले असते तर त्या कृत्याचा अर्थ समजण्यासारखा होता; परंतु त्याऐवजी हीन दीन अशा अस्पृश्य वर्गाप्रीत्यर्थ त्यांनी आपला अमोलिक देह अर्पण करण्याचें ठरविलें याचा उलगडा पुष्कळांस झालेला नाही. कित्येकांस असे वाटण्याचा संभव आहे कीं म.गांधी हे एवढें भयंकर दिव्य करण्यास केवळ हिंदुधर्मावरील प्रेमामुळे प्रवृत्त होत आहेत. तथापि ज्यांना गांधीजींच्या धार्मिक मतांची माहिती आहे त्यांचा या समजुतीवर विश्वास बसणार नाही. सारांश, स्वराज्य, स्वातंत्र्य किंवा हिंदुधर्म यांपैकीं कोणत्याहि उदात्त ध्येयाचा प्रामुख्यानें संबंध नसता मुख्य प्रधान मि. राम्से मॅक्डोनाल्ड यांच्या ज्ञाति-विषयक निर्णयामुळे अस्पृश्य वर्ग हिंदु समाजास अंतरतो असें दृष्टीस पडताच म. गांधी यांनी प्रायोपवेशनाची घोर प्रतिज्ञा उच्चारावी याचें इंगित काय हा प्रश्न साहजिकच शिल्लक राहतो. या प्रश्नाचें उत्तर त्यांच्या राजकीय किंवा धार्मिक मतापेक्षा त्यांच्या साधुत्वांत किंवा विश्वबंधुत्वांतच सांपडणार आहे. किंबहुना विश्वबंधुत्व हाच त्यांचा धर्म आहे असें म्हटलें तरी चालेल.

म. गांधींनी द. आफ्रिकेंतून हिंदुस्थानांत परत आल्यावर विविध चळवळी चालविल्या अस्पृश्यो-द्धार ही त्यापैकींच एक चळवळ होय. सदर चळवळीस त्यांनी इतक्या जोराची गति दिली कीं थोड्याच वर्षांत तो एकच विषय सर्वतोमुखीं होऊन बसला. अस्पृश्य वर्ग हा हिंदु समाजाचा एक महत्त्वाचा भाग आहे. स्पृश्य हिंदु समाजाशीं अस्पृश्यांचा अत्यंत निकट संबंध असल्यामुळे त्यांचे सगळें सुखदुःख स्पृश्य हिंदूंवरच अवलंबून आहे. हिंदुस्थानांतील बहुतेक वस्ती शहरापेक्षा खेड्यांतच पसरलली आहे. त्या खेड्यांमधील अस्पृश्यांचा पोटापाण्याचा व्यवसाय बऱ्याच अशीं स्पृश्य हिंदूंच्या आधीन आहे, इतकेंच नव्हे तर

त्यांच्या धार्मिक व सामाजिक बाबीहि त्यांच्याच मुठींत आहेत. देवळें, पाणवठे, शाळा व चरितार्थाचीं बरींच साधनें स्पृश्य हिंदूंच्या कह्यांत असल्याने स्पृश्य हिंदूंचा दर्जा अस्पृश्यांना मिळवावयाचा झाल्यास त्यांना स्पृश्य हिंदूंचे साहाय्य व सहकार्य अपरिहार्य होय.

मि. राम्से मॅक्डोनाल्ड यांनी दिलेल्या ज्ञातिविषयक निर्णयाने अस्पृश्यांचा मतदारसंघ स्पृश्य हिंदूंहून वेगळा होणार व कौन्सिलांतील प्रतिनिधि त्यांचे तेच निवडणार. या वेगळ्या मतदारसंघाबरोबरच मॅक्डोनाल्ड यांनी हिंदूंच्या सर्व सामान्य मतदारसंघांतहि अस्पृश्यांना सामील केलें असून त्यांना स्वतःचे प्रतिनिधि सदर संघामार्फत निवडून आणण्यास सवड ठेवली आहे. या दुहेरी योजनेमुळे अस्पृश्य वर्गाला आपले प्रतिनिधि कौन्सिलांत हुकुमी आले पाहिजेत अशी जी प्रबळ इच्छा आहे ती तर तृप्त होईलच, पण त्याखेरीज त्यांचा हिंदु या नात्याने स्पृश्य वर्गाशीं असलेला ऋणानुबंध कायम राहून त्यांस हिंदु समाजापासून तोडून बाजूला काढल्याचे पातक आपल्या माथीं बसणार नाहीं अशी मॅक्डोनाल्ड यांची समजूत आहे. पण म. गांधींच्या मताने ही समजूत भ्रामक आहे. कारण अस्पृश्य समाज हा स्पृश्य लोकांशीं तुलना करता शिक्षण, संपत्ति व संस्कृति या बाबतींत फारच मागसलेला आहे. त्यांची या तीनहि अंगांनी उन्नति घडवून आणण्याच्या कामीं स्पृश्य हिंदूंतील म. गांधी, डॉ. मुंजे, बॅ. सावरकर, पं. मालवीय, शेठ जम्नालाल बजाज प्रभृति कित्येक नामांकित गृहस्थांचें वजन व परिश्रम कारण झाले आहेत. या पुढाऱ्यांस अस्पृश्यांविषयीं आपलेपणाची भावना असल्याने सदर वर्ग हिंदु समाजांतच राहावा व त्याची अस्पृश्यता त्वरित लयास जाऊन तो हिंदु समाजाचा मजबूत अवयव बनावा अशी त्यांची स्वाभाविकच आकांक्षा आहे.

ही आकांक्षा अस्पृश्य वर्ग स्पृश्य हिंदु समाजाशीं चिकटून वागत आहे तोंपर्यंतच जोर करील. पण अस्पृश्य वर्ग कौन्सिलच्या निवडणुकीच्या निमित्ताने हिंदूंतून बाहेर पडला कीं बहुतेक हिंदु पुढाऱ्यांचें लक्ष त्यांजवरून उडेल व अस्पृश्यांच्या उन्नतीची सगळी जबाबदारी अस्पृश्य पुढाऱ्यांनाच उचलावी लागेल. किंबहुना ममत्वाच्या व प्रेमाच्या भावनेऐवजीं अस्पृश्यांच्या तुटक वर्तनामुळे तटस्थपणाचीच नव्हे तर विरोधाची किंवा द्वेषाचीहि बुद्धि हिंदु पुढाऱ्यांच्या व जनतेच्या मनांत उदित होऊन त्यांपैकीं पुष्कळजण अस्पृश्यांना विरोध करण्यासहि मागे घेणार नाहीत. सामान्य हिंदु जनतेची अस्पृश्य वर्गाविषयींची मनोवृत्ति लक्षांत घेतल्यास ती फारशी अनुकूल नाही असें दिसून येतें. महाड, पुणें, नाशिक येथील अस्पृश्यांच्या सत्याग्रहास स्पृश्य हिंदूंनीं विरोध केला त्यावरूनहि स्पृश्य हिंदु जनता अस्पृश्यांना बरोबरीचे हक्क देण्यास आज कबूल नाही ही गोष्ट सिद्ध झाली आहे. स्पृश्य हिंदूंचा असा विरोध असताहि त्यांचा द्वेष व प्रतिकार सहन करूनहि स्पृश्य हिंदूंचेच कित्येक पुढारी त्यांच्या मंदिरप्रवेशास किंवा पाणवठ्यास येणाऱ्या हरकती दूर करण्यास सांप्रत झटत आहेत. अर्थात् हें करीत असता ते सर्वसामान्य हिन्दु जनतेच्या रोषास व द्वेषासहि पात्र झाले आहेत. अस्पृश्योद्धाराचें व्रत हिन्दु पुढाऱ्यांनी चालविण्यांत भूतदया किंवा समदृष्टि हा एकच हेतु त्या प्रयत्नांच्या मुळाशीं सर्वांशीं आहे असें म्हणवत नाही. म. गांधींसारख्या कांहीं अपवादभूत व्यक्ति सोडल्या असता बाकीच्या बहुतेक हिंदु कार्यकर्त्यांनी अस्पृश्य वर्ग हा हिंदुसमाजातच राहावा आणि त्याचें राजकीय व सामाजिक दृष्ट्या हिंदु समाजाशीं तादात्म्य व्हावें या मुद्द्यावरहि आपली नजर स्थिर केली आहे.

मॅक्डोनाल्ड यांच्या नवीन योजनेस अनुसरून अस्पृश्यांना स्वतंत्र सुभा मिळाल्यास त्यांच्या उद्धाराचे स्पृश्य वर्गाने चालविलेले प्रयत्न शिथिल पडतील, स्पृश्यांच्या सहानुभूतीस अस्पृश्यवर्ग आंचवेल व स्पृश्य कार्यकर्ते आपल्या ज्ञातिबांधवांचा रोष व विरोध पत्करून अस्पृश्यांच्या उन्नतीप्रीत्यर्थ झटण्याच्या कष्टदायक भानगडींत सहसा शिरणार नाहीत. कोणी असें म्हणेल कीं अस्पृश्य वर्गाला मि. मॅक्डोनाल्ड यांनी हिंदु समाजापासून सर्वस्वी वेगळें कोठे केलें आहे ? त्याना हिंदूंच्या मतदारसंघांत राहून अस्पृश्य हिंदु उमेदवाराबरोबरच स्पृश्य हिंदु उमेदवारास निवडून आणण्याची सवड मॅक्डोनाल्ड यांनी ठेवलीच आहे. तिचा फायदा स्पृश्य व अस्पृश्य हिंदु विभागांनी भरपूर घेऊन परस्परांचा ऋणानुबंध कायम राखावा व वाढवावाहि.

परंतु हा युक्तिवाद दिसतो तितका खरा नाही. स्पृश्य हिंदु समाजाशीं अस्पृश्य वर्गाची तुलना केल्यास स्पृश्य हिंदु समाज शिक्षण, संपत्ति व संस्कृति या तीनहि गुणांत अस्पृश्याहून पुष्कळच पुढारलेला आहे. कायदेमंडळांच्या निवडणुकांत त्याचे उमेदवार स्पृश्य हिंदूंपुढे टिकाव धरणार नाहीत. सांप्रत हिंदी जनतेच्या मनःस्थितीकडे बारकाईने पाहिल्यास निवडणुकीच्याच काय पण इतरहि सार्वजनिक हालचालींत जातीने जातीस ओळखावें हाच प्रकार आढळतो. तशांतूनहि जे कित्येक स्पृश्य मतदार मन मोठें करून अस्पृश्यांच्या मदतीस यावयाचे तेहि अस्पृ-

त्यांना मॅक्डोनाल्ड यांच्या योजनेने स्वतंत्र मतदार-संघ व स्वतंत्र जागा मिळाल्या असल्यामुळे त्यांज-कडे लक्ष देणार नाहीत. फार काय पण अस्पृश्य वर्ग स्पृश्यांची पर्वा न करता इंग्रज मुत्सद्द्यांच्या कच्छपीं लागून स्वतःकरिता स्वतंत्र मतदारसंघ व स्वतंत्र जागा घेऊन बसल्यामुळे तर त्याने फिरून स्पृश्यांत घुसून त्यांच्यापैकीं आणखी जागा बळकावण्याचें ठरविल्यास त्यास स्पृश्य मतदारांकडून व उमेदवारांकडून विरोधच होईल. व या नवीन पद्धतीने उभयतांचे दळणवळण व सहकारिता न वाढता तिला ओहोटीच लागेल.

वरील प्रतिपादनाविरुद्ध एक आक्षेप घेतां येण्यासारखा आहे. तो हा कीं अस्पृश्य उमेदवारास स्पृश्य मतदारांनी निवडून दिलें नाही म्हणून अस्पृश्यांचें काय बिघडलें ? ते स्वतंत्र मतदार संघांतून कायद्याच्या बळावर निवडून येणारच आहेत. त्यांनी आपलीं सामाजिक व धार्मिक गाऱ्हाणीं कौन्सिलांत सांगावीं, मुसलमानप्रभृति अल्पसंख्याक वर्गाच्या प्रतिनिधींशीं संगनमत करून त्यांची मदत मिळवावी व आपणांस हवे तसे कायदेकानू बदलून घ्यावे. या म्हणण्यांत थोडें तथ्य आहे, नाहीं असें नाही. परंतु कायद्याच्या जोरावर तरी सामाजिक व धार्मिक सुधारणा घडवून आणण्यास कांहीं मर्यादा आहेच. सरकारी सत्तेच्या साहाय्याने अस्पृश्य मुलें स्पृश्य मुलांबरोबर आज शाळेत बसत आहेत, तशींच पुढे बसतील; आज अस्पृश्यांना सरकारी नोकऱ्या मिळत आहेत, तशाच पुढे मिळतील व आज त्यांना सार्वजनिक धर्मशाळेत विश्रांति घेता येते तशी पुढेहि घेतां येईल. कायदा झाला तरी तो यापेक्षा अधिक काय करूं शकणार ? वर निर्दिष्ट केलेल्या या व्यवहारांतील चारदोन बाबी होत. त्यांहून शेकडो महत्त्वाच्या बाबी अशा आहेत कीं त्यांत स्पृश्य हिंदूंनी ताणून धरण्याचें मनांत आणल्यास अस्पृश्यांना कुंठितच व्हावें लागेल. बहुतेक देवळें खासगी मालकीचीं आहेत. त्या देवळांत अस्पृश्यांना येऊं देणें न देणें ही देवळांच्या मालकांच्या मर्जीची गोष्ट आहे. तीच गोष्ट तीर्थांची, क्षेत्राची व पाणवठ्यांची. त्या सर्व ठिकाणीं अस्पृश्यांवरील बंदी कायम राखण्याचें स्पृश्य हिंदूंनी ठरविलें असता त्यांचा निर्धार ढासळून टाकण्याचें सामर्थ्य कोणत्या कायद्यांत आहे ! खेरीज कायदे करण्याचें जें सभागृह त्यांत स्पृश्य हिंदूंचे प्रतिनिधि आहेत व तेहि अस्पृश्य प्रतिनिधींहून संख्येने पुष्कळच अधिक आहेत. त्यांच्या विरोधास न जुमानता अस्पृश्यांना कायद्यांत फेरबदल करून घेणें-हि दिसतें तितकें सोपें नाही. सारांश, गांव करील तें राव करणार नाही ही म्हण याहि ठिकाणीं थोड्या-बहुत अंशीं प्रत्ययास आल्यावांचून राहणार नाही. यावरून अस्पृश्यांच्या उन्नतीस स्पृश्यांच्या विरोधा-पेक्षा सख्य व सहकारित्वच कसें इष्ट व आवश्यक आहे हें सिद्ध होणार आहे.

मि. मॅक्डोनाल्ड यांचा ज्ञातिविषयक निर्णय समजल्यापासून म. गांधींचा अन्तरात्मा तळमळूं लागला तो अस्पृश्य वर्ग हिंदु समाजांतून फाटून निघत आहे त्यामुळे अस्पृश्यांचे धार्मिक दृष्टया नुकसान होईल या बुद्धीने केवळ नसून अस्पृश्यांची उन्नति स्पृश्य हिंदूंच्या सहानुभूतीच्या अभावीं बंद पडेल या भीतीने होय. त्यांच्या उपोषणाची मीमांसा याच रीतीने करतां येते. अस्पृश्यां-करिता वेगळा मतदार–संघ नसावा हा त्यांचा उद्देश त्यांनीं सर सॅम्युएल होअर व मि. राम्से मॅक्डोनाल्ड यांस लिहिलेल्या पत्रांवरून स्पष्ट होतो. या मुद्द्यासंबंधाने त्यांची व स्पृश्य हिंदूंचीच काय पण अस्पृश्य हिंदूंपैकीं असंख्य लोकांचीहि एक-वाक्यताच आहे. परंतु राजाप्रभृति अस्पृश्य पुढाऱ्यांना संयुक्त मतदार–संघ म. गांधींप्रमाणेच हवा असला तरी त्यांना अस्पृश्यांची बाजू कायदेमंडळांत अस्पृश्यांच्या मुखाने मांडण्यास जे अस्पृश्य प्रति-निधि आवश्यक आहेत असें वाटतें ते प्रतिनिधि हमखास कसे निवडून येतील याचा खुलासा म. गांधींनी केल्यावांचून तडजोडीची भाषाच सुरू होत नाही. डॉ. आंबेडकर यांनी आपल्या नवीन खुलाशांत हाच मुद्दा ठासून मांडला असून त्यावरून राखीव जागा व संयुक्त मतदार–संघ या राजा–मुंजे यांच्या करारांतील योजनेस गांधीजी कबूल असतील तर डॉ. आंबेडकर यांचीहि संमति मिळेल अशी आशा बाळगण्यास जागा आहे. आजच्या रागरंगावरून गांधीजींची प्रतिज्ञा-पूर्ति गांधीजींच्या हातची आहे असेंच म्हणावें लागतें. मात्र जादूच्या कांडीप्रमाणे स्पृश्यास्पृश्यांची फिरून सांगड जमण्याच्या दृष्टीने परिस्थिती या अनुकूल असा अचानक पालट होण्यास गांधीजींची उपवासाची घोर प्रतिज्ञाच कारण झाली आहे याबद्दल मळीच मतभेद नाही.

# जातिविषयक निर्णयावरील केळकरांचें मुंबईतील भाषण

रविवार ता. ११ रोजीं सायंकाळीं ६॥ वाजता येथील दक्षिणी ब्राह्मण-सभेच्या विद्यमानें सभेच्या सार्वजनिक गणेशोत्सवांत श्री. न. चिं. केळकर यांचें बॅ. **मुकुंदराव जयकर** यांच्या अध्यक्षतेखालीं 'जातिविषयक प्रश्नाचा ब्रिटिश मुख्य प्रधानांनीं दिलेला निर्णय' या विषयावर भाषण झालें. सभेला अतिशय गर्दी लोटली होती. बॅ. जयकर यांचें प्रास्ताविक भाषण झाल्यावर श्री. **तात्यासाहेब केळकर** म्हणाले, 'कम्युनल अवॉर्ड' अर्थात् सरकारनें दिलेला ज्ञातिविषयक प्रश्नाचा निकाल वाईट आहे एवढेंच म्हणून स्वस्थ बसून भागणार नाही. वाईट म्हटल्यानंतर या निर्णयाबद्दल दोष कोणाला द्यावयाचा व कां हें सांगून पुढे हिंदु समाजानें कोणतें धोरण या निकालाबाबत स्वीकारावें हेंहि सांगितलें पाहिजे. मुसलमानांनां स्वार्थी मागण्या केल्या व कारवाई करून आपल्या पोळीवर तूप ओढलें म्हणून त्यांनाच मी वाईट म्हणावयला तयार नाही. त्यांना फक्त स्वार्थी व कोत्या दृष्टीचे असें आपण म्हणूं शकूं. परंतु जे सरकार आम्ही हिंदुस्थानाच्या हिताकरितां सर्व गोष्टी करतों व आम्ही हिंदुस्थानाचे विश्वस्त (ट्रस्टी) आहों असा जें टेंभा मिरवितें त्या सरकारानें हा ज्ञातिविषयक निर्णय देऊन एकराष्ट्रीयत्वाच्या बुद्धीचा नाश केला म्हणून सरकार वाईट व या निर्णयाचे जे पुढे कांहीं परिणाम होतील त्यांची सर्व जबाबदारी सरकारावर आहे असें मी म्हणतों.

### पंच होण्याची नालायकी

सरकाराची परिस्थिति लक्षांत घेतली म्हणजे सरकार या प्रश्नाचा निकाल तिऱ्हाईत पंच म्हणून देण्यास नालायक आहे असेंच कोणीहि म्हणेल. "तुम्ही आपापसांत एकमत करून तडजोड करा, नाही तर आम्ही पंच म्हणून निकाल देऊं तो मान्य करा" असें सरकारनें सांगितलें. गोलमेज परिषदेंत हिंदु-मुसलमानांची तडजोड होऊं शकली नाही त्याला कांहीं गुपित गोष्टी कारणीभूत झाल्या असें बॅ. जयकर यांनी आपल्या प्रास्ताविक भाषणांत सांगितलें. मी तें गुपित आपल्याला उघड करून सांगतों. सरकारची मुसलमानांना फूस होती ही ती एक गुपित गोष्ट होय. सरकारनें या ज्ञातिविषयक प्रश्नाबाबत जें धोरण स्वीकारलें आहे तें पाहिलें म्हणजे कोकणच्या देवाची आणि गुरवाची आठवण होते. कोंकणांत पिकलेलें शेत कधीं कापायचें हेंसुद्धा देवाला कौल लावून विचारतात. पण मौज ही कीं, देव कांहीच बोलत नाही. कौल लावून गुरवानें देवाला प्रश्न विचारावा आणि भक्ताचा कल पाहून स्वतः त्यानेंच उत्तरें द्यावींत असें घडतें. सरकारहि आपल्या स्वतःच्या हिताच्या दृष्टीनें सर्व गोष्टी करीत असल्यामुळे सरकार वस्तुतः आणि स्वरूपतः न्यायाधीश होऊं शकत नाही. न्यायाधीशासमोर दिवसा वादीनें आणि प्रतिवादीनें आपलें म्हणणें मांडावें आणि रात्रीं न्यायाधिशांनी व प्रतिवादीनें एकत्र बसून दुसऱ्या दिवसाचीं उत्तरें ठरवावींत याला कोणी न्याय म्हणेल काय? गोलमेज परिषदेंत एकमत होईल तें आम्ही मान्य करूं असें सरकार म्हणतें, परंतु एकमत होऊं नये अशी व्यवस्था केल्यावर एकमत होईल कशाला?

### लखनौचा करार

१९१६ सालीं लखनौचा करार करण्यांत टिळकांनी चूक केली असें कांहीं लोक म्हणतात; परंतु हा वस्तुस्थितीचा विपर्यास आहे. १९१४ सालीं लोकमान्य सुटून आले. महायुद्ध सुरू होऊन हिंदुस्थानाला स्वराज्य देणार असा गाजावाजा केला गेला. तेव्हां हिंदी राष्ट्राची एकमुखी राजकीय मागणी करता यावी, म्हणून लोकमान्यांनी मुसलमानांबरोबर लखनौचा करार केला. लखनौच्या करारांत मुसलमानांना स्वतंत्र मतदारसंघ व कांहीं प्रांतांत प्रतिनिधित्वाच्या बाबतींत जादा सवलती दिल्या गेल्या. परंतु त्या वेळीं कांग्रेसच्या पुढाऱ्यांप्रमाणेंच मुसलमान पुढारीहि असें म्हणत होते कीं, दहा वर्षांच्या आंत मुसलमानांना हिंदूंबद्दल दृढतर विश्वास वाटूं लागेल व मुसलमान स्वतंत्र मतदारसंघ सोडून देतील. पुढे असें झालें कीं एका बाजूनें मुसलमानांची स्वार्थी बुद्धि अधिक व बोकाळली व ते लखनौच्या कराराला नांवें ठेवूं लागले, तर हिंदु पुढारी राष्ट्रीय बुद्धीनें असें म्हणूं लागले कीं स्वतंत्र मतदारसंघ लोकशाहीच्या तत्त्वाविरुद्ध असल्यामुळे लखनौचा करार रद्द करावा. अशा प्रकारें मुसलमानांची दुर्बुद्धि व हिंदूंची सुबुद्धि लखनौच्या कराराच्या आड आली व तो करार रद्द करण्याची जरूरी भासूं लागली.

### त्रयस्थ कां नको?

वास्तविक राजनीतिशास्त्राचा असा नियम आहे कीं, दुसरा तह होईपर्यंत पहिला तह रद्द होत नाही. म्हणून सरकारनें हिंदु-मुसलमानांना असें स्पष्ट सांगावयास पाहिजे होतें कीं दुसरा करार एकमतानें तुम्ही करीपर्यंत लखनौचा करारच कायम ठेवला जाईल. बरें, लखनौचा करार मोडला असें सरकारला

वाटतें तर सरकारने निःपक्षपाती त्रयस्थाकडे म्हणजे राष्ट्रसंघाकडे हा प्रश्न न्यावा असें आम्ही म्हणत होतों. परंतु त्यालाहि सरकार नाकबूल. हिंदुस्थान राष्ट्रसंघाचा सभासद असल्यामुळे सरकारनें ही सूचना मान्य करावयास पाहिजे होती. परंतु सरकारनें हिंदुस्थानाला राष्ट्रसंघाचा सभासद केलें त्यातले इंगित असें कीं, हिंदुस्थानला मानाचा कोरडा लाडू खावयास देऊन राष्ट्रसंत्रांत आपल्या बाजूला अधिक मतें मिळवावीं. त्यानंतर आमची सूचना अशी होती कीं, राष्ट्रसंघाकडे हा प्रश्न सोपविला नाही तर नाही, निदान या प्रश्नाचा निकाल करण्याकरिता साम्राज्यांतील कोणी त्रयस्थ पंच नेमावा. पण तीहि गोष्ट सरकारास अमान्य झाली. बरें. त्रयस्थांकडे प्रश्न सोपवणें बरें वाटत नव्हतें तर राष्ट्रसंघानें अल्पसंख्याकांच्या बाबतींत जी नियमावलि केलेली आहे ती तरी हिंदुस्थानाच्या बाबतींत लावावयास पाहिजे होती हें सर्व केलें नाही तेव्हा जें केलें तें स्वतःच्या जबाबदारीवर तरी करावयाचें होतें. परंतु तसेंहि केलें नाही. निकाल देतांना त्याला निम्हाइताच्या निकालाचें स्वरूप देऊन त्याची जबाबदारी हिंदी लोकांवर टाकण्याचा यत्न केला.

### नको तें दिलें हवें तें नाकारलें

आता ब्रिटिश सरकाराच्या निर्णयाकडे पाहिले तर काय दिसते तें पाहा. हिंदूंनी जें मागितलें नाही तें दिले व मागितलें तें दिलें नाही. ख्रिश्चन, अस्पृश्य व स्त्रिया यांना स्वतंत्र मतदारसंघ मागितले नव्हते त्यांना ते दिले. 'वेटेज' च्या बाबतींत तर या ज्ञातिविषयक निर्णयाची मजल सायमन कमिशनच्या पुढे गेली आहे. घटनाबद्ध (स्टॅट्यूटरी) बहुमताच्या बाबतींत मुसलमानांनी जें या असें म्हटलें नव्हतें तें ब्रिटिश मुख्य प्रधानाच्या निर्णयानें पंजाबांतील मुसलमानांच्या पदरांत टाकलें आहे. म्हणून मी म्हणतों कीं, ब्रिटिश मुख्य प्रधानांनी दिलेल्या ज्ञातिविषयक निर्णयानें जें दिलें तें राष्ट्रहिताविरुद्ध असूनहि मुसलमानांनी घेतलें म्हणून मुसलमान स्वार्थी ठरतात, परंतु सरकार मात्र वाईट ठरतें.

### पुढील मार्ग

आता प्रश्न असा कीं, ज्ञातिविषयक निर्णय वाईट व अमान्य असें म्हटल्यानंतर पुढे काय करावें? कोणी म्हणतात कीं ह्या ज्ञातिविषयक निर्णयाचा फेरविचार होऊन तो आपल्याला मान्य असा होईपर्यंत मुसलमानांबरोबर झगडा चालू ठेवावा; पण याला सर्व हिंदु तरी एक होतील काय? आजच जर कांही लोक हा निर्णय वाईट आहे असें स्पष्ट शब्दांत म्हणावयास तयार नाहीत तर ते झगडा करावयास थोडेच तयार होणार! तेव्हा आपापसांतील झगड्याची सूचना व्यवहार्य नाही व इष्टहि नाही. दुसरी सूचना अशी आहे कीं मुसलमानांबरोबर तडजोड करावी. मुसलमानांबरोबर तडजोड करावयाची म्हणजे आज सरकारानें जें मुसलमानांना दिलें आहे त्यापेक्षा हिंदूंनी अधिक दिलें पाहिजे! तेव्हा तडजोडीची भाषा सध्या अव्यवहार्य आहे. तिसरी अशीहि सूचना पुढे आली आहे कीं सरकारानें दिलेला ज्ञातिविषयक निर्णय हिंदूंना अमान्य असल्यामुळे त्यांनी त्या ज्ञातिविषयक निर्णयावर उभारल्या जाणाऱ्या भावी राज्यघटनेवर बहिष्कार घालावा. आज या घटकेला हा प्रश्न आपल्यापुढे नसला तरी याचें उत्तर पुढील वर्षी कौन्सिलनिवडणुकीच्या वेळीं द्यावें लागेल. तेव्हा पुढे काय करावयाचें हें एव्हापासूनच ठरविलें पाहिजे. माझें मत असें कीं, बहिष्कार घालूं नये. कौन्सिलांत जाणें म्हणजे नवी राज्यघटना मान्य करणें व तिला पाठिंबा देणें नव्हे.

### बहिष्कार घालूं नका

आम्हीं कौन्सिलात जावें असें म्हटलें म्हणजे कांही लोक "यू वर्क थि कॉन्स्टिटयूशन" असें म्हणतात. परंतु तें खरें नाही. मी म्हणतों "वुई वर्क अंडर दि कॉन्स्टिटयूशन." या दोन वाक्यात मोठा फरक आहे. नवीन सुधारणाकायद्यानें मर्यादित स्वरूपांत का होईना पण प्रांतिक स्वायत्तता मिळणार व कायदे पास होणार आणि आपण ते घरीं बसून पाळणार. हीं कायदेमंडळे जे स्थानिक स्वराज्यसंस्थांचे कायदे करतील व त्यामुळे जीं लोकल बोर्डे व म्युनिसिपालिटया अस्तित्वांत येतील त्या आपण चालवणार, मग जेथे कायद्यांना जन्म दिला जातो तेथेच आपण कां जाऊं नये? कायदेमंडळांत न जाता स्थानिक स्वराज्यसंस्थांत जाणें याचा अर्थ हौदाची मुख्य तोटी बंद ठेवून घरच्या तोटया उघडून पाणी भरण्याचा उद्योग करणें असा आहे. कायदेमंडळांत न जाता जर कोणी सरकाराला प्रतिस्पर्धी सत्ता निर्माण करणार असेल तर त्याने कायदेमंडळांत जाऊं नये असें म्हटलेलें शोभेल. परंतु तसें न करता ज्ञातिविषयक निर्णयाच्या निंदेचें चक्र फिरवीत घरीं बसून कायदेमंडळात जाऊं नये असा जर कोणी मंत्र सांगूं लागला तर मात्र त्याची मला चीड येते. स्वतंत्र बुद्धीने विचार करा. मी असें म्हणतों कीं ज्ञातिविषयक निर्णयाविरुद्ध चळवळ कराच, पण कौन्सिलांत जाऊन तेथेहि जे योग्य दिसेल तें देशकार्य करा. आपली बुद्धि गहाण टाकून डोळे मिटू नका व बुद्धि शाबूत ठेवून मी म्हणतो तें खरें कीं खोटें हें पाहा, एवढेंच मला आपणाला सांगावयाचें आहे."

### भावी कायदेमंडळें

अशा आशयाचें श्री. केळकरांचें सुमारें दीड तास भाषण झाल्यावर बॅ. जयकर यांनी समारोपादाखल भाषण करतांना गोलमेज परिषदेंत हिंदु मुसलमानांत कां तडजोड होऊं शकली नाही याचा इतिहास सांगून पुढे काय धोरण ठेवावें याबद्दल केळकरांनी केलेल्या सूचनांना पाठिंबा दिला. ते म्हणाले कीं, "श्री. केळकरांनी नव्या सुधारणांबाबत आपण कोणतें धोरण स्वीकारावें याबद्दल योग्य दिशा दाखविली आहे. आपण बुद्धिमान आहां. आतापासून पुढे काय करावें याचा विचार करा. १९१९ च्या सुधारणा कायद्याने फारसे अधिकार दिले नसल्यामुळें त्या कायद्याने अस्तित्वांत आलेल्या कायदेमंडळांत विरोधाचें धोरण स्वीकारणें सोपें होतें. परंतु नवी राज्यघटना अमलांत आली म्हणजे बरेच अधिकार मिळतील. व बहुमतवाल्या पक्षाला मंत्रिमंडळहि बनवावें लागेल. तेव्हा नुसतें विरोधाचें धोरण आंखतां येणार नाही. कारण आपणापुढे प्रश्न येणार तो असा कीं, आपलें बहुमत झाल्यास सरकार मांडणार कोणाचें? आता उत्पन्न होणारी परिस्थिति पूर्वीपेक्षा भिन्न आहे. प्रश्न गुंतागुंतीचा असल्यामुळे पुढे काय धोरण ठेवावयाचें याचा खोल विचार एव्हापासून करून ठेवा. या विषयाबाबत तात्यासाहेब केळकरांनी खुलासेवार व मार्गदर्शक असें सुंदर व्याख्यान दिल्याबद्दल मी त्यांचे मनःपूर्वक आभार मानतों." आभारप्रदर्शनानन्तर सभेचें काम आटोपलें.

# मुंबईचें बातमीपत्र

( आमच्या बातमीदाराकडून )

मुंबई, ता. २० सप्टेंबर १९३१.

[ १ ]

### प्रास्ताविक

महात्मा गांधी यांनी उपवासाचा निश्चय जाहीर केला, त्यामुळे सर्व हिंदुस्थान हादरून गेलें. अर्थात् ज्याला जो प्रयत्न महात्माजींना वांचविण्यासाठी करता येईल तो करण्याला त्यानें आपण होऊन उद्युक्त व्हावें यांत आश्चर्य नाही व त्याप्रमाणे एकीकडून कलकत्त्याहून व दुसरीकडून मद्रासहून म्हणजे इतक्या दूरच्या प्रांतांतून पुढारी मुंबईस एकत्र जमले. अशा कामीं पंडित मदनमोहन हे उपक्रम करण्याला कधीं चुकत नाहीत. त्याप्रमाणें या कामांतील उपक्रमहि त्यांनीच केला. सोमवार ता. १९ सप्टेंबर रोजीं मुंबईस पुढाऱ्यांची परिषद भरावी असें त्यांचे आमंत्रण होतें, त्याप्रमाणें लोक येऊन दाखल झाले व परिषदेचें पहिलें अधिवेशन काल सोमवारीं साडेबारा वाजतां भरलें. कांही मंडळी काल न येता आज आली. आज मंगळवारच्या सभेला जास्तींत जास्त लोक हजर होते. खालील ठळक गृहस्थ या परिषदेकरिता बाहेर ठिकाणांहून मुद्दाम आले आहेत सर तेजबहादूर सप्रू, पं. मालवीय, घनःश्याम दास बिर्ला, रा. ब. राजा, डॉ. मुंजे, बापुजी अणे, नरसिंह चिंतामण केळकर, आमदार डॉ. वैशंपायन, टी. प्रकाशम्, बाबू राजेंद्रप्रसाद, राज. गोपालाचारी, हृदयनाथ कुंझरू, स्वामी सत्यानंद- देवी प्रसाद खैतान, शेट बगारिया, डॉ. चोइथराम, ले. क. सोढबान्स, सर गोविंद माडगांवकर, गोपाळराव देवधर, गवई, अमृतलाल ठक्कर. याखेरीज शेठ वालचंद हिराचंद, बॅ. जयकर- लक्ष्मीदास तेरसी, सर पुरुषोत्तमदास, सर चुनीलाल मेहता, सर चिमणलाल सेटलवाड, दळवी बंधु, के. नटराजन, शेठ मथुरादास खिमजी, एम. एल. डहाणूकर, डॉ. गोपाळराव देशमुख, डॉ. साठे, सावरकर बंधू, डॉ. वेलकर, डॉ. आंबेडकर, सोळंकी, देवरुखकर, नारायणराव काजरोळकर ही मुंबईतील पुढारी मंडळी व सौ. अवंतिकाबाई गोखले, सौ. हंसा मेहता, सौ. जयश्री रायजी, सौ. कमला नेहरू, सौ. अन्नपूर्णाबाई देशमुख वगैरे प्रमुख स्त्रिया हजर होत्या.

पहिली बैठक सोमवारीं व्हावयाची असें ठरलें होतें. तरी महात्मा गांधी यांचे विचार कांही तरी कळणें अवश्य, एरवीं परिषद तरी काय ठरविणार या विचाराने मुंबईतील कांही प्रमुख मंडळींनी एकत्र जमून बॉंबे सिटिझन्स इमर्जन्सी कमिटी म्हणजे पडेल तो प्रसंग पाहून काय करावें याचा निश्चय करणारें एक मंडळ स्थापन केलें व प्रथमच एक शिष्टमंडळ महात्माजींची गाठ घेण्याकरिता पुण्यास पाठवावें असें त्यांनी ठरविलें. या शिष्ट मंडळांत सर पुरुषोत्तमदास ठाकुरदास, मथुरादास खिमजी, सर चुनीलाल मेहता व घनश्यामदास बिर्ला असे गृहस्थ होते. ते गेल्या रविवारीं दोन प्रहरीं एक वाजता मुंबईहून मोटारींतून निघाले ते तडक संध्याकाळीं येरवडा येथे जाऊन त्यांनी महात्मा गांधी यांची गाठ घेतली. शिष्टमंडळाला गांधीजींना भेटण्याला परवानगी देण्याची योजना आधीच झाली होती.

म्हणून मंडळाला गांधीजींची भेट मिळण्यास विलंब लागला नाही. परंतु त्या दिवशीं महात्माजींचा मौनाचा अर्धा दिवस असल्यामुळे एकाने बोलावें व दुसऱ्याने ऐकावें इतकेंच झालें. म्हणून सोमवारीं दोन प्रहरीं शिष्टमंडळानें पुनः महात्माजींची गांठ घेतली व सुमारें दोन अडीच तास बोलणें झाल्यावर कांहीं मंडळी मोटारीने व कांही सायंकाळच्या एक्स्प्रेस गाडीने मुंबईस परत आली.

### सोमवारची हकीकत

शिष्टमंडळ पुण्यास गेलें हें माहीत होतें तरी परिषदेकरिता जमलेल्या मंडळींनी आपणहि कांही तरी चर्चा करावी, फुकट वेळ घालवूं नये अशा हेतूनें चर्चा केली. सभेच्या अध्यक्षस्थानीं पण्डित मदन मोहन मालवीय हे होते. सभेंतील चर्चा खासगी ठेवण्यांत यावी असे ठरविण्यांत आलें होतें. असें समजतें कीं शेठ वालचंद हिराचंद यांनी परिषदेकरिता आलेल्या मंडळींचे स्वागत केल्यावर पंडित मालवीय यांनी परिषदेवरील जबाबदारीची माहिती करून दिली. पुण्याहून शिष्टमंडळ परत आलें नसल्यामुळे परिषदेपुढे निश्चित असा कार्यक्रम नव्हता. तेव्हा प्रास्ताविक चर्चेला प्रारंभ झाला. डॉ. आंबेडकर यांनी प्रथमच असें सांगून टाकलें कीं, महात्माजींकडून कोणतीहि सूचना आल्याशिवाय आपणाला चर्चेंत भाग घेतां येणार नाही. त्यानंतर श्री. टी. प्रकासम्, राजगोपाळाचारी, डॉ. मुंजे, रा. ब. राजा, दादासाहेब करंदीकर, पंडित हृदयनाथ कुंझरू, पी. बाळू प्रभृति मंडळींची भाषणें झालीं. डॉ. मुंजे यांनी डॉ. आंबेडकर यांना असा सवाल टाकला कीं, कांही अटींवर मग त्या कोणत्याहि असोत ते संयुक्त मतदार संघांना मान्यता देण्यास तयार होतील अगर नाहीं? श्री. राजगोपाळाचारी यांनीहि असें सांगितलें कीं, गांधीजींच्या उपवासाचें कारण अस्पृश्यांना स्वतंत्र-मतदारसंघ दिले गेले हें असल्यामुळे गांधीजींनी उपवास करूं नये अशी जर परिषदेची इच्छा असेल तर डॉ. आंबेडकर यांनी संयुक्तमतदारसंघाला मान्यता द्यावी. सर्व सूचनांना व प्रश्नांना डॉ. आंबेडकरांचें उत्तर ठरलेलें होतें. गांधीजींकडून सूचना आल्याशिवाय मी कांहीच बोलण्यास तयार नाही हें तें उत्तर होय. तुमची म्हणून कोणतीहि सूचना असल्यास ती पुढे मांडा असें जेव्हां डॉ. आंबेडकरांना सुचविण्यांत आलें त्या वेळीं त्यांनीं असें सांगितलें कीं, मला कांहींच सुचवावयाचें नाही. गांधीजींकडून सूचना आली तर मात्र तिचा मी विचार करीन. रा. ब. राजा यांनी असें सांगितलें कीं, महात्माजी संयुक्त मतदार संघांत अस्पृश्यांना राखीव जागा देण्यास तयार आहेत अगर नाहीत याचा खुलासा होणें आवश्यक आहे. त्यानन्तर रा. ब. राजा यांनी असें सुचविलें कीं, पण्डित मालवीय प्रभृति हिंदु पुढाऱ्यांनी असें जाहीर आश्वासन द्यावें कीं अस्पृश्यांना सार्वजनिक देवालयें, रस्ते, पाणवठे, शाळा, वगैरे ठिकाणीं स्पृश्यांच्या बरोबरीनें वागविण्यांत यावें अशी आम्ही कायावाचामनें करून खटपट करूं. रा. ब. राजा यांनी वरील आशयाचा ठराव परिषदेपुढेंहि मांडला. त्यावर पंडित मालवीय यांनी भाषण करून अस्पृश्यता निवारणाबाबत कसकशा खटपटी करण्यांत येत आहेत याची सांग्रंत माहिती सांगून अलाहाबादेंतील त्यांच्या घरांतील देवालयांतहि अस्पृश्यांना देवदर्शनाकरिता जाता येतें असें सांगितलें. डॉ. सावरकर यांनी रत्नागिरी येथे अस्पृश्यतानिवारणाकरिता चाललेल्या चळवळीची माहिती सांगितली. शेवटीं हा ठराव मंगळवारीं विचारार्थ घ्यावा असें ठरलें. एकंदर चर्चेवरून महात्माजींच्या भेटीला गेलेलें शिष्टमंडळ परत येऊन महात्माजींचें म्हणणें कळेपर्यंत आणखी चर्चा करून कांही फायदा होण्यासारखा नाही असें परिषदेचें मत पडल्यानें परिषद मंगळवार दुपारपर्यंत तहकूब करण्यांत आली.

### तीन ठिकाणीं चर्चा

रात्रौ बिर्ला हाऊस, सरदारगृह व बॅरिस्टर जयकर यांचा बंगला या तीन ठिकाणीं चालू प्रश्नाची जोराने चर्चा सुरू होती. मात्र महात्माजींचें म्हणणें काय हें बॅरिस्टर जयकर यांचेकडे अगर सरदारगृहांत निश्चित कळलें नव्हतें. सरदारगृहांत रात्रीं नऊ वाजतां रा. ब. राजा व काजरोळकर हे अस्पृश्य पुढारी आले, व त्यांनीं डॉ. मुंजे, रा. केळकर, रा. अणे, दादासाहेब करंदीकर, डॉ. वैशंपायन, पांडुअण्णा शिराळकर प्रभृतींशीं बरीच चर्चा केली. एकंदर चर्चेचा रोख असा होता कीं, महात्मा गांधी यांनी मुख्य प्रधानांना लिहिलेल्या पत्रांत अगदी स्पष्ट शब्दांनी तसें सांगितलें नव्हते तरी ते संयुक्त मतदारसंघांत अस्पृश्यांना राखीव जागा देण्यास विरोध करणार नाहीत, असा फार संभव दिसतो. म्हणून तडजोडीचा निकाल चांगला लागेल अशी सर्वांनीं आशा व्यक्त केली. तथापि कांहींचें मत असेंहि पडलें कीं राखीव जागांना महात्माजींचा विरोध नसला तरी डॉ. आंबेडकर तर राहोतच.' परंतु महात्माजी तरी तेवढ्याने संतुष्ट होतील कीं नाही याची शंका व भीति वाटते. कारण डॉ. आंबेडकर 'ॲवॉर्ड' सोडून देण्याला तयार होणार म्हणून अधिक कांही मागणार, व महात्मा गांधींना कायदे कौन्सिलाच्या बाहेरहि अस्पृश्यता अनेक प्रकारांनी नष्ट करावयाची म्हणून तेहि अवांतर कांही गोष्टी या समेटांत आणण्याचा संभव आहे. कांहींचे असेंहि

मत पडेल जर महात्मा गांधी हे राखीव जागा देण्याला तयार होते तर त्यांनी मुख्य प्रधानांना लिहिलेल्या पत्रांत ती गोष्ट अधिक स्पष्ट करून सांगावयास पाहिजे होती, व ती तशी सांगितली असती म्हणजे चर्चेला पुष्कळच आधार झाला असता, व गांधींच्या मताबद्दल गैरसमज राहिला नसता. तिकडे बिर्ला हाऊसमध्ये पुण्याहून आलेलें शिष्टमंडळ पंडित मालवीय व इतर पुढारी यांना भेटून पुढें काय धोरण ठेवावें यासंबंधी चर्चा झाली व महात्मा गांधींनी निश्चितच नसलें तरी विधायक असें कांहीं सुचविलें असल्यामुळे त्यांना तडजोडीची आशा वाटूं लागली.

### मंगळवारची हकीकत

मंगळवारीं सकाळीं दिल्ली येथे भरणाऱ्या हिंदु-महासभेच्या अधिवेशनाविषयी काय करावें या-विषयीं चर्चा होऊन असें ठरलें कीं, महासभेचें अधिवेशन पुढे ढकलूं नये, कारण अद्यापि चार दिवस चर्चेला मिळतील व शनिवारीं संध्याकाळ-पर्यंत म्हणजे महासभेची विषयनियामक कमिटी सुरू होईपर्यंत इकडील तडजोडीचा कांहीं तरी निकाल दिल्लीस कळेल. ही हकीगत दिल्लीस व इकडील वृत्तपत्रांना धाडल्यावर श्री. शंकरलाल बँकर व अमृतलाल ठक्कर हे सरदारगृहांत येऊन त्यांनी श्री. केळकर, अणे व मुंजे यांच्याशीं विचारविनिमय केला व शेठ बिर्ला यांच्या निमंत्रणावरून त्यांना खाजगी चर्चेकरिता बिर्ला हाऊसमध्ये घेऊन गेले. या चर्चेमध्ये असें ठरलें कीं, मुंबईच्या परिषदेंत विशेष काळ न घालविता प्रत्येक पक्षाचे दोन व एक स्वतंत्र पांचवा असे पंच नेमून ते देतील तो निर्णय स्वीकारावा. कारण हें प्रकरण लांबल्यास गांधीजींचा उपवास वाढत जाऊन त्यांच्याशीं चर्चा करणें कठिण होईल. परंतु अशी सूचना करण्याचा प्रसंग आला नाहीं. कारण दुपारीं साडेबारा वाजता परिषद सुरू झाली व तींत फार थोडी चर्चा होऊन पण्डितजींनी असें जाहीर केलें कीं, आम्ही कोणी चार माणसें डॉ. आंबेडकर यांना घेऊन बसूं व इतर कोणाच्या कांहीं सूचना असल्यास त्या त्यांनी आमच्याकडे पाठवाव्या. अर्थात् हा तावडतोबीचा निकाल लागण्याचें कारण असें कीं, पुण्याहून परत आलेल्या शिष्ट मंडळातर्फे सर चुनीलाल मेहता यांनीहि हकीकत सांगितली. तींत ते म्हणाले कीं, महात्मा गांधी हे संयुक्त मतदार संघांत जागा राखून ठेवण्याला अनुकूल नसले तरी प्रतिकूल नाहीत. त्यांचा विरोध फक्त अस्पृश्यांकरिता जात-वार मतदार संघापुरता आहे. याशिवाय त्यांनी गांधीजींची म्हणून आणखी एक मोठी योजना सांगितली. परंतु ती इतकी गुंतागुंतीची होती कीं ती लोकांना समजून सांगणें व तिला लोकमत अनुकूल करणें ही गोष्ट महात्मा गांधी हे खुले होऊन देशांत हिंडून लोकांना सांगतील तरच शक्य होईल. पण राखीव जागांना महात्माजींची प्रतिकूलता आहेच असें नाही. एवढ्यानेंच आपलें पुष्कळ काम झालें व समेट होण्याची शक्यता दिसते म्हणून गांधीजींच्या तपशीलवार इतर योजनेकडे कोणीं लक्ष दिलें नाहीं. कारण ती योजना विकल्पार्थीच होती. तीच योजना हटकून स्वीकारली पाहिजे असें गांधीजींचें म्हणणें नव्हते. प्रथम डॉ. आंबेडकर हे यांत गांधीजी निश्चित असें कांहींच सांगत नाहीत असें म्हणाले व तसें नसेल तर मी आपल्या भूमिकेवरून एक केसभरहि हाल-णार नाही असेंहि त्यांनी सांगितलें. परंतु पुढे ते असेंहि म्हणाले कीं, चार मंडळींत बसून मी कोणत्याहि सूचनांचा विचार करावयास तयार आहें. अर्थात् चर्चेचें केंद्र येरवड्याहून हलून तें मुंबईस आलें ही गोष्ट चांगली झाली. गांधीजींप्रमाणे आंबेडकरहि निरनिराळ्या सूचनांचा विचार करावयास तयार आहेत असें पाहून सर्वांना आनंद झाला व बुधवारीं फिरून तीन वाजतां परिषद भरेल असें ठरून मंगळ-वारचें काम सुमारें दीड वाजतांच संपलें.

### समेटास किती काळ लागेल

तिसरें प्रहरीं मुंजे व केळकर यांनीं असा विचार केला कीं, जरी गांधीजी व आंबेडकर हे चर्चा कर-ण्यास तयार झाले तरी मुंबईतील उभय पक्षांना सूचना पटून त्या गांधीजींपर्यंत जाऊन त्यांना पसंत पडून नंतर मुख्य प्रधानापर्यंत जाऊन प्रधान-मंडळाला पटून नवा निकाल जाहीर होणें ही गोष्ट कमींतकमी एक आठवडा खाईल व तोंपर्यंत दिल्लीस महासभा भरली तरी तिला निश्चयात्मक ठराव न करतां सभा नांवाची करून बरखास्त करावी लागेल. शिवाय सभा चालू असतां इकडे गांधींचा उपवासहि वाढत्या स्थिती-ला पोचून सर्वांचें लक्ष तिकडे लागेल म्हणून सभेचें अधिवेशन पुढें ढकलावें असें मुंजे व केळकर यांनी ठरवून दिल्लीस व सर्व वृत्तपत्रांस सर्वत्र ताराहि झाल्या. अर्थात् दिल्लीच्या स्वागतमंडळाला ही गोष्ट आवडण्यासारखी नव्हती. त्यांची सर्व तयारी फुकट जाऊन निराशा होणार होती. म्हणून रात्रीं ९ वाजे-पर्यंत टेलिफोनवर उत्तरें–प्रत्युत्तरें एकसारखीं सुरू होतीं. शेवटीं असें ठरलें कीं, बुधवारीं रात्रीं नऊ वाजतां स्वागत कमिटीचे अध्यक्ष पंडित शिवनारायण हे वर्किंग कमिटीचा सल्ला घेऊन ठरेल तें मुंबईस कळवितील. मुख्यतः तारीख चोवीसच्या ऐवजी सव्वीस तारखेला अधिवेशन भरवल्यास कसें काय होईल असा विचार मुंबई व दिल्ली येथे चालू आहे, व फिरून नवीन निश्चय होईपर्यंत अधिवेशन तहकुब आहे.

अशाच समजुतीने सर्वांनी चालावें हें बरें. शुक्रवारीं सकाळीं या गोष्टीचा अखेर निकाल होऊन सोमवार तारीख सव्वीस रोजीं अधिवेशन भरावें असें ठरल्यास प्रतिनिधींना शनवारच्या गाडीने निघून सोमवारीं दिल्लीस पोंचतां येईल.

दरम्यान तडजोडीची चर्चा सुरू होती. प्रथम डॉ. आंबेडकर यांच्याशीं पंडितजी, सप्रू व जयकर यांनी चर्चा केली. त्यांत एक सूचना निघाली व तिला डॉ. आंबेडकर यांची थोडीबहुत संमति मिळाली. नंतर डॉ. मुंजे व केळकर यांना बिर्ला हाऊसमध्ये बोलावण्यांत आलें, व त्यांच्याशींहि या सूचनेची वाटाघाट झाली. तींत ही सूचना महात्माजींना करून पाहाण्यासारखी आहे असें ठरलें. नन्तर रा. ब. राजा, रा. पी. बाळू व गवई वगैरे लोकांना बोलवून त्यांच्याशीं चर्चा झाली; तीत वरील गृहस्थहि त्या सूचनेला अर्धवट अनूकूल झाले. तेव्हां फिरून रात्रीं नऊ वाजतां डॉ. आंबेडकर यांच्याशीं चर्चा व्हावी असें ठरलें. तात्पर्य मंगळवारीं सकाळीं जी विशेष आशा दिसत नव्हती ती सायंकाळीं दिसूं लागली. तेव्हां आता बुधवारीं काय होतें हें पहावें.

## ( नं. २ )

कालचें पत्र लिहून झाल्यानन्तर पूर्वीचा सगळा अदमास बदलला. म्हणजे आंबेडकर व राजा यांचें कोणत्याहि योजनेवर एकमत होणें जवळ जवळ अशक्य असें वाटत होतें पण तें संभवनीय ठरलें आणि त्यामुळे हिंदुमहासभेची बैठक ठरल्याप्रमाणें होणार नाही असे वाटत होतें, ती ठरल्याप्रमाणें व्हावी असें निश्चित करण्यांत आलें. रात्रीं नऊ वाजेपर्यंत बिर्ला हाऊसमध्ये पण्डित मालवीय, सप्रू, जयकर, केळकर, राजगोपाळाचारिअर, बिर्ला, प्रकाशम्, राजा, बाळ, गवई इत्यादि मंडळी एकत्र बसून त्यांनी जी योजना सर्वानुमते पसंत केली आणि ती घेऊन रात्रीं बाराच्या गाडीने सर तेज बहादुर सप्रू, जयकर, बिर्ला, राजगोपाळाचारिअर व बाबू राजेंद्र प्रसाद यांचें शिष्टमंडळ पुण्यास रवाना झालें. तें आज सकाळीं महात्माजींची गांठ घेऊन त्यांच्याशीं चर्चा करून परत दोनप्रहरीं तीन वाजतां भरणाऱ्या परिषदेपुढे हजर होऊन समक्षच निकाल सांगेल किंवा टेलिफोननेहि निकाल कळवील. तात्पर्य, काल दोन प्रहरीं तीन वाजता अनुकूल निकाल होण्याची जी आशा नव्हती ती आज उत्पन्न झाली आहे. दरम्यान येरवडा येथे महात्मा गांधीजींनी वर्तमानपत्रांच्या प्रतिनिधींना जी खुलासेवार मुलाखत दिली ती वाचून नव्या योजनेला गांधीजी संमति देतील अशी आशा वाटते. म्हणून ती योजना काय आहे हें थोडक्यांत सांगतों. ती योजना अशी:—

### नवी योजना

अस्पृश्य वर्गाला कोणत्याहि कायदे कौन्सिलांत जितक्या जागा द्यावयाच्या त्याचे दोन भाग 'अ' व 'ब' असे करावयाचे. पैकीं 'अ' जागांकरितां अस्पृश्य वर्गातर्फे वाटेल तितक्या उमेदवारांनी उभें राहावें; पण त्यांची प्राथमिक निवडणूक अस्पृश्यवर्गाच्या मतदारां-नीच करावी, व उभ्या राहिलेल्या एकंदर उमेद-वारांतून " अ " संख्येच्या तिपटीइतके उमेदवार निवडून द्यावे व या निवडलेल्या उमेदवारांची नोंद मुख्य निवडणुकीकरिता होणाऱ्या उमेदवारांच्या यादींत प्रथम करावी. यानंतर 'ब' वर्गाकरिता वाटेल तितके उमेदवार अस्पृश्य वर्गातून उभे राहावे व अशा रीतीने उभ्या राहिलेल्या एकंदर उमेदवारांपैकीं ठरीव जागांइतके नेमके उमेदवार सर्वसाधारण ( जनरल ) स्थानिक मतदारसंघाने निवडून द्यावे. उदाहरणार्थ रत्ना-गिरी व कुलाबा या दोन जिल्ह्यांना मिळून एकंदर बारा जागापैकीं चार जागा अस्पृश्यांना ठेवल्या असें समजूं. याचे दोन गट 'अ'च्या दोन जागा व 'ब'च्या दोन जागा. 'अ'च्या दोन जागा भरण्या-करिता त्या संख्येच्या तिपटीइतके म्हणजे सहा उमेदवारच निवडून द्यावयाचे. मग या निवडणुकी करिता किती कां लोक उभे असेनात. 'ब' च्या जागा दोन. याकरिता उभे राहणाऱ्या उमेदवारांना वरीलप्रमाणें पूर्वसंमति किंवा प्राथमिक निवडणूक नाही. म्हणून आपण समजूं कीं, ब वर्गाच्या जागांकरिता दहा उमेदवार उभे राहिले. तर अशा रीतीने रत्नागिरी-कुलाबा जिल्ह्यांकरिता एकंदर सोळा उमेदवारांची पक्की यादी तयार होईल, आणि मग स्पृश्यास्पृश्य मतदार हा भेद न ठेवता सर्वच्या सर्व मतदारांनी या सोळांपैकीं चार उमेद-वार अखेर निवडून द्यावे म्हणजे त्या दोन जिल्ह्यांच्या गटांचे प्रतिनिधि ठरले.

मात्र या चार जागा राखीव असें समजा-वयाचें म्हणजे एकंदर दोन जिल्ह्यांकरिता दिले-ल्या बारा जागापैकीं पहिल्या चार जागा अस्पृश्यांना मिळतील, व अशा रीतीने सोळा अस्पृश्य उमेदवारांपैकीं त्यांतल्या त्यांत अधिक मतें ज्या चौघांना मिळतील ते निश्चित निवडून आले असें समजावे. मग स्पृश्य उमेदवारापेक्षां यांना कितीहि कमी मतें मिळालीं तरी चालतील. हल्लीं कांहीं जिल्ह्यांतून मराठे लोकांकरिता राखीव जागा आहेत. त्याकरिता निवडणूक जशी होते तशी ही निवड-णूक अस्पृश्यांकरितां होईल असेंच समजावें. तसेंच

'ब' वर्गाकरिता ज्या जागा राखून ठेवावयाच्या असें म्हटलें त्या लोकसंख्येचें प्रमाण लक्षांत घेऊन कांही कमी कांही जास्ती अशा बेताने त्याची संख्या ठरविली जाईल. याचा अर्थ असा कीं, 'अ' वर्गाने आंबेडकरांचें समाधान व्हावें. म्हणजे खास अस्पृश्य वर्गाच्या पसंतीचे असे कांही लोक यावे आणि 'ब' वर्गाने रा. ब. राजा यांचें समाधान व्हावें. म्हणजे सांप्रत 'अ' बोर्डने दिलेल्या जागांपेक्षां अधिक जागा त्यांना राखीव मिळाव्या. आणि आशा अशी वाटते कीं, महात्मा गांधी यांनाहि ही योजना पसंत पडेल. कारण त्यांची प्रतिज्ञा अस्पृश्य वर्गाच्या स्वतंत्र मतदारसंघाकडून अखेर एकंदर निवडणूक न व्हावी इतक्या पुरतीच असल्याचें त्यांजकडून निश्चितपणें सांगण्यांत आलें आहे. मुख्य पक्या यादींत उमेदवाराचा समावेश होण्याला जर कांही प्राथमिक कसोटी म्हणून लावली तर तिला महात्माजींनी हरकत घेण्याचे कारण नाही. अर्थात् हें तिरंगी कोडें आहे म्हणून त्याचें उत्तरहि असेंच तिरंगी असावयाचें त्याला इलाज नाही. पण ज्या कोणत्याहि योजनेनें डॉ. आंबेडकर, रा. ब. राजा व स्वतः महात्मा गांधी या तिघांचेंहि समाधान होईल तिला शतशः धन्यावादच दिले पाहिजेत.

अशा रीतीने मुख्य भानगडीचा प्रश्न सुटण्याच्या मार्गाला लागत आहे असें दिसल्यामुळें दिल्ली येथील महासभेच्या अधिवेशनाच्या प्रश्नावर पडणारा ताण सहजच कमी झाला. तोपर्यंत उलट सुलट तारा, टेलिफोन सुरू होते. कारण दिल्लीची अडचण एक प्रकारची तर मुंबईची दुसऱ्या प्रकारची. परंतु अखेर पक्का निर्णय अस्तिपक्षी होऊन आज सकाळीं दिल्लीस अधिवेशन भरवावें अशी तार व टेलिफोन गेला. तसेंच उलटया सुलटया बातम्यांनी गोंधळून गेलेल्या प्रतिनिधींची मानसिक कुचंबणा संपवावी म्हणून मुंबईहून बाहेर गांवीं अनेक ठिकाणीं तारा करण्यांत आल्या. कारण अजूनहि प्रतिनिधींना आपल्या गांवाहून निघून दिल्लीला योग्य वेळीं पोंचण्याला अवसर मिळेल.

## (नं. ३)

### बुधवार ता. २१ ची हकीकत

आज डॉ. आंबेडकर यांनी ते कोणत्या अटींवर संयुक्त मतदारसंघाला मान्यता देण्यास तयार आहेत याबद्दल एक विस्तृत पत्रक प्रसिद्ध केलें असून त्यांत त्यांच्या किमान मागण्या मांडल्या आहेत.

### डॉ. आंबेडकरांच्या मागण्या

**पहिला भाग**—कायदेमंडळांतील प्रतिनिधी.

(अ) अस्पृश्य वर्गांना प्रांतिक कौन्सिलांत पुढील-प्रमाणें जागा देण्यांत याव्या:—

| प्रांत | एकंदर सभासद | आंबेडकरांची नवी मागणी | सरकारी निर्णया-प्रमाणे मिळणाऱ्या जागा |
|---|---|---|---|
| मद्रास | २१५ | ३० | १८ |
| मुंबई | २०० | १६ | १० |
| बंगाल | २५० | ५० | १० |
| संयुक्त प्रांत | २२८ | ४० | १२ |
| पंजाब | १७५ | १० | ० |
| बिहार–ओरिसा | १७५ | २० | ७ |
| मध्यप्रांत-वऱ्हाड | ११२ | २० | १० |
| आसाम | १०८ | ११ | ४ |
| एकूण | १४६३ | १९७ | ७१ |

(ब) या निवडणुकी संयुक्त मतदारसंघामार्फत व्हावयाच्या असून त्यांत वरील जागा मात्र राखीव म्हणून ठेवावयाच्या आहेत. परंतु, पहिलीं दहा वर्षें मात्र संयुक्त मतदारसंघांत अस्पृश्यवर्गातर्फे कोणी उभें रहावयाचें हे ठरविण्याकरिता अस्पृश्य-वर्गाच्याच मतदारांची प्राथमिक सभा भरवून त्यांनी प्रत्येक मतदार संघात त्यांच्यातर्फे ज्या उमेदवारांनी उभें राहावयाचें असेल त्यांच्यापैकीं दोन नांवें ठरवावयाची व त्यांनीच संयुक्त मतदार संघातर्फे उभें राहावयाचें. एकच सभासद ज्या मतदारसंघाम कायदेमंडळात पाठावता येतो अशा संघांपैकी प्रत्येक प्रांतातील ज्या संघांत ही योजना अमलांत याव-याची त्याची प्रांतवार संख्या पुढे दिली आहे. ती अशी:—मद्रास १८, मुंबई, मध्यप्रांत व बंगाल प्रत्येकी १०, आसाम ४, बहार ओरिसा ७, पंजाब ५, संयुक्तप्रांत १२.

### दहा वर्षांनंतर

(क) ही योजना फक्त दहा वर्षेच अमलांत राहावयाची. दहा वर्षांनंतर ही प्राथमिक निवड-णुकीची पध्दति बंद करून संयुक्त मतदार संघातर्फे परस्पर निवडणुकी अस्पृश्यांकरिता होतील. पण वरील जागा मात्र राखीव जागा म्हणूनच समजल्या जातील.

(ड) ही राखीव जागा ठेवण्याची व अधिक सभासद अस्पृश्यांना द्यावयाची योजना यापुढे आण-खी पंधरा वर्षें म्हणजे ही योजना अमलांत आल्या वेळेपासून एकंदर २५ वर्षे अमलांत राहावयाची व त्यानंतर मात्र ही पद्धति चालू ठेवा वयाची कीं नाही याबद्दल अस्पृश्य वर्गाचेंच मत घेऊन जो निकाल ते देतील त्याप्रमाणें ठरवावयाचें.

(ई) वरिष्ठ कायदे मंडळ किंवा लोकसभा व त्याशिवाय मध्यवर्ती असें स्टेट कौन्सिल जें असेल

त्यांतहि प्रांतिक कायदे मंडळाबाबत ठरविलेल्या वरील योजनेप्रमाणेच व त्याच अटींवर, लोकसंख्येच्या प्रमाणांत अस्पृश्यांतर्फे प्रतिनिधि घेतले जातील.

(फ) अस्पृश्य वर्गाकरिता तरी, मतदानाचा हक्क कायद्याप्रमाणें वयांत आलेल्या सर्व स्त्री-पुरुषांस दिला जाईल. प्रांतिक कायदेमंडळाकरिता व वरिष्ठ कायदेमंडळाकरिता मतदानाचा हक्क एकच राहील.

**लोकल बोर्डे**

**भाग दुसरा**—(१) आज निरनिराळ्या प्रांतांत अस्तित्वांत असलेल्या व पुढे उत्पन्न होणाऱ्या सर्व म्युनिसिपालिटया, लोकल बोर्डे, जिल्हा, तालुका, किंवा खेडीं यांतील युनियन्स, स्कूल बोर्डे व पंचायती या सर्व संस्थांमधून लोकसंख्येच्या प्रमाणांत अस्पृश्यांचे प्रतिनिधी घेतले पाहिजेत.

**सरकारी नोकऱ्या**

(२) मुख्य हिंदुस्थान सरकार किंवा प्रांतिक सरकारें यांच्या सरकारी नोकऱ्यांत कमींत कमी लोकसंख्येच्या प्रमाणाबरहुकूम नोकऱ्या दिल्या जातील अशी हमी दिली पाहिजे. या नोकऱ्यांकरिता लायकी मात्र ठरवावी. फक्त शैक्षणिक लायकीशिवाय इतर गुण ठरविण्याचे जे नियम आहेत ते सैल करून लोकसंख्येच्या मानाचें प्रमाण भरेपर्यंत त्यांना जागा देण्यांत याव्या.

(३) अस्पृश्य वर्गांना शिक्षण घेण्याच्या सोयी करण्याकरिता प्रत्येक प्रांतांत शिक्षणाकरिता म्हणून जी रक्कम बाजूस काढून ठेविली जाते त्यांतला लोकसंख्येच्या प्रमाणांत निश्चित अंश निराळा काढून ठेवून त्याचा विनियोग फक्त अस्पृश्यांच्या शिक्षणाकरिताच केला जावा.

(४) कानडाच्या घटनेंतील कलम ९३ प्रमाणे भावी घटनेंत अशी योजना करून ठेवावी कीं, शिक्षण, आरोग्य, सरकारी नोकऱ्या इत्यादि बाबतींत अन्याय केला जात आहे असें वाटल्यास गव्हर्नर किंवा व्हाइसरॉय यांच्याकडे दाद (अपील) मागण्याचा हक्क अस्पृश्यांना मिळावा.

**ही कमींत कमी मागणी**

वरील योजनेबाबत डॉ. आंबेडकरांनी दिलेल्या मुलाखतींत त्यांनी असें सांगितलें कीं, वरील मागणी ही कमींत कमी म्हणून मीं मांडली आहे. यापेक्षा मला खालीं जातां यावयाचे नाही. गांधींनी राखीव जागांकरिता आपली संमति दिली हें चांगलें झालें. कारण ते पूर्वी त्यांच्याविरुद्ध होते. तथापि माझी दृष्टि इतकीच कीं खरेखुरे अस्पृश्यांचे प्रतिनिधी कौन्सिलांतून निवडून यावे.

आज दुपारीं तीन वाजता हिंदुपुढाऱ्यांच्या बैठकीला पण्डित मालवीय यांच्या अध्यक्षतेखाली प्रारंभ झाला. सभेला आज बरेच कमी लोक हजर होते. पण्डित मालवीय यांनी असें सांगितलें कीं काल परिषद तहकूब झाल्यानंतर डॉ. आंबेडकर, रा. ब. राजा व इतर पुढारी मंडळी यांनी सर तेज बहादुर सप्रू यांनी सुचविलेल्या योजनेचा विचार केला व त्या योजनेवर सर्वांचें एक मत होणें शक्य असून ती योजना महात्मा गांधींपुढे मांडण्यासारखी आहे असें वाटल्यामुळे सर तेजबहादुर सप्रू, बॅ. जयकर, राजगोपाळाचारि, घनश्यामदास बिर्ला, राजेंद्र बाबू यांचें शिष्टमंडळ महात्मा गांधींना भेटण्याकरिता पुण्यास काल रात्रीं गेले. आज त्यांनी महात्माजींची भेट घेतली व शिष्टमंडळाला एकंदर वातावरण आशापूर्ण वाटत आहे. महात्मा गांधी यांनी डॉ. आंबेडकर, रा. ब. राजा व मी स्वतः यांना भेटीकरिता बोलावलें असून रा. ब. राजा हे आज दुपारीं पुण्यास गेले. डॉ. आंबेडकर आज रात्रौ पुण्यास जाणार आहेत व मीहि जात आहें उद्या सायंकाळपर्यंत आम्ही परत येऊं. सबब हें अधिवेशन उद्या रात्रौ सातवाजेपर्यंत मी तहकूब करतो. आता लोकांचे डोळे येरवड्यास काय वाटाघाटी होतात इकडे लागले आहेत.

डॉ. आंबेडकर यांनी हिंदु पुढाऱ्याच्या शिष्टमंडळाच्या विनंतीप्रमाणे येरवड्याच्या तुरुंगांत म. गांधींची मुलाखत घेण्यास जाण्याचें कबूल केलें आहे. महात्मा गांधींच्या पत्नी सौ. कस्तुरबाई गांधी यांना महात्माजींना भेटतां यावें म्हणून त्यांची मुक्तता सरकारने करावी अशाबाबत खटपट चालू आहे असें पंडित मालवीय यांनी आज हिंदुपुढाऱ्यांच्या परिषदेपुढे हा प्रश्न आला असता जाहीर केलें.

# नूतन बालक जनकाच्या मुळावर न जन्मो !

म. गांधींनी प्रायोपवेशनाची घोर प्रतिज्ञा उच्चारली व त्या प्रतिज्ञेबरहुकूम गेल्या मंगळवारपासून त्यांच्या उपोषणास सुरुवातहि झाली. उपोषणास प्रारंभ होण्यापूर्वी त्यांना येरवड्याच्या तुरुंगांतून हलवून दुसऱ्या एखाद्या ठिकाणीं ठेवण्यांत येईल असें सरकारने जाहीर केलें होतें. परंतु एकदा तुरुंगांतून बाहेर आल्यानंतर आपल्यावर सरकारानें कोणतीहि अट घालूं नये अशी गांधीजींनी उलट अट घातल्यामुळे व तो अट घालून घेण्यास सरकार तयार नसल्यामुळे या अटीतटीच्या सामन्यांत गांधिजी अखेर तुरुंगांतच राहिले. म. गांधींच्या वयाला त्रेसष्टावें वर्ष सुरू आहे. इतक्या उतारवयांत शरीराने धट्टीकट्टी असलेली माणसेंदेखील म्हाताऱ्यांतच गणली जातात. तशांतून गांधिजींचें शरीर तर पाठ्यवयासच नको, नुसता हाडांचा सांपळा! अशा माणसाचा निभाव अन्नावांचून किती दिवस लागेल याची काळजी प्रत्येकास वाटावी यांत नवल नाही.

गांधीजींचे चिरंजीव देवीदास हे त्यांस तुरुंगांत नुकतेच भेटून आले. त्यांच्या सांगण्यावरून गांधीजी आधीच इतके थकले आहेत कीं, त्यांनी उपोषणास प्रारंभ केल्यानंतर त्यांची थोडक्याच अवधींत काय वाट होईल याची कल्पनाहि अंगावर शहारे आणणारी आहे. त्यांच्या उपवासास एक दिवस लोटला नाही तोंच त्याचे डोळे खोल जाऊन त्यांस भारी अशक्तता आली आहे. म. गांधी मनाने कितीहि खंबीर असले तरी त्यांची काटक शरीरयष्टिहि वयोमानामुळे एका फासळीचीहि राहिलेली नाही याची मनोमय साक्ष अखिल हिंदी लोकांस आहे. म्हणून त्यांची घोर प्रतिज्ञा ऐकून प्रत्येकाच्या छातींत धडकी भरल्यासारखी झाली. डोक्यावरचें आभाळ फाटावें, पायाखालची धरणी दुभंग व्हावी, दिशा खावयास उठाव्या, ज्वालामुखीने एकाएकीं पेट घेऊन अग्निगोलकांचा वर्षाव करावा अशा प्रकारच्या संकटांचें स्मरण होऊन जो तो आपापल्या परीने संकटनिवारणाचे उपाय शोधूं लागला.

गांधीजी उपोषण करता करता दुर्दैवाने इहलोक सोडून गेल्यास आपणास तरी जगून काय करावयाचें अशा निराशेच्या फेऱ्यांत सांपडून किंवा त्यांच्या तपश्चर्येचें बल आपल्या तपश्चर्येने वाढवावें म्हणून कोणी स्वतः उपोषण करण्यास प्रवृत्त झाले. गांधीजींचा निश्चय अस्पृश्योद्धारासाठी आहे ही खूणगांठ बांधून अस्पृश्यांस नवीन धार्मिक व सामाजिक सवलतींनी संतोष देण्यास कोणी सिद्ध झाले. रोजचा कामधंदा न सुचल्यामुळे कोणीं उपोषणाच्या पहिल्या दिवशीं आपलीं दुकानें बंद ठेवून हरताळ पाळला. कोणीं ईश्वरास प्रार्थनेने करुणा भाकली, नामजपाने आळविलें व अभिषेकाने आपलेसें करण्याचें ठरविलें. अस्पृश्यांस पूर्वीच द्यावयाच्या सवलती आपण दिल्या नाहीत म्हणून स्पृश्य अनुताप पावले आणि डॉ. आंबेडकरांनी वेगळा मतदारसंघ मागून महात्माजींच्या मानेला नाहक तात लावली म्हणून अस्पृश्य आंबेडकरांना दूषण लावूं लागले. स्पृश्यांच्या देवालयांचीं द्वारें कैक वर्षांत अस्पृश्यांकरिता उघडलीं नव्हतीं तीं क्षणांत उघडलीं आणि स्पृश्यांच्या ज्या देवांचें दर्शनहि अस्पृश्यांस घडणें दुरापास्त होते त्या देवांचीं मस्तकें अस्पृश्यांनी भक्तिपूर्वक केलेल्या अभिषेकाने न्हाणिलीं.

सारांश, गांधीजींनी प्रायोपवेशनाची प्रतिज्ञा करतांच नाटकांतील ट्रॅन्सफर सीनप्रमाणे हिंदुस्थानाचें रूपच एकदम पालटलें. या देशांत इंग्रजी राज्य स्थापन झाल्यापासून उपोषण व उपासना, देव व देवभक्ति यांनी सुशिक्षित वर्गाच्या भीतीने पळून जाऊन दूर कोठे तरी तडीतापडींत व बायाबापड्यांत दडी दिली होती. परंतु गांधीजींच्या उपवासाने सुशिक्षितांसहि इतकी उपरति झाली कीं त्यांपैकीं पुष्कळांनी उपोषण पाळलें व देवाची भक्तिपूर्वक आराधना केली. सर्वांच्या अंतःकरणांतून द्वेष, मत्सर, कलह, वैर इत्यादि कलियुगांतील विकार लय पावून भक्ति, प्रेम, औदार्य, नम्रता, पावित्र्य इत्यादि सत्ययुगास शोभणाऱ्या उदात्त भावना उचंबळून येऊन त्यांचे सर्वत्र पूर लोटले. हा देखावा गेल्या शंभरपन्नास वर्षांत तरी हिंदुस्थानांत अपूर्व होय यांत शंका नाही. लोखंडाचे दोन तुकडे एकत्र सांधावयाचे झाल्यास त्यांपैकीं एक तुकडा थंडगार व दुसरा तेवढा तापून लालभडक असून भागत नाही. 'तप्तेन तप्तमयसा घटनाय योग्यम्' या कव्युक्तीचा विचार केल्यास हे दोनहि तुकडे सारखेच तापावे लागतात.

गांधीजींच्या उपोषणापूर्वी स्पृश्य हिंदु समाज कौन्सिलांत अस्पृश्य वर्गाशीं साधला जाण्यास उत्सुक होता. अस्पृश्यांपैकींहि बराच मोठा वर्ग त्याच मताला बिलगून असला तरी डॉ. आंबेडकर व त्यांचा कंपू विभक्त मतदारसंघाचा हेका धरून बसल्यामुळे हिंदु समाजांत फूट पाडण्यासाठी टपलेल्या मॅक्डोनाल्डप्रभृति ब्रिटिश मुत्सद्द्यांनी आंबेडकरांची तळी उचलून त्यांना सवता सुभा

देऊन टाकला. मॅक्डोनाल्ड यांचा निर्णय बदलून घ्यावयाच्या मार्गांत गांधीजींस विरोध करणारे प्रतिस्पर्धी डॉ. आंबेडकरच होत. यामुळे सर्वांची दृष्टि आंबेडकराकडेच वळली. जो तो आंबेडकरांसच गांधीजींचा प्राणघातक कृतान्त समजूं लागला. आंबेडकरांनीहि असल्या उपासाच्या खुळाला भीक घालणारा मी नव्हे असें सांगून मनाचा कठोरपणा निदर्शनास आणिल्यामुळे आंबेडकरास प्रसन्न करून घेण्यावांचून हिंदु पुढाऱ्यांना गत्यंतरच उरलें नाही.

पण आंबेडकर हे कांही म्हटले तरी हिंदुच आहेत. 'गांधीसारख्या पुण्यपुरुषाची हत्या करणारा नराधम हा' अशी जनतेने जन्मभर आपल्याकडे बोटे दाखवून आपल्या तोंडास काळोखी आणलेली आंबेडकराना सहन व्हावी कशी ? त्यांनी गांधीजींचा मनोदय स्पष्ट कळेल तर आपण तडजोडीस तयार असल्याचें सांगितलें. मात्र तसें करतांना गोष्ट या थराला नेण्याची जबाबदारी आपल्याकडे नसून गांधीजींकडेच आहे असा खुलासा सविस्तरपणें मुंबईच्या क्रॉनिकल पत्रांत छापून दोषाचें माप गांधीजींच्या पदरांत बांधण्याची संधि त्यांनी वायां जाऊं दिली नाही. त्यांचें म्हणणे असें कीं 'ज्याने उठावें त्याने आंबेडकरास मुळीं धरावें' हा अन्याय आहे. गोलमेज परिषदेच्या वेळीं गांधिजी अस्पृश्यांची कोणतीच मागणी मान्य करीनात. स्वतंत्र मतदारसंघ राहोच, पण संयुक्त मतदार संघास व राखीव जागासह ते आपली संमति देईनात. स्वतंत्र मतदारसंघाची अस्पृश्याची मागणी हाणून पाडण्याकरिता मुसलमानांच्या गोटांत शिरून त्यांच्या चौदा मागण्याहि त्यांच्या त्यांस देऊन टाकण्याचीहि त्याना दिकत वाटली नाही. पण मुसलमानांची बहादुरी अशी कीं त्यांनी या कृष्णकारस्थानांत शिरण्याचे नाकारलें. तुम्ही आमचे कसलेच प्रयत्न चालूं देत नाही तर तुम्ही आमचें मांडले आहे तरी काय, असा प्रश्न अस्पृश्यानी गांधीजींस विचारला असतां गांधीजींचे उत्तर हें कीं 'वयांत आलेल्या सर्वांसाठी मताधिकार मिळविण्याची खटपट मी करीत आहें व तो अधिकार इतरांबरोबर अस्पृश्यांनाहि मिळेल.'

या आश्वासनाने डॉ. आंबेडकरांचें समाधान झालें नाही. तेव्हा गांधीजींनी दुसरा एक पर्याय सुचविला तो असा. अस्पृश्य उमेदवारांनी स्पृश्य उमेदवाराबरोबर सर्वसामान्य मतदारसघातर्फे निवडणुकीस उभें राहावें. सदर निवडणुकींत अस्पृश्य उमेदवार यशस्वी झाल्यास ठीकच, नाहीपेक्षा त्याने आपण अस्पृश्य म्हणून निवडणुकींत हरलों असे गांधीजी व काँग्रेस यांच्या निदर्शनास आणावें म्हणजे गांधीजी यशस्वी अशा स्पृश्य उमेदवारास आपल्या जागेचा राजीनामा देण्यास लावतील व त्या जागीं अस्पृश्य उमेदवारास निवडून येण्यास मदत करतील. परंतु या सगळ्या भानगडी गांधीजी व काँग्रेस यांच्या मर्जीवर राहणाऱ्या असल्याने डॉ. आंबेडकर गांधीजींच्या या योजनेस कबूल झाले नाहीत. त्यांना कायदा व राज्यघटना यांच्या शाश्वत आधारावर आपले अस्पृश्य बांधव कौन्सिलांत हमखास निवडून यावयास पाहिजेत. ती सोय स्वतंत्र मतदार संघांत असल्यामुळे ते गांधीजींच्या बाजूस वळले नाहीत.

गांधीजींनी डॉ. आंबेडकरांच्या या आक्षेपास अद्यापि उत्तर दिलें नाही. तथापि आंबेडकरांचे हे आक्षेप खरे मानले तरी एक वेळ संयुक्त मतदार संघ व राखीव जागा या योजनेची तळी उचलणाऱ्या आंबेडकरांना गांधीजींच्या मतास नकार दिल्यानंतरहि आपल्या मूळ योजनेस चिकटून राहण्यास काय हरकत होती ? डॉ. आंबेडकर त्याच योजनेस चिकटून राहते तर गांधीजींना अन्नत्यागपूर्वक प्राणत्यागाची घोर प्रतिज्ञा करण्याची गरजच नव्हती. गांधीजी आपली विशिष्ट विचारसरणी सोडीनात म्हणून आंबेडकरांना आपल्या जुन्या विचाराला तिलांजलि देण्याचें कारण काय ? व ज्याअर्थी ते संयुक्त मतदारसंघास झुगारून देऊन स्वतंत्र मतदारसंघ कवटाळण्यास गेले त्याअर्थी ते ब्रिटिश मुत्सद्द्यांच्या लालुचीस बळी पडले, आणि गांधीजींवर व पर्यायाने एकंदर हिंदु समाजावर सूड घेण्यास उठले असेंच म्हणणें भाग पडतें.

गांधीजींनी आंबेडकरांना काहीच उत्तर दिलें नसलें तरी त्याना अस्पृश्यांच्या बाबतींत काय हवें आहे याची स्पष्ट कल्पना कोणासच नव्हती. आपण स्वतंत्र मतदारसंघाला विरुद्ध आहों असें त्यांनी सर सॅम्युएल होअर व मि. रॅम्से मॅक्डोनाल्ड यांना कळविलें होतें. परंतु काय नको हें सांगितल्याने काय हवे याचा उलगडा होतोच असें नाही. डॉ. आंबेडकर यांना इमर्जेन्सी कौन्सिलाच्या शिष्टमंडळाला व पं. मालवीयप्रभृति हिंदू परिषदेच्या पुढाऱ्यांना गांधीजी राजा-मुंजे करारास म्हणजे संयुक्त मतदारसंघास व राखीव जागांस कबूल आहेत काय याचा उलगडा पाहिजे होता. तो उलगडा करून घेण्यासाठी हिंदूंचें शिष्टमंडळ त्यांना येरवड्याच्या तुरुंगांत भेटलें व वर्तमानपत्रांच्या बातमीदारानी त्यांना खोदखोदून प्रश्न विचारून त्यांचा टाव काढला. त्यावरून स्वतंत्र मतदारसंघ जाऊन त्याच्या जागीं दुसरी कोणतीहि योजना आली तरी गांधीजी आपली प्राणत्यागाची प्रतिज्ञा मोडतील. राखीव जागांची योजना त्यांना पूर्वींहि नको होती व आजहि नापसंत आहे, तथापि मुंबईच्या हिंदु

पुढाऱ्यांच्या परिषदेस त्या उपायाशिवाय दुसरा उपायच न सांपडला तर त्या योजनेपुढे नाखुषीने मान वांकविण्यास गांधीजी कबूल होतील असें समजून आलें.

आता संयुक्त मतदार संघ व राखीव जागा यांचें ओझें गांधीजींस कां वाटावें अशी शंका कोणासहि येणारच. त्यावर गांधीजींनी आपल्या खुलाशांत भाष्य केलें आहे तें मननीय आहे. त्यांच्या मतें संयुक्त मतदारसंघांत कां होईना, अस्पृश्यांना राखीव जागा दिल्या असता स्पृश्य व अस्पृश्य यांत अंतर पडतें, व आपपर भाव दिसतो. गांधीजींना हें अंतर, हें द्वैत बिलकुल खपत नाही. स्पृश्य व अस्पृश्य समाज एकरूप झाले पाहिजेत. फार काय पण अस्पृश्य समाज त्वरित स्पृश्य बनला पाहिजे याची तळमळ गांधीजींना लागून राहिली असून तें कार्य अस्पृश्यांना राखीव जागा दिल्याने दुरावेल अशी त्यांस भीति वाटत आहे. यासाठी त्यांची अस्पृश्यांना विनवणी ही कीं त्यांनी आपला सगळा भार आपल्यावर व स्पृश्य हिंदूंवर टाकावा म्हणजे आपण आपल्या वजनाने व दीर्घोद्योगाने अस्पृश्यतेचा कलंक पुसून टाकून स्पृश्यास्पृश्यांमधील भेदभावास कायमची मूठमाती देऊं. गांधिजींची ही विचारसरणी त्यांच्या साधुत्वास, औदार्यास व कळकळीस साजेशी असली तरी डॉ. आंबेडकर व रा. ब. राजा यांसारख्या प्राकृत जनास तींत धोका वाटत असल्यामुळे त्यांचें समाधान तोंडी अभिवचनापेक्षा कायदेशीर लेखी आधारावांचून होणार नाही. ही मन:स्थिति लक्षांत घेऊनच डॉ. मुंजे यांना रा. ब. राजाबरोबर संयुक्त मतदारसंघाचा व राखीव जागांचा करार हिंदु-महासभेच्या वतीने करावा लागला व आंबेडकरांनाहि तसल्याच एखाद्या साधनाची आज गरज भासत आहे.

राजा-मुंजे करार ही एक तात्पुरती तडजोड झाली. ती तडजोड कायद्याच्या मुशींत घालण्यापूर्वी तिला किती तरी दिव्यांतून गेलें पाहिजे. तिच्यांत फेरबदल करतांना एका बाजूने डॉ. आंबेडकरांचा पक्ष व दुसऱ्या बाजूने प्रांताप्रांतांचे हिंदु पुढारी यांची हिसकाहिसक होईल व अखेर सदर योजना गांधिजींच्या पृथक्करणांत सांपडेल. फार लांब कशाला, मुंबईच्या हिंदु पुढाऱ्यांच्या परिषदेंतच सदर योजनेचे वाभाडे निघून एक वेगळीच योजना कशी जन्मास येऊं पाहत आहे हें आजच्या अंकातील मुंबईच्या बातमीपत्रांत कोणासहि पाहावयास सांपडेलच. त्याखेरीज डॉ. आंबेडकर यांची स्वतंत्र योजना आहेच. या दोनहि योजनांची रचना इतकी भानगडीची व गुंतागुंतीची आहे कीं ती म. गांधींचें उपोषणाने आधीच आटत चाललेलें रक्त आधिक आटविल्यावांचून राहणार नाही. मुंबईच्या हिंदु पुढाऱ्यांच्या परिषदेने आपला तळ मुंबईहून हालवून परवा पुण्यास आणिला हें एक प्रकारें बरेंच झालें. कारण त्या योगाने मुंबईस जाण्यायेण्याचे हेलपाटे वांचून गांधिजींच्या उपोषणाची मुदतहि आंखडेल. सारांश, स्पृश्यास्पृश्य हिंदूंस एकत्र सांधणाऱ्या योजनेच्या जन्मापूर्वीच्या प्रसूतिवेदना सांप्रत सुरू आहेत. त्या वेदना संपून नवीन बालक लवकर जन्म पावो व तें परमवंद्य गांधीजींच्या मुळावर न येवो अशीच कोणीहि परमेश्वरापाशीं या बिकट प्रसंगीं प्रार्थना करील.

# सेनापति बापटांसाठी जनतेस प्रार्थना

महाराष्ट्रांतील एक प्रमुख पुढारी सेनापति बापट यांनी म. गांधी याजप्रमाणेंच ता. २०-९-३२ पासून रत्नागिरीचे तुरुंगांत प्रायोपवेशन सुरू केलें आहे हें सर्वांस माहीतच आहे. इंग्लंडचे मुख्य प्रधान मि. रॅम्से मॅक्डोनाल्ड यांनी जो मतदानाचा निर्णय दिला आहे त्यांत अस्पृश्यासाठी स्वतंत्र मतदार-संघाची योजना केलेली आहे. या योजनेमुळे स्पृश्य व अस्पृश्य हिंदूंत कायमची फूट पाडून मानीव अस्पृश्यांवर अस्पृश्यतेचा कायमचा शिक्का बसेल व हिंदु समाजाचीं छकलें होतील असें महात्मा गांधींप्रमाणेंच से. बापट यांचेंहि ठाम मत आहे. ही आपत्ति टाळण्यासाठी,से. बापट यानीहि म. गांधींप्रमाणेंच सर्व हिंदूंसाठी संयुक्त मतदार संघाची योजना सरकारकडून मान्य होईपर्यंत अगर स्वतःचा अंत होईपर्यंत उपवास करण्याचें ठरविलें आहे.

सेनापति बापट यांनी केलेला हा निश्चय म. गांधींच्या इतकाच अढळ आहे. त्यांचा अनुपमेय स्वार्थत्याग, अलोट देशभक्ति, आणि देशाकरिता व विशेषतः गोरगरीबांसाठी त्यांनी केलेली खडतर तपश्चर्या सर्वांस विदित आहे. अशा समयीं से. बापट यांनी आरंभिलेल्या कार्यांत त्याना यश यावें व या खडतर व्रतांतून ते सुरक्षितपणें पार पडून त्यांना दीर्घायुरारोग्य प्राप्त व्हावें अशी परमेश्वराची प्रार्थना करणें हें अखिल महाराष्ट्राचें कर्तव्य आहे असें आम्हांस वाटतें.

याकरिता सर्व महाराष्ट्रभर सोमवार ता. २६-९-३२ रोजीं सर्वांनी उपोषण करून सायंकाळीं ६ ते ६-१५ पर्यंत गावोगांवीं सभा भरवाव्या, त्यांत वरील अर्थाची सामुदायिक प्रार्थना करावी व शक्य तर पुढे रोज आपआपले ठिकाणीं सदर वेळीं ह्या-

निमित्ताने परमेश्वराची प्रार्थना करावी अशी आमची आबालवृद्धांस विनंति आहे.

१ वासुदेव गणेश जोशी, २ वासुदेव कृष्णभावे, ३ शंकर गणेश लवाटे, ४ दिनकर वासुदेव दिवेकर, ५ गो. स. पळसुले, ६ भालचंद्र महेश्वर गुप्ते, ७ काशिनाथ गोविंद पाषाणकर, ८ काशिनाथ ठकूजी जाधव, ९ हरि मोरेश्वर जोशी, १० व्यंकटेश बळवंत हरोलीकर, ११ अनंत विष्णु काळे, १२ आत्माराम वासुदेव मोडक, १३ केशव आपासाहेब भगत, १४ गणपत महादेव नलावडे,

[देशभक्त पांडुरंग महादेव बापट यांची देशसेवा महाराष्ट्रांत सर्वांस महशूर आहे. त्यांनी आपला देह आजपर्यंत देशासाठी चंदनाप्रमाणे झिजविला असून त्यांच्या स्वार्थत्यागाला तुलनाच नाही. अशा या वंद्य पुरुषाने प्रायोपवेशनाचें घोर तप आरंभलें आहे. म. गांधींच्या पाठोपाठ प्रायोपवेशनाने आत्माहुति देणारांत ते बहुधा पहिलेच होत. अनेक गुणांत त्यांचें गांधीजींशीं पुष्कळच साम्य आहे. गांधीजींच्या प्रायोपवेशनाने सर्व हिंदुस्थान व्याकुळ झालें आहे. त्यांच्या मानाने बापट यांची भूमिका लहान असल्याने त्यांचें जनतेस विस्मरण पडण्याचा संभव आहे. महाराष्ट्राची कृतज्ञतेबद्दल प्रसिद्धी आहे. त्यास राजकीय रणभूमीवर अनेकवार धैर्याने तळपलेल्या बापटांची आठवण वरील विनंतिपत्राने वेळींच करून दिली आहे. तिजकडे गुणज्ञ व कृतज्ञ महाराष्ट्राचें दुर्लक्ष होणार नाही असा आम्हांस भरंवसा आहे. ]

—संपादक केसरी,

# हिंदुमहासभेचें १४ वें अधिवेशन

दिल्ली ता. २४ सप्टेंबर १९३२

## अध्यक्ष श्री. केळकर यांचें भाषण

सभ्य स्त्री–पुरुषहो,

हिंदुमहासभेच्या या चौदाव्या अधिवेशनाच्या अध्यक्षपदाचा जो मान आपण मला दिला तो स्वीकारून मीं आपल्या डोक्यावर मोठी जबाबदारी घेतली आहे, याची जाणीव मला आहे हें मी प्रांजलपणें कबूल करतों. १९२९ सालीं जबलपूर येथे भरलेल्या हिंदुमहासभेच्या अधिवेशनाचा मी अध्यक्ष होतों. त्या परिषदेपुढे जे महत्त्वाचे प्रश्न होते तेच या सभेपुढेहि आहेत. आज ज्ञातिविषयक बाबतींत दिलेल्या निर्णयाने त्या प्रश्नांना फारच तीव्र स्वरूप आलें आहे. म्हणून आपण सर्वांनी त्या प्रश्नांकडे काळजीपूर्वक व शांतपणें लक्ष द्यावें अशी माझी आपणास विनंति आहे. ब्रिटिश सरकारातर्फे मि. राम्से मॅक्डोनाल्ड यांनी ज्ञातिविषयक बाबतींत जो निर्णय दिला आहे त्याच्याशीं प्रत्येक प्रांतांतील हिंदु समाजाचा जिव्हाळयाचा संबंध आला आहे. तथापि बंगाल, पंजाब, सरहद्द प्रांत आणि सिंध या प्रांतांतील हिंदु समाजाला तर हा निर्णय फारच कठिण वाटत आहे. म्हणून मला अशी खरोखर इच्छा होती कीं, या अधिवेशनाचा अध्यक्ष म्हणून या प्रांतांतील एखादा प्रमुख हिंदु पुढारी नेमला जावा. परंतु ज्याअर्थी आपण मला आता निवडलें आहे त्याअर्थी मी या सर्व प्रश्नांबाबत माझ्या जबाबदारीची जाणीव ठेवून माझें मत आपल्यापुढे मांडणार आहें.

१९२५ सालीं कानपूर येथे भरलेल्या हिंदु–महासभेच्या खास अधिवेशनाचा व १९२९ सालीं जबलपूर येथे भरलेल्या वार्षिक अधिवेशनाचा अध्यक्ष या नात्याने भाषण करतांना मी हिंदु–महासभेचा इतिहास, तिचें धोरण, तिचें प्रचारकार्य वगैरे गोष्टींबद्दल साद्यंत हकीकत सांगितली होती. तिचा पुनरुच्चार मी आज करूं इच्छीत नाहीं. तसेंच जबलपूर येथील माझ्या भाषणांत १९१६ सालीं लखनौ येथे हिंदु-मुसलमानांत जो करार झाला त्याच्याऐवजीं दुसरा कोणता नवा करार करावा याबद्दल आलेल्या निरनिराळ्या योजनांचा तपशीलवार उल्लेख व तुलना मीं केली होती. परंतु गोलमेज परिषदेमुळे व आता १७ ऑगस्टच्या ज्ञातिविषयक निर्णयामुळे या प्रश्नाला निश्चित स्वरूप प्राप्त झालें आहे. म्हणून मी प्रथम त्या विषयाकडे वळतों.

### हा पंचायतीचा निकाल नव्हे

मला प्रथमतः असें म्हणावयाचें आहे कीं, पंचांनी पंचायत करून जो निकाल दिला जातो तसा हा निकाल नाही. ब्रिटिश सरकाराने आपल्या जबाबदारीवर दिलेला हा एक हुकुमवजा निर्णय आहे असें मी समजतों. गोलमेज परिषदेच्या किंवा सल्लागार कमिटीच्या ज्या सभासदांनी बेसावधगिरीने सरकाराकडे ही पंचायत सोंपविली त्यां सभासदांना या निर्णयाच्या बाबतींत तक्रार

करण्यास साहजिकपणें जागा नाही. परंतु हिंदु-सभेची तशी गोष्ट नाही. गोलमेज परिषदेला आपले प्रतिनिधि पाठवा असें सरकारानें तिला केव्हाहि सांगितलें नाही. आणि म्हणून १७ ऑगस्टचा निर्णय हिंदु-सभेला बंधनकारक ठरूं शकत नाही.

**२० ऑगस्ट व १७ ऑगस्ट**

पंधरा वर्षांपूर्वी या तारखेच्या जवळपासच्या एका तारखेस राजकीय सुधारणांबद्दल हिंदुस्थानच्या त्या वेळच्या स्टेट-सेक्रेटरींनी असाच एक जाहीरनामा काढला होता. त्यांत असें म्हटलें होतें कीं सरकाराच्या राज्यकारभाराच्या प्रत्येक खात्यांत हिंदी लोकांचें सहकार्य घेतलें जावें म्हणून निश्चित व्यवस्था करण्याचें सरकारानें ठरविलें आहे. व अशा रीतीनें ब्रिटिश साम्राज्यांतील एक घटक म्हणून जबाबदारीचें स्वराज्य आस्ते आस्ते हिंदी लोकांना देणार होतें. पायरी-पायरीनें पुढे जाऊन प्रगति करावयाची असा त्यांत हेतु दिला होता. परंतु कोणत्या व किती प्रमाणांत हिंदी लोकांची या स्वराज्याच्या बाबतींत प्रगति व्हावी हें ठरविण्याचा अधिकार ब्रिटिश सरकारानें आपल्या हातीं ठेवला होता. या कामीं अर्थात् लोकांचें सहकार्य सरकार घेणारच होतें. १९१७च्या ऑगस्टच्या२० तारखेस जाहीरनामा काढून सरकारानें जें धोरण आंखलें त्या धोरणांतीलच१९३२च्या १७ ऑगस्टला दिलेला ज्ञातिविषयक निर्णय ही एक पायरी आहे हें उघड आहे. या मधील काळांत सरकारानें लहान लहान सुधारणा केल्या असतील; परंतु प्रत्यक्ष जबाबदारीचा एक अंशहि सरकारानें अद्याप दिला नाही ही गोष्ट सर्वमान्य होण्यासारखी आहे. म्हणून असें म्हटलें पाहिजे कीं, नवीन राजकीय सुधारणा देण्यापूर्वी ज्ञातिविषयक निर्णय देऊन त्यांतील धोरणाबद्दलचीहि जबाबदारी सरकारानें आपल्या एकट्याच्याच शिरावर घेतली आहे.

**सरकारचीं कारस्थानें**

गोलमेज परिषद बोलावून हिंदुस्थानच्या लोकांशीं आपण विचारविनिमय करूं व निरनिराळ्या समाजांच्या पुढाऱ्यांमध्यें ज्या बाबतींत एकमत होईल ती बाब आपल्यास बंधनकारक होईल असें सरकारानें म्हटलें होतें हें खरें. पण सरकारास हें पक्कें माहीत होतें व त्यांनी आपल्या अंतःकरणांत अशी खूणगांठ बांधली होती कीं कोणत्याहि प्रश्नावर असें एकमत होणार नाही. किंबहुना मी असें म्हणेन कीं, असें ऐकमत्य होऊं नये म्हणून जरूर त्या सर्व कारस्थानी उपायांची तजवीज सरकारानें केली होती. उघड रीतीनें व गुप्त रीतीनें अल्पसंख्याकांना त्यांनी उत्तेजन दिलें व मुसलमानांना तर इतकें डोक्यावर घेतलें कीं, त्यांनी व इतर अल्पसंख्याकांनी आपल्या मागण्यांचा पारा फार उंच चढविला. ऐकमत्य झाल्याबरोबर तो निर्णय सरकारास बंधनकारक आहे या आमिषाला मोठे धुरंधर व्यवहारज्ञ पुढारी बळी पडले ही दुःखाची गोष्ट आहे. जेव्हां अशा तऱ्हेचा करार केला जातो त्या वेळीं करार करणाऱ्या लोकांना याची जाणीव असावयास पाहिजे कीं वाटाघाट करणारे दोघेहि एकदमच तरतील अगर बुडतील. एकट्या कोणासहि सुखरूप परत जाण्याची शक्यता नाही. अशी जाणीव असली तरच असल्या वाटाघाटी यशस्वी होतात. नैराश्य आलें किंवा आपल्या स्वतःच्या हातींच कायमची निर्णय देण्याची शक्ति आहे हें माहीत असलें तरच अशा वाटाघाटींत ऐकमत्य होतें.

परंतु या ऐकमत्यानें ज्याचें नुकसान होणार आहे असा सत्ताधारी व त्रयस्थ मनुष्य बाजूस उभा राहून आपल्या हातीं असलेल्या अधिकारांच्या दानाची लालूच एका पक्षास देऊं लागला तर ऐकमत्य अशक्य आहे. कारण बेकी होण्यांत व मतभेद उत्पन्न करण्यांत त्याचा फायदा असतो. त्रयस्थाला हें माहीत असतें कीं एकी व भांडणें होण्यांत त्याचा फायदा आहे. हिंदुस्थानांतील राजकीय पुढाऱ्यांनाहि हा दुसऱ्यास कोडें घालण्याचा खेळ खेळतां आला असता, नाही असें नाही. ब्रिटिश पार्लमेंटामध्यें जे पक्षोपपक्ष आहेत त्या सर्वांनी अगदी एकमतानें यापुढील सुधारणांचा हप्ता कोणत्या पद्धतीनें द्यावा हें ठरविल्यास आम्ही तो स्वीकारण्यास तयार आहोंत, उगाच गोलमेज परिषदेची धावाधाव कां करतां ? असा उलटा पेंच हिंदी पुढाऱ्यांनाहि टाकतां येणें शक्य आहे. पार्लमेंटांतील कॉन्झरव्हेटिव्ह, लिबरल, लेबर आणि रॅडिकल या सर्व पक्षांतील लोकांचें अगदी निश्चित एकमत हिंदुस्थानाच्या प्रश्नाच्या बाबतींत होणें तरी शक्य आहे काय, असा माझा त्यांना सवाल आहे. माझा हा सवाल पत्करून हिंदुस्थानाचा राजकीय प्रश्न एकदा कायमचा मिटविण्याचें ते कबूल करतील असें मला वाटत नाही. सरकाराला बालंबाल खात्री होती कीं गोलमेज परिषदेला अल्पसंख्याकांचे पुढारी म्हणून जे लोक बोलाविले होते त्यांचें एकमत होणें शक्य नव्हतें. व याचा भरपूर फायदा घ्यावा असेंच सरकारानें ठरविलें होतें.नुकतेच असेंब्लीमध्यें रा. ब. राजा यांनी ज्ञातिविषयक निर्णयाच्या भ्रमाचा भोपळा फोडण्याचें श्रेय संपादन केलें व अशाच रीतीनें गोलमेज परिषदेंत ठरलेल्या

इतर बाबींचाहि बोजवारा उडण्यास वेळ लागणार नाही.

## लखनौचा करार कां मोडला ?

तथापि या वेळीं मी ज्ञातिविषयक निर्णयासंबंधानच बोलणार आहे. इतर विषयांसंबंधी येथे बोलण्याचें कारण नाही. गोलमेज परिषद भरवून त्यांतून ज्ञातिविषयक प्रश्नावर तडजोड करण्याचा मार्ग सरकारनें स्वीकारला. पण हा मार्ग अनेक दृष्टींनी संशयास्पद होता. यापेक्षा दुसरे अनेक मार्ग सुचविता येण्यासारखे आहेत. मोर्ले--मिंटो सुधारणा जाहीर करण्यापूर्वी म्हणजे १९०६--०७ मध्येंच हिंदु--मुसलमानांचा या बाबतींत झगडा चालू होता. आणि आपल्यास हें माहीतच आहे कीं, १९१६ सालीं लखनौ येथे हिंदु व मुसलमान यांच्या पुढाऱ्यांनी एकमताने एक करार केला. सरकारने तोच करार मान्य केला. आणि तोच पाया समजून त्यावर कायदेकौन्सिलांतील हिंदु-मुसलमानांच्या प्रतिनिधींच्या संख्येची उभारणी केली. ती व्यवस्था आजहि कायम आहे. आणि या कराराला जर तड समजावयाचा असेल तर हा तह आम्ही मोडतों असें दोनहि पक्षांनी आगाऊ जाहीर केलें पाहिजे. पण तसें झालेलें नाही. या दोन समाजांत ऐकमत्य व्हावें असें खरोखरीच सरकारास वाटत असतें तर त्याने असें म्हटलें असतें कीं, “ पाहा ! हा आमच्याजवळ पूर्वीचा सर्वसंमत झालेला करार आहे व तो अद्याप अमलांत आहे. तुम्ही असाच दुसरा करार करून आणा, मगच आम्ही हा करार बदलूं, एरवी बदलणार नाही.” सरकारनें असेंहि केलें नाही. दोनहि पक्षांस जर हा करार यापुढे अमलांत ठेवणें प्रशस्त वाटलें नसतें तर (खटोच आविर्भाव आणून “तुम्ही एकी करा ” असें म्हणण्याऐवजी) सरकारनें स्वतःच निकाल देऊन तो अमलांत आणला असता तर कांही बिघडलें नसतें.

## राष्ट्रसंघाचा कित्ता गिरवा

उदाहरणार्थ, युरोपामधील निरनिराळ्या देशांतील अल्पसंख्याकांचा प्रश्न राष्ट्रसंघाने स्वतः जबाबदारी घेऊन सोडविलाच कीं नाही? या बाबतींत एक गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे ती ही कीं, अल्पसंख्याकांची गुंतागुंत असलेला असा जगावेगळा हिंदुस्थान हा एकच देश नाही. महायुद्धानंतर नवीन नवीन राष्ट्रें उत्पन्न करून जर्मनीची सत्ता कमकुवत करण्याचा प्रयत्न जेत्यांनी केला.पण त्याबरोबरच स्वसंमतीचें तत्त्व लावून जगांत लोकशाही निर्माण करण्याऐवजी अल्पसंख्याकांचे नवे नवे प्रश्न मात्र उत्पन्न झाले. म्हणूनच राष्ट्रसंघाला या अल्पसंख्याकांच्या बाबतींत नवीन नियम घालून द्यावे लागले. हे नियम पाहिले तर आपल्याला असें आढळून येतें कीं जातवार प्रतिनिधित्व व स्वतंत्र मतदारसंघ निर्माण करण्याऐवजी फक्त अल्पसंख्याकांची संस्कृति, त्यांच्या चालीरीती व त्यांचें शिक्षण एवढ्याच गोष्टींचें संरक्षण व संवर्धन करण्याची त्यांना हमी दिली आहे. इंग्रज सरकाराला अशा तऱ्हेचीच राष्ट्रीय प्रवृत्ति हिंदुस्थानांत उत्पन्न व्हावी अशी जर प्रामाणिक इच्छा असती तर त्यांनी हा राष्ट्रसंघाचा कित्ता हिंदुस्थानाच्या बाबतींतहि गिरविला असता. परंतु त्याऐवजीं त्यांनी असा निर्णय दिला आहे कीं, ज्यामुळे हिंदुस्थानाचे निरनिराळे असे कायमचे तुकडे पडतील ! खासगी व्यवस्थेमध्ये व राहणीमध्ये अनेक भेद आहेत तेच राजकारणांत व सार्वजनिक बाबतींत कबूल करून हिंदुस्थानाची कायमची चीरफाड करण्यांत आली आहे.

## ज्ञातिविषयक निर्णयाची चिकित्सा

ब्रिटिश सरकारानें दिलेला हा निर्णय अनेक दृष्टींनी घातुक आहे. गंमत ही आहे कीं स्वतंत्र मतदारसंघ आपल्यास पाहिजे म्हणून मुसलमानांनी हट्ट धरला तो या निर्णयाने तर पुरवलाच. पण हिंदी ख्रिस्ती, हिंदी बायका यांनी स्वतंत्र मतदारसंघ मागितले नसताहि ते त्यांच्यावर त्यांच्या इच्छेविरुद्ध लादण्यांत आले. सायमन कमिशनच्या शिफारशींच्याहि पुढे हा निर्णय गेला आहे. कायदेमंडळांत बहुसंख्य समाजांना कायमचें व निश्चित बहुमत देऊ नये व तसेच हिंदी ख्रिस्ती व अस्पृश्य वर्ग यांना स्वतंत्र मतदारसंघ देऊं नयेत असें सायमन कमिशनाचें स्पष्ट मत होतें; पण या निकालांत तेंहि मत झिडकारलें आहे. मुसलमानांच्या बाजूने पंजाब-सरकारानें ज्या मागण्या केल्या त्यांनाहि या निर्णयाने मागे सारलें. कारण पंजाब सरकारनें दोन जादा जागा देण्याची शिफारस केली असता जातिनिर्णयाने सुमारें दहा जागा जास्त दिल्या आहेत. खरोखरच सरकाराच्या मनांत अल्पसंख्याकांना लोकसंख्येच्या प्रमाणानुसार प्रतिनिधि देण्याचें आहे असें गृहीत धरलें तर सरकारानें मुसलमान अल्पसंख्याकांची जी सोय लावली आहे तीच इतर प्रांतांतील हिंदूंची लावावयास नको काय ? पण बंगाल किंवा पंजाब यांतील हिंदूंशीं सरकारानें अन्यायाचें आचरण कायमच ठेवलें आहे. अशा रीतीने कोणत्याहि एका सर्वसामान्य धोरणाने पाहता जातिनिर्णय समर्थनीय ठरत नाही. कांही विशिष्ट अल्पसंख्याकांना पक्षपात दाखवावयाचा हा उघड उघड डाव आहे. त्याच्या बुडाशीं असाहि हेतु आहे कीं, सरकाराच्या

मतें अप्रिय किंवा जहाल अशी राजकीय चळवळ व राष्ट्रीय वृत्ति यांचें तेज प्रकट करणाऱ्या हिंदु जातीचे पंख शक्य तितके कापून टाकावे. सरकारचा हेतु थोडक्यांत सांगावयाचा तर तो असा आहे कीं, कोणत्याहि प्रांतांत कार्यकारी मंडळावर ताबा ठेवण्याइतकें कायदेमंडळ समर्थ बनूं नये. गटाविरुद्ध गट उभे करून कोंबडी झुंजवावयाची आणि आपला लाभ तेवढा आपल्या पदरांत पाडून घ्यावयाचा असा हा कावा आहे.

## हिंदूंवर जुलूम

पंजाबमधील हिंदूंना लोकसंख्येच्या प्रमाणांतहि प्रतिनिधित्व मिळालें नाही, मग 'भरतीच्या' (Weightage) जागांची गोष्टच नको. तेथील हिंदु मातबर व वजनदार आहेत. त्यामुळे तेथे संयुक्त मतदारसंघ व खुली मतदानपद्धति चालू केली असती तर अल्पसंख्य म्हणून तेथील हिंदूंची लंगडी पडणारी बाजू सावरली गेली असती. पण सरकारानें स्वतंत्र मतदारसंघ व मुसलमानांना घटनान्तर्गत बहुमत बहाल केलें! बंगालमधील हिंदु हे शिक्षण, संस्कृति, संपत्ति व प्रतिष्ठा या सर्व बाजूंनी अग्रेसर आहेत. पण त्यांचीहि बिल्हेवाट तीच. मध्यप्रांतांत तर सायमन कमिशनाच्यापेक्षांहि जास्त जागा जातिनिर्णयामुळे मुसलमानांच्या पदरांत टाकल्या आहेत. संयुक्त प्रांतांतील हिंदूंची तक्रार पूर्वीपासूनच अशी होती कीं लखनौच्या करारानें मुसलमानांना 'भरतीच्या' जागा दिल्या. ती तक्रार दूर करण्याऐवजीं जातिनिर्णयानें वज्रलेप मात्र केली. मुंबई इलाख्यांतून सिंध वेगळा झाला तर मुसलमानांची संख्या इतकी थोडी राहील कीं, त्यांना दिलेल्या 'भरतीच्या' जागा अवास्तव ठरतील. त्या अवास्तव जागा आणि विभक्त झालेल्या सिंधमधील मुसलमानांचें प्राबल्य हे मुंबई इलाख्याच्या डोक्यावर ठेवलेले अन्यायाचे दोन डोंगरच होत. राजकारणाचा खेळ खेळतांना मुसलमानांनी सरकारी जादूने भारलेले फासे हातीं असल्यानें प्रत्येक डाव जिंकला यांत शंका नाही. परंतु सर्वपक्षीय परिषदेंत काय घडलें तें विचारांत घ्या.

## मुसलमानांचा हट्ट

त्या दृष्टीनें १९२५ सालीं दिल्ली येथे प्रथम हिंदु-मुसलमानांमध्ये बोलणें सुरू झालें. नंतर अस्पृश्य आले. युरोपियन, अँग्लो-इंडियन किंवा हिंदी ख्रिश्चन हे आले, पण आपली बाजू मांडण्यापेक्षा हिंदु-मुसलमानांत समेट करण्यावरच त्यांनी भर दिला. त्यांची ही उदासीन वृत्ति लंडन येथे मावळली आणि त्यांनी अल्पसंख्याकांचा करार घडवून आणला. लाला लजपतराय किंवा पं. मदन मोहन मालवीय यांसारख्या हिंदु-महासभेच्या नेत्यांनी संयुक्त मतदारसंघाची योजना पुढे मांडली; तेव्हा जिनांनी ती उचलून धरली, एवढेंच नव्हे तर स्वतंत्र मतदारसंघ हे तुम्हांला नुकसानीचे आहेत असें मुसलमानांना त्यांनी सांगितलें. पण त्याबरोबरच आपल्या म्हणून कांही अटी घातल्या व त्या अमान्य ठरल्या. त्यांपैकीं काहींना लालाजी व पंडितजी यांनी विरोध केला व त्या विरोधाला काँग्रेसनेंहि पाठिंबा दिला. याचें प्रतिबिंब नेहरू रिपोर्टांत आढळतें. पण जिनांच्या १४ मागण्यांच्या गठ्ठ्यालाहि मागे सारणाऱ्या मागण्या करणारे दुसरे मुसलमान पुढारी पुढे आले. त्यांचे समाधान सायमन रिपोर्टानेंहि झालें नाही. आपल्या मागण्यांची तार त्यांनी चढवीतच नेली. त्यांतच हिंदुस्थान-सरकारचा खलिता प्रसिद्ध झाला. लंडनमध्ये कट्टर मुसलमानांना युरोपियनांनी हाताशीं धरलें. त्यामुळे समेटाची आशा समूळ नष्ट झाली. मि. मॅक्डोनाल्ड यांचा धावा करण्यांत आला. हिंदु पुढाऱ्यांनी त्यांच्या मांडीवर मान टाकण्याचें कबूल केलें. पण मुसलमान त्यांच्या उदार वृत्तीच्या देखाव्याला भ्याले आणि त्यांनी हट्ट धरला कीं, ब्रिटिश मंत्रिमंडळानें जातिनिर्णय द्यावा. या मंत्रिमंडळांत हुजूर पक्षाचें प्राबल्य आहे हें लक्षांत ठेवलें पाहिजे.

या सर्वांची फलश्रुति म्हणजे सध्याचा जातिनिर्णय. त्याचा कांटा मुसलमानांच्या बाजूला इतका झुकत आहे तरी ते नापसंतीची आरोळी ठोकीतच आहेत! त्याचा अर्थ इतकाच कीं मिळालेले घबाड ते हातांतून जाऊं देणार नाहींत. तरीहि एक हिंदु पुढारी असें सुचवितात कीं, हिंदु-मुसलमानांनी एक तडजोड करावी. आशावादाचें यापेक्षा ढळढळीत उदाहरण दुसरें कोणतें असेल? आतापर्यंतच्या अशा प्रयत्नांत हिंदूंनी आपला एक एक हक्क गमाविला नाही काय? आणि मुसलमानांनी एक एक मागणी चढविली नाही काय? याचा अर्थ हिंदूंना खलबत करण्याचें कसब नाही असा नाही. तर त्यांची सारी उडी सरकाराच्या हातून सत्ता हिसकून घेण्यावर आहे आणि त्यासाठी त्यांना हिंदु-मुसलमानांची एकी हवी आहे. हे धोरण ठीक आहे, पण त्यालाहि कांही मर्यादा आहेच. काँग्रेसचा सारा भार हिंदु पुढाऱ्यांनी आपल्या शिरावर घेतला आहे आणि मुसलमान लोक मात्र महात्मा गांधी किंवा पंडित मोतीलाल यांसारख्या त्यांच्या हितकर्त्यांना दुस्मान म्हणून संबोधीत आहेत.

हा सर्व विचार जातिनिर्णयाच्या दृष्टीनेंच झाला. राज्यघटनेचा विचार अद्याप 'बहोत दूर' आहे. त्याचा कच्चा आराखडाहि अजून काढलेला नाही. पण त्याच्या आधीं जातिनिर्णय देण्याची कोण लगबग! जणुं कांही सारें ब्रह्मांड त्यांत भरलेलें आहे. त्यावरच इतका वेळ व उत्साह खर्च

झाला आहे कीं, बाकीचे मुख्य मुख्य मुद्दे कसे तरी गुंडाळून घेतले जातील कीं काय अशी भीति वाटते. यावरून वॉशिंग्टन आयर्व्हिनने लिहिलेली एक गोष्ट आठवते. ती गोष्ट अशी कीं, कांही ठराविक काळांत मी टेकडीवरून उडी मारून जातों असें एका पहिलवानानें जाहीर केलें. पण त्याची सारी शक्ति त्या टेकडीपर्यंत धावत येण्यांतच खलास झाली.तशी स्थिति हिंदुस्थानाची करण्याचा सरकारचा डाव दिसतो.

## जबाबदारी आली कीं जातवारी जाईल

नवीन राज्यघटना जेव्हा अंमलांत येईल तेव्हा कायदेमंडळाविषयीं हिंदु जातीनें आपलें काय धोरण ठेवावें याबद्दल मी आपलें कांही विचार मांडतों. कायदेमंडळाची रचना अत्यंत असमाधानकारक व सदोष होईल,या गोष्टीची मला पूर्ण जाणीव आहे.लोकप्रतिनिधींमध्ये इतके गट पाडण्यांत येतील कीं, सरकारला करून विरोध करणारा असा राष्ट्रीय पक्ष कित्येक वर्षे बनविणें कठिण होईल हेंहि मला कळतें. परंतु जर उद्या प्रांतांना स्वायत्तता देण्यांत आली तर राज्यकारभाराचीं सर्व सूत्रे सरकारपक्षाकडून निघून लोकपक्षालाच आपल्या हातीं घ्यावीं लागतील. यामुळे साहजिकच निरनिराळ्या गटांना आपापसांत सहकार्य करावें लागेल. अशा स्थितींत सत्तेचा ताजवा हा अत्यंत नाजूक राहील. कायदेमंडळांना खरीखुरी जबाबदारी देण्यांत आल्यावर जातवार दृष्टि निवळत जाईल असें मला वाटतें. कित्येकांना माझा हा फाजील आशावाद वाटेल, परंतु माझी तरी निदान त्यावर श्रद्धा आहे.

आपल्या देशांत,कांहींहि कारणानें असो,लोकसत्तेचें युग अवतीर्ण झालें आहे खरें. एक गोष्ट मात्र खरी कीं, कर भरणारांचा मताधिकार पुष्कळच विस्तृत करण्यांत आला आहे. सरकारवरहि मात करण्याकरितांच कीं काय, कॉंग्रेसने व नेहरूरिपोर्टाने मताधिकाराचें लोण वयांत आलेल्या सर्व स्त्री–पुरुषापर्यंत नेऊन भिडविलें आहे.मताधिकाराची अशी संधि देण्यांत आल्यास भणंगालाहि थोड्याशा अनुभवानंतर स्वतःची जबाबदारी कळूं लागून तोहि आपल्या हिताला जपल्याशिवाय राहणार नाही. अशा रीतीनें वरिष्ठ कायदेमंडळापासून तों तहत ग्रामपंचायतीपर्यंत कर भरणाऱ्यांना मतदानाचा समान हक्क राहील. आता प्रत्येक मतदार हा राष्ट्रीय वृत्तीचाच असेल अशी कोणाची कल्पना असेल तर ती मात्र व्यर्थ आहे. त्यासाठी मतदारांच्या अंगीं राष्ट्रीय वृत्ति बाणण्याचे प्रयत्न झाले पाहिजेत.

## बहिष्काराचा आत्मघातकीपणा

या दृष्टीने विचार करता कायदेमंडळाशीं असहकारिता करणें हें हिंदूंच्या दृष्टीनें फोलच नव्हे तर आत्मघातकीपणाचे ठरणार आहे. जोंपर्यंत निवडणुकीच्या नियमांत अशी अट नाही कीं, कांही ठराविक मतसंख्या पडेपर्यंत उमेदवार निवडला गेला असें धरलें जाणार नाही व ज्याअर्थी कोणत्याहि रीतीनें का होईना पण कायदेमंडळांतील जागा भरल्या जाणारच त्याअर्थी राष्ट्रीय दृष्ट्या निवडणुकींत भाग घेणें हेंच अधिक श्रेयस्कर ठरतें. मात्र या निवडणुकींना राज्यव्यवस्थेच्या कामीं डोळ्यांत तेल घालून व राष्ट्रीय वृत्तीने लोकहिताचीं कामें करणारे असे व उमेदवार उभे करण्यांत आले पाहिजेत. मुख्य प्रधानांनीं दिलेल्या जातीय निर्णयामुळे हिंदूंना अन्याय वाटणें साहजिकच आहे.परंतु मला हें कळत नाही कीं, कायदेमंडळावर बहिष्कार पुकारून तें या अन्यायांचें परिमार्जन कसें करून घेणार? कायदेमंडळावर बहिष्कार घालावयाचा व त्याच कायदेमंडळाने केलेले कायदे मिनतवारीनें मानावयाचे या विसंगत धोरणाचा अर्थच मला कळत नाही. राज्यघटनेनुसार काम करणें म्हणजे राज्यघटनेचाच स्वीकार करणें होय, हें विधान माझ्या मतें तर्कदुष्ट आहे. देशांत जोंपर्यंत स्वतंत्र व समान राज्यसत्ता स्थापन झाली नाही, तोंपर्यंत हिंदूंनी कायदेमंडळावर बहिष्कार घालणें म्हणजे आत्मनाश करणें होय. आजच हिंदूंची स्थिति शोचनीय आहे व तशांतहि त्यांनी कायदेमंडळावर बहिष्कार घातला तर त्यांची अवस्था किती अनुकंपनीय होईल ! हिंदूंना केवळ राजकीय स्वराज्यच मिळवावयाचें आहे असें नसून त्या स्वराज्यांत हिंदु राहून त्यांना त्यांचा योग्य हिस्सा मिळवावयाचा आहे. यास्तव हिंदूंनी आपल्या सर्व मान्याच्या जागा अधिक मजबूत करून कोणत्याहि संकटाला तोंड देण्यासाठीं सुसंघटित व तत्पर राहिले पाहिजे.

माझ्या मतें, आहे या जातिनिर्णयाच्या बाबतींतहि हिंदूंच्या हातून चूक होईल तर विनाशाची दरी त्याजपुढे आ पसरून उभीच आहे! सर्व जातीचे इरसाल प्रतिनिधि कायदेमंडळांत घुसले असता हिंदूंनी मात्र तेवढें त्यांवर बहिष्कार पुकारून आपले लायक प्रतिनिधि स्वजातीच्या हितरक्षणार्थ व अराष्ट्रीय वृत्तीच्या उच्छेदार्थ कायदेमंडळांत पाठविले नाहीत तर त्यांची किती दुर्दशा उडेल याची कल्पनाहि करवत नाही. कायदेमंडळांत शिरल्यावर मग परिस्थितीप्रमाणे स्वराज्य मागण्यासाठी व सरकारपासून अधिक सत्ता मिळविण्यासाठी इतर जातीशींहि संगनमत करण्यास कांहीच हरकत नाही. परंतु हिंदूंनीं हिंदु म्हणून कायदेमंडळांत गेलें पाहिजे एवढेंच आमचें म्हणणे. स्वराज्याचें ध्येय साध्य करण्याच्या कामीं हिंदु जातीने इतर जातींना दिशा दाखवावी, इतकेंच नाही तर वेळप्रसंगीं सरकाराशीं झुंज देतांना त्यांचें नेतृत्वहि

स्वीकारावें. परंतु या सर्व गोष्टी करीत असताहि इतर जाति राज्यकारभाराचा पुरेपूर फायदा घेत असता हिंदु जातीने मात्र त्यापासून अलिप्त राहतां कामा नये. त्यांनीहि राज्यघटनेपासून जितका ज्यास्तींत ज्यास्त फायदा करून घेता येणें शक्य आहे तितका करून घेतला पाहिजे.

# म. गांधींनी आपली प्रतिज्ञा खरी केली !

म. गांधींच्या प्रायोपवेशनास काल सात दिवस झाले. या सात दिवसांतील मंगळवारपासून शनिवारपर्यंतचे पांच दिवस अखिल हिंदु समाजास अत्यंत कष्टाचे व काळजीचे गेले. त्या मुदतींत हिंदुस्थानांतील कोट्यवधि लोकाचा प्राण पुण्याभोंवतीं, पुण्यांतील येरवड्याभोंवतीं, येरवड्यांतील खाटेवर पडलेल्या म. गांधींभोंवतीं व गांधीजींच्या प्राणाभोंवतीं घोटाळत होता. एकीकडे यमराज आपले पाश टाकून गांधीजींचे प्राण हरण करण्याच्या बेतांत होता तर दुसरीकडे हिंदु जनता गांधीजींच्या प्राणास प्रेमपाशांत पकडून त्यास हलूं न देण्याचा निर्धार करून बसली होती. गांधीजींच्या प्रायोपवेशनापूर्वीचे चारपांच दिवस व नंतरचे चार—पांच दिवस हिंदु पुढाऱ्यांच्या परीक्षेचे दिवस ठरले. तितक्या दिवसांत पं. मालवीय, बॅ. जयकर, डॉ. सप्रू, बाबू राजेंद्र प्रसाद, सर चुनीलाल मेहता प्रभृति हिंदु पुढाऱ्यांनी रात्र म्हटली नाही, झोंप म्हटली नाही, भूक म्हटली नाही, तहान म्हटली नाही. यांपैकीं कसल्याहि गैरसोयीकडे न पाहता तडजोड घडवून आणण्याच्या मानवी प्रयत्नांत त्यांनी काडीमात्रहि कसूर होऊं दिली नाही.

म. गांधींना जसें हें संकट तसें हिंदु पुढाऱ्यांनाहि संकटच. गांधीजी प्राण पणाला लावून व जिवाची आशा सोडून बसलेच होते. हिंदु पुढारी गांधिजींप्रमाणे आपल्या जिवावर उदार झाले नव्हते. त्यांना जगावयाचें होतें. पण गांधीजींना जगवून जगावयाचें होतें. कारण खरें जगणें हें त्याच जगण्यांत व खरें भूषणहि त्याच जीवनांत. तसेंच गांधीजींना वांचविण्याच्या प्रयत्नांत स्पृश्य हिंदु समाजाचाहि त्यांना जीव घ्यावयाचा नव्हता. गांधीजी वांचले पाहिजेत व स्पृश्य हिंदु समाजहि वांचला पाहिजे. गांधीजी अस्पृश्यांचे वाली व आंबेडकरहि अस्पृश्यांचेच वाली. हिंदु पुढारी गांधिजींचे वाली, स्पृश्यांचे वाली व अस्पृश्यांचेहि वाली. गांधीजी व आंबेडकर यांची ओढ अस्पृश्यांकडे व हिंदु पुढाऱ्यांची ओढ गांधीजी, स्पृश्य व अस्पृश्य यांजकडे. गांधीजी अस्पृश्यांच्या ओढीने स्वतंत्र मतदारसंघास विरोध करणार, आणि आंबेडकर त्याच अस्पृश्यांच्या ओढीने स्वतंत्र मतदारसंघ मागणार, हा आंबेडकर व गांधीजी यांजमधील फरक. आंबेडकर यांस हवा तो स्वतंत्र मतदारसंघ न देता त्यांस संयुक्त मतदारसंघाकडे वळवावयाचें हें हिंदु पुढाऱ्यांपुढे केवढे अवघड कोडें ! आणि तें कोडें सोडविण्यास मुदत किती ? तर गांधीजींच्या प्राणांताच्या अलीकडची. शिष्टमंडळांतील हिंदु पुढाऱ्यांपैकीं पुष्कळांनी विद्यापीठाच्या पुष्कळ परीक्षा दिल्या असतील. पण त्यांमधील एकाहि परीक्षेत त्यांना त्यांच्या परीक्षकांनी इतका बिकट प्रश्न घातला नसेल !

प्रायोपवेशन सुरू झाल्यानंतर गांधीजींची शक्ति या घटकेची त्या घटकेला नाही अशी स्थिति होती. परीक्षेच्या वेळीं घटेच्या ठोक्याकडे परीक्षेस बसलेल्या विद्यार्थ्यांचें लक्ष असतें. आणि कदाचित त्याच्या हातात रिस्टवॉच असल्यास मनगटावरील कांट्याकडेहि त्याच्या डोळ्यांना पाहावें लागतें. पण या वयोवृद्ध उमेदवारांच्या येरवड्याच्या तुरुंगांतील कोठडींत घेतल्या जाणाऱ्या परीक्षेंत त्यांना आपला एक हात ठोके मोजण्याकरिता जणुं काय गांधीजींच्या छातीवर किंवा नाडीवर ठेवून आपला पेपर दुसऱ्या हाताने संपवावयाचा होता. त्यांनी गांधिजींची आशा सोडली असती तर! तर काय? त्यांना जगाने परीक्षेंत शून्य मार्क देऊन नापास ठरवूनच्या ठरवून ब्रह्महत्येहूनहि भयंकर अशा हत्येचें पातक त्यांच्या माथीं बसलें असतें व त्या योगाने तोंडाला लागलेली काळोखी कितीहि नद्यांच्या, तीर्थांच्या किंवा सागरांच्या उदकांनी धुतली तरी पुसली गेली नसती. बरें, गांधिजींचा प्राण वांचविण्यासाठी हिंदु पुढाऱ्यांनी आपल्या प्रयत्नांची शिकस्त करण्याचें ठरवूनहि डॉ. आंबेडकरांच्या डोक्याने वेगळेंच कांही घेतलें असतें तर हिंदु पुढाऱ्यांच्या प्रयत्नांचें काय चीज झालें असतें? आंबेडकरांनी हटवादीपणाच करावयाचा किंवा हिंदु पुढाऱ्यांवर व गांधींवर पुरेपूर सूडच घ्यावयाचा तर त्यांना ' मर्चंट ऑफ व्हेनिस ' या शेक्सपियरच्या सुप्रसिद्ध नाटकांतील नतद्रष्ट शायलॉकप्रमाणे 'बस्स, घेईन तर स्वतंत्र मतदारसंघच घेईन, गांधींना जीवदान देण्याकरिता मी आपल्या

( मागील अंकीं ' केसरींत ' प्रसिद्ध झालेल्या )

किमान मागणीपासून रतिभरहि मागे सरणार नाही ' असें साफ सांगतां आलें असतें.

सारांश, गांधीजींनी आपल्या प्रायोपवेशनाने आंबेडकरांच्या हातांत एक कोरी करकरीत कट्यारच देऊन ठेवली होती. ती त्यांनी चाहील तर गांधींच्या पोटांत खुपसावी, नाही तर स्पृश्य हिंदूंच्या मानेंतून आरपार न्यावी. डॉ. आंबेडकर यांना डोकें आहे, पण काळजी नाही असें नागपूर शहरीं भरलेल्या जाहीर सभेंत एका अस्पृश्य पुढाऱ्याने नुकतेंच म्हटलें होतें. परंतु तें विधान तितकें खरें नाही असें आंबेडकरांनी आपल्या वर्तनाने सर्वांच्या निदर्शनास आणिलें आहे. कदाचित् तें विधान खरें मानलें तरी येरवड्याच्या विस्तीर्ण तुरुंगाच्या लहानशा कोठडींतील देखावा पाहून कसलाहि फत्तर फुटून त्याच्यातून करुणेचे प्रवाह वाहूं लागल्यावांचून राहिले नसते. तो रोहिदासासारखा देवीदास, ती तारामतीसारखी कस्तुरबाई, ते हरिश्चंद्रासारखे म. गांधी यांच्या सान्निध्यात कोणाचें मन विरघळणार नाही ? ते वसिष्ठासारखे मालवीय, त्याच्या दर्शनाने कोणाच्या डोक्यांत उन्नत विचार स्फुरण पावणार नाहींत ? ती किन्नरकंठी कवयित्री सरोजिनी. तिने बुलबुल पक्षाप्रमाणें स्वर्गीय बोल सुरू केल्यावर कोण आपलें देहभान विसरणार नाही ? अशांच्या संगतींत विश्वामित्राचा कठोरपणाहि त्याला सोडून जाईल. डॉ. आंबेडकर विश्वामित्राप्रमाणे तपस्वीहि नाहीत व निर्दयहि नाहीत. त्यांच्या नांवांत भीमराव हीं अक्षरें आहेत व तीं भयानकहि आहेत. पण भीम हा उग्र असला तरी तो धर्माच्या कह्यात राहणारा होता, हें लक्षांत ठेवलें पाहिजे. भीमावर जसा धर्माचा तसा आंबेडकरांवर गांधीप्रभृतींचा नैतिक ताबा थोडाबहुत चालून त्यांनी मिळते घेतलें असें झालेल्या निकालावरून दिसून येतें.

मागील खेपेस मुसलमानांसाठी गांधीजींनी एकवीस दिवसांच्या उपोषणाचें उग्रतप आरंभिलें तेव्हां ते दिल्लीस होते. त्यांना राहावयास प्रासादतुल्य वाडा होता व त्यांची बडदास्त ठेवण्यास त्यांचे स्नेही श्री. अन्सारी स्वतः डॉक्टरच होते. त्यांना श्वासोच्छ्वास करावयास स्वतंत्रतेची हवा होती, व त्यांची काळजी वहावयास त्यांच्या उशापायथ्याशीं रात्रंदिवस बसूं शकणारी हक्काची असंख्य शिष्यमंडळी होती. पण येरवड्यास तसें कोठे होतें ? म. गांधी कैदी, त्यांची भार्या कस्तुरबा कैदी, त्यांची शिष्या सरोजिनी कैदी. त्यांना शिष्टाईसाठी भेटावयास येणारे मालवीयप्रभृति स्नेही स्वतंत्र खरे, तरी तुरुंगांत आल्यानंतर तुरुंगाच्या शिस्तीप्रमाणें तेहि कैदीच. रात्र झाली कीं कस्तुरबाई आपल्या कोठडींत, सरोजनीबाई आपल्या कोठडींत, पं. मालवीय प्रभृति आपल्या बंगल्यांत आणि म. गांधी आपल्या थोड्या अनुयायांच्या व उपवासजन्य ग्लानीच्या ताब्यांत. ही परिस्थिति स्पृश्यास्पृश्यांच्या अत्यंत महत्त्वाच्या व भानगडीच्या विषयाची तड लावण्यास एकंदरीने प्रतिकूलच. गांधीजींनी आपल्या गळ्याला लावून घेतलेल्या फासाच्या धाकांत जो निकाल लागावयाचा त्याला घाई ही व्हावयाचीच. आणि घाई म्हटली कीं, तिच्या पाठोपाठ पडछायेप्रमाणे चूक ही उभी ठाकावयाचीच. म्हणून या घायकुताची गांधीजींच्या जीविताइतकीच जनतेला दहशत बसली होती. पुण्यास आल्यापासून चार दोन दिवसांच्या अल्पावधींत पं. मालवीय प्रभृति पुढाऱ्यांनी एवढ्या बिकट प्रश्नाचा निकाल लावला कसा याचेंच जग आश्चर्य करीत राहील व तो निकाल देतांना त्यांतील दोष वगळून व गुण तेवढाच उचलून त्याबद्दल हिंदू पुढाऱ्यांची तें पाठच थोपटील यांत शंका नाही.

हिंदु पुढाऱ्यापुढे कोडें कसें पडलें होतें तें पाहा. मॅक्डोनाल्ड याची योजना, राजा-मुंजे यांची योजना, आंबेडकर यांची योजना व हिंदु पुढाऱ्यांची स्वतःची योजना, अशा चार योजनांच्या चौकोनांत त्यांना आपला निर्णय बसवावयाचा होता. आंबेडकरांच्या मतलबास फारशी इजा पोचूं न देता गांधीजींचें ब्रीद पाळावयाचें तर त्यात स्पृश्य हिंदूंच्या हक्काचें आक्रमण झाल्यावांचून कसें राहील ? गांधीजींना विभक्त मतदार संघ नको व आंबेडकरांना राजा-मुंजांचा संयुक्त मतदार संघ नको, मग यावर तोड चालवावयाची कोणती ? तर पोटांत विभक्त मतदारसंघ व ओठांत संयुक्त मतदारसंघ याच जातीची. मुंबई येथील हिंदु पुढाऱ्यांच्या परिषदेने याच धर्तीवर योजनेचा आराखडा काढला होता. पण पुण्यांत आल्यावर त्याहि आराखड्यांत फेरबदल होऊन 'अ' व 'ब' या दोन वर्गाऐवजी एक 'अ' हाच वर्ग शिल्लक राहिला. आंबेडकरांच्या योजनेंत हे दोन वर्ग नसून फक्त एकच वर्ग होता. अर्थात् त्यांना हिंदु पुढाऱ्यांची दुहेरी योजना पसंत नसल्यामुळे त्या योजनेस त्यांनी पुण्यास आल्यापासून विरोध सुरू केला.

हिंदु पुढाऱ्यांच्या योजनेंत संयुक्त मतदारसंघाचे बरेच गुण अवशिष्ट होते. त्यांच्या योजनेप्रमाणे 'अ' वर्गाची उभारणी आंबेडकरांच्या समाधानासाठी होती, 'ब' वर्गाची उभारणी स्पृश्यांच्या समाधानासाठी होती. आणि या दोनहि वर्गातील उमेदवारांची गळद करून त्यांपैकीं एक उमेदवार कौन्सिलाकरिता स्पृश्यास्पृश्य मतदारांनी मिळून निवडून देण्याची युक्ति गांधीजींसाठी व संयुक्तमतदार संघाच्या पूर्ततेसाठी होती. पण पुण्यास आल्यानंतर गांधीजींसमोर स्पृश्य पुढाऱ्यांनी आंबेडकरांबरोबर तडजोड केली तिच्यांत 'ब'

वर्गाची उचलबांगडी होऊन फक्त 'अ' वर्ग काय तो जाग्यावर राहिला. कौन्सिलच्या एका जागेकरिता जे चार अस्पृश्य उमेदवार उभे राहावयाचे ते या 'अ' वर्गातर्फे एकट्या अस्पृश्यांनीच निवडावयाचे. अर्थात् सदर उमेदवार स्पृश्य व अस्पृश्य अशा उभयविध मतदारांच्या पसंतीचे नसून एकट्या अस्पृश्यांच्याच पसंतीचे असणार. ही पद्धत संयुक्त मतदारसंघाच्या तत्त्वास सोडून आहे. संयुक्त मतदार संघाच्या तत्त्वाप्रमाणे स्पृश्य व अस्पृश्य मिळून जितके उमेदवार असतील तितक्यांनी उभें राहावें आणि त्याना स्पृश्य व अस्पृश्य मिळून सर्व मतदारांनी आपलीं मतें द्यावीं. सदर उमेदवारांतील अस्पृश्य उमेदवारांपैकीं कित्येक उमेदवार एकट्या अस्पृश्य मतदारांना पसंत असतील; कित्येक एकट्या स्पृश्य मतदारांना पसंत असतील, आणि कित्येक स्पृश्य व अस्पृश्य अशा दोनहि धर्तीच्या मतदारांना पसंत असतील. म्हणून या प्रकारच्या निवडणुकींत उभयविध मतदारांना मान्य असा अस्पृश्य उमेदवार विजयी होण्याचा संभव होता.

स्वतंत्र मतदारसंघापेक्षा संयुक्त मतदारसंघापासून विशेष फायदा असला तर तो हाच होय. तोच फायदा मुंबईस हिंदु पुढाऱ्यांच्या परिषदेने 'अ' व 'ब' या द्विविध स्वरूपाच्या केलेल्या योजनेने सर्वांशांनीं नसला तरी बऱ्याच अंशांनीं साधणार होता. स्पृश्यास्पृश्य पुढाऱ्यांनी पुण्यास घडवून आणिलेल्या समेटाने हा फायदा बहुतेक गमावला आहे. नव्या मंजूर योजनेंत फक्त अस्पृश्य मतदारांच्या पसंतीचेच उमेदवार उभे राहणार व त्यांतलाच एक उमेदवार अखेर स्पृश्यास्पृश्य मतदारांच्या मतांनीं निवडून येणार. स्वतंत्र मतदारसंघातर्फे निवडल्या जाणाऱ्या उमेदवारांत व या उमेदवारांत मोठासा फरक नाहीं. फरक असलाच तर अस्पृश्यांनी एरवी एक किंवा दोन उमेदवार उभे केले असते त्याऐवजीं त्यांना चार उमेदवार उभे करावे लागल्यामुळे इतके सगळे उमेदवार कट्टर असे अस्पृश्य मिळणें अशक्य असल्याने एखाद-दुसरा स्पृश्यास्पृश्यांना मान्य असणारा उमेदवार उभा राहण्याची व तो निवडला जाण्याची आशा बाळगण्यापुरताच. स्पृश्यांच्या मतांचा उपयोग याच वेळीं व्हावयाचा. याखेरीज स्पृश्य व अस्पृश्य या उभयतांचा मतदारसंघ संयुक्त राहून स्पृश्य मतदारांना अस्पृश्य उमेदवाराला मतें देण्याची संधि मिळाली हा एक फायदा आहे. पण तो पुण्याहवाचनाचे वेळीं पत्नीने पतीच्या हाताला हात लावण्याइतक्याच महत्त्वाचा आहे.

असो. एवढाहि फेरबदल घडवून आणण्यास स्पृश्य पुढाऱ्यांना किती प्रयास पडले याचा विचार केला असता प्रस्तुत प्रश्नाचें बिकट स्वरूप वाचकांच्या लक्षांत येणार आहे. या बाबतींत चर्चेचे मुद्दे अनेक आहेत. तथापि स्थलसंकोचास्तव ते पुढील खेपेवर टाकणेंच योग्य होय. आजचा प्रसंग गांधीजींचे प्राण वांचविण्याचा प्रयत्न यशस्वी झाल्याबद्दल आनंद व्यक्त करण्याचा आहे; समेटाची छाननी करून त्यांतील कीस काढीत बसण्याचा नाही. वरील समेट गेल्या शनिवारीं घडून आला व त्याच्या तारा मुख्य प्रधान मि. मॅक्डोनाल्ड व भारतमंत्री सर सॅम्युएल होअर यांजकडे धडकल्याहि. त्या वेळीं मि. मॅक्डोनाल्ड आपल्या आतेच्या दफनाला गेले होते व होअरसाहेब त्यांजबरोबर टेलिफोनमधून खलबत करीत होते. गांधिजींसारख्या राष्ट्रीय पुढाऱ्याच्या जीविताची जोखीम आपल्यावर आहे याची जाणीव मि. मॅक्डोनाल्ड यांना कशी नसेल ? त्यांनी सर सम्युएल होअर व मंत्रिमंडळांतील इतर सभासद यांजबरोबर खलबत करून त्यांच्या संमतीने काल सोमवारीं दोन प्रहरीं स्पृश्यास्पृश्य पुढाऱ्यांत घडून आलेला करार आपल्यास मान्य असल्याचें गांधिजींस तारेने कळविलें. ती तार पोचताच गांधिजींनी उपोषण सोडलें व सर्व वातावरण आनंदाने दुमदुमलें.

# मुंबई कायदेमंडळाची बैठक

## मुख्य प्रधानांची समेटास संमति

सोमवार ता. २६ रोजीं मुंबई कायदेमंडळाच्या बैठकीला प्रारंभ होताच श्री. ल. र. गोखले यांनी खुलासा विचारल्यावरून गृहमंत्री ना. हडसन यांनी इन्स्पेक्टर जनरल ऑफ प्रिझन्स, डॉ. गिल्डर, डॉ. पटेल, सुपरिंटेंडेंट, मेजर मेहता, येरवडा तुरुंगाचे डे. सुपरिंटेंडेंट यांच्या वैद्यकीय मंडळाने ता. २६ रोजीं सकाळीं महात्माजींच्या प्रकृतीसंबंधाने आलेला अहवाल वाचून दाखविला. त्याचा आशय असा—आम्ही

आज रोजीं गांधींची प्रकृति तपासली व आमचें असें मत आहे कीं, कालच्यापेक्षा त्यांची जीवनशक्ति ( vitality ) फारच चांगली आहे. आज त्यांचा मौन व्रताचा दिवस होता, तरी त्यांना फारसा त्रास होत नसावा असें दिसलें. काल मळमळ ( Nausea ) वाढून वांतीचा त्यांना जो त्रास होत असे तो आज बराच कमी आहे. रक्ताचा दाब १८५ (Systolic) व ११० (Dyastolic) होता. त्यांच्या लघवींतील ॲसिटोन आणि युरिआ हीं वाढलीं आहेत. युरिआ तर १·५ वाढलें. या सर्व गोष्टींवरून गांधी हे मृत्यूच्या दारांत शिरत आहेत असें आमचें निश्चित मत झालें आहे.

नंतर मि. विंटर बोथॅम यांनी "गोलमेज परिषदेच्या आर्थिक मंडळाने केलेला रिपोर्ट मुंबई प्रांताला मान्य होण्यासारखा नाहीं असें या कायदेमंडळाचें ठाम मत आहे." अशा आशयाचा ठराव मांडला. त्यावर सर रफिउद्दीन अहमद यांनी अनुकूल भाषण केलें. रा. कामत यांनी त्याला विरोध केला. भुतो, पेटिट, खुरो, रा. ब. काळे इत्यादि सभासदांचीं अनुकूल भाषणें झाल्यावर ठराव सम्मत झाल्याचें जाहीर झालें. सरकारी सभासदांनी मात्र यावर आपलीं मतें दिलीं नाहीत.

**ब्रिटिश सरकारची स्पृश्यास्पृश्य कराराला मान्यता**

काल सोमवार ता. २६ रोजीं दोन प्रहरीं मुंबई सरकारचे गृहमंत्री ना. हडसन यांनी कौन्सिलांत स्पृश्यास्पृश्यांच्या कराराबद्दल सरकारी धोरणाचा जाहीर खुलासा केला. ते म्हणाले, " पुढील ठराव घेण्यापूर्वी मला एक खुलासा करावयाचा आहे. ज्या गोष्टीसंबंधाने खुलासा करावयाचा आहे त्याबद्दल आपल्या सर्वांनाच काळजी लागून राहिली आहे. गेल्या आठवड्याच्या शेवटीं स्पृश्य हिंदु व अस्पृश्य वर्ग यांच्यामध्ये जी तडजोड झाली त्यासंबंधाने मुख्य प्रधानाकडून आलेली तारच मी आपल्यापुढे मांडतों. ती तार अशी आहे:—नवीन होणाऱ्या कायदेमंडळांत अस्पृश्य वर्गातर्फे किती प्रतिनिधी असावेत या बाबतींत अस्पृश्यांचे पुढारी व स्पृश्य हिंदु यांच्यामध्ये जो करार झाला तो पाहून ब्रिटिश सरकारास फार समाधान वाटत आहे. या करारांत त्यांच्या हिताच्या दुसऱ्याहि बाबी आहेत. ऑगस्टच्या चार तारखेस ब्रिटिश सरकारानें पंचायतीचा म्हणून जो निकाल दिला त्यामध्ये अस्पृश्य वर्गाला मतदारसंघाच्या बाबतींत कांहीं खास सवलती दिल्या होत्या. त्याऐवजीं या करारानें अशी योजना केली आहे कीं, सर्व साधारण मतदारसंघांतच अस्पृश्यांकरिता जागा राखून ठेवल्या जाव्या. फक्त या राखीव जागांकरितां प्रतिनिधी कसे निवडावयाचे याबद्दल मात्र महत्त्वाच्या अटी घातल्या गेल्या आहेत.

सरकारने आपला निर्णय दिला त्या वेळीं या दोन्ही समाजांत ऐकमत्य नव्हतें. म्हणून नव्या कायदेमंडळांत अस्पृश्य वर्गाचें हिताहित उत्तम रीतीने संरक्षित केलें जावें याकरिता कांहीं योजना करणें सरकारास जरूर होतें. आता ज्या अर्थी अस्पृश्य वर्गाचे प्रतिनिधी व स्पृश्य वर्गाचे पुढारी यांची अशी खात्री झाली आहे कीं, या नव्या करारानें सरकारच्या वरील उद्देश उत्तम रीतीने साध्य होईल, त्या अर्थी सरकारच्या निर्णयांतील नवव्या कलमांत सांगितलेल्या पद्धतीप्रमाणे पूर्वीच्या योजनेंत फरक केला जाईल, व त्याप्रमाणे सरकारी निर्णयांतील कलम नऊमध्ये जी योजना सांगितली आहे त्या ऐवजी प्रांतिक कायदेमंडळांतील प्रतिनिधींच्या निवडणुकीबाबत या नव्या करारानें ठरविलेली योजना मान्य करावी अशी सरकार पार्लमेंटकडे शिफारस करील. सरकारी निर्णयांत पूर्वी जितक्या सर्वसाधारण मतदारसंघांना व स्वतंत्रपणें अस्पृश्यांना जागा दिल्या गेल्या होत्या तीच जागांची संख्या यापुढेहि राहील. फक्त अस्पृश्य वर्गाच्या राखीव जागा सर्वसाधारणसंघाच्या संख्येंत धरल्या जातील, इतकेंच. चार ऑगस्टच्या निर्णयाच्या ज्या मर्यादा आहेत त्याबाहेरच्याहि कांहीं कांहीं गोष्टींचा उल्लेख या नव्या करारांत आहे. उदाहरणार्थ ८ व ९ ह्या कलमांत दिलेल्या गोष्टींबद्दल आज कांहींच ठरवितां येणार नाहीं. पुढे जशी परिस्थिति उत्पन्न होईल तीवर मुख्यतः त्या बाबींच्या अंमलबजावणीचा प्रश्न अवलंबून राहील. तथापि स्पृश्य हिंदूंनी अस्पृश्य वर्गांना ज्या सवलती दिल्या आहेत त्यांचा हेतु हें एक स्पृश्य हिंदूंचे त्यांना दिलेलें वचन आहे अशी खूणगांठ सरकार आपल्या मनाशीं बांधील.

याशिवाय सरकारी निर्णयाचे बाहेरचे आणखी दोन मुद्दे आहेत. या तडजोडींत असें म्हटलें आहे कीं, लोथियन कमिटीने शिफारस केल्याप्रमाणे मतदाराची लायकी अस्पृश्य वर्गाच्या बाबतींतहि लागू करावी. एक गोष्ट स्पष्ट आहे कीं, सर्व स्पृश्य हिंदूंकरिता व अस्पृश्य वर्गाकरितांहि मतदानाची लायकी एकाच वेळीं ठरविली पाहिजे. परंतु या लायकीबद्दलचा सरकार अद्याप विचार करीत असल्याने आज त्याबद्दल निश्चित कांहीं सांगता येत नाहीं. दुसरा मुद्दा हा कीं, वरिष्ठ कायदे मंडळाचे प्रतिनिधी अस्पृश्यांनी कोणत्या पद्धतीने निवडावे हेंहि नव्या समेटाच्या शर्तींत सांगितलें आहे. परंतु हाहि प्रश्न ब्रिटिश सर-

कारने दिलेल्या निर्णयाच्या बाहेरचा आहे. या बाबतींत सर्व गोष्टींचा विचार करून सर्वंकष अशीच योजना तयार करण्याचा विचार चालू असल्याने सदर बाबतींतील एखाद्या लहानशा भागाचा म्हणजे अस्पृश्यवर्गापुरताच असा निकाल आज सरकार करूं शकत नाहीं. या दोनहि मुद्यासंबंधीं हें जें सरकारचें म्हणणें आहे त्यावरून या नव्या तडजोडींत सांगितलेल्या गोष्टींच्या विरुध्द सरकारचें मत आहे असें कोणी समजू नये. त्याचा फक्त विचार चालू आहे इतकेंच समजावें.

कोणाचाहि गैरसमज होऊं नये म्हणून आम्ही असें स्पष्टीकरण करतों कीं, ब्रिटिश हिंदुस्थानांतील सर्व साधारण मतदारसंघातर्फे वरिष्ठ कायदेमंडळांत पाठविल्या जाणाऱ्या प्रतिनिधींच्या संख्येपैकीं १८ टक्के जागा या नव्या कराराप्रमाणे अस्पृश्य वर्गांना द्यावयाच्या ठरविल्या आहेत. ही सवलत नव्या योजनेंत कशी काय बसवावयाची ही एक अडचण आहे, इतकेंच."

सायंकाळीं ५ वाजता बैठकीला पुनः सुरुवात झाल्यावर मि. रॅम्से मॅक्डोनाल्ड यांनी स्पृश्य व अस्पृश्य यांजमधील करारासंबंधी ब्रिटिश सरकारचा जो अनुकूल निर्णय जाहीर केला त्याबद्दल अभिनंदन करणारा ठराव रा. ब. काळे यांनी मांडला व तो एकमताने पास झाला.

यानंतर नगरचे रा.ब.चितळे यांनी मुख्य प्रधानांनी दिलेल्या जातीय निर्णयासंबधी पुढील आशयाचा ठराव मांडला. "मुख्य प्रधानांनी नुकताच जो जातीय निर्णय दिला तो सर्वसाधारणपणें अग्राह्य वाटत असल्याने या प्रांतापुरती संयुक्त मतदारसंघ व राखीव जागा यांच्या तत्त्वांवर एखादी सर्वसम्मत योजना करता आली तर पाहावी म्हणून हें कायदेमंडळ पुढील सभासदांची एक समिती नेमीत आहे. सर गुलाम हुसेन हिदायतुल्ला (अध्यक्ष), सर भुतो, सर रफिउद्दिन अहमद, विंटर बोथॅस, प्रेटर, डॉ. कोलॅको, रा. ब. भीमभाई नाईक, रा. ब. अंगडी, रा. ब. असवले, बी. एस कामत व रा. ब. चितळे हे ते सभासद होत."

# स्पृश्यास्पृश्य हिंदूंचा समेट

पुढें दिलेला करार पुणें येथे अखिल भारतीय-स्पृश्य हिंदूंचे पुढारी व अस्पृश्य हिंदूंचे पुढारी यांच्यामध्ये ता.२४रोजीं झाला व त्याला म.गांधींनी आपली संमति दिली. या करारांत अस्पृश्य वर्गाच्या प्रतिनिधींची संख्या निरनिराळ्या प्रांतांच्या कायदेमंडळांत किती असावी हें ठरविलें आहे. तसेंच अस्पृश्यांच्या कल्याणाच्या इतर कांहीं बाबतींबद्दलहि या समेटांत शर्ती आहेत. त्या शर्ती पुढीलप्रमाणें आहेतः—

( १ ) पुढीलप्रमाणे निरनिराळ्या प्रांतांच्या कायदेमंडळांत अस्पृश्य वर्गाकरिता म्हणून जागा राखून ठेविल्या जातील. सर्वसाधारण मतदारसंघांना ज्या जागा दिल्या आहेत, त्या जागांमध्ये या राखीव जागांचा अंतर्भाव करण्यांत आला आहे.

| प्रांत | कायदेमंडळांतील सर्व-साधारण जागा (हिंदु) | अस्पृश्यांकरिता राखीव जागा |
|---|---|---|
| १ मद्रास | १५३ | ३० |
| २ सिंधसह मुंबई | १०८ | १५ |
| ३ पंजाब | ४३ | ८ |
| ४ बिहार-ओरिसा | ११४ | १८ |
| ५ मध्यप्रांत व वऱ्हाड | ४८ | २० |
| ६ आसाम | ५७ | ७ |
| ७ बंगाल | ८० | ३० |
| ८ संयुक्तप्रांत | १४४ | २० |
| | [illegible] | [illegible] |

( २ ) या जागांकरिता प्रतिनिधींची निवडणूक संयुक्त मतदारसंघातर्फे होईल. मात्र निवडणुकीची पद्धति पुढे दिल्याप्रमाणे राहील—

मतदार संघाच्या सर्वसाधारण यादींत ज्या अस्पृश्य मतदारांचीं नांवें नोंदलीं गेलीं असतील, त्या अस्पृश्य मतदारांचा एक संघ मानला जाईल. या संघांतील प्रत्येक मतदार आपलें एक मत देऊन राखीव जागांपैकीं प्रत्येक जागेकरिता चार उमेदवारांचीं नांवें निवडील. ज्यांना या प्राथमिक निवडणुकींत जास्तींत जास्त मतें या संघांतील मतदारांकडून मिळतील तेच चार गृहस्थ प्रत्येक राखीव जागेकरिता म्हणून सर्वसाधारण मतदार संघातर्फे निवडून येण्याकरिता उमेदवार म्हणून कबूल केले जातील.

(३) वरिष्ठ कायदे कौन्सिलांत अस्पृश्य वर्गातर्फे जे प्रतिनिधि निवडले जातील तेहि संयुक्त मतदार संघातर्फे परंतु राखीव जागांकरिता म्हणून निवडले जातील व या निवडणुकीकरिता प्रांतिक कायदेमंडळांच्या प्रतिनिधींच्या निवडणुकीप्रमाणेंच वर कलम दोन मध्ये सांगितलेल्या पद्धतीने प्राथमिक निवडणुकी होऊन मग संयुक्त मतदार संघातर्फे निवडणुकी होतील.

(४) वरिष्ठ कायदे कौन्सिलांत ब्रिटिश हिंदुस्थानांतील सर्वसाधारण मतदार संघाकरिता ज्या जागा दिल्या जातील त्यांपैकीं १८ टक्के जागा अस्पृश्य वर्गाकरिता म्हणून राखून ठेवण्यांत येतील.

(५) प्रांतिक कायदे कौन्सिलांत व वरिष्ठ कायदे कौन्सिलांत अस्पृश्य वर्गातर्फे प्रतिनिधि वर सांगितलेल्या पद्धतीप्रमाणे निवडून देतांना, प्राथमिक निवडणूक होऊन, उमेदवार ठरविण्याची जी पद्धत सांगितली आहे ती दहा वर्षांनंतर बंद होईल. खाली दिलेल्या सहाव्या कलमांत सांगितल्याप्रमाणे स्पृश्य व अस्पृश्य हिंदूंनी परस्पर नवा करार केल्यास दहा वर्षांच्या अगोदरहि ही पद्धति बंद करण्यांत येईल.

(६) प्रांतिक व वरिष्ठ कायदेमंडळांत अस्पृश्य वर्गांकरितां ज्या राखीव जागा ठेवल्या आहेत, त्यांच्या निवडणुकीची कलम १ व कलम ४ मध्ये जी पद्धत सांगितली आहे, ती पद्धत या करारावर सही करणारे जे समाज आहेत त्यांच्या ऐकमत्याने हा करार बंद होईपर्यंत चालू राहील.

(७) वरिष्ठ व प्रांतिक कायदे कौन्सिलांतील निवडणुकीकरिता मतदानाचा हक्क प्राप्त होण्यासाठी लोथियन कमिटीच्या शिफारशीमध्ये अस्पृश्यांकरिता म्हणून जे गुण सांगितले आहेत, ते ज्या अस्पृश्यांना असतील त्यांनाच मताधिकार मिळेल.

(८) स्थानिक स्वराज्य संस्थांच्या निवडणुकीबाबत किंवा सरकारी नोकरीबाबत कोणालाहि तो अस्पृश्य आहे या सबबीवर नालायख समजण्यांत येणार नाही.

(९) वरील निवडणुकीबाबत व सरकारी नोकरीबाबत अस्पृश्य वर्गांना योग्य प्रमाणांत जागा मिळाव्या म्हणून शक्य तितका प्रयत्न केला जाईल. फक्त सरकारी नोकरीकरिता शिक्षणाच्या ज्या अटी सरकारने ठरविल्या असतील, त्या मात्र पुऱ्या झाल्या असल्या पाहिजेत.

(९) प्रत्येक प्रांतांत शिक्षणखर्चासाठी म्हणून जी रक्कम खर्च केली जाईल तींत योग्य प्रमाणांत अस्पृश्य वर्गांतील लोकांच्या शिक्षणाची सोय व्हावी म्हणून कांही रक्कम निराळी काढून ठेविली जाईल.

या करारावर पुढील पुढाऱ्यांच्या सह्या झाल्या आहेत, व इतर पुढाऱ्यांच्या सह्या घेतल्या जात आहेत—पं. मदनमोहन मालवीय, डॉ. सर तेजबहादूर सप्रू, बॅ. एम. आर. जयकर, डॉ. आंबेडकर, रा. ब. श्रीनिवासन्, रा. ब. राजा, सर चुनिलाल मेथा, श्री. राजगोपाळाचारीयर, बाबू राजेंद्रप्रसाद, श्री. घनश्यामदास बिर्ला, श्री. रामप्रसाद बिर्ला, श्री. शंकरलाल बँकर, श्री. बी. एस. कामत, श्री. गो. कृ. देवधर, श्री. अमृतलाल ठक्कर, श्री. आर. आर. बखले, डॉ. सोळंखी, श्री. पी. बाळू, श्री. गोविंद मालवीय, श्री. देवीदास गांधी, श्री. पां. ना. राजभोज, श्री. गवई इत्यादि.

# पापाचें फळ कीं चुकीचें प्रायश्चित्त ?

हिंदूंतील स्पृश्यास्पृश्य पुढाऱ्यांनी पुण्यास जमून म. गांधींच्या संमतीने गेल्या शनिवारीं नवा करार केला सदर करारास मुख्य प्रधान मि. राम्से मॅक्डोनाल्ड यांची मंजुरी मिळाल्यामुळे नव्या राज्यघटनेंत तो अमलांत येणार याविषयी आता शंका उरलेली नाही. मॅक्डोनाल्ड यांनी आपल्या ज्ञातिविषयक निर्णयांत अस्पृश्यांना स्पृश्य हिंदूंपासून विभक्त असा मतदारसंघ निर्माण केला होता. त्या योगाने अस्पृश्यांची स्पृश्यांपासून ताटातूट होत असल्याने अस्पृश्यांच्या कल्याणासाठीच विभक्त मतदारसंघास मूठमाती मिळावी अशी गांधीजींची कळकळाची इच्छा होती. ती इच्छा सफल करण्याच्या उद्देशाने गांधीजींनी घोर प्रायोपवेशन आरंभिलें. गांधीजी मागत होते त्याप्रमाणे नवीन कराराने विभक्त मतदारसंघ बाह्यतः दृष्टीआड झाला तरी अंगावर उमटलेला गोवर पोटीं पडला असता तो मावळला असें कोणी समजत नाही, उलट तो जास्तीच अपकारक मानला जातो, त्यासारखीच नूतन करारांतील मतदारसंघाची स्थिति झाली आहे. या दृष्टीने अस्पृश्यांचा विभक्त मतदारसंघ नवीन राज्यघटनेंत वेगळ्या स्वरूपाने कसा कायम राहणार याचें दिग्दर्शन आम्हीं गेल्या अंकांत केलेंच आहे. या खेपेस प्रस्तुत कराराची एकंदरीने युक्तायुक्तता पाहण्याचें योजिलें आहे.

मॅक्डोनाल्ड यांनी स्पृश्यास्पृश्यांचा निर्णय पूर्वी सांगितला त्याहून वेगळा निर्णय त्यांजपासून पुनः कां मागावयाचा तर त्यांतील विभक्त मतदारसंघ गळावा यासाठी. पण तें विष नवीन करारांत कोणत्या ना कोणत्या रूपाने शिल्लक राहिल्यानंतर तेवढ्या रूपांतराकरिता गांधीजींनी अस्पृश्यांपुढे मोजलेली रक्कम तिच्या योग्य किंमतीइतकी आहे कीं नाही याची शहानिशा जनतेने करण्याचें ठरविल्यास त्यांत वावगें तें काय आहे ? ती शहानिशा करताना नवीन कराराबरोबर तुलनेसाठी तीन योजना प्रामुख्याने पुढे येतात. एक डॉ. आंबेडकर ज्या योजनेस पहिल्या व दुसऱ्या गोलमेजपरिषदेंत कबूल होते ती संयुक्त मतदारसंघाची योजना, दुसरी राजा—मुंजे यांची योजना व तिसरी मि. राम्से मॅक्डोनाल्ड यांची सरकारी योजना. या तीन योजनांशिवाय सर

शंकरं नायर यांच्या अध्यक्षतेखाली नेमलेली सेंट्रल इंडियन कमिटी, सायमन कमिशन व गोलमेज परिषदेंत अल्पसंख्याक यांनी आपापल्या कल्पनेप्रमाणे केलेल्या सूचना आहेत. परंतु त्यांपैकीं कोणत्याहि सूचना अमलांत येण्याचा संभव नव्हता. तसा संभव असलाच तर पहिल्या तीन योजनांपैकीं एखाद्या योजनेचाच. डॉ. आंबेडकर यांनी विलायतेत म. गांधींसमोर आपली योजना सविस्तर मांडली नव्हती. तथापि संयुक्त मतदार संघ व राखीव जागा पत्करण्यास त्यांची तयारी होती. परंतु म. गांधी विभक्त मतदारसंघ दूर राहो, पण संयुक्त मतदारसंघास व राखीव जागांसहि कबूल नसल्यामुळे आंबेडकरांस त्यांचा नाद सोडून मुसलमानांच्या गोटांत शिरणें इष्ट वाटलें.

गांधीजींनी या आक्षेपास उत्तर देतांना नुकतेच असें म्हटलें होतें कीं, आपल्यापुढे स्वतंत्र मतदारसंघाचा प्रश्नच विलायतेस असतांना आला नव्हता. पण त्यांचें हें विधान वस्तुस्थितीस सोडून असल्याचें आता प्रसिद्ध झालें आहे. त्यांनी १३ नोव्हेंबर १९३१ रोजीं गोलमेज परिषदेंत पुढील उद्गार काढले होते. "मी पूर्वी एकदा म्हटलें आहे तेंच आताहि म्हणतों. हिंदु, मुसलमान, शीख, यांजमधील तिढा काढणारी जी तोड त्या त्रिवर्गास पसंत पडेल तिला राष्ट्रीय सभा आपली मान डोलवील. पण इतर कोणत्याहि अल्पसंख्याक जातीस राखीव जागा किंवा विभक्त मतदारसंघ देण्याचा बूट निघाल्यास त्याचा विटाळ ती स्वतःस होऊं देणार नाही ...... मी हिंदुस्थानाच्या एका टोकापासून दुसऱ्या टोकापर्यंत हिंडेन व अस्पृश्यांना सांगेन कीं, त्यांजवरील अस्पृश्यतेचा कलंक निघून जाण्यास स्वतंत्र मतदारसंघ किंवा राखीव जागा हा इलाज नव्हे." या उद्गारांवरून गांधीजींस अस्पृश्यांचे बाबतींत स्वतंत्र मतदारसंघाचेंच काय पण राखीव जागांचेंहि नांव निघताच कशा तिरस्कारपूर्वक आठ्या पडत होत्या हें दिसून येतें. वास्तविक त्या वेळीं गांधीजी राखीव जागांस कबूल होते तर डॉ. आंबेडकर यांच्या तोंडाला हल्लींप्रमाणे अनिवार लोभाचें पाणी न सुटतें. त्यांचा संतोष थोडक्यांत झाला असता. कारण सरकारापासून आपणास अमूक प्रमाणांत लाभ होईल अशी आशा बाळगण्यास त्या वेळीं त्यांस निश्चित आधार मुळीच नव्हता. पण त्यानंतर मुसलमानादि अल्पसंख्याकांच्या गोटांत शिरल्यावर स्वतंत्र मतदारसंघाच्या रक्ताची चट त्यांच्या जिभेला लागली, व त्यांच्या आशेला भरारी मारण्यास पंखें फुटलीं. तेथपर्यंत फक्त आशेचें मनोराज्यच होतें. पण त्यानंतर परवां मॅक्डोनाल्ड यांनी ज्ञातिविषयक निर्णय बगलेंतून बाहेर काढून व टेबलावर ठेवून स्वतंत्र मतदारसंघाची, स्वतंत्र जागांची व त्याखेरीज स्पृश्यांत घुसून अधिक जागा लाटण्याची मनद अस्पृश्यांस बहाल केल्यामुळे आंबेडकरांच्या मागण्यास साहजिकच खंबीरपणा आला. त्यांनी आपल्या हक्कांच्या किंमती वाढविल्या. गांधीजी प्रायोपवेशनास बसले, व त्यांच्या प्राणरक्षणास हिंदु पुढारी धावले, तेव्हा सरकारी दरापेक्षा अमुक इतकी किमान रक्कम अधिक द्याल तरच तुमचें बोलणें ऐकण्यास मला फुरसत आहे असें आंबेडकर ठासून सांगूं शकले.

मि. मॅक्डोनाल्ड यांनी आपल्या निकालपत्रकांत ठिकठिकाणच्या प्रांतिक कौन्सिलांत मिळून अवघ्या ७१ जागा देऊं केल्या होत्या. म्हणून स्पृश्य हिंदूंपाशीं मागणी करतांना आंबेडकरांनी आपली उडी १९७ जागांवर मारली. खेरीज म्युनिसिपालिट्या, लोकल बोर्डें व सरकारी नोकऱ्या यांत अस्पृश्यांस त्यांच्या संख्येच्या प्रमाणांत जागा असाव्यात असा त्यांनी आपला हक्क सांगितला तो निराळाच. आंबेडकरांनी इतकी भारी किंमत सांगितली तेव्हा १९७ जागांऐवजी १४८ जागांवर तंटा तुटला. तथापि हा आंकडा मॅक्डोनाल्ड यांच्या आंकड्यापेक्षा दुपटीहून मोठा आहे हें विसरता कामा नये. बरें, एवढी दुपटीपेक्षा जास्ती किंमत मोजूनहि संयुक्त मतदारसंघाचें निर्भेळ सुख स्पृश्य हिंदूंना लाभलें म्हणावें तर तसेंहि घडलें नाही. त्यांतहि पुनः अस्पृश्यांनीच अस्पृश्य उमेदवार निवडावयाचे व त्या निवडणुकीं मागाहून स्पृश्यांनी अस्पृश्याबरोबर हात लावून आपणास पवित्र करून घ्यावयाचें ही प्रतारणा शिल्लक आहेच. डॉ. आंबेडकर विलायतेस कबूल होते त्या वेळीं गांधीजींनी त्यांस अनुकूलता दर्शविली असती तर हा सवदा स्वस्तांत पडला नसता काय? पण तेव्हा स्वतंत्र मतदारसंघच काय, पण संयुक्त मतदारसंघांतील राखीव जागाहि अस्पृश्योद्धाराच्या आड येतात अशी गांधीजींची समजूत होती. नव्या करारांत संयुक्त मतदारसंघाहूनहि हीन प्रतीची योजना करण्यांत आली आहे तरी ती गांधीजींना पसंत आहे! अवघ्या दहा महिन्यांच्या आंत गांधिजींच्या मतात हें महदंतर कशामुळे पडलें ? आता ते फक्त विभक्त मतदारसंघ काय तो नको, बाकी काय वाटेल तें देतों असें म्हणण्याइतके अल्पसंतुष्ट कां बनले आणि हा मनसुबा साधण्याकरिता ते स्वतःच्या प्राणावरहि उदार कां झाले? या प्रश्नांचें सयुक्तिक उत्तर महात्माजींजवळ काय आहे ? ते केवळ एवढेंच म्हणतील कीं 'मी विलायतेहून हिंदुस्थानांत आलों तो तुरुंगांत पडलों. मी मोकळा नसतांना माझ्या पश्चात् ज्ञातिविषयक निर्णय

एक एक पायरी चढत गेला, व शेवटीं मॅक्डोनाल्ड यांनी आपला छाप मारून सरकारी निर्णय पक्का करून टाकल्यामुळे निर्वाणीचा उपाय म्हणून प्रायोपवेशनाचें ब्रह्मास्त्र मीं सोडलें व विभक्त मतदार-संघाहून कमी वाईट अशी जी तडजोड निघाली ती करून घेतली.'

गांधीजींचें हें उत्तर ठीक आहे,व तें त्यांना शोभेलहि. परंतु या प्रकारच्या वर्तणुकीस कोणीहि विचारी माणूस एका व्यक्तीची लहर असेंच नाव देईल. पण या ठिकाणीं प्रश्न असा उद्भवतो कीं, हिंदुस्थानासारख्या देशाच्या राजकारणाने एका व्यक्तींच्या लहरीवर हेलकावे खात राहावें हें श्रेयस्कर आहे काय ? सांप्रतचें युग लोकशाहीचें समजलें जातें, व सर्व देशांतील राजकारण लोकशाहीच्या तत्त्वावरच उभारलें जात आहे. गांधीजींना लोकशाही मनांतून मान्य नसली तरी तीच प्रस्थापित होणार हें ठाऊक असून त्याच धर्तीवर स्वराज्य मिळविण्याचें ध्येय त्यांनी आपल्या डोळ्यांसमोर ठेवलें आहे. त्या ध्येयास व्यक्तिनिष्ठ राजकारण विसंगत होय याची जाणीव त्यांस असावयास पाहिजे.पण ती प्रस्तुत प्रायोपवेशन प्रसंगीं मुळींच दृष्टीस पडली नाही. त्याचा परिणाम असा झाला कीं,गांधीजींचा जीव वांचविण्याकरिता डॉ. आंबेडकरांच्या बेसुमार मागण्या स्पृश्य पुढाऱ्यांना घाईघाईने पत्करणें भाग पडलें. या धांदलींत स्पृश्य-वर्गाच्या वांटयास तोटा आला व त्याच प्रमाणात अस्पृश्यांचा अपरिमित फायदा झाला. हीच गोष्ट निराळ्या रीतीने मांडावयाची तर असें म्हणतां येईल कीं, स्पृश्य हिंदू व त्यांचे पुढारी गांधीजींना मानतात याचें बक्षीस म्हणून त्यांनी नुकसान सोसावें व कित्येक अस्पृश्य हिंदू व त्यांचे पुढारी गांधीजींस मानीत नाहीत याचें शासन म्हणून त्यांनी फायदा उपटावा. आपले अनुयायी व भक्त यांनी आपणावर निष्ठा ठेवल्याबद्दल त्यांस झीज सोसावी लागते, व जे अनुयायी नाहीत व भक्तहि नाहीत त्यांची उलटपक्षी चैन चालते अशी कोणाहि पुढाऱ्याने जनतेची न कळत कां होईना समजूत करून देण्यापासून राजकीयदृष्ट्या आज नाही उद्या हानि झाल्यावांचून राहणार नाही.

गांधीजींनी उपोषण सोडल्यानंतर एक खुलासा प्रसिद्ध करून त्यांत अस्पृश्य पुढाऱ्यांचे आभार मानले आहेत. ते मानीत असता त्यांनी केलेलें एक विधान दुर्लक्ष करण्यासारखें नाही. त्यांचा अभिप्राय असा कीं, ' अस्पृश्य पुढाऱ्यांनी इतकें मिळतें घेतलें हें त्यांचें सौजन्य होय.पण तसें मिळतें न घेता त्यांनी बिनमुर्वतखोरपणाने ओढून धरलें असतें तरी तें क्षम्य ठरून स्पृश्य हिंदूंनी पिढ्यानुपिढ्या जीं पातकें केलीं आहेत त्यांना ती योग्य अशी शिक्षाच होती.'

गांधीजी म्हणतात तें एका अर्थाने खरेंच आहे! कारण डॉ. आंबेडकर यांनी आपल्या ज्या किमान मागण्या हिंदू पुढाऱ्यांसमोर ठेवल्या होत्या, त्या थेट मुसलमानांच्या धर्तीवर असून त्यांत त्यांनी प्रांतिक कौन्सिलापासून तों तहत कौन्सिल ऑफ स्टेटपर्यंतच काय, पण म्युनिसिपालिट्या, लोकलबोर्डें, सरकारी नोकऱ्या व शिक्षणविषयक खर्च यांसहि सरसकट लोकसंख्येचें मापच लागू केलें होतें. त्यांचें म्हणणें असें कीं, ज्या प्रमाणांत हिंदुसमाजांत अस्पृश्य वर्गाची संख्या आहे, त्या प्रमाणांत जागांचा, नोकऱ्यांचा व शिक्षणविषयक पैशाचाहि वांटा अस्पृश्यांस मिळाला पाहिजे. जणूं काय कोणतेहि हक्क, अधिकार किंवा उपभोग मागण्यास संख्या ही एकच कसोटी असून शिक्षणविषयक लायकी, कर भरण्याची पात्रता इत्यादि अवांतर कसोट्या नाहीतच.बाकीच्या बाबी सोडून फक्त शिक्षणाचीच बाब घेतली तर त्यासाठी खर्च होणाऱ्या रकमेचा वांटा सदर रकम ज्या करांच्या आधारावर जमा होते, त्या करांत ज्यांचा जितका हिस्सा असेल त्यांस तितक्या हिश्शाच्या प्रमाणांत मिळावा हें न्यायाचें कीं तो वाढा संख्येच्या बळावर मागावा हें न्यायाचें ? पण अशा वेळीं स्वार्थी मनुष्य न्यायअन्याय पाहातो कशाला ? त्याला कोणीकडून आपला कार्यभाग साधण्याशीं कारण!

आंबेडकरांना हिंदु पुढारी आयतेच खिंडींत सांपडले. गांधीजींच्या प्राणांचें मोल समजून हिंदु पुढारी या वेळीं आपण मागूं तें देतील, अशी आंबेडकरांनी आपली समजूत करून घ्यावी यांत त्यांची काय चूक ? बरें, आंबेडकर तसेंच खनपटीस बसले तर गांधीजी म्हणावयास तयारच कीं, 'पहा, स्पृश्य, हिंदू पापी. त्यांनी अस्पृश्य मागतील तें त्यास दान करून आपल्या कृतकर्मांचीं फळें भोगावीं !' पण त्यावर त्यांना आम्ही असें विचारतों कीं, हीं फळें स्पृश्य हिंदूंच्या कृतकर्मांचीं कीं गांधीजी इंग्लंडांत असता त्यांनी संयुक्त मतदार संघाची योजना झुगारून देण्यांत जी चूक केली त्या चुकीचीं.आपण चूक करावयाची व चुकीचे दुष्परिणाम भोगण्याची पाळी आली म्हणजे दुसऱ्याच्या काल्पनिक पापपुण्याकडे बोट दाखवून मोकळें व्हावयाचें हा खासा न्याय ! डॉ. आंबेडकर झाले तरी युक्तायुक्ततेस अगदींच बगल देणारे नाहीत. हिंदू पुढाऱ्यांनी त्यांजबरोबर तार्किक वाद सुरू केल्यावर शिक्षण, नोकऱ्या वगैरे बाबतींत लोकसंख्येचें प्रमाण गैरवाजवी असल्याचें ओळखून त्यांनी तें अखेर सोडून दिलें व मोघम शब्दांवर स्वतःचें समाधान करून घेतलें हा त्यांचा खरेपणाच होय यांत शंका नाही. परंतु तिळकीहि सुबुद्धि त्यांस सुचली नसती तर स्पृश्य

हिंदूंची मुंडी गांधिजींकरिता त्यांच्या हातांत ऐनजिनशी सांपडली होतीच कीं नाही ? मग ती मुंडी आंबेडकरांनी वाटेल तशी मुरगळण्याचें ठरविलें असतें तर म. गांधी स्पृश्य हिंदूंना म्हणावयास तयारच कीं, भोगा आपल्या कर्माचीं फळें. हीं फळें हिंदूंच्या कर्माचीं नाहीत तुमच्या चुकीचीं आहेत हें त्यांस वेळींच सांगणें लोकहितदृष्ट्या जरूर असल्यामुळे आम्ही हें कटु कर्तव्य आज भाइलाजाने बजावीत आहों.

गांधीजींची वरील विचारसरणी क्षणभर बाजूला ठेवून त्यांच्या केवळ प्रायोपवेशनाकडे लक्ष पुरविलें तरीहि प्रायोपवेशन त्यांनी स्वतः केलें खरें पण त्याचे क्लेश व एक प्रकारें जुलूमहि हिंदु जनतेच्या वांट्यास आला यांत तिळप्रायहि संशय नाही. जुलूम हा कोणत्याहि स्वरूपाने झाला तरी तो अनिष्टच. अशा प्रकारच्या जुलुमाने मनुष्याचें स्वातंत्र्य हरण होऊन त्याला न पटणाऱ्या गोष्टींसहि मान तुकविणें भाग पडतें. समेटास जमलेल्या बहुतेक हिंदु पुढाऱ्यांना व ठिकठिकाणच्या असंख्य हिंदूंनाहि डॉ. आंबेडकर यांजबरोबर घडवून आणिलेल्या करारांत प्रच्छन्न रीतीने स्वतंत्र मतदार संघच दडून बसला असून त्यासाठी अस्पृश्यांना द्यावयाच्या फाजील सवलतींपेक्षा मि. मॅक्डोनाल्ड यांचा निर्णयच पुष्कळ अशांनी पुरवला असेंच वाटलें असेल. गांधीजींनी उपोषणाचा धाक घातला नसता तर त्यांनी आपला मतभेद प्रांजलपणाने गांधीजींपुढे मांडून समेटास अनुमति देण्याचें नम्रतापूर्वक नाकारलें असतें. पण जे महात्माजी स्वतः उपास करून प्राणास मुकणार, त्यांना जर हा करार पसंत आहे, तर सदर करारापुढे सारा मतभेद गिळून हत्या टाळण्याच्या दृष्टीने आपली मान वांकविणेंच उचित होय असें हिंदु पुढाऱ्यांनी ठरविलें असावें.

कोणी म्हणेल कीं राजा–मुंजे करारापेक्षा नवा करार बरा. कारण राजा–मुंजे कराराने अस्पृश्यांना २५३ जागा देऊं केल्या होत्या. त्यापेक्षा नव्या करारान्वयें अस्पृश्यांना मिळणाऱ्या १४८ जागा पुष्कळच कमी आहेत. येथे एक गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे. ती ही कीं, राजा–मुंजे करारांत जागांची स्पष्ट वांटणी उभयतांच्या अनुमतीने झाली नव्हती. तथापि वादाकरिता तीहि कबूल केली तरी सदर करार शुद्ध संयुक्त मतदारसंघाचा होता. नव्या कराराप्रमाणे लपंडावाचा नव्हता. खेरीज राजा-मुंजे करारांत जागांचा आंकडा मोठा असला तरी सदर करार पोरका पडला होता. त्याच्याकडे इतरांनी फारसें ढुंकूनहि पाहिलें नाही. त्यांतून सदर करार विचारविनिमयाकरिता गांधीजी किंवा इतर पक्षांचे पुढारी यांनी घेतला असता तर रा. ब. राजा जागांच्या संख्येकरिता आपलाच हेका धरून बसले असते, असें त्यांच्या नंतरच्या वर्तणुकीवरून मानण्यास आधार नाही. आधार नसलाच तर तो अनुकूल असाच आहे कारण गांधीजींबरोबर झालेल्या नव्या कराराच्या वाटाघाटींत ते डॉ. आंबेडकरांप्रमाणेच सामील होते व अखेर संख्या त्यांच्या मूळ मागणीपेक्षा कमी झाली तरी तिला त्यांनी संमतिच दिली. अशा रीतीने विचार केल्यास राजा–मुंजे करारापेक्षां नव्या करारांत अस्पृश्यांचें समाधान कमी जागांवर करण्यांत आलें हा त्याचा गुण म्हणून गाण्यांतहि कांही जीव नाही.

सारांश, आताची ही व्यवस्था दहा वर्षेपर्यंत लोकांडीस बसणार व दहा वर्षांनी स्पृश्यास्पृश्यांच्या विचारास येईल तशी संयुक्त मतदारसंघाची स्थापना होणार. पण त्या दहा वर्षांनंतरचे आज कोणीं पाहिलें आहे? तीं दहा वर्षे भरेपर्यंत 'सुसरीणबाई, तुझीच पाठ मऊ ' या न्यायाने झाला हा करारच मान्य करून स्पृश्य हिंदूंना चालण्याशिवाय गत्यंतर नाही. हीं दहा वर्षे मॅक्डोनाल्ड यांच्या निर्णयांतील वीस वर्षांपेक्षा दहा वर्षांनी कमी असलीं तरी त्याचें समाधान गोमेचा एक पाय लंगडा झाला या समाधानाइतकेंच आहे.

# महात्माजींस अनावृत पत्र

महात्माजी,

आपणांस कसें संबोधावें हें पाहात होतों. पण आपल्या असंख्य अनुयायांना जें आपलें नांव पसंत तेंच देतों. पुढील चार शब्द मी भीत भीत लिहीत आहें. आपल्या व माझ्या अधिकारांतील अंतर इतकें मोठें आहे कीं, हे शब्द लिहिणें म्हणजे आपला उपमर्द करण्यासारखें आहे असें मला कितीदा तरी वाटलें; पण मन घट्ट करून लिहितों. आपण त्याचा अवमान किंवा विषाद मानूं नये. माझें लघुत्व हें, मला झालें आहे इतकें जर प्रतीत झालें नसतें, तर हें पत्र मी आपणांस याच्या आधीच लिहिलें असतें.

समाजसुधारणा व धर्मसुधारणा हीं हिंदु लोकांचीं पोरकीं अपत्यें आहेत. हिंदु लोकांचें मन राजकारणग्रस्त आहे. परिस्थिति लक्षांत घेता हें स्वाभाविक आहे असें दिसतें. राजकारणांत ज्यांनी विजय मिळविले आणि या भरतभूमीचे पाश निदान खिळखिळे केले त्यांच्यावर हा हिंदुसमाज आसक्त

आहे. जे समाजाचें व धर्माचें राजकारणानें अनवें-लिप्त असें संगोपन करीत असतील त्यांची भूमिका ध्यानांत घेण्याइतपत जागा हिंदु लोकांच्या मनांत नाही. जो राजकारणांत विजयी ठरला, ज्याची ईर्षा, शौर्य, त्याग व विराग हीं राजकारणांत उत्कर्षानें दिसलीं तोच कोणी जर वरील पोरक्या अर्भकांना सनाथ करील तर त्याचें ऐकावयास समाज तयार असतो असा आजवरचा अनुभव आहे. हें असें कां असावें याची शहानिशा करतांना पृथक्करणबुद्धीची अगदी कड लावली म्हणजे असें दिसतें कीं, या अन्नान्न झालेल्या व अवमानित देशांत तें अन्न मानानें खाण्याचा अधिकार जो कोणी उत्पन्न करून देईल तो आपला खरा उपकर्ता होय असें जनसमूहास वाटत असावें. हें त्याचें वाटणें सर्वथा युक्तच आहे. अर्थात् अशा देशभक्ताच्या सुधारणावादी आग्रहाला लोकांनी पसंति देण्याची तयारी दाखवावी हें त्यांच्या कृतज्ञताबुद्धीस शोभेसें आहे. आपल्यासारखा देशभक्त या सुधारणाभूमीवर अवतरला हें पाहून सुधारणेची इच्छा मनांत बाळगणाऱ्या अनेक सुधारकांप्रमाणें मलाहि निरतिशय आनंद होत आहे. या आपल्या आगमनानें अस्पृष्ट समाजाचा प्रश्न चालीस लागला हें पाहून परमसुख वाटतें. आपण करूं घातलेल्या त्यागाच्या प्रतिज्ञेनें सामान्य समाज खडबडून उठत आहे आणि यशस्वी देशभक्ताच्या शब्दाला जी किंमत मिळावयास हवी ती तो उत्सुकतेनें देत आहे.

महात्माजी, मला जर विचार बरोबर करतां येत असेल तर विनयबुद्धीनें लिहितों कीं, ही जागृतीची प्रणालि अमुक एका मर्यादेपर्यंतच जाणारी आहे. म्हणजे ती जेथपर्यंत पोहोचावयास हवी तेथपर्यंत पोहोचणारी नव्हे. आमच्याशीं झालेल्या संभाषणांत आपण म्हणालां व नंतरहि जाहीर केलें कीं, अस्पृष्टता अमुक दिवसांत नष्ट न झाली तर मी पुनः प्राणान्त उपवास करीन. महात्माजी, थोडें धैर्य धरून मी म्हणतों कीं, प्राणान्ताची भीति आपण समाजाला घालूं नका. राजकारणप्रवण अशा जन-समूहांत आपल्याला पुष्कळ अनुकूलता दिसेल; पण खरी ठेच पुढे लागावयाची आहे. जेथें ती लागावयाची त्या मर्यादेपर्यंत आपण पोहोंचला म्हणजे प्राणान्त उपवासाची दहशत ही कांहीशी राजसवृत्तीची (मला तामसच म्हणावयाचें आहे, पण मी अंग चोरीत आहें) व वृथा ठरेल. कारण तेथून पुढील प्रांत, कीं जो खरा कबजांत आला तरच देवालय-प्रवेशविषयक अस्पृश्यता खरी नष्ट होईल, तो घाबरून लवकर अनुकूल न होणारा आणि प्रचारकाची कसोटीच पाहणारा आहे असें शेवटीं दिसून येईल. आपल्या उपकारकाच्या प्राणान्त आग्रहानें ज्यांना त्यागबुद्धि सुचली त्यांचा हा झटका यापुढील प्रांतांत वावरणाऱ्या माणसास तितकाच बसेल किंवा निदान तो तसा बसवावा हें माझ्या लहान समजुतीनें योग्य नाही, व आपल्या दहशतीनें नवीन मार्गाकडे वळणारे लोक आपलें म्हणणें पत्करून सुद्धा विचारानें दरिद्रीच राहतील; व खरी भीति ही कीं, मूळ वस्तु कळली नसता त्यागाचें भय बाळगणारे असे उरतील.

ही तळतळाटाची भीति घालूं नका. यानें आधीच भेकड असलेला समाज पुन्हा जास्तच भेकड होईल. हा नवा विचार कां पत्करावा याचें आपल्या चित्तांत औदार्याचें जें कोणतें चलनवलन चालू असेल तें अज्ञ समाजाच्या मनांत आपण शिरवावें व अशा रीतीनें त्यांचीं मनें कबजांत घ्यावीं हा एकच उपाय धर्मसुधारणेच्या बाबतींत बलवत्तर आहे असें मला वाटतें. 'देवळें उघडा, नाहीतर महात्माजी जीव देत आहेत' असें जर लोकांस सांगितलें तर हा आग्रह शापगर्भ आहे, असें आपणांवर प्रीति करणाऱ्या लोकांसुद्धा निःसंशय वाटेल. महात्माजी, या अज्ञ व विचाराच्या औदार्यास मुकलल्या लोकांच्यापुढे आपल्या अनुयायांच्या द्वारा ही शापवाणी कां वदवितां ? 'देवळें उघडा, नाही तर महात्माजी मरत आहेत' या दोन पोट वाक्यांत जोडलेला जो कार्यकारण संबंध तो परमार्थरीत्या आपणांस संमत आहे काय ? म्हणजे एकांतून दुसरें फलितच व्हावें असा त्यांचा अंतःसबंध आहे काय ? पाहूं जाता इतकेंच दिसतें कीं, आपल्या उपकारकर्त्याच्या प्राणाची किंमत आपण इतकी तरी दिलीच पाहिजे असें लोकांस वाटावयास लावणें असा याचा अर्थ आहे. पण या धर्मसुधारणेंतील विनिमयपद्धति असावी तितकी उंच दर्जाची नाही असे म्हणण्याचें साहस मी करतों.

सुधारकानें खरी उंची गांठली असें केव्हा म्हणावें ? तर जेव्हा तो आपल्या प्रतिपादनानें श्रोत्यांस आपल्यासारखेंच वाटावयास लावील तेव्हाच. कोणत्याहि विषयांत प्रतिपक्षी श्रोत्यांपुढे हाच इलाज योजावयास हवा असें म्हणतां येणार नाही. पण प्रस्तुत प्रश्न धर्ममत बदलण्याचा आहे. लोभ, दुष्ट वासना, आसक्ति, अभिलाष इत्यादीं-वर मिळवावयाच्या विजयाचा नाही, आणि कांही अंशीं तो तसा आहे असा आग्रह असला तर ज्याला सुधारावयाचें त्याला मृदु हातानेंच धुऊनपुसून कबजांत घेतलें पाहिजे हें व्यावहारिक प्रमेय शिल्लक उरतें. 'देवळें उघडा, नाही तर मी प्रायोपवेशन करीन' म्हणजे पुढल्या या प्रायोपवेशनाच्या भीतीनें तुम्ही आता देवळें उघडा अशी दहशत घालण्याऐवजीं 'माझे धर्मबंधू हो तुमचीं मनें कबजांत घेण्याचे कामीं मी प्राणान्त कष्ट करीन' असा सिद्धान्त जर आपण लोकांपुढे मांडिला

तर तो धर्ममतप्रवर्तकाच्या भूमीशीं खरा सुसंगत होईल असें मला वाटतें. मरणें खरें पण तें दहशत घालून नव्हे, तर कष्टत असतांना प्राप्त करून घेणें हा धर्मसुधारकाचा खरा पेशा होय. हा पत्करल्यास लोकांना सत्यज्ञानें प्राप्त होतील, त्यांच्या हृदयांतील ग्रंथी सुटतील. त्याच्या सर्व संशयांचा छेद होईल आणि त्यांचीं वाङ्मयें विचाराच्या अभिनव औदार्यानें समृद्ध होतील.

ही भूमिका पत्करण्यास आपल्या सारखा विरागी, देह जिंकलेला आणि वासनांवर विजय मिळविलेला साधुपुरुष सर्वथा योग्य होईल. इतर कोणाचें हें काम नव्हे. जे कोणी ही सुधारणा घडून यावी म्हणून मनांत घोकत बसले आहेत, ते पराकाष्ठा आपल्या जवळ येऊन चार गोष्टी बोलण्याच्या योग्यतेचे आहेत, इतकाच त्याचा अर्थ आहे. महात्माजी, या भारतांत जीं मतमतान्तरें प्रचलित आहेत तीं या परिवर्तन पद्धतीनें प्रस्थापित झालीं असें इतिहास सांगतो. म्हणून आपण म्हणत असलेला हा आत्यंतिक इलाज करून पाहीनच असा आपण आग्रह धरूं नये. त्याऐवजीं मतपरिवर्तकाची शुद्ध व उदात्त भूमिकाच केवळ आपण पत्करावी. मला परमार्थाचें कांहींच ज्ञान नाही आणि त्याचा प्रतीति-हुंकार तर मुळींच नाही. पण माझ्या भोळ्या भावामुळें मनश्चक्षुपुढे प्रतिपादकाच्या भूमिकेचीं मोठीं मनोज्ञ चित्रें मात्र केव्हा केव्हा दिसतात.

हा महाराष्ट्र देश वीर प्रसवणारा म्हणून जरी गाजलेला असला तरी मूळची ही संतभूमि आहे. गोदावरीचा तटाक आणि चंद्रभागेचें तीर हीं आपल्या पूर्वी होऊन गेलेल्या लोकोत्तर संतांनी पावन केलेलीं आहेत. त्यांच्या संकीर्तनांनी येथील हवा शुद्ध झालेली आहे, आणि त्यांच्या उदार आचाराचीं पाउलें तेथील वालुकेंत स्पष्ट उमटलेलीं आहेत. अशा या पुण्य भूमींत सटीक बोलणाऱ्या अशा आपल्या अनुयायांच्या मेळ्यांत आपली कृशांग मूर्ति प्रतिपादनासाठी उभी आहे, भोंवताली जिज्ञासू, परंपरेचे अभिमानी, वहिमी अशा श्रोत्यांचा गराडा पडला आहे; सत्त्वभावप्रेरित अशा आपल्या वाणीचा घोष गोदावरीच्या व चंद्रभागेच्या घोषांत मिसळत आहे. या नद्यांच्या शुद्ध पाण्यानें जशी त्यांचीं मलीन शरीरें निर्मल होतात त्याप्रमाणें आपल्या सत्य वाणीनें त्यांचीं मनें शुद्ध होत आहेत, असा देखावा मला कितीदा तरी दिसतो. राजकारणांतील आपले असंख्य अनुयायी जसे आता भाकरी मिळणार म्हणून आनंदले आहेत तसे मिळत असलेली कदाचित् जाणार असें भय कोणा वडव्यांच्या पोटांत असेल. आजवरच्या पीठिकांची पडापड होत आहे म्हणून कोणी फडकरी व माळकरी मनानें खेद करीत असतील व कोणी हें अद्भुत काय घडत आहे म्हणून नुसतेच विचारमूढ झाले असतील. त्या सर्वांस आपलें आगमन वैऱ्याच्या आगमनासारखें वाटूं नये, तर विचाराच्या कचाटींतून आपली सानुकूल मुक्तता करणारा असा कोणी दैवीसंपद् लाभलेला योगिराज आपणाकडे येत आहे असें त्यांस वाटावें. महात्माजी, हे लोकहि अज्ञ आहेत, व म्हणून अनुकंपेस पात्र आहेत. त्यांना छळ नको असेल, पण सानुकूलतेनें परमार्थविचाराची नक्की शिकवण झाली तर ती नको असेल असें म्हणवत नाही. त्यांजपुढे आपण बोलावें, त्यांचे सर्व सत्यभाव जागे करावे, त्यांच्या चित्ताचीं किल्मिषें धुवावीं, त्यांना पाठ येत असलेल्या शास्त्रवचनांचे जिवंत अर्थ कोणते हें त्यास आपण पटवावें, स्वतःच्या अज्ञानाची आपण त्यांना प्रतीति करून द्यावी, आपलें प्रतिपादन ऐकत असता आजवरच्या अज्ञानतिमिराची त्यांना ओशाळगत व्हावी, त्यांनी दुःखाचे उसासे टाकावे व अशा या तिमिरांतून मुक्त होऊन आपण नवजीवनांत प्रविष्ट होत आहों असें वाटून त्यांना आनंदाश्रूंनें गरगरून भरतें यावें.

महात्माजी, या लोकांना संतवचनें पाठ आहेत. परंतु त्यांतील विचारांच्या औदार्याची सारिका पंख फडफडून केव्हाच निघून गेली आहे हें त्यांना माहीत नाही; त्यांना पाठ येत असलेल्या वचनांना रक्तक्षय झालेला आहे; आपण, आपलें प्रतिपादन चालू झालें, म्हणजे आपल्या निःश्वसनानें ते तेच विचार पुन्हा प्रभावी करावे. प्रतिपादन चालू असता मधून मधून त्यांच्या मनांत घुटमळत असलेल्या आक्षेपाचें पाणी होऊन त्यांचे कंठ दाटून यावे; प्रतिपादनाची शीग पोहोंचली म्हणजे आपली वाणी अस्पष्ट व्हावी; शब्द हे ध्यानाच्या तंद्रींत विरून जावे; श्रोत्यांचा व आपला शब्दातीत असा सूक्ष्मसंवाद चालू व्हावा, व अशा रीतीनें सर्व संशय फिटून सर्वांनी विठ्ठलाचा जयजयकार करावा व आपल्या अस्पृश्य बांधवांस त्यांनी खुषीनें जवळ करावें अशीं मधुर स्वप्नें मला कितीदा तरी पडत आलीं आहेत. मनुष्य जों जों जास्त पातकी अथवा अज्ञानी तों तों परमेश्वराचें कारुण्य जास्त व उचंबळतें. हा न्याय आपल्या परवाच्या भेटींत आपण सूचित केला होता. त्याचाच अवलंब आपल्या अज्ञ देशबांधवांच्या संशयविच्छेदाच्या कामीं आपण लागू करावा असें माझें म्हणणें आहे. त्यांस दहशतीनें सुधारावयास भाग पाडूं नये. कारण ती सुधारणा मूलग्राही व कायमची होणार नाही. आपण दृष्टीआड झालां कीं त्यांच्या मनांतील सर्व विकल्प पुनः उभे राहतील. असें होऊं नये असें वाटतें.

हें जर व्हावयास हवें असेल तर मला आपणांस

एक विनंति करावयाची आहे. ही माझी विनंति वाचून राजकारणी लोक 'समय न जाणणारा,' अशीं नांवें ठेवतील व आपला अधिकार न जाणणारा असा दोष आपण मला द्याल. पण आपल्या चित्ताची व्यथा केव्हां तरी बोलून टाकलीच पाहिजे हें ओळखून मी ही सूचना करतों. एवढें मतपरिवर्तन आपणाशिवाय व्हावयाचें नाही, व आपण तर बंदिवान आहां. राजकारणाची हिवाळी हवा अजून किती दिवस चालू राहील याचा निश्चय करवत नाही आणि आपण तर म्हणतां कीं अमुक दिवसांत अस्पृश्यता-निवारण झालें नाही, तर मी प्राणत्याग करीन. महात्माजी, हें सर्व कसें जमावें ? याला एकच इलाज आहे. आपण तुरुंगाच्या बाहेर यावें. बारा महिनेपर्यंत राजकारणाचें अक्षरहि बोलणार नाही असें वचन सरकारास द्यावें आणि या अस्पृश्यता-निवारणाच्या कामाची संततधार बारा महिने चालू ठेवावी. असें वचन देणें हें अवमानाचें आहे असें कोणास वाटेल; पण अस्पृश्यांसाठी जीवहि द्यावयास तयार असलेल्या आपणाला हा त्याग फार मोठा आहे, असें मला वाटत नाही. मला पक्कें स्मरत नाही; पण या प्रश्नाविषयीं बोलतांना आपण असें म्हणाला असें वाटतें कीं कायदेभंगाची हाक मला जास्त महत्त्वाची वाटते. हेंच जर आपलें कायमचें मत असेल तर आपल्या प्रयत्नांवर आशा लावून बसलेल्या सर्व समाजसुधारकांच्या आशा सुकून गेल्या असें आपण समजावें. आपण मागल्या मोठ्या शिक्षेतून जेव्हा सुटून आलां तेव्हा या प्रश्नाच्या मागें आपण लागतां काय अशी विनंति मी आपणांस केली होती. तीच आज पुन्हा करतों. ही मान्य करावी. तुरुंगांतून बाहेर यावें आणि महात्मा गांधींच्या सामर्थ्याचा आपल्याला उपयोग व्हावा अशी आशा करणाऱ्या आपल्या अस्पृष्ट बांधवाचें काम हातीं घ्यावें. झाला एवढा अतिक्रम पुरे आहे. पत्राचें उत्तर यावें. कळावें. ही विनंति आहे.

श्रीपाद महादेव माटे.

ता. क.—सर्व स्पृश्यास्पृश्यांनी सभा भरवून ठराव करून हीच विनंति महात्माजींस करावी, अशी त्यांसहि विनंति आहे.

# स्पृश्यास्पृश्यांचा समेट व लोकमत

(१) श्री. राजा—राजा यांनी आपल्या मुलाखतींत असे उद्गार काढले कीं, "नवी राज्यघटना अमलात आली म्हणजे मी मद्रासच्या प्रांतिक कायदेमंडळांत निवडून येण्याचा प्रयत्न करीन आणि अस्पृश्यांच्या ३० सभासदांचा एक गट तयार करीन आणि त्याच्या बळावर अस्पृश्यांचे कल्याण घडवून आणीन. अस्पृश्य मतदारांची यादी करणें बरेंच जड जाईल. कारण अस्पृश्य म्हणावें कोणाला हीच पंचाईत पडेल. मद्रास इलाख्यांत मात्र १९२० सालीं "लोकल बोर्ड्स् ॲक्ट"ने अस्पृश्यांची वर्गवारी केलेली आहे. इतर प्रांतांत "लोथियन रिपोर्टच" प्रमाण मानून चाललें पाहिजे. अस्पृश्य उमेदवारांचे मात्र हाल आहेत. कारण त्याची दुबार निवडणूक होणार आणि त्यामुळे त्याला दुप्पट खर्च येणार."

(२) राजा नरेंद्रनाथ—यांनी एक पत्रक प्रसिद्ध करून समेटाबद्दल असमाधान व्यक्त केलें आहे. ते म्हणतात, 'या समेटानें निराळ्या रूपानें व दहा वर्षांपुरता कां होईना पण अस्पृश्यांचा स्वतंत्र मतदारसंघ मान्य केलाच आहे आणि प्रधानांनी दिल्यापेक्षा पुष्कळच अधिक राखीव जागा अस्पृश्यांना दिलेल्या आहेत. त्या जागा अस्पृश्य नको म्हणतील तेव्हाच रद्द व्हावयाच्या—पण तो दिवस कधी उगवेल असें वाटत नाही. प्रधानांनी २० वर्षांची तरी मर्यादा घातली होती, पण ह्या समेटानें स्पृश्यास्पृश्यांची कायमची फाळणी केलेली आहे. पंजाबमध्ये ह्या समेटानें अस्पृश्यांना वाजवीपेक्षा जास्त जागा दिलेल्या असून स्पृश्यांना कमी जागा दिलेल्या आहेत. पंजाबची एकंदर हिंदु लोकसंख्या ६७६८९०२ असून कायदेमंडळांत १७५ जागा आहेत. त्यांपैकीं फार तर ४७ जागा हिंदूंना मिळतील, हें प्रमाण शें २६·८ इतकेंच आहे. वास्तविक तें शेकडा २९ असावयास पाहिजे. अस्पृश्यांची लोकसंख्या सुमारें ६ लाख आहे म्हणजे एकंदर लोकसंख्येच्या शें. २·५ आहे. पण त्यांना जागा मिळणार आठ म्हणजे शें. ४·५. अशा तऱ्हेनें हिंदुजातीकडून जास्त जागा हिसकून घेण्याचा अन्याय घडलेला आहे आणि तो चिरंतन राहणार आहे.'

(३) शौकतअली व खिलाफत परिषदेचे अध्यक्ष शेख अबदुल मजीद यांनी पुढील आशयाचें संयुक्त पत्रक काढलें आहे. "या समेटानें आम्हांला समाधान वाटतें. कारण त्यामुळे जाति-जातींचा (हिंदु-मुसलमानांचा) मोठा तंटादेखील निकालांत निघेल अशी आशा उत्पन्न होते. मुसलमानांच्या मागण्या सर्वांसमोर ठेवलेल्या आहेतच. त्यांचा योग्य तऱ्हेनें स्वीकार केला तर दुसऱ्या कोणत्याहि जातीचें नुकसान होणार नाही अशी आमची बालंबाल खात्री आहे. मुसलमान समाजाची आत्मोन्नति होऊन मुसलमान लोक महंमदाचे सच्चे अनुयायी आणि हिंदुस्थानाचे सच्चे नागरिक ज्यामुळे होतील असा सन्माननीय व चिरस्थायी समेट करण्यास तमाम मुसलमान लोक राजी आहेत."

# दडपशाहीचा नवा अवतार !

हिंदुस्थानसरकाराचे गृहमंत्री मि.हेग यांनी वटहुकुमाना कायमच्या कायद्याचे स्वरूप देण्यासंबंधी जे बिल असेंब्लीपुढे मांडलें होतें, त्यावर गेल्याच्या मागील सोमवारपासून शुक्रवारपर्यंत पांच दिवस गंभीर व कडाक्याचा वाद झाला. मि. हेग यांचं म्हणणें असें होतें कीं त्यांनी मांडलेले बिल सिलेक्ट कमिटीकडे म्हणजे सभासदांच्याच एका छोट्या मंडळाकडे खासगी चर्चेकरिता व जरूर त्या दुरुस्त्या करण्याकरिता पाठवावें. यावर लोकपक्षातर्फे अशी उपसूचना आली कीं, हें बिल लोकमत काय आहे हें अजमावण्याकरिता प्रसिद्ध करावें, त्यावर मतें मागवावीं व हीं मतें आल्यानंतर मग या बिलाचा विचार व्हावा. लोकपक्षाची ही योग्य सूचना नापास होऊन मूळ ठराव ६४ विरुद्ध ३२ मतांनी पसार झाला आणि लोकपक्ष व सरकारपक्ष यांच्या याबाबत झालेल्या पहिल्या चकमकींत सरकारचा जय झाला. पण सरकारला या जयांत प्रौढी मिरविण्यासारखे कांही नाही. कारण, असेंब्लीची घटनाच अशी आहे कीं, सरकारी सभासद, सरकारनियुक्त सभासद व सरकारजमा अशा मुसलमानाचा गट यांच्या संख्याबलानेच सरकारला आपलें हुकुमी बहुमत प्रभावी करतां येतें. अर्थात् लोकपक्षाला जय मिळणें हीच अपूर्वाईची गोष्ट. या वेळीं लोकपक्षाच्या बत्तीस मतांमध्ये एकतीस मतें लोकनियुक्त सभासदांचींच आहेत; नाही म्हणावयास श्री. नारायण मल्हार जोशी हे सरकारनियुक्त असले तरी त्यांनी आपल्या स्वतंत्र बाण्यास साजेल असा सरकारी ठरावाला खणखणीत विरोध केला व आपलें मतहि सरकाराविरुद्ध दिलें !

हुकुमी बहुमताचा फायदा सरकार पक्षाने आणखी एका गोष्टींत घेतला. ती गोष्ट ही कीं या बिलासंबंधी नेमलेल्या सिलेक्ट कमिटींत सरकाराने सर्व प्रमुख कायदेपंडित बाजूला ठेवून कायद्यांत वाकबगार नसलेल्याच लोकांची भरती करून घेतली आहे हीहि गोष्ट नजरेआड होऊं देता उपयोगी नाही. पंजाबचे सुप्रसिद्ध कायदेपंडित श्री. पुरी यांचे एकच नाव या कमिटींत दिसतें. लोकपक्षापैकीं सर हरिसिंग गौर, सर अबदुल रहीम वगैरे सभासदांना या कमिटीवर न घेता आपल्यास पाहिजे असेंच बिल पुढे यावे म्हणून ही कारवाई आहे. आपल्या शेवटच्या भाषणात मि. हेग यांनी स्वच्छ सांगितलें कीं या बिलांत ग्रथित केलेले सर्व अधिकार सरकारास मिळालेच पाहिजेत. ते अधिकार सोडावयास सरकार तयार नाही. या त्यांच्या भाषणावरून या सिलेक्ट कमिटीच्या कामाबद्दलच्या त्यांच्या काय अपेक्षा आहेत हें ध्यानांत येतें व सर अबदुल रहीम यांच्यासारख्या कलकत्ता हायकोर्टाच्या माजी न्यायाधीशास सुद्धा कां घेतलें नाही याचेंहि स्पष्टीकरण होतें. सिलेक्ट कमिटीने या कायद्याच्या अंमलबजावणीला कालाची मर्यादा घालावी असेंहि पुष्कळ सभासदांनी सुचविलें. या सूचनेचीहि काय वासलात लागते हें पुढे समजेलच. तूर्त इतकें तरी गृहीत धरून चालणें प्राप्त आहे कीं, वटहुकुमामुळे दडपशाहीचे जे जे अधिकार आज सरकारला मिळाले आहेत ते सर्व अधिकार या नव्या कायद्याच्या साहाय्याने सरकार आपल्याकडे कायम ठेवणार आहे. वटहुकुमांच्या परिसमाप्तीबरोबरच हें दडपशाहीचें भूत तात्त्विक दृष्ट्या समाधि घेईल हें खरें. पण त्याबरोबरच हा कायदा दडपशाहीचा झालेला नवा अवतार ठरणार हीहि गोष्ट निश्चित असें समजण्यास हरकत नाही.

या नव्या कायद्याची ओळख करून देण्याचें कारणच नाही. आज वटहुकुमाने चौकशीशिवाय ज्याप्रमाणें कोणाहि माणसास वाटेल तेव्हा अटक करतां येते, त्याप्रमाणे अटक करण्याचा अधिकार या नव्या कायद्याने सरकार आपल्याकडे घेणार आहे. सरकारी नोकरावर बहिष्कार टाकणे अगर त्याला कर्तव्यपराङ्मुख करण्याचा प्रयत्न करणें हा गुन्हा समजला जाणार. वर्तमानपत्रांची मुस्कटदाबी पूर्वीप्रमाणेच कायम राहणार असून वर्तमानपत्रकारांच्या विचारस्वातंत्र्यावर चांगलीच गदा येणार आहे. मुलांच्या गुन्ह्याबद्दल बापाला दंड, स्थावर व जंगम मालमत्ता जप्त करण्याचा अधिकार, बेकायदा ठरविलेल्या संस्थांचे फंड सरकारजमा करण्याची मुभा वगैरे हल्लीच्या वटहुकुमांत जे जे प्रकार आहेत ते सर्व या नवीन कायद्याने जिवंत राहणार आहेत. मुख्य लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट ही कीं, हीं सर्व कलमें यापुढे फौजदारी कायद्यांत समाविष्ट करण्यांत यावयाचीं आहेत सरकारला येऊनजाऊन अडचण पडते हायकोर्टाची व हायकोर्टाच्या देखरेखीखाली असणाऱ्या इतर न्यायकोर्टांची. परंतु या नव्या कायद्यांत अशी योजना सुचविण्यांत आली आहे कीं, तिच्यामुळे हायकोर्टाचा सर्वाधिकार अत्यंत मर्यादित होईल. हें सर्व प्रकार आज अमलांत आहेतच व तसेच ते पुढेहि राहणार.

हे सर्व कायदे करून सरकार आपलें कोणतें

उद्दिष्ट साधणार हें मि. हेग यांनी स्पष्टपणें सांगितलें आहे. सरकारचा मुख्य कटाक्ष राष्ट्रीय सभेवर व राष्ट्रीय सभेने सुरू केलेल्या कायदेभंगाच्या चळवळीवर आहे. ही कायदेभंगाची चळवळ कायमची गाडल्याशिवाय सरकारचें समाधान होणार नाहीं असे मि. हेग म्हणतात. त्यांनी मांडलेल्या विचारसरणीवरून त्यांना काय डाचत आहे हें समजतें. ते म्हणतात "कायदेभंगाच्या चळवळीमुळेच हा कायदा आम्हांला करावा लागत आहे. वटहुकुमामुळे जे अधिकार आम्हांला मिळाले त्यामुळेच कायदेभंगाची चळवळ यशस्वी होऊं शकली नाही. या चळवळीमुळे देशाचें आर्थिक नुकसान झालें व देशांत दुःस्थिति उत्पन्न झाली. ही चळवळ बंद पाडण्याकरिताच आम्ही हा नवा कायदा करून असें जाहीर करीत आहों कीं, आम्हांला वटहुकुमाने मिळालेलीं शस्त्रें जय्यत आहेत व त्यांचा आम्ही उपयोग करणार. या वेळेपुरतीच ही चळवळ आम्ही मारणार असें नसून ज्या वृत्तींमधून असल्या चळवळी उत्पन्न होतात त्या वृत्ति व ते विचारहि आम्हांस नाहीसे करावयाचे आहेत."

हें बिल असेंब्लीपुढे येण्यापूर्वीच राष्ट्रीय सभेला मारण्याचा सरकारचा विचार आहे ही गोष्ट सर्वांना महशूर होती. मि. सी. एफ्. अँड्र्यूज यांनी लंडनमधील आपल्या भाषणांत हा सरकारी हेतु जाहीर रीतीं चव्हाट्यावर मांडला होता. त्यांनी लॉर्ड विलिंग्डन यांची त्यापूर्वी भेट घेऊन त्याच्याशीं चर्चाहि केली होती व म्हणूनच अधिकारवाणीने ते म्हणाले कीं, "सरकारचा हेतु राष्ट्रीय सभा हाणून पाडण्याचा आहे. राष्ट्रीय सभेवर एवढा मोठा घाव कायदेमंडळाच्या साहाय्याने घालण्याचा विचार आहे कीं, जरी पुढेमागे हिंदी लोकांना जबाबदार अशी राज्यघटना मिळाली तरी, कायदेभंगाची चळवळ पुनः कधीहि डोकें वर काढणार नाही. व्हाइसरॉय म्हणाले कीं राष्ट्रीय सभेच्या डोक्यांत कायमची गदा घातली पाहिजे. म्हणजे, आपला अधिकार लोकांच्या स्वाधीन केला तरी आपल्याला पुनः कायदेभंगाच्या चळवळीबरोबर झगडण्याचा प्रसंग येणार नाही. आज जर आपण ही चळवळ मारूं शकलों व त्याबरोबरच नवी राज्यघटना तयार करून हिंदुस्थानास दिली तर हिंदुस्थानाची भविष्य कालांतील प्रगति व्यवस्थितपणें होईल." मि. सी. एफ्. अँड्र्यूज यांनी उच्चारलेल्या ह्याच गोष्टी गृहमंत्री बोलले. पण राष्ट्रीय सभेला हाणून पाडणें हें जितकें वाटतें तितकें सोपें नाहीं. राष्ट्रीय सभेला हल्लीं तरी निवळ संस्थेचें स्वरूप नसून तिला विचारांचें व कल्पनांचें स्वरूप आलें आहे. हे विचार व कल्पना म्हणजेच राष्ट्रीय सभा. राष्ट्राला स्वराज्य मिळावें, राष्ट्र स्वतंत्र व्हावें, तें परावलंबी राहूं नये,या विचारांना मारण्याची महत्त्वाकांक्षा धरणें हा वेडेपणा होय. विचारांना मरण नाही. ते अमरच असतात. अशा विचारांशीं व कल्पनांशीं झगडता झगडतांच केसरशाही व झारशाही उलथून पडली याची साक्ष इतिहास देत आहे.

असेंब्लींत या सरकारी धोरणाचा यथास्थित समाचार लोकपक्षीय सभासदांनी घेतला. सर सी. पी. रामस्वामी अय्यर हे बोलूनचालून सरकारी सभासद व त्यांतहि सरकारपक्षाचे पुढारी. असें असताहि ते म्हणाले कीं "तुम्ही व्यक्तींना डांबून ठेवूं शकाल व त्या योगाने त्या व्यक्तींनी उभारलेल्या संस्थाहि नामशेष कराल. परंतु तुम्ही विचारांचा नाश कसा करणार ? जर राष्ट्रीय सभेचें सत्य हें ध्येय असेल तर ती मरणार कशी व तिला मारणार कोण ? फार तर असें म्हणतां येईल कीं, राष्ट्रीय सभेचें दुसरें कांही ध्येय असेल व त्याचे परिणाम वाईट होणार असतील, तर मात्र तेवढ्यापुरता राष्ट्रीय सभेचा नाश होईल." मि. जहांगीर मुनशी ह्या पारशी गृहस्थांनी असेंब्लींत असे स्पष्टोद्‌गार काढले कीं, "मी दोन वर्षांपूर्वी राष्ट्रीय सभेवर विश्वास ठेवीत नव्हतों. पण हा चाललेला झगडा व सरकारची दडपशाही पाहिली म्हणजे खात्री पटते कीं, राष्ट्रीय सभेचें म्हणणें बरोबर असून तिने दाखविलेल्या मार्गानेच आपलें राजकीय ध्येय साध्य करतां येईल. अशा तऱ्हेची झालेली ही भावना तुम्ही मारून कशी टाकणार ? मी असेंब्लींत आज अगदी ब्रिटिश कपडे घालून उभा आहें. पण मी जाहीर रीतीने सांगतो कीं, माझ्या मनाचा कल सर्वस्वीं राष्ट्रीय सभेकडे आहे. पाहूं, आपण ही प्रवृत्ति कशी मारणार?" श्री.रंगा अय्यर, श्री.पुरी वगैरेंनी हाच कोटिक्रम पण निराळ्या शब्दांनी केला. श्री. पुरी यांनी तर असें स्पष्ट सांगितलें कीं, 'असले कायदे पसार करून राज्य चालविण्यापेक्षा राज्य सोडून देऊन निघून जावें हें उत्तम.' या सर्व वादविवादाचा इत्यर्थ हा आहे कीं, या दडपशाहीने राष्ट्रीय सभेला हाणून पाडण्याच्या सरकारच्या प्रयत्नास यश कधीहि येणार नाही.

सर हरिसिंग गौर व सर अबदुल रहीम यांनी कायद्याच्या शास्त्राच्या दृष्टीने पुष्कळ ऊहापोह केला व असें सिद्ध करून दाखविलें कीं, फौजदारी कायद्याची दुरुस्ती करून असले अधिकार आपल्याकडे घेण्यांत सरकार मोठी चूक करीत आहे. सर हरिसिंग यांचा मुख्य मुद्दा हा होता कीं, "असला अशास्त्रीय कायदा टिकाऊ नव्हे. कारण ' पिनल कोड ' म्हणजे फौजदारी कायदा हा शिक्षा ठोठावणारा कायदा आहे. गुन्हे बंद करण्याकरिता तो उत्पन्न झाला नाही. या नव्या कायद्याने गुन्ह्यांबद्दल कोणालाहि अटक करतां येते

व त्यावर जामिनाचीहि तजवीज नाही. त्यामुळे खालच्या मॅजिस्ट्रेटांच्या हातीं फार मोठी सत्ता दिली जात आहे. मालमत्ता जप्त करणाऱ्या अधिकाराविरुद्ध असेंब्लीनें यापूर्वीच आपलें मत दिलें असल्यानें आता त्या मताचें उल्लंघन होणें बरें नव्हे. त्याप्रमाणेंच गेल्या वर्षी वर्तमानपत्राच्या कायद्याबाबत चर्चा झाली. त्या वेळीं जीं कलमें असेंब्लीनें फेटाळलीं तीं आता पुनः नव्या स्वरूपांत मांडणें हें उचित नव्हे."

सर अबदुल रहीम यांनी तर मि. हेग यांनी पुढे मांडलेल्या कारणांचा धुव्वा उडविला. त्यांचा पहिला प्रश्न हा होता कीं या कायद्याला लोकमताचा पाठिंबा आहे कीं नाही ? मि. हेग यांनीच सांगितलें होतें कीं, हें बिल जर लोकमताकरिता पाठविलें तर लोकमत आपल्या निषेधाचाच शिक्का मारणार, हें जर खरें तर लोकप्रतिनिधींनी आपल्या मतदारांविरुद्ध जाऊन या बिलाला पाठिंबा कसा द्यावा ? जर लोकमत विरुद्ध असेल व तें आहे तर हें बिल मागे घेणेंच बरें ! कायदेभंग, कम्युनिझम् व क्रांतिकारकांची चळवळ नाहीशी करण्याकरिता सरकार हा नवा कायदा करीत आहे असें सांगण्यांत येतें. क्रांतिकारकांचा उच्छेद करण्याकरिता हिंदुस्थानसरकारानें स्वतंत्र कायदे केले आहेत. कम्युनिझमसंबंधी या कायद्यात कांहीच व्यवस्था नाही. मग काय असें समजावयाचें कीं, केवळ कायदेभंगाकरिताच हा खास कायदा करण्यांत येणार आहे? पण त्यांतहि अर्थ नाही. कारण राष्ट्रीय सभावाले तर आज तुरुंगांत जाण्याचीच चळवळ करीत आहेत, ते स्वतः स्वखुषीनें तुरुंग भरीत आहेत. तेव्हा कायदा केला, म्हणून ही प्रवृत्ति कशी बंद होणार असा प्रश्न सर अबदुल रहीम यांनी करून गृहमंत्र्यांचा उद्देश सर्व राष्ट्रीय चळवळ बंद करण्याचा दिसतो असें ते म्हणाले.

भावी हिंदी स्वराज्य--सरकाराकडे दोष येऊं नये म्हणून आपण हा दोष पत्करून नवा कायदा करून घेत आहों या सरकारतर्फे केलेल्या मखलाशीचा चांगलाच समाचार सभासदांनी घेतला. भावी स्वराज्यसरकाराबद्दल आलेला हा उमाळा पाहून पुष्कळांना इसापच्या लांडग्याची आठवण झाली. श्री. रंगा अय्यर यांनी सरकारचें हें सोंग चांगलेंच उघडकीस आणलें. तुम्ही स्वराज्य देणार हेंहि खोटें व स्वराज्य--सरकारावर दोष येऊं नये म्हणून हा कायदा करतां हेंहि खोटें असें त्यांनीं बजावलें. पुढील सरकार आपलें आपण पाहून घेईल, ही नसती उठाठेव तुम्हांला कशाला? असें त्यांनी स्पष्टपणें विचारलें. खरोखरच सरकारतर्फे गृहमंत्री यांनी हा कोटिक्रम करणें म्हणजे असेंब्लींतील सभासद व हिंदुस्थानाचे लोक यांनी आपली बुद्धि सरकारकडे गहाण ठेविली आहे असें गृहीत धरण्यासारखें आहे.

असेंब्लींत सरकारचा जय होऊन कदाचित् हा कायदा कायमच्याच स्वरूपांत हिंदुस्थानाच्या डोक्यावर लादलाहि जाईल. राजकारणाच्या धोरणाच्या दृष्टीनें मुख्य प्रश्न हा आहे कीं दडपशाहीच्या या उपायानें हिंदुस्थानांत शांतता उत्पन्न होऊं शकेल काय? मि. सी. एफ. अँड्र्यूज किंवा राष्ट्रीय सभेचे पक्षपाती अगर इंग्लंडांतील मजूर पक्षाचे पुढारी यांना ही गोष्ट पटत नसली तर असें म्हणतां येईल कीं, त्या सर्वांना राष्ट्रीय सभेबद्दल सहानुभूति आहे. पण 'ब्रिटिश कॉमनवेल्थ' चें ध्येय पुढे ठेवून राजकारणाचा विचार करणारें 'राउंड टेबल' हें नियतकालिक तर राष्ट्रीय सभेचे पक्षपाती नाहीना ? त्याच्या ताज्या अंकांत एक मुत्सद्यानें काढलेले उद्गार त्याच्या शब्दांतच देणें बरें. तो म्हणतो "एक काळ असा होता कीं, लंगडत चालणारी द्विदल राज्यपद्धति कायम ठेवून भागलें असतें. पण आता तो काळ गेला. आता एक स्वराज्य तरी द्यावयास पाहिजे किंवा हा प्रस्तुतचा झगडा असाच चालविला पाहिजे. पण त्याचा अर्थ हा कीं, वटहुकुमांना कायमचें स्वरूप द्यावयाचें व लष्करी सत्तेच्या जोरावर राज्यकारभार हांकावयाचा आणि उलट पक्षानें कायदेभंग व क्रांतिकारक चळवळ चालू ठेवावयाची. सरकारनें यांपैकीं एक मार्ग पत्करला पाहिजे."हाच लेखक पुढे म्हणतो कीं, दडपशाहीची कांस कायमची धरून राज्यशकट चालविणें अशक्य आहे. आज सरकारनें दडपशाही चालू ठेवावयाचें ठरविलें आहे याचा वरील लेखकाच्या मतें काय अर्थ होतो हें निराळें सांगण्याची जरूरी नाही.

या कायद्यानें होणारा दडपशाहीचा नवा अवतार हिंदुस्थानांतील शांततेच्या व प्रगतीच्या आड येणार अशीच वरील लेखकाची समजूत आहे. म्हणूनच त्यानें असें सुचविलें आहे कीं, 'उत्तम मार्ग म्हणजे नवीन सुधारणांचा मसुदा तयार झाला कीं, बरेचसे वटहुकूम बंद करावे व सर्व राजकीय कैदी मुक्त करावे. पुनः त्यांनी कायदेभंगास प्रारंभ केला तर त्यांना सरकारास अटक करतां येईलच !' हा उपाय सरकारला पसंत नाही असें दिसतें. या लेखकानें राष्ट्रीय सभेचाहि उल्लेख 'अत्यंत सुसंघटित व लोकप्रिय संस्था' या शब्दांनी करून सरकारानें या संस्थेचें बळ लक्षांत घेतलें पाहिजे असें सुचविलें आहे. 'राउंड टेबल' सारख्या साम्राज्यवादी नियतकालिकाच्या लेखकानेंसुद्धा अशा तऱ्हेची सरकारास

सूचना करणें यांत पुष्कळ अर्थ आहे. परंतु तें कांहीहि असलें तरी हिंदुस्थानाचे स्टेट-सेक्रेटरी सर सॅम्युएल होअर व व्हाइसरॉय लॉर्ड विलिंग्डन यांनीं असा चंग बांधला आहे कीं, कायदेभंग व त्याचा विचार प्रसृत करणारी राष्ट्रीय सभा यांच्यावर वरवंटा फिरविलाच पाहिजे. लोकपक्षाचें कर्तव्य एवढेंच कीं, पुनः हें बिल असेंब्लींत नोव्हेंबरमध्ये मांडलें जाईल, त्या वेळीं त्याला कसून विरोध करणाऱ्या लोकप्रतिनिधींना पाठिंबा द्यावयाचा व देशाच्या ऋणांतून मुक्त व्हावयाचें. भविष्यकालाचा विचार करण्याचें आज कारण नाही. राष्ट्राराष्ट्रांचे संबंध जुळविणारी अगर तोडणारी जी ईश्वरी शक्ति आहे तिच्या योजनेने जसें ठरेल तसें होईल !

# भौतिक रसायनाचा जनक म्हणजेच महर्षि ओस्वाल्ड

( ले.--वा. वि. भागवत, आग्रा. )

**जन्म २१ ऑगस्ट १८५३, मृत्यु ४ एप्रिल १९३२**

भौतिक रसायनाचें नांव घेतलें म्हणजे विलहेल्म ओस्वाल्डची मूर्ति दृष्टीसमोर उभी राहते. हा थोर शास्त्रज्ञ नुकताच ता. ४ एप्रिल १९३२ रोजीं वयाच्या ७९व्या वर्षी वारला. ओस्वाल्डचा जन्म सन १८५३ त जर्मनींतील रीज गांवीं झाला. १८६४ मध्ये त्यास हायस्कुलांत दाखल करण्यांत आलें. या ठिकाणीं त्याने सात वर्षें काढलीं. वास्तविक हा अभ्यासक्रम पांच वर्षांचाच होता. परंतु नेमलेल्या अभ्यासक्रमाव्यतिरिक्तहि ज्ञानार्जन करावयाचा त्याला नाद असल्यामुळे या शिक्षणासाठीं साहजिकच अधिक वेळ लागला. या काळांत दारूकाम तयार करणें, प्रकाशलेखन, सुतारकाम, पुस्तकबांधणी, चित्रकला इत्यादि गोष्टींत त्याने प्रावीण्य संपादन केलें. तसेंच, स्वतंत्र प्रयोगशाळा बांधावयाची झाल्यास काय केलें पाहिजे ह्याचीहि माहिती त्याने मिळविली. सन १८७१ त तो डॉरपेट विश्वविद्यालयांत दाखल झाला. येथे कांहीं दिवस त्याने निव्वळ उनाडक्या करण्यांत घालविले. परंतु घरून तंबी मिळतांच त्यानें नेटानें अभ्यास करून थोडक्याच काळांत पदवी मिळविली. १८७५ त त्याची डॉरपेट विश्वविद्यालयांत भौतिकशास्त्र शिकविण्यासाठी दुय्यम म्हणून नेमणूक झाली. सहा वर्षांनंतर रीगा येथे त्यास आचार्याची जागा मिळाली. सन १८८७ त तो लिपझिग येथे भौतिक रसायनाचा मुख्याचार्य म्हणून नेमला गेला. सन १९०५ पासून तो कार्यनिवृत्त झाला. .गांतील सुप्रसिद्ध नोबेल पारितोषिक त्यास १९०८ मध्ये देण्यांत आलें, ही गोष्ट त्याच्या कार्याचें महत्त्व दर्शविण्यास पुरेशी आहे.

भौतिक रसायनाच्या जनकत्वाचा मान ओस्वाल्ड, व्हॅन्टॉफ व अर्हिनिअस या त्रयीस देण्यांत येतो. या तिघांच्या कार्याबरोबरच या नवीन शास्त्राचा जन्म झाला. भौतिक रसायन हा रसायन आणि भौतिकशास्त्र यांस जोडणारा दुवा होय. ह्या शास्त्राचा जन्म होऊन पुरीं पन्नास वर्षेहि झालीं नाहीत. व्हॅन्टॉफ यास १९०१ चें व अरहिनिअस यास १९०३ मध्ये नोबेल पारितोषिक मिळालें. वरील जनकत्रयीपैकीं व्हॅन्टाफ हा १९११ मध्ये व अरहिनिअस १९२७ मध्ये वारला. उरलेला तिसरा जनक ओस्वाल्ड हा यंदाच दिवंगत झाला.

भौतिक रसायनांत सन १८८७ साल हें फार महत्त्वाचें गणलें जातें. अरहिनिअसचा जगन्मान्य ' विद्युत् पृथक्करण सिद्धान्त ' याच वर्षी पूर्णपणें प्रस्थापित झाला. ज्या विद्रवांतून विद्युत्प्रवाह वाहूं शकतो, त्यांत विद्रावकाचे अणु दलस्वरूपांत असतात, म्हणजे अणूचे दोन विभाग होतात व म्हणून विद्युत्वहाळ त्या विद्रवांतून जाऊं शकतें अशी या सिद्धान्ताची साधारण कल्पना देतां येईल. या सिद्धान्ताची उभारणी व्हॅन्टॉफ व ओस्वाल्ड यांच्या प्रायोगिक कार्यावर केली आहे. वयाच्या अवघ्या बाविसाव्या वर्षी अरहिनिअसने हा सिद्धान्त मांडला, पण तत्कालीन शास्त्रज्ञांनी त्याची वेड्यांत गणना केली. ओस्वाल्डने या संशोधनाचें महत्त्व तेव्हांच ओळखलें, व अरहिनिअसला उत्तेजन दिलें. याचें दृश्य फल म्हणजे आजच्या भौतिक रसायनाची अफाट वाढ व याच कार्याबद्दल अरहिनिअसला नोबेल पारितोषिक मिळालें हें होय. सन १८८५ च्या सुमारास व्हॅन्टॉफ, ओस्वाल्ड व अरहिनिअस हे रीगा येथें एकत्र पण स्वतंत्र कार्य करीत होते. व्हॅन्टॉफने विद्रवांतील विद्रावक वायुस्वरूपांत असतो हें सिद्ध केलें. पाण्यांत जर मीठ घोळलें तर त्यांत तें द्रव घन किंवा वायु स्वरूपांत आहे हें सांगतां येणें कठिण आहे. साधारण बुद्धीला तें घन किंवा

द्रव स्वरूपांत असेल असें वाटतें, पण तें चूक आहे हें व्हॅन्टॉफने सिद्ध केलें. या प्रयोगामुळे अरहिनिअसच्या कार्याला पुष्टि मिळाली. याच वेळेस ओस्वाल्डने २४८ अम्लांच्या वाहिकतेवर म्हणजे विद्युद्वाहक अम्लांतून किती सुलभतेने वाहूं शकते याच्या प्रमाणावर कार्य केलें, व त्याच्या साहाय्याने विद्रवांत विद्रावकांच्या अणूंचें विभाजन होतें हा अरहिनिअसचा सिद्धांत सत्य असल्याची खात्री पटविली. याच सिद्धान्ताच्या साहाय्याने विद्रवांच्या प्रकाशशोषणाचें गुह्य त्याने उकललें. परमँगॅनिक लवणांचे रंग विद्रवांत एकच कां असतात हें त्याने समजावून दिलें. दर्शकांच्या कार्याचें स्पष्टीकरण सुद्धा प्रथम त्यानेच केलें.

ओस्वाल्ड हा केवळ संशोधकच नव्हता, तर खरा लेखक व कुशल टीकाकार होता. त्याने भौतिक रसायनावर अनेक पुस्तकें लिहिलीं असून तीं प्रमाणभूत मानलीं जातात. इंग्लिश, फ्रेंच इत्यादि भाषेतील प्रमाणभूत पुस्तकें याच धर्तीवर लिहिलीं आहेत. जर्मनींतील शाळा व कॉलेजें यांतून शिकविल्या जाणाऱ्या प्रायोगिक पद्धतीला त्यानेच पद्धतशीर स्वरूप देण्याचा प्रयत्न केला. जर्मनींतील रसायन शास्त्राच्या प्रगतीचें बरेंच श्रेय त्यास आहे. भौतिक रसायनाचें पहिलें मासिक Zeit Schrift für physical Chemie त्याच्याच नेतृत्वाखाली सन १८८७ मध्ये निघालें. याच्या पहिल्याच अंकांत अरहिनिअसचा विद्युत् पृथक्करण सिद्धान्त—विद्रवांतील विद्रावक आणि वायुपदार्थांतील साम्य हे दोन अद्वितीय लेख प्रसिद्ध झाले. इतक्या महत्त्वाचे दोन लेख एकाच अंकांत कोणत्याहि मासिकांतून अजून प्रसिद्ध झाले नाहींत.

१८८७ पासून ओस्वाल्डची गणना जगमान्य शास्त्रज्ञांत होऊं लागली. दूरदूरच्या देशांहून विद्यार्थी एकत्र होऊं लागले व आज जितके म्हणून सुप्रसिद्ध भौतिक रसायनज्ञ आहेत ते याच शाळेंतून बाहेर पडले आहेत, असें म्हटलें असता अतिशयोक्ति होणार नाही. ओस्वाल्डची कार्यशक्ति दांडगी होती, व तदनुरूप त्याने आपल्या घराला ' Energy ' हें सार्थ नांव दिलें. त्याची चित्रकार म्हणूनसुद्धा प्रसिद्धि आहे.

ओस्वाल्डची देशभक्तीसुद्धा वाखाणण्यासारखी आहे. १९१४ मध्ये महायुद्ध सुरू झाल्याबरोबर त्याने जर्मनीस सर्वतोपरी मदत केली. किंबहुना जर्मनीने जो एवढा तग धरला तो केवळ शास्त्रज्ञांच्या जोरावर! जर्मनीची चारहि बाजूने नाकेबंदी झाल्यावर जर्मनीस नत्राम्लाकरिता दुसऱ्या राष्ट्रांवर अवलंबून राहता येणार नाही ही गोष्ट त्याने सरकारच्या नजरेस आणली. नत्राम्लासाठी चिली सॉल्टपिटर चिलीहून येत असे. तें युद्ध सुरू होताच येणें बंद झालें, व नत्राम्लाशिवाय स्फोटक द्रव्यें तयार करणें अशक्य! तेव्हा युद्ध लवकरच थांबवायाचें! पण अमोनियाच्या उर्वीकरणापासून नत्राम्ल तयार करण्याची कृति त्याने शोधून काढून हा प्रश्न सोडविला. या काळांतील हॉबर, नर्न्स्ट, ओस्वाल्ड, फिशर इत्यादिकांचें कार्य वाखाणण्याजोगें होतें. हॉबरने हवेंतील नत्रापासून अमोनिया तयार करण्याचा मार्ग शोधून काढला. झालें, स्फोटक द्रव्यें तयार करण्याचा प्रश्नच सुटला! या कार्याबद्दल त्यास नोबेल पारितोषिक देण्यांत आलें. नर्न्स्ट यासहि नोबेल पारितोषिक मिळालें आहे. इमिल फिशरसारखा अर्वरसायनज्ञ झाला नाही व पुढे होणार नाही. अन्नाची टंचाई पडूं लागल्याबरोबर कृत्रिम अन्न तयार करून हा प्रश्न त्याने सोडविला. जीवरसायनज्ञांनी प्रत्येक मनुष्यास कोणकोणतें अन्न किती किती प्रमाणांत अत्यावश्यक आहे हें प्रयोगान्तीं ठरवून अगदी कमी पैसे लागून कोणत्या अन्नाने कार्यभाग होईल हें ठरविलें. विषारी वायूचा उपयोग, त्यावर प्रतिकार इत्यादि सर्व गोष्टींचें संशोधन याच शास्त्रज्ञांनी केलें. वरील चौघांची या सर्व कार्यासाठी नियोजना झाली होती व त्यांनी आपलें कार्य कल्पनेच्या बाहेर यशस्वी करून दाखविलें यांत शंका नाही.

बापाप्रमाणेच मुलगाहि कर्तृत्ववान निघतोच असें नाही. किंबहुना विरळाच! पण शास्त्रज्ञांच्या बाबतींत हा नियम लागू पडत नाही असें दिसतें. ब्रॅगचा जनक थोरला पर्कीन याचा मुलगा आज अर्वरसायनांत तितकाच तज्ज्ञ मानला जातो. थोरल्या ब्रॅगबरोबर धाकट्या ब्रॅगलाहि नोबेल पारितोषिक मिळाल्याची गोष्ट सर्वविश्रुत आहे. ओस्वाल्डचा मुलगा व्होल्फँग ओस्वाल्ड याची आज सुप्रसिद्ध कलिलरसायनज्ञ म्हणून गणना करण्यांत येते. बापाप्रमाणे तोहि खरा लेखक असून 'कलिलरसायना' वरील त्याचीं पुस्तकें प्रमाणभूत आहेत. हली तो लिपझिग येथे कलिलरसायनाच्या आचार्याच्या जागेवर आहे.

# गांधीजयंतीची जाहीर सभा

मंगळवार ता. २७ रोजीं सायंकाळीं ६ वाजता श्रीशिवाजीमंदिरांत म. गांधी यांच्या ६४ व्या वाढदिवसानिमित्त कविवर्य **रवींद्रनाथ टागोर** यांचें 'अस्पृश्यतानिवारण' या विषयावर **पं. मदन मोहन मालवीय** यांच्या अध्यक्षतेखालीं व्याख्यान झालें. सभेस पुण्यांतील प्रचंड स्त्री-पुरुष वर्ग हजर होताच. पण श्री. टागोर, पं. मालवीय यांच्या समवेत आलेले असे श्री. देवीदास गांधी, गोविंदकांत मालवीय, बाबू राजेंद्रप्रसाद, श्री. बापूजी अणे, श्री. शंकरलाल बँकर, श्री. राजगोपाळाचारी वगैरे देशभक्त, तसेंच सौ. कमला नेहरू, कु. इंदु नेहरू, श्री. स्वरूपराणी, लेडी ठाकरसी, दे. भ. दास यांच्या पत्नी व भगिनी वगैरे उपस्थित होत्या. प्रारंभीं श्री. देवधर यांनी पं. मालवीय यांना अध्यक्षस्थान स्वीकारण्याची विनंति केली. अध्यक्ष स्थानापन्न झाल्यावर त्यांनी पुढील आशयाचें आपलें प्रास्ताविक व अध्यक्षीय अशा दोनहि नात्यांनीं भाषण केलें.

### पं. मालवीय यांचें भाषण

ते म्हणाले, "आज आपण या ठिकाणीं म. गांधींना ६४ वें वर्ष लागलें म्हणून त्यांचें अभिनंदन करण्यासाठी व त्यांना दीर्घायुष्य व आरोग्य लाभो अशी भगवंताची प्रार्थना करण्यासाठीं जमलों आहों. त्यांना ६४ वें वर्ष लाभलें म्हणून आपणा सर्वांना साहजिकच आनंद होत आहे. पण त्याहिपेक्षा आनंद होण्याचें विशेष कारण असें कीं, त्यांच्या असिधारा व्रताला गोड फळ आलें. दोन नद्यांचा संगम ज्या ठिकाणीं होतो त्या स्थानाला अधिक पावित्र्य व महत्त्व प्राप्त होतें. तसाच आजचा हा दिवस अतिशय महत्त्वाचा आहे. म. गांधींनी एक आठवडा उपवास करून स्पृश्यास्पृश्य वर्गांत समेट घडवून आणून जगाच्या इतिहासांत आपलें नांव अजरामर करून ठेवलें. अशा उपायांनी दोन पक्षांत समेट घडवून आणल्याचा दाखला इतिहासांत दुसरीकडे सांपडणार नाहीं. आजचा दिवस म्हणजे त्यांचा पुनर्जन्मच आहे. महात्माजींचें आत्मिक बल व त्यांची तपश्चर्या इतकी विलक्षण प्रभावी आहे कीं, शत्रूहि मित्र झाले. शेवटीं मला येवढेंच सांगावेसें वाटतें कीं, म. गांधींनी आजपर्यंत केलेलें अमूल्य कार्य व ज्या तत्त्वाकरिता त्यांनी सात दिवस उपोषण करून स्पृश्य-अस्पृश्य वर्गांत एकी घडवून अस्पृश्यता घालविण्यास केलेली खडतर तपश्चर्या लक्षांत आणा, व इतःपर कोणीहि अस्पृश्य नाहीं हें तत्त्व अंतःकरणांत कोरून ठेवा. अस्पृश्यांकरिता देवालयें खुलीं करा, विहिरीवर पाणी भरण्यास त्यांना परवानगी द्या. देवाजवळ स्पृश्य-अस्पृश्य हा भेद नाहीं. स्वच्छ स्नान केलेला, धूतवस्त्र परिधान केलेला, कोणत्याहि जातीचा मनुष्य देवालयांत आला तर त्याने देवालय अस्वच्छ न होता मूर्तींतील देवपणा अधिक उज्ज्वल होईल. कारण देवापुढे दर्शनाकरिता आलेल्या मनुष्याची 'निर्वैरः सर्वभूतेषु' अशी स्थिति असते. हा मी आपणाला म. गांधींचा संदेश म्हणून सांगत आहें, येवढे ध्यानांत ठेवा म्हणजे झालें."

### डॉ. टागोर यांचें भाषण

वरील आशयाचें पं. मालवीय यांचें उद्‌बोधक व गंगौघाप्रमाणे अस्खलित भाषण झाल्यावर कविवर्य रवींद्रनाथ टागोर यांचें पुढील आशयाचें इंग्रजींत प्रास्ताविक भाषण झालें. ते म्हणाले, "मी प्रवासाने फार दमलेला असल्यामुळे व वयोमानाप्रमाणे अशक्त झाल्यामुळे मला आज मोठ्याने भाषण करवणार नाहीं ही एक अडचण. आणि दुसरी अडचण अशी कीं, मला तुमच्या मातृभाषेंत बोलतां येत नाहीं. मीं माझें भाषण व म. गांधी यांचा संदेश लिहून आणला आहे. तो पं. गोविंदकांत मालवीय यांना वाचावयास देण्यापूर्वी मी येवढेंच सांगतों कीं गांधी हे केवळ हिंदुस्थानचे गुरु नसून अखिल जगाचे गुरु आहेत. तसेंच त्यांनी अस्पृश्यतानिवारणासंबंधी सांगितलेला संदेश लक्षांत घ्या." या आशयाचें त्यांनी थोडक्यांत प्रास्ताविक भाषण केल्यावर त्यांच्या सांगण्यावरून पं. गोविंदकांत मालवीय यांनी श्री. टागोर यांचें भाषण वाचून दाखविलें. त्याचा आशय असा:—

"म. गांधींनी केलेल्या अतुल परिश्रमाचें फळ समेटाच्या रूपाने आज आपणास पाहावयास सांपडत आहे. तेव्हा हें फळ सदोदित चांगल्या स्थितींत ठेवण्याची पुढील जोखीम आपण अंगावर घेऊन ती पार पाडली पाहिजे. त्यांच्या तपश्चर्येने हिंदुस्थानांत मानसिक ऐक्य झालें आहे. महात्माजींनी उपवास सुरू केल्याची बातमी कानीं पडताच अनेकांच्या मनांत विचित्र भावनातरंग उठूं लागले. पण सुदैवाने भीतीचे सर्व काळे ढग त्यांच्या उज्ज्वल तपश्चर्येने पार वितळून जाऊन समेटाचा सूर्यप्रकाश पडला. आणि या प्रकाशांत भारतभूमीचा उज्ज्वल भविष्यकाल स्पष्टपणें दृग्गोचर होऊं लागला आहे. आपली भारतमाता लवकर बंधमुक्त व्हावी अशी जर आपली इच्छा असेल तर सत्य, न्याय, प्रेम, वगैरे दैवी गुणांचीं मदत घेऊन अस्पृश्यता समूळ नाहींशी करा.

आणि या सत्कृत्याने जशी हिंददेवी मुक्त होईल तशीच म. गांधींची कीर्ति अजरामर होईल!" नंतर श्री. राजगोपाळाचार्य यांनी असा ठराव मांडला कीं, 'हिंदुस्थानांत इतःपर अस्पृश्य कोणीहि नाही.' या ठरावाला अनुमोदन देतांना श्री. देवीदास गांधी म्हणाले, थोड्याच कालांत जर अस्पृश्यता नाहीशी झाली नाही तर गांधीजींचा उपवास फुकट गेला असें म्हणावें लागेल. प्रत्येक स्पृश्याने अस्पृश्याला घरी बोलावून जेवावयास घातलें पाहिजे. निदान त्याला घरांत घेऊन गृहस्थाश्रमाला उचित असा त्याचा पाहुणचार तरी करावा. त्याच्याकरिता देवालयें उघडीं करावींत. बाबू राजेंद्रप्रसाद म्हणाले, "म. गांधी यांची इच्छा अशी आहे कीं सहा महिन्यांच्या आंत अस्पृश्यतेचा समूळ नाश झाला पाहिजे. आणि इतक्या कालानंतर जर अस्पृश्यता शिल्लक राहील तर महात्माजींनी फिरून उपवास करण्याचें ठरविलें आहे. तेव्हा असा प्रसंग गांधींच्यावर आणूं न देण्याचा निश्चय करा." यानंतर श्री. राजगोपाळाचार्य यांच्या ठरावाला श्रीमती स्वरूपाराणी नेहरू, श्री. बापूजी अणे, राजभोज, भाऊराव पाटील, यांचीं अनुमोदनपर अशीं भाषणें होऊन हा ठराव एकमताने पास करण्यांत आला. नंतर श्री. गो. कृ. देवधर यांनी पुढील ठराव मांडतांना आपल्या भाषणांत सांगितलें कीं, ता. १९ पासून २५ पर्यंत मुंबई येथे पुढाऱ्यांच्या सभा होऊन त्यांत जे ठराव करण्यांत आले त्याला पुणेंकर मंडळी अनुमोदन देतील अशी मला आशा आहे. ते ठराव असे—

( १ ) हिंदुस्थानांत यापुढे कोणीहि अस्पृश्य म्हणून समजला जाऊं नये.

(२) आजपर्यंत स्पृश्यांनी अस्पृश्यांच्या बाबतींत अन्याय व पक्षपात केला आहे. पण पुढे तो तसा होऊं नये, व अस्पृश्यांची संस्कृति, शिक्षण वगैरे वाढविण्याकरिता एक मोठा फंड जमविण्यांत यावा.

( ३ ) देवालयें, विहिरी, शाळा यांचा उपयोग स्पृश्यांना व अस्पृश्यांना सारखाच व्हावा.

वरील ठरावाला अनुमोदन देतांना श्री. दि. वा. दिवेकर आपल्या भाषणांत म्हणाले—

'आज आपण वरील ठराव मंजूर करीत आहों. त्याबरोबरच हे ठराव अमलांत आणण्याची जबाबदारी आपण घेत आहों हें लक्षांत ठेवा. महात्माजींचा असा उघड संदेश आहे कीं, सहा महिन्यांत जर अस्पृश्यता निर्मूल झाली नाही तर मी पुनः प्रायोपवेशनास सुरुवात करीन. तेव्हा वरील ठराव व महात्माजींचा निश्चय लक्षांत घेऊन हा ठराव पास झाल्याबरोबर कृतींत आणण्याची खटपट करा.' त्यानंतर बोहरी समाजातर्फे एका गृहस्थाने आपल्या भाषणांत म. गांधींनी त्यांच्या शिष्टमंडळाला दिलेल्या मुलाखतीचा सारांश सांगितला. महात्माजींनी आपल्या मुलाखतींत असें सांगितलें कीं, 'हिंदु समाजाकरिता मुसलमानांनी उपवास करूं नये असें कोठेंहि सांगितलें नाही. तसेच मीहि मुसलमान बंधूंकरिता उपवास करूं नये असेंहि कोठें सांगितलें नाही.' वरीलप्रमाणें मुलाखतीचा आशय सांगितल्यावर अस्पृश्य समाजाला सुशिक्षित करण्याकरिता उभारण्यांत येणाऱ्या फंडाला त्यांनी ५१ रुपयांची मदत देण्याचें आश्वासन दिलें. शेवटीं श्री. पाषाणकर यांनी पाहुण्यांचे आभार मानून पुष्पहार घातल्यावर अध्यक्षांनी सभा संपल्याचें जाहीर केलें.

# अनावृत पत्रास महात्माजींचें उत्तर

( ले.—श्रीपाद महादेव माटे, पुणें. )

मागील शुक्रवारीं मी जें अनावृत पत्र प्रसिद्ध केलें होतें त्याची प्रत त्याच दिवशीं महात्माजींस पोंचेल अशा बेताने आगाऊ त्यांजकडे पाठविली होती. त्या पत्राचें उत्तर ता. २-१०-३२ रोजीं महात्माजींनी लिहिलें आहे. मायना व एक प्रास्ताविक वाक्य इतकें झाल्यावर ते लिहितातः—

"तुमची विचारपद्धति मी उमगलों. माझें म्हणणें इतकेंच कीं कोणास कैचींत धरून वळवावें या हेतूने मी उपास करीत नाही. पांगुळलेलीं मनें चेतनायुक्त व्हावीं येवढ्यासाठीच तो असतो. आता कांही लोकांना जाच व्हावा हें दुर्दैवाने खरेंच आहे. पण हा जाच फार दिवस टिकतो किंवा सार्वत्रिक होतो असें मात्र म्हणतां येत नाही. धर्मसुधारक हा लोकांच्या मनावर हुकमत चालवूं पाहतो असें नव्हे तर तो लोकांना ढोसतो आणि त्यांना विचारास व आचारास प्रवृत्त करतो.

आपल्या वर्तनसूत्रांची ( Principles ) किंमत देऊन बंधमुक्तता विकत घ्यावी हें मीं करता कामा नये. अस्पृश्यतानिवारण हें माझ्या जीवितांतील कार्यक्रमांपैकीं एक जिव्हाळ्याचें काम आहे. पण हें काम म्हणजेच सगळा कार्यक्रम असें मात्र नाही.

माझें जीवित परमेश्वराच्या हातीं आहे. त्याची इच्छा असेल त्याप्रमाणे तो तें वळवीत राहील. तो माझ्या जीविताचें जें कांही करील तें आपल्या कल्याणाचेंच करील असें तुम्हांस वाटत नाहीं काय ?

आपला

एम्. के. गांधी"

*** माझें अनावृत पत्र आणि महात्माजींचें हें उत्तर हीं दोनहि वाचकांनी पुनः एकदा जोडीने वाचावीं अशी माझी त्यांना विनंति आहे. 'अमुक दिवसांत अस्पृश्यता मुळासकट उपटा, नाही तर मी प्राणान्त उपवास पुनः सुरू करीन' या त्यांच्या कडकडीत बजावणीचा अर्थ दहशतीसारखा होतो, व विशेषतः देवालयप्रवेशाचें काम दहशतीने न घडविता मुलाखतींत त्यांनी पसंत केलेल्या मतपरिवर्तनपद्धतीनें घडवावें एवढेंच माझें म्हणणें होतें. महात्माजींच्या उत्तराचा अर्थ एवढाच असावा कीं, आपण जरी असें निर्वाणीचें म्हणजे दहशतवजा बोललों असलों तरी लोकांनी तें तसें मानूं नये. तर त्यामुळे केवळ विचारास व आचारास प्रवृत्त व्हावें हें ठीक आहे. पण महात्माजींसारखा लोकोत्तर पुरुष प्राणत्यागास तयार होणार हें ऐकून लोकांस केवळ दहशत बसेल कीं नाही हें विवेचन पाहण्यासारखें आहे. लोकांना स्वतःला विचार करता येत नाही ही तर मूळ तक्रार आहे. धर्ममत बदलण्याच्या कामांतील विचारांची घडामोड कोणती, म्हणजे कोणते विचार कसे मांडावयाचे व कोणतें, कसें घडावयाचें हे समाजास प्रतिपादनपद्धतीने कळवावयास हवें आहे. तें धर्मविचार-निरत अशा महात्माजींनी प्रतिपादक बनून करावें असें म्हणणें आहे. दहशतीने चुळबुळ उत्पन्न होईल इतकें मात्र खरें. पण ही वैचारिक घडामोड लोकांची लोकांना सुसंबद्धपणें करतां येईल हें खरे वाटत नाही. तसेंच स्वार्थत्याग, अनासक्ति, निर्भयता व श्रद्धा यांनी युक्त असा सर्वश्रेष्ठ प्रतिपादक समाजापुढे प्रत्यक्ष उभा राहिला तरच हें काम साधण्यासारखें आहे असें इतरांच्या आजवरच्या अनुभवावरून मनांत चांगलें भरतें. मग ही विचाराची घडामोड आणि तिला लागणारें हें आत्मिक बल हीं केवळ निर्वाणीचें बोलल्याने प्रत्यक्ष कार्यक्षेत्रांत कशी अवतरतील हें समजणें मात्र अवघड आहे.

## महात्माजींचा ओढा कोणीकडे आहे ?

आपापलीं वर्तनसूत्रें टाकावीं असा आग्रह कोण कोणास करील ? शुद्धबुद्धीचा आग्रह मात्र असा आहे कीं, तुरुंगांत केवळ वांया जाणारा काल या विधायक कामांत खर्ची पडावा. राजकारणाविषयी बारा महिने कांही बोलणार नाही अशी अट त्यांनी पतकरणें म्हणजे तुरुंगांत राहिल्याने त्यांना जी अट मानावीच लागणारी आहे ती एका निराळ्या स्वदेशसेवेसाठी पाळली असें होईल. पण तत्त्वहानि होईल असें वाटत नाही. राजकारण अजीबात सोडावें असें मीं सुचविलें नाही. जो कोणी सुचवील तो गाफील विचाराचा व उद्धट वृत्तीचा ठरेल. राजकारण हा तर देशांतील मूळ महामंत्र आहे. पण "अस्पृश्यतानिवारण झाल्याविना स्वराज्य नाही" "अस्पृश्यता हा हिंदुधर्मावर कलंक आहे" "माझा हा प्राणान्त उपवास हिंदु लोकांना हादरा देण्यासाठींच आहे" "अमुक दिवसांत अस्पृश्यता गेली नाही तर मी प्राणान्त उपवास पुनः चालू करीन" इत्यादि उद्गारांतील निकड लक्षांत घेतां, नाही तर जें राजकारण कांही दिवस तरी व्हावयाचें नाहीच असें दिसतें तें न करण्याचें पत्करणें हा तत्त्वहानीचा प्रकार होईल असें मला अजूनहि वाटत नाही. कोणास वाटतें कीं हें पत्करल्याने लोक नाराज होतील. असें वाटणारांना महात्माजींची लोकप्रियता व आपणास जसें वाटतें तसेंच लोकांस वाटावयास लावण्याचें त्यांचें कसब यांचा पुरा कयास आला नसावा. तत्त्वें टाकावीं असा आग्रह नाही. तर निष्क्रिय राहण्यापेक्षा आपत्तीचा उपयोग या विधायक कामाला व्हावा येवढाच आग्रह आहे. व तो तरी महात्माजींच्या धोरणांतूनच उत्पन्न झाला असें म्हणावयास हरकत नाही. "राजकारणाचें असे तुम्ही कांही बोलतां उपयोगाचे नाही. म्हणजे तुम्हास गांठीभेटी व अस्पृश्यता निवारणाबद्दलची चर्चा यांची मोकळीक देतों" असें जें उपवास सुरू होतांना सरकारानें केलें व जें धोरण पत्करून महात्माजींनी या विषयापुरतें स्वातंत्र्य अनुभविलें तें धोरण कांहीशा मोठ्या प्रमाणानें त्यांनी आणखीहि पत्करावें हा विचार मी सुचविला इतकेंच काय तें. असो. मी ही अट पत्करून बाहेर येत नाही हें वचन वाचून त्यांचा खरा ओढा कोणच्या विषयाकडे आहे हें ध्यानांत येतें. व तसेंच या सुधारणेचेंहि कंटेपण मनांत चरचरून भरतें. समाजसुधारणा व धर्मसुधारणा हीं हिंदु लोकांचीं पोरकीं अपत्यें आहेत हेंच खरें.

परमेश्वराच्या मनांत आपल्या जीविताला जसें वळण द्यावयाचें आहे तसें तो देईल असें महात्माजींनी म्हटलें आहे. "मला आंतून हाक आली नाही" असा शब्दप्रयोग महात्माजी अनेकदा करतात. त्याचा व या लिहिण्याचाहि एकच अर्थ असावा असें वाटतें. प्रसंगोपात्त त्यांस होणाऱ्या या गूढ स्फुरणाविषयी बोलणें माझ्या आवाक्याच्या बाहेरचें आहे. सुसंस्कृत अशी उदात्त भावना आणि सूक्ष्म विवेकबुद्धि यांच्या संगनमताने जी उठावणी आंतून होईल ती म्हणजेच

हें गूढस्थ परमेश्वरी स्फुरण होय असें मी समजत होतों व म्हणून भावना व बुद्धि यांच्या खेळाविषयी व व्यापाराविषयी पत्रांत लिहिलें होतें. पण महात्माजींनी याच्याहि पलीकडची जी प्रतीति आहे ती माझ्यासारख्या सामान्यांस अगदी अगम्य असल्यामुळे तिजविषयी कांहीच बोलतां येत नाही. शेवटीं इतकेंच म्हणावयाचें कीं, हें अस्पृश्यतानिवारणाचें काम दमाने, संततपणें व मतपरिवर्तनपद्धतीने चालू ठेवून महात्माजींच्या जीवात्म्यास संतोष उत्पन्न करावा, इतकेंच आपल्या हातीं आहे.

# समेट–सेनापतींना सावधगिरीची सूचना

जगांत समजलेल्या गोष्टींच्या मानाने अद्यापि न समजलेल्या अशा गोष्टी किती तरी अधिक आहेत. आकाशांतील वारे कसे व कां उत्पन्न होतात, आणि ते उत्पन्न झाले म्हणजे कोणत्या क्रमाने गति स्वीकारून कसे विराम पावतात, हा विषय देखील अद्यापि अशा न समजलेल्या गोष्टींतच पडतो. गेल्या पांच-पन्नास वर्षांत याहि विषयांत संशोधन सुरू आहे. परंतु वायुशास्त्रज्ञहि हें कबूल करतात कीं वातचक्राच्या उत्पत्तीविषयीं व परिभ्रमणाविषयी अद्यापि निःसंदेह असे नियम बनवितां आलेले नाहीत. आणि नियम नाहीत म्हणून भविष्य करण्याची पात्रताहि नाही. या शास्त्रज्ञांकडून हल्ली जें काय होतें तें इतकेंच कीं, दृक्प्रत्ययावरून किंचित् पुढील अनुमान करावयाचें व त्यालाच भविष्य म्हणावयाचें! पण चाणाक्ष फलज्योतिषी आणि विचक्षण वायुशास्त्री यांच्या भविष्यांत वस्तुतः फारसा फरक नसतो. आणि पत्त्यांचा खेळ चालू असतां चोरून दुसऱ्याच्या हातांतील पत्ते पाहून आपला डाव टाकून ‘ जितं जितम् ’ असा कोलाहल करावयाचा तसा प्रकार या संशोधकांचा व शास्त्र्यांचा ठरतो. पण अज्ञात सृष्टि दुरून या खेळाकडे पाहून सर्वांनाच मनांत हांसत नसेल असें नाही.

पाऊस निघावयाचा किंवा वादळ उठावयाचें तर प्रथम कोठे तरी एखादे ठिकाणीं अकल्पित रीतीने हवा हलकी होऊन भोंवरा बनतो. आणि एकाचें पाहून दुसऱ्याने करावें ही वाईट खोड किंवा चांगली सवय सृष्टीतील निसर्ग शक्तींनाहि असल्यामुळेच कीं काय, जेथे अशी हलकी हवा उत्पन्न होऊन भोंवरा बनेल तेथे इतर ठिकाणचे वारे वाहत येऊन त्या भोंवऱ्याला चलन देतात. मग तो भोंवरा यथेष्ट संचार करूं लागतो; आणि संक्रांत आली भलत्या दिशेकडून व गेली भलत्या दिशेला, त्याप्रमाणे हें वातचक्र अधिकाधिक प्रबळ होऊन, पण पुढे पुढे त्यांतील जलांश संपल्यामुळे क्षीणबल होऊन, कोठे तरी विराम पावतें. या त्याच्या लहरी प्रवासांत लाभ व हानि हीं ज्याच्या त्याच्या नशिबाप्रमाणें अनेकांना अनेक प्रकारें प्राप्त होतात. कोठे योग्य वेळीं पर्जन्य पडल्याने धान्यसमृद्धि व पाण्याचा पुरवठा होतो, तर कोठे पिकांची नासधूस होऊन घरेंदारें कोसळून प्राणहानिहि होते.

या सृष्ट चमत्काराचें उदाहरण देऊन आम्ही पुढे काय सांगणार हा प्रश्न वाचकांना सहजच सुचेल. पण त्याचें उत्तर फार दूर नाही. म. गांधी यांनी प्राणांतिक उपवासाचा निश्चय करून निर्वाणपदावर पाऊल ठेवलें तेव्हापासून प्रचलित राजकारणाच्या वातावरणांत हलकी हवा होऊन एक भोंवरा बनला. त्याचा सद्यःपरिणाम म्हणून येरवड्याचा तह स्पृश्य व अस्पृश्य पुढारी यांच्या दरम्यान झाला, व इंग्लंडचे मुख्य प्रधान यांनीहि तो मान्य करून त्याप्रमाणे जातवारीच्या निर्णयांत फेरफार करण्याचें आश्वासन दिलें. अशा रीतीने अस्पृश्यांपुरता एक विशिष्ट प्रकारचा समेट होऊन, त्यांतल्या त्यांत म. गांधी यांचा जीव बचावला, हा एक मोठाच लाभ घडला यांत शंका नाही. पण त्यामुळे या राजकारणी वातचक्राला जी गति मिळाली ती एवढ्यावरच न थांबता तिच्यांतून इतर अनेक प्रांतांवर वारे उठणार व पर्जन्यवृष्टि होणार अशीं चिन्हें दिसत आहेत. मात्र वर दर्शविल्याप्रमाणें नैमित्तिक वाऱ्यापावसाचे परिणाम चांगले व वाईट दोन्ही प्रकारचे होतात त्याप्रमाणे, या राजकारणी वातचक्राची येथून पुढे जी प्रगति होईल तींतून लाभ अधिक निघेल कीं हानि अधिक होईल याचें मात्र आज निश्चित अनुमान आम्हांला करतां येत नाही. तूर्त बातमी आली आहे ती इतकीच कीं अस्पृश्यांशीं जर स्पृश्यांचा तह झाला तर हिंदूंचा मुसलमानांशीं व ख्रिस्ती लोकांशीं तसाच कां होऊं नये, अशी कल्पना सहजच उत्पन्न झाली आहे. आणि तिच्यांतून काय निष्पन्न होतें हें पाहण्याचा प्रयत्न आजच्या घटकेस मुंबई येथे सुरू आहे.

या प्रयत्नांत राष्ट्रीय पक्षाचे मुसलमान म्हणजे मौलाना अबुल कलम अझाद यांसारखे लोक पुढारी असून, हिंदी ख्रिस्ती लोकांचे एक पुढारी रे. मि. दत्त हेहि या कामीं पुढे आले आहेत. आणि त्यांनी पं. मदन मोहन मालवीय, सर पुरुषोत्तमदास ठाकूरदास, शेट घनश्यामदास बिर्ला इत्यादि पुढाऱ्यांशीं

वाटाघाट चालविली आहे. या वाटाघाटीचा हेतु असा आहे कीं, भावी राज्यघटनेंत संयुक्त मतदार संघ हाच पाया समजला जावा व त्यावर एकंदर इमारतीची उभारणी व्हावी. राष्ट्रीय दृष्टीने परमोच असेंच हें ध्येय होय. आणि या बाबतींत स्पृश्य व अस्पृश्य यांना जर आपसांत समजूत करून विधायक योजना निर्माण करतां आली, तर हिंदु व मुसलमान पुढाऱ्यांनाहि तीच गोष्ट यशस्वी रीतीने का करता येऊं नये ? आणि जी गोष्ट मुसलमानांची तीच हिंदी ख्रिस्ती लोकांची ! आणि खरोखर पाहिलें तर असा प्रश्न विचारणें हें अत्यंत सयुक्तिकच ठरेल. कारण हिंदुस्थानांत स्वराज्य मिळवावयाचें त जातीकरिता नाही तर जनतेकरिता आहे. आणि तें जनतेकरिता असें एकदा म्हटलें म्हणजे त्याचा आदि, मध्य व अंत या तीनहि स्थितींत जो जो कारभार व्हावयाचा, तो सर्व कोणत्याहि एक किंवा अनेक जातींच्या फायद्याकडे न पाहता एकंदर राष्ट्राच्या फायद्याकरिताच व्हावा असें म्हणणें ओघानेच प्राप्त होते.

या दृष्टीने आजपर्यंत जे प्रयत्न झाले त्यांत हिंदु समाजाने सर्वस्वी राष्ट्रीय अशीच दृष्टि ठेविलेली आहे. आणि याबाबत कोणीहि हिंदुमहासभेचा कोणताहि ठराव काढून पाहिल्यास, वरील विधानाला विसंगत किंवा विरोधी असे त्यांत कोणाला कांही आढळणार नाही अशी आमची खात्री आहे. हिंदु महासभेने हिंदु जातीकरिता किंवा हिंदु-धर्मीयाकरिता विशिष्ट किंवा वेगळें असे कांहीच मागितलेलें नाही. कित्येक प्रांतांतील मुसलमानांप्रमाणें दुसऱ्या कित्येक प्रांतांतील हिंदूहि अल्पसंख्याकच आहेत नव्हे का ? तथापि त्यांच्याकरिता हिंदुमहासभेने स्वतंत्र मतदारसंघ किंवा राखीव जागा मागितल्या नाहीत. उलट जनतेच्या उदारपणावर पूर्ण विश्वास न ठेवणाऱ्या आणि त्यामुळे स्वार्थाने कृपण किंवा भीरु बनविलेल्या वर्गाकरिता, कांही राखीव जागा ठेवण्यास संमति देण्यापर्यंत हिंदु-महासभेच्या उदार मताची मजल गेलेली आहे. आणि हिंदु महासभेचें मत म्हणजे मध्यम परस्थ अशा प्रचंड हिंदु जनतेचें मत, फक्त हिंदु समाजांतील जे कांही लोक हिंदु या नांवाला कंटाळलेले, किंवा विश्वबंधुत्वाच्या ध्येयाने वेडावलेले, किंवा स्वतःच्या भोळेपणामुळे दुसऱ्याच्या स्वार्थाला बळी पडलेले त्यांची तर मजल नेसलेलें वस्त्र सोडून त्याचें दान करण्यापर्यंत गेली ही गोष्ट वेगळी.

या उदार मतवादित्वाला जाब किंवा संवादित्व इतरहि कांही लोकांकडून मिळालें आहे, असादी नाहीच असें नाही. अशा लोकांत आम्ही राष्ट्रीय वृत्तीच्या कांही मुसलमान पुढाऱ्यांची गणना करतों. तसेच हिंदी ख्रिस्ती समाजाच्या कांही पुढाऱ्यांनीहि अशीच उदार राष्ट्रीय वृत्ति ठेविली आहे ही गोष्ट आम्ही प्रांजलपणें कबूल करतों. आणि पंडित मदन मोहन प्रभृति पुढाऱ्यांनी जी वाटाघाट चालविली आहे ती अशा खऱ्या राष्ट्रीय वृत्तीच्या लोकांशींच असेल तर आमचें कांहीच म्हणणें नाही. कारण त्यांतून निघेल तें चांगलेंच निघेल. वाईट निघेल अशी भीति वाटत नाही. पण ही गोष्ट दिसते तितकी सोपी नाही. शिवाय एका बाजूला पं. मदन मोहन यांच्या वृत्तीचा ठाव जसा आम्हांस लागत नाही, तसाच दुसरे पक्षीं, ही समेटाची नवीं बोलणीं म्हणजे स्वार्थ साधण्याची ती एक नवी पर्वणीच असें समजणारे मौ. शौकत अल्लीसारखे जे लोक बसल्या बसल्याच हळूहळू या सामभूमीकडे सरकूं लागले आहेत त्यांच्या मनाचा ठाव मात्र आम्हांला पक्का लागला आहे. म्हणून या नव्या वाटाघाटीसंबंधाने आमचें मन सहजच साशंक होतें.

सर्वपक्षीय परिषद नेहरू रिपोर्टासाठीं कित्येक दिवस भरत होती त्या वेळीं प्रांजल बुद्धीला व स्नेहभावाला भरपूर वाव होता. आणि गोलमेज परिषदेमध्ये ऐक्यभाव दाखवून सरकारावर भारत जनतेच्या राष्ट्रीय बुद्धीचें दडपण टाकण्याची सुसंधि प्राप्त झाली होती. असें असताहि ज्या मुसलमान पुढाऱ्यांना तशी बुद्धि झाली नाही त्यांना आताच ती कां सुचावी हा प्रश्न खरोखरच महत्त्वाचा नाही काय ? म. गांधींच्या उपोषणाने विरघळून जाण्याइतके मुसलमान पुढारी मऊ मेणाचे नाहीत. किंवा उपोषणामुळे भीषण झालेल्या म. गांधींच्या चेहऱ्याकडे पाहून, विश्वरूपदर्शनाने भिऊन शहाणा झालेल्या अर्जुनाप्रमाणे, शहाणे होणारेहि आमचे मुसलमान बंधु नाहीत. म्हणून संशय असा येतो कीं, पं. मदन मोहन मालवीय यांच्यासारखे सात्त्विक व भोळ्या वृत्तीचे लोक समेटाच्या या नव्या उद्योगपर्वांत पुढारीपण घेत आहेत, असें पाहून तर मौलानाभाई पुढे सरसावले नसतीलना ? अशी जबरदस्त शंका येते खरी. आणि आजपर्यंतच्या अनुभवावरून तरी ती शंका काढल्याबद्दल आम्हांस कोणी नांवें ठेवणार नाही असें वाटतें. म. गांधींच्या विभूतिमत्त्वाला मौ. शौकतअल्लीप्रभृति कितपत मान देतात हें कळून चुकलेंच आहे. तेव्हा त्या मानबुद्धीवर आपलें काम साधूं अशी आशा पंडितजींना असेल तर ती व्यर्थ होय. या समेटाच्या वाटाघाटींत त्यांना स्वतःच्या शहाणपणावरच विसंबावें लागेल हें त्यांनी पक्कें ध्यानांत ठेवावें. अनेक दृष्टींनी अनुकूल असा मुख्य प्रधानांचा

जातिनिर्णय हातीं पडला असता त्यांतील कोणताहि लाभ आपल्या हाताने एकीकरिता लवंडून देतील इतके कांही मुसलमान पुढारी उदार नाहीत. अर्थात् समेटाच्या वाटाघाटींत मिळालें तर आणखी कांही मिळवावें अशीच बुद्धि ते ठेवणार. पण ध्येयाच्या नादीं लागून किती गमावावें याला कांही मर्यादा असणारच!

चोरांनी घरावर दरवडा घालून बहुतेक मौल्यवान पदार्थ नेले! तथापि साधुत्वाच्या शिकवणीवर अढळ निष्ठा असणारा घराचा मालक चोरांच्या मागून पुनः जाऊं लागला! आणि दोनहि हात वर करून त्यांना ' चोरी करणें हें महापाप आहे ' असें मोठ्या कळकळीने सांगूं लागला! तेव्हा त्याच्या हातांत असलेली रत्नाची आंगठी चमकली. हें पाहून चोरांनी तोंड फिरविलें, व साधुत्वाचा उपदेश ऐकत असता मालकाच्या हातांत जी येवढीच मौल्यवान चीज उरली होती तीहि हळूच त्यांनी काढून घेतली व ते निघून गेले! असाच कांहीसा प्रकार जातिविषयक निर्णयावर मनांतून खष असलेल्या मुसलमानांशीं फिरून समेटाची वाटाघाट करणाऱ्या हिंदु पुढाऱ्यांचा न होवो म्हणजे मिळविली. पं. मदन मोहन यांच्या सत्प्रवृत्तीविषयी कोणास शंका नाही.तथापि त्यांना आमची आदरपूर्वक अशी सूचना आहे कीं, त्यांनी हिंदु समाजातर्फे म्हणून किंबहुना स्वतः-करिता म्हणून तूर्त कबुल्या अशा कोणत्याच देऊं नयेत व निष्कारण वाचाबद्ध होऊं नये. उपक्रम करण्याचा अधिकार कोणालाहि असला तरी निर्णय करण्याचा अधिकार कोणा एकट्यालाच असत नाही, ही गोष्ट लक्षांत ठेवून पंडितजी काय, किंवा सर पुरुषोत्तमदास काय, किंवा शेठ बिर्ला काय, यांनी वाटल्यास या व्यापक समेटाचा उपक्रम खुशाल करावा. मुसलमान व ख्रिस्ती समाजांचे पुढारी म्हणून जे कोणी बोलावयास येतील त्यांच्याशीं अवश्य वाटाघाट करावी. वाटाघाटींत निष्पन्न होणारे मुद्दे व चर्चा खुलासेवार प्रसिद्ध करावी व अनेक प्रकारच्या विधायक सूचना पुढे येतील त्या अवश्य नमूद कराव्या. पण हिंदु समाजाचें नुकसान आधींच पुष्कळ झालेलें आहे हें लक्षांत ठेवून आपल्या उतावीळपणाने किंवा गैरसावधगिरीने तें आणखी तरी होऊं नये एवढी खबरदारी तरी त्यांनी अवश्य घ्यावी.

कारण ज्या सूचना पुढे येतील त्यांचा विचार व चर्चा करण्याला एकंदर हिंदु समाजाला अवश्य ती संधि मिळाली पाहिजे. पं. मदन मोहन मालवीय इत्यादींनी स्वतःच ज्या हिंदुमहासभेला पूर्वी महत्त्व प्राप्त करून दिलें तिला आता मात्र कोणत्याहि नव्या योजनेवर मत देण्याचा अधिकार नाही असें तेहि म्हणूं शकणार नाहीत. प्रांतवार हिंदू पुढाऱ्यांचीं मतें घ्यावीं लागतील. तात्पर्य, आजचा विस्कळीतपणाहि जाऊन संयुक्त मतदार पद्धतीच्या पायावर भावी राज्यघटना होणार असेल तर तें फारच चांगलें; व ते जो कोणी घडवून आणील त्याला राष्ट्र दुवा देईल. तथापि समेटाच्या भोवऱ्यांत सांपडून सात्विक भोळें मन गिरक्या खाऊं लागण्याचा संभव असतो, येवढ्याकरिताच हा इशारा आज देणें आम्हांला प्राप्त झालें आहे. बातमी आली आहे त्याप्रमाणें एखादी सर्वपक्षीय परिषद पुनः बोलावली तर उत्तमच. पण तितकी तरी वेळ आली आहे असें वाटण्याला कोणाच्या काय सूचना, व त्याला कोणाची पूर्वसंमति किती आहे, इतकें तरी प्रसिद्ध होणें अवश्य आहे असे आम्हांला वाटते. सर्व-पक्षीय परिषदेचा खेळ गेल्या पांच-सात वर्षांत ज्यांनी पाहिला त्यांना असा निष्फळ खेळ पुनः न व्हावा असें वाटणें अगदी स्वाभाविक नाही काय ?

# कुलाबा जिल्ह्यांतील खेडीं

## प्राचीन व अर्वाचीन आर्थिक स्थिति

( ले. रा. ल. घरत, आवास, जि. कुलाबा. )

### शेती सुधारण्याचे प्रयत्न

खेड्यांत राहणाऱ्या पूर्वीच्या शेतकऱ्यांच्या सुखमय स्थितीचें वर्णन वडील माणसांच्या तोंडून ऐकून आणि सांप्रतच्या शेतकऱ्यांची कष्टमय स्थिति प्रत्यक्ष पाहून माझें अंतःकरण आज कित्येक वर्षे हळहळत आहे. शेती सुधारून शेतकऱ्यांचीहि स्थिति सुधारावी म्हणून मी यथामति यथाशक्ति प्रयत्न करीत आहें. आरंभींची माझी सर्व शक्ति बेसुमार सारावाढ होऊं नये या एका गोष्टीकडेच खर्च झाली. पुढे सुमारें २५ वर्षांमागें कुलाबा जिल्हा सभेचें पहिलें अधिवेशन पनवेलीस श्रीयुत चिंतामण विनायक वैद्य,एम.ए., एलएल.बी., यांचे अध्यक्षतेखाली झालें.

त्या वेळीं सभेने माझ्या अध्यक्षतेखाली शेती सुधारण्याचे उपाय सुचविण्यासाठी एक कमिटी नेमली. कमिटीनें माहिती मिळविण्यासाठी एक प्रश्नपत्रिका जिल्ह्यांतील पुढाऱ्यांकडे पाठविली. मिळालेल्या माहितीवरून मी जिल्ह्यांतील शेतीच्या व शेतकऱ्यांच्या स्थितीचा अहवाल तयार करून व सुधारणेचे कांहीं उपाय सुचवून तो रोह्यांस माझ्याच अध्यक्षतेखालीं झालेल्या जिल्हा सभेच्या अधिवेशनाच्या वेळीं सादर केला. माझी एक सूचना अशी होती कीं, पावसाच्या लहरीप्रमाणे जेव्हां अतिवृष्टि होऊन सर्व पाणी समुद्रांत जातें व पुढे बरेच दिवस पाऊस न पडतां कडक ऊन पडून पिकें करपूं लागतात तेव्हां अतिवृष्टीचें पाणी नद्या व नाले यांस धरणें बांधून सांठवून ठेवल्यास तें अनावृष्टीच्या वेळीं पिकांस उपयोगी पडेल. या सूचनेचा मीं टाइम्स ऑफ् इंडियांत लेख लिहूनहि सारखा पुरस्कार करीत होतो. माझ्या लेखांवरून " अलिबाग तालुक्यांत नद्या नाल्यास धरणें बांधण्याचा मुंबई सरकार विचार करीत आहे काय ? " असा पार्लमेंटांत प्रश्नहि विचारण्यांत आला होता. त्या प्रश्नास असें उत्तर मिळालें कीं, अलिबाग तालुक्यांत पाऊस फार पडतो म्हणून धरणांची गरज नाहीं. शेतकी कमिटीच्या अहवालासाठी मीं त्या वेळचे मुंबई सरकारच्या शेतकी खात्याचे डायरेक्टर मि. कीटिंग यांच्या बरोबरहि पत्रव्यवहार केला. त्यांनी शेतकी कॉलेजांतील प्रोफेसर नाइट व रावबहादुर केळकर यांस आवासास पाठविलें. मी त्यांस तालुक्यांतील अलिबाग, चौल व एक दोन खेडीं येथे नेऊन शेती व बागायताची स्थिति समजावून सांगितली. त्यांच्या सूचनांचा माझ्या अहवालांत मीं समावेश केला होता. कीटिंगसाहेबांबरोबर माझा पत्रव्यवहार चालू होताच. त्याचें तादृश फल म्हणजे थोड्याच वेळानें अलिबागेनजिक एक शेतकीचें सरकारी प्रयोग क्षेत्र स्थापण्यांत आलें. पुढे कांहीं वर्षांनी तें प्रयोगक्षेत्र कर्जतास नेण्यांत आलें, व रत्नागिरीस शेतकीचे डेप्युटी डायरेक्टर, कोंकण भाग यांची नेमणूक करण्यांत आली.

### आवासचें धरण

मुंबईतील माझ्या एका स्नेह्याच्या ५०० रुपयांच्या उदार देणगीमुळे आवासास शेतकीच्या उपयोगासाठी आम्हांस एका ओढ्यास एक धरण बांधतां आलें. अलिबागचे कै. बर्वे यांनीहि या कामासाठी माझ्याकडे ५० रुपये पाठविले होते. धरण तात्पुरतें चालू करण्याचा समारंभ त्या वेळचे कुलाब्याचे कलेक्टर मि. गॉर्डन यांच्या हस्तें झाला. अलिबागेस गेल्यावर त्यांनी आपल्या खासगींतून धरणासाठी मजकडे ५० रुपयांची मदत पाठविली. त्यांच्याबरोबर समारंभास आलेले अलिबागचे शेठ पुरुषोत्तमदास नागरदास यांनी २५ रुपये पाठविले. कांहीं वर्षांपूर्वी विजापुरास कलेक्टर असून तेथेच कैलासवासी झालेले मि. नाईक आमच्या धरणाच्या वेळीं कोंकणांत अधिकारी होते. त्यांच्या व शेतकी खात्याचे मि. गोनेहल्ली या नांवाचे एक तरतरीत अधिकारी होते त्यांच्या प्रोत्साहनाने आवासास जमीन सुधारण्याची सहकारी मंडळी निघून ती रजिस्टर करण्यांत आली व तिच्या मार्फत धरणाचें राहिलेलें काम करण्यांत आलें. मि. गोनेहल्ली यांच्याच प्रोत्साहनाने कुलाबा जिल्ह्यांतील पहिलीच शेतकरी सहकारी पतपेढी माझ्याच अध्यक्षतेखालीं आवासास स्थापन झाली. आवासचें धरण पाहण्यास स्वतः कीटिंग साहेब व शेतकी खात्यांतील इतर अधिकारीहि आले होते. पतपेढ्यांचे त्या वेळचे रजिस्ट्रार मि. यूबँक हेहि एकवार आवासास येऊन गेले होते. शेतीच्या बाबतींत डॉ. मॅन यांबरोबरहि माझा पत्रव्यवहार सुरू होता.

### जिल्हा शेतकी सभा

मि. काब्राजी कुलाब्याचे कलेक्टर असतां त्यांच्या अध्यक्षतेखाली माझें व्याख्यान होऊन कुलाबा जिल्हा शेतकी सभा अस्तित्वांत आली. कलेक्टर तिचे अध्यक्ष असून मी एक उपाध्यक्ष होतों. सभेने आरंभीं थोडें उपयुक्त कार्य केलें, परंतु कळकळीच्या कार्यकर्त्यांच्या अभावीं ती पुढे सुप्तावस्थेंतच राहिली. तालुका सभाहि स्थापण्यांत आल्या. अलिबाग तालुका सभेचा मी अध्यक्ष होतों, व पनवेल सभेचा एक चिटणीस होतों. अलिबाग, पनवेल, पेण, रोहें इत्यादि ठिकाणीं शेतकी प्रदर्शनेंहि झालीं. मुंबई सरकारचे वनस्पतिशास्त्रज्ञ मि. बर्न्स यांच्या अध्यक्षतेखाली अलिबागेस एका प्रदर्शनाच्या वेळीं माझें एक व्याख्यानहि झालें. माझ्या समजुतीप्रमाणें या सर्व प्रयत्नांचें फल फारच थोडें आलें.

### विनंति व आभार

माझ्या वयाला हल्लीं ७८ वें वर्ष चालू असून यापुढे माझ्या हातून एखादी सार्वजनिक सेवा घडेल असें दिसत नाहीं. यासाठी माझी सरकारापाशीं अशी नम्र विनंति आहे कीं, त्याने या हतभागी शेतकऱ्यांची सुधारणा करण्याकरिता ताबडतोब योग्य ते उपाय योजावे. सुखवस्तु व जाणत्या लोकांसहि मी नम्रपणें विनवीत आहें कीं, त्यांनी आपल्या व आपल्या शेजारच्या गांवांतील या गरीब बांधवांची सुधारणा करण्याकडे अवश्य लक्ष द्यावें. कायदे कौन्सिलाच्या सभासदांनी शेतकऱ्यांची सुधारणा घडवून आणणारे कायदे करावे

अशी माझी त्यांस प्रार्थना आहे. हल्लीं ग्रामसंघटनेचे व ग्रामसुधारणेचे प्रयत्न संघशक्तीनें करण्याच्या योजना पुढे येत आहेत, त्यांस जाणत्या व संपन्न लोकांनी जरूर ती मदत करावी. माझ्या शेतकरी बांधवांसहि माझें प्रेमाचें सांगणें आहे कीं, त्यांनी व्यसनाधीन न होता व उगाच चकाट्या पिटण्यांत अथवा पत्ते चाळण्यांत अमूल्य वेळ न दवडितां त्याचा सूत कांतण्याकडे वा इतर घरगुती धंदे करून चार पैसे मिळविण्याकडे उपयोग करावा.

शेवटीं जिल्ह्यांतील ज्या सद्गृहस्थांनी आपला अमूल्य वेळ खर्च करून माहिती गोळा केली आणि मला ही लेखमाला लिहिण्यास साहाय्य केलें त्यांचे, व ज्या केसरीकारांनी ती आपल्या वजनदार वृत्तपत्रांत प्रसिद्ध केली त्यांचे आभार मानून, आणि सरकारचे व आमदारांचें या विषयाकडे लक्ष जाईल अशी आशा करून रजा घेतों.

**टीप**— ता. १९-८-३२ च्या केसरींतील दुसऱ्या लेखाकांत पहिल्या रकान्यांत सन १८७९-९० असें आहे तेथें सन १८८९-९० असें पाहिजे व तिसऱ्या रकान्यांत वाशी असें आहे तेथें वावोशी असें पाहिजे.

# संस्थानिक व फेडरेशन

## ( पूर्वार्ध )

( ले.--प्रो. ग. र. अभ्यंकर )

कांही प्रमुख संस्थानिक, त्यांचे दिवाणजी व त्यांचे आश्रित यांनी सिमल्यावर स्वारी चढवली, तेव्हाच हें काय संकट आहे याबद्दल पुष्कळांना शंका उत्पन्न झाली. संस्थानिक आपापल्या गांवीं परत गेल्यानंतर सिमल्यांतील लोकांना हायसें वाटलें, असें एका इंग्रजी पत्राच्या बातमीदाराने वर्णन केलें आहे; व यावरून संस्थानिकांच्या बद्दल लोकमत काय आहे हें सहज अजमावतां येईल.

### संस्थानिकांच्या मतांचीं स्थित्यंतरें

नरेंद्र मंडळाच्या कांही प्रमुख संस्थानिकांनी गोलमेज परिषदेच्या पहिल्या बैठकीच्या वेळीं फेडरेशनच्या कल्पनेस आपला पाठिंबा दिला; सर्वांनी त्यांचा उदो उदो केला व फेडरेशन अस्तित्वात येणार असें वाटूं लागलें. दुसऱ्या गोलमेज परिषदेच्या वेळीं त्यांनी आपली अरेरावी वृत्ति निदर्शनास आणली. फेडरेशनच्या घटनेमध्ये सेनेटच्या सभेंत आपलें संख्याधिक्य असावें, प्रत्येक नरेंद्राला त्यांत स्थान असावें अशी त्यांनी मागणी केली. लोकसंख्येपेक्षा आपल्याला जास्त सभासद मिळावेत असा त्यांनी आग्रह धरिला. आपले प्रतिनिधि आपण नेमून देऊं त्यांसच घेण्यांत यावें असें त्यांनी ध्वनित केलें. भावी फेडरेशनच्या प्रधान मंडळांत आपल्यास कांही जागा देण्याची वहिवाट पाडावी अशी त्यांनी सूचना केली. सुप्रीम कोर्टाच्या हुकमतीखाली फेडरल विषयाच्या बाबींतसुद्धां आपण राहण्याचें त्यांनी नाकारलें, फेडरल घटना झाल्यानंतर ती आपोआप संस्थानिकांना लागू न होता प्रत्येक संस्थानिकाशीं स्वतंत्र तहनामे होऊन ती लागू करण्यांत यावी असा बूट त्यांनी काढला. संस्थानी प्रजेला प्रतिनिधि निवडून देणाच्या हक्काचा त्यांनी इनकार केला. संस्थानी प्रजेस नागरिकांचे मूलभूत हक्क देण्यास व ते घटनेंत सामील करण्यास त्यांनी कसून विरोध केला. फेडरेशनचा करभार प्रत्यक्षपणें कोणताहि देण्यास आपली नाखुषी आहे असें त्यांनी स्पष्ट कळविलें. अप्रत्यक्ष कराबाहेर फेडरेशनला आपण कोणतीहि आर्थिक मदत करणार नाही असा त्यांनी धाक घातला व हल्ली जी खंडणी त्यांच्याकडून घेण्यांत येते ती माफ करावी अशी त्यांनी शर्त घातली. या सर्व मागण्या शिरजोरपणाच्या होत्या. त्याला संमति देणें कित्येकांना धोक्याचें वाटतें. कोणत्याहि तऱ्हेने कां होईना फेडरेशन अस्तित्वांत यावें याबद्दल अगदी हुरळलेल्या कांही ब्रिटिश हिंदुस्थानांतील नामांकित पुढाऱ्यांना संस्थानिक म्हणतील त्या अटी मान्य करून त्यांना फेडरेशनच्या कक्षेंत ओढावें असा त्यांचा निर्धार दिसूं लागला. पहिल्या गोलमेज परिषदेच्या वेळीं फेडरेशनच्याबद्दल जी उत्सुकता संस्थानिकांनी दर्शविली तिचा दुसऱ्या गोलमेज परिषदेच्या शेवटीं कोठे मागमूस दिसेनासा झाला. लॉर्ड आयर्विन हे व्हाइसरॉय जाऊन लॉर्ड विलिंग्डन हे त्यांच्या ठिकाणीं स्थानापन्न झाले. पोलिटिकल अधिकाऱ्यांना फेडरेशन अस्तित्वांत येण्याबद्दल कोणतीहि उत्कंठा दिसत नव्हती. दोघा व्हाइसरॉयांच्या अस्तोदयामुळे असो किंवा कांही कारणाने असो फेडरेशनला विरोध करण्याचा कट कांही संस्थानांत दिसूं लागला.

### काठेवाडी संस्थानिक

काठेवाडांतील समुद्रकांठी असलेल्या संस्थानिकांना फेडरेशनला सामील होण्याने आपलें आर्थिक नुकसान होईल अशी भीति वाटूं लागली. ह्या संस्थानिकांचीं

बंदरें असल्यामुळे आंयात व निर्गत मालावरील जकातीमुळे त्यांचें उत्पन्न फारच वाढलें आहे. व फेडरेशनला सामील होण्यानें हें उत्पन्नहि आपल्या हातचें जाईल अशी त्यांना धास्ती वाटत आहे. अर्थात् ते फेडरेशनला सामील होण्यास आजमितीस तयार नाहींत. परवांच्या सिमल्याच्या सभेस काठेवाडच्यापैकीं, कोणीहि प्रमुख संस्थानिक हजर नव्हते हें याचेंच द्योतक आहे. अशा तऱ्हेनें संस्थानिकांच्या गटांत फूट झाली आहे. दुसरें एक कारण असें आहे कीं, नरेंद्र मंडळांत पुढारीपण प्राप्त झालेल्या बिकानेर, भोपाळ वगैरे नरेशांची संस्थानिक म्हणजे १०९ नरेंद्र अशी कल्पना झालेली दिसते. इतर ४५० संस्थानिकांचें अस्तित्व मानण्यास ते तयार नाहींत व नरेंद्रांचे १०९ सभासद सर्व समान दर्जाचे आहेत; उत्पन्न, लोकसंख्या, विस्तार, राजकीय महत्त्व, पूर्वपरंपरा व ऐतिहासिक लौकिक या गोष्टींचा विचार न करता या १०९ व्यक्तींना समान दर्जाचे मानावे, प्रत्येकाच्या वतीनें एकेक सभासद फेडरेशनच्या सेनेटमध्ये असावा अशी त्यांची तीव्र उत्कंठा आहे. या कल्पनेस म्हैसूरचे दिवाण व हैद्राबादचे सर अकबर हैदरी यांनीं जोराचा विरोध केला आहे. लोकसंख्या व उत्पन्न यांकडे लक्ष देऊन संस्थानिकांमध्ये प्रतिनिधींची वांटणी करण्यांत यावी असें त्यांनी जोरानें प्रतिपादन केलें आहे.

### राजे व प्रधान यांच्यामधील खटके

सर मिर्झा इस्मायल व सर अकबर हैदरी यांच्या मुद्देसूद व निर्भीड टीकेनें बिकानेरचे नरेश इतके संतप्त झाले कीं, त्यांचा व या दोन दिवाणांचा फेडरेल घटना कमिटीमध्ये खटका उडाला व यामुळेच फेडरल घटनेमध्यें सभासदांच्या वांटणीच्या संबंधानें फेडरेशनच्या कल्पनेस अनुकूल असलेल्या नरेशांमध्ये तीव्र मतभेद दिसत असून एकवाक्यता होण्याचा संभव नाहीं, व यामुळेच या गोष्टीचा निर्णय जातिविषयक निर्णयाप्रमाणे ब्रिटिश सरकारनें करावा असेंहि सुचविण्यांत येत आहे. फेडरेशनला अनुकूल असलेल्या संस्थानिकांत जोराचें रण माजलें आहे. तसेंच फेडरल घटना कमिटीमध्ये श्री. नारायणराव जोशी व डॉ. अंबेडकर यांच्या सडेतोड टीकेमुळे बिकानेरसारख्या अरेरावी संस्थानिकास पुष्कळ वेळा मूग गिळावे लागले व आपला मानभंग झाला असें त्यास वाटून आल्याचें दिसून आलें. यामुळेहि गोलमेज परिषदेबद्दलची या नरेशांची उत्सुकता अगदीं थंडावली आहे. ब्रिटिश हिंदुस्थानांतील पुढाऱ्यांशीं बरोबरीच्या नात्यानें वादविवाद करण्यापेक्षा आपले हस्तकच त्यांच्या तोंडाशीं यावेत असें सिमल्यास ठरल्याचें दिसतें. अशा रीतीनें फेडरेशनच्या बाबतींत संस्थानिकांचा उत्साह निरनिराळ्या कारणांनी अस्तंगत होत आला आहे.

### सार्वभौम सत्तेचें अधिष्ठान

या सर्वांपेक्षांहि एक अत्यंत महत्त्वाची अडचण उत्पन्न झाली असून तिचे निवारण कसें करतां येईल हें आजमितीस अजमावणें कठिण आहे. ती अडचण म्हणजे संस्थानिक व सार्वभौम सत्ता यांच्या परस्परसंबंधांची आहे. ज्या चार प्रश्नांचा खल सिमल्यास नुकताच झाला त्यांपैकीं हा एक महत्त्वाचा प्रश्न होता. व त्याचें स्वरूप समजून घेणें अत्यंत आवश्यक आहे. सार्वभौम सत्तेचे संस्थानिकांवरील नियंत्रण आजपर्यंत हिंदुस्थानसरकारकडे म्हणजे गव्हर्नर-जनरल-इन-कौन्सिल यांचेकडे होतें. गव्हर्नर-जनरल व त्यांचे कौन्सिलर हे सरकारनेंच नेमलेले असल्यामुळे ब्रिटिश सरकारच्या धोरणानेंच हे नियंत्रण आजपर्यंत चालवलें जात असे. स्वराज्याची भाषा जसजशी जोरानें हिंदुस्थानांत निघूं लागलें तसतसा संस्थानिकांच्या पोटांत भीतीचा गोळा उठू लागला. भावी राजकीय सत्ता लोकशाहीच्या हातीं गेली तर हिंदुस्थानांतील लोकांनी निवडून दिलेल्या प्रातिनिधिक संस्थेंतील पुढाऱ्यांच्या हातीं सार्वभौम सत्तेचे नियंत्रण जाईल व तसें झालें असता आपली अरेरावी सत्ता कालेंकरून नाहींसारखी होईल ही धास्ती त्यांस वाटूं लागली. व या भावी संकटांतून आपली सोडवणूक करण्याकरिता त्यांनी एका नवीन मताची घोषणा कांहीं धूर्त इंग्रजी मुत्सद्यांच्या व कायदेपंडितांच्या सल्ल्यानें करण्यास सुरुवात केली. संस्थानिकांनीं अशी टूम काढली कीं आपले राजकीय संबंध हिंदुस्थानसरकाराशीं नसून ते खुद्द बादशहाशीं आहेत. हिंदुस्थानांत स्वराज्य स्थापन झालें, लोकनियुक्त मंत्रिमंडळाच्या हातीं राज्यकारभार गेला तरी आपले संबंध खुद्द बादशहाशीं असल्यामुळे आपल्यावरील नियंत्रण या भावी स्वराज्याकडे देतां येणार नाहीं असें प्रतिपादण्यास त्यांनी सुरुवात केली. या मतास बटलर कमिटीनें, सायमन कमिशननें व पहिल्या गोलमेज परिषदेच्या प्रारंभीं खुद्द मॅक्डोनाल्डसाहेब यांनी मान्यताहि दिली. व यामुळे हिंदुस्थानांतील भावी स्वराज्याकडे संस्थानिकांवरील सार्वभौम सत्तेचें नियंत्रण जाणार नाहीं असें संस्थानिकांस आश्वासन मिळालें, व त्यायोगें त्यांच्या जिवांत जीव आला. भावी स्वराज्याच्या गव्हर्नर-जनरलकडे किंवा जबाबदार मंत्रिमंडळाकडे संस्थानिकांवरील हुकमत राहावयाची नाहीं या आश्वासनामुळे त्यांना

आपली अरेरावी सत्ता चिरंतन राहील असें वाटूं लागलें. आपल्यावरील नियंत्रण व्हाइसरॉय ह्या व्यक्तीकडे राहील. व्हाइसरॉय या नांवाचा एक विशिष्ट अधिकारी भावी राज्यघटनेत निर्माण करावयाचा असेंहि स्थूलमानाने ठरलें. ब्रिटिश सरकार व संस्थानिक यांच्या आपापसांतील कारस्थानाने हा व्यूह रचण्यांत आला. हिंदुस्थानातील मध्यवर्ती सरकाराकडे संस्थानांवरील सार्वभौमत्वाची जी सत्ता ब्रिटिश हिंदुस्थानांतील राज्याच्या प्रारंभापासून होती ती फेडरेशन आस्तित्वांत आल्यानंतर मध्यवर्ती फेडरल सरकारच्या हातीं न राहता व्हाइसरॉयाच्या हातीं राहावयाची. या योजनेमुळे लोकशाहीच्या कह्यांतून आपण सुटलों येवढी जाणीव संस्थानिकांस प्राप्त झाली. संस्थानिकांच्या दृष्टीने हा मोठा लाभ झाला असें त्यांस वाटूं लागलें.

# अखिल भारतीय स्वदेशी प्रदर्शन–सोलापूर

(१) सदर प्रदर्शन येथील 'बाय इंडियन लीग' तर्फे ता. १६।१०।३२ रोजीं पंडित **मदन मोहन मालवीय** यांच्या हस्तें उघडले जाणार आहे. प्रदर्शनाची तयारी जोराने चालू असून निरनिराळ्या कमिट्यांचे सभासद प्रदर्शन यशस्वी करून दाखविण्याकरिता अटोकाट मेहनत करीत आहेत. प्रदर्शनास आर्थिक मदत मिळविण्याकरिता ता. २५।९।३२ रोजीं येथील सुप्रसिद्ध वकील रा. नानासाहेब पुंडे, रा. जामदार, रा. कुंभकोणी व डॉ. आपटे इतकी मंडळी माढ्यास गेली होती. माढें गांव लहान वस्तीचें असलें तरी तेथे २२५ रुपये रोख मिळाले व आणखी कांही रकमांचे आंकडे पडले. सदर मदत मिळविण्याचे कामीं माढे येथील प्रसिद्ध वकील रा. भाऊसाहेब देशमुख ब्राह्मणेतर पुढारी व गांवमुन्सफ रा. गणपतराव साठे व शेठ माणिकचंद रामचंद यांची बहुमोल मदत झाली याबद्दल संस्था त्यांची ऋणी आहे. वरील मंडळींच्या मदतीनेच माढ्यास बाय इंडियन लीगची शाखा उघडण्यांत आली. याच दिवशीं येथून रा. काकासाहेब कौलगीकर वकील, रा. ललीत वकील, डॉ. पुरुषोत्तमपंत गोगटे, डॉ. वैशंपायन याच कार्याकरिता पंढरपुरास गेले. सुमारें दोन हजार रुपयांचीं आश्वासनें मिळालीं. ही मदत मिळविण्याचे कामीं तेथील वकील रा. भार्गव विष्णु काणे, श्री. आराध्ये वकील, रा. बाबासाहेब बुर्जे, रा. जगदीश गिरजी, रा. बाबासाहेब फत्तेपूर, रा. नाईक, श्री. कवठेकर, रा. गडम यांचा फार उपयोग झाला.

प्रत्यक्ष सोलापूर शहराच्या निरनिराळ्या वॉर्डीत हिंडून मदत मिळविण्याकरिता वॉर्डानिहाय तेथील कार्यकर्त्यांना विनंति करण्यांत आली आहे. वॉर्डीतील मदत मिळविण्याचे कामाची जबाबदारी डॉ. पुरुषोत्तमपंत गोगटे व डॉ. आपटे यांचेवर सोंपविली आहे.

डॉ. मोहोळकर प्रदर्शनाकरिता आर्थिक मदत मिळविण्यासाठी व प्रदर्शनकार्याच्या प्रसारार्थ मौजे तडवळ मंगरूळ व करजगी या गांवीं ता. २६।९।३२ रोजीं जाऊन आले. तेथील लोकानी उत्साहपूर्वक सुमारें ७५ रु. पर्यंत रोख मदत केली आहे.

रा. साठे व डॉ. पानसे लातुरास गेले होते. तेथून बऱ्याच आंकड्यांचीं वचनें मिळालीं आहेत, व कांही रुपये रोख जमा झाले आहेत.

# ग्रामपंचायतीला आंबेडकरांची आडकाठी !

शहराला जशी म्युनिसिपालिटी तशी खेड्याला ग्रामपंचायत; पण शहरांत म्युनिसिपालिटी ही संस्था लोकप्रिय झाली आहे. तितकी लोकप्रियता खेड्यांतून ग्रामपंचायतींना लाभली नाही; इतकेंच नव्हे तर तिला विरोधच आहे. या कारणाने ग्रामपंचायतीचा कायदा मुंबई इलाख्याच्या कायदे कौन्सिलाने सन १९२० सालीं मंजूर केल्यानंतर मुलकी अधिकाऱ्यांच्या वजनाने कांही निवडक व ठळक गांवांत ग्रामपंचायती स्थापण्याचा सोहळा साजरा झालेला दिसला तरी त्यांपैकीं पुष्कळ ग्रामपंचायतींचें आयुर्मान, शहरांतील बालमृत्युप्रमाणे वर्षसहा महिन्यांपलीकडे न जाता त्यांनी एकामागून एक राम म्हटला ! शहरांत पहावें तों म्युनिसिपालिटींत सभासद या नात्याने निवडून येण्याकरिता उमेदवार किती झटून पडतात. सभासदाची जागा एक असली तरी ती काबीज करण्यासाठी आठ आठ दहा दहा उमेदवार आपसांत लढत असतात. त्या लढाईत वार लागून कोणाच्याहि अंगांतून रक्ताच्या धारा वाहत नाहीत हें खरें; तथापि त्यांपैकीं पुष्कळांनी द्रव्यधारा किती सोडल्या असतील

यांची कल्पना शहरच्या रहिवाशांना नसेल असें नाही. शहर म्युनिसिपालिटींत शिरण्याची लजत नागरिकांना ज्या मानाने आहे त्याच्या शतांशहि खेड्यांतील लोकांना ग्रामपंचायतीची लजत नाही याचें सकृद्दर्शनीं कित्येकांस आश्चर्य वाटल्याशिवाय राहणार नाही.

म्युनिसिपालिटींत काम करूं इच्छिणाराच्या ठिकाणीं सार्वजनिक कार्याची हौस असावी लागते. ती हौस प्रारंभीं तरी शिक्षणावांचून उत्पन्न होऊं शकत नाही. शहर म्युनिसिपालिट्यांतून निवडून येणारे सर्वच सभासद सुशिक्षित असतात असें कोण म्हणेल? पण प्रथम म्युनिसिपालिट्यांत शिरून सभासदत्वाचें महत्त्व व मान्यता जनतेस पटवून देण्याचें श्रेय सुशिक्षित वर्गानेच मिळविलें आणि मागाहून त्याचें अनुकरण अशिक्षित किंवा अर्धशिक्षित लोकांनी करून आता म्युनिसिपालिटया हळूहळू सुशिक्षितांच्या हातच्या निसटून अशिक्षितांच्याच कबजांत सर्वस्वी जाऊं पाहात आहेत. अशिक्षित किंवा अर्धशिक्षित वर्गांत निवडणुकीची आवड वाढण्याचें मुख्य कारण सरकारदरबारीं व सार्वजनिक समारंभांत म्युनिसिपल सभासदांना मानमरातब मिळतो हें एक आहेच, खेरीज शेजाऱ्यापाजाऱ्यांच्या व ओळखीदेखीच्या लोकाचें बरेंवाईट करण्याची हुकमत हातीं राहाते, या लालुचीनेहि बरेच उमेदवार निवडून येण्याच्या खटपटीस लागतात.

या अनेक प्रकारच्या आमिषांस भुलून म्युनीसिपालिटींत सभासद या नात्याने मिरविण्याची हौस प्रत्येकास वाटेल. हौसेला मोल नसल्यामुळे तो उमेदवार स्वतःच्या पात्रापात्रतेचाहि विचार कदाचित् करणारहि नाही. पण हौस असली म्हणून फुरसतीची व सुखवस्तूपणाची अनुकूलता सर्वांना लाभेलच असें नाही. शहरांतील रहिवाशांचा उमेदवारांच्या माऱ्यापासून दिसतो इतका बचाव आज झाला असला तर त्याबद्दल त्यांनी द्यावयाचा दुवा वरील अडचणींसच दिला पाहिजे. उलटपक्षी खेड्यांची स्थिति अशी आहे कीं तेथील लोकांना सार्वजनिक कार्याची हौस नाही व त्या कार्याच्या मागे लागण्यास स्वास्थ्यहि नाही.त्यांचीं निर्वाहाचीं साधनें अत्यंत तुटपुंजी असल्याने त्यांना वेळेची फुरसत पुष्कळ असताहि सांसारिक विवंचनेपुढे मनाला श्रेष्ठ प्रतीच्या लोकसेवेची उमेद वाटत नाही. याशिवाय आधुनिक पद्धतीच्या सार्वजनिक कामाचें व्यसन लावणारा सुशिक्षित गुरुहि त्यांच्या वांट्याला येत नाही.

ग्रामपंचायतीचा कायदा पास होऊन इतकीं वर्षें झालीं असताहि खेड्यापाड्यांतून ग्रामपंचायतीच्या वाऱ्याला उभे राहण्यास ग्रामस्थ कां धजत नाहीत याचें विवेचन येथवर झालें, त्यावरून दोषाचें सारें खापर ग्रामस्थांच्या माथीं फुटतें व सरकार त्याचें मुळींच वांटेकरी नाही अशी कोणाची समजूत झाल्यास ती मात्र खरी नाही. सरकारने ग्रामपंचायतीच्या कायद्याची रचनाच अशी केली आहे कीं त्यामुळे सदर संस्था लोकप्रियतेस बऱ्याच अंशीं मुकली आहे. तिच्या पंचांना डोळ्यांत भरण्यासारखा अधिकार कोणताच नाही. असलाच तर डोळ्यावर येण्याचा मात्र आहे! ज्यांच्याजवळ दांतावर मारण्यासहि तांबडा पैसा नाही अशा आपल्या ग्रामस्थ बंधूंच्या माथीं घरपट्टीचा भुर्दंड बसवावा व त्याच्या वसुलांतून गावचे रस्ते झाडण्याचीं व दिवे लावण्याचीं कामें उरकून घ्यावीं हा पंचांचा अधिकार. खेड्यांतील लोकांची राहणी इतकी गरीबीची व गरजा इतक्या बेतच्या असतात कीं त्यांना साफ व स्वच्छ रस्ते आणि झगझगीत दिवे ही एक प्रकारें मिजासच वाटेल. ते आपल्या दारापुढची सार्वजनिक वाट स्वतःच बिनखर्चाने झाडतील व दुरुस्त ठेवतील आणि त्यावरून काळोख्या रात्रीं चालतांना वाटेवरील कंदिलाऐवजीं डोक्यावर लुकलुकणाऱ्या आकाशांतील तारकापुंजांनाच आपले मार्गदर्शक बनवितील.अशा निकृष्टावस्थेस पोचलेल्या ग्रामस्थांना गरज असली तर द्रव्यार्जनाच्या साधनांची आहे, द्रव्यहरण करणाऱ्या सुखसोयींची नाही.द्रव्यार्जनाचें साधन त्यांस उपलब्ध करून देतां येणे कोणाच्या स्वाधीन नसल्यास निदान त्यांचें द्रव्य जो रक्षण करील त्याला ते आपला सखा समजतील. ग्रामपंचायतीचा कायदा पास झाल्यापासून त्याजविरुध्द जनतेने व जनतेच्या पुढाऱ्यांनी आक्षेप घेतले असतील तर ते या स्वरूपाचेच होत. त्या दृष्टीने खेड्यांतील पंचायतींना दिवाणी व फौजदारी खटल्यांचा निवाडा करण्याचा अधिकार, मर्यादित प्रमाणांत कां होईना, देण्यांत यावा अशी मागणी लोकपक्षीय पुढाऱ्यांनी अनेकवार केली आहे. त्यांनी स्थानिक स्वराज्य परिषदेंत त्या संबंधाचे ठराव आणिले आहेत, बिल तयार करून तें सरकाराकडे पाठविलें आहे व तशा प्रकारची दुरुस्ती करण्याचें आश्वासन ना.हिदायतुल्ला हे स्थानिक स्वराज्यखात्याचे दिवाण असता त्यांजकडून मिळालेंहि आहे. परंतु ती सुधारणा कोणत्या ना कोणत्या कारणाने एकदा मागे पडून तिचा भाग्योदय मुंबई कौन्सिलाच्या चालू बैठकींत स्थानिक स्वराज्याचे नवे दिवाण ना. वकील यांच्याकरवीं घडून आला.

ना. वकील यांनी आणिलेलें बिल बरेंच विस्तृत आहे. ग्रामपंचायतीच्या मूळ कायद्यांत गांवाची

स्वच्छता, दिवाबत्ती, पाणीपुरवठा इत्यादि प्रमुख कामें होतीं. नवीन बिलांत पहिलीं कामें व अधिकार ग्रामपंचायतीकडे ठेवले आहेतच; पण त्याशिवाय दिवाणी व फौजदारी स्वरूपाच्या किरकोळ गुन्ह्यांचाहि इन्साफ करण्याचा अधिकार पंचायतीकडे सोंपविला आहे. या बाबतींत इतर इलाख्यांनी पूर्वीच आघाडी मारली असून पुढारलेला म्हणून गाजलेला मुंबई इलाखा मात्र मागें रेंगाळत पडला आहे. उशीरा कां होईना मुंबईसरकार जागें झालें हें सुचिन्हच समजलें पाहिजे. वरील अधिकाराशिवाय नव्या बिलात इतर सुधारणा झाली आहे ती अमलांत आल्यास पुरुषाप्रमाणें स्त्रियांनाहि पंच-निवडणुकीचा अधिकार मिळेल, पंचायतीची कर बसविण्याची सत्ता वाढेल व तिला लोकल फंडाच्या वसुलाचा कांहीं अंश लाभेल.

लोकशाहीचें तत्त्व प्रसृत होण्याच्या दृष्टीने स्त्रियांना मताधिकार मिळणें आवश्यक आहे याविषयी मतभेद नाही. पंचायतींनी कर बसवावे व गांवाची व्यवस्था ठेवावी, या मूळयोजनेंत सरकारानें आपल्यावरील खर्चाची जबाबदारी झुगारून दिली होती.परंतु नव्या बिलानें ती हमी सरकाराने घेतली नसली तरी त्यांत नमूद केल्याप्रमाणे लोकल बोर्डाच्या प्राप्तीचा वांटा ग्रामपंचायतीच्या ताटांत पडल्यास त्या आर्थिक सहाय्यावर ग्रामपंचायती सध्याप्रमाणे चार खुंटाच्या जहागिरीवर अवलंबून न राहता त्यांना उत्पन्नाचा वाहता झरा लाभून त्यायोगाने त्या कांहीसा जीव धरतील. बिलाच्या या बाह्य सौंदर्यास कोणी फारशीं नांवें ठेवणार नाही. तथापि त्याचे गुण त्याची अंमलबजावणी सुरू होईल तेव्हाच दृष्टीस पडतील. कारण सध्या सरकाराची स्थिति ओढघस्तपणाची असल्यामुळे त्यांना स्वतःच्या पदरास खार न लागता परभारें भलेपणा मिळेल तितका हवाच आहे. नवीन बिलाने सरकार लोकल बोर्डाच्या अर्ध्या भाकरीपैकीं लहानसा तुकडा पंचायतीच्या तोंडावर फेकण्याच्या व त्याच तुकड्याच्या किंमतीचें बोर्डाचें कामहि पंचायतीच्या गळ्यांत अडकविण्याच्या विचारांत आहे. हा प्रकार शिवरात्रीला एकादशीचें घर दाखवून देण्यांतलाच आहे. बिलावर या मुद्द्याच्या आधारें टीका झाली तर ती ग्राह्य व रास्तच होय. पण डॉ. आंबेडकर यांनी बिलावर टीका करतांना निराळीच तार लावली.

बिलांतील जो भाग लोकांच्या दृष्टीने उपयुक्त व महत्त्वाचा त्यावरच डॉ. आंबेडकरांनी आपलें हत्यार अत्यंत निष्ठुरपणाने चालविलें. त्यांचें म्हणणें असें कीं, 'खेड्यांतील लोक अडाणी व भोळसर असल्यामुळे त्यांच्यांत फौजदारी व दिवाणी अधिकार चालविण्याची लायकी नाही. खेरीज गांवांतून जातींचे तडे गेलेले व महारवडा गांवाबाहेर पडलेला. या कारणाने ग्रामपंचायतीपासून अस्पृश्यांना न्याय मिळण्याचें दूरच राहून त्यांजवर जुलूम होतील. पंचांची निवडणूक लोक करणार, त्याअर्थी पंच हे एक प्रकारें मतदारांचे मिंधे असल्यामुळे त्यांजकडून खरा न्याय मिळण्याची आशा अस्पृश्यांनीच काय, पण स्पृश्यांनीहि करूं नये; तशांतून पंचायतीला वरील अधिकार द्यावयाचेच ठरल्यास निदान गांवांतील अल्पसंख्य वर्गास आणि विशेषतः अस्पृश्यांस राखीव जागा तरी ठेवाव्या.'

स्वार्थावरच नजर द्यावयाची तर ब्राह्मण, सोनार, शिंपी, माळी वगैरे अल्पसंख्य जातींच्या पथ्यावरच आंबेडकरांची ही सूचना पडणारी आहे. कारण त्या योगाने त्यांना पंचायतींत आपला एखाद-दुसरा प्रतिनिधि हक्काने पाठवितां येईल. पण सार्वजनिक व्यवहार अशा संकुचित दृष्टीने सुरळीत चालणार नाही व यशस्वीहि होणार नाही. हिंदुस्थानांत जाति आहेत खऱ्या. तथापि त्यांतूनच लोकशाहीने आपली वाट काढली पाहिजे. सार्वजनिक कारभार जातीकडे पाहून पूर्वी कधी चालला नाही व पुढेहि चालणार नाही. फार प्राचीन काळापासून महत्त्वाच्या दाव्यांचे निवाडे पंचायती करींत आल्या असून ती पद्धत ब्रिटिशांनीच धुळीस मिळविली. सदर पद्धति सदोष, अन्यायाची व पक्षपातीपणाची असती तर ती लोकप्रिय होऊन इतका दीर्घ काल टिकलीच नसती. डॉ. आंबेडकरांच्या मतें ग्रामपंचायतींना हे अधिकार मुळीच देऊं नयेत किंवा द्यावयाचे तर पंचायतींची निवडणूक जातवारीच्या तत्त्वावर व्हावी. आंबेडकरांची पहिली सूचना अनिष्ट आहे व दुसरी घातक आहे. पहिल्या सूचनेने ग्रामसंघटनेच्या मुळावरच कुऱ्हाड बसेल व दुसऱ्या सूचनेने लोकशाही कारभाराच्या चिंधड्या उडून खेड्यापाड्यापर्यंत कलहाची रोपटीं खेड्याभोंवतालच्या निवडुंगाप्रमाणे माजतील. सुदैवाने आंबेडकरांच्या मतास इतराचा नाहीच पण मुसलमानांचाहि पाठिंबा नसल्यामुळे बिलांतील हें कलम शाबूत राहील अशी आशा बाळगण्यास हरकत नाही. तथापि बिलाचीं तीनहि वाचनें पार पडून तें बाहेर येईपर्यंत त्याची चर्या किती बदलेल हें कोणी सांगावें!

# महात्माजी व अस्पृश्यता

(ले. श्री. ल. रा. पांगारकर, सं. 'मुमुक्षु' नाशिक.)

रा. माटे यांनी केसरींत मोठ्या अदबीने पण खुबीने, भीतभीत पण मोकळेपणाने जें लिहिलें आहे तेंच जरा अधिक स्पष्टपणें मी महात्माजींच्या व त्यांच्या अनुयायांच्या कानावर घालूं इच्छित आहें. अस्पृश्यतानिवारणाच्या प्रश्नावर महात्माजींचें व माझें अकोल्यास एक तासभर बोलणें झालें होतें व या बाबतींत भलतीच घिसाडघाई करण्यांत आल्यास फसगत झाल्याविना राहणार नाही असें मीं त्यांस स्पष्ट सांगितलें होतें. अस्पृश्यतेविषयी जुन्या विचाराच्या हिंदूंना सहानुभूति नाही व हा हिंदुधर्मावर मोठा कलंक आहे ही भाषा बोलण्याचें सोडून द्याल तर बरें असें मीं म्हटले. चोखामेळा, रोहिदास चांभार, तामील देशांतील प्रख्यात शिवभक्त नंद इत्यादि भक्तांचें व देवी अहिल्याबाईसारख्या धनगर जातींत जन्मलेल्या अलौकिक स्त्रीरत्नाचें हिंदु समाजाने गौरव केलें आहे या गोष्टी दृष्टीआड करूं नयेत अशी त्यांना विनंति केली होती. मनुस्मृतींत अस्पृश्यांचा उल्लेख आहे. ७ व्या शतकांतल्या ह्युएनसंग या चिनी प्रवाशाने याबद्दल स्पष्ट लिहिलें आहे. ज्ञानेश्वरमहाराज, तुकाराममहाराज, श्रीसमर्थ इ. महाराष्ट्रीय समदर्शी संत अस्पृश्यतेबद्दल काय लिहितात व हिंदुसमाजांत याविषयी अनेक शतकांत रूढ झालेल्या भावना काय आहेत त्यांकडे विवेकाने पाहून अस्पृश्यतानिवारणाचा प्रश्न निर्मिमाणाने सोडविला पाहिजे. साधुसंतांची महाराष्ट्रीय जनतेवर जी जबर छाप आहे ती एकाएकीं ढिली होण्याचा संभव नाही. हिंदुधर्म व हिंदु समाज यांवर अप्रशस्तपणे वाटेल तशी टीका करण्याने हा प्रश्न सुटणारा नाही. बदललेल्या परिस्थितीची जाणीव हिंदु समाजाला नाही असें नाही. अस्पृश्यांबद्दल कांही तरी केलें पाहिजे असें त्याला वाटूं लागलें आहे. पण या दृष्टिकोनाचा विवेकाने फायदा घेऊन आस्ते आस्ते पुढे पाऊल टाकलें पाहिजे, एकदम सहभोजनापर्यंत मजल नेणे हें कार्यविघातक होईल.

अस्पृश्यांची राहणी सुधारूं द्या, त्यांच्या खाद्यपेयांत सुधारणा होऊं द्या, त्यांना विवेकाचें शिक्षण द्या, मेलेल्या जनावरांचें मांस खाणें व अमंगळपणें राहणें या गोष्टींपासून त्यांना परावृत्त करा, उद्योगधंद्याच्या व पोटापाण्याच्या त्यांच्या सोयी करा. याविषयीं जुना समाजहि नव्या समाजास मदत करण्यास तयार राहील. मंदिराच्या परिसरांत मुसलमान—ख्रिस्त्यांना जेथपर्यंत जातां येतें तेथपर्यंत व त्याच्या चार पावलें पुढेंहि अस्पृश्यांना येऊं द्या या म्हणण्यांत अर्थ आहे. मनुस्मृतींत सांगितलेल्या कित्येक अस्पृश्य जाती कालांतराने स्पृश्य झाल्या आहेत. सार्वजनिक सत्यनारायणांत प्रसाद वांटण्यासाठी मुद्दाम भंगी ठेवणें व नंतर सर्व जातींचीं सहभोजनें करणें या गोष्टीला समाज आज तयार नाही. शेंकडा ९० इतका हिंदु समाज आजहि जुन्या वळणाचा आहे व त्याच्या भावना दुखविण्याने अस्पृश्यतानिवारणाचें कार्य यशस्वी होणार नाही.

अस्पृश्यांतहि महार, मांग, चांभार, धेड, भंगी इत्यादि जाति आहेत व त्यांच्यांतहि परस्पर अस्पृश्यता आहे ती आधी गेली पाहिजे. ह्या सर्व अस्पृश्य जातींची एकजूट करणें व त्यांची राहणी सुधारणें या गोष्टी आंबेडकरांनी आज कराव्या व पुढील मार्ग भावी पिढ्यांतील कार्यकर्त्यांसाठी शिल्लक ठेवावा. आम्हाला हिंदु देवळें नकोत, हिंदु देव नकोत व हिंदुधर्म नको असें एकीकडे म्हणावयाचें व मंदिराच्या अंतर्भागांत एकदम प्रवेश पाहिजे, व वरिष्ठ जातींनी आमच्याशीं रोटीबेटीव्यवहार केला पाहिजे असा हट्ट धरावयाचा, असलें विसंगत वागणें सोडून देऊन सलोख्याने व प्रेमाने वागण्याचा धडा त्यांनी आपल्या बांधवांस घालून दिला पाहिजे. राजस व तामस प्रकार टाकून देऊन सात्त्विक प्रेमाचे प्रकार चळवळींत आणल्यानेच कार्यभाग होणार आहे. चार चार हजार वर्षांच्या रूढी व चालीरीती एका दमांत उखडून टाकूं अशी अपेक्षा महात्माजींसारख्या अलौकिक पुरुषानेहि करणें उचित होणार नाही. पहिल्या उपवासाच्या वेळीं लोकांनी कौतुक केलें व महापुरुषाचा प्राण वांचावा यासाठी पुढाऱ्यांनी आपल्या प्रयत्नांची शिकस्त केली हें योग्यच झालें. पण तसा अनुभव दरखेपेला येईलच असें नाही. महात्माजींसारखा मोहरा या भलत्या इरेस पडून वांया जाऊं नये अशी सर्वांची अगदीं हार्दिक इच्छा आहे.

महात्माजी केवढेहि मोठे असले तरी समाजरूप विराटपुरुष त्यांच्यापेक्षाहि मोठा आहे. 'The Collective wisdom of Centuries is greater than the wisdom of the greatest man' असें एडमंड बर्कने म्हटल्याचें स्मरतें. महात्माजींच्या उपवासाचें समाजाने कोडकौतुक केलें! पण मरणान्त प्रायोपवेशनाची आततायीपणाची

सांथ वाढत जाणें अनिष्ट आहे असेंच प्रत्येक विचारी मनुष्य म्हणेल. येशुख्रिस्त लोकांच्या पापासाठी सुळावर चढला. यांत अनुपम स्वार्थत्याग व धीरोदात्तपणा आहेच आहे. पण—

प्रजा सर्वाहि विमला विमानामाजि वाहिल्या ।
नेल्या स्वलोका ताराया कथा श्रोत्यांसि राहिल्या ॥

—मोरोपंत.

सर्व प्रजा आपल्यासारख्या निष्पाप करून त्यांस बरोबर घेऊन राम वैकुंठास गेले यांत अधिक उदात्तपणा आहे असें मला वाटतें. महात्माजींनी ख्रिस्ताचा कित्ता डोळ्यांपुढे ठेवण्यापेक्षा रामरायाचा कित्ता डोळ्यांपुढे ठेवणें अधिक श्रेयस्कर आहे. रामाने दहा हजार वर्षें राज्य करून प्रजा विमल केल्या. महात्माजींना इतकें दीर्घायुष्य न लाभलें तर प्रत्येक आयुष्यांत यावच्छक्य सत्प्रयत्न करून अनेक जन्मपर्यंत त्यांनी आपलें व्रत चालविण्यास कोणती हरकत आहे ?

आपल्या धर्माने पुनर्जन्म म्हणजे अनेक जन्म मान्य केलेच आहेत व तुकाराम महाराजांनी म्हटलें आहे—

मागे बहुता जन्मीं हेंचि करीत आलों आम्ही ।
भवताप श्रमीं दुःखें पीडिलीं निववूं त्या ॥

याचा अर्थ असा कीं भवतापाने श्रमलेल्या जीवांच्या उद्धारार्थ आम्हीं अनेक जन्म घेतले आहेत व जन्मोजन्मीं पतितोद्धाराचेंच काम करीत आलों आहों. तेव्हा तुकोबारायांच्या उदाहरणाप्रमाणे महात्माजींनी आपलें थोर कार्य अनेक जन्मांत मिळून केलें तर त्यांत वावगें काय आहे ? जगाचें कार्य एका अवतारांत पूर्ण झालें नाही म्हणून परमात्म्यालाहि अनेक अवतार घ्यावे लागले. महात्माजीहि दैवी संपत्तिमान असे अलौकिक पुरुष आहेत. त्यांच्या आयुष्याचा प्रत्येक क्षण जगाला खरोखरीच बहुमोलाचा वाटतो. म्हणून 'मरणान्त प्रायोपवेशनाचा ' निर्धार पुनः करण्याचें त्यांनी जे भय घातलें आहे त्यापासून त्यांनी निवृत्त व्हावें, जगून अधिक काय करावें, व समाज अधिक विस्कळित करण्याचें अपयश घेऊं नये अशी माझी नम्र विनंति आहे.

# केळकरांचा मद्रासेकडील दौरा

मद्रास येथील राष्ट्रीय पक्षाचें दैनिक 'स्वदेशमित्रन्' याला पन्नास वर्षें संपून एक्कावन्नावें वर्ष लागलें. त्यानिमित्त मद्रास येथे ता.८ आक्टोबर रोजीं म्हणजे विजयादशमीच्या दिवशीं सुवर्ण महोत्सव समारंभ मोठ्या थाटाने करण्यांत आला. त्या समारंभाचें अध्यक्षस्थान स्वीकारण्याकरिता रा. केळकर यांना मुद्दाम पुण्यास आमंत्रण देण्यांत आलें होतें. त्याप्रमाणे ते परवा ता.६आक्टोबर रोजीं पुण्याहून निघाले ते दुसरे दिवशीं सायंकाळीं साडेपाचचे सुमारास मद्रास सेंट्रल स्टेशनावर येऊन पोचले. त्या वेळीं त्यांच्या स्वागतार्थ बरीच मंडळी स्टेशनावर हजर होती. त्यांत 'हिंदु' व 'स्वदेशमित्रन्' वर्तमानपत्रांच्या संपादक व व्यवस्थापक मंडळांतील लोक होतेच; पण इतर छापखाने व वर्तमानपत्रें यांचेहि अनेक प्रतिनिधि हजर होते. त्यांत 'फेडरेटेड इंडिया'चे मि. शास्त्रुलु, तसेच व्यासराव, शिवराव तसेंच येथील दक्षिणी लोकांची जुनी वसाहत व नवी वसाहत यांतील बहुतेक प्रमुख लोक हजर होते. प्लॅटफॉर्मवर उतरल्यावर रा. केळकरांना निरनिराळ्या लोकांनी पुष्पहार घातल्यावर त्यांना माउंटरोडवरील कॉस्मॉपॉलिटन क्लबमध्ये उतरविण्यांत आलें. मद्रास येथे येण्याविषयी ज्यांनी निमंत्रण केलें ती आय्यंगार मंडळी तसेच दक्षिणी रहिवासी यांचे बंगले मद्रासेंत आहेत. तथापि शहराच्या निरनिराळ्या भागांत राहणाऱ्या स्नेही मंडळींना केळकरांना भेटण्याला सोईची म्हणून कॉस्मॉपॉलिटन क्लबची जागा पसंत करण्यांत आली.

ता. ८ रोजीं सकाळीं साडेआठ वाजता स्वदेशमित्रन् पत्राच्या कचेरींत वर्तमानपत्र व छापखाना यांतील कामगारांचें संमेलन भरलें. तेव्हा प्रथम वीणा व फिडल यांचें सुंदर वादन झाल्यावर कामगारांच्या तर्फे संपादक श्री. सी. आर. श्रीनिवास आय्यंगार यांना मानपत्र व कांही मौल्यवान जिनसा नजर करण्यांत आल्या. त्याला श्रीनिवास यांनी आभार प्रदर्शक उत्तर दिल्यावर श्री.ए. रंगस्वामी आय्यंगार यांना विनंति करून त्यांच्या हस्तें सर्व दर्जाच्या सुमारें दीड पावणेदोनशें मंडळींना खादीचीं वेलबुट्टीदार उपरणीं नजर केलीं, व अल्पोपाहार झाल्यावर हा सकाळचा कार्यक्रम समाप्त झाला.

## 'स्वदेशमित्रन्' पत्र

"स्वदेशमित्रन्" हें पन्नास वर्षांचें वर्तमानपत्र असून तें सुरवातीनन्तर लवकरच दैनिक करण्यांत आलें. हल्लीं दररोजच्या दोन आवृत्त्या निघत असून आठवड्यांतून तीन वेळां व आठवड्यांतून एक वेळ अशा रीतीने हें वृत्तपत्र निघत असतें. दैनिक पत्राचे वर्गणीदार पंचवीस हजारांवर आहेत व वर्गणी शहरांत अठरा रुपये व बाहेरगांवीं तेवीस रुपये आहे. ही गोष्ट लक्षांत घेता या इलाख्यांत वर्तमानपत्रें वाचण्या-

ची आवड किती आहे हें सहज लक्षांत येईल. मद्रास येथील वृत्तपत्रांची एक विशेष गोष्ट आहे. ती अशी कीं, बहुधा सर्व पत्रें संध्याकाळीं सुमारें पांच साडे पांच वाजता प्रसिद्ध होतात व उपनगरांतील लोकांच्या हातीं तीं साडेसातपर्यंत पडून त्यांचें वाचन रात्रींच होतें. मुंबई शहरांत याच्या अगदी उलटा प्रकार आढळतो. मद्रासेंतील पत्रें संध्याकाळीं निघण्याचें कारण असें कीं, दिवसभरची बातमी लोकाना ताजी देतां येते. नंतर बाहेरगांवाहून बातमीच्या तारा मद्रासेस फारशा येत नाहीत. मुंबईची गोष्ट यासंबंधाने थोडी वेगळी आहे. स्वदेशमित्रन्च्या एजन्सीच्या शाखा बहुतेक मोठमोठ्या गावीं असून खेड्यापाड्यांतून टपालाने अंक जातात. स्वदेशमित्रन् पत्र इतक्या वर्षांचे जुनें असल्यामुळे त्याचा जम फार चांगला बसला आहे. तामील नाडू व आंध्रपत्रिका हीं आणखी दोन देशी भाषेंतील दैनिकें मद्रासेस निघतात. परंतु 'स्वदेश मित्रन्' कडेच पुढारीपण आहे. स्वदेशमित्रन्ची स्वतःची इमारत असून छपाई, चित्रें वगैरेंच्या सर्व साधनांनी तें समृद्ध आहे. पत्राची मालकी संयुक्त भांडवलाच्या भागीदारांची आहे, व आजपर्यंत भागीदारांना केव्हा सहा तर केव्हा साडेसात टक्के डिव्हिडंड देण्यांत आलें आहे. मात्र यंदाच देशांत व्यापारधंदा कमी असल्यामुळे जाहिरातींचें उत्पन्न फार कमी, त्यामुळे भागीदारांना यावर्षी डिव्हिडंड मिळणें कठिण जाईल असें म्हणतात. या कारखान्यांत सर्व प्रकारच्या मिळून सुमारें दोनशें लोकांचा उदरनिर्वाह होतो. हिंदु व स्वदेशमित्रन् या दोनहि पत्रांचे मूळ उत्पादक कै. जी. सुब्रह्मण्य अय्यर हे होत. परंतु पुढे हीं दोनहि पत्रे कै. कस्तुरी रंग आय्यंगार व श्रीरंगस्वामी आय्यंगार यांच्या हातीं आलीं व सांप्रत हीं दोनहि पत्रें एकाच कुटुंबाची समाईक मालकीची मिळकत झाली आहे. कै. कस्तुरी रंग आय्यंगार यांचे चिरंजीव श्री. के. श्रीनिवासन हे हिंदू पत्राचे पूर्ण मालक आहेत श्री. रंगस्वामी आय्यंगार हे मात्र हिंदू पत्राचे संपादक व स्वदेशमित्रन्चे मॅनेजिंग डायरेक्टर आहेत. हिंदू पत्राचे मालक व स्वदेशमित्रन्चे संपादक हे निरनिराळे गृहस्थ आहेत. नामसादृश्यामुळे घोटाळा होऊं नये म्हणून हें मुद्दाम लिहिलें आहे.

# प्राचीन ग्रंथसंग्रह

आजकाल ग्रंथालयाचें नांव काढलें तर धर्माशीं त्याचा कोणत्याहि प्रकारें संबंध असावा असें मुळींच वाटत नाहीं. उलट ग्रंथांच्या द्वारें मिळणाऱ्या शास्त्रीय ज्ञानामुळे ग्रंथवाचकांचे मनांतून भोळ्या धार्मिक भावनांची हकालपट्टी होत आहे अशीहि तक्रार कित्येकांकडून केली जाते. परंतु आजच्या ग्रंथसंग्रहाची कल्पना बीजरूपाने कां होईना पण प्रथम प्रार्थनामंदिरें व मंदिरांना जोडून असणारे धर्ममठ यांच्या आश्रयाने फार प्राचीन काळींच वाढीस लागली, असें इतिहासावरून म्हणतां येतें.

अर्थातच प्राचीन धर्ममंदिरांच्या संग्रहांत धार्मिक ग्रंथांच्याच हस्तलिखित प्रति ठेविलेल्या असत. आपल्या हिंदुस्थान देशांत जरी वेद मुखोद्गत करून ठेवण्याची परंपरा रूढ होती, तथापि इतर अनेक प्रकारचे हस्तलिखित ग्रंथ काशी, पैठण इत्यादि धर्मक्षेत्रांतील विद्वानांच्या संग्रहांत कित्येक शतकांपासून जमा केलेले आजहि पाहावयास मिळतात. प्राचीन वाङ्मयाचा शोध करणारांस आज संग्रहाचा किती तरी उपयोग होत असतो.

पाश्चात्य देशांत सातव्या आठव्या शतकांपर्यंत या धर्ममठांतील संग्रहांची संख्या व महत्त्व फार वाढलें, आणि सरकारच्या दृष्टीने महत्त्वाच्या कागदांचें संरक्षण व प्रकाशन याच संग्रहांच्या विद्यमाने होऊं लागलें. ज्याप्रमाणे सरकार आजहि एखादें जाहीरपत्रक देवालयांत लावून जाहीर करतें, त्याप्रमाणेच पूर्वीच्या काळीं महत्त्वाचे कायदे व सनदा यांच्या अनेक प्रति करून त्या धर्ममठांतील संग्रहांत ठेवण्यांत येत. तेथे येणारे पांथस्थ व भक्तमंडळी यांच्या ते नजरेस पडत व अशा रीतीने हळू हळू जाहीर होत. छापण्याची कला अस्तित्वांत आली नव्हती, आणि वर्तमानपत्रेंहि शक्य कोटींत अवतरलीं नव्हतीं तेव्हाची जाहीर करण्याची ही तऱ्हा होय. मॅग्नाचार्टासारख्या महत्त्वाच्या कागदांच्या कांही प्रति अशा रीतीने इंग्लंडांतील निरनिराळ्या मठांत सांपडल्यामुळे त्या बाबतींतील इतिहाससंशोधनाला कितीतरी मदत झाली आहे.

इंग्लंडमधील राजकारणासंबंधींचे कागद धर्ममठांत ठेवावे अशाविषयी पहिल्या एडवर्डचे हुकूम मिळाले आहेत. तसेंच जेव्हा एखादा परंपराविषयक किंवा राजकीय हक्कांच्या बाबतींतील वादग्रस्त मुद्दा उपस्थित होई तेव्हाहि निरनिराळ्या धर्ममठांतील कागदपत्र गोळा करून आधार शोधण्याची त्या काळीं वहिवाट होती असे उघड पुरावे उपलब्ध आहेत. कोणत्याहि तात्त्विक मुद्द्यावर प्रकाश पडण्याजोगीं साधनें अत्युत्कृष्ट ग्रंथसंग्रहालयांत सदैव व

सुलभ रीतीनें उपलब्ध व्हावीं अशीच आपली आजची अपेक्षा असते.

प्राचीन संग्रहांतील धर्मग्रंथांचा प्रसारहि होत असे. महत्त्वाच्या ग्रंथांच्या सुंदर अक्षरांनीं नकला करून घेण्याची प्राचीन काळीं प्रथा होती. बहुतेक ग्रंथसंग्रहांमध्ये सर्व लेखनसाहित्यांनीं सुसज्ज असें स्वतंत्र दालन राखण्यांत येई. सुंदर लिपीची लेखनकला व ग्रंथांत चित्रें रंगविण्यासाठीं चित्रकला अशा दोनहि महत्त्वाच्या कला प्राचीन ग्रंथसंग्रहाच्याच आश्रयाने वाढल्या.

मध्ययुगांत हस्तलिखित पुस्तकें अर्थात् अत्यंत दुर्मिळ होतीं. परंतु निरनिराळ्या धर्ममठांनीं आपापसांत पुस्तकें द्यावीं घ्यावीं असा प्रघात रूढ होता. विद्यार्जनाचें पवित्र कर्तव्य करणाऱ्यांना सर्व प्रकारची मदत व्हावी असा त्या वेळींहि कटाक्ष होता. एका माणसाने आपल्या जवळचीं पुस्तकें एकदा दाखविण्याचेंहि नाकबूल केलें. तेव्हा त्या काळच्या कल्पनांना अनुसरून सेंट कोलंबा नांवाच्या साधूने त्या पुस्तकांना कायमचा शाप दिला! विद्यार्जनाच्या दृष्टीने ग्रंथांचा उपयोग होण्याची दक्षता बाळगण्याच्या भरांत पुस्तकांच्या सुरक्षिततेबद्दल व्यावहारिक दृष्ट्या काळजी बाळगणें हें अर्थात् आवश्यक समजलें जाई. कोणा एकाला दिलेलें पुस्तक त्यानें निष्काळजी माणसाला देऊन खराब होऊं देऊं नये यासाठीं त्या प्रथम-वाचकाला शपथ घालण्यांत येई. आणि जर कां ती मोडून तो तें पुस्तक दुसऱ्याला देतो असें आढळून आलें तर त्यावर सामाजिक व धार्मिक बहिष्कार पडण्याची भीति असे! ह्या शपथेमुळे पुढे खरोखर कुचंबणा होऊं लागली. व १२१२ मध्ये ज्ञानार्जन करणाऱ्यांच्या दृष्टीने एक महत्त्वाचा विजय संपादित झाला. त्या वर्षी पॅरिसच्या धर्म महासभेने शपथ व बहिष्कार यांचा निषेध केला. ग्रंथाचा मालक झाला म्हणून त्याला देखील ज्ञानप्रसाराच्या मार्गांत आड येतां येऊं नये असा त्या सभेचा अभिप्राय पडला, व गरीब आणि कष्टाळू विद्यार्थ्यांचा जीव भांड्यांत पडला.

तेराव्या व चौदाव्या शतकांच्या दरम्यान इंग्लंडांत रिचर्ड डबेरी या नांवाचा एका ग्रंथाची आवड असणारा संग्रहकर्ता होऊन गेला. त्याने आपल्या संग्रहांतील ग्रंथ देण्याच्या बाबतींत कांही नियम करून ठेविले होते. तें हल्लींच्या परिस्थितीशीं ताडून पाहता कांहींसे मनोरंजक वाटतील.

१ कोणत्याहि पुस्तकाची प्रत किंवा उतारे घेणें ते ग्रंथसंग्रहाच्या इमारतींतच घेतले पाहिजेत.

२ ज्या पुस्तकांची दुसरी प्रत संग्रहांत असेल अशींच पुस्तकें फक्त संग्रहाच्या बाहेर वाचकांना दिलीं जातील.

३ पुस्तक वाचण्यासाठीं नेणाऱ्या गरजूने ग्रंथाच्या किंमतीपेक्षां अधिक रकम अनामत ठेविली पाहिजे.

४ आणि शिवाय, 'आपण नेलेल्या ग्रंथाचा अभ्यास व निरीक्षण यापेक्षां अन्य उपयोग करणार नाही आणि ऑक्सफोर्ड शहर व त्याचीं उपनगरें त्यांच्या कक्षेबाहेर पुस्तक हालवणार नाही' अशी शपथ घ्यावी लागे!

पण एकंदरींत, इतक्या अडचणी असल्या तथापि पांचसहाशें वर्षांपूर्वी अभ्यासकांची इतकी सोय होत होती. हें पाहिलें म्हणजे मानवी परिश्रमाला साधनांची अमूल्य जोड मिळत आहे हा आधुनिक जीवनक्रमाचा विशेष असला तरी त्या साधनांच्या अभावींहि प्राचीन काळीं लोकोपकारी दृष्टि आणि लोकहितप्रवण मनोभूमि यांचें वैभव आजच्या इतकेंच भव्य आणि कुतूहल करण्यासारखें होतें यांत संशय नाही.

# रा. केळकर व सहभोजन

ता. २ रोजीं सर्व्हंट्स ऑफ इंडिया सोसायटीमध्ये निरनिराळ्या जातींच्या पुढारी लोकांना आमंत्रण देऊन एका विशिष्ट हेतूने कांही चालकांनीं एक सहभोजन घडवून आणलें. या भोजनाला रा. नरसिंह चिंतामण केळकर हे गेले होते. त्यासंबंधाने राष्ट्रीय पक्षाचे मित्र व सनातनी पक्षाचे एक पुढारी वैद्य पंचानन कृष्णशास्त्री कवडे यांनीं उपवास सुरू केला असें प्रसिद्ध झाले होतें. म्हणून त्यासंबंधाने खुद्द रा. केळकर यांचा खुलासा पुणे येथील 'सकाळ' पत्राच्या संपादकांनी घेऊन तो ता. ६ ऑक्टोबरच्या अंकांत प्रसिद्ध केला आहे. तो आम्हीहि याखाली देत आहों— —(सं. के.)

पुणें, ता. ४:—वैद्यपंचानन कृष्णशास्त्री कवडे यांनी, "सनातन धर्मावर अस्पृश्यतानिवारणाच्या नांवाखालीं घाला घालण्यांत येत असून श्री. तात्यासाहेब केळकरांसारखे सर्वमान्य पुढारीसुद्धा सहभोजनाला जातात" याबद्दल आपली तीव्र नापसंती व्यक्त करण्याकरिता, व हें धर्मावरील संकट देवाने टाळावें म्हणून, नवरात्राच्या दिवसांत उपोषण सुरू केल्याचें 'सकाळ' मध्ये प्रसिद्ध झालेंच आहे. या

उपोषणाच्या 'निमित्तांत' श्री. तात्यासाहेब केळकर सांपडले असल्यानें मी आज श्री. तात्यासाहेबांची मुलाखत घेतली. त्यावेळीं पुढीलप्रमाणे संभाषणे झालीं.

प्रतिनिधि—वै. कवडेशास्त्री यांनी उपोषण सुरू केल्याचें आपण वाचलेंच असेल.

केळकर—होय, वाचलें.

प्रति.—त्याला आपणहि एक कारण आहों.आपण सहभोजनाला गेला म्हणून पापनिवृत्ति होण्यासाठी शास्त्रीबोवांनी उपोषण सुरू केलें आहे.

केळकर—माझ्या जुन्या किंवा नव्या कोणच्याहि पापाच्या क्षालनाकरिता जर शास्त्रीबोवा उपवास करीत असतील तर ते माझ्यावर त्यांचे उपकार होतीलच; पण हल्लीं भूईमुगाचा हंगाम सुरू असल्यास कोणत्याहि प्रकारच्या उपवासामुळे स्वतः त्यांचेवरहि तो उपकार निराळ्या रीतीने होण्याचा संभव आहे ! पण विनोद सोडून दिला, आणि उपोषणांत कांही पुण्याई असली, तर ती माझ्याकरिता त्यांनी खर्च करावी इतका त्यांचा व माझा स्नेह खचित आहे.पण दुर्दैवानें,त्यांच्या उपवासाने निवृत्त होण्याइतकीं, माझीं मतें आता ऐलतीरावर राहिलेलीं नाहीत. मी सहभोजनाच्या पैलतीराला गेल्याने अतिक्रमण किंवा अत्याचार झाला असें त्याना वाटणें स्वाभाविक आहे. कारण ते स्वतः आचारधर्म कडकरीतीने पाळतात. पण गेल्या निदान पंधरा वर्षांचा काळ लक्षांत घेता, मी अस्पृश्यांच्या पंक्तीला बसलों ही अगदी नवीन किंवा प्रथमच गोष्ट घडली असें म्हणतां येत नाही. होमरूल लीगच्या चळवळींत ख्रिस्ती व मुसलमान यांच्याशीं आमच्यापैकीं पुष्कळांच्या पंक्ती मुंबईस झालेल्या आहेत. कॉंग्रेसच्या प्रसंगाने तर त्यानंतरच्या दहा वर्षांत कोणी कोणाच्या पंक्तीला बसावें याचा विधिनिषेधच राहिला नव्हता. अर्थात् अशा पंक्तीचें जेवण हें कांही त्याची हौस म्हणून माझें तरी घडलेलें नाही. कारण हें सर्व नैमित्तिकच होतें; व तोच प्रकार परवांच्याहि सहभोजनाचा झाला. पूर्वी सर्व्हंटस् ऑफ इंडिया सोसायटींत १९०७ सालीं मी मि. हेनरी नेव्हिनसन यांच्या पंक्तीला बसल्याचें मला आठवतें. तशाच प्रकारचें नैमित्तिक जेवण परवा तेथे झालेल्या सहभोजनाचें होतें. 'हिंदू अस्पृश्य' माझ्या पंक्तीला असल्याचा जे गवगवा करतात, ते ख्रिस्ती, युरोपियन, पार्शी, मुसलमान किंवा 'अस्पृश्येतर ब्राह्मणेतर' यांच्या पंगतसंगतीचा तितका बोभाटा करीत नाहीत. तेव्हा या सहभोजनाच्या प्रसंगीं मी हजर न राहणें म्हणजे, येऊन जाऊन हिंदूंतले अस्पृश्य तेवढे मला अपंक्त असें म्हणण्यासारखें उघडच झालें नसतें काय ? केवळ अस्पृश्यांशीं पंगत करणें हें जर धर्मदृष्ट्या पाप असेल, तर मग मी परधर्मीय व्हाइसरॉयांच्या पंक्तीला जेवलों ते पाप या सहभोजनाच्या पापाइतकें किंबहुना अधिकच खचित भरेल. तथापि मी हें मात्र सांगतों कीं, अस्पृश्यतानिवारणाचा जो प्रश्न हल्ली निघाला आहे, त्यांत सहभोजनाचा प्रचार किंवा उपदेश करणारांपैकीं मी नाही.माझ्यापासून वेगळ्या स्थितींतिल सनातनी लोकांना ती मजल अर्थात् फारच दूरची किंबहुना आतिक्रमणाचीच वाटेल. म्हणून अशा रीतीने त्यांना इरेला घालून त्यांच्या प्रामाणिकपणाच्या मर्यादेचा अंत कोणी पाहू नये. मात्र सनातनी लोकांनाहि आता अस्पृश्यतानिवारणाचें तत्त्व पटूं लागले आहे हें खास. आणि म्हणूनच त्यांनी निदान सार्वजनिक प्रसंगीं व सर्व सार्वजनिक स्थळीं स्पृश्यास्पृश्य भेदाभेद न मानला तर त्यांनी सत्य तत्त्वाला तितका तरी करभार दिला म्हणून मी समाधानच मानीन.

पं. मदन मोहन मालवीय झाले तरी आज याहून अधिक काय करीत आहेत? कारण अस्पृश्यता घालवावी असा सपाटून उपदेश करीत असताहि, ते माझ्यासारख्या दक्षिणी ब्राह्मणाच्या हातचें पाणी पिण्यासहि तयार होतील की नाही याची शंका वाटते. म्हणून हल्लीची चळवळ करणारांनाहि दुसऱ्या बाजूने माझें असें सांगणें आहे कीं, एरवी सुद्धा असे सहभोजनाचे प्रसंग वारंवार येणाऱ्या माझ्यासारख्या मनुष्याला जरी त्यांनी सहभोजनाला बोलाविलें, तरी त्यांनी सनातनी लोकांना तसा आग्रह करूं नये, व त्यांनी त्यास मान्यता दिली नाही तरी त्यांना नांवे ठेवूं नयेत."

# अस्पृश्यांचा देवालयप्रवेश

सांप्रत देशांतील पुढाऱ्यांच्या डोक्यांत अस्पृश्यतेचा विषय घोळत आहे. वटहुकुमांची दहशत बसून राजकीय चळवळ मंदावल्यामुळे जनतेचें लक्ष वेधून घेणाऱ्या व तिला कार्यांत गुंतविणाऱ्या एखाद्या चळवळीची गरज भासतच होती. अशा प्रसंगीं अस्पृश्यतानिवारणाची चळवळ उपस्थित झाली यामुळे कोणाहि देशहितचिंतकास बरें व वाटेल. अस्पृश्यतानिवारणाचा विषय महाराष्ट्रीयास तरी नवीन आहे असें नाही. सुमारें पंचवीस वर्षांपूर्वी कित्येक महाराष्ट्रीय सुशिक्षितांचें लक्ष अस्पृश्यांच्या दुःस्थितीकडे वळलें व त्यांच्या उद्धारासाठीं लहानमोठ्या प्रयत्नांना सुरुवातहि झाली. तेव्हापासून या विषयाची उजळणी महाराष्ट्रांत अनेकवार झाली आहे. म. गांधी यांनी असहकारितेच्या अमदानींत आपलें सामर्थ्यवान एन्जिन सदर चळवळीस जोडल्यामुळे तिने धावूं लागून पुढील मार्गांवरील काही स्टेशनें जलद घेतलीं यांत शंका नाही. सन १९२० च्या सुधारणा-कायद्याप्रमाणे लोकल बोर्डें, म्युनिसिपालिट्या व लोकशिक्षण हीं खातीं लोकनियुक्त दिवाणांच्या हातीं आल्याने अस्पृश्यांच्या मुलांस स्पृश्यांच्या शाळेंत बसण्याची व अस्पृश्यांच्या मोठ्या माणसांस सार्वजनिक धर्मशाळेंत निजण्याची सवलत मिळून सदर समाज स्पृश्यांच्या सन्निध येण्याचा मार्ग हळूहळू आक्रमूं लागला. तसेंच अस्पृश्यांच्या गरीब मुलांना शिकण्याकरिता नादाऱ्या व जेवण्याकरिता मोफत बोर्डिंगें यांचा लाभ होऊन शिक्षणांतहि त्यांचें पाऊल पुढे पुढे पडत चाललें.

वरील सुधारणांचा अन्य रीतीनेहि एकंदर हिंदु जनतेवर इष्ट परिणाम घडून आला. त्या सुधारणांनी अस्पृश्यांच्या हीनावस्थेची टिमकी गांवगन्ना वाजवून स्पृश्य समाजास जागें केलें व डोळे चोळून अस्पृश्यांकडे नव्या दृष्टीने पहावयास शिकविलें. त्या टिमकीच्या पाठोपाठ म. गांधींच्या प्रेरणेने राष्ट्रीय सभेचा नगारा झडला व त्याचा आवाज साऱ्या देशभर ऐकूं गेला. काँग्रेस ही संस्थाच अशी आहे कीं तिचें अस्पृश्यतानिवारण हें फार तर कर्तव्य होतें, पण इतिकर्तव्य होऊं शकत नाही. राजकीय स्वातंत्र्य या प्रधान कार्याच्या लवाजम्यांत अस्पृश्यतानिवारणाचा एक बारगीर सामील व्हावयाचा इतकेंच. काँग्रेसच्या कार्यापेक्षा या बाबतींत अधिक टिकाऊ कामगिरी जर कोणाकडून झाली असली तर ती वर लिहिल्याप्रमाणे स्थानिक स्वराज्यसंस्था व शिक्षणखातें यांजकडूनच; तथापि काँग्रेसने जनतेच्या विरोधास विरजण घालून तिची अस्पृश्यतानिवारणास मूक सहानुभूति मिळविली, याची किंमत गल्ल्याच्या पेटींतील रोकडीप्रमाणे मोजून दाखवितां येण्यासारखी नसली तरी बुद्धीस पटणारी व मोठी वाटणारी आहे हें कोणीहि कबूल करील.

काँग्रेसच्या नगाऱ्याने स्पृश्य हिंदु समाज डोळे उघडून अस्पृश्यांकडे पाहूं लागलाच; पण उलटपक्षीं अस्पृश्यांच्या पुढाऱ्यांनीहि स्पृश्यांकडे आपले वटारलेले डोळे लावले. त्यांचीं मनें अस्वस्थ झालीं व त्यांना अस्पृश्यतानिवारणाच्या बाबतींतील उशीर सहन होईनासा झाला. स्पृश्यांचीं मतें बदलून ते अस्पृश्यांस कालान्तराने आपल्या शेजारीं ममतेने बसवून घेतील तोंपर्यंत वाट पाहण्याचा सल्ला त्यांनी झिडकारला व ते अगदी हातघाईच्या सत्याग्रहावर आले. सत्याग्रहाच्या जोरावर महाड येथील चवदार तळ्याच्या पाण्याची चव चाखण्याचा त्यांनी प्रयत्न केला. पुण्यातील पर्वतीच्या दर्शनाकरिता तिच्या कोटावर त्यांनी मोर्चे लावले व नाशिकच्या काळाराममंदिरापुढे धरणें धरलें. इतकेंच काय, पण पंचवटीच्या कुंडांतील पाण्यांत बुडी मारण्यासहि ते निघाले. अस्पृश्यांत संचरलेल्या या वीरश्रीचें श्रेय अस्पृश्यांचे डॉ. आंबेडकरप्रभृति पुढारी घेऊं म्हणतील तर त्यांस राष्ट्रीय सभा तें सारें श्रेय केव्हाहि मिळूं देणार नाही. कारण त्या श्रेयांत तिचा वाटा फार मोठा आहे. तरीदेखील अस्पृश्यांचा सत्याग्रहाचा मार्ग राष्ट्रीय सभेला किंवा तिचे पुढारी म. गांधी यांना मान्य आहे असें म्हणणें अन्यायाचें होईल. गांधीजींस अस्पृश्यांचा मंदिरात प्रवेश झाल्यास हवा आहे, पण तो सत्याग्रहापेक्षा मतपरिवर्तनाने घडून येणें इष्ट व श्रेयस्कर वाटतें.

गांधीजींनी अस्पृश्यांस हिंदु मंदिरांच्या दारापाशीं आणून सोडलें आहे व आता फक्त त्या दाराच्या आतील प्राकारास त्यांचे पाय लागावयाचे उरले आहेत. अस्पृश्य दार ठोठावीत आहेत व गांधीजी देवाच्या पुजाऱ्यांना तें दार उघडण्याची विनंति करीत आहेत. मंदिरप्रवेशाची तळमळ अस्पृश्यांचें हृदय ज्या तीव्रतेने पोळीत आहे ती तीव्रता गांधीजींनाहि अन्तर्यामीं हुळहुळें करून सोडीत आहे. हिंदु समाजाचें मत बदलण्यास आणखी दहा पांच वर्षे लागणार असतील तर गांधीजींनाहि तावत्कालपर्यंत दम धरवणार नाही. पण त्यांचा उपाय देवालयाच्या दारापाशीं धरणें धरण्याचा नसून प्रायोपवेशनाचा आहे. त्यांचें मागचें प्रायोपवेशन मॅकडोनाल्डकृत अस्पृश्यविषयक निर्णय बदलून घेण्या-

करिता होतें. तर त्यांचें पुढचें प्रायोपवेशन मंदिरप्रतिबंध उठविण्याकरिता आहे. येत्या सहा महिन्यांत अस्पृश्यांना देवदर्शनाकरिता हिंदु मंदिरांचीं कवाडें न उघडल्यास मी प्रायोपवेशन करीन अशी गांधीजींनी स्पृश्य हिंदु समाजास धमकी दिली आहे. ही धमकी मलबार प्रांतांतील केळपन्न ऊर्फ कल्लापाची नव्हे किंवा दुसऱ्या कोणा लुंग्यासुंग्याची नव्हे. तथापि कल्लाप्पा झाला तरी तो प्रायोपवेशन करून प्राण सोडूं लागताच तिकडील हिंदूंची पांचावर धारण बसलीच. कल्लाप्पाच्या बाबतींत लोकांच्या मनाची ही अवस्था झाल्यास महात्माजींच्या धमकीमुळे सारें राष्ट्र एका टोकापासून दुसऱ्या टोकापर्यंत हवालदिल व्हावें व त्यांतील कार्यकर्त्यांनी जिवाचा आटापीट करावा यांत अस्वाभाविक काय आहे ?

विजेची कळ दाबल्याबरोबर शहरांत रस्तोरस्तीं विद्युद्दीपांची दिवाळी दिसावी त्याप्रमाणे गांधीजींचा निर्धार ऐकताच देवालयांत निजलेल्या नारायणापासून आदेश मिळाल्यासारखा होऊन शेंकडो मंदिरांचे मिटलेले दरवाजे खडाखड उघडल्याचा आवाज ऐकूं आला. ते लाकडी निर्जीव दरवाजे सताड उघडले असता त्यांच्या आवाजाने मनुष्यांच्या अन्तःकरणाचीं कपाटें न उघडलीं तर तीं मनुष्यें सजीव कसलीं ? नव्या आवेशाच्या भरात ज्याने त्याने आपल्या मालकीचें देऊळ उघडावें हें वाजवी होय. पण कित्येकांच्या अंगांत संचरलेला उत्साह इतका अनावर झाला कीं, त्यांनी ज्याचा दरवाजा आपण उघडीत आहों तें देऊळ आपलें कीं लोकांचें याचाहि विचार केला नाहीं ! याचें नांव उत्साह ! हा उत्साह सदोष असला म्हणून अक्षम्य आहे असें कोण म्हणेल ? पुरुषांच्या मर्दपणास शोभणारेंच हें कृत्य होय. परंतु स्त्रिया या कितीहि शूर बनल्या तरी अबलाच. कोठल्याशा स्पृश्य स्त्रियांनी अस्पृश्य स्त्रियांना आपल्यासारख्या उंची साड्याचोळ्या नेसवून द्वारपाळांच्या पहाऱ्यांतून त्यांचा देवालयांत प्रवेश करविला. ही एका जातीची चोरीच म्हणा. पण त्या चोरीचें पाप लागतें न लागतें तोंच तें देवदर्शनाने फिटल्यावांचून राहिलें असेल काय ? काही गांवांतून एक दिवस अस्पृश्यांचा मंदिरप्रवेश होऊन मावळला तर दुसरा दिवस त्या बाटलेल्या देवळाची पाखाळणी पाहत उगवला !

अस्पृश्यांचा विटाळ सरकारी नियमांनी जितका जावयाचा तितका गेलाच आहे. ज्याची जबाबदारी स्पृश्य जनतेवर आहे तो विटाळ दोन ठिकाणचा; एक वर लिहिल्याप्रमाणे देवालयातला व दुसरा पाणवठ्यावरचा. प्रकृत स्थळीं फक्त देवालयापुरताच विचार कर्तव्य आहे. अस्पृश्य लोक हिंदु आहेत, तेव्हा त्यांना हिंदु देवतांच्या दर्शनाची तृषा लागणें क्रमप्राप्तच समजलें पाहिजे. महाराष्ट्रीय संतजनांपैकीं भोळा भक्त चोखामेळा. याने पंढरीच्या पांडुरंगाची भक्ति केल्यास पाचशेंहून अधिक वर्षें झालीं. त्यालाहि पंढरिरायाचें दर्शन घडलें नसावें. त्याच्यामागून शेंकडों हजारों महार–मांग, चांभार पंढरीचे वारकरी बनले. त्यांनी टाळ मृदंग वाजविले, पताका फडकविल्या, फड स्थापले व खुद्द पांडुरंगाच्या भक्तिपेठेंत धर्मशाळाहि बांधल्या. पण त्यांना भक्तीने आर्त झालेला आत्मा चंद्रभागेंत बुडी मारून व पांडुरंगाच्या देवालयाच्या शिखराचें दर्शन घेऊनच शांत राखावा लागला. शिखराचें दर्शन घेऊन परत फिरण्याची ही तपश्चर्या पाचशें वर्षांनंतरहि फळास येऊं नये काय ? ज्या शिखराचें दर्शन त्यांनी पिढ्यानुपिढ्या घेतलें त्या शिखराखालच्या गाभाऱ्यांतील कानड्या विठ्ठलाचें विटेवर पाय व कटीवर कर ठेवून उभें असलेलें सावळें सुंदर ध्यान अद्यापिहि त्यांच्या नजरेस पडूं नये काय ? त्यांचे हे हाल पाहून ताटकळलेला विठ्ठल आता कंटाळला नसेल काय ? अस्पृश्यांनी स्पृश्यांजवळ येण्याकरिता केलेली ही उमेदवारी आता पुरे झाली नाही काय ? म. गांधींसारखा सत्पुरुष अस्पृश्यांची कड घेऊन उठला आहे त्याअर्थी ह्या अन्यायाविरुद्ध ईश्वरहि रागावला आहे असेंच समजणें भाग पडतें.

तसें म्हटलें तर अस्पृश्यांचें मागणेंहि 'लई' नाही. ते फक्त देवदर्शन मागत आहेत व तूर्त त्यांनी तेवढेंच मागावें. ती मागणी पुरवल्याने भ्रष्टाकार होईल ही जी स्पृश्य वर्गास भीति वाटत आहे ती अनुभवानीं दूर झाल्यावर त्यांना आपल्या बरोबरच्या इतर सवलती देण्यास स्पृश्यांना धीर येईल. स्पृश्य व अस्पृश्य यांनी या बाबतींत कोणतें धोरण ठेवावें हें पाहावयाचें झाल्यास असें म्हणण्यास हरकत नाही कीं अस्पृश्यांनी आपल्या गरजेवर लक्ष द्यावें व स्पृश्य हिंदूंनी ते आपले बंधु आहेत याची जाणीव बाळगून त्यांना सार्वजनिक दृष्टीने आपल्या बरोबरीला आणण्याची जबाबदारी ओळखावी. अशा रीतीने दोघांनी दोन बाजू सांभाळल्या असता उभयतांना भांडणाचें अमंगळ तोंडहि पाहावें लागणार नाही. हक्काची चढाची भाषा वापरल्यानेच भांडणें उत्पन्न होतात. म. गांधींनी प्रत्येक चळवळीस 'सविनय' या सोज्ज्वळ शब्दाची जोड देऊन तिला उच्च स्थानावर चढविण्याचा प्रघात पाडला आहे. त्याचें इंगित अद्यापि कित्येक अस्पृश्य पुढाऱ्यांना नीट उमजत नाही ही दुःखाची गोष्ट होय. विनय-

शीलतेने जर लोकांची मनें काबीज होतात तर देवळेंहि सहज काबीज होतील. अर्थात् त्याला थोडी गम खावी लागेल, पण काम मात्र खात्रीने फत्ते झाल्यावांचून राहणार नाही. नाशिकच्या चळवळीचें येथेच घसरलें. त्यामुळे अस्पृश्यांच्या चढेल वर्तनाने स्पृश्यवर्गाच्या मनाला इतकी अढी बसली आहे कीं इतरत्र मंदिरप्रवेशाची चळवळ यशस्वी होत असता नाशिक येथे काळ्या रामापाशीं तिचें नांवहि निघत नाही.

अस्पृश्यांनी तूर्त आपल्या चळवळीची गांठ देवदर्शनाशीं घालावी. त्यांतच त्यांच्या देवभक्तीची खरी कसोटी आहे. मंदिरप्रवेशाचे बाबतींत देवदर्शनाशिवाय हक्काच्या किंवा समानतेच्या वादांत ते शिरतील तर त्यांच्या चळवळींतील सात्विक भाव नष्ट होऊन तिला राजकारणाचा, राजस किंवा तामस वृत्तीचा स्पर्श झाल्याने देवदर्शन हें निवळ सोंग अथवा थोतांड आहे असा ते जनतेचा घातक समज करून देतील. एकदा राजकारणाच्या वळणावर हा विषय गेला म्हणजे त्यांतून अनेक कुलंगडीं निघाल्यामुळे तो सुखाने लवकर न संपता त्याच्या पायीं स्पृश्यास्पृश्यांचीं डोकीं फुटतील, रणें माजतील व कित्येकांस देवदर्शनाऐवजी मृत्यूचें दर्शन मात्र घडेल. हा परिणाम स्पृहणीय आहे काय याचा विचार अस्पृश्यांच्या पुढाऱ्यांनी अवश्य करावा.

हिंदुधर्मांत जाति व पंथ अनेक आहेत. तसेंच प्रत्येक जातीचे व पंथाचे विधि, नियम व वहिवाटीहि विविध स्वरूपाच्या आहेत. या कारणाने देवालयप्रवेशाच्या बाबतींत अस्पृश्यांना सर्वसामान्य असा एक नियम घालून देणें कठिण आहे. साधारणपणें स्पृश्य लोक जेथपर्यंत जाऊं शकतात तेथपर्यंत अस्पृश्यांनी जावें असें म्हटलें तरी त्यांत अनेक वादस्थळें संभवतात. कारण यासंबधांत सर्व स्पृश्यांनाहि एकच नियम लागू नाही. स्पृश्यांतहि ब्राम्हण, लिंगायत, गुरव, गोसावी व इतर स्पृश्य हिंदु हे भेद आहेत व त्या भेदांस अनुसरून दर्शनाच्या व देवास स्पर्श करण्याच्या वेगवेगळ्या वहिवाटी आहेत. ब्राह्मणांतहि जो सोवळा व स्नात असेल त्यास विवक्षित देवास गाभाऱ्यांत शिरून पाणी घालण्याची व स्पर्श करण्याची मोकळीक आहे. पण तो सोवळा व स्नात नसल्यास त्याला बाहेरूनच दर्शन घेण्यानें समाधान मानावें लागतें. ही जर खुद्द स्पृश्यांची स्थिति तर अस्पृश्यांनीं त्या भानगडींत शिरण्यांत अर्थ काय? या दृष्टीने पाहिल्यास अस्पृश्यांनी दर्शनसुखावरच तूर्त सतुष्ट राहणें त्यांना व अखिल हिंदु समाजाला हिताचें होय. स्पृश्यांची देव-दर्शनाच्या बाबतींत नीट समजूत घातली असता त्यांचा विरोध वितळण्यास विलंब लागणार नाही असें वाटतें.

# स्फुट सूचना

१ नाशिक जिल्ह्यांतील मालेगांव येथे मुसलमान लोक गेल्या गणेशोत्सवांत दंग्याच्या जोरावर हिन्दूंना आपला मठांतील गणपति बसवूं देईनात म्हणून तेथील सरकारी अधिकाऱ्यांनीहि त्यांस तो बसवूं दिला नाही. अशा रीतीने त्या वेळीं मुसलमानांनी हिंदूंवर जो जय मिळविला त्याची पुण्याई त्यांना सदैव उपयोगी पडणार असा सुमार दिसतो. कारण त्याच मालेगांवांत भाद्रपदांतील गणेशोत्सवाप्रमाणेच आश्विनांतील नवरात्रांत बालाजीचा उत्सव होतो व त्याची रोज रात्रीं मिरवणूक निघते. कोणी भक्ताने बालाजीस आपल्या घरीं पूजेकरिता व आरतीकरिता बोलावलें असता त्याच्या घरीं बालाजीस रस्त्याने मिरवीत नेण्यांत येतें. या वहिवाटीस अनुसरून एका हिंदूने यंदा ता. ८ ऑक्टोबर रोजीं बालाजीची मिरवणूक आपल्या घरीं बोलावली. पण हा दुर्दैवी प्राणी ज्या मठांत गणपति बसविण्यास मुसलमानांच्या दंग्यामुळे प्रतिबंध झाला त्या मठासमोर व राजेबहादूर यांच्या मागील चाळींत राहतो. तेव्हां हिंदूंनी आपल्याकडून मोठ्या सावधगिरीने वागण्याचा प्रयत्न केला. त्यांच्या पुढाऱ्यांने नाशिक येथील पोलिस सुपरिंटेंडेंटसाहेबांच्या कानावर मिरवणुकीची गोष्ट घातली. त्या वेळीं सुपरिंटेंडेंटांचें मन निर्विकार होतें असें दिसतें. त्यांनी सरळ बुद्धीने व न्यायाला धरून त्या हिंदूच्या घरीं बालाजीची मिरवणूक नेण्यास परवानगी दिली.

---

२ त्याप्रमाणें हिंदूंनी मिरवणूक काढली व ती विनधोकपणाने रस्त्याच्या टोकापर्यंत जेमतेम आली. तोंपर्यंत कोणाहि मुसलमानास सदर मिरवणुकीला प्रतिबंध करण्याची लहर लागली नाही. त्याला लहर लागली असती तर मिरवणूक कसची पार पडते? कारण हिंदूंचे हक्क रक्षण करण्यापेक्षा मुसलमानांची लहर राखणं हेंच मालेगांवचे अधिकारी आपलें कर्तव्य समजतात हें मागील गणेशोत्सवांत सिद्ध झालेंच आहे. पण या खेपेचें नवल असें कीं ज्या मिरवणुकीस गांव-

च्या रयतेपैकीं कोणाहि मुसलमानास अडथळा करण्याची बुद्धि झाली नाही तो मिरवणूक एका मुसलमान पोलीस कॉन्स्टेबलानेंच रोखून धरली. रस्त्याने मिरवणूक नेण्याची आमची पूर्वापार वहिवाट आहे, मशिदीवरून जातांना आम्ही वाद्यें वाजविणार नाही असें हिंदूंनी पोलीस शिपायास परोपरीने सांगून पाहिलें. पोलीस पडला मुसलमान; तो या युक्तिवादास व आर्जवास कसला जुमानतो? तो मिरवणूक नुसती रोखूनच थांबला नाही तर तो जवळच्या मशिदींतील मुसलमान पंचांस हाका मारूं लागला. अशा रीतीने मुसलमान भाईंना बोलावून तो काय करणार होता? 'माझें सामोपचाराचें कोरडें बोलणें ऐकत नसाल व तुम्हांला रोख दंगाच पाहिजे असेल तर ही पहा दंग्याची तयारी' असें हिंदूंना दाखविण्याचा त्याचा मुसलमानांना बोलावण्यांत हेतु होता काय?

# कार्यकर्त्यांस विधायक सूचना

(ले.–श्री. श्रीपाद महादेव माटे)

अस्पृश्यता–निवारणाच्या कामांत आता पुष्कळच मंडळी पडत आहेत. अस्पृश्यांचें गान्हाणें पटून हें काम करावयास लोक उत्सुक झाले असता त्यांनी पुढील कांही विधायक सूचना ध्यानांत ठेवल्या तर मध्या चालू असलेली देवालयप्रवेशाची चळवळ यशस्वी करण्यास त्यांना बरीच मदत होईल असें वाटतें. हिंदु समाजाच्या धर्मकल्पना, आहारविहार, समजुती, निरनिराळीं मतान्तरें, श्रेष्ठ-कनिष्ठ भाव, जातिमत्सर यांचा अंमल हिंदु समाजावर आजमितीस कसकसा चालू आहे इकडे लक्ष देऊन पुढील विधायक सूचना करीत आहे. कोणतीहि चळवळ यशस्वी व्हावयास ती, होईल तितकी, इतर गोष्टींपासून सुटी करावयास हवी असते हें व्यावहारिक मर्म ओळखून, या कामासाठी गांवोगांवीं प्रस्थापित होत असलेल्या मंडळांनी पुढील सूचनांचा अंगीकार करावा अशी माझी त्यांस विनंति आहे.

(१) ही चळवळ कायद्याच्या बळावर किंवा जबरदस्तीने करावयाची नसून मत बदलून करावयाची आहे हें धोरण त्यांनी पत्करावें.

(२) सुधारणाविषयक विचारांची गल्लत त्यांनी करूं नये. रोटीबेटी–व्यवहाराविषयीं समाजापुढे त्यांनी बोलूं नये. कारण देवालयप्रवेश, रोटी-व्यवहार, बेटी–व्यवहार इत्यादींपैकीं प्रत्येक बाबीचें बोलणें निरनिराळें आहे. प्रत्येकीचा न्यायान्याय, युक्तायुक्तता, भौतिक शास्त्रविचार, संस्कृति–कल्पना, हीं सर्व निरनिराळीं असूं शकतात. म्हणून विषय-संकर करूं नये. सर्वांच्याहि वर व्यवहार हा चळवळीच्या यशासाठी जास्त आदरणीय समजावा.

(३) मुख्यतः मोठ्या वस्तीच्या गांवीं व जेथे जातिविद्वेष व मतमतांतरें फार आहेत त्या ठिकाणीं निरनिराळ्या जातींतील सुधारकांचा एक संघ बनवावा. या संघांतील सर्व सुधारकांनी या देवालयप्रवेशाच्या बाबतींत 'अमुक एक मर्यादा आपण पत्करावयाची' असें आपापसांत बंधनकारक असें धोरण ठरवावें. त्या त्या जातीच्या सुधारकाने आपापल्या जातीपुढे जाऊन प्रतिपादन करावें, त्यांचें मत बदलावें व त्यांचीं देवळें उघडण्याचा आग्रह करावा. यामुळे फार फायदा होईल. आपापल्या जातीच्या समजुती, वहिवाटी इत्यादींची त्याला चांगली ओळख असल्यामुळे व तो स्वकीयांपुढेच बोलत असल्यामुळे त्यांचा मनोनुनय करण्याची आवश्यकता त्याला पटेल. 'आम्ही कोणी श्रेष्ठ जातीचे म्हणून तुम्हांस सांगावयास आलों आहों' हा दिमाख मिरविण्याची संधि वरिष्ठांना राहणार नाही; "तुम्हीं काय केलें आहे, म्हणून आम्हांला येऊन सांगतां?" असें इतरांना टाकून बोलण्याची वृत्ति यांतून आपोआप गळेल आणि आपले पूर्वीचे सूड उगविण्याला ही संधि बरी आहे असें पाहून पुढे येणारे जे संधिसाधक असतात त्यांना आळा बसेल. अर्थात् ज्यांनी आपल्या आजवरच्या वर्तनाने सर्व प्रियता प्राप्त करून घेतली असेल त्यांनी कोणापुढेहि जाऊन बोलावें; त्यांच्या प्रतिपादनास इतर जातींचे लोक अंतरूं नयेत हें निःसंशय खरें आहे.

शहरांतून त्या त्या देवळाच्या भोवतालच्या वस्तींतीलच स्वयंसेवक कामासाठी काढावे. वर दिलेल्या १ व २ या कलमांत सांगितलेलें धोरण आपणांस मान्य आहे असें प्रतिपादकांनी स्वच्छ सांगावें. "अस्पृष्ट लोकांस जरी देवालय-प्रवेश मिळाला तरी आम्ही त्या ठिकाणीं दर्शनपूजन, कथाकीर्तन इत्यादींसाठी जात राहूं" अशा अर्थाचीं पत्रकें काढून, घरोघरीं हिंडून, पुरुष-बायका या सर्वांच्या पसंतीबद्दलच्या सह्या यावर घ्याव्या. याने दोनतीन गोष्टी घडून येतील. जबाबदारी सामुदायिक होईल. लोकमत काय हें स्वच्छ दिसेल. आपल्या देवळांत कोणी येतील कीं नाही, आपल्याला

कांहीं चट्टा बसेल कीं काय व पवित्रपणाच्या कल्पनेंत आपली पायरी कमी होत जाईल कीं काय हा देऊळवाल्यांची सर्व भीति नष्ट होईल. इतकी अनुकूलता असून सुद्धा देऊळवाला बधेच ना, तर काय करावयाचें हा पुढचा प्रश्न आहे.

गांवांतील भिन्न भिन्न जातीय श्रेष्ठ लोकांचें एक मंडळ बनवावें व देवळाला कोणी पंच, ट्रस्टी अशासारखे चालक असले तर त्यांच्याशीं विचारविनिमय करावयास व त्यांना आपल्या मताचे करावयास या श्रेष्ठ लोकांनी त्याजकडे जात रहावें.

हें सत्या घेणें इत्यादि काम चालू होण्याचे आधी शुद्ध आणि सात्विक प्रतिपादन मात्र अखंड ठेवावें. याची जरुरी सर्वत्रच आहे. हें न करतांना केवळ सत्या गोळा करावयास आपण गेलों तर लोक विरुद्ध आहेत असा कयास मात्र गळ्यांत घेऊन बसूं. प्रतिपादन यथायोग्य न करतां जे अशा सत्या गोळा करतील त्यांची फसगत होईल व लोकमत विरुद्ध आहे हें सत्यांनिशीं ठरवून ते आपले काम आपणच बिघडवितील. यासाठीं ३ ऱ्या सूचनेंत जो संघ म्हणून सांगितला त्यांतील सभासद हे उत्तम प्रकारचे प्रतिपादक असावेत.

वरील सूचना आपले काम व्यवहार्य बनविण्यासाठीं केलेल्या आहेत. यांपैकीं प्रत्येक सूचनेवर तो तो विषय विशद व्हावा म्हणून, स्वतंत्र लेख लिहावयास हवा. तें काम माझी नादुरुस्त प्रकृति जसजशी बरी होत जाईल तसतसें मी जरूर करीन. माझें मत कोणत्या विषयासंबंधी खरोखरीच काय आहे व तें तसें कां असावें हें सांगण्याचा हक्क सर्वथा माझाच आहे व तो मी यथाकाल बजावीत राहीन.

# संस्थानिक व फेडरेशन

( ले—प्रो. ग. र. अभ्यंकर. )

## उत्तरार्ध

ब्रिटिश सरकारने या व्यवस्थेस मान्यता देण्याचें कारण याबरोबरच ध्यानांत ठेवणें जरूर आहे. हिंदुस्थानांत स्वराज्य झालें व जबाबदार राज्यपद्धति अस्तित्वांत आली आणि सार्वभौम सत्ताहि या मध्यवर्ती सरकाराच्या हातीं राहिली तर आपले सुखसोहळे कसे चालणार ही गोऱ्या नोकरशाहीस मोठी विवंचना पडली. गव्हर्नर वगैरे बड्या लाटांच्या संस्थानांत होणाऱ्या धूळभेटी, त्यांच्या मिरवणुकी, त्यांचें राजवैभवास शोभण्यासारखें स्वागत, त्यांना देण्यांत येणाऱ्या मेजवान्या, शिकारीसारखे त्यांचे पुरविण्यांत येणारे शोक, संस्थानिकांकडून देण्यांत येणाऱ्या खैराती, त्यांच्या इष्टमित्रांना मिळत असलेल्या सवलती, वशिल्यांच्या तट्टांकरिता संस्थानिकांचीं राखीव कुरणें व लोकशाहीला तोंड देण्याकरिता संस्थानिकाचा पाठिंबा व मदत आणि लोकशाहीच्या कचाट्यांतून मुक्त केल्यामुळे उपकृत अशा संस्थानिकांकडून आपल्या सर्व धोरणाला व आपल्या हितसंबंधाला मिळणारें खात्रीचें साहाय्य या सर्व गोष्टींचा मनमुराद फायदा घेण्यासाठी संस्थानिक व्हाइसरॉयांच्या कह्यांत ठेवणें व लोकशाहीच्या स्वराज्याच्या ताब्यांत ते न देणें हें ब्रिटिश सरकारास अत्यंत अवश्य वाटत होतें. याचसाठी संस्थानांचे संबंध खुद्द बादशहांशीं आहेत व संस्थानिकांचें नियंत्रण बादशहांच्या प्रतिनिधींच्या म्हणजे व्हाइसरॉयांच्या हातीं असावें व ते भावी स्वराज्याच्या हातीं असूं नये या संस्थानिकांच्या कल्पनेस ब्रिटिश सरकारने आपली मान्यता दिली.

ब्रिटिश सरकाराचा दुसरा एक हेतु असा कीं, संस्थानिक हे पुराणमताभिमानी असल्यामुळे व ते सदा आपल्या कह्यांत ठेवण्यानें हिंदुस्थानांत स्वराज्याची घटना अस्तित्वांत आली तरी हिंदुस्थानांत खरें स्वराज्य नांदण्यास फारच कालावधि लागेल संस्थानिकांची ढाल पुढे करून आपली सत्ता व आपलें ऐश्वर्य पुष्कळ काळपर्यंत टिकेल असाहि ब्रिटिश सरकाराचा हेतु असून त्याच्या सिद्धिसाठीच सार्वभौमत्वाची सत्ता मात्र फेडरेशनकडे न ठेविता आपल्या हातीं ती पाहिजे या धोरणाचा त्यांनी जोराने पुरस्कार केला. तसेंच मध्यवर्ती सरकाराच्यां घटनेंत जबाबदारीची व्यवस्था ठेवण्यास ब्रिटिश सरकाराने अशी एक अट घातली कीं, फेडरेशनच्या घटनेमध्यें संस्थानिकांना सामील करून घेतलें तरच आपण मध्यवर्ती सरकारास जबाबदारीची सत्ता देऊं. वस्तुतः पाहिलें असता, संस्थानिकांचें फेडरेशनच्या घटनेमध्ये सामील होणें किंवा न होणें व मध्यवर्ती सरकारास जबाबदारीची सत्ता देणें यांचा अर्थाअर्थी कोणताहि संबंध नाही. संस्थानिक एकजीव होऊन फेडरेशनमध्ये सामील झाले नाहीत तरी ब्रिटिश

हिंदुस्थानांतील प्रांतांच्या घटकांमध्येच फेडरेशनची घटना सहज निर्माण करता येईल व तेथे जबाबदार राज्यपद्धतिहि स्थापन करतां येईलच. आयर्लंडाचे दोन भाग झाले तरी आयरिश फ्री-स्टेटमध्ये जबाबदार राज्यपद्धतीचें स्वराज्य स्थापन करण्यांत आलें आहे. अशा स्थितींत ब्रिटिश हिंदुस्थानापुरतेंच फेडरेशन स्थापन करण्यास किंवा जबाबदार राज्यपद्धति तेथे अस्तित्वांत आणण्यास कोणतीहि हरकत दिसत नाही किंवा कोणतेंहि बलवत्तर कारण निर्दिष्ट करण्यांत आलें नाही.

वस्तुस्थिति अशी असता संस्थानिकांना फेडरेशनमध्ये सामील केलें तरच जबाबदार राज्यपद्धतीची सत्ता देऊं अशी ब्रिटिश सरकाराची दुराग्रहाची शर्त काय म्हणून ? संस्थानिकांच्या उन्नतीचा उमाळा आजच ब्रिटिश सरकारास कां येत आहे ? ईस्ट इंडिया कंपनीकडून हिंदुस्थानाचें राज्य ब्रिटिश सरकाराकडे येऊन आज ७५ वर्षे होत आलीं. इतक्या काळांत संस्थानिकांच्या आर्थिक किंवा राजकीय उन्नतीबद्दल काडीची उत्कंठा किंवा यत्किंचितहि उमाळा ब्रिटिश सरकारास आला नाही. मग आताच संस्थानिकांच्याबद्दल इतकी कळकळ ब्रिटिश सरकारास कां वाटूं लागली याचाहि खुलासा करणें अवश्य आहे. थोड्याशा विचाराअंतीं ही कळकळ संस्थानिकांसाठीं नसून स्वतःसाठी आहे हें सहज दिसून येईल. भावी फेडरल घटनेची जी रूपरेखा सँकी कमिटीने मान्य केलेली आहे ती वरवर पाहणारासमुद्धा या घटनेमध्ये बहुजनसमाजाच्या मताची छाप कायदेमंडळांच्या दोनहि सभांवर पडेल असें मुळीच दिसत नाही. सेनेट किंवा विशिष्ट हितसंबंधांच्या वरच्या सभागृहांत संस्थानिकांचे ८० सभासद व मुसलमान व इतर अल्पसंख्याकांचे $\frac{1}{3}$ सभासद राहतील असें मानलें तरीसुद्धा या सभागृहांतील २०० सभासदांच्यापैकीं बहुसंख्याक सभासदांच्या वांटणीस फक्त ५५ च जागा येतील. अल्पसंख्याक व संस्थानिक यांच्यापैकीं एका तरी पक्षाचें पाठबळ बहुसंख्याकांना मिळाल्याखेरीज बहुजनसमाजाच्या लोकमताचा विजय या सभेंत कधीच होणार नाही.

संस्थानिक लोक व्हाइसरॉयाच्या अंकित राहिल्याने पोलिटिकल खात्याच्या सासुरवासामुळे त्यांचीं ८० मतें सदैव सरकारच्या हुकमतींत राहतील. अल्पसंख्याकांनाहि सरकाराने नोकऱ्याचाकऱ्यांतून व प्रातिनिधिक संस्थांतून लोकसंख्येपेक्षाहि जादा मताधिक्य दिल्यामुळे ते सरकाराचे सदैव ऋणी राहणार. एकूण सरकाराच्या इच्छेविरुद्ध कोणतीहि गोष्ट भावी घटनेमध्ये सेनेटच्या सभागृहांत होणें अशक्य आहे. त्याचप्रमाणे घटनेंतील लोकसभेमध्येहि ( Popular House ) संस्थानिकांचे $\frac{1}{3}$ सभासद व अल्पसंख्याकांचे $\frac{1}{3}$ सभासद असल्यामुळे बहुसंख्याकांचे या सभेमध्ये $\frac{1}{3}$ पेक्षा अधिक मतसामर्थ्य राहणार नाही. सारांश, आपल्या हातांतील संस्थानिकांच्या हुकुमी मताच्या जोरावर नोकरशाहीचा चळवळाट यापुढेंहि चालू राहील; व याच कारणाकरिता संस्थानिकांना घटनेंमध्ये सामील केलेंच पाहिजे व संस्थानिकांनी आपल्या अंकित राहिलेच पाहिजे या दोन अटी ब्रिटिश सरकाराने घातल्या आहेत. त्या मान्य झाल्या तरच हिंदुस्थानाला फेडरेशन मिळणार. या दोन अटी घालण्यांत ब्रिटिशसरकाराचा हेतु आपलें वर्चस्व चिरंतन राहावें एवढाच आहे. सारांश, भावी राज्यपद्धतीचा विचार केला असता आज सुमारें ७५ वर्षांत गोऱ्या नोकरशाहीचें राज्य हिंदुस्थानांत झालें तर यापुढेहि संस्थानिक व अल्पसंख्याक लोकांच्या विद्यमाने हीच नोकरशाही आपला योगक्षेम पूर्वीप्रमाणेच यथेच्छ चालविण्याच्या प्रयत्नांत आहे असें स्पष्ट दिसतें.

हा एक तिरंगी सामना आहे. संस्थानिकांना लोकशाहीची धास्ती वाटत आहे. अनियंत्रित सत्ता स्वराज्याखालीं सर्वस्वीं नष्ट होईल हें संकट त्यांना दिसत आहे. यासाठीच फेडरेशनच्या हातीं आपल्यावरील नियंत्रण नसावें असा त्यांचा अलीकडे पांच वर्षांचा प्रयत्न चालू आहे व तो यशस्वी झाला आहे. ब्रिटिश सरकाराला लोकशाहीकडे सत्ता देणें अवश्य वाटत असलें तरी हा राज्यसंन्यास करतांना शक्य तितकीं विघ्नें आणावीं व साधेल तितका काळ राज्यवैभव उपभोगावें हा त्यांचा हेतु असून याचकरिता त्यांनी वर नमूद केलेल्या दोन अटी घातल्या आहेत. सरकाराचें हें धोरण यशस्वी होणार असें दिसत आहे. या सामन्यांतील दुसऱ्या पक्षाची ही कारवाई आहे. या सामन्यांतील तिसरा पक्ष म्हणजे ब्रिटिश हिंदुस्थानांतील कांही राजकीय पुढारी. कोणत्याहि मार्गाने असो, कितीहि लुळें-पांगळें असो, फेडरेशन एकदा येथे स्थापन व्हावें अशी त्यांची उत्कट इच्छा आहे व ती साध्य होईल असा सुमार आहे. या तिरंगी सामन्यांत खऱ्या स्वराज्याचा किंवा खऱ्या लोकशाहीच्या प्रभावाचा कोठेंच ठाव लागत नाही. खरोखरी हा सामना चौरंगी व्हावयास पाहिजे होता. तो चौथा पक्ष म्हणजे संस्थानांतील प्रजाजन हा होय. परंतु संस्थानांतील ८ कोटी प्रजाजन हीं माणसें आहेत किंवा नागरिकांचे हक्क देण्याची पात्रता त्यांच्या अंगीं आहे अशी जाणीव संस्थानिकांस नाही व ब्रिटिश सरकारासहि नाहीं. ही आजमितीची शोचनीय स्थिति आहे.

# केळकरांचा मद्रासेकडील दौरा

शनिवारीं 'स्वदेशमित्रन्'च्या समारंभाची सभा संपतांच येथील महाराष्ट्रीय मंडळींनी श्री. केळकरांना सैदापेठ पार्कमधील सीमोल्लंघनसमारंभाला नेलें. हें ठिकाण शहराच्या सीमेवर असून तेथें एक मोठा बगीचा आहे. तेथे नव्या वसाहतींतील सर्व महाराष्ट्रीय मंडळी बायकामुलांसुद्धां सीमोल्लंघना-करिता जमली होती. व एखाद्या वनभोजना-प्रमाणें बहासह फराळाची छोटी आवृत्ति तेथे काढण्यात आली होती. तेथे सर्व मंडळींच्या ओळखी केळकरांना करून देण्यांत आल्या. पाऊण तास गप्पा-गोष्टी झाल्या व सोनें देऊन घेऊन झाल्यावर सर्व मंडळी परत आली. रात्रीं दिवाण बहादुर गोपाल स्वामी आयंगार (ए. रंगस्वामी आयंगार यांचे बंधु व मद्रास सरकारच्या पब्लिक वर्क्स खात्याचे सेक्रेटरी) यांनी केळकरांना भोजनाला बोलावलें होतें. त्या ठिकाणीं हिंदु व स्वदेशमित्रन् पत्राचे मालक, संपादक आणि व्यवस्थापक व सर अलाडि कृष्ण स्वामी अय्यर (हल्लीचे मद्रास चे अॅड्व्होकेट जनरल) वगैरे इतर मंडळी बोलावली होती.

## आर्डिनन्स बिलाचा निषेध

रविवारीं सकाळीं हिंदु पत्राच्या कार्यालयांत मद्रास येथील वर्तमानपत्रकर्ते, मुद्रक, संपादक, छापखानेवाले वगैरे लोकांची सभा भरविण्यांत आली होती. अध्यक्षस्थानीं केळकरांची योजना झाल्यावर रंगस्वामी आयंगार यांनी नवीन ऑर्डि-नन्स बिल व विशेषतः त्यांतील छापखाने व वृत्तपत्रें या संबंधीचा भाग या संबंधाच्या कलमाविरुद्ध निषेधप्रदर्शक ठराव मांडला. त्यावर श्री. टी. प्रकाशम्, गणेसन इत्यादि लोकांनी बरीच चर्चा केल्यावर तो व दुसरा एक ठराव पास करण्यांत आला. निषेधाचें पुढील कार्य करण्या-करिता मद्रासपुरती येथील नऊ दहा गृहस्थांची कमिटी नेमण्यांत आली, व हिंदुस्थानाच्या निरनिराळ्या भागांत अशा प्रकारच्या ज्या कमिट्या होतील त्यांच्याशीं सहकार्य करण्याविषयी मद्रासच्या या कमिटीला अधिकार देण्यांत आला. ऑर्डिनन्स बिलावरील सिलेक्ट कमिटी भरेल त्या वेळीं तिला उद्देशून कांहीं सूचना कराव्या कीं नाही हें नक्की ठरलें नाही. पण असेंब्लीच्या बिनसरकारी सभा-सदांना अशी विनंति करण्याचें ठरलें कीं, त्यांनी लोकहिताच्या व वृत्तपत्रांच्या दृष्टीने बिलांतील अपवादात्मक कलमांना कसून विरोध करावा, व जरूर तर शेवटच्या वाचनाचे वेळीं बिलाच्या पुढील कलमांत आपण भाग घेत नाही असें सरकारला बजावून त्या बिलापुरतें निघून जावें.

हा कार्यक्रम झाल्यावर ट्रिप्लिकेनमध्ये महाराष्ट्र असोसिएशनचें संमेलन मुद्दाम भरविण्यांत आलें होतें. त्या ठिकाणीं रा. केळकर यांना असोसिएशन-तर्फे मानपत्र देण्यांत आलें. डॉ. देवाजीराव हे सभेचे अध्यक्ष असून सेक्रेटरींनी मानपत्र वाचून दाखविल्यावर असोसिएशनचे उत्साही कार्यकर्ते रा. पिंगळे यांनें मराठींत भाषण झालें. सदर 'असोसि-एशन' मद्रास तंजावरकडील जुन्या वसाहतीच्या महाराष्ट्रीय लोकांची समिति असल्यामुळे, रा. केळकर यांनी ही जुनी वसाहत व महाराष्ट्रांतील इतर भाग यांचें दळणवळण, संघटन, वाङ्मयवृद्धि व सामाजिक दृढबंधनें नवीं उत्पन्न होण्यासारख्या परस्पर विवाहादि गोष्टी कशा कराव्या, व वाढवाव्या यासंबधाने उपयुक्त सूचनांनी भरलेलें असें भाषण केलें. या समारंभाला जुन्या वसाहतींतील अनेक महाराष्ट्रीय स्त्रिया हजर असून त्यांपैकीं कृष्णाबाई सव यांनी केळकरांना उद्देशून केलेलें पद म्हणून दाख-विलें, व शेवटीं 'भगवा झेंडा फडकत आला' हें पद म्हटल्यावर महाराष्ट्राच्या जयजयकारांत सभा समाप्त झाली.

## मानपत्रसमारंभ

लगेच तेथून अकरा वाजण्याचे सुमारास शहरा-च्या दुसऱ्या एका भागांत काँट्रॅक्टर भिडे यांच्या बंगल्यावर नव्या वसाहतींतील सर्व मंडळी जमली होती. तेथे येथील प्रसिद्ध महाराष्ट्रीय व्यापारी रा. कोटनीस यांच्या अध्यक्षतेखाली रा. केळकरांना मानपत्र देण्याचा समारंभ झाला. डॉ. कॅ. निंबकर यांनी प्रथम महाराष्ट्रमंडळ व बिल्डिंग ट्रस्ट यांची माहिती सांगून मानपत्र वाचून दाखविल्यावर हस्तिदंताच्या नक्षीने मढविलेल्या चंदनी पेटींत घालून तें केळकरांना समर्पण केलें. रा. केळकर यांनी नव्या वसाहतींतील महाराष्ट्रीयांनी मुख्य महाराष्ट्राशीं ऋणानुबंध ठेवल्याबद्दल त्यांचा गौरव केला. महाराष्ट्रीय या नांवाचा अभिमान त्यांनी धरला, तो कसा योग्य आहे हें सांगून कलकत्याच्या महाराष्ट्रीय निवासाप्रमाणे मद्रासेस-हि महाराष्ट्रीय पाहुण्याकरिता व मंडळाच्या कचेरीकरिता मालकीची इमारत करण्याबद्दल प्रत्यक्ष ट्रस्ट करून जें कार्य योजलें त्याची प्रशंसा केली, व बिल्डिंग फंडाला स्वतःची खासगी म्हणून शंभर रुपयांची देणगी दिली. या बिल्डिंग

फंडाला पुण्याचे लक्ष्मणराव फाटक यांच्या कंपनितर्फे कॉन्ट्रॅक्टर भिडे यांनी पांच हजार रुपयांची देणगी दिली. तसेच रा. कोटनीस व रा. दांडेकर यांनी प्रत्येकीं एक हजार रुपये दिले आहेत, व अशा रीतीनें मद्रासेंतल्या मद्रासेंतच आणखी कांही वर्गण्या जमवून अकरा हजार रुपयांची रक्कम जमा केली. या फंडांतून बांधल्या जाणाऱ्या इमारतींचा उपयोग महाराष्ट्रांतून येणाऱ्या प्रवाशांना–यात्रेकरूंना होण्यासारखा आहे. ही गोष्ट लक्षांत घेता बिल्डिंग फंडट्रस्टींना आणखी जी रक्कम लागेल ती बृहन्महाराष्ट्राकडून मिळण्यास फारशी अडचण पडणार नाही असा अदमास रा. केळकर यांनी सांगून त्या कामीं शक्य ती मदत आपण करूं असें आश्वासन दिलें. या समारंभाकरिता सौ. ताराबाई सहस्रबुद्धे यांनी केलेलें पद म्हणून दाखविण्यांत आलें. तसेच गायनाच्या मराठीकरणाला उद्देशून रा. केळकरांनी तयार केलेल्या पद्यांतील एक पद एका मुलीने मुद्दाम बसविलेलें म्हणून दाखविलें. हा समारंभ सुमारें १२। वाजता आटोपला. नंतर त्याच जागीं रा. केळकर यांना रा. भिडे कॉन्ट्रॅक्टर यांनी इतर महाराष्ट्रीय मंडळीसह मेजवानी दिली.

तिसरे प्रहरीं फिरून महाराष्ट्रीयांच्या जुन्या वसाहतीने मराठा एज्युकेशन फंड संस्थेकरिता विकत घेतलेल्या मौब्रेज रोडवरील सर सी. पी. रामस्वामी अय्यर यांच्या बंगल्यानजिक असलेल्या नव्या मोकळ्या जागेंत घातलेल्या मंडपांत सदर फंडाची वार्षिक सभा भरविण्यांत आली होती. अध्यक्षस्थानीं डॉ. रंगनाथराव हे होते. सभेंत वार्षिक वृत्तान्त हिशेब वगैरे मंजूर करण्यांत आले. त्या प्रसंगीं रा. केळकर यांचें शिक्षणफंडाच्या उपयुक्ततेविषयी व्याख्यान झालें, व त्यांनी पुण्यामुंबईकडील शिक्षण-फंडाची माहिती सांगितली. त्यानंतर जुन्या वसाहतींतील एक प्रमुख कार्यकर्ते रा. विनायकराव यांनी मराठींत भाषण करून नवीन खरेदी केलेल्या जागेचा उपयोग करण्यासंबंधी अनेक कल्पना व सूचना सांगितल्या. नंतर परलोकवासी दिवाण सर टी. माधवराव नानू यांचे नातु रा. कृष्णराव यांच्या पत्नींनी स्त्रीसमाजातर्फे केळकरांचे आभार मानले, व त्यांच्या मुलींने बिनाच्या साहाय्याने मराठी, तामीळ व हिंदी वगैरे निरनिराळया भाषेंतील गाणीं सुंदर रीतीने गाऊन दाखविलीं. अशा रीतीने हा बहुतेक सर्व दिवस मद्रासेंतील महाराष्ट्रीयांची जुनी व नवी वसाहत यांच्या संगतींत रा. केळकरांना आनंदाने घालविता आला. या दोनहि वसाहती मिळून महाराष्ट्रीयांची लोकसंख्या बरीच होते, आणि त्या दोहोंतील बुद्धिमान, संपत्तिवान व कर्तृत्ववान लोकांची संख्या लक्षांत घेतली म्हणजे त्यांना कोणतेंहि देशोपयोगी काम होण्याला मुळींच अडचण पडणार नाही, व मद्रासेसारख्या शहरांतहि त्यांना आपल्या स्वतःचें म्हणून स्थान आंखतां येईल असें वाटण्याला पुष्कळ जागा आहे.

यानंतर रा. केळकर यांनी स्वराज्य पक्षाचे पूर्वीचे सभासद व राष्ट्रीय सभेचे एक वेळचे अध्यक्ष सुप्रसिद्ध श्रीनिवास आयंगार व लिबरल पक्षाचे येथील पुढारी सर शिवस्वामी अय्यर वगैरे गृहस्थांच्या गांठी घेऊन चर्चा केल्यावर स्वदेशमित्रन् पत्राच्या जागेंत कारखान्यांतील सर्व लोकांना रा. केळकर यांच्यासह मेजवानी देण्यांत आली, व अशा रीतीने रविवारचा सकाळपासून संध्याकाळपर्यंत एकसारखा पुरून उरणारा कार्यक्रम समाप्त झाला.

# पुणे–सार्वजनिक सभा

## कारभारी मंडळाची सभा

ता. ५ आक्टोबर १९३२ रोजीं सार्वजनिक सभेच्या कारभारी मंडळाची सभा भरली होती. या सभेंत पुढीलप्रमाणे ठराव मंजूर करण्यांत आले.

(१) इंग्लंडचे मुख्य प्रधान मि. रॅम्से मॅक्डोनाल्ड यांनी आपला ज्ञातिविषयक निर्णय जाहीर करून अस्पृश्यांना स्वतंत्र मतदारसंघ देऊन स्पृश्य हिंदूंतून फोडले ही गोष्ट बदलून घेण्याकरिता म. गांधी यांनी प्राणान्तिक प्रायोपवेशन सुरू केलें. त्यांतून ते ईश्वराच्या कृपेने सुखरूपपणें पार पडले याबद्दल ही सभा त्यांचें मनःपूर्वक अभिनंदन करीत आहे.

( २ ) शीख, मुसलमान, ख्रिस्ती वगैरे कोणत्याहि जातीस स्वतंत्र मतदारसंघ देण्याने राष्ट्रीयत्वास अपाय होतो असें आपलें मत या सभेनें पूर्वी दोनदां व्यक्त केलेंच आहे. यास्तव इंग्लंडचे मुख्य प्रधान मि. रॅम्से मॅक्डोनाल्ड यांनी जो ज्ञातिविषयक निर्णय दिला आहे, तो या सभेला सर्वस्वी नापसंत आहे. या निर्णयांत ज्यांनी स्वतंत्र मतदारसंघ मागितला होता त्या मुसलमान, अँग्लोइंडियन इत्यादिकांस तो देण्यांत आलाच आहे, पण त्याखेरीज स्त्रिया, हिंदी ख्रिस्ती लोक यांनी स्वतंत्र मतदारसंघ मागितला नसताहि किंबहुना स्त्रियानी आपलें मत त्याविरुद्ध प्रदर्शित केलें असतांहि त्यांस तो देण्यांत आला ही गोष्ट ब्रिटिश सरकारानें केल्यामुळे हिंदी समाजांत फळ्या पडून त्याच्या राजकीय उन्नतीस अडथळे उत्पन्न होण्यास हा निर्णय कारणीभूत होत

असल्याने या सभेला त्याबद्दल अत्यंत दिलगिरी वाटत असून ती सरकारचा तीव्र निषेध करीत आहे.

(३) (अ) ता. २४-९-३२ रोजीं पुणें येथे स्पृश्य-अस्पृश्य हिन्दु पुढाऱ्यांनी जो करार केला तो राष्ट्रीयत्वाच्या दृष्टीने सदोष असला तरी आपसांतील तडजोड म्हणून तो या सभेस मान्य आहे.

(ब) तसेंच हिंदूंतील स्पृश्यास्पृश्यामधील वरील तडजोड म. गांधी यांच्या प्रायोपवेशनाने घडून आली त्यांत दहा वर्षांनंतर प्राथमिक निवडणुकीची (पॅनेल) पद्धत जाऊन अस्पृश्याकरितां स्वतंत्र जागा ठेवावयाच्या कीं काय याचा निर्णय स्पृश्य व अस्पृश्य यांच्या संमतीने ठरवावयाचा आहे. म. गांधींस अस्पृश्यांकरिता स्वतंत्र मतदार-संघच काय पण संयुक्त मतदारसंघांतील राखीव जागाहि तत्त्वतः नको आहेत असें त्यांनी प्रसिद्ध केलें आहे. तरी दहा वर्षांनंतर फार काय पण शक्य तर दहा वर्षांपूर्वीहि सदर पद्धति मोडून अस्पृश्यांना राखीव जागांचे बाबतींत स्पृश्यांत सर्वस्वीं सामील करून घेण्याचा गांधीजींनी प्रयत्न करावा अशी या सभेची त्यांस विनंति आहे.

(क) गांधीजींचें वरील कार्य सुकर होण्याकरिता स्पृश्य हिंदूंनी अस्पृश्यता घालविण्याची शक्य ती खटपट करावी अशी या सभेची स्पृश्य हिंदूंस विनंति आहे.

# इंग्लंडचा कोंडा व हिंदुस्थानचे पोहे

ओटावा येथील व्यापारी परिषदेस हिंदुस्थानातर्फे म्हणून पाठविलेले सरकारनियुक्त प्रतिनिधि श्री. षण्मुखं चेट्टी हे दोन आठवड्यांपूर्वी हिंदुस्थानास परत आले. ओटावा येथे ठरलेल्या कराराच्या अटी ते येण्यापूर्वीच प्रसिद्ध झाल्या होत्या. त्यामुळे त्या राष्ट्रहितविघातक कराराच्या बाबतींत त्यांच्यावर प्रश्नांचा भडिमार झाला. श्री. चेट्टी यांना लोकांचें नीट समाधान करतां येईना. तेव्हा त्यांनी सोयीची पळवाट पत्करून मोठ्या ऐटीने जाहीर केलें कीं, आम्हीं प्रतिनिधींनी या कराराबाबत एक मोठा अहवाल लिहिला आहे,व या अहवालांतच ओटावा येथील करारनाम्याचा ग्रंथ नीट कसा समजून घ्यावा याची किल्लीहि सांगितली आहे. तेव्हा तो ग्रंथच पाहावा हें उत्तम! ता.१३ रोजीं हा ग्रंथ प्रसिद्ध झाला त्यावरून तो ऐंशी पानांहून अधिक छापील पानें असलेला भला मोठा ग्रंथसाहेब आहे, या गोष्टीची सत्यता पटली. पण ग्रंथ पाहता या सत्याची मजल यापुढे जात नसल्याचें आढळलें. कारण या ग्रंथावरून असें स्पष्ट दिसतें कीं इंग्लंडांतील साहेबांचेंच या कराराने अधिक कल्याण झालें असून मापास माप लावून हिंदुस्थानाच्या नफ्यातोट्याचा विचार केला तर नफ्याच्या दृष्टीने झुकतें माप इंग्लंडच्या पदरांत पडलें व त्या प्रमाणांत हिंदुस्थानाचा नफा तर झालेला नाहीच, उलट स्वदेशी उद्योगधंद्याच्या वाढीच्या दृष्टीने थोडेंबहुत नुकसानच झालें आहे!

असला हा आंतबट्ट्याचा करार हिंदुस्थानाच्या डोक्यावर बसविला जाणार अशी साधार भीति प्रथमपासून वाटत होतीच. प्रथम हिंदुस्थान सरकाराने व्यापारी लोकमतास धाब्यावर बसवून तज्ज्ञ, हुशार व दणकट लोकनियुक्त प्रतिनिधि वरील परिषदेस न पाठवितां व्यापारी धकाधकीचा व आंकड्यांच्या हातचलाखीचा मासला फारसा पाहिला नसलेले असे कांही सरकारनियुक्त प्रतिनिधि पाठविले ही चूकच झाली. शिवाय या प्रतिनिधींच्या मतांची वेसण त्यांनी आपल्याच हातांत ठेवली; तेव्हा लायखीने उत्पन्न होणारा आत्मविश्वास हा त्यांना लाभला तर नाहीच पण उलट त्याची जागा साहजिकपणे उत्पन्न होणाऱ्या कृतज्ञताबुद्धीने घेतली, व त्यामुळे असल्या या वरिष्ठांच्या हातास हात लावून होस हो ठोकणाऱ्या होयबांच्या हातीं हिंदुस्थानाचें भवितव्य गेलें. अट्टल कावेबाज व बुद्धिवान ब्रिटिश मुत्सद्द्यांशीं अशांची गांठ पडल्यावर तिचा परिणाम काय होणार हें उघड दिसत होतें. मातीचें मडकें पितळेच्या भांड्यावर आपटताच मडक्याचे तुकडे झाले! ब्रिटिश प्रतिनिधींनी आमच्या या हिंदी प्रतिनिधींपुढे एक नाटक केलें व त्यांत इंग्लंड १५ नोव्हेंबरपासून आपल्याबरोबर सवलतीच्या जकातीचा करार न करणाऱ्या देशांच्या मालावर एवढ्या जकाती बसविणार कीं,हिंदुस्थानाने जर करार न केला तर हिंदुस्थानाचा व्यापार रसातळाला जाईल अशी इंग्रज मुत्सद्द्यांनी भीति घातली! झालें. आमचे हे प्रतिनिधि घाबरले. त्यांनी हिंदुस्थानाच्या वतीने जकातीच्या सवलतीस मान्यता दिली व आपण हिंदुस्थानाचें केवढें मोठें कल्याण केलें व त्याला केवढ्या मोठ्या संकटांतून वांचविलें याच फुशारकींत ते परत आले. सगळ्या रिपोर्टांत हे प्रतिनिधि कशाची टिमकी वाजवीत असतील तर या गोष्टीची. म्हणूनच ब्रिटिश मुत्सद्द्यांनी यांची पाठ थोपटून यांना 'सुविचारी' अशी पदवी अर्पण केली. वसाहतींचे प्रतिनिधि

भांडले, तंडले, त्यांबी धमक्या दिल्या व आपला स्वार्थ साधला. आमच्या परधार्जिण्या बुद्धीच्या प्रतिनिधींनी स्वार्थ गमावून इंग्लंडचें हित साधलें ! मग इंग्रज मुत्सद्द्यांच्या दृष्टीने ते 'सुविचारी' कां न ठरावेत ?

यांच्या या 'सुविचारीपणा'चें प्रत्यंतर या अहवालांत सर्वत्र दिसून येतें. भित्रीं पोरें आपल्याला मार बसेल ह्या निराधार कल्पनेनेच लटलटतात तसेंच या प्रतिनिधींचें झालें. त्यांची मुख्य फुशारकी एकाच मुद्द्यावर व तो हा कीं, आम्हीं हिंदुस्थानाचें होणारें निश्चित नुकसान वांचविलें ! पण असें नुकसान खरोखरी होत होतें का, या प्रश्नाला या अहवालांत आंकडे देऊन उत्तरहि देण्याचा प्रयत्न त्यांनी केला नाही हें आश्चर्य नव्हे काय? या कराराबावत जे सवाल त्यांना विचारण्यांत आले आहेत ते मुख्यतः तीन-चार आहेत. पहिला सवाल असा आहे कीं,सध्या हिंदुस्थान राजकीय झटापटीच्या दंगलींत गुंतला असता, किंबहुना लवकरच स्वराज्याचे हक्क हिंदुस्थानास दिले जाणार असताना आजच या आर्थिक शृंखला हिंदुस्थानाने कां बांधून घ्याव्या ? स्वराज्य मिळून आर्थिक स्वातंत्र्य हातीं पडल्यावर मग वाटेल ते करार हिंदुस्थानाने केले असते ! दुसरा सवाल असा आहे कीं हा ओटावाचा करार करण्यांत हिंदुस्थानाच्या हातीं निव्वळ फायदा कोणता व किती पडला ? तिसरा सवाल असा आहे कीं, या करारामुळे नफा बाजूला राहिला, पण हिंदी उद्योगधंद्यांचें नुकसान तर झालें नाही ना ? चौथा सवाल असा कीं ओटाव्याचा करार अमलांत आल्यावर हिंदुस्थानाच्या बोकांडीं आणखी एखाद्या नव्या कराचें ओझें तर बसणार नाहीं ना ? आता जो अहवाल प्रसिद्ध झाला आहे त्यांत वरील प्रश्नांना समाधानकारक उत्तरें सांपडत नाहीत. अथपासून इतिपर्यंत सगळ्या अहवालाचा रोख १५ नोव्हेंबरपासून इंग्लंड ज्या जकाती बसविणार आहे त्या जकातींच्या भुतास गति देण्याकडे आहे !

अहवालांत नमूद केलेल्या गोष्टींतून वरील सवालांना उत्तरें काय दिलीं आहेत हें पाहण्यापूर्वी अहवालांत जी किल्ली दिली आहे ती प्रथम परीक्षेकरिता घेऊं म्हणजे आपोआपच सर्व उलगडा होईल. ओटावा येथे साम्राज्यांतील सर्व देशांस सारखेंच लागू पडेल असें सवलतीच्या जकातींचें धोरण ठरवावयास पाहिजे होतें. पण वस्तुस्थिति अशी आहे कीं ओटावा येथे हें धोरण कबूल केलें गेलें नाही. ओटावा येथे जे करार झाले ते फक्त सह्या करणाऱ्या दोन देशांमध्येच झाले. त्यांचा विधि-निषेध किंवा त्यांचें सुवेरसुतक इतरांस नाही. उदाहरणार्थ, हिंदुस्थान व इंग्लंड या देशांत हा व्यापारी तह झाला म्हणजे त्याचा अर्थ इतकाच कीं या तहांतील सवलतींच्या जकातींचें धोरण फक्त सह्या करणाऱ्या राष्ट्रांनाच बंधनकारक राहणार, इतरांस नाही. इंग्लंडने हिंदुस्थानास जकातीच्या सवलती दिल्या तर त्या सवलती साम्राज्यांतील वसाहती हिंदुस्थानाला देतीलच असा अर्थ नाही ! मग कोडें आहे तें हें कीं, इंग्लंड व हिंदुस्थान यांमध्ये अहवालांत लिहिलेलाच करार करावयाचा होता तर त्याकरिता ओटाव्यापर्यंत या प्रतिनिधींची वरात काढली कशाला? हा करार लंडनमध्ये बसून फार तर हिंदुस्थानाचे स्टेट सेक्रेटरी व इंग्लंडचे मुख्य प्रधान यांना सहज करतां आला असता !

हिंदुस्थानाला कांही स्वतंत्र अस्तित्व आहे व त्याचें हिताहित इंग्लंडहून वेगळें आहे असें प्रतिनिधि नेमतांनाहि दिसलें नाही अगर ओटावा येथील वाटाघाटींत किंवा करारनाम्यातहि दिसत नाही. मग एवढा आटापिटा का केला ? याचा निष्कर्ष एकच कीं, सर्वत्र सारखा लागू पडणारा नियम या किल्लींत नाही व त्यामुळेच पुष्कळ गोंधळ झालेला दिसतो. व्यापारी कराराच्या यशस्वीपणाचें एक गमक या अहवालांत दिलें आहे. त्यांत हे प्रतिनिधि म्हणतात "अशा तऱ्हेच्या व्यापारी तहाची किंमत पारखण्याची एकच परीक्षा आहे व ती ही कीं, असल्या कराराच्या योगाने सह्या करणाऱ्या राष्ट्राचा निर्गत व्यापार वाढला पाहिजे, निदान टिकून तरी राहिला पाहिजे, तो नष्ट होता उपयोगी नाही." ह्या परीक्षेचा जर अर्थ असा असला कीं, या करारामुळे इंग्लंडचा हिंदुस्थानाशीं व हिंदुस्थानाचा इंग्लंडशीं व्यापार वाढला पाहिजे तर हा करार करणें योग्य होतें; पण तसें नसल्यास मात्र ही परीक्षा करण्याची पद्धति किंवा हा निकष खोटा आहे व शास्त्रशुद्ध नाही असें म्हणावें लागेल.

मुख्य मुद्दा हा आहे कीं या कराराने हिंदुस्थानाचा सर्वच्या सर्व व्यापार वाढला कीं नाही हें पाहिलें पाहिजे. इंग्लंडशीं तो किती वाढला एवढेंच पाहून चालावयाचें नाही. इतर देशांशीं जो हल्लीं व्यापार चालतो तो बंद होऊन त्याचें तोंड इंग्लंडकडे फिरलें तर इंग्लंडशीं हिंदुस्थानचा व्यापार वाढला असें होईल पण तेवढ्याने हिंदुस्थानाचा व्यापार वटांत वाढला असें होणार नाही. सवलतीच्या जकाती दिल्या असता त्याचा परिणाम असा होतो कीं एक व्यापाराची मर्यादा तरी आकुंचित होते किंवा त्याची किंमत तरी कमी होते. पण यापैकीं कोणताहि परिणाम झाला तरी त्यांत हिंदुस्थानाचें नुकसानच आहे. इंग्लंडशिवाय इतर देशांशींच हिंदुस्थानाचा मोठा व्यापार आहे. व तो आकुंचित झाल्यास त्यांत हिंदुस्थानाचें नुकसानच होणार आहे,

फायदा खास नाही. आश्चर्य हें कीं, अहवालांत ही परीक्षा किंवा हा किल्लीचा नियम दिला आहे खरा. पण तो नियम लावून हिंदुस्थानाचा नफा-तोटा किती होतो याचा ताळेबंद किंवा नफातोटा पत्र-कहि या अहवालांत दिलेलें नाही. आता वर दिले-ल्या सवालांचीं तरी उत्तरें काय दिलीं आहेत तें पाहूं.

सर अतुल चतर्जी यांनी या परिषदेच्या प्रारंभींच अगदी स्पष्ट भाषेत सांगितलें होतें कीं, हिंदुस्थाना-च्या शेतीची, व्यापाराची व उत्पन्नाची दुर्दशा पाहिली म्हणजे कोणत्याहि तऱ्हेच्या जकातीच्या सवलती देणें हिंदुस्थानास शक्य नाही असें वाटतें. स्वराज्या-ची प्रत्यक्ष संस्थापना झाल्यावर मगच त्याचा विचार करणें योग्य. अशा तऱ्हेची सडेतोड भाषा बोलणारे सर अतुल यांचें तोंड पुढे कां बंद झालें व त्यांनी या सवलतींच्या करारास कां मान्यता दिली? ब्रिटिश मुत्सद्द्यांच्या दृष्टीने हे कर्णकटु शब्द काढणारा मृदंग कोणत्या मुखलेपाने मधुर ध्वनि काढूं लागला हें सम-जणें जरूर होतें! पण अहवालांत या कारणांचा पत्ता नाही. उलट आमच्या कच्च्या मालावर ग्रेटब्रिटनने १५ नोव्हेंबरपासून जबर जकाती बसविण्याची दहशत घातली. तेव्हा आम्हांस करारावर सह्या करण्याशिवाय गत्यं-तरच नव्हतें वगैरे भ्याडपणाच्या गोष्टी अहवालांत नमूद आहेत. लोकांचा या प्रतिनिधींना असा सरळ सवाल आहे कीं, जर अशा तऱ्हेची दहशत इंग्रज मुत्सद्दी घालीत होते तर आमच्या प्रतिनिधींनीहि त्यांस असें स्पष्ट बजावावयाचें होतें कीं, जर हिंदी मालावर इंग्लंडने जकाती बसविल्या तर हिंदुस्थानहि इंग्रजी मालावर जकाती बसवील. हिंदुस्थानानें आपली ही दहशत अमलांत आणली तर इंग्लंडच्या व्यापाराचें दिवाळें निघेल ही गोष्ट सूर्य-प्रकाशाइतकी स्पष्ट आहे. पण सरकारनियुक्त प्रति-निधि हें कसें बोलूं शकतील? हें स्वराज्यांत लोकांनी निवडलेले प्रतिनिधिच ठणठणीतपणें सांगूं शकले असते! सर अतुल चतर्जींना ही जाणीव होती असें त्यांच्या पहिल्या भाषणावरून दिसतें व ही गोष्ट जर खरी तर श्री. षण्मुखं चेट्टी म्हणतात त्याप्रमाणें अर्थशास्त्राच्या कसोटीला हा करार उतरतो ही गोष्ट खोटी आहे असेंच म्हटलें पाहिजे. आजच्या हिंदुस्थाना-च्या ताबेदारीच्या स्थितींत हा करार करावयास नको होता हें सर अतुलांचें पहिलें म्हणणेंच बरोबर होतें. पहिल्या सवालास यापेक्षा अधिक उत्तर अहवालांत नाही.

या करारापासून हिंदुस्थानाचा निव्वळ नफा काय व किती होणार हा प्रश्न विचारणें न्याय्य आहे. कारण, लॉर्ड कर्झन यांच्या कारकीर्दीतच असा स्पष्ट ठराव सरकारानेच केला होता कीं, हिंदुस्थानाचा प्रत्यक्ष मोठा फायदा होत असेल व तो फायदा ज्यांना सवलती दिल्या जाणार नाहीत अशा देशांनी केलेल्या प्रतिकारापासून होणाऱ्या नुकसानीपेक्षा अधिक होत असेल तरच या सवलतीच्या फंदांत हिंदुस्थानाने पडावें, नाही तर पडूं नये. हें तत्त्व आजलाहि सर्वांस कबूल झालेंच पाहिजे. ओटाव्याच्या या करारांत इंग्रजी मालालाच अधिक सवलती मिळावयाच्या असल्याकारणाने हिंदुस्थानाचा फायदा अधिक झाला असें हे प्रतिनिधि दाखविणार तरी कसे? दुसऱ्याच्या शेतांत गहूं पेरून स्वतःचें खळें गच्च भरलेलें कसें दिसणार! बाकी असल्या परप्रत्ययनेय बुद्धीच्या प्रतिनिधींकडून ही अपेक्षा करणेंच चूक. हा सगळाच प्रश्न अजीबात टाळण्याकरिता या अहवालांत म्हटलें आहे कीं 'सवलतीच्या व्यापाराची योजना मान्य केल्यास हिंदु-स्थानाचा फायदा किती होईल हा प्रश्न मुळीं उप-स्थित होत नव्हता. या योजनेच्या कक्षेबाहेर हिंदु-स्थान राहिला तर त्याचें नुकसान किती होईल व तें नुकसान वांचवावें कसें हा प्रश्न आमच्यापुढे होता.' ही मनोरचना नादानपणा दाखविणारी आहे. याचा अर्थ असा कीं, हिंदुस्थानाचें एवीतेवी नुकसान होणारच होतें. त्यांतल्या त्यांत कमींत कमी नुकसान व्हावें एवढीच आम्ही चिंता करीत होतों! धूर्त इंग्रजी मुत्सद्द्यांनी या मनोरचनेचा पूर्ण फायदा घेतला व हिंदुस्थानाचे पोहे घेऊन त्याच्या हातांत फक्त कोंडाच ठेवला! म्हणून वर दिलेल्या दुसऱ्या सवालालाहि या अहवालांत उत्तरच नाही.

१५ नोव्हेंबरच्या आंत जर हिंदुस्थानाने सवलती-च्या जकातीची ओटाव्याची नवी योजना मान्य केली नाही तर हिंदुस्थानाचें फार मोठें नुकसान होणार होतें तें आम्हीं थांबविलें या आरडाओरडी-तहि कांही अर्थ नाही असें थोडा विचार केला असता आढळून येतें. या अहवालांत लिहिलें आहे कीं, 'या कराराने युनायटेड किंग्डम (इंग्लंड) हून हिंदुस्थानांत येणाऱ्या सुमारें १,७०,००,००० पौंड किंमतीच्या मालावर सवलती याव्या लागतील व हिंदुस्थानांतून इंग्लंडमध्ये जाणाऱ्या ३,८०,००,००० पौंड किंमतीच्या मालावर इंग्लंड सवलती देणार आहे. ही सवलत जर दिली नसती तर हिंदुस्थानाचें फार मोठें नुकसान झालें असतें.' हिंदुस्थानावर एवढी मोठी आपत्ति आली होती पण ती यांनी वांचविली! पण प्रथम ही आपत्ति काय आहे हें पाहूं. हिंदुस्थानांतून निर्गत होणाऱ्या या ३ कोटी ८० लक्ष पौंड किंमतीच्या मालापैकीं दोन कोटींचा तर चहा आहे. चहावर इंग्लंडला जकात बसविणें शक्य आहे काय? चहावर जकात बसविणें म्हणजे तें पैसे चहा पिणाऱ्या

इंग्रज मनुष्याच्या खिशांतून घेण्यासारखें आहे ! सीलोन व जावा वगैरे ठिकाणांहून हल्लीच्या दुप्पट पैदास केली तरी पुरेसा चहा इंग्लंडला त्या देशांकडून मिळणार नाही. तेव्हां या बाबतींत व्यापारी स्पर्धेचा प्रश्न भ्रामक ठरतो.दुसऱ्याहि एका गोष्टीचा विचार केला पाहिजे. हिंदुस्थानांतील चहावर जकात बसविण्याने हिंदुस्थानांतील इंग्रज मळेवाल्यांचेंच नुकसान होणार असल्याने इंग्लंड चहावर जकात बसवूंच शकत नाही. शेवटचा एक मुद्दा सांगावयाचा तो हा कीं आमचे हे शहाणे प्रतिनिधि एक गोष्ट विसरले ती गोष्ट ही कीं, १५ नोव्हेंबरपासून इंग्लंड ज्या जकाती बसविणार होतें त्यामध्ये चहावरील जकात घातली गेलेली नाही ! त्याचा विचार मागाहून व्हावयाचा हें त्या जकातीच्या कायद्यांतच लिहिलें आहे ! तेव्हां चहावरील जकातीची गोष्ट प्रतिनिधींनी आज बोलणें हें केवळ वावदूकपणाचें आहे असें म्हटलें पाहिजे !

चहानंतर जूट किंवा ताग किंमतीच्या दृष्टीने येतो. हिंदुस्थानाशिवाय इतर देशांत ताग फारच थोडा होत असल्याने तागाच्या व्यापाराचें कुरण हिंदुस्थानाकरिता राखीव आहे असें मानण्यास हरकत नाही. शिवाय चहाच्या बाबतींत वर लिहिलेलीं सर्व कारणें तागालाहि तंतोतंत लागू आहेत. ज्या प्रमुख दहा बारा जिनसांवर ही सवलत मिळणार होती त्यांपैकीं चहा व ताग यांची वाट लागली. शिल्लक उरलेल्या जिनसांपैकीं तांदूळ, गळिताचीं धान्यें, कातडीं वगैरे जिन्नस राहिले. त्यांतहि आळशी वगैरे जिन्नस इंग्लंडमध्ये फार थोडेच जातात हें मागे एकवार लिहिलेंच आहे. अशा रीतीने पाहतां हिंदुस्थानास मिळणारा फायदा फारच अल्प प्रमाणांत आहे. याच्या उलट इंग्रजी मालाला मिळणाऱ्या सवलती भारी किंमतीच्या असल्याने हिंदुस्थानाचें नुकसान मात्र फार मोठ्या प्रमाणावर आहे. उदाहरणार्थ, हिंदुस्थानांतून इंग्लंडमध्ये जाणाऱ्या कापडावर वीस टक्के सवलत आहे.याच्या उलट इंग्रजी कापडाला हिंदुस्थान दहा टक्के सवलत देणार ! पण हिंदुस्थानांतून जाणाऱ्या व हिंदुस्थानांत येणाऱ्या कापडांत केवढें महदंतर आहे ! हिंदुस्थानांतून फार तर वजनाने १८९,००० पौंड कापड जातें पण इंग्लंडहून ४६ कोटी रुपयांवर कापड येतें याची वाट काय ? प्रो. सी. एन. वकील यांनी आपल्या सुंदर पत्रकांत आंकडे देऊन सिद्ध केलें आहे कीं, या सवलतीने इंग्लंडलाच तेहतीस कोटी रुपयांची नवी बाजारपेठ मिळणार ! तात्पर्य हें कीं, हिंदुस्थानाचें नुकसान होऊं नये म्हणून जो उद्योग या प्रतिनिधींनी केला तो त्यांच्याच गळ्यांत येऊन उलट हिंदुस्थानाचें नुकसान मात्र या कराराने झालें आहे.

पण सर्वांत मोठें नुकसान म्हणजे स्वदेशी उद्योगधंद्यांची होणारी गळचेपी हें होय ! महायुद्धानंतर हिंदुस्थानांत साबण, कातड्याचे जिन्नस, कापड, सीमेंट वगैरे लहानमोठे धंदे सावरूं लागले होते ते बहुतेक बुडतील! कारण इंग्लंडांतून येणाऱ्या या जिनसाना सवलती देण्यांत आल्या आहेत. इंग्लंडशिवाय इतर परदेशी मालावर जकाती बसविल्याकारणाने ते देश कदाचित् हिंदुस्थानाच्या मालावर जकाती बसवितील त्यामुळे होणारें नुकसान वेगळेंच. तसेंच जिन्नस महाग होऊन लोकांना त्याकरिता आपल्या खिशाला चाट लावावी लागणार आहेच. एक गोष्ट खरी कीं, लेजिस्लेटिव्ह असेंब्लींत हें बिल येईल त्या वेळीं तें हाणून पाडण्याची सभासदांनी शिकस्त केली तर हिंदुस्थानाचें नुकसान टळण्याचा अद्यापिहि संभव आहे. प्रतिनिधींचा अहवाल मात्र पूर्ण निराशाजनक आहे. आवळा देऊन कोहळा काढला अशी म्हण आहे ती या ठिकाणीं लागू पडते.

# अ. भा. हिंदुमहासभेची विनंति

(सेक्रेटरी अ.भा. हिंदुमहासभा नवी दिल्ली यांजकडून)

स्थानिक, जिल्हा व प्रांतिक हिंदुसभा आणि हिंदुमहासभेचे कार्यकर्ते यांसः—

दिल्ली येथे महासभेचें १४ वें अधिवेशन झालें. त्यांत अखिल हिंदु समाजाला संघटनेच्या कार्याची दिशा दाखविण्यांत आली आहे. आता कार्यकर्त्यांनी स्वस्थ न बसता झटून कामास लागलें पाहिजे. कामाची दिशा पुढीलप्रमाणे असावी.

१ स्थानिक शाखा स्थापन करणें.

२ जिल्हा व प्रांतिक परिषदा भरविणें.

३ हिंदू तरुणांचे संघ काढून त्यांच्यांत हिंदु संस्कृतीविषयी प्रेम उत्पन्न करणें.

४ ठिकठिकाणीं व्यायामशाळा स्थापन करणें, हिंदु स्वयंसेवक पथकें काढणें, हिंदु स्त्रिया व पवित्र स्थानांचें रक्षण करणें व हिंदूंच्या धर्मकार्यांत कोणी विघ्नें उपस्थित केल्यास त्याचें निवारण करणें.

५ सार्वजनिक ठिकाणीं प्रति रविवारीं सामुदायिक प्रार्थना करणें.

६ अस्पृश्यता नष्ट करण्याचा प्रयत्न करणें; हीं व अशा प्रकारचीं हिंदु संघटनेचीं कार्यें करून याची माहिती हिंदु-महासभा कचेरी, नवी दिल्ली या पत्त्यावर कळवावी.

# अ. भा. हिंदु महासभा

## पास झालेले ठराव

(१) जातवारीच्या निर्णयाने अस्पृश्य समजला जाणारा वर्ग कायमचा हिंदु समाजांतून फोडण्यांत येत असल्याचें पाहून म. गांधींनीं प्रायोपवेशनाचें दुर्धर व्रत अंगिकारलें याबद्दल महासभेस चिंता वाटत आहे व महात्माजींच्या प्रयत्नास यश मिळावें म्हणून महासभा त्यांना सर्व प्रकारची मदत देण्यास सिद्ध आहे. हिंदु समाजाचें अभंगत्व कायम राहण्यासाठीं महात्माजींनी केलेल्या प्रयत्नाबद्दल हिंदुसभा त्यांची कृतज्ञ आहे.

(२) पुण्यास स्पृश्यास्पृश्य पुढाऱ्यांमध्ये झालेल्या तडजोडीबद्दल महासभेस आनंद वाटत आहे. हा समेट घडवून आणणारे सर्व पक्षांचे पुढारी व खुद्द गांधीजी यांचें या वाटाघाटींचा शेवट यशस्वी रीतीने झाल्याबद्दल महासभा अभिनंदन करते. या उपोषणामुळे गांधीजींना जो त्रास व दगदग पडली तिच्यांतून त्यांची प्रकृति सुरक्षितपणें निभावून न्यावी अशी परमेश्वरास प्रार्थना आहे. प्रांतिक सरकाराचीं मतें घेऊन मग या समेटाचा निकाल करण्याचें धोरण सोडून देऊन, सरकारने या निकालास सर्व देशाची पूर्ण संमति आहे हें लक्षांत घेऊन, ताबडतोब मान्यता द्यावी. हिंदुस्थानसरकारने-हि तो ब्रिटिश सरकारकडे पाठविण्यास किंचितहि विलंब लावूं नये. म्हणजे मुख्य प्रधानहि या समेटाला तात्काळ मान्यता देऊन जातीय निर्णयांत तसा बदल करतील अशी आशा आहे.

(३) प्रांतोप्रांतीं दलित व इतर हिंदूंच्या कमिट्या नेमून त्यांच्या द्वारें दलित वर्ग कोणते व त्यांची लोकसंख्या किती याची चौकशी करावी. जर कांहीं जाती खरोखर दलित वर्गांत मोडण्यासारख्या नाहीत, असें या चौकशींत बाहेर आलें, तर त्या प्रमाणांत त्या प्रांतांत दलित वर्गांना म्हणून मिळालेल्या जागांची संख्या तेवढ्या प्रमाणांत कमी करावी.

(४) पुढील कारणासाठीं ब्रिटिश सरकाराने दिलेल्या जातीय निर्णयाचा हिन्दुमहासभेचें हें अधिवेशन तीव्र निषेध करीत आहे.

( अ ) या निर्णयाने जातवार मतदारसंघांना कायदेशीर मान्यता मिळत असून, ती लोकशाहीच्या तत्त्वाविरुद्ध आहे; तसेंच त्याने ब्रिटिश सरकाराने वेळोवेळीं व मुख्य प्रधानांनी १९३१ मध्ये कॉमन्स सभेमध्ये दिलेल्या, हिंदुस्थानांत जबाबदार लोकशाही सरकार स्थापण्याच्या, वचनाला हरताळ फांसला जात आहे.

( आ ) तसेच त्याने हिंदु व शीख या दोन समाजांनी एकमताने व मुसलमान, ख्रिस्ती, अस्पृश्य आणि स्त्रिया यांच्यापैकीं बऱ्याच मोठ्या विभागांनी केलेली संयुक्त मतदारसंघाची मागणी धाब्यावर बसविली.

( इ ) शिवाय त्यामुळे इतर अल्पसंख्याकांच्या हितसंबंधाची पर्वा न करता मुसलमान व युरोपियन यांना पक्षपात दाखविण्यांत आला. तो असा—(क) मुसलमान समाजाला बेसुमार संरक्षण देण्यांत आलें. (ख) लोकसंख्येच्या प्रमाणांत जितकें प्रतिनिधित्व पंजाब व बंगाल्यांतील हिंदूंना मिळणें अवश्य होतें, त्याहूनहि कमी प्रतिनिधित्व त्यांना देण्यांत आलें. ( ग ) ज्या परिस्थितींत मुसलमानांना जादा प्रतिनिधित्व देणें योग्य वाटलें, ती सर्व परिस्थिति शीख समाजाला लागू असूनहि त्यांना जादा संरक्षण व प्रतिनिधित्व देण्यांत आलें नाही. (घ) युरोपियन व अँग्लो-इंडियन समाजांना त्यांच्या संख्येच्या प्रमाणापेक्षां किती तरी पट जास्त प्रतिनिधित्व देण्यांत आलें. ( ङ ) तसेच त्याने लखनौ करारांत असलेली व सायमन कमिशनने मान्यता दिलेली जातींजातींच्या प्रतिनिधित्वासंबंधींची प्रमाणपद्धतिहि नाहीशी झाली आहे.

( ई ) सरकारने मुसलमानांना जें कायदेशीर वर्चस्व दिलें आहे, त्याचा परिणाम बहुसंख्य जातीं-वर अल्पसंख्य समाजांची सत्ता सुरू होण्यांत व कायदेशीर जातीय अरेरावी चालू करण्यांत होईल.

(उ) हा जातीय निर्णय त्रयस्थाने दिलेला निकाल नसून तो ब्रिटिश सरकारचा निर्णय आहे.

( ऊ ) हा जातीय प्रश्न सुरुवातीला सरकारनेच उत्पन्न केला आहे; व वर्तुळ परिषदेंतून राष्ट्रीय मुसलमानांस वगळून व मुसलमानांच्या चौदाहि मागण्या पुऱ्या करणारा हिंदुस्थानसरकारचा खलिता आगाऊच प्रसिद्ध करून या जातीय प्रश्नाच्या योग्य निर्णयाच्या वाटेंत सरकारनेच अडथळे उत्पन्न केले आहेत.

( ऋ ) जर ब्रिटिश सरकारची या प्रश्नाचा योग्य निर्णय देण्याची इच्छा असेल, तर राष्ट्रसंघाच्या अल्पसंख्यांच्या ठरावानुसार त्याचा निकाल द्यावा.

(५) सिंध प्रांत मुंबई इलाख्यांतून वेगळा करण्याच्या सरकारी योजनेस हिंदुमहासभेचा तीव्र विरोध आहे.

(६) राजकारणापासून सर्वस्वी अलिप्त असलेल्या मसूर ब्रह्मचर्याश्रम, सुधारसभा सक्कर, सुंदर सभा सक्कर; सुंदर सेवक सभा सक्कर, मुक्तेश्वर दळ नगर इत्यादि कित्येक धार्मिक संस्थांच्या मिळकती

ऑर्डिनन्सच्या नांवाखाली जप्त करण्यांत आल्या त्यांवरची जप्ती सरकारने उठवावी.

(७) अँग्लो–मॉस्लेम करारास बळी पडून काश्मीर सरकाराने आपल्या राज्यांतील हिन्दु प्रजेची जी गळचेपी चालवली आहे, त्याबद्दल हिंदुमहासभा काश्मीर सरकारास आगामी धोक्याची सूचना देत असून, हिंदुस्थानांतील इतर मुसलमानी राज्यांतल्या मुस्लीम प्रजेप्रमाणेच हिंदू राज्यांतील हिन्दु प्रजेचें संरक्षण झालें पाहिजे, असें बजावीत आहे.

(८) सयामच्या राज्यघटनेंत इष्ट ते फेरफार स्वसंतोषाने केल्याबद्दल हिंदु–महासभा सयामच्या राजेसाहेबांचें मनःपूर्वक अभिनंदन करीत आहे.

(९) काटकसरीच्या नांवाखाली निरनिराळ्या सरकारी नोकऱ्यांतील हिंदूंची सरकारने जी फाजील छाटाछाट चालवली आहे, त्याबद्दल हिंदुमहासभा सरकारचा तीव्र निषेध करीत आहे.

१० सरहद्द सरकारने सरकारी नोकऱ्यांबाबत हिंदु व शीख उमेदवारांविरुद्ध जें धोरण स्वीकारलें आहे, त्याबद्दल हिंदुमहासभा सरहद्द सरकाराचा तीव्र निषेध करीत असून सरकारी नोकरीसाठी उघड चढाओढीची परीक्षा घेऊनच उमेदवारांची भरती करण्याचें धोरण स्वीकारावें अशी विनंति आहे.

११ हिंदुस्थान, चीन, जपान, सिलोन, सयाम इत्यादि आर्यसंस्कृतीचा अभिमान बाळगणाऱ्या पौर्वात्य राष्ट्रांची हिंदुमहासभेने एक आर्यसंस्कृति परिषद भरवावी व अशा रीतीने जुने स्नेहसंबंध पुनरुज्जीवित करावे.

१२ नेपाळाधिपतींनी हिंदुसमाजाच्या ऐक्यासाठी जे अविश्रांत प्रयत्न चालविले आहेत, त्याबद्दल हिंदुमहासभा त्यांचें अभिनंदन करीत आहे.

१३ हिंदु तरुणांनी लष्करी शिक्षण घेऊन हिंदुस्थानच्या संरक्षणासाठी सज्ज होणें अत्यंत अगत्याचें असून याबाबत जरूर ती खटपट करण्यासाठी हिंदु महासभेतर्फे एक मध्यवर्ती हिंदु युवकसमिति स्थापण्यांत यावी.

१४ स्वदेशीच्या प्रसारार्थ बाय इंडियन लीगने चालविलेल्या खटपटीबद्दल हिंदु महासभा त्याचें अभिनंदन करीत असून, हिंदुस्थानांतील सर्व हिंदूंनी आपल्यास लागणारा सर्व माल हिंदीच विकत घ्यावा. विशेषतः बेकारीला आळा घालण्यासाठी हातसुताची व हातविणीची खादीच अधिक प्रमाणांत वापरावी, अशी हिंदु महासभेची सर्वांना नम्र विनंति आहे.

१५ अस्पृश्य बांधवांना बरोबरीच्या नात्यानें वागावण्याबद्दल महासभा पुनः सर्वांना विनंति करीत असून, सार्वजनिक देवळें, तळीं, विहिरी इ. ठिकाणीं त्यांस प्रवेश असावा असें हिंदू महासभेचें पूर्वीचेंच मत कायम आहे.

१६ भावी राज्यघटना अमलांत येताच हिंदु महासभेतर्फे मध्यवर्ती व प्रांतिक कायदेमंडळाच्या सर्व निवडणुकी लढविण्यांत याव्या, असें हिंदुमहासभेचें निश्चित मत आहे.

१७ हिंदु तरुणांनी आपल्या मातृभूमीच्या संरक्षणार्थ कवायत, शारीरिक शिक्षण, व्यायाम व स्वसंरक्षण यांचें शिक्षण घेऊन प्रांतानिहाय स्वयंसेवकदलें काढावींत.

१८ निजाम हैद्राबाद, भोपाळ, भावलपूर या मुसलमानी संस्थानांत हिंदु प्रजाजनांना सरकारी नोकऱ्यांत, धार्मिक आचारांत, शिक्षणाबाबत, व परभाषा शिकण्याबाबत जाच होतो अशा अनेक तक्रारी आल्या आहेत. त्यांची चौकशी करण्यासाठी महासभा एक कमिटी नेमीत असून तिला त्या संस्थानांतील अधिकाऱ्यांनी मदत करावी, अशी विनंति आहे व संस्थानाधिपतींनीहि लोकांना आपल्या तक्रारी मांडण्यास योग्य त्या सवलती द्याव्या अशी विनंति आहे.

१९ शुद्धि व संघटनाचें कार्य करणें, लोकांत हिंदुधर्म व हिंदु संस्कृति यांच्या ज्ञानाचा प्रसार करणें, त्यासाठी आश्रम, मठ स्थापणें प्रचारक तयार करणें हीं कामें महासभेच्या कार्यकारी मंडळाने करावींत.

२० महाराज सर भीम समशेरजंग बहादुर, रा. ब. महाजनी व भाई परमानंद यांची पत्नी यांच्या मृत्यूबद्दल ही सभा दुःख प्रदर्शित करीत आहे.

# प्राथमिक शिक्षकांचा पगार—अलावन्स व कपात

आर्थिक अडचणीमुळे सरकारने इतर खात्यांतील नोकरांच्या पगारांत शें. १० टक्के कपात केली व आपल्याप्रमाणेंच स्थानिकस्वराज्य संस्थांनीहि कपात करावी, असें सुचविलें. मात्र फरक एवढाच कीं स्थानिक स्वराज्यसंस्थांतील नोकरांच्या पगाराबद्दल कांहीहि उल्लेख न करता २० टक्के ग्रँट कमी केली! स्थानिक स्वराज्य संस्थांकडे प्रायमरी एज्युकेशन ॲक्टाने शाळा खात्याचा ताबा आला तो शिक्षणाची वाढ करावी, तें सक्तीचें व मोफत करावें, त्यासाठी कर बसवावे, योजना पाठवाव्या, नवीन खर्चापैकीं, सरकार आपला ⅔ हिस्सा देईल, व खातें ताब्यांत देतांना जितका पैसा खर्च होत होता तितका कायम ग्रँट म्हणून (डेटम लाईन) देईल अशीं आश्वासनें देऊन देण्यांत आला. पण हीं सर्व आश्वासनें पोकळ ठरल्याचें सर्वांस अवगत आहेच. अधिक साह्य देण्याचें बाजूलाच राहिलें, पण मिळ-णाऱ्या कायदेशीर ग्रँटमध्येच शेंकडा २० टक्के कपात केली गेली. गेल्या वर्षी शेंकडा ५, चालू वर्षी शेंकडा २०. हीच पद्धति पुढे चालू राहि-ल्यास स्थानिक स्वराज्य संस्थांना शाळा-खात्याचा कारभार चालविणें अशक्य होईल, म्हणून या आपत्तीला कसें तोंड द्यावें याचा विचार करण्यासाठी म्हणून सर्व बोर्डांची एक सभा भरविण्याचा उपक्रम पुणें जि. लो. बोर्डाने केला व तो यशस्वी होऊन सर्व स्थानिक स्वराज्य संस्थांनी ही कपात रद्द करून घेण्यासाठी शिकस्तीचे प्रयत्न करण्याचें ठरविलें ही आनंदाची गोष्ट होय.

प्राथमिक शाळांतील मोठ्या पगाराचे हेडमास्तर डे.ए.इन्स्पेक्टर यांचे हेडक्लार्क, मामलेदारांचे अवल-कारकून, सब-पोस्टमास्तर यांचा दर्जा पगाराच्या दृष्टीने एक मानून सरकारने सन १८८७ सालीं शिक्षकांचे पगाराचें स्केल खालीलप्रमाणे ठरवून दिलें.

| लायकी, | सुरुवात | अखेर |
|---|---|---|
| अन्ट्रेन्ड | ७ | ७ |
| फर्स्ट इयर ट्रेन्ड | ९ | २५ |
| सेकंड ,, ,, | १२,१५ | ४० |
| थर्ड ,, ,, | २०,२५ | ६० |

सन १८९४ सालीं ना. सेटलवाड यांनी शिक्ष-कांना शिपायापेक्षा कमी पगार असावा हें शिक्षका-च्या धंद्याला न शोभणारें आहे, असे उद्गार कौन्सिलांत काढिले तेव्हा "पैसा नाही" असा जबाब सरकारने दिला. पुढे १९०८ पासून खालील स्कीम-प्रमाणे पगार देण्यास सुरुवात झाली.

| लायकी | आरंभ | अखेर |
|---|---|---|
| अन्ट्रेंड | ९ | ११ |
| फर्स्ट ईयर ट्रेन्ड | १२ | २५ |
| सेकंड ,, ,, | १५ | ४० |
| थर्ड ,, ,, | २५ | ६० |

महायुद्धामुळे फार महागाई झाली. इतर खात्यांत पगारांत वाढ झाली तेव्हा शिक्षकांच्या पगाराची स्कीम खालीलप्रमाणे ठरविण्यांत आली. ही स्कीम इतर खात्यांतील नोकरांच्या त्या वेळच्या स्कीमशी तुलना केली असता अपुरी आहे हें स्पष्ट दिसून येईल.

| लायकी | आरंभ | अखेर | सिले० ग्रेड |
|---|---|---|---|
| अन्ट्रेंड | १२ | १५ | ० |
| फर्स्ट इयर ट्रेंड | १५ | ३० | ४० |
| सेकंड ,, ,, | २० | ४० | ५५ |
| थर्ड ,, ,, | २५ | ६० | ७५ |

याशिवाय या स्कीमवर शेंकडा २५ पण ८७॥ पेक्षां जास्त नाही, असा पगार देण्यांत येऊं लागला. सिलेक्शन ग्रेड्स शेंकडा १० मिळत असत.

इतर प्रत्येक खात्यांत पगाराची सुधारणा झाली. प्रा. शिक्षक अर्थात् नेहमींप्रमाणे मागेंच होते. पण त्यांच्या अर्ज, विनंत्या तक्रारींकडे लक्ष देऊन सर-कारानें साठे—परांजपे कमिटी नेमिली व त्या कमि-टीनें त्या वेळीं मिळत असलेल्या पगाराच्या ५-१० रुपयांनी पुढे असलेली अशी साठे-परांजपे स्कीम सुचविली. ती अशी—

| लायकी | आरंभ | अखेर | सि. ग्रेड |
|---|---|---|---|
| अन्ट्रेन्ड | २५ | ४० | ० |
| फर्स्ट इयर ट्रेंड | ३० | ५० | ५५ |
| सेकंड ,, ,, | ३५ | ६५ | ७५ |
| थर्ड ,, ,, | ४० | ८० | १०० |

सुधारणा कायद्याप्रमाणे निर्माण झालेल्या पहिल्या कौन्सिलांत नामदार परांजपे शिक्षण मंत्री झाले व त्यांनी वरील स्कीमचा आरंभ मात्र केला. व पुढील ग्रेड्स पैशाच्या अभावीं तशाच थबकून राहिल्या.

थांबवून ठेवण्याचें कारण पंचवार्षिक रिपोर्टांत पैशाचा अभाव व एकेक रुपया दिला तरी वार्षिक २। लाख रुपये खर्च वाढतो हें देण्यांत आलें आहे. इतर राष्ट्रांप्रमाणे प्रा. शिक्षण मोफत व सक्तीचें करणें सरकारच्या कर्तव्यक्षेत्रांत येत नाही काय? याकरिता हें फुकट देतां येणें शक्य आहे काय? शिक्षकांची संख्या जास्त हा शिक्षकांचा दोष आहे काय? राज्याच्या थोर वैभवाप्रमाणें लष्करी खात्यावर

कोट्यवधि खर्च होतो, मग तशाच महत्त्वाच्या प्रा. शिक्षणावर खर्च करण्याला मागे सरून कसें चालेल ? ही स्कीम देण्यांत हात आंखडीत असतांनाच सनदी नोकरांच्या पगारवाढीकरिता किती जास्त खर्च केला गेला ? बड्या पगारांच्या अधिकाऱ्यांच्या मुबलक सुखसोयीकडे अधिक लक्ष पुरविण्यापूर्वी अर्धपोटी नोकरांस पोटभर अन्नाची तरतूद करणें अवश्य नव्हतें काय ?

त्यानंतर अखेरची म्हणून पुढील स्कीम ठरली—

| लायकी | आरंभ | अखेर |
|---|---|---|
| अन्ट्रेंड | २५ | ३० |
| फर्स्ट इयर ट्रेंड | ३० | ४० |
| सेकंड „ „ | ३५ | ५० |
| थर्ड „ „ | ४० | ६० |

या स्कीमला जोडून ५ ते २५ पर्यंत अलावन्स देण्याची पद्धत सुरू झाली. या पद्धतीमुळे पूर्वी शेंकडा १० शिक्षकांचें ८७॥ जाऊन शेंकडा एखाद्याला ८५, शेंकडा ३।४ ना ८० व इतरांना ७५-७० असा पगार मिळूं लागला.

यापुढे अधिक सुधारणा झाली. S. 72 ही स्कीम १९२३ नंतरच्या शिक्षकांना लागू असून ती पुढीलप्रमाणे आहेः—

| लायकी | आरंभ | अखेर |
|---|---|---|
| अन्ट्रेंड | २० | ३५ |
| फर्स्ट इयर ट्रेंड | २५ | ४० |
| सेकंड „ „ | ३० | ५० |
| थर्ड „ „ | ३५ | ६० |

१९२३ नंतरच्या शिक्षकांना पहिल्याने अलावन्स मिळावयाचा नव्हता, पण अलीकडे तो द्यावा असें ठरलें आहे. १९२३ पासून १९२९ पर्यंत ए शिक्षकांना ट्रेंड होऊनहि प्रमोशन मुळीच दिलें गे नाही, ही लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे. बो ठेवील त्या पगारावर आपण राहूं अशा तऱ्हेचा लेख या शिक्षकाकडून घेतला असला तरी वरील गोष्ट अन्यायाचीच दिसेल.

इ. स. १८८७ पासून ज्या योजना प्रसवल्य गेल्या आहेत, त्यांचें निरीक्षण केल्यास अन्ट्रेंडच्या पगारांत ५ पटींपेक्षा जास्त, फर्स्ट इयरच्या पगारांत जवळ जवळ दुप्पट, सेकंड इयरच्या पगारांत सवापट वाढ केली आहे. थर्ड इअरच्या पगारांत मात्र मुळीच वाढ केलेली नाही. यावरून दुसराहि एक सामान्य नियम निघतो तो हा कीं, जों जों लायकी व जबाबदारी जास्त, तों तों पगारांच्या बाबतींतहि पीछेहाट जास्त! अन्ट्रेण्ड शिक्षकांच्या पगारांत झालेली वाढ आवश्यक होती, पण थर्ड इयर शिक्षकांच्या पगारान्ती ५० वर्षांच्या पूर्वीची स्थितिच आजहि बहुतांशीं चालू आहे. अलावन्स देतांनादेखील वरच्या दर्जाचे शिक्षक काम करण्याला पात्र, मात्र अलावन्सला अपात्र असा अन्याय केला गेला आहे. ( उदा. अन्ट्रेंड फर्स्ट इयर ट्रेंड नेहमी पात्र, सेकंड इयर ५ वर्षे व थर्ड इयर १० वर्षे अपात्र ! ) अलावन्ससाठीं दर २ वर्षांनी सरासरी हजेरीची तपासणी होते. अशी तपासणी १९२९ व १९३२ सालीं होऊन अलावन्स कमी केला व वाढलेला मात्र दिला नाही. त्यामुळे बऱ्याच शिक्षकांना दरमहा ५ रुपये नुकसान सोसावें लागत आहे. व हे शिक्षकहि विशेषतः थर्ड इअर व सेकंड इयरच आहेत.

# भोपाळांतील हिंदूंची दुःस्थिति

हिंदुस्थानांतील हिंदी संस्थानांत भोपाळचें राज्य बरेंच मोठें आहे. तेथील अधिपति आंग्लविद्याविभूषित असून प्रजाहितदक्ष असल्याचा बोभाटा आहे. परंतु त्याच्या राज्यांतील बहुजनसमाज हिन्दु असून त्यावर अनेक प्रकारचे धार्मिक, सामाजिक व शैक्षणिक जुलूम सारखे होत असतात! परवा त्यांनी अस्पृश्योद्धारासाठी पांच हजार रुपये देऊन लोकांची सहानुभूति आपल्या बाजूने वळविण्याचा प्रयत्न केला. परंतु त्यांच्या राज्यांतील हिंदूंची दशा अत्यंत शोचनीय आहे व ही गोष्ट येथे साधार दाखविण्याचें योजिलें आहे.

## शें. ९० लोकवस्ती

भोपाळ राज्य मध्य-हिंदुस्थानांत आहे. त्याचें क्षेत्रफळ ६९०२ चौ. मैल असून माळवा प्रांताच्या पूर्व सीमेवर तें पसरलें आहे. स. १९२१ च्या लोकगणनेनुसार त्याची लोकसंख्या ६९२४४८ इतकी असून त्यात मुसलमानांची संख्या केवळ ७७३६७ म्हणजे एकंदर लोकसंख्येंत शें. ११ इतकी व आहे. या मुसलमानांत २७५१५ मुसलमान खास राजधानींत राहतात व बाकीचे राज्यांत इतरत्र पसरले आहेत. यावरून शें.९० लोकसंख्या हिंदूंची आहे हें दिसून येईल. त्यांत शें. ६० शेती, शें. १४ व्यापार, शें.६ नोकरी व शें.१५ हिंदू इतर कामें करतात. या राज्यांत हिंदूंची लोकसंख्या अधिक असल्याने राजकोष हिंदूंच्या श्रमाने उत्पन्न झालेल्या पैशाने भरला जातो ही गोष्टहि निर्विवाद आहे. परंतु राज्यांतील हिंदूंची स्थिति मात्र सर्वतोपरी शोचनीय आहे. ती कशी हें आता क्रमशः पाहूं.

## शिक्षण

राज्यांतील बहुसंख्य प्रजा हिंदु असल्याने शिक्षण वस्तुतः त्यांच्या मातृभाषेंत द्यावयास पाहिजे; परंतु भोपाळमध्ये ती पद्धत नाही. शिक्षणद्वारें धर्मप्रसार करण्याचा हेतु तेथे स्पष्ट दिसून येतो. इस्लाम हा राष्ट्रधर्मच तेथे मानतात. ता. १ जुलै स. १९२४ रोजीं तेथील मुख्य न्यायाधीशांनी असे स्पष्ट उद्गार काढले होते कीं, राजाचा जो धर्म तोच राष्ट्रधर्म होय. या धोरणानुसार शिक्षणाची बोधभाषा उर्दू आहे. शें.९० हिंदूंची भाषा हिंदी असता त्यांस मातृभाषेंतून शिक्षण मिळत नाही. तेथील हमीदिया पुस्तकालयांतील १७२७१ पुस्तकांत एकहि पुस्तक हिंदीचें नाही! हिंदूंना त्यांच्या मातृभाषेंत शिक्षण द्या, अशाबद्दल तेथील रयतानी आतापर्यंत अनेक वेळा मागणी केली. स. १९३१ मध्ये भोपाळराज्य हिंदु सेवासंघाने अशी मागणी केली कीं, राज्यांतील सर्व विभागांत उर्दूच्या बरोबरीने हिंदी भाषा सुरू करावी.परंतु या अर्जासहि केराची टोपली दाखविण्यांत आली.

## हिंदुधर्माची कुचेष्टा

विद्यार्थ्यांना शिष्यवृत्ति देण्यातहि असाच पक्षपात! विद्यार्थी मुसलमान असला कीं त्याला छात्रवृत्ति ताबडतोब मिळते. मग लायकी नालायकी पाहण्यांत येत नाही. यासंबंधी हिंदूंनी फारच ओरड केली तेव्हा त्यांना अलीकडे सुमारें शें. ३० छात्रवृत्त्या देण्यांत येऊं लागल्या आहेत. शाळांतून नेमण्यांत येणाऱ्या पुस्तकांतून हिंदु धर्म व हिंदूंतील श्रेष्ठ पुरुष यांची थट्टा करण्यांत येते. पुस्तक ६मध्ये राजा दशरथाला 'बेवकूफ' इत्यादि विशेषणांनी संबोधण्यात आलेलें आहे. आदर्शभूत सर्व चरित्रें कुराणांतील व इस्लामी इतिहासांतील दिलीं आहेत. हिंदूंच्या इतिहासाचा उल्लेख अत्यंत तुच्छतेने करण्यांत आला असून मुसलमानी इतिहास म्हणजे 'सुवर्ण युग' म्हणून वर्णिला आहे. शिक्षण खात्यांतील डायरेक्टर, असि. डायरेक्टर, पर्सनल असिस्टंट डायरेक्टर, हायस्कूल हेडमास्तर वगैरे सर्व अधिकारी एकजात मुसलमान आहेत.

## कुराण-पठनाची सक्ति

शाळांना एकंदर सुट्या ५०, त्यांत हिंदुसणाबद्दल फक्त १६ सुट्या मिळतात. शाळांतून हिंदु विद्यार्थ्यांची संख्या जास्त आहे ही गोष्ट ध्यानीं धरण्यासारखी आहे. हिंदूंच्या शिक्षणांत अनेक विघ्नें उपस्थित करण्यांत येतात. हिंदु विद्यार्थी पास करण्यांतहि अत्यंत पक्षपात करण्यांत येतो. शाळांतून धर्मशिक्षण अवश्य ठेवलें आहे. अहमदिया व उबैदिया या शाळांतून तर केवळ धर्मशिक्षण देण्यांत येतें. कुराण-पठन हें अवश्य म्हणून ठेवलें आहे. राज्यांत हिंदूंची 'बालकिसा' स्कूल म्हणून एकच शिक्षणसंस्था आहे. त्याला फक्त ३८४५ रुपयांची ग्रँट देण्यांत येते व इतर म्हणजे सुल्तानास्कूलला २८३३३रु., व्हिक्टोरिया स्कूलला १०३८२ व हमीदिया स्कूलला६३३४ याप्रमाणे ग्रँट देण्यांत येते.

इस्लामधर्म-प्रसार हें नबाबाचें मुख्य धोरण दिसतें. कारण राज्याबाहेरील मुसलमानी शिक्षणसंस्थांस पुढीलप्रमाणे देणग्या देण्यांत येतात. सायन्स लायब्ररी अलीगड ६ हजार, मद्रास देवबंद ३ ह., इशाअत इस्लाम लंडन १२००, मुस्लीम अनाथालय कलकत्ता ३४००, क्रिकेटक्लब अलीगड २४००, मुस्लीम शिक्षण परिषद ३४००, मुस्लीम गर्ल्स स्कूल लखनौ १३००,

मुस्लीम गर्ल्स हायस्कूल पानिपत १२००; हीं व याखेरीज आणखी संस्थानाबाहेरील १६ संस्था मिळून ११५९८२ रुपयांची खैरात करण्यांत येते.

### धर्मस्वातंत्र्य

भोपाळ राज्यांत हिंदूंना धार्मिक अगर सामाजिक स्वातंत्र्य कांहींचेंहि नाही. भोपाळ राज्यांत आर्यसमाजाची एकहि शाखा नाही. हीच स्थिति हिंदूंच्या इतर संस्थांची. पं. शिवनारायण वैद्य हे तेथील ब्राम्हण सभेचे एक प्रमुख कार्यकर्ते म्हणून त्यांजवर कसा गहजब झाला या गोष्टी सर्वश्रुत आहेत. कोणी हिंदु आपला संघ काढूं लागला कीं, त्यांच्या मार्गांत विघ्नें आणण्याच्या हेतूने एक 'औरंगझेब असोसिएशन' नांवाची संस्था स्थापन करण्यांत आली आहे.

### हिंदु स्त्रियांना धोका

हिंदूंची मुलें व स्त्रिया पळविणें सररहा सुरू असून त्यांच्याबद्दल तक्रारी केल्या तरी दाद लागत नाही. एखादा हिंदु मुसलमानी धर्मांत गेला तर तेथील कायद्यान्वयें त्यांस परत स्वधर्मांत येतांच येत नाहीं. बाहेर ठिकाणाहून हिंदु मुलें पळवून आणून तेथें मशिदींत ठेवण्यांत येतात. त्यांना पुनः आपल्या घरांचें दर्शन व स्वधर्माचें नांवहि ऐकूं येत नाही. अ. भा. हिन्दु महासभेने हिंदूंच्या दुःस्थितीची चौकशी करण्यासाठी एक कमिटी नेमली होती. त्या कमिटीपुढे पळवून नेलेल्या स्त्रियांसंबंधाने फार रोमांचकारी हकीकत सांगण्यांत आली. राजा मिया नांवाच्या मुसलमानाने लीलावती नांवाची एक हिन्दु स्त्री पळविली. हाजि मिया यानें बाबूप्रसाद तिवारी यांच्या स्त्रीला पळवून नेलें. अशा अनेक कथा व जबरीनें मुसलमान केल्याच्या गोष्टी साक्षीदारांनी सांगितल्या.

### धर्मकृत्यांत विघ्नें

सुमारें ८० वर्षांत हिंदु देवतेचें एकहि नवें मंदिर बांधण्यांस परवानगी देण्यांत आली नाही. शिवाय पूजाअर्चा, कथा, पुराणें या कामांत विघ्नें उपस्थित होतातच. शेजारीं राहणाऱ्या मुसलमानांना त्रास होतो या सबबीवर भोपाळमधील एका मंदिरांतील गायन बंद करण्यांत आलें. उलट मशिदी मात्र अनेक ठिकाणीं नव्यानव्या उठत आहेत. भोपाळ शहरांत १३० व राज्यांत १०४ मशिदी आहेत व त्यांवर ४१४०० रु. खर्च होतो. सिनेमाच्या द्वारेंहि इस्लाम-धर्मप्रचार करण्यांत येतो. तबलीघ संस्थांनाहि भरपूर मदत करण्यांत येते. सरकारी तिजोरीतून फसली १३३७ सालीं बाहेरच्या तबलीघ संस्थांस १४९३०२ रुपये मदतीदाखल दिले आहेत. अशा रीतीनें हिंदूंच्याकडून वसूल झालेल्या रकमांतून इस्लाम-धर्मप्रचार होत आहे. हिंदूंना धर्मस्वातंत्र्य मुळीच नाही. कोणी हिंदु विधर्मांत गेला तर पैतृक संपत्तीवर त्यांचा वारसा राहत नाही असें हिंदुधर्मशास्त्र आहे. परंतु हें धर्मशास्त्र लाथाडून हिंदु बाटला तरी त्याला आपल्या पैतृक संपत्तींतील हिस्सा मिळालाच पाहिजे असा भोपाळचा एक कायदा आहे. त्याचप्रमाणें एखादी स्त्री मुसलमान झाली (बहुधा जबरीनेच बाटविल्या जातात) तर अगोदर तीसंबंधीं दाद लागत नाही व दाद लागली तरी नवऱ्याचा तिच्यावरील हक्कच नष्ट होतो असा कायदा भोपाळमध्यें आहे.

### कायदेमंडळ

भोपाळ राज्यांत कायदे-मंडळ स्थापन झालें असून संस्थानी राजकारणांत लोकशाहीची तत्त्वें रूढ केलीं असल्याचा डांगोरा पिटण्यांत येत आहे. परंतु कायदेमंडळाचा देखावा कसा भ्रामक व दिशाभूल करणारा आहे हें पुढील स्थितीवरून ध्यानीं येईल. या कायदेमंडळांत एकंदर २४ सभासद आहेत. त्यांत ७ हिंदु असून १७ मुसलमान आहेत. त्यांची वांटणी अशी—

| | | | |
|---|---|---|---|
| सरकारी अधिकारी | १४, | मुसलमान १३, | हिन्दु १ |
| सरकारनियुक्त | २ | १ | १ |
| लोकनियुक्त | ८ | ३ | ५ |

ज्या राज्यांत श. ९० हिन्दु तेथील हिंदूंचें प्रतिनिधी कायदेमंडळांत किती आहेत हें वरील हकीकतीवरून लक्षांत येईल. या कायदेमंडळाला कांही विशेष हक्क आहेत असेंहि नाही. नबाबसाहेब आपल्या इच्छेनुसार वाटेल तो कायदा रद्द करूं शकतात. कायदेमंडळांत जे हिंदु सभासद आहेत त्यांच्या मागें गुप्त पोलिसांचा जाच फार आहे. इतर लोकांशीं त्यांना संबंध ठेवूं दिला जात नाही व त्यांस कसल्याहि सार्वजनिक कार्यांत भाग घेतां येत नाही. या हिंदु सभासदांना सरकारची इतकी दहशत बसली आहे कीं, त्यांना धार्मिक अगर सामाजिक उत्सव-समारंभांत भाग घेणेंहि कठिण झालें आहे. यावरून कायदेमंडळ हें एक खेळणें कसें झालें आहे हें दिसून येईल.

### सरकारी नोकऱ्या

राज्यांत हिंदूंची संख्या जास्त अर्थात् राज्याचा वसूलहि हिंदूंकडून जास्त होतो; परंतु त्या प्रमाणांत त्यांना नोकऱ्या मिळत असतील म्हणावें तर तसेंहि नाही. या संबंधांत हिंदूंनी अनेक अर्ज केले, परंतु दाद नाही. राज्यांत एकच हिंदु मंत्री राजा अवधनारायण हे आहेत. नोकऱ्यांचें प्रमाण पाहा—

| विभाग | एकंदर जागा | हिंदु | मुसलमान |
|---|---|---|---|
| नबाबांचा खास नोकरवर्ग | २२ | २ | २० |
| स्टेट कौन्सिल | ६ | १ | ५ |
| जम्मू सोशल कौन्सिल | ४ | १ | ३ |
| औद्योगिक | १ | ० | ० |

| | | | |
|---|---|---|---|
| सेक्रेटरियट | २२ | १ | २१ |
| पर्सनल स्टाफ | ५ | ० | ४ |
| हायकोर्ट | ४ | ० | ४ |
| ज्युडीशियल ऑफिसर | १७ | १ | १६ |
| ऑनररी मॅजिस्ट्रेट | १४ | — | १४ |
| लीगल ॲडव्हायसर | १ | — | १ |
| पोलीस | १४ | — | १४ |
| ट्रेझरी व हायकोर्ट | ५ | ३ | २ |
| कॉमर्स इंडस्ट्री | २ | — | २ |
| अबकारी | २ | — | २ |
| पब्लिक वर्क्स | ८ | — | ७ |
| जंगल | ५ | — | ५ |
| रेकॉर्ड | २ | — | २ |
| बंदोबस्त | १ | १ | — |
| को-ऑपरेटिव्ह सोसायटी | २ | — | २ |
| लॅबोरेटरी | २ | — | २ |
| शिक्षण | ८ | १ | ७ |
| धर्म | १० | — | १० |
| तुरुंग | १ | — | १ |
| पुराणवस्तुसंशोधन | १ | — | — |
| म्यु. कमिटी भोपाळ | ९ | १ | ४ |

हीं व अशाच प्रकारचीं इतर खातीं पाहिलीं तरी त्यांतूनहि वरिष्ठ जागांवर मुसलमानांचाच भरणा आढळतो.

### हिंदूंच्या मागण्या

भोपाळ राज्यांत हिंदूंची अशी स्थिति आहे ती दूर व्हावी व हिंदुसमाजाला योग्य रीतीने वागविण्यांत यावें याबद्दल ता. १२ डिसेंबर १९३१ रोजीं तेथील हिंदूंनी एक अर्ज करून त्यांत २४ मागण्या केल्या होत्या. त्यांची दाद तर नाहीच, परंतु हिन्दूंनी अशा प्रकारची कांहीहि चळवळ करूं नये अशाबद्दल सर्व प्रकारचे प्रयत्न करण्यांत येत आहेत. भोपाळ राज्य हिंदु सेवासंघाने पुढील आशयाच्या मागण्या केल्या होत्या. त्या अशा:— आपल्या तक्रारी मांडण्यासाठी हिंदु महासभेचें अधिवेशन भरविण्याला परवानगी द्यावी. हिंदी भाषेला स्थान मिळावें. हिंदूंना लोकसंख्येच्या प्रमाणांत वरिष्ठ नोकऱ्या द्याव्या. त्याच प्रमाणांत कनिष्ठ नोकऱ्याहि द्याव्यात. शाळांमध्ये हिंदी भाषेंतून शिकविण्याचा नियम करावा. हिंदू मंदिरांवर होणारा खर्च हिंदु कमिटीच्या हातून करावा. हिंदु जहागिरदारांच्या जप्त केलेल्या जहागिरी त्यांस परत द्याव्या. कित्येक हिंदूंच्या जमिनी मुसलमानांच्या कबज्यांत आहेत त्या त्यांच्या त्यांना परत मिळाव्या. राज्यांत हिंदुधर्माचा प्रसार होण्यासाठी हिंदु धर्मप्रचारक नेमावेत. हिंदूंच्या संबंधाने जे दोन कायदे (बाटलेल्यास त्याचा पैतृक हिस्सा मिळणें, व बाटविलेल्या स्त्रीवरील हिंदु पतीचा हक्क नष्ट करणें ) आहेत ते रद्द करावे, मशिदीपुढे वाद्यें वाजविण्यास परवानगी असावी. कायदेमंडळ व म्युनिसिपालिटी यांमध्ये लोकसंख्येच्या प्रमाणांत हिंदूंना प्रतिनिधित्व द्यावें. गोमांस विकण्यास एक स्वतंत्र मार्केट बांधावें; वाटेल त्या ठिकाणीं तें विकूं देऊं नये.

अशा प्रकारच्या मागण्या करण्यांत आल्या. परंतु त्यांचा कांहीएक उपयोग झाला नसून राज्यांत सभा भरविण्यास परवानगी नाही व लोकांना आपलीं दुःखें चव्हाट्यावर मांडण्याचीहि संधि नाही. तरीहि पण भोपाळच्या नबाबांचा प्रजाहितदक्ष राज्यकर्ते म्हणून डांगोरा पिटण्यांत येतोच. तो कितपत खरा आहे तें वरील हकीकतीवरून नीट ध्यानीं येईल.

# पुणे शहरांतील स्थानिक स्वराज्य

## गेल्या पन्नास वर्षांचें सिंहावलोकन

( ले. एक नागरिक )

गेल्या विजयादशमीच्या सुमुहूर्तावर '१९५० चें पुणे' व त्यांतच अंतर्भूत असलेलें 'नगर संरक्षक दल' या दोन संस्थांची नुकतीच रीतसर स्थापना करण्यांत आली. या दोन संस्थांचे स्थापनेमुळे इतके दिवसपर्यंत वर्तमानपत्रांतून येणाऱ्या लिखाणास व विचारास निश्चित स्वरूप मिळून विजयादशमीचे सुमुहूर्तावर एका अर्थाने स्थानिक स्वराज्याच्या कक्षेत येणाऱ्या विचारांचें सीमोल्लंघन होऊन प्रत्यक्ष कामास सुरुवात झाली. महाराष्ट्रांत अग्रगण्य म्हणून समजल्या जाणाऱ्या पुण्यासारख्या शहराने अशा ध्येयवादी व व्यवहारपूर्ण संस्था स्थापून मार्गदर्शीत्वाचे आपलें व्रत कायम ठेवलें ही गोष्ट त्याला भूषणावह होय.

## उभय संस्थांचें ध्येय

'१९५० चें पुणे' या संस्थेचें ध्येय 'पुणे शहरांतील प्रत्येक नागरिक सुसंस्कृत, बलवान् व कार्यक्षम व्हावा आणि शहरांतील प्रत्येक कुटुंबास चांगल्या प्रकारें चरितार्थ चालविण्यास जरूर असणारी साधनसामुग्री मिळावी, यासाठी अवश्य असणारीं कामें अत्यंत कळकळीने व कार्यक्षमतेने व पुणे जिल्हा अगर महाराष्ट्र यांच्या उत्कर्षाच्या आड येणार नाहीत अशा रीतीने करणारी नगर-संस्था पुण्यास लाभावी म्हणून खटपट करणें, हें आहे. ही संस्था वरील ध्येयास पोषक असें शिक्षण देण्याचा प्रयत्न करणार आहे. पण नुसतें ध्येय ठेवून उपयोग काय ? प्रत्यक्ष व्यवहारांत प्रत्यक्ष कामाचाच उपयोग. हें काम करण्यासाठी 'नगर संरक्षक दला'ची योजना आहे. वरील संस्थेचें ध्येय दृष्टीपुढे ठेवून काम करणारे स्वयंसेवक तयार करून त्यांचेकडून नगराच्या आरोग्य वगैरे बाबींतील कामें करून घ्यावयाचीं व अशा रीतीने संस्थेचा व्याप वाढवीत पुणे शहराची सेवा करावयाची असा सध्याच्या कामाचा आराखडा आहे. मनुष्याची उन्नति व्हावयाची ती सर्वांगीण व्हावी लागते. धष्टपुष्ट शरीर व त्याबरोबरच धडधाकड मन यांची जोडगोळीच मनुष्यास कार्यक्षम बनविते. स्थानिक स्वराज्य संस्थांचें ध्येय हें व पाहिजे.

या संस्थेचें जें कार्यक्षेत्र आहे व तिचीं जीं ध्येयें आहेत, तींच ध्येयें व तेंच कार्यक्षेत्र पुणे शहर म्युनिसिपल कमिटीचें असलें पाहिजे म्हणून "सन १९५०चें पुणे" कसें होईल याची कल्पना करून आजचें पुणे व त्याचबरोबर पन्नास वर्षांपूर्वीचें पुणें याचा विचार साकल्याने करून पाहिला असता तो मोठा बोधप्रद व मनोरंजक होईल असें वाटतें. पुणें शहर म्युनिसिपल कमिटीशीं सहकार्य करून ती करीत असलेलें कार्य पुढे चालविण्याचें या संस्थेने ठरविलें आहे. पण पुणे शहर म्युनिसिपालिटीने आजपर्यंत कोणतें कार्य केलें,तिचा कारभार कसा होता व आहे, तिची स्थापना केव्हा झाली, तिची वाढ कसकशी झाली हाहि इतिहास पाहिला पाहिजे. म्हणजे यापुढील केल्या जाणाऱ्या कार्याची नीट कल्पना येईल. उच्च ध्येयें धरावींत, तीं गांठण्याचा प्रयत्न अतिशय कष्ट सोसून करावा यांतच भूषण आहे. असें उच्च ध्येय गांठीत असतांना यदाकदाचित् अपयश आलें तरी नामोहरम होण्याचें कारण नाही. म्युनिसिपल कारभारांत दोष असतील, परंतु ते सुधारण्याचा प्रयत्न न करता निव्वळ दोषांचें प्रदर्शन करून त्यांचेचबद्दल टिमकी वाजविणें रास्त होणार नाही. म्युनिसिपल कारभार,त्याचें कार्यक्षेत्र अवाढव्य असल्यामुळे त्याच्यांत चुका होणार नाहीत असेंहि म्हणतां येणार नाही. पण त्याचबरोबर म्युनिसिपल कमिटीकडून शहरांतील नागरिकांचें आरोग्य, संस्कृति व कार्यक्षमता वाढविण्याकरिता जे प्रयत्न केले जातात त्यांचेकडे कानाडोळा करून चालणार नाही, तर त्यांची योग्य ती किंमत म्युनिसिपल कमिटीचे पदरांत टाकिली पाहिजे.

## पुण्याची परिस्थिति

आपणापैकीं शेंकडा पाऊणशें लोकांना आपल्या जीविताचें, वित्ताचें रक्षण करणाऱ्या म्युनिसिपल कमिटीबद्दल असावी तशी माहिती नसते. पुणे शहर म्युनिसिपल कमिटीची स्थापना केव्हा झाली, तिची वाढ कसकशी झाली, तिची स्थिति पूर्वी काय होती, आज कशी आहे, आपण निवडून देतों त्या नगरपित्यांकडून आपणास ध्येयाचें शिखर गांठण्याचे कामीं मदत होऊन आपण त्या कामीं वर उन्नतीकडे चाललों आहोंत का सर्व जण मिळून अवनतीच्या खोल गर्तेकडे घसरत आहोंत हें पाहिलें पाहिजे.कारण स्थानिक स्वराज्याच्या गाड्याचीं चाकें दोन.त्यांपैकीं एक नगरपिते व दुसरे नागरिक अशी कल्पना केली तर या दोन चाकांनीं एकमेकांशीं सहकार्य करून हा स्वराज्य-संस्थेचा गाडा स्वराज्याचे ध्येयाकडे नेण्याचा प्रयत्न करणें हें व योग्य होय.

पुणे म्युनिसिपालिटीची स्थापना होण्याचे अगोदर याच पुणे शहराची स्थिति काय होती याचा विचार अगोदर केला पाहिजे.म्हणजे ज्या स्थितींत म्युनिसिपल कमिटी स्थापन झाली तिच्यापेक्षा आजची स्थिति चांगली आहे किंवा त्या स्थितीपेक्षा आजची स्थिति वाईट आहे, यावरून म्युनिसिपल कमिटीची कामगिरी बरी वाईट ठरविणें योग्य होईल. साधारणपणे पुणे म्युनिसिपल कमिटी स्थापन होण्याचे अगोदर म्हणजे सन १८५६-१८५७ या सालापूर्वी पुणें शहराची आरोग्य, पाणीपुरवठा वगैरे बाबतींतील स्थिति तितकीशी समाधानकारक नव्हती,हें आपणांस म्युनिसिपल कमिटीचे रिपोर्ट व इतर पुस्तकें यांचे साहाय्याने कळतें. बहुतेक ठिकाणीं अरुंद रस्ते, दमट घरें व अस्वच्छता हीं बऱ्याच प्रमाणांत होतीं.पाण्याचे बाबत नानाफडणीसांनी घातलेले नळ, चौधरी यांचे नळ वगैरे साधनांनी पाण्याची सोय केली गेली होती. परंतु त्याचबरोबर सदरचें पाणी शुद्ध करून उपयोगांत आणण्याचा परिपाठ नव्हता. तसेंच शौचकुपांची पद्धत सार्वजनिक आरोग्याचे दृष्टीने विघातक अशीच होती. या सर्व व इतर अशाच गोष्टींचा एके ठिकाणीं विचार केला असता ज्या वेळीं पुणे शहर म्युनिसिपल कमिटी स्थापन झाली त्या काळीं म्हणजे स.१८५६-५७ या काळांत वर दिलेल्या परिस्थितींत त्या वेळेस नेमल्या गेलेल्या नगरपित्यांस कामें करावीं लागत

होतीं, ही गोष्ट दृष्टीआड करून चालणार नाही. ज्या माणसांच्या कामगिरीची किंमत ठरवावयाची त्या माणसांचे भोवतीं त्या वेळीं परिस्थिति काय होती तिचा विचार अगोदर करावयास पाहिजे असतो. त्याप्रमाणें पुणे शहराच्या बाल्यावस्थेंतील स्थानिक स्वराज्य संस्थेस शहरांतील अस्वच्छ व अरुंद रस्ते, घाणेरडे शौचकूप, दमट घरें या व अशाचसारख्या इतर गोष्टींबरोबर झगडून प्रगति घडवून आणावयाची होती. त्यामुळे त्यांचें प्रगतीचें पाऊल आस्ते कदम पडत गेलें असल्यास त्यांत त्यांचा दोष नाही.

पुणे शहर म्युनिसिपल कमिटीची स्थापना सन १८५६-५७ या सालीं झाली. सदरची संस्था स्थापन होण्याचे कामीं लोकपक्षाकडून मागणी करण्यांत आलेली नव्हती, तर सरकारनेच सदरची संस्था लोकशाहीचे हातीं विशिष्ट नियमाने बद्ध करून दिली. तथापि एकपरी सदरची संस्था लोकशाही तत्त्वावर उभारलेली नव्हती असें म्हणावयास हरकत नाही. यामुळे अशा संस्थेच्या बाल्यावस्थेंत जे दोष तिच्यात शिरून बसले, ते तसच तिच्यांत राहून मोठेपणींसुद्धा त्यांचा पूर्णपणें नायनाट झालेला नाही. तथापि एक गोष्ट खरी कीं, त्याच दोषांबरोबर सदर संस्थेमुळे आपणांस जे फायदे झाले, जी आपली उन्नति झाली, त्यांचें श्रेय आपण त्या त्या वेळच्या नगरपित्यांस दिलें पाहिजे. पुणे शहर म्युनिसिपल कमिटीची स्थापना झाल्यावर त्या संस्थेंत प्रथम लोकनियुक्त सभासद असावयाचे, त्याऐवजीं सरकारनियुक्त लष्करी व पोलीस खात्यांतील अशी अधिकारी मंडळी होती.

### सरकारनियुक्तांचा कारभार

पुणे शहर म्युनिसिपल कमिटीची स्थापना सन १८५६ सालीं झाली असली तरी तिच्या हातून खऱ्या व लोकहिताच्या दृष्टीने म्हणण्यासारखी कामगिरी होण्यास सन १८६० पासून सुरुवात झाली. या वेळीं ध्यानांत धरण्यासारखी गोष्ट म्हणजे ही कीं, जे सभासद म्युनिसिपल कमिटीचे बोर्डावर असत, त्यांची निवडणूक, ज्या लोकांचे जीविताचें, वित्ताचें रक्षण व्हावयाचें होतें,ज्यांच्या सुखसोयी करावयाच्या होत्या त्या लोकांतून न होतां सदर सभासदांची निवड सरकारकडून होत असे. त्या वेळीं लोकनियुक्त असा एकहि सभासद नव्हता.अशी पद्धत सन१८८५ सालापर्यंत चालू होती. या कालखंडाचेसुद्धां परत दोन विभाग करावे लागतील. प्रथम विभाग सन १८५६ ते १८७५चा. या कालांत सरकारनियुक्त सभासदांची संख्या ३८ होती. सदर संख्या ठरवितांना लोकसंख्येचा वगैरे विचार केला गेला नसावा असें दिसतें. ज्यांची नेमणूक व्हावयाची ते सभासद सर्व रावबहादूर, खानबहादूर, सरकारी अधिकारी, पोलीस अधिकारी असे असत. त्या वेळीं अध्यक्ष निवडण्याचा अधिकार या सरकारनियुक्त सभासदांनाहि नसे, तर अध्यक्षपदाची माळ कायमचीच पुणे जिल्ह्याचे अधिकारी म्हणजे कलेक्टर यांचे गळयात घालून ठेवलेली होती. त्यानंतर १८७५ ते १८८३ या कालांत सदर सरकारी अधिकारी सभासदांची संख्या कमी करण्यांत येऊन ती २८ करण्यांत आली. जरी सभासदांचे संख्येंत बदल करण्यांत आला तरी पद्धत मात्र पूर्वीचीच ठेवण्यांत आली होती. म्हणजे जे सभासद बीनअधिकारी म्युनिसिपल कमिशनर म्हणून असावयाचे, त्यांचीहि नेमणूक सरकारच करीत असे. व त्या वेळींहि अध्यक्षस्थान मंडित करण्याचें काम कलेक्टरसाहेबांकडेच असे.

अशा तऱ्हेने पुणे येथील स्थानिक स्वराज्यास प्रारंभ झाला. व त्यामुळे प्रथम प्रथम तरी त्यांत एकांगीपणा राहिला गेला. तथापि या लोकांचे हातूनहि प्रतिकूल परिस्थितींत बरेंचसें काम केलें गेलें हें खरें. त्या वेळची पुण्याची एकदर स्थिति काय होती, त्यांत किती सुधारणा व्हावयास पाहिजे होती याचा थोडा फार उल्लेख केलेला आहेच.त्या मानाने पाहता थोडी का होईना पण भरीव कामगिरी या काळांत झाली,व शहर सुधारून लोकांची आरोग्यविषयक सुधारणा घडवून आणणें, शाळा स्थापन करून, असलेल्या शाळांना मदत करून उच्चवर्णीयांत व खालच्या जातींत शिक्षणाचा प्रसार करणें यासारखीं कामे सुरू होऊन हा स्वराज्यसंस्थेचा गाडा आस्ते कदम पुढे चालूं लागला. सन १८८५ चे सुमारास मात्र प्रगतीचें पाऊल बऱ्याच जोराने पुढें पडलें. प्रतिनिधी निवडून देण्याचा हक्क प्रथम याच सालीं मिळाला. त्यामुळे म्युनिसिपल कारभारांत लोकशाही सुरू झाली, असें म्हणण्यास हरकत नाही.

## केळकरांचें मद्रासेंतील भाषण

ता. ८ ऑक्टोबर रोजीं मद्रास येथे तेथील **'स्वदेशमित्रन्'** पत्राच्या सुवर्णमहोत्सवाचे अध्यक्ष या नात्याने श्री. **न. चिं. केळकर** यांनी जें भाषण केलें त्याचा आशय पुढे दिला आहे.

"श्री. रंगास्वामी अय्यंगार यांच्याशीं माझा स्नेहभाव आहे व. त्याशिवाय 'स्वदेशमित्रन्' पत्राला लौकिक मिळवून देणारे श्री. सुब्रह्मण्य अय्यर यांचाहि मी चाहता आहें. १८९७ सालची उमरावतीची

काँग्रेस आटोपल्यावर ते आणि मी नागपुरास गेलों असतां त्यांच्या अध्यक्षतेखालीं माझें व्याख्यान झालें होतें. त्या वेळीं माझ्या संपादकत्वाखालीं निघणाऱ्या 'मराठा' पत्रांतील उतारे 'हिंदू'त घेऊन व त्यांवर अनुकूल विचार प्रदर्शित करून त्यांनी मला उत्तेजन दिलें होतें. असेंच उत्तेजन विशेष रीतीनें त्यांनी मला दिल्याचा एक प्रसंग आठवतो. तो असा कीं, त्यांनी १८९८ च्या मद्रास काँग्रेसचा रिपोर्ट लिहिला होता. आणि त्यांत 'नजरेंत भरण्याइतक्या कर्तबगारीनें टिळकांच्या गैरहजेरींत 'मराठा' पत्र चालविणारा तरुण' असें माझें वर्णन केलें होतें. या सर्व प्रोत्साहनाबद्दल मी माझी कृतज्ञता प्रगट करण्याची आज संधि घेत आहें.

हें झालें खुद्द मजसंबंधी. पण 'केसरी–मराठा' आणि 'हिंदु-स्वदेशमित्रन्' यांचाहि भ्रातृभाव लक्षांत घेण्यासारखा आहे. 'हिंदू'चा जन्म १८७८ तील, केसरी–मराठ्यांचा १८८१ मधील आणि स्वदेशमित्रन्‌चा १८८२ सालांतील. पुणें आणि मद्रास येथे इंग्रजी आणि एतद्देशीय अशीं जुळीं वर्तमानपत्रें जवळ जवळ एकाच काळीं स्थापन होतात यांत एक विशिष्ट अर्थ आहे. आणि तो हा कीं, ब्रिटिशांची सत्ता ही तरुण भारताच्या हृदयांत शल्याप्रमाणे सलूं लागली होती. मद्रासला 'महाजनसभा' अस्तित्वांत आली आणि पुण्यास तशी संस्था तिच्या आधींच मूर्त स्वरूप पावली. मद्रासला 'नेटिव्ह पब्लिक ओपिनियन' पत्र उदय पावलें, तसेच मुंबईलाहि 'नेटिव्ह ओपिनियन' प्रगट होऊं लागलें. तुमचें वंगमायामंडळ 'तसें आमचें न्यू इंग्लिश स्कूल' आणि तुमचे जसे सुब्रह्मण्य अय्यर, टी. रंगाचारियर, पी. रंगाचारियर, केशवराव पंत, एन्. सुब्बाराव आणि विजयराघवाचार्य तसे आमचे टिळक, आगरकर, नामजोशी, आपटे आणि गोखले. तुलना पुरीच करावयाची तर मी असें म्हणेन कीं, 'हिंदु' आणि 'केसरी' हे उभयता आरंभीं कर्जांत बुडालेले, नंतर भरभराट पावलेले आणि आता आर्थिक दृष्ट्या थोडे उपकारक होऊन बसलेले असे असून त्यांचा राजकारणांतील प्रभाव सतत उच्च दर्जाचा राहिलेला आहे. १९३१ त मीं केसरा-मराठ्याचा सुवर्णमहोत्सव केला, १९२८ सालीं हिंदूच्या महोत्सव अंकाकरिता लेख लिहिला आणि 'स्वदेशमित्रन्' च्या सुवर्णमहोत्सवानिमित्त तर आज मी येथे जातीनेच हजर आहें.

माझी अशी कल्पना आहे कीं, मद्रास इलाख्यांत इंग्रजी पत्रांचा पगडा विशेष आहे आणि त्याचें कारण माझ्या मतें असें कीं, या प्रांतांत इंग्रजीचा शिरकाव फार आधीं झाला. आणि यामुळे सर्वसामान्य मद्रासी माणसालाहि इंग्रजीवर प्रभुत्व मिळालें. मुंबई इलाख्यांतील स्थिति याच्या उलट आहे. लोकहिताच्या दृष्टीनें चांगलीं चाललेलीं इंग्रजी पत्रें मुंबईच्या बाहेर किती मिळतील याची शंकाच आहे. पुष्कळ जिल्ह्यांत मराठी पत्रें चांगलीं चाललेलीं आहेत. खुद्द मुंबई शहरांतहि गुजराथी पत्रांची चलती विशेष होती. कारण केवळ गुजराथीच नव्हे, तर पारशी व मुसलमान समाजाचीहि तीच चालू भाषा होती. कांहीं पत्रें दोन भाषांत निघत. पण त्यांची स्थिति दोन बायकांच्या दादल्यासारखी झाली असें जरी असलें तरी ज्या ठिकाणीं युरोपियन विद्वानांना त्यांचीं मतें चूक असल्याचें दाखवावयाचें होते, त्या ठिकाणीं रानडे, तेलंग, टिळक वगैरेंनी इंग्रजीचाहि अवलंब केला आणि परक्यांच्या आळींत जाऊन त्याला हार खावयास लावलें. याच उद्देशानें पुण्याला जरी पेशव्यांचें राज्य असतें, तरी टिळक इंग्रजी किंवा जर्मन भाषा शिकलेच असते आणि त्या भाषांतून 'ओरायन' वगैरे पुस्तकें ते लिहिते. हें सर्व जरी खरें असलें तरी समाजाच्या सर्व थरांतून ज्ञान खेळविण्याला आणि त्याला राष्ट्रीय शिक्षण देण्याला योग्य साधन म्हणजे मातृभाषा हेंच होय. पारतंत्र्याचा दुष्परिणाम हा आहे कीं, राज्यकर्त्यांना आपले विचार कळविण्यासाठी इंग्रजी भाषेची सेवा करावी लागते आणि लोकमत वळविण्यासाठी मातृभाषेची उपासना करावी लागते. यापुढे पारतंत्र्याचें ग्रहण जसजसें सुटत जाईल आणि राष्ट्रपुरुष जसजसा जागृत होईल तसतसें इंग्रजी भाषेचें वर्चस्व हटत जाईल आणि मातृभाषेचा पगडा अधिकाधिक बसेल.

मुंबई इलाख्यांतील पहिलें एतद्देशीय पत्र 'मुंबई समाचार' हें होय. हें गुजराथी असून १८२२ सालीं जन्मास आलें. मराठींतील पहिलें पत्र 'प्रभाकर' हें १८४० सालीं सुरू झालें होतें. वर्तमानपत्रांचा उगम ग्रीक रंगभूमीपासून झाला असें म्हणतां येईल. तेथे नाट्यप्रसंगींच बातम्या जाहीर केल्या जात, दुसऱ्या टोकाला वर्तमानपत्रांचा अगदी अर्वाचीन नमुना म्हणजे 'भूमिपत्रिका' हा होय. कुलाबा जिल्ह्यांत तर एका स्मारकस्तंभालाच वर्तमानपत्र मानण्यांत आलें आहे! गेल्या वीसएक वर्षांत बसली नव्हती इतकी करकचून मुद्रणनियंत्रणाची तांत हिंदी पत्रांच्या गळ्याभोंवतीं सध्या बसलेली आहे. तरीहि कार्लाइलच्या शब्दांनी मी असें म्हणतों कीं, 'वर्तमानपत्रांचा महिमा कांहीं विशेष आहे.' आणि मला आशा आहे कीं, राजकारणाची नाडी ओळखण्याचे बाबतींत आम्ही अचूक होतों, आणि सरकार अज्ञानांत होतें, असें आम्ही त्यांना आज ना उद्या पटवून देऊं !!"

# देवालय, जलाशय व अस्पृश्य वर्ग

अस्पृश्यांना स्वतःचीं दैवतें व त्यांचीं मंदिरें आहेत, पण तीं क्षुद्र आहेत. कोणी म्हणेल श्रीविठ्ठल, महादेव, रामचंद्र, मुरलीधर या सर्वमान्य देवांचीं मंदिरें अस्पृश्यांनी बांधावीं किंवा त्यांच्याकरिता स्पृश्यांनी स्वतःच्या खर्चानें बांधून द्यावीं, त्या योगानें देवदर्शनाची त्यांची गरज स्वतंत्रपणानें भागेल. त्यावर उत्तर असें कीं असले उपक्रम कित्येक ठिकाणीं झाले आहेत. तथापि त्यापासून स्पृश्य व अस्पृश्य यांनी एकाच देवतेचें दर्शन घेण्याचा मुख्य हेतु न साधल्यामुळे सदर देवळें अखेर अस्पृश्यांचींच राहिलीं. खेरीज हिंदु समाजाचा अस्पृश्य वर्ग हा पृथक् व अलग भाग आहे अशी अस्पृश्यांची भावना कायम राहून पंढरीचा विठोबा, तुळजापुरची जगदंबा, नाशिकचा काळाराम, शिंगणापूरचा महादेव यांसारख्या ज्या देवतांच्या मूर्ति साधुसंतांच्या स्तवनानें व दर्शनानें हिंदुमात्राच्या अत्यंत आदरास पात्र झाल्या आहेत त्यांस पाहण्याचें श्रेष्ठ प्रतीचें सात्त्विक सुख त्यास न लाभल्यामुळे त्यांच्या मनाची अलगपणाची रुखरुख निघाली नाही. हिंदु धर्माशीं एकजीव होण्याच्या व अस्पृश्यांचा सामाजिक दर्जा वाढण्याच्या दृष्टीनें ही सुधारणा अत्यंत निकडीची आहे यांत शंका नाही.

स्पृश्य हिंदूंच्या देवालयांत आल्यानें अस्पृश्यांचं पारमार्थिक हितहि फार मोठें साधणार आहे. देवदर्शन हा मंदिरप्रवेशापासून एक फायदा झाला. परंतु देवालयांच्या प्राकारात कीर्तन, पुराण, भजन, निरूपण इत्यादि मनुष्याच्या पारमार्थिक उन्नतीचे विविध व्यापार सुरू असतात त्यांचेहि महत्त्व विशेष आहे. कीर्तनपुराणांतून देवादिकांच्या व पुण्यपुरुषांच्या कथा श्रवणीं पडून धर्माचें ज्ञान होतें. भजनानें परमेश्वराच्या ठिकाणीं भक्ति जडते व निरूपणानें नीतिबोध मिळून मोक्षाची वाट कळते. मानवाची मानसिक व आत्मिक तळमळ निवण्याला याशिवाय सुगम साधन दुसरें कोणतें आहे? नवविधा भक्तींत श्रवणभक्तीस पहिलें व वंदनभक्तीस सहावें स्थान देण्यांत आलें आहे त्याचें मर्म तरी हेंच होय. या श्रवणभक्तीनेच अस्पृश्यांचे आचार सुधारतील व त्यांच्या अंतःकरणांत उन्नत व पवित्र विचार उदित होतील.

मनुष्याच्या पारमार्थिकच काय पण ऐहिक प्रगतीलाहि श्रवणभक्ति किती उपकारक ठरते याचा प्रत्यय नित्य श्रवणास जाणाऱ्या आबालवृद्धांच्या बहुश्रुतपणावरून व वर्तणुकीवरून कोणासहि सहज येण्यासारखा आहे. देवालय ही भक्तिज्ञानाची एक शाळा असून तिला अस्पृश्यवर्ग प्रारंभापासून मुकला असल्यामुळे त्यांच्यांत कित्येक दुर्गुण व दुराचार प्रादुर्भूत झाले आहेत त्या दोषांपासून मुक्त करून त्यांस आपल्या योग्यतेस चढविणें हें स्पृश्य हिंदूंनी आपलें कर्तव्य समजलें पाहिजे. अस्पृश्यांकरिता या सोयी वेगळ्या कराव्या म्हटल्या तरी त्या होणार नाहीत. कारण या बाबतींत मुद्दाम अशी व्यवस्था कोणीच कोणासाठी करीत नाही. देवालयांतून हे व्यापार पूर्वापार अहर्निश करण्याची वहिवाट पडली असल्यानें त्या वाहत्या ज्ञानगंगेंत स्पृश्य वर्गास सहज स्नान घडतें. त्याच गंगातीरावर देवालयप्रवेशाच्या उपायानें अस्पृश्यांना येण्याची संधि दिल्यानें त्यांचें पारमार्थिक हित अनायासेंच साधून जाईल. हा उपक्रम करीत असतां देवालयांच्या मालकांनी अगर व्यवस्थापकांनी देवालयांचें पावित्र्य व शुचित्व राखण्याची खबरदारी अवश्य घ्यावी व स्पृश्यांच्या धार्मिक भावनांनाहि दुखवूं नये. जेणेकरून स्पृश्यांचें मन प्रसन्न व पवित्र राहील व अस्पृश्यांनाहि परमार्थसाधनाचा मार्ग खुला होईल असा मेळ घालण्यांतच खरें चातुर्य व कौशल्य आहे.

वास्तविक हिंदूंची जितकीं लहानमोठीं देवालयें आहेत त्या सर्वांत देवदर्शनाकरिता अस्पृश्य लोक येणारहि नाहीत. जीं देवळें त्यांच्या लगत्याला आहेत व जीं प्रसिद्ध आहेत अशाच देवळांत अस्पृश्य येण्याचा संभव अधिक. शहरांत स्पृश्य व अस्पृश्य यांची वस्ती इतकी तुटक असते कीं कोठा देवळांत जाणें अस्पृश्य लोकांना व्यवहारतःच अशक्य आहे. अशा देवळांच्या मालकांनी अस्पृश्यांना दर्शनास येण्याची मोकळीक ठेवली काय किंवा न ठेवली काय सारखीच. पुण्यासारखें शहर घेतलें तर त्यांत पर्वती, तुळशीबाग, बेलबाग या धर्तीच्या देवालयांत देवदर्शन घेण्याची उत्सुकता अस्पृश्यांना वाटणार व ती देखील प्रारंभींच. पण एकदा त्यांना कळलें कीं अशा पवित्र स्थळीं आपणास मज्जाव नाही तर ते वर्षे वर्षे सहा सहा महिने तिकडे वळणारहि नाहीत. आणि वळल्यास दर्शन घडल्यावर पुराण, कीर्तन यांच्या श्रवणास बसणारे फारच थोडे शिल्लक उरतील. याहिपुढे जाऊन देवालयाच्या मालकांना दर्शनाच्या वेळा व वाटा ठरविणें इष्ट वाटलें तर त्यालाहि कोणी हरकत घेणार नाही. सारांश, अस्पृश्यांना मंदिरप्रवेशाची परवानगी दिल्यानें स्पृश्यांना गैरसोयी सोसाव्या लागल्या किंवा अस्पृश्य देवळांत येण्यानें स्पृश्यांनी देवळावर बहिष्कार टाकला

अशा प्रकारची कोणतीहि अनिष्ट गोष्ट न घडण्याकरिता जेवढी खबरदारी घेणे जरूर वाटेल तेवढी मालकांनी अवश्य घ्यावी त्याबद्दल त्यांस कोणीहि दोष देणार नाही. मंदिरप्रवेशाचा प्रघात एकदा सुरू झाला म्हणजे खरी भीति कोणती व काल्पनिक भीति कोणती याचा उलगडा अनुभवानेच होऊन खऱ्या भीतीचें निवारण करण्यास धर्माभिमानी व देवभक्त अस्पृश्य स्पृश्यांना आनंदाने मदत करतील. कारण खरा धर्माभिमानी व देवभक्त मनुष्य सहसा आडरानांत शिरणार नाही.

अस्पृश्यांस देवालयप्रवेशाची गरज जशी धर्मदृष्ट्या आहे तशी जलाशयाची नाही. जलाशयाचें महत्त्व त्यास मुख्यतः व्यावहारिक आहे. नद्या, ओढे, नाले, विहिरी, तळीं इत्यादि जलाशयाचीं स्थानें अनेक आहेत. नद्यानाल्यांचें पाणी ज्या गांवांना बारमहा मिळतें अशीं गांवें महाराष्ट्रांत व महाराष्ट्राबाहेर असंख्य आहेत. गोदावरी, कृष्णा, भीमा, प्रवरा इत्यादि मोठमोठ्या नद्यांच्या तीरावरील क्षेत्रांतून लाखों रुपये खर्च करून पूर्वजांनी प्रशस्त व रमणीय घांट बांधून ठेवले आहेत. ते बांधण्यांत सदर घांटांवर स्नानाखेरीज संध्यावंदन, जपजाप्य इत्यादि धर्मकृत्यें साधावीं हा त्या काळच्या लोकांचा उद्देश असून त्या उद्देशास अनुसरून काल-मानाप्रमाणें अद्यापिहि त्या ठिकाणीं धर्मकृत्यें कमी-अधिक प्रमाणांत घडत आहेत. धर्म व व्यवहार यांची सांगड हिंदु धर्मांत इतकी उत्कृष्ट व बेमालूम घालून दिली आहे कीं धर्म कोठे संपतो व व्यवहार कोठून सुरू होतो हें ठरविणें कठिण पडतें.

धर्माचें स्वरूप तात्विक तर आहेच, पण खेरीज तें आचारात्मक म्हणजे व्यावहारिकहि आहे. धर्माचा आरंभ आचारापासून होत असून हा आचार जसा सर्वसामान्य जनास समजतो तसें धर्माचें तत्त्व सहसा समजत नाही. या कारणाने आपण आपला आचार पाळला म्हणजे आपला धर्म पाळला असें मानून मनुष्य समाधान पावतो. म्हणूनच आचाराचा महिमा निरनिराळ्या ग्रंथकारांनी निरनिराळ्या रीतींनी गाइला आहे. 'आचारलक्षणो धर्मः' हें एक धर्माचें लक्षण झालें. त्याशिवाय

आचारप्रभवो धर्मो धर्मादायुर्विवर्धते ।
आचाराल्लभते ह्यायुराचाराल्लभते श्रियम् ॥
आचारात्कीर्तिमाप्नोति पुरुषः प्रेत्य चेह च ॥

अशा प्रकारचे फायदे महाभारतांत वर्णिले आहेत. त्यांचा अर्थ असा कीं, आचारापासून धर्म उत्पन्न होतो, धर्मापासून आयुष्याची प्राप्ति होते. आचारापासून आयुष्य व वैभव हीं मिळतात. आणि आचारापासूनच मनुष्यास इहपरलोकीं कीर्ति लाभते. सारांश, आचार हा ऐहिक व पारमार्थिक दृष्ट्याहि कल्याणप्रद आहे. वरील न्यायाने धर्माच्या मुळाशीं जसा आचार आहे तशी आचाराच्या मुळाशीं जलाशय व तदनुषंगिक घांट देवालयें इत्यादि साधनें आहेत. जलाशयावर स्नानाने शरीर शुद्ध केल्यावर मनुष्य संध्यावंदन व जपजाप्य इत्यादि चित्तशुद्धीचे उपाय अनुसरतो. अशा त्या पवित्र व निरामय स्थितींत तितकीच शरीरशुद्धि पावलेल्या लोकांची संगत तो चाहतो व तद्विरुद्ध वर्तनाच्या जनसमूहाच्या उपसर्गाने मन व्यथित होऊन त्याचें उद्दिष्ट साधत नाही. श्रीक्षेत्र काशी, नाशिक, वांई, माहुली इत्यादि ठिकाणीं वेगवेगळे घांट बांधण्यांतील उद्देशहि हाच होय.

हिंदुसमाजांत जाति विविध आहेत व त्या त्या जातींचे आचारहि विविध आहेत. एका जातीच्या धर्माचरणास दुसऱ्या जातीच्या वागणुकीने व्यत्यय येऊं नये यास्तव त्या त्या जातींतील धनिकांनी शक्य त्या ठिकाणीं अनेक घांट बांधून ठेवले आहेत. हिंदु धर्मांतील प्रत्येक व्यक्तीची परंपरागत समजूत अशी आहे कीं, प्रत्येकाने आपल्या जातीस विहित असा आचार पाळावा. तो आचार पाळल्याने एका जातींतील मनुष्य दुसऱ्या जातीपुढे आपल्या श्रेष्ठत्वाची शेखी मिरवितो अशी स्वतःची समजूत कोणी करून घेत नाही व त्याबद्दल द्वेषबुद्धिहि मनांत बाळगीत नाही; उलट स्वकर्माचें प्रतिपालन करण्यास चुकल्यास त्याने स्वधर्म सोडला या निंदेस तो इतरांकडून स्वतःला पात्र करून घेतो.

हिंदुसमाज आचारास किती थोर मान देतो याचें येथपर्यंत विवेचन झालें. खरा हिंदु धर्माभिमानी मनुष्य-मग तो स्पृश्य असो वा अस्पृश्य असो—स्वधर्माप्रमाणे वागणाऱ्या कोणत्याहि इसमाच्या आचाराच्या आड येण्यांत पापच समजेल. अशा स्थितींत ज्या गावीं वेगवेगळे घांट बांधलेले आहेत त्या गांवांत अस्पृश्यांना आपला पाणवठा सोडून स्पृश्यांच्या घांटावर स्नानास, धुण्यास किंवा पाणी भरण्यास जाण्याचा उपदेश केल्यास तो अविचाराचा व असमंजसपणाचा ठरेल; इतकेंच नव्हे तर इतर जातींकडून तो जुलुमाचाहि मानला जाईल. कोल्हापूरचे कांही गृहस्थ, बोर्डिंगचे बरेच अस्पृश्य विद्यार्थी बरोबर घेऊन अस्पृश्यांकडून श्री. दत्ताच्या पादुकांना स्पर्श करविण्याच्या उद्देशाने ता. २ ऑक्टोबर रोजीं नृसिंहवाडीस गेले होते. त्यांनी या बाबतींत ग्रामस्थांची संमति मागितली. पण ती त्यांनी देण्याचें नाकारलें. तथापि त्यांस न जुमानता वरील लोक आपला बेत सिद्धीस नेणार असें चिन्ह दिसताच तेथील सरकारी अधिकाऱ्यांना सुबुद्धि सुचून त्यांनी अस्पृश्यांचा स्पर्श दत्ताच्या पादुकांना होऊं दिला नाही. तरी पण अस्पृश्य

मंडळी स्पृश्यांच्या घांटावर जाऊन आली ह्या गोष्टीने ब्राह्मण आदिकरून स्पृश्य हिंदूंचीं मनें दुखावल्याचें वृत्त येथील ज्ञानप्रकाशांत प्रसिद्ध झालें असून त्या आशयाचें पत्र नृसिंहवाडीच्या ग्रामस्थांनीं आम्हां-कडेहि पाठविलें आहे. सदर घांटावर अस्पृश्य व मुसलमान यांना येण्याचें कारण नाहीं असा हुकूम कै. छत्रपति शाहुमहाराज यांनी पूर्वीच दिला असता त्या हुकुमाची पायमल्ली अस्पृश्यांकडून झाली अशी वाडीच्या ग्रामस्थांची तक्रार आहे. अस्पृश्य लोक केवळ घाटावरून गेले या-बद्दल जर ही ओरड तर त्या घांटावर अस्पृश्यांनी रोज स्नानाचा व पाणी भरण्याचा प्रघात पाडल्यास स्पृश्यांच्या मनाची किती तडफड होईल याचा वाचकांनीच विचार करावा.

जेथील नद्यांना घांट आहेत अशीं क्षेत्रें व गांवें एकंदरीनें थोडींच आहेत. पण जेथील नद्यांना व ओढ्यांना गांवच्या लांबीच्या मानानें वेगवेगळे पाणवठे आहेत अशीं गांवें पुष्कळ आहेत. अस्पृश्यांची वस्ती गावापासून तुटक असल्याने त्यांचे पाणवठेहि स्पृश्यांपासून बऱ्याच अंतरावर असतात. देवळांच्या बाबतींत अस्पृश्यांनी आपली दृष्टि देवदर्शनावर ठेवणें जरूर आहे. त्याप्रमाणेंच जलाशयाच्या बाबतींतहि त्यांनी भरपूर पाणी मिळण्या-वरच तूर्त संतुष्ट राहिलें पाहिजे. समानतेच्या हक्काच्या आधारें हा प्रश्न ते सोडवूं पाहतील तर स्पृश्य वर्गाची सहानुभूति गमावून उलट विरोधच संपादन करतील. समानतेचा हक्क सांगणारांनी स्वतः स्वच्छतेचें तत्त्व इतर जातींच्या बरोबरीने पाळावयास शिकलें पाहिजे. अस्पृश्यतानिवारणास स्पृश्य समाजाकडून विरोध होण्याचीं मुख्य कारणे दोन आहेत. एक धार्मिक व दुसरें स्वच्छताविषयक. अस्पृश्यांची राहणी स्पृश्यांइतकी सुधारेल तेव्हा स्पृश्य पुढाऱ्यांना आपल्या स्पृश्यबंधूंची समजूत घालण्यास फार वेळ लागणार नाही. ती सुधारण्यापूर्वीच स्पृश्यांच्या पाणवठ्यावर येण्याचा ते आग्रह धरतील तर तो स्पृश्य समाजावर एक प्रकारचा जुलूमच होईल.इत-केंच काय पण त्यामुळे स्पृश्यांचें आरोग्यहि बिघडल्या-वांचून राहणार नाही.कांहीच्या मतें अस्पृश्याना स्पृश्यां-च्या पाणवठ्यावर येऊं द्यावें, पण त्यांजकडून पाण्या-ची खराबी न होण्यासाठी पाणवठ्यावर पाहारा बसवावा. तथापि खेडेगांवांची स्थिति ज्यांना माहित आहे त्यांना हा पाहारा कितपत ठेवला जाईल व त्याचा सुपरिणाम कितीसा दिसून येईल याची योग्य ती अटकळ आहेच.

खेड्यांतील लोक स्वच्छतेचे नियम परंपरागत आलेले आहेत म्हणूनच बहुधा पाळतात. त्यांपैकीं फार थोड्यांना तिचें महत्त्व कळतें. त्यांच्यांत कोणत्याहि नव्या उपक्रमाविषयीं उमेद नसल्याने ते उदासीन व हताश असतात. अशा गांवांत अस्पृश्यां-ना स्पृश्यांच्या पाणवठ्यावर येण्याची गांवकऱ्यांकडून परवानगी मिळणार नाहीच व ती कदाचित् मिळा-ल्यास पाणी निर्मळ ठेवण्याला आवश्यक निर्बंध पाळले न जाता ज्यावर खेड्याचें आरोग्य अवलंबून तें पाणीच बिघडल्याने खेडीं अधिकच अवनतावस्थेस पोंचतील. कांही गांवें अशीं आहेत कीं, त्यांत साऱ्या गांवाला एकच विहीर किंवा तळें असून त्यावर पाणी भरण्यास स्पृश्य लोक अस्पृश्यांना आडकाठी करतात. या गावीं तेथील रहिवाशांनी अस्पृश्यांना गांवविहिरीवर पाणी भरूं दिलें पाहिजे किंवा त्यांना पाणी मिळण्यासाठी स्वतंत्र विहीर अथवा तळें बांध-वून घेण्याची जबाबदारी पत्करली पाहिजे. गांवाच्या मदतीने अथवा स्वतंत्र रीतीने लोकल बोर्डालाहि हें काम करतां येण्यासारखें आहे.

म. गांधी यांची डॉ. आंबेडकर यांनी ता. १७ रोजीं येरवड्याच्या तुरुंगांत भेट घेतली. तिच्यांत सार्व-जनिक विहिरींचा प्रश्न उपस्थित झाला होता. बेळगांव जिल्ह्यांतील एका गांवच्या अस्पृश्यांनी जिल्हा-बोर्डापाशीं आपल्याकरिता वेगळी विहीर बांधून मागण्याचें ठरविलें होतें. पण डॉ. आंबेडकरांस ती योजना पसंत पडली नाही. सार्वजनिक विहिरींतून पाणी काढण्याचा हक्क स्पृश्यांइतकाच अस्पृश्यांना आहे या मुद्यावर आंबेडकरांनी वेगळ्या विहिरीस विरोध केला. या ठिकाणीं अस्पृश्यांनी हक्कांकरिता भांडावयाचें कीं सोयीकडे पाहावयाचें हा प्रश्न स्वाभाविकच उद्भवतो. हक्कावरच जोर दिल्यास स्पृश्यांची बाजू अस्पृश्यांहून केव्हांहि खंबीर आहे.स्पृश्याचा वहिवाटीचा हक्क त्यास अनुकूल आहे; शिवाय लोकल फंड भरणारात त्यांचेंच बहुमत असल्याने बोर्डाला त्यांच्याच मताला मान देणें भाग आहे. डॉ. आंबेडकर यांचें धोरण एकंदरींत लढाऊपणाचें आहे. अस्पृश्यांच्या अडचणी सोयीने दूर होण्याच्या दृष्टीने त्यांचें हें धोरण अनर्थावह होय यांत शंका नाही.

# अस्पृश्यता-निवारणावर अस्पृश्योद्धार हाच उपाय

सांप्रत अस्पृश्यतानिवारणाचा उच्चार सर्वत्र सुरू आहे. उच्चाराच्या मानानें आचाराचें प्रमाण केव्हांहि कमी असावयाचें तसें तें चालू चळवळींतहि पुष्कळ कमीच आहे. तथापि त्या उच्चारांत व कदाचित् आचारांतहि अस्पृश्यतेच्या उच्चाटनाची सारी जबाबदारी स्पृश्य वर्गावरच टाकण्यांत येत असल्याचें दृष्टीस पडतें. 'आजपासून अस्पृश्यता आमूलाग्र उपटून निघाली असें समजा, देवालयें उघडा व अस्पृश्यांना आत घ्या' अशी घोषणा कानीं आली म्हणजे एखाद्यास सहज वाटतें कीं, 'काय हो, स्पृश्य समाज किती कठोर व जुलमी आहे! अस्पृश्य लोक देवदर्शनासाठीं गयावया करीत असतां हा त्यास दार उघडून नुसतें दर्शनसुद्धां घेऊं देत नाहीं. कसलीं हीं हिन्दु माणसें व कसला हा त्यांचा धर्म!' सध्याच्या घोषणेंतून हाच ध्वनि निघत असल्यामुळे ठिकठिकाणचे स्पृश्य हिन्दु मनांतून अस्वस्थ झाले आहेत.

महात्मा गांधींपासून तों थेट पं. मालवीय यांजपर्यंत सर्व पुढारी अस्पृश्यतेचें निर्मूलन करण्यास स्पृश्यांस सांगत आहेत. हा उपदेश ठीक आहे, पण त्यांत तावडतोबीची जी घाई आहे, ती मात्र स्पृश्यांना घाबरून सोडणारी आहे. कारण घाई म्हटली कीं तिच्यांत तयारीला फारच थोडी फुरसत सांपडते. म. गांधींनी या कार्यास प्रथम फक्त सहा महिन्यांचीच मुदत घातली होती. पण ती मुदत एकंदर कार्याच्या व्यापाच्या मानानें अत्यल्प असल्याचें त्यांना विदित करण्यांत आल्यावरून मुदतीचा आग्रह त्यांनी बराच ढिला केल्याचें ऐकिवांत आहे. तथापि सहा महिन्यांच्या जागीं गांधिजींनीं एखाद्या वर्षाचा संकल्प केला असला तरी त्यामुळे घाईचा लकडा तितकासा कमी झाला असें कोणीहि समजणार नाहीं. गांधीजींनी आपल्या मनाशीं देवालयप्रवेश हेंच अस्पृश्यता गेल्याचें गमक ठरविलेलें दिसतें. देवालयप्रवेश ही एकच गोष्ट घेतली तरी ती वाटते तितकी सोपी नाहीं. देवालयाचा दरवाजा काय, त्याची कडी काढली व तो मागे ओढला कीं उघडतो. पण त्याची कडी निघण्यापूर्वी व तो ओढला जाण्यापूर्वी जनतेच्या मनात फार मोठी तयारी व घडामोड व्हावी लागते.

ही तयारी एकतर्फी नसून दुतर्फी आहे. स्पृश्यांनी देवळें उघडल्यावांचून तीं उघडत नाहीत यांत शंका नाहीं. पण स्पृश्य लोक देवळें उघडण्यास कां कबूल होत नाहीत याचा विचार व्हावयास नको काय? खरें पाहू गेलें असतां मंदिरप्रवेश धर्मदृष्ट्या निकडीचा असला तरी सर्व बाजूंनी विचार केल्यास ही पायरी अस्पृश्यतानिवारणाच्या चळवळींतील शेवटची होऊं शकेल. कशास कांही ठिकाण नसता चळवळीच्या पुरस्कर्त्यांनी आधीच्या सर्व पायऱ्या गाळून एकदम मंदिरावर चाल करण्याचें ठरविल्यामुळे स्पृश्य जनतेचीं मनें किती क्षुब्ध झालीं आहेत याची कल्पना आजच्या अंकांत छापलेल्या अनेक पत्रांच्या व लेखांच्या सारांशावरून कोणासहि होणार आहे. हीं पत्रें व लेख लिहिणारांत कोणी आधुनिक सुशिक्षित आहेत, कोणी संस्कृत पंडित आहेत, कोणी लोकमताचा अंदाज घेतलेले सद्गृहस्थ आहेत तर कोणी खेड्यांतील लोकांत सदासर्वदा मिसळणारे पाटील आहेत. ते सर्व विचारी, समंजस व देशहितचिंतकच आहेत. त्यांनी आपापल्या क्षेत्रांतील समाजाचें निरीक्षण फार बारकाईने व आस्थेने केलें आहे.

वे. शा. सं. आत्मारामशास्त्री ओडलमने हे स्वतः शास्त्री आहेत. त्यांच्या लेखावरून शास्त्रीवर्गाचा प्रस्तुत चळवळीस किती तीव्र विरोध आहे याचा अंदाज लागतो. त्यांच्या मतास तें शास्त्रीमंडळीतर्फेचें म्हणून स्वतंत्र रीतीने महत्त्व आहेच; खेरीज सनातनी हिंदु लोक धार्मिक बाबतींत शास्त्री-पंडितांवरच भिस्त ठेवून वागत असल्यामुळे तेहि शास्त्रीपंडितांच्या मताचेच होत असें त्यावरून समजून चालण्यास हरकत नाहीं. सनातनी हिंदु म्हणजे बहुजनसमाज असा अर्थ केल्यास हिंदूंतील बहुजनसमाज देवालयप्रवेशास आज मुळीच अनुकल नसल्याचें निदर्शनास येतें. 'अस्पृश्यांचा मंदिरप्रवेश आचार व धर्म या दोनहि दृष्टींनी सनातनी लोक निषिद्ध मानतात' असें ओडलमनेशास्त्री यांचें विधान सर्वांनी लक्षांत वागविण्यासारखें आहे. धुळे येथेहि शास्त्रीपंडितांना बोलावून त्याजबरोबर वरील बाबतींत गृहस्थ मंडळींनी चर्चा करण्याचा योग जमवून आणिला. परंतु शास्त्रीपंडितांचा कल मंदिरप्रवेशास एकंदरीने अनुकूल नसल्याचेंच त्यांत आढळून आलें. वेदांतवागीश श्रीधरशास्त्री पाठक यांचा त्या बैठकींत जुन्या शास्त्री मंडळींशीं प्रारंभीच मतभेद होऊन त्यांनी पुढील चर्चेत भाग घेण्याचेंच नाकारलें. धुळ्याचें उदाहरण शास्त्री-पंडितांचें बहुमत अजमावण्यास पुरेसें आहे.

रत्नागिरी जिल्ह्यांतील बहाळ येथील रहिवाशी रा. बापट हे स्वतः शास्त्री नाहींत किंवा आधुनिक पद्धतीचे विद्वानहि नाहीत. ते फक्त विमा कंपनीचे एक फिरते एजंट आहेत. त्यांना स्वतःला अस्पृश्यता-

निवारणाविषयीं सहानुभूतिच वाटते. इतकेंच काय पण आंबेडकरांसारखे सुशिक्षित अस्पृश्य आपल्या घरीं पाहुणे आल्यास त्यांचा सत्कार करण्यासहि ते आढेवेढे घेणार नाहीत. अशा प्रगमनशील विचाराच्या मनुष्यांचा सल्ला असा कीं, अस्पृश्योद्धार पायरी-पायरीने झाला पाहिजे. पहिल्या पायऱ्या टाकून एकदम देवालयाच्या पायरीवर पाऊल ठेवल्याने स्पृश्य समाजावर अतिक्रमण व जबरदस्ती होईल असा त्यांचा अभिप्राय आहे. विमा कंपनीच्या एजंटाला किती गांव पाहावे लागतात, व समाजांत मिसळून गिऱ्हाईक कबजांत आणण्यासाठी काय युक्तिवाद लढवावे लागतात याची माहिती ज्यांना आहे त्यांना लोकनिरीक्षण करून अशांनी बनविलेलें मत हेंच खरें लोकमत असें समजून चालणेंच इष्ट वाटेल.

विमा कंपनीचा एजंट गांवोगांवीं हिंडला व समाजांत वावरला तरी तो उठणार-बसणार पांढरपेशा-वर्गांतच. त्याच्या पकडींत गरीब व अडाणी शेतकरी सहसा सापडणार नाही. शेतकऱ्यांचें हृद्गत ओळखण्यास त्यांच्यांतील पाटीलच पाहिजे. तशांत तो पाटील चळवळ्या असला तर अधिकच चांगला. कुलाबा जिल्ह्यांतील वेळशेतचे रा. भिकू अंबू पाटील यांनी आसपासच्या शेंकडो खेड्यांतून प्रवास केला आहे. अस्पृश्योद्धाराच्या चळवळीची आवश्यकता पटल्यावरून त्यांनी पुष्कळ शेतकऱ्यांना प्रस्तुत विषय समजून सांगितला आहे. तथापि त्यांना शें. ९५ लोक अस्पृश्यांच्या देवालयप्रवेशास प्रतिकूल असल्याचेंच दृष्टोत्पत्तीस आलें. अस्पृश्यांना देवळांत घालण्याचा हट्ट धरण्यात आल्यास स्पृश्यास्पृश्यांचीं डोकीं फुटतील, व बखेडे माजतील अशी ग्वाही त्यांचें मन त्यांना देत आहे. अस्पृश्यता घालविण्याच्या चळवळींत फार घाई झाल्यास बहुजनसमाजाकडून तिचें निवारण तर होणार नाहींच, तर उलट त्या मतास अनुकूल असणारांचा एक संप्रदाय अस्तित्वांत येऊन जसा नानक पंथ किंवा जैन पंथ तसा गांधी पंथ उदय पावेल, व जुन्या अनेक पंथांत आणखी एका नव्या पंथाची भर पडेल अशी रा. खर्डेकर यांच्या मनाने धास्ती घेतली आहे.

भिन्नभिन्न क्षेत्रांतील लेखकांच्या मतांचा परामर्ष इतक्या विस्ताराने घेण्याचा उद्देश हा कीं, त्यावरून वाचकांना लोकस्थितीची नीट कल्पना यावी. कोणतीहि जुनी रूढि मोडून नवी रूढि पाडण्याच्या वेळीं त्या नव्या रूढीसंबंधाने बहुजनसमाजास काय वाटतें याचा अंदाज कार्यकर्त्यांना अवश्य असावा लागतो. त्या दृष्टीने विचार केल्यास देवालयप्रवेशासाठी चळवळ, वादविवाद व हालचाल गेलीं चार-पांच वर्षे सुरू असताहि त्या चळवळीस लोकमताची अनुकूलता अद्यापि मिळविता आली नाही ही गोष्ट स्पष्ट आहे. याचें कारण असें कीं, त्यासंबंधाची चळवळ पद्धतशीर रीतीने व्हावी तितकी झालीच नाही. मंदिर-प्रवेश हें धर्मदृष्ट्या अस्पृश्यांचें अंतिम साध्य होय. त्यासाठी करावयाच्या खटपटीचा प्रारंभ अस्पृश्यता-निवारणाच्या चळवळीच्या शेवटीं व्हावयास पाहिजे. त्या खटपटीचें आरंभस्थान भलतेंच धरलें तर तिला त्वरित यश यावें कसें ? अस्पृश्यतानिवारणाचीं अनेक अंगें आहेत. त्यांपैकीं कांहीं अंगांची पूर्तता करण्याची जबाबदारी स्पृश्य वर्गावर आहे व कांहींची जबाबदारी अस्पृश्यांवर आहे.

खेड्यापाड्यांतील स्पृश्यांवर अस्पृश्यतेच्या कल्पनेचा संस्कार इतका दाट बसला आहे कीं तेथील कित्येक माणसें अस्पृश्यांच्या शरीराचा विटाळ मानतातच, पण त्यांच्या सावलीलाहि त्यांच्या शरीराइतकेंच भिऊन ते तिजपासून दूरदूर पळतात. अस्पृश्यांना स्पृश्य लोक आपल्या घराचा उंबरठा ओलांडून पुढच्या अंगणांतहि पाऊल टाकूं देत नाहीत, मग त्यांचे पाय ओटीला व बैठकीला लागण्याची गोष्ट लांब राहिली. मद्रासेकडील कांहीं भागांत अस्पृश्यांना ब्राह्मणांच्या वस्तींतूनहि रस्त्याने चालत जाण्याची मनाई आहे. ज्या अस्पृश्यांना स्पृश्यांचे रस्ते, अंगणें व घरेंहि अद्यापि अप्रवेश्य आहेत त्या अस्पृश्यांना देवालयांत येऊन देवदर्शन घडण्याचा पल्ला किती लांबणीचा आहे याची अटकळ प्रस्तुत चळवळीच्या पुढाऱ्यांनी आपल्या मनाशीं बांधावयास हवी. डॉ. आंबेडकर यांना या चळवळीचा अदाज पुरता आला आहे व तिचें कांहीं अंशीं वैय्यर्थ्यहि त्यांना पटलें आहे, म्हणूनच ते मंदिरप्रवेश हा अस्पृश्यतानिवारणाचा गौण भाग समजतात. त्यांचें म. गांधींबरोबर ता. १७ ऑक्टोबर रोजीं येरवड्याच्या तुरुंगांत संभाषण झालें, त्यांत त्यांनीं आपलें मनोगत अगदीं उघड केलें आहे. अस्पृश्योद्धाराचें कार्य समाधानकारक रीतीने चालू व्हावयास पाहिजे असेल तर स्पृश्य हिंदूंनी अस्पृश्यांना स्वतःच्या मार्गाने आत्मोद्धार करूं द्यावा व त्याला जरूर तें साहाय्य पुरवावें. प्रत्येक बाबतींत स्पृश्य हिंदूंचेंच त्यांना अनुकरण करावयास लावण्यांत अस्पृश्यांचें तादृश हित नाही, अशी आंबेडकरांची समजूत आहे, व ती एक प्रकारें योग्यहि आहे. म्हणूनच देवालयप्रवेश व सहभोजन यांच्या भानगडींत अस्पृश्यांना न गुंतविता चालू चळवळीस अस्पृश्यांचीं आर्थिक व सामाजिक स्थिति सुधारण्याच्या व त्यांच्यांत शिक्षणप्रसार करण्याच्या वळणावर न्यावें असा आंबेडकरांनी गांधिजींना आपला सल्ला दिला आहे.

डॉ. आंबेडकर यांचा हा सल्ला इतर रीतींनीहि विचाराई आहे. अस्पृश्य समाजाभोंवतीं विटाळाचा

वेळा दोन कारणांनी पडला आहे. त्यांपैकीं एक कारण धार्मिक आहे व दुसरें व्यावहारिक आहे. अस्पृश्यांना स्पृश्यांकडून धार्मिक दृष्टया देवालयांत मज्जाव होत आहे. हा मज्जाव करणारांत एकटे अशिक्षित स्पृश्य नसून सुशिक्षित स्पृश्यहि आहेत. सुशिक्षितांतहि देवालयप्रवेशास अनुकूल लोक आहेत; पण त्यांचें प्रमाण आज इतकें थोडें आहे कीं, त्यांच्या वजनानें किती देवळें उघडलीं जातील व त्यांतील किती उघडीं राहतील याची शंकाच आहे. अनुकूल सुशिक्षितांत हा फरक त्यांच्या धार्मिक उदारमतवादित्वामुळे व स्वराज्याच्या निकडीमुळे पडला आहे. त्यांपैकीं कित्येकजण धार्मिक औदार्याऐवजीं धार्मिक औदासीन्यामुळेहि अनुकूल झाले असतील; नाही असें नाही. परंतु कांही सुशिक्षित असे आहेत कीं त्यांना अस्पृश्यांचा मंदिरप्रवेश हा भ्रष्टाकार वाटत असल्याने स्वराज्याकरिताहि सदर भ्रष्टाकार पत्करण्यास ते कबूल नाहीत. अशा मताच्या सुशिक्षित स्पृश्यांची संख्या प्रचंड आहे. ती मंडळी स्वराज्याच्या आमिषाने किंवा म. गांधींच्या धाकाने सहजासहजीं लवकर बदेल असें लक्षण तूर्त तरी दिसत नाही. त्यांच्या मतांत फरक पडला तर तो कालाने, परिस्थितीच्या गरजेने व शास्त्राधारानेच पडेल. शास्त्राधार हें जबरदस्त हत्यार असून त्याचें वजन सुशिक्षितांच्या मनावरूनहि अद्यापि म्हणण्यासारखें हललें नाही.

अस्पृश्यतानिवारणाच्या पुढाऱ्यांनी प्रगतिप्रिय शास्त्री-पंडितांची सभा भरवून व त्यांची अनुकूलता मिळवून सुशिक्षितांत व अशिक्षितांत त्या माहितीचा प्रसार केल्यास या प्रयत्नाचा सुपरिणाम त्वरित आढळल्याशिवाय राहणार नाही. स्मृत्यादि ग्रंथांतून अनुकूल शास्त्राधार मिळणें कठीण असल्याने त्यांजवर सर्वस्वीं विसंबून चालणार नाहीं. याचें एक प्रत्यंतर मनुस्मृतीच्या चौथ्या अध्यायांतील ७८व्या श्लोकांत पुढीलप्रमाणे आढळतें —

न संवसेच्च पतितैर्न चाण्डालैर्न पुल्कसैः ।
न मूर्खैर्नावलिप्तैश्च नान्त्यैर्नान्त्यावसायिभिः ॥

याचा अर्थ असा कीं, जे जातिभ्रष्ट आहेत, चाण्डाळ आहेत, शूद्रस्त्रीपासून जन्मलेले आहेत, मूर्ख व धनोन्मत्त आहेत, अन्त्यज आहेत किंवा अन्त्यजांशीं सहवास करणारे आहेत त्यांजबरोबर एकत्र बसूं नये.

आपस्तंबाने विशिष्ट प्रसंगास अनुलक्षून मत दिलें आहे तें येणेंप्रमाणे—

हीनवर्णस्तु यः कश्चिदन्त्यजैः सह संवसेत् ।
साशिखं वपनं कृत्वा मासमेकं यवान्पिबेत् ॥

याचा अर्थ असा कीं, मनुष्य हीन वर्णाचा असताहि तो अन्त्यजाच्या सहवासांत येईल तर त्याने मुंडन करून एक महिनाभर यवप्राशन करावें. परंतु हीं वचनें फार प्राचीन असल्यामुळे त्या कालाच्या पुढे गेलेला आजचा व्यवहार सदर वचनांनी मागे खेंचूं पाहणें अविचाराचें आहे. परंतु अशी सुबुद्धि सद्यःकालीं शास्त्री-पंडितांना सुचण्याचीं चिन्हें दिसत नाहींत ही दुःखाची गोष्ट होय. अशा स्थितींत चळवळीची मुख्य भिस्त सुरुवातीला तरी देवालयप्रवेशासारख्या धार्मिक सुधारणेवर न ठेवतां अस्पृश्यांच्या सामाजिक, आर्थिक व शैक्षणिक सुधारणेवरच ठेवणें योग्य ठरेल.

भोर संस्थानाधिपति श्रीमंत बाबासाहेब पंतसचीव यांनी अस्पृश्यतानिवारणासंबंधाचें आपलें धोरण नुकतेंच जाहीर केलें आहे. त्यांत त्यांनी देवालयादि धार्मिक संस्था प्रस्तुत चळवळीपासून अलिप्त ठेवल्या आहेत त्याचें मर्म झालें तरी हेंच होय. अस्पृश्यांत सुशिक्षित व विद्वान माणसें अलीकडे निर्माण होऊं लागलीं आहेत. डॉ. आंबेडकर हे त्यांपैकींच एक होत. त्यांच्या शिक्षणामुळे त्यांच्या राहणींतहि फरक पडला आहे व त्या फरकाच्या योगाने त्यांचा विटाळ केव्हाच फिटला आहे. ते कोणाहि स्पृश्याकडे गेले असता त्यांना सन्मानपूर्वक वागविण्यांत येईल. त्यांचाच दाखला इतर सुशिक्षित अस्पृश्यांस तारतम्याने लागू पडणार आहे. अशा व्यक्तींना शहरांतून स्पृश्यांच्या बरोबरीचा दर्जा जसा प्राप्त होतो तसा तो खेड्यापाड्यांतूनहि त्यांना मिळणार नाही किंवा मिळत नसेल असें नाही. अस्पृश्यांचे प्रतिनिधि सध्याच्या कायदेकौन्सिलांत आहेत त्याहून पुढील कौन्सिलांत कैक पटींनी वाढतील. ते सर्व प्रतिनिधि स्पृश्यांत गणले जाणार यांत शंका नाही. हाच क्रम म्युनिसिपालिट्या, लोकल बोर्डे व ग्रामपंचायती यांतहि वाढत्या प्रमाणांत दिसूं लागून त्यायोगाने त्या त्या टापूंतून अस्पृश्यतेची उचलबांगडीच होणार. शिक्षण व प्रातिनिधिक संस्थांतील दर्जा यांच्या जोरावर अस्पृश्यांच्या गळयाला बसलेली विटाळाची घट्ट मिठी सुटत चालली आहे. तसाच त्यांनी पांढरपेशांचे धंदे पत्करल्यामुळेहि त्यांजभोंवतालचा विटाळाचा विळखा ढिला पडत आहे.

सगळ्याच अस्पृश्यांनी आपले धंदे गलिच्छ म्हणून ते सोडावे असा त्यांस कोणीहि सल्ला देणार नाही व देऊंहि नये. कारण त्या सगळ्यांना इतर धंदे साध्य होण्याचा संभव नसल्यामुळे त्यांच्यांतील पुष्कळांना आपले आहेत हेच व्यवसाय संभाळून राहणें अपरिहार्य आहे. पण त्यांना स्वच्छतेचे धडे देणारा गुरु भेटल्यास गलिच्छ धंदे चालवूनहि इतर वेळीं स्वच्छ व झुळझुळीत कपडे घालून संभावितपणाने वावरण्यास हरकत नाही. सारांश, आंतून शिक्षण व बाहेरून स्वच्छतेचें वळण अशी अन्तर्बाह्य सुधा-

रणा घडून येण्यावरच त्यांची अस्पृश्यतेच्या पाशांतून त्वरित सुटका होणें अवलंबून आहे. अस्पृश्योद्धार म्हणतात तो हाच. त्या उद्धाराने अस्पृश्यांचा व्यावहारिक विटाळ फिटला व स्पृश्य समाजाच्या प्रत्येक सार्वजनिक व्यवहारात ते सरमिसळीने वावरूं लागले म्हणजे त्यांना देवालयांत शिरूं द्यावें कीं नाही अशी शंकादेखील कोणाच्या मनांत उरणार नाही. हा मार्ग धिमेपणाचा व लांबणीचा आहे खरा. परंतु तो चोखाळल्यावांचून इष्ट हेतु सिद्धीस जाईल अशी आशा वाटत नाही. एकीकडून अस्पृश्यांनी स्पृश्य होण्याच्या तयारीस लागावे व दुसरीकडून स्पृश्यांनी त्यांस या बाबतींत शक्य तें साहाय्य करावें या सहकारितेच्या तत्त्वावरच अस्पृश्यता-निवारणाची चळवळ चालू शकेल. चळवळीचें मूळ अस्पृश्योद्धार व चळवळीचें फळ अस्पृश्यतानिवारण. अस्पृश्यांच्या धार्मिक उन्नतीसाठी देवालयप्रवेशाची निकड फार असली तरी बहुजन समाजाची अनुकूलता नसल्यामुळे त्यांत जेवढें सामोपचाराने यश येईल तेवढ्यावरच संतुष्ट राहून प्रस्तुत चळवळीच्या पुढाऱ्यांनी अस्पृश्योद्धाराकडेच आपलें लक्ष मुख्यत: व प्रथमतः लावावें असें आम्हांस वाटतें.

# भावी महाराष्ट्र विद्यापीठ

### कॉलेजच्या प्रमुखांची योजना

पुण्यास स्वतंत्र महाराष्ट्र विद्यापीठ युनिव्हर्सिटी निर्माण होण्याबद्दल एका काळीं पुष्कळ गाजावाजा झाला. पण पुढे त्या प्रश्नावर कार्यप्रेरक असें ऐकमत्य न झाल्यामुळे तो प्रश्न तसाच पडून राहिला. त्यानंतर अगदी अलीकडे बॅ. जयकर, रा. ब. काळे, श्री. नरसिंह चिंतामण केळकर आदिकरून सर्वपक्षीय प्रमुख व कार्यकर्त्यांनी मन घालून महाराष्ट्र युनिव्हर्सिटीच्या प्रश्नाला फिरून चालना दिल्याचें कळल्यापासून लोकांचें लक्ष साहाजिकच तिकडे वेधून राहिलें आहे. वास्तविक पाहिलें तर अगदी प्राथमिक म्हणून जी सभा झाली तिजबद्दल परिस्फुटता व्हावी असें चालकांच्या मनांत नव्हतें, हें आम्हांला माहीत आहे. कांही गोष्टी कांही एका विशिष्ट मर्यादेपर्यंत थोड्याबहुत निश्चित झाल्यानंतरच मग झालेल्या चर्चेचा निष्कर्ष लोकांपुढे मांडावा असा प्रथम चर्चा करणारांचा असलेला बेत बराच योग्य होता असेंच कोणालाहि वाटेल.

गेल्या पांचसहा महिन्यांत महाराष्ट्र युनिव्हर्सिटीच्या प्रश्नाला अनुकूल असे वारे वाहूं लागले. कै. चिपळूणकरांची पन्नासावी पुण्यतिथि साजरी करतांना केसरी–मराठा संस्था, डे. ए. सोसायटी व महाराष्ट्र विद्याप्रसारक मंडळी आदिकरून संस्थांनी सहकार्याने एक योजना जाहीर केली. त्या प्रसंगाने पुण्यांतील प्रमुख संस्थांमधील विधायक सहकार्याचा मार्ग कांहीसा मळावयास सुरुवात झाली असें म्हणावयास हरकत नाही. मध्यंतरी वर उल्लेखिलेल्या प्राथमिक सभेने एक पाऊल पुढे टाकून योजना मुक्रर केली. त्या घटनेनंतर श्री. तात्यासाहेब केळकरांच्या एकसष्टाव्या वाढदिवसाच्या प्रसंगीं त्यांच्या वैयक्तिक गौरवाच्या शुभ निमित्ताने त्यांनी महाराष्ट्र युनिव्हर्सिटीच्या प्रश्नाला विशेष महत्त्व देणारी उत्तरादाखल भाषणें केलीं. त्यांचा परिणाम थोडा झाला असें नाही. पण त्याहूनहि अधिक परिणाम कशाचा झाला असेल तर टिळक स्मारकमंदिरांतील जाहीर सभेंत त्यांनी भावी महाराष्ट्र युनिव्हर्सिटीच्या आर्थिक योगक्षेमाची चिंता वाहून भा. इ. सं. मंडळाकडे दिलेल्या आठहजार रुपयांच्या डिबेंचरावरील आपलें स्वत्व महाराष्ट्र युनिव्हर्सिटीकरिता निवृत्त केलें याचा होय. श्री. तात्यासाहेबांच्या या देणगीमुळे महाराष्ट्र युनिव्हर्सिटीचा प्रश्न केवळ कल्पनासृष्टींतून प्रत्यक्ष सृष्टींत अवतरला असें म्हटल्यास ती अतिशयोक्ति होणार नाही.

मध्यंतरीं वर उल्लेखिलेल्या मंडळाने आपल्या कार्यांत आणखी एक पाऊल पुढे टाकून येथील बहुतेक कॉलेजांच्या प्रिन्सिपालांची मिळून एक सब-कमिटी नेमिली. हल्ली अस्तित्वांत असलेलीं उच्च विद्यालयें व संशोधनसंस्था यांच्या सहकार्याने महाराष्ट्र विश्वविद्यालयाला कशी सुरुवात करता येईल याचाच प्रामुख्याने विचार करून त्यांनी एक योजना बनविली आहे. ती खालीलप्रमाणे आहे.

### प्रिन्सिपाल्स सबकमिटीची योजना

१ महाराष्ट्र युनिव्हर्सिटी ही शिकविणारी संस्था असावी व खालील संस्था तिच्या घटक–संस्था समजाव्या —

(१) फर्ग्युसन कॉलेज (२) सर परशुरामभाऊ कॉलेज (३) नौरोजी वाडिया कॉलेज (४) लॉ कॉलेज (५) भांडारकर इन्स्टिट्यूट (६) रानडे इन्स्टिट्यूट (७) गोखले इन्स्टिट्यूट (८) भारत इतिहास सं. मंडळ. शिवाय कदाचित (९) बी. जे. मेडिकल स्कूल (१०) डेक्कन कॉलेज (११) ॲग्रिकल्चरल कॉलेज (१२) एंजिनिअरिंग कॉलेज या इतर संस्थाहि सामील होतील.

२ घटना, अन्तर्व्यवस्था आणि विद्यार्थी व शिक्षक यांचे परस्परसंबंध या बाबतींत प्रत्येक घटकसंस्था अगदी स्वतंत्र राहील.

३ पुण्यांतील विद्यार्थ्यांकरिता इंटरमिजिएटच्या परीक्षांसाठी द्यावयाचीं सर्व व्याख्याने युनिव्हर्सिटी-च्या नियंत्रणाखाली चालतील.

४ घटकसंस्थांपैकीं युनिव्हर्सिटी ज्या शिक्षकांना मान्यता देईल त्यांनी सहकार्याने शिक्षणाचा एक संघटित कार्यक्रम ठरवून त्याप्रमाणे व्याख्यानें देण्यांत यावीं.

५ प्रत्येक विषयामध्ये व्हावयाच्या व्याख्यानांचा कार्यक्रम घटकसस्थांतील त्या त्या विषयांच्या शाखा--प्रमुखानी ठरवावा. हे शाखाप्रमुख साहजिकच आपापल्या विषयांच्या अभ्यास--मंडळाचे सभासद असावे अशी अपेक्षा राहील.

६ प्रत्येक घटकसंस्थेने युनिव्हर्सिटीच्या मागणी-प्रमाणे प्रत्येक विषयाकरिता आपल्या शिक्षकांपैकीं कांही शिक्षक युनिव्हर्सिटीच्या कामाकरिता नेमून दिले पाहिजेत. ही संख्या वेळोवेळीं जरूरीप्रमाणें बदलतां यावी.

७ शिक्षण कार्याच्या वेळापत्रकाची सहकार्याने योग्य योजना व्हावी म्हणून घटक--संस्थांच्या प्रमुखांचें ( प्रिन्सिपालस ) एक मध्यवर्ती नियामक मंडळ असावें.

८ सोयीप्रमाणें व्याख्यानस्थळें ठरवावीं व शिक्षक व विद्यार्थी यांच्याकरिता वाहनाच्या सोयी असाव्या'

९ शिक्षण व शिक्षणावरील देखरेख या बाबतींत प्रत्येक घटकसंस्थेने स्वतंत्र व्यवस्था करावी.

१० युनिव्हर्सिटीच्या घटक संस्थांचें ग्रंथसंग्रह व शास्त्रीय प्रयोगालयें या बाबतींत सहकार्य होण्या-साठी स्वतंत्र मंडळें निवडावीं.

प्रस्तुत योजनेमध्ये आहेत त्या साधनांचाच तात्पुरता आणि तत्काल उपयोग करून घेण्याचें ध्येय डोळ्यांसमोर ठेविलें असल्यामुळे साहजिकपणेंच ही योजना अनेक दृष्टींनीं अपुरी आणि असमाधान-कारक झाली आहे. स्वतंत्र युनिव्हर्सिटी म्हणून सरकारी सनद मिळून स्थायिकपणा येण्याच्या दृष्टीने ही योजना कितपत यशस्वी होईल याची शंका आहे. आणि तसे स्थायी स्वरूप आल्या-शिवाय शिक्षणाचें माध्यम आणि शिक्षणांतील विषय या बाबतींत कोणत्याहि इष्ट व उपकारक योजना करून त्यांवर प्रयोग करणें कितपत साधेल हाहि एक महत्त्वाचा प्रश्न आहे. घटकसंस्थांना संघटना करून राहण्याला कोणत्या बंधनांनी भाग पाडतां येईल याचाहि विचार अवश्य झाला पाहिजे. कांही अंशांनी तरी अपरिहार्य बंधन निर्माण केल्या-शिवाय हल्लीचा मुंबई युनिव्हर्सिटीकडील ओढा सोडून कॉलेजांनी महाराष्ट्र युनिव्हर्सिटीकडे कशा-साठी वळावें ? याला समाधानकारक उत्तर प्रस्तुत योजनेंत नाही असेंच म्हणावें लागतें.

युनिव्हर्सिटीच्या आर्थिक योगक्षेमाबद्दल योजना करतांना ही अडचण उभी राहिली असली पाहिजे. त्या बाबतींत प्रिन्सिपालस सब--कमिटीने निरनिराळ्या तीन योजना सुचविल्या आहेत.

पहिली —पदवी व पश्चात्पदवी (पोस्ट–ग्रॅज्यूएट) परीक्षांच्या विद्यार्थ्यांनी सर्व फी युनिव्हर्सिटीकड भरावी, ग्रंथालयें व प्रयोगालयें यांवर अवश्य तो खर्च करून राहील तो पैसा निरनिराळ्या घटकसंस्थांमध्ये युनिव्हर्सिटीने वांटून द्यावा.

दुसरी —अथवा कॉलेजांनीच सर्व फी वसूल करून आपले खर्च भागून काही विशेष प्रमाणांत युनिव्हर्सिटीच्या खजिन्यांत भरणा करावा.

तिसरी —विद्यार्थ्यांनी द्यावयाच्या फीचे प्रथमच दोन विभाग कल्पावे. घटकसंस्थांच्या कारभाराचा खर्च भागविण्याकरिता कांही अंश घटकसंस्थांकडेच भरावा. राहिलेला अंश शिक्षणाकरिता दिलेली फी म्हणून सर्व संस्थांनी एकत्र जमवून तो 'युनिव्हर्सिटी फंड' म्हणून समजावा व नंतर शिक्षणार्थ दिलेल्या व्याख्यानाचा भार ज्या संस्थांवर जितका पडेल अथवा संस्थांनी पुरविलेल्या व्याख्यात्यांच्या व्याख्यानांचा उपयोग होत असेल त्या प्रमाणात युनिव्हर्सिटीने निरनिराळ्या संस्थांना त्या फंडांतून रक्कम द्यावी.

प्रस्तुत योजना बहुतेक उच्च संस्थांच्या प्रमुखांनी तयार केली असल्यामुळे त्या संस्था प्रस्तुत योजनेंत सामील होण्यास तयार आहेत असेंच गृहीत धरलें पाहिजे. यावर अनेकवार आणखी हात फिरून उप-युक्त योजना होतीलच. परंतु ही योजना अशा स्वरूपांत पुढे येण्याने महाराष्ट्र युनिव्हर्सिटीचा प्रश्न मार्गाला लागल्यासारखा झाला असल्यामुळे आम्ही ही योजना करणारांचें अभिनंदन करतों.

# मुंबई इलाख्यांतील उद्योगधंदे

( १९३१–३२ च्या सरकारी अहवालावरून )

इलाख्यांतील बहुतेक उद्योगधंद्यांना व्यापारमंदी-ची बाधा झाल्यावांचून राहिली नाही. मालाच्या किंमती उतरल्यामुळे बहुतेक कारखान्यांची प्राप्ति कमी होऊन नुकसानीच पदरांत पडली. बऱ्याचशा धंद्यांत परदेशी मालाची आयात मोठ्या प्रमाणांत होत असल्यामुळे तिची जागा भरून काढण्यासाठी देशी उद्योगधंद्यांना हातपाय हलवि-ण्यास पुष्कळ वाव आहे.

**कापड**—मुंबईमध्ये कापडाच्या ९१ गिरण्या आहेत. त्यांपैकीं २७ गिरण्या नुकसानींत चालल्या. सोलापूर येथील ४ गिरण्यांनी मात्र ६½ लाख रुपयांवर नफा जाहीर केला. खानदेशमधील एका गिरणीनेहि नफा जाहीर केला. अहमदाबाद येथे ६१ गिरण्या आहेत. त्यांपैकीं कांही तोट्यांत चालल्या असल्या तरी सर्वांना मिळून ४८ लाख रु. वर नफा झाला. मात्र कांही गिरण्यांना मुदलावर व्याजहि सुटलें नाही. आयात मालावर शें. २५ जादा जकात असल्यामुळे कापड धंद्याला एवढी तरी बरी स्थिति लाभली. १९३० सालीं इलाख्यांतील गिरण्यांची संख्या २२० असून त्यांत काम करणाऱ्या मजुरांचा आंकडा २९२४८८ होता. पण हेच आंकडे १९३१ सालीं खाली उतरून २१८ व २९०३५७ झाले.

**लोकर**—इलाख्यांत लोकरीच्या फक्त दोनच गिरण्या चालू होत्या. १९२० सालीं त्यांची संख्या ५ होती, ती १९२९ सालीं तिहींवर उतरली आणि त्याच वर्षाच्या अखेरीस एकीने दिवाळें काढलें. १९३० पेक्षा १९३१ सालीं मालाची पैदास शें. ४ ने वाढली. पण त्याची किंमत शें. ३१ ने कमी झाली आणि ती फक्त २२११९५९ रु. आली. लोकरीच्या आयातीला झपाट्याने उतार लागला. १९२९ सालीं तिची किंमत १ कोटी ७३ लक्ष होती तीच १९३० सालीं सुमारें ७५ लाख झाली. पण १९३१ सालीं ८७ लाखांवर गेली.

**होजिअरी**—सुमारें १३ लाख रुपयांचा माल १९३० सालीं तयार झाला. १९२९ सालीं १६ लाख रु. चा होजिअरीचा माल तयार झाला होता. त्या दोन वर्षांतील आयात अनुक्रमें २२ लाख व ४१ लाख रु. होती. या धंद्याची वाढ होण्याला पुष्कळ वाव आहे.

**साखर**—साखरेच्या दोन गिरण्या इलाख्यांत चालू होत्या. साखरेच्या आयातीवर जादा कर बस-विल्यामुळे दोनहि गिरण्यांचा संसार सुखाने चालला होता. एका गिरणींत २३ लक्ष २७ हजार रु. किंमतीची ६९८५ टन साखर तयार करण्यांत आली, आणि तिला ६ टक्के डिव्हिडंड देता आलें. दुसरा कारखाना लहान असून त्यांतून फक्त ३०८ टन साखर निघाली. याशिवाय पुण्याजवळ ३ लक्ष रु. भांडवलावर एक "स्वदेशी शुगर कंपनी" निघणार होती. १९३० सालीं साखरेची आयात ४४४७६६ टन म्हणजे ५ कोटी ८ लाख रुपये किंमतीची होती. ती १९३१ सालीं २४२२४७ टनांवर व २ कोटी ५८ लक्ष रु.वर उतरली. देशी साखरेला काबीज करण्याला मोठी बाजारपेठ मोकळी आहे.

**आगपेट्या**—इलाख्यांत आगपेट्यांचे एकंदर १५ कारखाने होते. त्यांतील २ संस्थानांत होते. पूर्वीच्या कारखान्यांपैकीं एकाला कुलूप लागलें, आणि दुसऱ्याने दक्षिण हैद्राबादकडे कूच केलें. पण एक नवा कारखानाहि स्थापण्यांत आला. सर्व कार-खान्यांत मिळून ६८ लाख रु. भांडवल खेळत होतें आणि ५ हजार लोक काम करीत होते. सुमारें ८८ लाख ग्रोस आगपेट्या दरसाल या कारखान्यांतून तयार होऊं शकतात. तरीहि परदेशांतून १९३१ सालीं सुमारें एक लाख ग्रोस आगपेट्या इलाख्यांत आल्या आणि जवळजवळ एक लाख रुपये परदेशाला गेले.

**कागद**—कागदाच्या ३ गिरण्या चालू होत्या. पैकीं कामाच्या टंचाईमुळे मार्च १९३१ पासून एक गिरणी बंद होती. सर्व गिरण्यांत मिळून ६२८ माणसें काम करीत होती, आणि तीं १० लाख २३ हजार रु. किंमतीचा २६९० टन कागद तयार करीत होती. तथापि परदेशांतून सुमारें ४० हजार टन कागद येथे आला, आणि त्यामुळें १ कोटीवर रुपये स्वदेशाला मुकले. कागदाच्या गिरण्यांनी या वर्षी प्रथमच डिव्हिडंड दिलें.

**कांच**—रजिस्टर्ड कारखाना एक असून रजि-स्टर्ड न झालेले ३ होते. त्यांतील कामगारांची संख्या ५०० होती. त्यांतल्या मालाची किंमत फक्त ३½ लाख रु. होती. पण आयात कांच माल त्याच्या पेक्षा सुमारें २० पट असून त्याची किंमत ६८ लाख रु.वर होती. अहमदाबाद येथील कारखान्याने सोडावॉटरच्या बाटल्या बनविण्यास सुरुवात केलेली आहे. बांगड्यांचा एक कारखाना कांदिविली येथें चालू होता. त्यांत ३६ लाख बांगड्यां-

च्या जोड्या तयार होत. आणि त्यांची किंमत २ लाख ६० हजार रुपये होती. पण परदेशाहून येणाऱ्या बांगड्यांची संख्या मोठी होती. सबंध हिंदुस्थानात ३४½ लाख रु.च्या बांगड्या आल्या. त्यापैकीं सुमारें २४ लाख रु.च्या बांगड्या मुंबई आणि कराची याच बंदरांनी घेतल्या. स्वदेशी बांगड्यांना पुष्कळच गिऱ्हाईक मिळण्यासारखें आहे.

**साबण**—रजिस्टर्ड कंपनी १ असून ३४ अनरजिस्टर्ड होत्या आणि लहान लहान कारखाने तर पुष्कळ ठिकाणीं चालू होते. तरीहि ४० लाखांहून अधिक रु. परदेशी साबणाने नेले. १९३० सालीं हा आंकडा ४५ लाख रु. वर होता.

**सिगारेट**—पूर्वीच्या ५ कारखान्यांना नव्या ६ कारखान्यांची जोड मिळाली. त्यांत ४०० माणसें काम करीत होतीं. या ११ कारखान्यांनी १६½ लाख रु.च्या सिगारेट तयार केल्या. तरीहि परदेशी सिगारेटींनी ५० लक्ष रुपयांची राख केलीच. सिगारेटचा मध्यम दर्जाचा कारखाना काढण्यास सुमारें २ लक्ष २० हजार रु. खर्च येतो. त्यांपैकीं ६० हजार रुपये यंत्रांना द्यावे लागतात.

**घड्याळें**:—मुंबईस २ व पुण्यास एक असे तीन कारखाने चालू होते. पैकीं मुंबई येथील विजेच्या घड्याळाच्या कारखान्याने आपलीं घड्याळें संस्था व संस्थानें यांना पुरविलीं. तेथील दुसऱ्या इन्डियन क्लॉक कंपनीने मनोरी घड्याळें ( Tower Clocks ) बनविलीं. पुण्याच्या ' हिंदुस्थान क्लॉक कंपनी ' ने संयुक्तप्रांत सरकारची मागणी स्वीकारली.

**विणकाम**:—हा धंदा बैठा धंदा म्हणून महत्त्वाचा आहे. १ लाख हातमाग चालू होते, आणि त्यावर ४½ कोटि रु. चें कापड निघालें. विणकऱ्यांकरिता एक आणि शेतकऱ्यांकरिता एक अशा दोन प्रकारच्या विणकामाच्या शाळा चालू असून त्यांची संख्या अनुक्रमें ७ व २ अशी होती. लोकरीच्या विणकामाचें प्रदर्शन दाखवून कांबळीं विणण्यांत कशी सुधारणा करतां येईल हें विणकऱ्यांना शिकविण्यांत आलें. त्यांच्यासाठी एक सुधारलेला चरका तयार करण्यांत आला. त्याच्यावर एका तासांत १९८८ वार लोकर कातली जाते. आणि कातणाऱ्यांचे दोन्ही हात मोकळे राहतात. त्याची किंमत १० रु. आहे. तथापि त्याचें स्वागत व्हावें तसें झालें नाहीं. पुणें येथे जून १९३० पासून सरकारी विणकामाची शाळा चालू आहे.

# अस्पृश्यतानिवारण व लोकमत

[ महात्मा गांधी यांनी प्राणान्तिक उपवासाची प्रतिज्ञा करून विशिष्ट क्षेत्रांत आपलें वांछित मिळविल्यापासून व अस्पृश्यतानिवारणाच्या प्रश्नाला पुनः प्रायोपवेशन करणार असल्याचें सांगितल्यापासून मोठीच चालना मिळाली आहे. अस्पृश्यतानिवारणासंबंधाने लोकमतनिदर्शन करणारे लेख व पत्रें आम्हांकडे अनेक येत आहेत. त्यांपैकीं काहींचा सारांश खाली देण्यांत येत आहे. —**सं. के.** ]

**अस्पृश्यतेचें मार्गक्रमण**—( ले. दि. गो. खेडेकर, बी. ए. मनमाड.) आजपर्यंत अस्पृश्यतेच्या उच्चाटनाकरिता नानक व महावीर जैन यांसारख्या धर्मसंस्थापकांनीहि मोठे प्रयत्न केले. परंतु त्यांच्या प्रयत्नांचा हिंदु—धर्मावर परिणाम झाला नाही. उलट हिंदुधर्मीयांची संघशक्ति वाढविण्याच्या ऐवजीं ती कमी होण्याला ते कारणीभूत झाले. हिंदुधर्मांतील असंख्य जाति एकत्र करण्याचा त्यांचा विचार बाजूला पडून त्यांच्या पंथांनी या भेदांत भर मात्र पडली. अस्पृश्यतानिवारणाचें पाऊल पुढे टाकतांना मोठी सावधगिरी बाळगिली पाहिजे. असंख्य हिंदु समाजाला पचेल एवढेंच त्याला करावयास लावलें पाहिजे. नाही तर नानक-महावीर यांच्या पंथाप्रमाणेच ' गांधीपंथ ' निर्माण होऊन अगोदरच्या अगणित पंथात याचीहि भर पडेल. अस्पृश्यतेचें निवारण चट्दिशीं व्हावें म्हणून कोणी रोटीव्यवहारापर्यंत मजल नेईल, तर हिंदु समाजांत दुफळी पडून अस्पृश्यतानिवारणाचें कार्य आणखी २—३ शतकें लांबणीवर पडल्याशिवाय राहणार नाही. सर्व वर्णांना असलेले समान हक्क अस्पृश्य लोकांना देऊन त्यांना इतर वर्णांप्रमाणे मानणें हेंच ध्येय आज डोळ्यांपुढे ठेवलें पाहिजे. अस्पृश्यांना समान हक्क देऊं नयेत असें आमचें म्हणणें नाही. आमचें म्हणणें इतकेंच कीं, अस्पृश्यतानिवारणाच्या कामीं जो मार्ग आक्रमण्यांत येईल, तो फार विचारपूर्वक व अखिल हिंदु समाजाचें हित डोळ्यापुढे ठेवून आक्रमण्यांत यावा.

**शेतकरी व अस्पृश्यता**—( ले.—भिकू आंबू पाटील, नागोठाणें.) आपल्या हिंदुधर्माला अस्पृश्यता ही गोष्ट कालिमा आणणारी आहे, हें मला पटतें. आपले अस्पृश्य बंधु धर्मानें हिंदु आहेत. आपल्या धर्मांत त्यांचा विटाळ मानावा अशीं शास्त्रवचनें कोणासहि दाखवितां येत नाहीत. आपल्यांत ज्या इतर दुष्ट रूढि आहेत, त्याप्रमाणे अस्पृश्यांचा विटाळ मानण्याची रूढि आहे. मी

स्वतः शेतकरी असून अस्पृश्यतानिवारणाच्या कामासाठी शेंकडों खेड्यांतून हिंडलों व अस्पृश्यांना देवळांत येण्याची परवानगी देण्याबद्दल मीं ग्रामस्थांना परोपरीनें विनविलें. परंतु या गोष्टीस शेंकडा ९५ लोकांची नापसंती आहे. माझा खेड्यांतील अनुभव असा आहे कीं, तूर्त खेड्यांत अस्पृश्यांना देवळांत जाण्याची परवानगी दिली, तर आपापसांत डोकीं फुटण्याची पाळी येईल. तूर्त या लोकांस सार्वजनिक पाणवठ्यावर येण्याची परवानगी द्यावी. तसेंच शाळा-दवाखाने यांमध्ये त्यांना समभावानें वागविण्यांत येण्याबद्दल प्रयत्न करावे. मुसलमान लोकांत यांचे खाण्यापिण्याचे व्यवहार होतात ते न करण्याबद्दल त्यांना उपदेश करावा. कोणतीहि गोष्ट घाईने व अविचारानें केल्यास हिंदुसमाजांत व खेड्यांत बखेडे मात्र माजतील.

**सहभोजनाची अनिष्टता**—(ले.-आत्मारामशास्त्री ओडलमने, मर्कारा.) रा.ओडलमने यांनी महात्माजींस सहभोजनासंबंधीं एक पत्र लिहून त्यात त्यांनी आपले मत पुढीलप्रमाणें प्रकट केलें आहे. "आपल्या प्रायोपवेशनामुळें देशामध्ये अस्पृश्यता-निवारणासंबंधीं जो उत्साह उत्पन्न झाला आहे, त्या उत्साहाच्या भरात आपले अनुयायी सहसंमेलन, सहपान, सहभोजन इत्यादि वरचढ कार्यक्रम आखूं लागले आहेत. परंतु असल्या प्रकारांनी अस्पृश्योद्धाराचा प्रश्न जास्तच बिकट होईल असें वाटतें. स्पृश्यांना अस्पृश्यांशीं सहपानादि प्रकार करणें आपल्याला असम्मत असेल तर तसें आपण स्पष्टपणें जाहीर करणें देशहिताच्या व धर्महिताच्या दृष्टीनें श्रेयस्कर आहे. मंदिरप्रवेशासंबंधीं माझें असें म्हणणें कीं, हिंदूंच्या कबुलीवांचून बलात्कारानें अस्पृश्यांकडून मंदिरप्रवेश करविणें नैतिक दृष्ट्या व धार्मिक दृष्ट्याहि अत्याचारच होय. सनातनी लोकांची मंदिरप्रवेशाला दुसरी अडचण म्हणजे अस्पृश्यांचे अनाचार, गोमांससेवन, मद्यपान इत्यादि दोष दूर झाल्यावांचून आणि शिक्षणादिकानें स्वच्छता, सदूव्यवसाय, सुविचार इत्यादि गुण त्यांच्यांत उत्पन्न झाल्यावांचून मंदिरप्रवेशाचा प्रयत्न फुकट होय. अस्पृश्यतानिवारण अवघ्या सहा महिन्यांत झालें पाहिजे म्हणून आपण पुनः प्रायोपवेशन करणार आहांत, तें म्हणजे सनातन्यांवर अत्याचार करणेंच होय. सहा महिन्यांत हा प्रश्न चुटकीसारखा सुटणें शक्य नाहीं."

**स्पृश्यास्पृश्य म्हणजेच शुद्धाशुद्ध**—(ले. दत्तात्रय नारायण बापट, वहाळ जि. रत्नागिरी.) सध्या अस्पृश्योद्धाराच्या चळवळींतील मूळचा शुद्ध हेतु बाजूस राहून स्पृश्य समाजावरच अतिक्रमणाचा व जबरदस्तीचा हल्लीं होत आहे. युगानुयुगें चार वर्ण, चार आश्रम यांनी युक्त असा हिंदुधर्म आजपर्यंत चालत आलेला असून योगसामर्थ्यानें एका क्षणांत अस्पृश्यता नष्ट करण्याचा प्रयत्न करणें मोठेंच आश्चर्य होय. अस्पृश्यता-निवारणाचें कार्य पायरी-पायरीनेंच झालें पाहिजे. आज एकदम सहभोजनाचे जे समारंभ सुरू आहेत, त्यामुळे अस्पृश्यता धुऊन जाण्याऐवजीं ती द्विगुणित होऊन अन्तःकलह मात्र निर्माण करील. मूळ अस्पृश्यता ही अशुद्धतेमुळेंच निर्माण झालेली असल्यामुळे अस्पृश्य समाज शुद्ध झाल्याशिवाय त्याची अस्पृश्यता जाणार नाही. अस्पृश्यता घालविण्यास सहभोजन किंवा सहपान हा मार्ग नसून शिक्षण, शुद्ध राहणी, उच्च संस्कृति इत्यादींची ओळख अस्पृश्यांना करून देण्यात आली पाहिजे. प्रत्येक स्पृश्यानें अस्पृश्याला त्याज्य न ठरवितां आपलाच भाऊ समजून त्याची अशुद्धता-अस्पृश्यता घालविण्याचा प्रयत्न केला पाहिजे. अस्पृश्योद्धारकांनी २-४गांवें प्रयोगादाखल प्रथम निवडावीं. तेथें शाळागृहें, वाचनालयें, स्थापून व सार्वजनिक उत्सव इत्यादि गंभीर आणि उदात्त कार्यक्रम ठेवून अस्पृश्यांचीं मनें शुद्ध व सुसंस्कृत करावीं. महार, मांग, चांभार, गंभीर इत्यादि बऱ्याच जातींत आपसांतील अस्पृश्यता नष्ट होण्यासच कित्येक वर्षें लागतील. मग रोटीव्यवहार कोठला ! ही खुद्द अस्पृश्यांतीलच गोष्ट ! अशी स्थिति असता सहभोजनावर एकदम उडी मारून अस्पृश्यता नाहीशी करण्याचा प्रयत्न करणें म्हणजे मूळ कार्याचा विघात करणेंच होय. अस्पृश्यतानिवारणाच्या प्रश्नांत एक गोष्ट प्रामुख्यानें लक्षांत ठेवावयाची म्हणजे व्यक्ति अस्पृश्य नव्हे तर राहणी अस्पृश्य! व याचसाठीं अस्पृश्यांना सध्या सहभोजनाची दिशा न दाखविता शुद्ध आचार, विचार व राहणी हे विषय त्यांना पटवून द्यावे. पुण्याच्या करारांतीहि 'सार्वजनिक अस्पृश्यता नष्ट करा' एवढीच विनंति आहे. अद्यापि खेड्यापाड्यांतून सावली, पाणी, हस्तस्पर्श इत्यादिकांचाहि विटाळ मानला जातो. तो दवडण्याचे प्रयत्न सर्व अस्पृश्योद्धारक मंडळींनी करावे. आज इतकें कार्य झालें तरी तें महत्त्वाचेंच ठरेल.

**अस्पृश्यांचा मंदिरप्रवेश**—ता. १४।१०च्या केसरींत धुळ्याच्या बातमीपत्रांत 'अस्पृश्याच्या मंदिरप्रवेशा' संबंधी जो मजकूर प्रसिद्ध झाला आहे त्यासंबंधी धुळ्याचे रा. अ. वि. टिळक वकील इत्यादि पांच गृहस्थ पुढील खुलासा करतात. "सदर प्रश्नाचा विचार करण्यासाठी सभा भरली असता रा. विष्णुपंत निजसुरे यांनी धार्मिक बाबतींत अनधिकारी लोकांना

अधिकार देण्याविषयी सहानुभूतिपूर्वक विचार करण्याचीं उदाहरणें शास्त्रांतहि असल्याबद्दल माहिती सांगितली. वेदान्तवागीश पाठकशास्त्री (पुणें) यांनी निर्णयोपयोगी चर्चा करावयाची असल्यास प्रमाणग्रंथ कोणते मानावयाचे, चाण्डालाचें लक्षण काय, अस्पृश्यता जातितः अगर कर्मतः, याबद्दल लेख करावा, निर्णय ठरेल तो सहीनिशीं मान्य करावयाचा काय हे प्रश्न विचारले. त्यावर वे. करमरकर, केळकर व रामदेव पण्डित यांनी सामान्य चर्चा व्हावी, अनुकूल–प्रतिकूल वचनें पाहावीं एवढाच सभेचा उद्देश असल्याचें सांगितलें. तेव्हा पाठकशास्त्री यांनी चर्चेंत भाग घेतला नाही. रामदेव पंडित यांनी जन्मजात अस्पृश्यता शास्त्रसिद्ध आहे असें प्रतिपादल्यावर रा. टिळक वकील यांनी मनु व याज्ञवल्क्य यांवरून अस्पृश्यता जन्मजात सिद्ध होत नाही, ती धंद्यावरून म्हणजे नैमित्तिक आहे असें सांगितलें. अशा तऱ्हेने अनुकूल–प्रतिकूल भाषणें झाल्यावर अनिर्णीत स्वरूपांत सभा विसर्जन पावली."

# तिसऱ्या गोलमेज परिषदेची मुखपरीक्षा

गोलमेज परिषदेचे खरे हाडवैरी सर सॅम्युअल होअर हे होत. सदर परिषदेला समुद्रांत बुडवूं, सुळावर चढवूं कीं पायाखालीं तुडवूं असें होअर साहेबाना झालें आहे. त्यांनी चारच महिन्यांपूर्वी गोलमेज परिषदेस ओढीत आणून समुद्रांत ढकलून दिलेंहि होतें. परंतु काठावरच्या हिंदी लोकांनी ओरडा केल्यामुळें मॅक्डोनाल्डप्रभृति ब्रिटिश मंत्र्यानी तिला आयत्या वेळीं हात देऊन बाहेर काढलें. अशा रीतीनें परिषदेचा जीव बचावला असला तरी होअर साहेबांचा तिजवरील राग कांही शमलेला नाही. ते आपल्या ठिकाणीं दातओठ चावीत आहेत, मुठी वळीत आहेत व तिजकडे डोळे फाडून पहात आहेत. परिषदेचा जीव घेता न आला तरी निदान तिची सर्वतोपरी विटंबना करण्याचा विचार त्यांच्या मनात घोळत असून त्या दिशेनें त्यांचीं कारस्थानें चालूच आहेत. डोक्यावरच्या केसांचे तीन पाट काढणें, नाक कान कापणें, हातपाय तोडणें व गाढवावरून हिंडविणें अशा प्रकारच्या क्रूर शिक्षा गुन्हेगारांस देण्याची पूर्वी पद्धत होती. तीच पद्धत जराशी सुधारून होअर यांनी अमलांत आणण्याचें योजिलेलें दिसतें.

## परिषदेचा कोंडमारा

होअर यांचा हत्येचा प्रयत्न फसल्यामुळे ते बरेच खजील झाले असावे. कारण त्यानंतर त्यांनी पार्लमेंटांत महत्त्वाचें असें एकहि भाषण केलें नाही. गेल्या २४ तारखेस कॉमन्स सभेंत त्यांनी तोंड उघडलें, पण पल्लेदार भाषण करण्याची उमेद न धरता विचारलेल्या प्रश्नाला उत्तर देण्यावरच वेळ भागविली. त्यांत त्यांचा जळालेला सुंभ सापडला, पण पीळ मात्र जसाच्या तसाच आढळला–पहिल्या गोलमेज परिषदेस हिंदी प्रतिनिधींची संख्या सत्तरापेक्षा जास्ती होती. परिषदेच्या दुसऱ्या बैठकीस त्यांची संख्या शंभरावर गेली. पण या तिसऱ्या बैठकीस होअरसाहेबांच्या सल्ल्यावरून, लंघनें घालून एखाद्याचें दोंद हलकें करावें त्याप्रमाणें तिला जावयाच्या हिंदी प्रतिनिधींची संख्या छाटीत-छाटीत चाळीसांवर आणिली आहे. तथापि परिषद कृशांगी बनली एवढ्यानें होअर यांचे लाल झालेले डोळे निवले नाहीत. त्यांच्या मनांत तिला खोलींत कोंडून घालावयाचें आहे. यासाठीं परिषदेंत काम काय चाललें आहे याची बातमी बाहेर फुटूं नये अशी त्यांची इच्छा असून ती पूर्ण करण्यासाठीं परिषदेचें स्वरूप सामान्यतः खासगी राहील असें ते सांगत आहेत.

त्याचप्रमाणें तिजपुढील कार्यक्रमहि प्रसिद्ध करण्याच्या ते विरुद्ध आहेत. खेरीज परिषदेंत प्रतिनिधींना भाषणाची परवानगी न देतां प्रश्नाला उत्तर या धर्तीनें चटावरचें श्राद्धच त्यांना उरकावयाचें आहे. गोलमेज परिषदेचा या रीतीनें कोंडमारा करण्यांत त्यांचा हेतु दुष्टपणाचा आहे. परिषदेचा कार्यक्रम जगाला कळला, कार्यक्रमातील प्रत्येक विषयावर वेगवेगळ्या वक्त्यांचीं भाषणें झालीं व तीं वर्तमानपत्रांनी प्रसिद्ध केलीं की परिषदेंतील अंडीपिल्लीं बाहेर पडतात, ब्रिटिश सरकारानें महत्त्वाचे विषय अजिबात गाळल्यास त्यांच्या उद्देशासंबंधानें लोक संशय घेतात, सरकार काय देणार याचा थांग लागतो, सरकारच्या अनुदारतेचा सर्वत्र डांगोरा पिटला जातो व परिषदेवर बाहेरच्या लोकमताचें दडपण बसून सरकारास त्यापुढे थोडीशी तरी मान वाकविणें भाग पडतें.

## पिंजऱ्यातील पाखरें

होअरसाहेबांनी घातलेला घाट शेवटास गेल्यास परिषद ही एक कानगोष्टच होणार. हिंदी प्रतिनिधि आपला वेळ मोडून व क्वचित् लोकापवाद पत्करूनहि केवळ देशहिताच्या दृष्टीनें परिषदेस जाणार आहेत. त्यांनी हिंदी जनतेची बाजू ब्रिटिश प्रतिनिधींपुढें कशी मांडली हें जनतेस कळण्याचा मार्ग बंद पडल्यास त्यांच्या कामगिरीचें तिजकडून चीज व्हावयाचें दूर

राहून उलट त्यांजविषयी अधिक गैरसमज पसरण्यास मात्र मदत मिळेल. होअर यांच्या कडी--कुलुपाने त्यांचा आणखी एक कावा साधणार आहे. कार्यक्रम आधीं आंखून परिषदेपुढे ठेवला म्हणजे ब्रिटिश सरकारास अप्रिय असणारे विषय त्यांना आयतेच गाळावयास सांपडतील: दुसऱ्या गोलमेज परिषदेच्या शेवटीं सरकारने संरक्षक अटींच्या पिंजऱ्यांत अडकविलेल्या पाखरांपैकीं परदेशचें राजकारण, सैन्यावरील हुकमत, युरोपियन व्यापाऱ्यांचें संरक्षण इत्यादि बाबी, चर्चेस म्हणण्यापेक्षा तर्पणास निघाल्या होत्या. पितृतर्पणाच्या वेळीं ज्याप्रमाणें पितराचें नुसतें नांव घ्यावयाचें व लगेच त्याच्याकरिता पळीभर पाणी सोडून मोकळें व्हावयाचें त्याप्रमाणें वरील महत्त्वाच्या बाबी निघून त्या हातावेगळ्या करण्यांत आल्या. कारण त्यापूर्वी हिंदु-मुसलमानांच्या वायफळ वाटाघाटींत सर्व प्रतिनिधींचा इतका काळ गेला होता कीं, या विषयांना खाणावळींतील फुलक्या सारखे तवा दाखवून न भाजतांच फेकून देण्यांत आलें होतें.

संरक्षित विषयांची वाट दुसऱ्या गोलमेज परिषदेने लावलीच आहे, व बाकीच्या कित्येक मुद्यांची चौकशी करून निर्णय सांगण्यासाठी नेमलेल्या डेव्हिड्सन, लोथियन प्रभृति कमिट्यांचे रिपोर्ट बाहेर पडलेच आहेत असें उत्तर हिंदी लोकांच्या सवालास मनामध्ये तयार ठेवूनच कार्यक्रम ठरविण्याचा अधिकार होअरसाहेबांनी हिंदी प्रतिनिधींपासून हिरावून घेण्याचा संकल्प केलेला असल्यामुळेच परिषदेंत आता भाषणें व्हावयाचीं नाहीत, फक्त प्रतिनिधींनी होय अगर नाही या शब्दांनीच तोंडी परीक्षा द्यावयाची असे होअर गेले चार महिने घोकीत आले आहेत. होअरसाहेबांच्या या मताप्रमाणेच परिषदेचें काम चालावयाचें असेल व तिजपुढे सैन्य, परराष्ट्रीय संबंध, राष्ट्रीय कर्ज इत्यादि महत्त्वाचे विषय निघावयाचे नसतील तर परिषदेसाठी सरकारास लाखो रुपये उधळण्याची व हिंदी प्रतिनिधींचा वेळ मोडण्याची काय गरज होती ? हे विषय वगळून उरले कोणते ? तर संस्थानिकांची कर्मकटकट, हिंदु-मुसलमानांची झकड आणि फेडरेशनची पोकळ अकड !

## होअरसाहेबांचा चक्रव्यूह

चर्चिल व होअर हे एकाच कटांतील मिलाफी असल्याचें स्पष्ट दिसतें. ब्लॅकपूल येथे कॉन्सरव्हेटिव्ह पक्षाची सभा होऊन गेल्यानंतर चर्चिल यांनी एक भविष्य कथन केलें. चर्चिल यांना परिषदेमार्फत हिंदी लोकांस स्वराज्याची एक कपर्दिकहि द्यावयास नको आहे. त्यांचा हा डाव ज्यास स्वराज्याचे खरेखुरे हक्क म्हणतात, असे प्रश्न परिषदे पुढे न येऊं देण्यानेंच साधणार आहे. कार्यक्रम ठरविण्याची सत्ता सर्वस्वी परिषदेच्या अध्यक्षांच्या हातांत ठेवली कीं होअरसाहेबांचा चक्रव्यूह चर्चिल साहेबांना हवा तसा अभेद्य झाला. तो चक्रव्यूह न आवडून प्रतिनिधि परत चालते झाले तर चर्चिल यांच्या मताने हिंदुस्थानावरील उत्पात ठरलेलें स्वराज्य, आयतेंच टळलें ! परिषदेच्या प्रतिनिधींना विलायतेस गेल्यानंतर पहिली महत्त्वाची कामगिरी बजवावयाची असली तर ती या चक्रव्यूहाचा भेद करण्याचीच होय. त्यांनी प्रथम परिषदेचीं कड्याकुलुपें तोडून टाकून तिला पूर्वीच्या दोन परिषदांप्रमाणे पूर्ण स्वातंत्र्य मिळवून दिलें पाहिजे.

सर सॅम्युएल होअर यांनी जो व्यूह रचला आहे तो स्वतःच्या जबाबदारीवर रचलेला दिसतो. त्याला इतर ब्रिटिश मंत्र्यांचें पाठबळ आहेच असें म्हणवत नाही. कारण त्यांनी वरील उद्गार चांचपडतच काढलेले आहेत. ते विचारांत घेतल्यास हिंदी प्रतिनिधींना परिषदेच्या वेळीं मागील परिषदेंतील सर्व सोयी मिळविणें फारसें जड जाणार नाही असें वाटतें. तथापि ब्रिटिश मंत्रिमंडळांत हुजूरपक्षाचा जोर मागील खेपेपक्षाहि या खेपेस वाढला असल्याने पूर्वीच्या दोन परिषदांइतकें स्वातंत्र्य तिसऱ्या गोलमेज परिषदेस मिळवून देण्यास तिला जाणारे प्रतिनिधीहि तशाच निग्रहाचे व नेटाचे पाहिजेत हें उघड आहे.

## प्रतिनिधींची निवड

परंतु जाणाऱ्या प्रतिनिधींचीं नांवें चाळून पाहिल्यास त्यांची निवड एकंदरीने निरुत्साह व निराशा उत्पन्न करणारी आहे असेंच म्हणावें लागतें. प्रतिनिधींचें संख्याबळ जवळ जवळ निम्यावर किंबहुना तृतीयांशावर उतरलें आहे. यामुळे निरुपयोगी पंक्तीपठाणांची गर्दी जशी मोडली आहे तसाच लायक, पाणीदार व जहांबाज प्रतिनिधींचाहि दुष्काळ तिच्यांत पडला आहे. याला कांही अंशीं देशाची राजकीय स्थिति कारण असली तरी त्या योगाने सरकारच्या दोषाची जबाबदारी कमी होते असें नाही. सरकार व राष्ट्रीय सभा यांजमधील लढा मिटून राष्ट्रीय सभेतर्फे निदान म. गांधी परिषदेस हजर राहतील हा संभव आता बहुतेक उरला नाही. गांधीजी ही व्यक्ति व तिच्या पाठीवरची राष्ट्रीय सभेची शक्ति या दोनहि इतक्या प्रभावशाली आहेत कीं, गांधीजींच्या साहचर्याने हिंदी प्रतिनिधींचा परिषदेंतील दरारा व वजन अनेक पटींनी वाढलें असतें. पण त्या लाभास हिंदी

राष्ट्र या प्रसंगीं आंचवत आहे, याची चुटपुट प्रत्येकाच्या अन्तःकरणाला चैन पडूं देत नाही. गांधिजी जात नाहीत म्हणून परिषदेवर बहिष्कार टाकावा या मताकडे देशांतील बऱ्याच लोकांच्या मनाचा काल झुकावा हें अगदी स्वाभाविक होय.

### कर्तव्याकर्तव्याचें द्वंद्व

मुंबईचे प्रसिद्ध व्यापारी सर पुरुषोत्तमदास ठाकूरदास हे स्वतःला राष्ट्रीय सभावाले म्हणवीत नाहीत व त्यांचा राष्ट्रीय सभेशीं लागाबांधाहि नाही. तथापि राष्ट्रीय सभेचे हजारो अनुयायी आज तुरुंगांत अडकून पडले आहेत व हालअपेष्टा भोगीत आहेत हें पाहून त्यांच्या आंतड्याला पीळ पडत नसेल काय ? पण कर्तव्याकर्तव्याचें द्वंद्व विचारी मनुष्याच्या डोक्यांत माजून राहतें तें याच वेळेला. गोलमेज परिषदेची तिसरी बैठक शेवटची म्हणून पूर्वीच्या दोनहि बैठकीहून अधिक महत्त्वाची आहे. तिच्यांत सगळ्याच कामाची सांगता व्हावयाची असल्यामुळे तिच्यापासून स्वराज्याच्या दृष्टीने जी कांही बरीवाईट निष्पत्ति होईल ती दीर्घ कालपर्यंत कायमचीच हिंदुस्थानास चिकटून राहणार आहे. अशा फलश्रुतीच्या प्रसंगीं ज्याला देशहित साधण्याची संधि मिळेल त्याने ती अवश्य साधली पाहिजे. या सद्बुद्धीने सर पुरुषोत्तमदास यांस आलेलें निमंत्रण त्यांनी स्वीकारलें, त्याबद्दल त्यांजवर मुंबईच्या व्यापाऱ्यांनी केवढा तरी गहजब केला आहे. पुरुषोत्तमदास हे स्वतःस कोणत्याहि व्यापारी संस्थेचे प्रतिनिधि न समजतां केवळ खाजगी व व्यक्तिगत पेशाने जात आहेत.तरीसुद्धा मुंबईच्या इंडियन मर्चेट्स चेंबर या संस्थेने त्यांजविरुद्ध निंदाव्यंजक ठराव आणला असून त्यावर सभेंत भवति न भवति झाली.

### निवडुंगाचा काटा

तिसऱ्या गोलमेज परिषदेपुढे विचारासाठीं यावयाच्या विषयांत देशी उद्योगधंदे व त्यांचें संरक्षण हा विषय अत्यंत जिव्हाळ्याचा आहे. त्या विषयावर बोलावयास परिषदेंत सर पुरुषोत्तमदास यांच्या इतका माहितगार व तज्ज्ञ असा दुसरा प्रतिनिधि नाही म्हटलें तरी चालेल. अशा स्थितींत पुरुषोत्तमदासांनाहि आडवून धरल्यास देशाचें किती नुकसान होईल याचा अवश्य विचार व्हावयास पाहिजे. सारांश, राष्ट्रीय सभेचे प्रतिनिधी गोलमेज परिषदेंत नाहीत ही आपत्ति अन्य रीतीनेहि तिला सांप्रत भोवल्यावाचून कशी राहत नाही त्याचें हें एक उदाहरण म्हणून सांगितलें. शिखांच्या मार्गांत ही नसली तरी दुसरीच अडचण आली आहे. मॅकडोनाल्ड यांनी दिलेला ज्ञातिविषयक निर्णय शीख समाजाला पंजाबांत अन्यायाचा वाटत असल्यामुळे त्यांनी परिषदेवर बहिष्कार टाकण्याचें ठरविलें आहे. त्या योगानें सरदार उज्ज्वलसिंगासारखा एखादा तीक्ष्ण निवडुंगाचा कांटा सरकारच्या कुशींत रुतला असतां तो मात्र आयताच प्रयत्नावांचून बाजूस पडला. श्राद्धाच्या ब्राह्मणांची भरती झाली पाहिजे म्हणून सत्पात्र ब्राह्मण नच मिळाला तर ब्राह्मणब्रुव बोलावून तेवढा पाट अडवून ठेवतात, त्याप्रमाणें उज्ज्वलसिंगाच्या ऐवजी तारासिंगाची योजना करून सरकारने शिखांचें सदर भरून घेतलें. सरदार तारासिंग हे पतियाळा संस्थानांतील नोकर असल्यामुळे ते आपले प्रतिनिधि नव्हत असें शिखांनी आपल्या सभेंत जाहीर केलें आहे.

### सर महमद इकबल

परिषदेस जावयाच्या प्रतिनिधींतील मुसलमानांचीं नांवें चाळलीं तर त्यांत सर महमद इकबल यांची मूर्ति पहिल्यानेच चमकतांना दृष्टीस पडते. त्यांस न घेतां पूर्ववत् बॅ. जिना यांचीच नेमणूक करण्यास काय हरकत होती ? पण नाही. जिना आपल्या चौदा मागण्यांनी हिंदूंना नावडते झाले असले तरी हिंदु-मुसलमानांच्या लढ्याशिवाय इतर राजकीय महत्त्वाचे प्रश्न परिषदेपुढे येतील, त्या बाबतींत लोकपक्षाच्या बाजूने सरकारपक्षावर चढाई करण्याला जिनाइतकी लायकी व बहादुरी कोणाहि मुसलमान प्रतिनिधींत नाही. पण सरकारला स्वराज्यवादी प्रतिनिधि परिषदेला जितके न येतील तितके सुखाचें असल्यामुळे त्यांनी इकबल ही व्यक्ति हुडकून काढली. सर महमद इकबल यांचें नांव कडवे मुसलमान या नात्याने शौकत अली यांजहूनहि सांप्रत अधिक गाजत आहे. त्यांना आज स्वराज्याची गरज वाटत नसून जिनांच्या चौदा मागण्यांना ते शौकत अलीपेक्षाहि जास्ती घट्ट आवळून बसले आहेत. तेव्हा हिंदूंस नडणाऱ्या व स्वराज्यास डावलणाऱ्या असल्या मुसलमानांना विसरून इंग्रजांची हिंदुस्थानांतील सत्ता कशी अबाधित राहील ?

### संस्थानिकांची शकल

संस्थानिकांनी या खेपेला वेगळीच शकल काढली आहे. गेल्या दोन परिषदांना बरेच संस्थानिक जातीने हजर राहिले व त्यांनी मान डोलाविली म्हणूनच फेडरेशनचा डोलारा पहिल्या परिषदेंत उभारता आला. पण त्यानंतर या भलत्याच फंदांत आपण कोठून पडलों अशी संस्थानिकांना चुटपूट लागून त्यांनी आपला कान आपल्याच हातांनी पिळून घेतला असून तें तेव्हांपासून एकएका मागच्या पावलाने पळ काढण्याचा विचारांत आहेत. त्यांनी फेडरेशनच्या मानेवर अटींची एवढी अवजड घोंड ठेवली आहे कीं तिच्या भाराखालीच

फेडरेशनची मान मोडावी. असे हे संस्थानिक परिषदेस स्वतः हजर राहिले असता इंग्लंडची स्वातंत्र्यप्रिय हवा त्यांच्या नाकांतून पोटांत शिरते, केवळ स्वार्थावर नजर देण्याची त्यांना लाज वाटते व इतरांची भीड पडते. यासाठी ती सगळीच बिलामत चुकविण्याच्या उद्देशाने संस्थानिकांनी स्वतःचें तोंडच चुकविण्याचें ठरवून आपल्या दिवाणांना व गुमास्त्यांना परिषदेस पाठविण्याचें योजिलें आहे.हे नोकर दिलेल्या शिदोरीचे व सांगितलेल्या कामगिरीचे मालक आहेत. त्यांना आपल्या जबाबदारीवर नवीन बूट काढण्याची किंवा नव्या कल्पनेस अनुमति देण्याची मुखत्यारी नसल्यामुळे फेडरेशनचा डोलारा येथपर्यंत दोन वर्षे मिरवीत आणित्यानंतर ताबुताप्रमाणे तो थंडा होण्याची आता भीति अगदींच नाही असें नाही. तसें झाल्यास सर्वांवर मुसलमानांचा 'आलविदा' म्हणत परत देशी येण्याचा शोकजनक प्रसंग कदाचित् ओढवावयाचा !

## सप्रू-जयकरांची दुक्कल

परिषदेच्या प्रतिनिधींत लायक प्रतिनिधि काय ते हिंदूंतच शोधावयास सांपडतील. बॅ. जयकर व सर तेज बहादुर सप्रू ही जोडी गोलमेज परिषदेस अव्वलपासून अखेरपर्यंत राहिलेलीच आहे. तेजबहादुर यांचा राज्यशासनाचा अभ्यास व अनुभव जगजाहीर आहेत. बॅ. जयकर यांची वक्तृत्वशैली व रुबाबदारी वजन पडणारी आहे. आणि त्या उभयतांचा परिषदेंतील खाचखळग्यांचा पक्का अनुभव नवीनांना मार्गदर्शक होणारा आहे. रा. न. चिं. केळकर यांची निवडणूक परिषदेंत नव्याने झाली असली तरी हिंदु प्रतिनिधींतच काय पण साऱ्या हिंदी प्रतिनिधींतहि त्यांचा दर्जा पुष्कळच वरिष्ठ प्रतीचा ठरेल यांत शंका नाही. लो. टिळकांचे सहकारी, प्रसिद्ध वर्तमानपत्रकार व राजकीय पुढारी यांपैकीं एक किंवा अनेक नात्यांनी गेलीं ३६ वर्षे हिंदुस्थानाच्या राजकीय नभोमंडळांत ते तळपत आहेत. ले. असेंब्लींत सात वर्षे त्यांनी काम केलें असल्याने अनुभवाची तीहि बाजू त्यांची पक्की आहे. राजकीय, सामाजिक, संस्थानविषयक किंवा तदनुषंगिक इतर प्रत्येक विषयाची जरूर ती माहितगारी असलेला त्यांच्या योग्यतेचा प्रतिनिधि तिसऱ्या गोलमेज परिषदेंत क्वचितच सापडेल. ज्ञातिविषयक तंटयांतील महत्त्वाचा निर्णय अद्यापि मॅक्डोनाल्ड यांनी द्यावयाचा राहिला आहे. कदाचित् तोहि परिषदेंत विचारासाठी येण्याचा संभव आहे. त्या वेळीं केळकर व जयकर हे उभयतां हिंदूंच्या हितसंबंधास धक्का लागू न देतां हिंदु-मुसलमानांचा मेळ घालण्यांत आपलें बुद्धिसर्वस्व खर्च करतील याचा हिंदु समाजास मोठाच आधार वाटत आहे. खेरीज केळकरांना संस्थानी प्रजेच्या चळवळीची व गाऱ्हाण्यांची खडानूखडा माहिती असल्यामुळे संस्थानी प्रजेस आपल्या हक्कांची दाद लावणारा हा एक मोठाच वाली लाभला याबद्दल परमानंद वाटावा यांतहि नवल नाही.

## लो. टिळकांचें धोरण

हिंदी जनतेची बाजू मांडण्याची येईल ती संधि साधावयाची हा लो.टिळकांचा दंडक असून त्या बाण्याने तात्यासाहेब केळकर आजपर्यंत वागत आले आहेत. कायदेमंडळावर बहिष्कार घालूं नये या मताचा पुरस्कार त्यांनी करून ले असेंब्लीचे सभासद या नात्याने सात वर्षे लोकसेवाहि याच तत्त्वावर बजावली. गोलमेज परिषदेचें कार्य असेंब्लीपेक्षा किती तरी श्रेष्ठ होय. तिच्यांत जी राज्यघटना ठरेल तिला अनुसरून भावी कायदेमंडळांची रचना व्हावयाची असल्याने ते राज्ययंत्राच्या वर्कशॉपमधील एक कुशल कारागीर म्हणूनच गोलमेज परिषदेस हजर राहणार आहेत. डॉ. मुंजे, बॅ. जयकर इत्यादि अनेक महाराष्ट्रीय प्रतिनिधि गोलमेज परिषदेस यापूर्वी गेले आहेत व ते महाराष्ट्राचे पुढारीहि आहेत. पण ज्यास महाराष्ट्राचा सर्व दृष्टींनी पुढारी म्हणता येईल असे तात्यासाहेब केळकरच होत या अर्थाचे उद्गार परवाच्या दिवशीं भरलेल्या जाहीर सन्मानाच्या सभेंत कांही वक्त्यांनी काढले त्याचें मर्म वेगळें आहे. लो. टिळकांचे शिष्य व त्यांची राजकीय परंपरा चालविणारे पुढारी असा त्यांचा महाराष्ट्रांत दर्जा असल्यामुळे महाराष्ट्रीयांस व विशेषतः पुणेकरास त्यांजविषयीं जो अभिमान वाटतो तोच वरील उद्गारांत प्रतिबिंबित झाला आहे. गोलमेज परिषदेंत स्वराज्याचा घाट किती चढून होईल हा प्रश्न स्वतंत्र आहे. तथापि तिच्यांत वादविवादाच्या, सल्लामसलतीच्या व तडजोडीच्या दृष्टीने जें देश-कार्य करतां येईल तें करण्याची संधि दे. तात्यासाहेब यांस लाभली व ती देशहितावर नजर देऊन त्यांनी स्वीकारली यांत त्यांची कर्तव्यनिष्ठाच सिद्ध होत आहे. गोलमेज परिषदेचें सभासदत्व हा एक विशेष प्रकारचा मान असून तो तात्यासाहेब यांजकडे पायानी चालत आला याबद्दल इतरांप्रमाणें आम्हीहि त्यांचें मनःपूर्वक अभिनंदन करतों.

# रा. केळकरांना पुणेकरांचा निरोप

बुधवार ता. २६ रोजीं सायंकाळीं ६ वाजता टिळक-स्मारक-मंदिरांत नगराध्यक्ष डॉ. नायडू यांच्या अध्यक्षतेखाली सार्वजनिक सभा व हिंदु-महासभा यांजतर्फे श्री. न. चिं. केळकर हे तिसऱ्या गोलमेज परिषदेकरिता शुक्रवारीं विलायतेस जाण्यास निघणार असल्यामुळे त्यांना निरोप देण्यासाठी जाहीर सभा भरली होती. प्रारंभीं गोपाळ गायन समाजांतील मुलांनी ईशस्तवन केल्यावर येथील हिंदु-महासभेचे अध्यक्ष चित्रावशास्त्री यांनी सभेचें कारण सांगून डॉ. नायडू यांना अध्यक्षस्थान स्वीकारण्याची विनंति केली. सदर विनंतीस श्री. दि. वा. दिवेकर यांनी अनुमोदन दिल्यावर अध्यक्ष स्थानापन्न झाले. त्यांचें खालील आशयाचें प्रास्ताविक भाषण झालें.

### डॉ. नायडू यांचें भाषण

ते म्हणाले, "मध्यंतरीं सर सॅम्युअल होअर यांनी असें जाहीर केलें होतें कीं आम्ही तिसरी गोलमेज परिषद भरविणार नाही. मग हिंदी लोक कांहीहि म्हणोत; त्यांच्या मताची आम्हांला मुळीच पर्वा नाहीं. सरसाहेबांच्या या धोरणाचा येथील जनतेने तीव्र निषेध केला इतकेंच नव्हे, तर सर्व्हंट्स ऑफ इंडिया सोसायटीने एक पत्रक काढून असें सांगितलें कीं सरकारानें तिसरी गोलमेज परिषद जर भरविली नाही, तर आम्ही त्यांच्याशीं मुळीच सहकार्य करणार नाहीं. या पत्रकावर दोनतीनशे सह्या होत्या. या पत्रकाचा योग्य तो परिणाम होऊन सरकारने तिसरी गोलमेज परिषद भरविण्याचें जाहीर केलें याबद्दल मी त्यांचें अभिनंदन करतों. गेलीं दोनतीन वर्षे गोलमेज परिषदेंत हिंदुस्थान-विषयक प्रश्नांचें घोंगडें भिजत पडलें आहे त्याचा निकाल लावण्याकरिता म्हणून ही तिसरी परिषद भरविण्यांत आली आहे; आणि म्हणूनच ही अनेक दृष्टींनी अत्यंत महत्त्वाची आहे. या परिषदेला एकंदर ४० सभासद बोलाविले असून मुंबई-इलाख्यातर्फे पांच गृहस्थांस निमंत्रणे देण्यांत आलीं आहेत. अखिल हिंदुस्थानाच्या राजकारणांत पुण्याला जें अग्रस्थान आहे त्याला अनुसरूनच सरकाराने श्री. केळकर यांची निवडणूक केली व ती त्यांनी मान्य केली याबद्दल मी पुण्यातर्फे त्यांचें अभिनंदन करतो व त्यांच्या हातून देशाला हितकर असेंच कार्य होईल असें इच्छितों."

यानंतर श्री. शि. ल. करंदीकर यांनी श्री. केळकर यांच्या अभीष्टचिंतनपर जे अनेक संदेश आले होते त्यांपैकीं भारत स्नेहसंवर्धक मंडळाचा व हिंदुमहासभेचा असे दोन संदेश वाचून दाखविले. नंतर श्री. केळकर यांना हिंदु विद्यार्थिसंघातर्फे हार घालण्यांत आल्यावर प्रो. नाईक यांचें खालील आशयाचें भाषण झालें.

### प्रो. नाईक यांचें भाषण

ते म्हणाले, "श्री. केळकर यांना पहिल्या गोलमेज परिषदेला निमंत्रण आलें असता देशाच्या बिकट परिस्थितीमुळे त्यांना तें नाकारावें लागलें; पण तिसऱ्या परिषदेचें आमंत्रण त्यांनी स्वीकारलें याबद्दल मी त्यांचें मनःपूर्वक अभिनंदन करतों. गेल्या गोलमेज परिषदांना गेलेली मंडळी सर्वांना पूज्य तर खरीच, पण म्हणण्याइतकी विश्वासाची नव्हती. ते तेथे काय काय गोष्टी करतील याचा कोणालाच अंदाज लागत नव्हता. ती ध्येयाच्या पाठीमागे लागलेली मंडळी होती. पण आज आपल्या सर्वांतर्फे जाणारे पुढारी श्री. केळकर हे सर्व तऱ्हेने सर्वांच्या विश्वासांतले असून देशाची परिस्थिति नीट जाणणारे आहेत. या परिषदेपासून फलनिष्पत्ति कांहीहि होवो; पण श्री. केळकर हे आपल्या देशाची बाजू योग्य तऱ्हेने मांडतील." नंतर प्रो. काळे यांचें पुढील आशयाचें भाषण झालें.

### प्रो. काळे यांचें भाषण

ते म्हणाले, "आमची मागणी अशी होती कीं, सरकारानें मागील दोन परिषदा जशा खुल्या भरविल्या तशीच हीहि भरवावी. या मागणीला मात्र स्टेट-सेक्रेटरी होअरसाहेबांनी वाटाण्याच्या अक्षता लावल्या. इतकेंच नव्हे तर आम्ही अगोदर कार्यक्रमपत्रिका तयार करूं, परिषदेंतील हकीकत प्रसिद्ध करणार नाही, फक्त या परिषदेची फलश्रुति काय झाली एवढेंच जाहीर करूं असें ते म्हणतात. ब्रिटिश सरकाराच्या राजकारणी धोरणाचा इतिहास पाहिला तर असें आढळून येईल कीं, एकदा ज्या पद्धतीने डाव टाकण्यास सुरुवात केली ती पद्धत ते कधीच बदलावयाचे नाहीत. आणि कोणत्याहि प्रश्नाचा निकाल शक्य तो लांबणीवर टाकून मग करावयाचा. मागील दोनहि परिषदांना गेलेल्या मंडळींत रोखठोक सवाल करणारी मंडळी फारच थोडी होती. पण या परिषदेला आपणांतर्फे जाणारे प्रतिनिधि अत्यंत रोकठोक बोलणारे आहेत इतकेंच नव्हे, तर अमुक ठराव मला मुळीच मान्य नाही असें सांगण्याचें धैर्यहि श्री. केळकर यांचें अंगीं आहे. प्रसिद्ध झालेल्या निमंत्रितांची यादी पाहिली तर विशिष्ट

पक्षाचीं माणसें जास्त असून त्यांच्या जोडीला जे स्वराज्यशिखर गांठण्यांत अगदी मद्दड आहेत अशा गृहस्थांची निवड अधिक प्रमाणांत झाली आहे. कांही लोक म्हणतात कीं हिंदु–महासभा ही जातिविशिष्ट आहे. पण ही समजूत चूक आहे. हिंदु–महासभा म्हणते कीं हक्क जे द्यावयाचे ते विशिष्ट जातीलाच उपयोगी पडतील असे न देता राष्ट्रीय दृष्टीने लोकशाहीची स्थापना करण्यास उपयोगी पडणारेच दिले पाहिजेत. हल्लींची राज्यघटना लोकशाहीला मुळीच पोषक नाही. रा. केळकर यांनी निमंत्रण मान्य केल्यामुळे हिंदु–महासभेचें म्हणणें योग्य तऱ्हेने मांडलें जाईल यांत शंका नाही. कांही लोक त्यांनी निमंत्रणाला संमति दिल्याबद्दल टीकाहि करतील. लोक दोहोंकडूनहि बोलतात हें सर्वांना माहीतच आहे. पण कांही गोष्टी स्वतःच्याच सारासार विचारावर अवलंबून असतात व अशा गोष्टींपैकींच ही एक गोष्ट आहे. तेव्हा हिंदु-महासभेच्या दृष्टीने व महाराष्ट्राच्या दृष्टीने, केळकरानी आमंत्रणाला मान्यता दिली हेच योग्य केलें याबद्दल मी त्यांचें अभिनंदन करतों."

नंतर श्री. वा. कृ. भावे यांचें खालील आशयाचें भाषण झालें.

### श्री. भावे यांचें भाषण

ते म्हणाले, "तिसरी गोलमेज परिषद अनेक दृष्टींनी महत्त्वाची आहे. या परिषदेंत अनेक मुख्य मुख्य प्रश्नांचा निकाल लागणार आहे. मुसलमानांच्या ज्या १४ मागण्या आहेत त्यांतील शेवटची मागणी जरी छाटून कमी केली असली तरी ती धोक्याची आहे. हिंदु-मुसलमानाचें ऐक्य झालें तर स्वराज्य सुकर होईल असा ध्वनि इंग्लंडमधून बॅ.जिना काढीत आहेत. गेल्या दोनही परिषदांस हिंदु--महासभेतर्फे डॉ. मुंजे गेले होते पण या परिषदेला त्यांना आमंत्रण आलें नाही हें एका तऱ्हेने बरेंच झालें. कारण या वेळीं ज्या दोन मुख्य पुढाऱ्यांत हिंदु–मुसलमानांच्या तडजोडीचें बोलणें चालू आहे त्यांत मालवीयजींना योग्य तो सल्ला देण्यास व मौलानासाहेबांना तोंड देण्यास डॉ. मुंजे योग्य आहेत. तसेंच इंग्लंडमध्ये या परिषदेंत तडजोडीचें जें काम करावयाचें आहे त्याला योग्य असे तात्यासाहेब केळकर हे आहेत. स्वतःचें थोडेसें सोडून दुसऱ्याचें बरेंचसे हस्तगत करण्याचें काम तात्यासाहेब योग्य तऱ्हेनें करतील यांत शंका नाही. तात्यासाहेब फक्त हिंदु-मुसलमानांचाच प्रश्न हातीं घेतील असें नसून त्यांचा सर्वच प्रश्नांचे बाबतींत हिंदुस्थानाच्या दृष्टीने फार उपयोग होईल.कांही लोकांचें असें म्हणणें आहे कीं,परिषदेला जाणारीं माणसें काँग्रेसच्या आड येत आहेत, पण ही त्यांची निवळ भूल आहे. कारण काँग्रेसचें जर सरकारावर खरोखरच कांही वजन असेल तर तिला परिषदेंत होणारी घटना बदलतांहि येईल. तात्यासाहेब यांनी सदर परिषदेचें आमंत्रण स्वीकारलें हेंच योग्य झालें व त्याबद्दल मी त्यांचें अभिनंदन करतो.' नंतर श्री. ल. र. गोखले यांचें खालील आशयाचें भाषण झालें.

### श्री. ल. र. गोखले यांचें भाषण

ते म्हणाले, "गोलमेज परिषदेची फलश्रुति काय होईल हें ठरल्यासारखेंच आहे. जें आम्ही मागतों तें मिळणार नसून ज्यांची आम्हीं कधीहि मागणी केली नाही अशा गोष्टी गळीं पडणार आहेत. मुंबई इलाख्यांतील जीं माणसें जाणार आहेत त्यांपैकीं कांही आपल्या जातीकरिता काम करणारीं आहेत. पण या सर्वांना पुरून उरणारे तात्यासाहेब आहेत. केळकर कामकऱ्यांचाहि प्रश्न पुढे आणल्याशिवाय राहणार नाहीत. सोडणें थोडें, धरणें फार अशी केळकर यांची तडजोडीची पद्धत आहे. तसेंच ते सरकारच्या भलत्याच कोटिक्रमाला बळी पडणारे नाहीत. तेव्हा सरकारने योग्य अशाच पुढाऱ्याला आमंत्रण दिलें व तें तात्यासाहेब यांनी मान्य केलें याबद्दल मी त्यांचें अभिनंदन करतों. आणि शेवटीं पुणेकरांना एवढीच विनंति करतों कीं त्यांना निरोप देणें एवढेंच आपलें काम नसून ते तेथे गेल्यावर त्यांना पाठबळ देऊन योग्य तऱ्हेने मदत करणें हेंहि आपलें कर्तव्य आहे." यानंतर श्री. न. चिं. केळकर यांचें पुढील आशयाचें भाषण झालें.

### श्री. न. चिं. केळकर यांचें भाषण

ते म्हणाले, "ज्या नागरिकांतून आपण प्रतिनिधि म्हणून जातों त्या समाजाचें जें मत तेंच देशाचें मत आहे असें म्हणण्यास मला हरकत वाटत नाही. तेव्हा आलेल्या अभिनंदनाच्या पत्रावरून मीं केलें हें सर्वांना मान्य आहे असें म्हणावयास हरकत नाही. माझी अशी कल्पना होती कीं ज्यांना प्रत्यक्ष निषेध करण्याचें धैर्य नाही अशांकडून कांहीं निनांवी पत्रें येतील. पण तशी पत्रें मात्र मुळींच आलीं नाहींत. आली तीं सर्व पत्रें होकारार्थीच आहेत. त्यांतूनहि कांहीं लोकांना असें वाटतें कीं, मीं केलें हें योग्य नाही, पण अशा दुटप्पी स्थितींत मार्क ट्वेनचें वाक्य आठवतें. तो म्हणतो 'When in doubt tell the truth, and do what you like '—जो आपल्या मनाचा निर्वाळा तोच खरा निर्वाळा मी अशा वर्गातला मनुष्य आहे. मला गोलमेज परिषदेचें निमंत्रण येईल

याचा संभवच नव्हता. मलाच काय पण लोकांनाहि अपेक्षा नव्हती. पण अगदी अनपेक्षित रीतीने निमंत्रण आलें. आणि तेंहि अगदी धारवाडी काट्यावर म्हणजे त्यावर मला विचार करण्यासहि फुरसत नव्हती. या परिषदेला मला निमंत्रण आलें यांत माझा तर मान आहेच. पण महाराष्ट्राचाहि आहे. आणि जितका मान मोठा तितकी जबाबदारी अधिक. मला पहिल्या परिषदेचें आमंत्रण आलें होतें. त्यावर जावें की नाहीं याबद्दल मीं दोन दिवस विचार केला. पण देशाची एकंदर परिस्थिति नीटशी नाहीं असें पाहून विवेकाने व आत्मनिष्ठेने तें निमंत्रण नाकारलें. आलेलें निमंत्रण नाकारण्याचें धैर्य मी एकट्यानेंच दाखविलें हें कोणीहि कबूल करील. आणि ज्या आत्मनिष्ठेने मीं पहिलें निमंत्रण नाकारलें त्याच आत्मनिष्ठेने व विवेकाने या निमंत्रणाचा मीं स्वीकार केला आहे. पण दोहोंत फरक इतका आहे कीं, पहिल्या परिषदेचें आमंत्रण स्वीकारावें कीं नाही, याचा विचार करण्यास भरपूर वेळ तरी मला मिळाला होता, पण या वेळीं मात्र एका तासाचाहि वेळ मिळाला नाही. हे निमंत्रण आलें त्या वेळीं मी दक्षिण-हैद्राबादेस केसरी सुरू व्हावा याची खटपट करण्यास गेलों होतों. सबंध दिवस निरनिराळ्या अधिकाऱ्यांच्या गांठी भेटी घेण्यांत गेला. आणि आपणांला परिषदेचें निमंत्रण येईल याची अंधुकहि कल्पना नसल्यामुळे मीं त्याचा पूर्वी विचारहि केलेला नव्हता. पण अकस्मात् मला तेथील रेसिडेंटांचें बोलावणें आलें. प्रथम अशी माझी कल्पना झाली कीं, माझें या संस्थानांत येणें येथील अधिकाऱ्यांना पसंत पडलें नसेल व मला बहुतेक येथून निघून जाण्याची सूचना देण्याचा त्यांचा विचार असेल. पण प्रत्यक्ष जाऊन पाहतों तों त्यांनी हिंदुस्थानसरकाराची तार आली आहे असें सांगून त्यांत त्यांनी गोलमेज परिषदेचें जर निमंत्रण केलें तर आपण स्वीकाराल कीं नाही याचें उत्तर त्यांनी ताबडतोब कळवावयास लिहिलें आहे असें सांगितलें. पहिल्या गोलमेज परिषदेचें आलेलें बोलावणें मीं न स्वीकारल्यामुळे या वेळीं मला निमंत्रण येईल याची मुळीच कल्पना नव्हती. आणि म्हणून मीं या गोष्टीचा पूर्वी विचारहि केला नव्हता. तरी पण सारासार विचार करून मी त्याला ताबडतोब होय असें उत्तर दिलें व या उत्तराला आपली सर्वांची मान्यता आहे हें पाहून मला आनंद होत आहे. ज्या मानाचा पूर्वी इनकार केला होता तोच मान आपल्या पायांनी कोणत्याहि तऱ्हेने खटपट न करता माझ्या पायाशीं पुनः चालून आला आहे. कांही लोक म्हणतात कीं या परिषदेंत राज्यघटनेसारखा महत्त्वाचा प्रश्न येणार असल्यामुळे म. गांधी तुरुंगांत असता तुम्हीं आमंत्रण स्वीकारलें हें योग्य केलें नाही. याला माझें उत्तर असें आहे कीं गांधी तुरुंगांत असता अहमहमिकेने लोकल बोर्ड व म्युनिसिपालिट्या यांचीं कामें जर करता येतात तर अशा वरिष्ठ दर्जाच्या परिषदेला हजर राहिल्यास कोठे बिघडलें ? खालच्या दर्जाच्या कामाला तुम्ही नांवें ठेवीत नाही; पण वरिष्ठ दर्जाच्या कामाला आज नांवें ठेवतां याचा अर्थ काय ? म. गांधी तुरुंगांत असेपर्यंत अमुक गोष्टी करूं नयेत अशी एखादी याद प्रसिद्ध झालेली मला तरी निदान आठवत नाही. असो. आपण जी गोष्ट करतों ती प्रामाणिकपणाने, निःस्वार्थीपणाने आणि विवेकाने जर केली तर त्यांत समाजाला भिण्याचें कांही कारण नाही. राजकारण म्हटलें कीं त्यांत उलटसुलट गांठी असणारच. पण वरील दृष्टीने जर एकमेकांनी एकमेकांच्या हातांत हात घालून काम केलें तर बरेचसे तिढे सुटण्याचा संभव असतो. आता मला तेथे काय काय गोष्टी करता येतील हें आता सांगणें कठिण आहे. पण एवढें मात्र सांगतों कीं, आजपर्यंत मीं ज्या तऱ्हेने आपल्या डोळ्यासमोर कामें केलीं आहेत त्याच पद्धतीने तुमच्या डोळ्याआड मी तेथे काम करणार आहें." शेवटीं अध्यक्षांनी समारोपादाखल भाषण केल्यावर शेठ हणमंतराम रामनाथ यांनी अध्यक्षांचे आभार मानून श्री. केळकर यांनी निमंत्रण स्वीकारल्याबद्दल त्यांचें अभिनंदन केलें व सार्वजनिक सभेतर्फे त्यांना व अध्यक्षांना त्यांनी हार घातला. नंतर महाराष्ट्र व्यायामशाळा व रामदास आखाडा यातर्फे श्री. केळकर यांना हार घालण्यांत आल्यावर राष्ट्रगीत झालें व सभा संपली.

# राजकीय कैद्यांना मारहाण

( ले.—श्री. शंकर नरहर आगाशे )

[ 'मराठ्याचे' माजी संपादक रा. शं. न. आगाशे हे ता. ५ नोव्हेंबर रोजीं नाशिकच्या तुरुंगांतून सुटून आले. त्यांना तुरुंगांत असता समजलेली हकीकत त्यांनी या पत्रांत लिहिली असून ती महत्वाची असल्यामुळे आम्ही देत आहों. सं. केसरी.]

नाशिकच्या तुरुंगांत दोन अडीच महिन्यांपूर्वी 'सी' क्लास मधील कैद्यांना मारहाण झाल्यामुळे सुमारें २००-३०० कैद्यानी अन्नत्याग केला होता. कित्येकांना सुपरिंटेंडेंटपुढे खटला होण्यापूर्वीहि दुय्यम अधिकाऱ्यांनी हातांतील दंडुक्यांनी मारहाण केली होती. पुढे ही गोष्ट सुपरिंटेंडेंटच्या नजरेस कांहीं प्रमुख कैद्यांनी आणली व तडजोड होऊन अन्नत्याग मोडला. पण त्याचें प्रायश्चित्त म्हणून तीन महिनेपर्यंत अन्नत्याग केलेल्या राजकीय कैद्यांचें पत्र लिहिणें व भेट घेणें हे हक्क रद्द करण्यांत आले व माफीचे चार दिवसहि कापण्यांत आले ! त्या वेळीं तडजोड झाली तरी अरेराव अधिकाऱ्यांच्या लीला मधून मधून चालूच असत. जेलचे अधिकारी बराकींत आल्यानंतर त्यांचे पुढे खाली मान घालून व तळपायावर हात ठेवून न बसल्याबद्दल, दंडाबेडी, चक्की, कांजी—रोटी, गनी क्लॉथ ड्रेस, खोडाबेडी, आडाबेडी, सेपरेट अशा शिक्षा देण्यांत येऊं लागल्या. पायावर हात ठेवण्यांचें नाकारल्यावरून एका पाठीमागून एक अशा सर्व शिक्षा कांहींना भोगाव्या लागल्या. सुमारें ३५ राजकीय कैद्याना अशा प्रकारें निरनिराळ्या शिक्षा देण्यांत आल्या होत्या. यांमध्ये अमळनरचे श्री. साने व पुराणीक हे दोघे एम. ए. झालेले राजकीय कैदीहि होते असें म्हणतात. तसेच चंदुलाल वैद्य, वेसाव्याचे डॉ. वैद्य व अमृतलाल मुरारजी हेहि या ३५ लोकांतच होते. पण शेवटच्या तिघांना कांहीं अधिकाऱ्यांनी स्वतःच मारलें. वार्डर हुसेनी यांचेकडूनहि वैद्य, अमृतलाल मुरारजी, दांडेकर, यांना मारविण्यांत आलें. अमृतलाल मुरारजी यांचे डोक्यावर, पाठीवर, तोंडावर, पायावर एवढा मार बसला कीं, ते सुमारें ८-९ दिवस अगदीं बेशुद्ध स्थितींत होते.

### अमृतलाल मुरारजी

श्री. अमृतलाल मुरारजी हे बार्डोली तालुक्यांतील वराड गांवचे रहिवासी असून त्यांनी सुरतेच्या डि. मॅजिस्ट्रेटपुढे १०० रुपयांचा जामीन देण्याचें नाकारल्यावरून सध्या नाशिकजेलमध्ये 'सी' क्लासमध्ये ते शिक्षा भोगीत आहेत. ते ता. २९ ऑक्टोबरपासून तारीख ४ नोव्हेंबरपर्यंत बेशुद्ध स्थितींत होते. जेलमधील सी व बी क्लासामधील लोकांना त्यांना दुखापत झाल्याची बातमी २९तारखेला जेल इस्पितळांत त्यांना नेण्यांत आलें तेव्हाच समजली. पण त्या वेळीं बातमी आली ती एवढीच कीं, श्री. चंदुलाल वैद्य, डॉ. दांडेकर व अमृतलाल मुरारजी यांना दुखापती झाल्या आहेत व त्यांपैकी एक अगदीं बेशुद्धावस्थेत आहे. त्याच वेळीं असेंहि समजलें कीं, या तिघांना मार गुरुवारीं सकाळीं बसला. पण शनिवारीं सकाळपर्यंत कोणीच त्यांची विचारपूस केली नाही ! या तिघांपैकीं एक तर अन्नपाण्यावांचून व औषधोपचारावांचून अगदी बेशुद्ध स्थितींत सुमारें ४८ तास होता अशी बातमी शनिवार ता. २९ नोव्हेंबर रोजीं आली असें म्हणतात ! त्यानंतर दोन दिवसांनी म्हणजे सोमवारीं सायंकाळीं समजलें कीं, 'अमृतलाल मुरारजी यांना जबर दुखापत होऊन ते बेशुद्ध स्थितींत आहेत. आणि चंदुलाल वैद्य व दांडेकर यांना थोडीशी दुखापत झाली होती. पण त्यांची प्रकृति काळजी करण्यासारखी नाही.'

### पायावर हात न ठेवल्याबद्दल शिक्षा

हे तिघेजण राजकीय कैदी पायावर हात न ठेवल्याबद्दल शिक्षा झालेल्या ३५-४० कैद्यांपैकींच होत. पण पायावर हात ठेवण्याचा हा नियम १९३० सालच्या सत्याग्रहाचे चळवळींत कोणत्याच जेलमध्ये राजकीय कैद्यांचे बाबतींत अमलांत नव्हता व १९३२ सालचे चळवळींतहि नाशिक जेलशिवाय इतर जेलमध्ये क्वचितच अमलांत आणला जात आहे. पण नाशिक जेलमधील अधिकाऱ्यांनी ह्या नियमाची अंमलबजावणी करण्यांतच आपलें सर्वस्व खर्च केलें ! 'बी' व 'सी' क्लासच्या राजकीय कैद्यांचे बाबतींत नियमांची अंमलबजावणी क्रमप्राप्तच थोडीशी सवलतीची असावी अशी प्रथा पडूं लागली होती. पण ही ढिलाई नाशिक जेलमध्ये बी क्लासमध्ये नाहीं, तरी 'सी' क्लासमध्ये कोणत्याहि तऱ्हेने चालू द्यावयाची नाही व चोर, डाकू, गुन्हेगार कैद्यांप्रमाणेंच राजकीय कैद्यांना वागवावयाचें असा चंग अधिकाऱ्यांनी बांधला होता. अपमान व मानखंडना होईल असे हुकूम कांही राजकीय कैद्यांनी केवळ तत्त्वाकरिता मानावयाचे नाहींत असें ठरविलें व सुमारें १००—१२५ कैद्यांनी 'पायावर हात ठेवावयचे नाहींत' व त्याकरिता पडेल ती शिक्षा भोगावयाची असें ठरविलें. मारहाणीबद्दल त्यांनी अन्नत्यागहि केला. पण म्होरक्या दिसेल

त्याला फोडून काढून सेपरेटची शिक्षा देण्याचा क्रम सुरू झाला व सुमारें एक महिनाभर ३५–४० लोकांना अशा तऱ्हेने दंडाबेडी, गनी क्लॉथ वगैरेच्या शिक्षा देण्यांत आल्या. या राजकीय कैद्यांना रात्रंदिवस कोंडून ठेवण्यांत येत असे. त्यांना वार्ड नं. ५ मध्ये ठेवण्यांत आलें आहे! आक्टोबरचे २० तारखेचे सुमारास जेल कमिटीने तपासणी केली त्यावेळीं 'बी' व 'सी' क्लासमधील लोकांनी 'सी' क्लासमधील लोकांना कशा भयंकर शिक्षा क्षुल्लक नियम मोडल्याबद्दल, शिस्तीच्या नांवाखाली देण्यांत आल्या हें उघडकीस आणलें पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाही. इतकेंच नव्हे तर फटक्यांची शिक्षा देण्याकरिता इन्स्पेक्टर जनरल ऑफ प्रिझन्स यांचेकडे परवानगी मागितली असता वरिष्ठ अधिकाऱ्यांनी ती नाकारली असें म्हणतात. नं. ५ व ६ या वार्डमध्ये बंडखोर कैद्यांना ठेवतात. नं. ६ या वार्डाची शिक्षा म्हटली कीं अंगावर शहारेच उभे राहतात. या ६ व्या वार्डात अमृतलाल मुरारजी यांस २६ ऑक्टोबर रोजीं मि. रोच (अॅ. जेलर) यांचे सांगण्यावरून नेण्यांत आलें. शनिवारीं सकाळीं रोच यांनी डॉ. काद्री (ज्यु. मे. ऑ.) यांना अमृतलाल मुरारजीचे आजाराची खबर दिली व त्यांनीच त्याला दुपारीं स्ट्रेचरवरून इस्पितळांत आणविलें. रविवारीं सकाळीं कोणी 'सी' क्लासमधील कैदी बेशुद्ध आहे अशी बातमी आली. तेव्हा 'बी' क्लासमधील लोकांनी अमृतलाल यांस आमच्यापैकीं कोणाला तरी भेटूं द्या व त्याचे प्रकृतीसंबंधाने आम्हाला माहिती कळवा अशी मागणी केली. त्यावरून मि. रोच यांनी श्री. शंकरराव देव यांना रविवारीं सायंकाळीं ५ वाजता बोलावलें. व त्यांचे जवळ ते असें म्हणाले म्हणतात कीं, 'रोग्याची प्रकृति बरी आहे. काळजी करण्यासारखें कांहीं नाहीं. त्याला थोडी फार दुखापत झाली आहे. त्याला स्ट्रेचर वरून नेलें असें तुम्ही सांगतां याचें मला आश्चर्य वाटतें! त्यांनीच स्वतःला दुखापत करून घेतली आहे व दुखापत करितांना मीं पाहिलें आहे.' परंतु आजारी मनुष्याचें नांव त्यांनी सांगितलें नाहीं. चंदुलाल वैद्य हे अमृतलाल शेट यांच्या परिचयाचे होते. त्यांनी 'चंदुलाल शेट यांना मला भेटूं द्या. त्यांचे नातेवाईकांस कळवा; खाजगी डॉक्टरांचा सल्ला घ्या; व या बाबतींत लागणारा खर्च माझेकडून घ्या;' अशी सोमवारीं इन्स्पेक्शनचे वेळीं मागणी केली. सुपरिंटेंडेण्ट यांनी इन्स्पेक्टर ज. ऑफ प्रिझन्सकडे पत्र पाठवा व परवानगी घ्या असा जबाब दिला. अमृतलाल शेठ यांनी तसें आय. जी. पी. यांना पत्रहि पाठविण्याकरितां लिहून दिलें. पण तें पत्र पाठविण्यांत आलें नाहीं असें सुपरिंटेंडेंट यांनीच पुन्हा गुरुवारीं त्यांना सांगितलें. सोमवारीं कांहीं विशेष भीतिदायक बातमी आली म्हणून डॉ. चंदुलाल (भडोच) यांनी जेलर यांची गाठ घेतली. पण त्यांनाहि मि. रोच यांनी सांगितलें म्हणतात कीं, "मी तुम्हांला खात्रीपूर्वक सांगतों कीं, त्या जखमा त्यांच्या त्यांनीच करून घेतल्या आहेत. शुक्रवारीं सायंकाळीं मी फेरीला गेलों होतों, तेव्हाच त्याला चक्कीवर (सर्व शिक्षांना त्रासून कंटाळून) डोकें हपटून घेतांना व खुर्च्यांनी व दंडाबेडींनी मारून घेतांना मीं पाहिलें. मी त्याचें दार खुलें करविलें व त्याला थांबविलें. डॉक्टरास बोलावलें व त्याने औषधोपचार केला. पण दुसरे दिवशीं (शनिवारीं) सकाळीं पाहतों तों डोकीवर ब्लँकेट घेऊन तो पडून होता. त्याने डोकें वर केलें तों त्याचे डोळे कांहीं चमत्कारिक दिसले म्हणून पुनः डॉक्टरांना कळविलें व नंतर त्याला इस्पितळांत नेण्यात आलें. मेडिकल ऑफिसर न्यू बोल्ट यांनी 'मेंदू आपटून घेतल्यामुळे हा इसम आजारी आहे व तो हळूहळू शुद्धीवर येत आहे' असें दुपारींच सांगितलें."

### अमृतलाल शेठ यांची विनंति

अमृतलाल शेठ यांनी मुंबईहून डॉ. मुळगांवकर, डॉ. शहा, सि. सर्जन यास बोलवा व लागेल तो खर्च करा तो खर्च आपण देऊं असे मेडिकल ऑफिसर यांस समक्ष सांगितलें व बजावलें कीं, "दुखापती कशाहि होवोत तो आत्महत्या करण्याचा प्रयत्न असेल अगर त्याचेवर कोणी अत्याचार व मारहाण केली असेल. कांहीं झालें तरी गुन्हेगार कोण व गुन्हा काय झाला याचा तपास लागणें जरूर आहे. तरी मेडिकल ऑफिसर या नात्याने तुम्ही डि. मॅजिस्ट्रेट यांस कळविणें जरूर आहे. तरी आपण तसें करावें."

मंगळवारीं दुपारीं मुरारजी देसाई (माजी डे. कलेक्टर) व डॉ. चंदुलाल यांनी रोच यांचे समक्ष सुपरिंटेंडेंट मि. विकहॅम यांची गांठ घेतली. व त्या दोघांनी डि. मॅ. कडे याबाबतींत बातमी देणें किती जरूरीचें आहे हें सांगितलें. त्यावेळीं सु. विकहॅम असें म्हणाले म्हणतात कीं, 'कांहीं दुखापती स्वतः करून घेतलेल्या असतील पण कांहीं मारहाणीनेहि झालेल्या आहेत. मी चौकशी करीतच आहें. पण मला असें वाटतें कीं जो कोणी याला जबाबदार असेल, मग तो ऑफिसर असला तरी त्याला ताबडतोब काढून टाकणेंच योग्य होईल.' पण त्यांनीहि बी. क्लासमधील डॉक्टर मंडळींपैकीं एकालाहि शुश्रूषा करूं देण्याची परवानगी दिली नाहीं!

### तुरुंगाच्या अधिकाऱ्यांवर खटला

शनिवारीं (अमृतलाल यांस बेशुद्ध स्थितींत इस्पितळांत नेलें तेव्हापासून) सकाळपासून बुधवार-

पर्यंत 'सी' क्लासमधील कैद्यांनी अन्नत्याग केला होता. 'बी' क्लासमधील कैदी गुरुवारपासून अन्नत्याग करणार होते. पण अमृतलाल मुरारजी यांचे शुश्रूषेकरिता 'सी' क्लासमधील दोन राजकीय कैदी घेण्यांत आले व कांहींना भेटू दिलें व समेट झाला. बुधवारीं पोलिस सपरिंटेंडेंट व इतर अधिकारी येऊन चौकशी सुरू झाली. गुरुवारीं डि. मॅजिस्ट्रेट स्वतःच आले व त्यांनी सर्व प्रकारें बारीक चौकशी केली व सायंकाळीं जेल बंद झाल्यावर रोच व जॅक्सन यांचेकडून कामाचा चार्ज घेऊन त्या दोघांना तूर्त कामावरून दूर केले. दोन हवालदारांना तूर्त कमी करण्यांत आलें आहे व एका वार्डरचा पट्टा व दंडा काढून घेण्यांत आला आहे. वरील ५ इसमापैकीं, रोच व जॅक्सन यांस जामिनावर खुलें करण्यांत आले असून सुपरिंटेंडंटच्या परवानगीशिवाय बंगला सोडून जाण्याची त्यांना मनाई करण्यांत आली आहे. लवकरच त्यांचेवरील खटला सुरू होईल. इंडि.पि.को. कलम ३२५ ( Grievous hurt ) खालीं खटला होणार आहे असें समजतें.

अधिकाऱ्यांनी श्री. अमृतलाल मुरारजी यांचे वडिलांना अमृतलाल इजा झाल्यानंतर तो बेशुद्ध असतांनाहि 'तो फक्त आजारी आहे' असें तारीख २ रोजीं म्हणजे ७।८ दिवसांनी पत्रानें कळविलें व भेटण्यास आल्यास भेट होईल असें सांगितलें. त्या पत्रावरून त्यांच्या मातोश्री व वडील त्यास गेल्या शनिवारीं भेटण्याकरिता आले होते. त्यांची भेट झाली. पण अमृतलाल यांस चार दोन शब्दहि नीटपणें बोलतां आले नाहीत. ते हातपाय हालवूं लागले आहेत व त्यांना चांगले शुद्धींत येऊन बोलूं लागण्यास आणखी ८—१० दिवस तरी लागतील असें म्हणतात.

# गांधीजींचें दुसरें प्रायोपवेशन दोन महिन्यांवर आलें !

म. गांधींच्या दुसऱ्या प्रायोपवेशनाचा वायदा सहा महिन्यांचा होता. पण त्यांनी आता प्रसिद्ध केलेल्या पत्रकावरून त्यांचें प्रायोपवेशन अवघ्या दोन महिन्यांवर आलें असल्याचें दिसून येतें. मलबारांत गुरुवायूरचें देवस्थान प्रसिद्ध आहे. त्या देवालयांत जाऊन अस्पृश्यांना देवदर्शन मिळावें यासाठी कल्लाप्पा नांवाच्या गृहस्थानें कांहीं दिवसांपूर्वी प्रायोपवेशन आरंभलें होतें. परंतु देवालयाच्या व्यवस्थापकांना विचार करण्यास अवकाश मिळावा यासाठी गांधीजींनी कल्लाप्पास आणखी तीन महिनेपर्यंत प्रायोपवेशन थोपवून धरण्यास सांगितलें. त्याप्रमाणें कल्लाप्पा यांनी प्रायोपवेशन थांबविलें आहे. गांधींनी दिलेली मुदत येत्या डिसेंबरअखेर संपते. ती संपण्यापूर्वी अस्पृश्याचा मंदिरांत प्रवेश होऊं न दिला तर मी स्वतः प्रायोपवेशनास प्रारंभ करीन असा गांधीजींनी धाक घातला आहे. अस्पृश्यवर्ग हा हिंदु समाजाचा एक भाग असल्यानें हिंदूंच्या देवळांत अस्पृश्यांना येण्यास मोकळीक मिळाली पाहिजे हें तत्त्व कोणीहि प्रगतिप्रिय हिंदु मान्य करील यांत शंका नाहीं. अस्पृश्यांचा सार्वत्रिक देवालयप्रवेश सुलभ होण्याच्या दृष्टीनें या धर्तीचा प्रयोग कोणत्या तरी श्रेष्ठ दर्जाच्या देवालयांत करण्याची गरज होतीच.

प्रयोगासाठीं निवडलेलें देवालय प्रसिद्ध असावें आणि त्याचें पावित्र्य राखण्याची अनुकूलता व्यवस्थापकांना असावी. त्या योगानें स्पृश्यांच्या मनाला कसलाहि किंतु न वाटता अस्पृश्यांना पृथक्‌पणें देवदर्शन करतां यावें. असें झालें व अस्पृश्यांचा प्रवेश स्पृश्यांना नडवीनासा झाला म्हणजे इतर देवालयांच्या मालकांत व व्यवस्थापकांतहि आपआपलीं देवालयें अस्पृश्यांसाठीं उघडण्याचें मनोधैर्य साहजिकच उत्पन्न होईल. त्या सर्वांस योग्य असा धडा घालून देण्यास गुरुवायूरचें देवालय हें अनुरूप स्थान समजण्यास हरकत नाहीं. सर्व देवालयांकरिता प्रायोपवेशन करण्याऐवजी एकाच देवालयावर त्याचा रोख धरण्यांत गांधिजींनी बऱ्याच साधक-बाधक गोष्टींचा विचार केलेला दिसतो. एक तर एकाच देवालयावर शरसंधान धरण्यानें देवालयाच्या व्यवस्थापकांस वजनदार व श्रद्धाळू हिंदु पुढारीहि भीड घालतील व ती भीड त्यांच्याकरिता व गांधिजींच्या प्राणाकरिताहि त्यांस ऐकावी लागून देवालयांत अस्पृश्यांना घेण्यावांचून त्यांस गत्यंतरच उरणार नाहीं.

तथापि याहि प्रायोपवेशनावर कित्येक आक्षेप घेतां येण्यासारखे आहेत. पहिला आक्षेप हा कीं देवालयप्रवेशाच्या बाबतींत सत्याग्रहाचा अवलंब कोणी करूं नये असें गांधिजींचें मत असून तें त्यांनी नाशिक येथील काळ्या रामाच्या देवळापुढील सत्याग्रहाच्या वेळीं अस्पृश्य पुढाऱ्यास कळविलें होतें. गांधीजींचें प्रायोपवेशन हा किरकोळ सत्याग्रह नसून फार मोठा सत्याग्रह आहे. मंदिरप्रवेशास इतरांचा सत्याग्रह निषिद्ध व गांधींचा सत्याग्रह तेवढा ग्राह्य व धर्म्य हें विलक्षण तत्त्व कोण कबूल करील ?

बरें, गांधिजींचां हा सत्याग्रहें धर्म्य कां ? तर तो ते ईश्वरी प्रेरणेवरून करतात म्हणून. ईश्वरी प्रेरणेचें नांव काढले कीं सगळेंच बोलणें खुंटलें म्हणा. परंतु सध्याच्या चिकित्सक काळांत गांधिजींच्या या कारणाविरुद्ध उघडपणें कोणी आक्षेप घेण्यास न धजला तरी त्या कारणाने त्याचें समाधान होईलच असें मात्र म्हणवत नाही. गांधीजींनी आणखी एक शर्तहि घातली आहे, ती मलबारांतील हिंदूंना पत्करेल कीं नाही याविषयीं शंकाच आहे. गांधिजी स्पृश्यांना म्हणतात कीं अस्पृश्यांना देवळांत घ्या इतकेंच नव्हे तर स्पृश्यांना ज्या तऱ्हेने घेण्यांत येतें त्याच तऱ्हेने त्यांना घ्या. अस्पृश्यांना देवदर्शन घडवूं या इतकेच नव्हे, तर स्पृश्य लोक देवळांत जेथपर्यंत जातील तेथपर्यंत अस्पृश्यांना जाण्यास मुभा ठेवा असाच गांधीजींच्या सूचनेचा अर्थ नव्हे काय ?

गांधीजींचें अस्पृश्यताविषयक धोरण लक्षांत घेतल्यास त्यास अनुसरूनच त्यांची वरील सूचना असल्याचें कोणीहि कबूल करील. आजच्या अंकांत जागेच्या अभावीं गांधिजींचें पत्रक छापतां आलें नाही. तें पुढील अंकीं देण्यात येईल. त्यांत स्पृश्य हिंदूंनी अस्पृश्य बंधु–भगिनींना आलिंगन दिलें पाहिजे आणि आपल्या स्वतःच्या भाऊ–बहिणींप्रमाणे त्यांना जवळ करून आपल्या घरांत, शाळांत व मंदिरांत घेतलें पाहिजे असें स्वच्छ सांगितलें आहे. गांधिजींच्या मताप्रमाणें एखाद्या निर्मळ अस्पृश्यास एखादा स्पृश्य हिंदू आलिंगन देण्यास उद्युक्त होईलहि. परंतु हें उदाहरण अपवादात्मकच मानतां येईल. पण त्याऐवजीं सर्व स्पृश्याना सरास अस्पृश्याना आलिंगन देण्यास व घरीं घेऊन जाण्यास ते सागतील तर त्यांचें म्हणणे कितीसे लोक ऐकतील ? आलिंगनाची शिफारस करात असता अस्पृश्यता ही हिंदूंनी आपल्या लहरीखातर उत्पन्न केली नसून तिला तशींच सबळ कारणें! अद्यापिहि आहेत, या कठोर सत्याचा गांधिजींना अगदीच विसर पडलेला दिसतो.

गांधिजींचा या प्रकारचा आग्रह त्यांच्या चळवळीस उपकारक न होता मारक होईल अशीच भीति वाटते. त्यांच्या पत्रकांतील सहभोजन व सहविवाह यासंबंधाचीं त्यांचीं मतें स्पृश्य हिंदूंस अत्यंत अप्रिय होणारीं आहेत. त्यांचीं पुढील विधानें वाचकांनी काळजीपूर्वक वाचावीं. गांधिजी म्हणतात, ‘सहभोजन आणि मिश्रविवाह यांना प्रतिबंध करणें हेंहि हिंदुधर्मांत येऊं शकत नाही. ...जेव्हा स्वयंस्फूर्तीने आणि स्वेच्छेने लोक स्पृश्यास्पृश्यांचीं व हिंदु-अहिंदूंचीं सहभोजनें घडवून आणतात तेव्हा तें एक सुचिन्हच होय असें मी समजतों.’ गांधिजी यास सुचिन्ह समजोत, पण इतर हिंदु त्यास सबगोलंकार व धर्मबुडवेपणा समजतात त्याची वाट काय ? स्पृश्यांना अस्पृश्यांच्या मंदिरप्रवेशासाठीं किती तरी सावधगिरीने व सामोपचाराने वळवून घ्यावयास पाहिजे. तें सारें बाजूस राहून गांधिजी सहभोजनाची व मिश्रविवाहाची तरफदारी करूं लागले तर स्पृश्य हिन्दु मंदिरप्रवेशास कबुली देतील कीं, त्याविरुद्ध अधिकच बिथरतील याचा गांधीजींनी विचार करावयास नको काय ? त्यांच्या या धोरणामुळे त्यांजवरील लोकांचा विश्वास उडून मंदिरप्रवेशाच्या चळवळीस जोराचा प्रतिकार होण्याचा मात्र फार संभव आहे. ज्याचीं मतें ज्ञातिसंकरास व वर्णसंकरास पूर्णपणें अनुकूल आहेत त्याला वरील प्रकारची धार्मिक सुधारणा बहुजनसमाजाकडून घडवून आणण्याच्या कामीं आज यश येण्याची आशा फारच थोडी आहे. गांधिजींचीं धार्मिक मतें काय आहेत हें सर्वसामान्य जनतेस एक वेळ समजावयास पाहिजेच होतें. त्या दृष्टीने त्यांचा खुलासा आवश्यक असला तरी तो समयोचित आहे असें मात्र कोणी समजणार नाही.

# त्रिवेणीच्या संगमावर त्रिवर्गांचा समागम

सुमारें तीन महिन्यांपूर्वी इंग्लंडाचे मुख्य प्रधान मि. राम्से मॅक्डोनाल्ड यांनी हिंदु, मुसलमान, शीख, ख्रिस्ती, युरोपियन, अँग्लो-इंडियन, मजूर, अस्पृश्य, स्त्रिया इत्यादिकांचे प्रतिनिधि प्रांतिक कौन्सिलांतून किती प्रमाणांत घ्यावे याविषयीं एक कोष्टक प्रसिद्ध केलें. मॅक्डोनाल्ड यांचें हें कोष्टक हिंदुस्थानांतील एकराष्ट्रीयत्वाच्या मानेवरून सुरी फिरविणारें ठरलें. त्या कोष्टकांत ज्यांनी विभक्त मतदारसंघ मागितले त्यांना त्यांचें इच्छाभोजन मिळालेंच. पण ज्यांना हें मिष्टान्नभोजन नसून विषान्नभक्षण आहे असें वाटत होते त्यांनाहि बळजबरीने तें चारण्यांत आलें. त्यामुळे हिंदुस्थानांत एक प्रकारचा असंतोष फैलावला व विशेषें करून हिंदु व शीख यांचीं मनें अधिकच विपण्ण झालीं. शीख समाज छोटा, लष्करी शिस्तीचा व एकजुटीचा असल्याकारणाने त्याने मॅक्डोनाल्ड यांच्या निर्णयावर बहिष्कार घालण्याचा निश्चय त्वरित ठरवून तो गोलमेज परिषदेपुरता अमलांतहि आणला.

हिंदु समाज फार मोठा, विस्कळित व प्रांताप्रांतांतून विभागलेला असल्यामुळे त्याला आपल्या असंतोषांतून ज्वाळा उत्पन्न करून तिचा राज्यकर्त्यांस चटका लावण्याचें साधन सांपडेना. हिंदु लोकांना आपलें हें दौर्बल्य या प्रकारें जाणवत असता येरवड्याच्या तुरुंगाभोंवतालच्या भिंती धरणीकंपाने दुभंग झाल्याचा आवाज ऐकूं आला. हिरण्यकश्यपूप्रमाणे मॅक्डोनाल्ड यांचा ज्ञातिविषयक निर्णय विलायतेहून बहुतेक अमरपट्टाच घेऊन हिंदुस्थानांत उतरला होता. तथापि हिरण्यकश्यपूस वर देतांना त्यालीं मरण दिवसा नाही, रात्रीं नाही, घरीं नाही, रानीं नाही, माणसापासून नाही, श्वापदापासून नाही असे सांगण्यात आल्यामुळे खांबाला प्रसूति–वेदना होऊन त्याने नृसिंहाला जन्म दिला. नृसिंहाने हिरण्यकश्यपूचें पोट फाडून त्याचीं आंतडीं बाहेर काढण्याकरिता जसा खांबांतून जन्म घेतला तसा अस्पृश्यांच्या निर्णयास नेस्तनाबूत करण्याकरिता येरवड्याच्या तुरुंगांत प्रायोपवेशनास जन्म घ्यावा लागला. नृसिंहजयंती प्रमाणे ही प्रायोपवेशनजयंती इतक्या अकल्पित रीतीने घडून आली कीं त्या योगाने सारा हिंदुस्थान देश आश्चर्यचकित झाला.

गांधिजींना ज्ञातिविषयक निर्णयाचा एक अवयव इतक्या उशिराने छाटतां आला हा चमत्कारच मानला गेला. हिंदी लोकांना आपसांतील तंटा आपसांत मिटवितां येऊं नये व तो मिटविण्याचा तोरा मि. राम्से मॅक्डोनाल्ड यांनी नाक खाजवीत आपल्यासमोर मिरवावा याची विशेष शरम हिंदु पुढाऱ्यांना वाटत होती. या निर्णयाचा एक अवयव छाटून निघाल्याबरोबर चमत्कार दाखविण्याचें सामर्थ्य आपल्या कल्पनेत व बुद्धिमत्तेत असल्याविषयी त्यांच्या मनांत आत्मविश्वास उपजून त्यांची कल्पकता प्रज्वलित झाली व तिने वरील चमत्कारापेक्षाहि अधिक महत्त्वाचे चमत्कार करून दाखविण्याकरिता उंच आकाशांत उड्डाण मारून पंख पसरले.

पं. मदन मोहन मालवीय यांची देशभक्ति व कल्पनाशक्ति अचाट आहे. त्यांच्या कल्पकतेच्या झपेखालीं सांपडणार नाही असें त्यांना बहुधा कांहींच आढळत नाही. हिंदु विश्वविद्यालयासारखी विशाल संस्था ज्यांच्या कल्पनेस झेपली त्यांनी हिंदु-मुसलमानांच्या अवघड ऐक्यास हात घालावा यांत अस्वाभाविक असें काय आहे? गंगातीरीं वारा करणाऱ्या या तपस्व्याची येरवड्यांतील बैराग्याशीं नजरानजर होताच त्याचा निश्चय काय झाला कोण जाणे? त्यांनी मॅक्डोनाल्डच्या हातांनी घडविलेली मूर्ति आपल्या हातांनी मोडून व आटवून नव्या मुशींतून नवी मूर्ति ओतण्याचा जणूं काय पणच केला. आणि हा पण शेवटास नेण्यास संवगडी भेटला तोहि अनपेक्षित मौलाना शौकतअली व पंडित मालवीयजी या उभयतांचा धर्माभिमान इतका जाज्वल्य आहे कीं ते हिंदु–मुसलमानांचा समेट करण्याकरिता हातांत हात घालतील हें सत्यनिष्ठ अशा मालवीयजींनी स्वमुखाने सांगितलें असतें तरी जगाने तें असत्यच मानलें असतें. परंतु एकदा चमत्कारांना सुरुवात झाल्यानंतर हाहि चमत्कार दुनियेच्या डोळ्यांना कां दिसू नये? हिंदु पंडित व मुसलमान मौलाना यांचें जातक जमलें व ते दोघे खरोखरच हिंदु–मुसलमानांच्या समेटाकरिता बाहेर पडले. या गंगाजमनी जोडीपैकीं पं. मालवीयजी यांचा श्रद्धाळू व सत्त्वस्थ स्वभाव लक्षांत घेता त्यांनी शौकतअलीवर विश्वासून त्यांजबरोबर सख्य जोडण्यास तयार व्हावें हें थोडें डाकें खाजवल्यानंतर विचारी माणसास पटेल. परंतु उलट शौकतअलीहि तितक्याच उत्साहाने मालवीयजींच्या शेजारीं उभे राहताच लोक हा समेटाची बोलवा थट्टेवरच नेऊं लागले. त्यांना तो फार्सच वाटून ते पुढे सुरू झालेल्या हालचालींकडे कुचेष्टेने पाहात बसले.

पण जों जों एक दिवस मावळून दुसरा दिवस उगवूं लागला तों तों समेट हें मुलांच्या खेळांतील जपानचें गुलाबी बाळ नसून हाडामांसाचें सजीव पोर आहे असें प्रत्ययास येत चाललें. मुसलमान पुढाऱ्यांनी लखनौस आपली परिषद भरविण्याचें ठरविलें व ती भरलीदेखील. पुण्यास साऱ्या हिंदुस्थानांतील ख्रिस्ती लोकांचा परिषद येथील ख्रिस्त-सेवासंघानें बोलाविली व ती झालीदेखील. पं. मालवीय यांनी पंजाबांत जाऊन शिखांना आपली सभा भरविण्यास सांगितलें व त्यांनी तें ऐकलेंदेखील. आता त्यानंतर हिंदूंची पाळी आली. मुसलमान पुढारी लखनौस बोलले, तेव्हा मुसलमानांच्या सवालास हिंदूंनी जबाब द्यावा असा मुसलमानांचा आग्रह पडल्यावरून पं. मालवीय यांनी प्रयाग हेंच पुण्यक्षेत्र ऐक्याच्या पवित्र कार्याकरिता पसंत केलें.

ज्ञातिविषयक ऐक्याच्या बाबतींत प्रमुख घटक हिंदु, मुसलमान व शीख यानाच मानण्यांत येतें व ते यथार्थहि आहे. त्या त्रिवर्गाचे प्रमुख पुढारी अलाहाबादेस जुळले व त्याशिवाय ख्रिस्ती पुढाऱ्यांनीहि येऊन परिषदेच्या समासांतील ऐक्य हें पद सार्थ केलें. सगळ्या हिंदुस्थानातील हिंदु एक व अभिन्न म्हटले तरी त्यांचे हितसंबंध प्रांतपरत्वें अनेक व भिन्न आहेत. मुसलमानांस उद्देशून बंगाल्यांतील हिंदूंचा पवित्रा वेगळा, पंजाबातील हिंदूंचा वेगळा व सिंधमधील हिंदूंचा निराळा. त्यांतल्या त्यांत पंजाबाचा सामना पंचरंगी न म्हटला तरी चौरंगी किंवा तिरंगी. तेथील शिखाचा तृतीय पंथ पडला तेव्हा परिषदेपूर्वी कांही दिवस या सामनेवाल्यांनी अलाहाबादेस जमून एकमेकांच्या डावपेचांची मजा पाहण्याकरिता निरनिराळया आखाड्यांत दोस्तीच्या कुस्त्या खेळून घेतल्या. त्यांत एकमेकांची पक्कड एकमेकांस कळल्यानंतर मुख्य परिषदेस ता. ३ रोजीं सुरुवात झाली.

परिषदेच्या अध्यक्षपदाकरिता पं. मालवीयजींनी मद्रासचे पितामह श्री. सी. विजय राघवाचारियर यांस गांठून आणलें होतें. विजयराघवाचार्य हे पंडितजींपेक्षाहि पिकलें पान झाले आहेत. कर्मठपणांत आचार्य व पंडित यांपैकीं कोण कोणास हार जातील याची चढाओढ लावल्याबांचून कोणतेंहि अनुमान बांधलें तरी तें अचूक ठरण्याऐवजी चूक ठरण्याचाच संभव जास्ती. परिषदेचें अध्यक्षपद स्वीकारणार आचार्य. त्याची सूचना आणणार मौलाना व त्याला अनुमोदन देणार पंडित. ही करणी कोणाचीहि असो, पण तीहि अघटितच गणली जाणारी होती. हिंदी लोकांत ज्ञातिविषयक ऐक्य घडवून आणणें म्हणजे मॅक्डोनाल्ड यांचा निर्णय उलथून पाडणें होय. त्यांचा निर्णय उलथून पाडण्यास हिंदु व शीख यांनी उत्सुक व्हावें यांत नवल नाही. कारण निर्णयानें त्यांचें नुकसानच केलें आहे. परंतु मुसलमानांनाहि हिंदु-शिखांइतकीच कां उत्सुकता वाटावी याचा नीट अंदाज अद्यापिहि लागत नाही. कारण निर्णयानें त्यांचें तसें नुकसान झालेलें दिसत नाही.

वरील बाबीसंबंधानें कांही हिंदु-मुसलमान पुढाऱ्यांचे उद्गार बाहेर पडले आहेत ते थोडेसे मार्गदर्शक आहेत. ऐक्य परिषदेस सुरुवात होण्यापूर्वी मौ. जाफरअली यांच्या अध्यक्षतेखालीं मौ. शौकतअली, मौ. अबदुल कलाम अझाद प्रभृति मुसलमान पुढारी एका खासगी बैठकींत जमले. तिच्यांत मुसलमानांचे तेरा मुद्दे हिंदु व शीख कबूल करतील तर आपण विशिष्ट प्रकारच्या संयुक्त मतदारसंघास तयार होऊं असें त्यांनी म्हटल्याचें बाहेर आलें आहे. त्यांतहि नवीन असें कांहीच नाही. लखनौच्या परिषदेंत हिंदु म्हणतात त्या तऱ्हेच्या संयुक्त मतदारसंघास मुसलमानांनीं मान्यता न देता त्याऐवजी महंमदअलींचा विचित्र मतदारसंघ सुचविला. कित्येक मुसलमान, स्पृश्यास्पृश्यांच्या करारांत ज्या संयुक्त मतदारसंघाचा शोध लागला त्या मतदारसंघावर डोळा ठेवून बसले आहेत. एकंदरीनें पाहता राष्ट्रीय मुसलमानांशिवाय दुसऱ्या कोणत्याहि मुसलमान पुढाऱ्यानें निर्भेळ संयुक्त मतदारसंघास खडखडीतपणे कबुली दिलेली नाही.

अलाहाबादेस हिंदु व शीख यांच्या बाजूनें प्रयत्न चालला होता तो संयुक्त मतदारसंघ गृहीत धरून मुसलमानांच्या उरलेल्या तेरा मागण्या कोणत्या फरकानें पत्कराव्या यासंबंधाचा. यासाठीं मुसलमानांच्या बाकीच्या तेरा मागण्या तरी कसल्या आहेत याची छाननी करून पाहण्यास हरकत नाही. त्या तेरा मागण्यांपैकीं ( १ ) हिंदुस्थानाची भावी राज्यघटना फेडरल असावी ( २ ) मुसलमानांना धर्म, शिक्षण व संस्कृति यांचें स्वातंत्र्य असावें ( ३ ) कोणतेंहि सामाजिक अगर धार्मिक बिल किंवा ठराव त्या त्या ज्ञातींतील तीन-चतुर्थांश सभासदांच्या मताविरुद्ध असेल तर विचारांत घेऊं नये ( ४ ) बलुचिस्थान व ( ५ ) वायव्य सरहद्दप्रांत यांना राजकीय सुधारणा द्याव्या. हे पांच मुद्दे असे आहेत कीं, त्यांस हिंदूंकडूनहि म्हणण्यासारखा विरोध होणार नाही. वायव्य सरहद्दप्रांतास सरकारानें सुधारणा देऊनहि टाकल्या असल्यामुळे त्याचा वाद संपलाच आहे ( ६ ) सिंध प्रांत मुंबई इलाख्यापासून वेगळा करण्याची पूर्वतयारी सरकाराकडून झालीच आहे. फक्त त्या प्रांताचा राज्यकारभार स्वतंत्रपणें चालवितांना नुकसान आलें

तर तें कोठून व कसें भरून काढावें एवढाच प्रश्न शिल्लक आहे. सिंध प्रांताची भाषा वेगळी व तो मुंबई इलाख्यांतील इतर प्रांतापासूनहि तुटक असल्यामुळे त्याची चूल स्वतंत्र मांडण्यास हिंदूंच्या संरक्षणाची हमी मुसलमान घेतील तर हरकत उरणार नाही.

(७) प्रांतांची पुनर्घटना करतांना त्या त्या प्रांतांत आज असलेल्या मुसलमानांच्या बहुसंख्येस धक्का लागूं नये, या मुद्दयाचा संबंध पंजाब व बंगाल या प्रांतांशींच येतो. परंतु त्या दोनहि प्रातांपैकीं पुनर्घटनेचा प्रसंग आलाच तर तो बंगाल्यापेक्षा पंजाबातच अधिक संभवनीय. तथापि पंजाबांतील शीख व हिंदु यांची मतदारसंघासंबंधाची तक्रार मिटली तर हाहि मुद्दा संपल्यासारखाच आहे. (८) ज्या प्रांतांत मुसलमान संख्येनें जास्ती असतील त्या प्रांतांत त्यांना त्या संख्येच्या प्रमाणांत कौन्सिलांतील जागा मिळाव्या व ज्या प्रांतांत ते संख्येनें कमी असतील त्यांत त्यांना पासंगाच्या अधिक जागा याव्या ही मुसलमानांची मागणी अगदींच गैरवाजवी आहे. त्याना इतर प्रांतांतून पासंग मिळाले आहेत, व त्याचा मोबदला पंजाब व बंगाल या प्रांतांत मुसलमानांस कमी जागा ठेवून मांटेग्यू-चेम्सफर्ड सुधारणा कायद्याने हिंदूंना अंशतः दिला आहे.

(९) साऱ्या हिंदुस्थानांत लोकसंख्येने मुसलमान एक-चतुर्थांशहि नसता त्यांनी मध्यवर्ती कौन्सिलांत एकतृतीयांश जागा मागाव्या त्या कशाच्या जोरावर! सदर कौन्सिलांतून मुसलमान व हिंदु यांचेच तवढे प्रतिनिधि यावयाचे नसून संस्थानिकांचे, इतर जातींचे व हितसंबधांचेहि प्रतिनिधि यावयाचे आहेत. त्यांच्यांतील एकतृतीयांश जागा मुसलमानांस मिळतील तर मध्यवर्ती कौन्सिलांतील कोणत्याहि जातीपेक्षा किंवा वर्गापेक्षा मुसलमानांचेंच मतांविक्य होऊन हिंदुस्थानाची सारी सत्ता सर्वांची न राहता एकट्या मुसलमानांचीच ठरेल (१०) मध्यवर्ती व प्रांतिक मंत्रिमंडळांत एकचतुर्थांस जागा मुसलमानांना याव्या ही मागणी वरच्या मागणीसारखीच भरमसाट आहे. मुंबई, मद्रास यासारख्या इलाख्यांत मुसलमान अगदीच थोडे असता त्यांच्याकरिता चतुर्थांश जागा राखून ठेवण्याचा हट्ट कोण चालूं देईल?

(११) नोकऱ्यांत योग्य हिस्सा, (१२)मुसलमानांच्या शिक्षणाकरिता खजिन्यांतून स्वतंत्र मदत व(१३) प्रांतांना शेषाधिकार हे मुसलमानांचे उरलेले मुद्दे होत. यांपैकीं पहिले दोन मुद्दे पुण्याच्या करारांत अस्पृश्यांनी मांडलेल्या व मिळविलेल्या दोन मागण्यांच्या जातीचेच असून त्याजवर हिंदु व मुसलमान पुढाऱ्यांनी तडजोड करावयाचीच म्हटलें तर होणार नाही असें नाही. पण शेवटचा तेरावा मुद्दा हिंदूंनी कोणत्याहि अटीवर कबूल करतां कामा नये. कारण सदर मुद्दा कबूल केल्यास प्रांत बलिष्ठ बनतील व मध्यवर्ती सत्ता कमकुवत होऊन मुसलमानी प्रांत कदाचित फेडरेशनमधून केव्हांहि फुटून बाहेर पडतील आणि अशा रीतीने हिंदुस्थान हा देश राष्ट्र या नात्याने जागेवर शिल्लकहि राहणार नाही.

लखनौ येथील मुसलमानांच्या परिषदेंत संयुक्त मतदारसंघाचा प्रश्न हिंदूंच्या दृष्टीने समाधानकारक रीतीनें सुटला असता तर वरील तेरा मुद्दयांपैकीं बरेच मुद्दे हिंदूंनी औदार्यपूर्वक तडजोडीने सैल करून घेतले असते. हें घडून येण्यास मुसलमानांनी आपलेंहि मन हिंदूंइतकेंच मोठें करावयास पाहिजे होतें. मौ. शौकतअल्ली यांनी समेटाकरिता आपण उत्सुक असल्याचें अलीकडील आपल्या भाषणांतून बऱ्याच वेळां अघळपघळ सांगितलें आहे. परंतु तें सारें सोंग होतें कीं काय अशी शंका येण्यासारख्या गोष्टी अलाहाबादेच्या परिषदेंत हल्ली घडत आहेत. सध्या अलाहाबादेस सिंध व पंजाब या प्रश्नावरच रण माजून राहिलें आहे. सिंध प्रांत मध्यवर्ती सरकाराची मदत घेऊन आज वेगळा करूं नये असें हिंदूंचें मत व तो आजच्या आज व सरकारच्या मदतीनेच वेगळा झाला पाहिजे हें मुसलमानांचें मत. शौकतअल्लींचा एकंदर रोख हिंदूंनी मुसलमानांचें ऐकावें असा. पण सिंधी हिंदू पडले खमंग. त्यांनी कोणालाच धूप घातला नाही. त्यामुळे शौकतअल्लींनी डोक्यांत राख घालून घेऊन परिषदेस सलाम ठोकला व अमेरिकेची वाट धरण्याकरिता मुंबईची गाडी तांतडीने पकडली. पंजाबच्या बाबतींत शिखांची कुस्ती मुसलमानांबरोबर ठरून राहिली, त्यामुळे राजा नरेंद्रनाथप्रभृति पंजाबी पुढाऱ्यांनीहि समेटाऐवजी लाहोरच जवळ केलें !

वरील एकंदर प्रकारावरून प्रयागास परिषदेचे बारा वाजणार असा रंग दिसूं लागला आहे. क्षेत्रीं गेल्यावांचून मुंडन होत नाही म्हणतात. प्रयाग हें हिंदूंचें जगप्रसिद्ध मुंडनक्षेत्र आहे. त्या क्षेत्रीं हिन्दूंबरोबर मुसलमान व शीख यांचेंहि मुंडन व्हावयाचें असलें तर तें कसें टळेल? सारांश, प्रयागास त्रिवेणीवरील संगमाप्रमाणे त्रिवर्गांच्या समागमानंतर त्यांचा संगम होण्याची आशा वाटूं लागली होती ती अखेरीस खोटी ठरली आणि त्रिवर्ग हे ऐक्याच्या अस्थि बुडवून, पिंड पाडून व मुंडन करून परत फिरले तर तें देशाचें नष्टचर्यच ओढवलें म्हणावयाचें!

# गोलमेज परिषदेंतील काम

## श्री. न. चिं. केळकर यांचें पत्रक

श्री. न. चिं. केळकर हे ता. २९ ऑक्टोबर रोजीं लंडनला जाण्याकरितां मुंबईहून निघाले त्या वेळीं त्यांनी जें पत्रक प्रसिद्ध केलें तें पुढे दिलें आहे.

" तिसऱ्या गोलमेज परिषदेला जातेवेळीं सर्व लोकांच्या माहितीकरिता म्हणून माझ्या मतासंबंधीचें एक पत्रक प्रसिद्ध करणें हें माझें कर्तव्य आहे असें मला वाटतें. १९३० मध्ये भरलेल्या पहिल्या गोलमेज परिषदेस हजर राहण्याकरिता मला निमंत्रण देण्यांत आलें होते. परंतु राष्ट्रात त्या वेळीं जी राजकीय परिस्थिति होती ती पाहून मी तें निमंत्रण साफ नाकारलें. हिंदी राष्ट्रीय सभेचे एकमेव प्रतिनिधि म्हणून म. गांधी दुसऱ्या गोलमेज परिषदेला हजर राहिले. त्या परिषदेला मला निमंत्रण दिलें गेलें नव्हते.

## तिसरी गोलमेज परिषद्

जिला तिसरी गोलमेज परिषद असें संबोधण्यांत आलें आहे त्या परिषदेला हजर राहण्यासाठी मुख्य प्रधानाकडून मला निमंत्रण आलें व तें मी स्वीकारलें. दुसऱ्या गोलमेज परिषदेची ही पुढील आवृत्ति आहे. या आमंत्रणाचा स्वीकार मी केला नसता तर जे अनेक लोक आपल्या हित-संबंधाचें संरक्षण तिसऱ्या गोलमेज परिषदेमध्ये मी करावें म्हणून मजवर अवलंबून आहेत त्यांना मीं दगा दिला असें झालें असतें. म्हणून तिसऱ्या गोलमेज परिषदेंत काम करून राष्ट्राची काही सेवा आपण करणें योग्य आहे असें मी ठरविलें. कारण राष्ट्रीय सभेसंबंधी जी निष्ठा माझ्या मनांत आहे ती निष्ठा केवळ भावना म्हणून मान्य करून परिषदेतील कार्यापासून दूर राहण्यापेक्षा नव्या सुधारणामध्ये राष्ट्राच्या कल्याणाच्या ज्या गोष्टी असतील त्याना पाठिंबा द्यावा व राष्ट्राच्या हिताच्या दृष्टीने ज्या ज्या गोष्टी अपकारक असतील त्यांना विरोध करावा हें अधिक चांगलें असें मला वाटतें.

## सरकारने संधि गमावली

तिसरी गोलमेज परिषद म्हणजे राष्ट्रीय सभेशी सहकार्य करण्याची सरकारला पुनः एकवार आलेली एक सुसंधि होती असें माझें ठाम मत आहे. निरनिराळ्या पक्षांच्या पुढाऱ्यांचें असें स्पष्ट मत आहे कीं या वेळीं राष्ट्रीय सभेशीं सरकारने सलोखा करावयास पाहिजे होता. राष्ट्रीय सभा ही हिंदुस्थानांतील अत्यंत सुसंघटित व सर्व राजकीय पक्षांत अधिक सामर्थ्यवान अशी संस्था आहे ही गोष्ट सर्वसंमत आहे. व राष्ट्रीय सभेने स्वखुषीने प्रत्यक्ष सहकार्य केल्याशिवाय भावी काळांतील कोणतीहि राज्यघटना नीट चालणार नाही असें माझें स्पष्ट मत आहे. सरकारने ही सुसंधि घालविली ही गोष्ट वाईट केली.

## राजकारणाची कोंडी

सध्या राजकारणांत जी कोंडी झाली आहे ती कोणाच्याहि चुकीमुळे झाली असो, लढणाऱ्या दोन-हि पक्षांच्या इभ्रतीचा व मानाचा भंग न होता ही कोंडी फुटली पाहिजे अशी वेळ आता खास आली आहे. या वेळींसुद्धा सरकारने दडपशाहीचे कायदे मागे घ्यावे व राष्ट्रीय सभेने कायदेभंगाची चळवळ मागे घ्यावी. या दोनही गोष्टी एकाच वेळीं व्हाव्या असें घडवून आणणें अशक्य आहे असें मला बिलकुल वाटत नाही. गेले तीन महिने अशा तऱ्हेने समेट घडून यावा अशी माझी इच्छा होती व त्याकरिता मी वाटहि पाहत होतों. परंतु दुःखाची गोष्ट ही कीं कशामुळेहि असो ही गोष्ट घडून आली नाही हें खरें!

## म. गांधी व राष्ट्रीय सभा

हिंदी राष्ट्रातर्फे बोलण्याचा किंवा प्रतिनिधि म्हणून काम करण्याचा म. गांधीइतका दुसऱ्या कोणासहि अधिकार नाही ही गोष्ट सिद्धच आहे. परंतु ते आज परिषदेला जाण्याच्या स्थितींत नाहीत म्हणून दुसऱ्यानीहि आपल्या बुद्धीप्रमाणे काम करूं नये हें म्हणणें शुद्ध तर्कवादास धरून नाही. विशेषतः हिंदु-महासभेने, वऱ्हाडांतील मित्रांनी व संस्थानी प्रजेंतील स्नेहीमंडळींनी जो माझ्यावर विश्वास टाकला आहे त्याकडे पाहता मी जर निमंत्रण स्वीकारलें नसतें तर त्या विश्वासाचा मी घात केला असें झालें असतें असें मला वाटतें. भावी स्वराज्याची घटना कायमची ठरविली जात असतांना त्यांत राष्ट्रीय सभेने भाग घेतला असता तर माझ्याहून अधिक आनंद दुसऱ्या कोणालाहि झाला नसता. प्रामाणिकपणें माझें असें निश्चित मत आहे कीं, या वेळीं सटरफटर सुधारणांची देणगी देऊन हिंदुस्थानाला फसविण्याचा जो डाव ब्रिटिश सरकार टाकीत आहे तो डाव खेळण्याला त्यांना सर्व रान मोकळें टाकणें गोष्ट चुकीची आहे!

## पुढील काम

तिसऱ्या गोलमेज परिषदेमध्ये मी काय करूं शकेन याचा आज मला अंदाज सांगता येत नाही. परंतु मी अशी ग्वाही देऊं शकतों कीं, कट्टर राष्ट्रीय पक्षा-

चा सभासद जें ठाण घेऊन बसला असता त्यापेक्षा एक तसूभरहि मी मागे घेणार नाहीं. या गोलमेज परिषदेमध्ये कामाची कोणती पद्धत स्वीकारणार आहेत हें एक गुपितच आहे. म्हणून या परिस्थितींत हिंदी लोकांना यापेक्षा अधिक आश्वासन मला देता येत नाही व यावरच मला संतुष्ट राहावें लागत आहे.

समारोप

मला शेवटीं एकच गोष्ट लिहिण्यासारखी वाटते. ती ही कीं, गोलमेज परिषदेचें काम सुरू झाल्यावर लगेच अगर त्यापूर्वीहि हिंदुस्थानांतील लढा संपविण्यांत यावा अशी माझी कळकळीची विनंति आहे. कारण सध्याच्या राजकीय गुलामगिरींतून हिंदुस्थानाची मुक्तता होण्याच्या दृष्टीने राष्ट्रीय सभेने या गोलमेज परिषदेच्या वाटाघाटींत भाग घेतल्यास हिंदुस्थानाचें कल्याण होणार आहे. मला आशा आहे कीं ही गोष्ट घडून येईल."

# विटाळाच्या उठकळेस काळाची अनुकूलता

म. गांधी सांप्रत येरवड्याच्या तुरुंगांत अडकून पडले आहेत. त्यांच्या शरीराला तुरुंगाच्या तटबंदीचा प्रतिबंध होत असला तरी त्या महात्म्याचा हिंदुस्थानाच्या कल्याणासाठी तळमळणारा आत्मा ती तटबंदी चढून बाहेर पसरला असून साऱ्या हिंदुस्थानांत संचार करीत आहे. गांधीजींची वृत्ति अत्यंत तीव्र आहे. चळवळ हा त्यांचा प्राण आहे. त्यामुळे कोणतीना कोणती चळवळ ते हातीं घ्यावयाचे व ती हातीं घेतली कीं तिच्या यशःसिद्धीकरिता त्यांनी आकाशपाताळ एक करून सोडावयाचेंच. गेल्या बारा पंधरा वर्षांतील विविध चळवळींचा इतिहास हेंच सत्य आपल्या कानाशीं येऊन कथन करीत आहे. गांधीजींची तपश्चर्या मोठी, कर्तृत्वशक्ति अचाट, धैर्य अनुपम, स्वार्थत्याग अलोट व चारित्र्य निष्कलंक. त्या सर्वांचें दडपण मनुष्याच्या मनावर पडून त्याला गांधीजींचें एखादें धोरण न पटलें तरी त्याविरुद्ध बोलण्याची हिंमत सहसा होत नाही. तथापि म. गांधी हे मानवच होत. व मानव म्हटला कीं त्याचें शारीरिक, मानसिक व बौद्धिक सामर्थ्य मर्यादितच असणार. मानवापेक्षा काल हा फार मोठा आहे. त्याला कोणाची गुमान नाही व भीडभाडहि नाही. त्याच्या आडाख्यांत बसेल त्याला तो जागा देतो व बाकीच्याला तो मागे टाकतो.

म. गांधींच्या चळवळींपैकीं स्वदेशी ही काळाच्या कंपार्टमेंटमध्ये बसली व खादी जागेच्या अभावीं प्लॅटफॉर्मवरच तिष्ठत राहिली. असहकारितेपैकीं ब्रिटिश राज्यपद्धतीचा तिटकारा तेवढा टिकला; पण कॉलेजें, कौन्सिलें व कोर्टें यांजवरील बहिष्कार मात्र मावळला. सांप्रत ब्रिटिश सरकारच्या करड्या अमलाने कायदेभंगाचें हत्यार गांधीजींच्या हातून काढून घेतलें ही त्यांच्या दृष्टीने निरुपायाची गोष्ट होय. तथापि त्याऐवजी तुरुंगांत बसून करतां येण्याजोगें अस्पृश्यतानिवारणाचें कार्य त्यांनी जोराला लावलें आहे. हें कार्य असें आहे कीं, त्यावर काळाची कृपा आहे. काल जी घटना करीत आहे तीच गांधीजी सांगत आहेत; किंबहुना काळच आपलें हृद्गत गांधिजींच्या मुखाने बोलत आहे असें म्हटलें तरी चालेल. कल्पनेला किंचित् ताणून तिला पुढील पांचपंचवीस वर्षांच्या टप्यावर नेऊन सोडलें तर गांधिजींच्या डोळ्यांना दिसणारा चित्रपटच कोणाहि विचारी व दूरदर्शी सुशिक्षिताच्या नजरेस पडल्यावांचून राहाणार नाही.

भविष्य काळ मोठा विलक्षण आहे. त्या काळांत उदय पावणारीं कायदेमंडळें अपूर्व क्रान्ति घडवून आणणार आहेत. प्रत्येक प्रांताच्या कौन्सिलांत अस्पृश्यांना स्वतंत्र जागा मिळाल्या आहेत त्यांचें संख्याबल ज्या पारड्यांत टाकावें तें पारडें जड भरणारें आहे. तें मुसलमान, खिस्ती इत्यादिकांच्या पारड्यांत पडलें तर प्रांताच्या कौन्सिलात त्यांची सरशी होईल, व स्पृश्य हिंदूंच्या वांट्यास आलें तर स्पृश्यास्पृश्य मिळून सर्वांवर मात करतील. सारांश, अस्पृश्य वर्गाच्या मर्जीप्रमाणे कौन्सिलाचा कांटा झुकणार असल्यामुळे अस्पृश्य मनांत आणतील ते पदरांत बांधून घेतील असें बऱ्याच अंशीं अनुमान काढण्यास हरकत नाही. स्पृश्यास्पृश्यांच्या करारात डॉ. आंबेडकर यांनी आर्थिक उन्नति, शिक्षणप्रसार व नोकऱ्यांत प्रवेश या मागण्या निकडीच्या म्हणून मांडल्या होत्या, व त्या स्पृश्य हिन्दु पुढाऱ्यांस कबूलहि झाल्या. त्यांपैकीं, अस्पृश्यांची आर्थिक उन्नति ही रूढार्थाने न समजता लाक्षणिक अर्थानेच समजावयाची आहे. अखिल हिंदुस्थानास आर्थिक स्वातंत्र्य मिळून त्यायोगाने त्यांत नवीन उद्योगधंदे उत्पन्न होऊन हिंदुस्थान सांपत्तिक दृष्ट्या भरभराट पावेल, त्याच वेळीं अस्पृश्यांची पोटापाण्याची विवंचना इतरांबरोबर नीट रीतीने सुटेल. परंतु त्याच्या अभावीं आंबेडकर अस्पृश्यांची आर्थिक सुस्थिति आणूं इच्छितात ती त्यांचे आहेत ते धंदे सुधारण्याने व त्यांना स्पृश्य करतात ते धंदे मिळवून देण्यानेच.

अस्पृश्यांच्या उन्नतीचा वरील एक उपाय झाला. परंतु त्यांत कसें व किती यश येईल याविषयीं शंका आहे.मात्र त्यापासून फायदा एवढा होईल कीं स्पृश्यांचे कांही धंदे अस्पृश्यांनी उचलल्याने त्यांचें स्पृश्य समाजांत पाऊल शिरकेल व त्यामुळे विटाळाच्या विळख्यांतून ते लोक बऱ्याच अंशीं आपली सुटका करून घेतील. सांप्रत अस्पृश्यांना शिंपी,वाणी,उदमी, व्यापारी,सुतार,विणकर इत्यादिकांचे व्यवसाय पत्करण्यास एकप्रकारें सामाजिक प्रतिबंध आहे.तो कायदेशीर प्रयत्नाने निघण्याचा संभव आहे. या बाबतींत अस्पृश्यांनीं कायद्याच्या आश्रयास जावें किंवा नाही हा मतभेदाचा विषय आहे. तथापि स्पृश्यांनी आपखुषीने आपल्या धंद्यांत त्यांना घेतलें तर अस्पृश्यांची तक्रार बिनबोभाट मिटेल. पण त्यास स्पृश्यांकडून हरकती आल्यास अस्पृश्यांचे कौन्सिलातील सभासद कायदेशीर प्रयत्नाकडे वळतील. शिक्षणप्रसार हे त्यांच्या उन्नतीचें दुसरें साधन. सरकारच्या खजिन्यांत नकार घंटा वाजत असल्यामुळे लो.बोर्ड व म्युनिसिपालिट्या यांस द्यावयाच्या रकमेस सरकार आजच कांही अंशीं अंगठा दाखविण्याच्या विचारांत आहे. अशा स्थितींत अस्पृश्यांचे पुढारी मागतील तेवढी मदत त्यांस प्रांतिक सरकाराकडून मिळणें जड जाईल. तथापि त्यांची मागणी अजिबात झिडकारण्याचा हिय्या सरकारला करवणार नाही.

अस्पृश्यतानिवारणाचा मूलाधार शिक्षणप्रसार हाच असून त्या दिशेने ज्या जोराने प्रयत्न होईल त्या जोराने अस्पृश्य आपलें डोकें वर काढून स्पृश्यतेचा सोपान चढतील. सरकारी नोकरीची पात्रता शिक्षणानेच ठरते यांत शंका नाही. पण कांही अस्पृश्य माणसें सरकारी लहानमोठ्या हुद्द्यावर चढण्यास सर्वच अस्पृश्य साक्षर किंवा फार सुशिक्षित झाले पाहिजेत असें नाही. शाळेंतील हेडमास्तर, तालुका कचेरींतील मामलेदार,कोर्टांतील मुन्सफ यासारख्या नाक्याच्या, मानाच्या व अधिकाराच्या जागावर थोडेबहुत अस्पृश्य शिक्षित चमकूं लागणें पुढील काळांत अगदीं सुसाध्य आहे. तेवढ्याने अस्पृश्य वर्गाचा नूर बराच बदलून जाईल. गांवच्या शाळेवर महार, मांग किंवा चांभार जातीचे 'थोरले मास्तर' आले कीं शाळेंत अस्पृश्यता राहते कशाला ? खेड्यांतील शाळांचा उंबरठा कोठे कोठे अस्पृश्यांच्या मुलांस आजहि हिमालयपर्वतासारखा दुर्लंघ्य व उंच असेल. क्वचित् शाळांत तीं मुलें तो उंबरघाट चढून आंत गेल्यानंतरहि त्यांना स्पृश्य मुलांचा स्पर्श अग्निस्पर्शासारखा दाहक व भयप्रद वाटत असेल.

परंतु विटाळाचा गोळा समजला जाणारा माणूस हेड मास्तराच्या खुर्चीवर विराजमान झाल्यानंतर विटाळच सोवळा झाला नव्हे काय? इतकेंच काय पण त्याच्या हाताखाली वाण्या-ब्राह्मणांचीं व माळ्या-मराठ्यांचीं मुलें शिकावयास येऊन तीं ब्राह्मणाने बहुत काळ भोगलेला गुरुत्वाचा मान त्याला अर्पण करतील. खेड्यातील शाळेचें मुख्य सूत्र अस्पृश्यांच्या स्वाधीन झाल्यावर त्याचा साऱ्या खेड्यावर किती अतर्क्य परिणाम होईल याचा वाचकांनीच विचार करावा. त्या मास्तराला गांवांत सर्वांनाच बरोबरीच्या नात्याने वागवावें लागेल; आणि त्यास मिळालेला समान दर्जा गांवाला सर्व बाजूंनी दुरावलेला महारवाडा जवळ आणील. इतकेंच नव्हे तर अस्पृश्यांची वेलीप्रमाणे सर्वांसमोर लवणारी मान त्या योगाने ताठ होईल.

यापेक्षाहि मामलेदार,मुन्सफ इत्यादि अधिकारांच्या जागांवर अस्पृश्यांतील सुशिक्षित माणसें दिसूं लागलीं म्हणजे तीं आपल्या जातीचें हीनत्व अधिकच घालवितील. आज गांवच्या येसकराला चावडीची पडवी देखील बहुशः पारखी असेल.तो दूर रस्त्यावर उभा राहूनच पाटलापुढे जोहार करीत असेल. पण कदाचित् त्याच येसकराचा मुलगा मोठा होत होत मामलतीच्या हुद्द्यावर चढला व आपल्याच गांवाला पट्टेवाल्यांच्या लव्याजम्यानिशीं टांग्यांत बसून आला तर त्याला दूर उभें करणें दूरच राहून येसकरावर खेकसणाऱ्या व त्याला टाकून बोलणाऱ्या गर्विष्ठ पाटलाला त्याच येसकराच्या मुलाशीं किती लगट करूं, त्याच्यापुढे किती अदबीने रामरामाकरिता मान लववूं असें होऊन जाईल. प्रतिष्ठित समजले गेलेले ब्राह्मण वकील स्वतःच्या जातीकडे जणूंकाय वतनाप्रमाणे चालत आलेल्या रावसाहेब या पदवीनेच अस्पृश्य जातीच्या मामलेदाराला व मुन्सफाला संबोधतील; क्लबात टेनिस, बिलियर्ड इत्यादि खेळ खेळतील; चहाचे पेले त्यांच्या बरोबर झोकतील व कालान्तराने त्यांच्या घरीं जाऊनहि चहा चिवड्यावर व शिरापुरीवर हात मारतील !

मामलेदार, मुन्सफ, डे. कलेक्टर, शाळाखात्यांतील सुपरवायझर, अॅडमिनिस्ट्रेटिव्ह ऑफिसर, लोकल बोर्डाच्या दवाखान्यावरील डॉक्टर या जागा अस्पृश्यांना क्रमाक्रमाने मिळतील तेव्हा मिळोत. पण त्यांच्याहिपेक्षा अगदीं नजीक ठेपलेल्या इतर सुधारणा आहेतच. मुंबईच्या कायदे कौन्सिलांत अस्पृश्यांचे सतरा प्रतिनिधी बसतील. त्याचप्रमाणें लोकलबोर्डें व म्युनिसिपालिट्या यांतून अस्पृश्यांकरिता जागा ठेवण्यांत येतील आणि ग्रामपंचायतींतहि त्यांचा एखादा पंच हटकून हजर राहीलच. त्या त्या सर्व अस्पृश्यांची अस्पृश्यता त्यांना सोडून जाणारच कीं नाही? या जागांवर शहरांतल्या इतकीच किंवा कदाचित् त्यांच्याहूनहि अधिक प्रमाणांत खेड्यांतील अस्पृश्य प्रतिनिधींची निवड झाली असल्याने त्या-

प्रमाणे स्पृश्यास्पृश्यांचा तेथील व्यवहार सरमिसळीने चालेलच; पण त्याचा फायदा त्यांच्या अज्ञ बांधवांनाहि मिळून अस्पृश्यतेचें त्यांना लागलेलें ग्रहणहि झपाट्याने सुटत जाईल. डॉ. आंबेडकर व रा. ब. राजा यांसारखे उच्च शिक्षण घेतलेले व पुढारलेले अस्पृश्य नव्या मनूतील प्रांतिक राज्यकारभारांत मंत्रिपदावर चढतील, गृहमंत्री होतील व प्रसंगवशात् गव्हर्नराच्या श्रेष्ठस्थानींहि बसून राजप्रतिनिधींचा बडेजाव उपभोगतील.

मुसलमान व इंग्रज यांचाहि विटाळ त्यांजकडे राज्याधिकार आल्यावरच मावळला. 'न वदेत् यावनीं भाषां प्राणैः कण्ठगतैरपि ' हें वचन सुप्रसिद्ध आहे. फारशी, आरबी, इंग्रजी या भाषा प्राण गेला तरी शिकूं नयेत अशी हिंदूंची समजूत होती. मुसलमानांचें उदाहरण फार जुनें म्हणून सोडून दिलें तरी पुण्यासारख्या शहरांत अव्वल इंग्रजींत मिशनऱ्यांनी इंग्रजी शाळा सुरू केल्या असता त्यांत आपलीं मुलें न पाठविणारे ब्राह्मण पुण्यांत व इतरत्र थोडे नव्हते. पण त्या शाळांवरचा बहिष्कार लवकरच उठला. फार काय पण इंग्रजी शिक्षण घेऊनहि पोटास बिब्बा घालण्याची पाळी पुष्कळांवर सांप्रत येत असतां त्याच शिक्षणाकरिता झटून पडणाऱ्या मुलांना कितीहि नव्या नव्या शाळा काढल्या तरी रीघ मिळत नाही असा काळ आला आहे. सरकारी नोकरींत शिरून आणि साहेबाचे शिरस्तेदार, चिटणीस व दप्तरदार होऊन अधिकार गाजविणारे ब्राह्मण लोक साहेबाच्या स्पर्शाने विटाळलेला आपला देह घरीं आल्यावर स्नानाने शुद्ध करून घेत असत. पण तो काळ पालटत पालटत आता इतका पालटला आहे कीं साहेबाशीं शेकहँड करावयास मिळाल्याने जन्मल्याचें सार्थक मानणारे लोक ब्राह्मणांत व इतर हिंदूंत आतां कमी नाहीत. अस्पृश्य लोक स्पृश्यांप्रमाणेच पुढील राजवटींत राजसत्तेचे बरोबरीने वांटेकरी होणार असल्यामुळे त्यांचा धर्मदृष्ट्या व व्यावहारिक दृष्ट्याहि विटाळ झडणार याची खूणगांठ सर्वांनी आपल्या मनाशीं बांधून ठेवावी.

सारांश, गांधिजींनीं हातीं घेतलेल्या अस्पृश्यता निवारणास काळ सर्वस्वी अनुकूल आहे. अस्पृश्यता नष्ट होणार हें ठाम ठरल्यानंतर ती किती प्रमाणांत जाणार याचा वाद घालण्यांत हशील काय? स्पृश्य वर्गांत जितके व्यवहार सामुदायिकरीत्या हल्ली चालतात त्यांपैकीं कोणत्याहि व्यवहारापासून अस्पृश्यांना गाळणें भविष्य काळीं अशक्य आहे. हिंदुलोक इतर कोणत्याहि धर्माच्या लोकांपेक्षा अधिक सहनशील, दयाळू, सुविचारी व मिळतें घेणारे आहेत. कालाच्या नव्या मांडणीची कल्पना त्यांपैकीं पुष्कळांना आली नसल्यामुळे त्यांचा अस्पृश्यतानिवारणास विरोध होत आहे. तो विरोध उपोषणाच्या धाकाने हटावयाचा नाही. गांधीजी उपोषणाच्या हट्टालाच पेटले तर गुरुवायूरसारख्या एखाद्या महत्त्वाच्या देवळाचे दरवाजे अस्पृश्यांना उघडतील. आतांच हातीं आलेल्या बातमीवरून तीहि गोष्ट अशक्यप्रायच दिसते. उपोषणाचा मार्ग समजूत पटविण्याचा नाही. अडवणुकीचा आहे. या चळवळीस जें यश यावयास पाहिजे तें अडवणुकीच्या मार्गानें येणार नाही, पटवणुकीच्या मार्गानेच येणार आहे. हिंदूंना वेद व शास्त्रें वंद्य वाटतात तितकेच ते संतवचनांपुढेहि आपली मान वांकवितात.

बहुजनसमाजाच्या मनावर संतवचनांचा पगडा बळकट बसला आहे. वारकरी पंथाने हिंदूंचें एकीकरण केलें खरें, पण त्यांनी हिंदूंच्या धर्मसमजुतींना शक्य तितका धक्का लावण्याचें टाळलें. 'अत्यजांना' शिवण्यांत तेहि अधर्मच मानीत. कलियुगांत धर्म बुडणार असें त्यांस वाटत असून त्या संबंधाचे दुःखोद्गार संतांनी अनेक ठिकाणीं काढले आहेत. त्यांत तुकाराम, नामदेव व रामदास याप्रकारचे अब्राह्मण-ब्राह्मण संत आहेत हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. तुकारामबुवा कालिप्रभावाचें वर्णन करतांना म्हणतात.

आचार भ्रष्ट होती लोक कळीं। पुण्यक्षीण बळी झालें पाप।
वर्णधर्म कोणी न धरी विटाळ। घालिती गोंधळ एके ठायीं॥

तुकोबांच्या अभंगाप्रमाणेच नामदेवांच्या नांवावर मोडणारा पुढील अभंग वाचनीय आहे.

थोर वर्तमान पडेल काळू।' चहू वर्णांचा होईल एकचि मेळू।
कोणी कोणाचा न धरती विटाळू। मग गोपाळू निघते झाले।
आता वेळोवेळीं सांगूं किती। मोडला धर्म झाली प्रवृत्ति। विष्णुदास नामा येतो काकुळती। कैसेनि करूं भक्ति पंढरिराया॥

दासबोधांतील रामदासांच्या पुढील ओव्या पुष्कळांच्या परिचयाच्या असतील. त्यांचेहि अस्पृश्यतेसंबंधाचे विचार त्या वाचून कळून येतील. त्या अशाः—

अंत्यज शब्दज्ञाता बरवा। परि तो नेऊन काये करावा।
ब्राम्हणासन्निध पुजावा। हें तों न घडे कीं॥
जें जनावेगळें केलें। तें वेदे अव्हेरिलें।
म्हणोनि त्यास बोलिलें। पाखांड मत॥

म. गांधी यांच्या मताप्रमाणें अस्पृश्यता हा कलंक असेल तर तो वरील ब्राह्मण अब्राह्मण साधुसंतांसहि लागू पडेल. तसेंच स्पृश्यवर्गाने अस्पृश्यांवर हा अन्याय केला असेल तर वरील ब्राम्हण-अब्राम्हण साधुसंतहि त्या अन्यायाचे वांटेकरी ठरतील. वस्तु-

स्थिति अशी आहे कीं न्यायनीतीच्या कित्येक कल्पना युगापरत्वें बदलत असतात. तीनचारशें वर्षांपूर्वींच्या कल्पना आजच्या कालांत टिकाव धरूं शकणार नाहीत व सद्यःकालांतील कल्पना आणखी शेंदोनशें वर्षांनी कालाच्या पावलाखालीं चिरडून गेल्यावांचून राहाणार नाहीत. आमचे साधुसंत अस्पृश्य लोक ज्या अमंगळ स्थितींत होते ती स्थिति जमेस धरून स्पृश्य समाजाचा अस्पृश्यांपासून बचाव करण्याच्या दृष्टीने या प्रश्नाकडे पाहात होते. वास्तविक अस्पृश्यतेंत न्यायान्यायापेक्षां नीति–अनीतीचाच संबंध अधिक येत असून नीतिदृष्ट्या योग्य तेंच धोरण साधुसंतांनी त्या काळीं अवलंबिलें असेंहि म्हणावयास हरकत नाही. अशा संत मंडळींना पर्यायाने अन्यायी ठरविल्याने कोट्यवधि हिंदुमात्रांच्या अंतःकरणाला घरें पडणार नाहीत काय ?

तसें कोणास दूषण न देताहि अस्पृश्यतेचें कार्य जसें सिद्धीस जाऊं शकेल त्याचप्रमाणे प्रायोपवेशनाचा धाक न घालताहि तितक्याच नेटाने केवळ गांधीजींच्या वजनावर त्या कार्याचा प्रसार होईल. नुसतीं देवळें घेतलीं तरी किती देवळें उघडलीं म्हणजे अस्पृश्यता बुडाली असें गांधीजी कबूल करतील? त्याला खरोखर तशी कसोटी लावणेंच कठिण आहे. गांधीजींच्या गेल्या प्रायोपवेशनानंतर बरींच देवळें अस्पृश्यांकरिता मोकळीं झालीं आहेत. तीं जमेस धरल्यास म्हटलें तर आजहि देवालयांपुरता अस्पृश्यतानिवारणाच्या चळवळीने विजय संपादला आहे. नाहीपेक्षा हिंदुस्थानांतील यच्चयावत् लाखों देवळें अस्पृश्यांकरिता उघडलीं गेलीं नाहींत तोंपर्यंत चळवळ यशस्वी झाली नाही असेंच मानावें लागेल. अर्थात् तें कार्य वर्ष सहा महिन्यांचें नसून कैक वर्षांचें आहे. ते कार्य लोकांची समजूत पटण्यापूर्वी जबरदस्तीने चालविल्यास अस्पृश्यांवरील अन्याय दूर करता करता स्पृश्यांवर मात्र अन्याय घडेल. पण प्रचारकार्याने त्यांची समजूत घातल्यास उभयतांच्या संतोष राखल्याचें श्रेय लाभेल. कालाचा ओघ सर्वस्वी चळवळीस अनुकूल असल्याने म. गांधींनी यशाविषयीं नाउमेद होण्याचें किंवा वर्ष सहा महिन्यांच्या मुदतीची घाई करण्याचें कारण नाही असेंच आम्हांस वाटतें. ते प्रायोपवेशनाचा धाक घालतात म्हणून त्यांचे अनुयायी देवालयप्रवेशाची धिसाडघाई करीत असल्याचें म. गांधींनी आपल्या तिसऱ्या पत्रकांत त्यांजकडे आलेल्या खासगी पत्राच्या आधारें म्हटलें आहे व अशा अनुयायांना त्यांनी दोषहि दिला आहे. तथापि गांधीजी स्वतःच प्रायोपवेशनाचा विचार सोडून देतील तर त्यांच्या कित्येक उतावळ्या अनुयायांनाहि धिसाडघाईचा मोह उत्पन्न होणार नाही.

# रा. केळकर व महाराष्ट्र विद्यापीठ

ता. २४ ऑगस्ट १९३२ रोजीं रा. केळकर यांच्या ६१ व्या वाढदिवसानिमित्त जाहीर समारंभ झाला त्यावेळीं त्यांनी महाराष्ट्र विद्यापीठाच्या प्रीत्यर्थ आठ हजार रुपयांची देणगी दिली, हें वाचकांना माहीत आहेच. त्यानंतर हल्ली विलायतेस जाण्याला निघण्यापूर्वी रा. केळकर यांनी या देणगीसंबंधाचें ट्रस्टडीड पक्कें केलें आहे. त्याचा आशय खालीलप्रमाणेः—

या आठ हजार रुपयांची रक्कम भारत इतिहास संशोधक मंडळाला कर्जाऊ देऊन त्याचे त्याच रकमेचे कर्जरोखे घेण्यांत आले आहेत. हे कर्जरोखे केळकर यांनी चिटणीस शिक्षण-प्रसारक-मंडळी, पुणें यांचे नांवें लिहून देऊन सदर संस्थेच्या स्वाधीन केले आहेत व अशा रीतीने या रकमेवरील स्वत्वनिवृत्ति रीतसर पुरी केली आहे. ही रक्कम महाराष्ट्र विद्यापीठ कायदा किंवा खर्डा (चार्टर) याच्या योगाने रीतसर अस्तित्वांत येईल त्या वेळीं सदर देणगी नवीन विद्यापीठाच्या अधिकारी मंडळाच्या स्वाधीन करण्यांत येईल व तसें झालें म्हणजे मग प्रस्तुतच्या ट्रस्टचें कार्य समाप्त होईल. पण तें घडून येईपर्यंत दरसाल या ८००० रु.च्या रकमेवर जें व्याज येईल तें म्हणजे कमींतकमी चारशें रुपये, ट्रस्टी करतील त्या नियमानुसार, मराठी वाङ्मयास उत्तेजन देण्याकरिता खर्च केले जातील. हें काम करण्यास म्हणजे ट्रस्टचें काम चालविण्यास खालील तीन ट्रस्टी नेमण्यांत आले आहेत.

१ विद्यमान चिटणीस शिक्षण--प्रसारक--मंडळी, पुणें (एक्स--ऑफिशिओ).

२ प्रो. धनंजय रामचंद्र गाडगीळ, पुणें.

३ रा. न. चिं. केळकर किंवा त्यांनी आपलेकरिता नेमून दिलेला इतर कोणी ट्रस्टी.

सदर ट्रस्टींनी शक्य तर या ट्रस्टचे हेतूकरिता आणखी द्रव्यनिधि मिळवावा. तसेंच शक्य असल्यास ट्रस्टच्या हेतूला अनुसरून कार्य करणाऱ्या इतर कोणत्याहि संस्थेशीं सहकार्य करावें. या ट्रस्टचें नांव 'यशोदा चिंतामणी स्मारक ट्रस्ट' असें राहून त्या नांवाने काम चालवावें

व महाराष्ट्र विद्यापीठाच्या स्वाधीन हे पैसे केल्यानंतर किंवा इतर संस्थांशीं सहकार्य करतानाहि स्मारकाचा हेतु लक्षांत ठेवून हें सजोड नांव लोकांपुढे राहील अशी व्यवस्था करावी. वरीलप्रमाणे ट्रस्ट करण्यांत आला आहे व त्यांत ट्रस्टी या नात्याने काम करण्याची संमति प्रो. गाडगीळ यांनी दिली असून चिटणीस शिक्षण-प्रसारक-मंडळी यांनाहि ट्रस्टींचे काम करण्यास व ही ८००० रु. ची रकम सदर संस्थेच्या हिशेबांत दाखल करवून घेऊन तिच्या वार्षिक अहवालांत या रकमेच्या व्याजाचा जमाखर्च दाखल करण्यास मंडळीच्या कौन्सिलाने संमति दिली आहे.

# वटहुकुमांचा नवा अवतार !

## असेंब्लीपुढील घातुक बिल

हिंदुस्थानसरकारने असेंब्लीच्या अधिवेशनापुढे मांडण्यासाठी सर्व वटहुकुमांचें मिळून एक बिल तयार केलें असून तें सिलेक्ट कमिटीकडूनहि जाऊन आलें आहे. ह्या बिलाचें स्वरूप किती भयंकर आणि अतिव्याप्त आहे, हें त्याच्या पुढील सारांशावरून दिसून येईल. बिलाचा थोडक्यांत मसुदा असाः—(१) या बिलाला १९३२ चा क्रिमिनल लॉ अमेंडमेंट ॲक्ट म्हणून संबोधिलें जाईल. या कायद्यांतील चार आणि सात कलमांखेरीज बाकीचीं सर्व कलमें एकदम अमलांत येतील. प्रांतिक सरकारांनी चार आणि सात या दोन कलमांचा अंमल त्यांना जेव्हा अवश्य वाटेल तेव्हा त्यांनी तसें आपल्या गॅझेटमध्ये प्रसिद्ध करून सुरू करावा. (२) इंडियन पिनल कोडांतील १४० कलमापुढे १४० अ म्हणून पुढील कलमाचा समावेश करावा. तें कलम असें—"बादशहांच्या लष्करी, नाविक किंवा वैमानिक दळांत न शिरण्याबद्दल जो कोणी एखाद्याचें मन बळवील किंवा तसा प्रयत्न करील त्या इसमाला १ वर्षपर्यंत तुरुंगाची शिक्षा किंवा दंड किंवा दोनहि शिक्षा देण्यांत येतील." (३) इं. पि. कोडाच्या १६४ कलमानंतर १६४ अ कलम पुढीलप्रमाणें समाविष्ट करावें—"आपलें कर्तव्य न करण्याबद्दल किंवा त्यांत चुकारपणा करण्याबद्दल जो कोणी सरकारी नोकरांचें मन वळवील किंवा तसा प्रयत्न करील त्या इसमाला १ वर्षपर्यंत तुरुंगाची किंवा दंडाची किंवा दोनहि शिक्षा दिल्या जातील." (सरकारी नोकर, या शब्दाचा अर्थ स्थानिक अधिकाऱ्यांचे नोकर, किंवा रेल्वेचे नोकर किंवा प्रांतिक सरकारें आपल्या गॅझेटमध्ये ज्यांचा तसा उल्लेख करतील ते लोक असा घ्यावा.)

## सरकारजमा वाङ्मय

(४) इं. पि. कोडाच्या १६४ अ कलमापुढे पुढील आसयाचें १६४ ब कलम घालण्यांत यावें. "जो कोणी इसम सरकारी नोकराचें मन नोकरीविषयी षित करील, किंवा ती नोकरी सोडण्याबद्दल त्याला भाग पाडील किंवा काम मध्येच थांबविण्याबद्दल सांगेल किंवा शिस्त मोडण्यास उपदेशील, किंवा त्याच्याशीं व्यवहार करण्यास जो नाकारील किंवा त्याला सामानसुमान देणार नाही किंवा घर किंवा जागा भाड्याने देणार नाही किंवा त्याच्याशीं औपचारिक व्यवहार करणार नाही किंवा ज्या माणसाशीं त्या सरकारी नोकराचा संबंध आहे त्याच्याशींहि जो असे व्यवहार करणार नाही किंवा त्याच्याशीं व्यापारी संबंध ठेवणार नाही त्या माणसाला ६ महिनेपर्यंत तुरुंगाची शिक्षा किंवा दंड किंवा दोनहि शिक्षा दिल्या जातील.' (५) इं. पि. कोडाच्या १८८ कलमापुढे खालील आशयाचें १८८ अ कलम घालण्यांत यावें—"सरकारने जीं वर्तमानपत्रें, पुस्तकें किंवा इतर पत्रकें जप्त केलीं असतील त्या वर्तमानपत्रांतील, पुस्तकांतील किंवा पत्रकांतील मजकूर जो छापील, त्याचा प्रसार करील किंवा जाहीर ठिकाणीं उच्चारील त्याला सहा महिनेपर्यंत तुरुंगाची शिक्षा किंवा दंड किंवा दोनहि शिक्षा दिल्या जातील." (६) इं. पि.कोडांतील ५०५ (ब) कलमांतील 'सरकार किंवा सार्वजनिक शांतता याच्या विरुद्ध ज्यांच्या हातून गुन्हा घडेल' या शब्दांऐवजीं 'सरकारी नोकर किंवा प्रजा याविरुद्ध द्वेष किंवा तिरस्कार दर्शविला जाईल,' हे शब्द योजण्यांत यावेत. (७) इं. पि.कोडांतील ५०७ कलमापुढें ५०७ अ हें कलम समाविष्ट करावें. त्याचा आशय असा, "जो कोणी इसम एखाद्याच्या नैसर्गिक हक्कांची पायमल्ली करील किंवा त्याला त्याच्या उद्योगधंद्यांपासून परावृत्त करील किंवा त्याच्या कामांत अडथळा आणील किंवा तो किंवा तत्संबंधी यांजवर अत्याचार करील किंवा तो मनुष्य किंवा तत्संबंधी लोक ज्या ठिकाणीं राहात असतील किंवा काम करीत असतील त्या ठिकाणीं जो सहेतुकपणे रेंगाळत हिंडेल किंवा उभा राहील किंवा त्याच्या मालकीच्या जिंदगींत ढवळाढवळ करील त्या माणसाला ६ महिनेपर्यंत तुरुंगाची किंवा दंडाची किंवा दोनहि शिक्षा देण्यांत येतील."

## मुलाबद्दल आईबापांना शिक्षा

(८) सन १८९८ च्या क्रि. प्रो. कोडांतील

३८३ कलमापुढे ३८३ (अ) कलमाचा पुढील अर्थी अन्तर्भाव करावा—"ज्या गुन्हेगाराला दंड भरण्याची शिक्षा झाली असेल तो गुन्हेगार जर १६ वर्षांच्या आंतील असेल तर कोर्टानें तो दंड त्या गुन्हेगाराचे आईबाप किंवा पालक यांजकडून, जसा कांही त्यांनीच गुन्हा केला आहे असें समजून वसूल करण्याबद्दल हुकूम करावा. आईबाप किंवा पालक दंड भरण्यास नाकारतील तर त्याना तुरुंगाची शिक्षा देण्यांत येईल. कोर्टानें असा हुकूम करण्यापूर्वी अर्थातच पालक व आईबाप यांना आपलें म्हणणें मांडण्यास अवसर द्यावा." (९), (१०) व (११) या कलमांतून क्रि. प्रो. कोडाच्या २ ऱ्या शेड्यूलमध्ये कांहीं विशिष्ट तपशील सांगितल्यावर (१२) कलमांत पुढील गोष्टी सांगितल्या आहेत—"इं. पि. कोडाच्या १८६, १८८, १८९, १९०, २२८, २९५ अ, २९८, ५०५, ५०६ किंवा ५०७ या कलमांप्रमाणे होणारा गुन्हा हा जामीन देण्यास अपात्र व तो गुन्हा करणारा इसम वॉरंटाशिवाय पकडण्यास योग्य असल्याचें प्रांतिक सरकारांनी त्यांना जरूर वाटेल त्या वेळीं आपल्या गॅझेटमध्ये प्रसिद्ध करावें." (१३) १९२२ सालाच्या पोलीस ॲक्टांतील २ ऱ्या कलमापुढे पुढील आशयाचें २ (अ) हें कलम घालण्यांत यावें—"जो कोणी एखाद्याला पोलीस खात्यांत नोकरी न धरण्याबद्दल सांगेल किंवा तसा प्रयत्न करील त्याला १ वर्षपर्यंत सजेची किंवा दंडाची किंवा दोनहि शिक्षा देण्यांत येतील. हा गुन्हा करणाऱ्या इसमाला वॉरंटाशिवाय पकडण्यांत येईल व त्याला जामिनावर सोडण्यांत येणार नाहीं."

### संस्था बेकायदा ठरविणें

(१५) १९०८ सालाच्या इं. क्रि. लॉ अमेंडमेंट ॲक्टाच्या १६ व्या कलमांत पुढील कलम पोटकलम (२) म्हणून घालण्यांत यावें. त्याचा आशय असा—"गव्हर्नर-जनरल-इन-कौन्सिल यांना इंडिया गॅझेटमध्ये एक नोटीस देऊन कोणतीहि विशिष्ट संस्था बेकायदेशीर म्हणून जाहीर करतां येईल. त्या नोटिशीची मुदत संपेपर्यंत ती संस्था सर्व ब्रिटिश हिंदुस्थानांत बेकायदेशीर म्हणूनच गणली जाईल."

(१७) इं. क्रि. लॉ. अमेंडमेंट ॲक्टाच्या १७ कलमापुढे पुढील आशयाचें १७ (अ) कलम घालण्यांत यावें. "प्रांतिक सरकारांनी आपल्या गॅझेटमध्ये नोटीस देऊन कोणतेंहि घर, इमारत, तंबू किंवा नौका यांचा उपयोग बेकायदेशीर गोष्टींकरिता होत आहे असें त्यांना आढळून आल्यास त्या बेकायदेशीर ठरवाव्या. मग डि. मॅजिस्ट्रेटाला किंवा त्यानें ज्याला लेखी अधिकार दिला असेल त्या पोलीस अधिकाऱ्याला त्या जागेंतून कोणत्याहि माणसाला हाकलून देऊन ती जागा रिकामी करतां येईल व तिचा ताबा घेतां येईल. ही नोटीस अमलांत असेपर्यंत सरकारच्या ताब्यांतच ती जागा राहील." १७ (ब) [ १ ] डि. मॅजिस्ट्रेटानें जागेचा ताबा घेतल्यावर त्या जागेंत असलेल्या सर्व जंगम मालाचा ताबा घेऊन त्याची त्यानें नोंद केली पाहिजे व नोंदींसह अहवाल प्रांतिक सरकाराला सादर केला पाहिजे. ( २ ) त्या जंगम वस्तूंचा विनियोग बेकायदेशीर चळवळीकडे होण्याचा संभव प्रांतिक सरकारांना वाटल्यास त्या सर्व वस्तू जप्त करण्यांत येऊन त्यांची वासलात लावण्यांत येईल. ( ३ ) जप्त केलेल्या ज्या वस्तूंची वासलत लावण्यांत आली नसेल त्या वस्तू डि. मॅ. कडून योग्य मालकाला देण्यांत येतील. १७ (क) अशा बेकायदेशीर जागेंत डि. मॅजिस्ट्रेटाच्या परवानगीवांचून जो इसम प्रवेश करील त्याला वारंटाशिवाय पकडण्यांत येऊन त्याला जामीन देतां येणार नाही. १७ ( ड ) [ १ ] योग्य चौकशीअंती प्रांतिक सरकारांना बँकेतील ठेवी, सिक्यूरिटी इत्यादि पैशांचा विनियोग बेकायदेशीर संस्थांच्या योगक्षेमासाठीं होत असल्याची खात्री वाटत असली तर त्यांना ते पैसे जप्त करतां येतील. ( २ ) पैसे जप्त करण्यापूर्वी ते ज्याच्या नांवें असतील त्या इसमावर प्रथम नोटीस बजावण्यांत येईल. ( ३ ) वरील पैशांचा उपयोग बेकायदेशीर संस्थांकडे होत असल्याचा संशय सरकाराला आल्यास ते पैसे ज्याच्या नांवावर आहेत त्या इसमावर ते पैसे बँकेतून न काढण्याबद्दल किंवा त्यांचा उपयोग न करण्याबद्दल नोटीस बजावण्यांत येईल. (१७) एफ वरील कलमप्रमाणें सरकारनें एकदा मालमत्तेचा ताबा घेतल्यावर त्याविरुद्ध फौजदारी किंवा मुलकी कोर्टाला कांही करतां येणार नाही.

### अधिकारी गुन्हा करीत नाहीत

(१८) १९३१ सालच्या इंडियन प्रेस ॲक्टांत 'खून किंवा अत्याचार यांना प्रोत्साहन देणाऱ्या मजकुरावरुद्ध' या शब्दांऐवजीं 'छापखान्यावर चांगलें नियंत्रण बसावें म्हणून' हे शब्द घालावे. (२०) १९३१ सालच्या इंडियन प्रेस ॲक्टांतील ४ ( १ ) [ ब ] कलमापुढे खालील पोट कलमें घालण्यांत यावीं. "( क ) जो प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष रीत्या सरकारी अधिकारी, सोजीर, नाविक अधिकारी किंवा वैमानिक किंवा पोलीस अधिकारी यांना नोकरी न करण्याबद्दल फितवील किंवा ( ड ) बादशहा किंवा सरकार किंवा न्यायालयें, किंवा हिंदी संस्थानिक किंवा ब्रिटिश सरकारचा कोणताहि प्रजाजन यांजबद्दल द्वेष किंवा तिरस्कार उत्पन्न करील ( इ ) किंवा जो एखाद्याला धमकी देऊन त्याला पैसाअडका देण्यास भाग पाडील किंवा एखादें काम करण्यास लावील ( एफ् ) राज्यकारभार, कायदा आणि सुव्यवस्था यांमध्ये अडथळा आणण्यास एखाद्याला

जो चिथवील किंवा उत्तेजन देईल, किंवा शेतसारा, कर, भाडें, पट्टी इत्यादि न देण्यास सांगेल (जी) किंवा सरकारी नोकरांना नोकरीचा राजीनामा देण्याबद्दल जो वळवील (एच्) किंवा बादशहांच्या निरनिराळ्या प्रजाजनांत शत्रुत्व किंवा द्वेषभावना जो उत्पन्न करील (आय) किंवा बादशहांच्या कोणत्याहि दळांत शिरण्याबद्दल किंवा पोलीस खात्यांत शिरण्याबद्दल जो कोणी एखाद्याचें मन बिघडवील" ( २१ ) हा कायदा अमलांत येतां क्षणींच १९३२ सालच्या स्पेशल पॉवर्स ऑर्डिनन्समधील ६२ वें कलम अमलांत राहणार नाही. (२२) स्पेशल पॉवर्स ऑर्डिनन्स अन्वयें चालू असलेले खटले हा कायदा अमलांत आल्यावर त्या कायद्यान्वयेंच ते भरण्यांत आले आहेत या दृष्टीने पुढेहि चालू राहातील. ( २३ ) प्रेस ॲक्टखाली सुरू असलेल्या खटल्यांचीहि वरीलप्रमाणेंच गोष्ट समजावी. ( २४ ) स्पेशल पॉवर्स आर्डिनन्सच्या ६ व्या भागांतील कलमाप्रमाणे एखाद्या माणसावर आरोप ठेवण्यांत आला असेल तर त्याचा खटला या नवीन कायद्यानुरूप चालून त्याखाली त्याला शिक्षाहि देतां येईल."

# कोंकणांतील जाहीर सभा

### अस्पृश्यता निवारणाचा क्रम

कुवें तालुका राजापूर येथे ता. ३ नोव्हेंबर रोजीं ८।१० गांवच्या प्रमुख लोकांची सभा श्रीमल्लिकार्जुनाचे देवालयांत श्रीयुत गणेश भिकाजी परांजपे यांच्या अध्यक्षतेखाली अस्पृश्यतानिवारण व तदनुषंगिक सहभोजन, सहपान, मंदिरप्रवेश इ. प्रस्तुत वादग्रस्त गोष्टींसंबंधीं विचार करण्याकरिता भरली होती. या सभेस आजूबाजूच्या गांवचे ब्राह्मण, मराठे, वाणी, कुणबी, महार वगैरे सर्व वर्गांचे जुन्या नव्या मताचे ६०-७० पुढारी लोक हजर होते. सभेपुढे श्री. विश्वेश्वर मास्तर ( वांकेड येथील वर्णाश्रमधर्म शिक्षण संस्थेचे चालक ) यांनी अस्पृश्यता कशी निर्माण झालेली आहे व तिला शास्त्राधार काय आहे त्यासंबंधीं माहिती सांगून शास्त्रवचनास बाध येईल अशी कोणतीहि गोष्ट करणें उचित नाही असें सुचविलें. श्रीयुत वि. वा. भागवत यांनी आपल्या भाषणांत धर्माची व्याख्या काय, शास्त्रनियमांत वेळोवेळीं बदल कसा होत आला आहे, व सध्या कित्येक बाबतींत शास्त्रनियमांविरुद्ध, लोकाचार ( शास्त्रास कवटाळून बसलेल्या लोकांचा सुद्धा ) कसा चालला आहे तें निदर्शनास आणून अस्पृश्यता नाहीशी करूं इच्छिणाऱ्या लोकांचे जुन्या चालीरीतिसंबंधाने आक्षेप व कोटिक्रम काय आहेत तें सांगितलें. श्रीयुत सुर्वे मास्तर यांनी धर्मनियम प्रस्तुत लोकमत व व्यवहार आणि त्यांचा राजकीय दृष्ट्या समाजावर होणारा परिणाम हीं लक्षांत घेऊन सध्यांच्या परिस्थितींत जनतेला योग्य तें वळण समाजाच्या पुढाऱ्यांनी स्वोदाहरणाने लाविले पाहिजे. केवळ शास्त्रवचनांच्या जाळ्यांत गुरफटून राहून चालू व्यवहाराकडे दुर्लक्ष करणें त्याचप्रमाणे केवळ राजकारणासाठी लोकांचीहि धर्मश्रद्धा व त्यांचें पावित्र्य हीं जबरदस्तीने नष्ट करणें योग्य नाही असें सांगितलें. त्यानंतर अध्यक्षांनी एकेक प्रश्न विचाराकरिता सभेपुढे मांडला व त्यावर सभेंत भवति न भवति होऊन पुढील ठराव बहुमताने मंजूर करण्यांत आले.

( १ ) अस्पृश्यता योग्य तऱ्हेने नष्ट व्हावी हें या सभेस संमत आहे. तथापि त्या कामीं कोणावरहि सक्ती न होतां त्याचप्रमाणे सहभोजन, सहपान, अशा प्रकारचे अतिप्रसंग न करता मतपरिवर्तनाने व अस्पृश्यांच्या अंतर्बाह्य सुधारणेने ती नष्ट व्हावी. (२) अस्पृश्यांना सार्वजनिक देवालयामध्ये नियमित वेळीं मर्यादित जागेपर्यंत जाऊन देवदर्शन करण्यास प्रत्यवाय नसावा (३) अस्पृश्यता ही अस्वच्छता व अपवित्रता वगैरे कारणांनी निर्माण झालेली आहे. ती नष्ट करण्याकरिता अस्पृश्यांना शिक्षण, शुद्ध राहणी व उच्च संस्कृति यांची ओळख प्रथम करून देण्यांत आली पाहिजे. याकरिता प्रत्येक स्पृश्य व्यक्तीने त्यांना त्याज्य न ठरविता त्यांची अशुद्धता घालविण्याचा प्रयत्न केला पाहिजे व तो सर्वांनी करावा अशी या सभेची स्पृश्य बाधवांस कळकळीची विनंति आहे. मुसलमान वगैरे अन्य धर्मीयांना स्पृश्य हिंदू आपल्या घरांत जेथपर्यंत घेतात, तेथपर्यंत स्वच्छ राहणी असलेल्या अस्पृश्यास घेण्यास हरकत नाही. (५) अस्पृश्यतानिवारणाचे कामीं कायद्याचें पाठबळ मिळविण्याचे अस्पृश्य पुढाऱ्यांचे जे प्रयत्न चालले आहेत त्याबद्दल ही सभा नापसंती व्यक्त करीत असून स्पृश्यास्पृश्यांच्या सलोख्यानेच हा प्रश्न सुटण्यासारखा आहे. ( ६ ) महात्मा गांधींनी अस्पृश्यतानिवारणास सहा महिन्यांची मुदत दिली आहे तीबद्दल या सभेची पूर्ण नापसंति आहे. अस्पृश्यता ठराविक मुदतींत समूळ नष्ट होणें शक्य नाही असें या सभेचें स्पष्ट मत आहे. ( ७ ) महात्मा गांधींनी अस्पृश्यता ६ महिन्यांत समूळ नाहीशी न झाल्यास पुनः आपणास प्रायोपवेशन करावें लागेल अशी धमकीवजा

घोषणा केलेली आहे तीबद्दल ही सभा दिलगिरी व्यक्त करीत असून महात्माजींनी शक्य तितक्या लवकर हा आपला संकेत परत घ्यावा अशी त्यांना या सभेची नम्र विनंति आहे.

येणेप्रमाणें सात ठराव पास करण्यांत आल्यानंतर अध्यक्षांनी सभेच्या कामाचा समारोप केला व रा. सुर्वेमास्तर यांनी अध्यक्षांचे व सभेस आलेल्या सर्व लोकांचे आभार मानल्यावर सभा बरखास्त करण्यांत आली.

# मोगलाईतील हिंदूंचा धर्मच्छळ

स्वतः राजा कोणत्याहि धर्माचा असला तरी त्याने आपला धर्माभिमान आड येऊं न देता प्रजेस तिच्या धर्माप्रमाणें वागविणें हें त्याचें कर्तव्य होय. परंतु या शिष्टसंमत नियमाविरुद्ध निजामदरबाराचें धोरण असल्यामुळे निजामशाहींतील हिंदूंचीं मनें उद्विग्न व त्रस्त बनलीं आहेत. धार्मिक बाबतींतील हिंदूंच्या छळाचीं उदाहरणें वारंवार घडत असून त्यापैकीं पैठण येथील गणपतिविसर्जनाचें उदाहरण अत्यंत बोधप्रद आहे. पैठणास विद्यार्थिसंघामार्फत सार्वजनिक गणेशोत्सव गेलीं बरींच वर्षें साजरा करण्यांत येत आहे. सुमारें साठ वर्षापूर्वी एकनाथमहाराजांची दिंडी रस्त्याने मिरवीत नेण्याच्या बाबतींत हिंदु व मुसलमान यांजमध्ये वाद उत्पन्न झाला. सदर वाद निजामसरकाराने मिरवणुकीच्या वाटेंतील मशिदी टाळण्याकरिता मिरवणुकीसाठी वेगळा रस्ता बांधून देऊन मिटविला. तेव्हापासून ५७–५८ वर्षें नाथांची दिंडी व काय, पण हिंदूंच्या सर्व मिरवणुकी या नवीन रस्त्याने वाजत–गाजत बिनहरकत जात होत्या. परंतु अलीकडे निजामराज्यांत जेथे तेथे मुसलमानी धर्माचें वर्चस्व लादूं इच्छिणाऱ्या मुसलमानांची अधिकाराच्या जागेवर नेमणूक होत असल्याने तेच अधिकारी नाहीं त्या ठिकाणीं स्वतःच कुरापत काढून हिंदूंच्या हक्कांची पायमल्ली करतात.

***

पैठण येथे तसलाच प्रकार घडून स्थानिक मुसलमानांचा अर्ज किंवा तक्रारहि नसता दोन वर्षांपूर्वी गणपतीच्या मिरवणुकींत विशिष्ट ठिकाणावरून वाद्यें वाजवीत जाण्यास अधिकाऱ्यानी मनाई केली व वाद्यें वाजवावयाचीं असल्यास तो रस्ता सोडून दुसऱ्या गांवाबाहेरच्या रस्त्याने मिरवणूक नेण्यास उत्सवाच्या चालकांस कळविलें. लोकांनी हा अन्यायाचा हुकूम पाळण्याचें नाकारून मिरवणूक थांबविली व गणपतीची मूर्ति निषेधपूर्वक रस्त्याच्या कडेलाच ठेवली. तेव्हापासून सदर मूर्ति त्याच ठिकाणीं आहे. विद्यार्थिसंघाचे अध्यक्ष रा. व्ही. आर. तुळजापूरकर यांनी जेवढे म्हणून कायदेशीर उपाय आहेत ते सर्व योजण्याचें ठरवून हें प्रकरण नेत नेत खुद्द निजामसरकारापर्यंत भिडविलें. तेथील कार्यकारी कौन्सिलाने या बाबतींत खालील अधिकाऱ्यांच्या निकालाची तळी उचलली होती. परंतु ती अन्यायाची व वहिवाटीस सोडून असल्याची खात्री कौन्सिलाची झाली असताहि इभ्रतीस बळी पडून कौन्सिल दिलेला निकाल फिरवून घेण्यास नाखुष आहे असें समजतें. निजाम-सरकाराकडून हें प्रकरण कौन्सिलाकडे फेरविचाराकरिता परत आलें आहे, पण तें वरील कारणासाठी तसेंच भिजत पाडून हळूहळू जिरवून टाकण्याच्या विचारांत कौन्सिल दिसतें. कारण सदर प्रकरणाचे उत्पादक रा. तुळजापूरकर यांस पैठणाहून उचलून त्यांच्या तुळजापूर या गांवीं अधिकाऱ्यांनी नेऊन सोडलें व त्या गांवाबाहेर निजामाच्या राज्यांत कोठेहि जाण्याची त्यांस बंदी केली. रा. तुळजापूरकर यांजवरील निर्बंधामुळे त्यांची हालचाल तर थांबलीच, पण त्याशिवाय सदर दडपशाहीचा इतरांवरहि वचक बसून पैठणांतील चळवळ नामशेष करण्याची निजामसरकारने आपल्याकडून युक्ति योजली. त्यायोगाने पैठणकरांस न्याय न मिळताच त्यांच्या तोंडाला कुलूप बसणार असें दिसतें.

***

वाद्यांसंबंधीचा अन्याय एकट्या पैठणकरांच्याच राशीला लागला आहे असें नसून मोगलाईतील इतर गांवीहि तोच प्रकार सुरू आहे. आळंद येथील गणेशोत्सवांतील मिरवणुकीस मशीदच आड येऊन वाद्यें वाजविण्यास अधिकाऱ्यांनी प्रतिबंध केला. त्यामुळे पैठणचें अनुकरण आळंद या गांवींहि होऊन चालू सालीं तेथील लोकांनी सार्वजनिक गणपतीचें विसर्जनच केलें नाही. या गोष्टीस थोडे दिवस लोटले नाहीत तोंच आळंद गांवीं एक भयंकर प्रकार घडून आला. तेथील नगरेश्वराच्या मंदिरांतील गणपतीची मूर्ति ता. २४ ऑक्टोबर रोजीं पहाटेच्या सुमारास कोणी दुष्टाने उचलून नेऊन मारुतीच्या वेशीपाशीं छिन्नविच्छिन्न करून टाकलेली आढळली! मूर्तीचें मुंडकें धडापासून वेगळें करून ते तुकडे फेकून देण्यांत आले. हें दुष्कृत्य मुसलमानाशिवाय दुसऱ्या

कोणाचें असूं शकेल काय? त्यामुळे हिंदु व जैन लोकांत क्षोभ उत्पन्न होऊन त्यांनी हरताळ पाडला व जाहीर सभा भरवून त्याबद्दल निषेध प्रदर्शित केला. मोगलाईतील प्रजेपैकीं कांही प्रजा मुसलमान आहे, राज्य मुसलमानांचें आहे व अधिकारीहि त्याच जातीचे आहेत. या कारणाने हिंदूंची बाजू न्यायाची असली तरी त्यांची दादच लागत नाही. हिंदु असहाय व सहनशील आहेत. पण त्यांच्या असहाय स्थितीस व सहनशीलतेसहि मर्यादा आहे. सत्याग्रहाचा जन्म या असहाय स्थितींतच होत असतो. निजामसरकारच्या हद्दींतील हिंदु प्रजेस या शस्त्राच्या आराधनेशिवाय दुसरी गतिच राहिली नाही, तर ती याहि मार्गाचा अवलंब केल्यावांचून राहणार नाही हें निजामदरबाराने, अधिकाऱ्यांनी व आळंद हा जहागिरीचा गांव असल्यामुळे तेथील जहागिरदारांनी लवकर ओळखून हिंदु प्रजेचा संतोष राखण्यांतच आपलें हित आहे हें ओळखावें एवढाच इषारा तूर्त आम्ही देऊन ठेवतों. त्याचा योग्य विचार होईल अशी आम्हांस आशा आहे. हैद्राबादचे संस्थानिक मुसलमानी धर्माचे असले तरी देशी संस्थानिकच आहेत. ज्या सत्याग्रहाची कास हिंदी लोक परकीय अशा ब्रिटिश राज्यकर्त्यांविरुद्ध निरुपायाने धरतात त्याच सत्याग्रहाची कास हैद्राबादेच्या हिंदी संस्थानिकाविरुद्ध हिंदी लोकांनी धरल्यास त्यांत हैद्राबादसरकाराची अब्रू ती काय राहिली?

# युरोपियन राष्ट्रांचें शस्त्रनियंत्रण

निःशस्त्रीकरण परिषदेच्या दुसऱ्या अधिवेशनाला सुरुवात केव्हां होईल तेव्हां होवो. पण त्यापूर्वी निरनिराळ्या राष्ट्रांचे प्रतिनिधि निःशस्त्रीकरणाच्या विविध योजना मांडीत आहेत त्या महत्त्वाच्या आहेत. परिषदेचे सूत्रचालक इंग्लंड व फ्रान्स हीं दोन राष्ट्रें असल्याने त्यांनी अशा योजना सुचविण्यांत विशेष दक्षता दाखवावी हें अगदीं साहजिक आहे. फ्रान्सचे मुख्य मंत्री एम्. हेरियट यांनी अशी योजना सुचविली आहे कीं, सर्व राष्ट्रांनी कायमच्या लष्कराला अर्धचंद्र देऊन त्याऐवजीं थोड्या मुदतीपुरती जरूर वाटेल तेव्हां सक्तीने लष्करभरती करावी. फ्रान्सची ही योजना आर्थिक दृष्ट्या विचारणीय असली तरी कार्यक्षमतेच्या दृष्टीने ती विशेष उत्साहजनक नाही. फ्रान्सच्या योजनेंतील कार्यक्षमतेचा कमकुवतपणा काढून टाकावयाचा असेल तर त्याला असा एक उपाय सुचवितां येईल कीं, या राष्ट्रीय सैन्याला बिकट प्रसंगीं मदत करण्यास राष्ट्रसंघाचें सैन्य उभारण्यांत यावें. या पद्धतीने दोन फायदे होण्याचा संभव आहे.एक तर प्रत्येक राष्ट्राची त्याला कायमचें सैन्य पोसावें न लागल्यामुळे आर्थिक दृष्ट्या अधिक ओढघस्त स्थिति होणार नाही व दुसरें असें कीं त्याला संकटकालीं मदतच पाहिजे असल्यास राष्ट्रसंघाचें सैन्य खडेंच आहे. शिवाय राष्ट्रसंघ हा सर्वच राष्ट्रांचा संघ असल्याने त्याला एवढें सैन्यखातें पोसणें फारसें कठिण जाणार नाही. अशा रीतीने राष्ट्रसंघाचें सैन्य उभें राहिल्यावर त्याचा वचक आक्रमणशील राष्ट्रावरहि बसल्याशिवाय राहणार नाही.

फ्रान्सची वरील सूचना हवेंत पसरत आहे तोंच इंग्लंडनेहि आपली एक योजना तयार केली असल्याची कुणकुण वर्तमानपत्रांना लागली आहे. इंग्लंडाच्या सूचनांचा मथितार्थ असा कीं, जगांतील सर्वच वैमानिक दळें मोडण्यांत यावीं किंवा त्यांत अतिशय छाटाछाट करण्यांत यावी. तसेंच खासगी मालकीच्या विमान-संख्येवरहि चांगलीच मर्यादा घालण्यांत आली पाहिजे. इंग्लंडची ही योजना इतर राष्ट्रांनाच काय पण खुद्द त्या राष्ट्रांतील विचारवंत मुत्सद्यानाहि कितीशी प्रिय होईल याबद्दल शंकाच वाटते विमानविद्येची वाढती प्रगति लक्षांत घेता व एक परिणामकारक युद्धसाधन म्हणून त्याचें महत्त्व अजमावतां विमानदल—नाशाची योजना विशेष ग्राह्य वाटणार नाही. सूचकाच्या दृष्टीने या योजनेकडे पाहिलें असता ती व्यवहार्य ठरण्यास दुसऱ्या एका गोष्टीची तरतूद केली पाहिजे. व ती गोष्ट म्हणजे 'न्यूज क्रॉनिकल'ने सुचविल्याप्रमाणे वैमानिक व्यवहाराचें नियंत्रण व नियमन हीं दोनहि राष्ट्रसंघाच्या हातांत ठेविलीं पाहिजेत. आणखी एक अशी सूचना करण्यांत आली आहे कीं, सार्वजनिक आणि खासगी शस्त्रास्त्रनिर्मितीवर अत्यंत कडक निर्बंध घालून ती नियमित करावी.

इंग्लंड काय किंवा फ्रान्स काय या दोनहि राष्ट्रांच्या योजनांचा इत्यर्थ राष्ट्रसंघच शस्त्रसंपन्न करून त्याला विश्वसंरक्षक बनवावा असा आहे. निःशस्त्रीकरण परिषदेच्या पहिल्या अधिवेशनांतहि फ्रान्सने राष्ट्रसंघाला जगाच्या संरक्षणाची सुपारी देण्याची सूचना केली होती. त्या वेळीं इंग्लंडनें फ्रान्सच्या सूचनेला फारशी अनुकूलता दाखविली नसली तरी तेंहि तिला प्रतिकूल नाही हें आता इंग्लंडच्या नव्या योजनेवरून दिसून येतें. इंग्लंड,फ्रान्स हीं दोनहि राष्ट्रें साम्राज्यवादी व त्यांतून त्यांचीं

शस्त्रास्त्रांचीं कोठारेंहि अजस्र. शिवाय सध्या राष्ट्रसंघाचें बाहुलेंहि तीं नाचविणार तसेंच नाचणार.त्यामुळे छोट्या राष्ट्रांना या सूचनेंत कांहीं कावा असावा असा अंदेशा येणे स्वाभाविक आहे. छोट्या राष्ट्रांना मनांतून अशी भीति वाटते कीं, फ्रान्स व इंग्लड हीं राष्ट्रें सर्व शस्त्रास्त्रे व भौतिक, नाविक आणि वैमानिक दळे राष्ट्रसंघाच्या हवालीं करण्यांत यावीं व राष्ट्रसंघाने जगांत शांतता प्रस्थापित करावी अशी सूचना करतात; त्यांचा या सूचनेंत अन्तःस्थ हेतु असा आहे कीं, आपला राष्ट्रीय सैन्याचा अगडबंब खर्च वांचवून परस्पर राष्ट्रसंरक्षणाचें काम राष्ट्रसंघाकडून व्हावे व छोट्या राष्ट्रांवर त्यांच्याच पैशाने बसवितां आला तर आपला लष्करी बचकहि बसवावा.

छोट्या राष्ट्रांची ही भीति अगदींच निराधार आहे असें म्हणवत नाही.त्याला कारण असें कीं,आज राष्ट्रसंघाचें पान फ्रान्स व इंग्लंड यांच्याच तंत्राने हलत असल्याने राष्ट्रसंघाचें सैन्य म्हणजे त्यांचेंच सैन्य असा अर्थ होतो. सर्व राष्ट्रांनी आपल्या नख्या छाटून आपला सर्व दारूगोळा संघाच्या कोठारांत रिचविणें म्हणजे स्वतःच्या हाताने पूर्वी होतों त्यापेक्षाहि अधिक जहांबाज आखाडसासू आपल्या डोक्यावर बसवून घेणेंच नव्हे काय? या विचारसरणीमुळेच पहिल्या अधिवेशनांत फ्रान्सच्या उपयुक्त सूचनेला छोट्या राष्ट्राकडून विरोध झाला. फ्रान्सने पुनः त्याच सूचनेचा दोर वळण्यास प्रारंभ केला आहे.परंतु आमच्या मतें फ्रान्सला आपली ही सूचना छोट्या राष्ट्रांकडून मान्य व प्रिय करून घ्यावयाची असेल तर त्याने प्रथम ती सूचना आणण्यांत आपला प्रामाणिक व शुद्ध हेतु असल्याचें सिद्ध केलें पाहिजे व प्रत्यक्ष स्वकृतीने छोट्या राष्ट्रांची संशयनिवृत्ति केली पाहिजे. राष्ट्रसंघाची रचना, घटना व कार्यपद्धति ही लोकशाहीच्या तत्त्वानुरूप जितक्या कसोशीने आणि सचोटीने अमलांत येईल तितक्या प्रमाणांत सदर सूचनेला छोट्या राष्ट्रांची अनुमति मिळत जाईल हें निश्चित.

फ्रान्स,इंग्लंड, अमेरिका प्रभृति राष्ट्रें निःशस्त्रीकरणाच्या निरनिराळ्या योजना आपल्या मताप्रमाणे सुचवीत आहेत हे ठीक आहे.परंतु त्यापूर्वी त्यांनी एका महत्त्वाच्या मुद्दयाचा निर्णय लावला पाहिजे.निःशस्त्रीकरण परिषदेचें पहिलें अधिवेशन समाप्त होताच जर्मनीने एक महत्त्वाचा व विचारणीय मुद्दा उपस्थित केला. तो मुद्दा म्हणजे शस्त्रसंभारांतील समानतेच्या दर्जाचा. जर्मनीने उपस्थित केलेल्या मुद्दयाबद्दल फ्रान्स इंग्लंड प्रभृति जेतीं राष्ट्रें त्याला नांवें ठेवीत आहेत. परंतु व्हर्सेलिसच्या तहाचा विचार करता व इंग्लंड-प्रभृति राष्ट्रांची त्या तहांतील कलमांविरुद्ध गेलीं १०-१५ वर्षे चाललेली वागणूक पाहता जर्मनीला दोष देण्यास जागाच रहात नाही व्हर्सेलिसच्या तहांतील शस्त्रास्त्रविषयक कलमानी जर्मन गरुडाचे पंख पुरतपणी निर्दयतेने कापले जाऊन त्याला जटायूप्रमाणे विवश स्थितींत फेकण्यांत आलें. त्या कलमाचीच थोडक्यांत पाहणी करूं म्हणजे तीं किती घातुक आणि भयंकर आहेत याची योग्य कल्पना येईल.

व्हर्सेलिसचा तह म्हणजे जेत्या राष्ट्रांनी केवळ सूडबुद्धीने जर्मनीकरिता तयार केलेला एक खोडाच होय. खोड्याची शिक्षा अशी आहे कीं, तिच्यामुळे मनुष्य प्राण्याचीं हाडेंनूहाडे मोडलीं जाऊन त्याला यमयातना सोसाव्या लागतात. परंतु मोठ्या उद्वेगाची गोष्ट अशी कीं, फ्रान्स, इंग्लंड-प्रभृति राष्ट्रांनी व्हर्सेलिसच्या तहाच्या मिषाने एक विलक्षण खोडा निर्माण करून त्यांत जर्मनीला जखडून टाकलें व जर्मनीचें आर्थिक आणि शारीरिक शोषण केलें. व्हर्सेलिसच्या तहाने जर्मनी पर्वतप्राय वार्षिक नुकसानभरपाईच्या हप्त्यांनी जसा नागवला गेला तद्वत् शस्त्रनियंत्रणाच्या कलमाने हतवीर्य आणि नामर्द झाला. मानधन जर्मन राष्ट्राला या दोनहि अटी लांछनास्पद होत्या; तरी आलेल्या आपत्तींच्या परिहारासाठी त्याला त्या नाइलाजाने का होईना पण मान्य कराव्या लागल्या. रजनीचें तमःपटल पसरूं लागलें असता एवढा चण्डरश्मि सूर्य, पण त्यालासुद्धा कांही काल तिच्यापुढे नमते घ्यावें लागतेंच ना ! त्यांतलाच हा प्रकार. व्हर्सेलिसच्या तहांतील शस्त्रनियंत्रणाच्या अटीने जर्मनीचे तेव्हांचे दरोबस्त किल्ले पाडण्यांत आले, आणि दारूगोळा व इतर युद्धविषयक रासायनिक द्रव्यांनी समुद्राचें तर्पण करण्यात आलें ! खड्या फौजेला तर इतकी जबर कात्री लावण्यांत आली कीं, जर्मनीने भावी काळांत स्वसंरक्षणासाठी अवघे एक लाख सैनिकच ठेवले पाहिजेत व त्यांच्या प्रमाणांतच दारूगोळा, बंदुकी इत्यादि युद्धसाधनें मर्यादित केलीं पाहिजेत असें ठरविण्यांत आलें.

नाविक दलावर घातलेली पकड तर विशेषच जाचक, भयंकर आणि जुलमी आहे. सहा युद्धनौका, सहा लहान क्रूझरें, बारा विनाशिका आणि बारा टॉर्पेडो बोटी इतकेंच नाविक दळ राखण्याची जर्मनीवर सक्ति करण्यांत आली ! तसेंच १० हजार टन वजनापेक्षा अधिक वजनाचीं जहाजे बांधण्यास बंदी करण्यांत आली. किनाऱ्यालगतच्या नाविक व्यूहाचें निर्दालन करून दोस्त राष्ट्रांनी जर्मनीचा किनारा अरक्षित व उजाड केला. जर्मनीच्या छातींत इतकीं अपमान-शल्यें रोविलीं तरी दोस्तांची सूडाची भावना अतृप्त राहिली, म्हणूनच

कीं काय जर्मनी या अटी पाळतो किंवा नाही याची चाचणी घेण्याकरितां त्याच्या डोक्यावर एक निरीक्षण-मंडळ लादण्यांत आलें ! तोंडानें एकादशी म्हणत कांदा खाणाऱ्या धूर्त आणि कावेबाज माणसाप्रमाणें दोस्त राष्ट्रांनी निःशस्त्रीकरणाच्या तत्त्वाकडे अंगुलि-निर्देश करीत जर्मनीवर निःशस्त्रीकरण लादलें व आपण स्वतः मात्र शस्त्रसंभाराचे मलिदे या नाही त्या मिषानें चोरून खाण्याचें व्रत अव्याहत ठेवलें. ही दोस्त राष्ट्रांची प्रामाणिक बुद्धि! जर्मनी काय एवींतेवीं संकटाच्या चापांत सांपडलेलाच होता. त्यानें या अपमानास्पद अटी मान्य केल्या इतकेंच नव्हे तर १९१८ सालापासून आजतागायत त्यानें त्या अटींचें पालन एखाद्या योग्याप्रमाणें एकनिष्ठेनें केलें; तें इतकें कीं, दोस्त राष्ट्रांनाहि जर्मनीच्या सहनशीलतेचें व तत्त्वनिष्ठेचें कौतुक वाटून आपल्या माना शरमेनें नमवाव्या लागल्या !

जर्मनी आपल्या सत्त्वपरीक्षेंत उतरला म्हणून स्वार्थान्ध आणि कपटी दोस्त राष्ट्रांना त्याची काय लाज किंवा चाड ! व्हर्सेलिसच्या तहान्वयें जर्मनीला निःशस्त्र करण्यांत आलें तेव्हाच त्यांत अशी एक अट होती कीं, जर्मनीनें आपल्यावरील निःशस्त्रीकरणाच्या अटी मान्य करून त्याप्रमाणें आचरण चालविलें म्हणजे इतर दोस्त राष्ट्रांनीहि पुढील वर्षापासून आपला शस्त्रसंभार कमी कमी करीत आणला पाहिजे. परंतु दोस्त राष्ट्रांनी वचनभंग करून आपलीं शस्त्रास्त्रें कमी तर केलींच नाहीत, उलट तीं वाढविलीं ! जर्मनीचीं हत्यारें मात्र काढून घेतलीं तीं घेतलींच. जर्मनीला दोस्त राष्ट्रांच्या या वचनभंगाची अर्थातच चीड आली. खुद्द जर्मनीचें दोस्तांच्या या कपटपूर्ण धोरणानें कांही नुकसान न होतें तर त्यानें त्यांच्याकडे ढुंकूनहि पाहिलें नसतें.

परंतु आजची स्थिति तशी नाही. कारण सांप्रत जर्मनीजवळ त्यानें व्हर्सेलिसच्या तहाची कसम खाल्ल्यानें स्वसंरक्षणापुरतींहि शस्त्रास्त्रें राहिलीं नाहीत आणि दोस्त राष्ट्रांचीं शस्त्रागारें तर उतूं चाललीं आहेत. हें विसदृश चित्र जर्मनीला, विशेषतः त्यांतील शौर्यशाली तरुणांना कसें खपणार ? म्हणूनच त्यानें आता योग्य संधि जाणून शस्त्रास्त्रांतील समानतेच्या दर्जाची मागणी केली आहे. ही शस्त्रसमानतेची मागणी केवळ न्याय्यच नव्हे तर धर्म्य व क्रमप्राप्त आहे. परंतु फ्रान्स-इंग्लंड--प्रभृति राष्ट्रांना जर्मनीची ही मागणी म्हणजे युरोपवर ओढवणारें महत्संकट वाटतें ! शस्त्रसमानतेच्या मागणीला विरोध करतांना फ्रान्सनें बेशरमपणें असें विधान केलें कीं, या मागणीच्या मिषानें जर्मनीला आपला शस्त्रसंभार पुनः वाढवून पूर्वीप्रमाणें जगाला डोईजड व्हावयाचें आहे. परंतु या विधानांत एक मोठा दोष असा कीं, खुद्द फ्रान्सच शस्त्रनियमनाचा प्रश्न जेव्हा जेव्हा पुढें येतो तेव्हा तेव्हा प्रत्येक राष्ट्राला स्वसंरक्षणापुरतें व परचक्रनिवारणास पुरेसें राष्ट्रीय सैन्य ठेवण्याचा हक्क असला पाहिजे अशी मागणी करतो.

आता प्रश्न असा कीं, व्हर्सेलिसच्या तहानें जर्मनीच्या फौजफाटा व खडें सैन्य जितकें मर्यादित केलें आहे तेवढें सैन्य जर्मनीला स्वतःचें संरक्षण करण्यास समर्थ व पुरेसें आहे का ? तज्ज्ञांचा अभिप्राय असा कीं, जर्मनीजवळ आज जितकें व ज्या तऱ्हेचें सैन्य आहे तेवढ्यानें त्याला परचक्रनिवारण करतां येणें शक्य नाही. अशी वस्तुस्थिति असता जर्मनीनें आपलें सैन्य स्वसंरक्षणाला पुरेसें इतकें वाढविण्याबद्दल मागणी केली तर ती दोषास्पद कशी ? व तिजमुळें युरोपवर संकटछाया का पडावी व ती फ्रान्सच्या म्हणण्याशींहि विरोधी कशी हें एक तें दुराग्रही फ्रान्सच जाणो! फ्रान्सला आपला हा युक्तिवाद सदोष व स्वमतविरोधी वाटला म्हणूनच कीं काय कोण जाणे, आता नुकतेंच असें प्रसिद्ध झालें आहे कीं, फ्रान्सचे मुत्सद्दी एम. हेरियट यांना जर्मनीच्या मागणींतील न्याय्यपणा पटला असून ते शस्त्रसमानतेला मान्यता देण्यास तयार आहेत. या मान्यतेलाहि त्यांनी विकल्पाची अशी एक शेपटी जोडली आहे कीं, या मागणीनें जर्मनीचा पुनःशस्त्रीकरणाचा हेतु दिसून आला तर मात्र फ्रान्स जर्मनीला पुनः जोराचा विरोध करील. पुनःशस्त्रीकरण ( re-arm ) हा शब्द संदिग्ध आहे. त्याचे दोन अर्थ होऊं शकतील. त्यांपैकीं एक अर्थ असा कीं, स्वसंरक्षणास योग्य इतकीं शस्त्रें धारण करणें व दुसरा अर्थ म्हणजे आहेत हीं शस्त्रास्त्रेंच मर्यादेपेक्षा अधिक वाढविणें. पैकीं पहिला अर्थच जर्मनीला ग्राह्य असावा.

फ्रान्स आपल्या मनांत दुसरा अर्थ समजून जर्मनीच्या भावी लष्करी सामर्थ्याला भीत आहे. परंतु सद्यःस्थितींत तरी त्याची ही भीति निराधार व अवास्तव आहे. शिवाय श्लीरसारख्या जबाबदार जर्मन मुत्सद्द्यांनीहि शस्त्रसमानतेच्या मागणींतील आपला शुद्ध हेतु एकदा सोडून दहादा जाहीर केला आहे. जर्मन मुत्सद्द्याचें म्हणणें असें कीं, एक तर सर्व राष्ट्रांनी व्हर्सेलिसच्या तहांतील शस्त्रविषयक अटींप्रमाणें काटेकोर वर्तन ठेवून आपापलीं शस्त्रागारें रितीं करीत आणलीं पाहिजेत किंवा जर्मनीला तरी आपलीं शस्त्रास्त्रें वाढविण्यास मुभा दिली पाहिजे. युरोपच्या क्षितिजावर शस्त्रास्त्रांच्या विद्युल्लता सतत चमकत असता एकट्या जर्मनीनें मात्र दैन्यांत राहावें ही विषम व लज्जास्पद स्थिति पुढेंहि

चालू राहणें शक्य नाही. कारण जर्मनीचें तींत मरण आहे. या सर्व प्रकरणाचा कयास काढता जर्मनीचें मागणें यथान्याय ठरत आहे व त्याला प्रत्यंतर म्हणजे आता फ्रान्सहि त्या मागणीला आपली मान्यता देण्यास भीतभीत राजी झाला आहे. जर्मनीची ही शस्त्रसमानतेची मागणी फ्रान्स, इंग्लंड, अमेरिका प्रभृति प्रमुख नेत्या राष्ट्रांनी अन्तःकरणपूर्वक संमत केली तर निःशस्त्रीकरणाची निरगाठ सुटण्याच्या कामीं मोठीच मदत होणार आहे.

जर्मनीच्या शस्त्रसमानतेच्या मागणीला फ्रान्सने आपली मान्यता कांही अटींवर जाहीर करताच आता इंग्लंडहि तिला आपला रुकार देण्यास पुढे आलें आहे. ता. १० नोव्हेंबर रोजीं हाउस ऑफ कॉमन्समध्ये निःशस्त्रीकरण व जर्मनीची शस्त्रसमानतेची मागणी या दोन महत्त्वाच्या प्रश्नांवर वादविवाद झाला. कोणत्याहि गोष्टीवर बाळसें चढवून लोकांत तिचा दिमाख कसा दाखवावा याची हातोटी इंग्लंडला मोठी चांगली साधली आहे आणि याच गुणावर तें जगाला झुलवीत ठेवून आपलें वर्चस्व किंवा प्रतिष्ठा अबाधित राखीत असतें. फ्रान्सच्या पोटांतलें ओठावर येण्यास क्षणाचाहि विलंब लागत नाही. एम्. हेरियट यांनी वादविवादाचें शिंग लोकसभेंत न फुंकता एकदमच आपण जर्मनीच्या हक्काला संमति देण्यास अनुकूल असल्याचें सांगून टाकलें. परंतु सायमनसाहेब पडले कपटनाटकांतील मुरलेले सूत्रधार! त्यांनी वादविवादाच्या नाटकाच्या जाहिराती आगाऊ फडकवून आपल्याकडे जगाचे नेत्र आकर्षून घेतले व ता. १० रोजीं एक कलमवार योजना मांडून निःशस्त्रीकरणाच्या आपल्या उदार धोरणाने जगाला दिपविण्याचें कसब केलें. सायमनसाहेब म्हणतात कीं, जर्मनीची मागणी अत्यंत न्याय्य असून व्हर्सेलिसच्या तहाने त्याजवर जे अन्याय लादले गेले त्यांचें परिमार्जन करून इतर राष्ट्रांप्रमाणे सर्व प्रकारचीं शस्त्रास्त्रें बाळगण्यास त्यासहि सवलत असली पाहिजे. मात्र जर्मनीची ही मागणी मान्य झाल्यावर सर्व राष्ट्रांनी आपसांतील भांडणें, किंवा कुरापती मिटविण्यासाठी शस्त्रास्त्रांचा उपयोग करता कामा नये.

जर्मनीची शस्त्रसमानतेची मागणी व्यवहार्य व सर्वमान्य होण्यासाठी सर सायमन यांनी योजना केली आहे ती अशी—(१) निःशस्त्रीकरणाच्या ज्या नव्या करारांत जर्मनीवरील शस्त्रनियमनाच्या अटींचा उल्लेख करण्यांत येईल, त्यांतच इतर राष्ट्रांच्या शस्त्रास्त्रांवरील नियमनाचा निर्बंधहि उल्लेखण्यांत यावा; (२) इतर राष्ट्रांच्या शस्त्रास्त्रांवरील नियमनाला जेवढी मुदत घालण्यांत आली असेल तेवढीच जर्मनीच्या शस्त्रनियमनाचीहि मुदत असावी; (३) नव्या करारांत जर्मनीच्या शस्त्रसमानतेच्या हक्काचा स्पष्ट शब्दांत उल्लेख करण्यांत यावा. ब्रिटनने मांडलेली ही योजना विचारणीय आहे. तिचें महत्त्व म्हणजे तींत जर्मनीच्या शस्त्रसमानतेच्या नैसर्गिक हक्काला मान्यता देण्यांत आली आहे. निःशस्त्रीकरण परिषदेचा एक हेतु असा आहे कीं, सर्व राष्ट्रांनी आपापलीं शस्त्रास्त्रें स्वसंरक्षणापुरतीं ठेवून बाकीचीं अंबारांत टाकून द्यावीं. त्यामुळे स्वसंरक्षणापुरतींच हत्यारें किंवा दारूगोळा नियमित राहिल्यावर पराक्रमणाची खुमखुम ही 'अतृणे पतितो वन्हिः' या न्यायाने जागच्या जागींच जिरून जाईल. पराक्रमणाच्या महत्त्वाकांक्षेची नांगी अशा तऱ्हेने मोडली गेल्यावर युद्धाचा संभवहि साहाजिकच कमी होईल व जगांत शांतता नांदण्यास मदत होईल.

जगांत शांतता स्थापणें हें निःशस्त्रीकरण परिषदेचें ध्येय असल्यामुळे तिने तत्सिद्धयर्थ शस्त्रनियमन या एका साधनाचा प्रसार चालविला आहे. परंतु आमच्या मतें हें ध्येय शंभर टक्के व्यवहारांत येण्यास राष्ट्रांच्या मानसिक वृत्तींतहि मोठीच क्रांति झाली पाहिजे. मनोवृत्ति युद्धविरोधी बनल्यावर एखादे वेळीं जवळ शस्त्रें असलीं तरी त्यांचा उपयोग करण्यास हात पुढे सरसावणार नाही. जराक्रान्त मृगपति नखदंष्ट्रायुक्त खरा, परंतु जवळच तृणांकुरांच्या गालिचावर बागडणाऱ्या हरिणावर झडप घालण्याची त्याला इच्छाच होत नाही. युद्धाविषयी इतकी उदासीनता बाणली तरच जगांत निःशब्द शांतता नांदणें शक्य आहे. परंतु हा मनुष्यस्वभाव बदलणें निसर्गतः अशक्य आहे. या दृष्टीने विचार करता निःशस्त्रीकरणाच्या ज्या योजना पुढे येत आहेत त्यांत अधिक उपयुक्त व अधिक परिणामकारक असेल तिचाच अवलंब केल्यास पूर्ण शांतता नसली तरी युद्धजन्य अशांतता कमी होण्यास तिचा बराच उपयोग होईल.

# श्री. ताराबाई मोडकांचें व्याख्यान

## साक्षरता-प्रसाराची योजना

मंगळवार ता. ८ रार्जी सायंकाळीं ५॥ वाजता नूतन मराठी विद्यालयाचे सभागृहांत भावनगर येथील 'बालक मंदिरा'च्या प्रमुख कार्यकर्त्या श्रीमती **ताराबाई मोडक** यांचें 'साक्षरतेच्या प्रसाराची योजना' या विषयावर श्री. किंकर यांचे अध्यक्षतेखाली व्याख्यान झालें. श्रीमती ताराबाई आपल्या भाषणांत म्हणाल्या, "सध्या राजकीय किंवा सामाजिक विषय हे लोकांच्या मनाला विशेष पटतात व ते त्यांना मनोरंजक वाटतात. साक्षरतेच्या प्रश्नाचें महत्त्व त्यांना तितकें वाटत नाही. परंतु बारकाईने विचार करतां वरील दोन विषयांइतकाच हाहि विषय चिंतनीय व मनोरंजक असल्याचे लोकांना आढळून येईल. कांही लोक म्हणतात, 'अहो, निरक्षरता हा आमच्या लोकांवर प्रसादच आहे असें समजा. कारण त्यामुळे तरी आम्हा सुशिक्षितांप्रमाणे आमचे खेड्यांतील शेतकरी बांधव या पाश्चात्य संस्कृतीच्या खोड्यांत अडकले नाहीत! आमचीं कथा-पुराणें-प्रवचनें हीं जनतेत शिक्षणप्रसाराचें काम करीतच आहेत.' परंतु हा युक्तिवाद अगदींच संकुचित बुद्धीचा आहे. कथा-पुराणें-प्रवचनें ऐकूं नये व त्यापासून ज्ञानप्राप्ति करून घेऊं नये असें कोण म्हणतो? आमचे म्हणणें एवढेच कीं, सांप्रतची देशाची व जगाची परिस्थिति आकलन होण्यास प्रत्येक नागरिकाला लिहितां व वाचता आले पाहिजे.

दुसरे कित्येक असा आक्षेप घेतात कीं, साक्षरता हा गौण प्रश्न आहे. प्रथम राजकीय व सामाजिक प्रश्न सोडवूं व नंतर स्वराज्य मिळाल्यावर आपोआपच साक्षरतेचा प्रश्न निकालांत निघेल. वरवर पाहणारांना हा आक्षेप खरा वाटण्याचा संभव आहे. परंतु थोडा अधिक विचार केला तर त्यांत विशेष तथ्य नाही असे दिसून येईल. कारण स्वराज्य मिळाल्यावर सर्व गोष्टी राष्ट्रांत एकदम उत्पन्न होतील हें म्हणणें योग्य नाही. मला तर असेंच म्हणावयाचें आहे कीं, स्वराज्य लवकर येण्यासाठीच आपण हा प्रश्न आधीं हातीं घेतला पाहिजे. स्वराज्य आणि साक्षरता यांचा अन्योन्यसंबंध आहे असें म्हणण्यासहि हरकत नाही. रशिया, चीन, अमेरिका या राष्ट्रांनी मोठमोठ्या योजना करून निरक्षरता राष्ट्रांतून घालविण्याचे मोठे प्रयत्न चालविले आहेत. अमेरिकेने तर असा कायदाच केला कीं, अमुक मुदतींत निरक्षरता ही गेलीच पाहिजे व ती निरक्षरता घालविण्यासाठी सुलभ शिक्षणोपयोगी अशीं पुस्तकेंहि छापण्यांत आलीं.

शहरांतील सुशिक्षित लोकांना खेडेगांवांत निरक्षरतेचा गर्द अंधकार किती दाट पसरला आहे याची योग्य कल्पना नाही. म्हणून प्रथम सुशिक्षितांनी खेडेगांवांतून साक्षरतेचा प्रसार करण्याच्या प्रश्नाचा विचार करण्यास सुरुवात केली पाहिजे. प्रत्यक्ष त्या कामांतच पडल्यावर हा विषय नीरस नसून सरस आहे, कंटाळवाणा नसून जिवंत आहे, याची खात्री पटेल. आपण निरक्षर माणसाला शिकवूं लागलों म्हणजे त्याच्या मुखचर्येवर जो एक प्रकारचा सात्त्विक आनंद व तेज दिसतें तें पाहून आपल्या मनातहि उदात्त भावना उत्पन्न होऊन आपणहि त्याच आनंदरसांत रमून जातों. सुमारें तीन वर्षांपूर्वी आम्हीं भावनगर येथे 'बालक मंदिर' या संस्थेतर्फे साक्षरतेच्या प्रसाराची योजना आंखली. महात्माजींनी स्वराज्याच्या मोहिमेचा कार्यक्रम आखल्यावर आम्हींहि देशसेवेचा एक मार्ग म्हणून साक्षरता-प्रसाराच्या योजनेचें उदक सोडलें. ज्यांना स्वराज्याच्या कष्टमय मोहिमेंत सामील होण्याचें सामर्थ्य नसेल किंवा काही कारणामुळे भाग घेतां येत नसेल त्यांना या कार्याला सक्रिय साहाय्य देतां येईल. खेड्यांतील लोकांना लिहिण्यावाचण्यास लवकर यावें म्हणून मीं गुजराथींत एक पुस्तक तयार केलें. निरनिराळ्या प्रचारकांनी खेडीं वांटून घेऊन त्यांत हीं पुस्तकें शिकविण्यास आरंभ केला व आम्हांला असें आढळून आलें कीं, ३५ दिवसांत ३५ पाठ त्यांना शिकविता येणें शक्य आहे.

खेडेगांवांतील लोकांना साधारण अक्षरओळख झाल्यावर त्यांना आम्ही वर्तमानपत्रें वाचण्यास शिकवूं लागलों व त्या गोष्टीचा फार मोठा उपयोग होतो असें आमच्या निदर्शनास आलें. कारण वर्तमानपत्रांत देशांतील चळवळीची व इतर अनेक जिव्हाळ्याच्या प्रश्नांची हकीकत व चर्चा येत असल्याने खेड्यांतील लोक वर्तमानपत्रें मोठ्या आवडीने वाचूं लागले. मध्यम बुद्धीच्या माणसाला थोड्या दिवसांत लिहिण्यास नसलें तरी वाचण्यास शिकविणें सुलभ आहे. परंतु या लोकांतून शिक्षणाचा प्रसार करणें वाटतें तितकें सोपें नाही. या प्रसाराच्या कामीं तीन-चार अडचणी आहेत. ज्या अशिक्षित समाजांत आपण पुस्तकें व पाट्या पेन्सिली घेऊन त्यांना शिकविण्याकरिता जातों त्या लोकांना आपल्याविषयीं श्रद्धा वाटत नाही. यास्तव प्रथम आपण त्यांचे व आपले हितसंबंध एकच असून त्यांच्याच कल्याणासाठी हें काम चालू आहे, याची खात्री पटविली पाहिजे आणि त्यांचा विश्वास संपादन केला

पाहिजे. दुसरी अडचण म्हणजे आपल्याला लिहिता वाचतां येईल कीं नाही या गोष्टीबद्दल ते लोक स्वतःच साशंक असतात. म्हणून प्रचारकाने अत्यंत मधुर व मृदु शब्दांनी त्यांना शिकविलें तर त्यांची शंका निर्मूल होऊन त्यांना शिकण्यांत उलट आनंद व उत्साह वाटेल. कठोर किंवा त्यांचे उणें काढणारे शब्द वापरण्यांत आल्यास मात्र भलताच परिणाम होईल. तिसरी अडचण स्त्रियांची. 'आम्हांस शिकून काय करावयाचें आहे' हा स्त्रियांचा आक्षेप. परंतु त्यांनाहि आपण शिक्षणाचें महत्त्व पटविलें पाहिजे.

आता शिक्षणप्रसाराचें हें काम करण्यास माझ्या मतें चार प्रकारचे लोक उपयोगी पडूं शकतील. ते म्हणजे—( १ ) कॉलेजमधील विद्यार्थी, ( २ ) शाळेंतील विद्यार्थी, (३) सुखवस्तु सुशिक्षित स्त्रिया व (४) शिक्षक वर्ग. पैकीं कॉलेजच्या विद्यार्थ्यांना त्यांना मिळणाऱ्या लांब मुदतीच्या दिवाळी—उन्हाळ्याच्या सुट्यांचा उपयोग या कामीं उत्तम रीतीने करता येईल. सुखासीन, आळशी व चैनी म्हणून त्याची सध्या जी बदनामी होत आहे तीहि त्यांना या पुण्यकर्माने धुऊन काढता येईल. शाळेंतील विद्यार्थ्यांनाहि शिकविण्याचें काम करतां येतें याचा अनुभव आम्हांला आला आहे. सुखवस्तु साशिक्षित स्त्रियांनी मध्यम व कनिष्ठ स्थितींतील स्त्रियांना शिक्षणाचा चुडा भरण्याचें मनांत आणल्यास निरक्षरतेचें मोठेंच क्षेत्र हस्तगत होणार आहे. राहता राहिला शिक्षकांचा वर्ग. परंतु सध्या त्यांच्यावर पडणारा कामाचा बोजा पाहिला म्हणजे त्यांना हें अधिक काम सांगण्याचा उत्साह वाटत नाही. यासाठीं सरकार, म्युनिसिपालिट्या, लोकल बोर्डें यांनी त्यांच्या कामाचे तास कमी केले तर त्यांना या साक्षरताप्रसाराच्या कार्याला आपल्या अनुभवाची व ज्ञानाची जोड देतां येईल. ज्ञानप्रसाराचें हें काम करण्यास सर्व वर्गांपेक्षां हाच वर्ग अधिक लायक आहे. अडाणी लोकांस वाचण्यास शिकवितेवेळीं आम्हीं शुद्धलेखनाच्या बाबतींतहि कांही सुधारणा केल्या आहेत आणि त्या म्हणजे ऱ्हस्व व दीर्घ स्वर असा भेद न करता दीर्घ स्वर ठेवण्यांत आला असून अनुच्चारित अनुस्वारांनाहि अर्धचंद्र देण्यांत आला आहे. या सुधारणांमुळे लिपिज्ञान सुलभतेने होऊन वाचण्याची कला लवकर येते असें आम्हांस अनुभवान्तीं कळून आलें. असो. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे प्रत्येकानें आपण एक तरी मनुष्य सुशिक्षित करूं अशी प्रतिज्ञा केली व शाळाधिकारी, शिक्षक आणि कॉलेजाचे प्रोफेसर यांनीहि संघटनेने कांही प्रयत्न चालविले तर अल्प काळांत साक्षरताप्रसाराचें कार्य उरकल्याशिवाय राहणार नाही."

# मासिक सिंहावलोकन

ता. १ चीन-जपानी युद्धाबद्दलचा 'लिटन रिपोर्ट' प्रसिद्ध झाला.

२ म. गांधींचा ६४ वा वाढदिवस सर्वत्र साजरा करण्यांत आला.

३ हिंदी क्रिकेट संघ इग्लंडहून मुंबईस दाखल झाला.

४ आयर्लंडचे गव्हर्नर जनरल मि. मॅक्नील यांनी राजीनामा दिला.

५ लीस्टर येथे मजूर पक्षाची सभा भरून म. गांधींचें सहकार्य गोलमेज परिषदेला सरकारानें मिळवावें असा ठराव झाला.

६ ब्लॅकपूल येथे ब्रिटिश हुजूरपक्षाची परिषद भरून हिंदुस्थानविषयक सरकारी धोरणाला पाठिंबा देण्यांत आला.

७ संयुक्त प्रांतांतील बुधालडा येथे शीख—मुसलमानांत गोवधावरून दंगा झाला. ८ माणसें ठार झालीं.

८ मद्रास येथील 'स्वदेशमित्रन्' पत्राचा सुवर्ण—महोत्सव श्री. न. चिं. केळकर यांचे अध्यक्षतेखालीं साजरा झाला.

११ हिंदी हॉकीसंघ युरोपांत २७ सामान्यांमध्ये विजयश्री संपादून मुंबईस परत आला.

१२ मुंबईच्या कायदेमंडळांत मि. जे. बी. पेटिट यानीं असा ठराव मांडला कीं, मध्यवर्ती सत्तेविरहित केवळ प्रांतिक स्वायत्तता दिली तर लोकांचा असंतोष उणावण्याऐवजीं दुणावेल मात्र. ठराव मंजूर झाला.

१४—१५ लखनौ येथे मुसलमानांची सर्वपक्षीय परिषद भरून मि. जिनांच्या १४ मागण्यांपैकीं १३ मागण्या कायम असल्याचें जाहीर करण्यांत आलें !

१७ लैलापूर येथे शीख समाजाची परिषद भरून आपल्या हक्करक्षणाच्या मागण्या त्यानी मांडल्या.

१७ भोरचे अधिपति यांनी संस्थानांतील शाळा, कोर्टें, कचेऱ्या यांमध्ये अस्पृश्यता मानली जाणार नाही असें आपल्या दरबारांत जाहीर केलें.

१८ सरहद्द कायदेमंडळांत शेतसारा निम्मा कमी करावा असा ठराव सरकारी विरोधास न जुमानतां मंजूर झाला.

१८ ब्रिटिश पार्लमेंटाची बैठक सुरू होऊन

ओटावा करारास मान्यता देण्याच्या बिलाचें पहिलें वाचन मंजूर झालें. रशियाशीं केलेला व्यापारी करार मोडण्यांत आला.

१८ इंग्लंडांतील बेल्फास्ट गावीं १० हजार बेकारानी दंगेधोपे व लुटालूट केली. ३ माणमें ठार व २५ घायाळ झालीं. ता. २७ रोजींहि लंडन येथें बेकारांनी मिरवणूक काढून दंगा केला व २०००० पोलिसांनी तो मोडला. ता. ३० रोजीं याच प्रकाराची पुनरावृत्ति निघाली ! ता. ३१ रोजीं लॅंकेशायर येथील १०००० विणकरांनी पगारकाटीमुळे संप पुकारला ! !

१९ कुलाबा जिल्ह्याचे डि. डे. कलेक्टर मि. कौंडिण्य यांजवर पनवेल येथे गोळीबार करण्यात आला. पट्टेवाल्यानी रिव्हॉल्व्हर पकडला, पण हल्ला करणारा इसम निसटला.

२० मुंबईच्या फ्री प्रेसची १० हजार रुपयांची जामिनकी रद्द करण्यांत आली. त्याच्या दोनतीन वर्षांच्या आयुष्यांतील ही सहावी जामिनकी होय ! ता. २७ रोजीं मालक व प्रकाशक यांजकडून पुनः प्रत्येकीं १०।१० हजार रुपयांचा म्हणजे एकूण २० हजार रुपयांचा जामीन मागण्यांत आला ! !

२२ तिसऱ्या गोलमेज परिषदेच्या ३१ प्रतिनिधींचीं नांवे जाहीर झालीं.

२३ सोलापूर येथे 'अखिल भारतीय स्वदेशी प्रदर्शन ' श्री. न. चिं. केळकर यांचे हस्तें उघडलें.

२४ मद्रास सदर्न मराठा रेल्वेवरील पेरांबूर कारखान्यांतील ५॥ हजार मजुरांनी संप पुकारला.

२६ पुणे येथे नगराध्यक्ष डॉ. नायडू यांचे अध्यक्षतेखाली सार्वजनिक सभा आणि हिन्दु महासभा यांचे वतीने सभा भरून श्री. न. चिं. केळकर यांना गोलमेज परिषदेला जाण्यास निरोप देण्यांत आला.

२८ श्री. न. चिं. केळकर हे पुण्याहून मुंबईस गेले. तेथे बॅ. जम्नादास मेहता यांच्या अध्यक्षतेखालीं महाराष्ट्रांतील ठिकठिकाणच्या राष्ट्रीय पुढाऱ्यांची परिषद भरून श्री. केळकर यांना निरोप देण्यांत आला. मुंबईच्या 'डेक्कन मर्चंटस् चेंबर ' नें दुसरे दिवशीं त्यांचा सन्मान केला.

२८–२९ पुणें येथे हिंदी ख्रिस्ती लोकांची परिषद डॉ.डिसूझा यांचे अध्यक्षतेखालीं भरली. तींत सरकारी जातिनिर्णयाचा निषेध करण्यांत आला व इतर जातींच्या पुढाऱ्यांशीं बोलणें करण्यासाठी एक कमिटी नेमण्यांत आली.

२९ म. गांधींची मुलाखत घेण्याची मौ. शौकतअल्लींनी परवानगी मागितली असता व्हाइसरॉयांनी ती नाकारली.

२९ गोलमेज परिषदेचे पुढील प्रतिनिधी मुंबईहून विलायतेस रवाना झाले.—( १ ) सर तेज बहादूर सप्रू ( २ ) श्री. मुकुंदराव जयकर ( ३ ) सर हेन्री गिड्नी ( ४ ) मि. चौधरी झाफरुल्लाखान ( ५ ) सर अकबर हैदरी ( ६ ) सरदार तारासिंग ( ७ ) सर ए. पी. पेट्रो ( ८ ) श्री. न. चिं. केळकर ( ९ ) डॉ. शफत अहमदखान.

३० सर अल्ली इमाम हे वयाच्या ६३ वे वर्षी हृदयाच्या विकाराने रांची येथे मरण पावले.

३१ भारतमंत्री होअर यांनी कॉमन्ससभेंत खुलासा केला कीं, ' गोलमेज परिषदेशीं कॉंग्रेसचें सहकार्य घडवून आणण्याच्या प्रयत्नास सुरुवात करण्याचे गांधींच्या हातीं आहे. '

३१ मुंबईच्या ' इंडियन मर्चंट्स चेंबर 'ने सर पुरुषोत्तमदास ठाकुरदास हे गोलमेज परिषदेंत भाग घेत आहेत म्हणून त्यांजवर निंदाव्यंजक ठराव पसार केला.

# अमृतलाल मुरारजींची सुटका

नाशिकच्या सेंट्रल जेलमधून शुक्रवार ता. ११ रोजीं दुपारीं अमृतलाल मुरारजी यांस सोडण्यांत आलें. त्यांना क्रि. प्रो. १०९ कलमान्वयें जामीन न दिल्याबद्दल एक वर्षाची शिक्षा झाली होती. अशा प्रकारें शिक्षा झाली असता तुरुंगामध्येंहि तुरुंगाधिकाऱ्याकडे जामीन देऊन सुटका होऊं शकते. फक्त असा जामीन दिल्यावर तुरुंगाधिकाऱ्याने शिक्षा देणाऱ्या मॅजिस्ट्रेटला त्याबद्दल कळवून त्याचा हुकूम आला म्हणजे सुटका करावयाची असा शिरस्ता आहे. अमृतलालांचे बाबतींत मात्र हा शिरस्ता कां पाळण्यांत आला नाहीं, याचा उलगडा मुळींच होत नाहीं. कारण येथे तुरुंगांत जामिनाचा अर्ज केला असता तुरुंगाधिकाऱ्याने तो परत करून ज्या सुरतेच्या मॅजिस्ट्रेटने अमृतलाल यांस शिक्षा दिली, त्याजकडे जाऊन हुकूम आणा असें सांगितलें !

### बिनशिक्याचा हुकूम !

अमृतलाल यांचे वडील बार्डोली तालुक्यांत वाराड येथे शाळामास्तर आहेत. त्यांना जेल सुपरिंटेंडेंटनेच पत्र पाठवून त्यांचा मुलगा नासिक जेलमध्ये आजारी असल्याचें कळविलें होतें, व त्यावरून ते, अमृतलालाची मातुश्री व इतर कांही नातलग नाशिकला आले. प्रथम ते अमृतलाल यांस जेलच्या रुग्णालयांत भेटले त्या वेळीं

अमृतलाल बोलण्याच्या स्थितींतहि नव्हते. त्यांनी येथे आल्यावर सुरतेस मनुष्य पाठवून तेथील मॅजिस्ट्रेटपुढें जामीन देऊन सुटकेचा हुकूम आणला व तो तुरुंगांत नेऊन दिला. पण या वेळींहि या हुकुमावर मॅजिस्ट्रेटचा शिक्का नाही म्हणून तो मानण्याचें सुपरिंटेंडेंटनें नाकारलें व शिक्का मारून हुकूम घेऊन येण्याबद्दल फर्माविलें. त्यावरून अमृतलालच्या इष्ट–मित्रांना पुनः एकदा सुरतेची यात्रा करावी लागली. शिक्क्या-सह हुकूम आल्यानंतर मात्र तो अमलांत आला व अमृतलालांची सुटका झाली.

### सिव्हिल हॉस्पिटलमध्ये रवानगी

सुटका करण्यापूर्वी तुरुंगांतच अमृतलाल यांची जबानी घेऊन ती नमूद करण्यात आली हें एक परीनें बरें झालें. कारण बाहेरच्या लोकांचा संपर्क होण्यापूर्वींच अमृतलालनें दिलेली जबानी शुद्धस्वरूपाची झाली, त्यांत इतरांच्या सांगीची भर पडण्यास अवकाश नव्हता असें म्हणतां येईल. रुग्णालयांतून सुपरिंटें-डेंटच्या ऑफिसांत अमृतलाल यांस स्ट्रेचरवरून आणलें. तेथून पुढे दोन माणसांनी दोहींकडे आधार देऊन त्यांस हळूहळू दरवाजाच्या बाहेर आणलें. तेथे गांवांतील चार प्रमुख डॉक्टरांनी त्यांची पुनः तपा-सणी केली. तेथे त्यांचा फोटोहि काढण्यांत आला व स्ट्रेचरवरून मोटारींत घालून येथील सिव्हिल हॉस्पि-टलमध्ये त्यांना पोंचविण्यांत आलें. अमृतलाल यांचें वय अवघें वीसबावीस वर्षांचें असावें. त्यांच्या अंगांत त्राण बिलकुल राहिलें नसून गात्रें विगलित झालीं आहेत. डोक्याच्या मागच्या बाजूस टेंगूळ आलें असून पायास सूज आलेली आहे. माकड-हाडावरील जखम अजून भरून आलेली नसल्यामुळे बांधलेली आहे. अंगावर ठिकठिकाणीं आयोडिन लावलेले व वण पडलेले दिसत आहेत. अजूनहि त्यांस बोलण्याचे श्रम होतात.

### चौकशीचें भवितव्य

अमृतलाल यांची जेलमध्ये अशी अवस्था झाली याच्या कारणांविषयी चौकशी होऊन त्याबद्दल जबाब-दार अशा लहानमोठ्या अधिकाऱ्यांवर लवकरच खटला होणार आहे व तो स्पेशल मॅजिस्ट्रेटपुढे चाल-णार आहे. मग तो तुरुंगाच्या आवारांत चालणार का बाहेर चालणार, कोणावर काय काय आरोप ठेवणार, त्यांत साक्षी कोणाच्या होणार इत्यादि गोष्टींबद्दल लोकांचे तर्क चालू आहेत. खटला सुरू होईपर्यंत कांही चर्चा करतां येत नाही. मात्र ज्या-अर्थी पोलीस अधिकाऱ्यामार्फत रीतसर चौकशी सुरू झाली आहे त्याअर्थी हें प्रकरण आता लवकरच जनतेपुढें आल्यावांचून राहत नाहीं. इन्स्पेक्टर–जनरल ऑफ प्रिझन्स हेहि नाशिकला येऊन गेले. खटल्याचा बनाव कसा होतो व त्यांत आणखी काय काय गोष्टी बाहेर येतात इकडे लोकांचें लक्ष वेधलें आहे.

## अस्पृश्यतेसंबंधीं वांईचा निर्णय

ता. २७-१०-३२ पासून ता. ३-११-३२ पर्यंत वांई येथे अस्पृश्यतानिवारणासंबंधीं साधकबाधक चर्चेचा एक व्याख्यानसप्ताह श्री. बाळासाहेब साठे यांच्या अध्यक्षतेखाली साजरा करण्यांत आला. त्या सप्ताहांत खालील मंडळींची भाषणें झालीं—

**वक्ते**—(१) श्री. रा. रा. शंकरराव जोशी (प्रचारक प्रा. पा. शाळा) ता. २७, (२) श्री. रा. रा. रामभाऊ भावे वकील (अध्यक्ष टि. स्मा. संस्था वांई) ता. २८, (३) वे. मू. निळंभटजी लेले (अध्यक्ष ब्रा. सभा वांई) ता. २९, (४) श्री. रा. भाऊराव पाटील (चालक सत्यशोधक बोर्डिंग हाऊस सातारा) ता. ३०, (५) श्री. रा. भाऊसाहेब भट वकील (निरूपणकार वांई) ता. ३१, (६) वे. शा. सं. दीक्षित बापुशास्त्री बापट (पांचवडकर) ता. १ (७) श्री. रा. विश्वनाथराव चिंचकर (संपादक उद्यमप्रकाश वांई) ता. २ (८) श्री. रा. पांडुरंगराव राजभोज (संपादक 'दलित-बंधु' पुणें.) ता. ३.

समारोपाचे दिवशीं अध्यक्षांनी सर्व व्याख्यानांचा निष्कर्ष म्हणून पुढील निर्णय जाहीर केला. शास्त्र व सदाचार म्हणजे रूढि यांचा त्याग न करिता सार्वजनिक रस्ते व पाणवठे, धर्मशाळा, बाजार जत्रा, शाळा या प्रसंगीं व स्थळीं अस्पृश्यतानिवारण करणें न्यायाचें होणार नाही असें नाहीं. किंबहुना आता तशी अस्पृश्यता ठेवणें देशकालपरिस्थिती-च्या मानाने अनिष्ट आहे.

### अस्पृश्यतेचे तीन प्रकार

अस्पृश्यतानिवारणाची व्याप्ति केवढी आहे ह्याचा विचार आता करणें जरूर आहे. अस्पृश्यतेचे प्रकार तीन आहेत. एक शौचास्पृश्यता, दुसरी व्यव-सायास्पृश्यता व तिसरी जन्मास्पृश्यता. शौचास्पृश्यता म्हणजे सोंवळयाओंवळयांतील, व्यवसायास्पृश्यता म्हणजे धंद्यामुळे उत्पन्न झालेली आणि जन्मास्पृ-श्यता म्हणजे जन्मतः उत्पन्न झालेली. शौचास्पृश्यता ही जाणें इष्ट नाही व शक्यहि नाही. स्नान करून सोवळ्याने धूतवस्त्र नेसून जल घेऊन

सार्वजनिक रस्त्यांने जाणारी कोणाहि जातीची व्यक्ति असली तरी पारोशा कपडे घातलेल्या माणसाने त्या व्यक्तीस स्पर्श करतां उपयोगी नाही. ब्राह्मणाब्राह्मणांत ही अशा प्रकारची अस्पृश्यता प्रत्यक्ष मानली जात आहेच.

हीच गोष्ट पाणवठ्यांची व धर्मशाळांची. हल्लीं स्नान करतांना, वस्त्रें धुतांना अगर धर्मशाळेंतून स्वयंपाक करतांना स्पृश्य समाजांत जो तारतम्यानें भेद असतो, तो कायमचा राहणार आहे; व नवीन स्पृश्य होणारासहि लागू आहे. कोणाहि जातीची व्यक्ति पाणवठ्यावर असतां एकमेकांवर पाणी न उडविणें व मर्यादा राखणें हा आचार हल्लींहि रूढच आहे. इतर ठिकाणें म्हणजे बाजार, शाळा, जत्रा ह्या स्थळीं सर्व व्यवहार पूर्ण ओंवळयानें चालत असल्यामुळे त्या ठिकाणीं सोंवळयांतील अस्पृश्यतेचा संबंध नाही. त्या स्थळीं सर्व स्पृश्य व नूतन स्पृश्य हिंदूंनीं एकत्र व्यवहार करण्यास हरकत नाही.

### देवालयप्रवेशाची मर्यादा

याच ठिकाणीं सार्वजनिक देवालयाचा विचार करणें जरूर आहे. ह्या बाबतींत देशाचार भिन्न भिन्न आहेत. परंतु देवालयें ही धर्माची प्रत्यक्ष बाब समजली जाते व देवालयाबद्दलच्या भावनाहि इतर सार्वजनिक ठिकाणापेक्षा अत्यंत पवित्र असतात. त्याचप्रमाणें कोणाहि व्यक्तीची भावना न दुखविता हा प्रश्न सोडविणें जरूर आहे. या बाबतींत पुढील तऱ्हेने तजवीज करणें अन्यायाचें होणार नाही. गाभाऱ्यांत (कीर्तिमुखाच्या आंतील भाग) पुजाऱ्याखेरीज इतर सोंवळयाने येणाऱ्या ब्राह्मणांस अनुष्ठानाकरिता अगर दर्शनाकरिता हरकत नसावी. सभामंडपांत कीर्तिमुखापर्यंत सर्व स्पृश्य समाजाला कपडे घालून दर्शनाची मोकळीक असावी. नवीन स्पृश्य होणाऱ्या लोकांनी प्राकारातून म्हणजे अंगणांतून सभामंडपाच्या पायऱ्यापासून दर्शन घ्यावें. खाजगी मालकीचीं देवालयें, खाजगी दिलेलीं देवालयें, हेतुपुरस्सर उत्सर्ग केलेलीं देवालयें ह्यांचा प्रश्न ह्या क्षेत्रीं येत नाही. त्यांचा विचार मालकांनी मूळ हेतु लक्षांत ठेवून, वरील विचारसरणी पटल्यास अवश्य करावा अशी त्यांना विनंति करणें जरूर आहे.

आता व्यवसायास्पृश्यतेसंबंधी बोलावयाचें झाल्यास कातडें कमावण्याचे धंदे (चांभार, ढोर,) मृत गुरें फाडणें व बांधकाचे धंदे (महार, मांग,) गलिच्छ धंदे (भंगी झाडू) हे धंदे करीत असता अस्पृश्यता राहावी. रोजच्या कामांतून बाहेर पडल्यावर त्यांना इतरांप्रमाणेच वागविण्यांत यावें.

आजच्या अस्पृश्यांनी ज्ञानसंपन्न व्हावें, शुचिर्भूतपणा स्वीकारावा, मृतमांस भक्षण करूं नये, इतर अवगुणापासून परावृत्त व्हावें. त्यांच्या उन्नत्यर्थ सर्व स्पृश्य समाज त्यांच्याशीं सहकाराने व सहानुभूतीने वागेल यात शंका बाळगूं नये. एकमेकांच्या अनुमतीने जितकें पाऊल पुढे पडेल तितकें टिकेल. दंडेलीने प्रगति खुंटेल मात्र.

हिंदु धर्माची शिकवण प्रत्येकाने स्वधर्माच्या आचरणाने पायरी पायरी उन्नति करून घ्यावी अशी आहे. धर्माचरणानेच अभ्युदय व निःश्रेयस यांची प्राप्ति होते याकरितां पांचहि वर्णांनी ऐहिक मोक्ष व पारलौकिक मोक्ष यांच्या प्राप्त्यर्थ धर्माची कांस धरावी 'धर्मात् अर्थश्च कामश्च' अशी घोषणा महर्षि व्यासांनी केली आहे. व ती घोषणा चिरंतन, सुखदायी व उन्नतिप्रद आहे.

# महाराष्ट्राची औद्योगिक प्रगति

नोकरी म्हटली कीं ती सरकारी असा आपल्याकडे सर्वसाधारण समज होऊन बसला आहे. व तो सद्यःस्थितींत सुशिक्षित वर्गापुरता खराहि आहे. कारण लक्षावधि सुशिक्षितांना काम देतां येईल असें सामर्थ्य हिंदुस्थानांत तरी एकट्या सरकारांतच आहे. म्हणून कोणी माणूस नोकरी पाहत असला व त्याला ती मिळत नसली म्हणजे स्वतंत्र धंद्यांत पडण्याचा उपदेश करण्यांत येतो. परंतु मनुष्य एकटा व्यक्तिशः उभारील असे धंदे फार थोडे आणि तेहि कमी प्रतीचे व कमी प्राप्तीचे असतात. वाण—सौद्याचें दुकान, कापड विकण्याचें दुकान, किंवा कपडे शिवण्याचें दुकान इत्यादि धंदे व्यक्तिशः चालविण्यासारखे आहेत व त्यांत जरूर त्याने शिरावेंहि; तथापि या प्रकारचे धंदे वरिष्ठ प्रतीच्या सुशिक्षितांस शोभणारे नाहीत व त्यांच्या शिक्षणाचें चीजहि करणारे नाहीत.

सांप्रत युनिव्हर्सिटींतून पदव्या घेऊं इच्छिणाऱ्या तरुणाच्या मनोवृत्तींत पालट पडलेला स्पष्टपणाने दिसून येतो. पूर्वी आर्ट्स कोर्सकडे जाऊन बी. ए. होण्याचीच तरुणांची हाव असे. परंतु या पदव्या देणारे कारखाने शहरोशहरीं निघाल्याने त्या वाणाचा माल मातीमोलाने विकण्याची पाळी येताच पालकांची व विद्यार्थ्यांचीहि त्या मार्गावरील श्रद्धा उडून ती निराळ्या शिक्षणक्रमाकडे वळली आहे. ऐपतवान पालकें आपल्या मुलांना बी. ए. च्या

शिडीवर न चढवितां शक्य तर शास्त्र,शिल्प, वैद्यक, कृषि, व्यापार इत्यादि वाटा दाखवून बी. एससी. बी. ई., एम्. बी. बी. एस., बी. एजी., बी. कॉम्. या पदव्या हस्तगत करावयास सांगतात. नवीं नवलाई या दृष्टीनें वरील पदव्यांपैकीं कांहीं पदव्यांची आरंभी चहा झाली. व डॉक्टराची पदवी घेतलेल्यांना अगदींच आकाशाकडे पाहत बसण्याची दुर्दशा आजहि ओढवली आहे असें नाहीं. नव्या डॉक्टरांना पूर्वीप्रमाणें पाण्यासारखा पैसा मिळत नसला तरी चार–दोन वर्षांच्या कसरतीनंतर आब राखून प्रतिष्ठेने प्रपंच चालविण्यास त्यांस पंचाईत पडत नाहीं. परतु सर्वांनीं त्या एकाच धंद्यांत दाटी करणें इष्ट नाहीं व शक्यहि नाहीं. खेरीज त्यांतील प्राप्तीचें मानहि उत्तरोत्तर उतरतच जाईल यांत शंका नाहीं.

डॉक्टरीची पदवी सोडून बाकीच्या पदव्यांकडे पाहिल्यास बी. ए. पेक्षा त्यांची रया फारशी अधिक राहिलेली नाहीं. खरें म्हटलें असता बाकीचे पदवीधर भौतिक शास्त्रें, शिल्प, कृषि व व्यापार यांत निष्णात. त्यांचें कार्यक्षेत्र किती तरी विस्तीर्ण ! सुधारलेल्या राष्ट्रांनीं आपली सारी संपत्ति या शास्त्रांच्या परिशीलनानें कमावली. विमानांचें गगनोदरात उड्डाण, मोटारीचा वायुवेग, धुरावांचून आगगाडी, तारांवांचून संदेश, माणसावांचून संभाषण आणि सजीवाप्रमाणे छायाचित्रांचा नाच इत्यादि विस्मयकारक चमत्कार पाश्चात्य देशांतील भौतिक शास्त्रज्ञच करून दाखवीत नाहींत काय? बोरघाटांतील बोगदे, सक्करचा बराज व भाटघरचा बंधारा हीं प्रचंड कामें शिल्पशास्त्रज्ञांनीच बांधलीं नाहींत काय ? मुंबई, कलकत्ता, मद्रास, कराची येथील कोट्यवधि रुपयांची उलाढाल करणाऱ्या पेढ्या, बँका, इन्शुअरन्स कंपन्या व्यापारविशारदांनीच चालविल्या नाहींत काय ? महायुद्धांत बीटरूटपासून साखर काढण्याचे ऑस्ट्रिया-हंगेरी–प्रभृति देशांतील कारखाने बंद पडले. त्या वेळीं जावा बेटांतील डच मळेवाल्यांनी शास्त्रज्ञांना हाताशीं धरलें, त्यांजकडून 'मेंडेलियन' नियम मानववंशाप्रमाणे वनस्पतींनाहि लागू पडतात कीं नाहीं याचे प्रयोग करून पाहिले आणि अशा रीतीनें उसांतील साखरेच्या अंशाचें प्रमाण पुष्कळ पटींनी वाढवून साखरेपासून अधिक फायदा मिळविला व त्याबरोबरच मनुष्यबळ वांचविलें हें तरी कृषिशास्त्रवेत्त्यांच्या अकलेचेंच द्योतक नव्हे काय ?

महाराष्ट्रभूमीनें आपल्या पोटांत खनिज संपत्ति किती दडवून ठेविली असेल ती असो, पण तिची रूपसंपदा असाधारण आहे यांत शंका नाहीं.. पश्चिमेस विस्तीर्ण रत्नाकर तिचें चुंबन घेत निजबरोबर अष्टौ प्रहर गोष्टी सांगत व तिला पंख्यानें वारा घालीत बसला आहे. गिरिराज सह्याद्रि रत्नखचित मुकुट चढवून व सोन्यामोत्यांच्या आभरणांनी व मौल्यवान् वस्तूंनीं आपला भव्य देह सजवून सम्राटाप्रमाणें वैभव मिरवीत आहे. त्याच्यापासून वाहणाऱ्या कृष्णा, गोदावरी, भीमा, प्रवरा इत्यादि नद्या या कसबी कारागिरानीं ओढून लांबविलेल्या जणुं काय जरीच्या चकचकीत ताराच होऊन राहिल्या आहेत. निसर्गाची अशी बहाल मर्जी महाराष्ट्रावर आहे. तिच्या या सहज सौंदर्यांत ब्रिटिश राज्यकर्त्यांच्या वाणिज्यवृत्तीलाहि द्रव्यलोभानें भरच टाकावीशी वाटली. लहानमोठ्या नद्यांना त्यांच्या मनपसंत मार्गांपासून त्यांनी बळेंच वळवून शुष्क मैदानांना व माळरानांना रंगविण्यासाठी नेलें व त्यांजकडून मनोहर चित्रपट काढून घेतले. त्या चित्रपटांकरिता व विजलीच्या बत्तीकरिता पुण्याच्या पश्चिमेस आणि सह्याद्रीवरील शांत व प्रसन्न वनश्रीच्या छायेत जीं अफाट सरोवरें निर्माण करण्यांत आलीं आहेत त्या योगानें तो प्रदेश स्कॉटलंडांतील सरस्तटाकांप्रमाणे कविजनांना स्फूर्तिदाता गुरुच होऊन राहिला आहे.

महाराष्ट्राचें हे सर्व नैसर्गिक सौंदर्य नेत्रांना संतोषवील, पण पोटांतील आग मात्र शांत करणार नाहीं. किंबहुना ही आग दिवसानुदिवस भडकतच आहे म्हटलें तरी चालेल. उद्योगधंदे व कलाकौशल्य हे राष्ट्राच्या जीवनाचे झरे आहेत. महाराष्ट्रांत पाण्याचे झरे डोंगरकपारींतून व दऱ्याखोऱ्यांतून झुळझुळ वाहातांना ऐकूं येतात. पण जीवनाचे झरे मात्र कोठें फारसे दिसत नाहींत व ऐकूंहि येत नाहींत. मराठ्यांच्या या देशावर इंग्रजानीं आपलें छत्र धरल्यास झालेल्या काळांत अकरा वर्षे भरीला घातलीं असता सव्वाशें वर्षें पुरीं होतील. इंग्रजी राज्य झाल्यापासून काल जितका पुढे गेला तितका औद्योगिक दृष्ट्या महाराष्ट्रहि पुढे गेला काय हें उत्सुकतेनें पाहण्यासाठीं निघणाराच्या भेटीसाठीं निराशाच सामोरी येईल यांत शंका नाहीं.

या काळांत गिरण्यांचा धंदा हिंदुस्थानांत बराच भरभराटला. त्याचीं मुंबई, अहमदाबाद, कानपूर, नागपूर इत्यादि प्रचंड केंद्रें बनलीं. महाराष्ट्रांतहि सोलापूर, बार्शी, अमळनेर, धुळें इत्यादि शहरीं गिरण्यांचीं गगनचुंबित धुराडीं धूर सोडूं लागलीं. त्या धुराड्यांनी धूर सोडून कोणाच्या डोळ्यांवर सोन्याचा धूर चढविला असला तर त्याचें श्रेय महाराष्ट्रीयांना नाहीं. बेलापुरास साखरेचा कारखाना निघाला व त्या साखरेनें स्वदेशी म्हणून पुष्कळांचें तोंड गोड केलें. पण त्या गोडीला घरच्या साखरेच्या गोडीची सर खास येणार नाहीं. त्या बहुतेक गिरण्या व तो कारखाना महाराष्ट्रीयांनी स्वतःच्या मोठेपणाकरिता फार तर

आपला म्हणावा. तथापि खऱ्या अर्थाने त्या यशाचा फारच थोडा वांटा महाराष्ट्राच्या पदरीं पडतो. आता वरील उद्योगधंद्यांच्या उत्पादकांपैकीं बरेच जण पिढ्यानुपिढ्या महाराष्ट्रांत राहत असल्यामुळे ते आपणास महाराष्ट्रीय म्हणवीत असतील व त्यांत भूषणहि मानीत असतील. पण आम्ही ज्या भावाने वरील सूक्ष्म फरक मुद्दाम करतों तो त्यांच्याहि लक्षांत आल्यावांचून राहणार नाही.

खास महाराष्ट्रीयांनी चालविलेल्या कारखान्यांस दुसऱ्या किंवा तिसऱ्या प्रतीचेंहि स्थान देतां येईल कीं नाही याची शंकाच आहे. त्यांच्यापैकीं एकाहि कारखान्याचें भांडवल कोटि, अर्ध कोटि किंवा पाव कोटीचेंहि भरणार नाही. त्यांची कुवत दहा पांच लाखांच्या आंतबाहेर व त्यांची संख्या हाताच्या पांच बोटांच्या आंत बाहेर. तळेगांवची काचशाळा, ओगल्यांचे काच–कंदिल, किर्लोस्करांच्या नांगर–खुर्च्या आणि टिकेकर–वेलणकरांचीं लुगडीं-पातळें यांचेच मागून पुढून गुण गाऊन कोणासहि समाधान मानावें लागेल. या महाराष्ट्राच्या कर्तबगारीचा हा अल्पारंभ क्षेमकर आहे पण ती शीग समजली तर महाराष्ट्राची दृष्टि अगदींच कोती ठरेल. याखेरीज पाव–बिस्किटांच्या भट्ट्या, गाई–साबणांचे धंदे व औषधांच्या रसशाळा पुणें, मुंबई, येवलें, पनवेल इत्यादि लहानमोठ्या शहरांतून किफायतशीर रीतीने सुरू असून पुण्या–मुंबईत साध्या व विजेच्या पण अस्सल देशी घड्याळांनीहि आपला जम चांगला बसवीत आणला आहे. नव्या जुन्या अशा दोन इन्शुअरन्स कंपन्या आहेत व त्या जोमाने चालल्या आहेत. या विविध अंगांनी महाराष्ट्रीयांची बुद्धिमत्ता, कल्पकता व उद्योगप्रियता सिद्ध झाली असली तरी इतर प्रांतांतील औद्योगिक प्रगतींच्या मानाने महाराष्ट्राची प्रगति अत्यंत मंदच मानावी लागेल.

महाराष्ट्रांत बुद्धिसामर्थ्य प्रचंड आहे, ज्ञानलालसा जबर आहे, विद्याभिरुचि स्पृहणीय आहे, स्वार्थत्याग अनुकरणीय आहे, अल्पसंतुष्टता आश्चर्यकारक आहे व धाडसहि कौतुकास्पद आहे. या सद्गुणांची योग्य कार्याकडे योजना केल्यास महाराष्ट्राचे पांग फिटण्यास विलंब लागणार नाही. अखिल हिंदुस्थानाचा औद्योगिक भाग्योदय केव्हा होईल तेव्हा होवो. परंतु आहे या स्थितींतहि महाराष्ट्र इतर प्रांतांच्या मागे पडला आहे याचीं कारणें पुढीलप्रमाणें नमूद करतां येतील. गुजराथेंत धनिक असा व्यापारी वर्ग आहे. संयुक्त प्रांत व बंगाल यांत तालुकदारांचा व जमीनदारांचा सधन वर्ग आहे. त्या त्या प्रांतांच्या उन्नतीला त्यांच्या संग्रहांतील द्रव्य अनेक रीतींनी उपयोगी पडतें. गुजराथेंतील श्रीमान शेटजी युरोपच्या वारंवार वाऱ्या करून तिकडे झपाट्याने सुरू असलेल्या औद्योगिक प्रगतीचीं सूक्ष्म कारणें समजून घेतात व त्या धर्तीवर आपल्या इकडील उद्योगधंद्यांत सुधारणा घडवून आणितात. पैशाकडे पैसा जातो या न्यायाने त्यांची संपत्ति अधिकाधिक वाढतेच आहे. पण त्याबरोबर त्यांच्या वाढत्या वजनाचा सरकारदरबारावरहि परिणाम होऊन त्याचा फायदा कोणत्या ना कोणत्या रूपाने त्यांना आपल्या प्रांताला द्यावयास सांपडत आहे. त्यांचीं व्यापारी वळणें, ज्ञान व अनुभव यांची योग्यता त्यांच्या जवळच्या द्रव्याहूनहि अधिक आहे. त्यांना आपल्या समाजांतील होतकरू तरुणांना शिक्षणाच्या बाबतींत योग्य ती दिशा दाखवून व्यापारधंद्यांत समाविष्ट करून घेतां येतें व एकंदर गुजराथी समाजच सधन असल्यामुळे जे सुशिक्षित लोक वकील, डॉक्टर, बॅरिस्टर, सॉलिसिटर अशा व्यवसायांतून आहेत त्यांना व त्यांच्यांतील हरएक चळवळीला त्यांचा आश्रय चागला मिळतो. यामुळे नोकरपेशाच्या मनुष्यास नोकरी मिळणें जड जात नाही व व्यापारधंद्याची हौस बाळगणाऱ्या तरुणास भांडवल न धंदा शोधण्याचीहि सहसा अडचण पडत नाही. या दृष्टीने महाराष्ट्रीय समाजाची गुजराथी समाजाशीं तुलना केल्यास गुजराथी समाजाचें पाऊल प्रत्येक क्षेत्रांत महाराष्ट्राच्या फारच पुढे असल्याचें आढळून येतें.

बंगाल व महाराष्ट्र यांचें कांही बाबतींत बरेंच साम्य आहे. महाराष्ट्राप्रमाणेच त्याचा शिक्षणाकडे ओढा आहे उद्योगधंद्यांचें वाळकडू महाराष्ट्रीयांसारखेंच बंगाली लोकांनाहि नाही. शिक्षण संपलें कीं ते नोकरीच शोधतात. पण त्यांच्यांतील जमीनदारांचा वर्ग सधन व सुशिक्षित असून त्यांची साधनसामग्री बंगालच्या आधुनिक उद्धारास बऱ्याच अंशीं कारण झाली असावी. बंगाल्याइतकें परदेशांत शिक्षण संपादन करून परत आलेले तरुण हिंदुस्थानांतील इतर प्रांतांत क्वचितच सांपडतील. शास्त्रें व कला यांची बंगाली लोकांस विशेष आवड असून त्या शाखांत केवळ या देशांतच काय पण साऱ्या जगांत त्यांनी नांव गाजविलें आहे. सर जगदीश चंद्र बोस, प्रफुल्ल चंद्र राय व डॉ. रवींद्रनाथ टागोर हीं नररत्नें बंगाल प्रांतच प्रसवला. कलकत्त्यातील पहिल्या दोघांच्या प्रयोगशाळा व त्यांच्या स्फूर्तीने व सल्ल्याने भरभराटीस आलेली बेंगॉल केमिकल वर्क्स ही संस्था यांनी भौतिक शास्त्रांत बंगाल्यास अग्रेसरत्वाचा मान यापूर्वीच दिला असून त्याच्या बळावर बंगालचा भाग्योदय समीप आला आहे असें समजण्यास हरकत नाही. कोमिल्ला येथें बंगाल्यांतील बेकार तरुणांनी सन

१९२२ सालीं एक श्रममंदिर उघडलें. त्याचें भांडवल प्रारंभीं केवळ २१० रुपयांचें होतें. त्यांतील तरुण मोलमजुरी करून पोट भरीत, पण त्यांनी आपल्या परिश्रमानें सदर संस्था आता इतकी रंगारूपाला आणिली आहे कीं तिच्याजवळ दोन लक्ष रुपयांचें भांडवल जमून त्यांच्या आधारें त्यानीं वीज पुरविण्याचा कारखाना काढला आहे. इतर ठिकाणच्या बेकार तरुणांना हें उदाहरण स्फुरणदायक नव्हे काय?

सारांश, गुजराथ प्रांताला सधन व सुशिक्षित व्यापारी वर्ग लाभला आहे व त्याजकडेच त्या प्रांताचें पुढारीपण आहे. बंगाल्यांतील जमीनदार सधन व सुशिक्षित आहेत. खेरीज त्या प्रांताला जगप्रसिद्ध शास्त्रज्ञहि लाभले आहेत. बंगालचें औद्योगिक पुढारीपण स्वाभाविकपणें त्यांजकडेच आलें आहे. महाराष्ट्र हा वरील दोनहि प्रांतांच्या गुणास पारखा आहे. त्याच्यांत सुशिक्षित व सधन व्यापारी वर्ग नाही, व्यापाराचें परंपरागत ज्ञान व अनुभव नाही आणि बंगाल्याप्रमाणे नामांकित शास्त्रज्ञहि नाहीत. या कारणानें इकडील सुशिक्षित तरुणांना कोणीहि मार्गदर्शक नसल्यामुळे त्यांची स्थिति दीनवाणी झाली आहे. भौतिक शास्त्र, शिल्प, व्यापार, कृषि इत्यादिकांत पारंगतता मिळविलेले शेकडो तरुण बुद्धिवान व होतकरू पदवीधर बेकार बनून घरोघरीं स्वस्थ बसले आहेत. त्यांना वाणसौद्याचीं किंवा कापडाचीं दुकानें घालण्यास सांगणें म्हणजे त्यांच्या ज्ञानाची हेटाळणी करणें नव्हे काय? त्यांतील प्रत्येकानें वेगवेगळा धंदा काढणेंहि अव्यवहार्य आहे. सामुदायिक भांडवलावर सामुदायिक पद्धतीनें धंदा निघावा व त्यांत इतरांनीं भागीदारीनें किंवा नोकरपेशानें राहावें हाच स्वाभाविक क्रम होय.

धंदे म्हटले म्हणजे कांहीं लहान प्रमाणावर कांहीं मोठ्या प्रमाणावर काढतां येण्यासारखे असतात. धंदा लहान काय किंवा मोठा काय तो उत्पादक असला तरच राष्ट्रोन्नतीचा समजला जाईल. तरुण मनुष्य शिक्षण संपवून बाहेर पडल्यानंतर त्याला कोणता धंदा काढावा व तो कसा फायदेशीर होईल त्याची कल्पना नसते. यासाठी त्यांतील अनुभविक व तज्ज्ञ गृहस्थांनीच त्याची पूर्वतयारी करून ठेवली पाहिजे. पुण्यांत कॉलेजें अनेक आहेत. त्यांतून शास्त्रें व विद्या यांत परदेशांत जाऊनहि पारंगतता मिळविलेले प्रोफेसर आहेत. त्यांचें लक्ष तरुणांच्या अडचणींकडे लागलें असल्याचें स्पष्ट दिसतें. तरुणांच्या औद्योगिक शिक्षणाची अल्पस्वल्प तरतूद करण्याची कल्पना येथील शिक्षण प्रसारक मंडळीच्या डोक्यांत सांप्रत घोळत आहे हें त्याच कळकळीचें द्योतक होय. त्यांचा हा उद्योग स्तुत्य व आवश्यकहि आहे. परंतु एकंदर महाराष्ट्राच्या बेकारीचा प्रश्न सोडवावयाचा झाल्यास तो अगदी निराळ्या रीतीनें व व्यापक प्रमाणावर सोडवावयास घेतला पाहिजे. धंद्यांचें ज्ञान, भांडवल व निवड यांची सांगड जमली पाहिजे. ज्ञान आहे पण भांडवल नाही; भांडवल आहे पण धंद्याची निवड होत नाही. निवडहि कदाचित होईल, पण सहकारित्व नाही अशी दुरवस्था असून तिजवर संघटना हा एकच उपाय होय. ही संघटना घडवून आणण्याची पूर्वतयारी पुण्यासारख्या विद्येच्या केंद्रस्थानीं महाराष्ट्राची औद्योगिक परिषद भरविल्यास तिच्यांत होणारी आहे. अशा प्रकारच्या परिषदा राष्ट्रीय सभेबरोबर भरविण्याची पूर्वी वहिवाट होती; पण अलीकडे ती बंद पडून फक्त स्वदेशी प्रदर्शनेंच उघडलीं जातात. अखिल हिंदुस्थानाकरिता असलेल्या परिषदेची गरज कदाचित् आता नसेल, पण विशिष्ट प्रांताच्या गरजा व अडचणी लक्षांत घेतां ती अद्यापि आहे इतकेंच नव्हे तर तिची आवश्यकता तीव्रतेनें भासूं लागली आहे. महाराष्ट्राचें लक्ष या प्रश्नाकडे वळावें व त्या दिशेनें त्याजकडून कांही उपक्रम व्हावा या उद्देशानेंच प्रकृत विषयाचा ऊहापोह आज केला आहे.

# कोकण-प्रांतीय मराठी-साहित्य-संमेलन

## अध्यक्ष प्रो. काणे यांचें भाषण

ठाणें येथे कोंकण प्रांताचे साहित्य-समेलन ता. ५।६ रोजीं भरलें त्या वेळीं अध्यक्ष या नात्याने रा. पांडुरंग वामन काणे यांनी खालील आशयाचें भाषण केलें.

"ज्याला आपण हल्ली कोंकण असें म्हणतों त्या प्रदेशाला फार प्राचीन काळीं अपरान्त म्हणत असत. इ. स. पूर्वी तीनशेंपासून तो इ. स.च्या चौथ्या पांचव्या शतकापर्यंत दक्षिणेकडे बनवासे किंवा केरल (मलबार) येथपासून तों उत्तरेस सुरतपर्यंत पसरलेल्या देशाला अपरान्त हे नांव होतें. प्राचीन कालापासून कोंकणाचे सात भाग होते असें वर्णन आहे. हे सात विभाग कोणते याबद्दल विद्वानात फार वाद आहे. सह्याद्रिखंडांत (उत्तरार्ध अ. ६. ४७-४८) केरल, तुलंग, सौराष्ट्र, कोंकण, करहाट, करनाट, बर्बर हे सात कोंकणदेश आहेत असें सांगितले आहे. हे सात विभाग कोणतेहि असले तरी कोंकणाचे १४०० गावें असलेला उत्तर कोंकण व ९०० गावें असलेला दक्षिण कोंकण असे दोन भाग प्राचीन काळापासून होते यांत संशय नाही. खारेपाटण येथील शिलालेखांत शिलाहार अनन्तपाल १४०० ग्राम असलेल्या कोंकणाचा राजा होता असें म्हटलें आहे. त्याचप्रमाणे शके ९१९ मधील भादान ताम्रपटांत शीलार अपराजित याने १४०० गावें असलेल्या कोंकणातील माहिरिहारविषयान्तर्गत भादान गांव दान दिल्याचा उल्लेख आहे. कल्याणी येथील चालुक्यवंशीय सम्राट विक्रमादित्य आहवमल्ल याचा महामण्डलेश्वर गोवा कादम्ब जयकेशी(दुसरा) हा इ. स. ११२५-२६ मध्ये, ९०० गांव असलेल्या कोंकण, पलसिगे १२०००, पग्वे ५००, कवडीद्वीप (सपाद लक्ष, सवालाख) या प्रदेशांवर राज्य करीत होता असें वर्णन आहे. तेव्हा गोव्यापासून ठाणें व त्याच्या उत्तरेच्या प्रदेशाला कोंकण म्हणत होते व या कोंकणांत १४०० गावें असलेला उत्तरेकडील भाग व ९०० गावें असलला दक्षिणेकडील भाग या दोघांनाहि कोंकण हीच देशवाचक संज्ञा होती असें सिद्ध होतें.

## प्रसिद्ध संस्कृतवाङ्मयोपासक

कोंकण प्रांत हा आर्यावर्ताच्या एका टोंकाला आहे. प्राचीन काळीं दळण-वळणाचीं साधनें फार थोडीं होतीं आणि सह्याद्रीसारख्या दुर्भेद्य पर्वतराजाचे पायथ्याशीं कोंकण देश आहे तरी काश्मीरक उद्भट याने 'काव्यालंकारसारसंग्रह' या नांवाचा एक अलंकारशास्त्रपर ग्रंथ लिहिला आहे, त्यावर इन्दुराज याने विद्वत्तापूर्ण अशी टीका लिहिली आहे, हा इंदुराज (किंवा प्रतीहारेन्दुराज) मूळ कोंकणचा रहिवाशी होता असें त्याने टीकेच्या शेवटीं दिलेल्या श्लोकांत म्हटलें आहे. ह्या इन्दुराजाचा गुरु मुकुल नांवाचा काश्मीरक महाविद्वान् होता. त्याच्यापाशीं इन्दुराजाने कोंकणांतून जाऊन अलंकारशास्त्राचें अध्ययन केलें हे विशेष लक्षांत ठेवण्यासारखें आहे. मुकुलभट्ट इ. स. ९२५ च्या सुमारास झाला हें मीं 'संस्कृत साहित्यशास्त्राचा इतिहास' या पुस्तकांत (पान १४६) दाखविलें आहे. याज्ञवल्क्यस्मृतावर अपरार्क किंवा अपरादित्य याची फार विस्तृत अशी टीका आहे. ही टीका मिताक्षरा टीकेच्या खालोखाल योग्यतेची आहे. एका बाबतींत तर ती मिताक्षरा टीकेपेक्षाहि श्रेष्ठ आहे. तिच्यांत प्राचीन स्मृति व इतर ग्रंथ यांचीं अवतरणें मिताक्षरेपेक्षांहि जास्त देण्यांत आलीं आहेत. ही टीका अपरार्काने इ स. च्या १२ व्या शतकाच्या पूर्वार्धांत लिहिली व ती आज काश्मीरामध्ये अत्यंत प्रमाण म्हणून मानली जाते हें विशेष लक्षांत ठेवण्यासारखें आहे. कोंकण व काश्मीर यात शेकडों कोसांचें अंतर असूनहि त्यांचा परस्परांशी वाङ्मयाचे बाबतींत विशेष संबंध होता हे यावरून दिसते.

मंखाच्या श्रीकंठचरितांत कुंकणेश्वर अपरादित्य याने काश्मीर देशाचा राजा जयसिंह याजकडे (सन ११२९-११५०) तेजकंठ नांवाचा आपला दूत पाठविला होता असें वर्णन आहे (सर्ग २५ १०९ १११). भारत वर्षांत जे प्रसिद्ध ज्योतिर्विद होऊन गेले त्यात गणेश दैवज्ञ हा अग्रगण्य आहे. याचा ग्रहलाघव हा ग्रंथ अतिप्रसिद्ध आहे. हा ग्रंथ शके १४४२ च्या सुमारास लिहिण्यांत आला. या ग्रंथावरूनच भारतवर्षातील बहुतेक जुन्या मतांचीं पंचांगें करण्यांत येतात. गणेश दैवज्ञ हा मुरुड जंजिरा संस्थानांतील नान्दगाव (नान्दग्राम) येथील होता. क. दीक्षितांचें भारतीय ज्योतिःशास्त्र (पान २५८-२५९) अनन्तसुत काशीनाथोपाध्याय (ऊर्फ बाबा पाध्ये) यांचा धर्मसिन्धु हा ग्रंथ आज शेंभर-सवाशें वर्षे महाराष्ट्रांत किंवा अखिल भरतखण्डांत विद्वन्मान्य आहे. रत्नागिरी जिल्ह्यांतील गोळवली हें पाध्यांचें मूळ वसतिस्थान होय. बाबा पाध्यांचे वडील हे रत्नागिरी जिल्हा सोडून पंढरपूर येथे येऊन राहिले असें धर्मसिन्धूंतच सांगितलें आहे.

ज्याप्रमाणें संस्कृतवाङ्मयांत या भूमीच्या सुपुत्रांनीं भर घालून कोंकणाला मोठेपणाला चढविलें

त्याप्रमाणें आंग्ल राजवटीच्या पूर्वी मराठी वाङ्मयांतहि कोंकणप्रान्तीयांनी भर घातलेली आहे. प्रसिद्ध भगवद्भक्त व कविचूडामणि मोरोपंत यांचें घराणें कोंकणांतीलच असून त्यांचे वडील घाटांवर आले. याखेरीज् विठ्ठल नरसिंह साखोळकरांसारखे कवि, प्रभाकर दातारासारखे शाहीर, कृष्णाजी सोहोनी ( पेशव्यांची बखर ) वगैरे गद्यलेखकहि या भूमींत चमकून गेले. ब्रिटिश राजवटींत या प्रांतांतील लोकांनी केलेली विविध वाङ्मयसेवा सर्वप्रसिद्ध असल्यामुळे तिचा विशेष निर्देश करण्याचें कारण नाही.

### कोंकणांतील राजकीय स्थित्यंतरें

आता कोंकणाचीं राजकीय स्थित्यंतरें कशीं झालीं याचें मी दिग्दर्शन करतों. व तें मुख्यत्वेंकरून उत्तरकोंकणविषयीच आहे. सोपारा येथे अशोकाच्या शासनाचे अवशेष सांपडल्यामुळे इ. स. पूर्वी ३ ऱ्या शतकांत मौर्यांचें साम्राज्य उत्तर-कोंकणांत होतें याबद्दल वाद करणें शक्य नाही. त्यानंतर आंध्रभृत्य राजांचा अंमल या प्रांतावर झाला. त्यानंतर क्षत्रपांचा अंमल येथें झाला. नहपानाचा जांवई उसवदात (ऋषभदत्त) यानें मरुकच्छ, दशपूर, गोवर्धन शोर्पारग ( सोपारा) येथें चतुःशाल, आवसथ यांचें दान केल्याचा व नानगोल नावाच्या गांवांत बत्तीस हजार नारळाच्या झाडांचें दान चरक शाखेच्या परिषदेला दिल्याचा उल्लेख नाशिक येथील नंबर २ च्या शिलालेखांत (एपिग्राफिआ इन्दिका पुस्तक ८ पान ७८) त्यानंतर आभीर वंशाचें व त्रैकुटकांचें राज्य येथे झालें. त्यानंतर इ. स. च्या ५-६ व्या शतकांत मौर्य नांवाचे राजे होते. त्यांना बदामीच्या चालुक्यांनी जिंकलें. पुढे इ.स.८०० पासून १२६० पर्यंत २० शिलाहार वंशांतील राजांनी राज्य केलें. हे शिलाहार चालुक्य व राष्ट्रकूट यांचे मांडलिक होते व शेवटीं बहुतेक स्वतंत्र होते. उत्तर-कोंकण, दक्षिण-कोंकण आणि कोल्हापूर अशा तीन ठिकाणीं शिलाहार वंशाच्या शाखा होत्या. शिलाहार हें मूळ नांवाचें संस्कृत रूप आहे. महाराष्ट्रांत शेलार हें प्रसिद्ध मराठे घराणें आहे व पुण्याजवळ शेलारवाडी स्टेशन प्रसिद्ध आहे. शिलाहारांचा अंमल सन १२६० च्या सुमारास नष्ट होऊन नंतर देवगिरी यादवांचा अंमल सुरू झाला. पुढे देवगिरी यादवहि नष्टराज्य झाल्यावर मग मुसलमान, पोर्तुगीज, मराठे, इंग्रज या राजवटींत हा देश क्रमाक्रमाने आला हें सर्वांस विदितच आहे.

ह्या दोन हजार वर्षांच्या इतिहासांत कोंकणांत अनेक नगरें उदयास आलीं व लयास गेलीं. कांहीं अजून जीव धरून आहेत. परंतु त्यांचें प्राचीन वैभव कांहीच शिल्लक राहिलें नाही. उत्तरेकडून सुरुवात करून नवसारी, संजाण, डाहाणू, सोपारा, ठाणें, कल्याण, चेमुल्य ( चेऊल ) वगैरे शहरें नाशिक व कान्हेरी येथील कोरीव लेण्यांतील शिलालेख वगैरे टॉलेमी व आरबी प्रवासी यांचे ग्रथ यांत प्रामुख्यानें उल्लेखिलेलीं आहेत. याशिवाय हंजमननगर, पुरी, चंद्रपुर, वलिपट्टन नागपूर इत्यादि शहरें व शेंकडों गांव यांची नावे नुसत्या शिलाहारांचेच लेख घेतले तरी त्यांत येतात. पुरीचा तर उल्लेख इवल्लीच्या शिलालेखांत पश्चिम समुद्राची लक्ष्मी असा केलेला आहे. पण ही पुरी म्हणजे घारापुरी किंवा राजपुरी किंवा आणखी दुसरें कोणतें नगर याचा वाद आहे. नगर हंमजन ( किंवा हंयमन ) असें वलिपट्टन शिलालेखांत आहे. कांहींच्या मतें हें संजाण होय. पण कांहींना तें कबूल नाही. नागपुर ( अनन्तदेवाचें शके १०१६ मधील ताम्रशासन ) म्हणजे नागांव किंवा नागोठणें याबद्दल वादच आहे. वलिपट्टन कोठे होतें याचा पत्ताच नाही. शिलालेखांचा व ताम्रशासनांचा अभ्यास करून हल्लींच्या गांवांचीं नांवें सर्व समजावून घेऊन प्रयत्न केल्यास प्राचीन लेखांतील गांवांचा माग लागण्याचा फार संभव आहे व त्यामुळे इतिहासाचे ज्ञानांत चांगलीच भर पडेल. वरील नगरांसंबंधांचे उल्लेख व त्यांची आजची स्थिति पाहिली म्हणजे 'सर्वे यस्य वशादगात्स्मृतिपथं कालाय तस्मै नमः' या सुभाषिताची आठवण झाल्याशिवाय राहत नाही.

### मराठीची आबाळ कां होते ?

प्राचीन वैदिक भाषा, पाणिनीय संस्कृत, पाली व प्राकृत, अपभ्रंश, मराठी अशा क्रमाने मराठीची उत्क्रांति होत गेली याविषयीं बहुतेक विद्वानाचें एकमत आहे. मराठी भाषा बोलणारांची संख्या १९२१ च्या खानेसुमारीप्रमाणे १८७९७८३१ आहे. यांपैकीं मुंबई इलाख्यांत ८४३५०००, मध्यप्रांत व वऱ्हाड यात ४७७३००० व निजामाच्या राज्यांत ३२९६००० आहेत व बाकीचे सुमारें बावीस लक्ष सर्व हिंदुस्थानभर पसरलेले आहेत. हिंदुस्थानांत साक्षरतेचें प्रमाण शेंकडा ८ व ९ यांचे दरम्यान आहे. यामुळे जरी मराठी बोलणारे लोक जवळजवळ दोन कोटि असले तरी लिहिणारे वाचणारे लोक १५।१६ लाखच आहेत. याशिवाय आपल्या देशातील गरिबी लक्षांत घेतली पाहिजे. आपल्या देशांतील माणशीं सरासरी सालिना उत्पन्न निरनिराळ्या आंकडेशास्त्रज्ञांच्या मताप्रमाणे ४० रुपयांपासून १०० रुपये पर्यंत आहे. अर्थात् साक्षर माणसें थोडीं असल्यामुळे त्यांचेकडूनच भाषेंतील ग्रंथांना मागणी यावयाची. सालिना ५० किंवा १०० रुपये उत्पन्न असणाऱ्या मनुष्याकडून ग्रंथखरेदीचे कामीं किती रुपये खर्च

करण्याची आपण अपेक्षा करणार ? आणखी दुसरी गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे ती ही कीं, मराठीला उच्च शिक्षणांत, विश्वविद्यालयांत, सरकारदरबारांत फारसा प्रवेशच नाही म्हटलें तरी चालेल. यामुळे उच्च दर्जाच्या वाङ्मयाचा योग्य परामर्श या मोठ्या संस्थांकडून घेतला जात नाही आणि तशा वाङ्मयाची जरूरहि या संस्थांना लागत नाही. शिवाय सुशिक्षित म्हणून जे लोक आहेत व ज्यांच्याजवळ चार पैसे आहेत त्यांचा बराच वेळ व पैसा इंग्रजी वाङ्मयाकडे व क्वचित् संस्कृत, पर्शियन अशा प्राचीन भाषेंतील अभिजात वाङ्मयाकडेहि खर्च होत असतो. अशा बहुविध कारणांमुळे मराठींतील वाङ्मयाची वृद्धि व्हावी तशी होत नाही ही गोष्ट खरी आहे.

### आशेचे किरण

इंग्लंडमध्येहि १८व्या शतकांत जॉन्सन, गोल्डस्मिथ सारख्या श्रेष्ठ वाङ्मयभक्तांची सांपत्तिक दृष्टया किती कनिष्ठ स्थिति होती याचा विचार केला असता मराठीच्या भक्ताना निराश होण्याचे कारण नाही. गेल्या दीडशें दोनशें वर्षांत इंग्लंड वगैरे देशांत संपत्तीचा अपरिमित पूर आला आहे. शेंकडा ९९ लोक साक्षर झाले आहेत. इंग्रजी भाषा जाणणारे निदान वीस पंचवीस कोटी लोक जगांत आहेत व त्या भाषेचा विश्वविद्यालयांत व सरकारदरबारांत फार मोठा मान आहे म्हणन ग्रंथकार बनून लक्षावधि रुपये मिळविणारांचीं उदाहरणें पाहून आपले डोळे दिपून जातात व मराठीच्या भवितव्यतेबद्दल निराशेचे घनदाट पटल आपल्यापुढे उभें राहतें. परंतु आपल्या देशाची सांपत्तिक स्थिति सुधारेल, शिक्षणाची पध्दति बदलून देशी-भाषांना उच्च शिक्षणांत, विश्वविद्यालयांत व सरकारदरबारांत योग्य मान मिळूं लागेल तेव्हा हीहि स्थिति सुधारेल असें माझें मत आहे. मराठींत आजहि उत्तम लेखक आहेत व कांही शाखांत तरी चांगले ग्रंथ निर्माण होत आहेत असें मला वाटतें. १९३१ सालांत निघालेल्या ७०० ग्रंथांचें अवलोकन केलें असता नाटकें, कादंबऱ्या व चरित्रें या बाबतींत स्थिति समाधानकारक आहे असें म्हणण्याला हरकत नाही. परंतु बाकीच्या शाखांतील वाङ्मय नीरस व निराशाजनक आहे असे म्हणणें भाग पडते. सर्व लेखकांत प्रो. फडके यांच्या लेखणीचा वाङ्मयाच्या विविध प्रान्तांत अनिरुद्ध संचार आहे. त्यांची एकाच वर्षांत सात पुस्तकें प्रसिद्ध झालीं.

आपण संमेलनासाठी जमलेले सर्व मराठी वाङ्मयाचे अभिमानी आहां. अशा संमेलनापासून प्रत्यक्षत- उत्तम ग्रंथांची निपज होत नाही. परंतु संमेलनें हीं प्रसिद्धीकरणाचीं व सहानुभूति आणि सांघिक प्रयत्न यांचें केंद्रीकरण करण्याचीं मोठीं साधनें आहेत. संस्था प्रत्यक्ष काम करीत नाहीत. कामें व्यक्तींनीच करावयाचीं असतात. परंतु संमेलनें व त्यांतून उत्पन्न होणाऱ्या संस्था यांचें काम कार्यकर्त्यांना द्रव्याचें पाठबळ देणें त्यांचा उत्साह वाढविणें, संग्रहालयें, संशोधकमंडळें स्थापून नवीन अभ्यासकांना अभ्यासासाठी जागा व अभ्यासाचीं साधनें सुलभ करणे हेंच होय. कोणतीहि भरीव कामगिरी करण्याला स्वतःच्या कुलाचा, संस्थेचा, देशाचा व स्वभाषेचा अभिमान असे सर्व प्रकारचे अभिमान कारणीभूत होत असतात. परंतु हे सर्व अभिमान जरी उत्तम असले तरी त्या सर्वांहून श्रेष्ठ असा सत्याचा अभिमान आहे."

# इंग्रज शिष्टांचें हिंदुस्थानाविषयी मत

गेल्या ऑगस्ट महिन्यामध्ये हिंदुस्थानाची परिस्थिति स्वतः डोळ्याने पाहून सत्यकथन करण्याच्या उद्देशाने लंडन येथील 'इंडिया लीग'तर्फे एक शिष्टमंडळ मुंबई बंदरात उतरलें. मिस् एलन विलकिनसन, मिस् मुर्नीका व्हैटले व मि. लिओनार्ड मॅटर्स हे या मंडळाचे सभासद असून श्री कृष्ण मेनन हे या मंडळाचें चिटणिशी काम पाहत होते. गेल्या चार महिन्यांत या मंडळाने सरकारी व बिन सरकारी लोकांच्या गांठीभेटी घेतल्या. देशांतील राष्ट्रीय सभा व इतर संस्थाचे पुढारी याजबरोबर त्यांनी विचारविनिमय केला. खेड्यापाड्यातील शेतकऱ्यांची परिस्थिति स्वतः डोळ्यांखाली घातली व अधिकृत रीतीने प्रसिद्ध झालेले आंकडे व पत्रकेहि त्यांनी तपासलीं. हिंदुस्थानाच्या चारहि टोंकाच्या प्रदेशांत हे शिष्टमंडळ हिंडलें. आपली दृष्टि कलुषित होऊं द्यावयाची नाही हा त्यांचा निश्चय होता. या सर्व गोष्टींमुळे त्यांच्या निर्णयाला एक प्रकारचें विशिष्ट महत्त्व आहे. म्हणून त्यांनी प्रसिद्ध केलेल्या पत्रकांतील मुख्यमुख्य भाग खाली देण्यांत आला आहे.

### आमची समजूत

"ज्या वेळीं आम्हीं लंडनचा किनारा सोडला त्या वेळीं आम्हांला असें सागण्यांत आलें होतें कीं, व्हाइसरॉय व स्टेट सेक्रेटरी यांनी अंगीकारलेल्या धोरणाला सर्वस्वीं यश आलें आहे व राष्ट्रीय सभा जवळ जवळ चिरडली गेली आहे. आम्हांला असेंहि सांगण्यांत आलें होतें कीं स्वराज्याची

चळवळ फक्त सुशिक्षित हिंदूंपैकीं मूठभर लोकांनी चालविलेली असून या बेकार झालेल्या सुशिक्षित व बुद्धिमान लोकांनी अज्ञानी जनतेच्या भोळ्या समजुतींचा फायदा घेतला आहे. आम्हांस असेंहि सांगण्यात आलें होतें कीं हिंदुस्थानांत सर्वत्र बजबजपुरी माजलेली असून विशेषतः मुसलमान इंग्रजांच्या बाजूनें इतर सर्व जनतेशीं लढत असलेले आम्हांस आढळून येतील.

## इंग्रजांवर विश्वास नाहीं

"परंतु आम्ही सर्व ठिकाणीं प्रत्यक्ष हिंडून अनुभव घेतल्यानंतर आम्हाला याच्या उलट परिस्थिति आढळून आली. हिंदुस्थानातील जातीजातींत थोड्याबहुत मारामाऱ्या आहेत. या माऱ्यामाऱ्यांचा मुख्य वादस्तंभ हा आहे कीं भावी स्वराज्यांत राजकीय सत्ता कशी वांटून घ्यावयाची. परंतु हिंदुस्थानाला स्वराज्य पाहिजे या बाबतींत सर्वत्र ऐकमत्य आहे. व तसेंच दडपशाहीला व वटहुकुमाना सर्वांचाच विरोध आहे. सरकारी दृष्टीनें या प्रश्नाकडे पाहणारे लोकहि आम्हांस आढळले. पण ते बोटांवर मोजण्याइतकेच आहेत. विशेषतः ज्यांनी पूर्वी सरकारी अधिकारी या नात्यानें सरकारचीं मोठमोठीं कामें केलीं त्या लोकांमध्ये तर ब्रिटिश सरकारवरचा विश्वास अजिबात उडाला आहे! तपशिलाबाबत निरनिराळ्या पुढाऱ्यांचा कितीहि मतभेद असला तरी एक गोष्ट सर्वजण कबूल करतात कीं राष्ट्रीय सभेइतकी सामर्थ्यवान व प्रभावशाली अशी दुसरी राजकीय संस्था देशात नाही. यापुढे केव्हांहि जर मोकळेपणानें निवडणुकी झाल्या तर राष्ट्रीय सभाच या सर्व निवडणुकांत विजयी होईल व म्हणून पुढील कोणतीहि राज्यघटना जर यशस्वी व्हावयाची असेल तर त्याला राष्ट्रीय सभेच्या सहकार्याशिवाय यश मिळणार नाही. विशेष गोष्ट ही कीं सरकारी अधिकाऱ्यांचे सुद्धां हेंच मत आहे.

## भयंकर दारिद्र्य

"आम्हीं जीं खेडीं पाहिली त्यांत हिंदुस्थानाच्या जनतेचें खरें खरें चित्र दिसत होतें. हिंदी शेतकऱ्याचें दारिद्र्य पाहून आम्हांला तर धक्का बसला. प्रत्येक घर—तें घर कसलें झोपडीच—मूर्तिमंत दारिद्र्याचा आरसा होता. जेथे जावें तेथे कर्जबाजारीपणा, निरक्षरता, कर व खंड यांचें जबरदस्त ओझें व भुकेची हाकहाक हीच आम्हांस आढळून आली. हिंदुस्थानांत ब्रिटिश राज्य आहे हें थोड्या ठिकाणीं एखादी शाळा किंवा एखादें पोस्ट ऑफिस दिसे तेव्हांच आमच्या लक्षांत येई. हल्लीच्या चळवळीमुळे गुप्त पोलीस, त्यांचे अधिकारी वगैरे मधून मधून दिसत असत व कांहीं ठिकाणीं हत्यारी पोलीस व त्यांचे पडलेले तळ यामुळें देशांत चाललेल्या लढ्याची जाणीव आम्हांस होई. शेतकरी निरक्षर असला तरी त्याला त्याच्या आर्थिक व राजकीय दुःस्थितीची उत्तम कल्पना आहे. तो ब्रिटिश राज्याचा स्तुतिपाठक खास नाही. त्याला राष्ट्रीय सभेचा स्वयंसेवक हा आपल्याला अधिक जवळचा आहे असें वाटतें. शेतकऱ्यांबाबत आम्हांस ज्या कल्पना करून दिल्या होत्या त्या साफ खोट्या होत्या असें आम्हांस आढळून आलें.

## वटहुकुमांचा वरवंटा

"वटहुकुमाच्या अमलामुळे शेतकऱ्यास कोणतीहि तोशीस लागलेली नाही असें इंग्लंडमध्यें नेहमीं सांगण्यांत येतें. परंतु ही गोष्ट खोटी आहे असा आमचा अनुभव आहे. कित्येक खेड्यांतून जादा पोलिस बसविले गेलेले आम्हांला दिसतात. त्यांचा खर्च शेतकऱ्यांकडूनच सरकारी अधिकारी वसूल करीत असत. व या बाबतींत सुद्धां नेहमीचे सर्व कायदे धाब्यावर बसविले गेलेले आम्हांस दिसत होते. वटहुकुमांच्या अमदानींत नुसती राजकीय चळवळच दडपली गेली आहे असे नव्हे. या दडपशाहीचा सवाई सोटा शैक्षणिक व सामाजिक अशा संस्थांच्या डोक्यावरहि बसला आहे. आम्हीं असें प्रत्यक्ष पाहिलें आहे कीं कांही ठिकाणीं शाळा व रुग्णालयें हींहि या तडाख्यांतून सुटलीं नाहींत. बंगाल, आसाम, गुजराथ, या प्रांतांत तर ज्या ठिकाणीं करबंदीची चळवळ चालू होती तेथे सुधारलेल्या राज्यास कालिमा लागेल अशा तऱ्हेचे सरकारी अधिकाऱ्यांचें वर्तन होतें. सरकारी सारा जबरदस्तीनें वसूल केला जात होता यांत शंका नाही. लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट एकच कीं, पुरुषाप्रमाणे हिंदु स्त्रियाहि या लढ्यांत मोठ्या उमेदीनें व उत्साहानें पडत आहेत."

## पोलिसांचा पराक्रम

"'पोलीस राज्य' म्हणजे काय याची आम्हांला कल्पना नव्हती. आम्हीं त्याची फक्त वर्णनें ऐकलीं होतीं. व आम्हांला त्या राज्याचे हिंदुस्थानांत आल्यावर लोकांना चटके कसे बसतात याचा अनुभव आला. पोलिसांच्या अत्याचाराला आळा घालण्यास कोणताच कायदा उपयोगी पडत नाही. व हे अत्याचार खालच्या वर्गाचे पोलिसच करतात असें नव्हे तर मोठमोठे अधिकारीहि करतात! जे सत्याग्रही स्वतः होऊन पोलिसांच्या स्वाधीन होतात. व अटकेस विरोध करीत नाहीत त्याना अटक करतांना पोलिसास मारहाण कां करावी लागते हें आम्हांस समजत नाही. आम्हाला असें सांगण्यांत आलें कीं नुसती अटक करण्यापेक्षा या लाठीहल्ल्यांचा जनतेच्या मनावर मोठा

परिणाम होतो. परंतु हीं कारणें आम्हांस पटत नाहीत. अगोदर खालच्या वर्गातील शिपायाना पगार फारच बेताचा असतो, ते सुशिक्षितहि नसतात. अशा पोलिसांच्या हातीं असली बेजबाबदारीची सत्ता देणें हें केव्हांहि घातक आहे. अशा परिस्थितींत जप्त केलेली किंवा सरकारजमा झालेली मालमत्ता पोलिसांना प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष रीतीने विकत घेऊं देणें या-सारखी निंद्य गोष्ट दुसरी कोणतीहि नाहीं.

## अधिकाऱ्यांची मनोरचना

"आम्ही सरकारी अधिकाऱ्यांशीं पुष्कळ वेळा बोललों. व त्यांच्या कानावर या अत्याचारांच्या अनेक गोष्टी घातल्या. परंतु आम्हांला असें आढळून आलें कीं ते आमचें म्हणणें ऐकत. पण आमच्या म्हणण्याकडे लक्ष मात्र देत नसत. वटहुकुमांचा हा सारा परिणाम आहे. यांतून वरच्या वर्गाचे अधिकारीहि सुटले नाहीत. दुसरी एक गोष्ट आम्हांला आढळली ती ही कीं, प्रत्यक्ष लोकांच्या भावना अधिकाऱ्यांना बिनचूक माहीत असतात असें नाही. ते आपल्या सत्तेच्या जोरावर आपला अधिकार चालवितात. म्हणूनच लोकांच्या संमतीने राज्ययंत्र चाललें आहे असें दिसत नाही!

## हिंदु व मुसलमान

"हिंदु-मुसलमानांच्या बाबत आमचें मत नमूद करणें आम्हांस अवश्य वाटतें. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे खेड्यापाड्यांतून जातिनिष्ठ भावनांचा उद्रेक अजिबात नाही असेंच म्हटलें पाहिजे. ज्या गांवांत मुसलमान अगर हिंदु अगदीं अल्पसंख्य आहेत तेथेहि बहुसंख्य लोकांची भीति त्यांना वाटत नाही असें आम्हांस आढळलें. शहरांतून मुसलमान, शीख व हिंदु यांचे पुढारी जी भाषा वापरतात त्याचा पडसादहि खेड्यांतील लोकांस समजत नाही. मुसलमानांतील तरुण वर्ग हा कॉंग्रेसचा अनुयायी आहे व मोठ्या माणसांतहि राष्ट्रीय सभेच्या कार्यक्रमांतील तपशिलाबाबत मुसलमानांत फारसा मतभेद नाही. म्हणून आम्हांस असें वाटतें कीं मुसलमान ब्रिटिश राज्याचे पाठीराखे असून स्वराज्याच्या चळवळीच्या विरुद्ध आहेत, हे म्हणणें खोटें आहे.

## भविष्य काळ

"दंडपशाहीने असंतोष जाईल असें वरिष्ठ अधिकाऱ्यांनाहि वाटत नाही. त्यांचें म्हणणें इतकेंच कीं, नवीन सुधारणांच्या योगाने प्रत्यक्ष सत्ता लोकांच्या हातीं आली म्हणजे देशांत शांतता होईल. आम्हांला हें पटत नाही. आमच्या मतें सध्याचें धोरण बदलून राष्ट्रीय सभा व म. गांधी यांच्याशीं सलोखा करून पुढील घटनेच्या बाबतींत त्यांचें सहकार्य संपादल्याशिवाय हिंदुस्थानांत शांतता नांदणार नाही. हाच मार्ग आहे, दुसरा नाही. जनतेचा ज्यांच्यावर विश्वास आहे असे पुढारी तुरुंगांत खितपत पडले असता व लोकांचें भाषणस्वातंत्र्य हिरावून घेतलें असता पुढील राज्यव्यवस्थेंत भाग घेण्यास हिंदी लोक तयार होतील असें आम्हांस वाटत नाही.

## सरकारची घोडचूक

"आम्हांला फार वाईट वाटतें कीं या सलोख्याच्या बाबतींत सरकार मोठी घोडचूक करीत आहे. राष्ट्रीय चळवळीकडे त्यांची पाहण्याची दृष्टि दूषित असल्यामुळे ही चळवळ हाणून पाडण्याचा उद्योग त्यांनी आरंभिला आहे. तसेच म. गांधींनी आपल्यास शरणचिठी द्यावी ही मागणीहि अव्यवहार्य आहे. कारण या योगाने सरकार स्वतःच सलोख्याच्या मार्गांत मोठी धोंड टाकीत आहे. जयकरांना किंवा शौकतअलींना म. गांधींबरोबर मुलाखत घेण्यासहि परवानगी न देणें म्हणजे एक प्रकारचें युद्ध पुकारणें आहे. जणुं काय राष्ट्रीय पक्षाच्या किल्ल्याला वेढा घातला आहे. व त्यांची रसद मारली म्हणजे ते शरण येतील, अशी जर सरकारची कल्पना असेल तर ती भ्रामक ठरल्याशिवाय राहणार नाही. वटहुकुमांचा अमल सुरू होऊन नऊ महिने झाले. व आता त्यांना कायमचें स्वरूप देण्यांत येत आहे, याचा अर्थच असा कीं वटहुकूम सर्वस्वी अयशस्वी झाले! लोक ज्या हालअपेष्टा सोशीत आहेत व राक्षसी दडपशाहींत लोकांनी जे हालकष्ट सोसले त्यांतच त्यांची परीक्षा झाली. पुढील पिढी या अनुभवाची स्मृति विसरेल ही गोष्ट शक्य नाही. शिवाय हिंदुस्थानहि आपल्या घराची डागडुजी करूं लागला आहे असें स्पृश्यास्पृश्यांच्या करारावरून दिसतें. हिंदु-मुसलमानांतहि एकी करण्याचे प्रयत्न चालू आहेत. यावरून हिंदुस्थानाचा भविष्यकाळ मोठा उज्ज्वल आहे असें म्हणणें प्राप्त आहे."

## समारोप

अशा तऱ्हेचा, मुख्य मुख्य बाबींसंबंधाचा अहवाल वरील शिष्टमंडळाने आपल्या पत्रकांत मांडला आहे. शेवटीं ज्या सरकारी व बिनसरकारी लोकांनी त्यांना मदत केली त्यांचे आभार मानून त्यांनी हा अहवाल संपविला आहे.

# प्रो. लक्ष्मणशास्त्री लेले यांचा मृत्यु

पुण्यांतील प्रसिद्ध कवि व रसिक गृहस्थ प्रो. लक्ष्मण गणेशशास्त्री लेले यांचा गेल्या शुक्रवारीं पहाटे पुणें येथे ससून हॉस्पिटलमध्ये मधुमेहाचे विकाराने अंत झाला हें वृत्त वाचून सर्वांस अत्यंत वाईट वाटेल यांत शंका नाहीं. कै. लक्ष्मणशास्त्री यांचा जन्म इ. स. १८७० सालीं झाला. त्यांचे वडील गणेशशास्त्री लेले हे कै. कृष्णशास्त्री चिपळुणकरांच्या पिढींतील नाणावलेले शास्त्री होते. गणेशशास्त्री यांनी रघुवंशाचें पद्यात्मक भाषांतर, साहित्यशास्त्र, तीर्थयात्रा प्रबंध वगैरे गद्यपद्यात्मक ग्रंथ लिहून उत्तम कीर्ति मिळविली होती.

गणेशशास्त्री यांच्या सहवासांतच लक्ष्मणशास्त्री यांचें पूर्ववय गेलें, आणि जुन्या शास्त्र्यांच्या पठडींतील विद्वत्तेचा परिचय त्यांस घडला. लक्ष्मणशास्त्र्यांची मूळची रसिकता व्युत्पन्नतेच्या तेजानें जी पुढे खुललेली दिसली, त्याचें बीज वरील परिचयांतच सांपडेल. लक्ष्मणशास्त्री यांस इंग्रजी विद्येचाहि संस्कार होऊन कॉलेज-शिक्षणाचाहि थोडा अनुभव मिळाला होता. गणेशशास्त्र्यांचें वास्तव्य नाशिकास असल्यामुळे लक्ष्मणशास्त्री यांनी नाशिकासच आपला संसार सुरू केला. तेथील "नाशिक-वैभव" पत्राचे ते कांहीं दिवस संपादक होते. पुढे लवकरच त्यांनी पुण्यास स्थलांतर केलें व प्रथम कांहीं दिवस न्यू इंग्लिश स्कूलमध्ये काम केल्यानंतर येथील नूतन मराठी विद्यालयांत ते शिक्षक म्हणून राहिले आणि पुढे तें विद्यालय चालविणाऱ्या 'शिक्षण प्रसारक मंडळीचे' आजीव सेवक म्हणून त्यांनी २० वर्षे अध्यापनाचें कार्य करून नुकतेंच निवृत्तिवेतन घेण्यास सुरुवात केली होती.

शिक्षक या नात्यानें कै. लक्ष्मणशास्त्री यांचा अनुभव दीर्घकालीन होता. त्यांनी निरनिराळ्या प्रकारचे विषय शाळेंत शिकविले असले आणि अंकगणितांचीं गमतीचीं कोडीं सांगून कधी कधी विद्यार्थ्यांचें मनोरंजन केलें असलें तरी संस्कृत विषयाचे अध्यापक म्हणूनच त्यांनीं उत्कृष्ट कीर्ति संपादन केली. त्यांची अध्यापनशैली अत्यंत मार्मिक असे. ते विद्यार्थ्यांवर तत्काळ छाप बसवीत. पेषाकाची ठाकाठिकी, चेहऱ्याचा, रुबाबदारपणा आणि सौंदर्य, बोलण्याची ऐट, भाषेंतील प्रसाद आणि हजरजबाबीपणा इत्यादि गुणांची अंगच्या रसिकतेस व विद्वत्तेस जोड मिळाल्यामुळे ते विद्यार्थ्यांचीं मनें सहज आकर्षून घेत यांत नवल नाहीं. सभ्य अभिनयानें आपलें म्हणणें ठसविण्याची हातोटीहि त्यांना साधली होती. काव्य हा त्यांच्या अत्यंत जिव्हाळ्याचा विषय होता. कालिदासाचें शाकुंतल तर त्यांस इतकें प्रिय होतें कीं तें शिकवितांना ते अगदी तन्मय होऊन जात. विषयाचें मर्म विद्यार्थ्यांच्या गळीं सहज पूर्णपणें उतरेल अशीच पद्धति ते अवलंबीत.

संस्कृताप्रमाणेच मराठी वाङ्मयाचेंहि त्यांनी अत्यंत रसिकतेनें व भक्तीनें अध्ययन केलें होतें. आणि त्याचें अध्यापनहि ते तितक्याच परिणामकारक रीतीनें करीत असत. मराठी आणि संस्कृत वाङ्मयांतून मुलांकरिता सुंदर गद्य-पद्य वेच्यांचीं पुस्तकेंहि त्यांनी बरींच प्रसिद्ध केलेलीं अद्यापहि शाळांतून चालतात. इंग्रजी वाङ्मयाचाहि त्यांनी मार्मिकपणें अभ्यास केला होता आणि संस्कृत किंवा मराठीचें इंग्रजींत भाषांतर ते आवडीनें करीत. मुंबई युनिव्हर्सिटींत बी. ए. ला मराठी विषय विकल्पानें घेण्याची सोय इ. स. १९२१ सालीं झाली. त्या वेळीं लक्ष्मणशास्त्री यांस न्यू पूना कॉलेजमध्ये अध्यापनाचें काम करण्याची संधि मिळाली. तेथेहि त्यांनी उत्कृष्ट लौकिक कमावला आणि युनिव्हर्सिटीनें बी. ए. व एम्. ए. परीक्षांस त्यांस मराठीचे परीक्षक नेमून त्यांच्या गुणांचें चीज केलें.

आयुर्वेदाचेंहि त्यांनी सशास्त्र अध्ययन केलें होतें आणि कांहीं दिवस दवाखाना चालविण्याचाहि त्यांनी यत्न केला, परंतु त्यापेक्षा आपला जुना अध्यापकाचा व्यवसायच त्यांना अधिक मानवला. इ. स. १९०८ सालीं श्रीशारदापीठाच्या शंकराचार्यांनी त्यांना 'वैद्यपंचानन' ही दिलेली बहुमानाची पदवी त्यांनी नाकारली होती.

केवळ शिक्षक म्हणूनच न राहता लक्ष्मणशास्त्री यांनी आपल्या बहुश्रुततेचा फायदा ग्रंथरूपानेंहि सर्व जनतेस करून दिला. लहानमोठीं अशीं सुमारें २५ पुस्तकें त्यांनी प्रसिद्ध केलीं असतील. त्यांपैकीं सुमारें निमी पुस्तकें शालोपयोगीच असून त्यांनी त्यांस थोडी सुस्थितीहि मिळवून देऊन त्यांच्या मनाची हौस थोडी फार पुरविली. परंतु त्यांच्या विद्वत्तेची व काव्यशक्तीची साक्ष ज्यावरून पटते असे त्यांचे ग्रंथ एका प्रकारें त्यांच्या अंगावरच पडले म्हटलें तरी चालेल! सुमारें २८ वर्षांपूर्वी त्यांनी आपला 'अलंकारप्रकाश' नांवाचा उत्कृष्ट ग्रंथ प्रसिद्ध केला. या ग्रंथांत रस, वृत्ति, रीति वगैरे काव्यशास्त्रीय विषयांची प्रौढ भाषेंत व्यवस्थित मांडणी केली असून कोठे कोठे स्वरचित उदाहरणेंहि दिलीं आहेत. याच वेळेस त्यांनी

आपल्या आवडत्या शाकुंतलाची मराठी छाया रचून तयार केली. व पुढे ती २०।२२ वर्षांनीं प्रसिद्ध केली. हें त्यांचें मराठी शाकुंतल अत्यंत सुरस असें उतरलें आहे. अलंकारप्रकाश आणि मराठी शाकुंतल हे दोन्ही ग्रंथ मराठीच्या उच्च शिक्षणांत अंतर्भूत होण्यासारखे आहेत. कालिदासाचा त्यांचा दुसरा आवडता ग्रंथ म्हणजे ' मेघदूत '. त्याचेंहि समवृत्त मराठी भाषांतर करून त्यांनी प्रसिद्ध केलें होतें, तेंहि सरस आहे. त्याचप्रमाणे जगन्नाथपंडित यांच्या ' भामिनी विलासाचें ' पद्यात्मक भाषांतर अलंकार, टिप्पणी वगैरेसह त्यांनी प्रसिद्ध केलेलें आहे. तेंहि वाचनीय आहे.

' विश्वमंगल ' या नांवाचें शिवपार्वती-विवाहाचें एक संगीत नाटक रचून नाट्य-वाङ्मयांत त्यांनी भर टाकली आहे. ' भाऊसाहेब' या नांवाचें त्यांचें एक ऐतिहासिक नाटक अद्याप अमुद्रित आहे. नाटकाप्रमाणें व थोडें चरित्र-लेखनहि त्यांनी केलें आहे. त्यांचे ग्रामस्थ आणि गेल्या पिढींतील एक पुढारी कै. गंगाधर नरसिंह केतकर यांचें सविस्तर चरित्र त्यांनी प्रसिद्ध केलें आहे. वर सांगितल्याखेरीज ' पद्यमंजरी,' 'तिलकांजली', 'अबलाविजय' 'महाराष्ट्रवंदन', अहिल्या-स्मरण वगैरे लहान लहान काव्यग्रंथ त्यांनी प्रसिद्ध केले आहेत. लक्ष्मीविलास नांवाचें एक काव्य पूर्ण करण्याचा त्यांचा विचार होता.

पद्याप्रमाणेंच ते गद्यहि सुंदर लिहीत. प्रौढ, मार्मिक व प्रवाही अशी त्यांची भाषापद्धति असे आणि भाषणाप्रमाणेच त्यांचा लेखहि ठसकेदार असे. उचित शब्दयोजना करण्यांतहि ते फार कुशल असत. कै. रेव्हरंड टिळक, आगाशे, विनायक, मोगरे, तांबे प्रभृति प्रसिद्ध कवींच्याविषयी परीक्षणात्मक लेख त्यांनी ' विविधज्ञानविस्तारां 'त लिहिले होते, त्यावरून ते कुशल टीकाकार होते हें सहज दिसून येतें.

कै. लक्ष्मणशास्त्री यांच्या मृत्यूने पुण्यांतील एक उत्कृष्ट रसिक, नामांकित शिक्षक, जुन्या वळणाचा प्रख्यात कवि, आणि हृदयंगम वक्ता नाहींसा झाला आहे. त्यांचें केसरीवर विशेष प्रेम होतें आणि केसरीवरील टिळकगुणवर्णनपर श्लोक त्यांच्याच तिळकांजलींतून घेतलेला आहे. ते कांहीं वर्षे म्युनिसिपालिटीचेहि सभासद होते. अशा गुणी मनुष्याच्या मृत्यूमुळे सर्व महाराष्ट्र हळहळेल यांत शंका नाही. त्यांच्यामागे त्यांचे चिरंजीव रा. भालचंद्रपंत व इतर पुत्रकन्या वगैरे सर्व आप्त सुविद्य आहेत. ते जगराहटीप्रमाणें आपलें सांत्वन करून घेतील व शास्त्रीबोवांचे अमुद्रित व दुर्मिळ ग्रंथ प्रसिद्ध करून शास्त्रीबोवांचें ऋण फेडतील अशी आशा आहे.

# हिंदुस्थानाच्या राज्याभिषेकाची तयारी !

हिंदुस्थानास राज्याधिकार देण्याची वाटाघाट इंग्रज सरकार गेलीं चार–पांच वर्षे करीत आहे. गोलमेज परिषदेच्या दोन बैठकी त्याच हेतूने भरल्या व आता तिसऱ्या बैठकीस सुरुवातहि त्याच हेतूने झाली आहे. तिसऱ्या परिषदेचे सूत्रधार मि. राम्से मॅक्डोनाल्ड यांनी रंगभूमीवर प्रवेश करून मंगलाचरण म्हणत म्हणत हातांतून फुलें फेकलीं. तीं खाली पडलीं न पडलीं तोंच वरून पडदाहि सुटला व पुढील प्रवेशास ता. २१ रोजीं प्रारंभ झाला. ब्रिटिश मुत्सद्द्यांच्या शब्दापेक्षा त्यांच्या मुद्रेवरूनच स्वराज्याचा नोकझोक अधिक कळून येतो. राज्यार्पणाची भाषाच बोलावयाची तर इंग्रज लोक ती पटीभर बोलले आहेत. पण त्या भाषेचा कोणाला अर्थ कळला असल्यास शपथ. मनांतील भाव जितका मुद्रेवरून, हातवाऱ्यांवरून व अंगविक्षेपांवरून समजावयाचा त्यापेक्षा अधिक इंग्रजांच्या भाषणावरून खात्रीने कळणार नाही. भाषा ही अर्थवाहक होय असें म्हणणारे खुशाल म्हणोत, परंतु इंग्रजांच्या बाबतींत तरी याच्या अगदी उलट अनुभव आला आहे. त्यांची भाषा अर्थ सांगण्यापेक्षा अर्थ झाकण्याकरिताच असल्याचें सिद्ध झालें आहे. या दृष्टीने इंग्रजांच्या चालू बोलचित्रपटाची योग्यता मूक अशा जुन्या चलचित्रपटाहून अधिक नाही हें कोणासहि कबूल करावें लागेल.

इंग्लंडांतील ब्रिटिश मुत्सद्दी बोलण्याच्या कामांत पटाईत आहेतच. हिंदुस्थानांतील ब्रिटिश अधिकारी त्यांचेच चेले, तेव्हा त्यांनी त्यांची ती विद्या जशीच्या तशी उचलावी यांत नवल काय ? ब्रिटिशांनी हिंदुस्थानाला स्वराज्य कधीकाळीं द्यावयाचें ठरविलें आहे कीं नाही कोण जाणे ! पण त्यांनी 'स्वराज्य' हा शब्द वेळीं-अवेळीं उच्चारण्याचें मात्र ठरविलेलें दिसतें. शारदा नाटकांत भद्रेश्वर दीक्षिताने शिवदर्शनाचा महिमा वर्णिला आहे. तो म्हणतो, शिवदर्शन सकाळीं,

घेतलें असता आदल्या रात्रीच्या काळोखांत केलेलीं सर्व पातकें नाश पावतात, दुपारच्या दर्शनाने जन्मापासूनचीं पातकें नष्ट होतात व सायंकाळच्या दर्शनाने सात जन्मांतील पातकें जळून जातात. गोऱ्या अधिकाऱ्यांनी भट्टेश्वर दीक्षिताच्या वचनांतील मर्म बरोबर ओळखून तें स्वराज्याच्या मंत्राला तंतोतंत लागू केलें आहे. त्यांना कोणतेंहि दुष्कृत्य करावयाचें असो, ते स्वराज्याचा मंत्र लाबडतोब जपण्यास सुरुवात करतात. तीन आचमनें घ्यावीं, डोळ्याला पाणी लावावें, प्राणायामाच्या कवायतीसाठी नाकपुडीजवळ नुसतीं तीन बोटें न्यावीं आणि स्वराज्याचा मंत्र जपावा कीं झालीं मनांतलीं व हातांतलीं पापें जळून त्यांची होळी! म्हणून येथील अधिकाऱ्यांनीहि स्वराज्याचा नामोच्चार जोराने चालविला म्हणजे देशावर मोठा उत्पात ओढवणार असें खात्रीने समजावें.

असेंब्लीच्या चालू बैठकींत वटहुकुमांच्या बिलावर कळावयाचा वाद झाला. त्या वेळीं बिलाचें समर्थन करतांना हिंदुस्थानसरकाराचे गृहमंत्री मि. हेग यांनी शकुंतलेस सासरीं जाण्यासाठीं निरोप देणाऱ्या कण्व ऋषीप्रमाणेच हुंदका आणिला! ते म्हणाले ' आता आम्ही असलों काय आणि नसलों काय सारखेंच! हें राज्य वर्षदोन वर्षांत तुमच्या हवालीं करून आम्ही मोकळे होणार. आमच्या गादीवर तुम्हीच बसून राज्य चालविणार असल्यामुळे तुमची इडापिडा टळावी एवढ्यासाठींच बिलाच्या मीठमोहऱ्या तुमच्यावरून ओवाळून टाकण्याची खटाटेव आम्हाला करावी लागत आहे. नाहीपेक्षा आमच्या स्वतःविषयी म्हणाल तर आमचा बाजार आटोपलाच आहे.' हेग साहेबांची हिंदुस्थानाविषयी केवढी ही कर्तव्यतत्परता व कृतज्ञता! त्यांनी खाल्ल्याघरचे वासे मोजल्यावर त्यांची दानत ती काय उरली! हिंदुस्थानाला स्वराज्य मिळावयाचें आता ठरलेंच आहे, तेव्हा हिंदुस्थानाच्या प्राचीन वैभवास व उज्ज्वल परंपरेस शोभेल अशा राज्याभिषेकाची ढोलेजंग तयारी ते करणार, आपल्या डोळ्यांनी राज्याभिषेकाचा अपूर्व सोहळा पाहणार आणि मग स्वतःविषयीं धन्योद्गार काढीत आल्या वाटेने ते व त्यांचे सवंगडी परत विलायतेस जाणार!

अशा उल्हासाने सुरू झालेल्या राज्याभिषेकाचा थाट काय विचारावा! इंग्लंडचा एक राजा मरून दुसरा राजा नुसता गादीवर येतो तर त्या वेळीं हिंदुस्थानांत सर्वत्र दीपोत्सव होतो, गोरगरिबांना अन्नदान मिळतें व बंदीजनांच्या कष्टमय कारागृहवास संपून त्यांना स्वातंत्र्याचें सुख लाभतें. एक राजा मेला व दुसरा गादीवर आला यांत अधिक तें काय घडलें? राजघराणें तेंच व प्रजाजनहि तेच. मग त्या मानानें हिंदुस्थानच्या राज्याभिषेकाची गोष्ट अगदीच वेगळी. ही जवळजवळ राज्यक्रांतिच. राजपुरुष अधिकारच्युत व्हावयाचे व प्रजा राज्यपदावर चढावयाची. हें सर्व पूर्ण शांततेने व सलोख्याने घडून यावयाचें. बंदुकींतून एकहि गोळी न सुटतां व मनुष्याच्या शरीरांतून रक्ताचा एकहि थेंब न गळतां जगाने कधी न देखलेला व न ऐकलेला असा हा चमत्कार देवांनी विमानांत बसून बघावा व त्यावर आकाशांतून आनंदाने पुष्पवृष्टिच करावी अशा योग्यतेचा. असें हें महापर्व ज्यांच्या औदार्याने व प्रजावात्सल्याने पार पडावयाचें त्या ब्रिटिशांच्या उत्साहाला पारावार काय असावयाचा!

पूर्वकाळीं राज्याभिषेकाच्या प्रसंगीं राजेलोक प्रजाजनांपैकीं ज्याला त्याला त्याच्या योग्यतेप्रमाणे वस्त्रें-भूषणें अर्पण करीत, घरें व जमिनी इनाम देत, पदव्यांनी गौरवीत व बंधमोचनाने संतोषवीत. इंग्रजांना हिंदी लोकांचा प्राचीन इतिहास पूर्णपणें अवगत आहे, त्यांच्या चालीरीति माहीत आहेत व दानधर्माचें ज्ञानहि आहे. त्या सर्वांचा काळजीपूर्वक विचार करून हिंदुस्थानांतील उदारधी इंग्रज अधिकाऱ्यांनी हिंदुस्थानच्या राज्यारोहणाच्या तयारीकरितां आपले अठरा कारखाने उघडले आहेत. हा खटाटोप हिंदुस्थानसरकारापासून तो तहत सर्व प्रांतिक सरकारापर्यंत जोराने सुरू आहे. हिंदुस्थानच्या ले. असेंब्लींत त्यासंबंधाचें प्रमुख बिल आलें आहे. राज्यारोहणाच्या तयारीचा सर्व मान एकट्या हिंदुस्थानसरकाराने आपल्याकडे घेतल्यास प्रांतिक सरकार त्यांचा हेवा केल्यावांचून कशी राहतील? म्हणून या बाबतींत हिंदुस्थानसरकाराने समदृष्टि ठेवून प्रत्येक प्रांताला आपल्या मानाचे अंशभागी बनविलें आहे.

दिल्लीच्या असेंब्लींत बिल येऊन जे अधिकार शिल्लक उरले त्यांचीं बिलें प्रांतिक कौन्सिलांत त्या त्या प्रांताचें सरकार आणणार आहे. असेंब्लींत प्रथम बिल आलें व नंतर तें सिलेक्ट कमिटीकडे फेरफारांकरितां गेलें. सिलेक्ट कमिटींत निम्मे सरकारपक्षाचे व निम्मे लोकपक्षाचे सभासद होते. कमिटीचें अध्यक्षस्थान हिंदुस्थानसरकाराचे कायदेमंत्री सर बी. एल. मित्तर यांनी स्वीकारलें होतें. कमिटीच्या सभासदांत कोणत्याहि प्रश्नावर तट पडून दोन्ही बाजूंना एकसारखीं मतें मिळालीं म्हणजे अध्यक्ष ना. मित्तर आपलें जादा मत सरकारच्या पारड्यांत टाकून तें पारडें जड करीत. अध्यक्ष निष्पक्षपाती असावा व त्याने आपलें जादा मत विवेकपूर्वक द्यावें अशी समजूत आहे. पण ती समजूत ना. मित्तर यांनी पार धुळीस मिळविली.

एकदा प्रसंग असा आला कीं अध्यक्षांनी आपल्या

जास्त मताची पुण्याई सरकारच्या बाजूनें खर्च करूनहि त्यांचा मतलब साधण्याचा संभव दिसेना. ता. २६ ऑक्टोबर रोजीं कमिटीची बैठक नित्याप्रमाणें भरून संपली.व दुसऱ्या दिवशीं सकाळीं व दुपारीं अशी दोनदा बैठक बसण्याचें ठरलें. त्याप्रमाणे सकाळची बैठक भरली. तिच्यांत असें निष्पन्न झालें कीं दुपारच्या बैठकीला सरकारपक्षाचे एक सभासद मि. यामीनखान हजर राहूं शकणार नाहीत. कारण त्यांना दोन-प्रहरीं मीरत येथें कांही कामाकरिता जावयाचें होतें. यामीनखानांच्या गैरहजिरींत एखाद्या उपसूचनेवर मतें घेण्याची पाळी आली असता अध्यक्षांचें जास्त मत भरीला घालूनहि सरकाराचा पराभव चुकणार नव्हता. सरकारपक्षाला हा पेच येऊन पडला ! त्यावर अशीहि एक युक्ति निघाली कीं यामीनखान यांना मिरतेला जाणे भागच असल्यास त्यांनी आपल्या बरोबर लोकपक्षांतील एखादा सभासद पळवून न्यावा. म्हणजे उभयपक्षांचेंच बल पूर्ववत राहून सरकारची ठरल्याप्रमाणे सरशीच होईल.

पण लोकपक्षाचे सभासद कसले खमंग ! त्यापैकीं कोणीच यामीनखानाबरोबर मिरतेला जाण्यास निघेना. तेव्हा सरकार पक्षाने एक लोणकढी थाप तयार ठेवली.अध्यक्षांनी सांगितलें कीं,गृहमंत्री मि.हेग यांना दुसरीकडे जरूरीचें काम असल्यामुळे त्यांच्या गैरहजिरींत कमिटीची दुपारची बैठक बंद ठेवली आहे.त्यावर लोकपक्षातर्फे एका सभासदानें खोचून म्हटलें 'अहो ! हेगसाहेबांची खोटी सबब कशाला सांगतां ! त्यापेक्षा सरळ म्हणा ना कीं, यामीनखानांना मिरतेस कामाला जावयाचें आहे म्हणून कमिटीची बैठक तहकुब ठेवली आहे !' कमिटीच्या बैठकींत सरकारची याहून अधिक फटफजिती ती काय व्हावयाची उरली ? सरकार पक्षाच्या या निर्लज्जपणाच्या वर्तणुकीचा वीट आल्यामुळेच कमिटींतील चार सभासद रा.पुरी, ए. सी. मित्र, अझरअली व गया प्रसादसिंग यांस कमिटींतून त्वेषपूर्वक चालतें व्हावेसें वाटलें.

सिलेक्ट कमिटीने आपला रिपोर्ट असेंब्लीस सादर केला, त्यांत सरकारच्या सगळ्या लीला चव्हाट्यावर आणिल्या आहेत. कमिटीचा रिपोर्ट एकमताने झाला नसून त्यास अनेक भिन्न मतपत्रिका जोडण्यांत आल्या आहेत. त्या सर्वांत खासदार भास्करराव जाधव, वऱ्हाडचे एस. जी. जोग, महमद अझरअली, गया प्रसादसिंग, व एस. सी. मित्र यांची भिन्नमतपत्रिका अधिक महत्त्वाची होय. त्यांनी लोकपक्षाची बाजू कमिटीपुढे निर्भीडपणाने मांडली ही गोष्ट त्यांस भूषणावह होय यात शंका नाही. त्यांनी निरोधनावरील कायद्याचे निर्बंध बिलांतून काढून टाकण्याची कसोशीने खटपट केली. त्यांचें म्हणणें असें कीं स्वदेशी उद्योगधंद्यांच्या वाढीकरिता गिऱ्हाइकाचे युक्तिवादाने व सामोपचाराने मन वळविण्यासाठी परदेशी कापडाच्या दुकानावर पिकेटिंग करण्यास प्रतिबंध नाही असे शब्द बिलाच्या सातव्या कालमांत घालावे. पण लोकपक्षाची ही साधी मागणीहि अध्यक्षांनी झिडकारून लावली. शांततायुक्त पिकेटिंगहि चालूं न देण्याचा सरकारचा निश्चय झाला असल्याचें त्यानी निक्षून सांगितलें. अखेर दुरुस्त बिलात लाजेकाजेने जे शब्द सरकार पक्षाने घातले आहेत त्यांत स्वदेशी उद्योगधंद्यास उत्तेजन व मद्यपान-निषेधाची तरफदारी हा सातव्या कलमाखालीं गुन्हा होत नाही असें नमूद केलें आहे. पण त्या योगाने पिकेटिंगच्या चळवळीस उघडपणें परवानगी मिळत नसल्यामुळे वरील शब्दयोजना निरुपयोगीच ठरते.

मुद्रणस्वातंत्र्य नष्ट होऊं नये, मुलाचें प्रायश्चित्त बापाला मिळूं नये, नवीन बिलाची मुदत सहा महिन्यांपेक्षा अधिक असूं नये अशाहि भास्कररावप्रभृति सभासदांच्या सूचना होत्या. पण त्या सरकारपक्षाने धुडकावून लावल्या. वटहुकुमापेक्षां मूळ बिलांत कांही सुधारणा आहेत व त्या सुधारणांत कमिटीनेंहि थोडी भर घातली आहे; परंतु कारलें हें जात्याच कडवट. तें तुपांत तळलें किंवा साखरेंत घोळलें म्हणून त्याला गोडपणा थोडाच येणार ? बिलांत मुख्य गुण आला असला तर तो हा कीं, डि. मॅजिस्ट्रेटाने काढलेल्या हुकुमावर न्यायकोर्टाकडे अपील करण्याचा अधिकार आरोपीस प्राप्त होणार आहे. मसूरचा ब्रह्मचर्याश्रम सरकारानें बेकायदेशीर ठरविला, त्यांतील ७ हजारांचे रुपये किंमतीची मालमत्ता जप्त केली, ती मातीच्या मोलाने लिलावांत विकली आणि आश्रमवासीयांना देशोधडीला लावलें. ब्रम्हचर्याश्रमाची स्थापना हिंदूंच्या सामाजिक व धार्मिक उद्धारासाठी झाली होती; त्याचा राजकारणाशीं काडीइतकाहि संबंध नव्हता याची माहिती सर्व लोकांस असता आश्रमाचे चालक श्रीविनायकमहाराज यांस त्यांजवरील आरोपाचे बाबतींत न्यायकोर्टांत आपली बाजू मांडण्यास वटहुकुमाने सवडच न ठेवल्यामुळे महाराजांजवळचा सर्व पुरावा जागच्या जागींच जिरून त्यांना आपल्या आश्रमाची होत असलेली धूळधाण कपाळाला हात लावून उघड्या डोळ्यांनी पाहण्याची पाळी आली.तशी दुबळी अवस्था दुसऱ्या एखाद्या संस्थेवर यापुढे ओढवणार नाही एवढेंच काय तें दुःखांत सुख.वर्तमानपत्रासंबंधाच्या नियंत्रणांत म्हणण्यासारखा कांहीच फरक झाला नाही. जमीनमहसूल, लोकल फंड किंवा इतर कोणताहि कर सरकाराकडे न भरण्याचा अथवा तहकूब ठेवण्याचा उपदेश वृत्तपत्रांनी रयतेस केल्यास तो राज्यकारभाराविरुद्ध चिथावणी देण्याचा गुन्हा घडतो.

करबंदीचा उपदेश कोणीहि नेहमीच कायदेभंग मनांत ठेवून करतो असें नाही. कायदेभंगाच्या चळवळीपूर्वीहि हा उपदेश अनेकवार करण्यांत आला असल्याचीं खेडा–बार्डोलीसारखीं पुष्कळ उदाहरणें देतां येतील. या चळवळीचा हेतु रयतेचें दुःख–निवारण करण्याचा होता, सरकारच्या राज्यैकारभाराचा गाडा खुंटविण्याचा नव्हता. मद्यपाननिषेध, परदेशी मालावरील बहिष्कार याहि चळवळी याच प्रकारच्या होत. अज्ञ लोकांनी व्यसनांतून मुक्त होऊन आपल्या अब्रूचें, द्रव्याचें व शरीरसंपत्तीचें रक्षण करावें हा मद्यपान-निषेधक चळवळीचा उद्देश आहे, सरकाराचें उत्पन्न बुडविण्याचा नाही. बहिष्काराची चळवळहि देशांतील उद्योग--धंद्यांना उत्तेजन देण्यासाठी आहे, इंग्लंडसारख्या परकीय राष्ट्राविषयीं द्वेषबुद्धि माजविण्यासाठी नाही व या सर्व चळवळींचा जन्म कायदेभंगाच्या चळवळीपूर्वी झाला आहे. याचा स्पष्ट अर्थ असा कीं वरील प्रकारची कोणतीहि चळवळ कायदेभंगाच्या अभावीहि अस्तित्वांत राहूं शकते. कायदेभंग अनित्य आहे, बहिष्कार नित्य आहे. कायदेभंगापूर्वीहि जर बहिष्कारादि चळवळी चालू होत्या, तर कायदेभंगाशीं त्यांचा अर्थाअर्थी कांहीहि संबंध न येता त्या स्वतंत्रपणें स्वतंत्र संस्थांकडून कायदेभंगाच्या व कायदेभंगानंतरच्या काळांतहि कां चालूं राहूं नयेत हें आम्हांस समजत नाही. वाळल्याबरोबर ओलेंहि जळतें तें असें! नवीन कायद्याच्या रुळाखाली कायदेभंग तर दडपला जाणारच पण देशांतील इतर कोणत्याहि चळवळी चालणार नाहीत व त्या निकोपपणाने वाढीसहि लागणार नाहीत.

हिंदुस्थानांतील नोकरशाही हिंदुस्थानाच्या राज्याभिषेकाची तयारी या रीतीने करीत आहे! राज्याभिषेकाच्या मंगल समयीं ती बंदिजनांना मुक्त न करतां स्वतंत्र लोकांना तुरुंगांत लोटणार, गोरगरीबांना सुग्रास अन्न खावयास न घालता त्यांना तुरुंगांत खेचून कदान्न भक्षावयास लावणार, गुणिजनांना जमिनी इनाम न देतां त्यांच्याच जमिनी हिरावून घेणार, त्यांना स्वतः बांधलेलीं घरें बहाल न करता त्यांनी स्वत:करिता बांधलेल्या घरांतून त्यांना हाकून देणार, लहान मुलांच्या हातांत पेढ्यांचे पुडे न ठेवता उलट त्यांच्यापासून व त्यांच्या पालकांपासून दंडाच्या रकमा वसूल करणार. विद्वानांचा महावस्त्रांनी सन्मान न करता तुरुंगांतील साडेतीन वस्त्रांनी करणार आणि शूरांचीं शरीरें सोन्यारुप्याच्या कडींतोड्यांनी न भूषविता हातकड्यांनी व पायबेड्यांनी सजविणार! तसेंच कोणाला केव्हाहि पकडणार व केव्हाहि सोडणार.नवीन बिलांचें स्वरूप या प्रकारचें आहे व त्यांची घडण राज्यारोहणाच्या समारंभाकरिता होत असल्याचें हिंदुस्थानसरकारचे गृहमंत्री मि. हेग हे सांगत आहेत. राजाला हत्तीवर सोन्याच्या अंबारींत बसवून व त्यावर रत्नजडित छत्र धरून लाखो लोकांच्या गर्दीतून वाजतगाजत राज्याभिषेकास नेल्याचीं वर्णनें प्राचीन महाकवींनी केलीं आहेत. पण त्याऐवजीं राजाच्या मुसक्या बांधून व त्याचे तीन पाट काढून त्याची राज्याभिषेकाकरिता धिंड हिंडविल्याचें उदाहरण कथा-पुराणात व जगाच्या इतिहासांत एक तरी सांपडणार आहे काय? पण नव्या काळांतील नव्या महाकवींकरिता असें एखादें अभिनव व स्फूर्तिदायक महापर्व पुरविण्याचा हिंदी नोकरशाहीचा विचार नसेल असें तरी कोणीं म्हणावे?

# श्रीहनुमान व्यायाम प्रसारक मंडळ, उमरावती लष्करी छावणी

श्रीहनुमान व्या. प्र. मंडळाने आपल्या उद्देशाप्रमाणे शारीरिक शिक्षणाबरोबरच लष्करी शिक्षण सार्वत्रिक करण्याचे प्रयत्न यंदापासून सुरू केले असून, यापुढे परगांवच्या लोकांकरितां व गांवांतील फक्त लष्करी शिक्षण पाहिजे असणाऱ्या लोकांकरितां वर्गांच्या किंवा छावण्यांच्या द्वारां लष्करी शिक्षण देण्याचा मंडळाचा बेत आहे. त्याकरितां मंडळानें नगरसंरक्षक दलाची योजना तयार केली आहे.इतकेंच नव्हे तर येत्या डिसेंबरपासूनच तिला मूर्त स्वरूप येणार आहे.या सर्व पुढील योजना पार पाडण्याकरिता व शिक्षक व अधिकारी तयार करण्यासाठी मंडळाने दिपवाळीच्या सुटींत ही छावणी उघडली होती.

दिपवाळीच्या सुट्टींत दहा दिवस सकाळ संध्याकाळ व्यायाम मंदिराच्या पटांगणावर सैनिकांस शिक्षण देण्यांत येत असे. स्कॉड ड्रील, प्लॅटून ड्रील, मस्केट्री ट्रेनिंग, फायरिंग, एक्सरसाइजेस वगैरे सर्व शिक्षण पूर्ण झाल्यावर तीन दिवस कॅंपिंगचें शिक्षण देण्याकरितां दूरच्या ठिकाणांवर छावणी देणें अवश्य होतें. त्याप्रमाणे शुक्रवार ता. ४ रोजीं सैनिकांनीं आपापले सर्व सामान बरोबर घेऊन व बंदुका खांद्यावर टाकून अधिकाऱ्यांसहित छावणीच्या तळाकडे कूच केलें.

### लष्कराचा तळ

उमरावतीपासून सरासरी दीड मैलावर असलेल्या व सरकारी लष्कराच्या तळाकरतां पूर्वी उपयोगांत आणीत असलेल्या काळापाणी मैदानावर तंबू, राहुटया वगैरे लावून सैनिकानीं तळ दिला होता. पण मुक्काम फक्त तीनच दिवसांचा होता. व यामुळे कार्यक्रम भरगच्च आंखण्यांत आला होता. छावणींतील सर्वांचे कॅडेट्स्,ऑफिसर्स, क्वार्टरमास्टर सार्जेंट्स् व बॅंड्समेन असे चार विभाग पाडण्यांत आले असून त्यांच्याकरिता निरनिराळे तंबू व राहुटया उभारण्यात आल्या होत्या.याशिवाय किचन हाउस, आरमारी, वगैरेसाठी कनातीच्या कोठड्या बनविण्यांत आल्या होत्या. त्यामुळे खरोखरच लष्कराचा तळ येथे पडला आहे कीं काय असा आभास उत्पन्न होऊन बरेचसे प्रेक्षक तेथे हजर असत.

ता. ४ रोजीं सायंकाळीं ५ वाजतां व्यायाममंदिरांतून बिगुलच्या चालीवर मार्च करीत सर्वांनी तेथे कूच केल्यावर मंडळाच्या लष्कराचा जरीकाठी केशरी झेंडा तेथे मैदानाचे एका बाजूस मध्यभागीं रोविला, व केवळ अर्ध्या तासांत निरनिराळे तंबु उभे केले व सूर्यास्तासमयीं बॅंडच्या रिट्रीटच्या प्रशांत निनादांत ध्वजारोपण झाल्यानंतर सर्व जरूर ती व्यवस्था करण्यांत आली. त्यानंतर विश्रांति व भोजन झालें व रात्रीपासून कार्यक्रम सुरू झाला.

सैनिकाचे निरनिराळे भाग पाडण्यांत आले होते व प्रत्येक पथकाला दोनदोन तासांची 'सेन्ट्री ड्यूटी'(पाहाऱ्याचें काम) देण्यांत आली होती.रात्रीं चांदणें स्वच्छ असून थंडीहि कडक पडली होती. तरी पण सेन्ट्रीचे बुटाचे खाडखाड आवाज आणि "हू कम्स देअर ?" वगैरे हुकमी शब्द मधून मधून स्पष्ट ऐकूं येत असत. गार्ड माउंटिंग व गार्ड डिस्माउंटिंगच्या वेळेस सैनिकांची आतुरता, तडफ व शिस्त अत्यंत पाहण्यासारखी होती.

### झेंडयास सलामी

दुसरे दिवशीं पहाटेस साडेपांच वाजतां 'रीव्हीली'चा व 'राउजा'चा बिगुल झाल्याबरोबर सर्व सैनिक मोठ्या उत्साहाने व हुरूपाने उठले आणि प्रातर्विधि आटोपून व पोशाख चढवून ६॥ वाजता बिगुलाच्या 'फालइन'च्या कॉलबरोबर मैदानावर उपस्थित झाले. लष्करी बॅंडच्या उत्साहवर्धक आवाजांत झेंड्यास 'प्रेझेंट आर्म'ची सलामी दिल्यानंतर दिवसाच्या कार्यक्रमास सुरुवात झाली.

दोन दिवसांचे अवधींत प्रत्येकास ऑफिसर्सचें काम करावयास मिळून, थोडथोडा वेळ प्लॅटून चालविण्याचें शिक्षण मिळालें. हुकूम कसा द्यावा व चुका दुरुस्त कशा कराव्यात,लढाईच्या वेळेस प्रसंग पाहून आपल्या प्लॅटूनच्या हालचाली व निरनिराळे व्यूह कसे करावेत वगैरे गोष्टी प्रत्येकास शिकविण्यांत आल्या त्याबरोबरच सर्वांना 'आर्म्सड्रील'हि शिकविण्यांत आली. बिगुलचे 'कॉल' वगैरेचें शिक्षण सर्वांस देण्यांत येऊन प्रत्येक कॉलचा अर्थ व त्याबरोबर करावयाची कामगिरी या सर्वांची माहिती करून देण्यांत आली. खंदकांतील लढाईचें शिक्षण देण्यासाठी खंदक मुद्दाम खोदून करण्यांत आले असून तेंहि शिक्षण सर्वांस देण्यांत आलें.

### लष्करी बॅंड

वरील शिक्षण व दैनिक कार्यक्रम चालू असता मंडळाचा कर्णमधुर लष्करी बॅंड सतत वाजत होता.मंडळाने जवळ जवळ २००० रुपये खर्च करून या बॅंडचें शिक्षण विद्यार्थ्यांस दिले आहे. आणि तो बॅंडहि मंडळाच्या कीर्तीत भर टाकण्याच्याच योग्यतेचा झाला आहे. हा बॅंड सतत चालत असल्याने एकंदर हालाचालीस व कार्यक्रमास फारच मनोरंजकता प्राप्त झाली होती.

### सामने व चढाओढी

वरील शिक्षणाबरोबरच प्रत्येक तुकडीच्या चढाओढी लावण्यांत आल्या होत्या. Kit competition, Observation competition, Memory test, Musketry competition, Short and long range, Running races इ. सामन्यांत अधिकाऱ्यांनी स्वतः चढाओढीमें भाग घेऊन एकंदर कार्यक्रम फारच चुरशीचा केला. शर्यतीच्या एकंदर निकालावरून पाहता निशाणबाजींत सैनिकांनी फारच प्रगति दाखविली यांत शंका नाही.

दिवसरात्र 'सेन्ट्री ड्यूटी' चालू असून तें काम फारच व्यवस्थितपणामें व चोख होत होतें. याशिवाय 'सिग्नलिंग' 'अॅम्ब्युलन्स' वगैरे इतर गोष्टींचेंहि शिक्षण सर्व सैनिकांस देण्यांत आलें.

ही छावणी पाहण्याकरिता गांवांतील लोकांची सारखी ये--जा सुरू होती. गांवांतील बरींचशी प्रतिष्ठित मंडळी रविवारीं सकाळीं व सायंकाळीं भेट देण्यास आली होती. कित्येकजण तर सारखे बसून कार्यक्रम अवलोकन करीत असत.

### कॅंप--फायर

रविवारीं रात्रीं कॅंप फायरचा कार्यक्रम करण्यांत आला. सैनिक व अधिकारी सर्व एके ठिकाणीं एकत्र जमून सर्वांनी तो कार्यक्रम फारच मौजेनें पार पाडला. हा कार्यक्रम सरासरी दीड तास चालला, व सारा वेळ हंसून हंसून मंडळीस चांगलीच करमणूक झाली. या कार्यक्रमास गांवांतील बरींचशी मंडळी हजर होती.

सोमवारीं सकाळीं पहाटेस उठल्यानंतर झेंड्यास सलामी दिल्यावर सूर्योदयापूर्वीच पंधरा मिनिटांत तंबु, राहुट्या वगैरे पाडून व व्यवस्थित ठेवून सर्वांनी आपापलें सामान खांद्यावर व पाठीशीं घेतलें व बिगुलाच्या निनादांत मार्च करीत सर्व सैनिक मंडळाच्या पटांगणावर आले. तेथे पुनः मंडळाच्या निशाणास 'प्रेझेंट आर्म'ची सलामी दिल्यावर आपापल्या बंदुका शस्त्रागारांत ठेवून सर्वांनीं स्वगृहीं प्रयाण केलें.

याप्रमाणें मंडळाचा लष्करी कॅंप यशस्वी रीतीनें पार पाडला. मंडळाच्या आंखलेल्या 'सिव्हिक डिफेन्स फोर्स'च्या योजनेला चालना देण्याच्या हेतूनें, येत्या डिसेंबरमध्ये लष्करी शिक्षण परगांवांतील लोकांस देण्यासाठीं नाताळाच्या सुटींत दहा दिवसांचा एक वर्ग मंडळातर्फे निघणार आहे. त्या वर्गांत शिकून तयार झालेल्या सैनिकांच्या द्वारें लष्करी शिक्षणाचा सर्व देशभर प्रसार करण्याचा मंडळाचा हेतु आहे. तरी या नाताळमधील वर्गास व सिव्हिल डिफेन्स फोर्सच्या योजनेस सर्वांनी सक्रिय सहानुभूति दाखवून मंडळाचें कार्य यशस्वी करण्यास मदत करावी अशी सर्वांस विनंति आहे.

## सिंधच्या विभक्तीकरणाची योजना

अलाहाबाद येथील ऐक्यपरिषदेच्या कमिटीने सिंधचा प्रश्न सोडविण्यासाठी जी योजना तयार केली आहे तिच्यांत पुढील कलमें अंतर्भूत आहेत—(१) सिंध प्रांत स्वतंत्र करावा (२) मंत्रिमंडळांत निदान एक हिंदु असावा व मंत्रिमंडळ कायदेमंडळाला सामुदायिक रीत्या जबाबदार असावें (३) एखाद्या कायद्याला सर्व अल्पसंख्याक समाजाच्या ⅔ प्रतिनिधींनी हरकत घेतली आणि ती मंत्रिमंडळाने मान्य केली, तर तो कायदा मागे घेण्यांत यावा. मंत्रिमंडळाने मान्यता न दिली तर तो प्रश्न स्वतंत्र लवादाकडे सोंपवावा. तें लवाद मध्यवर्ती सरकारने नेमावें व तें तीन हिंदी न्यायाधीशांचें असावें. त्यांत एकाच जातीचे दोन न्यायाधीश नसावे आणि अन्याय झालेल्या अल्पसंख्य समाजांतील एक न्यायाधीश असावा. लवादाचा निर्णय प्रांतिक सरकाराला बंधनकारक होईल (४) मतदानाचे अधिकार सर्वांना सारखे असावे. (५) मतदारसंघ संयुक्त असावा. विशिष्ट मतदारसंघ धरूनहि हिंदूंकरिता प्रांतिक कायदेमंडळांत शें. ३७ जागा दहा वर्षेपर्यंत राखून ठेवाव्या (६) सर्व स्थानिक संस्थांत मतदारसंघ संयुक्तच असावा (७) नोकऱ्यांचा विचार करण्यासाठीं एक प. स. कमिशन नेमावें व त्यांत हिंदु सभासद निदान ⅓ असावे. शें. ६० जागा गुणाप्रमाणे भराव्या व शें. ४० जागा अल्पसंख्याकांची कुचंबणा टाळण्यासाठी राखून ठेवाव्या. सिंधी व सिंधवासी माणसांना नोकरीसाठीं आधी पसंत करावें (८) सिंधमध्ये एक हायकोर्ट स्थापन करावें (९) सार्वजातीय समेट साधला तरच त्याचें एक अंग म्हणून सिंधची ही योजना अमलांत आणावी (१०) सिंधी पुढाऱ्यांनी आर्थिक प्रश्नाचा विचार करण्यासाठीं या महिनाअखेर आपली सभा भरवावी.

# अलाहाबादेच्या समुद्रमंथनांतील ऐक्यसुधा

रत्नैर्महार्हैस्तुतुषुर्न देवाः। न भेजिरे भीमविषेण भीतिम्। सुधां विना न प्रययुर्विरामं। न निश्चितार्थाद्विरमंति धीराः ॥

पुराणांतरीं देवदानवांनी मिळून आपल्यास अमृताची प्राप्ति व्हावी म्हणून केलेल्या समुद्रमंथनाची अत्यंत हृदयंगम अशी कथा आहे. हें समुद्रमंथन पुष्कळ वर्षे चाललें होतें. त्यांतून अनेक दिव्य रत्नें निघालीं व तसेंच काळकूट विषहि निघालें. अत्यंत मौल्यवान् अशा रत्नांनी देवांचें समाधान झालें नाही. या मंथनांतून उत्पन्न झालेलें काळकूट सर्व जगाला जाळीत सुटलें पण त्याचीहि त्यांना भीति वाटली नाही. प्रत्यक्ष अमृताचा कुंभ हातीं पडेपर्यंत त्यांनी आपल्या श्रमांत खळ पडूं दिला नाही. अमृताचा कुंभहि लपवून ठेवला गेला. पण तो देवांनी पुनः मिळविला. देवांचा अमृत मिळविण्याचा निश्चय कणखर होता. आपण आपल्या प्रयत्नांत विजय मिळवूंच मिळवूं अशी त्यांनी मनाशीं खात्री बाळगली होती व म्हणूनच शेवटीं त्यांना जय मिळाला. हिन्दुस्थानांत हिन्दु, मुसलमान, शीख, ख्रिस्ती वगैरे ज्ञातींत ऐक्य घडवून आणण्याचे जे प्रयत्न झाले ते पाहिले म्हणजे देवदानवांच्या समुद्रमंथनाच्या प्रयत्नाची आठवण झाल्याशिवाय राहत नाही. व अशीहि खात्री वाटूं लागते कीं शेवटीं यांत यश मिळाल्याशिवायहि राहणार नाही.

आजपर्यंतचा या ऐक्य घडवून आणण्याच्या प्रयत्नांचा इतिहास मात्र उद्वेगजनक व उत्साहभंग करणारा आहे खरा. कारण त्यांतून रत्नें क्वचितच निघालीं! हालाहल विष मात्र अनेक वेळा वांट्यास आलें. लॉर्ड बर्कनेहेडच्या उद्दाम भाषणाने हिंदी राष्ट्रीय पुढाऱ्यांच्या स्वाभिमानाला कडकडून दंश केल्यामुळे पंडित मोतीलाल नेहरूंच्या नेतृत्वाखालीं निरनिराळ्या ज्ञातींमध्ये राष्ट्रीय वृत्तीच्या पायावर ऐक्याची इमारत बांधण्याचा चारपाच वर्षांपूर्वी मोठा प्रयत्न झाला व त्यांत कांहीसें यशहि मिळालें. पण शेवटीं दुर्दैवी मनुष्याच्या भाग्यहीनत्वामुळे हातांत धरलेल्या सोन्याची माती होते त्याप्रमाणेच त्या सर्वांगसुंदर योजनेचे जनक खुद्द पं. मोतीलालजी यांच्या डोळ्यांदेखत खुद्द राष्ट्रीय सभेनेच त्या योजनेला मूठमाती दिली! गेल्या वर्षी महात्मा गांधी विलायतेस गोलमेज परिषदेस गेले त्या वेळीं हिंदु व मुसलमान समाजांत ऐक्य करण्याचा आणखी एक मोठा प्रयत्न झाला. या प्रयत्नाचा शेवट तर नेहरूंच्या प्रयत्नापेक्षाहि अधिक शोकपर्यवसायी झाला! त्यांत ऐक्य होण्याचें बाजूलाच राहिलें पण उलट सर्व अल्पसंख्याक म्हणविणारे गट व त्यांचे पुढारी यांनी आपल्या तंबू व राहुट्या लोकपक्षाच्या गोटांतून उठवून ब्रिटिश छावणीच्या आवारांत नेल्या व ही सर्व मंडळी ब्रिटिशांच्या निशाणाखाली उभी राहून शत्रुपक्षाच्याच बाजूने लढूं लागली! अशा तऱ्हेने पराभूत झालेले महात्मा गांधी हिंदुस्थानास परत आले व ऐक्याच्याच मागे लागून तें साधावयाचें असा निश्चयहि त्यांनी केला. पण तेंहि घडून आलें नाही.

इतिहासाची पुनरावृत्ति होते म्हणतात त्याप्रमाणे गेल्या दोनतीन महिन्यांत एक नवीनच अकल्पित घटना घडून आली व या ऐक्याच्या प्रयत्नांच्या चक्रास पुनः भरधांव गति मिळाली. ब्रिटिश सरकाराने मुख्य प्रधानांच्या द्वारें जो ज्ञातिविषयक निर्णय दिला त्यामुळे पुनः हिंदी राष्ट्रीयवृत्तीचा स्वाभिमान डवचला गेला व ' प्रायः स्वं महिमानं क्षोभात् प्रतिपद्यते जन्तुः ' या कालिदासोक्तीप्रमाणे सर्व राष्ट्रीय कर्तृत्वशक्ति पुनः जागृत झाली. अस्पृश्यवर्गांची व हिंदु समाजाची ताटातूट होऊं नये म्हणून गांधीजींच्या प्रायोपवेशनाच्या दिव्यामुळे स्पृश्यास्पृश्यांचा करार झाला व त्याच प्रकाशांत हिंदुमुसलमान व शीख यांच्या ऐक्याचा मार्ग दिसूं लागला. वर दिलेला पराभवाचा इतिहास या वेळीं पं. मालवीयजी वगैरे पुढाऱ्यांच्या डोळ्यांपुढे नव्हता असें नाही. पण प्रयत्नाची कांस धरणारा आशावादी मनुष्य कविनिर्मित सृष्टींत वाळूचे कण रगडून तेल काढण्याची महत्त्वाकांक्षा धरूं शकतोच कां नाही? मग या प्रत्यक्ष सृष्टींत विकारसंमिश्र का होईना पण विचार करणाऱ्या व राष्ट्रहिताच्या शुद्ध भावनेने स्फुरण पावलेल्या राष्ट्रीय कार्यकर्त्यांनी पुनः एकवार राष्ट्रीय ऐक्य घडवून आणण्याच्या प्रयत्नास अलाहाबादेस सुरुवात करावी यांत आश्चर्य नाहीं. प्रयागच्या या त्रिवेणीसंगमावर पूर्वीचा इतिहास डोळ्यांपुढे असल्यामुळे ऐक्याचीं हाडें बुडविलीं जातात कीं काय अशी साहजिकच भीति आम्हांसहि वाटत होती. परंतु या खेपेस या वेळेपुरता तरी योगायोग असा आला कीं, ऐक्याचीं हाडें न बुडतां या हाडांतून वज्र निर्माण करणाऱ्या राष्ट्रीय उद्योगाच्या मार्गावरील पुढचा टप्पा या परिषदेने गांठला. आज दुसरीकडे या छोट्या ऐक्य परिषदेंत झालेले ठराव दिले आहेत त्यांवरून ही गोष्ट प्रतीत झाल्याशिवाय राहाणार नाही.

पंडित गोविंद मालवीय यांच्या पत्रकांत अलाहा-

बादेस जमलेल्या पुढाऱ्यांनी केवढा "उद्दंड व नेटका' प्रयत्न केला याचें यथातथ्य वर्णन गणितपद्धतीने केलें आहे. पंडित मालवीयजींच्या निमंत्रणावरून सर्व ज्ञातींचे राष्ट्रीय वृत्तीचे पुढारी एकत्र जमले व त्यांनी रात्रीचा दिवस करून व एकमेकांना आळविण्याची व एकमेकांची समजूत घालण्याची शिकस्त करून परिषदेंतील सर्व लोकांना संमत अशी एक घटना घडवून आणली. सद्विचाराला व सत्कार्याला मरण नाही. एकदां उगमस्थानापासून निघालेला पाण्याचा प्रवाह आपला मार्ग काढीत जातो, पुढे त्याला मोठ्या नदीचें स्वरूप येतें व तो आपलें ध्येय गाठतो. तशीच स्थिति या राष्ट्रैक्याच्या प्रयत्नांची आहे. हा प्रवाह आपला मार्ग चोंखाळीत असतांना दिसेनासाहि होतो. नाही असें नाही. अलाहाबादेच्या नव्या योजनेने या प्रवाहाच्या गतीचीच आठवण होते. पंडित मोतीलाल नेहरूंनी केलेल्या योजनेचा प्रवाह देशहितविघातक अशा रूक्ष वाळवंटांत जिरला असें वाटत होतें. पण तो या अलाहाबादेच्या समेटाने पुनः जिवंत झाला असें दिसतें.व म्हणूनच ज्या बुद्धीने त्या वेळीं नेहरू रिपोर्टाचें आम्हीं अभिनंदन केलें त्याच राष्ट्रहितबुद्धीने याहि प्रयत्नाचें आम्ही हार्दिक अभिनंदन करतो.

आम्ही हें जें अभिनंदन करीत आहों याचा अर्थ असा नव्हे कीं, आमच्या मताने ही योजना सर्वगुणसंपन्न आहे, यांत हिंदूंचा मोठा फायदा झाला आहे. किंवा शुद्ध राष्ट्रीय बुद्धीच्या दृष्टीने ही योजना निर्दोष आहे. ज्ञातिविषयक आकुंचित कल्पना सोडून शक्याशक्यतेचा विवेक डोळ्यांपुढे ठेवल्यास व आजच्या राजकीय परिस्थितींत हिंदु--मुसलमानांच्या ऐक्याच्या पाठबळाची स्वराज्याच्या संपादनाच्या कार्यांत केवढी जरूरी आहे याचा ताळा मनाशीं घातल्यास अलाहाबादेस सिद्ध झालेल्या समेट-योजनेकडे कोणासहि सहानुभूतीनेच पहावेसें वाटेल. म्हणूनच अनेक अडचणींचे डोंगर, दुराराध्य मुसलमानांची स्वार्थपूर्ण दऱ्या--खोरीं आणि त्यापेक्षाहि कोणत्याहि तऱ्हेचा समेटच न होऊं देण्यांत ज्यांचें हित आहे अशांच्या डावपेंचांच्या,प्रलोभनाच्या व कपटी कारस्थानांच्या नद्यांतील भोंवरे हीं सर्व संकटें टाळून ज्यांनी एकीचा मार्ग काढला त्यांच्या प्रयत्नांची तारीफच केली पाहिजे.

प्रयागक्षेत्रीं जन्मास आलेल्या या ऐक्याच्या योजनेला अजून अनेक दिव्यांतून जावयाचें आहे. डिसेंबरच्या पहिल्या आठवड्यांत सर्व ज्ञातींच्या सर्व राजकीय पक्षोपपक्षांच्या व अँग्लो-इंडियन,युरोपियन वगैरे ब्रिटिश सरकाराशीं एकरूप असलेल्या समाजांच्या प्रतिनिधींची सभा बोलावण्यांत आली असून त्या परिषदेच्या कसोटीस ही योजना उतरावयाची आहे ही गोष्ट विसरतां कामा नये. या दिव्यांतून शिरसलामत पार पडणें कठिण. परंतु त्यांत यश आलें तरी ब्रिटिश प्रधानमंडळानें त्याचा औरसपणा कबूल करून त्याला वारसा सर्टिफिकेट दिलें पाहिजे व त्यांनी केलेला ज्ञातिविशिष्ट निर्णय रद्द केला पाहिजे ! हें काम किती बिकट आहे हें सांगणें नकोच. तथापि हीं संकटें दिसतात इतकी अनुल्लंघनीय नाहीत असें वाटतें. व तें तसें ठरलें तर हिंदुस्थानाचा भाग्यरवि उदयास आला असें म्हणण्यास हरकत नाहीं. पण आज त्याचा विचार करण्याचें कारण नाही. "संकटाच्या सैतानाला, तो प्रत्यक्ष भेटेपर्यंत, अभिवादन करण्याची जरूरी नाही" असें लॉर्ड मोर्ले म्हणत असत तें वचन डोळ्यांपुढे ठेवून आज त्या प्रश्नाची चर्चा न करणेंच उत्तम, योग्य वेळीं त्याचा विचार केला जाईलच. पुढे अद्याप किती अडचणींतून जावयाचें आहे याचें दिग्दर्शन एवढ्याचकरिता केलें कीं, सर्वांस सावधगिरीची सूचना मिळावी व भलत्याच दिशेने या बाबतींतील वादाचें अगर टीकेचें तट्टू भडकूं नये. हिंदु-मुसलमानांत भावी स्वराज्याच्या घटनेंतील अधिकाराच्याबाबत ऐकमत्य होणें शक्य नाही ही दगडावरची अटळ रेघ असें मानण्याची प्रवृत्ति उत्पन्न झाली होती. ती प्रवृत्ति या समेटाने नष्ट होईल व 'रेखा तितकी पुसून जाते' या समर्थोक्तिप्रमाणें ती अटळ रेषा पुसली गेली अशी मनाशीं खूणगांठ बांधून पुढील संकटें डोळ्यापुढें ठेवून मगच या योजनेच्या गुणदोषांची चर्चा होणें योग्य होईल इतकेंच आम्हांस म्हणावयाचें आहे. व या दृष्टीनेंच आम्ही या योजनेची थोडी चिकित्सा करीत आहों.

अलाहाबादेच्या समेटाच्या योजनेची चिकित्सा प्रथमतः राजकीय दृष्टीने करणें उचित होय. हिंदु, मुसलमान, शीख वगैरे ज्ञातींमध्ये ऐक्य उत्पन्न करण्याचे 'लखनौच्या करारा'पासून जे प्रयत्न झाले त्यांच्या मुळाशीं एकच उद्देश होता. हिंदुस्थानाने आपल्या राजकीय गुलामगिरीच्या शृंखला तडातड तोडून स्वराज्योपभोगी व्हावें हाच तो उद्देश. हिंदु व मुसलमान यांनी हें उद्दिष्ट खांद्यास खांदा लावून प्रयत्न करून साधावें हा एकच मुद्दा लोकमान्यांनी लखनौस करार केला त्या वेळीं आपल्या डोळ्यापुढे ठेवला होता,ही गोष्ट मशहूर आहे. महात्मा गांधींनीहि विलायतेस कोऱ्या कागदावर सही करण्याचें कबूल केलें तें याच उद्देशाने प्रेरित होऊन. परवा नुकत्याच झालेल्या कराराच्या शेवटीं याच गोष्टीचें बंधन हिंदु, मुसलमान व शीख पुढाऱ्यांनी आपल्यावर घालून घेतलें आहे हें बंगाल प्रांतासंबंधीच्या करारांतील एका कलमाने सिद्ध होते.तसेंच कराराच्या पहिल्या कलमांतहि प्रांतिक स्वायत्ततेबरोबरच

मध्यवर्ती सरकार लोकपक्षाला सर्वस्वी जबाबदार राहील व हिंदुस्थानाच्याच हिताच्या दृष्टीने संरक्षक बंधनें घातलीं जातील असें स्पष्ट म्हटलें आहे. या दृष्टीने पाहता दोनहि गोलमेज परिषदांच्या वेळीं ब्रिटिश साम्राज्यवादी मुत्सद्द्यांनी मुसलमानांस फोडण्याचा जो डाव टाकला होता त्याला चांगलाच शह बसला असें म्हटलें पाहिजे! स्वराज्याच्या हक्काबाबत दाणे टाकून कोंबडीं झुंजवावयाचा ब्रिटिशांचा उद्योग यापुढे यशस्वी होणार नाही. ज्ञातिविषयक निर्णय हें कायमच्या बेकीचें सरकारच्या बाजूचें शस्त्र होऊन बसलें होतें. तेंहि या समेटाने बोथट होणार. या सर्व दृष्टींनी पाहिलें असता अलाहाबादच्या समेटाचें महत्त्व लक्षांत येतें. आमचा एक आक्षेप आहे तोहि नमूद करणें जरूरीचें आहे; व तो आक्षेप म्हणजे शेषाधिकार प्रांताकडेच राहावे असा जो या बाबतींतील कलमांत अर्थ दृग्गोचर होतो तो आम्हांस मान्य नाही हा होय. पुढील मोठ्या परिषदेंत या कलमांत दुरुस्ती झाली पाहिजे.

यानंतरच्या चिकित्सेचा विषय म्हणजे मुसलमानांच्या सुप्रसिद्ध चौदा मुद्द्यांचा.त्यांपैकीं,राज्यपद्धतीच्या कांही मुद्द्यांचा विचार वर झालाच. सिंध, बलुचिस्थान, व सरहद्द प्रांत यांना इतर प्रांताप्रमाणे पूर्ण स्वायत्तता असावी असें या चौदा मुद्द्यांत कलम आहे. याला हिंदूंचाहि वास्तविक विरोध नव्हता. पण प्रश्न हा होता कीं, हे प्रांत अशा रीतीने स्वायत्त झाले तर अल्पसंख्य हिंदूंची वाट काय होणार ? अलाहाबादेच्या या समेटांत अल्पसंख्याक मुसलमानांना त्यांचा धर्म, संस्कृति, व्यक्तिगत हक्क, धार्मिक चालीरीति, भाषासंवर्धन वगैरे बाबतींत जे हक्क दिले आहेत तेच हिंदूंना लागू केले असल्यामुळें त्याबद्दलची तक्रार येण्यासारखी नाही. सिंधच्या विभक्तीकरणाच्या प्रश्नांत मात्र बरीच गुंतागुंत होती. पण त्यांत आर्थिक बोजा सिंधनेच उचलावा असें ठरल्यामुळे तोहि प्रश्न मिटला. शिवाय सरकारी नोकऱ्या, मंत्रिमंडळात प्रतिनिधि वगैरे बाबींत सिंधच्या हिंदूंना समाधान वाटेल अशी योजना झाली, यामुळे तोहि प्रश्न निकालांत निघाल्यासारखा आहे. सिंधच्या विभक्तीकरणाच्या बाबत जी दुसरीकडे योजना प्रसिद्ध झाली आहे तिजवरून सिंधांतील हिंदूंना धर्म, संस्कृति वगैरे गोष्टी संरक्षित करतां येतील असा सिंधांतीलच प्रतिनिधींचा अभिप्राय दिसतो.

पण यापेक्षा ऐक्याच्या मार्गातील खरी धोंड म्हणजे पंजाब व बंगाल येथील मुसलमानांना कायदेशीर मार्गाने कायमचें व ठाम बहुमत द्यावें ही होती व आजच्या समेटानंतरहि ती कायम आहे असें आम्हांस वाटतें. या योजनेंतील हें मोठें वैगुण्य आहे. लोकसंख्येच्या प्रमाणांत कोणालाहि कमी जास्ती जागा मिळावयाच्याच, पण कायद्यानेच त्या जागांचा निर्णय कायमचा केला तर राष्ट्रहितबुद्धीचाहि कायमचाच कोंडमारा होणार हें निश्चित. म्हणून या प्रांतांतून कायद्याने कायमचेंच बहुमत देऊं नये एवढीच राष्ट्रीय हिंदूंची व हिंदुसभेची मागणी होती. या समेटाच्या योजनेंत बंगाल व पंजाबमध्ये कायमच्या ५१ टक्के जागा मुसलमानांना दिल्या गेल्या ही चूक होय यांत शंका नाही. या प्रकरणाचाहि पुढील मोठ्या सभेंत विचार झाला पाहिजे.

यानंतरचा व सर्वांत मोठा प्रश्न म्हणजे संयुक्त मतदारसंघाचा. कारण मुसलमानांच्या चौदा मुद्द्यांपैकीं बहुतेक सर्व मुद्दे थोड्याबहुत फरकाने मान्य केले गेले हें वरील विवेचनावरून स्पष्ट दिसतेंच. स्वतंत्र मतदारसंघ ही मात्र मुसलमानांची खरी ढाल व ती कायमची आपल्या हातांत ठेवण्याचा अट्टाहास जातिनिष्ठांनी चालविला होता. त्यांचा हा हट्ट चालूं देणें म्हणजे राष्ट्रीयत्वाच्या बुद्धीला नख लावण्यासारखेंच होतें. व म्हणूनच खरें वादचक्र या एका मुद्द्याभोंवतींच फिरत होतें. मौ. शौकतअल्लींनी आपल्या धाकट्या भावाचा म्हणजे महमदअल्लींचा तोडगा पुढे मांडला. महमदअल्लींची योजना अशी कीं, संयुक्त मतदार-संघांतूनच आपल्या ज्ञातींचीं चाळीस टक्के मतें ज्याला मिळतील, व इतरांचीं कांही थोडींबहुत मिळतील तो उमेदवार निवडला गेला असें समजावें. अलाहाबादेच्या परिषदेंत यांत असा फरक करण्यांत आला कीं, संयुक्त मतदारसंघांत ज्याला अधिकांत अधिक मतें मिळून स्वज्ञातीयांचीं ३० टक्के मतें मिळतील तो निवडला गेला असें समजावें. ३० टक्के न मिळाल्यास जास्तींत जास्ती मतें ज्याला मिळालीं असतील तो निवडला जाईल. महमदअल्लींच्या तोडग्यांत स्वज्ञातीयांच्या मतावर भर होता व या योजनेंत संयुक्त मतदारसंघाच्या मतावर भर आहे हें लक्षांत ठेवलें म्हणजे यांतील फरक लक्षांत येतो व त्यांतील मर्महि कळतें.

मध्यवर्ती सरकारच्या कायदेमंडळांत आपल्यास एक-तृतीयांश जागा मिळाव्या आणि प्रांतिक व मुख्य सरकारच्या मंत्रिमंडळांतहि आपल्याला त्याच प्रमाणांत जागा मिळाव्या असाहि मुसलमानांचा हट्ट होता. अलाहाबादेच्या योजनेंत ब्रिटिश हिंदुस्थानाकरिता जेवढ्या जागा ठेविल्या जातील त्यांतील ३२ टक्के जागा मुसलमानांना देण्याचें ठरलें आहे व मंत्रिमंडळांतील जागांचें निश्चित प्रमाण न करता अल्पसंख्याक हिंदूंना जो न्याय लागू तोच त्यांना लागू करण्यांत आला आहे. एकंदरींत तारतम्याने विचार केल्यास अलाहाबादेची योजना कांही

बाबतींत सदोष असली तरी ती विचारार्ह आहे यांत शंका नाही. म्हणूनच राष्ट्र या योजनेकडे सहानुभूतीने पाहील अशी आम्हांस उमेद आहे. समुद्रमंथनांतून शेवटीं सुधा निघाली तसेच यापुढील परिषदेच्या वादविवादाच्या मंथनांतून ऐक्याची सुधा निघेल अशीच कोणाहि देशभक्तीने प्रेरित झालेल्या मनुष्यास आशा वाटण्यास जागा झाली हा कांही थोडाथोडका फायदा नव्हे. 'प्रसादचिन्हानि पुरः फलानि' या न्यायाने या प्रयत्नाबद्दल सर्वांना आनंदच होईल यांत शंका नाही.

# म. गांधींची मुलाखत

सोमवार ता. २१ माहे नोव्हेंबर रोजीं रा. वा. कृ. भावे यांनी म. गांधींची भेट येरवड्याच्या तुरुंगांत घेतली. रा. हरिभाऊ फाटक यांस आदल्या दिवशीं पत्र आल्याप्रमाणें ते उभयतां दुपारीं १ वाजता तुरुंगापाशीं गेले. त्याच वेळीं गांधिजींचें मौनव्रत संपावयाचें होतें. तें संपताक्षणींच भेटीची पहिली संधि आपल्यास मिळेल अशी त्यांची अपेक्षा होती. पण ती तितकीशी खरी ठरली नाही. कारण त्यांच्या पूर्वी कांही वेळ 'टाइम्स'पत्राचा एक प्रतिनिधि व बाबू सतीशचंद्र दास गुप्त गांधिजींपाशीं जाऊन बसलेंच होते. त्यांपैकीं टाइम्सच्या बातमीदाराबरोबर गांधींचें बोलणें व्हावयाचें तें होऊन सदर बातमीदार तुरुंगाच्या बाहेर आल्यावर भावे व फाटक यांना भेट घ्यावयास मिळाली. तुरुंगाच्या दरवाज्यावर उजव्या हाताला एक माडी आहे त्या माडींत गांधीजी एका खुर्चीवर बसले होते. ते उघडेच असून कंबरेभोंवतीं त्यांनी गुंडाळलेलें एक लहानसें वस्त्र एवढाच काय तो त्यांच्या अंगावरचा कपडा. नाही म्हणावयास त्यांच्या दोन कोपरांना फडक्याच्या पट्या बांधल्या होत्या. त्यांची गणना वाटली तर वस्त्रांत करावी, वाटली तर चिंध्यांत करावी. त्यांचे हात चरख्यावर सूत काढून दुखूं लागले म्हणून त्या पट्या बांधल्या होत्या असें नंतर तपासाअंतीं समजलें.

गांधींच्या उजव्या हाताला त्यांचे शिष्य रा. महादेवभाई देसाई हे संभाषणाचीं टिपणें घेण्याचें काम करीत होते. खोलींत सरकारी कागदपत्र व इतर सामान असून बाकीची जागा गांधीजींकरिता मोकळी करण्यांत आली होती. त्या जागेंत सायंकाळीं ४ वाजेपर्यंत ते बसतात, भेटावयास येणारांशीं अस्पृश्यतानिवारण या विषयावर चर्चा करतात व मग तुरुंगांतील आपल्या खोलींत परत जातात असा त्यांचा नित्यक्रम आहे. भावे व फाटक भेटावयास गेले त्या वेळीं गुरुवायूर मंदिराच्या बाबतींत गांधिजींबरोबर वाटाघाट करण्याकरितां मंगलोर येथील एक वकील मुद्दाम आले होते. भावे यांनी गांधिजींस विचारावयाच्या प्रश्नांचा एक कागद बरोबर नेला होता. हेतु असा कीं महत्त्वाचे मुद्दे गळूं नयेत, चर्चेचें काम सोपें व्हावें व गांधिजींचा वेळ अधिक न जाता तें लवकर संपावें. गांधिजींनी त्यांस विषय काढण्याविषयीं सांगितल्यावर भावे यांनी आपले मुद्दे वाचून दाखविले, व त्यांचा कागद त्यांच्या हवालीं केला. त्यांतील एक एक मुद्दा घेऊन त्यांनी त्यासंबंधाचें आपलें म्हणणें सांगितलें.

( १ ) प्रायोपवेशनाने देवालयप्रवेशास विरुद्ध असणाऱ्या लोकांवर सक्ती होते कीं काय या मुद्याचा खुलासा करतांना ते म्हणाले, 'माझें पहिलें उपोषण गुरुवायूर देवालयाच्या बाबतींत आहे. सदर देवालयांत अस्पृश्यांना येऊं देण्यास तिकडील बहुमत अनुकूल असल्याचें मला समजलें आहे. उपोषणाचा हेतु मला अनुकूल असणारांनी मंदिरप्रवेशास मदत करावी हा आहे. जे मंदिरप्रवेशास प्रतिकूल आहेत त्यांच्याकरिता माझें उपोषण नाही. अर्थात् त्यामुळे त्यांजवर माझ्या उपोषणाने बळजबरीहि होण्याचें कारण नाही. आता उपोषणाचा कांही परिणाम त्यांनाहि जाणवेल व ते मंदिरप्रवेशाच्या प्रयत्नास लागतील हें खरें आहे; पण त्या भावनेचें स्वरूप प्रेमाचें राहील, सक्तीचें असणार नाही. आई मुलाचा हट्ट मायेकरिता पुरविते. त्यांतलाच हा एक प्रकार आहे. अशा रीतीने प्रेमाखातर जे लोक अस्पृश्यांच्या मंदिरप्रवेशास आज अनुकूल होतील, त्यांची कालांतराने मंदिरप्रवेशाच्या आवश्यकतेविषयी खात्री पटण्याचीहि आशा आहे.

(२) अस्पृश्यांना देवालयांत विशिष्ट ठिकाणापर्यंतच येऊं यावें हा मुद्दा गांधीजींस पटला नाही. देवाचे पुजारी खेरीजकरून इतर स्पृश्य लोक देवळांत जेथपर्यंत जाऊं शकतात तेथपर्यंत अस्पृश्यांनाहि जाण्याची परवानगी असावी असा त्यांचा अभिप्राय दिसला.

( ३ ) अस्पृश्यतानिवारणास मुदत घालणें अव्यवहार्य आहे; सहा महिने किंवा तितक्या बेताची मुदत अगदीच अपुरी आहे, हा मुद्दा त्यांस पटला. सहा महिन्यांचा आंकडा वर्तमानपत्रांत प्रसिद्ध झाला खरा, पण त्यावर माझा जोर नाही व इतरांनीहि तो प्रमाण समजूं नये असें त्यांनी सांगितलें.

( ४ ) 'सुशिक्षित स्पृश्य व सुशिक्षित अस्पृश्य' यांजमधील अस्पृश्यतेचा वाद मिटल्यासारखा आहे.

वाद असलाच तर अशिक्षित स्पृश्य व अशिक्षित अस्पृश्य यांत आहे.' या मुद्यावर गांधीजी म्हणाले, 'माझ्याकडे ज्यांचीं पत्रें आलीं आहेत ते सगळेसुशिक्षित स्पृश्यच आहेत. ते अस्पृश्यतानिवारणाच्या कामीं अनेक प्रकारच्या अडचणी सांगत आहेत. यावरून सुशिक्षितांचा विरोध उघडपणें दिसून येतो. शहरांतून सुशिक्षित अस्पृश्यांची अस्पृश्यता गेल्याचीं कांही उदाहरणें आढळत असतील. पण तो वरवरचा देखावा आहे. त्यांना स्पृश्य सुशिक्षित कारणपरत्वें भेटत असतील. परंतु ते त्यांस आपल्या घरांत राहावयास ठेवून घेणार नाहीत. डॉ. आंबेडकर यांचीच गोष्ट पहा. त्यांना मुंबईसारख्या शहरांतहि गांवदेवी वगैरे हिंदु वस्तीच्या भागांत राहवयास घर मिळत नाही. मोठमोठ्या हॉटेलांत येण्यासहि मज्जाव आहे. पुण्यांत ते आले तर त्यांना युरोपियन हॉटेलांत जावें लागून रोज दहा रुपयेपर्यंत खर्च करावा लागतो. यासाठी अस्पृश्यतेचें तत्त्वच अजिबात हिंदु समाजानें हुसकून लावल्यावांचून अस्पृश्यांच्या वाटेंतील अडचणी दूर होणार नाहीत. सुशिक्षित स्पृश्य, अस्पृश्यता-निवारणास विरुद्ध आहेत याचा अर्थ अशिक्षित स्पृश्यांची अस्पृश्यता निवारणास अनुकूलता आहे असा नव्हे. तथापि अशिक्षित स्पृश्य लोक सरळ असतात. त्यांची समजूत घातली म्हणजे पटते. ते उलटसुलट आक्षेप काढीत बसत नाहीत. त्यांना मार्गावर आणणें जितकें सोपें आहे तितकें सुशिक्षित स्पृश्यांना आणणें सोपें नाही असा गांधिजींच्या प्रतिपादनाचा आशय होता.

( ५ ) अस्पृश्यांची राहणी सुधारण्यापूर्वी स्पृश्यांशीं निकट संबंध आणल्यास स्पृश्य हिंदूंची संस्कृति व नीतिमत्ता खालीं घसरेल हा मुद्दा गांधिजींना तितकासा पटला नाही. ते म्हणाले 'अस्पृश्यांना दूर लोटलें म्हणूनच हिंदूंची संस्कृति व नीतिमत्ता अधोगतीस पोचली आहे. हिंदूंनी त्यांना जवळ केल्यास तो श्रेष्ठपणा कांचनगंगेइतका वाढेल. हें जरी खरें असले तरी सगळयाच गोष्टी घाईने होणार नाहीत याविषयीं त्यांचें दुमत नाही. तथापि या बाबतींत हिंदू समाजाशीं थोडीबहुत दांडगाई केल्यावाचून हा प्रश्न हवा तितका लवकर सुटणार नाही असा त्यांच्या बोलण्याचा झोक मात्र दिसला.

# अलाहाबादेची ऐक्य-परिषद

### मंजूर झालेले ठराव

अलाहाबाद येथे भरलेल्या ऐक्य परिषदेचे चिटणीस **पं. गोविंदकान्त मालवीय** यांनी तेथे झालेल्या ऐक्यपरिषदेच्या कामाबद्दल पुढील पत्रक काढलें आहे.

"ऐक्य परिषदेंतील कमिटीच्या कामाला नोव्हेंबरच्या तिसऱ्या तारखेस सुरुवात झाली. आणि तिच्यांतील वाटाघाटी ता. १७ रोजीं रात्रीं ७॥ वाजता संपल्या. कमिटीची बैठक डिसेंबरच्या ३ऱ्या तारखेस १ वाजता पुनः बोलाविली आहे. त्या वेळीं कमिटीच्या कामाचा अहवाल पसंत केला जाईल. डिसेंबरच्या ५ तारखेस १२ वाजता अलाहाबाद येथे मेयो हॉलमध्ये मोठी सर्वपक्षीय परिषद भरणार आहे. त्या परिषदेपुढे मंजूर झालेला अहवाल मांडला जाईल.

या कमिटीमध्ये जे सभासद हजर होते त्यांना अशी विनंति करण्यांत आली आहे कीं, त्यांनीं या दरम्यानच्या काळांत आपापल्या संस्थांकडून समेटाला संमति मिळवून ठेवावी.

ऐक्य परिषदेच्या या मंडळांत हिंदु, मुसलमान, शीख व ख्रिस्ती प्रतिनिधी होते. मंडळांच्या २३ सभा झाल्या व त्यांनी एकंदर १३६ तास वाटाघाट करण्यांत घालविले. हिंदु, मुसलमान व शीख यांच्यासंबंधाने ज्या ज्या बाबी उत्पन्न झाल्या त्यांचा निकाल एकमताने करण्यांत आला. ख्रिस्ती समाजाचे प्रतिनिधी या कमिटीच्या शेवटच्या सभांना हजर नव्हते. म्हणून त्यांच्या समाजाच्या कांही बाबी शेवटीं शेवटीं निघाल्या कारणाने तें काम व इतर थोडें राहिलेलें शिलकी काम या सर्वांचा निकाल या कमिटीची पुढे बैठक भरेल त्या वेळीं करण्यांत येईल.

### सर्वपक्षीय परिषद

या कमिटीने आपल्या सभेमध्ये समेटाचा ठराव पास केला आहे तो अखेर हिंदुस्थानाची जी ऐक्य परिषद भरणार आहे त्या परिषदेपुढे ठेविला जाईल. ही परिषद अलाहाबादेस सोमवार ता. ५ डिसेंबर १९३२ रोजीं भरेल व तिच्याकरिता देशांतील सर्व राजकीय व ज्ञातिनिष्ठ संस्थांच्या प्रतिनिधींना, तसेंच स्त्रिया, ख्रिस्ती समाज, अँग्लो इंडियन, व्यापारी, मजूर व जमीनदार यांच्याहि प्रतिनिधींना बोलावण्यांत येईल.

### ठराव

या कमिटीने जे ठराव पसार केले ते पुढीलप्रमाणे आहेत—

### मध्यवर्ती स्वायत्तता

(१) या सभेचें असें स्पष्ट मत आहे कीं, हिंदुस्थानाचे मध्यवर्ती सरकार लोकांना पूर्ण जबाबदार असें बनविल्याशिवाय व दुसऱ्या कोणत्याहि राष्ट्रीय

सरकाराला असणारे पूर्ण हक्क त्याला दिले गेल्याशिवाय हिंदुस्थानाच्या गरजा समाधानकारक रीतीनें भागल्या जाणार नाहींत व हिंदी लोकांचें राष्ट्रीय हितहि साधणार नाही.

म्हणून या परिषदेची अशी मागणी आहे कीं, मध्यवर्ती सरकारावरील ताबा हिंदी लोकांकडे दिला जावा व या बाबतींत जीं संरक्षक बंधनें कायद्यानें घालणें जरूर असेल तीं हिंदुस्थानच्या हिताच्या दृष्टीनें अपरिहार्य आहेत अशी खात्री पटली पाहिजे.

(२) धर्म, संस्कृति व व्यक्तिगत कायद्यांचें संरक्षण :—

(अ) भावी राज्यघटनेमध्यें मूलभूत हक्कासंबंधानें जीं कलमें घातलीं जातील त्यांत निरनिराळ्या समाजांची संस्कृति, भाषा, लिपी, शिक्षण आणि धर्माच्या बाबी व धर्मादाय देणग्या या सर्व बाबतींत संरक्षण दिलें जाईल अशी हमी असली पाहिजे. (आ) घटनेमध्यें विशिष्ट कलमें घालून व्यक्तिगत कायद्यांचें संरक्षण केलें जाईल. (इ) निरनिराळ्या प्रांतांतील अल्पसंख्याक समाजांचे राजकीय व इतर हक्क यांसंबंधी संरक्षणाची व्यवस्था करण्याची जबाबदारी मध्यवर्ती सरकारावर राहील. (ई) कोणत्याहि समाजाच्या व्यक्तिगत कायद्यांत बदल केला जाणार नाही. परंतु कायदेमंडळांतील त्या समाजाच्या प्रतिनिधींच्या द्वारें तशी इच्छा प्रदर्शित केली तर व त्या समाजांतील लोकमत अनुकूल असेल तरच त्यांत बदल केला जाईल. (ऋ) आज ब्रिटिश हिंदुस्थानांत मुसलमान समाजाचे बाबतींत जो व्यक्तिगत कायदा अंमलांत आहे त्यामध्यें फरक केला जाणार नाही. परंतु जरूर पडल्यास असा फरक मुसलमानी धर्माच्या तत्त्वाप्रमाणे केला जाईल. (ॠ) जर एखादें बिल कायदेमंडळांत पसार झालें; परंतु एखाद्या विशिष्ट समाजाच्या त्या कौन्सिलांतील दोनतृतीयांश सभासदांना असें वाटलें कीं, त्या कायद्यामुळे त्यांच्या धर्माला किंवा धर्माच्या पायावर उभारलेल्या चालीरीतींना किंवा मूलभूत हक्कांपैकीं एखाद्या हक्काला तें बिल बाधक आहे किंवा त्या कायदेमंडळाच्या एकतृतीयांश सभासदांनी त्या बिलाला आक्षेप घेतला तर तें बिल पास झाल्यापासून एक महिन्याचे आंत त्यांना आपली तक्रार कायदेमंडळाच्या अध्यक्षांकडे दाखल करण्याचा अधिकार आहे. अशा तऱ्हेची तक्रार दाखल झाल्यानंतर अध्यक्षांनी ती तक्रार गव्हर्नर किंवा गव्हर्नर-जनरल यांच्याकडे पाठवावी व गव्हर्नरांनी अगर गव्हर्नर-जनरलांनी तक्रार हातीं आल्यावर एक वर्षपर्यंत त्या बिलाचा अंमल करण्याची परवानगी देऊं नये.

एक वर्ष गेल्यानंतर तें बिल फेरविचाराकरिता कायदेमंडळाकडे पाठविण्यांत येईल. कायदेमंडळानें अशा तऱ्हेनें परत आलेल्या बिलाचा विचार पुनः केला व त्या बिलांत कोणताहि फरक त्यांनी करण्याचें नाकारलें व तक्रारी मिटविल्या गेल्या नाहींत तर गव्हर्नर अगर गव्हर्नर-जनरलनें आपल्या इच्छेप्रमाणे त्या बिलाला मंजुरी द्यावी अगर न द्यावी. परंतु त्या बिलाचा ज्यांच्यावर परिणाम होणार आहे त्या समाजाच्या दोन सभासदांना वरिष्ठ न्यायकोर्टांत याबद्दल दाद मागतां येईल व त्या बिलाचा कायदेशीरपणा ठरवून घेतां येईल. या सभासदांनी या बिलाच्या योगानें आपल्या धर्माला किंवा धर्मावर उभारलेल्या सामाजिक चालीरीतींना किंवा त्या समाजाच्या मूलभूत हक्कांना बाध येतो असें सिद्ध केलें म्हणजे पुरे.

या अटींमुळे पंजाब, मुंबई, बिहार–ओरिसा आणि संयुक्त प्रांत यांच्यासंबंधी जीं संरक्षक बंधनें या परिषदेंत मान्य केलीं गेलीं आहेत त्यांना बाध येणार नाही.

### (३) लष्कर व न्यायखातें

लष्कर व न्यायखातें यांतील जागा हिंदुस्थानाच्या सर्व लोकांना मोकळ्या ठेवल्या जातील असें या परिषदेंत ऐकमत्यानें ठरलें आहे. या नोकऱ्या देतांना फक्त गुणांकडेच लक्ष दिलें जाईल व ज्ञातीच्या वैशिष्ट्याचा किंवा प्रांताच्या विशेषत्वाचा अगर राजकीय पक्षभेदाचा कोणताहि संबंध मानला जाणार नाही.

### (४) मंत्रिमंडळ

(अ) मध्यवर्ती सरकारचें मंत्रिमंडळ बनवितांना मुसलमान, शीख व इतर अल्पसंख्याक समाज यांचे प्रतिनिधि समाविष्ट केले जातील व ही बाब वहिवाटीच्या पायावर उभारलेली अशी समजली जाईल. पहिल्या दहा वर्षांत मध्यवर्ती सरकाराच्या प्रधान–मंडळांत एका शीख सभासदाला जागा दिली जाईल. (आ) प्रांतिक सरकाराच्या प्रधान–मंडळांत अल्पसंख्याकांचे प्रतिनिधी वरीलप्रमाणेच वहिवाटीचा हक्क म्हणून घेतले जातील.

### (५) नोकऱ्या

(अ) पक्षभेदातीत असें एक 'पब्लिक सर्व्हिस कमिशन' म्हणजे नोकऱ्या देणारें मंडळ नेमलें जाईल. हें कमिशन नोकऱ्यांकरिता कोणते गुण पाहिजेत हें ठरवील. नोकऱ्या देतांना दोन गोष्टी तें कमिशन डोळ्यांपुढे ठेवील. पहिली गोष्ट ही कीं, सरकारी नोकरांची कार्यक्षमता कोणत्याहि दृष्टीने कमी होऊं द्यावयाची नाही व दुसरी गोष्ट म्हणजे देशाच्या सरकारी नोकरींत देशांतील सर्व समाजांना न्याय्य वांटा व न्याय्य

संधि दिली जाईल. ( आ ) पंजाब प्रांतांतील पब्लिक सर्व्हिस कमिशनमध्ये हिंदु, मुसलमान, शीख या समाजांचे प्रतिनिधी घेतले जातील, तसेंच इतर प्रांतीय कमिशनमध्ये त्या त्या प्रांतांतील महत्त्वाच्या समाजांचे प्रतिनिधी घेतले जातील.

( इ ) वरील ठरावांत जीं तत्त्वें सांगितलीं आहेत, त्याप्रमाणें एक योजना करण्याकरिता एक सात सद्गृहस्थांची कमिटी नेमण्याचें एकमतानें ठरलें आहे. या कमिटीला आणखी सभासद करून घेण्याचा अधिकार आहे.

सूचनाः—या सात गृहस्थांच्या कमिटींत तीन हिंदु, दोन मुसलमान, एक शीख आणि एक ख्रिस्ती सभासद असला पाहिजे असें ठरलें आहे.

## ( ६ ) शेषाधिकार

शेषाधिकारासंबंधानें पुढील गोष्टीवर ऐकमत्य झालें. कोणते अधिकार प्रांतिक सरकारांकडे राहावयाचे व कोणते हिंदुस्थानसरकाराकडे राहावयाचे यांचें साकल्यानें एक कोष्टक प्रथम तयार करावयाचें. एकदां असें कोष्टक तयार झालें म्हणजे या कोष्टकांत सांगितल्याप्रमाणें प्रांतिक सरकारांकडे दिलेले अधिकार त्यांच्याकडे कायम राहतील; ते काढून घेण्याचा अधिकार हिंदुस्थानसरकारास नाही. जो अधिकार स्पष्टपणें या कोष्टकांत सांगितला नाही तो अधिकार कोष्टकांत दिलेल्या विषयांच्या अनुसंधानें प्रांतिक सरकाराकडे अगर हिंदुस्थानसरकाराकडे राहील. या बाबतींत मतभेद उत्पन्न झाल्यास त्याचा कायमचा निकाल करण्याचा अधिकार वरिष्ठ न्याय-सभेकडे राहील. व अडचणीच्या वेळीं हिंदुस्थानसरकाराच्या मताप्रमाणें हे अधिकार दिले जातील. दरम्यान जरूर पडल्यास त्यांनी वरील कोर्टाची मदत घ्यावी.

## ( ७ ) कायदेमंडळें

मध्यवर्ती कायदेमंडळांत लोकनियुक्त जागांपैकीं ३२ टक्के जागा मुसलमानांकरिता राखून ठेविल्या जातील व ४$\frac{2}{3}$ टक्के जागा किंवा १४ जागा शिखांकरिता राखून ठेविल्या जातील. या बाबतींत मुख्य कायदेमंडळांत ३०० सभासद राहतील. ब्रिटिश हिंदुस्थानापुरताच हा नियम आहे असें समजावें.

## ( ८ ) संयुक्त मतदार-संघ

सर्व निवडणुकी संयुक्त मतदार-संघातर्फे व्हाव्या. परंतु पुढील दहा वर्षांकरिता खाली दिलेली योजना अमलांत राहील. ही योजना महमदअलींनी जी तोड सुचविली होती तींतच कमी जास्ती करून ठरविली आहे.

जे उमेदवार निवडणुकीकरिता उभे असतील त्यांपैकीं ज्या ज्या उमेदवारांनी आपल्या समाजापैकीं ३० टक्के मतें मिळविलीं असतील त्या उमेदवारांपैकीं ज्यांना संयुक्त मतदारसंघांतून अधिकांत अधिक मतें मिळालीं असतील ते निवडले गेले असें समजलें जाईल. जर कोणत्याच उमेदवाराला वर सांगितलेलीं ३० टक्के मतें मिळणार नाहीत तर संयुक्त मतदार-संघातर्फे ज्याला जास्तींत जास्त मतें मिळतील त्याला निवडलें जाईल. पण त्यानें आपल्या समाजापैकीं जास्तींत जास्त मतें मिळविलीं असलीं पाहिजेत. १० वर्षांनंतर हा ३० टक्क्यांचा नियम आपोआपच नष्ट झाला असें समजलें जाईल. परंतु या १० वर्षांपूर्वीहि जर कोणत्याहि समाजाला शुद्ध संयुक्त मतदारसंघ आपल्यास पाहिजे असें वाटेल तर ती पद्धत स्वीकारण्यास त्याला हरकत नाही.

## (९) मुसलमानांना जादा जागा

पुढील दहा वर्षेपर्यंत ब्रिटिश प्रधानमंडळाच्या नुकत्याच झालेल्या निर्णयापूर्वी ज्या जादा जागा मुसलमानांना दिल्या गेल्या होत्या त्याच त्यांना देण्यांत येतील.

## (१०) बंगाल

( अ ) संयुक्त मतदारसंघातर्फे निवडणुकी होतील. परंतु राखीव जागेची पद्धत अमलांत येईल. (आ) मुसलमानांना ५१ टक्के जागा दिल्या जातील; आणि सर्वसाधारण मतदारसंघांत हिंदु वगैरे जे लोक आहेत त्यांना ४४·७ टक्के जागा दिल्या जातील. खास मतदारसंघाच्या जागेचा अंतर्भाव वरील प्रमाणांत होतो. ( इ ) सर्व राखीव जागा व सर्व खास मतदार संघाच्या जागा दहा वर्षांनंतर नष्ट होतील. ( ई ) बंगाल कायदेमंडळांत वर लिहिलेल्या प्रमाणांत हिंदु व मुसलमान या समाजांत जागा मिळतात कीं नाही हें पाहण्याकरिता तसेंच वरील अ व आ या बाबतींत मतभेद झाला तर निकाल करण्याकरिता एक कमिटी नेमली जाईल. (उ) बंगालच्या प्रांतिक कायदेमंडळांत मुसलमानांना एकंदरींत ५१ टक्के प्रतिनिधी मिळाले तरच मुसलमान समाजाला संयुक्त मतदारसंघाची योजना मान्य आहे असें समजलें जाईल.

( ऊ ) प्रांतिक सरकारांत व मध्यवर्ती सरकारांत पूर्ण जबाबदारीचें स्वराज्य तावडतोब संस्थापित व्हावें म्हणून हिंदु व मुसलमान या दोनहि समाजांनी एकत्र प्रयत्न करावा. ( ऋ ) राखीव जागेची पद्धत नष्ट झाल्यानंतर वयांत आलेल्या प्रत्येक स्त्रीपुरुषास मताधिकार दिला जाईल. ( ॠ ) वरील सर्व कलमें हा एक गठ्ठा समजला जाईल.

## ( ११ ) बलुचिस्थान

बलुचिस्थानाला इतर प्रांतांप्रमाणें कायदेमंडळ

देण्यांत यावें व त्या प्रांताचा कारभार इतर प्रांताप्रमाणेच चालावा.

( १२ ) सरहद्दप्रांत

हिंदुस्थानांतील इतर प्रांतांप्रमाणेंच सरहद्द प्रांतालाहि कायदेमंडळ असावें.

( १३ ) पंजाब

पंजाबांतील मंत्रिमंडळांत कमींत कमी १ शीख व हिंदु सभासद असेल व प्रधानमंडळ सामुदायिक तीनें कायदेमंडळाला जबाबदार राहील.

पंजाब कायदे-मंडळाच्या सभासदांची संख्या २०० राहील. तींत मुसलमानांना ५१ टक्के, शिखांना २० टक्के, हिंदूंना २७ टक्के व ख्रिस्ती, अँग्लो-इंडियन व युरोपियन यांना मिळून २ टक्के जागा दिल्या जातील.

पंजाबचा हा करार दहा वर्षांकरिता आहे.

( १४ ) सिंध

सिंध हा प्रांत मुंबई इलाख्यापासून स्वतंत्र केला जाईल व इतर मोठ्या प्रांतांप्रमाणेच अल्पसंख्याकांच्या हितसंबंधांचें रक्षण करण्याची जी योजना आहे तीच सिंध प्रांताला लागू पडेल.

# महाराष्ट्र कवि-संमेलन

## अध्यक्ष प्रो. बेहरे यांचें भाषण

पुण्यास गेल्या आठवड्यांत म. कवि संमेलन भरलें. त्याचें अध्यक्ष प्रो. नारायण केशव बेहरे यांच्या भाषणाचा सारांश पुढील प्रमाणे—

"काव्याचा व वाङ्मयाचा शोध अनंत कालापासून अबाधित चालू आहे. संस्कृत काय किंवा मराठी भाषेंत काय गतकालांत हजारों वाङ्मयतपस्व्यांनी आपली वाणी शिणविली असेल व यथाशक्ति काव्यदेवीची उपासना केली असेल; परंतु काळाच्या ओघांत त्या कवींचीं नांवें लुप्तप्राय झालीं आहेत. हजारों संस्कृतमराठी कवींपैकीं व्यास, वाल्मिकी, कालिदास, भवभूति, भास इत्यादि प्रसिद्ध संस्कृत कवि, किंवा मुकुंदराज, ज्ञानेश्वर, एकनाथ, तुकाराम, रामदासादि मराठी सुप्रसिद्ध संत कवि यांचींच नांवें काळाच्या ओघांतून बचावलीं आहेत. इतरांची आठवण बुजली. परंतु त्यामुळे त्यांची कामगिरी कमी होत नाही, ईश्वराच्या घरीं त्यांची वाङ्मयतपस्या खास रुजू असेल. वाङ्मयसेवक व कवि हे भेदातीत असावेत असें पुष्कळांचें म्हणणें आहे. परंतु समाज जोंपर्यंत जिवंत आहे तोंपर्यंत मतभेद हे असणारच. मतभेद असले तरच समाजाची वाढ होईल. मतभेद नाहीसे झाले तर समाजाची प्रगति खुंटून त्याच्या ऱ्हासाला आरंभ होतो. जीवशास्त्राच्या अभ्यासकांना हें तत्त्व नवीन नाही. हे मतभेद प्रगतीच्या आड आले नाहीत म्हणजे झालें. खुद्द इंग्रजी कवितेंत School of romantic poetry, Realistic poetry, the school of Late poets वगैरे अनेक भेद आपल्या दृष्टीस पडतील. परंतु या मतभेदांमुळेच इंग्रजी काव्यवाङ्मय संपन्न व धष्टपुष्ट झालें आहे. आणि या मतभेदाबद्दल कवींनाच केवळ नांवें ठेवावयास नको. शिवाय आजच्या लोकशाहीच्या काळास अनुसरून काव्यवाङ्मयाने राजेरजवाड्यांच्या आश्रयास उभें न राहतां

### सत्य व स्वातंत्र्य

या भूमिकेवरच काव्याचें अधिष्ठान ठेविलें पाहिजे. तसें असलें तरच तें चिरंजीव असतें. काव्यांत दंभ भरला असला तर पावसाळ्यांत उगवणाऱ्या लाकडावरील छत्र्यांप्रमाणे त्याची किंमत जग करील. कवींची भूमिका निर्भय असली पाहिजे. मनांतील विचार त्याने निर्भयतेने पुढे मांडले पाहिजेत आणि त्याची भूमिका सत्याची असली तर त्याला हें कठिणहि जाऊं नये. लेखनस्वातंत्र्य व वाक्स्वातंत्र्य यांचें महत्त्व सर्व सुधारलेलें जग ओळखून आहे. कारण तसें स्वातंत्र्य नसलें तर राष्ट्रांतील विचारी मान्यवंतांना व कवींना जगाला आदेश देण्याचें, ध्येयाचा मार्ग दाखविण्याचें व राष्ट्रोन्नतीचा रथ पुढें नेण्याचें कार्य करतां येत नाहीं. यासंबंधीं माझ्या मतांचा अनेक वेळां विपर्यास करण्यांत येतो. 'राष्ट्रीय भावना ज्यांत नसेल तें काव्यच नव्हे' हें मत माझें म्हणून सांगण्यांत येतें, परंतु तें खरें नव्हे. त्या मतांत एक महत्त्वाचा शब्द गळलेला आहे, आणि तो शब्द गाळला गेल्यामुळे अर्थाचा अनर्थ होऊं शकतो. कोणत्याहि देशाचे काव्यवाङ्मय तपासून पाहिलें तर आपणांस असें आढळून येईल कीं वाङ्मयगंगेला समांतर अशी राष्ट्रेतिहासाची सिंधु नदी वाहत असते. हा सिद्धांत त्रिकालाबाधित आहे.युरोप काय किंवा हिंदुस्थान काय कोठेहि आपणांस हें तत्त्व अजमावून पाहतां येईल. एखाद्या राष्ट्राचा एखाद्या काळांतील इतिहास समजावून घ्यावयाचा असला तर त्या काळांतील वाङ्मयाचें

मार्मिक अवलोकन केल्याशिवाय भागणार नाही. उलटपक्षीं इतिहासाचें ज्ञान असल्याशिवाय त्या काळांतील वाङ्मयाचें रहस्य उलगडणार नाही. महाराष्ट्राच्या काव्यगंगेत प्रत्येक जातीच्या प्रतिनिधि संताने आपल्या काव्याच्या कावडी देन कावडी पाणी त्या काळांत ओतलेलें आपणांस सांपडेल. ज्ञानेश्वर किंवा एकनाथ या ब्राह्मण कवींच्या बरोबरीने मराठा तुकाराम, शिंपी नामदेव, कुंभार गोरा, माळी सावता, फार काय पण महार चोखोबा व चांभार रोहिदास या भिन्नजातीय स्पृश्यास्पृश्य संतांनी आपल्या काव्यवचनामृताने महाराष्ट्रांत बंधुभावनेचा प्रसार केला. पंढरपूरचा विठोबा हें त्याचें पूज्य दैवत, महाराष्ट्र हा त्यांचा देश व अठरापगड जातींचे लोक हे एकमेकांचे बंधू. पुरुषांप्रमाणेच मुक्ताबाई, जनाबाई इत्यादि ब्राम्हणब्राह्मणेतर संतकवींनी आपल्या काव्यरचनेच्या कावडी महाराष्ट्र काव्यगंगेंत ओतल्या आहेत. महाराष्ट्रांतील या बंधुभावनेमुळेच मराठ्यांचें महान राष्ट्र झालें. परंतु पुष्कळांना ही विचारसरणी पटत नाही. काव्याचें ध्येय राष्ट्राच्या प्रगतीवर अवलंबून असता कामा नये असें त्यांचें म्हणणें. काव्य ही चित्रकला, नृत्यकला, गायनकला याप्रमाणेच एक कला आहे. आणि कलेचें ध्येय सौंदर्यनिर्मिती हेंच आहे असा त्यांचा आग्रह. जगांतील कला व सौंदर्यवादाचे अत्यंत मोठे पुरस्कर्ते कवि रवींद्रनाथ टागोर हे होत. उलटपक्षीं मानव जातीच्या प्रगतीला उपयुक्त होईल तेंच खरें वाङ्मय व तेंच उच्च दर्जाचें काव्य ही बर्नार्ड शॉची विचारसरणी. दोघेहि थोर कवि; दोघांना जगांत विलक्षण मानमान्यता मिळाली आहे; वाङ्मयसेवकाचा गौरव करणारें

## नोबेल प्राईझ

दोघांनाहि मिळालेलें! परंतु या थोर महाकवींच्या विचारसरणींत एकवाक्यता होऊं शकणारच नाही असें नाही. काव्य ही एक थोर कला आहे. कलेचें ध्येय सौंदर्यनिर्मिती हेंहि खरें! आणि कोणतीहि कलाकृति पाहिली म्हणजे माणसाला आनंद होतो, हेंहि तितकेंच खरें. या व्याख्यांचें सत्य प्रत्येकाला मान्य करावेंच लागेल. परंतु सौंदर्य म्हणजे काय व खरा आनंद कोणता या प्रश्नावर मतभिन्नता झाल्याशिवाय राहणार नाही. ताजमहालासारखा शिल्पकलेचा नमुना हिंदुस्थानांतच काय परंतु जगांत देखील अन्यत्र क्वचितच सांपडेल. परंतु शिल्पकलेच्या या अलौकिक सुंदर इमारतीच्या ठायीं शहाजहान बादशहाच्या मुमताज बेगमेवर असलेल्या अलौकिक व दिव्य स्वर्गीय प्रेमाचा कोणी कवि आरोप करील,तर माझ्यासारखा इतिहासाचें बारकाईने परिशीलन केलेला गृहस्थ तें मान्य करणार नाही. मोंगल बादशहा मूळचे विलासी होते, मराठ्यांसारखे रुक्ष नव्हते. आणि त्यांतल्या त्यांत शहाजहान बादशहासारखा विलासी बादशहा दुसरा कोणी झाला नाही. त्याच्या रंगमहालांत बेगमांची व त्याच्या आवडत्या विलासदासींची अत्यंत गर्दी होती. ताजमहाल हे त्याच्या शिल्पसौंदर्योपासनेचें स्मारक मानतां येईल; मुमताज बेगमेवरील स्वर्गीय प्रेमाचें खास नव्हे. प. वा. माधवराव महाराज शिंदे यांनी

## शिवपुरी येथे

आपल्या परमपूज्य मातोश्रीच्या स्मरणार्थ जी अप्रतिम छत्री बांधली आहे ती शिल्पकलेच्या दृष्टीने ताजमहालापेक्षां कांकणभर कमी भरली तरी भावना व प्रेम या दृष्टीनें माझ्या मनोवृत्ति तेथेच अधिक उचंबळून येतील. रमणीप्रेम हेंच खरें प्रेम व मातृप्रेम हें त्या मानाने फिकें असें ज्याचें म्हणणें त्यांना ही विचारसरणी पटणार नाही. वधूपरीक्षणार्थ जाणारा तरुण वधूच्या शरीरसौष्ठवाकड जितक्या आतुर दृष्टीने पाहतो तितका तिच्या

## मानसिक सौंदर्याकडे

खास पाहत नाही. परंतु शारीरिक सौंदर्य हें क्षणभंगुरच ठरणार आणि मानसिक सौंदर्याचा मोह काळाला देखील कमी करतां येणार नाही. ही सौंदर्याची दृष्टि व्यक्तीच्या वयोमानाप्रमाणे बदलत जाते.त्यामुळे चिरंतन सौंदर्य कोणतें या प्रश्नाचा मनुष्य विचार करूं लागतो. रंगीबेरंगी कपडे व तलम वस्त्रें यांमध्ये भासणारें सौंदर्य महात्मा गांधींच्या दिव्य उपदेशाने, त्यांच्या अनुपम स्वार्थत्यागाने, त्यांच्या पवित्र साधेपणाने व गरीबांविषयीं त्यांच्या अंतःकरणांत उचंबळणाऱ्या प्रेमळ सहानुभूतीने पांढऱ्या शुभ्र जाड्या-भरड्या हातसुताच्या खादींत आज भरलें आहे. शेट जम्नालाल बजाज यांच्यासारखे कुबेर किंवा नेहरूकुटुंबांतील अत्यंत सुसंस्कृत व सुखांत वाढलेले स्त्री-पुरुष ओबडधोबड खादींत एरवीं आनंद कां मानते? ज्याप्रमाणे सौंदर्याची कल्पना बदलत असते त्याप्रमाणेच

## आनंदाची व्याख्या

देखील देशकालवर्तमान, शिक्षण, संस्कृति व इतिहास यांच्या अनुषंगाने बदलत असते. एकाला तमाशांत आनंद वाटतो तर दुसऱ्याला सुंदर नाट्यांतच गोडी वाटते. दोघांनाहि आनंद होतो खरा. परंतु तमाशांत रंगणाऱ्या इसमाला आपण ग्राम्य ठरवितों व, नाट्यांत किंवा काव्यांत दंग होणाऱ्या इसमाला आपण सुसंस्कृत गणतों. दारूच्या कैफांत झिंगणाऱ्या माणसाला प्रसंगीं गटारांत लोळण्यापासून देखील ब्रम्हानंद वाटेल. शिपाई युद्धाच्या नशेंत तर झाला म्हणजे दुसऱ्यांचे जीव घेण्यांत त्याला परा-

काव्यांचा आनंद व अभिमान वाटतो. युद्ध संपल्यानंतर All quiet on the Western Front किंवा The road back to home या युद्धकालीन मनोवृत्तीचें दिग्दर्शन करणाऱ्या कादंबऱ्यांत दर्शविल्याप्रमाणें युद्धानंतर त्या शिपायाच्या अंतःकरणांतील माणुसकीचा देव जागृत होऊन त्यास केल्या कृत्याचा पश्चात्तापहि कदाचित् होईल. परंतु प्रत्यक्ष युद्ध चालू असता तो सैतानाच्या भूमिकेंत आनंद मानतो. त्याच्या उलट महात्मा गांधींसारख्या थोर तपस्व्याला अस्पृश्यांच्या उद्धारार्थ स्वतःचा प्राण देण्यांत आनंद वाटतो. या आनंदाच्या भिन्न भिन्न उदाहरणांत

**कांहींच तरतमभाव**

नाहीं का ? त्यामुळे काव्यकलेच्या सौंदर्यनिर्मिती व आनंदोत्कर्ष या व्याख्या स्वीकारल्या तरी काव्याला ध्येय असतेंच असतें या मताचें खंडण कसें होणार ? कवीचें हृदय अत्यंत हळवें असतें. जगांतील सुखदुःखांचे नानाविध प्रसंग पाहून त्याचें हृदय विरघळतें. व त्याच्या हृदयांत उत्पन्न झालेल्या प्रेमळ सहानुभूतीच्या लहरी सुंदर शब्दांच्या रूपाने बाहेर पडल्या म्हणजे तें काव्य होय. त्यामुळे एखाद्या सुंदर मुलीच्या पायाला कंटक बोचून पाय रक्तबंबाळ झाला व कवीचें सुलभ भावनावश मन विव्हल होऊन जें शब्दजाल निर्माण होतें तें काव्यच होय यांत तिळमात्र संदेह नाही. परंतु जर्मनी देश जर्मन लोकांचा आणि ते तेथील मालक, इंग्लंड देश इंग्रजांचा आणि तेच तेथले मालक, जपान देश जपान्यांचा व तेच तेथले मालक आणि हिंदुस्थान देश हिंदी लोकांचा असता आज

**त्याची मालकी कोणाकडे आहे ?**

हा सभोंवतीं धांगडधिंगा घालणारा परंतु बालसुलभ प्रश्न रमणीच्या कटाक्षानें विव्हल होणाऱ्या हळव्या मनाच्या तरुणाला आज सुखानें झोंप घेऊं देईल काय ? याचा विसर कसा पडूं शकेल ? ज्याला या दारुण सत्याचा विसर पडेल तो कशाचा कवि ? त्याचें अंतःकरण फुलासारखें नाजुक कसें म्हणतां येईल ? आणि म्हणून ज्याप्रमाणें शिवकालीन काव्यगंगेंत भक्तिरसाचें विशेष रीतीने प्रतिबिंब पडलेलें दृष्टोत्पत्तीस येतें, किंवा दुसऱ्या रावबाजीच्या अपयशी व व्यसनी कारकीर्दीत इष्कबाजीच्या लावण्यांवरच मराठी काव्यगंगेला आपली तहान भागवून घ्यावी लागली, त्याप्रमाणेंच आजच्या मराठी काव्यांत देशाच्या आर्थिक, सामाजिक, राजकीय किंवा धार्मिक दुःस्थितीचें विशेष तीव्रतेने प्रतिबिंब पडणें साहजिकच होय. हा 'आज' शब्द लक्षांत घेतल्याशिवाय माझ्या विधानांत सत्य सांपडणार नाही. कवीच्या रथाला एक चाक भावनेचें असेल तर दुसरें कल्पनेचें असतें. किंवा नव्या कवीच्या विमानाचे हे दोन प्रमुख फडफडणारे पंख होत असें म्हटलें तरी चालेल, आणि काळाच्या ओघांत हिंदुस्थानाला स्वराज्य मिळालें म्हणजे उद्यांचा कवि कदाचित् सुखविलासाचीं पूर्ववत् स्तोत्रें गाऊं लागेल किंवा भक्तींत रंगून जाईल किंवा ब्रह्ममायेच्या वेदांती जाळांत गुरफटून जाईल; इतकेंच काय परंतु काळाच्या

**अनंत ओघांत**

दोनचार हजार वर्षांत मोठमोठीं साम्राज्यें रसातळीं जातात. इजिप्त, कार्थेज, ग्रीस, रोम, इस्तंबूल, जर्मनी रशिया हीं सर्वच साम्राज्यें रसातळास गेलीं आणि कवीची कल्पना पुढील दहावीस हजार वर्षांपलीकडे बघण्यास शक्य झाली आणि दुर्दैवानें हिंदुस्थानने इंग्लंड, जपान, जर्मनी वगैरे देश जिंकून तेथे आपलें साम्राज्य स्थापन केलें तर त्या काळचे हिंदी कवि तत्कालीन हिंदी लोकांच्या साम्राज्यवादाचा निषेधच करतील, आणि हिंदी वीर व मुत्सद्यांना परकीयांच्या देशांतून आपलें चंबूगबाळें आटोपून परत हिंदुस्थानांत येण्यास भाग पाडतील. वीरांनी अद्भुत पराक्रम करावे व या शब्दसृष्टीच्या ईश्वरांनी ते काव्यांत वर्णावे. राष्ट्रांत पराक्रमच उरला नाही तर कवीला प्रचंड स्फूर्ति असली तरी तो काय रडणार ?

परतु या भाटाच्या भूमिकेशिवाय महाकवीची

**द्रष्ट्याची भूमिका**

असते. 'जें न देखे रवि तें देखे कवि.' रामाचा पराक्रम अवलोकन करून वाल्मिकीने रामायण लिहिलें असेल तर तो पहिल्या भूमिकेवर असेल. परंतु दिक्कालांतून त्याची भेदक दृष्टि आरपार जाऊन भविष्य काळीं घडून येणाऱ्या रामचरित्राची भूमिका त्याच्या दिव्य दृष्टीला अगोदर दिसली असेल तर तो द्रष्टा होय. रामायणरचनेच्या या दोनहि कथा पुराणांतरीं प्रचलित आहेत, आणि कोणत्याहि दृष्टीने कवीच्या भूमिकेचा विचार केला तरी तो राष्ट्राचा उपदेशक व मार्गदर्शक, ध्येयवादाचा पुरस्कर्ता व प्रेरक, असाच ठरतो. त्याचें काव्य कलापूर्ण असलें तरी त्यांत सौंदर्याबरोबर तत्कालीन राष्ट्रेतिहासाचें विशेष रीतीने प्रतिबिंब पडलेलें असतें आणि भावी प्रगतीच्या ध्येयवादाचें चित्र देखील त्यांत पाहावयास सांपडतें. त्या दिव्य काव्याच्या वाचनानें जो आनंद होतो तो उच्च दर्जाचा असतो. त्याची किंमत राष्ट्राच्या संस्कृतीनेच केवळ मापतां येईल.

**आधुनिक काव्याची गुणदोषात्मक चर्चा**

रविवार तारीख २० रोजीं सायंकाळीं श्री. श्री. म. माटे एम्. ए. यांनीं आधुनिक काव्य व कवि यांसंबंधाने गुणदोषात्मक पहिलें भाषण केलें. त्याचा सारांश असाः—

आधुनिक कवींनी माझ्या भाषणाबद्दल भीति बाळगूं नये. मी त्यांचा परम मित्र व चाहता आहें मराठी कवितेचें युगमान बदललें आहे आणि याचें श्रेय आधुनिक कवींना आहे. जुन्या कवींचे सुविद्य व अविद्य असे दोन भाग करतां येतात. सुविद्य जे होते ते केवळ परमार्थवादी होते. ब्रह्म हेंच काय तें सर्वस्व व सब जग हें केवळ माया असा सारखाआग्रह ते धरून राहिले. अविद्य याचा अर्थ जे सुसंस्कृत नव्हेत ते. अविद्य कवि म्हणजे १८व्या शतकांतले शेवटचे कवि. यांच्या कवनांतील शब्द चांगले पण अर्थ चांगला नाही. थोडक्यांत म्हणजे पारमार्थिक व विषयकल्पना-रत अशीं हीं दोन टोकें होतीं. शुद्ध व निर्कोप अशा संसाराचें गायन कोणीच करीत नसत. पारमार्थिक कवींच्या कवितेचा परिणाम समाजावर इतका झाला कीं काम, क्रोध, लोभ, मोह, मद व मत्सर हे षड्रिपु आहेत अशी लोकांची ठाम समजूत होऊन बसली. पण माझें म्हणणें असें कीं, षड्रिपु हे मित्र बनविल्याशिवाय संसार सुखमय होणार नाही. क्रोध, काम इ. हे शत्रु केव्हा होतात हें पाहिलें पाहिजे. क्रोध काय किंवा काम काय, मर्यादेच्या पलीकडे गेला तरच तो रिपु; एरवी तो मित्रच आहे. अनिवार झाला म्हणजे शत्रु बनतो. म्हणून तो कायमचा 'शत्रु' हें तत्त्वज्ञान मला पटत नाही. समाजामध्ये 'दानाची' आवश्यकता आहे. पण लोभ मुळांतच नसेल, व लागतो त्यापेक्षां जास्त पैसा मिळवणार नाही तर तो मनुष्य 'दान' कोठून करणार! मोहाची गोष्ट घेतली तरी तेंच. मोहाच्या पायीं अभिलाष उत्पन्न झाला तरच तो शत्रु तसेंच प्रत्येक स्त्री-पुरुषाचे ठायीं मत्सराची भावना जागृत असावयास व पाहिजे. चित्ताच्या दारामध्ये 'मत्सर' हा कुत्रा उभा आहे म्हणूनच स्त्री-पुरुषांचे संबंध सुखावह होत असतात.

### शेक्सपियरचीं नाटकें

आपण शेक्सपिअरचीं नाटकें पाहिलीं तर आपणाला हेंच दिसेल कीं, अतिरेकाला गेलेल्या विकाराचर शेक्सपिअरने आपलीं शोकरस पूर्ण नाटकें लिहिलीं आहेत. अर्थात् विचारी माणसांना तारतम्य भाव असतो; व त्यांना मित्र व रिपु यामधला भेद कळतो. पण काम इ. आपले शत्रु आहेत ही तत्त्वज्ञानाची प्रथा पडून गेली आहे ती चूक आहे इतकेंच माझें म्हणणें व ही अशी प्रथा पडून गेल्यामुळे मानवी जीवितार्चे गायन निर्भयपणें होईना. वात्सल्य गाइलें पण तें यशोदेचें; प्रेम गाइलें, पण तें राधेचें. मत्सर गाइला पण तो भामेचा. प्रत्यक्ष माणसाच्या विकारांचें गायन करवेना. पण आतां आपण या परमार्थ-छापेंतून मुक्त झालों आहों. म्हणून म्हणतों कीं, आधुनिक कवि 'नवें युग' सुरू झालें आहे हें दाखवीत आहेत. देशाची स्थिति, समाजांतील स्त्रीपुरुषांच्या कल्पना, आचारविचार, त्यांची प्रगति व अधोगति यांचें प्रतिबिंब त्या त्या कालच्या काव्यांत दिसतें. पण आतां दुसरीच भीति उत्पन्न झाली आहे. आधुनिक कवि इंग्रजींच्या टापेखालीं सापडले आहेत. ते इंग्रजी छापेचें जीर्ण वस्त्र घेण्यापलीकडे कांही करीत नाहीत. कांही तरी स्वतंत्र विचाराचें काव्य निर्माण झालें पाहिजे. मी असें म्हणेन कीं, मेळ्यांतील पदें करणाऱ्या कवींनीहि राजकीय परिस्थितीचें प्रतिबिंब आपल्या कवनांत ओतून समाजाला उपकृत केलें आहे. कांही जुने संस्कृत कवि केवळ दिलखुष कवि होते असेंच मी म्हणतों. त्यांचेप्रमाणे आधुनिक कवींनाही प्रेम हें एकच 'साधन' कविता करण्याला आहे असें वाटूं लागलें आहे. पण प्रेम हा एक विकार आहे. नवीन कवींचें अंतःकरण मृदु आहे हेंहि खरें. पण त्याला एकच विकार कळतो. म्हणून कवींच्या अग्रभागीं असलेल्या कवींची जबाबदारी मोठी आहे इतकेंच मला सांगावयाचें आहे.

### " काय दादा! पुन्हा एकदां तें वाचा "

कल्पना करा, सातारा जिल्ह्यांतील एखाद्या दुष्काळी गांवच्या गरीब, अजाण अनाथ स्त्रीचा नवरा, पाऊस पडेना, शेतांत धान्य पिकेना म्हणून पोटाकरिता मुंबईस गिरणींत नोकरीला गेला आहे व वर्ष दोन वर्षांनी डोक्यावरील मातीची भरलेली टोपली टाकीत असतां आपल्या तिकडे पाऊस पडला असे शब्द दुसरा कोणी वर्तमानपत्र वाचीत असतांना कानावर पडले व तो डोक्यावरील टोपली तेथेच टाकून, "काय दादा! पुन्हा एकदा तें वाचा" असें म्हणाला व दुसऱ्या दिवशीं नोकरीचा मिळेल तो पगार घेऊनें मुलखांत निघून गेला. जातांना लहान मुलीला चिरडी, दुसऱ्या मुलाला इतर खेळगीं व बायकोला लुगडें घेऊन घरीं निघाला. जातो तों पाऊस पडत आहे; रात्र पडली आहे, घराचें दार लावलें आहे, आंत त्याची बायको 'रात्रीच्या वेळीं दारावर धक्के कोण देत आहे' म्हणून भयभीत झाली आहे व तिचा नवरा मोठमोठ्यानीं आपल्या मुलाबाळांना भेटण्याकरिता उत्सुक होऊन दार ठोकतो आहे. एकदाचा दरवाजा उघडल्यावर त्याच्या दृष्टीस जें दृश्य पडेल व सर्वांना जो आनंद होईल अशा त्या प्रसंगाचें वर्णन आधुनिक कवींनी कां करूं नये? अशा प्रसंगाची कविता झाली तर मला वाटतें ती आनंददायक होईल. दुसरें एक उदाहरण घेतों. समजा, एखाद्या स्त्रीने पाट लावण्याचें ठरविलें. पाट लावण्याचे आदले दिवशीं चालीरीतीप्रमाणें अमावास्येच्या काळोख्या रात्रीं काखेंत कोंबडा घेऊन ती आंब्याच्या झाडाखाली बसली व तेथे जातांना वाटेंत त्या कोंबड्याने टाहो

फोडला. त्या कोंबड्याच्या आक्रोशावरून तिला वाटलें कीं आपण पाट लावूं नये अशी आपल्या पहिल्या पतीची इच्छा आहे. व तिनें पाट लावावयाचा नाही असा निश्चय केला. अशा ह्या हृदयस्पर्शी प्रसंगाचे वर्णन आधुनिक कवींनी कां करूं नये? जनसमूहाचे मनोगत व्यक्त होईल तर तें आपलें काव्य आहे असें समाजास वाटेल.

कवींनी कविता लिहावी ती अगदीं सोप्या भाषेंत लिहावी. किंबहुना ती कविता समाजांतील अगदी खालच्या वर्गाला समजावी व तिच्यांतील रसास्वाद त्याला चाखतां यावा.तसेंच आधुनिक कवींनी त्रोटक कविता करण्याची पद्धत सोडून द्यावी. अलीकडे प्रसिद्ध झालेल्या कवितांवरून असें वाटूं लागतें कीं कवींचे हातपाय कांपत आहेत.मला असें वाटतें कीं,कवि हे समाजाला पुढे नेत असतात. चिमणी, मैना, यांसारखीं लहान लहान पदें करणें एवढेंच कवींचें काम नाही. काव्यामध्ये कांही तरी भव्यता दिसावी, वाङ्मयामध्ये मोठमोठे थोर पुरुष निर्माण व्हावे अशी इच्छा आहे. लहान लहान रोपटीं नको असें नाही; पण त्याबरोबरच मोठें वडाचें झाडहि वाढूं दे म्हणजे त्याच्या छायेखालीं पांथस्थांना तासन्तास बसून काव्यानंद सेवितां येईल.

### संत कवि

यानंतर श्री. केशवराव ठाकरे यांचें अति स्प भाषण झालें. त्याच्या भाषणाचा मथिताथ असा कीं,–" महाराष्ट्रांत चित्रकला, काव्यकला, नृत्यकला इ. कलांची आवडच नाही. ज्ञानेश्वर-तुकारामादि संतकवींनी महाराष्ट्राला निराशावादी बनवून गुलाम करून टाकलें. राष्ट्रीयत्वाच्या दृष्टीनें संत कवींची योग्यता अगदीं कमी आहे. याचा विचार आधुनिक कवींनी केला पाहिजे. संत कवींनी ईश्वरी अवताराची कल्पना पसरविली व त्यामुळें स्वकर्तृत्वाची जाणीव कमी झाली. शृंगार, वीर, बीभत्स इ.रसापैकीं कोणताहि एक रस का होईना पण पूर्णत्वानें आधुनिक कवींमध्यें दिसून येत नाही. वैषयिक कविता लिहिणाऱ्या कवींना शिक्षा झाली पाहिजे." यानंतर कवि यशवंत व सोपानदेव चौधरी यांनी दोन कविता गाऊन दाखविल्या व रविवारचें चर्चेचे काम संपलें.

### आधुनिक कवींची तरफदारी

सोमवारीं सकाळीं प्रो. जोग यांनी चर्चेस प्रारंभ केला. त्यांनी आधुनिक कवींचें समर्थन केलें. ते म्हणाले, "कवींबद्दल भलतीच अपेक्षा करून घेऊं नये. म्हणजे मग निराश होण्याचें कारणच राहणार नाही. अनुकरण–प्रियता हा दोष असेल तर तो सर्व कालीं सर्व प्रकारच्या वाङ्मयांत सांपडेल. कालांतरानें टाकाऊ वाङ्मय नाहींसें होईल. भव्यता, उदात्तता पाहिजे असें सांगण्यांत आलें. आजहि तास अर्धा-तास वाचण्यास पुरतील अशीं आधुनिक काव्यें आहेत. उ. विरहतरंग, गंगावर्णन इ. दुःखार्तांचें व शोकार्तांचें समाधान व्हावें आणि मनास आनंद व्हावा हाच जर काव्याचा उद्देश असेल तर ती कविता लहान असली काय किंवा मोठी असली काय सारखीच. बगली, हवेली बांधण्याची आवड नाही का उत्पन्न झाली? मोठमोठे वाडे बांधण्याची आवड आता जात चालली आहे. तर मग लहान लहान कविता करण्याचा सुधारलेला प्रघात पडूं लागला तर त्यांत वावगें काय आहे ? कविता 'राष्ट्रीय' असूं शकते कीं काय हाच मुळी प्रश्न आहे? राष्ट्रीय इतिहासाला धरून काव्य असावें हें कबूल आहे. पण तें काव्य सर्व कालीं सर्व देशांना पटेल असें असावें. जर्मनी, फ्रान्स, रशिया या देशांतील क्रांति कवींनी घडवून आणली हें म्हणणें योग्य नाही. प्रेमविषयक काव्यें सर्वच चांगलीं असतात असें कोणीच म्हणत नाही. पण म्हणून आधुनिक कवींच्या सर्वच कवितांवर सरसकट बहिष्कार घालणें योग्य होणार नाही. लोकांची अभिरुचि बदलत चालली आहे. कवितेत उपमा, अलंकार नाहीत म्हणून ती कविता कमी दर्जाची असें म्हणतां येणार नाही."

वरील आक्षेपाना श्री. श्री. म. माटे व श्री. प्र. के. अत्रे यांनी उत्तरें दिलीं. श्री. अत्रे म्हणाले, 'अनुकरण करावयाचें तें विषयांचें किंवा भावनांचे असावें. विशिष्ट पद्धत किंवा लकब यांचें अनुकरण करूं नये व स्वातंत्र्यपूर्वक अभिनव विचार करण्याची संवय कवींनी लावून घ्यावी.

### गूढगुंजन

सोमवारीं संध्याकाळीं प्रो. रा. ग. हर्षे यांनी 'आधुनिक काव्यांतील गूढगुंजन' हा विषय घेऊन त्यावर आपले विचार मांडले. ते म्हणाले " उपनिषदांमध्येहि 'गूढवाद' आहे. ज्ञानेश्वरादि संतकवींमध्ये गूढवाद आहे. संत-मंडळींचे ३ भाग करता येतात ते असे (१) साक्षात्कारी किंवा जीवन्मुक्त (२) मुमुक्षु व (३) महन्त. कै. केशवसुतांनी गूढगुंजनाची प्रथा सुरू केली. या 'गूढगुंजना'-चा प्रकार कै. गोविंदाग्रजांनी कळसास नेऊन पोंचविला. आधुनिक कवींनी आत्मसाक्षात्काराचें भलतेंच अवसान आणावें हें बरें नाही. बडबडीचा व आचरणाचा आविष्कार यांमध्यें महदंतर आहे. अर्थशून्य रचना व दुर्बोधता यालाच गूढगुंजन म्हणावयाचें कीं काय? मिस्टिसिझम् (अतींद्रिय ज्ञान) याचा अर्थ Dreamy contemplation upon ideas that have no foundation असा आढळतो. कवींना कल्पनाशक्ति असते. ती

भावनाप्रधान व ध्येयवादी असते हेंहि खरें. पण ज्या कवींनी आपले स्वतःचे अनुभव आपल्या कवितेंत ओतले आहेत त्याच कवींचीं काव्यें चिरकाल टिकणारीं अशीं होतात व त्याच कवितांची चहा होते. कवींनी स्वतःशीं प्रामाणिक राहावें. केवळ काव्यशिल्पी बनूं नये.मनाची शुद्धता ठेवावी. बुद्धीला प्रतीत नसेल तर तो साक्षात्कार नव्हे!" नागपूरचे श्री.देशपांडे (कवि अनील) यांनी हर्षे यांच्या टीकेला उत्तर दिलें. त्यांचें म्हणणें असें कीं, "तर्क, युक्ति व बुद्धि यांच्या-पलीकडे या जगांत कांही आहे म्हणून गूढवादाला महत्त्व आलें. प्रतीति-धर्म याचा अर्थ अधिकृत ग्रंथांत सांपडतो तो असा कीं, तर्काच्या पलीकडचें असें जें तें. चित्रकला व गायन--कला यांमध्ये शब्दांनी व्यक्त करतां येत नाही असें चित्रकाराला व गवयाला ज्याप्रमाणे वाटतें तसेंच कवीला वाटलें व त्यांनी त्याप्रमाणे कविता लिहिली तर त्यांत वावगें तें काय झालें? सारांश, 'गूढगुंजन' अगर 'गूढवाद' हा सर्व कलांमध्ये सारखाच आहे. मग त्यांत भेदाभेद कांहीहि असोत."

### समारोप

यानंतर श्री. शंकरराव मुजुमदार यांनी आधुनिक नाटकांतील पदांची तुलनात्मक दृष्टीने थोडीशी चर्चा केली व अलीकडे नाट्यपदांतूनहि दुर्बोधता कशी वाढत चालली आहे हें निदर्शनास आणलें. त्याचप्रमाणे श्री. श्रीधरपंत रानडे, सॉ. सुखटण-कर, श्री. पारसनीस व य. रा. दाते यांचीं भाषणें झालीं. यानंतर अध्यक्ष श्री. बेहेरे यांचें समारोपा-त्मक भाषण झालें. स्वागताध्यक्ष व अध्यक्ष यांना पुष्पहार घालण्यांत आले आणि प्रतिनिधि व पाहुणे मंडळी याना अल्पोपाहार देण्यांत आला.

सोमवारीं रात्रीं कांही वेळ इ. सं. मंडळाचे जागेंत व त्यानंतर जागेच्या अभावीं श्रीशिवाजीमंदिरांत श्री. नातू, सोपानदेव चौधरी, प्र. के. अत्रे, मनोहर, यशवंत, कु. संजीवनी मराठे, सौ. भावे इ. निर-निराळ्या कवींचें काव्यगायन झालें.

# गुरुवायुरू मंदिराचा इतिहास

येत्या जानेवारीच्या २ तारखेस गुरुवायुरू या देवालयांत अस्पृश्यांना प्रवेश मिळण्यासंबंधीच्या बाबतींत श्री. केल्लपन् यांच्यासमवेत म. गांधी हे प्रायोपवेशनास पुनः प्रारंभ करणार असल्याने अखिल राष्ट्राचें मन गुरुवायुरू देवालयाकडे वेधणें साहजिक आहे. तेव्हा या प्रसंगीं या गुरुवायुरू देवालयासंबंधीची माहिती महाराष्ट्रीय वाचकांस देणें योग्य होईल.

गुरुवायुरू हें देवालय मलबार--केरळ प्रांतांत प्रसिद्ध देवस्थान आहे. पण सध्याचा मंदिर-प्रवेशाचा प्रश्न पुढे येऊन जर त्यांत महात्माजींचें जीवित इरेस घातलें गेलें नसतें तर या देवालयाची प्रसिद्धि कदाचित् केरळ प्रांताबाहेर झाली नसती! मलबारी लोकांमध्ये गुरुवायुरू देवालयाचें महत्त्व फार आहे. इतर ठिकाणच्या लोकांना या देव-स्थानाची माहिती नसली तरी मलबारी लोकांचे तें एक प्रसिद्ध यात्रेचें ठिकाण आहे. हरहमेश या लोकांचे जमाव या देवाच्या दर्शनार्थ लोटत असतात. या देवस्थानासंबंधीचा उज्ज्वल असा प्राचीन इतिहास या भागांत प्रसिद्ध आहे.

गुरुवायुरू देवालय हें फार पुरातन म्हणून प्रसिद्ध हे. या देवालयांतील मूर्ति ही श्रीकृष्णाचा पिता [वसु]देव याच्या घराण्याचें आराध्य दैवत असल्याची [ख्या]ति आहे. मथुरा नगरींतील कंसाच्या कारागृहांत [कृष्]ण जन्माचे वेळीं वसुदेव-देवकीला जें विश्वरूप-दर्शन घडलें त्या विश्वरूपाच्या प्रतिबिंबाबरहुकूम ही गुरुवायुरू मूर्ति घडविण्यांत आली असल्याबद्दलची प्रसिद्धि आहे. द्वापार युगानंतर जो महाप्रलय झाला, त्या काळीं या मूर्तीचें गुरुश्रेष्ठ बृहस्पति व वायुदेव या उभयतांनी मोठ्या दक्षतेने रक्षण केलें. कलियुगाचे आरंभीं सुरक्षित स्थळाचे दृष्टीने पुष्कळ ठिकाणांचा शोध करून अखेरीस सध्याचें हें ठिकाण योग्य दिसल्यावरून तेथे या मूर्तीची स्थापना करण्याचें ठरविण्यांत आलें. या ठिकाणीं प्रथम महेश्वराची मूर्ति होती, पण खुद्द महेश्वरांनीच (शंकरांनी) प्रकट होऊन या मूर्तीची स्थापना आपल्या जागीं करण्यास सांगितल्यावरून व आपण जवळच असलेल्या अंबापुरम् या ठिकाणीं राहण्याचें खुषीने मान्य केल्यावरून त्या रमणीय ठिकाणीं या मूर्तीची तेथे प्रतिष्ठापना करण्यांत आली अशी आख्यायिका आहे. गुरु व वायु हे उभयता या मूर्तिस्थापनेचे मूळपुरुष म्हणून तेव्हापासून या देवस्थानास गुरुवायुरू असें नाव मिळालें. आजदेखील गुरुवायुरू देवतेच्या दर्शनास येणारे लक्षावधि भक्तगण जवळच असलेल्या अंबापुरम् या ठिकाणीं जाऊन शंकराचें दर्शन घेतल्याशिवाय राहात नाहीत.

या देवतेच्या जागृतपणाविषयीची हकीकत अशी कीं, अद्वैतशिखामणि शंकर (शंकराचार्य) याच्या काळीं गुरुवायुरू हें प्रख्यात यात्रेचें ठिकाण होतें. एकदा हे शंकर या देवस्थानाच्या आसपास

आले असता, देवदर्शनास जाण्याचें त्यांनी टाळलें व तेथून ते निघून जात असतां त्यांस वातरोग होऊन त्यांचे हातपाय जखडले गेले ! तेव्हा देवदर्शन टाळल्याच्या आपल्या चुकीमुळेंच असें झालें असल्याचें शंकरास पटून, ते देवालयांत गेले व देवास त्यांनी साष्टांग नमस्कार घातला.तेव्हा भगवंतांनी त्यास विश्वरूप दर्शन देऊन रोगमुक्त केलें. शंकरांनीहि देवाचा उत्सव वगैरे केला अशी दंतकथा आहे.

अशा या प्रख्यात देवालयाचा जीर्णोद्धार पांचव्या शतकांत झाला, त्या वेळचीहि एक आख्यायिका प्रसिद्ध आहे. त्या कालच्या पांड्य घराण्यांतील सार्वभौम राजास कोणा ज्योतिषाचे सांगण्यावरून आपण सर्पदंशानें मरण पावणार असल्याचें भाकित समजलें होतें. तेव्हा आपण यापुढील आयुष्य तीर्थक्षेत्रें करण्यांत घालवावें असें ठरवून तो तीर्थयात्रा करीत गुरुवायुरू येथे येऊन पोहोचला. जीर्ण झालेलें तें देवालय व देवालयांतील ती प्रसिद्ध सुंदर मूर्ति पाहून देवालयाचा जीर्णोद्धार करण्याचें त्यानें ठरविलें आणि जीर्णोद्धार करण्याच्या खटपटींत तो गुंतला असतांनाच ज्योतिषांनी ठरविलेला त्याचा अपमृत्युकाल टळून गेला ! राजानें ज्योतिष्यांस आपणास मृत्यु न येण्याचें कारण विचारलें. तेव्हा ज्योतिषानें गणित मांडून राजास कळविलें कीं, "महाराज, आपण देवालयाच्या जीर्णोद्धार कार्यांत गढून गेलां असतांनाच तुम्हांस सर्पदंश झाला, पण ईश्वरकार्यांत तुम्ही गुंतलां असल्यामुळ तुम्हांस सर्पविष बाधलें नाहीं व मृत्यु आला नाहीं ! पण सर्प-दंशाची खूण तुमच्या हातावर आहे. आपण जिवंत राहिलांत हा केवळ या गुरुवायुरू देवतेच्याच महिमा होय." याप्रमाणें राजास देवाचें महत्त्व पटल्यावर त्यानें देवालय-जीर्णोद्धाराचें काम पूर्ण केलें व देवालयाच्या व्यवस्थेकरिता बऱ्याच देणग्या दिल्या.

देवस्थानाचा अलीकडील इतिहास म्हणजे टिपू सुलतानाच्या वेळचा होय. टिपू सुलतान हा मलबारांत गेला असता मुसलमानांच्या हातीं ही मूर्ति लागू नये म्हणून ती त्रावणकोर संस्थानांतील एका प्रसिद्ध मंदिरांत नेऊन ठेवण्यांत आली. टिपूच्या लोकांनी देवालयांतील तूप ओतून देवालयास आग लावून दिली. पण ईश्वरी माहिम्यामुळे त्याचवेळीं मुसळधार पर्जन्यवृष्टि होऊन देवालयास आगीपासून बिलकूल धक्का पोहोंचला नाही. टिपूसदेखील या प्रसंगीं वातरोगानें पछाडलें व इतर प्रकारानें देवाच्या जागृतपणाची प्रचीति त्यास दिसून आल्यावरून टिपूस देवाचें महत्त्व वाटलें, व त्यानें आसपासचीं गावें देवस्थानास इनाम करून दिलीं ! पुढे दोन वर्षांनी पुनः पूर्वीची मूर्ति आणवून गुरुवायुरू या देवालयांतील पूर्व ठिकाणीं तिची स्थापना करण्यांत आली.या देवालयाचा अधिकार पूर्वीपासून ७२ ब्राम्हण कुटुंबांच्या घराण्याकडे होता, पण कालांतरानें हीं ७२ कुटुंबें एकामागून एक नाश होत जाऊन नामशेष झाल्याकारणानें अलीकडे या देवालयाचा सर्व अधिकार कालीकतच्या राजाकडे गेला आहे.

अशा प्रकारचा या देवालयाचा इतिहास आहे. सध्या अस्पृश्यांना या मंदिरांत प्रवेश मिळावा म्हणून प्रयत्न चालू आहे.मलबारच्या ब्राह्मणब्राह्मणेतर सनातन्यांचा यास विरोध आहे. आणि येत्या जानेवारीच्या २ तारखेस याच महत्त्वाच्या प्रश्नाकरितां श्री. केलप्पन् यांच्याबरोबर म. गांधीजी प्रायोपवेशनाचें दिव्य सुरू करणार आहेत.

# धान्याचा सुकाळ पण धनाचा दुष्काळ

गेलीं पाऊणशे वर्षें आगगाडी व आगबोट हे दोन राक्षस हिंदुस्थानाच्यामागे हात धुऊन लागले आहेत. त्या दोघांचें संगनमत आहे. एकानें परदेशच्या मालाचे कुलपी गोळे समुद्रांतून हिंदुस्थानाच्या किनाऱ्यावर आणून त्यांचा ढीग सांठवावा व दुसऱ्यानें तो दारूगोळ्यांचा ढिगारा तेथून उठवून त्यांचा भडिमार करीत सर्व हिंदुस्थान देश पालथा घालावा. त्याचा परिणाम असा झाला कीं या परदेशी मालाच्या अजस्त्र माऱ्यामुळे जुनें हिंदी कलाकौशल्य आणि उद्योगधंदे यांचा धुव्वा उडून हिंदी कारागीर अन्नान्नदशेला पोंचले. हे दोन राक्षस हिंदुस्थानावर चालून येतांना असली मारगिरी करीत व परत जातांना लुटालुटींत मिळविलेली अपरिमित संपत्ति इंग्लंडप्रभृति परदेशांत वाहून नेत.त्यामुळे येथील पर्वतांच्या मस्तकावरील पाणी समुद्रांत नेऊन सोडण्याचें प्रचंड कार्य जसें गंगा, ब्रह्मपुत्रा सिंधू-आदिकरून महानद्यांनी अनादिकालापासून अव्याहत चालविलें आहे, त्याचप्रमाणे पाण्याऐवजीं पाण्याइतकाच पैसाहि देशाबाहेर शेंकडों मुखांनी वाहून नेणारी आगगाडी ही प्रतिगंगाच आधुनिक भगीरथानें निर्माण केली आहे. तिनें जमिनीवरून समुद्रापर्यंत पैसा आणावा व आगबोटीनें तो सातासमुद्रांपलीकडे पोंचवावा असा क्रम जवळ जवळ पाऊण शतकभर सुरू आहे. अशा रीतीनें विलायतेच्या दिशेनें वाहणाऱ्या सुवर्णगंगेनें हिंदुस्थानांतील सारी संपत्ति खणून नेल्यामुळे हिंदुस्थान देश कंगाल बनावा यांत शंका नाहीं.

पण त्याचबरोबर आणखी एक नवा प्रकार हिंदुस्थानांत घडून आला. आगगाडी येण्यापूर्वी येथील शेतच्या मालाला पुरेसा खप नसे. त्या योगाने शेतीचा व्यवसाय शेतकऱ्याला तितकासा किफायतशीर न झाल्याने त्याच्या मालाचा पैसा होत नव्हता. बैलगाड्या व लमाण जेथपर्यंत मालाला घेऊन जातील तेथपर्यंतच त्याची पोंचण्याची मजल. पण आगीचा राक्षस असा सामर्थ्यवान व वेगवान भेटला कीं त्याला हजारो खंड्यांचा माल आपल्या खांद्यावर चढवून हजारों मैलांचे अंतर तोडणें त्याच्या खातरेंतहि राहिलें नाहीं. तो वाऱ्यासारखा साऱ्या हिंदुस्थानभर हिंडू लागला व प्रत्येक शेतकऱ्याला नवीन प्रकारच्या उदिमाची दीक्षा देऊन व शेतकरी पिकवील तितका माल विकत घेऊन समुद्रांतील राक्षसाकडे उसळया मारीत परतूं लागला. आगगाडीने शेतकऱ्याची सांपत्तिक स्थिति कांहीं अशी सुधारली व पूर्वीप्रमाणे कोणतीहि व कोठलीहि जमीन पडित न राहता ती वहीत करण्यास उत्तेजनच मिळालें. त्यामुळे पेशवाईतील धान्याच्या भावापेक्षा इंग्रजी राज्यांतील धान्याचे भाव बरेच महागले.

तथापि इंग्रजी राज्यांतील भाव किती प्रमाणांत तेजीचे झाले हें समजण्यास पेशवाईतील भावांची स्थिति माहीत असणें जरूर आहे. पेशवाईत बाजारभाव काय होते याची कल्पना पुढील आंकड्यांवरून येण्यासारखी आहे. सन १७२० सालीं महाराष्ट्रांत ज्वारी रुपयास १४ पायली, बाजरी १० पायली, हरभरे ६ पायली, तांदूळ ४॥ पायली, तूप ३। शेर व तेल ४ शेर असल्याचा दाखला सांपडतो. हाच निरख उत्तर पेशवाईतहि कमीअधिक प्रमाणांत आढळतो. इंग्रजी राज्यांत हें मान बदलत गेलें. त्याला कारण मुख्यतः आगगाडीच झाली. आगगाडी व आगबोट या दुकलीने हिंदुस्थानच्या शेतकऱ्यांचें तोंड परदेशाकडे फिरवून परदेशांतील कारखानदारांच्या व सामान्य जनतेच्या गरजा भागविण्याची चटक हिंदी शेतकऱ्यांना लावली. हिंदुस्थानांत इंग्रजी राज्यापूर्वीहि कापूस, गहूं, भुईमूग, ताग, मका व इतर धान्यें पिकत असतच. पण तीं मुख्यतः देशांतल्या लोकांच्या गरजा पुरविण्यासाठीच पिकविण्यांत येत.

परंतु आगगाड्या व आगबोटी यांनी हजारों कोसांवरील दूर देश जणूं काय हिंदुस्थानाच्या दाराशींच आणून उभे केले. इंग्लंड, फ्रान्स, जर्मनी इत्यादि देशांतील यांत्रिक सामर्थ्यावर चाललेल्या कारखान्यानी अगणित संपत्ति कमावली होती. शाडूचा गोळा विकत घेऊं गेल्यास पैसा दोन पैशांपेक्षा त्याला जास्ती दाम द्यावा लागत नाही. पण त्याच गोळ्यापासून गणपतीची गोंडस मूर्ति घडविणारा कसबी चितारी त्या एकदोन पैशावर रुपया आठ आणे सहज मिळवूं शकतो. हेंच अंतर कच्च्या व पक्क्या मालाच्या किंमतींत साहजिकच दिसून येतें. अशा रीतीने अकलेच्या बळावर खोऱ्यांनी पैसे ओढणाऱ्या वरील देशांतील कारखानदारांना पैशाच्या जिनसास चार पैसे द्यावे लागले म्हणून कां जड वाटावें? याच उपायाने इकडील शेतकऱ्यांना टक्क्यांची चटक लावून परदेशी कारखानदारांनी व त्यांजवर गब्बर झालेल्या तिकडील सामान्य जनतेने कापूस, गहूं, भुइमूग इत्यादि जिनसा पिकविण्यास उत्तेजन दिलें. त्याबरोबर शेतकऱ्यांचें लक्ष ज्वारी, बाजरी या प्रकारचें हलक्या प्रतीचें धान्य पिकविण्यावरून हळूहळू उडूं लागलें. खेरीज याहि धान्याची नेआण देशांतल्या देशांत दुर्भिक्षाच्या निमित्ताने होत राहिल्यामुळे धान्याची चणचण वाढत चालली व रुपयाला ज्वारीचा भाव चौदा पायली असल्याच्या गोष्टी सायंकाळीं शिळोप्याच्या वेळीं आजोबांनी अंगणांत बसून नातवंडांना सांगण्यापैकींच उरल्या.

तथापि सन १८९६ सालापर्यंत धान्याचे भाव एकंदरीने मंदीचेच होते. पण त्या सालीं हिंदुस्थानांत विशेषतः दक्षिणेंत भयंकर दुष्काळ पडून धारण तेजीची झाली व वारंवार आलेल्या अवर्षणांनी धान्याचे दर अधिकाधिक कडकडतच गेले. तथापि अधूनमधून सुबत्तेचें एखादें वर्ष आलें तर त्यांत पेशवाईतल्याप्रमाणें रुपयाला चौदा पायली ज्वारी न मिळाली तरी त्या वेळच्या पायल्यांइतके शेर तरी पदरांत पडत. पण हीहि स्थिति मधील पंचवीस वर्षांत बदलून धारण निम्म्यावर आली. महायुद्धाच्या अखेरच्या वर्षांत दुर्भिक्ष इतकें बोकाळलें कीं, कित्येक ठिकाणीं गरीबांकरिता स्वस्त धान्याचीं दुकानें काढावीं लागून त्या दुकानांपाशीं श्रीमंतांच्या दाराशीं भिक्षेकरिता जसे भिकारी जमावे तसे हातांत पैसे घेऊन गोरगरीब खरेदीकरिता तिष्ठत राहिलेले दृष्टीस पडत. ही केवळ तेरा वर्षांपूर्वीचीच शोचनीय स्थिति. ती ज्यांनी पाहिली त्यांना 'धनुर्मासांत खिचडीबरोबर लोण्याच्या मुदी खाण्याचे व लग्नकार्यांत तुपाचे द्रोण पिण्याचे जे दिवस गेले ते कायमचे गेले. या इंग्रजी राज्यांत तसले दिवस पुनः दिसावयाचे नाहींत' असें वाटलें असल्यास नवल काय? त्यानंतर खरोखर कांहीं काळ असा गेला कीं, तुपाला अत्तराची सर आली व तुपाची धार झारींतून द्रोणांत धरण्याऐवजीं अत्तरदाणींत तुपांत भिजविलेला फाया ठेवून तो चांदीच्या काडीनेच जेवणाराच्या हाताला चोळावा आणि जेवणाराने भाताचा घास

तोंडांत घालावा व तुपाचा सुवास नाकाने हुंगावा ही कल्पना शक्य कोटींतील ठरली.

परंतु गेल्या चार-पांच वर्षांत काळाला उलटी कलाटणी खाऊन महागाईच्या कुशीवरून स्वस्ताईच्या कुशीवर वळण्याची लहर लागल्याचें दिसून येतें. या मुदतींत पावसाचें मान वाढत्या प्रमाणांत असून त्यानें आपल्याकडून तरी आबादीआबाद करून सोडलें आहे. कोठें कोठें तर आपल्या दरम्यानच्या वर्षांतील हलगर्जीपणाबद्दल हाकाटी करणाऱ्या लोकांना संतापून मार द्यावा त्याप्रमाणें पावसानें अतिवृष्टीची झोड उठवून जणु काय झोडपूनच काढलें आहे. एकीकडून मेघराजानें आग्रहाआग्रहानें पाऊस वाढून जनतेचें फार दिवसांचें गाऱ्हाणें ऐकलें व दुसरीकडून जगानेंहि हिंदुस्थानाचें सांचलेलें उपकाराचें ओझें डोक्यावरून खांद्यावर उतरण्याचें मनांत आणिलें.

हिंदुस्थानांतून परदेशांत वाहणारा धान्याचा ओघ न साहून कित्येक लोक निर्गतीस जकातीनें आळा घालून हिंदुस्थानांत अन्नाची स्वस्ताई कां करूं नये असे प्रश्न कांही वर्षांपूर्वी सरकारास नसले तरी एकमेकांस विचारीत असत. त्या बिचाऱ्या अदूरदृष्टि लोकांना हें काय माहीत कीं परकीय राष्ट्रें हिंदुस्थानांतील धान्याची आशा न करतां उलट हिंदुस्थानाला आपलें धान्य पाठवून लयकरच स्वत: ऋणमुक्त होण्याच्या तयारींत आहेत ! त्यांनीं मुद्दाम केलेल्या संकल्पामुळे असो किंवा ईश्वराची तशी मर्जी लागल्यामुळे असो एक अनपेक्षित उलथापालथ घडून आली. हिंदुस्थानाचा माल पराराष्ट्रांना घ्या म्हणून त्यांची कितीहि आर्जवें केलीं तरी तीं घेईनात. हिंदुस्थानांतून ज्या जिनसा निर्गत होतात त्यांतील प्रमुख जिनसा कापूस, ताग, धान्यें, डाळी, आटा इ. होत. या मालाचा खप परदेशांत कसा कमी पडत चालला याचे आंकडे बोधप्रद आहेत. कापूस व ताग यापुरते आपण दोनच वर्षांचे आकडे घेऊं व त्यांची तुलना करून पाहू. १९२९-३० सालांत ६५ कोटींचा कापूस येथून परदेशीं रवाना झाला होता, तो १९३०-३१ सालीं ४६ कोटींवर आला. म्हणजे एकाच वर्षांत त्याचा खप १९कोटींनीं उतरला. तागाचीहि तीच अवस्था.१९२९-३०या वर्षी२७कोटींचा ताग बाहेर गेला होता.पण१९३०-३१ सालांत तो फक्त१२कोटींचाच खपला.या व्यापारांत हिंदुस्थानाचें पाऊल अवघ्या एका वर्षांत १५ कोटींनी मागे हटलें. धान्य, डाळी व आटा यांची रवानगी तीन वर्षांपूर्वी ४३ कोटींपर्यंत झाली होती. पण ती १९३०-३१ सालीं २३ कोटींवर आल्यामुळे हिंदी व्यापाराला वीस कोटींची ठोकर बसली.

सारांश, पराराष्ट्रें उपरोधिकपणानें हिंदुस्थानास उद्देशून मनांत म्हणूं लागलीं—"हिंदुस्थानांतील कच्चा माल व धान्यादि जिनसा आम्ही नेतों म्हणून आम्हांस हिंदी लोक दोष देतात व महागाईचें खापर आमच्या माथीं फोडतात काय ? ठीक आहे. तुमचा माल नेण्याचें पाहा आता आम्हीच बंद करतों. सांचवा तुम्ही तो आपल्या पेवांतून नाही तर अंबारांतून किंवा विका देशांतल्या देशांत मातीच्या मोलानें.' पराराष्ट्रें हिंदी लोकांना एवढाच टोला देऊन थांबत नाहीत. त्यांची तयारी यापुढेहि गेली आहे. हिंदुस्थानांतील धान्य परदेशांत कमी जाऊं लागलें ते लागलेंच, पण त्याच्या उलट परदेशांतून व हिंदुस्थानांत धान्य येण्यास सुरुवात झाली आहे. हें धान्य, डाळी व आटा इत्यादि पदार्थ अवघ्या सहा वर्षांपूर्वी ९० लक्ष रुपये किंमतीचें इकडे आलें होतें; पण त्याची आयात गेल्याच वर्षी २ कोटी ८१ लक्ष रुपयांपर्यंत झाली. तर मग आता परदेशांनी हिंदुस्थानाचें उसनें फेडावयाचें काय ठेवलें ? त्या देशांनी हिंदुस्थानाचा कच्चा माल नेण्याचें कमी करीत आणलें इतकेंच नव्हे तर लागल्यास तो माल आमच्याकडूनच घेऊन जा, तो आम्ही स्वस्त दरानें तुम्हांला देतों अशी भाषा बोलण्यास व त्याप्रमाणें वागण्यासहि त्यांनी सुरुवात केली हा चमत्कार नव्हे काय ?

अवघ्या बारा वर्षांपूर्वी जगाला अन्नान्नदशा आली होती. जगांतील जमीन आहे तेवढीच आहे. ती वाढत नाही पण लोकसंख्या मात्र वाढत आहे. अशा वाढत्या लोकसंख्येला अन्न कोठून व कसें पुरवावयाचें याची विवंचना जगाची काळजी वाहणाऱ्या चिंतकांना पडली होती. ती विवंचना आता नष्ट होऊन जगांत जिकडे तिकडे धनाची नसली तरी धान्याची समृद्धि नांदूं लागली आहे. इतकें थोडें धान्य पुरवावें कसें या फिकिरीऐवजीं इतकें गडगंज धान्य खपवावें कसें हाच चर्चेचा विषय सध्या जगभर होऊन बसला आहे. हिंदुस्थानापुढे यापूर्वी फक्त एकच संकट उभें होतें. आता त्या एका संकटाशेजारीं दुसरें संकट उभें राहिलें आहे. पूर्वी कापड, साखर इत्यादि परदेशी तयार मालापासून स्वदेशी उद्योगधंद्यांचा बचाव करून नवे धंदे उभारण्याचा विचार हिंदुस्थानास कर्तव्य होता. यापुढे तो विचार त्याला करावयास पाहिजेच. पण त्याशिवाय त्याला स्वतःच्या शेतीच्या रक्षणाचीहि काळजी जरूर वाहावयास पाहिजे.

उद्योगधंदे व शेती हीं राष्ट्राच्या जीवनाचीं मुख्य साधनें होत. त्यांपैकीं उद्योगधंदे हिंदुस्थानांत जवळ जवळ नाहीत म्हणण्यास हरकत नाही व आहेत तेहि परदेशी धंद्यांच्या हल्ल्यामुळे नीटसे चालत नाहीत. उरली फक्त शेती. तीहि परदेशांतील शेतीच्या संघटित

व यांत्रिक शक्तीपुढे ठार झाली तर हिंदी लोकांना धनोत्पादक साधन तें काय उरलें? त्यांनी संसारास लागणारा पैसा कशावर मिळवावा? उद्योगधंदे खालावल्यास मोलमजुरी मिळणार नाही. शेतचा माल न खपल्यास किंवा योग्य किंमतीला न गेल्यास हातांत पैसा खेळणार नाही. अशा स्थितींत अन्न व वस्त्र कितीहि स्वस्त झालें तरी जोंपर्यंत तें फुकट वांटण्याचीं सदावर्ते व भांडारें निघालीं नाहीत तोंपर्यंत स्वस्ताई हा शब्द महागाईच्या अर्थानेच वापरला जाईल. कारण स्वस्ताई हा शब्द केव्हाहि सापेक्षच आहे. एका काळांतील किंमतीशीं दुसऱ्या काळांतील किंमती आपण ताडून पाहतों तेव्हा तुलनेने त्या स्वस्त किंवा महाग ठरवितों इतकेंच काय तें.

पेशवाईतील किंमतीच्या मानाने हल्ली महाग दिसणाऱ्या जिनसा आजच्या दृष्टीने स्वस्तच आहेत. कोठे तेव्हाचे रुपयाचे चौदा पायली जोंधळे व कोठे आजचे चौदा शेर जोंधळे! परंतु ही ऐतिहासिक तुलना चालू व्यवहाराला उपयोगी पडत नाही. चालू व्यवहार हा मनुष्याच्या चालू प्राप्तीवरूनच उलगडावयाचा असतो. आज ज्याची मासिक मिळकत बारा वर्षांपूर्वीच्या महागाईत होती तितकीच मुबलक असेल त्याचें आजच्या स्वस्ताईत तुपाची कढी करूं कीं, अत्तराचे दिवे जाळूं अशा हर्षवायूने कदाचित् डोकेंहि फिरेल! पण त्या स्वस्ताईचा टोला बसून ज्याची प्राप्ति अगदीच आटली त्याला या स्वस्ताईतच भयंकर महागाई दिसूं लागून वस्त्र म्हणून दिशा पांघरूं कीं अन्न म्हणून हवा खाऊं अशा भीतीने गांगरून जाऊन कदाचित् त्याचेंहि डोकें भडकेल! हिंदुस्थान हा गरीब लोकांचा देश असल्यामुळे त्याला 'शय्या भूमितलं दिशोऽपि वसनं ज्ञानामृतं भोजनं' हाच श्लोकचरण म्हणण्याची वेळ आज प्राप्त झाली आहे. कणसें दाण्याने भरलीं व शेतें हुरड्याला आलीं म्हणजे शेतकरी लोक लहान वासरांना तोंडाला म्होरक्या घालून शेतांत बागडण्याला सोडीत असतात. त्यांनी त्या हिरव्यागार कणसाकडे आतुरतेने पाहावें व नुसतेच चहूंकुरीं बागडावें! तशीच फसवणूक सध्याच्या स्वस्ताईने हिंदी लोकांची मांडली आहे. त्यांच्यापुढे धान्याची धारणा गुडघाभर आहे व कापडाचे ठाण स्वस्त आहे, पण पोटात अन्नाचें शीत नाही व पाठीवर कापडाची एक वीत नाही अशी असंख्य हिंदी लोकांची हलाखी आहे. या विपरीत परिस्थितीच्या मुळाशीं असणारीं कारणें फार मनोरंजक आहेत. पण त्यांची चर्चा विस्तारभयास्तव पुढील खेपेवरच टाकणें भाग आहे.

# मरणाच्या दारीं बसलेला हिंदुस्थान

पाश्चात्य राष्ट्रांची अक्कल बडी आहे. त्यांना शास्त्र ही एक जादूच सापडली. त्या जादूच्या जोरावर त्यांच्या कर्तृत्वाने सीमाच सांडली. जादूगार फुंक मारून व हातांतील काडी फिरवून अजब चमत्कार करून दाखवितो. तो हातांत पाणी घेतो व तेंच अत्तर म्हणून लोकांच्या अंगावर फेकतो व तात्काळ त्याचा घमघमाट सुटून तो दाही दिशा दरवळतो. तो जवळ खव्याचा गोळाहि नसता रिकामे हात उपरण्याखाली दडवून त्यांतून ताज्या पेढ्यांनी भरलेलें ताट बाहेर काढतो व भोंवताली थक्क होऊन उभ्या राहिलेल्या लोकांना त्यांतील खुमासदार पेढे खावयास देतो. तथापि जादुगाराचे हे चमत्कार खरे कीं खोटे याची शंका घ्यावयास जागा आहे. व सदर चमत्कार खरे मानले तरी त्यांना वश असणारें कर्णपिशाच्च कोणा गंध्याच्या कुपींतील अत्तर व हलवायाच्या परातींतील मिठाई गुप्तपणें आणूनच जादुगाराच्या स्वाधीन करतें. परंतु दूर पश्चिमेकडे आपल्या बाटल्यांचा पसारा मांडून बसलेल्या आधुनिक जादुगाराजवळ यापैकीं कोणताच लपंडाव नाही. त्याचा सगळा व्यवहार रोखठोक आहे. कार्य व कारण याची सांगड घालण्याचें कसब त्याच्याइतकें कोणासच साधलें नाही म्हटलें तरी चालेल.

वरील आधुनिक शास्त्रज्ञ जादुगारांनी स्थूलाला सूक्ष्म व सूक्ष्माला स्थूल, दृश्याला अदृश्य व अदृश्याला दृश्य, एकाला अनेक व अनेकांना एक बनविण्याचा विलक्षण खेळ माडला आहे. मोठमोठ्या गवयाना ते एखाद्या तबकडींत कोंडून ठेवतात व त्यांच्या लहरीवर अवलंबून न राहता आपल्या लहरीवर त्यांस अवलंबून ठेवून चाहील तेव्हा गावयास सांगतात. बारीक छायाचित्रातून साडेतीन हात देहाचीं माणसें निर्माण करून त्यांना नाचवितात. क्षणापूर्वी शून्यवत् भासणारा पडदा हजारों माणसांनी गजबजून सोडतात व पुनः क्षणानंतर त्याच ठिकाणीं निर्जन वन दाखवितात. मूळ नट आपल्या घरीं झोपीं गेला असता त्याला न कळत शहरांतील शेंकडों गुलहौशी लोक उद्यानांत किंवा उपाहारगृहांत बसून त्याच्या हंसण्यांखिदळण्याच्या नकलांवर मौजा मारीत असतात. ते शास्त्रज्ञ निर्जीव हत्तींकडून सजीव हत्तींपेक्षाहि अधिक कामें करून घेतात, घोड्यावांचून गाड्यांना

पळवितात व पंखावांचून आकाशांत विहरतात. अशा अतुल सामर्थ्याच्या शोधक लोकांना परमेश्वराची पर्वा काय व संकटाची गुमान काय ! तथापि हल्ली पाश्चात्य राष्ट्रांवर त्यांच्या असल्याच करामतीमुळे नवें संकट ओढवलें आहे. त्यांतून पार पाडण्यास वरील जादुगारांचें साहाय्य किती होतें पाहावें !

महायुद्धांत कोट्यवधि मानवांच्या संहाराचा शोक पुरवून पाश्चात्य राष्ट्रांनी आपल्या डोळ्यावरची धुंदी उतरविल्यावर त्यांचे लक्ष स्वतःच्या स्थितीकडे वेधलें. युद्धांतील आसुरी आयुधांनी क्रोडो माणसांची कत्तल उडविली होती तरीहि उरलेल्या प्रजेला अन्नाचा तुटवडा त्या वेळीं तीव्रतेने भासत होता. युद्धकालांत एक उणीव त्यांच्या लक्षांत आली. युद्ध सुरू होऊन जगाच्या वाटा खुंटल्यानंतर शत्रूच्या वेढ्याने कोंडून पडलेल्या देशाने खावें काय ही मुख्य अडचण त्यांच्यापुढे उभी राहिली. ती अडचण दूर करण्याकरिता आपली शेती सुधारण्याचें ज्या त्या राष्ट्रीय सरकाराने ठरविलें. युरोपांतील इंग्लंड, फ्रान्स, जर्मनी प्रभृति देशांतील लोकसंख्या फार मोठी आहे व त्या मानाने त्यांचें क्षेत्रफळ फार लहान आहे. अशा आकुंचित क्षेत्रफळांत धान्याची पुष्कळ पैदास करावयाची झाल्यास प्रत्येक जमिनींत पाचपट, दसपट पीक काढण्यावांचून गत्यंतर नाही. या दृष्टीने नाना प्रकारच्या खताचा शोध लावून प्रत्येक युरोपियन राष्ट्राने आपली धान्योत्पत्ति बरीच वाढविली.

युरोपियन राष्ट्रांना या कामांत यश आलें खरें; परंतु त्याच वेळीं विस्तीर्ण क्षेत्रांचे इतर पाश्चात्य देश स्वस्थ बसले नव्हते. रशियाने झारच्या वेळची जेरची कात व पारतंत्र्याची शृंखला फेकून देऊन तो तरणाबांड व मनाचा मुखत्यार बनला होता. त्यांत समानसत्तावादी सरकार स्थापन झाल्याबरोबर जगाचा व रशियाचा संबंध तुटला. त्याला जगांत कोणीहि वाली न उरल्यामुळे रशियांत दुष्काळ पडला तेव्हा अन्नाच्या तुटवड्याने लक्षावधि लोक उपाशीं मरण पावले, तेव्हा रशियाने सावध होऊन शेतकऱ्यांची संघटना केली व त्यांनी एक-एकट्यांनी आपआपलीं शेतें पिकविण्याऐवजी समूहाने, यांत्रिक आउतांनी व सामुदायिक भांडवलावर शेतें पिकविण्यास सुरुवात केली. त्यामुळे रशियांतील गव्हाची पैदास कित्येक पटींनी वाढली. रशियाप्रमाणेच कानडा, ऑस्ट्रेलिया व अर्जेन्टाइन या नव्या जगांतील देशांनी सामुदायिक पद्धतीवर शेती आरंभली. कोणताहि जिन्नस सामुदायिक रीतीने फार मोठ्या प्रमाणावर उत्पन्न केल्यावांचून किफायतशीर होत नाही असा अलीकडचा अनुभव आहे. जर्मनी, अमेरिका इत्यादि देशांतील कारखाने मोठ्या प्रमाणावर चालविण्याची वहिवाट पडल्यामुळे त्यांच्या धडाक्यापुढे जगांतील लहान लहान कारखाने मृत्यूच्या पंथास लागले. हाच न्याय रशिया, अर्जेंटाईन, कानडा, ऑस्ट्रेलिया इत्यादि कृषिप्रधान देशांनी स्वतःच्या शेतीस लावून दाणा व माती बरोबर करून सोडली.

रशियाने कम्यूनिझमचा अम्मल केल्यामुळे तो युरोपांतील इतर देशांप्रमाणे जुना देश असताहि त्याला वरील योजना सुकर झाली. परंतु कानडाप्रभृति देशांना ही सामुदायिक पद्धति स्वीकारण्यास नैसर्गिक अनुकूलताच होती. कारण त्यांच्यांतील एक एक शेतकरीच हजारो एकर जमिनीचा धनी होता. त्यानी धान्याचे पर्वतप्राय ढीग पाडल्यानंतर ते ढीग युरोपांतील लहान लहान देशांच्या अंगावर सहजच आदळले. त्यांचा गहूं व इतर धान्ये स्वस्त असल्याने इंग्लंड, फ्रान्स, जर्मनी इत्यादि देशांतील शेतकऱ्यांच्या धान्याचा खप त्यांजपुढे सपशेल थांबला. हे कारखानदारीचे देश तयार मालाची चढाई वरील कृषिप्रधान देशांवर करीत तर वरील कृषिप्रधान देश आपल्या धान्याचे हल्ले कारखानदारांच्या देशांवर चढवीत. या सुमारास कारखानदारीच्या मालाची फाजील पैदास झाल्यामुळे त्याचा खप मागं हटून युरोपियन राष्ट्रांत बेकारी बळावं लागली होती. त्या बेकाराना पोटगी देऊन वांचविण्याची विवंचना वरील राष्ट्रांस होतीच. त्याच्या जोडीस शेतकऱ्यांची शेतीहि बुडून तेहि बेकार बनल्यास शेतकरी व मजूर या दोघाना म्हणजे बहुतेक सगळ्या देशालाच पोटगीवर जगावयाचें झाल्यास त्यांना पोटगीसाठी पैसा पुरविता पुरविता कुबेरदेखील कफल्लक बनावयाचा, मग राष्ट्रीय सरकारांची कथा काय ? यासाठी देशांतील शेतकऱ्यांचें धान्य कितीहि महाग पडलें तरी बेहेत्तर पण तेंच पिकविण्यास त्यांस उत्तेजन द्यावयाचें व तेंच सर्व जनतेस खाऊं घालावयाचें असा ज्या त्या राष्ट्रीय सरकाराने निश्चयच केला.

राष्ट्रीय सरकारांच्या या निश्चयाचा परिणाम वेगळाच झाला. त्यांनी परदेशच्या धान्यावर भयंकर जकात बसवून तें धान्य बाहेरच्या बाहेर थोपवून धरलें व त्यामुळे देशातील लोकांना मिळणारें स्वदेशी धान्य दुप्पट महाग पडूं लागलें. अशा रीतीचा अटकाव युरोपातील बहुधा प्रत्येक देशांत झाल्यामुळे कानडा, ऑस्ट्रेलिया वगैरे राष्ट्रांना आपलें धान्य जगाच्या उरलेल्या भागांत जाईल त्या भावाने खपविल्याशिवाय दुसरा मार्गच राहिला नाही त्यांच्या धान्याच्या किंमती एकतृतीयांशावर उतरल्या म्हणून हें धान्य हिंदुस्थानाकडे वळलें व हिंदुस्थानांत येथील धान्यापेक्षा स्वस्त भावाने विकण्यांत

आलें. परदेशी धान्याचें परचक्र हिंदुस्थानास दुहेरी भोवलें. एकतर त्यामुळे येथील धान्याची निर्गत कुंठून शेतकऱ्यांचा माल शिलकी राहिला व दुसरें असें कीं तो येथल्या येथे खपावा तर त्याला हा बाहेरचा नवाच वैरी भेटला. हिंदुस्थानांतील स्वस्ताईची मीमांसा कांही अंशीं अशा रीतीने करतां येते. युरोपमधील प्रत्येक देश अन्नाच्या गरजा आपल्या आपण भागविण्यांत गुंतला व त्यांतूनहि थोडीशी कूस सांपडली असतां ती आपल्या-कडे ओढण्यास रशिया, कानडा वगैरे सामुदायिक शेतीचे देश टपून बसले, त्यामुळे त्यांच्याशीं चढाओढ चालविणें भागसलेल्या हिंदुस्थानास दुरापास्त झालें. यावरून हिंदी शेतकरी कांही बाबतींत परदेशी पेठांस मुकला तो कायमचा मुकला असें तूर्त समजण्यास हरकत नाही. त्याला संभाळतां आलीच तर आपली पेठ कशीबशी संभाळतां येईल. पण तिला सुद्धां जकातीचें संरक्षण अवश्य द्यावें लागेल असें वाटतें.

एकीकडे रशियासारखे मोठाले शेतीचे देश आपली अन्नाची गरज भागवून जास्ती धान्याची पैदास करीत आहेतच व दुसरीकडे युरोपांतील प्रत्येक देश येतील त्या अडचणींना तोंड देऊन आपलें शेतीचें उत्पन्न वाढवीतच आहे. या कारणाने जगाला पाहिजे त्यापेक्षां अधिक धान्य उत्पन्न होत असल्यामुळे आता यापुढे धान्याच्या महागाईची आशा बाळगण्यास शेतकरी वर्गास सध्या तरी जागा नाही. त्याच ठिकाणीं आणखी कित्येक बाबी लक्षांत ठेवण्यासारख्या आहेत. मनुष्याने धान्याच्या खपास निराळ्या रीतीने आळा घालण्यास सुरुवात केली आहे.पूर्वी धान्य हें जसें माणसाला तसें जनावरालाहि लागत होतें. पण अन्न खाणाऱ्या जनावराला अन्न न खाणारें यंत्र प्रतिस्पर्धी भेटून चाकांनी चालणाऱ्या यंत्रांनी पायांनी चालणाऱ्या जनावरांचा संहार चालविला आहे. जेथे तेथे यंत्राने जनावराला पिटा-ळून लावलें आहे. आगगाड्या व मोटारी यांनी त्यांचीं वाहनें बंद पाडीत आणिलीं व ट्रॅक्टरसारख्या यांत्रिक आउतांनी त्यांना शेतावरून रजा दिली. अशा रीतीने गरीब बिचाऱ्या जनावरांवर जिकडून तिकडून संक्रांत गुदरल्यामुळे घोडे, बैल इत्यादिकांना दाणावैरण घालून जतन करण्याचें कारणच कमी होत चाललें.

धान्याचा खप यामुळे जसा उतरला तसा मनुष्याने प्रजोत्पत्तीस आळा घालण्याचें ठरवि-ल्याने धान्याच्या वाढत्या खपास कांही अंशीं पायबंद बसला. युरोपांतील बऱ्याच देशां-तून लग्नसंस्थाच नामशेष होण्याच्या मार्गात आहे. लग्नें नाहीत म्हणून संतति नाही व संतति नाही म्हणून लोकसंख्येची वाढ नाही. लग्नें स्वातंत्र्याच्या आड येतात, व संतति सुखाच्या आड येते. जीं जोडपीं दुर्दैवाने अगर सुदैवाने वैवाहिक स्थितीत अनु-भवीत आहेत त्यांनी आपणांस जरूर त्यापेक्षा अधिक संतति उत्पन्न होऊंच नये असा बंदोबस्त केला आहे. इतक्या कैचींतूनहि जीं माणसें जिवंत आहेत त्यांच्या आहाराच्या कल्पना बदलल्या आहेत. त्यांच्या अन्नांतून धान्या चा अंश कमी होत आहे. ते द्विदल धान्यें, पिठूळ पदार्थ व रोटी सहसा खात नाहीत. त्या अन्नांत त्यांना लज्जतच वाटत नाही. त्यांऐवजीं लोणी, फळें, मांस, मासे यांचा खप वाढत्या प्रमाणांत आहे. मासे मांसाला मागे टाकीत आहेत. त्या योगाने पाश्चात्य लोकांच्या रोजच्या आहारांत धान्यादिकांचें प्रमाण एक-अष्टमांशावर आलें आहे असें म्हणतात.

धान्याचा खप अशा अनेक कारणांनी उतरला व त्याची पैदास वाढली म्हणजे धान्य स्वस्त व्हावें हा त्याचा स्वाभाविक परिणाम होय. याकरिता धान्याची पैदास त्याच्या खपाच्या प्रमाणांत होत गेल्यास धान्याला भाव येण्याचा थोडाबहुत संभव आहे. वास्तविक पाहता जे देश धान्योत्पादक आहेत त्यांनी मुख्यतः धान्य उत्पन्न करावें व कारखानदारीच्या देशांनीं तयार मालाच्या पैदाशीकडे लक्ष पुरवावें हेंच योग्य. श्रम-विभागाच्या व सुव्यवस्थेच्या दृष्टीने हाच मार्ग श्रेय-स्कर. परंतु युरोपियन राष्ट्रांची दृष्टि सध्या तरी संकुचित बनली आहे. प्रत्येक राष्ट्र स्वतःपुरताच विचार करीत आहे. एका राष्ट्राला दुसऱ्या राष्ट्रांची भीति व अविश्वास वाटतो. केव्हा युद्ध जुंपेल व केव्हा युरोपियन राष्ट्रांत फळ्या पडून त्यांचा कोंडमारा होईल या धास्तीने जें तें राष्ट्र ग्रासलें असल्यामुळे त्या सर्वांनी स्वावलंबनावरच सर्वस्वी भिस्त ठेवली आहे. तथापि याविरुद्ध ब्रिटिश साम्राज्यांतील देशांचा संघ, पूर्व-युरोपांतील राष्ट्रांचा संघ अशा प्रकारचे संघ स्थापण्याचा प्रयत्न सुरू आहे; परंतु हा प्रयत्न अपुरा होय.

राष्ट्राराष्ट्रांमधील अविश्वास नाहीसा व्हावा व त्यांजमधील स्नेहसंबंध वाढावा या दिशेने राष्ट्रसं-घाचा उद्योग सुरू आहे व आन्तरराष्ट्रीय परिषदाहि भरत आहेत. तथापि या उद्योगांना म्हणण्या-सारखें यश आलें नाही. खरें म्हटलें असता नुसत्या युरोपियन राष्ट्रांचीच नव्हे तर जगांतील सर्व देशांची या बाबतींत एकवाक्यता करणारी व त्या त्या देशाच्या हितास जपणारी योजना जगत्परिषद भरून तिने ठरविली पाहिजे. ती ठरेल तेव्हा ठरो, पण आज एकटा हिंदुस्थान देशच घेतल्यास त्याला जगांत

हक्काने उभें राहण्यास व आपलें धोरण निश्चित करण्यास जागाच नाही. तो जगाच्या आर्थिक लाटांवर तरंगत आहे व त्याच्या थपडा खात खात नाकातोंडांत पाणी जाऊन बुडण्याच्या बेतांत आहे. अशा कंठिण प्रसंगीं युरोपियन राष्ट्रांचा कित्ता सध्यापुरता गिरवून हिंदुस्थानसरकारानें जालीम उपायांची अंमलबजावणी न केली तर हिंदुस्थान मरणाच्या दारीं बसलाच आहे!

# पुण्यांतील शिवाजी मिलिटरी स्कूल

पुणें येथील श्रीशिवाजी प्रिपेरेटरी मिलिटरी स्कूलचे स्कॉच प्रिन्सिपाल ले. क. मि. हचिसन यांनी आपल्याला शाळेचा राजीनामा देणें भाग का पडलें यासंबंधी जें ४८ पानांचें सविस्तर पत्रक काढलें त्याला उत्तर म्हणून आता शाळेच्या पोटमंडळाने एक पत्रक काढलें आहे. परंतु वाईट इतकेंच वाटतें कीं, मि. हचिसन यांनी आपल्या पत्रकांत प्रिन्सिपॉलचे शाळेसंबंधीचे अधिकार, शिक्षक वर्गाची नालायकी, हिशेबांची अव्यवस्था, विद्यार्थ्यांच्या भोजनविषयक अडचणी व तक्रारी आणि श्री. येवले यांचें शिस्तीच्या विरुद्ध वर्तन, इत्यादि बाबतींत जे साधार आरोप केलेले आहेत, त्यांपैकीं एकाहि आरोपाला कमिटीने उत्तर दिलें नाही व ज्या एका आरोपाला उत्तर दिलेलें आहे तेंहि तितकेंसें समाधानकारक नाही. कमिटी म्हणते कीं, प्रि. हचिसन यांनी आपल्याकडे पत्रकच न पाठविल्यानें त्यांच्या आरोपांना उत्तर देणें अशक्य आहे. परंतु या युक्तिवादाने कोण फसणार? प्रि. हचिसन यांनी प्रसिद्ध केलेलें पत्रक कमिटीच्या निदर्शनाला आलें म्हणूनच ना तिने तरी हा तुटपुंजा खुलासा प्रसिद्ध केला? यावरून कमिटीला हचिसन यांचें पत्रक पाहावयास मिळालें होतें असेंच अनुमान निघतें. आणि तिला जर हें पत्रक पाहावयास मिळालें होतें तर हचिसन यांनी उपस्थित केलेल्या महत्त्वाच्या मुद्द्यांना, स्वतः तिच्याकरिता नसलें तरी जनतेच्या माहितीसाठीं तरी निदान, सविस्तर व मुद्देसूद उत्तरें देणें तिचें कर्तव्य होतें.

कमिटीची ही लटपटपंची सोडून देऊन तिने आपल्या पत्रकांत ज्या गोष्टी निवेदन केल्या आहेत त्यांचाच आता विचार करूं. कमिटीचें पत्रक अथपासून इतिपर्यंत बारकाईने वाचलें असता त्यांतून विशेष असें कांहीच निष्पन्न होत नाही. तिच्या सर्व म्हणण्याचा आशय असा कीं, प्रि. हचिसन यांनी त्यांजबरोबर आगाऊ झालेल्या करारांत तशा अटी नसताहि हिंदुस्थानांत आल्यावर पगाराबद्दल कुरबूर सुरू केली आणि हजार रुपयांच्या ठिकाणीं त्यांनी २५०० रुपयांची मागणी केली. घरभाड्याबद्दलहि ते खळखळ करूं लागले. आता मि. हचिसन यांनी अगदी याच मुद्द्यावर काय म्हटलें आहे तें पाहा. आपल्या पत्रकांतील सहाव्या पृष्ठावर ते म्हणतात, "मी आणि कमिटी यांमधील वादाचा मुद्दा पगाराची बाब नसून केवळ (absolutely) अधिकाराचाच प्रश्न होता." आणि आश्चर्याची गोष्ट अशी कीं, कमिटीनेहि एके ठिकाणीं प्रि. हचिसन यांनी पगाराच्या बाबतींत विशेष ओढून न धरण्याचें ठरविल्याचें कबूल केलें आहे.

राहता राहिला मुद्दा प्रिन्सिपालच्या अधिकाराचा. मि. हचिसन यांची शाळेच्या प्रिन्सिपॉलच्या जागेवर नेमणूक होण्यापूर्वी कमिटी व ते यांच्यांत कांही करारमदार झाला होता व त्याला उभय पक्षांची संमति होती ही गोष्ट दोघांच्याहि पत्रकांत नमूद आहे. आता प्रश्न असा येतो कीं, ज्या अधिकाराच्या मुद्द्यावर कमिटी आणि प्रिन्सिपाल यांचें बिनसलें तो मुद्दा मूळ करारांत समाविष्ट होता किंवा नाही? प्रि. हचिसन यांनी आपल्या पत्रकांत पान २ वर करारांतील पहिला परिच्छेदकच मुळी उद्धृत केला आहे. त्यांत असें म्हटलें आहे कीं, "शाळेची व्यवस्था आणि नियंत्रण या बाबतींत प्रिन्सिपालचीच सत्ता चालेल, इतकेंच नव्हे तर शाळेच्या विस्तारासाठीं आणि वाढीसाठीं जे जादा अधिकार वेळोवेळीं ठरतील तेहि त्याला आहेत." या वाक्यावरून असें सहज अनुमान निघतें कीं, पुढे अधिकार काय मिळावयाचे असतील ते मिळोत वा न मिळोत, निदान नेमणुकीच्या वेळीं तरी प्रिन्सिपालचे जे वास्तविक व नैसर्गिक अधिकार म्हणून गृहीत धरले गेले त्यांत शाळेची सुव्यवस्था आणि नियंत्रण या बाबतींत प्रिन्सिपालाला अधिकार व तेहि पूर्णाधिकार आहेत ही गोष्ट कमिटीला मान्य होती.

या अनुमानाला पोषक असा एक पुरावा मिळूं शकतो व तोहि कमिटीचे अध्यक्ष जे करवीरस्थ महाराज त्यांच्याच पर्सनल सेक्रेटरींचा. रा. सा. सुर्वे यांजकडे श्री. येवले यांच्या नियमबाह्य वर्तणुकीसंबंधी प्रि. हचिसन यांनी तक्रार केली असता तिला उत्तर म्हणून रा.सा.सुर्वे प्रि.हचिसन यांना असें लिहितात कीं, "शाळेचा कारभार (affairs of the school) आणि शिक्षकांचें वर्तन या दोनहि बाबतींत

आपल्या हातीं अंतिम निर्णय आहे व तो तसा असलाच पाहिजे. या बाबतींत खुद्द महाराज व कमिटी यांचीहि सहानुभूति आणि सहकार्य आपल्यालाच मिळेल." कमिटीचें म्हणणें असें कीं, प्रिन्सिपालला शाळेच्या बाबतींत पूर्णाधिकार असल्याची गोष्ट कमिटीला मान्य नाही व तसा करारांतहि स्पष्ट उल्लेख नाही. परंतु प्रि. हाचिसन यांनीं उद्धृत केलेला परिच्छेद आणि येवल्यांच्या वर्तणुकीसंबंधी प्रिन्सिपालच्या पत्राला रा.सा.सुर्वे यांनीं त्यांना पाठविलेलें उत्तर हीं दोनहि कमिटीच्या विरुद्ध आहेत.कोल्हापूरचे महाराज हे तर कमिटीचे अध्यक्षच. अर्थात् त्यांच्या पर्सनल सेक्रेटरीनें दिग्दर्शित केलेले विचार त्यांचेच म्हणून बेजबाबदार असणेंहि शक्य नाही. अशा पद्धतीनें छाननी करता कमिटीचा युक्तिवाद लंगडा व असमाधानकारक दिसतो. असो. एकंदरींत झालेला हा सर्व प्रकार उदयोन्मुख शाळेच्या दृष्टीनें अनिष्ट असाच झाला. शाळेची व्यवस्था उत्तम प्रकारची ठेवून शाळेचें उद्दिष्ट कार्य यशस्वी होण्यास जरूर ती उपाययोजना कमिटी करील असा आम्हांस भरंवसा वाटतो.

# सर विश्वेश्वरअय्या यांचें भाषण

मुंबई येथे ता. ५ रोजीं डेक्कन मर्चंट्स असोसिएशनतर्फे भरलेल्या वर्गीकृत व्यापारी प्रदर्शनाच्या उद्‍घाटनप्रसंगीं समारंभाचे अध्यक्ष सर एम्. विश्वेश्वरअय्या यांनी जें महत्त्वाचें भाषण केलें त्याचा सारांश पुढे देण्यांत येत आहे. सर विश्वेश्वरय्या आपल्या भाषणांत म्हणाले— "प्रदर्शनें हीं स्फूर्ति आणि ज्ञान यांचे निर्झर असून जनतेला त्यांपासून मोठाच लाभ होत असतो. उद्योगधंदे आणि व्यापारउदीम यांमध्ये साहस दाखविण्यास तरुणांना एक प्रकारचें प्रोत्साहन मिळून बेकारांना उपजीविकेची दिशा दाखविण्यास त्यामुळे मदत होते. याच शहरांत १९०४ सालीं एक जंगी औद्योगिक प्रदर्शन भरलें होतें. त्या प्रदर्शनाचा परिणाम असा झाला कीं, उद्यम क्षेत्रांत कित्येक नवीन शाखा निर्माण झाल्या. प्रस्तुत प्रदर्शन हें डेक्कन मर्चंट्स असोसिएशनच्या देखरेखीखाली भरत आहे. उद्योगधंदे आणि कारखाने यांना उत्तेजन देणें हें या संस्थेचें मुख्य ध्येय आहे. हिंदुस्थानांत उत्पन्न झालेल्या मालाचें वर्गीकरण करून त्यांची विक्रीकरिता प्रत ठरविणें हें संघाचें आद्य उद्दिष्ट आहे. पुढील खेपेस जेव्हां प्रदर्शन उघडण्यांत येईल तेव्हां कारखानदार आणि उत्पादक यांची एक परिषदहि भरविली जाईल अशी मला आशा आहे. १९३० सालीं वर्गीकृत मालाचें जें पहिलें प्रदर्शन भरलें तें आर्थिक दृष्ट्याहि यशस्वी झालें ही आनंदाची गोष्ट होय.

### स्वदेशीची कांस धरा

मुंबई शहरांत स्वदेशी–संघ स्थापण्यांत आला असून त्याच्यातर्फे स्वदेशीचीं प्रदर्शनेंहि भरविलीं जात आहेत ही समाधानाची गोष्ट होय. अशा प्रदर्शनांचा हेतु अर्थातच जनतेंत स्वदेशी मालाबद्दल औत्सुक्य निर्माण करून राष्ट्र स्वावलंबी बनविणें हा होय. इतर राष्ट्रांतूनहि अशाच धर्तीची चळवळ चालू आहे. आपल्या देशांत जो माल तयार होत नाही त्यावांचून नडणार असलें तरच तो विकत घ्यावयाचा, नाही तर आपल्या देशातच जो भलाबुरा माल तयार झाला असेल त्यावरच भागवून घ्यावयाचें अशी इतर देशांतील लोकांची वृत्ति दिसून येते. आपल्या देशांतील लोकांनींहि आता याच वृत्तीचा अवलंब केला पाहिजे. आपल्या लोकांत अशा प्रकारची जागृति झाली असल्याचें वरील प्रयत्नावरून दिसतें. हिंदुस्थानानें एकदा का आपल्या मनाशीं उद्योगधंद्याची शाखा हस्तगत करण्याचे ठरविलें तर देशांत मजुरी आणि कच्चा माल इतका स्वस्त आहे व इतर परिस्थिति इतकी अनुकूल आहे कीं, बोलबोल म्हणता त्याला व्यापारांत उत्कर्ष साधतां येईल. अर्थात् या गोष्टींना सरकारचें उत्तेजन व सक्रिय पाठिंबा आणि जनतेची जिवंत सहानुभूति पाहिजे.

### हिंदी व्यापाऱ्यांची स्थिति

जगाच्या आर्थिक दुःस्थितीचें आणि व्यापारविषयक मंदीचें सिंहावलोकन करून हिंदुस्थानाच्या व्यापारासंबंधी बोलतांना ते म्हणाले, "हिंदुस्थानाच्या व्यापारविषयक स्थितीचें दोन दृष्टींनी निरीक्षण केलें पाहिजे. (१) जागतिक व्यापारमंदीमुळे तात्पुरत्या उत्पन्न होणाऱ्या अडचणी व (२) हिंदुस्थानाचा जगांतील व्यापारी पेठेंत असलेला कमी दर्जा या त्या दोन दृष्टी होत. पहिल्या कारणामुळे जगांतील सर्वच देशांच्या खिशाला खार लागला. परंतु हिंदुस्थानाला त्याचा दुष्परिणाम विशेष जाणवला. कच्चा माल आणि खाद्य पदार्थ हेच मुख्यतः हिंदुस्थानांतून परदेशीं रवाना होत असल्यानें त्यांच्या किंमतीच एकदम अतिशय उतरल्यानें नैसर्गिक रीत्या लोकांची क्रयशक्ति कमी झाली. त्यांतच विशेष वाईट गोष्ट म्हटली म्हणजे अलीकडे परदेशांतून हिंदुस्थानाच्या किनाऱ्यावर कापूस, गहू, तांदूळ

मांसारखा कच्चा माल उतरूं लागला आहे. यावरून हेंच सिद्ध होतें कीं, कच्च्या मालाच्या बाबतींतहि आपल्या बाजार पेठांवर नियंत्रण ठेवण्यास हिंदुस्थान असमर्थ आहे. हीच स्थिति अशीच पुढेहि चालू राहणार असेल तर हिंदुस्थानाची क्रयशक्ति पार संपुष्टांत येऊन त्याच्या आंतरराष्ट्रीय व्यापारी पतीलाहि जबरदस्त धोका पोहोचणार आहे.

देशाचा व्यापार व उद्योग भरभराटीस लागावा, व्यापारी हितसंबंधाचें संरक्षण व्हावें म्हणून राष्ट्रीय धोरण असें कांहींच ठरलेलें नाहीं ही शोचनीय गोष्ट होय. वास्तव सामान्यतः सरकारी संस्था आणि लोकप्रतिनिधियुक्त संस्था अशा दोन संस्था स्थापण्यांत आल्या पाहिजेत. या दोनहि संस्थांचे उद्देश अर्थातच एक असावे व त्यांच्यावर स्थानिक लोक घेण्यांत यावे. अशा तऱ्हेच्या संस्था सध्या देशांत नाहीत असें नाहीं. परंतु त्यांचे हेतु एक नाहीत, त्यांना एकमेकांबद्दल सहानुभूति वाटत नाहीं आणि त्यांच्यांत सहकार्यहि वसत नाहीं. वैयक्तिक प्रयत्नांचा अशा कामीं निभाव लागणें शक्य नाहीं. खरें पाहता सरकारनेच या कामीं पुढाकार घेऊन निरनिराळ्या व्यापारी संस्थांत सहकार्य उत्पन्न करण्याची खटपट केली पाहिजे. सरकारचें हें उदासीन धोरण आहे तर लोकांचेंहि चुकीचें वर्तन होत आहे. आपल्याला योग्य असा पेशा स्वीकारण्याची दिशाच लोकांना राहिली नाहीं. त्यामुळे शेतीवर उपजीविका करणारांची संख्या उगीचच फुगत गेली आणि इतर धंदे मात्र पोरके पडले."

## सरकारचें सहानुभूतिशून्य धोरण

सरकारच्या जकातविषयक धोरणावर टीका करतांना वक्ते म्हणाले, "सरकारकडून गंगाजळींच्या द्वारें लोकांना ज्या सवलती व जें साहाय्य मिळतें तें अगदींच तुटपुंजें आहे. आंतबट्ट्याच्या चलनपद्धतीनें तर देशांतील व्यापाराच्या नाड्याच आंखडल्या! पूर्वी नौकानयनाच्या बाबतींत ज्या सवलती होत्या त्या आता दिसेनाशा झाल्या आहेत व हिंदी व्यापाऱ्यांना परदेशांत कसल्याहि सवलती मिळत नाहीत. देशामध्ये कोठें कोठें वस्तुसंग्रहालयें उघडण्यांत आलीं आहेत. परंतु खेदाची गोष्ट अशी कीं, त्यांत बव्हंशीं औद्योगिक विभाग ठेवलेला नसतो. त्यामुळे त्यांचा व्यापाऱ्यांना उपयोग होत नाहीं. इतर देशांत तीं तीं सरकारेंच व्यापाऱ्यांच्या हितासाठी मोठमोठे बाजार आणि प्रदर्शनें भरवीत असतात. परंतु या राष्ट्रीय जागृतीच्या कार्यासाठींहि हिंदुस्थानसरकार कांहीं हालचाल करील अशीं चिन्हें दिसत नाहीत. देशाच्या औद्योगिक प्रगतीकरिता हिंदुस्थानसरकार आणि पाश्चात्य राष्ट्रें व जपान हीं कसा उद्योग करतात, हें पाहिलें म्हणजे त्यांच्या धोरणांत जमीन-अस्मानाचें अंतर दिसून येतें. बेकारीचा रोग हटविण्याकरिता प्रत्येक पाश्चात्य राष्ट्र किंवा जपान तयार झालेला माल परदेशीं पाठविण्यासाठी व कच्चा माल आयात करण्यासाठी व्यापाऱ्यांना पाहिजे त्या सवलती देऊन उत्तेजन देत असतें तर हिंदुस्थानसरकारचें धोरण बरोबर अगदीं याच्या उलट.

## राष्ट्रीय सरकारानें काय केलें असतें ?

व्यापाराच्या आजच्या या दुर्दशेंत आपल्या देशांत राष्ट्रीय सरकार असतें तर अन्न, वस्त्र, वाहतूक हीं सुलभप्राप्त होण्याकरिता त्यानें जारीनें एखादी योजना केली असती. औद्योगिक, शास्त्रीय व व्यापारविषयक शिक्षणाची हेळसांड विद्यापीठांनी केली असती तर राष्ट्रीय सरकारानें त्यांना त्या शिक्षणावर अधिक भर देण्यास भाग पाडलें असतें. जमाचें नेतृत्व व नियंत्रण हातीं यावयाचें असेल तर तें याच शिक्षणानें येणार आहे. बरें, सर्वसामान्य शिक्षणाचा पारा तरी उच्च स्थानीं गेला असेल म्हणावें तर तसेंहि नाहीं. इतर प्रगतिपर राष्ट्रांतून शिक्षित लोकांचें प्रमाण ९० टक्के पडत असता या देशांत तें १० टक्यांहूनहि कमीच पडतें.

ग्रेट ब्रिटन आणि अमेरिका हीं दोनहि राष्ट्रें परदेशांत भांडवल आणि माणसें निर्यात करतात. भांडवल व्याजाच्या रूपानें पैसा आणतें तर माणसें संपत्तिच आणतात. अनुभव आणि व्यापार यांची वाढ होते ती निराळीच! हिंदुस्थानाची स्थिति याच्या अगदीं उलट. हिंदुस्थानांत दरसाल दरमाणशीं व्यापाराचें उत्पन्न १६ रु. पडतें तर तेंच ग्रेटब्रिटनमध्ये ३८० रु., कानडामध्ये ४७९ रु. आणि जपानमध्ये ५३ रु. पडतें! खेड्यांतील लोक ९०० कोटींच्या ऋणांत रुतले आहेत. ही हिंदुस्थानाची दरिद्रावस्था! ही स्थिति सुधारावयाची तर योग्य उपायांची योजना ताबडतोब झाली पाहिजे. राष्ट्राची औद्योगिक आणि आर्थिक प्रगति होण्यास उद्योगधंदे, शेती आणि शिक्षण हीं तीन बळवत्तर कारणें होत. उद्योगधंदे आणि शेती या दोनहि शाखा फोफावतील तर व्यापारावरहि बाळसें चढेल. परंतु उद्योगधंद्यांनाच या देशांत उत्तेजन देण्यांत येत नाहीं व शेती चांगली पिकत नाहीं. एकूण दोनहि बाबतींत निराशाच! हिंदुस्थानसरकार व्यापार, जकात व चलन यांसंबंधीं जें धोरण आंखतें तें हिंदुस्थानाच्या फायद्याच्या दृष्टीनें नसून इंग्लंडच्या हितदृष्टीनेंच

आंखत आहे व म्हणूनच तर ही दुर्दशा!!" ओटावाकरारासंबंधी बोलतांना ते म्हणाले, "या करारामुळे हिंदुस्थानाच्या व्यापाराला चाट बसेल. परंतु या वर्षीच देशांत जबाबदार राज्यपद्धति स्थापण्यांत येईल व समभूमिकेवरून इतर राष्ट्रांशीं व्यापारी करारमदार करण्याची हिंदुस्थानाला मुभा मिळेल तर या विषाला थोडा तरी उतारा पडेल."

# मध्य-युरोपाचें समक्ष दर्शन

## ( श्री. क्षीरसागर यांची मुलाखत )

श्री. दिनकरपंत क्षीरसागर हे सत्तावीस वर्षांचे तरुण व धाडशी गृहस्थ आहेत. हे मूळचे औंधचे रहिवाशी. अमळनेरचे श्रीमंत प्रतापशेठ यांच्या मदतीनें कृत्रिम रेशीम व रंग ( कापड छापणें वगैरे ) यांचें काम शिकण्याकरिता ते जर्मनींत गेले. ते जर्मनी (१॥ वर्ष), हंगेरी (१ वर्ष), स्वीडन (४ महिने), झेकोस्लोव्हाकिया ( ३ महिने ) वगैरे देशांत मिळून सुमारें साडेतीन वर्षे राहून नुकतेच परत आले आहेत. प्रथम बनारस हिंदु युनिव्हर्सिटींत संशोधन करून त्यांनी सोलापूर आदिकरून दोन-तीन ठिकाणीं गिरणकामाचें प्रत्यक्ष ज्ञान मिळविलें. पूर्वतयारीमुळे त्यांचा युरोपांतील सर्व काल कारणीं लागला. विद्यालयांत शिक्षण असें फक्त ३ टर्म्स त्यांना घ्यावें लागलें व राहिलेला वेळ कारखान्यांत काम करून त्यांना अनुभविक ज्ञान मिळवितां आलें. त्या ज्ञानाचा उपयोग करून आता ते श्रीमंत प्रतापशेठजींच्या गिरण्यांत काम सुधारणा करतां येतील या उद्योगाला लागणार आहेत. अशा सुक्रिय तरुणाच्या युरोपीय अनुभवांचा केसरीच्या वाचकांना लाभ व्हावा म्हणून आमच्या प्रतिनिधीनें घेतलेल्या मुलाखतीचा गोषवारा येथे देत आहोंत.

### जर्मनींत कामाला बंदी

रा. क्षीरसागर यांची सदर विषयाची पुस्तकी क्रिया जर्मनींतच झाली. पूर्वतयारीमुळे तेथील अभ्यासक्रम फार लवकर आटोपला व प्रमाणपत्र मिळालें. परंतु प्रत्यक्ष कारखान्यांत काम करण्यास तेथील लोक परवानगी देईनात. जपानी लोकांना आपण सर्व प्रकारें साहाय्य केलें. परंतु आता त्यांनी आपला व्यापार बसविला, ही जपानाविरुद्ध जर्मनांची मुख्य तक्रार आहे. म्हणून ते आता जपत आहेत. त्यांतून श्री. क्षीरसागर १९२९ त गेले, त्यानंतरचा काळ सर्व युरोपलाच, विशेषतः जर्मनीला, खंडण्यांमुळे फार हलाखीचा गेला. त्यामुळेहि असले अनुदार विचार कारखानदारांमध्ये आढळले.

### इतरत्रहि आकुंचित दृष्टि

वास्तविक ज्याने त्याने आपल्या लहानशा देशापुरतें पाहावें अशी प्रवृत्ति युरोपांत गेल्या महायुद्धापासून फारच वाढली आहे. प्रसंगीं दगा मिळूं नये व परावलंबन टाळावें याकरिता जो तो देश स्वयंपोषित होण्याचा आटोकाट प्रयत्न करीत आहे. 'स्वदेशी' माल घेण्याची प्रवृत्ति बळावत आहे. सर्व सरकारें या बाबतींत अत्यंत दक्षता बाळगून कडक निर्बंध ठेवतात. मूल्यवान वस्तु व रोकड रकम युरोपियन राष्ट्रें परदेशांत जाऊं देत नाहीत. व स्वदेशांत न होणाऱ्या जिनसा बाहेरून येऊं देत नाहीत. माल अधिक निर्यात होण्याकडे देतां येईल तेवढें लक्ष देतात. कापूस किंवा तसेच दुसरे जिन्नस बाहेरून आणावेच लागतात. शिक्षणाकरिता युरोपांत गेलेल्या हिंदला स्वतःच्या अक्कल-हुशारीवर प्रवेश मिळवावा लागतो. सामान्यतः सर्व कारखानदार साम्राज्यवादी ( Imperialists ) आहेत. परंतु त्यांच्याकडेहि वशिले लावून, सामाजिक दृष्ट्या सर्व लोकांत मोकळेपणानें मिसळून असें काम साधतां येतें. तो प्रयोग क्षीरसागर यांना अननुभवाने जर्मनींत करतां आला नाही. तो नंतरचे देशांत साधला.

### स्वच्छ दांत

युरोपांत ( म्हणजे जर्मनी आदिकरून मध्ययुरोपांत ) हिंदी माणसाबद्दल तुच्छतेची भावना दिसत नाही. उलट आज तिकडे बदलत असलेल्या आभिरुचीमुळे हिंदी माणसाचा सांवळा रंग (brown) व त्याचे स्वच्छ दांत हाच एक कौतुकाचा विषय होऊन बसतो. आपण आपल्या पद्धतीप्रमाणे सरसहा सर्व युरोपबद्दल विधानें करतों तीं यामुळे वास्तविक चुकतात. हंगेरींतील लोक तर आपण मारवाडांतून आलों असें मानतात. त्यांची भडक रंगाविषयी आवड, मोराची चिन्हें, बायकांचा लहंगा, मिरच्या व तेल यांचें आहारांत वैपुल्य व कांही हिंदी शब्दांशीं भाषेचें साम्य ह्या गोष्टींवरून त्यांच्या म्हणण्याला बळकटी येते. तेथे क्षीरसागरांचे दिवस मोठ्या आनंदांत गेले व त्यांना फार साहाय्य झालें.

### औद्योगिक प्रगति

क्षीरसागर हे मूळ कृत्रिम रेशीम व रंगकामाकरिताच गेले असता त्यांचें शिक्षण अपेक्षेबाहेर लवकर आटोपलें. त्यानंतर शेठजींनी आपल्या सौजन्यामुळे व शिक्षणप्रेमामुळे त्यांना अधिक वेळ

तिकडे राहण्याचा आग्रह केला. त्याचा फायदा घेऊन श्री.क्षीरसागर यांनी मग सर्व औद्योगिक संघटना अभ्यासिली. सर्व देशांत जर्मनी पुढारलेला असल्याचें त्यांच्या लक्षांत आलें. जेथें इंग्लंडमध्ये एक इसम दोन किंवा तीन माग चालवूं शकतो तेथे जर्मनींतील केवळ कामगार-मुलींना छत्तीस ते चाळीस माग चालवितांना क्षीरसागर यांनी प्रत्यक्ष पाहिलें आहे. या गोष्टी यांत्रिक सुधारणा पराकोटीला गेल्यामुळेच शक्य झाल्या. तथापि आपल्याकडील मजुरांना तशीं सुधारलेलीं यंत्रें दिल्यास तेहि इतक्या चांगल्या तऱ्हेने काम करतील अशी कोणाची समजूत असल्यास ती बरोबर नाही. कौशल्याचें म्हणजे.संथपणाचे व किचकट परिश्रमाचें काम दिवसानुदिवस बसून करण्यांत आपल्याकडील कामकरी मागे पडणार नाही. परंतु यंत्रांशीं काम करावयाला लागणारी तडफ, जुळवून घेण्याची प्रवृत्ति, बारीकसारीक हालचाली जागरूकपणें, ताबडतोब नियमित व एकसारख्या न कंटाळता करीत राहण्याचा निरलसपणा, सर्वसाधारण प्रामाणिकपणा इत्यादि गुणांच्या अभावामुळे आपला मजूर युरोपियन मजुराच्या पांचपट महाग पडतो. तिकडील महाग वेतनाचा मजूर परवडतो; परंतु हिंदी स्वस्ताईचा मजूर किफायतशीर ठरत नाही. आजच्या युगांत उत्पादन मोठ्या प्रमाणांत स्वस्तांत स्वस्त व जलदांत जलद झालें तरच इतर परकी लोकांशीं टक्कर देतां येईल.

जर्मनांना महायुद्धानंतर खंडणीच्या फार बिकट अटी पाळाव्या लागल्या. त्यांतून त्यांनी यंत्रांची, मजुरांची,शिकणाऱ्या मुलांची व सर्व राष्ट्रीय पदार्थांची सुधारणा करून आपत्तीला तोंड दिलें. शिस्त, टापटीप, काम करण्याची तत्परता, आपल्या कामांत सुधारणा करण्याची तीव्र हौस हे गुण वरपासून खालपर्यंत सर्व पाश्चात्यांत दिसून येतात. आपल्या इकडे मजुरापासून मॅनेजरांपर्यंत सर्व लोक अगदीं उलट असतात. यामुळेच मालकाच्या निवळ नफ्याशिवाय या सगळ्या खाबू लोकांचा भाग गिऱ्हाइकाला द्यावा लागून माल भयंकर महाग पडतो. केवळ भावनेने हा प्रश्न सुटणार नाही. तर आपल्याला पाश्चात्यांच्या सर्व सुधारणा शक्य तितक्या लवकर आत्मसात् केल्या पाहिजेत. घरगुती धंदे हा प्रश्न अजीबात निराळा आहे. त्यांचेंहि संवर्धन राष्ट्रीय पैसा व सरकारी पाठिंबा यांमुळे झालें पाहिजे.परंतु यांत्रिक उत्पादनाचा प्रश्न हा त्यांच्याच धोरणावर यांत्रिक प्रगति करून सोडविला पाहिजे. जर्मनीने आधीचेच मोठे कारखाने आणखी एकत्र करून त्यांचे इंटरसेन गेमाइन शाफ्ट्स (Groups of interested associates ) बनविले व युद्धोत्तर परिस्थितीशीं तोंड दिलें. कांहीहि वस्तु, कच्चा माल,परिश्रम,वेळ हीं फुकट न घालवितां मालाचें उत्पादन करणें हेंच आजच्या परिस्थितींत प्रत्यक जगूं इच्छिणाऱ्या देशाचें कर्तव्य आहे.

### थोड्या वेळांत अधिक काम

भांडवल असलें तर यंत्रें हीं परदेशांतून मिळवितां येतील असें क्षणभर गृहीत धरलें, तथापि परदेशांतील मजूर आणविण्यांत कांहीच तात्पर्य नाही. अर्थात् आपल्या मजुराची कार्यक्षमता वाढविली पाहिजे. युरोपांतील मजूर बहुधा लिहितां वाचतां येणारा, निदान बहुश्रुत असतो. प्रत्येक देशांत त्यांचें 'मजुरांचें वर्तमानपत्र' ( ज. आरबायटर त्सायटुंग) असतें. तें ते सर्व लोक वाचतात. त्यांत सर्व देशांतील निवडक बातमी असते. हिंदुस्थान, गांधी यांच्याबद्दल त्यांना चांगली माहिती आहे एवढेंच नव्हे तर हिंदुस्थानांतील शारदा कायदा व त्याच्या अन्वयें लहान मुलींचीं लग्नें केल्याबद्दल झालेल्या शिक्षा यांचेंहि उल्लेख त्यांचे वर्तमानपत्रांत क्षीरसागर यांनी पाहिले. तेथील मजूर बहुश्रुत असल्यामुळे चौकस फार. प्रत्येक कारखान्यांत पहिले दोन-तीन दिवस ते हिंदुस्थानाबद्दल तेच तेच प्रश्न विचारीत!

हीच चौकसपणाची बुद्धि ते आपल्या कामाकडे लावतात. आपल्या विशेष शाखेची उत्तम माहिती त्यांना असते एवढेंच नव्हे तर खटपटीने आपण आणखी नवीन सुधारणा काय करावी हें ते पाहत असतात. मजुरांचे श्रम व लागणारा वेळ कमी होऊन अधिक काम कसें करावें ह्या गोष्टी संशोधनाच्या बाबी समजल्या जातात.रासायनिक वगैरे प्रयोग करण्याकरिता प्रत्येक कारखान्याला एक प्रयोगशाला जोडलेली असते. मजुरांच्या हालचालींचें स्टॉपवॉच घेऊन पृथक्करण करून प्रत्येक हालचालीला लागणारा वेळ मोजून तो कमी कसा करतां येईल याची चिंता बाळगणारा मजूर व कारखानदार हे वर्ग कोणीकडे व वेळ गमावण्याचे नवे नवे मार्ग शोधून काढणारे आपले कामकरी कोणीकडे ? युरोपांत या हालचालींवर ताबा मिळवून कार्यक्षमता वाढविण्याच्या टेलर (अमेरिकन) व बेडो (फ्रेंच) या दोन पद्धति प्रचलित आहेत. पैकीं टेलरची सर्वमान्य असून बेडोच्या पद्धतींत भांडवलवाल्यांच्या दृष्टीनेच विचार केलेला असल्यामुळे तिजबद्दल नवीन राष्ट्रांत चांगलें मत नाही.

### सोशिऑलिस्ट मतांचा प्रसार

युरोपांतील राजकारण राजसत्तेकडून सुटून झपाट्याने समाजसत्तावादाकडे झुकलें आहे. थोड्याच वर्षांमागे साम्राज्याखाली नांदणाऱ्या जर्मनींत आज पाहावें तो राजसत्तेचा पक्षपाती बहुधा कोणीं आढळत नाहीच. साम्राज्यवादी थोडे

आहेत. पण बहुतेक भरणा समाजसत्तावाद्यांचा आहे.मात्र हा समाजसत्तावाद अत्यंत राष्ट्रीय स्वरूपाचा आहे. विचारी माणसांना व्यापक किंवा आंतरराष्ट्रीय समाजसत्तावाद अशक्य कोटींतील वाटतो. राष्ट्रीय सत्तावाद्यांपैकीं देखील एकतंत्रीपणाचे म्हणजे डिक्टेटर-शाहीचे भोक्ते थोडे हें साहजिकच आहे. ऑस्ट्रियाचे लोक खरोखर सोशॅलिस्टच आहेत. परंतु रशियाचें अनुकरण न करतां हळूहळू उत्क्रांतीने होईल तेंच पुरें अशा मताचे व असें समाधानाने बोलणारे लोक बरेच आहेत. यामुळे सोशॅलिझम् म्हटलें म्हणजे भयप्रद क्रांति असें रशियाच्या उदाहरणावरून एकदम वाटतें तें खरें नाही. व युरोपांतील लोक त्याला भीतहि नाहीत.हंगेरींत मात्र कम्यूनिझमूच्या विरुद्ध प्रबळ लोकमत आहे. परंतु ते नुकत्याच त्याच्या सहा महिन्यांच्या कारकीर्दीच्या आलेल्या कटु अनुभवामुळे आहे. त्या औटघटकेंत त्यांनी फार भयंकर प्राणहानि व विलक्षण घडामोडी केल्या. त्यांची भीति तेथील लोकांना कायमची बसली आहे.

जर्मनींत असतांना हिंडेनबुर्ग,नात्सी पक्षाचा पुढारी हिटलर इत्यादि मोठे लोक क्षीरसागरांना पाहावयास मिळाले. उतारवयांतहि हिंडेनबुर्गची कार्यक्षमता पाहून ते थक्क झाले.हिटलर हाहि मोठा परिणामकारक वक्ता व मोहक रुबाबदार चेहऱ्याचा गृहस्थ आहे. हिटलर हा मूळचा इमारतींना चुना फासणारा गृहस्थ. परंतु सध्याच्या हलाखीच्या स्थितींत परराष्ट्रीय कर्ज देण्याचें जर्मनीने नाकारावें या त्याच्या सूचनेमुळे तो पुढे आला. विद्यार्थी, बेकार व कम्युनिझम ठार मरावा म्हणून खटपट करणारे कांही भांडवलवाले यांचें याला पाठबळ आहे. पण पुढे त्याचे हातून कांही कार्य होईल असें आज तरी दिसत नाही. मुसोलिनी इटलींत जें करूं शकला तेंच जर्मनींत करावें असा हिटलरचा स्वार्थी विचार. परंतु मुसोलिनीला मिळाली तशी संधि हिटलरला मिळाली नाही व मिळणारहि नाही, असें तिकडील लोक बोलतात.

# महाराष्ट्र हिंदुधर्म परिषदेचें अधिवेशन

महाराष्ट्र हिंदु-धर्म परिषदेचें अधिवेशन पुण्यास भरविण्याचा निश्चय महाराष्ट्र हिंदुसभेचे अध्यक्ष वे. सिद्धेश्वरशास्त्री चित्राव यांनी ता. २२ नोव्हेंबर रोजीं केसरींतून जाहीर केला. हा निश्चय जाहीर झाल्यापासून परिषद भरण्यास अवघा अठरा दिवसांचाच अवधि राहिल्याने परिषदेंत फक्त अस्पृश्यतानिवारण या एकाच विषयाची चर्चा व्हावी अशी मूळ योजना होती ! किंबहुना त्या एकाच विषयाचा विचार करण्यासाठी सदर परिषद इतक्या त्वरेने भरविण्याचें ठरलें असें म्हटलें तरी चालेल. अस्पृश्यतानिवारण या विषयास इतकें महत्त्व याच वेळीं परिषदेच्या दृष्टीने कां प्राप्त झालें याचें कारण कोणासहि न सांगताच समजण्यासारखें आहे. म. गांधी यांनी त्यांच्या विशिष्ट परिस्थितीमुळे राजकीय चळवळीस तूर्त बाजूस ठेवून केवळ अस्पृश्यतेच्या उच्चाटनाकरिता कंबर कसली आहे. म. गांधींसारखा अचाट सामर्थ्याचा कर्मवीर या कार्याकडे वळलेला पाहून हिंदु संघटन करूं इच्छिणारास ती ईश्वरी कृपाच वाटावी यांत नवल नाही.

अस्पृश्यतानिवारण हा हिंदु-महासभेस अत्यंत जिव्हाळ्याचा विषय वाटतो. त्या अस्पृश्यतानिवारणापैकीं देवालय-प्रवेशाचा खडतर कार्यभाग गांधीजींनी आपल्या शिरावर घेतला असून प्रायोपवेशनाच्या धडकीने केरळ प्रांतांतील प्राचीन गुरुवायूर मंदिराचे दरवाजे जानेवारी महिना उजाडण्याचे आंत उघडण्याची शपथ त्यांनी वाहिली आहे. गांधीजींच्या या निर्धाराने पूर्वीपेक्षा अधिक लोकांचें लक्ष या चळवळीकडे लागले आहे यांत शंका नाही. मंदिरप्रवेशाचें पाऊल पुढे पडण्याचा हा सुमुहूर्त साधण्याची कल्पना हिंदुसभेच्या चालकांस सुचली; म्हणूनच त्यांनी अवधि थोडा असताहि परिषद भरविण्याची योजना मुक्रर केली. परंतु अस्पृश्यतानिवारण हा एक धार्मिक विषय झाला. त्या विषयाने सर्व हिंदुस्थानदेश दुमदुमला असता तितक्याच किंवा त्याहूनहि अधिक महत्त्वाच्या एका राजकीय विषयानेहि साऱ्या हिंदु जनतेचीं मनें व्यग्र करून सोडलीं आहेत. अलाहाबादेस त्रिवेणीच्या संगमावर हिंदु, मुसलमान शीखप्रभृतींचा समागम होऊन त्यांनी देशांतील ज्ञातिविषयक बखेडा मोडून टाकून सर्वांचें राजकीय दृष्ट्या ऐक्य घडवून आणण्याचा व त्या योगाने स्वराज्याचा चिंतामणी सुलभ करण्याचा घाट घातला. त्या उद्योगांत पं. मालवीय आदिकरून पुढाऱ्यांना बरेंच यश आलें असून पूर्ण यशःसिद्धि अलाहाबाद येथे चालू महिन्याच्या दुसऱ्या आठवड्यांत सर्वपक्षीय परिषद भरून तिच्यात प्राप्त होण्याची आशा उत्पन्न झाली आहे.

अलाहाबाद येथील परिषदेंत ठरलेला ज्ञातिविषयक करार मोठा व व्यापक आहे. त्यांतील कित्येक कलमें वादग्रस्त असून त्यांच्याशीं हिंदुस्थानांतील प्रत्येक प्रांताचा निकट संबंध

येत असल्याने हिंदु परिषदेसारख्या जबाबदार संस्थेने त्याची भेट काळजीपूर्वक छाननी करावी व त्यावर आपलें मत बनवावें हें उचित होय. महाराष्ट्र हिंदु परिषद भरविण्याची योजना प्रथम बाहेर आली तेव्हा ती अस्पृश्यतानिवारणापुरतीच असल्याचें जाहीर झालें होतें. तथापि त्यानंतर मुंबईचे हिंदू-सभेचे कार्यकर्ते डॉ. नारायणराव सावरकर यांनी आपलें पत्र केसरींतून प्रसिद्ध केलें, त्यांत कित्येक महत्त्वाच्या सूचना मांडल्या आहेत. त्या सर्वच चिंतनीय असल्या तरी त्यांनी अलाहाबाद येथील करारावर दिलेला जोर उपेक्षणीय नव्हत. पुण्यांतील हिंदुसभेच्या कार्यकर्त्यांसहि डॉक्टर सावरकर यांची वरील सूचना मानवली.

तिला अनुसरून सभेने आपल्या कार्यक्रमांत अलाहाबादेच्या करारासहि गोवून घेतलें व त्याबरोबरच प्रथम डिसेंबर महिन्याच्या १० व ११ या दोन तारखा ठरविण्यांत आल्या होत्या तरी त्या बदलून परिषदेचें अधिवेशन त्यांनी एक आठवडा पुढे नेलें. ही एका बाजूनें सोय झाली खरी, पण तीच दुसऱ्या बाजूने गैरसोय होऊं लागली. अलाहाबाद करारावर प्रांतांनी आपलीं मतें द्यावयाचीं तीं सर्वपक्षीय परिषदेस मार्गदर्शक व्हावयाचीं असल्यास सर्वपक्षीय परिषदेच्या अधिवेशनापूर्वीच तीं जाहीर झालीं पाहिजेत. सर्वपक्षीय परिषद अलाहाबादेस १४ तारखेस भरणार असल्याने प्रांतिक परिषदेच्या तारखा त्या तारखेच्या अगोदर कांही दिवसांच्या अंतराने धरणें इष्ट होय. तसाच विचार केल्यास पुण्याची परिषद डिसेंबरच्या पहिल्या आठवड्यांतच पार पडावयास पाहिजे होती. परंतु ती गोष्ट सर्वथैव अशक्य असल्यामुळे १० व ११ या एकवार रद्द ठरलेल्या तारखाच सभेच्या कार्यकर्त्यांस पुनः कायम कराव्या लागल्या.

महाराष्ट्रांतील ठिकठिकाणच्या हिंदु प्रतिनिधींना तारखांची ही धरसोड थोडी चमत्कारिक वाटली असेल व परिषदेच्या तारखा बऱ्याच पुढच्या ठेवाव्या असें धुळ्याचे रा. निजसुरे यांजप्रमाणे ज्या कित्येक हिंदु धर्माभिमान्यांचें मत आहे त्यांना एका आठवड्याने अलीकडे आलेल्या वरील दोन तारखा अधिकच गैरसोयीच्या भासाव्या यांत नवल नाही. वास्तविक राष्ट्रीय सभेप्रमाणे प्रांतिक हिंदु परिषदेची बैठक दरसाल भरणें हिंदु संघटनेस अत्यंत जरूरीचें आहे. तथापि दोन चार वर्षांनी जेव्हा ती एखाद्या वेळीं भरविण्यांत येते तेव्हा तरी तिच्या अधिवेशनाच्या मागे घाईचा लकडा बिलकूल न लावता सर्व ठिकाणच्या कार्यकर्त्यांना परिषदेस येण्यास, परिषदेपुढील विषय सुचविण्यास व त्यांचा पूर्ण विचार करण्यास भरपूर सवड मिळाली पाहिजे हें उघड आहे. साधारणपणें परिषदेच्या तारखा आगाऊ महिना दोन महिने प्रसिद्ध झाल्या म्हणजे परिषदेच्या यशाचा विमा उतरला असें निश्चित समजण्यास हरकत नाही. कारण परिषद चारदोन वर्षांत जर एकदाच भरणार तर ती उत्कृष्टपणें पार पडावी अशी कोणाचीहि अपेक्षा असणार हें स्वाभाविक होय.

हिंदूंच्या धार्मिक हक्कांवर व वहिवाटीवर इंग्रजी राज्यांत व मोगलाईंतहि एका विशिष्ट क्रमाने अतिक्रमण होत आहे तें थांबविण्याकरिता स्वयंसेवक दळें स्थापन करणें आणि पैठण, मालेगांव, संगमनेर इत्यादि मुसलमानांकडून पीडिल्या गेलेल्या गांवांतील हिंदूंवरील धार्मिक संकट निवारणें, तसेंच मुंबईसारख्या राजधानीच्या शहरांत मुसलमान गुंड दिवसाढवळ्या हमरस्त्यावर सुरे खुपसून हिंदूंचा प्राण घेतात त्यापासून हिंदूंना वांचविण्याचा उपाय शोधणें इत्यादि कामें हिंदुसमाजाच्या दृष्टीने कमी जिव्हाळ्याचीं आहेत असें नाही. गोमांतक, वसई वगैरे प्रदेशांत मोठ्या प्रमाणाने व इतरत्र तुरळकपणाने धर्मांतरित अशा पूर्व हिंदूंची शुद्धि श्री. विनायकमहाराज मसूरकर, व त्यांचा शिष्यवर्ग, मुंबईतील रा. सुंदरराव वैद्य, पुण्यांतील रा. दाणीप्रभृतींचा हिंदुधर्ममठ आणि इतर गांवांतील हिंदु कार्यकर्ते घडवून आणीत असतात. गोमांतकांत बाटलेल्या हिंदूंची वस्ती मोठ्या प्रमाणात असल्याने त्यांना स्वधर्मांत येण्यास गैरसोय वाटत नसली तरी तेथील पोर्तुगीज राज्यकर्त्यांचा व ख्रिस्ती पाद्र्यांचा जोराचा विरोध असल्यामुळे शुद्धीकृत गावढ्यांना धार्मिक व राजकीय विपत्तींत आयुष्य कंठावें लागत आहे; खेरीज शुद्धीकरणाची चळवळ हातीं घेतलेले श्री. विनायकमहाराज व त्यांचा शिष्यवर्ग, यांचा मतप्रसारच तिकडील सरकाराने बहुतेक खुंटवून टाकला आहे. महाराष्ट्रांतील शुद्धीच्या चळवळीस हें मोठेंच विघ्न उपस्थित झालें असून त्याच्या निवारणाचा उपाय ताबडतोब न निघाला तर तीं धर्मदृष्ट्या मोठीच हानि समजावी लागेल.

परधर्मांत गेलेल्या हिंदूंना स्वधर्मांत घेणें हा जसा हिंदु समाजसंरक्षणाचा एक इलाज तसाच परधर्मांत जाण्याच्या कारणांचेंहि निर्मूलन करणें हा दुसरा इलाज होय. सांप्रत शुद्धीकरणाची चळवळ सर्वत्र गाजत असतां मधून मधून हिंदु स्त्रीपुरुष नव्याने बाटून ख्रिस्ती अगर मुसलमानी धर्मांत प्रविष्ट झालेले आढळून येतात व. त्यास केवळ द्रव्याची लालूच हें एकच निमित्त नसून हिंदु समाजाची अनास्था व हेळसांड यांसच त्याबद्दल अधिक दोष द्यावा लागेल. यासाठी ज्या त्या जातीची एक संघटित संस्था व विशिष्ट परिस्थितीच्या पाशांतून हिंदु

सभेची शाखा स्थापण्याचीहि आवश्यकता भासते. हिंदुस्थानांतील इतर बऱ्याच प्रांतांपेक्षां महाराष्ट्रांतील हिंदु समाज अधिक जागृत आहे, कार्यकर्तेहि आस्थेवाईक व स्वार्थत्यागी आहेत आणि ठिकठिकाणीं या कामास वाहिलेल्या संस्थाहि बऱ्याच आहेत. परंतु त्यांचें परस्परांशीं असावें तितकें सहकार्य नाही व त्यांस हुकुमी द्रव्यबळाचा पुरेसा आधारहि नाहीं, या कारणानें कार्यकर्त्यांचा उत्साह व परिश्रम कांही अंशीं वांया जात आहेत. तो नाश थांबविण्याची व एकंदर कार्याची सर्व बाजूंनी उठावणी करण्याची जबाबदारीहि मध्यवर्ती हिंदुसभेवर व तिनें भरवावयाच्या परिषदेवर साहाजिकच पडते.

सारांश, परिषदेचें यश तिच्यांत मंजूर होणाऱ्या ठरावांवरून व त्यांजवरील वाटाघाटीवरून मोजावयाचें झाल्यास अशा प्रकारचे कैक विषय सुचवितां येतील, व ते सर्व महत्त्वाचेहि आहेत. परंतु चर्चा पुष्कळ झाली व ठरावहि सर्वांगसुंदर बनविण्यांत आले तरी त्यांची अंमलबजावणी परिषदेकडून पार न पडल्यास तिला खरें यश कितीसें लाभेल ! त्यापेक्षा एकदोन विषयांपुरताच सुटसुटीत कार्यक्रम आंखला तर त्याचा पिच्छा पुरविला जाऊन त्याप्रमाणें महाराष्ट्रांत एका शिस्तीने कार्य घडून आल्यास त्याचें यश कोणीहि मोठेंच मानील यांत संशय नाही. त्या दृष्टीने व येथून पुढे केवळ चारपांच दिवसांच्या मुदतींतच परिषद भरावयाची आहे या दृष्टीनेहि सभेच्या कार्यकर्त्यांनी अवघ्या दोनच विषयांची निवड केली ती योग्य झाली असेंच म्हटलें पाहिजे. तशांतून वेळ सांपडल्यास व वर नमूद केलेल्या इतर बाबींपैकीं, आणखी एखाद्यादुसऱ्या बाबीची निकड परिषदेच्या निदर्शनाला आल्यास परिषद तिचा समावेश आपल्या कार्यक्रमांत अवश्य करील हें सांगावयास नकोच.

तथापि परिषदेकरिता निवडलेले दोनच विषय इतके महत्त्वाचे आहेत कीं त्यांचा सांगोपांग विचार होऊन निर्णय लागण्यांतच परिषदेचे दोनहि दिवस बहुतेक संपून जातील अशी भीति वाटते. परिषदेंत अस्पृश्यतानिवारणापैकीं देवालयप्रवेशावरच मुख्य भिस्त ठेवण्यांत येणार आहे. देवालयप्रवेशाचा प्रश्न पुण्याची पर्वती व नाशिकचा काळाराम येथील अस्पृश्यांच्या सत्याग्रहामुळें गेलीं दोनतीन वर्षे विशेष गाजत आहे. परंतु त्या वेळच्या महाराष्ट्रीय हिंदु जनतेच्या मनःस्थितींत व सध्याच्या मनःस्थितींत बरेंच अंतर पडलें आहे. सांप्रत म. गांधींनी देवालयप्रवेशाकरिता प्रायोपवेशनाचा निश्चय जाहीर केला आहे व त्याबरोबर अस्पृश्यतानिवारणासंबंधानें आपलीं सारीं मतें हिंदु जनतेस मोकळ्या मनाने सांगून टाकलीं आहेत. त्यांच्या अस्पृश्यतानिवारणाची व्याप्ति अस्पृश्यांना आजच्या आज सर्वस्वीं स्पृश्यांच्या बरोबरीने बनविण्यापर्यंत पोचली आहे. अस्पृश्यांना घरींदारीं, जनींविजनीं, महालींमंदिरीं स्पृश्यांनी सर्रास आपल्या संगतींत घेऊन वावरावें अशी त्यांची इच्छा आहे. देवालयांत जेथपर्यंत स्पृश्य जातात तेथपर्यंत अस्पृश्यांनाहि जाण्यास मोकळीक मिळावी असा त्यांचा आग्रह आहे.

म. गांधींनी अस्पृश्यतानिवारणाचें समग्र चित्र हिंदुमात्रापुढे रेखाटलें आहे. तें सबगोलंकाराच्या स्वरूपाचें आहे. गांधिजींचे राजकीय काय किंवा सामाजिक काय सर्वच विचार क्रांतिकारक आहेत. त्यांनी कायदेभंगाची मोहीम आरंभिली त्या वेळेस सरकारास त्यांनी आपलें राजकीय विश्वरूपच दाखविलें. त्या विश्वरूपदर्शनाने सरकारचे डोळे दिपून त्यांनी वटहुकुमांचा बळकट कोट बांधला व आपला बचाव केला. आता राजकीय विश्वरूपाऐवजीं सामाजिक व धार्मिक विश्वरूप दाखविण्याची पाळी गांधीजीवर आली. तें रूप दृष्टीस पडताच सामान्य हिंदु समाजाचेंच काय पण गांधिजींचे राजकीय बाबतींत भक्त म्हणविणारांपैकींहि कित्येकांचे डोळे दिपले असून त्यांना 'दंष्ट्राकरालानि च ते मुखानि दृष्ट्वैव कालानलसन्निभानि। दिशो न जाने न लभे च शर्म प्रसीद देवेश जगन्निवास॥' या श्रीमद्भगवद्गीतेंतील श्लोकाचें स्मरण होऊन हें उग्ररूप टाकून द्या व पूर्वीचें सौम्य रूप धारण करा असें अर्जुनाप्रमाणें ते गांधिजींस आर्जवपूर्वक म्हणूं लागले आहेत.

अर्जुनास श्रीकृष्णाने सांगितलें ' कालोऽस्मि लोकक्षयकृत्प्रवृद्धो लोकान्समाहर्तुमिह प्रवृत्तः ' तसेंच गांधीजी आपल्या विश्वरूपामार्फत भक्तांना व हिंदु जनतेला अस्पृश्यतेसंबंधानें दर्शवीत आहेत. श्रीकृष्णाच्या विक्राळ दाढांच्या अनेक तोंडांत धृतराष्ट्राचे सर्व पुत्र, भीष्म, द्रोण, कर्ण व सर्व मोठमोठे योद्धे शिरतांना अर्जुनाच्या दृष्टीस पडत होते. तें भेसुर चित्र पाहून अर्जुन त्या क्षणीं गडबडला तरी भारतीय युद्धाच्या अखेरीस त्याला त्या गोष्टीचा प्रत्यय आलाच. तशीच अस्पृश्यतेचीहि जवळ जवळ स्थिति आहे. लोकसत्तेचा अरुणोदय दहा वर्षांपूर्वी झाला तेव्हा ब्राह्मणेतर वाद उत्पन्न होऊन ब्राह्मण व ब्राह्मणेतर येत येत आता बहुतेक समान भूमिकेवर आले आहेत. आता लवकरच लोकसत्तेचा सूर्योदय होणार असून त्याच्या अपूर्व व प्रखर किरणांच्या प्रभावाने स्पृश्य व अस्पृश्य हे हिंदूंतील दोनहि समाज साम्यावस्थेस पोंचणार अशीं चिन्हें स्पष्टपणें

दिसत आहेत; इतकेंच काय पण लोकसत्तेचा सूर्य माध्यान्हीं तळपूं लागेल तेव्हा हिन्दु, ख्रिस्ती, मुसलमान, पार्शी यांजमध्ये आज दृष्टीस पडणारे धार्मिक व सामाजिक भेदहि त्याच स्वरूपांत शिल्लक राहातील कीं नाही याची शंकाच आहे.

पाश्चात्यांत लोकसत्तेचे नमुने तीन राष्ट्रांत तीन प्रकारचे आढळतात. इंग्लंडांत लोकसत्ता प्रचलित असताहि सामान्य लोक व लॉर्ड हा भेद दृष्टीस पडतो; पण तो अमेरिकेंत मुळीच दिसून येत नाही. अमेरिकेंत श्रीमंत व गरीब ही विषमता अद्यापि शिल्लक आहे तीहि रशियाने समूळ नाहीशी करून सर्वांना आर्थिक बाबतींत एकाच माळेचे मणी बनविलें आहे. लोकसत्तेचा हा भिन्न देशांतून होत चाललेला विकास लक्षांत घेतल्यास तो हिंदुस्थानांत तरी कसा टळणार? तथापि एखाद्याशी 'जातस्य हि ध्रु मृत्युः ध्रुवं जन्म मृतस्य च' असा गीतावचनाचा हवाला देऊन तुझा आजा मेला, बाप मेला तसा तूंहि मरणार यासाठी तूं आजच कां जीव देत नाहीस असा कोणा तत्त्ववेत्त्याने बुद्धिवाद केला असता तो म्हणणारच कीं, मी मरेन तेव्हा मरेन, पण म्हणून आजच कां मी आपल्या हाताने आत्महत्येचें पातक आपल्या माथीं मारून घेऊं ? त्यांतलीच अवस्था अस्पृश्यतानिवारणाची आहे. सनातन धर्माभिमानी स्पृश्य लोक निकराला येऊन असें सांगणार कीं पुढील लोकसत्तेत वर्णसंकर व सबगोलंकार होणार असेल तर होवो बिचारा. त्याचे परिणाम पुढील पिढ्या भोगतील. पण त्या कार्यास मंदिरप्रवेशाच्या रूपाने हातभार लावून आम्हांस अधर्मीय वाटणाऱ्या वर्णसंकराच्या पातकाचे धनी आम्हीं कां व्हावें ?

म. गांधी यांनी दाखविलेल्या विश्वरूपदर्शनाचा परिणाम सामान्य हिंदु जनतेवर वरील प्रकारचा घडला आहे,त्यामुळे सरकाराप्रमाणे जनतेपाशीं आत्मसंरक्षणार्थ वटहुकुमांचा कोट बनविण्याची सत्ता नसली तरी प्रतिकाराची तयारी मात्र स्पष्टपणें दिसूं लागली आहे. आघातासारखा प्रत्याघात या सृष्टिनियमास धरून ही गोष्ट घडून येत आहे. पुण्यास परवाचे दिवशीं भरलेल्या सनातन वैदिक धर्मीय परिषदेपासून जर कांही बोध घ्यावयाचा असेल तर तो हाच होय. त्यावरून गांधिजींच्या विश्वरूपदर्शनापासून अस्पृश्यतानिवारणाच्या कार्याचें हित झालें कीं हानि घडली हें ठरविणें कठिण आहे. सबगोलंकाराच्या घोषणेचा विटाळ होण्याचें टळून मंदिरप्रवेशाची चळवळ पूर्ववत् सुटी राहिली असती तर ती गोष्ट बहुजनसमाजाच्या दृष्टीने श्रेयस्कर होती. तथापि आहे या स्थितींतहि हिंदुधर्म परिषदेने आपलें धार्मिक धोरण स्पष्ट करून मंदिरप्रवेशाचा विषय हातीं घेतला व लोकमतास न दुखविलें तर तिच्या कार्यांत यश येईल असा आम्हांस भरंवसा वाटतो. या दृष्टीने अस्पृश्यतानिवारण व अलाहाबादेचा महत्त्वाचा करार यांविषयी लोकमत प्रदर्शित होऊन तीं कामें यशस्वी रीतीने पार पडण्यास महाराष्ट्रांतील सर्व ठिकाणच्या प्रतिनिधींनी परिषदेस हजर राहणें अवश्य होय. परिषद भरण्यास अवघे चारच दिवस उरले आहेत. तथापि हें कार्य स्वतःचें समजून अल्प मुदतीचे निमित्त मनांत न आणतां महाराष्ट्रांतील ही परिषद हैद्राबाद, नागपूर, पुणें, नाशिक इत्यादि शहरीं पूर्वी भरलेल्या परिषदांइतकीच भव्य, प्रातिनिधिक व महत्त्वाची होईल अशी आम्हांस आशा आहे.

# तात्यासाहेब केळकरांची मुलाखत

(ले. श्री. द. वि. ताम्हनकर, लंडन)

[ गोलमेज परिषदेसंबंधाचें सर्वसामान्य बातमीपत्र आज दुसरीकडे दिलेंच आहे. या पत्रांत रा. केळकर याच्या प्रवासाची व अवांतर माहिती देण्यांत येत आहे. ती मुलाखतीच्या स्वरूपाची आहे. सं.—केसरी. ]

प्रश्न—आपली ही विलायतेस येण्याची दुसरी खेप नव्हे काय?

उत्तर—होय, दुसरी.पण पहिली खेप संपवून परत गेलों तेव्हा पुनः मी विलायतेस येईन अशी कल्पना मला स्वप्नांतहि आली नाही; व मनांतून तशी विशेष इच्छाहि नव्हती. मात्र माझे एक गुजराथी स्नेही शेठ दीपचंद जव्हेरी यांच्या घरीं (नं. ६० टालबट रोड बेस वॉटर येथे) लो.टिळक,मी,वासूकाका जोशी, खापर्डे वगैरे मंडळी राहत होतों, तेव्हा दीपचंद मला नेहमी म्हणत कीं, "केळकर, तुम्ही पुनः विलायतेस येणार खास असें माझें भविष्य आहे. तर केव्हा येणार तें सांगा." तेव्हा मी त्यांना म्हणे कीं, "मी पुनः येणार हें भविष्य जर तुम्ही करतां तर केव्हा येईन याचेंहि भविष्य तुम्हांला कां करता येऊं नये? मला तर तूर्त संभव दिसत नाही." सुमारें

२-३ वर्षांपूर्वी अहमदाबादेच्या शेतकरी परिषदेचा अध्यक्ष म्हणून काम संपवून मी सुरतेस जव्हेरीशेठ यांचा पाहुणा म्हणून गेलों. तेव्हांहि त्यांनी पूर्वीचीच गोष्ट काढली; तेव्हा मी त्यांना म्हणालों, "तुमच्या भविष्याला आता मुदतीचा कायदा लागणार. तेव्हा ती बात सोडून द्या." पण कांही लोक कायद्यांतील मुदत होऊन गेली तरी इमानानें ऋण फेडतात. त्याप्रमाणे जव्हेरीशेठ यांच्या भविष्याचें झालें आहे. कारण पुन्या १३ वर्षांनंतर पुनः मी विलायतेला आलों! आणि मौज ही कीं, पूर्वी एका २९ तारखेला मुंबईस आगबोटींत बसलों व बरोबर त्या म्हणजे २९ तारखेसच या खेपेसहि मुंबईस आगबोटींत बसलों.

प्र.—मग ही विलायतेची दुसरी फेरी करावयास लागणार हें आपणांस केव्हा कळलें ?

उ.—ता.१२ आक्टोबर रोजीं हैद्राबाद येथें अंदाजानें व नक्की ता. २४ नोव्हेंबर रोजीं पुणें येथे. पण यासंबंधाची हकीकत मी इकडे येण्यापूर्वी पुण्याच्या सभेंत जाहीर रीतीनें सांगितली आहे. व तुम्हीं ती वाचली नसली तरी तिकडील लोकांना वर्तमानपत्रांतून आता ती समजली असल्यामुळे पुनः सांगत नाही.

प्र.—मग अवघ्या ४ दिवसांत तुमची विलायतसफरीची सर्व तयारी कशी झाली ?

### राजापुरी तांब्या

उ.—पूर्वीच्या अनुभवानें. 'विलायतेच्या यात्रेची तयारी' हा विषय मी पूर्वी विनोदी कवितांच्या रूपानें वर्णिला, त्यांत गमती अशा पुष्कळ असल्या तरी सत्याचा अंशहि पुष्कळच होता. म्हणून या खेपेस मला हिवाळ्याकरिता मुद्दाम कपडे शिवण्यापलीकडे अधिक तयारी अशी कांही करावयाची नव्हती. मात्र स्वदेशी शिंप्याकडून तीन दिवसांत कपडे कसे तयार होणार ही चिंता वाटली. पण पुण्याचे कुशल शिंपी कारखानदार रा. आर. डी. गोखले यांनी ती सर्व चिंता दूर केली; व खरोखरच ३ दिवसांत सर्व कपडे तयार करून दिले. इतकेंच नव्हे तर, विलायती शिंप्यानें शिवलेल्या कपड्याइतका मान त्यांना येथे मिळत आहे. ही कपड्यांची अडचण नसती तर मी बाकीची सर्व तयारी एका दिवसांत करूं शकलों असतों. पण याहि खेपेला वाजवीहून अधिकच सामान मीं आणलें आहे. हिंदी प्रवाशाला सामानाचा मोह सुटत नाही. पण अखेर खरी अडगळ व अडचण बरोबरच्या सामानाचीच होते. वास्तविक एक सूट केस व एक हँडबॅग घेऊन मनुष्याला विलायतेचीच काय पण साऱ्या युरोपची सफर करतां येईल व तसें करणारे लोक आढळतातहि. मीं आणलेल्या सामानापैकीं कदाचित् निम्में सामानहि मला वाटेंतून परत पाठवितां आलें असतें. फक्त एकच वस्तु मीं माझ्या खास आठवणीनें आणली ती म्हणजे अस्सल मोठा राजापुरी तांब्या! तो कां हवा होता याचें कारण ज्याचें त्यानें समजावें !

### म. गांधींचें सामान

मला असें आठवतें कीं, १९०५ सालीं आम्ही कुटुंबाची सर्व मंडळी काशीयात्रेला गेलों. त्या वेळीं प्रत्येकाच्या गरजेचें असें समजून आम्हीं इतकें सामान बरोबर घेतलें कीं पहिल्या जळगांवाच्या मुक्कामालाच त्यांतलें निम्में सामान गुड्स करून पुण्यास परत पाठविलें. कारण माणसांच्या काळजीपेक्षा सामानाची विवंचनाच अधिक होऊं लागली. फकीर, बैरागी लोक खरे सुखी. कारण हिंदुस्थानाच्या या टोंकापासून त्या टोंकापर्यंत केवळ खांद्यावर वाहून नेण्याइतक्या सामानानें त्यांचें काम सहा ऋतु व तीन काळ भागतें. पण एखाद्या विरागी माणसालाहि स्वतःचा नसला तरी दुसऱ्याच्या हव्यासाच्या आग्रहापासून उपद्रव होतो. म. गांधी यांना प्रवासाला किती थोडें सामान लागत असेल याची कल्पना कोणीहि करील. पण मला असें समजतें कीं, त्यांच्या प्रेमाखातर इतर मंडळींनी मुंबई बंदरावर त्यांच्या खोलींत इतकें सामान भरून दिलें कीं, त्याची वाट कशी लावावी यावर ३ दिवस एक कमिशन बसून, सभासदांचा मतभेद होऊन, महात्मा गांधींना निर्णयाचा सर्वाधिकार आपल्या हातीं घेऊन निम्म्याहून अधिक सामान एडनहून मुंबईस परत पाठवावें लागलें !

प्र.—आपला प्रवास एकंदरीनें कसा काय झाला?

उ.—एकंदरीनें प्रवास फारच सुखकर झाला. फक्त जुन्या प्रवासाची याहि खेपेला बरोबर पुनरावृत्ति व्हावयाची होती म्हणूनच कीं काय नेमकें भूमध्य समुद्रांत शेवटल्या दिवशीं बारा तास वादळ झालें. पण उद्यापासून समुद्रप्रवास संपला या खुषींत असल्यामुळे त्याचें आम्हीं कांही मानलें नाही. पूर्वीच्या प्रवासांत तेव्हा जर्मनीशीं पक्का तह न झाल्यामुळे आमची बोट मार्सेलिसला लागली नाही. यामुळे अटलांटिक महासागर व इंग्लिश चॅनल यांमधून आणखी ८-९ दिवस समुद्रप्रवास करावा लागला होता. तो या खेपेस टळणार ही आनंद वाटण्यासारखीच गोष्ट होती.

प्र.—तर मग आपण फ्रान्सची भूमि यंदाच प्रथम पाहिली म्हणावयाची ?

उ.—होय. पण भूमि पाहिली इतकेंच पाहिलें. कारण मार्सेलिसहून संध्याकाळीं ४॥ वाजता आगगाडींत बसलों तो कॅले बंदरावर दुसरे दिवशीं दोन प्रहरीं एकाचे सुमारास येऊन पोंचलों. वाटेंत पारिस शहर लागलें, खुद्द पॅरिस स्टेशनावर गाडी उभी राहिली व पुण्याची पॅसेंजर गाडी भायखळ्यावर

थांबले तितका वेळ थांबली. तितक्या अवधींत मी प्लॅट-फॉर्मवर उतरून पारिस जितकें पादाक्रांत करतां येईल तेवढें केलें. म्हणजे खरा फ्रान्स अजून मला पाहावयाचाच आहे. मात्र आदले दिवशीं दोन तास व दुसरे दिवशीं ६ तास आगगाडींतून फ्रान्सचा प्रदेश भरपूर पाहावयास सांपडला. तसेंच रात्रीं चांदणें होतें यामुळे भिंगाच्या खिडकींतून कांहीं वेळ पहात बसलों होतों.

**फ्रान्स पाहून काय वाटलें ?**

**प्र.**—हा प्रदेश पाहून आपली काय कल्पना झाली?

**उ.**—कल्पना हीच कीं इकडे हिंदुस्थानासारखे मोठे भूभाग कांहीच दिसत नाहींत. डोंगर, नद्या भेटल्या तरी त्या हिंदुस्थानाच्या मानाने लहान, पण सपाटी असो; डोंगर असो; सगळ्या भागावरून माणसाचा हात फिरला आहे असें स्पष्ट दिसतें. रानवट किंवा इंग्रजींत ज्याला 'वाइल्ड' असे म्हणतात असें कोठेंच कांहीं दिसलें नाहीं. हिंदुस्थानाप्रमाणें मोठे वृक्ष नाहीत. आहेत ते सुरूच्या झाडासारखे म्हणजे बारीक पानांचे असतात. मात्र ते सरळ उंच असतात आणि पाहावें तेथें लागवड करून मुद्दाम लावल्यासारखे हारीच्या हारीने दिसतात. गाईमेंढ्यांच्या कळपांकरिता राखलेलीं मोठमोठीं कुरणें देखील नव्या दिल्लींतील हरळीगवताच्या राखीव मैदानाप्रमाणे सारखीं दिसतात. बागबगीचे विस्तृत असे कोठेंच नाहींत. थोड्या जागेंत पुष्कळ पीक काढण्याची विद्या सफळ झाल्यामुळे लहान लहान तुकडे करून लागवड करतात तसें दिसतें. बांधदरोळ्या कोंकणच्या बांधासारख्या. एक गोष्ट विशेष दिसली कीं फ्रान्समध्ये आगगाड्यांचा फैलाव फार. बहुतेक सर्व वाटभर रेल्वे यार्डांतूनच जातों कीं काय असें भासत होतें. मधून मधून जंक्शनें व रेल्वेच्या शाखा बऱ्याच आढळत. उलटसुलट जाणाऱ्या गाड्यांचीहि रहदारी बरीच दिसली. असे दोन तीन मैलहि जात नव्हते कीं जेथे एखादें लहानसें खेडें रेल्वेलगत नव्हतें व जें पाहावें तें टूमदार व नमुनेदार. विजेची रोषनाई नाहीं असें गांव क्वचितच दिसलें. व खेडे गांवांत वीज कशी परवडते याचें आश्चर्य वाटलें. खेडीं सांधणारे रस्ते व रानांतील रस्ते अरुंद पण अत्यंत नीटनेटके व वळणदार. रस्ता अरुंद ठेवण्यांत खर्चाची जी बचत होत असेल ती तो रस्ता दुरुस्त ठेवण्यावर खर्च होत असावी.

**प्र.**—आगबोटीवरील दिवस सहवासाच्या दृष्टीने कसे गेले ?

**बोटीवरचा सहवास**

**उ.**—पूर्वीच्या खेपेपेक्षा यंदा बोट मोठी तरी गर्दी कमी होती. कारण विलायतेला जाण्याचा आता उलटा मोसम होता, तेव्हा सुलटा होता. यामुळे या खेपेस अगदीं जरूरीच्या कामानिमित्त जाणारी तेवढी मंडळीच बोटीवर होती. सुदैवाने मला सर्वांत वरच्या डेकवर खोली व तीहि सिंगल म्हणजे एका माणसाची असल्यामुळे मी खालच्या डेकवर क्वचितच जाई. वरचें माझें डेक मला पुरून उरण्याइतकें होतें म्हणून हिंडून फिरून वाचून वेळ घालवीत होतों. अपरिचितांशीं आपण होऊन ओळख करून घ्यावी किंवा नसत्या गोष्टी उकरून काढून बोलाव्या याचा मला कंटाळा आहे. शिवाय ज्या कामाकरिता निघालों त्यासंबंधीच वाचावयाचें कितीतरी होतें. खालीं येणेंजाणें जेवणापुरतें. किंवा बरोबरच्या हिंदी प्रतिनिधींशीं बोलण्यापुरतें

**प्र.**—मग तेथे गोलमेज परिषदेविषयीं बरीच चर्चा होत असेल ?

**उ.**—होत होती. पण याविषयीं मनमोकळेपणाने बोलणें होई तें सप्रू, जयकर, मी व सर कावसजी जहांगीर यांच्या मध्येच होई. इतरांपैकीं सर अकबर हैदरी, डॉ. शफत अहमदखान व वाजायत हुसेन यांच्याशींच संभाषण होई. हैदरी यांच्याशीं मी वऱ्हाडासंबंधाने बोलत असें; कारण वऱ्हाडची मागणी अशी आहे कीं आपला प्रांत हिंदी प्रांतापासून अलग व स्वतंत्र व्हावा, पण निजामाच्या राज्यांत परत जाऊं नये. डॉ. अहमदखान यांच्याशीं हिंदु-मुसलमानांच्या संबंधी काहीं भाषण होई. पण अधिकाराने बोलण्याइतके ते जबाबदार नाहींत असें दिसलें. पण इतिहासाचे प्रोफेसर म्हणून त्यांच्याशीं गप्पा मारीत होतों. वाजायत हुसेन हे काश्मीर संस्थानचे प्रतिनिधि व तरुण सिव्हिलियन आहेत. मी पूर्वी विलायतेला गेलो तेव्हा केंब्रीज येथे त्यांची गांठ पडली होती. त्यांच्या सांगण्यांत असें आलें कीं, काश्मीरच्या महाराजांचें मुसलमान प्रजेशीं वागण्याचें धोरण खरोखरीच चांगलें आहे व दंगेधोपे होतात ते फालतू माणसांकडून होतात. शिवाय बाहेर गवगवा ऐकूं येतो इतका मुळांत बखेडा नाहीं. काश्मीर संस्थान फेडरेशनमध्ये सामील होऊं इच्छितें असेंहि दिसलें.

**प्र.**—सप्रू, जयकर व आपण या त्रिवर्गांच्या संभाषणांत काय निष्पन्न झालें ?

**उ.**—सप्रू, जयकर या दोघांनाहि परिषदेच्या फलश्रुतीबद्दल थोडी चिंताच वाटत होती. पण मध्यवर्ती सरकार जबाबदार करण्याचा प्रश्न न निघेल किंवा निघून त्यास वाटाण्याच्या अक्षता लागतील तर आपण त्यापुढे परिषदेच्या कामांत भाग घेऊं नये असें माझ्याप्रमाणें त्यांचेंहि म्हणणें दिसलें. व एकंदरीने मनीव पुढारी या नात्याने सप्रू यांचा रोख बरा दिसला. आपल्यावर इतरांपेक्षांहि कांहीं विशेष जबाबदारी पडत आहे ही जाणीव त्यांना असलेली दिसली.

## मुक्कामाची सुखसोय

प्र.—लंडनमधील मुक्कामाची सुखसोय आपणांस कशी वाटते?

उ.—ही सुखसोय पूर्वीपेक्षा या खेपेस मला यंदा विशेष रीतीने करूनच घ्यावी लागली आहे. पूर्वी उन्हाळ्यांत आलों. यंदा भर हिंवाळ्याशीं गांठ पडली आहे. पूर्वी चिटणीस म्हणून आलों,हल्ली यजमान किंवा स्वतः प्रतिनिधि या नात्याने आलों आहें या दोनहि कारणांमुळे विशेष चांगल्या प्रतीची जागा घेऊन, विशेष चांगल्या पद्धतीने राहावें लागत आहे व त्याप्रमाणें करीतहि आहें. यामुळे सुखसोयींचा प्रश्न फारसा उरलेला नाही. खर्च मात्र किती होईल हें न सांगितलेलेंच बरें.

प्र.—पण सरकार भत्त्याच्या रूपाने प्रतिनिधींना कांही रक्कम देणार आहेना?

उ.–तें तर उघडच आहे.पण तो सर्व भत्ता संपून बहुतेक प्रतिनिधींना पदरमोड बरीच करावी लागेल.

प्रश्न—येथील मुक्कामाचा अंदाज काय आहे?

उ.—सर्वच बाजूंनी नाताळाची मजल दिसते. तशी उचलच आहे. तसें झालें तर मला आनंदच वाटेल. कारण माझ्यासारख्या बैठ्या वृत्तीच्या माणसाला कारणाशिवाय एक दिवसहि अधिक या असल्या हवेंत राहणें आवडणार नाही. याचा अर्थ कामच लांबलें तर हवेला कंटाळून तें टाकून देऊन जाईन असें मात्र नाही.

प्रश्न–मग याहि खेपेस युरोप खंड पाहण्याची आपली इच्छा साधणार नाही.

उ.—मी स्वतः प्रवासाचा कंटाळा करणारा असल्यामुळे बहुधा एकदमच हिंदुस्थानास परत जाईन. कारण या हिवाळ्यांत युरोप झालें तरी इंग्लंडासारखेंच.जॉन्सनप्रमाणेच मीहि असें म्हणणारा आहे कीं, I want to see but I do not want to go to see "पाहावेसें वाटतें, पण पाहावयासाठी उठून जावेसें वाटत नाही." अर्थात माझ्यासारख्या माणसाला कोण कृपाळू उपकारी देवदूत खाकेत मारून हिंडून जग दाखविणार? तेव्हा डोळे मिटून कल्पना करून किंवा डोळे उघडून लेखी वर्णनें वाचून भूगोलाचें ज्ञान मिळवावें.

इतकें बोलणें झाल्यावर मीं तात्यासाहेब केळकरांची रजा घेतली.

## श्री. दिनकरराव क्षीरसागर



# मध्य युरोपांतील समाजस्थिति

[ रा. क्षीरसागर यांच्या मुलाखतीचा एक भाग गेल्या अंकीं प्रसिद्ध झालाच आहे. या अंकांत मध्य-युरोपांत जी समाजस्थिति त्यांच्या दृष्टीस पडली तिचें वर्णन दिले आहे. —सं. केसरी ]

मध्य-युरोपांत सामाजिक बाबतींत तरी सर्वत्र समतेचें साम्राज्य दिसून येतें. इतकें कीं श्री. क्षीरसागर यांना ह्या बाबतींत कोणींहि परकें मानलें नाही. तिकडील खाणेंपिणें सर्वांच्या परिचयाचें आहे. अंडीं व पक्ष्यांचें मांस हें साधारणपणें शाकाहारांत जमा होतें. आहारशुद्धीला ते लोक महत्त्व देतात. आणि नवीन दीर्घायुष्याच्या प्रयोगामुळे शाकाहाराकडे तात्त्विक दृष्ट्या तरी सर्वांचींच मनें वळल्यासारखीं दिसतात. पण एकंदरींत केवळ अन्न व वस्त्र एवढ्यावर समाधान न पावतां सिनेमा, दारू, सिगारेट, नाच इतक्या सर्व गोष्टींचा समावेश आवश्यक गोष्टींत करण्याची सर्वसाधारण प्रवृत्ति असल्यामुळे तिकडील बेकार किंवा निकामी या शब्दांचा अर्थ आपण सावधगिरीनेंच केला पाहिजे. खा, प्या व चैन करा हें सूत्र ते लोक मानतात. यामुळे नैतिक जीवनाबद्दल आपल्या व त्यांच्या कल्पना यांत जमीनअस्मानाचें अंतर आहे. लग्नापूर्वीचें आयुष्य सर्व प्रकारच्या चैनींत घालविण्यास त्यांस मुभा असते. यामुळे संततिनियमनाचे यांत्रिक उपायहि सरसहा अमलांत आहेत. नाही तर कुमारिकेच्या संततीसाठी बापाला अठरा वर्षेपर्यंत दरमहा 'आलिमेंड' नांवाचा दंड भरावा लागतो.

सर्व समाजाचें निरीक्षण करून असें वाटतें कीं 'राष्ट्र' एवढी कल्पना व तीत अंतर्भूत होणारे देशाभिमान व आनुषंगिक सद्गुण एवढेच काय ते तिकडील लोकांना महत्त्वाचे वाटतात. इतर संबंध हे शारीरिक सुखोपभोगाचे अनेकविध प्रकार आणि म्हणून वैयक्तिक स्वातंत्र्याचे विषय अशासारखे ते मानतात. पातिव्रत्य हा अर्थात् विवाहितांचा व विवाहबंधनें मोडेपर्यंतचा विचार होय. या अर्थाच्या दृष्टीने नीतीच्या वर्तनाचा तेथील लोकांच्या शरीरप्रकृतिवर वाईट परिणाम झाल्याचें क्षीरसागर यांस दिसलें नाही. हा बहुधा तेथील कणखर हवेचा व खडतर जीवनक्रमाचा परिणाम असावा. तेथील राहणी इतकी सुखाची होण्यासाठी व्यक्तिमात्राला दिवसांतून बराच वेळ कामांत घालवावा लागतो. शिवाय चैन करण्याच्या बुद्धिबरोबरच शरीरस्वास्थ्य व शरीरसंवर्धन या महत्त्वाच्या बाबतींकडे लक्ष देण्याची शास्त्रीय बुद्धि तिकडे फैलावली असल्यामुळे तारुण्यरक्षणाची योग्य ती काळजी प्रत्येक इसम घेतोच. स्त्रियांमध्येहि व्यायामाची प्रथा पडत चालली आहे. शाकाहार, उपवासमीमांसा, अशासारखे प्रकार वाढत आहेत. अगदी अलीकडे नग्न-संप्रदाय वाढीस लागला आहे. त्याचा मुख्य हेतु शरीरबल-संवर्धन व आकृतिसंवर्धन हाच आहे. या शेवटच्या पंथाच्या संस्था वाढीस लागून त्यांचे सचित्र अहवालहि प्रसिद्ध होतात. त्यांत शास्त्रीय दृष्ट्या चिकित्सा केलेली असते. स्वतःचा पांढरा रंग त्यांना आवडेनासा झाला आहे, यामुळे उन्हांत पडून सांवळा रंग बनविण्याची विलक्षण हौस दिसून आली. त्यांतूनच पुढें हा नग्न-संप्रदाय वाढीस लागला. दारू, नाच ह्या तेथील समाजांत आवश्यक गोष्टी समजतात. परंतु अफू, गांजा अशा इतर मादक पदार्थांविरुद्ध तिकडे जोराचें लोकमत असून तसलें व्यसन कोणाला नाही. आज समाजाची नवी घडी बसत आहे. ती मागच्यापेक्षा बरीच चांगली बसत आहे असें वाटतें. सत्याची चाड दिसून येते. परंतु प्रसंगप्राप्त असत्य ( Emergency Lie ) त्यांना चालतें.

## राहणीची सुधारणा

तिकडील राहणी उच्च दर्जाची आहे, याचा अर्थ तींत अनेक प्रकारच्या सुखसोयींचा अवश्यक समावेश होतो हाच आहे. ती उच्च दर्जाची आहे म्हणून महाग आहे असें नाही. मोठ्या प्रमाणावरील उत्पादनाचे नियम वस्तुजाताला लावल्यामुळे सर्व गोष्टी युरोपांत स्वस्त आहेत असेंच क्षीरसागर यांचें म्हणणें आहे. ते तिकडे राहत होते त्याप्रमाणेंच मुंबईत राहूं म्हणतील तर तेथल्यापेक्षा मुंबईत दुप्पट खर्च लागेल असें ते म्हणतात. साधनांचा अधिकांत अधिक व उत्तम उपयोग करण्याच्या आपल्या पद्धति फार मागसलेल्या आहेत. व्यर्थ खराबी फार व दुरुपयोग पुष्कळ.

## हिंदुस्थानाचें भवितव्य

हिंदुस्थानाच्या मागसलेल्या परिस्थितींतून परदेशांत गेलेला मनुष्य साधारणपणें दिपून जातो हें खरें असलें तथापि क्षीरसागर हे एका विवक्षित ध्येयाने प्रेरित होऊन गेल्यामुळे त्यांचे ह्या बाबतींतील कांहीं विचार नक्की झालेले आहेत. संकटाची धोंड पुढे येऊन उभी राहिली म्हणजे केवढे आटोकाट प्रयत्न करावे लागतात याचें दृश्य त्यांनी प्रत्यक्ष जर्मनी व इतर पुनर्घटित मध्यप्रदेशांत पाहिलें असल्यामुळे त्या तऱ्हेने आपल्याला

जिवापाड मेहनत केली पाहिजे हें त्यांच्या मनावर पक्कें बिंबलें आहे. आता आपल्या गिरण्या मंद अशा जुन्या तऱ्हेने चालविणें बंद झालें पाहिजे या धारणावर ते येथे प्रयत्न करणार आहेत. युद्धोत्तर युरोपचे व हिंदुस्थानचे आजचे प्रश्न तत्त्वतः एकाच स्वरूपाचे असून त्यांच्याच मार्गाने कडक स्वदेशीचें व्रतपालन करण्यासाठी पडतील ते परिश्रम केले पाहिजेत असे त्यांचें मत आहे. ही गोष्ट एका-दोघांच्या परिश्रमाने होण्यास रखी नसून सर्व राष्ट्रांतील कारखानदार व संघटित सरकार यांनी आपल्या देशांत उत्पादन वाढविण्यासाठी हरएक प्रयत्न केले पाहिजेत. आजच्या सर्व शाखांत यांत्रिक सुधारणा केल्या पाहिजेत व सुधारलेलीं यंत्रें चालविण्यासाठी मजुरांचा सुधारलेला नमुना स्वदेशांतच पैदा केला पाहिजे.

### कांही किरकोळ गोष्टी

'हिंदु' हा शब्द 'इंडिअन' या अर्थाने वापरतात. व हिंदु-हिंदू व हिंदु-मुसलमान यांचा झगडा चालला आहे असा ते प्रयोग करतात. गांधी, टागोर व कृष्णमूर्ति हीं तीन हिंदी माणसें तिकडे चांगलीं परिचित आहेत. गांधी तर इतके प्रसिद्ध आहेत कीं 'ब्रिटिश इंडिया' हें नांव सांगून जेथे त्यांना काहीच बोध होत नाही तेथें 'गांधी इंडिया' म्हटल्यानें अधिक लवकर ओळख पटते. टॉलस्टॉय् यांच्या सेक्रेटरीने तिकडे 'गांधींवर' व्याख्याने देऊनहि त्यांना प्रसिद्धी मिळवून दिली आहे. तिकडील लोक आदरातिथ्यांत फारच पुढारलेले आहेत. सर्वांत स्वीडनमध्ये हा प्रकार विशेष दिसला. अगदीं आपल्या इकडच्याप्रमाणें आभार मानून घेण्याबद्दल नाखुषी तिकडे फार. आपल्याप्रमाणेच घरोघर मोफत पाहुणचार करण्याची पद्धति आहे. तेथे सर्व प्रकारच्या आधुनिक सुधारणा व जुन्या प्रकारचें आस्थेचें आदरातिथ्य यांचा चांगला मेळ दिसला. एकदां रस्त्यांत माहिती विचारण्याकरिता एक मनुष्य क्षीरसागर यांनी गांठला तो प्रत्यक्ष स्वीडनचा क्राऊन प्रिन्स होता ! त्याने योग्य माहिती देऊन शिवाय मोठ्या मानाने क्षीरसागर यांस आपल्या उजव्या हाताने चालविलें. एका हॉटेलमध्ये त्याने त्यांना उपाहार दिला व आपण चालता झाला. मागाहून क्षीरसागर यांस त्या माहिती देणाराचें खरें स्वरूप समजून आलें.

मित्र म्हटला कीं त्याच्याशीं तिकडील लोक प्रतारणा करीत नाहीत. एकदोन स्नेही एका यंत्रांत सुधारणा करीत होते. त्याचें पेटंट घेतलें असतां त्यांना फायदा होणार होता. अशी ही जिव्हाळ्याची गोष्ट असताहि त्यांनी क्षीरसागर यांस मदतीला घेऊन परकीपणा किंवा व्यापारी गौप्य न ठेवता त्यांना सहकारी म्हणून आनंदाने काम करूं दिलें.

तिकडील तुरुंग व शिक्षणसंस्था वगैरे पाहून श्री. क्षीरसागर यांस फारच समाधान झालें. तेथील शिक्षण संस्था व दिलें जाणारें शिक्षण इतकें प्रागतिक आहे कीं प्रेमळ शिक्षकांच्या आस्थेवाईक देखरेखीखाली फेंगडे पाय, पाठीचें पोंक, तिरळे डोळे इत्यादि शारीरिक व्यंगें देखील औषधोपचाराशिवाय कोंवळ्या मुलांना प्रेमाने कांही हालचाली करावयास सांगून दुरुस्त केलीं जातात. आयुष्य हें आनंदाकरिता आहे. आणि त्याचा उपभोग सर्व प्रकारे आनंदाने घेतां यावा म्हणून नाना तऱ्हेचे उपाय शोधण्याची प्रवृत्ति तेथे सर्वत्र दिसून येते. मग वेळ पडेल त्याप्रमाणे ते इतर गोष्टी दडपून नेतात. तात्त्विक दृष्ट्या व शास्त्रीय दृष्ट्या एखाद्या गोष्टीचें महत्त्व लक्षांत घेण्याची बौद्धिक लायकी त्यांच्या ठिकाणीं आहे. परंतु व्यावहारिक अडचणी लक्षांत घेऊन ते तात्त्विक ज्ञानाचा डोंगर वाटेंत उभा राहूं देत नाहीत. शाकाहाराचें महत्त्व लक्षांत घेण्याचे शोध ज्या कालांत विशेष लागले त्याच कालांत युद्धोत्तर मांसाहाराची गरज भागविण्याकरिता गायबैलांबरोबर घोड्यांचाहि संहार होऊं लागला. झेकोस्लोव्हेकियांतील लोक कुत्र्याचें मांस आवडीने खातात. तर इटालींत मांजरेंहि भक्ष्यस्थानीं पडतात. जर्मनींत एका धाडसी खाटकाने माणसेंच गडप करून त्याचें मांस विकण्याचा व्यापार कांही दिवस केला. पुढे लवकरच तो उघडकीस आला. परंतु हे प्रकार अपवादात्मक आहेत. आपल्याला असह्य वाटेल इतक्या झपाट्यानें तिकडे सुधारणा चालली आहे असें आपण प्रत्यहीं वाचतों. परंतु अगदीं आघाडीचीं उदाहरणें ही तिकडेदेखील विरळाच असतात. तिकडेहि तीं सर्वमान्य समजत नाहीत. सर्वसाधारण समाज सामान्यतः एका विशिष्ट परिस्थितीलाच चिकटून राहत असतो. मात्र कांही विशिष्ट बाबतींत आपल्या व त्यांच्या कल्पनांत मूलभूत फरक आहेत त्यामुळे त्यांचेबद्दल आपण एकदम प्रतिकूल मत बनवूं नये. आजच्या परिस्थितींत त्यांच्या अनेक गोष्टी आपल्याला शिकून आपण घेण्यासाठी कचाचे व्रत पत्करलें पाहिजे. या बाबतींत विद्यार्थी व इतर लोक यांस अवश्य ती आपणास अवगत असलेली माहिती देण्यास आपण तयार आहोंत असें श्री. क्षीरसागर यांनी सांगितलें.

# पुण्यांतील लष्करी शाळेचे ढोंगी कैवारी

पुणें येथील श्रीशिवाजी मिलिटरी स्कूलचें अनिष्ट व अप्रिय प्रकरण अधिक न चिघळतां स्कूल कमिटीने प्रि. हचिसन यांनी केलेल्या आरोपांना सडेतोड, सयुक्तिक व साधार उत्तर देऊन सदर प्रकरण निकालांत काढावें व जनतेचा तत्संबंधी झालेला गैरसमज दूर करावा अशी आमची मनःपूर्वक इच्छा होती. परंतु कमिटीने आपलें कर्तव्य चोखपणें बजावलें नाहीं आणि एक खुलासे-वजा पत्रक काढलें तें इतकें 'मिळमिळीत' व 'रडकें' आहे कीं, त्याने कोणाहि तिऱ्हाइताचें समाधान होणार नाही. कमिटीने शाळेच्या हिताच्या दृष्टीने असा अंगचोरपणा करावयास नको होता, तो केला. परंतु खेदाची गोष्ट अशी कीं, खोटया पक्षाभिनिवेशाला बळी पडल्यामुळे म्हणा किंवा सदसद्विवेकबुद्धि चळल्यामुळे म्हणा, स्वतःच्या भालप्रदेशीं 'उदार' मताचा टिळा लावणाऱ्या आणि ज्ञानाच्या प्रकाशांतून अज्ञानाचें व असत्याचें काजळ प्रतिदिनीं बाहेर फेंकणाऱ्या पुणें येथील एका दैनिकाने कमिटीला चार हितकर गोष्टी सांगून वस्तुस्थिति समजून देण्याऐवजीं केसरीकारावर प्रच्छन्न मार्गाने भलते-सलते मिथ्यारोप करण्याची आपली परंपरा सभाळली. शिवाजी मिलिटरी स्कूलच्या वादास पक्षाभिमानाचें स्वरूप येईल अशी कोणाचीच कल्पना नव्हती. निदान आमची तरी इच्छा तो वाद पक्षातीत राहावा अशी असल्याने 'प्रक्षालनाद्धि पंकस्य दूरादस्पर्शनं वरम्' या व्यवहारनीतीचा अवलंब करून पक्षनिष्ठेच्या चिखलापासून आम्हीं आपल्याला दूर ठेवलें होतें. परंतु आमच्या चिरविरोधी व्यवसायबंधूला हा सुजनपणा न साहून त्याने आम्हांवर पक्षद्वेषाचा आरोप केला म्हणूनच पुनः एकवार या विषयावर आम्हांस लेखणी उचलावी लागली आहे.

आमच्या टीकाकारांनी ही गोष्ट प्रथम लक्षांत ठेवली पाहिजे कीं, स्वतः केसरीकारांना प्रि. हचिसन किंवा कमिटी यापैकीं कोणाचाच उमाळा येण्याचें कारण नाही. त्यांतल्या त्यांत आमचा ओढा असला तर हचिसनपेक्षा कमिटीकडेच असणार हें उघड आहे. श्रीशिवाजी मिलिटरी स्कूल ही संस्था महाराष्ट्रांत अपूर्व आहे. तेव्हा तिची प्रतिष्ठा वाढावी आणि तिचें कार्य अप्रतिहतपणें चालू राहावें असें आम्हांस स्वाभाविकच वाटतें. या दृष्टीने विचार करतां सध्या शाळेविषयी जो वाद उपस्थित झाला आहे त्यांतून सत्य बाहेर येणेंच अगत्याचें आहे. आतापर्यंत प्रि. हचिसन यांनीच आपली बाजू साधार व मुद्देसूद रीत्या जनतेपुढे मांडली आहे. कमिटीनेंहि तितक्याच मुद्देसूदपणाने त्यांनी केलेल्या आरोपांना उत्तरें देऊन त्यांची वासलात लावावयास पाहिजे होती. त्याचा साहजिकच असा परिणाम झाला असता कीं, जनतेला अन्वयव्यतिरेकाने उभय पक्षांपकीं न्याय्य पक्ष कोणता हे समजून या अप्रिय वादाला मूठमाती मिळाली असती.

शिवाय लष्करी शाळेचा प्रश्न महाराष्ट्राच्या जिव्हाळ्याचा आणि अभिमानाचा आहे. त्यामुळे प्रि. हचिसन यांनी राजिनामा दिल्यापासून शाळेंतील विद्यार्थ्यांच्या पालकांचीं शाळेसंबंधी विचारपूस करणारीं पत्रेंहि आम्हांकडे येत आहेत. याहि कारणाने आम्हांला या वादांत पुनः पडावें लागलें आहे. हेतु असा कीं, कमिटीने किंवा कमिटीचे अध्यक्ष करवीरस्थ श्रीमन्महाराज यांनी या प्रकरणीं अधिक लक्ष घालून शाळेचें काम सुयंत्रित, पक्षातीत आणि शिस्तवार चालवावें. ले. क. हचिसन यांनी शाळेच्या आणि कमिटीच्या कारभारावर व व्यवस्थेवर जे आरोप केले आहेत ते कोणत्याहि हेतूने केलेले असोत; त्यांचें निराकरण कमिटीकडून अधिकृत रीत्या झालें पाहिजे असें आमचें मत आहे. तसें निराकरण जोंपर्यंत होत नाही तोंपर्यंत जनतेच्या मनावर प्रि. हचिसन यांच्याच पत्रकाचा पगडा कायम राहणार हें उघड होय. मग कमिटीची अवास्तव वकिली करणारे येथील बुद्रुक टीकाकार कांहीहि बरळोत वा खरडोत! कमिटीने प्रसिद्ध केलेल्या पत्रकाने फक्त आमचेंच तेवढें असमाधान झालें असें नाही, तर आमच्या टीकाकारांचे सहोदर 'संस्थानी स्वराज्य' कार यांचेंहि समाधान झाल्याचें आढळत नाही. ते आपल्या ता. २ डिसेंबरच्या अंकांत म्हणतात, "कमिटीतर्फे खुलाशाचें एक पत्रक हल्लीं प्रसिद्ध झालें आहे; परंतु त्यांत कमिटीने क. हचिसन यांच्या मुख्य आरोपास उत्तर दिलेलें दिसत नाही व त्यामुळे लोकांच्या मनावर क. हचिसन यांच्या म्हणण्याचाच पगडा बसणार आहे." ज्ञानप्रकाशकारांना हे घरचे मुष्टिमोदक आमच्या मोदकांपेक्षा अधिक आवडतील असें आम्हांस वाटतें.

ले. क. हचिसन यांनी शाळेच्या प्रिन्सिपालच्या जागेचा राजिनामा दिला म्हणूनच या वादाला अंकुर फुटला. प्रि. हचिसन यांच्या राजिनाम्यासंबंधी लिहितांना 'अशा उदयोन्मुख शाळेच्या पहिल्याच प्रिन्सिपालाला असा नाट लागावा हें सुचिह्न नव्हे' अशा आशयाची आम्हीं टीका केली होती. त्यावर "पण

सदा सर्वदा अशा नेमणुकांना विरोध करणाऱ्या व स्वतःस राष्ट्रीय देशभक्त म्हणून म्हणविणाऱ्या मंडळींनी या वेळीं नक्राश्रु कां गाळावेत ? " असा प्रश्न करून हे ज्ञानप्रकाशकार आम्हांला हिणवीत आहेत. जणुं काय केसरीकारांनी युरोपिअन प्रिन्सिपालच्या जागेकरिता लंडनमध्ये आपल्या एजंटामार्फत जाहिरातीच फडकावल्या होत्या! वास्तविक युरोपियन प्रिन्सिपाल नेमण्याचा पान्हा फुटला असला तर तो कमिटीला फुटला होता, आम्हांला नव्हता हें तिच्या मूळ उद्देशपत्रिकेवरूनच स्पष्ट दिसतें. मग नसत्या गोष्टीबद्दल केसरीकारांना दूषण देण्यांत पुरुषार्थ काय ! एखादी संस्था सुरू होऊन फार दिवस झाले नाहीत तोंच तिच्या राशीला यादवीचा व ज्ञातिप्रेमाचा शनि लागावा ही स्थिति राष्ट्रप्रेमी माणसाच्या हृदयाला बोचणारी अशीच आहे. या बाबतींत 'संस्थानी स्वराज्य'कार म्हणतात, " परंतु या संस्थेचें काम व्यवस्थितपणें चालण्याच्या मार्गांत नसते अडथळे तिच्या स्थापनेनंतर अल्पकाळांत दुर्दैवाने यावेत ही मोठ्या कष्टाची गोष्ट होय. " दुसऱ्याच्या राष्ट्रीयत्वाबद्दल नक्राश्रू ढाळणाऱ्या येथील प्रकाशकारांनी आपल्या सहोदराचे हे उद्‌गार नीट डोळे उघडून वाचावे.

उपर्युक्त वाक्यांत टीकाकारांनी आमच्यावर विसंगतीचा आरोप लादण्याचा प्रयत्न केला आहे. तो असा कीं, केसरीकार स्वतः 'राष्ट्रीय देशभक्त' म्हणवून घेतात तर त्यांनी प्रि. हचिसन यांच्या राजिनाम्याबद्दल एवढें वाईट कां वाटून घ्यावें ? परंतु या युक्तिवादाची उभारणी आभासाच्या वाळूवर कशी करण्यांत आली आहे पहा. खुद्द केसरीकार हे सर्व सरकारी कनिष्ठ वरिष्ठ नोकऱ्यांचें व खात्यांचें हिंदीकरण ताबडतोब झालें पाहिजे या मताचे असून त्या धोरणाला अनुसरूनच शिवाजी मिलिटरी स्कूलसारख्या खासगी संस्थेच्या प्रिन्सिपालच्या उच्च स्थानीं एका हिंदीतर माणसाची नेमणूक झाली ही गोष्ट त्यांना कधीच पसंत नव्हती. परंतु स्वतः कमिटीलाच आपल्या देशबांधवांच्या कार्यक्षमतेबद्दल विश्वास नसल्यानें तिने ले. क. हचिसन यांची त्या जागीं नेमणूक केली व आमचे टीकाकार म्हणतात, त्याप्रमाणे तिनेच " अशा मार्गांनी आपल्या देशबांधवांची नालायकी जगजाहीर केली! " अर्थात् एकदा जी नेमणूक व्हावयास नको होती ती झाल्यावर आहे तीच वस्तुस्थिति घेऊन चालावयास पाहिजे.

कमिटीने ले. क. हचिसन हे अनुभविक लष्करी तज्ज्ञ म्हणून त्यांची एवढ्या मोठ्या हुद्द्यावर नेमणूक केली. कांही महिने त्यांनी शाळेचा कारभार सुव्यवस्थितपणें व शिस्तीने चालविला त्याबद्दल त्यांनी शाळाखात्याच्या अधिकाऱ्याची शाबासकीहि मिळविली. अशा प्रकारच्या स्वतः कमिटीनेच पसंत केलेल्या गृहस्थाला शेवटीं राजिनामा देण्याची पाळी यावी व त्याने त्याबद्दल कमिटीवर उघड उघड आरोप करावे यावरूनच शाळेच्या अन्तर्व्यवस्थेत कांही तरी गोंधळ माजला असला पाहिजे अशी कोणाची समज झाल्यास त्यांत त्याची काय चूक? केसरीकार व्यक्तीला महत्त्व देत नाहींत तर तत्त्वाला देतात व म्हणूनच एक जबाबदार पत्रकार या नात्याने भि. हचिसन आणि स्कूल कमिटी यांचीं पत्रकें वाचून त्यांना कमिटीवर निर्भीड टीका करावी लागली. कमिटीला आपला पक्ष सबळ व निरपवाद आहे असा विश्वास वाटत असेल तर तिने या आरोपाचें निराकरण जरूर केलें पाहिजे. प्रि. हचिसन हे व्यक्तिशः राजिनामा देऊन स्वदेशीं परत गेले हा वादाचा मुद्दा नसून त्यांना कमिटीच्या अव्यवस्थेमुळे तो द्यावा लागला या गोष्टीचें महत्त्व विशेष आहे.

कमिटीचा अन्तर्गत कारभार पक्षातीत न राहून पक्षनिष्ठ धोरणानेच चालत होता, याचा ध्वनि प्रि. हचिसन यांच्या पत्रकातून निघतो. त्याला पोषक असा मजकूर पुणें येथील 'संस्थानी स्वराज्यांत'हि आला आहे. तो असा कीं, " स्मारकाची ही योजना व्यवस्थितपणें शेवटास नेण्याकरिता जातिवैशिष्ट्यातीत अशी एक कमिटी तेव्हा नेमण्यात आली होती. परंतु हें विस्तृत वृत्तीचें धोरण दक्षिणेंतील ब्राह्मणेतर पक्षाच्या कांहीं पुढाऱ्यांना पसंत न पडून त्यांनी कमिटीच्या कामांत नसत्या लहानमोठ्या अनेक अडचणी आणण्यास सुरुवात केल्यामुळे कै. श्री. माधवराव महाराज शिंदे यांनी या गोष्टींतून आपलें मन काढलें व या शिवस्मारकाच्या योजनेचे अष्टाधिकार कै. श्री. शाहुछत्रपति महाराज यांचे हातीं सुपूर्त केले. कोल्हापूर दरबाराच्या पखाखालीं असलेल्या जातिनिष्ठ अशा कमिटीकडून कां होईना, परंतु संस्थेचें काम चालू राहो अशा वृत्तीने या कमिटीकडून केल्या जाणाऱ्या कामामध्ये अनेक बाबी टीका करण्यासारख्या असूनहि लोकांकडून सदर कमिटीच्या कामावर आजवर टीका झाली नाहीं. " या उताऱ्यावरून कमिटीचा कारभार कोणत्या धोरणानें चालला आहे व तें धोरण व शाळेच्या उन्नतीच्या आड कसें आलें आहे याविषयी वाचकांची खात्री होईल.

यानंतरचा मुद्दा प्रिन्सिपालाच्या अधिकाराचा. गेल्या शुक्रवारच्या अंकांत यासंबंधी प्रि. हचिसन व कमिटी यांजमध्ये लंडन येथे झालेल्या मामुली करारांतील एक परिच्छेद आम्हीं उद्धृत करून त्याला पोषक असा करवीरस्थ महाराजांचे पर्सनल सेक्रेटरी रा. सा. सुर्वे यांच्या पत्रांतील

मजकूर दिला होता. यावर ज्ञानप्रकाशकार लिहितात, "सदर टीकाकार ( म्हणजे केसरीकार ) म्हणतात, त्याप्रमाणे वस्तुस्थिति आहे असें क्षणभर मान्य केलें, तरी यावरून कमिटीचा व कोल्हापूरच्या महाराजांचा सरळपणा सिद्ध होत नाहीं काय ?" या आमच्या व्यवसायबंधूंना आम्हांला असें सांगावयाचें आहे कीं, श्रीमंत महाराजांनी किंवा त्यांच्या पर्सनल सेक्रेटरींनी प्रिन्सिपालाच्या न्याय्य अधिकारांना मान्यता देण्यांत मनाचा सरळपणा व सौजन्य दाखविलें तेंच गुण या कमिटीने दाखवावयास पाहिजे होते, पण ते तिने दाखविले नाहीत. हीच तर आमची तक्रार. परंतु कमिटीने मन्थरेची वक्रता स्वीकारली म्हणूनच हें सारें रामायण निर्माण झालें !

प्रिन्सिपालाच्या हातीं अमर्याद व अनियंत्रित सत्ता असावी असा कोणाचाच आग्रह नाहीं. परंतु संस्था नवीन व तीहि लष्करी स्वरूपाची असल्याने तिचा संसार नीटनेटका थाटण्यास व ती कार्यक्षम करण्यास प्रिन्सिपालाच्या हातीं कांही काल तरी विशिष्ट अधिकार असणें अपरिहार्य आहे. या अधिकारांत शिक्षक नेमणें किंवा बडतर्फ करणें, विद्यार्थ्यांची भोजनविषयक व्यवस्था करणें इत्यादि गोष्टी समाविष्ट होतात. त्या अधिकारांचा दुरुपयोग केला जातो कीं काय एवढेंच कमिटीने पाहावयाचें. म्हणे कमिटी त्यांना योग्य अधिकार द्यावयाला तयार झाली होती; पण करार कायमचा व अखेरचा झालेला नव्हता. असलीं भ्रामक विधानें करून टीकाकार स्वतःचीच बाजू अधिक लंगडी करून घेत आहेत. प्रि. हचिसन यांनी आपल्या अधिकाराचीं सूत्रें हातीं घेतल्यावर रुजू होण्याच्या दिवसापासून कमिटीजवळ करार कायम करण्याबद्दल एकसारखी निकड लावली होती. परंतु आश्चर्य असें कीं, त्यांनी राजिनामा देईपर्यंत कमिटीने कराराला मान्यता देण्याची टाळाटाळ केली. प्रि. हचिसन हे लंडनमध्ये असतांनाच मुख्य मुद्द्यांवर ते व कमिटी यांजमध्ये मामुली पद्धतीने करार झाला होता तर पुढील तपशिलाकरिता कमिटीने इतकी दिरंगाई कां करावी हें एक गूढच आहे. त्याचा खुलासा आमच्या ढोंगी टीकाकारांनी केल्यास बरें.

ता. २९ नोव्हेंबरच्या केसरींत शिक्षकवर्गाच्या नालायकीसंबंधाचीं कांहीं मनोरंजक उदाहरणें,आम्हीं प्रि. हचिसन यांच्या पत्रकांतून दिलीं होतीं. त्यांना आधार म्हणजे न्या. मू. माडगांवकर व एज्युकेशनल इन्स्पेक्टर मि. बी. एच. काजी यांच्या शेऱ्यांचा. न्या. मू. माडगांवकर हे शाळेला भेट देण्यास गेले असता त्यांना तेथील एका वर्गातील शिक्षक असा भेटला कीं,त्याचें बोलणेंच माडगांवकर यांना समजेना, मग विद्यार्थ्यांना तें किती समजत असेल व अशा शिक्षकापासून त्यांना काय फायदा होत असेल हें विद्यार्थ्यांनाच माहीत ! मि. काजी आपल्या शेऱ्यांत म्हणतात, "अशा धर्तीच्या शाळेला जसा (कार्यक्षम) शिक्षकवर्ग पाहिजे तसा आहे असें म्हणतां येत नाहीं. कांहीं शिक्षक तर कार्यक्षमतेंत पुष्कळच कमी भरतील." अशा स्थितींत शिक्षणतज्ज्ञांच्या आणि न्यायाधीशांच्या शेऱ्यांचा आधार घेऊन शिक्षकवर्ग नालायक आहे असें म्हणणारा बेजबाबदार कीं वस्तुस्थितीकडे मुद्दाम डोळेझांक करून कमिटीची खोटी तरफदारी करणारा टीकाकार बेजबाबदार हें जनतेनेच आपल्या मनाशीं ठरवावें.

कमिटीने प्रसिद्ध केलेल्या त्रोटक पत्रकांत श्री. येवले या हंगामी प्रिन्सिपालांवर करण्यांत आलेल्या नियमबाह्य वर्तणुकीच्या आरोपांना तरी निदान उत्तरें मिळावयास पाहिजे होतीं. प्रि. हचिसन यांनी श्री. येवले यांजवर हिशेब, अभ्यासक्रम, अध्यापन इत्यादि बाबतींत दिरंगाईचा व प्रिन्सिपालाच्या अवज्ञेचा उघड उघड आरोप केला आहे. श्री. येवले यांनी आपल्या योग्य अधिकाराचें अतिक्रमण केलें असें रा. सुर्वे यांचेंहि मत झालें असावें असें त्यांच्या पुढील उद्गारांवरून म्हणावें लागतें. प्रि. हचिसन यांना पाठविलेल्या पत्रांत ते लिहितात, " व्हाइस–प्रिन्सिपाल यांच्या बाबतींत आपण जें म्हणतां त्याबद्दल मला पूर्ण सहानुभूति वाटते. कांहीं बाबतींत श्री. येवले यांनी व्हाइस-प्रिन्सिपाल या नात्याने त्यांना असलेल्या वाजवी अधिकारांची अतिव्याप्ति केली आहे असेंच आढळतें" रा. ब. जगताप यांनीहि श्री. येवले यांना अशाच कारणावरून प्रिन्सिपालाची माफी मागावयास लावलें होतें. श्री. येवले यांच्यावर करण्यांत आलेल्या या आरोपांची तपशीलवार व साधार शाबिती करण्याची जबाबदारी आम्हांवर पडत नसून ती खुद्द श्री. येवले यांजवरच पडत आहे. श्री. येवले हे स्वतः सुशिक्षित, सुसंस्कृत किंवा सुजनहि असतील, पण म्हणून त्यांनी एका लष्करी शाळेच्या व्हाइस–प्रिन्सिपालची जागा अडवून गैरशिस्त वर्तन करावें हें त्यांच्या दर्जास शोभतें काय? प्रि. हचिसन यांनी आपल्यावर कुभांड रचलें आहे अशी त्यांची खरोखरीच खात्री असेल तर त्यांनी आपली बाजू चव्हाट्यावर मांडावी. आरोपांची शाबिती करण्याची जबाबदारी न्यायतः कोणावर, या साध्या गोष्टीची जाणीव न्यायाची तराजू हातांत घेऊन बसल्याचें ढोंग करणाऱ्या ज्ञानप्रकाशकारांना पाहिजे होती. परंतु पक्षद्वेषाच्या विकारवशतेला बळी पडलेल्या विवेकभ्रष्टांना इतका सारासार विचार कोठून सुचावा !

आमच्या व्यवसायबंधूने पक्षद्वेषाच्या कैफाने

तारवटून आम्हांवर जे निष्कारण आरोप केले त्यांचें निराकरण आतापर्यंत झालें. या वादाची धूळ वर्तमानपत्रांच्या रकान्यांत उडण्यापासून कमिटीचा कोणताच फायदा नाही. असला तर तोटाच आहे. अवघ्या हिंदुस्थानांत लष्करी शाळांचा आधीच दुष्काळ आहे. ज्या एक-दोन शाळा आहेत त्या सरकारी व श्रीमंती थाटाच्या आहेत. श्रीशिवाजी मिलिटरी प्रिपरेटरी स्कूल ही एकच संस्था खासगी प्रयत्नावर उभारलेली व तीहि पुण्यासारख्या प्रमुख शहरीं स्थापण्यांत आली याबद्दल महाराष्ट्राला साहजिकच अभिमान वाटतो. खासगी शिक्षण-संस्थांच्या या पावन क्षेत्रांत लावण्यांत आलेलें लष्करी शाळेचें रोपटें वृद्धिंगत व्हावें आणि त्याच्या छायेखाली महाराष्ट्रांतील तरुणवर्ग लष्करी शिक्षणानें तेजस्वी बनून मातृभूमीच्या संरक्षणास सज्ज व्हावा या रम्य आशांच्या लहरी महाराष्ट्रीयांना स्फुरण आणीत आहेत. महाराष्ट्रीयांचें हें सुखस्वप्न सत्यसृष्टींत उतरविणें किंवा 'हा हन्त हन्त नलिनीं गज उज्जहार' या शोकमय पद्यांतील नलिनी-नाशाप्रमाणें त्या आशा होरपळून टाकणें हें सर्वस्वी कमिटीच्या हातांत आहे. यास्तव कमिटीला व व्हाइस-प्रिन्सिपाल श्री. येवले यांना आमची अशी कळकळीची सूचना आहे कीं, त्यांनी प्रिन्सिपाल हचिसन यांच्या सर्व मुद्द्यांना विस्तृत व समर्पक उत्तरें द्यावीं व गैरसमजाचें तिमिरपटल घालवून शाळेचें नांव उज्ज्वल करावें. हा सरळ मार्ग न पत्करता गप्प बसण्यानें ते आपली बाजू लंगडी असल्याचेंच पर्यायानें कबूल करीत आहेत. श्रीशिवाजी मिलिटरी स्कूलच्या कारभारावर जी आम्हीं टीका केली ती पक्षाभिमानानें केली असें म्हणण्यानें येवलेप्रभृतींची बाजू सावरणार नाही, हचिसन यांच्या पदरांत त्यांच्या चुकीचें माप बांधलें तरच ती सावरणार आहे. परंतु तशी बुद्धि श्री. येवले व कमिटी यांना होत नाही त्याअर्थी पाणी कोठें मुरतें आहे हे जाणणारा जाणतच आहे.

# ओटावा कराराची छाननी

## परस्परविरुद्ध मतें

ओटावा येथे हिंदुस्थानातर्फे म्हणून इंग्लंड व ब्रिटिश साम्राज्यांतील इतर वसाहती यांच्या प्रतिनिधींबरोबर जो व्यापारी करार केला गेला त्याची बाबवार छाननी करण्याकरिता असेंब्लीनें एक कमिटी नेमली होती. या कमिटीचे पंधरा सभासद होते. कमिटीनें अर्थशास्त्रज्ञ व व्यापारविषयक तज्ज्ञ यांच्या साक्षी घेतल्या; परंतु कराराबाबत तीव्र मतभेद उत्पन्न होऊन १२ सभासदांनी थोड्या फरकानिशीं मूळ कराराला तीन वर्षेपर्यंत मान्यता देण्याचें ठरविलें. बाकीच्या तीन सभासदांनी हा करार मान्य करूं नये असा आपला अभिप्राय दिला आहे.

## कराराचें समर्थन

बहुमतवाल्या सभासदांनी जो रिपोर्ट केला आहे त्याचा सारांश पुढीलप्रमाणे आहे. ते म्हणतात,—

" ओटावा येथे केलेल्या कराराला संमति देणें हें हिंदुस्थानाच्या हिताचें आहे असें आम्हांला वाटतें. परंतु या कराराची खरी परीक्षा करावयाची असल्यास तो कांही विशिष्ट कालपर्यंत अंमलात ठेवला पाहिजे. आम्हीं ज्या शिफारशी केल्या आहेत त्यांवरून तशी परीक्षा केली जाईल असें आम्हांस वाटतें.

आता यापुढे दरवर्षी जकातीच्या बाबतींत ज्या सवलती दिल्या जातील त्यांचा परिणाम काय होतो याची सरकारानें नोंद ठेवावी; तसेंच व्यापारी लोकांनी व्यापारावर काय परिणाम होतो याबद्दलची त्यांचीं मतेंहि दप्तरीं ठेवावीं.

आमची अशी शिफारस आहे कीं, कायदेमंडळांतील पंधरा सभासदांची एक कमिटी या कामाकरितां नेमावी; त्या कमिटीनें हिंदुस्थानांतील शेती, व्यापार व उद्योगधंदे यांवर या कराराचा काय परिणाम होतो हें पाहून त्याचा असेंब्लीकडे रिपोर्ट करावा.

आमची आणखी अशी शिफारस आहे कीं, या कराराची अंमलबजावणी तीन वर्षे झाल्यानंतर सरकारनें असेंब्लीकडे याबाबतचा रिपोर्ट करावा. आणि त्यानंतर या करारामुळें हिंदुस्थानाचें नुकसान होत आहे असें असेंब्लीचें मत पडलें तर हा करार मोडण्याबद्दलची जरूर ती सहा महिन्यांची नोटीस सरकारनें द्यावी."

## बुडणारा व्यापार तरेल

बहुमतवाल्यांच्या रिपोर्टांत असें म्हटलें आहे कीं, ग्रेटब्रिटननें ज्या सवलती हिंदुस्थानास देण्याचें हल्ली ठरविलें आहे त्या जर दिल्या नसत्या तर आज ज्या ज्या बाजारपेठेंत हिंदुस्थानाचा पुष्कळ माल खपतो त्या बाजारपेठा हिंदुस्थान गमावून बसला असता. हा बुडता व्यापार करारानें तारला असें म्हणण्यास हरकत नाही. या बाबतींत हिंदुस्थानांतून इंग्लंडकडे निर्यात होणाऱ्या सरकीला जकातीच्या सवलती मिळाल्या नाहीत ही गोष्ट बरी झाली नाही. म्हणून त्यांची हिंदुस्थानसरकारला विनंति कीं त्यांनी सदर

बाबतींत सवलती मिळाव्या म्हणून पत्रव्यवहार सुरू करावा.

### परदेशचा व्यापार

या रिपोर्टांत पुढे असें म्हटलें आहे कीं, इंग्लंड-खेरीज इतर परदेशांमध्ये हल्लीं हिंदुस्थानांतून निर्गत होणाऱ्या मालावर जास्तींतजास्ती जकाती बसवल्या जात असल्याने आज तरी हिंदुस्थानाला आपला व्यापार वाढविण्याची संधि नाहीं. आहे हा व्यापार टिकवितां येईल कीं नाही याचीच शंका आहे. उलट पक्षीं इंग्लंडांतील बाजारपेठ आत्मसात करून तेथील व्यापार वाढविण्याची हिंदुस्थानास या करारानें संधि मिळत आहे. व ही बाजारपेठ हिंदुस्थानाच्या दृष्टीनें सर्वांत मोठी आहे हेंहि लक्षांत ठेविलें पाहिजे. याशिवाय हिंदुस्थानांतील ज्या उद्योगधंद्यांना हल्लींच्या जकातीमुळे संरक्षण मिळत आहे त्याची जोपासना करण्याची व्यवस्था करावी असेंहि त्यांनी नमूद केलें आहे.

### सवलतींची यादी

बहुमतवाल्या सभासदांच्या शिफारशींचे चार भाग केले आहेत. पहिल्या भागांत इंग्लंडकडून ज्या जिनसांवर सवलती मिळणार आहेत त्यांचा विचार केला आहे. ( करारांतील ए. बी. सी. डी. कोष्टक )

ते म्हणतात, कांहीं जिनसांवर ज्या सवलती दिल्या आहेत त्यांपासून फायदा होणार आहे ही गोष्ट खरी; पण त्या फायद्याची अतिशयोक्ति करण्यांत अर्थ नाहीं. या वर्गांत त्यांनी पुढील जिन्नस घातले आहेत. मॅग्नेशियम क्लोराइड, सूत, कापड, धान्याचा कोंडा व तांदुळाची करड. गव्हासंबंधानें ते असें म्हणतात कीं, आजच्या परिस्थितींत दिलेल्या सवलतीनें फारसा फायदा होणार नाहीं. परंतु यापुढे गव्हाची पैदास हिंदुस्थानांत मोठ्या प्रमाणावर होणार आहे असे शेतकी तज्ज्ञांचे मत असल्यानें ही सवलतहि स्वीकारणें बरें. खोबरेल तेलासंबंधानें जी आंकडेवार माहिती आहे तिजवरून इंग्लंडमध्ये या मालाला पुष्कळ मागणी येणें शक्य आहे. सध्याची स्थिति मात्र अशी आहे कीं, पूर्वी जें खोबरेल तेल बाहेर पाठविलें जात होतें त्याचा खप हिंदुस्थानांतच होऊं लागला आहे. तथापि निर्गत व्यापारावर या सवलतीचा परिणाम फारसा होणार नसला तरी भुईमुगाचें तेल व तिळाचें तेल यांवर जी महत्त्वाची सवलत देण्यांत आली आहे त्या दृष्टीनें हीहि महत्त्वाची बाब समजली पाहिजे.

अळशीसंबंधानें असें म्हणतां येते कीं, या बाबतींत हिंदुस्थानास पूर्ण मक्ता आहे. कारण हिंदुस्थानाइतका हा जिन्नस दुसरीकडे पैदा होत नाहीं. तथापि हिंदुस्थानाचा प्रतिस्पर्धी अर्जेंटाइन आहे व त्या देशाचा माल विलायतेंत अधिक खपतो. अर्जेंटाइन देश अळशी स्वस्त विकूं शकतो. यामुळे आज जी दहा टक्क्यांची सवलत या बाबतींत इंग्लंड देणार आहे ती अपुरीच ठरेल. व त्यामुळ अर्जेंटाइनची हकालपट्टी इंग्लंडच्या बाजारांतून हिंदुस्थानास सहज करतां यगार नाही असें वाटतें. हिंदुस्थानांतील अळशीचा भाव कमी व्हावा या दृष्टीनें त्याच्या जाती पाडणें व ती पाठविण्याची व्यवस्था करणें या बाबतींत अधिक लक्ष घातलें पाहिजे.

### तांदुळाला सवलत

खुद्द इंग्लंडमध्ये हिंदुस्थानांतून तांदूळ थोडा जातो. म्हणजे एकंदर निर्यातीपैकीं तांदुळाची निर्यात थोडी असते. तथापि त्यावर पन्नास टक्के सवलत दिली असल्या कारणानें कदाचित् हिंदुस्थानाला ती बाजार पेठ आपल्या ताब्यांत घेतां येईल. अर्थात् ही भविष्य काळचीच गोष्ट आहे. पण साम्राज्यांतून हिंदुस्थानाला कोणीहि प्रतिस्पर्धी नसल्यानें या सवलतीची किंमत अधिक आहे यांत शंका नाही.

आजपर्यंत युनायटेड किंग्डममध्ये जितकी 'पॅरॅफिन वॅक्स' खपते त्यापैकीं फक्त ४२ टक्के हिंदुस्थानांतील आहे. या जिनसास नवीन मिळणाऱ्या सवलतीनें हिंदुस्थानास ही बाजारपेठ पूर्ण कबजांत घेतां येईल असें वाटतें.

### सवलतींचा निश्चित फायदा

बहुमतवाल्यांच्या मतानें पुढील जिनसांच्या बाबतींत ज्या सवलती दिल्या आहेत त्या निश्चित फायद्याच्या आहेत. ते जिन्नस असे— कॉफी, काथ्या, काथ्याच्या चटया, गळिताचीं धान्यें, मसाल्याचे जिन्नस, सागवान वगैरे लांकूड, लोकरीचे रंग व सतरंज्या, तंबाखू, एरंडी, भुईमूग,'पिगलेड'. किंमतीच्या दृष्टीनें पाहतां या जिनसांची किंमत दोन कोटी सात लक्ष पौंडांपर्यंत होते. रिपोर्टांत असें म्हटलें आहे कीं, "साम्राज्यांतील देशांत या जिनसा तीन कोटी पांच लक्ष बासष्ट हजार पौंड किंमतीच्या खपतात. साम्राज्यांतील सर्व देशांतून इंग्लंडमध्ये हे जिन्नस पाठविले गेले तरी हिंदुस्थानाला आज साडेतेरा कोटी रुपये किंमतीचें नवें गिऱ्हाईक मिळालें असें म्हणावयास हरकत नाही."

### कातड्याचा व्यापार

"कमावलेल्या कातड्याची निर्गत आजच युनायटेड किंग्डममध्ये ( ग्रेट ब्रिटनमध्ये ) ऐशीं टक्के होत आहे. यावरील जकातीला आम्ही विशेष महत्त्व देतों याचें कारण हा एक कच्च्या मालापासून पक्का माल करण्याचा धंदा आहे. व अशा उद्योगधंद्यास मदत होणें म्हणजे हिंदी उद्योगधंद्याच्या वाढीला उत्तेजन देण्यासारखें आहे."

### ज्यूट

ज्यूट किंवा ताग हा हिंदुस्थानांतून मोठ्या प्रमाणावर निर्गत होतो. पण आता युरोप खंडांतील देश हिंदुस्थानाचे या बाबतींत प्रतिस्पर्धी बनले आहेत. हिंदुस्थानांतील या धंद्याची जितकी माल उत्पन्न करण्याची शक्ति आहे तितकी उपयोगांत आणली जात नाही. फक्त पंचेचाळीस किंवा पन्नास टक्केच हल्ली माल उत्पन्न केला जातो. या दृष्टीने पाहता ज्यूटवर सवलत मिळाल्याकारणाने हा धंदा पूर्ण वाढीस लागेल हें कबूल केलें पाहिजे.

चंदन व मॅग्नेशियम यांवरील सवलतीचा उपयोग स्थानिक लोकांनाच होईल हें खरें. तशा सवलती मिळाव्या म्हणून त्या जिनसांच्या कारखानदारांनी मागणी केली होती.

### चहा, कॉफी, तंबाखू

चहा, कॉफी व तंबाखू हे जिन्नस हिंदुस्थानांतून मोठ्या प्रमाणावर परदेशीं पाठविले जातात व देशाच्या निर्गत व्यापारामध्ये त्यांना मोठें स्थान आहे. आज या जिनसांना जी बाजारपेठ मिळत आहे ती सवलती दिल्या गेल्या नसत्या तर हिंदुस्थानाच्या ताब्यात राहिली नसती. म्हणून या सवलतींचाहि हिंदुस्थानास मोठा फायदा मिळणार आहे.

सरकी व मॅंगेनीज यांचाहि मोठा निर्गत व्यापार आहे. पण या बाबतींत सवलती दिल्या गेल्या नाहीत ही दुःखाची गोष्ट आहे.

पोलाद व लोखंड या बाबतींत असें म्हटलें आहे कीं, इंग्लंडच्या बाजारांत कच्च्या लोखंडाचा व्यापार नव्या दिलेल्या सवलतींने वाढेल.

### परदेशी जकाती

इंग्लंडने दिलेल्या सवलतींचा विचार करता त्या रिपोर्टांत म्हटलें आहे कीं हल्ली निरनिराळ्या देशांनी हिंदुस्थानाविरुद्ध मोठमोठ्या जकातींच्या भिंती उभारलेल्या आहेत. या दृष्टीने इंग्लंडने दिलेल्या सवलती फार उपयोगाच्या आहेत, या सवलतींचा परिणाम प्रत्यक्षपणें किती होणार आहे हें आज सांगतां येत नाही. कांही जिनसांबाबत व्यापारवृद्धि निश्चितपणें होईलच असेंहि म्हणतां येत नाही. परंतु जे जिन्नस हिंदुस्थान पुष्कळ पिकवितो व ज्यांना विलायतेंतील बाजारांत खप आहे त्या जिनसांचा व्यापार दिलेल्या सवलतीमुळे वाढेल असें आम्हांस वाटतें. विशेषतः अळशी, भुइमुगाचें तेल, जवसाचें तेल, एरंडीचें तेल, व 'रेप तेल,' यांचा खप अधिक वाढेल व त्यापासून फायदा होईल असें वाटतें. असा हिशेब केला गेला आहे कीं आज सहा कोटी रुपयांचे हे जिन्नस खपतात त्याऐवजीं यापुढे ते साडेनऊ कोटि रुपयांचे खपतील.

### हिंदुस्थानाने द्यावयाच्या सवलती

यानंतर इंग्लंड व वसाहती यांच्या मालाला हिंदुस्थानाने ज्या सवलती द्यावयाच्या त्यांचा या रिपोर्टांत विचार केला आहे. प्रथम ही गोष्ट सांगितली आहे कीं, जे संरक्षित हिंदी धंदे आहेत त्या बाबतींत परदेशाला सवलती दिलेल्या नाहीत व यापुढेहि ज्या धंद्यांना संरक्षण द्यावें लागेल त्यांना हेंच तत्त्व लागू होईल.आज ज्यांना संरक्षण नाही पण पुढे मिळावयाचें आहे त्यांच्या बाबतींत एक वर्ष फुकट गेलें म्हणून कांही मोठें नुकसान होणार नाही. कारण सहा महिन्यांत करार बदलून घेतां येतो. आणि आयात मालावर जकात बसविण्याचा हक्कहि हिंदुस्थानसरकारास आहेच. शिवाय हा प्रश्न टॅरिफ बोर्डाकडे विचाराकरिता पाठविला आहे.

### गिऱ्हाइकांवरील नवा बोजा

इंग्लंडमधील मालाला सवलती दिल्याने हिंदुस्थानांतल्या गिऱ्हाइकावर प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष रीतीने जिनसांच्या महागाईमुळे किती बोजा पडेल हें आज सांगतां येत नाही. तथापि व्यापारी अनुभव असा आहे कीं, जो देश सवलतीचे जिन्नस पैदा करतो त्या देशाला त्या जिनसांचा आपला बाजार तुटूं नये म्हणून किंमती कमी कराव्या लागतातच. व या दृष्टीने जिन्नस पैदा करणाऱ्या देशावरच हा भार पडतो असें म्हटलें पाहिजे; विशेषतः कारखान्यांत उत्पन्न होणाऱ्या मालाच्या बाबतींत ही गोष्ट खरी आहे. कारण हल्ली कच्च्या मालाच्या किंमती पक्क्या मालाच्या किंमतींइतक्या किंवा त्या प्रमाणांत उतरल्या नाहीत. तथापि किंमती कशा चढतात व उतरतात, हा बोजा कोणावर पडतो हें पाहण्याची योजना केली आहे असें बहुमतवाल्यांच्या रिपोर्टांत म्हटलें आहे.

### नवीन कराचा प्रश्न

सवलती दिल्या कारणाने जकातीचें उत्पन्न कमी होईल व त्यामुळे नवे कर बसाविले जातील कीं काय असा प्रश्न आहे. परंतु या बाबतींत हा रिपोर्ट म्हणतो कीं, फडणिसांनी आम्हांला असें आश्वासन दिलें आहे की 'जकातीचें उत्पन्न कमी न होईल अशा दृष्टीनेच नवीन सवलती दिल्या जातील!'

### कमिटीची नेमणूक

शेवटीं या सवलतींमुळे ज्या क्रिया व प्रतिक्रिया उत्पन्न होतील त्या सरकाराने पाहाव्या. व शिवाय एक पंधरा सभासदांची कमिटी नेमून त्यांनीहि लक्ष ठेवावें असें रिपोर्टांत सुचविलें आहे. तीन वर्षांनंतर तपशीलवार रिपोर्टावरुन जर असेंब्लीला हा करा

बरोबर नाही असें वाटलें तर कराराच्या चौदाव्या कलमाप्रमाणे करार मोडण्याची नोटीस देतां येईल.

### वसाहती

वसाहतींच्या व्यापाराच्या बाबतींत तपशीलवार माहिती नाही असें रिपोर्टात म्हटलें आहे. तथापि इंग्लंडला वसाहतींकडून ज्या ज्या सवलती मिळतील त्या त्या हिंदुस्थानाला मिळाल्याशिवाय राहणार नाहीत असें म्हणून हिंदुस्थानांत वसाहतींकडून येणारा माल हा फळें, भाज्या वगैरेच्या स्वरूपाचा असल्याकारणानें त्याचा हिंदुस्थानास उपयोगच होईल असें म्हटलें आहे. व शेवटीं अगदी प्रारंभीं म्हटल्याप्रमाणे या सवलतींमुळे हिंदुस्थानाचाच फायदा होणार आहे व अनुभवाने तेच सत्य ठरेल असें म्हणून हा रिपोर्ट संपविला आहे. या रिपोर्टावर पुढील गृहस्थांच्या सह्या आहेतः—

(१) सर जोसेफ भोर, (२) सर हरिसिंग गौर (३) मि. यामिनखान (४) सर अलम पार्सन्स (५) श्री. रंगा अय्यर (६) मि. एच. पी. मोदी (७) मि. जेम्स (८) मि. डीक्षोझा (९) मि. अबदुल्ला हरून (१०) डॉ. झिया उद्दीन अहमद (११) सर झुलिपकारअली व (१२) मि. षण्मुखं चेट्टी.

### भिन्नमतपत्रिका

सर अबदुल रहीम, श्री. सीताराम राजू व दि. ब. हरविलास सारडा यांनी भिन्नमतपत्रिका स्वतंत्र लिहिली असून ओटावा येथील करारानें हिंदुस्थानाचें व्यापारी हित होईल असें आपल्यास वाटत नाहीं असें ते ठामपणे आपल्या भिन्न मतपत्रिकेंत म्हणतात.

### इंग्लंडचें हित

ते पुढे म्हणतात कीं बहुमतवाल्यांनी आपल्या रिपोर्टातच अशी कबुली दिली आहे कीं, हिंदुस्थानांतून बाहेर जाणाऱ्या मालावर इंग्लंड किती सवलती देणार हें त्यांनी तपासून पाहिलें आहे. परंतु हिंदुस्थानांत इंग्लंडहून येणाऱ्या मालावर हिंदुस्थानानें किती सवलती द्यावयाच्या याची भरपूर छाननी त्यांनी केली नाही. वास्तविक असेंब्लीनें ही कमिटी नेमली त्या वेळीं या दोनही दृष्टींनी या प्रश्नाची चिकित्सा व्हावी असें सांगितलें गेलें होतें. परंतु व्यापारी व अर्थशास्त्रज्ञ यांनी कराराची परीक्षा या दोनही दृष्टींनी करा असें सांगितलें असतांनासुद्धा तशी ती केली गेली नाही ही मोठी चूक झाली. इंग्लंडच्या आजच्या आर्थिक दुःस्थितींत हिंदुस्थानांत एक नवी बाजारपेठ निर्माण करून इंग्लंडला मदत करावी असा कॉन्झरव्हेटिव्ह पक्षाचा डाव होता. त्यालाच आपला देश बळी पडला! या करारानें हिंदुस्थानाचें हित किती होतें ही त्याची खरी परीक्षा आहे. पण त्यानें इंग्लंडचेंच हित साधल असें झालें आहे! हिंदुस्थानाच्या हिताबरोबरच इंग्लंडचें हित होत असल्यास काय हरकत आहे हा युक्तिवाद खोटा आहे.

### मनोराज्यांतील कल्पना

हा करार इतक्या व्यापक स्वरूपाचा आहे व त्यामुळे देशाच्या आर्थिक परिस्थितीवर एवढा परिणाम होणार आहे कीं, याचा अधिक विचार व्हावयास पाहिजे होता, व या बाबतींत व्यापारी, उद्योगधंदेवाले व शेतकीचे तज्ज्ञ यांच्या मतास मान देणें अवश्य होतें. पण तसें झालें नाही. बरें, सध्याच्या आर्थिक दुःस्थितींतून हिंदुस्थान सुटेल असेंहि बहुमतवाले म्हणत नाहीत. उलट बहुमतवाल्यांनी या प्रश्नाकडे मुळी लक्षच दिलें नाही. तीन वर्षांत अमुक अमुक फायदे मिळण्याचा संभव आहे असें मनोराज्य करून त्यांतील अमुक गोष्टी शक्य आहेत येवढ्यावरच त्यांनी वेळ मारून नेली आहे.

### शेतीचा विचारच नाही!

सर जॉर्ज शूस्टर यांनी असें म्हटलें होतें कीं हिंदुस्थानाचा निर्गत व्यापार आयात व्यापारापेक्षा अधिक असल्याशिवाय परदेशाचें देणें हिंदुस्थानाला देतां यावयाचें नाही. ही जर गोष्ट खरी तर ब्रिटिशांचा जो नवा व्यापार वाढेल त्याचा मोबदला म्हणून हिंदुस्थान कोणती अधिक निर्गत करणार? हिंदुस्थानातील शेतीचा माल यापुढे अधिक निपजेल ही कल्पना चुकीची आहे. शास्त्रीय पद्धतीची शेतकी झाल्याशिवाय शेतींतून अधिक पैदास होणें शक्य नाही व अशी शास्त्रीय शेती व्हावयास पुष्कळच वर्षे लागतील. म्हणूनच आम्ही म्हणतों कीं शेतीचा विचार बहुमतवाल्यांनी मुळीच केला नाही!

### मुख्य बाबींना फाटा

हिंदुस्थानांतून जो कच्चा माल परदेशीं जातो त्यापैकीं पुष्कळ जिनसांच्या बाबतींत हिंदुस्थानास कोणी प्रतिस्पर्धी नाही. तेव्हा त्यावर सवलती दिल्या असें म्हणणें व्यर्थ होय. याचा विचार केला गेला नाही. तसेच रुपया व स्टर्लिंग यांची सांखळी बांधली गेल्याकारणानें गेल्या अकरा महिन्यांत शंभर कोटी रुपयांचें सोनें परदेशीं रवाना झालें आहे. अशा परिस्थितींत सोन्याचें नाणें वापरणाऱ्या देशाच्या व्यापाराबाबत हिंदुस्थानाची क्रयशक्ति या करारानें अधिकच कमी होणार आहे. या गोष्टीचाहि बहुमतवाल्यांनी विचार केला नाही. निर्गत होणाऱ्या जिनसांपैकीं कांही जिन्नसांच्याबाबत ऑस्ट्रेलिया, कॅनडा यांच्याशीं आपल्याला टक्कर देणें फार कठिण आहे. रशियाची तर गोष्ट बोलावयासच नको. इंग्लंडने अमुक इतका गहू आपण

पंजाबांतून निश्चित घेतों असें वचन दिल्याशिवाय व रेल्वेचे दर त्या बाबतींत कमी केले गेल्याशिवाय या करारापासून पंजाबी शेतकऱ्यांचा कांही एक फायदा होणार नाही. हिंदुस्थान व ब्रह्मदेश यांत जितका तांदूळ होतो त्यापैकीं फक्त पांच टक्केच इंग्लंडमध्यें जातो म्हणून त्यावरील सवलतीचा उपयोग नाही. खोबरेल तेल, मसाल्याचे जिन्नस, इतर तेलें, कॉफी, तंबाखू, या जिनसांच्या निर्गतीसंबंधानें सर अबदुल रहीम यांनी विस्तृत विवेचन केलें आहे व त्यात हिंदुस्थानचा फायदा नाही असें ते म्हणतात. हिंदुस्थानांतून जितका भुईमूग बाहेर जातो त्यापैकीं फक्त सहा टक्केच इंग्लंड घेतें. नव्वद टक्के इतर देश घेतात. अशा परिस्थितींत नव्या सवलतीनें इंग्लंडमधील भुईमुगाची आयात फार तर आणखी सहा टक्के होईल यापेक्षां अधिक होणार नाही. मग या सवलतीचा फायदा काय! हीच स्थिति कमावलेल्या कातड्यांची आहे.

### ताग व चहा

तागासंबंधी सर अबदुल रहीम म्हणतात कीं, हिंदुस्थानाला आज तरी तागाचा मक्ताच आहे. व या बाबतींत खुद्द इंग्लंड हाच त्याची प्रतिस्पर्धी आहे. शिवाय इंग्लंडमध्ये फक्त पांच टक्केच ताग जातो. तेव्हा इंग्लंडमधील डंडी येथील व्यापाऱ्यांशीं टक्कर मारावयाची असल्यास हिंदुस्थानाला दुसऱ्या देशाकडेच पाहिलें पाहिजे व शिवाय तागाच्या जिनसांवरील निर्गत जकात बंद केली पाहिजे! चहाच्या बाबतींत सीलोन हिंदुस्थानाचा प्रतिस्पर्धी आहे असें सर अबदुल रहीम यांना वाटत नाही. शिवाय चहाची किंमत इंग्लंडमध्ये वाढेल या भीतीनें चहावर जकात बसविली जाणार नाही. या दृष्टीने त्यावरील सवलतीचाहि फायदा नाही. अशीच इतर जिनसांचीहि स्थिति आहे. म्हणून बहुमतवाल्यांच्या शिफारशींत अर्थ नाही.

### समारोप

सर अबदुल रहीम वगैरे शेवटीं म्हणतात कीं इंग्लंडमधून हिंदुस्थानांत येणाऱ्या मालाला ज्या सवलती दिल्या आहेत त्यांची पुन्हा छाननी करावी. बहुमतवाल्यांनी जीं संरक्षक बंधनें दिलीं आहेत तीं व्यवहारांत निरुपयोगी आहेत.शिवाय नवी राज्यघटना तयार होऊन हिंदुस्थान स्वायत्त होईपर्यंत या जकातींच्या सवलतींचा मुळीं विचारच करूं नये हें चांगलें कारण नवी राज्यघटना कशी होते हें कोणालाच माहित नाही!

### गौर व रंगा अय्यर

सर हरिसिंग गौर व रंगा अय्यर यांनी एक स्वतंत्र पत्रिका जोडली असून त्यांत ते म्हणतात कीं, आजच्या परिस्थितींत ओटावा करार मान्य तरी केला पाहिजे किंवा फेकून दिला पाहिजे. या दोन्ही गोष्टी बऱ्या नाहीत म्हणून आम्ही तात्पुरती ३ वर्षांची मान्यता देऊन त्यांच्या परिणामाचा अनुभव पाहावा असें ठरविलें. ज्या वसाहती हिन्दी लोकांना अत्यंत अपमानास्पद रीतीनें वागवितात त्यांना सवलती देणें चूक आहे हें खरें. पण आपणच जर सलोख्याची वृत्ति दाखविली तर त्याचा परिणाम होऊन वसाहती आपलें वर्तन सुधारतील असें वाटतें! याशिवाय श्री. रंगा अय्यर स्वतःच्या स्वतंत्र पत्रिकेंत 'आपण कमिटी नेमणार व कराराची मुदत ३ वर्षेच ठेवणार यांतच आपला विजय आहे' असें म्हणतात!

# महाराष्ट्र हिंदुधर्म परिषद

## अस्पृश्यतानिवारण व अलाहाबाद करार

### परिषदेची सुरुवात

सदरहू परिषदेचें सहावें अधिवेशन तारीख १० ११ शनिवार व रविवार रोजीं पुणें येथे टिळक मंदिरांत बॅ. जम्नादास मेथा यांचे अध्यक्षतेखाली भरलें. शुक्रवार ता. ९ रोजीं सायंकाळीं मुंबईहून **बॅ. जम्नादास मेथा** डेक्कन क्वीनने पुण्यास आले. स्टेशनवर त्यांचे स्वागतार्थ स्वागताध्यक्ष श्री. सिद्धेश्वरशास्त्री चित्राव, दा. वि. गोखले, शं. रा. दाते, वा. कृ. भावे प्रभृति सुमारें २५-३० मंडळी गेली होती. परिषदेच्या अधिवेशनाला शनिवारीं सायंकाळीं ४वाजता सुरुवात झाली.येथील गांधर्व महाविद्यालयाचे चालक श्री.विनायकबुवा पटवर्धन यांनी स्वागतपर पद्य म्हटलें व त्यानंतर श्री. सिद्धेश्वरशास्त्री चित्राव यांचें भाषण झालें. तें भाषण आजच्या अंकांत दुसरीकडे दिलेंच आहे. पहिल्या दिवशीं परिषदेला बाहेरगांवाहून आलेले प्रतिनिधि व स्वागत कमिटीचे सभासद मिळून २५०-३०० मंडळी हजर होती. पण दुसरे दिवशीं सनातन वैदिकधर्म परिषदेला आलेल्या शास्त्री-पंडितांनीहि सभेंत हजर राहून भाग घेतला. त्यामुळे एकंदर संख्या सातशेंपर्यंत गेली. परिषदेला हजर असलेल्या मंडळींमध्ये खालील गृहस्थ प्रामुख्याने दिसत होते. धर्मभास्कर

विनायकमहाराज मसूरकर, श्री. वामनराव पोतदार, श्री. दिवेकरशास्त्री, श्री. शंकरराव लवाटे, वैद्यपंचानन कवडेशास्त्री, श्री. नानासाहेब सप्तर्षि नगर, सी. ग. साठे सोलापूर,श्री.आप्पासाहेब मुळे उंबरगांव,श्री. हरि मोरेश्वर जोशी,श्री. ल. ब.भोपटकर, श्री.दा. वि. गोखले, श्री. बाबूराव जनार्दन गोखले, बॅ. आगरवाला, श्री. श्री. म. माटे, श्री. वा. कृ. भावे, श्री. पांडुआण्णा शिराळकर, श्री. रा. वि. पटवर्धन, पं. श्रीधरशास्त्री पाठक, श्री. राघवेंद्रराव, श्री. जावडेकर धुळें, श्री. ना. वि. भोंडे, श्री. आप्पासाहेब गद्रे, पं. सातवळेकर औंध, डॉ. ना. दा. सावरकर मुंबई, डॉ. फडके कल्याण, रा. य. रा. दाते, डॉ. पळसुले, कु. मैनाबाई शहाणे, सौ. दुर्गाबाई केळकर इ. स्वागतसभेचे अध्यक्ष श्री. सिद्धेश्वरशास्त्री चित्राव यांचें भाषण झाल्यावर या परिषदेचे चिटणीस श्री. रा. गो. भिडे यांनी आलेल्या अभिनंदनपर तारा व पत्रें वाचून दाखविलीं. **श्री.ल. ब. भोपटकर** यांनी बॅ. जम्नादास मेथा यांनी अध्यक्षस्थान स्वीकारावें अशी सूचना मांडली व तिला **श्री. नानासाहेब सप्तर्षि** यांनी अनुमोदन दिलें. अध्यक्षांना श्री. विनायक महाराज मसूरकर यांनीं पुष्पहार घातला.

**अध्यक्ष बॅ. जम्नादास मेहता यांचें भाषण**

धर्मपरिषदेचें अध्यक्षस्थान आपल्याला दिल्याबद्दल आश्चर्य व्यक्त करून व आभार मानून बॅ. मेहता इंग्रजींत म्हणाले,

"हिंदुधर्म याचा अर्थ व्यापक व उदार आहे; तो मानव धर्मच आहे. त्याच्या या महाराष्ट्रीय परिषदेपुढे महत्त्वाचे विषय दोन आहेत.एक अस्पृश्यतानिवारण व दुसरा अलाहाबादेचा करार. हिंदुस्थानाच्या भावी राज्यघटनेत हिंदु समाजाला कोणतें स्थान मिळणार याचा विचार करणें अवश्य आहे. तो विचार करण्यासाठी नव्या सुधारणा कोणत्या येणार आहेत याची कल्पना बांधली पाहिजे. नव्या सुधारणांचा खल गोलमेज परिषदेंत जोरानें चालू आहे. पण त्याची फलश्रुति म्हणून हिंदुस्थानाचें पाऊल स्वातंत्र्याच्या मार्गावर पुढे पडेल असें भाकीत करणारा माणूस धाडशीच म्हटला पाहिजे. सायमन कमिशनपासून भारतमंत्र्यांच्या परवाच्या भाषणापर्यंत गेलीं पांच वर्षें ज्या ज्या गोष्टी घडून आल्या, त्या सर्व वरील भाकिताला मारकच आहेत,पोषक नाहीत. इंग्रज लोक आपला जुनापुराणाच डाव खेळत आहेत. राजकीय, आर्थिक,लष्करी–सर्व तऱ्हची सत्ता आपल्या मुठींत ठेवावयाची आणि तिचें दान हिंदुस्थानाला आम्ही करणार आहों असा पुकारा करावयाचा असा तो डाव आहे. लाडू गट्ट करावयाचा आणि तो शिल्लकहि ठेवतों म्हणावयाचें असा हा कावा आहे. संरक्षक बंधनें खरीं असतील तर स्वराज्य खोटें ठरेल व हिंदी प्रजा असंतुष्ट राहील. उलट स्वराज्य खरें असेल तर 'संरक्षक बंधनें' खोटीं ठरतील व इंग्रज जनता नाराज होईल.तात्पर्य, परिषदेचा डोंगर पोखरून भल्या मोठ्या भोपळ्याशिवाय कांहीहि हातीं लागणार नाही हें खास !

**या स्वराज्यांत काय राम ?**

"माझें मत असें कीं,जात,पात व धर्म यांच्या पायावर उभारलेली कोणतीहि लोकशाही कायम टिकणार नाही. पण मॅक्डोनाल्ड यांच्या जातिनिर्णयांत मोठी गोम आहे ती हीच. आणि म्हणून तो कुचकामाचा झाला आहे. राज्ययंत्राच्या खंबीरीसाठी व जनतेच्या सुखासाठी सर्वांना गोवणारें असें नागरिकत्वाचें एकच सूत्र असावयास हवें. म्हणून आपल्या ऐक्यघटनेचा पाया सर्वसामान्य असें राष्ट्रीयत्व हा असला पाहिजे, ज्ञातिनिष्ठेचें वाळवंट हा नव्हे. या कसोटीला लावून पाहिलें तर अलाहाबादेचा करार हा सरकारी जातिनिर्णयापेक्षा कमी भयंकर नाही. त्या कराराच्या निर्मितीसाठी पं. मालवीयजीप्रभृति राष्ट्रनेत्यांनी भगीरथ प्रयत्न केले याची मला पक्की जाणीव आहे. पण ते सर्व ऐक्याच्या दृष्टीने व्यर्थ गेले असें म्हटल्यावांचून राहवत नाही. राष्ट्रीयत्वाचा प्रवाह त्या दिशेने कधीच वाहत नाही.एकराष्ट्रीयत्वाची भावना हाच त्याचा उगम आहे.आपला धर्म कोणताहि असो आणि आपली जात कोणतीहि असो, आपण एकाच राज्ययंत्रांत सांपडलों आहों,एकाच तऱ्हेच्या कायद्यांचा ( वटहुकुमांचाहि ! ) वरदहस्त आपल्या मस्तकावर आहे आणि करांच्या एकाच जात्यांत आपण भरडून निघत आहों. आपले हितसंबंध एक; आपलें राष्ट्र एक ! रूढि, धर्म, संस्कृति यांत भिन्नता असेल, तर त्यांचें संरक्षण होईल–मग तो समाज अल्पसंख्य असो वा बहुसंख्य असो. पण दुर्दैव असें कीं, लॉर्ड मिंटोच्या काळापासून आपल्या राजकारणांत जातिनिष्ठेचें विष भिनत भिनत चाललें आहे आणि त्यामुळे राष्ट्रीयत्व क्षीण क्षीण होत आहे. मॅक्डोनाल्ड यांच्या निर्णयावर सर्वांनी आग पाखडली. पण आता राष्ट्रैक्याच्या नांवाखाली त्याच निर्णयाचा स्वीकार केला जात आहे. कसा तो पाहा—

अलाहाबादेच्या कराराचें पहिलें कलम असें आहे कीं, मध्यवर्ती सरकार लोकांना पूर्ण जबाबदार असावें आणि त्याला स्वराज्याचे सर्व अधिकार असावे. पण लगेच या मागणीला अशी मुरड घातली आहे कीं, कांहीं 'संरक्षक बंधनें' घातलीं तरी चालतील. पण या बंधनांच्या सांपळ्यांत तुम्ही एकदा सांपडलां कीं स्वराज्याचें नांव नको ! खजिन्यावर सत्ता नाही, लष्करावर हुकमत नाही आणि परराष्ट्रसंबंधांवर ताबा नाही.

त्या सरकाराचा अधिकार शून्यप्रायच नव्हे काय ? परराष्ट्रसंबंध हे तर महत्त्वाचे अधिकार आहेत. पण ते लंडनमध्येच नव्हे तर अलाहाबादेमध्येहि सोडून देण्यांत आले. अशा स्वराज्यांत काय राम राहणार ?

२,५, १३ व १४ हीं कलमें मान्य करण्यासारखीं आहेत.

पण शेवटचें कलम पाहा. त्यांत म्हटलें आहे कीं, सर्व करार हा अविभाज्य असून त्यांतील एक कलम दुसऱ्यावर अवलंबून आहे.असें जर आहे तर पुढील आठवड्यांत सर्वपक्षीय परिषद बोलावली तरी कशाला ? हें धोरण त्याज्य आहे. त्यांत दुःखाची गोष्ट ही कीं, अलाहाबादेचा करार म्हणजे प्रधानांच्या जातिनिर्णयाची सुधारलेली आवृत्तिच होय.

## हिंदूंना दोन, मुसलमानांना एक

३ रें कलम ठीक आहे. पण लष्कराचा ताबा मिळाल्याशिवाय त्याचा काय उपयोग ? आणि त्याची आशा भारतमंत्र्यांनी परवा समूळ खणून काढलीच आहे! ६वें कलम शेषाधिकाराचें.पण तें अगदी मोघम आहे.खऱ्या अडचणींना बगलच दिली आहे.मुख्य मुद्दा हा आहे कीं, सर्व शेषाधिकार मध्यवर्ती सत्तेच्या हातीं दिले पाहिजेत व तिचे निर्णय हेच अंतिम स्वरूपाचे मानले पाहिजेत. ७ व्या कलमानें मध्यवर्ती कायदेमंडळांतील जागांची वांटणी केली आहे. त्यांत हिंदु समाजाची हानि झाली आहे. जातवार प्रतिनिधित्वाची जुनी योजनाच त्यांत मांडली आहे. हा लोकशाहीवर " मूले कुठारः " आहे. मी त्याला कसून विरोध करतों. बरें, जातींना प्रतिनिधित्व द्यावयाचेंच तर तें लोकसंख्येच्या प्रमाणानुसार द्यावयास हवें. तसें केलें असतें तर मध्यवर्ती कायदेमंडळांत मुसलमानांना शें. २५ जागा मिळाल्या असत्या.पण करारानें शें.३२ जागा बहाल केल्या आहेत ! एवढ्यानेंच संपलें नाही. मुसलमानांचे हिंदूंशीं लोकसंख्येचें प्रमाण १:३ असें आहे पण हिंदूंना २ जागा मिळाल्या कीं मुसलमानांना १ जागा मिळणार आणि तीहि यावच्चंद्रदिवाकरौ !! खरोखर, अलाहाबाद कराराचे कर्ते हे जातिनिष्ठेच्या भुताला बेभान अवस्थेंत बळी पडले असेंच म्हटलें पाहिजे !!!

कलमें १०, ११ व १२ हीं पंजाब, बंगाल व सिंध यासंबंधी आहेत. त्यांत कालमर्यादा न घालतां मुसलमानांना घटनाबद्ध बहुमत देण्यांत आलें आहे ! १० वर्षांची मुदत एके ठिकाणीं घातली आहे, पण ती दुसऱ्या विधानानें उडवून लावली आहे. १० वर्षांनंतर पुनः विचार करण्यांत येणार आहे म्हणे ! वरील तीन प्रांतांशिवाय इतर प्रांतांत मुसलमानांना 'भरतीच्या जागा' देण्याची तरतूद ९ व्या कलमानें केली आहे. मॉंटफर्ड सुधारणा व लखनौ करार यांत अशीच तरतूद होती. बहुसंख्य हिंदूंना अल्पसंख्य बनविण्याच्या या योजनेचें आयुर्मान १० वर्षांनीं वाढलें आहे आणि नंतरहि पुनः विचार हा आहेच ! जातवार प्रतिनिधित्वावर सर्वत्रच नांगर कां नाहीं फिरविला ? मंत्रिमंडळाच्या रचनेंतहि जातवारीची पिंपळमुळी लावलेली आहेच. त्यासाठीं ४ थें कलम घातलें आहे. बारा वर्षांच्या कटु अनुभवानेंहि या पद्धतीबद्दल आमचे डोळे उघडू नयेत काय ?

## मालवीय व मॅक्डोनाल्ड

आता आपण जातवार मतदारसंघाच्या कुंद हवेंतून संयुक्त मतदारसंघाच्या प्रसन्न हवेंत शिरत आहों. अशा वेळीं थकल्याभागल्या जीवाला नवचैतन्य देण्यासकोणती वृक्षराजी स्मितवदनानें बोलावीत आहे हें पाहूं.अलाहाबाद करारांतील ८व्या कलमान्वयें दहा वर्षेंपर्यंत ना स्वतंत्र ना संयुक्त मतदारसंघ अशी स्थिति राहणार आहे.कराराच्या १४ व्या कलमामध्ये अराष्ट्रीय, लोकसत्तेला विरोधी अशीं कित्येक बंधनें घालूनहि निर्भेळ संयुक्त मतदार-संघ स्थापला जाईल म्हणावें तर तसेंहि नाही. या करारामुळे असें मात्र होणार आहे कीं, ३० टक्के अल्पसंख्याकांच्या हातांत अशी सत्ता येणार आहे कीं, त्यांनी ७० टक्के बहुसंख्याकांचें मत खुशाल लाथाडावें ! अशा दृष्टीनें विचार करता पंडित मालवीयजींच्या संयुक्त मतदारसंघापेक्षा मि. मॅक्डोनाल्ड यांचा स्वतंत्र मतदारसंघच बरा नव्हे का असें उघडपणें विचारण्याची वेळ आली आहे. इतर बाबतींतहि अलाहाबादचा करार आहे या स्वरूपांतच कायम राहावयाचा असेल तर दहा वर्षांनंतरहि संयुक्त मतदारसंघाचा पोकळ फुगाच आपल्या हातीं पडणार असें मला वाटतें. श्री. विजयराघवाचार्य करार झाल्याबद्दल हर्षातिरेकानें नाचले, तर दुसऱ्या कित्येकांनी आनंदाश्रू ढाळले ! परंतु माझी मात्र पूर्ण विचारांतीं निराशाच झाली. बिनशर्त संयुक्त मतदारसंघ स्थापन झाला पाहिजे व प्रत्येक वयांत आलेल्या स्त्रीपुरुषाला मतदानाचा हक्क असला पाहिजे या मताचा मी अव्वलपासून पुरस्कर्ता आहें. याशिवाय खरी लोकसत्ता प्रादुर्भूत होणेंच अशक्य आहे आणि मंत्रिमंडळें, कायदेमंडळें व एकंदर सार्वजनिक जीवितहि वैयक्तिक व ज्ञातिविषयक स्वार्थानें दूषित झाल्याशिवाय राहणार नाही.

कित्येकजण असा आक्षेप घेतील कीं, लोकशाहीचें तात्त्विक दृष्ट्या उदात्त चित्र रंगाविणें मोठें सुलभ आहे; परंतु प्रत्यक्ष कार्यकर्त्यांना या कल्पनारम्य ध्येयावरच दृष्टि खिळवून राष्ट्रीय ऐक्यासारख्या व्यावहारिक गोष्टीकडे दुर्लक्ष करून चालणार नाही. एकदा कार्याला प्रारंभ झाला म्हणजे हळूहळू सर्व

कांहीं जमत जातें. म्हणून सदिच्छेनें व सहकार्यानें अलाहाबादचा करार पाळणें हेंच सद्यःस्थितींत क्रमप्राप्त ठरतें. परंतु गेल्या २२ वर्षांचा अनुभव या आशावादाच्या विरुद्ध साक्ष देत आहे. १९०९ सालीं कायदेमंडळांतून जातवार प्रतिनिधित्वानें मूळ धरल्यापासून प्रतिवर्षी आपण एकमेकांपासून अलग होत आहों. अशी वस्तुस्थिति असता आताच एखादा चमत्कार घडून येईल असें समजण्यांत कांहीच तथ्य नाहीं. विभक्त मतदार-संघाच्या द्वारा आपण राष्ट्रीय ऐक्य साधण्याचा कां प्रयत्न करावा हेंच मला कळत नाहीं. सहकार्याविषयीं म्हणाल तर जोंपर्यंत एखाद्या माणसाच्या मनाला आपल्याला अन्याय झाला आहे हें शल्य बोचत आहे तोंपर्यंत तो मनुष्य दुसऱ्याशीं सहकार कसा करणार ? ऐक्याचा देखावा दाखविला कीं, राज्यकर्त्यांपासून आपण सत्ता हस्तगत करून घेऊं ही कल्पना भोळी आहे. अशा देखाव्यानें ब्रिटिश लोक थोडेच बधणार ? १९२१ सालीं आपण असा प्रयत्न केला व त्या वेळीं आपल्याच डोक्यांत धोंडा पडला. पुनः त्याच फोल आशांच्या जाळ्यांत अडकण्यापासून काय फायदा? त्याच गोष्टीची पुनरावृत्ति करण्यांत काय होईल? या सर्व अनिष्ट गोष्टींवर उपाय म्हणजे माझ्या मतें लोकशाहीचा सरळ मार्ग चोखाळणें हाच होय. राज्यघटनेंत मामुली हक्क मिळण्यास नागरिकत्व हेंच मुख्य लक्षण ठेवण्यांत यावें व सर्व नागरिकांना समान हक्क असले पाहिजेत. १९१६ सालीं झालेल्या लखनौ—कराराला आपण चिकटून राहिलों तरी पुष्कळ झालें. त्याच्यापुढे प्रगति करतां आली नाहीं तरी परागति न करणें श्रेयस्कर होय. अलाहाबाद—करारांत मला तरी राष्ट्रीय ऐक्याचें बीज दिसत नाहीं. राष्ट्रीय हिंदु, लोकशाहीचा भोक्ता व मजुरांचा कार्यकर्ता या सर्व दृष्टींनी अलाहाबाद कराराला माझी अमान्यता आहे व आपणहि तो करार स्वीकारूं नये अशी माझी विनंति आहे.

### गांधीजींचें उपोषण

आजकाल सार्वजनिक कारभारांत महात्मा गांधींचा शब्द म्हणजे धर्म मानला जात आहे. ही स्थिति विशेषतः परतंत्र राष्ट्रांत तरी स्पृहणीय नाहीं. एकाच माणसानें सर्वांकरितां विचार करणें व तो विचार दुसऱ्यावर लादण्याचा प्रयत्न करणें हें अत्यंत अनिष्ट होय. महात्मा गांधी हेच आज सर्व सार्वजनिक प्रश्न एकटे सोडवीत आहेत. आणि सर्वांत वाईट असें कीं, प्रत्येक बाबतींत मला 'ईश्वरी प्रेरणा' होते असें ते सांगत आहेत! एवढ्यावरच ते थांबत नाहींत तर विशिष्ट गोष्ट सिद्ध होण्यासाठीं ते प्राणान्तिक उपोषणाचें दिव्यहि अंगीकारीत आहेत. याचा साहजिकच परिणाम म्हणजे सारासार विचाराला त्यामुळे गवसणी बसणार आहे. महात्माजींची ही विचारवंतांवर जबरदस्तीच होत आहे. महात्मा गांधींच्या या सर्व अद्भुत मार्गांचें पहिलें फळ म्हणजे येरवड्याचा करार हा होय.मुत्सद्देगिरीचा नमुना म्हणून तो ओळखला जात आहे. परंतु तर्काच्या कसावर त्याला घासला तर प्राणान्तिक उपोषणानें जे दोष निघून जावे अशी गांधींची इच्छा त्यांपैकीं कांहीं दोष त्यांमध्ये मोठ्या प्रमाणांत दिसून येतात. हिंदु समाजांतील अस्पृश्यता निघून जावी म्हणून नव्हे तर मि. मॅक्डोनाल्ड यांचा अस्पृश्यविषयक जातिनिर्णय बदलावा म्हणून गांधींनी उपोषण सुरू केलें. उपोषण सुरू होताच मॅक्डोनाल्ड यांच्या जातिनिर्णयांतील गुणावगुणांचा विचार बाजूस पडून महात्माजींचे प्राण कसे वांचतील हीच चिंता सर्वांना पडली. त्यामुळे साहजिकच डॉ. आंबेडकर यांच्या मुठींत सर्व परिस्थिति गेली व शेवटीं त्यांना अधिक हिस्सा द्यावा लागला.

### प्रतिक्रियेला सुरुवात

अस्पृश्यतानिवारणाचा प्रश्न घेतला तर त्याला प्रायोपवेशनासारखें खडतर व्रत आचरावयास पाहिजे अशांतला मुळीच भाग नाहीं. उलट त्याच्या अभावींच हें कार्य सुलभपणें होणार आहे. सनातनी हिंदु अस्पृश्यतानिवारणाच्या विरुद्ध असले तरी त्यांचीहि या बाबतींत दिवसानुदिवस अधिक अनुकूलता दिसून येत आहे. मात्र जेव्हा तेव्हा प्रायोपवेशनाची टांगती तलवार हिंदु समाजाच्या डोक्यावर धरणें फायद्याचें नाहीं. अखिल भारतीय अस्पृश्यतानिवारणसंघानें हें काम मामुली पद्धतीनें व शिस्तवार चालवावें. असें न होता गांधींनी प्रायोपवेशनाचा मार्ग स्वीकारला तर मात्र प्रतिक्रिया सुरू झाल्याशिवाय राहणार नाहीं. अस्पृश्यतानिवारण हें कांहीं अंतिम साध्य नाहीं.अस्पृश्यांना नागरिकत्वाचे समान हक्क मिळणें,त्यांच्या शैक्षणिक गैरसोई दूर होणें,त्यांची आर्थिक दुःस्थिति सुधारणें याच गोष्टी महत्त्वाच्या आहेत. गुरुवायूर—मंदिरासारखें मंदिर अस्पृश्यांना खुलें करण्यासाठीं सार्वत्रिक मतें घेण्यापासून विशेष कांहीं साधेल असें दिसत नाहीं. अस्पृश्यांची सर्वांगीण उन्नति व्हावी ही सर्वांचीच इच्छा आहे व तसे प्रयत्नहि चालू आहेत. परंतु त्यासाठीं प्रायोपवेशनाचा हा मार्ग हितकर नसून त्यामुळे झाली तर कार्यहानिच होणार आहे."

अध्यक्षांच्या भाषणानंतर परिषदेचें त्या दिवसाचें काम संपलें. रात्रीं ९ ते १२ पर्यंत विषयनियामक कमिटीची बैठक होऊन अस्पृश्यतानिवारणासंबंधीचा ५ कलमी ठराव मंजूर करण्यांत आला.

दुसरे दिवशीं परिषदेच्या कामाला सकाळीं ८॥ वाजता सुरुवात झाली व श्री. ल. ब. भोपटकर यांनी पहिला ठराव मांडला. तो असा,–

### अस्पृश्यतानिवारण

**म. गांधी** यांनी अस्पृश्यतानिवारणाच्या बाबतींत आतापर्यंत जे कळकळीचे परिश्रम केले आहेत त्यांबद्दल ही परिषद त्यांचे मनःपूर्वक आभार मानते व असा ठराव करते कीं,

(१) अस्पृश्यतानिवारणाचे बाबतींत कळकळ वाटणाऱ्या सर्व कार्यकर्त्यांनी भूतकाळाची विचक्षणा करीत बसण्यापेक्षा, वर्तमान कालीं हा प्रश्न कसा सोडवितां येईल या विषयींचा प्रयत्न करावा. विशेषतः हिंदु समाजापैकीं कोणत्याहि घटक समाजाच्या मनोभावना दुखविल्या जातील अशा प्रकारें शक्य तों त्यांनी बोलूं व लिहूं नये. सध्या प्रचलित असलेली अस्पृश्यतेची पद्धति ही मानवी समतेच्या व सामाजिक न्यायाच्या विरुद्ध आहे म्हणून शक्य तितक्या लवकर अस्पृश्यतेचे उच्चाटन करण्यांत यावें.

(२) अस्पृश्यतानिवारणाचा प्रश्न मुख्यतः मानव्याचा व सामाजिक न्यायाचा असल्यामुळे तो सहभोजन, मिश्रविवाह वगैरे सामाजिक सुधारणांच्या बाबीपासून स्पष्टपणें अलग ठेवण्यांत यावा.

(३) सभा, शिक्षणसंस्था वगैरे सार्वजनिक ठिकाणीं अस्पृश्यांचे समसमान हक्क असल्याबद्दल स्पृश्य वर्गांमध्ये जी वाढती जागृति दिसत आहे तिजबद्दल या परिषदेस पूर्ण जाणीव आहे. व त्यांनी सार्वजनिक धर्मशाळा व पाणवठे वगैरे अस्पृश्य वर्गांना खुले करण्याच्या बाबतींतहि अशीच जाणीव व्यक्त करावी अशी विनंति ही परिषद स्पृश्य वर्गांना करीत आहे.

(४) (अ) अस्पृश्य वर्ग हा सनातन हिंदुधर्माचा अनुयायी असून तो हिंदुधर्मांतील देवतांचाच उपासक आहे. म्हणून धर्मशास्त्र, उपासनाशास्त्र, आजचा व्यवहार व सामाजिक परिस्थिति यांचा विचार करता हिंदूंच्या सार्वजनिक देवाळयांमध्यें अस्पृश्यांचा दर्शनार्थ प्रवेश व्हावा असें या परिषदेचें मत आहे.

(ब) स्पृश्य हिंदूंच्या वैयक्तिक मालकीचीं आणि पंचायतीचीं जीं देवालयें असतील तीं त्यांनी या अस्पृश्य वर्गास दर्शनार्थ खुलीं करावीं व कीर्तन, पुराण, प्रवचन यांच्या श्रवणाचा लाभ त्यांना जेणेंकरून घडेल अशी व्यवस्था करावी अशी या सभेची आग्रहाची सूचना आहे.

(क) मंदिरप्रवेश अस्पृश्यांना करूं देण्यास असलेला विरोध दूर करण्यासाठी अस्पृश्यतानिवारणाचें कार्य करणाऱ्या लोकांना ही परिषद अशी विनंति करते कीं अस्पृश्यांनी मृतमांस व गोमांस भक्षण करूं नये अशाविषयी अस्पृश्य वर्गांमध्ये त्यांनी प्रचार करावा.

### श्री. भोपटकर यांचें भाषण

वरील ठरावावर भाषण करतांना श्री. भोपटकर म्हणाले, "ठराव सर्वसामान्य स्वरूपाचा आहे. कोणाच्याहि मनोभावना दुखवल्या जाऊं नयेत अशी शब्दयोजना व अर्थयोजना करण्यांत आली आहे. अस्पृश्यतेचें समर्थन सामाजिक व धार्मिक दृष्ट्या करतां येईल असे वाटत नाही. भूतकालाची विचक्षणा न करतां वर्तमानकालीं काय करतां येईल याचा विचार व्हावा. अस्पृश्यता हा हिंदुधर्मावर कलंक आहे अगर देवळांत सरसहा सर्वच वर्गांतील लोकांना थेट मूर्तीपर्यंत जाण्याचा जन्मसिद्ध हक्क आहे अशी भाषा वापरण्यापेक्षा, अस्पृश्यतानिवारणाचा प्रश्न कसा सोडवतां येईल त्याकडे लक्ष द्यावें. हा प्रश्न खेळीमेळीने सोडवावयाचा आहे. मनुष्य अमक्याच्या पोटीं जन्माला आला म्हणून तो मरेपर्यंत अस्पृश्य हें तत्त्व पूर्वीच्या सामाजिक दृष्टीने युक्त असेल. पण सध्याच्या सामाजिक समतेच्या व मानव्याच्या दृष्टीने एखाद्याला अस्पृश्य मानणें केव्हाहि युक्त होणार नाही. सर्व माणसें हीं परमेश्वराचीं लेकरें आहेत असें कबूल केल्यानंतर अस्पृश्यतेची मूलभूत कल्पना हिंदुधर्मांत आहे हें म्हणणे युक्त नाही. सहभोजन, मिश्रविवाह व अस्पृश्यतानिवारण यांची गल्लत करण्यांत येते. पण अशी गल्लत करणें चुकीचें आहे. सार्वजनिक रस्ते, धर्मशाळा व पाणवठे खुले करण्यांत यावे अशीच आग्रहाची विनंति ह्या ठरावाने करण्यांत येत आहे. प्रत्येक मनुष्य आपल्या घरीं दरवाजाच्या आंत आपल्या घरचा मालक आहे. सध्या मानले जाणारे अस्पृश्य हे हिंदुधर्मांतील देवतांचे उपासक आहेत. धर्मशास्त्रांत अस्पृश्यता नाही, वैदिक धर्मामध्ये अस्पृश्यताच नाही ही गोष्ट आमचे सनातनी वैदिक धर्मबंधु विसरतात. सर्व लोकांच्या पैशाने जीं देवालयें बांधलीं जातात त्या देवळांत फक्त 'दर्शनार्थ' प्रवेश व्हावा अशी सौम्य मागणी या ठरावाने करण्यांत आली आहे. या आपल्या हिंदु बांधवांना देवाचें दर्शनच होऊं नये असें प्रामाणिकपणें आपणाला म्हणतां येणार नाही."

या ठरावाला **श्री. नानासाहेब सप्तर्षि** यांनी अनुमोदन दिलें. ते म्हणाले "ज्या देवालयांत ख्रिश्चन व मुसलमान यांना आपण येऊं देतों त्या देवालयांत अस्पृश्यांना येऊं न देणें हें मानवधर्माला धरून आहे काय याचा विचार होणें जरूर आहे. अस्पृश्यांनी देवाचें दर्शन घेतलें म्हणून देवाचें 'देवपण' नष्ट

होतें कीं काय याचा आपण विचार करा. परवाच रा. ब. श्रीनिवासन यांनी अस्पृश्यता नष्ट न होईल तर अस्पृश्यांना मुसलमानी धर्म स्वीकारावा लागेल असें सांगितलें. असें झालें तर हिंदु समाज निर्बल होईल ह्याचा विचार आपण करावा. अस्पृश्यांमध्ये मृतमांस, गोमांस खाण्याचा प्रघात आहे तोंपर्यंत त्यांना मंदिर–प्रवेश मिळूं नये असें म्हणणें म्हणजे सर सॅम्युएल होअर यांनी हिंदी लोक स्वराज्याला पात्र होईपर्यंत स्वराज्य देऊं नये असें म्हणण्यासारखें आहे."

### श्री. लवाटे यांची उपसूचना

यानंतर **श्री. शंकरराव लवाटे** यांनी मंदिर-प्रवेशाचा प्रश्न शास्त्री–मंडळींच्या कमिटीकडे सोंपवावा अशी उपसूचना मांडली व मूळ ठरावाला विरोध केला. ते म्हणाले "हिंदुधर्माच्या दृष्टीनें अस्पृश्यता पाळणें अत्यंत जरूर आहे. जातिभेद व मिश्रविवाह यांचा मंदिर–प्रवेशाशीं कांहीं संबंध नाहीं असें सांगणें ही धूळफेंक आहे. सहभोजन ही अस्पृश्यतानिवारणाची दुसरी पायरी असें म. गांधीप्रभृति लोक आचरणानें दाखवीत आहेत." वैद्यपंचानन कवडेशास्त्री व गोविंदराव जोशी यांनी श्री. लवाटे यांच्या सूचनेला अनुमोदन दिलें.

### श्री. श्रीधरशास्त्री पाठक यांचा पाठिंबा

**श्री. श्रीधरशास्त्री पाठक** यांनी शास्त्रीय दृष्ट्या अस्पृश्यतेला आधार नाहीं हें विशद करून दाखविलें. ते म्हणाले 'चांडालं पतितं शवं स्पृष्ट्वा सचैलं स्नानमाचरेत्' असें वचन आहे. पण आपण राजभोज, सकट यांना 'चांडाल' म्हणणार काय हा प्रश्न आहे. ब्राह्मण स्त्री व शूद्र पुरुष यांपासून झालेली संतति ती चांडाल संतति असें शास्त्र सांगतें. चांडाल हा गुणवाचक शब्द आहे. 'चांडाळ जाति' असा उल्लेख वेदांत सांपडत नाहीं."

ठरावावर सकाळीं ४॥ तास व सायंकाळीं सुमारें ३ तास चर्चा होऊन सुमारें २० वक्त्यांचीं भाषणें झालीं. श्री. दिवेकरशास्त्री, श्री. म. माटे, डॉ. सावरकर इत्यादिकांचीं अनुकूल भाषणें झालीं व गंडाळेशास्त्री, गाडगीळशास्त्री, झांजले, चंद्रात्रेय, सिद्धेश्वर बळवंत अभ्यंकर इ. लोकांचीं प्रतिकूल भाषणें झालीं.

### श्री. भोपटकरांचा ठराव मंजूर

सभेंत सनातनी पक्षाचे प्रतिनिधि पुष्कळ जमले होते. आणि ठराव व उपसूचना वादग्रस्त स्वरूपाची असल्यामुळे बरीच अस्थिरता उत्पन्न झाली होती. मत–मोजणीपर्यंत पाळी आल्यास बराच गोंधळ माजेल अशीं चिन्हें दिसूं लागलीं व तसा तो माजलाहि. अध्यक्षांनी अर्धा तासपर्यंत परिषद बरखास्त केली व शेवटीं मंदिराचे आंतले भागांत दोनहि पक्षांचे दोन प्रतिनिधि नेमून मतें नोंदण्याची व्यवस्था करण्यांत आली. तरीदेखील पक्षोपपक्षांच्या अभिनिवेशानें सर्व मंडप दणाणून गेला होता. दिवे गेले, खुर्च्यांची इकडे तिकडे फेंकाफेक झाली व एका मनुष्यानें दांडगाईनें अध्यक्षांच्या डोक्यावरील विजेचा ग्लोबहि फोडला व जमलेल्या शिष्ट सभ्य लोकांचे अंगावर कांचा पडल्या! मतें मोजण्याला तासभर वेळ लागला. शेवटीं श्री. लवाटे यांची उपसूचना २७९ विरुद्ध ३३५ मतांनी फेटाळण्यांत आली. व त्यानंतर श्री. भोपटकर यांचा ठराव २३३ विरुद्ध १२६ मतांनीं मंजूर झाला.

यानंतर कै. **राजे लक्ष्मणराव भोसले**, समाज-भूषण **बाबुराव फुले, रा. ब. महाजनी** व **वि. गं. केतकर** यांच्या अकालीं निधनाबद्दलचा दुःखप्रदर्शनाचा ठराव उभे राहून मंजूर करण्यांत आला. तसेच गांधींच्या प्रायोपवेशनाच्या मार्गासंबंधानें खालील ठराव मंजूर करण्यांत आला.

"कोणताहि धार्मिक, सामाजिक, राजकीय किंवा इतर स्वरूपाचा प्रश्न सोडविण्याच्या कामीं प्राणांतिक उपवासासारख्या जबरीच्या मार्गाचा अवलंब करणें हें युक्त नाहीं असें या परिषदेचें मत आहे; व म. गांधी, श्री. केल्लपन किंवा दुसऱ्या कोणाहि यापुढे कोणत्याहि प्रश्नासंबंधानें असलें प्रायोपवेशन करूं नये अशी या परिषदेची आग्रहाची विनंति आहे."

### अलाहाबादेचा कराराला मान्यता

यानंतर अलाहाबादेस होणाऱ्या सर्वपक्षीय परिषदेपुढे जो हिंदु–मुसलमानांच्या तडजोडीचा 'अलाहाबाद करार' येणार आहे त्यासंबंधानें चर्चा सुरू झाली. त्या कराराला प्रथम खो देण्याचा प्रयत्न बॅ. अग्रवाल यांनी केला. त्यांनी करारांतील १५ व्या कलमाप्रमाणें ठरावांतील कोणत्याहि कलमांत फेरफार करण्यांत येणार नसेल व सर्वच कलमांचा परस्पर-संबंध असेल तर हा करार अमान्य व्हावा अशा अर्थाचा ठराव मांडला. या ठरावावर भाषण करतांना त्यांनी 'अलाहाबाद करारानें मुसलमानांच्या १३ मागण्या दिल्या आहेत व हिंदूंचें सर्वस्वी नुकसान झालें आहे. सबब तो करार मान्य नाहीं' असें सांगितलें. बॅ. अग्रवाल यांच्या ठरावाला डॉ. पळसुले यांनी अनुमोदन दिलें. पण एकदा हा ठराव मंजूर झाला तर करारच फेटाळला जाणार हें जाणून, **श्री. ओतूरकर** यांनी 'सर्व पक्षांनी या कराराला मान्यता दिली तर हिंदु पुढाऱ्यांनीहि हा करार मान्य करावा अशी उपसूचना मांडली. व करार सदोष असला तरी ऐक्याच्या दृष्टीनें तो मान्य करणें किती जरूरीचें आहे हें सांगितलें. या उपसूचनेला **श्री. शं. न. आमाशे** यांनी अनुमोदन दिलें

व मॅक्डोनाल्डच्या निकालापेक्षा अलाहाबाद कराराने पंजाब, सिन्ध व बंगाल यांमध्ये हिंदूंना किती जास्त जागा मिळणार आहेत हें आंकडेवार सिद्ध केलें. त्याचप्रमाणे सिंध, बंगाल व पंजाब प्रांतांतील हिंदु-मुसलमानांनी आपल्या प्रांतांपुरता कायदेमंडळांतील जागांचा प्रश्न सोडवला असल्याकारणानें व प्रांतिक स्वायत्तता प्रत्येक प्रांतांतील लोकांना असावी हें तत्त्व मान्य करण्यांत आल्याकारणानें हा प्रश्न, हिंदु महासभेचा पूर्वीचा विरोध लक्षांत घेतां, कसा सोडविण्यांत आला आहे हें डॉ. बा. शि. मुंजे यांनी 'अलाहाबाद करारा' संबंधानें जें पत्रक काढलें आहे त्यांतील आधार देऊन दाखविलें. हा करार सदोष असला तरी मॅक्डोनाल्डच्या निकालापेक्षा अधिक हितकर आहे सबब फेटाळून लावूं नये अशी आगाशे यांनी विनंति केली. अखेर उपसूचनेवर दोनदां मतें घेऊनहि श्री. ओतूरकर यांची उपसूचना १६३ विरुद्ध १२९ मतांनी मंजूर झाली.

## श्री. भोपटकर यांची सशर्त मान्यता

यानंतर अध्यक्षांनी श्री. ल. ब. भोपटकर यांना अलाहाबाद करारासंबंधाचा ठराव मांडण्यास सांगितलें. या ठरावाचा आशय कांही विवक्षित दुरुस्त्या झाल्या नाहींत तर करार मान्य नाही असा होता. सबब प्रो. ओतूरकर यांची उपसूचना मंजूर झाल्यानंतर हा ठराव मांडतां येतो कीं काय असा प्रश्न श्री. आगाशे यांनी उपस्थित केला. पण अध्यक्षांनी याचा निकाल न लावतां श्री. भोपटकर यांना अर्धा तास भाषण करूं दिलें. त्या ठरावाला डॉ. सावरकर यांनी अनुमोदन दिलें. पण ठरावांतील शेवटचा भाग गाळणें जरूर आहे असें प्रो. ओतूरकर, ना. वि. भोंडे, दि. वा. दिवेकर प्रभृतींनी दाखवून दिलें व त्यानंतर श्री. भोपटकर यांनी करार अमान्य आहे अशा अर्थाचा ठरावाचा शेवटचा भाग परत घेतला. पण नंतर श्री.आर. डी.थत्ते यांनी ओतूरकर यांची उपसूचना मूळ ठरावाला जोडून जोड ठरावावर मतें घेण्यांत आलीं पाहिजेत असा प्रश्न उपस्थित केला व अध्यक्षांनी सूचना मान्य केली! या वेळीं सुमारें १०॥ झाले होते व म्हणून श्री. शं. रा. दाते यांनी सभा तहकूब करावी व सोमवारीं सकाळीं परिषदेचें काम ८ वाजतां सुरू व्हावे अशी सूचना आणली व ती मंजूर झाली. त्यानंतर बॅ. जम्नादास मेथा यांचे स्वागतमंडळातर्फे आभार मानण्यांत आले. नंतर त्यांना मेजवानी देण्यांत आली. व ते रात्रीच्या गाडीनें मुंबईस निघून गेले. दुसरे दिवशींचें अध्यक्षांचें काम करण्याचा अधिकार श्री. सिद्धेश्वर शास्त्री चित्राव यांस देण्यांत आला.

## अलाहाबाद कराराच्या संबंधीचा ठराव

सोमवारीं सकाळीं ७॥ वाजता पुनः तडजोडीच्या बुद्धीने अलाहाबाद कराराची चर्चा सुरू झाली. सुरुवातीसच कराराच्या संपूर्ण निषेधाऐवजीं तडजोड करण्याची बॅ. अग्रवाल यांनी इच्छा व्यक्त केल्यावरून प्रो. ओतुरकर वगैरे मंडळींनी महाराष्ट्राचें निश्चित एकमत व्यक्त होणें इष्ट आहे या भावनेने तीच वृत्ति पत्करली. शेवटीं करार आहे असाच १० वर्षे मान्य करण्याचा ठराव सर्वसम्मत झाला. तो ठराव असा—

### अलाहाबादेचा करार

(अ) अलाहाबाद येथील ऐक्य परिषदेंत जी ऐक्याची भावना आणि सदिच्छा व्यक्त करण्यांत आली त्याबद्दल या हिंदु-धर्म परिषदेस आनंद होत असून ज्या पुढाऱ्यांनी ऐक्याची स्थापना केली त्यांचें ती अभिनंदन करीत आहे.

(ब) अलाहाबादेचा निर्णय आहे या स्थितींत सदोष असून, खालील शिफारशींच्या अनुरोधाने त्यांत दुरुस्ती घडवून आणावी असें या परिषदेचें मत आहे.

(१) राष्ट्राच्या घटनेंत कोणत्याहि समाजास कायद्याप्रमाणे बहुमत देणें हें तत्त्व लोकसत्ताक राज्यपद्धतीच्या मूलभूत तत्त्वांशीं विसंगत आहे.

(२) त्यामुळे राष्ट्रांत राष्ट्रीय भावनेची अभिवृद्धि होणें शक्य नाही.

(३) मध्यवर्ती सरकार व प्रांतिक सरकार यांच्यामध्ये अधिकाराची वांटणी झाल्यानंतर अवशिष्ट राहिलेले अधिकार प्रांतिक सरकारास देण्याचें तत्त्व शेवटीं आत्मघातकीपणाचें निःसंशय होईल.

(४) ब्रेन कमिटीचा निर्णय व सिंध प्रांतांतील हिंदूंना वाटत असलेली भीति यांचा विचार करता सिंध प्रांत मुंबई इलाख्यापासून तूर्त तरी अलग करणें इष्ट नाही.

(५) सर्व समाजांच्या हिताहिताचा विचार करता सर्व मतदारांचे संघ संयुक्त असावेत, व अशा संघांमार्फतच प्रतिनिधींची निवड करण्यांत यावी.

फक्त १० वर्षेपर्यंत महमद अलींच्या योजनेप्रमाणे निवडणुकी व्हाव्या. त्यानंतर महमद अलींची योजना व कायदेमंडळांतील जातिविशिष्ट राखीव जागा आपोआप रद्द समजल्या जाव्या.

(६) मंत्रिमंडळाची घटना जातिविशिष्ट पायावर करण्याची पद्धति अमलांत आणणें अनिष्ट आहे.

(७) सदर कराराचा १० वर्षांनी पुनः विचार व्हावा.

(क) १४ तारखेला अलाहाबादेस भरणाऱ्या परिषदेपुढे वरील शिफारशी हिंदुधर्म परिषदेच्या प्रतिनिधीनें मांडाव्या. जर या शिफारशी परिषदेनें स्वीकारल्या नाहीत तर या परिषदेच्या प्रतिनिधीने

सर्व पक्षांना करार मान्य असल्यास १० वर्षांनंतर त्याचा फेरविचार करण्यांत यावा असें सांगून या करारास १० वर्षांच्या मुदतीची संमति द्यावी व संमति देतांना या करारांच बाबतींत हिंदूंनी जास्तींत जास्त स्वार्थत्याग केला आहे, याहून जास्त त्याग त्यांना करतां येणार नाही असा स्पष्ट खुलासा करावा.

### डॉ. पळसुले यांचा तात्त्विक विरोध

८॥ वाजतां जाहीर अधिवेशन श्री. चित्राव-शास्त्री यांचे अध्यक्षतेखाली सुरू झालें. प्रारंभीं सभेच्या ठरावाचा प्रचार व पुढील कार्यकारी मंडळ यासंबंधी ठराव करण्यांत आल्यानंतर प्रो. ओतूरकर व बॅ. अग्रवाल यांनी आदले दिवशीं पास झालेल्या ओतुरकरांच्या उपसूचनेमुळे उत्पन्न झालेल्या परिस्थितीबद्दल खुलासा केला व आपला ठराव उपसूचनेसह परत घेण्याची परवानगी मागितली ती देण्यांत आली. नंतर प्रयाग करारांतील हिंदु हितविघातक गोष्टांचा स्पष्ट निर्देश करून अशा घातुक स्थितींतहि केवळ ऐक्यबुद्धीने १० वर्षांसाठी सम्मति देण्याचा ठराव श्री. **अग्रवाल** यांनी मांडला व त्यास श्री. **ओतूरकर** यांनी अनुमोदन दिलें. या ठरावांतील अराष्ट्रीय वृत्तीला पोषक असणाऱ्या, राखीव जागा, भेसळ पद्धतीची महमदअल्लीची मतदान-पद्धति वगैरे गोष्टी १० वर्षांनंतर आपोआप नष्ट झाल्या पाहिजेत ही गोष्ट स्पष्टपणें व्यक्त झाली नसल्याबद्दल डॉ. पळसुले यांनी विरोध दर्शविला; तथापि प्रयागला जाणाऱ्या प्रतिनिधीने तो मुद्दा जोराने प्रतिपादन करावा एवढ्या तडजोडीवर त्यांनी आपली उपसूचना मांडली नाही. ठराव सपशेल नाकारावा असा विरोध श्री. थत्ते यांनी केला. शेवटीं मूळ ठराव ६१ विरुद्ध ३८ मतांनी पास झाला.

नंतर प्रयाग परिषदेला प्रतिनिधि म्हणून श्री. अग्रवाल यांना नेमणारा ठराव मांडण्यात आला. त्यांत अध्यक्ष या नात्यानें बॅ. जम्नादास यांचें नांव सन्मानार्थ म्हणून घालण्यांत आलें. त्यानंतर अध्यक्षांचे विनंतीवरून श्री. मसूरकर महाराजांचें आशीर्वादपर व उद्बोधक असें भाषण झालें. अध्यक्षांनी उपसंहारात्मक भाषण करतांना कट्टर पुराणमताभिमानी शास्त्रीपंडितांनी विशेष आस्थेने भाग घेतल्याबद्दल त्यांचे आणि श्री. लवाटे, कवडेशास्त्री, डावरे व पंढरपूरची मंडळी यांचे आभार मानले. त्याचप्रमाणें पं. श्रीधरशास्त्री पाठक यांच्या साहाय्याचा त्यांनी प्रामुख्याने उल्लेख केला. नंतर सर्व साहाय्यकांचे आभार मानण्यांत आल्यावर परिषद समाप्त झाली. प्रतिनिधींतर्फे रत्नागिरीचे देव, नाशिकचे कर्डिले यांनी स्वागतमंडळाचे आभार मानले.

# पुण्याच्या परिषदेंतील कडाक्याची लढाई

महाराष्ट्र हिंदुधर्म परिषदेचें सहावें अधिवेशन शनिवार ता. १० रोजीं सायंकाळीं ४ वाजता पुणें येथे टिळक-मंदिरांत भरलें. परिषदेच्या तारखा निश्चित झाल्यापासून परिषद भरेपर्यंत केवळ एक आठवड्याचाच अवधि उरला होता. इतक्या थोड्या अवधींत परिषद भरवून ती तिच्या नांवलौकिकास शोभेल अशा रीतीने पार पाडावयाची हें कार्य एकंदरीने फार अवघड हें कोणीहि कबूल करील. श्री. ल. ब. भोपटकर, वे. सिद्धेश्वरशास्त्री चित्राव व माटे प्रभृति प्रमुख कार्यकर्त्यांस पहिली अडचण पडली ती अध्यक्षांची. अध्यक्षपदाकरिता लायख गृहस्थांचीं नांवेंच सुचवूं लागल्यास हवीं तितकीं सुचवितां येतील. परंतु खरी अडचण नांवें सुचविण्याची नसून ज्या गृहस्थाचें नांव सुचवावें त्यानें अध्यक्षस्थान पत्करण्याची. कारण एकएकास विनंति करून त्याचा नकार घेत घेत अखेर यश येईपर्यंत वरसंशोधनाप्रमाणे वाट पाहण्यास परिषदेच्या चालकांना पुरेशी फुरसतच नव्हती. तथापि महाराष्ट्रीयांच्या सुदैवाने या कामीं परिषदेच्या स्वागत मंडळास त्वरित यश लाभलें.

काळ्या रात्रीं हाक मारली असताहि हातचीं कामें तशींच टाकून महाराष्ट्रीयांचा शब्द खाली पडूं न देणारे जे कित्येक परप्रांतीय पुढारी आहेत त्यांपैकींच मुंबईचे प्रसिद्ध नागरिक बॅ. जम्नादास माधवजी मेहता हे होत. त्यांचा परप्रांतीयपणा सोयीचा आहे. कोणत्याहि परिषदेचा अध्यक्ष शक्य तितका ज्या त्या प्रांताच्या बाहेरचा निवडण्याचा प्रघात आहे. अध्यक्ष परप्रांतीय असल्यास तो पक्षातीत राहून परिषदेचें काम धारवाडी कांट्याने चालवूं शकतो ही समजूत वरील प्रघाताच्या मुळाशीं आहे व ती निराधार आहे असेंहि नाही. त्या दृष्टीने बॅ. जम्नादास यांस परप्रांतीय ठरविण्यांत तोहि हेतु साधण्यासारखा आहे. परंतु या सोयींतहि एक गैरसोय अशी असते कीं, त्या अध्यक्षास भाषेची नड पदोपदीं जाणवते. प्रांतिक परिषदेचा सर्व व्यवहार त्या प्रांताच्या भाषेंतून चालण्याने खरें वाक्स्वातंत्र्य वक्त्यांना व प्रतिनिधींना उपभोगावयास सापडतें. परंतु अध्यक्षास ती भाषाच अवगत नसेल तर त्याला वक्त्याचें हृद्गत समजणार

नाही व तो परिषदेपुढील कामकाजाशीं समरस न झाल्यामुळे त्याला आपलें धोरण कोणतें ठेवावें याचा उमज पडणार नाही.

परंतु जम्नादास मेहता यांस अध्यक्ष निवडण्याने त्याहि नडीचें निवारण झालें. त्यांना मराठी भाषा उत्तम समजते व थोडीबहुत बोलतांहि येते, यामुळे अध्यक्ष व प्रतिनिधी यांचा मेळ चांगला बसला. याचें कारण एका अर्थानें ते महाराष्ट्रीय आहेत हेंच होय. ते मूळचे ठाणें जिल्ह्यांतीलच रहिवाशी असून महाराष्ट्रीय या नात्याने बरींच वर्षे महाराष्ट्र प्रांतिक काँग्रेस कमिटीचें अध्यक्षस्थानहि त्यांस देण्यांत आलें होतें. त्यांना महाराष्ट्र हिंदुधर्म परिषदेचें अध्यक्षस्थान स्वीकारण्याची विनंति टेलिफोनवरून करण्यांत आली, व त्या विनंतीस त्यांची टेलिफोनवरूनच अनुमति मिळाली. ही अनुमति त्यांनी हातचें दुसरें महत्त्वाचें काम टाकून दिली यांत त्यांचा महाराष्ट्राविषयींचा आपलेपणा व जिव्हाळाच दिसून येतो. तथापि त्यांनाहि अध्यक्षीय भाषण तयार करण्यास इतका थोडा वेळ उरला होता कीं तें भाषण बॅ. जम्नादास 'येता जाता व उठत बसताच' रचीत होते असें म्हणण्यांत अतिशयोक्ति मुळीच नाही. ते परिषदेंत अध्यक्ष या नात्याने बोलण्यास उभे राहिले असता त्यांच्या हातांत छापील प्रतीऐवजीं प्रुफेंच पडल्याने प्रुफरीडरच्या खडतर कामाचा अनुभव घेत घेत त्यांना प्रुफांच्या खडकाळ चढउतारावरून आपल्या वक्तृत्वाची गाडी आदळत आपटत चालवावी लागली.

बॅ. जम्नादास यांनी वरील कष्ट महाराष्ट्रावरील प्रेमाखातरच हौसेने सोसले यांत शंका नाही. त्यांच्या तत्परतेमुळे अध्यक्षाची गरज उत्कृष्टपणें भागली तरी महाराष्ट्रांतील ठिकठिकाणचे व दूरदूरचे प्रतिनिधि परिषदेस कसे येऊं शकतील ही चिंता शिल्लक राहिलीच. परंतु परिषदेच्या कार्यक्रमापैकीं अस्पृश्यांचा देवालयप्रवेश हा एकच विषय असा होता कीं, त्याच्या वासावर परिषदेस हजर राहण्याची भूक अनुकूल व प्रतिकूल पक्षीयांना लागावीच. तशांत देवालयप्रवेशाच्या चळवळीचा उगम ज्यांच्यापासून सांप्रत झाला आहे ते म. गांधी पुण्यपत्तनासान्निधच राहात असल्याने पुणें शहरास एखाद्या क्षेत्राचें माहात्म्य प्राप्त होऊन सिंहस्थाची पर्वणी एकट्या नाशिक क्षेत्राच्या वांट्यास न येतां पुणें शहराच्या वांट्यासहि आली आहे. गेल्या आठवड्यात शंकराचार्यांच्या स्वाऱ्या, काशीचे पंडित, गुजराथेंतील शास्त्री आणि पंढरपूरचे पुराणिक हरिदास पुण्यांत थडकले. त्यांच्या आगमनापूर्वीच आहिताग्नि राजवाडे यांच्या अग्निहोत्रमंदिरांत अव्याहत दोन महिने व्याख्यानें झडून व शेवटीं सनातनी वैदिक धर्मीयांची परिषद भरून बहुधा निवृत्त व उदासीन राहणारा सनातन मतवादी वर्ग खडबडून उठला, व आपल्या मतास पुष्टि देणारे लोक आधुनिक सुशिक्षितांतहि सांपडतात या प्रत्ययाने त्यास आत्मविश्वास आला.

म. गांधी यांनी आपल्या पत्रकांचा धडाका कोणत्याहि हेतूने सुरू ठेवला असला तरी त्यांतील त्यांची विचारसरणी वाचून याच दिशेने व याच वेगाने अस्पृश्यतानिवारणाची चळवळ चालावयाची असल्यासें आपण गप्प बसूं तर आपलें मरण पुरें ओढवेल या भीतीनेहि सनातन मतवादी वर्गाच्या अन्तःकरणांत निर्वाणीचें धैर्य उत्पन्न होऊन त्यांनी गांधीजींशीं निकराने लढण्याचें ठरविलें. अशा रीतीने संग्रामासाठी सज्ज झालेल्या या सेनेच्या शिरोभागीं पं. राजेश्वरशास्त्री द्रविड, पं. देवनायकाचार्य प्रभृतीसारखे सेनानी शोभूं लागल्याने त्यांचें बळ अनेकपट वाढलें. शास्त्री-पंडितांनी पुणें शहरांतील नाक्याच्या जागा पकडून त्यांवरून आपल्या विद्वत्तेची, शास्त्रवचनांची व वक्तृत्वाची गोलंदाजी करून सनातनीयांत लढवय्या शिपायास जरूर असणारी वीरश्री उत्पन्न केली. त्या वीरश्रीने नटलेल्या शिपायांना महाराष्ट्र हिंदुधर्म परिषद हें एक रणक्षेत्रच भेटलें व त्या रणक्षेत्रावर नवमतवाद्यांशीं झुंज खेळण्यासाठी त तलवारी उपसून निघाले. त्यांच्या या लढण्याच्या ईर्षेने हिंदुधर्म परिषदेचा नूर अजीबात बदलला. परिषद श्रोत्यांनी व प्रतिनिधींनी गजबजून गेली. श्रोत्यांचा व प्रतिनिधींचा तोबा उडाल्याने परिषदेचा मंडप तमाम भरला. दोनहि पक्ष रविवारीं सकाळ–संध्याकाळ अस्तन्या सारून बसले व त्यांच्या या उत्साहास व आवेशास साजेसाच अध्यक्ष त्यांना मिळाला.

बॅ. जम्नादास हे वीरवृत्तीचे पुढारी आहेत. प्रतिपक्षी म्हटला कीं त्यावर ते धडाडीने झडप घालतात. आपले विचार भीडभाड न ठेवतां ते सांगून टाकतात. परिषदेपुढे अस्पृश्यतानिवारणाच्या तोडीचा दुसरा विषय म्हटला म्हणजे अलाहाबादेच्या कराराचा. पहिल्या विषयाचे अध्वर्यु म. गांधी व दुसऱ्या विषयाचे द्रष्टे पं. मालवीय असले तरी त्याहि कराराचा अग्रज पुण्याचा करार असल्याने पुणें–करारास पुढे करून म. गांधींवर हत्यार चालविण्याची संधि जम्नादासांनी दवडली नाही. त्यांचें अंतःकरण म. गांधींच्या साधुत्वाचें स्मरण होतांच लोण्याच्या गोळ्याप्रमाणें विरघळतें, पण त्या साधुत्वाने कांही बाबतींत देशाची हानि होत असल्याच्या विचाराने लागलीच त्यांचें अंतःकरण बर्फाच्या खड्याहूनहि कसें कठिण बनतें याचा पुरावा त्यांच्या भाषणांत पदोपदीं मिळत होता. बॅ. जम्नादास मेहता यांनी

भाषण करीत असता समोर येईल त्या विषयाच्या निष्ठुर प्रहारानी चिंधड्या उडविल्या. त्यांनी म. गांधींच्या प्रायोपवेशनाचें अंग रक्तबंबाळ केलें, पुणें-कराराचा तिळाएवढाहि तुकडा राहू दिला नाहीं व अलाहाबाद-कराराची रेवडी उडविली. त्यांचें भाषण लहानच झालें. पण तें होत असता कित्येकांना आपल्या कानांत तापलेलें शिसें ओतल्याच्या वेदना झाल्या असतील व कैकांच्या डोळयांपुढें काजवेहि चमकले असतील.

ज्या परिषदेचा प्रारंभ तोफांच्या गडगडाटांत झाला त्या परिषदेंत शेवटपर्यंत शस्त्रांच्या खणखणाटाशिवाय दुसरें काय ऐकूं यावयाचें ? व युद्धाच्याच भाषेत बोलावयाचें तर मारीन किंवा मरेन याशिवाय दुसरे कोणते विचार चालावयाचे ! परिषदेपुढे पहिला महत्त्वाचा ठराव अस्पृश्यतानिवारणाचाच आला. त्याची रचना रा. अण्णासाहेब भोपटकर व वे. महादेवशास्त्री दिवेकर यांनी कोणाच्या डोळयांना न खुपावी व कोणाच्या मनाला न लागावी अशी केली होती. त्यांत अस्पृश्यतानिवारणाची हातघाई नव्हती किंवा देवालयांत अस्पृश्यांना देवापर्यंत जाऊं देण्याचाहि आग्रह नव्हता. तथापि त्या ठरावास रा. भाऊसाहेब लवाटे यांनी उपसूचना आणून मंदिरप्रवेशाचा शास्त्रीय निर्णय विद्वत्सभेकडून करून घ्यावा व मग भोपटकरांच्या ठरावातील त्या कलमाचा विचार व्हावा असें सांगितले.

मूळ ठराव व त्यावरील उपसूचना यांच्या वादविवादास रविवारीं सकाळीं ८॥ वाजता तोंड लागून तो त्या दिवशीं रात्रीं ९ वाजेपर्यंत घुमत राहिला. या वादविवादांत जुन्या-नव्या, वृद्ध-तरुण, लहान-मोठ्या, विद्वान-अविद्वान वक्त्यांनी भाग घेतला. उभय पक्षीय वक्ते तळमळीने व कळकळीने बोलत होते. वक्त्यांची निवडहि चातुर्याने करण्यांत आली होती. उलट-सुलट वक्त्यांच्या गुंफणीने उभय पक्षीय श्रोत्यांचीं मुखकमलें कधी म्लान तर कधी प्रफुल्लित होत असतांना दिसत होतीं. यजमानाने अग्निकुंडात आज्य व आहुति टाकल्याने अग्नींतून कधी ज्वाला चेताव्या तर कधी धूरहि बाहेर पडावा; त्याप्रमाणे सभासदांच्या डोक्यांत कधी खिन्न विचारांचें व अन्तःकरणांत कधी क्षुब्ध विकारांचें काहूर माजत होतें. विचार-विकारांची खळबळ उडविण्यांत रा. माटे, डॉ. सावरकर, शंकरराव लवाटे, रा. गंवाळेशास्त्री इत्यादिकांच्या भाषणांचा दर्जा उच्च प्रतीचा ठरेल. माटे यांनी आपल्या विचारप्रवर्तक व उद्बोधक मांडणीने आणि सावरकर यांनी प्रदीपक व प्रक्षोभक वक्तृत्वशैलीने सभेकडून वाहवा मिळविली.

अध्यक्षांनीं वरील ठराव व उपसूचना यांवर मतें घेतलीं तेव्हा दोनहि बाजूंनी उभारलेले हात इतके होते कीं अधिक हात कोणाला मिळाले हें ठरविणें अशक्य दिसल्यावरून अखेर प्रतिनिधींचीं तिकिटें पाहून मतगणना करण्याचा निर्वाणीचा मार्ग त्यांस अनुसरावा लागला व त्यांत रा. भोपटकर यांच्या ठरावास सुमारें साठ मतें अधिक पडून मंदिरप्रवेशाचा ठराव मंजूर झाला. या ठरावांत हिंदूंतील कोणाहि व्यक्तीस दचकण्यासारखें कांहीच नाहीं. देवालयांत अस्पृश्यांना देवदर्शनाकरिता प्रवेश मिळावा, त्यांना कीर्तन, प्रवचन व पुराण यांच्या श्रवणाचा लाभ व्हावा अशीच ठरावांतील तद्विषयक कलमाची शब्दयोजना आहे. अस्पृश्यांना देवळाच्या गाभाऱ्यांत जाऊं द्यावें किंवा सभामंडपांत बसूं द्यावें असें ठरावांत कोठेहि म्हटलेलें नाहीं व देवळांत शिरून स्पृश्यांना शिवण्याचीहि शिफारस त्यांत केलेली नाहीं. प्रस्तुत ठरावास परिषदेंत जितका तीव्र विरोध झाला तितका म. गांधी यांनी आपलें आत्यंतिक स्वरूप प्रकट केलें नसतें तर इतर काळांत न होताहि हा ठराव सहज पास झाला असता. ठरावास अनुकूल ३३५ व प्रतिकूल २७९ मतें पडलीं यावरून देवालयप्रवेशास जनतेचा विरोध किती तीव्र आहे याची कल्पना नीट होते, कार्याचा बिकटपणा लक्षात भरतो व मिळालेल्या यशाचे महत्त्व काय प्रमाणांत मानावयाचें हें ज्याचें त्याला समजतें.

बाकीच्या कार्यक्रमांत अलाहाबाद येथील करारासंबंधाने परिषदेने मत प्रकट केलें त्याचें महत्त्व विशेष होतें. अध्यक्षांनी करारावरील आपला अभिप्राय पहिल्या भाषणांतच सांगून टाकला असल्यामुळे त्यांचा विरोध करारास ठरलेलाच होता. परंतु तो परिषदेवर लादण्याचा त्यांचा आग्रह नव्हता. हिंदुस्थानाची भावी राज्यघटना नागरिकांच्या समान हक्कावरच उभारली पाहिजे, असें त्यांचेंच काय पण सर्व राष्ट्रीयांचें मत आहे. परंतु त्या तत्त्वाचा मुसलमानादि ज्ञातिनिष्ठांकडून अंगीकार होईपर्यंत त्यांच्याशीं सलोखा करावयाचाच नाही कीं देवाण घेवाण या पद्धतीने नागरिकत्वाचीं स्थूल तत्त्वें व ज्ञातनिष्ठांच्या निकडीच्या गरजा यांचा समन्वय करून हिंदु-मुसलमानांच्या भांडणाचें तोंड काळें करावयाचें हाच काय तो वादाचा मुद्दा आहे. बॅ. जमनादास यांच्या मतें ज्ञातिनिष्ठांच्या कोणत्याहि मागणीस भीक न घालतां त्यांस ज्ञातिनिष्ठेपेक्षा राष्ट्रीयत्वाचें महत्त्व पटेपर्यंत जनतेने वाट पहावी; मग त्यांचें या दिशेने मतपरिवर्तन होण्यास विलंब लागला तरी हरकत नाही. हा उपाय दिरंगाईचा असला तरी खात्रीचा आहे असें जमनादास यांचें म्हणणें आहे. पण त्यांची ही विचारसरणी

मान्य केल्यास हिंदुस्थानास स्वराज्याकरिता किती दीर्घ काल थांबावें लागेल याविषयी कल्पनाहि करवत नाही. त्यापेक्षा ज्ञातिनिष्ठांच्या कांही अटी मर्यादित मुदतीपर्यंत कबूल करून स्वराज्याच्या मार्गांतील एक एक कांटा काढून टाकावा व हळूहळू ज्ञातिनिष्ठांना राष्ट्रीयत्वाच्या वळणावर आणावें असें म्हणणारा राष्ट्रीय पक्षांतहि बराच मोठा वर्ग आहे. अलाहाबादेस झालेल्या कराराकडे हा वर्ग याच दृष्टीने पाहत असून अलाहाबाद येथे आता भरावयाच्या सर्वपक्षीय परिषदेंत ज्ञातिनिष्ठेच्या विषाचा शक्य तितका निचरा करावा व त्यांत येईल तेवढ्या यशावर संतुष्ट राहून करारास मान्यता द्यावी, पण अजीबात परिषदेचा कपाळमोक्ष करूं नये असें या वर्गास वाटतें. महाराष्ट्र हिंदु धर्म परिषदेंत प्रो० ओतूरकर यांनी आपली उपसूचना याच हेतूने मांडली व ती अखेर पासहि झाली. ओतूरकर यांची ही उपसूचना, भोपटकरांनी मान्य केली व या विषयाचा शेवट आनंददायक झाला, याबद्दल कोणासहि समाधानच वाटेल.

अशा रीतीने परिषदेंत मुख्य दोन ठराव यावयास पाहिजे होते ते आले व त्यांचा निर्णयहि समाधानकारक रीतीने लागला याबद्दल परिषदेचें अभिनंदन करणें आमचें कर्तव्य होय. परिषदेंत हिंदुसंघटनेचें कार्य पुढे चालविण्याविषयी एक ठराव मंजूर झाला तो सुपरिणामी आहे. सदर ठरावाप्रमाणे कृति झाल्यास त्यामुळे एक अंमलबजावणीचें खातेंच निर्माण होऊन तें परिषदेस सजीव व कर्तृत्वशाली बनविल्यावांचून राहणार नाही. यंदाच्या परिषदेपुढील विषय एकंदरीने वादग्रस्त असल्यामुळे तिचें काम अवघड व अवखळ होईल अशी अटकळ प्रारंभापासून होती व तीच अखेर खरी ठरली. इतक्या महत्त्वाच्या परिषदेचीं सूत्रें चालविणारा अध्यक्ष सहनशील, समयज्ञ, सहानुभूतिपूर्ण, चतुर व कष्टाळू असला पाहिजे हें उघड आहे. ते सर्व गुण बॅ. जम्नादास यांच्या अंगीं वसत असून त्या गुणांच्या जोरावर त्यांनी परिषद निर्विघ्नपणें शेवटास नेली व तिच्या नांवलौकिकांत भर घातली याबद्दल आम्ही त्यांचें मनःपूर्वक अभिनंदन करतों.

# ओटाव्याच्या खोड्यांतील इंग्लंडचा कावा

कानडा देशाच्या ओटावा राजधानींत ब्रिटिश साम्राज्य परिषद जुलई व ऑगस्ट या दोन महिन्यांत भरली. सदर परिषदेस ब्रिटिश साम्राज्यांतील सर्व देशांचे प्रतिनिधि हजर होते. हिंदुस्थानसरकाराने हिंदुस्थानातर्फे सर अतुल चतर्जी, श्री. षण्मुखं चेट्टी, सर पदमजी जिनवाला, शेठ हाजी अब्दुल्ला हरून, साहेब जादा आवास अहमदखान व सर जॉर्ज रेनी यांची रवानगी केली होती. परिषद दोन महिने सुरू होती. तरी कालगणनेने एक महिनाच चालून तिच्यांत करार ठरला. त्यावर या प्रतिनिधींच्या हिंदुस्थानच्या वतीने सह्या झाल्या. करारांत हिंदुस्थानातर्फे म्हणून ज्या सवलती इंग्लंडास मिळाल्या त्यांस ले. असेंब्लीने संमति दिल्यावाचून कायमपणा येणार नसल्यामुळे असेंब्लीच्या चालू बैठकींत त्याच विषयाचा ऊहापोह होत आहे. कराराचें स्वरूप व्यापक व घोटाळ्याचें आहे, त्याची छाननी असेंब्लींतील सर्वसामान्य सभासदांना साधण्यासारखी नाही. यासाठी असेंब्लीने आपल्यापैकीं कांही निवडक सभासदांची एक कमिटी नेमली आणि तिच्याकडे तज्ज्ञांना बोलावून त्यांच्या साक्षी घेण्याचें व करार एकंदरीने हिंदुस्थानास फायद्याचा आहे किंवा कसें याचें परीक्षण करण्याचें काम सोपविलें.

असेंब्लीने नेमलेल्या कमिटींत ना. भोर (अध्यक्ष), सर हरिसिंग गौर, महंमद यामीनखान, मि. पार्सन्स, श्री. रंगा अय्यर, एच. पी. मोदी, एफ. इ. जेम्स, डिसोझा, हाजी अब्दुल्ला हरून, झियाउद्दिन अहमद, झुल्फिकार अलीखान, षण्मुखं चेट्टी, सर अबदुल रहीम, सीताराम राजू व हरविलास शारदा यांची योजना करण्यांत आली होती. या सभासदांपैकीं दोन सभासद हिंदुस्थान सरकारने ओटाव्यास पाठविलेले प्रतिनिधिच होते हें कोणाच्याहि सहज लक्षांत येण्यासारखें आहे. यांनी आपल्यापुढे साक्षीकरितां मुंबई विद्यापीठांतील अर्थशास्त्राचे प्रोफेसर रा. वकील व रा. घोष, बंगाल नॅशनल चेंबर ऑफ कॉमर्सचे अध्यक्ष श्री. सरकार, टाटा आयर्न ॲंड स्टील वर्क्सचे डायरेक्टर मि. दलाल यांना बोलावलें. त्यांचा पुरावा ऐकून व स्वतंत्रपणें चर्चा करून कमिटी रिपोर्ट लिहावयास बसली, तेव्हा तिच्यांत मुख्यतः दोन फळ्या पडल्या. अध्यक्ष सोडून एकंदर चौदा सभासदांतील सात सभासद सरकारपक्षाचे व सात लोकपक्षाचे होते तरी ओटावा येथील करार हिंदुस्थानास सर्वस्वी हानिकारक आहे असें सांगणारे फक्त तीनच सभासद उरले व त्यांनी आपलें विरुद्ध मत नमूद केलें. पण बाकीच्या सर्वांनी बहुतांशीं मूळ कराराचीच तळी उचलून धरली.

कमिटीचे दोन्ही रिपोर्ट असेंब्लीसमोर आल्यानंतर बहुमताचा रिपोर्ट मंजूर होऊन ओटावा येथील करारास

अनुसरून टॅरिफ कायद्यांत दुरुस्ती करण्याकरितां सरकारानें नवें बिल सादर केलें. या बिलाचें पहिलें वाचन मंजूर झाल्यावर त्यांत फेरफार सुचविण्यासाठीं तें सिलेक्ट कमिटीच्या स्वाधीन करण्यांत आलें. सदर कमिटीचे अध्यक्ष सर बी. एल. मितर हे असून सभासदांत ना. भोर, सर एफ. नाईस, सर शूस्टर, श्री. षण्मुखं चेट्टी, रंगा अय्यर, थॅम्पन, बी. सीताराम राजू, सर सुरावर्दी, मि. एच. पी. मोदी, मि. चिनॉय, जेम्स, डॉ. डीसोझा, हाजी वजिरुद्दीन, मॉर्गन, सरदार संतसिंग, एस. जी. मित्र व नारायणराव गुंजाळ हे समाविष्ट होते. ही कमिटी कोणत्या जिनसांवर किती जकात बसवावी हें ठरविण्यासाठींच होती.

परंतु सदर कमिटीपेक्षा खरी महत्त्वाची कमिटी ओटावा कराराचें परीक्षण करण्याकरिता नेमलेलीच. तिच्यापुढे रा. वकील, घोष इत्यादि तज्ज्ञांच्या साक्षी झाल्या. त्या सर्वांनी ओटाव्याचा करार हिंदुस्थानास एकंदरीने फायदेशीर नाहीं असेंच मत दिलें. हें मत समजून घेण्याच्या हेतूनेच कमिटी नेमण्यांत आली असल्याने त्या मताच्या अनुरोधानेच कमिटीने आपला निर्णय सांगावयास पाहिजे होता. परंतु कमिटींतील बहुसंख्य सभासदांनी तज्ज्ञांचा अभिप्राय झुगारून देऊन करारावर आपल्याच मान्यतेचा शिक्का मारला. या सभासदांत युरोपियन सभासद असला तर एखादाच. कमिटीचे इतर सभासदच काय पण कमिटीचे अध्यक्ष ना. भोर हेहि हिंदीच. हाजी अबदुल्ला हरून व षण्मुखं चेट्टी ओटाव्याची तीर्थयात्रा करून आले असल्यामुळे त्यांनी देव्हाऱ्यांत घालून आणलेल्या कराराचें नामसंकीर्तन करावें यांत नवल नाहीं. तथापि सर हरिसिंग गौर, एच. पी. मोदी, रंगा अय्यर हे तरी हरून व चेट्टी यांजप्रमाणे बाडगे नव्हते. रंगा अय्यर यांच्यासारखा सरकारावर तुटून पडणारा सभासद सध्याच्या असेंब्लींत एकहि सांपडणार नाहीं. तो सुद्धा सरकारच्या गळाला लागला. यावरून सरकारी अधिकारी अधिक धूर्त व हिकमती समजावयाचे कीं हिंदी सभासदांना भोळे मानावयाचें हें ठरविणें कठिण आहे. कारण मुंबईतील गिरणीवाल्यांचे प्रमुख मि. मोदी याना भोळे म्हणेल कोण ?

असेंब्लींत कमिटी नेमण्यापूर्वी वादविवाद झाला त्या वेळीं मोदी यांनी सरकारची अशी खरड काढली होती कीं, त्याच्या डोक्यावर क्वचित् एखादा केस राहूं दिला असेल! पण तेच मोदी कमिटीच्या गुहेंतून बाहेर पडले तेव्हा सरकारशीं पूर्णपणें तद्रूप झालेले दिसले ! हिंदी सरकाराने हिंदी सरकीस ब्रिटिश सरकाराकडून संरक्षण देण्याचें कबूल करून मोदींच्या तोंडापुढे सरकीचें घमेलें सारलें म्हणूनहि कदाचित् मुंबईचे मोदी सरकारापुढे पान्हावल असतील, नाहीं असें नाहीं. तशांतून त्याच्या वर्तीने बोलावयाचेंच झालें तर असें म्हणता येईल कीं, त्यांनी सवलतीच्या जकातीचा परिणाम काय दिसून आला याचा रिपोर्ट सरकारानें दरसाल करावा, व तीन वर्षांअखेर मुख्य रिपोर्ट लिहून जकातीच्या धोरणाचा फेरविचार व्हावा अशा शिफारशी केल्या आहेत, त्या हिंदुस्थानाच्या हिताची त्यांना कळकळ वाटते म्हणूनच कीं नाहीं ? परंतु त्यांना कळकळ वाटत नसेल असें आम्ही तरी कोठे म्हणतों ? तथापि बहुमतवाल्यांना करारांतील उलथापालथीचे परिणाम काय होतील याचा अंदाज बरोबर न लागल्यामुळे म्हणा किंवा त्यांतील मोदीसारखे कांही लोक सरकीस मिळालेल्या सवलतीच्या मोहास बळी पडल्यामुळे म्हणा ते सरकारपक्षाच्या आहारीं गेले यांत शंका नाहीं. सारांश, डळमळीतपणा हाच त्यांच्या स्वभावांतील मुख्य दोष असून असले बिनबुडाचे प्रतिनिधि असेंब्लीसारख्या अव्वल प्रतीच्या कायदेमंडळास लाभावे हें देशाचें दुर्दैवच नव्हे तर काय ! या होळीच्या होळकरांत सर अबदुल रहीम, सीताराम राजू व हरविलास शारदा या त्रिवर्गांनी आपल्या स्वतंत्र बाण्याने चमकावें व ओटावा कराराचा धुव्वा उडवावा याबद्दल त्यांचें जितकें अभिनंदन करावें तितकें थोडेंच आहे.

प्रत्येक देशाचें व्यापारी धोरण त्या देशाच्या अन्तःस्थ स्थितीवरून ठरवावयाचें असतें. इंग्लंड हा कारखानदारीचा देश असल्यामुळे त्याचें लक्ष आपल्या कारखान्यांतील माल परदेशांतून किफायतशीर रीतीने खपविण्यावरच खिळून राहाणार. हिंदुस्थानाची मुख्य भिस्त शेतीवर आहे व शेतांत पिकणाऱ्या जिनसावरच त्याचें जीवित अवलंबून आहे. हें विधान स्थूलपणाने झालें. त्याचा बारकाईने विचार करण्यासाठीं हिंदुस्थानाच्या निर्गत व आयात मालाच्या आंकड्यांकडे लक्ष देणें अगत्याचें आहे. हिंदुस्थानाचा निर्गत व्यापार १९२९-३०सालीं सामान्यतः तीनशें कोटींचा व आयात व्यापार अडीचशें कोटींचा होता. निर्गत व्यापारांत मुख्य जिनसा ताग, कापूस, तांदूळ, चहा, गळिताचीं धान्यें व कातडीं या होत. ताग व तागाचें कापड मिळून सुमारें ७० कोटींचा माल परदेशीं रवाना होतो. यांपैकीं नुसता तागच घेतला तर तो तीस कोटींचा भरेल. बाकीचें चाळीस कोटींचें तागाचें कापड विणणाऱ्या गिरण्या बंगाल्यांत असून त्या बहुतेक सर्व युरोपियन कारखानदारांच्याच मालकीच्या आहेत. हिंदुस्थानाच्या सुती कापडाला हिंदुस्थानाबाहेर फारसें गिऱ्हाईक नाहीं. गिऱ्हाईक आहे तें मुख्यतः कापसाला आहे. हा कापूस साठपांसष्ट

कोटींपर्यंत परदेशांत जातो व कापडाचा खप अवघा पांचसात कोटींचाच होतो. खाण्याचें धान्य ३३ कोटींचें, तांदूळ, चहा व गळिताचीं धान्यें प्रत्येकीं २६ कोटींचीं व कातडीं १८ कोटींचीं याप्रमाणे हिंदुस्थानास परदेशांपासून रक्कम मिळते. तांदुळाची रक्कम हिंदुस्थानाच्या नांवावर मोडत असली तरी ब्रह्मदेशाच्याच पदरांत पडते. आणि चहाचे मळेवाले बहुधा युरोपियन असल्यामुळे त्यांतील फक्त मोलमजुरीच हिंदी लोकांच्या वांटयास येते. हिंदुस्थानाच्या आयातींत कापड ५० कोटींचें, साखर १६ कोटींची, लोखंड व पोलाद २० कोटींचें, यंत्रें वगैरे ६७ कोटींचीं व रॉकेल १० कोटींचें धरण्यास हरकत नाही.

हिंदुस्थानाच्या हिताच्या दृष्टीने आयात-निर्गतीच्या व्यापाराचा विचार केल्यास निर्गत मालाचा खप अधिक झाला पाहिजे व त्याची किंमत हिंदुस्थानास अधिक मिळाली पाहिजे, तरच मुख्यतः शेतकरी वर्गास शेतीचा धंदा हल्लींपेक्षां जास्ती फायदेशीर होऊन त्याची सांपत्तिक स्थिति सुधारेल. हिंदुस्थान हा प्रायः शेतकऱ्यांचाच देश असल्यामुळे शेतकऱ्यांच्या सुखावरच साऱ्या जनतेचें सुख अवलंबून आहे. परंतु सांप्रत धान्य व कच्चा माल यांचे भाव उतरल्याने शेतकरी खालावला व त्याच्याबरोबर सारा देश खालावून व्यापारी, नोकरवर्ग व मजूर यांच्या प्राप्तीला त्याचे दुष्परिणाम जाणवूं लागले. आयात मालापैकीं कापड, साखर, गहूं व पोलाद यांसच काय तो आळा बसण्याचा संभव आहे. बाकी राहिलीं यंत्रें, रॉकेल, पेट्रोल इत्यादि. हिंदुस्थानांत यंत्रें बनतील व खाणी निघतील त्याच वेळीं या दिशेने वाढणारा संपत्तीचा ओघ थांबेल. परंतु त्याची आशा तूर्त तरी कोणी बाळगीत नाही. कापडास इंग्लंड व जपान हे दोन जबरदस्त प्रतिस्पर्धी हिंदुस्थानाला भेटले आहेत. हिंदुस्थानास कापडाचा धंदा सर्वस्वी हस्तगत होण्यासारखा असल्यामुळे या दोनहि देशाच्या कापडावर प्रतिबंधक जकाती बसवूनच हिंदुस्थान आपलें डोकें वर काढूं शकेल. पण त्या बाबतींत हिंदुस्थानाला पूर्ण आर्थिक स्वातंत्र्य मिळालें पाहिजे.

ओटाव्याचा करार वरील कसोटीस टिकला तरच तो हिंदुस्थानाच्या फायद्याचा ठरेल. एरव्ही इंग्लंडने आपल्या व्यापाराची विस्कटलेली घडी बसविण्याकरितांच हिंदुस्थानाच्या पायांत हा खोडा अडकविला आहे असें म्हणावें लागेल. कमिटींतील सर अबदुल रहीमप्रभृति अल्पमतवाल्यांनी आपल्या खुलाशांत याच दृष्टीने चिकित्सा करून प्रस्तुत करार हिंदुस्थानास फायदेशीर नाही इतकेंच नव्हे तर त्यापासून हिंदुस्थानाच्या व्यापाराची घडी गेलीं कित्येक वर्षें जगांतील भिन्न भिन्न राष्ट्रांशीं नैसर्गिकपणें बसली आहे ती बिघडून घोटाळा माजेल व निर्गत व्यापारास धक्का पोचेल असें मत दिलें आहे. इंग्लंडचा नवा करार एकट्या हिंदुस्थानाशीं नसून ब्रिटिश साम्राज्यांतील सगळ्या देशांशीं आहे. तेव्हा त्याचा फायदा एकट्या हिंदुस्थानाला होणार नाही हें उघड आहे. हिंदुस्थानांतून विशिष्ट प्रकारचा माल इंग्लंडांत जातो. त्याला ब्रिटिश साम्राज्यांतील कित्येक देशच प्रतिस्पर्धी भेटणार आहेत. गहूं जसा हिंदुस्थानांतून निर्गत होतो तसा तो आस्ट्रेलिया व कानडा या देशांतूनहि इंग्लंडांत जात असून त्या देशांत संघटित पद्धतीच्या व यंत्रसाहाय्याच्या बळावर त्याची पैदास करण्यांत येत असल्यामुळे त्या दोन देशांपुढे हिंदुस्थानाचा टिकाव लागणार नाही.

हिंदुस्थानाच्या तांदुळांतून फक्त पांच टक्के तांदूळ इंग्लंड घेतें व बाकीचा तांदूळ परदेशांमधून खपतो. भुईमूग ६ टक्के इंग्लंडांत व ९४ टक्के इतर देशांत रवाना होतो. इंग्लंडला लागणारा बराच कापूस अमेरिकेंतून येतो, व तो लांब धाग्याचा असतो. हिंदी कापूस आंखूड धाग्याचा असला तरी अलीकडे मध्यम लांबीचा कापूस हिंदुस्थानांत निपजत आहे. अमेरिकेच्या कापसावरील जकात वाढवून हिंदी कापसास इंग्लंडने उत्तेजन दिलें तर इंग्लंडास हवा त्या जातीचा कापूस हिंदुस्थानांत पैदा होऊन इकडील शेतकऱ्यांची स्थिति सुधारेल. पण तशी सवलत हिंदुस्थानास देण्यास इंग्लंड कबूल नाही. हिंदुस्थानाचा चहा इंग्लंडांत मोठ्या प्रमाणांत खपतो. त्याला ब्रिटिश साम्राज्यांत सीलोन व साम्राज्याबाहेर जावा व सुमात्रा हे दोन प्रतिस्पर्धी आहेत. परंतु हिंदुस्थानांतील चहाचे मळेवाले बहुधा इंग्रज लोकच असल्याने सवलतीचा करार इंग्लंडने हिंदुस्थानाशीं केला नसता तरीसुद्धा हिंदी चहावर इंग्लंडांत जकात वाढण्याची भीति नव्हती.

हिंदी तागाचा व्यापार इंग्लंडबरोबर फारसा चालतच नाही. त्याचा खप इंग्लंडांत फक्त ५ टक्के आणि अमेरिका व अर्जेंटाईन यांत ९५ टक्के होतो. अर्थात् या बाबतींत इंग्लंड हिंदुस्थानाच्या काय उपयोगी पडणार हें दिसतच आहे. इंग्लंडास लागणारी ७५ टक्के आळशी अर्जेंटाईनमधून व १९ टक्के हिंदुस्थानांतून जाते. इंग्लंडने हिंदुस्थानाच्या आळशीस १० टक्के जकातीची सवलत दिली तरी तिला टक्कर देऊनहि अर्जेंटाईन टिकाव धरील इतकी त्या देशांतील शेतीची सुधारणा झाली आहे. इंग्लंडास कातडीं पुरविणारा ब्रिटिश साम्राज्यांत हिंदुस्थानाशिवाय दुसरा देशच नाही. तेव्हा त्यावर इंग्लंडने विशेष कृपा

केली न केली तरी सारखीच. कोणी असें म्हणेल कीं, याच काय पण इतर कोणत्याहि जिनसांत इंग्लंडने हिंदुस्थानास सवलत न देतां साम्राज्याबाहेरील कोणत्याहि देशास ती देण्याचें ठरविलें तर त्यापासून हिंदुस्थानाचा तोटा होणार नाही काय? पण या शंकेस उत्तर असें कीं, हिंदुस्थानाचा निर्गत व्यापार इंग्लंडपेक्षा साम्राज्याबाहेरील देशांशींच फार मोठ्या प्रमाणावर चालतो. तेव्हां इंग्लंडपासून सवलती न मिळाल्याने गोमेचा एक पाय मोडला म्हणून ती जशी लंगडी होत नाही तशीच हिंदुस्थानाची स्थिति आहे. उलटपक्षीं इंग्लंडने हिंदुस्थानास दिलेल्या सवलतीच्या मोबदल्यांत हिंदुस्थानाने साम्राज्याबाहेरील देशांतून आयात होणाऱ्या मालावरील जकाती वाढविल्यास परकीय राष्ट्रें हिंदी मालावर तोच प्रयोग करून त्याचा आहे हाहि व्यापार मारून टाकतील व 'इदं च नास्ति परं च न लभ्यते' अशी हिंदुस्थानाची अवस्था होईल.

हिंदुस्थानाच्या आयातींत कापड, साखर, लोखंड, पोलाद, यंत्रें या मुख्य बाबी आहेत. यांपैकीं साखर वगळल्यास बाकीचा माल खुद्द इंग्लंडमधून हिंदुस्थानांत येतो. सुमारें एक अब्ज रुपये किंमतीचा हा माल हिंदुस्थानांत असाच सतत खपत राहावा, किंबहुना त्याचा खप दिवसेंदिवस वाढावा यासाठीच ओटाव्याचा खोडा हिंदुस्थानाच्या पायांत अडकविण्याचें घाटत आहे. या खोड्यांत न पडतां हिंदुस्थानास पूर्णपणें आर्थिक स्वातंत्र्य उपभोगावयास मिळालें असें मानल्यास हिंदुस्थान जपानाबरोबरच इंग्लंडचेंहि कापड ठार मारून दरसाल ५० कोटी रुपये किंमतीच्या मालाची पेठ काबीज करील, लोखंड-पोलादाचे कारखाने वाढवील व ज्या देशांत इंग्लंडपेक्षां स्वस्त यंत्रें मिळतात त्या देशांतून यंत्र मागवून आपले कारखाने भरभराटीस आणील. पण हिंदुस्थानाच्या प्रगतीचा हा मार्ग खुंटवावा, हिंदुस्थानासारखें प्रचंड गिऱ्हाईक आपल्या दाराशीं कायमचें बांधून ठेवावें व त्यांतील कच्चा माल स्वस्तांत पाडावा यासाठी ओटाव्याचा खोडा हिंदुस्थानच्या पायांत अडकविण्यांत येत आहे. यापासून हिंदुस्थानाची आर्थिक भरभराट थांबेल इतकेंच नव्हे तर आहे हाहि व्यापार खालावून त्याला हल्लीहूनहि अधिक विपन्नावस्था प्राप्त झाल्यावांचून राहाणार नाही अशी भीति वाटते.

# भोर संस्थान प्रजापरिषद्

## एका परिषदेचे दोन अध्यक्ष

भोर संस्थान प्रजापरिषदेचें नववें अधिवेशन ता. ११ व १२ रोजीं शिरवळ येथे बाजार-माळावर भरणार असल्याचें परिषदेच्या कार्यकारी मंडळाने जाहीर केलें. बाहेरगावीं निमंत्रणपत्रिकाहि रवाना झाल्या. अध्यक्षस्थानीं नाशिक कॉलेजाचे प्रिन्सिपाल श्री. त्र्यंबक अप्पाजी कुळकर्णी यांची नेमणूक झाली. आणि साताराचे वकील व 'ऐक्य' पत्राचे संपादक श्री. वाग्भट नारायण देशपांडे याना स्वागताध्यक्ष नेमण्यांत आलें. परिषदेच्या स्वयंसेवकांनी भोंवतालच्या सर्व खोऱ्यांतून, वाड्यांतून हिंडून प्रत्येकाकडून चार चार आणे वर्गणी घेऊन त्यांना सभासद करून घेण्याचा सपाटा चालविला व त्यांनी सुमारें दोन हजार मावळ्यांना सभासद करून घेतलें.

पण खुद्द शिरवळ गांवांत निराळीच घटना घाटत होती. भोर संस्थानांत वतनदार लोकांचा एक संघ असून त्याला 'देशमुखसंघ' म्हणतात. देशमुख संघाने परिषदेचें अध्यक्षस्थान श्री. बळवंत बाबूराव पासलकर यांना दिलें व रा. काशिनाथ ठकूजी जाधव यांना स्वागताध्यक्षाचा मान दिला. या संघानेहि स्वतः खटपट करून सुमारें तीन हजार मावळे जमा केले. प्रजा परिषद्-संघाचें शिबिर परिषदेचे चिटणीस श्री. वाळिंबे यांच्या वाड्यांत आणि देशमुख संघाचें शिबिर श्री. देशपांडे यांच्या वाड्यांत होतें. भोर दरबाराने संस्थानाच्या हत्यारबंद लाठीबंद अशा ६० पोलिसांची एक तुकडी शिरवळ गांवांत आणून ठेवली होती. रविवार ता. ११ रोजीं ४ वाजल्यापासून परिषदेच्या कार्यास सुरुवात होणार असल्यामुळे दोनहि पक्षांचे मावळे १२ वाजल्यापासून येऊं लागले. अमुक मावळा कोणत्या पक्षाचा आहे हें चटकन ओळखतां येत असे. प्रजापरिषदेच्या पक्षांतील मावळा आपापल्या पाठीवर दोनतीन दिवस पुरतील इतक्या भाकरी बांधून आला होता. आणि देशमुख-संघाच्या मावळ्याच्या हातांत फक्त एक काठीच दिसत होती. त्यांची जेवणाखाण्याची सोय शिरवळास करण्यांत आली होती.

## परिषदेस सुरुवात

परिषद् सुरू होण्याच्या अगोदर एक तास म्हणजे तीन वाजता देशमुख संघाच्या अध्यक्षांची मिरवणूक ढोल, सनई, लेजीम यांच्या गजरांत परिषदेच्या ठिकाणीं जाण्यासाठी काढण्यांत आली. यानंतर अध्यक्षस्थान कोणास द्यावें असा महत्त्वाचा प्रश्न उपस्थित झाला. देशमुख-संघाने अशी तडजोड सुचविली कीं श्रीमंतां-

त्या फोटोची मिरवणूक काढावी व तो फोटो खुर्चीवर ठेवून त्यापुढे सर्वांची भाषणें व्हावीं. पण ही तडजोड कोणासच मान्य झाली नाहीं. शेवटीं असें ठरलें कीं एका पक्षाचे अध्यक्ष श्री. कुळकर्णी व दुसऱ्या पक्षाचे श्री. पासलकर या दोघांनीहि या परिषदेचें अध्यक्षस्थान स्वीकारावें व स्वागताध्यक्षाची जागा श्री. वा. मा. देशपांडे यांना द्यावी. या तडजोडीस अनुसरून परिषदेच्या कामास सायंकाळीं ६ वाजता सुरुवात झाली. प्रारंभीं स्वागताध्यक्ष श्री. वा. मा. देशपांडे यांनी पुढील आशयाचें भाषण वाचून दाखविलें.

### स्वागताध्यक्षांचें भाषण

"दरबारच्या मनांत लोकप्रतिनिधींविषयी अविश्वास वसत असून दरबाराच्या या धोरणाचा तीव्र निषेध करणें आणि दरबाराचें हें अविश्वासाचें धोरण श्रीमंतांचे निदर्शनास आणणें हें आपल्या परिषदेचें आद्य कर्तव्य आहे. विश्वासानें विश्वास वाढतो ही म्हण प्रजेप्रमाणेंच राज्यकर्त्यांनीहि लक्षांत ठेविली पाहिजे. आमची थोडक्यांत मागणी अशी आहे कीं, राज्यकारभाराचें आजपर्यंतचें जुनें स्वरूप बदलून त्याला ताबडतोब नवीन प्रकारचें वळण श्रीमंतांनी दिलें पाहिजे. संस्थानाचा दिवाण हा ब्रिटिश हद्दींतील विद्यमान अथवा पेन्शनर असा रेव्हेन्यू खात्यांतलाच अधिकारी असला पाहिजे अशी संस्थानिकांची जी एक समजूत आहे ती बदलली पाहिजे. कारण अशा अधिकाऱ्याच्या ठिकाणीं प्रगतिप्रियता दिसून येत नाहीं. तसेंच संस्थानाचें उत्पन्न मर्यादित असून तें बहुतेक आजचा कारभार आहे तसाच चालू ठेवण्यास खर्च होतें हेंहि खरें आहे. असें जरी असलें तरी त्यांतून नवीन नवीन सुधारणा करण्यास मार्ग निघतच नाहीं असें मात्र नाहीं. उत्पन्नाच्या हिशेबानें कारभाराच्या चालू अवाढव्य खर्चास जर थोडीफार कात्री लावली तर बऱ्याचशा सुधारणा करतां येतील. माझी अशी सूचना आहे कीं, या प्रगतिपर योजना कर्ज उभारून केल्या तरी हरकत नाहीं. अशा तऱ्हेनीं कर्जें राष्ट्रें काढतातच; म्हैसूर संस्थानानेंहि तसें कर्ज काढलें असून आपल्या हद्दींत पुष्काळच सुधारणा केल्या आहेत. कर्ज उभारण्याची कल्पना अधिकाऱ्यांना जर पटत नसेल आणि नवीन लोकोपयोगी सुधारणा करण्यास जर त्यांची तयारी नसेल तर श्रीमंतांनी सर्व अधिकार आम्हा लोकपक्षाच्या हातीं द्यावा. शेवटीं लोकपक्षालाहि मला अशी विनंति करावीशी वाटते कीं त्यांनी अत्याचारास प्रोत्साहन देऊन संस्थानांत अशांतता माजवूं नये व श्रीमंतांना त्रास देऊन सुधारणेचें काम लांबणीवर पाडूं नये."

श्री. देशपांडे यांचें भाषण झाल्यावर त्यांनी आजच्या परिषदेच्या दोन विरुद्ध पक्षांत समेट झाला याबद्दल आनंद प्रदर्शित करून श्री. कुळकर्णी व रा. पासलकर यांना अध्यक्षस्थान स्वीकारण्याची विनंति केली व त्यास रा. का. ह. जाधव यांनी दुजोरा दिला. नंतर श्री. कुळकर्णी यांनी आपलें भाषण वाचून दाखविलें त्याचा सारांश पुढीलप्रमाणे—

### पहिल्या अध्यक्षांचें भाषण

"ज्या प्रांतांत दुष्काळाचें भय अधिक त्या प्रांतांत जमिनी कुणब्यांच्या मालकीच्या राहण्याचा फार संभव असतो. याच्या उलट ज्या ठिकाणीं दुष्काळ क्वचित् पडतो त्या ठिकाणीं शेतजमिनी सावकाराच्या मालकीच्या होतात व शेतकरी हा निवळ मजूर बनतो. आणि कुणबी हा एकदा का सावकाराच्या तडाख्यांत सांपडला कीं, त्याला त्याची मगरमिठी सोडवणें दुरापास्त होतें. अशा वेळीं सहकारी पतपेढ्यांचा चांगला उपयोग होतो. भोर संस्थानांत पतपेढ्या काढण्यास चांगली वाव आहे व श्रीमंतांनी या बाबतींत लक्ष घातलें पाहिजे. गेल्या दहा वर्षांच्या कारकीर्दीत श्री. बाबासाहेब यांनी पुष्कळ सुधारणा केल्या आहेत. त्यांनी 'जबाबदारीची राज्यपद्धति' हें आपलें ध्येय आहे असें जाहीर केलें. सन १९२८ सालीं एक कौन्सिलहि निर्माण केलें. पण त्यांत सामान्य जनतेच्या विश्वासांतलीं माणसें फारशीं आढळत नाहींत! हल्लीं प्रजापक्ष व सरकार यांमध्ये जो मतभेद झाला आहे तो नाहीसा होण्यास दोनहि बाजूंनी खुल्या दिलानें आपल्या मनांतल्या कल्पना बोलून दाखविल्या पाहिजेत. कौन्सिलांतील जागा निवडणुकीच्या पद्धतीनें भरल्या, तर जनतेच्या विश्वासांतलीं माणसें त्यांत येतील. सरकारी बजेटाकडे पाहतां एकंदर संस्थानाचा खर्च सात लाखांचा असून पैकीं शिक्षणाच्या पायीं अवघे २८ हजार रुपये खर्च केले जातात ही किती दुःखाची गोष्ट आहे ! आणि शिक्षणाच्या वांट्याला इतकी अपुरी रक्कम येण्याचें कारण सरकारी नोकरांचे लठ्ठ पगार, खासगीचा अवास्तव खर्च आणि निरुपयोगी अशा खात्यांवर खर्चाची रेलचेल!

अस्पृश्यतानिवारणाच्या बाबतींत श्रीमंतांनी जें प्रगतिपर धोरण जाहीर केलें आहे तें अगदी योग्य आहे. संस्थानाच्या प्रजेनेंहि सरकारच्या आश्रयाखालीं एक 'अंत्यज-सेवा-मंडळ' स्थापन करावें. सध्याचा काळ लोकशाहीचा आहे. या वेळीं सामान्य जनतेचें कल्याण हें सर्वांत श्रेष्ठ कार्य आहे. जशी आपण श्रीमंतांना स्वार्थत्याग करण्याची विनंति करतों तसाच वतनदार, इनामदार लोकांनीहि स्वार्थत्याग केला पाहिजे. प्रजेच्या हिताच्या दृष्टीने आणखी एक बाब अशी आहे कीं, कित्येक

वतनदार लोकांस पूर्वी कामें केल्याबद्दल वतनें व हक्क मिळाले आहेत. तेंच काम जर हल्लींच्या वतनदारांना करावें लागत असलें तर त्यांनाहि मोबदला मिळणें रास्त आहे. पण अशीं कामें जर करावीं लागत नसतील तर मात्र त्यांनी आपले हक्क सोडून देऊन गरीब रयतेकडून इतःपर फुकट जिनसा घेणें बंद केलें पाहिजे. शेवटीं श्रीमंत बाबासाहेब व दिवाण रा. सा. हुल्याळ यांनी संस्थानांत ज्या सुधारणा केल्या आहेत त्याबद्दल मी त्यांचे आभार मानतों व उत्तरोत्तर अधिकाधिक सुधारणा करण्यास परमेश्वर त्यांना बुद्धि व आयुष्य देवो असें इच्छितों.'

**दुसरे अध्यक्ष श्री. पासलकर**

नंतर दुसरे अध्यक्ष रा. पासलकर यांनी आपलें भाषण वाचून दाखविलें. "श्रीमंत सरकारांनी जबाबदार राज्यपद्धति हें आपलें अंतिम ध्येय ठरविलें आहे. व प्रजेचीं गाऱ्हाणीं ऐकून घेतल्यावर जर तीं लवकर दूर होत नसतील तर श्रीमंतांनी सनदशीर व शांततेच्या मार्गानें चळवळ करण्याची प्रजेला मोकळीक दिली आहे. श्रीमंतांनी कायदेकौन्सिल नेमून बिनसरकारी सभासदांची संख्या अधिक प्रमाणांत ठेविली आहे. तसेंच श्रीमंतांनी प्रजेला आपलीं गाऱ्हाणीं गैरसोय दूर करून घेण्याकरिता लोकल बोर्डेंहि दिलीं आहेत. तेव्हा आपल्या अडचणी लवकर निवारण करून घेणें न घेणें हें प्रजेच्या तयारीवर व कर्तृत्वावर अवलंबून आहे. प्रजापरिषदेच्या पहिल्या अधिवेशनांत जे ठराव शिष्टमंडळामार्फत श्रीमंतांच्या कानावर घालण्यांत आले होते त्यांचा योग्य तो विचार करून त्यांनी प्रजेला मुद्रणस्वातंत्र्य व भाषणस्वातंत्र्य दिलें आहे. परंतु प्रजेच्या असंतोषाच्या ज्या मुख्य बाबी म्हणजे जंगल हिरडा व वतन त्यासंबंधी प्रजेचे हक्क काय आहेत याची नीट चौकशी करून समाधानकारक निकाल लागल्याशिवाय असंतोष कमी होणार नाही हें श्रीमंतांनी जाणून त्यांनी याबाबत कमिट्या नेमल्या. श्रीमंतांनी गेल्या सालीं ३३ हजार रुपयांची साऱ्याची सूट दिली, यावरून श्रीमंतांचें धोरण दडपशाहीचें आहे असें कोणीहि म्हणणार नाही. माझी सरकाराला अशी विनंति आहे कीं त्यांनी जंगल व वतनें या बाबतींत प्रजेला योग्य त्या सवलती द्याव्या. कांही पुढाऱ्यांचें म्हणणें असें आहे कीं हिरड्याबद्दल सरकारानें स्वामित्व घेऊं नये; पण जमाखर्चाची तोंडमिळवणी करण्याकरिता स्वामित्व घेणें जरूर आहे."

यानंतर रात्रौ श्री. ह. स. देशपांडे यांच्या घरीं दोनहि पक्षांतील पुढाऱ्यांची विषयनियामक सभा भरून त्यांत दुसरे दिवशीं आणावयाच्या ठरावांचा मसुदा तयार करण्यांत आला. सोमवारीं सकाळीं ११ वाजता पुढील कामास सुरुवात झाली व प्रारंभीं श्री. वा. ना. देशपांडे यांनी परिषद यशस्वी होण्याबाबत बाहेरगांवांहून आलेल्या तारा वाचून दाखविल्या. नंतर पुढीलप्रमाणें कांही महत्त्वाचे ठराव सभेमध्ये पास झाले—

**ठराव**

(१) श्रीमंतांनी नुकतेंच अस्पृश्यतानिवारणाच्या कामीं जें धोरण जाहीर केलें आहे त्याबद्दल ही परिषद श्रीमंतांचें अभिनंदन करीत आहे. (२) श्रीमंतांनी फेडरल सत्तेस मान्यता दिली व अंतिम ध्येय 'जबाबदार राज्यपद्धति' ठेवण्यांत येईल असें जाहीर केलें त्याबद्दलहि परिषदेस समाधान वाटत आहे. (३) सर्व म्युनिसिपालिट्या व लोकल बोर्डें यांत लोकनियुक्त सभासदांचें मताधिक्य असावें, संस्थानांत निदान पांच गांवीं तरी ग्रामपंचायतींची स्थापना करण्यांत यावी (४) संस्थानाच्या उत्पन्नाच्या मानानें अधिकाऱ्यांना मोठे पगार आहेत ते कमी करावे. (५) जंगलविषयक ज्या तक्रारी आहेत त्या समूळ नाहीशा करण्यास तीन बिन–आधिकारी व दोन अधिकारी यांची मिश्र कमिटी नेमण्यांत यावी. (६) भाटघर धरणामुळे लोकांनी आसपास जी नवीन वस्ती केली आहे त्या वस्तींतील रस्ते चांगले करण्यांत यावे. (७) पवनमावळ तालुक्यांत फिरत्या डॉक्टराची नेमणूक व्हावी. (८) खेडेगांवांत चांगल्या पाण्याची सोय व्हावी. (९) संस्थानांतील जबाबदार वरिष्ठ अधिकाऱ्यांनी असभ्य भाषा वापरूं नये. (१०) जबाबदार राज्यपद्धति लवकर व शांततेच्या मार्गांनी प्रजेला हस्तगत करतां यावी म्हणून प्रजेला या बाबतींत योग्य तें शिक्षण देण्यांत यावें. (११) चराईची फी सरसकट दोन आणे ठेवण्यांत यावी. (१२) एजंटांना वाहतुकीच्या मोटारी जितक्या ठेवावयाच्या असतील तितक्या ठेवण्यास परवानगी असावी.

वरीलप्रमाणे कांही मुख्य मुख्य ठराव पास होऊन श्री. आगाशे वकील यांनी अध्यक्षद्वयांचे आभार मानल्यावर परिषद संपली.

# हिंदुस्थानास सुनावलेला तीन वर्षांचा बंदिवास !

असेंब्लीचें जादा अधिवेशन दिल्ली येथे ता. ७ नोव्हेंबर रोजीं सुरू झालें आणि ता.१५ डिसेंबर रोजीं संपलें. या सवा महिन्याच्या कालांत असेंब्लीने मुख्यतः दोन कामें पार पाडलीं. एक म्हणजे ओटावा येथे हिंदी शिष्टमंडळाने जो व्यापारी करार केला होता त्याला मान्यता देऊन तदनुसार जकाती बसविण्याचें बिल तिन तीन वर्षांपुरतें मंजूर केलें.आणि दुसरें असें कीं,या महिनाअखेर वटहुकुमांची दुसरी षाण्मासिक मुदतहि खलास होऊन ते संपुष्टांत येणार म्हणून त्याना तीन वर्षांपुरतें कायद्याचें स्वरूप दिलें.खास बंगालकरितां ‘अत्याचार--प्रतिबंधक’ कायदा केला तो वटहुकुमी बिलाच्या वर्गापैकींच समजण्यास हरकत नाही. अशा प्रकारें ओटावा कराराने हिंदुस्थानाच्या व्यापाराला आणि वटहुकुमी कायद्याने त्याच्या राजकारणाला तीन वर्षें बंदिवासाची शिक्षाच ठोठावली असें म्हटलें पाहिजे.

त्यांत खेदाची गोष्ट अशी कीं, हिंदुस्थानाच्या कपाळीं आलेला हा त्रैवार्षिक बंदिवास हिंदी असेंब्लीने मान्य केला असा डंका जगभर गाजणार ! नाही तर यापूर्वी व्हाइसरॉयांनी आपल्या अधिकाराच्या जोरावर रुपयाचा पौंडाशीं पाट लावून हिंदुस्थानाचा आर्थिक घात केला होताच कीं नाही ? तसेच एकदाच नव्हे तर दोनदा, देशावर वटहुकुमांचा वज्राघात करून आपल्या वासवी शक्तीने हिंदी राजकारणाला दडपलें होतेंच कीं नाही ? पण ओटावा करार व वटहुकुमी कायदा यांना असेंब्लीनेच मान्यता दिल्यामुळे ओटावा करार हिंदुस्थानाच्या हिताचा आहे व वटहुकुमांनी चालविलेल्या दडपशाहीस हिंदी राष्ट्राचा पाठिंबा आहे असा जगाचा विपरीत ग्रह झाल्यावांचून मात्र राहणार नाही.मुंबई, बंगाल,वगैरे प्रांतिक सरकारांनी वटहुकुमी कायद्यांना आपापल्या प्रांतांत मंजुरी दिली आणि त्या योगाने त्या त्या प्रांतांना दडपशाहीच्या एक एका बराकींत कोंडून ठेवलें. त्या सर्वांवरती जाडजूड दगडी तट उभारण्याचें काम मध्यवर्ती कायदेमंडळाने शेवटास नेलें ! असेंब्ली म्हणजे कायदेमंडळांतील मेरुमणि. तिच्यांत लोकपक्ष व राजपक्ष या उभयतांचे नेचक व मातबर प्रतिनिधि असावयाचे. तिचें अधिकारक्षेत्र व्यापक; तशी तिची जबाबदारीहि मोठी. तिने ओटावा करार व वटहुकुमी कायदा यांना मान्यता दिली याचा परराष्ट्रांमध्ये असाच अर्थ होईल कीं, या व्यापारी व राजकीय बंदिवासाची आवश्यकता हिंदुस्थानाच्या लोकप्रतिनिधींनाहि पटली.

पण हा निवळ भ्रम आहे; वस्तुस्थिति याच्या अगदी उलट आहे. असेंब्लीच्या बैठकींत जमलेल्या शेळपट सभासदांच्या बहुमताला देशांतील कानाकोपऱ्यांतूनहि पाठिंबा नाही याची जाणीव जनतेलाच नव्हे, तर असेंब्लीला आणि खुद्द सरकारालाहि नाही असें नाही. असेंब्लीच्या सभागृहांत उभें राहून सर अब्दुर रहीम या सरकारी किताबवाल्या मुसलमान सभासदाने जाहीर केलें कीं, “ ओटावा कराराला असेंब्लींत बहुमत मिळालें तरी सारा देश त्याच्याविरुद्ध आहे!’ आणि हें मत श्री. चेट्टी यांनीहि मान्य केलें ! वटहुकुमी बिलाचा निषेध असेंब्लींतच तिचे एक सभासद श्री. दत्त यानी बोलून दाखविला. ते म्हणाले, “बेहेत्तर आहे, सारें जग माझ्यावर उलटलें तरी, पण मी या बिलाला कसून विरोध करीनच करीन.” बंगालच्या “अत्याचार–प्रतिबंधक” बिलाच्या बाबतींतहि, श्री. मित्र यांनी क्रांतिकारकांच्या चळवळीचा पूर्वेतिहास कथन करून असें प्रतिपादिलें कीं, “जुलमाला जुलमानेच जाब मिळतो. अशा जुलमी कायद्यामुळे अत्याचार वाढतात, ते कमी होत नाहीत. असले स्वैर कायदे व जनतेंतील वाढती गरिबी आणि बेकारी हींच अत्याचाराचीं कारणें होत. तीं दूर करण्याचा उपाय हिंदुस्थानाला तत्काळ वसाहतींचें स्वराज्य देणें हाच होय. ”

असा खराखुरा व खणखणीत हितोपदेश करणारे विदुर व विकर्ण सध्यांच्या असेंब्लींत फारच थोडे आहेत हें देशाचें दुर्दैव होय आणि ओटावा करार व वटहुकुमी कायदा हीं त्या दुर्दैवाचींच फळें होत. बहुतेक ‘ लोक–प्रतिनिधि ’ जनतेचे गण–नायक नाहीत, स्वतः गणहि नाहीत; तर केवळ गणंग आहेत हेंच या अल्पकालिक पण चिरस्मरणीय अशा असेंब्लीने जगजाहीर केलें आहे ! असेंब्लीच्या एका सभासदानेच स्पष्ट शब्दांनी कबुली दिली कीं, जेथे तेथे आम्हाला पराभवाची धूळ चारली जात आहे ती मुख्यतः कायदेमंडळावर बहिष्कार घालणाऱ्या लोकांमुळेच होय, चेट्टी किंवा भोर यांच्यामुळे नव्हे. याचा स्पष्ट अर्थ कोणाच्याहि लक्षांत येणार आहे. देशांतील प्रमुख राजकीय संस्थेने कायदेमंडळावर बहिष्कार घातल्यामुळे लायख माणसें बाहेर राहिलीं व नालायकांची भरती कायदेमंडळांतून झाली. त्याचा परिणाम या पराभवाच्या रूपाने देशास भोंवत आहे व त्याच्या जबाबदारीचें खापर जनतेच्या डोक्यावर विनाकारण फुटत आहे. असेंब्लींतील सध्याच्या गणंगापैकीं कित्येक-

पण आपल्या जबाबदारीविषयीं इतके बेफिकीर होते कीं, त्यांनी बैठकीला नुसते हजर राहण्याचीहि तकलीफ घेतली नाहीं! अंदाजपत्रकावरील चर्चेचें दळण दळीत बसणाऱ्या नित्याच्या हिवाळीपावसाळी बैठकींपेक्षाहि असेंब्लीच्या या जादा अधिवेशनापुढे राष्ट्राचा भावी व्यापार व राजकारण यांच्या दृष्टीने किती महत्त्वाचे प्रश्न येणार आहेत याचीहि शुद्धि 'लोकांनी निवडलेल्या' या गणंगांना राहिलेली दिसत नाही. याबद्दल 'सन्मान्य' सभासदांना स्पष्ट शब्दांनी कानपिचक्या देणें अध्यक्षांनाहि जरूर वाटलें.

असेंब्लींतील एकंदर १४० सभासदांपैकीं २६ तर सरकारी अधिकारीच असतात आणि ते बहुधा नियमाने हजर राहतात. सरकारनियुक्त सभासदांची संख्या १४ असून ते अशा महत्त्वाच्या बैठकीला उपस्थित असतातच. म्हणजे हे ४० हात सरकारच्या भ्रू-भंगाप्रमाणे केव्हाहि खाली वर व्हावयाचे असतात. उरलेल्या १०० सभासदांमध्ये कोणी गरम, कोणी नरम, तर कोणी थंड असे सभासद असावयाचे. पण या जादा अधिवेशनाचे वेळीं असेंहि फक्त ६२ प्रतिनिधिच हजर होते. म्हणजे ३८ जणांनी घराची ऊब सोडली नव्हती. हे बेजबाबदार व कामचुकार 'प्रतिनिधि' असेंब्लीला हजर राहते, तर वटहुकुमी बिलाला मंजुरीचा टिळा सहसा न लाभता! तसाच सरकारने जर थोडासा सरळपणा आपल्या बुद्धींत ठेवला असता आणि आपलें कृत्य खऱ्या लोकमताच्या अचूक ताजव्यांत तोलण्यासाठी आपल्या ४० हस्तकांना किंवा निदान २६ सरकारी अधिकाऱ्यांना तटस्थ ठेवलें असतें तर वटहुकुमी बिल नामंजूर होऊन खरें लोकमत प्रकट झालें असतें! म्हणजे ५६ विरुद्ध ३१ अशी मतनोंदणी न होता ३० विरुद्ध ३१ असेंच या गणंगांच्याहि असेंब्लीचें मत असल्याचें जगापुढे आलें असतें. हाच अर्थ दुसऱ्या भाषेंत सांगावयाचा तर असा कीं, वटहुकुमी बिलाला लाभलेलें बहुमत हें खरें बहुमत नव्हे आणि त्याला मिळालेली मंजुरी ही लोकप्रतिनिधींची मंजुरी नव्हे, आणि लोकसमाजाची तर नव्हेच नव्हे!

पण असा निष्कर्ष ओटावा करारास तंतोतंत लागू पडत नाही, याचें कारण त्या वेळीं पुष्कळ सभासदांनीं आपलीं मतें उलटींपालटीं करून आपल्या मतदारांशीं धडधडीत विश्वासघात केला हें होय. या विश्वासघातक्यांचे म्होरके सर हरिसिंग गौर व श्री.मोदी हे होत.हे सभासद ओटावा कराराचें असेंब्लींत पाऊल पडतांच प्रथम त्यावर धावून गेले व तुटून पडले. पण सिलेक्ट कमिटीच्या कारभाराचा–किंवा कारवाईचा–काळ मध्यंतरीं गेल्यानंतर गौर–मोदीप्रभृतींनी अवसानघात करून आपलें मोहोरें बदललें आणि ते बेलाशक बिलाच्या पाठीराख्यांत सामील झाले! त्यांची अशी थारेपालट होण्याला कोणत्या जादूची कांडी उपयोगी पडली असेल हें आज कोण सांगूं शकणार? उद्या जर सरकाराने गौर यांना 'जॉइंट पार्लमेंटरी कमिटीपुढे' पाचारलें अथवा सर झुलफिकर अल्लीखान यांच्या इच्छेप्रमाणे पंजाबी गव्हाला रेल्वेच्या दरांत सवलती दिल्या किंवा शेठ हाजी अब्दुल्ला हरून यांच्या मागणीप्रमाणे परदेशी साखरेच्या आयातीला अडसर लावला, तर मग असें ठामपणाने म्हणतां येईल कीं, अमुक सभासद तमक्या आमिषाला बळी पडला आणि फलाण्या सभासदाने फलाणा लांच खाऊन विश्वासघात केला. पण आजमितीला तसा आरोप करण्याला पुरावा पुढे आणणें जड जाईल.

ओटावा करार हिंदुस्थानाच्या व्यापाराला अपायकारक असल्याची जाणीव बऱ्याच सभासदांना होती यांत शंका नाही. त्या कराराच्या बिलावर जे ६० सभासद बोलले, त्यांतील अनुकूल भाषण करणाऱ्या सभासदांनीहि आडवळणाने पण तीच जाणीव प्रगट केली हें त्यांचीं भाषणें सूक्ष्मपणें वाचणारास कळण्यासारखें आहे. 'हा निवळ जुगार आहे' असें सर अबदुल रहीम यांनी ठणठणीत शब्दांनी बजावलें आणि सरकारतर्फे समर्थन करतांना सर जोसेफ भोर यांनाहि 'एकदा अनुभव घेऊन पाहा' अशी मखलाशी करण्यापलीकडे कांहीं उत्तर देतां आलें नाही. खुद्द फडणवीस सर जॉर्ज शुस्टर यांनीहि जवळ जवळ असाच शेरा मारला कीं, हा करार हिंदुस्थानापेक्षा ब्रिटिश साम्राज्यालाच अधिक पोषक आहे. त्यांनी स्पष्टपणें विचारलें, 'तुम्हांस जगाची बाजारपेठ स्थिर ठेवावयाची आहेना? मग तिला आधारभूत असणाऱ्या ब्रिटिश व्यापाराची खंबिरी वाढविण्यास मदत करा व ओटावा करारास मान्यता द्या.' तात्पर्य, साऱ्या जगाची व ब्रिटिश साम्राज्याची आर्थिक सुस्थिति राखण्यासाठी हिंदुस्थानानें आपल्या व्यापारी हिताचा होम करण्यास सादर व्हावें अशी सरकाराची मागणी होती. तिलाहि मान डोलावणाऱ्या 'लोकप्रतिनिधींना' बेजबाबदार म्हणावें कीं बेअकली म्हणावें हें ठरविण्याचें काम आम्ही वाचकांवरच सोंपवितों.सदासर्वदा सरकारच्या बाजूने नाचणाऱ्या मुसलमान वर्गांतल्या आठ सभासदांनीहि या कराराचे विरुद्ध मत दिलें यावरूनहि कराराचा घातकपणा उघड होतो.

ब्रिटिश व्यापाराला जागतिक मंदीचें किंवा बहिष्काराची बाधा पूर्वीइतकी पुढें जाणवूं नये म्हणून हिंदुस्थानसरकारानें असेंब्लीच्या मेणचटपणाचा फायदा घेऊन जसा

ओटावा करार मंजूर करून घेतला, तसाच वटहुकुमाचा व अत्याचार-प्रतिबंधाचा कायदा पसार करवून घेऊन सरकारने पुढे अवतीर्ण होणाऱ्या राजकीय सुधारणांना कायदेभंगवाले व क्रांतिकारक यांच्या आगीचा व रोगांचा उपसर्ग पोंचूं नये म्हणून एक प्रकारें विमाच उतरला ! होअरशाहीच्या कंजूष व चढेल धोरणांतून गाळून निघणाऱ्या सुधारणा सर्व हिंदी प्रजेला संतुष्ट करतील अशी आशा खुद्द होअर यांनाहि नसेल. तेव्हा असंतुष्ट झालेल्या लोकांनी नव्या सुधारणांविरुद्ध बंड पुकारूं नये व त्यांचा अंमल चांगल्या प्रकारें—म्हणजे आपल्याला हवा त्या रीतीने—चालावा यासाठी हुकुमशाहीची मुदत तीन वर्षे लांबविण्यांत आली आहे. 'हा निनांवी लष्करी कायदाच !' असें वर्णन नेमस्ताग्रणींनीहि ज्या सत्तेचें केलें, तिचा वरवंटा पुनः तीन वर्षे राष्ट्राच्या मस्तकावर फिरूं देण्याला सिलेक्ट कमिटींतील सभासदांची जरूर ती संमति मिळेना म्हणून तिच्या अध्यक्षांनी किती गडबडगुंडा केला आणि चार सभासदांना सिलेक्ट कमिटींतून निषेधार्थ निर्गमन कसें करावें लागलें हा इतिहास ताजाच आहे.

अशा सत्तेचा वापर गेले अकरा महिने केल्यानंतर सरकाराच्या अनुभवास असें आलें कीं, त्यांच्या अम्मलबजावणींत जर कोणता खडा खुपत असेल तर न्यायमंदिरांचा. राजकारणाचें घड्याळ न पाहतां आपल्या न्यायाच्या होकायंत्राकडे टक लावूनच हायकोर्टें हीं वटहुकुमांच्या जबड्यांत अडकलेल्या इसमांनाहि, २० हजार रुपये दंडाचें गांठोडें बहाल करून, खुशाल जाऊं देतात आणि वटहुकुमांच्या अर्थाचा—सरकाराच्या दृष्टीने—अनर्थ करतात! कॉंग्रेस ही संस्था बेकायदा ठरलेली नाही असा शास्त्रार्थ एका हायकोर्टाने सांगितला, तर कॉंग्रेसचें निशाण लावणें हा गुन्हा होत नाही असा निर्वाळा दुसऱ्या हायकोर्टाने दिला. बहिष्काराचा प्रचार हा शासनार्ह ठरत नाही असा कौल एका न्यायमंदिराने दिला; तर शांततापूर्ण निरोधनाला प्रतिबंध करणें चुकीचें आहे असें दुसऱ्या न्यायासनाने ठरविलें. एकाने तर शेरा मारला कीं 'पोलिसांचा पुरावाच लटपटीत आहे.' तात्पर्य, वटहुकुमांच्या पोटांत सांठवून ठेवलेले अन्याय हायकोर्टाच्या वांतिकारक औषधाने ओकून पडतात हें लक्षांत आल्यावरून सरकारने नव्या कायद्यांत हायकोर्टाचेच हात तोडून टाकले !

न्यायमंदिरें हीं पक्षातीत असून ब्रिटिशांचा न्याय चोख असतो असा लोकांचा विश्वास. त्रस्त जनतेला शरण जाण्यास हायकोर्टें हीं अभयस्थानें होत. पण सरकाराने नव्या कायद्यान्वयें ती निवाऱ्याची जागा बऱ्याच अंशीं उध्वस्त करून टाकली ! न्यायमंदिरांची सत्ता कमी करण्याचा अधिकार हिंदुस्थानसरकारास पोंचत नाही असा कायदेशीर मुद्दा सर गौर यांनी मांडला होता, पण सरकारच्या सल्लागारांनी तो उडवून लावला आणि हायकोर्टाचा अधिकार कमी केला. या योगाने सरकारनेच आपला हायकोर्टावरील अविश्वास जगजाहीर केला अशी टीका श्री. जोग यांनी 'अत्याचारप्रतिबंधक' बिलावर बोलतांना केली. तीच स्थिति पालकांवरील जबाबदारीची. मुलाच्या आगळिकीबद्दल बापाने दंड भरावा किंवा कैद भोगावी असा—एकाच्या गुन्ह्याबद्दल दुसऱ्याला शिक्षा करण्याचा—अधिकारहि न्यायाच्या मूलतत्त्वांस सोडून आहे असा मुद्दा उपस्थित करण्यांत आला असतां त्यालाहि वाटाण्याच्या अक्षताच लावण्यांत आल्या ! कोणाचीहि मालमत्ता जप्त करणें हें लढाईच्या धामधुमींतच क्षम्य ठरतें, एरव्ही नाही. अशी जप्ती इंग्लंडातील 'कॉमन लॉ'-चेंहि विरुद्ध आहे, या आक्षेपाचीदेखील तीच वाट. मद्यनिरोधन व स्वदेशीप्रसार यांनाहि धोकाच उत्पन्न करण्यांत आला आहे आणि ही सर्व मुस्कटदाबी कायम राहाण्यासाठी सरकाराने वर्तमानपत्रांच्या गळ्याला तांत लावून दडपशाहीवर शिक्कामोर्तब ठोकलें आहे ! !

अशा प्रकारें ओटावा करार व वटहुकुमी बिल यांचे पाश आवळून असेंब्लीने हिंदुस्थानाच्या व्यापारी व राजकीय पारतंत्र्यावर कळस चढविला आहे! आश्चर्याची गोष्ट अशी कीं, या राष्ट्रघाताचे घटक असणाऱ्या सभासदांना पुढील निवडणुकीसाठीं आतापासून कंबर कसण्याला दिक्कत वाटत नाही ! ! नव्या सुधारणांच्या वाढत्या कुरणांत आपल्याला पुनः चरावयाला सांपडावें म्हणून असेंब्लींत लहान लहान पक्षाचे गट स्थापण्याला सभासदांनी एव्हापासूनच सुरुवात केली आहे. पुढील हिंवाळ्यांत निवडणुकी होतील तेव्हा आपल्या अंगावर मतदारांनी प्रतिनिधित्वाची झूल घालावी अशा हेतूने निरनिराळ्या 'पार्ट्या' तयार होत आहेत. राष्ट्रीय पक्षांतून फुटून निघालेल्या राजाबहादुर कृष्णम्माचारियर यांचे अध्यक्षतेखाली ऐपतदाराची एक 'सेंटर पार्टी' जन्मास आली आहे. तिचे सभासद सध्या बारा असून शेतकऱ्यांचा कैवार हें या पक्षाने आपलें ब्रीद म्हणून जाहीर केलें आहे! यामिनखानांचा 'युनायटेड इंडिया' नांवाचा पक्ष असून त्याचे अकरा सभासद आहेत. ओटावा कराराला मान डोलावणारे सर हरिसिंग गौर यांच्या 'नॅशनॅलिस्ट' या मोहक पण भ्रामक नांवाच्या पक्षाचे सभासद २५ आहेत. तात्पर्य, यापुढे सरकारी

नियमाला अनुसरून, दहा सभासदांचा समूह जमला कीं त्यांचा एक पक्ष होणार. तरी या उमेदवारांत बटहुकुमी बिलाला व ओटावा कराराला मान्यता कोणी व कां दिली याचा आधीं प्रथम विचारून मगच मतदारांनी आपल्या मतांचा विनियोग करण्याचें ठरविलें पाहिजे !

# वाङ्मयांतील उसनवारीच्या मर्यादा

( ले. श्री. विनायक पुरुषोत्तम आपटे, पुणें )

" युद्धाची हौस हीच राष्ट्राच्या जिवंतपणाची खूण. ज्या राष्ट्रामध्ये शांतता व आबादानी दिसेल तें राष्ट्र हळूहळू आंतून पोखरलें जात असावें अशी खूणगांठ आपण खुशाल मनाशीं बांधावी."—

प्रसिद्ध इंग्रज ग्रंथकार रस्किन यांनें आपल्या देशाची नाडीपरीक्षा करतांना केलेलें वरील निदान वाङ्मयासहि तंतोतंत लागू पडतें. दोन वर्षांपूर्वी 'ओलेती' या 'रत्नाकरांतील' चित्रावरून उठलेलें वादळ वाचकांच्या स्मरणांतून अजून गेलें नसेल. त्या वादामध्ये पक्षोपपक्ष पुष्कळच झाले. व्हावयास नको अशी व्यक्तिगत टीकाहि झाली. पुढे कालांतरानें वादळ शान्त झालें, परंतु 'कला व नीति' ह्यांचा अन्योन्य-संबंध काय आहे ह्या महत्त्वाच्या प्रश्नावर विद्वानांनीं मननीय विचार प्रदर्शित केले आणि ते मराठी वाङ्मयास उपकारक झाले. 'प्रतिभासाधन' ग्रंथाबद्दलहि हल्लीं बरीच 'भवति न भवति' चालू आहे. प्रो. फडके व श्री. कानिटकर यांनी योग्यायोग्य मार्गांनी एकमेकांवर चढविलेले हल्ले पाहून तमासगिरांची घटकाभर करमणूक होत आहे, नाही असें नाही. भर चव्हाटयावर ही सुशिक्षित मंडळी एकमेकांशीं हमरीतुमरी करतांना पाहून लोकांना मात्र विस्मय वाटणें साहजिक आहे. हा वाद आज नाही तरी उद्यां मिटेल. परंतु ह्या वादामुळे महत्त्वाच्या एका प्रश्नास तोंड फुटलें आहे. आणि तो प्रश्न म्हणजे वाङ्मयांतील उसनवारीस कांही मोजमाप आहे किंवा नाही हा होय.

स्वतंत्र लेखन कोणतें हें ठरवितांना अस्तिपक्षीं विचार करणें वाटतें तितकें सोपें नाही. जेथे उसनवारी किंवा उचलेगिरी नाही तें स्वतंत्र असें फार तर ढोबळ मानानें म्हणतां येईल. उचलेगिरी केव्हाहि निंद्यच. वाङ्मयाच्या पवित्र क्षेत्रांत सुशिक्षित व सुबुद्ध माणसानें केलेली उचलेगिरी निंद्यच नव्हे तर किळसवाणी होय ! कॉपीराइटच्या कायद्यानें अशा उचलेगिरीस थोडाबहुत पायबंद घातला आहेच. शिवाय समंजस लोकहि अशा वाङ्मय-चोरांची योग्य संभावना चारचौघांदेखत करीत असल्यामुळे या बाबतींत अधिक न लिहिलेलेंच बरें.

## उसनवारीच्या तीन तऱ्हा

वाङ्मयांतील उसनवारीच्या तऱ्हा ठोकळ मानानें तीन असूं शकतात. एक भाषेची, दुसरी मांडणीची व तिसरी आणि अत्यंत महत्त्वाची म्हणजे विचारांची. ह्या तीन तऱ्हांपैकीं एक अगर जास्त तऱ्हा कमी-अधिक प्रमाणांत बहुतेक सामान्य अगर सर्वमान्य ग्रंथांत असूं शकतात. सर्वस्वी स्वतंत्र असें कोणतेंहि लेखन नाही असें मात्र ह्यावरून म्हणतां यावयाचें नाहीं. तीनहि तऱ्हांची उसनवारी सांपडेल असे ग्रंथ म्हणजे निरनिराळे वेचे ( Anthology ). वाङ्मयाच्या उद्यानामधून सुंदर सुंदर आणि सुवासिक अशीं वेचक पुष्पें ग्रथित करून तीं रसिकांस सादर करण्यास परिश्रम आणि कौशल्य लागत नाही असें कोण म्हणेल ? परंतु अशा पुस्तकांना स्वतंत्र ग्रंथांची सर कशी येणार ? अनुवाद अथवा भाषांतर केलेल्या ग्रंथांचीहि गत तीच; कारण येथें भाषेची जरी उसनवारी नसली तरी अनुवादित ग्रंथांतील विचारांचा भाषेतर बसलेला पगडा स्वभाषेंत आणलेल्या ग्रंथावर थोडाफार राहतोच. वरील विधानाची सत्यता श्री. हुदलीकर ह्यांनी जर्मन भाषेमधून मराठींत आणलेल्या 'तरुण वेर्टरचीं दुःखें' व 'पश्चिम आघाडीवरील सामसूम' ह्या पुस्तकांवरून कळून येईल.

## सर राधाकृष्णन् यांजवर हल्ला

केवळ मांडणीचीच उसनवारी केल्याचा बोभाटा वाङ्मयांत फारसा नाही. त्याचें कारण असें कीं, उसनवारी करावयाचीच तर ती नुसत्या मांडणीचीच कोण करतो ? कायद्याच्या सटीक पुस्तकाच्या बाबतींत मात्र एकाची मांडणी दुसऱ्यानें तंतोतंत उचलल्याबद्दल तक्रारी आहेत. प्रसिद्ध तत्त्वज्ञ डॉ. सर राधाकृष्णन् ह्यांच्यावर मांडणीची उसनवारी केल्याबद्दल तीन वर्षांपूर्वी 'मॉडर्न रिव्ह्यू'च्या संपादकांनी एकच गहजब उडवून दिल्याची वाङ्मयांत नोंद आहे. एम.ए.च्या परीक्षेसाठी आपण लिहिलेल्या प्रबंधांतील विचारांची मांडणी डॉक्टरसाहेबांनी जशीच्या तशीच आपल्या हिंदी तत्त्वज्ञानाच्या इतिहासांत दडपली म्हणून दास नांवाच्या त्यांच्याच एका विद्यार्थ्यानें

'मॉडर्न रिव्ह्यू'मधून त्याच्याविरुद्ध एकच गिल्ला केला. बंगालमधील मद्रासी व बंगाली ही धुमसणारी तेढ फुलविण्याचा हा चालून आलेला मोका संपादकांनी अर्थातच दवडला नाही. पण पुढे डॉक्टरसाहेबांनी अमूकसामीचा लाख दीड लाखांचा मला-मकम दावा कोर्टांत लाविल्यावर सर्व वातावरण एकदम शान्त झालें ! व्यक्त केलेल्या विचारांना फाटा देऊन केवळ मांडणीचीच उसनवारी शक्य नाही; आणि जरी ती शक्य आहे असें घटकाभर धरलें तरी तो कांही स्वतंत्र ग्रंथनिष्पत्तीस कालिमा आणणारा गुन्हा होत नाही.

जी गोष्ट मांडणीची तीच भाषेची. एखाद्या लेखकाच्या भाषेची आपल्या लेखनावर दाट छाया पडूं देणें हाहि वाङ्मयांतील एक उसनवारीचाच प्रकार होय. अभिजात लेखक स्वतःचीच भाषा बनवीत असतो. म्हणून भाषेची उसनवारी करण्याचा मोह लुंग्यासुंग्या लेखकाखेरीज इतरांस सहसा होत नाही. अशा लोकांस अच्युत बळवंत कोल्हटकरांचें लिखाण फार रुचतें, आणि त्याचें कारण अशांना फक्त तसेंच लिखाण पचतें हें होय. भाषेच्या उसनवारीची ही प्रथा हल्लींच्या कांही कवींत व नाटककारांत दिसून येते. गडकरी अनुप्रासयुक्त लिहित; आणि गडकरी तर प्रसिद्ध नाटककार; तेव्हा "लागा अनुप्रास जुळवावयास" असाच या लेखकांचा ग्रह दिसतो. पण हा सर्व माकडचेष्टा होत. विचारांची भरघोंव फेक करणारा गडकऱ्यांचा वारू कोठे, आणि त्यांची बालिश नक्कल करणारे कल्पनाशून्य औटघटकी नाटककारांचें तट्टू कोठे !

## खरी उसनवारी

आता तिसरी व अत्यंत महत्त्वाची उसनवारीची तऱ्हा म्हणजे कल्पनांची अगर विचारांची. ग्रंथकाराच्या स्वातंत्र्याची कसोटी येथेच लागते. 'व्यासोच्छिष्टं जगत्सर्वम्' ह्या न्यायानें जगांतील कोणतीहि कृति एकाच व्यक्तीच्या बुद्धिसर्वस्वाचें फळ म्हणून सर्वस्वी नसला तरी स्वातंत्र्य व उसनवारी ह्यालाहि कांही अदृष्ट सीमा आहेतच. जगांतील केवळ अतुल अशा कोणत्याहि लेखकाचा ग्रंथ घेतल्यास त्या ग्रंथामध्ये मांडलेल्या कल्पना केवळ त्याच ग्रंथकाराच्या डोक्यांत आल्या, आणि त्यानें रंगविलेले प्रसंग केवळ त्याच्याच मनचक्षूंपुढे उभे राहिले असें थोडेंच आहे ! केवळ तसेंच पाहूं गेलें तर जगांत नवीन अशी कोणतीहि कल्पना नाही. परंतु कल्पनांना व समाजाच्या विचारांना मूर्त स्वरूप देण्याची ही हातोटी ज्या लेखकांना उत्कृष्ट साधली तेच लेखक वाचकाच्या डोळ्यांसमोर नेहमी खेळतात आणि त्यांच्याच कृतीला वाङ्मयांत चिरस्थान प्राप्त होतें. अमूर्त परंतु जनतेच्या डोक्यांत खेळणाऱ्या कल्पनांना मूर्त स्वरूप देण्याचा उद्योग हाच लेखकाचा व्यवसाय. कल्पनांचे अणुपरमाणु समाजांत इतस्ततः विखुरलेले असतातच; ते एकत्र करून त्यांचा रस बनवून तो साच्यांत ओतण्याचें काम । लेखकाचें.

## लेखनाचे तीन प्रकार

हे कल्पना ओतण्याचे साचे साधारण तीन असूं शकतात. पहिल्या तऱ्हेच्या साच्यांचा विशेष हा कीं ते कोणाच्याच मालकीचे नसतात. धर्मशाळेसारखी त्यांची स्थिति असते. कोणीहि यावें, दोन दिवस राहावें आणि चालू लागावें, हाच येथला प्रकार. जेथे कलाकौशल्याचा अभाव आहे, परंतु कांही तरी लिहावें अशी ज्यांना इच्छा आहे असे लोक आपले विचार या साच्यांत ओततात. मुलांना फुलाची उपमा देणें आणि वदनाला चंद्र ( अमावास्येचासुद्धा ! ) म्हणणें ह्या किंवा अशाच दुसऱ्या कल्पनांची घडण ह्या साच्यांमधून होते.

दुसऱ्या तऱ्हेचे साचे कांही विवक्षित लेखकांच्याच मालकीचे असूं शकतात. ह्या साच्यांची घडण त्यांनी आपल्या आवडीनुरूप केलेली असते. आपले साच दुसऱ्या कोणीहि वापरूं नयेत म्हणून हे लेखक अत्यंत जागरूक असतात. त्यांच्या परवानगीने आपले विचार तेथे घडवून जनतेसमोर मांडणें हा वाङ्मयांतील उसनवारीचा पण क्षम्य प्रकार होय. नव्हे, मी तर असें म्हणेन कीं, अशी उसनवारी केल्याशिवाय वाङ्मयाची सुंदर वाढ होणेंहि शक्य नाही. परंतु हे साचे पळवून आणून त्यांत आपले विचार ठोकणें व ते जनतेपुढे माझे स्वतःचे म्हणून मांडणें हें गर्हणीय होय.

## कलावंत लेखक

तिसऱ्या तऱ्हेचे साचे तयार करण्याचें काम डॉ. रवींद्रनाथ ठाकूर, मि. गाल्सवर्दी, हार्डी, शॉ किंवा त्यांच्या तोडीचे असेच दुसरे कलावन्त करूं शकतात. येरा गबाळांचें हें काम नाही. ह्या साच्यांमधून निघालेलें वाङ्मय अत्यंत ओजस्वी, अभिजात व म्हणून चिरस्थायी असतें. ज्यांची प्रतिभा जातिवंत आहे, अशा लेखकांच्या कल्पनेचा संसार खरोखर रमणीय असतो. त्यांचे विचार जसे तेजस्वी तसेच ते वजनदार व जोरकस असल्यामुळें त्यांना नेहमीची मूस अपुरी पडूं लागते. कित्येक वेळां असे विचार रूढीची कोंडी फोडून भाषेवर कुरघोडी करतात. शब्दसृष्टीच्या ह्या परमेश्वरापुढे नेहमीचे वाक्प्रचार लुळे पडतात आणि मानी भाषा त्यांच्यासमोर दासीसारखी नम्रतेने उभी राहते. कोणासहि न जुमानणारा व्याकरणाचा डोंगेश्वर त्यांना बिनतक्रार शरणचिठी लिहून देतो;

आणि वेळीं-अवेळीं शिष्टाचाराचे नियम सांगणारें नीतिशास्त्र त्यांच्यापुढें आपली पोथी गुंडाळून ठेवतें. शेक्सपीयर, शॉ, किंवा आपल्याकडील तुकाराममहाराज यांचे ग्रंथ वाचल्यास वरील म्हणणें प्रत्ययास येईल.

पहिल्या तऱ्हेच्या सांच्यांतील वाङ्मय ओतीव व ठराविक नमुन्याचें असल्यामुळें जनतेमध्ये वाचनाची गोडी उत्पन्न करण्याखेरीज दुसरी कोणतीहि भरीव कामगिरी त्याच्या हातून होत नाही. दुसऱ्या तऱ्हेचें वाङ्मय ज्ञानदानाचें काम करतें. समाजास इष्टानिष्ट वळण लावण्याचें कार्य येथेच होतें. शेवटच्या सांच्यांत तयार झालेलें वाङ्मय समाजाच्या उच्च संस्कृतीचें खरें प्रतिबिंब होय; आणि म्हणूनच तें केवळ देशिक न राहतां त्याला आंतरराष्ट्रीय स्वरूप प्राप्त होतें. पहिल्या व दुसऱ्या तऱ्हेच्या वाङ्मयास चलनी नाण्याची व नोटांची उपमा दिली तर तिसऱ्या तऱ्हेच्या वाङ्मयास सोन्याची लगडच म्हणावें लागेल इतकें त्याचें महत्त्व आहे.

### ऋण–निर्देश

उसनवारीच्या दृष्टीने ह्या तीनहि तऱ्हांकडे पाहिल्यास एक गोष्ट ठळकपणाने नजरेस येते ती अशी कीं, पहिल्या व तिसऱ्या प्रकारांची उसनवारी नव्वद टक्के होत नाहीं; ह्याचें कारणहि उघडच आहे. पहिला प्रकार उसनवारी करण्याच्या किंमतीचा नसतो आणि तिसऱ्याची उसनवारी करण्याइतकी आपली किंमत नसते! राहता राहिला प्रकार दुसरा. येथे मात्र दुसऱ्याच्या ऋणाचा कृतज्ञतापूर्वक उल्लेख होणें जरूर आहे. पण मौज अशी कीं पुष्कळ लेखक मनाचा एवढाहि मोठेपणा दाखवीत नाहीत, आणि म्हणूनच उसनवारीस उचलेगिरीचें स्वरूप येऊं लागलें आहे.

आणखीहि एक गोष्ट लक्षांत ठेवणें जरूर आहे. केवळ कल्पनांचें साम्य जमलें एवढ्याच पुराव्यावर एखाद्या लेखकास परपुष्ट म्हणणें धाडसाचें होईल. श्री. ना. ह. आपटे यांच्या 'पहाटेपूर्वीचा काळोख' नांवाच्या एका कादंबरीबद्दल श्री. हडप यांनी अशीच ओरड केली होती. परंतु उचलेगिरी किंवा उसनवारी केली असें हमखास म्हणण्यास इतर बऱ्याच महत्त्वाच्या गोष्टी विचारांत घेणें जरूर आहे, लेखकाचें शिक्षण, त्याला अवगत असलेल्या भाषा, त्याचा वाचनाचा व्यासंग आणि त्याचें राहण्याचें ठिकाण ह्या सर्व गोष्टी ध्यानांत घेतल्या पाहिजेत. पुणें, मुंबई किंवा बडोदें यासारखी वाचनालयांची सोय इतरत्र फारशी नाही. आडवळणाच्या गांवीं राहिलेल्या आणि ज्याची सांपत्तिक स्थिति बेताबाताचीच आहे अशा लेखकास परदेशांतीलच काय पण स्वदेशांत प्रसिद्ध झालेल्या कित्येक उत्कृष्ट पुस्तकांचें मलपृष्ठदेखील पाहावयास सांपडलें नसेल!

ह्या उसनवारीच्या आरोपांतून मुक्त होण्याचा मार्ग एका प्रसिद्ध इंग्रज लेखकाच्या शब्दांत सांगावयाचा म्हणजे आपला वाचनाचा व्यासंग अजीबात सोडून देणें हा होय! वाङ्मयांतील त्याच्या अपूर्व यशाबद्दल सांगतांना तो म्हणतो, "माझ्या यशाचा मोठा वांटा जर कोणत्या एका गोष्टीस द्यावयाचा असेल तर ती म्हणजे माझा वाचनाचा तिटकारा. उभ्या आयुष्यांत मीं आठदहा पुस्तकें वाचलीं असतील-नसतील." सुज्ञ वाचकांना ह्या विधानाची खोंच कळून येईलच.

# नाशिक तुरुंगांतील प्रकरण

### अधिकाऱ्यांवरील खटला

नाशिक रोड सेंट्रल जेलमध्ये गेल्या आक्टोबर महिन्यांत ता. २७ रोजीं अमृतराय मुरारजी नांवाच्या 'क' वर्गांतील सत्याग्रही कैद्याला मारहाण केल्याबद्दल जेलर रॉश व जॅक्सन, शिपाई खंडू व महादू आणि वॉर्डर हुसेन या पांच आरोपींवरील खटला ता. १२ रोजीं स्पे. मॅजिस्ट्रेट मि. स्ट्रीटफील्ड यांचेपुढे नाशिक मामलेदार-कचेरींत सुरू झाला. खटला पाहण्यासाठी आगाऊ पास मागून जावें लागतें. यामुळे प्रेक्षक फारसे नसतात. सरकारतर्फे मि. शिंदे व कुंटे हे काम चालवीत असून रॉश व जॅक्सन यांचेतर्फे बॅ. ब्राऊन व श्री. टिळक वकील हे काम चालवीत आहेत. खंडूतर्फे श्री. वर्तक व महादूतर्फे श्री. सबनीस हे आहेत.

### अमृतराय यांची जबानी

ता. १२ रोजीं अमृतराय यांची साक्ष झाली. त्यांनी दिलेल्या जबानीचा सारांश पुढीलप्रमाणेः—

"मला सुरतेस ता. ९ जूनला जामीन न दिल्यावरून शिक्षा झाली. प्रथम साबरमतीच्या तुरुंगांत मी होतों तेथून इतर २०० कैद्यांबरोबर मी नाशिकच्या तुरुंगांत आलों. मला नं. ७ च्या वॉर्डांत ठेवण्यांत आलें. जेलचे अधिकारी समोरून गेले तर खाली बसून पायावर हात ठेवावे असें मला सांगण्यांत आलें; हा सर्वसामान्य नियम होता. प्रत्येकजण तो पाळतो का नाहीं याची तपासणी होत नव्हती. पुढे तो कडक रीतीनें बजावला जाऊं लागला. मला मारहाण होण्यापूर्वी ता. १० ऑक्टोबरला मीं प्रथम हा नियम मोडला. ह्या नियम

मोडणारे एकंदर सुमारें १० कैदी होते. याबद्दल सर्वांना सुपरिंटेंडंटपुढे उभें करण्यांत आलें. डॉ. दांडेकरहि यांपैकीं एक होते. मला तीन महिने तरटाचे कपडे व दंडाबेडी अशी शिक्षा मिळाली. नियम मोडण्याचें माझ्या मनांत नव्हतें. पण माझा अपमान करण्यांत आल्यामुळे मीं नियम मोडला.

### चक्की दिली

ता. १० पासून मीं नियम मोडण्यास प्रारंभ केला. तेव्हा प्रथम दोनतीन दिवस मला क्वारंटाईन-मध्ये ठेवलें. नंतर वॉर्ड नं. ५ मध्यें नेलें. ता. २४ ऑक्टोबर रोजीं सर्व नियम मोडणाऱ्यांना सुपरिंटेंडेंटपुढे नेण्यांत आलें. त्यांतून सुमारें १०–११ जण निवडून काढण्यांत आले. नवीन आलेल्या डॉक्टराने आम्हांस तपासलें. ता. २५ ला संध्याकाळीं मि. रॉश व मि. जॅक्सन हे आले व त्यांनी " पायावर हात ठेवून बसशील कीं नाही? " असें विचारलें. मी ' नाही ' असें उत्तर दिलें. त्यांनी माझें नांव टिपून घेतलें. ता. २६ रोजीं सकाळीं मी, डॉ. दांडेकर व हिरालाल अशा तिघां कैद्यांना नं. ६ च्या बराकींत नेलें. त्या दिवशीं आम्हांस चक्की देण्यांत आली. ता. २७ रोजीं सकाळीं आरोपी नं. ४ व ५ यांनी मला सांगितलें कीं, जेलर येत आहेत व तुम्ही पायावर हात न ठेवल्यास चंदूलालप्रमाणे तुम्हांसहि वागविण्यांत येईल.

### बेशुद्ध होईतों मारहाण

नंतर थोड्या वेळाने जेलर रॉश व जॅक्सन शिपाई व वॉर्डर ( आरोपी नं. १ ते ५ ) हे आले. दांडेकर यांना पायावर हात ठेवण्याबद्दल प्रश्न विचारला असता त्यांनी 'होय' असें उत्तर दिलेलें मीं ऐकलें. रॉश म्हणाले " शाबास!" नंतर ते माझे खोलीपुढे आले. मला तोच प्रश्न विचारला असतां मी 'नाही' म्हणून उत्तर दिलें. रॉश याने आरोपी नं. ४ (महादू) यास दार उघडण्यास सांगितलें. रॉश प्रथम आंत येऊन त्याने माझ्या छातीवर धक्का देऊन जोराने ढकललें. नंतर सर्व आंत आले. रॉश याने ढकलल्या-वर मी खाली पडलों. आरोपी नं. ५ हुसेन याने माझे पाय उचलले व तळव्यावर दंड्याने सुमारें अर्धा तासपर्यंत तडाखे मारले. तो मारीत असतां रॉश याने डोक्यावर, खांद्यावर, छाती-वर व पाठीवर तडाखे मारले. जॅक्सनजवळ दंडा होता व रॉशजवळ लोखंडी तुंबा असलेली काठी होती. नंतर बेड्यांना धरून चारपांच वेळा मला उचलून जमिनीवर आदळलें. तिघांनी मला उचललें. ते तिघे कोण हें आठवत नाही. नंतर रॉश याने हनुवटीवर, छातीवर व कुशींत बुटाच्या लाथा मारल्या. गळ्यावर काठीने दाबलें. मी रडलों, ओरडलों, व विव्हळलों. " तूं पायावर हात ठेवशील का नाही ?" असा प्रश्न ते सारखे करीत होते. कांही म्हणाले कीं " फक्त एक–दोन मिनिटें पायावर हात ठेव." मी शुध्दीवर असेपर्यंत "नाही" असें उत्तर देत होतों. जेव्हा जेव्हा मी ओरडण्याचा प्रयत्न करी त्या त्या वेळीं हुसेन माझा गळा धरी. नंतर रॉश म्हणाला कीं " हा ढोंग करीत आहे," तेव्हा माझ्या तोंडांत बोळे देण्यांत आले. रॉश म्हणाला, " याला धुण्याच्या जागीं न्या." धुण्याच्या जागीं मला नेल्याचें आठवतें. नळ सोडून त्यांनी मला धुतलें. माझे कपडे धुण्यांत आले व मला दुसऱ्या खोलींत नेलें.

कोणत्या खोलींत नेलें तें आठवत नाही. नंतर मी बेशुद्ध झालों. प्रथम सावध झालों, तेव्हा त्याच खोलींत होतों. नंतर काय झालें तें आठवत नाहीं.पुनः चांगला सावध झालों तेव्हा मी हॉस्पिटलमध्ये होतों. त्या वेळीं माझी आई व बाप हीं होतीं. ता. ११ नोव्हेंबरला माझ्या बापाने सुटकेचा हुकूम आणला व माझी सुटका झाली. नंतर सिव्हिल हॉस्पिटलमध्ये आलों. तेथे २५ नोव्हेंबरपर्यंत होतों. तेथून नाशिकच्या सॅनिटोरियम-मध्ये गेलों. सिव्हिल हॉस्पिटल सोडलें तेव्हा आजारी स्थितींतच होतों. नंतर खासगी डॉक्टराने मला उपचार केले. मला अजून जलदी चालतां येत नाही व कांही वाचलें असतां काय वाचलें तें नीट आठवत नाही.

### जेल डॉक्टरांची जबानी

ता. १३ रोजीं नाशिक जेलमधील डॉक्टर अवचट यांची जबानी झाली. तिचा सारांश पुढील प्रमाणेः–"अमृतलाल मुरारजी याचेसंबंधी मला प्रथम ता. २९ रोजीं सकाळीं ७ला खबर मिळाली. त्याच्या खोलींत जाऊन त्यास तपासण्यास मला रॉश याने सांगितलें. मी नं. ६च्या बराकींत गेलों. खोलीचा नंबर ध्यानांत नाही. खोली दारापासून लांबच्या टोकाला होती. पण अगदीं शेवटची नव्हती. अमृतलाल बेशुद्ध स्थितींत होता.त्याने कांही बोलावें म्हणून मीं प्रयत्न केला. पण तो बोलेना. अमृतलाल उताणा निजला होता. त्याच्या अंगावर त्याचे कपडे व ब्लँकेट होतें. त्याला पाहिल्यावर मी मुख्य डॉक्टर न्यूबोल्ट यांचेकडे गेलों. दोघांनी त्याला तपासलें व त्यास ' क ' वर्गाच्या कैद्यांच्या दवाखान्यांत नेलें. तेथे त्यास न्यूबोल्ट यांनी तपासलें "

यानंतर डॉ. न्यूबोल्ट यांची पुढीलप्रमाणे जबानी झालीः-"नाशिकच्या तुरुंगावर मी ता. ३ ऑक्टोबरला कामावर आलों. ' क ' वर्गाच्या कैद्यांसाठी काढले.

त्या "एक्स्टेन्शन कँपवर मी डॉक्टर व दुय्यम सुपरिंटेंडेंट या दोनहि कामांवर होतों. 'क' वर्गाचे कैदी नियम पाळीत नव्हते. ते पायावर हात ठेवण्यास हरकत घेत. मला हें जॅक्सन याने कळविलें. जॅक्सन माझ्या हाताखाली होता व आम्हां दोघांवर मुख्य सुपरिंटेंडेंट मि. विकहॅम यांची देखरेख होती. अमृतलाल, दांडेकर व चंदूलाल वैद्य यांचीं नोंदबुकें (हिस्ट्री टिकेट्स) मी हजर करतों. अमृतलाल व चंदूलाल यांस दंडा बेडी देण्यांत आली. दांडेकर यास दहा दिवस हातबेडी देण्यांत आली. नियमभंग माझ्या देखत घडले नाहीत. जॅक्सन याने मला त्या गुन्ह्यांसंबंधी खबर दिली. नियमभंग झाले तेव्हां सर्व कैदी एक्स्टेन्शन कँपमध्ये होते. नंतर त्यांस नं. ५ च्या बराकींत नेलें. अमृतलाल, दांडेकर व चंदूलाल हे त्यांत होते. गुन्हेगारांचे म्होरक्ये यांची तपासणी ते शारीरिक शिक्षेला लायक आहेत का नाहीत, याबद्दल ता. २५ ऑक्टोबरला करण्यांत आली. ते सुमारें १५ जण होते. सर्व लायक आहेत असें आढळलें. ता. २९ आक्टोबर रोजीं सकाळीं अमृतलाल आजारी असल्याबद्दल डॉ. अवचट यांच्याकडून समजलें. मी त्याच्या खोलींत गेलों. तो बेशुद्ध स्थितींत पडला होता. त्याला डोलीवर ठेवून दवाखान्यांत नेलें. तेथे त्याला झालेल्या दुखापतींची मीं नीट तपासणी केली. त्या वेळीं दुपारीं १ वाजण्याचा सुमार होता. ता. ३१ रोजीं अमृतलाल हळूहळू शुद्धीवर आला. ता. ३ नोव्हेंबर रोजीं त्याने बोलण्याचा प्रयत्न केला. तो ता. ११ पर्यंत जेलच्या दवाखान्यांत होता. त्या दिवशीं तो पूर्ण शुद्धीवर होता व [illegible] साहाय्याने तो जेलच्या ऑफिसपर्यंत चालला. नंतर त्यास सिव्हिल हॉस्पिटलमध्ये नेलें.

ता. ३० ऑक्टोबर रोजीं सकाळीं सुपरिंटेंडेंट यांस मीं या बाबतींत खबर कळविली. मी स्वतः गेलों नाही. रिपोर्ट पाठविला. आठवड्याच्या फेरीमध्ये ता. ३१ ला सुपरिंटेंडेन्ट विकहॅम यांनी दवाखान्यांत अमृतलाल यांस पाहिलें. अमृतलालच्या सर्व जखमा कठिण पदार्थाच्या आघाताने झालेल्या अशा आहेत. तपासणीपूर्वी १२ ते २४ तास अगोदर त्या झाल्या असाव्या. डोक्यावरील व तोंडावरील दुखापतींमुळे बेशुद्धि आली असावी असें मला वाटतें. ता. ३१ ला अमृतलालने डोळे उघडून आजूबाजूस पाहिलें, पण बोलला नाही."

### सिव्हिल सर्जनांची जबानी

यानंतर नाशिक सिव्हिल हॉस्पिटलचे नवीन सिव्हिल सर्जन मेजर फ्रॅन्सिस यांची जबानी झाली. ते म्हणाले "मी ता. १९ नोव्हेंबरला नाशिक सि. हॉस्पिटलमध्ये कामावर आलों. अमृतलाल हा तेथे होता. ता. २५ ला तो बरा झाल्यामुळे त्यास मोकळें केलें. त्याची रुग्णपत्रिका माझेजवळ आहे! ता. ११ ला तो आला त्या वेळीं डी सिल्व्हा हे सिव्हिल सर्जन होते."

डी सिल्व्हा यांची यानंतर साक्ष झाली. ते म्हणाले "ता. २ नोव्हेंबरला अमृतलाल यास मीं तुरुंगांत तपासलें. तो अंथरुणावर निजला होता व दोन इसम त्याची शुश्रूषा करीत होते. माझ्या तपासणीच्या वेळीं तो शुद्धीवर होता, पण प्रश्नांचीं उत्तरें देत नव्हता. त्याला बोलतां येत नव्हतें कीं काय हें सांगतां येत नाही. त्याच्या शरीरावर अनेक जखमा होत्या. तो शुद्धीवर होता असें मी म्हणतों याचें कारण डोळे उघडून तो माझ्या हालचालीप्रमाणे नजर फिरवून पाहत होता. जखमा त्याने स्वतःच करून घेतलेल्या अशा नाहीत. डोक्यावर व तोंडावर झालेल्या दुखापतीमुळे बेशुद्धि आली असावी. तोंडावरील जखमा लांब व बोथट अशा वस्तूने झाल्या असाव्या. ता. ११ला त्यास सिव्हिल हॉस्पिटलमध्ये आणलें त्या वेळीं त्यास मीं तपासलें. त्याच्या अंगावरील सूज व त्यास आलेली अशक्तता यांबद्दल त्यास उपचार केले. अंशतः जखमांमुळे व अंशतः ता. २ नोव्हेंबरनंतर आलेल्या तापामुळें त्यास अशक्तता होती. तो बहुधा मलेरियाचा ताप असावा असें वाटतें."

यानंतर डॉ. न्यूबोल्ट यांस तापासंबंधी प्रश्न विचारण्यांत आले; तव्हां ते म्हणाले "ता. २९ रोजीं प्रथम उपचार करण्यांत आला तेव्हा अमृतलालच्या अंगांत ताप होता. तो ता. ४ नोव्हेंबरपर्यंत होता. त्या दिवशीं तो उतरला व पुनः १०० अंशांपर्यंत चढला. ता. ४ नंतर ताप वाढल्याने मीं सिव्हिल सर्जन यास बोलावलें. अमृतलाल यास ता. २९ पासून ताप येत असल्याबद्दल मीं सिव्हिल सर्जन यांस सांगितल्याचें मला आठवत नाही."

### डॉ. दांडेकर यांची साक्ष

याप्रमाणें वैद्यकीय अधिकाऱ्यांच्या साक्षी झाल्यावर डॉ. दांडेकर यांची साक्ष झाली. ते म्हणाले, "मला बांद्रें येथे हजेरीची अट मोडल्याबद्दल १ वर्षाची शिक्षा झाली व 'क' वर्ग मिळाला. ता. १४ सप्टेंबरला ठाण्याच्या तुरुंगांतून मला नाशिकच्या तुरुंगांत आणलें. तेथे एक्स्टेन्शन कँपमध्ये मी होतों. अमृतलाल तेथे होता. पायावर हात ठेवण्याच्या शिस्तीबद्दल सर्व कैद्यांना सांगण्यांत आलें. या नियमाचा भंग करण्यास पांचसहा कैद्यांनी आरंभ

केला. त्यांना महिनाभर दंडाबेडींची शिक्षा झाली. त्यांत मी नव्हतों. ता. १० रोजीं आणखी कांही कैद्यांनी नियमांचा भंग केला त्यांत मी होतों. जेलर रॉश यांच्या हुकुमाने आम्हांस न्यू बोल्ट यांचेसमोर उभें करण्यांत आलें. चार दिवस शिक्षेचें अन्न आम्हांस देण्यांत आलें. क्वारंटाईनमध्यें वेगळ्या खोल्यांत आम्हांस तीन दिवस ठेवलें. नंतर नं. ५ च्या बराकींत नेलें. तरीहि आम्ही पायावर हात ठेवण्याचें नाकारीत होतों. ता. २४ ला रॉश यानें येऊन नियमपालनाबद्दल आम्हांस विचारलें. ता. २५ ला सुमारें २४ जणांना ऑफीसवर नेलें. आमच्यापैकीं १० जणांना शारीरिक शिक्षा देण्यासाठी म्हणून रॉश व जॅक्सन यांनी निवडलें. वैद्यकीय दृष्ट्या न्यूबोल्ट यांनी तपासून शारीरिक शिक्षेस लायक अशी आमच्या नोंदबुकांत नोंद करण्यांत आली. ता. २६ रोजीं रॉश यानें आम्हांस नं. ६ च्या बराकींत नेऊन चक्की देण्याचा हुकूम केला. "एकाला ताळ्यावर आणला व एकदोन दिवसांत तुम्हांसहि ताळ्यावर आणीन" असें रॉश म्हणाला.

## जिवाला धोका !

नं. ६ च्या बराकींतील, नं. ५४ च्या खोलींत मला व अमृतलाल यांस नं. ५५ च्या खोलींत ठेवलें. आम्हांस ४० पौंड ज्वारी दळण्यास दिली. ता. २७ रोजीं सकाळीं ७ चे सुमारास आरोपी नं. १, २, ४ व ५ हे पाण्याच्या टोटीच्या बाजूने व्हरांड्यावरून आले. प्रथम माझ्या खोलीजवळ आले व 'नियम पाळशील की नाही!' म्हणून विचारलें. आदले दिवशीं चंदुलाल व आरोपी नं. ५ यांनी 'नियम मोडल्यास तुझ्या जिवाला धोका येईल' असें सांगितलें होतें. मीं नियम पाळण्याचें कबूल केलें. नंतर ते अमृतलालचे खोलीकडे गेले. दोनहि खोल्या बंद होत्या. बाहेरून रॉश यानें तोच प्रश्न अमृतलाल ह्यांस विचारला. त्यानें "नाही" असें उत्तर दिल्याचें मीं ऐकलें. नंतर रॉशने दार उघडण्याचा हुकूम केल्याचें ऐकलें. मला रॉश हा आंत गेलेला दिसणें शक्य नव्हतें. मला काठीचा आवाज व "तूं ऐकलेंच पाहिजे" असे रॉश यांचे उद्गार ऐकूं आले. काठ्या, दंडुके यांचे आवाज व अमृतलालचें ओरडणें मीं ऐकलें. मारण्याचा आवाज मीं २० मिनिटेंपर्यंत ऐकला. नंतर अमृतलालचा आवाज हळू येऊं लागला. मारणें थांबलें. पुनः प्रश्न विचारण्यांत आला व पुनः मारणें चालू झालें. जड वस्तु जोरानें जमिनीवर आदळल्यासारखा आवाज मला ऐकू आला. दंडुक्याचा एक तुकडा बाहेर फेकलेला मीं पाहिला. कांही वेळाने अमृतलालचा आवाज थांबला, पण मारणें चालू होतें.

## जमिनीवर रक्ताचे डाग

"जोंपर्यंत हा कबूल होत नाही तोंपर्यंत यांस पुनः मारण्यांत येईल" असे रॉश याचे उद्गार मीं ऐकले. नंतर तो म्हणाला, "याला दुसऱ्या खोलींत नेऊन ही खोली धुतली पाहिजे." बंगाली हा अमृतलाल यास माझ्या खोलीवरून नेतांना मीं पाहिलें. आरोपी नं. ५ हा मागोमाग होता. अमृतलालच्या अंगावर लंगोटीखेरीज कपडे नव्हते. मला दोन क्षणच तो दिसला. ता. २६ ला माझ्या खोलींतील चक्की जड आहे, अशी मीं आरोपी नं.४ व ५ यांचेजवळ तक्रार केली. अमृतलाल यास दुसरीकडे नेल्यावर मला आरोपी नं. ४ याने नं. ५५ च्या खोलींत नेलें. शुक्र नांवाच्या झाडूवाल्याने खोली झाडली. तेथे रक्ताचे डाग दिसत होते. ३॥ वाजेपर्यंत मी त्या खोलींत होतों. नंतर मला नं. २७ च्या खोलींत नेलें. मी दुसरे दिवशीं पायखान्याकडे जातांना नं. ३२ च्या खोलींत अमृतलालचें डोकें मला दिसलें. ता. २७ रोजीं बंगाली याने अमृतलालसाठी माझी लंगोटी मागून नेली. ता. ४ डिसेंबरला मी सुटलों."

याप्रमाणे साक्षी झाल्यावर त्या दिवसाचें काम संपलें. ता. १४ रोजीं आरोप ठेवण्याबद्दल बॅ. ब्राऊन, मि. सबनीस व मि. वर्तक यांचीं भाषणें झालीं व शिंदे यांनी उत्तर दिलें. झालेल्या साक्षींत आरोपी नं. ३ व ४ यांना प्रत्यक्ष मारतांना पाहणारा साक्षीदार नसल्याने आरोप ठेवण्यापूर्वी ता. १५ ला आणखी साक्षी घेण्याचें ठरलें व त्या दिवसाचें काम संपलें.

## महमदअल्लीची साक्ष

ता. १५ रोजीं महमदअल्ली ऊर्फ सफदरखान जंगी या नाशिक जेलमधील कैद्याची जबानी झाली. तिचा सारांश पुढीलप्रमाणेः "मी अलाहाबाद युनिव्हर्सिटीचा 'एम्. ए.' आहे. मी पेशावर येथें ए. व्ही. स्कूलचा हेडमास्तर होतों. १९३० पासून नाशिकजेलमध्ये आहें. सर्व आरोपींस ओळखतों. रॉश यांना १९२३ मध्यें मीं येरवडा जेलमध्ये होतों तेव्हापासून ओळखतों. ६ व्या नंबराच्या यार्डांत १२ नं. च्या खोलीमध्यें मी गेल्या आक्टोबरांत होतों. मी, अमृतलाल, दांडेकर व चंदूलाल यांस ओळखतों. नं. ६ सेपरेट यार्ड यांत आरोपी नं. ३ खंडू हा हवालदार होता व आरोपी नं. ४ महादू हा वार्डर शिपाई होता. किल्ल्या ठेवण्याचें काम त्याचेकडे होतें. याच वॉर्डांत आरोपी नं. ५ हुसेन हा कैदी वॉर्डर होता. ता. २६, २७ व २८ आक्टोबरं

रोजीं या यार्डमध्ये घडलेल्या गोष्टी मला आठवतात. ता. २६ रोजीं अमृतलाल यास नं. ६ यार्डमधील एका खोलींत चक्की पिसतांना मीं पाहिलें. तो, दांडेकर व हरीलाल यांचेबरोबर नं. ५ यार्डमधून नं. ६ यार्डमध्ये येतांना मीं पाहिले. ता. २७ आक्टोबर रोजीं सकाळीं मी माझ्या खोलीबाहेर कुराण वाचीत बसलों होतों. ७॥ वाजण्याचे सुमारास आरोपी नं. १ व २ हे दोघे येतांना मी पाहिलें. त्यांचे मागोमाग हुसेन वॉर्डर होता. अमृतलालच्या शेजारच्या दांडेकराच्या खोलीशीं ते थांबले. पायावर हात ठेवण्याबद्दल दांडेकराला त्यांनी प्रश्न विचारलेला मीं ऐकला. थोडें बोलणें झाल्यावर हे लोक पुढच्या खोलीपाशीं गेले. अमृतलाल यास पायावर हात ठेवण्यासंबंधी प्रश्न केलेला मीं ऐकला; उत्तर मला ऐकूं आलें नाहीं. हा वेळपर्यंत महादू हा मागच्या खोल्यांच्या रांगेकडे होता. त्याला दाराचें कुलूप उघडण्यासाठी बोलावण्यांत आलें. दार उघडल्यावर लोक आंत गेल्याच्या पावलाचा आवाज मीं ऐकला. नंतर एकसारखे काठ्या व दंडे यांच्या तडाख्यांचे आवाज व अमृतलालाच्या भयंकर किंकाळ्या ऐकू आल्या. सुमारें १५ मिनिटें हें मारणें चालू होतें.

### बोंब करता है करो करो

"बोंब करता है,करो करो" असा हुसेन फकीरा याचा आवाज मीं ऐकला. यानंतर किंकाळ्या बंद होऊन दडपलेले उसासे ऐकूं येऊं लागले.तडाख्यांचा आवाज बदलला व ते मऊ भागावर मारण्याचा आवाज आला. मी या भयंकर मारहाणीनें भयभीत होऊन जमिनीवर डोकें टेकून या कैद्यासाठी परमेश्वराची प्रार्थना करूं लागलों. नंतर १० मिनिटें गेलीं. मारण्याचा आवाज बंद झाला होता. रॉश हा माझ्याशीं १९२३ सालापासून दयाळूपणानें वागे. म्हणून कैद्याचे वतीनें मध्यस्थी करण्यास पुढे जाण्याचे माझे मनांत आलें. मी पुढे जाऊन अमृतलालाच्या खोलीपुढे अर्धवट खांबामागे असा उभा राहिलों. माझ्या पुढील देखावा भयंकर होता. पांचहि आरोपी उभे असून त्यांच्या पायांशीं अमृतलाल पडला होता. आरोपी नं.५ हा अमृतलालाच्या पायांतील आडाबेडीचे कडीनें त्याचा पाय उचलून तळव्यावर जोरानें दंडे मारीत होता. महादू हा तितक्याच जोरानें मांडीवर व माकडहाडावर तडाखे देत होता. पांच मिनिटांनी आरोपी नं. ३ खंडू हा दाराकडून धावत आला व मारण्यांत सामील झाला. तो व आरोपी नं. २ हे दंड्यांनी बरगड्यांवर तडाखे देत होते. आरोपी नं. १ रॉश हा त्याच्या हातांतील "ए. डी. पोलो हंटर" ने अधिक दुःख होईल अशा नाजूक भागांवर मार देत होता. अमृतलाल अर्धवट बेशुद्ध स्थितींत होता.

### हंटरला लावलेला शिशाचा गोळा

त्याचें कण्हणें अगदी मंद झालें होतें. चेहऱ्यावरील आठ्यांवरून तीव्र वेदना होत असल्याचें दिसत होतें. आरोपी नं. १ च्या हंटरला लावलेला शिशाचा गोळा निखळून जमिनीवर पडला. त्या वेळीं मारणें थांबलें. रॉश यानें पायावर हात ठेवण्याबद्दल पुनः प्रश्न विचारला. अमृतलाल यानें मानेनेंच नकार दर्शविला. पुनः दंड्यांचे आवाज सुरू झाले. नं. ५ हा अमृतलालच्या तंगड्यांवर व गुढघ्यावर तडाखे देत होता. अमृतलाल असहाय स्थितींत तडफडत होता. हा प्रकार पाहून मला मध्यस्थी करण्याचें धैर्य झालें नाहीं व मी तसाच परत गेलों. मारणें थांबविण्याबद्दल रॉश यानें हुकूम केलेला मीं ऐकला. सर्व लोक खोलीबाहेर पडले. नं. १ व २ हे आरोपी माझ्यासमोरून बाहेर गेलेले मीं पाहिले.महादु घाबरून इकडे तिकडे धावत होता. दारापाशीं जाऊन त्यानें आपल्या मोडलेल्या दंड्याचे तुकडे लपविल्याचें मीं पाहिलें. हुसेन यानेंहि आपल्या मोडलेल्या दंड्याचे तुकडे तेथेच लपविले.नंतर माझ्या खोलीपाशीं येऊन भिंतीवर पाय ठेवून पायाच्या पट्ट्या त्यानें सोडल्या. त्यावर रक्ताचे डाग होते. त्यानें बेडी काढली. रक्ताचे डाग धुवून काढण्यासाठीं विश्वनाथ बानर्जी या कैद्याला सांगितलें. शंकर नांवाच्या कैद्यास खोली धुण्यास व अमृतलाल याचें अंग धुण्यास सांगितलें. नंतर पुनः मी अमृतलाल यास पाहण्यास गेलों. तो त्याच खोलींत होता. त्याचे पायाचे तळवे व गळा खूप सुजला होता. तोंड अर्धवट निळें झालें होतें. पाय दुखावले होते. डोळे लालभडक झाले होते. कपाळावरून रक्त येत होतें. तोंडांतून रक्त येत होते. मला तें दृश्य पाहवेना व मी पुनः माझे खोलींत परत आलों. अमृतलाल यास धुतल्यानंतर दुसऱ्या खोलींत नेलें. ती नं. ४० ची खोली असावी. पुढे १० वाजता सुपरिंटेंडेंट राउंडला आला. नं.१ व २ यार्ड त्यानें पाहिले. पुढील यार्डांत रिपोर्ट करण्यासारखें कांहीं नाहीं असे रॉश यानें सुपरिंटेंडेंटला सांगून त्यास पुढे येण्याचें थांबविलें. या वेळीं मी माझ्या यार्डाच्या दारांशीं हवालदार यांस संख्या मोजण्याचे कामीं मदत करीत होतों. दुपारीं ४ ते ५ च्या सुमारास अमृतलाल यास मागच्या ओळींत ३१ किंवा ३२ नंबरच्या खोलींत नेलें. त्याबरोबर दांडेकरालाहि नेले.

### खिडकीवरून पाहिलें

या वेळीं पुढच्या ओळीच्या खोलींतील एक

महमद हुसेन कल्याणी नांवाचा कैदी खिडकीवर चढून पाहात होता. त्याला जॅक्सनने पाहिलें व शिक्षेसाठी उभें केलें. रात्रीं अमृतलाल शुद्धीवर होता, कारण सायंकाळीं ४ ते पहाटे ४ पर्यंत त्याचें कण्हणें ऐकूं येत होतें.पहाटे ५ नंतर त्याचें कण्हणें ऐकूं येईनासें झालें. महमद हुसेन या कैद्याला सुपरिंटेंडेंटपुढे उभे केलें. तो खिडकीवर चढल्याचें रॉश याने सुपरिंटेंडेंटला सांगितलें, पण काय पाहण्यासाठीं चढला हें सांगितलें नाही. त्याला १० दिवस आडाबेडीची शिक्षा झाली. सुपरिंटेंडेंटने कांही खोल्या पाहिल्यावर बाकीच्या खोल्या रिकाम्या असल्याचें रॉश याने सांगितलें म्हणून सुपरिंटेंडेंट पुढे गेला नाही. त्याच दिवशीं मला व विश्वनाथ बानर्जी याला नं. ४ च्या यार्डांत नेलें. तेथें तीन राजकीय कैदी असल्यामुळे पांच मिनिटांनंतर आम्हांस नं. ३ च्या यार्डांत नेलें. असें करण्याबद्दल रॉशचा हुकूम आहे असें खंडूने आम्हांस सांगितलें. दोन तासांनी बानर्जी यास काम करण्यासाठी फॅक्टरींत व निजण्यासाठीं सर्कलमध्ये पाठविण्यांत आलें. मी यार्ड नं. ६ मध्ये होतों. त्या वेळपर्यंत अमृतलाल यांस अन्न किंवा वैद्यकीय मदत मिळाली नाही. याप्रमाणे उपाशी ठेवणें व उपचार न करणें म्हणजे ठार मारण्याचा प्रयत्न होईल असें मी आरोपी नं. ३, ४ व ५ यांना सांगितलें. पण त्यांनी दुर्लक्ष केलें. शनिवारीं डॉक्टर येऊन गेल्यावर अमृतलाल यास दवाखान्यांत नेल्याचें मीं पाहिलें.

चंदूलाल या 'क 'वर्गाच्या राजकीय कैद्यास ता. २२ आक्टोबर रोजीं यार्ड नं.५मधून नं ६मध्ये आणून चक्की दिली होती. त्याने अन्न घेण्याचें व काम करण्याचें नाकारलें असें कळल्यावरून मीं त्यास तसें न करण्यास सांगितलें. त्यानें ऐकलें नाही. त्यानंतर रॉशने त्याला खोलींत ता. २३ आक्टोबरला खांद्यावर मारलें. हुसेन फकीरा याने त्यास खाली पाडून त्याच्या तळव्यावर मारलें. तो बेशुद्ध झाल्यावर मारणें थांबलें. तीन दिवसांनंतर अमृतलाल या यार्डांत आला. चंदुलालनें मला सांगितलें कीं, या नव्या आलेल्या तीन कैद्यांना सांग कीं, त्यांनी ऐकलें नाही तर त्यांस मार बसेल. आरोपी नं. ५ नें मला अमृतलालकडे नेलें. दांडेकराने नियम पाळण्याचें कबूल केलें. पण अमृतलाल म्हणाला कीं मी जीव गेला तरी अपमान सोसणार नाही. ही गोष्ट ता. २६ ला झाली. ता. २७ रोजीं मारल्यानंतर रॉश खोलीबाहेर आला. तेव्हा त्याचा ए. डी. पोलो हंटर मोडला होता."

## महमदअल्लीची उलट तपासणी

सबनीस वकील यांनी आरोपी नं. ३ तर्फे उलटतपासणींत कांही प्रश्न विचारले. महमदअली ऊर्फ सफदरखान म्हणाला "डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटने पूर्वी माझी जबानी घेतली नाही. त्यांनी फक्त माझ्या खोलीचा व इतर कैद्यांच्या खोलीचा नंबर विचारला. पोलीस सुपरिंटेंडेंटलाहि माझी जबानी घेऊं नका अशी मीं विनंति केली तरी थोडीशी जबानी मीं दिली. जेलचे अधिकारी समोरून जाईपावेतों मलाहि पायावर हात ठेवावे लागत. ता. २७ रोजीं याप्रमाणे मीं पायावर हात ठेवले. अमृतलालाच्या खोलीपुढे मी पांच मिनिटें उभा होतों." आरोपी नं. ५ याने स्वतः सफदरखान याची उलटतपासणी केली तेव्हा सफदरखान म्हणाला. "अमृतलाल व दांडेकर हे नं. ५ मधून नं. ६ च्या यार्डांत आले त्यावेळीं दोघानाहि चक्कीचें काम दिलें होतें. दुसरे दिवशीं अमृतलाल यास मारण्यात आलें. चक्कीच्या कामाबद्दल त्यांच्या पुस्तकांत नोंद केली किंवा नाहीं हें माहीत नाहीं. त्यांनी किती काम केलें हेंहि माहीत नाही. ता. २६ रोजीं आरोपी नं. ५ याने मला सांगितलें कीं, राजकीय कैदी नियम मोडतात त्यांस तसें न करण्याबद्दल उपदेश करा."

याप्रमाणे साक्षी झाल्यावर आरोप ठेवण्यापूर्वी आरोपींना कांही सांगावयाचें आहे कीं काय म्हणून विचारलें. नं १ ते ४ यांनीं पुढें काय सांगावयाचें तें सांगूं असा जबाब दिला. नं.५वॉर्डर हुसेन आरोपी याने पुढीलप्रमाणे आपलें म्हणणें सविस्तर सांगितलें "अमृतलाल हा दोन दिवस चक्कीच्या बराकींत होता. त्याला रोज ४० पौंड दळण दिलें होतें तें त्यानें पुरें केलें नाहीं. सफदरखान व बंगाली मला म्हणाले कीं तूं लवकरच जानेवारींत सुटणार आहेस तेव्हा तूं कांही त्रासांत पडूं नको. मीं त्यांना सांगितलें कीं, मला कोणाला मारण्याची इच्छा नाही. तुम्ही या राजकीय कैद्यांना सांगा कीं, जेलर आले असतां पायावर हात ठेवा. त्यांनी ठेवले नाहीत तर मला जाब द्यावा लागतो. सफदरखान चक्कीच्या खोलीकडे गेला व त्याने अमृतलाल व दांडेकर यांस पायावर हात ठेवण्यास सांगितलें. दांडेकर व चंदूलाल यांच्या खोल्यांचीं कुलपें बंद नव्हतीं. मी, दांडेकर, चंदूलाल, सफदरखा व बंगाली असें पांचजण अमृतलालकडे गेलों. अमृतलाल याच्याशीं इंग्रजींत न बोलता गुजराथींत बोला म्हणजे मला समजेल असें मी म्हणालों. चंदूलाल व दांडेकर यांनी अमृतलाल यास नियम पाळण्यास सांगितलें. मींहि सांगितलें. तेव्हा मान कापली तरी मी पायावर हात ठेवणार नाही असें

अमृतलाल म्हणाला. त्याने चक्कीचें काम अर्धेंच संपविलें.

दुसरे दिवशीं सकाळीं ७–७॥ चे सुमारास जेलर रॉश आला. जॅक्सन बरोबर होता. चंदुलाल टोंकाच्या खोलींत होता. अधिकारी येत आहेत पायावर हात ठेवा असा इशारा मीं दिला. चंदुलालने पायावर हात ठेवले. पुढील खोल्या रिकाम्या होत्या. शेवटीं अमृतलाल व दांडेकर यांच्या खोल्या शेजारीं होत्या त्यांना नीट बसण्याचा इषारा मीं दिला. दांडेकर नीट बसला. त्याचें आरोपी नं. १ शीं इंग्रजींत कांही संभाषण झालें. नंतर अमृतलालकडे गेलों. अमृतलाल बसला; पण पायावर हात ठेवले नाहीत. दोन जेलर, मी व आरोपी नं. ४ असे दारापुढे उभे होतों. रॉशने त्याला विचारलें कीं पायावर हात कां ठेवीत नाहीस ? अमृतलाल म्हणाला ' हा नियम पाळण्यास गांधींचा हुकूम नाहीं. इतर सर्व नियम पाळीन पण हा नियम पाळणार नाही ' रॉश निराश झाला व रागावला. किल्ल्या बाळगणाऱ्या शिपायास त्याने खोलीचें कुलप उघडण्यास सांगितलें. रॉशने हाताने अमृतलालाच्या छातीवर धक्का दिला व पायावर लाथा मारल्या व अमृतलाल पाठीवर पडला. जॅक्सनने दंड्याने मारण्यास आरंभ केला. खंडू हवालदार सर्कलचे बाजूने धावत आला व त्यानेंहि मारण्यास सुरुवात केली. मी व आरोपी नं. ४ उभे होतों. रॉशनें म्हटलें कीं 'नुसते उभे काय राहिलांत?' हुकूम न मानल्या-बद्दल इतर वॉर्डरांची माफी कापल्याचें व त्यांना शिक्षा केल्याचें मला माहीत होतें.

### अमृतलालचे पाय उचलले

मीं आडाबेडीनें अमृतलालचे पाय उचलले व तळव्यावर ६ तडाखे दिले. आरोपी नं. ४ ने त्यास खांद्यावर मारलें. अमृतलाल ओरडूं लागल्यावर रॉश म्हणाला ' तो बोंब करतो आहे त्याचें तोंड टोपीनें बंद कर. ' मी त्याची टोपी काढून तोंडावर धरली. पण तो गुदमरेल म्हणून फार जोराने कोंबली नाही. रॉश त्यास मारीत होता. अमृतलाल बेशुद्ध झाला. त्याचें ओरडणें थाबलें. पायावर हात ठेवण्याबद्दल त्यास विचार असें रॉश मला म्हणाला. त्याप्रमाणें विचारलें. तेव्हा मानेने त्याने नकार दर्शविला. तो नियम पाळीपर्यंत रोज त्यास थोडेंफार मारीत चला असें रॉशने मला सांगितलें. त्याच्या ए. डी. पेलो हंटरचा शिशाचा गोळा निखळून पडला. आरोपी नं. ४ चा दंडाहि फुटला. परत जातांना रॉशला मी म्हणालों कीं, तुम्ही वकील बॅरिस्टर याल, पण मी मात्र अडकेन.

अमृतलाल यास धुवून कपडे बदलण्यास रॉशने सांगितलें. आरोपी नं. ४ निघून गेला. मीं बंगाली यास बोलावलें; तो बटनें करण्याचें काम करीत होता. शंकरलाहि बोलावलें. अमृतलाल यांस आम्ही हौदावर नेले. शंकराला मीं कपडे धुण्यास सांगितलें. अमृतलाल यास मागच्या खोलींत नेण्यास बगाली यास सांगितलें. अमृतलालची लंगोटी ओली झाली. तेव्हा दांडेकर याजकडून दुसरी लंगोटी घेतली. शंकराला अमृतलाल याचा बिछाना घेऊन जाऊन त्यावर निजविण्यास सांगितले. रॉशने मला बोलावलें. अमृतलालने अन्न न घेतल्याचें मीं त्यास सांगितलें. रॉशने सांगितलें कीं 'अमृतलालने आपणच आपल्याला मारून घेतलें ' असें कोणीं विचारल्यास सांग. डॉ. न्यूबोल्ड यास ही गोष्ट कळवूं नको असेहि रॉश याने सांगितलें. तिसऱ्या दिवशीं डॉ. अवचट आले. त्यांचेबरोबर मी व आरोपी नं. ३ व ४ असे गेलों. अमृतलाल बोलत नव्हता. याबद्दल रिपोर्ट कां केला नाही असें डॉक्टरने विचारलें त्या वेळीं ' रॉशच्या सांगण्यावरून रिपोर्ट केला नाही असें मी म्हणालों ' याप्रमाणें आरोपी नं. ५ ने जबानी दिली. यानंतर सर्व आरोपींवर अमृतलाल यास ता. २७ आक्टोबर रोजीं जबर दुखापत केली असा ३२५ कलमान्वयें आरोप ठेवण्यांत आला, सर्वांनी एका सामान्य हेतूनें गुन्हा करणें व एकमेकां-च्या गुन्ह्यांस मदत करणें असेहि आनुषंगिक आरोप पिनल कोड कलम ३४ व ११२ प्रमाणें ठेवण्यांत आले व त्या दिवसाचें काम संपलें.

### बॅरिस्टराचे प्रश्न

ता. १६ रोजीं अमृतलाल याची उलटतपासणी झाली. ती पुढीलप्रमाणें. बॅ ब्राऊन यांचे प्रश्नास " सकाळीं ७ ते ७॥ पर्यंत आम्हांस कांजी मिळते; पुढचें जेवण १० ते १०॥ पर्यंत येतें. मारण्याच्या दिवशीं मारल्यानंतर अन्न कोणीं आणलें तें सांगतां येणार नाही. माझे डोळे मिटले होते व मला फार मार लागला होता." आरोपी ५ चे प्रश्नास-'आरोपी नं. ५ याला रॉशने मला मारण्यास सांगितलें. मारण्यास प्रारंभ कोणी केला हें आठवत नाही. रॉश याने मला लाथ मारली नाही, छातीवर हाताने ढकलून खालीं पाडलें, लाथ मारली असल्यास आठवत नाही. जॅक्सनसुद्धा सर्वांनी मारलें. रॉशने आरोपी नं. ५ यास मला मारण्याचा हुकूम केल्याचें आठवतें. हा हुकूम करण्यापूर्वी रॉश याने मारण्यास सुरुवात केली होती कीं नाही तें आठवत नाही. रॉशने माझें तोंड बंद करण्याचा हुकूम केला व माझें तोंड बंद करण्यांत आलें. टोपीने का कशाने तें आठवत नाही. हुकूम केल्यानंतर

आरोपी नं. ५ ने मारण्यास सुरुवात केली. मला पायावर हात ठेवण्यास पुनः सांगितलें असतां मी मानेनें नकार दर्शविला. जमिनीवर कांहीं पडल्याचा आवाज ऐकला. काय पडलें तें आठवत नाही. आरोपी नं. ४ चा दंडा मोडला. दंडयाचा तुकडा मीं त्याचे हातांत पाहिला. मारल्यानंतर रॉश हुसेन यास कांही बोलल्याचें आठवतें. काय बोलला तें आठवत नाही. हुसेनला दुसऱ्यांनी मला धुण्यास सांगितल्याचें आठवतें. रॉश याने धुण्याचा हुकूम केला."

# वे. विष्णुशास्त्री बापट यांचें शोचनीय निधन



पुणें येथील आचार्य-कुलाचे संस्थापक वे. शा. सं. विष्णुशास्त्री बापट यांस मंगळवार ता. २० रोजीं दुपारीं २ वाजता मेंदूच्या विकाराने पुणें मुक्कामीं देवाज्ञा झाली हें कळविण्यास अत्यंत खेद वाटतो. कै. शास्त्रीबुवांचा जन्म रत्नागिरी जिल्ह्यांतील राजापूर तालुक्यांत धाऊलवल्ली येथे ता. २२-५-१८७१ रोजीं झाला. त्यांच्या वयाच्या आठव्या वर्षी त्यांचे वडील निवर्तल्यामुळे ते संस्थान रामदुर्ग येथे आपल्या चुलत्याजवळ शिक्षणासाठी जाऊन राहिले. तेथे मराठी शिक्षण घेतल्यानंतर शिरोळ व मिरज येथे आपल्या आजोळीं जाऊन त्यांनी इंग्रजीचा अभ्यास सुरू केला. इंग्रजी सातव्या इयत्तेपर्यंत मजल मारल्यावर शास्त्रीबुवांनी सन १८९२ च्या सुमारास कराचीं कँटोनमेंट स्टेशनावर सिग्नलरची नोकरी धरली. पुढे तेथेच ते असिस्टंट स्टेशनमास्तरहि झाले.

याच सुमारास त्यांच्या आयुष्यांत पालट होण्याचा प्रसंग आला. प्रो. डायसन नांवाच्या जर्मन तत्त्ववेत्त्याचें 'शांकर फिलॉसफी' या विषयावर एक व्याख्यान ऐकण्याचा त्यांना योग आला. या व्याख्यानाचा त्यांच्या मनावर इतका परिणाम झाला कीं, शंकराचार्यांचें तत्त्वज्ञान कळल्याबांचून आपला जन्म व्यर्थ आहे असेंच त्यांच्या मनाने घेतलें. या मनःस्थितींत नोकरीचा राजीनामा देऊन ते वांईस कै काशिनाथ वामन ऊर्फ भाऊशास्त्री लेले यांच्याकडे धर्मशास्त्राचें अध्ययन करण्यासाठी राहिले. वांईस त्या वेळीं प्रज्ञानंदस्वामी नांवाचे एक वेदांती होते. त्यांजपाशीं विष्णुशास्त्री यांनी मुख्यत्वेंकरून आचार्यांच्या भाष्याचा अभ्यास केला. कांही काल याप्रमाणें वांई येथे घालविल्यावर बापटशास्त्री यांनी मुंबईस लेखनाचा स्वतंत्र उद्योग सुरू केला. पुढे सुमारें दहा वर्षेपर्यंत सिंध-हैद्राबाद येथील गिडुमल संस्कृत पाठशाळेंत त्यांनी मुख्य अध्यापक या नात्याने काम केलें. या अवधींत त्यांनी संस्कृत ग्रंथांच्या भाषांतराचें काम सुरू ठेवलेंच होतें. हैद्राबादेहून ते १९१२ सालीं पुण्यास आले.

पुण्यास आल्यावर त्यांनी ब्रह्मविद्या ग्रंथरत्नमाला हें मासिक व आचार्य हें पाक्षिक सुरू करून स्वतःच्या जबाबदारीवर दशोपनिषदादि प्रस्थानत्रयीचीं सभाष्य भाषांतरें प्रसिद्ध केलीं. त्यांच्यासारख्या एकट्या गृहस्थाने वेदान्तासारख्या गहन विषयावरील सुमारे ८० ग्रंथांचीं समग्र भाषांतरें मराठी वाचकांस सुलभ करून दिलीं ही गोष्ट खरोखरीच कौतुकास्पद होय. त्यांच्या या पुस्तकांची किंमत ६० हजारांवर आहे असें म्हणतात. कै. बापट हे कट्टे शांकर मतानुयायी असल्याने त्यांनी कै. लोकमान्यांच्या गीता-रहस्याच्या खंडनपर असें गीतेवर विस्तृत भाष्य प्रसिद्ध केलें व हीच गोष्ट त्यांच्या प्रसिद्धीस विशेष कारणीभूत झाली असें मानण्यास हरकत नाही. सन १९२५ मध्ये शास्त्रीबुवांनी ग्रंथलेखन व प्रकाशन बंद ठेवून 'आचार्यकुल' ही प्राचीन पद्धतीचें अनुकरण करणारी संस्था स्थापन केली. तींत ते विद्यार्थ्यांना प्रस्थानत्रयीचें शिक्षण देत असत. शास्त्रीबुवांचें आचार्यकुलावर अपत्यनिर्विशेष प्रेम

होतें. परंतु सदर संस्थेचा ट्रस्ट त्यांच्या हयातींत त्यांच्या हातून झाला नाही. कलकत्ता येथील संस्कृत परीक्षा पुढील महिन्यांत झाल्यावर ट्रस्ट करण्याचा त्यांचा विचार होता. तथापि त्यांच्या आकस्मिक मृत्यूने ती गोष्ट तशीच राहिली.

एक वर्षापूर्वी त्यांस पक्षघात झाला. तेव्हापासून त्यांची प्रकृति थोडी थोडी खालावतच चालली. पण अशा स्थितींतहि त्यांचें अध्यापन चालूच होतें. यावरून त्यांची आपल्या कार्याबद्दलची उत्कटता व दक्षता किती होती हें लक्षांत येण्यासारखें आहे. मरणाचे दिवशीं सकाळीं ९ वाजता त्यांनी शिष्यवर्गास पाठ दिला व मासिकाचें शेवटचें प्रुफ तपासून ते स्नान करण्यास गेले. तेथे दोन तांबे पाणी अंगावर घेतात तोंच हातांतील तांब्या पडला व ते बेशुद्ध झाले. त्यांना अर्धांगाचा जोराचा झटका आला. व त्यांतच दुपारीं अडीच वाजता त्यांचें प्राणोत्क्रमण झालें. त्यांच्यामागें त्यांच्या पत्नीशिवाय दुसरा परिवार नाहीं. त्यांच्या निधनाने सनातन धर्माचा व शांकर संप्रदायाचा एक कट्टा अभिमानी नाहीसा झाला. आपलें ज्ञान आपल्यापाशींच गढून न देतां त्यांनी स्वतःच्या हिमतीवर ग्रंथद्वारा व शिष्यद्वारां त्याचा प्रसार निरपेक्षपणाने केला हें त्यांच्या जीवितांतील खरें रहस्य होय. अशा प्रकारची कर्तबगार माणसें समाजांत नेहमीच विरळा असतात. या दृष्टीने पुणें-करांचें, महाराष्ट्राचें व संस्कृत विद्येचें जें नुकसान झालें आहे तें लवकर भरून येणें दुरापास्त असल्या-मुळे त्यांच्या मृत्यूविषयीं अधिकच हळहळ वाटते.

कै. शास्त्रीबुवांच्या अंत्यविधीस त्यांचा शिष्य-परिवार व गांवांतील शास्त्रीमंडळी व इतर सद्गृहस्थ बरेच जमले होते, ही गोष्ट त्यांच्यावरील प्रेमाचें द्योतक होय. स्मशानभूमीवर वे.शा. सं. रानडेशास्त्री, श्री. वासुदेवराव भावे, श्री. शंकरराव लवाटे, श्री. गाडगीळ, श्री. का. न. केळकर, श्री. नारायणशास्त्री वाडेकर, काव्यतीर्थ खाडिलकर वगैरेचीं शास्त्रीबुवां-च्या गुणवर्णनपर भाषणें झालीं. शास्त्रीबुवांचे मेहुणे रा. वासुदेव हरि जोग यांच्या हस्तेंच त्यांचा शेवटचा संस्कार झाला.

# कोल्हापूरच्या साहित्यसंमेलनाचे सुयोग

महाराष्ट्र साहित्य संमेलनाचें सतरावें अधिवेशन पुढील आठवड्यांत कोल्हापुरास भरण्याचें ठरलें आहे. लोकसंख्येच्या मानाने महाराष्ट्रांत कोल्हापूर हें तिसऱ्या प्रतीचें शहर असलें तरी ऐतिहासिक-दृष्ट्या त्याचें महत्त्व विशेष आहे. मराठ्यांचें स्वराज्य व साम्राज्य सुमारें सव्वाशें वर्षांपूर्वीच लयाला गेलें. त्याचीं लहानमोठीं शकलें महाराष्ट्रांत व महाराष्ट्राबाहेर विखुरलीं आहेत. त्यांत कोल्हापुराची प्रामुख्याने गणना करण्यास हरकत नाहीं. बडोदें, ग्वाल्हेर, इंदूर हीं संस्थानें कोल्हापूर संस्थानापेक्षांहि विस्तृत आहेत. पण तीं महाराष्ट्राबाहेर असल्यामुळे खास महाराष्ट्रांत कोल्हापूर हें एकच संस्थान श्रेष्ठ होय. विस्ताराने तें श्रेष्ठ आहेच, पण त्याहि पेक्षां श्रीशिवछत्रपतींच्या वंशजांची एक गादी या नात्याने महाराष्ट्रच काय, पण बृहन्महाराष्ट्रहि त्याज-कडे पूज्यबुद्धीने पाहात आहे. त्या बाबतींत कोणत्याहि महाराष्ट्रीय संस्थानास कोल्हापूरची सर यावयाची नाही.

गतकालीन स्वराज्याशीं कोल्हापूरचा इतर संस्थानांहून अधिक निकट संबंध पोंचतो-तो संबंध लक्षांत घेतल्यास अर्वाचीन महाराष्ट्रांतील बहुतेक चळवळींचा पुढाकार कोल्हापुराकडेच जाव-यास पाहिजे. त्यांतल्या त्यांत राजकीय चळवळीची गोष्ट वेगळी असल्याने त्याखेरीज इतर हालचालीचें केंद्र कोल्हापूर हेंच होऊन राहण्यास त्यास नैस-र्गिक अनुकूलता पुष्कळ आहे. जें स्थान कर्नाटकांत म्हैसुराचें तेंच स्थान महाराष्ट्रांत कोल्हापुराचें. म्हैसूर संस्थानाने आपलें विद्यापीठ स्थापन केलें, भद्रावती येथे लोखंडाचा व शिवसमुद्रम् येथे विजेचा कारखाना काढला, उद्योगधंदे वाढविले, बेंग-ळूरच्या रिसर्च इन्स्टिटयूटला उत्तेजन दिलें व प्रजा-जनासाठी कायदेमंडळाची मुहूर्तमेढ रोवून लोकशाहीच्या मनूचा उदार मनाने मान राखला. अशा रीतीने म्हैसूर संस्थानाची कोल्हापुराशीं तुलना केल्यास कोल्हापूर संस्थान पुष्कळच बाबतींत मागा-सलें असल्याचें कोणासहि कबूल करावें लागेल.

म्हैसूरची साधनसंपत्ति कोल्हापुरापेक्षां बऱ्याच अंशीं अधिक आहे यांत शंका नाहीं. परंतु कोल्हा-पुरास ज्या साधनसामुग्रीची अनुकूलता आहे तिचाहि उपयोग देशोद्धाराच्या कार्याकडे समाधान-कारक रीतीने झाला आहे असें कोणाच्यानेहि म्हणवणार नाही. तथापि सध्याचे छत्रपति राजाराम-महाराज याच्या कारकीर्दीत ही स्थिति हळूहळू सुधारत चालल्याचीं थोडथोडीं चिन्हें स्पष्ट दिसूं लागलीं आहेत. महाराष्ट्र साहित्य संमेलनाचें कोल्हापुरांतील अधिवेशन हें त्यांपैकींच एक सुचिन्ह

होय. साहित्य संमेलनाचीं कांही अधिवेशनें बडोदें, इंदूर,ग्वाल्हेर या महाराष्ट्राबाहेरील मराठी संस्थानिकांच्या राजधान्यांत केव्हांच होऊन गेलीं आहेत. इतकेंच नव्हे तर पोर्तुगीजांच्या अमलाखालील माडगांव व मुसलमानांच्या अमदानींतील हैद्राबाद या दूरच्या शहरीं अत्यंत प्रतिकूल स्थितींतहि जें साहित्य-संमेलन होऊं शकलें तें कोल्हापुरास गेल्या पंचवीस-तीस वर्षांत भरण्याचा योग एकदाहि आला नाही यावरून महाराष्ट्राचें नशीब आजवर निजलें होतें या दुःखोद्गाराशिवाय दुसरा कोणता उद्गार निघू शकेल ?

परंतु उशिरा का होईना महाराष्ट्राचें निजलेलें नशीब जागें झालें व कोल्हापुरास संमेलनाचा सुयोग जुळून आला याबद्दल अखिल महाराष्ट्रीयांस धन्यता वाटत असल्यास त्यांत नवल कसले? गेलें साहित्य-संमेलन हैद्राबादेस ऐन उन्हाळ्यांत भरलें. त्या स्थळीं संमेलनास दुहेरी उन्हाळा जाणवला. एक सूर्याच्या प्रकोपाचा व दुसरा राजाच्या अवकृपेचा. सूर्याचा ताप बर्फाच्या थंडाव्यालाहि निववितां येईना व राजाच्या वक्रदृष्टीपुढे अध्यक्ष डॉ. केतकर यांच्या भाषणाचाहि टिकाव लागेना. परंतु यंदाचें वर्षी हैद्राबादेंतील त्या उन्हाळ्याच्या झळी दूर राहून कोल्हापुरास हिंवाळ्याची शीतळाई आली आहे. संमेलनास पाण्यांत पाहणाऱ्या निजामाऐवजी संमेलनाचा सन्मान करणारे छत्रपति राजाराम महाराज त्यास लाभले आहेत. परिषदेचे अध्यक्ष बडोद्याचे श्रीमंत सर सयाजीराव महाराज हे श्वशुर व राजाराम महाराज हे जामात अशी जोडी जमल्यामुळे अध्यक्षांच्या भाषणांतील कांही भाग गाळला जाण्याऐवजीं त्यांतील शब्दान् शब्द कोल्हापूर दरबाराकडून झेलला जाण्याचाच पूर्ण संभव उत्पन्न झाला आहे.

श्रीमंत सयाजीराव महाराज यांच्या वयाने सत्तरीची सीमा गांठली आहे. त्यांच्याइतका वयोवृद्ध व ज्ञानवृद्ध संस्थानिक महाराष्ट्रांतच काय पण साऱ्या हिंदुस्थानातहि अगदी विरळा. अलीकडे कित्येक वर्षे ते स्वतःच्या संस्थानांत पाहुण्यासारखे येतात आणि इंग्लंड व फ्रान्स या परकीय देशांत स्वदेशाप्रमाणे वावरतात. यामुळे त्यांच्या वर्तणुकींत बाह्यतः उपरीपणा दिसत असला तरी आपल्या कारकीर्दीचा दीर्घकाल प्रजेच्या हितार्थ घालविल्यानंतर त्यांना स्वतःच्या संस्थानाचा व हिंदुस्थानाचा अन्तर्यामीं केव्हांहि पूर्णपणें विसर पडणें शक्य नाही. ते युरोपांत राहात असतां हिंदुस्थानाच्याच हितचिंतनांत चूर असतील व युरोपांतील परिस्थितीचें सूक्ष्म दृष्टीने निरीक्षण करीत असतां त्यापासून हिंदुस्थानाने काय बोध घ्यावा याचेच ठोकताळे आपल्या मनाशीं बांधीत असतील. त्यांचा विद्याव्यासंग जबर आहे, वाचन विस्तृत आहे, ज्ञानप्रसाराची आवड स्वतःसिद्ध आहे व अवलोकन व्यापक आहे. म्हणून त्यांची निवड साहित्य-संमेलनाच्या अध्यक्षस्थानाकरिता झाली ती केवळ एक बडे संस्थानिक या आगंतुक हक्काने झाली नसून विद्वत्तेच्या पात्रतेमुळे करण्यांत आली असल्याने यथायोग्य होय, याविषयी बिलकुल संशय नाही. त्यांनी स्वतः कदाचित् ग्रंथकार या नात्याने नांव मिळविलें नसेल, परंतु विद्वानांस प्रोत्साहन देऊन त्यांनी महाराष्ट्र सारस्वतांत इतक्या अमूल्य व विविध ग्रंथांची भर घातली आहे कीं, त्या बाबतींत त्यांची बरोबरी कोणाच्यानेहि करवणार नाही.

सर सयाजीराव महाराज यांचें आगमन अध्यक्ष या नात्याने कोल्हापुरास होईल त्या वेळीं त्यांचे नातजावई छत्रपति राजाराम महाराज त्यांच्या सन्मानांत, भपक्यांत, बडेजावकींत व इनामांत बिलकुल न्यून पडूं देणार नाहीत या भरंवशाने तें अनुपम ऐश्वर्य पाहण्याकरिता पूर्वीच्या कोणत्याहि संमेलनास लोटला नव्हता इतका प्रतिनिधींचा व प्रेक्षकांचा पूर बहुधा कोल्हापुरास लोटेल हें खरें आहे. छापील ग्रंथाचें बाह्यांग मनोहर असावें लागते पण त्या बाह्यांगापेक्षाहि त्याच्या अन्तरंगाचें महत्त्व अधिक असतें हें विसरतां कामा नये. हा न्याय परिषदा व संमेलनें यांनाहि लागू आहे. लग्नकार्यांतील मेजवान्या खाण्यास, आतषबाजी पाहण्यास व वाजंत्री ऐकण्यास शेकडों नव्हे हजारों लोक जमतात. पण त्या नादांत जनसमूह दंग असता इहपर लोकाच्या दृष्टीने अत्यंत श्रेष्ठ, गंभीर व पवित्र अशी, वधूवरांच्या पदरांचीच नव्हे तर, जन्माचीहि गांठ दुसरीकडे मारली जात असते. त्यासारखीच महत्त्वाची घटना कोल्हापूरच्या संमेलनांतील अवांतर भपक्यांत घडून यावी अशीच कोणीहि विचारी मनुष्य अपेक्षा करील.

साहित्य संमेलनाचा एक हेतु विद्वानांच्या भेटी व्हाव्या, त्यांनी परस्परांशीं गोष्टी कराव्या, वादविवाद रंगवावे, नित्याच्या बांधीव आयुष्यक्रमांतील शीण घालवावा व साहित्य-चर्चेतील श्रेष्ठ सुखाचा आस्वाद घ्यावा हा आहेच. गेल्या सोळा साहित्य संमेलनांत मुख्य कार्य जर कोणतें साधलें असेल तर तें हेंच होय. परंतु हा हेतु गौण समजला पाहिजे. महाराष्ट्र वाङ्मयाची चोहों बाजूंनी चालू असलेली कुचंबणा संपून काव्य, कादंबऱ्या, नाटकें, इतिहास, तत्त्वज्ञान, भौतिक शास्त्रें, धर्मग्रंथ इत्यादि विविध अंगांचा पद्धतशीर व योग्य विकास करून राष्ट्रोन्नति कशी घडवून आणतां येईल याचे उपाय शोधून काढण्याकरिताच साहित्य-संमेलनाचा मुख्यतः

जन्म झाला आहे. महाराष्ट्र साहित्यसंमेलनाची जन्मकथा राष्ट्रीय सभेहूनहि जुनी आहे. राष्ट्रीय सभेप्रमाणेच साहित्यसंमेलनाचे जनकहि कै. महादेव गोविंद रानडे हेच होत. पहिलें संमेलन त्यांच्या स्फूर्तीनें पुण्यास सन १८७८ सालीं भरलें. त्या वेळीं संमेलनाचा उद्देश कोणत्या विषयावरील ग्रंथांची उणीव आहे तें ठरविणें, ग्रंथ तयार करविणें, ग्रंथकर्ते, मासिकपुस्तककर्ते, वर्तमानपत्रकर्ते यांची परिषद पुण्यास भरविणें हा होता. परंतु कै. रानडे व कै. गोपाळराव देशमुख यांच्या प्रयत्नाने पुण्यांत सभा भरली तरी तिच्या वरील उद्देश फार थोड्या प्रमाणांत साधल्याचें दृष्टीस पडतें. त्यानंतर सातारा व पुणें येथें १९०६ सालापर्यंत संमेलनाच्या दोन बैठकी झाल्यावर १९०७ मध्ये पुण्यांत आणखी एक संमेलन भरलें व त्यांत महाराष्ट्र साहित्य परिषदेची प्राणप्रतिष्ठा करण्यांत आली. मराठीचे कोश रचणें, शास्त्रीय परिभाषा बनविणें, प्राचीन काव्यें, ऐतिहासिक व इतर महत्त्वाचे लेख जमविणें व ते प्रसिद्ध करणें हें चित्र परिषदेस मूर्त स्वरूप देतांना, संमेलनाच्या चालकांनी आपल्या नजरेसमोर ठेवलें होतें.

परिषदेनें १९१३ सालीं 'साहित्य पत्रिका' नांवाचें त्रैमासिक सुरू करून मूळ उद्देशास धरून आपलें पाऊल बरेंच पुढें टाकलें. साहित्य पत्रिका ही प्रारंभीं कांहीं दिवस 'विविध ज्ञानविस्ताराची' एक पुरवणी म्हणून छापली जात होती; पण पुढे पत्रिकेच्या प्रगतीस हें परावलंबन गैरसोयीचें वाटल्यामुळे व इतर कांही कारणांमुळे पत्रिकेचें प्रकाशन सांप्रत स्वतंत्रपणें होत असतें. परिषदेस रावसाहेब नारायण गोविंद चापेकर यांसारखे विद्वान, कर्तव्यदक्ष, निरलस व आस्थेवाईक अध्यक्ष लाभले असून त्यांच्या देखरेखीखाली सध्याच्या प्रतिकूल स्थितींतहि पत्रिका आपलें कार्य शक्य तितक्या समाधानकारक रीतीनें पार पाडीत आहे. वास्तविक परिषदेची भरभराट याहूनहि किती तरी पटींनी अधिक व्हावयास पाहिजे. परिषदेच्या नामोच्चार करताच तिला फ्रान्समध्ये सन १६३५ सालीं स्थापन झालेल्या ॲकॅडेमीचा दाखला देण्यांत येतो. ती संस्था फ्रेंच भाषेची उन्नति करण्यासाठींच जन्मास येऊन तिनें फ्रेंच भाषेला सौंदर्य, शुद्धता, ठसठशीतपणा व स्थैर्य आणण्याकरिता शब्दकोश, व्याकरण, काव्य-शास्त्रादिकांवरील ग्रंथ यांची रचना करून आपलें नांव सार्थ केलें. महाराष्ट्र साहित्य परिषदहि फ्रेंच ॲकॅडेमीच्या धर्तीवर कांही भरीव कामगिरी बजावण्यास असमर्थ होती असें नाही. महाराष्ट्रांतहि साहित्याच्या अंगोपांगांचा अभ्यास केलेले अनेक विद्वान आहेत. त्यांच्या ठिकाणीं कार्याची आस्था आहे व त्यागाची बुद्धि आहे. ज्ञानकोश आणि नवीन होत असलेले व होऊं घातलेले शब्दकोश, चरित्रकोश व धर्मकोश इत्यादि प्रचंड उद्योग स्वतंत्रपणें महाराष्ट्रीय वाङ्मयोपासकांनी हातीं घेतले आहेत हें त्यांच्या गुणांचें द्योतक होय.

परंतु हेंच कार्य साहित्य परिषदेनें आपल्या शिरावर घेतलें असतें तर तें अधिक सौकर्यानें व कमी कालावधींत तडीस गेल्यावांचून राहिलें नसतें. अशा प्रकारचे उद्योग परिषदेकडून पार पडावे यासाठींच १९१७ सालीं इंदुरास भरलेल्या साहित्यसंमेलनास श्रीमंत तुकोजीरावमहाराज यांनी दहा हजार रुपयांची उदार देणगी दिली. परंतु त्या देणगीनें परिषदेच्या कार्याचा वेग न वाढता, तिला उलटी खीळच बसून तिचा गाडा अडून पडला. ज्यांच्या हाताला ती देणगी लागली त्यांनी तिचा सद्व्यय तर केला नाहीच, पण दुसऱ्या कोणालाहि तो करूं न दिल्यामुळे गव्हाणींतील कुत्र्याच्या गोष्टीप्रमाणे परिषदेस दुरवस्था प्राप्त झाली. तो पैसा भांडणाचें मूळ होऊन बसला व तेव्हापासून गेलीं पंधरा वर्षें महाराष्ट्रांत इतका बखेडा माजला कीं, तो वार्षिक संमेलनासहि भोवून व परिषद संमेलनाच्या आड येऊन परिषद कोणती व संमेलन कोणतें याचें सामान्य लोकांना कोडेंच पडलें.

परिषदेचें गाडें तिचे एक चालक रा. ब. पाध्ये यांच्या दुराग्रहाने अडून पडलें नसतें तर बडोद्याचे अमात्य कै. रमेशचंद्र दत्त यांनी आश्वासन दिल्याप्रमाणे बडोदें संस्थानांतून व इतर संस्थानांतूनहि परिषदेस द्रव्यसाहाय्य लाभून तिची प्रगति सांपत्तिक दृष्ट्या व कार्यदृष्ट्याहि पुष्कळच झाली असती अशी आशा बाळगण्यास जागा आहे. तथापि महाराष्ट्र भाषेच्या सुदैवाने अलीकडे हा तंटा मिटविण्याचा प्रयत्न बराच यशस्वी झाला आहे हें नमूद करण्यास आनंद वाटतो. रा. ब. पाध्ये यांनीहि घडलेले अनिष्ट परिणाम लक्षांत आणून सलोख्याने वागण्याचें धोरण दर्शविलें असून रा. चापेकर व रा. न. चिं. केळकर प्रभृति गृहस्थांनी एक कमिटी नेमून हा वाद मिटविण्याचा घाट घातला आहे. वरील कमिटीच्या संकेतास अनुसरून महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या पुनर्घटनेचा आराखडाहि तयार करण्यांत आला आहे. तो आराखडा मंजूर करणें व परिषदेच्या मार्गांतील तंट्याचें मूळ उपटून टाकून परिषद समर्थ व कार्यक्षम बनविणें हीं दोन महत्त्वाचीं कामें कोल्हापूर येथील साहित्यसंमेलनांत यंदा व्हावयाचीं आहेत. या दृष्टीने वरील अधिवेशनावर केवढी जबाबदारी पडली आहे याची वाचकांना कल्पना येणार आहे.

हिंदी व बंगाली साहित्यसंमेलनांनी महाराष्ट्राची मूळ योजना अमलांत आणून ती केव्हाच यशस्वी करून दाखविली. या बाबतींत इतर भाषांनी आघाडी मारावी व त्या योजनेचा जनक असा महाराष्ट्र मागे पडावा याचें लांच्छन महाराष्ट्रीयांस वाटूं नये काय? हिंदी व बंगाली साहित्य परिषदांजवळ मोठाले निधि व मालकीच्या इमारतीहि असून त्यांची कामें यशस्वी रीतीने सुरू आहेत. तरी त्यांच्या प्रगतीपासून महाराष्ट्रीयांनी योग्य बोध घेऊन परिषदेच्या तंट्यास करवीरच्या पंचगंगेंत अगर रंकाळ्याच्या तळ्यांत जळसमाधि द्यावी आणि महाराजद्वयांच्या पुरस्काराने भावी कार्याची रूपरेखा आंखावी अशी आमची संमेलनांत जमणाऱ्या मराठी भाषेच्या हितचिंतकांस आग्रहाची विनंति आहे.

कोल्हापुरास लाभले आहेत या प्रकारचे सुयोग वारंवार येतात असें नाही. म्हणून ते प्राप्त झाले असतां त्यांचा भरपूर फायदा घेणें हेंच सुज्ञाचें कर्तव्य होय. महाराष्ट्र विद्यापीठाचीहि योजना गेलीं कित्येक वर्षें महाराष्ट्रांत गाजत आहे व ती कोल्हापूरच्या हवेंतहि अलीकडे तरंगू लागली आहे. तिलाहि मूर्त स्वरूप लवकर देण्याचें सामर्थ्य जर कोणांत असेल तर ते करवीरचे छत्रपति व बडोद्याचे महाराज यांच्यासारख्यांतच आहे. तेंहि उपक्रम कोल्हापुरांत झाल्यास कोल्हापूर येथील सतरावें अधिवेशन आजपर्यंतच्या सर्व अधिवेशनांत अद्वितीय ठरल्याशिवाय राहणार नाही. महाराष्ट्र विद्यापीठाची ही योजना सिद्ध होण्यास साहित्य परिषद हीच खरी प्रेरक शक्ति असून तिचें सामर्थ्य वाढल्याने व तिच्या वाटेंतील विघ्नें दूर झाल्याने विद्यापीठासच काय पण मराठी वाङ्मयांतील सर्व श्रेष्ठ प्रवृत्तींच्या हालचालीसहि जिवंतपणा येईल यांत शंका नाही.

# वेळापत्रक साधलें; पण स्टेशन हुकलें !

कागदीं लिहिता नामाची साखर। चाटिता मधुर केवीं लागे ? ॥ १ ॥ —तुकाराम.

तिसऱ्या गोलमेज परिषदेवर शनिवार ता. २४ रोजीं सकाळीं विसर्जनाच्या अक्षता लॉर्ड सँके यांनी टाकल्या व हिंदी प्रतिनिधींना शुभाशीर्वादपूर्वक हिंदुस्थानास परत जाण्याची परवानगी दिली. या परिषदेचे मुख्य सूत्रचालक हिंदुस्थानाचे स्टेट-सेक्रेटरी सर सॅम्युएल होअर हे होते. स्वतः सर सॅम्युएल होअर हे एक मोठे कर्तबगार करारी व जळता पाय जाळतील पण मागे घेणार नाहीत, अशा वृत्तीचे मुत्सद्दी आहेत. शिवाय त्यांच्या पाठीशीं कान्सरव्हेटिव्ह पक्षाचें प्रचंड बहुमत असल्यामुळे आज तरी कर्तुमकर्तुमन्यथाकर्तुम् समर्थ असा अधिकार त्यांच्या हातांत खेळत असल्यास नवल नाही. सर सम्युएल होअर यांनी या परिषदेचें एक वेळापत्रक आंखलें होतें. आगगाडीचेंहि वेळापत्रक असतेंच. पण त्यांत गाडी कोणत्या स्टेशनाला जावयाची हें निश्चित असतें व वेळच्या वेळीं स्टेशनें गांठणें ही जरी महत्त्वाची बाब असली तरी कोणत्या स्टेशनला शेवटीं गाडी पोंचावयाची याचें महत्त्व अधिक मानलें जातें. त्यामुळे जरी ठरलेल्या वेळापत्रकाप्रमाणे आगगाडी निरनिराळ्या स्टेशनांवर अडचणीमुळे पोंचूं शकली नाही तरी ती शेवटीं उशीरा का होईना पण ठरलेल्या शेवटच्या स्टेशनापर्यंत जातेच जाते.

तिसऱ्या गोलमेज परिषदेच्या कामाचें सर सॅम्युएल होअर यांनी बांधलेलें वेळापत्रक या जातीचें नव्हतें. त्यांना वेळेचें महत्त्व अधिक वाटत होतें. नाताळ सुरू होण्यापूर्वी ही परिषद संपवावयाचीच असा त्यांचा निश्चय होता. म्हणून पूर्वी ठरविलेल्या बावीस तारखेनंतर मोठ्या माराकुटीने रात्रीचा दिवस करून त्यांनी परिषदेचें काम दोन दिवस अधिक चालू दिलें खरें. पण शेवटीं ता. २४ ला म्हणजे नाताळाच्या प्रारंभींच्या दिवशीं या परिषदेचा कारभार त्यांनी आटोपला ! या वेळापत्रकांत वर म्हटल्याप्रमाणे स्टेशनांचें महत्त्व नसल्यामुळे मध्यवर्ती सरकाराचा कारभार लोकसभेला जबाबदार असला पाहिजे, या स्वराज्याच्या प्राणभूत तत्त्वाचा विचार या परिषदेंत झालाच नाही. किंबहुना त्याचा प्रत्यक्ष असा उच्चारहि फारसा करण्यांत आला नाही. वेळ संपल्यामुळे नाटक संपलें व भरतवाक्य म्हणण्यांत येऊन पडदा पडला. नायकनायिकेचें शेवटीं काय झालें हें प्रेक्षकांना न समजल्यामुळे शेवटीं यांतून काय निघालें हा प्रश्न अनिश्चितच राहिला !

या परिषदेचा थोडा मागील इतिहास पाहिला तर परिषद अशा विसाडवाईने संपली याचें आश्चर्य वाटण्याचें कारण राहत नाही. आमच्या वाचकांस हा इतिहास माहीत आहेच. गोलमेज परिषदेसारखी प्रतिनिधिक परिषद बोलावून हिंदुस्थानांतील प्रतिनिधि व ब्रिटिश मुत्सद्दी यांनी, भावी हिंदी स्वराज्य कसें असावें, त्याची घटना कोणत्या

स्वरूपाची असावी आणि ब्रिटिश सरकारानें अधिकाराच्या सिंहासनावरून उतरून हिंदी लोकशाहीची त्या सिंहासनावर संस्थापना कशी करावी वगैरे प्रश्न एकत्र बसून चर्चा करून निकालांत काढावे हा प्रकारच सर सॅम्युएल होअर यांना मनापासून पसंत नव्हता. किंबहुना त्यांना या परिषदेच्या पद्धतीची चीड होती. दुसऱ्या गोलमेज परिषदेच्या वेळीं त्यांनी एकदाच नव्हे तर अनेकदा त्या परिषदेचें काम संपवावें म्हणून सूचना आणिलया होत्या ! मुख्य प्रधान मि. रॅम्से मॅक्डोनल्ड यांच्यापुढे त्यांचें कांहीं चाललें नाहीं ही गोष्ट वेगळी.

पण दुसरी गोलमेज परिषद कशी तरी कडेला लावल्यावर सर होअर यांनी त्यांना जिचा मनापासून कंटाळा अशा सामोपचाराच्या, वादविवादाच्या व सल्लामसलतीच्या गोलमेज परिषदेच्या पद्धतीस लाथ मारली व परिषदेचें अजीबातच उच्चाटन करण्याचा बूट पुढे मांडला. परंतु सर तेजबहादुर सप्रू वगैरे हिंदी पुढाऱ्यांनी हिंदी राष्ट्रीय सभेचे अनुकरण करून सरकाराशीं असहकार पुकारला व बहिष्काराचें शस्त्र उचललें. त्या वेळीं, मुख्य प्रधान राम्से मॅक्डोनाल्ड, चन्सेलर लॉर्ड सँके, व कॉन्सरव्हेटिव्ह पक्षाचे पुढारी मि. बाल्डविन व प्रधान–मंडळांत त्या वेळीं नव्यानें आलेले लॉर्ड आयर्विन यांच्या आग्रहानें त्यांनी आपले डावपेंच बदलले इतकेंच. पण ओढूनताणून आणलेलें हें चंद्रबळ कितीसें साहाय्यक होणार ? सर सॅम्युएल होअर यांनी या तिसऱ्या परिषदेस मूठभरच प्रातिनिधि बोलावले व परिषदेच्या कामाचें वेळापत्रक ठरवून कसें तरी काम ओढून काढलें ! हा इतिहास डोळ्यांपुढे ठेवला म्हणजे या परिषदेचा दोरा मध्येच कसा तोडला गेला याचें आश्चर्य वाटत नाहीं. तो कर-न-कऱ्याचा वसा होता व तो असाच पार पडावयाचा !

एकंदरींत या परिषदेंत कोणाचा जय झाला असें विचारल्यास सर सॅम्युएल होअर यांच्याच प्रतिगामी धोरणाचा विजय झाला असें म्हणणें प्राप्त होतें. हिंदुस्थानाच्या पदरांत कांहींच पडलें नाहीं असा अर्थ नाहीं. कारण परिषदेंतील वादाचा प्रकार चितपट झाल्याशिवाय न संपणाऱ्या कुस्तीसारखा नव्हता. तो क्रिकेटच्या किंवा आट्यापाट्यांच्या धर्तीचा खेळ होता. म्हणून अमुक गडी उताणा पडल्यानें तो पूर्ण पराभूत झाला असें म्हणतां येत नाहीं. क्रिकेटमध्यें पराभूत बाजू कांहीं तरी रन्स काढतेच किंवा आट्यापाट्यांच्या खेळामध्यें पराभूत बाजूला कांहीं मार्कांची जोड मिळतेच. तसा परिषदेचा प्रकार होता. सर सॅम्युएल होअर यांनी अखेरी तर साधलीच पण सर्व वादविवादाच्या वेळींहि आपलें म्हणणें खरें केलें. त्यांच्या मूळ मनोवृत्तीकडे व त्यांच्या परिषदेच्या पूर्वीच्या आग्रहाकडे पाहिलें तर त्यांनीच आपला सर्व कावा साधला असें म्हटलें पाहिजे. सर तेजबहादुर सप्रू, बॅ जयकर, श्री. केळकर वगैरे हिंदी प्रतिनिधींनींहि आपल्या वादकौशल्याची, कुशाग्रबुद्धीची व मुत्सद्देगिरीची शिकस्त केली यांत शंका नाहीं, व त्याबद्दल त्यांना धन्यवाद दिलेच पाहिजेत. पण शेवटीं ज्याच्या हातीं ससा तो पारधी या न्यायानें सत्ताधीश असे सर सॅम्युएल होअरहेच विजयी ठरले असें म्हणणें प्राप्त येतें. गोलमेज परिषदेंतून शेवटीं निष्पन्न तरी काय होणार, याचा थोडासा अंदाज केला म्हणजे जय कोणाचा झाला याची चिकित्साच करण्याचें कारण पडणार नाहीं. कारण फलनिष्पत्ति हीच खरी परीक्षा आहे.

हिंदुस्थानाचा राज्यकारभार आपल्या कुलमुखत्यारीनें व अनियंत्रितपणें करण्याचा जो अधिकार आज इंग्रज सरकार व त्यांची नोकरशाही यांच्या हातांत आहे तो पूर्णपणें, हिंदी लोकांनी निवडलेल्या प्रतिनिधींच्या हातीं येणें याचेंच नांव स्वराज्य. हें अधिकारसंक्रमण शक्य तितक्या लवकर व्हावें ही हिंदी लोकांची मागणी. हा अधिकार सर्वस्वी हिंदी लोकांच्या हातीं देऊं नये, देणें भागच पडले तर आस्ते आस्ते सावकाशीनें द्यावा व त्याचा प्रारंभ प्रांतिक स्वायत्ततेपासून करावा अशी इंग्रजांची इच्छा. साहजिकपणेंच तीनहि गोलमेज परिषदांमध्ये जी वादविवादाची हाणामारी झाली ती वरील दोन मुद्द्यांवरच. हिंदी लोकांचे म्हणणें कीं, प्रांतिक स्वायत्तता तर पाहिजेच; पण मध्यवर्ती कारभारहि लोकसभेला जबाबदार केल्याशिवाय प्रांतिक स्वायत्तता ही लुळी व पांगळी ठरेल. म्हणून फार तर परराष्ट्रीय संबंध अगर युद्ध पुकारणें किंवा बंद ठेवणें असल्या बड्या साम्राज्यविषयक बाबीखेरीज मध्यवर्ती सरकाराचाहि सर्व कारभार हिंदी लोकांच्या स्वाधीन करा असा हिंदी प्रतिनिधींचा आग्रह होता. हिंदी संस्थानें व खालसा मुलूख यांनी मिळून संयुक्त स्वराज्यपद्धति स्थापन केल्यासच हा स्वराज्याचा अधिकार, आम्ही कांहीं जरूरीचीं संरक्षक बंधनें घालून देऊं, असें पहिल्या गोलमेज परिषदेंत सांगितलें गेलें व तशी संयुक्त स्वराज्य-पद्धति आपण स्थापन करतों असें संस्थानिक व ब्रिटिश हिंदुस्थानाचे प्रातीनिधि यांनी सांगितल्यामुळे तो प्रश्न मिटला. या अधिकारन्यासाच्या वेळीं जे अनेक गुंतागुंतीचे प्रश्न निघतात त्यांची वासलात लावण्याकरिता कमिटया नेमण्याचें कार्य दुसऱ्या परिषदेनें केलें व जीं संरक्षक बंधनें घाला-

वयाचीं तीं हिंदुस्थानाच्याच हिताचीं असलीं पाहिजेत असा महात्मा गांधींचा आग्रह मान्य झाला. तिसऱ्या परिषदेंत प्रामुख्याने या संरक्षक बंधनांचीच छाननी झाली.

मध्यवर्ती सरकाराच्या कारभारांतील जबाबदारीच्या तत्त्वाचें मंगळसूत्र संयुक्त राज्यपद्धतीच्या गळ्यांत अडकविल्याने संस्थानिकांच्या खुषीवर तो प्रश्न अवलंबून राहिला. तिसऱ्या गोलमेज परिषदेंत संस्थानिकांच्या प्रतिनिधींना या बाबतींतील आपल्या अटी मांडल्या व त्यावर कडाक्याचा वाद झाला. संयुक्त सरकाराला स्वतःचें असें स्वतंत्र उत्पन्न पाहिजे, त्याच्या जमाबंदीच्या बाबी आजच तोडून द्याव्या व संयुक्त सरकाराच्या स्थापनेपूर्वी जें राष्ट्रीय कर्ज हिंदुस्थानाला आज आहे त्याचा बोजा खालसा मलुखाने सोसावा असा संस्थानी प्रतिनिधींचा आग्रह आहे. या प्रश्नावर ऐकमत्य झाले नाहीं. संयुक्त सरकाराचे घटक म्हणून होणारे निरनिराळे प्रांत व संस्थानें यांचे अधिकार आज निश्चित ठरविले जावे व त्याबरोबरच शेषाधिकाराचा प्रश्नहि मिटवावा अशी संस्थानी लोकांची दुसरी अट होती. या अटीवरहि बरेंच रण माजलें, पण पुष्कळशी एकवाक्यता झाली. संस्थानें हल्ली जी खंडणी ब्रिटिश सरकाराला देतात ती बंद करावी व पूर्वी ब्रिटिशसरकाराने जोडून घेतलेले संस्थानी प्रांतहि परत करावे असाहि त्यांचा आग्रह होता. पण त्यावर फारशी चर्चा झाली नाहीं. इतकें होऊनहि संस्थानी प्रतिनिधींनी संयुक्त राज्यपद्धति मान्य करून त्यांत सामील होण्यास बिनतक्रार मान्यता दिली नाही ती नाहीच ! संयुक्त राज्यपद्धतीची घटना तयार करतांना आपला सल्ला घ्यावा, ती तयार झाल्यावरहि तिची परीक्षा करण्याकरिता आपणाला वेळ द्यावा व नंतर आम्हीं सामील व्हावयाचें कीं नाही हें ठरवूं असें त्यांनी सांगितलें व हें मान्य करणें सर सॅम्युएल होअर यांना सोयीचें असल्याने त्यांनी तें मान्य केलें ! तात्पर्य, संयुक्त राज्यपद्धति स्थापन करण्याचा प्रश्न असाच अधांतरीं राहिला व म्हणून जबाबदारीची राज्यपद्धति अमलांत येण्याचा निश्चितकाल या परिषदेंत ठरला नाहीं !

सर तेजबहादुर सप्रू यांनी सरकारास स्पष्ट सांगितलें कीं, 'संयुक्त राज्यपद्धतीचा कारभार सुरू करण्याची तारीख मुक्रर करा. ज्या संस्थानिकांना त्यांत सामील व्हावयाचें असेल ते होतील. कोणीच सामील न झाले तरी लोकसभेला जबाबदार अशी व्यवस्था सुरू करण्याचें मात्र निश्चित ठरवा.' पण ही सूचना मान्य करण्याचें होअर यांनी साफ नाकारलें. लॉर्ड सँकी यांनी संस्थानिक सामील होतील अशी आशा प्रकट केली व होअर यांनी हा संस्थानिकांचा प्रश्न म्हणजे एक मोठी अडचण असल्याचें कबूल केलें. पण हें भूत त्यांनीच मुद्दाम उठविलें होतें हें ते विसरले. एकंदरींत या प्रश्नाची तड लागली नाहीं हें खरें. याशिवाय ब्रिटिश सरकारातर्फे म्हणून संरक्षक बंधनाच्या अटी घालण्यांत आल्याच. त्यांत मुख्यतः लष्करावरील सत्ता, आर्थिक स्वातंत्र्य, व्यापारी सवलती, परराष्ट्रीय कर्जें, रिझर्व्ह बँकेची स्थापना आणि शेवटीं गव्हर्नर-जनरल व प्रांतिक गव्हर्नर यांचे जादा अधिकार इतक्यांचा समावेश होतो. यांपैकीं प्रत्येक प्रश्नावर स्वतंत्र चर्चा करणें जरूर आहे. पण साकल्याने म्हणावयाचें झाल्यास आज इतकें म्हणणें प्राप्त आहे कीं, या सर्व बाबींमध्ये घातलेलीं संरक्षक बंधनें हिंदुस्थानाच्या हिताकरितांच घातलेलीं नाहीत. ब्रिटिशांच्या सत्तेची पक्कड किंचितहि ढिली होऊं देऊं नये म्हणूनच या संरक्षक बंधनांची योजना करण्यांत आली.

बरें, प्रांतिक स्वायत्तता तरी पुरी मिळाली असेंहि म्हणतां येत नाही. कारण, प्रांताच्या गव्हर्नरांना जे खास अधिकार दिले आहेत त्यांची यादी पाहता तिची लांबी स्वायत्ततेंत अंतर्भूत होणाऱ्या अधिकारापेक्षांहि मोठी आहे. नेमके हे अधिकार कोणते हें लक्षात यावें एवढ्याकरितां गव्हर्नरांच्या खास अधिकारांची थोडीं उदाहरणें घेऊं. अल्पसंख्याकांचें संरक्षण, सनदी नोकरांचे पगार व बढालीबढती, इंग्रजी व्यापाराचें संरक्षण या बाबी गव्हर्नराकडे दिल्या आहेत व त्यांच्या अंमलबजावणीकरितां योग्य तो पैसा खर्च करण्याचा अधिकार गव्हर्नर यांना दिला आहे. हेंहि मान्य झालें असतें; पण ह्यापुढे जाऊन प्रांतिक गव्हर्नरांना कोणताहि कायदा कायदेमंडळाने तो पसार केला असला तरी नापास करण्याची सत्ता दिली आहे ! राष्ट्रीय आपत्तीच्या वेळीं, कायदा व सुव्यवस्था यांची कायमची जबाबदारी गव्हर्नरांच्या डोक्यांवर दिली असल्याकारणाने वाटेल ते नवे वटहुकूम काढण्याचा अधिकार प्रांतिक गव्हर्नरांना मिळणार असल्याचें स्पष्ट झालें आहे. स्वतः नवे कायदे करून ते लोकावर लादण्याचा अधिकार जर प्रांतिक गव्हर्नरांना दिला तर मग स्वायत्तता ती कोठें राहिली हें समजणें कठिण आहे ! म्हणून हें स्वराज्य नसून ही स्वराज्याची थट्टा आहे असें वाटल्याशिवाय राहत नाही.

या सर्व प्रश्नांचा निर्णयात्मक निकाल देण्याकरितां ब्रिटिशसरकार लवकरच एक 'व्हाइट पेपर' किंवा शुभ्र खलिता काढणार असून त्यांत ग्रथित केलेल्या निकालांच्या पायावर स्वराज्याच्या कायद्याचा मसुदा करून पार्लमेंटला तो लवकरच सादर

करणार आहे. हा शुभ्र खलिता प्रसिद्ध झाल्यावर त्या संबंधीं खल करून हिंदुस्थानाचें राष्ट्रीय धोरण ठरविण्याकरितां एक सर्वपक्षीय परिषद भरविण्यांत यावी अशी आमची सूचना आहे. सरकारच्या सद्हेतूची परीक्षा पाहण्याकरितां सर तेजबहादूर सप्रू व सर पुरुषोत्तमदास यांनी सरकारास अशी विनंति केली आहे कीं, महात्मा गांधींना व इतर सर्व राजकीय कैद्यांना सरकारने आपण हिंदुस्थानांत परत जाण्यापूर्वी सोडून द्यावें. या परीक्षेला सरकार उतरले तरच पुढील सर्वपक्षीय परिषदेची योजना सिद्ध होईल, एरव्ही होणें शक्य नाही. सर तेजबहादूर सप्रू म्हणाले कीं "माझा महात्मा गांधींशीं मतभेद आहे. पण माझें असें ठाम मत आहे कीं, स्वाभिमान व देशप्रीति यांचा प्रत्यक्ष अवतार म्हणून कोणाकडे बोट दाखवावयाचें असेल तर मला त्यांच्याकडेच बोट दाखविलें पाहिजे. नव्या घटनेच्या संबंधांत आम्हीं तरी महात्मा गांधीशिवाय कोणाचा सल्ला घ्यावा? कैदी असेपर्यंत ते सल्ला देतील असें मला वाटत नाही. म्हणून माझी विनंति कीं, त्यांची व राष्ट्रीय सभावाल्या इतर पुढाऱ्यांची अटकेंतून मुक्तता करा. इंग्रजी राज्याविषयीं लोकांमध्ये इतका तिटकारा आलेला मीं माझ्या सार्वजनिक आयुष्यांत कधीहि पाहिला नाही. पुढाऱ्यांची मुक्तता व स्वराज्यदान हाच त्यावर उपाय आहे." सर सॅम्युएल होअर यांनी ह्या प्रश्नाचा मी विचार करीन असें आश्वासन दिलें आहे. पाहूं प्रत्यक्ष कृति त्यांच्या हातून कशी घडते ती.

स्वराज्याच्या योजनेची खरी परीक्षा तिच्या अमलबजावणींत आहे. व्हाइट पेपरवर कांहीहि लिहिलें अगर नवा कायदा केला तरी लोकांच्या हातीं सत्ता येऊन संरक्षक बंधनांच्या बुरख्याखाली जे खोडे तयार करून ठेवले आहेत ते बाजूला सारले जातील त्या वेळींच स्वराज्याचा खरा उपभोग लोकांना घ्यावयास सांपडेल. नुसत्या कागदावर साखरेचें नांव लिहिलें म्हणून त्या कागदांतील अक्षरांत मधुरपणा थोडाच येणार आहे? नुसती बोलाचीच कढी व बोलाचाच भात असला तर जेवणाराची तृप्ति कशी होणार? हें सर्व लक्षांत घेऊनच 'हिंदु' पत्राला नुकत्याच दिलेल्या आपल्या मुलाखतींत श्री. न. चिं. केळकर म्हणतात कीं "घटनेंत कोणत्याहि तऱ्हेचा फेरबदल करण्याचा हक्क खुद्द संयुक्त लोकसभेलाहि ठेवला नाही. या बाबतींत इतकीं बंधनें व इतक्या अडचणी घातल्या गेल्या आहेत कीं मताधिकार वाढविण्याचाहि हक्क आम्हांला नाही. निदान दहा वर्षें तरी या घटनेंत फरक करण्याचा पार्लमेंटाशिवाय इतरांना अधिकार नाही इतके आम्हांस जखडून टाकण्याचा विचार आहे.अशा परिस्थितींत हिंदुस्थानानें ही लुली पांगळी केलेली मर्यादित हक्कांची योजना मान्य करावी अशी शिफारस करण्याचें मी अभिवचन देऊं शकत नाही." श्री. केळकरांच्या या म्हणण्याच्या अर्थाचें स्पष्टीकरण करण्याचें कारण नाही. त्यांच्या या उद्गारावरूनहि गोलमेज परिषदेची फलश्रुति किती निराशाजनक आहे याविषयीं कोणाचीहि खात्री होईल.

# नाशिकच्या तुरुंगांतील प्रकरण

डॉ० न्यूबोल्ड—कोर्टाच्या प्रश्नास—"मी ता. १ आक्टोबरला कामावर आलों त्या वेळीं माझें हुकमतींत एक्स्टेन्शन कॅंपमधील 'क' वर्गाचे सर्व राजबंदी होते. तेथे सर्वच्या सर्व 'क' वर्गाचे कैदी राजबंदी होते कीं नाही याबद्दल खात्री नाही. या कैद्यांना शिक्षा देण्याची जबाबदारी माझ्यावर होती. सर्वच 'क' वर्गाचे कैदी शिक्षेसाठी माझेपुढे आणले जात असत. जॅक्सन हा नित्याच्या फेरींत येत असे. रॅश हा सुपरिंटेंडेंटबरोबर आलेला मीं पाहिला आहे. ता. २५ रोजीं माझ्या पुढे आणलेले कैदी मीं ऑफिसांत व दवाखान्यांत पाहिले. ते कोठून आणले होते हें मला माहीत नाही. सुपरिंटेंडंटच्या हुकुमावरून जॅक्सनने त्यांना आणलें होतें. 'क' वर्गाच्या कैद्यांची शिस्त राखण्याची जबाबदारी माझ्यावर होती. फटक्यांची शिक्षा देण्यास इन्स्पेक्टर जनरलची परवानगी लागते.

मि. ब्राऊन यांचे प्रश्नास उत्तर देतांना ते म्हणाले, "डे. सुपरिंटेंडेंट या नात्याने मी विकर्हेम यांना जबाबदार होतों. माझा दुसरा अधिकार मेडिकल ऑफिसर हा होता. झालेल्या गोष्टीबद्दल मला प्रथम ता. २९ रोजीं सकाळीं ८ चे सुमारास खबर मिळाली. मीं दुपारीं १ ला अमृतलालचे तपासणीस सुरुवात केली. मला दुखापती भयंकर वाटल्या. तपासणीस थोडा वेळ लागला. नंतर मीं त्याला काय होत आहे तें पाहात बसलों. मीं संध्याकाळीं यार्ड सोडला. मी सीनियर जेलर यास भेटलों व त्याला हें सुपरिंटेंडेंटला कळविण्यास सांगितलें.

अमृतलाल यास पाहिलें तेव्हां विशेष काळजी करण्यासारखी स्थिति आहे असें मला वाटलें. पण काय झालें आहे हें नीट समजून घ्यावयाचें होतें. मी सायंकाळीं ७-७॥ ला जेलमधून बाहेर निघालों. त्या वेळीं बरीच भयंकर स्थिति (अमृतलालची) आहे अशी माझी खात्री झाली होती. मि. विकहॅम हे तुरुंगाच्या बाहेर जवळच रहातात. ही भयंकर हकीगत सुपरिंटेंडेंट यांस त्या वेळींच कळविण्यास कांही प्रत्यवाय नव्हता. दुसरे दिवशीं २ वाजेपर्यंत मीं सुपरिंटेंडंटला कळविलें नाहीं. सुपरिंटेंडेंटकडे पाठविलेल्या रिपोर्टाची स्थळप्रत मी सादर करतों. हा रिपोर्ट मीं रविवार ता. ३० ऑक्टोबर रोजीं सकाळीं पावणेदहा वाजतां लिहिला. माझ्या माहितीप्रमाणे सुपरिंटेंडेंट रविवारीं जेलमध्ये फेरीस आला नाही. भयंकर प्रकार असताहि सुपरिंटेंडेंटने जखमी इसम पाहण्यापूर्वी २ दिवस गेले. मीं मेडिकल ऑफिसर या नात्याने प्रत्येक खोली रोज पाहिली पाहिजे असा नियम आहे. पण हें काम मेडिकल ऑफिसर अगर त्याचा दुय्यम अधिकारी करूं शकतो असाहि दुसरा नियम आहे. मीं ता. २७ रोजीं खोली पाहिली नाही.

## मी नवा मनुष्य आहें

मी नवीन मनुष्य आहें. मला तुरुंगाच्या नियमांची चांगलीशी माहिती नव्हती. माझ्या नोकरींत यापूर्वी माझा इतर तुरुंगांशीं संबंध आला. पण मुंबई इलाख्यांतील तुरुंगांशीं आला नाही. इतर तुरुंगांत वरीलप्रमाणे काम करणें हें माझें कर्तव्य नव्हतें. ता. २८ आक्टोबर रोजींहि मीं खोल्या पाहिल्या नाहीत. पूर्वी आठवड्याच्या फेरींत मीं खोल्या पाहात असें. दुय्यम वैद्यकीय अधिकाऱ्यासंबंधाच्या नियमामुळे मुख्य वैद्यकीय अधिकाऱ्याची जबाबदारी सुटत नाही याची मला ता. २७ रोजीं माहिती नव्हती. मला नियम नं. १०० (जेल-मॅन्युअल) हा ध्यानांत नव्हता. मीं एकदा जेल मॅन्युअलमधील नियम पाहिले होते. मला माझ्या कर्तव्याची सर्वसाधारण जाणीव होती. प्रत्येक नियम माझ्या ध्यानांत नव्हता."

मि. वर्तक यांचे प्रश्नास—" डेप्युटी सुपरिंटेंडेंट या नात्याने मला यार्डमधील शिपायाचें काम काय असतें तें माहित आहे. ता. २७ रोजीं आरोपी नं. ४ यांजकडे कैद्यांना सुरक्षित राखणें, देखरेख ठेवणें, कांही विशेष घडल्यास जेलरला कळविणें व आजारी म्हणून रिपोर्ट झालेल्यांना दवाखान्यांत आणणें हीं कामें होतीं. जेलर नसतांना कैदी आजारी झाला तर कामावरील शिपायाला डॉक्टरला बोलावतां येतें किंवा कैद्याला दवाखान्यांत घेऊन जातां येतें. शिपायाचा नजिकचा वरिष्ठ जेलर हा आहे. शिपायाने जेलरकडे रिपोर्ट करावयाचा असतो. तो खोल्यांच्या कुलपाच्या किल्या बाळगतो व जेलरने सांगितल्यास कुलपें उघडतो.'

रा. सबनीस यांच्या प्रश्नास-"खंडू हवालदाराच्या अधिकारांत सर्व ६ यार्ड होते का नाही हें मला माहीत नाही. तो सर्कलवर हवालदार होता व यार्डमधील शिपायांवर देखरेख करण्याचें काम त्याचेकडे होतें."

## तुरुंगांतील परिपाठ

आरोपी नं. ५ च्या प्रश्नास-"कोणाहि शिपायाने, वॉर्डराने अगर हवालदाराने अमृतलाल जखमी असल्याचें मला सांगितलें नाही. कैदी आजारी झाल्यास त्याने वॉर्डरला, वॉर्डरने शिपायाला, शिपायाने हवालदाराला व हवालदाराने जेलरला व जेलरने सुपरिंटेंडेंटला कळवावें असा परिपाठ आहे. एक दुय्यम वैद्यकीय अधिकारी रोज सकाळीं व संध्याकाळीं प्रत्येक यार्डांत येतो; पण प्रत्येक खोली पाहात नाही. माझ्या पूर्वीच्या अधिकाऱ्याकडून मी कामावर आलों तेव्हां कांही सूचना मिळाल्या नाहीत. अमृतलाल आजारी झाला ही गोष्ट दडवून ठेवण्याचे कामीं मीं जेलरशीं संगनमत केलें नाही तिसऱ्या दिवशीं कैद्याला मीं दवाखान्यांत नेलें. आरोपी नं. ५ याला मीं जखमांचें कारण विचारलें नाही. अमृतलाल याने जखमा स्वतःच करून घेतल्या आहेत अशाबद्दल आरोपी नं. ५ हा कांही बोलल्याचें मला आठवत नाही."

फेरतपासणींत मि. शिंदे यांच्या प्रश्नास—"ता. २९ रोजीं सुपरिंटेंडेन्टकडे रिपोर्ट करण्याबाबत मीं सीनियर जेलर रॉश यांचा सल्ला घेतला होता."

कोर्टाच्या प्रश्नास—"ता. २९ रोजीं अमृतलाल यांच्या जिवास धोका असल्याचें माझे नजरेस आलें, पण तो तत्काल मरेल असें मला वाटलें नाही. अमृतलालची ता. २९ रोजीं रात्रीं कामावरील सब-असिस्टंट सर्जन याने शुश्रूषा केली."

डॉ. अवचट—बॅ. ब्राऊन यांचे प्रश्नास "मीं दुय्यम वैद्यकीय अधिकारी आहें. नाशिक जेलमध्ये ९ सप्टेंबर १९३१ पासून आहें. नियम मला माहीत आहेत व मी ते पाळतों." कोर्टाच्या प्रश्नास—"एकंदर ३ दुय्यम वैद्यकीय अधिकारी आहेत. त्यांना कामें वांटून दिलीं आहेत. 'ब' वर्गाचे दवाखान्यांत आलेले कैदी व नेहमी गुन्हे करणारे (हॅबीचुअल्स) कैदी यांना पाहण्याचें माझें काम आहे. माझेकडे हेंच काम एक्स्टेन्शन कँप सुरू झाल्यापासून आहे. खोल्यांतून कैद्यांना तपासणें हें माझें काम नाही. त्या भागांतील कैदी पाहण्याचें काम मि. काझी यांचे आहे."

यानंतर डॉ. दांडेकर यांची उलटतपासणी होऊन ता. १६ चें काम संपलें.

### महमदअल्लीची उलटतपासणी

ता. १७ रोजीं महमदअल्ली जंगी याची पुढील-प्रमाणे उलटतपासणी झाली. कोर्टाचे प्रश्नासः—“ जी शिक्षा मी आज भोगीत आहें ती १४।११।२९ ला सुरू झाली. शिक्षा इं. पि. को कलम ४२० अन्वयें तीन आरोपांबद्दल एकंदर ४॥ वर्षांची सक्तमजुरीची आहे. नाशिक जेलमध्ये १००० ‘हॅबि-च्युअल ’ गुन्हेगार कैदी आहेत. फक्त मीच एकटा नॉनहॅबिच्युअल आहें. १२ वर्षांपूर्वी मला ४६६ कलमान्वयें शिक्षा झाली होती. पण मी त्या खट-ल्यांत पुढे सुटलों.’

बॅ. ब्राऊन यांच्या प्रश्नास—“अमृतलालाच्या खोली-ची मागील बाजू माझ्या खोलीपुढे होती. त्यामध्ये १२ वार अंतर होतें. तितक्या अंतरावरून मी काठीचे तडाखे मऊ भागावर पडत आहेत का कठीण भागावर पडत आहेत तें सांगूं शकतों. ता.२७ ला चंदुलाल यास मारलें तरीहि मला रॉश याच्या पूर्वीच्या दयाळूपणाची आठवण होती. चंदुलाल यास मारण्या-ला जें कारण घडलें तें तो अन्न घेत नव्हता म्हणून. मी अमृतलालचे खोलीपुढे गेलों तेव्हा लगेच रॉशला भेटलों नाही. पुढेहि मीं त्यास भेटून मध्यस्थी केली नाही. आरोपींच्या पायापाशीं अमृतलाल पडला होता तेव्हा त्याचें डोकें चक्कीच्या बाजूला व तिरपें होतें. हुसेन फकीरा त्याच्या उजव्या बाजूस व रॉश हा डोक्याशीं होता. जॅक्सन व खंडू हे दोहों बाजूंस उभे होते. रॉश हा उजव्या बाजूस होता, त्याचे-जवळच जॅक्सन होता. दाराच्या जवळ हुसेन व त्याचे अलीकडे जॅक्सन होता. खोलींत गर्दी झाली नाही, कारण खोली बरीच मोठी आहे. इतके लोक भोंवतीं असूनहि अमृतलालचे तोंड मला दिसलें, कारण मी डाव्या बाजूस होतो व त्या बाजूस आरोपी नं. ३ हाच होता. मारण्याचें थांबल्यावर त्यांच्या पायामधूनहि मला पाहतां येई. दुसरे दिवशीं रॉशबरोबर सुपरिंटेंडेंट आला त्या वेळीं नं. ३ च्या खोलींत कल्याणी या कैद्यास शिक्षेसाठी सुपरिंटेंडेंटपुढे उभें केलें. त्या वेळीं मी त्यांचे मागोमाग गेलों नाही. नं. ३च्या खोलींत मी गेलों नाही. अमृतलाल यास यार्ड नं. ८ मध्ये नेतांना मीं हॉस्पिटलमधून पाहिलें. तेथे मी डोळा धुण्यास गेलों होतों.”

### विकहॅम दयाळू आहेत

मि. सबनीस यांच्या प्रश्नास—“सुपरिंटेंडेंट विकहॅम याला १९३१ मे-पासून ओळखतों. तो दयाळू व खालच्या अधिकाऱ्यांवर विश्वास टाकणारा आहे. अमृतलालाच्या भयंकर स्थितीबद्दल विकहॅम याला कळवावें असें मला वाटलें, पण कळविलें नाही. कारण सहबंद्याशीं सहानुभूति ठेवणें हा भयंकर गुन्हा आहे. शिवाय मी सर्वस्वी जेलरच्या हातांत असल्यामुळे माझ्या जिवाला तसें करण्यांत धोका होता. शिवाय असा रिपोर्ट करूनहि उपयोग होत नाही. कारण दुय्यम अधिकारी मध्ये येऊन त्याला आडकाठी करतात. शिवाय हुसेन फकीरा याने गप्प बसण्यास सर्व कैद्यांना धाक देऊन बजावलें होतें. दुसरे दिवशीं सुपरिंटेंडेंट विकहॅम याला रॉश याने ‘पुढील भागांत कांही रिपोर्ट करण्यासारखें नाही ’ असें सांगितलें तेव्हा ते माझेपासून १० यार्डांच्या अंतरावर होते. मी अमृतलालाचे खोलीपुढे उभा होतों व मारतांना प्रत्यक्ष पाहिलें ही गोष्ट प्रत्यक्ष मीं मि. डेव्हिस यांचेपुढे सांगितली नाही. पण कोर्टापुढे येईपर्यंत मला काय म्हणावयाचें आहे तें राखून ठेवीत आहें असें मीं म्हणालों. मी मारल्याचें पाहिलें ही गोष्ट प्रथम बंगाली याला मी सांगितली. मी उभा असताना त्यानेहि मला पाहिल्याचें सांगितलें. मी बंगाली याचेजवळ ८॥ वाजता ही गोष्ट बोललों पुढे ही गोष्ट कोणास सांगितली नाही.कारण मी आजारी होतों. पण आता मला आठवतें कीं, खंडूच्या सांग-ण्यावरून मी चौथ्या यार्डांत गेलों, तेथे इतर कैद्यां-प्रमाणें तीन राजकीय कैदी होते. एकाचें नांव स्वामी आनंद, दुसऱ्याचें नांव पुरी, तिसऱ्याचें नांव आठवत नाही. त्यांना मीं सांगितलें कीं, अमृतलाल यांस मारतांना मीं पाहिलें ”

श्री. वर्तक वकील यांच्या प्रश्नास— “ आरोपी नं. ४ हा अमृतलालाच्या डाव्या बाजूला आरोपी नं. ५ समोर तोंड करून उभा होता. कांही थोड्या कैद्यांखेरीज बाकीचे कैदी खोल्यांतून बंद केलेले होते.

आरोपी नं. ५ चे प्रश्नास—“ अधिकाऱ्यांचे देखत त्यांचे हुकुमाखेरीज एक कैदी दुसऱ्या कैद्याचे अंगावर हात टाकूं शकत नाही. ”

### सिव्हिल सर्जनची उलटतपासणी

नंतर नाशिक सिव्हिल हॉस्पिटलमधील माजी सिव्हिल सर्जन डी सिल्व्हा यांची उलटतपासणी पुढीलप्रमाणे झाली. बॅ. ब्राऊन यांच्या प्रश्नास-- “ हिस्टीरिया असलेले लोक विमनस्क झाले असता मूर्च्छित होतात ही गोष्ट खरी आहे. विमनस्क स्थितींत त्यांनी बोलणें बंद करणें हें संभवनीय आहे. ‘कंकशन’मुळे सहा-सात दिवसांनंतर बारीक ताप सामान्यतः असतो असें नाही. त्यामुळे ताप आलाच तर तो २४ तासांच्या आंत येतो. ता. ९ ला मीं सिव्हिल हॉस्पिटल सोडलें तेव्हा अमृतलाल बिछान्यावरून उठून व्हरांड्यापर्यंत सुमारें १५ पावलें चालत असें

मीं त्याला शेवटीं पाहिलें तेव्हा तो आधार घेतल्याशिवाय चाले, पण फारच मंद गतीनें. तो प्रथम केव्हा चालूं शकला हें आठवत नाहीं."

यानंतर नाशिक सिव्हिल हॉस्पिटलमधील हल्लीचे सिव्हिल सर्जन डॉ. फ्रॅन्सिस यांची उसटतपासणी झाली. कोर्टाचे प्रश्नास—"मीं ता. २० ला डॉ. डी सिल्व्हा यांचेसह अमृतलाल यास पाहिलें. तो हॉस्पिटलमधून सोडण्यासारख्या स्थितींत नव्हता. त्याच्या हातापायांस थोडी सूज होती व पाठीकडे वाहती जखम होती. ता.२० ला तो थोड्या अंतरापर्यंत चालूं लागला व पुढे अधिक चालूं लागला.ता.२० ला त्याची मानसिक स्थिति उत्तम होती. केवळ सूज व जखम बरी होण्यासाठीं त्याला ठेवलें होतें."

बॅ. ब्राऊन यांचे प्रश्नास "कंकशन झालें असता कित्येक दिवस किंवा आठवडे बेशुद्धि राहते."

यानंतर डॉ. काद्री हे आपल्या जबानींत म्हणाले, "मी ता.१०सप्टेंबर ते ता.१२ नोव्हेंबरपर्यंत नाशिक जेलमध्ये होतों. मी एक्स्टेन्शनच्या हॉस्पिटलमध्ये नं. ८ च्या यार्डांत कामावर होतों तेव्हा ता. २९ ऑक्टोबर रोजीं रात्रीं मीं अमृतलाल यास पाहिलें. तोच एक रोगी तेथे होता. दुसरें कोणी नव्हतें. रात्रीं १० ते सकाळीं ६ पर्यंत मीं त्याची शुश्रूषा केली. त्याला प्रथम ताप १०० अंश होता. रात्रीं एक वाजता १०१'६ इतका होता. दोन वाजता १००'६ व पहाटे ६ वाजता ९९'४ होता. नाडी अनियमित होती. तो शुद्धीवर आला नाहीं. त्याच्या डोक्यावर सारखें बर्फ ठेवलेलें होतें. सकाळीं ६ वाजता सामान्यतः स्थिति तीच होती. अमृतलाल आजारी असल्याची खबर मला प्रथम ता. २९ रोजीं सकाळीं डॉ. अवचट यांजकडून मिळाली."

उलट तपासणी—"मला जेलचे सर्व नियम माहीत नाहींत. कांहीं नियम माहीत आहेत. मीं जेलमध्ये थोडे दिवस होतों तेवढ्यांत मीं हळूहळू नियमांचा परिचय करून घेत होतों. मी जेलमध्ये होतों तेव्हा मला नियमांचा अर्थ समजला त्याप्रमाणे मी वागत होतों. त्या वेळीं यार्ड नं. ६, 'ब'वर्ग, सर्कल व हॅबिच्युअल' कैदी हे माझे अधिकारक्षेत्रांत होते. मी यार्डांत रोज सकाळीं व सायंकाळीं जात असें पण प्रत्येक खोलींत जात नसे. माझ्या वरिष्ठ वैद्यकीय अधिकाऱ्यानें मला असा परिपाठ असल्याचें सांगितलें होतें कीं, कामावरील वैद्यकीय अधिकाऱ्यानें यार्डांत जावें; ज्या कैद्याला उपचाराची जरूरी असेल त्यास पगारी वॉर्डरानें अगर कैदी वॉर्डरानें दारापाशीं आणावें. कोणी कैदी आजारी झाल्यास वॉर्डरानें प्रथम डॉक्टराला कळवावयाचें व मग डॉक्टरानें त्याला पाहावयाचें. डॉ. अवचट यांनीं मला हा परिपाठ असल्याचें सांगितलें. डॉक्टरानें प्रत्येक खोली पाहिली पाहिजे हा नियम आता मला कळला. पण मीं सांगितल्याप्रमाणेंच परिपाठ बरेच दिवसांपासून आहे. आरोपी नं. ५ याचेपाशीं ता. २७ रोजीं सकाळीं आयोडीन व क्विनीन मीं दिलें कीं नाहीं हें आठवत नाहीं. ता. २८ व २९ रोजीं दिल्याचें आठवत नाहीं. या तीनहि दिवशीं आरोपी नं. ५ यांचेजवळ मी कांहीहि दिलें नाहीं हें मी शपथेवर सांगण्यास तयार आहे.

# स्फुट सूचना

१ महात्मा गांधींनी गुरुवायुर मंदिर-प्रवेशानिमित्त ता.२जानेवारीपासून मरणांत उपोषण करण्याचा निश्चय जाहीर केला असल्याचें सर्वांस माहीतच आहे. पण अस्पृश्यांना पंचांच्या ताब्यांतील देवळें रूढीला झुगारून मद्रासच्या 'रिलिजस एंडाउमेंट ॲक्टा'-खाली उघडतां येणार नाहींत असें आम्हीं पूर्वीच म्हटलें होतें. ट्रस्टींना बेकायदेशीर कृत्य करण्याचा आग्रह म. गांधी तरी कसा धरणार? ही कायद्याची अडचण पाहून महात्माजींनी असें ठरविलें होतें कीं ही अडचण निघेपर्यंत आपण आपल्या प्रायोपवेशनास सुरुवात करणार नाहीं. मध्यंतरीं हा कायदाच बदलून घेऊन बहुमत अनुकूल असल्यास पंचांनी अस्पृश्यांना प्रवेशास परवानगी द्यावी अशी खटपट सुरू झाली. डॉ. सुबारायन यांनी तसें एक बिलहि तयार केलें व तें मंजुरीसाठीं हिंदुस्थान-सरकाराकडे पाठविलेंहि. परंतु अशा तऱ्हेचीं बिलें खुद्द असेंब्लींत व इतर प्रांतिक कायदेमंडळांतहि आलीं असल्याकारणानें प्रांतिक सरकारांचें मत अजमावल्याशिवाय म्हणजे निदान ता. १५ जानेवारी-पर्यंत तरी आपल्याला या बिलाला मंजुरी देतां येत नाहीं असें हिंदुस्थानसरकारानें मद्रास सरकाराला कळविलें आहे. या दृष्टीनें पाहतां ता. १५ जानेवारी-पर्यंत किंबहुना असा नवा कायदा होईपर्यंत महात्मा गांधींनी उपवास सुरू करणें न्याय्य होणार नाहीं. याच बाबतींत बोलणें करण्याकरितां गुरुवायूरचे सत्याग्रही श्री. केलप्पन् हेहि पुण्यास येत आहेत. त्यांच्या बैठकींत काय ठरतें हें लवकरच समजेल. तथापि श्री. केलप्पन हेहि कायद्याची अडचण अस-

त्यास प्रायोपवेशनास सुरुवात करूं नये असाच मताचे आहेत असें प्रसिद्ध झालें आहे. सांप्रत येरवडयाच्या तुरुंगांत धार्मिक प्रश्नांचा खल म. गांधींबरोबर सुरू आहे. दोनहि पक्षांची शास्त्रीमंडळी त्यांजपाशीं वादविवाद करीत असल्याचें दृश्य अपूर्व आहे यांत शंका नाहीं. हा अस्पृश्यतानिवारणाचा प्रश्न एवढ्या धसास गांधींनी लावला याची कृतज्ञताबुद्धि जागृत ठेवून त्यांच्या राजकारणास अस्पृश्यांनीहि मदत करावी अशी अपेक्षा करणें अनाठायीं नाहीं.

---

२ अत्याचारी चळवळीचा बीमोड करण्याचा चंग बंगालसरकारने बांधला असून त्यासाठी आपल्या हातीं नवीं प्रभावशाली अशीं कायद्याचीं शस्त्रास्त्रें सिद्ध करून घेतलीं आहेत. चितागांग येथील हिंदु रहिवाश्यांवर जबरदस्त कर लादून त्यांचीं हाडें नरम करण्यांत आलीं आहेतच; परंतु तेवढ्यानेहि सरकारची तृप्ति न झाल्याने डाका व चितागांग-विभागांतील कॅप्टनच्या दर्जापर्यंतच्या सर्व लष्करी अधिकाऱ्यांना व डेप्युटी सुपरिंटेंडेंट ऑफ पोलिसच्या दर्जाच्या सर्व अधिकाऱ्यांना जिल्हाधिकाऱ्याच्या अधिकारांनी मंडित करण्यांत आलें आहे. याचा उघड अर्थ वरील दोनहि भागांतील मुलकी अमलाबरोबरच लष्करी कायदाहि सुरू झालेला आहे! परंतु हे लष्करी अधिकारहि अपुरे वाटून कीं काय कोण जाणे, बंगालसरकारने जाहीर पत्रकाच्या द्वारें असें जाहीर केलें आहे कीं, एखाद्या घरांतील माणसाची माहिती कोणत्याहि पोलीस अधिकाऱ्याने घरमालका-जवळ अगर घरांत राहणाऱ्या इसमाजवळ मागितली असता ती त्या इसमाने तत्काल पुरविली पाहिजे. अशा रीतीने बंगाल-सरकारने अत्याचाराचा बीमोड करण्यासाठी कायद्याच्या बुरख्याखाली लष्करी राज्य सुरू केलें आहे! यामुळे बंगालमधील लोकांस आपलें वित्त, जीवित व अब्रू अशाश्वत वाटत असल्यास नवल नाहीं.

# अलाहाबादेच्या परिषदेंत

( ले. बॅ. सी. बी. आगरवाल, पुणें).

महाराष्ट्र हिन्दु-धर्म परिषदेचा प्रतिनिधि म्हणून मी ऐक्य परिषदेला उपस्थित होतों. परिषदेचें खुलें अधिवेशन असें ता. १६ रोजीं भरलें तेंच काय तें. त्या दिवशीं बंगाल्यांतील हिन्दु-मुसलमानांच्या बाबतींत सबकमिटीचें मतैक्य होईपर्यंत अधिवेशन तहकूब करण्यांत आलें. प्रथमदर्शनींच असें दिसून येतें कीं, देशांतील जनतेला परिषदेचे निर्णय संमत व्हावेत म्हणून तिची घटना जितकी प्रातिनिधिक स्वरूपाची असावयास पाहिजे तितकी ती झालेली नाहीं. हिंदु आणि मुसलमान या समाजांतील कांहीं गट, कोणत्या कां उद्देशाने असेना, पण परिषदेपासून अलिप्त राहिले आहेत. त्यामुळे असें म्हणण्यास मला हरकत वाटत नाहीं कीं, कमिटीने एकमुखी निर्णय दिले तरी ते बहुजनसमाजाला खात्रीने मान्य होतीलच असें नाहीं. पं. मालवीय यांनी परिषद यशस्वी करण्यासाठीं आपला लौकिक व आपला प्राणच जणुं पणाला लावला आहे. त्यांच्याचप्रमाणे श्री. सी. विजयराघवाचार्य हेहि जिवाचें रान करीत आहेत. या दोघांचे भगीरथ प्रयत्न चालू नसते तर परिषद पहिल्याच दिवशीं छिन्नविच्छिन्न झाली असती!

हिंदूंची ऐक्यविषयक वृत्ति कोणाच्याहि लक्षांत येण्यासारखी आहे. त्यांना ऐक्याची तहान लागली आहे आणि ती भागविण्यासाठी कोणतीहि किंमत देण्याला ते तयार आहेत असें म्हटलें तर त्यांत अतिशयोक्ति होणार नाहीं. मुसलमानांना आपल्या बाजूला वळविलें नाहीं तर ते ब्रिटिशांच्या कच्छपीं लागतील आणि त्या योगें राष्ट्रीय वृत्तीला धोका पोंचेल अशा धास्तीने हिंदु लोक कोणताहि स्वार्थत्याग करण्यास तयार झाले आहेत.

परिषदेंतून निष्पन्न कांहीहि होवो; पण एकंदर चर्चेचें धोरण न्यायाला धरून होतें असें कोणाला म्हणतां येणार नाहीं. मुसलमान आपल्या मागण्या मांडीत सुटले आहेत, याचें कारण त्या न्यायाला धरून आहेत हें नसून त्यांना त्या हव्या आहेत एवढेंच. त्यांना हिंदूंनी मान डोलावली पाहिजे; नाहीं तर परिषदेचा भंग होईल! देवाणघेवाणाचें धोरण मुसलमानांनी पत्करलेलें नाहीं आणि युक्तिवाद त्यांना वावडा आहे. हरएक बाबतींत हिंदूंनी आपल्या हक्कांचा होम करावा असें परिषदेचें धोरण आहे. वादाची पद्धतिहि टीकास्पद आहे. प्रत्येक प्रांताचा विचार त्या प्रांतांतील पुढाऱ्यांनीच करावा अशी पद्धति घालून देण्यांत आली आहे. म्हणजे बंगाल्यांतील हिंदु व मुसलमान यांचें बंगाल्यांतील प्रश्नाबाबत एकमत झालें, तर इतर प्रांतांच्या पुढाऱ्यांनी तें मान्य केलेंच पाहिजे, त्यांना त्यांत बोलण्याचा कांहीं अधिकारच नाहीं. या पद्धतीमुळे डॉ. मुंजे यांच्यासारख्या पुढाऱ्यांची स्थिति मोठी चमत्कारिक झाली आहे. एखाद्या प्रांताचा

प्रश्न तेथील पुढाऱ्यांनी निकालांत काढला म्हणजे डॉ. मुंजे यांना त्यांत हात घालतां येत नाहीं.

परिषदेंत मतैक्य झालें अशा बातम्या वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध होत असल्या, तरी सरकारी खलिता ( White Paper ) बाहेर पडेपर्यंत मुसलमान लोक शेवटचा निर्णय देणार नाहीत हें खास. ब्रिटिश सरकारच्या निर्णयापेक्षा अलाहाबाद कराराने आपल्या पदरांत जास्त हक्क पडत आहेत असें स्पष्टपणें दिसून येईल, तेव्हाच त्या करारावर शिक्कामोर्तब ठोकण्याचा विचार मुसलमान करतील, एरवी नाही.

# सैन्याधिकार नाही तर स्वराज्य कसलें ?

आशां कालवतीं कुर्यात्कालं विघ्नेन योजयेत् । विघ्नं निमित्ततो ब्रूयान्निमित्तं वापि हेतुतः ॥

—कणिकनीति.

राजनीतिशास्त्रज्ञ कौटिल्य याने आपल्या अर्थशास्त्रांत 'अलब्धलाभादि चतुष्टयं राज्यतन्त्रम् ' असें राज्याधिकाराचें चतुर्विधात्मक लक्षण सांगितलें आहे. अलब्धाचा लाभ, लब्धाचें परिरक्षण, रक्षिताचें वर्धन आणि वर्धिताचें सत्पात्रीं दान हीं राज्यसत्तेचीं चार प्रमुख अंगें होत. सूत्ररूपाने वर्णन करावयाचें म्हणजे दण्ड आणि कोश किंवा लष्कर आणि खजिना हेच स्वराज्याचे दोन जिवंत झरे आहेत. हिंदुस्थान सध्या स्वराज्याची वाट चालूं लागल्याची भाषा ऐकूं येते. इतकेंच नव्हे तर स्वातंत्र्यशैलाची निम्मीअधिक चढण चढून जाऊन त्याला स्वराज्याचें नयनमनोहर आणि भावनारम्य उत्तुंग शिखरहि दिसूं लागल्याची कल्पना कित्येकांना उल्लसित करीत आहे. अशा उल्लासलहरींनी उत्स्फूर्त झालेल्या मनःस्थितींत आपल्या पदरांत मधुर आश्वासनांचा केवळ मोहोरच पडत नसून भरीव हक्कांचा भरदार घोसच पडत आहे कीं नाही हें सावधानतेने पाहण्याची जबाबदारी हिंदी लोकांवर साहजिकच येऊन पडते. शब्दांचा फुलोरा फुलविण्याची विद्या ब्रिटिशांना हस्तगत झाली असल्याने गोलमेज परिषदेचीं तीन अधिवेशनें भरवून त्यांत त्यांनी आश्वासनें आणि अभिवचनें यांचा नुसता पाऊस पाडला. परंतु दुःखाची गोष्ट अशी कीं, त्या पर्जन्यबिंदूपासून स्वराज्याच्या हक्काचा एकहि पाणिदार मोती पूर्णांशाने निर्माण झाला नाही !

हिंदुस्थानाला वसाहतींचें स्वराज्य यथाक्रम देण्यांत येणार असून संघटनात्मक राज्यपद्धति स्थापित करण्यांत येणार ही गोष्ट आता निश्चित झाली आहे. तिसऱ्या अधिवेशनाचें भरतवाक्य म्हणत असता लॉर्ड सँकी, सर सॅम्युएल होअरप्रभृति ब्रिटिश मुत्सद्द्यांनी त्याच मंत्राचा पुनरुच्चार केला. ब्रिटिश सरकाराच्या या धोरणाप्रमाणे आज नाही उद्या हिंदुस्थानाला ब्रिटिश वसाहतींप्रमाणे स्वराज्य प्राप्त होणार यांत शंकाच नाही. परंतु राष्ट्राला स्वराज्य मिळालें याचा अर्थ असा कीं, त्याच्या अंगीं राज्यकारभाराचे अष्टाधिकार चालविण्याचें सामर्थ्य आले पाहिजे. राज्यकारभारामध्यें लष्कर आणि तिजोरी या दोन बाबींचा प्रामुख्याने समावेश होतो. स्वराज्याचें शेत सुरक्षित व सुसंपन्न राहण्यास त्याच्याभोंवती लष्करी नियंत्रणाचें कुंपण घालून त्यांत संपत्तीचे पाट खेळविले पाहिजेत. हिंदुस्थानालाहि स्वतंत्र वसाहतींच्या चाकोरींतूनच जावयाचें आहे तर त्याच्याहि दिमतीला स्वतंत्र लष्कर आणि स्वतंत्र गंगाजळी असावयास नको काय ? मोर्लेपासून मॅक्डोनाल्डपर्यंतच्या सर्व जबाबदार ब्रिटिश मुत्सद्द्यांनीं हिंदुस्थानाला स्वराज्याचे हक्क देण्याचीं अभिवचनें दिलीं. परंतु आश्वासनें पूर्ण करण्याची वेळ येताच कणिकनीतींत सांगितल्याप्रमाणे हिंदी लोकांच्या अपात्रतेचा दोष उगाळून त्यांना विघ्नाचा नाट ते लावतात असा अनुभव येतो. याच धोरणाचें ताजें उदाहरण म्हणजे भारतमंत्री सर सॅम्युअल होअर यांनीं ता. ६ रोजीं लष्कराबाबत वाचलेलें पत्रक व ता. २४ रोजीं केलेलें शेवटचें भाषण हें होय. हिंदुस्थानाला आम्ही सुधारणा देणार, लष्कराचें हिंदीकरणहि करणार, फार काय रिझर्व्ह बँक स्थापून आर्थिक स्वातंत्र्याच्या युगाला सुरुवातहि करणार असें म्हणून त्यांनी आपल्या भाषणांत गोड वाक्यांची साखर तर खूप पसरली; परंतु डॉ. सप्रू, बॅ. जयकर, श्री. न. चिं. केळकर यांसारखे मर्मज्ञ मुत्सद्दी असल्या पुंगीने थोडेच डोलणार ? त्यांनी आपल्या भाषणांतून ब्रिटिशांच्या या कणिकनीतीचे चांगलेच वाभाडे काढले. होअरप्रभृति मुत्सद्दी एका हाताने स्वराज्याचा वृक्ष लावीत आहेत तर दुसऱ्याच

हाताने मोठ्या हिकमतीने लष्कर आणि खजिना या त्याच्या जिवंत मुळ्या खच्ची करीत आहेत !

गोलमेज परिषदेच्या तिसऱ्या अधिवेशनांत प्रारंभींच लष्कराचा प्रश्न चर्चेस निघाला असतां डॉ.सप्रू, श्री.केळकरप्रभृति राष्ट्रीय प्रतिनिधींनी लष्कराच्या हिंदीकरणाची निश्चित कालमर्यादा ठरविण्यांत यावी, लष्कराचा ताबा मध्यवर्ती सत्तेला देण्यांत यावा, लष्करखात्याचा मंत्री लोकनियुक्त असून कायदेमंडळाला जबाबदार असावा, लष्कराचा खर्च ठरविण्याचा अधिकार लोकसभेला असावा इत्यादि महत्त्वाच्या मागण्या निःसंदिग्धपणें मांडल्या. लोकप्रतिनिधींच्या मागण्यांचे हे पडसाद उठताच होअर, पीलप्रभृतींचीं हृदयें 'हृदयानि व्यदारयत्' या वर्णनाप्रमाणे विदीर्ण होऊ लागलीं. हिंदुस्थानातील ब्रिटिश सत्तेवर ही मोठीच आपत्ति कोसळली असें त्यांना वाटलें.साहाजिकच आहे;लष्कराच्या राखीव कुरणांतील हिरव्या हरळीवर स्वच्छंदतेनें बागडणाऱ्या पांढऱ्या हत्तींना हिंदी सत्तेचा हा अंकुश कसा मानवणार ? सर सॅम्युअल होअर व डॉ. सप्रू यांजमध्ये तर सदर प्रश्नावर चांगलाच वाद झाला. राष्ट्र स्वसंरक्षणक्षम आणि परचक्रनिवारणास योग्य होण्यास त्याच्या अंगीं प्रथम लष्करी शिक्षण आणि शिस्त बाणली पाहिजे; सैन्याधिकाराशिवाय त्याला स्वराज्य देणें म्हणजे त्याची थट्टाच करणे होय;लष्कर–मंत्री हिंदी मनुष्य नेमला असता लष्करी खात्याशीं त्याचा संबंध येऊन त्याला त्याची माहिती होऊ शकेल; लष्कराचा ताबा कायदेमंडळाच्या हातीं आल्यास खर्चांत पुष्कळच बचत करतां येईल आणि अप्रत्यक्ष रीत्या लष्करोपयोगी सामान हिंदुस्थानांतच घेतल्याने येथील कारखान्यांसहि उत्तेजन मिळेल; हिंदीकरण लवकर करण्यांत आल्यास हिंदी लोकांच्या ठायीं लष्करी शिस्त व बाणा बाणून ते युद्धक्षम सेनानी होतील इत्यादि मुद्दे डॉ. सप्रू व श्री. केळकर यांनी आपल्या भाषणांत फारच विवेचक व चिकित्सक पद्धतीनें मांडले होते. हिंदी प्रतिनिधींच्या या युक्तिवादाला व बिनतोड कोटिक्रमाला उत्तर देण्याचा प्रयत्न सर होअर यांनी केला. परंतु त्यांत शिळे युक्तिवाद व भ्रामक विधानें यांचेंच भुसें सर्वत्र पसरलें असल्याने लख्ख प्रकाश पडण्याकरिता त्यांच्या मुख्य मुख्य विधानांची छाननी करणें जरूर आहे.

भारतमंत्री आपल्या भाषणांत मोठ्या आढ्यतेने म्हणतात कीं, "हिंदुस्थानाच्या सुरक्षिततेला धोका पोहोचूं नये म्हणून संक्रमणकालांत लष्कराचा ताबा व्हाइसरॉयांच्या हातीं ठेवणेंच भाग आहे." जणुं काय हिंदी कायदेमंडळाच्या स्वाधीन लष्कर करतांच उद्या हिंदुस्थानांत 'अंधारयुग'च अवतरणार आहे ! सायमन कमिशननेंहि आपल्या अहवालांत ज्ञातिकलहाच्या भुताचें भयानक व हिडिस वर्णन करून त्याला गाडण्यासाठीं गोऱ्या मांत्रिकाच्या हातींच लष्कराचा भारलेला वडगा असला पाहिजे अशी फुशारकी मारली होती. होअर काय किंवा सायमन काय दोघांच्याहि म्हणण्याचा मतलब असा कीं, लष्कर हें व्हाइसरॉयाच्या अधिकारकक्षेंत असलें म्हणजे देशांत दंग्याधोप्यांचे वणवे न भडकता सर्वत्र निःशब्द शांततेचें चांदणेंच पसरेल. परंतु हा युक्तिवाद किती पोरकट व भ्रामक आहे हें सिद्ध करण्यास गेल्या दहा वर्षांत उद्भवलेल्या आसुरी दंग्यांचा इतिहास हा भरपूर पुरावा आहे. सध्या तरी लष्कर हें हिंदुस्थान सरकारच्याच पूर्ण हुकमतीखाली आहे; कायदेमंडळाची नुसती सावलीहि त्यावर पडत नाही. अशी स्थिति असता कानपूर–नागपूर-मुंबईची यमपुरी कां गाजली ? दिवसाढवळ्या सैतानी दंगेखोरांच्या पाशवी लीला चालू असतां ब्रिटिश लष्कराचा दरारा कोठे दडून बसला होता ? या सर्व गोष्टींची जाणीव असल्यामुळेच सायमन यांनी आपल्या अहवालांत ब्रिटिश लष्करावरून स्तुतीचीं निरांजनें ओवाळीत "मोघम आश्वासनांनी लष्कराचा प्रश्न सुटणारा नाही. उलट त्यामुळे ब्रिटिश धोरणाबद्दल हिंदी जनतेचीं मनें साशंक होतील. म्हणून या बाबतींत आपल्याला जें धोरण स्वीकारावयाचें असेल तें निर्भीडपणाने स्वीकारले पाहिजे" असा स्पष्ट इशारा दिला होता.

दुसरा प्रश्न लष्कराच्या हिंदीकरणाचा. "हिंदी लोक लष्करी कामांत जसजसे अधिक लायक ठरत जातील तसतसा लष्करांत त्यांचा अधिक भरणा केला जाईल. हिंदीकरणाचा प्रश्न घाईने सुटणारा नाही" इत्यादि मुक्ताफळें उधळून होअरसाहेबांनी हिंदी प्रतिनिधींच्या तोंडाला पानें पुसलीं. होअरसाहेबांनी हें पीछेहाटीचें धोरण स्वीकारलें यांत नवल वाटण्याचें कांही कारण नाही. एक गोष्ट मात्र खरी कीं, हिंदीकरणाच्या प्रश्नाबाबत पहिल्या गोलमेज परिषदेंत ब्रिटिश सरकारने जें उदार धोरण दाखविलें त्याचा मागमूसहि तिसऱ्या अधिवेशनांत राहिला नाही. हिंदीकरणाच्या या प्रश्नाचें आकलन वाचकांना नीट व्हावें म्हणून त्याचा संक्षेपानें थोडा पूर्वेतिहास पाहूं. लष्कराच्या हिंदीकरणाचा विचार करण्यासाठी हिंदुस्थानसरकारने १९२१ सालीं शी कमिटी, १९२५ सालीं स्कीन कमिटी व १९३१ सालीं चेटवुड कमिटी अशा निरनिराळ्या कमिट्या नेमल्या! मध्यंतरीं १९२३ सालीं लॉर्ड रॉलिन्सन यांनीहि आपली 'एट् यूनिट्स सिस्टिम' किंवा आठ पथकांची योजना जाहीर केली. या निरनिराळ्या

कमिट्यांच्या शिफारशींचें तौलनिक दृष्ट्या निरीक्षण करता स्कीन कमिटीची योजना बरीचशी प्रगतिपर तर चेटवुड कमिटीची योजना अत्यंत परागतिक असल्याचें आढळून येतें. शी कमिटीने लष्कराचें हिंदीकरण ३० वर्षांत होईल असा आराखडा मांडला. स्कीन कमिटीच्या मतें हिंदीकरण खरें यशस्वी होण्यास हिंदी व लष्करी अधिकाऱ्यांनी सहकार्याने व बंधुत्वाने एकत्र काम केलें पाहिजे; कारण तसें झाले म्हणजे परस्पर ज्ञानाने परस्परांच्या उणीवा नाहींशा होऊन दोघेहि कर्तबगार सेनानी तयार होतील. चेटवुड कमिटीने लष्करी शाळेंत प्रतिवर्षी घ्यावयाच्या विद्यार्थ्यांची ६० ही संख्या व एका डिव्हिजनचें हिंदीकरण या गोष्टी करण्याचें ठरवून उजव्या हाताने दान केलें तर व्हाइसरॉय कमिशनें बंद करून आणि लष्करांत लढाऊ बिनलढाऊ असा भेद निर्माण करून डाव्या हाताने तें दान परत घेतलें. एकूण साराच भ्रमाचा भोपळा. चेटवुड कमिटीच्या शिफारशींमुळे लष्कराचें संपूर्ण हिंदीकरण होण्यास निदान दीडशें वर्षे तरी जावीं लागतील; परंतु होअर यांच्या घोषणेप्रमाणें हिंदीकरण व्हावयाचें तर ख्रिस्ताच्या पुनरुत्थानाची रम्य उषाच उगवावी लागणार !

हिंदुस्थानांत लष्करी कॉलेज स्थापन करण्यांत यावें व लष्कराचें हिंदीकरण ' भरपूर प्रमाणांत ' व्हावें हीं दोन तत्त्वें पहिल्या गो. मे. परिषदेच्या 'डिफेन्स सब्-कमिटी'ने मान्य केलीं. डिफेन्स कमिटीचा ठराव असा कीं, " हिंदुस्थानाच्या भावी राज्यघटनेच्या दृष्टीने हिंदुस्थानाच्या संरक्षणाची जबाबदारी ही मुख्यतः हिंदी लोकांची आहे, ब्रिटिशांची नाही. हें ध्येय प्राप्त होण्यासाठी हिंदीकरणाची गति भरपूर प्रमाणांत वाढविली पाहिजे." सैन्याशिवाय देशाचें दास्यदैन्य फिटणार नाही हें मर्म ओळखूनच हिंदी पुढाऱ्यांनी लष्कराच्या हिंदीकरणाचा लकडा सरकारामागे कित्येक वर्षे लावला आहे. हिंदी लोकांच्या या मागणीचा न्यायीपणा व अपरिहार्यता सरकारनेच नेमलेल्या कमिट्यांनाहि पटला हें डिफेन्स कमिटीच्या ठरावावरूनच सिद्ध होत आहे.परंतु सरकार या कमिट्यांच्या अहवालांची दखलगिरी घेईल तेव्हा ना ? सरकारला हिंदीकरणाचें तत्त्व मान्य आहे. परंतु तें हिंदीकरण कोणत्या पद्धतीने व्हावें, त्याच्या संपूर्णतेची अंतिम कालमर्यादा किती, इत्यादि तपशिलासंबंधी मात्र सरकारने खळखळ चालविली आहे. हिंदीकरणावर वाद चालू असता ' हिंदीकरणाला कालाची निश्चित मर्यादा घालण्यांत यावी ' अशी डॉ. सप्रूंनी मागणी केली. परंतु तेवढ्याने उसळून ' ब्रिटिश सरकार स्वतःला कालमर्यादेचें बंधन घालूं इच्छित नाही.' असें होअरसाहेब गुरगुरले ! शी व स्कीन या कमिट्यांनी कांहीसें उदार धोरण स्वीकारून हिंदीकरणाची कालमर्यादा ३०–३५ वर्षांवर आणून ठेवली होती. डॉ. मुंजे यांच्याहि मतें हा काल विशेष त्याज्य नाही. वादासाठी संक्रमणकालांत लष्कराचा ताबा व्हाइसरॉयाच्या हातीं असावा असें गृहीत धरलें तरी त्या संक्रमणकालाची तरी अन्तिम मर्यादा कोणती? सर सप्रू यांचें म्हणणें इतकेंच होतें कीं, संक्रमणकालाची निश्चित मर्यादा ठरवून तो जसजसा संपत येईल तसतसें लष्कराचें हिंदीकरणहि संपूर्ण झालें असलें पाहिजे.

हिंदीकरणावर भारतमंत्र्यांचा मुख्य आक्षेप म्हणजे हिंदी लोकांच्या नालायकीमुळे लष्कराच्या कार्यक्षमतेंत कमीपणा येईल हा होय. परंतु हाहि आक्षेप त्यांच्याच अंगलट कसा येतो तो पाहा. १८५७ सालापूर्वी मराठ्यांच्या आणि इंग्रजांच्या तीन सुप्रसिद्ध लढाया झाल्या. त्या तीनहि लढायांत मराठ्यांची मर्दुमकी चांगलीच कसाला लागली होती. १८५७ सालानंतरहि इंग्रजांनी एतद्देशीयांशीं ज्या लढाया मारल्या किंवा परदेशच्या रणक्षेत्रावर जो रणरंग उधळला तोहि हिंदी शिपायांच्या शौर्यानेच! गेल्या महायुद्धांत फ्लँडर्सच्या रणभूमीवर ब्रिटिश साम्राज्याचा यशोध्वज कोणीं अढळ ठेवला असेल तर तोहि हिंदी सैनिकांनीच. या सर्व प्रसंगांवरून एकच गोष्ट सिद्ध होते कीं, हिंदी राज्ये लोपलीं तरी हिंदी लोकांच्या अंगचे शौर्य, धैर्य, पराक्रम, युद्धनैपुण्य, समरनेतृत्व इत्यादि लष्करी गुण लुप्त झाले नाहीत. इतकेंच नव्हे तर हिंदी सैनिकांना जेव्हा जेव्हा स्वपराक्रम दाखविण्याचा अवसर मिळाला तेव्हा तेव्हा त्यांचें वीर्यतेज चपलेप्रमाणे चमकून गेल्याचेंच सिद्ध झालें आहे. वस्तुस्थिति अशी आहे कीं, सरकार हिंदी लोकांना लष्कराच्या राखीव कुरणांत पायच टाकूं देत नाही. म्हणूनच वरील आक्षेप निराधार आहे असें आम्ही म्हणतों.

१८५७ सालानंतर हिंदुस्थानांत ब्रिटिशांचा अंमल जारी झाला. ब्रिटिश अधिकाऱ्यांनी आपल्या रियासतीला सुरुवात करतांच पहिली गोष्ट ही केली कीं, त्यांनी शस्त्रनियंत्रणाचा कायदा करून हिंदी लोकांना निःशस्त्र बनविलें. हिंदी लोकांच्या पौरुषावर ब्रिटिशांनी हा वज्राघातच केला! एकीकडे हिंदी लोकांपासून शस्त्रें काढून घेण्यांत आलीं व दुसरीकडे लष्करांतील वरिष्ठ अधिकाराचें द्वार त्यांना बंद करण्यांत आलें; मिळून दोनहि बाजूंनी कोंडमारा! अशा तऱ्हेने ब्रिटिशांनी हिंदी लोकांचा सहेतुक तेजोवध केला. याला पुरावा म्हणजे टेंपलसाहेबांची साक्ष वाचा. इ. स. १८७८-७९ सालीं एडन कमिशनपुढे

साक्ष देतांना टेंपलसाहेब मोठ्या तोऱ्याने म्हणतात कीं, "ब्रिटिश राजवटींत हिंदी लोकांच्या अंगीं असलेला लष्करी बाणा लोपत लोपत शेवटीं अगदीं नष्ट झाला व ही गोष्ट ब्रिटिश साम्राज्याच्या स्थैर्याच्या दृष्टीने हितावहच झाली. यासाठी सरकारने नेटिव्हां-पासून शस्त्रें सक्तीने काढून घेतलीं ! !" के ॲन्ड मॉलिसन यांनी लिहिलेल्या 'हिंदी बंडाचा इतिहास' या पुस्तकांतील पुढील उतारा पाहा. "हिंदुस्थानांत आमची (ब्रिटिश) सत्ता जों जों वृद्धिंगत होऊं लागली तों तों हिंदी सैन्यांत वरिष्ठ अधिकारी असलेल्या हिंदी माणसाला कमी करून त्याच्या जागीं तरण्या बांड इंग्रज मनुष्याची नेमणूक होऊं लागली. यामुळे हिंदी सैनिकांचे वैयक्तिक कर्तबगारी, निधडेपणा, संघप्रेम इत्यादि उपजत लष्करी गुण मारले गेले." हिंदी लोकांतील शिपाईगिरी समूळ उखडून टाकण्यासाठी सरकारने वर्णभेद, जातिभेद, धर्मभेद व देशभेद यांचा किती भरपूर उपयोग केला हें ज्यांना कळून घ्यावयाचें असेल त्यांनी १८८७ सालीं बरोने लिहिलेलें 'सिपॉय ऑफिसर्स मॅन्युअल' हें पुस्तक अवश्य वाचावें; याशिवाय लष्करी व बिनलष्करी जाती असा नवाच भेद उत्पन्न केल्यामुळे हिंदुस्थानांतील बहुजन समाज क्षत्रियवृत्तीस पारखा झाला. हिंदी लोकांचा लष्करी बाणा अशा रीतीने खच्ची केला गेला असतां हिंदीकरणाने लष्कराची कार्यक्षमता व शिस्त कमी होईल असा युक्तिवाद होअरसाहेबांनी करावा हें मोठेंच धार्ष्ट्य होय ! शेंदीडशें वर्षांत स्वतःच्या जबाबदारी-वर युद्धाचा एकहि प्रसंग आला नसता गेल्या महा-युद्धांत हिंदी वीरांनी जो अद्भुत व अतुल पराक्रम गाजविला तो खरोखरीच विस्मयचकित करणारा होता. अर्थात् याच नैसर्गिक गुणांना लष्करी शिक्षणाची व प्रत्यक्ष जबाबदारीची जोड मिळाली म्हणजे हेच गुण अधिक उज्ज्वलतेने उफळून बाहेर पडल्याशिवाय कसे राहतील ?

हिंदीकरणाच्या प्रश्नाचा साधकबाधक रीतीने विचार झाल्यावर लष्करी खर्च व त्यावरील ताबा यांसंबंधी भारतमंत्री काय म्हणतात तें पाहूं. भारतमंत्री म्हण-तात कीं, लष्कराच्या अंदाजपत्रकावर कायदेमंडळा-ला फार तर चर्चा करतां येईल व त्याला विश्वासांत घेण्याचा प्रयत्नहि करण्यांत येईल; परंतु खर्चांत कमीज्यास्ती करण्याचा हक्क मात्र त्याला राहणार नाही. म्हणजे कायदेमंडळाने वादविवादाचे नुसते फवारे उडवावेत, प्रत्यक्ष लष्करी खर्चाला टाकी मात्र लावूं नये. हिंदुस्थानाच्या उत्पन्नापैकीं निम्म्यापेक्षां अधिक भाग लष्कराच्या खाईंत हविर्भाग म्हणून पडत अस-ल्याने शिक्षण, उद्योगधंदे, कृषि इत्यादि इतर राष्ट्रोपयोगी खात्यांची उपासमार होते ही तर हिंदी लोकांची तक्रार आहे. अर्थात् लष्कराच्या खर्चांत कमीजास्त करण्याचा जर कायदेमंडळाला अधिकार मिळणार नसेल तर नुसत्या चर्चेचा कितीसा उपयोग होणार? तीच गोष्ट लष्करमंत्री नेमण्याबद्दल. तूर्त तरी व्हाइसरॉयच लष्कर-खात्याचा मंत्री नेमणार व तो असेंब्लीला जबाबदार न राहता व्हाइसरॉयाला जबाबदार राहणार असें भारतमंत्री सांगत आहेत ! नवीन राज्यघटनेंत एक सिव्हिलियन लष्कर-मंत्री म्हणून नेमला जाईल हा एका दृष्टीने लाभच आहे, पण तो अत्यल्प आहे. लष्कर-मंत्री कायदेमंडळाला जबाबदार असला पाहिजे या मागणीचें महत्त्व असें कीं, लष्कर-मंत्री हा लोक-नियुक्त असला म्हणजे साहजिकच त्याचें खातेंहि सोंपीव होणार व कायदेमंडळालाच तो जबाबदार राहिला म्हणजे त्याच्या कारभारावर नियंत्रणहि पडणार. लष्करावरील खर्च योग्य वाटल्यास लोकसभा त्याला संमति देईल; वावगा वाटल्यास त्याला संमति देणार नाही किंवा त्याला तारतम्याने काट देईल. थोडक्यांत म्हणजे मंजूर किंवा नामंजूर करण्याचा अधिकार कायदेमंडळाच्या हातीं राहील. परंतु भारतमंत्र्यांनी लोकपक्षाच्या याहि मागणीला विरोध केला.

भौमिक, नाविक आणि वैमानिक असें त्रिदला-त्मक लष्कर असतें. हिंदुस्थानांत डेहराडून येथे सँढर्स्ट कॉलेज स्थापून, विलायतेंतील लष्करी विद्या-लयांत बोटावर मोजण्याइतके हिंदी विद्यार्थी घेऊन आणि डफरीन बोटीवर कांही विद्यार्थ्यांची सोय लावून हिंदुस्थानसरकारने हिंदीकरणाचा उत्तुंग हिमालय मुंगीच्या पावलाने चढण्यास सुरुवात केली आहे ! ब्रिटिश मुत्सद्यांकडून हिंदीकरणाची भाषा जेव्हा बोलली जाते तेव्हा भौमिक शाखेचें हिंदीकरण असाच त्याचा अर्थ प्रामुख्याने घेतला जातो. अर्थातच वैमानिक शाखेकडे अजून सरकारची दृष्टिच वळलेली नाही. परराष्ट्रीय सरकारें आपल्या राष्ट्रांतील तरुणांच्या महत्त्वा-कांक्षेच्या कळ्या सक्रिय उत्तेजनाच्या अनुकूल वायुलहरींनी प्रफुल्लित करून त्यांच्या सुगंधित परि-मलाने अखिल राष्ट्रांत नवचैतन्य प्रस्फुरित करतात; परंतु तीच परकीय सत्ता अंकित राष्ट्रांतील तरुणां-च्या कोमल भावनांवर आपल्या औदासीन्याचें उष्ण जल शिंपून त्यांना कोमेजून टाकते ! राष्ट्रीय सरकाराच्या प्रोत्साहनाने स्वतंत्र राष्ट्रांतील तरुण चंडोलाप्रमाणे विमानाने भरारी मारून स्वर्गांतील नंदनवनांत स्वातंत्र्यगान करतो किंवा मत्स्याप्रमाणे महासागराच्या मांडीवर खिदळत लोळतो ! परंतु ताबेदारीच्या बेडीने जखडलेल्या तरुणाला हें सुख केवळ मनोविमानावरच आरूढ होऊन उपभोगावें लागतें. तिसऱ्या गोलमेज परिषदेंत लष्कराचीं किल-

किल्लीं झालेलीं कवाडें सताड उघडीं होतील अशी आशा वाटत होती. परंतु होअर यांनी हिंदीकरणाची किल्ली पुरतीच आपल्या हातीं ठेवली. परंतु असल्या शकुनी शक्कलांनी स्वातंत्र्यसन्मुख हिंदी लोक किती दिवस फसले जाणार ? ब्रिटिश सरकारला आम्हांस एवढेंच बजावावयाचें आहे कीं, हिंदी लोकांच्या हातीं लष्कराची सत्ता स्वेच्छेने देण्यास सरकार राजी नसलें तरी ती लोकमताच्या प्रभावाने द्यावीच लागणार !

# हिंदी लष्कराचा प्रश्न

## श्री. केळकर यांचें भाषण

गोलमेज परिषदेमध्ये हिंदी लष्कराचा प्रश्न चर्चेकरिता निघाला त्या वेळीं श्री. **न. चिं. केळकर** यांनी जें भाषण केलें तें पुढे दिलें आहे.

### शिफारशी लपविता कां ?

आपल्या भाषणाच्या प्रारंभीं त्यांनी माहिती मिळविण्याकरिता आपल्यास तीन प्रश्न विचारावयाचे आहेत असें सांगितलें. या तीन प्रश्नांत लष्कराचें हिंदीकरण करण्याच्या बाबतींत ज्या अनेक कमिटया नेमल्या गेल्या व ज्या कमिटयांचे अहवाल सरकारच्या धोरणाविरुद्ध जात असल्यामुळे प्रसिद्ध केले नाहीत ते अहवाल गोलमेज परिषदेच्या सभासदांना तरी आता द्या असा त्यांनी आग्रह धरला. ते म्हणाले, "नेक नामदार थॉमस यांच्या अध्यक्षतेखाली हिंदुस्थानाच्या संरक्षणाच्या प्रश्नाची छाननी करण्याकरिता नेमलेल्या कमिटीने अनेक तज्ज्ञांच्या कमिट्या नेमल्या होत्या. हिंदुस्थानाच्या सरसेनापतींच्या अध्यक्षतेखाली एक कमिटी नेमली होती हें मला माहीत आहे. या कमिटीने सन १९३१ च्या जुलै महिन्याच्या पंधरा तारखेस आपल्या शिफारशी सादर केल्या; पण त्यांतील पुष्कळ सभासदांनी भिन्नमतपत्रिका त्याला जोडल्या आहेत. या शिफारशींच्या नकला गोलमेज परिषदेच्या नव्या सभासदांस मिळावयास पाहिजे आहेत. आतापर्यंत या रिपोर्टांच्या प्रती मला तरी मिळाल्या नाहीत.

दुसरी एक तज्ज्ञांची कमिटी नेमली होती. तसेंच स्कीन कमिटीनेहि एक पोटकमिटी नेमली होती. या दोनहि कमिट्यांनी आपल्या शिफारशी लिहून सादर केल्या आहेत. त्यांचे अहवाल आम्हांस कां मिळूं नयेत ? या कमिट्यांचे रिपोर्ट मिळावे म्हणून असेंब्लीमध्ये व बाहेर अनेक प्रयत्न केले गेले. उदाहरणार्थ डिफेन्स सब-कमिटीच्या अहवालाच्या ४८व्या पानावर मि. जिना याचें भाषण दिलें आहे. त्यांत ते म्हणतात कीं, 'स्कीन कमिटीने नेमलेल्या पोटमंडळाने इंग्लंड, फ्रान्स, अमेरिका व कानडा येथे जाऊन तेथील लष्करी शिक्षणाचा व संघटनेचा अभ्यास केला व पुष्कळ माहिती जमवून अहवाल लिहिला. तो अहवाल पाहिला असता इतर देशांतील लष्करी संघटनेची व्यवस्था उत्तम समजून येते.' मीं असेंब्लींत असतांना अनेकवेळां या रिपोर्टांची मागणी केली. श्री. जयकर यांनीहि डिफेन्स सबकमिटींत मागणी केली होती. पण हे रिपोर्ट दिले नाहीत. म्हणून ते आज तरी द्या असें माझें म्हणणें. जर आपण हे रिपोर्ट आम्हांस दिले नाहीत तर हिंदुस्थानांत राष्ट्रीय सैन्य व राष्ट्रसंरक्षणाकरितां उभें करावें लागणारें नागरिकांचें दुसऱ्या दर्जाचें सैन्य या दोनहि प्रश्नांच्या बाबतींत या कमिट्यांचे रिपोर्ट आमच्या बाजूचे आहेत व सरकारच्या धोरणाच्या विरुद्ध आहेत, म्हणूनच तुम्ही ते लपवून ठेवतां असा आम्हांस संशय आल्यास त्यांत गैर काय ? माझा सरळ प्रश्न असा आहे कीं, हे रिपोर्ट कां लपवितां ?

### लष्करावरील लोकसभेचा ताबा

आजच्या कार्यक्रमपत्रिकेंत ज्यांनी ती तयार केली त्यांनी दुसऱ्या परिच्छेदांत म्हटलें आहे कीं, 'ज्या अर्थी लष्करी खातें यापुढे दिवाणी खातें राहणार नाही त्या अर्थी असें ठरलेंना कीं इत्यादि.' काय हा प्रश्न ? गोष्टी गृहीत धरण्याचें केवढें हें धारिष्ट ! असें ठरलें ना ? असा प्रश्न केल्यास त्याला माझें ठणठणीत उत्तर आहे कीं, असें ठरणें मुळींच शक्य नाही! हिंदुस्थानाच्या संरक्षणाच्या बाबतींत गव्हर्नर जनरल हा कोणालाहि जबाबदार नाही व त्याला जादा अधिकार आहेत असें गृहीत धरलें तरी लष्करी खातें हें दिवाणी खात्यांच्या कक्षेबाहेरचे असून केवळ लष्करी खात्याच्या अखत्यारींतील आहे असें अनुमान कसें निघतें किंवा तें निघतें असें गृहीत कां धरलें पाहिजे ? लष्करीखातें हें दिवाणी अखत्यारांतीलच खातें मानलें पाहिजे व त्यावर लोकसभेचाच ताबा पाहिजे.

### कायद्यांचे आधार

ज्यांनी आजच्या कार्यक्रमपत्रिकेचा मसुदा तयार केला त्यांचें गुपित या शब्दांनी बाहेर फुटलें आहे ! या शब्दांचा सहज अर्थ असाच नाहीं का, कीं या वेळेपर्यंत लष्करी खातें हें दिवाणी

खातेंच समजलें जात होतें ! तसें नसतें तर 'यापुढे हें खातें दिवाणी राहणार नाही' असें म्हणण्यांत स्वारस्य काय ? परंतु, यापलीकडे जाऊन हिंदुस्थान सरकारच्या कायद्याच्या दृष्टीनेहि हें खातें दिवाणी आहे असें मी सिद्ध करून देऊ शकतों. त्या कायद्याच्या ३३व्या कलमांत गव्हर्नर जनरल इन कौन्सिल यांच्याकडे दिवाणी खात्यांच्या जोडीनेच लष्करी खात्याची सत्ता दिली गेली असल्याचें म्हटलें आहे. गव्हर्नर जनरल व त्यांचें कौन्सिल हे लष्करी अधिकारी नव्हेत. ते दिवाणी अधिकारी आहेत. हिंदुस्थान लष्करी अमलाखाली खास नाही ! त्यावरील अंमल दिवाणी आहे. सर सेनापति हे एकटेच लष्करी अधिकारी आहेत. परंतु, ते गव्हर्नर जनरलच्या कौन्सिलाचे सभासद असतात व असें नाही. ते जेव्हा सभासद असतात त्या वेळीं इतर सभासदांपैकीं एक, एवढाच त्यांचा दर्जा असतो. ३७व्या कलमान्वयें त्यांचा दर्जाहि गव्हर्नर जनरलच्या खालचा आहे. याचाच अर्थ असा कीं, लष्करी सत्ता ही दिवाणी सत्तेच्या अंकित आहे. जेव्हा लष्कराच्या प्रथम हालचाली युद्धाच्या अगोदर केल्या जातात त्या वेळीं त्या गव्हर्नर जनरलच्या हुकुमाप्रमाणें केल्या जातात; सर सेनापतींच्या हुकुमान्वयें नव्हेत. ३६व्या कलमान्वये जर एखाद्या लष्करी अधिकाऱ्याला गव्हर्नर जनरलच्या कौन्सिलाचे सभासद नेमलें तर त्याला आपले लष्करी अधिकार सोडावे लागतात; यावरूनहि लष्करी खात्याचा दर्जा समजतो. तसेंच ६५ डी या कलमान्वयें हिंदी कायदेमंडळाला लष्कराच्या कांहीं बाबतींत कायदे करण्याचाहि अधिकार दिला गेला आहे. आणि १९१९ च्या कायद्यांत गव्हर्नर जनरल इन कौन्सिल या शब्दांच्या ऐवजीं कायदेमंडळ हे शब्द मुद्दाम जाणूनच घातले आहेत. यावरून (१) लष्करी खातें हें कांहीं बाबतींत तरी दिवाणी खातें समजलेंच पाहिजे व (२) कायदेमंडळाचा त्याच्यावरील ताबा काढून घेतला जाणें शक्य नाही, असे दोन सिद्धांत प्रस्थापित होतात. ही सर्व व्यवस्था अजीबात बदलण्याचा आपला उद्देश आहे काय ? आणि गव्हर्नर जनरल यांना जे नवे खास अधिकार देण्यांत येणार आहेत त्याचें निमित्त करून सर्व लष्करी खातें हें दिवाणी खात्याच्या कक्षेंतून काढून घेण्याचा हा डाव आहे असं म्हटल्यास काय हरकत ?

### कायदे करण्याची सत्ता कोणाची ?

स्टेट सेक्रेटरींनी काढलेल्या पत्रकांत असें म्हटलें आहे कीं, 'जर गव्हर्नर जनरल यांच्या शिरावर आपण नव्या नव्या जबाबदाऱ्या टाकणार तर त्यांना सहा महिन्यांपेक्षा अधिक मुदतीचे कायदे देखील करण्याची सत्ता दिली पाहिजे. कारण, थोड्या मुदतीचे हंगामी कायदे करून त्यांचें काम भागणार नाहीं'. लष्कराबाबत नवे कायदे करण्याचीहि सत्ता व्हाइसरॉयसाहेबांना देण्याचा विचार आहे काय ? सरकारचा खरोखरीच असा विचार आहे काय कीं, यापुढे कायदे–मंडळाने केलेले कायदे व गव्हर्नर–जनरलनी केलेले कायदे असे कायद्याचे दोन प्रकार हिंदुस्थानांत चालू ठेवावयाचे ? व हे कायदेसुद्धा कायम स्वरूपाचे असणार ! नवीन वटहुकूम काढण्याचे अधिकार या खास हक्कांच्या बुरख्याखाली गव्हर्नरजनरलला देण्याचा विचार दिसतो. परंतु हें योग्य नाही. कायदे करण्याची सत्ता फक्त कायदेमंडळाकडेच राहिली पाहिजे. सेक्रेटरी ऑफ स्टेट म्हणतात त्याप्रमाणें ती गव्हर्नर जनरलला देता येणार नाही. लष्कराकरिता कायदे करण्याचा अधिकार कायदेमंडळाकडे असावा व लष्करी खात्याचा कारभारहि गव्हर्नर जनरलच्या हाताखालीं काम करणाऱ्या बिनलष्करी चिटणिसांकडे असावा असें माझें मत आहे. तो तज्ज्ञ नसला तरी चालेल, कारण आज तरी तशीच वहिवाट आहे. लष्करी चिटणीस हा हल्लीहि बिनलष्करीच आहे. आज ब्रिटिश पार्लमेंटाला व हिंदी कायदेमंडळालाच लष्करी बाबतींत कायदे करण्याचा अधिकार आहे. पार्लमेंटानें पाहिजे तर आपला अधिकार गव्हर्नर जनरलला द्यावा, पण हिंदी कायदेमंडळाचा कायदे करण्याचा अधिकार गव्हर्नर जनरलकडे देतां कामा नये. कायदेमंडळ व लष्कर यांचा आज जो संबंध येतो तो कायम ठेवावा इतकेंच नव्हे तर तो हरतऱ्हेने वाढविला जावा असें माझें मत आहे.

### लष्करी खर्चावरील लोकसभेचा ताबा

लष्करी खात्याच्या कारभारासंबंधींहि माझें म्हणणें वरीलप्रमाणेंच आहे. आकस्मिक आपत्तीच्या वेळीं आपली जबाबदारी पार पाडण्याकरितां लष्कराबाबत गव्हर्नर जनरलला जो खर्च करावा लागेल त्याचेंच उदाहरण घेऊ. अशा प्रसंगीं गव्हर्नर जनरलने पैशाची मागणी कायदेमंडळाकडे करावी. मी इतकेंहि म्हणेन कीं, त्यांनी स्वतःच आपल्या अखत्यारींत पैसाहि खर्च करावा. परंतु, लष्करी खात्याचा कारभार चालविणाऱ्या बिनलष्करी चिटणिसानें या पैशाकरितां पुरवणी मागणी लोकसभेकडे करावी. कायदेमंडळ ही मागणी योग्य असल्यास मंजूर करीलच; परंतु प्रश्न हा उत्पन्न होतो कीं, कायदेमंडळानें ही मागणी मान्य केली नाही तर काय करावयाचें ? मी यासंबंधी इतकें म्हणूं शकतों कीं, अशा अडचणीच्या वेळीं गव्हर्नर जनरलांनी आपल्या अधिकारांत शिक्केबाजीच्या तत्त्वावर मंजुरी द्यावी म्हणजे झालें. 'आता इतकेंच कीं, भावी कायदेमंडळाला, लष्करी अंदाजः

पत्रकाचा विचार करण्याच्या बाबतींत अधिकार राहतील' असें म्हटलें आहे. माझा उलट आग्रह असा आहे कीं, लष्करी अंदाजपत्राचा नुसता विचारच काय पण त्यावर मतें देऊन ते मंजूर करण्याचा अगर न करण्याचाहि अधिकार कायदेमंडळाला पाहिजे. तात्पर्य, लष्करी खर्चावरहि कायदेमंडळाचा पूर्ण ताबा पाहिजे असें मी म्हणतों.

### द्विदलपद्धतीचाच नमुना

वरील योजना भावी काळांत कशी अमलांत येईल याचें चित्र मी पुढीलप्रमाणें काढीन. सध्याच्या कारभाराची द्विदलपद्धतिच पूर्णपणें या लष्करी बाबतींत अमलांत यावी इतकेंच म्हणणें. आज खजिना, कायदा व सुव्यवस्था हीं राखीव खातीं गव्हर्नराच्या कार्यकारी मंडळाच्या सभासदांच्या अधिकारांतील असतात व हे सभासद कायदेमंडळाला जबाबदार नसून ते गव्हर्नरला जबाबदार असतात. सोपीव खात्याचे दिवाण व हे अधिकारी यांच्यामध्ये एवढाच फरक असतो. परंतु फडणीस खात्याचें किंवा गृहमंत्र्याच्या खात्याचें अंदाजपत्रक कायदेमंडळाकडे चर्चेकरिता येतेंच; इतकेंच नव्हे तर त्यावर मतेंसुद्धा दिलीं जातात. कांही खर्च जर कायदेमंडळानें नामंजूर केला तर गव्हर्नर सर्टिफिकेट देऊन त्यांना जिवंत करतातच कीं नाही? मध्यवर्ती सरकाराच्या कारभारांत अशीच लष्करी खात्याची व्यवस्था लागावी व वरिष्ठ लोकसभेनें कांही खर्च नामंजूर केल्यास तो गव्हर्नर जनरलानें आपल्या अधिकारांत मंजूर करून घ्यावा. पण तो प्रश्न कायदेमंडळापुढें आला पाहिजे असा मात्र माझा आग्रह आहे.

### लष्करी सभासद हिंदीच पाहिजे

गव्हर्नर जनरलला दिलेल्या खास लष्करी अधिकारांची अंमलबजावणी करणारा अधिकारी कोण असावा हा यापुढचा प्रश्न आहे. माझें असें स्पष्ट मत आहे कीं, तो बिनसरकारी असावा. तो हिंदी असला तर अधिक पसंत होईल व तो हिंदी कायदेमंडळाच्या सभासदांपैकींच असला तर फारच उत्तम. माझ्या म्हणण्याचा इत्यर्थ हा कीं, वसाहतींमध्ये आज जी पद्धति सुरू आहे तीच हिंदुस्थानांत चालू ठेवावी व द्विदल स्वरूपाच्या प्रकारानें का होईना पण लष्कर-मंत्री हा कायदेमंडळांतील बिनसरकारी हिंदीच असावा हे उत्तम. मला या बाबतींत इतकेंच सांगावयाचें आहे कीं, गव्हर्नर जनरलाला खास अधिकार देण्याचा प्रश्न निघाला असतां आक्षेपांना उत्तर म्हणून सर सॅम्युएल होअर यांनी सांगितलें कीं, गव्हर्नर-जनरलाला व्यवहारज्ञान असतें इतकें तरी गृहीत धरावयास हरकत नाही. त्याचीच आठवण देऊन मीहि म्हणतों कीं, कायदेमंडळालाहि ते व्यवहारज्ञान त्याच मापांत नसतें असें नाही! व्यवहारज्ञान असण्याचा मक्ता ईश्वरानें फक्त गव्हर्नर-जनरललाच दिला आहे असें नाही. जर कायदेमंडळांनें गव्हर्नर-जनरलवर विश्वास टाकावा अशी अपेक्षा तुम्ही करतां तर तुम्हींहि कायदेमंडळावर विश्वास टाकलाच पाहिजे.

### हिंदी लष्कर-मंत्री काय करील ?

राखीव खातें म्हणून कां होईना, पण लष्करी खात्याचा कारभार बिनसरकारी हिंदी मंत्र्याकडे सोपविला तर तो राष्ट्रहिताच्या दृष्टीनें अनेक गोष्टी करूं शकेल. पहिली गोष्ट तो जी करूं शकेल ती ही कीं, कांही बाबतींत लोकमतानुसार लष्करी खर्चांत तो चांगलीच काटकसर करूं शकेल. तसेंच लोकमतानुसार तो कांही लष्करी बाबतींत अधिक खर्चहि करील; नाही असें नाही. उदाहरणार्थ, लष्कराचें हिंदीकरण अधिकाधिक करून तो लष्करी खर्च कमी करील. तसेंच राष्ट्रसंरक्षणाकरितां नागरिकांचें राखीव सैन्य तयार करण्याकरिता नागरिकांना लष्करी शिक्षण द्यावें म्हणून तो अधिक पैसा खर्च करील. विद्यापीठाचीं जीं लष्करी पथकें आहेत व प्रांतिक सैन्य म्हणून ज्या तुकड्या तयार केल्या जात आहेत त्यांच्या लष्करी शिक्षणावर व्हावा तितका खर्च हल्लीं होत नाही अशी लोकांची तक्रार आहे. ती तक्रार हिंदी मंत्री दूर करील. विद्यापीठाच्या पथकावर हल्लीं जो खर्च होतो त्याचा मोठा भाग इंग्रजी लष्करी अधिकाऱ्यांच्या पगारावारीच जातो. हें शिक्षण हिंदी लष्करी अंमलदारहि खास देऊं शकतील. तसेंच लष्कराला लागणाऱ्या सर्व वस्तू तयार करण्याचे कारखाने, हिंदी लष्करी मंत्री हिंदुस्थानांतच उभारील. त्यायोगानें काटकसर तर होईलच, पण या जिनसा तयार करण्यास लागणारें कौशल्यहि हिंदी लोकांत उत्पन्न होईल.

### राष्ट्रीय सैन्याची जरूरी

शेवटीं मला हें सांगावयाचें आहे कीं, हिंदी लष्कर-मंत्री राष्ट्रसंरक्षणार्थ जरूर असें राष्ट्रीय सैन्य उभारील यांत शंका नाही. आपल्या मातृभूमीच्या संरक्षणासाठी आपण स्वतःच संनद्ध असावें ही हिंदी लोकांची भावना परकीयांना समजणेंच शक्य नाही. या भावनेचा पडसाद हिंदी अंतःकरणांतच उठणार! उदाहरणार्थ, आज हिंदुस्थानांत कांही जातीच बिनलष्करी ठरविल्या गेल्या आहेत. या कामीं 'लष्करी परंपरेच्या' महत्त्वाचें उगाच खूळ माजविलें आहे. इंग्लंडमध्ये अगर दुसऱ्या कोणत्याहि इतर देशांत हा फरक केला जात नाही असें वाटतें. आजच्या पिढीचे पराक्रम म्हणजेच

पुढच्या पिढीची परंपरा नाहीं काय ? पण मूळच्या पराक्रमी पिढीची परंपरा कोठें आहे ? या परिषदेंत पुष्कळ संस्थानी प्रतिनिधी आहेत. मी त्यांना असें विचारतों कीं, त्यांनी त्यांच्या संस्थानांच्या मूळ संस्थापकाकडे दृष्टि टाकावी व स्वतःस असा प्रश्न विचारावा कीं, त्या संस्थापकांना लष्करी परंपरा होती काय ? त्यांनी स्वतःच्या समशेरीच्या बळावर राज्यें कमाविली व त्यांच्या पराक्रमामुळेंच त्यांच्या कुटुंबांतील भावी पिढ्यांना लष्करी परंपरा उत्पन्न झाली. यापेक्षां या लष्करी परंपरेच्या चिकित्सेंत मी पडत नाहीं. मला एवढी खात्री वाटतें कीं, हिंदी लष्करमंत्रीच देशांतील जनतेच्या भावना उत्तम रीतीनें समजूं शकेल. परक्यांना त्या समजणारच नाहीत."

# कुलपति विष्णुशास्त्री बापट

[ वियोगिनी वृत्तम् ]

दिवसे दिवसे सनातनो
बत धर्मो ह्रसतीति सांप्रतम्।
परिखिन्नमना गतोऽसि किं
परलोकं वद शास्त्रिसत्तम ॥ १ ॥
अथवाऽस्त्ववतार ईश ते
निजधर्मं परिरक्षितुं पुनः।
भगवन्तमितीव तं हरिं
गतवान् प्रार्थयितुं भवानितः ॥ २ ॥
यदविन्दत बादरायणः
प्रणयन् ग्रन्थवरान् यशोऽमलम्।
निगदन्निह तान् स्वभाषया
सुकृती त्वं तदविन्दथा अपि ॥ ३ ॥
मरणावधि नो महोद्यमाद्
व्यरमस्त्वं ननु धर्मभूषण।
चरितं स्पृहणीयतां गतं
तव यूनां परलोकमीयुषः ॥ ४ ॥
अवनाविह शांकरं मतं
पुनरुज्जीवयितुं कृतश्रमः।
न तनुं न धनं परिस्थितिं
विषमां वा न भवानजीगणत् ॥ ५ ॥
कुरुते दृढनिश्चयः पुमान्
असहायोऽपि कृतिं महत्तराम्।
भवति प्रथमं निदर्शनं
कृतविद्योऽत्र भवान् परं मम ॥ ६ ॥
विरलाः खलु सांप्रतं नराः
सुरभाषाध्ययने कृतश्रमाः।
निधनेन भवादृशामतः
सुजनानां हृदयं विदीर्यते ॥ ७ ॥
इदमद्य पुनर्दुनोति मां
त्वयि याते सहसा दिवं प्रति।
प्रियशिष्यगणस्तु तावकः
क्व नु यायात्सुतरां निराश्रयः ॥ ८ ॥
अयि भो धनिका दयापराः
श्रुणुताभ्यर्थनमेतदेव मे।
भवतामनवेक्षणादहा
इदमाचार्यकुलं न नश्यतु ॥ ९ ॥

—मुकुन्दरायः

# स्फुट सूचना

१ जानेवारी महिना जसजसा जवळ येत चालला तसतशी अखिल हिंदुस्थानांत म. गांधी व श्री. केलाप्पन यांच्या दुसऱ्या प्रायोपवेशनाबद्दलची चिंता वृद्धिंगत होऊं लागली. श्री. केलाप्पन हे मद्रासेहून गेल्या बुधवारीं पुण्यास दाखल होऊन त्यांनी म. गांधींशीं बराच वेळ विचारविनिमय केला. त्याचे आधीं म. गांधींच्या अस्पृश्यताविषयक दहा प्रश्नांचा निर्णय करण्यासाठीं सनातनी व सुधारक अशा शास्त्रीपंडितांची. भवति–न–भवति येरवड्याच्या कारागृहांत चालू होतीच. त्या मंथनांतून 'अस्पृश्यतेला शास्त्रांत आधार नाहीं' असें निष्पन्न झाल्याचें समजतें. गुरुवायूरच्या आसमंतात् केलेल्या मतमापनाचा कौलहि अस्पृश्यांच्या मंदिरप्रवेशाला अनुकूल असाच पडला आहे. हे चोहों दिशांनी वाहणारे वारे ध्यानीं घेऊन आणि मुख्यतः मद्रास इलाख्यांतील कायद्याची अडचण लक्षांत आणून, म. गांधींनी, आणि त्यांजबरोबर श्री. केलाप्पन् यांनीहि, ता. २ जानेवारी रोजीं द्वितीय प्रायोपवेशन करण्याचा आपला संकल्प बिनमुदत तहकूब केला. ही बातमी वाचून जनतेच्या मनावरील एक मोठें ओझें उतरल्यासारखें होईल यांत शंका नाहीं. मात्र प्रायोपवेशनामुळे अस्पृश्यतानिवारणाला जी प्रचंड चालना सध्या लाभलेली आहे, ती प्रायोपवेशनाच्या तहकुबीनें मंद होऊं न देण्याची जबाबदारी जनतेच्या शिरावर आहे याची खूणगांठ सर्वांनी बांधली पाहिजे.

# सूचिपत्र.